# भारतीय संस्कृतिकोश

केंद्रीय शिक्षामंत्रालय, नवी दिल्ली व महाराष्ट्र राज्य
साहित्य आणि संस्कृतिमंडळ यांच्या साहाय्याने प्रकाशित

## दुसरा खंड

कंक ते गावडा

संपादक

पं. महादेवशास्त्री जोशी

सहसंपादक

तर्कतीर्थ सौ. पद्मजा होडारकर, एम्. ए.

**भारतीय संस्कृतिकोश मंडळ**

४१३ शनिवार पेठ, पुणे २

प्रकाशक :
प. महादेवशास्त्री जोशी
भारतीय संस्कृतिकोशमंडळासाठी
४१३ शनिवार पेठ, पुणे २



मुखपृष्ठ :
श्री. सुधाकर खासगीवाले



अंतर्गत सजावट :
श्री. दत्ता महाबळेश्वरकर
श्री. सुधाकर खासगीवाले
श्री. गंगाधर ताटके



ठसे :
श्री. ब. शं. दाते
कलाभुवन, पुणे २



प्रथमावृत्ती :
शके १८८६
( सन १९६४ )



प्रकाशन :
हस्ते केंद्रीय उपशिक्षण मंत्री श्री. भक्तदर्शन
नवी दिल्ली
दि. २ ऑगस्ट १९६४



मुद्रक :
श्री. मा. ह. पटवर्धन
संगम प्रेस प्रा. लि.,
३८३, नारायण पेठ,
पुणे २

# प्रास्ताविक

भारतीय संस्कृतिकोशाच्या प्रथम खंडाच्या प्रकाशनानंतर दीड वर्षानं आज दुसऱ्या खंडाच्या प्रकाशनाचा सुयोग येत आहे. दोन खंड प्रकाशित झाले, यामुळे आता आमचा उत्साहही द्विगुणित झाला आहे. हा उत्साह आम्हाला पुढील कार्यासाठी उपकारक होईल, यात शंका नाही.

कोशाचा संकल्प, योजना आणि व्याप्ती यांविषयी प्रथमखंडाच्या प्रस्तावनेत सविस्तर लिहिलेच आहे. त्यामुळे या ठिकाणी त्याची पुनरुक्ती करीत नाही. मात्र काही गोष्टींचा खुलासा करणे आवश्यक आहे.

**शुद्धलेखन**— पहिली गोष्ट शुद्धलेखनाची. कोशाच्या प्रथमखंडात महाराष्ट्र साहित्य परिषदेने शुद्धलेखनाचे जे नियम केले होते, ते आम्ही पाळले व तदनुसार तो खंड छापला; पण त्यानंतर मराठी साहित्य महामंडळाने शुद्धलेखनाचे काही नवे नियम केले आणि ते महाराष्ट्र राज्य सरकारनेही मान्य केले. त्या मान्य नियमांना अनुसरून या द्वितीय खंडाचे मुद्रण केलेले आहे. त्यामुळे कोशरचनेत आपाततः काही विषयांचा अनुक्रम बदलणे भाग पडले आहे. तत्सम ऱ्हस्व इकारान्त आणि उकारान्त शब्द प्रथमेत दीर्घान्त लिहावे; पण ते समासात पूर्वपदी असता मात्र ऱ्हस्वान्तच लिहावे, असा महामंडळाचा नवा नियम आहे. त्यामुळे जो बदल करावा लागला, तो असा—

उदा० कली हा शब्द. तो पूर्वीच्या शुद्धलेखनाप्रमाणे ऱ्हस्व इकारान्त असल्यामुळे कोशात प्रथम येत होता आणि कलियुग, कलिचतुर्दशी, कलिसंतरणोपनिषद हे मुख्य विषयाशी संबंधित असलेले विषय त्यानंतर येत होते; पण नव्या शुद्धलेखनाप्रमाणे वरील विषयातला कली शब्द समासात येत असल्यामुळे तो ऱ्हस्वच राहिला आणि त्यामुळे हे संबंधित विषय प्रथम घ्यावे लागले व कली हा मुख्य विषय या सर्वांच्या पुढे घ्यावा लागला. असे ऱ्हस्व इकारान्त उकारान्त तत्सम शब्दांच्या संबंधात सर्वत्र झाले आहे.

**जाती जमातींची माहिती**— दुसरा मुद्दा जाती-जमातीच्या संबंधाचा. गेल्या शतकात व चालू शतकाच्या प्रारंभी अनेक पाश्चात्य संशोधकांनी भारतातील बहुसंख्य जाती-जमातींचे संशोधन करून मोठमोठे ग्रंथ लिहून ठेवले आहेत. आम्ही जाती-जमातींची माहिती देताना त्या ग्रंथांचा उपयोग केला आहे. पण त्यातली बरीच माहिती आता जुनी झाली आहे, याचीही आम्हाला जाणीव आहे. कालमानाप्रमाणे त्या त्या जाती-जमातींच्या जीवनात, व्यवसायात, राहणीत व चालीरीतींत बऱ्याच प्रमाणात बदल झालेला असणे शक्य आहे. पण त्या त्या जातींच्या वर्तमान जीवनाची प्रत्यक्ष पाहणी करून त्यांच्याविषयी अद्ययावत माहिती मिळविणे, आम्हाला शक्य झालेले नाही.

अलिकडे भारतीय वा पाश्चात्य संशोधकांनी काही जाती-जमातीसंबंधी प्रत्यक्ष संशोधन करून नवे ग्रंथ लिहिले आहेत. सदर नवे संशोधनग्रंथ अधिकात अधिक मिळविण्याचा प्रयत्न करून आम्ही त्या त्या जाती-जमातींची माहिती लिहिताना त्यांचा उपयोग केला आहे. १९६१ सालच्या शिरगणतीवरून जाती-जमातींसंबंधी जी अद्ययावत माहिती उपलब्ध झाली, त्यांचे सरकारी अहवाल आता हळूहळू प्रकाशित होऊ लागले आहेत. भारतात सर्वत्र जिल्हानाम्यांची (गॅझेटिअर्स) नवरचना चालू आहे.

प्रस्तुत सरकारी अहवाल व जिल्हा-नामे जसजसे उपलब्ध होतील, तसतसा माहितीच्या अद्ययावतपणासा‍ आम्ही त्यांचा उपयोग करू.

**माननीयांचे साहाय्य आणि सहकार्य—** सर्वश्री तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, म. म. पोतदार, डॉ. रा. ना. दांडेकर, काकासाहेब गाडगीळ, दुर्गा भागवत, वि. पु. भागवत, प्रा. न. र. फाटक, सेतुमाधवराव पगडी, अ. ह. लिमये, डॉ. ए. एन्. उपाध्ये, डॉ. चिं. द्वा. देशमुख, बॅ. नाथ पै, चॅरिटी कमिशनर श्री. गोडसे, ग. त्रि. केतकर, दा न. शिखरे, डॉ. सी. ग. देसाई, ईश्वरसिंघ ठाकूर, पोपटलाल शहा, श्री. ए. रा. धोंगडे. बाबूराव सणस, सौ. सुधाबाई जोशी, सौ. सुनीता देशपांडे, अशोक महादेव जोशी, रा. चिं. ढेरे, डॉ. शां भा. देव, वि. धों. आठल्ये, डॉ. भास्करराव फाटक, दत्तप्रसन्न काटदरे, रामदास भटकळ, सदानंद भटकळ, पी. एन्. कुमठा, फर्ग्युसन कॉलेजचे ग्रंथपाल के. ह. बोरगावकर, जयंतराव टिळक, मा. ल. भागवत, प्रा. शांता शेळके, विद्याधरशास्त्री भिडे, म. वा. जोशी, श्री. ना. पेंडसे, विंदा करंदीकर, वि. आ. बुवा, 'जी. डी. आपटे आणि कंपनी' ऑडिटर्स, आर. सी. जैन ऑडिटर, नानासाहेब गोरे, न्यायविद्वान दत्तात्रेयशास्त्री कवीश्वर, श्रीमंत सरदार आबासाहेब मुजुमदार, केसरी-मराठा संस्था, डॉ. व. ग. राहूरकर, बोकील, पां. रा. ढमढेरे, गोंधळेकर, कुलाबा जिल्हा परिषदेचे अध्यक्ष श्री. लिमये, वा. रा. पाटणकर, शं. मं. होडारकर, श्रीपाद जोशी, ल. शं. मराठे, माणिकलाल परदेशी, भाऊसाहेब नातू, द्वा. भ. कर्णिक, शंकर सारडा, पु. रा. बेहरे, बा. द. सातोस्कर, प्रा. वसंत नूलकर इत्यादी मंडळींनी कोशकार्याला हस्ते परह अनेक प्रकारे मदत केली आहे. मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानतो व प्रस्तुत कार्याला त्यांचे सहक अखंडपणे मिळत राहो, असे प्रार्थितो.

**अनुदाने—** कोशाच्या प्रथम खंडाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृतिमंड आरंभी ५००० रुपये अनुदान दिले आणि प्रकाशनानंतर आणखी ५००० असे एकूण १०,००० रुपये ि द्वितीय खंडासाठीही याच प्रकारे मदत मिळाली आहे व मिळायची आहे. केंद्रसरकारच्या शिक्षण मंत्रालयान‌ही प्रस्तुत द्वितीय खंडाच्या प्रकाशनासाठी चालू वर्षी १०,००० रुपयांचे अनुदान दिले आहे.

भारतीय संस्कृतिकोश मंडळ वरील अनुदानाबद्दल महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृतिमंडळ आणि केंद्रीय शिक्षण मंत्रालय यांच्याविषयी अत्यंत कृतज्ञ आहे.

प्रस्तुत द्वितीय खंडाच्या प्रकाशनासाठी पुणे विद्यापीठाने १००० रु. चे अनुदान मंजूर केले आहे. त्याबद्दल भारतीय संस्कृतिकोश मंडळ पुणे विद्यापीठाचे मनःपूर्वक आभार मानीत आहे.

**सन्माननीय देणगीदार—** गेल्या वर्षी भारतीय संस्कृतिकोशमंडळाला काही मान्यवर दात्यांकडून पुढीलप्रमाणे अनुदाने मिळाली आहेत—

श्रीमान शेठ अरविंद नवीनचंद्र मफतलाल, मुंबई– ५००० रु.

सर्वश्री हिंदुस्थान मटीरिअल्स (प्रा.) लि. मुंबई– १००१ रु.

श्रीमान उद्योगपती विश्वासराव चौगुले, गोवे– १००० रु.

आंतरभारती, पुणे– १००० रु.

श्रीमान शेठ सोहनलालजी दुग्गड, कलकत्ता– ५०१ रु.

अखिलभारतीय आर्य (हिंदू) धर्म सेवा संघ, दिल्ली– ५०० रु.

कस्तुरबाई सिंदिया कमिशन ट्रस्ट, मुंबई– ५०० रु.

गेल्या व चालू वर्षी आमच्या कोशाचे आगाऊ ग्राहक होऊन ज्यांनी आमचे कार्य पुढे जाण्यास मदत केली त्या सर्व सज्जनांचे मंडळाच्या वतीने मी मनःपूर्वक आभार मानतो.

प्रस्तुत कोशाच्या मुद्रणाची जबाबदारी संगम प्रेस, पुणे या छापखान्याचे चालक पटवर्धनबंधू यांनी स्वीकारली आहे. कोशाचे मुद्रण निर्दोष, स्वच्छ आणि सुंदर व्हावे यासाठी ते आत्मीयतेने संपादकाशी सहकार्य करीत आहेत. याबद्दल मंडळाला त्यांच्याविषयी अत्यंत कृतज्ञता वाटते. त्यांचे असेच आस्थापूर्वक सहकार्य आम्हाला अविच्छिन्न मिळत राहील, अशी आशा आम्ही करतो.

कलाभुवन, पुणे या संस्थेचे चालक श्री. बाळूका दाते यांनी कोशातले सर्व ठसे किती स्वच्छ आणि सुबक करून दिले आहेत, ते कोशातले कोणतेही सचित्र पान उलगडून पाहिल्यानंतर सहज कळून येईल. या त्यांच्या सहकार्याबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार.

प्रस्तुत खंडातली बहुतेक सर्व रेखाचित्रे श्री. दत्ता महाबळेश्वरकर, जी. डी. (आर्ट), यांच्या हातची आहेत. ते आमच्या कामाला अग्रक्रम देऊन, ते वेळेवर आणि मनःपूर्वक करतात, याबद्दल त्यांचेही आभार मानले पाहिजेत.

प्रस्तुत कोशाच्या तिसऱ्या खंडाच्या मुद्रणालाही आम्ही लवकरच प्रारंभ करू, असे आमच्या वाचकांना व चाहत्यांना आश्वासन देऊन हे प्रास्ताविक पुरे करतो.

सर्वांचा नम्र
महादेवशास्त्री जोशी
– संपादक व कार्यवाह

**संपादकीय विभागात काम करणारी मंडळी**

श्री. व. ग. सहस्रबुद्धे, बी. एस्‌सी.
सौ. सुलोचना लिमये, एम्. ए.
श्री. विद्याधरशास्त्री भिडे, एम्. ए.
श्री. सुहास हरी जोशी, एम्. ए.
श्री. रा. शं. नगरकर, बी. ए.
श्री. रामचंद्र वामन दातार, बी. ए.

**संपादकीय साहाय्यक**

श्री. मोरेश्वर माधव वाळिंबे
श्री. रमेश अमृत परचुरे
श्री. वसंत चिंतामण फाटक
श्री. विजय नारायण सरदेशमुख
श्री. किशोर हरी जोशी
श्री. परशुराम कृष्णाजी गोवंडे

# संदर्भ ग्रंथ संक्षेप

अं. भा. — अंधःकारयुगीन भारत, काशीप्रसाद जायसवाल, १९५७

अ. अ. — अभिधान अनुशीलन, विद्याभूषण विभु, १९५८

ॲ. ॲ. रा. — Annals and Antiquities of Rajasthan, J. Tod

अ. का. — अशोक ते कालिदास, अ. ज. करंदीकर, १९६२

अ. गों. अ. — Among the Gonds of Adilabad, Setu Madhavrao Pagadi, 1949

अ. द. हिं. क. — अकबरी दरबार के हिंदी कवि, सरयूप्रसाद अग्रवाल, १९५१

अभि. रा. — अभिधानराजेंद्र, विजयराजेन्द्रसूरिश्वरजी

अ. सा. — अपभ्रंश साहित्य, हरिवंश कोछड, १९५६

अ. स्क. म. ग. म्यु. — Amaravati Sculptures in the Madras Government Museum

अ. हि. नॉ. इं. — Early History of North India, Sudhakar Chattopadhyaya, 1958

आं. सा. इ. — आंध्रका सामाजिक इतिहास, सुरवरम् प्रताप रेड्डी, अनु.–आर्. वेंकटराव, १९५९

आ. आ. दे. — आर्यो का आदिदेश, संपूर्णानंद, १९५७

आ. इ. — आयुर्वेद का इतिहास, कविराज सूरमचंद्र

ऑ. इं. ओ. कॉ. — Proceedings and Transactions of the All India Oriental Conference, Annamalainagar, 1955

आ. लो. मू. — आर्य लोकांचे मूलस्थान, बाळ गंगाधर टिळक, १९१०

आ. वि. स्मा. ग्रं. — आचार्य विजयवल्लभसूरि स्मारक ग्रंथ, श्री महावीर जैन विद्यालय प्रकाशन, १९५६

आ. सं. मू. — आर्य संस्कृति के मूलाधार, बलदेव उपाध्याय

इं. आ. — Indian Architecture, Percy Brown, 1944

इं. टे. स्क. — Indian Temple Sculpture, K. M. Munshi, 1959

इं. नॉ. ई फ्रॉं. — India's North-East Frontier in the 19 th Century, Verrier Elwin, 1959

इं. फो. लो. — Indian Folk-lore

इं. बु. इ. — The Indian Buddhist Iconography, Benoytosh Bhattacharya, 1958

इं. वे. क. सू. — India of Vdice Kalpasūtras, Ram Gopal, 1959

इं. स्ट. पा. प्रे. — Indian Studies Past and Present

इं. हि. ज. — Indian Historical Journal, 1961

इ. ब्रॉं. — Icons in Bronze, D. R. Thaper, 1961

उ. कों. प्रा. इ. — उत्तर कोंकणाचा प्राचीन इतिहास, पु. बा. जोशी, १९२६

उ. प्र. बौ. वि. — उत्तर प्रदेश में बौद्ध धर्मका विकास, नलिनाक्षदत्त, कृष्णदत्त वाजपेयी, १९५६

उ. भा. सं. प. — उत्तर भारत की संतपरंपरा, परशुराम चतुर्वेदी, १९५२

उ. यो. द. — उमेश योग दर्शन– उमेशचंद्रजी, अनु. – प्रभाकर य. रानडे, १९५१

उ. र. — उपनिषद् रहस्य, रा. द. रानडे

ऋ. आ. — ऋग्वेदिक आर्य – राहुल सांकृत्यायन, १९५९.

ऋ. ब्र. क. — ऋग्वेदीय ब्रह्मकर्मसमुच्चय

ए. इं. क. — The Age of Imperial Kanauj, R. C. Majumdar, 1955

ए. इं.–मुज — Ancient India, R. C. Majumdar, 1960

ए. इं.–मुक. — Ancient India, R. K. Mukherji, 1956

ए. इं. सा. इं. हि. क. — Ancient India & South Indian History & Calture, S. K. Aiyangar, 1941

ए. इं. हि. ट्रॅ. — Ancient Indian Historical Tradition, F. E. Pargiter, 1962

एन्सा. मुं. — Encyclopaedia Mundarica, Haufman, 1950

एन्सा. रि. — An Encyclopaedia of Religion, Virgilius Ferm

एन्सा. रि. ए. — Encyclopaedia of Religion and Ethics, James Hastings 1953–56

**एन्सा. हिं. आ.** — An Encyclopaedia of Hindu Architecture, Prasannakumar Acharya, 1946

**एस्. इं.** — Essays on Indology, Satyavrat Shastree, 1963

**ए. से. ए. इं.** — Ethnic Settlements in Ancient India, Sashi Bhusan Chaudhuri, 1955

**ए. हो. रा.** — एक होता राजा, सरोजिनी बाबर, १९६४

**ओ. नि. सं.** — ओझा निबंध संग्रह, गौरीशंकर हिराचंद ओझा, १९५४

**ओ. स्मृ. ग्रं.** — ओझा स्मृति ग्रंथ

**क. अ. वि. प्र.** — कदीम अग्रवाल विवाह प्रथा, किरणकुमारी गुप्ता, १९५४

**क. औ. सं.** — कला और संस्कृति, वासुदेवशरण अग्रवाल, १९५२

**क. क.** — कथाकल्पतरू, दा. सा. यंदे, १९५४

**क. क. च.** — कर्नाटक कविचरित्र, आर. नरसिहाचार्य

**क. को. प्र.** — कथा कोष प्रकरण, संपा. आचार्य जिनविजय मुनि, १९४९

**क. कौ.** — कविता कौमुदी, रामनरेश त्रिपाठी, १९४६

**क. द.** – Ed. Karnataka Darshana, R. S. Hukkerikar, 1955

**क. नृ. का.** — कलचुरी नृपति आणि त्यांचा काळ, वा. वि. मिराशी, १९५६

**कबीर** — हिंदी और कन्नड में भक्ति आदोलन का तुलनात्मक अध्ययन, हिरण्मय, १९५९

**क. ले. गॉ. ओ.** — The Cult of the Lake Goddess of Orisa, Journal of the Anthropological Society of Bombay, Volume XII, No. 2, 1921

**क. सं.** — कल्पना संगीत, गो. स. टेंबे,

**क. स. सा.** — कथासरित्सागर ( हिंदी रूपांतर) संपा.– विष्णु प्रभाकर, १९५९

**क. हि. क** — Cultural History of Karnataka, A. P. Karmarkar, 1947

**क. हि. वा. पु.** — Cultural History from the Vayu Purana – Devendra Kumar Rajaram Patil, 1946

**क. हे. इं.** — The Cultural Heritage of India, Sunitikumar Chatterji, 1958

**कां. चि. – सु. गो.** — कांगडा चित्रशैली, बाळासाहेब पंडित प्रतिनिधी– सुश्लोक गोविंद, रा. चि. श्रीखंडे, १९५४

**का. ए. सां. अ.** — कादंबरी : एक सास्कृतिक अध्ययन, वासुदेवशरण अग्रवाल, १९५८

**का. ट्रा. स. इं.** — Castes and Tribes of Southern India – Thurston

**कादं. ए. सां. अ.** — कादंबरी : एक सास्कृतिक अध्ययन, वासुदेवशरण अग्रवाल, १९५८

**की. पॉ.** — The keys of Power, J. Abbot, 1932

**कुं. ती. र.** — कुंदकुंदाचार्य के तीन रत्न, गोपालदास जीवाभाई पटेल, १९४८

**कु. कां.** — Kulu and Kangra, Tourist Division, 1958

**कु. सं.** — कुमार संभव

**कृ. क. त.** — कृत्यकल्पतरु, लक्ष्मीधर भट्ट, १९४८

**कृ. जी. ब्र. श.** — कृषक जीवन संबंधी ब्रजभाषा शब्दावली, अम्बाप्रसाद 'सुमन', १९६०

**कै. सा. द.** — कैरली साहित्य दर्शन, रत्नमयीदेवी दीक्षित, १९५६

**कों. क.** — The Kongu Country, M. Aroki Swami, 1956

**कोल्हापूर गॅझे.** — Kolhapur District Gazetteer, P. Setu Madhav Rao, 1960

**क्रि. स्ट. नै. च.** — A Critical Study of Shri Harsha's Naishadhiyacaritam, A. N. Jani

**क्रि. स्ट. ले. उ.** — A Critcial Study of the Later Upanishads, S. G. Desai

**क्ला. डि. हिं. मा.** — Classical Dictionary of Hihdu Mythoylogy, John Dawson, 1957

**खं. वै.** — खंडहरोका वैभव, मुनिकातिसागर

**ख्रि. ध.** — ख्रिस्ती धर्म, र. पु. चव्हाण, १९५८

**ख्रि. प.** — ख्रिस्त परिचय, बाबाराव सावरकर, १९४६

**ख्रि. म. इ.** — ख्रिस्तमहामंडळाचा इतिहास, डोरोथिया स्टीव्हन्स, १९५८

**ख्रि. म. सं इ.** — ख्रिस्तमहामडळाचा संक्षिप्त इतिहास, म. रा. लेदर्ले, १९६३

**ग. गी.** — गणेशगीता, द. र. देवधर १९३६

**गया गॅझे.** — Gaya District Gazetteer, P. C. Roy Choudhury, 1957

**ग. लो.** — गढवाली लोकगीत, गोविंद चातक, १९५६

**गां. गा.** — गावगाडा त्रिबक नारायण आत्रे, १९५९

**गॉ. नॉ. बु.** — The Gods o Northern Buddhism

**गा. स.** — गाथासप्तशती, संपा– स. आ. जोगळेकर, १९५६

**गी. त. मं.** — गीतातत्त्वमंजिरी, ज. स. करंदीकर, १९५३

**गी. र.** — गीतारहस्य – बा. गं. टिळक

**गुज. गॅझे.** — Gugarat State Gazetteers, Surat District, M. R. Palande, 1962

**गु. सा. इ.** — गुप्त साम्राज्य का इतिहास, वासुदेव उपाध्याय, १९३९

**गो. गौ. ब्रा कु.** — गोमंतकातील गौड सारस्वत ब्राह्मण आणि त्यांचे कुलदेव, वि. र. शेळडेकर

**गो. च. प.** — श्रीगुरु गोरक्षनाथ चरित्र आणि परंपरा, रा. चि. ढेरे, १९५९

**ग्रे. वी. इं.** — Great Women of India, Swami Madhavananda, 1953

**ग्लो. उ. प्र.** — Glories of Uttar Pradesh, Nandalal Chatterji, 1957

**चंपा. गॅझे.** — Champran District Gazetteer, P. C. Roy Choudhury, 1960

**च. व. चिं.** —चतुर्वर्गचिन्तामणि

**चि. छा.** —चिनारच्या छायेत, श्रीपाद जोशी, १९६२

**जं. रा.** — जंगलचे राजे, कुसुम व वसंत नारगोळकर, १९५५

**ज. अँ. सो. बॉ.** — Journal of the Anthropological Society of Bombay.

**ज. आं. हि. रि. सो.** — Journal of Andhra Historical Research Society, Nyapatı Kameswara Rao, 1960

**ज. वि. ध.** — जगातील विद्यमान धर्म, रा. ब. आठवले, १९३५

**ज. स्मा. ग्रं.** — जयंति स्मारक ग्रंथ, श्रीशिवपूजन सहाय, १९४२

**जॉ. ए. मे. इं.** — Studies in the Geography of Ancient and Medieval India, D. C. Sirkar, 1960

**जा. का. भा. सं.** — जातक-कालीन भारतीय संस्कृति, पंडित मोहनलाल महतो 'वियोगी', १९५८

**जै. इ.** — Jaina Iconography, B. C Bhattacharya

**जै. ध.** — जैन धर्म, पं. कैलाशचंद्र शास्त्री, १९५५

**जै. व्र. वि. सं.** — जैन व्रत – विधान – संग्रह, बारेलाल जैन राजवैद्य, १९५२

**जै. सा. इ.** — जैन साहित्य और इतिहास, नाथूराम प्रेमी, १९५६

**टें. ली. आं. प्र.** — Temples and Legends of Andhra Pradesh, N. Rameshan, 1962

**ट्रा. ए. इं.** — Tribes in Ancient India, Editor – Bimal Churn Law, 1943

**ट्रा. का. बे.** — Tribes and Castes of Bengal, Census of India, 1951

**ट्रा. का. सें. प्रॉ. इं.** — Tribes and Castes of the Central Provinces of India, R. V. Russel, Rai Bahodur Hiralal

**ट्रा. के.** — Tribes of Kerala, A. A. D. Luiz, 1962

**ट्रा. मि. ओ.** — Tribal Myths of Orisa, Verrier Elwin, 1954

**डा. फे.** — The Dynamics of Faith, Khajendranath Mitra, 1952

**डि. अँ.** — Dictionary of Anthropology, Charles Winick

**डि. इ.** — Dictionary of Islam, T. P. Hughes, 1935

**डि. ए. बं.** — Descriptive Ethnology of Bengal, E. J. Dalton–Census of India, 1951

**डि. सा. इं. म्यु. म्यु.** — A Dictionary of South Indian Music and Musicians, P. Sambamoorthy

**डि. सिं.** — A Dictionary of Symbols, J. E. Cirtlot, 1938

**डे. हिं. इ.** — The Development of Hindu Iconography, Jitendra Nath Banerjee, 1956

**त. उ. सा** — तमिळ और उसका साहित्य, पूर्ण सोमसुंदरम

**त. ए. हं. इ. अँ.** — The Tamils 1800 Years Ago.

**त. सा. सं** — तमिळ साहित्य और संस्कृति, अवधनंदन, १९५८

**तां बौ. सा. सा.** — तान्त्रिक बौद्ध साधना और साहित्य, नागेंद्रनाथ उपाध्याय, १९३९

**ती. म.** — तीर्थरूप महाराष्ट्र, प. महादेवशास्त्री जोशी, १९५६

**ते. उ. सा.** — तेलुगु और उसका साहित्य, हनुमच्छास्त्री 'आयचित'

**त्रिचूर गॅझे.** — Trichur District Gazetteer, A. Sreedhara Menon, 1962

**थो. प.** — थोरांचा परिचय, १९४९

**द. द.** — दक्षिण दर्शन, अर्धवार्षिक, जानेवारी १९६१, मइलै हिन्दी विद्यालय, मइलापूर, मद्रास ४

**द. भा.** — दक्षिण भारत, (द्वैमासिक), मार्च-एप्रिल, १९६१, हिन्दी प्रचार सभा, मद्रास

**दा. चं.** — दानचंद्रिका'

**दे. सु.** — The Delhi, Sultanate, R. C. Majumdar, 1960

**द्र. के. आ. त्रा.** — Dravid and Keral in the Art of Travankore, Stella Kramrisch

**द्र. गॉ. मॉ. हिं** — Dravidiyan Gods in Modern Hinduism, W. T. Elmore

**ध. तं. शि.** — धन्वंतरितत्रशिक्षा, पं. मिश्र कन्हैय्यालाल, १९५३

**ध. सिं.** — धर्मसिंधु

**न. लो.** — नक्षत्र लोक, पं. महादेवशास्त्री जोशी, १९५७

**ना. प्र. प.** — नागरी प्रचारिणी पत्रिका, नागरी प्रचारिणी सभा, काशी

**ना. सं.** — नाथ-संप्रदाय, हजारीप्रसाद

द्विवेदी, १९५०
**नि. उ. सा.** — निमाडी और उसका माहित्य, कृष्णलाल हंस, १९६०
**नि. सिं.** — निर्णयसिंधु, कमलाकर भट्ट
**न्या. को.** — न्यायकोश – भीमाचार्य झळकीकर, १९२८
**न्यू. इं. अँ. भाग – २** — New Indian Antiquary
**पं. जी. सा.** — पंजाब जीवन और साहित्य, शर्मा मनमराम, १९६१
**प. ध. शा. को.** — पवित्र धर्मशास्त्रविषयक कोश, दि. शं. सावरकर, १९४२
**पा. पा. व्या. सं.** — पाणिनी आणि पाणिनीय व्याकरणसंप्रदाय, म. दा. साठे, १९६०
**पा. भा.** — पाणिनिकालीन भारतवर्ष, वासुदेवशरण अग्रवाल, १९५५
**पालामो गॅझे** — Bihar District Gazetteers– Palamau Gazetteer, P. C. Roy Chaudhury, 1961
**पा. वा. ते. भि. र.** — पाली वाङ्मयातील तेरा भिक्षुणी रत्ने, भागवत, १९५३
**पु. इं.** — The Purana Index, V. R Ramachandra Dikshitar, 1955
**पु. त. नि.** — पुरातत्त्व निबंधावली, राहुल साकृत्यायन, १९३७
**पु. त. मी.** — पुराण तत्त्व मीमांसा, त्रिपाठी श्रीकृष्णमणि, १९६१
**पू. प. सं. म.** — पूर्व और पश्चिम की संत महिलाएँ, स्वामी घनानंद, १९६२
**पृ. पु.** — पृथिवी पुत्र, वासुदेवशरण अग्रवाल, १९६०
**पो. वी. हिं. सि.** — Position of Women in Hindu Civilization, A. S. Altekar, 1956.
**प्र. र.** — प्रयोग रत्न.
**प्र. वि.** — प्रतिमा– विज्ञान, द्विजेंद्रनाथ शुक्ल, १९५६
**प्रा. ऐ. को.** — भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश, रघुनाथ भास्कर गोडबोले, १९२८
**प्रा. ऐ. श.** — प्राचीन ऐतिहासिक शस्त्र, माणिकराव
**प्रा. च. को.** — प्राचीन चरित्र कोश, सि. वि. चित्राव, १९३२
**प्रा. भा. क. वि.** — प्राचीन भारत के कलात्मक विनोद, हजारीप्रसाद द्विवेदी, १९५२
**प्रा. भा. प्र.** — प्राचीन भारतके प्रसाधन, अत्रिदेव विद्यालंकार, १९५८
**प्रा. भा. म.** — प्राचीन भारतीय मनोरंजन, मन्मथ राय, १९५७
**प्रा. भा. वि.** — प्राचीन भारतीय विद्यापीठे, ना. गो. तवकर, १९५०
**प्रा. भा. वे.** — प्राचीन भारतीय वेषभूषा, मोतीचंद्र, १९५१
**प्रा. भा. सां.** — प्राचीन भारतकी सांग्रामिकता, पं. रामदीन पांडेय, १९५७
**प्रा. मौ. बि.** — प्राङ्मौर्य बिहार, देवसहाय त्रिवेद, १९५४,
**प्रा. सा. इ.** — प्राकृत साहित्य का इतिहास, जगदीशचद्र जैन, १९६१
**फॅ. इं. क.** — Facets of Indian Culture, R Srinivasan, 1962
**फे. फे. आ.** — Fairs and Festivals of Assam, Hem Barua & J. D. Baveja, 1956
**फो. आ. बें.** — Folk-Art of Bengal, Ajit Mukeriee, 1946
**फो. डा. म.** — Folk – Dance of Maharashtra, Rajabhau Joshi, 1950
**फो. रि. बें.** — Folk religion of Bengal, S. R. Das, 1953
**फो. लो.** — Folk–lore
**फो. लो. नॉ. इं.** — Folk Lore of Northern India
**बं उ. सा.** — बंगला और उसका साहित्य, हंसकुमार तिवारी
**बं. सा. क.** — बंगला साहित्य की कथा, भोलानाथ शर्मा, १९५७
**बॅ. आ. क.** — The Background of Assamese Culture, R. M. Nath
**बाँ. बे. क्रा.** — Bombay Beggars and Criers
**बा. तों. ओ.** — बायबलची तोंड ओळख, दे. ना. टिळक, १९५७
**बी. काकती – न्यू. इं. अँ. भाग २** — Kalit caste of Assam — B. Kakati, New Indian Antiquary Vol. II
**बी. सी. लॉ को. व्हॉ.** — B C. Law Commemoration Volume, D. R. Bhandarkar, 1946
**बु. उ. अ.** — बुद्ध और उनके अनुचर, कौसल्यायन आनंद, १९५३
**बौ. ध. द.** — बौद्ध धर्मदर्शन – आचार्य नरेंद्रदेव, १९५६
**ब्र. कृ. मा. भ.** — ब्रजभाषा के कृष्ण – काव्य मे माधुर्य भक्ति, रूपनारायण, १९६२
**ब्र. ख. तु. अ.** — ब्रजभाषा और खडी बोली का तुलनात्मक अध्ययन, भाटिया कैलाशचंद, १९६२
**ब्रा. भि. वि.** — ब्राह्मणातील भिन्नशाखीय विवाह – पं. महादेवशास्त्री दिवेकर, १९४५
**भं. डा. म. खि.** — Bhanja Dynasty of Mayurbhanj and their ancient capital Khiching, Ramprasad Chanda, 1929
**भ. अ. को.** — भरतखडाचा अर्वाचीन कोश, रघुनाथ भास्कर गोडबोले, १८८१
**भ. क.** — भक्तीचा कल्पवृक्ष, भा. पं. बहिरट, १९५६
**भ. ना.** — भरतमुनीचे नाटयशास्त्र गोदावरी केतकर, १९६३
**भा. आ.** — भारत के आदिवासी, जनक अरविंद, १९५७
**भा. आ. सं.** — भाषा आणि संस्कृति,

ना. गो. कालेलकर, १९६२
**भा. इ. रू.** — भारतीय इतिहास की रूपरेखा, जयचंद्र विद्यालंकर, १९३३
**भा. क.** — भारतरत्न महर्षि अण्णासाहेब कर्वे, दा. न. शिखरे, १९५८
**भा. क. प.** — भारतीय कला के पद चिन्ह, जगदीश गुप्त, १९६१
**भा. क. सिं.** — भारतीय कला का सिंहावलोकन, पब्लिकेशन्स डिव्हिजन, भारत सरकार, १९५५
**भा. का. शा. प.** — भारतीय काव्यशास्त्र की परपरा, नगेन्द्र, १९५६
**भा. कौ.** — Bharata Kaumudi, Radhakumud Mukarjee, 1945
**भा. ज्यो. इ.** — भारतीय ज्योतिष का इतिहास, गोरख प्रसाद, १९५६
**भा. द.** — भारतीय दर्शन, पं. बलदेव उपाध्याय, १९५७
**भा. द. सं.** — भारतीय दर्शन संग्रह, पं. द. वा. जोग, १९५८
**भा. प्र.** — सचित्र भारत-प्रवास-वर्णन, बाळासाहेब लक्ष्मणराव घोरपडे, १९१२
**भा. प्र. वि.** — भारतीय प्रतिमा–विज्ञान, द्विजेंद्रनाथ शुक्ल, १९५६
**भा. प्रा. रा.** — भारत के प्राचीन राजवंश, विश्वेश्वरनाथ रेऊ, १९२१
**भा. प्रा. लि.** — भारतीय प्राचीन लिपिमाला, प. गौरीशंकर हिराचंद ओझा, १९५९
**भा. लो. नृ.** — भारतीय लोक–नृत्य, देवीलाल सामर, १९५७
**भा. लो. सा.** — भारतीय लोक साहित्य, श्याम परमार, १९५४
**भा. वां.** — भारतीय वाङ्मय, संपा. – नगेन्द्र, १९५८
**भा. वा.** — भारतीय वास्तुशास्त्र, द्विजेंद्रनाथ शुक्ल, १९५५
**भा. सं. म.** — भारत के संत महात्मा, रामलाल, १९५७
**भा. स. स्थि.** — भारतीय समाज स्थिती, वि. पा. दाडेकर
**भा. सा.** — भारत सावित्री, वासुदेवशरण अग्रवाल, १९५७
**भा. सा. सां. रे.** — भारतीय साहित्य की सांस्कृतिक रेखाएँ, परशुराम चतुर्वेदी, १९५५
**भू. स. वा. ख. ध.** — The Bhumijas of Seraikela and the wild Kharias of Dalbhum, Tarak Chandra Sen, 1931
**भों. क. का.** — भोजपुरी कवि और काव्य, दुर्गाशंकरप्रसाद सिंह, १९५८
**मं. म.** — मंत्रमहोदधि
**मं. मू. मो.** — मगल मूर्ती मोरया, रा. चि. ढेरे, १९५८
**मं. मू. श्री.** — मंगलमूर्ती श्रीगणेश, पु. रा. बेहरे, १९५९
**म. का.** — मनोरम कश्मीर, मोहनकृष्ण दर, १९५८
**म. च. को.** — मध्ययुगीन चरित्रकोश, सि. वि. चित्राव, १९३७
**म. चा. दै.** — महाराष्ट्राची चार दैवते, ग. ह. खरे, १९५८
**म. जि. धुळे** — महाराष्ट्राचे जिल्हे– धुळे, महाराष्ट्र सरकार, १९६१
**म. जि. ना.** — महाराष्ट्राचे जिल्हे – नासिक, महाराष्ट्र सरकार, १९६२
**म. जी.** — महाराष्ट्र – जीवन, गंगाधर बाळकृष्ण सरदार, १९६०
**मदुरा गॅझे** — Madras District Gazetteers, Madurai, Gazetteer of India, B. S. Baliga, 1960
**म. दे.** — मध्य देश, धीरेन्द्र वर्मा, १९५५
**म. प.** — महाराष्ट्र परिचय, प्रसाद प्रकाशन, १९५४
**म. भां. उ. सं.** — महाभारताचा उपसंहार, चि. वि. वैद्य, १९२१
**म. भा. व्या.** — महाभारतावरील व्याख्याने, बाळशास्त्री हरदास, १९६१
**म. भा. सा.** — Medieval Mysticism of India – Kshitimohan Sen
**म. म. वा.** — महानुभावीय मराठी वाङ्मय, य. खु. देशपांडे, १९६०
**म. रि.** — मराठी रिसायत, मध्य-विभाग २, गो. स. सरदेसाई, १९२१
**म. लो.** — मराठी लोककला – तमाशा, नामदेव व्हटकर, १९५९
**म. वा. इ.** — मराठी वाङ्मयाचा इतिहास, ल. रा. पांगारकर, १९३५
**म. श. को.** — महाराष्ट्रीय शब्दकोश, य. रा. दाते, १९३५
**म. सं. चं.** — महाराज संसारचंद, सिह राजेश्वर प्रसाद नारायण, १९५९
**म. सा.** — महाराष्ट्र सारस्वत, वि. ल. भावे, १९५१
**म. सा. अ.** — मध्यकालीन साहित्य मे अवतारवाद, कपिलदेव पाण्डेय, १९६३
**म. ज्ञा. को.** — महाराष्ट्रीय ज्ञानकोश, श्रीधर व्यंकटेश केतकर
**मा. गु. लि.** — Milestones in Gujrathi Literature, K. M Zaveri, 1934
**मा. री.** — मारवाड के रीतिरस्म, जगदीशसिह गहलोत
**मि. रि.** — Myth and Reality, D. D. Kosambi, 1962
**मुं. इ. जा.** — मुंबई इलाख्यातील जाती
**मु. चिं.** — मुहूर्त चितामणि
**मु. स. सं.** — मुस्लिम सण और सस्कार, श्रीपाद जोशी, १९६३
**मू. वि.** — मूर्तिविज्ञान, ग. ह. खरे
**मे. मि. इं.** — Medieval Mysticism of India, Kshitimohan Sen
**मै. श. गु. अ. ग्रं.** — मैथिलीशरण गुप्त अभिनंदन ग्रंथ, संपादक – वासुदेवशरण अग्रवाल, १९५६
**मोंघीर गॅझे.** — Monghyr Dirtrict Gazetteer, P. C. Roy, Choudhury, 1960

म्यु. इं. — The Music of India, Herbert A Popley, 1921
यं. चिं. — यंत्रचिंतामणि
य. इं. क. — Yasastilak and Indian Culture, K. K Handike, 1949
यो. सो. — योगसोपान पूर्वचतुष्क, नारायणबुवा घमंडे, १९५१
रं. ऐ. को. व्हॉ. — R. V. Rangaswami Aiyangar Comemoration Volume
रत्ना. गॅझे. — Ratnagiri Dirtrict Gazetteer, P. Setu Madhav Rao, 1962
रा. क. अ. — राजस्थानी कहावते – एक अध्ययन, कन्हैय्यालाल सहल, १९५८
रा. का. स. — रामायणकालीन समाज, शां. ना. व्यास, १९५८
रा. जा. — राजस्थान की जातियां, १९५४
रा. पिं. सा. — राजस्थान का पिङ्गल साहित्य, मोतीलाल मेनारिया, १९५८
रा. भ. शा. — रामभक्तिशाखा, रामनिरंजन पांडेय, १९६०
रा. भा. औ. सा. — राजस्थानी भाषा और साहित्य, मोतीलाल मेनारिया १९५२
रा. रा. उ. न्हा. — राजपूत राज्यांचा उदय व न्हास, ह. वा. देशपांडे, १९३८
रा. ले. सं. — राजवाडे लेखसंग्रह, संपा– लक्ष्मणशास्त्री जोशी, १९५८
रा. लो. नृ. — राजस्थानी लोकनृत्य, संपा.– देवीलाल सामर, १९५७
रा. सं. — रामायणकालीन संस्कृति, शांतिकुमार नानूराम व्यास, १९५८
रा. सं. सि. सा. — राधावल्लभ संप्रदाय सिद्धान्त और साहित्य, विजयेन्द्र स्नातक, १९५८
रि. इं. — The Religions of India, A. P. Karmarkar, 1950
रि. लि. इं. — Religious Litetrature of India, Farukher
रि. सो. कु. — Religion and Society Among the Coorgs of South India, M. N. Srinivas, 1952
रे. क. इं. — Races and Cultures of India, D. N. Majumdar, 1958
ल. वि. सो. — लग्नविधि आणि सोहळे
लो. ध. ना. — लोकधर्मी नाटयपरंपरा, श्याम परमार, १९५९
लो. ध. ना. प. — लोकधर्मी नाटयपरंपरा, श्याम परमार, १९५९
लो. ना प. — लोकनाटयाची परंपरा, संपा.– वि. कृ. जोशी, १९६१
लो. सा. भू. — लोकसाहित्यकी भूमिका, कृष्णदेव उपाध्याय, १९५७
लो. सा. रू. — लोकसाहित्याची रूपरेखा, दुर्गा भागवत, १९५६
लौ. नी — लौहित्य और नीलाचल, हेम बरूवा, १९६१
व. का. रा. — वरंगलचे काकतीय राजे, कृष्णाकुमार, १९४६
वा. रा. बाल. २३ — वाल्मिकी रामायण, बालकांड २३, काशीनाथशास्त्री लेले, १९२८
वा. श. अग्रवाल – सि. ज्यु. व्हॉ. भां. रि. १९४२ — वासुदेवशरण अग्रवाल, Silver Jubilee Volume, Bhandarkar Oriental Research Institute, 1942
वि. ज. स्मृ. ग्र. — स्वामी विवेकानंद जन्म शताब्दी स्मृति ग्रथ, संपा. – रा. चिं. ढेरे, १९६३
वि. ती. क. — विविध तीर्थकल्प, जिनप्रभसूरि, सिंधी जैन ग्रंथमाला, ग्रंथांक १०, १९३४
वि. मुं. रा. प. — विशाल मुंबई राज्य परिचय, १९६०
वि. स. र. — विज्ञानप्रणीत समाजरचना, पु. ग. सहस्रबुद्धे
वि. सा. इ. — विजयनगर साम्राज्य का इतिहास, वासुदेव उपाध्याय, १९४५
वि. स्मृ. ग्रं. — विक्रम स्मृति ग्रथ, १९४५
वे. इं. — Vedic Index of Names and Subjects, A. A. Macdonell, A. B. Keith
वे. ए. — The Vedic Age, R. C. Majumdar, 1957
वै. वा. इ. — वैदिक वाङमय का इतिहास, पं. भगवद्दत्त, १९५६
वै. वि. भा. प. — वैज्ञानिक विकास की भारतीय परंपरा, सत्यप्रकाश, १९५४
वै. शै. म. व. — The Vaishnava Sects, the Shaiva Sects, Mother Worship, Swami Tattvananda
वै. सा. — वैदिक साहित्य, पं. रामगोविंद त्रिवेदी, १९६०
वै. सा. सं. — वैदिक साहित्य और संस्कृति, बलदेव उपाध्याय, १९५८
व्र. चं. — व्रतचन्द्रिका, गौरीशंकर उपाध्याय, १९५२
व्र. ति. नि. — व्रततिथिनिर्णय – श्रीनेमिचंद्र शास्त्री, १९५६
व्र. प. — व्रतपरिचय, हनूमान शर्मा, १९५७
व्हि. गॉ. सा. इं. — The Village Gods of South India, Henry Whitehead, 1921
श. का. — शब्दकल्पद्रुम:, राधाकांत देव
शी. त. म्यु. — Sheaves from Tamil Muse, Edi. P. Sri Acharya, 1959
शृं. ना. — शृंगार नायिका, स. आ. जोगळेकर, १९५५
शृं. हा. — शृंगार–हाट, संपा. – मोतीचंद्र १९५९
सं. कौ. — संस्कारकौस्तुभ, वेंकटाचार्य गजेन्द्रगडकर, १९१४
सं. ख्रि. सि. — संक्षिप्तरूप ख्रिस्ती धर्मसिद्धांत, जॉर्ज पी. पारडिंग्टन, १९६३
सं. द. — संगीत दर्पण, दामोदर पंडित

**सं. प्र.** — संस्कृतीची प्रतीके, पं. महादेवशास्त्री जोशी, १९६२
**सं. मि.** — सशोधकाचा मित्र, ग. ह. खरे, १९३१
**सं. मु.** — संशोधन मुक्तावलि, वासुदेव विष्णु मिराशी
**सं. वि.** — संस्कृति आणि विज्ञान, द. के. केळकर
**सं. शा.** — संगीत शास्त्र, के. वासुदेव शास्त्री, १९५८
**सं. शा. क. इ.** — संगीत शास्त्रकार व कलावंत यांचा इतिहास, लक्ष्मण दत्तात्रय जोशी, १९३५
**सं. सा.** — संत साहित्य, सुदर्शनसिंह, मजीठिया १९६२
**सं. सा. इ.** — संस्कृत साहित्यका इतिहास, ए. बी. कीथ, भाषातरकार–मंगलदेव शास्त्री, १९६०
**सं. सा. सो. इ.** — सस्कृत साहित्याचा सोपपत्तिक इतिहास, विनायक वामन करबेळकर, १९५४
**स. पॉ.** — The Serpent Power, Arthur Avalon ( Sir John Woodroffe), 1958
**स. भा. प्र. व.** — सचित्र भारत प्रवास वर्णन, बाळासाहेब लक्ष्मणराव घोरपडे, १९१२
**स. श. गो. बो.** — सतराव्या शतकातील गोमंतकी बोली, वि. भा. प्रभुदेसाई, १९६३
**सा. इ. इ. गॉ. गॉ.** — South Indian Images of Gods and Goddesses
**सा. इं. फे.** — South Indian Festivities, P. V. Jagadisa Ayyar, 1921
**सिं. जै. ग्र.** — सिंघी जैन ग्रंथमाला, ग्रंथांक ११, (कथाकोषप्रकरण) आचार्य जिन विजय मुनि, १९४९
**सि. सा.** — सिद्ध साहित्य– धर्मवीर भारती, १९५५
**सु. का. शा.** — सुलभ काव्यशास्त्र, महादेवशास्त्री जोशी, १९६१
**सु. वि. को.** — सुलभ विश्वकोश, य. रा दाते, चि. ग. कर्वे
**से. इं. १९५१** — Census of India, 1951
**से. क. रि.** — Sedition Committee Report
**से. का. हिं. ग.** — Tne Sacred Complex in Hindu Gaya, L. P. Vidyarhi, 1961
**से. रि. १९११** — Census Report, 1911
**सो. चें. म.** — Social Changes in Malabar, M. S. A. Rao, 1957
**सो. हि. का.** — The Social History of Kamrup, Nagendranath Vasu, 1922
**स्कू. से. जै. लि.** — Schools and Sects in Jaina Literature, Amulyachandra Sen, 1931
**स्ट. इं. अँ.** — Studies in Indian Antiquities, H. Raychaudhari 1958
**स्ट. उ.** — Studies in the Upapuranas, R. C. Hazra, 1958
**स्ट. ओ. फो. लो.** — A Study of Orissan Folk lore, Kunjbihari Das, 1953
**स्ट्र. एं.** — The Struggle for Empire, R. C. Majumdar, 1957
**स्ट. जॉ. एं. मि. इं.** — Studies in the Geography of Ancient and Medieval India, D. C. Sircar, 1960
**ह. च. सां. अ.** — हर्षचरित– एक सांस्कृतिक अध्ययन, वासुदेव शरण अग्रवाल, १९५३
**हजारी. गॅझे.** — Hajaribagh District Gazetteer, P. C. Roy Choudhury, 1957
**ह. रा.** — हमारा राजस्थान, पृथ्वीसिह महता विद्यालंकार, १९५०
**ह. वृ.** — हमारे वृक्ष, राजेश्वर प्रसाद नारायण सिंह, १९६०
**हिं. क. को.** — हिंदी कथाकोश, हिंदुस्तानी एकेडेमी, इलाहाबाद, १९५४
**हिं. क. भ. तु. अ.** — हिंदी और कन्नड में भक्ति आंदोलन का तुलनात्मक अध्ययन, हिरण्मय, १९५९
**हिं. दे. का. व.** — हिंदुस्थान देशातील कारागिरीचे वर्णन, बाळकृष्ण आत्माराम गुप्ते, १८८९
**हिं. नी. वि.** — हिंदी में नीतिकाव्य का विकास, रामसरूप, १९६२
**हिं. प. मी.** — हिंदु परिवार मीमांसा, हरिदत्त वेदालकार, १९५५
**हिं बं. वै. क.** — १६ वी शतीके हिंदी और बंगाली वैष्णव कवि, रत्नकुमारी
**हिं. म. कृ.** — हिदी और मलयालम मे कृष्णभक्ति काव्य, नायर के. भास्करन्, १९६०
**हिं. वि. को.** – हिंदी विश्वकोश, संपादक धीरेन्द्र वर्मा, भगवतशरण उपाध्याय, गोरखप्रसाद, नागरी ·प्रचारिणी सभा, वाराणसी
**हिं. सं.** — हिदु संस्कार, राजबली पांडेय, १९५७
**हिं. सा. को.** — हिंदी साहित्य कोश, संपा. – धीरेंद्र वर्मा, १९५९
**हिं. हॉ. से.** — Hindu Holidays and Ceremonials, B. A. Gupte, 1916
**हि. ऑ. को.** — History of the Konkan, Alexander Nairan
**हि. इं. लॉ.** — History of Indian Logic, S. C. Vidyabhushan
**हि. के.** — A History of Kerala, K. M. Panikkar, 1960

**हि. कै. मा.** — History of Kailash Mansarovar, Pranavand, 1949

**हि. जॉ. ए. इं.** — Historical Geography of Ancient India, Bimal Churna Law, 1954

**हि. जै. मो.** — History of Jaina Monachism, S. B. Deo, 1956

**हि. ध.** — History of Dharma Shastra, P. V. Kane

**हि. पि.** — Himalayan Pilgrimage, B N. Datar, 1961

**हि. बें. लँ. लि.** — History of Bengali Language and Literature, Dineshchandra Sen, 1954

**हि. मि.** — Historical Miscelleny

**हे. क.** — The Heritage of Karnatak, R. S. Mugali, 1946

**हे. व्र.** — हेमाद्री व्रतखंड

**ज्ञा. प्र.** — ज्ञानेश्वरांची प्रभावळ, ल. रा. पांगारकर, १९२८

# संदर्भ ग्रंथ सूची


**अष्टछापपरिचय** — धीरेन्द्र वर्मा, १९४७

**अक्षर अमर रहे** — वाचस्पति गैरोला, १९५९

**आदिवासी गट्टी** — धर्मदेव शास्त्री, १९५४

**एस. सी. मित्र** — Journal of the Department of Letters Vol. IV, Calcutta University Press, 1921

**कदर** — K. Govin Menon, Census of India, 1931

**कनौज** — रामकुमार दीक्षित, १९५५

**कर्नाटक** — प. महादेवशास्त्री जोशी, १९६१

**कऱ्हाडे ब्राह्मणांचा इतिहास** — वि. रा. आठल्ये, १९४७

**कांकरोली का इतिहास** — कण्ठमणि शास्त्री, १९४०

**कामकल्प** — Kama Kalpa or the Hindu Ritual of Love, P. Thomas, 1959

**कामपुरुषार्थ** — ग. सी. पेंडसे, १९५९

**कामरूप** — The Social History of Kamarupa, Nagendranath Vasu, 1922

**कामसूत्र** — बंधु विपिनचंद्र, १९६१

**कालटी** — श्रीपाद जोशी, १९६३

**काव्यप्रकाश** — संपा. – कृ. श्री. अर्जुनवाडकर, अरविंद मगळूरकर, १९६२

**कुमाऊँ** — राहुल सांकृत्यायन, १९५९

**कुलचूडामणिनिगम** — Kulchudamani Nigama, Arthur Avalon, 1956

**केरळ** – पं. महादेवशास्त्री जोशी, १९६०

**ख्रिस्तपुराण** — शान्ताराम बंडेलू, १९५६

**क्रीडांगणावर** — श्री. वि. गंधे, १९५४

**गणेशमीमांसा** — श्रीकृष्ण, १९५०

**गज्जलाञ्जलि** — माधव ज्यूलियन (मा. त्रि. पटवर्धन)

**गाडगे महाराज** — अमरेन्द्र, १९५९

**गुजरात** — पं. महादेवशास्त्री जोशी, १९६३

**चित्पावन** — ना. गो. चापेकर

**जर्नी थ्रू टॉयलँड** — Journey Through Toyland, Kamala Dongarkeri, 1954

**ट्री वर्शिप** — Tree Worship and Ophiolatry, G. Subramania Pillai, 1948

**डॉ. हिरण्यमय** — हिंदी और कन्नड में भक्तिआंदोलन का तुलनात्मक अध्ययन १९५९

**तमिळनाडू** — पं. महादेवशास्त्री जोशी, १९६०

**तर्जुमा** — कुरान शरीफ-अहमद बशीर

**तर्पण** — ना. गो. चापेकर, १९४८

**तालीमुल-कुरान** — ख्वाजा हसन निजामी, १९३०

**तेलुगु-वाङ्मय** — शं. सा. परशा, १९१२

**दी खासीज** — Major P. R. T. Gurdon, 1907

**दी गारोज्** — The Garos, D. N. Majumdar, 1956

**दी नेकेड रॉक** — Rev. M. Hermans, Western Railway Annual, 1955–56

**दी प्रॉफेट ऑफ दी डेझर्ट** — K. L. Gauba, 1949

**दुर्गा भागवत** — Anthropos Vol. 52, 1957

**धम्मपद** — संपा. भिक्षु धर्म रक्षित, १९५३

**नवद्वीप** — श्री. चैतन्यलीला धाम, नवद्वीप, आनंदयात्री, १९६१

# स्थूल शुध्दिपत्र

| पान | स्तंभ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| १० | १ | १० | ७० व्या | ७ व्या |
| १७ | २ | ७ | अनाफि | हनफी |
| २६ | १ | १७ | लो. ना. प. | लो. ध. ना. |
| ५५ | २ | १ व ३ | असई | औसा |
| ६१ | १ | ६ | इंग्रजांच्या......सुरू झाला | हे वाक्य गाळावे. |
| ६१ | १ | शीर्षक २ रे | कन्नय्य भागवतार | हा विषय ‘ कन्नडियन ’नंतर वाचावा. |
| ७० | १ | १२ | केरळातले | तमिळनाडमधील |
| ९९ | १ | १६ | तेरगावजवळ | हा शब्द गाळावा. |
| २५१ | २ | १६ | लो. ना. प. | लो. ध. ना. |
| ३२० | १ | ४० | वटपोरे | व टपोरे |
| ३२० | २ | १ | सौदर्याचे | डोळे हे सौंदर्याचे |
| ३६६ | १ | २० | आंध्रमधील बार्सी | महाराष्ट्रातील बार्शी |
| ४५९ | १ | शीर्षक १ ले | साहत्य | साहित्य |
| ५०९ | २ | केयिरन हा विषय | | केयिरन हे विशेष नाम नसून सामान्य नाम आहे. मूळ शब्द केर्न; त्याचा अर्थ दगडी बुरुज किंवा ढीग असा आहे. थडगे किंवा मृताचे स्मारक म्हणूनही हा शब्द वापरतात. अशी स्मारके सर्वत्र आढळतात. ही माहिती आंध्र या लेखात वाचावी. |
| ५६८ | २ | शेवटची | शिकारही | शिकारही करतात |
| ६०२ | १ | शीर्षक २ रे | कास्तभ | कौस्तुभ |
| ६०८ | १ | शीर्षक २ रे | क्रॉस | हा विषय ‘ क्रव्याद ’ नंतर वाचावा. |
| ६९१ | २ | ८ | लो. ना. प. | लो. ध. ना. |

# भारतीय संस्कृतिकोश

## खंड दुसरा

**कंक** (१) एक प्राचीन जमात. हे लोक कपाळावर शिंगे धारण करीत, असा उल्लेख आढळतो. तिबेट व भारत यांच्या सरहद्दीवर गंगेच्या पलीकडे याचे वास्तव्य असावे. भरतांनी याचा पराभव केला होता. हे लोक विष्णुभक्तीमुळे पापमुक्त झाले, असे भागवतात म्हटले आहे (भाग० पु० ९. २०. ३०; २०. ४. १८). कृष्ण मिथिलेला जात आहे, अशी वार्ता समजताच या लोकांनी त्याची भेट घेतली व त्याला उपायने दिली ( भाग० पु० १०. ८६. २० ). चीनच्या इतिहासात कग् नावाचे लोक आढळतात, ते हे कंकच असावेत. [ए. से. ए. इं.]

(२) वाराह कल्पातील वैवस्वत मन्वंतरात झालेला शंकराचा अवतार. सनक, सनातन, सनंदन व सत्कुमार हे याचे पुत्र असून हा निवृत्तिमार्गी होता. [प्रा. च. को.]

(३) शाल्मलि द्वीपातील मुख्य पर्वत.

(४) कुश द्वीपातील एक पर्वत.

(५) युधिष्ठिराने अज्ञातवासासाठी घेतलेले नाव.

(६) पाचव्या द्वापरातील विष्णूचा अवतार.

**कंकटि ब्राह्मण** आपस्तंब श्रौतसूत्रात या नावाच्या एका ब्राह्मण ग्रंथाचा उल्लेख आढळतो (१४. २०. ४). [वे. इं.]

**कंकण** 'कंकणं करभूषणम्' = हस्ताचे भूषण म्हणजे कंकण होय. चांदी, सोने, पितळ इ. धातूची, तसेच काचेची, शंखाची इ. अनेक प्रकारची कंकणे करतात. कंकण हा कुमारी व सुवासिनी याचा एक प्रमुख सौभाग्यालंकार मानला जातो. विधवा स्त्रिया कंकणे वापरीत नाहीत.

भारतातल्या स्त्रिया पुरातन कालापासून कंकणे वापरीत असलेल्या दिसतात. मोहेंजोदडो येथील उत्खननांत मिळालेल्या एका स्त्रीमूर्तीच्या हातांत कोपरापर्यंत कंकणे घातलेली दिसतात. शुंग कालातील चूलकोला, सुदर्शना, चंदा इ. यक्षिणीच्या मूर्तींच्या हातांत कंकणे आढळतात. सांची येथील स्त्रीचित्रात, गांधारमूर्तिकलेत, तसेच अजंटा येथील कोरीव स्त्रीमूर्तीत कंकणाचा आढळ होतो. बाणाच्या कादंबरीत सरस्वती शंखांची कंकणे धारण करीत असल्याचा उल्लेख आहे.




कंकणाचे प्रकार



हातभर कांकणे घालणारी स्त्री - मोहेंजोदडो

भारताच्या काही भागात विशेषेकरून काही आदिवासी जमातीत बायका कोपरापर्यंत कंकणे घालताना दिसतात. बंगालमध्ये शंखांची कंकणे हा सौभाग्यालंकार मानला जातो. पंजाबात मंगलप्रसंगी हस्तीदंती कंकणे वापरण्याची प्रथा आहे. लाखेची ही कंकणे वापरली जातात. लग्नाच्या आधी वधूला जी कंकणे भरतात, त्याला महाराष्ट्रात लग्नचुडा असे नाव आहे. आपला चुडा अर्थात कंकण वज्राचे व्हावे म्हणजेच आपले सौभाग्य अभंग राहावे. अशी सुवासिनीची आकांक्षा असते. त्यासाठी ती व्रते ही करते.

महाराष्ट्रातली एक महिला आपल्या चुड्यासाठी अर्थात चिरसौभाग्यासाठी देवाला पुढील प्रार्थना करते —

**देई देवा मज। देशील तितुकें पुरे,**
**अक्षय माझे चुडे। जन्मवेरीं॥**
**देवाच्या देउळीं। उभी मी जागतये।**
**आयुष्य मागतें। चुडेयांना॥**

प्रत्येक प्रदेशाच्या लोकगीतांतून स्त्रियांची चुड्याविषयीची आसक्ती अनेक प्रकारे मुखरित झाली आहे. **पाहा**–अलंकार.

**कंकणपा** चौऱ्यायशी सिद्धांपैकी एक. कोकणपा असेही याचे नामांतर दिलेले आहे. तजूर येथील ग्रंथात याला कोकदत्त असेही म्हटले आहे. कोकणपा या नावावरून तो कोकणातला रहिवासी असावा, असे वाटते. पण सस्क्य विहारातल्या सूचीत याला विष्णुनगरचा (मगध) राजपुत्र म्हटलेले आहे. हा कंबलपाच्या परिवारातला होता तंजूरमध्ये याचा चर्यादोहाकोषगीतिका नावाचा ग्रंथ आढळतो. [सि. सा.; पु. त. नि.]



कंकणपा

**कंकालमूर्ति** शिवाचे एक रूप. 'जगाचा कर्ता कोण?' हे विचारण्यासाठी काही ऋषी एकदा ब्रह्मदेवाकडे गेले. ब्रह्मदेव म्हणाला, की 'मीच जगाचा कर्ता.' शिव म्हणाला, की 'तू खोटे बोलतोस.' पण ब्रह्मदेव तो आरोप कबूल करीना. त्यामुळे क्रोधाविष्ट होऊन शिवाने ब्रह्मदेवाचे पाचवे मस्तक तोडले. ती हत्या स्त्रीरूपाने शिवाच्या मागे लागली. ती कशी दूर करावी, ते विष्णूला विचारण्यासाठी तो वैकुंठात गेला; पण दारावरचा विष्वक्सेन नावाचा द्वारपाल त्याला आत जाऊ देईना. तेव्हा शिवाने त्यालाही ठार मारले. त्यामुळे दुसरी ब्रह्महत्या लागली. शेवटी काशीस गेल्यावर तो त्या दोन्ही हत्यांपासून मुक्त झाला. याचे मूर्तिकरण पुढीलप्रमाणे करतात—

चतुर्भुज. खालच्या दोन हातांत कंकाल म्हणजे मोठे हाड व डमरू ही आयुधे. गळ्यात रुंडमाळा. खांद्यावर विष्वक्सेनाचे प्रेत. तमिळनाडमधल्या काही मंदिरांतून हे शिवरूप आढळते. [डि. सा. इं. म्यु. म्यु.; मू. वि.]

**कंकालिपा** चौऱ्यायशी सिद्धांपैकी सातवा सिद्ध. हा जातीने शूद्र वर्णाचा असून मगध देश हे त्याचे वास्तव्यस्थान होते. याने सहजानंदस्वभाव या नावाचा ग्रंथ लिहिला आहे. [म. च. को.]



कंकालिपा

**कंखारेवत** एक बौद्ध थेर. हा श्रावस्ती येथील एका धनिक कुलांत उत्पन्न झाला. प्रव्रज्या घेतल्यानंतर याने ध्यानाभ्यासात विशेष नैपुण्य मिळविले. [थेरगाथा]

**कंगर** द. भारतातील एक जात. कगर शब्दाचा अर्थ नोकर असा आहे. यांनाच खोगार असेही म्हणतात. हे वृत्तीने निर्भय व चलाख असतात. पूर्वी हे लोक खेड्यापाड्यातून पहारेकऱ्याचे काम करीत. त्याचे वंशज विशाखापट्टनम् जिल्ह्यात आढळतात. हे लोक पूर्वी दरोडेखोर म्हणून प्रसिद्ध होते. तिकडील पूर्वीचे राजे व त्यांचे सरदार, याना लुटालूट करण्यासाठी आपल्या पदरी बाळगीत. रात्रीच्या वेळी तोंडाला काळे फासून ४०–५० च्या टोळीने हे लोक दरोडे घालीत. जुन्या काळात यांनी खेड्यापाड्यात दहशतीचे वातावरण निर्माण केले होते. [का. ट्रा. स. इं.]

**कंचनी** राजस्थानातील मुसलमान गायिका. यांना कंजरी व यांच्या भाईबंदांना कंचन असेही म्हणतात. कंचन लोक आपल्या बहिणींना गाणे शिकविणे व त्यांच्या गाण्याला वाद्यांची साथ करणे, ही कामे करतात.

**कंचुक** एक प्रकारचा लांब कोट किंवा चोगा. प्राचीन वस्त्र-भूषेत याचा आढळ होतो. शकराजे व शिपाई यांना कंचुक प्रिय होता. कनिष्काच्या मृण्मय मूर्तीत गुडघ्याच्याही खाली पोचणारा कचुक दिसतो. कंचुक किवा चोगा हा साध्या कापडाचा बनवीत. कंचुकावर कमरेच्या जागी वस्त्र लपेटून किवा दोरीसारखे कांहीतरी वेढून त्याला गाठ मारीत. गाठीचा सोगा किवा पदर गुडघ्यापर्यंत लोंबता ठेवीत. मथुरेत एक सूर्यमूर्ती मिळाली आहे, तिच्या अगात असाच लांब कंचुक आहे. त्याचा गळा गोल आहे व दोन्ही पाख्यांना खाली किनारदार गोट आहे. हर्षचरितावरून कळते, की श्रीमत व राजेरजवाडे आपल्या चोग्यावर मोत्यांचा कशिदा काढीत.

अमरावतीच्या शिल्पात मोतद्दार, पहारेकरी, सेवक, इ. दासवर्गातल्या पुरुषांच्याच अंगावर कचुक दिसतो. कचुक वापरून राजद्वारावर पहारा करणाऱ्या सेवकाला कंचुकी असे म्हणत सस्कृत नाटकात कंचुकी पुष्कळदा आढळतो. पाहा–कंचुकी. [प्रा. भा. वे. भू.]


ठिपक्याचा कचुक

**कंचुकी** (१) राजवाडयातील अंत:पुरावर देखदेख करणारा पुरुष. याचे लक्षण पुढीलप्रमाणे ––

**अन्त:पुरचरो वृद्धो विप्रो गुणगणान्वित: ।**
**सर्वकार्यार्थकुशल: कञ्चुकीत्यभिधीयते ।।**

(श. क.)

**अर्थ** – अंत पुरात वावरणारा, वृद्ध, विप्र, अनेक गुणानी युक्त आणि (अत.पुरविषयक) सर्व कार्ये पार पाडण्यात कुशल, तो कचुकी या नावाने ओळखला जातो.

कंचुकीच्या अंगात लाब चोगा व हातात दड असतो. प्रात:-काळी राजा शयनावरून उठला, की कंचुकी अंतर्गृहातल्या सेविकासह (अभ्यागारिका) राजाजवळ जात असे, असे कौटिल्याने सागितले आहे. अमरावतीच्या शिल्पात कंचुकीच्या पुष्कळ मूर्ती आढळतात. अंगात लांब अगरखा, डोक्यावर पागोटे, हातात दंड, चेहऱ्यावर सुरकुत्या व चिंताग्रस्त मुद्रा अशा अवस्थेत त्या मूर्ती दिसतात.

(२) चोळीचे सस्कृत नाव कंचुकी असे आहे. कंचुकीचा इतिहास फार प्राचीन आहे. वेदकालात शिवणकला अस्तित्वात आली होती, असे ऋग्वेदातील तत्संबंधी आलेल्या उल्लेखांवरून कळून येते (ऋ. २. ३२. ४). त्या कलेचा उपयोग पहिल्या प्रथम कंचुकी तयार करण्यासाठीच केला गेला असावा, असे वाटते. बुद्धाच्या काळांत बौद्ध व जैन भिक्षुणी कंचुकीचा उपयोग करीत, असे उल्लेख आहेत. जुन्या कंचुकीला दोन आखूड बाह्या असत, पण गुडया नसत. बायका स्वत:च आपल्या चोळया शिवीत. चोळी अंगात घातल्यावर दोन्ही स्तनाच्या खाली मध्यभागी तिच्या टोकाना गाठ मारून ती ठाकठीक वसवीत. समुद्रगुप्ताची जी नाणी उपलब्ध झाली आहेत, त्यावरील लक्ष्मीचा ठसा कंचुकीसहित आहे. कालिदासाने शाकुंतलात कंचुकीच्या टोकांना खांद्यावर गाठ मारीत असल्याचा उल्लेख केला आहे (१. १९). पण त्यावरून त्या कंचुकीची घडण कशी असावी, त्याचा बोध होत नाही.

पोशाखाच्या बाबतीत राज्यकर्त्यांचे अनुकरण करण्याची प्रवृत्ती फार जुनी आहे. याचे उदाहरण म्हणजे स्त्रियांची कंचुकीविशेष (ब्लाउज) व कूर्पासक (जॅकेट) ही वस्त्रे होत. मध्य आशियातून येऊन उत्तर भारताच्या मैदानी प्रदेशात आपली सत्ता प्रस्थापित करणाऱ्या शक व कुशाण या राज्यकर्त्यांपासून वरील ब्लाउज व जॅकेट ही वस्त्रे भारतीय स्त्रियांनी उचलली, असे दिसते. ब्लाउज हा कंचुकीचा एक विशेष प्रकार आहे. कमरेच्या वरचा भाग झाकण्यासाठी तो वापरला जातो. तो कंचुकीपेक्षा जरा सैल असून त्याला गुंड्या असतात व कमरेजवळ एका पट्ट्याने तो तंग बसेल, अशी व्यवस्था केलेली असते. जॅकेट हे दुसऱ्या कपड्यावर घालायचे असते. त्याचीही उची कमरेपर्यंत असते. मथुरा आणि गांधार शिल्पात चोळी घातलेल्या स्त्रिया आढळतात. वायव्य प्रांतातील गांधार शिल्पातल्या स्त्रीमूर्ती सर्रास ब्लाउज व जॅकेट घातलेल्या आढळतात. हारीति ही बौद्ध देवीही लांब बाह्यांचा ब्लाउज घातलेली अशी एका ठिकाणी आढळते शकांच्या एका नाण्यावर कमळावर उभ्या असलेल्या लक्ष्मीचा ठसा आहे व तिच्याही अंगात ब्लाउज आहे.

सांप्रत कंचुकीचे विविध आकार आणि प्रकार अस्तित्वात आले आहेत. त्यांत काही कचुकींच्या गुडचा किवा बंद पुढील भागी असतात; तर काहींचे ते पाठीवर असतात. जुन्या काळी विधवा स्त्रिया चोळया घालीत नसत. अलीकडे मात्र घालतात.

सुवासिनीने कोणत्याही धर्मकृत्यात चोळी घातली पाहिजे, असा संकेत रूढ झालेला आहे. [पो. वी. हिं. सि.]

**कंचुगार** द. भारतातील एक जात. हे लोक ताब्यापितळेची व काशाची भांडी बनवितात. यांच्यापैकी दक्षिण कर्नाटकात राहणारे लोक वैष्णव असून तिरुपतीच्या व्यंकटेशाचे भक्त आहेत. यांना मद्य आणि मास चालते. [का. ट्रा. स. इं.]

**कंजक्करुवी** द. भारतातील झांजेसारखे एक वाद्य. हे ब्रॉझचे बनवितात. [डि. सा. इं. म्यु. म्यु.]

**कंजर** उत्तर भारतातील जिप्सी लोकांसारखी एक भटकी जमात. काश्मीर, पंजाब, उत्तर प्रदेश, राजस्थान, मध्य प्रदेश इ. भागात यांची वस्ती आहे. याच्यापैकी बरेचसे लोक हिंदू व काही थोडे मुसलमान आहेत. पजाबमध्ये या लोकांना कचन असेही म्हणतात. याना कुंचबधिया असेही आणखी एक नाव आहे. कारण ते लोक कुचे बाधण्यात प्रवीण असतात. वाळयाचे पडदे, पंखे, टोपल्या, चटया इ. विणणे, नगारे करणे हे याचे प्रमुख व्यवसाय होत. विणकरी लोकाना सूत साफ करण्यासाठी लागणारे बोरूचे कुचे हे तयार करीत. पूर्वी ते कोल्ह्यांची व लांडग्यांची शिकार करीत व त्याबद्दल त्यांना सरकारातून पुरस्कार मिळे.

या लोकांचा कोल्हाटी व वेरिया यांच्याशी संबंध असावा व या सर्वांचे पूर्वज उत्तर भारतातील डोंब हे असावे, असे एक मत आहे. तैमूरलगाच्या वेळी अनेक कंजर लोक भारतातून बाहेर पडले व इराण, ईजिप्त, स्पेन, तुर्कस्तान व इंग्लड या देशांपर्यंत जाऊन पोचले. अद्यापही त्याचे वशज त्या देशात अपभ्रष्ट व मिश्र अशी हिंदी भाषा बोलतात.

द. भारतात कंजरांनी मराठी भाषा, पेहराव आणि चालीरीती उचलल्या असून ते मरीआईला भजतात. राजस्थानात यांच्या स्त्रिया घरोघरी नृत्य करतात. त्यांच्या नृत्याला पुरुष ढोलके व मजीरा वाजवून साथ करतात. शृंगारिक प्रेमगीते गाण्यात यांचा हातखंडा आहे—

**ढोलाढोल मजीरा बाजे रे ।**
**काळी झींट को घागरो नजारा मोर रे ।।**

अशी गाणी कजरणी गाऊ लागल्या, की प्रेक्षक मंत्रमुग्ध होतात.

मध्य प्रदेशात जाट व मुलतानी असे याचे दोन भेद आहेत. कलखा व मल्हा या त्यांच्या पोटजाती असून त्यांच्यांत परस्पर विवाहसंबंध होतो. विवाहाच्या वेळी नवरा मुलगा एक कुदळ लग्न-मंडपात ठेवून शपथ घेतो, की 'मी पत्नीला हाकलून देणार नाही किंवा टाकून देणार नाही.'

माना नावाचा मूळ पुरुष यांचा देव आहे. पावसाळ्यात हे समारंभाने त्या देवाची पूजा करतात व त्याला पशू बळी देतात. काही लोक नानकालाही भजतात.

मुसलमान झालेल्या कंजरास पुनश्च जातीत घेणे झाल्यास त्याच्यावर दही शिपडतात. नदीवर नेऊन त्याला स्नान घालतात व सोन्याची कांडी तापवून जिभेला डाग देतात. व्यभिचारी स्त्रीला देखील दही शिंपडून शुद्ध करतात. पूर्वी हे लोक ठिकठिकाणी भटकत व चोऱ्यामाऱ्या करीत. परंतु हल्ली हे कायम स्वरूपाची वस्ती करून राहू लागले आहेत. हे लोक प्रेत पालथे ठेवून पुरतात.

कंजर लोकांना मांस व मद्य अतिशय प्रिय आहे. त्यामुळे त्यांच्यांत दारू व बकरा या दोन गोष्टींना फार महत्त्व आहे. [म. ज्ञा. को.; भा. लो. सा.; लोककला त्रैमासिक.]

**कंजर महादेव** पंजाबमधील कांगडा जिल्ह्यात धर्मशाला नगराजवळ खनियारा गावात कंजर महादेवाचे मंदिर आहे. आख्यायिका अशी सागतात, की शिवाने कंजर (किरात) या रूपात अर्जुनाशी इथेच युद्ध केले. सदर प्रसग म. भा. च्या वनपर्वात सविस्तर आलेला आहे (३८-४०). [कल्याण—तीर्थांक]

**कंजिक व्रत** एक जैन व्रत. हे व्रत चौसष्ट दिवसांनी समाप्त होते. तितके दिवस व्रतकर्त्याने कांजी पिऊन राहायचे असते. कोणत्याही महिन्याच्या प्रतिपदेपासून याचा आरंभ करता येतो. [जै. व्र. वि. स.]

**कंटकार** शक, पुलिंद यांच्याबरोबर उल्लेखिली जाणारी एक प्राचीन जमात (मत्स्य पु. ११३.४२).

**कंटाल** बंगालमधील एक जात. राजबन्सी जातीची ही एक पोटशाखा. हे लोक पालख्या वाहण्याचा धंदा करतात. [डि. ए. ब.]

**कंठी** गळयात घालण्याचा एक मौल्यवान अलंकार. याला कंठा असेही म्हणतात. कठीत माणिक, पाचू इ. मौल्यवान रत्ने जडविलेली असतात. या अलंकाराचे वर्णन गाथासप्तशतीत केले आहे —

**उअ पोम्मराअमरगअ संवलिआ णहअलाओ ओअरइ ।**
**णहसिरिकण्ठब्भट्ठव्व कंठिआ कीररिञ्छोली ॥**

(१·७५)

अर्थ – पाहा, पोपटांची रांग आकाशातून उतरत आहे. जणू गगनश्रीच्या कंठातील पाचूचा व माणकांचा कंठाच ओघळत आहे.

सांप्रत प्रचारात असलेला सोन्याचा कठा भरहूतच्या शिल्पा-तही आढळतो; पण त्याला रत्ने मात्र जडवलेली नाहीत.

वाजपेय यज्ञात सर्व ऋत्विजानी सोन्याच्या कंठ्या गळ्यात घालाव्या, असे सांगितले आहे (आश्व. श्रौ. सू. ९·९). राजसूयान्तर्गत दशपेय यज्ञात उद्‌गात्याने सोन्याची कंठी घालायची असते (बौधा. श्रौ. सू. १२.१८). **पाहा** – अलंकार.

**कंड** मुंड आदिवासीतील जातिबहिष्कृत व्यक्तीला जातीत परत घेण्याचा विधी. मुंडांमध्ये पुढील अपराधासाठी स्त्री-पुरुष आपल्या जातीला मुकतात. एखाद्या स्त्रीने परजातीतील पुरुषाशी विवाह करणे अथवा त्याच्याशी अनैतिक संबंध ठेवणे, हा अपराध दंडनीय समजतात. पुरुषाने परजातीतल्या स्त्रीकडून कुक् लावून घेणे किंवा परजातीतील एखादी स्त्री रखेली म्हणून ठेवणे हाही गुन्हा ठरतो. अशा स्त्रीच्या हातचे अन्न त्या पुरुषाने घेतले, तर गुन्ह्याची मात्रा वाढते.

अशा गुन्ह्यांचा निवाडा त्यांच्या पंचायतीत होतो. गुन्हा सिद्ध झाला, तर शुद्ध होऊन जातीत परत येण्यासाठी त्याला कंड नामक विधी करावा लागतो. कंडाचा प्रकार असा–

भिन्न कुळातला मनुष्य एक पांढरा कोंबडा कापतो व त्याच्या रक्तात पाणी आणि तांदुळाच्या दारूचे आंबवण मिसळून ते मिश्रित द्रव्य अपराध्यावर शिंपडतो. या विधीनंतर अपराध्याने जातीला मोठी जेवणावळ घालायची असते. एवढे झाल्यावर मग तो शुद्ध होतो. [ एन्सा. मुं. ]

**कंडवार** मदुराई जिल्ह्यात वस्ती करून राहिलेल्या तुळु ब्राह्मणांची एक पोटजात. [ का. ट्रा. स. इं. ]

**कंडु** बिहारच्या पालामो जिल्ह्यातील एक जात. मधेशिया, मगहिया व कनौजिया असे या जातीत पोटभेद आहेत. विवाहसमयी वधू-वर पक्ष एकमेकांना वस्त्रे व अलंकार देतात. वधू गरीब असल्यास तिचा विवाह वरगृही होतो. खेड्यातील कंडु चुरमुरे व मेवामिठाई विकतात. काही लोक शेतीही करतात. [ पालामो गॅझे. ]

**कंडेरा** एक जात. यांची वस्ती राजस्थान व मध्यप्रदेश यांत आहे. डांगीबारा, धुनका व मनवाला अशा यांच्या पोटजाती आहेत. हे इतिहासकाळात गोलंदाज म्हणून प्रसिद्ध होते. हे शोभेची दारू तयार करतात. एका स्तंभाला प्रदक्षिणा घातल्याने त्यांचा लग्नविधी पुरा होतो. जातीची पंचायत असते. तिच्या मुख्याला चौधरी म्हणतात. जातिबहिष्कृत माणसाला परत जातीत घ्यायचे ठरते, तेव्हा प्रथम चौधरीला त्याच्या हातचे अन्न खावे लागते. अपराधी माणूस त्यासाठी चौधरीला एक रुपया व पागोटे देतो. हे आपणाकडची धर्मकृत्ये करण्यास ब्राह्मणाना बोलावितात. ज्येष्ठ शु. १० मीस हे लोक आपल्या दुकानात लुकमान हकीम याची मुसलमानी पद्धतीने पूजा करतात. [ म. ज्ञा. को. ]

**कंड्र** ओडिसात राहणारी एक जात. हा शब्द कांड = बाण या शब्दापासून बनला असावा. बसोर हा जातिवाचक शब्दही धनुष्यबाण या अर्थीच आहे. कंड्र व बसोर हे लोक बांबूच्या टोपल्या, हारे इ. वस्तू तयार करतात. या लोकांनी संस्कृतीच्या प्राथमिक अवस्थेत बाबूचे धनुष्यबाण बनविण्याची कला हस्तगत केली असावी आणि त्यावरूनच त्याना ही नावे पडली असावी. कंड्रांच्या बायका केसांची वेणी न घालता फक्त त्यांची गाठ बांधतात. भंडारा जिल्ह्यातील कंड्र ही गोंडांची शाखा असावी. कारण ते गोंडी भाषा बोलतात. महाराष्ट्रात बुरुडांना अस्पृश्य मानतात, तसेच ओडिसात कंड्रांनाही अस्पृश्य मानतात. **पाहा** – कांध्र. [ ट्रा. का. सें. प्रॉ. इं. ]

**कंतालिपा** चौऱ्यांयशी सिद्धांपैकी ६९ वा सिद्ध. हा कह्लपाचा शिष्य होता. हा मणिधर देशाचा रहिवासी व जातीने शिंपी होता. याला कंथालिपा असेही म्हणतात. [ म. च. को. ]

**कंति** (इ. स. ११०० चा सुमार) एक कन्नड कवयित्री. ही अभिनव पंपाच्या समकालीन होती. हिच्याविषयी कर्नाटकात अनेक आख्यायिका प्रचलित आहेत. कंति ही प्रतिभावान विदुषी होती. ती व अभिनव पंप या दोघांत शास्त्रार्थ होत असत. तिच्या बुद्धिमत्तेने अभिनव पंप थक्क होई. ही होयसळ राजा बल्लाळ (पहिला) याच्या दरबारात होती. कवी बाहुबली याने हिला अभिनव वाग्देवी या पदवीने गौरविले आहे. [ ग्रे. वी. इं. ]

**कंथधान** एक प्राचीन जमात. हे लोक कंदाहारचे रहिवासी असावे. [ए. से. ए. इं.]

**कंथा** नाथयोग्यांचे भगव्या रंगाचे वस्त्र. पाठीकडून अंग झाकले जाईल, अशा पद्धतीने हे गळचात अडकवितात. याला गूदरी (गोधडी) असेही म्हणतात. कारण जुन्या-पुराण्या चिंध्या एकत्र शिवून कंथा तयार करावी, असा संकेत आहे. भगवा रग ब्रह्मचर्यसाधक समजला जातो. तो रंग वापरल्याने वीर्यस्तंभनशक्ति वाढते, अशीही कल्पना आहे. या बाबतीत दंतकथा अशी आहे, की पार्वतीने आपल्या रक्तात रंगवून एक कंथा गोरक्षनाथाला दिली आणि तेव्हापासून लाल किंवा भगवा रंग योग्यांनी पवित्र ठरविला. [गो. च. प.]

**कंदपुराणम्** (सं. स्कंद पुराण) स्कंदपुराणावर आधारित असलेले तमिळ भाषेतले एक पुराण. कच्चियप्प शिवाचार्यर (११ वे शतक) हा याचा कर्ता होय. हा कांची येथील सुब्रह्मण्याच्या मंदिरात पुजारी होता. वेद-वेदांगे, साहित्य, व्याकरण इ. विषयांत कच्चियप्प मोठा पंडित होता. स्कंद हा तमिळ लोकांचा सर्वाधिक पूज्य असा देव आहे. त्याच्या चरित्राचे आणि अद्‌भुत कृत्यांचे विस्तृत वर्णन या पुराणात केलेले आहे. यात विविध प्रसंगांच्या अनुषंगाने अनेक आख्याने व उपाख्याने दिलेली आहेत. तमिळनाडमध्ये हे पुराण अत्यंत लोकप्रिय आहे. या पुराणातले पहिले १०० छंद साक्षात सुब्रह्मण्याने संशोधिले होते, अशी दंतकथा सांगतात. हा समग्र ग्रंथ धार्मिक भावनेने भरलेला आहे. **पाहा**-सुब्रह्मण्य. [त. सा. सं.]

**कंदप्पिय** एक धार्मिक पथ. या पंथाचे लोक थट्टा–मस्करी व विदूषकी करून पैसे मिळवितात. हे लोकांना हसवितात, पण स्वतः मात्र हसत नाहीत. [स्कू. से. जै. लि.]

**कंदर्प** (१) आठव्या कल्पाचे नाव [पु. इं.]. (२) कामदेवाचे नाव. **पाहा**–काम.

**कंदर्पा** जैन दैवतसमूहातली यक्षिणी (दिगंबरमते मानसी). धर्मनाथाची सेविका. हिचे वर्णन असे—

**कन्दर्पा देवीं गौरवर्णां अश्ववाहनां चतुर्भुजाम्...**

(निर्वाणकलिका)

अर्थ–कंदर्पा ही देवी गौर वर्णाची, अश्वारूढ (दिगंबरमते व्याघ्रारूढ), चतुर्भुज (दिगंबरमते षड्‌भुज), अशी आहे. हिच्या नावावरून हिचे रतीशी नाते सूचित होते. हिला पन्नगदेवी असेही म्हणतात. मनसा या सर्पदेवतेशीही हिचा सबंध दिसतो. [जै. इ.]

**कंदाहार** गंधार पाहा.

**कंदुकक्रीडा** चेंडूचा खेळ. प्राचीन काळापासून हे एक मनोविनोदाचे लोकप्रिय साधन ठरलेले आहे. वाल्मीकि रामायणात कन्दु या शब्दाचा प्रयोग आढळतो (६·४०. ३१). लहान मुले व मोठी माणसेही चेंडू खेळत. कधी कधी पुरुषाना नादी लावण्यासाठी स्त्रिया चेंडू खेळत व त्या खेळात आपल्या शरीराचे चापल्यादि गुण प्रकट करीत. ऋष्य-शृगाला मोह घालण्यासाठी त्याच्या आश्रमात आलेल्या गणिका चेंडू खेळत व तदनुषंगाने आपली अंगप्रत्यंगे दाखवीतच आल्या, असे महाभारतात वर्णन आहे (वन.१११·१६). स्वप्न-वासवदत्त या नाटकात पद्मावती कंदुकक्रीडा करताना दिसते (अंक २). बालपणी उमेलाही चेंडू खेळण्याची अत्यंत आवड होती, असे स्कदपुराणावरून कळते (माहेश्वरखंड २३·८). कालिदासानेही गौरीच.ा या कंदुकक्रीडेचे वर्णन केले आहे —

**मन्दाकिनीसैकतवेदिकाभिः**
**सा कन्दुकै : कृत्रिमपुत्रकैश्च ।**
**रेमे मुहुर्मध्यगता सखीनां**
**क्रीडारस निर्विशतीव बाल्ये ।।**

(कु. सं. १·२९)

अर्थ – ती पार्वती बालसुलभ क्रीडारस अनुभवीत असता मंदाकिनीच्या तीरावर कधी वाळूच्या वेदी, कधी चेंडू, कधी बाहुल्या यांनी आपल्या मैत्रिणीसह खेळत असे.

प्राचीन काळी चेंडू कापडाचे बनवीत. जैनांच्या सूत्रकृतांग ग्रंथात कापडी चेंडूचा उल्लेख आहे (१·४. २). छोटी छोटी मुले चेंडू खेळत, त्याचे उल्लेख रघुवंशात (१६·८३), भागवतात (३·२०·३६) व मालविकाग्निमित्र या नाटकात आढळतात. सुह्म देशाच्या राजकुमारीला देवीने स्वप्नात दृष्टान्त दिला होता, की प्रत्येक महिन्याच्या तृतीयेच्या दिवशी तिने मंदिरात जाऊन चेंडूचा खेळ खेळावा व नृत्यकलेचे प्रदर्शन करावे. तो स्वप्नातला आदेश राजकन्येने पाळला. ती जेव्हा मंदिरात जाऊन चेंडू खेळे, तेव्हा तो खेळ पाहण्यासाठी नगरातले लोक तिथे गर्दी करीत. त्यामुळे पुढे त्या गोष्टीला कंदुकोत्सव असे नाव पडले (दशकुमारचरित २·२०६). [प्रा. भा. म.]

**कंदुकोत्सव** एक प्राचीन क्रीडाविनोद. दशकुमारचरिताच्या सहाव्या उल्लासात याचे वर्णन आले आहे. ताम्रलिप्ति नगराबाहेरच्या एका उद्यानात हा उत्सव होत असे. सुह्मपति तुरंगधन्व्याची कन्या कंदुकावती हिला विंध्यवासिनी देवीने इष्ट वरप्राप्तीसाठी प्रतिमास कंदुक नृत्य करण्याचा आदेश दिला होता. [ शृंगारहाट. ]

**कंपा** काची येथील पवित्र जलाशय. याला कंपातरंगिणी असेही म्हणतात. [ पु. इं. ]

**कंपिला** एक जैन तीर्थक्षेत्र. हे फरुकाबाद जिल्ह्यात असून इथे तेरावा तीर्थंकर श्रीविमलनाथ याचे चार कल्याणकोत्सव झाले होते. दर वर्षी चैत्र महिन्यात इथे यात्रा भरते व रथोत्सव होतो. [ जै. ध. ]

**कंबन** ( ९ वे शतक ) तमिळनाडमधला एक महाविख्यात कवी. काही विद्वान त्याचा काल १२ वे शतक मानतात. याचा जन्म चोल राज्यातील तिरुवळुंदूर या गावी झाला. याच्या बापाचे नाव आदित्तन असे होते. तो राजपुरोहित होता. कंबनला बालपणापासूनच रामभक्ति जडली होती. तो प्रथम शैव होता; पण पुढे नम्माळवार याच्या उपदेशाने वैष्णव बनला. प्रथम तमिळ शैव साहित्याचे त्याने अध्ययन केले होते. वैष्णव झाल्यावर त्याच्याही साहित्याचे त्याने चांगल्या प्रकारे आलोडन केले.

नम्माळवाराच्या प्रेरणेनेच त्याने तमिळ भाषेत रामायणाच्या अनुवादाला प्रारंभ केला. कंबनची प्रतिभा अद्‌भुत असून ती त्याच्या ग्रथात सर्वत्र चमकते. पाच वर्षांत त्याने आपली रामायणरचना पुरी केली. इ. स. ८८५ मधल्या फाल्गुन पौर्णिमेच्या दिवशी कंबनने श्रीरंगम् येथील साहित्यसभेपुढे आपल्या रामायणाचे वाचन केले. ते समग्र ऐकल्यावर साहित्यसभेने त्याला मान्यता दिली व कंबनला कविचक्रवर्ती या उपाधीने गौरविले. थोडयाच काळात साऱ्या दक्षिण भारतात त्याचा कीर्तिपरिमल दरवळला. तमिळ भाषेत त्याच्याही आधी काही कवींनी रामकथा गायिली होती; पण कंबनच्या प्रकाशापुढे त्यांच्या रचना फिक्या पडल्या. शटगोपरन्तादि, एरेषुपदु, सिलैयेषुपदु, तिरुक्कैवषक्कम्, सरस्वतीअन्तादि इ. अनेक ग्रंथ कबनने लिहिले आहेत; पण त्या सर्वांत रामायण हाच त्याचा सर्वोत्कृष्ट ग्रंथराज ठरला आहे. असे सांगतात, की एक दिवस यदृच्छेने तुलसीदासाला कंबनच्या रामायणाचे श्रवण घडले व ते ऐकल्यावरच अवधी भाषेत रामचरित्र रचण्याची त्याला स्फूर्ती झाली. कंबननंतर १४ व्या शतकापर्यंत तमिळ भाषेत अनेक रामायणे निर्माण झाली. त्यामुळेच या पांचशे वर्षांच्या कालखंडाला कंबनयुग म्हटले गेले आहे. समकालीन तसेच उत्तरकालीन कवींनीहि कंबनला गौरविले आहे. पाहा—कंबरामायण. [ के. विश्वनाथन्; त. सा. सं. ]

**कंबम्** तमिळनाडमधले मदुराई जिल्ह्यातले एक क्षेत्र. या ठिकाणी शिव, विष्णू व सुब्रह्मण्य यांची मंदिरे आहेत, तशीच सतीची स्मारके म्हणूनही पाच लहान मदिरे आहेत. [ मदुरा गॅझे. ]

**कंब राजपूत** कामळी पाहा.

**कंबरामायण** कबन महाकविकृत रामायण. याचे कविदत्त नाव 'इरामावतारम्' असे आहे. उत्तरेत तुलसीदासाच्या रामायणाला जे स्थान आहे, तेच स्थान तमिळनाडमध्ये कंबरामायणाला आहे; पण या दोन रामायणांत एक मूलभूत फरक आहे तो असा—सरल आणि सुदर भाषेमुळे तुलसीरामायण उत्तर भारतातल्या जनतेचा दैनंदिन पाठ्यग्रंथ बनला आहे; पण त्याला काव्य म्हणण्यापेक्षा भक्तिशास्त्र किंवा नीतीशास्त्र म्हणणेच अधिक समर्पक ठरेल. कंबनचे रामायण हे एक रसपूर्ण महाकाव्य आहे. त्यात ठायी ठायी प्रतिभेची गगनभरारी दिसून येते. त्यात मानवी भावनांची अभिव्यक्ती असाधारण सामर्थ्याने केलेली आहे. वाल्मीकीचा राम हा पुरुषोत्तम असला तरी, तो एक मानव आहे. कंबनच्या रामायणात तो दैवी शक्तीचा अवतारी पुरुष बनला आहे. आपण रामायणरचनेची प्रेरणा वाल्मीकीकडूनच घेतली, असे कंबन सागतो —

**वांगरुम् पादनन्तुगम्। वकुत्तु वाल्मीकीयेन्बान्।**
**तीङ कविसेविकळार। त्तेवरुम् परुगच्चेय्दान्।**
**आंगवन् पुकषन्द। नाट्टैयन्बेनुम् नरवमान्दि।**
**मूंगैयान् पेसलुर् रनेन्न। यान् मोषियलुर्रेन्।**

अर्थ — वाल्मीकीने छंदोबद्ध रामकथा अशा पद्धतीने ऐकविली, की तिच्यावर देवही आसक्त झाले. त्याने ज्या कोसलभूमीचे वर्णन केले आहे, त्याचेच पुनश्च वर्णन करायला माझ्यासारखा एक मुका आता प्रवृत्त झाला आहे.

वाल्मीकीच्या मूळ कथेचे मर्म ध्यानी घेऊन त्याने आपली रचना केली असली, तरी आपल्या रचनेत देशकालाला उचित असे काही फरकही त्याने केले आहेत. कबन हा दक्षिण देशाच्या प्रतिभेचा सर्वश्रेष्ठ प्रतिनिधी मानला जातो. तो भारतीय संस्कृतीच्या एकतेचे महान दर्शन उत्कृष्टपणे घडवितो. कबरामा-

यणात हिंदू धर्माची परंपरा, दर्शन आणि संस्कृती यांचा त्रिवेणीसंगम आढळतो. कंबनने रामाला विष्णूचा अवतार मानले असले, तरी त्याला कुठल्याही संप्रदायाच्या चौकटीत बसविले नाही.

दुसऱ्या दृष्टीने पाहायचे, तर कंबरामायणात नावीन्याबरोबरच कवीची बंडखोरीही आहे. त्याने आपल्या ग्रंथात संस्कृतोद्भव छंदांचा आधार घेतला आहे. तोवर तमिळ भाषेत अशा प्रकारचा छांदस प्रयोग कोणी केला नव्हता. त्याने संस्कृत, तेलुगु व कन्नड या भाषांतूनही बरेच शब्द घेतले आहेत.

कंबन मिथिलेला सद्‌भावाचे आणि लंकेला अधर्माचे निवासस्थान मानतो. कोणत्याही देशाचे माहात्म्य तिथे धान्य किती पिकते किंवा भौतिक वैभव किती लखलखते यांवर नसून त्या देशात सच्छील आणि गुणवान माणसे किती जन्मतात, यावर अवलंबून असते, असे कंबन सांगतो.

कंबनने राजधर्मही चांगल्या प्रकारे विशद केला आहे. तो म्हणतो ––

प्रजेवर प्रेम केल्याने राजा मातृवत पूज्य होतो. जनहित केल्याने पावन तपस्वी बनतो. प्रजेला सद्‌गति देत असल्याने तो पुत्रवत ठरतो आणि जर तो कठोर किंवा निर्दय बनला, तर तो रोगाप्रमाणे धिक्कारालाही योग्य ठरतो.

कंबनच्या पूर्वीचे कवी राजा हा राष्ट्राचा प्राण समजत होते; पण कंबन म्हणतो, की राजा हा प्राण नसून प्राण धारण करणारा देह आहे. राष्ट्राचा प्राण म्हणजे प्रजा ! प्रजेला प्रेमाने संभाळले पाहिजे. राजनीतीतही प्रेमाचा समावेश व्हायला पाहिजे–

**यारोडुम् पकै कोळ् इलन्देर पिन्**
**पोरोडुङ्गुम् पुकषोडुङ्गादु**

अर्थ – कोणी कोणाचा द्वेषच करीनासा झाला, की युद्धे आपोआप थांबतील आणि यश तेवढे चिरंतन राहील.

नीतिमत्तेचे समर्थन करताना तो म्हणतो ––

**कुर्रम् इल्लै, ओर कुर्रम् इल्लामैयाल्,**
**शीर्रम् इल्लै, तम् शिन्दैयिल् शेव्वियाल्;**
**आर्र् नल्लर्म् अल्लदु इलामैयाल्,**
**एर्रम् अल्लदु इलितहवु इल्लैये.**

**अर्थ** – ज्या प्रदेशांत दुष्टपणा वावरत नाही, त्यावर मृत्यूची छाया कधी पडेल का ? पुण्यमय आत्मा क्रोधाचा झंजावात सुटला तरी आपली शांती कधी सोडील का ? पापमार्गापासून दूर असलेल्या राज्यातील लोकांचा अध:पात कधी तरी होईल का ? त्याना कधी मान खाली घालावी लागेल का ? (मुळीच नाही. )

अशा अनेक गुणविशेषांमुळे कंबनचे रामायण हा तमिळ शारदेचा कौस्तुभमणी ठरला आहे. ४००० पद्यपंक्तीचे हे महाकाव्य आहे. [ के. विश्वनाथन्; त. सा. सं; शीव्हज फ्रॉम् तमिळ म्यूज. ]

**कंबल** (१) लोकरीची शाल. पाणिनीच्या काळी भारतात विशेषत: भारताच्या वायव्य भागात निरनिराळ्या प्रकारची लोकरीची वस्त्रे व शाली तयार होत व तिथून मध्य देशात विक्रीसाठी येत. पाणिनीने प्रावार, पांडुकंबल व पण्यकंबल अशा तीन कंबलप्रकारांचा उल्लेख केला आहे. पण्यकंबलाची लांबी-रुंदी निश्चित ठरलेली असे. पांडुकंबलाने आच्छादलेल्या रथांना पाणिनीने पांडुकंबली असे म्हटले आहे. इंद्राचा हत्ती व त्याचे आसन यांवर आंथरण्यासाठी पांडुकंबलाचा उपयोग करीत व हे वस्त्र गधार देशात तयार होई, असे वेस्संतर जातकात म्हटले आहे. महावणिज जातकात उड्डियान कबलाचा उल्लेख आहे. आजही गधार प्रदेशात तिथल्या स्त्रिया अशा शाली विणतात. या शालीच्या किनारी भडक लाल रंगाच्या असतात. भारताच्या वायव्य भागात या स्वाती–कंबल या नावाने प्रसिद्ध आहेत ( पा. भा. ).

श्रीकृष्णाच्या वस्त्रप्रावरणात कांबळीला विशेष स्थान आहे. गायी चारताना त्याच्या खांद्यावर कांबळ असायचीच, असे वर्णन सूरदासाने अनेक ठिकाणी केले आहे. त्याच्या सवंगड्यांच्या खाद्यावरही कांबळ असे.

वल्लभ संप्रदायात कांबळ्याला ईश्वराच्या शक्तिस्वरूप मायेचे प्रतीक मानलेले आहे.

(२) पाताळातील नागांचा एक अधिपती. हा इष (आश्विन) महिन्याचा स्वामी आहे. हा सुतलाचा रहिवासी होता, असे ब्रह्मांड व वायुपुराण सांगते.

**कंबलदान** कंबल = कांबळे. विष्णूच्या प्रीतीसाठी याचे दान देतात. दानमंत्र असा––

**शीतवर्षाहर: पुण्यो दृष्टीबलविवर्धन: ।**
**कम्बलस्य प्रदानेन शान्तिरस्तु सदा मम ।।**

अर्थ –थंडी व पाऊस यांच्यापासून रक्षण करणाऱ्या पवित्र, तसेच दृष्टीचे बल वाढविणाऱ्या कांबळ्याच्या दानाने मला सदैव शान्ती लाभो.

अशाच प्रकारे चित्रकंबल म्हणजे पट्ट्यांचे कांबळे किंवा लोकरीची शाल यांचेही दान सांगितले आहे. [दा. चं. ]

**कंबलपा** चौऱ्यांयशी सिद्धांपैकी एक. ओडिसा प्रांतातल्या राजवंशात याचा जन्म झाला. तारुण्यातच भिक्षु बनून याने त्रिपिटकाचे अध्ययन केले. पुढे वज्रघंटापाद याचा याला सहवास घडला व याने त्याचे शिष्यत्व पत्करले. वज्रघटापाद ओडिसात काही वर्षे राहिला. त्याच्यामुळे तिथे वज्रयान पंथाचा पुष्कळ प्रचार झाला. कंबलपा पुढे बौद्धदर्शनाचा पंडित झाला. प्रज्ञापारमिता दर्शनावर भोटिया भाषेत याचे चार ग्रंथ उपलब्ध आहेत. याने अकरा तंत्रग्रंथही लिहिले आहेत. त्यांपैकी असमध दृष्टी, असंमधसर्ग दृष्टी, व कबलगीतिका हे ग्रंथ प्राचीन ओडिया किंवा मगही भाषेत आहेत. याला कमरिपा असेही म्हणत. [ पु. त. नि. ]



कंबलपा

**कंबलांबरपा** चौऱ्यांयशी सिद्धांपैकी एक. याच्या निवासस्थानाविषयी मतभेद असून कोणी त्याला ओडिसाचा तर कोणी उद्यानाचा रहिवासी मानतात. हा चक्रसंवरतंत्राचा अनुयायी असून तीर्थिक वैष्णवांशी त्याचा संबंध होता. मंत्रावती नावाच्या एका सिद्ध योगिनीशी त्याचे वैर उत्पन्न झाले आणि तिने याच्यावर मारणमंत्राचा प्रयोग केला. ते समजल्यावर याने कांबळ्याचे रूप घेतले. मंत्रावतीने त्या कांबळ्याचा एक एक धागा वेगळा केला व तिच्या मैत्रिणी असलेल्या योगिनींनी तो एक एक धागा खाऊन टाकला. पण तरीही हा पुनश्च जिवंत झाला. सिद्ध बनण्यापूर्वी हा एक राजपुत्र होता, असे सांगतात. याने इंद्रभूतीला दीक्षा दिली होती, परंतु हा इंद्रभूति कोणता, ते मात्र सागितलेले नाही. हा जालंधरपाचा गुरु होता, असेही सांगितले आहे. याच्या अकरा ग्रंथांचे अनुवाद उपलब्ध असून त्यांपैकी तीन अपभ्रंश भाषेत आहेत. [ सि. सा. ]

**कंबुज** कंबोडियाचे प्राचीन नाव. पाहा–भारत बृहत्तर.

**कंबोज** भारताच्या वायव्य दिशेस गंधार देशाच्या जवळचे हे एक जनपद होते. पाणिनीच्या काळी एकराजपद्धतीने या जनपदाचा कारभार चालत होता. गंधार, कपिश, बाल्हीक व कंबोज या चार मोठ्या जनपदांची एक चौकडी होती. कंबोजांच्या राजधानीचे नाव राजपूर असे होते. हे राजपूर म्हणजे सांप्रतचे राजौरी (जिल्हा-पूंछ-काश्मीर) होय, असे कनिंगहॅम म्हणतो (ए. जि. ऑ. इं.). या कंबोज जनपदातल्या लोकांना कांबोज म्हणत. यांचा महाभारतात अनेकदा उल्लेख आलेला आहे (सभा. २४. २२; ४५. १९–२०; ४७. ३–४).

अर्जुनाने आपल्या दिग्विजयात दरदाबरोबर कांबोजांचा पराजय केला होता. हे लोक भारतीय युद्धात कौरवांच्या बाजूने लढले होते. त्या युद्धाच्या वेळी त्याचा राजा सुदक्षिण नामक होता व त्याचाही वध अर्जुनानेच केला होता. शांतिपर्वात कांबोज लोक संकरोत्पन्न व चौर्यावर उपजीविका करणारे आहेत, असे म्हटले आहे. बौद्ध व जैन साहित्यातही कांबोज आढळतात. अशोकाने कंबोजात आपले धर्मप्रचारक पाठविले होते, असा उल्लेख त्याच्या एका शिलालेखात आहे. पंचविंश ब्राह्मणात मद्रगाराचा शिष्य म्हणून कांबोज औपमन्यव याचा निर्देश झाला आहे. त्यावरून कंबोजांचा मद्र किंवा उत्तरमद्र यांच्याशी संबंध असल्याचे दिसते. मद्र व कंबोज या दोन्ही मानवगणांत भारतीय व इराणी अशा उभय संस्कृतीचे मिश्रण असावे, असे वाटते. यास्काचे सांगणे आहे, की शव् हा धातु जाणे या अर्थी केवळ कंबोजातच प्रचलित आहे (निरुक्त २.१. ३–४). शवति हा इराणी भाषेचा शब्द असून संस्कृतात त्याचा प्रयोग होत नाही. यावरून ग्रियर्सनने असे अनुमान काढले आहे, की कंबोज ही भारताच्या वायव्य सीमेवर राहणारी एक अर्धसभ्य जमात असावी. मनूनेही काबोजाना दस्यू या नावानेच उल्लेखिले आहे (१० ४४–४५). कांबोजांची भाषा इराणीमिश्रित संस्कृत होती. डॉ. वासुदेवशरण अग्रवालाच्या मते कंबोज जनपद हिंदुकुश पर्वताच्या ईशान्येस होते. आधुनिक पामीर व बदख्शाँ या दोन्ही प्रदेशाचा प्राचीन काळी कंबोज जनपदात समावेश होता. कौटिल्याने कांबोजांना वार्ताशस्त्रोपजीवी (कृषि व शस्त्र या साधनांनी उपजीविका करणारे) असे म्हटले आहे. युआनच्वांगने याची गणना असभ्य जातीत केलेली असून त्यांना आर्यजनांच्या सांस्कृतिक परंपरेच्या बहिर्गत मानले आहे.

म. भा. च्या सभापर्वात कांबोजाचे नाव बर्बरांसह व उद्योगपर्वात शक-पुलिंद-यवनांसह आले आहे (सभा. ११. २४; उद्योग. १८६. ८०). कांबोज हे प्रथम क्षत्रिय होते; पण सगराने त्यांना पतित ठरवून यवनांप्रमाणे त्याचे शिर मुंडविले, असे

हरिवंशात म्हटले आहे (१३·७६३–६४; १४.७७५–८३). पाणिनीच्या गणपाठात यवनमुंड व कंबोजमुंड असे दोन शब्द आले आहेत (२. १. ७२). त्यावरून वाटते, की शक-यवनांप्रमाणे कंबोजातही शिरमुंडनाची प्रथा होती. कंबोज देशातले घोडे प्रसिद्ध होते राजसूयप्रसंगी कंबोजांनी युधिष्ठिराला घोड्यांचाच नजराणा दिला होता (म. भा. सभा. ४७·४). बौद्धांच्या जातकात व जैनांच्या उत्तराध्ययनसूत्रातही कंबोजातल्या घोड्यांचे वर्णन आले आहे. कालिदासही कंबोजातल्या (वनायुदेश्य) अश्वाची प्रशंसा करतो (रघु. ५).

इ. स. च्या ७० व्या शतकात काश्मीरच्या मुक्तापीड ललितादित्य या राजाने भोट्ट, दरद व कंबोज या देशांवर स्वारी केली होती, असे राजतरंगिणीवरून कळते (४). भोट्ट म्हणजे बाल्टिस्थान, दरद म्हणजे बलुचिस्तान आणि कंबोज म्हणजे बदख्शाँ व पामीर होय. पेतवत्थु या ग्रंथाच्या परमार्थदीपनी या टीकेत कंबोजाच्या नावाशी द्वारकेचा संबंध दाखविला आहे; पण ती द्वारका म्हणजे सौराष्ट्रातली द्वारका नसून बदख्शाँचा दरवाज नामक एक भाग होय.

इ. स. च्या १२ व्या शतकापर्यंत कंबोज देशाचे अस्तित्व स्वतंत्रपणे दिसते. त्यानंतर हळूहळू हे जनपद काश्मीर राज्यात विलीन झाले व त्याची पृथक सत्ता नष्ट झाली. ते नावही विस्मृत झाले. सांप्रत कंबोजी, कमोज व कामोजे या नावांच्या काही जमाती टोळ्या काफिरीस्तानच्याजवळ दिसतात. त्यांच्या नावातच आता प्राचीन कंबोजाची स्मृति अवशिष्ट राहिली आहे. [ पा. भा.; ना. प्र. प.; रा. ले. सं.; हिं. वि. को. ]

**कंस** (१) एक प्राचीन माप. दोन आढक = एक कस, असे त्याचे कोष्टक होते. अर्थशास्त्रातल्या कोष्टकाप्रमाणे १ कंस = ५ शेर व चरकाच्या कोष्टकाप्रमाणे ६⅔ शेर. [ पा. भा. ]

(२) श्रीकृष्णाचा मामा व शत्रु. **पाहा**—कृष्ण.

**कंसारा** एक जात. ही मुख्यत्वे गुजरात व सौराष्ट्र या प्रदेशांत आढळते. कांसे या शब्दावरून यांना हे नाव मिळाले आहे. हे आपली उत्पत्ती पुढीलप्रमाणे सांगतात—

पावागढ येथे पाच बंधू राहत होते. ते कालीचे भक्त होते. काशाचे टाळ वाजवून ते नित्य तिचे भजन करीत. त्यावर देवीने प्रसन्न होऊन त्यांना सांगितले, की 'तुम्ही धातूची भांडी बनवून उपजीविका करा'.

हल्लीचे कंसारा हे ह्या पाच बंधूंचे वंशज होत. यांच्यांत पोटभेदही आहेत. हे रामानंद व वल्लभ यांच्या संप्रदायांचे अनुयायी आहेत. काली ही कुलदेवता. आश्विन शु. ९ मी हा मुख्य सण. हे बहुतेक शाकाहारी असतात. [ मुं. इ. जा. ]

**क** व्यंजनांतील प्रथम वर्ण. कठ हे याचे उच्चारणस्थान होय लहान वय, साम्य वगैरे दर्शविण्यासाठी कधी कधी 'स्वार्थे क' हा प्रत्यय एखाद्या नामाला जोडतात. उदा० बाल—बालक.

क चे अनेक अर्थ आहेत—(१) ब्रह्मदेव (२) दक्ष प्रजापती (३) कश्यप (४) वायू (५) सूर्य (६) यम (७) विष्णू (८) कामदेव (९) अग्नी (१०) आत्मा (११) राजा (१२) गाठ (१३) मोर (१४) पक्ष्याचा राजा (१५) पक्षी (१६) मन (१७) शरीर (१८) वेळ (१९) मेघ (२०) शब्द, ध्वनी (२१) प्रकाश (२२) संपत्ती (२३) केस इत्यादि.

ककार हा सर्व वर्णांची मूलप्रकृती असून त्याचे तत्त्व पुढीलप्रमाणे आहे—

**वामरेखा भवेद् ब्रह्मा विष्णुर्दक्षिणरेखिका ।**
**अधोरेखा भवेद् रुद्रो मात्रा साक्षात् सरस्वती ।।**

(कामधेनुतंत्र)

अर्थ—ककाराची डावी रेखा ही ब्रह्मरूप, उजवी विष्णुरूप व अधोरेखा रुद्ररूप असून मात्रा ही साक्षात् सरस्वती आहे.

याशिवाय, ककार हा स्वतः 'प्रकृतिसुदरी' असून तो सर्वदेवांची माता आहे; त्याचप्रमाणे, पंचदैवत ककार हे त्रिपुरसुंदरीचे आसन आहे, असेही कामधेनुतत्रात सागितले आहे.

**अक्षरविकास**—क या अक्षराला सांप्रतचे स्वरूप प्राप्त होण्यापूर्वी पाच अवस्थातून जावे लागले आहे. पहिली अवस्था

क = + ǂ

कच्या रूपाचा विकासक्रम

अशोकाच्या गिरनार येथील शिलालेखात, दुसरी कुशाणकालीन मथुरा येथील लेखात व तिसरी इ. स. च्या दुसऱ्या शतकातील क्षत्रपवंशी रुद्रदामनच्या गिरनार येथील लेखात दिसून येते. चवथी अवस्था जपानातील एका मठात सापडलेल्या उष्णीपविजयधारिणीच्या एका ताडपत्री पुस्तकात (इ स. ६ वे शतक) पाहायला मिळते. यांत क च्या उजव्या बाजूला गाठ आहे. पुढे वळणाच्या बाबतीत थोडी थोडी प्रगती होऊन आजचा वळणदार क निर्माण झाला. हैहयवशी राजा जाजल्लदेव याच्या वेळचा एक लेख (इ. स. ११११४) व परमार राजा धारावर्ष

याच्या वेळचा ओरिआ येथील लेख (इ. स. १२०८) यात या प्रगतावस्थेतील क आढळतो. [श. क.; म. ज्ञा. को.]

**कइकोट्टीकळि** मलबारमधील स्त्रियांचे एक नृत्य. सुमारे बारा स्त्रिया या नृत्यात भाग घेतात. हातांनी टाळ्या वाजवून तोंडाने देवाची गाणी म्हणत त्या फेर धरून नाचतात. तिरुआतिरा व ओणम् या उत्सवात हे नृत्य विशेषेकरून केले जाते. [मलबार]

**ककुच्छंद** चालू कल्पातील चार बुद्धांपैकी दुसरा याचे जन्मस्थान काही ग्रंथांत क्षेमावती, तर काही ग्रंथात नाभिका असल्याचे सांगितले आहे. नाभिका नेपाळच्या तराईत असून ककुच्छंदाचे निर्वाणही तिथेच जवळपास झाले आहे. [म. च. को.]

**ककुत्था** उ. प्रदेशातून वाहणारी एक लहान नदी. ही गंडकी नदीला मिळते. बुद्ध राजगृहाहून कुशीनाराकडे जात असता त्याला ही नदी ओलांडावी लागली होती. [हि. जॉ. ए. इ.]

**काकुत्स्थ राजवंश** सूर्यवंशी पुरजय राजाचे नामान्तर. मनु – इक्ष्वाकु – शशाद – पुरजय – असा तो वंशवृक्ष आहे. या पुरंजयालाच ककुत्स्थ असे नाव मिळाले. कारण घडले ते असे–एकदा देवासुराचे युद्ध जुपले. त्यात देवांनी आपल्या बाजूने लढण्यासाठी पुरंजयाला बोलावणे केले. तो म्हणाला, की ‘इंद्र जर माझे वाहन होत असेल तर मी युद्धासाठी येईन.’ प्रसंग बाका असल्यामुळे इंद्राला ती अट मान्य करावी लागली. मग इंद्र बैल झाला. पुरंजय त्याच्या वशिंडावर (ककुद्) बसला व त्याने असुराचा सहार केला. म्हणून त्या दिवसापासून त्याचे नाव ककुत्स्थ (वशिवर आरोहण करणारा) असे पडले. याच्या वंशात पुढे दिलीप, रघु, अज, दशरथ, राम इ. पराक्रमी राजे झाले व ते काकुत्स्थ म्हणून प्रसिद्धी पावले. [हि. क. को.]

**ककुद्मान्** शाल्मलि द्वीपातील एक पर्वत. कैलासाच्या वायव्येस याचे स्थान आहे. यावर इंद्राने रत्नांचा पाऊस पाडला, असे पुराणात सांगितले आहे. [पु. इं.]

**ककुभ्** (१) एक वैदिक छंद. उष्णिक् छंदाचाच एक भेद.

(२) एक रागिणी. हिचे लक्षण पुढीलप्रमाणे–

**धैवतांशग्रहन्यासा संपूर्णा ककुभा मता।**
**त्रितयी मूर्च्छनोत्पन्ना शृङ्गाररसमण्डिता॥**

(सं द.)

अर्थ – ककुभ रागिणी संपूर्ण आहे. हिचे ग्रह, अंश व न्यास धैवत आहेत. मूर्च्छना तिसरी आहे. ही शृंगाररसाने शोभित होते.

हिचे मूर्तिध्यान पुढीलप्रमाणे–

**पीतं वसाना वसनं सुकेशी**
**वने रुदन्ती पिकनाददूना।**
**विलोकयन्ती ककुभोऽतिभीता**
**मूर्तिः प्रदिष्टा ककुभस्तथेयम्॥**

(सगीतदामोदर)

अर्थ – पीत वस्त्र परिधान करणारी, जिचे केस चांगले आहेत अशी, वनात रुदन करणारी, कोकिळाच्या शब्दाने दुःखित झालेली व भयभीत होऊन दिशाचे विलोकन करणारी अशी ककुभ रागिणीची मूर्ती असते.

ही रागिणी बिलावल रागाचा एक भेद आहे. हिचा वादी ऋषभ व संवादी पंचम आहे. या दोन स्वरांची संगती मनोहर वाटते. ही रागिणी अलैय्या बिलावल व झिंझोटी या दोन रागांच्या मिश्रणाने बनलेली असून बिलावल थाटातील आहे.

**कक्कलन** मलबारी शिप्यांची एक जात. यांच्यांत चार पोटजाती आहेत कावित्यान, मणिप्परायन, मेल्लुत्तन व चपट्टरायन अशी त्याची नावे आहेत. सामुद्रिक पाहणे हा यांचा मुख्य व्यवसाय आहे. हे अपभ्रष्ट तमिळ भाषा बोलतात उत्तर मलबारात यांना कुरवन असे म्हणतात. हे मृतांना पुरतात व लग्नसंबध आपापल्या पोटजातीतच करतात. [म. ज्ञा. को.]

**कचग्रहविक्षेप** प्राचीन युद्धविद्येतले एक यंत्र. या यंत्राने शत्रूचे केस पकडले जात व तो दूर फेकला जात असे, असे सांगितले आहे.

**कच-देवयानी पूजा** उत्तर प्रदेशातील एक काम्य विधी. तांदुळाच्या पिठात हळद मिसळून ते पीठ पातळ करून त्याच्या रेघोट्यानी भूमीवर कच व देवयानी याची चित्रे काढतात. मग त्याची पूजा करतात व त्यावर लगेच पाट ठेवतात. सूर्य हा देवयानीचा पिता असून त्याने कच-देवयानीचे मुखावलोकन करायचे नसते, असा संकेत आहे. म्हणून हा पाट ठेवतात. मग त्या पाटावर विवाहेच्छु

वराला किंवा वधूला बसवितात. असे केल्याने एका वर्षाच्या आन विवाहेच्छु कन्या-पुत्राचे लग्न होते अशी समजूत आहे. हा विधी द्वादशीच्या दिवशी करतात. [ संमेलनपत्रिका-लोक-संस्कृति अंक ]

**कचारी** एक वन्य जमात. बोडो आदिवासीतील हिडिंबियाल किंवा दिमच या नावाने ओळखल्या जाणाऱ्या लोकाना तेथील हिंदू लोक कचारी या नावाने ओळखतात. आसाम व भूतान याच्या सीमेवरच्या डोंगराळ प्रदेशात हे लोक राहतात. यांची वस्ती बहुधा टेकड्यांच्या पायथ्याशी असते. हे मूळ मंगोल वंशाचे असले, तरी यांचा हिंदूंच्या जाति-व्यवस्थेत प्रवेश झालेला आहे. आसामातल्या काही नद्या आणि प्राकृतिक विभाग यांची नावे कचारीमूलक आहेत. त्यावरून अनुमान होते, की कोणत्या तरी प्राचीन काळी कचारी टोळ्या सगळ्या आसाममध्ये पसरल्या असाव्या. प्राचीन काळी ब्रह्म-पूर, सोनपूर, दीमपूर वगैरे विभागांत यांची लहान लहान राज्ये निर्माण झाली होती. लक्ष्मीद्रपूर या शहरी त्याची मुख्य राजधानी होती. कचारीची प्राथमिक अवस्थेतील शिल्पकला व मूर्तिकला आजही भग्न अवशेषाच्या रूपात कुठे कुठे उप-लब्ध होते.

कचारी लोक नेपाळी लोकांसारखे दिसतात. ते ठेंगणे असले तरी सुदृढ असतात. ते साधेभोळे, आनंदी व सत्यवचनी अस-तात. त्याच्यांतले लैंगिक संबंधही संयमपूर्ण असतात. शेती हा त्यांचा मुख्य व्यवसाय असतो. सांप्रत पुष्कळसे कचारी लोक चहाच्या मळ्यात व कारखान्यात मजुरी करतानाही दिसतात. याना डुकराचे मास व सुकी मासळी आवडते. पुरुषांबरोबरच स्त्रियाही मच्छीमारी करतात. पुरुषांच्या सामुदायिक शिकारीत मात्र बायका भाग घेत नाहीत. हे ‘ जू ’ नावाची तांदुळाची दारू बनवितात. काही कालापूर्वी कचारी लोक दूध पिणेच नव्हे, तर त्याला स्पर्शही करणे निषिद्ध मानीत. कचारी स्त्रिया रेशमाचे किडे पाळतात व कापड विणतात.

कचारी जमातीत अनेक कुले आहेत. प्रत्येक कुलाचे एक एक देवक असते. जो पशू देवक म्हणून मानला असेल, त्याची हत्या करणे निषिद्ध असते. हे लोक आपल्या शेजारी राहणाऱ्या राभा, कोच व सरनिया या जमातीत विवाहसंबंध करतात; पण तो शिष्टसंमत मानला जात नाही. विधुर पुरुष आपल्या धाकट्या मेहुणीशी व विधवा स्त्री आपल्या धाकट्या दिराशी लग्न करू शकते. कचारी लोक सामान्यतः एकपत्नी अस-तात; पण त्यांच्यांतले धनिक व संततिहीन लोक अनेक बायका करतात. त्यांच्या जमातीची पंचायत असते. त्यांचे लग्न, संपत्ती इ. विषयांतले झगडे पंचायतीतले प्रमुख लोक मिटवितात.

कचारी लोक भुताखेतांवर विश्वास ठेवतात. पृथ्वी, वायू व आकाश यांच्या ठिकाणी दैवी शक्तीचे वास्तव्य असते, असे समजतात. त्यांच्यात निसर्गपूजा आणि पितृपूजा अल्पप्रमाणा-तच आढळते. त्यांच्या जमातीच्या कांही खास देवता आहेत. १९ गृहदेवता व ६५ ग्रामदेवता एवढी त्यांची संख्या आहे. त्याची स्थाने गावापासून थोड्या अंतरावर असतात. देउरी किंवा देवदाई हा या ग्रामदेवतांचा पुजारी असतो. जन्म, नाम-करण, विवाह इ. प्रसंगी ते देउरीच्यामार्फत ग्रामदेवतांची पूजा करतात. त्यांच्या वस्तीत एखादा भगतही असतो. तो मंत्र-तंत्रांच्या द्वारे रोगांवर इलाज करतो. देवदानी नावाच्या त्यांच्या-मध्ये काही स्त्रिया असतात. त्यांच्या ठिकाणी दैवी सामर्थ्य असते व त्या महामारी दूर करू शकतात, अशी समजूत आहे. सांप्रत हे लोक बहुतांशी हिंदू देवतांनाच भजतात. त्यांच्या खास देवताची संख्या आता हळूहळू घटत चालली आहे.

सर्वसामान्य लोक मृतांना जाळतात; पण धनिक लोकांत पुरण्याची प्रथा आहे. कचारी लोक मृत्यू म्हणजे आत्म्याचे केवळ शारीरिक परिवर्तन मानतात. मृत आत्मा कधीही नष्ट होत नाही, तो नव्या शरीरात पुनश्च प्रवेश करतो व चिरंतन राहतो, अशी त्यांची श्रद्धा असते. [ बॅ. आ. क.; इं. फो. लो.; हि. वि. को. ]

**कचेरा** काचेच्या बांगड्या बनविणाऱ्यांची एक जात. जबल-पूरच्या आसपास प्रामुख्याने यांची वस्ती आहे. आपल्या लग्नात पार्वतीच्या हातांत बांगड्या भरण्यासाठी महा-देवाने एका यज्ञवेदीतून एक पुरुष निर्माण केला, तोच आपला मूळ पुरुष होय, असे हे लोक मानतात. महादेवाने एका क्षत्रि-याला बांगड्या तयार करण्यास सागितले व पुढे त्याने तोच धंदा चालू ठेवला, अशी दुसरी कथा आहे.

आर्या, गडरिया, सुनार, नौवा, ठकुरेल, कच्छवाह, चौहान, कुरिया इ. याची बरीच नावे इतर जातीपासून घेतलेली आहेत. यावरून यांच्या जातीत बरेच मिश्रण झालेले आहे, असे वाटते. रसेलचा तर्क असा, की ज्या वेळी मुसलमानांच्या हातच्या बांगड्या घालायच्या नाहीत, अशी समजूत रूढ झाली, तेव्हा बऱ्याच हिंदू जातीनी हा धंदा सुरू केला असेल व नतर त्यांची सर्वांची मिळून एकच जात बनली असेल.

यांच्यांतील निरनिराळ्या वर्गास बैंक असे नाव असून एकाच बैंकात विवाह होत नाहीत. तसेच आते, मामे व मावस भावंडांचीही लग्ने होत नाहीत. जातीत मुलीचे प्रमाण थोडे असल्याने या लोकांत लहानपणीच मुलीची लग्ने होतात. कन्या-

शुल्क बरेच घेतात. एका खांबाला वधू-वरांनी प्रदक्षिणा घातल्या म्हणजे लग्नविधी पुरा होतो. त्यानंतर एका पाटचावर वरवंटा ठेवतात आणि वधू-वर आपल्या पायाने तो परस्पराकडे लोटण्याचा प्रयत्न करतात. अशा रीतीने ती एकमेकांच्या शक्तीची परीक्षा घेतात. विवाह सुखकर होईल किंवा नाही हे ठरविण्याची यांची एक पद्धत आहे. लग्न झाल्यानंतर कानात घालायची ढाल (कर्णफूल) भिंतीवर चिकटवितात व त्यावर दूध ओततात. ती खाली पडली तर विवाह सुखकर होईल, असे मानतात. रसेलच्या मते हा विधी पुत्रजन्माचा सूचक आहे.

स्त्रियांच्या कमतरतेमुळे विधवेला दिराबरोबरच विवाह करावा लागतो. स्वजातीयांबरोबर स्त्रियांनी व्याभिचार केला, तर त्याकडे दुर्लक्ष करतात, पण परजातीयांबरोबर केल्यास त्यांच्यावर बहिष्कार घालतात.

जातीची पचायत असून तिच्या मुख्याला मालिक किंवा दिवाण म्हणतात. हे देवीचे उपासक असून आश्विन व चैत्र शु. १ दे ला भांडचात धान्य पेरून जव्हारे करतात. कोणी कोणी नऊ दिवस एकाच जागी बसून आपल्या अंगावर हे धान्य उगवितात.

हे उ. भारतातून बांगडचांना लागणारी कच्ची काच आणतात. बागडचा विकण्याचे काम बहुधा स्त्रियाच करतात. नेहमी भट्टीजवळ राहावे लागत असल्याने या लोकाचे डोळे अधू असतात. [ म. ज्ञा. को. ]

**कचेश्वर** एक मराठी कवी. चाकण येथे ब्रह्मे नामक वैदिक ब्राह्मणाच्या घरात याचा जन्म झाला. हा काश्यपगोत्री ऋग्वेदी व देशस्थ होता. एकदा त्याच्यावर कोणीतरी विषप्रयोग केला व त्याला धापेची व्यथा जडली. तेव्हा याला तुकारामाच्या अभगाचे भजन करण्याविषयी कोणीतरी सागितले. देहूला तुकारामाचा टाळकरी अंबाजी याच्याकडे अभंगांच्या वह्या होत्या. म्हणून हा देहूला गेला. तिथे याला तुकारामाचे दर्शन घडले व तेव्हापासून त्याला तुकोबाचा ध्यास लागला असे सागतात. पुढे तुकोबाने स्वप्नात येऊन त्याच्यावर अनुग्रह केला आणि तेव्हापासून हा कथा-कीर्तने करू लागला. त्याची धापेची व्यथाही नाहीशी झाली. भक्तिमार्गात रंगल्यामुळे लोक याला वेडा म्हणू लागले. बापानेही त्याला घराबाहेर काढले. मग तो चाकणजवळील रानात झोपडी बांधून राहिला.

शाहू महाराजानी याला गुरुस्थानी मानले होते, म्हणून याला पुढे राजगुरु असे उपनाव मिळाले. बाळाजी विश्वनाथही कचेश्वराला फार मानीत असे. शाहू महाराजांनी याला पुष्कळ द्रव्य देऊ केले; पण याने ते स्वीकारले नाही. तेव्हा त्यांनी त्याच्या शिष्याच्या नावे सहा गावे इनाम दिली व शिष्याने ती पुढे कचेश्वराच्या मुलांच्या नावे करून दिली. इ. स. १६८५ मध्ये याने पाऊस पाडून दाखविला, म्हणून त्याला व त्याच्या वंशजांना चाकण परगण्यातील प्रत्येक गावातून एक टका व एक मण धान्य मिळत असे. इ. स. १७३१ मध्ये उंब्रज येथे फाल्गुन शु. २ ये ला याने देह ठेवला. माहुली येथे याची समाधी आहे. यान स्थापलेल्या पांडुरंगाच्या मूर्ती खेड व चाडोली या ठिकाणी आहेत.

कचेश्वराने बहुविध पद्यरचना केली असून ती त्याच्या परंपरेतील लोकाकडे आहे. त्याची सुदामचरित्र व गजेंद्रमोक्ष ही दोन आख्याने छापलेली आहेत. या आख्यानाची रचना श्लोकबद्ध असून त्यात चामर, सवाई वगैरे वृत्तें आहेत. याची शब्दयोजना साधी व दृष्टान्त नेहमीच्या व्यवहारातले असल्यामुळे याची कविता बायकांच्या तोंडी बसली. याने आत्मचरित्रही लिहिले आहे. [ म. ज्ञा. को; भ. क. ]

**कच्चान** कात्यायन पाहा.

**कच्चेरि** कर्नाटक-सगीताच्या मैफलीचे नाव. कच्चेरि हा कचहरी या उर्दू शब्दाचा अपभ्रंश आहे. कच्चेरीत एकजण (गायक किवा वादक) मुख्य असतो. त्याला व्हायोलिन, मृदगम्, घटम्, झाज, ढोलक इ. वाद्यांची साथ असते. कच्चेरीचे पुढील पाच धर्म मानले आहेत —

(१) **गायक-वादकधर्म** – संगीताचे वेगवेगळे कायदे, त्याचे उपयोग, सभ्यता, साथीच्या गायक-वादकांच्या नैतिक वर्तनाची जबाबदारी या गोष्टी गायक–वादकधर्मात येतात.

(२) **सभापतिधर्म** – मैफलीला प्रतिष्ठित व कलामर्मज्ञ असे दोन सभापती नेमले जातात. त्यांतला एक लक्षण–लक्ष्य विद्वान म्हणजे शास्त्र आणि अभिव्यक्ती याचे उत्तम ज्ञान असणारा व वाद्यांचीही माहिती असणारा असतो; तर दुसरा रसिक म्हणजे मर्म जाणून रसग्रहण करणारा असतो. सभापती हा अधूनमधून कार्यक्रमाचे थोडक्या शब्दांत मार्मिक दिग्दर्शन करतो.

(३) **सभाजनधर्म** – सभेला जमणारे श्रोते यांचेही काही धर्म असतात. शात चित्ताने बसून पाहणे व ऐकणे, गायन चालू असता आपसात न बोलणे, तबोरा वगैरे वाद्ये जुळविली जात असता आवाज न करणे, कार्यक्रम चालू असता आत न येणे किवा बाहेर न जाणे इ. धर्म सभाजनांनी कटाक्षाने पाळायचे असतात.

(४) **यजमानधर्म** – पुष्कळदा एखादा यजमान मंगलप्रसं-

गाच्या निमित्ताने स्वत:च्या घरी संगीताची कच्चेरि घडवून आणतो व त्यासाठी गायक-वादकांना निमंत्रण देतो. यजमानाने गायक–वादकाची राहण्या–भोजनाची उत्तम सोय करणे, योग्य वेळी त्याना कार्यक्रमाच्या जागी आणणे, मैफल संपल्यावर योग्य बिदागी देऊन त्यांची परतीच्या प्रवासाचीही व्यवस्थित सोय करणे इ. गोष्टी यजमानधर्मात येतात.

(५) **कार्यदर्शीधर्म** – कार्यदर्शी म्हणजे कच्चेरीच्या संपूर्ण कार्यक्रमाचा कार्यवाह होय. मैफलीत कोणता कलावंत कोणता कलाप्रकार दाखविणार आहे, ते प्रथम निश्चित करणे व त्याची रूपरेषा शक्यतो छापील पत्रकाच्या द्वारे श्रोत्यांच्या हाती देणे, ही गोष्ट कार्यदर्शीधर्मात मुख्यत्वे येते. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**कच्छ** भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरचा एक प्रदेश. उत्तरेस व पूर्वेस मोठे रण, दक्षिणेस कच्छचे आखात व पश्चिमेस सिंधु सागर (अरबी समुद्र) अशा याच्या चतु:सीमा आहेत. याची पूर्व-पश्चिम लांबी १६० मैल व दक्षिणोत्तर रुंदी ३५ ते ७० मैल आहे. हा प्रदेश भारताच्या मुख्य भूमीपासून सुटा असून एखाद्या बेटासारखा आहे. याला जोडून उत्तरेस पाकिस्तानची सरहद्द लागते.




हा प्रदेश रूक्ष, रेताड व खडकाळ असला, तरी त्यात डोंगरांच्या रांगा, नद्यांची खोल पात्रे, लागवडीस आणलेली डोंगरखोरी व गुरचराईची कुरणे यामुळे त्याला वैविध्य प्राप्त झाले आहे.

कच्छच्या सर्व डोंगरांत धिनोधर पर्वत सर्वोच्च आहे. त्याचे शिखर सुमारे १००० फूट उंच आहे. पूर्वी या पर्वतात ज्वालामुखी धुमसत असे. कच्छमधील कोणत्याही नदीला वर्षभर पाणी असत नाही. या प्रदेशात धरणीकंप पुष्कळच होतात. १८१९, १८४४, १८४५, १८६४, व १९५६ या सालात कच्छमध्ये भूकंपाचे प्रचंड धक्के बसले. शेवटच्या भूकंपात अंजार हे गाव सबंधच्या सबंध भूमीत गडप झाले. आजमितीस त्याच ठिकाणी नया अंजार या शहराची आधुनिक पद्धतीवर उभारणी झाली आहे.

हा प्रदेश नापीक असून आर्थिक दृष्टचाही मागसलेला आहे. पावसाच्या अनियमितपणामुळे भूमी नापीक व उद्योगधंद्यांचा अभाव यांमुळे या प्रदेशातल्या पुष्कळ लोकांनी स्थलांतर केले. पुष्कळसे कच्छी लोक व्यापारधंद्यानिमित्त मुंबईत व गुजरातेत स्थायिक झाले. कच्छचा समुद्रकिनारा बराच मोठा आहे. तिथे काडला या गावी मोठे बंदर बांधले गेले आहे. या बंदरामुळे यापुढे कच्छचा व्यापार पुष्कळ वाढेल व उद्योग धद्याना अनुकूल अशी परिस्थिती प्राप्त होईल. काडला बंदराजवळ आता कित्येक तेल-कंपन्यानी आपली केंद्रे स्थापन केली आहेत. या प्रदेशात मीठ भरपूर पिकते. मच्छीमारीच्या उद्योगालाही इथे बराच वाव आहे. कच्छमध्ये लिग्नाईट, कच्चे लोखंड इ. खनिजे बऱ्याच प्रमाणात सापडतात. कच्छचे पशुधन फार मोठे आहे. गाई, म्हशी, शेळ्या, मेंढ्या व उंट या सर्वांची मिळून ९ लाख संख्या असावी, असा सरकारी अंदाज आहे. ज्वारी, बाजरी, गहू, मूग, शेंगदाणे व कापूस ही पिके या प्रदेशात थोड्याफार

प्रमाणात होतात. तांदूळ मात्र बाहेरून आणावा लागतो.

कच्छी लोक धाडसी दर्यावर्दी आहेत. हे लोक चांदीच्या भांड्यावर नक्षीकाम करण्याबद्दल प्रसिद्ध आहेत. कच्छी भाषा ही गुजरातीची एक बोली आहे. थोड्या प्रमाणात इथे फारसीही बोलली जाते. कच्छचा प्रदेश आता उत्तर भारत, राजस्थान आणि गुजरात या प्रदेशांशी रेल्वेमार्गाने जोडला गेला आहे.

फार प्राचीन कालापासून कच्छ हा एक जनपद म्हणून प्रसिद्ध आहे. पाणिनीला या प्रदेशाची माहिती होती (अष्टा. ४. २. १३३). त्याने त्या जनपदातील लोकांना काच्छक असे म्हटले असून त्याची तीन वैशिष्ट्ये सांगितली आहेत. ती अशी— (१) काच्छकं हसितम् (कच्छी लोकाच्या हसण्याचा ढंग). (२) काच्छकं जल्पितम (कच्छी लोकांच्या बोलण्याचा ढंग) व (३) काच्छिका चूडा (कच्छी लोकाची शेंडी ठेवण्याची पद्धती.) कच्छमधील लोहाणा क्षत्रिय आजही डोक्याचा पुढचा अर्धा भाग मुंडित करून बाकी सगळ्या भागाची शेंडी राखतात.

'अग्नी' उत्तरपद असलेली काडाग्नी व विभुजाग्नी अशी दोन नावे काशिका या ग्रंथात आली आहेत. विभुजाग्नी हे सांप्रतचे कच्छमधील प्रसिद्ध भुज शहर व कांडाग्नी म्हणजे कांडला बंदराच्या ईशान्येचे सदा तप्त रेगिस्तान होय.

ग्रीक ग्रंथातही कच्छचा उल्लेख आहे. सिकंदरला कच्छच्या रणाची माहिती होती. इ. स. च्या दुसऱ्या शतकात कच्छचा समावेश मेदनेरच्या राज्यात झाला व नंतर लौकरच ते शकांच्या ताब्यात गेले. इ. स. ३९० पर्यंत सौराष्ट्रातील क्षत्रप राजे कच्छवर राज्य करीत होते. त्यानंतर हा प्रदेश गुप्त साम्राज्यात समाविष्ट झाला. पुढे काही काल याच्यावर वल्लभीच्या राजांनी स्वामित्व केले. सातव्या शतकात हा प्रदेश सिंधमध्ये सामील झाला. त्यानंतर चारण, काठी व चावडा या लोकांनी त्यावर स्वाऱ्या केल्या. नवव्या शतकात अरब लोक या प्रदेशाच्या किनाऱ्यावर येऊन राहिले.

१४ व्या शतकापासून कच्छच्या अर्वाचीन इतिहासाला प्रारंभ होतो. सिंधचे सत्ताधीश सुम्र लोक यांच्या जुलमाला कंटाळून सिंधमधील सम्मा राजपूत कच्छमध्ये आश्रयार्थ आले. तिथल्या चावडा राजपुतांनी त्यांना राहायला जागा दिली; पण या सम्मानी आपल्या आश्रयदात्यांचेच राज्य बळकाविले. त्या वंशात जोजाड नावाचा एक राजा झाला. त्याच्या नावावरून हे लोक आपल्याला जाडेजा म्हणू लागले. त्याचा अर्थ जाडचे पुत्र असा होतो. त्याचा धर्म हिंदू व मुसलमान याच्या धर्माच्या मिश्रणाने बनलेला होता. आपल्या मूळ जातीपासून अशा प्रकारे वेगळे झाल्यामुळे पुढे त्यांच्या मुलीना योग्य पती मिळेनासे झाले. त्यामुळे त्यांच्यांत मुलीना जन्मतःच मारून टाकण्याची चाल पडली व बराच काल ती चालू राहिली असे सांगतात.

इ. स. १४५० पर्यंत जाडेजांच्या तीन शाखा कच्छवर राज्य करीत होत्या. १४५० साली जाम हमीराचा मुलगा खेंगार याने अहमदाबादच्या सुलतानाच्या साहाय्याने सर्व कच्छ देश आपल्या ताब्यात आणला. खेंगारचा चुलता जाम रावळ हा काठेवाडात पळून आला व तिथे त्याने नवानगरचे राजघराणे स्थापन केले. खेंगारच्या मुलाने सुलतानापासून फुटून पूर्ण स्वतंत्र होण्याचा प्रयत्न केला; पण त्यात त्याचा पराभव होऊन त्याला मोगलांची सत्ता कबूल करावी लागली. सहा



कोटेश्वरमंदिर



त्रीकमरायजीचे मंदिर

पिढ्यांपर्यंत खेगारच्या घराण्यात राज्याचा अधिकार चालला. १७१८ साली गुजरातच्या सुभेदाराने कच्छवर पुष्कळ स्वाऱ्या केल्या; पण त्याचे काही साधले नाही. १७६२ च्या सुमारास कच्छमध्ये बंड उद्भवले व राज्यात अंदाधुंदी माजली. अखेर १८१५ साली त्या राजघराण्याला इंग्रजांशी तह करून देशात शांतता स्थापावी लागली. १८१८ साली कच्छ इंग्रजांच्या ताब्यात आला. इंग्रजांनी एका अज्ञान मुलाला राजा म्हणून कच्छच्या गादीवर बसविले व तिथे आपला रेसिडेंट नेमला. [ म. ज्ञा. को.; वि. मु. रा. प.; पा. भा. ]

**कच्छप** (१) विष्णूचा एक अवतार. **पाहा**–कूर्म अवतार. (२) कुबेराच्या नवनिधीतला पाचवा [हि. क. को.]

**कच्छपघात** एक राजवंश. हे घराणे कछवाहा राजपुताचे पूर्वज घराणे मानले जाते. मात्र त्याला ऐतिहासिक आधार सापडत नाही. या घराण्याच्या तीन शाखा होत्या व त्यांची राज्ये ग्वाल्हेर, दुबकुंड व नरवर या ठिकाणी होती.

ग्वाल्हेर शाखेचा पहिला ज्ञात पुरुष लक्ष्मण हा होय. इ. स. १० व्या शतकाच्या उत्तरार्धात ग्वाल्हेर हे चंदेलराजा धंग याच्या आधिपत्याखाली होते. इ. स. ९७७ च्या सुमारास लक्ष्मणाचा पुत्र वज्रदामन् याने ते जिंकून घेतले व ग्वाल्हेरचे स्वतंत्र राज्य स्थापले. त्याच्यानंतर मंगलराज, कीर्तिराज, असे काही पुरुष त्या गादीवर बसले. भोज परमार याने ग्वाल्हेरवर स्वारी केली असता कीर्तिराजाने ती परतविली; पण इ. स. १०२१ मध्ये गजनीच्या महंमुदाने स्वारी केली तेव्हा मात्र कीर्तिराजाला शरणागती पत्करावी लागली. त्यानंतर मूलदेव, पद्मपाल, इ. काही राजे राज्य करून गेले. पुढे इ. स. ११९६ मध्ये ग्वाल्हेर मुसलमानांच्या ताब्यात गेले.



कछवाहा राजपूत

दुबकुंड व नरवर येथील या घराण्याच्या शाखांचा इतिहास फारसा उपलब्ध नाही.

कछवाहा राजपूत हे कच्छपघाताचे वंशज असे समजले जाते. हे लोक राजस्थानात असून त्यांच्याही अनेक शाखा आहेत. शेखावत, राजावत व नरुका या त्यांपैकी प्रमुख होत. कछवाहा हे मुख्यत्वे वैष्णव आहेत. शेखावत शाखेचे लोक मुले सहा वर्षांची होईपर्यंत त्यांना निळ्या रंगाचे कपडे घालतात. कछवाहा जातीत स्त्रियांची संख्या पुरुषांपेक्षा जास्त आहे. [ स्ट्र. एं.; बी. सी. लॉ को. व्हॉ. ]

**कच्छपी वीणा** सतारीसारखे एक वाद्य. याचा भोपळा चपटा असतो. क्वचित तो लाकडाचाही करतात. हिला तराफ्याच्या तारा असतात. ही वीणा नखी किंवा नख याने वाजवितात. हिच्यावर रागदारीच्या व लयकारीच्या गती वाजविता येतात. हिच्या दांड्याच्या अग्रभागी सामान्यतः सिंहमुख असते. या वाद्याला सरस्वती-वीणा किंवा कछवा असेही म्हणतात.

**कच्छपेश्वर** एक मूर्ती. कच्छप म्हणजे कूर्मावतारी विष्णू; पण एका शिल्पात तो शिवलिंगाला अभिषेक करीत असल्याचे दाखविले आहे. वैष्णवापेक्षा आपला संप्रदाय श्रेष्ठ आहे अशा भावनेचे हे एक शैव निदर्शन आहे. [डे. हि. इ.]

**कच्छ-मच्छ** स्त्रियांचे व्रत. चातुर्मासात पहिले दोन महिने दूध व पुढचे दोन महिने दही न खाणे, अशा प्रकारचे हे व्रत आहे. कच्छ-मच्छ ( मत्स्य-कूर्म ) हे दोन अवतार जोडीने उच्चारले जातात, त्याचप्रमाणे दही-दूध हाही जोडशब्द आहे. [ म. श. को. ]

**कच्छीघोडी नृत्य** राजस्थानातील एक नृत्यप्रकार. कच्छीघोडी म्हणजे कमरेपर्यंतची घोडी. ही घोडी बनविणे म्हणजे एक कला आहे. बांबूच्या पट्ट्या आणि कागद या वस्तूंनी ती तयार करतात. नाचणारा माणूस ते अवजार आपल्या कमरेभोवती बांधतो. घोडीच्या दोही अंगी पायघोळ वस्त्र शिवलेले असते. त्यामुळे घोडी कमरेला बांधणारा माणूस घोड्यावर स्वार झाल्यासारखा दिसतो. असे अनेक घोडेस्वार खांद्यावर तलवार धरून एकत्र येतात व झांज व ढोल यांच्या साथीवर नाचतात. मुख्यत्वे लग्नप्रसंगी नवरदेवाच्या मिरवणुकीपुढे हे नृत्य करतात. हे एकप्रकारचे युद्धनृत्य आहे. या घोडेस्वारांच्या सामन्याला काही पदाती

वीर असतात. त्याच्या हातात तलवार असते. पदाती घोडेस्वारावर तलवारीचे वार करतो व घोडेस्वार ते चुकवितो.



कच्छीघोडी नृत्य

तसेच घोडेस्वाराने केलेले वार पदाती आपल्या ढालीवर झेलतो. या नृत्यातली वेषभूषा मोगली ढंगाची असते. पोषाखाचे रंग भडक असतात.

जुन्या काळी हे नृत्य करणारे नर्तक गुप्तहेरांचे काम करीत. ते शत्रूच्या गोटात शिरून व शत्रुपक्षाचे मनरंजन करून तिकडची गुप्त बातमी काढीत. हे नृत्य राजस्थानाप्रमाणेच महाराष्ट्रातहि दिसून येते. [ लोककला त्रैमासिक; भा. लो. नृ. ]

**कच्छीमेमण** मुसलमानातील एक वर्ग. यांची वस्ती मुंबई, गुजरात व सौराष्ट्र या प्रदेशांत विशेष आहे. हे लोक पूर्वी सिंधमधील लुहाणा जातीचे हिंदू होते. बगदादचा साधू मौलाना अब्दुल कादर जिलानी याला भारतात आपला धर्म प्रस्थापित करण्याची फार इच्छा होती. पण त्याला ते जमले नाही. पुढे त्याचा सहावा वंशज सैय्यद युसुफुद्दीन कोरदिरी याला सिंधमधील हिंदूंना मुसलमान करण्याविषयी इ. स. १४२१ मध्ये दृष्टान्त झाला व त्याप्रमाणे तो सिंधमध्ये आल्यावर तिथल्या राजाने त्याचे स्वागत करून प्रथम स्वतः इस्लाम धर्म स्वीकारला. मणिकजी नावाच्या लुहाणा जातीच्या पुढाऱ्यानेही इस्लामी दीक्षा घेतली. तेव्हा कोरदिरीने त्यांना मुआमीन ( = श्रद्धावान ) हे नाव दिले. सोळाव्या शतकात हे लोक कच्छ प्रातात आले व तेव्हापासून ते कच्छीमेमण या नावाने ओळखले जाऊ लागले.

कच्छीमेमण वर्णाने गोरे असून त्यांचा बाधा बळकट असतो. त्यांच्या बायका लहानपणापासून हात, पाय व नखे मेंदीने रंगवितात. स्त्रिया व पुरुष दोघेही डोळ्यांत सुरमा घालतात. वयातीत स्त्री–पुरुष आपल्या पाढऱ्या केसांना मेंदी व नीळ लावतात.



मेमणात हलाई मेमण असा दुसरा एक पोटभेद आहे. कच्छी व हलाई यांच्यांत विवाहसंबंध होत नाही. यांच्यांत हुंड्याची पद्धत होती. हे विवाह निका पद्धतीने करतात. व्यभिचाराबद्दल स्त्रीला किंवा पुरुषाला घटस्फोट घेता येतो. हे दारू पीत नाहीत. पुष्कळसे लोक गोमांसही खात नाहीत. त्यांचा पोषाख काठेवाडी पद्धतीचा असतो. पुरुष डोक्याचे मुंडन करतात व दाढी ठेवतात. हे अनाफि पंथाचे सुन्नी असून बहुतेक लोक मक्केची यात्रा करतात. [ म. ज्ञा. को.; वि. मुं. रा. प. ]

**कछवाहा** राजस्थानातील एक जात. रामपुत्र कुश याच्यापासून हे आपली उत्पत्ती सांगतात. **पाहा** — कच्छपघात.

**कजंगल** अनेक टेकड्यांचा हा विस्तृत प्रदेश अंग देशाच्या पूर्वेस आणि गगेच्या ईशान्येस सुवर्णरेखेपर्यंत पसरलेला आहे. गौतमबुद्ध एकदा कजंगलातील मुखेलुवन येथे राहिला होता. त्या वेळी त्याने इंद्रियभावनासुत्त स्वमुखाने सांगितले, असे सांगतात. बुद्धाच्या काळात इथे अन्न–धान्य सहज प्राप्त होत असे. [ हि. जॉ. ए. इं. ]

**कजरी** उ. भारतात श्रावण महिन्यात जी लोकगीते गातात, त्यांना कजरी किंवा कजली असे म्हणतात. श्रावण महिन्यात आकाशात काजळाप्रमाणे काळे ढग जमतात, त्यावरून या गीतांना कजरी असे नांव मिळाले, अशी या शब्दाची एक व्युत्पत्ती सांगतात. भारतेंदूच्या मतानुसार मध्यभारताचा एक परोपकारी राजा दादूराय हा मृत्यू पावल्यावर तिथल्या स्त्रियांनी आपला शोक प्रगट करण्यासाठी कजरी नामक एका नवीन गीतप्रकाराचा आश्रय केला. श्रावणातील तृतीयेला कजरी तृतीया असे नाव आहे. त्यावरूनही कदाचित या गीतांना कजरी हे नाव मिळाले असावे.

कजरी गीतांची रचना सर्वप्रथम कोणी केली ते सांगणे कठिण आहे. परंतु सुमारे शंभर-दीडशे वर्षांपूर्वी भोजपुरी संतकवीच्या आणि विशेषतः लक्ष्मीसखीच्या रचनेत कजरी गीते आढळतात. मिर्जापूरची कजरी फार प्रसिद्ध आहे.

**लीला राम नगर की भारी**
**कजली मिर्जापुर सरनाम ।**

अशी त्या भागात एक म्हणच आहे. मिर्जापूरला कजरी गाण्याचे मोठे फड रंगतात आणि त्यात पुरुषांबरोबर स्त्रियाही

भाग घेतात. काही वेळेला गवयांच्या दोन फडात कजरी गीतांचे सवाल-जबाबही होतात.

कजरी गीतात शृंगार रस प्रमुख असतो. संभोग व विप्रलंभ अशा उभयविध शृंगारांचे वर्णन त्यात सुंदर रीतीने केलेले असते. कजरीचा एक नमुना पुढीलप्रमाणे--

**कइसे खेले जइबू सावनमें कजरिया,**
**बदरिया धिरि आइल ननदी ।**
**तू त चललू अकेली, साथे संगी**
**न सहेली, गुंडा घेरि ।**
**लींहे तोहरी डगरिया,**
**बदरिया धिरि आइल ननदी ।**

[ हिं. सा. को. ]

## कजरी तृतीया

भाद्रपद वद्य ३ येस उत्तर प्रदेशातल्या स्त्रिया कजरीची पूजा करतात. या दिवशी गहू, चणे व तांदूळ याच्या पिठात तूप, साखर वगैरे घालून त्याचे गोड पदार्थ बनवितात. म्हणून या व्रताला हे लोक सातुडी (सत्तू=पीठ) तीज किंवा सतवा तीज असे म्हणतात. या व्रताची कथा अशी --

एकदा देवसभेत महादेवाने विष्णूसमोर महाकाली देवी काजळाप्रमाणे काळी आहे, असा तिच्या काळ्या वर्णाचा उल्लेख केला. तेव्हा ती रागावली. तिने आपला श्यामवर्ण हिरव्या धान्यांत टाकून दिला. मग आपले शरीर दग्ध करून हिमालयाच्या पोटी जन्म घेतला. हीच पुढे त्या जन्मातही शिवाची पत्नी झाली. त्या वेळेपासून भाद्रपद वद्य ३ येस हिरव्या धान्य-रोपात असलेल्या हरिकाली देवीची पूजा, जागरण व जलाशयात तिचे विसर्जन करण्याची प्रथा पडली. पापमुक्ती, सुख, सौभाग्य व अपत्यप्राप्ती हे या व्रताचे फल आहे.

उ. प्रदेशात या व्रताचा बराच प्रचार आहे. विशेषतः काशी व मिर्जापूर या भागात याला विशेष महत्त्व आहे. या दिवशी इथल्या स्त्रिया झाडाला झूले टांगतात व त्यांवर झोके घेत कजरीची गीते गातात. [ व्र. चं. ]

## कजरी नवमी

एक व्रत. श्रावण शु. ९ मीस कजरी नवमी म्हणतात. पुत्रवती स्त्रिया हे व्रत करतात. त्या बाहेरून माती आणतात व ती खापरात भरून भिंतीच्या मुळात ठेवतात. भिंतीवर हळदीने भगवतीची प्रतिमा रेखतात. तिच्या शेजारी घर, मुलासहित पाळणा, मुंगूस व मुलाची आई, अशा आणखी आकृत्या काढतात. या चित्रांकनालाच नवमी म्हणतात. मग नवमीची पूजा करून कजरी नावाचे एक धान्य खालच्या मातीत पेरतात. मग कहाणी ऐकतात. नवमी-पासून पौर्णिमेपर्यंत सात दिवस सायंकाळी धूपारती करतात. या सात दिवसात कजरी उगवते आणि तिचे अंकुर वाढतात. कजरीची कथा पुढीलप्रमाणे--

एक स्त्री होती. तिला बरेच दिवस मूल नव्हते. म्हणून तिने एक मुंगूस पाळले व त्यालाच ती आपले मूल समजू लागली. कालांतराने तिला मुलगा झाला. त्या मुंगसाला ती आपल्या मुलाचा मोठा भाऊ मानू लागली एक दिवस ती मुलाला पाळण्यात ठेवून पाण्याला गेली. जाताना तिने मुंग-साला सांगितले, की ' तू मुलाचे रक्षण कर. ' मुगूस पाळण्याशी बसून राहिले. एवढ्यात एक साप पाळण्यावर चढू लागला. तेव्हा मुंगसाने त्याला मारले व रक्ताने भरलेल्या तोंडाने ते बाहेर आले. एवढ्यात घागर घेऊन आलेल्या स्त्रीने त्याला पाहिले. तिला वाटले, की याने आपल्याच मुलाला मारले. म्हणून तिने हातातली घागर त्याच्या डोक्यात घातली. मुगूस मरून पडले. घरात आल्यावर मुलगा सुखरूप असून एक साप मात्र खांडोळी होऊन जमिनीवर पडला आहे असे तिला दिसले. खरी हकीकत समजल्यावर तिला पश्चात्ताप झाला आणि ती रडू लागली. एवढ्यात शेजारच्या बायका नवमीची माती आणण्यासाठी तिला बोलवायला आल्या. त्यांनी तिला म्हटले, की 'आता पश्चात्ताप करू नको. आमच्याबरोबर कजरी-साठी माती आणायला चल. कजरी पेर. भिंतीवर नवमीचे चित्र काढ. तिथेच मुंगूस आणि मुलासहित पाळणा यांचीहि चित्रे काढ. या मुगसाने तुझ्या मुलाला राखले, म्हणून आम्ही-सुद्धा नवमीबरोबर त्याचे चित्र काढू आणि त्याची पूजा करू.' त्या स्त्रीने तसे केले. त्या दिवसापासून हे व्रत सुरू झाले.

## कज्जलागौरीव्रत

सौभाग्यवती स्त्रिया सौभाग्यवृद्धीसाठी श्रावण वद्य ३ येस कज्जलागौरीची पूजा करतात. कज्जलागौरी हे देवीचेच एक रूप आहे.

## कझुगुमलै

तमिळनाडमधील तिरुनेलवेलि जिल्ह्यातील एक पवित्र ठिकाण. इथे डोंगराच्या पोटात खोद-लेले सुब्रह्मण्याचे एक मंदिर आहे. इथली सुब्रह्मण्यमूर्ती थोडी वेगळी आहे. तिला सहा हात व एक मुख आहे. सामान्यतः सुब्रह्मण्य हा षण्मुख व बारा हातांचा असतो. स्थानिक रामा-यणकथेवरून हा देव संपातीचा उपास्य होता असे कळते. हे मंदिर एक हजार वर्षांपूर्वीचे असावे असे म्हणतात. तमिळ कवींनी इथल्या देवावर अनेक गीते रचली असून ती विविध

रागांत म्हटली जातात. या मंदिरापासून थोड्याच अतरावर विविध नृत्याचे कोरीव शिल्प आहे. तिथेच जवळ जैनांच्याही काही कोरीव मूर्ती आहेत. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**कटकम्** (१) कर्नाटक संगीताचा रागविषयक कोश. यात सर्व रागांची यादी दिली असून प्रत्येक रागाचे संभाव्य संचार (Melodic Phrases). क्रमसंचार, विशेष संचार व अपूर्व संचार असे सर्व संचारही दिले आहेत. जेव्हा एखादा संचार आरोहण-अवरोहणक्रमाशी जुळत नसेल, तेव्हा तो संचार कटकम्‌मध्ये समजतो. अशा पुस्तकांना तानपुस्तकम् म्हणतात. गोविंद दीक्षितार, तोडि सीतारामय्या इ. काही संगीतकारांची तानपुस्तके हस्तलिखित स्वरूपात उपलब्ध आहेत. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

(२) कड्याच्या आकाराचे कोरीव नक्षीकाम. एखाद्या स्तभाच्या मूळभागी व शिरोभागी असे कोरीव काम करतात. [ मानसार. ]

**कटकार** एक जात. वैश्य पुरुष व शूद्र स्त्री यांच्या विवाह-बाह्य संबंधामुळे झालेली ही सतती होय, असे उशना व वैखानस सांगतात. [ हि. ध. ]

**कटधानक** एक जात. आवर्तक पुरुष व ब्राह्मण स्त्री याची संतती. [ हि. ध. ]

**कटपयादि संख्या** शब्दांचे अनुक्रम ठरविण्यासाठी योजलेली एक स्मृतिसाहाय्यक पद्धती. भारतात संगीत, ज्योतिष आणि इतरही कला व शास्त्रे यात या पद्धतीचा उपयोग करतात.

संस्कृत वर्णमालेवर ही पद्धत आधारलेली असून तिचे चार भाग पाडलेले आहेत––

(१) कादिनव–कपासून ञपर्यंतचे ९ वर्ण.

(२) टादिनव–टपासून धपर्यंतचे ९ वर्ण.

(३) पादिपंच–प ते म हे ५ वर्ण.

(४) याद्यष्ट–य ते हपर्यंतचे ८ वर्ण.

प्रत्येक वर्णाचा त्या विभागातील जो अनुक्रम तीच त्याची संख्या समजायची. न या वर्णाचा अर्थ शून्य मानलेला आहे.

या पद्धतीचा अवलंब करताना प्रथम शब्दातील वर्णाचे अनुक्रम ठरवितात आणि मग ते एकापुढे एक लिहितात. तसे करून मिळालेली संख्या बरोबर उलट क्रमाने लिहिली, की कटपयादि सख्या मिळते. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**कटबू** महाराष्ट्र व कर्नाटक या प्रदेशात आढळणारी एक भटकी जात. यांना किलिकेट व छत्री अशी अन्य नावे आहेत. बागडी, बुडबुडकी, गोंधळी इ. अनेक जातीच्या मिश्रणातून ही जात बनली आहे. हे लोक स्वत:ला क्षत्रिय म्हणवितात. बायका गोंदण्याचे काम करतात. यांच्यात तेरा कुळे आहेत. त्यांपैकी गणाचारी कुळातला माणूस त्यांच्याकडचे उपाध्येपण करतो. हे महादेव व दुर्गव्वा यांना भजतात. मृतांना पुरतात. [ मु. इ. जा ]

**कटवा** बंगालमधील नवद्वीपाच्या परिसरातील एक पुण्य-क्षेत्र. चैतन्यप्रभूच्या संन्यासग्रहणाचे स्थळ म्हणून याची प्रसिद्धी आहे. इथे चैतन्याचे मंदिर आहे. [ नवद्वीप. ]

**कटसन्** द. भारतातील बुरुडाची व चुनखडी भाजणाऱ्यांची एक लहानशी जात. तिनेवेल्ली जिल्ह्यात यांची वस्ती आहे. हे लोक टोपल्या विणतात. यांच्या पट्टन-कट्टी व नीट्टरसन अशा दोन उपशाखा असून त्यांतील लोक फक्त ज्ञातीतच विवाह करतात. यांचा सामाजिक दर्जा वेट्टुवनापेक्षा उच्च मानला जातो. यांना इतके दिवस मंदिरप्रवेश मिळत नसे. हे भुताखेताची पूजा करतात व मृताना पुरतात. [ का. ट्रा. स. इ. ]

**कटारी** द. भारतातील एक जमात. गोल्ल, मुन्नाच आणि येरुकल यांच्यांतील मिश्र संबंधापासून ही बनली आहे. यांच्यात सगोत्र विवाह होत नाहीत. [ का. ट्रा. स. इं. ]

**कटाहद्वीप** कथासरित्सागरातील चंद्रस्वामी ब्राह्मण याचा पुत्र महीपाल आणि कन्या चंद्रावती या कथेत कटाहद्वीपाचा उल्लेख आहे. चंद्रस्वामीची मुले अरण्यात हरवली असता तो त्यांच्या शोधाला निघतो व शोध करीत करीत कटाहद्वीपात जातो. काही पाश्चात्य पंडितांच्या मते हे कटाहद्वीप इंडोनेशियाच्या प्रदेशात असावे.

**कटाक्षराज** एक तीर्थ. याला कटा असेही दुसरे नाव आहे. लाहोर–पेशावर मार्गावरच्या खिवडा स्टेशनापासून नऊ मैलांवर एका डोंगरावर हे तीर्थ आहे. इथल्या कटाक्षराज तलावाला अमरकुड असे म्हणतात. याला पृथ्वीचा नेत्र असेही म्हणतात. दरवर्षी वैशाख महिन्यातील संक्रांतीला इथे पाच दिवस मोठी यात्रा भरते. उदासी, संन्यासी, बैरागी इ. साधू लोक या दिवसात मोठी मिरवणूक काढतात आणि

कटाक्षराज तलावात स्नान करतात. या तीर्थासंबंधी एक आख्यायिका आहे ती अशी—

दक्षयज्ञाच्या वेळी अपमान झाल्यामुळे पार्वतीने अग्निप्रवेश केला. त्या वेळी शंकराला अतिशय दुःख झाले व त्याच्या नेत्रांतून अश्रू गळू लागले. या अश्रूपासून दोन तीर्थे निर्माण झाली. त्यांपैकी एक पुष्कर व दुसरे कटाक्षराज होय. [ कल्याण-तीर्थांक. ]

**कटि अंकम्म** द. भारतातील मुख्य शक्तिदेवता. ही स्मशानात राहते व गावात अनेक प्रकारचे उत्पात घडविते. म्हणून संकटकाळी हिला बकऱ्याचा बळी देतात. हिचे पूजाविधान पुढीलप्रमाणे असते—

प्रथम गावकऱ्यांची मिरवणूक स्मशानात जाते. हिची कथा सागणारा मादिगा मिरवणुकीत सर्वांच्या पुढे असतो. स्मशानातली माती व कापूस एकत्र करून तो कटि अंकम्माची मूर्ती घडवितो. त्या मूर्तीपुढे शिजविलेल्या भाताचा ढीग घालतात. बकरा बळी देऊन त्याचे रक्त मूर्तीच्या तोंडाला लावतात. हे उपचार चालू असताना मादिगा देवीच्या कथा सागतो व कथात्मक गाणीही म्हणतो. [ द्र. गॉ. मॉ. हिं. ]

**कटिबंध** कटिबंध म्हणजे कंबर आवळण्याची दोरी किंवा कमरपट्टा होय. कमरेच्या वस्त्राला आधार म्हणून प्राचीन काळी कटिबंधाचा उपयोग करीत. धार्मिक विधीत वस्त्र किंवा कासोटा सुटू नये, म्हणून विशेष प्रकारचे कटिबंध वापरण्याची पद्धतही पुरातन आहे. उपनयनविधीत त्याच उद्देशाने बटूच्या कमरेला तिपेडी मेखला बांधली जाते. ही पद्धत केवळ हिंदूंतच आहे असे नसून पारशी, ग्रीक व रोमन लोकही धार्मिक विधीत कटिबंध वापरतात.

जगातील सर्व देशांत पोषाखाचा एक महत्त्वाचा भाग म्हणून कटिबंधाचा उपयोग केला जात असे व आजही केला जातो. कटिबंधाने वेषभूषेला सुटसुटीतपणा तर येतोच; शिवाय तो एक अलंकारही ठरतो. त्या दृष्टीने भारतात रेशमी, जरतारी, सोन्याचे असे विविध प्रकारचे कटिबंध प्रचलित आहेत. श्रीमंत आणि राजेरजवाडे यांच्या स्त्रियांचे कटिबंध रत्ने किंवा मोत्ये जडविलेले असतात. स्त्रियांनी वापरायच्या कटिबंधांना रसना, मेखला, कांची, सप्तकी, इ. नावे आहेत. कटिबंध जेव्हा रेशमी असतो, तेव्हा त्याच्या पदरांच्या संख्येवरून त्यांची नावे वेगवेगळी होतात—

**एकयष्टिर्भवेत्काञ्ची मेखला त्वष्टयष्टिका ।**
**रसना षोडश ज्ञेया कलापः पञ्चविंशकः ।।**

अर्थ—एकपदरी कटिबंधाला कांची, आठपदरीला मेखला, सोळापदरीला रसना व पंचवीसपदरीला कलाप म्हणतात.



कटिबंध

भारतातल्या वेगवेगळचा स्त्रीशिल्पांत कटिबंधाचे अनेक प्रकार दिसतात. संकटनिवारण व रोगपरिहार यांसाठी विशिष्ट कटिबंध वापरण्याची चाल सर्व देशात प्रचलित होती. स्त्रियांनी प्रसूतीपूर्वी व प्रसूतीसमयी कमरपट्टा वापरल्याने त्यांना फायदा होतो, अशीही कल्पना कित्येक ठिकाणी आढळते. [ एन्सा. रि. ए.; हलायुधकोश ]

**कटि येने** मुंड आदिवासी मुलांचा एक खेळ. हा खेळ फार प्राचीन असून असुर दंतकथांमध्ये त्याचा उल्लेख आलेला आहे. विटीदांडूसारखा हा खेळ असून तो अर्धवर्तुळाकार फळचांनी खेळतात. [ एन्सा. मुं. ]

**कटिसूत्र** कडदोरा किंवा कमरपट्टा. वास्तुशास्त्रात वास्तूच्या मध्यभागी २७ अंगुळे रुंदीची एक पट्टी करतात, तिलाही कटिसूत्र असे नाव आहे. [ एन्सा. हिं. आ. ]

**कटिसूत्रबंधन** कडदोरा बांधण्याचा विधी प्रत्येक वर्षाच्या शेवटी गाय, भूमी, हिरण्य, इ. वस्तूंचे दान करून सुवर्णाचा कडदोरा कमरेस बांधावा, असे विधान

आहे. या विधीत दूर्वांकुर, घृत व चरू याचे रुद्रदेवतेच्या उद्देशाने हवन व देव–पितरांचे तर्पण करायचे असते. ह विधान जन्मनक्षत्रावर करावे, असे प्रयोगपारिजातात सांगितले आहे. धर्मकृत्ये करण्याच्या वेळी हा कडदोरा काढून ठेवायचा असतो; अन्यथा कर्म निष्फल होते असे आश्वलायन सांगतो. [ नि. सि. ]

**कटीके** आंध्रातील खाटीक जात. यांनाच कटिकिलु असे दुसरे नाव आहे. याचे गाईकसाई, सुलतानी व सुरसुस असे तीन भेद आहेत. यांच्यापैकी गाईकसाई गोमांस विकतात. बळजबरीने सुता केलेल्या खाटकांना सुलतानी खाटीक असे म्हणतात. सुता न केलेले खाटीक हे सुरसुस या नावाने ओळखले जातात. यांच्यापैकी बरेचसे खाटीक मुसलमान आहेत. कांही थोडे स्वतःला हिंदू म्हणवितात व हिंदूचे रीतीरिवाज पाळतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**कटेरी** द. भारतातील एक शक्तिदेवता. ही समर्थ असूनही सौम्य आहे. इतर शक्तीपासून ती भक्ताचे रक्षण करते. गर्भवती स्त्रिया सुखप्रसूतीसाठी हिला भजतात. कलशावर हिची मूर्ती स्थापून तिची पूजा करतात. ज्या स्त्रीला तिची पूजा करायची असेल, ती दुसरे कोणी पाहणार नाही, अशी व्यवस्था करून एकटयानेच करते. हिला पंतकटेरी, रक्तकटेरी, छेसूकटेरी अशी अन्यही नावे आहेत. [ द्र. गॉ. मॉ. हिं. ]

**कटोरावतो** ओडिसातील एक जात. ओरिया जमीनदारांच्या जनानखान्यातील दासीपासून झालेली संतती. हे लोक स्वत.ला क्षत्रिय समजतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**कट्ट** द. भारतातील एक जात. हिला कट्टे असेही नाव आहे. देवांग व कुर्नी यांच्या अनेक गोत्रांपैकी हे एक गोत्र आहे. [ का. ट्रा. स. इं. ]

**कट्टई** महाराष्ट्रातील एक जात. यांच्यापैकी पुष्कळसे लोक स्वत.ला चांभार म्हणवितात. औरंगजेबाच्या फौजेबरोबर हे लोक दक्षिणेत आले. यांच्यात अनेक पोटभेद असून एका आडनावात लग्ने होत नाहीत. विधवाविवाह रूढ आहे. हे धर्माने हिंदू आणि नाथपंथी असून बालाजी, भवानी, महादेव व विठोबा यांस भजतात. यांचे उपाध्ये उत्तर भारतीय ब्राह्मण असतात. खोगिरे बनविणे, हा याचा पिढीजात धंदा आहे. [ मु. इ. जा. ]

**कट्टनायकन्** केरळातली एक जमात. यांना काडु असेही म्हणतात. हे लोक उंच, काळे व कुरळया केसांचे असतात. स्त्रियाप्रमाणे पुरुषही कर्णभूषणे घालतात. बायका लांब वस्त्र नेसतात व उजव्या खांद्याजवळ त्याची गाठ मारतात. हे लोक निबिड अरण्यात झोपडया बांधून राहतात. त्याच्या बोलीत सर्व द्रविड भाषातील शब्दांचे मिश्रण असते. हे मूळचे पश्चिम घाटातील रहिवासी होते. त्यांच्या काही चालीरीतीवरून त्यांच्यांत जुन्या काळी पितृप्रधान कुटुंबपद्धती होती, असे दिसते.

सामान्यतः हे लोक जंगलखात्यात काम करतात. सर्वांना शिकारीची विद्या अवगत असते. यांची नावे प्राणी किंवा पशू यांच्यावरून ठेवलेली असतात. हे सूर्य–चंद्रांची पूजा करतात. सोमवार व शुक्रवार हे शुभ दिवस मानतात. जादूटोण्यावरही विश्वास ठेवतात.

**विवाहप्रथा** –– या लोकांत पूर्वी राक्षसविवाहाची पद्धती होती; पण आता ती त्यांनी सोडली आहे. ताळीबंधन हा लग्नातला मुख्य विधी असतो. मामाच्या मुलीवर हक्क सांगितला जातो. हे लोक पूर्वी अनेक बायका करीत. प्रसूतीनंतर १५ दिवस जननाशौच पाळतात.

**मर्तिकप्रथा**– मृतांना पुरतात. ज्या झोपडीत मृत्यु झाला असेल, ती झोपडी सोडून देतात. मृताला पुरले असेल त्या जागी चौथरा बांधतात. लग्नापूर्वी माणूस मेल्यास तो भूतयोनीत जातो, असे समजतात. मृताचे वर्षश्राद्ध करतात. [ ट्रा. के. ]

**कट्टबोम्मनपाट्टु** कट्टबोम्मन नामक एका राष्ट्रीय वीर पुरुषाला उद्देशून लिहिलेल्या गीतांना हे नाव आहे. वीरपांडिय कट्टबोम्मन हा तिरुनेलवेल्ली जिल्ह्यातील पंचलम् कुरीची या प्रदेशावर राज्य करीत होता. त्याच्या धाकटया भावाचे नाव होते उमाइ दुराइ. या दोघांनी मिळून १८ व्या शतकात ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीशी जोराचा लढा दिला. या लढयात हे दोघेही बंधू धारातीर्थी पडले. तमिळनाडमधल्या लोककवींनी या पुरुषांना आपल्या गीतांतून अमर केले. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**कट्टी** प्राचीन काळी पश्चिम द्वीपकल्पातील ही एक महत्त्वाची जमात होती. त्या द्वीपकल्पाला काठियावाड हे नाव या जमातीच्या नावावरूनच पडले आहे.

कट्टी हे सिथिक वंशाचे असून सिकंदराच्या स्वारीच्या वेळी ते पंजाबमध्ये होते. काठियावाडात ते बहुधा आठव्या

शतकात आले असावे. तिथल्या राजांचे आणि कट्टींचे जे तंटे-बखेडे झाले, त्यांचा उल्लेख जैसलमीरच्या बखरीत आढळतो. बाराव्या शतकात हे कट्टी फार प्रबल झाले. पृथ्वीराज आणि कनोजचा राजा जयचंद याच्यामधील युद्धात ते दोन्ही बाजूंनी लढले होते. हे लोक सूर्याचे उपासक आहेत यांना शांततामय जीवन आवडत नाही. हे निबडद्या छातीचे व शरीराने धिप्पाड असतात. त्यांच्या केसाचा रंग फिकट करडा असून डोळे निळसर असतात. [अॅ. अॅ. रा.]

**कट्टकुड्डागिर** द. भारताच्या सालेम जिल्ह्यातील तुरुवलरांची पोटजात. यांच्यात तात्पुरत्या विवाहसंबंधालाही मान्यता देण्याची पद्धत आहे. **पाहा – तुरुवलर.**

**कठ** (१) एक प्राचीन गण किंवा समाज. रावी नदीच्या पूर्वेस सांप्रत माझा नावाचा एक प्रदेश आहे. याच प्रदेशात प्राचीन काळी कठ समाज राहत होता. हे लोक स्वतंत्र वृत्तीचे आणि शूर होते. त्यांचे गणराज्य होते. एका काळी कठ लोक काश्मिरात सुप्रतिष्ठित होते, हे काश्मिरी वाङ्‌मयावरून कळते. सिकंदराने पौरसाचा पराभव केल्यावर कठ लोक त्याच्याशी सामना द्यायला उभे राहिले, असे अनेक इतिहासकार सांगतात (मॅक्क्रिंडल–इन्व्हेजन ऑफ् इंडिया, पृ. ११५, ११८, २७९, ३४७). यांच्या शेजारी विपाशा नदीच्या तीरावर क्षुद्रक व रावीच्या मुखाकडे मालव या गणांची राज्ये होती. सिकंदराच्या विरुद्ध हे तीन्ही गण संघटित होण्याच्या बेतात होते; पण त्या आधीच सिकंदराने कठांवर धाड घालून त्यांची सांकल नामक राजधानी जिंकून घेतली.

कथ, कथस, कथिअस, कथको व इतर तत्सम नावांचे जे लोक हिंदुकुश पर्वतापासून बंगालपर्यंत व नेपाळपासून गुजरातपर्यंत पसरलेले होते त्यांचा वरील कठांशी संबंध असला पाहिजे. सौराष्ट्रातले काठी लोक हेही कठांपैकीच असावे. सिंधु नदीच्या मुखापासून गुजरातच्या पूर्वेपर्यंत पसरलेल्या आखाताला कंथिअन आखात असे नाव इतिहासग्रंथात आढळते, तेहि कठांवरूनच पडले असावे.

कठांच्या जोडीने कपिष्ठलांचाही उल्लेख होतो. मेगॅस्थिनीजने रावीच्या तीरावर कंबिस्थोलइ नावाचे एक नगर असल्याचा उल्लेख केला आहे. कंबिस्थोलइ हा कपिष्ठलाचाच अपभ्रंश आहे. हे कपिष्ठल म्हणजे सांप्रतचे कैथल होय. हे कर्नाल शहराच्या पश्चिमेस ३८ मैलांवर आहे. त्यावरून बियास नदीच्या पूर्व किनाऱ्यावर कपिष्ठल लोक राहत होते, असे कळून येते.

कंबिस्थोलि अर्थात कपिष्ठल हे लोक अरचुशिया प्रांतात किंवा त्याच्या जवळपास राहत होते, असे टॉलेमी म्हणतो. परोपमीसदे या प्रदेशात कटसेस किंवा कटेसेस नावाची एक टोळी राहत होती, असे प्लिनीचे म्हणणे आहे. कपिशा (काफिस्तान) किंवा त्याच्या जवळपासच्या प्रदेशात वसलेल्या एखाद्या व्रात्य जमातीचा हा उल्लेख असावा. कारण व्रात्यांच्या काही धार्मिक परंपरा आजही त्या प्रदेशात आढळतात. या व्रात्याच्या एका बाजूला इराणी लोक होते व दुसऱ्या अंगाला भारतीय आर्य होते. याचा परिणाम असा झाला, की त्या व्रात्यांनी इराणी लोकांकडून काही रीतीरिवाज उचलले आणि त्याचबरोबर आर्यांकडून यजुर्वेदोक्त कर्मकांडही उचलले. कठ व कपिष्ठल हे यजुर्वेदी होते, हे सुप्रसिद्धच आहे.

या संदर्भात कपिशा व कपिस्तेत ही दोन ग्रामनामे पाहिली असता कपिश (=कापिर) आणि कपिष्ठल या नावांचा परस्पर संबध असावा, असे वाटते. काफिस्तानात ज्या 'कटि' भाषा बोलल्या जातात, त्यांमध्ये कठांच्या भाषेचे काही अवशेष असावे, असे वाटते.

खोरे जमिया या प्रदेशाच्या प्राचीन राजधानीचे नाव काठ असे होते. त्याचप्रमाणे ट्रान्झोक्सनीया या प्रदेशाच्या भौगोलिक पाहणीत तिथली बरीच ग्रामनामे कठान्त असल्याचे आढळून आले आहे. खोतान हे नावही कठ शब्दापासून निघाले असावे आणि तक्षशिला किंवा काश्मीर या भागातून कठ लोक तिकडे गेल्यावर ते रूढ झाले असावे. कठांच्या या भ्रमणशील वृत्तीमुळेच त्यांच्या काही शाखांना चरक, चारायणीय व आह्वरक अशी नावे मिळाली आहेत.

खोतान, सीस्तान, शकस्तान इ. प्रदेशांत कठ लोक फार प्राचीन काळी गेले होते, असे म्हणता येते. कारण त्या प्रदेशांत खरोष्ठी या प्राचीन भारतीय लिपीत लिहिलेले ग्रंथ उपलब्ध झाले आहेत. कठ लोक श्रौतयाग करीत व त्यासाठी अरणीचे मंथन करून अग्नी सिद्ध करीत. अशा तऱ्हेच्या बऱ्याच अरणी खोतानमध्ये मिळाल्या आहेत. कठांचे हे त्या भागातले वास्तव्य इ. स. च्या १ ल्या शतकातले किंवा त्याच्याही आधीचे असावे, असे वाटते.

कठ व मैत्रायणी या भारताच्या वायव्य प्रदेशात राहणाऱ्या लोकांपैकी काहींनी एशिया मायनर व मेसापोटेमिया या प्रदेशातही प्रवेश केला होता. त्या भागातील खत आणि मितान्नीस या लोकांचे कठ आणि मैत्रायणी या नावांशी जे साम्य आहे, त्यावरून ही गोष्ट लक्षात येते. या बाबतीत अशीही शक्यता आहे, की आपल्या मूलस्थानापासून निघालेल्या कठांपैकी काही लोक भारताकडे व काही एशिया मायनरकडे गेले असावे.

कठ लोक पीतवर्णी होते. त्यांची शारीरिक ठेवण मंगोलाइड होती. हे लोक बहुधा मंगोल, हूण इ. लोकसमाजांच्या नजीकचे रहिवासी असावे. कैतन, खितत, किवा खितै या नावाच्या जमाती चीनच्या ईशान्येकडील प्रदेशात राहत होत्या. इ. स. च्या ११ व्या शतकात त्यांनी उत्तर चीन व त्यानजीकचा तार्तरीचा प्रदेश काबीज केला आणि कथे, खितै, कितै, कितैअ इ. आपली कुलनामे त्या भागाला दिली. तो प्रदेश अरब, इराणी व तुर्क या लोकांना आणि त्यांच्या मार्फत युरोपातील मध्ययुगीन ग्रंथकारांना ज्ञात होता.

कठांचे मर्चकठ, प्राच्यकठ व उदीच्यकठ असे तीन विभाग होते. उदीच्यकठ हे अल्मोडा, गढवाल, कुमाऊँ, पंजाब, काश्मीर व अफगाणिस्तान एवढ्या प्रदेशांत पसरलेले होते. उदीच्यकठांना उत्तर भारतात श्रेष्ठ दर्जा प्राप्त झाला होता. कठांच्या अनेक वेदशाखा होत्या. चरक, चारायणीय, लौगाक्षी इ. त्यांची नावे होती. त्यांच्या संहिता होत्या आणि गृह्यसूत्रेही होती. काठकशाखांचे अध्ययन काश्मीर व उ. प्रदेश यांमध्ये लोकप्रिय झाले होते.

कठ लोकांच्या उपग्रंथांचा निर्देश करताना चरणव्यूहात म्हटले आहे.

**तन्नास्ति यन्न काठके ।**

अर्थ — जे काठकात नाही, ते अन्यत्र आढळणार नाही.

यास्कही काठकसंहितेचा उल्लेख करतो. कठांची कठवल्ली व कठश्रुती ही उपनिषदे असल्याचे सांगितले आहे. सांप्रत सुप्रसिद्ध असलेले कठोपनिषद हे कृष्णयजुर्वेदाच्या काठक शाखेचेच आहे. काठक श्रौतसूत्र आणि काठक ब्राह्मण यांच्यांतले उतारेही अनेक ठिकाणी येतात. पतंजलि हा सनपूर्व दीडशेच्या सुमारास होऊन गेला. काठकाम्नाय त्याच्या काळी फार प्रचलित होता, असे तो सांगतो. बौद्ध धर्माचा प्रसार होण्यापूर्वी कठ हे नाव दूरदूरच्या प्रदेशात विख्यात झाले होते. कठ लोक ज्या ज्या प्रदेशांत गेले त्या त्या प्रदेशांत त्यांनी आपले कर्मकांडही नेले. कालान्तराने त्यांनी ते मध्य आशिया, चीन व पूर्वेकडील देश यांतही प्रस्थापित केले. काश्मीर हे कठशाखांचे केंद्र होते. त्याच प्रदेशात पुढे बौद्ध धर्माने प्रवेश केला. काश्मिरात बौद्धधर्म झपाट्याने वाढला. त्यातूनच पुढे हिंदू व बौद्ध यांच्यांत धार्मिक वैमनस्य निर्माण झाले. नंतरच्या काळात वायव्येकडून शक, हूण, आभीर व गुर्जर या जमाती भारतात आल्या. हिंदूंचा पाडाव करण्यासाठी बौद्धांनी त्या जमातीशी सख्य केले. त्यांच्यापैकी शकांनी उत्तर भारतात अनेक प्रकारे विध्वंस केला. याच काळात भारतातल्या अनेक वैदिक शाखा नष्ट झाल्या. श्रौतसूत्रे व गृह्यसूत्रेही नष्ट झाली. यजुर्वेदाचा काठकाम्नाय याच काळात नष्ट झाला असावा. यजुर्वेदाच्या या काठकशाखेचे कालान्तराने लोकांना इतके विस्मरण झाले, की महार्णव या ग्रंथाच्या कर्त्याने अंग, वंग, कलिंग, आध्र इ. देशांत कोणकोणत्या वेदशाखा प्रचलित आहेत, ते सांगताना काठकशाखेचे नावही उच्चारले नाही.

अशा रीतीने बौद्ध धर्म आणि बाहेरून आलेल्या जमाती टोळ्या यांच्या वर्चस्वामुळे आणि त्यांनी निर्माण केलेल्या अव्यवस्थेमुळे उत्तर भारतात वेदांचे अध्ययन जवळजवळ नष्ट झाले. ज्या प्रदेशांत वेदांचा आणि वैदिक धर्माचा उदय झाला, त्याच प्रदेशांत तो नष्टप्राय होण्याची भीती उत्पन्न झाली. अशा परिस्थितीत वैदिक धर्माने विंध्याच्या दक्षिणेस आश्रय घेतला व तिथे अध्ययन-अध्यापनाच्या परंपरा चालू केल्या.

संस्कृत वाङ्मयात कठांच्या ऱ्हासाबद्दल, काठकाम्नाय कसा नष्ट झाला, त्याबद्दल प्रत्यक्ष असा एकही उल्लेख आढळत नाही. सांप्रत या शाखेची संहिता व दोन गृह्यसूत्रे एवढेच ग्रंथ काश्मीरमध्ये उपलब्ध झाले आहेत. ज्याअर्थी संहिता व सूत्रे सापडली, त्याअर्थी काठक ब्राह्मणही पूर्वी अस्तित्वात असले पाहिजे. जयंतभट्टाने ते असल्याचा उल्लेखही केला आहे.

सिकंदराच्या काळी रावी नदीच्या पूर्वेकडील प्रदेशांत कठांचे गणराज्य होते, हे सुरवातीस सांगितलेच आहे. या राज्यात एक विचित्र प्रथा रूढ होती, असे जयचंद्र विद्यालंकार सांगतात.

कठांच्या राज्यात जन्मलेला प्रत्येक मुलगा हा संघराज्याची संपत्ती मानला जात असे. माता-पित्यांनी केवळ त्याचा संभाळ करायचा. संघाच्या वतीने एक निरीक्षक अधिकारी प्रत्येक कुटुंबातल्या अपत्यांचे निरीक्षण करीत असे. एखादे मूल जर कमजोर किंवा कुरूप आढळले, तर एक महिन्याच्या आत ते मारून टाकले जात असे. [ भा. कौ. २ भा. इ. रू. ]

(२) वसिष्ठ कुलातील गोत्रकार ऋषिगण. याच्या नावावर कठसहिता, कठब्राह्मण, कठपरिशिष्ट, कठल्ल्युपनिषद व कठसूत्र असे ग्रंथ आहेत. [ प्रा. च. को. ]

**कठपुतळी** कळसूत्री बाहुल्या पाहा.

**कठरुद्र उपनिषद** शांतिपाठावरून हे उपनिषद कृष्णयजुर्वेदाचे आहे, असे कळते. या उपनिषदात प्रजापतीने देवांना ब्रह्मविद्येचा उपदेश केला आहे. ब्रह्मवेदनानेच ब्रह्मप्राप्ती होते, हे तत्त्व प्रजापतीने या उपनिषदात ठामपणे सांगितले आहे—

**न कर्मणा न प्रजया न चान्येनापि केनचित् ।**
**ब्रह्मवेदनमात्रेण ब्रह्माप्नोत्येव मानवः ।।**

अर्थ—मानवाला कर्माने, प्रजेने, किंवा अन्य कोणत्याही उपायाने नव्हे; तर केवळ ब्रह्मवेदनानेच ब्रह्मप्राप्ती होते.

या उपनिषदात सृष्ट्युत्पत्तीचा क्रम पंचीकरण पद्धतीने सांगितला आहे. त्यानंतर आत्म्याच्या पचकोशाचे वर्णन आहे. महायतीला जेव्हा परम अद्वैताचे ज्ञान होते, तेव्हाच परम अमृताचे पान करून तो निर्भय होतो, असे प्रजापती म्हणतो. हे उपनिषद गद्यपद्यात्मक आहे. [ सी. ग. देसाई. ]

**कठिण** बौद्ध भिक्षूंचे एक व्रत. श्रावस्तीमध्ये असताना वर्षावास संपल्यानंतर बुद्धाने कठिण नामक एका व्रताचे आयोजन केले व तीस भिक्षूंना त्याविषयी प्रवचन दिले. या व्रतासाठी बुद्धाने भिक्षूंना तेरा नियम सागितले आहेत, ते असे–

(१) उकिरडा, स्मशान, इ. ठिकाणी पडलेल्या चिंध्या गोळा करून त्याचे चीवर बनवावे व ते धारण करावे.

(२) ही वस्त्रे फक्त तीनच असावी. एक संधाटि, एक उत्तरासंग व एक अंतरवासक.

(३) भिक्षा मागून आणलेल्या अन्नावर उदरनिर्वाह करावा. विनयपिटकात सागितलेल्या चौदा प्रकारच्या अन्नाचे ग्रहण करू नये.

(४) अघेमधे कोणतेही घर न वगळता प्रत्येक घरी भिक्षा मागावी.

(५) एकाच बैठकीत भोजन करावे. भोजन करताना गुरूला नमस्कार करण्यासाठी किंवा अन्य कारणासाठी उठावे लागल्यास पुन्हा भोजनास बसू नये.

(६) केवळ एकच भिक्षापात्र जवळ ठेवावे. तसेच मिळालेल्या सर्व पदार्थाचे भोजन करावे. मग ते स्वादिष्ट असोत वा नसोत.

(७) एकदा भोजन झाल्यानंतर पुन्हा काही ग्रहण करू नये.

(८) गाव किंवा शहर यांच्याजवळ न राहता दूरच्या अरण्यात राहावे.

(९) केवळ वृक्षाखाली निवास करावा.

(१०) मोकळ्या जागी राहावे, परंतु ज्या भिक्षूने हे व्रत आधीपासून घेतले असेल, त्याने पावसाळ्यात एखाद्या छायावृक्षाचा आश्रय करण्यास हरकत नाही.

(११) जनशून्य स्मशानात राहावे.

(१२) आपले आसन व अंथरूण स्वतःच तयार करावे.

(१३) रात्री आडवे न पडता बसून झोप घ्यावी. तीन रात्रींतून एक रात्र जागून निरीक्षणात घालवावी.

या व्रताच्या सुरवातीच्या दिवशी गृहस्थाश्रमी लोक संघातील भिक्षूना लागणारी वस्त्रे दान देत. या वस्त्रांना कठिण नाव होते. ती वस्त्रे अन्य भिक्षूंना वाटण्याचे काम या कठिणव्रतधारी भिक्षूकडे सोपविण्यात येई. [ उ. प्र. बौ. वि. ]

**कठिणदान** हा एक बौद्ध धर्मातला वस्त्रदानाचा लोकप्रिय उत्सव आहे. आश्विन पौर्णिमेपासून कार्तिक पौर्णिमेपर्यंत केव्हा तरी हा साजरा केला जात असे. एका विहाराला एकदाच हा उत्सव करता येत असे. कठिण म्हणजे बौद्ध भिक्षूने वापरण्याचे पीत वस्त्र. त्याचे दान करणाऱ्या दात्याला प्रथम अधिकार प्राप्त करून घ्यावा लागे. आषाढ पौर्णिमेपासून तो आश्विन पौर्णिमेपर्यंत तीन महिने त्याला एखाद्या मठात वर्षावास करावा लागे. या तीन महिन्यात त्याने त्या मठात राहून दान करायची वस्त्रे शिवून रंगवावी लागत. अशा प्रकारे नियमाचरण करून शिवलेली 'कठिण' वस्त्रे मग तो दाता उत्सव करून भिक्षूना वाटी. कमीत कमी पाच भिक्षूंना तरी त्या वस्त्रांचे दान करावे लागे. वर्षावासात राहणाऱ्या भिक्षूंनाच हे दान घेण्याचा अधिकार असे. हे एकच दान असे, की ज्यासाठी दात्याला संघाची परवानगी घ्यावी लागे. बौद्ध धर्मात कठिणदान हे सर्वश्रेष्ठ दान मानले आहे. यासाठी या दानप्रसंगी बौद्ध दाते सढळ हाताने पैसा खर्च करीत. त्यावेळी भक्तिसंगीताचे गायन, धार्मिक परिसवाद व विद्वानांची व्याख्याने घडवून आणली जात. जमलेल्या लोकाना मिष्टान्नाचे भोजनही मिळे. आग्नेय आशियातील बौद्ध लोक विशेषत्वाने हा उत्सव साजरा करीत. [ इं. फो. लो. ]

**कठेश्वर** नर्मदेच्या तीरावरील एक तीर्थ. [ पु. इं. ]

**कठोपनिषद** हे कृष्णयजुर्वेदाच्या काठकशाखेच्या अंतर्गत आहे. याचे दोन अध्याय असून प्रत्येक अध्यायात तीन वल्ली आहेत. यात यमाने नचिकेत्याला ब्रह्मविद्या सांगितली आहे. नचिकेता यमलोकी गेला असता, यमाने त्याला तीन वर मागायला सांगितले. नचिकेत्याने दोन वर मामुली स्वरूपाचे मागून तिसरा महत्त्वाचा वर मागितला, तो असा–

'मनुष्य मरणाधीन झाल्यावर त्याचा आत्मा अविनाशी राहतो किंवा नाही, याबद्दल लोकांत मतभेद आहेत. तेव्हा यातील सत्यासत्य कोणते, ते तू मला सांग.'

यावर यमाने पुष्कळ आढेवेढे घेतले व प्रस्तुत वराचा आग्रह न धरण्याबद्दल नचिकेत्याला अन्य काही प्रलोभनेही दाखविली; पण नचिकेत्याने आपला आग्रह सोडला नाही

मग त्याच्या प्रश्नाला उत्तर देताना यमाने पुढील विचार प्रकट केले आहेत —

**श्रेयश्च प्रेयश्च मनुष्यमेत:**
**तौ संपरीत्य विविनक्ति धीर: ।**
**श्रेयो हि धीरोऽभिप्रेयसो वृणीते**
**प्रेयो मन्दो योगक्षेमाद् वृणीते ।।**

(१·२)

अर्थ—श्रेय आणि प्रेय हे दोन्ही पदार्थ मिश्रसे होऊन जीवापुढे प्रकट होतात. बुद्धिमान पुरुष पोक्त विचार करून दोहोंचेही तारतम्य पाहतो. शहाणा पुरुष प्रेयापासून श्रेय निवडून काढतो व त्याचा स्वीकार करतो. पण मंद पुरुष योगक्षेम चालला पाहिजे म्हणून प्रेयाचा स्वीकार करतो

म्हणून ज्याला श्रेयाची इंच्छा असेल, त्याने प्रिय असलेल्या व प्रिय वाटणाऱ्या इच्छांचा विचारपूर्वक त्याग करावा. श्रेय ही विद्या असून प्रेय ही अविद्या आहे. या अविद्येत गुरफटलेले व स्वत:ला बुद्धिमान आणि शास्त्रकुशल समजणारे लोक जन्ममरणाच्या फेऱ्यात सापडतात. नित्य परमात्मा अनित्य साधनांनी प्राप्त होत नाही. म्हणून परमात्मपद हेच अंतिम ध्येय समजून अनित्य फलांचा त्याग करावा. अध्यात्मयोगाची प्राप्ती झाल्याने हर्ष-शोक मावळतात. आत्मसाक्षात्कार झाल्यावर परमानंदाची प्राप्ती होते. ब्रह्म हे धर्माधर्म, कार्याकार्य आणि भूत-भविष्य यांच्या पलीकडचे आहे. अशा ब्रह्माच्या प्राप्तीचा मार्ग हाच श्रेयस्कर मार्ग होय.

आत्मा हा ज्ञानस्वरूप असून तो वृद्धी-क्षयांनी रहित आहे. तो जन्मतही नाही आणि मरतही नाही. शरीराचा नाश झाल्यानेही आत्म्याचा नाश होत नाही. या आत्म्याचे सदैव चिंतन करावे. सदोदित आत्मचिंतन करणाऱ्या साधकाला आत्मप्राप्ती होते.

आत्मवस्तु नित्य असून तीच परमपुरुषार्थ आहे, या सिद्धान्तावर श्रद्धा ठेवून त्याचा साक्षात्कार अनुभवाने करून घ्यायचा, हा मुद्दा जसा या उपनिषदात स्पष्ट केला आहे; तसाच इंद्रिये, मन आणि बुद्धी या ज्ञानसाधनांच्या पलीकडे जाऊन त्यांना अगोचर असणाऱ्या आत्मस्वरूपाचा निश्चय आत्म्याच्या साहाय्याने केला असता आत्मस्वरूपाची प्राप्ती होते, असा दुसरा मुद्दाही या उपनिषदात स्पष्ट केला आहे. आत्मा आहे, हा पहिला सिद्धान्त व आत्म्यालाच आत्मा ओळखता येतो, हा दुसरा सिद्धान्त होय. तिसरा सिद्धान्त या उपनिषदाच्या मते हा, की आत्मा आणि परमात्मा हे भिन्न नसून एकच आहेत.

दुसऱ्या अध्यायाच्या पहिल्या वल्लीत प्रथमत: आपली इंद्रिये बहिर्मुख का याचे कारण दिले आहे. बाह्यविषय पाहणे हाच इंद्रियांचा धर्म होय. या इंद्रियांचीच आकांक्षा पूर्ण करणारे पुरुष मृत्यूच्या सत्तेखाली येतात व जन्म-मरणाच्या चक्रात सापडतात. पण इद्रियांना लगाम घालून जे आत्मस्वरूप पाहण्याचा निश्चय करतात, तेच आत्मज्ञान प्राप्त करून घेऊन अमर होतात.

दुसऱ्या वल्लीत आत्मा व परमात्मा यांचे वसतिस्थान शरीर व विश्व आहे, असे सांगून आत्मा हा अज आणि शुद्ध ज्ञानरूप असल्याचे सागितले आहे. पुढे त्याच्या विभूती आणि त्याचे सर्वान्तर्यामित्व सांगितले आहे. पुढील मंत्रात तो सर्वप्रकाशक असल्याचेही सांगितले आहे—

**न तत्र सूर्यो भाति न चन्द्रतारकं**
**नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्नि: ।**
**तमेव भान्तमनुभाति सर्वं**
**तस्य भासा सर्वमिदं विभाति ।।**

(२·१५)

अर्थ—तिथे सूर्याचा, चंद्राचा व तारकांचा प्रकाश पोचू शकत नाही. हे विद्युत्प्रकाशही तिथे जात नाहीत; मग अग्नी कुठून जाईल ! तो (परमात्मा) प्रकाशू लागला म्हणजेच सर्व प्रकाशित होते. त्याच्या प्रकाशाने हे सर्व स्पष्ट दिसते.

तिसऱ्या वल्लीत परमात्म्याच्या सत्तेचे सामर्थ्य वर्णिले आहे. तो प्रपंचाचे अधिष्ठान असून त्याच्याच भयाने सर्व जीव आणि सर्व देवदेवता आपापली नियत कर्मे करतात. आत्मज्ञान होण्याला जर कोणता लोक योग्य असेल, तर तो मृत्युलोकच होय.

परेत झाल्यावर जीवात्म्याची स्थिती काय होते, हा नचिकेत्याचा प्रश्न होता. यमधर्माने या प्रश्नाला उत्तर देताना जीवात्मा व परमात्मा यांचे स्वरूप समजावून सांगितले आहे. परमात्मा म्हणजे उपाधिरहित जीव व जीवात्मा म्हणजे उपाधीने युक्त परमात्मा, असा विवेक करून यमाने शुद्ध आत्मस्वरूप म्हणजेच ब्रह्मस्वरूप होय व ते केव्हाही नष्ट होत नाही अथवा त्याच्या ठिकाणी कसलाही विकार संभवत नाही, असे सांगितले आहे.

हे उपनिषद तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने फार महत्त्वाचे आहे. यात आत्म्याच्या अमरत्वाविषयी व्यक्त केलेले विचार अत्यंत प्रगल्भ असून आत्मज्ञानाच्या प्राप्तीबद्दल साधकाला दिलेल्या सूचनाही व्यवहार्य आहेत.

## कडकलक्ष्मी

कोल्हापूरच्या अंबाबाईचे भक्त कडकलक्ष्मी या नावाने एक देवीची घुमटी डोक्यावर घेऊन गावोगाव फिरतात व भिक्षा मागतात. पुरुष व स्त्री अशी दोघे कडकलक्ष्मी हिंडवितात. पुरुष आपल्या कमरेभोवती

घागऱ्याप्रमाणे लुगडे गुडाळतो. तो लांब केस राखतो. बाईच्या उजव्या हातात मोरपिसांचा कुंचा असतो. पुरुष आधी ढोलके वाजवून लोकांना गोळा करतो. बाई मग मागेपुढे सरकून छातीवर स्वस्तिकाकार हात ठेवून नमस्कार केल्याचा आणि अंगात संचार झाल्याचा अभिनय करते. पुरुष एक आरोळी ठोकून स्वतःच्या खांद्यावरच्या आसुडाने स्वतःच्याच अंगावर



कडकलक्ष्मी

फटके मारू लागतो. आपल्या दंडाभोवती एक दोरी बांधून त्यांत तो दाभणें खुपसतो. त्यातून रक्त वाहू लागले, तरी तो त्याची पर्वा करीत नाही. हे सर्व करीत असताना तो अंगात आल्यासारखे दाखवितो. कडकलक्ष्मी गावात आली, की ज्यांनी तिला कधी नवस केला असेल, ते लोक तिची पूजा करतात. सर्वसामान्य लोकही कडकलक्ष्मीवाल्याला धान्य व पैसे देतात.

**कडा** राजस्थानातल्या वीररसप्रधान कथाकथनात कडा नावाचा एक प्रकार आहे. या प्रकारात एक व्यक्ती कोणत्यातरी एका लोकगीताचे गायन करते व सभोवतीचा समाज त्या लोकगीताचे ध्रुवपद एकस्वराने गातो. या गायनाच्या साथीला नगारा वाजविला जातो. [ लो. ना. प. ]

**कडापाचा मठ** एक लिंगायतस्वामीचा मठ. हा कोल्हापूरच्या दक्षिणेस ९ मैलांवर आहे. मठाच्या आवारात मध्यभागी सिद्धेश्वराचे मंदिर आहे. त्याच्या भोवती अडकेश्वर, चक्रेश्वर व रुद्रपाद याची छोटी मंदिरे असून समोर नंदी आहे. सुमारे ५ ते ६ हजार लिंगायत इथल्या मठस्वामीचे शिष्य असून ते कोल्हापूर, कोकण, मुंबई, मद्रास व म्हैसूर या भागांत पसरलेले आहेत. [ कोल्हापूर गॅझेट. ]

**कडालिंगी** भटक्या हिंदू बैराग्यांचा एक वर्ग. हे नंगे असतात व इंद्रियदमन व्हावे, म्हणून आपल्या लिंगाभोवती लोखंडी कडे घालून त्याला एक साखळी बांधतात. क्वचित काही लोक आपले लिंग छाटूनही टाकतात. हे लोक शैव असून यांना सेवर असे दुसरे नांव आहे. सेवरांचीच एक खेवर नावाची उपशाखा असून ते लोक नरकपाल जवळ बाळगतात. कोरडच्या जटेतून पाणी पिळून काढणे, दारूपासून दूध तयार करून ते प्राशन करणे, हाताचे तळवे एकावर एक चोळून त्यातून धान्य निर्माण करणे, इ. चमत्कार दाखवून कडालिंगी साधू लोकांकडून पैसे उपटतात. हे लोक समुदायाने हिंडतात. [ म. ज्ञा. को. ]

**कडिया** गुजरातेतली कुंभारांची एक जात. यांना विटा पाडणारे किंवा चुनखडीवाले असेही म्हणतात. मडकी करणाऱ्या कुंभारांपेक्षा हे स्वतःला श्रेष्ठ समजतात. यांच्यापैकी काही गवंडीकामही करतात. परनामी, स्वामी नारायण, रामानंदी व कबीरपंथी यांपैकी कोणत्यातरी पंथाचे हे अनुयायी असतात. यांच्यांतले भांडणतटे जातीतले प्रमुख लोक मिटवितात. यांच्यांतले कित्येक लोक मुसलमानही झाले आहेत. [ म. ज्ञा. को. ]

**कडुवेली सिद्धर** तमिळनाडमधील एक संतकवी. आध्यात्मिक तत्त्वांबरोबरच याने नीतितत्त्वांचाही उपदेश केला आहे. याचे वैशिष्ट्य असे, की याने लोकांना वेदोक्त मार्गाने जाण्याचा उपदेश केला. मद्यपान व अफू यांचा याने निषेध केला आहे. याने काही पदे रचली आहेत. [ द. द. ]

**कडुलिंब** एक वृक्ष. या वृक्षात रोग आणि पिशाच यांची बाधा दूर करण्याचे सामर्थ्य आहे, असे मानतात. वर्षप्रतिपदेच्या दिवशी याची पाने भक्षण करण्याचा विधी आहे. याला संस्कृतात पारिभद्र म्हटले असून त्याची उत्पत्ती अमृतातून झाली असल्याचे मानले आहे. या वृक्षाला काही लोक ब्रह्मदेवाचे तर काही लोक जगन्नाथाचे प्रतीक समजतात. काली किंवा दुर्गा हिचा हा प्रियवृक्ष आहे. दक्षिणेकडील बहुतेक

सर्व देवीमंदिरांच्या आवारात कडुलिंबाचे झाड असते. हे झाड तोडणे एखाद्या तरुण मुलीची हत्या करण्याइतके अशुभ समजतात. ग्रामदेवता आणि क्षुद्र दैवते यांच्या पूजाविधीत याच्या डहाळचांना फार महत्त्व असते. मांत्रिक लोक विंचू, सर्प वगैरेंचे विष उतरविण्याच्या कामीही याच्या डहाळचांचा उपयोग करतात. देवी, काजिण्या इ. रोगांची साथ आली असता रोग्याच्या अंथरुणाच्यावर कडूलिबाची डहाळी बांधतात. रोग्याच्या अंगाला त्याच्या पानांचा रस चोळतात. रोगमुक्तीचे स्नान घालताना त्या पाण्यात याची पाने टाकतात. घराच्या बांधणीत एखाद्या दाराची किंवा खिडकीची चौकट कडुलिंबाच्या झाडाची बसविल्यास त्या घरात कोणाला भूतबाधा होणार नाही, असे समजतात. ग्रामीण भागातल्या स्त्रिया कडुलिंबाच्या डहाळचा नेसून देवीला प्रदक्षिणा करण्याचा नवस बोलतात. कित्येक ब्रह्मचारी, योगी किंवा तापसी कडुलिंबाची पाने खाऊन राहतात.



कडुलिंब

**कड्डु नृत्य** जम्मू-काश्मीर भागातील एक लोकनृत्य. सुगीच्या वेळी हे नृत्य करतात. पुरुषांच्याबरोबर स्त्रियाही त्यात भाग घेतात. नृत्यासाठी प्रथम एका गोल जागेत विस्तव पेटवितात व त्याच्याभोवती लयबद्ध पदविन्यास करीत नाचतात. नृत्याच्या साथीला ढोल व बासरी ही वाद्ये असतात. रात्रभर हे नृत्य चालू असते. या नृत्याच्या मागे देवाला प्रसन्न करण्याची भावना असते. पंजाबातील भांगडा नृत्याशी याचे बरेच साम्य आहे. [ योजना ]

**कढीभात** महाराष्ट्रातील लग्नविधीतला एक सोहळा. यात सीमान्तपूजनाच्या वेळी वधूपक्षाकडील मुंडळी वरपक्षांतल्या लोकांना कढीभाताचे जेवण वाढतात व कढीचे आणि भाताचे भांडे आंदण देतात.

**कणगावलि** जैन श्रमणांचा एक उपवास. ५ वर्षे ९ महिने आणि १८ दिवस एवढा याचा कालखंड असतो. [ हि. जै. मो. ]

**कणबी** गुजरातमधील एक जात. यांना पाटीदार असेही म्हणतात. उमेने चिखलाचा एक पुरुष निर्माण केला व शिवाने त्याला सजीव केले. हा पुरुष आपला मूळ पूर्वज होय, असे हे सांगतात. यांच्यांत नऊ पोटभेद आहेत. यांच्यांतल्या काही पोटजाती अर्धहिंदू अर्धमुस्लीम अशा आहेत. कणबी लोक स्वतःला द्विज म्हणवितात व जानवे घालतात. बिजमार्ग, दादूपंथ, कबीरपंथ, स्वामीनारायण, वल्लभ इ. अनेक संप्रदायांचे हे अनुयायी आहेत. काही जैनही झाले आहेत. यांच्यांतल्या आंजणाकणब्यांचे कोळचांशी साम्य दिसते. गुजर कणब्यांत अनेक पोटभेद आहेत.

कडवा कणबी स्वतःला रामपुत्र कुशाचे वंशज किंवा अनुयायी समजतात. काबूल–पंजाबमार्गे आपण गुजरातेत आलो असे ते सांगतात. यांच्यांत लालचुडावाला, काळाचुडावाला आणि अहमदाबादी असे तीन पोटभेद आहेत. लेवांप्रमाणेच यांच्यातही कुळी आणि अकुळी असे दोन प्रकार आहेत. यांच्यांत मूळच्या ५२ शाखा असून त्यांची नावे पंजाबातील भिन्न भिन्न गावांवरून पडली आहेत. नव्या नव्या शाखा उत्पन्न होण्याची प्रक्रियाही चालूच आहे.

यांच्यांतली लग्ने ९, १० अथवा ११ वर्षांनी एकदाच सामुदायिकपणे होतात. हा लग्नाचा मुहूर्त फक्त तीनच दिवस असतो अलीकडे मात्र ही कालमर्यादा एका वर्षापर्यंत आली आहे. पूर्वी हे लोक मूल जन्माला आल्यानंतर एका महिन्याच्या आत त्याचा लग्नाचा वाङ्‌निश्चय करीत. कित्येक वेळी गर्भातच अपत्याचा वाङ्‌निश्चय होत असे. गर्भवती स्त्रिया मांडवातल्या बोहल्याभोवती प्रदक्षिणा घालून हा विधी पार पाडीत. त्यांच्यांतली लग्ने वर सांगितल्याप्रमाणे कित्येक वर्षांनी एकदाच होत असल्यामुळे व मुलीला योग्य वेळी नवरा मिळण्यास पंचाईत पडत असल्यामुळे ते पुढीलप्रमाणे सोय करून ठेवतात—

सामान्य लग्नाच्या मुहूर्तावर मुलीचे लग्न एका पुष्पगुच्छाशी लावतात. मग तो गुच्छ पाण्यात फेकून देतात. तसे करण्याने

मुलगी विधवा झाली, असे समजतात. त्यानंतर मग सवडी-प्रमाणे तिचे दुसरे अर्थात खरे लग्न लावतात. दुसरीही एक पद्धत आहे. एखाद्या विवाहित पुरुषाला थोडेसे पैसे देऊन मुलीचे लग्न त्याच्याशी लावतात आणि लगेच तिचा घटस्फोट करून घेतात. मग सवडीने तिचे खरे लग्न लावतात. लग्ना-पूर्वी उंझ येथील पार्वतीची पूजा करतात. नंतर तिथला जोशी फासे टाकून लग्नासाठी मुहूर्त पाहतो. ज्या संख्येचा फासा पडेल ते किंवा त्यापुढील वर्ष लग्नासाठी ठरवितात. त्या वर्षातला बहुधा वैशाख मासच लग्नासाठी पसंत करतात. सांप्रत ही पद्धत नष्ट होत चालली आहे.

लेवा कणब्यात त्यांच्या वस्तीच्या खेड्याचे संघ बनविलेले असतात. त्यांना गोल म्हणतात. एका गोलात लग्नसंबंध करीत नाहीत. मतिया कणबी अर्धमुस्लीम आहेत. कोणत्या तरी संकट-काळी त्यांचे हे धर्मांतर झाले; पण अलीकडे त्यांनी मुसलमानी चालीरीतींचा त्याग केला असून ते वैष्णव बनले आहेत. पिराणा मतिया या पोटजातीत प्रथमवरास विधवेशी लग्न करायचे झाल्यास प्रथम ते शमीशीं करावे लागते. हे आपणास सत्पंथी म्हणवितात. इमाम शहा हा यांचा गुरू होय. त्याची धर्ममते एकत्र करून तयार केलेला शिक्षापत्री नावाचा ग्रंथ हा यांचा धर्मग्रंथ आहे. हे ईद पवित्र मानतात, शुक्रवारी उपास करतात व रमजान पाळतात. ते गुरूच्या पादांगुष्ठाची पूजा करतात. मृतांना पुरतात. स्त्रिया दहा दिवस ऊर बडवून शोक करतात.

मोमना कणबीही काही मुस्लिम रिवाज पाळीत असले तरी ते शेंड्या ठेवतात. अलीकडे ते स्वामीनारायणपंथ स्वीकारून हिंदू बनले आहेत. हे लोक लग्नात होम न करता 'दुवा' करतात. हे आपल्या धर्मस्थानास खाना म्हणतात. खान्यामध्ये एक पाट असतो. त्याला ब्रह्माचा पाट असे म्हणतात. त्यावर कलश भरून ठेवून त्यात थोडी माती टाकतात. हे पाणी पवित्रो-दक म्हणून प्राशन करतात. पितृपक्षांत खान्यामध्ये जाऊन तिथल्या लोकांना कंसार (शिरा) वाटतात. हे शाहाकारी आहेत.

उदा कणबी हे उदा नावाच्या भगताचे अनुयायी आहेत. ते इतर जातीपासून अलग राहतात व ब्राह्मणांच्या हातचेसुद्धा पाणी पीत नाहीत. उंझ येथील उमादेवी ही सगळ्या कणबी जातीची कुलदेवता होय. ते स्थान हे आपले मूलस्थान असे मानतात. यांच्या घरचे उपाध्येपण औदीच्य ब्राह्मण करतात. यांना मद्यमांस चालत नाही. हे शेतीच्या कामात तरबेज आहत. [मुं. इ. जा.; म. ज्ञा. को.; पो. वी. हि. सि.]

## कणसरी

कणसरी म्हणजे भाताची लोंबी. वारली लोक हिला आपली देवता मानतात. ते तिची शपथ मोडीत नाहीत. हिच्याविषयी वारली लोकात पुढील कथा प्रचलित आहे –

धरण्या नावाचा एक कुणबी होता. त्याला शेती करण्याची इच्छा झाली. हे पाहून देवाने कणसरी त्याच्या स्वाधीन केली. त्याने तिला प्रेमानें वाढविले. एकदा धरण्याच्या घराला आग लागली असता तो स्वतःचा जीव वाचविण्यासाठी कणसरीला टाकून पळाला. ती कशीवशी आगीतून बाहेर पडून आई-वडिलांकडे जायला निघाली. ती जळत जळत चालली होती. वाटेत तिला देवलोक लागला. तिच्या आगमनाने देवलोकालाही आग लागली. ते पाहून तिने समुद्रात उडी टाकली. तिचे आईबाप तिच्या-मागे धावले आणि त्यांनी तिला समुद्रातून बाहेर ओढून पोटाशी धरले. आगीत होर-पळून कणसरी विद्रूप झाली होती. देवांनी तिला मग पुन-र्जन्म दिला. ती जलमा नामक कुणब्याच्या घरी जन्माला आली. तिथेच वाढून मोठी झाली



कणसरी

इकडे धरण्या कुणबी तिच्या वियोगाने रडत राहिला होता. देवांना त्याची दया आली व त्यांनी कणसरीला धरण्याच्या खळचावर आणून त्याच्या स्वाधीन केले. मग तो मनोभावे तिची सेवा करू लागला. पाहा – वारली [जं. रा.]

## कणाद

(१) हा वैशेषिक दर्शनाचा आदिप्रवर्तक होय. कणाद हे याचे मूळ नाव नव्हे. तो शेतात पडलेले धान्याचे कण गोळा करून उञ्छवृत्तीने निर्वाह करीत होता,

म्हणून त्याला कणाद, कणभक्ष, कणभुज अशी नावे पडली (न्यायकंदली). सूत्रालंकार ग्रंथात याचे नाव उलूक असल्याचे सांगितले आहे. हा दिवसभर ग्रंथरचना करी व रात्रौ आहार मिळविण्यासाठी बाहेर पडे. त्यावरून लोक याला उलूक (घुबड) म्हणू लागले, असे सांगतात. पण उलूक नावाची पुढील व्युत्पत्तीही ध्यानात घेण्याजोगी आहे–

सर्वदर्शनसंग्रहात वैशेषिक दर्शनाला औलूक्यदर्शन म्हटले आहे. गंधार (कंदाहार) देशात उलूक नावाची एक जमात राहत होती. कणाद हा त्या जातीतून आलेला असावा आणि म्हणून त्यालाही उलूक म्हटले गेले असावे. वायुपुराणाच्या मते कणाद हा प्रभासक्षेत्रात जन्मला होता व तेथील सोमशर्मा आचार्याचा शिष्य होता. त्याचे दुसरे एक नाव काश्यप असेही होते. उदयनाचार्याने आपल्या किरणावली या ग्रंथात कणादाला कश्यपपुत्र मानले आहे. कणादाने महेश्वराला प्रसन्न करून त्याच्या कृपेने शास्त्र प्राप्त करून घेतले, अशी कथा आहे. पाशुपतसूत्रात कणादाला पाशुपत म्हटले आहे. उलूक जमातीचे लोक लकुलीशाच्या पाशुपतसप्रदायाचे अनुयायी होते, असे डॉ. हजारीप्रसाद द्विवेदी म्हणतात (नाथसंप्रदाय). प्रभासक्षेत्र हे लकुलीशसंप्रदायाचे मोठे केंद्र होते. त्यावरून कणादाचा प्रभासक्षेत्रातील जन्म, त्याचे सोमशर्म्याचे शिष्यत्व व त्याचे उलूकत्व या तीन्ही गोष्टीचा मेळ बसतो.

न्यायदर्शनात सामान्य या पदार्थाच्या जोडीने विशेष या नावाचा आणखी एक पदार्थ कणादाने मानला आहे. म्हणून त्याच्या दर्शनाला वैशेषिक दर्शन म्हणतात. त्यानेच वैशेषिक सूत्रांची रचना केली. त्या ग्रंथाचे दहा अध्याय असून प्रत्येक अध्यायात दोन आह्निके आहेत. वैशेषिक सूत्रांचा रचनाकाल निश्चित करणे कठिण आहे. अश्वघोषाने आपल्या सूत्रालंकार ग्रथात वैशेषिकदर्शन बुद्धपूर्व मानले आहे व श्री. दासगुप्ता यांनी अनेक प्रमाणांनी ती गोष्ट सिद्ध ठरविली आहे (ए हिस्टरी ऑफ इंडियन फिलॉसॉफी, पृष्ठ २८२). द्रव्याचे परमाणु असतात, ही कल्पना कणादाने प्रथम मांडली. त्यामुळे वैशेषिक दर्शनातच परमाणुवाद प्रथम अवतीर्ण झाला, असे समजतात. **पाहा**–वैशेषिक दर्शन.

(२) सोमशर्म्याचा पुत्र. विष्णूचा एक अवतार. [ पु. इं. ]

**कणाद तर्कवागीश** (इ. स. १५६० चा सुमार) एक तर्कपंडित. हा वासुदेव सार्वभौमाचा शिष्य होता, अशी समजूत आहे. याने पुढील तीन ग्रंथ लिहिले आहेत – (१) मणिव्याख्या – तत्त्वचिंतामणीवरील टीका. (२) भाषारत्नम् – वैशेषिक दर्शनावरील ग्रंथ व (३) अपशब्दखंडन – वैशेषिक दर्शनावरील ग्रंथ. [ हि. इं. लॉ. ]

**कणिक** धृतराष्ट्राचा नीतिविशारद असा ब्राह्मण मंत्री. धृतराष्ट्राने पांडवांचे बल व वीर्य पाहून धास्ती घेतली व त्याच्या नाशाचा उपाय या कणिकाला विचारला. कणिकाने धृतराष्ट्राला ज्या कूटनीतीचा उपदेश केला, तो संक्षेपात पुढीलप्रमाणे–

शत्रू तीन प्रकारचे असतात. दुर्बल, समान व बलिष्ठ. दुर्बलांवर नेहमी शस्त्र उगारलेले असावे, म्हणजे तो आपली मान कधीही वर उचलणार नाही. समान शत्रूपुढे आपला पराक्रम सदैव जागृत ठेवावा व बल वाढवून त्याच्यावर हल्ला करावा. बलिष्ठ शत्रूला भेदाने नष्ट करावे. शत्रूच्या सेवकांत स्वामिद्रोह उत्पन्न करावा. मारायचे ते पुरते मारावे; अर्धवट सोडू नये. शत्रू दुर्बल असला तरी त्याची उपेक्षा करू नये.

**अग्न्याधानेन यज्ञेन काषायेण जटाजिनैः ।**
**लोकान्विश्वासयित्वैव ततो लुम्पेद्यथा वृकः ।।**
**वहेदमित्रं स्कन्धेन यावत्कालस्य पर्ययः ।**
**ततः प्रत्यागते काले भिन्द्याद् घटमिवाश्मनि ।।**

(म. भा. आदि. १४०. १९, २१).

अर्थ–अग्निहोत्र ध्यावे, यज्ञ करावे, काषायवस्त्रे धारण करावी, जटा वाढवाव्या, मृगचर्म पाघरावे (येन केन प्रकारेण) लोकांच्या अंतःकरणात आपल्याविषयी विश्वास उत्पन्न करून मग एखाद्या लाडग्याप्रमाणे शत्रूचे सर्वस्व लुबाडावे. जोवर आपला काळ वाईट आहे, तोवर शत्रूला (खुशाल) खांद्यावरून वाहावे व पुन्हा काळ अनुकूल आला, की घडा ज्याप्रमाणे दगडावर आपटून फोडतात, त्याप्रमाणे शत्रूला नष्ट करावे.

**वाचा भृशं विनीतः स्याद् हृदयेन तथा क्षुरः ।**
**स्मितपूर्वाभिभाषी स्यात्सृष्टो रौद्रेण कर्मणा ।।**
**अञ्जलिः शपथः सान्त्वं शिरसा पादवन्दनम् ।**
**आशाकरणमित्येवं कर्तव्यं भूतिमिच्छता ।।**

(म. भा. आदि. १४०. ६६–६७)

अर्थ–वाणीने अत्यंत विनीत असावे; पण हृदय वस्तऱ्याच्या धारेप्रमाणे तीक्ष्ण असावे. अंतःकरणात केवढेही क्रूर कृत्य करायची इच्छा असली, तरी बोलताना मात्र नेहमी स्मितपूर्वकच बोलावे. हात जोडणे, वचन देणे, सान्त्वन करणे, पायांवर डोके ठेवणे, वाटेल तशी आश्वासने देऊन आशा उत्पन्न करणे, यांपैकी कोणत्याही गोष्टीच्या ऐश्वर्याची इच्छा करणाऱ्याने वेळ पडेल त्याप्रमाणे उपयोग करावा.

दुसऱ्याच्या मर्मावर आघात केल्यावाचून, दारुण कर्म केल्यावाचून किंवा बगळ्याप्रमाणे ढोंग करून आघात केल्यावाचून

जगात कोणालाही महदैश्वर्य प्राप्त झालेले नाही. कोणतेही काम इतक्या गुप्तपणे करावे, की आपले शत्रू व मित्र या दोघानाही त्याचा पत्ता लागू नये.

या कणिक नीतीच्या प्रकरणाचा उपसंहार श्री. चिंतामणराव वैद्य पुढीलप्रमाणे करतात—

जो कुटिल नीतीचा प्रकार कणिक नीतीच्या अध्यायात दृष्टोत्पत्तीस येतो, तो महाभारतकाळी नवीनच उत्पन्न झाला असावा, असे मानण्यास हरकत नाही. ही नीती म्याकियाव्हेली या युरोपातील प्रसिद्ध कुटिल राजनीतीच्या प्रतिपादकाच्या मताप्रमाणेच कुटिल असून त्याचा पगडा त्या वेळी हिंदुस्थानावर बराच पडलेला होता, असे चाणक्य व चंद्रगुप्त यांच्या इतिहासावरून दिसते. चाणक्याची नीतीही अशाच प्रकारची त्याच्या ग्रंथावरून दिसते. मुद्राराक्षसात त्या नीतीचे बरेच आविष्करण केलेले आहे. [ म. भा. उ. सं.; प्रा. च. को.]

**कणियान** तमिळनाड व केरळ या प्रदेशात राहणारी एक जात. हे पूर्वास्पृश्य होते. हे लोक वैदूगिरी करतात. ज्योतिषाचाही धंदा करतात. कुंडली पाहणे व विवाहादि सस्कारांना मुहूर्त काढून देणे, यासाठी इतर जाती याना बोलावितात. त्रिवांकूरमध्ये तीटकणियान या नावाचा यांचा एक पोटभेद आहे. हे छत्र्या बनवितात व देवऋषिपणही करतात. हे ताळिकेट्टु कल्याणम् व संबधम् या दोन्ही पद्धतींनी लग्ने करतात. [ म. ज्ञा. को. ]

**कण्णकी** तमिळनाडची एक देवता. त्या भागात सती म्हणून हिला भजतात. हिची स्थाने तमिळनाडमध्ये; तशीच लंकेतही आहेत. लंकेत हिला पत्तिनी म्हणतात. शिलप्पधिकारम् हे तमिळ महाकाव्य हिच्यावरच आधारित आहे.

**कण्णप्प** द. भारतातील एक शैव संत. हा एक गरीब शिकारी होता. एकदा एका झाडाखाली याने एक शिवलिग पाहिले आणि त्या शिवलिंगावर त्याची भक्ती जडली. नंतर तो रोज त्या शिवलिंगाची पूजा करू लागला. एक दिवस लिंगाच्या एका डोळ्यातून रक्त येताना त्याला दिसले. अनेक उपाय करूनही रक्त थांबेना, तेव्हा त्याने आपला एक डोळा काढून तिथे चिकटविला. तोच शिवलिगाच्या दुसऱ्याही डोळ्यातून रक्त येऊ लागले. तेव्हा आपला दुसराही डोळा काढण्याचा तो विचार करू लागला. इतक्यात शंकराने त्याला दर्शन दिले व कण्णप्प असे नांवही त्याला बहाल केले.

याच्या कथेवर कण्णप्पर कुरवंजी नामक एक गीतिनाटच मार्कंड नवलर नामक कवीने लिहिले आहे. हे नाटच कथकळि शैलीने सादर करतात.

**काणि** (१) तमिळ भाषेतील काव्याचा एक प्रकार. हे सयमक असते. तायुमानवार या कवीचे परापरकण्णि हे याचे उदाहरण होय. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

(२) एक वाद्य. उडुक्के या वाद्याच्या एका बाजूला तारांच्या जागी घोड्याचे केस बांधतात. त्यांना स्पर्श करताच या वाद्यातून मधुर आवाज येतो. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**कण्णिगे** आकासकन्निगे पाहा.

**कण्णिदा परमेश्वरी** द. भारतातील एक ग्रामदेवता. हिला देवतांची देवता समजतात. कोमटी लोक हिचे उपासक आहेत. हिच्याविषयी पुढीलप्रमाणे कथा आहे—

एकदा कोमटी व म्लेच्छ लोक यांच्यामध्ये युद्ध जुंपले. त्यात कोमटचांचा पराभव झाला. मग त्यांनी पार्वतीला प्रसन्न करून घेतले. तिने त्यांच्या कार्यासाठी एका कोमटी कुटुंबात जन्म घेतला. त्या मुलीचे लावण्य पाहून म्लेच्छांनी तिला मागणी घातली. ते कोमटचांना रुचले नाही. पुनश्च कोमटी व म्लेच्छ यांचे युद्ध झाले. त्यात म्लेच्छ हरले; पण त्याच वेळी कोमटचांना त्या मुलीच्या कौमार्याविषयी संशय आला. त्यांनी तिला अग्निकाष्ठे खायला सांगितले. ती अग्निकुंडात उडी घालून अदृश्य झाली व पार्वतीच्या रूपाने वर आली. तिने मग कोमटचांना आपली उपासना करायला सागितले. [ व्हि. गॉ. सा. इं. ]

**कण्णियम्म** द. भारतातील कोळ्यांची देवता. एखादा वाळूचा उंच सुळका हिचे प्रतीक असते. मासळी मिळेनाशी होते, तेव्हा कोळी लोक ह्या देवतेची पूजा करतात. [ व्हि. गॉ. सा. इं. ]

**कण्व** (१) एक वैदिक ऋषी. हा गोत्रप्रवर्तकही आहे. हा आंगिरसकुलोत्पन्न घोर ऋषीचा पुत्र होता. प्रगाथ नावाचा याचा एक भाऊ होता. हे दोघे बंधू वनात आश्रम उभारून राहत होते. एके दिवशी प्रगाथ हा कण्वपत्नीच्या मांडीवर मस्तक ठेवून झोपला असता कण्व तिथे आला. ते दृश्य पाहून कण्वाला क्रोध आला. त्यावर प्रगाथाने त्याला हात जोडून म्हटले, ' हे बंधो, तुमची पत्नी ही माझी माता असून तुम्ही माझे वडील आहा. ' या बोलण्याने कण्वाचा संशय फिटून

त्याचा रागही शांत झाला (बृ. दे. ६. ३५–३८). कण्व पूर्वी आंधळा होता, त्याला अश्वींनी डोळे व कान दिले, असाही उल्लेख आढळतो.

हा ऋग्वेदाच्या पहिल्या मंडलातील ३६ ते ४३ या सूक्तांचा द्रष्टा आहे. तो यदु-तुर्वशांचा पुरोहित म्हणूनही प्रसिद्ध आहे.

(२) शुक्लयजुर्वेदाच्या काण्वशाखेचा प्रवर्तक.

(३) कश्यप कुलोत्पन्न ब्रह्मर्षी.

**कण्वकुल** कण्व या वैदिक ऋषीचे पुढे स्वतंत्र कुलच निर्माण झाले. कारण बरेचसे सूक्तकार आपणास कण्व म्हणवितात. त्यांच्या अनेक सूक्तांतून कण्वाचा उल्लेख असतो. या कुलातील सूक्तद्रष्टे ऋषी पुढीलप्रमाणे——

वत्स, प्रस्कण्व, कुसादि, गोषूप्ति, अश्वसूप्ति, प्रगाथ, भर्ग, कलि, हर्यत, नीपातिथि, सोभरि, पर्वत, नारद, त्रिशोक, इरिंबिठि, ब्रह्मातिथि, सद्‌ध्वंस, शशकर्ण कुरुस्तुति व सोभरिपुत्र कुशिक. [ म. ज्ञा. को. ]

**कण्व ब्राह्मण** महाराष्ट्रात याची तुरळक वस्ती आहे. हे शुक्लयजुर्वेदाच्या काण्वशाखेचे अनुयायी आहेत. याना प्रथमशाखीय असेही म्हणतात. हे संकेश्वरपीठाचा निग्रहानुग्रह मानतात. सप्तश्रृंगी, मातापुरी, व्यंकोबा आणि खंडोबा या यांच्या कुलदेवता आहेत. [ ब्रा. भि. वि. ]

**कण्वाश्रम** सहाराणपूरमधून वाहणाऱ्या मालिनी नदीच्या तीरावर बीजनौर जिल्ह्यात हा आश्रम होता, असे महाभारतावरून कळते ( वन. ८२.४५ ). राजस्थानात कोटाच्या आग्नेयीस चंबळच्या काठी तो होता, असे श्री. डे सांगतात. शकुंतलेचे पालनपोषण याच आश्रमात झाले. इथे मुले व मुली या दोघांनाही शिक्षण दिले जात असे. [ हि. ध.; हि. जॉ. ए. इं. ].

**कण्हगिरी** (सं. कृष्णगिरि) काराकोरम किंवा काळा पर्वत याचे नाव (वायु पु. ३६). हिंदुकुश पर्वताला पश्चिमेकडे जोडून हा पर्वत आहे. [ हि. जॉ. ए. इं. ]

**कण्हपा** चौऱ्यांयशी सिद्धांपैकी एक. याचे संस्कृत नाव कृष्णपाद असे होते. याला कान्हूपा, कानपा, कान्हफा इ. नावांनीही ओळखतात. तिबेटी परंपरेच्या आधारावर श्री. राहुल सांकृत्यायन हे याला कर्नाटकीय ब्राह्मण मानतात. पण डॉ. भट्टाचार्य यांच्या मते तो कर्नाटकातला नसून ओडिसातला आहे व जातीचा कोष्टी आहे. तारानाथही त्याला ओडिसातलाच मानतात.



कण्हपा

महाराज देवपाल (इ.स. ८०९-८४९) याच्या कारकीर्दीत हा सोमपुरी विहारात पंडित भिक्षू म्हणून राहत असे. हा विहार बंगालमधील राजशाही जिल्ह्यातल्या पहाडपूर या गावी होता. पुढे हा सिद्ध परंपरेत दाखल होऊन जालंदरपादाचा शिष्य झाला. याचे दर्शनावर सहा व तंत्रावर चौऱ्याहत्तर ग्रंथ तजूरमध्ये ( तिबेट ) मिळतात, असे राहुल सांकृत्यायनांनी म्हटले आहे. याशिवाय याने बरीच पद्ये लिहिली असून त्यांचा भोटिया भाषेत अनुवादही झालेला आहे. कण्हपाची पद्ये चर्याचर्य विनिश्चय या ग्रंथात अधिक संख्येने मिळतात. एका पदांत अवधूतीच्या अंगसंगाने उत्पन्न होणाऱ्या महासुखाचे वर्णन कण्हपाने विवाहाच्या रूपकाच्या द्वारे केले आहे–

**भव निर्वाणे पडह मादला ।**
**मण पवण वेणि करण्ड कशाला ।।**
**जअ जअ दुन्दुहि साद उछलिला ।**
**कान्ह डोम्बी विवाहे चलिला ।।**
**डोम्बी विवाहिआ अहारिउजाम ।**
**जउतुके किउ आणुतु धाम ।।**
**अह निसि सुरअ पसंगे जाअ ।**
**जोइणि जाले रअणि पोहाअ ।।**
**डोम्बी एर संगे जो जोइ रत्तो ।**
**खणह न छाडअ सहज उन्मतो ।।**

(चर्यापद, १९.)

कण्हपाच्या या पदातली डोंबिनी किंवा डोमिनी म्हणजे सुषुम्ना मार्गाने प्रवाहित होणारी शक्ति होय. [ चंचल चित्त हाच ब्राह्मण होय.] डोंबिनीचा स्पर्श होईल या भयाने तो अभागी ब्राह्मण सारखा पळत सुटला आहे. विषयांचे जंजाल हे एक नगर होय. डोंबिनी या नगराच्या बाहेर राहते. कण्हपा म्हणतो, की ' हे डोंबिनी, तू नगराच्या बाहेर कुठेही राहा. हा निर्घृण व नग्न कण्हपा तुझा संग करीलच करील. '[सि. सा ; अ. सा.; ना. स.]

**कण्हेर** याची फुले लालसर गुलाबी रंगाची असून त्यांचा गुच्छ असतो. मुळात हे झाड वेस्ट इंडीजमधले आहे, असे सांगतात. परतु हल्ली भारतात ही झाडे सर्वत्र उगवतात. मंदिराच्या आवारात हे झाड लावण्याचा रिवाज आहे. याला वर्षभर फुले येतात. फुलांना मंद सुवास असतो. श्रीकृष्णाला



कण्हेर

लहानपणी ही फुले फार आवडत असत, असे सांगतात. कण्हेरीच्या फुलाचा उपयोग प्रामुख्याने देवाला वाहण्यासाठी करतात. कण्हेरीच्या बिट्ट्यांचा खेळात उपयोग होतो. [ ह. वृ. ]

**कत** विश्वामित्र कुलातला एक सूक्तद्रष्टा ऋषी (ऋ. ३·१७-१८). याने अग्नीचे स्तवन करून विश्वामित्रांना धन मिळावे, असे प्रार्थिले आहे.

**कतरगाम** लंकेतला एक संग्राम देव. लंकेच्या आग्नेय किनाऱ्यावर घनदाट अरण्यात याचे मंदिर आहे. याच्या उत्सवाच्या वेळी केवळ सिलोनीच नव्हेत; तर तमिळनाडमधूनही यात्रेकरू इथे जमतात. हिंदू लोक कतरगाम देवाला फार घाबरतात. कारण तो देव सूड घेणारा असून क्षुल्लक कारणानेही तो रागावतो व माणसावर आपत्ती आणतो, अशी त्यांची समजूत आहे.

या देवासंबंधी आख्यायिका सांगतात, ती अशी – प्रथम हा देव जेव्हा लकेमध्ये गेला, तेव्हा त्याने तिथल्या तमिळ लोकांकडे आसरा मागितला. पण त्यांनी त्याला धुडकावून लावले. तेव्हा तो सिहली लोकाकडे गेला. त्यांनी त्याचा आदर करून त्याला एक पर्णकुटी बाधून दिली. मग तो तिथे राहिला. त्याने तमिळ लोकांना असा शाप दिला, की 'तुमच्यावर नेहमी संकटे येतील आणि मला नवस केल्याशिवाय त्या संकटाचे निवारण होणार नाही.' त्यामुळे तमिळनाडमधले असंख्य भाविक हिंदू संकटकाळी त्याला नवस करतात व तो फेडण्यासाठी तिथे जातात.

सिंहली लोक त्या देवाला महासेन, बराआध, कोतौडा, कडा, कुमार इ. नावानी ओळखतात; तर, तमिळ लोक त्याला कंडस्वामी, कन्नन् कुमारन्, कदिरामन्, अरुमुकन् कुजन, कुलगन् इ. नावांनी सबोधतात.

या देवतेच्या उत्पत्तीचा इतिहास उपलब्ध नाही; परतु दंतकथांवरून असे दिसते, की हा देव मुळात एक भारतीय राजा होता. त्याचे नाव कुमार. गणपती हा त्याचा भाऊ. एकदा कुमार लंकेच्या अरण्यात शिकारीला गेला असता, त्याला एक सुदर तरुणी दिसली. तिचे नाव वल्लिअम्म असे होते. वेद्दा आदिवासी जमातीच्या प्रमुखाची ती मानलेली कन्या होती. राजाला तिच्याशी लग्न करायची इच्छा झाली, पण ती त्याच्याबरोबर जायला तयार होईना. मग कुमाराने एक युक्ती केली. वल्लिअम्माला हत्तीची फार भीती वाटे. म्हणून त्याने गणपतीला हत्तीचे रूप घ्यायला सांगितले. गणपतीने हत्तीच्या रूपात तिला भय दाखवावे आणि कुमाराने तिचे रक्षण करावे, असे ठरले. गणपतीने एक जलपात्र कुमाराच्या हाती दिले व कार्यभाग उरकल्यावर ते आपल्या मस्तकावर शिपडण्यास सांगितले. तेणेकरून गणपतीला त्याचे मानवरूप पुनश्च प्राप्त होणार होते. कुमाराची ही युक्ती सफल झाली व त्याचा वल्लिअम्माशी विवाह झाला. पण या सर्व गडबडीत गणपतीने दिलेले पाणी सांडून गेले होते. त्यामुळे गणपतीला पूर्वीचे रूप परत मिळाले नाही. हत्तीचे मस्तक आणि मानवी धड असे त्याचे रूप कायम झाले. कुमार व वल्लिअम्म नंतर कतरगाम या ठिकाणी राजा–राणी म्हणून राहू लागली.

दरवर्षी पंधरा दिवस या देवाचा उत्सव होतो. त्या वेळी देवाची मिरवणूक निघते. देवापुढे नृत्यगायन होते. शेवटच्या रात्री मेनिकगंगा नदीत देवाने स्नान केल्यावर उत्सव संपतो.

गौतम बुद्ध लंकेला गेल्या वेळी या ठिकाणी गेला होता. म्हणून बौद्धांनाही हे स्थान पूज्य झाले आहे.

**कतिबहु** आसामातील नागा जमातींचा एक प्रमुख उत्सव. भाताच्या लोंब्या पिकत आल्या म्हणजे हा उत्सव करतात. गर्भवती पृथ्वीचा हा उत्सव आहे, असे मानतात. त्यासाठी केळीचा एक लहानसा खुंट एखाद्या स्त्रीप्रमाणे सजवितात. मग त्या स्त्रीच्या पोटाला भाताच्या लोंब्या, अशोकाची पाने इ. वस्तू वरून बाधतात. त्यानंतर सात दिवस नाचगाणे चालते. घरात गोड धोड पदार्थ होतात. शेवटच्या दिवशी अत्यंत अश्लील भाषा वापरून एकमेकाची टिंगल करतात. अश्लील बोलल्याने गर्भाला अपाय करण्यासाठी आलेली भुतेखेते पळून जातात, अशी समजूत आहे.

नागांप्रमाणेच आसामातील इतरही लोक आश्विनाचे शेवटचे सात दिवस हा उत्सव करतात. शेवटच्या दिवशी घरोघर दीपोत्सव करतात. [ बॅ. आ. क. ]

**कत्तन देवर** तमिळनाडमधील एक ग्रामदेव. याच्या उत्पत्तीविषयी पुढील दोन कथा आहेत—

एका ब्राह्मण स्त्रीला व्यभिचारापासून एक मुलगा झाला. जन्मताच तिने त्याला टाकून दिले आणि एका परिटाने त्याचा संभाळ केला. मोठा झाल्यावर त्याने आपल्या अनैतिक जन्माचा सूड घेण्यासाठी त्या प्रदेशातील सर्व स्त्रियांना



कत्तन देवर

बलात्काराने भ्रष्ट केले. लोकानी त्याला पकडण्याचा पुष्कळ प्रयत्न केला; परंतु तो त्यांच्या हाती सापडला नाही. शेवटी तो आपण होऊनच सुळावर चढला व भूतयोनीत गेला. सांप्रत लोक त्याला मरिअम्माचा सेवक समजतात.



एकदा इंद्राने एका ब्राह्मणाचा वध केला. मरता मरता ब्राह्मणाने इंद्राला शाप दिला, की "लग्न होताच तुझे धड कुजून झडेल व लोक तुला कत्तन देवर म्हणून ओळखतील." या शापामुळे इद्राला कोणी मुलगीच देईना. शेवटी कृष्णाला त्याची दया आली व त्याने मोहिनीचे रूप घेऊन त्याच्याशी लग्न केले. पण त्याच संध्याकाळी इंद्राचे धड गळून पडले व शिर तेवढे शिल्लक राहिले. अद्यापही तो त्याच अवस्थेत आहे.

चैत्र महिन्यात याची जत्रा भरते. तिथले पदयाची जातीतले पुरुष स्त्रियांचा वेष घेऊन व गळयात ताळी (मंगळसूत्र) बांधून त्या जत्रेत येतात व संध्याकाळ झाल्यावर गळयातली ताळी तोडून टाकतात. [ द्र. गॉ. मॉ. हि. ]

**कत्तिकच्छन** कार्तिक पौर्णिमेला साजरा होणारा एक प्राचीन उत्सव. कत्तिक नख्खत्त अथवा कत्तिक रती अशीही याची अन्य नावे आहेत. काशी, श्रावस्ती, इ. मोठमोठ्या नगरांतून लागोपाठ सात दिवस हा उत्सव चालत असे. नगर शृंगारणे, रात्री दिवे लावणे, यक्षराज चित्त याचे पूजन करणे, इ. कार्यक्रम या वेळी होत.

**कत्यूरी राजवंश** हिमालयातील पहिला ऐतिहासिक राजवंश. या वंशातल्या प्रारंभीच्या राजांचा काल व वंशोद्गम ठरविणे, ही इतिहाससंशोधकांच्या पुढची एक समस्या आहे. कत्यूरी राजे व पालराजे यांच्या अभिलेखात बरेच साम्य असल्यामुळे एवढेच कळू शकते, की 'कत्यूरीप्रशस्ती' लिहिणाऱ्या लेखकांना सुरवातीच्या पालराजांच्या अभिलेखांचा चांगल्या प्रकारे परिचय होता. कत्यूरींचे पाच ताम्रपट व एक शिलालेख आजवर मिळाले आहेत. त्यांचे कोष्टक पुढीलप्रमाणे—

| प्राप्तिस्थान | अभिलेख | राजा | काल | राजधानी | राजसंवत् |
|---|---|---|---|---|---|
| १ पांडुकेश्वर | ताम्र | ललितशूर | ९४५-६० | कार्तिकेयपूर | २१ |
| २ पांडुकेश्वर | ताम्र | ललितशूर | ९४५-६० | कार्तिकेयपूर | २२ |
| ३ वागेश्वर | शिला | भूदेव | ९६०-८० | — | — |
| ४ बालेश्वर | ताम्र | देशट | १०१५-३० | कार्तिकेयपूर | ५ |
| ५ पांडुकेश्वर | ताम्र | पद्मट | १०३०-४५ | कार्तिकेयपूर | २५ |
| ६ पांडुकेश्वर | ताम्र | सुभिक्षराज | १०४५-६० | सुभिक्षपूर | ४ |

यांतील पहिल्या तीन अभिलेखांवरून कत्यूर वंशवृक्ष तयार होतो, तो असा—

१ वसन्तन (= सज्यनरा)
|
२ खर्पर
|
३ अधिधज (= लद्धा)
|
४ त्रिभुवनराज
|
५ निवर्त (— नाशू)
|
६ इष्टगण (= वेगा)
|
७ ललितशूर (= लया)
|
८ भूदेव

पुढच्या तीन अभिलेखावरून वंशवृक्ष तयार होतो, तो असा—

१ सलोणादित्य (= सिहवली)
|
२ इच्छट (= सिंधु)
|
३ देशट (= पद्मल्ल)
|
४ पद्मट (= ईशाल)
|
५ सुभिक्षराज

वर दिलेली दुसरी वंशपरंपरा ही पहिल्या वंशपरपरेची उत्तराधिकारिणी असावी. वरील पाचही अभिलेखाची लिपी कुटिल आहे व तिबेटमधून प्राप्त झालेल्या ताम्रपटांशी मिळतीजुळती आहे. वरील चार अभिलेखात कत्यूर राजवंशाची राजधानी कार्तिकेयपूर असल्याचे दिसते. याचाच अपभ्रंश पुढे कत्यूर असा झाला. दुसऱ्या परंपरेतल्या सुक्षिभराजाने तिचे मूळ नाव बदलून तिला स्वतःच्या नावावरून सुभिक्षपूर असे नाव ठेवलेले दिसते. कत्यूरलाच सांप्रत जोशीमठ म्हणतात.

ललितशूर हा कत्यूरी वंशाचा संस्थापक आहे. तोच कत्यूरी वंशातला सर्वात प्रतापी राजा आहे. भोटसाम्राज्य दुर्बल होत आहे, असे दिसल्यावरं त्याने पालराजांचे साहाय्य घेऊन भोटसत्तेला परास्त केले आणि तिथे आपले राज्य स्थापले. ऐतिहासिक परंपरेवरून असे दिसते, की या वंशाचा संस्थापक वासुदेव असून वंशसमापक वीरदेव हा होता. पण आश्चर्याची गोष्ट ही, की ही दोन्ही नावे कोणत्याही अभिलेखात नाहीत आणि वंशावळीतही नाहीत.

अट्किन्सनने जी ऐतिहासिक सामग्री गोळा केली आहे, तिच्यावरून पुढील गोष्टी कळतात—

मुसलमान इतिहासकाराच्या मतानुसार काबूलमध्ये कटोरमान वंशाचे राज्य होते. त्या राजपरंपरेत एक वासुदेवही होता. या वासुदेवाचा उत्तराधिकारी कनक हा त्या वंशातील शेवटचा राजा होय. जोशीमठाला प्रथम कार्तिकेयपूर म्हणत. पुढे ते नाव बैजनाथ या त्याच्या नव्या राजधानीला प्राप्त झाले.

सुभिक्षराज (इ. स. १०४५–६५) याच्यानंतर कत्यूरी वंशावळ खंडित होते, हे त्या वंशाच्या ऱ्हासाचे सूचक असावे. पण परंपरेवरून कळते, की तेराव्या शतकाच्या शेवटी कत्यूरीच्या मूलवंशाचा ऱ्हास झाला असला, तरी त्या वंशातले पुरुष डोटी, अस्कोट, पाली (द्वाराहट) या भागांवर स्वामित्व करीत होते.

वीरदेव हा कत्यूरी वंशाचा शेवटचा राजा अधर्मी आणि अत्याचारी निघाला. त्याच्यानंतर कत्यूरी राज्य छिन्नभिन्न झाले. गढवाल त्या राज्यातून अलग झाले. ब्रह्मदेव या कत्यूरी पुरुषाने कुमाऊँचे राज्य मिळविले. दुसरी शाखा डोटी येथे राज्य करू लागली. तिसरी अस्कोटवर सत्ता चालवू लागली. चौथ्या शाखेने वारामंडलात (अलमोडा प्रदेश) राज्य मिळविले पाचवी शाखा कत्यूर व दानपूर परगण्याची शासक बनली. सहाव्या शाखेचे राज्य द्वाराहट व लखनपूर येथे स्थापित झाले.

डोटी येथील राज्य बराच काल प्रभावशाली राहिले. सीरा राज्य डोटीच्या कत्यूरी वंशाचीच एक शाखा होती. सोर येथील बम (ब्रह्म) राजवंशही डोटीचीच एक शाखा असून त्याची राजधानी पिठौरागढ ही होती. अस्कोटचा राजवंशही कत्यूरीचीच शाखा होती. कत्यूरी त्रिलोकपाल याचा पुत्र अभयपाल याने इ. स. १२७९ साली कत्यूरहून अस्कोटला येऊन तिथे एका छोट्या राज्याची स्थापना केली. अस्कोट हा अष्टकोट या शब्दाचा अपभ्रंश आहे. इथल्या राजांना रजवार ही उपाधी होती. [कुमाऊँ]

**कत्ल** याचा अर्थ वध किंवा खून असा आहे. जाणूनबुजून हत्याराचा उपयोग करून एखाद्या व्यक्तीचा जीव घेणे महापाप आहे, असे इस्लामी धर्मशास्त्रात मानलेले आहे. ते करणाऱ्याला नरकयातना भोगाव्या लागतात. अशा वधाबद्दल बदला घेणे आवश्यक असते, असे कुराणात म्हटले आहे (सूरा २. १७३; ४. ९५). अशा व्यक्तीला देहान्ताची शिक्षा सांगित-

लेली आहे. मात्र ज्याची हत्या झाली असेल, त्याचे आप्त त्याला क्षमा करून जीवदान देऊ शकतात. अजाणता दुसऱ्याच्या मृत्यूला कारणीभूत झालेला मनुष्य प्रायश्चित्त घेऊन व दंड भरून सुटू शकतो. प्रायश्चित्त म्हणून दोन महिने उपास करावा व एका गुलामाला मुक्त करावे, असे सांगितले आहे. जाणून-बुजून व अजाणता एखाद्याचा वध करणाऱ्याला त्या मृत व्यक्तीच्या संपत्तीचा हक्क प्राप्त होत नाही [ डि. इ. ]

**कथक नृत्य**- भारतातील चार शास्त्रीय नृत्यांपैकी एक नृत्य. ही नृत्यकला उ. प्रदेशात जन्म पावली. कथा या शब्दावरून कथक हा शब्द बनला आहे. कित्येक लोक त्याचा कथ्थक असाही उच्चार करतात. प्राचीनकाळी उ. प्रदेशात कथा सांगणाऱ्या लोकांचा एक वर्ग होता. पुराणकथा काव्यात ग्रथित करून त्या मंदिरातून सांगणे, हा त्यांचा व्यवसाय होता. प्रथम ते आपली कथा साध्या, सरळ पद्धतीने सांगत; पण पुढे कथा परिणामकारक व्हावी आणि श्रोत्याच्या मनावर ती ठसावी, यासाठी त्यानी कथागायनाबरोबरच त्यात अभिनयाचाही समावेश केला. त्यातूनच पुढे कथक नृत्य जन्माला आले. मंदिरसंस्थेच्या अनुषंगाने जन्मल्यामुळे सुरवातीस कथकळीप्रमाणेच हेही एक धार्मिक नृत्यच होते. आजच्या कथक नृत्याहून ते वेगळे होते आणि प्रयोगावस्थेतही होते.

उ. प्रदेशात मोगली अंमल सुरू झाल्यावर मोगलांनी हे नृत्य आपल्या करमणुकीसाठी मंदिरातून राजदरबारात आणले. मुळात ते भक्तीच्या आविष्काराचे साधन होते; पण मोगली आश्रय मिळाल्यावर तेच शृंगार-विलासांच्या आविष्काराचे माध्यम बनले. मोगलानी या कलेची वाढ केली खरी; पण तिचे शुद्ध स्वरूप मात्र बिघडवून टाकले. मोगली दरबारातला ढिलेपणा आणि पाचकळपणाही त्या कलेत शिरला.

त्यामुळेच सभ्य व प्रतिष्ठित हिंदूंची त्या नृत्यावर इतराजी झाली. हलक्या दर्जाचे कलावंत सोडले, तर मोठ्या दर्जाचे हिंदू कलाकार त्या नृत्याकडे पाठ फिरवून बसले. त्यामुळे त्याला समाजात प्रतिष्ठाच उरली नाही. पुढे मोगलांच्या ऱ्हासानंतर या नृत्यालाही उतरती कळा लागली. धंदेवाईक नर्तकीच्या दिवाणखान्याशिवाय ही कला अन्यत्र कुठे दिसेनाशी झाली. सभ्य लोक त्याला बाजारनृत्य किंवा बाजारबसवीचे नृत्य, असे तुच्छतापूर्वक म्हणू लागले व त्यापासून चार पावले दूर राहू लागले. पण असे झाले, तरी ही कला नष्ट न होता काही ठिकाणी जीव धरून राहिली. मोगलकालातल्याच काही घराण्यांनी पुढे या कलेची उत्तम जोपासना केली.

कथक हे पूर्णपणे ताल आणि लय यावर आधारलेले नृत्य आहे. ही कला हिंदुस्थानी संगीत पद्धतीचाच एक भाग आहे, असे म्हणायला हरकत नाही. यात नृत्यापेक्षा नृत्ताला अधिक महत्त्व असते. याच्या भिन्न भिन्न प्रकारात नृत्ताचे सौंदर्य खुलविले जाते.

या नृत्याला मृदंग किंवा तबला आणि सारंगी एवढी साथ पुरते. नर्तक किंवा नर्तिका पायांत चाळ बांधून नृत्याला उभी ठाकते. नर्तकाचा पोशाख चुणिदार पायजमा, वर लांब अंगरखा व त्यावर आवळलेला शेला किंवा कमरपट्टा असा असतो. पूर्वी नर्तिकाही असाच पोशाख करीत; पण अलीकडे साडी किंवा घागरा, त्यावर चोळी अथवा ब्लाउज आणि या सर्वांवर ओढणी, असा कथक नर्तिकेचा पोशाख ठरून गेला आहे.

नर्तकाची तयारी झाली, की सारंगीवाला ज्या तालात नृत्य करायचे असेल त्या तालाचा लेहरा किंवा नघमा धरतो. विशिष्ट रागातली ही एक अस्ताई असते व तो तिचीच पुनः-पुन: आवर्तने वाजवीत राहतो. नर्तक त्या लेहऱ्यावर त्रिताल, झपताल किंवा एकताल या ठराविक तालात नृत्याला सुरुवात करतो. नृत्याची लय प्रथम संथ असते. ती पुढे सवाई, दिढी, दुगण, चौगुण आणि आठगुण अशा पटींनी वाढविली जाते.

मृदंगातून किंवा तबल्यातून ज्या प्रकारचे बोल निघतात, त्याना अनुसरूनच नर्तकाचे नृत्य चालते. या नृत्याचे जे विविध प्रकार आहेत, ते निरनिराळ्या बोलांवरच आधारलेले असतात. या बोलाचे वर्गीकरण पुढीलप्रमाणे आहे—

(१) **गणेशवंदन**— कार्यारंभी विघ्नहर्त्या गणपतीला नमन करण्याची प्रथा पुरातन आहे. कथक नृत्यातही ही पद्धत पूर्वी होती, पण मोगली काळात ती बंद पडली. अलीकडे पुनश्च तिचा स्वीकार करण्यात आला आहे. या रचनेत गणेशस्तुतीचे शब्द मृदंगाच्या बोलात गुंफलेले असतात. उदा०—

**गं गं गणपति गजमुख मंगल गिट**
**गिड गिट गिड थुन् थुन् तत् तत् थै—**
**जय जग वंदन व-ऋतुं-ड दा नो धा ता—**
**विघ् नह रन, सुख कर न, धा गेन धागे**
**धिमि किटि धिमि किटि थुडंग थुडंग**
**ददि गण थै थुडंग थुडंग**
**ददि गण थै थुडंग थुडंग ददि गण थै ।**

(२) **थाट**— याचा अर्थ सजावट किंवा डौलदार अवस्थान. आमद नृत्यापूर्वी नर्तक हे अवस्थान (पोज) घेतो. याला थाट बंधन असेही म्हणतात.

(३) **आमद**— या फारसी शब्दाचा अर्थ आगमन असा आहे. हे प्रारंभीचे नृत्य असते. याचे बोल पुढीलप्रमाणे आहेत—

**धा त क थूं गा धा गे दिं गे**
**ता धा धिन् ता धेत्ता किडधा**
**तक्का थूं गा क ति ट क ता**
**ति टि क ता गे दि गि न धा**



कथक – सलामी

(४) **तत्कार**–'ता थै तत्' हा कथक नृत्याचा प्राणभूत पदन्यास आहे. त्यातूनच पुढील सर्व नृत्यविस्तार व्हायचा. कालियमर्दनाच्या वेळी कृष्ण त्या नागाच्या फणावर नाचला, तेव्हा हे ध्वनी त्याच्या पदाघातातून निघाले, अशी समजूत आहे. म्हणून कथक नृत्यात तत्कार हे कुठल्याही तालातील पदन्यासाचे मूल स्वरूप समजतात. तत्कार करताना नर्तकाची पावले सपाट व झटपट पडतात. सर्व तालाचे स्वतःचे असे तत्कार असतात आणि कुठल्याही तालात नृत्य सुरू करण्यापूर्वी ते लागोपाठ दाखवायचे असतात. तत्कार हा मूळ, दुप्पट आणि चौपट या तीन गतींत कमीत कमी दाखविला जातो. कधी कधी यापेक्षाही पटी वाढवितात. तत्कार करताना पायावर जोर असतो. त्या वेळी हाताना काम नसते; म्हणून ते छातीवर ठेवले जातात. पदन्यासांची लय वाढते, तेव्हा हात छातीवरून कमरेवर घेतात. संथ लय असते, तेव्हा



कथक – तत्कार

तत्काराबरोबर भुवयाही हालवतात. ज्या पायाचा आघात त्याच बाजूची भुवई हालवायची असते.

(५) **परमेलु**– पर अर्थात् भिन्न स्वरांचा ज्यात मेळ घातलेला असतो, अशा बोलांना परमेलु असे नाव आहे. वाद्यांचे ध्वनी व बोल याचे सुरेख मिश्रण करून ही रचना केलेली असते. हे बोल नगारा, पखवाज, झांज मंझीरा, इ. वाद्याचे अनुकारी असतात. उदा०–



कथक – परमेलु

**जग जग थरि थरि कुकु थरि नग थरि**
**धिमि किट तक नग थरि किट थूंगा**
**थरिक थरिक थरिक तनग धिमिकि ततक**
**जगज गजग थुन् थुन् थुन् तथूंगा ।**

(६) **परन**— हे बोल अनेक आवर्तनांचे, वेगवेगळ्या लयीचे व धावते असतात. पखवाजातून हे बोल जोमदारपणे काढले जातात. या बोलावर नृत्य करताना नर्तकाचे अंगविक्षेपही जोरकस होतात. या बोलांचे एक उदाहरण असे—

**किट तक थुन् थुन् ना ते ते ता धा**
**दिन् ता किडधा धित् ता**
**कतिटधा धिन् ता कत् तिट**
**धा दिन् ता किडधेत् धा धिन् ता**
**कतिटधा थुन् – ता धा कतिट धा**
**थुन् – ता धा ।**

(७) **क्रमलय**– 'तत्कार की बढत' असे याचे रूढ नाव आहे. ही बढत सव्वा, दीड, पावणे दोन, दोन इ. क्रमाने होते. यात नर्तक तालातील मूलभूत तत्काराने नृत्याला प्रारंभ करतो. मग भिन्न लयजाती दाखवून शवटी जलद लयीत येतो. उदा०–

**तत् थै थै तत्**
**ता थै थै तत्**
**आ थै थै तत्**

(८) **कबित**– ही एक तालबद्ध अशी काव्यरचना असते. तीत सवैया, घनाक्षरी, पंचचामर, इ. वृत्ते वापरलेली असतात.

नर्तक त्या कवितातला अर्थ विविध अभिनयाच्या द्वारे व्यक्त करतो व पायांनी ताल धरतो. यातली एक रचना पुढील-प्रमाणे--

**तांडव गत मुंडन पर**
**निर्तत वनमाली**
**पं पं पं पग पटकत**
**फं फं फं फनन उपर**
**बिं बिं बिं बिनति करत**
**नागबधू आली।**

(९) **तोडा व तुकडा**--तोडचात निरनिराळचा लांबीचे बोल असतात. आखूड बोलांना तुकडे म्हणतात. त्यात नृत्याची 'ता थै' इ. अक्षरे असतात. तोडचाचा मुख्य भर ठोक्यावर असतो. ज्या ठोक्यावरून सुरवात होते, त्या ठोक्याला सम म्हणतात. ही तालाची पहिली मात्रा असते. तोडचाचा शेवटही सामान्य-



कथक -- तोडा व तुकडा

पणे समेवरच होतो. तोडचाची अखेर सुंदर व्हावी म्हणून नर्तक त्यात अनेक प्रकारच्या तिहाईचा अंतर्भाव करतात.

या तिहाई कित्येकदा अत्यंत कठिण असतात. नर्तक लोक या तिहाईतच आपल्या प्रतिस्पर्ध्यावर मात करतात.

तोडा चालू असताना पदाघात होतात. त्यांना मस्तक, मान आणि हात याच्या हालचालींची साथ द्यायची असते. गिरक्या किंवा चक्कर हे कथक नृत्याचे वैशिष्टच होय. गिरक्या घेताना पदाघातही तालात झाले पाहिजेत, असा नियम आहे. एकाच ठिकाणी उभे राहून तीन, नऊ, सत्तावीस अशा गिरक्या घेणे, ही दीर्घ अभ्यासाने साध्य होणारी अत्यंत कठिण गोष्ट असते.

**गतनिकास**--कथक नृत्यात अभिनयाचा प्रारंभ गतनिकास या प्रकारापासून होतो. गतभाव म्हणजे एखादी कथा सांगण्याचा अभिनय. यात पदन्यासाचे खास काम नसते. या वेळी हात व शरीर यांची रसानुरूप हालचाल करायची असते. या प्रकारात विविध मुद्रांचाही अंतर्भाव असतो. या वेळी लेहरा



कथक -- गिरकी

व तबल्याचा ठेका द्रुत लयीत चालतो, पण नृत्य मात्र संथ लयीत होते. कृष्णलीला, शिव--पार्वतीची किंवा अन्य कोण्यातरी देवाची कथा, तसेच मानवी व्यवहारातल्या दैनंदिन घटना अभिनयाच्या द्वारे व्यक्त केल्या जातात. याशिवाय जलभरण, केस विचरणे, फुले तोडणे, पूजासाहित्य तयार करणे, पूजा करणे, इ. मनोहर नृत्याभिनयही गतमधून दाखविले जातात.

**पढन्त**--पठण या शब्दावरून हा शब्द बनला आहे. या प्रकारात नर्तक किंवा त्याचा गुरू नृत्याचे बोल म्हणतो व टाळचा देऊन ताल धरतो. यात शुद्ध उच्चार, स्वरभेद दर्शविणे व योग्य जागी जोर देणे, या गोष्टींना महत्त्व असते. जातीचा व यतीचा उपयोग करून हे बोल रचलेले असतात. चतस्र, तिस्र, खंड, मिश्र व संकीर्ण असे जातींचे पाच प्रकार आहेत. सम, गोपुच्छ, स्रोतगत, मृदंग व पिपीलिका असे यतीचे पाच प्रकार आहेत. लयीच्या भिन्न भिन्न रूपांमुळे वेगवेगळे यती होत असतात.

**संगीत**--कथक नृत्याचे विविध प्रकार हिंदुस्थानी संगीताच्या प्रकारांवर आधारलेले असतात. ध्रुपद, कीर्तन, होरी, धमार, भजन, ठुमरी, इ. संगीत-प्रकारांवरून त्या त्या नृत्यप्रकारांना नावे दिलेली आहेत. कथक नृत्याचा मुख्य विषय

अनुराग किंवा तद्विषयक अनुकूल–प्रतिकूल भाव हा असतो. याला ठुमरीभाव असे म्हणतात. यात अभिनयाला प्राधान्य असते. वादक ठुमरी वाजवितो व नर्तक ती तोंडाने म्हणत अभिनय करतो. हे नृत्य उभ्याने किंवा बसूनही करता येते. यात कलाकाराला आपले अभिनय-कौशल्य दाखविण्याला पुष्कळ वाव असतो.


कथक – पलटा

**घराणी –** कथक नृत्याची जयपूर, लखनौ व बनारस अशी तीन घराणी प्रसिद्ध आहेत. जय-पूरच्या घराण्याने कथक कलेतील शुद्ध नृत्त किंवा नर्तन या अंगाची विशेषत्वाने वाढ केली आणि ते घराणे त्या दृष्टीने प्रसिद्धीस आले. जयलाल हा या घराण्याचा प्रवर्तक होय. त्याच्या शिष्यपरंपरेत नारायणप्रसाद, सुंदरप्रसाद, शंकरप्रसाद, गौरीशंकर, कार्तिकराम, मोहनप्रसाद, हजारीलाल, कुंदनलाल व सुदरलाल असे नामांकित नर्तक झाले. लखनौ घराण्याने नृत्ताच्या बरोबरीने नृत्य व मुद्राभिनय याही अगांची वाढ केली. ठाकूरप्रसाद हा या घराण्याचा प्रवर्तक होय. कालिकाप्रसाद व बिन्दादिन हे ठाकूरप्रसादाचे पुत्र. या दोघांनी लखनौ घराण्याच्या उभारणीसाठी फार मेहनत घेतली व कथक नृत्याच्या तंत्रांत मोलाची भर घातली. अच्छनमहाराज, लच्छुमहाराज व शंभुमहाराज हे कालिकाप्रसादाचे सुपुत्र होत. लखनौ घराण्यात हे तिघेही नावाजते ठरले आहेत. या घराण्यातील चालू पिढीत बिरजूमहाराज, दमयंती जोशी, मेनकादेवी ही मंडळी सुप्रसिद्ध आहेत. बनारस घराणे सुख-देवप्रसाद यांनी निर्माण केले. गोपीकृष्ण व सितारादेवी ही याच घराण्यातील होत.

एकाकाळी कथक नृत्याला पडता काळ आला होता; पण आज ते दिवस बदलले आहेत. सांप्रत इतर कलांबरोबरच कथक नृत्यालाही ऊर्जितावस्था येत आहे. भारत सरकारही अशा कलाकारांचा राष्ट्रीय सन्मान करून त्यांना समाजात प्रतिष्ठा प्राप्त करून देत आहे. त्यामुळे कथक नृत्यकला यापुढे अधिकाधिक प्रगत व प्राणवान होईल, अशी आशा करायला हरकत नाही. [ रोहिणी भाटे; मोहन खोकर ]

**कथकळि** कथकळि हे केरळातील एक सुप्रसिद्ध नृत्य आहे. भारतातल्या चार शास्त्रीय नृत्यांपैकी ते एक गणले जाते. कथ-कळि हा जोड शब्द आहे. त्याचा अर्थ कथेवर आधारलेले नृत्यनाट्य असा होतो. केरळ आणि त्यातल्या त्यात त्रिवांकुर (त्रावणकोर) हे कथकळीचे माहेर समजतात. हा नृत्यप्रकार गेल्या तीन-चारशे वर्षांतच स्वतंत्र-पणे पुढे आला असला, तरी त्याचे मूळ मात्र दोन हजार वर्षां-पूर्वी केरळात प्रचलित असलेल्या नृत्त-नृत्य प्रकारात आढळून येईल. केरळात उगम पावून बहरलेल्या अनेक नृत्य–नाट्य संप्रदायाचा सुदर परिपाक म्हणजे कथकळि होय. आर्य व द्रविड या दोन संस्कृतींचा मिलाफ कथकळीमध्ये झालेला आढळेल. त्या दोन संस्कृतींतील विविध कला व देवतार्चनाचे प्रकार यांचे संमिश्रण कथकळीच्या तंत्रात झालेले दिसेल.

म्हणूनच कथकळीच्या इतिहासाचा मागोवा घेताना केरळात इतिहास-पुराणकाळी प्रचलित असलेल्या सर्व कलाप्रकारांची आणि त्यांच्या तत्राची माहिती घ्यावी लागते. चाक्यार-कूत्तु, कूडियाट्टम्, मुटियेट्टु, तिरयाट्टम्, नियाट्टम्, शास्त्रकळि, एझामट्टुकळि, कामसंताकम्, मीनाक्षी-नाटकम्, कृष्णनाट्टम् या सर्व प्राचीन-अर्वाचीन कलाप्रकाराचा त्यात समावेश करायला हवा.

**चाक्यारकूत्तु** हा केरळातला सर्वांत जुना नृत्य-नाट्य प्रकार आहे. फार पूर्वकाळी केरळात आलेल्या आर्य लोकांनी हा कथाभिनयाचा प्रकार तिथल्या जीवनात प्रथम सुरू केला. शिल-प्पधिकारम् या तमिळ महाकाव्यात त्याचा उल्लेख आहे. चेर राजघराण्यातील सुप्रसिद्ध राजा शेंगट्टुवान् हा उत्तर दिग्विजय करून आल्यावर उत्तर त्रिवांकुरमधल्या पारावूर या गावच्या चाक्यारने कूत्तु नामक त्रिपुरविजयाच्या कथेवर आधारलेले कथानाट्य दाखवून, त्या राजाचे मन रिझविले, असा तिथे उल्लेख आहे.

या प्रकाराला चाक्यारकूत्तु म्हणण्याचे कारण असे, की चाक्यार जातीच्याच पुरुषांना तो कथाभिनय करण्याचा अधिकार असतो. चाक्यार लोक त्या भागांत वंशपरत्वे मंदिरसेवा करणारे आहेत. महाभारतकालीन सूत लोकांचे आपण वंशज आहो, असा त्यांचा दावा आहे.

चाक्यार हा आपली कथानके पुराणे आणि महाकाव्ये यांतून निवडतो. त्याच्या साथीला मिझावु नावाचे एक वाद्य असते. नांबियार जातीचाच पुरुष ते वाजवितो. संबळासारखे दुसरे एक वाद्य असते, ते नङ्गियार जातीची स्त्री वाजविते. चाक्यार विनोदी संवाद बोलत असताना किंवा अनेक क्लृप्त्या योजून प्रेक्षकात हास्यकल्लोळ उठवीत असताना नङ्गियार स्त्रीने मात्र

चेहऱ्यावरची सुरकुतीही न मोडता निर्विकार मुद्रेने स्तब्ध उभे राहिले पाहिजे, असा एक विचित्र दंडक आहे.

चाक्यारकूत्तूचा प्रयोग जेव्हा एकच व्यक्ति करते, तेव्हा त्याला प्रबन्धकूत्तु म्हणतात. जेव्हा अनेक चाक्यार मिळून एकत्र प्रयोग करतात, तेव्हा त्याला कूडियाट्टम् म्हणतात. यात अभिनय हे प्रधान अग असते. हा एक लांबलचक नाटचप्रकार आहे. सबंध नाटक अभिनीत करायचे, तर त्यासाठी कित्येक रात्री लागतात. मल्याळम् भाषेत कूडियाट्टम्साठी लिहिलेली 'सुभद्रा–धनजयम्', 'तपती–संवरणम्' इ. अनेक पौराणिक आख्याने आहेत. हस्ताभिनय व मुखाभिनय या गोष्टी कूडियाट्टम्मधूनच कथकळीत आल्या आहेत. त्याचप्रमाणे पात्राचे चेहरे रंगविणे व कथेतील भूमिकेला अनुसरून त्या त्या पात्राची वेषभूषा करणे, या गोष्टीही कूडियाट्टम्मधूनच कथकळीने स्वीकारल्या आहेत.


कथकळि – दमयंती

**मुटियेट्टु–** द्रविड लोक हे प्राचीन काळापासून भगवती शक्तीचे उपासक आहेत. त्यांच्या शक्तिपूजेत नृत्याला फार महत्त्व होते. मुटियेट्टु, तिरयाट्टम्, तियाट्टम् हे शक्तिपूजेतील नृत्यप्रकार होत. भगवतीने शुंभ–निशुभादि दैत्य–दानवांवर जे विजय मिळविले, त्यांच्या कथा या प्रकारातून अभिनीत केल्या जात. त्या प्रसंगी देव–दानवांची पात्रे अनुरूप मुखवटे घालून सजवीत आणि राक्षसांच्या भूमिका करणारे नट भयानक वेष करून रगभूमीवर थयथया नाचत. कथकळीत तोंडावर मुखवटे घालण्याची प्रथा आली, ती या शक्तिपूजेच्या नृत्यातूनच. चेंडा नावाचे दोन काठयांनी वाजविले जाणारे ढोलक्यासारखे वाद्यही याच नृत्यप्रकारातून कथकळीत दाखल झाले आहे.

**कृष्णनाट्टम्–** कथकळि आणि पुरातन विविध कलाप्रकार यांना जोडणारा ठळक दुवा कोणता असेल, तर तो कृष्णनाट्टम् हा होय. कालिकतचा राजा मानवेदन याला कृष्णनाट्टम्चा जनक मानतात. तो १७ व्या शतकात होऊन गेला. देवतार्चनाचे एक साधन म्हणून मानवेदनने कृष्णनाट्टम् रूढ केले. त्याच्यापूर्वी बरीच शतके केरळात 'अष्टपदी आट्टम्' नावाची एक नृत्यकला प्रचलित होती. जयदेवाच्या गीतगोविंद काव्याच्या आधारे त्या नृत्याचे प्रयोग होत. मानवेदनने त्याच धर्तीवर कृष्णपदी नावाचे एक आख्यान रचून ते कलाकारांच्या द्वारे रंगभूमीवर आणले. हे आख्यान संस्कृतात होते आणि कृष्णजन्मापासून कृष्णनिर्वाणापर्यंतचे सर्व महत्त्वाचे प्रसंग त्यात ग्रथित केलेले होते. श्रावणात कृष्णजन्मोत्सवाच्या अगोदर ओळीने आठ रात्री हप्त्याहप्त्याने त्याचा प्रयोग व्हायचा. या नृत्य-नाटचाला लोक कृष्णनाट्टम् म्हणून ओळखू लागले आणि केरळात ते खूप लोकप्रिय झाले. उत्तर मलबारमधील गुरुवायूर येथील मंदिरात आजही कृष्णजयंतीच्या निमित्ताने त्याचे प्रयोग चालतात.


कथकळि – कृष्ण-सुदामा

या कृष्णनाट्टम्ने रामनाट्टम्च्या निर्मितीला स्फूर्ती दिली, असे म्हणायला हरकत नाही. कृष्णनाट्टम्चा बोलबाला दक्षिण केरळात कोट्टारकरा येथील सामुतिरी राजाच्या कानापर्यंत पोचला. आपण एकदा ते पाहावे आणि आपल्या प्रजेलाही दाखवावे, असे त्याला वाटले. त्याने मानवेदनला विनंती केली, की 'तुमचे कृष्णनाट्टम्चे कलापथक आमच्या राज्यात पाठवून द्यावे.' त्यावर मानवेदनने त्याला प्रत्युत्तर पाठविले ते असे– 'तुमच्या राज्यातल्या लोकांची माझ्या कृष्णनाट्टम्चे रसग्रहण करण्याची पात्रता नाही. सबब आमचे कलापथक तिकडे येणार नाही.'

सामुतिरी राजा काही सामान्य पुरुष नव्हता. काव्य व नाटच यांतले काही तोही जाणत होता. मानवेदनचे ते अपमानकारक उत्तर त्याला झोंबले. तो म्हणाला, 'ठीक आहे. मी काही मेल्या आईचे दूध प्यालो नाही. तुझे कृष्णनाट्टम्, तर माझे रामनाट्टम्!'

**रामनाट्टम्–** त्या प्रसंगाने त्याच्या प्रतिभेवरची राख उडाली. तो काव्यरचनेसाठी मांडी ठोकून बसला. त्याने रामायणावर एक कथानाटक तयार केले. कृष्णनाट्टम्प्रमाणे तेही आठ रात्री चालेल, इतके प्रदीर्घ होते. सामुतिरीने केवळ आख्यानच लिहिले नाही, तर त्याचे प्रयोग करण्यासाठी उत्कृष्ट नटसंचही तयार केला. कृष्णनाट्टम्मध्ये प्रचारात असलेल्या रंगीत मुख-

वटयांना अजीबात फाटा देऊन त्याने रंगभूषा व अभिनय यांवर विशेष भर दिला.

समग्र रामनाट्टम्‌चे आठ विभाग आहेत. त्यांतले वालीवधम् व तोरणयुद्धम् हे दोनच सांप्रत प्रचलित आहेत. साहित्यदृष्टया रामनाट्टम् उच्च कोटीची कलाकृती नाही; तरीही त्यातल्या कित्येक पदाचे काव्यसौदर्य उल्लेखनीय आहे उदा० –

**कलय सदा रघुनायकम्**
**विबुधनिकरकरविगलितसुमकुल–**
**विलसितनवमणिगणचूडम् ।। १ ।।**
**समरधरोपरि गतमृडशेखरलस–**
**दुस्तरशिशुशशिभालम्**
**विधुहृन्मर्षितमानसनलिनी**
**कनकसरोरुहदलनयनम् ।। २ ।।**

अर्थ – रघुनायक श्रीराम याला ओळख. देवसमुदायाच्या हातातून गळलेल्या पुष्पाप्रमाणे शोभणारा व नवरत्नांनी युक्त असा त्याचा चूडाबंध आहे. समरभूमीवर गेलेल्या शिवाच्या मस्तकी शोभणाऱ्या चंद्रखडाप्रमाणे त्याचा भालप्रदेश आहे. चंद्राच्या हृदयाचे निष्पीडन करून जणू ज्याचे जल निर्माण केले आहे, अशा मानस सरोवरात उगवणाऱ्या. कमलिनीच्या सुवर्णकमलाच्या दलाप्रमाणे ज्याचे नेत्र आहेत, असा तो श्रीराम आहे.

आजची कथकळि ही कृष्णनाट्टम् आणि रामनाट्टम् यांची सुधारलेली आवृत्ती होय. कथकळीची सृष्टी ही पौराणिक सृष्टी आहे. देवांचे स्वर्गीय लीलाविलास, दानवांच्या चढाया, राक्षसांच्या भयानक लीला, मानवी नायकाचा धीरोदात्तपणा, अशा विविध प्रकारांनी या कथानाटयाचा विस्तार होतो. कथकळि हे धार्मिक नृत्य आहे. देवाचीकृपा संपादणे, हे त्याचे उद्दिष्ट असते. यामुळे कथकळीच्या नट–नर्तकांवर एक विशेष प्रकारची जिम्मेदारी येऊन पडते. त्यांना केवळ सोंग नटवून भागत नाही;


कथकळि–कृष्णनाट्टम्

तर आपापल्या भूमिकेच्या अंतरंगात शिरावे लागते. अविरत साधना व योग्य ती यम–नियमांची शिस्त यांची कास धरल्यावाचून त्या कलेत सफलता मिळत नाही.

**वैशिष्टय–** कथकळीतली मुख्य गोष्ट ही, की त्यात नटाला भाषणाची सवलत नाही. त्याला जे काही सांगायचे, व्यक्त करायचे, ते नेत्रविभ्रम, मुखाभिनय आणि हस्तमुद्रा यांच्या द्वारेच करावे लागते. अभिनय हीच कथकळीतली भाषा असते आणि ती आत्मसात करायला दीर्घकालीन अभ्यासाची आवश्यकता असते. त्याला कलरीत अर्थात नृत्यशाळेत दाखल होऊन गुरूच्या हाताखाली पद्धतशीर शिक्षण घ्यावे लागते. पहिला धडा व्यायामाचा. शरीर डौलदार आणि लवचिक बनविणे, हे पहिले काम. त्यासाठी विशिष्ट पद्धतीचा नित्य व्यायाम असतो. त्याच्या जोडीला मालिशही करून घ्यावे लागते. मग सकाळसंध्याकाळ काही तास त्याला अभिनयाचे पाठ दिले जातात. गुरू आपल्या शिष्याला एकेक करून सर्व प्रकारच्या भूमिका शिकवितो आणि त्यात प्रावीण्य मिळाल्यावर ज्याच्या त्याच्या आवडीप्रमाणे ज्याला त्याला विशिष्ट भूमिकेचा अधिक अभ्यास करायला अनुज्ञा देतो.

कथकळीचे कलाविश्व हे एक वेगळेच विश्व आहे. सामान्य मानवाला त्यात स्थान नाही. त्या जगात वावरतात ते देव, दानव, वीरपुंगव आणि प्रेमोन्मत्त सुंदर रमणी. या अतिमानवांना अनेक अद्‌भुत सामर्थ्ये प्राप्त झालेली असतात. त्यामुळे कथकळीच्या, प्रवर्तकापुढे प्रश्न पडला तो हा, की हे अतिमानव्य रंगभूमीवर दाखवायचे कसे? उदाहरणार्थ, रामरावणांचा प्रसंग घ्या. राम हा मानव असूनही अवतारी, तसाच सत्त्वधीर आणि दैवी शक्तीचा पुतळा, तर रावण हा तामस आणि राक्षसी वृत्तीचा उद्रेक! या दोघाचे प्रतिनिधी रंगभूमीवर दाखविणे आणि ते राम-रावण म्हणून प्रेक्षकांना पटविणे, हे मोठे अवघड काम होते. पण विशिष्ट प्रकारचे मुखवटे, प्रतीकात्मक रंगभूषा आणि व्यवच्छेदक मुद्राभिनय यांची चतुर योजना करून कथकळीच्या आचार्यांनी त्या कामी अपूर्व यश संपादिले. शिवाय साहित्य, संगीत आणि वाद्य यांची


कथकळि – नर्तकाचा पृष्ठभाग

त्याला यथायोग्य जोड दिली. त्यामुळे कथकळि ही अनेक घटकांचा सुसंवादी मिलाफ असलेली एक परिपूर्ण कला बनली.

कथकळीत पात्रांच्या स्वभावानुसार त्यांची रंगरंगोटी केली जाते.

पहिला प्रकार ‘ पच्चा ’ म्हणजे हिरवा. सात्त्विक, सद्‌गुणी आणि उच्च दर्जाच्या पात्राच्या मुखावर हा रंग चढवितात. हा रंग देऊन झाल्यावर त्या नटाच्या चेहऱ्याला पाढरी ‘ चुट्टी ’ अर्थात एक धनुष्याकृती पट्टी हनुवटीवरून दोन्ही कानांपर्यंत चिकटवितात. ओठाचा रग अधिक लाल व भुवयांचा आणि डोळ्यांचा रंग गडद काळा करतात.

‘ कट्टी ’ हा दुसरा रग होय. हा रंग हिरवाच असतो; पण कातरकाम करावे, तसा तो लावतात. त्याच्या जोडीला त्यात पांढरा आणि लाल असे दोन रंग भरतात. रावण, दुर्योधन इ. गर्विष्ठ, आक्रमक व दुराचारी पात्रे कट्टीवर्गातली असतात.

तिसरी रंगभूषा म्हणजे ‘थडी’. या प्रकारात पात्रांना त्यांच्या स्वभावधर्माला अनुसरून दाढी लावली जाते. या दाढ्या लाल, पांढऱ्या आणि काळ्या असतात. निषाद, किरात आणि गुहावासी पात्रांची रंगभूषा थडी पद्धतीने केली जाते.

‘ करि ’ म्हणजे काळा. हा चवथा प्रकार होय. तो दुष्ट-पणाचा निदर्शक असतो. शूर्पणखा, सिंहिका, इ. राक्षसिणी या करिवर्गात येतात. त्यांचे चेहरे गडद काळ्या रंगाने रंगवितात.

‘ मिनिक्कु ’ हा पाचवा प्रकार होय. याचा अर्थ घोटीव असा आहे. ही रंगभूषा साधी व सौम्य असते. या रंगात अभ्रक मिसळतात. डोळ्यांना आणि भुवयांना काळा व ओठाना लाल रंग देतात. ब्राह्मण, ऋषी आणि गरती स्त्रिया अशा सात्त्विक आणि आध्यात्मिक प्रवृत्तीच्या पात्रांची रंगभूषा या पद्धतीने होते.

रंगभूषेप्रमाणेच वेषभूषा आणि अलंकार यांमध्येही कथ-कळीचे वैशिष्ट्य असते. सामान्यतः पच्चा व कट्टी या रगभूषेचा पोषाख पांढरा फुगीर घागरा, लाल डगला आणि भपकेदार शिरस्त्राण असा असतो. करिवर्गातल्या पात्रांचा पोषाख काळा असतो, तर थडीवर्गातल्या पात्रांचा करडा असतो. बहुतेक सर्व पात्राचे केस लांबसडक असतात व ते त्याच्या कमरेपर्यंत पोचतात. सर्व नटाचे डोळे लाल असतात आणि चेहऱ्याच्या हिरव्या किंवा काळ्या रगामध्ये ते उठून दिसतात. पच्चा आणि कट्टी या वर्गातल्या पात्रांना किरीट-कुंडले चढवितात. हे किरीट लाकडाचे व नक्षीदार असतात आणि त्यावर सोन्याचा वर्ख चढविला, की ते दिव्याच्या प्रकाशात झळाळू लागतात. कुंडले दोन प्रकारची असतात. त्यांतला एक प्रकार कमळाच्या आका-राचा असतो. ही कुंडले लहान, गोल व खोलगट असून ती कानांच्या वर घाल-तात. ही रंगभूषा व वेषभूषा परिश्रमपूर्वक करावी लागत अस-ल्याने तिला बराच वेळ लागतो. रंगभूषा करून घेताना नट उताणा झोपतो. ती पुरी होईपर्यंत तो अत्यंत स्तब्ध असतो. त्या अवधीत तो केवळ आपल्या भूमिकेचेच चिंतन करतो.



कथकळि–वेषभूषा

वर एका ठिकाणी मुद्रांचा उल्लेख केला आहे. कथकळीची सारी भिस्त अभिनय आणि मुद्रा यांच्यावर असते. विशिष्ट आशयाचा आविष्कार करण्यासाठी हातांची व अंगुलींची विशिष्ट प्रकारची ठेवण किंवा रचना म्हणजे मुद्रा होय. कथ-कळीच्या शास्त्रात चोवीस प्रमुख मुद्रा मानल्या आहेत, त्या अशा––

**हस्तपताको मुद्राख्यः कटको मुष्टिरित्यपि ।**
**कर्तरीमुखसंज्ञश्च शुकतुण्डः कपित्थकः ।।**
**हंसपक्षश्च शिखरो हंसास्यः पुनरञ्जलिः ।**
**अर्धचन्द्रश्च मुकुरो भ्रमरः सूचिकामुखः ।।**
**पल्लवत्रिपताकश्च मृगशीर्षाह्वयस्तथा ।**
**पुनः सर्पशिरःसंज्ञो वर्धमानक इत्यपि ।।**
**अराल ऊर्णनाभश्च मुकुलः करकामुखः ।**
**चतुर्विंशतिरित्येताः करशास्त्रज्ञसम्मताः ।**

या स्थूलमुद्रा आहेत. या प्रत्येकीचे पुढे सूक्ष्म भेद होत जातात.

**प्रयोग**––कथकळीचा प्रयोग सूर्यास्तापासून सुरू होऊन रात्रभर चालतो. माणसाच्या उंचीची एक प्रचंड समई रंगमंचा-वर ठेवतात. पाच ते सहा शेर तेल मावेल, एवढे भले भक्कम तिचे चाडे असते. तिच्यात दोन वाती तेववितात. एक प्रेक्षकांच्या बाजूने व दुसरी रंगमंचाच्या बाजूने. प्रयोगाला सुरुवात होण्या-पूर्वी ढोल वाजविले जातात. वाद्य थांबल्यावर दोन पुरुष रंगमंचा-वर येऊन अंतरपाटासारखा एक रंगीत पडदा धरतात. त्याच्या मागे उभे राहून गायक ‘ वंदनश्लोकम् ’ गातो. वंदन संपताच

दोन नट थोडचम् नावाचे एक भक्तिनृत्य पडद्याआडच करतात. प्रेक्षकांना त्याच्या घुगरांचा आवाज तेवढा ऐकू येतो. कथकळीच्या नर्तकसंघात एकूण बारा लोक असतात. चार गाणारे, चार नाचणारे आणि चार वाजविणारे. वाद्यांमध्ये चेंडा हे वाद्य प्रमुख असते. हे ढोलाच्या जातीचे वाद्य दोन काठ्यांनी वाजवितात. मड्डुलम् म्हणजे मृदंगाच्या जातीचे ढोलके होय. ते बोटांनी वाजवितात. एक मोठा तास असतो, त्याला चेंगलम् म्हणतात. याशिवाय कासाळू, बीन, मुरली अशी आणखीही काही वाद्ये साथीला घेतात. अशा प्रकारे वादकांनी प्रथम वातावरण तयार केल्यावर नृत्याची नांदी सुरू होते.

नंतर मुख्य नर्तक रंगभूमीवर प्रवेशतो. पुडापड्डा या प्रकाराने तो अभिनयाला प्रारंभ करतो. नोटकलासम् आणि नीलपदम् असे त्याचे दोन प्रकार असतात. पहिल्या प्रकारात केवळ नेत्रविभ्रम आणि दुसऱ्या प्रकारात नेत्रविभ्रमाबरोबरच अंगविक्षेपही करायचे असतात. नंतर मेलपदम्ला प्रारंभ होतो. मेलपदम् म्हणजे पदन्यास होय. यात नर्तक ताल धरून नाचू लागतो.

पुष्कळ वेळा खेळाची सुरवात एखाद्या प्रणयप्रसंगाने होत असते. त्यासाठी नायकनायिका रंगभूमीवर येतात. मुख्य नायक किंवा सूत्रधार त्यांचा परिचय करून देतो. तो प्रसंगानुरूप जी पद्ये गातो, त्यांना धरून ते प्रेमी युगुल अभिनय करते. याला परिजाट्टम् म्हणतात. कथकळीतील हे प्रणयदृश्य म्हणजे कलाकुसरीचा उत्कृष्ट नमुनाच असतो.

त्यानंतर तिरानोक्कु हा नृत्यप्रकार होतो. ती एक अशी घटना असते, की त्या प्रसंगी धीरोदात्त, सुजन आणि नीतिमान् अशा पात्रांच्या जोडीने दुष्ट, आक्रमक आणि आढ्यतेखोर अशी पात्रे रंगभूमीवर प्रवेश करतात. उदा० दुःशासन, रावण, हिरण्यकशिपु, इत्यादि. मग देव विरुद्ध दानव, सुष्ट विरुद्ध दुष्ट, पुण्य विरुद्ध पाप, धैर्य विरुद्ध क्रौर्य, असे ते द्वंद्व खडे होते. आह्वान, युद्ध आणि वध अशा प्रकारे तो प्रवेश कळसाला पोचतो.

या युद्धाच्या प्रसंगी चेंडे आणि मड्डुलम् मोठ्याने व द्रुत लयीत वाजवितात. त्या वाद्याचा आवाज सर्वत्र दुमदुमत असला तरी त्या दुष्ट पात्रांची कामे करणाऱ्या नटाचे पदाघात आणि डरकाळ्या त्या वाद्यध्वनीलाही मागे सारतात. त्या प्रसंगी ते नट आपण मानव असल्याचे जणू विसरूनच जातात. त्यांच्या अंगात जणू त्या रावणाचा, त्या हिरण्यकशिपूचा संचारच होतो. त्यांचा तो रंगभूमीवरचा थयथयाट पाहतांना भित्र्या प्रेक्षकांचा थरकाप उडतो. त्या युद्धनृत्याने उठणारा धुरळा त्या नटांच्याही डोक्यावरून वर जातो.

अखेर ते युद्ध संपते. त्यात दुष्टांचे निर्दालन होते आणि त्यानंतर शांतरस अवतरतो. दुर्गुणावर सद्‌गुणाचा आणि पापावर पुण्यांचा विजय दाखविणे व त्यामुळे मानवी मनाला उदात्त अशा नैतिक भूमिकेवर आरूढ करणे, हेच कथकळीचे उद्दिष्ट आहे. कथकळीला अशा प्रकारे नैतिक तत्त्वज्ञानाची बैठक आणि धर्माचा आधार लाभलेला आहे.

कथकळीला रंगभूमीची भव्यता असत नाही. त्यातला राजा किंवा सम्राटही एखाद्या लाकडी उखळीवर अथवा तिपाईवर बसून सिंहासनाधिष्ठित झाल्याचा आव आणतो. राजाने रंगभूमीवर दमदार पावले टाकीत रुबाबाने प्रवेश केला, की प्रेक्षक त्याच्याभोवती कल्पनेचा राजदरबार उभा करून त्याला पाहतात. कथकळीच्या यशाची सारी भिस्त असते, ती नटावर! आणि नटाचे यश अवलबून असते, ते त्याच्या अभ्यासावर आणि कल्पकतेवर.

कथकळि हे नाट्य खरे; पण नृत्य हा त्याचा स्थायीभाव असतो. त्यामुळे रंगभूमीवर असताना नटाचा एकही क्षण नृत्यावाचून सुना जात नाही. तो आसनस्थ असला, तरी त्याच्या डोळ्यांची लयदार हालचाल आणि मुद्रेवरील तरळत्या छटा यांचे नृत्य चालूच असते. त्याची एकही हालचाल गद्य किंवा सामान्य नसते. कथकळि हे नृत्याच्या तांडवशैलीपैकी आहे. ताकद आणि जोम हे त्याचे विशेष असतात. ते नेहमी गतिमान असते, असावे लागते. तांडवाच्या हालचालीतूनच त्याचे अतिमानव्य आणि अलौकिकत्व यांचा प्रत्यय घडायचा असतो.

केरळात इ. स. १८६० पर्यंत कथकळि नृत्याचा खूप गाजावाजा झाला. पण इतक्या लोकप्रिय आणि शास्त्रशुद्ध कलेलाही नियतीचा चक्रनेमिक्रम बाधल्यावाचून राहिला नाही. त्यानंतर सुमारे पाऊणशे वर्षे कथकळि जीवन्मृत होऊन पडली होती. त्यानंतर तिला पुनश्च चेतना देण्याचे महत्कार्य महाकवी वळ्ळत्तोळ यांनी केले. १९३० साली केरळात 'केरळ कलामंडलम्' नावाची एक संस्था स्थापन करून वळ्ळत्तोळ यांनी एक उत्कृष्ट नटसंच शिकवून तयार केला. तो नृत्यसंघ बरोबर घेऊन ते साऱ्या भारतभर हिंडले. जागोजागी त्यांनी डोळ्यात भरेल आणि स्मरणात राहील, असे कथकळीचे प्रदर्शन केले. ब्रह्मदेश, मलाया इ. भारताच्या शेजारी देशातही त्यांनी दौरा काढला. या व्यापक संचारात त्यांना जो द्रव्यलाभ झाला, त्याच्या साहाय्याने १९३७ साली चेरुमुरुथि या गावी त्यांनी केरळ कला मंडलम्ची स्वतंत्र इमारत बांधली.

आजमितीस कथकळि पुनश्च नव्या जोमात आली आहे. श्री. गोपीनाथ, श्री. रागिणीदेवी, श्री. माधवन् कृष्णन्,

श्री. केनु कृष्ण कुट्टी, श्री. शिवरामन्, श्री. उदयशंकर, श्री. राम-गोपाल, श्री. शांताराम या स्त्री-पुरुष कलापंडितांना कथकळीच्या आजच्या भाग्योदयाचे श्रेय द्यावे लागेल. [ मोहन खोकर; कै. सा. द. ]

**कथा** 'प्रबन्धकल्पना कथा' असे अमराने तिचे लक्षण केले आहे. या लक्षणाची फोड 'सारसुंदरी' या ग्रथात केली आहे, ती अशी—

'प्रबन्धेन कल्पना अर्थात् प्रबन्धस्य अभिधेयस्य कल्पना स्वयं रचना' = प्रबंधाची अर्थात जे अभिधेय (सांगण्याजोगे) असेल त्याची कल्पनेने स्वत: रचना करणे, म्हणजे कथा होय. असेच लक्षण भरतानेही केले असून त्यात 'बह्वनृता स्तोकसत्त्वा' = पुष्कळशी खोटी व अल्पसत्त्व अर्थात अल्पसत्य असलेली, असे आणखी एक विशेषण भरीस घातले आहे. अमर व भरत या दोघांना धरून कोलाहलाचार्याने कथेची व्याख्या सांगितली आहे, ती अशी—

**प्रबन्धकल्पनां स्तोकसत्यां प्राज्ञाः कथां विदुः ।**

अर्थ— कल्पनेने रचलेली व अल्पांशाने सत्य असलेली ती कथा होय, असे प्राज्ञाचे मत आहे.

कथेला काही लोक आख्यायिका असेही म्हणतात. पण संस्कृत भाषेतल्या सर्व कथाकाव्याना आख्यायिका म्हणता येणार नाही. संस्कृत साहित्याचार्यांनी कथा व आख्यायिका यामधला भेद बारकाईने स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. रुद्रटाने आपल्या काव्यालंकार या ग्रंथात संस्कृत व प्राकृत या दोन्ही भाषांमध्ये प्रचलित असलेल्या कथा डोळ्यापुढे ठेवून कथेचे स्वरूप पुढीलप्रमाणे सांगितले आहे—

कथेत प्रारभी देवता आणि गुरू याना वंदन असले पाहिजे. त्यानंतर कथालेखकाने स्वत चा व स्वत:च्या काव्यकथेचा परिचय करून दिला पाहिजे. मग कथालेखनाचा उद्देशही सागितला पाहिजे ( काव्यालकार १६. २०—२३ ).

रुद्रटाने कथा ही गद्यात लिहिली जावी, असे सागितले आहे. भामहाने गद्य व पद्य या दोन्ही प्रकारांत लिहिल्या जाणाऱ्या कथा डोळ्यांपुढे ठेवून कथेचे लक्षण आणि तिचे प्रकार सांगितले आहेत. तो कथेला आख्यायिकेहून भिन्न मानतो.

वर उल्लेखिलेल्या भामह, रुद्रट. इ काव्यशास्त्रज्ञाच्या विवेचनावरून आणि प्राकृतादि भाषांतल्या कथासाहित्याच्या अवलोकनावरून कथेची लक्षणे संक्षेपात पुढीलप्रमाणे सांगता येतील—

(१) कथा ही गद्य व पद्य अशी उभयविध असते.

(२) कथेत एखाद्या सुंदर तरुणीवर नायकाचे प्रेम जडणे, तिलाही नायकाचे आकर्षण वाटणे, त्याने तिचे अपहरण करणे, तन्निमित्त युद्ध होणे आणि अखेरीस त्या दोघाच्या विवाहाने प्रेमाची पूर्तता होणे, असे प्रसंग असतात.

(३) कथानक सरस व प्रवाही असते. विशिष्ट व्यक्तीच्या जीवनावर लिहिल्या जाणाऱ्या कथांत कवीच्या स्वैर कल्पनेला काही बंधने पडतात; पण सामान्य व्यक्तीवर लिहिलेल्या कथांत कल्पनेला स्वैर विहार असतो. त्यांत कुतूहल वाढविणाऱ्या अनेक अतिमानवी घटनाचा समावेश असतो.

(४) शैलीच्या दृष्टीने कथा ही एक अलंकृत काव्यकृती असते.

भारत हा कथाप्रिय म्हणून नावाजलेला देश आहे. पुरातन काळापासून भारतीयांची कथावाङ्मयाकडे पाहण्याची दृष्टी भाविकाची आहे. भारतीयांनी कित्येक ठिकाणी वाणीला व कथेला देवत्व दिलेले आढळते. कथेविषयीची ही भावना जशी वैदिकात दिसते, तशीच ती वैदिकेतर भिन्न भिन्न जातीमध्येही दिसते. कथाना अतिमानुष शक्ती असते, अशी त्यांची श्रद्धा असते. कथानी माणसाला शाप दिल्याच्या गोष्टीही सापडतात. प्रवासात असताना एका राजपुत्राला प्रधानपुत्र 'गोष्ट सांग' म्हणतो. राजपुत्राला पाच गोष्टी ठाऊक असतात; पण त्या न सांगता तो तसाच झोपी जातो. मग झोपेत त्या गोष्टी राजपुत्राच्या पोटातून बाहेर येतात व झाडावर बसून त्याच्या नाशाचा विचार करतात. एका कुणबी कथेतही रुसलेल्या चार गोष्टींनी उंबरठ्यात, दाराआड, पलंगावर व चुलीत लपून बसून नायकाला शिक्षा केल्याची हकीगत आहे.

कथा किंवा कहाणी सांगितली तर पुण्य लाभते व कुशलाचीही प्राप्ती होते, असा समज आहे. बाळ-बाळंतीणीच्या कुशलासाठी कातोडी, ठाकर, महार, इ. जातीत बाळंतिणीला पाचवी-सहावीच्या रात्री कथा सांगण्याची पद्धत आहे. अशुभनिवारण हाही एक कथेचा हेतु आढळतो. एका राजपुत्राला रोग झाला असता त्याने आपल्या चार बायकाना चार कथा सांगितल्या व तो रोगमुक्त झाला, अशीही कथा आहे. भारतीयाची कथाविषयक दृष्टी अशी भाविक बनण्याचे कारण कथाची प्राचीन परंपरा हे होय. भारतीयांनी आपल्या धर्माचरणात कथांचा उपयोग बाधीव पद्धतीने केला आहे

जगातल्या दुसऱ्या कुठल्याही सुसंस्कृत राष्ट्राच्या पूर्वी भारतीयांनी अद्‌भुतकथा, कल्पितकथा, प्राणिकथा आणि कहाण्या यांना अभिजात साहित्याचे स्वरूप देऊन ग्रथबद्ध केले. भारतीय अभिजात ललित वाङ्मयाच्या मूळ प्रेरणा वैदिक वाङ्मयातल्या कथासाहित्यातून निघालेल्या आहेत. कालिदासाच्या विक्रमोर्वशीय या नाटचकृतीचे बीज ऋग्वेदातल्या

पुरूरवा–उर्वशी संवादात आढळेल. ऋग्वेदसंहितेत अनेक कथा-संदर्भ आले आहेत. अश्विनौ देवांनी विमदाच्या स्त्रीला त्याच्या घरी नेऊन पोचविले, असुरांनी अत्रीला यंत्रात घालून आगीचे चटके दिले असता अश्विनौ देवानी त्याचा दाह शांत केला, इंद्राने अपालेला रोगमुक्त करून तारुण्य दिले, इंद्राने असुरांच्या नव्याण्णव पुरांचा विध्वंस केला, इत्यादि

ऋग्वेदातील इंद्र, अश्विनौ आणि मरुत् याच्या वर्णनपर सूक्तात कितीतरी कथाबीजे भरलेली आहेत. या कथाचा उलगडा व संग्रह करण्याचे कार्य पहिल्या प्रथम शौनकाने केले. त्याने सुमारे ४८ कथा आपल्या बृहद्देवता या ग्रंथात नोंदल्या आहेत. कीथच्या मते बृहद्देवता हा ग्रंथ महाभारताच्या आधीचा आहे. शौनकाने कथाप्रसंगांना कथा न म्हणता इतिहास म्हटले आहे, त्याचे कारण त्याच्या मंत्रविवरणात सापडते. कथा ही मंत्रात अंतर्भूत असून कर्मकांडात मंत्रालाच प्राधान्य असल्याने तिला वेगळे सबोधिण्याची गरज नाही, असा त्याचा आशय दिसतो. त्याने आचिरव्यासा, संलाप व पवित्राख्यान असे जे तीन मंत्रप्रकार दिले आहेत, त्यांत कथाच अभिप्रेत आहेत.

सूतपरंपरा ही मत्रपरंपरेहून भिन्न अशी अवैदिकाची परपरा होय. त्या परपरेत इतिहास, पुराणे व कथा यांचा फार मोठा भरणा आहे. अर्वाचीन काळात इतिहास–पुराणांच्या कक्षा भिन्न झाल्या असल्या तरी इ. स. च्या ५ व्या शतकापर्यंत हे दोन शब्द समानार्थक होते. इतिहास-पुराण याचा त्या काळचा स्थूल अर्थ म्हणजे प्राचीन कथा हाच होय. महाभारतात प्राणिकथांनाही इतिहासच म्हटले आहे. महाभारतोत्तर वाङमयात कथा हा शब्द लोकप्रिय झाला व त्या मानाने इतिहास शब्दाचा संकोच झाला. त्यावरून कथा हा शब्द उपनिषदोत्तर असून महाभारतपूर्व आहे, असे अनुमान करता येते.

पुराणांची परंपरा बरीच प्राचीन असावी. वैदिक आणि अवैदिक दैवतकथा यांच्या मिश्रणाचा आधार पुराणपरंपरेमागे असावा. भारतीय दैवतकथा आणि उत्पत्तिकथा यांच्या अभ्यासात या मिश्रणाच्या खुणा दिसतात.

ऋग्वेदात अनेक कथाबीजे किंवा त्रुटित कथासंदर्भ आढळतात, तर महाभारत हे विविध प्रकारच्या कथांचे भांडारच आहे. व्यास हे उत्तम कथालेखक होते. महाभारतातले नलदमयंती–आख्यान हे आख्यानसमुदायात उत्कृष्ट गणले गेले आहे. मूळ विदर्भातल्या लोकमानसात वावरणारी ती कथा व्यासांनी उचलली व तिच्यावर प्रतिभेचे संस्कार करून ती रसाळ बनविली. तोंडोतोंडी चालत आलेले कथासाहित्य मूळचे लोकभाषेतलेच होय. तेच पुढे संस्कृत भाषेच्या आधाराने अभिजात वाङमयात दाखल झाले. हे विस्तृत कथासाहित्य ग्रांथिक भाषेत आणण्याचा हा प्रयोग भारतात शतकानुशतके अबाधितपणे चालत राहिला.

हे परंपरागत कथासाहित्य तीन प्रकारांनी ग्रंथनिविष्ट झाले आहे –

(१) धार्मिक व रामायण–महाभारत यांसारख्या ग्रंथांत मूळ कथेच्या अनुषगाने कित्येक बोधपर कथा ग्रथित झाल्या आहेत. त्याचप्रमाणे मूळ कथेच्या अनुषंगाने काही उपकथा म्हणूनही दाखल झाल्या आहेत. पुराणे, त्रिपिटक व जैनचूर्णी यांतल्या अनेक कथांचा समावेश या वर्गात होतो.

(२) हा विभाग नीतिकथा व प्रेमकथा यांचा आहे. बौद्ध जातके, जैनकथाकोश, पंचतत्र, कथासरित्सागर, इ. कथासाहित्याचा यात समावेश होतो.

(३) हा विभाग अद्‌भुतकथांचा आहे. यात दंडीचे दशकुमारचरित, बाणाची कादंबरी, सुबधूची वासवदत्ता इ. अद्‌भुत वाङमयाला ललित वाङमयाचा घाट देणाऱ्या साहित्याचा समावेश होतो.

ऋग्वेदापासून तो बाणभट्टापर्यंत सुमारे पाच ते सहा हजार वर्षांचा कालखड वरील कथावाङमयाने व्यापलेला आहे.

पचतंत्र, हितोपदेश, कथासरित्सागर इ. कथासग्रह पाहिले, तर त्यांत नावीन्य आणि वैचित्र्य भरपूर आढळते. या साहित्यात चारित्र्यसपन्न राजे, बलशाली योद्धे, लावण्यवती राजकन्या आणि शुद्धचरित ब्राह्मण यांचाच केवळ आढळ होत नसून सामान्य जनांच्या वैचित्र्यपूर्ण व्यक्तिरेखाही त्यात सर्वत्र चमकून दिसतात. विदूषक, छटेल तरुण, कलावंत, भोंदू संन्यासी, गणिका, मूर्ख, टोणपे, कुटिणी, लोभी ब्राह्मण, शेतकरी, कारागीर, व्यापारी अशा भिन्न भिन्न थरांतल्या सत्त्व-रज-तमांच्या चालत्या बोलत्या प्रतिकृती या साहित्यात नानाविध भलेबुरे प्रसंग निर्माण करीत असताना आढळतात. हीच या कथावाङमयाच्या धवल यशाची पताका होय. भारतीय साहित्याची हीच शाखा अशी आहे, की तिचा फैलाव सर्व जगभर झाला. यूरोप, आफ्रिका इ. जगभरच्या अद्‌भुत आणि कल्पित कथांवर भारतीय कथावाङमयाचा खोल ठसा उमटलेला आहे.

बौद्ध व जैन यांचे महत्त्वही कथासंग्रहाच्या दृष्टीने असाधारण आहे. गौतम व महावीर हे दोघेही धर्मप्रवर्तक आणि दोघेही समकालीन होते. बौद्धांच्या जातककथांची संख्या ५५० इतकी भरते. बौद्ध साहित्यात आणखी एक विशाल कथासंग्रह उपलब्ध असून तो अवदान या नावाने सुप्रसिद्ध आहे. महावीरही नीतिकथांचा उपयोग करताना दिसतो. जैन लोक कथारचनेत मोठे निष्णात होते. त्यांनी कथांचा उपयोग आपल्या धर्मप्रचाराच्या कामी चांगल्या रीतीने करून घेतला आहे. जैन

प्रबंधातही लोकप्रिय कथा आढळतात. बुद्ध व महावीर या दोघा महापुरुषांनी मान्य केलेल्या कथा सर्वस्वी पारंपरिक अशा आहेत. बौद्धांच्या जातककथा आणि जैनांच्या चूर्णी हे दोन्ही नीतिकथांचे संग्रह आहेत. भारतीय वाङमयातल्या सर्वात जुन्या प्राणिकथा बौद्ध-जैनाच्याही पूर्वी महाभारतात आढळतात. तापस संस्कृतीतून निघालेल्या या प्राणिकथांनी समाजाच्या नीतिशिक्षणाचे व त्याबरोबरच मनोरंजनाचेही बहुमोल कार्य केले आहे. नीतिकथांचा उगम प्रथम ब्राह्मणवाङमयात झाला. त्यांना प्राणिकथांची पुरवणी महाभारताने जोडली. बुद्धापासून ख्रिस्तापर्यंतच्या मधल्या काळात प्राणिकथा व कल्पितकथा यांचा प्रसार मोठ्या प्रमाणात झाला. जिथे कर्मकांडाला तुच्छ लेखून नीतितत्त्वांनाच प्राधान्य मिळते, तिथेच कल्पितकथांना अवसर प्राप्त होतो. मानवी आचार व वासना यांचे उदात्तीकरण म्हणजेच धर्म, अशी बौद्ध-जैनांची भावना होती आणि म्हणूनच धर्मकथांचे त्यांचे भांडार समृद्ध झाले आहे.

भारतात कथासंग्रहाच्या कार्याला जसे व्यास, वररुचि, गुणाढ्य, बुद्ध हे पुरुष लाभले, तसे कोणत्याही अन्य देशाला प्राचीन काळी लाभले नाहीत. पण त्याबरोबरच कथाविषयाची चर्चा करणाऱ्या ॲरिस्टॉटल्सारख्या इतिहासकाराची मात्र भारतात उणीव आहे.

संस्कृतमधील कथासाहित्य ही भारताची विश्वसाहित्याला एक मोठीच देणगी आहे. भारतीय कथानी विश्वसाहित्यात प्रवेश करून त्या त्या देशांतल्या लोकांना नीतिशिक्षण दिले आहे. इसापच्या नीतिकथा, तसेच अरबी ‘ अलिफलैला ’ मधल्या मनोरजक कथा याना मूळ भारतीय कथाचाच आधार आहे. मध्ययुगात युरोपमध्ये बरलाम आणि जोजेफ़ यांची एक कथा सुप्रसिद्ध होती. जोजेफ याने नीतीचा आणि धर्माचा उपदेश करून बरलाम या राजाला ख्रिस्ती धर्म स्वीकारायला लावले. जोजेफ याला ‘ बुदसफ ’ असे दुसरे नाव होते. तो बोधिसत्त्व या शब्दाचाच अपभ्रंश आहे. त्यावरून या कथेचे मूळही भारतातच आहे, हे कळून येते. फार प्राचीनकाळी यहुदी लोकांना भारतीय कथाचा परिचय झालेला होता. बायबलातल्या अनेक कथा मुळात भारतीयच आहेत. सम्राट सिकंदराच्या मातेचा पुत्रशोक कमी करण्यासाठी एका तत्त्ववेत्त्याने तिला ‘ ज्या घरात आजवर कोणाचाही मृत्यु झाला नाही, अशा घरातून थोड्या मोहऱ्या घेऊन ये,’ असे सांगितले. सिकंदराची माता त्यासाठी घरोघर हिंडली; पण जिथे मृत्यु झाला नाही, असे एकही घर तिला सापडले नाही. त्यामुळे ती निराश होऊन परत त्या तत्त्ववेत्त्याकडे आली. त्याने मग तिला जीवनाची नश्वरता पटवन तिचा शोक दूर केला. ही कथाही मूळ भारतीयच आहे. बुद्धाने किसा गोतमीला अशाच प्रकारे संसाराच्या नश्वरतेचा उपदेश केला होता.

भारतीय कथा इ. स. च्या ६ व्या शतकाच्या पूर्वीच चीनमध्येही प्रविष्ट झाल्या होत्या. त्यांच्या प्राचीन विश्वकोशात अनेक भारतीय कथाचे अनुवाद आढळतात. इटलीचा सुविख्यात कवी पेत्रार्क याचा डिकॅमेरान नावाचा कथाग्रंथ जगप्रसिद्ध आहे. त्यातल्या कित्येक कथा म्हणजे भारतीय कथांचे परिवर्धित रूप आहे. तूतीनामा या नावाने जो एक फारसी कथासंग्रह आढळतो, तोही शुकसप्ततीचा अनुवादच आहे. **पाहा**— आख्यायिका. [ लो. सा. रू.; हिं. वि. को.; श. क. ]

## कथाकथक

कथा सागणारा तो कथाकथक होय. प्राचीन काळी पोथ्यापुस्तकांचा प्रचार मर्यादित असल्याने कथा व कहाण्या सागणाऱ्या लोकांचा एक वर्गच निर्माण झाला होता. त्यांच्या व्यवसायाचीही खूप चलती होती. कथा हा सर्वप्रिय विषय असल्यामुळे कथा सांगणारा आणि तीही फुलवून खुलवून सांगणारा वक्ता लोकांना प्रिय व आदरणीय वाटे. वैदिक कालात आख्यानविद् नामक एका विशिष्ट श्रेणीचे धंदेवाईक लोक होते. ते वेदांतल्या कथा सांगून यज्ञप्रसंगी यजमानाचे व ऋत्विजांचे मनोरंजन करीत. वेदोत्तर कालात सूत—मागध जातीच्या लोकांनी ते काम आपल्या शिरावर घेतले. शौनकादिक ऋषींना महाभारताची कथा सागणारा उग्रश्रवा हा सौति म्हणजे सूतपुत्र होता. हे सूत—मागध पौराणिक कथा सांगण्याचे काम पृथु-वैन्याच्या कालापासून करीत आले आहेत.

कौटिल्याच्या अर्थशास्त्रावरून कळते, की त्या काळात कथावकाश नावाचे काही गुप्तहेर असत व ते कहाण्या सांगून सशयित चोरांचा पत्ता लावीत. कालिदासाने मेघदूतात अवंतीच्या ग्रामवृद्धांचा उल्लेख केला आहे. हे लोक उदयनाच्या कथा रसाळपणे सांगत (पूर्वमेघ ३२). इंद्रद्युम्न राजाने जेव्हा पुरुषोत्तम क्षेत्राची यात्रा केली, तेव्हा त्याच्या समागमे मनोवेधक कथा सांगून उपजीविका करणारे (विचित्राः कथनाजीवाः) काही लोक होते (स्कंद पु. पुरुषोत्तम खंड ११·१८). वत्सराज सहस्रानीक याच्या पदरी समन्तक नावाचा एक कथाकथक होता (कथासरित्सागर). प्राचीनकाळी राजभवनात राजा, राणी व राजकुमार यांच्या मनोविनोदनासाठी कथाकथकांची योजना केलेली असे. कादंबरीतला शूद्रक राजा निरनिराळ्या प्रसंगी राजभवनात कथाकथनाचे समारंभ घडवून आणीत असे. कुमार चंद्रापीड विद्याध्ययन पूर्ण करून राज्यात परत आल्यावर आपल्या आईला भेटण्यासाठी गेला होता. त्या वेळी वृद्ध तापसी आपल्या आईला इतिहास—पुराणांतल्या

पुण्यकथा एकवीत बसल्या आहेत, असे दृश्य त्याने पाहिले.

आदिपुराणात कथाकथकाच्या अंगी कोणकोणते गुण आवश्यक आहेत त्याची एक लांबलचक यादी दिलेली आहे–

कथाकथक सदाचारी, स्थिरबुद्धी, संयमी, प्रियदर्शन, प्रियभाषी, सुसंस्कृत वाणीचा, प्रतिभाशाली, प्रत्युत्पन्नमती, सहिष्णू व उदार स्वभावाचा असावा. त्याला अनेक विद्या–कला अवगत असाव्या. आपली विधाने दृष्टान्तानी दृढ करण्याचे वाक्चातुर्य त्याच्या ठिकाणी असावे. कथा सांगताना त्याने भुवया चढवू नयेत; आक्रोश करून बोलू नये; विशेष म्हणजे श्रोत्यांची पात्रता आणि ग्रहणक्षमता लक्षात घेऊन त्या अनुरोधाने आपल्या कथेचा प्रपंच करावा (आदि पु. १·१२६–३८). [प्रा. भा. म.]

**कथाकालक्षेपम्** दक्षिणेतील एक कीर्तनाचा प्रकार. भागवतार हा रामायण-महाभारतातल्या गोष्टी व संतचरित्रे संगीताच्या आधारे लोकांना सांगतो. केवळ करमणूक हा या प्रकाराचा उद्देश नसून श्रोत्यांना नीती व सद्विचार यांची शिकवण देणे हा असतो. महावैद्यनाथ अय्यर हे ६३ नायन्मारांवर कथाकालक्षेपम् सांगत. तंजोर कृष्ण भागवतार (इ. स. १८४७–१९०३) यांना आधुनिक कथाकालक्षेपम्चे जनक म्हणतात. हा प्रकार साधारणपणे ३ ते ४ तासांचा असतो. यात भागवतार तेलुगु, संस्कृत, इ. भाषांतील वचनांच्या आधारे निरूपण करतो. त्यागराजाच्या कृतीचे आकर्षक संगीत याच्या साथीला असते. **पाहा** – कीर्तन. [डि. सा. इं. म्यु. म्यु.]

**कथाकोष** श्रीचंद्रकवीकृत अपभ्रंश भाषेतील ग्रंथ. या ग्रथात ५३ संधी असून ग्रंथ अप्रकाशित आहे. प्रत्येक संधीच्या शेवटच्या पद्यात कवीच्या नावाचा उल्लेख आहे. श्रीचंद्रकवी हा कुंदकुंदाचार्याच्या परपरेतील वीरचंद्राचा शिष्य होता. कवीने या ग्रथाची रचना केली त्या वेळी अणहिलपुरात मूलराज सोळंकी हा राजा राज्य करीत होता (इ. स. ९४१–९९६).

यात प्रत्येक संधीत एक याप्रमाणे ५३ सधीत ५३ कथा आलेल्या आहेत. सर्व कथा धार्मिक व उपदेशपर आहेत. राजा श्रेणिक, मगध देश, पाटलिपुत्र व राजगृह याच्याशी संबद्ध अशा अनेक कथा त्यात आहेत. या कथामध्ये पशुपक्षीही पात्ररूपाने आलेले आहेत. [अ. सा.]

**कथाकोष प्रकरण** जिनेश्वर सूरि नावाचे अनेक आचार्य जैन वाङमयात प्रसिद्ध आहेत. परंतु श्वेतांबर संप्रदायात ज्याला विशेष मान आहे आणि जो सर्वांत प्रसिद्ध आहे, तो जिनेश्वर सूरीच या ग्रथाचा कर्ता मानतात. हा आचार्य वर्धमान सूरीचा शिष्य होता. भारताच्या प्राचीन कालातील समाज, संस्कृति, भाषा, इ. गोष्टीसबंधी या ग्रथात बरीच माहिती मिळते. [सि. जै. ग्रं.]

**कथानिका** कथेचा एक प्रकार. हिचा गाभा कारुण्यमिश्रित असतो. हिच्यात भयानक रस विपुल असला, तरी कथानिका शेवटी सुखपर होते. शेवट सुखात्मक करण्यासाठी अद्भुताचा आश्रय केलेला असतो. त्यासाठी आकाशवाणी किंवा दुसरे कोणते तरी अतिमानवी तंत्र अवलबिलेले असते. कथानिका ही उदात्त भावनाचे पोषण करणारी नसते. हिचेच प्राकृत रूप कहानी किंवा कहाणी असे असून ते हिंदी, गुजराती, मराठी, बंगाली वगैरे भाषांत प्रचलित आहे. कहाणी उदात्त भावांची नसते, हे विधान मराठी कहाणीला मात्र लागू होण्यासारखे नाही. मराठीत कहाणी म्हणजे धर्मकथा असे मानलेले असून तिच्यात कुठेतरी उदात्तपणाचा अंश हमखास आढळतो. सर्व व्रतकथा या कहाण्याच असून त्याही उदात्त भावांचाच आविष्कार करतात. जिच्यात काही उदात्त भाव अथवा पुण्यफल नाही, तिला मराठीत भाकड कथा म्हणतात. भाकड कथा हा कथानिकेचा मराठी पर्याय होऊ शकेल. [लो. सा. रू.]

**कथारामायण** असमिया भाषेत रघुनाथ महंताने रामायणकथा गद्यरूपात प्रथम लिहिली तिचे नाव. शंकर देवाचा शिष्य शतानद याच्या पाचव्या पिढीत रघुनाथ महंताचा जन्म झाला. त्याच्या पित्याचे नाव कृष्णनाथ असे होते. रघुनाथ महताने कथारामायणाशिवाय शत्रुंजय व अद्भुत-रामायण नामक दोन काव्यग्रथांचीही रचना केली आहे. [मै. श. गु. अ. ग्रं.]

**कॅथॉलिक** या शब्दाचा मूळ अर्थ जगन्मान्य असा आहे. प्रादेशिक चर्च व सर्वसामान्य जागतिक चर्च यातील भेद स्पष्ट करण्यासाठी कॅथॉलिक चर्च हा शब्द प्रथम पुढे आला. पण कालान्तराने मूळ किंवा प्राचीन असा नवाच अर्थ त्या शब्दाला प्राप्त झाला. म्हणूनच सांप्रत रोमन कॅथॉलिक चर्च म्हणजे मूळ किंवा प्राचीन चर्च असे समजले जाते.

ज्यांचा बाप्तिस्मा झालेला आहे, जे ख्रिस्तावर विश्वास ठेवतात व पोप हा ख्रिस्ताचा पृथ्वीवरील अधिकृत प्रतिनिधी असून सर्व धार्मिक बाबतीत त्याचा अधिकार अबाधित आहे असे मानतात, त्याना कॅथॉलिक असे म्हणतात.

कॅथॉलिक मडळाचे काम मुख्यत्वे पुढीलप्रमाणे असते–

(१) ख्रिस्ताच्या प्रकटीकरणाची व तारण होण्यास जे आवश्यक असेल, त्याची शिकवण देणे, हा अधिकार पोपचा असतो.

(२) विहित संस्कार करून आपले विधी, प्रार्थना व नैतिक शिकवण याचे पावित्र्य राखणे.

(३) पंथाच्या शिस्तीचे पालन करणे.

कॅथॉलिक मडळामध्ये इतर ख्रिस्ती मडळापेक्षा पुढील वैशिष्टचे असतात--

(१) **ऐक्य** – सर्व कॅथॉलिक लोकांची श्रद्धा एकाच प्रकारची असते. ते पोपच्या सत्तेखाली एकत्र होतात. आपल्या विषयीचे सर्व अधिकार ख्रिस्ताने पोपला दिले आहेत, असे ते समजतात.

(२) **पावित्र्य** – कॅथॉलिक लोक आपला धर्म पवित्र आहे, असे मानतात. कॅथॉलिक चर्च या पावित्र्याच्या रक्षणासाठी सर्व प्रकारची साधने पुरविते.

(३) **विश्वव्यापन** – ख्रिस्ताच्या काळापासूनच कॅथॉलिक समाजाचे अस्तित्व सर्व शतकात आढळून येते. अखिल मनुष्यजात आपल्या समाजात सामील करून घेणे, हे या पंथाचे ध्येय आहे. या दृष्टीने विश्वव्यापनासाठी या पंथाने इतिहासकाळात अनेक युद्धे केली आहेत व अलीकडच्या काळात गरीब-दुबळ्यांना औषधपाणी देणें, त्यांच्या शिक्षणासाठी शिक्षण-सस्था उघडणे, बायबलाचा निरनिराळ्या भाषांत अनुवाद करणे, इ. भूतदयेची व सास्कृतिक कार्येहि केली आहेत.

१६ व्या शतकात ख्रिश्चन धर्म मानणारा पण कॅथॉलिक चर्चला धुडकावून देणारा असा एक धार्मिक पथ युरोपात अस्तित्वात आला. त्याला प्रॉटेस्टट असे नाव मिळाले. त्यामुळे मग कॅथॉलिक म्हणजे प्रॉटेस्टंट पथाच्या विरुद्ध आहे तो, असा एक विरोधात्मक नवा अर्थ त्या शब्दाला प्राप्त झाला. साप्रत कॅथॉलिक हा शब्द निरनिराळ्या अर्थांनी वापरतात. प्रत्येक वेळी संदर्भावरून त्याचा अर्थ निश्चित करावा लागतो. मात्र तो अर्थ वर दिलेल्या अर्थापासून फारसा भिन्न असत नाही. [एन्सा. रि. ए.; सु वि. को.]

**कथासरित्सागर** गुणाढ्याच्या पैशाची भाषेतील बृहत्कथा या ग्रंथाचे सोमदेवाने केलेले सक्षिप्त संस्कृत रूपांतर. सोमदेव हा कवी काश्मिरी ब्राह्मण असून काश्मीरच्या अनत राजाच्या पदरी होता. अनंतदेवाची विदुषी पत्नी सूर्यवती, हिला बृहत्कथामंजरी हा क्षेमेंद्राचा ग्रथ सक्षिप्त व नीरस वाटला. म्हणून तिने सोमदेवाला नवीन ग्रंथ लिहिण्यासाठी प्रोत्साहन दिले. मग सोमदेवाने बृहत्कथेला अनुसरून संस्कृतात कथासरित्सागराची रचना केली. हा अनंत राजा इ. स. च्या ११ व्या शतकात होऊन गेला. त्यावरून या ग्रंथाचा कालही ११ व्या शतकाचा उत्तरार्ध हा ठरतो.

या ग्रंथात एकंदर १८ लबक, १२४ तरंग आणि २४००० श्लोक आहेत. लंबकाची नावे पुढीलप्रमाणे– (१) कथापीठ (२) कथामुख (३) लावाणक (४) नरवाहनदत्तजनन (५) चतुर्दारिका (६) मदनमंचुका (७) रत्नप्रभा (८) सूर्यप्रभा (९) अलंकारवती (१०) शक्तियश (११) वेला (१२) शशाकवती (१३) मदिरावती (१४) पंच (१५) महाभिषेक (१६) सुरतमजरी (१७) पद्मावती व (१८) विषमशील.

हा लंबकक्रम बृहत्कथामजरीच्या क्रमाहून भिन्न आहे. मंजरीचा क्रम मुळाबरहुकूम असावा. पहिले पाच लंबक दोन्ही ग्रंथांत सारखेच आहेत. पण पुढे सोमदेवाने मूळचा क्रम वदलला आहे. कथेची रसहानी होऊ नये, हे त्याचे कारण असावे. सोमदेवाची भाषा प्रसादमाधुर्यादि गुणांनी नटलेली आहे, तशीच ती ओघवतीही आहे त्याने मुख्यत. आपल्या ग्रंथात अनुष्टुभ छंदच वापरला आहे. तरगाच्या शेवटी मात्र तो भिन्न वृत्ताची योजना करतो

कथासरित्सागर हा त्याच्या उपलब्ध स्वरूपात रोचक आणि ज्ञानवर्धक झाला आहे. प्राचीन भारतात इतिहासलेखनाचीच प्रवृत्ति कमी होती, तिथे सामाजिक इतिहासाच्या लेखनाविषयी काय बोलावे ! पण कथासरित्सागर अशा अनेक कथाचे आगर आहे, की ज्या कथा तत्कालीन भारताचे रीति-रिवाज, तसेच धार्मिक विश्वास व संकेत यांचा परिचय घडवितात.

इ. स. च्या १० व्या व ११ व्या शतकात भारतामध्ये असख्य छोटी छोटी राज्ये होती. हे राजे महत्त्वाकांक्षी आणि वशाभिमानी असत. त्याचे मत्री प्रायः वुद्धिमान ब्राह्मण असत. राजदरबारांत ईर्ष्या, द्वेष, मत्सर, कारस्थाने याचा सुळसुळाट असे. कित्येक राजे स्वतःच्या भोगविलासासाठी प्रजेची पिळणूक करीत. त्यामुळे कित्येकदा अशा राजाविरुद्ध प्रजा बंड करून उठे. उच्च वर्णातले लोक चाडालकन्येपर्यंत हीनवर्णाच्या मुलीशी विवाह करीत (मदनमंचुका व सुरतमंजरीची कथा). आतरजातीय तसेच आंतरप्रातीय विवाहही होत. गांधर्व-विवाह प्रचलित होता. स्त्रियाना पूर्ण स्वातंत्र्य होते. नृत्य, गीत व चित्र या कलांचा बराच प्रसार होता. उच्च कुलातल्या स्त्रियाही नृत्य शिकत. स्त्रीजीवन एका अंगाने चारित्र्यादि गुणांनी जितके उन्नत होते, तितकेच दुसऱ्या अंगाने अधःपतितही होते. कल्याणवती आणि मानपरा या स्त्रियांच्या कथा नारी-चारित्र्याच्या अध्ययनाच्या दृष्टीने महत्त्वाच्या आहेत.

पुण्यकथा एकवीत बसल्या आहेत, असे दृश्य त्याने पाहिले.

आदिपुराणात कथाकथकाच्या अंगी कोणकोणते गुण आवश्यक आहेत त्याची एक लांबलचक यादी दिलेली आहे–

कथाकथक सदाचारी, स्थिरबुद्धी, संयमी, प्रियदर्शन, प्रियभाषी, सुसंस्कृत वाणीचा, प्रतिभाशाली, प्रत्युत्पन्नमती, सहिष्णू व उदार स्वभावाचा असावा. त्याला अनेक विद्या–कला अवगत असाव्या. आपली विधाने दृष्टान्तानी दृढ करण्याचे वाक्चातुर्य त्याच्या ठिकाणी असावे. कथा सांगताना त्याने भुवया चढवू नयेत; आक्रोश करून बोलू नये; विशेष म्हणजे श्रोत्यांची पात्रता आणि ग्रहणक्षमता लक्षात घेऊन त्या अनुरोधाने आपल्या कथेचा प्रपंच करावा (आदि पु. १.१२६–३८). [प्रा. भा. म.]

**कथाकालक्षेपम्** दक्षिणेतील एक कीर्तनाचा प्रकार. भागवतार हा रामायण-महाभारतातल्या गोष्टी व संतचरित्रे संगीताच्या आधारे लोकांना सांगतो. केवळ करमणूक हा या प्रकाराचा उद्देश नसून श्रोत्यांना नीती व सद्विचार यांची शिकवण देणे हा असतो. महावैद्यनाथ अय्यर हे ६३ नायन्मारांवर कथाकालक्षेपम् सांगत. तंजोर कृष्ण भागवतार (इ. स. १८४७–१९०३) यांना आधुनिक कथाकालक्षेपम्चे जनक म्हणतात. हा प्रकार साधारणपणे ३ ते ४ तासांचा असतो. यात भागवतार तेलुगु, संस्कृत, इ. भाषांतील वचनांच्या आधारे निरूपण करतो. त्यागराजाच्या कृतीचे आकर्षक संगीत याच्या साथीला असते. **पाहा** – कीर्तन. [डि. सा. ई. म्यु. म्यु.]

**कथाकोष** श्रीचंद्रकवीकृत अपभ्रंश भाषेतील ग्रंथ. या ग्रथात ५३ संधी असून ग्रंथ अप्रकाशित आहे. प्रत्येक संधीच्या शेवटच्या पद्यात कवीच्या नावाचा उल्लेख आहे. श्रीचंद्रकवी हा कुंदकुंदाचार्यांच्या परपरेतील वीरचंद्राचा शिष्य होता. कवीने या ग्रथाची रचना केली त्या वेळी अणहिलपुरात मूलराज सोळंकी हा राजा राज्य करीत होता (इ. स. ९४१–९९६).

यात प्रत्येक संधीत एक याप्रमाणे ५३ संधीत ५३ कथा आलेल्या आहेत. सर्व कथा धार्मिक व उपदेशपर आहेत. राजा श्रेणिक, मगध देश, पाटलिपुत्र व राजगृह याच्याशी संबद्ध अशा अनेक कथा त्यात आहेत. या कथामध्ये पशुपक्षीही पात्ररूपाने आलेले आहेत. [अ. सा.]

**कथाकोष प्रकरण** जिनेश्वर सूरि नावाचे अनेक आचार्य जैन वाङमयात प्रसिद्ध आहेत. परंतु श्वेतांबर संप्रदायात ज्याला विशेष मान आहे आणि जो सर्वांत प्रसिद्ध आहे, तो जिनेश्वर सूरीच या ग्रथाचा कर्ता मानतात. हा आचार्य वर्धमान सूरीचा शिष्य होता. भारताच्या प्राचीन कालातील समाज, संस्कृति, भाषा, इ. गोष्टीसबंधी या ग्रथात बरीच माहिती मिळते. [सि. जै. ग्रं.]

**कथानिका** कथेचा एक प्रकार. हिचा गाभा कारुण्यमिश्रित असतो. हिच्यात भयानक रस विपुल असला, तरी कथानिका शेवटी सुखपर होते. शेवट सुखात्मक करण्यासाठी अद्भुताचा आश्रय केलेला असतो. त्यासाठी आकाशवाणी किंवा दुसरे कोणते तरी अतिमानवी तंत्र अवलबिलेले असते. कथानिका ही उदात्त भावनाचे पोषण करणारी नसते. हिचेच प्राकृत रूप कहानी किवा कहाणी असे असून ते हिंदी, गुजराती, मराठी, बंगाली वगैरे भाषांत प्रचलित आहे. कहाणी उदात्त भावांची नसते, हे विधान मराठी कहाणीला मात्र लागू होण्यासारखे नाही. मराठीत कहाणी म्हणजे धर्मकथा असे मानलेले असून तिच्यात कुठेतरी उदात्तपणाचा अंश हमखास आढळतो. सर्व व्रतकथा या कहाण्याच असून त्याही उदात्त भावांचाच आविष्कार करतात. जिच्यात काही उदात्त भाव अथवा पुण्यफल नाही, तिला मराठीत भाकड कथा म्हणतात. भाकड कथा हा कथानिकेचा मराठी पर्याय होऊ शकेल. [लो. सा. रू.]

**कथारामायण** असमिया भाषेत रघुनाथ महंताने रामायणकथा गद्यरूपात प्रथम लिहिली तिचे नाव. शंकर देवाचा शिष्य शतानद याच्या पाचव्या पिढीत रघुनाथ महंताचा जन्म झाला. त्याच्या पित्याचे नाव कृष्णनाथ असे होते. रघुनाथ महताने कथारामायणाशिवाय शत्रुंजय व अद्भुत-रामायण नामक दोन काव्यग्रथांचीही रचना केली आहे. [मै. श. गु. अ. ग्रं.]

**कॅथॉलिक** या शब्दाचा मूळ अर्थ जगन्मान्य असा आहे. प्रादेशिक चर्च व सर्वसामान्य जागतिक चर्च यातील भेद स्पष्ट करण्यासाठी कॅथॉलिक चर्च हा शब्द प्रथम पुढे आला. पण कालान्तराने मूळ किवा प्राचीन असा नवाच अर्थ त्या शब्दाला प्राप्त झाला. म्हणूनच सांप्रत रोमन कॅथॉलिक चर्च म्हणजे मूळ किंवा प्राचीन चर्च असे समजले जाते.

ज्यांचा बाप्तिस्मा झालेला आहे, जे ख्रिस्तावर विश्वास ठेवतात व पोप हा ख्रिस्ताचा पृथ्वीवरील अधिकृत प्रतिनिधी असून सर्व धार्मिक बाबतीत त्याचा अधिकार अबाधित आहे असे मानतात, त्याना कॅथॉलिक असे म्हणतात.

कॅथॉलिक मडळाचे काम मुख्यत्वे पुढीलप्रमाणे असते–

बनविण्याचा हंगाम आश्विन ते माघ असे ५ महिने चालतो. उरलेले ७ महिने त्यांना बेकारीत कंठावे लागतात. हंगाम संपला, की पुढच्या बेकारीच्या काळासाठी ठेकेदार प्रत्येक कुटुंबाला ५ ते ६ मण धान्य उधार देतो व हंगामातल्या मजुरीत त्याची किमत वसूल करून घेतो. त्यामुळे त्यांना वर्षानुवर्षे एकाच ठेकेदाराच्या गुलामगिरीत सक्तीने हाडाची काडे करावी लागतात.

बेकारीच्या काळात जवळचे धान्य संपले, की हे लोक रानातली कंदमुळे खाऊन आणि पाखरांची शिकार करून कसाबसा आपला जीव जगवितात. चार वासे आणि त्यांवर गवताचे आच्छादन घालून हे लोक आपली घरे बनवितात. पावसाळ्यात ती घरे गळू लागतात आणि कथोडियांना त्यांचा निवारा सोडून एखाद्या मोठ्या वृक्षाच्या तळी आपला संसार मांडावा लागतो. कपडे किंवा पुरेसे पांघरूण नसल्यामुळे थंडीच्या दिवसात त्यांचे अतोनात हाल होतात. थंडीच्या रात्री सुरू झाल्या, की हे लोक आगटी पेटवितात आणि ढोलक्याच्या साथीवर नाचून-गाऊन रात्र कशीबशी घालवितात. हे लोक सामाजिक दृष्ट्या अत्यंत मागसलेले आहेत. त्यांच्या ठेकेदारांनी त्यांचा बाहेरच्या जगाशी कधी संपर्कच येऊ दिला नाही. हे लोक सत्यभाषी आणि विनम्र आहेत. त्यांच्या बोलीत मराठी, गुजराती व बागडी या भाषाचे मिश्रण असते.

**प्रसूतिप्रथा** – एखाद्याच्या घरी पुत्र जन्मला, की हे लोक सामूहिक आनंदोत्सव करतात. माता स्नान करून सूर्याची पूजा करते. झाडाच्या फांदीला लोंबविलेल्या कापडाच्या झोळण्यात मुलाला ठेवून त्या झोळण्याला झोके देतात. या सस्काराच्या वेळी जमलेले सर्व लोक गातात आणि वाद्ये वाजवितात.

**विवाहप्रथा** – लग्नाच्या वेळी वराला वधूसाठी १० ते २१ रुपयांपर्यंत देज द्यावे लागते. सालवृक्षाचे चार खांब उभे करून व त्यांवर जाभळीच्या डहाळ्याचे आच्छादन घालून लग्नमंडप तयार करतात. विवाहसस्कार अग्नीच्या साक्षीने करतात. त्या वेळी सामूहिक नृत्य होते.

**देवधर्म** – शिमगा, दिवाळी व रक्षाबंधन हे यांचे मुख्य सण होत. या वेळी नृत्य आणि गीत यांच्या स्पर्धा लावतात. कालिका ही यांची उपास्यदेवता होय. एखादा माणूस आजारी पडला, की कालिकेच्या प्रसन्नतेसाठी हे लोक जंगलाला आग लावतात. रोगाच्या बाबतीत औषधापेक्षा मंत्र-तंत्रावरच त्यांचा अधिक विश्वास असतो.

**मृतकप्रथा** – मृताला पुरतात. पुरण्याच्या आधी ५ नातेवाईक मृताच्या मुखात तादूळ घालतात. त्याच्या दोन्ही हातांवर एक एक रुपया किंवा काही पैसे ठेवतात. ५ दिवसांनंतर क्षौर करून सुतक सपवितात. [हीरालाल शर्मा — संयुक्त राजस्थान.]

## कथ्थिरवांद्लु

द. भारतातील भुरट्या चोरांची एक जात. जत्रा, उत्सव, रेल्वे–प्लॅटफॉर्म, इ. गर्दीच्या ठिकाणी हे लोक चाकू–कात्र्या विकण्याच्या मिषाने जातात व संधि साधून लोकांचे खिसे कापतात. त्यासाठी हे लहान कात्री किंवा काचेचा तुकडा आपल्याजवळ बाळगतात. काही वेळा पायातील चढावातही कात्री लपविलेली असते. चोरलेल्या बारीकसारीक वस्तू लपवून ठेवण्यासाठीही ते चढावांचा उपयोग करतात. वेगवेगळ्या प्रातात हे निरनिराळ्या नावांनी ओळखले जातात. या जातीच्या सर्व लोकांच्या भुवयांमध्ये हळकुंड लाल करून त्याने डाग दिलेला असतो. फेफरे येऊ नये म्हणून लहानपणीच असे डाग दिले जातात. [का. ट्रा. स. इं.]

## कदंब

(१) द्वारकेतील एक तीर्थ. [वराह पु. १४९]
(२) एक वृक्ष. गौरी–गणपतीच्या पूजेत याची पत्री आवश्यक असते. कृष्णाने याच वृक्षावरून यमुनेच्या डोहात उडी मारली होती. कात्यायनी व्रताच्या प्रसंगी यमुनेत स्नान करणाऱ्या गोपींची वस्त्रे उचलून घेऊन श्रीकृष्ण कदंब वृक्षावरच बसला होता.

## कदंब कवी

(जन्म इ. स. १४६२) कलिंग देशातील एक ज्योतिर्विद्यापंडित. हा प्रतापरुद्राचा दिवाण होता. याने ज्योतिषार्णव नावाचा एक ग्रंथ लिहिला असून पंचांग करण्यास त्याचा उपयोग होतो. [भ. अ. को.]

## कदंब राजवंश

इ. स. च्या ४ थ्या शतकात कुंतल प्रदेशावर (म्हैसूरचा उत्तर भाग) पल्लवांची सत्ता होती. त्या वेळी मयूरशर्मा नावाच्या एका ब्राह्मणाने शस्त्रविद्या हस्तगत करून सैन्याची जमवाजमव केली आणि श्री पर्वताच्या आसपासचा अरण्यमय प्रदेश हस्तगत केला. पुढे तो पल्लवराजांचा मांडलिक बनला व त्याने आभीर, त्रैकूटक, पारियात्रिक, शकस्थान, पुनाट, मोकरी, इ. प्रदेश जिंकले. अशा प्रकारे मयूरशर्म्याने जे राज्य स्थापन केले, त्याला कदंबाचे राज्य असे म्हणतात.

कदंब कुलाबद्दल अनेक दंतकथा प्रचलित आहेत. कदंबाच्या झाडाखाली एक परित्यक्त बालक वनवासीच्या एका नागरिकाला आढळले व त्याने त्याचा संभाळ केला. कदबाच्या झाडाखाली आढळले, म्हणून त्याला कदंब हे नाव देण्यात आले आणि तोच कदंब वंशाचा मूळ पुरुष होय. कोणी सांगतात,

की त्याच्या कुलघरात कदंबाचे झाड होते, म्हणन त्याना कदंब असे नाव मिळाले. मयूरशर्म्याचा राज्यकाल इ. स ३४५ ते ३७० असा अनुमानाने निश्चित केलेला आहे. त्याने १८ अश्वमेध केले अशी दंतकथा आहे. सारस्वत ब्राह्मण म्हणतात, की त्यानेच आपल्या पूर्वजाना सरस्वतीच्या खोऱ्यातून यज्ञकर्मासाठी दक्षिणेत आणले. कदंब हे मानव्य गोत्री ब्राह्मण होते, असे त्याच्या शिलालेखांवरून समजते.

मयूरशर्म्याचा पुत्र कंगवर्मा हा होय. आपल्या नावापुढची शर्मा ही ब्राह्मणत्वनिदर्शक उपाधी त्याने काढून टाकली व त्याऐवजी वर्मा ही उपाधी धारण केली. याच्या कारकीर्दीत कदंब राज्य अधिक शक्तिवान बनले व त्याची चागली भरभराट झाली. ज्या वेळी समुद्रगुप्ताने पल्लव राजांवर हल्ले चढवून त्यांना पराजित केले, तेव्हा कंगानेही पल्लवांना दाबण्याचा प्रयत्न केला. स्त्रीराज्य, मूषिक व भोजक या तीन राज्यांवर कंगवर्म्याने आपली सत्ता स्थापन केली होती व पल्लवाचे राज्य सोडून सर्व दक्षिणेचे राज्य त्याच्याकडे आले होते. परंतु पुढे पृथ्वीषेण वाकाटकाने कंगाचे राज्य जिंकून घेतले व त्याचा पराभव केला. पुढे कंगाचा पुत्र भगीरथ (इ. स. ३९५–४२०) याने ते गेलेले राज्य परत मिळविले.

पाचव्या शतकात कदंब कुलाच्या तीन शाखा तीन ठिकाणी राज्य करीत होत्या. वनवासी, उच्छंगी व त्रिपर्वत इथे त्यांच्या राजधान्या होत्या. सहाव्या शतकाच्या उत्तरार्धात बदामीच्या कीर्तिवर्मा चालुक्याने वनवासीच्या कदंबांचा पराभव करून रेवतीद्वीपाचा म्हणजे वेंगुर्ल्याच्या आसपासचा प्रदेश आपल्या राज्याला जोडला. प्राचीन चालुक्य व राष्ट्रकूट या सम्राट घराण्यांच्या अमदानीत कदबकुले कशीबशी जीव धरून होती. तैलप चालुक्याने राष्ट्रकूटांचा पराभव करून उत्तर चालुक्य साम्राज्याची स्थापना केली (इ. स. ९७३). यानंतर लौकरच वनवासी भागात त्याने आपले मांडलिक म्हणून कदंबांची स्थापना केली. यावरून सत्तासंपादनाच्या कामात त्याला कदंबांचे साहाय्य झाले असावे, असे वाटते. त्याने षष्ठदेव ऊर्फ चतुर्भुज (इ. स. ९६६-९८०) कदंबाला महामंडलेश्वराचा दर्जा व गोमंतकाचे राज्य दिले.

उत्तर चालुक्यांच्या अमदानीत वनवासी, हनगल, उच्छंगी व गोमंतक या ठिकाणी कदंब कुलाच्या शाखा राज्य करीत होत्या.

गोव्याच्या कदंबाचे राज्य गोवे बेटाच्या दक्षिणेस होते. त्यात साष्टीचा काही भाग व पश्चिम घाटाच्या बाजूची जमिनीची एक पट्टी येत असे. गोव्याची राजधानी चंद्रपूर येथे होती. इथे राज्य करणाऱ्या कदंबांपैकी गुहल्लदेव दुसरा (इ. स. ९८०–१००५) याने पश्चिम घाटातील लोकांना जिंकून राज्य वाढविले व पल्लव राजाना मदत केली. गुहल्लदेवाचा मुलगा षष्ठदेव याने शिलाहाराच्या मुलखावर स्वारी करून नवशत कोकण व कवडीद्वीप ही जिकून घेतली (इ. स. १०१०).

यानतर शिलालेखातून जयसिंहाचा (इ. स. १०३१-१०३७) उल्लेख येतो. याची राणी फार कर्तबगार होती. जयसिंहानतर मयूरवर्मा दुसरा (इ. स. १०३७–१०३८) गादीवर आला.

त्याच्यामागून तैल (पहिला) किंवा तोयिमदेव हा वनवासी घराण्याच्या गादीवर आला. याच्या कारकीर्दीत राज्यावर चोलांच्या स्वाऱ्या सारख्या होत होत्या. आपला मुलगा कीर्तिवर्मा याला याने वनवासीचा सुभेदार नेमले (इ. स. १०३८). कीर्तिवर्म्याने बापाच्या मृत्यूनतर राज्याशी असलेला सबंध तोडून टाकला व तो स्वतत्र झाला. चालुक्य घराण्यातील यादवीचा फायदा घेऊन त्याने त्याचे मांडलिकत्वही झुगारून दिले. पुढे त्याने गोव्याच्या कदंबांवर चाल केली; पण गोव्यावर राज्य करणाऱ्या जयकेशीने त्याला मागे हटविले.

इ. स. १०५० च्या सुमारास कदंबवंश कोकणात स्थायिक झाला. दक्षिण शिलाहारांची राजधानी गोपकपट्टण (सांप्रतचे जुने गोवे) येथे होती. जयकेशीनेही (इ. स. १०५०–१०८०) आपली राजधानी तिथेच नेली. याचे आरमार बलिष्ठ होते. याने शिलाहार मुरमुणी व लट यांचा पराभव केला. विक्रमादित्य चालुक्याला आपली मुलगी देऊन याने चालुक्याशी सख्य केले. जयकेशीने गोवे ही राजधानी फार भरभराटीस आणली. त्याने पुष्कळ दानधर्म केला. गद्याण व डाक्मा अशी त्याने दोन सोन्याची नाणी काढली होती.

जयकेशीनतर त्याचा मुलगा गुहल्लदेव तिसरा (इ. स. १०८०–११००) हा गादीवर आला. याच्या कारकीर्दीत कवडीद्वीप व इरिडिगे हा प्रदेश कदबांच्या हातून गेला; पण त्याचा भाऊ विक्रमादित्य (इ. स. ११००-११०४) याने गादीवर आल्यावर तो परत मिळविला. विक्रमादित्याच्या मागून त्याचा मुलगा जयकेशी दुसरा (इ. स. ११०४-११४७) हा गादीवर आला. हा आपल्याला 'कोकण चक्रवर्ती' म्हणवून घेई. विक्रमादित्य चालुक्याने याला आपली मुलगी दिली होती. त्यामुळे दक्षिणच्या राजांमध्ये जयकेशीचे वजन फार वाढले.

जयकेशीनतर त्याचे दोन मुलगे पेरमाडी (शिवचित्त) व विजयादित्य (विष्णुचित्त) एकामागून एक गादीवर आले. पेरमाडीची राणी कमलादेवी हिने अनेक देवळे बांधली व ब्राह्मणांना अग्रहार दिले. चालुक्यांचे साम्राज्य होते, तोपर्यंत पेरमाडी हा त्यांचा राजनिष्ठ मांडलिक म्हणून राहिला. त्याच्या मृत्यूनंतर कलचुरी राजा आहवमल्ल याने गोव्यावर स्वारी केली; पण विजयादित्य (विष्णुचित्त) याचे साहाय्य घेऊन

वीरबल्लाळ होयसळाने कलचुरींचा पराभव केला. पुढे यादव आणि होयसळ यांच्या भांडणात हनगळच्या कामदेव कदंबाने विजयादित्याला आपला मांडलिक बनविले.

विजयादित्यानतर जयकेशी (तिसरा) (इ. स. ११८७-१२१६) गादीवर आला. त्याचा पुत्र त्रिभुवनमल्ल हा यादवांशी झालेल्या लढाईत मारला गेला. यानंतर दहा वर्षे कदंबराज्य यादवांकडे होते. पुढे त्रिभुवनमल्लाचा पुत्र षष्ठदेव याने ते परत घेतले. षष्ठदेवाचा मेहुणा कामदेव याने इ. स. १२६० मध्ये चांदोर येथे आपली गादी नेली व पन्नास वर्षे तिथे राज्य केले. या वेळी मुसलमानांच्या वर्चस्वामुळे यादवांची सत्ता अगदी खिळखिळी झाली होती. या संधीचा फायदा घेऊन कदबानी यादवाचे माडलिकत्व झुगारून दिले; पण इ. स. १३१० नंतर कदबराज्याला उतरती कळा लागली. राजघराण्यातच यादवी सुरू होऊन एका पक्षाने होनावरच्या नबाबाला आपल्या मदतीस बोलाविले. आपण मुसलमान होऊ व नबाबाच्या मुलीशी निका लावू, असे त्याने नबाबाला आश्वासन दिले. तेव्हा नबाबाने त्याच्या मदतीसाठी इब्न बतूताच्या आधिपत्याखाली ५२ जहाजाचे आरमार पाठविले. त्या वेळी हिंदूचा पूर्ण पाडाव होऊन गोव्यावर मुसलमानी सत्ता प्रस्थापित झाली. ती जरी अल्पकाळच टिकली असली (इ. स. १३५७), तरी त्यानंतर कदबाना मात्र पुन्हा कधीच डोके वर काढता आले नाही.

गोव्यातील कदंबांच्या राजवटीत व्यापारी व शेतकरीवर्ग फार सुखी आणि सधन होता. राज्यात विणकर, कासार, सराफ, कारागीर आणि उदमी यांच्या वेगवेगळ्या संघटना होत्या. गोपकपट्टण या मुख्य बदरातून आयात-निर्यात व्यापार चालत असे. गावाचा कारभार ग्रामसस्थांच्या मार्फत होत असे. अद्यापही गोमंतकात ही ग्रामसस्थांची पद्धत चालू आहे. [अं. भा.; सह्याद्रि; वि. मुं. रा. प.; ए. इं.-मजु.]

**कदर** एक वन्य जमात. कोच्चिनमध्ये चित्तूर तालुक्याच्या पूर्वेकडील घनदाट जंगलात व त्रिवांकुर, कोइबतूर या प्रदेशांतील जंगलात ही आदिवासी जमात राहते. तमिळ भाषेत कदु शब्दाचा अर्थ वन असा होतो. त्यावरून या लोकांना वनवासी या अर्थी कदर असे नाव पडले. ते वनवासी का झाले, याविषयी पुढील कथा सागतात— एकदा देवाने कदरांना जेवायला बोलावले असता यानी गोमांस खायला नकार दिला. तेव्हा देवाने त्याना वनात राहण्याची आज्ञा केली. पुढे देवाने संपत्ती वाटली. ती सगळ्यांनी ओंजळी भरून घेतली. पण कदरांना नीट ओंजळ न करता आल्याने ती सपत्ती खाली सांडली. तीच वनसंपत्ती ते सांप्रत गोळा करीत राहिले आहेत.

हे लोक नेग्रिटो वंशाचे आहेत. याची उंची ५ फुटाच्या आतच असते. हे कृष्णवर्णी, जाड ओठाचे, मांसल नाकाचे, कुरळ्या केसांचे आणि शरीरयष्टीने मजबूत असतात. हनुवटीशिवाय त्याच्या चेहऱ्यावर दाढी मुळीच नसते. मिशाही विरळच असतात. हे लोक दाढीमिशा कधीच काढीत नाहीत. हे अपभ्रष्ट अशी तमिळ भाषा बोलतात.

बांबूची एक चौकट उभारून तिच्यावर बांबूचीच पाने पसरून ते आपला तात्पुरता निवारा बनवितात. हे काम मुख्यत्वे त्यांच्या बायका करतात. बराच कालपर्यंत त्यांना विस्तव पेटविणे माहीत नव्हते. अलीकडे ते चकमक वापरून किंवा बांबूचे दोन तुकडे एकमेकांवर घासून अग्नी उत्पन्न करतात. यांना शेती करणे माहीत नाही. जगलात मिळणारी कंदमुळे व शिकारीत मिळणारे पशुपक्षी, हेच त्याचे अन्न होय. पूर्वी हे बांबूच्या काठीला टोक करून तिच्या साह्याने कदमुळे उकरीत; पण अलीकडे ते त्या काठीला लोखंडी टोक लावतात. कदमुळे भाजून किंवा उकडून खातात. मधही त्याना फार आवडतो. मध मिळविण्यासाठी हे लोक खास मोहीम काढतात. मिळालेला मध बांबूच्या नळकांड्यातून साठवून ठेवतात.

कदर हे स्वभावाने गरीब असतात. ते सहसा भांडणतटे करीत नाहीत. अलीकडे मात्र त्यांच्यांत गुन्हेगारी शिरू लागली आहे. वनवासी असल्यामुळे हे लोक सदैव जागृत असतात. पशुपक्ष्यांच्या आवाजाचा अर्थ त्याना कळतो. हिंस्र पशूची त्यांना भीती वाटत नाही. नुसत्या वासावरून ते हिंस्र पशू ओळखतात. एखादा कदर हिंस्र श्वापदाकडून मारला गेला, असे क्वचितच घडते. कुत्रा हा त्यांचा सोबती असतो.



कदर पुरुष

गेल्या शतकाच्या अखेरीपर्यंत हे लोक विवस्त्र होते. आता कपडे घालू लागले आहेत. त्यांच्या एकेका वस्तीत १५ ते २० झोपड्या असतात. जिथे पाणी आणि अन्न असेल, तिथेच ते वस्ती करतात. कंदमुळे व शिकार मिळेनाशी झाली, की वस्ती उठवून दुसरीकडे जातात. कदर हे स्वभावतःच कलाप्रिय आहेत.

त्यांची झोपडी तात्पुरती असली, तरी ते अनेक प्रकारे तिला सजवितात. त्याच्या झोपड्या आत-बाहेर स्वच्छ असतात. बसण्यासाठी व झोपण्यासाठी ते ताडाच्या पात्याच्या चटया बनवितात. मध, मेण आणि वेलदोडे गोळा करणे, हे यांचे मुख्य व्यवसाय आहेत. ते हत्ती पकडण्याच्या मोहिमेत भाग घेतात व जंगलखात्याचेही काम करतात. सरकारने शेतीसाठी त्याना काही जमिनी फुकट दिल्या आहेत; पण त्यांचा शेतीकडे ओढा नसतो. हत्तीसारखे जंगली प्राणी शेतीची नासाडी करतात; म्हणूनही ते त्या भानगडीत पडत नसतील. मात्र त्यांच्या झोपड्यामोवती लहानसे परसू असते व त्यात ते भाजीपाला करतात आणि केळीही लावतात.

कदर पुरुष कमरेभोवती पांढरी किवा रंगीत लुंगी गुंडाळतात. स्त्रियाही लुंगीच नेसतात आणि वर चोळी घालतात. काचेच्या बांगड्या, मण्यांच्या आणि कवड्यांच्या माळा व कर्णभूषणे हे त्यांचे अलंकार असतात. कदर स्त्रिया बांबूच्या फण्या सुरेख बनवितात. स्त्रियांप्रमाणेच पुरुषही केस वाढवून पाठीमागे त्याची गाठ मारतात. पूर्वी स्त्री-पुरुष दोघेही समोरचे दात काळे करीत; पण आता ती पद्धत बंद पडली आहे.

**विवाहप्रथा** – मुलगी वयात आल्याशिवाय तिचे लग्न करीत नाहीत. मामेबहिणीशी लग्न करतात. लग्ने आई-बाप ठरवितात. प्रेमविवाहही प्रचलित आहेत. आपल्याच वस्तीतली मुलगी करण्यापेक्षा दुसऱ्या वस्तीतली मुलगी करणे अधिक पसंत करतात. पूर्वी हुंडा म्हणून जंगलात सापडणाऱ्या वस्तूचीच देवघेव होत असे; पण अलीकडे त्याची जागा पैशानी घेतली आहे. विवाहसमारंभ एक किंवा दोन दिवस चालतो. लग्नात नवरा मुलगा नवरीच्या गळ्यात ताळी बांधतो. नंतर भोजनसमारंभ व नाच-गाणे होते. अलीकडे सुसंस्कृत जगाच्या सपर्काने पांढरपेशा लोकातले लग्नसोहाळे आणि देवघेवीचे प्रकार त्यांच्यांत शिरले आहेत. हल्ली या लोकांत मुलीची संख्या कमी कमी होत असल्यामुळे मुलीची लग्ने लहान वयातच होऊ लागली आहेत.

कदर लोकांत स्त्री-पुरुषसमागम घरात होत नाही. त्यासाठी ते दांपत्य जंगलात एका निश्चित करून ठेवलेल्या जागी जाते व दिवसाच दांपत्यसुखाचा उपभोग घेते. समागमानंतर दोघेही स्नान करूनच घरात प्रवेश करतात. मासिक पाळीच्या वेळी स्त्रियाना वेगळ्या झोपडीत राहावे लागते. ही रूढी सक्त पाळली जाते. रजस्वला स्त्री घरात राहिली, तर संकट येते, अशी त्यांची समजूत आहे.

**प्रसूतिप्रथा** – कदर स्त्रियांचे बाळंतपणही अशाच बाहेरच्या झोपडीत होते. बाळंतीण दहा दिवस त्या झोपडीत राहते. ती घरी येण्याच्या वेळी ती झोपडी जाळून टाकतात. १० व्या दिवशी मुलाचे नामकरण होते. मुलाचे नाव बाप ठेवतो किंवा तो नसल्यास वस्तीचा मुखिया ठेवतो. कान टोचणे आणि नाक टोचणे हे विधीही नामकरणाच्या दिवशीच करतात. कदर लोकांत मातृसत्ताक कुटुंबपद्धती चालते.

**देव-धर्म** – हे लोक भुते-खेते आणि वेताळ यांना तर भजतातच; शिवाय भद्रकाली, भगवती, शास्ता, हनुमान, इ. देवतांनाही भजतात. कैलपर नावाच्या डोंगरापासून मलवय आणि मलंकुरत्ति हे जोडपे निर्माण झाले आणि त्यांच्यापासून आपली जात उत्पन्न झाली, असे ते समजतात. अथुवचेरिअम्मल ही देवी वरील दांपत्याचीच मुलगी होय. ती कदरांची मंगल देवता आहे. त्या भागात ज्यांच्यावर कसल्यातरी मूर्ती खोदलेल्या आहेत, अशा कितीतरी मोठमोठ्या शिळा आहेत. कदराची धारणा आहे, की त्या मूर्ती अथुवचेरिअम्मलनेच खोदल्या आहेत. कदरांच्या या देवतांची स्थाने निश्चित नसतात त्याच्या पूजेचा दिवसही निश्चित नसतो. त्याना देवपूजेला पुजारी लागत नाही. भूतबाधा होते, तेव्हा मात्र भगताला बोलावितात.

**मर्तिकप्रथा** – हे लोक प्रेते पुरतात; पण मृत्यूनंतर प्रेत ३-४ दिवस घरातच ठेवतात. ते चार दिवस आणि प्रेत पुरल्यानंतरचे सात दिवस घरात एका शिंक्यावर मृतासाठी अन्न ठेवतात. चौथ्या दिवशी गाणी गातात, भोजनसमारंभ करतात आणि मग प्रेत उचलतात. पुरताना प्रेताजवळ बांबूची उकरणी, मडके व करवंटीची पळी या वस्तू ठेवतात. प्रत्यक्ष पुरण्याच्या विधीपेक्षा नंतर केव्हा तरी जो मृत्युसमारंभ करतात, त्याला विशेष महत्त्व असते. त्या दिवशी मृताच्या नावाने थाटाची मेजवानी होते. शरीर नष्ट होते; पण आत्मा अमर असतो, तो स्वर्गात जातो आणि पुनर्जन्मही घेतो, या कल्पना कदरांना माहीत आहेत.


कदर स्त्री

कदर स्त्री-पुरुषाचे करमणुकीचे साधन मुख्यत्वे नृत्य हेच आहे. स्त्री-पुरुषांची नृत्ये वेगवेगळी असतात. नृत्याला ढोल व सनई यांची साथ असते. पुरुषांची नृत्ये शिकारीवर आधारलेली असतात.

पूर्वी कदर जमात निरोगी आणि काटक होती. ते मोठमोठी ओझी लीलेने वाहून नेत. पण सखल प्रदेशातील कपडे घालणाऱ्या लोकांशी संबंध आल्यामुळे त्यांचे आरोग्य आता पार बिघडून गेले आहे. त्यांच्या आहारात आता कंदमुळांची जागा भाताने घेतली आहे. त्याना दारू, कॉफी, अफू, इ. पदार्थ सेवन करण्याची व्यसने जडली आहेत. पूर्वी त्यांना झाडपाल्याची बरीच औषधे माहीत होती; पण ती आता ते पार विसरून गेले आहेत. आता त्यांचा वर्णही बदलत चालला आहे [कदर–के. गोविंद मेनन; दि नेकेड रॉकरेव्ह–एम्. हरमान्स. कदर ऑफ कोचिन–यू. आर. एरेन फेल्स.]

**कदलीव्रत** एक काम्यव्रत. भाद्र. शु. १४ शी ही या व्रताची तिथी आहे. या दिवशी केळीच्या झाडाची पूजा करतात. गुर्जर लोक हे व्रत कार्तिक, मार्गशीर्ष किंवा वैशाख या महिन्यांच्या पौर्णिमेस करतात, असे व्रतार्कात म्हटले आहे. पूजेचा ध्यानमंत्र पुढीलप्रमाणे–

**ध्याये त्वां कदलीदेवि सौभाग्यफलदायिनि ।**
**रूपं देहि जयं देहि यशो देहि च निश्चितम् ।।**

पूजा झाल्यावर केळीला पाणी घालतात. पूजिलेल्या केळीला घड आल्यावर व्रताचे उद्यापन करतात. त्या प्रसंगी तिल व घृत यांचे हवन करून आचार्यपूजा, वायनदान, दंपतीभोजन इ. गोष्टी करतात. व्रताचे फल–आरोग्य, सौदर्य व अपत्य यांची प्राप्ती. या व्रताची कथा अशी––

श्रीकृष्णाच्या उपदेशानुसार रुक्मिणीने कदलीव्रत केले. पुढे कौरवांच्या सभेत द्रौपदीचे वस्त्रहरण होत असता द्रौपदीने कृष्णाचा धावा केला, तेव्हा कृष्ण रुक्मिणीला म्हणाला, की 'तू केलेल्या कदलीव्रताचे फल द्रौपदीला दे.' तिने तसे केले. त्यामुळे दु:शासनाचे सर्व प्रयत्न निष्फळ झाले. केळीला ज्याप्रमाणे एकाखाली एक असे पदर असतात, त्याप्रमाणे द्रौपदीच्या अंगावर एकाखाली एक अशी अनेक वस्त्रे उत्पन्न होऊन तिचे लज्जारक्षण झाले. [व्रतराज]

**कदलीक्षेत्र** श्रीशैलपर्वतावरील एक क्षेत्र. भार्गवाने मंजुनाथाची उपासना केली असता मंजुनाथाने आकाशवाणीच्या द्वारे त्याला सांगितले, की 'तू कदलीक्षेत्रात जा; तिथे मी तुला दर्शन देईन.' परशुरामाने तिथे जाऊन नवनाथासहित शिवलिंगाचे पूजन केले. मग त्याला मंजुनाथाचे दर्शन झाले. मंजुनाथाने त्याला नाथपंथाची कीर्ती वाढविण्याचा आदेश दिला.

वरील कथेवरून हे नाथपंथाचे आवडते क्षेत्र असल्याचे कळून येते. मकरसंक्रांतीच्या दिवशी इथे मोठा उत्सव होतो. त्या दिवशी इथे नाथयोग्याचा समुदाय जमतो.

**कदीमी अग्रवाल** अग्रवाल वैश्यांचा एक भेद. बीसे अग्रवालांव्यतिरिक्त इतर सर्वाहून हे स्वत:ला उच्च समजतात. खुर्जा, बुलंदशहर आणि अलीगढ या भागात प्रामुख्याने यांची वस्ती आहे. सर्व जातीत आपली जात प्राचीन आहे, असे हे मानतात. कदीमी याचा अर्थच प्राचीन असा आहे. आजवर यांचे विवाहसंबध महाजन वैश्यांच्या घरी होत नव्हते; पण आता ते होऊ लागले आहेत. वाणिज्य व्यवसाय हा याचा पुरातन व्यवसाय होय. पण अलीकडे हे नोकऱ्याही करतात. यांच्या कदीमीपणाविषयी पुढील आख्यायिका सांगतात–

अग्रवालांचे पूर्वज एकदा युद्धावर गेले होते. परत आल्यावर त्यांनी पाहिले, की नगरातले सर्व लोक शत्रूच्या भयाने नगर सोडून पळून गेले आहेत. पण युद्धावरून परतलेले हे लोक न घाबरता तिथेच राहिले. त्यानंतर त्या नगरात जे लोक वास्तव्याला आले, ते या अग्रवालांना कदीमी (अर्थात् प्राचीन) म्हणू लागले. [क. अ. वि. प्र.]

**कदुपत्तन** मद्रास व कोच्चिन येथे आढळणारी एक जात. कदु नावाचे मांस खाल्ल्यामुळे हे पतित झाले, असे सांगतात. पूर्वी याना मंदिरप्रवेशाची परवानगी नव्हती. यांचा मीठ तयार करण्याचा धंदा होता. पण अलीकडे ते मुख्यत्वे शेती व नोकरी करतात. यांना एळुतच्छन असेही दुसरे नाव आहे. यांच्यांतले कित्येक लोक पूर्वी शिक्षक असत. यांच्यांत बापाचा वारसा मुलाला न मिळता जवळच्या सपिंडाला मिळत असे. आता ही पद्धत बदलली आहे. ब्राह्मणाप्रमाणे हे लोक वृद्धी व अशौच १० दिवस पाळतात. [म. ज्ञा. को.]

**कदेर** बंदुकीची व शोभेची दारू बनविणारे लोक. हे लोक बुंदेलखंड ही आपली जन्मभूमी मानतात. मध्यप्रदेशात विशेषेकरून ग्वाल्हेरमध्ये यांची बरीच वस्ती आहे. यांना पूर्वी बाणदार, गोलंदाज व कंदेर अशीही नावे होती.

यांच्या लग्नविधीत मंगलस्तंभाला फेरी घालणे, ही गोष्ट मुख्य असते. हे लोक धर्मकृत्यासाठी ब्राह्मणांना बोलावितात. हे ज्येष्ठ शु. १०मीस लकुमान हकीम याची पूजा करतात. दारूचा शोध या हकिमाने लावला, अशी यांची समजूत आहे. [ट्रा. का. सें. प्रॉ. इं.]

**कद्रा** एक जात. हिला कदमा असेही नाव आहे. या लोकाची वस्ती मुख्यत्वे बंगाल, बिहार, ओडिसा या राज्यांत आणि मध्य प्रदेशातील रायपूर व बालाघाट या जिल्ह्यांत आहे. हे लोक टोपल्या, चटया, सुपे, इ. विणतात. भंडारा जिल्ह्यातील कद्राना गोंडांची एक शाखा समजतात. गोंडी भाषेचे अपभ्रष्ट रूप असलेली भाषा ते बोलतात. याच्या बायका पदर डोक्यावरून घेत नाहीत. केसाची वेणी न घालता नुसताच बुचडा बांधतात. [ सु. वि. को.; म. ज्ञा. को. ]

**कनकदास** ( १६ वे शतक ) कर्नाटकाच्या दासकूटातील एक भक्तकवी. पुरंदरदासानंतर हाच विशेष लोकप्रिय आहे. धारवाड जिल्ह्यातल्या बाड या गावी याचा जन्म झाला. याचे मूळचे नाव तिम्मप्प असे होते. असे सांगतात, की एकदा तो शेतात खणत असता त्याला सुवर्ण-नाण्यांनी भरलेला हंडा सापडला व तेव्हापासून लोक त्याला कनकनायक म्हणू लागले. पुढे दासपरंपरेत आल्यावर तो कनकदास झाला. हा जातीने धनगर किंवा व्याध होता, अशी दोन मते आहेत. हा एका राजाच्या सैन्यात दाखल होऊन सेनापतीच्या अधिकारापर्यंत चढला होता. सैन्यात असतानाच एका रात्री चेन्नकेशवाने त्याला स्वप्न-दृष्टान्त देऊन आपला दास होण्याविषयी आदेशिले; पण कनकदासाने त्या दृष्टान्ताकडे दुर्लक्ष केले. पुढे एका युद्धात त्याचा जबरदस्त पराभव झाला आणि त्या वेळी त्याला चेन्नकेशवाच्या आज्ञेचे स्मरण झाले. मग लगेच तो सैन्यातून निवृत्त झाला आणि उडुपीला येऊन व्यासरायाचा शिष्य बनला. तो कितीतरी वर्षे व्यासरायाची सेवा करीत राहिला होता; पण हीन यातीचा असल्यामुळे तिथले कट्टर ब्राह्मण गावातल्या श्रीकृष्णमंदिरात त्याला प्रवेश करू देत नव्हते.

पुढे एका रात्री कनकदास मंदिराच्या पश्चिम भिंतीच्या बाहेर बसून कृष्णस्तुती गाऊ लागला. रात्रभर तो तंबोऱ्याच्या साथीवर कृष्णभक्तीची मधुर पद्ये गात होता आणि श्रीकृष्ण ती ऐकत होता. दुसऱ्या दिवशी सकाळी ब्राह्मण मंदिरात जातात, तर कृष्णमूर्ती पूर्वाभिमुख होती, ती पश्चिमाभिमुख झालेली. हा चमत्कार कनकदासामुळे घडून आला, हे लोकांना पटले. मग त्यानी मंदिराच्या पश्चिम भिंतीत एक खिडकी पाडली. आजही ती 'कनकन किंडी' या नावाने तिथे दिसते.

कनकदास मध्वाचार्यांच्या वैष्णव पंथात प्रविष्ट झाला असला, तरी तो आपले विचार-स्वातंत्र्य राखून होता. त्याने जातिभेद व सामाजिक दोष यांवर सडकून टीका केली आहे. तो एका ठिकाणी विचारतो–

चिखलात उत्पन्न होणारे कमल देवावर वाहिले जात नाही काय ? गायीच्या रक्त-मांसातून उत्पन्न होणारे दूध ब्राह्मण पीत नाहीत काय ? मला सांगा, की भगवान् नारायणाचे कुल कोणते ? सज्जनांच्याही कुलाची चर्चा कशाला करायची ? (कनकदासर कीर्तन भाग १).

कनकदासाच्या काळी कर्नाटकात शक्तिपूजेचे बरेच प्रस्थ होते, असे दिसते. लोक नाना प्रकारच्या क्षुद्र देवतांची आराधना करीत होते आणि त्यांना पशुबली समर्पीत होते. कनकदासाला ते आवडले नाही. त्याने क्षुद्र देवतांच्या पूजेचे खंडन करून केवळ एका नारायणालाच भजायला सांगितले. कनकदास हा सर्वसमर्पणात्मक भक्तीचा पुरस्कर्ता होता. त्याने हजारो पदे रचली आणि नरसिंहस्तोत्र, मोहनतरंगिणी, रामध्यान-मंत्र, हरिभक्तिसार व नळचरित्रे अशी पाच काव्येही निर्मिली. तो आपली गीते एकतारीच्या सुरावर म्हणत सर्वत्र हिंडत असे. त्याच्या गीतात वेलपुडिकेशव ही नाममुद्रा जोडलेली असते. कनकदासाला १०० वर्षांचे आयुष्य लाभले, असे सांगतात. [ डॉ. हिरण्मय; क. द.; डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**कनकदुर्गम्म** आंध्रातील एक शक्तिदेवता. हिला देऊळ व मूर्ती नसते. जत्रेचा ठराविक दिवसही नसतो. जेव्हा गुरा-ढोरांच्या रोगांची साथ येते, तेव्हा सुतारा-कडून तिची काष्ठमूर्ती घडवितात आणि तिची जत्रा करतात. त्या प्रसंगी रेडा, कोंबडी व बकरी तिला बळी देतात. त्या दिवशी गावात कोणाच्याही घरी विस्तव पेटवीत नाहीत. रात्री चुडण्या पेटवून तिची मिरवणूक काढतात व तिला ग्रामसीमेच्या बाहेर नेऊन टाकतात. सीमेवर येताच चुडण्या विझवितात. हेतू हा, की देवीला गावात परत येण्याचा मार्ग दिसू नये. मूर्ती विसर्जित केल्यावर सगळे लोक मौन धरून परत येतात. हिची कथा अशी —

विजयवाड्याजवळ एक कोमटीण राहत होती. तिच्या एका आजारात तिची मांसावर वासना गेली. पण तिला ते मिळाले नाही. ती इच्छा अतृप्त राहूनच तिला मृत्यु आला. ती भूत बनली. तिने गावातल्या गुरांवर संक्रांत आणली. लोक घाबरले. मग त्यांनी तिला पशुबळी देऊन तृप्त केले. त्या दिवसापासून तिची आराधना सुरू झाली. [ द्र. गॉ. मॉ. हिं. ]

**कनकनंदी** मुंडपृष्ठ पर्वताच्या पूर्वेस असलेले एक तीर्थ. या तीर्थात स्नान करणारा मनुष्य ऋणत्रयातून मुक्त होतो. [ पु. इं. ]

**कनकमुनी** गौतमाचा पूर्ववर्ती एक बुद्ध. भारत व नेपाळ यांच्यामधल्या तराईच्या जगलात कपिलवस्तू-जवळ याचा जन्म झाला, असे सांगतात. सम्राट अशोकाने त्या जागी उभारलेला स्तंभ इ. स. १८९९ साली सापडला आहे. फाहियान व युआन च्वांग यांना त्याच्या जन्मस्थानी अशोकाने बांधलेला एक स्तूप आढळला होता. त्यात कनकमुनीच्या देहाचे अवशेष होते, असे त्यांनी वर्णन केले आहे. पण तो स्तूप सांप्रत तिथे नाही. अशोकस्तंभ मात्र दोन तुकडे होऊन पडलेला आढळतो.

प्राचीन बौद्ध साहित्यात गौतम बुद्धाच्या पूर्ववर्ती अशा सहा बुद्धांचा उल्लेख मिळतो. त्यांतलाच हा कनकमुनी होय. महावस्तु, कर्मविभंग, इ. ग्रंथांत याचे नाव कोनाकमुनी अथवा कोनाकमन असे आढळते. याला कनकमुनी नाव मिळण्याचे कारण असे, की त्याच्या जन्मकाळी साऱ्या जंबुद्वीपावर कनकाची ( सोने ) वृष्टी झाली होती. याचा बाप सैन्यदत्त हा राजा होता. कनकमुनीच्या जन्मानंतर त्याने राज्यत्याग करून भिक्षुधर्म स्वीकारला. कनकमुनी हा प्रागैतिहासिक मानला जातो. मेजर फोर्बसने गौतम बुद्धाच्या पूर्ववर्ती तीन बुद्धांचा कालनिश्चय करण्याचा प्रयत्न केला आहे. त्याच्या मतानुसार ककुच्छंद सनपूर्व ३१०१, कनकमुनी सनपूर्व २०९९ व काश्यप सनपूर्व १०१४ या काळात होऊन गेला. [ हि. वि. को.; एन्सा. रि. ए. ]

**कनका** एक महानदी. मुडपृष्ठ पर्वतावर तप करणाऱ्या लोमशाने हिचे स्मरण केले आणि ही निर्माण झाली. इथे श्राद्ध विहित आहे. [ पु इं. ]

**कनकाभिषेकम्** सोन्याचा अभिषेक. कलावंताच्या सत्काराची दक्षिणेतील एक विशिष्ट पद्धती. एखाद्या राजदरबारात सर्वोत्तम कवी, नर्तक किंवा गायक यांचा श्रेष्ठ सत्कार करायचा, म्हणजे त्याच्या मस्तकावर कलशातून सुवर्णाची नाणी ओतायची, अशी पद्धत असे. अरुणगिरि नाथर, अरुणाचल कविरायर व रामस्वामी दीक्षितार यांचा असा कनकाभिषेक झाला होता. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**कनकामर** ( ११ वे शतक ) एक जैन मुनी आणि कवी. हा ब्राह्मण असून चंद्र ऋषीचा वंशज होता. पुढे त्याला वैराग्य उत्पन्न झाले व तो दिगंबर जैन बनला. देशाटन करीत असता तो आसाइय ( आशापुरी ) नगरीत पोचला. ही आसाइय नगरी म्हणजे पूर्वीचे निज़ाम राज्यातले असई हे गाव असावे. तो आपल्या काव्यात तेरापूर येथील लेण्यांचे तपशीलवार वर्णन करतो ( क. चरिउ. ४ व ५ संधि ) हे तेरापूर म्हणजे सांप्रतचे तेर होय. असई, तेर व धाराशिव ( सध्याचे उस्मानाबाद ) ही गावे जवळ जवळ असून ती प्राचीन काळी राष्ट्रकूटांच्या राज्यात मोडत होती. राष्ट्रकूट राजा तिसरा कृष्ण याने चेर, चोल, पांड्य, सिंहल, इ. दाक्षिणात्य राजांवर विजय मिळविले होते. कनकामराने तेच विजय आपल्या कथानायकाच्या नावावर वर्णिले आहेत. कनकामराची भाषा यादवकालीन मराठीचे पूर्वरूप दाखविते. आसाइय नगर व करकंडचरिउ यांमधील राजेरजवाड्यांची नावे महाराष्ट्राबाहेरील राजवटीत सापडत नाहीत. या आणि अशाच अन्यही काही ग्रंथांतर्गत पुराव्यांवरून कनकामराचे महाराष्ट्रीयत्व सिद्ध होण्याजोगे आहे.

प्रस्तुत कवीने करकंडचरिउ नामक ग्रंथ लिहिला असून तो दहा संधीत विभक्त आहे. या ग्रंथात कवीने जैन धर्मातील सदाचारमय जीवनाचे प्रतिपादन केले आहे. या ग्रंथात हिंदू दैवतांचेही उल्लेख आढळतात. हा ग्रंथ सर्वसामान्यपणे प्रचारात्मक आहे. त्याचे कथानक संक्षेपात असे---

अंग देशाच्या चंपापुरीत धाडीवाहन नावाचा राजा राज्य करीत होता. एका प्रसंगी तो कुसुमपुरात गेला असता त्याचे राजपुत्री पद्मावती हिच्यावर मन जडले. धाडीवाहनाने तिच्याशी लग्न केले. पुढे ती गर्भवती झाली. पुरुषवेषात राजाबरोबर हत्तीवर स्वार होऊन नगरसंचार करण्याचे तिला डोहाळे लागले. राजा-राणी हत्तीवर बसली. हत्ती नगर सोडून रानात घुसला. तो राजाला आटोपेना. राणीच्या आग्रहावरून राजाने कसाबसा आपला जीव वाचविला. राणी मात्र हत्तीवर तशीच बसून राहिली. हत्ती एका तळ्यात घुसला तेव्हा राणीने बाजूला उडी मारून वनात प्रवेश केला. तिथेच तिला एक पुत्र झाला. त्याला एका चंडाल पुरुषाने उचलून नेले. तो एक शापभ्रष्ट विद्याधर होता. त्याने त्या मुलाचे नाव करकंड ठेवले. तारुण्यात प्रवेश करताच त्याला दतिपुरचे राज्य मिळाले. गिरिनगरच्या राजकन्येशी त्याचे लग्न झाले. धाडीवाहन राजाला या घटनांचा पत्ता नव्हता. करकंड दंतिपुरच्या राज्यावर बसताच धाडीवाहनाने त्याला आपले मांडलिकत्व स्वीकारण्याचा खलिता धाडला. करकंड क्रोधाविष्ट होऊन चंपानगरीवर चालून आला. बाप–लेकांचे घोर युद्ध झाले. काही वाईट होण्यापूर्वी पद्मावतीने पिता-पुत्रांची ओळख करून दिली. पुढे करकंडाने आपले साम्राज्य वाढविले. त्यानंतर एक दिवस एका विद्याधराने करकंडाची पत्नी मदनावती हिला पळविले. त्याही आपत्तीतून करकंड सुखरूप बाहेर

निघाला. विद्याधराने मदनावतीला परत आणून करकंडाच्या स्वाधीन केले. पुढे करकंडाला वैराग्य उत्पन्न झाले. आपल्या पुत्रावर राज्य सोपवून त्याने घोर तपश्चर्या केली व मोक्ष मिळविला. [अ सा.]

**कनकावली व्रत** एक जैनव्रत. आश्विन महिन्यापासून याचा प्रारंभ. शुक्लपक्षात १ दा, ५ मी व १० मी; तसेच कृष्णपक्षात २या, षष्ठी व १२शी असे प्रत्येक महिन्यात ६ उपवास करणे, असा या व्रताचा विधी आहे. अशा प्रकारे वर्षाचे एकूण ७२ उपवास होतात. हा या व्रताचा लघु प्रकार होय. बृहत् प्रकार ५२२ दिवसांनी पूर्ण होतो व त्यात ४३४ उपवास व ८८ पारणा असतात. [जै. व्र. वि. सं.; व्र. ति. नि.]

**कनक्कन** मद्रास, म्हैसूर व कोच्चिन या भागांतील एक जात. हे लोक होडया चालविणे, मासे पकडणे, शेती व मजुरी करणे, इ. व्यवसाय करतात. हे फार गरीब असून शिक्षणाच्या बाबतीत मागासलेले आहेत. हिशेबाच्या कामात मात्र हे फार तरबेज असतात. प्राचीन काळी गावाचे हिशेबनीस म्हणून यांची नेमणूक होत असे. हे तमिळ भाषा बोलतात.

सरट्टु, कैकट्टी, श्री व सोलिया अशा यांच्या चार शाखा आहेत. हे लोक शैव, वैष्णव किंवा लिंगायत पंथाचे अनुयायी आहेत. हे मद्य-मांस निषिद्ध मानतात.

मुलीला प्रथम रजोदर्शन झाले, की तिला सात दिवस बाजूला बसवितात. सातव्या दिवशी तिला मैत्रिणीबरोबर तळयावर नेऊन सजवून चौरंगावर बसवितात व तिची आई तिच्या गळयात ताली बांधते.

कनक्कनांचा लग्नविधी अत्यंत साधा असतो. वधू-वराना जवळ बसवून केळयाची शिकरण खायला दिली व त्याच्यावर अक्षता टाकल्या, की विवाहविधी पुरा होतो.

बाप मेल्यानंतर मुलगा ४१ दिवस किंवा एक वर्ष सुतक पाळतो. हे लोक भुता-खेतांना भजतात. [का. ट्रा. स. इं.]

**कनखल** (१) हरिद्वारपासून दोन मैलांवर असलेले एक क्षेत्र. इथे गंगेची निळी धारा व कालव्यातून येणारी धारा या दोन्ही एकत्र मिळतात. बाजाराच्या रस्त्याने पुढे गेल्यावर दक्ष प्रजापतीचे मंदिर लागते. याच ठिकाणी दक्षाने यज्ञ केला होता व शिवाने त्या यज्ञाचा विध्वंस केला होता (वायु पु. ८३. २१). या मंदिराजवळच सतीने अग्निप्रवेश केल्याचे कुंड दाखवितात. या क्षेत्राला मायाक्षेत्र असेही नाव आहे. या क्षेत्रात गंगास्नानाचे महापुण्य सांगितले आहे. याच्या जवळच्या



कनखल तीर्थ

टेकडीवर शंकराचा त्रिशूल आहे. त्याची स्थापना कोणी आणि कधी केली, ते समजत नाही. या ठिकाणी आर्यसमाजाचे आश्रम व शिक्षणसंस्था आहेत. [हिं. ध.; पु. इ.]

(२) गयेजवळील एक तीर्थ (वायु पु. १११.७). (३) नर्मदातीरावरचे एक तीर्थ. इथे गरुडाने तप केले (पद्म पु. १. २०. ६७). (४) मथुरेजवळचे एक तीर्थ. पांचाल देशाच्या एका नापिताने इथे स्नान केल्याने त्याला ब्राह्मणजन्म मिळाला (वराह पु. १५२. ४०-४९).

**कनखलिपा** चौऱ्यांयशी सिद्धांपैकी एक स्त्री. हिचा क्रमांक ६७ वा येतो. ही कण्हपाची शिष्या असून



कनखलिपा

अगचेनगर येथील राहणारी होती. हिचा सनातनावर्तत्रयमुखागम नावाचा एक ग्रंथ आहे. [म. च. को.]

**कॅनन लॉ** ख्रिस्ती नियमशास्त्र. कॅथॉलिक चर्च–विशेषतः रोमन कॅथॉलिक चर्च– याच्या कायद्याला कॅनन लॉ असे म्हणतात. ईश्वराची दया व त्याच्या आज्ञा याचा प्रसार करणे, हे काम आपले आहे, अशा महत्त्वाकांक्षेने ख्रिस्ती चर्च प्रेरित झाल्यावर कॅनन लॉ तयार करण्याची गरज उत्पन्न झाली.

कॅनन लॉ हा दैवी कायदा समजला जातो. प्रत्यक्ष ईश्वराने सागितलेले व चर्चकरिता नेमून दिलेले नियम, असा त्याचा अर्थ आहे. हे नियम ईश्वरप्रणीत असल्यामुळे त्यात फेरफार करण्याचा अधिकार कोणालाही नाही, अशी ख्रिस्ती जनतेची धारणा आहे. या दैवी कायद्याच्या आधारे पुढे जे इतर पुष्कळ नियम वेळोवेळी करण्यात आले, ते मनुष्यकृत असल्यामुळे त्यांत फेरफार होऊ शकतो. रोमन कॅथॉलिक चर्चने या नियमाचे दोन प्रकार मानले आहेत– (१) कॅनन लॉ– ‘ कोडेक्स ज्यूरिस कॅनोनिसी’ व (२) चर्च लॉ- ‘ नॉन कोडिफाइड पेपल डिक्रीटल्स अॅड लेगेस ’

पुढे पोपसाहेबांच्या डिक्रीटल्सचा व कौन्सिलच्या कॅनन्सचा फार मोठा संग्रह शतकानुशतके वाढत गेला. तेव्हा इ. स. च्या ६ व्या शतकात, ८ व्या शतकात व १२ व्या शतकात अशी तीन वेळा कॅनन्सची व्यवस्थित माडणी करण्यात आली. नंतर १५ व्या शतकापर्यंतच्या अशा सर्व पोपसाहेबांच्या आज्ञापत्रांचे व्यवस्थित ग्रंथ तयार करून ते १५८२ साली १३ व्या ग्रेगरी पोपने प्रसिद्ध केले. पुढे कौन्सिल ऑफ् ट्रेन्टच्या कॅनन्स व डिक्रीज (१५४५–१५६३) व व्हॅटिकन कौन्सिलच्या कॅनन्स व डिक्रीज (१८६९–१८७०) यांची संहिता (कोड) तयार करून ती १९१७ साली प्रसृत करण्यात आली.

सांप्रतच्या कॅनन् लॉ मध्ये पुढील बाबीचा अंतर्भाव होतो. (१) चर्चची घटना (२) चर्चचा अधिकारी वर्ग (३) क्लर्जी, इतर धार्मिक अधिकाराचे लोक व सामान्य जन यांच्या वागणुकीचे नियम व (४) मॅरेज (विवाह), तसेच सॅक्रामेंटल्स, यांचा तपशील.

एका काळी जगावर साम्राज्य करण्याची चर्चने महत्त्वाकांक्षा बाळगली होती. त्या वेळी कनन लॉ चे क्षेत्र फार विस्तृत होते. त्या वेळी चर्च व युरोपातील राजसत्ता यांच्यामध्ये सुमारे एक शतकभर लढा चालला होता. चर्च असा दावा सांगत होते, की क्लर्जी, त्यांची मिळकत, चर्चची मिळकत, ख्रिस्ती जनतेचे दिवाणी दावे व फौजदारी स्वरूपाचे गुन्हे या बाबींवर चर्चचाच अधिकार चालला पाहिजे. स्टेट (राजसत्ता) चर्चचा हा अधिकार मानायला तयार नव्हती. पण या दोन पक्षांच्या संघर्षात चर्चचा विजय झाला व दिवाणी कायदे, फौजदारी व दिवाणी न्यायदान, मृत्युपत्रे आणि डिसीडन्ट मिळकतीची व्यवस्था, या सर्व बाबीबद्दल सविस्तर नियम करण्याची कामगिरी चर्चला मिळाली. त्या वेळी रोमन लॉच्या धर्तीवर चर्चने जे कायदे व अंमलबजावणीचे नियम केले, ते तत्कालीन अन्य कायद्यांपेक्षा बरेच प्रगतिपर होते. त्यामुळे पुढील कायदेपंडितांना त्याचा श्रेष्ठ आदर्श लाभला. [ एन्सा. रि. ]

**कनमपल्ला** त्रेसष्ट नायन्मारांपैकी एक. याची शिवभक्ती अद्‌भुत होती. देवापुढे धूप–दीप जाळण्यात याने आपले सर्व धन खर्ची घातले. पुढे तो गवताचे भारे विकून उपजीविका करू लागला. एके दिवशी याचा भारा कोणी घेईना; म्हणून त्याने त्याच्या चुडचा करून पेटविल्या. त्यातच आपला जटाभारही त्याने जाळून टाकला.

**कनियन** द. भारतातील एक जात. केरळमध्ये हा शब्द कनिसन असा उच्चारतात. गणिक=ज्योतिषी या संस्कृत शब्दाचा कनियन हा मल्याळम् अपभ्रंश आहे.

कनियनांना पणिक्कर किंवा पणिक्कन व आसन अशी दोन बिरुदे आहेत. जे लोक पूर्वी लोकांना तालीम शिकवीत असत, त्यांना पणिक्कर म्हणतात. आसन हे संस्कृत आचार्य शब्दाचे अपभ्रष्ट रूप आहे.

कनियनांची कनियर व तित अशी दोन कुले असून तित लोक ताडाच्या छत्र्या बनविण्याचा धंदा करतात. त्याचबरोबर ते देवऋषीपणही करतात. कनियर लोक भविष्य सांगण्याचा व्यवसाय करतात.

परशुरामाने केरळात ठिकठिकाणी आखाडे उघडले व शूद्र तरुणांना देशाचे रक्षण करता यावे, या हेतूने त्यांना शारीरिक शिक्षण देण्याचे काम पणिक्कनांकडे सोपविले, असे सांगतात.

कनियन हे पूर्वी ब्राह्मण समजले जात होते. परंतु त्यांच्या भविष्याचा लोकांना पडताळा येईनासा झाल्यावर हळूहळू त्यांची ब्राह्मणत्वाची प्रतिष्ठा कमी होत गेली. छत्री, काठी, भस्म व कवडचांची पिशवी या वस्तू कनियन वापरतात व त्या आपणास सुब्रह्मण्याकडून मिळाल्या, असे सांगतात. केरळच्या दक्षिण भागातील कनियन स्वतःला गंधर्व स्त्री व कनी नावाचा एक ब्राह्मण साधू यांचे वंशज मानतात. या कनीच्या नातवाने पुढे सुब्रह्मण्य या देवतेला प्रसन्न केले व नालीक हे आडनाव मिळविले, असे सांगतात. अजूनही यांच्यापैकी काही लोक स्वतःला नाली असे म्हणवून घेतात.

कनियनांची राहणी स्वच्छ असते. त्यांच्या कमरेला एक लोखंडी सळई व सुरी खोचलेली असून हातातल्या ताडपत्री

छत्रीत अनेक कुंडल्या खोचलेल्या असतात. हे लोक बुद्धिमान असून यांच्यापैकी पुष्कळांना मल्याळम् व संस्कृत भाषा चांगली अवगत असते. या लोकांना मांस व मासे निषिद्ध नाहीत, परंतु काही कुटुंबे हा आहार वर्ज्य मानतात. मांस खाणाऱ्या व न खाणाऱ्या लोकांत विवाहसंबंध होतात; मात्र मांसभक्षण करणारी वधू मांसभक्षण न करणाऱ्या कुटुंबात पडली, तर तिला मांसाहार वर्ज्य करावा लागतो. पूर्वी हे लोक अनेक भावात मिळून एकच बायको करीत. अजूनही क्वचित ही प्रथा आढळते. उच्चवर्णीय हिंदूंचे बरेचसे संस्कार हे लोक पाळतात. कनियन मुलगा सोळा वर्षांचा झाला, की त्याचा उपनयनसदृश असा एक संस्कार करतात.

त्रिवांकुर येथील लोक सामाजिक व घरगुती अशा दोन्ही बाबतीत कनियनांचा ज्योतिषविषयक सल्ला घेतात.

हे सूर्य, चंद्र, ग्रह, गणेश, सुब्रह्मण्य, विष्णु, शिव व भगवती या देवतांना भजतात.

पूर्वी हे लोक मृतांना पुरीत असत हल्ली जाळतात व वार्षिक श्राद्धही करतात.

कनियन लोक त्यांच्या भविष्यकथनाच्या विद्येमुळे हिंदू, मुसलमान व ख्रिश्चन या सर्व लोकांत सारखेच प्रिय आहेत [ का. ट्रा. स. इं. ]

**कनियावल** राजस्थानातील एक व्रत मुलीच्या विवाहाच्या दिवशी तिच्या घरातील लोक उपास करतात आणि विवाहसमारंभ पार पडल्यावर तिचे मुखावलोकन करून मग भोजन करतात. कनियावल हा कन्याव्रत या शब्दाचा अपभ्रंश आहे. या व्रताला राजस्थानात धार्मिक महत्त्व आहे. [ मरु भारती ]

**कनिष्क** ( सनपूर्व पहिले शतक. काहींच्या मते इ. स. चे पहिले शतक) शकांच्या नंतर भारतावर आक्रमण करणाऱ्या कुशाण वंशातील एक बलाढ्य राजा. युएची अर्थात ऋषिक नामक जमातीचे पाच संघ सनपूर्व १ ल्या शतकात बल्खच्या आसपास स्थायिक झाले होते. त्यांपैकी कुशाण नावाचा संघ उत्तरोत्तर प्रबल होत गेला आणि त्याचा प्रमुख कुजुल कदफिसेस याने काबूल व कंदाहार जिंकून सिंधू नदीपर्यंत मजल मारली. त्याचा पुत्र वेम याने वाराणसीपर्यंतचा प्रदेश जिंकला होता. त्याच्या नंतरचा कुशाण राजा कनिष्क हा वेम म्हणजे कदफिसेस ( दुसरा ) याचा पुत्र होय, असे काही इतिहासकारांचे मत होते; पण तो कुशाणांच्या वेगळ्या घराण्यातला पुरुष होता, असे प्रो. विलसन म्हणतात. तो इ. स. ७८ साली राज्य करू लागला. कनिष्क व कदफिसेस ( दुसरा ) याचा संबंध आणि कनिष्काचा काल यांविषयी इतिहासकारांत खूप मतभेद आहेत. कनिगहॅम व फ्लीट याच्या मते कनिष्क सनपूर्व ५८ या वर्षी राजा झाला आणि त्यानेच विक्रम सवत् स्थापन केला.

युआन च्वांगने लिहून ठेवले आहे, की कनिष्क हा गाधार येथे राज्य करीत असता, त्याची सत्ता आसपासच्या राज्यांवर प्रस्थापित झाली होती व दूरदूरच्या प्रदेशावरही त्याचे वर्चस्व होते. युआन च्वांगच्या या म्हणण्याला कनिष्काच्या नाण्यांचा दुजोरा मिळतो. कनिष्काची नाणी काबूलपासून गंगाकाठच्या गाझीपूरपर्यंत सापडत असल्यामुळे त्याच्या राज्यविस्ताराची कल्पना येऊ शकते.

कनिष्काच्या मृत्यूनंतर कुमारलात नामक एका बौद्ध पंडिताने कल्पनामंडितिका नावाचे एक पुस्तक लिहिले आहे. त्याचा चिनी अनुवाद उपलब्ध आहे. त्यात कनिष्काविषयी लिहिले आहे, की त्याने पूर्व भारत वर चढाई केली होती आणि त्याचे सामर्थ्य दुर्दम्य होते. श्रीधर्मपिटकनिदानसूत्र नावाच्या एका ग्रंथाचा चिनी भाषेत अनुवाद झालेला आहे. त्यात कनिष्काविषयी पुढील मजकूर आहे—

कनिष्काने पाटलिपुत्रावर चढाई करून तिथल्या राजाला पराभूत केले. त्याने प्रथम त्या राजाकडे भारी करभार मागितला; पण शेवटी बौद्ध पंडित अश्वघोष आणि बुद्धाचा कमंडलु या दोन वस्तू घेऊन तो संतुष्ट मनाने परत फिरला. त्यानंतर इराणच्या पार्थव राजाने पश्चिमेकडून कनिष्कावर चढाई केली. उभयपक्षी घोरादर युद्ध झाले. त्या युद्धात कनिष्काने पार्थव राजाचा पराभव केला. इतकेच नव्हे; तर हिंद-चीनच्या सर्व राज्यावर आपले आधिपत्य स्थापले. वक्षु नदीच्या पश्चिमेस अराल पर्वत व कास्पियन समुद्र इथवर पसरलेल्या युएची राज्यांना त्याने आपल्या साम्राज्यात समाविष्ट केले. त्यानंतर अश्वघोषाने कनिष्काला बौद्ध धर्म उपदेशिला.

एका खोतानी ग्रंथात कनिष्काने साकेतावरही ( अयोध्या प्रांत ) चढाई केल्याचा उल्लेख आहे. कनिष्काचे नाव असलेले अभिलेख पेशावर, बहावलपूर, मथुरा व सारनाथ इथवर सापडतात. त्यावरून कळते, की त्याने मध्यदेश आणि मगधदेश हे सातवाहनांकडून जिंकून घेतले होते. कनिष्ककालीन शेवटचा अभिलेख शक संवत् २३ च्या ग्रीष्मऋतूच्या पहिल्या महिन्यातला आहे. शके २४ ( इ. स. १०२ ) च्या एका अभिलेखांत कनिष्काचा उत्तराधिकारी वासिष्क याचे नाव आहे.

कनिष्काने बदख्शॉं येथील पूर्वीची ऋषिक ( युएची ) राजधानी सोडून पुरुषपूर ( पेशावर ) येथे आपल्या विशाल

साम्राज्याची नवी राजधानी स्थापली. या राजधानीत त्याने मोठमोठ्या सुंदर इमारती बांधल्या व सातवाहन सम्राटांच्या दरबाराशी स्पर्धा करण्यासाठी पुरुषपूर हे विद्या व वाङमय याचे केंद्र बनविण्याचा प्रयत्न केला. पाटलिपुत्रातून केवळ अश्वघोषालाच त्याने आपल्या राज्यात आणले नाही, तर सुप्रसिद्ध वैद्य चरक यालाही आणले, असे चिनी ग्रंथावरून कळते.

सम्राट अशोकानंतर बौद्ध धर्माचा हिरीरीने पुरस्कार करणारा दुसरा सम्राट म्हणजे कनिष्कच होय. अशोकाच्या नतरची बौद्धांची चौथी संगीति ( महापरिषद ) कनिष्काने बोलाविली. तसेच अनेक स्तूप, विहार आणि चैत्य यांची निर्मिती करण्याच्या कामीही त्याने अशोकाचे अनुकरण केले. आपल्या राजधानीत त्याने ४०० फूट उंचीचा आणि तेरा मजल्यांचा एक स्तूप उभारला होता व तो नवव्या शतकापर्यंत उभा होता. तो जर आज शिल्लक असता, तर जगातल्या अद्‌भुत वास्तूत त्याची गणना झाली असती

बुद्धोत्तर भारताच्या इतिहासात कनिष्काच्या इतके विराट व्यक्तिमत्त्व असलेला सम्राट क्वचितच आढळतो. पुराणात जालधर या नावाने ज्या असुराचे आख्यान दिले आहे, तो जालंधर म्हणजे कनिष्कच होय, असे काही संशोधकांचे मत आहे. भारतातील बौद्ध पथाचा इतिहास लिहिणारे लामा तारानाथ हेही कनिष्काला जालधर किंवा जालधराधीश असे म्हणतात. पद्मपुराणाच्या मते जालंधरदेश व्यापण्यापासूनच कनिष्काच्या कर्तृत्वाचा प्रारंभ झाला आहे.

पद्मपुराणात जालंधराच्या ( कनिष्क ) बापाचे नाव सिंधु ( समुद्र ) असे दिलेले असून भार्गवाने त्याला पुढीलप्रमाणे उपदेश केलेला आहे–

**तवात्मजो विक्रमेण त्रैलोक्यं भोक्ष्यते ध्रुवम् ।**
**जंबुद्वीपे महापीठं योगिनीगणसेवितम् ।।**
**आप्लावितं त्वयेदानीं मुञ्च जालन्धरालयम् ।**
**तत्र राज्यं प्रयच्छास्मै तनयाय महार्णव ।।**

( पद्म पु. उ. खं. ५ )

अर्थ– हे महासागरा, तुझा पुत्र आपल्या पराक्रमाने त्रैलोक्याचा उपभोग घेईल. जंबुद्वीपातील योगिनीगणसेवित असे जालंधर महापीठ आता तू जे व्यापले आहेस, ते मोकळे करून तेथील राज्य तुझ्या पुत्राला ( कनिष्काला ) दे.

जालंधर देशाला त्रिगर्त असेही दुसरे नाव आहे. सांप्रतचे लाहोर, जालंधर आणि कांगडा हे जिल्हे प्राचीन काळी त्रिगर्त लोकांनी व्यापलेले होते. जालंधर अथवा त्रिगर्त देशात एकदा जलप्रलय होऊन त्याला महार्णवाचे स्वरूप प्राप्त झाले होते. या जलप्रलयानंतर त्रिगर्तांच्या पश्चिमेकडे राहणाऱ्या कुशाणानी रावी नदी ओलांडून त्रिगर्तावर आक्रमण केले. या आक्रमणाचा पुढारी कनिष्क हा होता. त्यावरूनच पद्मपुराणाने त्याला जालंधर ही संज्ञा दिली असावी. वरील श्लोक याच घटनेचे सूचक आहेत.

कनिष्काचा मृत्यु युद्धाच्या मोहिमेतच झाला ( इ. स. १०१ ). त्याविषयीची आख्यायिका अशी– आपल्या विजययात्रेत पामीरचे पहाड उल्लंघून पलीकडे गेल्यावर कनिष्क आजारी पडला. त्याच्या सैनिकांना दीर्घकालीन संग्रामाचा कटाळा आला होता. शांतता आणि स्वस्थता या गोष्टींना ते अगदी आसुसले होते. म्हणून कनिष्क आजारी पडल्याचे पाहून ते त्याच्यावर उलटले आणि त्यांनी त्याला कांबळचात गुडाळून ठार केले. **पाहा–** कुशाण राजवंश. [ भा. इ. रू.; म. ज्ञा. को. ]

**कनिष्ठ** भौत्य मन्वंतरातील पाच देवगणांपैकी एक. [ पु. इ. ]

**कनेत** पंजाबमधील एक जात. हे लोक डोंगराळ मुलखातले असून वृत्तीने स्वतंत्र व धाडसी आहेत. जुन्या काळी हे लोक एकमेकांची खेडी लुटीत. दिवसभर झोपा काढून रात्री दरवडे घालीत प्रत्येक खेड्यात त्यांचा एक मुख्य असे. त्याला ते मोवन्ना म्हणत. आणलेल्या लुटीतला हिस्सा तो घेई व शिवाय प्रत्येकाकडून थोडा करही घेई. गावातली उत्तम जमीन ते देवाला देत व तिच्याहून जरा कमी प्रतीची जमीन मोवन्नाला देत. यांच्या पडक्या घरांचे अवशेष अद्यापि दृष्टीस पडतात. ही घरे किल्लेवजा दिसतात.

कालातराने सपाट प्रदेशातून ब्राह्मण व क्षत्रिय त्या प्रदेशात गेले, त्यांनी तिथल्या जमिनी बळकाविल्या व ते त्या सर्व प्रदेशाचे मालक बनले. याबद्दल दंतकथा सागतात, ती अशी – बलरामजीने क्षत्रियांची कत्तल चालविली, त्या वेळी काही क्षत्रिय कुले या मुलखात पळून आली. त्यांतले काही ब्राह्मण झाले, तर काही बनिया बनले. ज्यांनी आपले प्राण वाचविण्यासाठी जात बदलली, त्यांना राजपूत अथवा खत्री म्हणू लागले.

कनेत लोक आपण ब्राह्मण व राजपूत यांच्या मिश्र विवाहापासून उत्पन्न झालो, असे समजतात.

**विवाहप्रथा –** कनेत लोक सोनार, नापित, इ. जातीतल्या मुलींशी लग्ने करतात; पण आपल्या मुली मात्र त्या जातीत देत नाहीत. खश व कारून या जातीशी कनेतांचा लग्नसंबंध होतो. पूर्वी हे लोक अनेक बायका करीत. यांच्यांत दुसरी एक चाल अशी होती, की कुटुबात चारपाच सहोदर बंधू असले,

तर त्यांच्यापैकी वडील भावाने लग्न करायचे व त्याची बायको ती सर्व बंधूंनी आपली बायको मानायची.

**मर्तिकप्रथा–** हे लोक प्रेते जाळतात. यांच्या प्रत्येक पोट-जातीचे वेगळे स्मशान असते. हे मृतात्म्याची पूजा व प्रार्थना करतात.

बृहत्संहितेत कुन्निद किंवा कुलिंद अशा एका जमातीचा उल्लेख येतो. ते लोक म्हणजेच कनेत असावे, असे कनिगहॅम म्हणतो. [ म. ज्ञा. को. ]

**कनोज** उ. प्रदेशाच्या फरुखाबाद जिल्ह्यातील एक शहर. कनोज या शब्दाचे मूळ संस्कृत रूप कान्यकुब्ज असे आहे. भारतीय साहित्यात हा शब्द सकुचित नगरवाचक अर्थाने, त्याचप्रमाणे व्यापक प्रदेशवाचक अर्थानेही येतो. प्रतीहार राजांच्या लेखात कान्यकुब्ज शब्द प्रदेशवाचक म्हणून वापरला आहे व त्याची राजधानी महोदय होती, असे म्हटले आहे. राजतरंगिणीत कान्यकुब्जाचा विस्तार यमुनातटापासून कालिका नदीपर्यंत होता, असे सांगितले आहे. युआन च्वांगने याचा परिघ जवळजवळ ६७० मैल होता, असे म्हटले आहे. स्कंद-पुराण व प्रबंधचिंतामणि या ग्रंथांत कान्यकुब्ज प्रदेशात ३६ लाख गावे होती, असा उल्लेख आहे.

वाल्मीकि रामायणात कनोज शहराचे मूळ नाव महोदय असल्याचे सांगितले आहे. महोदय नगराला कान्यकुब्ज हे नाव कसे पडले, याबद्दल वा. रामायणातच एक कथा दिली आहे—कुशाचा पुत्र कुशनाभ याने महोदय नावाच्या नगराची स्थापना केली होती.परंतु वायूच्या शापामुळे पुढे त्याच्या शंभर मुलींना कुब्जत्व प्राप्त झाले व या शहराला कन्याकुब्ज असे नाव मिळाले. भागवतात कान्यकुब्ज हे अजामिळाचे नगर होते, असे म्हटले आहे. गाधि राजाची ही राजधानी होती. गाधि राजाच्या नावावरून याला गाधिपूर किंवा गाधिनगर व कुश राजाच्या नावावरून कुशस्थल, कोश व कुशिक अशीही नावे मिळाली होती.

कनोजचा अलीकडचा इतिहास मौखरी राजांपासून सुरू होतो. गुप्त साम्राज्याच्या शेवटच्या दिवसांत हरिवर्मा या मौखरी राजाने एक नवीन राज्य स्थापन केले व कनोज ही आपली राजधानी बनविली. हरिवर्म्याच्या नंतर त्याचा पुत्र आदित्यवर्मा व नातू ईश्वरवर्मा यानी तिथे राज्य केले. ईश्वर-वर्म्याच्या मागून त्याचा पुत्र ईशानवर्मा गादीवर आला. या वंशातील हा सर्वश्रेष्ठ राजा होता. याने आपल्याला महाराजाधिराज ही पदवी घेतली होती. मौखरी राजांनी इ. स. ६०६ पर्यंत कनोजवर राज्य केले.

यानंतर कनोजवर राज्य करणारा प्रमुख राजा म्हणजे हर्षवर्धन हा होय. त्याच्या कारकीर्दीत कनोज शहर एका विशाल साम्राज्याची राजधानी बनले. इ. स. ६४७ मध्ये हर्ष मृत्यू पावल्यावर त्याच्या साम्राज्याचे तुकडे झाले. आणि मग कनोजला विशेष महत्त्व राहिले नाही.

आठव्या शतकाच्या प्रारंभी यशोवर्म्याने कनोजवर आपली सत्ता स्थापन केली. त्याच्या मागून वृत्रायुध, इंद्रायुध व चक्रायुध या राजांनी इ. स. सुमारे ७७० ते ८१६ पर्यंत कनोजवर राज्य केले. या तीन राजाचा परस्परसंबंध काय होता, ते मात्र अज्ञात आहे.

या कालानंतर कनोजवर अनेक आक्रमणे झाली. राजस्थान व माळवा यांवर राज्य करणारा प्रतीहार राजा नागभट (द्वितीय) याने चक्रायुधाचा पराभव करून कनोज जिंकून घेतले व तिथेच आपली राजधानी ठेवली. नागभटाचा नातू मिहिर-भोज हा अत्यंत पराक्रमी होता. त्याच्या साम्राज्याचा विस्तार पश्चिमेस सौराष्ट्रापासून पूर्वेस बंगालपर्यंत, आणि उत्तरेला पंजाबपासून दक्षिणेला नर्मदेपर्यंत होता. या विशाल साम्राज्याची राजधानी कनोज येथेच होती.

१० व्या शतकाच्या शेवटी कनोजवर राज्यपाल नावाचा राजा राज्य करीत होता. त्याच्या कारकीर्दीत इ. स. १०१८ मध्ये गझनीच्या महंमदाने मोठ्या सैन्यानिशी कनोजवर स्वारी केली. कनोजचे वैभव पाहून महंमद व त्याचे सैन्य चकित झाले. राज्यपालाचा पराभव करून महंमदाने हे वैभवसंपन्न नगर लुटून नेले व त्याला अवकळा प्राप्त झाली. यानंतर कनोजला आपले पूर्वीचे वैभव कधीच प्राप्त झाले नाही.

कनोजची ही शोचनीय अवस्था चंद्रदेव गाहडवाल याच्या उदयानंतर बदलली. चंद्रदेवाने एक नवीन राज्य स्थापन केले आणि कनोज हीच आपली राजधानी केली. त्याने कनोजच्या इतिहासात शांती, सुव्यवस्था व समृद्धी यांचे एक नवीन युग सुरू केले. त्याच्यामागून मदनपाल, गोविंदचंद्र, विजयचंद्र व जयचंद्र यांनी कनोजवर राज्य केले. जयचंद्र गाहडवाल इ. स. ११७० च्या सुमारास राज्यावर आला. जयचंद्र व पृथ्वीराज चौहान याचे युद्ध इतिहासात प्रसिद्ध आहे.

इ. स. ११९२ मध्ये महंमद घोरी याने भारतावर स्वारी करून पृथ्वीराज चौहान याचा पराभव केला व दिल्ली जिंकून घेतली. या स्वारीच्यावेळी जयचंद्राने पृथ्वीराजाला मदत केली नाही. जयचंद्राच्या या संकुचित वृत्तीचे फळ त्यालाही भोगावे लागले. पुढच्याच वर्षी म्हणजे इ. स. ११९३ साली महंमद घोरीने जयचंद्रावर स्वारी केली आणि त्याला ठार मारून कनोज शहर आपल्या ताब्यात घेतले. त्यानंतर बरेच दिवस

कनोजच्या जनतेला हालअपेष्टा भोगाव्या लागल्या. लोकांना जीवितवित्ताची सुरक्षितता वाटेनाशी झाली.

यानंतर शेरशहा व हूमायू यांनी कनोजवर सत्ता प्रस्थापित केली. अकबराच्या वेळी कनोजचा अंतर्भाव मोगल साम्राज्यात झाला. इंग्रजाच्या कारकीर्दीत १८५७ सालचा स्वातंत्र्यसंग्राम इथेच सुरू झाला.

भारताच्या सांस्कृतिक इतिहासात कनोजला महत्त्वाचे स्थान आहे. हे एक पवित्र तीर्थक्षेत्र होते, असे पुराणांतरी सांगितले आहे. भागीरथीच्या तीरावर असल्याकारणाने त्याचे माहात्म्य वाढले होते. गुप्त-हर्ष कालात कनोज हे बौद्ध संस्कृतीचे प्रमुख केंद्र होते. हर्षाच्या कारकीर्दीत इथ अनेक संघाराम होते व त्यात दहा हजार भिक्षू राहात होते. हिंदू देवदेवतांचीही इथे दोनशे मंदिरे होती. विद्या व कला यांचे तर ते माहेरघरच होते. भवभूति व वाक्पतिराज हे दोन कवी यशोवर्म्याच्या काळी कनोजमध्ये होऊन गेले. सांप्रत कनोज शहर अत्तरांसाठी प्रसिद्ध आहे. [ कनौज; हि. जॉ. ए. इं.; वि. स्मृ. ग्रं. ]

**कनोजी ब्राह्मण** कान्यकुब्ज ब्राह्मण पाहा.

**कन्नय्य भागवतार** त्यागराजाचा प्रसिद्ध शिष्य. त्यागराजाच्या सर्व कृती यानेच प्रथम त्रावणकोरचा महाराजा स्वाति तिरुनाळ याला ऐकविल्या. पुढे त्याच्याच दरबारात आस्थान विद्वान म्हणून कन्नय्य भागवताराची नेमणूक झाली. [ डि. सा. इं. म्यु. म्यु.]

**कन्नड भाषा व साहित्य** द. भारताच्या पाच भाषांना 'पंचद्राविड भाषा' असे म्हणायची वहिवाट आहे. तमिळ, तेलुगू, मल्याळम्, कन्नड व तुळू अशी त्यांची नावे आहेत. त्यांतली तुळू वगळल्यास बाकीच्या चारही भाषा संपन्न अशा साहित्यिक भाषा आहेत. तुळु सोडून बाकीच्या चारी भाषाना स्वतंत्र लिपी आहेत तुळु ही भाषा कन्नड भाषेची एक परिपुष्ट अशी बोली आहे. दक्षिण कॅनरा हा तुळूचा प्रदेश होय. याशिवाय कोडगु, तोड, कोट व बडग या नावानी ओळखल्या जाणाऱ्या बोलींचा परिवार कन्नड भाषेला लाभला आहे. कोडगु ही तुळूची जुळी बहीण म्हटले तरी चालेल. ती कूर्गमध्ये बोलली जाते. बाकीच्या तीन बोली नीलगिरीच्या वेगवेगळ्या भागांत प्रचलित आहेत. त्यांचा अद्यापि विकास झालेला नाही.

कन्नड या नावाने कोणती तरी एक भाषा महाभारताच्या कालातही बोलली जात असावी, असे वाटते. तिथे 'कर्नाट' शब्द अनेक वेळा आढळतो. शिलप्पधिकारम् या तमिळ महाकाव्यात कन्नड भाषा बोलणाऱ्यांना करुनाडर असे म्हटले आहे. करुनाडु=काळचा मातीचा देश, हे लक्षण कर्नाटकाच्या भूभागाला लागू पडते. बृहत्संहिता, कथासरित्सागर, बृहत्कथा, इ. ग्रंथांत कर्नाट शब्द आढळतो.

कन्नड लिपी ही तेलुगु लिपीला अगदी जवळची आहे. या दोन्ही लिपीचा उगम अशोककालीन ब्राह्मी लिपीच्या दक्षिणी शाखेतून झाला आहे. १३ व्या शतकापूर्वी लिहिल्या गेलेल्या तेलुगु शिलालेखांच्या आधारे दाखविता येते, की त्या कालापर्यंत तेलुगु व कन्नड या दोन्ही लिपी एकच होत्या. वर्तमान कन्नड लिपी देवनागरीहून भिन्न दिसत असली, तरी दोहोंच्या ध्वनिसमहात फारसे अंतर नाही. जे आहे ते एवढेच, की कन्नड स्वरमालेत 'ए' आणि 'ओ' याची ऱ्हस्व रूपे आहेत. तसेच व्यंजनात वर्त्स्य 'ल' च्या जोडीने मूर्धन्य 'ल' हा एक वर्ण अधिक आहे. प्राचीन कन्नडमध्ये 'र' व 'ळ' या दोन्ही वर्णाचे एकेक मूर्धन्य रूप प्रचलित होते; पण आधुनिक कन्नडमध्ये ते लुप्त झाले आहे. कन्नड वर्णमालेत पूर्वी एकूण ४७ वर्ण होते. सांप्रत त्यांची सख्या ५२ पर्यंत वाढविली गेली आहे. कन्नड ही द्राविड कुळातली भाषा असली तरी तिच्या-

| | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ಅ | ಆ | ಇ | ಈ | ಉ | ಊ | ಋ | ೠ | ಎ | ಏ | ಐ | ಒ | ಓ | ಔ | ಂ | ಃ |
| अ | आ | इ | ई | उ | ऊ | ऋ | ॠ | ऎ | ए | ऐ | ऒ | ओ | औ | अनुस्वार | विसर्ग |

| | | | | | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ಕ | ಖ | ಗ | ಘ | ಙ | ಚ | ಛ | ಜ | ಝ | ಞ | ಟ | ಠ | ಡ | ಢ | ಣ | ತ | ಥ | ದ | ಧ | ನ | ಪ |
| क | ख | ग | घ | ङ | च | छ | ज | झ | ञ | ट | ठ | ड | ढ | ण | त | थ | द | ध | न | प |

| | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ಫ | ಬ | ಭ | ಮ | ಯ | ರ | ಲ | ವ | ಶ | ಷ | ಸ | ಹ | ಳ | ಕ್ಷ | ಜ್ಞ |
| फ | ब | भ | म | य | र | ल | व | श | ष | स | ह | ळ | क्ष | ज्ञ |

कन्नड लिपी

मधल्या सर्व धार्मिक, शास्त्रीय व तात्त्विक संज्ञा संस्कृता-मधूनच घेतलेल्या आहेत. संस्कृत भाषेने कन्नडच्या कायेत आपले तेज व सत्त्व प्रविष्ट केले आणि त्यामुळेच कन्नड ही एक समृद्ध साहित्यभाषा बनली.

कन्नड साहित्याच्या कालविभागासबंधी विद्वानात एकमत नाही; पण प्रा. मुगळी यांनी केलेले त्याचे कालविभाजन पुष्कळ अशी मान्य होण्याजोगे आहे ते असे—

(१) **पंपपूर्व युग**– (इ. स. ९५० पर्यंत)
(२) **पंपयुग**–(इ. स. ९५० ते ११५० पर्यंत)
(३) **बसवयुग**–(इ. स. ११५० ते १५०० पर्यंत)
(४) **कुमारव्यासयुग**–(इ. स. १५०० ते १९०० पर्यंत)
(५) **आधुनिक युग**–(इ. स. १९०० च्या पुढे)

**पंपपूर्व युग**– या युगातली एकच साहित्यकृती गाजते आणि ती म्हणजे कविराजमार्ग ही होय. दंडीच्या काव्यादर्शाच्या आधारे कन्नड भाषेत लिहिलेला तो अलकारशास्त्रावरचा ग्रंथ आहे. मान्यखेटचा राष्ट्रकूट राजा नृपतुग याने इ. स. ८१५ ते ८७७ या कालखडात कधीतरी तो निर्माण केला, असा आज-वरचा समज होता. पण आधुनिक संशोधक आता त्याच्या कालाविषयीच नव्हे; तर कर्त्याविषयीही संदेह प्रगट करू लागले आहेत. प्रा. मुगळी यांच्या मते नृपतुगाचा दरबारी कवी श्रीवि-जय याने हा ग्रंथ स्वतः लिहून आपल्या आश्रयदात्याच्या नावाने प्रकाशित केला.

या ग्रंथात कवीने अनेक गद्य-पद्य लेखकांचा नामनिर्देश केला आहे. कवीश्वर, लोकपाल, विमलोदय, नागार्जुन, जयबंधु, दुर्विनीत अशी त्यांची नावे आहेत. या नामावळीवरून असे वाटते, की नृपतुंगाच्या काळात कन्नड साहित्य निर्माण होऊन प्रगतीची वाट चालू लागले होते. वाङमय आधी आणि त्याच्या नियमांचे शास्त्र त्यानंतर, हा तर नियमच आहे. ज्या अर्थी अलंकारशास्त्रावर कन्नड भाषेत ग्रंथ निर्माण व्हावा, अशी आकांक्षा नृपतुगाला झाली, त्या अर्थी त्याच्या काळात कन्नड भाषेचा साहित्यसंसार मांडला जाऊ लागला होता, ही गोष्ट ओघानेच मान्य करावी लागते. श्रीवर्धदेव हा ग्रंथकार याच कालखंडातला आहे. त्याने सुमारे शहाण्णव हजार कविताचा चूडामणि नामक जैन तत्त्वज्ञानावरचा एक ग्रंथ लिहिला होता, असे शोधाअंती कळते. याच काळातला दुसरा एक ग्रंथ वड्डाराधने हा होय. यात १९ जैन महापुरुषांच्या कथा गद्यात सांगितल्या आहेत. शिवकोटचाचार्य नामक जैन कवीने इ. स. ९०० ते १०७० या कालात कधीतरी याची रचना केली. कन्नड गद्याचे सर्वप्रथम रूप या ग्रंथात आढळते.

इ. स. ५ व्या शतकापासून कन्नडमधले शिलालेख सापडू लागतात. पुढच्या पुढच्या शतकात या शिलालेखांची संख्या वाढत गेलेली दिसते. सर्वात प्राचीन शिलालेख बेलूरनजीक हलमिडी या खेड्यात सापडला आहे. एका शिलालेखात छंदोबद्ध रचना आढळली आहे. बदामी आणि श्रवणबेळगोळ या ठिकाणी सापडलेले शिलालेख शब्दरचना आणि अलकार या दोन्ही दृष्टीनी वाचनीय आहेत. ५ ते ७ या शतकांत कन्नडचे स्वरूप कशा प्रकारचे होते, ते या शिलालेखावरून कळते.

कन्नड साहित्याचे आद्यप्रवर्तक जैन होते. त्यांच्यामुळेच कर्नाटकात जैन धर्माचा विस्तार झाला. जैन ग्रंथकारांचे हे कन्नड साहित्य बहुतांशी धार्मिक होते आणि धर्मप्रचारासाठीच लिहिलेले होते. आपल्या धर्माला अनुकूल असा फेरबदल करून त्यांनी सस्कृतातले पुराणभांडारही कन्नड साहित्यात आणून ओतले. या पौराणिक ग्रंथसंपदेमुळे कन्नड साहित्य अनेक गुणांनी विकसित झाले.

**पंपयुग** —— महाकवी पप याने आपल्या सरससुंदर काव्य-निर्मितीने कन्नड साहित्याच्या सुवर्णयुगाचा सूर्योदय केला. हा कन्नडचा आदिकवी मानला जातो. हा इ. स. ९०२ मध्ये वेंगिपळु या अग्रहारात जन्मला. तो जैन असला, तरी त्याचे आजे–पणजे ब्राह्मण होते. दोन्ही धर्मांचा वारसा त्याला त्याच्या कुळातूनच लाभल्यामुळे त्याच्या ग्रंथरचनेत ब्राह्मणी व जैन या उभय संस्कृतीतल्या श्रेष्ठ गुणाचा उत्कर्ष पाहायला मिळतो. पंपाचे दुसरे वैशिष्ट्य हे, की त्याने कन्नडला संस्कृत भाषेच्या निकट संपर्कात आणून ठेवले.

कन्नड भाषेत चंपूकाव्याच्या रचनेलाही यानेच प्रारंभ केला. या कालखंडात असा एक अलिखित नियम पडून गेला होता, की प्रत्येक कवीने धार्मिक व लौकिक अशी उभयविध काव्ये रचली पाहिजेत. धार्मिक काव्यात धर्माचे विवेचन व धर्मो-पदेश असावा आणि लौकिक काव्यात सौंदर्याला प्राधान्य देऊन जनांचे मनरंजन करावे. जैन कवी पहिल्या प्रकाराला आगमिक म्हणतात. आगमिक कृतीत सामान्यत्वे एखाद्या तीर्थंकराचे चरित्र असते; तर लौकिक कृतीत रामायण, महाभारत किंवा जैन कथाभांडारातला एखादा प्रसंग खुलवून सांगितलेला असतो. पपाचे आगमिक काव्य आदिपुराण हे होय. या पुरा-णात ऋषभनाथाच्या अनेक कथांचा संग्रह केलेला आहे. बौद्ध जातकांच्या धर्तीवर या कथा लिहिलेल्या आहेत. धर्मविवेचन व काव्यसौंदर्य ही दोन्ही त्या पुराणात प्रकर्षाने आढळतात.

पंपाने लौकिक काव्यासाठी महाभारत हा ग्रंथ निवडला. त्याच्या या ग्रंथाला विक्रमार्जुनविजय किंवा पंपभारत असे नाव आहे. या काव्याचा नायक युधिष्ठिर नसून अर्जुन आहे. अर्जुनाचे अनेक पराक्रम आणि विजय पंपाने ओजस्वी भाषेत

वर्णिले आहेत. त्यासाठी त्याने महाभारताच्या मूळकथेत खूपच उलथापालथ केली आहे. तो द्रौपदीला गौण ठरवून सुभद्रेला प्राधान्य देतो. द्रौपदी पाच पांडवांची भार्या नसून एकट्या अर्जुनाचीच होती, असे सागतो. श्रीकृष्णाला तर तो मानीतच नाही. त्याचे मन ओढ घेते, ते दानशूर कर्णाकडे. भीमसेनाला मात्र त्याने व्यासोक्त पद्धतीने वर्णिले आहे. भारतीय युद्धात दुःशासनाचा वध केल्यावर द्रौपदीची वेणी सावरताना तो तिला गौरवाने म्हणतो––

**इदरोळ् श्वेतातपत्रस्थगित–**
**दशदिशामंडलम् राजचक्रम्**
**पुद्दिळ कौडित्तडंगित्तिदरोळे**
**कुरु राजान्वयं यत्प्रताप-**
**क्किदारिंदं नोडगुर्बुविदुरिदुवे**
**महाभारतक्कादिया त्युब्ज**
**दळाक्षो पेळ सामान्यमे**
**बगेये भवत्केशपाशाप्रपंचम्**

अर्थ–हे पाचालि ! तुझ्या या वेणीसंहारात दशदिशाचे भूपती सामावून गेले आहेत. यातच कौरवाचा नाशही साठविलेला आहे. हे एवढे महाभारत घडले, याचे मूळ कारण ही तुझी वेणी ! आणि कुरुक्षेत्रावर हे महायुद्ध उभे झाले, त्याचेही मुख्य कारण म्हणजे दुःशासनाने तुझ्या केशपाशाला केलेला पापी करस्पर्श हेच होय.

महाकवी पपाच्या श्रेष्ठ काव्यगुणांवर कन्नड रसिक लुब्ध आहेत. याच काळातले आणखी दोन प्रमुख कवी म्हणजे पोन्न आणि रन्न हे होत. पोन्न हा राष्ट्रकूटाच्या दरबारात नावाजला. शातिपुराण, जिनाक्षरमाला व भुवनैकरामाभ्युदय असे त्याचे तीन काव्यग्रथ आहेत. शेवटचा ग्रथ उपलब्ध नाही. रन्न हा मुधोळ येथे जन्मला. हा चालुक्याचा आश्रित कवी होता. त्याने अजितपुराण व साहसभीमविजय किवा गदायुद्ध ही दोन काव्ये लिहिली. त्याच्या गदायुद्धाचा नायक भीम आहे. हे काव्य वीररसपूर्ण आहे. या काव्याने रन्नाची कीर्ती अमर झाली. पप, पोन्न व रन्न या तिघाना कन्नड लोक रत्नत्रय म्हणून ओळखतात.

नागवर्मा, चामुडराय, दुर्गसिंह, चद्रराज, नागवर्मा (दुसरा) हेही पंपयुगातलेच कवी होत. नागवर्म्याने कर्नाटककादंबरी व छदोवुधि असे दोन ग्रथ लिहिले. चामुडरायाचे चाउंडरायपुराण हे प्राचीन कन्नड गद्याचा सुदर नमुना आहे. चंद्रराज याने मदनतिलक व दुर्गसिहाने पचतत्र हे ग्रंथ लिहिले. नागवर्मा (द्वितीय) याला अभिनव पप म्हणून गौरवितात. हा कवी जैन होता. त्याने पपभारताच्या धर्तीवर रामायण लिहिले आहे व जैन कल्पनेप्रमाणे ते सुधारून घेतले आहे. त्यामुळे मूळ रामायण व याचे रामायण यांमध्ये खूप फरक पडलेला आहे. त्याच्या मते राम-लक्ष्मण हे अवतार नसून कारणपुरुष आहेत. रामाने अहिंसाव्रताची दीक्षा घेतली आहे. रावण–वधासाठी तो लंकेत जातो; पण स्वतः रावणाचा वध करीत नाही. ते काम लक्ष्मण करतो. राम एकपत्नीही नाही. त्याने अनेक राजकन्यांशी लग्ने केली आहेत. शेवटी राम जैनदीक्षा ग्रहण करतो व मगच त्याला कैवल्य मिळते.

**बसवयुग**––बाराव्या शतकाच्या मध्यावर कर्नाटकात नवीन सामाजिक व धार्मिक चळवळीचा उदय झाला. वाङमयातही या चळवळीचे पडसाद उमटले. नयासेन हा कवी त्या कालाचा अग्रदूत मानावा लागेल. त्यापूर्वीच्या कन्नड लेखकांनी आपल्या वाङमयकृतीला भारदस्तपणा येण्यासाठी संस्कृत शब्दाचा वारेमाप वापर चालविला होता. त्यामुळे ती कन्नड भाषा कन्नडिगांनाच दुर्बोध झाली होती. नयासेनाला हे वरे वाटले नाही. त्याने त्या भारदस्त शैलीविरुद्ध बडच पुकारले. त्याने साध्यासुद्धा बोलभाषेत जैननीतिकथा लिहिल्या व त्या लोकप्रियही झाल्या. त्याच काळात कर्नाटकात बसवेश्वराने वीरशैवपथ सघटित करून एक क्रातिकारक चळवळ सुरू केली. बहुजनसमाजाचा धार्मिक आणि सामाजिक दर्जा वाढविणे, हा वीरशैवाचा मुख्य उद्देश होता. जातिरहित व वर्णरहित असा एक नवा समाज बसवाला निर्माण करायचा होता. बसव आणि त्याचे अनुयायी यांनी त्यासाठी बोलाचालीतल्या कन्नड भाषेचा स्वीकार करून वाङमयनिर्मितीस प्रारभ केला.

पपयुगापर्यत कन्नड साहित्य ही पडिताची मक्तेदारी होती; पण बसवाच्या या क्रातिकारी युगात ही मक्तेदारी सपली. साहित्य जणू उघड्या मैदानात आले. लेखक होण्यासाठी आता सस्कृत शिकण्याची किवा पडित होण्याची गरज उरली नाही. आणि असे असूनही लोकाच्या बोलभाषेत लिहिले गेलेले या काळातले साहित्य सकस व जोमदार ठरले. अल्लम प्रभु, अक्क महादेवी, चेन्नबसव, सिद्धराम, या मडळीनी आपल्या साहित्यरचनेने वीरशैव पथाचा कर्नाटकभर प्रभाव पाडला. वीरशैवाचे हे साहित्य वचनगळु या नावाने प्रसिद्ध आहे. या वचनकाराची गणतीच करायची, तर ती दोन-अडीचशेच्या घरात जाईल.

कर्नाटकात बारा व तेरा या शतकात वीरशैव मतावलंबी असे दोन श्रेष्ठ कवी निर्माण झाले. हरिहर व राघवाक अशी त्यांची नावे आहेत. हरिहराची पपाशतक व रक्षाशतक ही दोन शतककाव्ये व गिरिजाकल्याण हे प्रौढ चंपूकाव्य प्रसिद्ध आहे. याशिवाय एका निराळ्याच छदात त्याने १२० शिवभक्तांची चरित्रे लिहिली आहेत, त्याना रगळे असे म्हणतात.

राघवांक हा हरिहराचा भाचा व शिष्य होय. त्याने हरिश्चद्र काव्य रचून ते पंपापूरच्या राजसभेत गायिले. वीरेश्वरचरिते हे त्याचे काव्य वरंगळचा राजा प्रतापरुद्र याच्या दरबारी निर्माण झाले. याशिवाय त्याची आणखीही काही सुंदर काव्ये उपलब्ध आहेत. व्यक्ती व प्रसंग यांच्या वर्णनात राघवांक पटाईत आहे. त्याचे हरिश्चद्र काव्य भारतीय साहित्यातले एक अनर्घ्य रत्न आहे, असे समजतात.

तेराव्या शतकात कर्नाटकात फिरून एकदा धार्मिक परिस्थिती बदलली. रामानुजांनी प्रतिपादिलेला विशिष्टाद्वैत हा संप्रदाय आणि मध्वाचार्यांनी प्रतिपादिलेला भक्तिप्रधान द्वैत संप्रदाय हे दोन्ही वैष्णवसंप्रदाय एकाच वेळी कर्नाटकात आपापल्या मतप्रचारासाठी बाहेर पडले. त्यांनी कन्नड साहित्यात एका नव्या शक्तीचा संचार केला. आजवर जैनानी रामायण-महाभारतादि ग्रंथ व पौराणिक आख्याने आपल्या धर्माचा मोठेपणा प्रस्थापित करण्यासाठी वेडीवाकडी करून लिहिली होती. या काळात वैष्णव कवीनी ती सर्व आख्याने आणि पुराणे पुनश्च शुद्ध स्वरूपात लोकापुढे आणली. रुद्रभट्ट नावाचा एक वैष्णव कवी याच कालात चमकला. त्याने लिहिलेले जगन्नाथ-विजय हे कन्नडमधले सर्वात पहिले वैष्णवकाव्य मानले जाते. मध्वाचार्यांना कर्नाटकात अनेक अनुयायी लाभले. त्यानी वैष्णवभक्ती सामान्य जनांपर्यंत नेऊन पोचविली. माध्वमताची ही सर्व मंडळी हरिदास या नावाने कर्नाटकात संघटित झाली. १५ व्या शतकात या संप्रदायाने उत्कर्षाचे शिखर गाठले. या हरिदासांनी कन्नड भाषेत विपुल साहित्य निर्मिले. पुरंदरदास, कनकदास हे या हरिदासांतले श्रेष्ठ पुरुष होत. १३ व्या शतकात उगम पावलेली ही दासपरंपरेची गंगोत्री आपल्या अखंड प्रवाहाने १८ व्या शतकाला येऊन भिडली आहे.

**कुमारव्यासयुग** – पधराव्या शतकापासून तो एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीपर्यंतच्या कालाला कुमारव्यासयुग म्हणतात. कन्नड साहित्याचा हा वैभवशाली कालखंड होय. या कालखंडाच्या सुरवातीस विजयनगरचे साम्राज्य गाजत होते. त्या सम्राटांनी कर्नाटकातल्या सर्व धर्मांच्या कवीना उदार आश्रय दिला, त्यामुळे कन्नड साहित्य विविध अंगांनी समृद्ध झाले. याच कालात ब्राह्मण व वीरशैव कवींनी कन्नड साहित्यात मोलाची भर घातली. वीरशैव संतांची बरीचशी चरित्रे याच काळात लिहिली गेली. प्रभुलिंगलीले हा चरित्रग्रथ त्या सर्वांचा मुकुटमणी शोभतो.

ब्राह्मण कवीत कुमारव्यास, कुमारवाल्मीकि आणि लक्ष्मीश या तिघांचा प्रामुख्याने उल्लेख करावा लागतो. कुमारव्यास हा कन्नड साहित्याला लाभलेला एक हिरा आहे. तो हरिहरामध्ये भेद न मानणारा परम भागवत होता. या कवीने महाभारताची पहिली १० पर्वे कन्नड भाषेत रूपांतरित केली आहेत. तो भगवंताची लीला या दृष्टीनेच महाभारताकडे पाहतो. त्यामुळे त्याच्या महाभारताचा नायक अर्जुन किंवा धर्म नसून योगेश्वर श्रीकृष्ण हा आहे. त्या ग्रथात कवीचा कृष्णविषयक भक्तिभाव ओतप्रोत दिसून येतो. या कवीचे मूळ नाव नार्णप्प असे होते; पण त्याचे महाभारत कर्नाटकात इतके लोकप्रिय झाले, की लोक त्याला गौरवाने कुमारव्यास म्हणू लागले.

कुमारवाल्मीकीचे मूळ नाव नरहरि होते. त्याने भामिनी-षट्पदी या छंदात कन्नड रामायणाची रचना केली. त्याला तोरवे रामायण असे म्हणतात. हा ग्रंथही कर्नाटकात लोकप्रिय झाला आणि नरहरीला कुमारवाल्मीकि ही पदवी मिळाली. कन्नड साहित्यात अशी साठ-सत्तर लहान-मोठी रामायणे असल्याचे श्री. बोम्मण्णा सांगतात.

लक्ष्मीशाने जैमिनिभारत रचले. त्यात महाभारतातली कित्येक आख्याने सरससुंदर भाषेत वर्णिलेली आहेत. लोकप्रियतेच्या दृष्टीने कुमारव्यासरचित भारताच्या खालोखाल जैमिनिभारताला स्थान आहे. कुमारव्यासाने न लिहिलेली पुढची आठ पर्वे तिम्मण कवीने लिहिली व कन्नड महाभारत संपूर्ण केले. तिम्मण कवीच्या या ग्रंथाला 'कृष्णराज भारत' म्हणतात. समग्र भागवताचा कन्नड पद्यानुवाद चाटु विठ्ठलनाथ या कवीने केला. नागरस नावाच्या कवीने वासुदेवकथामृतसार या नावाने भगवद्गीतेचा कन्नड अनुवाद केला.

पंपयुगात जैन कवीनी चपूशैली लोकप्रिय बनविली होती. पण पुढच्या बसवयुगात ती लुप्तप्राय झाली. कुमारव्यासाच्या युगात पुनश्च अनेक वीरशैव कवींनी तिचा अंगीकार केला. १७ व्या शतकाच्या उत्तरार्धात षडक्षरदेव नावाचा एक श्रेष्ठ दर्जाचा वीरशैव कवी होऊन गेला. त्याने राजशेखरविलास, शबरशंकरविलास व वृषभेंद्रविजय या नावाची तीन प्रबंध-काव्ये चंपूशैलीत रचली. १७ व्या शतकात म्हैसूरचा राजा चिक्कदेवराय याच्या आश्रयाला राहून कित्येक वैष्णव कवींनी उत्तम काव्ये निर्माण केली. या कवीत तिरुमलार्य, चिक्कुपाध्याय, सिंगरार्य, होन्नम्म, हेळवनकट्टे गिरियम्म, महालिंगरग ही नावे विशेष उल्लेखनीय आहेत. याच कालात वीरशैव पंथाला आणखी एका महान संताचा लाभ झाला. हा संत सर्वज्ञ या नावाने प्रसिद्ध आहे. त्याने त्रिपदी छंदात विपुल काव्य निर्माण केले आहे. कबिराचा दोहा, तुकोबाचा अभंग, तशी सर्वज्ञाची त्रिपदी. सर्वज्ञाला कन्नड जनपद साहित्याचा शिरोमणी समजतात. त्याच्या त्रिपदीचे दोन नमुने पुढे दिले आहेत.

**कल्लु कल्लने ओट्टि कल्लिनलि मनेकट्टि**
**कल्लमेल कल्ल कोळुव मानवरेल्ल**
**कल्लिनंतहरु सर्वज्ञ**

अर्थ – दगडांचे मंदिर बनवून त्यात दगडाचीच प्रतिमा स्थापणारा माणूस स्वतःच एक दगड ठरेल.

**ध्यानदा होसबत्ति मौनदा तिळितुप्प**
**स्वानुभववेंब बेळगिना जियोतिय –**
**ज्ञानव सुडुगु सर्वज्ञ**

अर्थ – ध्यानरूपी नवी वात, मौनरूपी स्वच्छ तूप आणि स्वानुभवरूपी ज्योत, अशा दीपानेच अज्ञानाचा अंधकार दूर होऊन ज्ञानाची प्राप्ती होते.

**आधुनिक युग** – आधुनिक कालात सर्वश्री श्रीकंठय्या, पंजे मंगेशराय आणि अलुर व्यकटराय हे तिघे कन्नड साहित्याचे महर्षी समजले जातात. आजच्या कन्नड साहित्यिकात भिन्न भिन्न धर्माच्या, संप्रदायांच्या आणि व्यवसायांच्या लोकांचा समावेश आहे. १९ व्या शतकाच्या प्रारंभापर्यंत कन्नड साहित्यात पद्याचेच साम्राज्य होते व त्या मानाने गद्याची उपेक्षा होती. कन्नड गद्याची खरी सुरवात म्हैसूरचे महाराज मुम्मुडि कृष्णराय यांनी केली, असे म्हणतात. तिथूनच पुढे गद्य प्रभावी होऊ लागले. प्राथमिक गद्य संस्कृत, बंगाली व इंग्लिश या भाषांतल्या ग्रंथांचे भाषांतरच असे. त्यानंतर पुढे कन्नड भाषेला आधुनिकता येऊ लागली. १९ व्या शतकाच्या उत्तरार्धापासून कन्नड साहित्यात स्वतंत्र कलाकृती अवतीर्ण होऊ लागल्या. तथापि त्या कालात करिबसवशास्त्री, मूळबागळ, मुद्दण, इ. मोजक्या लेखकांचीच कामगिरी डोळ्यात भरण्याजोगी होती. इंग्रजी भाषेतील कथा, कादबरी, निबंध इ. सर्व साहित्यप्रकारांचे आलोडन करून त्या काळचे लेखक पुढे सरसावले. श्रीकंठय्या यांच्या इंग्लिश गीतेगळु या काव्यसंग्रहाबरोबरच कन्नड साहित्यात आधुनिक काव्याचे नवयुग अवतरले. या कालखंडातली पंजे मंगेशराय, गुडप्पा, मास्ती वेंकटेश अय्यंगार, मजेश्वर पै, सालि रामचंद्र राव शांतकवी ही कविनामे विशेष उल्लेखनीय आहेत. पुट्टप्पा आणि बेंद्रे हे कर्नाटकाचे श्रेष्ठ कवी होत. सुमारे वीस कवितासंग्रह व रामायणदर्शन हे महाकाव्य एवढी रचना पुट्टप्पाची असून सखीगीत, नादलीले, अरळु मरळु, गगावतरण, इ. काव्यसंग्रह बेंद्रे यांच्या नावावर आहेत.

कन्नडमध्ये बंगाली व मराठी कादबऱ्यांच्या अनुवादाने कादंबरीनिर्मितीस प्रारंभ झाला. चालू युगाच्या कादंबरीकारात पुट्टप्पा, शिवराम कारंथ, कृष्णराव गोकाक हे अग्रगण्य आहेत. मास्ती वेंकटेश अय्यंगार यांना कन्नड लघुकथेचे जनक मानतात. कन्नडची कथासृष्टी विपुल आहे. आजच्या कथालेखनात कामत व श्रीपतिशास्त्री हे अग्रगण्य समजले जातात.

कन्नड साहित्याच्या कुशीत पहिले नाटक जन्माला आले ते मित्रविदा गोविद हे होय. ते हर्षाच्या रत्नावलीचे कन्नड रूपांतर आहे. म्हैसूरच्या राजाचा दरबारी कवी सिगरार्य हा याचा कर्ता होय. कन्नड या शब्दातील नड हा मूळ शब्द नट शब्दाचा अपभ्रंश आहे, असे काही लोक मानतात. कन्नड शिलालेखात, शिल्पात आणि काव्यातही त्या जनतेचे नाटचप्रेम प्रकट झालेले दिसते. पण असे असूनही कन्नड साहित्याच्या प्रारंभिक युगात नाटकांचा अभाव दिसावा, हे मात्र आश्चर्यजनक वाटते. नाटके असावी; पण विद्याजड पंडितांच्या उपेक्षेमुळे ती जीवन्मृत ठरली असावी. कारण त्यांच्या अस्तित्वाचे काही दाखले प्राचीन लेखकांच्या ग्रंथांत आढळतात. त्यावरून वाटते, की प्रारंभिक युगातही कन्नडभाषी लोक नाटचाला अपरिचित नव्हते आणि कन्नडमध्ये नाटकांचाही अभाव नव्हता.

१९ व्या शतकाच्या शेवटच्या चरणात साऱ्या भारतातच रंगभूमीला एक नवे पुनर्जीवन लाभले. इतर प्रदेशांप्रमाणेच कर्नाटकातही म्हैसूरनरेश चामराज वोडेयार यांच्या प्रोत्साहनाने एक नाटकमंडळी जन्माला आली. अशाच पुढे आणखीही काही नाटकमंडळ्या निघाल्या. या कालात निरुपमा, रामवर्मा-लीलावती, विष्णुलीले, कृष्णलीले, इ. बरीच नाटके रंगभूमीवर येऊन लोकप्रिय झाली. चालू शतक तर कन्नड नाटचसृष्टीला वैभवाचे ठरले आहे. कै. त्यागराज परमशिव कैलासम् यांनी आपल्या उण्यापुऱ्या साठ नाटकांनी कन्नड नाटचसृष्टी श्रीमंत केली. महाराष्ट्रात गडकरी–खाडिलकर आणि उ. भारतात भारतेंदु याचे नाटचसृष्टीत जे स्थान, तेच कर्नाटकांत कैलासम् यांचे आहे. त्यांच्या नाटचात तत्त्वार्थाचा तळठाव गाठणाऱ्या बुद्धीचे सामर्थ्य प्रत्ययाला येते. ते वाल्मीकीच्या कारुण्याने जगाकडे पाहत. त्यांनी आपल्या नाटकात निर्माण केलेले हास्यही तितकेच कारुण्यपूर्ण आहे. त्यांच्या नाटचकलेचा आस्वाद घेणाऱ्या रसिकाला जो अनुभूतीचा दिव्य स्पर्श घडतो, तो क्षणभर त्याला थरारूनच सोडतो.

**कन्नड लोकसाहित्य** – वर्णक, बण्णवाडु, हाडु, गब्ब, ही कन्नड लोकसाहित्याची प्राचीन नावे आहेत. कन्नड भाषेत अनेक ढंगांची आणि भावांची अगणित लोकगीते आहेत. गरतिय हाडु नावाचा एक कन्नड लोकगीतांचा संग्रह आहे. गरति म्हणजे कुलस्त्री आणि हाडु म्हणजे गीत होय. या संग्रहात सतिपति नामक त्रिपदी छंदातले एक गीत आहे. हे एक पति-पत्नीतले भांडण आहे; पण या भांडणाच्या शेवटी त्या

दोघातले मनोमालिन्य दूर होऊन त्यांचे परस्पर प्रेम अधिक फुलून उठते. काव्याच्या शेवटी पती आपल्या सतीला म्हणतो–

**कमळद हू निन्न काणदे इरलारे ।**
**मल्लिगी माय बिडलारे । केरगी ।**
**गरी निन्ननगलि इरलारे ।।**

अर्थ– हे प्रियतमे, तू जणू कमलपुष्प आहेस. तुला पाहिल्यावाचून चैनच पडत नाही. तू मल्लीची माया आहेस. तुझ्यापासून दूर होताच येत नाही. तू केवडयाची पात आहेस. तुला सोडून मी राहूच शकत नाही.

कुठल्याही प्रदेशातल्या लोकगीतात विवाहगीताचे विशेष महत्त्व असते. त्या गीतांवरून त्यांचे संकेत, श्रद्धा, रूढी व सामाजिक रीतिरिवाज यांचे थोडयाफार प्रमाणात दर्शन घडते. कर्नाटकातील जनपदात विवाहगीत गायिले जाते, ते लक्ष्मी–नारायणाच्या विवाहाचे असते. लग्नमंडपात जमलेल्या इंद्र, अग्नी, सूर्य, चद्र, इ. देवताना दुर्लक्षून लक्ष्मी पुढे होते आणि नारायणाच्या गळयात माळ घालून त्याच्यापुढे सलज्ज उभी राहते. विष्णु प्रथम चकित होतो व मग हळूहळू तिच्याकडे प्रेमळ दृष्टीने पाहू लागतो. मग त्याला वाटते–

**एनगे तक्क वळेंदु एनगे वल्लभे एन्दु ।**
**एनगागि इवळेंदु जननवागि हळेंदु ।।**
**मनदि श्रीहरि तानु । आलोचिसि**
**विनयदि कुळिहनु ।**

अर्थ– ही वधू मला अनुरूप आहे. ही आता माझी पत्नी झाली आहे. माझ्यासाठीच हिचा जन्म झाला आहे. असा विचार करून श्रीविष्णु संकोचाने किंवा विनयाने स्वस्थ बसला.

मुलगी जेव्हा प्रथम सासरी जायला निघते, त्या वेळी तिच्या अंतरात निर्माण होणारे कारुण्य पुढील पंक्तीत व्यक्त झाले आहे–

**हेण्णु हडेयलि बेड ।**
**हेरवरिगे कोडबेड ।**
**हेण्णु होगाग अळबेड**
**हडेदव्या शिट्टागी शिवगे बैबेड ।**

अर्थ– आई, मुलीला जन्म देऊ नको. (दिलास तरी) तिला दुसऱ्याच्या हाती देऊ नको. (दिलीस तरी) ती सासरी जाताना रडू नको. आई, राग धरून शिवाची निंदा करू नको.

आपल्या माहेर–सासराविषयी एक नववधू पुढीलप्रमाणे आपले मत व्यक्त करते–

**अत्तिगे तायल्ल, हित्तळि चिन्नल्ल ।**
**मत्ते बंदणिक मखल्ल ।**
**हेण् मक्ळगे हुट्टिद मनेयु निजवल्ल ।**

अर्थ– सासू आई होऊ शकत नाही. पितळ सोने होऊ शकत नाही. आणि मुलीच्या वाटयाला माहेर हे तिचे स्वतःचे घर होऊ शकत नाही.

कन्नडमध्ये कृषिविषयक लोकगीतेही बरीच आहेत. कन्नड शेतकरी सकाळी शेतीच्या कामाला प्रारभ करताना पुढील प्रार्थना करतो–

**एळु ताले एद्द यार यार नेनेयलि ।**
**एळ्ळु जीरिगे बेळेयोळ ।**
**भूमितायि एद्दोंदु गळिगे नेनेदेगु ।**
**नेत्तिन्यागळ नारायण होत्तिरो भूमितायि ।**

अर्थ– तीळ व जव पिकविणाऱ्या हे धरित्री, मी प्रातःकाळी उठून तुझेच स्मरण करितो. जिच्या भालप्रदेशावर सूर्यदेव प्रकाश सांडीत आहे, अशा धरतीमातेला मी वंदन करितो.

जेव्हा शेतकरी पीक कापून घरात धान्य आणतो, तेव्हा त्याची गृहिणी पुढील गीत गाते–

**भाग्यलक्ष्मी बप्पाग बागिललि कादिद्दे ।**
**हूगु अक्षतेय हरिवाण हिडिदिद्दे ।**
**होळिबारे नम्म मने तुंबि ।**

अर्थ– धान्यलक्ष्मी घरी येण्याच्या वेळी मी हातात पूजासाहित्याचे तबक घेऊन उभी होते. हे भाग्यलक्ष्मी, तू माझे घर भरून टाक.

कन्नडमध्ये आजवर बरेच लोकगीतांचे संग्रह प्रकाशित झाले आहेत. कर्नाटकात आता लोककला व लोकसाहित्य याच्या शास्त्रीय अध्ययनाचा प्रारभ झालेला आहे. कर्नाटकात यक्षगान या नावाचे एक लोकनाटय अत्यंत लोकप्रिय आहे. त्या नाटयप्रकारावर एक अभ्यासपूर्ण ग्रंथ श्री. शिवराम कारंत यांनी लिहिला आहे. श्री. मास्ती वेंकटेश अय्यंगार यांनी पॉप्युलर कल्चर इन् कर्नाटक या आपल्या ग्रंथात कन्नड लोकसाहित्याचा सर्वांगीण परिचय करून दिलेला आहे. **पाहा**–यक्षगान. [ कर्नाटक; क. द.; हिं. वि. को. ]

**कन्नडियन** म्हैसूरमधून उत्तर व दक्षिण अर्काट, चिंगलपेट, इ. जिल्हयांत येऊन स्थायिक झालेले लोक. सैन्यात नोकरी करणे, हा यांचा परंपरागत धंदा होता; पण हल्ली हे लोक निरनिराळे व्यवसाय करतात. उत्तर व दक्षिण अर्काट जिल्हयांत मुख्यत्वे कृषी व पशुपालन करतात. म्हैसूर प्रांतात यांना गवळी असे म्हणतात. यांच्यापैकी बरेचसे लोक लिंगायत असून काही थोडे वैष्णव आहेत.

कन्नडियन हे म्हैसूर प्रांतातून तमिळनाडमध्ये का पळून आले, त्याचा इतिहास असा–

१७ व्या शतकाच्या शेवटी म्हैसुरात चिक्कदेव राजा राज्य करीत होता. त्याने आपल्या राज्यात काही सुधारणा सुरू केल्या. त्यामुळे लिंगायत जंगमांच्या आर्थिक स्थैर्याला धक्का बसला व त्यांनी सर्व राज्यात बंडाचा उठाव केला. चिक्कदेव राजाने निष्ठुरपणे ते बंड मोडून काढले व सातशेच्यावर जंगमांना ठार मारून त्यांचे मठही उद्ध्वस्त केले. त्या धामधुमीत कन्नडियन लोकांनी हे स्थलांतर केले.

हे लोक कन्नड भाषा बोलतात व त्यावरूनच स्वत:ला कन्नडियन किंवा कन्नडियर असे म्हणवून घेतात. तमिळनाडच्या काही भागात त्यांना कवडी किंवा कवडिग म्हणजे डोक्यावरून ओझे वाहणारे, असे नाव पडले आहे.

कन्नडियनाचे गवलियर व कडपेरी असे दोन भेद आहेत. गवलियर वेताच्या टोपल्यात दह्याची भांडी ठेवून ते विकायला जातात; तर कडपेरी त्यासाठी बांबूच्या टोपल्या वापरतात. त्यामुळे त्यांचे हे पोटभेद झाले आहेत. या दोन्ही पोटजातीत रोटीव्यवहार होतो; पण लग्नसंबंध होत नाही.

**विवाहप्रथा–** कन्नडियन मुलीचा विवाह त्या वयात येण्यापूर्वी होतो. लग्नसमारंभ नऊ-दहा दिवसपर्यंत चालतो. लग्नखर्च कमी यावा, म्हणून अनेक कुटुंबे एकत्र येऊन अनेक विवाहसमारंभ एकत्र उरकतात. लग्नाच्या वेळी पाच सवाष्णींची निवड केली जाते. लग्नातील प्रत्येक महत्त्वाच्या विधीच्या वेळी त्या स्नान करतात. वधू-वरांसाठी पाकसिद्धी करायचा अधिकार फक्त त्यांनाच असतो. पुरोहिताला गुरुक्कुल असे म्हणतात. याच्यांत विधवाविवाहाची पद्धत आहे.

**मर्तिकप्रथा–** तिरडी सजवून ती स्मशानात नेतात. तिथे मृताला पुरतात व वर चारी कोपऱ्यांत चार दिवे ठेवतात. मृताचे आशौचही पाळतात.

हे लोक वीरभद्र व अरिसेवई या दोन देवतांना भजतात. [ का. ट्रा. स. इं. ]

## कन्नु

तांत्रिक बौद्ध साधनेतील एक देवता. हिला कर्णतारा असेही म्हणतात. ही अष्टभुज कुरुकुल्ला देवीची सखी आहे. [ तां. बौ. सा. सा. ]

## कन्फेशन

ख्रिस्ती धर्मातील एक पापक्षालनाचा विधी. केलेल्या पापाबद्दल परमेश्वराची क्षमा व्हावी, म्हणून सर्व पापकृत्यांचा पाढा चर्चच्या धार्मिक अधिकाऱ्यापुढे वाचणे किंवा कबुलीजबाब देणे, या कृत्याला कन्फेशन म्हणतात. आपण पंथबाह्य किंवा धर्मबाह्य होऊ नये, म्हणून कॅथॉलिक पंथीयांनी ही पद्धत शोधून काढली व रूढ केली. मध्ययुगीन काळात कन्फेशन केल्यावरही प्रायश्चित्त म्हणून दंड किंवा शिक्षा होत असे; पण आता ती पद्धत रद्द झाली आहे. पूर्वी सार्वजनिकरीत्या कन्फेशन होत असे; पण आता ते खाजगीरीत्या केले तरी चालते. हल्ली लहानसहान पापांबद्दल कन्फेशन देणाऱ्याला संपूर्ण माफी मिळते. पातक फार मोठे असले, तर मात्र शिक्षा होते. पूर्वी कन्फेशन घेण्याचा अधिकार केवळ बिशपलाच असे; पण हल्ली ते सामान्य प्रीस्टने घेतले तरी चालते.

कॅथॉलिक पंथात कन्फेशन देणे, हे व्यक्तीचे एक प्रमुख नैतिक कर्तव्यच ठरून गेले आहे. रोमन कॅथॉलिक चर्चच्या धर्मशास्त्रात वर्षातून एकदा तरी सार्वजनिकरीत्या कन्फेशन्स घ्यावी, असे आहे. ऑर्थाडाक्स चर्चेस दरवर्षी एकदा कन्फेशन्स घेतात. अँग्लिकन चर्चेस व्यक्तीला वर्षातून जितक्या वेळा हवे असेल, तितक्या वेळा कन्फेशन घेतात. चर्चचा पाद्री परिस्थितीस अनुसरून कन्फेशन देणाऱ्याला माफी देतो किंवा ती नाकारून शिक्षा किंवा दंड करतो. कन्फेशनच्या विधीच्या वेळी कन्फेशन घेणारा पाद्री एका बंदिस्त ठिकाणी बसतो व समोरच्या भिंतीत ठेवलेल्या छिद्रातून कन्फेशन देणारी व्यक्ती त्याच्यापुढे आपला कबुलीजबाब देते. [ एन्सा. रि. ]

## कन्यका परमेश्वरी

दक्षिणेतील कोमटी जातीची पूज्य देवता. ही सती गेल्याचे प्रसिद्ध आहे. हिच्या कथेवर तिमय्या नामक आंध्र कवीने तेलुगु भाषेत कन्यकापुराण रचले आहे. [ भ. अ. को. ]

## कन्या

(१) कन्या आणि पुत्र अशी दोन्ही प्रकारची अपत्ये एकाच आई-बापाच्या पोटी जन्माला येत असली, तरी त्यांच्या अधिकारात मात्र महदंतर असते. पुत्र जन्मल्या कुटुंबात कायमचा राहणारा, तर कन्या ही वयात येताच 'परक्याचे धन' होऊन कुटुंबातून निघून जाणारी. कन्या आणि तिचा विवाह ही जशी एक कौटुंबिक समस्या असते, तशीच ती सामाजिकही असते. त्यामुळे कन्या या वस्तूबद्दल प्राचीन व अर्वाचीन धर्माचार्यांनी अनेक अंगांनी विचार केलेला आहे. कोणत्या वयोवस्थेतल्या मुलीला कन्या म्हणावे, इथपासून या विचाराला प्रारंभ होतो. याविषयी एक सुप्रसिद्ध श्लोक आहे, तो असा–

**अष्टवर्षा भवेद्गौरी दशवर्षा तु कन्यका ।**
**सम्प्राप्ते द्वादशे वर्षे कुमारीत्यभिधीयते ।।**

अर्थ–आठ वर्षांची मुलगी ती गौरी, दहा वर्षांची ती कन्या व बारावे वर्ष लागले की ती कुमारी होय.

याशिवाय विवाहयोग्य वयोवस्थेला प्राप्त झालेल्या कन्येला वर्या, जिच्यासाठी आई–वडील विवाहसंबंध निश्चित करतात तिला वृत्त्या व जी स्वतः आपल्या पतीची निवड करते तिला पतिवरा म्हणतात ( अष्टा. ३. २. ४६ ).

कन्या ऋतुस्नात होण्यापूर्वी विवाह करावा. तसे न केल्यास पित्याला पाप लागते, असे गौतम सांगतो. काही सूत्रकाराचे मत मुलगी वस्त्र परिधान करू लागण्याच्या आतच तिचे लग्न करावे, असे आहे. सनपूर्व ५०० वर्षांपूर्वीचा काल हा सूत्रकाल मानतात. यावरून त्याकाळी मुलीची लग्ने अल्पवयात करण्याची पद्धत असावी, असे दिसते.

ऋतुमती झाल्यापासून कन्येने तीन वर्षे आपल्या लग्नाची वाट पाहावी व तेवढ्या अवधीत बापाने लग्नाची खटपट न केल्यास स्वतःच पुढाकार घेऊन इष्ट वराशी विवाहबद्ध व्हावे, असे मनूचे मत होते (९. ९०–९१). तसेच गुणहीन वराशी कन्येचे लग्न लावू नये, असेही मनूने स्पष्ट सागितले होते ( ९.८९ ). परंतु ऋतुप्राप्तीपूर्वी मुलीचे लग्न न केल्यास वधू-पित्याला पाप लागते, या गौतमाच्या वचनावर लोकांची श्रद्धा असल्यामुळे प्रसंगी गुणहीन वरालाही कन्या देऊन तिचे लग्न लवकर उरकण्यात येत असे. मनूच्या काळातच मुलींना शिक्षण देण्याची प्रथा बंद झाली होती. त्यामुळे मुलीना विशेष व्यवसायही उरला नव्हता. म्हणूनही कदाचित त्यांची लग्ने लहान वयातच करण्याची पद्धत चालू राहिली असावी.

ऋग्वेदकालापासून सोम, गंधर्व आणि अग्नी हे कन्येचे दैवी पालक मानलेले आहेत. सोम प्रथम, गंधर्व स्तन पुष्ट झाल्यावर व अग्नी रजोदर्शन झाल्यावर कन्येचा उपभोग घेतो, असे गृह्यसंग्रहात सागितले आहे. म्हणूनच आठवे वर्ष हा काल मुलीच्या विवाहाला प्रशस्त मानला गेला.

प्राचीन काळी कन्येचेही उपनयन करून तिला अध्ययन करायला लावीत; पण पुढच्या काळात मुलीच्या बाबतीत लग्न हेच उपनयनाच्या जागी आले आणि आठवे वर्ष हा जो उपनयनाचा प्रशस्त काल, तोच तिच्या लग्नाचाही प्रशस्त काल ठरविण्यात आला (सं. कौ.).

कौमार्यावस्थेत स्त्रीला मरण आल्यास तिला स्वर्ग मिळत नाही, अशीही समजूत होती. त्यामुळे ती मेल्यानंतर प्रेताला अग्नी देण्यापूर्वी तिचे एखाद्या वराशी लग्न लावीत, असे वैखानस स्मार्तसूत्रावरून कळते (५.९). पण ही चाल सार्वत्रिक असेल, असे वाटत नाही.

कन्याविक्रय करणे, हे सर्व शास्त्रकारांनी निंद्य मानले आहे. द्रव्य देऊन विकत घेतलेली कन्या पत्नी न होता दासी ठरते, असेही मत होते.

प्राचीन धर्मशास्त्रकारांनी पित्याच्या संपत्तीवर कन्येचा हक्क मान्य केलेला नाही. गौतम, बौधायन व वसिष्ठ हे धर्मसूत्रकार कन्येला पित्याची वारस मानीत नाहीत. आपस्तंब मात्र या बाबतीत विकल्प सांगतो (आप. ध. सू. २. ६. १४३). याज्ञवल्क्यानेही म्हटले आहे, की मनुष्य निपुत्रिक मरण पावला, तर त्याची संपत्ती प्रथम त्याच्या विधवेला व ती नसल्यास त्याच्या मुलीला मिळावी. बृहस्पति मात्र या बाबतीत थोडा अधिक उदार आहे. तो म्हणतो–

**अङ्गादङ्गात् सम्भवति पुत्रवद्दुहिता नृणाम् ।**
**तस्मात् पितृधनं त्वन्यः कथं गृह्णीत मानवः ।।**

(बृहस्पति स्मृतिचं.)

अर्थ–पुत्राप्रमाणेच कन्याही पित्याच्या अंगाअंगातून उत्पन्न होते. मग पित्याचे धन तिला वगळून दुसरा माणूस कसा घेऊ शकेल ?

तथापि हा दृष्टिकोन सर्वच शास्त्रकांराना मान्य झाला नाही. त्यांनी वारसा हक्कात मुलीला वगळण्याचेच धोरण अगीकारिले.

पितृप्रधान कुटुंबसंस्थेत कन्या जन्माला येणे, ही घटना प्राचीनकालापासून आजतागायत सामान्यतः खेदजनकच मानली जाते. पित्याच्या घरी पुत्राइतक्याच अगत्याने कन्येचे पालनपोषण होत असले, तरी तिच्याविषयी आईबापाच्या मनात एक प्रकारची गंभीर भावना वसत असते. तिचे संरक्षण, तिचा विवाह व तिचे भावी जीवन, याविषयीच्या चिंतेचे अस्पष्ट असे दडपण आई-बापांच्या मनावर सदैव असते. समाजाच्या खालच्या थरातील आई-बापांना मात्र कन्याजन्माचा आनंद होतो. कारण त्याच्या बाबतीत कन्या ही देजाच्या रूपाने द्रव्य मिळविण्याचे एक साधन ठरते.

धर्मशास्त्रात कन्या व पुत्र यांच्यासाठी संस्कारांच्या वेगवेगळ्या पद्धती सांगितल्या आहेत, त्याही पुत्रापेक्षा कन्येचे गौणत्व गृहीत धरूनच–

**नामान्नप्राशनं चूडां कुर्यात् स्त्रीणाममन्त्रकम् ।**

(महानिर्वाणतंत्र ९)

अर्थ–नामकरण, अन्नप्राशन व चौल हे मुलीचे संस्कार अमंत्रक करावे.

विवाह होताच कन्या ही आई-बापांना सोडून पतिगृही जाते. तिथे ती कशी वागेल व तिला कसे वागविले जाईल, यांविषयीही आई-बाप काळजी करीत असतात. स्त्रियांच्या बाबतीत सामाजिक बधने कसोशीने पाळली जावी, असा लोकांचा कटाक्ष असतो. समाजाची दृष्टीही तिच्या बाबतीत तितकीशी सहानुभूतीची नसते. त्यामुळे तिच्या शीलाविषयी काही अपवाद

उत्पन्न झाला, किंवा तिला वैधव्य आले, तर मग आई-बापांच्या दुःखाला पारावारच उरत नाही.

कन्येविषयी असमाधान वाटण्याचे दुसरे कारण असे, की कुटुंबाचे रक्षण, पोषण व संवर्धन या कामी पुत्राचा जसा साक्षात उपयोग होतो, तसा कन्येचा होत नाही. वास्तविक कुटुंबाच्या स्वास्थ्यासाठी व त्याचे सातत्य टिकविण्यासाठी पुत्राइतकीच कन्येचीही गरज असते; पण ही गोष्ट सामान्यपणे लक्षात घेतली जात नाही.

वैदिक काळात कन्येविषयी असा हीन भाव नव्हता. त्या काळी कन्या-पुत्रांना समान लेखले जाई. पुत्राप्रमाणेच कन्येलाही वेदाध्ययनाचा अधिकार असे. आजन्म ब्रह्मचारिणी राहणे, स्वतः योग्य पतीची निवड करणे, अपत्यप्राप्तीपूर्वी वैधव्य प्राप्त झाले, तर नियोगाचा अवलंब करून पुत्रप्राप्ती करून घेणे, इ. सवलती महाभारताच्या काळापर्यंत मुलींना दिल्या जात होत्या.

पण पुढे ही स्थिती पालटली. पितृपूजेचे महत्त्व वाढले. पितृतर्पण करण्याचा अधिकार फक्त पुत्रालाच आहे; कन्येला नाही, ही समजूत दृढ झाली. यवन, शक, पल्हव, तुषार, इ. जमाती टोळ्यांची भारतावर वारंवार आक्रमणे होऊ लागल्यामुळे कन्येच्या बाबतीत तिचे संरक्षण व गोपनीयत्व यांना महत्त्व प्राप्त झाले. त्यामुळे स्मृतींनी कन्येचे ब्रह्मचर्य ही पुराणकालीन अतएव कालबाह्य गोष्ट ठरवून टाकली. मनूने म्हटले, की—

**वैवाहिको विधिः स्त्रीणां संस्कारो वैदिकः स्मृतः ।**
**पतिसेवा गुरौ वासो गृहार्थोऽग्निपरिक्रिया ।।**

(२. ६७)

अर्थ—विवाहविधी हाच स्त्रियांचा उपनयन संस्कार मानलेला आहे. पतिसेवा हाच तिचा गुरुकुलातील वास व गृहकृत्ये हीच तिची अग्निपरिचर्या होय

पितृसत्ताक कुटुंबपद्धतीत कन्येला काही सवलती व अधिकार प्राप्त होत; पण तिला पूर्ण स्वातंत्र्य मात्र नव्हते. 'पिता रक्षति कौमारे' असे मनूचे वचन आहे (९.३). तदनुसार पित्यावर कन्येच्या संरक्षणाची संपूर्ण जबाबदारी होती. पिता नसेल, तर ते काम तिच्या भाईबंदांना करावे लागे. पित्याच्या मृत्यूनंतर त्याच्या संपत्तीची वाटणी होताना कुटुंबात एखादी कन्या लग्नाची असेल, तर तिच्या विवाहासाठी संपत्तीचा विशिष्ट भाग बाजूला काढला जात असे. जर कन्येचा आजन्म कुमारी राहण्याचा विचार असला, तर तिच्या भरण–पोषणाची जबाबदारी कायद्याने तिच्या परिवारावर पडत असे. मातेच्या मृत्यूनंतर तिच्या स्त्रीधनावर कन्यांचाच अधिकार असे. वाटणीच्या वेळी संपत्तीचा चौथा भाग कन्येला मिळाला पाहिजे, असे कात्यायनाने म्हटले आहे. पण त्यावर विज्ञानेश्वराचे भाष्य असे, की चौथा भाग याचा अर्थ संपूर्ण पैतृक संपत्तीचा चौथा भाग असा नव्हे, तर पुत्र झाल्यावर त्याला जेवढी वाटणी मिळाली असती, तिचा चौथा भाग होय.' दायभाग या ग्रंथाच्या मतानुसार पैतृक संपत्ती अत्यल्प असेल, तर भावाने आपल्या वाटच्यातला चतुर्थांश खर्च करून बहिणीचा विवाह करावा, असे होते.

भारतात इंग्रजी राजवट येण्यापूर्वी आणि त्यानंतरही काही काळपर्यंत भारतीय कन्येची अवस्था शोचनीयच होती. बाळपणाचा उंबरठा ओलांडला, की तिने सरळ कोणाच्या तरी गृहिणीपदावरच आरूढ व्हायचे. प्रथम बाला आणि लगेच गृहिणी. मधली कुमारी ही अवस्था तिच्या वाटचाला येतच नव्हती. आई–बापांच्या उबेतून बाहेर पडायचे ते सासरचा छळवाद सोसण्यासाठीच. बाळपणी लग्न होऊन घरात आलेल्या अजाण अबोध मुलीला सासूने नाना प्रकारांनी छळणे ही गोष्ट त्या काळी घरोघरी आढळणारी होती.

पण १९ व्या शतकाच्या उत्तरार्धापासून भारतीय कन्येचे जीवन हळूहळू पालटू लागले. भारतीय समाजसुधारकांनी मुलींना मुलांच्या बरोबरीने शिक्षण मिळाले पाहिजे, असा प्रचार व प्रयत्न सुरू केला. त्यामुळे मुली शिकू लागल्या. हळूहळू मुलींचे शिक्षण सार्वत्रिक झाले. त्या उच्च शिक्षणही घेऊ लागल्या. त्यामुळे त्यांच्या विवाहाची वयोमर्यादाही वाढली. ज्ञानाची आणि सेवेची अनेक क्षेत्रे त्यांना खुली झाली. आजमितीस त्या कला, खेळ, स्पर्धा, संघटना यामध्ये मुलांच्या बरोबरीने भाग घेऊ लागल्या आहेत. आता भारतीय राज्यघटनेनेही त्याना सर्व क्षेत्रांत समान अधिकार दिले आहेत. घटनेनुसार पैतृक संपत्तीतही मुलांच्या बरोबरीने त्यांना हक्क मिळालेला आहे. एका काळी कन्या ही आई – बापांना तसेच देशालाही चिंतेची बाब होती; पण आज ती भारताच्या भाग्यविधानाला हातभार लावणारी एक शक्ती ठरली आहे.


कन्या राशीची आकृती

(२) बारा राशींतील सहावी राशी. उत्तराचे तीन पाद, हस्त व चित्रा नक्षत्राचे पहिले दोन पाद मिळून कन्या राशी बनते. एका हातात धान्याचा अंकुर व दुसऱ्या हातात अग्नी घेऊन नौकेत उभी असलेली स्त्री, असे तिचे रूपवर्णन दीपिका या ग्रंथात दिले आहे. ही राशी

शीर्षोदय, दिनबला, पिंगलवर्णा, दक्षिण दिशेची स्वामिनी, वातप्रकृती, शीतलस्वभाव, शुद्ध भूमीवर सचार करणारी, वैश्यवर्णी, रूक्ष, शिथिल अगाची, बोलताना अडखळणारी, अल्पसंतती व अल्पपुरुषसंगा अशी मानलेली आहे. हिचा स्वामी बुध आहे. कन्या राशीवर जन्मलेला पुरुष पुढील लक्षणांचा होतो, असे सांगितले आहे–

**कन्यालग्नोद्‌भवो मर्त्यो नानाशास्त्रविशारदः।**
**सौभाग्यगुणसम्पन्नः सुन्दरः सुरतप्रियः ।।**

(कोष्ठीप्रदीप)

अर्थ – कन्यालग्नावर जन्मलेला पुरुष विविध शास्त्रांत पंडित, भाग्यशाली, सुंदर व विलासप्रिय होतो.

## कन्याकुमारी

केरळातले एक सुप्रसिद्ध तीर्थस्थान. हे भारताच्या दक्षिण टोकावर आहे. हे एक भूशिर असून इथे पश्चिम सागर, दक्षिण महासागर, व गगासागर (बगालचा उपसागर) या तीन सागरांचा संगम झालेला आहे. त्यामुळेच याचे माहात्म्य विशेष आहे. यात्रिकांच्या स्नानासाठी इथे समुद्रतीरावर पक्का घाट बांधलेला आहे. घाटावर मडप आहे. या मंडपात यात्रेकरू श्राद्धादि कृत्ये करतात. याचे प्राचीन नाव गंगैकोंडचोलपुरम् असे होते. इथे पहिला कुलोत्तुगचोळ याचा एक शिलालेख सापडला आहे. प्राचीन काळापासून या क्षेत्राची कीर्ती गाजत आहे.

इथे समुद्रतीरावरच कुमारी देवीचे मंदिर आहे. कित्येक द्वारे ओलांडून आत गेल्यावर कुमारीचे दर्शन होते. इथली देवीची मूर्ती दर्शनीय आहे. तिच्या एका हातात जपमाला आहे. उत्सवप्रसंगी तिला रत्नजडित अलंकारांनी शृंगारतात. मंदिराच्या उत्तरेच्या अग्रहारात भद्रकालीचे मंदिर आहे. ही भद्रकाली कुमारीची सखी मानली जाते. हे ५१ शक्तिपीठामधले एक पीठ आहे. इथे सतीच्या देहाचा पृष्ठभाग गळून पडला, असे सांगतात. ही कुमारी देवी या ठिकाणी कशी आली व इथे का राहिली, यांविषयी पुढील कथा आहे —



कन्याकुमारी देवी

बाणासुराने तप करून शंकराकडे अमरत्वाचे वरदान मागितले. शंकर म्हणाला, की 'कुमारी कन्येशिवाय अन्य कोणाच्याही हातून तू मरणार नाहीस'. हा वर मिळाल्यावर बाणासुराने त्रैलोक्यात उच्छाद माडला. सर्व देव भयभीत झाले व विष्णूला शरण गेले. विष्णूने त्यांना कन्येच्या उत्पत्तीसाठी यज्ञ करण्याचा आदेश दिला. त्या यज्ञकुंडातल्या अग्नीतून दुर्गादेवी कन्यारूपाने प्रकट झाली. शंकर पती मिळावा, म्हणून तिने दक्षिण सागराच्या तीरावर तपश्चर्या सुरू केली. शिवाने प्रसन्न होऊन तिचे पाणिग्रहण करण्याचे मान्य केले. या घटनेने सर्व देव घाबरले. कारण कुमारीचे लग्न झाल्यावर तिच्या हातून बाणासुर मरणार नव्हता. म्हणून मग त्यांनी नारदाला पुढे घातले. शंकर कैलासाहून कुमारीचे पाणिग्रहण करण्यासाठी निघाला होता. विवाहाचा मुहूर्तही ठरला होता. तिथून जवळच असलेल्या शुचीन्द्रम् या क्षेत्रापर्यंत शकराचे आगमन झालेही होते; पण नारदाने कपट करून त्याला तिथेच थांबवून धरले. त्यामुळे लग्नाचा मुहूर्त टळला. कुमारी ही अविवाहितच राहिली. तिने पुनश्च तपाला प्रारंभ केला.

कुमारीच्या सौदर्याची कीर्ती बाणासुराच्या कानी गेली. तो तिच्यापाशी येऊन तिला आपल्याशी लग्न करण्याचा आग्रह करू लागला. कुमारीने त्याला झिडकारिले. बाणासुराने अतिप्रसंग करताच त्यातून युद्ध निर्माण झाले व कुमारीने त्या युद्धात बाणासुराचा वध केला. तेव्हापासून आजतागायत ती शिवाची मार्गप्रतीक्षा करीत राहिली आहे.

महाभारतात कन्याकुमारीचे माहात्म्य सांगितले आहे —

**ततस्तीरे समुद्रस्य कन्यातीर्थमुपस्पृशेत् ।**
**तत्तोयं स्पृश्य राजेन्द्र सर्वपापैः प्रमुच्यते ।।**

(म. भा. वन. ८५.२३)

अर्थ – हे भीष्मा, (कावेरीत स्नान करून) समुद्रावरच्या कन्यातीर्थात स्नान करावे. या तीर्थातल्या जलाचा स्पर्श झाल्यावर मनुष्य सर्व पापांतून मुक्त होतो.

इथे समुद्रात थोड्या अंतरावर एक खडक पाण्याच्या वर दिसतो. स्वामी विवेकानंद या क्षेत्रात आले असता या खडकावर ध्यानस्थ बसत होते. त्यामुळे त्याला साप्रत विवेकानंदखडक असे नाव मिळाले आहे.

## कन्यागत

गुरू हा ग्रह कन्या राशीत असतो तो काल. या कालात गंगा कृष्णेला भेटायला येते, असे समजून भाविक लोक कृष्णास्नानासाठी जातात. कन्यागतात कन्यादान

केल्याने त्याचे फल बहुगुणित मिळते, अशी समजूत आहे. कन्यागती कृष्णास्नान, श्राद्ध, क्षौर, इ. कृत्ये विहित आहेत.

**कन्यातीर्थ** (१) कुरुक्षेत्रातला एक कूप. याला कन्याकूप असेही म्हणतात. या तीर्थात स्नान करणारा देवलोकी कीर्ती मिळवितो, असे सांगितले आहे. [ कृ. क. त. ]

(२) नर्मदेवरील एक तीर्थ. कोणत्याही शु. ३ येस या तीर्थात स्नान करावे, असे सांगितले आहे (मत्स्य पु. ९२.७९).

**कन्यादान** विवाहप्रयोगातला एक महत्त्वाचा विधी. वराला पूर्वाभिमुख व वधूला पश्चिमाभिमुख समोरासमोर बसवितात. वधूपिता ( किंवा कन्यादानकर्ता ) आपल्या भार्येसह उत्तराभिमुख बसतो व कन्यादानाचा संकल्प करतो. मग दाता व वधू-वर उभे राहतात. दाता कन्येच्या खांद्याला स्पर्श करून पुढील मंत्र म्हणतो—

**कन्यां कनकसम्पन्नां कनकाभरणैर्युताम् ।**
**दास्यामि विष्णवे तुभ्यं ब्रह्मलोकजिगीषया ।।**
**विश्वम्भरः सर्वभूतः साक्षिण्यः सर्वदेवताः ।**
**इमां कन्यां प्रदास्यामि पितॄणां तारणाय च ।।**

एका कास्यपात्रावर कन्येला ओंजळ करायला लावतात. तिच्यावर वर आपली ओजळ धरतो. मग कन्येचा पिता कलशातल्या अभिमंत्रित जळाची धार वराच्या ओंजळीत धरतो. काही ठिकाणी वराच्या ओंजळीवर कन्यापिता आपली ओंजळ धरतो व कन्येची माता त्या ओजळीत पाण्याची धार ओतते. त्या वेळी पुरोहित ' कन्या तारयतु । पुण्यं वर्धताम् ।' इ. मंत्र म्हणतो. मग वधू-वरांच्या गोत्र-प्रवराचा व पितृत्रयीचा त्रिवार उच्चार करतात. मग ' कन्या प्रतिगृह्णातु भवान् ' असे वधूपिता वराला म्हणतो. वर ' प्रतिगृह्णामि ' असे प्रत्युत्तर देतो. मग ' धर्मे च अर्थे च कामे च नातिचरितव्या त्वयेयम् '= धर्म, अर्थ व काम या तिन्ही पुरुषार्थाच्या आचरणात तू या वधूला डावलू नको, अशी कन्यापिता वराची प्रार्थना करतो. वर ' नातिचरामि '= मी हिचा अतिचार करणार नाही, असे प्रतिवचन देतो. धर्म व प्रजोत्पादन यांसाठी मी तुमच्या कन्येचा स्वीकार करतो, असे म्हणून तो कन्यादान स्वीकारतो. या वेळी वधूपिता वराला सुवर्ण दक्षिणा देतो. त्याचप्रमाणे जलपात्रे, भोजनपात्रे, अलंकार, इ. उपयुक्त वस्तूही त्याच वेळी वराला समर्पण करतो. मग ब्राह्मण वधू-वरांस अभिषेक करतात. कन्यादान केल्यानंतर तिचे आईबाप तिला संतती होईपर्यंत तिच्या घरी जेवीत नाहीत.

सर्व प्रकारच्या दानांमध्ये कन्येचे दान श्रेष्ठ असल्याचे पुराणांत सांगितले आहे—

**कन्यादानं तु सर्वेषां दानानामुत्तमं स्मृतम्**
(श. क. )

कन्यादानाचे निरनिराळे प्रकार असले तरी ब्राह्मविवाहपद्धतीने कन्यादान केल्यामुळे ब्रह्मलोक मिळतो असे सांगितले आहे. म्हणून कन्यादानाच्या विधीस सुरवात करताना ब्रह्मलोक मिळविण्याची इच्छा संकल्पामध्ये निर्दिष्ट केलेली असते.

**पाहा**—विवाह. [ प्र. र; दा. चं. ]

**कन्व्हर्शन** ख्रिस्ती धर्मशास्त्रातला एक शब्द. धर्मात बदल-होणे किंवा करणे असा याचा सामान्य अर्थ आहे. एखादा अन्यधर्मीय मनुष्य ख्रिस्ती धर्मात दाखल झाला, म्हणजे त्याचे कन्व्हर्शन झाले, असे मानतात. माणसाची प्रवृत्ती, श्रद्धा, सहानुभूती, निष्ठा व आध्यात्मिक ध्येय यांमध्ये एकदम बदल घडून येणे म्हणजे कन्व्हर्शन होय, असा त्याचा व्यापक अर्थ आहे. या शब्दाची नेमकी व्याख्या करणे कठीण आहे. कारण कन्व्हर्शनच्या बाबतीत व्यक्ती तितक्या प्रकृती, हा सिद्धान्त लागू आहे. कन्व्हर्शनची शेकडो उदाहरणे तपासल्या अन्ती असे दिसून येते, की त्यांतील प्रत्येक उदाहरण आपापल्या परी स्वतंत्र आहे. केवळ एखादा धर्मपंथ बदलणे, म्हणजे खऱ्या अर्थाने कन्व्हर्शन नव्हे. माणसाच्या मनोरचनेत कसकसे फरक होतात व ते कोणत्या वेळी कोणत्या अवस्थेत होतात, याचेही कन्व्हर्शन या शब्दाखाली ख्रिस्ती धर्मशास्त्रात विवेचन केलेले आहे—

(१) शारीरिक दृष्टचा विचार करता गर्भावस्थेपासून तो बाळपण संपेपर्यंत त्याच्यात होणारे बदल व तारुण्यात पदार्पण झाल्यावर त्याच्यात होणारे शारीरिक व मानसिक बदल यानाही कन्व्हर्शन म्हणता येईल. तारुण्यातला नवा दम, नवी उमेद आणि काहीतरी उदात्त व लोकोत्तर कृत्य करण्याची तीव्र आकांक्षा हे माणसाचे कन्व्हर्शनच म्हटले पाहिजे. जुन्या प्रवृत्ती, सवयी किंवा रूढी ओलाडून पुढे जाण्याची इच्छा हाही कन्व्हर्शनचाच एक भाग आहे, असे समजले पाहिजे.

(२) जीवशास्त्राप्रमाणे व मानसशास्त्राप्रमाणे माणसाची तीव्र जिज्ञासा आणि नवेनवे शोधण्याचा त्याचा हव्यास या गोष्टी परिणामी त्याच्यात विलक्षण क्रांती घडवून आणतात. त्याचे मन नवी नवी स्वप्ने पाहण्यात आणि ती व्यवहारात आणण्यात दंग होऊन जाते. त्याची दृष्टी विशाल होते. हे फरक इतक्या सहजपणे होतात, की ते केव्हा आणि कसे झाले, हे लक्षातही येत नाही. कुमारावस्थेतून तारुण्यात प्रवेश करताना धर्म माणसाच्या कामवासनेचे उदात्तीकरण करतो. याच वेळी अहंकार, भय, सामूहिक जीवन, भावाभिव्यक्ती, गुणग्राहकता इ. भावनांचेही उदात्तीकरण होते. तारुण्यात प्रवेश केल्यावर

माणसात जे शारीरिक व मानसिक परिवर्तन होते, तेही फार महत्त्वाचे आहे. शारीरिक प्रक्रियेने तो दुसरी आत्मप्रतिमा निर्माण करतो. या कन्व्हर्शनलाच आपण पुनर्जनन म्हणतो. स्वत:ऐवजी समाजाची चिंता करणे, वरवर दिसणाऱ्या घटना बाजूला करून वस्तुनिष्ठ गुणग्रहण करण्याची वृद्धी होणे आणि ऐहिक, आत्मकेन्द्रित जीवनापेक्षा विश्वात्मक जीवनाची स्पृहा निर्माण होणे, इ. गोष्टी त्याच्या मानसिक परिवर्तनाच्या प्रक्रियेत अंतर्भूत होतात.

(३) कन्व्हर्शन होत असताना मनातल्या विरोधी भावनांचे द्वंद्व माजते. वासनांचे सुख विरुद्ध सुसंस्कृत अभिरुची, पाप विरुद्ध पुण्य किंवा सौजन्य आणि ईश्वर विरुद्ध सैतान अशा प्रकारचे ते युद्ध असते. सेंट आगस्टाईन, डेव्हिड, इ. विचारवंतांच्या अंतरात आयुष्यभर हे मानसिक द्वंद्व चालू होते. 'हे परमेश्वरा, मला सद्विचार दे, शुद्ध अंत:करण दे, म्हणजे मी तुझा आज्ञाभंग करणाऱ्यांना तुझे ज्ञान करून देईन व पापी जनांचे मतपरिवर्तन करून त्यांना तुझ्याप्रत आणीन,' अशी त्यांची प्रार्थना असे.

(४) ममत्वापासून विश्वात्मकतेपर्यंत घडून येणारे परिवर्तन किंवा मानवी मनातली ही क्रांती हाही कन्व्हर्शनचाच प्रकार आहे.

(५) एखाद्या धर्माची दीक्षा घेणे आणि अशा अन्य दीक्षिताशी धर्मबंधुत्व पत्करणे, हेही कन्व्हर्शनच आहे. वैयक्तिक किंवा सामुदायिक प्रचाराने हे साध्य करता येते. ग्रीक तत्त्वज्ञानाच्या प्रचाराने युरोपात प्रथम क्रांती घडून आली. आपण एका भव्योदात्त धर्माचा संदेश देत आहो, अशा थाटात त्यावेळच्या प्रचारकांनी धर्मप्रसार केला. पॉल आणि बर्नाबास यांची प्रवासकथा म्हणजे तो एक वैयक्तिक व सामुदायिक धर्मांतराचा प्रचंड इतिहासच आहे. या धर्मप्रचाराच्या हव्यासातच मोठमोठी धर्मयुद्धे झाली.

(६) एका धर्मतत्त्वावर निष्ठा ठेवल्यानंतर पुढे अधिक विचार केल्याअंती त्या तत्त्वाहून अधिक परिपक्व किंवा अधिक परिपूर्ण अशा त्यापुढील तत्वाचे दर्शन घडून जे मानसिक परिवर्तन घडून येते व त्यामुळे पुढील विचाराच्या कक्षेत चित्त गुंतून एक प्रकारच्या शांत व समाहित अशा अवस्थेचा अनुभव घेते, ते काउंटर कन्व्हर्शन (प्रतिपरिवर्तन) होय.

(७) काही लोकांचे नैतिक किंवा आध्यात्मिक कन्व्हर्शन होत असते. हिंदुधर्मातल्या द्विजत्वकल्पनेप्रमाणे ते जणू एकाच जन्मात दुसरा जन्म घेऊन वावरत असतात. ते ख्रिश्चन म्हणून वावरत असले तरी ते तसे आहेत, असे ओळखता येत नाही. कारण धर्माची पहिली अवस्था टाकून त्यांनी नव्या नैतिक व आध्यात्मिक द्विजत्वाचा स्वीकार केलेला असतो.

(८) बाल्य, तारुण्य आणि प्रौढत्व या तीन वयोवस्थांना तीन जन्म असे मानता येईल. तिसऱ्या म्हणजे प्रौढ अवस्थेत माणसाला अनुभवाने जगाचे यथार्थ ज्ञान झालेले असते. जीवनाचा हेतु काय आणि जीवनात काही अलौकिक तत्त्व आहे काय, याचा शोध घेण्याची आकांक्षा या प्रौढ अवस्थेत निर्माण होण्याची शक्यता असते. हेही एक कन्व्हर्शनच आहे, असे म्हणायला हरकत नाही.

(९) बौद्धिक कन्व्हर्शनची यापुढची पायरी म्हणजे संन्यास किंवा सर्वसंगपरित्याग होय. इहलोकातली कर्तव्ये करीत असताना माणसाला जे कष्ट आणि जी दु:खे सोसावी लागतात, त्यामुळे त्याला कित्येकदा वैराग्य प्राप्त होते. मग तो देहाने आणि मनाने सर्व कर्तव्यकर्माचा त्याग करून संसारातून उठतो व एखादी गुहा, क्षेत्र किंवा आश्रम याचा आश्रय करतो. तिथे एकांतात राहून त्याचे मनन व चिंतन चालते. या अवस्थेत तो ईश्वराच्या साक्षात्कारासाठी स्वत:वर अनेक बंधने लादून घेतो व अनेक प्रकारचे देहदंडही सोसतो. [एन्सा. रि.]

**कपटेश्वर** काश्मीरदरीच्या दक्षिणेस कोठेराजवळचे एक देवस्थान. इथे शिवाने लाकडाचे रूप धारण केले होते, अशी कथा आहे ( राजतरं. १.३२ ). [हि. ध.]

**कपर्दिविनायकव्रत** एक काम्य व्रत. हे स्त्री–पुरुष दोघांनाही करता येते. गणेश ही या व्रताची देवता आहे. याचा आरंभ श्रावण शु. ४ थीला करतात. ते न जमल्यास कोणत्याही महिन्यात रविवारी हे करता येते. मात्र व्रतारंभकाळी गुरु-शुक्राचा अस्त नसावा. हे व्रत चारदाच करायचे असते. व्रताचा विधी असा–

व्रताच्या आदल्या दिवशी एकभुक्त राहतात. व्रतदिनी सकाळी जलाशयावर जाऊन तिलोदकाने स्नान करतात. पूजास्थानावर चंदनाने मंडल काढून त्याच्या मध्यभागी अष्टदळ रेखतात. त्यावर गणपतीची प्रतिमा ठेवतात. मग षोडशोपचार पूजा करतात. पांढरी फुले व हरिद्रामिश्रित अक्षता, हे या व्रतातले विशेष उपचार आहेत. नैवेद्यासाठी पहिल्या व दुसऱ्या रविवारी तांदुळाच्या भाकऱ्या, तिसऱ्या रविवारी तांदुळाची खीर व चौथ्या रविवारी दहीभात घेतात. या नैवेद्याचे समान आठ भाग करून त्यातला एक भाग गणेशाला अर्पण करणे व बाकीचे सात भाग व्रतकर्त्याने भक्षण करणे, हा या व्रतातला आवश्यक विधी आहे. पूजा झाल्यावर ब्रह्मचारी बटूला एक वराटक

(कवडी) व मूठभर तांदूळ यांचे वायन व दक्षिणा देतात. कथा-श्रवणानंतर मूर्तीचे विसर्जन करतात. या व्रताची कथा अशी—

एकदा शिव-पार्वती द्यूत खेळली. त्या द्यूतात शिवाने सर्वस्व गमाविले. शिव दीन झाला व त्याने पार्वतीने जिंकून घेतलेल्या वस्तूपैकी फक्त व्याघ्रचर्म तिच्याकडे मागितले. पण तेवढेही पार्वतीने त्याला दिले नाही. शिवाला राग आला आणि तो एकदम गुप्त झाला. मग पार्वतीला पश्चात्ताप होऊन ती त्याच्या शोधार्थ वणवण भटकू लागली. फिरता फिरता एका उद्यानात काही स्त्रिया एकत्र जमून कोणाची तरी पूजा करताना तिला दिसल्या. पार्वतीने जवळ जाऊन त्याना विचारले, की 'तुम्ही कोणाची पूजा करीत आहा?' स्त्रियांनी सांगितले, की 'आम्ही कपर्दिविनायकाची पूजा करतो.' पार्वतीने पुन्हा विचारले, की 'या व्रताचे फल काय?' स्त्रिया म्हणाल्या, की 'इष्ट कामना-सिद्धी.' मग पार्वतीने ते व्रत स्वतः आचरिले. त्याच्या पुण्याने तिला शिव भेटला.

नंतर ते व्रत लोकांत प्रसृत झाले व त्याची कीर्ती विक्रमादित्याच्या कानापर्यंत पोचली. विक्रमादित्य त्या व्रताचे विधान आपल्या राणीस सांगू लागला. 'या व्रतात एक कवडी दान करायची असते,' असे जेव्हा विक्रम राणीला म्हणाला, तेव्हा तिने आपल्या श्रीमंतीच्या तोऱ्यात त्या कवडीदानाची अवहेलना केली. त्यामुळे पुढे तिला विपन्नावस्था आली. तीही पार्वतीप्रमाणे रानोमाळ भटकू लागली. पुढे सुदैवाने तिला काही ऋषी भेटले. त्यांनी तिची चूक तिच्या नजरेला आणली. मग तिने हे व्रत करून गणेशाची करुणा भाकली. त्यानंतर तिला निजवैभव प्राप्त झाले. [व्रतराज]

**कपर्दी व गुहदेव** वेदान्त तत्त्वज्ञानाचे आचार्य. प्राचीन काळी यांची विशेष ख्याती होती. रामानुजाने वेदार्थसंग्रहात या दोघांना 'आपले उपजीव्य' म्हटले आहे. त्यावरून सगुण ब्रह्म हाच उपनिषदांचा प्रतिपाद्य विषय आहे, असे हे दोघे समजत होते असे ठरते. ईश्वराच्या प्राप्ती-साठी ज्ञानाबरोबरच कर्माचीही आवश्यकता आहे; तसेच भक्तीच्या योगाने भगवान भक्ताचे मनोरथ पूर्ण करतो, असे या आचार्यांच्या मताचे सर्वसामान्य स्वरूप आहे. यांच्याविषयी याहून अधिक माहिती उपलब्ध नाही. [शंकराचार्य-उपाध्याय]

**कपलानी** नाथपंथाची एक शाखा. कपिलमुनीने ही शाखा प्रवर्तित केली, असे मानतात. बंगालमध्ये या शाखेचा मठ आहे. [गो. च. प.]

**कपाल** (१) एक यज्ञीय वस्तू. दोन अंगुले लांबी, रुंदी व उंची असलेल्या खापराच्या तुकड्यास कपाल म्हणतात. अशी कपाले एकत्र जोडून ती अग्नीमध्ये माडून त्यावर पुरोडाश भाजायचा असतो. प्रत्येक देवतेसाठी कपालांच्या संख्येचा




कपाल – अष्टाकपाल

वेगवेगळा गट असतो. त्याप्रमाणे त्या त्या पुरोडाशाला अष्टा-कपाल, द्वादशकपाल इ. नावे असतात. [विद्याधरशास्त्री भिडे]

(२) माणसाच्या कवटीचे पात्र. तंत्रमार्गातले कपाल हे एक साधन असून कित्येक उग्र देवतांच्या हाती ते असते. माणसाच्या कवटीचे असल्यामुळे त्याला नरकपाल असेही म्हणतात. ज्या कपालात रक्त भरलेले असते त्याला असृक्कपाल व मास भरलेले असते त्याला मांसकपाल म्हणतात. महाकालीच्या हाती कपाल आवश्यक मानलेले आहे. शिवही कपालधारी आहे. कपालाच्या उत्पत्तीची बौद्धतंत्रातली कथा अशी—

यमान्तक या बौद्ध देवाने यमाशी युद्ध करण्यापूर्वी तीन दरोडे-खोरांना ठार मारले व त्यांच्या कवट्यातून रक्त प्राशन केले. तेव्हापासून कपाल हे तांत्रिक उपकरणात दाखल झाले. तांत्रिक पूजाप्रसंगी कपालात मद्य भरून ते देवाला अर्पण करतात. [गॉ. नॉ. बु.]

**कपालक्रिया** संन्यासी पुरुष मृत्यू पावतो, तेव्हा त्याचा आत्मा ब्रह्मरंध्र भेदून वर जातो, असे समजतात. अशा पुरुषाचे प्रेत पुरताना त्याच्या डोक्याची कवटी

फोडण्याची चाल आहे. या क्रियेला कपालक्रिया म्हणतात. याच्या मागचा विचार पुढीलप्रमाणे आहे–

सामान्य मनुष्याचा आत्मा मृत्यूच्या वेळी त्याच्या आंतड्यातून अधोमार्गाने बाहेर पडतो, तर पुण्यवान मनुष्याचा आत्मा सुषुम्ना नाडीच्या द्वारे ऊर्ध्व मार्गाने जातो. संन्यासी किंवा योगी याचे आत्मे कपालशिखरातून सरळ स्वर्गाला जातात. म्हणून अशा पुरुषाचे प्रेत बसलेल्या स्थितीत पुरण्याची चाल आहे. अशा वेळी शंखाने किंवा नारळाने त्या सन्याशाची कवटी फोडून त्या खळग्यात शाळिग्राम ठेवतात.

**कपालमोचन** वाराणसीतले एक तीर्थ. कपाली हे शिवाचे एक नाव आहे. शिवाने ब्रह्मदेवाचे पाचवे मस्तक तोडले आणि ते शिवाच्या हाताला चिकटले. पण विष्णूच्या कृपेने वाराणसीत त्या कपालाचे सहस्र तुकडे झाले. त्या वेळेपासून या तीर्थाला कपालमोचन असे नाव पडले (मत्स्य पु. १८२. ८७–१००).

सरस्वतीच्या काठी सधोरा येथे, अवती नगरीत, काश्मीरात देगाम येथे आणि हरिद्वार क्षेत्रात, कपालमोचन नावाची तीर्थे असल्याचे पुराणांतरी सांगितले आहे.

**कपाली** (१) सिद्धांच्या चर्यापदात कपालीचा अर्थ चर्याधर किंवा चर्यानिष्णात असा आहे. याची व्याख्या अशी– ' क महासुखं पालयति इति कपाली '= क म्हणजे महासुख, त्याच्या बीजाचे जो पालन करतो, तो कपाली होय. सिद्धसंप्रदायात डोंबीची साधना करणाऱ्याला कपाली म्हणतात. [ हिं. सा. को. ]

(२) एक मातृदेवता. [ पु. इं. ]

(३) शिवाचे एक नाव. [ पु. इं. ]

(४) एक भैरव. [ पु. इं. ]

(५) एक जात. हे लोक पूर्व बंगालमधल्या चौव्वीस परगण्यात राहतात. हे कोष्टी आणि शेतकरी आहेत. स्वत.ला वैश्य म्हणवून घेतात. बहुतेक सर्व वैष्णवपंथी आहेत. यांच्यांत बालविवाह प्रचलित आहे; पण घटस्फोट व विधवाविवाह निषिद्ध आहेत. [ से. इं. १९५१–रिस्ले. ]

**कपिल** (१) स्वायंभुव मन्वंतरात झालेला विष्णूचा पाचवा अवतार. कर्दम व देवहूति याचा पुत्र. याचा जन्म सिद्धपुर येथे झाला. हा नेहमी बिंदु सरोवरावर राहत असे, असे भागवतात म्हटले आहे (३. २५. ५). तिथेच याने आपल्या मातेस सांख्य तत्त्वज्ञान उपदेशिले. पण त्याच्या जन्माविषयी व जन्मस्थानाविषयी निश्चित काही सांगता येत नाही. काही विद्वान त्याच्या ऐतिहासिकतेविषयीही संदेह व्यक्त करतात. पुराणे व महाभारत यात याचा उल्लेख आहे. प्रत्येक कल्पाच्या प्रारंभी कपिल जन्म घेतो, असेही म्हटले आहे. जन्मतःच त्याला सकलसिद्धी प्राप्त होत्या. त्यामुळे त्याला आदिसिद्ध किंवा आदिविद्वान म्हणतात. ' सिद्धानां कपिलो मुनिः ' =सर्व सिद्धांत कपिलमुनी तो मी, असे भगवंतानेही गीतेत म्हटले आहे (१०.२६). आसुरि नामक एक श्रोत्रिय ब्राह्मण याचा शिष्य होता, असे सांगितले आहे. पण तो कपिलाचा साक्षात शिष्य नव्हता, तर कपिलप्रतिपादित सिद्धान्तांचे स्फुरण त्याच्या अंतरात झाल्यामुळे त्याचा गुरु-शिष्यसंबंध निर्माण झाला होता. शतपथ ब्राह्मणात आढळणारा आसुरि हाच जर कपिलशिष्य आसुरि असेल, तर त्या ब्राह्मणाचा काल (सनपूर्व ७०० वर्षे) हाच कपिलमुनीचा काल मानता येईल.

नारद पुराणात (४, ४९) दोन कपिलांचा उल्लेख आहे. त्यांतला एक ब्रह्मदेवाचा अवतार असून दुसरा विष्णूचा आहे. आणखीही एक कपिल आढळतो तो वेदान्ती आहे (श्वेता. ५. २.; ब्र. सू. २. १. १ वरील शांकरभाष्य).

कपिल हा सांख्यशास्त्राचा प्रवर्तक होय. तत्त्वज्ञानाच्या द्वारे मोक्ष मिळविणे, हे सांख्यशास्त्राचे उद्दिष्ट आहे. कर्मकांडापेक्षा ज्ञानकांडाला महत्त्व देणे, हे सांख्यदर्शनाचे वैशिष्ट्य आहे. उपनिषदांतही ज्ञानाला कर्माहून श्रेष्ठ मानले आहे. श्वेताश्वतर उपनिषदात सांख्य सिद्धान्ताचे प्रतिपादन आढळते; पण हे प्रतिपादन संगतवार नाही.

कपिलाला आदिसिद्ध मानण्याचे कारण हे असणे शक्य आहे, की कपिलानेच पहिल्या प्रथम ध्यान आणि तप या मार्गाचा उपदेश केला. त्याच्यापूर्वी कर्म हाच एक मार्ग होता व ज्ञान ही केवळ एक चर्चेची बाब होती. कपिलाने ज्ञानाला साधनेचे रूप दिले आणि मोक्षमार्गात त्याग, तपस्या व समाधी या तत्त्वांना महत्त्व प्राप्त करून दिले.

कपिलवस्तु हे बुद्धाचे जन्मस्थान कपिलाच्याच नावाने वसलेले होते. गंगेचा जिथे सागराशी संगम झाला, त्या ठिकाणी सगरपुत्रांना कपिलमुनीचा शाप झाला होता. त्यावरून असे म्हणायला हरकत नाही, की कपिलवस्तु हे कपिलाचे जन्मस्थान असून गंगा-सागर हे त्याचे तपःस्थान असावे.

कपिल हा निरीश्वरवादी होता. त्यानेच पहिल्या प्रथम प्रकृति-पुरुष विवेकाच्या द्वारे विकासवादाचे प्रतिपादन केले व सृष्टी एका विशिष्ट क्रमाने उत्पन्न होते व लय पावते, असे सांगितले. संसार हा प्रकृतीच्या त्रिगुणातून स्वाभाविकपणे उत्पन्न होतो, असे मानून प्रकृतीच्या पलीकडे या सृष्टीचा कोणी

कर्ता असू शकेल, या गोष्टीचा त्याने निषेध केला. सुख–दुःख ही प्रकृतीची देणगी आहे आणि पुरुष अज्ञानाने बद्ध झालेला आहे. अज्ञानाचा नाश झाल्यावर प्रकृति-पुरुष ही दोन्ही आपापल्या स्थानी स्थित होतात. हे अज्ञान ज्ञानाने नष्ट होते. म्हणून कर्मकाड निरर्थक व ज्ञानमार्ग आवश्यक ठरतो. बुद्ध-महावीर याच्यासारखे नास्तिक दार्शनिकही कपिलाच्या विचारांनी प्रभावित झालेले दिसतात. आस्तिक दर्शनातही वेदान्त व योग ही दर्शने स्पष्टरूपाने सांख्यांच्या त्रिगुणात्मक विकासवादाचा स्वीकार करतात.

कपिलमुनीच्या नावावर पुढील ग्रंथ उपलब्ध आहेत – सांख्यसूत्र, तत्त्वसमास, व्यासप्रभाकर, कपिलगीता ( वेदान्तविषयक ), कपिलपंचरात्र, कपिलसहिता, कपिलस्तोत्र व कपिलस्मृती. **पाहा**–सांख्यदर्शन, योगदर्शन, अद्वैतदर्शन, कपिलवस्तु. [ हि. वि. को ]

(२) कुशद्वीपातील एक पर्वत. [ भाग पु.५.१६.२६. ]

(३) महाभद्र सरोवराच्या उत्तरेचा पर्वत. [पु. इं.]

(४) शाल्मलिद्वीपातील ब्राह्मणांचा एक वर्ग. [पु इं.]

(५) अग्निविशेष. हा विश्वपति व रोहिणी यांचा पुत्र होय. याला त्या त्या देवतेला आहुती पोचविण्याचा अधिकार आहे. [ म. भा. वन. २२३.२१. ]

**कपिलधारा** कोटा–बीना लोहमार्गावर वसलेले नर्मदेवरचे एक तीर्थ. हे स्थान नाहरगढ गावापासून एक मैल दूर जंगलात आहे. इथल्या पर्वतावरच्या गोमुखातून कपिलगंगेची धारा खाली पडते. जवळच शिवकुंड व शिवमंदिर आहे. आसपास काही गुफा आहेत. या स्थानाचा मार्ग कठिण आहे. इथे कपिलमुनीने तप केल्याचे सागतात. त्याच्याच तपोबलाने इथे पर्वतातून गंगेची धारा प्रकट झाली. [ कल्याण तीर्थांक ]

**कपिलबल** आयुर्वेदाचा एक आचार्य. हा पंचनदाचा रहिवासी होता. याचा पुत्र दृढबल याने चरकसंहितेच्या अंतिम भागाचे संस्करण केले आहे. हे पितापुत्र गुप्तकालापूर्वी होऊन गेले.

अष्टांगहृदयाच्या भूमिकेत कपिलबलाला शल्यतंत्रकर्ता असे म्हटले आहे. [ आ. इ. ]

**कपिलब्राह्मण** हे गुजरातेत भरुच जिल्ह्यात आढळतात. हे कपिलऋषीपासून आपली उत्पत्ती सांगतात. यांचा मुख्य व्यवसाय शेती हा आहे. [ मुं. इ. जा. ]

**कपिल मुनी** एक क्षेत्र. बंगालमधल्या खुलना जिल्ह्यात कबडाक नदीच्या काठी हे क्षेत्र आहे. प्राचीन काळी कपिल नामक मुनीचे हे निवासस्थान होते. पुढे त्याच्याच नावाने ते प्रसिद्धीला आले. कपिलमुनीने इथे कपिलेश्वरी नामक अबिकेचे मदिर उभारले, असे सागतात. चैत्र महिन्यात या देवीची जत्रा भरते. [ भा. प्र. ]

**कपिलर** (इ. स. १ ले शतक) तमिळनाडमधला एक कवी याचा जन्म तिरुवादवूर या गावी ब्राह्मणकुलात झाला. याची बुद्धी तीक्ष्ण होती. अध्ययन समाप्त केल्यावर तो तत्कालीन सघम्‌चा सदस्य बनला. त्याच्या विद्वत्तेने संघम्‌मधले इतर कवी प्रभावित झाले. पांड्य राजालाही तो प्रिय व आदरणीय झाला. त्यामुळे संघम्‌मध्ये त्याची प्रतिष्ठा वाढली.

कपिलर मदुरेत राहत असता उत्तर प्रदेशातला ब्रह्मदत्त नावाचा राजा मदुरेस आला. तमिळ भाषा व साहित्य यांच्याबद्दल त्याच्या मनात आदर नव्हता. कपिलरच्या मनाला ती गोष्ट लागली. त्याने मग कुरिंजिप्पाट्टु नामक काव्य रचले व ते ब्रह्मदत्ताला ऐकविले. त्या काव्यातले सौदर्य व लालित्य पाहून ब्रह्मदत्ताचे मत बदलले. तो तमिळ भाषेचा भक्त बनून तमिळ साहित्याचे अध्ययन करू लागला. कपिलरच्या या काव्याची गणना पत्तुप्पाट्टुमध्ये झालेली आहे. या काव्याची कथा अशी–

एक लावण्यवती किसानकन्या आपल्या शेताची रखवाली करीत उभी होती. एक पहाडी राजा शिकारीला निघाला असता त्या ठिकाणी पोचला व त्या कन्येचे सौदर्य पाहून मोहित झाला. तिलाही त्याच्याविषयी प्रेम उत्पन्न झाले. राजाने तिच्याशी गांधर्वविवाह केला ; पण तिला न घेताच तो आपल्या राज्यात गेला. कन्या विरहदुःखाने कृश झाली. मग तिच्या आईबापांना तिचे प्रेमरहस्य कळून आले. त्यांनी मग त्या राजाशी तिचा समारंभपूर्वक विवाह घडवून आणला.

काही कालानंतर कपिलर मदुरेतून निघून कलनाडूच्या वेलपेगन नामक राजाकडे गेला. तो राजा आपल्या राणीची उपेक्षा करून एका गणिकेवर प्रेम करीत होता. नगरातल्या लोकांची राणीविषयी सहानुभूती होती; पण राजाची कानउघाडणी करायला मात्र कोणी धजत नव्हता. अखेर ते काम कपिलरने केले. कपिलरच्या विद्वत्तेचा नि चारित्र्याचा वेलपेगनवर प्रभाव पडला व तो आपले अनैतिक वर्तन सोडून आदर्श गृहस्थ बनला. त्या दिवसापासून कपिलर वेलपेगनचा घनिष्ट मित्र झाला. [ त. सा. सं. ]

**कपिलवस्तू** शाक्यांची राजधानी. हिला कपिलपुर किंवा कपिलाह्वयपुर अशीही नावे होती. या नगराचा कपिलमुनीशी संबंध होता, असे दिव्यावदानात म्हटले आहे. अश्वघोषाच्या बुद्धचरितात 'कपिलस्य वस्तु' अशी त्याची फोड दिली आहे. याच्या जवळच्याच लुंबिनीवनात बुद्धाचा जन्म झाला, अशी परंपरागत समजूत आहे. कपिलवस्तु म्हणजे नेपाळच्या सरहद्दीवरील बस्ती जिल्ह्याच्या उत्तर भागातले पिप्रावा हे गाव होय, असे व्हिन्सेंट स्मिथ मानतो. तिलौराकोट हे कपिलवस्तु होय, असे ऱ्हिस डेव्हिड्स् व पी. सी. मुखर्जी यांचे मत आहे. गोरखपुरच्या उत्तरेस नेपाळ तराईत निगलिवा नावाचे एक गाव आहे, त्याच्या नैर्ऋत्येस तौलिव नामक एक दुसरे गाव आहे आणि त्याच्या उत्तरेस २ मैलांवर तिलौराकोट हे ठिकाण येते. कपिलवस्तूत तिलौरा, चित्रादेई रामघाट व सडवा इतक्या गावांचा समावेश होतो. तिलौरा येथे शाक्यांचा महाल होता. श्री. मुखर्जी सांप्रतच्या रुम्मिनदेई या स्थळालाच लुंबिनीवन मानतात. हे स्थान कपिलवस्तूच्या पूर्वेस १० मैलांवर आहे.

शाक्यांच्या काळी कपिलवस्तूचा प्रदेश कोसल राज्यात गणला जात असावा. या नगराच्या स्थापनेविषयी बौद्धग्रंथांतून अनेक कथा आढळतात. सम्राट अशोक आपल्या राज्यारोहणानंतर विसाव्या वर्षी या ठिकाणी आला होता. बुद्धाचा जन्म झाला, त्या ठिकाणी निगाली तळ्याजवळ त्याने एक शिलास्तंभ उभा केला आहे. बुद्धाचे स्थान म्हणून या शहराचा त्याने मोठा सन्मान केला व त्याचा करही माफ केला. अशोकाच्या या यात्रेनंतरच कपिलवस्तूला धार्मिक महत्त्व प्राप्त झाले व तिथे स्तूप आणि मठ निर्माण झाले.

फाहियान हा चिनी प्रवासी इथे येऊन गेला होता. त्याने केलेले या शहराचे वर्णन हे पहिलेच विश्वसनीय वर्णन म्हणून समजावे लागते. त्याला हा प्रदेश उजाड दिसला. त्याने तिथे काही भिक्षुसंघ व मठ–विहार पाहिले. जिथे शुद्धोदनाचा महाल होता, तिथे त्याला बुद्ध व त्याची माता यांच्या मूर्ती आढळल्या.

युआन च्वांगलाही कपिलवस्तूची हीच तऱ्हा दिसली. कपिलवस्तूच्या भोवती मजबूत तटबंदी होती. तिथे हजाराहून अधिक बौद्ध मठ होते व अनेक मंदिरेही होती, असे युआन च्वांग सांगतो. त्याच्या काळी शुद्धोदनाचा महाल व मायादेवीचा महाल यांचे बौद्धविहारात रूपांतर झाले होते.

कपिलवस्तूच्या जवळच एका मैलावर निग्रोधवन असून त्यात निग्रोधाराम नावाचा विहार होता. श्री. मुखर्जी म्हणतात, की लोरी कुदानच्या दक्षिणेस जी एक मोठी टेकडी आहे, तोच हा निग्रोधाराम होय. बोधिप्राप्तीनंतर पित्याच्या आग्रहावरून कपिलवस्तूत आलेला बुद्ध निग्रोधवनातच राहिला होता. १९५६ साली भारतात बुद्ध महापरिनिर्वाणाचा २५०० वा महोत्सव झाला, त्या वेळी या स्थलातील अवशेषांची डागडुजी करण्यात आली. त्या वेळी आशियातल्या अनेक देशांतून बौद्ध यात्रिक कपिलवस्तूच्या दर्शनाला आले होते. [ हि. जॉ. ए. इं.; भारती; म. ज्ञा. को. ]

**कपिला** (१) तपकिरी रंगाची गाय. सुवर्णकपिला, गौरकपिला, रक्ताक्षी, गुडपिंगला, बहुवर्णा, श्वेतपिंगला, श्वेतपिंगाक्षी, कृष्णपिंगला, पाटला व पुच्छपिंगला असे कपिलेचे दहा प्रकार वराहपुराणात सांगितले आहेत. कपिलादान हे महत्त्वाचे दान म्हटले आहे. ते सहस्र साध्या गाईंच्या दानाहून अधिक फलप्रद आहे. कपिला गाय सवत्स द्यायची असते. देताना तिच्या शिंगांना सोन्याची व खुरांना रुप्याची टोपणे घालावी, पाठीवर ताम्राचे आच्छादन घालावे, गळ्यात घंटा व शेपटीला मोती बांधावे आणि तिला सर्व प्रकारे सुशोभित करून दानासाठी उभे करावे, असे सांगितले आहे. दानाचा मंत्र असा–

**कपिले सर्वदेवानां पूजनीयाऽसि रोहिणि ।**
**तीर्थदेवमयी यस्मादत. शान्तिं प्रयच्छ मे ।।**

मग ब्राह्मणाच्या हाती दानोदक सोडतात. गाईला प्रदक्षिणा घालतात. दानाचे फल– मनोरथपूर्ती, पापनाश, स्वर्गवास व मोक्षप्राप्ती. कपिलेचे दान केल्याने विष्णुपुराणाचे दहा अध्याय श्रवण केल्याचे पुण्य लाभते (विष्णु पु. ६. ८. ५४.) आणि पृथ्वीदानाचे पुण्य मिळते (मत्स्य पु. १९०. ७१–७२).

(२) एक नदी. ही शुभ्र पर्वताच्या पूर्वेस असून तिचे स्नान गंगास्नानफल देणारे आहे. [ कालिका पु. ८१ ]

**कपिलातीर्थ** हे नर्मदेवर आहे. या तीर्थात स्नान व देव-पितरांचे अर्चन केले असता सहस्र कपिला धेनूंच्या दानाचे पुण्य मिळते. [ म. भा. वन. ८३.४५ ]

**कपिलाषष्ठी** हा योग पुढील गोष्टी एकत्र येऊन होतो. या विषयी श्लोक असा––

**प्रोष्ठपदासिते पक्षे षष्ठी भौमेन संयुता ।**
**व्यतीपातेन रोहिण्या सा षष्ठी कपिला स्मृता ।।**

अर्थ – भाद्र० व. षष्ठी, मंगळवार, हस्तनक्षत्री सूर्य, रोहिणी नक्षत्रात चंद्र व व्यतीपात इतके सगळे योग ज्या दिवशी जमून येतील, त्या दिवसाला कपिलाषष्ठी म्हणतात.

हा योग ६० वर्षांनी एकदा येतो. हा एक श्रेष्ठ योग आहे. हे सूर्यपर्व असल्यामुळे याचा पर्वकाळ दिवसाच मानतात. या दिवशी दान, हवन वगैरे कृत्ये करायची असतात. कपिला-

षष्ठीस श्राद्ध करावे, असे स्पष्ट विधान नाही; पण इतर महान योगांवर श्राद्ध करतात, तसेच ते या योगावरही करावे, असे धर्मसिंधुकारांचे मत आहे. याशिवाय या दिवशी सूर्यपूजा व कपिलाधेनूचे दान हेही विधी सांगितले आहेत. या कपिलाषष्ठीची कथा पुढीलप्रमाणे–

एकदा नारद गंगास्नान करीत असता त्याला जलात मत्स्यांचे एक जुळे दिसले. त्या दृश्याने नारदाची शृंगारभावना उत्तेजित होऊन आपणही लग्न करून ससारसुख अनुभवावे, असे त्याला वाटले. मग तो द्वारकेला गेला. कृष्णाच्या सोळा हजार एकशे आठ बायका असल्याचे त्याला माहीत होते. त्याने कृष्णाजवळ त्यांपैकी एक स्त्री मागितली. कृष्णाला ते चमत्कारिक वाटले; पण स्पष्ट नकारही देववला नाही. तो म्हणाला, ' नारदमुने, जिच्या महालात मी नाही, ती माझी स्त्री तू घेऊन जा. ' नारद कृष्णस्त्रियांचे सगळे महाल हिंडला; पण प्रत्येक महालात कृष्ण उपस्थित असलेला त्याला दिसला. मग तो खट्टू होऊन नदीवर स्नानास गेला. बुडी मारून वर येतो, तो आपले पुरुषरूप जाऊन आपल्याला स्त्रीरूप प्राप्त झाले आहे, असे त्याला दिसले. याचा अर्थ नारदाची नारदी बनली. तेवढ्यात तिथे एक ऋषी आला. त्याने त्या नारदीशी लग्न केले. मग दरवर्षी एक या प्रमाणे नारदीला साठ पुत्र व एक कन्या झाली. त्या कन्येचे नाव कपिला असे होते. नारदी त्या पोरवड्याला कंटाळली. तिने विष्णूचा धावा केला. विष्णू प्रकट होऊन त्याने नारदीला परत नारद बनविले. एवढ्यात नारदीचे ६० पुत्र भूक लागली, म्हणून गिल्ला करीत तिथे आले. विष्णूने प्रत्येकाला आळीपाळीने एक एक वर्ष पृथ्वीचे राज्य करण्यास सांगितले.

नारदीचे हे साठ पुत्र म्हणजेच प्रभवादी साठ संवत्सरे होत. ही मुलगी म्हणजेच कपिलाषष्ठी होय. या कपिलाषष्ठीच्या योगावरच विष्णूने नारदीला पुनश्च नारद केले होते.

**कपिलेश** कपिला नदीची एक अधिष्ठात्री देवता. सोमवती अमावास्येला कपिलेशाच्या दर्शनाचे विशेष फल असल्याचे सांगितले आहे. [ पु. इं. ]

**कपिवन** एक वैदिक ऋषी. ज्यात दोन दिवस सोमाचे हवन आहे, असा एक अहीन याग याच्या नावावर आहे. स्वर्गप्राप्तीसाठी तो करायचा असतो (आश्व. श्रौ. सू. १०. ८. ३). कपिवन हा भूनामक महर्षीचा पुत्र होता. त्याने हा अहीन याग केल्यामुळे त्याचे दारिद्र्य नष्ट झाले, असा उल्लेख तांड्य ब्राह्मणात आहे (२०. १३). [ वे. इं. ]

**कपिश** काबूलच्या ईशान्येस १५५ मैलावर असलेला एक प्राचीन प्रदेश. युआन च्वांग, टॉलेमी व प्लिनी यांनी याचे वर्णन केले आहे. इथे घोडे चांगले निपजत. इथला क्षत्रिय राजा बुद्धानुयायी होता. तो प्रतिवर्षी चांदीची नऊ हात उंचीची बुद्धमूर्ती बनवीत असे. याशिवाय विशिष्ट कालावधीने मोक्षमहापरिषद भरवून तो धर्मचर्चा घडवून आणी व त्या प्रसंगी गोरगरिबांना दानधर्मही करी. या प्रदेशात शंभर बौद्धमठ व कित्येक स्तूप आणि देवालयेही होती. [ हि. जॉ. ए. इं. ]

**कपिष्ठल** कठचरणाच्या अंतर्गत असलेला एक चरण. कपिष्ठलांची संहिता उपलब्ध आहे. पाणिनीने कपिष्ठल गोत्राचा उल्लेख केला आहे (८. ३. ९१). मेगॅस्थिनीजने पंजाबातल्या कबिस्थोलोई नामक लोकांचा निर्देश केला असून ते कपिष्ठलच असावे, असे म्हणता येते. कपिष्ठलांच्या प्रदेशातून इरावती नदी वाहते, असे वर्णन आहे. त्यावरून वाटते, की कपिष्ठलाचा प्रदेश इरावतीच्या जवळपास कठांना लागूनच असावा. पाहा-कठ. [ पा. भा. ]

**कपूरिया** बंगालमधील एक जात. हे लोक मूळचे भटक्ये; पण सांप्रत बंगलमध्ये स्थिरावले आहेत. पूर्वी ते घोड्यांचा व्यापार करीत. अलिकडे भिक्षा मागतात व प्रसंगी लोकांची घोडी चोरून विकतात. ते स्वतःला ब्राह्मण समजतात. शीतलामाता ही यांची देवता होय. मृताशौच तीन दिवस पाळतात. श्राद्ध करीत नाहीत.

**कपोत नैर्ऋत** ऋ. १०. १६५ या सूक्ताचा द्रष्टा. याने कपोत पक्ष्याची आपणांस बाधा न व्हावी म्हणून देवांना प्रार्थिले आहे.

**कप्पिलियर** मदुरा जिल्ह्यातील एक शेतकरी जात. हिला करुंपुरथल असेही म्हणतात. मात्र या जातीचा उल्लेख होतो, तो कोउंडर किंवा कवंडर या नावाने. तोत्तियार लोकांनी छळ केल्यामुळे ते तुंगभद्रेच्या काठचा आपला प्रदेश सोडून इथे आले, असे काहींचे मत आहे; तर मुसलमानांच्या जाचाला कंटाळून म्हैसूर, कांचीपुरम्, कोईंबतूर करीत करीत ते मदुरेला आले, असे काही लोक सांगतात.

कंबलम् नामक ज्या नऊ जाती आहेत, त्यांपैकी ही एक जात आहे. जातीच्या सभा होतात, त्या वेळी हे लोक कांबळ्यावर बसतात, म्हणून यांना कंबलम् हे नाव पडले. कप्पिलियरांमध्ये धर्मकट्टु व मुनुकट्टु असे दोन भेद आहेत. विधवांना एकदा

पुर्नविवाह करायला परवानगी देणारे ते धर्मकट्टु व दोनदा पुर्नविवाह करायला अनुमती देणारे ते मुनुकट्टु होत. याच्यात परस्पर विवाहसंबंध होतो. याशिवाय यांच्यात अनेक पोटजाती आहेत. हे लोक कन्नड भाषा बोलतात.

या जातीतील मुलगी प्रथम रजोदर्शन झाल्यावर घराच्या एका कोपऱ्यात किंवा एका झोपडीत तेरा दिवस बसून राहते. नंतर ती झोपडी जाळून टाकतात व तिने वापरलेली मातीची भाडी फोडून टाकतात.

**विवाहप्रथा**––द. भारतातले विवाहाचे सर्वसाधारण चिन्ह जे ताळीबंधन, ते त्यांच्यांत नाही. विवाहाच्या पहिल्या दिवशी वधूला तिच्या मामाकडे नेतात. तिथे तिच्या अंगाला हळद व चंदनाची उटी लावल्यावर मामा तिच्या पायांत जोडवी घालतो लग्नात वधू-वरांच्या करांगुली एकत्र बांधतात. या दिवसाला करबंधन असे नाव आहे. यांच्यांत आतेबहिणीशीच विवाह करण्याविषयी निर्बंध आहे.

लाक्कम्म, वीरलाक्कम्म या त्यांच्या ज्ञातिदेवता असून याशिवाय हे चेनराय, तिम्मप्प, इ. देवतांनाही भजतात.

यांच्यापैकी काही लोक विशिष्ट अवलादीची गुरे पाळतात. हे गाईचे दूध काढीत नाहीत. कळपाच्या म्होरक्याला वृषभराज म्हणतात. तो मेल्यावर त्याच्या जागी दुसऱ्या एका बैलाची विधिपूर्वक निवड करतात. त्याला नंदगोपाळस्वामी असे म्हणतात व त्याच्या दिमतीला स्वतंत्र परिचारक नेमतात. [मदुरा गॅझे.]

**कफन** मुसलमान लोक प्रेताला झाकण्यासाठी वापरतात ते वस्त्र. त्या कामी पुरुषासाठी तीन तुकडे असलेले वस्त्र वापरतात. स्त्रीसाठी पाच तुकडे असतात, ते असे- (१) इझार–बेंबीपासून खालच्या भागासाठी. (२) कमीस – गळचापासून गुडघ्यापर्यंतच्या भागासाठी. (३) लिफाफा – सर्व शरीर झाकण्यासाठी. (४) सीनाबंद–स्त्रीचे वक्षःस्थळ झाकण्यासाठी व (५) दवनी– स्त्रीच्या डोक्याला बांधण्यासाठी. ही सर्व वस्त्रे पांढरी असतात. [डि. इ.]

**कफ़शगार** एक मुसलमान जात. हे लोक महाराष्ट्रात आढळतात. काबूलहून आलेल्या लोकांचे हे वंशज आहेत. हे आपसात व अन्य मुसलमानांत विवाहसंबंध करतात. हे हनफी पंथाचे सुन्नी असून काजीची आज्ञा पाळतात. [मुं. इ. जा.]

**कबड्डी** एक अखिल भारतीय खेळ. याला महाराष्ट्रात हुतुतू, बंगालमध्ये हुडु, तमिळनाडमध्ये चेडुगुडु, सौराष्ट्रात भडिभडि, पतियाळाच्या काही भागात संचीपक्की, केरळात वडीकळि व मध्य आणि उत्तर प्रदेशात कबड्डी अशी वेगवेगळी नावे आहेत.

या खेळाचे विशेष संगोपन महाराष्ट्रातच झाले आहे. हल्ली या खेळाचे सामनेही होत असतात. त्याची नियमावलीही आता तयार झाली आहे. पूर्वी होळी, नागपंचमी, कोजागरी, इ. सणांच्या प्रसंगी हा खेळ खेळला जात असे.

या खेळासाठी एक दीर्घ चौकोनी क्रीडांगण आखून घेतात. त्याच्या मधोमध एक रेघ काढतात. तिला मध्यरेषा असे म्हणतात. या खेळात ही मध्यरेषा महत्त्वाची असते. मध्यरेषेपासून ८ फूट अंतरावर दोन्ही बाजूस दोन रेषा आखतात. त्यांना निदानरेषा असे म्हणतात. प्रत्येक खेळाडूने निदानरेषेपर्यंत

अंतिम रेषा
निदान रेषा
मध्य रेषा
निदान रेषा
अंतिम रेषा

कबड्डी क्रीडांगण

तरी चढाई करायला गेलेच पाहिजे, असा नियम आहे. क्रीडाक्षेत्राच्या दोन्ही अंगांच्या रेषांना अंतिमरेषा म्हणतात. खेळाडूंनी या अंतिम रेषांच्या आतच खेळायचे असते. जो खेळाडू त्या रेषेच्या बाहेर जातो, तो बाद होतो. याशिवाय राखीव क्षेत्र (लॉबी) नावाची काही जागा असते. झटापट झाली असता या राखीव क्षेत्राचा उपयोग करतात.

प्रत्येक संघात नऊ खेळाडू असतात. खेळ सुरू करण्यापूर्वी दोन्ही संघ आपापल्या क्षेत्रात उभे राहतात. ओलीसुकीत जिकणारा संघनायक आपल्यापैकी एखाद्या गड्याला विरुद्ध पक्षाच्या क्षेत्रात चढाई करायला पाठवितो. चढाईसाठी जाणारा हा गडी 'कबड्डी कबड्डी' किंवा 'हुतुतू' असे म्हणत दम धरून विरुद्ध पक्षावर हल्ला करायला जातो. नियमांचे उल्लंघन न करता दम उखडण्यापूर्वी तो खेळाडू प्रतिपक्षाच्या



कबड्डी–पकडलेला गडी
मध्य रेषेस स्पर्श करण्यास धडपडतो

जेवढ्या खेळाडूंना स्पर्श करील, तेवढे खेळाडू बाद होतात. धरायला आलेल्या खेळाडूंच्या कोंडीतून निसटून दम उखडण्यापूर्वी जर त्याने मध्यरेषेला स्पर्श केला, तर त्याला शिवणारे सर्व गडी बाद होतात. एका पक्षाची चढाई झाल्यानंतर दुसऱ्या



कबड्डी–प्रतिपक्षी गड्याचा दम उखडणे

पक्षाचा गडी चढाईसाठी येतो; असे आलटून पालटून चालते. बाद झालेले गडी क्षेत्राच्या बाहेर जातात. दुसऱ्या पक्षातले एक किंवा अनेक जितके गडी बाद होतील, तितके पहिल्या पक्षाचे गडी जिवंत होऊन परत खेळायला येतात.

चढाई करणाऱ्याने प्रतिपक्षाच्या क्षेत्रात जाणे व दम घालणे या दोन्ही क्रिया एकदम सुरू करायला हव्या. तसे न केल्यास किंवा एकाच वेळी दोन खेळाडू चढाई करायला गेल्यास, त्या संघाची चढाईची पाळी गेली असे समजतात. चढाई करणाऱ्याने निदानरेषा ओलाडायला हवी, असा नियम आहे. ती न ओलाडता किंवा एकाही खेळाडूस बाद न करता तो आपल्या क्षेत्रात परत आला, तर त्याला बाद समजतात.

अखिल महाराष्ट्र शारीरिक शिक्षण मंडळाने या खेळाची नियमावली १९३३ साली तयार केली. त्या वेळेपासून आजतागायत महाराष्ट्रात याच नियमावलीच्या आधारे हा खेळ खेळला जातो. महाराष्ट्रात याच्या पुढील तीन पद्धती प्रचलित आहेत –

(१) **संजीवनी** – संजीवन म्हणजे पुनरुज्जीवन. यात बाद झालेला गडी जिवंत होऊन पुन्हा खेळू शकतो. विरुद्ध पक्षाचा खेळाडू बाद केल्यामुळे मारणाऱ्या पक्षाचा बाद झालेला गडी जिवंत होऊन पुन्हा खेळात भाग घेतो. हा प्रकार खेळ संपेपर्यंत चालू असतो. या पद्धतीत प्रत्येकी २० मिनिटांचे दोन डाव असतात. डावाची कालमर्यादा संपण्यापूर्वीच जर एखाद्या पक्षाचे सर्व गडी बाद झाले, तर त्या पक्षावर लोण होतो.

(२) **गनिमी** – या पद्धतीत एकदा बाद झालेला खेळाडू लोण होईपर्यंत जिवंत होत नाही.

(३) **अमर** – या पद्धतीत खेळाडू बाद झाला, तरी त्याला क्रीडागणाच्या बाहेर जावे लागत नाही. त्याबद्दल फक्त कमी-जास्त गुणाची नोंद केली जाते. या पद्धतीत लोण कधीच होत नाही. २० मिनिटांची कालमर्यादा संपली, की डाव संपला असे समजले जाते.

महाराष्ट्रातले कबड्डीचे मोठमोठे सामने संजीवनी पद्धतीने खेळले जातात. अ. भा. ऑलिंपिक खेळात कबड्डीला स्थान मिळाल्यापासून तिथेही सजीवनी पद्धतीनेच कबड्डीचे सामने होतात. [ हुतुतू – श्री. वि. गंधे ]

## कबंध

(१) दैत्य – दानवगणांपैकी एक. 'कबन्धमुदरे मुखम्'= कबंधाला उदराच्या ठिकाणी मुख असते, असे त्याचे लक्षण सांगितले आहे (वा. रा. ३. ६९. २७). याविषयी कथा अशी–

दनु नावाच्या एका दानवाने उग्र तप करून ब्रह्मदेवाकडून दीर्घायुष्याचा वर मिळविला. मग तो इंद्रावर चालून गेला. इंद्राने वज्रप्रहार करून त्याला भूमीवर पाडले व त्याचे डोके

आणि मांड्या हे अवयव त्याच्या पोटात घुसविले. फक्त हात तेवढे बाहेर ठेवले. मग तो दनु इंद्राला शरण गेला. इंद्राने त्याच्यावर दया करून त्याचे हात खूप लांब केले. मग तशा कबंधावस्थेतच तो वनात राहू लागला. आपल्या लांब हातांनी तो बसल्या जागेवरूनच आपले भक्ष्य आपल्याकडे ओढून आणी. पुढे दाशरथी राम वनवासात गेला असता या कबधाची आणि त्याची गाठ पडली व रामाने त्याला ठार मारले (वा. रा. ३. ६९.).

अमरावती व गांधार येथील शिल्पांत कबंधाच्या मूर्ती कोरलेल्या आढळतात. त्यांना पोटावर बेंबीच्या जागी तोंड असते. शिवाय धडावर मूळचे मस्तकही असतेच. या मूर्ती ठेंगण्या व बृहदुदर अशा निर्मिलेल्या असतात. या कबधाना ठेंगू यक्ष असेही म्हणतात. [ डे. हिं. इ. ]

(२) सुमंतूचा एक शिष्य. याने आपल्या पथ्य व देवदर्श या दोन शिष्याना अथर्ववेदाचे दोन भाग करून त्याचे अध्यापन केले. [ पु. इं. ]

**कबलिगर** एक भिक्षेकरी जमात. अंगात जाकीट, डोक्याला पागोटे व कमरेला लंगोटी असा याचा वेष असतो. त्याच्या डाव्या खांद्याला व उजव्या हाताला माणसाच्या केसांची दोरी गुंडाळलेली असते. हे स्वभावाने फार तापट असतात. एखाद्याने भिक्षा घातली नाही, तर हे आपल्या हातावर किंवा शरीराच्या इतर भागावर जखम करून घेतात. त्याशिवाय प्राण देण्याचीही धमकी देतात. [ बॉ. बे. क्रा. ]

**कबायली** भारताच्या वायव्य दिशेला काश्मीर व पंजाब या राज्याच्या सीमेजवळ कबायली लोकाचा प्रदेश आहे. कबायली लोक प्राचीन काळापासून स्वतंत्र आहेत. ब्रिटिशांनाही त्यांचा हा प्रदेश अंकित करता आला नाही.

यांच्यात चित्राली, बाजौरी, चमकानी, युसुफजयी, उत्तमनरवेल, खट्टक, इ. काही पोट विभाग आहेत. हे सर्व लोक इस्लामचे अनुयायी असून बहुतेक पठाणी किंवा पुश्तु भाषा बोलतात. पशुपालन करणे, शिकार करणे व योग्य भूमी मिळाल्यास शेती करणे, हे यांचे धंदे आहेत. पुरुष सकाळी उठून मेंढ्या चारायला जातात. आणि स्त्रिया घरकामाशिवाय चारा गोळा करणे, शेतात काम करणे, इ. गोष्टी करतात. यांच्या स्त्रिया अत्यंत सुदर व सुदृढ असतात. सलवार, कुडता व जाकीट असा स्त्री-पुरुषाचा सामान्य वेष असतो. स्त्रिया डोक्याला रुमाल बांधतात; तर पुरुष पगडी घालतात. स्त्रिया केसांच्या दोन वेण्या घालतात आणि त्या गालांवरून खाली वक्षःस्थळावर आणतात. यांच्या कानात कुंडले व गळ्यात धातुयंत्र असते. हे लोक अतिशय अस्वच्छ असतात. स्नान करणे ही गोष्टच त्यांना माहीत नाही. अंगातले कपडे वर्षातून एकदा किंवा दोनदाच बदलतात. गहू, मका, भाजी व मांस हे यांचे मुख्य अन्न होय.

यांची घरे गुहांसारखी असून त्यांची दारे अगदी लहान असतात. चोरी होऊ नये म्हणून आपल्या जनावरांनाही ते घरातच बांधतात.

या लोकांच्या अनेक टोळ्या आहेत. टोळीच्या प्रमुखाला ते सरदार म्हणतात. हा पुरुष पंचायतीच्या समोर पंचांच्या सल्ल्याने टोळीतल्या कज्जे–खटल्याचा निर्णय देतो.

हे लोक अत्यंत क्रूर असून वैराचा बदला सामान्यतः हत्येनेच घेतात. त्याच्याजवळ नेहमी बंदूक असते.

हे लोक अतिथिसत्काराच्या बाबतीत मात्र तत्पर असतात. मुल्लावर अतिशय विश्वास ठेवतात. त्याचा आदेश झाल्यास स्वतःचा जीवही धोक्यात घालायला मागेपुढे पाहत नाहीत. [ भा. आ. ]

**कबीर** उत्तर भारतातील एक सुप्रसिद्ध संत आणि कवी. याच्या जन्मवर्षाबद्दल विवाद आहे. कोणी ते इ. स. ११४९ मानतात, तर कोणी १३९९ मानतात. अजून त्याबद्दल निर्णय व्हायचा आहे. त्याच्या जन्माविषयी परंपरागत कथा सांगतात, ती अशी–

ज्येष्ठ पौर्णिमेस एका ब्राह्मण विधवेच्या पोटी एक पुत्र जन्माला आला. उजळ माथ्याने त्याचे पालनपोषण करणे त्या विधवेला अशक्य होते. म्हणून तिने काशीतल्या एका तलावाच्या काठी (लहरतालाब) त्याला टाकून दिले. कर्मधर्मसंयोगाने काशीतला नीरु नावाचा एक विणकर आपली स्त्री नीमा हिच्यासह त्या रस्त्याने जात असता, त्याला हा अनाथ शिशु गवसला. त्याने घरी आणून त्याचे पुत्रवत पालनपोषण केले. तोच पुढे कबीर या नावाने प्रसिद्ध झाला.

कबीर आपल्या काव्यात अनेक ठिकाणी आपण काशीचा विणकर असल्याचे सांगतो तत्कालीन अन्य संतही त्याला काशीनिवासीच समजतात. त्याचे मृत्युस्थान मात्र काशी नसून मगहर हे आहे. त्याने स्वतःच म्हटले आहे, की सारे जीवन काशीत व्यतीत करून मृत्युसमयी मी मगहरला उठून आलो–

**मरती बार मगहर उठि आइआ।**
**मरनु भइआ मगहरको बासी।**

मगहरमध्येच मुसलमानी प्रथेप्रमाणे कबिराचे दफन झाले असले पाहिजे. त्याच्या खुणा आजही तिथे आढळतात, असे

श्री. परशुराम चतुर्वेदी सांगतात. कबिराचे दहन करावे का दफन करावे, असा त्याच्या हिंदु–मुसलमान शिष्यात वाद उत्पन्न झाला असता, त्याच्या कफनाखाली प्रेतच राहिले नाही आणि तिथे पान, फूल या वस्तूच उत्पन्न झाल्या, अशी दंतकथा आहे.



सत कबीर– हिं. वि. को.च्या सौजन्याने

कबीर हा धर्माने मुसलमान होता, असेही काही लोक मानतात. पण कबीर हा रामाचा उपासक होता, तसेच हिंदूच्या उच्च-तम आध्यात्मिक विचाराचा प्रबल समर्थक होता, यावरून कित्येक विद्वानांनी तो मुसलमान नसावा, असेही म्हटले आहे. त्याचे कबीर हे नावही खरे नाव नसावे आणि त्याचे पालक आई-बाप मुसलमान असल्यामुळे हा हिंदुकुलोत्पन्न मुलगा मुसलमान समजला गेला असावा, असेही त्यांचे मत आहे. पण कबिराचा जन्म हिंदुकुलात झाला, ही गोष्ट कुठल्याही प्रमाणाने सिद्ध होऊ शकत नाही, असे श्री. परशुराम चतुर्वेदी यांचे स्पष्ट मत आहे.

कबिराला कुठल्याही पाठशाळेत शिक्षण मिळालेले दिसत नाही. तो स्वतःच एका ठिकाणी म्हणतो–

**मसि कागद छूयो नही**
**कलम गह्यो नही हाथ ।**

अर्थ–मला कागद आणि शाई यांचा स्पर्श झाला नाही व मी कलमही हातात धरले नाही.

कबिराने आपल्या गुरूचे नाव कुठेही दिलेले नाही; पण परंपरेने असे मानले जाते, की रामानंद हे त्याचे गुरू होते. रामानंद त्या काळचे एक मोठे धार्मिक पुढारी आणि सुधारक होते. त्यांचेही वास्तव्य काशीतच असल्यामुळे कबिराचा आणि त्याचा संपर्क आला असण्याची व त्याने रामानदांकडून गुरू-पदेशही घेतला असण्याची शक्यता आहे.



कबिराच्या कुटुंब-परिवाराबद्दल विश्वसनीय अशी काही माहिती मिळत नाही. कबीरपथी लोक त्याला विरक्त आणि एकाकी समजतात; पण ते खरे नाही. त्याच्याच काव्यातल्या काही उल्लेखांवरून तो गृहस्थ होता, असे समजते. लोई नावाची कोणी एक स्त्री त्याची संगिनी होती. तीच त्याची पत्नी असे मानले जाते. काही लोक असेही समजतात, की कबिराने दोन किंवा तीन विवाह केले होते. कमाल नावाचा त्याला एक पुत्र होता, असेही त्याच्या चरित्रात सांगितले आहे. कबीर गृहस्थ असला, तरी त्याची आर्थिक स्थिती मात्र ठीक नव्हती. तो सदैव वस्त्रे विणण्याचे काम करी; पण तरीही निर्वाहापुरते अन्नाच्छादन मिळविणे त्याला कठीण जाई. आणि याचे कारण हे, की व्यवसायात त्याचे म्हणावे तसे लक्ष नव्हते. तो सदैव अध्यात्मचिंतनात मग्न असे. जोवर बाप हयात होता, तोवर ठीक चालले होते; पण पुढे त्याच्या ससाराची परवड्च झाली.

कबीर हा ज्ञानी पुरुष होता. हे ज्ञान त्याने केवळ सत्संगा-तून मिळविले होते. मात्र त्याचे समकालीन संत त्याला भक्त या रूपातच ओळखतात. चरित्रकारांनीही त्याला भक्तांच्या मालिकेत बसविले आहे. उ. भारतात भक्तिसाधनेचे प्रवर्तन रामानदानी केले. रामानंद वैष्णव होते, कबीर हा त्यांच्या शिष्यांपैकी एक होता आणि वैष्णवभक्ताविषयी त्याच्या अंत-रात अपार श्रद्धा होती, यावरूनच कबिराचे भक्तमालिकेत परिगणन झालेले आहे.

कबीर भक्त होता, ही गोष्ट निस्संशय; पण त्याहीपेक्षा तो अधिक काही तरी होता. त्याच्या काव्यात तीर्थे, व्रते, मूर्तिपूजा, इ. बाह्य गोष्टींविषयी अनास्था दिसून येते. अवतारवाद आणि शास्त्रप्रामाण्य यांचा तर तो विरोधकच आहे. सगुण उपास्या-पेक्षा निर्गुण ब्रह्माचेच महत्त्व तो प्रतिपादितो.

कबिराच्या पुढे एक धार्मिक समस्या उभी होती. आपल्या आवतीभोवती त्याला सर्वत्र धर्माचे आणि पंथाचे झगडे दिसत होते. हे झगडे केवळ हिंदू–मुसलमानांतच नव्हते, तर ते तत्का-लीन समस्त संप्रदायांत होते. यती, शाक्त, जैन, शेख, काजी हे सगळे एकमेकांच्या विरुद्ध लढत होते. प्रत्येक जण आपलाच तेवढा सत्यमार्ग समजत होता व अन्यांविषयी द्वेष व तिरस्कार बाळगीत होता. पण कबिराने स्पष्टपणे सांगितले, की धर्मतत्त्वाचे वास्तविक रूप सामूहिक किंवा सांप्रदायिक असत नाही; तर ते व्यक्तिगतच असू शकते. प्रत्येक व्यक्तीला सत्यज्ञान तितकेच होते, की जितके त्याच्या निजानुभवात प्रविष्ट होऊ शकेल. कबीर स्वत.ही आपण पूर्ण सत्य पूर्ण रूपात जाणले, असे कुठेही सागत नाही. दुसऱ्यानेही तसा दावा करू नये, असे त्याला वाटे–

**जस तूं तस तोहि कोई न जान ।**
**लोग कहैं सब आनहि आन ।।**

(कबीर ग्रथावली पद ४७)

अर्थ– हे परमेश्वरा, जसा तू आहेस, तसा तू कोणाकडूनही जाणला जात नाहीस. सगळे लोक तुझ्याबद्दल वेगळे वेगळेच बोलतात.

**जहुवां प्रगटी बजावहु जैसा ।**
**जस अनभै कथिया तिनि तैसा ।।**

(कबीर ग्रंथावली, रमैणी ३)

अर्थ– ज्याला जशा प्रकारचा अनुभव येतो, तो तशा प्रकारे त्याचे वर्णन करतो.

**जिहि हरि जैसा जाणिया ।**
**तिनक तैसा लाभ ।**

(कबीर ग्रथावली, साखी २१)

अर्थ– जो ज्या प्रकारे त्याला जाणतो, तदनुसार त्याला लाभ होतो.

कबिराला हिंदू आणि मुसलमान या दोघांनाही राम–रहिम यांचे ऐक्य सांगायचे होते. अल्ला आणि राम हे मुळात एकाच तत्त्वाचे बनलेले आहेत. त्याची फक्त नावेच तेवढी भिन्न आहेत. जे नमाजात आहे, तेच पूजेतही आहे. तोच सत्यस्वरूप परमात्मा महादेव आहे आणि मुहंमदही आहे. त्याला आदिपुरुष ब्रह्मा म्हणा किंवा अल्ला या नावाने पुकारा. तुर्क आणि हिंदू दोन्ही एकच आहेत. मौलाना आणि पांडे सारखेच आहेत. कोणी खुतबा पढतो, तर कोणी वेद पढतो. दोन्ही एकच आहेत. सगळी एकाच मातीची गाडगी-मडकी. केवळ नावे तेवढी भिन्न भिन्न !

कबिराचा परमेश्वराविषयीचा किंवा परब्रह्माविषयीचा हा अनुभव निर्गुणाकडे झुकणारा आहे. तो परमेश्वराला गुन-अतीत, गुनबिहून, निरगुन, निराकार या स्वरूपात प्रतिपादितो.

**अलख निरंजन लखै न कोई ।**
**निरभै निराकार है सोई ।।**
**सुंनि असूथल रूप नहीं रेखा ।**
**द्रिष्टि अद्रिष्टि छिप्यौ नहीं पेखा ।।**

अर्थ– तो अलख व निरंजन आहे. त्याला कोणी लक्ष्य करू शकत नाही. तो निर्भय आहे, निराकार आहे. तो शून्य नाही व स्थूलही नाही. तो दृश्यही नाही आणि अदृश्यही नाही. तसेच लपलेलाही नाही आणि प्रकटही नाही.

पण परमेश्वराला केवळ निर्गुणनिराकार म्हणण्यातच कबिराला समाधान नाही. केवळ 'नेति नेति' म्हणून तो थांबत नाही. त्याने त्याला सगुण–साकार स्वरूपातही पाहण्याचा आणि दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. सृष्टिकर्ता या स्वरूपात त्याला पाहून तो म्हणतो–

**आपन करता भये कुलाला ।**
**बहुविधि सृष्टिरची दर हाला ।।**
**बिधना कुंभ कीये द्वै बानां ।**
**प्रतिबिंबतामांहि समाना ।।**
**बहुत जतन करि बानक बाना ।**
**सौज मिलाया जीव तहा ठाना ।।**

अर्थ– त्याने स्वतः कर्ता बनून कुंभार ज्याप्रमाणे नाना प्रकारची गाडगी–मडकी बनवितो, त्याप्रमाणे विविध सृष्टीची रचना केली आणि जीवाच्या रूपाने तोच त्या सृष्टीत प्रतिबिंबित झाला. तो तिचे पालनपोषणही करू लागला. ज्याने ही चित्ररूपिणी सृष्टी रचली, तोच तिचा सूत्रधारही आहे. या सृष्टीला ज्यानी चित्ररूप मानले, ते भले होत.

कोणत्याही प्रचलित धर्माचे किंवा संप्रदायाचे अनुसरण करणे, हा उद्देश कबिराने कधीही ठेवला नाही. त्याने कुठल्या नवीन मतवादाचा पायाही घातला नाही. त्याने सत्यालाच ईश्वर मानले आणि तो सत्यरूपी ईश्वर एकरस आणि ओतप्रोत असल्याचे सागितले. त्याने समाजात निर्द्वंद्व वृत्तीने राहून व्यापक नैतिक नियमांच्या पालनाकडे लोकांचे लक्ष वेधले. तो कपट, पाखड, अत्याचार याचा विरोधी आणि ऋजुता, साधेपणा, स्पष्टोक्ती व प्रेम यांचा समर्थक झाला. त्याला कोण्या काल्पनिक परलोकाविषयी आस्था नव्हती. तो आदर्श व्यक्तीच्या प्रभावाने इहलोकालाच स्वर्ग बनवू पाहत होता.

कबिराचा शिष्य धर्मदास याने सर्वप्रथम इ. स. १४६५ मध्ये कबिराच्या काव्याचा एक संग्रह बीजक या नावाने तयार केला. कबीरकाव्याचा दुसरा संग्रह काशी येथील नागरी प्रचारिणी सभेने प्रकाशित केला आहे उपलब्ध संग्रहात शीखाचा आदिग्रथ, कबीरग्रथावली व कबीरबीजक हे ग्रथ अधिकृत मानले जातात. पण या तिन्ही ग्रथांतल्या कबीरबानीमध्ये न्यूनाधिकता, पाठभेद व संख्येत कमी–अधिकपणा दिसतो. कबिराच्या रचनेला शब्द, बानी, वचन, उपदेश अशी अनेक नावे दिलेली आहेत. कबिराची साखी प्रसिद्ध आहे. 'साखी' हे संस्कृत साक्षीचे रूपांतर आहे. साक्षी त्याला म्हणावे, की ज्याने कोणतीही वस्तू वा घटना आपल्या डोळयानी पाहिली आहे. 'साखी आँखी, ज्ञानकी' = साखी हा ज्ञानाचा डोळा आहे, असे कबिराच्या साख्यांबद्दल बीजकात म्हटले आहे.

कबिराची भाषा पूरबी हिंदी आहे. 'बोली हमारी पूरबी' असे तो सांगतो; तरीही त्याच्या काव्यात अवधी, व्रज, भोजपुरी, खडीबोली, अरबी, फारसी, इ. भाषांतले बरेच शब्द आढळतात. त्यामुळे त्याच्या भाषेचे निश्चित स्वरूप सांगता

येत नाही. कबिराच्या कवित्वात अद्‌भुत शक्ती वास्तव्य करते. त्याची वाणी ओजस्वी, निर्भीड आणि स्पष्ट आहे. तो वाणीचा प्रभू होता. त्याने जी गोष्ट ज्या रूपात प्रकट करण्याची इच्छा केली, ते रूप त्याच्या वाणीने यथार्थपणे उभे केले. 'अकह कहानी'ला रूप देऊन मनोग्राही बनविण्याची ताकद कबिराच्या ठिकाणी जेवढी आहे, तेवढी फार थोडया कवीत आढळते. [उ. भा. स. प.; कबीर; सं. सा.]

**कबीरजी** रूपकबीरजी नामक साधूने स्थापलेला एक पथ. या पथाचे अनुयायी गळचात कंठी घालतात. परान्न घेत नाहीत. शात व सद्वर्तनी असा यांचा लौकिक आहे. [व. शै. म. व.]

**कबीरपंथ** कबिराच्या हयातीतच त्याला अनेक अनुयायी लाभले होते; पण कबिराने त्यांना हाताशी धरून एखाद्या विशिष्ट पथाची स्थापना केली असेल, असे मात्र वाटत नाही. कबिराचा उपदेश मानवमात्रासाठी होता व त्यामुळेच त्याला कोणत्याही प्रकारे साप्रदायिक रूप देण्याची आवश्यकता नव्हती. पण कबिराच्या निर्याणानतर त्याच्या शिष्य-प्रशिष्यानी त्याच्या नावाने अनेक पथ प्रवर्तित केले. 'कबीरबानी'चा संग्रह करून त्याच्या सिद्धान्ताचा प्रचार करणे, त्याने सागितलेल्या साधनांची व्याख्या करणे, त्या साधनांचा उपदेश देणे, अशा प्रकारचे उद्योग कबिराच्या मृत्यूनंतर त्याच्या अनेक शिष्यानी सुरू केले आणि त्यामुळे एकाच कबीरपंथाच्या भिन्न भिन्न शाखाही निर्माण झाल्या. प्रत्येकाचे मठ वेगळे आणि तीर्थादी स्थानेही वेगवेगळी झाली. कबीरपंथाच्या ग्रंथात अशा बारा भिन्न भिन्न पथांची नावे आढळतात. या बारा पथाच्या प्रवर्तकांची नावे अनुरागसागर या ग्रंथात पुढीलप्रमाणे दिली आहेत—

मृत्युअंधा, तिमिरदूत, अंधअचेत, मनभंग, ज्ञानभंगी, मकरंद, चितभग, अकिलभंग, विसभर, नकटा, दुरगदानि व हंसमुनि. तिथे असेही म्हटले आहे, की या बारा पंथप्रवर्तकांनी कबीरोपदिष्ट सत्यमार्गाचे अनुसरण योग्य प्रकारे केले नाही.

अनुरागसागर या ग्रथाची रचना इ. स. च्या १९ व्या शतकाच्या प्रारभीची असावी, असे वाटते. त्या काळापर्यंत उत्तरप्रदेश, मध्यप्रदेश, ओडिसा, गुजरात, काठियावाड, बिहार, एवढचा भारताच्या भूभागात कबीरपथ पूर्णरूपाने प्रस्थापित झाला होता व त्याच्या भिन्न भिन्न शाखांमध्ये परस्पर स्पर्धा आणि सघर्षही माजले होते.

कबिराने आपले चार प्रमुख शिष्य भारताच्या चारी दिशांना मतप्रचारासाठी पाठविले होते, असे कबीरपथी साहित्यावरून कळून येते. चत्रभुज, बंकेजी, सहेतजी व धर्मदास अशी त्यांची नावे होती. यांतल्या पहिल्या तिघाविषयी काहीच माहिती मिळत नाही. चौथ्या धर्मदासाने मात्र १५ व्या शतकाच्या अखेरीस मध्यप्रदेशात कबीरपंथाच्या धर्मदासी शाखेचे प्रचलन केल्याचे कळते. या शाखेतही सांप्रत अनेक उपशाखा निर्माण झाल्या आहेत. मध्यप्रदेशातले बांधवगड हे धर्मदासाचे निवासस्थान होते व इथेच त्याने आपल्या शाखेची स्थापना केली. धर्मदास हा विद्वान व चारित्र्यसंपन्न पुरुष होता. त्याच्या नावावर बरीच ग्रंथरचना आढळते. त्यांतला एक संग्रहरूप ग्रंथ 'धनी धर्मदासजी की शब्दावली' या नावाने प्रकाशित झालेला आहे.


कबीरपथी साधू

कबीरपंथाची आणखी एक प्रसिद्ध शाखा म्हणजे काशीतली कबीरचौरावाली शाखा ही होय. सुरतगोपाल या कबिराच्या शिष्याने तिची स्थापना केली. आजही काशीत त्याच नावाच्या मोहल्ल्यात त्या शाखेचा मठ आहे. त्याच्या जवळच नीरूटीला नावाचे एक स्थान आहे. नीरू व नीमा हे कबिराचे मानलेले आई–बाप तिथे राहत होते, असे समजतात. सांप्रत तिथे एका विद्यालयाची स्थापना झाली असून त्या ठिकाणी बरेच कबीरपंथी लोक विद्याध्ययन व सत्संग करतात. हा मठ एका महंताच्या ताब्यात असून तिथे प्रतिवर्षी एक जत्रा भरते व नव्या इच्छुकांना पंथाची दीक्षा दिली जाते.

मगहर हे कबिराचे मृत्युस्थल होय. हे गोरखपुराच्याजवळ आहे. तिथे अमी नदीच्या किनाऱ्यावर एक मठ आहे. मधे उंच भिंत बांधून त्या मठाचे दोन विभाग केलेले आहेत. त्यात एका अंगाला कबीरपंथी मुसलमान साधू व दुसऱ्या अंगाला हिंदू महंत राहतात. इथल्या मुसलमान महंताला 'गनी करन कबीर' म्हणतात.

कबीरपंथाच्या तिसऱ्या शाखेचे नाव भगताही शाखा असे असून तिचा मठ बिहारमध्ये धनौती येथे आहे. ही शाखा

भगवान गोसाई याने चालू केली. भगवान गोसाई हा कबिराच्या शिप्यापैकी एक होता व तो कबिराने वेळोवेळी केलेले उपदेश लिहून घेत असे, अशी आख्यायिका सांगतात. पण ही आख्यायिका इतिहासाच्या कसोटीवर उतरत नाही. भगवान गोसाई हा कबिराचा समकालीन नव्हता, असे श्री. परशुराम चतुर्वेदींनी साधार प्रतिपादिले आहे. या भगताही शाखेचे अनुयायी निंबार्क सप्रदायाच्या अनुयायाप्रमाणे वेषभूषा करतात. बीजकाचा पाठ व सत्संग करणे हे आपले कर्तव्य समजतात आणि स्वतःला इतर पंथीयांहून वेगळे समजतात.

याशिवाय कटक (ओडिसा) येथील साहेबदासी पंथ, काठियावाडमधला मूलनिरंजनपंथ, बडोदे येथील टकसारीपंथ व भरूच येथील जीवापंथ याही कबीरपंथाच्या उल्लेखनीय अशा शाखा आहेत. याशिवाय सत्यकबीर, नामकबीर, दानकबीर, मगलकबीर, हसकबीर व उदामीकबीर या नावाचेही काही पथ कबिराच्या नावावर चालतात. त्याचप्रमाणे कमाल, नित्यानद व कमलानंद यांच्या नावावर काही पंथ द. भारतात असल्याचे कळते. बिहारमधील विदुपुर व मझनी या ठिकाणी अनुक्रमे जग्गूदास व ज्ञानीदास यांनी प्रवर्तित केलेले दोन पंथ चालतात. हे धनौती शाखेतून निघाले असावे. काठियावाडमध्ये आणखी एक उपशाखा मार्गीशाखा या नावाने चालते व गुजरातमध्ये दुसरी एक ऊदाशाखा या नावाने चालते. धर्मदासाच्या छत्तीसगडी शाखेच्या उपशाखा सिंध, नेपाळ व सिक्किम येथे असल्याचे सांगतात.

अशा प्रकारे कबीरपंथ अखिल भारतात सर्वत्र पसरला आहे. कबीरपंथाच्या साहित्यात बौद्ध जातकांच्या धर्तीवर रचलेले काही कथाग्रंथ आढळतात. कबीरपंथाची अशी धारणा आहे, की जेव्हा जेव्हा जगाची धार्मिक घडी विस्कटली, तेव्हा तेव्हा ती सुधारण्यासाठी सत्यपुरुषाने कबिराला निरनिराळे अवतार घ्यायला लावून जगात पाठविले. सत्ययुगात सत् सुकृत या नावाने, त्रेतायुगात मुनी या नावाने, द्वापरात करुणामय या नावाने व कलियुगात कबीर या नावाने तो अवतरला. प्रत्येक युगात त्याने भिन्न भिन्न व्यक्तीवर कृपा करून जनांना मुक्तीचा मार्ग दाखविला. या संबंधात धोंधल राजा, मधुकर ब्राह्मण, राणी इंदुमती, चंडविजय, सुदर्शन, इंद्रदमन, इ. व्यक्तीच्या कथा अनुरागसागर, सुखनिधान, निरंजनबोध इ. ग्रंथांत दिलेल्या असून प्रसंगवशात कबिराचे विविध उपदेशही त्या त्या ठिकाणी दिलेले आहेत.

कबीरपंथात कबीरमन्शूर या ग्रंथाला फार महत्त्व आहे. हा ग्रंथ आजमगढ येथील स्वामी परमानंदाने रचला. त्यात कबीरपंथाचे तत्त्वज्ञान पुढीलप्रमाणे विशद केलेले आहे–

जीव हा प्रथम हंसा या नावाने आपल्या सत्यस्वरूपात होता व त्याचा देह धैर्य दया, शील, विचार व सत्य या पक्क्या पाच तत्त्वांचा बनलेला होता. त्याचा प्रकाश व स्वभाव अलौकिक होता. पण असा सर्वगुणसपन्न दैवी देह प्राप्त होऊनही त्याच्या आनंदमग्नत्वामुळे हंसाला आत्मविस्मृती झाली व त्याचा परिणाम म्हणून त्याचा देह पक्क्या तत्त्वाचा होता तो कच्च्या तत्त्वांचा बनला. त्याचे धैर्य आकाशात, दया वायूत, शील अग्नीत, विचार जलात व सत्य पृथ्वीत परिणत झाले. या तत्त्वाबरोबरच प्रकृतीही पंचवीस तत्त्वांच्या रूपाने कच्च्या रूपात परिणत झाली. हंसा आनदविभोर होऊन शून्याकडे पाहत असता त्याची छाया स्त्रीरूपिणी बनून त्याच्याजवळ आली व त्या दोघांच्या सयोगातून पुढे विश्वसृष्टी निर्माण झाली. हा स्त्री-पुरुष-सयोग म्हणजे वास्तवात माया-ब्रह्माचाच संयोग होय.

अशा प्रकारे सूक्ष्मातून स्थूलात आलेल्या व भ्रमात पडलेल्या या हसाला पुनश्च त्याचे मूलरूप कसे प्राप्त व्हायचे ? त्यासाठी एकच उपाय असतो व तो म्हणजे स्वसवेद हा होय. स्वसवेदाच्या (स्वरूपाची जाणीव) साह्याने तो पुनश्च नानात्वातून एकत्वाकडे किंवा द्वैताकडून अद्वैताकडे वळतो. पण जोवर जीवाच्या ठिकाणी वासनेचा अकुर विद्यमान असतो, तोवर अद्वैताच्या मार्गाकडे वळूनही त्याला शीघ्र मुक्ती लाभत नाही त्याला वारवार जन्म–मरणाच्या चक्रात भ्रमावे लागते. वेदवेदान्तादी ग्रंथ केवळ ब्रह्मप्राप्तीचे उपाय सागून तिथेच थांबतात. त्याना ठाऊक नसते, की ब्राह्मी स्थिती ही सुद्धा जीवाला आत्यंतिक व शाश्वत सुख देण्याच्या कामी असमर्थ आहे. पारख झाल्याशिवाय किंवा सद्गुरूची साहाय्यता असल्याशिवाय जीवाला शाश्वत सुख मिळणे शक्य नाही. जीवाचा सारा भ्रम निरस्त करून त्याला सत्यस्वरूपाची अनुभूती करविणे व त्याची बुद्धी कायमची स्थिर करणे हे सामर्थ्य केवळ एका कबिराच्या ठिकाणीच आहे. या स्थितीला सत्यपद, परमपद किंवा पारखपद अशी नावे आहेत. ‘ तत्त्वमसि ’ इ. महावाक्यांच्या अनुभूतीने प्राप्त होणाऱ्या स्थितीहून ही स्थिती नितान्त भिन्न व उच्च आहे.

कबीरमन्शूर या ग्रंथाची रचना तत्पूर्वीच्या पंथीय साहित्याच्या आधारावर पण कल्पनेचा जास्तीत जास्त आश्रय घेऊन केलेली आहे. कबिराच्या मूळ सिद्धान्ताच्या विरुद्ध अशाही कित्येक गोष्टी त्या ग्रथात समाविष्ट झालेल्या आहेत. पण कबीरपंथाच्या साहित्यात असेही काही ग्रंथ आहेत, की जे बहुतांशी बीजकाचे भाष्य या स्वरूपात लिहिले गेले आहेत. या ग्रंथांनी उपनिषदे व वेदान्तग्रंथ यांतील विचाराशी कबिराच्या

विचारांचे सामंजस्य प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केलेला आहे. बीजक हा ग्रंथ कबिराच्या अस्सल रचनाचा संग्रह असो वा नसो; पण एवढी गोष्ट खरी, की कबिराचे मूल सिद्धान्त त्यात फार मोठ्या अंशाने संगृहीत झालेले आहेत.

कबीरपंथात मूर्तिपूजेला स्थान नाही. हिंदू व मुसलमान असे दोन्ही धर्मांचे लोक कबीरपथात आहेत. कबीरपंथी लोक पांढऱ्या रगाची उंच टोपी घालतात. कपाळावर गंधाचा त्रिपुड्र लावतात. गळ्यात १०८ तुळशीच्या मण्यांची माळ घालतात. कुराण किवा ग्रंथसाहेब यांच्याप्रमाणे कबीरपंथी लोक 'बीजक' या ग्रंथाची पूजा करतात. स्त्रियांनाही पंथात दाखल करून घेतात. पंथात येणाऱ्या बहुतेक स्त्रिया विधवा किंवा पंथ स्वीकारलेल्या पुरुषांच्या धर्मपत्नी असतात. कबीर जरी जातिभेदाविरुद्ध होता, तरी पंथाच्या लोकांना हीनवर्णाचे लोक पंथात येऊ नयेत, असेच वाटते. ब्राह्मण कबीरपंथात आला, तर तो तुळशीची माळ गळ्यात घालून शिवाय जानवेही घालतो.

पंथांच्या त्या त्या शाखेचे अधिकार चालविण्यासाठी महंत नेमलेले असतात हे महत कोणत्याही जातीतून आपले चेले निवडतात. चेला निवडण्याचा विधी पुढीलप्रमाणे असतो—

प्रथम चेल्याचे मुडण करवितात. त्या वेळी डोक्याच्या मध्यभागी केसांची एक बट शिल्लक राखतात, ती महंत स्वतः कापतो. चेला ब्राह्मण असला, तर महंत त्याचे यज्ञोपवीत काढून घेतो व त्या केसांच्या बटेसह ते जमिनीत पुरून टाकायला लावतो. नंतर होम करतात. महंत चेल्याला आपले वस्त्र देतो. मग भोजनसमारभ होतो. चेला बनल्यावर त्या पुरुषाला घरदार सोडून मठवास पत्करावा लागतो व गुरूची अखंड सेवा करावी लागते.

महंत मृत्यु पावल्यावर त्याचे शव चौथ्या दिवशी पुरतात. त्या वेळी जमलेल्या इतर महंतांना दूध व रोटी दिली जाते. मृत्यूपूर्वी महत बहुधा चेलेमंडळीतून एखादा लायक माणूस आपल्या मागे महतपदासाठी निवडतो व महंतमंडळीला भंडारा घालून ही निवड जाहीर करतो.

महंतांचे दोन वर्ग असतात. एक संन्यासी व दुसरा घरवासी. संन्यासी महतांना पर्वत अशी उपाधी असते. ते जगापासून अलिप्त असतात. घरवासी महंतांना गीर, अतिथी, पुरी किंवा भारथी म्हणतात. ते आपल्या मठात सहकुटुंब राहतात. घरवासीना संन्याशांपेक्षा खालच्या दर्जाचे मानतात. संन्यासी घरवाशांकडचे अन्न खात नाहीत. घरवासी मात्र संन्याशांचे उष्टे देखील खातात.

कबीरपंथात, विशेषतः त्याच्या धर्मदासी शाखेत जे कर्मकांड निर्माण झाले आहे, त्यात चौकाविधी व जोतप्रसाद या दोन विधीना विशेष महत्त्व आहे. चौकाविधी प्रत्येक रविवारी, ते न जमल्यास प्रत्येक पौर्णिमेस आणि तेही न जमल्यास भाद्रपद व फाल्गुन या महिन्याच्या पौर्णिमेस अवश्य केला जातो. त्या दिवशी पथाचे अनुयायी उपवास करतात. रात्र पडल्यावर पंथाच्या मठात किंवा मंदिरात एकत्र जमतात. या विधीसाठी समारभाच्या जागी $११\frac{३}{४} \times ७\frac{३}{४}$ फूट असा एक चौकोन शेणाने सारवून घेतात. या मोठ्या चौकात गव्हाच्या पिठाने दुसरा एक चार फुटी चौकोन तयार करतात. या आतल्या चौकाच्या मध्यभागी फुले ठेवतात. मग मदिराचा पुजारी किवा महंत मोठ्या चौकाच्या बाहेर मांडी घालून बसतो. त्याच्या उजव्या हातास दोन कलश ठेवलेले असतात. त्यांपैकी एकात १२५ विड्याची पाने व दुसऱ्यात महंताचे चरणतीर्थ असते. डाव्या हाताला एक मोठी घागर पाण्याने भरून ठेवतात. तिच्यावर एक नारळ असतो आणि शेजारी मिठाई असते. प्रारंभी महंत बीजकातील काही वचने म्हणतो. नंतर चौकाला तुपाचे दिवे ओवाळतात. मग ती आरती भक्तगणांमधून फिरवितात. तिला जोतप्रसाद असे म्हणतात. नतर नारळ फोडून त्याचे तुकडे, विड्याची पाने व आतल्या चौकातील पिठात तूप मिसळून त्याच्या केलेल्या गोळ्या, या सर्व वस्तू प्रसाद म्हणून भक्तमंडळीला वाटतात. प्रसाद वाटण्यापूर्वी त्यावर महंताचे चरणतीर्थ शिंपडतात. या प्रसादाला परवाना असे नाव आहे. परवाना ग्रहण केल्याने मुक्ती मिळते, अशी कबीरपंथीयांची श्रद्धा आहे. म्हणूनच परवान्याचा अंशही ते वाया जाऊ देत नाहीत. [ उ. भा. सं. प.; म. ज्ञा. को.; ट्रा. का. सें. प्रॉ. ]

**कबीरवट** गुजरातेत भरुच शहरापासून सुमारे बारा मैलांवर एक पुरातन वटवृक्ष आहे, त्यास कबीरवट असे म्हणतात. याची कथा अशी—

जीवा व तत्त्वा नावाचे दोघे बंधू भरुच शहरी राहत असत. त्यांना परमार्थसिद्धीसाठी गुरू करायचा होता. त्यांनी ठरविले, की ज्याच्या चरणतीर्थाने सुकलेल्या वटवृक्षाला पालवी फुटेल, त्याला गुरू करायचे. ती गोष्ट कबिराच्या चरणतीर्थाने घडून आली. म्हणून या वृक्षाला कबीरवट असे नाव मिळाले. दुसरी आख्यायिका अशी—

कबिराने दात घासताना चावून टाकलेल्या एका फांदीपासून हा वृक्ष निर्माण झाला. कसेही असो; हा वृक्ष पुरातन व अतिविस्तीर्ण आहे, यात शंका नाही. नर्मदेच्या पुरांनी याच्या विस्ताराचा बराच भाग वाहून नेला आहे. फोर्ब्स म्हणतो, की हा वृक्ष तीन-चार एकर जागा व्यापून राहिलेला असून तो डोंगरासारखा उंच दिसे. सात हजारांच्यावर माणसे याच्या

खाली बसू शकत. इ. स. १८१९ नंतर या वृक्षाची फारच दुर्दशा झाली. मधले खोड तर जवळजवळ नाहीसेच झाले. कबिराच्या मंदिरावरून आता त्या खोडाची खूण पटवावी लागते. याच्याजवळ शुक्लतीर्थ आहे. भाविक लोक या वडाच्या दर्शनासाठी जातात. मार्गशीर्ष महिन्यात कबीरवटाची यात्रा भरते.

**कबीर सय्यद अहमद** चळपतदार नामक मुसलमान भिकाऱ्यांच्या एका पंथाचा संस्थापक. हा एक साधुपुरुष होता. त्याला दैवी सामर्थ्य प्राप्त झाले होते, अशी समजूत आहे. त्याला अग्नीची बाधा होत नसे. तो कोणत्याही संकटापासून किंवा रोगापासून माणसाला मुक्त करी. तसेच इतर लोकांसाठी तो प्रार्थना करी व त्या प्रार्थनेचा लोकांना खूप फायदा होई, असेही सांगतात. याचे चाळीस शिष्य होते. याच्या मृत्यूनंतर प्रत्येक शिष्याने आपले चाळीस शिष्य तयार केले. त्यामुळे या पंथाचा खूप प्रसार झाला. **पाहा**-चळपतदार. [ मु. इं. जा. ]

**कबीरा** उ. प्रदेश, राजस्थान, मध्यप्रदेश व बिहार या प्रदेशांत अशी काही गीते आढळतात, की ज्यांची शेवटची पंक्ती ‘ कहे कबीर सुनो भई साधो ’ अशी असते. या गीतांना कबीरा असे नाव आहे. कबीरा ही कबिराची रचना नाही; तर त्याच्या भावधारेने प्रभावित झालेली ती लोकगीते आहेत. त्यामुळे या गीतांवर कबिराच्या श्रद्धेची छाप पडली आहे. या गीताचा ग्रामीण समाजात पुष्कळ प्रचार असून त्याचे गायक एकतारीच्या सुरावर रात्ररात्र ही गीते गात असतात. [ हिं. सा. को. ]

**कबुइ** ही एक मणिपूरमधील भ्रमणशील जमात आहे. या जमातीतले लोक सदैव शिकारीच्या नादात असतात. त्यांचे एक विशिष्ट नृत्य आहे, त्याला कबुइनृत्य म्हणतात. हे तरुण-तरुणीचे संमीलित नृत्य असते. त्यातूनही शिकारीचा आनंदोल्लास अभिव्यक्त केला जातो. त्याची कथाही मृगया-विषयकच असते. घंटा, बासरी व हाओपुग नावाचा नगारा ही या नृत्याची प्रमुख वाद्ये होत. नगाऱ्याची मंद व द्रुत लय त्या नृत्यात गांभीर्य आणि वीररस निर्माण करते. नृत्याचा नायक पुरुष असतो. त्याच्या हातात भाला व ढाल ही आयुधे असतात. पोषाख रंगीबेरंगी व पक्ष्यांच्या पिसांनी मंडित असतो. ढालीवर रौद्र आकृती काढलेल्या असतात. त्या नृत्यातला तरुणींचा पोषाखही आकर्षक असतो. [ भा. लो. नृ. ]

**कबूतर** (सं. कपोत) याचा उल्लेख ऋग्वेदापासून मिळतो. ऋग्वेदकाळी या पक्ष्याला यमदूत अतएव अशुभ समजत होते. पुढील मंत्रात त्याच्या अशुभत्वाची भावना आणि भीतीही स्पष्ट झालेली आहे –

**देवा. कपोत इषितो यदिच्छन्**
**दूतो निर्ऋत्या इदमाजगाम ।**
**तस्मा अर्चाम कृणवाम निष्कृतिं**
**शं नो अस्तु द्विपदे शं चतुष्पदे ।।**

(ऋ. १०.१६५.१)

अर्थ–देवहो, जो (हा) कपोत पक्षी आमच्या घराकडे (कोणीतरी) धाडून दिला आहे, त्यात काहीतरी हेतू आहे. तो अवनतीचा दूत म्हणून इकडे आला आहे. त्याला अनुलक्षून आम्ही (देवांचे) स्तोत्र म्हणू आणि त्याच्या अमंगलत्वाचे निराकरण करू. आमच्या लोकांचे आणि पशवादिकाचे कल्याण होवो.

कपोताच्या अशुभत्वाची ही कल्पना पुराणानीही स्वीकारलेली आहे (मत्स्य पु ६·३२). जगातल्या भिन्न भिन्न धर्मांच्या पौराणिक कथात कबूतरविषयक कथा आढळतात. मुहंमद पैगंबराला ईश्वराचा संदेश कबूतराच्या द्वारेच येत होता. हे कबूतर दाणे टिपता टिपता तो संदेश पैगंबराच्या कानांत सागत असे असे सागतात. ग्रीक कथांत कबूतर हा सौंदर्यदेवतेचा प्रिय पक्षी मानलेला आहे. शिबी राजाने एका कबूतराच्या प्राणरक्षणासाठी त्याच्या वजनाइतके स्वतःचे मांस ससाण्याला दिले, अशी कथा भारतीय पुराणात आहे.



कबूतर

संदेशवाहक या रूपात कबूतराचा उपयोग इतिहासकाळापासून करून घेतलेला दिसतो. ख्रिस्ती लोकाच्या धर्मयुद्धात कबूतरांच्या द्वारे संदेश पाठविले जात होते. भारत आणि इराण या देशातही कबूतराचा संदेशवाहक म्हणून उपयोग करीत. असे सांगतात, की सम्राट अकबराजवळ २० हजार संदेशवाहक कबूतरे होती. भारतीय इतिहासात कबूतरविषयक एक मनोरंजक घटना आढळते ती अशी–

बंगालचा बल्लाळसेन नावाचा राजा (१२ व्या शतकाचा उत्तरार्ध) युद्धाला निघाला असता, त्याने एक कबूतर बरोबर घेतले होते. तो आपल्या राणीला म्हणाला होता, की ' हे कबूतर एकटेच राजवाड्यात परत आले, तर मी युद्धात कामी आलो, असे तू समज. ' दैववशात ते कबूतर युद्धभूमीवरून एकटेच निसटले व राजमहालात येऊन दाखल झाले. त्याला पाहून राणी समजली, की आपला पती धारातीर्थी पडला. म्हणून तिने सती जाण्याची तयारी केली. ती भडकत्या चितेत प्रवेश करणार, एवढ्यात राजा दौडत परत आला आणि म्हणूनच केवळ त्या राणीचे प्राण वाचले.

कबूतराचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे पश्चिमेच्या लोकांनी त्याला शांतीचे प्रतीक मानले आहे. जगात शांतीची प्रतिष्ठापना व्हावी, या हेतूने विशिष्ट प्रसंगी एखाद्या मोठ्या व्यक्तीकडून पांढरे कबूतर आकाशात उडवायचे, असा प्रघात पडलेला आहे. डेविड लो, विकी, पिकासो, इ. पाश्चात्य चित्रकारांनी शांतीचे प्रतीक म्हणूनच कबूतराचे चित्रण केले आहे.

भारतीय स्थापत्यातही कबूतराला स्थान मिळाले आहे. प्राचीन इमारतीच्या माथ्यावर जो एक कंगोरा पुढे आलेला असतो, त्यात कबूतराच्या आकृती बसविलेल्या असतात. या आकृतींना कपोतपालिका असे नाव आहे.


कपोतपालिका

या कबूतराच्या चोचीतून छपरावरचे पाणी वाहून जाण्याची व्यवस्था केलेली असते. [ वे. इं.; एन्सा. हिं. आ.; नवनीत जून १९५४ ]

## कब्बलिगर

कर्नाटकातील एक जात. या लोकांना अंबी, अंबिग, अंबेकर, बारकर, बारेकरी, कब्बेरु, कब्बेर, कभेर, जाड, सनगर, सुन्नुकल्लु व बेष्टा अशी अन्य नावे आहेत. यांच्यांत पुष्कळ पोटभेद आहेत. हे लोक दक्षिणेतून वर आले असावे. मच्छिमारी, होड्या चालविणे, पालख्या वाहणे व शेती करणे हे यांचे पिढीजात धंदे आहेत.

यांच्या दोन शाखा आहेत. गौरीचे पुत्र मानले जातात ते गौरीमक्कलु व गंगेचे पुत्र मानले जातात, ते गंगीमक्कलु. यांच्यांत परस्पर अन्नोदकव्यवहार होतो; पण लग्नसंबध होत नाही. यांच्यात वहिणीच्या, आतेच्या व मावशीच्या मुलीशी लग्न होते. कन्यामूल्य घेतात. लग्नाच्या वेळी धारे व हालबंग हे विधी करतात. लग्नविधीसाठी ब्राह्मण पुरोहिताला बोलावितात. विधवांचे विवाह रात्री एखाद्या मंदिरात लावतात. त्या समारंभात विवाहित स्त्री-पुरुषाना मज्जाव असतो.

यांची पंचायत आहे. तिच्या प्रमुखाला कट्टेमणि अवरु म्हणतात. जातीचे न्यायनिवाडे तोच करतो. अपराध्याला क्षौर करून तीर्थ घेण्याची शिक्षा दिली जाते.

हे लोक वैष्णव आहेत. ते भरमप्पा, कोपली परमानंद, मैलारलिंग, वीरभद्र, द्यामव्वा, दुर्गव्वा, हलगव्वा, इ. ग्रामदेवतानाही भजतात. पूर्वी याच्यातल्या काही मुली हुलगम्म या देवीला बसवी म्हणून अर्पण केल्या जात. हे लोक भाद्रपद पौर्णिमेला पर्जन्यदेवतेसाठी मोठा उत्सव करतात. त्यावेळी जोकुमर नावाच्या देवतेची मृण्मय प्रतिमा करून तिची पूजा करतात व सार्वजनिक भोजन घालतात. यांची बारिका नावाची एक पोटजात असून त्या जातीतील स्त्रिया गावात हिंडून जोगवा मागतात.

**मर्तिकप्रथा** – अंत्यविधी जंगम किंवा जातीतील जाणता चालवितो. मृत्यूनंतर विषम महिन्यात मृत पुरुषासाठी एक मुखवटा बनवून व स्त्री असेल तर तिच्यासाठी शंखाकृती भांडे बनवून घरात ठेवतात. अविवाहित मृताला पुरतात. विवाहित मृताला जाळतात. पितराप्रीत्यर्थ ज्ञातिभोजन घालतात. महालय करतात. [ का. ट्रा. स. इ.; मुं. इ. जा. ]

## कब्र

मुसलमानी थडगे. मुसलमान लोक प्रेत पुरण्यासाठी जमिनीत ४ फूट खोल खड्डा खणतात व त्याच्या तळाशी एका बाजूला आणखी एक खोबण (लहद) खोदून तिच्यात


कब्र

मृताचे तोंड मक्केकडे येईल, अशा तऱ्हेने प्रेत ठेवतात. त्यामुळे भारतात हा खड्डा नेहमी दक्षिणोत्तर खोदला जातो. प्रेत ठेवल्या-

वर ती लहद कच्च्या विटांनी बंद करतात व सर्व खड्डा मातीने भरून टाकतात. नंतर त्यावर एक लहानसा उचवटा करतात. मृत शरीरालाही दुःखाची जाणीव असते, असे मानून त्यावर दाव न येईल अशा पद्धतीने लहदची रचना करतात. मुहंमद पैगंबराने कबरीवर पक्के बांधकाम करण्याची व आलेख कोरण्याची मनाई केली आहे (मिश्कात ५. ९. ६); परतु वहाबी पंथाच्या मुसलमानांशिवाय इतर सर्व मुसलमानांनी या आदेशाकडे दुर्लक्ष केले आहे. ताजमहालसारखी काही अप्रतिम शिल्पे कबरीवरच बांधण्यात आलेली आहेत. [ डि. इ. ]

**कमच** दक्षिणेतील एक तंतुवाद्य. याला दोन मुख्य तारा व नऊ साहाय्यक तारा असतात. हे सारंगीप्रमाणे गजाने वाजवितात. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**कमंडलू** कलशाच्या आकाराचे, पण तोटी असलेले किंवा नसलेले पितळेचे, मातीचे किंवा लाकडाचे भांडे. हा कमंडलू हातात वागविण्यासाठी त्याला तोंडावर अर्धगोल अशी कडीही असते. ऋषिमुनींच्या हाती कमंडलू दाखवितात. वामनाच्या हातीचा कमंडलू त्याला वसिष्ठाने दिला होता (मत्स्य पु. २४४. ८४). ब्रह्मदेवाच्या कमंडलूतूनच गंगा उगम पावली आहे (भाग. पु. ८. २१. ४). शिवाच्या व दत्ताच्याही हातात कमंडलू असतो. ब्रह्मचाऱ्याच्या साधनवस्तूत कमंडलूचा समावेश आहे. तांब्या, पंचपात्री व पळी या तिन्ही पात्रांची गरज एकटा कमंडलू भागवितो.





कमंडलू–(१) यज्ञीय (२) साधूंचा

**कमरया** राजस्थानातील एक जात. हे लोक मेघवाळ व भांबी या जातीचे खुषमस्करे आहेत. वास्तवात ही भांबीचीच एक शाखा आहे. भांबींच्या घरी यांचे अन्नोदकव्यवहार होतात; पण विवाह मात्र होत नाहीत. हे लोक चिकारा नावाचे वाद्य वाजवून गाणी गातात. गुर्रा लोक त्यांच्या घरी पौरोहित्य करतात. यांच्या स्त्रिया तेरहताली नृत्याबद्दल प्रसिद्ध आहेत. त्या पायांत चांदीचे अलंकार घालतात. हे लोक मृतांना पुरतात. [ रा. जा. ]

**कमल** एक जलपुष्प. याला पद्म, नलिन, सारस, पुष्कर, तामरस, अरविंद, शतपत्र, राजीव, इ. अनेक नावे आहेत. प्राचीन काळापासून कमल हे भारतीयांचे सर्वात आवडते पुष्प आहे. ऋग्वेदात पुंडरीक (श्वेतकमल) व पुष्कर (नीलकमल) अशा कमलाच्या दोन जातींचा उल्लेख आढळतो. शार्ङ्गऋषी अग्नीला उद्देशून म्हणतो–

> **आयने ते परायणे दूर्वा रोहन्तु पुष्पिणीः।**
> **ह्रदाश्च पुण्डरीकाणि समुद्रस्य गृहा इमे ।।**
> (ऋ. १०. १४२. ८.)

अर्थ–(हे अग्ने,) तू जिकडून आलास तिथे आणि जिकडे जाणार आहेस, तिथे भूमी फुललेल्या दूर्वांनी आच्छादित होवो. जिकडे तिकडे सरोवरे आणि त्यात कमळे (पुंडरीक) प्रफुल्लित असोत. खरोखर समुद्राची मंदिरे (म्हणतात) ती हीच!

अथर्ववेदात मनुष्याच्या हृदयाला पुंडरीक म्हटले आहे (१०. ८. ४३). तारकांच्या तेजापासून कमलांची उत्पत्ती होते, असे पंचविंश ब्राह्मणात सांगितले आहे (१८. ९. ६). अश्विनौ देवांच्या गळ्यात निळ्या कमलांचा हार असे (ऋ. १०. १८४. २). पुष्कर नावाचे कमलाच्या आकाराचे एक यज्ञीय पात्रही आहे.



कमल

ब्राह्मणग्रंथांत कमलाचा संबंध विश्वोत्पत्तीशी दाखविलेला आहे. तै. ब्राह्मणात याविषयी पुढील कथा आहे–

हे विश्व प्रथम द्रवावस्थेत होते. त्याचा विकास करण्याच्या इच्छेने प्रजापती जेव्हा इकडेतिकडे पाहू लागला, तेव्हा जल-पृष्ठावर त्याला एक पुष्करपर्ण (कमलपत्र) दिसले. त्या पर्णाला काही तरी खाली आधार असला पाहिजे, असे वाटून प्रजा-पतीने वराहरूप घेऊन जलात बुडी मारली. त्याच्या तळाशी त्याला पृथ्वी आढळली. तिचा एक तुकडा त्याने वर आणला व त्या पुष्करपर्णावर पसरून दिला (१. १. ३. ५).

तै. आरण्यकात प्रजापतीचा जन्म पुष्करपर्णावर झाला असल्याचे सांगितले आहे (१. २३. १). प्रलयजलात बाल-रूपाने वटपत्रावर शयन करीत असलेल्या विष्णूच्या नाभीतून एक कमल निर्माण झाले व त्या कमलातून ब्रह्मदेवाचा जन्म झाला, असे महाभारत व पुराणे यांत सांगितले आहे. ब्रह्म-देवाप्रमाणे लक्ष्मीही कमलजा आहे. मिसर देशातही एक प्राचीन कमलासना देवता आढळते. ती बहुधा आपल्या कमलजा लक्ष्मीचीच भगिनी असावी. मोहेंजोदडोच्या उत्खननात एक स्त्रीमूर्ती सापडली आहे. तिला धरित्रीचे प्रतीक मानतात. तिच्या केशकलापात जे एकच एक फूल आहे, ते कमल होय. वायुपुराणात पृथ्वीचा आकार कमळासारखा असल्याचे सागितले आहे. राजाच्या बाहूवर जर कमलाचे चिन्ह असले, तर तो चक्रवर्ती होतो, असे सामुद्रिकशास्त्र सांगते.

विधात्याप्रमाणेच बुद्धाचे आसनही कमल हेच कल्पिलेले आहे. तो विकसित कमलावर बसतो व खालच्या कमलावर आपला पाय टेकवितो. बुद्ध चालू लागला, की त्याच्या पावला-गणिक कमले उमलत, अशी बौद्धांची श्रद्धा आहे. बौद्धांच्या दहा पारमितांपैकी प्रज्ञापारमिता ही जणू बुद्धाची सहचारिणीच मानलेली आहे. लक्ष्मीच्या हातात कमल असते, त्याप्रमाणे प्रज्ञापारिमितेच्या हातातही कमलच असते. श्रीविष्णू हा आपल्या हातात लीलाकमल धारण करतो, त्याप्रमाणेच बौद्धांचा सर्वश्रेष्ठ बोधिसत्व अवलो-कितेश्वर हाही पद्मपाणीच आहे. 'ॐमणिपद्मे हुं' हा मंत्र त्याचाच आहे आणि त्यातही मणिकमलाचाच उच्चार आहे.



कमलवनातील लक्ष्मी

महायानी बौद्धांनी सुखावती नामक एक स्वर्ग कल्पिला आहे. त्या ठिकाणी प्रत्येक आत्मा पद्मातूनच खुलतो आणि पद्म-वनातच विहरतो. लामा धर्माचा संस्थापक पद्माकर याचेही कमल हेच चिह्न आहे.

जैनानीही कमलाचा आदर केला आहे. त्यांच्या शिल्पकलेत कमल सर्वत्र आढळते.

इस्लामच्या स्वर्गातही ७ व्या अस्मानात अल्लाचे सिंहासन मांडलेले असून त्याच्या उजव्या अंगाला एक कमलपुष्प प्रफु-ल्लित असल्याचे सांगितले आहे.

बौद्ध शिल्पात राजगृह, कान्हेरी, वेरूळ इ. ठिकाणच्या लेण्यांतून कमल हे प्रतीक, शोभा आणि आधार या तिन्ही दृष्टींनी खोदलेले आहे. पश्चिम भारतातील बौद्ध लेण्यांत कमल हे गोल नक्षीकरिता योजिलेले आढळते. भितीवरील नक्षीकाम असो किंवा स्तंभाचा माथा असो, तिथे कमलाकृती कोरलेली दिसतेच. कमलातून वर आलेली व कमल धारण करणारी लक्ष्मी हे चित्र पुरातन असून अनेक बौद्ध लेण्यात ते आढळते. बुद्धाचेच नव्हे; तर अनेक पौराणिक देवताचे आसनही कमला-कृती बनविलेले असते. वेरूळच्या लेण्यांत बुद्ध एका विशाल कमलावर पाय ठेवून बसला आहे आणि त्याच कमलाच्या छत्रछायेत बसून काही भक्त त्याची प्रार्थना करीत आहेत, असे सुंदर खोदकाम दिसते. मुसलमानी शिल्पातही कमलाने प्रवेश मिळविलेला आहे. ताजमहालाच्या घुमटाच्या मुळाशी कमलाच्या पाकळचा असून शिखरामध्ये पालथे कमल आहे.



कमलप्रतीकमूर्ती– या मूर्तीत सर्वांगी कमल वापरले आहे

या पालथ्या कम-लातही गर्भितार्थ आहे. अनेक मंदिरां-च्या अलंकरणात पालथे कमल दिसून येते आणि त्याचा अर्थ योगशास्त्रात त्या संकेतांनी उलगडतो. मानवमात्राच्या शरीरात मूलाधार,

स्वाधिष्ठान, इ. षट्चक्रे असून ती कमलाकारच आहेत. प्रत्येक चक्राची देवता भिन्न आहे. ही देवता जोवर सुप्त असते, तोवर ते चक्र मान टाकून पालथे असते आणि ती देवता जागृत झाली, की मग ते उभे व उताणे होते.

एकंदर विचार केल्याअंती भारतीय संस्कृतीचा गेल्या ५ हजार वर्षांचा इतिहास या कमलप्रतीकाने प्रफुल्ल झालेला आहे. कमलाची लोकप्रियता सार्वभौम आहे. विष्णू आणि लक्ष्मी या दोन विश्वाधार देवतांनी आदरिल्यामुळे ते सनाथ आणि सगर्व झाले आहे. पद्मपुराण हे वैष्णव पुराण असून त्यात कमलाचे माहात्म्य पुढील कथेच्या द्वारे सांगितले आहे –

दंडपाणी नावाचा एक भिल्ल होता. तो चोऱ्यामाऱ्या करून कुटुंबपोषण करी. एके दिवशी एक ब्राह्मण विष्णुपूजा करीत असता त्याने दंडपाणीजवळ एक कमल मागितले. दंडपाणीने ते दिले. त्या पुण्याने त्याला स्वर्ग मिळाला व पुढच्या जन्मी तो वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मण झाला (क्रियाखंड १३).

कमलाचे दान केल्याने पुढील जन्म वैभवशाली मिळतो. कमलपुष्प अंगावर धारण करणे मंगलदायक होते. कमलांची अर्थात अष्टदलपद्मांची रांगोळी काढल्याने घरात लक्ष्मी येते. कमलाच्या पाकळ्या सेवन केल्याने अवयव सुंदर व सतेज होतात. हे सर्व कमलविषयक संकेत होत.

वरील कथा, संकेत आणि विधाने याचे विश्लेषण केल्यास कमल हे पिंडब्रह्मांडात पुढील तत्त्वाचे प्रतीक आहे, हे कळून येते ––

(१) स्त्रीतत्त्व व जीवोत्पादन (२) भूमी, योनी, चिच्छक्ती (३) शोभा, वैभव, आरोग्य, कीर्ती (४) शाश्वत जीवन, अमृत (५) शुचित्व आणि शुद्ध ज्ञान. [सं. प्र.; भा. प्र. वि.; म. ज्ञा. को.; एन्सा. रि. ए.]

**कमलपा** (इ. स. १० वे शतक) वज्रयानी सिद्धांपैकी एक. याच्याविषयी निश्चित माहिती मिळत नाही. डॉ. हजारीप्रसाद यांच्या मते हा बंगालमध्ये शूद्र कुलात उत्पन्न झाला असावा. [ना. स.]

**कमलभव** (इ. स. १२३५ चा सुमार) एक कन्नड कवी हा जैन होता. याने १४ व्या तीर्थकरावर शांतीश्वर पुराण नावाचा ग्रंथ लिहिला आहे [क. क. च.]

**कमलयंत्र** स्त्रियांना अखंड सौभाग्याची प्राप्ती, वंध्येला गर्भधारणा व मृतवत्सेला पुत्रलाभ या उद्देशासाठी कमल नामक यंत्र धारण करावे, असे सांगितले आहे. भूर्जपत्रावर गोरोचन व केशर याच्या मिश्रणाने हे यंत्र लिहितात. त्याची तीन दिवस पूजा करतात. एका दांपत्याला भोजन




कमलयंत्र

घालतात. नंतर त्या यंत्राला तंतूने वेष्टून त्रिलोहाच्या (सोने, रुपे व तांबे) एका पोकळ मण्यात ते भरतात व तो मणी हारात गुंफून गळ्यात धारण करतात. [यं. चि.]

**कमलशील** (इ. स. ७५० चा सुमार) हा शांतरक्षिताचा शिष्य असून बौद्ध न्यायाचा पंडित होता. हा प्रथम नालंदा येथे तंत्रशास्त्राचा अध्यापक म्हणून राहिला होता. पण पुढे तिबेटच्या राजाच्या बोलावण्यावरून तो तिकडे गेला. तिथे त्याने चिनी धर्मोपदेशक महायान होशग याला वादात जिंकून तिथून हाकलून दिले. याने पुढील ग्रंथ लिहिले आहेत––

(१) न्यायबिंदुपूर्वपक्ष– या ग्रंथात धर्मकीर्तीच्या न्यायबिंदूवर लिहिलेल्या टीकाचा सारांश आहे. हा मूळ संस्कृत ग्रंथ उपलब्ध नसून त्याचे तिबेटी भाषांतर मात्र सापडते.

(२) तत्त्वसंग्रहपंजिका– ही शांतरक्षिताच्या तत्त्वसंग्रहावरील टीका आहे. हिचीही मूळ संस्कृत प्रत मिळत नाही; तिबेटी भाषांतर तेवढे उपलब्ध आहे. [म. च. को ; हि. इं. लॉ.]

**कमलषष्ठी** मार्ग. शु. षष्ठीचे नाव. या तिथीस कमलदानाचे व्रत करतात. ब्रह्मा ही याची देवता आहे. व्रतावधी एक वर्ष. व्रताचा विधी असा––

पंचमीस प्रारंभिक नियम. षष्ठीस उपवास व सुवर्णकमल आणि साखरेचे कमल याचे दान. ७ मीस ब्राह्मणाला खिरीचे भोजन. [हि. ध.]

**कमलसप्तमी** चैत्र शु ७ मीचे नाव. या दिवशी सूर्याचे व्रत करतात. व्रतावधी एक वर्ष. सूर्य ही व्रताची देवता. तिलपात्रात कमलावर सूर्याची स्थापना व पूजा करणे आणि सुवर्णकमलाचे दान करणे, असा या व्रताचा विधी आहे. [ मत्स्य पु. ७८३ ]

**कमला** लक्ष्मीचे नामान्तर. ही एक महाविद्याही आहे. तिला लक्ष्मीविद्या असे म्हणतात. कमलेचे सुप्रसिद्ध ध्यान पुढीलप्रमाणे आहे--

**कान्त्या काञ्चनसन्निभां हिमगिरिप्रख्यैश्चतुर्भिर्गजैः ।**
**हस्तोत्क्षिप्तहिरण्मयामृतघटैरासिच्यमानां श्रियम् ।।**
**बिभ्राणां वरमब्जयुग्ममभयं हस्तैः किरीटोज्ज्वलाम् ।**
**क्षौमाबद्धनितम्बबिम्बललितां वन्देऽरविन्दस्थिताम् ।।**

अर्थ– जिची कांती सुवर्णसदृश आहे, हिमालयासारखे चार हत्ती आपल्या सोंडांमध्ये सोन्याचे अमृतघट घेऊन जिच्यावर अभिषेक करतात, जिच्या दोन हातात कमल असून दोन हात अभयवरदमुद्रेत आहेत, जिचा मुकुट झगमग करीत आहे, जिने आपल्या कटीला क्षोमवस्त्र बांधले आहे आणि जी कमलावर स्थित आहे, अशा कमलेला मी वंदन करितो.

'श्री' या एकाक्षरी बीजाने कमलेची उपासना करतात.

**कमला एकादशी** अधिकमासातल्या कृष्ण ११ शीचे नाव. हिचे व्रत केल्याने जन्म-मरणाचा फेरा चुकतो. हिचे माहात्म्य लक्ष्मीने जयशर्मा नामक ब्राह्मणास सागितले. [ पद्मपु. उ. खं. ६२ ]

**कमलाकरभट्ट** (१) (इ. स. १६ व्या शतकाचा उत्तरार्ध) एक धर्मशास्त्री ग्रंथलेखक. हा सुप्रसिद्ध नारायणभट्ट याचा नातू व रामकृष्णभट्टाचा पुत्र होय. याचे पाडित्य अगाध होते. याने न्याय, व्याकरण, मीमांसा, वेदान्त, काव्य, धर्मशास्त्र आणि वैदिक यज्ञ या विषयांवर बाव्वीसाहून अधिक ग्रंथ लिहिले आहेत. त्यापैकी निम्म्याहून अधिक ग्रंथ धर्मशास्त्रावरचे आहेत. त्याच्या सर्व ग्रथांत शूद्रकमलाकर, विवादतांडव आणि निर्णयसिधू हे तीन ग्रंथ अत्यंत प्रसिद्ध आहेत.

**शूद्रकमलाकर**– याला शूद्रधर्मतत्त्व किंवा शूद्रधर्मतत्त्वप्रकाश अशीही नावे आहेत. शूद्राची धार्मिक कर्तव्य आणि कृत्ये याबाबतीत हा ग्रथ प्रमाण मानतात. या ग्रंथात त्याने सुमारे २०० ग्रंथातले उतारे घेतले आहेत. यातले विषय पुढीलप्रमाणे–

विष्णू व इतर देवता याची शूद्रांनी करायची पूजा, व्रते व उपवास, शूद्रांनी करायचे सार्वजनिक उपयोगाच्या कामाचे दान (पूर्तकर्म), शूद्राचे दत्तविधान, शूद्रांचा संस्काराधिकार, शूद्रकर्तृक श्राद्धे, वर्ज्यावर्ज्यकर्मे, नित्यकर्तव्ये, आशौचे, उत्तरक्रिया, स्त्रियांची आणि विधवांची कर्तव्ये, प्रतिलोम संततीसाठी नियम, इत्यादी.

**विवादतांडव**– या ग्रंथाचे नीलकंठाच्या व्यवहारमयूखाशी बरेच साम्य आहे. दिव्याविषयीचा भाग तर दोहोंमध्ये बहुतेक सारखाच आहे. यात पुढील विषय आले आहेत–

सभा, सभासद, न्यायाधीश, अमात्य, लेखक, हिशेबनीस, दावा–अर्ज, पुराव्याचे प्रकार, साक्षीदार, कब्जा, शिक्षेचे प्रकार, मुख्य व गौण पुत्र, वडिलार्जित संपत्तीचे वाटप, इत्यादी.

**निर्णयसिंधू**– हा ग्रंथ म्हणजे त्याच्या पांडित्याचे व परिश्रमाचे हे एक स्मारकच आहे. हा ग्रंथ न्यायालयामध्ये प्रमाण मानतात. या ग्रंथात सुमारे १०० स्मृती व ३०० हून अधिक निबंधकार याची नावे देऊन त्यांचे उतारेही दिले आहेत. ग्रंथाचे तीन परिच्छेद आहेत. यात पुढील विषय आहेत–

धार्मिक कृत्यांविषयी कालनिर्णय, चाद्र–सौर वर्षे, संक्रांतीची धार्मिक कृत्ये, अधिक व क्षयमास, शुद्धा व विद्धा तिथी, वर्षातील विविध व्रते व सण, गर्भाधानादी संस्कार, सापिंडय, श्राद्ध, आशौचे, उत्तरक्रिया, सहगमनविधी, संन्यास, मूर्तिप्रतिष्ठा, विविध कार्यासाठी शुभमुहूर्त, इत्यादी.

याशिवाय कमलाकरभट्टाने पुढील ग्रंथ लिहिले आहेत – दानकमलाकर, शातिरत्न, पूर्तकमलाकर, व्रतकमलाकर, प्रायश्चित्तरत्न, बह्वृचाह्निक, गोत्रप्रवरदर्पण, कर्मविपाकरत्न, सर्वतीर्थविधी, सस्कारप्रयोगकमलाकर, तत्त्वकमलाकर इत्यादी. [ हि. ध,; आ. सं. मू. ]

(२) मध्वसंप्रदायाचा अनुयायी व प्रख्यात दार्शनिक आचार्य. याची प्रतिभा असामान्य असल्यामुळे याला द्वितीय मध्वाचार्य असे म्हणत. हा श्रीविष्णूच्या सर्व अवतारांना पूर्णावतार मानी. याने तप्तमुद्रा धारण केल्या होत्या.

**कमलाकांत दास** बंगालमधील एक वैष्णव कवी. याचा पदरत्नाकर नामक संग्रह प्रसिद्ध आहे. यात ४३ तरग आहेत. [ हिं. बं. वै. क. ]

**कमलाक्षी** एक तात्रिक देवता. हिचे मूर्तिध्यान पुढील प्रमाणे– त्रिलोचना, शशिकलाधारिणी, उजव्या हाती कमळ व डाव्या हाती रुद्राक्षमाला धारण करणारी. आकर्षणप्रयोगासाठी हिची पूजा करतात. [ श्रीविद्यार्णवतंत्र ]

**कमान** तोरण. कमानीत दगडाची किंवा विटाची अर्धगोल पद्धतीने अशी रचना केलेली असते, की ते दगड परस्परांचे वजन तोलून धरतात. कमानीचे विविध आकार असतात व त्यानुसार त्यांना नालाकृती, मल्लाकृती, समत्रि-कोणात्मक, त्रिकेंद्रक, चतु:केंद्रक, ओजी ( कळसपान ), रोमन, सॅरेसेनिक अशी नावे आहेत.




दोन भिंतीमधील मोकळ्या जागेवर बांधकाम करण्याची प्राचीन पद्धत म्हणजे दोन्ही बाजूंनी विटा थोड्या थोड्या पुढे आणून शेवटी त्या जुळविणे ही होय. अशा प्रकारचे बांधकाम सिंधुसंस्कृतीच्या अवशेषात आढळते. यातूनच पुढे कमानीचा

उगम झाला असावा. परंतु भारतीय शिल्पकारांच्या अशा बाधकामाच्या मजबुतीवर विश्वास नसल्यामुळे प्राचीन वास्तुशिल्पात कमानीचा उपयोग फारसा केलेला आढळत नाही. भिटगाव येथील एक मंदिर, मिरपूरखास येथील स्तूप, बुद्धगया येथील मंदिर इ. क्वचित ठिकाणी कमानीचे प्रयोग केलेले आहेत तेवढेच.

उंच व चिंचोळ्या कमानीची नक्षी शोभिवत व आकर्षक असली तरी आधाराच्या दृष्टीने उपयुक्त नसते. दोन्ही बाजूच्या आधारस्तंभांमध्ये अधिक अंतर असल्यास गोथिक किंवा टयूडर कमानीचा उपयोग सर्वत्र केला जातो. मुसलमानांच्या आगमनानंतर जे शिल्पकाम हिंदुस्थानात झाले त्यात कमानीची रचना केलेली आहे. पण १४ व्या शतकातील मुसलमानी शिल्पात कमानीच्या जोडीला एक भालही वापरलेले दिसते; कारण त्या वेळच्या शिल्पकारांना कमानीच्या मजबुतीविषयी खात्री वाटत नव्हती. हिंदू शिल्पातील गणेशपट्टीवरून ही कल्पना त्यांना सुचलेली होती. पण शास्त्रीय दृष्टीने ही योजना बरोबर नाही. व १५ व्या–१६ व्या शतकातील मशिदींच्या शिल्पात ती आढळतही नाही तिथे गोथिक (चतुःकेंद्रक) कमानीचाच उपयोग केलेला आहे. मध्ययुगीन कमानीचे प्रकार चित्रात दाखविले आहेत, त्याची नावे पुढीलप्रमाणे––

(१) नैसर्गिक कमान, (२) भिंतीतून पुढे आलेली कमान, (३) सारनाथ येथील धमेख स्तूपातील कोनाडा (७ वे शतक), (४) दिल्लीच्या कुत्ब मशिदीतली एक कमान ( इ. स. १२००), (५) अलाई दरवाजा, कुत्ब, दिल्ली (१४ वे शतक), (६) अजमीर येथील एका मशिदीतली एक कमान (१३ वे शतक), (७) घियास उद्-दिन ची कबर, दिल्ली (१४ वे शतक), (८) गोथिक सुशोभित कमान (१३ वे शतक), (९) जामे मशीद, अहमदाबाद (१५ वे शतक), (१०) गोथिक टयूडर चतुःकेंद्रक कमान, (१५००), (११) मोगलकालीन चतुःकेंद्रक कमान (१६ वे शतक), (१२) मोगलकालीन महिरपी कमान (१७ वे शतक). **पाहा**– तोरण. [सु. वि. को.; इं आ.]

## कमार

एक जमात. मध्यप्रातातील रायपुर जिल्ह्यात बिंद्रनवागड, सुअरमार व फिंगेश्वर जहागिरी, धमतरी तहसीलचा काही भाग आणि ओरिसातील खरियार या भागात कमाराची मुख्यवस्ती आहे. हा प्रदेश छत्तिसगडचा दक्षिण भाग असून अगदी डोंगराळ आहे. कमारांच्या मूलस्थानाबद्दल, काहीही माहिती उपलब्ध नाही. ते गोंडांच्या वंशातले नसून त्यांचे व गोंडाचे आनुवंशिक वैर आहे. गोंड लोकांना कमार लोक आपल्याहून वरच्या दर्जाचे मानतात. पण त्याच्याशी सामाजिक संबंध ठेवणे कमारांना पसंत नसते. गोंड स्त्रीशी लैंगिकसंबंध ठेवणाऱ्याला किंवा गोंडाच्या हातचे अन्न खाणाऱ्या स्त्रीला ते लोक बहिष्कृत करतात.



कमार पुरुष

हे लोक मध्यम बांध्याचे असून त्यांची शरीरे धष्टपुष्ट व स्नायू पिळदार असतात. त्यांचा वर्ण तपकिरी असून केस काळे व राठ असतात. ते पूर्वी फारसे कपडे वापरीत नसत. ते लोक काटक, कष्टाळू व उद्योगप्रिय आहेत. ते स्वभावाने शांत असून उत्तम धनुर्धर आहेत. त्यांच्या स्त्रिया फार आनंदी व विनोदी असतात. कमार स्त्रिया देहभूषेसाठी गोंदून घेतात.

शेती, मासेमारी व शिकार हे त्यांचे पूर्वपार उद्योग आहेत. त्यांत सर्वजण सहकार्याने भाग घेतात. बांबूपासून टोपल्या, सुपे, पेटया, चटया, तट्टे, सापळे व शिप्तरे करण्यात हे लोक फार कुशल आहेत.

**विवाहप्रथा–** कमार जातीत कुळे किंवा गोते असतात. एकाच गोतातील स्त्री-पुरुषांचा विवाह होऊ शकत नाही. जातीच्या बाहेरही लग्न होत नाही. पुरुष पत्नीच्या वडील बहिणीशी व स्त्री पतीच्या वडील भावाशी कधीही लग्न करू शकत नाही. आते-माते भावंडांचे लग्न किंवा बायकोच्या लहान बहिणीशी लग्न ही नेहमीची प्रथा आहे. वधू-वर वयात आल्यानंतरच लग्न होते आणि त्यांची संमती विचारात घेतली जाते.

वडील माणसानी जमविलेले आणि विधिपूर्वक साजरे केलेले लग्न म्हणजेच खरा विवाह, असे हे मानतात. त्यात जो मध्य-

स्थाचे काम करतो त्याला महालिया म्हणतात. वाङ्निश्चयाच्या प्रसंगी दोन्ही पक्षाच्या अंगावर मद्य शिंपडले जाते. त्यामुळे वाङ्निश्चय हा न मोडण्याजोगा करार ठरतो. नंतर वर्ष दोन वर्षांनी लग्न होते. वधू-वर प्रथम एका खांबाला सात प्रदक्षिणा घालतात. मग त्यांना तेलहळद लावतात. त्या विधीला तेलचढण म्हणतात. त्यानंतर मद्यपान, नाचगाणी, इ. कार्यक्रम होतात.

दुसऱ्या दिवशी वधूसह वरपक्ष आपल्या गावी जातो आणि तिथे तेलउतरण विधी होतो. नंतर वधू-वर एकमेकांवर तांदूळ टाकतात. शेवटी लगिन-उठाण हा विधी असतो. त्यात दोघेही विवाहस्तंभाला पुन्हा सात प्रदक्षिणा घालतात.

कमाराच्या लग्नात कोणत्याही पक्षाला हुंडा द्यावा लागत नाही. वधू-वरानी पळून जाऊन लग्न करणे, तरुणीने तरुणाच्या घरात घुसून त्याची वायको म्हणून राहणे (पैथुविवाह), घरजावई होणे, असे लग्नाचे इतर प्रकारही आहेत. बहुपत्नीत्वाची प्रथा आहे. काडीमोड रूढ असली तरी तिचे प्रमाण कमी आहे.


कमार स्त्री

स्त्रियांना गरोदरपणी अनेक प्रकारे जपतात. दोन ते तीन महिने जननाशौच पाळतात. रजस्वलेचा विटाळ मानतात. तिच्या पतीलाही त्या कालात पूजा वगैरे कार्यक्रमात भाग घेता येत नाही.

**सामाजिक रचना** – ही सर्व जमात मिळून एकाच प्रकारचे लोक आहेत. त्यांच्यात उपजाती नाहीत. जमातीचे कायदे व रूढीबंधने यांची अंमलबजावणी प्रादेशिक पंचायतीद्वारा केली जाते. यांची कुटुंबसंस्था पितृसत्ताक असून सामायिक कुटुंबे सहसा आढळत नाहीत. या जमातीत उच्च-नीच असे वर्ग पडलेले नाहीत.

कमार जातीचा सर्व कारभार पंचायतीच्या सत्तेखाली चालतो. बहुतेक सर्व गुन्ह्यांसाठी शिक्षा म्हणजे जमातीला मेजवानी द्यावी लागते. मारामारी, खून, बलात्कार व इतर जमातीच्या शेतात चोरी, हे मोठे गुन्हे मानीत नाहीत. मात्र बाप-मुलगी, बहिण-भाऊ अशांचा संभोग हे मोठे पाप मानतात. तसेच चेटुक करणे, गाय मारणे, हेही मोठे गुन्हे मानले जातात. त्यासाठी अपराधी व्यक्तीला जातीबाहेर काढण्याची शिक्षा होते. घोड्यावर बसणे किंवा त्याला स्पर्श करणे, बूट घालणे किंवा त्याला शिवणे, हेही त्यांच्या मते पाप होय.

**देव–धर्म**– कमार लोक महादेवाला विश्वकर्ता मानतात. मनुष्याचा जीव (आत्मा) भगवानाच्या इच्छेनुसार जन्म-मृत्यूच्या फेऱ्यात सापडतो व ठाकुरदेव सर्वांचे भुताखेतापासून रक्षण करतो, अशा त्यांच्या कल्पना आहेत. पांडव, हनुमान, दुल्हादेव हे देवदूत समजले जातात. त्यांच्या घरात माता, वुध-राज, पूर्वजांचे आत्मे या सर्व कुलदेवतांची स्थापना ओट्यावर केलेली असते. प्रत्येक धार्मिक प्रसंगी त्यांची पूजा करतात. बडीमाता, माई, देवी ही मातेचीच भिन्न रूपे असून त्या रोगराईचे निवारण करतात असे मानतात. या देवतांच्या मूर्ती नसतात.


कमारांची आयुधे–(१) छोथा (२) धोला व (३) बाबूचा बाण. ही आयुधे मच्छीमारीसाठी वापरतात.

कमारांना भूत-पिशाचाची फार भीती वाटते. त्यांचा कोप झाला की बलिदान करून त्यांना प्रसन्न करणे एवढाच त्यांचा धर्म असतो. याशिवाय धूप जाळून होम करण्याचीही प्रथा आहे.

हरेली व पोरा असे त्यांचे दोन सण श्रावण–भाद्रपद महिन्यात येतात. त्यावेळी कुलरक्षक देवतांची पूजा करतात. नवीन धान्य तयार होते, तेव्हा नवखाईचा सण असतो. दिवाळी, दसरा, होळी हे सणही कमार लोक पाळतात. होळीच्या प्रसंगी ठाकुरदेवापुढे होम-हवन करून धूप जाळतात

त्याला मोहाची फुले अर्पण करतात व त्या फुलांची इतर मांसादी पदार्थासह मेजवानी करतात.

या जमातीत बैगाचे महत्व फार आहे. तो स्वयंभू असतो, म्हणजे स्वत.च्या गुणांमुळे त्याला सामर्थ्य प्राप्त झालेले असते, अशी त्यांची समजूत आहे. त्याचे अनेक प्रकार आहेत. डिह बैगा हा धार्मिक विधी करणारा पुरोहित असतो. नाडी-छुवैया बैगा हा नाडीचिकित्सा करून औषधे देतो. झाडफुकैया बैगा हा मत्रबळाने भुताखेतांना पिटाळून लावतो. सर्वात श्रेष्ठ गुनी बैगा होय. तो देवतांना आवाहन करून त्यांना प्रसन्न करू शकतो.

**मृतकप्रथा**– मृत्यू म्हणजे भुताखेताचा कोप अशी कमाराची समजूत आहे. ते मृताला स्नान न घालता तेल-हळद लावतात. प्रेते पुरण्याची चाल आहे. प्रेताचे डोके उत्तरेकडे करतात. मृताच्या रोजच्या उपयोगाच्या सर्व वस्तू त्याच्या थडग्या-जवळ ठेवून देतात मग सर्वजण स्नान करून घरी जातात. वृद्ध किंवा प्रतिष्ठित मनुष्याचे प्रेत जाळण्याची प्रथा आहे. वडील किंवा भाऊ मेला असता, क्षौर करण्याचीही पद्धत आहे. [कमार– एस्. सी. दुबे]

## कमारी

वज्रयानी सिद्ध. हा व पैंताली या नावाने प्रसिद्ध असलेला सिद्ध हे दोन्ही एकच असावे, अशी कल्पना आहे. हा जातीचा लोहार होता. [ ना. स ]

## कमाल

कबिराचा पुत्र व शिष्य. याच्या चरित्राविषयी विशेष माहिती मिळत नाही. बोधसागर ग्रंथावरून कळते, की हा कबिराच्या आज्ञेवरून सतमताच्या प्रचारासाठी अहमदाबादकडे गेला होता. त्याच्या कवितेवरून तो महाराष्ट्रात पंढरपुरी आला होता असे कळते. कमालाच्या कवितेवर सूफी-मताचा प्रभाव दिसतो.

कबिराप्रमाणेच तोही बाह्यसाधनांपेक्षा हृदयाच्या सच्चे-पणाला विशेष महत्त्व देतो व रामनाम सर्व साधनात श्रेष्ठ मानतो. पुढील वचनांवरून कमालाच्या विचारधारेचा परिचय होऊ शकेल–

**काहे कू जंगल जाता बच्चा।**
**अपना दिल रखो रे सच्चा।**

अर्थ– बेटा, कशाला जंगलात जाण्याची इच्छा धरतोस ? अरे आपले हृदय सच्चे ठेव म्हणजे झाले !

**राजा रंक दोनों बराबर**
**जैसे गंगाजल पाणी ।**
**मान करो कोइ भूपर मारो**
**दोनो मीठा बानी ।।**

अर्थ– राव-रंक दोघेही सारखे. गंगाजल आणि इतर पाणी यात फरक नाही. कोणी मान करो अथवा अपमान करो. दोन्ही वाणी गोडच आहेत (किंवा दोघांसाठीही वाणी सारखीच गोड असावी)

कमाल हा अत्यंत निगर्वी होता. त्याच्या विनयशीलते-विषयी कित्येक कथा प्रचलित आहेत. मगहर येथे कविराच्या समाधीजवळ जी दुसरी एक समाधी आहे, ती कमालाची असावी, असे म्हणतात. [ उ. भा. सं प. ]

## कम्म

तमिळनाडमधील एक बहुसंख्य जात. हे लोक द्रविड वंशाचे आहेत. मूळचे लष्करी पेशाचे; पण आता शेत-करी बनले आहेत. कम्म = ताडपत्र, यावरून यांच्याविषयी एक दंतकथा निर्माण झाली आहे, ती अशी–

कम्म आणि वेलम हे मूळ एकाच जातीचे होते. त्यांच्या बायका गोषा पाळीत. पण त्या गोषापद्धतीमुळे त्याना इतर शेतकरी जातीशी स्पर्धा करताना अडचण होऊ लागली. म्हणून आपल्या बायकांनी गोषा टाकावा, अशी जातीतल्या कोण्या एकाने सूचना केली. ती ज्याना मान्य झाली, त्यांनी एका ताडपत्रावर तसा करार लिहिला. हा करार ज्या गटाने मानला, त्या गटाला पुढे कम्म असे नाव मिळाले.

कम्म शब्दाचा कर्णकुंडल असाही अर्थ आहे. त्यावरून या जातीचे नाव पडले, अशीही आख्यायिका सांगतात–

एकदा राक्षसांनी ऋषीचा छळ आरंभिला. ऋषी विष्णू-कडे गाऱ्हाणे घेऊन गेले. विष्णूने त्यांना लक्ष्मीकडे पाठविले. लक्ष्मीने आपली कर्ण–कुंडलांची पेटी ऋषींना दिली व १०० वर्षे तिची पूजा करायला सांगितले. ऋषींनी तसे केले. १०० वर्षे भरताच त्या पेटीतून १०० योद्धे उत्पन्न झाले व त्यांनी राक्षसांचा पराभव केला. हे शंभर योद्धे कर्णकुंडलांच्या पेटीतून उत्पन्न झाले म्हणून त्याना कम्म म्हणू लागले.

चिट्टिपूल, कुरुन्नोलु, कुलकल, इ. त्यांची गोत्रे आहेत. गंपा, गोदजाती, कवली, दुगा, इ. त्याच्या पोटजाती आहेत. याच्यांत शैव व वैष्णव असे दोन्ही पंथ आहेत. वैष्णव कम्म विष्णू-बरोबर गंगेचीही पूजा करतात. यांच्या स्त्रिया पडदा पाळतात. कम्माना घरगडी म्हणून एखाद्याच्या घरी काम करणे कमी-पणाचे वाटते.

**विवाहप्रथा**– मामेबहिणीवर आतेभावाचा पूर्ण हक्क असतो. बहिणीच्या मुलीशी लग्न करण्यास मुभा आहे. तमिळ प्रदेशा-तल्या कम्माना नवऱ्यापेक्षा बायको वयाने मोठी असलेली चालते. कधी कधी एखादी तरुणी आपल्या 'तान्हेबाळ' नव-ऱ्याला कडेवरून नेतांना दृष्टीस पडते. लग्न वराच्या घरी

स्थाचे काम करतो त्याला महालिया म्हणतात. वाङनिश्चयाच्या प्रसंगी दोन्ही पक्षाच्या अंगावर मद्य शिंपडले जाते. त्यामुळे वाङनिश्चय हा न मोडण्याजोगा करार ठरतो. नंतर वर्ष दोन वर्षांनी लग्न होते. वधू-वर प्रथम एका खांबाला सात प्रदक्षिणा घालतात. मग त्यांना तेलहळद लावतात. त्या विधीला तेलचढण म्हणतात. त्यानंतर मद्यपान, नाचगाणी, इ. कार्यक्रम होतात.

दुसऱ्या दिवशी वधूसह वरपक्ष आपल्या गावी जातो आणि तिथे तेलउतरण विधी होतो. नंतर वधू-वर एकमेकांवर तांदूळ टाकतात. शेवटी लगिन-उठाण हा विधी असतो. त्यात दोघेही विवाहस्तंभाला पुन्हा सात प्रदक्षिणा घालतात.

कमाराच्या लग्नात कोणत्याही पक्षाला हुंडा द्यावा लागत नाही. वधू-वरांनी पळून जाऊन लग्न करणे, तरुणीने तरुणाच्या घरात घुसून त्याची बायको म्हणून राहणे (पैथुविवाह), घर-जावई होणे, असे लग्नाचे इतर प्रकारही आहेत. बहुपत्नीत्वाची प्रथा आहे. काडीमोड रूढ असली तरी तिचे प्रमाण कमी आहे.


कमार स्त्री

स्त्रियांना गरोदरपणी अनेक प्रकारे जपतात. दोन ते तीन महिने जननाशौच पाळतात. रजस्वलेचा विटाळ मानतात. तिच्या पतीलाही त्या कालात पूजा वगैरे कार्यक्रमात भाग घेता येत नाही.

**सामाजिक रचना** – ही सर्व जमात मिळून एकाच प्रकारचे लोक आहेत. त्यांच्यात उपजाती नाहीत. जमातीचे कायदे व रूढीबंधने यांची अंमलबजावणी प्रादेशिक पंचायतींद्वारा केली जाते. यांची कुटुंबसंस्था पितृसत्ताक असून सामायिक कुटुंबे सहसा आढळत नाहीत. या जमातीत उच्च-नीच असे वर्ग पडलेले नाहीत.

कमार जातीचा सर्व कारभार पंचायतीच्या सत्तेखाली चालतो. बहुतेक सर्व गुन्ह्यांसाठी शिक्षा म्हणजे जमातीला मेजवानी द्यावी लागते. मारामारी, खून, बलात्कार व इतर जमातीच्या शेतात चोरी, हे मोठे गुन्हे मानीत नाहीत. मात्र बाप-मुलगी, बहिण-भाऊ अशांचा संभोग हे मोठे पाप मानतात. तसेच चेटुक करणे, गाय मारणे, हेही मोठे गुन्हे मानले जातात. त्यासाठी अपराधी व्यक्तीला जातीबाहेर काढण्याची शिक्षा होते. घोड्यावर बसणे किंवा त्याला स्पर्श करणे, बूट घालणे किंवा त्याला शिवणे, हेही त्यांच्या मते पाप होय.

**देव–धर्म** – कमार लोक महादेवाला विश्वकर्ता मानतात. मनुष्याचा जीव (आत्मा) भगवानाच्या इच्छेनुसार जन्म-मृत्यूच्या फऱ्यात सापडतो व ठाकुरदेव सर्वांचे भुताखेतापासून रक्षण करतो, अशा त्यांच्या कल्पना आहेत. पांडव, हनुमान, दुल्हादेव हे देवदूत समजले जातात त्यांच्या घरात माता, वृध-राज, पूर्वजांचे आत्मे या सर्व कुलदेवतांची स्थापना ओटयावर केलेली असते. प्रत्येक धार्मिक प्रसंगी त्यांची पूजा करतात. बडीमाता, माई, देवी ही मातेचीच भिन्न रूपे असून त्या रोगराईचे निवारण करतात असे मानतात. या देवतांच्या मूर्ती नसतात.


कमारांची आयुधे–(१) छोथा (२) धोला व (३) बाबूचा बाण. ही आयुधे मच्छीमारीसाठी वापरतात.

कमारांना भूत-पिशाचाची फार भीती वाटते. त्यांचा कोप झाला की बलिदान करून त्यांना प्रसन्न करणे एवढाच त्यांचा धर्म असतो. याशिवाय धूप जाळून होम करण्याचीही प्रथा आहे.

हरेली व पोरा असे त्यांचे दोन सण श्रावण–भाद्रपद महिन्यात येतात त्यावेळी कुलरक्षक देवतांची पूजा करतात. नवीन धान्य तयार होते, तेव्हा नवखाईचा सण असतो. दिवाळी, दसरा, होळी हे सणही कमार लोक पाळतात. होळीच्या प्रसंगी ठाकुरदेवापुढे होम-हवन करून धूप जाळतात

त्यामुळे करवसुली म्हणजे नाहक जुलूम असा प्रजेचा अनेक प्रसगी गैरसमज होतो. राजसत्ता अनियत्रित असली तर हा समज पुष्कळ अंशी खराही असतो. कारण राजे लोक कर-रूपाने मिळणारा पैसा स्वतःच्या मालकीचा असे समजून बहुतेक तो खाजगी खर्चाकडेच लावतात. याशिवाय प्रजेकडून नजराणे व देणग्या उपटतात ते वेगळेच! तथापि शत्रूपासून देशाचे व प्रजेचे संरक्षण करणे, देशातल्या गुंडगिरीला आळा घालून शांतता राखणे, प्रजेचे वित्त व जीवित यांच्या संरक्षणाकरिता कायदे करून त्यांची अंमलबजावणी करणे, प्रजेच्या शिक्षणाकरिता व सार्वजनिक आरोग्याकरिता खर्च करणे, ही सरकारची कामे असून ती करण्याबद्दल मोबदला म्हणून प्रजेने शासन संस्थेला कर द्यायचा असतो आणि ज्या राज्यपद्धतीत सरकारवर प्रजेचा ताबा चालतो, तिथे सरकारकडून वर उल्लेखिलेली कामे बऱ्याचशा योग्य रीतीने बजावलीही जातात.

प्रजेच्या खाजगी उत्पन्नातून कराच्या रूपाने विवक्षित वाटा घेण्याचा राजाला हक्क आहे, ही भावना भारतात पूर्वापार चालत आलेली आहे. मात्र हा कर बेताचा व प्रजेला डोईजड न होईल असा असावा, असे बहुतेक सर्व धर्मशास्त्रकारानी सागून ठेवले आहे. प्राचीन स्मृतिकारांनी असा एक सामान्य नियम दिला आहे, की राजाने प्रजेच्या उत्पन्नाचा एक षष्ठाश भाग कर म्हणून घ्यावा. कर कशा पद्धतीने घ्यावा याविषयी मनू म्हणतो –

**यथा फलेन युज्येत राजा कर्ता च कर्मणाम् ।**
**तथाऽवेक्ष्य नृपो राष्ट्रे कल्पयेत् सततं करान् ।।**
**यथाल्पाल्पमदन्त्याद्यं वार्योकोवत्सषट्पदाः ।**
**तथाल्पाल्पो ग्रहीतव्यो राष्ट्राद्राज्ञाऽऽब्दिकः करः ।।**
( ७.१२८–२९ )

अर्थ – राजा फलाने युक्त व्हावा ( राजकर्मे चालण्यास प्रत्यवाय येऊ नये) व कर्माचा कर्ताही (व्यापारी, उदमी, शेतकरी ) फलाने ( लाभ ) युक्त व्हावा, अशा रीतीने विचार करून राजाने राष्ट्रातील लोकांकडून सार्वकाल करांचे ग्रहण करावे. ज्याप्रमाणे जळू, वासरू व भुगा हे प्राणी (रक्त, दूध व मध हे पदार्थ) थोडे थोडे ग्रहण करून खातात, त्याप्रमाणे ( मूळ भांडवलाचा उच्छेद होणार नाही म्हणजे राजाने आपणाकडून कर घेतला, हे प्रजेला जाणवणारही नाही) अशा बेताने राजाने राष्ट्रातून थोडा थोडा वार्षिक कर घ्यावा.

त्यापुढे मनू म्हणतो, की राजाने अधाशीपणा करून प्रजेला मुळासकट पिळून काढू नये. तसे केल्यास राजा व प्रजा या दोघांवरही अनर्थ ओढवेल.

महाभारतात जमीनबाबीखेरीज खाणी, मीठ, व्यापारी माल, नौकानयन, हत्तीचे कळप या बाबी सरकारी उत्पन्नाच्या असतात, असे सागितले आहे. राजाने ज्यावर कर बसवू नये, अशा बाबी पुढीलप्रमाणे होत्या–

**अटवी पर्वताश्चैव नद्यस्तीर्थानि यानि च ।**
**सर्वाण्यस्वामिकान्याहुर्नास्ति तत्र परिग्रहः ।।**

अर्थ –अरण्य, पर्वत, नद्या व तीर्थे यांवर कोणाचेही स्वामित्व नाही. म्हणून यांवर राजाने कर घेऊ नये.

यावरून प्राचीन काळी जंगलातील लाकूड-फाटा, दगड-माती व चारा-गवत हे सर्व प्रजेला फुकट मिळत असे, असे दिसते.

प्राचीन काळी निरनिराळ्या वर्गातील लोकांपासून निरनिराळ्या प्रमाणात व प्रत्यक्ष ऐनजिनसी किंवा चाकरीच्या रूपाने कर घेतला जात असे. गुरांच्या वाढीपैकी $\frac{१}{५०}$ व पिकांचा $\frac{१}{८}$, $\frac{१}{६}$ किंवा $\frac{१}{१२}$ कर घ्यावा, असे मनूचे वचन आहे(७.१३०). कौटिल्याने जकातीच्या व करांच्या बाबींची बरीच मोठी यादी दिलेली आहे. परदेशी जाणारा व परदेशातून येणारा सर्व प्रकारचा माल, भाजीपाला, कंदमुळे, फुले, फळे, धान्ये, लाकूड, बांबू, लोकर, कापूस, रेशीम, हिरे-माणके व जनावरे यांवर राजाने जकात घ्यावी, असे कौटिल्य सांगतो. या यादीतली बरीचशी कलमे करपात्र म्हणून मनूनेही उल्लेखिलेली आहेत (७.१३१-१३२). विवाहोपनयनादी संस्कार व धार्मिक कृत्ये यांवर कर नसावा, असे कौटिल्य सांगतो; आणि खजिना रिकामा झाला तरी राजाने श्रोत्रियांकडून कर घेऊ नये असे मनू म्हणतो (७.१३३).

**करपद्धतीचा इतिहास–** ११ ते १३ या शतकांत द. भारताच्या बऱ्याच मोठ्या प्रदेशात चोळ राजे राज्य करीत होते. ते आपल्या प्रजेपासून उत्पन्नापैकी $\frac{१३}{३०}$ ते $\frac{४}{१५}$ एवढा भाग सरकारी कर म्हणून घेत. प्रत्येक उद्योगधंद्यावर ते लहान-मोठ्या प्रमाणात कर आकारीत. त्याची जमीनधारापद्धती कायम नव्हती. त्यामुळे प्रत्येक पाहणीच्या वेळी जमिनीचा कर कमी-जास्त होत असे. करवसुलीच्या बाबतीत चोळ राजे फार कडक होते. चोळांच्या मागून द. भारतावर विजयनगरचे साम्राज्य आले. त्या राज्याचा पहिला मुख्यप्रधान माधव याने सर्व उत्पन्नांचा $\frac{१}{४}$ भाग जमीन-महसूल म्हणून ठरविला. हा कर नगद द्यावा लागे व त्यात गावकरी, कामगार वगैरेंच्या खर्चाचा समावेश होत नसे. त्यानंतरच्या राजांनी हाही नियम मोडला व जमिनीच्या उत्पन्नाचा जवळजवळ अर्धा भाग जमीन-महसूल म्हणून ठरविला. मदुरेचे नायक राजे जमिनीच्या एकंदर उत्पन्नाचा अर्धा भाग कर म्हणून घेत. याशिवाय प्रत्येक धंद्यावरही त्याचा जबरदस्त कर असे. शिवाय ते मजुरांकडून वेठबिगार करून घेत, ती वेगळीच. तंजाऊरचा व्यंकोजी हा

मराठा राजा उत्पन्नाचा ⅘ कर घेत असे. अर्काटचे नबाब उत्पन्नाचा अर्धा भाग जमीन–महसूल म्हणून घेत व त्यानी करवसुलीसाठी नेमलेले मक्तेवाले शेतकऱ्यांकडून उरलेला अर्धा भागही बळजबरीने काढून नेत व त्याची उपासमार करीत. प्रसंगी शेतकऱ्यांना देहदड व कैदखाना, अशा प्रकाराच्या शिक्षाही देत.

मराठेशाहीतील करपद्धतीसबंधाने मल्हार रामरावकृत राजनीती या ग्रंथात पुढील मजकूर आहे– 'वणिक वर्गापासून क्रय-विक्रय कसा झाला, त्यांच्या योगक्षेमास काय पाहिजे, याचा विचार करून तदनुरूप करभार त्यांच्यापासून घ्यावा. या प्रमाणे आय-व्यय पाहून शिल्पकारादिक म्हणजे कारागीर लोक यांपासून कर घ्यावा. यावरून मराठेशाहीत सर्व प्रकारच्या व्यापारी मालावर व स्थानिक कारागिरीच्या वस्तूवर कर घेतला जात असे, असे कळते. या शिवाय घरपट्टी व दुकानपट्टी नावाचेही कर असत तंबाखू, मीठ, माड, ताड व दारू विकणे यांवरही कर असे. तूप तयार करणे, गुरे चारणे, लग्नपट्टी, म्हैसपट्टी, मच्छीमारी, कर्जपट्टी, सरंजामपट्टी, वेतनपट्टी, सावकारपट्टी, उंबरेपट्टी, भाडेपट्टी, संतोषपट्टी, हवशीपट्टी, शिबंदीपट्टी, वगैरे किरकोळ करही असत. समुद्रावरील व्यापारावर जकात असे निरनिराळ्या प्रकारचे धंदे करणाऱ्यांवर स्वतत्र कर असत. गवडी, पाथरवट वगैरे लोकांकडून महिन्यातून एका दिवसाची मजुरी कर म्हणून घेत. वतन व घरे यांच्या विक्रीची नोंद करून त्यांवर सरकारची शेरणी अथवा नजर वसूल करीत.

मुमलमानी अमलात प्रजा जमीन-महसूल द्यायलाही नाखूष असे. कारण एक तर हे राजे प्रजेच्या हिताची कामे क्वचितच करीत. परचक्रापासून रक्षण करण्याचे कामही त्याच्या हातून नीट होत नसे. शिवाय राजघराणीही वारवार बदलत. राजा मरण पावताच त्याच्या वारसांमध्ये गादी मिळविण्यासाठी कलह सुरू होत. त्यामुळे कर नक्की कोणत्या राजाला द्यायचा हे निश्चितपणे प्रजेला कळत नसे. एकाच वर्षात अनेकदा राज्यक्रांती झाली, तर अनेकदा कर द्यावा लागेल, अशी प्रजेला भीती वाटे. पुष्कळदा सरकारकडूनही बाकी ठेवण्यास परवानगी मिळे. बाकी राहिली तर लगेच जमीन जप्त होत नसे. या काळात जमीनधाऱ्याशिवाय इतरही अनेक कर असत. धद्याच्या परवानगीसाठी कर, हिंदूंवर बसविलेले जझियासारखे विशिष्ट कर, मासे, तेल, तूप, गोवऱ्या, दही, दूध, रानगवत, जळाऊ लाकूड, तंबाखू, अफू, मातीची भांडी, भाड्याच्या गाड्या उंट, इ. वस्तूंवरील कर, अशा करांच्या अनेक बाबी असत.

भारतात ब्रिटिश अंमल सुरू झाल्यावर येथील करव्यवस्था हळहळू पाश्चात्य धर्तीवर नेण्यात आली. युरोपात प्रचलित असलेली आडाम स्मिथची करतत्त्वे इथेही स्वीकारण्यात आली ही तत्त्वे पुढील प्रमाणे आहेत––

**(१) कराची समता**– प्रत्येक देशातील प्रजाजनानी आपल्या सरकारच्या योगक्षेमाकरिता होता होईल तो ऐपतीप्रमाणे कर दिला पाहिजे. अर्थात् सरकारच्या संरक्षणाखाली प्रजेला ज्या उत्पन्नाचा उपभोग घ्यायला मिळतो, त्या उत्पन्नाच्या मानाने हा कर असावा.

**(२) कराची निश्चितता**– कर भरण्याची वेळ, पद्धती व रक्कम या सर्व गोष्टी कर भरणाऱ्याला व दुसऱ्या प्रत्येक माणसाला स्पष्टपणे व निश्चितपणे ठाऊक असल्या पाहिजेत

**(३) कराचा सोईस्करपणा**– कर भरण्यास सोईस्कर होईल, अशा वेळी व अशा रीतीने करवसुली करावी.

**(४) कराची काटकसर**– प्रत्येक कराची अशी योजना पाहिजे, की प्रजेकडून करांच्या रूपाने निघालेली रक्कम व सरकारच्या तिजोरीत येणारी रक्कम यात शक्य तितकी कमी तफावत असावी. म्हणजे कर वसूल करण्याचा खर्च कमीत कमी व्हावा व अधिकात अधिक रक्कम सरकारच्या तिजोरीत पडावी.

वरील चार तत्त्वे आता सर्वमान्य झालेली आहेत. [ म. ज्ञा. को. ]

(२) दिव्य करण्यासाठी उपयोजिला जाणारा एक घडा. धर्मग्रंथावर एक तुळशीचा रोपा व गगेच्या पाण्याचा एक घडा ठेवून ते सगळे आरोपीच्या डोक्यावर ठेवतात. विशिष्ट मुदतीत त्याच्यावर काही आपत्ती न आल्यास आरोपी निर्दोषी आहे, असे समजतात. [ म. श. को. ]

## करकचतुर्थीव्रत

एक स्त्रीव्रत. कार्तिक कृ. ४ थीस हे व्रत करतात. गौरी ही या व्रताची प्रधान देवता असून शिव, गणेश, कार्तिकेय या गौणदेवता आहेत. हे व्रत सायंकाळी करतात. या व्रताचा विधी असा –

व्रतदेवतांची चित्रे काढून ती वडाच्या झाडाखाली पूजास्थानी ठेवतात. मग स्नान, संकल्प, गणपतीपूजन, इ. झाल्यावर गौरीची पूजा करतात. मग पुढील मंत्राने प्रार्थना करतात–

**नमः शिवायै शर्वाण्यै सौभाग्यं सन्तातिं शुभाम् ।**
**प्रयच्छ भक्तियुक्तानां नारीणां हरवल्लभे ।।**

अर्थ – शिवा, शर्वाणी हिला नमस्कार. हे हरप्रिये, भक्तियुक्त अशा स्त्रियांना सौभाग्य व शुभसंतती दे.

या व्रतात अन्न–धान्य–दीप–सहित १० जलपूर्ण कुंभांचे दान

पोळीचा नैवेद्य व चंद्रोदय झाल्यावर त्याला अर्घ्यप्रदान करायचे असते. व्रताचे फल –सौभाग्यप्राप्ती. या व्रताची कथा अशी –

इंद्रप्रस्थ नगरीत वेदशर्मा नावाचा एक ब्राह्मण होता. त्याला वीरवती नावाची एक मुलगी होती. लग्नानतर माहेरी आल्यावेळी तिने आपल्या भावजयींसह करकचतुर्थीव्रत केले ; पण चंद्रोदयापूर्वीच त्याला अर्घ्यप्रदान करून भोजन केल्यामुळे व्रतदोष घडला. त्यामुळे तिचा पती निर्वतला. वीरवतीने आपल्या पतीचा अंत्यसंस्कार करू दिला नाही. ती मृतपतीच्या शेजारी एक वर्षभर प्रायोपवेशन करून बसली. त्या पुण्याने तिला इंद्रपत्नी शची हिचे दर्शन झाले. शचीने वीरवतीला व्रतात घडलेला प्रमाद सांगून पुनश्च ते करायला सांगितले. वीरवतीने तसे केले. मग शचीने जलसिचन करून तिच्या मृतपतीला उठविले. [ व्रतराज ]

## करकंडुगुंफा

मराठवाड्यातील उस्मानाबाद नगराला पूर्वी धाराशिव असे नाव होते. धाराशिवपासून काही मैलावर असलेल्या तेर गावाजवळ पहाडात काही गुफा आहेत. करकडुचरितानुसार राजा करकंडूने ज्या गुफा खोदविल्या त्या याच होत, असे जाणकाराचे मत आहे.

या गुफापैकी मुख्य गुफेत पार्श्वनाथाची काळ्या पाषाणाची पाच फुटी भव्य मूर्ती पद्मासन घालून बसलेली आहे. दुसऱ्या खोलीतही सात फण्याच्या नागासह पार्श्वनाथाची मूर्ती आहे.

इथे एकूण चार गुंफा आहेत. त्यांतील बहुतेक मूर्ती पार्श्वनाथाच्या असून महावीराची मात्र एकही नाही. त्यावरून या गुंफा पार्श्वनाथाच्या काळी तयार झाल्या असाव्या, असे अनुमान आहे. [ जै. ध. ]

## करकाष्टमी

कार्तिक कृ. ८ मीस हे नाव आहे. या दिवशी करायच्या व्रताचा विधी असा – रात्रौ गौरीची पूजा. सुगंधी द्रव्य–मिश्रित जलाने भरलेल्या व पुष्पमालांनी सुशोभित केलेल्या नऊ पात्रांचे दान व नऊ कुमारिकांना भोजन. [ हि. ध. ]

## करंग

बंगालमधील एक जात. यांची वस्ती मुख्यत्वे चोव्वीस परगण्यात आहे. हे लोक दक्षिण भारतातून समुद्रमार्गे बंगालमध्ये आले असावे, असे अनुमान आहे. ब्रह्मदेश आणि मलाया या देशात आध्रातून गेलेले करंग तिकडेही त्याच नावाने ओळखले जातात. हपानिया आणि मोटगड ही यांची मुख्य केंद्रे आहेत. हे लोक लाकडी व दगडी वस्तू तयार करतात.

## करंगड

भागलपुराजवळची एक टेकडी. कर्ण राजावरून या टेकडीला हे नाव मिळाले आहे. इथे शैवपंथीयांची तीन मदिरे असून त्यातले एक मंदिर फार प्राचीन आहे. [ हि. जॉ. ए. इं. ]

## करगम्

तमिळनाडमधले एक प्रसिद्ध धार्मिक नृत्य. मरियम्म या देवीपुढे हे नृत्य केले जाते. गावात साथीचे रोग येऊ नयेत हा त्याचा उद्देश असतो. पर्जन्यदेवाच्या कृपेसाठीही हे नृत्य करतात. हे नृत्य कित्येक रात्री चालते.

करगम् म्हणजे धातूचे एक भाडे. त्यात दूध, पाणी किंवा तादूळ भरतात. त्याच्या तोंडावर बाबूची महिरप बसवितात. तिला फुले व लिबे बाधतात. त्या पात्राला हळदकुंकू वाहतात. मग देवीचा पुजारी ते करगम् आपल्या डोक्यावर व हातात तलवार किवा कडूलिंबाच्या डहाळ्या घेऊन नाचू लागतो. त्या नाचाला ढोल व नागस्वरम् यांची साथ असते. नाचता नाचता त्या पुजाऱ्याच्या अंगात संचार होतो व तो घुमू लागतो. तशाही परिस्थितीत त्याच्या डोक्यावरचे करगम् खाली पडत नाही. [ मोहन खोकर ]



करगम् नृत्य

## करगामहोत्सव

हा बेंगळूर येथे होत असतो. या महोत्सवासाठी कर्नाटकातल्या कानाकोपऱ्यातून लाखो लोक बेंगळूर येथे जमा होतात. हा आदिशक्ती द्रौपदीचा पूजनोत्सव आहे. करगा म्हणजे कलश होय. या कलशावर द्रौपदीचे आवाहन केले जाते.

या उत्सवात गौड, गणाचारी, पुजारी पोतराज व वीरकुमार या लोकांचे स्थान महत्त्वपूर्ण असते. त्याना १० दिवसपर्यंत व्रतस्थ राहावे लागते. करगापुजारी तर १० दिवस

स्त्रीवेषातच राहतो तो कपाळी कुंकू लावून, हातात बांगड्या व गळ्यात मंगळसूत्र धारण करतो.

या उत्सवास चैत्र कृ. ७ मीच्या रात्री चंद्रोदयानंतर प्रारंभ होतो. प्रथम ध्वजारोहण करतात. हा ध्वजस्तंभ ४५ फूट उंचीचा असतो. त्याचा अग्रभाग पीतवस्त्रांनी अलंकृत करतात. त्यानंतर रथ सजविणे, सप्तप्राकारपुरीची पूजा, दिशावंदन, इ. विधी करतात. प्रत्येक दिशेला भाताचा बळी देतात. १३ शीच्या रात्री द्रौपदीदेवीला मोगरीच्या कळ्यांनी सजवितात. दशदिशांना देवीच्या आगमनाची सूचना देतात. त्यावेळी हातात नग्न खड्ग धारण करणारा वीरकुमार आपल्या वक्षःस्थलावर त्या खड्गाचा प्रहार करतो. मग देवी आपले पती पंचपांडव यांना भेटण्यासाठी त्यांच्या मंदिराकडे जाते. पंचपांडवाच्या उत्सवमूर्ती द्रौपदीचे स्वागत करण्यासाठी पुढे येतात. एवढे झाल्यावर मग देवीची मिरवणूक मंदिरात जाते.

दक्षिणेत अनेक ठिकाणी द्रौपदीसह पंचपांडवांची मंदिरे आहेत. महाबलिपुरम् येथेही रथाकार स्थापत्याच्या रूपाने ती दिसतात. द्रौपदीसह पंचपांडवांची पूजा – विशेषेकरून करगा – महोत्सव – पल्लव राजाच्या कारकीर्दीत सुरू झाला. कर्नाटकात हा उत्सव केंपे गौडाच्या कारकीर्दीपासून अविच्छिन्न रूपाने सुरू आहे. केंपे गौडाने पल्लव राज्यातून अग्निकुलातले काही क्षत्रिय आपल्या राज्यात आणून वसविले व धर्मराजमंदिरातले पूजापाठ आणि करगामहोत्सव या गोष्टींची जबाबदारी त्यांच्यावर सोपविली त्याने मंदिराच्या खर्चासाठी बरीचशी जमीनही लावून दिली. केंपे गौडाच्या कालात छोट्या प्रमाणात सुरू झालेला हा उत्सव सांप्रत कर्नाटकाचे एक सांस्कृतिक पर्व बनून राहिला आहे. [ युगप्रभात १९५९ ]

**करटा** एक प्राचीन आनद्ध वाद्य. लांबी २१ अंगुळे, घेरा ४० अंगुळे, मुखाचा व्यास १२ किंवा १४ अंगुळे, असे याचे माप असे. याची दोन्ही तोंडे चामड्याने मढवीत. दोन्ही चामड्यात प्रत्येकी १४ छिद्रे असत व प्रत्येक दोन छिद्रांच्या मध्ये विग्निका नामक लोखंडाच्या वाट्या बसवीत. कुडुप नावाच्या साधनाने हे वाद्य वाजवीत. चर्चिका ही या वाद्याची देवता होय. [ स. शा. ]

**करंड** एक शिरोभूषण. हे टोपलीसारखे किंवा मधाच्या पोळ्यासारखे असते. हा अलंकार मध्ये घेऊन जो मुकुट तयार करतात, त्याला करंडमुकुट असे नाव आहे. [मानसार ७·१६४ ]

**करडिपट्टी** मदुरेपासून आठ मैलावरचे एक ठिकाण. इथे एक निसर्गनिर्मित गुहा असून प्राचीन काळी गुणसेन नावाचा एक जैन साधू तिच्यात राहत असे. या गुहेचे तीन भाग पडतात. मधल्या भागात तीन तीर्थंकरमूर्ती खोदलेल्या असून त्यांच्या खाली खोदीव लेखही आहेत. उत्तरेकडील गुहेत एक सिंहारूढ देवी असून ती एका गजारूढ पुरुषाशी युद्ध करीत असल्याचे दृश्य आहे. दक्षिणेकडील गुहेत यक्षिणीची अर्धवट मूर्ती दिसते. तिथल्या एका शिलालेखावरून त्या ठिकाणास तिरुक्कट्टमपल्ली म्हणत, असे दिसते. त्या लेखात कनकनंदी व त्याची शिष्यपरंपरा यांचाही उल्लेख आढळतो. [ मदुरा गॅझे. ]

**करडिवाद्य** वाळूच्या घड्याळाच्या आकाराचा मोठा मृदंग. हा दोन काठ्यांनी वाजवितात. याचा प्रचार दक्षिणेत आहे. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**करण** ( १ ) लेखक किंवा कारकून यांची एक जात. जुन्या ग्रंथकारांनी यांची उत्पत्ती वैश्यपिता व शूद्रमाता यांच्यापासून सांगितली आहे. ' शूद्राविशोस्तु करणः ' = शूद्रा स्त्री व वैश्य पुरुष यांच्यापासून उत्पन्न झालेला तो करण होय ( ब्रह्म. वै. पु. ब्रह्मखंड १० ). हे आपण मूळ कायस्थ असल्याचे सांगतात. ययातिकेसरी नावाच्या ओडिसाच्या राजाने ( ४४७ – ५२६ इ. स. ) यास कारकुनी करण्यासाठी उ. प्रदेशातून ओडिसात आणले. बल्लाळसेनाच्या राजवटीत (११५८ – ११७० इ. स.) ते ओडिसातून बंगालमध्ये आले. ओडिसात यांचा क्रमांक ब्राह्मणानंतर लागतो. कायस्थांप्रमाणेच हेही चित्रगुप्तालाच आपला पूर्वज समजतात. यांच्यांत गोत्रे आहेत, तशीच देवकेही आहेत. गोत्रे ऋषींच्या नावावरून चालत असून देवके प्राण्यांवरून आली आहेत. यांचे धंदे मुख्यत्वे कारकुनी, पतोजीगिरी व पटवारीपण हे आहेत. यांच्यात परमार्थ व कुंभीपतिया असे दोन पंथ आहेत. हे लोक स्वतःला स्मार्त म्हणवितात.

**विवाहप्रथा–** ओडिसात क्षत्रिय, करण, खांडाईत व उडिया अशा चार समान थरातल्या जाती आहेत. त्यांच्यात वैवाहिक सोपानपरंपरा आढळून येते. करण हे क्षत्रियांच्या घरी मुली देतात व खांडाईतांच्या मुली करतात. खांडाईत करणांच्या घरी मुली देतात व उडियांच्या मुली करतात. उच्च जातीत असलेले विवाहविषयक विधिनियम हे पाळतात. लग्नाच्या वेळी वधू–वरांचे हात दर्भांनी बांधतात. याला हस्तबंधनविधी असे नाव आहे. हा विधी झाला म्हणजे लग्न पुरे होते. ब्राल-

विवाह होत असत, तेव्हा लग्न झालेली मुलगी ऋतुमती होई-पर्यंत माहेरीच राहत असे. यांची लग्ने दिवसाच होतात; रात्री होत नाहीत.

**मृतकप्रथा** – हे लोक प्रेतांचे दहन करतात व श्राद्धेही करतात. [ट्रा. का. बें.; म. ज्ञा. को.]

( २ ) पंचांगातले एक अंग. तिथीचे अर्ध. महिन्याच्या तिथी ३० असतात व त्यामुळे एका चांद्र महिन्यात ६० करणे होतात. चंद्र व सूर्य यांच्यामध्ये ५ अंश अंतर पडले, की एक करण होते. अशी ६० करणे होतात. ७ करणांचे एक चक्र, अशी ८ पूर्ण चक्रे झाली, की महिन्याची ५६ करणे होतात. ४ करणे शिल्लक राहतात ती शकुनि, चतुष्पाद, नाग व किस्तुघ्न ही होत. कृष्ण चतुर्दशीच्या उत्तरार्धात शकुनि, अमावास्येच्या प्रथमार्धात चतुष्पाद, त्याच तिथींच्या उत्तरार्धात नाग व शुक्ल प्रतिपदेच्या प्रथमार्धात किस्तुघ्न, अशा क्रमाने ती येतात. ७ करणाच्या चक्राचा प्रारंभ शुक्ल १ देच्या उत्तरार्धापासून होतो. या करणाची नावे अशी— बव, बालव, कौलव, तैतिल, गरज, वणिज, भद्रा (विष्टि किंवा कल्याणी), शकुनि, चतुष्पाद, नाग व किंस्तुघ्न. सायन–निरयन पंचांगातली करणे एकच येतात.

बृहत्संहितेत (९९.३-५) कोणत्या करणावर कोणत्या गोष्टी कराव्या ते पुढीलप्रमाणे सांगितले आहे –

| करण | कृत्ये |
|---|---|
| बव | शुभ, चर, अस्थिर व पौष्टिक |
| बालव | धर्मकृत्ये. |
| कौलव | प्रेम व मैत्री जोडणे. |
| तैतिल | सौभाग्य सूचक वस्तूंचा संग्रह व गृहनिर्माण. |
| गरज | शेती, बीबियाणे व घरातील कामे. |
| वणिज | वाणिज्यविषयक कृत्ये. |
| विष्टि | शुभकृत्यास वर्ज्य व शत्रुघातविषयक कृत्यांस उक्त. |
| शकुनि | औषधे, पौष्टिके व मंत्रादी. |
| चतुष्पाद | पशुविषयक, द्विज, पितर यांना उद्देशून कर्मे व राज्यकृत्ये. |
| नाग | स्थावर व दारुण कृत्ये. |
| किस्तुघ्न | पौष्टिक व मंगल कृत्ये. |

(३) मोठी सनई. हे वाद्य वरच्या दोन सप्तकात वाजविले जाते. [म्यु. इं.]

## करणमुद्रा

मूर्तिकलेतील एक मुद्रा. हात उभा, कनिष्ठिका व तर्जनी ही दोन बोटे सरळ, मध्यमा व अनामिका ही दोन बोटे तळव्यावर वाकलेली आणि त्यावर अंगठ्याचा



करणमुद्रा

दाब, अशा हस्तमुद्रेला करणमुद्रा म्हणतात. [इं. बु. इ.]

## करणव्रत

करणसंबंधी व्रत. माघाच्या शुक्ल पक्षात बवकरण येईल, त्या दिवशी हे व्रत करतात. याचा विधी असा–कलशावर ताम्रपात्रात अच्युताच्या सुवर्णमूर्तीची स्थापना व पूजा. अष्टाक्षरमंत्राचा जप व उपवास. अशा प्रकारे त्याच करणावर ६ वेळा व्रत करून ७ व्या खेपेस त्याचे उद्यापन करतात. त्या प्रसंगी ७ ब्राह्मणांना भोजन घालतात. असेच व्रत बालवादी करणावरही करायचे असते. [हे. व्र.]

## करणानुयोग

जैन साहित्यातील अनुयोगग्रंथांपैकी एक प्रकार. या ग्रंथांत ऊर्ध्वलोक, अधोलोक, मध्यलोक, तसेच चार गती आणि चार युगे यांचे वर्णन असते. दिगंबर व श्वेतांबर या दोन्ही संप्रदायात या विषयाचे शेकडो ग्रंथ आहेत. करणानुयोग म्हणजे भूगोल व खगोल या दोन शास्त्रांची समष्टीच म्हणता येईल. या विषयावर जैन लेखकांनी विपुल साहित्य निर्माण केले आहे. भूगोल व खगोल यातील सर्व परोक्ष व दूरवर्ती क्षेत्रे आणि विविध पदार्थ यांचे वर्णन साक्षात सर्वज्ञ भगवंताने आपल्या दिव्य ध्वनीने केले, अशी जैनांची परपरागत श्रद्धा आहे.

पृथ्वी एखाद्या थाळीप्रमाणे गोल व चपटी आहे, तिच्यात अनेक द्वीपे आणि समुद्र आहेत, द्वीपानंतर समुद्र व समुद्रानंतर द्वीप असा तिचा जलस्थल क्रम आहे, जंबुद्वीपाच्या मध्ये त्याची जणू नाभीच असा सुमेरी पर्वत आहे, अशा प्रकारची वर्णने करणानुयोगात आढळतात. प्रथमानुयोग किंवा कथानुयोग

ग्रंथांतही या विषयाने बरीच जागा व्यापली आहे. दिगंबर संप्रदायाच्या महापुराण, हरिवंशपुराण, पद्मपुराण इ. ग्रथात तसेच अन्य चरित्रग्रंथांतही हा सृष्टिविस्ताराचा विषय विस्तृतपणे लिहिलेला आहे. श्वेतांबर संप्रदायाचे भगवतीसूत्र, जंबुद्वीपप्रज्ञप्ति, सूर्यप्रज्ञप्ति, चंद्रप्रज्ञप्ति, इ. अगोपांग ग्रथ करणानुयोगाच्या वर्णनाने भरलेले आहेत.

दिगंबर संप्रदायातला या विषयाचा सर्वांत प्राचीन ग्रंथ लोकविभाग हा आहे. त्रिलोकप्रज्ञप्ति हा त्यानंतरचा ग्रंथ होय. जंबुद्वीपप्रज्ञप्ति नावाचा ग्रंथ दोन्ही संप्रदायांचा आहे. त्यांतल्या श्वेतांबराच्या जंबुद्वीपप्रज्ञप्तीत १३ उद्देश व २४२७ गाथा आहेत. त्यात भरत, ऐरावत, पूर्वोत्तर विदेह, देवकुरु, उत्तरकुरु, लवण समुद्र, ज्योतिषपटल, इ. प्रदेशाचे वर्णन आहे. [जै. सा. इ.]

**करणी** (१) राजस्थानातील एक देवता. बीकानेरहून २० मैलांवर असलेल्या देशनोक या गावी हिचे मंदीर आहे. ही देवी महामायेचा अवतार मानली जाते. तिच्या अवताराविषयी अनेक आख्यायिका राजस्थानात प्रचलित आहेत. त्यातली सर्वप्रसिद्ध आख्यायिका अशी–

जोधपूर राज्यातल्या सुवाप या गावी मेहोजी नावाचा एक चारण राहत होता. तो भगवतीचा परमभक्त होता. त्याला एका मागोमाग सहा मुलीच झाल्या. मग आपल्याला पुत्र व्हावा म्हणून त्याने देवीची प्रखर आराधना सुरू केली. काही कालाने देवी प्रसन्न होऊन त्याला म्हणाली, की 'तुला हवा तो वर माग.' मेहोजी बोलला, 'देवी माझे नाव चालावे'. त्यावर 'तथास्तु' म्हणून देवी अतर्धान पावली.

मेहोजीला मातवीही मुलगीच झाली कारण देवीकडे त्याने स्पष्टपणे मुलगा व्हावा, असे मागितले नव्हते; 'नाव चालावे' एवढेच त्याने मागितले होते आणि त्या मुलीने ते चालविले. कारण ही कन्या भगवतीचा अवतार होती. हिचा जन्म आश्विन शु. ७ मीस झाला. मेहोजीने तिचे नाव रिघुबाई असे ठेवले; पण करणी या लाडक्या नावानेच ती प्रसिद्ध झाली. वयात आल्यावर तिचा विवाह साठी गावच्या दीपोजी नामक चारणाशी झाला; पण तिने आजन्म ब्रह्मचर्यच पाळले. दीपोजीचा वंश चालण्यासाठी तिने आपल्या गुलाब नावाच्या बहिणीशी त्याला दुसरे लग्न करायला लावले. पुढे त्या भागात दुष्काळ पडला. त्यामुळे करणी देवीने ग्रामत्याग केला. ती आपले गोधन बरोबर घेऊन देशनोकच्याजवळ आली. तिथे काही काल राहिली. तिथे तिने आपली रवी जमिनीत पुरली आणि तिलाच पुढे पालवी फुटली, असे सांगतात. आजही तो वृक्ष तिथे दाखवितात. तिथून पुढे ती आजच्या देशनोक या गावी आली. त्या गावाची स्थापना तिनेच केली, असे सागतात.



करणीमाता मंदिर– राजस्थान

देशनोक गावी ती ५० वर्षे राहिली. तिचे ज्या ठिकाणी वास्तव्य होते, तिथेच तिचे मंदिर उभारण्यात आले आहे. तिचे वंशजच आजमितीस तिथे पुजारी आहेत.

हिची पाषाणमूर्ती चतुर्भुज आहे. चैत्र व आश्विन या महिन्यातल्या नवरात्रात इथे फार मोठा मेळावा भरतो. इथले एक वैशिष्ट्य असे, की करणी देवीच्या मंदिरात उंदरांचा भारी सुळसुळाट आहे. ते सारखे इकडून तिकडे पळत असतात. त्यांच्यावर पाय न पडेल, अशा बेताने यात्रेकरूला देवीची प्रदक्षिणा करावी लागते. इथे जर एखाद्याला पांढरा उंदीर दिसला, तर त्याला त्या रूपात देवीचेच दर्शन झाले, असे मानतात.

हिच्याच वरप्रसादाने बीकाजी या राजपुरुषाला राज्यवैभव प्राप्त झाले तेव्हापासून करणीदेवी ही बीकानेरच्या राजवंशाची कुलदेवी ठरली.

चारणकुलात शक्तिरुपिणी देवीने करणीसह चार अवतार घेतले. त्याविषयी पुढील दोहा प्रसिद्ध आहे––

**आवड तूठी भाटियाँ, कामेही गोडाँह ।**
**श्री बरवड सीसोदियाँ, करणी राठोडाँह ।।**

अर्थ–आवड नावाची देवी भाटियांना, कामेही गौडांना, बरवड सीसोदियाना व करणीदेवी राठोडांना वरदायिनी झाली.

राजस्थानात करणीदेवीविषयी असामान्य भक्ती आहे. [मरुभारती–ऑक्टो. १९५५; संयुक्त राजस्थान–फेब्रु. १९५७]

(२) पूर्व बंगालमधील एक कोष्टी जमात. यांची धार्मिक कृत्ये बारणा ब्राह्मण करतात. [ट्रा. का. बे.]

(३) लग्नात वरदक्षिणेशिवाय वर व तत्पक्षीय मंडळी याचा वधुपक्षाकडील लोक वस्त्र–पात्र–अलंकार देऊन सन्मान करतात, त्याला करणी म्हणतात.

## करणीदान

(१६८४ इ. स. चा सुमार) राजस्थानातील एक चारण कवी. उदयपूर राज्यातील सूलवाडा या गावी याचा जन्म झाला. हा डिंगल भाषेचा महाकवी होता. याने व्रजभाषेतही ग्रंथ लिहिले आहेत. याचा 'सूरजप्रकाश' नावाचा बृहद्ग्रंथ डिंगल भाषेत रचलेला असून तो लोकप्रसिद्ध आहे. चारणकाव्यपरंपरेतला तो एक हिरा आहे. त्या ग्रंथात ७५०० छंद आहेत. डिंगल भाषेचे ज्याला ज्ञान आहे, अशा प्रत्येक माणसाला करणीदानाच्या सूरजप्रकाशातले ५–१० दोहे तरी मुखोद्गत असतातच. करणीदान हा एक निर्भय कवी होता. सत्य सांगण्यात तो कोणापुढेही कचरत नसे. त्याच्याविषयी एक गोष्ट सांगतात, ती अशी––

एकदा जयपूरचा महाराजा जयसिंह व जोधपूरचा महाराजा अभयसिंह हे दोघे एकाच वेळी पुष्करतीर्थावर स्नानाला आले. एवढ्यात करणीदानाचीही स्वारी तिथे उपस्थित झाली. उभय राजानी त्याचा सन्मान केला. हळूहळू काव्यचर्चा सुरू झाली. एवढ्यात अभयसिंह कवीला म्हणाला 'बारहटजी, आज तुम्ही आम्हा दोघाविषयी काही तरी काव्यमय बोला. हे तीर्थ स्थान आहे. तेव्हा जे काही बोलाल, ते शंभर टक्के सत्य असू दे.'

करणीदानाला उत्तम सधी मिळाली. त्या दोन्ही राजांच्या दुष्कृत्यांबद्दल त्याला कधीतरी स्पष्ट बोलायचेच होते. यत्किंचितही न डगमगता लगेच त्याची वाणी पुढील दोहा वदली—

**पत जैपुर जोधाण**
**पत, दोनू थाप उथाप ।**
**कूरम मारयो डीकरो**
**कम धज मारयो बाप ।।**

अर्थ—तुम्ही दोघेही एकाहून एक वरचढ आहा. अहो जयपूरनरेश, तुम्ही सत्तेसाठी आपल्या पुत्राची हत्या केलीत आणि अहो जोधपूरवाले, तुम्ही आपल्या बापाचा खून पाडलात.

जयपूरचा महाराजा धूर्त होता. त्याने हा उघड उघड आरोप हसण्यावारी घालविला; पण जोधपूरनरेश अभयसिंह मात्र रागाने लाल झाला. त्याने तलवारीच्या मुठीला हात घालून म्हटले, 'दुसरा कोणी असता, तर त्याने तुझे शीरच धडावेगळे केले असते. चालता हो इथून. मला तुझे तोंड पाहायचे नाही.' त्यावर करणीदानाने उत्तर दिले, 'जर मी सच्चा कवी असेन, तर एक दिवस तुम्हाला माझे तोंड पाहावेच लागेल.'

पुढे इ. स. १७३१ मध्ये अभयसिंहाने गुजरातवर चढाई केली. अहमदाबादचा सुभेदार सर्बलंदखाँ याच्याशी घनघोर युद्ध करून त्याने अहमदाबाद जिंकले. या युद्धांत मारवाडी वीरानी आणि खुद्द अभयसिंहानेही अद्भुत पराक्रम केला. या युद्धप्रसंगावर करणीदानाने लगेच एक काव्य रचले. त्या काव्याची सर्वत्र प्रशंसा झाली. ती प्रशंसा अभयसिंहाच्याही कानी आली. त्यालाही ते काव्य ऐकण्याची अनावर इच्छा झाली. पण पुष्करतीर्थावर उच्चारलेले 'मी तुझे तोंड पाहणार नाही,' हे शब्दही त्याच्या लक्षात होतेच. त्याने कवीला बोलावून तर घेतले; पण त्याच्यामध्ये नि आपल्यामध्ये एक कनात उभी करून तो काव्य ऐकायला बसला. करणीदानाने धीर गंभीर स्वरात काव्याला प्रारंभ केला. होता होता अभयसिंह आणि सर्बलंदखाँ यांच्या द्वंद्वयुद्धाचा प्रसग सुरू झाला. कवीच्या वाणीत ओज प्रगटले. शब्द जणू ठिणग्यांसारखे उडू लागले. ऐकता ऐकता अभयसिह इतका बेफाम झाला, की त्याने 'वाहवा ! वाहवा !' म्हणत आपल्या कटयारीने मधली कनात फाडून करणीदानाचे मुख पाहिले व पुढे होऊन त्याला दृढ मिठी मारली. त्या काव्यावर अभयसिंह बेहद्द खूष झाला. त्याने करणीदानाला 'कविराज' ही पदवी दिली, 'लाखपसाव' दिला व आलावास गावाची जहागिरीही दिली. [ मरुभारती आक्टो. १९५८ ]

## करताळ

एक घनवाद्य. हे चिपळ्यांसारखेच असते. वरच्या अगाने निमगोल व आतल्या अंगाने सपाट असे काशाचे दोन तुकडे बनविले, की हे वाद्य होते. यातला प्रत्येक तुकडा टीचभर लांब व तीन बोटे रुंद असतो. याचा आकार मध्यापासून टोकांकडे निमुळता होत जातो. प्रत्येक हाती असे दोन तुकडे घेऊन हे वाद्य वाजवितात. हे तुकडे अंगठा व मध्यमा – अनामिका यांच्या पेरात खेळते धरून त्यांचा एकमेकांवर आघात करतात. बोटे भराभर चालवून करताळ वाजविणे, हे कौशल्याचे काम आहे. याचा आवाज मधुर येतो. काही भिक्षेकरी करताळाच्या साथीवर गाणी म्हणत भिक्षा मागतात; वैष्णव पंथी लोकांचे हे आवडते वाद्य आहे. बंगालमध्ये हे खोलाबरोबर (ढोल) वाजवितात. संगीतात ताल धरण्यासाठीही याचा उपयोग होतो. कित्येकदा दोन वर्तुळाकार लाकडी तुकडे डाव्या हाती धरून व उजव्या हाताच्या तळव्याने त्यांवर आघात करूनही करताळ वाजवितात.



करताळ

**करतोया** कामरूप देशाच्या पश्चिम सीमेवरून वाहणारी एक नदी (म. भा. वन ८५.३). हिलाच सदानीरा असे दुसरे नाव आहे. ही ब्रह्मपुत्रा नदीची एक शाखा आहे. गौरीच्या विवाहप्रसंगी कन्यादानाचे उदक शंकराच्या हातातून खाली सांडले व त्यातून या नदीचा उगम झाला. ही सोडून बाकीच्या सर्व नद्या श्रावण महिन्यात रजस्वला होतात; पण ही मात्र शुद्ध राहते म्हणून हिला सदानीरा असे म्हटले आहे. तीर्थयात्रापर्वात हिचे महत्त्व पुढीलप्रमाणे सांगितले आहे –

**करतोयां समासाद्य त्रिरात्रोपोषितो नरः ।**
**अश्वमेधमवाप्नोति प्रजापतिकृतो विधिः ॥**
(म. भा. वन ८५.३)

अर्थ – करतोया नदीवर येऊन जो मनुष्य त्रिरात्र उपवास करतो, त्याला अश्वमेधाचे फल प्राप्त होते. हा विधी प्रजापतीने केला होता.

कालिकापुराणात ही नदी तीस योजने लांब असल्याचे सांगितले आहे (५१.६५). हिचा उगम रंगपूर जिल्ह्यातील दोमार गावाच्या वरच्या बाजूस झाला आहे. मार्कंडेयपुराणाच्या मते ती विंध्य पर्वतात उगम पावते (५४.२५); तर वायुपुराणाच्या मते ती ऋक्षपाद पर्वतातून निघते (४५.१००). [हि. जॉ. ए. इं.; पु. इं.; श. क.; हि. ध.]

**करथी** पंजाबमधील पहाडी लोकांचे एक नृत्य. शेतातल्या पिकाची कापणी झाल्यानंतर चांदण्यारात्री गावातल्या एका मोकळ्या जागी स्त्री–पुरुष एकत्र जमून हे नृत्य करतात. हे स्त्री–पुरुषांचे नृत्य असले तरी संमिश्र नाही. बायका व पुरुष वेगवेगळी वर्तुळे करून नाचतात. या नृत्याच्या वेळी लोकगीते गायिली जातात व त्यांना ढोल व अन्य वाद्ये यांची साथ असते. [पंजाब – जीवन व साहित्य]

**करद** संगीत रत्नाकरात सांगितलेला मृदंगाचा एक प्रकार. **पाहा** – मृदंग. [डि. सा. इं. म्यु. म्यु.]

**करदर्शन** सकाळी उठल्यावर अन्य कोणतीही वस्तू पाहण्याआधी आपले हातांचे दोन्ही तळवे डोळ्यासमोर धरून करदर्शन करावे, असे सांगितले आहे. त्याचा मंत्र असा –

**कराग्रे वसते लक्ष्मीः करमध्ये सरस्वती ।**
**करमूले तु गोविन्दः प्रभाते करदर्शनम् ॥**

अर्थ – हाताच्या अग्रभागी लक्ष्मी, मध्यभागी सरस्वती व मूलभागी गोविंद राहतो. (म्हणून) सकाळी करदर्शन करावे.

हातात देवता वसत असल्यामुळे माणसाच्या हातून दिवसभरात कोणतेही दुष्कृत्य घडू नये, शक्य तर सत्कृत्यच घडावे, अशी या करदर्शनाच्या मागची भूमिका असावी.

**करदिकई** दक्षिणेतील मृदंगाचा एक प्रकार. याचा आवाज अस्वलाच्या गुरगुरण्यासारखा येतो, म्हणून याला हे नाव पडले. **पाहा**– मृदंग. [डि. सा. इं. म्यु. म्यु.]

**करदिसमेळ** दक्षिणेतील मृदंगाचा एक प्रकार. याचा आकार शंकूसारखा निमुळता असतो. हा लिंगायतांच्या देवळातून वाजविला जातो. **पाहा**–मृदंग. [डि. सा. इं. म्यु. म्यु.]

**करन्यास** नि + अस् = ठेवणे, या धातूपासून न्यास शब्द निघाला आहे. देवता किंवा आपली अंगे यांचा हाताच्या ठिकाणी न्यास करणे (त्या ठिकाणी बसविणे), याला करन्यास म्हणतात. तांत्रिक पूजाप्रकारात न्यासाला फार महत्त्व आहे. त्यामुळे शारीरिक पावित्र्य लाभते. नेहमीच्या पूजाविधीत येणारा न्यास पुढीलप्रमाणे––

**अंगुष्ठाभ्यां नमः हृदयाय नमः** (अंगठ्यांना व हृदयाला स्पर्श); **तर्जनीभ्यां नमः शिरसे स्वाहा** (तर्जनींना व मस्तकाला स्पर्श); **मध्यमाभ्यां नमः शिखायै वषट्** (मध्यमा व शेंडी यांना स्पर्श); **अनामिकाभ्यां नमः कवचाय हुम्** (अनामिकांना स्पर्श व दोन्ही हात आपल्या हृदयाकडे वळवणे); **कनिष्ठिकाभ्यां नमः नेत्रत्रयाय वौषट्** (कनिष्ठिका दोन्ही डोळे व भालप्रदेश यास स्पर्श); **करतलकरपृष्ठाभ्यां नमः अस्त्राय फट्** (तळवे व तळव्याची मागची बाजू यांना स्पर्श व टाळी वाजविणे); **पाहा**– लघुन्यास, महान्यास.

**करपल्लवी** एक सांकेतिक भाषा. बोटे आणि तळहात यांच्या साहाय्याने ही बोलली जाते. या भाषेतील खुणांचा श्लोक असा––

**आदर्शं कमलं चक्रं टंकारं तलहस्तकम् ।**
**पत्रं च याचना षट्कं भाषा हि करपल्लवी ॥**

अर्थ–अच्या बाराखडीसाठी आरश्याची खूण म्हणजे आपल्या बाजूने हाताचा उभा तळवा. कवर्गासाठी हाताची कमलाकृती. चवर्गासाठी तर्जनी चक्राकार फिरविणे. टवर्गासाठी तर्जनीचा हवेत आघात. तवर्गासाठी तळवा दाखविणे. पवर्गासाठी उभा तळवा आणि पसरट बोटे. यवर्गासाठी याचनेचा हात. श्वर्गासाठी बोटाने भुंग्याची गती दाखविणे.

बाराखडीसाठी बोटांच्या पेरांचा आणि प्रत्येक वर्गातल्या वेगवेगळ्या वर्णांसाठी बोटांचा उपयोग, अशा प्रकारे ही भाषा

बोलली जाते. महाराष्ट्रात नंदीबैल फिरविणारे लोक करपल्लवीचा उपयोग करतात. एक माणूस दात्याला त्याचे नाव विचारतो आणि ते करपल्लवीच्या साहाय्याने दूर उभा असलेल्या दुसऱ्या माणसाला सागतो. मग तो दुसरा माणूस त्या नावाचा मोठ्याने उच्चार करून ढोलके वाजवितो.

**करपात्री** जोग्यांचा एक वर्ग. हे लोक कर = हात हेच भोजनाचे पात्र समजतात. म्हणजे भिक्षा हातावरच घेतात आणि हातावरच खातात. [ म. श. को. ]

**करपुतळी** (सं. कज्जलपुतळी) काही लोक काश्याच्या थाळीला काजळाचा लेप देऊन त्यावर दिव्याचा प्रकाश टाकतात. त्या प्रकाशात जे आणि जसे काही दिसेल, त्याप्रमाणे इच्छुकाचे बरे-वाईट भविष्य सागतात. कोणी कोणी हाताच्या आंगठ्याच्या नखाला काजळ लावून त्यातही भविष्य पाहतात. [ म. श. को. ]

**करंभ** यवाची लापशी. प्रथम यवावरचे टरफल काढायचे, मग ते भाजायचे व त्याचे पीठ करून ते दुधात घोटायचे म्हणजे करंभ बनते (श. ब्रा. २.५.२.१४; ४.२.४.१८). करभ हा पूषण्वान् इन्द्र देवतेचा हवी आहे (सत्या. श्रौ. सू. ८.१). तिळांचीही अशीच लापशी बनवीत (वाज. सं. १९.२२). करंभाचे उल्लेख वैदिक साहित्यात अनेक ठिकाणी आढळतात. यवाची दुग्धमिश्रित लापशी हे वैदिकाचे आवडते अन्न असावे.

**करंभपात्र** चातुर्मास्यातर्गत वरुणप्रघास पर्वात करंभ पात्रांचा होम करण्यास सांगितला आहे. ही पात्रे यवाच्या पिठाची व दिवटीच्या आकाराची करतात. ती आगठ्याच्या पेराएवढी व एकच कंगोरा असलेली करावी, असे वाराह श्रौतसूत्रात सागितले आहे (७.३.१८). यजमानाचे जितके नातलग असतील त्याच्या संख्येपेक्षा एक जास्त इतकी ती पात्रे करायची असतात. [ विद्याधरशास्त्री भिडे ]

**करंभवालुक** कर्मभ्रष्ट लोकांसाठी निर्मित असा हा एक नरक आहे. [ पु. इ. ]

**करभाजन** ऋषभदेवाचा एक पुत्र व ब्रह्मज्ञानी. निरनिराळ्या युगात माणसे श्रीहरीच्या ज्या विविध रूपांची पूजा करतात, त्याचे वर्णन याने केले आहे (भाग पु. ५.४.११; ११.२.२१). जनकाला यानेच ज्ञानोपदेश केला व त्यामुळेच जनक विदेहपदवीला प्राप्त झाला.

**करमचूरव्रत** एक जैनव्रत. दोन वर्षे व आठ महिने एवढ्या कालावधीत ६४ दिवस जपजाप्य करून हे व्रत समाप्त करायचे असते. 'ॐ ह्री णमो सिद्धाणं सिद्ध परमेष्ठिने नमः' हा या व्रतातला जपमंत्र असतो. [ जै. व्र. वि. सं. ]

**करमपरब** मुंड लोकांचा एक सण. या सणाच्या देवतेला करमबोंगा म्हणतात. एखादा मुंड अडीअडचणीत सापडला किंवा आजारी पडला, तर तो करमबोगाला नवस करतो. त्या नवसाचे प्रतीक म्हणून एक टोपली तो छताला किवा भिंतीला टागून ठेवतो. करमसणाच्या दिवशी एखादे मूल जन्माला आल्यास त्याला करम हे नाव ठेवतात. करमबोंगाची अवकृपा झाल्यास तो लागोपाठ तीन वर्षे सणाच्या दिवशी करमबोंगाची पूजा करतो. या पूजाविधानाला ओडा करम असे म्हणतात. जेव्हा गावात साथ पसरते किंवा गावावर संकट येते, तेव्हा सगळा गाव मिळून करमबोगाची जी पूजा करतो, तिला हटु करम म्हणतात.

करमबोंगाचा वार्षिक पूजाविधी भाद्रपद महिन्याच्या वद्य ११ शीस करतात. त्याच्या दुसऱ्या दिवशी इंदीचा सण येतो. दोन्ही सण एका दिवशी आल्यास त्याला इंदीकरम म्हणतात. त्या दिवशी कुंवार मुली उपोषण करतात. १० मीच्या दिवशी करमसण आल्यास त्याला दसइ करम म्हणतात. ओडा करमचे नृत्य ज्याने नवस केला असेल, त्याच्या अंगणात होते. राज करम सार्वजनिक नृत्यांगणावर साजरा होतो. गावातील एखाद्या रस्त्यावर ज्याचे नृत्य होते, त्याला हटिया करम म्हणतात.

ओडा करम हा करम देवतेचा नवसाचा सण असतो. त्याचा विधी असा—

तिथी निश्चित झाली, की त्याआधी गावातल्या मुली यजमानाच्या परसात मक्याचे दाणे पेरतात. पूजेच्या मुख्य दिवशी त्या मुली उपोषण करतात. उत्सवाच्या दिवशी उषःकाली गावातल्या मुलीचा ताफा तरुण मुलाच्या सोबतीने करम वृक्षाच्या फांद्या तोडून आणायला जातो. मुलगे डहाळ्या तोडून मुलीच्या हातात देतात. मुली त्या डहाळ्या जमिनीला न लावता यजमानाच्या घरी आणतात. यजमानाने खड्डे खणून दिल्यावर मुली त्या डहाळ्या त्यांत पुरतात. यजमानपत्नी पूजासाहित्य पुढे आणते. यजमान प्रथम त्या डहाळ्याना पिठाचे व शेंदुराचे तीन पुंड्र ओढतो. डहाळ्यासमोर जमीन शिंपडून

तिच्यावर तांदुळाचे तीन पुंजके घालतो. ते पुंजके काळ्या कोंबडयाला खाऊ घालतो. मग त्या कोबडयाचे मुडके तोडतो. डहाळयांच्या मुळात दिवा लावतो. डहाळयांना नमस्कार करून आलिंगन देतो. पूजाविधीत भाग घेणाऱ्या मुला-मुलींना जेवण घालतो. करमपूजेची कहाणी ऐकतो. मग स्त्री-पुरुष मिळून करमबोंगाच्या प्रसन्नतेसाठी रात्रभर नृत्य करतात. [ एन्सा. मुं. ]

**करमपूजा** मुड लोकाचे एक व्रत. भाद्र० वद्य ११ शीला ते करतात. व्रतविधान ३ ते ४ दिवस चालते. या व्रतात तांदुळांच्या दारूची आवश्यकता असते. नाच-गाणेही चालते. काही ठिकाणी हे व्रत एकाच दिवसात पूर्ण करतात.

करम हा एक वृक्ष आहे. त्याची फांदी आणून परसात पुरतात. पाहणाच्या (पुरोहित) हस्ते त्या फांदीची पूजा करतात. बायका त्या फादीला पानसुपारी वाहतात. या पूजेत कोबडयाचा बळीही असतो. व्रतकर्त्याला दिवसभर उपास करावा लागतो. रात्री ढोल वाजवून नाच-गाणे होते. दुसऱ्या दिवशी सकाळी फांदीची मिरवणूक काढून तिचे नदीत विसर्जन करतात. पूजा झाल्यावर पाहण या व्रताची कथा सांगतो, ती अशी—

कर्मा व धर्मा असे दोघे बंधू होते. धर्मा व्यापारासाठी फिरतीवर जाई व कर्मा घरचा कारभार पाही. धर्मा परत येत असता कर्मा त्याला सामोरा जाई; पण हे सामोरे जाणे एक दिवस टळले. कारण कर्मा त्यावेळी करम वृक्षाची पूजा करीत होता. धर्माला त्या गोष्टीचा राग आला व त्याने ती फांदी उपटून टाकली. त्यामुळे करमदेव धर्मावर कोपला त्याचे शेत पुरात वाहून गेले. धर्माने पाहणाला या गोष्टीचे कारण विचारले. पाहण म्हणाला, की 'तू करमवृक्षाचा अपमान केलास, म्हणून असे घडले.' ते ऐकून धर्माचे डोळे उघडले. त्याने मग भावासह करमवृक्षाची पूजा केली.

हे व्रत मुख्यत्वे मुड स्त्रिया करतात. या व्रताचे पुण्य त्यांना न मिळता त्याच्या भावांना मिळते, अशी समजूत आहे. [ एस्. सी. मित्र ]

**करमा नृत्य** मध्यप्रदेश व त्याच्या पूर्व आणि उत्तर सीमांलगतचा प्रदेश यातील आदिवासी व खालच्या जातींचे हिंदू, कापणीच्या हंगामाच्या वेळी जो उत्सव करतात, त्याला करमा म्हणतात. भाद्रपदाचा शुद्ध पक्ष हा याचा काल असतो. त्यावेळी सर्व जमातीचे म्हणून जसे काही पूजाविधी होतात, तसेच ते प्रत्येक कुटुंबातही होतात. याचा मुख्य विधी म्हणजे करम वृक्षाच्या डहाळीचे पूजन हा होय. या उत्सवात नाच–गाण्याला महत्त्वाचे स्थान आहे. या नृत्याविषयी मझवार लोक एक कथा सागतात, ती अशी—

एका कुटुंबात सात भाऊ राहात होते. त्यांच्यापैकी सहा मोठे भाऊ कामासाठी शेतावर जात व धाकटा भाऊ त्याच्या बायकांना स्वयंपाकात मदत करी. थोरल्या भावांसाठी अन्न घेऊन जाण्याचे काम त्याच्याकडेच असे करम वृक्षाची एक फांदी अंगणात रोवून तो आपल्या सहा भावजयांसह तिच्याभोवती नृत्य करी, त्यामुळे कधी कधी त्याला शेतावर अन्न नेण्यास उशीरही होई. एक दिवस ते सहा बंधू अचानक घरी आले, तो त्यांना अंगणात नाच चाललेला दिसला. तो पाहून ते क्रुद्ध झाले व त्यांनी ती करमवृक्षाची फांदी उपटून नदीत फेकून दिली. त्यामुळे धाकटया भावाला राग आला व त्याने गृहत्याग केला. त्यानंतर त्या सर्व कुटुंबाची दुर्दशा झाली.

पुढे धाकटा भाऊ रानावनात भटकत असता एके दिवशी करमवृक्षाची एक फांदी नदीत तरंगत असलेली त्याला दिसली. ती हस्तगत करण्यासाठी तो पात्रात उतरत असता त्याला त्या फांदीतून पुढील शब्द ऐकू आले. 'तू पापी आहेस; मला स्पर्श करू नकोस.' मग त्याने करमदेवतेची प्रार्थना करून तिला प्रसन्न करून घेतले. तिच्या प्रसादाने त्याचे घरदार पुनश्च समृद्ध झाले. तेव्हापासून त्या टोळीतले लोक प्रतिवर्षी करमदेवतेची पूजा करू लागले.

ज्या प्रदेशात करमउत्सव होत नाही, तिथेही करमानृत्य मात्र धूमधडाक्याने चालते. शेतीच्या विविध हंगामातही ते करण्याची प्रथा आता रूढ झाली आहे. या नृत्यातील काही हावभाव कृषिकृत्यांसारखे बसविलेले असतात. 'भरपूर धान्य पिको' ही या नृत्याच्या द्वारे करमदेवतेला प्रार्थना असते.



करमा नृत्य

सरळ रांगेत किंवा वर्तुळाकार उभे राहणे, ढोलाची साथ

असणे किंवा नसणे, भिन्न अंगविक्षेप व पदन्यास, मंद किंवा द्रुतलय, यावरून करमा नृत्याचे अनेक प्रकार होऊ शकतात. मात्र त्या सर्व प्रकारात स्त्री-पुरुषाच्या रांगा वेगळ्या असतात. मिर्झापूरमध्ये स्त्री-पुरुष समोरासमोर सरळ रेषेत उभे राहून नाचतात. जशपूरमध्ये स्त्री-पुरुषांची दोन स्वतंत्र वर्तुळे असतात. नाचताना प्रथम उजवीकडे सरकतात त्यावेळी सर्वजण ताठ असतात. डावीकडे परतताना पुढे वाकून नाचतात. या प्रकाराला जुगिया म्हणतात. छोटा नागपूरमध्ये लूझखी नावाचा एक नृत्यप्रकार आहे, त्यात मुली लगडल्यागत नाचतात व टाळ्या वाजवितात. केसरिकप्पा नावाचा एक नृत्यप्रकार आहे, त्यात केसरी नावाची फळे तळ्यातून काढण्याचे हावभाव करतात. या वेळी ढोल वाजविणारे तरुण मुलींच्या समोर बसतात. नाच-रंगात आला, की काही मुलींच्या अंगात येते. त्यांचे नेसते वस्त्रही सैल होते. मग समोरचा तरुण लाथ मारून किंवा केस ओढून त्या मुलीला सावध करतो. हा नाच बराच प्रक्षोभक असून त्यात अश्लीलपणाही आढळतो. करमा झूमर, करमा लहकी, करमा रागिनी असेही याचे आणखी काही प्रकार आहेत.

करमा नृत्य हे मुंड आदिवासीचे सर्वाधिक प्रिय नृत्य आहे. मुंडारी भाषेत करमा नृत्याची शेकडो गाणी आहेत.

करमा गीताचे चार प्रकार आहेत – (१) करमराज–यात करमदेवतेची स्तोत्रे आणि तिच्या पूजेचे महत्त्व सांगणारी गीते येतात. (२) प्रेमगीते (३) बेताल आणि अश्लील गाणी व (४) गावगप्पा किंवा पौराणिक कथा सांगणारी गीते.

मुंडांचा लहसुआ नावाचा एक नृत्यप्रकार आहे, तोही करमा नृत्यातच येतो. त्यात स्त्री-पुरुष वर्तुळे करून नाचतात. पुढे वाकून नाचत नाचत वर्तुळाच्या मध्यबिंदूकडे जातात. आणि परत जाग्यावर येताना किंचित डाव्या बाजूला सरकतात. मध्य-प्रदेशात खल्ला नावाचा एक नृत्यप्रकार आहे. त्यात नाजूक पदन्यास व चक्राकार गतीचा सुंदर विलास दिसून येतो. ताडी व लहकी हे प्रकारही फार आकर्षक असतात. त्यांतले पद-लालित्य प्रेक्षणीय असते. [ दुर्गा भागवत ]

## करमाला

जपसंख्या मोजण्यासाठी हाताच्या बोटांच्या पेरांचा उपयोग करतात, त्याला करमाला असे नाव आहे. या मालेत एकूण १० पेरे मोजतात. याविषयी मुंडमालातंत्रात श्लोक आहे, तो असा—

**अनामिकात्रयं पर्व कनिष्ठा च त्रिपर्विका ।**
**मध्यमायाश्च त्रितयं तर्जनीमूलपर्विका ।**
**करमाला समाख्याता आरभ्यानामिकान्तरात् ।।**

अर्थ – अनामिकेची तीन पेरे, कनिष्ठिकेची तीन पेरे, मध्यमेचे तिसरे पेर व तर्जनीची तीन पेरे मिळून करमाला होते. हिचा आरंभ अनामिकेच्या मधल्या पेरावरून होतो.

करमालेची जपपद्धती अशी – अनामिकेच्या मधल्या पेरावर एक म्हणायचे. तिथून खाली मूळ पेरावर दोन, पुढे कनिष्ठि-केवर चढत्या क्रमाने तीन, चार, पाच, अनामिकेच्या वरच्या पेरावर सहा, मध्यमेच्या वरच्या पेरावर सात व तर्जनीच्या तीन पेरावर उतरत्या क्रमाने आठ, नऊ व दहा अंक मोजायचे. तर्जनीच्या खालच्या पेरावर येताच तशाच उलटया क्रमाने अनामिकेच्या मधल्या पेरापर्यंत यायचे. या एका उलट-सुलट फेऱ्यात वीस ही संख्या होते. करमालेत तर्जनीचे मूळ पेर हे मेरुमण्याच्या जागी समजायचे आणि ते ओलांडायचे नाही. तसेच मध्यमेच्या खालच्या दोन पेरांनाही स्पर्श करायचा नाही. जेव्हा मणिमाला नसेल, तेव्हा ही करमाला प्रशस्त सांगितलेली आहे.

## कर राजवंश

इ. स. च्या ८ व्या शतकाच्या मध्यावर ओडिसा प्रांतातला शैलोद्भव राजांचा अमल नष्ट झाला. त्यानंतरच्या २५० वर्षांच्या काळात त्या प्रदेशाच्या निरनिराळ्या भागात निरनिराळी राजघराणी राज्य करीत होती. त्यांच्या सीमा व परस्परसंबंध याविषयी काहीच माहिती मिळत नाही. जी थोडीबहुत मिळते, ती करनामक राजवंशाची. हा राजवंश कर्तृत्ववान् होता व पूर्व समुद्राजवळच्या बालासोर, कटक, पुरी व आजूबाजूचा काही प्रदेश, एवढ्या भागावर त्याची सत्ता चालू होती.

ओडिसात कर घराणे राज्य करीत असता बंगाल प्रदेशावर पाल राजे राज्य करीत होते. या दोन्ही घराण्याचे अधून मधून राजकीय संबंध आलेले दिसतात. या करवंशाला भौम अशीही दुसरी संज्ञा आहे. त्यावरून हे राजे भूमीपासून आपली उत्पत्ती मानीत, असे समजते. महेंद्र पर्वताच्या आसमंतात राह-णाऱ्या भौम लोकांचा विष्णुपुराणात उल्लेख आहे. ते भौम या कर घराण्याचे पूर्वज असावे. महानदीच्या दक्षिणेकडील प्रदे-शात ' माती वंशाचे ' जे लोक आहेत, त्यांचाही या भौमांशी संबंध असावा, असे वाटते.

या राजवंशाला कर हे नाव पडण्याचे कारण असे, की त्या वंशातील बहुतेक राजांनी आपल्या नावापुढे कर हे पद जोडले आहे. उदा० शिवंकर, शुभंकर इत्यादि. या घराण्या-तला पहिला राजा क्षेमंकरदेव हा होय. आठव्या शतकाच्या मध्यास याने ओडिसावर आपली सत्ता प्रस्थापित केली. त्यानं-तर क्षेमंकर धरून या राजघराण्यात १२ पुरुष व ५ स्त्रिया

राज्यारूढ झाल्या त्याचा क्रम पुढीलप्रमाणे —

(१) क्षेमंकरदेव (२) पहिला शिवंकरदेव ऊर्फ उत्तमसिंह (३) पहिला शुभाकरदेव (४) दुसरा शिवंकरदेव (५) पहिला शांतिकरदेव ऊर्फ गयाद (६) दुसरा शुभाकरदेव (७) तिसरा शुभाकरदेव ऊर्फ सिंहकेतु (८) त्रिभुवन महादेवी (९) दुसरा शांतिकरदेव (१०) चौथा शुभाकरदेव (११) तिसरा शिवंकरदेव (१२) तिसरा शांतिकरदेव (१३) पांचवा शुभाकर देव (१४) गौरी (१५) दंडीमहादेवी (१६) बकुलमहादेवी व (१७) धर्ममहादेवी.

वरीलपैकी तीन राजे बौद्धधर्मी होते. नवव्या शतकाच्या मध्यास या वंशाला पडता काळ आला होता, असे दिसते. कारण त्यावेळी बंगालच्या पाल घराण्यातील देवपालाने ओडिसावर स्वारी करून तो प्रांत हस्तगत केला होता. या स्वारीपूर्वी कर राजांनी बौद्ध धर्माचा त्याग करून शैव पथाचा स्वीकार केला होता. त्रिभुवन महादेवी ही विष्णुभक्त होती. इ. स. ९५० ननर या राजवशाची काय अवस्था झाली, ते समजायला मार्ग नाही. बहुधा सोमवशीय राजानी या घराण्याला पदच्युत केले असावे. कर घराण्यातील राजानी दिलेली दानपत्रे गुहदेवपाठक अथवा गुहेश्वरपाठक या ठिकाणाहून दिलेली आहेत. यावरून तिथे या राजघराण्याची राजधानी असावी, असे दिसते. [ए. इं. क.]


करवली

**करवली** लग्नात वराच्या बहिणीस करवली म्हणतात. करा म्हणजे मगल कलश. तो हातात घेऊन ती सुमुहूर्ताच्या वेळी वराच्या मागे उभी राहते किंवा वरप्रस्थानाच्या वेळी तो डोक्यावर घेऊन वराच्या मागे घोडयावर बसते. लग्नात विहिणीच्या खालोखाल करवलीचा मान असतो. वधूची माता करवलीचे पाय धुऊन तिला लुगडयाची घडी देते.

**करवाँ चौथ** उत्तर प्रदेशात कार्तिक वद्य ४ थीला हे नाव आहे. या दिवशी तिकडील स्त्रिया सौभाग्यवृद्धीसाठी व्रत करतात. त्यासाठी भितीवर चंद्र रेखतात. त्याच्याखाली शिव-पार्वती, गणपती व कार्तिकेय यांच्या मूर्ती काढतात. मग त्यांची पूजा करतात. व्रतकर्ती स्त्री दिवसभर उपवास करते. सायंकाळी साजशृंगार करून घरच्या वृद्ध स्त्रीला सौभाग्यवायन देते. कोऱ्या गाडग्यात घारगे भरून ते ब्राह्मणाला दान देते. रात्री चंद्र उगवल्यावर चंद्राला अर्घ्य देते व कहाणी ऐकून मग भोजन करते. या व्रताची कथा अशी —


करवाँ चौथ

पांडव वनवासात होते. अर्जुन तपश्चर्येसाठी इंद्रकील पर्वतावर गेला होता. तो गेल्यावर पाडवावर अनेक विघ्ने येऊ लागली. द्रौपदीने त्यासाठी कृष्णाचा धावा केला. कृष्णाने तिला दर्शन देऊन करवाँचतुर्थीचे व्रत करायला सांगितले. द्रौपदीने ते केले व त्याच्या पुण्याने पाडवांची संकटे दूर झाली पाहा – करकचतुर्थीव्रत.

**करवाझी** केरळातली एक जमात. कर=जमीन. यावरून जमीन धारण करणारे, या अर्थाने हे नाव पडले असावे. हे तमिळ भाषेचीच एक बोली बोलतात. गळयात मण्यांच्या माळा घालतात. गोमांस खातात. त्यांचा ऊर नावाचा एक जमातप्रमुख असतो. पुरोहिताचे कामही तोच करतो. त्याच्या मदतनिसाला वारिजन म्हणतात.

मुलींची लग्ने त्या वयात आल्यानंतर करतात. ताळीबंधन हा एकच महत्त्वाचा लग्नविधी असतो. अरगलिनिची ही यांची उपास्यदेवता होय. तिच्या प्रसन्नतेसाठी ते नृत्य करतात. पुनर्जन्म मानतात. मृतांना पुरतात व तीन दिवस सुतक पाळतात. [ट्रा. के.]

**करवीर** साप्रतच्या कोल्हापुराचे प्राचीन नाव. हे गोमंत पर्वताच्या पायथ्याशी वसले असल्याचे भागवतात सांगितले आहे. जरासंधाने कृष्ण व बलराम यांचा पाठलाग केला, तेव्हा हे बंधू मथुरेहून करवीराकडे पळून आले व तिथे एक रात्र विश्राती घेऊन प्रातःकाल होण्यापूर्वी गोमत पर्वतावर चढले, अशी कथा आहे.

पुराणकालात करवीर हे पश्चिम भारतातले एक प्रसिद्ध तीर्थ, शक्तिपीठ व व्यापारी केंद्र होते. स्कंद पुराणातल्या करवीर माहात्म्यात या नगराला दक्षिण काशी असे म्हटले आहे. तिथेच त्याचे वर्णनही दिले आहे –

**योजनं दश हे पुत्र काराष्ट्रो देशदुर्धरः ।**
**तन्मध्ये पञ्चक्रोशं च काश्याद्यादधिकं भुवि ॥**
**क्षेत्रं वै करवीराख्यं क्षेत्रं लक्ष्मीविनिर्मितम् ।**
**तत्क्षेत्र हि महत्पुण्यं दर्शनात् पापनाशनम् ।।**
**तत्क्षेत्रे ऋषयः सर्वे ब्राह्मणा वेदपारगाः ।**
**तेषां दर्शनमात्रेण सर्वपापक्षयो भवेत् ।।**

(स्कंद पु. सह्याद्रिखंड उ. २·२४-२७)

अर्थ – काराष्ट्र ( करवीर ) देशाचा विस्तार दहा योजने असून हा देश दुर्गम आहे. याच देशात मध्यभागी लक्ष्मीनिर्मित क्षेत्र असून ते काशी इ. क्षेत्रांहून अधिक पवित्र व दर्शनमात्रे पापाचा नाश करणारे आहे. इथे वेदपारंगत ब्राह्मण व ऋषी वास्तव्य करीत असून त्याच्या दर्शनानेच पापक्षय होऊन जातो.

सह्याद्रीच्या घाटमाथ्यावरचे हे एक मोठे शहर आहे. त्याच्या अवती-भोवती प्रचीतगड, महिपतगड, विशाळगड, बावडा इ. नऊ पहाडी किल्ले आहेत सस्थाने विलीन होण्यापूर्वी कोल्हापूर हे एक मोठे संस्थान होते. सांप्रत ते जिल्हयाचे ठिकाण झाले आहे. या जिल्हयातून खाली कोकणात उतरण्या-साठी आबाघाट, फोंडाघाट इ. बरेच गाडचा जाण्याजोगे व व केवळ पायवाटेचे असे घाट आहेत. कोल्हापूरला लागूनच पंचगगा नदी वाहते. या शहरात रकाळे नावाचा एक मोठा तलाव आहे. आणखीही बरेच होते; पण ते आता बुजविले गेले आहेत. या भागात उसाची लागवड फार मोठचा प्रमाणा-वर होते व गुळाचा धदाही तेजीत चालतो. कोल्हापूर हे मराठी चित्रपट सृष्टीचे आद्यपीठ समजले जाते.

कोल्हापूरच्या इतिहासाचे प्राचीन हिंदू कारकीर्द, मुसलमानी कारकीर्द व मराठचाची कारकीर्द असे तीन कालविभाग पडतात. १८७७ साली इथे एका मोठचा बौद्ध मंदिराचे अवशेष सापडले आहेत. इ. स. च्या पहिल्या शतकातील आंध्रभृत्य राजांची नाणीही सापडली आहेत. आध्रभृत्य, कदब, चालुक्य, राष्ट्रकूट, शिलाहार व देवगिरीचे यादव या घराण्यांचा या प्रदेशावर अंमल होऊन गेला. १३४७ साली कोल्हापूर बहामनी सुलता-नांच्या ताब्यात गेले. १४९८ पासून इथे विजापुरकरांचा अमल सुरू झाला. छत्रपती शिवाजीने विजापुरकराकडून हा प्रदेश जिकून घेतला. १७०७ साली छत्रपती शाहू व ताराबाई याच्यात सत्तेबद्दल संघर्ष सुरू झाला. १७३० साली त्या दोघांची तडजोड होऊन कोल्हापूर प्रात ताराबाईला तोडून देण्यात आला. सस्थान विलीन होईपर्यंत ताराबाईच्या वशजाकडे हा प्रदेश चालत राहिला.



अंबाबाईचे मदिर – कोल्हापूर

महालक्ष्मी ही करवीर पीठाची मुख्य देवता होय. हिचे मदिर शहराच्या मध्यभागी व पश्चिमाभिमुख आहे. मंदिर दिशासाधन करून बाधलेले आहे. या मदिराला पहिला लाकडी व दुसरा दगडी असे दोन सभामंडप आहेत. मात्र लाकडी मंडपातून दगडी मंडपात जायला प्रवेशद्वार नाही. मंदिराभोवती प्रशस्त प्राकार आहेत. मंदिरात जाण्यासाठी उत्तर व दक्षिण या दोन्ही अंगी दरवाजे ठेवले आहेत. महालक्ष्मीच्या उजव्या हाताला महाकाली व डाव्या हाताला महासरस्वती या दोन देवतांची मंदिरे लागूनच आहेत. मुख्य मंदिरातून महाकालीच्या मंदिराकडे जाताना 'वाटेत' काळचा पाषाणावरचे श्रीचक्र दिसते. हे महाकालीचे मंदिर स्थापत्य शिल्पाचा एक सुंदर नमुना आहे. महासरस्वतीचे मंदिर मात्र ओबडधोबडच आहे.

महालक्ष्मीची मूर्ती काळचा पाषाणाची व तीन फूट उच

आहे. ती चतुर्भुज असून तिने मातुलिंग, गदा, खेटक व पानपात्र अशा चार वस्तू धारण केलेल्या आहेत. तिच्या मुकुटावर भगलिंगाच्या आकृती असाव्या, असे श्री. खरे म्हणतात. काही वर्षापूर्वी या देवतेवर वज्रलेप नामक संस्कार झाला व त्यामुळे तिच्या मूळ रूपात थोडा फरकही पडला. आता तिच्या मस्तकावर नागफणा, तिच्याखाली लिंग आणि त्याभोवती योनी असे दृश्य आढळेल.

या मंदिराला अनेक नक्षीदार स्तंभ आहेत. मंदिराचा चौथरा तारकाकृती आहे. मंदिराचे गर्भागार कर्णदेव नामक एका चालुक्याच्या सुभेदाराने ६३४ साली बांधले, असा इतिहासज्ञांचा तर्क आहे. पुढे शिलाहार वंशातल्या मारसिंह राजाने या मंदिराचा कलापूर्ण विस्तार केला व त्याच वंशातल्या गंडरादित्याने त्यावर कळस चढविला. यादवाच्या सत्ताकालात १२१८ साली या मुख्य मंदिराला महाकालीचे व महासरस्वतीचे अशी दोन मंदिरे जोडली गेली.

देवी भागवतात महालक्ष्मी व करवीर यांचे दोन ठिकाणी संयुक्त उल्लेख आहेत. तिथल्या पार्वतीच्या रूपाला महालक्ष्मी असे नाव असल्याचेही तिथे सांगितले आहे. मुसलमानी अमलापर्यंत या महालक्ष्मीचे महत्त्व एकसारखे वाढत होते. त्यानंतर मात्र या देवस्थानाला वाईट दिवस आले. मुसलमानानी मंदिराची नासधूस केली आणि देवीला पुजाऱ्याच्या घरी लपून छपून वास्तव्य करावे लागले. १७१५ साली तिचा हा अज्ञातवास संपला व पूर्वीच्या मंदिरात तिची पुन:प्रतिष्ठा झाली. तेव्हापासून आजतागायत तिची पूजाअर्चा अव्याहत चालू आहे. सध्याची मूर्ती व प्राचीन मूर्ती यांची वर्णने तोलून पाहिली, तर मूर्तीच्या चार हातांपैकी खालच्या दोन हातांतील आयुधाची अदलाबदल झालेली दिसते. त्यावरून वाटते, की पूर्वीची मूर्ती निराळी होती व आजची मूर्ती निराळी आहे. हा बदल मुसलमानी अमलात झाला असावा.


महालक्ष्मी–कोल्हापूर

सांप्रत या देवीला अंबाबाई असे म्हणतात. पण हे नाव लौकिक आहे; ग्रांथिक नव्हे. महाराष्ट्रातल्या स्त्रिया अंबाबाईला सौभाग्याची देवता मानतात. तिच्यावर त्यांची नितांत श्रद्धा आहे. त्या तिची खणा-नारळाने ओटी भरतात व मंगळवारी तिच्या कृपेसाठी उपवास करतात. कोल्हापूर हे शक्तिक्षेत्र म्हणून समजले जात असले, तरी प्राचीन काळी कोल्हापूरला शिवक्षेत्रच मानीत.

जैन लोक या देवीला पद्मावतीदेवी असे म्हणतात व त्याच नावाने तिला भजतात.

कोल्हापूरजवळ पंचगंगेच्या काठी ब्रह्मगिरी नावाची एक टेकडी आहे त्या टेकडीचे १९४५ साली पुण्याच्या डेक्कन कॉलेजतर्फे उत्खनन झाले. त्या उत्खननात २००० वर्षापूर्वीचे एक नगर सापडले. त्यातील घरे भाजलेल्या विटांची होती व त्याचा पायाही काळजीपूर्वक घातलेला होता. स्वयंपाक घरात दोन चुली आढळल्या, त्या वाटोळे तीन दगड मांडून केल्या होत्या. चुलीजवळ पाटा-वरवंटा व दुसऱ्या बाजूस खोलवर पुरलेला एक रांजण आढळला. ताट, थाळी, तांब्या, लोटा, पणती, वाटचा व झाकणे ही सर्व पात्रे मातीचीच पण कलापूर्ण दिसली. काही भांड्यात शिधासामग्रीही आढळली. कापसाचे धागे सापडले; पण संपूर्ण वस्त्र मिळाले नाही. तलवार, चाकू, बाणाची टोके, कुऱ्हाड, कोयता, इ. हत्यारेही सापडली. दागिनेही भरपूर गवसले. काही वस्तूंवरून, त्या २००० वर्षापूर्वीच्या काळात भारताचा रोमन संस्कृतीशी संबंध आला असल्याचे सूचित झाले. महाराष्ट्रात २००० वर्षापूर्वी नागरिक जीवन कशा प्रकारचे होते, ते स्थूल मानाने समजण्यास या उत्खननाची बरीच मदत झाली आहे. [म. चा. दै.; ती. म.; वि. मु. रा. प., म. ज्ञा. को.]

## करवीरप्रतिपद्व्रत

ज्येष्ठ शु. १ देस हे व्रत करतात. देवालयाच्या बागेतील करवीर वृक्षाची 'आकृष्णेन रजसा' (ऋ. १. ३५. २) या मंत्राने पूजा करणे, हा या व्रताचा विधी आहे. तमिळनाडमध्ये हे व्रत सूर्यव्रतांपैकी आहे. फल दुःख व रोग यांचा नाश. [हि. ध.; व्रतपरिचय]

## करवीर्य

आयुर्वेदाचा एक प्राचीन आचार्य. हा दिवोदास धन्वतरीचा शिष्य व सुश्रुताचा समकालीन होता. याचे एक शल्यतंत्र होते. [आ. इ.]

## करसाळ गीते

गोंडांची अंत्यसंस्काराची गाणी. मृताच्या दहाव्या दिवशी रात्री गावाबाहेर एका सागवृक्षाच्या खाली बसून ही म्हटली जातात. या विधीसाठी मृताचे आप्तेष्ट जमा होतात. मग एक शेकोटी पेटवितात. जम-

लेले लोक तिच्या दोही अंगी दोन फड करून बसतात. गोंडांचे पुरोहित फडाचे म्होरके असतात ही गाणी सवाल जबाबाच्या स्वरूपाची असतात. एक पक्ष सवालाचे गाणे म्हणतो व दुसरा त्याला गाण्यातच जबाब देतो. या गाण्यांना मृदंग, मुरली व एकतारी याची साथ असते. अविवाहित तरुणाना या विधीत भाग घेता येत नाही. या गीतांचा एक नमुना असा—

**किरिविरि किरिविरि करवंता**
**सैयरनिय्या पोल्लो बतायेगे**
**कहानी कहानी इंतुनेर**
**किरिविरि—**
**कहानी केजेका इंतोव**
**केंजा हीरा; किनडाके केवि**
**केवि ओकमी केंजा**
**नूंगी चोपोलो किनडाके केवि**

भावार्थ— मी खरी गोष्ट सांगेन. लहान भावा, तू गोष्ट सांग म्हणतोस, तर ऐक. गोष्ट तिळभरच आहे. लैया कुमारी· सातपदरी लुगडे फाडून ती बाहेर येते. अशी बळकट ही कोण ? सजीव का निर्जीव ? या धरित्रीवर तिचा शोध कर. आपण एका गावचे लोक. भांडण नको, रुसवा नको. आपण हा खेळ प्रेमाने खेळू. [लो. सा. रू.]

**करहाटक** सातारा जिल्ह्यातील कृष्णा—कोयना संगमावर वसलेले एक नगर. याचा उल्लेख महाभारतात मिळतो (सभा ३१·७०). **पाहा** — कऱ्हाड.

**करा** ( स. कलश ) महाराष्ट्रात लग्नाच्या आधी घाणा भरायच्या वेळी एक पाण्याचा गडवा भरून ठेवतात· त्यात पैसा—सुपारी टाकून वर आंब्याचा टाळा आणि नारळ ठेवतात. लग्न लागायच्या वेळी करवली हा करा हाती धरून वराच्या मागे उभी राहते. लग्न उरकेपर्यंत हा करा कायम ठेवतात. **पाहा**— करवली.

**कराडी** एक जात. हे लोक फक्त कुलाबा जिल्ह्यात आढळतात. शेती व मोलमजुरी करून राहतात. भाषा मराठीच; पण बरीच अशुद्ध बोलतात. राहणी व पेहेराव मराठ्यांप्रमाणे असतो. [ म. ज्ञा. को. ]

**करावह** इस्लामी धर्मशास्त्रातला सोयरीक या अर्थाचा शब्द. सोयरीक करण्यासबधी त्यांच्या शास्त्रात पुढील विधि-निषेध आहेत— माता, कन्या, आत्या, मावशी, सावत्र आई, आजी, भाची, नात, सासू, सून, नातसून यांच्याशी लग्नसंबंध निषिद्ध आहे. एका पुरुषाला दोन बहिणीशी लग्न करता येत नाही; पण पत्नी मृत झाली, तर तिच्या बहिणीशी लग्न करता येते. मृत भावाच्या पत्नीशी लग्न करणे मुसलमानात सर्वमान्य आहे. चुलत भावडांची लग्नेही श्रेष्ठ समजली जातात. [ डि इ ]

**करारी** शाक्तांचा एक उपपंथ. कराल = भयंकर या शब्दापासून हे नाव बनले असावे. हे काली, चामुडा, छिन्नमस्ता अशासारख्या उग्र रूपात शक्तीची उपासना करतात. प्राचीन काळी हे देवीला नरबलीही अर्पण करीत. त्रिशूळ किवा गळ यानी अंग भोसकणे, जीभ किवा गाल यातून सळया आरपार घालणे, शस्त्राने जखमा करून घेणे, तीक्ष्ण टोकाच्या सुळचांवर निजणे, अशा अघोरी उपायानी हे देहदंड करून घेतात व लोकाकडून पसे उकळतात. हे लोक भारतात सर्वत्र आढळतात. [ म. ज्ञा. को. ]

**कराल** एक प्राचीन आयुर्वेदाचार्य. हा विदेहाचा वंशज होता. अष्टागसंग्रहावरून कळते, की निमि विदेह हा त्याचा गुरू होता (पृ. २). सुश्रुत संहितेच्या व्याख्येत त्याला शालाक्यतत्रकार म्हटले आहे ( सु. सं. उ. १·४-७ वरील व्याख्या ). अनेक सहिताकार व टीकाकार यांना करालाचे तंत्र परिचित होते. [ आ. इ. ]

**करालिया** एक मुसलमान जात. हे लोक गुजरातेत आढळतात. हे सुन्नी पंथाचे असून व्यवसायाने कुंभार आहेत. हे कठियाराशी लग्नसबंध करतात. दोन्ही जातीची मिळून एक पंचायत असते. हे लोक आंब्याच्या मोसमात ज्ञातिभोजन घालतात. या भोजनास हजर न राहील त्याला दंड द्यावा लागतो. यांच्या स्त्रिया सुदर, बांधेसूद व काटक असतात. [मु. इ. जा.]

**कराष्टमी** आश्विन वद्य ८ मीचे नाव. या दिवशी कुमारिका गंगोदकाने भरलेला करा घेऊन त्यावर देवीची पूजा करतात. ही चाल काशीच्या आसपास दृष्टीस पडते. [ म. ज्ञा. को. ]

**करिकाल चोळ** ( इ. स. चे २ रे शतक ) चोळ राजघराण्यातील सुप्रसिद्ध पुरुष. हा महापराक्रमी होता. याने चोळराज्य स्थिरपद केले. हा विद्वानांचा चाहता होता. **पाहा**— चोळ राजवंश.

**करिदिन** ग्रहण, अयनसंक्रान्ती, होळी, प्रेतदाह व वैशाख अमावस्या या दिवसांच्या दुसऱ्या दिवसाला करिदिन असे म्हणतात व तो दिवस प्रवास आणि शुभकृत्ये याना वर्ज्य समजतात.

**करिंपालन** केरळातली एक लहान जात. करि=कोळसा, यावरून हे नाव पडले आहे. हे लोक अनेक ठिकाणी हिंडून शेती करणे, शिकार करणे, लाकडे तोडणे' रानातील मिऱ्ये गोळा करणे, कोळसे वाहून नेणे इ. व्यवसाय करतात. यांच्यातले जुन्या वळणाचे लोक जटा वाढवितात. बायका शिरोभूषण घालतात. मल्याळम्‌चीच एक बोली बोलतात. गोमांस खातात. या लोकाचे धर्मांतर मोठ्या प्रमाणावर झाले आहे. हे मरुमक्कतायम् पद्धतीचा वारसा पाळतात.

**विवाहप्रथा** – मुलीला देज द्यावे लागते. आधी उपवर मुलीकडून सेवा करून घेऊन मग तिच्याशी लग्न करणे, असाही प्रकार आहे.

**मृतिकप्रथा** – प्रौढ मृतांना जाळतात. लहान मुलांना पुरतात. मृताचे श्राद्ध करतात. [ ट्रा. के.; का. ट्रा. स. इं. ]

**करिव्रत** एक काम्यव्रत. याची देवता ब्रह्मा आहे (मत्स्य पु. १०१·७२). उपवास व सुवर्णाच्या दोन हत्तींसह रथदान हा याचा विधी आहे. फल– पुढील जन्मी राज्यलाभ. [ हे. व्र. ]

**करी** त्रेसष्ट नायन्मारांपैकी एक. कवित्वाबद्दल राजाकडून मिळालेले अपार धन याने मदिरांच्या जीर्णोद्धारात खर्च केले. यथाकाल याला शिवकृपा लाभली.

**करीतलाई** कटणी पासून ३० मैलावर असलेले प्राचीन कलाकृतींचे एक मोठे केंद्र. दशावतार, सूर्य महावीर, गणेश यांच्याप्रमाणेच जैनाच्याही सुदर मूर्ती येथे आहेत.

**करुणरस** शृंगारादी आठ रसात करुण रसाचे स्थान तिसरे मानलेले आहे. भरताच्या नाटचशास्त्रात शृंगार व हास्य यांच्यानंतर याचे स्थान मानले असून त्याची उत्पती रौद्र रसापासून होत असल्याचे सागितले आहे. या रसाची प्रक्रिया साहित्यदर्पणात पुढीलप्रमाणे सागितली आहे–

**इष्टनाशादनिष्टाप्तेः करुणाख्यो रसो भवेत् ।**
**धीरैः कपोतवर्णोऽयं कथितो यमदैवतः ॥**
**शोकोऽत्र स्थायिभावःस्यात् शोच्यमालम्बनं मतम् ।**
**तस्य दाहादिकावस्था भवेदुद्दीपनं पुनः ॥**
**अनुभावा दैवनिन्दाभूपातक्रन्दितादयः ।**
**वैवर्ण्योच्छ्वासनिश्वासस्तम्भप्रलयनानि च ॥**
**निर्वेदमोहापस्मारव्याधिग्लानिस्मृतिभ्रमाः ।**
**विषादजडतोन्मादचिन्ताद्या व्यभिचारिण. ॥**

(परि. ३·४०)

अर्थ–इष्ट वस्तूचा किंवा व्यक्तीचा नाश व अनिष्टाची प्राप्ती यामुळे करुणरस निर्माण होतो. विद्वानांनी हा कपोत वर्णाचा असल्याचे व याची देवता यम असल्याचे सांगितले आहे. शोक हा याचा स्थायीभाव आहे. ज्याच्या विषयी शोक करायचा ती व्यक्ती किंवा वस्तू हा आलबनविभाव होय. व्यक्ती नष्ट झाली असली, तर तिच्या गुणवर्णनाने आणि रोगपीडित असल्यास तिला होणाऱ्या दाहादी वेदनानी शोकाची भावना उद्दीप्त होणे, हा उद्दीपनविभाव होय. दैवाला दोष देणे, भूमीवर अंग टाकणे, आक्रोश करणे, हे या रसाचे अनुभाव असून शरीर फिकट होणे, दीर्घ नि.श्वास टाकणे, वृत्तींना स्तंभ येणे, बडबडणे, वैराग्य येणे, मोह होणे, झेडू फुटणे, व्याधी उत्पन्न होणे, ग्लानी येणे, स्मृतिभ्रंश होणे, विषाद, जडता, उन्माद व चिता उत्पन्न होणे, इ. हे या रसाचे व्यभिचारीभाव होत.

इतर रसांपेक्षा हा करुणरस विशेषत्वाने अनुभवाला येतो. जगात सुखाऐवजी दुःखाचाच सुकाळ आहे. सुख कुठे आहे, ते हुडकायलाच जावे लागते, पण दुःख मात्र जिकडे दृष्टी वळेल, तिकडे हमखास आढळते. एकदरीत हा ससार दैन्य–दुःखांनी भरलेला आहे. ही दैन्य–दुःखे पाहून मोठमोठ्या कवीचे हृदय द्रवले आहे आणि त्यानी आपल्या काव्यातून करुणरसाचा पूर वाहविला आहे. महाभारतात नल–दमयती, सावित्री, इ. पुष्कळ कथांतून करुणरस उत्कटत्वाने दिसतो. स्त्री-पर्वात तर त्याला महापूर आलेला आहे. रामायणात रामाचे वनप्रस्थान, दशरथाचा मृत्यू, सीताहरण इ. प्रसंगी करुणरसाचा उत्कट परिपोष झालेला आहे. भवभूतीचे उत्तररामचरित तर करुण रसाचेच नाटक आहे भवभूतीचा दावाच असा आहे, की ' एको रसः करुण एव 'करुणरस हाच एकमेव रस आहे. कालिदासाने रघुवंशात वर्णिलेला अजविलाप हा करुणरसाच्या काव्यात श्रेष्ठ प्रतीचा मानला गेला आहे.

करुणरसाची काव्यात वाचकाला व नाटकात प्रेक्षकाला होणारी अनुभूती सुखात्मक असते की दुःखात्मक, असा एक विवादास्पद प्रश्न या रसाच्या सबंधात उपस्थित केला जातो. नाटयदर्पणाचा कर्ता रामचंद्र गुणचंद्र याने या विषयाचे विवेचन करताना करुण हा ' सुखदुःखात्मको रसः ' असे म्हटले

आहे (कारिका १०९). कित्येक आचार्यांनी सर्व रसांचे दोन विभागांत वर्गीकरण केले आहे. शृंगार, वीर, हास्य, अद्भुत व शात हे पाच रस अनुकूलवेदनीय असल्यामुळे त्यांना सुखात्मक वर्गात घातले असून करुण, रौद्र, बीभत्स व भयानक हे चार रस प्रतिकूलवेदनीय असल्यामुळे त्यांना दु खात्मक वर्गात घातले आहे. रसकलिका, दशरूपक, इ. अनेक ग्रंथांतही करुणरसाला दु.खात्मक मानून मग त्याच्या आनंदात्मकतेविषयी विचार केला आहे. रसिकांना करुणरस आवडतो व त्यांची त्या रसाच्या ठिकाणी उत्तरोत्तर प्रवृत्ती होते, हेच करुणरसाच्या आनंदात्मकतेचे महत्त्वाचे प्रमाण मानलेले आहे (दशरूपकावरील धनिककृत व्याख्या ४.४४–४५). [सु. का. शा.; करुणरस–डॉ. ब्रजवासीलाल श्रीवास्तव; हि. सा को.]

**करुणवीणा** बासरीसारखे एक वाद्य. शिल्पकृत्यात नक्षीसाठी या वीणेचा आकार कोरतात. [एन्सा. हिं. आ.]

**करुणा** चित्ताची एक भावना किंवा वृत्ती. दया, कृपा, अनुकंपा असे या शब्दाचे पर्यायशब्द आहेत. दुःखी जीवांच्या विषयी दया किंवा सहानुभूती या रूपात ही भावना व्यक्त होते. मनुष्याचा नैतिक व आध्यात्मिक विकास होण्यासाठी त्याच्या चित्तात करुणा निर्माण होणे आवश्यक आहे, असे दार्शनिक सांगतात. चित्ताची शाती व समता याच्या प्राप्तीसाठी करुणा आवश्यक आहे. पातंजल-योगसूत्रात मैत्री, मुदिता व उपेक्षा याच्या बरोबरीने करुणेचा नामनिर्देश येतो. जैन व बौद्ध ही दर्शनेही करुणेचे महत्त्व सांगतात. बोधिसत्त्वाचे हृदय करुणेने ओतप्रोत भरलेले असते व ते प्राणिमात्राची दुःखे दूर करण्यासाठी सदैव बद्धपरिकर असतात, असे बौद्ध साहित्यात सांगितले आहे. [हि. विं. को.]

**करुंपुरत्तन** द. भारतातील एक जात. करुअरुत्तर=नाश करणारे, या शब्दाचा करुंपुरत्तन हा अपभ्रंश आहे. एका फितुर सैनिकामुळे वेल्लाळ या चोळ राजाचा नाश झाला व त्यामुळे त्या फितुराच्या वंशजांना हे नाव मिळाले. विन्स्लोच्या मते ताडी काढणाऱ्या लोकांना हे नाव आहे. काही वेळा, या जातीचे नाव करुंपुरम असेही लिहिलेले आढळते. हे बरोबर असेल, तर मुळात ही जात शानान किंवा इलुवन असली पाहिजे. [का. ट्रा. स. इं.]

**करुप्पण्ण** तमिळनाडचा ग्रामदेव. मदुरेचे कल्लार हे याचे भक्त आहेत. साखळी, गदा, भाला आणि विळा ही याची आयुधे आहेत. तिकडील लोक त्याला ही आयुधे वाहण्याचा नवस करतात. इष्ट कामना सिद्ध झाल्यावर वरील



करुप्पण्ण

आयुधे त्याच्यासाठी एखाद्या झाडावर टांगून ठेवतात किंवा जमिनीत पुरतात. [सा. इं. इ. गॉ. गॉ.]

**करुमलै** याचा अर्थ काळी टेकडी असा आहे. तमिळनाडमध्ये ही टेकडी असून ती रंगमलैच्या दक्षिणेस सुमारे पाच मैलावर आहे. ही टेकडी पवित्र मानली जाते. एकमेकांना लागून असणाऱ्या दोन शिलाखडामधून इथे एक झरा वाहतो. यात्रेकरू शनिवारी तिथे स्नानासाठी जातात. [मदुरा गॅझे.]

**करूरम्मा** (इ. स. १७ वे शतक) केरळातील एक संत स्त्री. करूर हे तिचे गाव त्रिचूरपासून जवळच आहे. नारायण भट्टतिरि व पून्तानम् हे केरळीय सत तिला समकालीन होते; पण त्या दोघांपेक्षाही करूरम्माची भक्ती सखोल होती. भगवान तिला वश होता. तिच्या घरी बायका पडदा पाळीत. एक दिवस घरात कोणीही नसता एक अतिथी तिच्या घरी आला. तेव्हा तिची लाज राखण्यासाठी भगवान बालरूप घेऊन तिथे प्रगटला व त्याने अतिथीला भोजन वाढले. नारायण भट्टतिरि हा करूरम्माला फार मानीत होता. आपल्या अन्तकाळी तिने आपल्या जवळ राहावे, असा त्याने आग्रह धरला व करूरम्माने ती त्याची इच्छा पूर्ण केली. करूरम्मा वात्सल्य-

भावनेने देवाची भक्ती करी व देवही शिशुरूपाने तिच्या अगावर खेळे, असे सांगतात. **पाहा** – नारायण भट्टतिरि, पून्तानम्; [ पू. प. सं. म. ]

**करूष** एक देश व लोक. काशी आणि वत्स या देशांच्या दक्षिणेस चेदी व मगध यांच्यामध्ये असलेल्या पहाडी प्रदेशाला प्राचीन काळी करूषदेश असे नाव होते. रीवा हे त्याचे केंद्र असून, त्या देशाचा विस्तार पश्चिमेस केन नदीपासून पूर्वेस बिहारच्या सीमेपर्यंत होता.

करूष हा वैवस्वत मनूचा सहावा पुत्र होय. त्याच्या संततीला कारूष असे म्हणत. हे लोक दाक्षिणात्यांपासून उत्तरापथाचे संरक्षण करीत. हे जातिवंत लढवय्ये होते व ब्राह्मण आणि ब्राह्मणधर्म याचे समर्थक होते. त्यांच्या लढाऊ वृत्तीचा उल्लेख पाणिनीनेही आपल्या गणपाठात केला आहे (४·१·१७८ वरील गणपाठ ). त्यांचा प्रदेश विंध्य पर्वतराजीवर असून तो दुर्गम होता. महाभारतात कारूषांच्या अनेक शाखा आढळतात. त्यांच्या शेजारच्या प्रदेशात राहणाऱ्या जाती त्यांना आपल्या बरोबरीचे मानीत नसत.

दाशरथी रामाच्या काळात या प्रदेशात सुंदाची पत्नी ताटका ही कारूषांची अधिनायिका होती. ती वैदिक धर्माच्या विरुद्ध होती. आपल्या प्रदेशात ती ऋषींना आश्रम स्थापू देत नसे. तिचा पुत्र मारीच हा रावणाचा मित्र होता. विश्वामित्राने रामाच्या साहाय्याने त्याला विंध्य प्रदेशातून दक्षिणेकडे पिटाळले. अनेकवार प्रयत्न करूनही त्याला करूष देशाचे राज्य परत मिळू शकले नाही. पुढे त्याने रावणाशी मैत्री करून त्याला सीताहरणाची मसलत दिली. त्यापूर्वीच रामाने ताटकेचा अंत केला होता. पुढे विश्वामित्राने तिच्या वंशजांना ताटकायन नावाचे गोत्र देऊन आपल्या पक्षात सामील करून घेतले.

कुरुवंशी वसूच्या काळात करूष देश चेदी राज्यात मोडत होता; पण पुढे थोड्याच काळात तो स्वतंत्र राज्य या रूपात उदयास आला. त्याच वंशातल्या वृद्धशर्मा नामक राजाला श्रुतदेवीपासून दंतवक्त्र नावाचा पुत्र झाला. हा करूष देशाचा प्रतापी राजा समजला जातो. तो द्रौपदीच्या स्वयंवरप्रसंगी उपस्थित होता. भारतीय युद्धात कारूष लोक धृष्टकेतूच्या नेतृत्वाखाली पांडवांच्या बाजूने लढले. त्यांनी त्या युद्धात अतुल पराक्रम गाजविला; पण ते सगळे १४ हजार वीर भीष्माच्या हस्ते मारले गेले.

करूष देशात हत्ती चांगले निपजत, असे कौटिल्याने म्हटले आहे. बिहारमधल्या शाहाबाद व पालामो या जिल्ह्यात खरवार नावाची एक जमात राहते. हे लोक मुंडांशी मिळते जुळते आहेत. याची उत्पत्ती मनुपुत्र करूषापासून झाली असल्याचे मानतात. कालांतराने त्यांना करूवार व पुढे खरवार म्हणू लागले. **पाहा**–खरवार. [प्रा. मौ. बि.; हि. जॉ. ए. इं.; पु. इ.]

**करंगा** पश्चिम बंगालमधील एक छोटी द्रविडियन जमात. टोपल्या विणणे, तळी खोदणे व बैलगाड्यांची चाके बनविणे हा यांचा व्यवसाय आहे. हे लोक बैल आणि बकरे यांना खच्ची करण्याचेही काम करतात. [ट्रा. का. बे. ]

**करेवक्कल** कर्नाटकातील एक जात. हे लोक शेती व मजुरी करतात. यांच्यात पुष्कळ देवके आहेत. हे व्यकटरमण, जतगा, हुलीदेव, वाघदेव, करिदेव अम्म या देवतांना भजतात. मद्य निषिद्ध मानतात. मृतांस जाळतात किंवा पुरतात. [मुं. इ. जा. ]

**करोटी** थाळी. मूर्तीच्या कानातला एक पसरट, नक्षीदार अलंकार. [एन्सा. हिं. आ. ]

**कर्क** मेषादी बारा राशीतली चौथी रास. पुनर्वसूचा चौथा चरण व पुष्य आणि आश्लेषा अशी सव्वादोन नक्षत्रे मिळून ही रास बनते. ही चर राशी असून जलप्रवृत्तीची आहे. हिचा स्वामी चंद्र असून गुरू या राशीत उच्च असतो. **कर्क** राशीत सूर्यसंक्रमण होते, तेव्हापासून दक्षिणायनाला प्रारंभ होतो.



कर्क–एक सांकेतिक आकृती

**कर्कखंड** काशीपासून बीरभूमपर्यंतच्या पहाडी प्रदेशाला प्राचीन काळी कर्कखंड म्हणत. वैतरणी नदी ही या प्रदेशाची दक्षिण सीमा होती. मुसलमान इतिहासकार याला झारखंड म्हणतात. महाभारतात या प्रदेशाचा उल्लेख कर्णदिग्विजयाच्या प्रसंगात आला आहे. याचा अर्कखंड असाही पाठभेद आहे. कर्क किंवा अर्क अशासाठी म्हटले गेले, की कर्कवृत्त या प्रदेशातून रांचीवरून पुढे जाते.

या प्रदेशात मुंड, सताळ, उराँव, कोर, असुर, इ. अनेक आदिवासी जाती राहतात. या जाती द्रविडपूर्व आहेत. मुंड लोक या प्रदेशात कुठून आले, ते कळत नाही. या भागात पुरातत्त्व खात्याने विशेष काही शोध केलेला नाही. पण जी सामग्री

प्राप्त झाली आहे तिच्या अभ्यासावरून वाटते, की इथे प्राचीन काळापासून मनुष्यवस्ती आहे. अश्मयुगातल्या वस्तू इथे फारच अल्प मिळाल्या आहेत. पण ताम्रयुगात येथील लोकांच्या संस्कृतीची उत्तरोत्तर वृद्धी होत गेलेली दिसते. [प्रा. मौ. बि.]

**कर्कटी व्रत** एक काम्य व्रत. सूर्य कर्कराशीत प्रवेश करतो त्या दिवशी सोमवार असल्यास त्या योगावर हे व्रत करतात. शिव–गौरी ही या व्रताची देवता आहे. हे व्रत मुख्यत्वे स्त्रिया करीत असल्या, तरी पुरुषांनाही त्याचा निषेध नाही. याचा विधी असा –

प्रातःकाळी शभर चुळा भरून व पांढरे तीळ पाण्यात टाकून स्नान. नंतर पंचगव्यप्राशन. व्रताचा संकल्प. सुशोभित मडपाखाली सर्वतोभद्र मंडलावर कलशस्थापना. कलशावरच्या पूर्णपात्रात शिवगौरी, वृषभ, फळांसह कर्कटीची (काकडी) सुर्वणाची केलेली वेल या देवतांची स्थापना. पुढील मंत्राने कर्कटीचे ध्यान –

**कल्पवल्लि महाभागे सर्वसौभाग्यदायिनि ।**
**चिन्तयामि व्रतादौ त्वां भर्तृश्रेयोऽभिवृद्धये ।।**

अर्थ– हे सकलसौभाग्यदात्री कल्पवल्ली, पतीच्या श्रेयाची अभिवृद्धी व्हावी म्हणून व्रताच्या आरंभी मी तुझे चिंतन करते.

मग शिव–गौरीपूजा. वेळूच्या शिप्तरात ११ काकड्या घालून त्याचे दान. रात्रौ जागरण व कथाश्रवण. दुसऱ्या दिवशी तिल, घृत, पायस यांचा होम. प्रतिमादान व गोप्रदान. दशदाने व ११ ब्राह्मणांस भोजन. या व्रताची कथा अशी –

हरी दीक्षित नावाचा एक वेदशास्त्रज्ञ ब्राह्मण होता. त्याच्या भार्येचे नाव गुणवती. त्याला एकीमागून एक अशा सात मुली झाल्या. यापैकी सहा जणींची लग्ने झाली; पण दुर्दैवाने त्या सहाही जणी विधवा झाल्या. सातवी मुलगी ध्रुवा. हरी दीक्षित तिच्यासाठी वरसंशोधन करू लागला. पण कोणीही तिला वरायला तयार होईना. कारण सर्वानाच आपल्या मरणाचे भय वाटे. शेवटी ब्राह्मण वैतागला, ध्रुवेला घेऊन अरण्यात गेला आणि तिथे एका धोंड्याशी तिचे लग्न लावून परत आला. ध्रुवा बिचारी त्या अरण्यात एकटी पडली. ती त्या धोड्याला जणू आपला जिता जागता नवरा समजून त्याची सेवा करू लागली. दगडाच्या मूर्ती जर वाञ्छित फल देतात, तर या धोड्याची श्रद्धेने सेवा केल्यास तो आपले मनोरथ का पूर्ण करणार नाही, असा भाव तिने मनात धरला.

पुढे एक दिवस मेघगर्जना सुरू झाली. त्यातून वीज पडली आणि तो धोंडा दुभंगला. त्या आघाताने ध्रुवेला जणू पतिनिधनाचे दुःख झाले. ती आक्रोश करू लागली. तेवढ्यात शिव–पार्वती विमानात बसून जात होती. ध्रुवेचा तो आक्रांत पार्वतीच्या कानी पडला. तिला ध्रुवेची दया आली. तिने आपले विमान खाली उतरविले. पार्वतीने ध्रुवेचा वृत्तांत जाणून घेऊन शंकराला विचारले, 'नाथ, या मुलीची अशी दशा कां झाली ?' त्यावर शिवाने त्या सातही बहिणींचा पूर्ववृत्तांत सांगितला. तो म्हणाला –

'पूर्वजन्मी या सातही मुली एका ऋषीच्या कन्या होत्या. त्याने एका अनुरूप ऋषिकुमाराला आणून त्या सर्वांचे त्याच्याशी लग्न लावले. पण विवाहानंतर त्यांच्यामध्ये सापत्नभाव उत्पन्न होऊन त्या एकमेकींचा द्वेष करू लागल्या. त्यामुळे पतिसेवा विसरल्या. बिचारा तो ऋषिपुत्र आबाळ झाल्यामुळे मरण पावला. त्यानाही पुढे थोड्याच काळात मरण आले. पुढे त्या सातही जणी हरी दीक्षिताच्या घरी जन्मल्या. पूर्वजन्मी पतिसेवेच्या कर्तव्याला चुकल्यामुळे या जन्मी त्यांना वैधव्य आले.'

त्यावर पार्वती म्हणाली, 'इतर जणीचे काहीही होवो ; पण या मुलीचे आपण कल्याण करायला हवे. तरी याचा उपाय सांगा.' त्यावर शिवाने ध्रुवेला कर्कटीव्रत उपदेशिले. ध्रुवेने ते केले. त्याच्या पुण्याने त्या दुभंगलेल्या दगडातून एक देखणा पुरुष बाहेर आला. तो तिचा पूर्वजन्मीचा पतीच होता. त्याला पाहून ध्रुवा आनंदित झाली व त्या दोघांनी पुढे उत्तम संसार केला. [व्रतराज]

**कर्करी** ऋग्वेदात उल्लेखिलेले एक वाद्य (ऋ. ४.४.३३). ही बहुधा वीणा असावी. मैत्रायणीसंहितेत 'कर्करिकर्ण्यः' = ज्याच्या कानावर कर्करीसारखे चिन्ह आहे, अशी गुरे, असा शब्दप्रयोग आहे (४.२.९). [वे. इं.]

**कर्केतन** एक मणिरत्न. याचे अनेक रंग असतात. याला छिद्र केल्याने याची चमक कमी होते. जो मणी स्निग्ध, स्वच्छ, एकरंगी, फिकट पिवळ्या वर्णाचा व वजनाला जड असतो, तो श्रेष्ठ मानलेला आहे. सुवर्णपात्रात ठेवून अग्नीवर तापविल्याने त्याचे तेज वाढते. हा मणी पद्मवनात उत्पन्न होतो अशी आख्यायिका आहे. [एस्. के. कल्याणसुंदरम्]

**कर्कोटक** (१) एक नाग. कद्रूचा पुत्र. हा भोगवती नामक पाताल राजधानीत राहतो. हा नारदाच्या शापाने दावाग्नीत सापडला असता नलराजाने याला त्यातून बाहेर काढले.

कर्कोटकाचे प्रातःस्मरण कलिदोषनाशक असल्याचे समजतात. त्याविषयी प्रातःस्मरणातला श्लोक असा–

**कर्कोटकस्य नागस्य दमयन्त्या नलस्य च ।**
**ऋतुपर्णस्य राजर्षेः कीर्तनं कलिनाशनम् ।।.**

याचा अर्थ स्पष्ट आहे.

(२) कर्कोटक ही एक जमातही होती. महाभारतात त्यांना विधर्मी म्हटले आहे ( कर्ण. ४४ ). या कर्कोटक जमातीला कार्तवीर्य अर्जुनाने जिकले होते, असे वायुपुराणात म्हटले आहे (९४. २६).

**कर्कोटकनगर** याचा उल्लेख कथासरित्सागरात आला आहे. हे नगर पूर्वसमुद्राच्या पलिकडे असून त्याच्यापलिकडे ६० योजनांवर दुर्गम अशी शीतोदा नदी वाहते व ती उतरल्यावर पुढे उदयाद्री हा पर्वत लागतो.

**कर्ण** कुंतीचा कानीन पुत्र. याची जन्मकथा पुढीलप्रमाणे आहे– कुंती ही यादव कुलातील शूराची मुलगी. ती त्याने कुंतिभोजाला दत्तक दिली होती. ती या दत्तकपित्याकडे असताना दुर्वास ऋषी कुंतिभोजाकडे आला. त्याच्या सेवेसाठी कुंतिभोजाने कुंतीची योजना केली. कुंतीच्या सेवेने दुर्वास प्रसन्न झाला. परत जाताना त्याने कुंतीला एक मंत्र देऊन सांगितले, की 'या मंत्राने तू कोणत्याही देवतेला बोलावू शकशील व ती देवता आपल्या सामर्थ्याने तुला पुत्र देईल.'

बालसुलभ वृत्तीमुळे कुंतीला त्या गोष्टीची घाई झाली व मंत्राची परीक्षा पाहण्यासाठी समोर दिसणाऱ्या सूर्यनारायणाला तिने आवाहन केले. सूर्य तिच्या समोर प्रकट झाला व त्याने तिच्या कौमार्याचा भंग न करता तिला एक पुत्र दिला. तो पुत्र म्हणजेच कर्ण होय. तो सूर्याप्रमाणे तेजस्वी होता व त्याच्या अंगावर कातडीसारखे सहज कवच व कानात रत्नजडित कुंडले होती. कुंती माता झाली खरी; पण कौमार्यावस्थेत आपल्याला पुत्र झाल्याबद्दल तिला अत्यंत भीती वाटली. या मुलाचा त्याग करून आपण अब्रूनिशी सुटले पाहिजे, असे तिने ठरविले व कर्णाला एका पेटीत बंद करून गंगेत सोडून दिले. ती पेटी आणि तो पुत्र अधिरथ नावाच्या सूताला सापडला. अधिरथ व त्याची भार्या राधा या दोघांनी त्याचे वसुषेण असे नाव ठेवून पुत्रवत पालन केले. कर्ण हा कुंतीपुत्र असून सूतपुत्र गणला गेला, तो या घटनेमुळेच.

कर्णाचा लहानपणापासूनच धनुर्विद्येकडे ओढा होता. तेज, बल, सौंदर्य, पराक्रम व बुद्धिमत्ता हे गुण कर्णाच्या ठिकाणी सहज सिद्ध होते. द्रोणाचार्याने कौरव–पांडवांच्या बरोबरीने त्यालाही धनुर्विद्या शिकविली. कर्ण हा शस्त्रविद्येत पुष्कळदा अर्जुनावरही ताण करतो, हे दुर्योधनाने पाहिले व हळहळू त्याला आपल्या बाजूस वळवून घेतले.

कर्णाने द्रोणाकडून धनुर्विद्या मिळविली खरी; पण त्याला ब्रह्मास्त्र मात्र मिळाले नव्हते. या एकाच गोष्टीत अर्जुन कर्णाला वरचढ होता. म्हणून तो ब्रह्मास्त्र शिकविण्याबद्दल द्रोणाकडे आग्रह धरू लागला. पण द्रोणाने त्याची ती इच्छा पुरी केली नाही. द्रोण म्हणाला, की 'यथावत व्रताचरण करणाऱ्या ब्राह्मणाला किंवा तपस्वी क्षत्रियालाच मी ब्रह्मास्त्र शिकवितो; इतरांना नाही.' द्रोणाने अशा प्रकारे त्याच्या हीन कुलाची जाणीव करून देऊन त्याच्या जणू मर्मावरच आघात केला. त्या प्रसंगापासून कर्णाने द्रोणाविषयी मनात अढी धरली ती कायमचीच. पुढे जेव्हा जेव्हा प्रसंग सापडला, तेव्हा तेव्हा कर्णाने विषारी नागासारखा दंश करून द्रोणाचार्यांचा पाणउतारा केलेला दिसतो, त्याचे मूळ या प्रसंगात आहे.

द्रोणाने झिडकारल्यावर ब्रह्मास्त्र मिळविण्याची त्याची आकांक्षा अनावर झाली. त्यासाठी तो मग महेंद्र पर्वतावर परशुरामाकडे गेला. तिथेही आपल्या कुलहीनतेची अडचण येऊ नये, म्हणून त्याने खोटे बोलायचे ठरविले. 'मी भार्गवगोत्राचा ब्राह्मण असून धनुर्वेद शिकण्यासाठी तुमच्याकडे आलो आहे,' असे म्हणून त्याने परशुरामाला अभिवादन केले. कर्णाच्या अनेक सद्गुणांनी आणि त्याच्या गुरुसेवेने परशुराम प्रसन्न झाला. त्याने कर्णाला ब्रह्मास्त्राचा संपूर्ण प्रयोग यथाविधि शिकविला. पण कर्णाचे दुर्दैव तिथेही आडवे आले आणि त्याला मिळालेली ही विद्या शापित ठरली. गोष्ट घडली, ती अशी–

एके दिवशी उपवासामुळे श्रांत झालेला परशुराम कर्णाच्या मांडीवर डोके ठेऊन निजला असता, एक किडा खालून कर्णाची मांडी पोखरू लागला. त्यातून वाहणाऱ्या रक्ताच्या स्पर्शाने परशुराम जागा झाला. वेदना सहन करण्याच्या बाबतीतले कर्णाचे विलक्षण धैर्य पाहून परशुरामाला त्याच्या ब्राह्मणत्वाबद्दल शंका आली. 'खरे काय ते सांग' असे परशुरामाने म्हटल्यावर कर्णाने आपण ब्राह्मणपुत्र नसून सूतपुत्र असल्याची कबुली दिली. त्यावर परशुराम त्याला म्हणाला–

'अस्त्रलोभाने तू माझ्याशी कपटाचरण केलेस, ह्यामुळे मी तुला शाप देणार आहे आणि स्वतःच्या देहाची पर्वा न करता तू माझी जी अविश्रांत सेवा केलीस, त्याबद्दल मी तुला वरही देणार आहे. माझा शाप असा, की तुल्यबल योद्धयाशी युद्ध करताना अखेरच्या क्षणी मी दिलेल्या ब्रह्मास्त्राचे तुला पूर्णपणे विस्मरण होईल. माझा वर असा की, हा विशिष्ट प्रसंग सोडून इतर वेळी या ब्रह्मास्त्राचा तुला उपयोग होईल व तुझ्यासारखा योद्धा पृथ्वीवर सहसा होणार नाही.' ( म. भा. शांति. ३).

अशी ही शापित विद्या घेऊन कर्ण परत हस्तिनापुरी आला.

पुढे द्रोणाने एक दिवस कौरव-पांडवांची अर्थात आपल्या शिष्यांची जाहीरपणे परीक्षा घ्यायचे ठरविले. त्या परीक्षेच्या प्रसंगी कौरव-पांडवांचे भांडण झाले व कर्णाने अर्जुनास द्वंद्व युद्धाचे आवाहन दिले. पण त्याही वेळी कर्णाचे हीनकुलत्व त्याला आड आले. कृपाचार्य त्याला म्हणाला, की ' अर्जुनाशी द्वंद्वयुद्ध करण्यापूर्वी तू तुझे कुलगोत्र काय ते सांग. ते सांगितल्यावर तुझ्याशी द्वंद्वयुद्ध करायचे, की नाही ते अर्जुन ठरवील .' ते ऐकून सहाजिकच कर्णाची मान खाली झाली. कर्णावरचा हा प्रसंग दुर्योधनाने नेमका ओळखला. कर्ण हा क्षत्रिय व राजपुत्र नसल्यामुळे त्याला हे सर्व अपमान व उपहास सोसावे लागतात, हे दुर्योधनाला जाणवले. लागलीच दुर्योधन पुढे आला व सर्वांना उद्देशून म्हणाला—

' शौर्य हे कुलावर अवलंबून नसते. कर्ण राजपुत्र नाही, म्हणूनच त्याचा असा अधिक्षेप होत असेल, तर मी त्याला अंगदेशाचे राज्य बहाल करतो. '

एवढे बोलूनच दुर्योधन थांबला नाही, तर त्याने त्या क्षणी कर्णाला राज्याभिषेक केला. कर्ण त्याच्या या उपकाराने भारावून गेला. त्याने दुर्योधनाला विचारले, की ' याच्या मोबदल्यात मी तुला काय देऊ ? ' त्यावर दुर्योधन म्हणाला, ' तू माझ्याशी कायमचे सख्य ठेव. '

त्या दिवसापासून कर्णाने सरळ सरळ दुर्योधनाचा पक्ष स्वीकारला व सूक्तासूक्त मार्गांनी दुर्योधनाचे महत्त्व जितके वाढविता येईल तितके वाढविण्याचा प्रयत्न चालविला. दुर्योधनाशी सख्य दृढ होताच कर्णाने पहिली गोष्ट केली, ती भीष्म-द्रोणादिकाच्या व्यक्तिमत्त्वाला विरोध करण्याची. मनात असूनही दुर्योधन ज्या गोष्टी त्यांच्या तोंडावर बोलू शकत नसे, त्या प्रथम कर्ण बोलू लागला. एकदा भर सभेत त्याने दुर्योधनाला सांगितले —

' भीष्म-द्रोण हे तुझे पितामह व गुरू नसून मंत्री आहेत. त्यांनी तुझेच ऐकले पाहिजे. तुझेच हित चिंतिले पाहिजे. पण त्याऐवजी ते पांडवाचे हित व तुझे अहित चिंतून मंत्रिपदाचे कर्तव्य विसरतात. '

दुर्योधनाच्या मनावरचे भीष्म-द्रोणांचे दडपण कर्णाने अशा भाषणांनी कमी करून टाकले.

महाभारताचा इतिहास सूक्ष्मतेने पाहिल्यास कुरु-पांडवांचा वैराग्नी कर्णानेच सदैव धगधगीत ठेवला, असे दिसून येईल. महाभारतात श्रीकृष्णाच्या व्यक्तिमत्त्वाखालोखाल कर्णाचेच व्यक्तिमत्त्व ठसठशीतपणे दिसून येते. कर्ण नसता, तर भारताचे महाभारत झालेच नसते. कर्णाच्या व्यक्तिमत्त्वासंबंधी परस्पर भिन्न मते प्रचलित आहेत. काहींच्या मते तो सद्गुणांचा पुतळा, तर काहींच्या मते तो दुर्गुणांचे आगर ठरला आहे. पण महाभारतकार मनुष्याच्या श्रेष्ठ-कनिष्ठत्वाची कसोटी त्याच्या व्यक्तिगत गुणावगुणांपेक्षाही शाश्वत स्वरूपाच्या नीतिमूल्यांवर लावतात. ज्या लोकोत्तरत्वामुळे एरवी एकाद्या राष्ट्राचे व मानवतेचे कल्याण व्हावे, त्याच लोकोत्तरत्वामुळे केवळ व्यक्तिगत महत्वाकांक्षेपायी केवढा भयानक स्वरूपाचा राष्ट्रीय विध्वंस घडून येऊ शकतो, त्याचे मूर्तिमंत प्रतीक म्हणूनच व्यासांनी कर्णाचे व्यक्तिचित्र रेखाटले आहे. कर्णाच्या व्यक्तिमत्त्वाचा धाक व प्रभाव त्याच्या शत्रूंप्रमाणेच मित्रांवरही होता. त्याच्या पराक्रमाची प्रशंसा तर एका ठिकाणी प्रत्यक्ष युधिष्ठिरानेही केली आहे ( शांति १). कर्णाने दिग्विजय करून तत्कालीन समर्थ सत्ताधीशांनाही धूळ चारल्याचे वर्णन महाभारतात आहे. एकदा तर त्याने सम्राट जरासंधासारख्या महान मल्लयुद्धविशारदालाही मल्लयुद्धातच जिंकले होते.

पण कर्ण हा नुसताच पराक्रमी योद्धा असता, तर त्याच्याविषयी इतके अलौकिक आकर्षण कधीच निर्माण झाले नसते. तसे ते झाले, याचे कारण अतुल पराक्रमाबरोबरच अनेक दैवी अभिजात गुण त्याच्या ठिकाणी वसत होते, हे होय. कर्ण हा जसा पराक्रमी तसाच दानशूर, तपस्वी व ब्रह्मण्य होता. त्याच्या या गुणांचे वर्णन महाभारतात पुढीलप्रमाणे केलेले आहे —

**आपृष्ठतापादादित्यमुपातिष्ठत वीर्यवान् ।।**
**तस्मिन्काले नु जपतस्तस्य वीरस्य धीमतः ।**
**नादेयं ब्राह्मणेष्वासीत् किञ्चिद्वसु महीतले ।।**

(आदि. १११.२५–२६)

अर्थ — तो पराक्रमी (रोज सकाळी नदीतटाकी जाऊन) समोरचे ऊन पाठीवर येऊन पाठ तापेपर्यंत सूर्याचे उपस्थान करी. (अशा प्रकारे) त्या बुद्धिमान वीराची तपस्या चालत असता त्याला ब्राह्मणांना अदेय असे पृथ्वीतलावरचे कोणतेही धन नसे.

त्याने आपली सहज कवच-कुंडले ब्राह्मणरूपाने याचक होऊन दारी आलेल्या इंद्राला सहजपणे काढून दिली. हे कर्णाचे दानशौर्य सर्वस्वी अतुलनीय असेच आहे. या दानापासून कर्णाला परावृत्त करण्यासाठी स्वप्नात आलेल्या सूर्याला त्याने या बाबतीत जो विचार सांगितला, तो अत्यंत तेजस्वी आणि असामान्य आहे. कर्ण म्हणतो —

**यद्यागच्छति मां शक्रो ब्राह्मणच्छद्मना वृतः ।**
**हितार्थं पाण्डुपुत्राणां खेचरोत्तम भिक्षितुम् ।।**
**दास्यामि विबुधश्रेष्ठ कुण्डले वर्म चोत्तमम् ।**
**न मे कीर्तिः प्रणश्येत त्रिषु लोकेषु विश्रुता ।।**

**मद्विधस्यायशस्यं हि न युक्तं प्राणरक्षणम् ।**
**युक्तं हि यशसा युक्तं मरणं लोकसम्मतम् ।।**
(वन. ३००)

अर्थ– हे सूर्यदेवा, जर इंद्र छद्मब्राह्मण होऊन पाडवांच्या हितासाठी माझ्याकडे भिक्षा मागायला येत असेल, तर मी माझी कुंडले आणि उत्तम असे कवच त्याला देईन. कारण त्रैलोक्यात प्रसिद्ध असलेली माझी कीर्ती नष्ट न व्हावी. माझ्या सारख्याला अपकीर्तीचे जिणे जगणे, हे युक्त नव्हे. कीर्तियुक्त अतएव लोकसंमत असे मरण स्वीकारणेच मला श्रेयस्कर वाटते.

कर्ण जितका सहनशील तितकाच समयज्ञही होता. त्याच्या या गुणाचा श्रेष्ठ प्रत्यय द्रोणपर्वात येतो. भीष्माचे धारातीर्थी पतन झाल्यावर मगच कर्णाने महायुद्धात भाग घेतला, ही गोष्ट प्रसिद्ध आहे. भीष्म युद्धात पतन पावताच कर्णाशिवाय आता आपल्याला कोणीही त्राता नाही, असेच कौरवपक्षीय सैन्याला वाटले. त्या वेळी दुर्योधनासह सर्वांनाच असे वाटत होते, की आता कर्णाने सेनापतित्व स्वीकारावे. पण आपण सेनापती झाल्यास आपल्याहून वृद्ध असलेल्या लोकांच्या मनात आणि पर्यायाने कौरवसेनेतल्या प्रथम श्रेणीच्या वीरात मानसिक फूट पडेल, ही गोष्ट त्याने हेरली आणि आजवर प्रसंग सापडेल तिथे तिथे त्याने ज्या द्रोणाचार्यांची निंदा आणि निर्भत्सनाच केली, त्या द्रोणाचार्यालाच आग्रहपूर्वक सेनापतिपदाचा अभिषेक करविला.

नेहमी इतरांविषयी अधिक्षेपाने बोलणारा कर्ण अंतरात मोठा गुणग्राहक होता. त्याला व्यक्तीच्या महात्मतेची जाणीव सदैव असे. अर्जुनाला युद्धात ठार मारण्याची वारंवार घोषणा करीत असताही त्याला पांडवांचे गुण व अर्जुनाचा प्रभाव यांची पूर्ण जाणीव होती. इतकेच नव्हे; तर प्रसंगी तो ती व्यक्तही केल्यावाचून राहत नसे. प्रत्यक्ष शल्याजवळदेखील त्याने अर्जुनाच्या गुणांची मुक्त कंठाने प्रशंसा केली आहे व श्रीकृष्णापाशी युधिष्ठिराला धर्मात्मा म्हणून गौरविले आहे. कुरुकुलाधम म्हणून भीष्माचा वारंवार पाणउतारा करणारा कर्ण, भीष्माच्या मृत्युप्रसंगी त्याच्या महान व्यक्तिमत्वासमोर माथा नमवून नम्र झाला आहे. भीष्माच्या पतनाची वार्ता ऐकताच ज्या लोकांनी दारुण विलाप केला, त्यात कर्ण प्रमुख होता. भीष्मासारख्या श्रेष्ठ युगपुरुषाच्या अंतकाळी त्याचे दर्शन घेणे, हे कर्तव्य समजून कर्ण रणभूमीवर आला आणि अंजलिसंपुट जोडून भीष्माला म्हणाला—

**कर्णोऽहमस्मि भद्रं ते वद मामभि भारत ।**
**पुण्यया क्षेम्यया वाचा चक्षुषा चावलोकय ।**
**न नूनं सुकृतस्येह फलं कश्चित् समश्नुते ।।** (द्रोण. ३)

अर्थ–हे भरतपितामह, तुमचे क्षेम असो ! मी कर्ण (तुमच्या भेटीला ) आलो आहे. तुम्ही मजकडे कृपा दृष्टीने पाहा व माझ्याशी क्षेमयुक्त वाणीने बोला. अरेरे ! ( तुमची ही दशा पाहून ) माणसाला त्याच्या सुकृताचे फळ इहलोकी मिळतच नाही की काय अशी शंका येते.

भीष्माचा निरोप घेऊन कर्ण परत निघाला असता, तो दीर्घ नि.श्वास टाकत होता व त्याच्या नेत्रांतून अविरत अश्रुधारा वाहत होत्या, असे महाभारतकारांनी म्हटले आहे.

कर्ण हा मैत्रीचा पुतळा होता. दुर्योधनविषयक व्रताला तो आमरण जागला. शिष्टाई विफल झाल्यानंतर कर्णाला कौरव-पक्षातून फोडण्यासाठी कृष्ण त्याच्याकडे गेला आणि त्याला म्हणाला. ' कर्णा, तू कुंतीपुत्र असून युधिष्ठिराचा मोठा भाऊ आहेस. तू पांडवपक्षात ये. तुला सार्वभौमपद मिळेल. पांडव तुझी सेवा करतील आणि द्रौपदीही तुझी पत्नी होईल. असे तू केलेस तर युद्ध आणि तज्जन्य सर्वनाश टळेल आणि तूही सम्राट बनून सर्व सुखे उपभोगशील......'

यावर कर्णाने कृष्णाचा यत्किंचितही अपमान न करता आपला निर्धार सांगितला, तो असा——

' कुंती माझी माता व पांडव माझे बंधू ही गोष्ट तू मला विदित केलीस, हे ठीक आहे. पण कुंतीने जन्मताच मला नदीत सोडून दिले, ही फार मोठी चूक केली. त्यामुळे मला सूताच्या घरी राहावे लागले व क्षत्रियकुलोत्पन्न असूनही सूतपुत्र म्हणून वारंवार अपमानही सोसावे लागले. शिवाय कुंतीला मी आता माझी आई म्हणून जवळ करू शकणार नाही. कारण राधेच्या ( माझे पालन करणाऱ्या सूतपत्नीच्या ) मजवरील अकृत्रिम प्रेमामुळे मी बद्ध झालो आहे. आता मला हे संबध तोडता येणे शक्य नाही. शिवाय ' मी तुझ्याशी आमरण मैत्री ठेवीन ' असे दुर्योधनाला आश्वासन दिल्यानंतर मी त्याचा विश्वासघात करून पांडवाना मिळणे हे सर्वथा अनुचित ठरेल. (उद्योग १४०. )

त्यानंतर कुंतीने स्वत: कर्णाची भेट घेतली व माता म्हणून त्याला आपली ओळख दिली. तेव्हा कर्णाने प्रथम तिची निर्भर्त्सना केली, तिला तिच्या कृत्याचा जाब विचारला आणि शेवटी तिची दया येऊन तिला सांगितले, की ' मी तुझ्या सर्वच मुलांना मारणार नाही; फक्त अर्जुनाचा तेवढा वध करीन. '

कर्णाच्या अंगी लोकोत्तर दैवी गुण जितके प्रकर्षाला पोचले होते, तितकेच काही कमालीचे दुर्गुणही त्याच्या स्वभावात घर करून राहिले होते. तो विलक्षण गर्विष्ठ होता. तो मनोरथात दंग होऊन राहत असे. त्याची आत्मश्लाघा तर पराकोटीची होती. अशा या अंतर्गत दोषानी तो डागळलेला होता.

अखेर त्याच्याच स्वभावदोषांतून निर्माण झालेल्या प्रचंड वणव्यात तो जळून दग्ध झाला. अर्जुनाशी झालेल्या अटीतटीच्या युद्धात पृथ्वीने कर्णाचे रथचक्र गिळले. तो खाली उतरून ते वर काढीत असता, श्रीकृष्णाने त्याच्या पापांची त्याला आठवण करून दिली आणि अर्जुनाला त्याच्यावर बाण सोडून त्याचे मस्तक उडविण्यास सांगितले. श्रीकृष्ण त्या वेळी कर्णाला म्हणाला, ‘तुझ्यासाठी एकच गोष्ट आता नियतीने ठरविली आहे आणि ती म्हणजे मृत्यू ! क्रूर, भीषण, वेदनामय मृत्यू ! ’

युधिष्ठिराला कौरवपक्षातल्या एका कर्णाचीच भीती वाटत होती. अर्जुनाच्या हातून कर्णवध झाल्यावर कर्णाचे प्रेत प्रत्यक्ष पाहीपर्यंत ती घटना त्याला खरीच वाटेना (कर्ण. ९६). मग धर्माने त्या पराक्रमाबद्दल अर्जुनाची पाठ थोपटली. त्याच वेळी कुंती पुढे आली व तिने कर्ण आपला पुत्र असल्याचे पाडवांना सांगितले. ते ऐकून पांडवांना धक्का बसला व दुःखही झाले. या वेळी ही गोष्ट व्हायला नको होती, असे युधिष्ठिराला वाटले व कुंतीचे हे कृत्य न आवडून त्याने समस्त नारीजातीलाच शाप देऊन टाकला, ‘बायकाच्या मनात गुप्त काहीही राहू शकणार नाही.’ (म. भा. शांति. ६). [ म. भा. व्या.; प्रा. च. को. ]

**कर्णपार्य** ( इ. स. ११४० चा सुमार ) एक कन्नड कवी. कन्नमरय, कण्णप्प व कर्णप या नावानीही त्याचा निर्देश होतो. हा जैन होता. याने नेमिनाथ पुराण, माळवी माधव व वीरेशचरित्र असे तीन ग्रंथ लिहिले आहेत. कल्याणकीर्ती हा याचा गुरु होता. [ म. च. को. ]

**कर्णपिशाची** एक देवता. दुसऱ्याच्या अंतःकरणातील हेतु समजावा, अशी इच्छा असल्यास कर्णपिशाची देवतेची साधना करतात. हिचे ध्यान पुढीलप्रमाणे –

**चितासनस्थां नरमुण्डमालां**
**विभूषितामस्थिमणीन्कराब्जैः ।**
**प्रोतां नरान्त्रैर्दधतीं कुवस्त्रां**
**भजामहे कर्णपिशाचिनीं ताम् ।।**

अर्थ – चितेच्या आसनावर बसणारी, नरमुंडमाला धारण करणारी, हातात अस्थिमण्यांच्या माला माणसांच्या आंतड्यात ओवून धारण करणारी, मलिन वस्त्र नेसलेली, अशा कर्णपिशाचिनीला आम्ही भजतो.

या मंत्राने ध्यान करून मग पूजा करतात. तत्पूर्वी यंत्रावर दिक्पाल व त्याची आयुधे यांची पूजा करायची असते. पूजा झाल्यावर मग तिच्या मंत्राचा जप करतात. हा मंत्र असा –

**ॐ ऱ्हीं कर्णपिशाचिनि कर्णे मे कथय स्वाहा ।**

या मंत्राचा एक लक्ष जप आणि त्याच्या दशांश संख्येने बेहड्याच्या समिधांनी हवन करतात. हे विधान केल्याने मंत्र सिद्ध होतो. मग अशुचि अवस्थेत बोरीच्या झाडाखाली बसून एक लक्ष जप करतात. तेणेकरून कर्णपिशाचिनी संतुष्ट होते व दुसऱ्याच्या अंतःकरणातले विचार, तसेच भूत-भविष्याच्या गोष्टी कानात येऊन सांगते, अशी समजूत आहे.

हिचे अन्य मंत्र असे –

**ॐ कर्णपिशाचि वदातीतागतं ह्रीं स्वाहा ।**

**प्रणवं माया कर्णपिशाचि मे कर्णे कथय हुं फट् स्वाहा ।**

दुसऱ्या एका विधानात मध्यरात्री हिची पूजा करून हिला भाजलेला मासा नैवेद्य म्हणून समर्पावा, असेही सांगितले आहे. जपही रात्रीच करावा, असे म्हटले आहे.

कर्णपिशाचिनी मंत्राची सिद्धी मिळविलेले काही तुरळक मांत्रिक आजही आढळतात. माणूस समोर आला की ते त्याच्या मनातले विचार आणि त्याच्या जीवनात घडलेल्या गोष्टी धडाधड सांगतात. अशा मांत्रिकांचा शेवट बरा होत नाही, असाही अनुभव आहे [ मं. म.; श. क. ]

**कर्णपीडनासन** जमिनीवर उताणे निजतात. दीर्घ श्वास फुफ्फुसात घेऊन दोन्ही पाय हळूहळू वर उचलीत मस्तकाकडे आणतात. डाव्या–उजव्या गुडघ्याने डावे–उजवे कान दाबतात. दोन्ही हात पाठीकडे जमिनीवर सरळ ठेवून हातांची बोटे एकमेकात गुतवितात. हनुवटी गळयाच्या



कर्णपीडनासन

खळग्यात टेकवितात. यथाशक्ति हे आसन झाल्यावर श्वास फुफ्फुसात ओढून घेऊन हळूहळू पाय जमिनीस टेकवितात. कर्णवेदना व बहिरेपण नष्ट होण्यासाठी या आसनाचा उपयोग

होतो. स्त्रियांनीही हे आसन करायला हरकत नसते. मात्र गुरूच्या देखरेखीखाली ते करणे योग्य होय. [ उ. यो. द. ]

**कर्णपूरक** कानातला एक अलंकार. हा त्रिवलयांकित असून त्यावर रत्ने जडवितात. मूर्तींच्या कानात कर्णपूरक आढळतो. **पाहा** – अलंकार.

**कर्णप्रयाग** हिमालयातील एक तीर्थ. हे गढवाल प्रदेशात अलकनंदा व पिंडर या नद्यांचा संगम होऊन बनले आहे. इथे सूर्यपुत्र कर्ण याचे मंदिर आहे.

**कर्णप्रहर** सूर्योदयापासून ७–३० घटिकांचा ( ३ तास ) काळ. हा काल पवित्र समजला जातो. सूर्यपुत्र कर्ण सकाळी सूर्योदयापासून एक प्रहर सूर्याकडे टक लावून बसत असे, यावरून हा संकेत निर्माण झाला असावा.

**कर्णप्रावर्ण** एक प्राचीन जमात. या लोकांच्या देशालाही हेच नाव होते. या देशाला नलिनी नदीचे पाणी मिळत असे. [ पु. इं. ]

**कर्णबट्टू** मुख्यत्वे गोदावरीच्या परिसरात असलेली तेलुगु कोष्टयांची एक जात. हिला कर्णभट्टू असेही म्हणतात. या जातीच्या उत्पत्तीची कथा पुढीलप्रमाणे –

गोदावरी जिल्ह्याच्या एका भागावर प्राचीन काळी एक राजा राज्य करीत होता. दोन राक्षस आपल्या रोजच्या जेवणाकरिता त्याच्या प्रजाजनांना पळवून नेत असत. त्यामुळे राजा फार दुःखी झाला आणि त्याने आपल्याला या संकटातून वाचविण्याविषयी शकराची प्रार्थना केली. मग शकराने आपल्या कानातून नऊ वीर निर्माण केले व त्याना त्या राक्षसाना मारण्याची आज्ञा केली. या योद्धयांच्या वशजांना कर्णभट्टु असे नाव मिळाले.

हे लोक शैव किंवा लिंगायत पंथाचे आहेत. सोमेश्वर ही यांची देवता असून हे लोक पौष प्रतिपदेला तिचा उत्सव करतात. मुलीला रजोदर्शन झाल्यावर सोळा दिवस विटाळ पाळतात. मुलीचे लग्न लहान वयात करतात. विधवाविवाहाची चाल नाही. लिंगायत कर्णबट्टूंची प्रेते बसलेल्या स्थितीत पुरतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**कर्णभूषणदान** सौभाग्यवृद्धीसाठी स्त्रियांनी कर्णभूषणाचे दान करावे, असे दानचंद्रिकेत सांगितले आहे. याचा मंत्र असा––

**भूषणं कर्णयोः स्त्रीणां स्वर्णरत्नादिसंयुतम् ।**
**ताटंकस्य प्रदानेन सौभाग्यं वर्धतां मम ।।**

अर्थ–स्त्रियांचे कान शोभविणाऱ्या व सुवर्ण रत्न यानी युक्त अशा ताटंकाच्या (कर्णभूषण) दानाने माझे सौभाग्य वाढो.

**कर्णभूषणे** कानात घालण्याच्या अलंकारांस कर्णभूषणे म्हणतात. कानात अलंकार घालण्याची चाल फार प्राचीन आहे. प्राचीन काळी स्त्रियांप्रमाणेच पुरुषही कर्णभूषणे वापरीत असत. ऋग्वेदात कर्णशोभन असा एक शब्द येतो. हा पुरुषांचा अलंकार होता. सांप्रतही मारवाड, कर्नाटक आणि तमिळनाड या प्रदेशांतले पुरुष कर्णभूषणे वापरतात. मुसलमानी स्त्रियांतही कर्णफूल, झुमका, बिजली की बाळी, इ. कर्णालंकार घालण्याची पद्धत आहे. मद्रासकडील कदर, कल्लार, इ. जातीतील बायका आपल्या कानांच्या पाळचांत भलीमोठी कडी अडकवितात. वन्य जमातीतही कर्णवलये घालून कान सुशोभित करण्याची पद्धत आहे. बिगबाळी ही एकाच कानात घालायचा पुरुषी अलंकार आहे. तो डाव्या कानाच्या वरच्या पाळचाला भोक पाडून त्यात घालतात. कुंडले हा प्राचीन काळचा एक प्रमुख कर्णालंकार होता. भारतीय मूर्तिशिल्पात त्याचा विपुल प्रमाणात आढळ होतो. सांप्रत कर्णभूषणांचे जुने प्रकार लुप्त होत चालले आहेत. हल्ली भारतात सर्वत्र स्त्रिया केवळ कानाचे खालचे पाळे टोचून त्यात मोत्यांच्या किंवा हिऱ्याच्या कुडचा, विशिष्ट खडे, लोंबती कर्णफुले किंवा मोठ्या आकाराची कर्णवलये वापरतात. **पाहा** – अलंकार.

**कर्णरिपा** चौऱ्यायंशी सिद्धांपैकी एक. याची दुसरी नावे आर्यदेव आणि वैरागीनाथ ही आहेत. सस्क्यसूची प्रमाणे हा नालंदानिवासी होता. तारानाथांनी याला नागार्जुनाचा शिष्य म्हटले आहे; पण त्यांच्या मते आर्यदेव आणि कर्णरिपा या दोन भिन्न व्यक्ती आहेत. कर्णरिपा हा मेवाडचा राजा होता व पिंगला नावाची अप्रतिम लावण्यवती अशी त्याची राणी होती. पुढे हा भिक्षू बनला. याने अनेक तंत्रग्रंथ लिहिले आहेत. [ सि. सा.; पु. त. नि. ]



कर्णरिपा

**कर्णवास** उ. प्रदेशातले एक क्षेत्र. अलीगढ–बरेली रेल्वे-मार्गावरच्या राजघाट नरौरा या स्टेशनवर उतरून कर्णवासाला जावे लागते. याचे प्राचीन नाव भृगुक्षेत्र असे आहे. भृगु ऋषीचे इथे वास्तव्य होते. दुर्गेने शुभ–निशुंभांना मारल्यावर याच क्षेत्रात विश्रांती घेतली होती. इथे कल्याणी देवी या नावाने तिचे मंदिर बांधलेले आहे. कुंतीने आपला कानीन पुत्र कर्ण याला पेटीत घालून गंगेत सोडले होते, ती पेटी याच क्षेत्रात गंगेतून बाहेर काढली गेली. ती कर्णाचीही तपोभूमी आहे. त्याच्याच नावावरून या क्षेत्राला कर्णवास हे नाव मिळाले. इथे एक कर्णाची शिला दाखवितात. त्या शिलेवर बसून कर्ण याचकांना दाने देत असे. या क्षेत्राजवळच बुधौ नावाचे एक स्थान आहे. तिथे बुद्धाने तप केल्याचे सांगतात. [ कल्याण–तीर्थांक ]

**कर्णवेध** एक शिशुसंस्कार. मूल जन्मल्यापासून ७ व्या किंवा ८ व्या महिन्यात मुलाचे कान टोचावे, असे बौधा. गृह्यशेषसूत्रात सांगितले आहे. बृहस्पतीच्या मते ते १०, १२ किंवा १६ व्या दिवशी किंवा ७ व्या अथवा १० व्या महिन्यात टोचावे, असे आहे. कर्णवेधाचा विधी पुढीलप्रमाणे आहे—

दिवसाच्या पूर्वार्धात पिता पूर्वेस तोंड करून बसतो व मुलाच्या उजव्या व डाव्या कानाला स्पर्श करून ' भद्रं कर्णेभिः शृणुयाम...' हा मंत्र म्हणतो. मग कुशल माणूस किंवा सोनार मुलाचे दोन्ही कान टोचतो. टोचताना मूल रडल्यास त्याच्या तोंडाला मध लावतात. संस्काराच्या सांगतेसाठी ब्राह्मणभोजन घालतात.

हल्ली सर्वसाधारणपणे १२ व्या दिवशी मुलाचे कान टोचून त्यात सुंकले घालतात. या संस्काराचा गृह्यसूत्रात उल्लेख नाही, पण निबंधग्रंथात आहे. मुसलमानात ही कान टोचण्याची पद्धत नसल्यामुळे त्यांना ' अविंध ' म्हणतात.

अलंकार घालण्यासाठी अवयवांना छिद्रे पाडण्याची प्रथा जगातल्या सगळ्या सभ्य, असभ्य, अर्धसभ्य जातीत आहे. त्यावरून ही प्रथा अतिप्राचीन असावी. कर्णवेध हा कानात काही तरी अलकार घालण्यासाठी व त्याच्या सुरक्षसाठी केला जात असे.

पण कर्णवेधाला संस्कार या स्वरूपात मान्यता मिळाली, ती गृह्यसूत्रानंतरच्या काळात. अथर्ववेदाच्या एका सूक्तात कर्णवेधाचा उल्लेख आहे; पण कौशिकाने तो व्यवहार पशूचे कान चिह्नित करण्यासाठी होत असे, असे म्हटले आहे. बृहस्पतीच्या मताप्रमाणे कान टोचण्याची सुई सोन्याची असावी, असे आहे. पण तेवढे सामर्थ्य नसल्यास ती चांदीची किंवा लोखंडाचीही चालते. वर्णभेदाप्रमाणेही सूचीभेद सांगितले आहेत.

हळूहळू या संस्काराने धार्मिक स्वरूप ग्रहण केले. त्यामुळे तो अपरिहार्य ठरला. त्याची अवज्ञा करणे, हे पाप मानले जाऊ लागले. देवल आपल्या स्मृतीत लिहितो, की ' ज्या ब्राह्मणाच्या कर्णरंध्रात सूर्याची छाया प्रवेश करीत नाही, त्या ब्राह्मणाच्या केवळ दर्शनानेही पुण्यक्षय होतो. अशा ब्राह्मणाला श्राद्धासाठी निमंत्रित करू नये; केल्यास ते आसुरश्राद्ध होते.' [ हि. ध.; हिं. सं. ]

**कर्णश्रुत वासिष्ठ** एक सूक्तद्रष्टा. याने सोमाचे स्तवन करणारे ५८ ऋचांचे एक मोठे सूक्त (ऋ. ९.९७) रचले असून ते उपमादी अलंकारांनी नटलेले आहे. त्याने मांश्चत्व या नावाच्या एका सरोवराचा उल्लेख केला आहे. तसेच निगुतनामक आर्यशत्रूंना सोमाने गाढ झोप आणली व त्याचा संहार केला, अशी एक कथाही त्याने सांगितली आहे.

**कर्णसाळे** द. भारतातील तेलुगु कोष्टयांची एक जात. मदुरा व तंजाऊर या भागात या लोकांना सेनियन असे नाव आहे. यांच्यापैकी काही शैव व काही वैष्णव आहेत. काशी हे यांचे एकच गोत्र असून कोडविली, रुद्राक्षल, मंध, इ. त्यांची अनेक कुले आहेत.

हे जातीच्या प्रमुखाला सेट्टी असे म्हणतात. काही वेळा ही जागा वंशपरपरेने चालते. पेड्डु कापु व नेल सेट्टी असे दोघे सेट्टीचे मदतगार असतात.

मुलीला रजोदर्शन झाले, म्हणजे तिच्यासाठी एक वेगळी झोपडी उभारतात. तिसऱ्या किंवा पाचव्या दिवशी मुलीचे नातेवाईक गोड भात घेऊन येतात व जमलेल्या लोकांना तो भात आणि पानसुपारी वाटतात.

सोमेश्वर ही या जातीची देवता आहे. काही कर्णसाळे लिंगायत आहेत. परतु अंगावर लिंग धारण केलेच पाहिजे, असा त्यांच्यात नियम नाही. हे लोक सर्वसाधारणपणे जाडेभरडे सुती कापड विणतात.

प्रेते बसलेल्या स्थितीत पुरतात. अंत्यक्रियेसाठी जंगमाला बोलावितात. [ का. ट्रा. स. इ. ]

**कर्णसुवर्ण** बंगालमधील गंगेच्या पश्चिमेकडचे एक प्राचीन राज्य. बरद्वान, बाँकुरा, पश्चिम मुर्शिदाबाद व हुगळी हे सांप्रतचे जिल्हे मिळून हे राज्य बनले होते. मुर्शिदाबाद

जिल्ह्यातील रांगामाती किंवा श्री. चक्रवर्तींच्या मते लक्ष्मणावती ही कर्णसुवर्णाची राजधानी असावी. प्राचीन भूवर्णनकारानी या प्रदेशाला किरणसुवर्ण म्हटले आहे. या प्रदेशातील लोकांना कोल म्हणत. सातव्या शतकात या देशावर शशांक राजा राज्य करीत होता. [ म. ज्ञा. को. ]

**कर्णा** एक सुषिर वाद्य. हे पितळेचे करतात. याची लांबी सुमारे चार हात असते. मोठे तोंड वीतभर व्यासाचे व तोंडात धरायचे टोक अंगठ्याएवढ्या व्यासाचे असते. याचा



कर्णा

नाद गंभीर असतो. देवस्थानातील नगारखान्यात कर्णा असतोच. चौघडा बंद होण्याच्या वेळी तो वाजविला जातो.

**कर्णिका** (१) जगत्कमलाचा तंतू. या जगत्कमलाला १०० कोपरे आहेत, असे अत्रि म्हणतो व १००० कोपरे आहेत, असे भृगु मानतो. भागुरीच्या मते ते चौकोनी, तर गालवाच्या मते तबकाच्या आकाराचे आहे या प्रत्येकाचे ज्ञान अपूर्ण असून ब्रह्मालाच त्याचे संपूर्ण ज्ञान आहे, असे वायुपुराणात म्हटले आहे (३४.५८-६९).

(२) इमारतीच्या माथ्याजवळील पुढे आलेला भाग. याची रचना वेलीसारखी असते. [ मानसार ३२ ]

**कर्णीरथ** चहूबाजूनी पडदे लावलेला व हातांनी ओढला जाणारा छोटा रथ. प्राचीन काळी मोठ्या रथाबरोबरच कर्णीरथही वापरीत असत. राजस्थानामधल्या राजमहालात आजही कर्णीरथ प्रचारात आहेत. प्राचीन काळी विशेषतः स्त्रिया अशा रथात बसून जात असत. कालिदासाने रघुवंशात कर्णीरथाचा निर्देश केलेला आहे–

**श्वश्रूजनानुष्ठितचारुवेषां**
**कर्णीरथस्थां रघुवीरपत्नीम् ।**
**प्रासादवातायनदृश्यबन्धैः**
**साकेतनार्योऽञ्जलिभिः प्रणेमुः ।।**

(रघु. १४.१३)

अर्थ– सास्वांनी सुंदर वस्त्रे नेसविलेल्या व कर्णीरथात बसलेल्या त्या रामपत्नी सीतेला साकेतातील स्त्रिया, वाड्यांच्या खिडक्यांतून बाहेर दिसणाऱ्या अंजलि–बंधांनी नमस्कार करत्या झाल्या.

गुप्तपणे राजवाड्याच्या आत-बाहेर जाऊ इच्छिणारे राजपुरुष कर्णीरथातून जात असत. [ शृं. हा. ]

**कर्तरी** (१) मूर्तिकलेतील एक आयुध. हे सुरीसारखे असते व त्याच्या टोकाला करवतीसारखे दाते असतात. जेव्हा या कर्तरीवर वज्र असते, तेव्हा तिला वज्रकर्तरी म्हणतात.

(२) एक योग. दोन क्रूर ग्रहामध्ये चंद्र असणे किंवा जन्मलग्न असणे, याला कर्तरीयोग म्हणतात. या योगावर कन्या जन्मल्यास तिला तो अशुभकारक ठरतो. [ श. क. ]

**कर्ताभाजा** बंगालमधील एक धर्मपंथ. औलचंद हा याचा संस्थापक होय. याला श्रीकृष्णाचा अवतार समजतात. या पंथाच्या अनुयायांना सत्यधर्माचे साधक असे समजतात. या पंथात हिंदू व मुसलमान असे दोन्ही धर्माचे लोक असतात. या पंथात प्रविष्ट झालेला ब्राह्मणही मुसलमान गुरूकडून दीक्षा घेण्यात कमीपणा मानीत नाही. रामशरण पाल या गृहस्थाने बंगालमध्ये या पंथाचा खूप प्रचार केला. [ म. भा. सा. ]

**कर्दम** एक ऋषी व प्रजापती. हा स्वायंभुव मन्वंतरात ब्रह्मदेवाच्या छायेपासून उत्पन्न झाला (भाग. पु. ३. १२. २७). याने कृतयुगात सरस्वतीच्या तीरी दहा सहस्र वर्षे तप केले. त्यानंतर त्याला विष्णूने दर्शन दिले. कर्दमाने विष्णूची स्तुती करून त्याच्याकडे अनुरूप पत्नी मागितली. त्यावर विष्णूने त्याला म्हटले, ' मनू हा सार्वभौम राजा आपली कन्या देवहूती हिच्यासह परवाच्या दिवशी तुझ्याकडे येईल. तू त्या कन्येशी विवाह कर. पुढे तिच्या उदरी मी अवतार घेईन व सांख्यशास्त्र निर्माण करीन '

भगवंताच्या सांगण्याप्रमाणे मनू कर्दम ऋषीकडे आला व त्याने आपली कन्या देवहूती कर्दमाला दिली. देवहूतीने उत्तम सेवा करून कर्दमाला संतुष्ट केले. मग कर्दम एक दिवस तिला म्हणाला, की ' तुझी काय इच्छा आहे ते सांग.' त्यावर देवहूतीने समृद्ध ऐश्वर्यासह संभोगाची इच्छा व्यक्त केली. कर्दमाने तिची ती इच्छा पूर्ण करायचे ठरविले. त्याने समग्र ऐश्वर्यसाधनानी संपन्न असे एक विमान निर्माण केले. उभयता त्या विमानात बसून शंभर वर्षे त्रैलोक्यात हिंडली. त्याच कालावधीत देवहू-

तीची समागमेच्छाही पूर्ण झाली. देवहूतीला कला, अनसूया, इ. नऊ कन्या झाल्या. त्या कन्या कर्दमाने मरीचि, अत्रि, इ. ऋषीना दिल्या. पुढे त्याला विष्णूच्या अंशाने कपिल नावाचा पुत्र झाला. कर्दमाने त्यानतर देवहूतीला कपिलाच्या स्वाधीन करून आणि त्याची अनुज्ञा घेऊन गृहस्थाश्रमाचा त्याग केला. उर्वरित आयुष्य त्याने वनवासात घालविले व योगाभ्यास करून ते सार्थकी लावले. **पाहा**– कपिल. [ भाग. पु. ३.२१-२४ ]

## कर्दमाल

गयेच्या नाभिस्थानीचे एक तीर्थ. इथे स्नान व श्राद्ध केल्याने पितृऋणातून मुक्ती होते. [ पु. इं. ]

## कर्नाटक

द. भारतातला एक प्रदेश. मनुस्मृतीतल्या पुढील श्लोकावरून हा शब्द व्युत्पादितात.

**झल्लोमल्लश्च राजन्याद् व्रात्यान्निच्छिविरेव च ।**
**नटश्च करणश्चैव खसो द्रविड एव च ।।**

(मनु. १०.२२)

यावर कुल्लूकाची व्याख्या अशी–

**क्षत्रियात् व्रात्यात् सवर्णायां झल्ल-नट-करण-मल्ल-निच्छिवि खस-द्रविडाख्या जायन्ते ।**

अर्थ–व्रात्य क्षत्रियापासून सवर्ण स्त्रीच्या ठिकाणी जी प्रजा होते, तिला देशपरत्वे झल्ल, नट, करण, मल्ल, निच्छिवि, खस, द्रविड अशी नावे आहेत.

ज्या प्रदेशात हे व्रात्य क्षत्रिय राहायला गेले, त्या प्रदेशांना त्यांची त्याची नावे मिळाली. त्यापैकी करण–नट हे लोक ज्या भागात राहत, त्याला करणनट > करणणट > कर्णाटक असे म्हणू लागले.

या प्रदेशाला कन्नड असेही दुसरे नाव आहे. तो शब्द करु= मोठा किंवा उच व नाडु = प्रदेश, या दोन शब्दांवरून व्युत्पादितात. करुनाडु > कन्नाडु > कन्नड, ही व्युत्पत्ती बहुतेक सर्व विद्वानांनी मान्य केली आहे.

बेळगाव–कारवार या जिल्ह्यांचा काही भाग, पूर्वीचे म्हैसूर संस्थान, पूर्वीच्या निजाम-राज्याचा प. विभाग, पूर्वीच्या मद्रास इलाख्यातले कानडा आणि बल्लारी हे जिल्हे, पूर्वेस गुंटूर व कृष्णा नदी व उत्तरेस गोदावरी, एवढ्या सर्व प्रदेशाला पूर्वी कर्णाटक असे म्हणत. सांप्रतच्या कर्नाटकाच्या अर्थात म्हैसूर राज्याच्या चतुःसीमा बदलल्या आहेत.

नैसर्गिक परिस्थितीला धरून कर्नाटकाचे तीन ठोकळ विभाग पाडता येतात, ते असे–

(१) **खालाटी किंवा समुद्राची किनारपट्टी**– हिची लांबी सुमारे १०० कोस आहे. कर्नाटकाचा हा घाटाखालचा प्रदेश होय. सह्याद्रीचे अनेक फाटे या प्रदेशात घुसले आहेत. त्यामुळे हा भाग अरण्यमय बनला आहे. सह्याद्रीतून उगम पावलेल्या काळी, गंगावळी, तदडी, शरावती या नद्या या प्रदेशातून वाहत जाऊन समुद्राला मिळतात. कारवार, कुमठा, होनावर, अंकोले, भटकळ ही बंदरे या नद्याच्या मुखावरच बांधली आहेत. या भागात भात व नारळ यांचे उत्पन्न चांगले येते.

(२) **घाट किंवा मलेनाडु** – सह्याद्रीच्या या घाटाची उंची सर्वत्र समान नाही. उत्तरेस ती दोन ते तीन हजार फूट व दक्षिणेस सहा हजार फुटांच्याही वर आहे. मलेनाडुमध्ये मलप्रभा, घटप्रभा, तुगभद्रा, कावेरी, पेन्नार या नद्या उगम पावल्या असून त्या पश्चिमेकडे न वळता पूवकडे वळल्या आहेत. यांचे प्रवाह अत्यंत वेगवान आहेत. त्यांच्यावर धरणे आणि कालवे बांधलेले आहेत. मलेनाडुमध्ये सागवान, शिसवी, चंदन, इ. विविध वृक्ष भरपूर आहेत. या भागात कापूस, हळद, मिरची व तंबाखू ही पिके मोठ्या प्रमाणावर होतात.

(३) **उत्तर कर्नाटक**– कृष्णा नदीचा काठ व तिच्या वरचा प्रदेश हा उत्तर कर्नाटक होय. यात रायचूर, बागलकोट, विजापूर, गुलबर्गा, बिदर हा भाग येतो. इथल्या लोकांचा मुख्य व्यवसाय शेतीचा असून या भागातले लोक दुय्यम धंदा म्हणून विविध प्रकारचे कापडही निर्माण करतात.

कर्नाटक खनिज संपत्तीने मातबर आहे. भारतात जेवढे सोने निघते, त्यातला ८० टक्के भाग कोलारच्या सुवर्णखाणीतून बाहेर येतो. कर्नाटक ही वाच्यार्थाने सुवर्णभूमी आहे.

**इतिहास** — या प्रदेशात ज्ञात इतिहासाच्याही पूर्वकाळी मनुष्यवस्ती होती. ही माणसे वानरसदृश असून ती नैसर्गिक गुहांमध्ये वास्तव्य करीत होती, असे सांगतात. आजवर त्या भागात जे उत्खनन झाले आहे, त्यात अतिप्राचीन अश्मयुगापासून लोहयुगापर्यंतच्या काळातल्या विविध मानव संस्कृतीचे दर्शन घडविणारे किती तरी अवशेष सापडले आहेत. मलप्रभेच्या खोऱ्यात व तुंगभद्रेच्या काठी अतिप्राचीन अश्मयुगातल्या दगडी उपकरणांचे नमुने मिळाले आहेत. घटप्रभेच्या तीरी व बेळगाव जिल्ह्यात उत्तर अश्मयुगातल्या दगडी उपकरणांचे काही सुंदर नमुने गवसले आहेत. भीमा व कृष्णा या नद्यांच्या खोऱ्यात मौर्य व आंध्र यांच्या काळातल्या रंगीत व नक्षीदार मृण्मय पात्रांचे तुकडे हाती लागले आहेत. कोन्नूर, बदामी, ऐहोळ या स्थळी उजेडात आलेली भव्य दगडी स्मारके ही मौर्य काळातली असावी, असे संशोधकांचे अनुमान आहे. चंद्रवल्ली येथे आंध्र काळातले बरेच अवशेष उपलब्ध झाले आहेत. अजून अनेक ठिकाणी उत्खनन व्हायचे आहे. उत्खनित वस्तूंचा तौलनिक अभ्यासही व्हायचा आहे. ही कामे पुरी

झाल्यावर कन्नड संस्कृतीचा विस्तार कुठवर झालेला होता, ते कळून येईल.

संस्कृत साहित्यात कर्नाटकाचा उल्लेख पहिल्या प्रथम महाभारतात आढळतो. भीष्मपर्वात द्रविड, केरळ, कर्नाटक, इ. दक्षिण प्रदेशाची नावे आली आहेत. त्या प्रदेशातले वनवासी म्हणजे शिरसी-वनवासीच्या भागातले लोक आणि महिष्क म्हणजे म्हैसूर प्रदेशातले लोक होत. कुंतल हे देशवाचक नाव कर्नाटकाच्या उत्तर भागाला व महाराष्ट्राच्या काही प्रदेशाला मिळून लागू होत होते, असे म्हणतात. अशोकाचे शिलालेख व टॉलेमी आणि पेरिप्लस यांचे ग्रंथ, यांत कर्नाटकाशी संबद्ध असे पुष्कळ शब्द आढळतात. प्राचीन तमिळ ग्रंथांतही कन्नड भाषेतले काही शब्द दिसतात. त्यावरून वाटते, की इ.स. पूर्वीच कन्नड प्रदेशाचे वेगळे व्यक्तित्व निर्माण झाले असावे आणि कन्नड भाषेचा उगमही त्याच काळातला असावा.

प्राचीन कन्नडिग लोक दोन भिन्न वंशाचे होते. एक वंश द्रविडांचा व दुसरा द्रविडपूर्वांचा. नाडवर, बंट, कुरूब, ओक्कलिग हे द्रविडवंशी होत. ते शेतकरी व पशुपालक होते. आर्यांशी द्रविडांचा संबंध येण्यापूर्वीच ते तमिळनाडमधून कर्नाटकात वस्ती करायला आले. तिथे त्यांनी वसाहती मांडल्या. सूतकताई, विणकाम, बांधकाम, इ. कलांत त्यांनी बरेच नैपुण्य मिळविले. ते नाना प्रकाराची शस्त्रे बनवीत व लढाईला सदैव सज्ज असत. आर्यांशी संबंध आल्यावर त्यांच्या विकासाचा वेग वाढला. कालांतराने ते आर्यांच्या वर्णव्यवस्थेत दाखल होऊन




सांप्रतचे कर्नाटक अर्थात म्हैसूर राज्य

क्षत्रिय बनले. इरुल, काडुकरुब, शबर, मातंग, बेड, इ. कर्नाटकातल्या वनवासी टोळ्या द्रविडपूर्व मानववंशाच्या मानल्या जातात. रामायणात ज्यांना राक्षस म्हटले आहे, ते लोक हेच असावे.

प्रस्तुतच्या कर्नाटकाचा प्राचीन काळी चोळ देशात समावेश होत असे. चोळमंडलम् असेही कर्नाटकाला दुसरे नाव होते. फार प्राचीन काळापासून कर्नाटकावर चोळ राजे राज्य करीत होते. या चोळांच्या आधी कर्नाटक अशोकाच्या साम्राज्यात समाविष्ट झाला होता. अशोकाचे शिलालेख कर्नाटकात अनेक ठिकाणी आढळले आहेत. त्याच्या काळी रिष्टिक, पेत्तनिक, वनवासी, महिषमंडल, इ. छोटी छोटी अनेक राज्ये दक्षिण भागात होती. रिष्टिक हे रट्ट लोकांचे पूर्वज होत. तेच पुढे राष्ट्रकूट या नावाने कर्नाटकाचे अधिपती झाले. पेत्तनिकांना प्रतिष्ठानक असेही म्हणत. हे सातवाहन वंशाचे पूर्वज असणे शक्य आहे. त्यांनी महाराष्ट्राप्रमाणेच कर्नाटकावरही साम्राज्य गाजविले. सातवाहनाचे साम्राज्य नर्मदा-गोदावरीपासून कृष्णा-तुंगभद्रेपर्यंत पसरले होते. त्याच्याही खाली म्हणजे म्हैसूर विभागावरही त्यांचीच सत्ता चालत असावी. कर्नाटकात या सातवाहनांचे काही शिलालेख सापडले आहेत. त्यांची पुष्कळ नाणीही गवसली आहेत. कुंतल नामक कर्नाटकाच्या भागावर सातवाहनांचे विशेष प्रेम असावे. कारण अनेक सातवाहन राजे स्वत:ला 'कुंतलस्वामी' ही उपाधी लावून घेण्यात गौरव मानीत. या राजवंशात हाल सातवाहन,

गौतमीपुत्र शातकर्णी, पुलुमायी, इ. काही राजे सुविख्यात होऊन गेले.

सातवाहनांच्याच काळात सांप्रतच्या वनवासी प्रदेशावर चुटु नावाच्या एका घराण्याचे राज्य होते. चुटु म्हणजे छोटे किंवा कनिष्ठ. हे मानव्य गोत्री ब्राह्मण होते, सातवाहनाचे मांडलिक होते आणि नातेवाईकही होते. सातवाहन साम्राज्याचा दक्षिण विभाग सांभाळण्याची जबाबदारी त्यांच्यावर होती. पुढे सातवाहनांच्या सत्तेला उतरती कळा लागली आणि हे चुटु घराणे धिटाई करून स्वतंत्र झाले. त्याने सुमारे १५० वर्षे त्या भागावर राज्य केले. (चुटु पाहा). नंतर त्यांचीही सद्दी संपली आणि त्या जागी कदंबकुल पुढे आले. कदंब ही चुटुकुलाचीच एक शाखा होती. कदंबाचे राज्य स्थापणारा पहिला पुरुष मयूरशर्मा हा होय. इ. स. च्या पाचव्या शतकात या कदंबकुलाच्या तीन शाखा तीन ठिकाणी राजधान्या स्थापून राज्य करू लागल्या.

चालुक्य हे कदंबांचे मांडलिक घराणे होते. या घराण्यात जन्मलेल्या पुलिकेशी नावाच्या पुरुषाने ( इ. स. ६ वे शतक ) कदंबांना मागे रेटून कर्नाटकावर आपली सत्ता स्थापन केली. बदामी ही कदंबांची मूळ राजधानी होती. चालुक्यांनी तीच आपलीही राजधानी केली. सांप्रत दिसतो तो बदामीचा किल्ला पुलिकेशीनेच बांधला. या पुलिकेशीने 'सत्याश्रय' असे बिरुद स्वत:ला लावून घेतले होते. ऐहिक व पारलौकिक कर्तव्ये यथायोग्य बजावणारा म्हणून सत्याश्रय पुलिकेशीची ख्याती झाली.

त्याचा नातू दुसरा पुलिकेशी आजापेक्षाही सवाई कर्तबगार निघाला. उभ्या दक्षिणेत आपले साम्राज्य स्थापून तो 'आसमुद्रक्षितीश' बनला एवढे शतकृत्य केल्यावर त्याला घराण्याचे 'सत्याश्रय' हे बिरुद थिटे वाटू लागले, म्हणून त्याने स्वत:ला 'परमेश्वर' अशी उपाधी घेतली. चालुक्यांच्या या वैभवकालातच कांचीचे पल्लव प्रबळ झाले. त्या वंशातला नरसिंह वर्मा हा राजा बळ बांधून चालुक्यावर चालून आला. त्याने चालुक्यांना काही ठिकाणी मागे रेटून कर्नाटकाचा काही भाग तर बळकावलाच; शिवाय त्याची राजधानी बदामीही जिंकून घेतली. चालुक्यसत्ता या अकल्पित घणाघाताने हादरली. पण अजून त्या घराण्याची सद्दी संपली नव्हती. त्याच घराण्यात जन्म घेतलेल्या विक्रमादित्य ( दुसरा ) याने पल्लवांना जिंकून आणि खुद्द त्यांची राजधानी कांचीनगरी पादाक्रांत करून आपल्या पराभवाचे सव्याज उट्टे फेडले.

पण आता चालुक्यांचे नष्टचर्यच उभे झाले होते. कारण पल्लवाचा बंदोबस्त झाला, तर राष्ट्रकूटांनी त्यांच्या विरुद्ध उठावणी केली. इ. स. ७५३ च्या सुमारास दंतिदुर्ग या राष्ट्रकूट राजाने चालुक्याचा पराभव करून कर्नाटक आपल्या सत्तेखाली आणला. राष्ट्रकूटांची कर्नाटकावरील सत्ता १० व्या शतकाच्या अखेरीपर्यंत चाललेली दिसते. या कालखंडात चालुक्य घराण्याच्या काही शाखा वेगवेगळ्या ठिकाणी राष्ट्रकूटांच्या आधिपत्याखाली मांडलिक या नात्याने नांदत होत्या, पण आपल्या पराभवाचे शल्य त्यांच्या हृदयात सदैव सलत राहिले होते. त्यांच्या पैकी तैल (दुसरा) नावाच्या एका पुरुषाने आपल्या सैन्याची उत्तम प्रकारे संघटना केली. मग पूर्ण तयारीनिशी तो राष्ट्रकूटांवर धडकला. त्याने राष्ट्रकूटांची सत्ता पूर्णपणे उखडून टाकली. याच चालुक्यांच्या वंशात विक्रमादित्य (सहावा) हा पुरुष अत्यंत महत्त्वाकांक्षी निपजला. त्याने बंग, कलिंग इथवर आपले राज्य वाढविले. अशा प्रकारे तो चक्रवर्ती बनला. चालुक्य वंशाला त्याने पुनश्च देदीप्यमान केले. त्याच्या नंतर चालुक्य वंशाला एकसारखी उतरती कळा लागली. कलचुर्य बिज्जल हा चालुक्याचाच एक मांडलिक होता. वरिष्ठ सत्ता दुबळी होताच त्याने उठाव करून चालुक्यांचे राज्य जिंकून घेतले (इ. स. ११५६). बसवेश्वर ज्याचा मंत्री होता, तो बिज्जल हाच होय.

देवगिरीचे यादव हेही चालुक्यांचे मांडलिक होते. त्या घराण्यातील भिल्लम ( ११८७–९१ इ. स. ) याने कृष्णा नदीच्या उत्तरेकडील प्रदेशात स्वतंत्र राज्य स्थापले. होयसळांनी तुंगभद्रेच्या दक्षिणेकडील प्रदेशावर आपली सत्ता स्थापन केली. या दोन नद्यांच्या मधील प्रदेशासाठी वरील दोन्ही राजसत्तांची स्पर्धा दीर्घकाळ चालू होती. ( यादव व होयसळ राजवंश पाहा). वरंगळच्या काकतीय राजांशीही त्यांना झगडावे लागले. अशा प्रकारे आपसात लढून या तीन्ही सत्ता दुर्बळ झाल्या होत्या. इ. स. १२९५ मध्ये अल्लाउद्दीन खिलजी विंध्य ओलांडून दक्षिणेत आला व त्याने देवगिरीच्या रामचंद्रदेवाचा पराभव करून त्याच्याकडून खूप संपत्ती लुटून नेली. दिल्लीला परत गेल्यावर थोड्याच काळात त्याने आपला सेनापती मलिक काफूर याला मोठ्या फौजेनिशी दक्षिणेत धाडले. त्याने देवगिरी, वरंगळ, द्वारसमुद्रम् या राज्यांवर धाड घालून आपल्या फौजा पार मदुरा-रामेश्वरापर्यंत नेऊन भिडविल्या. त्याने मदुरेच्या पांड्यांनाही जिंकले. दक्षिणेतील ही नाव घेण्याजोगी चार स्वतंत्र राज्ये होती; पण मलिक काफूरच्या मुसंडीपुढे ती हतप्रभ झाली आणि चौदाव्या शतकाच्या पहिल्या पंचविशीतच आपल्या स्वातंत्र्याला मुकली.

यानंतरच्या कर्नाटकाचा इतिहास सांगायचा तो विजयनगरच्या साम्राज्याचा. तो इतिहास दिव्य आहे, प्रतापी आहे आणि अक्षराअक्षरातून स्फूर्ती देणारा आहे. इ. स. १३३५

मध्ये विजयनगरचे पुण्याहवाचन झाले. विशिष्ट आकांक्षा व उद्देश मनात धरून निर्माण केलेले ते एक नवे राज्य होते. त्यासाठी हरिहर व बुक्क या दोन सहोदर बंधूंनी बळ बांधले. याच वेळी जर आपण हिंदूंच्या स्वातंत्र्यरक्षणासाठी व्यापक आणि जोमदार प्रयत्न केले नाहीत, तर दक्षिणेचे मरण अटळ आहे, हे भविष्य त्यांना जाणवले. ते आपले गुरू विद्यारण्य-स्वामी यांच्या प्रेरणेने असे एक स्वतंत्र राज्य निर्माण करण्याच्या उद्योगास लागले. तुंगभद्रेच्या दक्षिण तीरावर विद्यानगर नावाची राजधानी उभारून त्यांनी आपल्या या नव्या राज्याची प्रतिष्ठा केली. ज्येष्ठ बंधू हरिहर हा त्या राज्याचा अधिपती म्हणून सिंहासनावर बसला. बुक्क त्याचा सेनापती झाला. त्यांनी हळूहळू आपल्या राज्यविस्तारालाही प्रारंभ केला. एकेक करीत त्यांनी मुसलमानांची आक्रमणे परतवून लावली आणि अनेक राजे–रजवाड्यांना आपल्या निशाणाखाली आणून उभे केले. हरिहराच्या मागून बुक्क गादीवर आला बुक्कामागून त्याचा सुपुत्र कंपराय हा राजा झाला. त्याने स्वतःला 'दुसरा हरिहर' हे नाव घेतले. तो मोठाच कर्तबगार निघाला. भारताच्या दक्षिण भागातून मुसलमानी सत्तेची हकालपट्टी करण्याचे ईप्सितकार्य त्याने पुरे केले. काबीज केलेले सर्व प्रदेश आपल्या अधिसत्तेखाली आणून त्याने राज्याचे साम्राज्य बनविले. राजधानीचे 'विद्यानगर' हे नाव बदलून त्याने तिचे 'विजयनगर' असे नवे नामकरण केले. दक्षिणची भूमी मुसलमानांच्या मगरमिठीतून सुटली, हे जनतेच्या मनावर ठसविण्यासाठी त्याने श्रीरंगम् आणि मदुरा येथील मुसलमानांनी उद्‌ध्वस्त केलेली देवालये पुन्हा पूर्वीच्याच दिमाखात उभी केली. त्याचबरोबर हिंदू जातीचा कोलमडत चाललेला आत्मविश्वासही त्याने पुनश्च दृढ केला.

विजयनगरच्या गादीवर एकूण चार घराण्यांनी साम्राज्यसत्ता उपभोगली. पहिले संगम घराणे, दुसरे साळूव घराणे, तिसरे तुळुव घराणे व चौथे आरविडू घराणे होय. तिसऱ्या घराण्यातला कुलदीपक पुरुष म्हणजे कृष्णदेवराय (१५०९–१५२९). त्याच्या डोक्यावर चढलेला राजमुकुट काटेरी होता. मुसलमानांनी दक्षिणेत पुनश्च नाक खुपसले होते. बहामनीच्या नंतर आलेल्या शाह्या प्रबळ बनू लागल्या होत्या. त्यांनी विजयनगरच्या साम्राज्याचे काही लचके तोडले होते. हिंदू राज्यांमध्येही बेदिली माजली होती. साम्राज्याला अनेक ठिकाणी खिंडारे पडली होती.

कृष्णदेवरायाने ती खिंडारे आपल्या पोलादी हातांनी बुजवून काढली. मुसलमानांनी जिंकलेले साम्राज्याचे भाग त्याने पराक्रम करून पुनश्च आपल्या साम्राज्याला जोडले. साम्राज्याची इभ्रत व दराराही वाढविला. समग्र दक्षिणेत आपली सत्ता दृढमूल केली. मुसलमानांनी मोडलेल्या समस्त मंदिरांच्या जीर्णोद्धारासाठी त्याने एक स्वतंत्र निधी निर्माण केला. हिंदू संस्कृतीची जोपासना करणाऱ्या कित्येक संस्था त्याने ठिकठिकाणी स्थापन केल्या. अनेक विद्वान कवी व कलावंत यांचा तो आश्रयदाता बनला. दक्षिणेत हिंदू संस्कृती जयिष्णू व वर्धिष्णू करून त्याने हिंदुत्वाचा ध्वज उंच फडकत ठेवला. त्याच्या कारकीर्दीत विजयनगरच्या स्थापनेचा हेतु सर्व प्रकारे सफल झाला.

विजयनगरचे हे साम्राज्य इ. स. १३३६ पासून १५६५ पर्यंत पूर्ण वैभवाने तळपले. पण पुढे त्यालाही नियतीचा चक्रनेमिक्रम बाधल्यावाचून राहिला नाही. आदिलशाही, कुतुबशाही, इमादशाही, निजामशाही व बरीदशाही अशा पाच मुसलमानी सत्ता दक्षिणेत प्रस्थापित झाल्या होत्या. या पाचही सत्ता विजयनगरच्या साम्राज्याविरुद्ध एकवटल्या आणि रक्कसतंगडगी येथील युद्धात त्यांनी विजयनगराचा पाडाव केला. या युद्धात सुमारे १ लाख लोकांची कत्तल झाली. विजयी मुसलमान सैन्याने राजधानीत घुसून विजयनगरच्या अमाप वैभवाची लुटालूट केली, उरलेसुरले फोडले, तोडले आणि जाळून टाकले.

विजयनगर उद्‌ध्वस्त झाले व साम्राज्य सर्वांगी खिळखिळे झाले, या गोष्टी खऱ्या; पण त्या साम्राज्याचा संपूर्ण शेवट मात्र त्या लढाईत झाला नाही. कारण हिंदूंना सर्व आघाड्यांवर नामोहरम करण्याइतकी शक्ती त्या वेळी दक्षिणेतल्या कोणत्याच मुसलमानशाहीत नव्हती. त्यामुळे पुढेही शंभर वर्षे ते साम्राज्य कसेबसे तग धरून राहिले.

कर्नाटकातील हिंदू राज्ये नष्ट झाल्यानंतर ठिकठिकाणचे अंमलदार आपली वतने सांभाळून राहिले. त्यांना पाळेगार किंवा देसाई अशा संज्ञा प्राप्त झाल्या. १७ व्या शतकात शहाजी व शिवाजी यांनी कर्नाटकात मराठ्यांची सत्ता स्थापन केली. पुढे औरंगजेबाने कर्नाटकाच्या काही भागावर आपली सत्ता बसविली. मोगलांनी कर्नाटकातला जो प्रदेश जिंकला त्या सर्वांचा समावेश हैदराबाद व विजापूर या दोन सुभ्यांत होत असे. सुभ्यांच्या हाताखाली बादशहाने ठिकठिकाणी जे अधिकारी नेमले होते, तेच पुढे बलाढ्य होऊन आपणांस नबाब म्हणवू लागले. अर्काट, शिरे, कडपे, कर्नूल व सावनूर या ठिकाणचे नबाब १८ व्या शतकात विशेष प्रबळ झाले. याशिवाय म्हैसूर, बिदनूर, चित्रदुर्ग, आनेगुंदी, इ. कित्येक स्वतंत्र संस्थानेही कर्नाटकात होती. सारांश पेशवाईच्या वेळी कर्नाटकात मराठे, मुसलमान व कानडी पाळेगार यांची सत्ता व परस्पर स्पर्धा चालू होती. पेशव्यांनी कर्नाटकावर अनेक स्वाऱ्या करून तिथे आपली सत्ता दृढ करण्याचा प्रयत्न केला; पण तिथले पाळे-

गार व देसाई याचा समूळ उच्छेद त्यांना करता आला नाही. तो पुढे हैदर व टिपू यानी केला. पेशव्यांनी म्हैसूर, सावनूर, बिदनूर, शिरे वगैरे परगण्यांवर स्वाऱ्या करून तेथील सत्ताधीशांकडून पुष्कळ खंडणी वसूल केली.

इ. स. १७६१ च्या सुमारास कर्नाटकात हैदरअलीचा उदय झाला. त्याने रायदुर्ग, चित्रदुर्ग, बिदनूर, सावनूर, इ. राज्ये जिकली व मराठ्यांच्या सत्तेला शह दिला. थोरल्या माधवरावाने हैदरास नामोहरम करून त्याच्याकडून खंडणी घेतली खरी; पण नंतर हैदराने पुन्हा उचल केली आणि १७८० पर्यंत कृष्णा नदीच्या दक्षिणेकडील मराठी अंमल बहुतेक उडवून दिला. त्याच्यामागून त्याचा पराक्रमी मुलगा टिपू यानेही आपला दरारा चहूकडे बसविला. त्याने हिंदूंचा खूप छळ केला. नाना फडणविसाने त्याच्यावर चढाई केली आणि १७८६ मध्ये बदामीचा किल्ला व १७८७ त गजेंद्रगड जिकून घेतला. शेवटी मराठे, निजाम, व इंग्रज या तिघांच्या संघटित स्वारीमुळे टिपूचा पराभव झाला (१७९२). पुढे १७९९ साली इंग्रजांनी निजामाच्या मदतीने टिपूला मारून त्याचे राज्य जिकले. मात्र त्यांनी काही मुलुख म्हैसूरच्या पहिल्या राजाचा वंशज कृष्णराज वोडेयार याला देऊन म्हैसूर संस्थानाची स्थापना केली.

कर्नाटकाच्या नवीन प्रदेशराज्याला म्हैसूर राज्य म्हणतात. त्यात पूर्वीचे म्हैसूर संस्थान आणि बेळगाव, धारवाड, विजापूर, कारवार या भागांचा समावेश होतो. या राज्याची राजधानी बेंगळूर ही आहे. या शहराचा पाया एका पाळेगाराने घातला. त्याने इ. स. १५३७ त इथे एक किल्ला बांधला. तो प्रथम



विधानसौध– बेंगळूर

मातीचा होता. पुढे हैदराने तो वाढवून दगडी बांधला. आता तो किल्ला पाडून त्या जागी नवे शहर वसविले गेले आहे. हे शहर तिथले कारखाने व उद्योगधंदे यामुळे प्रसिद्ध आहे; त्याचप्रमाणे तेथले बगीचेही अत्यंत प्रेक्षणीय आहेत. बेंगळूरचा विधानसौध म्हणजे सचिवालय ही नवी इमारत स्वातंत्र्योत्तर भारतातील सर्वोत्तम वास्तू आहे. चैत्यधर्तीच्या कमानी, मोगल शैलीचे घुमट व कळसावरील अशोकचिन्हांकित सिह लक्ष वेधून घेतात.

पूर्वीच्या म्हैसूर संस्थानची राजधानी म्हैसूर येथे होती. हे फार पुरातन शहर आहे. त्याला लागूनच एक टेकडी आहे, तिचे नाव चामुंडा टेकडी. तिच्या माथ्यावर चामुंडा म्हणजेच महिषासुरमर्दिनी देवीचे भव्य गोपुरयुक्त मंदिर आहे. जवळच महिषासुराचा पुतळा आहे. याच टेकडीच्या उतारावर एक अखंड शिळेत घडविलेला प्रचंड नंदी आहे.

म्हैसूर ही एक उद्याननगरी असून ती अनेक राजप्रासादांनी सुशोभित झाली आहे. या नगरीच्या आसपासची वने चंदनाची



रानटी हत्तीचा कळप

आहेत. सह्याद्रीचा हा भाग घनदाट अरण्यानी व्यापलेला असून त्यात रानटी हत्तीचे कळप नेहमी फिरताना दिसतात.

याशिवाय श्रीरंगपट्टण, विजापूर, बदामी, ऐहोळ, पट्टदकल,



शिवमंदिर– आर्सीकेरी

हंपी, श्रवण बेळगोळ, बेलूर, हळेबीड, आर्सीकेरी, इ. अनेक

दर्शनीय शहरे कर्नाटकात आहेत. त्यातली काही स्थाने धार्मिक व ऐतिहासिक दृष्टीने महत्त्वाची आहेत; तर काही तिथल्या शिल्पामुळे विशेष प्रसिद्ध झाली आहेत कर्नाटकातील आणखी एक प्रेक्षणीय स्थळ म्हणजे जोग धबधबा. गिरसप्पा येथे शरावती नदी सुमारे १००० फूट उंचीच्या कड्यावरून खाली कोसळते. एवढा उच धबधबा सर्व जगात हा एकच आहे.



जोग धबधबा – गिरसप्पा

**सांस्कृतिक जीवन** — आर्य लोक दक्षिणेत आल्यानंतर त्याना प्रथम भेटले ते कन्नडिग. या सपर्कामुळे कन्नडिगानी आर्यसंस्कृतीचा स्वीकार केला, त्याचप्रमाणे आर्यानीही मूळ द्रविड संस्कृतीतल्या काही गोष्टी स्वीकारल्या. आर्यानी दक्षिणेत यज्ञसंस्था रुजवली आणि दाक्षिणात्याकडून शिवशक्तीची पूजा घेतली. त्याकाळी कर्नाटकात मातृसत्ताक कुटुबपद्धती होती. पण ती हळू हळू टाकून देऊन कन्नडिगांनी आर्यांची पितृसत्ताक व्यवस्था अंगिकारली. काही वन्य जमाती मात्र आर्यांच्या संपर्कात न आल्यामुळे अजूनही मातृसत्ताक व्यवस्था पाळतात.

कर्नाटकात नवरात्रोत्सवाला नाडहब्ब म्हणतात. दसऱ्याचा उत्सव तिकडे फार थाटाने साजरा केला जातो. म्हैसूरचा दसरा तर जगप्रसिद्ध आहे. श्रावणातला शुक्रवार संपत शुक्रवार म्हणजे लक्ष्मीचा वार समजला जातो. त्या दिवशी सवाष्णीला न्हाऊ जेवू घालतात. दुसऱ्या शुक्रवारी वरमा लक्ष्मीचे व्रत अत्यंत श्रद्धेने व सणाप्रमाणे साजरे केले जाते. नागपंचमीला झोपाळे बांधतात, माहेरवाशिणीला घरी आणतात. दिवाळीपेक्षा या सणाचे महत्त्व अधिक असते. त्या दिवशी तंबिटाचे म्हणजे तांदुळाच्या पिठाचे लाडू करतात. कन्नडिगांची ज्येष्ठा लक्ष्मीची कथा म्हणजे महाराष्ट्रातील आदित्य राणूबाईची कहाणी.

पंढरीचा विठोबा हा कन्नडिगाचा उपास्य देव आहे पंढरपुरचे विठ्ठलमदिर होयसळ विष्णुवर्धन या कन्नड राजानेच बांधले असे म्हणतात. जेजुरीचा खंडोबाही अनेक कन्नड घराण्याचा कुलदेव आहे. सौदत्तीजवळच्या डोगरावरची एल्लम्म ही कर्नाटकाची भूदेवता आहे. कर्नाटकात बजरंगबलीचीही उपासना केली जाते.

**धार्मिक इतिहास** – आर्यांचा दक्षिणेत प्रवेश होण्यापूर्वी कर्नाटकाचा धर्म हा शुद्ध द्राविड धर्म होता. द्रविड लोक हे शिवपूजक होते, तसेच मारी देवतांच्या रूपात शक्तीलाही भजणारे होते. उग्र आणि भयंकर अशा मारी देवतांना पुजणे, त्यांना पशुबळी देणे, त्या देवताची वार्षिक जत्रा करून त्याच्यापुढे नृत्य-नाटच करणे, नाग, लिंग, वृक्ष, भुते-खेते याचीही पूजा करणे, वार्षिक जत्रा करून वार्षिक कृत्यात त्याना स्थान देणे, असे त्या धर्माचे ढोबळ स्वरूप होते. पुढे वैदिकधर्मी आर्यांच्या सपर्कात आल्यावर कन्नडिगानी त्यांच्याही काही देवता स्वीकारल्या. आपल्या मूळच्या दैवताना न सोडता त्यानी आपल्या धर्माला ही अधिकाची जोड दिली.

वैदिक आर्यांच्या नंतर कर्नाटकात प्रथम पदार्पण करणारा धर्म म्हणजे जैन धर्म होय. सनपूर्व तिसऱ्या शतकाच्या सुमारास भद्रबाहु व चद्रगुप्त मौर्य ही जैन गुरुशिष्याची जोडी आपल्या शेकडो अनुयायांसह कर्नाटकात उतरली. पूर्व भारतात त्या काळी महाभयकर दुष्काळ पडला होता. त्या दुष्काळातून आपल्या अनुयायाचे प्राण वाचविण्यासाठी भद्रबाहूने हे महाप्रस्थान केले होते. त्याने तिथे अनेक कन्नडिगांना आपल्या धर्माची दीक्षा दिली व अनेक मठही उभारले.

त्या काळापासून आजतागायत कर्नाटकात जैन धर्म सुस्थिर आहे. मात्र त्याची प्राचीन काळची भरभराट आता उरलेली नाही. ८ व्या शतकात शंकराचार्यांचा अवतार होईपर्यंत जैन धर्माने तिथे धार्मिक वैभव उपभोगले. पण आचार्यांनी आपल्या समर्थ वाणीने आणि करणीने वैदिक धर्माला पुनश्च उजळा दिल्यावर जैन धर्माला त्या प्रदेशात उतरती कळा लागली. बौद्धधर्माचा पायरव कर्नाटकात सुरू झाला, तो जैनाच्या नंतर आणि अशोकाच्या प्रेरणेने. पण वनवासी प्रांतात त्याचा थोडा फार बोलबाला झाला, तरी कर्नाटकाची भूमी बौद्धांना 'बरड'च ठरली. शंकराचार्यांनंतर तर त्यांचा तिथे मागमूसही उरला नाही.

बाराव्या शतकात आणखी एक नवाच धर्मसंप्रदाय वीरशैव या नावाने कर्नाटकाच्या भूमीत पुढे आला. बसवेश्वर हा या पंथाचा प्रवर्तक होय. कर्नाटकात त्यापूर्वी प्रचलित असलेल्या शैवमताचा परिष्कार करून बसवाने ते नव्या स्वरूपात मांडले. त्याने वीरतेचा पुरस्कार करून एका अंगाने पूर्वीच्या शैवमतातील विकृती दूर केल्या आणि दुसऱ्या अंगाने जैनांचे प्राबल्य कमी करून कन्नडिगांना परमशिवाकडे आकर्षित केले. वर्णाश्रम हे पाखंड आहे, जातीपाती निरर्थक आहेत आणि मूर्तिपूजा तुच्छ आहे, असे बसवाचे मत होते. तो नवसमाजाचा नेता व दुष्ट रूढीचा शत्रू होता. त्याने स्त्रियांनाही पुरुषाच्या बरोबरीने धर्माचे द्वार उघडून दिले. त्याने आपल्या अनुयायांना हृदयावर शिवलिंग धारण करण्याची आज्ञा केली व शिवाच्या मानसपूजेवर भर दिला. चेन्नबसव, अल्लमप्रभु अक्क महादेवी, सर्वज्ञ, अशी अनेक समर्थ माणसे या पथाला लाभली. त्यांनी कर्नाटकात सर्वत्र वीरशैव पथाचा प्रचार केला. कन्नड भाषा व संस्कृती यांच्या विकासात या वीरशैवांचा फार मोठा वाटा आहे. कर्नाटकात जन्मलेला आणि कर्नाटकापुरताच मर्यादित राहिलेला असा हा पंथ आहे. १२ व्या शतकापासून आजतागायत तो त्या भूमीत एक प्रमुख पंथ म्हणून नांदत आहे.

अकराव्या शतकात रामानुजाचार्य हे तमिळनाडमधून कर्नाटकात आले. तिथे विष्णुभक्तीचा पाया त्यांनीच घातला. तेराव्या शतकात मध्वाचार्य हे याच भूमीत जन्मले. त्यांनी द्वैताश्रयी विष्णुभक्ती कर्नाटकात खूपच वाढविली. शंकराचार्यांच्या मायावादाला विरोध करण्यासाठी वायुदेवाने मध्वाचार्यांच्या रूपात अवतार घेतला, असे माध्व मंडळी मानतात. मध्वाचार्यांना कर्नाटकात अनेक अनुयायी लाभले. त्यांनी माध्वसंप्रदाय सामान्य जनांपर्यंत नेऊन पोचविला. माध्वमताचे हे अनुयायी हरिदास या नावाने आपला समूह करून कर्नाटकात सर्वत्र हिंडत आणि आपली 'कीर्तने' गाऊन जनात विष्णुभक्तीचा प्रचार करीत. त्यामुळे या हरिदास संस्थेचे नावच दासकूट असे पडले. या दासकूटाची परंपरा नरहरितीर्थापासून सुरू होते. व्यासराय, विजयदास, पुरंदरदास, कनकदास, अशासारख्या अनेक धुरंधर संत कवींनी दासकूटाची परंपरा उज्जल केली. या हरिदासांचे कीर्तनसाहित्य कर्नाटकाला गंगेप्रमाणे पावन व संजीवक ठरले. कन्नडिगांच्या सांस्कृतिक विकासाला ते मोठेच उपकारक झाले. १३ व्या शतकात उगम पावलेली ही हरिदासपरंपरेची गंगोत्री आपल्या अखंड प्रवाहाने १९ व्या शतकाला येऊन भिडली आहे.

चौदाव्या शतकात इस्लामधर्म कर्नाटकात प्रवेशला. मुसलमान लोक दक्षिणेत उतरले, ते धर-मार करीतच. कर्नाटकाची सत्ता हस्तगत करण्यासाठी त्यांनी एकामागून एक आक्रमणे सुरू केली. कर्नाटकात हिंदू संस्कृतीच्या संरक्षणाची व संवर्धनाची प्रेरणा मुसलमानांच्या आक्रमणातूनच स्फुरण पावली. विजयनगरचे साम्राज्य हे त्याचे फळ होय. हे साम्राज्य इस्लामी साम्राज्यवादाची पाळेमुळे उखडून टाकण्यासाठी स्थापन झाले असले, तरी त्या सम्राटांनी इस्लाम धर्मावर मात्र कधीही प्रहार केला नाही. ते मुसलमानांशी सलोख्यानेच वागले. त्यांचे सर्वच धर्मपंथांच्या बाबतीत सहिष्णुतेचे व समन्वयाचे धोरण होते. त्यांनी तसे प्रयत्नही केले. बुक्करायाने जैन-वैष्णव यांच्यातली तेढ कमी करण्याच्या कामी बरेच यश मिळविले. कंपरायाने तर सर्वांनी सर्व देवता वंद्य मानाव्या, असे मुळी आज्ञापत्रच काढले होते.

कर्नाटकातले सर्व राजे-महाराजे यांनी स्वतः मानीत नसलेल्या धर्मपंथांनाही उदार आश्रय दिलेला दिसतो. सातवाहन राजे वैदिक धर्माचे होते; पण त्यांनी बौद्धांना सढळ हाताने देणग्या दिल्या. कदंबवंश शैव असूनही त्यांनी जैन मठांचे वैभव वाढविले. गंगराजे जैन होते; पण त्यांनी ब्राम्हणी धर्माला उदारपणे वागविले. चालुक्य हे वैष्णव; पण त्यांनी जैन व शैव या दोघांच्याही बाबतीत आपले मन उदार ठेवले. होयसळ राजा बिट्टिदेव याने रामानुजाना आसरा देऊन त्यांच्या विष्णुभक्तीच्या प्रचाराला बहुमोल साह्य केले. विजयनगरचे हिंदुसाम्राज्य आपल्या सत्तावैभवाने गाजत असतानाच ख्रिस्ती धर्माने कर्नाटकात चंचुप्रवेश केला आणि त्यालाही तिथे आपला प्रचार करायला अवसर मिळाला.

कर्नाटकातल्या राजांना विद्येची रुची व कदर होती. राज्यात विद्येचा सुकाळ व्हावा, म्हणून ते ब्राह्मण पंडितांना तसेच जैन आचार्यांना अग्रहार देत. कर्नाटकातल्या चालुक्यादी राजांनी शिल्पादी कलाना राजाश्रय दिला व कलाक्षेत्रात कर्नाटकाला अजरामर करून ठेवले. कर्नाटकाची शिल्पकला ही भारताला मिळालेली बहुमोल देणगी आहे. मौर्य-सातवाहनांपासून कर्नाटकाला कलेचा सिद्धहस्त लाभला आहे. सातवाहनकाळात बौद्धांच्या प्रेरणेने कलाकारांनी जे विहार व लेणी खोदली, तो कर्नाटकाच्या वास्तुशिल्पाचा श्रीगणेशा होय. कर्नाटकात आढळणाऱ्या बौद्धमूर्ती हे तेथील मूर्तिकलेचे सर्वांत प्राचीन अवशेष होत. श्रवण बेळगोळ येथील बाहुबलीचा पुतळा ही द. भारतातील सर्वात मोठी जैनमूर्ती होय. या पुतळ्याची उंची ५७ फूट असल्याचे सांगतात. हा पुतळा १० व्या शतकात चामुंडरायाने घडविला. कदंब आणि चालुक्य यांच्या राजवटीत तिथे शिवविष्णूची कलासुंदर मंदिरे निर्माण झाली. कदंबांच्याच काळात

तिथे जैन शिल्पही विकसित झाले. होयसळाच्या कारकीर्दीत कन्नड शिल्पाने स्वतःचा जणू कलाशाध्यायच रचला. ११ व्या शतकातले होयसळेश्वरमदीर, १२ व्या शतकातले केशवस्वामीचे देवालय, १३ व्या शतकातले केदारेश्वराचे देवालय, होयसळ राजा नरसिह (तिसरा) याच्या सेनापतीने बाधलेले सोमनाथ-पूर येथील देवालय, ही सर्व मंदिरे म्हणजे शिल्पकलेची रत्नेच होत. ही मंदिरे जक्कणाचार्य व डंकणाचार्य या दोन पितापुत्र वास्तुशास्त्रज्ञांनी घडविली, असे सांगतात. होयसळ राजांच्या उदार आश्रयाखाली त्यांनी कर्नाटकाचे हे स्थापत्यवैभव वाढविले. विजयनगरच्या कालखडात तमिळनाडमधील द्राविड शिल्पाच्या प्रभावामुळे कर्नाटक शिल्पात अनेक नवीन प्रथा निर्माण झाल्या व कर्नाटकाच्या रसिकतेची आणि सौदर्य-प्रीतीची अनेक अक्षय्य स्मारके सर्वत्र उभी झाली.

कर्नाटकाचा हा दोन हजार वर्षाचा इतिहास कर्तृत्व, बुद्धी, पराक्रम व संस्कृती यांचे भव्य दर्शन घडवितो. भारतीय सस्कृतीच्या विकासात कर्नाटकाचा फार मोठा वाटा आहे. कर्नाटक शिल्प व कर्नाटक संगीत ही दोन कन्नडिगाच्या बुद्धिमत्तेची श्रेष्ठ उदाहरणे होत. राज्यकारभाराची एक वेगळीच प्रथा या प्रदेशाच्या इतिहासात आढळते. तिथले राजे जमीन–महसुलापैकी ⅙ भाग स्वतःसाठी ठेवून बाकीचे सर्व धन शिक्षण, धर्म, कला, सामाजिक प्रगती, इ. कार्यासाठी खर्च करीत. खेडे हा राज्य-कारभाराचा घटक मानला जात असे. खेड्यात लोक पंचायती स्थापून आपापल्या गावांचा कारभार चालवीत. राज्यकार-भाराच्या सोईसाठी अशा अनेक खेड्याचे गट केलेले असत. राजाच्या आधिपत्याखाली व्यापारी उदमी लोकांच्याही स्वतंत्र संस्था व सघटना असत. राज्यात शारीरिक शिक्षण देणारे अनेक आखाडे असत. तिथे तरुणाना कुस्ती, नेमबाजी व युद्ध-कला याचे शिक्षण दिले जाई. त्यामुळे सैन्यात योग्य तरुणाची भरती करण्याला मदत होत असे. **पाहा**–कन्नड भाषा व साहित्य. [क. द.; कर्नाटक; हे. क.; म. रि.]

## कर्नाटक संगीत

द. भारतात प्रचलित असलेल्या गायन पद्धतीला कर्नाटक संगीत असे म्हणतात. कर्नाटक शब्दाचा लाक्षणिक अर्थ 'जुने' असा आहे. हे संगीत भारतातले जुने संगीत समजतात. भरतमुनी म्हणतो. 'भारताच्या दक्षिण भागातील लोकांना नृत्य आणि गाणे–बजावणे यात आनंद वाटतो. त्यांची गानशैली मार्दवपूर्ण व अभिनय सफाईदार असतो. हा प्रदेश विंध्यपर्वतापासून खाली दक्षिण समुद्रापर्यंत पसरला आहे.'

दाक्षिणात्य संगीत मध्ययुगात यादवांची राजधानी देवगिरी येथे विकास पावत होते; पण पुढे मुसलमानांनी ते नगर जिंकून लुटल्यानंतर तिथले संगीतज्ञ विजयनगरच्या साम्राज्यात आश्रयाला गेले. पुढे विजयनगरचे साम्राज्यही मोडले. त्यानंतर तिथले नायक राजे आणखी खाली दक्षिणेस गेले व त्यानी तिकडे स्वतंत्र राज्ये स्थापली. त्यापैकी तंजाऊरच्या राज्यात या संगीताला विशेष प्रोत्साहन मिळाले.

कर्नाटक संगीताचा विकास मुख्यत्वे वैणिक परपरेच्या अनुषंगाने झाला आहे. वैणिक परंपरा म्हणजे वीणावादनाची परपरा होय. दक्षिणेतले बहुतेक मोठे संगीतविशारद या वैणिक संप्रदायातले आहेत. बोबिली, विजयनगर, तंजाऊर, म्हैसूर व त्रिवांकुर येथील संगीताचार्यांनी या वैणिक संगीत पद्धतीला जन्म दिला व चक्रबंधम्, बंधतानम् अशासारख्या काही खास तंत्रांची त्या वीणावादनाला जोड दिली. कालांतराने हा वैणिक संप्रदाय दक्षिणेत बद्धमूल झाला. हळूहळू त्याच्या श्रेष्ठत्वाबद्दल गायकांच्या मनात अभिनिवेशही उत्पन्न झाला.

या सप्रदायाच्या बैठकीचा नियम 'आदि नट, अत्य सुरट', असा आहे. म्हणजे जलशाचा प्रारंभ नट रागाने व त्याची समाप्ती सुरटी रागाने करणे. ही पद्धत मानसशास्त्र व सौदर्य-शास्त्र याच्या अभ्यासावर आणि त्यातील अनुभवांवर आधारलेली आहे. नट रागाचे स्वर तीव्र असतात व त्यांच्यामुळे संगीताला योग्य असे वातावरण निर्माण होते. सुरटी हा एक शुभ राग आहे. जलशाची समाप्ती त्या रागाने करणे, हे मंगलप्रद समजतात. मध्यरात्रीचे धार्मिक कार्यक्रम सुरटी रागानेच समाप्त करतात.

कर्नाटक संगीताविषयी ज्यात थोडी-बहुत शास्त्रीय माहिती मिळू शकते, असा सर्वात प्राचीन ग्रंथ म्हणजे शिलप्पधिकारम् हे महाकाव्य होय. त्यात वीणा, मृदग, इ. त्या काळी प्रचलित असलेल्या अनेक वाद्यांचा उल्लेख असून स्वर व राग यांच्याविषयीही थोडीबहुत माहिती आहे. शिलप्पधिकारम्मध्ये उल्लेखिलेली गायनपरंपरा अद्यापि तमिळनाडमधील 'पण' पद्धतीत दिसून येते. हिंदुस्थानी संगीतात जसे आरोही-अवरोही असे गट असतात; तशाच प्रकारच्या कर्नाटक संगीतातील गटांना 'पण' म्हणतात. जीभ, नाक, ओठ, दात, इ. आठ अवयवांच्या साहाय्याने व एडुतळ (उचलणे), पडुतळ (आडवे करणे), नळिहळ (दाबणे), कंपितम् (स्वर कापविणे), कुटिलम् (वक्र करणे), ओळि (स्वरनिर्मिती करणे), विरुथम् (पिरगळणे) व टक्कु (शुद्ध उच्चार), या क्रियांच्या योगाने पणांची उत्पत्ती होते. वरील क्रियांना सांप्रत स्थाय व गमक असे म्हणतात. कर्नाटक संगीतातल्या आलापीची ही मूलतत्त्वे होत.

या संगीताचे दोन कालखंड पाडता येतात—(१) **संघम्काल** (सनपूर्व ५० पर्यंत) आणि (२) **तेवारम्काल** (सनपूर्व ५० ते इ. स. १८०० पर्यंत). या दुसऱ्या कालखंडात ज्या बिकट पण मधुर व तालबद्ध अशा रचना निर्माण झाल्या, त्याच त्यापुढील काळाला आदर्शभूत ठरल्या आहेत. त्यात भिन्न प्रांतात व भिन्न काळात प्रचलित असलेल्या रचनांचीही भर पडली आहे.

इ. स. च्या १२ व्या शतकात मानसोल्लास या ग्रंथाचा कर्ता सोमेश्वर याने दक्षिणेतल्या या गायनपद्धतीला कर्नाटक संगीत असे नाव दिले. १३ व्या शतकात उत्तर भारतातील संगीतावर मुसलमानी छाप पडू लागली; पण त्यापूर्वीच दक्षिण भारतातल्या संगीताचे वेगळे वळण दिसू लागले होते. तथापि दोन्ही पद्धती निश्चितपणे वेगळ्या झाल्या त्या विद्यारण्याच्या काळात (१४ वे शतक). विद्यारण्यांनी प्रथमच कर्नाटकी रागांचे वर्गीकरण मेल-जन्य पद्धतीने केले; पण निश्चित नियमाच्या अभावी काही काळ ही रागपद्धती अस्पष्टच राहिली. पुढे १५ व्या शतकात पुरंदरदासाने कर्नाटकी रागांचे स्वरूप स्पष्ट केले व त्यामुळेच कर्नाटक संगीताला निश्चित असे शास्त्रीय स्वरूप प्राप्त झाले. या घटनेचे दर्शन प्रथमतः स्वरमेलकलानिधी या ग्रंथात होते. हा ग्रंथ रामामात्य याने १६ व्या शतकाच्या मध्यावर रचला. शार्ङ्‌देवाच्या संगीतरत्नाकरातील शुद्ध स्वरसप्तक त्याने स्वीकारले; पण विकृत स्वरसप्तकासंबधी मात्र तो साशंक राहिला. त्याशिवाय त्याने संगीतरत्नाकरातील ऋषभ व धैवत यांच्या श्रुतिकालाऐवजी चतु.-श्रुती व षष्ठश्रुतिकालांचा उपयोग केला. सप्तकातील १२ भिन्न स्वर आणि नायन्मार व आळवार यांची भक्तिगीते यामुळे कर्नाटकसंगीताला सध्याचे स्वरूप प्राप्त झाले. रामामात्याने मेलकर्ता पद्धतीला शास्त्रीय रूप दिले व मेल नावाचे नवीन प्रकरण आपल्या स्वरमेलकलानिधी या ग्रंथात समाविष्ट केले.

कर्नाटक संगीतावरचा यानंतरचा महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे सोमनाथाचा रागविबोध हा होय (इ. स. १७ वे शतक). त्यात त्याने परंपरागत २२ श्रुती मानलेल्या असून ७ शुद्ध व ७ विकृत स्वराचेही वर्णन केले आहे. हा ग्रंथ श्रेष्ठ दर्जाचा असून अहोबल व भलभट्ट या सगीततज्ञांनीही त्याचा आदर केला आहे.

१६ व्या शतकातील पं. वेंकटमुखी याने कर्नाटक संगीताला अधिक रेखीव स्वरूप दिले. ध्वनी व त्यांची कंपनसंख्या यांचा सूक्ष्म अभ्यास करून त्याने रागाचे जनक व जन्य असे दोन विभाग पाडले. या जनक रागानाच मेलकर्ता, मेल, कर्ता व संपूर्ण अशी दुसरी नावे आहेत. त्यांची संख्या ७२ असून प्रत्येकात सप्तस्वर असतात. जनक रागापासून उत्पन्न झालेले ते जन्य होत. त्याची संख्या कमी आहे त्यांत मूळ रागांतले स्वर असतात व क्वचित बाहेरचेही एक दोन स्वर असू शकतात.

कर्नाटक संगीतात रागांचा क्रम प्रस्तारभेदांनी ठरत असतो. ऋषभ आणि गांधार यांच्या योगाने प्रत्येक रागाचे सहा भेद होतात आणि धैवत व निषाद यांच्या योगाने सहा भेद संभवतात. पहिल्या सहा भेदात दुसऱ्या सहा भेदांनी प्रस्तार केल्याने ६ × ६ =३६ आणि त्यात प्रत्येकी प्रतिमध्यम (तीव्र) स्वर घेतल्याने होणारे ३६ असे ७२ मेल होतात.

या ७२ मेलांची कल्पना स्पष्ट व्हावी म्हणून सहा चक्राची योजना केलेली आहे. त्याचे कोष्टक पुढीलप्रमाणे—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ ला | ऋषभ | व | १ ला गाधार | मिळून | चक्र १ ले |
| १ ला | ऋषभ | व | २ रा गांधार | ,, | चक्र २ रे |
| १ ला | ऋषभ | व | ३ रा गांधार | ,, | चक्र ३ रे |
| २ रा | ऋषभ | व | २ रा गांधार | ,, | चक्र ४ थे |
| २ रा | ऋषभ | व | ३ रा गांधार | ,, | चक्र ५ वे |
| ३ रा | ऋषभ | व | ३ रा गांधार | ,, | चक्र ६ वे |

मेलपद्धतीचे आणखी एक वैशिष्ट्य असे, की तिच्यात मेल रागांची नावे अशा रीतीने योजलेली असतात, की त्या रागांच्या नावातील पहिल्या दोन अक्षरांनी त्या त्या रागाचा क्रमांक समजून यावा आणि क्रमांक समजल्याने रागाला लागणारे प्रयोगस्वरही समजावे.

या पद्धतीत क पासून ह पर्यंत जितके वर्ण आहेत, त्यांतून ञ हा वर्ण सोडून बाकीच्या वर्णांचे पाच भाग केलेले असतात व त्यातील प्रत्येक अक्षरासाठी विशिष्ट अंकही ठरविलेला असतो.

| क्रम | अक्क्क म | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | ० |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | कादिनवा. | क | ख | ग | घ | ङ | च | छ | ज | झ | |
| २ | टादिनवा: | ट | ठ | ड | ढ | ण | त | थ | द | ध | |
| ३ | पादिपंचा: | प | फ | ब | भ | म | | | | | |
| ४ | याद्यष्टा: | य | र | ल | व | श | ष | स | ह | | |
| ५ | नकाराय बिंदु: | | | | | | | | | | न |

**उदा०** — माया = ५१ — क्र. १५ मायामालवगौळ
नव ≐ ०४ — क्र. ४० नवनीत
धीर = ९२ — क्र. २९ धीरशंकराभरण
हरि = ८२ — क्र. २८ हरिकांभोजी

जनक रागांची वैशिष्टये पुढीलप्रमाणे —

(१) आरोह व अवरोह या दोन्हीमध्ये सातही स्वरांचा उपयोग (२) आरोह व अवरोह यांतील नियमितपणा व (३) त्यात वापरलेल्या स्वराचे सजातीय (एकजिनसी) रूप.

जन्य रागांचे दोन गट पाडलेले आहेत –(१) वर्ज राग व (२) वक्र राग.

'वर्ज' गटातील रागात एक दोन स्वर कमी असतात. रागाच्या आरोहात व अवरोहात जितके स्वर असतात, त्यांवरून या गटाचे आठ उपगट केलेले आहेत.

'वक्र' रागांच्या आरोहात किवा अवरोहात किंवा दोन्हीमध्ये वक्र स्वर असतो म्हणजे क्रमाने स्वरांचे गायन करीत असता मध्येच आधीचा स्वर पुन: घेतला जातो. एका रागात असे १ ते ४ वक्रस्वर असू शकतात.

ज्या जन्य रागात जनक रागाचेच स्वर प्रयुक्त असतात, त्याला उपाग राग म्हणतात व ज्यात काही स्वर जनक रागातील स्वरांहून अधिक असतात, त्याला भाषांग राग म्हणतात.

प्राचीन काळी दाक्षिणात्य संगीत हे मुख्य सात स्वरांच्या पायावरच आधारलेले होते. हिंदुस्थानी सगीताप्रमाणे कर्नाटक संगीतातही प्राचीन कालापासून २२ श्रुती स्वीकारलेल्या आहेत. कर्नाटक संगीतात स्वरांची अदलाबदल व संयोग ( Permutations and combinations ) यांना प्राधान्य असून त्यात स्वरमाधुर्यापेक्षा तालबद्धतेला अधिक महत्त्व दिलेले असते.

कर्नाटक सगीतात १०८ ताल असल्याचे सांगितले आहे. नंदिकेश्वराने आपल्या भरतार्णव या ग्रंथात ११२ तालांचा उल्लेख केला आहे; ३५ व ७२ तालाचेही उल्लेख आढळतात. ७२ ताल वेंकटमखीच्या रागनामाप्रमाणे असून रागाच्या नावावरून तालाचेही स्वरूप समजते; पण अशी तालसंख्याविषयक मते विविध असली, तरी सांप्रत पुढील सात तालच प्रामुख्याने उपयोजिले जातात. त्यांचे कोष्टक पुढीलप्रमाणे–

| क्रमांक | तालाचे नाव | अंग | मात्रासंख्या | ठोका |
|---|---|---|---|---|
| १ | एकताल | । | ४ | १ |
| २ | रुपकताल | O । | २ + ४ = ६ | २ |
| ३ | झपताल | । U O | ४ + १ + २ = ७ | ३ |
| ४ | त्रिपुटताल | । O O | ४ + २ + २ = ८ | ३ |
| ५ | मठ्यताल | । O । | ४ + २ + ४ = १० | ३ |
| ६ | अटताल | ।।OO | ४+४+२+२=१२ | ४ |
| ७ | ध्रुवताल | । O। । | ४+२+४+४=१४ | ४ |

। = लघु. O = द्रुत. U = अणुद्रुत.

या सात तालाचे त्र्यस्र, चतुरस्र, खंड, मिश्र व संकीर्ण असे पोटभेद आहेत. चतुरस्र जातीच्या त्रिपुटतालाला आदिताल म्हणतात.

कर्नाटक संगीतावर द्रविड संस्कृतीची छाप स्पष्ट असली, तरी त्यात आर्यतत्त्वे व द्राविड आचार यांचा सुंदर संगम झाला आहे. हिंदुस्थानी संगीतातील राग व ताल आत्मसात करताना दाक्षिणात्यांनी त्यांना कर्नाटकी रंगरूप दिले आहे. दक्षिणी शिल्पाप्रमाणेच दक्षिणी संगीतही नक्षीदार असते. त्यातील प्रत्येक स्वर अलंकृत असतो. त्यात श्रद्धा, भाव[illegible] व उत्साह भरपूर असतो. पुष्कळदा अलकारांची पुनरुक्ती होते व ती कधी कधी कंटाळवाणीही वाटते, पण त्या पुनरुक्तीत एक प्रकारची शिस्त असते व एकजिनसीपणाही असतो.

कर्नाटक संगीताची स्वररचना हिंदुस्थानी सगीताप्रमाणे शांत, स्थिर व स्पष्ट नसते. त्यातले स्वर कंपयुक्त असतात व त्यात सरमिसळ झाल्यासारखीही वाटते. द भारतीय कलाकार आपली स्वररचना शास्त्रशुद्ध ठेवण्याचा कसोशीने प्रयत्न करतात. त्यात स्वत.ची वेगळी अशी धाटणी दाखवीत नाहीत. कारण वेगळ्या धाटणीमुळे रचना सदोष होईल, अशी त्यांची समजूत असते.

कर्नाटकसंगीताच्या रचनेचे प्रकार पुढीलप्रमाणे आहेत–

(१) **लक्षणगीत** – ही लक्षणगीते पुरंदरदासाने रचलेली आहेत. हा प्रकार हिंदुस्थानी संगीताप्रमाणेच आहे.

(२) **वर्णम्** – ही एक प्रतिष्ठित आणि परिश्रमपूर्वक तयार केलेली मधुर रचना असते. गायक ही रचना खडतर अभ्यास करून शिकतात. त्यामुळे इतर रचनांमध्ये त्याना सहजपणे संचार करता येतो. या रचनेत शब्द कमी असतात आणि स्वरांचा भरणा अधिक असतो.

वर्णम्‌चे दोन भाग असतात. पहिल्या भागाला पूर्वांग व दुसऱ्याला उत्तराग म्हणतात. पूर्वांगात पल्लवी, अनुपल्लवी व मुक्ताबाई या स्वरांचा समावेश असतो. उत्तरांगात चरणम् या स्वरांचा समावेश असतो. दोन्ही भागांची लाबी समान असते.

तानवर्णम् व पदवर्णम् असे वर्णम्‌चे दोन प्रकार आहेत. पहिल्यातील पल्लवी, अनुपल्लवी व चरणम् यात शब्द असतात. तर इतर भागात सरगमचा उपयोग केलेला असतो. पदार्पणाची गती मंद असते. याची रचना हिंदुस्थानी संगीतातील पदासारखी असून या पदांचा नृत्याच्या वेळी उपयोग होतो.

(३) **कृति**– ही रचना हिंदुस्थानी संगीतातील ध्रुपदासारखी असते. कर्नाटक संगीतातील ही सर्वांत विकसित अशी रचना होय. ती अठराव्या शतकात रूढ झाली. वर उल्लेखिलेले पल्लवी आदी प्रकार हे कृतीचे मुख्य भाग असतात. ही रचना केव्हा केव्हा चिट्टस्वरांनी सजविलेली असते. हे चिट्टस्वर (सरगम) मध्यम लयीत गायिले जातात. रचनेत स्पष्ट न झालेले रागस्वरूप या चिट्टस्वरांमुळे समजून येते.

(४) **पदम्**– ही रचना हिंदुस्थानी संगीतातील ख्यालासारखी

असते. पदम्‌चे गायन कृतीप्रमाणेच करतात; पण त्याचा प्रारंभ अनुपल्लवीने केला जातो.

(५) **जावळि**– ही रचना ठुमरीसारखी असून त्यातला शृंगार नृत्याभिनयासाठी उपयुक्त असतो.

(६) **रागमालिका**– या रचनेच्या भिन्न भागांचे राग भिन्न असतात. रचनेत जितके राग असतील, तितकेच रागमालिकेचे चरण असतात व त्या सर्वांची लांबी समान असते. याशिवाय काही रचना तालभेदावरही आधारलेल्या असतात–

(अ) तालमालिका– या रचनेच्या प्रत्येक भागाचा ताल भिन्न ; पण राग एकच असतो.

(आ) पंचतालेश्वर– हाही तालमालिकेसारखाच एक प्रकार आहे. याचे पाच विभाग असतात.

(इ) राग-तालमालिका– यात प्रत्येक भागाचा ताल व राग भिन्न असतो.

(ई) तिल्लाना– हिंदुस्थानी संगीतातल्या तराण्यासारखाच हा प्रकार असतो.

(७) **पल्लवी**– श्रेष्ठ गायकच फक्त ही गातात. हिचे राग व ताल फार अवघड असतात. हिचे स्वरूप ख्यालासारखे असते. कर्नाटक संगीतातली पल्लवी व हिंदुस्थान संगीतातली अस्थाई समान आहेत. तसेच अनुपल्लवी व अंत्रा हेही समान आहेत. चरणम् हा भाग उभयत्र संचार करणाऱ्या संचारी स्वरासारखा असतो.

कर्नाटक संगीताची शास्त्रशुद्ध व परंपरागत वाद्ये म्हणजे सरस्वतीवीणा, बासरी, मृदगम् व नागस्वरम् ही होत.

सांप्रत कर्नाटक संगीताचे जे रूप प्रचलित आहे, त्याच्या जनकत्वाचे श्रेय तंजाऊरचा राजा रघुनाथ नायक (इ. स. १५५४–१६२६) याच्याकडे जाते. १२ स्थिर पडदे असलेली वीणा त्याच्याच काळात निर्माण झाली. रघुनाथ नायकाने संगीत-सुधा या आपल्या ग्रंथात पूर्वकालीन ग्रंथातल्या विरोधी मत-प्रवाहांचा परामर्ष घेऊन कर्नाटक संगीताचे शास्त्र व तंत्र यांची नव्याने माडणी केली. आजचे कर्नाटक संगीत त्या अनुरोधानेच मार्ग क्रमीत आहे. रघुनाथ नायकाने अनेक हिंदुस्थानी रागांचा आपल्या पद्धतीत स्वीकार केला. त्याच काळातले वीरभद्रय्या, अडपय्या यांनीही कर्नाटक संगीताच्या विकासाला हातभार लावला आहे.

इ. स. च्या १८ व्या शतकात त्यागराज, शामशास्त्री, मुत्तु-स्वामी दीक्षितार, क्षेत्रज्ञ व महाराजा स्वाति तिरुणाल महा-राजा केरळ (त्रावणकोर) यानी कर्नाटक संगीताचे सुवर्णयुग सुरू केले. त्यागराजाच्या कृती नाविन्य व वैचित्र्य यांनी परि-पूर्ण आहेत. त्यात विविध अलंकारही असतात. कृती व संगती हे प्रकार त्यानेच सुरू केले. कर्नाटक संगीतावर जी बौद्धिक व तांत्रिक बंधने होती, ती शिथिल करण्याचे बरेचसे श्रेय त्याग-राजाला आहे. त्यागराजाचे संगीत भक्तिरसपूर्ण व प्रतिभा-शाली आहे. लोकप्रिय भावनांच्या आविष्कारांत शामशास्त्री श्रेष्ठ होते. त्यांच्या रचनेत राग, भाव व ताल यांचा उत्तम संयोग झालेला आहे. त्यांच्या फक्त ५० रचना उपलब्ध असून त्या फार अवघड आहेत. रागरचनेचे सौंदर्य विचारपूर्वक वाढ-विणे, हे दीक्षितार याचे वैशिष्टय होय. हे सर्व भारतभर फिरले होते आणि त्यांनीच कर्नाटक संगीतात हिंदुस्थानी संगीतातील रागांचा उपयोग पुष्कळ प्रमाणावर केला. त्यांच्या सर्व ३०० रचना संस्कृतात आहेत. त्यांच्याप्रमाणेच त्यागराजानेही हिंदु-स्थानी रागांचा उपयोग केला आहे. महाराजा स्वाति तिरुणाल यांच्या रचना तमिळ, तेलुगु, कन्नड, मल्याळम्, संस्कृत, मराठी, हिंदी आदी विविध भाषांत असून त्यापैकी ६०० तेलुगुमध्ये आहेत. शामशास्त्रीच्या रचनेत शांतरस, त्यागराजांच्या रचनेत भक्तिरस, दीक्षितार याच्या रचनेत करुणरस व क्षेत्रज्ञांच्या रचनेत शृंगाररस प्रामुख्याने दिसतो. १८ व्या शतकातच गोपालकृष्ण भारती नावाचा एक संगीतज्ञ दक्षिण भारतात होऊन गेला. त्याने लोकगीताच्या आधारावर आपल्या रचना तयार केल्या. भरत, मतग, शार्ङ्गदेव यांच्या प्राचीन ग्रंथांशिवाय कर्नाटक संगीताचा प्रपंच करणारे विद्यारण्यांचा संगीतसार, रामामात्याचा स्वरमेलकलानिधी, रघुनाथ नायकाचा संगीत-सुधा, वेंकटमखीचा चतुर्दंडीप्रकाशिका व तुळजाजीचा संगीत सारामृत हे ग्रंथही प्रसिद्ध आहेत. [श्रीमंत सरदार आबासाहेब मुजुमदार-पुणे]

## कर्पूरदान

कर्पूर = कापूर. एक सुगंधी ज्वालाग्राही द्रव्य. हे एक पूजाद्रव्यही आहे. देवाच्या षोडशोपचार पूजेत मंगलारती झाल्यावर कापूराची आरती करतात. या कर्पूराचे दान केल्याने लक्ष्मी प्रसन्न होते, असे सांगितले आहे. दानमत्र पुढीलप्रमाणे–

**कर्पूरं शीतलं चारु देवर्षिगुरुसेवितम् ।**
**तस्मादस्य प्रदानेन लक्ष्मीस्तिष्ठतु मे गृहे ॥**

अर्थ– देव, ऋषी आणि गुरु यांनी सेवित, सुंदर व शीतल अशा कापूराच्या दानाने माझ्या घरी लक्ष्मीचा वास होवो. [दा. चं.]

## कर्म

हा शब्द कृ धातूपासून निघाला असून करणे, व्यापार व हालचाल, असे त्याचे अर्थ आहेत. हे सामान्य अर्थ होत. मीमांसा व वेदान्त या शास्त्रांत कर्म शब्दाचा धार्मिक दृष्टीने

अर्थ केलेला असून त्याचे अनेक प्रकारे विवेचन केलेले आहे. त्या दृष्टीने सर्वदर्शनसंग्रहात कर्माची व्याख्या केलेली आहे, ती अशी–

**क्रियते फलार्थिभिरिति कर्म धर्माधर्मात्मकं बीजाङ्कुरवत् प्रवाहरूपेणानादि ।।**

अर्थ– फलाची अपेक्षा असणाऱ्या लोकांकडून जे केले जाते, ते कर्म होय. ( हे कर्म ) धर्माधर्मात्मक व बीजातून अंकुर निघावा त्याप्रमाणे प्रवाहरूपाने अनादी असते.

कर्म शब्द ऋग्वेदात सुमारे ४० ठिकाणी आलेला आहे. त्यातल्या काही ठिकाणी त्याचा अर्थ वीरकृत्ये असा असून, काही ठिकाणी धार्मिक क्रिया असा आहे. उदा० –

**अस्येदु प्र ब्रूहि पूर्व्याणि**
**तुरस्य कर्माणि नव्य उक्थैः ।**

(ऋ. १·६१·१३)

अर्थ–खरोखर वेगाने (शत्रूवर) त्वरित तुटून पडणाऱ्या या देवाचे ( इंद्र ) पुरातन कालापासूनचे पराक्रम ( कर्मे ) वर्णन करू लागा.

**जुषन्त विश्वान्यस्य कर्मो–**
**पस्तुतिं भरमाणस्य कारोः ।**

( ऋ. १·१४८·२ )

अर्थ– धर्मरत भक्ताचे कर्म आणि सेवा इ. सर्व काही त्याला प्रियच असते.

प्राचीन वैदिक धर्मात यज्ञयागानाच धार्मिक कर्मे म्हटले असून हे यज्ञयाग कसे करावे, तेही सागितले आहे. यासंबंधात वैदिक ग्रंथांतून ठिकठिकाणी जी अनेक व कधी कधी परस्पर विरोधी वाटणारी वचने आढळतात, त्यांची सगतवार जुळणी करून दाखविण्यासाठीच जैमिनीच्या पूर्वमीमांसाशास्त्राची प्रवृत्ती झाली आहे. जैमिनीच्या मताप्रमाणे यज्ञयागात्मक कर्म करणे, हाच मुख्य व प्राचीन धर्म होय.

यज्ञार्थ केलेली कर्मे जरी स्वतत्र फलदायक नसली, तरी यज्ञाने जी सुखमय स्वर्गाची प्राप्ती होते, तिच्यासाठीच यज्ञकर्ता पुरुष आवडीने यज्ञ करीत असतो. म्हणूनच खुद्द यज्ञ हे कर्म पुरुषार्थ या सदरात जमा केलेले आहे. ज्या वस्तूविषयी मनुष्याची प्रीती असून जी प्राप्त व्हावी, अशी त्याची इच्छा असते, तिला पुरुषार्थ म्हणतात (जै. सू. ४. १. १-२). त्यामुळे यज्ञार्थ म्हणजे स्वतंत्ररीत्या फल न देणारी अतएव अबधक कर्मे आणि पुरुषार्थ म्हणजे पुरुषाच्या लाभाची अतएव बंधक कर्मे असे सर्व कर्मांचे दोन वर्ग होतात. संहिता व ब्राह्मणे यांत यज्ञयागादिकांचेच वर्णन आहे. ऋग्वेदसंहितेत इंद्रादी देवांच्या स्तुतिपर सूक्ते आहेत खरी; पण त्यांचा विनियोग यज्ञप्रसंगीच कर्तव्य असल्यामुळे सर्व श्रुतिग्रंथ यज्ञादी कर्मप्रतिपादकच आहेत, असे मीमासक म्हणतात. यज्ञकर्माने स्वर्गप्राप्ती होते; मग ते यज्ञ कोणी अज्ञानाने करो अथवा ब्रह्मज्ञानपूर्वक करो, असेही मीमांसक कर्मवाद्यांचे म्हणणे आहे.

या यज्ञयागादी श्रौतकर्माशिवाय दुसरीही धार्मिक दृष्टचा आवश्यक कर्मे चातुर्वर्ण्य भेदाने मन्वादी स्मृतीतून वर्णिलेली आहेत. उदा० ब्राह्मणाला अध्ययन-अध्यापन, क्षत्रियाला युद्ध, वैश्याला वाणिज्य व शूद्राला सेवा इत्यादी. ही कर्मे पहिल्याने स्मृतिग्रंथांतूनच व्यवस्थेशीर प्रतिपादिली असल्यामुळे त्यांना स्मार्तकर्मे किंवा स्मार्तयज्ञ असेही म्हणतात. श्रौत-स्मार्त कर्माखेरीज काही धार्मिक कर्मे, व्रते, दाने, उपवास, इ. केवळ पुराणांतूनच विस्ताराने प्रतिपादिली असल्यामुळे त्याना पौराणिक कर्मे असे म्हणता येईल.

गीतेने मात्र कर्म शब्दाचा अर्थ केवळ श्रौत अथवा स्मार्त कर्मे एवढाच अतएव संकुचित न घेता त्याहून जास्त व्यापक घेतला आहे. मनुष्य जे जे काही करतो ते सर्व कर्मच होय (५.८-९); मग ती कर्मे कायिक, वाचिक अथवा मानसिक कोणत्याही प्रकारची असोत. किंबहुना देहाचे जिवत राहणे आणि मरणे ही सुद्धा कर्मेच असून प्रसंगानुसार जगणे आणि मरणे या दोन कर्मांपैकी कोणते कर्म पत्करावे, याचाही विचार करण्याची गरज गीतेच्या दृष्टीने उत्पन्न होते. हा विचार उत्पन्न झाला, म्हणजे कर्म या शब्दाचाच कर्तव्यकर्म किंवा विहितकर्म असाही अर्थ होतो (गी. ४ · १६). त्यापुढे गीता म्हणते, की कर्माची गती गहन आहे, म्हणून कर्म म्हणजे काय, हेही जाणले पाहिजे व विकर्म (विपरीत कर्म) आणि अकर्म (कर्म न करणे) हेही समजून घेतले पाहिजे (गी. ४ · १८).

केवळ मनुष्याच्या कर्माबद्दलचा हा विचार झाला. याच्याही पलिकडे जाऊन सर्व चराचर सृष्टीच्या व्यापारालाही गीतेने कर्म हाच शब्द योजिलेला आहे. गीतेत कर्म हे ब्रह्मोद्भव मानले असून यज्ञ हा कर्मातून उत्पन्न झाल्याचे सागितले आहे (३ · १४–१५). कर्म किंवा कर्मरूपी यज्ञ आणि सृष्टी म्हणजे प्रजा ही सर्व बरोबरच निर्माण झाली आहेत, असे गीतेचे मत आहे. याचा सारांश असा, की सृष्टी निर्माण होण्याच्या वेळी मूळ निर्गुण ब्रह्मात जो व्यापार दिसून आला, तेच कर्म होय. या मूळकर्मापासूनच सूर्य, चंद्र, इ. सृष्टीतील सर्व पदार्थांचे व्यापार पुढे परंपरेने निर्माण झाले आहेत.

जगातील सर्व व्यापारांचे मूलभूत असे विश्वोत्पत्तिकालीन कर्म केव्हा उत्पन्न झाले, त्याचा पत्ता लागत नाही. म्हणूनच वेदान्ती लोक कर्माला अनादी म्हणतात (वे. सू. २.१.३५). इथे अनादी शब्दाचा अर्थ ' ज्याचा आरंभ दुर्ज्ञेय आहे, ' असा

घेतला पाहिजे; तथापि हे चिद्रूप ब्रह्म कर्मात्मक म्हणजे दृश्यसृष्टिरूप केव्हा व का होऊ लागले, याचा जरी ठाव लागत नसला, तरी त्या कर्माचा पुढील व्यापार कसा चालतो, याचे मात्र नियम ठरलेले आहेत. पैकी मूळ प्रकृतीपासून म्हणजेच अनादिकर्मापासून सृष्टीतील नामरूपात्मक विविध पदार्थ पुढे कोणत्या क्रमाने निर्माण झाले, त्याचे सांख्यशास्त्रात वर्णन केले आहे.

भारतीय धर्मात व तत्त्वज्ञानात कर्म हे श्रद्धेचे प्रतीक म्हणून मानले आहे. ब्राह्मणे व उपनिषदे यात कर्माच्या तत्वज्ञानाचा विचार झालेला आहे.

ईशावास्योपनिषदात म्हटले आहे, की—

**कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः ।**

(ईश. २)

अर्थ— (मानवाने) या लोकी कर्म करीतच शंभर वर्षे जगण्याची इच्छा धरावी.

बृहदारण्यकात याज्ञवल्क्याने कर्माचे विवेचन पुढीलप्रमाणे केले आहे—

मानवाला काहीतरी इच्छा असते. त्या इच्छेनुसार तो निश्चय करतो. जसा त्याचा निश्चय, तशी त्याची क्रिया म्हणजे कर्म. जसे मानव कर्म करतो, तसे त्याला फळ मिळते. त्या कर्मफलाचा पूर्ण उपभोग घेतल्यावर मानव या कृतियुक्त जगात जन्माला येतो. पुण्यकर्मांनी तो पुण्यवान् होतो व पापकर्मांनी पापी बनतो (बृहदा. ३·२·१३).

गीता म्हणते, की कर्म हे मानवाला अपरिहार्य आहे—

**न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।**
**कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ।।**

(गी. ३·५)

अर्थ—कोणीही कर्म केल्यावाचून क्षणभरदेखील राहत नाही. प्रकृतीचे गुण हे प्रत्येक मनुष्याला (नेहमी काही ना काही तरी) कर्म करायला लावीत असतात.

कर्म हे स्वभावतःच बंधक असते. म्हणून कर्मे करण्यापूर्वी त्यांचा तो दोष नाहीसा होईल, असा काहीतरी उपाय करावा लागतो. कर्माच्या ठिकाणी असलेली आसक्ती सोडणे, हाच तो उपाय होय. याच स्थितीला नैष्कर्म्य असे म्हणतात. नैष्कर्म्यसिद्धी प्राप्त होण्यास कर्मे न सोडता ज्ञानाने आसक्तीचा क्षय करून ती करीत राहणे, हाच एक मार्ग असतो.

**कर्माचे प्रकार**—वैदिक कर्म सामान्यतः दोन प्रकारचे सांगितले आहे— (१) अर्थकर्म व (२) गुणकर्म. आत्मगत अपूर्व उत्पन्न करणारे ते अर्थकर्म होय. उदा० अग्निहोत्र, दर्शपूर्णमास, प्रयाज इत्यादी. जे कर्म संस्कार उत्पन्न करते, ते गुणकर्म होय. याचेही दोन विभाग पडतात—(१) उपयुक्त संस्कारक व (२) उपयोक्ष्यमाण संस्कारक पहिल्याला प्रतिपत्ति कर्म असेही म्हणतात. जे द्रव्य उपयोग केल्यानंतर त्याच ठिकाणी ठेवल्यास कार्य करणाऱ्याच्या संचारादिकांस प्रतिबंध करते, त्याचा विहित प्रदेशी त्याग करणे, याला प्रतिपत्ति कर्म म्हणतात. उदा०— दीक्षित यजमानाने आपले अंग काळविटाच्या शिंगाने खाजविल्यावर त्याचा चात्वालावर त्याग करणे.

अर्थकर्माचे तीन प्रकार आहेत— (१) नित्य (२) नैमित्तिक व (३) काम्य.

'यावज्जीवमग्निहोत्रं जुहोति' (यावज्जीव अग्निहोत्र होम करतो), 'सायं जुहोति' (सायंकाळी होम करतो,) प्रातर्जुहोति' (प्रातःकाळी होम करतो), इ. वाक्यांवरून अधिकारी पुरुषाने नियमाने होम केला पाहिजे, असे ज्ञान होते. अशा प्रकारे ज्ञात होणारी अग्निहोत्रादी कर्मे ही नित्य होत.

दर्श—पूर्णमासादी कर्मे अंतरल्यास पाथिकृतीष्टी करायला सांगितली आहे. योग्य कालाचा अतिपात होणे, हे निमित्त या ठिकाणी घडले असल्यामुळे अशा कर्मांना नैमित्तिक म्हणतात. निमित्ते न झाल्यास ती करावी लागत नाहीत.

नित्य व नैमित्तिक कर्मे न केल्यास दोष लागतो; पण ती केल्याने मात्र विशेष असे काहीच फल मिळत नाही, असे कित्येक म्हणतात. पण दुसरे कित्येक लोक दुरितनिवृत्ती हे त्याचे फल असल्याचे सांगतात.

फलाची इच्छा धरणाऱ्याकडून फलाची साधने म्हणून जी कर्मे केली जातात, त्यांना काम्य म्हणतात. काम्य कर्माचेही तीन प्रकार आहेत— (१) केवळ ऐहिक फल देणारे— उदा० कारीरीष्टी— पाऊस पडून शेतीभाती भरघोस पिकावी म्हणून ही इष्टी केली जाते, (२) केवळ पारलौकिक फल देणारे— स्वर्गाच्या इच्छेने केले जाणारे विविध याग व (३) ऐहिक व पारलौकिक फल देणारे— उदा० वायव्यं श्वेतमालभेत भूतिकामः = ज्याला ऐश्वर्याची इच्छा असेल, त्याने वायुदेवतेसाठी शुभ्र अजाचे आलभन (हनन) करावे, हा विधी. या विधीने इहलोकी व परलोकी ऐश्वर्य लाभते.

गुणकर्माचे उत्पत्ती, आप्ती, विकृती व संस्कृती असे चार प्रकार होतात—

(१) अग्नीचे आधान, (२) स्वाध्याय = अध्ययन, (३) व्रीहीचे अवहनन अर्थात भातावरील तूस काढून टाकणे; यात व्रीहीची विकृती होते व (४) व्रीहीचे प्रोक्षण. हे त्या द्रव्यावर संस्कार उत्पन्न करते. वरील उदाहरणातील पहिले व दुसरे ही दोन स्वतंत्र गुणकर्मे आहेत. ती यज्ञाची अंगे नव्हेत. पण पुढची दोन मात्र यज्ञांग गुणकर्मे होत.

याशिवाय वर्ण, आश्रम, देवता, गुण, व्यक्ती यांच्या अनुषंगानेही कर्माचे अनेक प्रकारे वर्गीकरण निरनिराळ्या धर्मग्रंथांत केलेले आहे.

**त्रिविध कर्म–** नित्य, काम्य व नित्यकाम्य. नित्य = संध्यावंदनादी. काम्य = यागादी. नित्यकाम्य = एकादशीव्रतादी (तर्कप्रकाश). मीमांसकमने दुसरा पर्याय – नित्य, नैमित्तिक व काम्य. नित्य = सध्यावंदनादी, नैमित्तिक = ग्रहणश्राद्धादी, काम्य = स्वर्गोद्देशाने अश्वमेधादी. तिसरा पर्याय– वैदिक, तांत्रिक आणि मिश्र. ज्यातील मंत्र व त्यांची अगे ही वेदोक्त असतात, ते वैदिक; ज्यातील मत्र व अंगे तंत्रोक्त असतात, ते तांत्रिक व वेदोक्त आणि तंत्रोक्त या दोहोंचाही ज्यात समावेश असतो, ते मिश्र होय (भाग. पु. ११.२७.७). याचाच आणखी एक पर्याय श्रौत, स्मार्त व पौराणिक असा आहे. यज्ञयागादी श्रुत्युक्त कर्म ते श्रौत, चातुर्वर्ण्यभेदाने स्मृतींनी सांगितलेले ते स्मार्त व पुराणात प्रतिपादिलेले ते पौराणिक होय.

**द्विविध कर्म–** (१) संचित व प्रारब्ध– ज्याचा विपाक सुरू झालेला नाही, असा कर्माशय (कर्माचा साठा) म्हणजे संचित होय. हे सचित ज्ञानाग्नीने जळून जाते. ज्याचा विपाक सुरू झाला आहे, असा कर्माशय म्हणजे प्रारब्ध होय. ते उपभोगानेच नष्ट होते (वाचस्पत्यम्). (२) दैव व पित्र्य– व्रत, दान, नक्त, एकभुक्त, अयाचित व उपवास असे दैवकर्माचे सहा भेद आहेत. दैव, पार्वण व एकोद्दिष्ट असे तीन भेद पित्र्यकर्माचे आहेत. (३) प्रवृत्त आणि निवृत्त–शरीरभोगाविषयी आसक्ती धरून केले जाणारे ते प्रवृत्त व संसारनिवृत्तीला साहाय्यभूत होणारे ते निवृत्त कर्म होय. (४) शुभ व अशुभ – तप, ब्रह्मचर्य, यज्ञ, प्रजा, श्राद्ध, विद्या आणि दान ही शुभकर्मे असून वध, चौर्य, पीडा, मद्यपान व अतितृष्णा ही पाच अशुभ कर्मे होत (ब्रह्माण्ड पु. २.२८.७५; ३.४.५–२४).

प्रत्येक कर्म सत्त्व, रज, तम या तीन गुणांनी त्रिविध होते, असे गीतेत सांगितले आहे (१८.२३–२५). या त्रिगुणात्मक कर्मांत निष्काम सात्त्विक कर्मालाच उत्तम कर्म म्हटले आहे.

बऱ्या किंवा वाईट कर्माचे बरे किंवा वाईट फळ मिळाल्यावाचून राहात नाही. यातून कोणाचीही सुटका नाही, हा कर्मसिद्धान्त आहे. यालाच भौतिक विज्ञानात कार्यकारण– सिद्धान्त असे म्हणतात. यावरून तीन गोष्टी सिद्ध होतात– (१) केलेले कर्म भोगण्यासाठी मनुष्याचे अस्तित्व आहे, (२) वाईट कर्माचे फळ चांगली कर्मे करून चुकविता येणार नाही, व (३) वाईट कर्मांचे फळ आपोआप मिळत असते. यावरूनच पुनर्जन्माचा सिद्धान्तही प्रस्थापित होतो.

छांदोग्योपनिषदात कर्माचा प्रभाव सांगताना म्हटले आहे, की ज्यांचे आचरण चांगले असते, त्याना चांगला जन्म मिळतो व ज्यांचे आचरण वाईट असते, त्याना वाईट योनीत जन्म घ्यावा लागतो (छांदो ५.१०.७–८). ब्रह्मसूत्रातही म्हटले आहे, की जीवाला त्याच्या पूर्वजन्मातील बऱ्यावाईट कर्माप्रमाणे परमात्मा पुढील जन्माची दिशा दाखवितो. **पाहा–** कर्ममार्ग; कर्मयोगशास्त्र; कर्मविपाक. [ गी. र.; हि. ध.; गी. त. मं.; भा. द. सं.; क. हे. इं.; पु. इं. ]

**कर्मकांड** मंत्र व ब्राह्मणे मिळून जो वेदभाग होतो, त्याला कर्मकांड असे म्हणतात. कर्मकांडात श्रौत यज्ञयागादी कर्मे व त्यांची विधाने यांचा समावेश आहे. **पाहा–** कर्ममार्ग.

**कर्मकार** शूद्र स्त्रीच्या ठिकाणी विश्वकर्म्यापासून झालेली संतती. ही एक संकर जात आहे. लोहाराला कर्मकार म्हणतात. [ हि. ध. ]

**कर्मचूरव्रत** एक जैनव्रत. हे व्रत दोन वर्षे व आठ महिने एवढ्या कालाने पुरे होते. कोणत्याही महिन्याच्या ८ मी पासून याचा प्रारंभ करतात. [ जै. व्र. वि. सं. ]

**कर्मनाशा** एक नदी. ही बंगालमधील कैमुर डोंगरात उगम पावते व बंगाल आणि उत्तरप्रदेश याच्या सीमेवरून वाहत जाऊन पुढे गंगेला मिळते. हिची लांबी १४६ मैल आहे. मेगास्थिनीजने उल्लेखिलेली कोमेरानीस नदी ती हीच असावी. या नदीच्या तीरावर करम वृक्षाची पूजा करणारे द्रविड आदिवासी राहतात. त्यावरून हिला प्रथम करमा हे नाव पडले असावे व पुढे त्याचे संस्कृतीकरण होऊन ते कर्मनाशा झाले असावे, असाही काही विद्वानांचा तर्क आहे.

हिचा उल्लेख महाभारतात नाही; पण हरिवंश व इतर पुराणे यांत आहे. पुराणात त्रिशंकूच्या कथेशी तिला जोडून दिले आहे. त्रिशंकू अधांतरी लोंबकळत असता त्याची जी लाळ गळाली, तिच्यापासून ही नदी उगम पावली, अशी कथा आहे. वसिष्ठ-विश्वामित्र यांच्या भांडणाशी हिचा संबंध जोडला गेला आहे, त्याअर्थी ती गोत्रांतर्गत विवाद्य प्रदेशांमधली किंवा दोन मानववंशांमधली सीमा असावी. कदाचित आर्यांच्या वसाहतीची ती पूर्वेकडील सीमाही असू शकेल.

ते काहीही असो; पण आजतागायत या नदीला दोषयुक्त मानले आहे एवढे खरे. हिचे पाणी स्वच्छ असते; पण कोणीही हिंदू हिच्यात स्नान करीत नाही. हिच्यावर पूल होण्यापूर्वी

हिच्या पाण्याचा स्पर्श होऊ नये म्हणून धार्मिक हिंदू हीन जातीतल्या लोकांच्या पाठीवर बसून पैलपार जात. नावेतून जायचे असले, तर अंगावर पाणी उडू नये म्हणून नावाड्यांना वल्ही सावकाश सावकाश मारायला सांगत. हे संकट टळावे म्हणून अहल्याबाई होळकर हिने तिच्यावर पूल बाधायचा प्रयत्न केला होता; पण तो फसला. पुढे काशी येथील प्रसिद्ध व्यापारी राजा पडणीमल याने ते पुलाचे काम पूर्ण केले. या पुलावरून आता धार्मिक हिंदूना कर्मनाशेच्या जलाला स्पर्श न करता अलिकडे पलिकडे जाता येते. [ म. ज्ञा. को.; फो. लो. नॉ. इं. ]

**कर्मनिर्जराव्रत** एक जैनव्रत. आषाढ शु. १४ शीस प्रारंभ. अन्य मते भाद्र० शु. ११ शीस प्रारंभ करून पुढे चार दिवस. या व्रतात 'ॐ ह्री सम्यक् तपसे नमः' या मंत्राचा त्रिकाल जप, सिद्धभगवानाची पूजा व उद्यापन हे विधी येतात. व्रताची कथा अशी–

धनश्री नावाची एक श्रेष्ठिकन्या होती. तिने हे व्रत करून स्वर्गसुख प्राप्त करून घेतले. [ व्र. ति. नि.; जै. व्र. वि. सं. ]

**कर्मभूमी** पथ्वी ही मानवाची कर्मभूमी आहे. इथे तो विविध कर्मे करतो व अन्यत्र स्वर्गादी लोकी त्यांची फळे उपभोगतो (ब्रह्मांड पु. ४.९.१०). मात्र पुराणकर्त्यानी पृथ्वी म्हणजे भारतवर्ष एवढीच कल्पना मनाशी धरलेली आहे. पुराणात इतर वर्षांची भारतवर्षाशी तुलना करून भारतेतर वर्षे ही भोगभूमी आहेत, असे सांगितले आहे ( विष्णू पु. २.३.२२ ). स्वर्गात किंवा नरकात कर्म नसते. तिथे फक्त भूलोकी केलेल्या पुण्य-पापांचा भोग असतो. पुण्यक्षय होताच मानवजीव परत भूलोकी येतो, तसेच यातना भोगून पापक्षय झाला म्हणजे त्याही जीवाला परत मर्त्यभूमीत यावे लागते आणि मग पुनश्च त्याची कर्मरहाटी सुरू होते. सर्व पुराणांनी हाच सिद्धान्त सांगितला आहे. **पाहा–** कर्मविपाक.

**कर्ममार्ग** मंत्र व ब्राह्मणे मिळून वेदाचा जो भाग बनतो, त्याला कर्मकांड म्हणतात. उपनिषदांना ज्ञानकांड म्हणतात. भारतीय तत्त्वज्ञानात मोक्षाचे तीन मार्ग सागितले आहेत, ते म्हणजे कर्म, ज्ञान आणि भक्ती हे होत. या तीहींचा उदय याच क्रमाने झाला आहे. काही आचार्यांनी या तीन्ही मार्गात एक प्रकारची संगती दाखविली असून ते परस्पर विसंगत नाहीत, असेही प्रतिपादिले आहे. काही आचार्य त्यांची तुलना करून त्यांत श्रेष्ठ-कनिष्ठ भावही दर्शवितात व त्यांत परस्पर विरोध असल्याचेही सांगतात. लो. टिळक यांनी मात्र कर्म हे निरासक्त चित्ताने आणि फलाशारहित असे केल्यास ते स्वतंत्रपणे मोक्षदायक होत असल्याचे सागितले आहे. शंकराचार्य हे ज्ञानमार्गाला श्रेष्ठत्व देऊन 'ज्ञानादेव तु कैवल्यम्' = ज्ञानानेच मोक्ष मिळतो, या वचनावर भर देतात. त्यांनी कर्ममार्गाला मान्यता दिली आहे; पण ती केवळ चित्तशुद्धीपुरतीच. विवेकचूडामणीत ते स्पष्टच सागतात–

**चित्तस्य शुद्धये कर्म न तु वस्तूपलब्धये**

अर्थ— कर्म हे चित्ताच्या शुद्धीसाठी असून ते आत्मज्ञानासाठी उपयुक्त नाही.

द्वैतवादी मध्वाचार्य हे कर्म आणि ज्ञान यांच्यापेक्षा भक्तीलाच महत्व देतात. त्रिपादविभूतिमहानारायणोपनिषदात 'भक्तियोगान्मुक्तिः' = भक्तियोगाने मुक्ती मिळते असे सांगून पुढे म्हटले आहे––

**भक्त्या विना ब्रह्मज्ञानं कदापि न जायते ।** (८.४)

अर्थ – भक्तीवाचून ब्रह्मज्ञान कधीही होत नाही.

पण भक्तिमार्गाचा उदय बराच उत्तरकालीन असल्यामुळे शास्त्रकारांचा वाद कर्म व ज्ञान या दोन मार्गासंबंधीच प्रामुख्याने आहे.

ऋग्वेदकाली कर्म हे यज्ञयागात्मक होते. यज्ञाने देवतांना संतुष्ट करणे, हाच त्या वेळचा धर्म होता.

ब्राह्मणकालात ही यज्ञसंस्था अंगोपांगांनी विकसित आणि तितकीच जटिलही झाली. 'यज्ञो वै श्रेष्ठतमं कर्म' = यज्ञ हेच श्रेष्ठतम कर्म होय, अशी समजूत ब्राह्मणकालात दृढ झाली (श. ब्रा. १. ७. १. ५.). आयुष्यातील प्रत्येक गोष्ट यज्ञकर्माला अनुसरूनच केली पाहिजे व कर्मावाचून कोणतीही वस्तू प्राप्त होणार नाही, असे मानले जाऊ लागले. कर्मामुळेच मोक्ष किंवा स्वर्ग प्राप्त होतो व कर्मामुळेच देवानाही सांप्रतचे स्थान प्राप्त झाले, असे वैदिक लोक मानू लागले (श. ब्रा. ३. १. ४. ३).

ऋग्वेदकालातच यज्ञाशिवाय इतर गोष्टींकडे लक्ष देणारा वैदिकांव्यतिरिक्त एक निराळा वर्ग होता. हा वर्ग सूतांचा होय. ब्राह्मणकालात या सूतसंस्कृतीची आणि तिच्यातल्या विचारांची वाढ झाली. सूतसंस्कृतीचा अभिमानी वर्ग आणि यज्ञालाच केवळ मोक्षदायक कर्म न मानणारा किंवा यज्ञसंस्थेतल्या कर्मकांडाविषयी साशंक झालेला असा वैदिकांचा एक वर्ग, यांच्यामध्ये विचारांची देवघेव होऊन औपनिषदिक तत्त्वज्ञानाची वाढ सुरू झाली. त्यामुळे ज्ञानमार्गाला प्राधान्य व कर्ममार्गाला गौणत्व देण्याकडे विचारी लोकांची प्रवृत्ती होऊ लागली. कर्माचे चांगले अथवा वाईट फल भोगण्यास

पुनर्जन्म घ्यावा लागतो, तेव्हा असे हे कर्म करण्यापेक्षा ज्ञानप्राप्ती करून घेणे, हेच श्रेयस्कर होय, असे उपनिषदातले आचार्य प्रतिपादन करू लागले.

काही वेळा ज्ञान आणि कर्म यांची सांगड घालून त्या उभय मार्गात तडजोडही केल्याचे दिसून येते. वेदान्ती लोकानी ज्ञान हे साध्य असून कर्म हे त्याचे साधन आहे, असा विचार माडला. ज्ञानप्राप्ती एकदम होणे शक्य नाही. त्यासाठी प्रथम वर्णाश्रमविहित कर्मे आवश्यक असून त्या कर्माच्याच योगाने मनुष्याची मोक्षमार्गाकडे जाण्याची तयारी होते, असे त्याचे मत होते. पण तेवढचाने प्रश्न सुटला नाही. कारण–

कर्म हे ज्ञानाला साधन म्हणावे, तर ज्ञानप्राप्तीसाठी कोणती विशिष्ट कर्मे करावी, हे कशावरून कळायचे ? हा नवा प्रश्न निर्माण झाला. 'वेदविहित कर्मे करावी,' असे त्याचे उत्तरही देण्यात आले. तथापि तेवढचानेही सर्व गोष्टीचा उलगडा होईना. वेदविहित कर्मे म्हणजे मुख्यतः यज्ञ होय. पण काही ठिकाणी यज्ञातील विशिष्ट क्रियेसंबंधी वेदात आढळणारे मंत्र व ब्राह्मणात सागितलेली क्रिया यांत विसगती दिसू लागली. अशा वेळी कोणत्या विधानाला प्रामुख्य द्यावे व जिथे संशय येईल तिथे काय करावे, त्याचा निर्णय देण्यासाठी मग जैमिनीची पूर्वमीमांसा प्रवृत्त झाली.

त्यानंतरचा काल हा धर्मसूत्राचा काल होय. त्यात कर्म व ज्ञान या उभय मार्गाची संगती लावून मनुष्याने व्यवहारात कसे आचरण ठेवावे, हे सांगितले आहे. धर्मसूत्रांत फक्त त्रैवर्णिकांचाच विचार केला आहे. त्रैवर्णिकांसाठी ब्रह्मचर्य आणि त्यात करायचा स्वाध्याय, गृहस्थाश्रम आणि त्यात करायची यज्ञकर्मे, वानप्रस्थाश्रम व त्यात करायची ज्ञानसाधना आणि अखेरीस संन्यास अशी आश्रमधर्माची व त्या त्या आश्रमातील कर्माची व्यवस्था सांगितली आहे.

आतापर्यंत कर्म म्हणजे यज्ञयागादी कृत्ये असाच अर्थ रूढ होता. ही कर्मे कर्त्याला त्यापासून काहीतरी फल मिळावे, या इच्छेनेच करायची असत. पण भगवद्गीतेत याहून निराळा विचार आढळतो. मोक्षप्राप्ती केवळ ज्ञानानेच होते, असे नसून भक्तीने किंवा कर्मानेही ती होते. मात्र कर्माने मोक्ष मिळवायचा असल्यास ते कर्म निष्काम झाले पाहिजे, असे गीतेत सांगितले आहे.

**कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः ।**

(गीता ३·२०)

अर्थ – जनकादिक पुरुष कर्म करूनच सिद्धी ( मोक्ष ) मिळविते झाले.

'कर्मणा बध्यते जन्तुः' = कर्माने प्राणिमात्र बांधला जातो, हा सिद्धान्त आहे, ही गोष्ट खरी; पण त्याचा खरा अर्थ विचारात घेतला पाहिजे. जड किंवा अचेतन कर्म कोणाला बांधीत नाही आणि सोडतही नाही. मनुष्य आसक्तीने किंवा फलाशेने कर्म करतो, म्हणून तो स्वत:च बद्ध होतो. ही आसक्ती एकदा सुटली म्हणजे त्याने नुसत्या बाह्येंद्रियानी कर्मे केली तरीही तो मुक्तच असतो, असे निष्पन्न होते. तात्पर्य, ज्ञानाचा व काम्य कर्माचा जरी विरोध असला, तरी निष्काम कर्म आणि ज्ञान यांमध्ये कोणताच विरोध येऊ शकत नाही, असे लो. टिळक म्हणतात. याला उदाहरण म्हणून त्यांनी महाभारतातला पुढील श्लोक उद्धृत केला आहे–

**कुर्वते ये तु कर्माणि श्रद्दधाना विपश्चितः ।**
**अनाशीर्योगसंयुक्तास्ते धीराः साधुदर्शिनः ।।**

अर्थ– जे श्रद्धायुक्त विद्वान् योगयुक्त होऊन फलासक्तिविरहित कर्मे करतात, ते धीर व साधुदर्शी (सम्यग्दृष्टीचे) होत.

या जगात कर्म कोणासही सुटले नाही व सुटणे शक्य नाही. तेव्हा कर्माची बाधा न होण्यासाठी प्राप्तकर्तव्य फलाशा सोडून आचरीत राहणे, एवढाच एक मार्ग माणसाच्या ताब्यातला असून तोच उत्तम आहे. प्रकृती आपले व्यवहार सतत करीतच राहणार; पण माणसाने त्यातील कर्तृत्वाच्या अभिमानाची बुद्धी सोडली, म्हणजे तो मुक्तच आहे. **पाहा**– कर्मयोगशास्त्र. [म. ज्ञा. को.; गी. र.]

## कर्मयोगशास्त्र

लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांनी त्याच्या मंडाले येथील तुरुंगवासात (इ. स. १९०८ ते १९१४) लिहिलेला भगवद्गीतेवरील ग्रंथ १९१५ मध्ये प्रसिद्ध केला ( पृष्ठे ८६४ ). या ग्रंथाला नावच त्यानी 'श्रीमद्भगवद्गीतारहस्य अथवा कर्मयोगशास्त्र' असे दिले असून त्या ग्रंथामधील पानावर 'गीतारहस्य अथवा कर्मयोग' असे संक्षिप्त रूप छापलेले आहे. इंग्रजीमध्ये या ग्रंथाला त्यानी 'दी हिंदू फिलॉसफी ऑफ् लाइफ, एथिक्स अॅण्ड रिलिजन्' असे नाव दिलेले आहे. त्यावरून कर्मयोगशास्त्र हेच हिंदूच्या जीवितविषयक, नीतिविषयक, आणि धर्मविषयक तत्त्वज्ञानाचे सार आहे, असा त्यांचा अभिप्राय स्पष्ट दिसतो. या ग्रंथातील तिसरे प्रकरण कर्मयोगशास्त्र असे आहे. त्यामध्ये त्यानी आपले मुख्य मत थोडक्यात मांडले आहे. अकरावे व बारावे ही दोन प्रकरणे अनुक्रमे 'संन्यास व कर्मयोग' आणि 'सिद्धावस्था व व्यवहार' या नावाची आहेत. त्यात त्याच मताचा साधकबाधक आणि ऐतिहासिक प्रमाणांसह विस्तृत उहापोह केलेला आहे.

गीतेमध्ये दोन निष्ठांचा उल्लेख संन्यास आणि कर्मयोग

(५·२) व सांख्य आणि योग (४·५) अशा शब्दांनी केलेला आहे. तिसऱ्या अध्यायाच्या तिसऱ्या श्लोकात या निष्ठांना ज्ञानयोग आणि कर्मयोग अशी नावे दिली आहेत. या दोन निष्ठा लोकामध्ये पूर्वीपासून प्रचलित आहेत. त्या दोन्हीही निष्ठा वैदिक धर्मानुसार मनुष्याचे अंतिम साध्य मोक्ष किंवा निःश्रेयस् प्राप्त करून देणाऱ्या असल्या, तरी त्यामध्ये कर्मयोग हा ' विशेष ' म्हणजे अधिक चांगला, असा अभिप्राय गीतेच्या पाचव्या अध्यायातील दुसऱ्या श्लोकात व्यक्त केलेला आहे. वैदिक परंपरेने चालत आलेल्या जीवनाच्या या दोन निष्ठांपैकी किंवा मार्गापैकी कर्मयोग हा अधिक ग्राह्य आणि स्वीकार्य म्हणून मुख्यतः त्याचेच प्रतिपादन गीतेने केले आहे, असा गीतारहस्य या ग्रथाचा अभिप्राय आहे.

कर्मयोग म्हणजे कर्माचा, कर्माच्या ठायी, कर्मासबंधाने किंवा कर्मविषयक योग, असा अर्थ होतो. योग या शब्दाचा अर्थ उपाय किंवा साधन असा आहे. लो. टिळक लिहितात—

" योग शब्दाने कोणत्या विशिष्ट प्रकारचे कौशल्य, साधन, युक्ती अगर उपाय गीतेत मुख्यत्वेकरून विवक्षित आहे, हे सांगण्यासाठी 'योगः कर्मसु कौशलम्' (गी. २·५०) = योग म्हणजे कर्मे करण्याची काही विशेष प्रकारची कुशलता, युक्ती, चतुराई अगर शैली, अशी या शब्दाची व्याख्या गीतेतच मुद्दाम केलेली आहे आणि यावरील शांकरभाष्यातही ' कर्मसु कौशलम् ' या पदांचा ' कर्माचे ठायी स्वभावतः असणारे जे बधकत्व ते नाहीसे करण्याची युक्ती, असाच अर्थ केलेला आहे " (गी. र. पृ. ५४).

योग शब्दाचे गीतेत जे इतर उल्लेख आलेले आहेत, त्यांचाही लो. टिळकानी पुढे ऊहापोह केला आहे, तो असा—

" योग हा शब्द प्रथमतः गीतेच्या दुसऱ्या अध्यायात आला असून तेथेच त्याचा अर्थ काय तेही स्पष्ट सांगितले आहे. युद्ध का केले पाहिजे, याची सांख्यमार्गाप्रमाणे उपपत्ती सांगितल्यावर आता तुला योगाप्रमाणे उपपत्ती सांगतो (गी. २·३९) असा भगवंतांनी आरंभ केला असून प्रथम यज्ञयागादी काम्य कर्मातच नित्य गुग झालेल्या लोकांची बुद्धी फलाशेमुळे कशी व्यग्र झालेली असते, याचे वर्णन केलेले आहे (गी. २·४१-४६). नंतर याप्रमाणे बुद्धी व्यग्र होऊ न देता आसक्ती सोड, पण कर्मे सोडून देण्याच्या आग्रहात पडू नकोस असे सांगून ' योगस्थ होऊन कर्मे कर, ' (गी. २.४८) असा उपदेश केला आहे व तेथेच योग म्हणजे सिद्धी अगर असिद्धी यांचे ठायी समतोलबुद्धी असा योग शब्दाचा अर्थ प्रथम स्पष्ट दिला आहे. नंतर फलाशेने कर्मे करण्यापेक्षा समत्वबुद्धीचा हा योगच श्रेष्ठ होय (गी. २·४९), तसेच बुद्धी सम असली म्हणजे कर्माच्या पाप-पुण्याची बाधा कर्त्यास लागत नाही म्हणून हा योग सपादन कर, असे सांगिल्यावर लागलीच ' योगः कर्मसु कौशलम् ' (गी. २·५०) हे योगाचे लक्षण पुनः दिलेले आहे. ... ... वैदिक धर्माप्रमाणे दोन मार्ग आहेत. पैकी ज्ञान प्राप्त झाल्यावर सर्व कर्माचा स्वरूपतः संन्यास म्हणजे त्याग करणे, हा एक मार्ग असून ज्ञानप्राप्ती झाली, तरी कर्मे न सोडता त्यांच्या पाप-पुण्याची बाधा न लागेल, अशा युक्तीने तीच आमरणान्त करीत राहणे हा दुसरा मार्ग आहे. या दोन मार्गास उद्देशूनच गीतेत संन्यास आणि कर्मयोग अशी पूर्ण नावे योजिली आहेत (गी. ५·२) संन्यास म्हणजे सोड आणि योग म्हणजे जोड अर्थात् कर्माच्या सोड-जोडीचे हे दोन भिन्न मार्ग होतात. सांख्य आणि योग (सांख्ययोगौ) अशा दुसऱ्या संक्षिप्त सञ्ज्ञाही पुढे (गी. ५.४) या दोन मार्गासच अनुलक्षून योजल्या आहेत (गी.र. पृ. ५४-५५). "

कर्मयोग आणि संन्यास या मार्गामध्ये मुख्यतः भेद येतो, तो ज्ञानप्राप्तीनतरच्या आयुष्यक्रमणाच्या पद्धतीत. म्हणून कर्मयोगाच्या चर्चेमध्ये ज्ञानोत्तर किंवा सिद्धावस्थेनंतर कर्म किंवा जगाचा व्यवहार चालवीत राहणेच श्रेयस्कर या मुद्द्यावर अधिक भर द्यावा लागतो. पण याचा अर्थ कर्मयोगमार्ग ज्ञानोत्तरच सुरू होतो असा नव्हे आणि ज्ञानोत्तर कर्म करणारा तोच तेवढा कर्मयोगी असेही नव्हे. ज्ञान प्राप्त होण्यापूर्वी निष्काम कर्मे ही चित्तशुद्धीला उपयुक्त आहेत. चित्तशुद्धीसाठी निष्काम कर्म करणाऱ्या लोकांचाही कर्मयोगमार्गातच अंतर्भाव होतो. मात्र याबद्दल कर्मयोग आणि संन्यास यांच्यामध्ये विशेष वाद नसल्यामुळे मुख्यतः ज्ञानोत्तर कर्मयोगाच्या आवश्यकतेसंबंधीचे विवेचनच कर्मयोगाच्या प्रतिपादनात पुष्कळ होते. मुमुक्षूचे चित्त शुद्ध करणे, एवढेच काय ते कर्मयोगाचे किंवा कर्ममार्गाचे फल, असे संन्यासमार्गी मानतात. चित्त शुद्ध झाल्यानतर कर्माचा उपयोग संपला, म्हणून कर्मयोग हे केवळ ज्ञानयोगाचे साधन आहे, असे ते मानीत असल्यामुळे त्यांच्या दृष्टीने कर्मयोगाला स्वतंत्र महत्त्व नाही. कर्म हाच योग असा कर्मयोग या समासाचा विग्रह करून ते त्याचा अर्थ कर्मानुष्ठान असा करतात (गी. ३. ३ वरील आचार्यभाष्य). हा कर्मयोग अज्ञानी लोकांसाठी ज्ञानप्राप्तीचा उपाय म्हणून सांगितला आहे, तसेच अज्ञानी लोकांच्या ठिकाणीच कर्मयोग संभवतो; कर्मयोग ज्ञानी लोकांच्या ठिकाणी सभवत नाही (अज्ञानामेव कर्मयोगः न तु ज्ञानिनाम्— शांकरभाष्य), असे संन्यासमार्गी स्पष्ट सांगतात. चित्तशुद्धीनंतरदेखील ज्ञान-निष्ठायोग्यता आणि सर्वकर्मसंन्यास अशा आणखी दोन पायऱ्या संन्यासमार्गीयांनी मानल्या आहेत. त्यांच्या दृष्टीने कर्मयोगाचा अर्थ 'निःसंगतया द्वन्द्वनिर्हाणपूर्वकं ईश्वराराधनार्थे कर्मयोगे कर्मानुष्ठाने' असा आहे (गी. २.३९ वरील आचार्यभाष्य).

जीवन्मुक्त अवस्थेत देखील लोकसंग्रहार्थ कर्म करीत राहणे अधिक श्रेयस्कर आहे, असा गीतेचा सिद्धांत असल्याचे टिळक लिहितात—

"जीवन्मुक्त अवस्था ही पूर्ण ब्रह्मभूत किंवा परमावधीची ब्राह्मी स्थिती होय आणि श्रीमच्छंकराचार्यांनी आपल्या शारीरकभाष्यात ( वे. सू. ४. ३. १४ ) हीच अध्यात्मज्ञानाची अत्यंत पराकाष्ठा किंवा पूर्णावस्था आहे, असे प्रतिपादन केले आहे. किंबहुना ही स्थिती प्राप्त होण्यास मनुष्य एक प्रकारे परमेश्वरच झाला पाहिजे, असे म्हणण्यास हरकत नाही; आणि अशा रीतीने ब्रह्मभूत झालेले पुरुष कर्मसृष्टीतील सर्व विधि-निषेधांच्या पलिकडच्या स्थितीस पोहोचलेले असतात, हेही मग सागावयास नको. कारण यांचे ब्रह्मज्ञान सदैव जागृत असल्यामुळे हे जे काही करतात ते नेहमीच शुद्ध निष्काम बुद्धीने पूर्ण अतएव पापपुण्यापासून अलिप्त अतएव शुद्ध असते. ही स्थिती प्राप्त झाल्यावर ब्रह्मप्राप्तीसाठी दुसरे कोठे जाण्याची किंवा मरण्याची म्हणजे देहपात होण्याचीही जरूर राहत नसल्यामुळे अशा स्थितप्रज्ञ ब्रह्मनिष्ठ पुरुषास 'जीवन्मुक्त' असे म्हणतात....... पराकाष्ठेच्या निष्कामत्वाची ही अवस्था आणि सांसारिक कर्मे यांचा निसर्गतःच परस्पर विरोध असल्यामुळे ही अवस्था ज्यास प्राप्त झाली, त्याची कर्मे आपोआपच सुटून तो संन्यासी बनतो, असे बऱ्याच लोकांचे म्हणणे आहे. पण गीतेस हे मत मान्य नसून खुद्द परमेश्वर ज्याप्रमाणे कर्मे करतो, त्याप्रमाणे जीवन्मुक्तानेही निष्काम बुद्धीने लोकसंग्रहार्थ आमरणान्त सर्व व्यवहार करणे अधिक श्रेयस्कर होय. निष्कामत्वाचा व कर्माचा विरोध नाही असा गीतेचा सिद्धान्त आहे." (गी. र. पृ. २८५)

चित्तशुद्धी आणि ज्ञानप्राप्ती झाल्यानंतरही कर्म उरते, असे संन्यासमार्गीही मानतात. पण त्याला तत्त्वतः अकर्म असे ते म्हणतात. या ज्ञानोत्तर कर्माचा संभव पुढील रीतीने श्री शंकराचार्यांनी मांडला आहे–(१) प्रारब्धकर्म सोडता येत नाही म्हणून, (२) लोकसंग्रहार्थ, (३) शिष्टनिंदा टाळण्यासाठी व (४) कोणत्याही कारणाने कर्म टाकणे अशक्य असते म्हणून. या चार कारणांमुळे कर्म करणारे ज्ञानी दिसले, तरी त्या मार्गाचा शंकराचार्य कर्मयोगात अंतर्भाव करीत नाहीत. कारण कर्मयोग हा अज्ञान्यांपुरताच आहे, असे त्यांचे मत आहे. ज्ञानोत्तर केवळ शरीरधारणेपुरते भिक्षाटनादिकर्म तेवढेच करणारे ज्ञानी आणि लोकसंग्रहाच्या हेतूने कर्म करणारे ज्ञानी असा भेद आचार्यांनी मानला आहे. पण त्याला ते प्रवृत्त आणि निवृत्त अशी नावे देतात.

ज्ञानपूर्व चित्तशुद्धीसाठी कर्मानुष्ठान आचार्यांनी अपरिहार्य मानलेले नाही. तो एक पर्याय मानलेला आहे आणि त्याला कनिष्ठ स्थान दिलेले आहे. कारण 'ज्ञानयोगेन साङ्ख्यानाम्' ( गी. २. ३९ ) या श्लोकावरील भाष्यात सांख्यमार्गी लोकांना त्यांनी पुढील विशेषणे दिली आहेत—

"आत्मानात्मविवेकवैराग्यवता ब्रह्मचर्याश्रमादेव कृतसंन्यासानां ब्रह्मणि एव अवस्थितानां परमहंसपरिव्राजकाना निष्ठा अनुष्ठेयतात्पर्यमित्यर्थः"; त्याचप्रमाणे चौथ्या अध्यायांतील २१ आणि २४ हे श्लोक संन्यासमार्गाचे म्हणजे ज्ञाननिष्ठ यतीचे वर्णन करणारे आहेत, असे आचार्यांनी मानले आहे. २० आणि २३ या श्लोकात वर्णन केलेला ज्ञानी हा ज्ञाननिष्ठ यती आचार्यांनी मानलेला नाही. ज्ञाननिष्ठ यती हा 'आदितः एव कर्मणि अप्रवृत्तः' = मुळापासूनच कर्माच्या ठिकाणी प्रवृत्त न झालेला असा असतो, असे या ठिकाणी वर्णन केले आहे. यावरून कर्मयोग हा अनेक वैकल्पिक उपायापैकी एक उपाय आचार्यांनी मानला असून त्याचा संबंध फक्त ज्ञानपूर्व काळातच येतो, असे त्यांनी म्हटले आहे.

कर्मयोगाच्या विवेचनात लोकसंग्रह या शब्दाला विशेष महत्त्व आहे. त्याच्या विरुद्ध संकर असा शब्द गीतेतच आला आहे. मी जर कर्मे केली नाहीत, तर इतर लोकही आपापली कर्मे करणार नाहीत आणि संकर निर्माण होईल, असे भय स्वतः श्रीकृष्णानी पुढील श्लोकात व्यक्त केले आहे –

**उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् ।**
**सङ्करस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ।।**

(गी. ३·२४)

संकर याचा अर्थ लोकांनी आपापली कर्मे सोडून दिल्यामुळे समाजात उत्पन्न होणारी अव्यवस्था होय. त्यामुळे लोक उत्सन्न होतील आणि त्यांचा नाश होईल. अर्थात् लोकसंग्रह करावयाची इच्छा करणाऱ्या माणसाने लोकांना सन्मार्गाला लावणारे काम करावे. या श्लोकावरील विवरणांत टिळक म्हणतात की 'जगाला सन्मार्गाला लावून त्याचा नाश होऊ न देता संग्रह म्हणजे चागल्या रीतीने धारण, पोषण, पालन किंवा बचाव करणे, या सर्व गोष्टींचा लोकसंग्रह शब्दात समावेश होतो. गी. र. पृ. ३१३ ते ३२० पर्यंत या लोकसंग्रहाचे विवेचन टिळकांनी केले आहे. मनुस्मृतीमध्ये राष्ट्राचा संग्रह हे शब्द याच अर्थाने आले आहेत (मनु ७·११४); तसेच महाभारतातही शांतिपर्वामध्ये एका श्लोकात लोकसंग्रह हा शब्द आलेला आहे –

**लोकसङ्ग्रहसंयुक्तं विधात्रा विहितं पुरा ।**
**सूक्ष्मधर्मार्थनियतं सतां चरितमुत्तमम् ।।**

(२५८·२५)

हा श्लोक देऊन टिळक लिहितात. 'लोकसंग्रहकारक व सूक्ष्म

प्रसंगी कोणता धर्म पत्करावा, हे सांगणारे साधुपुरुषांचे उत्तम चरित्र खुद्द ब्रह्मदेवानेच निर्माण केले आहे, असे भीष्मांनी युधिष्ठिरास सांगितले आहे. '

शंकराचार्यांनी गीताभाष्यामध्ये 'लोकस्य उन्मार्गप्रवृत्ति-निवारणम्' असा लोकसंग्रह शब्दाचा अर्थ दिलेला आहे. मधुसूदन सरस्वतींनी त्यापुढे 'स्वधर्मे स्थापनं च' अशी त्याला पुस्ती जोडली आहे. तिच्या योगाने लोकसंग्रहाचा दुहेरी अर्थ पूर्णपणे लक्षात येतो. आचार्यांच्या व्याख्येतही तो अभिप्रेत आहे. लोकांना स्वधर्म म्हणजे आपापली सामाजिक कर्तव्ये पाळण्यास प्रवृत्त करणे आणि त्या कर्तव्यापासून ते च्युत होत असतील, तर त्यांना आवरणे, अशी दोन्ही कामे लोकसंग्रहात अंतर्भूत होतात.

कर्मयोगाचे विवेचन आणि प्रतिपादन दोन तीन प्रकारांनी होऊ शकते—(१) शब्दप्रामाण्यानुसार म्हणजे गीतेत आणि इतर वेदान्तग्रंथांत कर्मयोग कसा सांगितला आहे याचे विवेचन व (२) शब्दप्रामाण्य बाजूला ठेवून स्वतंत्र विचारानेही कर्मयोगाचा मार्ग कसा युक्त आहे ते दाखविणे. या दोन्ही प्रकारचे विवेचन गीतारहस्यात आहे. तिसरा प्रकार पाश्चात्य तत्त्वज्ञानी आणि बौद्धख्रिस्तादी इतर धर्म यांच्यांतही कर्मयोगाला कसा आधार मिळतो ते दाखविणे हा होय. त्याचेही विवेचन गीतारहस्यात आहे. गीतेशिवाय इतर वेदान्तविषयक ग्रंथांतील कर्मयोगाला अनुकूल असे सर्व उल्लेख संन्यास आणि कर्मयोग या प्रकरणात टिळकांनी उद्धृत केले आहेत. कर्मयोगाच्या विवेचनाचा आणखी एक प्रकार म्हणजे कर्मयोग आणि संन्यास यांचा समन्वय किंवा अंतरंगांतील एकरूपता दाखविणे. गीतेच्या आधारे गीतारहस्यात हा समन्वय कोणत्या प्रकारे आणि कोणत्या मर्यादेपर्यंत होऊ शकतो, हे स्पष्ट केले आहे.

कर्म या शब्दाची व्याख्या गीतेमध्ये श्वासोच्छ्वासापासून सर्व प्रकारच्या हालचाली अशी केली आहे. कोणीही मनुष्य कर्माशिवाय क्षणभरदेखील जिवंत राहू शकत नाही आणि कर्माशिवाय शरीरयात्रासुद्धा चालणार नाही, अशी विधाने गीतेमध्ये केली आहेत. यावरून कर्माचा हाच व्यापक अर्थ गीतेमध्ये घेतला आहे, हे स्पष्ट होते. सृष्टीच्या नियमानुसार आणि मनुष्याच्या शरीरातील इंद्रियांच्या व्यवस्थेनुसार कर्मे होत राहतात. ती थांबवता येत नाहीत. आत्मोन्नतीच्या दृष्टीने या कर्मांचा संग, आसक्ती, फलाशा आणि स्वार्थी मनोरथ सोडणे एवढ्याच गोष्टी करणे शक्य असते.

यासाठी प्रथम इंद्रियांचा निग्रह करणे अवश्य आहे. विषयलालसा किंवा काम हाच मनुष्याला पापाचरणास प्रवृत्त करतो. या विषयलालसेला जिंकायचे असेल, तर प्रथम इंद्रियांवर ताबा ठेवला पाहिजे. ज्याची सर्व इंद्रिये ताब्यात आहेत, तो मनुष्य स्थिर बुद्धीचा होतो. या स्थितप्रज्ञ अवस्थेचे वर्णन गीतेच्या दुसऱ्या अध्यायात केले आहे आणि याच ब्राह्मी स्थितीमुळे ब्रह्मनिर्वाण, मुक्ती किंवा मोक्ष प्राप्त होतो, असे त्याचे फल सांगितले आहे.

तिसऱ्या अध्यायात कर्माची आवश्यकता का आहे, हा कर्मयोगाचा मुख्य विषय प्रतिपादिलेला आहे. त्या अध्यायाला कर्मयोग असेच नाव आहे. दुसऱ्या अध्यायाच्या अखेरीस सांगितलेली ब्राह्मी स्थिती प्राप्त करून घेणे, हे सांख्य आणि योग या दोन्ही निष्ठांना सारखेच मान्य आहे. पण कर्मयोगनिष्ठा ही कर्मे सोडू नयेत, असे सांगणारी आहे. त्याची कारणे तिसऱ्या अध्यायात पुढीलप्रमाणे दिली आहेत— कर्माशिवाय कोणी राहू शकत नाही. प्रकृतीच्या गुणांना सर्वच वश आहेत. देहयात्रासुद्धा कर्मावाचून चालायची नाही. अकर्मापेक्षा कर्म चांगले, असे ८व्या श्लोकात सांगितले आहे. त्यानंतर ९ ते १६ पर्यंतच्या श्लोकांत प्राचीन काळापासून चाललेल्या यज्ञचक्राचे वर्णन आलेले असून सृष्टीच्या उत्पत्तीबरोबरच यज्ञ निर्माण झालेला आहे आणि सृष्टीच्या पुढील स्थितीसाठी हे यज्ञचक्र चालायचे आहे, तेव्हा यज्ञार्थ कर्म सोडता उपयोगी नाही, असा प्राचीन सिद्धान्त असून त्याचाच अनुवाद इथे केला आहे. म्हणून असक्त चित्ताने आपले कार्य सतत कर आणि त्यायोगेच माणसाला मुक्ती किंवा परमगती प्राप्त होते, जनकादी पूर्वीच्या ज्ञानी पुरुषांनी कर्माच्या योगानेच सिद्धी प्राप्त करून घेतली, असे पुढे २० व्या श्लोकात सांगितले आहे. पुढे ३५ व्या श्लोकात स्वधर्म म्हणजे समाजरचनेनुसार आणि स्वतःच्या स्वभावाला अनुरूप असे कर्तव्य आचरणे, हे श्रेयस्कर असल्याचे सांगितले आहे.

चौथ्या अध्यायाच्या प्रारंभी भगवंतांनी आपण होऊन विवस्वान्, मनु, इक्ष्वाकु यांच्या परंपरेने आलेला आणि पुढेही राजर्षींच्या परंपरेने चाललेला हा योग मध्यंतरी पुष्कळ काळ गेल्यामुळे नष्ट झाला, म्हणजेच विस्मृतीत गेला, तोच आता मी तुला सांगत आहे आणि हेच उत्तम रहस्य आहे, असे पहिल्या तीन श्लोकात सांगितले आहे. यावरून 'बुद्धियोगे त्विमां शृणु' (गी. २.३९) इथून कर्मयोगाच्या विवेचनाला सुरुवात झाली होती, ते विवेचन तिसऱ्या अध्यायाच्या अखेरीस संपले असे ठरते. ४ थ्या अध्यायाच्या प्रारंभी हा योग (इमं योगम्) असे ज्याला म्हटले तोच योग सर्व गीतेत सांगायचा आहे, असे शंकराचार्यांनी ४ थ्या अध्यायाच्या उपक्रमभाष्यामध्ये म्हटले आहे. ते भाष्य असे—

**योऽयं योगः अध्यायद्वयेनोक्तः ज्ञाननिष्ठालक्षणः ससंन्यासः कर्मयोगोपायः अस्मिन् वेदार्थः परिसमाप्तः प्रवृत्तिलक्षणो**

**निवृत्तिलक्षणश्च । गीतासु च सर्वासु अयमेव योगो विवक्षितो भगवता । अत परिसमाप्तं वेदार्थं मन्वानः तं वंशकथनेन स्तौति भगवान् ।**

यामध्ये दुसऱ्या अध्यायाच्या ११ व्या श्लोकापासून तिसऱ्या अध्यायाच्या अखेरपर्यंतचा भाग एकच ज्ञाननिष्ठालक्षण ससंन्यास आणि कर्मयोगोपाय असा योग सांगितला असून तो सर्व गीतेत अभिप्रेत आहे, असे आचार्यांनी म्हटले आहे. कर्मयोगाला ते एका उपायाचे स्थान कसे देतात ते यावरून समजेल.

वेदार्थ दोन प्रकारचा आहे. एक प्रवृत्तिलक्षण आणि दुसरा निवृत्तिलक्षण. हा दोन्ही प्रकारचा वेदार्थ या ठिकाणी परिसमाप्त झाला आहे, असे आचार्य म्हणतात. तसेच भाष्याच्या उपक्रमामध्येदेखील आचार्यांनी म्हटले आहे—

**द्विविधो हि वैदिको धर्मः**
**प्रवृत्तिलक्षणो निवृत्तिलक्षणश्च ।**

हाच धर्म अर्जुनाला निमित्त करून जगताची स्थिती पालन करण्याची इच्छा करणाऱ्या नारायणाच्या अवताराने म्हणजे श्रीकृष्णाने सांगितला आणि तोच व्यासानी सातशे श्लोकात ग्रथित केला, असे आचार्यांनी यापुढे म्हटले आहे. प्राचीन काळापासून चालत असलेल्या या द्विविध वैदिक धर्मापैकी प्रवृत्तिलक्षण धर्म हाच कर्मयोग होय. यापैकी निवृत्तिमार्गाने शुक-याज्ञवल्क्यादी गेले आणि प्रवृत्तिमार्गाने व्यास, वसिष्ठ, जैगीषव्य, जनक आणि श्रीकृष्ण हे गेले, असे गीतारहस्यात दाखवले आहे.

प्रवृत्ती आणि निवृत्ती हे प्राचीन मार्ग खरे; पण त्यांचे स्वरूप एकांतिक होते. म्हणजे केवळ ज्ञान आणि केवळ कर्म अशा स्वरूपाचे होते. पण गीतेत सांगितलेला कर्मयोग हा, ही दोन्ही आत्यंतिक टोके टाळून कर्म आणि ज्ञान, तसेच प्रवृत्ती आणि निवृत्ती यांचा समन्वय करणारा आहे. वेदामध्ये वर्णिलेल्या केवळ यज्ञकर्मानी जे स्वर्गाचे फळ मिळते ते अशाश्वत व मर्यादित ठरवून त्याच्याहून श्रेष्ठ आणि शाश्वत असे निःश्रेयस् किंवा मोक्ष हे फळ उपनिषदांच्या काळी पुढे आले. यज्ञ हे देखील निष्काम बुद्धीने करावे, म्हणजे त्यायोगे आत्मिक आणि मानसिक उन्नती होते, असे म्हणून निष्कामता ही मुख्य ठरवून यज्ञांना गौणता देण्यात आली. तसेच यज्ञ या शब्दाचाही अत्यंत व्यापक अर्थ करून आत्मोन्नतीकरिता आणि लोकसंग्रहाकरिता केलेला त्याग आणि तप यांनादेखील यज्ञ म्हणून संबोधण्यात आले. अशा रीतीने यज्ञाचा अर्थ विस्तारून त्या शब्दाची पारंपरिक प्रतिष्ठा चालू ठेवण्यात आली. चौथ्या अध्यायातील २५ ते ३० या श्लोकांमध्ये इंद्रियनिग्रह, आत्मसंयम, स्वाध्याय, तप या सर्वांनाच यज्ञ म्हटले आहे.

कर्मयोगामध्ये ईश्वरार्पण बुद्धीने कर्म करावे, असा एक महत्त्वाचा भाग असल्यामुळे ईश्वराची भक्ती असल्याशिवाय कर्मयोग पुरा होत नाही. 'मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्य' (गी. ३·३०)यात भक्तीचा बीजभूत उल्लेख आहे. ईश्वर सर्व जगात भरलेला, सर्वसाक्षी आणि शाश्वत धर्माचा रक्षणकर्ता आहे. त्याला सर्वभावे शरण गेल्याशिवाय सर्व कर्मे परमेश्वरार्पण करण्याची बुद्धी उत्पन्न होणार नाही. म्हणूनच गीतेतील कर्मयोग हा भक्तिप्रधान आहे. या भक्तियोगाचे विवेचन गीतेमध्ये पुढील अध्यायात पुष्कळच आलेले आहे आणि गीतारहस्यातही शेवटचे भक्तिमार्गाचे प्रकरण यासाठीच घातले आहे.

लोकसंग्रह अर्थात् समाजधारणा किंवा लोकस्थितिरक्षण नीट व्हावे, यासाठी समाजामध्ये काही पद्धती प्रस्थापित झालेल्या असतात. गीतेच्या कालात यासाठीच चातुर्वर्ण्याची पद्धत चालू होती आणि ती स्वभावगुणांवरच आधारलेली होती. या व्यवस्थेनुसार व्यक्तीकडे आलेले कर्म हेच त्या व्यक्तीचे स्वकर्म किंवा स्वधर्म असे मानले गेले होते. पण चातुर्वर्ण्यव्यवस्था नसली आणि दुसरी काही समाजरचना असली, तरी तदनुसार प्रत्येक व्यक्तीकडे काहीतरी कर्तव्य येतेच आणि कोणतीही समाजव्यवस्था समाजाच्या सुस्थितीसाठीच कल्पिलेली असते, म्हणून चातुर्वर्ण्यव्यवस्थेतच कर्मयोग शक्य आहे अन्यत्र शक्य नाही असे समजण्याचे कारण नाही, हे गीतारहस्यात पुढीलप्रमाणे स्पष्ट केले आहे.

"शास्त्रत· प्राप्त झालेले कर्तव्य निष्काम व आत्मौपम्य बुद्धीने केले पाहिजे, हे गीतेतील नीतिधर्माचे मुख्य सार होय व हे सर्व देशांतील लोकांस सारखे लागू पडते. आत्मौपम्य दृष्टीचे व निष्काम कर्माचरणाचे हे सामान्य नीतितत्व सिद्ध झाले, तरी ते ज्या कर्मास लागू करावयाचे ती कर्मे या जगात प्रत्येकास कशी होतात, याचाही काही खुलासा करणे जरूर होते. म्हणून ते सांगण्यास तत्काली लागू पडणारे साहजिक उदाहरण या नात्याने चातुर्वर्ण्याचा उल्लेख गीतेत केला आहे व त्याबरोबर गुणकर्मविभागाने त्या समाजव्यवस्थेची थोडक्यात उपपत्तीही दिली आहे. पण हा काही गीतेचा मुख्य भाग नसून चातुर्वर्ण्यव्यवस्था जर कोठे चालू नसेल किंवा लंगडी पडली असेल, तर तेथेसुद्धा तत्काली अंमलात असलेल्या समाजव्यवस्थेप्रमाणे समाजधारणपोषणाची जी जी कामे आपणास प्राप्त होतील, ती ती लोकसंग्रहार्थ धैर्योत्साहाने व निष्काम बुद्धीने कर्तव्य म्हणून करण्यासाठी मनुष्य जन्मास आला आहे, केवळ सुखोपभोगास नव्हे, असा सर्व गीताशास्त्राचा व्यापक सिद्धान्त आहे. गीतेतील नीतिधर्म केवळ चातुर्वर्ण्यमूलक आहे असे जे कित्यकाचे म्हणणे आहे ते खरे नव्हे हे लक्षात ठेवले पाहिजे." (गी. र. पृ. ४७२)

मनुष्याला ब्राह्मी स्थिती प्राप्त झाली, म्हणजे तो निर्द्वन्द्व आणि त्रिगुणातीत होतो. म्हणून त्याला कोणताही नियम घालता येत नाही. म्हणजे अमुक कर किंवा तमुक कर अशी त्याला आज्ञा करता येत नाही.

दुसरे असे, की ज्ञानी मनुष्य सर्व भूताच्या ठिकाणी एकात्मता पाहतो. 'हे विश्वचि माझे घर' अशी त्याची भावना असते. असे असता स्वतःच्या शरीरधारणेसाठी अवश्य ते कर्म तो करीत राहणार, तर जगापासून त्याचा वेगळेपणा न उरल्यामुळे जगाच्या धारणेसाठीही तो आत्मीयतेने कर्म करीलच. ज्ञान आणि कर्म यांचा खरा विरोध नसून ज्ञान आणि आसक्ती किवा सकामता याचा विरोध आहे. आसक्ती काढून टाकली, तर कर्म हे ज्ञानाला कोणताही कमीपणा आणणारे नाही.

पण त्यापुढे कर्म हेच ज्ञानाबरोबर मोक्षाचे साधन आहे काय ? असा प्रश्न येतो. 'कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः' (गी. ३. २०) या श्लोकाच्या पूर्वार्धात आणि त्यापूर्वीच्या श्लोकातील 'असक्तो ह्याचरन् कर्म परमाप्नोति पूरुषः' या श्लोकार्धात कर्म हे मोक्षाचे साधन आहे, असे गीतेने मानले आहे असे दिसते. पण टिळकांनी गीतारहस्यात या श्लोकाचे विवेचन करताना आणि इतरत्रही ग्रंथातील विवेचनात कर्म हे मोक्षाचे साधन म्हणून प्रतिपादन केले नाही. कारण कर्म हे मोक्षाचे साधन म्हणणे हे पूर्वीच्या सर्व वेदान्तग्रंथांच्या विरुद्ध जाते. 'कर्मणा बध्यते जन्तुः विद्यया तु प्रमुच्यते' (शुकानुप्रश्न म. भा. शांति. २४०.७) हा जुना सिद्धान्त टिळकांनीमान्य केलेला आहे. टिळक म्हणतात —

"या सिद्धान्ताबद्दल वाद नाही. तर 'कर्मणा बध्यते' म्हणजे काय ? याचा विचार केला, तर जड किवा अचेतन कर्म कोणास बाधीत नाही आणि सोडीतही नाही. मनुष्य फलाशेने किंवा आपल्या आसक्तीमुळे कर्मात बद्ध झालेला आहे. ही आसक्ती सुटली म्हणजे नुसत्या बाह्येंद्रियांनी कर्मे केली तरी तो मुक्तच होय." (गी. र. पृ. ३०१).

कर्मयोगामध्येच ज्ञान आणि भक्ती याचा अंतर्भाव होतो. म्हणूनच गीतारहस्यामध्ये ज्ञानयुक्त भक्तिप्रधान कर्मयोग गीतेला अभिप्रेत आहे, असे म्हटले आहे. कर्म, भक्ती आणि ज्ञान या तीन्हीचा समन्वय गीतेने सतत ठेवला आहे. ज्ञान्यामध्येही जो भक्तिमान असेल, तो चांगला; तसेच भक्तांमध्येही जो स्वकर्माने देवाची पूजा करीत असेल, तो चांगला; तसेच जो ज्ञानार्थी आणि भक्ती ठेवणारा असेल, तोच खरा कर्मयोगी असे गीतेने दर्शविले आहे. यामुळे गीतेमध्ये ज्ञानयुक्त भक्तिप्रधान कर्मयोग आहे, असे म्हणणे हे गीतेच्या समन्वयात्मक आणि संग्रहात्मक धोरणाला धरूनच आहे. [ ग. वि. केतकर ]

**कर्मविपाक** याची व्याख्या पुढीलप्रमाणे दिलेली आहे — **कर्मणः अधर्ममूलकस्य अशुभफलजनकस्येति यावत् विपाकः परिणामः। इह रोगादिभोगजनकदुःखमयपरिणामः। अमुत्र नरकभोगादिजनकदुःखमयपरिणामश्च।**

अर्थ — अधर्ममूलक अर्थात अशुभ फल उत्पन्न करणाऱ्या कर्माचा परिणाम म्हणजे कर्मविपाक होय. या लोकी तो रोगादी दुःखे उत्पन्न करतो व परलोकी नरकभोगादी दुःखे उत्पन्न करतो.

कर्मविपाकानुसार विविध पापाचे फल विविध रूपांनी दृष्टीस पडते, असे धर्मशास्त्रात सांगितले आहे. उदा०—

**स्तेनः कुनखी भवति श्वित्री भवति ब्रह्महा।**
**सुरापः श्यावदन्तस्तु दुश्चर्मा गुरुतल्पगः।**

(वासिष्ठ ध. सू. २०.४४)

अर्थ — चोरी करतो त्याची नखे वाईट होतात. ब्रह्महत्या करणाऱ्याला कुष्ठ होते. मद्य पिणाऱ्याचे दात किडतात व गुरुपत्नीशी पापसंबंध करणाऱ्याची कातडी घाणेरडी होते.

शंखलिखित स्मृतीत ही यादी बरीच लांबलचक दिलेली आहे. मनुस्मृतीतही कर्मविपाकाची वरीलप्रमाणेच यादी दिलेली आहे (११.४९–५२). शातातपस्मृतीत एक अध्याय कर्मविपाकासाठी खर्ची घातला आहे. याज्ञवल्क्याने कर्मविपाक सांगितला आहे, त्यात तो म्हणतो —

परस्त्रीचे हरण करणारा व ब्राह्मणाचे द्रव्य चोरणारा, निर्जल अरण्यात ब्रह्मराक्षस होऊन पडतो. धान्य चोरणारा उंदराच्या जन्माला जातो. सोने चोरणारा कृमी, कीट, पतंग या योनीत जन्म घेतो. कित्येक पापकर्माचा विपाक म्हणून कर्त्याला वृक्षवल्लीचाही जन्म घ्यावा लागतो (याज्ञ. ३ २०७–२१५).

अशुभ कर्माची ही फले चुकविण्यासाठी धर्मशास्त्रात अनेक प्रायश्चिते सांगितली आहेत. याविषयी मनु म्हणतो —

**अकामतः कृतं पापं वेदाभ्यासेन शुध्यति।**
**कामतस्तु कृतं मोहात् प्रायश्चित्तैः पृथग्विधैः॥**

(मनु. ११.४६)

अर्थ — अबुद्धिकृत पाप वेदाभ्यासाने धुवून जाते. मोहामुळे आणि बुद्धिपूर्वक केलेले पाप नाना प्रकारच्या प्रायश्चित्तांनी नष्ट होते.

या कर्मविपाकाच्या मागील वैचारिक भूमिका पुढीलप्रमाणे सांगता येते —

या जगात मनुष्याला जी उच्च-नीच अवस्था प्राप्त होते व त्याला जी निरनिराळी सुख-दुःखे भोगावी लागतात, त्याच्या मूळ कारणाचा उलगडा भारतीय तत्त्वज्ञानात आणि धर्मशास्त्रात कर्मविपाकाची कल्पना स्वीकारून केलेला आहे. भारतीयांची

अशी समजूत आहे, की जीवात्म्याला अनेक जन्म–मरणांच्या फेऱ्यातून जावे लागते व त्याला विशिष्ट जन्मात जे सुख किंवा दुःख मिळते, ते त्याच्या पूर्वजन्मातील कर्माचे फल असते. ही उपपत्ती सर्वथैव समाधानकारक नसली, तरी तिच्यामुळे पुष्कळांना समाधान वाटते व पुष्कळांची नैतिक आचरणाकडे प्रवृत्तीही होते, ही गोष्ट सत्य आहे.

कर्मविपाकाची ही कल्पना भारतात वैदिक कालापासून चालत आलेली आहे. ब्राह्मणग्रंथांत तिचा आढळ होतो व उपनिषदात ती वाढीस लागल्याचे दिसते. उपनिषदांनी नैतिक कल्पनांमध्ये कर्मविपाकाच्या तत्त्वाला बरेच प्राधान्य दिलेले आहे. एखादा मनुष्य कुरूप अथवा रोगी निपजला, तर त्याचे कारण त्याने पूर्वजन्मी केलेले पाप असे मानण्याकडे औपनिषदिक आचार्यांचा कल दिसून येतो. महाभारतात अनेक ठिकाणी कर्माचे प्राबल्य वर्णिले आहे, ते असे –

**सुशीघ्रमपि धावन्तं विधानमनुधावति ।**<br>
**शेते सह शयानेन येन येन यथा कृतम् ।।**<br>
**उपतिष्ठति तिष्ठन्तं गच्छन्तमनुगच्छति ।**<br>
**करोति कुर्वतः कर्म च्छायेवानुविधीयते ।।**<br>
**येन येन यथा यद्यत्पुरा कर्म समीहितम् ।**<br>
**तत्तदेकतरो भुङ्क्ते नित्यं विहितमात्मना ।।**

(म. भा. शांति. १८१.८-१०)

अर्थ – मनुष्य कितीही वेगाने धावू लागला, तरीही पूर्वजन्मीचे कर्म त्याचा पाठलाग करीत असते. तो निजला, तर ते त्याच्याबरोबर झोपते. तो उठला, की ते त्याच्याबरोबर उठते. तो चालू लागला, की ते त्याच्या मागून चालू लागते आणि तो कर्म करू लागला, तर तेही त्याच्या कर्मात सहभागी होते. सारांश, प्राण्याच्या मागे त्याचे प्राक्तन कर्म छायेसारखे लागलेले असते. ज्या ज्या पुरुषाने पूर्वी आपल्या इच्छेप्रमाणे जे जे कर्म केले असेल, ते ते (त्याचे फल) त्याला एकटचालाच भोगावे लागते.

कर्मविपाकप्रकरणात कर्माचे संचित, प्रारब्ध व क्रियमाण असे तीन भेद केलेले आहेत. कोण्याही मनुष्याने सांप्रतच्या क्षणापर्यंत केलेले जे कर्म त्याला संचित असे म्हणतात. मग ते या जन्मात केलेले असो, किंवा पूर्वजन्मात केलेले असो. संचित म्हणजे साठविलेले. यालाच अदृष्ट आणि मीमांसकमते अपूर्व अशी दुसरी नावे आहेत. ही नावे पडण्याचे कारण असे, की कर्म किंवा क्रिया ज्या वेळी करावी, त्या वेळेपुरतीच ती दृश्य असते आणि ती वेळ गेल्यावर पुढे ते कर्म किंवा ती क्रिया स्वरूपतः शिल्लक न राहता तिचे सूक्ष्म परिणाम मात्र शिल्लक राहतात. या संचित कर्माची फले सर्वच्या सर्व एकदम भोगणे शक्य नसते. कारण या संचित कर्म–परिणामांपैकी काही चांगले तर काही वाईट म्हणजेच परस्परविरोधी फले देणारे असू शकतात. काही संचित स्वर्गप्रद असते, तर काही नरकप्रद असते. त्यामुळे त्या सर्वांची फळे एकाच काळी उपभोगणे शक्य होत नाही. ती एकामागून एक अशीच भोगावी लागतात. म्हणून संचितापैकी जी कर्मे फलोन्मुख झाली असतील, अर्थात फल देऊ लागली असतील, त्यांनाच प्रारब्ध (फल देऊ लागलेले संचित) असे म्हणतात. हे प्रारब्ध भोगीत असताना या जन्मातही प्रसंगानुसार माणसाच्या हातून प्रारब्धभोगाव्यतिरिक्त काही कर्मे होतच असतात. अशा कर्मांना क्रियमाण किंवा वर्तमान कर्मे म्हणतात. क्रियमाणाचेही बरे–वाईट परिणाम माणसावर घडतातच. त्यांतले कांही परिणाम तात्कालिक असतात व त्यांचे बक्षीस वा प्रायश्चित्त तिथल्या तिथेच मिळते. उदा० वाटेने चालत असता अनवधानाने निखाऱ्यावर पाय पडला, तर तो भाजेल व त्याच्या वेदना तात्काळ भोगाव्या लागतील. अर्थातच ते क्रियमाण भोगाने संपून जाईल. पण समजा, त्याच माणसाने चालता चालता वाटेत पडलेला एखादा दागिना अभिलाषबुद्धीने उचलला व खिशात घातला, तर त्या क्रियमाणाचे दोन पर्याय संभवतात. चोरी उमगली, तर तिचे प्रायश्चित्त तात्काळ मिळून ते क्रियमाण भोगाने संपून जाईल; पण ती न उमगली तर, ते चौर्यकर्म त्याच्या संचितात जमा होऊन पुढे प्रारब्धानुसार त्याला त्याचे फळ भोगावे लागेल. अशा प्रकारे संचित, प्रारब्ध व क्रियमाण यांची प्रक्रिया चालू राहते.

मनुष्यप्राण्याच्या आयुष्यातील सुखदुःखाचा विचार करू लागल्यास, त्यात बाह्यतः तरी मोठेच वैषम्य दिसते. एखादा मनुष्य जन्मभर सुखात व ऐषआरामात लोळत राहतो, तर दुसरा एखादा आपत्तींनी ग्रासला जाऊन व अन्नालाही मोताद होऊन आपले आयुष्य संपवितो. ईश्वराच्या दयाळू राज्यात असे हे 'वैषम्यनैर्घृण्य' का, असा त्यामुळे साहजिकच प्रश्न निर्माण होतो. पण या प्रश्नाचे उत्तर समजून घ्यायचे असल्यास ते कठिण नाही.

सृष्टिनिर्मितीबरोबरच सृष्टीचे नियमही ठरून गेलेले आहेत. अग्नीत बोट घातल्यास ते भाजावे, हा अग्नीचा धर्म आहे. आत पडलेली वस्तु बुडविणे, हा पाण्याचा धर्म आहे. अपथ्य केले, की रोग जडणे हा शरीराचा धर्म आहे. एतावता सृष्टितील सर्व व्यापार नियमबद्ध आहेत. हे नियम मनुष्याने समजून घेतले पाहिजेत. सृष्टिचक्र स्वतःच्या नियमानुसारच चालत असते. त्याबद्दल ईश्वराला दोष ठेवण्यास जागा नाही. सृष्टीचे रहाटगाडगे एकदा सुरू झाले, की पुढे त्यात परमेश्वर हात घालीत नाही. कर्माचे फल नेमून देणे एवढेच त्याचे काम. तेवढे

झाले, की मग तो ‘ उदासीनवत् ’ राहतो. आणि म्हणूनच त्याला वैषम्य (विषमबुद्धी) व नैर्घृण्य (निर्दयता) हे दोष लागत नाहीत, असे वेदांतशास्त्र सांगते (वे. सू. २. १. ३४.) त्यामुळे कर्मसिद्धान्तानुसार असे मानावे लागते, की सांप्रत सुखमय जीवन जगणाऱ्या माणसाने या जन्मी तसे परिश्रम केले असतील किंवा पूर्वजन्मात तरी ते केलेले असतील. ‘ नादत्तमुपतिष्ठते ’ हा आणखी एक सृष्टीचा नियम आहे. दिल्याशिवाय मिळत नाही, असा त्याचा अर्थ आहे. त्या दृष्टीने एखाद्याच्या सुखदुःखाचे मूळ त्याच्या या जन्मीच्या कर्मात शोधून न सापडल्यास त्याच्या पूर्वजन्माकडे बोट दाखवावे लागते आणि पूर्वजन्म मानल्यावर त्याच न्यायाने पुनर्जन्मही मानावा लागतो. कर्मविपाकाच्या सिद्धान्तानुसार पूर्वजन्मात अथवा या जन्मात भूतकाळी माणसाने जे जे कर्म केले असेल, त्याचा शुभाशुभ परिणाम त्याला भोगावा लागणार, हे निश्चित आहे. कोणताही जीवात्मा जन्माला येताना पूर्वजन्मातले संस्कार आपल्या बरोबर घेऊन येतो व त्यांतील जो संस्कार सर्वांत प्रबळ असेल, तदनुकूल जन्मस्थान गाठतो. त्या जन्मस्थानाच्या निवडीमुळे त्या माता-पित्यांच्या अनुवंशक्षम गुणावगुणांची त्याच्या पूर्वीच्या संस्कारावर प्रतिक्रिया घडू लागते. त्या संघर्षातून जो निष्कर्ष निघेल, तदनुरूप स्थूलमानाने त्याला आरोग्य, विद्या, बुद्धी, त्रिगुणांचे न्यूनाधिक्य, द्रव्यलाभाचे योगायोग, यशापयश, सुखदुःख, आयुर्मर्यादा, इ. गोष्टी प्राप्त होतात. या स्थूल रूपरेषेच्या आत त्याच्या त्या गुणावगुणांचा संकोच अथवा विकास होतो. या संकोच–विकासाची मर्यादाही निसर्गाने ठरवलेली असते.

**कर्मविपाक व आत्मस्वातंत्र्य**– समजा एखाद्याने प्रश्न केला– ‘ माझ्या मागच्या पापामुळेच मी आज दुःख भोगीत असेन; पण मी जर आज मनात आणले, की यापुढे तरी मला दुःख भोगावे लागू नये, म्हणून मी पापाचरण करणार नाही, तर माझ्या वृत्तीत तशी सुधारणा होणे शक्य आहे काय आणि माझा पुढील दुःखभोग सुटेल काय ?’

यावर शास्त्रकारांचे उत्तर असे–‘ या जन्मात ज्या आपत्ती आल्या आहेत, त्या भोगल्यावाचून सुटका नाही. प्रारब्धकर्मणां भोगादेव क्षयः ( = प्रारब्धकर्माचा भोगानेच क्षय व्हायचा.) ’ एकदा यंत्र फिरू लागले, की त्याच्या मागची शक्ती काढून घेतली, तरी त्याचे फेरे काही काळ चालू राहायचेच. तद्वतच हे आहे. तथापि माणसाला ‘ यापुढे मी पापाचरण करणार नाही,’ असा निश्चय केव्हाही करता येईल. यालाच आत्मस्वातंत्र्य म्हणतात. पूर्वीचे पाप अथवा चालू भोग या गोष्टी या आत्मस्वातंत्र्याला अडवू शकत नाहीत. या निश्चयाचा परिणाम म्हणून माणसाच्या क्रियमाणाने त्याच्या संचितात नव्या दुःखांची भर पडणार नाही. शिवाय चालू दुःखाचा भोग जो पूर्वी असह्य वाटत होता, तो नवोदित विवेकाने सह्य वाटू लागेल आणि या नव्या सुविचाराच्या संस्काराने संचितातले जुने वाईट संस्कार पुसले जाऊन तेही भावी काळात तापदायक ठरणार नाहीत.

मनुष्य प्रकृतीच्या अधीन होऊन नाना प्रकारची कर्मे करतो, हे खरे; पण प्रकृती कितीही बलिष्ठ असली, तरी आत्मसामर्थ्यापुढे तिचा टिकाव लागत नाही. प्रकृतीचा जोर इंद्रिये, मन व बुद्धी यांच्यापर्यंत चालतो; पण ‘ यो बुद्धेः परतस्तु सः ’ म्हणजे बुद्धीच्याही पलीकडे असणारा जो आत्मा, त्याच्यावर प्रकृती अंमल चालवू शकत नाही.

या सगळ्याचा निष्कर्ष असा, की मनुष्याला इच्छास्वातंत्र्य, बुद्धिस्वातंत्र्य व आत्मस्वातंत्र्य आहे. कर्मविपाकाने तो बांधला गेला असला तरी, पूर्वीच्या कर्मांचे फल भोगण्यापुरताच तो बांधलेला असतो. प्रारब्ध त्याच्या हातून नवी पापे घडवू शकत नाही.

मनुष्य एकदा आपल्या शुद्ध आत्म्याच्या स्वतंत्र प्रेरणेने वागू लागला, म्हणजे तो जे व्यवहार करतो, ते स्वभावतःच मोक्षानुकूल होऊन अखेर तो निर्मल व स्वतंत्र अशा परमात्म्यात मिळून जातो (म. भा. शांति. ३०८. २७–३०). देहेंद्रियांना मोक्षानुकूल कर्मे करायला लावून ब्रह्मात्मैक्य ज्ञानाने मोक्ष मिळविण्याची उपाधिबद्ध आत्म्याची जी ही स्वतंत्र शक्ती ती मनात आणूनच भगवंताने म्हटले आहे––

**उद्धरेदात्मनाऽऽत्मानं नात्मानमवसादयेत् ।**
**आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मनः ॥**
(गीता ६.५)

अर्थ – मनुष्याने आपण होऊनच आपला उद्धार करावा. आपण आपल्या स्वतःला खचू देऊ नये. कारण (प्रत्येक जण) आपणच आपल्या स्वतःचा बंधू (हितकर्ता) आणि आपणच आपला शत्रू (नाशकर्ता) आहे.

**बौद्धांचा कर्मवाद**–बौद्ध धर्मात कर्मवादाची वाढ पराकाष्ठेची झाली आहे. मीमांसादी दर्शनात शुभाशुभकर्मांची फले शुभाशुभ मिळतात, असे सांगून मनुष्याला नैतिक आचरणाकडे प्रवृत्त केलेले आहे; पण बौद्ध दर्शनात सर्वच गोष्टींच्या मुळाशी कर्म आहे व सर्व प्रश्नांचा उलगडा कर्मानेच होतो, असे दाखविले आहे. बौद्ध तत्त्वज्ञानाप्रमाणे जीव म्हणजे कर्माच्या योगाने अनेक द्रव्यांचा एकत्र झालेला व क्षणोक्षणी बदलणारा समुच्चय होय. त्यामुळे बौद्ध पुनर्जन्म मानीत नाहीत. जेव्हा एखादा मनुष्य मरतो, तेव्हा एक नवीन मनुष्य जन्माला येऊन मृत

जीवाचे कर्म ग्रहण करतो. व्यक्ती नवी असली तरी तिचे कर्म तिला गत व्यक्तीशी बद्ध करते, अशी याबाबत बौद्धांची उपपत्ती आहे.

बौद्ध हे ईश्वरही मानीत नाहीत. त्यांच्या तत्त्वज्ञानाप्रमाणे सृष्टी ही विधात्याने निर्माण केलेली नसून सर्व जीवांचे एकवटलेले कर्म हेच सृष्टीचे कारण होय. जीवलोक व भाजनलोक (विश्व) यांचे वैचित्र्य ईश्वरकृत नाही. कारण ईश्वरच मुळात नाही. हे लोकवैचित्र्य कर्मजन्य आहे. प्राणिमात्राच्या कर्मातून ते उत्पन्न होते.

कर्माचे प्रकार दोन–(१) चेतना व (२) चेतयित्वा. चेतना हे मानस कर्म असून त्याच्यापासून जे उत्पन्न होते ते चेतयित्वा कर्म होय. कायिक व वाचिक असे चेतयित्वाचे दोन प्रकार होतात. चेतना कर्म व चेतयित्वाचे दोन प्रकार मिळून कर्म त्रिविध होते. या तीन कर्मांची सिद्धी आश्रय, स्वभाव आणि समुत्थान या तीन कारणांनी होते.

कृत व उपचित असे कर्माचे आणखी दोन भेद होतात. जे कर्म स्वेच्छेने किंवा बुद्धिपूर्वक (संचिन्त्य) केले जाते, ते उपचित आणि तद्विरुद्ध ते कृत होय. सर्व कर्मे उपचित होत नाहीत. अर्थात फल देण्याला प्रारंभ करीत नाहीत.

चेतना हे मानस कर्म असून कायिक, वाचिक कर्मावाचून ते आपले अभीष्ट प्राप्त करू शकते. ऋषींच्या शुद्ध अशा चेतना कर्मापासूनच फल उत्पन्न होते. पण सामान्य लोकांना त्यासाठी काय व वाक् यांचे समुत्थान करावे लागते. चेतना क्षणिक आहे. पण पुनः पुन. अभ्यास केल्याने तिच्यापासून कायविज्ञप्ती व वाग्विज्ञप्ती होऊ शकते.

बौद्धांनी कर्माचे आणखीही काही प्रकार कल्पिले आहेत, ते असे–

(१) शुद्ध व अशुद्ध– शुद्धकर्म वासना, अज्ञान इ. दोषापासून अलिप्त असते. म्हणून जीवाला त्याचे फल भोगावे लागत नाही. अशा कर्मापासून ससाराचा उच्छेद होऊन निर्वाणप्राप्तीचा मार्ग सुकर होतो. इतर सर्व कर्मे अशुद्ध होत. त्याचेही पुन्हा चांगले व वाईट, पुण्यकारक व पापकारक असे फलदृष्टचा भेद करता येतात. इहलोकी सुख मिळावे म्हणून केलेली कर्मे वाईट व परलोकी सुख मिळावे म्हणून केलेली कर्मे चागली होत. त्याचप्रमाणे दुसऱ्याचे बरे किंवा वाईट करण्याच्या उद्देशाने केलेली कर्मे सुचरित्रे किंवा दुश्चरित्रे होत.

सुचरित्रांचे मूळ अलोभ, अद्वेष व अमोह या तीन गोष्टींत असते. सत्कृत्याच्या विरुद्ध केलेली सर्व कर्मे ही दुष्कृत्ये होत. मिथ्या दृष्टीने केलेल्या सत्कृत्यांचे फलही मिथ्या होते.

(२) कुशल, अकुशल व अव्याकृत– बौद्धांचा हा आणखी एक कर्मविभाग आहे. जे कृत्य दुःखाचा अंत करते व निर्वाण जवळ आणते, ते कुशल होय. अकुशल म्हणजे वाईट फल देणारे व अव्याकृत म्हणजे चांगले किंवा वाईट कोणतेच फल न देणारे कर्म होय. पुण्य, अपुण्य व अनिद्य हा विभागही अशाच प्रकारचा आहे. त्यांना सुखवेदनीय, असुखवेदनीय व सुखासुखवेदनीय असेही म्हणतात.

(३) नियत व अनियत– नियत म्हणजे निश्चित फलदायी व अनियत म्हणजे अनिश्चित फलदायी होय.

दुष्कृत्यांमध्ये १० कर्मास बौद्धांनी कर्मपथ असे नाव दिले आहे. हिसा, चौर्य व व्यभिचार हे कायिक कर्मपथ व असत्य, निंदा, गर्व व मिथ्या भाषण हे मानसिक कर्मपथ आहेत. पहिले दोन वर्ग चेतनायुक्त, कायिक कर्मात मोडतात व तिसरा वर्ग फक्त मानसिक असतो. प्रत्येक कर्माचे पुन्हा पूर्वसिद्धता (मौल प्रयोग), प्रत्यक्ष कर्म (मौल कर्मपथ) व पश्चात् कृत्य (पृष्ठ) असे पृथक्करण करता येते. उदा. खाटकाने पशू विकत आणून त्याच्या वधाची तयारी करणे, त्याचा प्रत्यक्ष वध करणे व त्याच्या मांसाचा विक्रय करणे, ही तीनही त्या कार्याची अगे असली तरी त्यांपैकी प्रत्यक्ष वध करणे, यालाच कर्मपथ म्हणतात व त्याचेच विशेषतः फल त्या खाटकास भोगावे लागते. कोणतेही कृत्य कर्मपथ या संज्ञेस प्राप्त व्हायला त्या कृत्याचे पूर्ण ज्ञान कर्त्याला अवश्य असावे लागते. चुकीने केलेले कृत्य कर्मपथ या संज्ञेत येत नाही. जो मनुष्य अजाणता एखाद्या मनुष्याचा घात करतो, तो घात करण्याचे पातक करतो; पण मनुष्यवधाचे पातक करीत नाही. कारण ते कृत्य अज्ञानाने झालेले असते. पण जैनांची विचारसरणी याहून भिन्न आहे. ते म्हणतात, अग्नी ज्याप्रमाणे जाणता व अजाणता या दोघानाही सारखाच जाळतो, त्याप्रमाणे जाणून किंवा नेणूनही मनुष्यवध करणारा सारखाच दोषी ठरतो.

**जैन कर्मवाद**– जैनानी आपला कर्मवाद पुढीलप्रमाणे माडला आहे– पुद्‌गल द्रव्याचे अणू व स्कंध असे दोन भेद होतात. स्कंध म्हणजे अणूंचा समुच्चय होय. या स्कंधाच्या विशेष परमाणूना कार्माणवर्गणा असे म्हणतात. ही कार्माणवर्गणा ससारात सर्वत्र व्यापलेली आहे. विस्तवाने तापलेला लोखंडाचा गोळा जसा जलाला आकर्षित करतो, तद्वत रागद्वेषांनी युक्त अशा आत्म्याचा कार्माणवर्गणेशी संबंध जडणे यालाच कर्मबंध म्हणतात. या कर्मबंधामुळे आत्म्याच्या ज्ञान–दर्शनमय शक्तीचा घात होऊन त्याच्यावर अज्ञानाचा पडदा पडतो. कर्मबद्ध झाल्यामुळे तो स्वत्वाला विसरतो आणि ते स्वत्व पुनश्च प्राप्त होऊन मुक्ती मिळेपर्यंत ८४ लक्ष योनींच्या फेऱ्यात भ्रमण करीत राहतो. जीवाचा कर्माशी बीज–वृक्षवत अनादी संबध आहे. जीवाच्या

ठिकाणी अतुल सामर्थ्य असते; पण कर्मबंधामुळे तो त्या सामर्थ्याला वंचित होतो. कर्मामुळे जीवाचा स्वभावही लुप्तप्राय होऊन विभावरूपी जे रागद्वेषादी परिणाम, त्यांत त्याची परिणती होते. कर्मामुळेच जीव चतुर्गतीमध्ये (नरक, पशु, मनुष्य व देव या चार योनीत) नाना प्रकारची सुख–दुःखे भोगतो. असे हे कर्म आठ प्रकारचे आहे–

१. ज्ञानावरणीय– ज्याच्यामुळे ज्ञानशक्तीवर पडदा पडतो ते. त्यामुळे ज्ञानप्रसाराचे आणि ज्ञानवृद्धीचे मार्ग अवरुद्ध होतात.

२. दर्शनावरणीय – आत्म्याच्या दर्शनशक्तीचा लोप करणारे. याच्यामुळे चित्स्वरूपाचा परिचय घडण्यास अडथळा होतो व आत्मा आणि शरीर एकच आहे, अशी समजूत होते.

३. वेदनीय– परपीडा न करणे या आत्मगुणाचा लोप करणारे. याच्यामुळे आत्म्याला क्लेश होतात.

४. मोहनीय– आत्म्याच्या दर्शन व सुचरित्र यांवर आच्छादन घालणारे. दुराचरण, लोभ, मत्सर, असूया, इ. दोषानी या कर्माचा बंध जडतो.

५. आयुकर्म– आत्म्याच्या सर्वव्यापक शक्तीचा लोप करून मर्यादित काळापावेतो त्याला एकाच अवस्थेत ठेवणारे. ज्याप्रमाणे पिंजऱ्यात ठेवलेल्या पोपटाची गती पिंजऱ्यातून बाहेर पडेपर्यंत अवरुद्ध होते, तद्वत या कर्माने जीवाची अवस्था होते.

६. नामकर्म– सूक्ष्म गुणांचा घात करून आत्म्यासाठी नाना प्रकारच्या शरीरांची योजना करणारे. या कर्मामुळेच जीव ८४ लक्ष योनीत नाना रूपे घेऊन फिरत असतो.

७. गोत्रकर्म– जीवाला उच्च-नीच कुलात जन्म घ्यायला लावणारे.

८. अंतरायकर्म– आत्म्याच्या ठिकाणी असणाऱ्या पराक्रम, दान, भोग, इ. विविध प्रकारच्या शक्तींचा अस्त करणारे कर्म. दुसऱ्याच्या पराक्रम, दान, लाभ, भोग इ. उच्च गुणांचा घात केल्याने या कर्माचा उदय होतो.

वरील अष्टकर्माचा जीवाशी संयोग झाल्यामुळे जीव संसारातच गुरफटून राहतो. जीवाला बरी-वाईट गती प्राप्त होणे, हे सर्व कर्माधीन आहे. कर्माचा संपूर्णपणे लोप झाल्याशिवाय मोक्ष प्राप्त होत नाही. म्हणून अष्टकर्माचे हनन करणे, ही गोष्ट महत्त्वाची आहे.

## कर्मसमर्पण

कर्माचे ईश्वराला समर्पण. याविषयी वचन असे––

**नित्यं नैमित्तिकं काम्यं यच्चान्यद् मोक्षसाधनम् ।**
**विष्णोः सर्मापितं सर्वं सात्त्विकं सफलं भवेत् ।।**

अर्थ–नित्य, नैमित्तिक, काम्य किंवा दुसरे कोणतेही मोक्ष मिळवून देणारे कर्म (पूर्ण झाल्यावर) विष्णूला समर्पण केल्याने सात्त्विक व सफल होते.

यासाठी संध्योपासना झाल्यावर आचमन करून ‘ इदं यत्कृतं प्रात संध्योपासनाख्यं कर्म तत्परमेश्वराय समर्पयामि ’ (हे जे प्रातःसंध्योपासना नावाचे कर्म (मी) केले ते मी परमेश्वराला सर्मपित करतो.) हा मंत्र म्हणतात (आचारेन्दु). यालाच कर्मसमर्पण ही संज्ञा आहे.

कर्मसमर्पणाची ही कल्पना वैष्णव धर्मातून आलेली आहे आणि तिचा उगम भगवद्गीतेतील पुढील श्लोकात आहे–

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।**
**यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम् ।।**
**शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबन्धनैः ।**
**संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि ।।**

(गीता ९. २७–२८)

अर्थ–हे कौतेया, तू जे करतोस, खातोस, हवन करतोस, दान करतोस, तप करतोस, ते (सर्व) मला अर्पण करीत जा. अशा प्रकारे वागल्याने कर्मे करूनही कर्माची शुभाशुभफलरूप जी बंधने त्यांपासून तुझी सुटका होईल व (कर्मफलांचा) संन्यास करण्याच्या या योगाने युक्तात्मा (शुद्धान्तःकरण) व मुक्त होत्साता तू मला येऊन पोचशील.

कर्म ईश्वरार्पण केल्याने त्यातले न्यूनाधिक्यादी दोष कर्त्याला बाधक होत नाहीत, असेही वैष्णवधर्माचे सांगणे आहे. कर्म हे स्वभावतः बंधक असते; पण तेच ईश्वरार्पणबुद्धीने केल्यास कर्त्याला त्याचा लेप लागत नाही, असा शास्त्रकारांनी सिद्धान्त सागितला आहे.

## कर्मसाक्षी

कर्मांचा साक्षी अर्थात कर्मे साक्षात पाहणारा. सूर्याला हे नाव आहे. वैदिक क्रियापद्धतीत याविषयी पुढील श्लोक आहे–

**सूर्यः सोमो यमः कालो महाभूतानि पञ्च च ।**
**एते शुभाशुभस्येह कर्मणो नव साक्षिणः ।।**

अर्थ–सूर्य, चंद्र, यम, काल आणि पंचमहाभूते हे नऊ या लोकी शुभाशुभ कर्माचे साक्षी आहेत.

महाभारतात क्षेत्रज्ञाला कर्मसाक्षी म्हटले असून तो हृदयात स्थित असल्याचे सांगितले आहे (आदि ४७.२९).

## कर्मक्षयव्रत

एक जैन व्रत. हे ७४ महिन्यांत पुरे होते. यात १४८ उपवास व तितक्याच पारणा असतात. या व्रतात ‘ ॐ ह्री णमो सिद्धाणं ’ या मंत्राचा त्रिकाल जप करायचा असतो. [ जै. व्र. वि. सं. ]

**कर्मांगदेवता** कर्मारंभी पुण्याहवाचनामध्ये कर्मांगदेवतेचा उल्लेख करायचा असतो. प्रत्येक कर्माची देवता भिन्न भिन्न असते. विवाहात अग्नी, गर्भाधानात ब्रह्मा, पुंसवनात प्रजापती, सीमंतोन्नयनात धाता, जातकर्मात मृत्यू, चौलात केशी, उपनयनात इंद्र, श्रद्धा व मेधा, वास्तुहोमात वास्तोष्पती, ग्रहमखात नवग्रह, याप्रमाणे निरनिराळ्या कर्मांच्या निरनिराळ्या देवता सांगितल्या आहेत. [ ऋ. ब्र. क. ]

**कर्मा-धर्मा** एक व्रत. हे उत्तर बिहारमध्ये प्रचलित आहे. हे व्रत भाद्र. शु. ११ शीस सायंकाळी करतात. या दिवशी बायका आपल्या परसात दोन खळगे करून एकात पाणी व दुसऱ्यात दूध ओततात. त्या दोन खळग्यांच्या मध्यभागी कुशतृणाचे रोप लावतात. जितके भाऊ असतील, तितकी कुशाची पाती आपल्या केसांत खोचतात. विष्णूची पूजा करून केवळ फलाहार करतात. दुसऱ्या दिवशी खळग्यातले दूध-पाणी, कुश, निर्माल्य हे सगळे नदीत नेऊन सोडतात. ब्राह्मणाला शिधा देतात व व्रताचे पारणे करतात. या व्रतामुळे स्वतःच्या व बंधूंच्या आपत्ती दूर होतात, अशी समजूत आहे. या व्रताची कथा अशी–

गौड देशात कर्मा व धर्मा या नावाचे दोघे बंधू होते. ते शेती करून कुटुंबपोषण करीत. पुढे एक दिवस दोघांचे भांडण झाले. दोघेही हमरीतुमरीवर आले. दोघांनी एकमेकांना शाप दिला, की 'तुझे पुण्य नष्ट होईल.' तो शाप खरा ठरला व दोघांनाही दुर्दशा आली. मग पश्चात्ताप होऊन ते दोघे शापमुक्तीचा उपाय शोधण्यासाठी अरण्यात गेले. तिथे एका वनदेवतेच्या मंदिराजवळ त्यांना एक यती भेटला. कर्मा-धर्मांनी त्याला आपली कर्मकथा ऐकविली. त्याने मग त्या दोघांना कर्म-एकादशीचे व्रत सांगितले. त्या दोघांनी घरी येऊन ते व्रत केले. त्यामुळे त्यांची सर्व दुःखे दूर झाली.

ही कथा व हे व्रत मुंड आदिवासीतही प्रचलित आहे. पण त्या कथेचे वळण वेगळे आहे. **पाहा** – करमपूजा.

**कर्माबाई** जगन्नाथपुरीत राहणारी एक भक्तिपरायण स्त्री. ती रोज प्रातःकाळी जगन्नाथाला खिचडीचा नैवेद्य दाखवीत होती. त्या कामी ती सोवळ्याओवळ्याचा विधिनिषेध पाळीत नसे. एक दिवस एका संताने तिला त्याबद्दल दोष दिला. तदनुसार तिने त्यापुढे सोवळे करायचे ठरविले. दुसऱ्या दिवशी सकाळी उठून ती विधियुक्त स्नान करायला समुद्रावर गेली. पण त्यामुळे देवाच्या खिचडीला विलंब लागला. देव त्यामुळे कष्टी झाला. जेव्हा पंड्यांनी पडदा खोलून पाहिले, तेव्हा त्यांना दिसले, की देवाच्या मुखांत खिचडीचा घास आहे. देवाने पंड्यांना सांगितले, की सोवळ्याओवळ्याचे विधिनिषेध कर्माबाईला लागू नाहीत. ती पूर्वी जशी मला खिचडी देत होती, तशीच यापुढेही देईल.

**कर्मार** ऋग्वेदकाळात घडकाम करणाऱ्याला हे नाव दिलेले आहे. त्या काळी ब्राह्मण घडकाम्यांचा एक वर्गच होता, असे डॉ. केतकर म्हणतात. त्यांच्या कामाची रीत व त्यांची हत्यारे यांविषयी विशेषशी माहिती उपलब्ध नाही. ते भट्टी लावून धातूचा रस बनवीत, हे मात्र निर्विवाद आहे. ते पक्ष्याच्या पंखांचे भाते बनवीत (ऋ. ९.११२.२) व अग्नीवर ठेवण्यासाठी धातूची पात्रेही तयार करीत (ऋ. ५.३.१५). यजुर्वेद व अथर्ववेद यांतही कर्मारांचा उल्लेख आहे. पाणिनी कर्मारांच्या भस्त्रा (भाता), अयोघन (घण) व कुटिलिका (आकडी) या हत्यारांचा उल्लेख करतो (अष्टा. ७.३.४७; ३.३.८२;.४.४.१८). [ म. ज्ञा. को.; पा. भा. ]

**कर्वे धोंडो केशव** (१८५८-१९६२) यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यात शेरवली येथे झाला. तिथून त्यांच्या वडिलांनी त्यांना मुरूड येथे शिक्षणासाठी आणले. मराठी सातवीच्या परीक्षेसाठी ते मुरूडहून कोल्हापुरापर्यंत चालत गेले. तिथून पुढच्या शिक्षणासाठी वडिलांनी त्याना रत्नागिरीस पाठविले. तिथे एका मराठी शाळेत शिक्षकाची नोकरी करून ते इंग्रजी शिकू लागले. १८८१ साली मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर ते मुंबईस विल्सन कॉलेजात जाऊ लागले. १८८४ साली ते बी. ए. झाले. त्यांनी एम्. ए. साठीही प्रयत्न केला; पण त्यात त्याना यश मिळाले नाही. नंतर त्यांनी मुंबईमधील निरनिराळ्या शाळांमध्ये ४।५ वर्षे शिक्षकाचे काम केले. १८९१ साली त्याची पहिली पत्नी निधन पावली. त्याच वर्षी पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजमध्ये त्यांना प्राध्यापकाची जागा मिळाली.



महर्षी धोंडो केशव कर्वे

कर्व्यांना लोक अण्णासाहेब या नावाने ओळखीत. अण्णांना त्या काळी वाचनासाठी फारशी सवड मिळत नव्हती; तरी ते सुधारकातले लेख आवडीने वाचीत. विधवा स्त्रियांवर समाजा-

कडून होणारा अन्याय तर त्यांच्या जिव्हारी लागे. त्यामुळे या विधवांच्या उद्धारासाठी आपण काहीतरी केलेच पाहिजे, असे त्यांच्या मनाने घेतले. त्यांना पुनश्च लग्न करायचे होते; पण ते त्यांनी विधवेशीच करायचे ठरविले. श्री. बाळकृष्ण केशव जोशी यांची बालविधवा कन्या गोदावरी हिच्याशी त्यांचा १८९३ साली दुसरा विवाह झाला. अण्णाच्या या पत्नीचे नाव आनंदीबाई असे होते. कुटुबात व आश्रमात त्यांना बाया या नावाने संबोधीत. त्या जन्मभर आपल्या पतीशी त्यांच्या स्त्रीशिक्षणाच्या कार्यात सहभागी राहिल्या.

या विवाहामुळे महाराष्ट्रातील सनातनी मंडळींचा कर्व्यावर रोष झाला. वृत्तपत्रांतून त्यांच्यावर निंदा-नालस्तीचा वर्षाव होऊ लागला. मुरूडच्या ग्रामस्थांनी तर त्यांच्यावर बहिष्कारच घातला; पण कर्वे डगमगले नाहीत. आपण केले ते योग्यच केले, असे त्यांना पक्के वाटत होते. सर्व प्रकारची सुधारणा समाजात पसरली पाहिजे आणि त्यासाठी आपण कसून प्रयत्न केला पाहिजे, असा त्यांचा निर्धार झाला होता.



सौ. आनंदीबाई कर्वे ऊर्फ बाया

पुनर्विवाहाच्या प्रश्नासंबंधी लोकात जागृती उत्पन्न करण्यासाठी कर्व्यांनी महाराष्ट्रात व्याख्यानाचे दौरे काढले. मिशनऱ्यांच्या शांतपणाने व तर्कशुद्ध युक्तिवादाने लोकांना न दुखविता, न डिवचता ते आपले विचार लोकांच्या गळी उतरवू लागले.

१८९९ साली त्यांनी पुण्याच्या सदाशिव पेठेत अनाथबालिकाश्रम सुरू केला. तोच आश्रम त्यांनी नंतर पुण्याजवळच्या हिंगणे या गावी नेला. एक झोपडी व एक विद्यार्थिनी एवढेच त्याचे प्रारंभिक स्वरूप होते. हळूहळू त्या आश्रमात विधवा विद्यार्थिनींची संख्या वाढू लाग्ली. आश्रमाला विचारी आणि विवेकी दात्याकडून हळूहळू द्रव्यसाहाय्यही मिळू लागले. त्या द्रव्यातून आश्रमाची मोठी इमारत उभी राहिली. त्यानंतर विधवांना तसेच सर्वसामान्य मुलींना पद्धतशीर शिक्षण मिळावे, या उद्देशाने त्यांनी १९०७ साली महिला विद्यालय नावाची एक संस्था स्थापन केली. भारतातल्या स्त्रियांमध्ये शिक्षणाचा प्रसार करणे हे एक अत्यंत पवित्र असे देशकार्य आहे, ही श्रद्धा त्यांच्या अंतरात बाणली होती. ते लोकांनाही तसाच उपदेश करीत.



प्रारंभीचा अनाथबालिकाश्रम

पुढे स्त्रियांसाठी एक स्वतंत्र राष्ट्रीय विद्यापीठ असावे, असे त्यांना वाटू लागले. या विद्यापीठात मुलींना प्रपंचशास्त्र, आरोग्यशास्त्र, पाककला, चित्रकला, गायनकला, इ. स्त्रीजीवनाला आवश्यक अशा सर्व विषयांचे शिक्षण मिळावे, असा त्यांचा उद्देश होता. त्या दृष्टीने निकराचे प्रयत्न करून अण्णांनी १९१६ साली भारतीय महिला विद्यापीठाला जन्म दिला. या विद्यापीठाला १९२० साली सर विठ्ठलदास ठाकरसी यांनी १५ लाख रुपयांची देणगी देऊन त्याच्या अभिवृद्धीला फार मोठी मदत केली.

त्यानंतर अण्णांनी जगभर प्रवास केला. निरनिराळ्या देशांतून त्यानी आपल्या महिला विद्यापीठाला मदत मिळविली. एवढे सगळे संकल्पिलेले आणि हाती घेतलेले स्त्री-शिक्षणाचे महत्कार्य व्यवस्थित मार्गाला लागल्यावर अण्णांना केवढी कृतकृत्यता वाटली असेल, ते त्यांच्याच शब्दांत सांगणे उचित होईल. १९५७ साली आकाशवाणीला दिलेल्या मुलाखतीत ते म्हणतात–

"मी अत्यंत सुखी आहे. मला शक्य होते, ते मी सारे केले. केवळ विधवांसाठीच नव्हे, केवळ स्त्रीशिक्षणसाठीच नव्हे, तर हरिजनांसाठीही मी शक्य तितका झटलो. 'जात-पात-तोडक मंडळाचेही कार्य मी केले. 'इच्छा तेथे मार्ग' हे माझे सूत्र ! नवा मार्ग काढण्यावर माझ्या मनाचा सदा भर. जीवनाचे नवे नवे मार्ग मी शोधीत गेलो, म्हणूनच मला माझ्या जीवनात आनंद लुटता आला, असे मला वाटते."

१९५५ साली अण्णांना राष्ट्रपतीकडून 'पद्मविभूषण' ही

पदवी मिळाली व १९५८ साली त्यांना 'भारतरत्न' हा सर्वोच्च बहुमान प्राप्त झाला. १०४ वर्षांचे दीर्घ आयुष्य भोगून अण्णा ९ नोव्हेंबर १९६२ रोजी कालवश झाले. [ भा. क. ]

**कऱ्हाड** सातारा जिल्ह्यातले एक प्राचीन क्षेत्र. याला पुराणांत करहाटक क्षेत्र म्हटले आहे. शिलालेख व ताम्रपट यांत करहाटक, करहाट, करहाड व करहड अशी या क्षेत्राची नावे दिली आहेत. करहा या नावाच्या नदीवरूनही करहाटक किंवा करहाड ही नावे प्रचलित झाली असावी. पाटण तालुक्यात केरा या नावाची एक नदी कोयनेस मिळते. प्राचीन काळी तिलाच करहा म्हणत असावे. कऱ्हाडे ब्राह्मणांची उत्पत्ती या क्षेत्रात झाली असे सह्याद्रिखंडात म्हटले आहे.

इथे कृष्णा व कोयना याचा संगम होतो. या संगमास प्रीतिसंगम म्हणतात. सामान्यतः संगमाच्या ठिकाणी एक नदी आडवी येऊन दुसऱ्या नदीला मिळते; पण इथे कृष्णा व कोयना समोरून येऊन एकमेकींना भेटल्या आहेत. असे संगम क्वचितच आढळतात. त्यामुळें कृष्णामाहात्म्यात या क्षेत्राचे महत्त्व फार सांगितले आहे.

दिग्विजयासाठी निघालेल्या सहदेवाने करहाटक जिंकले होते, असा महाभारतात उल्लेख आहे ( सभा. ३१. ७० ). त्याच श्लोकात करहाटकाला पाषंड असे विशेषण लावले आहे. पाषंड म्हणजे पाखंडी. हे बहुधा बौद्ध असावे. कारण कऱ्हाडच्या परिसरात आगाशिव आणि जाखिणवाडी येथील लेणी प्राचीन बौद्धांची असून त्या भागात काही बौद्ध अवशेषही आढळतात. कऱ्हाडात जैनांचे अवशेष फारसे सापडत नाहीत. कऱ्हाड ही कोण्या एका काळची रणभूमी असल्याचे तिथे आढळणाऱ्या वीरगळ नावाच्या कोरीव दगडांवरून कळते.

कऱ्हाडवर भोज, चालुक्य, राष्ट्रकूट व शिलाहार या राजवटी अम्मल गाजवून गेल्या. शिलाहारांची कुलदेवी महालक्ष्मी. हिचे मंदिर कोल्हापुराप्रमाणे कऱ्हाडातही आहे. कऱ्हाडावर काही काल मुसलमानी अम्मलही चालला. अदिलशाहीच्या काळात इब्राहिमखानाने बांधलेली एक मशीद कऱ्हाडात आहे. तिला १०६ फूट उंचीचे दोन उत्तुंग मनोरे आहेत. या मशिदीत ९ शिलालेख आहेत.

पुराणकाळात कऱ्हाड हे आदिक्षेत्र समजले जात होते. ते एक प्रमुख यात्रास्थान होते. काशीप्रमाणेच कऱ्हाडासही यात्रेकरूला पंचक्रोशी करावी लागे. सखूबाई या सुप्रसिद्ध संत स्त्रीचे या ठिकाणी मंदिर आहे. इथल्या संगमाजवळ संगमेश्वर महादेव आहे. एक भुईकोटही आहे. [ कऱ्हाड – य. रा. गुप्ते. ]

**कऱ्हाडे ब्राह्मण** दक्षिणी ब्राह्मणांतला एक पोटभेद. हे महाराष्ट्रात सर्वत्र आहेत. शिलाहाराच्या राजवटीत हे उदयास आले. मूळचे हे देशस्थ ऋग्वेदी असावे. ऋग्वेदाची शाकलशाखा ही एकच वेदशाखा यांच्यांत आढळते. यांची चौवीस गोत्रे पुढीलप्रमाणे आहेत—

अत्री, आंगिरस, उपमन्यू, काश्यप, कुत्स, कौडिन्य, कौशिक गार्ग्य, गौतम, जामदग्नी, नैध्रुव, पार्थिव (द्वादश), पार्थिव ( त्रयोदश ), बादरायण, भार्गव, भारद्वाज, मुद्गल, लोहिताक्ष, वत्स, वासिष्ठ, वैन्य, वैश्वामित्र, शांडिल्य व शालाक्ष.

तुंगभद्रेपासून नर्मदा-गोदावरीपर्यंतच्या प्रदेशाला प्राचीन काळी करहाटक असे म्हणत. या प्रदेशात ऋग्वेदी शाकलशाखी ब्राह्मण राहत. यांच्यांतले काही लोक करहाटक(कऱ्हाड)— मधून पुढे खाली कोकणात उतरले. कऱ्हाडातून आलेले म्हणून कोकणातील लोक त्यांना कऱ्हाडे म्हणू लागले. रत्नागिरी जिल्ह्यातल्या कऱ्हाड्यांना शिलाहार राजांनी तिकडे नेले. गोमंतकातल्या कऱ्हाड्यांना कमलादेवी व माधव मंत्री यांनी तिकडे नेले. याशिवाय गुजरातमधूनही काही ऋग्वेदी शाकलशाखी ब्राह्मण कोकणात गेले. तेही गुर्जर या आडनावाने कऱ्हाड्यांत समाविष्ट झाले. गोदावरीकाठच्या पैठण क्षेत्रातून नृसिंहभट्ट सत्यवादी नावाचे एक गृहस्थ कोकणातील संगमेश्वरानजीकच्या मावळंगे या गावी तपश्चर्या करण्यासाठी गेले व पुढे तिथेच त्यांचा वंश वाढला. मावळंगकर या उपनावाने तेही कऱ्हाडे ब्राह्मणांत सामील झाले. अंबेजोगाईहून कोकणातील नेवरे गावी गेलेले खेर हेही कऱ्हाड्यांतच जमा झाले.

कोल्हापूरची महालक्ष्मी ही बहुतेक कऱ्हाड्यांचीकुलदेवता आहे. कदंब राजांनी बेळगावच्या आजूबाजूची कित्येक कऱ्हाडे घराणी गोमंतकात नेली व तिथे इनामे वगैरे देऊन वसविली. त्यांनी गोव्यातली विजयादुर्गा, महालसा व भवानी—कमलेश्वर ही दैवते आपली कुलदैवते मानली. याशिवाय आदिनाथ, आर्यादुर्गा व प्रयागमाधव अशी कुलदैवते असणारीही काही घराणी आहेत.

इतिहासकाळात बहुतेक कऱ्हाडे हे खोत, इनामदार, सरदेसाई, सरदेशपांडे, देसाई, सरपोतदार, पोतदार, मुकादम, सबनीस, कारखानीस इ. सरकारी कामे करणारे हुद्देदार होते. त्यामुळे त्या गावातला किंवा भागातला प्रमुखपणा त्यांच्याकडे असे.

कऱ्हाडे ब्राह्मण सांप्रत सर्व भारतभर पसरले आहेत. काशी व नासिक येथे ते क्षेत्रोपाध्याय आहेत. नेपाळातल्या पशुपतेश्वराचा पुजारी कऱ्हाडाच असावा, असा नियम आहे. रामेश्वराचे पुजारी म्हणून तिथेही कऱ्हाडे ब्राह्मण आहेत. [ कऱ्हाडे ब्राह्मणांचा इतिहास. ]

**कन्हौर** बिआस नदीच्या दक्षिण तीरावरील एक प्राचीन नगर. इथे शक व विक्रमादित्य यांचे युद्ध झाले, असे अल् बिरूनी सांगतो. [ हि. जॉ. ए. इं. ]

**कलईगार** एक मुसलमान जात. हे लोक भारतात सर्वत्र आढळतात. हे स्वत:ला शेख म्हणवितात. भांड्यांना कल्हई लावणे, हा यांचा धंदा आहे. हे हनफी पंथाचे सुन्नी आहेत. हे आपसात व अन्य मुसलमानात लग्नसंबंध करतात. ही जात संघटित आहे. जातीच्या मुख्याला चौधरी म्हणतात. तो लोकांनी निवडून दिलेला असतो. [ मुं. इ. जा. ]

**कलंकी ब्राह्मण** ही स्वतंत्र जात नाही. बहिष्कृत ब्राह्मणांकडे ज्यांनी अन्नोदकाचा व्यवहार केला, अशा काही लोकांना पुढे कलंकी ब्राह्मण म्हणू लागले. [ ब्रा. मि. वि. ]

**कलंगा** बिहार व ओडिसा या प्रदेशांत आढळणारी एक जात. हे कवारांचे संबंधी असून तेलुगु प्रदेशांतून तिकडे गेले असावे. हे लोक पूर्णपणे द्रविडवर्गातले आहेत. मूल झाल्यावर एक कोंबडे दोन्ही हातांत धरून दाबून मारायचे व त्याच्या रक्ताचा टिळा त्या नवजात मुलाच्या कपाळी लावायचा अशी त्यांच्यांत चाल आहे. ही चाल त्यांच्या द्राविड उत्पत्तीची साक्ष देते. यांच्यांत काही पोटजातीहि आहेत. देवकांच्या भिन्नत्वावरून त्या बनल्या आहेत. हे लोक उंच बांध्याचे असतात. पूर्वी हे लोक अन्य जातीतल्या लोकाना आपल्या जातीत घेत; पण सांप्रत ती प्रथा बंद झालेली आहे. कलंगा पुरुषाने कोणत्याही जातीच्या स्त्रीच्या ठिकाणी प्रजोत्पादन केल्यास, ती प्रजा कलंगा जातीची समजली जाते. कलंगा स्त्रीने अन्य जातीत व्यभिचार केल्यास तिला मात्र कायमची बहिष्कृत करतात. यांचा पोषाख व दागिने छत्तिसगडी पद्धतीचे असतात.

**विवाहप्रथा** – मुलामुलींची लग्ने प्रौढपणीच होतात. वधूपिता ५ रुपये मुलीचे देज म्हणून घेतो. लग्नमंडपात मोहाच्या झाडाचा खांब रोवतात. या खांबाला वधू–वर तीन दिवस रोज सात प्रदक्षिणा घालतात. लग्नाच्या आधी गोंड माणसाकडून ग्रामदेवतेची पूजा करतात. विधवेला पुनश्च लग्न करायचे असल्यास जातीची परवानगी घ्यावी लागते. काडीमोड करतेवेळी जातीसमोर त्या स्त्रीच्या बांगड्या फोडतात. [ म. ज्ञा. को. ]

**कलगी–तुरा** महाराष्ट्रातल्या तमाशेवाल्यांत कलगीवाले व तुरेवाले असे दोन संप्रदाय आहेत. कलगी शब्दाचा अर्थ उर्दू–इंग्रजी कोशात पागोट्यात लावायचा एक अलंकार किंवा लहान वलय असा आहे. तुऱ्याचा अर्थही तोच आहे. कलगी शब्द मूळ तुर्की भाषेतला आणि तुरा अरबी भाषेतला. हे दोन्ही शब्द फारसी भाषेत जसेच्या तसे आढळतात. तिथूनच ते मराठीत आले. कलगी म्हणजे माया किंवा प्रकृती आणि तुरा म्हणजे ब्रह्म किंवा पुरुष असा त्याचा अध्यात्मपर अर्थ करतात. हा अर्थ मुळातल्या शब्दांना नाही. मराठीत तो कसा काय आला, ते कळत नाही. ते काहीही असले तरी कलगी (गजरा) व तुरा ही त्या दोन्ही संप्रदायांची बोधचिन्हे ठरली आहेत. कलगीवाल्यांना नागेश व तुरेवाल्यांना हरदास म्हणतात. कलगीवाल्यांचे निशाण भगवे असते, तर तुरेवाल्यांचे हिरवे किंवा पांढरे असते. कलगीवाले शक्तीचे उपासक तर तुरेवाले शिवाचे उपासक आहेत.

तमाशाच्या फडावर हे दोन्ही पक्ष समोरासमोर उभे ठाकतात व रात्रभर त्यांचे सवाल–जबाब होतात. कलगीवाल्यांनी सवालाची लावणी म्हणायची व तुरेवाल्यांनी जबाबाची लावणी म्हणून शेवटी कलगीवाल्यांना प्रतिसवाल टाकायचा. या स्पर्धेत जो हरेल त्याचे निशाण व डफ दुसऱ्या पक्षाने हिसकावून घ्यायचे, अशीही पद्धत आहे.

सवाल–जबाबाच्या या कवनाला भेदिक म्हणतात. भेद म्हणजे रहस्य. अर्थात् प्रकृति–पुरुषांच्या रहस्याविषयी ज्यात प्रश्नोत्तरे असतात, ते भेदिक होय. प्रकृती श्रेष्ठ की पुरुष श्रेष्ठ, किंवा शक्ती श्रेष्ठ की शिव श्रेष्ठ, अशा वादातून ही भेदिकाची कवने निर्माण झालेली असतात. कलगीवाले शक्तीला श्रेष्ठत्व देतात, तर तुरेवाले शिवाचे श्रेष्ठत्व प्रतिपादितात.

तुरेवाला प्रश्न करतो– ‘तू जी शक्ती म्हणतोस, ती उत्पन्न झाली कशी व कुठून? त्यावर कलगीवाला उत्तर देतो–

**अध ऊर्ध्व शून्य चतुर महाशून्यापासून ।**
**शून्यामधि निजले नारायण ।**
**निरंजनाच्या इच्छेमध्ये शक्ती जाली उत्पन्न ।**

पण तुरेवाल्याला शक्तीची ही थोरवी पटत नाही. तो लगेच म्हणतो–

**शिवाविण काय करिल शक्ती**
**जिवाविण काय करिल कुडी ।**
**मनावाचून कल्पना येईना**
**पाण्यावाचून जसे मोती ।**
**दीपावाचुन प्रभा पडेना**
**भावेविण आंधळी भक्ती ।**
**ज्ञानावाचून मुक्ती मिळेना**
**निष्फळ अर्थाविण पोथी ।।**

वैष्णव, दत्त, महानुभाव, इ. अन्य संप्रदायांचीही भेदिके

आढळतात. कोणत्याही पंथाशी नाते-गोते नसलेली केवळ पौराणिक अशी ही भेदिके असतात. त्यांतही मोठे गमतीदार प्रश्न विचारलेले असतात. उदा०—

**दहात बसावे दहात उठावे गोष्ट बोला खरी ।**
**बिनबापाचा पुत्र जलमला आईबि नव्हती घरी ।**

या सवालाचे उत्तर लव असे आहे. सीता कुशाला घेऊन नदीवर गेल्याचे वाल्मीकीला ठाऊक नव्हते. त्याने पाळणा रिकामा पाहिला आणि त्याला वाटले की, सीतेचे बाळ माकडांनी उचलून नेले. आता सीता परत आली आणि तिला बाळ दिसले नाही, तर ती रडून आक्रोश करील, अशी भीती वाटून वाल्मीकीने दर्भांकुरांचे अभिमंत्रण करून त्यांचे सजीव बालक बनविले आणि ते पाळण्यात निजविले. आता पाहा. लवाचा बाप राम; पण त्याचा लवाच्या जन्माशी काही संबंध नाही. बरे, सीतेने जन्म दिला म्हणावे, तर ती आश्रमातच नव्हती.

कलगी-तुऱ्यातल्या काही कूटांना वैदिक कूटाचाही आधार सापडतो. भेदिक कूटातील काही कल्पना मध्ययुगीन कालात व विशेषतः भूमध्य समुद्राच्या संस्कृतीत समान असल्याचे सांगतांना श्री. दुर्गा भागवत लिहितात— एका भेदिक लावणीत, तारकासुराने वेद तर पळविलेच; पण पृथ्वीचीही घडी करून तो पळाला, तर तो कशावरून पळाला ? असा प्रश्न मला आढळला. अगदी हाच प्रश्न जर्मनीत मध्य युगापासून चालत आलेला आहे, तो असा. ‘ ख्रिस्टोफने येशू ख्रिस्ताला खांद्यावर घेतले आहे. येशू ख्रिस्ताने सारे जग उचलून धरले आहे. मग ख्रिस्टोफ कशावरून चालतो ?’ भेदिकांच्या प्रथेसारखी ही आध्यात्मिक प्रश्नोत्तरांची प्रथा इतरत्र व्यवस्थित जोपासलेली दिसत नाही.

भेदिके रचणाऱ्या शाहिरांना अध्यात्माचे शाब्द वा प्रत्यक्षज्ञान होते असे नव्हे; पण त्यांनी पुराणांचे श्रवण चांगल्या प्रकारे केले होते. त्याना अध्यात्माचा परिचय होता तो पुराणांच्याच अनुषंगाने. ऐन उमेदीत शृंगारिक लावण्या रचणारे शाहीरही आयुष्याच्या उत्तरार्धात अध्यात्मपर भेदिक कवनांकडे वळत. तमाशाच्या फड़ातही मध्यरात्रीपर्यंत शृंगाराची उधळपट्टी झाल्यावर उत्तर रात्री अध्यात्माचा रंग थाटला जाई.

कलगी-तुऱ्याच्या या कवितेचा विस्तार अफाट आहे. तुळजापुरात आणि सातारा जिल्ह्यात अंकलखोप येथे भेदिक कवनांचो बाडेच्या बाडे रुमालात बांधून पडलेली आहेत. पण त्यांतला फारच थोडा भाग छापलेला आढळतो. आपल्या ज्ञानाचा गौप्यस्फोट होऊ नये, म्हणून हे शाहीर आपली कवने कोणाला देत नाहीत.

डफ आणि तुणतुणे याच्या साथीवर ही कलगी–तुऱ्याची गाणी गाइली जातात. ठराविक तीन चार चालींत ती गाणी म्हणतात. फडातला प्रमुख असेल, तो गाणे म्हणतो व बाकीचे त्याची ‘री’ ओढतात.

महाराष्ट्राच्या बाहेर माळवा, निमाड, उ. भारत व राजस्थान या भागातही कलगी–तुऱ्याचा प्रचार आहे. ते तुऱ्याला तुर्रा म्हणतात. वरील प्रदेशांत कलगीवाले कलगीला माता व तुर्ऱ्याला तिचा पुत्र मानतात. तुर्रावाले त्या दोघांना दंपती समजतात. त्यांच्याही आखाड्यात दोन्ही पक्ष समोरासमोर उभे ठाकून सवाल-जबाब करतात. त्या दोघांत मध्यस्थाचे काम टुंडा नामक पक्ष करतो.

कलगी पक्षाची धारणा अशी, की आदिशक्ती हीच शिवाच्या उत्पत्तीला कारण आहे. नाथसिद्धांच्या परवर्ती परंपरेतून ही धारणा त्यांच्यात आली असावी. तुर्रापक्ष शिवाला शक्तिद्वारा उत्पन्न न मानता त्या दोघांचा दांपत्यभाव धोषित करतो. कलगीपक्ष त्याच्याही पुढे जाऊन विचार करतो, की ‘जगताची उत्पत्ती ही शक्तीच्या इच्छेचे फल आहे. तिच्याच साहाय्याने शिव कर्मरत होतो. ’ या विचारात कलगीवाल्यानी वामकेश्वर तंत्राचा आधार घेतलेला दिसतो. दोन्ही पक्षावर नाथ व सिद्ध यांच्या दार्शनिक विचारांचा प्रभाव आहे. त्याचबरोबर दोन्ही पक्ष आपला सिद्धांत प्रस्थापित करण्यासाठी पुराणे, उपनिषदे, कुराणातली आयते आणि इतरही अनेक ग्रंथ यातील प्रमाणे पुढे करतात.

कलगी– तुर्ऱ्याच्या या विशिष्ट शैलीच्या उत्पत्तीविषयी निश्चित काही सांगता येत नाही. काहीचे मत आहे, की उ. प्रदेशातला बनारसीदास (कलगीपक्ष) व कवितागिरजी (तुर्रापक्ष) हे दोघे या प्रथेचे जनक होत. अन्य काहींच्या मते दक्षिणेतला शाहअली (कलगीपक्ष) व तुकनगीर (तुर्रापक्ष) या दोघांनी संयुक्तपणे या प्रथेला जन्म दिला.

माळव्यात या प्रथेचा प्रवेश १९ व्या शतकात झाला, असे कळते. त्याच्याही पूर्वी तिथे प्रश्नोत्तरपद्धती विद्यमान असावी; पण कलगी-तुर्ऱ्याच्या सवाल–जबाबांनी तिला एक नवीन लोकप्रिय स्वरूप प्राप्त झाले. एका बाजूने मुसलमान आणि दुसऱ्या बाजूने मराठे यांनी जेव्हा माळव्यात पदार्पण केले तेव्हा मुसलमानांबरोबर ख्याल आणि मराठ्यांच्या संगे लावणी त्या भागात प्रविष्ट झाली. कलगी–तुर्ऱ्याच्या गाण्यांना तिथे ख्याल असेही म्हणतात. ख्यालाच्या परंपरेने पुढे माळव्यातल्या ‘माच’ (लोकनाट्य) प्रथेशीही संबंध जोडला. माच व कलगी-तुर्रा यांतले गज़ल, झेला, दादरा, तितारी, चोतारी, इ. गेयप्रकार समान असेच आहेत.

माळव्यांतली कलगी-तुर्ऱ्याची ही प्रथा प्रथम धार्मिक होती.

ती संतांच्या वाणीनेच मुखर झाली होती. पण पुढे पुढे तिच्यावर ‘खडी बोली’चा प्रभाव पडला. रीतिकालातल्या लोककवींनी तिला शृंगाराचा साज चढविला. माळव्यात रामदंगल नावाची एक परंपरा आहे, ती या कलगी-तुर्‍याच्या प्रथेतून निघाली आहे. [म. जी; म. लो.; लो. ना. प.; श्याम परमार]

## कलचुरी राजवंश

(५५०–१७४० इ. स.) भारताच्या प्राचीन इतिहासात कलचुरी राजवंशाला अनेक दृष्टींनी महत्त्वाचे स्थान आहे. सुमारे १२०० वर्षे या राजवंशाने भारतातल्या कोणत्या ना कोणत्यातरी प्रदेशावर राज्य केले. दीर्घकालीन सत्ता एवढेच या राजवंशाचे वैशिष्टच नाही तर या वंशात अनेक थोर कीर्तीचे राजे होऊन गेले. त्यांनी साम्राज्ये स्थापली; शिवाय विद्या-कलांनाही उदार आश्रय दिला.

या वंशातले बहुतेक राजे शैव संप्रदायातील पाशुपत पंथाचे अनुयायी होते. त्याच्या आर्थिक बळावरच त्या पंथाचा सर्वत्र प्रसार झाला. त्यानी बाधलेली उत्तुंग मंदिरे आता बहुधा भग्न झाली आहेत; पण त्यांचे जे काही अवशेष आढळतात, त्यांवरून तत्कालीन स्थापत्याची श्रेष्ठता प्रत्ययाला येते.

कलचुरी राजांनी आपला वंशसबध पुराणप्रसिद्ध कार्तवीर्य हैहयाशी जोडला होता. ६ व्या शतकाच्या अखेरीस दिलेल्या काही दानपत्रांत त्यांचा हैहयवंशीय असा निर्देश आढळतो. त्यावरून त्याच कालात कलचुरीनी आपला संबंध हैहयांशी जोडला असावा, असे दिसते.

कलचुरी हे माहिष्मती नगरीत उदयास आले. ही नगरी नर्मदा नदीने सर्व बाजूनी वेढलेली होती, असे दिसते. ‘यन्मेखला भवति मेकलशैलकन्या’= मेकल पर्वताची कन्या नर्मदा माहिष्मतीची मेखला झाली आहे, असे राजशेखर म्हणतो. प्राचीन काळी कार्तवीर्य हैहयांची हीच राजधानी होती. त्यामुळेच आपल्या वंशाच्या पुराणप्रसिद्धतेसाठी कलचुरीना माहिष्मतीच्या हैहयांशी आपले नाते जोडण्याची कल्पना सुचली असावी.

**कृष्णराज–** या कलचुरिकुलाचा मूळ पुरुष कृष्णराज हा होय. याने इ. स. ५५० ते ५७५ या कालावधीत माहिष्मतीवर राज्य केले. याची नाणी राजस्थान, माळवा, मुंबई, सातारा, नासिक, अमरावती, बैतुल या विभागांत सापडली आहेत. त्यांवरून एवढ्या विस्तृत प्रदेशावर कृष्णराजाचे राज्य पसरले होते, असे दिसते.

याच सुमारास विदर्भातील बलाढ्य अशा वाकाटक वंशाचा अस्त झाला होता. कोकण, गुजरात व उ. महाराष्ट्र या प्रदेशावर राज्य करणारे त्रैकूटक राजे या काळातच हतप्रभ होऊ लागले होते. या अनुकूल सधीचा फायदा घेऊन कृष्णराजाने आपल्या राज्याचा विस्तार केला. कृष्णराजानंतर त्याचा पुत्र शंकरगण हा राज्यावर आला. याने इ. स. ५७५ ते ६०० या काळात राज्य केले.

**बुद्धराज–** शंकरगणाचा पुत्र बुद्धराज हा इ. स. ६०० च्या सुमारास गादीवर आला. त्यानंतर थोड्याच कालात दक्षिणेतील बदामीच्या मंगलेश चालुक्याने बुद्धराजाच्या साम्राज्याच्या दक्षिण भागावर स्वारी केली. या स्वारीत बुद्धराजाचा पराभव झाला. त्यापुढे पुलिकेशी या चालुक्य राजाने तर बुद्धराजाच्या अमलाखालचा महाराष्ट्रही हिसकावून घेतला.

या पराभवानंतर कलचुरींना वाईट दिवस आले. पुढे दीड-पावणेदोनशे वर्षे त्यांना पराभूत अवस्थेतच राहावे लागले. त्यांनी फिरून एकवार गतवैभव मिळविण्याचा प्रयत्न केला खरा; पण त्यातही त्यांना अपयशच आले. त्यानंतर चालुक्याचे स्वामित्व मान्य करूनच त्यांना दिवस कंठावे लागले.

**वामराजदेव–** इ. स. ७ व्या शतकाच्या अखेरीस त्या वंशात वामराजदेव नावाचा एक महत्त्वाकांक्षी राजा उत्पन्न झाला. दक्षिणेत चालुक्य आपली मात्रा चालू देत नाहीत, असे दिसून येताच त्याने उत्तरेकडे आपली नजर वळविली. त्याच्या काळात कनौजच्या सम्राट हर्षाचे निधन झाले होते व सर्वत्र गोंधळ माजला होता. या परिस्थितीचा फायदा घेण्याचे ठरवून त्याने कालंजर या दुर्भेद्य किल्ल्यावर आक्रमण करून तिथे आपले ठाणे बसविले. तिथून बुंदेलखंड, बघेलखंड व त्यापुढे गंगा पार करून प्रतापगड, रायबरेली, गोरखपूर हा उत्तरेचा प्रदेश पादाक्रांत करून त्याने श्वेतपद (गंडकी नदीच्या पलीकडचा गोरखपुरचा प्रदेश) येथे लक्ष्मणराज नावाच्या आपल्या धाकट्या भावाची स्थापना केली. या लक्ष्मणराजाच्या वंशजानी त्या प्रदेशावर कित्येक पिढ्या राज्य केले. त्यांना सरयूपारचे कलचुरी असे म्हणत.

वामराजदेवाच्या काळापासून कलचुरींना चेदी देशाचे अधिपती किंवा चैद्य म्हणू लागले. प्राचीन काळी या चेदी देशात यमुनेच्या दक्षिणेचा आणि चंबळेच्या आग्नेयीचा नर्मदेपर्यंतचा प्रदेश अंतर्भूत होत असे. या प्रदेशात त्रिपुरी किंवा आधुनिक तेवर हे नगर होते. कलचुरींचे राज्य या त्रिपुरीत स्थापन झाले. वामराजदेव हा या राज्याचा संस्थापक होय. म्हणूनच त्याचे नाव त्याच्या वंशजांच्या सर्व ताम्रपटांत आदराने नमूद केलेले आढळते.

इ. स. ८२५ ते ८५० या काळात लक्ष्मणराज (पहिला) याने राज्य केले. त्यानंतर कोकल्ल (पहिला) हा गादीवर

आला. हा राजा महत्त्वाकांक्षी होता. त्याने कनोजच्या प्रथम-भोजास साहाय्य करून व वेंगीच्या चालुक्यांविरुद्ध राष्ट्रकूटांना मदत करून आपले महत्त्व प्रस्थापित केले. त्याने चंदेल राज-कन्या नट्टादेवी हिच्याशी विवाह करून मध्यभारतातील चंदेल राजवंशाशी मैत्रीचे सबंध जोडले. अशा प्रकारे उत्तर-दक्षिण भारतात कोकल्लाने आपले बरेच वर्चस्व प्रस्थापित केले. इ. स. ८५० ते ८९० पर्यंत त्याने राज्य केले असावे.

याचा मंत्री सोमेश्वर हा मोठा विद्वान होता. त्याने कारीतलाई येथे सोमस्वामीचे उत्तुंग मंदिर बांधून त्याच्या जवळच सोमस्वामीपुर नावाचा अग्रहारही वसविला. या मंदिराला लक्ष्मणराज व त्याचा पुत्र शंकरगण ( तिसरा ) यांनी काही ग्रामांचे दान केले आहे.

लक्ष्मणराजानतर शंकरगण गादीवर बसला. कलचुरी नृपती बहुधा शिवोपासक असत; पण शंकरगण मात्र वैष्णव होता




त्यानंतर या वंशातला प्रतापी राजा युवराजदेव हा होय. तत्कालीन भारतीय राजांत याला मोठा मान होता. त्याचा पुत्र द्वितीय लक्ष्मणराज हाही महाप्रतापी निपजला. याने दक्षिण कोसलावर (छत्तीसगड) इतकेच नव्हे; तर पुढे ओडिसापर्यंत चाल करून तिथल्या राजांचा पराभव केला. ओडिसाच्या अधिपतीकडून त्याने कालिय नागाची रत्नजडित सुवर्णमूर्ती हस्तगत करून ती सौराष्ट्रातल्या सोमनाथाला अर्पण केली.

त्यानंतरचा आणखी एक पराक्रमी कलचुरी नृपती म्हणजे कोकल्ल ( दुसरा ) हा होय. त्याने कनोजच्या राज्यपालाचा, गौडाच्या महीपालाचा व कुंतलेश पंचम विक्रमादित्य याचा पराजय केला. मथुरेजवळ गझनीच्या महंमुदाशी सामना देणाऱ्या कुलचंद नामक एका राजाचा मुसलमान इतिहासकार उल्लेख करतात. हा कुलचंद म्हणजे द्वितीय कोकल्ल हाच असावा, असे इतिहासवेत्त्याचे अनुमान आहे.

द्वितीय कोकल्लाचा मुलगा गागेयदेव हा होय. हा इ. स. १०१५ च्या सुमारास गादीवर आला. याने आपले सामर्थ्य वाढवून, तसेच परमार, भोज आणि चोल राजेंद्र यांच्याशी सख्य करून कुंतलनृपती जयसिह याच्यावर स्वारी केली. याने गंगा-यमुनांच्या दुआबातला प्रदेशही जिकून घेतला. पुढे काशीही जिकली व प्रयाग येथे आपली दुसरी राजधानी स्थापली. प्रयाग येथेच त्याचा मृत्यू झाला व त्याच्या बरोबर त्याच्या शंभर राण्या सती गेल्या, असे एका कोरीव लेखात म्हटले आहे.

**कर्णदेव**— गांगेयानंतर इ. स. १०४१ मध्ये त्याचा पुत्र कर्ण हा गादीवर आला. हा बापाच्या सवाई पराक्रमी निघाला. आपल्या कारकीर्दीच्या पहिल्या ७ वर्षातच त्याने अनेक विजय मिळविले. थोडयाच कालात तो समग्र उ. भारताचा चक्रवर्ती बनला. इ. स. १०५२ मध्ये त्याने स्वत.ला चक्रवर्तीपदाचा अभिषेकही करून घेतला. त्या काळात कर्णाच्या तोडीचा सेनापती भारतात दुसरा कोणी नव्हता, असे सांगतात. त्याने वाराणसी येथे कर्णमेरू नावाचे बारा मजल्यांचे गगनचुंबी शिवालय बांधले. त्याचे अवशेष राजघाटाजवळ अद्यापि दिसातत. वाराणसीजवळच त्याने कर्णावती नावाचा एक अग्रहार स्थापला. कर्णाने इ. स. १०४१ ते अंदाजे १०७३ पर्यत राज्य केले.

कर्णाची आवल्लदेवी नावाची एक राणी होती. ही हूण राजकन्या होती. तिच्यापासून झालेला यश:कर्ण नामक पुत्र कर्णानंतर गादीवर बसला. या यश:कर्णाने आंध्रावर स्वारी करून वेंगीचा चालुक्य नृपती सप्तम जयादित्य याचा पराभव केला. मात्र त्यापुढे यश:कर्णाच्या सत्तेला व वैभवाला उतरती कळा लागली. गाहडवालवंशी चंद्रदेव याने कनोज व त्याच्या लगतचा प्रदेश यश:कर्णाच्या ताब्यातून हिसकावून घेतला. पुढे त्याला वाराणसीही सोडून त्रिपुरी येथील आपल्या मूळ राजधानीला परत यावे लागले. त्याच्या कारकीर्दीपासून कलचुरीची सर्वत्र पीछेहाटच झाली. त्यांचे राज्य बघेलखंडापुरतेच मर्यादित झाले. विजयसिंह हा त्रिपुरी शाखेचा शेवटचा ज्ञात राजा होय.

**रत्नपूरचे कलचुरी**— इ. स. नवव्या शतकाच्या अखेरीस त्रिपुरीच्या कलचुरीनी द. कोसलात आपली शाखा स्थापन केली. प्रथम कोकल्लाचा पुत्र द्वितीय शंकरगण याने कोसलनृपतीपासून पालिदेश जिंकल्याचा निर्देश कोरीव लेखात आहे. त्याने तिथे आपल्या लहान भावाची नेमणूक केली. त्याची राजधानी तुम्माण (सध्याचे विलासपूर जिल्हयातील तुमाण) येथे होती. तिथे कलचुरींच्या दोनतीन पिढयांनी राज्य केले असावे. नंतर सुवर्णपूर (सोनपूर) येथील सोमवशी राजांनी या शाखेचे उच्चाटन केले, असे दिसते. पुढे कोकल्लदेवाच्या वेळी (९९० ते १०१५ इ. स.) कलिगराज नामक कलचुरी राजपुत्राने द. कोसलदेश जिकून तुम्माण नगरातच आपली राजधानी स्थापली. त्याचा पुत्र कमलराज याने त्रिपुरीच्या गांगेयदेवाला उत्कलच्या स्वारीत बरेच साहाय्य केले. त्याचा पुत्र रत्नराज याने रत्नपूर नामक नगर वसवून तिथे आपली राजधानी स्थापली. इ. स. १०६५ च्या सुमारास रत्नदेवाचा पुत्र पृथ्वीदेव ( पहिला ) हा गादीवर आला. हा आपणास सकलकोसलाधिपती म्हणवतो. याच्या कारकीर्दीत छत्तीसगडातील बराच भाग कलचुरी राज्याला जोडला गेला.

पृथ्वीदेवाचा पुत्र जाजल्लदेव याची गणना या वंशातील प्रमुख राजांमध्ये केली जाते. त्याने वैरागड, लांजिका (लांजी), भाणार (भंडारा), तलहारी, इ. प्रदेश जिंकले. शिवाय त्याने



कलचुरीकालीन विष्णुमंदिर—जाजगीर

दंडकपूर, आंध्र, किमिडी (गंजाम) इ. दूरदूरच्या प्रदेशांवर स्वाऱ्या करून विजय मिळविले. जाजल्लदेवाने बस्तर जिल्हयांतील सोमेश्वर, सुवर्णपूरचा भुजबळ व उत्कल देशाधिपती यांनाही पराभूत केले. कनोजचे गाहडवाल व जेजाकभुक्तीचे चंदेल या राजांशी त्याचे मैत्रीचे संबंध होते. त्याने त्रिपुरीच्या मुख्य कलचुरी शाखेचे स्वामित्व झुगारून देऊन स्वतंत्र कारभार सुरू केला आणि स्वत:च्या नावाची सोन्याची व तांब्याची नाणी पडली. त्याने जाजल्लपूर नामक नवे नगर वसविले. ते सध्या जांजगीर या नावाने विद्यमान आहे.

जाजल्लदेवाचा पुत्र रत्नदेव याच्या कारकिर्दीत (११२०–३५) त्रिपुरीचा गयाकर्ण व गंगराजा चोडगंग यांनी त्याच्या राज्यावर स्वाऱ्या केल्या; पण रत्नदेवाने त्यांचा पराभव केला. त्याने विद्या व कला यांनाही उदार आश्रय दिला.

रत्नदेवाचा पुत्र पृथ्वीदेव (पहिला) हाही पराक्रमी होता. त्याने कलिंगावर स्वारी करून गंगराजा मधुकामार्णव याला बंदिवान केले.



कलचुरीची नाणी

इ. स. ११६५ च्या सुमारास गादीवर आलेला द्वितीय जाजल्लदेव पराक्रमी होता; पण त्याच्यानंतर कोसलदेशात बंडाळी माजली. १२ व्या शतकाच्या अंतापर्यंत आणखी दोन तीन राजांनी तिथे राज्य केले. त्यानंतरचा सुमारे ५०० वर्षांचा इतिहास उपलब्ध नाही. १८ व्या शतकात छत्तीसगडावर मराठ्यांचे आक्रमण होईपर्यंत तिथे हैहयांचे राज्य कसेबसे टिकून होते. त्या राज्यात अनेक स्वतंत्र छोटी संस्थानही होती. त्यांनी मराठ्यांचे स्वामित्व लगेच कबूल केले. अशा रीतीने द. कोसलातील कलचुरी राज्याचा शेवट झाला. [ क. नू का. ]

**कलचुरी शक** याला चेदिसंवत किंवा त्रैकूटक संवत अशी-ही नावे आहेत. हा शक कोणी सुरू केला याबद्दल विद्वानांत मतभेद आहेत. डॉ. भगवानलाल इंद्रजी यांच्या मतें महाक्षत्रप ईश्वरदत्त, डॉ. फ्लीट यांच्या मतें ईश्वर दत्त किंवा त्याचा बाप शिवदत्त व श्री. रमेशचंद्र मुजुमदार यांच्या मतें कुशाणवंशी कनिष्क हा या शकाचा प्रवर्तक असावा. पण ही सर्व अनुमानेच आहेत. हा शक ज्या लेखात सांपडतो ते लेख चालुक्य, गुर्जर, सेंद्रक, कलचुरी व त्रैकूटक वंशी पुरुषांचे असून ते गुजरात, मध्यप्रांत व कोकण या भागांतच आढळून येतात. ज्या अर्थी या शकाला कलचुरी किंवा चेदी हे नाव दिलेले आहे, त्या अर्थी त्या वंशातल्याच एखाद्या राजाने हा शक सुरू केला असणे शक्य आहे. या शकाचा प्रारंभ इ. स. २४९ या वर्षी २६ ऑगस्ट किंवा हिंदु पंचांगाप्रमाणे कार्तिक शुद्ध १ दा या दिवसापासून होतो, असे डॉ. कीलहॉर्न यांनी गणित करून सिद्ध केले आहे. या शकाचा निर्देश करणारा सर्वांत अलीकडचा लेख इ. स. ९५८ सालातला आहे. हा शक इ. स. च्या १३ व्या शतकापासून लुप्त झाला असावा असे दिसते [ म. ज्ञा. को. ]

**कलंदकनिवाप** राजगृहातल्या (राजगीर) वेळुवनानजीकचा अरण्यमय प्रदेश. इथे बुद्ध काही काल राहिला होता. इथे खारींना (कलंदक) खाण्यासाठी राजाकडून नियमितपणे धान्य टाकले जात असे म्हणून या प्रदेशाला हे नाव मिळाले. इथे बुद्धाचे वास्तव्य असताना 'गिरिग्ग समज्जा' नामक संगीतोत्सव झाला होता व त्याला सहा भिक्षुसंघ उपस्थित होते, अशी माहिती विनयपिटकात दिलेली आहे (२.१०७).

**कलंदर** (१) एक जात. या शब्दाची व्याख्या अशी–'कलं शास्त्रविहितवाक्यं शिष्टाचारं वा दृणाति' = कल म्हणजे शास्त्रविहित वाक्य किंवा शिष्टाचार; त्याचा जो आदर करीत नाही किंवा त्याचा जो भंग करतो तो कलंदर होय. लेट जातीच्या पुरुषापासून तीवर कन्येच्या ठिकाणी उत्पन्न झालेल्या पुरुषाला कलंदर म्हणावे असे ब्रह्मवैवर्त पुराणात म्हटले आहे. [ श. क. ]

(२) फकीर किंवा बैरागी यांचा एक वर्ग. [ डि. इ. ]

**कलभ्र** दक्षिणेतील एक प्राचीन राजवंश. याच्याविषयी अगदी अलीकडच्या काळापर्यंत कोणालाच फारशी माहिती नव्हती. नाव माहीत होते; पण स्थाननिश्चय होत नव्हता. मात्र अलीकडे उपलब्ध झालेल्या काही पुराव्यावरून (वेल्विकुडि-प्लेट्स) कलभ्र हे तमिळनाडमधले होते, हे आता निश्चित झाले आहे. इ. स. ५ व्या शतकापासून ७ व्या शतकापर्यंत ते दक्षिणेत धुमाकूळ घालीत होते असे दिसते. पांड्यांच्या प्रदेशावर त्यांनी आक्रमण केले होते. चोळ व चेर या राजांशीही त्यांचे संबंध आले होते. काही विद्वानांच्या मते कलभ्र हे सांप्रतच्या कलवार जातीचे लोक होत. 'संघम' कालीन तमिळ वाङ्मयात या विधानाला पुष्टी देणारे उल्लेख आढळतात. [ डॉ. एस्. के. अय्यंगार ]

**कलमा** 'ला इलाह इल्लिल्लाह–' हे वाक्य म्हणजे इस्लामचा मूलमंत्र आहे. त्यालाच कलमा असे म्हणतात. इस्लामच्या अनुयायांचे असे सांगणे आहे, की प्रत्येक मुसल-

मानाने आयुष्यात एकदा तरी या मंत्राचा उद्‌घोष केला पाहिजे. [ हि. सा. को. ]

**कलरचिंग** दक्षिणेतील त्रेसष्ट नायन्मारांपैकी एक. हा पल्लव वंशातला राजा निस्सीम शिवभक्त होता. एकदा याचा तिरुवारूर या शिवक्षेत्रात मुक्काम असता त्याच्या राणीने देवाच्या बागेतले एक फुल खुडून हुंगले. त्या अपराधाबद्दल तिथल्या सेरुथनाइ नायन्माराने राणीचे नाक कापले. पण ती शिक्षा अपुरी वाटून राजाने तिचा हातही तोडला. त्यावरून त्याची एकान्तिक शिवभक्तात गणना झाली.

**कलरी** केरळात नायराच्या प्रत्येक वसाहतीत एक भगवतीचे मंदिर असते. प्राचीन काळी त्या मंदिराच्या आवारात एक आखाडा असे. त्या आखाड्यांत प्रत्येक नायर तरुणाला कुस्ती, मुष्टियुद्ध, द्वंद्वयुद्ध इ. प्रकारांचे शिक्षण तज्ज्ञ गुरूकडून दिले जात असे. इथे अंगाला मालिशही करीत असत.



कलरीत चालणारे मालिश

त्यामुळे त्वचा नितळ होई व व्यायामाने देह पिळदार बने. अशा प्रकारे कलरीत तयार झालेले तरुणच सैन्यात भरती केले जात. केरळातील महामखम् उत्सवाच्या वेळी युद्धविद्येच्या आणि शस्त्रनैपुण्याच्या स्पर्धा होत असत. [ सो. चें. म.; केरळ. ]

**कलवार** एक हिंदू जात. बिहार, ओडिसा व उ. प्रदेश या भागात यांची वस्ती आहे. मोहाच्या फुलापासून व साखरेपासून दारू गाळणे हा यांचा मुख्य व्यवसाय आहे. सांप्रत ते शेतीही करतात. रिस्लेच्या मते कलवार ही बनियांपैकी एक पतित शाखा असावी. चंपारण्यातले कलवार सोडले, तर इतर भागांतल्या कलवारात घटस्फोट रूढ नाही. हे धार्मिक कृत्यासाठी पतित ब्राह्मणांना बोलावतात. यांचा सामाजिक दर्जा तेल्यांप्रमाणे आहे.

हे वैष्णव आहेत. विष्णूशिवाय हे सोखा, काली, गोरिया, बरमदेव इ. अनेक देवतांना भजतात. काही पोटजाती पशुबलीही देतात. उ. प्रदेशातले कलवार थोडे सुधारलेले आहेत. ते मातादेवी, फूलमती, हरदौल, पंचनपीर व मदैन या देवतांना भजतात. मदैन ही त्यांची मद्यदेवता असून दारू गाळण्याच्या हंगामात तिची पूजा केली जाते. तिच्या नावाने शपथ घेतल्यास ते ती मोडीत नाहीत. कडुलिंब व पिंपळ या वृक्षांना हे लोक फार पवित्र मानतात व त्यांच्या मुळांत होमही करतात. कलवारांच्या प्रत्येक घरात देवघर असते व त्यात गृहदेवतेची स्थापना असते. गाझीमियाँचे प्रतीक म्हणून एक लोखंडी भाला गृहदेवतेजवळ ठेवतात व मूल जन्मल्यावर त्याची पूजा करतात. मध्यप्रदेशातले कलवार दुल्हादेवाला भजतात. सोन्याच्या किंवा रुप्याच्या तबकडीची रातमा या नावाने पूजा करतात. होळीच्या वेळी पूर्वजांची पूजा करतात. काही सुधारलेले लोक भगवानाचे उपासक बनले आहेत. काही लोक सूर्याचेही उपासक आहेत. ते रविवारी उपास करतात. [ एन्सा. रि. ए.; रे. क. इं. ]

**कलवो** गुजरातेत श्रीगौड ब्राह्मणाच्या लग्नातला एक सोपस्कार. महाराष्ट्रात नवऱ्या मुलाला रुखवत नेतात, त्याप्रमाणे श्रीगौडांतली वधूमाता गुळपापडीचे पाच लाडू, पाणी, अक्षता, कुंकू व दही हे पदार्थ घेऊन वराच्या जानोश्यात जाते. प्रथम वराला दही देऊन मग लाडू खाऊ घालते. या कृत्याला कलवो म्हणतात. [ ल. वि. सो. ]

**कलश** गोलाकार, उभट पात्र. हेमाद्रीच्या व्रतखंडात या शब्दाची व्युत्पत्ती पुढीलप्रमाणे दिली आहे–

**कलं कलं गृहीत्वा च देवानां विश्वकर्मणा ।**
**निर्मितो यः सुरैर्यस्मात् कलशस्तेन उच्यते ।।**

अर्थ – विश्वकर्म्याने देवांच्या कलेकलेचे ग्रहण करून निर्मिल्यामुळे त्याला कलश असे म्हटले जाते.

सुरासुर अमृताच्या प्राप्तीसाठी क्षीरसागराचे मंथन करीत असता अमृत धारण करण्यासाठी विश्वकर्म्याने याची निर्मिती केली, अशी याच्या उत्पत्तीची कथा आहे ( कालिकापुराण ८७ ). कलशाची मोजमापे तंत्रसारात पुढीलप्रमाणे सांगितली आहेत–

**पञ्चाशदङ्गुलव्याम उत्सेधः षोडशाङ्गुलः ।**
**कलशानां प्रमाणं तु मुखमष्टाङ्गुलं स्मृतम् ।।**

अर्थ– ५० अंगुळे परिघ, १६ अंगुळे उंची व ८ अंगुळे मुख असे कलशाचे प्रमाण सांगितले आहे.

कलशांचे ९ प्रकार असून त्यांची नावे पुढीलप्रमाणे आहेत– (१) क्षितींद्र (२) जलसभव (३) पवन (४) अग्नी (५) यजमान (६) कोशसंभव (७) सोम (८) आदित्य व (९) विजय. यांपैकी विजयकलश पीठाच्या मध्यभागी स्थापतात व बाकीचे ८ पूर्व, पश्चिम, वायव्य, आग्नेयी, नैर्ऋत्य, ईशान्य, उत्तर व दक्षिण अशा अनुक्रमे अष्ट दिशांना स्थापतात.

कलशाच्या ठिकाणी कोणकोणत्या देवतांचे कोणकोणत्या भागात वास्तव्य असते, ते पुढील श्लोकात सांगितले आहे–

**कलशानां मुखे ब्रह्मा ग्रीवायां शङ्करः स्थितः ।**
**मूले तु संस्थितो विष्णुर्मध्ये मातृगणाः स्थिताः ।**
**दिक्पाला देवताः सर्वे वेष्टयन्ति दिशो दश ।**
**कुक्षौ तु सागराः सप्त सप्तद्वीपाश्च संस्थिताः ।।**
**नक्षत्राणि ग्रहाः सर्वे तथैव कुलपर्वताः ।**
**गङ्गाद्याः सरितः सर्वा वेदाश्चत्वार एव च ।।**
**कलशे संस्थिताः सर्वे तेषु तानि विचिन्तयेत् ।**

(कालिकापुराण ८७)

अर्थ– कलशाच्या मुखाच्या ठिकाणी ब्रह्मा, गळ्याच्या ठिकाणी शंकर, मूलभागी विष्णू, मध्यभागी मातृकागण व दशदिशांना वेष्टून दिक्पाल वास्तव्य करतात. त्याच्या पोटात सप्तसागर, सप्तद्वीपे, ग्रहनक्षत्रे, कुलपर्वत, गंगादी सरिता व चार वेद असतात. या सर्व देवतांचे कलशाच्या ठिकाणी चिंतन करावे.

विवाहादी मंगल कार्यात, शांतिकर्मात, स्वारीवर निघण्याच्या वेळी व राज्यारोहणप्रसंगी प्रथम धान्यराशीवर कलशस्थापना करतात. पुण्याहवाचनाच्या वेळी दोन कलश स्थापतात. त्या कलशांत सोने, रुपे, मोती, पाचू आणि प्रवाळ ही पंचरत्ने घालतात. दूर्वा व पंचपल्लव यांनी तो सुशोभित करतात. पुष्कळदा त्याला कोरे वस्त्र वेष्टितात. त्यावर मग पूर्णपात्र किंवा नारळ ठेवतात. जसे विधान असेल, त्याप्रमाणे कलशांची संख्या एकपासून एकशेआठपर्यंतही असू शकते. वरुणाची पूजा कलशावरच करतात. विधान पूर्ण झाल्यावर त्या कलशातल्या जलाने ब्राह्मण, यजमानदंपतीला व त्याच्या परिवाराला मूर्धाभिषेक करतात. त्या वेळी 'समुद्र ज्येष्ठाः सलिलस्य मध्याः–' इ. वैदिक सूक्ते म्हणतात.


मांगलिक कलश

**कलशाचे प्राचीनत्व–** कलश हा वेदकालापासून परिचित आहे. ऋग्वेदात त्याचे उल्लेख मिळतात (१.११७.१२; ३. ३२.१५). ऋग्वेदातला हा कलश मातीचा किंवा भोपळ्याचा बनविलेला असे. याशिवाय द्रोणकलश, पूतभृत् व आधवनीय असे आणखी कलश वैदिक साहित्यात आढळतात. आधवनीय आणि पुतभृत् म्हणजे सोमरस साठविण्यासाठी तयार केलेले मातीचे मोठे कलश होत. द्रोणकलश हा द्रोणाच्या आकाराचा, चौकोनी किंवा वाटोळा असावा असे सांगितले आहे. पुढच्या काळात कलश हे सोने, चांदी व तांबे या धातूंचे करू लागले. सांप्रत मंगलकार्यात ताम्रकलशच वापरतात.

बौद्ध धर्मातील पुरातन प्रतीकांपैकी कलश हे एक प्रतीक आहे. उपयुक्त पात्र व रहस्यमय प्रतीक अशा दोन्ही अर्थांनी कलश बौद्ध धर्मात आढळतो. कलशाची योजना व्यवहारात पाणी व तत्त्वज्ञानात जीवनामृत साठविण्यासाठी असते. कलश हे अवलोकितेश्वराचे एक विशेष अभिज्ञान चिह्न आहे. अवलोकितेश्वर आपल्या जवळच्या कलशात करुणामृत साठवून ठेवतो, अशी कल्पना आहे. बौद्ध धर्मात पाच मोठे सच्छिद्र कलश पाच ज्ञानी बुद्धाची प्रतीके म्हणून वेदीवर ठेवतात.


उभट कलश–बौद्ध

बौद्ध धर्म अस्तित्वात येण्यापूर्वीही लहानमोठ्या समारंभात कलशाची योजना असे. राजाला राज्याभिषेक करण्याच्या प्रसंगी सिंहासनाजवळ चतुःसमुद्रांच्या जलाने भरलेले चार कलश ठेवीत. या राजाचे राज्य समुद्रवलयांकित (सार्वभौम) आहे किंवा होवो, ही भावना त्या कलशस्थापनेच्या मागे असे. त्याच कलशातील जलाने राजाला अभिषेक करीत. रामचंद्राच्या राज्याभिषेकाचे वर्णन कालिदासाने अशाच प्रकारे केले आहे.

**सरित्समुद्रान्सरसीश्च गत्वा**
**रक्षःकपीन्द्रैरुपपादितानि ।**
**तस्यापतन्मूर्ध्नि जलानि जिष्णो –**
**र्विन्ध्यस्य मेघप्रभवा इवापः ।**

(रघु. १४ ८)

अर्थ– राक्षस व वानर यांच्या नायकांनी भिन्न भिन्न नद्या, समुद्र व सरोवरे याच्यातून आणलेली जले, मेघातले पाणी

विंध्याच्या डोक्यावर पडावे, त्याप्रमाणे (सुवर्णकलशातून) जयशील रामाच्या मस्तकावर पडली.

कलशाची योजना भारतीय शिल्पकलेतही बऱ्याच प्रमाणात दिसून येते. कमलपुष्पांनी युक्त असे नक्षीदार कलश भरहूत, सांची, अमरावती, येथील बौद्ध शिल्पात आढळतात. मंदिरातले व लेण्यांतले स्तंभ मुख्यत्वे कमल आणि कलश याच्या संयोगानेच घडविलेले दिसतात. मंदिराच्या शिखरावर शेवटी जो कळस



मंदिराचा कळस

असतो, तो कलशच होय. खाली कलश व त्यावर उभा नारळ ठेवूनच शिखराचे काम पूर्ण होते. भारतीय शिल्पांतला कलश वाटोळा किंवा अंड्याच्या आकाराचा असतो, तर गांधार शिल्पातला टोकदार असतो. मैत्रेय बोधिसत्त्व, वसुधारा, या बौद्ध देवता व धन्वंतरी ही पौराणिक देवता, या कलशधारी आहेत. कुबेराचा उजवा पाय एका लवंडलेल्या कलशावरच दाखवितात.

**आध्यात्मिक प्रतीक**– कलश हे एक आध्यात्मिक प्रतीक आहे. कलश म्हणजे मानवशरीर आणि जल म्हणजे त्यातले जीवनतत्त्व होय. शरीर म्हणजे एक मातीचे भांडे हे खरे; पण चैतन्यरूपी तत्त्वाने भरून राहिल्यामुळे ते सुवर्णकलशाहूनही अधिक मूल्यवान ठरले आहे. भारतीय कलाकारांनी पूर्ण कुंभ किंवा पूर्ण कलश या रूपात चैतन्यपूर्ण मानवशरीराची मधुर कल्पना साकार केली आहे. पूर्ण कलशाच्या मुखावर ठेवलेले पुष्पपल्लव हे जीवनसमृद्धीचे द्योतक होत. कलशातल्या दूर्वा



मांगलिक कलश

या सकल जीवसृष्टीच्या मुळचा समजाव्या आणि पंचरत्ने ही पंचभूते, पंचेंद्रिये, पंचविषय यांची प्रतीके मानावी. जोवर मानवशरीर चैतन्याने परिपूर्ण आहे, तोवरच ते दर्शनीय असते. चैतन्य लुप्त झाले, की लगेच ते अमंगल होते. रिकामा घडा म्हणजे केवळ खापरच समजावे. [वेदविद्या; गॉ. नॉ. बु.; भा. प्र. वि.; वे. इं.]

**कलश गलन** मुंडारी लोकांचा एक लग्नविधी. सदन व उराँव लोकही हा विधी करतात. पुष्कळ संतती व्हावी, हा या विधीचा उद्देश असतो. वर व वधू या दोघांच्याही घरी हा विधी होतो. या वेळी ग्रामदेवतांना लाल कोंबड्याचा बळी देतात, भाताच्या दारूचा नैवद्य दाखवितात व नंतर ती दारू जमलेल्या लोकांना वाटतात. या वेळी वराची आई व भावजय या दोघी कलश व टोपली डोक्यावर ठेवून नाचत नाचत घरात प्रवेश करतात. [एन्सा. मुं.]

**कलशदान** सुख – शांती प्राप्त होण्यासाठी कलशदान करावे, असे दानचंद्रिकेत सांगितले आहे. त्याचा मंत्र असा –

**कलशः शुभदो भव्यो जलेन परिपूरितः।**
**दानेनास्य महत्सौख्यं शान्तिरस्तु सदा मम ।।**

अर्थ – शुभकारक, भव्य आणि पाण्याने भरलेल्या कलशाचे दान केल्याने मला अत्यंत सुख आणि शांति लाभो.

**कलशपूजा** कोणत्याही देवाची पूजा करीत असता प्रथम शुद्धोदकाने भरलेल्या कलशाची पूजा करतात. त्या वेळी 'कलशस्य मुखे विष्णु.' इ. श्लोक म्हणतात. नंतर त्यातील पाणी तुलसीपत्राने सर्व पूजासाहित्यावर प्रोक्षण करतात. तेव्हा पुढील मंत्र म्हणतात—

**अपवित्रः पवित्रो वा सर्वावस्थां गतोऽपि वा ।**
**यः स्मरेत् पुण्डरीकाक्षं सबाह्याभ्यन्तरः शुचिः ।।**

या प्रोक्षणाने पूजासाहित्याची शुद्धी झाली असे समजतात.

**कलशवास्तुचक्र** हे चक्र गृहप्रवेशाच्या वेळी विचारात घेतात. प्रवेशकाळी सूर्य ज्या नक्षत्रात असेल, ते नक्षत्र वास्तुरूप कलशाच्या मुखावर असते. त्याचे फल गृहदाह. त्यापुढची चार नक्षत्रे कलशाच्या पूर्वभागी असतात. त्यावर गृहप्रवेश केल्याचे फळ उद्वासन (निर्वासन). त्यापुढची चार नक्षत्रे कलशाच्या दक्षिणभागी. त्यावर प्रवेश केल्यास द्रव्यलाभ. त्यापुढची चार नक्षत्रे पश्चिमभागी. त्यांचे फल समृद्धी. त्यापुढची चार नक्षत्रे उत्तरभागी. त्यांचे फल कलह. त्यापुढची चार नक्षत्रे कलशाच्या गर्भात. त्याचे फल विनाश. त्यापुढची तीन नक्षत्रे कलशाच्या बुडावर. त्यांचे फल स्थैर्य. त्यापुढची तीन नक्षत्रे गळ्यावर. त्यांचे फलही स्थैर्य हेच आहे. या कलशवास्तुचक्राचे तात्पर्य असे —

सूर्यनक्षत्रापासून प्रवेशाच्या दिवसाच्या नक्षत्रापर्यंत नक्षत्रे मोजून त्यांची संख्या ६, ७, ८, ९, १०, ११, १२, १३, २२, २३, २४, २५, २६ व २७ यांपैकी कोणतीही असल्यास ती शुभ व याहून अन्य संख्या अशुभ समजावी. [मु. चिं.]

**कलहांतरिता** नायिकाभेद. रतिमंजरीत हिची व्याख्या दिली आहे ती अशी— 'पतिमवमत्य पश्चात्परितप्ता कलहान्तरिता' = रागाच्या भरात पतीचा अपमान केल्यामुळे तो निघून गेल्यावर पश्चात्तापाने व्यथित झालेली, ती कलहांतरिता होय. ईर्ष्याकलहांतरिता व प्रणयकलहांतरिता असे हिचे दोन भेद सांगितलेले आहेत.


कलहांतरिता — मोगलशैलीतले चित्र

'प्रियमन्यकान्तासक्तं पराभूय पश्चात्तापवती' = प्रियकर अन्य स्त्रीवर आसक्त झाल्यामुळे त्याला झिडकारून मग त्याबद्दल पश्चात्ताप करणारी ती ईर्ष्याकलहांतरिता होय. 'स्वाज्ञोल्लङ्घनजनितकोपेन नायकं पराभूय पश्चात्तापवती' = आपली आज्ञा अवमानिल्यामुळे प्रियकराला झिडकारून मग त्याबद्दल पश्चात्ताप करणारी ती प्रणयकलहांतरिता होय.

आरंभी कलह व मग पश्चात्ताप, ही या नायिकेची मुख्य लक्षणे होत. उदा०

**विरहविषमः कामो वामस्तनूकुरुते तनुं**
**दिवसगणनादक्षश्चायं व्यपेतघृणो यमः ।।**
**त्वमपि वशगो मानव्याधेर्विचिन्तय नाथ हे**
**किसलयमृदुर्जीवेदेवं कथं प्रमदाजनः ।।**

(अमरुशतक ६७)

अर्थ — विरहामुळे विरुद्ध झालेला वक्र काम माझ्या तनूला कृश करीत आहे. हा निर्दय यम दिवस मोजण्यात दक्ष आहे. हे नाथा, तूही अभिमानाच्या अधीन झाला आहेस. तेव्हा विचार कर, की (अशा परिस्थितीत) पालवीप्रमाणे मृदु असलेली तुझी प्रेयसी कशी बरे जगू शकेल !

कलहांतरितेचे गाथासप्तशतीतले एक उदाहरण असे —

**अह सो विलक्खहिअओ मए**
**अहव्वाए अगहि आणुणओ ।**
**परवज्जणच्चरीहिं**
**तुम्हेंहि उपेक्खिओ णेन्तो ।।**

(४२०)

अर्थ — (नायिका म्हणते) मीच दुर्दैवी. त्याने अनुनय केला; पण मी तो झिडकारला. सख्यांनो, तो जाऊ लागला तेव्हा तुम्हीही त्याची उपेक्षा केलीत. [शं. ना.]

**कला** स्थापत्य, शिल्प, चित्र, नाटच, संगीत इ. प्रकाराना कला असे अभिधान आहे. मात्र कला या शब्दाच्या व्युत्पत्तीबद्दल भाषाशास्त्रज्ञांत मतभेद आहेत. मोनियर विलियम्सने आपल्या संस्कृत कोशात या शब्दाची व्युत्पत्ती संदिग्ध असल्याचे सांगितले आहे. संस्कृतपडितानी कला शब्दाच्या पुढील व्युत्पत्ती दिल्या आहेत— (१) कल म्हणजे सुदर, कोमल, मधुर किंवा सुख देणारे आणि त्याला अनुकूल असेल ती कला. (२) कल्=शब्द करणे, वाजविणे. यावरून तत्संबद्ध ती कला. (३) कड्=मदमस्त करणे, प्रसन्न करणे. तदनुकूल ती कला. (४) कम् आनन्दं लाति इति=आनंद देणारी ती कला होय.

संस्कृत शब्दकोशात कला शब्दाचे सुमारे वीस अर्थ दिलेले

असून त्यांतील काही प्रमुख अर्थ पुढीलप्रमाणे आहेत– चंद्राचा सोळावा भाग, एखाद्या वस्तूचा सोळावा अंश, कालाचा एक भाग, मुद्दलाचे व्याज, राशीच्या तिसाव्या भागाचा साठावा भाग, एखाद्या कामातील अपेक्षित प्रावीण्य, कपट, नौका इत्यादी. या अर्थापैकी एखाद्या कामातील अपेक्षित चातुर्य, प्रावीण्य, हाच अर्थ कला शब्दाच्या आधुनिक अर्थाशी निकटचा वाटतो. परंतु कला शब्दाला मिळालेला हा अर्थ बऱ्याच नंतरच्या काळातला आहे. कला शब्दाचा प्राचीनतम प्रयोग ऋग्वेदात आढळतो, तो पुढील ऋचेत–

**यथा कलां यथा शफं**
**यथा ऋणं स नयामसि।**

( ऋ. ८. ४७. १७. )

त्यानंतर शतपथ ब्राह्मण, षड्विंश ब्राह्मण, सांख्यायन ब्राह्मण तैत्तिरीय आरण्यक, अथर्ववेद, इ. ग्रंथांतही हा शब्द उपयोजिलेला आहे. परतु यांपैकी एकाही ठिकाणी त्याचा अर्थ कार्यकौशल किंवा शिल्प असा नाही.

कला शब्दाचा आधुनिक अर्थाने प्रथम प्रयोग झाला, तो भरताच्या नाटचशास्त्रात–

**न तज्ज्ञानं न तच्छिल्प न सा विद्या न सा कला।**

अर्थ– असे कोणतेहि ज्ञान नाही, शिल्प नाही, विद्या नाही, कला नाही......

भरतमुनीने वरील श्लोकात कला ही ज्ञान, शिल्प व विद्या यापेक्षा निराळी मानली आहे. पण तरीही कला या शब्दाने त्याला नेमके काय अभिप्रेत होते, हे सागणे कठीण आहे. त्यावर व्याख्या करताना अभिनवगुप्त 'कला गीतवाद्यादिका' असे म्हणतो. हा अर्थ जर बरोबर मानला, तर कला म्हणजे संगीतकला, एवढाच अर्थ त्यातून निष्पन्न होईल.

भरताच्या पूर्वी (इ. स. १ ले शतक) ललितकला व उपयोगी कला या सर्वांना मिळून शिल्प अशी एकच संज्ञा होती. संहिता व ब्राह्मणे यांत शिल्प शब्द याच अर्थी योजलेला आहे. कौषीतकी ब्राह्मणात नृत्य व गीत यांनाही शिल्प असेच म्हटले आहे. पाणिनीची अष्टाध्यायी, तसेच तत्कालीन संस्कृत व बौद्ध साहित्य यांतही शिल्प शब्दाचा प्रयोग याच अर्थाने केलेला आहे. परंतु या शिल्प शब्दात काव्याचा मात्र अंतर्भाव झालेला नव्हता, असे डॉ. भोलानाथ तिवारी यांचे मत आहे.

**कलेचे प्रकार** –– सर्वसाधारणपणे चौसष्ट कला प्रसिद्ध आहेत. शुक्रनीती, काही तंत्रे, कामसूत्र, इ. ग्रंथांत या चौसष्ट कलांची नावे दिलेली आहेत. ही नावे सर्वत्र सारखी नसून त्यांत थोडाफार फरक आहे. कामसूत्रातील चौसष्ट कलाची नावे पुढीलप्रमाणे–

(१) गीत (२) वाद्य (३) नृत्य (४) नाटच (५) आलेख (चित्रे काढणे) (६) विशेषकच्छेद्य (तिलक लावण्यासाठी साचे बनविणे (७) तंडुलकुसुमावलिविकार (तांदूळ व फुले याच्या साहाय्याने रांगोळी किंवा नकशी काढणे (८) पुष्पास्तरण (फुलांची शय्या तयार करणे) (९) दशनवसनागराग (दात, वस्त्र व शरीराची विविध अगे याना रंगविणे किंवा कलापूर्ण ढंगाने सजविणे) (१०) मणिभूमिकाकर्म (ऋतुमानानुसार घर शृंगारणे) (११) शयनरचना (१२) उदकवाद्य (जलतरग वाजविणे) (१३) उदकघात (जलक्रीडा किंवा पिचकारी मारणे) (१४) चित्रयोग (अवस्थापरिवर्तन, वृद्धाला तरुण करणे) (१५) माल्यग्रंथविकल्प (माळा गुफणे) (१६) केशशेखरापीडयोजना (केसांत फुले गुफणे किंवा मुकुट बनविणे) (१७) नेपथ्ययोग (देशकालानुसार कपडे किंवा दागिने अगावर घालणे (१८) कर्णपत्रभंग (पाने व फुले यांच्या साहाय्याने कर्णफुले बनविणे) (१९) गंधयुक्ती (सुगंधी द्रव्ये तयार करणे) (२०) भूषणयोजन (अलंकार घालणे (२१) इंद्रजाल (२२) कौचुमारयोग (कुरूपाला सुरूप बनविणे) (२३) हस्तलाघव (२४) चित्रशब्दापूपभक्ष्यविकारक्रिया (सूपकर्म) (२५) पानकरस-रागासव-योजन (पेये तयार करणे) (२६) सूचिकर्म (२७) सूत्रकर्म (वेलबुट्टी काढणे किंवा रफू करणे) (२८) प्रहेलिका (उखाणे, कोडी घालणे) (२९) प्रतिमाला (अंत्याक्षराची योग्यता ठेवण) (३०) दुर्वाचयोग (कठीण शब्दांचा अर्थ लावण) (३१) पुस्तकवाचन (३२) नाटिकाख्यायिकादर्शन (३३) काव्यसमस्यापूर्ती (३४) पट्टिका-वेत्रवाणविकल्प (नेवार किंवा वेत यांची बाज विणणे) (३५) तुर्ककर्म (चरखा किंवा तकली यांनी सूत काढणे) (३६) तक्षण (दगडावरील कोरीवकाम) (३७) वास्तुविद्या (३८) रौप्य-रत्नपरीक्षा (३९) धातुवाद (कच्ची धातु पक्की करणे किंवा मिश्रित धातु वेगळी काढणे) (४०) मणिरागज्ञान (रत्नाचे रंग ओळखणे) (४१) आकरज्ञान (खाणीचे ज्ञान) (४२) वृक्षायुर्वेदयोग (उपवन तयार करण्याची कला) (४३) मेष-कुक्कुट-लावकयुद्धविधि (मेषादिकांना झुजविण्याची कला) (४४) शुकसारिका-प्रलापन (४५) उत्सादन (मालिश करणे) (४६) केशमार्जनकौशल (४७) अक्षरमुष्टिकाकथन (करपल्लवी) (४८) म्लेच्छितकलाविकल्प (विदेशी भाषाज्ञान) (४९) देशभाषाज्ञान (देशी बोली जाणणे) (५०) पुष्प-शकटिका-निमित्तज्ञान (प्राकृतिक लक्षणाच्या आधारे भविष्य वदविणे (५१) यंत्रमातृका (यंत्रनिर्माण) (५२) धारणमातृका (स्मरणशक्ती वाढविणे) (५३) संपाठ्य (दुसऱ्याचे ऐकून जसेच्या तसे म्हणणे) (५४)

मानसी काव्यक्रिया (शीघ्रकवी बनणे) (५५) क्रियाविकल्प (एखाद्या वस्तूच्या क्रियेचा प्रभाव पालटणे) (५६) छलिक-योग (चलाखी करणे) (५७) अभिधानकोष, छंदोज्ञान (शब्द व छंद यांचे ज्ञान) (५८) वस्त्रगोपन (फाटलेले वस्त्र शिवण दिसणार नाही, अशा कौशल्याने शिवणे) (५९) द्यूत (६०) आकर्षणक्रीडा (६१) बालक्रीडाकर्म (लहान मुलांना खेळविणे) (६२) वैनायिकी विद्याज्ञान (विनय व शिष्टाचार यांचे ज्ञान (६३) वैजयिकीविद्याज्ञान (दुसऱ्यावर विजय मिळविणे) (६४) व्यायामिकीविद्याज्ञान (व्यायामकला).

प्रबंधकोशात कलांची सख्या ७२ सांगितली आहे, तर ललितविस्तर या ग्रंथांत पुरुषकला या मथळ्याखाली त्यांची ८६ नावे दिली आहेत. क्षेमेंद्र या काश्मीरी पंडिताने आपल्या कलाविलास या ग्रंथात कलांची फार मोठी सूची दिली आहे. या सूचीतील ६४ कला या जनोपयोगी कला असून त्यांपैकी निम्या पुरुषार्थाच्या प्राप्तीसाठी व निम्या मात्सर्य-शील-प्रभाव-मान यां-संबंधी असल्याचे सांगितले आहे. याशिवाय, सोनाराच्या सोने चोरण्याच्या ६४ कला, वेश्यांना मोहित करून त्याच्याकडून पैसे लुबाडण्याच्या ६४ कला, १० भेषज कला, १६ कायस्थांच्या कला, त्याचप्रमाणे १०० सारकला यांचीही त्या ग्रंथात चर्चा केलेली आहे.

यावरून, ज्या कामात थोडेबहुत कौशल्य लागते, त्या सर्व कामांची प्राचीन विद्वानांनी कलेच्या सदरात गणना केलेली आहे, असे दिसून येईल. ललितकलांमध्ये वास्तू, मूर्ती, चित्र व संगीत याचा अंतर्भाव होतो, हे सर्वमान्य आहे; परंतु ललित कलांत काव्याचा अंतर्भाव होतो किंवा नाही याबद्दल मात्र विद्वानांत मतभेद आहेत. कित्येक कलासमीक्षकांच्या मते काव्य हे कलेच्या सदरात मोडत नाही. भारतीय दृष्टीने ज्ञानाच्या विद्या व उपविद्या अशा दोन शाखा असून त्यांपैकी विद्येच्या शाखेत काव्याचा समावेश होतो व उपविद्येच्या शाखेत कलेचा अंतर्भाव होतो, असे या विद्वानांचे म्हणणे आहे. कलेच्या काही सूचीत काव्य-व्याकरण, काव्यसमस्यापूरण, अलंकार, इ. नावे येतात, त्यांचा संबंध काव्याशी नसून उक्ती किंवा चमत्कृती याच्याशी आहे, असेही त्याचे मत आहे. काही प्राचीन साहित्य-काराची मतेही या आधुनिक विद्वानांच्या मताशी मिळती-जुळती आहेत, असे दाखविता येईल. 'साहित्य-संगीतकलाविहीन:' या भर्तृहरीच्या श्लोकांत साहित्याचा कलेहून स्वतंत्र उल्लेख केलेला आहे. भामह व दंडी यांच्याही काव्यात अशाच प्रकारचे उल्लेख आलेले आहेत.

इंग्रजीत कलेसाठी 'आर्ट' हा शब्द उपयोजिला जातो. या शब्दाचा संबंध फ्रेंच आर्ट व लॅटिन आर्टेम किंवा आर्स याच्याशी जोडतात. मुळात अर् या धातूपासून हा शब्द साधलेला असून त्याचा अर्थ बनविणे, उत्पन्न करणे असा आहे. संस्कृतातील ईर् = जाणे, फेकणे, उपयोग करणे, हा धातू अर् या धातूशी संबद्ध मानलेला आहे. संस्कृतमध्ये कला किंवा शिल्प याचा जो सर्वसाधारण अर्थ होतो, तोच अर्थ लॅटिन आर्स शब्दाचाही होतो.

इंग्रजीत कला शब्दाचा प्रयोग पहिल्यांदा तेराव्या शतकाच्या प्रथम चरणात झाला. तिथे तो शब्द केवळ कौशल्य अशा अर्थीच योजिला आहे. त्यानंतर सुमारे ४०० वर्षांनी म्हणजे १७ व्या शतकात वास्तू, मूर्ती, चित्रण, काव्य, संगीत, नृत्य इ. सर्वांना उद्देशून कला शब्दाचा प्रयोग होऊ लागला.

**कलेची व्याख्या**– कलेची समर्पक व्याख्या करणे हे अत्यंत कठीण काम आहे. तरीसुद्धा अनेक विद्वानांनी आपापल्या परीने कलेची व्याख्या करण्याचा प्रयत्न केला आहे.

प्राचीन संस्कृत ग्रंथकारानी कलेच्या काही व्याख्या दिलेल्या आहेत त्या अशा—

**कलयति स्वस्वरूपावेशेन तत्तद् वस्तु**
**परिच्छिनत्ति इति कलाव्यापारः।**

(क्षेमराज – शिवसूत्रविमर्शिनी)

अर्थ– कलावंत एखाद्या वस्तूच्या ठिकाणी आपल्या आत्म-स्वरूपाचा जो आविष्कार करतो, त्याला कला असे म्हणावे

**व्यञ्जयति कर्तृशक्तिं कलेति तेनेह कथिता सा।**

(भोजराज–तत्त्वप्रकाश)

अर्थ– ईश्वराच्या कर्तृत्वशक्तीचा जो आविष्कार आपल्याला पाहायला मिळतो, तीच कला होय.

पाश्चात्य दार्शनिकांपैकी प्लेटो हा कलेला सत्याच्या अनु-कृतीची अनुकृती असे म्हणतो. ॲरिस्टॉटल तिला नुसते अनु-करण असेच नाव देतो. क्रोचेच्या मते कला ही बाह्य प्रभावाची अभिव्यक्ती होय. हेगेलच्या मते आधिभौतिक सत्तेला व्यक्त करण्याचे माध्यम म्हणजे कला होय. आपल्या मनातील भाव-भावना, क्रिया, रेखा, रंग, ध्वनी किंवा शब्द यांच्या माध्य-मांतून अशा प्रकारे व्यक्त करणे, की त्याच्या दर्शनाने किंवा श्रवणाने दुसऱ्याच्या मनांत तसे भावतरंग निर्माण व्हावे, असे टॉलस्टायने कलेचे स्पष्टीकरण केले आहे. रस्किनच्या मतानुसार प्रत्येक महान कलाकृती ही ईश्वराच्या कृतीविषयी मानवाला जो आनंद होतो, त्याची अभिव्यक्ती असते. गटेने कलेला आत्म्याची किमया असे संबोधले आहे; तर फ्राइडने सयत भावनांचे उद्दीपित रूप म्हणजे कला असे म्हटले आहे. कला म्हणजे मानवाला आपली गमावलेली प्रतिष्ठा प्राप्त करून देण्याचे एक साधन आहे, असे विचार शिलरने व्यक्त केले आहेत. भारतीय दार्शनिकांपैकी डॉ. आनंद कुमारस्वामींचे मत

असे, की कलाकार हा नवीन काही निर्मिती करीत नाही; तर तो अस्तित्वात असलेल्याचाच शोध घेतो. रवींद्रनाथ ठाकूर म्हणतात, की मनुष्य आपले प्रतिबिंबच कलेच्या द्वारे व्यक्त करीत असतो.

वर दिलेल्या व्याख्या या सामान्यत: ललितकलेच्या व्याख्या आहेत. ललितकला हा कलेचा एक भाग आहे. तत्त्वत: बोलायचे तर शरीराला किंवा मनाला उपयुक्त किंवा आल्हादक अशा वस्तूंच्या निर्मितीसाठी मानव आपल्या कर्तृत्वशक्तीचा जो कौशल्यपूर्ण प्रयोग करतो, त्याला व्यापक अर्थाने कला असे म्हणता येईल. कलेचे क्षेत्र अत्यंत व्यापक आहे. तिची अनेक रूपे आहेत. खाणे, चालणे, गप्पा करणे इथपासून तो चित्र काढणे, शिल्प निर्माण करणे, काव्य रचणे या सर्वांचा अंतर्भाव कलेतच होतो. पण असे असले तरी सर्वसामान्यपणे साहित्य, सौंदर्यशास्त्र व समीक्षा यांच्या संदर्भात कला शब्द ललितकला अशा संकुचित अर्थानेच घेतला जातो.

कला म्हणजे अभिव्यक्ती, याबाबत बहुतेक सर्व विद्वानांचे एकमत आहे. ही अभिव्यक्ती कुठे होते, याबद्दल मात्र विद्वानात मतभेद आहेत. कलेची अभिव्यक्ती ही प्रथम माणसाच्या मनात होते व नंतर तिचा बाह्य आविष्कार होतो, असे क्रोचेचे मत आहे. त्यामुळे आपल्याला दिसणाऱ्या मूर्ती, चित्र, काव्य, इ. कलाकृती या मनातील यथार्थ कलेच्या प्रतिकृतीच आहेत, असे त्याचे म्हणणे आहे. दुसरे काही विद्वान् कलेच्या बाह्य आविष्कारालाच कला असे म्हणतात. वस्तुतः हा प्रश्न मानसशास्त्राच्या कक्षेतील आहे. कलेची अमूर्त अभिव्यक्ती प्रथम मनात होते आणि रग, स्वर, शब्द इ. द्वारा तिचा बाह्य आविष्कार होतो व मग दुसऱ्यालाही त्या कलाकृतीचा आस्वाद घेता येतो. हा बाह्य आविष्कार म्हणजे अंतरातल्या कलेची प्रतिकृती असते, यात काही संदेह नाही. परंतु व्यवहारात या प्रतिकृतीलाच जास्त महत्त्व असते. त्यामुळे तात्त्विक दृष्टया आभ्यंतर व व्यावहारिक दृष्टया बाह्य, या दोन्ही अभिव्यक्ती कलाच होत. अभिव्यक्ती कशाची होते, हा त्यानंतरचा प्रश्न आहे. कोकिळेचा पंचम, झुळझुळता झरा किंवा मोराने पिसारा उभारून केलेला नाच या गोष्टी ऐकून किंवा पाहून मनात आनंदाच्या ऊर्मी उठतात व आनंदोर्मींचीच कलेच्या द्वारे अभिव्यक्ती होते. या अनुभूतीच्या अभिव्यक्तीलाच आत्मानुभूतीची किंवा सत्याची अभिव्यक्ती असे म्हणतात.

**कलेचे प्रयोजन** – कलेच्या संबंधात आणखी एक प्रश्न उद्भवतो तो असा, की कलेचे प्रयोजन काय ? या बाबतीतही विद्वानांची मते भिन्न भिन्न आहेत. कोणी आत्माविष्कार हे प्रयोजन मानतात, तर कोणी अनुकरण हे कलेचे लक्ष्य समजतात. कलेसाठी कला या मताचा पुरस्कार करणारेही काही आहेत. रस्किन, टॉलस्टॉय वगैरे रसिक जीवनासाठी कलेला राबवावी, असे म्हणतात. दुसरे कोणी यश, सेवा, आनंद किंवा मनोविनोदन हे कलेचे प्रयोजन मानतात. पण कलेच्या प्रयोजनामागची शुद्ध सैद्धान्तिक तत्त्वे बाजूला ठेवली तरी केवळ व्यावहारिक दृष्टीने कलेची निर्मिती वरीलपैकी एखाद्या किंवा अनेक हेतूंनी होत आलेली दिसते. पाश्चिमात्य देशांत कलेचे प्रयोजन काय, याविषयी मोठेच वादविवाद झालेले आहेत व त्याचे लोण आपल्यापर्यंतही येऊन पोचले आहे. परंतु आपल्याकडे प्राचीन काळीच मम्मटाने या सर्व गोष्टींचा समन्वयात्मक विचार केलेला दिसतो. तो म्हणतो–

**काव्यं यशसेऽर्थकृते व्यवहारविदे शिवेतरक्षतये ।**
**सद्यः परनिर्वृतये कान्तासंमिततयोपदेशयुजे ।।**

अर्थ– यश, धन, व्यवहारज्ञान, अशुभनिवारण, श्रेष्ठ आनंद व कांतासमित उपदेश ही काव्याची प्रयोजने होत.

भारतात प्राचीन काळापासून कला हा परतत्त्वाच्या साक्षात्काराचा एक मार्ग मानलेला आहे. कला ही केवळ इंद्रियसुखासाठी नाही; ती श्रीमंतांनी उपभोगायची ऐष-आरामाची चीज नाही किंवा ते एक करमणुकीचे साधनही नाही. कलेचे लक्ष्य यापेक्षाही उंच्च आहे. मानवाच्या प्रगतीसाठी भक्ती, ज्ञान किंवा प्रेम यांच्याइतकीच कलेचीही आवश्यकता भारतात मानली जात होती. ईश्वर हा जसा ज्ञानाचे अधिष्ठान तसाच तो सौंदर्याचाही मूलस्रोत आहे, अशी लोकांची भावना होती. ईश्वर सर्वसाक्षी व सर्वव्यापक आहे, तसाच तो सर्वांगसुंदरही आहे. सत्य, शिव व सौंदर्य हे त्याचे त्रिविध रूप आहे. जगातील प्रत्येक सुदर वस्तू ही ईश्वराच्या सौंदर्याची छाया आहे. स्वरांचे, आकृतीचे, रंगाचे किंवा तालाचे सौंदर्य हे ईश्वराच्या सौंदर्याची पुसटशी का होईना, पण छाया आहे. संध्याकाळच्यावेळी सूर्याचा लाल गोळा समुद्रात बुडताना पाहिला, की मन हर्षाने उचबळून येते, याचे कारण त्यात आपल्याला दैवी सौंदर्याचा साक्षात्कार होतो, हेच आहे. गर्द वृक्षांच्या राईतून झुळझुळ वाहणारा जलप्रवाह, आकाशात दिसणारी इंद्रधनुष्याची सप्तरगी कमान, कोकिळाचे मधुर कूजन, गानसम्राटाचे हृदय हेलावून सोडणारे भैरवीचे स्वर, ही सर्व कमी-अधिक प्रमाणात ईश्वराच्या सौंदर्याचाच साक्षात्कार घडवितात. म्हणूनच त्यापासून आनंद मिळतो. सुदर वस्तू म्हणजे ईश्वराच्या असीम सौंदर्याचे अल्पस्वल्प दर्शन घडविणारी गवाक्षेच होत. ईश्वर हा परमसुंदर आहे, असे भारतीय संस्कृती मानते. रुक्मिणीने कृष्णाला भुवनसुदर असे संबोधिले आहे. मधुसूदन सरस्वतीनेही कृष्णाला सौंदर्यसारसर्वस्व असे म्हटले आहे.

पंढरीच्या काळचा विठोबाला पाहून तुकोबानेही 'सुदर ते ध्यान उभे विटेवरी' असेच म्हटले आहे. ईश्वराच्या याच सौंदर्यविषयक बाजूवर भर देऊन कलाकार आपली निर्मिती करीत असतो व त्याद्वारे ईश्वराला मानवाच्या समीप आणण्याचा प्रयत्न करीत असतो; असे म्हटले पाहिजे. कळा म्हणजे एक सौंदर्ययोगच आहे. कलाकार हेसुद्धा एक प्रकारचे योगीच होत. अनेक मोठमोठे ऋषी आणि देव हे महान कलाकार होते. काही देवतांची नावे या बाबतीत सूचक आहेत. शंकराचे नटराज हे नाव, तो श्रेष्ठ नर्तक असल्याचे दर्शविते. रंगनाथ हा रंगभूमीचा व्यवस्थापक होता, असे समजते. भारतातील सर्व कलांना अशा रीतीने अध्यात्माची बैठक दिलेली आढळते.

प्राचीन काळी भारतात कला आणि धर्म हातात हात घालून मार्ग क्रमीत असत. निरनिराळचा देवतांची मंदिरे म्हणजे कलेची आगरेच होत. काही काही मंदिरांची शिल्पे डोळे दिपविणारी आहेत, तर काही देवताच्या मूर्ती आपल्या सौंदर्याने थक्क करणाऱ्या आहेत. याचे कारण म्हणजे ती केवळ कसबी लोकाची कारागिरी नव्हती; तर भक्तीने भारलेल्या भाविकांची ती देवाच्या चरणी रुजू केलेली सेवा होती. म्हणूनच त्या कलेच्या मांडणीत आपले नाव कोरून ठेवावे असे त्यांना वाटले नाही. त्या कलाकृतीच्या निर्माण-प्रसंगी ते जणू कलानिधी ईश्वराशी तद्रूप झाले होते. भारतीय कलेचे हे एक वैशिष्टच मानावे लागते.

कलाकाराने कलेचा जो बाह्य आविष्कार केलेला असतो, तो आविष्कार म्हणजे त्याच्या मुळाशी असलेल्या कल्पनेला दिलेले मूर्त स्वरूप असते. कलाकाराच्या दृष्टीने हा विचार त्याच्या बाह्य प्रकटीकरणापेक्षा जास्त महत्त्वाचा असतो. बाह्य जगात त्या वस्तू कशा असतात, कशा दिसतात, यापेक्षा त्याचे अत - स्वरूप काय आहे, ते जाणून घेण्याची कलाकाराची धडपड असते. कलाकाराच्या दृष्टीने बाह्य जगत हे त्यामागच्या प्रेरक-तत्त्वाचा शोध घेण्याचे एक साधन असते. जगातील घटना व वस्तू यांना कलाकाराच्या दृष्टीने एक वेगळा अर्थ असतो व कलाकार तोच गर्भित अर्थ आपल्या कलाकृतीतून जगाला सांगण्याचा प्रयत्न करीत असतो.

यावरून भारतीय कला ही यथार्थवादी असण्यापेक्षा आदर्शवादी व प्रतीकात्मक का असते, ते कळून येईल. पाश्चात्यांना अभिप्रेत असलेला कलेच्या क्षेत्रातील यथार्थवाद हा भारतीय कलेला परका आहे. भारतीय कलावंताची कलाकृती ही त्याला आलेल्या अनुभवांची प्रतिकृती असते. कलेची भाषा ही भावनांची भाषा असते. त्यामुळे जगातील कोणत्याही माणसाला ती कळू शकते. खरी कलाकृती जीवनातल्या एखाद्या महान सत्याचा साक्षात्कार घडविणारी असते. भारतीय चित्रकला किवा भारतीय शिल्पकला याचे निरीक्षण केल्याअती एखाद्या वस्तूच्या हुबेहूब चित्रीकरणाला शिल्पकार किवा चित्रकार दुय्यम स्थान देतो, असे दिसून येईल. जेव्हा तो एखाद्या माणसाचे चित्र रंगवितो, तेव्हा तो एखाद्या विशिष्ट व्यक्तीचेच चित्र रंगवितो, असे नसून ती व्यक्ती ज्या वर्गाची प्रतिनिधी असेल, त्या वर्गाचेच तो चित्रीकरण करीत असतो. त्याचबरोबर त्या व्यक्तीच्या द्वारा ईश्वराला जे काय सांगायचे असते तेही व्यक्त करण्याचा त्याचा प्रयत्न असतो. अशा रीतीने ते रंगचित्रण म्हणजे त्या क्षणी ती व्यक्ती काय असते, सर्वसाधारणपणे ती कशी असते व ईश्वराला ती कशी असावी असे वाटते, या सर्वाचा तो मिलाफ असतो. एखाद्या कॅनव्हासच्या किवा कागदाच्या तुकड्यावर त्या व्यक्तीची केवळ प्रतिकृती काढणे, एवढाच जर हा प्रश्न असता, तर त्यासाठी मोठ्या चित्रकाराची गरज नव्हती. कॅमेऱ्यानेही ते काम होऊ शकले असते. केवळ अनुकृती व हेतुपुरस्सर सर्जनात्मक अभिव्यक्ती यामधला जो फरक, तोच छायाचित्रण व कलाकृती यांमधला फरक असतो.

मंदिरांतल्या मूर्तीही काही विशिष्ट तत्वे डोळ्यांसमोर ठेवून भारतीय मूर्तिकारांनी घडविल्या आहेत. त्या घडविताना त्याना निसर्गातील जे काही सुदर वाटले, त्या सर्व सौंदर्यविषयक तत्त्वांचा त्यांनी उपयोग केला आहे. त्यामुळे सर्वसामान्य लोकांच्या ज्या सौंदर्यकल्पना असतात, त्याच्याशी त्या मूर्ती क्वचित प्रसगी जुळणाऱ्या नसतात. असे असले तरी त्यांचा ठसा मात्र मनावर खोल उमटतो. भारतीय मूर्तिकाराना मानवेतर योनीतही जे काही सुदर वाटले, त्याचा त्यांनी आपल्या कलेत स्वीकार केला व माणसाच्या आणि पशूच्या काही अवयवाचा संयोग करून अर्धमानव, अर्धपशू अशाही मूर्ती घडविल्या.

**कलेचे वैशिष्टच**– कलेचे आणखी एक वैशिष्टच असे, की ती रसिकाला स्थलकालाच्या बंधनापलीकडे नेऊन सोडते. अनेक मैल लांब पसरलेल्या डोंगराच्या रांगा आणि त्यावरची वनराजी चित्रकार कॅनव्हासच्या काही इंचांच्या तुकड्यावर साकार करतो. पण जेव्हा आपण ते रंगचित्र पाहातो, तेव्हा निसर्गातील भव्य देखावाच आपणापुढे माडला असल्याचे आपल्या प्रत्ययाला येते. अशा प्रसंगी कलाकार आपल्याला स्थलाच्या अतीत घेऊन जातो.

तीच गोष्ट काळाचीही. अनेक वर्षाच्या कालखंडात घडलेल्या घटना नाटककार केवळ तीन–चार तासांच्या अवधीत प्रेक्षकासमोर उभ्या करतो. त्या पाहताना काही काळ प्रेक्षकांना

आपण त्याच जुन्या काळात वावरत असल्याचा प्रत्यय येतो. याचा अर्थ चालू काळाचे बंधन सुटून प्रेक्षक त्याच्या पलीकडे जातो, असा होतो.

कलेचे आणखी एक वैशिष्टच असे, की ती क्षणिक अस्तित्वाच्या घटनांना चिरंतनत्व प्राप्त करून देते. कन्याकुमारीसारख्या ठिकाणी सूर्याच्या उदयास्ताची शोभा अवर्णनीय दिसते. पण सर्वांनाच काही ती शोभा पाहण्यासाठी कन्याकुमारीला जाणे शक्य नसते. आकाश अभ्राच्छादित असल्यास तिथे जाऊनही तो निसर्गाचा रम्य सौंदर्याविष्कार दिसू शकत नाही. पण चित्रकाराने एकदा ती घटना चित्रित केली, की मग प्रेक्षकाला बसल्या जागी व केव्हाही ती पाहता येते. निसर्गातील ही क्षणिक घटना चित्रकाराच्या कामगिरीमुळे चिरंतन बनते.

मानवी जीवन हे कलेच्या योगाने समृद्ध बनते. कलाविरहित जीवन म्हणजे ते 'कलेवर'च होय. ज्ञानसाधना केल्याने मानवाच्या बुद्धीची वाढ होते. तर कलेच्या अभ्यासाने त्याच्या जीवनाचे भावनात्मक अंग परिपुष्ट होते. माणूस जर केवळ भातभाकरीवर संतुष्ट राहिला, तर मग पशूत आणि त्याच्यात फरक तो काय! 'साहित्यसंगीतकलाविहीनः साक्षात् पशुः पुच्छविषाणहीनः'= साहित्य, संगीत इ. कलांनी विहीन माणूस म्हणजे शेपटी आणि शिंगे नसलेला पशूच होय, असे भर्तृहरीने म्हटले आहे ते याच अर्थाने. माणसाला कलेचा रसास्वाद घेता येतो आणि पशूला तो घेता येत नाही, हाच त्या दोघातला फरक आहे. चिनी भाषेत एक म्हण आहे, की 'तुमच्याकडे जर ब्रेडचे दोन तुकडे असतील तर त्यांपैकी एक विका आणि त्यातून एक कमळ विकत आणा.' याचा अर्थच असा, की माणसाच्या आसपास सुंदर वस्तू असणे हे त्याला अन्नाइतकेच महत्त्वाचे आहे. अन्नाच्या योगाने शरीर सुदृढ बनते, तर सौंदर्याच्या आस्वादाने आत्म्याची तृप्ती होते. प्रत्येक सुंदर वस्तू ही त्रिभुवनसुंदर परमेश्वराचाच संदेश देणारी असते.

मानवी भावनांचा समतोल उत्कर्ष साधण्यास कलेसारखे दुसरे प्रभावी साधन नाही. उत्कृष्ट कला दुष्ट विकारांचा उपशम करते आणि सद्भावनांना उद्दीपित करून त्यांचे उदात्तीकरण करते.

त्याचप्रमाणे ती जीवनालाही परिपूर्णता आणते. जग हे सदैव निराशा आणि उणिवा यांनी भरलेले असते. एखाद्या कलावंताचे बाह्य जीवनही पुष्कळदा नीरस किंवा दुःखी दिसते. पण तो कलाकार आपल्या कलाकृतीत जीवनातील साऱ्या उणिवा भरून काढतो आणि अशा रीतीने आपले जीवन समृद्ध करतो.

भारतीय कला अनेकदा प्रतीकात्मक असते. कलाकार एखाद्या मूर्तीचे बाहू गुडघ्यापर्यंत लांब बनवितो. वास्तव जगात असे आजानुबाहू पुरुष दिसत नाहीत. परंतु हे लांब बाहू महान शक्तीचे द्योतक म्हणून मूर्तिकाराने घडविलेले असतात. आपल्या अनेक देवता या चतुर्भुज, अष्टभुज असतात. कित्येक देवतांची शिरे एकाहून अधिक, सम किंवा विषम असतात. त्या देवतांचे सामर्थ्य मानवापेक्षा कितीतरी पटींनी अधिक असते, हे त्या मूर्तीच्या द्वारे कलाकाराला सूचित करायचे असते.

**प्राचीन युग** – भारतीय कलेचा इतिहास वैदिक काळापासूनच सुरू होतो. वैदिक साहित्यात कलेची लक्षणे आढळतात, त्याचप्रमाणे कलेसंबंधी विचारही अनेक ठिकाणी आढळतात त्या काळातील कलाकृती मात्र उपलब्ध नाहीत. याचे कारण असे असू शकेल, की वैदिक द्रष्टयांना मानवी शिल्पापेक्षा देवशिल्पाचे आकर्षण अधिक होते. द्यावा–पृथिवीच्या मधील अंतराळात चंद्र, सूर्य, रात्र, दिवस, उषा, संध्या इ. जी अनंत देवसृष्टी विलसते, तिची शोभा अक्षय व नित्यनूतन असते. रात्रीचे नक्षत्रखचित आकाश, नद्यांचे सतत वाहणारे प्रवाह, वाऱ्याचा झंझावाती संचार, पर्जन्यवृष्टी, इ. देवशिल्पाचे जे नैसर्गिक सौंदर्य प्रतीत होते, त्यापासून वैदिक माणूस स्फूर्ती घेत होता व आपल्या जीवनातही तशाच प्रकारची श्री व सौंदर्य पाहण्याचा सराव करीत होता. श्री व सौंदर्य यांचे वाचक शब्द वैदिक वाङ्मयात विपुल आढळतात. सौंदर्याची अधिष्ठात्री देवी श्री व वैभवाची अधिष्ठात्री देवी लक्ष्मी यांची आर्यांनी यजमान–पत्नीच्या ठिकाणी कल्पना केलेली आहे. व्यक्तिगत सौंदर्याची ही भावना पुढे देवी श्रीलक्ष्मीच्या रूपात प्रकट झाली. भारतीय कलेत श्रीलक्ष्मी ही सौंदर्याचे साक्षात प्रतीक मानण्यात येऊ लागली. स्वस्तिक, चक्र, पूर्णकुंभ, कमल ही ऐतिहासिक युगातील कलेची लेणी वैदिक कालातच उदयाला आली. जरी वैदिक कालातील मानवी कलाकृती उपलब्ध होत नसल्या, तरी कलेबद्दलचा दार्शनिक दृष्टिकोन समजण्याच्या दृष्टीने ही सामग्री फार उपयुक्त आहे.

**सिंधुसंस्कृती**– सिंधुसंस्कृतीचे अवशेष मोहेंजोदडो व हराप्पा या ठिकाणी प्रामुख्याने सापडले आहेत. इथे सापडलेल्या दोनचार मानवी मूर्तीच्या चेहऱ्यावरून सिंधुसंस्कृती ही असुरसंस्कृती होती, हे कळून येते. मोहेंजोदडोचे निवासी व्यक्तिगत सौंदर्याच्या खुलावटीकडे अधिक लक्ष देत असावे. घरातील स्नानागारे, सोन्यांचे दागिने, बांगडया, इ. गोष्टी याच्या साक्षी आहेत. सुंदर वस्तूंची भूषणे लेवून शरीर सुशोभित करण्याची आवड आर्य व असुर या दोन्ही संस्कृतीत सारखीच दिसून येते.

मातीची खेळणी व भांडी हेही एक सिंधुसंस्कृतीचे वैशिष्टच आहे. मोहेंजोदडो येथील उत्खननात सापडलेल्या भांडयांवर

काळ्या रंगात पाने-फुले, झाडे, उडणारे पक्षी, तरणाऱ्या मासोळ्या, धावणारे पशू, इ. विविध आकृती काढलेल्या दिसतात. वृक्ष, वनस्पती व पशू-पक्षी यांच्याशी भारतीय कलेने प्राचीन काळापासूनच सख्य प्रस्थापित केले होते, असे तिथे कळते. इथे सापडलेल्या बैलाच्या मूर्ती उच वशिडाच्या व डौलदार बांध्याच्या असून कलेच्या दृष्टीने श्रेष्ठ दर्जाच्या आहेत. इतक्या जिवंत आकृती पुढील काळात फारशा बनवल्या गेल्या नाहीत, असे म्हणावे लागते. मोहेंजोदडोची कला ही प्राणवान कला आहे.



मातीचे खेळणे – मोहेंजोदडो

**जनपदयुग** — सनपूर्व सुमारे आठव्या शतकापासून तो मौर्यकालाच्या आरंभापर्यंतच्या काळाला महाजनपदांचे युग असे नाव आहे. शिल्प शब्दाला याच काळात अधिक महत्त्व प्राप्त झाले. जीवनाशी संबंधित अशा सर्व उपयोगी व्यापारांची या काळात शिल्पामध्ये गणना केली गेली. नाचणे, गाणे, वाद्ये वाजविणे, इ. गोष्टी पाणिनीने शिल्पात अंतर्भूत केल्या होत्या. परंतु शिल्प शब्दाचा पुरा अर्थविस्तार जातकांच्या काळात झाला. सुतार, धोबी, माळी, बुरुड, इ. अनेक कारागिरांना शिल्पकार व त्यांच्या कारागिरीला शिल्प असे त्या काळात म्हणू लागले. चौसष्ट कलांची गणना याच काळात रूढ झाली. कलेतील बाह्य अलंकरण व सजावट यांवर या कालात विशेष लक्ष दिले जाऊ लागले. या युगाचे आणखी एक वैशिष्टच असे, की प्रत्येक शिल्पाचे सवर्धन विशिष्ट गटांकडून होऊ लागले. या विशिष्ट गटांचेच पुढे जातीत रूपांतर झाले, असे म्हणतात. हे गट म्हणजे ते ते शिल्प शिकण्याची चालती बोलती विद्यालयेच होती. सर्वसाधारणपणे मुलगा पित्याकडून ती कला आत्मसात करी. अशा प्रकारे प्रत्येकाला त्याच्या त्याच्या कलेचे कुलपरंपरेने शिक्षण मिळे.



वृषभ-मोहेंजोदडो

**मौर्य व शुंगयुग**— जनपद युगानंतर विशाल राज्यांचे युग अस्तित्वात आले. या कालातील कलेचे अनेक नमुने उपलब्ध आहेत. धार्मिक व दार्शनिक अनुभूतीचे प्रतीकाच्या द्वारा अंकन करणे, हे या काळाच्या कलेचे वैशिष्टच होय. सूर्य, चैत्य वैजयंती, वृक्ष, वृषभ, हत्ती, मोर, इ. अनेक आकृतीच्या या कालातल्या रेषा अत्यंत सुंदर व प्रावीण्यदर्शक आहेत.

मौर्य कालात स्थापत्य व शिल्प यांची अनेक प्रकारे उन्नती झाली. चंद्रगुप्त मौर्याचा पाटलीपुत्र नगरातील राजप्रासाद हा मौर्य कलेचा एक वैशिष्टच-पूर्ण नमुना होता. परंतु गुप्तकालानंतर तो नष्ट झाला. मौर्यकलेच्या उपलब्ध उदाहरणांत अशोकाचे स्तंभ हे वैशिष्टचपूर्ण आहेत. पस्तीस किंवा त्याहूनही अधिक फूट उंचीचे हे स्तंभ एकसंध दगडांतून बनवलेले आहेत. या साऱ्या स्तंभाचे शिरोभाग शिल्पकलेच्या सौष्ठवाची पराकाष्ठा दर्शवितात. दिल्ली, प्रयाग, सारनाथ, इ. ठिकाणी हे स्तंभ दिसतात.



अशोकस्तंभाचा शिरोभाग

स्तूपनिर्मितीच्या शैलीचा अधिक विकास मौर्य कालातच झाला. भरहुत व सांची येथील स्तूप अतिशय प्रसिद्ध आहेत. स्तूपांजवळच्या वेदिका व चार दिशाना असलेली चार दारे शिल्पकलेच्या दृष्टीने महत्वाची आहेत. मौर्य कालातील व त्यानंतरच्या शुंग कालातील ( सनपूर्व २ रे शतक ) कला या दोन्ही एकाच प्रकारच्या आहेत. यथार्थ चित्रण हे या शैलीचे वैशिष्टच आहे. त्या कलाकारांनी वेदिकास्तंभ व तोरणे यांवर कोरलेल्या दृश्यांतून तत्कालीन नागरिक जीवनाचे दर्शन घडते.

मौर्य-शुंग कलेचे दुसरे वैशिष्टय म्हणजे ती अलंकरणप्रिय आहे.



स्तूप–साची

वेदिका व तोरणस्तंभ यांना सजविण्यासाठी त्या कलाकारांनी वृक्षवनस्पती व पशुपक्षी यांचा मोठ्या प्रमाणावर उपयोग केलेला आहे. या कालातील अनेक यक्षमूर्तीही उपलब्ध आहेत. त्या काळी यक्षपूजा फार प्रचलित होती. या यक्ष मूर्ती डोळ्यांपुढे ठेवूनच पुढे मथुरा शैलीतील बोधिसत्वाच्या मूर्ती बनविल्या गेल्या आहेत.



सूर्यमूर्ती–बिहार

शुग कालाच्या शेवटी म्हणजे सनपूर्व पहिल्या शतकात उत्तर भारतात व विशेषत: मथुरेच्या आसपास भागवत धर्माची एक मोठी लाट पसरली होती. मथुरा, बेसनगर, इ. ठिकाणच्या लेखात संकर्षण व वासुदेव यांची पूजा व त्यांची मंदिरे यांसंबंधी उल्लेख आढळतात. अहिच्छत्र येथे मिळालेल्या पंचाल राजांच्या शिक्क्यांवर चक्रधर, विष्णू, सूर्य, इंद्र, भूमी, फल्गुनी, इ. देवताच्या मूर्तींचे चित्रण आढळते. सांची, भरहुत, बोधगया व ओडिसा येथील शुगकालीन शिल्पात देवी, श्रीलक्ष्मी, गजलक्ष्मी इ. मूर्ती सापडल्या आहेत.

इ. स. च्या १ ल्या शतकात देवतांच्या अनेक प्रतिमा निर्माण झाल्या. बुद्ध व बोधिसत्त्व, चोवीस तीर्थंकर व त्यांचे पार्श्वचर, शिव, विष्णू, ब्रह्मा, सूर्य, कार्तिकेय, दुर्गा इ. देवतांच्या प्रतिमा याच कालांत तयार होऊ लागल्या. मूर्तीच्या बरोबरच मंदिरे, चैत्य इत्यादींची निर्मिती होऊं लागली व शिल्पकार मूर्तींची घडण व तिची बाहेरील सजावट या दोन्हींवर आपले कौशल्य सारखेच प्रगट करू लागले.

**कुषाणकाल**– मथुरा हे या कालातील शिल्पकलेचे केंद्र होते. तिथून तिचा विस्तार श्रावस्ती, सारनाथ, कौशांबी, सांची इ. ठिकाणी झाला. याच काळात भारताच्या वायव्येला शक, यवन, इराणी, इ. ज्या परकीय संस्कृती नांदत होत्या, त्यांच्यामध्ये एका कलाशैलीचा विकास झाला. तिलाच गांधारशैली असे नाव आहे. इ. स. च्या पहिल्या शतकापासून सुमारे सहाव्या-सातव्या शतकापर्यंत या शैलीत कलानिर्मिती होत राहिली. ग्रीक शिल्पकलेचा या शैलीवर अधिक प्रभाव आहे. मूर्ती निर्माण करताना आदर्शाकडे लक्ष न देता यथार्थ चित्रण करायचा त्यांनी प्रयत्न केला. त्यामुळे आध्यात्मिक आशयाच्या दृष्टीने त्या मूर्ती सुन्या झाल्या. भारतीय परिभाषेत मूर्तीच्या शारीरिक सौष्ठवापेक्षा, तिच्यात भक्ताचे आध्यात्मिक भाव जागविण्याचे व वाढविण्याचे सामर्थ्य किती आहे, यावर तिची श्रेष्ठता ठरत असते. या कसोटीवर ठेवून पाहता गांधार शैलीची बुद्धमूर्ती फार फिकी ठरते.



विष्णू–तक्षशीला

**गुप्तकाल** – इ. स. चे चौथे शतक हे भारतीय कला व संस्कृती याचे सुवर्णयुग मानले जाते. शिल्प व चित्र, वस्त्र व आभूषण, भाषा व साहित्य ही सर्व क्षेत्रे या कालात अद्‌भुत सौंदर्याने नटून गेली. आकृतीचे माधुर्य व मंडण याचा मधुर मिलाफ जसा गुप्तकालात दिसतो, तसा तो दुसऱ्या कोणत्याही कालात आढळत नाही. राजघाट येथील मातीच्या खेळण्यांपासून तो अजटा येथील दिव्य भित्तिचित्रांपर्यंत एक अखंड व रमणीय कलाधारा वाहत राहिलेली दिसते.

गुप्तकालात चित्र, शिल्प, नृत्य व सगीत यांची ललितकला म्हणून समाजात आराधना होऊ लागली. या सर्व कला हे नागरी शिक्षणाचे एक अंग बनले. गुप्तकालीन कला ही बरीच अंतर्मुख आहे. कला व काव्यसाहित्य या क्षेत्रांत तत्कालीन कलाकारांनी आत्मतत्त्वापर्यंत पोचण्याचा प्रयत्न केलेला आढळतो. अजंटा येथील भित्तिचित्रांपैकी पद्मपाणि अवलोकितेश्वर, सारनाथ येथील धर्मचक्रप्रवर्तनमुद्रेतील बुद्ध, मथुरा येथील आर्य यशदित्राने स्थापलेला बुद्ध हे सर्व गुप्तकालीन कलेचे अत्युत्कृष्ट नमुने आहेत. सश्रद्ध जनतेच्या धार्मिक भावनांना आवाहन करण्याचे व अध्यात्मिक शातीचे साक्षात रूप समोर उभे करण्याचे सामर्थ्य या सर्व मूर्तींत आहे. संस्कृतीच्या उन्नत अवस्थेत प्रायः कला ही सर्वोत्तम सौदर्याचे माध्यम बनते व त्याचबरोबर आत्मशक्तीला प्रेरणा देणाऱ्या आदर्शाचीही ती सांकेतिक भाषा बनते. गुप्तकालात मूर्तींचे बाह्य रूप नितळ झाले व वस्त्रे आणि अलंकार यांनी त्याच्या शोभेत अधिक भर पडली. याबरोबरच त्या मूर्तीला किंवा शिल्पाला एक विलक्षण भावपूर्णताही प्राप्त झाली. मूर्तीची ही भावमुद्रा म्हणजे त्या कलाकृतीचा प्राणच होय.



भित्तिचित्र–अजटा

तत्कालीन भारतीय शिल्पाचा संसार पाहायचा तर मथुरा व देवगढ येथे असलेले गुप्त कालांतील एक सुदर मंदिर पाहिले पाहिजे. या दशावतार मंदिराचे द्वारतोरण शिल्पसौदर्याचे अप्रतिम उदाहरण म्हणून सगळे कलावेत्ते वाखाणतात. त्याच्या पार्श्वस्तंभांवरील प्रतीहारी स्त्री-पुरुषांच्या मूर्ती तर अत्यंत रमणीय आहेत.

गुप्त कालात मातीच्या खेळण्यांना महत्त्वाचे स्थान होते. राजघाट, पद्मावती, अहिच्छत्र व श्रावस्ती येथील उत्खननात मातीची अनेक सुदर खेळणी सापडली आहेत.



द्वारपाल–वेरूळ

गुप्त कालात चित्रकलेचा प्रचार ही बराच झाला होता. अजंटा हे गुप्तकालीन चित्रकलेचे महान तीर्थ आहे. त्यामुळे या कालातील चित्रकलेला अजंटाशैली असे नाव मिळाले. बाघ येथेही गुप्तकालीन भित्तिचित्रे आहेत.

आठव्या शतकात भारतीय कलेला एक नवे ओज प्राप्त झाले. कलेतील कोमल व सुकुमार भाव मागे पडून त्याची जागा भव्यता व विशालता यांनी घेतली. कलाक्षेत्रात मनुष्याच्या कायपरिमाण मूर्ती मागे पडून देवसदृश विशाल प्रतिमा निर्माण होऊ लागल्या. प्रतापी राष्ट्रकूटांनी वेरूळ येथे भव्य कैलासमदिर निर्माण केले. वेरूळच्या मदिरातील प्रत्येक शिल्पकृती या नव्याने स्वीकारलेल्या भव्यतेची साक्षीदार ठरली आहे.

**पूर्व मध्यकाल**– मध्यकालाचे साधारणपणे पूर्व व उत्तर असे दोन भाग पाडतात. आठवे व नववे शतक हा पूर्व मध्यकाल व दहावे ते बारावे शतक हा उत्तर मध्यकाल होय. पूर्व मध्यकालात उत्तरेला गुर्जर, प्रतीहार, दक्षिणेला राष्ट्रकूट, त्याच्याहीखाली काची येथे पल्लव व पूर्वेला पाल अशी चार मोठी राज्ये नांदत होती. गुर्जर व प्रतीहार यांनी निर्मिलेली शिल्पे व स्थापत्ये बहुतेक सर्व नष्ट झाली आहेत. कांची येथील कैलासनाथमंदिर व त्यातील मूर्तिसंभार व पाल युगातील अनेक मूर्ती ही पूर्व मध्यकालीन कलेची उदाहरणे आहेत.

या कालात पौराणिक देवतांच्या आख्यानात्मक चरित्राचे चित्रण अनेक ठिकाणी केलेले आढळते. शिव व विष्णू यांच्या दैवी लीलांचे ओजस्वी चित्रण हे या काळातील शिल्पकलेचे वैशिष्टय ठरले आहे. शिवतांडवाचे शिल्पमय प्रदर्शन ही या युगाची सर्वोच्च कल्पना व कलाकृती होय.



बुद्ध—मथुरा

**उत्तर मध्यकाल**— या कालात शिल्प व स्थापत्य या दोन्ही कलांची विशेष उन्नती झाली. उत्तरेला खजुराहो, पश्चिमेला अबू व शत्रुंजय, दक्षिणेला तंजाऊर व हळेबीड आणि पूर्वेला भुवनेश्वर व कोणार्क ही त्या कालातील कलेची काही प्रमुख केंद्रे होती. उत्तरेत चंदेल्यांनी स्थापत्यकलेला विशेष प्रोत्साहन दिले. माळव्याच्या उदयादित्य व भोज या परमारवंशी राजांनी काही उत्कृष्ट मंदिरे बांधविली. उदयादित्याने बांधलेले उदयपुर येथील उदयेश्वर मंदिर शिल्पाच्या दृष्टीने अत्यंत भव्य आहे.



दिलवाडा मंदिरातील नक्षीकाम

दिलवाडयाच्या मंदिरातील संगमरवरी काम अत्यंत नाजूक असून त्यात अलंकरणाची रेलचेल आहे. कोणार्क येथील सूर्यमंदिराची सजावटही अत्यंत वैभवशाली आहे.

पूर्व मध्ययुगात ज्या प्रमुख देवतांचा उत्कर्ष झाला होता, त्यांच्या स्वरूपाचे आणखी तपशील त्यापुढील काळात निर्माण झाले. देवतांचे अनेक नवे आविष्कारही अस्तित्वात आले. मातृका, योगिनी, यक्षिणी व शासनदेवता यांची संख्या वाढली. या वाढत्या देवसंख्येला अनुरूप अशा ध्यानधारणा व साधनमाला यांचा प्रचार समाजातही वाढला. या कालातील धार्मिक व सामाजिक जीवनाचे एक वैशिष्टय म्हणजे स्त्रीला पुरुषापेक्षा महत्त्व मिळाले हे होय या काळात सर्वसामान्य लोकांची उद्योगप्रियता कमी होऊ लागली आणि स्त्री-पुरुष संबंधातल्या गुह्य भावनांनी धार्मिक पूजेअर्चेत स्थान मिळविले. सहजप्राप्य अशा संभोगसुखाची ब्रह्मानंदाशी तुलना होऊ लागली. याच काळात शिल्प व चित्र यांत स्त्री-पुरुषांच्या नग्न मूर्ती चित्रित होऊ लागल्या. प्रत्येक देवतेबरोबर तिची एक शक्तीही मानली जाऊ लागली. कामभावनेचे विडंबन करणाऱ्या अशा अनेक मूर्ती खजुराहो, भुवनेश्वर व कोणार्क इथल्या मदिरांत आढळतात. तिबेटातील बौद्ध कला ही बंगालच्या पालकलेचेच रूपातर आहे. तिथे नग्न किवा यब्-युम् मूर्ती अधिक प्रमाणात आढळतात. या कालात दार्शनिक व इतर क्षेत्रातही नवीन विचारांचा स्वीकार होण्याचे बंद झाले. मूर्तिकलेच्या क्षेत्रातही वैशिष्टयाचा ऱ्हासच झाला. त्यामूळे सर्व मूर्ती एकमेकीच्या प्रतिकृती भासू लागल्या.

या कालात शिल्पाच्या सजावटीसाठी पत्रलता कोरण्याची पद्धत सुरू झाली. याचीच परिणती उत्तर मध्ययुगाच्या शेवटी दगडात कोरलेल्या जाळयात दिसून येते. वास्तुकलेतही या वेळी अनेक सूक्ष्म भेद निर्माण झाले. चंदेलकला व दक्षिणेतील होयसळकला या दोहोतही त्रिकूटाचल मदिरांच्या शैलीचा विकास झाला. विशालता व भव्यता हे या शैलीचे वैशिष्टय आहे. त्यातील सजावट वैभवाची निदर्शक आहे. हिंदुयुगाच्या अभ्युदयाचे हे अंतिम दृश्य होय. [ सम्मेलन पत्रिका-कला अंक; क. औ. सं.; फॅ. इं. क. ]

**कलानिधी** बांसरीचा एक प्रकार. ही १६ अंगुले लांब असते. जेव्हा १ ते ७ छिद्रे बोटांनी बंद करून फुक मारतात, तेव्हा तिच्यातून मद्रस्थायी ऋषभ ऐकू येतो. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**कलापग्राम** हिमालयातले एक पौराणिक स्थान. अनेक थोर ऋषि-मुनींच्या वास्तव्यामुळे हे स्थान प्रसिद्ध आहे (भाग. पु. १०.८७.७). देवाची नावाचा एक कुरुवंशातील

पुरुष या स्थानी तप करीत असून तो अगामी कृतयुगाच्या आरंभी कलियुगात नष्ट झालेल्या वर्णाश्रम–धर्माची पुनश्च प्रतिष्ठापना करील, असे भागवतात म्हटले आहे (१२.२.३७). इक्ष्वाकुवंशातला मरु राजाही कलापग्रामी तप करीत आहे, असेही भागवतात सागितले आहे. [ पु. इं. ]

**कलाबहू** बंगालमधला एक लोकोत्सव. हैमवती दुर्गा विवाहानंतर कैलासाहून माहेरी आली होती, या पौराणिक घटनेवर हा उत्सव आधारलेला आहे. बंगालमध्ये नववधू नवरात्रात माहेरी येते. तिला त्या वेळी आसनावर बसवून माहेरची माणसे साडी-चोळी देतात. तिच्या शेजारी केळीचा एक खुट उभा करून त्यालाही साडी नेसवितात. ती केळ हे दुर्गेचे प्रतीक होय. त्यालाच कलाबहू म्हणतात.

**कलाल** एक जात. या जातीला कलवार, कलार, कलान अशीही नावे आहेत. ही जात भारतात सर्वत्र आढळते. या जातीत हिंदू, मुसलमान, शीख असे वेगवेगळ्या धर्माचे लोक आढळतात. पूर्वी हे लोक दारू गाळण्याचा धंदा करीत; सांप्रत अन्य व्यवसाय करू लागले आहेत. यांच्यांत अनेक पोटजाती आहेत.



कलाल–राजस्थान

बंगालमधले कलाल ब्राह्मणांकडून आपले संस्कार करवितात. सोखा नामक देवतेची श्रावणातल्या सोमवारी पूजा करतात व तिला दूध व तांदूळ वाहतात. बुधवारी व गुरुवारी काली व बंदे या देवतांना पशुबली व मिठाई देतात. मंगळवारी गौराईला डुकराचे पिलू व मद्य देतात. यांच्यातील एक पोटजात पाचाण पीराला भजते, तर दुसरी बरहम् देवाला भजते. उ. प्रदेशातले कलाल दारूभट्टी चालू असता मदन या मद्यदेवतेची पूजा करतात. आवळी, लिंब व पिंपळ, हे वृक्ष पूज्य मानतात. रविवारी सूर्यदेवाप्रीत्यर्थ उपवास करतात. पृथ्वीदेवता सायरी हिला मद्य अर्पण करतात.

मध्यप्रदेशातले कलार दुल्हा देवाला भजतात. काही लोक एकेश्वरीमताचे असून ते केवळ एका भगवानालाच मानतात. बहादुर कलरिया व सुसन चाबारी हे दोघे पितापुत्र मोठे कलाल पुरुष होऊन गेले. कलाल त्यांना देव मानून त्यांचे उत्सव करतात.

छत्तिसगडात दंडसेन नावाचा एक कलालांचा वर्ग आहे. त्यांच्याविषयी पुढील आख्यायिका सांगतात—

वालोदच्या राजपूत राजाचा एक पुत्र व एक कलालपुत्र हे दोघे जिवलग मित्र होते. राजपुत्र आपल्या मित्राकडे वारंवार जात असे. त्या जाण्यायेण्यात कलालपुत्राची बहीण राजपुत्राच्या मनात भरली. त्या दोघांचे संबंधही जमले. मुलीच्या बापाला ते रुचले नाही. त्याने एक दिवस राजाकडे जाऊन त्याला विचारले, " माझ्या घरी रोज एक कुत्रा येतो व तो माझे घर विटाळतो; त्याला काय करावे ? "

" त्या कुत्र्याला जिवे मारावे " राजा उत्तरला.

" मी त्या कुत्र्याला मारले, तर मला शिक्षा नाही ना होणार ? "

" मुळीच नाही. "

हे अभिवचन घेऊन कलाल आपल्या घरी गेला व राजपुत्र त्याच्या मुलीशी एकांत करायला आला असता कलालाने त्याचा वध केला. त्यामुळे सगळे राजपूत खवळले. त्यांचे व समस्त कलालांचे युद्ध झाले. त्यात कलालांचा विजय झाला. पण त्यानंतर कलालांनी वालोदचे राज्य सोडले व ते अन्यत्र राहायला गेले. अजूनही छत्तिसगडी कलाल हा नेम पाळतात. ते वालोदमध्ये जात नाहीत.

विदर्भात कलालांची मठिया कलार म्हणून एक पोटजात आहे. हे लोक स्वतःला क्षत्रिय म्हणवितात. यांच्यात जातपंचायतीची पद्धत व्यवस्थित चालते. जातीतल्या अपराध्यास पंचायत वाळीत टाकते. हा बहिष्कार अत्यंत कडक असतो व अपराधी मनुष्य वठणीवर येऊन प्रायश्चित घेईपर्यंत तो चालू राहतो.

गुजरात व महाराष्ट्र या प्रदेशातले कलाल उ. प्रदेशातून इकडे आले असावे. यांची राहणी निकृष्ट असते. हे गुरेही

पाळतात. खंडोबा, भैरोबा, देवी, ही याची उपास्य दैवते आहेत. जातीतला प्रमुख मनुष्य इतरांच्या विचाराने जातीय तंटे मिटवितो.

**विवाहप्रथा**—मुलीची लग्ने लहानपणीच करतात. लग्ने बहुतेक ज्ञातीभोजनाच्या वेळी ठरवितात. देज घेत नाहीत; पण वधूचे आईबाप फारच निर्धन असले, तर वरपक्ष त्याना आर्थिक मदत करतो. लग्ने ब्राह्मणपुरोहिताकरवी लावली जातात. काडीमोड व विधवाविवाह रूढ आहे.

कलालांना मद्य–मांस चालते. अनेक कलाल पोटजातीची, आपला दर्जा उच्च करण्याबद्दल धडपड असते. म्हणून कलालांच्या भिन्न भिन्न पोटजातीत उच्चनीच भेद निर्माण झाले आहेत. **पाहा**— कलवार. [ म. ज्ञा. को. ]

**कलावंत** एक जात. ही जात मुख्यत्वे कर्नाटक, गोमतक व रत्नागिरी जिल्हा या भागात आढळते. गाणे व नाचणे या कलांची पिढीजात उपासना या वर्गात होत असल्यामुळे यांना हे नाव मिळाले असावे. कर्नाटकात या जातीतल्या पुरुषांना ‘ गाण ’ असे नाव आहे. हे लोक आपण गंधर्व-अप्सरा यांचे वंशज असल्याचे सागतात. विजयनगरच्या राजांजवळ अनेक कलावंतिणी असत व दरबारात त्याना मोठा मान असे. विजयनगर मुसलमानांनी काबीज केल्यावर तिथल्या कलावंतिणी सोंधे आणि कानडा या भागात राहायला गेल्या.

कलावंतांत पाच वर्ग आहेत, ते असे—कोकणी, मराठा, कर्नाटकी, लिगायत व तेलंगी. कोकणी कलावंतांत बांदोडकर, बोरकर, जोतकर, काकोडकर, नावेलकर, पर्वतकर, फातर्पेकर, शिरोडकर, इ. आडनावे आहेत. एका आडनावात लग्नसंबंध करीत नाहीत.

गोमंतकातला कलावंतसमाज सांप्रत गोमतक मराठा या नावाने ओळखला जातो. ‘ गोमंतक मराठा समाज ’ या नावाने त्यांची एक सुसंघटित जातिसंस्था समाजाच्या सर्वांगीण उत्कर्षाचे काम करीत आहे. या समाजात सांप्रत शिक्षणाचा प्रसार चांगल्या प्रकारे होत आहे. त्याच्यातले कित्येक स्त्री–पुरुष उच्च बौद्धिक व्यवसायात मान–मरातब मिळवून बसलेले दिसतात. या समाजाने कला व ज्ञान या दोन्ही क्षेत्रांतली फार मोठी माणसे भारताला दिली आहेत. स्त्रियांनी देवदासी म्हणून राहणे व तनुविक्रयासारख्या निंद्य कर्मात जीवन व्यतीत करणे, या गोष्टींचा या समाजाला आता अत्यंत तिटकारा आलेला आहे. त्यांच्यांतल्या शिकलेल्या सुसंस्कृत मुली सांप्रत अनेक उच्च जातीतल्या मुलांशी लग्ने करून मानास्पद गार्हस्थ्यजीवनाचा लाभ घेऊ लागल्या आहेत. गायन–वादनाच्या कलेला हा वर्ग अजून पारखा झालेला नाही; पण शिक्षणाने त्यांच्यापुढे अनेक नवी नवी महत्त्वाकांक्षेची क्षेत्रे उभी झालेली असल्यामुळे त्याच्या पुढील पिढयांत गायन–वादनकला हळूहळू लुप्त होत जाणार असे दिसते.

पूर्वी या जातीत मुलीचे लग्न करीत नसत. त्या ऐवजी शेस नावाचा एक लग्नसदृश विधी करीत. मुलगी आठ, नऊ वर्षांची झाली, की तिची शेस घालायची असा सकेत होता. त्यासाठी जातीतल्या एका मुलीलाच वरवेष चढवून तिच्या हाती एक कटचार देत. जिची शेस व्हायची ती मुलगी वधूवेष करून त्या कटचारीला माळ घाली. या विधीसाठी एखाद्या पुरुषाला वर म्हणून उभा केल्यास तो पुरुष तिच्यावर आपला हक्क प्रास्थापित करील, या भीतीने मुलाऐवजी मुलीलाच वरवेष देण्याची चाल पडली असावी. हा शेसविधी पुष्कळ खर्च करून समारभाने साजरा करीत. पायांत चाळ बांधणे आणि अंगावर शेला घेणे हे अधिकार या समारंभातच त्या मुलीला मिळत. शेस झाल्यानंतर मग ती मुलगी देवाच्या सेवाचाकरीला पात्र समजली जाई. देवावर चवरी वारणे, त्याच्या समोर नृत्य करणे, देवाचा रथ किवा पालखी निघाली असता तिच्यापुढे पेण्यापेण्याला नाचणे, देवाला आरती ओवाळणे अशी त्यांची देवसेवेची कामे असत. सांप्रत कलावंतात देवाची सेवा असली तरी शेसविधी मात्र होत नाही. हायकोर्टाने अशा प्रकारचे लग्न (मुलीशी मुलीचे) फौजदारी गुन्ह्यांत दाखल केल्यामुळे तो प्रकार आता कायद्याने बंद झाला आहे.

कलावतिणी या लग्न न करता देवदासी म्हणून राहत असल्याकारणाने त्या जातीतल्या मुलांना अन्य जातीतल्या मुली विकत घेऊन त्यांच्याशी लग्न करावे लागते. पूर्वी मातेची संपत्ती स्त्रीवारसापद्धतीने मुलीकडे जाई. पण हायकोर्टाने त्याबाबतीतही हस्तक्षेप करून मातेची संपत्ती तिच्या मुलीना आणि मुलांना समप्रमाणात वाटून दिली जावी, असे ठरविले आहे.

कलावंताचा पिढीजात धंदा गाणे, नाचणे हा होय. त्या प्रकारच्या सेवेसाठी यांना देवस्थानातून जमिनी इनाम दिलेल्या असतात. कलावंतिणी नृत्य–गायन करतात, तेव्हा जातीतले पुरुष सारंगी व तबला वाजवून त्यांना साथ करतात. जुन्या काळी सुखवस्तू लोकांत लग्नप्रसंगी कलावतिणीचे गाणे करण्याची पद्धत होती. अजूनही तिचे अवशेष अढळतात. देवळी, बदे, आडबटकी, पडिआर या जातीतल्या स्त्रियांना देवापुढे नृत्य करायचे असल्यास कलावंतिणीकडून आधी दीक्षा घ्यावी लागते. दीक्षा घेऊनही त्यांना कलावंतिणीचा दर्जा प्राप्त होत नाही.

कर्नाटकी कलावंतांना पात्रदवरु म्हणतात. यांच्यांतल्या

स्त्रिया स्वतःला रंभा–उर्वशीच्या प्रतिनिधी समजतात. कोकणी कलावंतिणींप्रमाणे त्यांच्यांतही सातव्या वर्षी मुलींना चाळ व ओढणी देण्याचा विधी केला जातो. हे लोक शेसविधीला पुडी म्हणतात. फरक एवढाच की मुलगी वरवेषधारी स्त्रीच्या हातातल्या कट्यारीला माळ घालण्याऐवजी मड्डलाला (मृदंग) माळ घाली.

कार्तिकस्वामी ही कलावंतांची यजमानदेवता होय. ही एक आश्चर्याचीच गोष्ट म्हटली पाहिजे. पण एका पौराणिक कथेवरून या संकेताचा उगम कळून येतो. कार्तिक स्वामी जेव्हा तारकासुराला मारण्याच्या मोहिमेवर निघाला, तेव्हा वाटेत अप्सरांनी नृत्यगायन करून त्याचे चित्त उल्हसित केले अशी एक कथा आहे. तेव्हापासून कार्तिकेय हा कलावंतिणीचा यजमानदेव बनला. याशिवाय गोमंतकातल्या कलावंतिणी म्हाळसा, शांतादुर्गा, कामाक्षी, इ. देवतांना भजतात. कर्नाटकातील कलावंतिणी मैलारदेव, गुत्तेम्म, फुलगेम्म या देवताना भजतात. अय्यप्प किंवा शास्ता या देवाला गुरू मानतात. कऱ्हाडे, चित्पावन किंवा हविक हे ब्राह्मण कलावंताच्या घरी पौरोहित्य करतात.

पूर्वीच्या राजवटीत ' नायकीण कलावंत ' म्हणून एक खातेच असे. सकाळी राजाच्या देवघरातील देवापुढे नृत्य करणे व दरबाराच्या आणि कोणत्याही मोठ्या समारंभाच्या प्रसगी गाणेनाचणे यांसाठी कलावंतिणींची नेमणूक होत असे. खासगीच्या अनेक खात्यांपैकी हे एक खाते असे. **पाहा**– देवदासीप्रथा. [ म. ज्ञा. को.; मुं. इ. जा. ]

## कलावंत व कव्वाल

एक गाणारी जात. यांची वस्ती राजस्थान व उ. भारत या भागात आहे. हिंदू व मुसलमान असे दोन्ही धर्माचे कलावंत आहेत. प्रख्यात गायक तानसेन याचा जन्म कलावंत जातीतच झाला होता, असे सांगतात. या जातीत अद्यापही गाणे शिकणाऱ्या विद्यार्थ्याला तानसेनाच्या नावाने गंडा बांधला जातो.

कव्वाल ही उपजाती कलावंतांतूनच निर्माण झाली आहे. अमीर खुस्रवच्या काळात सामुदायिक रूपात कव्वाल्या म्हणण्याची प्रथा प्रथम सुरू झाली. कव्वाली गाण्याची परंपरा ज्यांनी चालविली आणि वाढविली ते लोक पुढे कव्वाल या नावाने ओळखले जाऊ लागले. कलावंतांच्या घराण्यात प्राधान्याने शास्त्रीय संगीताची परंपरा चालू राहिली. ते लोक अमीरांच्या आश्रयाला राहिले व ध्रुपद गायकीत नावाजते ठरले. सांप्रत प्रसिद्ध असलेले प्रख्यात ध्रुपदिये डागर बंधू हे कलावंतांपैकीच आहेत.

या जातीत हिंदू-मुसलमानांचे एक चमत्कारिक मिश्रण आहे. काही लोक आपल्या नावापुढे खाँ लावतात, तर काही लोक सेन लावतात. उदा० रहिमनखाँ व अमृतसेन. कलावंतात संगीतशास्त्राचे जे जाणकार असतात, त्यांना पोथीपंडित म्हणतात. [ परंपरा लोकगीत ]

## कलावा

एक प्रकारचे सुती वस्त्र. याचे संस्कृत नाव कलाप असून हे पचरंगी व चित्रित असते, असे बाणाच्या कादंबरीत वर्णन आहे. हिंदी प्रदेशात त्यालाच कलावा म्हणतात. सर्व मांगलिक कार्यात याचे प्रचलन आहे. विवाहप्रसंगी कलावे अहेर म्हणून देण्याचीही प्रथा आहे. [ का. ए. सां. अ. ]

## कलिंग

(१) एक देश व राज्य. सांप्रतच्या ओडिसाला प्राचीन काळी कलिंग म्हणत. ते पूर्वेकडील एक प्राचीन राज्य होते. ऋग्वेदात कलिंगाचा स्पष्ट उल्लेख नाही; पण कक्षीवान ऋषीचा उल्लेख आहे. हा कक्षीवान कलिंग देशाच्या राणीच्या दासीचा पुत्र होता (ऋ. १. १२५ सा. भा.) महाभारतात या देशाचे स्थान आर्यावर्ताच्या पूर्वेस असल्याचे सांगितले आहे. हा देश इंद्रप्रस्थाच्या आग्नेयीस होता. तो वैतरणी नदीच्या काठाकाठाने वसलेला असून, त्याची दक्षिण सीमा आंध्रप्रदेशाला भिडली होती. वेगवेगळ्या ग्रंथांत त्याच्या सीमा वेगवेगळ्या सांगितल्या आहेत. कलिंगाचा विस्तार पुरीपासून गंगेपर्यंत होता, असे कामसूत्र सांगते. ५ व्या शतकातील एका शिलालेखावरून त्याचा विस्तार महानदीपासून कृष्णेपर्यंत होता, असे कळते.

अर्जुन कलिंगाच्या तीर्थयात्रेला गेला होता. सहदेव दिग्विजयासाठी इथे आला होता. कर्णाने व श्रीकृष्णाने या प्रदेशावर स्वारी केली होती. परशुरामानेही कलिंग जिंकला होता. इथला राजा चित्रांगद याच्या कन्येशी दुर्योधनाने विवाह केला होता. भारतीय युध्दात कलिंगराजा आपल्या गजदळासह कौरवांच्या बाजूने लढला होता. धर्मराजाने कलिंग देशात येऊन एक यज्ञ केला होता.

कलिंगाचा उल्लेख नेहमी अंगवंगाच्या बरोबर होतो. सुदेष्णा नावाच्या बलिराजाच्या राणीला दीर्घतमा ऋषीपासून जे पाच पुत्र झाले, त्यातल्या एकाचे नाव कलिंग होते. त्याने पुढे आपल्या नावाने राज्य स्थापले. बौद्ध वाङ्मयातही याचे बरेच उल्लेख सापडतात. बुद्धाच्या निर्याणानंतर त्याच्या अवशेषाची वाटणी झाली, त्या वेळी तेथील ब्रह्मदत्त राजाच्या वाटणीस बुद्धाच्या डाव्या बाजूचा एक दात आला, अशी बौद्धकथा आहे. कलिंगाचे उत्तर व दक्षिण असे दोन विभाग होते, असे बौद्ध वाङ्मयावरून कळते. उत्तर कलिंगाचे राज्य सिंहबाहू नामक पुरुषाने

तेथील जंगल तोडून निर्माण केले होते. महाभारतातही कलिंग देश हा जगलांचा प्रदेश असल्याचे म्हटले असून, कौटिल्याने या प्रदेशात हत्ती उत्तम निपजतात, असे सांगितले आहे. आणखी एक महत्त्वाचा उल्लेख म्हणजे कृतयुगात पहिला मानव या प्रदेशात उत्पन्न झाला हा होय (वायु पु. ५८. ११०).

कथासरित्सागरात कलिंगाचे बरेच वर्णन येते. कलिंगाचा एक राजा प्रद्युम्न नामक होता व शोभावती ही त्याची राजधानी होती. मदिरावती लबकात एक ब्राह्मण नरवाहनदत्ताला त्या नगरीचे वर्णन पुढीलप्रमाणे सांगत आहे—

'शोभावती नगरीत कलीला प्रवेश नाही. कोणत्याही अन्य राष्ट्राने तिला पाहिले नाही. कारण विधात्याने अपूर्व कौशल्य दाखवून ती नगरी निर्मिली आहे...'

विषमशील लंबकात आणखी एक कथा आहे. विक्रमादित्याने कलिंग राजाला सांगितले, की तुझी कन्या मला दे. पण तो कबूल होईना. तेव्हा विक्रमादित्याने वेताळाच्या मार्फत त्याला घाबरवून सोडले व ती कन्या मिळविली.

इतिहासावरून असे दिसते, की मौर्य साम्राज्याच्या स्थापनेपूर्वी कलिंग हे एक प्रबल राज्य होते. डॉ. मित्र यांनी ओडिसातल्या गुहेत सापडलेले काही शिलालेख प्रसिद्ध केले आहेत. त्यात वीर, विधुक व ऐर अशी कलिंगाच्या राजांची नावे आढळतात. त्यांपैकी ऐराचा काल सनपूर्व चौथे शतक हा आहे. नवनंदांपैकी एका नंद राजाने कलिंगाचा काही भाग जिंकून घेतला होता. अशोकाचा कलिंगविजय तर प्रसिद्धच आहे. सनपूर्व २६१ या वर्षी अशोकाने कलिंग देश जिंकला. या प्रदेशात त्याने दोन शिलाशासने कोरली आहेत. त्यावरून या प्रदेशाचा राज्यकारभार चालविणे त्याला फार त्रासाचे झाले असावे, असे वाटते. एक तर तो प्रदेश अशोकाच्या मुख्य राजधानीपासून फार दूर होता व दुसरे म्हणजे तिकडचे सुभेदार व अधिकारी अशोकाच्या हुकुमाची अंमलबजावणी मनापासून करीत नव्हते. त्या सुभेदारांना स्वतंत्र होण्याची हाव होती. त्यामुळे अशोकाच्या मृत्यूनंतर थोड्याच दिवसात कलिंग देश स्वतंत्र झाला. चेत नावाच्या राजवशाने त्यावर स्वामित्व मिळविले. सुप्रसिद्ध राजा खारवेल हा याच वंशातला होता. उदयगिरी येथील एका शिलालेखात खारवेलाने स्वतःची व आपल्या वंशाची हकीगत दिली आहे. याच खारवेलाने सनपूर्व २१२ या वर्षी मगधराजाचा पराभव करून त्याला आपला मांडलिक बनविले. ग्रीकांचे आक्रमण परतवून लावण्याच्या कामी या खारवेलाने पुष्यमित्राला साहाय्य केले होते. पुढे हा प्रदेश वेंगीच्या चालुक्यांच्या ताब्यात गेला असावा (इ. स. ७५०). युआन च्वांगच्या वेळी या देशाची फार दैना झाली होती. राज्यातली लोकसंख्या कमी होऊन सर्वत्र जंगल माजले होते. इ. स. ९९० मध्ये राजराज चोळ याने कलिंग देश जिंकला व त्याचे स्मारक म्हणून महेंद्रगिरीवर एक जयस्तंभ उभारला, असा उल्लेख आढळतो. ११ व्या शतकाच्या अखेरीस हा प्रदेश कुलोत्तुंग चोळ याने जिंकून घेतला. त्यापुढे तो बहामनी राजे, कुतुबशहा, मोगल, निजाम व इंग्रज यांच्या हाती आला. [ए. इं.; ट्रा. ए. इं., स्ट. जॉ. ए. मि. इं.; ए. इं. सा. इं. हि. क; म. ज्ञा. को.; पु. इ.]

(२) कृतयुगातील एक दैत्य. याने स्वर्ग जिंकून दिक्पालांच्या जागी असुरांची स्थापना केली. पण श्रीमाता देवीने याच्यावर पर्वत ठेवून ती स्वत· त्यावर बसली. अशा रीतीने त्याचा पराभव झाला. [प्रा. च. को.]

(३) मानससरोवराच्या दक्षिणेचा एक पर्वत. [पु. इं.]

**कलिचतुर्दशीव्रत** एक जैनव्रत. आषाढ शु. १४ पासून व्रताला प्रारंभ होतो. त्या महिन्यापासून पुढच्या चार महिन्यातल्या शु. १४ शीस उपवास करतात. असे चार वर्षे व्रत केल्यावर मग त्याचे उद्यापन करतात. [जै. व्र. वि. सं.]

**कलित** आसाममधील एक जात. हे लोक ब्रह्मपुत्रेच्या खोऱ्यात राहतात. कामरूप, नौगांग, दरंग व शिवसागर या चार जिल्ह्यात ते बहुसंख्य आहेत. जुन्या काळी आसामच्या जीवनात या लोकांचे प्रभुत्व होते. परदेशी अभ्यासकांनी मध्ययुगीन आसामची वस्ती कलित व कलितेतर अशीच विभागलेली होती. हे लोक आर्य वंशाचे असून ब्रह्मपुत्रेचे खोरे त्यांनीच प्रथम वसविले, असे इतिहासज्ञ सांगतात. कलिताचा सामाजिक दर्जा ब्राह्मणांच्या खालोखाल आहे. गेट या लेखकाने आसामचा इतिहास या ग्रंथात म्हटले आहे, की कलित लोक बहुतांशी आर्यवंशाचे दिसतात. जे आर्य प्रथम आसामात शिरले, त्यांनी तेथील मूळच्या आर्येतर जमातीतील स्त्रियांशी विवाह केले. त्या संबंधांतून जी प्रजा निर्माण झाली, तेच हे कलित होत. कलितांचा दावा असा आहे, की ते क्षत्रिय असून परशुरामाच्या भीतीने या प्रदेशात येऊन लपून राहिले. कुल लपविले म्हणून त्यांना कुललुप्त म्हणू लागले व पुढे त्या शब्दाचा कलित असा अपभ्रंश झाला.

या कुललुप्त शब्दाविषयी आणखी एक उपपत्ती सांगितली जाते, ती अशी—

इ. स. च्या १५ व्या शतकात प. आसाममध्ये खेन वंशाची सत्ता होती. ही सत्ता एका गुराख्याच्या मुलाने स्थापन केली

आणि स्वतःला नीलध्वज असे नाव घेतले. खेन हा ऑस्ट्रिक भाषेतील शब्द असून त्याचा अर्थ बालक असा आहे. नीलध्वज हा एक अनाथ बालक होता. तो राजा झाल्यावर लोकानी त्याला कुलहीन न म्हणता कुललुप्त असे एक प्रकारचे गूढ नाव दिले असावे. बंगालच्या रंगपुर जिल्ह्यात खेन नावाचे लोक अद्यापि आहेत. आसाममधील त्याच जातीच्या लोकाना कलित म्हणतात.

काही वर्षामागे आसामी पंडितांमध्ये कलित जातीच्या इतिहासाविषयी बराच वादविवाद झाला होता. त्यातल्या काही पंडितांनी वरील कुललुप्त कल्पनेला मान्यता दिली, तर काहींनी असे मत व्यक्त केले, की पंजाबमधील आर्यांमध्ये चातुर्वर्ण्यव्यवस्था निर्माण होण्यापूर्वी ज्या आर्य टोळ्या आसाममध्ये गेल्या, त्या लोकांची प्रजा हेच सांप्रतचे कलित होत. या मताला कलिताच्या आणखी एका समजुतीचा आधार मिळण्याजोगा आहे. कलित सागतात, की ते रामाच्या काळात मिथिलेहून आसामात आले. राम हाच त्याचा मुख्य उपास्य देव आहे, यावरून त्याच्या या दाव्यात काही तथ्य असावेसे वाटते.

एका आसामी पंडितानें कुललुप्त कल्पना स्वीकारून कामरूपातल्या कलितांचा प्राचीन भारतातील कोल्टा, काल्टी, कालतोया, इ. टोळ्यांशी संबंध जोडला आहे. आसामच्या बाहेर अन्यत्रही कलित नावाचे लोक आहेत.

**शारीरिक ठेवण**– कलितांचा वर्ण काळसर किंवा पिंगट असतो. जिवणी रुंद असते. डोळे हरिणाच्या डोळ्यांसारखे टपोरे असतात. भुवया सुस्पष्ट व डोळ्यांच्या पापण्या मोठ्या असतात. कपाळ रुंद पण कानशिले अरुंद असतात. दाढीमिशा असतात. स्त्रिया बहुतांशी सुदर असतात.

शेती हा त्यांचा मुख्य व्यवसाय आहे. पण आसाममध्ये व्यावसायिक जाती नसल्याने कलितांमध्ये सोनार, लोहार, कासार असे व्यावसायिक लोकही आहेत. कलिताची घरे मोठी आणि प्रशस्त असतात. ते सवर्ण हिंदूचे सर्व धार्मिक आचार पाळतात. कलितांना सच्छूद्र मानतात. हे लोक मुली वयात आल्यानंतर त्यांची लग्ने करतात. [ कलित– बी. काकती – न्यू इं. अॅ. भाग २ ]

**कलित्तोगै** अंतिम तमिळ संघम्च्या ग्रंथांपैकी कलित्तोगै हा एक महनीय ग्रंथ आहे. कलि = विशिष्ट छंद व तोगै = संकलन. कलिछदातल्या १५० गीतांचे संकलन असा या ग्रंथाच्या नावाचा अर्थ आहे. याचे पाच भाग असून त्यांचे निर्माते अनुक्रमे पेरुंकडुंगो, कपिलर, मरुदन इळ नाहनार, चोळन् नल्लु रुद्गिरन् व नल्लंदुवनार हे आहेत.

ही प्रेमगीते असून संवादात्मक आहेत. हे संवाद युवती, तिचा प्रियकर आणि तिची दासी यांच्यामधले आहेत. यात व्यक्त झालेले प्रेम पवित्र आणि भावनोत्कट आहे. त्याला अश्लीलतेचा स्पर्श कुठेही झालेला नाही. प्रेम हा या ग्रंथाचा प्रधान रस असला तरी त्याच्या अनुषंगाने त्यात जीवनाचे वैचित्र्य, राजनीती, प्रकृतिसौंदर्य, जड प्रकृतीचे चेतनतत्त्वाशी तादात्म्य, नानाविध सूक्ती, नीती, धर्म, इ. गहन विषयांवर मनोग्राही विश्लेषणही आढळते. शब्दसौंदर्य, भावगांभीर्य, नादमाधुर्य आणि उपमा–रूपकांची चतुर योजना, या गुणांनी हा ग्रंथ परिपुष्ट आहे. कलित्तोगै हा संघम्कालीन तमिळ जीवनाचा आरसाच आहे, असे म्हटले तर त्यात अतिशयोक्ती होणार नाही. तो एक श्रेष्ठ आणि अमर ग्रंथ आहे. या ग्रंथातील एक सुदर नमुना पुढे दिला आहे–

**एरित्तरु कदिर ताङ्गि**
**एन्दिय कुडै नीलल्**
**उरित्तालन्द करकमुम्**
**उरै शानर् मुक्कोलुम्**
**नेरिप्पडच्चुवल अशैइ**
**वेरु ओरा नेञ्जत्तुक्**
**करिप्पु एवल् शेयल् मालैक्**
**कोळे नडै अन्दणीर्**
**वेव् इडैच् चेलल् मालै**
**ओलुक्कत्तीर इव इडै**

वरील पक्तीत सुरू झालेल्या संपूर्ण प्रसगाचा आशय पुढील प्रमाणे–

एक तरुणी आपल्या प्रियकराबरोबर निघून गेलेली असते. तिच्या या पलायनाने तिची माता बहुत दुःखी होते व तिला शोधायला निघते. भेटेल त्याला विचारीत सुटते. वाटेत तिला काही यात्रेकरू भेटतात. ती त्यांना विचारते.

" एक तरुण मुलगी तिच्या प्रियकरासह पळून जात असलेली तुम्ही पाहिलीत काय?"

त्यावर यात्रेकरू 'होय' म्हणतात व तिची समजूत घालतात.

"तू त्या सुंदर विनयशील तरुणीची माता आहेस,खरे ना? बाई, आम्ही त्या दोघांना पाहिले. या उजाड प्रदेशातील उष्ण वाळूतून प्रवास करताना आम्हाला ती भेटली. पण आम्ही त्याना एका शब्दानेही दोष दिला नाही. ती वैध मार्गानेच जात आहेत; मग कशाला त्यांना बोल लावायचा? त्याचे मीलन आता सर्वश्रुत झाले आहे. तू त्या तरुणीची आई असलीस तरी तिने तुझ्याजवळ किती दिवस राहायचे? ती आपल्या

प्रियकरासंगे निघून गेली, यात बिघडले कुठे? मोती सागराच्या पोटी जन्म घेतो; पण त्याचा उपभोग दुसरेच घेतात. मलयावर चंदन वृक्ष उगवतात; पण त्याची शीतल उटी दुसरेच लावतात. पोवळी खडकावर जन्म घेतात; पण त्या खडकाला त्यांचा उपयोग नसतो. साततारी वीणा तिच्यातून निघालेल्या स्वरांची गोडी चाखू शकते काय? हे सर्व लक्षात घे आणि मुलगी निघून गेली म्हणून दुःख करू नको. [ शी. त. म्यू.; द. भारत; त. ए. हं. इ. अॅ. ]

## कलिंदी डोम

पश्चिम बंगालमधील डोंबांची एक पोट जात. हे लोक अनेक वर्षापूर्वी मजुरी मिळविण्यासाठी बिहारमधून बंगालमध्ये आले. कलू व लक्ष्मी या डोम दंपतीचे आपण वंशज आहो, असे हे मानतात. याच्यांत कच्छप, सडिल (बैल), नाग, शंख, इ. देवके आहेत.

**प्रसूतिप्रथा**— बाळंतिणीच्या सातव्या दिवशी देवाने बाळाचे भविष्य लिहावे म्हणून प्रसूती झालेल्या जागी ताडपत्र, सापाची कात, आंब्याची फादी, दौत-टाक व पाण्याचा माठ या वस्तू ठेवतात. २१ दिवस जननाशौच पाळतात. २२ व्या दिवशी बाळबाळंतिणीस स्नान घालून केळीच्या झाडाखाली षष्ठी-पूजा करतात.

**देवधर्म**— हे कालीभक्त आहेत. आपला कुलपुरुष म्हणून हे काली–डोमाची पूजा करतात. वैशाखात मंगलचंडीच्या उत्सवाच्या वेळी तिला कोंबडा व बकरा बळी देतात. सर्पदंशापासून बचाव होण्यासाठी मनसा देवीची पूजा करतात. माघात कालीपूजन करतात. गावाच्या स्वास्थ्यासाठी वानबिबी अथवा दुखिराम ठाकूर यांची पूजा करतात. हे वैष्णव आहेत. यांचा सामाजिक दर्जा निकृष्ट मानतात.

**मर्तिकप्रथा**— हे लोक प्रेते पुरतात किंवा नदीत टाकून देतात. गर्भिणी मृत झाल्यास गर्भ बाहेर काढून त्याला वेगळे पुरतात. [ फोकलोअर सप्टें. १९६२ ]

## कलिप्रागाथ

सूक्तद्रष्टा. याने जबर व्याज उकळणाऱ्या कंजूष सावकाराचा उल्लेख केला असून इंद्राने त्याला वठणीवर आणावे असे म्हटले आहे ( ऋ. ८. ५५. १० ). ऋण आणि व्याज या दोन्ही आर्थिक कल्पना ऋग्वेदकाळी अस्तित्वात होत्या, असे याच्या सूक्तावरून दिसते.

## कलियन

त्रिवांकुरमधील एक जात. या जातीत मुलीला प्रथम रजोदर्शन झाले असता, पंधरा दिवस एका स्वतत्र झोपडीत ठेवतात. सोळाव्या दिवशी स्नान करून व डोक्यावर मडके घेऊन ती घरी येते. नंतर स्वयपाक करून इतर स्त्रियांना जेवायला वाढते. एवढे झाल्यावर ती शुद्ध झाली असे मानतात. नंतरच्या रजोदर्शनाच्या वेळी मात्र ती पाचच दिवस विटाळ पाळते.

मुलीचे लग्न ती वयात आल्यावर करतात. चुलत भावंडांत लग्न होते. लग्न होण्यापूर्वी नवऱ्या मुलाला आपल्या भावी सासऱ्याकडे सहा महिने काम करावे लागते. हे काम म्हणजे मुलीच्या बापाला द्यायचे देज होय. लग्नसमारंभ वरगृही रात्रीच्या वेळी होतो. तिसऱ्या दिवशी वधू-वरांचे कपडे केशराच्या पाण्यात भिजवितात व वधू–वर नदीवर जाऊन स्नान करतात. लहान किंवा मोठ्या विधवा भावजयीशी पुरुषाला लग्न करता येते. बायकोला मूल होत नसल्यास तिच्याच बहिणीशी दुसरे लग्न करण्याची प्रथा आहे. प्रसूती एका स्वतंत्र झोपडीत होते. सहा दिवस सोयर पाळतात. बापाचा वारसा मुलाकडे येतो.

कलियन लोक फिरती शेती करतात. पेरणी व कापणी चालू असताना स्त्रीसमागम वर्ज्य मानतात. [ रजःकण– ना. गो. चापेकर ]

## कलियुग

युगचौकडीतले चौथे युग. याला भारतयुद्धसंवत किंवा युधिष्ठिरशक असेही म्हणतात. भारतीय युद्ध चालू असताच द्वापरयुग संपून कलियुग सुरू झाले म्हणून व त्या युद्धात युधिष्ठिराला विजय मिळाला म्हणून कलियुगाला ही अन्य नावे मिळाली. याचा प्रारंभ सनपूर्व ३१०२ या वर्षी फेब्रुवारीच्या १८ तारखेस झाला असे सांप्रत समजतात. शके १८८५ च्या पंचांगात याची ५०६४ इतकी गत वर्षे दिलेली आहेत. हा काल चैत्रादी व मेषादी असा दोन प्रकारचा मानतात.

भारतीय युद्धाच्या कालाबद्दल मतभेद आहेत. त्या युद्धानंतर ५१ वर्षांनी श्रीकृष्णाचे निर्याण झाले, असे महाभारतात म्हटले आहे आणि तेव्हापासून कलियुग सुरू झाले, असे पुराणांचे मत आहे. परंतु भारतीय युद्धानंतर लवकरच कलियुगाचा आरंभ झाला असे मानले जाते. भारतीय युद्धाचा काल ठरविण्याच्या बाबतीत ऐहोळ ( विजापूर जिल्हा ) येथील दुसऱ्या पुलिकेशीचा एक शिलालेख महत्त्वाचा आहे. त्यात म्हटले आहे, की ३७३५ इतका कलिकाल मागे पडला असता व शकाची ५५६ वर्षे होऊन गेली असता, ही प्रशस्ती लिहिली गेली. याचा अर्थ शालिवाहन शकापूर्वी ३१७९ या वर्षी भारतीय युद्ध झाले, म्हणजेच कलियुग सुरू झाले असा होतो. जेसलमीर येथील शिलालेखावरूनही हेच गणित

येते. अर्थात युधिष्ठिर व शालिवाहन यांच्या शकातले अंतर ३१७९ वर्षे आहे, हे सिद्ध होते.

सप्तर्षी हे मघानक्षत्री आले म्हणजे कलियुगाला प्रारंभ होतो, असे पुराणात म्हटले आहे ( भाग. पु. १२.३ ). कलियुगाची वर्षे ४,३२,००० इतकी असून संध्या व संध्यांश हा काल १२०० वर्षांचा आहे.

**कलियुगाचा स्वभाव** – या युगात धर्माचा फक्त एक पाद शिल्लक राहतो. अधर्म चतुष्पाद म्हणजे सर्वांगी बलवान होतो. त्यामुळे माणसांमधल्या असत्प्रवृत्ती बळावतात. नास्तिकता आणि पाखंड यांची वृद्धी होते. आश्रमांचा विपर्यास व वर्णांचा संदेह निर्माण होतो ( मत्स्य पु. १६४. १२-१५ ). त्रिगुणांपैकी तमोगुण हा कलियुगाचा मुख्य गुण आहे व दान हे मुख्य कर्म आहे ( वायु पु. ८.६६ ). या युगात माणसाचे आयुष्यही अल्प होते. यज्ञसंस्था उत्सन्न होते. लोभ व मोह वाढतात. सत्य क्षीण होते ( मत्स्य पु. १४३). जेव्हा कल्की अवतार होईल, तेव्हा कलियुग संपून कृतयुगाला प्रारंभ होईल ( भाग. पु. १२.२.२३ )

**कलेर्दोषनिधे राजन्नस्ति ह्येको महान् गुणः ।**
**कीर्तनादेव कृष्णस्य मुक्तसङ्गः परं व्रजेत् ।।**
( भाग. पु. १२.३.५१ )

अर्थ – कलियुग हे दोषांचे आगर असले, तरी त्याचा एक मोठा गुण आहे; (तो हा, की) या युगात केवळ श्रीकृष्णाच्या नाम-गुणसंकीर्तनाने (माणूस) संगरहित होऊन मोक्षाला जातो.

कलियुग सुरू होताच शौनकादी ऋषी नैमिषारण्यात एकत्र जमले आणि त्यांनी सूतमुखाने कृष्णकथा श्रवण केली. कृष्णकथा हीच कलियुगाचे सर्व दोष दूर करणारी आहे ( भाग. पु. १.१). [ स. मि.; म. ज्ञा. को. ]

## कलिवर्ज्यप्रकरण

कलियुगात ज्या गोष्टी निषिद्ध मानलेल्या आहेत, त्याना कलिवर्ज्य असे नाव आहे. समुद्रपर्यटण, उदकयुक्त कमंडलुधारण, साधूंनी सर्व वर्णाच्या लोकाकडे भिक्षा मागणे, सन्मान्य अतिथी आला असता त्याच्या भोजनासाठी गाय वा बैल मारणे, शूद्रांनी शिजविलेले अन्न ब्राह्मणांनी वैश्वदेवासाठी घेणे किंवा जेवणे, नरमेध किंवा अश्वमेध करणे, आंतरजातीय विवाह करणे, त्रैवर्णिकांनी मादक पेये पिणे, आततायी ब्राह्मणाला ठार मारणे, सपिंड व सगोत्र मुलीशी विवाह करणे, नियोग करणे, वानप्रस्थाश्रम स्वीकारणे, दीर्घकाल ब्रह्मचर्य धारण करणे, देहपातापर्यंत महाप्रस्थान करीत राहणे, आते–मामे बहिणीशी विवाह करणे, ब्राह्मणांनी यज्ञात पशू मारणे, सोमविक्रय करणे, आपत्काळी क्षत्रिय-वैश्यादिकाची वृत्ती स्वीकारणे, फुंकणीवाचून तोंडाने फुंकर मारून अग्नी पेटविणे, ब्राह्मणांनी प्रवास करणे, बलात्कारादिकांनी दूषित झालेल्या स्त्रियांना जातीत घेणे, अग्निहोत्र घेणे, मधुपर्कात गोवध करणे, मांसश्राद्ध करणे इ. गोष्टी कलियुगात करू नयेत, असे धर्मशास्त्रकारांनी सांगितले आहे.

या कलिवर्ज्यप्रकरणावर प. रघुनाथशास्त्री कोकजे यांनी आपल्या हिंदूंच्या अवनतीची मीमांसा या ग्रंथात पुढील विचार मांडले आहेत –

आदित्यपुराणात केवळ पाच कलिवर्ज्ये सांगितली आहेत; तर ब्रह्मपुराणात त्यांची संख्या सातांच्या आसपास आहे. पण अशा प्रकारच्या वचनांना वेदांत कोणताच आधार नाही. स्मृतिकारांनी ज्या ठिकाणी युगधर्म सांगितले आहेत, त्या ठिकाणी त्या त्या युगात त्या त्या धर्माचे प्राबल्य किंवा सुकरत्व दाखविण्याचा त्यांचा अभिप्राय दिसतो. एका युगातील धर्म दुसऱ्या युगात निषिद्ध मानणे त्यांना अभिप्रेत नव्हते. कलियुग शब्दाचा इतिहास–पुराणांत आणि अर्वाचीन धर्मशास्त्रीय वाङ्मयात प्रसिद्ध असलेला अर्थ प्राचीन धर्मशास्त्रकारांना मुळीच मान्य नव्हता.

मनूने तर कृत, त्रेता, द्वापर आणि कली ही युगे राजाच्या कर्तृत्वावर किंवा त्याच्या कर्तव्यच्युतीवर अवलंबून असल्याचे सांगून पुढे राजा उद्यमरहित झाल्याने कलियुग अवतरते; पण तोच जेव्हा यथाशास्त्र उद्योग करू लागतो, तेव्हा कृतयुग निर्माण होते, असे स्पष्ट विधान केले आहे.

इ. स. च्या १२ व्या शतकातील स्मृतिचंद्रिका या ग्रंथाचा लेखक देवण्णभट्ट याने तर कलिवर्ज्य प्रकरणाचे नाव घेऊन विश्वरूप (मिताक्षराकार), स्मृतिसमुच्चयकार, श्रीकर, देवस्वामी इ. टीकाकारांना दूषण दिले आहे. हे कलिवर्ज्य प्रकरण इ. स. च्या ११ व्या शतकात मान्यता पावले असून तत्पूर्वी धर्मशास्त्रीय ग्रंथात त्याला मान्यता नव्हती, असे श्री. दप्तरी यांनी ऐतिहासिक पुराव्यांची छाननी करून सिद्ध केले आहे. त्यावरून कलियुगाची ४२०० वर्षे उलटून जाईपर्यंत धर्मशास्त्रज्ञांनीच या प्रकरणाची दखल घेतलेली नव्हती, हे दिसून येते.

एक पराशरस्मृती सोडली, तर अन्य कोणताही स्मृतिकार आपली स्मृती अमुक कालासाठी आहे, असे सांगत नाही. पराशरस्मृतीत मात्र 'कलौ पाराशराः स्मृताः' (= कलियुगात पराशरोक्त धर्म मानावे), असे विधान आहे. कलिवर्ज्यप्रकरणातील कित्येक निषेध पराशरस्मृतीविरुद्ध असल्यामुळे कलिवर्ज्यप्रकरण हे अप्रमाणच ठरते. या कलिवर्ज्यप्रकरणात वेळोवेळी समाजातील लोकांनी आपापल्या मताला अनुसरून बरीच भर घातलेली दिसते.

कलिवर्ज्यप्रकरणाच्या शेवटी लोकरक्षणार्थ ही कृत्ये महात्म्यांनी सांगितली आहेत, असे उल्लेख येतात त्याचप्रमाणे कलिवर्ज्य हे संकेतमूलक असल्याने नवीन सकेत निर्माण होतात जुने बधनकारक राहत नाहीत. एकूणच या कलिवर्ज्याला श्रुतिस्मृतीइतके प्रामाण्य मिळालेले नाही. मातुलकन्येशी विवाह करू नये, असे जे कलिवर्ज्यात सांगितले आहे, त्याबद्दल धर्मसिधुकारानी मतभेद दर्शविला आहे. संन्यास आणि अग्निहोत्र ही कलिवर्ज्ये अद्यापही चालूच आहेत. यावरून धर्माभिमान्यांनी हे प्रकरण सर्वस्वी प्रमाण धरले नव्हते, हे कळून येईल. परदेशगमन, यवनसंसर्गाने पतित झालेल्याना पुनश्च धर्मात घेणे, इ. नव्याने सुरू झालेल्या सुधारणाचे वावडे असणाऱ्यांनी या कलिवर्ज्याचा भरपूर उपयोग करून घेतला. कलिवर्ज्याची कोणत्या पातकात गणना करावी किंवा त्याबद्दल कोणते प्रायश्चित्त द्यावे, याची स्पष्ट चर्चा कोणत्याही धर्मशास्त्रज्ञाने केली नाही. ' समयश्चापि साधूना प्रमाणं वेदवद् भवेत् । ' (=तत्कालीन महात्म्यांनी निर्माण केलेले सकेत हे श्रुतीइतकेच प्रमाण होत) हेच या कलिवर्ज्यप्रकरणाचे सार आहे. साधूंचा समय म्हणजेच धर्मज्ञांचा निर्णय हा मार्गदर्शक समजावा, हे सोदाहरण दाखविण्यासाठीच कलिवर्ज्यप्रकरण असून त्यातील निषेध सर्वाना सर्वकाळी सारखेच बंधनकारक नाहीत, हे त्यावरून कळून येते.

कालमाहात्म्याने एखादी अधर्मप्रवृत्ती बळावली असेल, तर तिला नावे ठेवीत न बसता जितके शक्य होईल, तितके धर्मानुष्ठान करीत राहावे हेच युक्त, असे माधवाचार्यांनी या संदर्भात म्हटले आहे. [ हि. ध.; नि. सिं.; ध. सि. ]

**कलिविहित धर्म** कलियुगात मनुष्याने आपल्या शाश्वत कल्याणासाठी पुढील धर्म आचरावे, असे सांगितले आहे –

गीतापाठ, गंगास्नान, विष्णुपूजा, कपिला धेनूचे दान, अश्वत्थपूजा, एकादशीव्रत, गुरुभक्ती, जप, नामसकीर्तन, दान इत्यादी. [ ध. सि. तृ. प. ]

**कलिसंतरण उपनिषद** हे कृष्णयजुर्वेदाचे असून याला हरिनामोपनिषद असेही दुसरे नाव आहे. हे उपनिषद द्वापरयुगाच्या शेवटी ब्रह्मदेवाने नारदाला सांगितले. याचा साराश असा, की नारायणाच्या केवळ नामाने कलिदोष नष्ट होतात. हे नाम सोळा शब्दाचे आहे –

**हरे राम हरे राम राम राम हरे हरे ।**
**हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ।।**



यातील सोळा शब्दाचा जीवाच्या सोळा कलांशी सबंध असून हा मत्र जीवाच्या आवरणाचा नाश करणारा आहे. मंत्राच्या जपाला कोणतेही विधिविधान नको. या मत्राचा जप करणारा ब्राह्मण सायुज्यमुक्ती मिळवितो. साडेतीन कोटी जप केल्याने ब्रह्महत्यादी पापापासून मुक्ती मिळते. नामजप हीच नव्य भक्ती होय. [ सी. ग. देसाई. ]

**कली** एक युगवाचक व्यक्ती. क्रोध व हिंसा यांच्यापासून कलीचा जन्म झाला. भय व मृत्यू ही कलीची दोन अपत्ये होत ( भाग. पु. ४. ८. ३–४ ). दमयंतीचे स्वयवर मांडले असता हा तिच्या प्राप्तीच्या इच्छेने निघाला. पण वाटेत भेटलेल्या इंद्राने त्याला सांगितले, की ' दमयंतीचे स्वयंवर झाले व तिने देवाना सोडून नलनामक एका मानव राजाला वरले.' ते ऐकून कलीला राग आला व त्याने नलाच्या शरीरात प्रवेश मिळवून त्याला द्यूत खेळण्यास प्रवृत्त केले. त्या द्यूतात नलराजा राज्यासह सर्वस्वाला मुकला. पुढे कली नलाच्या देहातून निघून बिब्याच्या झाडात शिरला.

कलीने ब्रह्मावर्ताचे राज्य मिळविले होते. पण तो वृषभरूप धर्माचा व गोरूप पृथ्वीचा छळ करू लागल्यामुळे परीक्षित राजाने त्याचा पराभव करून त्याला ब्रह्मावर्तातून निघून जायला सांगितले. तेव्हा कली त्याची प्रार्थना करून म्हणाला, की ' मला राहण्यासाठी काही जागा दे.' त्यावर परीक्षिताने त्याला राहण्यासाठी मद्य, द्यूत, सुवर्ण, स्त्रिया व हत्या अशी पाच क्षेत्रे नेमून दिली. कली हा बालकांत शूर आणि शूरांसमोर भित्रा आहे. तो माणसांतला लांडगा आहे (भाग. पु. १.१८.८ ).

कली हा जातीने म्लेच्छ आहे. प्रद्योत नामक राजाने म्लेच्छाचा संहार केल्यावर कली नारायणाकडे गेला व त्याची स्तुती करून म्हणाला. ' प्रद्योताने माझे स्थान नष्ट केले. तेव्हा मला दुसरे स्थान द्या. ' त्यावर नारायणाने त्याला नीलपर्वत हे नवे स्थान दिले ( भवि. पु. प्रति. १. ४). नतर नारायणाने स्वत:च्या अंगमलापासून म्लेच्छवंशाची अभिवृद्धी करणारे अदम–हव्यावती हे जोडपे उत्पन्न केले. या दोघांना कलीने नीलपर्वतावर काही दिवस ठेवून घेतले.

(२) एक म्हातारा ब्राह्मण. याला अश्वीनी तरुण करून बायकोही मिळवून दिली ( ऋ. १०. ३९.८.; १.११२.१५).

(३) कश्यपाला मुनीनामक स्त्रीपासून झालेला एक गंधर्व.

**कलेवा** उ. भारतातल्या लग्नविधीतला एक उपचार. त्याचा अर्थ प्रात:कालीन उपहार असा आहे. वधूपक्षाकडची

मंडळी वरपक्षाला कलेवा देत असतात. या कलेव्याची गाणीही आहेत.

**कलोंगणी** भविष्य सागून भिक्षा मागणारे लोक. हे टोळी करून हिंडतात. टोळीत तीन ते पाच लोक असतात. हे लोक हातात एक पुस्तक घेऊन त्यातील कविता म्हणतात. यांना गायनविद्याही अवगत असते. गाणे म्हणत असताना वाद्ये वाजवून हे लोक प्रेक्षकांचे लक्ष आपल्याकडे ओढतात. मानवजातीचे व जगाचे पुढे काय होणार, तसेच जलप्रलय केव्हा होणार, त्याचेही भविष्य हे सागतात. [ बॉ. बे. क्रा ]

**कल्किद्वादशी** भाद्रपद शु. १२ शीचे नाव. या दिवशी कल्की या अवताराची पूजा करावी असे सांगितले आहे (वराह पु. ४८·१-२४)· [ हि. ध ]

**कल्किपुराण** एक उपपुराण. हे १८ व्या शतकाच्या प्रारंभी बंगालमध्ये निर्माण झाले. भागवतपुराणाचा हा पुढचा भाग होय, असे त्यातच म्हटले आहे. हे भविष्य-कालीन घटना सागणारे पुराण असून त्यात कलियुगाच्या अंती अवतार घेणाऱ्या कल्कीच्या अवतार–कृत्याचे वर्णन दिलेले आहे. कल्की हा कलीशी संग्राम करून वर्णाश्रम-धर्माचे पुनरुज्जीवन करील व मग कृतयुगाचा प्रारभ होईल, असे त्यात सांगितले आहे. या पुराणातल्या विविध विषयांचे समीक्षण करता ते वैष्णवपुराण असल्याचे कळते. द्वैताद्वैत तत्त्वज्ञान हे या पुराणाचे प्रतिपाद्य आहे. [ स्ट. उ. ]

**कल्की** विष्णूचा १० वा किंवा २१ वा अवतार. हा कलियुगाच्या शेवटी विष्णुयशस् नामक ब्राह्मणाच्या पोटी कीकट देशातल्या शबलग्रामात जन्माला येईल; त्याचे गोत्र पराशर असेल; आयुष्य २५ वर्षे असेल; तो देवदत्त नावाच्या अश्वावर आरूढ होऊन पृथ्वी पादाक्रांत करील; दुष्ट व अधर्मी लोकांचे दमन करून तो पुनश्च धर्मस्थापना करील; तो आचाराने म्लेच्छ बनलेल्या शत्रूंचा नाश करील; जगाचा सम्राट होईल; पुरोहित याज्ञवल्क्य त्याला या कामी साहाय्य करील व एवढे करून शेवटी गगा–यमुनांच्या संगमांत तो देहविसर्जन करील; त्यानंतर कृतयुगाचा प्रारंभ होईल, असे भविष्य कल्किपुराणांत वर्तवलेले आहे.

श्री. जायस्वाल यानी विष्णुयशपुत्र कल्की म्हणजे मालवराज यशोधर्मा होय, असे म्हटले आहे. त्याच्या मंदसोर-प्रशस्तीवरून (इ. स. ५३२) कळते, की त्याचे नाव विष्णुवर्धन होते व त्याने सम्राट ही उपाधी धारण केली होती. तो स्वतःला मनू, भरत, माधाता याच्या तोडीचा समजत असे त्याने आपल्या राज्यातल्या वर्णसकराला आळा घातला व हूणाधिपती मिहिरकुल याला आपल्या पायाशी नमविले. हूण म्हणजेच पुराणकाराच्या



कल्की – एक प्राचीन चित्र

मते म्लेच्छ होत. शक व हूण यांच्या आक्रमणानी भारतीय समाजात व जीवनात विलक्षण खळबळ निर्माण झाली होती. यशोधर्म्याने त्यांना परास्त करून वर्णाश्रमधर्माची घडी नीट बसविली. जायस्वाल यांचे हे मत खरे मानायचे, तर कल्की अवतार यापुढे व्हायचा नसून इ. स. च्या ६ व्या शतकातच होऊन गेला, असे म्हणावे लागते.

श्री. पाठक यानी जैन ग्रंथाच्या आधारे असे दाखविले आहे, की कल्किराजनामक एक अत्याचारी राजा ६ व्या शतकात होऊन गेला त्याने जैन लोकावर जबर कर लादला होता; त्यामुळे निर्ग्रंथपथाच्या लोकाची उपासमार होऊ लागली. मग एका राक्षसाने कल्किराजाला ठार मारले. मृत्यूनंतर तो अनेक वर्षे रत्नप्रभानामक नरकात हालअपेष्टा भोगीत होता. हूण राजा मिहिरकुल अत्यंत अत्याचारी होता. कल्की हे त्याचेच दुसरे नाव होय असेही एक मत आहे. श्री. शंकर याच्या मते मिहिरकुल याचा पिता तोरमाण हाच कल्की होता. पाटलीपुत्रचा राजा शिशुपाल हा याचा पिता होय.

श्री. मनकड यानी कल्किपुराणातील कल्की हा एक ऐतिहासिक पुरुष होता, असे सिद्ध केले आहे. त्याने अनेक हिंदू राजांच्या साहाय्याने मगधाची राजधानी कीकट या नगरावर स्वारी करून बौद्धधर्मी राजाचा पराजय केला. विशाखयूप व अवतिवर्धन याच्या मृत्यूनतर कल्की माहिष्मती व अवतीचाही राजा झाला.

कल्की हा बौद्धधर्मी होता असे श्री. वासुदेव उपाध्याय म्हणतात. पण बौद्ध साहित्यात या मताला आधार सापडत नाही.

प्रभावकचरितनामक जैन ग्रंथात कल्काचार्य नावाच्या एका ब्राह्मणाचे चरित्र आहे. तो मध्यप्रदेशातील धारानगरीचा रहिवासी होता व त्याने शक राजांच्या मदतीने उज्जयिनीचा राजा गर्दभिल्ल याचा पराजय केला, असे त्यात म्हटले आहे. या ब्राह्मणाने पुढे जैन धर्म स्वीकारला, असेही त्या कथेत सांगितले आहे. **पाहा** – कालकाचार्य

विष्णुपुराण (४.२४.९८), भागवत (१.३.२५), महाभारत, वनपर्व (३. १९०. ९६–९७) इ. ग्रथांत कल्किपुराणाप्रमाणेच भविष्य वर्तविलेले असून कल्की म्लेच्छाचा नाश व कलियुगाचा अंत करील आणि तो वैदिक धर्माचा संस्थापक व सत्ययुगाचा प्रवर्तक होईल असे म्हटले आहे. मध्ययुगीन साहित्यात सर्वत्र कल्कीचे हे पौराणिक रूपच दिसून येते. त्या वेळी समाजाची जी दुर्दशा झाली होती ती सुधारून सत्ययुग सुरू होईल, या आशावादाचे ते द्योतक असावे.

हयशीर्ष पचरात्र व अग्निपुराण यात कल्कीच्या दोन प्रकारच्या प्रतिमाचे वर्णन आहे. एक द्विभुज व दुसरी चतुर्भुज. द्विभुज मूर्तीचे ध्यान असे–

**खड्गोद्यतकरः क्रुद्धो हयारूढो महाबल.।**
**म्लेच्छोच्छेदकरः कल्की द्विभुज. परिकीर्तितः ।।**

(च. व. चि.)

अर्थ– खड्गधारी उगारलेला हात, क्रुद्ध, अश्वारूढ, महाबल, म्लेच्छाचा उच्छेद करणारा, द्विभुज असा कल्की सागितला आहे.

कल्की हा शूद्राचे शुद्धीकरण करील, असे मत्स्यपुराणात सांगितले आहे. [ हि. ध.; भा सा.; पु. इं; म. सा अ. ]

## कल्प

एक कालमान. पौराणिक कल्पनेप्रमाणे ब्रह्मदेवाच्या एका दिवसाला कल्पःअसे म्हणतात. कृत, त्रेता, द्वापर व कली या चार युगाच्या एका पर्यायाला चतुर्युगी किवा युगचौकडी असे नाव आहे. या युगचौकडीत मानवाच्या वर्षमानाप्रमाणे ४३२०, ००० इतकी वर्षे होतात. अशा युगचौकडीचे सहस्र पर्याय झाले म्हणजे ब्रह्मदेवाचा प्रातःकाळापासून सायंकाळापर्यंतचा केवळ एक दिवस होतो तितक्याच पर्यायांची पुढे एक रात्र असते. याप्रमाणे जे एक अहोरात्र बनते, त्याला कल्प असे नाव आहे. ज्याप्रमाणे दिवसात प्रातःसंध्या व सायंसध्या होते, त्याचप्रमाणे प्रत्येक युगात असे साध्यकाल असतात. युगाचा आरंभ होण्याच्या पूर्वकालास सध्या व युगाच्या अत्यकालास सध्यांश म्हणतात. मनुष्याचे एक वर्ष हा देवताचा एक दिवस व मनुष्याची ३६० वर्षे म्हणजे देवतांचे एक वर्ष मानलेले आहे. याला दिव्यवर्ष म्हणतात. एका युगचौकडीत १२००० दिव्यवर्षे होतात. या दिव्यवर्षाचे कोष्टक पुढीलप्रमाणे आहे.—

| | युगकाल वर्षे | संध्यावर्षे | संध्यांशवर्षे | एकूण वर्षे |
|---|---|---|---|---|
| कृतयुग | ४००० | ४०० | ४०० | ४८०० |
| त्रेतायुग | ३००० | ३०० | ३०० | ३६०० |
| द्वापरयुग | २००० | २०० | २०० | २४०० |
| कलियुग | १००० | १०० | १०० | १२०० |
| | | | | १२००० |

एका कल्पात–

२ × १२००० × १००० = २ × १२०००,००० दिव्यवर्षे आणि २ × १२०००,००० × ३६० = २×४३२०,०००,००० मानववर्षे होतात.

ब्रह्मदेवाचे आयुर्मान १०० ब्राह्म वर्षाचे मानलेले आहे. त्यात प्रत्येकी ५० वर्षाचे दोन विभाग आहेत. त्यातील पहिला विभाग सपून गेलेला असून साप्रत द्वितीय विभागातला श्वेतवाराह नावाचा कल्प सुरू आहे. त्यातली सहा मन्वतरे होऊन चुकलेली असून साप्रत वैवस्वत नावाचे मन्वंतर चालू आहे. हा वैवस्वत मनूच्या अधिकाराचा काल आहे. ज्योतिषशास्त्राच्या मताप्रमाणे एका कल्पात २४ मन्वन्तरे होतात.

कल्पमानाची कल्पना फार जुनी आहे. 'धाता यथापूर्वमकल्पयत्' या वैदिक वचनावरून कल्प शब्द निघालेला आहे. 'कल्पादौ विसृजाम्यहम्' (गी. ९. ७) या भगवद्गीतेतील वचनाप्रमाणे विधाता कल्पारभी सृष्टी उत्पन्न करतो आणि कल्प संपला म्हणजे सृष्टीचा लय होतो. कल्पाची ही कल्पना भूगर्भशास्त्रांतील वर्षसख्यांच्या कल्पनेशी पुष्कळशी जुळणारी आहे, असे श्री. वैद्याचे मत आहे.

एकूण कल्प ३० असून त्यांची नावे मत्स्यपुराणात (अ.२८९) पुढीलप्रमाणे दिलेली आहेत –– (१) श्वेत (२) नीललोहित (३) वामदेव (४) रथंतर (५) रौरव (६) देव (७) बृहत् (८) कदर्प (९) सद्य (१०) ईशान (११) तम (१२) सारस्वत (१३) उदान (१४) गारुड (१५) कौर्म (१६) नारसिह (१७) समान (१८) आग्नेय (१९) सोम (२०) मानव (२१) तत्पुरुष (२२) वैकुंठ (२३) लक्ष्मी (२४) सावित्री (२५) घोर (२६) वाराह (२७) वैराज (२८) गौरी (२९) माहेश्वर व (३०) पितृ.

१८ व ३२ असे कल्पाच्या सख्येबाबत मतभेदही आहेत. कल्पाच्या नावातही भेद आहेत. हेमाद्रीने दिलेली कल्पांची यादी वेगळी आहे. पुरुषार्थचितामणीचा क्रम मत्स्यपुराणातल्या क्रमाहून भिन्न आहे.

यांतील कौर्मकल्प ही ब्रह्मदेवाची पूर्णिमा असून पितृकल्प ही अमावास्या आहे. कल्पारभी जो अवतार होतो, त्यावरून

त्या कल्पाला नाव मिळते. साम्प्रतच्या कल्पारंभी वराह अवतार झाला, म्हणून या कल्पाला वाराहकल्प म्हणतात.

मत्स्यपुराणाने सात्त्विक, राजस, तामस व संकीर्ण असे कल्पांचे गुणभेद मानले आहेत सात्त्विकात विष्णूचे, राजसात ब्रह्मचाचे, तामसात अग्नि-शिवांचे व सकीर्णात पितराचे माहात्म्य वृद्धिंगत होते. [म. भा. उ. सं.; पु. त. मी.; म. ज्ञा. को.; हि. ध.]

**कल्पग्राम** मथुरेतील एक तीर्थ. तिथे वराहाचे मंदिर आहे. [वराह पु. १६६]

**कल्पनाबंध** ज्या एखाद्या मध्यवर्ती कल्पनेभोवती किंवा संकेताभोवती एखादी कथा निर्माण केली जाते, अशा अतर्भूत मध्यवर्ती विषयाला कल्पनाबंध (motif) म्हणतात. मोटिफ म्हणजे कथेतले एखादे असाधारण तत्त्व होय. या तत्त्वामुळे कथेला गती मिळते आणि कलाटणीही मिळते. उदाहरणाने सांगायचे तर माता हे मोटिफ होऊ शकत नाही. कारण ते सामान्य तत्त्व आहे पण सावत्र आई मोटिफ होऊ शकते. कारण ते असामान्य तत्त्व आहे.

लोककथासाहित्यात असे अनेक कल्पनाबंध असतात. अदृश्य पगडी, उडणारी सतरंजी, जादूचा घोडा, बोलणारे व दूर-देशीच्या वार्ता सागणारे पक्षी, जादूच्या खडावा, सांकेतिक भाषा, एखाद्याने आपला प्राण दुसऱ्या एखाद्या प्राण्याच्या शरीरात ठेवणे, ही सर्व कल्पनाबधांची उदाहरणे होत. या कल्पनाबंधा-मुळेच त्या त्या गोष्टीची तड लागते. उदा०—

एक होता राजपुत्र. तो प्रवासात असताना अचानक एका संकटात सापडला. त्यातून कसे पार पडावे हे काही त्याला कळेना. एवढ्यात तिथल्या एका झाडावर दोन पक्षी आपसांत बोलत असलेले त्याने ऐकले. त्यांतला एक पक्षी दुसऱ्याला सांगत होता, की या राजपुत्राने अमुक एक गोष्ट केली तर हा संकटमुक्त होईल. राजपुत्राने ते ऐकले, त्याप्रमाणे केले व तो संकटातून मुक्त झाला.

वरील कथेत जो कल्पनाबंध आहे, त्याला उपश्रवण असे नाव आहे. हा कल्पनाबंध फार प्राचीन असून छांदोग्य उपनि-षदातल्या जानश्रुती व रैक्व यांच्या आख्यानात तो वापरलेला आहे. तिथे एका हंसदंपतीच्या परस्पर वार्तालापातून जानश्रुती राजाला रैक्व नावाच्या एका गाडीवानाची योग्यता कळते.

असे हे अनेक कल्पनाबंध लोककथांमध्ये कार्य करीत अस-लेले आढळतात. या कल्पनाबंधांचे क्षेत्र फार व्यापक आहे. निरनिराळ्या देशांतल्या लोककथांत सारख्याच प्रकारचे कल्पनाबंध आढळत असल्यामुळे त्यांचा व्याप आंतरराष्ट्रीयही आहे. टॉमसन नावाच्या एका पाश्चात्य पडिताने 'मोटिफ इंडेक्स ऑफ फोक लिटरेचर' नावाचा एक मोठा ग्रंथ लिहिला असून त्यात अनेक कल्पनाबंधांचे शास्त्रीय विवेचन केले आहे. [लो. सा. रू.; लो. सा. भू.]

**कल्पलतादान** सुवर्णाच्या दहा कल्पवल्ली तयार करून त्यांचे दान दिल्याने स्वर्गप्राप्ती होते, असे सांगितले आहे. [पु. इं.]

**कल्पवल्ली** मनात कल्पिलेले देणारी वल्ली. ही वास्तव नसून कल्पित आहे. भारतीय शिल्पात कल्पवल्लीची योजना केलेली दिसते. एक वेल आडवी वळणे घेऊन लांब



कल्पवल्ली — सांची येथील कोरीव चित्र

पसरली आहे आणि तिला विविध प्रकारचे अलंकार लागले आहेत, अशी दृश्ये साची, भरहूत, इ. ठिकाणच्या स्थापत्यात दिसतात. पाहा— कल्पवृक्ष.

**कल्पवास** माघ महिन्यात काही लोक एक पर्णकुटी उभा-रून प्रयाग क्षेत्री गंगा—यमुना सगमावर निवास करतात, त्याला कल्पवास असे नाव आहे.

**कल्पवृक्ष** एक स्वर्गीय अर्थात कल्पित वृक्ष. मनात कल्पावे ते हा देतो, अशी याच्याविषयी समजूत आहे. हा कुरुप्रदेशात वाढतो व याच्यापासून मद्य, वस्त्रे आणि रत्ने निघ-तात, असे वायुपुराणात सांगितले आहे (८.९३). कल्पवृक्षा-पासून कल्पिणाऱ्याच्या इच्छेनुसार वस्त्रे, भूषणे, अन्नपान इ. वस्तू प्राप्त होतात, ही कल्पना साहित्य व कला या दोन्ही क्षेत्रांत प्राचीन कालापासून रूढ आहे. अलकेतील स्त्री पुरुषाना कल्पवृक्ष हे अलकाराचे व प्रसाधनवस्तूचे भाडार वाटते, असे कालिदास सांगतो—

**वासश्चित्रं मधु नयनयोर्विभ्रमादेशदक्षं**
**पुष्पोद्‌भेदं सह किसलयैर्भूषणानां विकल्पान् ।**
**लाक्षारागं चरणकमलन्यासयोग्यं च यस्या**
**मेकः सूते सकलमबलामण्डनं कल्पवृक्षः ॥**
(उ. मेघ. १४)

अर्थ– ज्या अलकानगरीत चित्रविचित्र वस्त्र, नयनविभ्रमकारी मद्य, पालवीसह पुष्पोद्‌गम, विविध प्रकारची भूषणे व पायाना लावण्यास योग्य असा अळिता ही सर्व स्त्रियांची भूषणे आणि प्रसाधने कल्पवृक्ष एकटा पुरवितो.



कल्पवृक्ष– एक काल्पनिक चित्र

भरहूत व साची या ठिकाणच्या शिल्पांत अशा प्रकारच्या सर्व वस्तू देणारा कल्पवृक्ष कोरलेला आढळतो. शिल्पात नक्षीकामासाठीही कल्पवृक्षाची आकृती कोरतात. राजाच्या किवा देवाच्या सिंहासनावरही कल्पवृक्ष कोरलेला असतो. मानसार ग्रथात त्याचे सविस्तर वर्णन दिलेले आहे. कल्पवृक्षाच्या खोडावर एक सर्प वेटोळे घालून वसलेला असतो. त्याचप्रमाणे विविध प्रकारच्या वेली, भिन्न आकाराची पाने व रगीबेरंगी फुले त्या कल्पवृक्षावर असतात. शाखांच्या मधल्या जागी देवता, विद्याधर किवा वानर असतात.

कल्पवृक्षाची कल्पना पूर्वेकडील सर्व धर्मात आहे. खिस्ती व मुसलमान यानीही ती उचलली आहे. मुसलमानांच्या मते कल्पवृक्ष स्वर्गात असतो. त्याला बारा प्रकारची फळे येतात व त्याची पाने जखम भरून काढण्यासाठी उपयोगी पडतात.

**कल्पवृक्षदान** याचा विधी पुढीलप्रमाणे– फलयुक्त असा सुवर्णाचा कल्पवृक्ष करून तो गुडपात्रावर उभारतात. त्याच्या चारी बाजूना संतान, मंदार, पारिजात व चदन असे आणखी चार वृक्ष सुवर्णाचेच करून ठेवतात. त्याच्या मुळाशी ब्रह्मा, विष्णु, शिव, सूर्य, काम व रती याच्या प्रतिमा ठेवतात. मग त्या सर्व परिवारासह कल्पवृक्षाचे दान करतात. दानाचा मंत्र असा–

**नमस्ते कल्पवृक्षाय चिन्तितार्थप्रदायिने**
**विश्वम्भराय देवाय नमस्ते विश्वमूर्तये ॥**

अर्थ– चितिलेले देणारा, विश्वभर व विश्वमूर्ती अशा कल्पवृक्षरूपी देवाला नमस्कार असो

दानाचे फल– विष्णुलोकप्राप्ती. [ मत्स्य पु. २७६ ]

**कल्पव्रत** एक काम्यव्रत. तीन दिवस दुग्धाहार व तांदुळाच्या राशीवर सुवर्णाचा कल्पवृक्ष स्थापून त्याचे दान. फल– ब्रह्मपदाची प्राप्ती [ मत्स्य पु. १०० ५० ]

**कल्पसूत्रे** वेदाच्या पडगात याचे स्थान दुसरे आहे. विधी, नियम, न्याय, इ. कल्प शब्दाचे अनेक अर्थ आहेत. अल्पाक्षर, असदिग्ध, साररूप व विश्वतोमुख (व्यापक अर्थ सांगणारे) अशा वाक्याला सूत्र म्हटले आहे. त्यावरून विधी व नियम यांविषयी जे वरील लक्षणाने युक्त असे वाक्यसमूह आहेत, त्याना कल्पसूत्र असे म्हटले आहे. ' **कल्पो वेदविहितानां कर्मणामानुपूर्व्येण कल्पना–शास्त्रम्** '= कल्प म्हणजे वेदविहित कर्माची क्रमबंद्ध माडणी किवा शास्त्र होय ( विष्णु मित्र). कल्पसूत्रांचा उल्लेख तै. आरण्यकात आढळतो (१.३१.; २. १०). कल्प या शब्दावरून पूर्वी ब्राह्मणे किवा आरण्यके यांचाच बोध होत असावा, असे दिसते. तै. आरण्यकात पूर्वी काही मत्र असून 'अतऊर्ध्व कल्प.' असे म्हटले आहे (१.३१). यावरून त्याकाली कल्प व ब्राह्मणे एकत्रच असून कल्परूपाने स्वतंत्र ग्रथ ब्राह्मणकालानंतर निर्माण झाले असावे, असे दिसून येते.

कल्पसूत्रे ही कर्मकाडविषयक विधि-नियम सांगतात. वैदिक धर्मातली सारी कर्मे, सगळे सस्कार, सगळी अनुष्ठाने व सगळे रीतिरिवाज प्रायः कल्पसूत्रांतूनच उत्पन्न होतात. प्राचीन हिदू जीवनाची नित्य–नैमित्तिकादी कर्मे, सर्व धार्मिक क्रिया आणि समस्त सस्कृती या गोष्टीचे ज्ञान होण्याच्या कामी कल्पसूत्रे

ही अत्यंत महत्वाची ठरतात. धर्मानुष्ठानांत मानस भावना संलग्न करणे आणि धार्मिक विधि–नियमांच्या चाकोरीत व्यक्ती आणि समाज याचे जीवन संयत करणे, हा कल्पसूत्रांचा प्रधान उद्देश आहे. वेदाच्या शाखाभेदांचा विचार करता कल्पसूत्रांची संख्या ११३० इतकी असली पाहिजे; पण सांप्रत सुमारे ४० सूत्रेच आढळून येतात.

कल्पसूत्रे तीन प्रकारची आहेत– श्रौतसूत्रे, गृह्यसूत्रे व धर्मसूत्रे. श्रौत शब्द श्रुतीवरून आलेला आहे. श्रुतीत म्हणजेच वेदात सांगितलेल्या यज्ञादी विधानांचे विवरण करणाऱ्या सूत्रांना श्रौतसूत्रे म्हणतात. श्रौत यज्ञांचे हविर्यज्ञ, सोमयज्ञ, पशुयज्ञ, सत्रे इत्यादी अनेक प्रकार आहेत. आश्वलायन, लाटयायन, सत्याषाढ, आपस्तंब, इ. श्रौतसूत्रांत या श्रौत यज्ञांचे विस्तृत विवरण मिळते. धर्माचा आणि यज्ञसंस्थेचा इतिहास समजण्याच्या कामी ही सूत्रे अत्यत उपयुक्त आहेत.

वैदिकांच्या कुटुंबात जन्मापासून मृत्यूपर्यंत जे नानाविध संस्कार केले जातात, त्याचप्रमाणे विविध कर्तव्ये आणि अनुष्ठाने पार पडली जातात, त्याचे विवरण करणाऱ्या सूत्रांना गृह्यसूत्रे असे नाव आहे. या सूत्रावरून त्या काळच्या कित्येक रूढी व चालीरीती समजून येतात. इंडो–युरोपियन लोकांत आढळून येणाऱ्या चालीरीतीशी गृह्यसूत्रांतील चालीरीतीचे काही प्रमाणात साम्य दिसून येते, यावरून वैदिक आर्यांचा व इंडो–युरोपियनांचा संबंध प्रागैतिहासिक कालापासून होता, हे ध्यानात येते. गृह्यसूत्रांत पितृयज्ञ, पार्वणयाग, अष्टकायाग, इ. सात प्रकारच्या पाकयज्ञांचे विधान आहे. यांपैकी काही याग आजही मूळरूपातच प्रचलित आहेत. अष्टकायज्ञ, आश्वयुजीकर्म, आग्रहायणी, चैत्रीयाग हे यज्ञ मात्र रूपान्तरित होऊन प्रचारात आहेत. याशिवाय पूर्तकर्मे, अशुभ निवारणाचे उपाय, पंच महायज्ञ, उपनयन, विवाह, इ. संस्कारांची विधाने इ. विषयही गृह्यसूत्रांत सागितले आहेत.

सामाजिक, राजनैतिक व पारमार्थिक कर्तव्ये, वर्णाश्रमजातीची कर्तव्ये, विवाद, दायभाग, कर, स्त्रियांचे समाजातील स्थान, चौर्यव्यभिचारादी अपराधाना दंड, इ. विषयाचे विवरण धर्मसूत्रांत येते. ही सूत्रे भिन्न काळी व भिन्न स्थळी रचलेली असल्यामुळे त्यांत एकवाक्यता आढळत नाही.

याशिवाय शुल्बसूत्रे नावाचा आणखी एक प्रकार आहे त्यात यज्ञासाठी क्षेत्र मोजून घेणे, त्या जागी वेदी बांधणे इत्यादीविषयी बरेच नियम दिलेले आहेत. पाणिनीच्या शिक्षेत कल्पसूत्रे हे वेदपुरुषाचे हात असल्याचे म्हटले आहे.

**काल–** कल्पसूत्रांच्या रचनेचा काल निश्चित ठरविणे कठिण आहे. बहुतेक प्रमुख श्रौतसूत्रे व काही गृह्यसूत्रे सनपूर्व ८००–४०० या कालखंडात रचली गेली, असे वैदिक वाङमयाच्या अभ्यासकानी ठरविले आहे. धर्मसूत्राचा काल सनपूर्व ६००–३०० हा येतो. कल्पसूत्रांत त्या त्या विधीबरोबर कोणते मंत्र म्हणावे, तेही सांगितले आहे. त्यावरून वैदिक मत्राचा अर्थ समजण्यास बरीच मदत होते.

सूत्रकारांनी एकूण ४२ कर्मे (संस्कार) सागितली आहेत; त्याचबरोबर सत्य, सद्गुण व सदाचार या नैतिक गुणांवरही बराच जोर दिला आहे. गौतम हा धर्मसूत्रकार चत्वारिंशत् कर्मवादी आहे. तो म्हणतो, की 'जो पुरुष ४० संस्कारांनी युक्त आहे, पण सत्य–सदाचारादी गुणांनी रहित आहे, त्याला ब्रह्मप्राप्ती होऊ शकणार नाही व ब्रह्मलोकही मिळणार नाही' (८. २.२५). वासिष्ठ धर्मसूत्रातही म्हटले आहे, की 'ज्याप्रमाणे पक्ष्याची पिले पंख प्राप्त झाल्यावर घरट्याचा त्याग करून निघून जातात, त्याचप्रमाणे वेद–वेदांगे सद्गुणशून्य मनुष्याचा त्याग करतात (६.३).' या वचनावरून कळून येते, की वैदिक ऋषींनी सत्य व सदाचार हे सद्गुण सनातन धर्माचा पाया म्हणून मानलेले आहेत.

**जैन कल्पसूत्र**— जैन ज्याला सामान्यतः कल्पसूत्र म्हणून समजतात, ते स्थविरावली, जिनचरित व पज्जोसवणाकप्प असे तीन ग्रंथ मिळून झाले आहे. त्यांतही पज्जोसवणाकप्प हेच खरे कल्पसूत्र होय, असेही एक मत आहे. यात जैन श्रमण व साध्वी याचे विधिनिषेध सागितले आहेत. या कल्पसूत्राचा कर्ता भद्रबाहू असल्याची समजूत आहे. त्यानेच त्यावर निर्युक्ती लिहिली आहे. त्याशिवाय त्यावर संघदासाचे भाष्य व इतर अनेक टिकाही आहेत. या कल्पसूत्राचा सारांश पुढीलप्रमाणे—

**प्रथम परिच्छेद**— साधू व साध्वी यांनी न फोडलेल्या अपक्व ताडफळांची भिक्षा घेऊ नये. गावाबाहेर वस्ती असल्यास एक महिना गावात व एक महिना बाहेर राहावे. साध्वीसाठी ही मुदत दोन व चार महिने एवढी आहे. साध्वींनी भररस्त्यावरच्या जागेत किंवा सार्वजनिक ठिकाणी राहू नये. जलाशयाच्या काठी थांबू नये. कुटुंबवत्सल माणसाच्या घरात राहू नये. साधूच्या हातून एखादी चूक झाल्यास दुसऱ्या साधूने त्याच्याशी सामोपचारानेच वागावे. पावसाळ्यात पर्यटण करू नये. पर्यटणाची भूमर्यादा पूर्वेस अग–मगध, दक्षिणेस कौशाबी, पश्चिमेस स्थूणा व उत्तरेस कुणाल ही मानावी. जैन धर्माचा प्रचार असेल, तर या मर्यादेच्या बाहेर जायलाही हरकत नाही. सध्याकाळी व रात्री भिक्षाग्रहण व रस्त्यात भटकणे वर्ज्य समजावे.

**द्वितीय परिच्छेद**— पसारा असलेल्या घरात राहू नये. ज्या घरी राहायचे, त्या घरी भिक्षा घेऊ नये. वापरायची

वस्त्रे उंटाचे केस, ताग, सण किंवा लोकर यांची असावीत.

**तृतीय परिच्छेद**— भिक्षेच्या वेळी कोणाच्या घरात शिरू नये. म्हातारा, अशक्त व रोगी साधू भिक्षेसाठी हिंडत असता त्याला उन्हाने वगैरे घेरी येतेसे वाटले, तर मात्र त्याने घरात शिरायला हरकत नाही. साधूनी साध्वीच्या व साध्वीनी साधूच्या राहत्या ठिकाणी पाऊलही ठेवू नये. एखाद्या गावी सैन्याची छावणी पडली असली, तर रात्र होण्यापूर्वी ते ठिकाण सोडावे.

**चतुर्थ परिच्छेद**— पहिल्या प्रहरी भिक्षा मागून आणलेले अन्न चौथ्या प्रहरापर्यंत ठेवू नये. बरोबरचे अन्न दोन कोसापेक्षा अधिक अंतरावर नेऊ नये. वर्तनात एखादा प्रमाद घडल्यास गुरूपाशी त्याची कबुली द्यावी. प्रायश्चित्त घेणाऱ्या साधूने स्वतः भिक्षा मागू नये. गुरूने त्याला रोज एका घरची भिक्षा द्यावी. प्रायश्चित्त घेणार नसेल, त्याला वाळीत टाकावे. गगा, यमुना, शरयू, कोशिका व माही या पाच नद्या एका महिन्यात दोनदा ओलाडू नयेत.

**पंचम परिच्छेद**— सूर्योदयापूर्वी किंवा सूर्यास्तानंतर नकळत अन्न मुखात गेल्यास ते थुंकून तोंड धुवावे. साध्वीने एकटे राहू नये व एकटीने प्रवास करू नये. तिने आपले अंग उघडे टाकू नये किंवा अमर्याद वर्तन करू नये.

**षष्ठ परिच्छेद**— असत्य व कठोर भाषण, तसेच एखाद्याचा उपहास किंवा अपमान करू नये. घेतलेल्या प्रायश्चित्ताचा उल्लेख करू नये. कठिण समयी एखाद्या साधूने साध्वीस आधार दिला, तर ते पाप समजू नये. सद्‌वर्तनाच्या आड येणाऱ्या लोकाचा सहवास वर्ज समजावा. [ इं अॅ. पु. ३९; म. ज्ञा. को.; वे. ए.; वै. सा. ]

## कल्पादी तिथी

चैत्र शु. १ दा, चैत्र शु. ५ मी. वैशाख शु. ३ या, कार्तिक शु. ७ मी. मार्ग. शु. ९ मी, माघ शु. १३ शी व फाल्गुन कृ. ३ या कल्पारंभाच्या तिथी मानलेल्या असून त्या तिथीवर श्राद्ध केल्याने पितरांची तृप्ती होते, असे सांगितले आहे. [ नि. सि ]

## कल्पित कथा

हिलाच इंग्रजीत फेबल असे म्हणतात अशा प्रकारच्या कथात मुख्यत. नीतिपर प्राणिकथांचा समावेश होतो. या कथांतला आशय गंभीर असला तरी त्यात सूक्ष्मसा उपरोधही दिसतो. बहुसंख्य कल्पित कथा अन्योक्तीसारख्या असतात. पशुपक्ष्याच्या द्वारे त्यांत माणसालाच उपदेश असतो हा एक स्वतत्र वाङ्मयप्रकार आहे. कल्पितकथा सुसंस्कृत व्यक्तींकडूनच रचल्या गेल्या आहेत. या कथा सपूर्णतः व्यावहारिक असतात, हेच त्यांचे वैशिष्ट्य होय. त्यांचा धार्मिक कथाशी संबध नसतो. भारतीय वाङ्मयात कल्पित कथा सर्वप्रथम महाभारतात आढळतात. शातिपर्वात अशा कित्येक कथाच्या द्वारे विवक्षित आशय समजावून दिलेला आहे. अनागत विधाता, प्रत्युत्पन्नमती व दीर्घसूत्री या नावाच्या तीन मत्स्यांची कथा मूळ महाभारतातच आहे ( शाति १३७ ). सकटाची चाहूल लागल्याबरोबर त्वरित त्यापासून आत्मसरक्षण करण्याच्या तजविजीस लागावे, हे व्यावहारिक शहाणपण या कथेत सागितले आहे त्या ठिकाणचा तात्पर्यबोधक श्लोक असा—

**अनागतविधाता च प्रत्युत्पन्नमतिश्च यः ।**
**द्वावेव सुखमेधेते दीर्घसूत्री विनश्यति ।।**

( शाति. १३७–२० )

अर्थ— सकट येण्यापूर्वीच त्यावर उपाययोजना करणारा व सकट आल्याक्षणी ज्याला उपाय सुचतो असा, हे दोघेच सुखाने नांदतात. दीर्घसूत्र म्हणजे मतिमद किंवा चेंगट असतो, तो नाश पावतो.

महाभारतात अशा सुदर कथांचा संग्रह आहे. धृतराष्ट्राचा मत्री कणिक धृतराष्ट्राला उपदेश करताना म्हणतो—‘ राजा, एकदा एका धूर्त कोल्हयाने वाघ, घोडा, लाडगा व मुगूस या चार मित्राचा भक्ष्य मिळेपर्यंत उपयोग करून घेतला व नतर त्या चारी मित्राना ठकवून ते सर्व भक्ष्य स्वत:च्याच घशात घातले. हे राजा, तूही पांडवाशी याच पद्धतीने वाग. ’

नद्या व समुद्र याची कथा, कूपात पडलेल्या ब्राह्मणाची कथा, सुवर्णाची विष्ठा टाकणाऱ्या पक्ष्यांची कथा, व्याधाने पसरलेल्या जाळ्यात दोन कपोत सापडले ती कथा, विश्वासघातकी माजराची कथा, अशा अनेक सुदर कल्पितकथा महाभारतात असून त्यांपैकी कित्येक कथा जगाच्या निरनिराळ्या भागातही गेल्या आहेत इसापच्या कथा याही नीतिपर कल्पितकथाच असून जागतिक साहित्यात त्याना अढळ स्थान प्राप्त झाले आहे. [ लो. सा. रू; म. ज्ञा. को. ]

## कल्ब

एक सूफी कल्पना. सूफी लोक आत्म्याचे कल्ब, रूह व सिर्र असे तीन विभाग मानतात. त्यापैकी कल्ब हा मनुष्याच्या बौद्धिक क्रियाचा आधार आहे. तो भौतिक व आध्यात्मिक जगताच्या मध्यभागी स्थित आहे. सुष्ट–दुष्ट प्रवृत्तीचे द्वद्व कल्बांतच चालते. एका अगाने कल्ब परमात्मज्ञानासाठी खुला राहतो व दुसऱ्या अंगाने वासनांनाही आत प्रवेश देतो. [ हि. सा. को. ]

**कल्याण** (१) एक सामद्रष्टा. सत्रानुष्ठान करणाऱ्या अंगिरसाना देवयान मार्ग उपलब्ध करून देण्यासाठी हा ऊर्ध्व मार्गाने जात असता ऊर्णायू नामक गंधर्वाने याला देवयान मार्गाचे साधक असे एक साम उपदेशिले. ते साम घेऊन तो अंगिरसांकडे परत आला. अंगिरसानी त्याला विचारले, की 'हे साम तुला कोणी उपदेशिले ?' त्यावर ऊर्णायूचे नाव न सागता आपण स्वतःच ते मिळविले, असे त्याने असत्य सागितले. त्या सामाने इतर ऋषी स्वर्गाला गेले, पण खोटेपणामुळे कल्याणाला मात्र स्वर्ग मिळाला नाही. [ म. ज्ञा. को.– बुद्धपूर्व जग ]

(२) समर्थ रामदास स्वामीचा पट्टशिष्य. याचे मूळचे नाव अंबाजी असे होते. हा भगूरच्या कृष्णाजीपंत पटवाऱ्याचा मुलगा. त्याचे सुदर हस्ताक्षर पाहून रामदासस्वामीनी त्याला आपल्या जवळ घेतले. त्याचे कल्याण हे नावही त्यानीच ठेवले. याच्या हातचा दासबोध धुळ्याच्या सत्कार्योत्तेजक सभेने प्रसिद्ध केला आहे. स्वामींनी त्याला डोमगावच्या मठाचा अधिपती नेमले होते. तिथेच त्याची समाधी आहे. [ म. वा. इ. ]


कल्याणस्वामी

(३) एक राग. रागविबोधविवेकात याचे मूर्तिध्यान पुढीलप्रमाणे सांगितले आहे—

**सच्छत्रचामरोऽच्छस्ताम्बूली मौलिरत्नमालावान्**
**कल्याणः सितवासा राजा सिंहासनासीनः ।।**

अर्थ— मस्तकी छत्रचामर धारण करणारा, निर्मल तांबूल सेवन करणारा, मस्तकी रत्नमाला धारण करणारा, शुभ्र वस्त्र नेसणारा व सिहासनावर वसणारा, असा हा कल्याण राजा आहे.

या रागाला फक्त मध्यम तेवढा तीव्र व बाकीचे स्वर शुद्ध लागतात. मुख्य स्वर गंधार असून मध्यम व निषाद अल्पाशाने लागतात. यातच शुद्धमध्यम मिसळला म्हणजे यमन–कल्याण राग बनतो. गानसमय– सायंकाळ.

**कल्याणक व्रत** एक जैनव्रत. याचे लघू व मध्यम असे दोन भेद आहेत.

लघुव्रत ५ दिवसात पुरे होते. पहिल्या दिवशी उपवास, दुसऱ्या दिवशी कांजीभक्षण, तिसऱ्या दिवशी एकभुक्त, चौथ्या दिवशी रुक्षभोजन व पाचव्या दिवशी मुनिवृत्तीने भोजन.

मध्यमव्रत १३ दिवसात पुरे होते. पहिल्या दिवशी उपवास, पुढे चार दिवस एकभुक्त, त्यापुढचे तीन दिवस काजीभक्षण, त्यापुढे दोन दिवस रुक्षभोजन, त्यापुढे दोन दिवस मुनिवृत्तीने आहार व शेवटी एक दिवस उपवास. [ जै. व्र. वि. सं. ]

**कल्याणदेवी** हिची मूर्ती महाकोसलात आढळते. ही चतुर्भुज असून सपरिकर आहे. हिच्या हातात धनुष्याची प्रत्यंचा असून पीठाच्या खाली सिंह खोदलेला आहे.


कल्याणदेवी

स्त्रीसौंदर्याच्या सर्व कळा दाखविणारी अशी ही अप्रतिम मूर्ती आहे. [ खं. वै. ]

**कल्याण पुजारी** (१७ वे शतक) राधावल्लभ संप्रदायातला एक कवी. जातीने सनाढच ब्राह्मण याने सुमारे २०० पदे लिहिली असून ती ललितमधुर व सारगर्भ आहेत. [ रा. स. सि. सा. ]

**कल्याण बसव** कर्नाटकातले एक वीरशैव क्षेत्र. चालुक्यवंशी इम्मडी ( दुसरा ) तैलप्प याने इ. स. ९७३ मध्ये कल्याण येथे राज्यस्थापना केली. त्याच्या कार-

कीर्दीत कल्याण वैभवशाली बनले. चालुक्यांचा बिज्जल नावाचा एक सेनापती होता. त्याने कल्याणच्या सोमेश्वर राजाला पद-



श्री बसवेश्वर मंदिर– कल्याण

च्युत करून त्या गादीवर स्वतः आरोहण केले. बसवेश्वर हा बिज्जलाचा प्रधानमंत्री होता. बसवेश्वराने वीरशैव पंथाच्या प्रचारासाठी शिवानुभव मंडप नावाची एक संस्था स्थापन केली होती. या ठिकाणी बसवेश्वराचे एक मंदिर असून इथे दरवर्षी बसवजयंतीपासून पुढे चार दिवस मोठी यात्रा भरते.

इथे परुषकट्टा नावाचे एक स्थान दाखवितात. बसवेश्वर या कट्ट्यावर बसून लोकांना उपदेश करीत असे. इथे आणखी एक भव्य मंदिर असून त्यात अल्लमप्रभूंची गद्‌गी ( बैठक ) आहे.



बसवकल्याण येथील प्रसिद्ध किल्ला

बसवाचा प्रासाद ज्या ठिकाणी होता, त्या ठिकाणी सांप्रत एक गुहा आहे. बसवेश्वर या जागी बसून शिवाराधना करीत असे. याशिवाय इथे सदानंद स्वामींचा मठ, सिद्धेश्वर मंदिर, त्रिपुरान्त सरोवर, रेवणसिद्धाचे मंदिर, महतमठ. इ. पवित्र स्थळे आहेत. गावातल्या जुन्या वास्तूंची पडझड झालेली आहे. मूर्ती छिन्नभिन्न होऊन आजुबाजूला पडल्या आहेत. कित्येक मंदिराचे मशिदीत रूपांतर झाले आहे. चांगल्या स्थितीत आहे तो तिथला किल्ला हा किल्ला ७०० वर्षांचा जुना आहे.

**कल्याणमल्ल** (इ. स. १५ वे शतक) अनंगरंग या कामशास्त्रावरील ग्रंथाचा कर्ता. याला कोणी ब्राह्मण तर कोणी क्षत्रिय म्हणतात. हा कलिंग देशाचा राजा अनंगभीम याच्या पदरी होता. या राजाने शके १०९४ त जगन्नाथाचे देवालय बांधले, असे त्या देवालयातील शिलालेखावरून कळते. पण कल्याणमल्ल हा इ. स. १५ व्या शतकात, लोदी घराण्यातील लाडखान नामक सरदाराच्या पदरी होता, अशी माहिती आता उपलब्ध झाली आहे. **पाहा** – अनंगरंग. [ भ. अ. को.; म. ज्ञा. को.; कामकल्प ]

**कल्याणरक्षित** (१) (इ. स. ८२९ चा सुमार) एक आचार्य व धर्मोत्तराचार्याचा गुरू. हा वादविवादात अत्यंत प्रवीण होता. याने पुढील ग्रंथ लिहिले आहेत– (१) सर्वज्ञसिद्धिकारिका – हा ग्रंथ तिबेटात आहे. (२) बाह्यार्थसिद्धिकारिका – या ग्रंथाची मूळ संस्कृत प्रत उपलब्ध नाही. तिबेटी भाषांतर मात्र मिळते. (३) श्रुतिपरीक्षा – वरीलप्रमाणेच. (४) अन्यापोहविचारकारिका व (५) ईश्वरभंगकारिका – हे दोन ग्रंथ तिबेटी भाषांतरापुरतेच उपलब्ध आहेत. [ हि. इ. लॉ. ]

(२) (इ. स. १००० चा सुमार) एक जैन तर्कज्ञ. प्रमाणवार्तिकटीका या ग्रंथाचा कर्ता.

**कल्याणवर्मा** (जन्म इ. स. ५७८) गुप्तकालीन एक क्षत्रिय राजा. याचे छोटेसे राज्य देवग्राम या ठिकाणी असून तो गुप्तांचा मांडलिक असावा असे म्हणतात. याने सारावली नामक एक ज्योतिषग्रंथ लिहिला आहे. ब्रह्मगुप्ताने याचा उल्लेख केला आहे.

**कल्याणसप्तमी** रविवारी येणाऱ्या शु. ७ मीस हे नाव आहे. हिला विजया असेही म्हणतात. या तिथीस सूर्यपूजा, तिल-घृतपात्रदान, गोप्रदान, या गोष्टी कराव्या, असे सांगितले आहे (मत्स्य पु. ७४. ५-२०). व्रतावधी एक वर्ष. फल – सूर्यलोकप्राप्ती.

**कल्याणसुंदरमूर्ती** शिव आणि उमा यांच्या विवाहाचा प्रसंग ज्यात दर्शविलेला आहे, अशा शिल्पाला कल्याणसुदरमूर्ती असे म्हणतात. अशा प्रकारच्या मध्ययुगीन मूर्ती भारतात अनेक ठिकाणी आढळतात. घारापुरी येथील हे शिल्प सर्वोत्कृष्ट आहे. अशाच प्रकारचे दुसरे मूर्तिशिल्प वेरूळ येथे आहे. त्यात मध्यभागी शिव पार्वतीचा हात धरून उभा आहे. डाव्या बाजूस ब्रह्मा विवाहाचा पुरोहित या नात्याने स्थंडिलासमोर बसलेला आहे. त्याच्या मागे इंद्र उभा आहे. पार्वतीच्या मागे उजव्या कोपऱ्यात विष्णू-लक्ष्मी कन्यादान करणारे या नात्याने उभे आहेत. वरच्या अंगास आकाशात तरंगणारे दिक्पाल आहेत. मध्ययुगीन शिल्पकलेचा हा एक सुदर नमुना आहे. गया येथील अशा प्रकारच्या शिल्पात पार्वतीच्या हातात आरसा आहे, प्रभावळीवर नवग्रह व बैठकीच्या खाली आनंदाने नाचणारे शिवगण आहेत. शंकराने मदनदहन करून मग पार्वतीशी लग्न केले, या कथेवरून कामान्तक व कल्याणसुंदर अशी दोन शिल्पे प्रचारात आली; पण कामान्तकाचे शिल्प मात्र कुठे आढळत नाही. [ डे. हि. इ·; मू. वि. ]



कल्याणसुदर

**कल्याणिनी द्वादशी** एक व्रत. पांडवांपैकी भीमाने हे व्रत केले व त्यामुळे पुढील कल्पात त्या तिथीला भीमद्वादशी हे नाव मिळाले. [ पु. इं. ]

**कल्याणी** एक देवता. ही मलय पर्वतावर असून ती मायेची अनुचरी आहे. [ मत्स्य पु. १३. ३६ ]

**कल्लादनार** ( १००–१३० इ. स. ) एक तमिळ कवी. वेकडम् हे याचे गाव होय. एका भयंकर दुष्काळात त्याने ते सोडले व तो कावेरीच्या तीरावर राहायला आला. तिथल्या राजांनी त्याला सन्मानपूर्वक आपल्या दरबारात ठेवून घेतले. अलंकानम्च्या लढाईत हा पांड्यांच्या सैन्याबरोबर होता. विजयी पांड्य राजाची स्तुतिपर कवने गायिल्यामुळे याला युद्धातल्या लुटीचा काही भाग मिळाला. तोलकाप्पियम् या तमिळ व्याकरणावर याने टीका लिहिली असे म्हणतात, पण ती सध्या उपलब्ध नाही. [ कनकसभै ]

**कल्लार** तमिळनाडमधील एक जात. या लोकांची वस्ती मुख्यत्वे मदुरा, रामनाथपुरम्, तंजाऊर व तिरुचिरापल्ली या जिल्ह्यात आहे. कल्लर किंवा कल्लन या शब्दाचा तमिळ भाषेतला अर्थ चोर असा आहे हे लोक धंदेवाईक चोर–दरोडेखोरांपैकी होते. अगदी अलिकडच्या काळापर्यंत ते धाकदपटशा दाखवून लोकांकडून पैसे उकळीत. त्यांनी आपल्या गावावर दरोडा घालू नये, म्हणून प्रत्येक गावातले लोक दरवर्षी ठराविक रक्कम गोळा करून ती या कल्लाराना देत. जो गाव अशा प्रकारचा वार्षिक तनखा देत नसे, त्या गावाला हे आग लावीत व गुरेढोरे पळवून नेत. त्यांच्या या करपद्धतीला कुडीकवल असे नाव होते.

सांप्रत त्यांच्यामधली ही दहशतवादाची व लूटमारीची प्रवृत्ती मावळत चाललेली दिसते. कल्लार जमातीत सुधारणा घडवून आणण्यासाठी पोलीस व लेबर डिपार्टमेंटकडून प्रयत्न होत असल्याचा इ. स. १९२० पासूनचा दाखला मिळतो त्या कामासाठी खास पोलीस अधिकारीही नेमला जात असे. पण त्याचाही विशेषसा उपयोग होत नाही, असे दिसून आल्यावर कल्लार रेक्लेमेशन स्कीम नावाची एक योजना आखण्यात आली. पण तीही फारशी यशस्वी न झाल्यामुळे ती कामगिरी इ. स. १९४९ पासून हरिजन वेल्फेअर डिपार्टमेंटकडे सोपविण्यात आली आहे. या योजनेखाली कल्लाराच्या पचायती नेमणे, सहकारी संस्था स्थापून शेती करण्याविषयी त्याना प्रोत्साहन देणे, शिक्षणाचा प्रसार करणे, इ. गोष्टी केल्या जातात. या योजनांना हळूहळू यश मिळत असून कल्लार जात आता गुन्हेगारी प्रवृत्ती टाकून शेतीकडे वळू लागली आहे. त्यांनी सांप्रत शांततामय जीवन स्वीकारले असले, तरी त्याची धाडसी कृत्ये करण्याची आवड मात्र कायम आहे.

**पोटजाती**–– कल्लारात मलेनाडु, शिवकुडीनाडु, वेलुरनाडु, कुन्नंकोत्तैनाडु, कंडदेवी, पुरमलैनाडु, तेन्निलैनाडु, पलयनाडु अशा प्रमुख पोटजाती असून प्रत्येक पोटजातीत आणखी उपपोटजातीही आहेत. काही पोटजातीत वंशपरंपरागत ग्रामप्रमुख असतात व जातीचे आचार–विचार ठरविण्याचा अधिकार त्याच्याकडे असतो. हे ग्रामप्रमुखच त्याचे जातीय तटेही मिटवितात.

कल्लार जातीत शैव लोकाचा भरणा विशेष असून काही

थोडेच वैष्णव आहेत. शैव कल्लार आडवे भस्म लावतात. भूतप्रेतपूजा हेच त्यांच्या धर्माचे वैशिष्टय आहे. ते करुप्पन, अंदी, मंडी, इ. देवताना भजतात. अलगिरिस्वामी हे त्यांचे मुख्य दैवत होय. या देवाच्या उत्सवात कल्लाराना विशेष हक्क आहेत. त्याचे पुरोहित त्यांच्यातलेच असतात. ते शकुन-प्रश्न पाहतात व बऱ्या–भल्यासाठी देवाला कौलही लावतात. कल्लार आषाढातला शुक्रवार, कार्तिकातला 'कथिगै' व पौषातला 'पोंगल' हे दिवस महत्त्वाचे मानतात.

कल्लाराना बैलांच्या झुजी लावण्याचा फार शौक आहे. ते बैलाच्या शिगाला फडके बांधतात आणि ढोल वाजवून त्या बैलाला घाबरवितात. बैल बेफाम होऊन उधळल्यावर त्याच्या शिंगाचे फडके जो तरुण काढून आणील, त्याला ते वीर पुरुष मानतात कल्लार कुमारिका आपला पती म्हणून अशा वीर तरुणानाच पसंत करतात.

**विवाहप्रथा—** यांच्यात पोटजातिपरत्वे विवाहपद्धती निरनिराळया असून त्यातला बारीक सारीक तपशीलही भिन्न भिन्न असतो. याना आतेबहिणीशी लग्न करण्याचा हक्क असतो. आतेबहीण वरापेक्षा वयाने मोठी असली, तरी चालते. विवाहाच्या वेळी वराची बहीण वधूगृही जाऊन वधूच्या आई-बापांना २१ नाणी व एक वस्त्र देते आणि वधूच्या गळयात ताळी बांधते. लग्नाचा मुहूर्त ताडपत्रावर हळदीने लिहितात व ते पत्र एकमेकाना देतात. वरप्रस्थान निघताना शंख वाज-वितात. वधूगृही पोचल्यावर त्या पक्षाची मडळी वरपक्षाला त्याची जात विचारतात. वरपक्ष आपण इंद्रकुलातले व अहिल्या गोत्राचे थलवलनाडु असल्याचे सागतो.

नतर वराची बहीण वधूच्या गळयात बांधायची ताळी सर्व मंडळीत फिरविते. प्रत्येक जण त्या ताळीला स्पर्श करतो. नंतर ती ताळी वधूच्या गळयात बांधली जाते. सासरी जाताना वधूचे आई–बाप तिला थोडे तांदूळ व एक कोंबडे देतात. काही पोटजातीत विवाहाला प्रथम मुलीच्या मामाची समती घ्यावी लागते. मांडवपरतणीच्या दिवशी वधू–वरांना भाताच्या मुटकुळयानी ओवाळतात व त्या वेळी तिथे जमले-ल्या बायका 'किल्ल इल्ल इल्ल' असा उद्घोष करतात. या विधीला उलवीड्दल म्हणतात.

**प्रसूतिप्रथा–** प्रथम रजोदर्शन झाल्यावर ऋतुमतीला सात किंवा नऊ दिवस दूर ठेवतात. सोळाव्या दिवशी तिला पाण्याने व भाताने ओवाळतात. मग एक स्त्री तिला हाती धरून पाटा-वरून उठवते व पाटाला प्रदक्षिणा घालते. मग ऋतुमती चारी दिशाना जलप्रोक्षण करून नमस्कार करते. गर्भारपणी सातव्या महिन्यात तिची नणंद तिच्यासाठी खीर तयार करते, तिला ओवाळते व ओणवी उभी करून तिच्या पाठीवर दूध ओतते. दुसऱ्या एका पोटजातीत अशा वेळी गर्भिणीच्या पाठी-वर तांदुळाच्या पिठाने काही चित्राकृती काढतात व त्यावर दूध ओततात. प्रसूतीनंतर त्या कुटुंबात तीन दिवस जननाशौच पाळले जाते. काही पोटजातीत मूल सात दिवसाचे किंवा एक महिन्याचे झाल्यावर प्रथम त्याचे कान टोचून मग नामकरण विधी करतात. पुरमलैनाडु या पोटजातीत मुलाची सुंता करण्याचीही चाल आहे. या सुंतेचा खर्च मुलाची आत्या सोसते. कारण पुढे तिची मुलगी त्या मुलाची पत्नी व्हायची असते.

**मर्तिकप्रथा–** कल्लार लोक मृताना पुरतात. ती क्रिया चालू असताना जमलेले इसम चिरूट ओढतात. पुरमलै कल्लारात मात्र प्रेताचे दहन होते. गर्भिणी स्त्री मृत झाल्यास तिच्या पोटातील मूल बाहेर काढून ते तिच्या बरोबर जाळतात. ज्या घरात मृत्यू होतो, त्या घरातली माणसे शेणपाण्याने भरलेले भाडे, केरसुणी व जळके कोलीत या वस्तू घरासमोर किंवा तिवाठयावर नेऊन ठेवतात. त्यामुळे घरातल्या लोकांना भूत-बाधा होत नाही, अशी समजूत आहे. [ मदुरा गॅझे.; म. ज्ञा. को. ]

## कल्लाळी

नांदेड जिल्ह्यातील एक क्षेत्र. इथे नदीकिनारी एका टेकडीवर ब्रह्मदेवाची सुमारे आठ फूट उंचीची मूर्ती आहे. तिच्यावर मदिर नसून ती एका चबुतऱ्या-वर स्थापलेली आहे. मूर्तीपुढे शिवलिग आहे. हे स्थान जागृत आहे, असे मानतात [ पुरुषार्थ ]

## कल्लिनाथ

( १५५० इ. स. चा सुमार ) एक संगीताचार्य. विद्यानगरचा महाराजा इम्मडिदेवराय याच्या दरबारात हा आस्थानपडित होता. संगीतरत्नाकरावरची कला-निधी ही सुप्रसिद्ध व्याख्या याने केली. ही व्याख्या नसती, तर सदर ग्रंथ समजणे दुर्घट झाले असते, असे म्हणतात. [ सं. शा. ]

## कल्हण

( इ. स. १२ वे शतक ) कवी व इतिहासकार. जन्मस्थान काश्मीर. मूळ नाव कल्याण होते; पण त्याचा अपभ्रंश होऊन कल्हण असे झाले. त्याच नावाने याची प्रसिद्धी झाली. काश्मीरमधील एका ब्राह्मणकुलात याचा जन्म झाला. याच्या पित्याचे नाव चंपक असे होते. चंपक हा महाराज हर्ष याचा विश्वासपात्र मंत्री होता. हर्ष हा इ. स. १०७६ ते ११०१ पर्यंत काश्मीरच्या गादीवर होता. पण शत्रूने कपटव्यूह रचून त्याची हत्या केली. त्यामुळे चंपकाला फार दुःख झाले व तो काश्मीर सोडून काशीवासाला आला.

कल्हणाची इच्छा असती, तर बापाच्या मागून प्रधानकीची वस्त्रे त्याच्या अंगावर झळकली असती; पण तो त्या अधिकारपदापासून चार हात लांबच राहिला.

त्याने एक निराळेच महत्कार्य आपल्या शिरावर घेतले आणि ते म्हणजे काश्मीरचा इतिहास लिहिणे हे होय. त्याने त्या दृष्टीने साधनसामग्री जुळविण्याचे काम सुरू केले. प्राचीन ग्रंथ, शिलालेख, ताम्रपट, नाणी, शिक्के आणि प्राचीन स्थापत्य या ऐतिहासिक साधनांचा त्याने कसून अभ्यास केला. काश्मीरची सर्व भूमी त्याने पायाखाली घातली. प्रत्येक ठिकाणच्या स्थानिक परंपराही जाणून घेतल्या. त्याने सगळ्या काश्मीरचे उत्तम प्रकारे दर्शन व श्रवण केले. मग भूतकालातल्या संपूर्ण ऐतिहासिक घटनांचा क्रम लावून त्याने लेखनाला सुरवात केली. महाभारतकालापासून प्रारंभ करून १२ व्या शतकापर्यंतचा विस्तृत, क्रमबद्ध असा राजकीय व सांस्कृतिक इतिहास त्याने लिहून काढला. इ. स. ११४८ ते ११५० या अवघ्या दोन वर्षांत त्याने आपला ग्रंथ पूर्ण केला. ही रचना सुस्सलाचा पुत्र राजा जयसिंह याच्या कारकीर्दीत झाली.

या ग्रंथाचे नाव आहे राजतरंगिणी. तो संस्कृत भाषेत असून श्लोकबद्ध आहे. या ग्रंथाची श्लोकसंख्या ७८२६ इतकी असून तो आठ खंडांत विभाजित आहे. महाभारत सोडल्यास समस्त संस्कृत साहित्यात या ग्रंथाशी तुलना होऊ शकेल, असा दुसरा इतिहासग्रंथ नाही. नवव्या शतकापर्यंतचा त्याने सांगितलेला इतिहास काहीसा अंधुक आणि असंगत असला, तरी त्यापुढचा १२ व्या शतकाच्या मध्यापर्यंतचा इतिहास मात्र सुसंघटित, प्रमाणित आणि विवेचनात्मक असा उतरला आहे. कुठेही पक्षपात आणि अभिनिवेश न दाखविता कल्हणाने इतिहासलेखन केले आहे. या विषयीचा त्याचा दृष्टिकोन पुढील श्लोकात व्यक्त झाला आहे–

**श्लाघ्यः स एव गुणवान् रागद्वेषबहिष्कृता ।**
**भूतार्थकथने यस्य स्थेयस्येव सरस्वती ।।**

अर्थ – ज्याची वाणी राग–द्वेषांपासून अलिप्त होऊन ऐतिहासिक घटनांचे वर्णन करण्याच्या कामी दृढ राहते (कुठेही पक्षपात करीत नाही), तोच गुणवान् पुरुष (अर्थात इतिहासलेखक) प्रशंसनीय समजावा.

कविकर्म म्हणजे काव्यरचना, काव्यद्वारा केलेली प्रशस्ती. त्याचे महत्त्व सांगतांना तो लिहितो–

**भुजतरुवनच्छायां येषां निषेव्य महौजसाम् ।**
**जलधिरशना मेदिन्यासीदसावकुतोभया ।।**
**स्मृतिमपि न ते यान्ति क्ष्मापा विना यदनुग्रहम् ।**
**प्रकृतिमहते कुर्मस्तस्मै नम कविकर्मणे ।।**

अर्थ – ज्या महान् ओजस्वी भूपतींच्या भुजरूपी वनतरूंच्या छायेचा आश्रय करून ही समुद्रमेखला पृथ्वी सर्व बाजूंनी निर्भय झाली, असे ते भूपती ज्याच्या अनुग्रहावाचून स्मरणातही शिल्लक राहू शकत नाहीत, अशा स्वभावतःच महत्त्व असलेल्या कविकर्माला आम्ही नमस्कार करतो.

कल्हणाला भारताच्या भूतकालाविषयी जसा प्रेमादर वाटतो, तसाच तो आपल्या जन्मभूमीविषयी अर्थात काश्मीरविषयीही वाटतो. तो म्हणतो –

**त्रिलोक्यां रत्नसूः श्लाघ्या**
**तस्यां धनपतेर्हरित् ।**
**यत्र गौरीगुरुः शैलो**
**यत्तस्मिन्नपि मण्डलम् ।।**

अर्थ – त्रैलोक्यात पृथ्वी श्लाघ्य, पृथ्वीवर उत्तर दिशा प्रशंसनीय, उत्तरेतही गौरीपिता हिमाचल प्रशंसनीय आणि त्यातही काश्मीरमंडल प्रशंसनीय होय.

कल्हणाने आपल्या काळातल्या काश्मीरचे अत्यंत सजीव असे चित्र रेखाटले आहे. प्रवरसेन, ललितादित्य, अवंतिवर्मा, इ. नरपतींचे पराक्रम, त्यांचे युद्धकौशल्य, त्यांच्या विजययात्रा, इ. प्रसंग त्याने रसरशीतपणे वर्णिले आहेत. त्याचबरोबर इतर अनेक राजांच्या आणि राजकुमारांच्या भीरुतेचे, दुष्टपणाचे, व्यसनाधीनतेचे यथोचित वर्णन करायलाही तो कचरला नाही. काश्मीरच्या राजांचे उत्कर्षापकर्ष, त्यांची कृष्ण कारस्थाने, हत्या, पराजय, क्रूरता, अभिलाषा, आलस्य, विषयभोग या सर्व अवगुणांची त्याने यथेच्छ निर्भर्त्सना केली आहे. वाईटाला वाईट म्हणायला त्याने कुठेही मागे पुढे पाहिले नाही. म्हणूनच राजतरंगिणी हा केवळ इतिहासग्रंथ न राहता त्याला नीतिविषयक काव्याचेही स्वरूप प्राप्त झाले आहे. दुष्कृत्याचा परिणाम कसा होतो, ते एका दृष्टान्ताने तो विशद करतो –

**योऽयं जनापकरणाय सृजत्युपाय**
**तेनैव तस्य नियमेन भवेद्विनाशः ।**
**धूमं प्रसौति नयनान्धकरं यमग्नि–**
**र्भूत्वाम्बुदः स शमयेत् सलिलैस्तमेव ।।**

अर्थ – जो कोणी दुसऱ्याच्या नाशासाठी एखादा दुष्ट उपाय शोधतो, तो उपाय शेवटी त्या दुष्कर्मी पुरुषालाच घातक होतो. डोळ्यांना अंधत्व देणाऱ्या धुराला अग्नी प्रसवतो खरा; पण तो धूर शेवटी ढगात परिवर्तित होऊन जलवृष्टीने अग्नीलाच विझवून टाकतो.

आधी सज्जन, सुस्वभावी, सद्गुणी; पण पुढे मात्र बिघडलेले अशा राजांविषयी कल्हणाला सदैव आश्चर्य वाटत आले आहे. तो म्हणतो –

**चित्रं नृपद्विपाः पूतमूर्तयः कीर्तिनिर्झरैः ।**
**भवन्ति व्यसनासक्तिपांसुस्नानमलीमसाः ।।**

अर्थ – ज्याप्रमाणे हत्ती जलाशयात स्नान करून निर्मळ झाल्यानंतर फिरून धूळ अगावर उडवून घेऊन मलिन होतो, त्याप्रमाणे राजे लोकही प्रथम कीर्तीने पुनीत झाल्यावर मागाहून दुर्व्यसनांच्या आसक्तीत लोळून मलिन होतात, हे (खरोखर) आश्चर्य आहे.

कल्हणाची वर्णनशैली अद्भुत आहे. जिथे जिथे संधी मिळेल, तिथे तिथे चार उपदेशाचे शब्द सागितल्याशिवाय तो पुढे जातच नाही. तो कित्येक घटना नाटचमय संवादानी उभ्या करतो. त्याची राजतरगिणी केवळ राजांची मालिका नाही. ती राजनैतिक, सामाजिक आणि काही अंशी आर्थिक ज्ञानाचीही खाण आहे.

कल्हण हा शैव असून प्रत्यभिज्ञादर्शनाचा अनुयायी होता. पण तरीही बौद्ध धर्माविषयी त्याच्या मनात नितान्त आदर वसत होता. विशेषतः बौद्धाचे अहिसातत्त्व त्याला अत्यंत प्रिय होते. असा हा कल्हण कवी राजतरंगिणी लिहून संस्कृत साहित्याच्या गगनागणातला ध्रुवतारा ठरला आहे. [ सं. सा. इ.; आर्. एल्. शर्मा; योजना ]

## कवच

(१) वैदिक वाङमयात उरस्त्राण (छातीचे संरक्षक) या अर्थी हा शब्द आलेला आहे (अथर्व. ११. १०. २२; श. ब्रा. १३. २. २. ७; ऐ. ब्रा. ७. १९. २, वाज. स. १६. ४५). कवच हे युद्धात शत्रूच्या शस्त्रापासून आपल्या छातीचा बचाव व्हावा या हेतूने वापरण्याची पद्धत पुरातनकालापासून आहे. वायुपुराणात शिवाला वारंवार कवची म्हटले आहे. कवचाचे गुणदोष युक्तिकल्पतरूत पुढीलप्रमाणे सागितले आहेत–

**शरीरावरकत्वं तु लघुत्वं दृढता तथा**
**दुर्भेद्यतेति कथितः कवचे गुणसंग्रहः ।।**
**सच्छिद्रतातिगुरुता तनुता सुखभेद्यता**
**कवचानां विनिर्दिष्टः समासाद्दोषसंग्रह. ।।**

अर्थ – शरीराचे आवरण करणे, हलके, घट्ट व दुर्भेद्य असणे, हे कवचाचे गुण सांगितले आहेत. सच्छिद्र, अवजड, पातळ व सहजासहजी फुटणारे कवच हे सदोष होय.

वर्णानुक्रमे शुक्ल, रक्त, पीत व कृष्ण असे त्याचे चार रंग सांगितले आहेत. कवच धातूचे करीत व त्यावर नक्षीकामही केलेले असे. याविषयी महाभारतात पुढील श्लोक आहे–

**शतसूर्य शतावर्त शतबिन्दुशताक्षिमत् ।**
**अभेद्यकल्पं मत्स्यानां राजा कवचमाहरत् ।।**
(विराट. ३१. १३-१४)

अथ – ज्यावर शंभर सूर्य, शभर चंद्र किवा पद्मे, शंभर डोळे (नेत्राकार चक्रे) जडविलेली आहेत, असे आणि जवळजवळ अभेद्य असलेले कवच मत्स्यराज विराटाने (आपल्या छातीवर) बाधले.

कवचे किवा चिलखते कातडयाचीही करीत असावेत. भारतीय युद्धातले रथी, पदाती व गजारूढ योद्धे नेहमी कवच वापरीत. शत्रूच्या बाणापासून संरक्षण होण्यासाठी कवचाचा उपयोग रथी व सारथी या दोघांनाही होत असे. कर्णाला कवचकुंडले जन्मतःच मिळाली होती.


मोगलकालीन चिलखत आणि शिरस्त्राण

सनपूर्व ४ थ्या शतकात सिकंदराविरुद्ध लढणाऱ्या भारतीय वीरांच्या अंगांत लोखंडी चिलखते होती, असे ग्रीक इतिहासकारांनी लिहून ठेवले आहे. कौटिल्याने चिलखताच्या विविध प्रकाराचे व त्यांच्या बनावटीचे तपशीलवार वर्णन दिले आहे.

छत्रपती शिवाजी महाराजानी अफजुलखानास मारले, त्या वेळी त्यांच्या अंगात ‘जरी कुडती’चे चिलखत होते. शिवाजीमहाराजांचे हे चिलखत साताऱ्यास महाराजांच्या जलमंदिरात ठेवलेले आहे. लढाईत उपयोजिल्या जाणाऱ्या हत्तीघोडचांनाही कातडचाचे किवा लोखंडाचे चिलखत घालण्याची प्रथा बहुतेक देशांत प्राचीन काळापासून रूढ आहे

चिलखताचे अर्धे व पूर्ण असे दोन प्रकार असत. अर्धे चिलखत केवळ छातीच्याच संरक्षणासाठी असे; तर पूर्ण चिलखतात छातीप्रमाणेच पाठीच्याही सरक्षणाची व्यवस्था असे. मध्ययुगात चिलखताच्या रचनेत बरीच सुधारणा झाली; पण त्यानंतरच्या काळात मात्र युद्धकार्यात चिलखताचा उपयोग केलेला आढळत नाही.

(२) मंत्रविद्येतही कवच नावाचा प्रकार असतो. दिव्य, भौतिक आघातापासून शरीराचे रक्षण व्हावे म्हणून एखादा मंत्र किंवा एखादे यंत्र भूर्जपत्रावर किंवा अन्य कोणत्या तरी पानावर लिहितात आणि ते ताइतात घालून गळ्यात किंवा दंडात बांधतात, त्यालाही कवच असे नाव आहे. रोगमुक्ती किंवा विशिष्ट कामना सिद्ध होण्यासाठीही कवचांचा उपयोग केला जातो. देवताची जशी स्तोत्रे असतात, तशीच कवचेही असतात. या कवचामध्ये त्या देवतेने आपल्या सर्व शरीरावयवांचे रक्षण करावे, अशी प्रार्थना असते. सुप्रसिद्ध रामरक्षास्तोत्रात पुढील रामकवच आले आहे–

**शिरो मे राघवः पातु भालं दशरथात्मजः ।।**
**कौसल्येयो दृशौ पातु विश्वामित्रप्रियः श्रुती ।**
**घ्राणं पातु मखत्राता मुखं सौमित्रिवत्सलः ।।**
**जिह्वां विद्यानिधिः पातु कण्ठं भरतवन्दितः ।**
**स्कन्धौ दिव्यायुधः पातु भुजौ भग्नेशकार्मुकः ।।**
**करौ सीतापतिः पातु हृदयं जामदग्न्यजित् ।**
**मध्य पातु खरध्वंसी नाभिं जाम्बवदाश्रयः ।।**
**सुग्रीवेश. कटी पातु सक्थिनी हनुमत्प्रभुः ।**
**ऊरू रघूत्तमः पातु रक्षःकुलविनाशकृत् ।।**
**जानुनी सेतुकृत् पातु जङ्घे दशमुखान्तकः ।**
**पादौ बिभीषणश्रीदः पातु रामोऽखिलं वपुः ।।**

अर्थ– राघव माझ्या शिराचे, दशरथात्मज भालप्रदेशाचे, कौसल्यापुत्र डोळ्यांचे, विश्वामित्रप्रिय कानांचे, मखरक्षक नाकाचे, लक्ष्मणाविषयी वात्सल्य धारण करणारा मुखाचे, विद्यानिधी जिह्वेचे, भरतवंदित कंठाचे, दिव्य आयुधे धारण करणारा खांद्याचे, शिवधनुष्य भग्न करणारा भुजांचे, सीतापती हातांचे, परशुरामाला जिंकणारा हृदयाचे, खर राक्षसाचा वध करणारा कटिभागाचे, जांबवानाला आश्रय देणारा नाभीचे, सुग्रीवाचा धनी कंबरेचे, हनुमंताचा प्रभु जांघाचे, राक्षसांच्या कुळांचा संहार करणारा रघुकुलातील श्रेष्ठ (रघूत्तम) मांड्यांचे, सेतू बांधणारा गुडघ्याचे, रावणाचा नाश करणारा पोटऱ्यांचे, व बिभीषणाला राज्यलक्ष्मी देणारा पायांचे रक्षण करो. याप्रमाणे श्रीरामचंद्र माझ्या सर्व शरीराचे रक्षण करो.

यासारखीच शिवकवच, गोपालकवच, हनुमत्कवच, मंगलकवच, सूर्यकवच, इ. कवचे प्रसिद्ध आहेत. भाविक लोक आपल्या आयुरारोग्यासाठी स्तोत्रपाठाप्रमाणे या कवचांचाही पाठ करतात. [ रि. इ.; म. ज्ञा. को.; श. क. ]

**कवठ** (सं. कपित्थ) एक फळ. हे वाटोळे व पिकण्यापूर्वी आंबट असते. हे फळ शिवाला प्रिय आहे. म्हणून महाशिवरात्रीस ते शिवाला अर्पण करण्याची चाल आहे.

**कवडी** एका जातीच्या गोगलगायींच्या शिंपल्याला कवडी म्हणतात. जुन्या काळी कवडीचा उपयोग नाणे म्हणून करीत असत. कवडी ही जागतिक संस्कृतीत प्राचीन काळापासून आलेली असून ती भगप्रतीक म्हणून समजली गेली आहे. ती अंबादेवीची प्रिय वस्तू आहे. अंबाबाईचे भुत्ये आपल्या उभट टोपीवर कवड्या जडवितात व गळ्यातही कवड्यांच्या माळा घालतात. दक्षिणेत ग्रामदेवताच्या पुजारिणीही गळ्यात कवड्यांच्या माळा घालतात. सोंगट्या खेळताना फाशाऐवजी चार कवड्या घेतात आणि त्यानी ‘ दान ’ टाकतात. कोकणात नाट नावाचा एक खेळ आहे. त्यासाठीही कवड्याच वापरतात.

**कवणमद्दलम्** एक प्रकारचा ढोल. विटंक नावाचे त्यागराजाचे एक क्षेत्र तंजाऊर जिल्ह्यात आहे. तिथे पालखी नेत असताना जे नृत्य होते, त्यात या ढोलाची साथ असते. नागपट्टनम् येथील मंदिरातील नित्याच्या पूजाविधीत या वाद्याचा उपयोग करतात. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**कवरै** तमिळनाडमधील एक जात. हे लोक आपणास बलिज म्हणवितात. बली = अग्नी, ज = उत्पन्न झालेले, अशी त्या शब्दाची व्युत्पत्ती सांगतात. कवरै हे नाव कुरुवंशातल्या कौरवार या नावावरून पडले असून तोच आपल्या जातीचा मूळ पुरुष, असे ते समजतात. शिवपत्नी गौरी हिला गौरवालु नावाचा मुलगा होता. त्याच्यापासून उत्पत्ती झाल्यामुळे त्या शब्दाच्या अपभ्रंशाने कवरै हे नाव पडले, अशी आणखी एक उपपत्ती सांगितली जाते. दोरा कृष्णम्मा नावाचा एक सरदार होता. त्याने एका रानटी हत्तीला वठणीवर आणले व तिरुनेलवेली हा प्रदेश जिंकून घेतला. त्यामुळे या जातीत दोरा कृष्णम्माला फार मान आहे. काही लोक तर त्यालाच आपल्या जातीचा मूळपुरुष समजतात.

हे लोक व्यापारी आहेत. यांच्यात तुपकी जेत्ती, पगदल, बंदी, सिमनेली, इ. पोटजाती आहेत. पोटजातीचे परस्पर लग्नसंबंध होतात.

मदुरा जिल्ह्यातले कवरै हे विशिष्ट प्रकारच्या मातीच्या बांगड्या तयार करून विकतात. या जिल्ह्यातले कवरै स्वतःला चेट्टी म्हणवितात. रंगारी, कोष्टी, चित्रकार, इ. व्यवसाय करणाऱ्या कवरैंना नायक्कन म्हणतात. तजाऊरमधील कवरैंना नायक हे बिरुद आहे. जे लोक शेती करतात, त्यांना रेड्डी म्हणतात. वलैयल ही कवरैंची सर्वांत मोठी उपशाखा होय.

**विवाहप्रथा** – इतर अनेक तेलुगू जातीप्रमाणेच याचे लग्न-विधी होतात. फक्त सिमनेली पोटजातीत थोडा फरक आहे. त्यांच्यात लग्नाच्या आधी वधू-वर डोक्यावर कलश घेऊन देवळात जातात व कृष्णम्माची पूजा करून एका मुवासिनीला विडा, नारळ व दक्षिणा देतात. [ मदुरा गॅझे.; का. ट्रा. स. इं. ]

**कवलचांद्रायण** एक जैनव्रत. व्रतावधी एक मास. अमावास्येपासून प्रारंभ करून रोज एकेक ग्रास वाढवीत १४ शीला चौदा ग्रास अन्न ग्रहण करायचे. पूर्णिमेस उपवास. पुनश्च कृष्ण पक्षात प्रतिदिनी एकेक ग्रास कमी करीत १४ शीस एक ग्रास अन्न घ्यायचे. अमावास्येच्या दिवशी उपवास करायचा. असा या व्रताचा विधी आहे.

हे व्रत ऋषभनाथाचा पुत्र बाहुबली याने केले व त्यामुळे त्याला केवलज्ञान प्राप्त होऊन मोक्षही मिळाला. ऋषभनाथाच्या दोन कन्या ब्राह्मी व सुंदरी यानी या व्रताच्या प्रभावाने स्त्रीलिंगाचा छेद करून स्वर्गामध्ये देवत्व प्राप्त करून घेतले. [ जै. व्र. वि. सं. ]

**कवलाहार** जैनाचे सहावे बाह्यतप. मुनीने जास्तीत जास्त बत्तीस व साध्वीने अठ्ठावीस कवल (ग्रास) ग्रहण करावे, असे सांगितले आहे ( भगवतीसूत्र २११ ). भाताची पन्नास शिते=एक कवल, असे त्याचे कोष्टक आहे. जैन आगमात मुनीच्या आहाराचे नोकर्माहार, कर्माहार, कवलाहार, लेप्याहार, ओजाहार व मानसाहार असे भेद सांगितले आहेत.

मुळात विधान असे होते, की केवलीला ( जीवन्मुक्त ) कवलाहाराची गरज नाही. कारण त्याच्या शरीरस्थितीला नोकर्माहार व कर्माहार हेच पुरेसे असतात. उत्तरकालात सवस्त्रमुक्तीला जशी मान्यता दिली गेली, तशीच ती केवलीच्या कवलाहारालाही देण्यात आली. दिगंबर व श्वेतांबर या दोन संप्रदायांत जे मुख्य तीन भेद आहेत, त्यांत कवलाहार हा एक आहे. [ हि. वि. को. ]

**कवष ऐलूष** एक सूक्तद्रष्टा. इलूपा नावाच्या शूद्र दासीपासून याचा जन्म झाला, म्हणून याला ऐलूष म्हणू लागले. त्याच कारणामुळे याला यज्ञकर्मात अयोग्य ठरवून सरस्वतीच्या तीरावरील अंगिरसाच्या सत्रातून हाकलून देण्यात आले व जिथे पाणीही मिळणार नाही, अशा अरण्यात नेऊन सोडण्यात आले; पण त्याने अपोनप्त्रीय सूक्त म्हटल्याने सरस्वती नदी प्रसन्न होऊन याच्याकडे वळली. ती जागा परिसारक या नावाने अद्यापि प्रसिद्ध आहे. पुढे अन्य ऋषींना याची थोरवी समजली व त्यानी याला आपल्यामध्ये परत बोलाविले ( ऐ. ब्रा. २. १९ ). हा पुढे कुरुश्रवण राजाचा उपाध्याय झाला ( ऋ. १०. ३२. ९ ).

कवपाच्या नावावर ऋग्वेदाच्या १० व्या मंडलातील ३० ते ३४ ही सूक्ते आहेत. माणसाने वागावे कसे, या विषयी तो म्हणतो––

**परि चिन्मर्तो द्रविणं ममन्यादृतस्य पथा नमसा विवासेत् ।**
**उत स्वेन क्रतुना सं वदेत श्रेयांसं दक्षं मनसा जगृभ्यात् ।।**

( ऋ. १०. ३१. २ )

अर्थ–– मर्त्य मानवाने सर्व प्रकारे द्रव्यप्राप्तीची चिंता वाहावी, पण सनातन सद्धर्माच्या मार्गाने ( वागून ) नम्रभावाने ( देवाची ) सेवा मात्र करीत राहावे. आपल्या कर्तृत्वाच्या धोरणाने प्रयत्न करावा, विचारणा करावी आणि चातुर्य आणि उन्नती ही ध्येये मनात घट्ट धरून ठेवावी.

**कवळास** उत्सवसमारंभ आटोपल्यावर गौरी–गणपतीच्या मूर्तींचे, तसेच मंगळागौरीचे जलाशयात विसर्जन करणे, याला कवळास म्हणतात. कवळासाच्या वेळी मूर्तींच्या अंगावरची फूल–पत्री बाजूला करतात. [ म. श. को. ]

**कवाटपुरम्** सांप्रत अस्तित्वात नसलेले एक प्राचीन नगर. वाल्मिकी रामायणात या नगराचा उल्लेख मिळतो. सीताशुद्धीसाठी जाणाऱ्या वानराना सुग्रीव म्हणतो––

**ततो हेममयं दिव्यं मुक्तामणिविभूषितम् ।**
**युक्तं कवाटं पाण्ड्यानां गता द्रक्ष्यथ वानराः ।।**

( वा. रा. किष्किन्धा ४. ४१. १९ )

अर्थ–– हे वानरांनो, त्यानंतर मोती व रत्ने यांनी विभूषित, सुवर्णमय व दिव्य असे पाड्यांचे कवाट नामक पूर तुम्ही पाहाल.

यावरून कवाटपूर हे पांड्याच्या राजधानीचे शहर होते, असे कळते. या विषयीचा इतिहास तमिळ भाषेतील प्राचीन ग्रंथांत आढळतो, तो असा– पाड्याची पहिली राजधानी दक्षिण मदुरा ही होती. ती एका सागरी उत्पातात जलमग्न झाली. त्यानंतर पाड्यांनी आपली दुसरी राजधानी पूर्वीच्या राजधानीच्या उत्तरेस निर्माण केली व तिला कवाटपुरम् असे नाव दिले. तमिळ कवींचा दुसरा ‘ संघम् ’ इथेच स्थापन झाला.

कौटिल्यानेही कवाटपुरम्चा उल्लेख केला असून तिथे विशेष प्रकारची मोत्ये घाऊक प्रमाणात सापडतात, असे म्हटले आहे.

महाभारताच्या द्रोणपर्वात सागरध्वज नावाच्या एका पांड्य राजाचे वर्णन आहे. हा राजा पाडवाच्या बाजूने कौरवाशी लढला होता (म. भा. द्रोण. २३.७२). कवाटपुर ध्वस्त झाल्यावर उर्वरित प्रदेश सुदृढ करून त्यावर तो राज्य करीत राहिला.

वरील वर्णनावरून कवाटपुरम् ही पांड्यांची राजधानी वैभवशाली होती आणि त्यानंतर दक्षिणमदुरेप्रमाणेच तीही समुद्रात बुडाली, हे कळून येते.

कवाटपुरात स्थापित झालेल्या तमिळ कविसंघाने मुरुवल, शयन्दम्, शेयिर्रियम्, इ. नाटके, तसेच पेरुनारै, पेरुकुरुगु, इशैनुक्कम्, ताळवगैयोत्तु, इ. सगीतशास्त्रावरचे ग्रंथ निर्माण केले होते; पण आज त्यापैकी एकही उपलब्ध नाही. [ मदुरा गॅझे; त. उ. सा. ]

## कवार (कंवर)

वऱ्हाड व मध्यप्रदेश यांत आढळणारी एक जात. तमिळनाडमधील कवरै व कवार हे मुळात एकच असावेत. कवारांचा कौरिया, रवत व धोबी या जातीशी पूर्वसंबंध असावा, असे यांच्या चालीरीतीवरून वाटते. याचे आठ पोटविभाग आहेत. त्यापैकी तवर हे स्वत.ला तोमार रजपूत समजतात व जानवे घालतात. यांनी ब्राह्मणांची गोत्रेदेखील घेतली असून विधवाविवाह निषिद्ध ठरविला आहे. पैंकर लोक हे आपले पूर्वज हैहय राजाच्या पायदळात होते, असे सांगतात. रावतिया लोक बहुधा कंवर पुरुष व रावत स्त्री याची संतती असावे. रावतांची कौरिया रावत म्हणून जी पोटजात आहे, तीही अशाच मिश्रसबंधाची असावी. कौरिया रावताने कंवर स्त्रीशी व्यभिचार केल्यास तिला जातिबहिष्कृत करीत नाहीत, यावरून या दोन जातींत पूर्वी लग्नसंबंध रूढ असावे व कालांतराने ते बंद झाले असावे, असे वाटते.

**देवधर्म–** कवार वाघाला देव मानतात. त्यांची व्याघ्रदेवता घरा या नावाने प्रसिद्ध आहे. वाघाने एखाद्यास मारून खाल्ले तर वाघाचा व त्या कुटुंबाचा रक्तसंबंध जुळला, असे समजतात. मग तो तोडण्यासाठी दोरी तोडणे या नावाचा विधी करतात. त्यासाठी एका बैगाला वाघाचे सोंग देतात. मग त्या बैगाला घेऊन वाघाने जिथे माणसाला खाल्ले असेल, तिथे जातात. बैगा रक्त सांडलेल्या जागेवरची माती तोडात भरून रानात पळतो. मग जमलेली माणसे त्याला फिरवून आणून तोंडातला मातीचा घास टाकायला लावतात. नंतर तो बैगा मयताच्या कुटुबीयाना दोरीने एकत्र बांधतो. मग एका कोंबडीला दाणे घालतो. कोंबडीने दाणे खाल्ले म्हणजे वाघाचा व त्या कुटुंबाचा संबंध तुटतो. मग बैगा ती दोरी तोडून सर्वाना मुक्त करतो. साप चावला, तरी देखील हाच विधी करतात.

कंवर लोक सर्पाला फार भितात. ते सर्पाचा मागही ओलाडीत नाहीत. मंडवा रानी नावाची त्यांची एक देवता आहे. ती वाट चुकलेल्या माणसाला योग्य मार्गावर आणते. एका जमीनदाराची राख असलेली एक कोळीण गर्भारपणी मेली व सारंगगडच्या राजाची एक घासिया स्त्री राख होती तिचा खून झाला. पुढे या दोघी बाया कवारांच्या देवता बनल्या.

कवारात जादू–टोण्याचेही प्रस्थ आहे. युद्ध करणे, हा आपला खरा धंदा आहे, असे हे लोक समजतात. बाप जिवंत असताना मुलाने वाटणी मागितली, तर त्याला दोन बैलांशिवाय काही मिळत नाही. यांची पंचायत असते. तिच्या मुख्याला परधान म्हणतात अपराध्याला तोच जातिबहिष्कृत करतो. त्याला परत जातीत घेताना एका धोब्याची आवश्यकता असते. निरनिराळ्या पाच भांड्यांतून पतिताबरोबर धोबी जेवला, की तो पतित शुद्ध होतो. कवार लोक गोड व कौराई रावत याच्या हातचे जेवतात.

कवारांच्या बायका काशाचे वाळे, काशाच्या किंवा चांदीच्या सऱ्या व चादीची कर्णफुले घालतात. स्तनावर कृष्णाची मूर्ती, हातावर हरणाचे चित्र व पायावर विविध आकृती गोंदवून घेतात. स्त्री–पुरुष मिळून टिपऱ्या खेळतात व नाचतात.

**विवाहप्रथा–** कवारांची ११७ देवके आहेत. समान देवकांत लग्नसंबंध होत नाहीत. मुलीला मागणी घालण्याची चाल आहे. लग्ने प्रौढ वयातच होतात. चांगली मागणी आली नाही, तर मुली बऱ्याच वयापर्यंत अविवाहित राहतात. मागणीसाठी वरपिता आपल्या मित्रांना पाठवितो. ते वधूपित्याकडे येऊन म्हणतात–'अमका तमका माणूस तुमच्या घरची पेलाभर पेज पिऊ इच्छितो.' तो संबंध वधूपित्याला पसंत असल्यास तो त्या मित्राना पेज करून वाढतो. लग्न ठरल्यावर मुलीच्या घरी बांगड्या, लुगडे, पुऱ्या, उडीद व ठरलेले देज पाठवितात. लग्नात वरपक्षीय मंडळी जुन्यात जुना पोशाख घालतात. त्या पोशाखाचा इतिहासही वर्णन करून सागतात माडवात पुरलेल्या लग्नस्तंभाला वधू–वरांनी पहिल्या दिवशी सहा व दुसऱ्या दिवशी एक प्रदक्षिणा घातल्यावर लग्न पुरे होते. त्यानतर वधूची आई वधू–वरांचे पाय दुधाने धुवून ते तीर्थ घेते. दुसऱ्या दिवशी वधू-वर तळ्यात स्नान करतात व एकमेकावर पाच पाच गडवे पाणी ओततात. स्नान झाल्यावर नवरामुलगा वधूच्या खांद्यावरून एका गवताच्या हरिणाला सात बाण मारतो. प्रत्येक बाण सोडताना वधू त्याच्या तोंडात साखर घालते. त्यानंतर वधू माहेरी येते व तिथे गौरीचा खेळ खेळते. त्यासाठी गौरीची एक अश्लील मूर्ती बनवितात. गावातले तरुण

व मुली तिच्या भोवती ढोल वाजवून गाणी गातात. एवढ्यात एखादा तरुण आपल्या अंगात गौरीचा संचार झाल्याची बतावणी करतो. मग सगळे तरुण हुल्लड करून गवताच्या दोऱ्यांनी तिथे जमलेल्या मुलींना मार देतात.

याच्यात मुलीचे साटेलोटे करण्याचीही पद्धत आहे. त्याला गुजरावत असे म्हणतात. ज्याला वधूशुल्क देणे शक्य नसेल, तो वधूपित्याच्या घरी तीन वर्षे नोकरी करतो. लग्नापूर्वी मुलीने स्वजातीत किंवा कवरै रावताशी व्यभिचार केला असल्यास, मुलीच्या बापाने ज्ञातिभोजन घातले, की तो गुन्हा माफ होतो. जातीबाहेर व्यभिचार केल्यास मात्र तिला कायमची बहिष्कृत करतात. विधवेचा विवाह होतो, तेव्हा वधू-वर घराच्या वळचणीस उभे राहतात व वर आपल्या वधूच्या कानाला स्पर्श करून त्यात ओव्याच्या पानाची सुरळी खुपसतो. पुरुषाचे तिसरे लग्न कुमारिकेशी व्हायचे असल्यास एका मातीच्या प्रतिमेशी प्रथम लग्न लावतात. मग नवरामुलगा ती प्रतिमा फोडून तिचे उत्तरकार्य करतो व नंतर ठरलेल्या मुलीशी लग्न लावतो. विधवेने दिराशी लग्न केले, तर तिच्या पहिल्या नवऱ्याची मुले व दुसऱ्या नवऱ्याची मुले यांचा दर्जा व हक्क सारखा राहतो. तंवर लोकांस कंवरांच्या मुलीशी लग्न करता येते; पण ते आपल्या मुली मात्र कंवरांना देत नाहीत. सिरगुजाच्या कंवरात एका काळी सतीचीही चाल होती. हे लोक त्या भागातल्या सतीस्थानांना भक्तिभावाने भजतात.

**प्रसूतिप्रथा**– स्त्रिया प्रसूतीच्या वेळी भितीला टेकून व पाय पसरून बसतात. त्यांना मदत करायला सुईण असते. मुलगा बोलका व्हावा, अशी इच्छा असल्यास त्याचे नाळ पंचायतीच्या घरात पुरतात; व्यापारी व्हावा, असे वाटले, तर बाजारात व धर्मनिष्ठ व्हावा असे वाटले तर एखाद्या देवस्थानात पुरतात. मुलीचे नाळ उकिरड्यावर पुरतात. छत्तिसगडात बाळतिणीला तीन दिवस काहीही खायला देत नाहीत. जुळे झाले, तर एखादे धातुपात्र फोडून त्यांचा संबंध तोडतात.

**मर्तिकप्रथा**– प्रेते पुरतात. श्रीमंत कंवार मात्र अलिकडे प्रेते जाळू लागले आहेत. प्रेत पुरताना स्वर्गात पेरणी करण्यासाठी म्हणून प्रेताच्या शेजारी तीळ व उडीद ठेवतात. पुरलेल्या जागेवर तांब्या, ताट व गंज ठेवतात. ही भांडी नतर धोब्याला मिळतात. प्रेत जाळायचे झाल्यास ते अर्धे जळल्यावर त्यातील काही लाकडे सुपात घालून मृताच्या घरी नेतात व घरच्या बायकांनी त्यांना स्पर्श केल्यावर ती लाकडे परत आणून चितेत टाकतात. प्रेतविधी करून परत येताना वाटेतल्या एखाद्या चवाठ्यावर सर्वांत पुढचा माणूस पायाने एक दगड उचलतो व मागच्यास देतो. तो आपल्या मागच्यास देतो. शेवटचा माणूस तो दगड फेकून देतो. या प्रकाराने मृताच्या आत्म्याचा व घरच्या मंडळीचा सबंध तुटला, असे समजतात. तिसऱ्या दिवशी मृताच्या अस्थीचे शुद्धीकरण करतात. **पाहा** – कवरै. [ म. ज्ञा. को. ]

**कवाली** वाजंत्र्यांची एक जात. याची वस्ती ओडिसा व बंगाल या प्रदेशात आहे. कायस्थ पिता व धोबीण माता यांच्यापासून याची उत्पत्ती झाल्याचे सांगतात. हे बहुतेक सगळे वैष्णव आहेत. सरस्वती ही यांची उपास्य देवता होय. [ ट्रा. का. बें. ]

**कविकंकण मुकुंदराय** (मृत्यू १६४० इ. स.) एक बंगाली कवी. बरद्वान जिल्ह्यातील दामन्या या गावी हा राहत असे. त्या परगण्याचा सुभेदार फार क्रूर होता. त्याच्या उपद्रवाला त्रासून हा आपले जन्मस्थान सोडून भटेन या गावी राहायला आला. याला चंडीने स्वप्नात दर्शन देऊन कवित्वस्फूर्ती दिली. याने आपले आयुष्य चंडीच्या आराधनेत घालविले. याचा चंडीमगल हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. या काव्यग्रंथाचे तीन विभाग असून पहिल्यात शिव-पार्वतीचे, दुसऱ्यात शिकारी कालकेतूचे व तिसऱ्यात धनपती आणि श्रीमंत यांचे वर्णन आहे. [ क. कौ. ]

**कविगणस्पर्धा** ओडिसा व बंगाल या प्रदेशांत पूर्वी प्रचलित असलेला एक स्पर्धाप्रकार. या कविगणाच्या जथ्यात ४ किंवा ५ लोक असत. ते साधेच कपडे वापरीत. आपल्या काव्यगायनासाठी ते ढोलक्याची साथ घेत. श्रीमंत लोक या कविगणाच्या स्पर्धा घडवून आणीत. त्यासाठी दोन गटांना निमंत्रिले जाई. कोणत्या विषयावर सवाल-जबाब व्हायचे, ते आधी त्यांना कळविले जात असे. मग स्पर्धेच्या वेळी ते समोरासमोर उभे राहून सवाल-जबाब करीत. त्यात कवीच्या वाक्‌चातुर्याचा आणि बहुश्रुतपणाचा कस लागे. शेकडो लोक ही स्पर्धा पाहायला जमा होत. विजयी कविगणाला बक्षीस देऊन त्याचा गौरव केला जाई. महाराष्ट्रातल्या कलगीतुऱ्यासारखाच हा प्रकार होता, असे म्हणायला हरकत नाही. सांप्रत या कविगणस्पर्धा हळूहळू लोप पावत आहेत [ स्ट. ओ. फो. लो. ]

**कविचंद्र** (इ. स. १६ व्या शतकाची अखेर) एक बंगाली कवी. याचे मूळ नाव शंकर होते; पण कविचंद्र या पदवीनेच तो प्रसिद्ध झाला. हा बांकुरा जिल्ह्यातील पन्ना या

गावी राहत असे. त्याने रामायण, महाभारत व भागवत यांचे बंगालीत भाषांतर केले आहे. त्याच्या रामायणातला बराच भाग कृत्तिवासाच्या रामायणात समाविष्ट केला गेला आहे. **पाहा**– कृत्तिवास रामायण. [ हि. बें. लँ. लि. ]

**कविदास मुकुंदराज** एक मध्ययुगीन मराठी कवी. याच्या कालासंबंधी व चरित्रासंबंधी काहीही माहिती मिळत नाही. हा त्र्यंबकनाथ नामक एका महायोग्याचा शिष्य होता. याने गोरक्षनाथाच्या योगमार्तंड व विवेकमार्तंड अशा दोन्ही ग्रंथावर टीकात्मक असा योगविवेकमार्तंड नावाचा ग्रंथ लिहिला आहे. या ग्रंथामुळेच हा कवी प्रसिद्धीस आला. प्रथम श्लोकावरील टीकेचा काही भाग वाचला, तरी मुकुंदराजाच्या भाषिक व वैचारिक सामर्थ्याची कल्पना येईल—

**जयाचिया आत्मप्रतीति । बंधमोक्षाची हरे भ्रांति ।**
**तो मिनुनाथ चित्तीं । सेवितों मी ।।**
**जिया पुरुषीं निरंतर । न साहे द्वैतभावसंचार ।**
**तेथ सेव्यासेव्य प्रकार । म्हणाल कैसा ।।**
**जेंवि जळाचिया पोटिं । तरंग दृश्यत्वेंसि उठि ।**
**परि तो जळत्वेंसि तुटि । पडों नेदि ।।**
**तेवीं गुरुशिष्यमिसें । सेव्यासेव्यत्व उल्हसे ।**
**परि ऐक्यत्व जैसें तैसें । अखंडाकारें ।।**

नाथपंथीय सांप्रदायिक तत्त्वज्ञानाच्या अभ्यासात या ग्रंथाचे महत्त्व विशेष आहे. [ गो. च. प. ]

**कविपरमेष्ठी** (इ. स. ५५० चा सुमार) एक जैन आचार्य. प्राचीन कन्नड जैन कवीनी 'जगप्रसिद्ध' म्हणून याचा उल्लेख केला आहे. याचा नामनिर्देश समंतभद्र व पूज्यपाद या दोघांच्यामध्ये होत असतो. त्रिषष्टिशलाकापुरुषपुराण व चरितपुराण हे दोन ग्रंथ याने लिहिले होते व जिनसेनाने आपले आदिपुराण याच्या पहिल्या ग्रंथावरून लिहिले, असे चामुंडराय म्हणतो. [ क. क. च. ]

**कविराक्षस** (१२ व्या शतकाची अखेर किंवा १३ व्या शतकाचा प्रारंभ) एक तेलुगू कवी. याचे मूळचे नाव भीम असे होते. गोदावरी जिल्ह्यातील वेमुलवाडा या गावी हा जन्मला. याच्या जन्माविषयी अनेक दतकथा आहेत. मुख्य दंतकथा अशी–

हा शिवप्रसादाने एका विधवेच्या पोटी जन्मला. गावातली मुले याला विधवेचा पोर म्हणून चिडवीत. त्यामुळे त्याने आपले गाव सोडले आणि तो द्राक्षारामम् येथे जाऊन तिथल्या मंदिरातील शिवलिंगाला मिठी मारून बसला. तेव्हा शिवाने त्याला वर दिला, की 'तू जे जे बोलशील व जे जे करशील, ते ते सर्व सत्य होईल.'

पुढे हा आपल्या मूळ गावी आला. गावात एका ठिकाणी ब्राह्मणभोजन चालले होते, तिथे गेला. ब्राह्मणांनी विधवेचा पोर म्हणून त्याला हाकलून दिले, तेव्हा त्याने तिथल्या ब्राह्मणांना शाप दिला, की 'तुमच्या पानांतल्या अन्नाचे बेडूक होतील.' आणि आश्चर्य असे, की त्याची शापवाणी खरी ठरली. मग त्या ब्राह्मणांनी त्याला परत बोलावून म्हटले, की 'तू जर या बेडकांचे फिरून अन्न बनवशील, तर आम्ही तुला जातीत घेऊ.' तेव्हा तेही अद्भुत त्याने करून दाखविले. त्यानंतर अद्भुत गोष्टी करणारा व शिव्याशाप देणारा कवी म्हणून आंध्रात याची ख्याती झाली

हा चोक्कराज चालुक्य या राजाच्या पदरी होता. याने छंदःशास्त्रावर एक टीकात्मक ग्रंथ लिहिला आहे. याने भीमन्नाज्योतिष नावाचा एक ज्योतिषग्रंथ लिहिला होता व कित्येक विषयांवर पद्यरचनाही केली होती; पण हे त्याचे वाङ्मय सांप्रत उपलब्ध नाही. तिकडील विद्वानांच्या व कवीच्या बाडातून याची फुटकळ कविता कुठे कुठे आढळते. तेलंगणातील लोक याच्या कित्येक आख्यायिका मोठ्या प्रेमाने सांगतात. हा कवी सदाचरणी व दानशूर होता असेही सांगतात. [ तेलुगु वाङमय ]

**कविशेखर** (इ. स.१६ वे शतक) बंगालमधील एक वैष्णव कवी. खरे नाव देवकीनंदन सिंह. याने संस्कृतात गोपालचरित नामक महाकाव्य व बंगालीत गोपालेर कीर्तनामृत आणि गोपालविजय नामक पांचालीकाव्ये लिहिली. [ हि. बं. वै. क. ]

**कविसमाज** कवी, विद्वान्, कलावंत यांची सभा. प्राचीन काळी विद्याप्रेमी राजे अशा सभा भरवून चर्चा आणि विद्वद्गोष्टी करीत. राजशेखराने आपल्या काव्यमीमांसेत राजांनी असे कविसमाज वारंवार घडवून आणावे, असे म्हटले आहे (१०. १७४–१७७). त्या समारंभाचे तो पुढीलप्रमाणे वर्णन करतो–

अशा समारंभाचे सभागृह सोळखांबी आणि चतुर्द्वार असावे. मध्यभागी एका वेदिकेवर राजाचे सिंहासन मांडले जावे. गृहाच्या उत्तर दिशेस संस्कृत कवी, वेदवेत्ते ब्राह्मण, पौराणिक, स्मार्त व वैद्य यांना बसवावे. पूर्वेला प्राकृत भाषांचे कवी, नट,

नर्तक, वादक, भाट याना बसवावे. दक्षिणेस भूतभाषेचे कवी, वैशिक, गणिका, जादूगार, मल्ल याना बसवावे व पश्चिमेस अपभ्रंश भाषेचे कवी, चित्रकार, सोनार, लोहार यांना बसवावे. अशा सभेत नव्या काव्यांचे समालोचन व रसग्रहण व्हावे. कवींना पारितोषिके दिली जावी.

सोमेश्वराच्या दरबारात कधी कधी तिसऱ्या प्रहरी असे कविसमाज होत व त्या प्रसंगी काव्य, नाटक, दर्शन, इ. विषयाची चर्चा चाले, असे मानसोल्लास या ग्रंथावरून कळते.

वाराणसी, उज्जयिनी, इ. प्रमुख विद्याकेंद्रात काव्य-शास्त्र-परीक्षेसाठी अधूनमधून ब्रह्मसभा भरत. त्या परीक्षेत उत्तीर्ण होणाऱ्या कवीची आणि विद्वानांची वस्त्र-दक्षिणा देऊन संभावना केली जाई. सभेचा एक रथ असे. त्याचे नाव ब्रह्मरथ. त्या रथातून अशा विद्वानांची मिरवणूक काढीत. अशा ब्रह्मसभेचा अध्यक्ष होणे, ही गोष्ट फार मानाची समजली जात असे. [ प्रा. भा. म. ]

**कवी** (१) कु धातूला इ प्रत्यय लागून कवी हा शब्द बनलेला आहे. कु धातूचा अर्थ व्याप्ती, आकाश अर्थात सर्वज्ञता असा आहे. यावरून कवी हा सर्वज्ञ आहे, द्रष्टा आहे असे ठरते. 'कविर्मनीषी परिभूः स्वयम्भूः' अशी श्रुती आहे. आपल्या अनुभवाच्या क्षेत्रात किंवा दृष्टीच्या टप्प्यात जो सर्व गोष्टींचा समावेश करतो, तो परिभूः आणि आपल्या अनुभूतीसाठी जो दुसऱ्या कुणावरही अवलबून नसतो, तो स्वयंभू होय.' म्हणजे काव्य ही स्वतःसिद्ध व सर्वज्ञ अशा मनीषीची सृष्टी असते. वैदिक साहित्यात कवी, द्रष्टा व ऋषी हे शब्द समानार्थी योजलेले असून वेदप्रकाशक ब्रह्म्याला आदिकवी म्हटले आहे. लौकिक साहित्यात मात्र रमणीय शैलीत काव्यरचना करणाऱ्यालाच कवी अशी संज्ञा दिली जाते. लौकिक साहित्यातला वाल्मीकी हा आदिकवी होय.

सर्वसाधारण लोक जे शब्दार्थ योजतात, तेच शब्दार्थ कवीही योजतो. पण त्यांची तो अशी काही आश्चर्यजनक रचना करतो, की त्यामुळे सुदर काव्यकृती निर्माण व्हावी. म्हणूनच एका सुभाषितकाराने म्हटले आहे–

**त एव पदविन्यासास्त एवार्थविभूतय. ।**
**तथापि नव्य भवति काव्यं ग्रथनकौशलात् ॥**

अर्थ – शब्द तेच, शब्दांचे अर्थही तेच; परंतु रचनेच्या कौशल्यामुळे काव्य हे नवीन वाटते.

कवी हा क्रान्तदर्शी असतो. काव्यसृष्टीचा तर तो प्रजापतीच होय. त्याला ज्या प्रकारचे विश्व हवे असते, तशा प्रकारचे ते तो निर्माण करतो. हाच आशय पुढील श्लोकात सांगितला आहे.

**अपारे काव्यसंसारे कविरेव प्रजापतिः ।**
**यथास्मै रोचते विश्वं तथैव परिवर्तते ॥**

(आनंद. ३. ४३ परिकर श्लोक)

नवनवोन्मेषशालिनी प्रतिभा व वर्णननैपुण्य हे कवीचे आवश्यक गुण मानलेले आहेत. प्रतिभा म्हणजे विशिष्ट मानसिक शक्ती. ही शक्ती पूर्वजन्मीच्या किंवा काहींच्या मते इहजन्मीच्याही संस्कारांनी लाभते, असे राजशेखराच्या काव्यमीमांसा या ग्रंथात म्हटले आहे. दंडीने प्रतिभेचे सहज व उत्पाद्य असे दोन प्रकार मानलेले आहेत. राजशेखराने प्रतिभेचा आणखी एक औपदेशिक नावाचा तिसरा प्रकार सांगितला आहे. सहज, आहार्य व औपदेशिक अशी त्रिविध प्रतिभा राजशेखर मानतो. पूर्वजन्मातल्या संस्कारांनी प्राप्त होणारी ती सहज, इहजन्मीच्या संस्कारांनी प्राप्त होणारी ती आहार्य व मत्रतंत्रादी उपायांनी साध्य होणारी ती औपदेशिक होय. या तीन प्रकारच्या प्रतिभेच्या साहाय्याने रचना करणाऱ्या कवीना राजशेखराने अनुक्रमे सारस्वत, आभ्यासिक व औपदेशिक अशी नावे दिली आहेत.

प्रतिभेप्रमाणेच कवीला आवश्यक असलेली दुसरी बाब म्हणजे व्युत्पत्ती, असे राजशेखर म्हणतो.

**प्रतिभाव्युत्पत्ती मिथः समवेते श्रेयस्यौ इति यायावरीयः ।**

अर्थ– प्रतिभा व व्युत्पत्ती या परस्पर संलग्न असल्या तर श्रेयस्कर होत, असे यायावराचे मत आहे.

या दोहोंनी सपन्न असणारा तोच खरा कवी **होय,** असे राजशेखराने सांगितले आहे. ही व्युत्पत्ती ज्यांच्या व्यासंगाने संपादन करायची त्या विविध ज्ञानशाखांना त्याने काव्यार्थयोनी असे नाव दिले आहे. श्रुती, स्मृती, इतिहास, पुराण, इ. अनेक विद्यांचा कवीने अभ्यास करावा, असे सांगितलेले आहे. काव्यविद्या अर्थात् साहित्यविद्या ही या सर्व विद्यांचा निष्यंद म्हणजे सारभूत रस असल्याचे सागून राजशेखराने तिला आन्वीक्षिकी, त्रयी, वार्ता व दंडनीती यांच्या जोडीला पांचवी विद्या म्हणून मानाचे स्थान दिले आहे.

**कवींचे प्रकार –** याशिवाय काव्यशास्त्राच्या विविध अंगातील निपुणतेनुसार राजशेखराने कवींचे पुढील आठ प्रकार केले आहेत– (१) रचनाकवी– पदांच्या संयोजनात निपुण (२) शब्दकवी– शब्दांचा प्रयोग करण्यात कुशल (३) अर्थकवी– ज्याच्या रचनेत अर्थसौंदर्य विशेषत्वाने आढळते, तो (४) अलंकारकवी– अलंकारांच्या प्रयोगात चतुर (५) उक्तिकवी– ज्याच्या रचनेत विशेष चमत्कृती असते, तो (६) रसकवी– रसपरिपोष करण्यात कुशल (७) मार्गकवी– रीतींच्या प्रयोगात चतुर व (८) शास्त्रार्थकवी – जो आपल्या काव्यात शास्त्रीय अर्थाचा

समावेश कौशल्याने करतो तो. या सर्व गुणांनी संपन्न असलेल्या कवीला महाकवी असे म्हणतात.

भामह म्हणतो की, कवीने प्रथम श दार्थाचे ज्ञान प्राप्त करून घ्यावे, शब्दार्थ जाणणाऱ्यांची सेवा करावी, अन्य कवींची काव्ये अभ्यासावी आणि मगच काव्यरचनेला प्रवृत्त व्हावे.

वामनाने कवीला लोकव्यवहार, शब्दशास्त्र, अभिधान, कोश, छंदःशास्त्र, कला, कामशास्त्र व दंडनीती याचे ज्ञान आवश्यक मानले आहे. त्याचप्रमाणे काव्यशास्त्राचे अध्यापन करणाऱ्या गुरूची सेवाही कवीने केली पाहिजे, असे त्याचे मत आहे.

क्षेमेंद्र मागतो, की कवीने नाटक, शिल्प, सुदर चित्र, वेगवेगळ्या प्राण्यांचे स्वभाव इत्यादींचे व समुद्र, नदी, पर्वत, इ. भिन्न भिन्न स्थानाचे निरीक्षण केले पाहिजे.

कवीने निरनिराळ्या छंदांचा व अलंकारांचा विशेष अभ्यास करावा, असे वाग्भटाचे मत आहे.

**कवीची दिनचर्या–** कवीने आपली दिनचर्या कशी ठेवावी, यावद्दलही राजशेखराने आपल्या काव्यमीमांसेत मार्गदर्शन केले आहे. तो म्हणतो, की कवीने नेहमी शास्त्रे व कला यांचे पारायण करावे. त्याने कायावाचामनाने पवित्र राहावे. सदा हसतमुख असावे. त्याचे घरही नेहमी स्वच्छ व सर्व ऋतूंना अनुकूल असावे. त्याचे परिचारक अपभ्रंश भाषा बोलणारे असावे. त्याच्या अंत.पुरातील लोकांना प्राकृत व संस्कृत भाषाचे ज्ञान असावे व त्याचे मित्र अनेकभाषाकोविद असावे. कवीच्या जवळ लेखनसामग्री नेहमी सिद्ध असावी. त्याने आपली अपुरी रचना दुसऱ्यांना वाचून दाखवू नये. त्याने आपल्या दिवसाचे चार विभाग करावे. प्रातःकाळी संध्यावंदन झाल्यावर सरस्वतीचे सूक्त म्हणावे, नंतर अध्ययनकक्षात जाऊन काव्याला उपकारक अशा विद्यांचे व उपविद्याचे अध्ययन करावे. दुसऱ्या प्रहरी काव्यरचना करावी. मध्याह्नाच्या सुमारास स्नान करून भोजन करावे. तिसऱ्या प्रहरी काव्यसमस्या, मातृका व चित्रयोग यांचा अभ्यास करावा व काव्यगोष्टी कराव्या. चौथ्या प्रहरी स्वरचित काव्याची परीक्षा करावी आणि प्रदोषापर्यंत परीक्षण केलेल्या काव्याचे लेखन करावे.

राजशेखराचे हे वर्णन वात्स्यायन कामसूत्रात (१·४) वर्णन केलेल्या नागरिकवृत्तीशी व अर्थशास्त्रात वर्णिलेल्या राजवृत्तीशी मिळतेजुळते आहे. सत्कवीचे काव्य दिक्कालाच्या मर्यादा ओलांडून पलिकडे जाते व लोकांच्या आदराला पात्र होते. कालिदास, भवभूती, गुरुदेव रवींद्रनाथ, इ. कवींच्या कीर्तीचा परिमळ अद्यापिही सर्वत्र दरवळत आहे. कवीच्या अमर यशाबद्दलचा हाच आशय एका सुभाषितकाराने पुढील श्लोकात व्यक्त केला आहे–

**जयन्ति ते सुकृतिनो रससिद्धाः कवीश्वराः ।**
**नास्ति येषां यशःकाये जरामरणजं भयम् ।।**

अर्थ– सुकृती, विद्वान आणि रससिद्ध कवीश्वराचा जयजयकार असो ! त्यांच्या यशरूपी शरीराला वार्धक्य व मरण यांचे भय नसते. [ हि. सा. को.; काव्यप्रकाश ]

(२) स्वायंभुव मन्वंतरातील भृगुऋषीच्या तीन पुत्रातील कनिष्ठ.

(३) सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या नवव्या मडलातील ४७ ते ४९ व ७५ ते ७९ एवढी सूक्ते याच्या नावावर आहेत. या सूक्तातून त्याने सोमाची स्तुती केली आहे.

(४) वैवस्वत मन्वंतरातील ब्रह्मपुत्र. याला वारुणी कवी अशी संज्ञा आहे (म. भा. अनु. ८५).

(५) शुक्राचार्यांचे एक नाव (उशना पाहा).

(६) उशीराग्नीचे नाव. याने स्वधेशी विवाह केला (ब्रह्मांड पु. ३. १०. ८५). [ प्रा. च. को.; पु. इं. ]

## कवींद्र

(१६७८ इ. स. चा सुमार) एक हिंदी कवी. याचे मूळ नाव उदयनाथ होते. पण रसचंद्रोदय, विनोदचंद्रिका आणि जोगलीला हे ग्रंथ लिहिल्यामुळे त्याला लोक कवींद्र म्हणू लागले. [ म. च. को. ]

## कवींद्र परमेश्वर

(इ. स. १५ व्या शतकाची अखेर) एक बंगाली कवी. परागलखान नावाचा हुसेनशहाचा एक सेनापती होता. त्याच्या आज्ञेवरून कवींद्राने महाभारताचा बंगाली अनुवाद केला. १७ हजार श्लोक एवढी या ग्रंथाची रचना असून त्यात स्त्रीपर्वापर्यंतचाच भाग आला आहे. या ग्रंथात प्रारंभी कवींद्राने सुलतान हुसेनशहा, परागलखान व त्याचा पुत्र छुटिखान यांची स्तुती केली आहे. या ग्रंथाला परागली महाभारत असे म्हणतात. पुढे छुटिखानाच्या आज्ञेवरून श्रीकरणनंदी या कवीने त्यापुढचे अश्वमेधपर्व रचले. [ हि. बे. लॅ. लि. ]

## कवुट्टम्

तमिळनाडमधील भक्तिगीतांना हे नाव आहे. सस्कृत स्तोत्रासारखी ही भक्तिगीते असतात. विनायक, सुब्रह्मण्य, नटराज, काली, विष्णू, अशा देवांवर कवुट्टम् लिहिलेली असून त्या त्या देवाच्या उत्सवात ती गायिली जातात. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

## कव्य

पितराच्या उद्देशाने दिलेल्या अन्नादिपदार्थांना कव्य म्हणतात ही कव्ये वेदवेत्त्या ब्राह्मणाला द्यावी,

याविषयी मनूचे वचन पुढीलप्रमाणे आहे–

**श्रोत्रियायैव देयानि हव्यकव्यानि दातृभिः ।**
**अर्हत्तमाय विप्राय तस्मै दत्तं महाफलम् ।।**

(३·१२८)

अर्थ– हव्ये आणि कव्ये दात्यांनी श्रोत्रीय व आचारसंपन्न अशा ब्राह्मणालाच द्यावी. अशा प्रकारचे दान महाफल देणारे होते.

## कव्यवाह

एक पितृगण ब्रह्मदेवाची मानसकन्या संध्या हिला पाहून दक्षादी लोक मोहित झाले आणि त्याच्या स्वेदबिंदूपासून या गणाची उत्पत्ती झाली. याचे सोमप, आज्यप व स्वकालीन असे तीन भेद आहेत. [ प्रा. च. को. ]

## कव्यवाहन

एक पैतृक अग्नी. पवमान अग्नीचा पुत्र. कव्य म्हणजे पितरांना दिलेले अन्न. ते त्याच्याप्रत पोचविणारा, म्हणून त्याला कव्यवाहन असे नाव पडले. [ पु. इं. ]

## कव्वाली

एक गीतविशेष. कौल=सांगणे, बोलणे, प्रशंसा करणे, या फारसी शब्दावरून कव्वाल शब्द व्युत्पादितात. कव्वाली हा समुदायाने गाण्याचा गीतप्रकार आहे. कव्वालीचा आविष्कार प्रथम इराणमध्ये झाला. कव्वाली म्हणजे एखादी रागरागिणी नव्हे; तर ती एक विशिष्ट प्रकारची धुन आहे. कव्वालीचा पेशा बाळगणारे कित्येक लोक आहेत. भारतात कव्वाली गाण्याची पद्धत ख्वाजा मोइनुद्दीन चिश्ती याने आणली, असे म्हणतात. सूफी पंथाच्या द्वारे कव्वालीचा प्रसार झाला व तिला लोकप्रियता लाभली. सूफी संत उपासनेच्या वेळी भावोन्मादाने गात उठत व त्यांच्या भोवतीचा सारा समाज त्या गाण्याचे अनुकरण करी. कालांतराने कव्वाली गाणाऱ्याचा एक वर्गच निर्माण झाला व तो सूफींच्या उपासनासभेत गाण्याचे काम करू लागला. प्रारंभी हे कव्वालीगायक सूफी पंथाचे साधक होते; पण पुढे ते पेशेवार बनले.

कव्वालीचे मुख्य तीन भेद आहेत –– (१) हम्द – यात परमात्मप्रशंसेची गीते असतात, (२) नात – यात रसूलची प्रशंसा असते व (३) मनकबत – यात औलियांचे वर्णन व रसूलच्या वंशजाची प्रशंसा असते.

कसीदा, गज़ल, रुबाई, इ. काव्यप्रकार कव्वालीच्या स्वररचनेत गायिले जाऊ शकतात. [ हि. सा. को. ]

## कशिदा

भरतकाम पाहा.

## कशिपुदान

कशिपू = कापसाची उशी. हिचे दान पुढील मंत्राने करतात–

**मृदु ह्यबीजकार्पासपूरितं सुखदं नृणाम् ।**
**तस्मादस्य प्रदानेन सुखं स्यात् सर्वदा मम ।।**

अर्थ – मऊ व बिनबियाच्या कापसाने भरलेल्या व माणसांना (झोपताना) सुखावह असलेल्या या उशीच्या दानाने मला सार्वकाळ सुख मिळो.

दानफल– यावज्जीव शीत–वात–उष्णनिवारण. [ दा. चं. ]

## कशेरुक

एक प्राचीन मानवगण. मत्स्य व वायु या पुराणात या लोकाचा उल्लेख आहे. यांनी भारतीय युद्धात भाग घेतला होता.

## कश्यप

(१) सूक्तद्रष्टा. ऋग्वेदातली १.९९; ८.२९; ९.६४; ९.६७ १० १३ इ. बरीच सूक्ते याच्या नावावर आहेत. हा अग्नीचा शिष्य व विभांडकाचा गुरू होय (वं. ब्रा. २). याचा व वसिष्ठाचा घनिष्ठ संबंध होता (बृहद्दा. २.२.४). हा विधात्याचा मानसपुत्र आहे. मरीची हा याचा पिता व कर्दमकन्या कला ही माता होय (भाग. पु. ४.१.). याला तार्क्ष्य व अरिष्टनेमी अशी अन्य नावे आहेत. हा सप्तर्षीत गणला जातो. तसेच याची प्रजापतीतही गणना आहे.

वायुपुराणाच्या मते याला पूर्णिमा नामक एक सख्खा भाऊ असून सहा सावत्र बंधू होते. याच्या सापत्न मातेचे नाव ऊर्णा असे होते. अग्निष्वात्त नामक पितर हे सुद्धा याचेच बंधू मानलेले आहेत. याला सुरूपा नावाची एक बहीण असून ती ब्रह्म्याच्या अंगिरानामक मानसपुत्राला दिली होती (वायु पु २.४.५.).

विवस्वान् हा कश्यपाचा पुत्र होय. दिती व अदिती या कश्यपाच्या भार्या होत. दैत्य ही दितीची संतती असून देव हे अदितीचे पुत्र होत. विनता व कद्रू याही कश्यपाच्याच भार्या आहेत. त्याला विनतेपासून गरुड व अरुण आणि कद्रूपासून नाग हे पुत्र झाले. दक्ष प्रजापतीने त्याला आपल्या तेरा कन्या दिल्या. शिवाय ब्रह्म्याच्या सांगण्यावरून त्याने पुलोमा व कालका या वैश्वानर कन्यांशीही विवाह केला. भागवतात याच्या अरिष्टानामक अन्य चार भार्या सांगितल्या आहेत. मनुष्य, पशु, पक्षी, नाग, जलचर, इ. सृष्टी ही कश्यपाची संतती असून तिच्यामुळेच पृथ्वी प्राणिसृष्टीने भरून गेली.

परशुरामाने पृथ्वी निःक्षत्रिय करून सरस्वतीच्या तीरी रामतीर्थावर अश्वमेध केला. त्या वेळी कश्यप हाच त्या यज्ञाचा अध्वर्यू होता. यज्ञाच्या शेवटी परशुरामाने दक्षिणा म्हणून जिंकलेली पृथ्वी (मध्यदेश) कश्यपाला दिली. कश्यपाने ती पृथ्वी

ब्राह्मणाना वाटून देऊन स्वतः वनवास पत्करला (भाग. पु. ९. १६. २२).

कश्यपाने अर्बुदपर्वतावर मोठे तप केले. त्या वेळी अन्य ऋषींनी त्याला तिथे गंगा आणण्यास सांगितले. तेव्हा कश्यपाने शिवाची प्रार्थना करून त्याच्याकडून गंगा मिळविली. ती ज्या ठिकाणी कश्यपाला मिळाली, ते स्थान कश्यपतीर्थ म्हणून प्रसिद्ध झाले (पद्म पु. उ. १६४). नंतर ती गंगा घेऊन तो स्वस्थानी गेला. त्या ठिकाणी पुढे केशरंध्रतीर्थ उत्पन्न झाले. कश्यपाने आणली म्हणून गंगेला काश्यपी असे नाव पडले. गरुड हा विष्णूचे वाहन झाल्यावर कश्यपाने त्याला नारायणमाहात्म्य सांगितले.

पुढे पृथ्वी दुष्टांच्या भारामुळे बुडू लागली असता कश्यपाने तिला मांडीचा आधार देऊन तारले म्हणून पृथ्वीला काश्यपी व उर्वी अशी दोन नावे मिळाली (म. भा. शां. ४९).

बटु वामन हा कश्यपाचाच पुत्र होय. दैत्यांनी देवांचा पराभव करून त्यांना स्वर्गभ्रष्ट केले, या घटनेमुळे अदितीला फार दुःख झाले. तिने दैत्यांचा पराभव करील, असा एक पुत्र आपणास व्हावा, अशी कश्यपाजवळ आकांक्षा व्यक्त केली. कश्यपाने तिला त्यासाठी पयोव्रत करण्यास सांगितले (भाग. पु. ८. ३). त्या व्रताच्या प्रभावाने विष्णू वामनरूपाने अदितीच्या उदरी अवतरला.

कश्यप व ऐल यांचा संवाद झाला आहे. त्यात कश्यपाने ऐलाला ब्राह्मणांचे महत्त्व व पापपुण्यांतला सूक्ष्म भेद या गोष्टी समजावून सांगितल्या. कश्यपाने एका सिद्धाची उपासना करून त्याच्याकडून ज्ञान मिळविले, अशीही कथा आहे (म. भा. आश्व. १७).

कश्यपाच्या नावावर कश्यपसंहिता (वैद्यकीय), कश्यपोत्तर संहिता, कश्यपस्मृती व कश्यपसिद्धान्त असे चार ग्रंथ आढळतात. हेमाद्री, विज्ञानेश्वर व माधवाचार्य हे कश्यपस्मृतीचा उल्लेख करतात. बौधायनाने आपल्या धर्मसूत्रात कश्यपाचे मत म्हणून पुढील श्लोक दिला आहे—

**क्रीता द्रव्येण या नारी सा न पत्नी विधीयते ।**
**सा न दैवे न सा पित्र्ये दासीं तां कश्यपोऽब्रवीत् ।।**
(१. ११. २०)

अर्थ— जी स्त्री द्रव्य देऊन विकत घेतली, ती पत्नी होऊ शकत नाही. तिला दैव-पितृकार्यात अधिकार नसतो. ती केवळ दासी असते, असे कश्यप म्हणतो.

कश्यपकुलात एकूण सहा ऋषी झाले आहेत. कश्यप, वत्सार, नैध्रुव, रैभ्य, असित व देवल अशी त्यांची नावे आहेत. कश्यपाचे गोत्र ते काश्यप होय. त्याचे व शांडिल्य गोत्राचे पटत नाही. म्हणजे त्या दोन गोत्रांत परस्पर विवाहसंबंध करीत नाहीत. ज्याना गोत्राचे स्मरण नाही किंवा ज्यांना गोत्रच नाही, त्याचे काश्यप गोत्र समजतात.

(२) द. भारतातील अगस्त्याच्या मागून झालेला शिल्पशास्त्रज्ञ. काश्यपीय असे याच्या ग्रंथाचे नाव आहे. या ग्रंथातला 'अंशुमान वेदकल्प' हा भाग विशेष प्रसिद्ध आहे. दक्षिणेतील कलाकार कश्यपाचा ग्रंथ हा प्रमाणभूत मानतात. [म. ज्ञा. को.; प्रा. च. को.; वै. वा. इ.; हि. ध.]

(३) प्रस्तुत कल्पातील चार बुद्धांपैकी पहिला बुद्ध. याचा परिनिर्वाणस्तूप श्रावस्तीजवळ टंडवा या गावी आहे. फाहियानने तेच याचे जन्मस्थान असे म्हटले आहे. पण काही लोक काशी ही याची जन्मभूमी मानतात. हा निर्वाणाला गेला, तेव्हा याचे शरीर दग्ध होईना; म्हणून त्याच्या शरीरावरच स्तूप बांधण्यात आला. [म. च. को.]

## कषाय

कष् = हिंसा करणे, यावरून हा शब्द बनला आहे. क्रोध, अभिमान, मोह व लोभ हे दोष कषायात येतात. कारण ते आत्म्याला कुगती देऊन त्याची हिंसा करतात. ओले वस्त्र हे वाऱ्याने वाहून आणलेल्या धुळीला किंवा परागादी रेणूना आपल्या ठिकाणी ग्रहण करते, त्याप्रमाणे कषायरूपी जलाने ओला झालेला आत्मा योगाने आणलेल्या कर्माचे सर्व बाजूनी ग्रहण करतो व त्यामुळे कुगतीला जातो.

कषाय शब्दाचा दुसरा एक अर्थ आहे, तो म्हणजे निर्विकल्प समाधीतले एक विघ्न.

**लयविक्षेपाभावेऽपि चित्तवृत्ते रागादिवासनया**
**स्तब्धीभावात् अखण्डवस्त्वनवलम्बनम् ।**
(वेदान्तसार–समाधिकल्प)

अर्थ— लय आणि विक्षेप या दोन्ही विघ्नांचा अभाव असूनही राग–द्वेषादी वासनेने चित्तवृत्ती (मधेच) स्तब्ध होऊन अखंड (आत्म) वस्तूचे अवलंबन करता न येणे, याला कषाय म्हणतात. [भा. द. सं.; श. क.]

## कसबती

एक मुसलमान जात. या जातीत काही बाटलेले राजपूत आहेत. हे लोक राजपूत व कोळी जातींतल्या मुलीशी लग्ने करतात. [मु. इ. जा.]

## कसबीण

वेश्यांची एक जात. कसब = शरीरविक्रय या अरबी शब्दावरून कसबी हे या जातीला नाव पडले आहे. कलावंतांपेक्षा ही जात खालची समजतात. या जातीत मुलीचा विवाह करण्याची चाल नाही. मुलगे मात्र

लग्न करतात. त्यांच्यापैकी कोणी भडवे ( कसबीण व गिऱ्हाईक यांच्यांतले मध्यस्थ ), तर कोणी सारगिये बनतात. यांच्यापैकी कसबिणी व नायकिणी या नावाने ओळखल्या जाणाऱ्या स्त्रिया हिंदू असतात. तवाईफ या मुसलमान, बोगम या तेलंगी व देवधरनी या गोंड जातीच्या असतात.

या जातीत मुलगी ऋतुमती झाली, की तिचा प्रथमसंबंध एखादा श्रीमंत हेरून त्याच्याशी ठरवितात. या विधीच्या वेळी तिला ४।५ दिवस नवऱ्यामुलीप्रमाणे वागवितात. तेल–हळद लावून तिचे एका कटचारीबरोबर लग्न लावतात. त्यासाठी मांडवात एक लग्नस्तंभ पुरतात. ती मुलगी कटचारीसह त्या स्तंभाला ७ प्रदक्षिणा घालते. त्यानिमित्त जातीला भोजन घातले जाते. तिचा नियोजित पुरुष तिला कुंकू लावून ७ वेळा पदर घालतो. ती मग त्या रात्री त्या पुरुषाकडे जाते व तो अन्न–वस्त्र देईल तितके दिवस त्याच्याजवळ राहते. त्या पुरुषा-कडून निघाल्यावर मग तिला वेश्यावृत्ती चालविण्यास मोकळीक मिळते. हा पहिला वर कसबी जातीहून भिन्न जातीचा असावा लागतो. अशा बायका मोहक वेषभूषा करण्यात तरबेज व संभाषणात चतुर असतात. त्यांची स्वतंत्र जात बनल्यामुळे त्यांना आपला धंदा निंद्य वाटत नाही.

**प्रसूतिप्रथा**— पहिल्या गर्भारपणात ७ वा महिना लागला, की गर्भिणी १०८ करंज्या करून त्या स्वत: खाते व मैत्रिणीनाही वाटते. तिच्या मैत्रिणीही तशाच करंज्या करून तिच्याकडे पाठवितात. करंजी हे योनिप्रतीक मानलेले आहे. त्यावरून कसबिणीची आपणास मुलगी व्हावी, ही आकांक्षा व्यक्त होते. प्रसूतिपूर्वी कसबीण हरभऱ्याचे पीठ लावून न्हाते, उत्तम वस्त्रालंकार लेवून स्वत:ला नटविते व मैत्रीणीना बोलावून त्यांना दूध–भात, मिठाई, इ. पदार्थ खाऊ घालते.

उ. प्रदेशात अशा गाणाऱ्या, नाचणाऱ्या बायकांना बेडणी म्हणतात. तिकडचे शेतकरी कापणीच्या हंगामात एखाद्या रात्री काही बेडणी जमवून त्यांना नाचवितात. या नृत्याला राय असे म्हणतात. बंगालमध्ये अशा कित्येक बायका वैष्णव बनतात व भीक मागत आखाड्या आखाड्यातून हिंडतात. त्याच्यामुळे वैष्णव समाजात अनीतीचाही फैलाव होतो, असे म्हटले आहे. धीट कसबिणी प्रवास करीत असता एखाद्या गावातल्या गरती व विधवा स्त्रियांना यात्रेस नेण्याच्या मिषाने फसवून आणतात व आपल्या पथात ओढतात. त्यामुळे गावातले सभ्य लोक या वैष्णव कसबिणीना गावातून हाकलून लावतात. तारुण्य उलट-ल्यावर आपला उदरनिर्वाह चालविण्यासाठी काही तरुण मुली या जवळ बाळगतात. निराश्रित मुली अशा बायकाच्या जाळ्यात सापडतात.

महाराष्ट्रात व कर्नाटकात काही जिल्ह्यातून कसबिणी आढळतात. अविवाहित, परित्यक्त, विधवा व काडीमोड घेतलेल्या अशा बायकातून या जातीत भरती होत असते. त्यांच्यांतही निरनिराळ्या पोटजाती आहेत. बेळगाव व विजा-पूर या जिल्ह्यात कसबण या नावाची मुसलमानी वेश्याची जात आहे. मात्र त्या कोणत्याही प्रकारे इस्लाम धर्माचे पालन करीत नाहीत. त्यांच्यांतल्या चालीरीती हिंदूसारख्याच आहेत. कसबणाची पुरुषसंतती कोणतातरी उद्योग करून पोट भरते. त्यांच्या बायका गरती स्त्रियांप्रमाणे राहतात. या कसबणाचा समाज नायकीण किंवा बाई या नावाने ओळखिल्या जाणाऱ्या एका स्त्री अधिकाऱ्याच्या देखरेखीखाली वागतो. सांप्रत ही मुसलमान कसबणाची जात घटत चालली आहे. त्याची कारणे अशी सागतात, की त्यांचे आश्रयदाते जे सधन मुसलमान ते आता गरीब झाले आहेत व समाजातले पुरुष आपल्या बायकांना पातिव्रत्यभंगाबद्दल टाकून देण्यासारख्या कडक शिक्षा करीत नाहीत. [ म. ज्ञा. को. ]

**कसाई** सर्वत्र आढळणारी जात. उ. प्रदेश व पंजाब यांमध्ये यांची सर्वात जास्त वस्ती आहे. पजाबात याना कसाब म्हणतात. गायकसाई व बकरकसाई असे याच्यात दोन वर्ग आहेत. मुसलमान कसायांचीही एक स्वतत्र जात बनली आहे. महाराष्ट्रात यांना खाटिक म्हणतात. धनगर, मराठा, कुणबी या जातीपैकी ज्यानी बकरी-मेंढरे मारण्याचा धदा सुरू केला, त्या लोकांचीच पुढे खाटिक या नावाने स्वतंत्र जात बनली असावी. खाटकात अनेक पोटजाती आहेत. हे लोक शेती किंवा मजुरीही करतात. यांचे रीतिरिवाज मराठ्यांसारखेच असतात.

मुसलमान कसाई पशूवर घाव घालण्यापूर्वी कुराणातले काही मत्र म्हणतात. पशू मरण्यापूर्वी त्याचे थोडे रक्त जमिनी-वर वाहू देतात. या कृतीला जिहब किंवा हलाल असे नाव आहे.

कसाई हे पीरांना व अवलियांना भजतात. जौनपुरा येथील करारबीर हा यांचा मुख्य देव होय. गगादेवी व अमरोहा येथील मिरानसाहेब यांनाही हे पूज्य मानतात. यांची जात-पंचायत असते. तिच्या मुख्याला चौधरी म्हणतात.

कसाई मृतांना पुरतात. मुसलमान कसाई मृताच्या तिसऱ्या दिवशी कलिमा पढून फुटाणे वाटतात. नवव्या दिवशी फकिरास व विसाव्या किंवा चाळिसाव्या दिवशी जातीस जेवण घालतात. [ म. ज्ञा. को. ]

**कसायपाहुड** (सं. कषायप्राभृत) एक जैन ग्रंथ. षट्खंडा-गमाप्रमाणे कसायपाहुडही द्वादशांगातला एक महत्त्वपूर्ण अवशेष आहे. याला पेज्जदोसपाहुड असेही म्हणतात. पेज्ज=राग व दोस=द्वेष होय. प्रस्तुत ग्रंथात क्रोधादी कषायाची राग–द्वेषांत होणारी परिणती व त्या कषायांची प्रकृती, स्थिती, अनुभाग व प्रदेशगत वैशिष्ट्ये यांचे निरूपण केलेले आहे. या ग्रंथात २३३ गाथासूत्रे आहेत. याचा कर्ता आचार्य गुणधर हा असून त्याचा काल इ. स. चे दुसरे किंवा तिसरे शतक मानलेला आहे. त्याने हा ग्रंथ रचून आचार्य नागहस्ती व आर्यमंक्षू या दोघानी त्याचे व्याख्यान केले. इ. स. च्या सहाव्या शतकाच्या सुमारास आचार्य यतिवृषभ याने सहा हजार चूर्णीसूत्रे व त्यानंतर उच्चारणाचार्य याने बारा हजार उच्चारणसूत्रे रचून मूळ ग्रंथावर विस्तृत भाष्य केले. इ. स. ८७४ मध्ये आचार्य वीरसेन व जिनसेन या दोघांनी वरील चूर्णीसूत्रांना धरून जयधवला-नामक टीका लिहिली.

कसायपाहुड हा ग्रंथ १५ अधिकारांत विभक्त आहे. यातल्या पहिल्या आठ अधिकारात संसाराला कारणीभूत होणाऱ्या कर्मांचे व पुढच्या सात अधिकारांत त्या कर्मांच्या विविध दशाचे वर्णन आहे. [प्रा. सा. इ.]

**कसीदा** उर्दू काव्याचा एक प्रकार. कसीदा म्हणजे एखाद्याची काव्यातून प्रशंसा करणे होय. याचे दोन भेद आहेत– पहिल्या भेदात कवी प्रारंभापासूनच प्रशंसनीय व्यक्तीची प्रशंसा करू लागतो, तर दुसऱ्या भेदात तो प्रथम बसंत, बहार, दर्शन, ज्योतिष, इ. विषयांसंबंधी काही गोष्टी सांगून मग प्रशंसेकडे वळतो. कसीद्याचे प्रशंसेनंतरचे अंग दुआ हे असते. यात कवी प्रशंसित व्यक्तीविषयी शुभकामना व्यक्त करून त्याच्याकडे विदागी मागतो.

कसीदा ही दरबारी कविता आहे. सांप्रत ते दरबार गेले आणि त्यामुळे ती कविताही लुप्त झाली आहे. पण इतिहास-काळात कसीद्याचे महत्त्व एवढे होते, की केवढ्याही मोठ्या कवीला त्याने उत्तम कसीदे लिहीपर्यंत उस्ताद (गुरू) ही पदवी प्राप्त होत नसे.

कवी जौकने लिहिलेल्या कसीद्याचा एक नमुना पुढील प्रमाणे—

**वाहवा क्या मोतदिल है । बाग़े आलम की हवा ।**
**मिस्ले नब्ज़े साहबे सेहत है । हर मौजे सबा ।।**
**भरती है क्या मसीहाई का । दम बादे बहार ।**
**बन गया गुलज़ारे आलम । रश्के सद दारुश्शिफा ।।**
**रखेगा तावीज़ और गंडा । कोई क्यों अपने पास ।**
**बाग़े आलममें यही आलम । जो सेहतका रहा ।।**
**इस क़दर जाती रही आलमसे । बीमारी की आज ।**
**नाम गुलशनमें नहीं है । नरगिसे बीमारी का ।।**
**वह वली अहदे ज़माँ मिर्ज़ा । मुहम्मद बू ज़फ़र ।**
**उसकी क़ुवत गर ज़ईं फ़ोंको । बना दे अक़विया ।।**

अर्थ – वाहवा ! जगत्‌रूपी बागेची हवा कशी समशीतोष्ण आहे! प्रातःकालीन सुगंधी शीत वायूची झुळुक म्हणजे आरोग्य संपन्न व्यक्तीची नाडीच आहे जणू ! वसंतातील पवन मेले-ल्याना जिवत करण्याचा दावा करतो आहे. जगरूपी उपवन इतके सुंदर बनले आहे, की आरोग्यधामालाही त्याचा हेवा वाटावा. जगात आरोग्याची अशीच स्थिती राहिली, तर कोणी गंडेताईत कशाला जवळ बाळगील ? आज जगातून आजाराचे असे काही उच्चाटण झाले आहे, की बागेत आजारी नरगिस (पुष्पा)चे नावसुद्धा उरलेले नाही. आमचे युवराज मिर्जा मुहम्मद अबू ज़फर याचे सामर्थ्य दुर्बळाना व म्हाताऱ्यांनाही बलवान बनवील.

**कस्तूरबा** (१८६९–१९४४ इ. स.) महात्मा गांधींच्या धर्मपत्नी. यांचा जन्म पोरबंदर येथे झाला. वयाच्या १३ व्या वर्षी याचे लग्न झाले. गांधीजी इंग्लंडमधून बॅरिस्टर होऊन परत आल्यावर त्यांनी मुंबईत आपला ससार थाटला. नंतर गाधीजी आफ्रिकेत गेले, त्यांच्याबरोबर कस्तुरबाही गेल्या. आफ्रिकेत गांधीजीनी सत्याग्रहाची चळवळ सुरू केली तेव्हा त्यांच्या पावलावर पाऊल टाकून यानीही कारागृहवास पत्करला. त्यांची धर्मश्रद्धा किती प्रखर होती, याचे एक उदाहरण सांगण्याजोगे आहे. आफ्रिकेत असताना त्या एकदा खूप आजारी पडल्या. त्यातून बरे होण्यासाठी व ताकद येण्यासाठी त्यांनी मांसाहार करावा, असा त्याच्या डॉक्टरांनी त्यांना आग्रहाचा सल्ला दिला. 'मला मृत्यू आला तरी चालेल; पण मी मांस खाणार नाही,' असे त्यांनी निर्धाराने सागितले व त्या आमिष पदार्थांना शिवल्याही नाहीत.

१९१५ साली गाधीजी भारतात परत आले व साबरमतीस आश्रम उभारून राहिले. त्या आश्रमाची सर्व अंतर्गत व्यवस्था कस्तूरबा पाहत असत. आश्रमातील सगळी मंडळी कस्तूरबांना 'बा' म्हणत. व्यवस्थितपणा व टापटीप यावर त्याचा कटाक्ष असे. त्या स्वतः नियमित वागत व दुसऱ्यांनाही तसे वागायला लावीत.

साबरमतीच्या आश्रमात अस्पृश्यांना प्रवेश द्यावा, असे गाधीजीच्या मनात आले. पण कस्तूरबाचे सनातनी धार्मिक

मन त्या गोष्टीला तयार होईना. त्यांना ते पाप वाटत होते, अघटित वाटत होते. पण गांधीजी त्याच्याहून खंबीर. कस्तूरबा वुद्धिवादाने, समजुतीने वळत नाहीत, असे पाहिल्यावर त्यानी उपोषण सुरू केले. मग मात्र ती पतिपरायण साध्वी विरघळली.



कस्तूरबा

आपल्या हट्टासाठी पतीच्या शरीराला आणि मनाला क्लेश देणे हे श्रेयस्कर नव्हे, असे जाणून त्यानी गांधीजीच्या त्या योजनेला संमती दिली. त्या प्रसंगानंतर अस्पृश्यतेविषयीचे आपले सगळेच परंपरागत दुराग्रह त्यांनी सोडून दिले. एवढेच नव्हे; तर त्या आणखी एक पाऊल पुढे गेल्या. त्यांना मुलगे होते; पण मुलगी नव्हती. म्हणून मग एका अस्पृश्य मुलीला जवळ बाळगून आणि तिचा प्रतिपाळ करून त्यानी आपली मुलीची हौस पुरी करून घेतली.

चंपारण्याच्या सत्याग्रहापासून त्या भारताच्या राजकीय आदोलनात गांधीजीच्या बरोबरीने भाग घेऊ लागल्या. १९२१ व १९३० साली झालेल्या सविनय कायदेभंगाच्या चळवळीत कस्तूरबांनी तुरुंगवास भोगला. बार्डोलीच्या सत्याग्रहातही त्यानी भाग घेतला. त्याच सुमारास बोरसद येथे पोलिसांनी स्त्रियांच्या समुदायावर लाठीहल्ला केल्याची बातमी आली. त्यावेळी कस्तूरबा आजारी होत्या. पण त्यांनी तशाही अवस्थेत बोरसदला जाण्याचे ठरविले. त्यांच्या डॉक्टरानी त्यांना मनाई केली; पण तिच्याकडे दुर्लक्ष करून त्या बोरसदला निघून गेल्या. तीच गोष्ट १९३९ सालच्या राजकोट येथील सत्याग्रहाची. त्याही वेळी कस्तूरबाची प्रकृती नादुरुस्त होती. पण आपल्या जगण्या–मरण्याची तमा न वाळगता त्यानी सत्याग्रह करून तुरुंगाची वाट धरली.

१९४२ साली १५ ऑगस्टला कॉंग्रेसने गांधीजींच्या आदेशानुसार ‘ चलेजाव ’चा ठराव संमत केला. त्यासरशी इंग्रज-सरकारने भारत संरक्षण कायद्याखाली गांधीजी व कॉंग्रेसचे सर्व प्रमुख पुढारी याची धरपकड केली. त्या वेळी कस्तूरबा मुबईस बिर्लाभवनात होत्या. त्याच संध्याकाळी शिवाजीपार्कवर सभा घेऊन महात्माजींचा संदेश लोकांना सागण्याचा आपला मनोदय त्यांनी प्रकट केला. सायंकाळी सभेला जाण्यासाठी निघण्यापूर्वी दोन पोलीस अधिकारी बिर्लाभवनावर आले. ‘ तुम्ही आज जाहीर व्याख्यान देणार आहा काय ? ’ असे त्यांनी कस्तूरबांना विचारले. त्यासरशी यत्किंचितही न डगमगता त्या चौऱ्याहत्तर वर्षाच्या वृद्ध साध्वीने त्या अधिकाऱ्यांना ‘ होय ’ असे करारी उत्तर दिले. तत्क्षणी त्यानाही अटक झाली.

गाधीजीना पुण्यातील आगाखान बंगल्यात स्थानबद्ध करण्यात आले होते. कस्तूरबांनाही तिथेच बंदिस्त करण्यात आले. त्यानंतर उणे पुरे दीड वर्ष लोटले आणि कस्तूरबांची प्रकृती खालावली. त्यांना हृदयविकार जडला. त्यातच पुढे न्यूमोनिया झाला व तो असाध्य ठरला. पेनिसिलीन हे न्यूमोनियावरचे प्रभावी औषध त्या वेळी नुकतेच बाहेर पडले होते. अजून ते सार्वत्रिक झाले नव्हते. इंग्रज सरकारने कस्तूरबांचे प्राण वाचविण्यासाठी ते औषध आणविण्याचा प्रयत्न केला; पण त्याआधीच सरत्या माघातल्या महाशिवरात्रीच्या रात्री कस्तूरबांनी इहलोक सोडला. त्यांच्या मृत्यूमुळे अखिल भारताला असे वाटले, की एक राष्ट्रमाउली आपणांस सोडून गेली. ‘ पुन्हा मला माझ्या जीवनसगिनीची निवड करण्याची संधी मिळाली, तर मी जन्मोजन्मी कस्तूरबाचीच निवड करीन ’ असे त्या वेळी म. गांधींनी उद्‌गार काढले. गांधीजीचे कस्तूरबावर प्रगाढ प्रेम होते, याचे ते निदर्शक आहेत.

कस्तूरबांचे जीवन म्हणजे एक अखंड यज्ञच होता. या यज्ञाची परिसमाप्ती कारागृहाच्या चार भितीत झाली. त्यामुळे भारतीय स्वातंत्र्याच्या लढ्याला एक ऊर्जस्वल स्वरूप प्राप्त झाले आणि भारतीय स्वातंत्र्याच्या इतिहासात म. गांधींबरोबरच त्यांचेही नाव अजरामर झाले. कस्तूरबांच्या अंगी अनेक गुणविशेष होते. पतीच्या कार्याला आणि ध्येयाला समर्पण बुद्धीने वाहून घेणे, हा त्यातला सर्वश्रेष्ठ गुण होय. त्यांच्या मृत्यूनंतर एका वर्षाच्या आत भारतीय जनतेने त्यांच्या स्मरणार्थ दीड कोटीचा निधी उभा केला. त्या निधीतून सांप्रत

देशभर ग्रामीण महिलांच्या उद्धाराची कामे चालतात. **पाहा–** गांधी. [ थो. प. ]

**कस्तूरीदान** कस्तूरी म्हणजे एक प्रसिद्ध सुगंधी द्रव्य. हे ज्या मृगाच्या बेंबीच्या गाठीत असते, त्याला कस्तूरीमृग म्हणतात. आयुर्वेद व गंधशास्त्र यांत कस्तूरीचा अनेक प्रकारे उपयोग सांगितला आहे. कस्तूरी हे एक पूजा-



कस्तूरीमृग

द्रव्यही मानलेले आहे. श्रीविष्णू किंवा कृष्ण यांच्या कपाळी कस्तूरीचा टिळा असतो, असे त्याचे वर्णन आढळते. कस्तूरीचे दान केल्याने सुख, भोग व शांती प्राप्त होते, असे सांगितले आहे. दानमंत्र असा—

**कस्तूरी भाग्यदा भव्या देवमर्त्यजनप्रिया ।**
**दानेनास्याः सुखं भोगाः शान्तिरस्तु सदा मम ।।**
(दा. चं.)

अर्थ– कस्तूरी ही भाग्य देणारी व देवा-मानवांना प्रिय आहे. हिच्या दानाने मला सदैव सुख, भोग व शांती यांचा लाभ होवो.

**कस्तूरी रंगाचार्य** (१५ व्या शतकाची अखेर) एक वैष्णव आचार्य. हा श्रीरंगसूरी या नावाने प्रसिद्ध आहे. कार्याधिकरणवाद व कार्याधिकरणतत्त्व असे त्याचे दोन ग्रंथ आहेत. त्यांत त्याने वडकलई व तेंगलई या दोन पंथांतला भेद दाखवून तेंगलई या पंथाला आपला पाठिंबा दर्शविला आहे.

**कस्थ** पश्चिम बंगालमधील मिदनापूर या जिल्ह्यात राहणारी एक जात. हे लोक जमीनदार व शेतकरी आहेत. १९२१ सालच्या जनगणनेत त्यांची अस्पृश्य म्हणून गणना झाली आहे; पण १९३१ सालच्या जनगणनेत तशी नोंद नाही. ते स्वतःला कायस्थ म्हणवितात. त्यांना अस्पृश्य ठरवायला कोणताही सबळ पुरावा उपलब्ध नाही. [ ट्रा. का. बें. ]

**कहाणी** कथानिका पाहा.

**कहार** (सं. स्कंधकार = खांद्यावर ओझी वाहणारा.) उ. प्रदेश, बिहार, ओडिसा, बंगाल, मध्यप्रदेश, विदर्भ व महाराष्ट्र या विभागांत आढळणारी एक जात. हे लोक पालख्या वाहणे, मासे मारणे, टोपल्या विणणे, इ. व्यवसाय करतात. कलिंगडे व शिंगाडे पिकवितात.

वंशशास्त्रज्ञांच्या मते कहार ही संमिश्र जात आहे. ब्राह्मण पिता व निषाद किंवा चांडाल माता यांच्यापासून कहारांची उत्पत्ती झाल्याचे सांगतात. त्यांच्यापैकी धुरिया कहार, हे आपली उत्पत्ती महादेवाने केलेल्या धुळीपासून झाली, असे सांगतात. बिहारमधील कहारांचा मूळपुरुष जरासंध राजा होता, असे कनिंगहॅम सांगतो. कहार स्वतः आपण ब्राह्मणांचे गुरू आहो, असे सांगतात. रामाच्या सांगण्यावरून नारदाने कहार जातीचा गुरू केला होता, अशी दंतकथा त्यांच्या जातीत प्रचलित आहे. अन्य जातीच्या लोकांना ते आपल्या जातीत घेऊ शकतात.

घारूक, जइधर, खावार, मलहा, बथमा, बाटधीमर, राइक-वार, रावानी, सिंघरिया व तुराई अशा यांच्या पोटजाती आहेत. इमिलीय, अतेरीय, मुडेरी अशी त्यांची गोत्रे आहेत. पोटजातींच्या व गोत्राच्या नावांवरून त्यांच्या अनेक व्यव-सायांचा बोध होतो. कहारात काही मुसलमानही आहेत. या सर्व गोष्टींवरून कहार ही जात किती गुंतागुतीची आहे, याची कल्पना येऊ शकेल.

**देव-धर्म** — बंगालमधील कहार बहुधा शिव-शक्तीची उपासना करतात. रावानी या पोटजातीतले लोक कार्तिक शु. ७ मीस रानात जाऊन आवळीची पूजा करतात, ब्राह्मणांना भोजन घालतात व मग आपण मद्यमिश्रित भोजन करतात. डाक, कर्ता, बंदी, गोरैया, धर्मराज, सोखा, शंभुनाथ, रामठाकूर व दामूबीर हे यांचे देव आहेत. दामूबीर हा मरून देव झालेला एक कहारच आहे. त्याला बकऱ्याचा बळी देतात. सोम, बुध व शुक्र हे तीन वार दामूबीराच्या पूजेचे दिवस मानतात. उ. प्रदेशातले कहार भैरवाला भजतात व त्याला बकरा, रोट व मद्य अर्पण करतात. हनुमान देवाला वस्त्र, जानवे व फुलांच्या माळा घालतात. झाशी विभागात यांच्या रीतिरिवाजांत हिंदु-मुस्लीम चालींचे चमत्कारिक मिश्रण झाले आहे. शिंगाडे लाव-ताना सिलोमनबाबा व त्याचा भाऊ माधवबाबा यांची पूजा

करतात. कलिगडे लावताना घटोरियाबाबा या देवाला संतुष्ट करतात. मच्छीमारीसाठी व मेणे उचलण्यासाठी बाहेर पडताना कालूकहार या देवाचे स्मरण करतात.

कहाराची पचायत असते. विधवेने विवाह केल्यानंतर तिच्या नवऱ्याने पूर्वीच्या तिच्या मृत पतीच्या कुटुबास द्यायची रक्कम ठरवणे, चोरी किंवा व्यभिचार करणाऱ्या गुन्हेगारास शासन व मालमत्तेसंबंधी सर्व वादाचे निर्णय, ही तीन मुख्य कामे पचायत करते. कहार जातीत मुलाला सात व मुलीला पाच नावे ठेवतात. पण व्यवहारात मात्र पहिल्याच नावाचा उपयोग करतात. तप्तमुद्रेसारखे दिव्याचे प्रकारही त्यांच्यात थोडेबहुत आढळतात.

**विवाहप्रथा**— नाते असलेल्या कोणत्याही कुटुबाशी लग्नसंबध करीत नाहीत. एकाहून अधिक बायका करायच्या असतील, तर सबळ कारणे दाखवून पंचायतीची परवानगी घ्यावी लागते. पूर्वी हे लोक ८ वर्षाआधी मुलीचे व १५ वर्षाआधी मुलाचे लग्न करीत. अविवाहित स्त्रीशी व्यभिचार करणे, महापातक समजतात. विधवेशी किवा परस्त्रीशी संबंध ठेवणाऱ्याला दंडादाखल त्या स्त्रीच्या नवऱ्याच्या कुटुबास जेवण व पैसे द्यावे लागतात. विधवा-विवाह पंचायतीच्या मान्यतेनेच होतो.

दक्षिणेतले कहार आपण औरंगजेबाच्या वेळी बुदेलखंडातून दक्षिणेत आलो, असे सांगतात. भंडारे, गंगोळे, कचरे, लडके, लाचुरे, लिंब्रे, मेहेरे, पाद्रे, तांब्रे अशी यांची आडनावे असून एका आडनावात लग्नसंबंध होत नाही. मामेबहिणीशी लग्न करीत नाहीत. या लोकात बहुपत्नीत्व रूढ आहे. शमी हे यांचे देवक आहे. लग्नप्रसंगी कुभाराकडून एक घडा मिरवीत आणून तो देवकाजवळ ठेवतात. बहुतेक लग्नविधी मराठ्यांप्रमाणेच असतो.

**कहारनृत्य**— उ. प्रदेशातील कहारांचे नृत्य प्रेक्षणीय असते. त्यात सुरवातीला ढोल व टाळ याच्या साथीवर समूहगान करतात व मग नृत्याला प्रारंभ करतात. नृत्याला गती आली, की नर्तक जोरजोरात गिरक्या घेतात.

**मर्तिकप्रथा**— मृत मनुष्य विवाहित असेल, तर त्याला जाळतात व अविवाहित असेल, तर पुरतात. कुणबी किंवा भोई याच्याप्रमाणे मृताचे सर्व विधी करतात. पितरांचा महालय भाद्रपदात न करता, दिवाळीस किंवा महाशिवरात्रीस करतात.

मेणे-पालख्यांची पद्धत नष्ट झाल्यामुळे यांचा तो धंदा बुडला. मग हे घरकाम करणारे गडी बनले. पूर्वी यांच्या बायका, राजेलोकाच्या पालख्या जनानखान्याच्या अंतर्भागात नेण्याचे काम करीत. अंत:पुराचे रक्षण करण्यासाठी राजे लोक कहारांच्या बायकांचे एक पथक ठेवीत. हे लोक पशूचे मांस खातात; पण पक्ष्यांचे खात नाहीत. हे आपला दर्जा भोई लोकांच्यावर मानतात. यांना कुणब्यांच्या हातचे अन्नोदक चालते. [मुं. इ. जा.; म. ज्ञा. को. ; फो. लो.]

**कहोळ कौषीतकी** एक वैदिक ऋषी. कहोळ, कहोड व कहोल असे याच्या नावाचे तीन उच्चार आहेत. श्री. चापेकर यांच्या मते मूळचा शब्द कहोड असा असावा.

व्रीहियवादी नवी धान्ये वृष्टीमुळे उत्पन्न होत असल्याने ती प्रथम देवतांना समर्पून म्हणजेच नवान्नाने आग्रयणयाग करून भक्षण करावी, ही चाल याने सुरू केली. आश्वलायन गृह्यसूत्रातील ब्रह्मयज्ञांगतर्पणात याचे नाव आहे. बृहदारण्यकात याला कौषीतकेय म्हटले आहे (३. ५. १). हा याज्ञवल्क्याचा समकालीन होता.

कहोळ हा उद्दालक ऋषीचा शिष्य होय. गुरूने आपली सुजाता नामक कन्या याला दिली होती. ती गर्भिणी असताना कहोळ स्वाध्याय करीत असलेला पाहून गर्भाने त्याला तसे न करण्याविषयी सांगितले. कहोळाला त्यामुळे राग आला व त्याने गर्भाला शाप दिला, की 'तू आठ ठिकाणी वाकडा होशील !' तोच पुत्र पुढे अष्टावक्र या नावाने प्रसिद्ध झाला.

कहोळ एकदा द्रव्ययाचनेसाठी जनक राजाकडे गेला. तिथे वरुणपुत्र बदी याने त्याला वादात जिंकून उदकात बुडविले. ही गोष्ट अष्टावक्राला कळताच तो जनकाकडे गेला व त्याने बंदीला वादात जिंकून आपल्या पित्याला परत आणले ( म. भा. वन १३६ ). कहोळ हा एक मध्यमाध्वर्यू होता. [तर्पण; प्रा. च. को. ]

**कळंब** विदर्भातले एक गणेशक्षेत्र. हे गाव यवतमाळपासून १४ मैलावर आहे. पूर्वी हे एक मोठे व समृद्ध नगर असावे, असे अनुमान आहे; कारण तशा प्रकारचे अनेक अवशेष इथे आढळतात. इथल्या गणेशाचे नाव चिंतामणी असे आहे. त्याविषयी गणेशपुराणात पुढील कथा आहे—

अहल्येशी जारकर्म केल्यामुळे इंद्राच्या अंगाला सहस्र भगे पडली. ते पाप धुवून काढण्यासाठी इंद्राने इथे 'चिंतामणी' गणेशाची मूर्ती स्थापून कळंबाच्या झाडाखाली गणेशषडक्षरी मंत्राचे पुरश्चरण केले. त्यामुळे चिंतामणी प्रसन्न झाला व त्याने इंद्राच्या सहस्र भगांचे सहस्र नेत्र केले. मग इंद्राने त्या स्थापित गणेशमूर्तीवर सुवर्णरत्नखचित मंदिर बांधले.

सांप्रतचे इथले गणेशमंदिर साध्या बांधणीचे असून ते जमिनीत खूप खोल आहे. त्याच्या प्रवेशद्वाराजवळ चौमुखी गणेशमूर्ती आहे. आत उतरल्यावर एक कुंड लागते, त्याला

पावनतीर्थ म्हणतात. या मंदिराजवळच अनसूया व शंकर यांची मंदिरे आहेत. शिवाय गावाच्या पश्चिमेस तमेश्वराचे व ईशान्येस सिद्धेश्वराचे अशी आणखी दोन मंदिरे आहेत. [ वसंत गिरटकर. ]

**कळसवणी** दैवज्ञ व इतर काही जाती याच्यात लग्नाच्या आधी केला जाणारा एक विधी. चार सुवासिनी घडे भरून विहिरीचे पाणी आणतात व आंब्याच्या पानाने ते वधू-वरावर शिपडतात. त्यावेळी पुढील गाणे म्हणतात–

**आकाशीं रहाट जे । जुंपियले हो ।**
**खणविल्या बावी । बावीचे पाणी जे ।**
**थेंबो थेंबी कळस भरीये । त्या कळसा ठावू करा ।**
**आप्त ही लक्ष्मीबाई । नवरी सीतादेवी न्हाई ।**

**कळसूत्री बाहुल्या** आपल्या देशात फार प्राचीन काळापासून कळसूत्री बाहुल्याचा खेळ प्रचलित आहे. चौसष्ट कलांमध्यें ही कला अंतर्भूत आहे. भारत, लका, बाली, सुमात्रा, जावा, चीन, इ. देशांत या कलेचा प्रसार होता व आजही आहे. या कलेचा सर्वप्रथम उल्लेख महाभारतात आढळतो––

**परप्रयुक्तः पुरुषो विचेष्टते ।**
**सूत्रप्रोता दारुमयीव योषा**
(म. भा. उद्यो. ३२.१३)

**अर्थ–** कळसूत्री बाहुली ज्याप्रमाणे सूत्रधाराच्या इच्छेनुसार हालचाल करते, त्याप्रमाणे मनुष्य हा ईश्वराच्या इच्छेनुसार हालचाल करतो.

पंचतंत्रात काष्ठचित्रक्रीडनक असा शब्द आला आहे, तो कळसूत्री बाहुलीलाच उद्देशून होय (१.५). नलराजाच्या प्रमोदभवनात नित्य कळसूत्री बाहुल्यांचा नाच होत असे व सूत्रधार भिंतीच्या आड बसून त्या बाहुल्या नाचवीत असे, असा उल्लेख श्रीहर्षाने नैषधीयचरितात केला आहे (१८.१३). अवदानकल्पलतेत बाहुल्यांच्या नाचाला यंत्रपुत्रकलीला असे नाव दिलेले आहे (६५.१९७). अशा अनेक उल्लेखांवरून कळसूत्री बाहुल्यांचा खेळ महाभारतकालाच्याही पूर्वीपासून भारतात प्रचलित होता, असे म्हणता येते.

या खेळाचा उगम व त्याचे स्वरूप या बाबतीत विद्वानांत मतभेद आहेत. कळसूत्री बाहुल्यांच्या खेळातला सूत्रधार जे कार्य करतो, तेच कार्य करणारा सूत्रधार भरताच्या नाट्यशास्त्रात आढळतो. ज्याप्रमाणे बाहुल्यांच्या दोऱ्या आपल्या हातात घेऊन त्या खेळातील सूत्रधार त्यांचे संचालन करतो; त्याचप्रमाणे रंगभूमीवरचा सूत्रधारही पात्रांच्या कृतीचे संचालन करतो. यावरून नाटकाच्या रंगभूमीवर सूत्रधार



कळसूत्री बाहुल्या व त्यांचा संचालक

अवतीर्ण झाला तो कळसूत्री बाहुल्यांच्या रंगभूमीवरूनच, असे अनुमान निघते. 'वेदार्थयत्न' कर्ते श्री. पंडित यानी विक्रमोर्वशीयम् या नाटकातल्या सूत्रधार शब्दावर टीप देताना हे अनुमान केले आहे व डॉ. पिशल हाही याच मताचा आहे. पिशलच्या मते भारतीय नाटचाचे मूळ कळसूत्री बाहुल्यांच्या खेळांत असून त्या खेळाची जन्मभूमी भारत हीच आहे.

बाहुली या अर्थाचे पुत्रिका, दुहित्रिका, पुत्रलिका, पांचालिका, इ. शब्द संस्कृत भाषेत आढळतात. भारतातल्या या बाहुल्या लोकर, लाकूड, रेडचाचे कातडे, शिंग व हस्तिदंत याच्या बनवीत. प्राचीन काळीही मुलींना बाहुल्यांची खूप आवड असे. विराटाची कन्या उत्तरा हिने कौरवांना जिंकून परत येताना आपल्या बाहुल्यांसाठी रंगीबेरंगी तलम व मऊ वस्त्रे आणण्याविषयी अर्जुनाला सांगितले होते (म. भा. विराट. ३७.२८–२९).

यांत्रिक हालचाली करणाऱ्या बाहुल्याचा उल्लेख कथासरित्सागरात आला आहे, तो असा– मयासुर नावाचा एक शिल्पकार होता. सोमप्रभा नावाची त्याची एक कन्या होती. ती राजकन्या कलिंगसेना हिला भेटायला गेली असता तिने यांत्रिक बाहुल्यांची एक पेटी कलिंगसेनेला भेट म्हणून दिली. त्या पेटीत अनेक बाहुल्या होत्या. प्रत्येक बाहुलीत एक कळ होती. ती कळ दाबली, की एक बाहुली आकाशात उडून फुलाचा हार घेऊन खाली येई, दुसरी पाणी आणी, तिसरी नाच करी व

चवथी आवाज काढी. अशा प्रकारच्या कळसूत्री बाहुल्या मिळाल्यावर कलिंगसेना त्यांच्याशी खेळण्यात दंग झाली.

राजशेखराने आपल्या बालरामायण नाटकाच्या पाचव्या अंकात दोन कळसूत्री बाहुल्या रंगभूमीवर आणल्या आहेत. त्यातली एक बाहुली सीता व दुसरी सीतेची दूधबहीण सिंदूरिका होती. त्या दोन्ही बाहुल्या माणसांप्रमाणे चालतबोलत होत्या. त्यांना पाहून रावण फसला. त्याला वाटले, की त्या खऱ्याच सीता आणि सिंदूरिका आहेत. त्याने सीतेच्या बाहुलीला स्पर्श केला, तेव्हा त्याला आपली फसगत कळून आली. मग रावणाने त्या बाहुल्या आपल्याबरोबर लंकेत नेल्या.

रंगभूमीवर कळसूत्री बाहुल्या आणणारे संस्कृत भाषेतील हे एकमेव नाटक होय. त्या बाहुल्यांची सूत्रे हलविणाऱ्या माणसाला राजशेखराने सूत्रधार असेच म्हटले आहे. कथासरित्सागरात कळसूत्री बाहुल्यांना साज चढविणाऱ्याला वेषकार व



कळसूत्री बाहुला – तोंड लाकडाचे, अंग कापडाचे.

त्यांचे खेळ दाखविणाऱ्याला नर्तक असे म्हटले आहे. या कळसूत्री बाहुल्यांचे अवयव हव्या त्या दिशेला फिरवता यावे, म्हणून त्यांच्या अंगांतून तारा नेलेल्या असतात. या तारांनाच कळसूत्र असे म्हणतात. कळसूत्र हाती घेऊनच सूत्रधार बाहुल्यांना विविध प्रकारे नाचवीत असतो.

भारतात आजही राजस्थान, माळवा, सौराष्ट्र, महाराष्ट्र व केरळ या प्रांतात कळसूत्री बाहुल्यांची परंपरा विद्यमान आहे. भारताच्या बाहेर पूर्वेकडील देशात या खेळाचे जे स्वरूप दिसते, तेही भारतीय परंपरेला धरूनच आहे. पाश्चिमात्य देशात आधुनिक यंत्रविद्येची जोड देऊन कळसूत्री बाहुल्यांचे प्रयोग मोठमोठ्या नाट्यगृहातही दाखविले जातात. पाश्चात्य देशात ही कला आजमितीस नव्या आकर्षक ढंगाने पुढे येत आहे व लोकप्रियही होत आहे.

उत्तर प्रदेशात कळसूत्री बाहुलीला कठपुतळी असे म्हणतात. याचा अर्थ लाकडाची बाहुली असा आहे. ही कठपुतळी बनविताना लाकडाबरोबरच कापड व चामडे यांचाही उपयोग केला जातो. कठपुतळी ही छोटी बाहुली नसते, तर ती उंच व भरघोस असते. ज्या प्रकारचे कथानक असेल, त्याप्रमाणे स्त्रीपुरुष कठपुतळ्यांची वेषभूषा करतात. गोल चेहरा, मासळीच्या आकाराचे डोळे, रेखीव भुवया व आकर्ण ओठ अशी त्यांची मुखाकृती असते. प्रत्येक पुतळीच्या मागे सूत्र बांधण्यासाठी एक कडी असते. कातणयंत्रावर घालून त्यांना ठाकठीक करतात व त्यावर रंगरोगण चढवितात. जोधपूरच्या कठपुतळ्या पौराणिक किंवा ऐतिहासिक व्यक्तित्वाला अनुरूप अशा उंच, ठेंगू, नाजूक वा भयानक असतात. दक्षिणेतल्या पुतळ्यांची बनावट दाक्षिणात्य ढंगाची असते. ज्या प्रदेशात या कठपुतळ्या बनवितात, त्या प्रदेशातील वेषभूषा त्यांच्या अंगावर चढविली जाते.

बाहुल्यांचा खेळ दाखविणारा माणूस त्यासाठी एक रंगमंच बनवितो व त्याच्यामागे एक चारपायी ठेवून तिच्यावर बसतो. प्रेक्षक समोर बसून तो खेळ पाहतात. कित्येकदा या खेळासाठी खाब व महिरपी उभारून मोगली दरबारासारखा दरबार तयार केला जातो. त्याची उंची सामान्यतः तीन ते चार फूट असते व लांबी-रुंदी आठ ते दहा फूट असते. दरबाराचे छत खुले असते व तिथल्या आढ्यावर बसून सूत्रधार आपल्या बाहुल्यांना वरून खाली उतरवितो व बोटाच्या कुशल हालचालींनी त्यांना नाचवितो. या दरबाराच्या लांबीला आणि उंचीला शोभतील अशा आकाराच्या पुतळ्या बनविल्या जातात. राजे-राजवाड्याच्या मोठ्या व सामान्य पात्रांच्या पुतळ्या छोट्या असतात. कळसूत्री राजा सिंहासनावर बसतो. त्याच्यापुढे येणारी बाहुली कापत कापत पुढे येते. नर्तकी बाहुली एका हाताने आपल्या घागऱ्याचा काठ वर उचलून नृत्य करते. हे नृत्य कथकपद्धतीशी मिळते-जुळते असते. कळसूत्री वीरपुरुष तलवार

फिरवीत नाचतात. या नृत्याला ढोलकीची साथ असते. त्यामुळे या प्रयोगात एक गतिमान वातावरण निर्माण होते. जोधपुरी कलाकार या कलेत अत्यंत निष्णात असतात.



नर्तकी बाहुली

भारतात कळसूत्री बाहुल्यांच्या नृत्याच्या दोन पद्धती आहेत. एक राजस्थानी पद्धती व दुसरी दाक्षिणात्य पद्धती. राजस्थानी पद्धतीत सूत्रधार रंगमंचाच्या वर बसून सूत्रांच्या साहाय्याने बाहुल्या नाचवितो. दक्षिण भारतातल्या बाहुल्या मोठ्या असतात आणि सूत्रधार खाली बसून लांब काठ्यांच्या द्वारे त्यांचे संचालन करतो. रंगभूमीवर एक पडदा असतो. बाहुल्यांचे संचालन त्या पडद्यामागे होते. प्रेक्षकांना बाहुल्या प्रत्यक्ष न दिसता पडद्यावर त्यांच्या छाया दिसतात. या खेळाला मलबारमध्ये पवाकूत्तु म्हणतात. पवाकूत्तुमध्ये रामायण-महाभारतातील आख्यानेच विशेषेकरून दाखविली जातात. हे खेळ तिकडच्या मंदिरातून होत असतात. ते करणाऱ्यास कूत्तुकर म्हणतात वंशपरंपरेने हा धंदा करणारे लोक तिकडे आहेत. त्यांना देवालयातून बिदागी मिळत असते. कित्येक मंदिरात या खेळासाठी स्वतंत्र दालन असते.

राजस्थानातल्या कठपुतळ्या लाकडाच्या व कापडाच्या असतात. त्यांची उंची पाऊण फुटापासून दीड फुटापर्यंत असते. प्रत्येक बाहुलीला दोन ते पाच धागे जोडलेले असतात. पहिल्या प्रथम एक माणूस ढोलके वाजवून खेळ सुरू झाल्याची सूचना देतो. नंतर एक बाहुली रंगमंचावर येऊन रंगमंच झाडण्याचा अभिनय करून निघून जाते. मग एकामागून एक बाहुल्या येऊ लागतात. सूत्रधार रंगमंचाच्या मागे उभा राहून त्यांचे संचालन करतो. दुसरा एक माणूस ढोलक्याच्या साथीवर कथा–गीत गातो व रंगभूमीवर येणाऱ्या प्रत्येक पात्राचा परिचय करून देतो.

या खेळात अमरसिंह नावाचे एक पात्र असते. त्याचा परिचय पुढीलप्रमाणे करून दिला जातो–

**अमरकी कमरमे काहेकी कटारी ।**
**जोधपूर गढवाई बीकानेर सरवाई ।**
**कतरा अमरा दुख दे गई ।**
**अमरसिंह कटारी रंग ले गई ।**

बिरबलाच्या पात्राचा परिचय पुढीलप्रमाणे होतो–

**अटक चटक से लगी लिये चटकन हाथ ।**
**रंगराव हंस खेलिया गिया बिरबल साथ ।**
**गोकुलसे गंगा बही पाछे खड्या वजीर ।**
**सोन्या सब दराबर की लेग्यो बिरबल वजीर ।**

राजस्थानातल्या या खेळात धार्मिक आणि ऐतिहासिक कथांचेच मुख्यत्वे प्रदर्शन होते. उत्तर भारतात कठपुतळ्यांच्या साहाय्याने रामायणातल्या कथा प्रदर्शित केल्या जातात. [ लो. ध. ना.; लो. ना. प. ]

## कळसूबाई

सह्याद्रीतील एक देवता. कळसूबाईचे शिखर हे सह्याद्रीचे सर्वोच्च शिखर होय. या देवतेची स्थानिक दंतकथा अशी–

कळसू ही एका गरीब कोळ्याची मुलगी. तिला रानावनात भटकण्याची फार हौस होती. एकदा ती फिरत फिरत या शिखराच्या पायथ्याशी आली व तिथल्या इंदूर या गावी एका कोळ्याच्या घरात कामाला राहिली. कामाला राहताना तिने अट घातली, की ' मी भांडी घासणार नाही व झाडलोट करणार नाही. ' काही दिवस तसे गेले; पण पुढे एक दिवस तिला ती कामे करण्याची आज्ञा झाली. तिने आज्ञेप्रमाणे भांडी घासली व झाडलोटही केली. मात्र ते काम होताच तिने कोळ्याचे घर सोडले व ती शिखरावर येऊन राहिली. तिथला तिचा जीवनक्रम पाहून आजबाजूचे लोक तिला देवीचा अवतार मानू लागले. त्यांनी त्या शिखरावर तिचे मंदिरही उभारले. सांप्रत कोळी लोक तिला आपली कुलदेवता मानतात व नवसही करतात. [ सह्याद्री ]

## कळापूर्णोदयमू

तेलुगू भाषेतील एक प्रबंधकाव्य. पिंगलसूरना हा याचा कर्ता होय. गंधर्व आणि मानव जातीचे स्त्री-पुरुष यांच्या प्रणयी जीवनातल्या अनेक अद्‌भुत घटनांनी हे प्रबंधकाव्य भरलेले आहे. या काव्यातल्या व्यक्तींना अनेक विद्या–कला अवगत आहेत. त्यांना देवतांचे वर

आहेत; तसे अभिशापही आहेत. असूया आणि अभिलाषा यांनी या काव्यातल्या घटनांना तीव्रता आलेली आहे. मणिकंधर, मणिस्तंभ, नलकूबर, रंभा, कलभाषिणी, कळापूर्ण, इ. अनेक दैवी आणि मानवी व्यक्तींनी या प्रबंधकाव्यातील कथाप्रसंग घडविले आहेत. त्यातील कळापूर्ण या नायकाची कथा पुढीलप्रमाणे –

कळापूर्ण हा मणिस्तंभ गंधर्वाचा पुत्र. तो कासारनगरात जन्मला. तारुण्यात आल्यावर त्याला कासारनगराचे राज्य मिळाले. त्याच्या पत्नीचे नाव अभिनवकौमुदी असे होते. एका सिद्धयोग्याकडून मिळालेला एक दिव्य मणी कळापूर्णाच्या गळ्यात होता. त्याने जेव्हा अंगदेशावर स्वारी केली, तेव्हा त्या देशाच्या पट्टराणीने तो मणी पाहिला. त्या मण्याच्या प्रभावाने त्या पट्टराणीला एक कन्या झाली. मधुरलालसा असे तिचे नाव ठेवण्यात आले. अनेक विद्या-कलांचे शिक्षण घेत मधुरलालसेने यौवनात पदार्पण केले.

एक दिवस ती आपल्या सख्यांसह उद्यानात जलक्रीडा करीत असता शिकारीसाठी त्या भागात आलेल्या कळापूर्णाच्या नजरेस पडली. मधुरलालसेचे अप्रतिम लावण्य पाहून कळापूर्ण मोहित झाला. मधुरलालसेलाही तो नवयुवक फार आवडला. तो डोळ्यापुढून दूर होताच मधुरलालसेला वियोगजन्य मूर्च्छा आली. कळापूर्णही तिचे रूपलावण्य अंतरात साठवूनच राजधानीस गेला. त्याने मधुरलालसेला रीतसर मागणी घातली व नंतर एका शुभमुहूर्तावर त्या दोघांचे लग्न झाले. अभिनवकौमुदीला सवत आली. कळापूर्णाने एक दिवस आपल्या दोन्ही राण्यांना गायन करायला लावले. त्यात मधुरलालसा श्रेष्ठ ठरली. कळापूर्णाने तिचे खूप कौतुक केले व तिला एक सुंदर वीणा आणून देण्याचे आश्वासनही दिले. ही गोष्ट अभिनवकौमुदीच्या जिवाला झोंबली. मधुरलालसेविषयी असूया धरून ती कळापूर्णावर रुसून बसली. कळापूर्णाने तिला अनेक आश्वासने दिली; पण तरीही तिचा रुसवा जाईना. अखेरीस तो तिला म्हणाला, ' मी जी वीणा आणीन, ती मधुरलालसेला न देता तुलाच देईन. मग तर झाले !'

त्यावर अभिनवकौमुदीची कळी खुलली; पण मधुरलालसेने कळापूर्णाशी अबोला धरला. तिचीही समजूत घालता घालता कळापूर्णाच्या नाकी नव आले. शेवटी तो तिला म्हणाला, 'मी तुझ्यासाठी सुंदर नूपुरे बनवीन आणि त्या नूपुरांना देशोदेशीच्या राजाच्या किरीटांतली सप्तरंगी रत्ने जडवीन.' हे अभिवचन मिळाल्यावर मधुरलालसेचाही राग गेला.

कळापूर्ण मग दिग्विजय करण्यासाठी निघाला. चोळ, पांड्य, गौड, कलिंग, इ. राजांना जिंकून त्याने त्यांच्या किरीटातली रत्ने मिळविली. परत येताना तो मृगेन्द्रवाहनालय या मंदिरात गेला व तिथली अप्रतिम वीणा घेऊन राजधानीस परत आला. मग त्याने अभिनवकौमुदीला वीणा समर्पित करण्याचा व मधुरलालसेच्या पायात रत्नजडित नूपुरे चढविण्याचा मोठा समारंभ केला.

पुढे कित्येक वर्षे त्याने त्या दोन्ही राण्यांच्या सहवासात विविध विलाससुखे उपभोगिली. मग एक दिवस मधुरलालसेने त्याला लक्ष्मीनारायणसंवाद नामक एक कथा ऐकविली. ती ऐकून कळापूर्णाला विरक्ती उत्पन्न झाली. त्या क्षणापासून तो ईश्वरभक्तीकडे वळला. उर्वरित आयुष्य त्याने केवळ प्रजेचे कल्याण करण्यात व्यतीत केले. समस्त प्रजा त्याला भगवान म्हणू लागली.

## कक्षीवान

सूक्तद्रष्टा. दीर्घतमा आणि उशिज यांचा पुत्र. याची जन्मकथा बृहद्देवतेत दिली आहे, ती अशी–

दीर्घतमा हा एकदा नदीत पडला व वाहत वाहत अंग देशाच्या किनाऱ्याला लागला. नंतर त्याने तिथल्या राजाची भेट घेतली. अंग राजाला पुत्रसंतान नव्हते. दीर्घतम्याकडून आपणास पुत्र निर्माण करून घ्यावा, अशा इच्छेने त्याने उशिज नावाची आपली दासी दीर्घतम्याकडे पाठवून दिली. तिच्या उदरी दीर्घतम्यापासून जो मुलगा झाला, तोच हा कक्षीवान होय.

विद्यार्थिदशेत गुरुगृही राहून याने तत्कालीन संपूर्ण विद्या हस्तगत केली. नंतर गुरूचा निरोप घेऊन तो घरी येण्यास निघाला. वाटेत विश्रांतीसाठी म्हणून रस्त्याच्या कडेला बसला असता त्याला तिथेच झोप लागली. तेवढ्यात स्वनय नावाचा राजा आपली राणी व पुरोहित यांच्यासह फिरत फिरत तिथे आला. त्या निद्रिस्त ऋषिकुमाराचे दिव्य तेज व रूपसौंदर्य पाहून त्याच्या मनात त्या युवकाविषयी प्रेम निर्माण झाले. राजाने त्याला जागे करून त्याचे कुल–गोत्र विचारले. कक्षीवानाने त्याला आपला सर्व वृत्तांत सांगितला. तो ऐकून स्वनय राजा प्रसन्न झाला. त्याने कक्षीवानाला घरी नेऊन आपली उपवर कन्या त्याला दिली. त्याशिवाय त्याला नानाप्रकारच्या देणग्याही दिल्या (बृ. दे. ३. १४१–१५०).

कक्षीवान ऋग्वेदाच्या १.११६ ते १.१२६ व ९.७४ या सूक्तांचा द्रष्टा आहे. हा स्वतःला पज्रिय (पज्र कुलातला) म्हणवितो (ऋ. १.११६.७). हा श्रुतिरथ, प्रियरथ व सिन्धुतीरावर राज्य करणाऱ्या भाव्य राजाचा पुरोहित होता. त्या राजांकडून याला शेकडो सुवर्णनिष्क, शेकडो गाई व शेकडो घोडे अशा देणग्या मिळाल्या. याने शंभर वल्ही असलेल्या नौकेचा उल्लेख केला आहे (ऋ. १.११६.५). याच्या सूक्तांत इंद्र व अश्विनौ यांच्या सामर्थ्याच्या आणि परोपकाराच्या

कित्येक कथांची बीजे आढळतात. गांधारी अविकेचा म्हणजे गांधार देशातल्या मेढीचा हा उल्लेख करतो. त्यावरून आजच्या पख्तूनिस्तानमधली मऊ मऊ लोकर वेदकाळीही प्रसिद्ध असल्याचे कळते. त्या काळातले ऋत्विज दशविध हवींनी अग्नीला व देवतांना संतुष्ट करीत, असे हा म्हणतो (ऋ. १.१२२.१३). हा स्वतः भरघोस दान घेणारा होता, तसाच सत्कर्मासाठी भरघोस दान देणाराही होता. तो एका ठिकाणी म्हणतो, की 'यज्ञकर्मनिष्ठ व सच्छील पुरुषाला भेटण्याकरिता आज सकाळी मी आपल्या रथात भरपूर धन भरून घेऊन येथे आलो आहे' (ऋ. १.१२५.३). याने पुढील मंत्रात दानाचे माहात्म्य सांगितले आहे—

**नाकस्य पृष्ठे अधि तिष्ठति श्रितो**
**यः पृणाति स ह देवेषु गच्छति ।**
**तस्मा आपो घृतमर्षन्ति सिन्धव-**
**स्तस्मा इयं दक्षिणा पिन्वते सदा ।।**

(ऋ. १.१२५.५)

अर्थ– जो कोणी दानधर्माने (ईश्वरास) संतुष्ट करतो, तो स्वर्गाच्या शिखरावर चढून जाऊन तिथेच राहतो. त्याचा देवाच्या मंडळात प्रवेश होतो. त्याच्याचकडे स्वर्गातील व पृथ्वीवरील नद्या घृताचे लोट वाहून नेतात आणि त्याच्याकरिता ही सुपीक धरित्री समृद्धीने ओतप्रोत भरून जाते.

## कांकरोली

मेवाडमधील एक पुण्यक्षेत्र. याला कांकडोली असेही म्हणतात. हे ठिकाण उदयपूरच्या ईशान्येस ३६ मैलांवर; तसेच नाथद्वाराच्या उत्तरेस ११ मैलांवर आहे. वल्लभसंप्रदायाचे हे तृतीय पीठ आहे. नाथद्वाराला जाणारा प्रत्येक यात्रिक कांकरोलीला गेल्याशिवाय राहत नाही.

इथे द्वारकाधीशाचे विशाल व दर्शनीय असे मंदिर असून त्यातली देवप्रतिमा काळ्या पाषाणाची आहे. प्रारंभी हा देव कांकरोलीजवळच्या आसोटिया या गावी होता. महाराणा संग्रामसिंहाच्या कालात (इ. स. १७१९) गिरिधरजी द्वितीय यांनी कांकरोली येथे मंदिर बांधून देवाला तिथे आणले. तेव्हापासून कांकरोली हे पुण्यक्षेत्र ठरले. या मंदिराचा पूर्व-दरवाजा, त्यावरील मेघडंबऱ्या व तिथला नगारखाना या गोष्टी राजस्थानात सुप्रसिद्ध आहेत. इथले मंदिर विस्तीर्ण असल्यामुळे वैष्णवांना इथे जसा दर्शनानंद मिळतो, तसा तो नाथद्वारालाही मिळत नाही.

मंदिराच्या प्राकाराला लागूनच इथे राजसमुद्र नावाचा एक विस्तीर्ण तलाव आहे. तालेडी व गोमती या दोन छोट्या सरिता या राजसमुद्राला येऊन मिळतात व त्याचे पाणी कायम ठेवतात. महाराणा राजसिंहाने इ. स. १६७४ साली हा तलाव बांधला.

या देवस्थानात प्रतिवार्षिक अनेक मंगलोत्सव होत असतात. त्यावेळी देवाला खूप शृंगारतात आणि विविध प्रकारचे भोग चढवितात. राजसमुद्र, नौचौकी, दयालशाह, बडीपाल, इ. दर्शनीय स्थले कांकरोलीच्या परिसरात आहेत. **पाहा–** नाथद्वारा [ कांकरोली का इतिहास. ]

## कांकायन

एक आयुर्वेदाचार्य. हा शालाक्यतंत्रकार होता. चरकवर्णित हिमाचलावरील ऋषिसंमेलनात हा उपस्थित होता. बाह्लीक देश हे याचे वास्तव्यस्थान होते. 'काङ्कायनश्च बाह्लीकः' असे चरकसंहितेत म्हटले आहे. अथर्ववेदाच्या अनुक्रमणीवरून हा आथर्वण मंत्राचा द्रष्टा होता, असे कळते. [ आ. इ. ]

## कांगडा

पंजाबात जो हिमालयाचा भाग आला आहे, त्यात चार प्रमुख दऱ्या आहेत. कांगडा, कुलू, स्पिती व लहौल अशी त्यांची नावे आहेत. धौलधार पर्वतराजी आणि त्याला समांतर असलेली लहान डोंगरांची रांग यांच्यामध्ये कांगडा दरी आहे. कांगडाच्या दक्षिणेस बियास नदी व पंजाबचे मैदान आहे. पठाणकोटपासून ४० मैलांवरच्या शाहपुरापासून ही दरी सुरू होते व तिथून पुढे ईशान्येस ५४ मैलावर संपते. त्यापुढे हिमाचल प्रदेश लागतो.



वज्रेश्वरी मंदिर — कांगडा

कांगडामध्ये अनेक मंदिरे असून त्यातले वज्रेश्वरी किंवा महामाया हिचे मंदिर सुप्रसिद्ध आहे. हिला विद्येश्वरी असेही म्हणतात. इथे सतीचे मुंड गळून पडले, म्हणून ५१ शक्तिपीठात

याची गणना झाली. इथे तिची मूर्ती मुंडमात्रच आहे तिच्या सन्मुख रजतपीठावर वाग्यंत्र आहे.

कांगडा नगरापासून २१ मैलांवर ज्वालामुखीचे प्रसिद्ध मंदिर आहे. एप्रिल महिन्यात तिथे मोठी जत्रा भरते.

कांगडाच्या सीमेजवळ वैजनाथाचे मंदिर आहे. तिथल्या प्रशस्तीत या वस्तीचे नाव किरग्राम असे लिहिले आहे. किरग्राम म्हणजे किराताचे ग्राम होय. ऋग्वेदात आढळणारा



वैजनाथ मंदिर – कांगडा

इंद्रशत्रू शंबर हा किरात होता व तो या भागाचा राजा होता. बियास व रावी या दोन नद्यांच्या मधल्या पहाडी मुलखावर शंबराचे आधिपत्य होते व त्याच नद्याच्या मधल्या मैदानी मुलखावर दिवोदास राज्य करीत होता. दिवोदास आणि शबर हे परस्परांचे वैरी होते. याच शंबराला पुढच्या परंपरेत जालंधर असे नाव पडले. या जालंधराचा इथे कान गळून पडला, म्हणून या प्रदेशाला कानगढा → कानगडा → कागडा असे नाव मिळाले, अशी एक लोकव्युत्पत्ती आहे.

कांगडा शहर सुमारे २३५० फूट उंचीवर आहे. ते बाणगंगा व माझी या दोन नद्यांच्या मध्यभागी वसले आहे. एका बाजूने जुने कांगडा व दुसऱ्या बाजूने भवन (= नवे कांगडा) ही नवी वस्ती आहे. याचे जुने नाव नगरकोट असे होते व सुशर्माचंद या राजाने भारतीय युद्धानंतर ते वसविले होते असे सागतात. सहाव्या शतकात तिथे जालंधर राजाची राजधानी होती.

कांगड्याची मूळ लोकवस्ती डोगरा राजपूतांची आहे. त्याशिवाय ठाकूर, गद्दी, इ. जातीचे लोकही या प्रदेशात राहतात. इथे प्रामुख्याने डोगरी भाषा बोलली जाते. शिवाय अन्य काही पहाडी बोलीही आहेतच. प्राचीन वशावळीवरून असे दिसते, की सनपूर्व हजार दीड हजार वर्षांपासून इथे कटोच राजपुतांची सत्ता होती. त्यांचे राज्य जालंधरपर्यंत पसरलेले होते. मुसलमानी अमदानीत या लोकांना पराभूत होऊन पहाडात आश्रय घ्यावा लागला. कागडा येथील मंदिरात बहुत धनसपत्ती आहे, अशा वार्ता ऐकून गजनीचा महंमद व फिरोज



कांगड्यातील एक स्त्री

तुघलख यांनी कांगडावर आक्रमण करून इथली मंदिरे लुटली व मूर्ती फोडल्या.

कागडा हे जैनाचेही प्राचीन तीर्थस्थान आहे. इथे अनेक जैनमंदिरे होती, पण ती मुसलमानांनी उद्ध्वस्त केली. [ हि. वि. को.; कल्याण–तीर्थांक; पं. जी. सा.; हि. पि. ]

**कांगडा चित्रशैली** हुमायूं, अकबर, जहांगीर, शहाजहान, इ. मोगल सम्राटांनी मोठ्या प्रेमाने जवळ बाळगलेले ललित कलांचे कलाकार औरंगजेब बादशहाने आपल्या राज्यातून हाकलून दिले. ही कलावंत मंडळी मग सर्वत्र पांगली. त्यांतले काही चित्रकार कांगडा दरीतील रामपूर संस्थानात व दक्षिण हिमालयाच्या छोट्या–मोठ्या राज्यांत आश्रयासाठी गेले. त्या भागात त्या लोकांनी ज्या चित्रकलेचा प्रसार केला, तिला कांगडाशैली असे नाव मिळाले. हे चित्रकार हिंदू होते.

तसे पाहिले तर कागडाशैली ही स्वतंत्र शैली नाही. अजंटा, मल्लभूम इ. प्राचीन हिंदू चित्रशैलीच्या आधारावरच तिचा संसार मांडला आहे. मोगल बादशहांनी इराणी चित्रकलेशी मिश्रण करून सजविलेल्या मोगल चित्रकलेचाही तिच्यावर काही अंशी प्रभाव आहे.

कांगडा दरी निसर्गसौंदर्याने नटलेली आहे. चित्रकारांच्या कल्पनेला या निसर्गसौंदर्याने बल दिले आणि चित्राना विष-



दानलीला

यही पुरविले. कांगडाशैलीत निसर्गप्रेम फार आढळते. मेघमाला, आकाशात उडणाऱ्या बकपंक्ती, चमकत्या विद्युल्लेखा, पहाडी पशुपक्षी, कदलीवृक्ष आणि अनेक पहाडी फुले ही तिथल्या निसर्गातली मनोहर दृश्ये कागडाचित्रशैलीत विशेष प्रमाणात आढळतात. सामाजिक जीवनातल्याही सर्व प्रसंगांवर, कृष्णलीलादी पौराणिक आख्यानांवर आणि प्रेमी युगुलांवर कागडाशैलीत सुदर चित्रे आढळतात. कांगडाशैलीतल्यासारखी प्रेमविषयक चित्रे अन्य शैलीत आढळत नाहीत. या चित्रांत कोमलता, माधुर्य आणि गती हे तीन्ही गुण दिसतात.

कांगडाकलम हे अत्यंत बारीक कलम आहे. खारीच्या केसाने बनविलेल्या कुंचल्याने हे चित्रकार अति नाजुक आणि सूक्ष्म रेषा काढीत. या चित्रकलेत स्त्रीसौंदर्याचे अद्भुत दर्शन घडते. कांगडा शैलीतल्या स्त्रियांचे डोळे हे मृगनयन असतात. स्त्रियाचे लाब नाक, गोलाकार हनुवटी आणि पुष्ट उरोज या कागडाशैली ओळखण्याचा खुणा आहेत.

कांगडाशैलीचा राजस्थानी शैलीशी घनिष्ट संबंध असला, तरी त्या दोन्ही शैलीत भिन्नताही मोठी आहे. अलंकरण, रंगाचा भडकपणा इ. गोष्टी राजस्थानी व कांगडा या दोन्ही चित्रशैलीत समान असल्या, तरी राजस्थानी शैलीत नसलेली स्वाभाविकता कांगडाशैलीत विशेषत्वाने दिसते.

या शैलीचे खास वैशिष्टय म्हणजे रेषासौदर्य. तरल, नाजुक व प्रवाही अशा रेषांनी कागडा चित्रे दर्शनीय झाली आहेत. चित्रातले रंगही प्रसन्न आणि टवटवीत आहेत. हे चित्रकार मुख्यत्वे ताबडा, पिवळा, निळा, पांढरा व सोनेरी हे रंग



कृष्णपादवंदन

वापरीत. रंगांचा वापर प्रतीकात्मकही आढळतो. भावनेची उत्कटता दाखविण्यासाठी ते ताबडा व मांगल्यसूचनासाठी हिरवा रंग वापरताना दिसतात.

चित्रांचे विषय प्राधान्याने प्रणयात्मक आहेत. प्रेमिकांच्या मानसिक अवस्थांचे चित्रण करण्यासाठी या चित्रकारानी वापरलेली प्रतीकेही तितकीच काव्यपूर्ण व मनोवेधक आहेत. ते प्रेमिकांच्या समोर बहुधा निर्झर दाखवितात. त्या निर्झरावर हेलावणारे तरंग, ही प्रेमिकांच्या मानसिक आंदोलनांची प्रतीके समजायची. वृक्षाला बिलगणाऱ्या वेली, पक्षियुग्म, फुलांची पखरण, ही प्रतीकेही शृगारभावनेच्या परिपोषासाठी वापरलेली आहेत.

१८ व्या शतकाचा उत्तरार्ध व १९ व्या शतकाचा पूर्वार्ध या १०० वर्षाच्या काळात कांगडापद्धतीचा उत्कर्ष झाला. गुलेर येथे प्रथम ती वाढली व तिथून कांगडामध्ये आली. असे सांगतात, की बसोलीचे कित्येक निपुण चित्रकार मोगली दरबारातून गुलेर येथे राहायला गेले होते. कागडा शैलीच्या सुरवातीच्या चित्रांवर बसोलीकलमाची छाप दिसते, याचे कारण हेच असावे. गुलेरचे संस्थापकच पुढे तिथून कांगडा येथे आले व त्यानी त्या ठिकाणी नव्या राज्याचा पाया घातला.

एक विलक्षण योगायोग असा, की कांगडाचे राजे वंशपरंपरेने

कलाप्रेमी असेच निर्माण झाले आणि त्यांच्या आश्रयामुळेच कागडा हे कलाकेंद्र बनले.

कांगडाचा शेवटचा राजा संसारचंद हा होय. १७७४ ते १८२३ एवढी त्याची कारकीर्द झाली. कांगडाशैलीला पराकोटीला पोचविण्याचे श्रेय या ससारचंदालाच आहे. तो चित्रविद्यानिपुण होता. लढाईवरून परत आल्यावर पुन्हा लढाईवर जाईपर्यंतचा काळ तो ललितकलांच्या आस्वादात घालवीत असे. त्याचा दरबार चित्रांनी भरलेला असे. कित्येक चित्रकार रोज आपापली चित्रे घेऊन त्याच्याकडे येत व तो त्यांचे परीक्षण करून त्या कलाकारांना योग्य मार्गदर्शनही करी. त्यामुळे संसारचंदाजवळ चित्रांचा एक मोठा खजिनाच निर्माण झाला.



राधेचे प्रसाधन

संसारचंदाचे भव्य प्रासाद, मनोहर उद्याने, त्यांमागच्या ठेंगण्या टेकड्या, त्यांतून वळणावळणांनी वाहणारी बियास नदी आणि दूर दिसणारी हिमाचलाची बर्फाच्छादित शिखरे, अशा प्रकारची पार्श्वभूमी कांगडाशैलीच्या चित्रांना मिळालेली आहे. ही चित्रशैली प्रामुख्याने वस्तुनिष्ठ आहे. मोगल शैलीचे आणि क्वचित पाश्चात्य शैलीचेही ठसे तिच्यावर स्पष्ट दिसतात. मशालीच्या आणि भुसनळ्याच्या प्रकाशात वस्तूंच्या सावल्या लांबच लाब दाखवून अंधाराचे स्वरूप व्यक्त करण्याचा प्रयत्न काही चित्रात दिसतो. नाजूक आणि नखरेबाज अशी नारीची आकृती रेखाटण्यात तर कागडाशैलीचा हातखंडा आहे.

कागडा येथील चित्रकारानी चित्रांखाली आपली नावे दिलेली नाहीत. त्यामुळे कोणते चित्र कोणत्या कलाकाराचे ते कळायला मार्ग नाही. पण त्या प्रदेशात परंपरागत चालत आलेल्या दंतकथावरून कळते, की कुशानलाल, बसिया, फत्तू आणि पुरखू असे चौघे जण ससारचंदाच्या दरबारातले प्रमुख चित्रकार होते. या सर्वांत पुरखू हा श्रेष्ठ होता. त्याच्या चित्रांत हाताची सफाई आणि कोमलता यांचे अद्‌भुत दर्शन घडते, असे बेडन पॉवेलने लिहून ठेवले आहे. या चित्रशैलीबद्दल जे. सी. फ्रेंच हा कलासमीक्षक लिहितो—

" १८ व्या शतकात कांगडाचित्रकारांच्या कुंचलीने उषःकाल आणि इंद्रधनुष्य यांच्या रंगांचे सुंदर प्रदर्शन केले आहे. त्यांनी चितारलेल्या पुरुषाच्या मुखाकृतीवर वीरता ओसंडून दिसते आणि स्त्रीच्या मुखमुद्रेवर सविनय सौंदर्य प्रतीत होते. ही चित्रे पाहून असे वाटते, की आपण कोणत्यातरी जादूच्या नगरीत येऊन पडलो आहो. "

भारतातल्या कित्येक वर्तमान चित्रशैलींवर कांगडा कलमाचा मोठाच प्रभाव आहे. आधुनिक चित्रकारांचा असा प्रयत्न आहे, की कांगडाशैलीतले रेखा, रंग आणि भाव आपल्या चित्रांत यावे. कित्येक चित्रकाराना या कामी यशही मिळालेले दिसते. त्यांपैकी श्री. अवनींद्रनाथ ठाकूर हे प्रमुख होत.

कृष्णलीला, अष्टनायिका, त्यांचे मुग्धा, प्रौढादी भेद, नलदमयंतीसारख्या प्राचीन प्रणयकथा अथवा हमीर-हाटा-सारखी अर्वाचीन कथानके, हे कांगडाशैलीचे प्रमुख चित्रविषय ठरले आहेत. [ कां. चि. – सु. गो ; म. सं. चं. ]

## कांगडी गुरुकुल

गंगेच्या पूर्व किनाऱ्यावर, हरिद्वारपासून जवळच वसलेले एक लहान गाव. चालू शतकाच्या प्रारंभी इथे महात्मा मुशीराम म्हणजे स्वामी श्रद्धानद यांनी एका गुरुकुलाची स्थापना केली म्हणून या गावाला विशेष महत्त्व प्राप्त झाले आहे. त्या वेळी भारतात दोन प्रकारच्या शिक्षणपद्धती प्रचलित होत्या. संस्कृत, व्याकरण, दर्शने, इ. विषयांचे शिक्षण देणाऱ्या पाठशाळांची प्राचीन पद्धती आणि ब्रिटिश सरकारच्या शासनव्यवस्थेसाठी कारकून व अधिकारी तयार करणारी इंग्रजी, गणित, इतिहास, भूगोल व आधुनिक शास्त्रे शिकविणारी मेकॉलेप्रणीत नवीन शिक्षणपद्धती. भारताच्या सर्वांगीण विकासाच्या दृष्टीने या दोन्ही पद्धती अपूर्ण

होत्या. प्राचीन विद्येप्रमाणेच पाश्चात्य ज्ञानाचीही भारतीय लोकांना आवश्यकता होती. म्हणून वरील दोन्ही पद्धतींचा समन्वय करून एक नवीन राष्ट्रीय शिक्षणपद्धती सुरू करण्याऱ्या हेतूने महात्मा मुंशीराम यांनी हे गुरुकुल स्थापले.

महात्मा मुंशीरामांना या कार्याची प्रेरणा आर्यसमाजाचे प्रवर्तक स्वामी दयानंद याच्याकडून मिळाली आणि त्यांनी हे कार्य आर्यसमाजाच्या आधारानेच सुरू केले. इ. स. १९०० च्या मे महिन्यात पंजाबमधील गुजराणवाला येथे ३४ विद्यार्थ्यांची पाठशाळा सुरू करून हे गुरुकुल स्थापण्यात आले खरे; पण मुंशीराम यांना ते स्थान गुरुकुलासाठी योग्य वाटले नाही. प्राचीन गुरुकुलांप्रमाणे एखाद्या पर्वताचा आधार लाभलेले व नदीच्या किनाऱ्यावर असलेले एखादे रमणीय स्थान त्यांना हवे होते. नजीबाबादचे रईस मुंशी अमनसिंह यानी आपले कागडी हे गाव मुंशीराम यांना या कार्यासाठी देऊन मुंशीरामाची ती अपेक्षा पूर्ण केली. लगेच तिथल्या जंगलातील काही भूमी साफ करून व तिथे झोपड्या बांधून १९०२ च्या मार्च महिन्यात गुजराणवाला येथील गुरुकुल तिथे नेण्यात आले.

पंजाबी जनतेचे औदार्य व सहकार्य लाभल्यामुळे या गुरुकुलाचा वेगाने विकास झाला. इ. स. १९०७ मध्ये त्याचा महाविद्यालयविभाग सुरू झाला आणि १९१२ साली कागडी गुरुकुलातील शिक्षण संपवून बाहेर पडलेल्या विद्यार्थ्यांचा पदवीदानसमारंभ साजरा करण्यात आला. हे गुरुकुल सरकारकडून कसलेही साहाय्य न घेता सर्वथा स्वतंत्रपणे चालत असल्यामुळे ही एक राजद्रोही संस्था आहे, असा त्या काळी इंग्रज सरकारचा गैरसमज झाला होता. पण तो लवकरच दूर झाला. इ. स.१९२३ च्या सुमारास गुरुकुलाचा विस्तार होऊन वेद, आयुर्वेद, कृषी व कला या विषयांची महाविद्यालये तिथे स्थापन करण्यात आली.

१९२४ साली या गुरुकुलावर एक भीषण दैवी आपत्ती कोसळली. गंगा नदीला भयंकर पूर येऊन तिच्या काठी असलेल्या गुरुकुलाच्या इमारती उद्ध्वस्त झाल्या. त्यानंतर १९३० मध्ये गंगेच्या पश्चिम किनाऱ्यावर सध्याच्या जागी गुरुकुलाची नव्याने उभारणी केली गेली.

कागडी गुरुकुलातील शिक्षणपद्धतीची वैशिष्ट्ये पुढीलप्रमाणे आहेत—

सर्व विद्यार्थी गुरूजवळ, त्याच्या कुटुंबाचे घटक म्हणून राहतात. ब्रह्मचर्य पाळून स्वाध्याय करतात. त्यांचे चारित्र्य आणि शारीरिक, मानसिक व बौद्धिक विकास यांकडे लक्ष दिले जाते. त्यांना संस्कृत भाषेचे अध्ययन आवश्यक ठरविलेले आहे. शिक्षणाचे माध्यम हिंदी आहे. वेदविद्या, दर्शने याप्रमाणेच आधुनिक पाश्चात्य शास्त्रे व भाषा यांचेही शिक्षण इथे दिले जाते. राष्ट्रीय भावनेची जोपासना करणे, हा या गुरुकुलाचा मुख्य उद्देश आहे.

या गुरुकुलातील विद्यालयात ८ ते १० वयाच्या मुलांना प्रवेश मिळतो आणि १० वर्षांच्या शिक्षणक्रमात त्यांना प्राचीन व अर्वाचीन सर्व विषयांचे ज्ञान दिले जाते. त्यानंतर महाविद्यालयातील शिक्षणक्रम चार वर्षांचा असून त्यात उत्तीर्ण होणाऱ्यांना वेदालंकार, विद्यालंकार, आयुर्वेदालंकार, इ. पदव्या दिल्या जातात. यापुढे आणखी दोन वर्षांच्या अभ्यासानंतर वाचस्पती ही पदवी मिळवता येते. विशिष्ट विषयातील संशोधन करणाऱ्याला विद्यामार्तंड ही पदवी दिली जाते. विद्वानांचा सन्मान करण्यासाठी त्यांनाही समारंभपूर्वक ही पदवी देतात.

गुरुकुलाच्या शासनव्यवस्थेत उपकुलपती हा सर्वश्रेष्ठ अधिकारी असून महाविद्यालयांचे प्रधानाचार्य हे त्याच्या आदेशाप्रमाणे कामे करतात. या गुरुकुलात एक उद्योगविभागही आहे. त्यातील मुख्य उद्योग म्हणजे आयुर्वेदीय औषधे शास्त्रोक्त पद्धतीने तयार करणे हा होय.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर या गुरुकुलाच्या पदव्यांना सरकारी मान्यता मिळाली आहे. [ हि. वि. को. ]

**कांचनकुंडली** एक तांत्रिक सिद्धयुपाय. शेणाची मूर्ती करून वर्षभर कांचनकुंडली या नावाने तिची पूजा करतात.

**ॐ लोलजिह्वे अट्टाट्टहासिनि सुमुखि कांचनकुंडलिनि खेचक्षे हुं ।**

हा या देवीचा मंत्र होय. त्याचा यथाविधी जप करतात. वर्षभर अशी आराधना केल्याने देवी संतुष्ट होऊन साधकाला वश होते. हा जपविधी तिवाठ्यावरच्या वडाच्या बुध्याशी बसून कोणाच्या नकळत करायचा असतो. [ ध. तं. शि. ]

**कांचनगौरीव्रत** भाद्र० शु. ३ येस गौरीची पूजा करणे हा याचा विधी आहे.

**कांचनपुर** हिमालयाच्या शिखरावरील एक नगर. या ठिकाणी विद्याधर लोक राहत, असे कथासरित्सागरावरून कळते.

**कांचनपुरीव्रत** एक काम्य व्रत. व्रततिथी शु. ३ या, कृष्ण ११ शी, ८ मी, पूर्णिमा, अमावास्या व संक्रांती, या होत. या दिवशी सुवर्णाची नगरी बनवून तिच्यात

विष्णुलक्ष्मीच्या मूर्ती स्थापाव्या व त्या नगरीचे दान करावं, असे सांगितले आहे. फल– सर्व वस्तूंचा लाभ व सर्व पापांपासून मुक्तता. [ हि. ध. ]

**कांची** (१) अयोध्या, मथुरा, इ. सप्तपुरींपैकी एक पुरी. हे ठिकाण मद्रासच्या नैर्ऋत्येला सुमारे ४५ मैल दूर असलेल्या चिंगलपेट जिल्ह्यात आहे. द. भारतातील हे अत्यंत प्राचीन नगर असून शैव व वैष्णव या दोघांनाही ते सारखेच पवित्र वाटते. शहराचे शिवकांची किंवा मोठी कांची व विष्णुकांची किंवा छोटी कांची असे दोन भाग आहेत. कांचीला कच्ची, कच्चीपेडु किंवा कांचीपुरम् अशीही नावे आहेत. इथे बौद्ध व जैन यांचीही अनेक मंदिरे व मठ होते. इथे मिळालेले लेख व शिलालेख यावरून द. भारताच्या इतिहासावर बराच प्रकाश पडतो.



कैलासनाथ मंदिर – कांची

युआन च्वांग हा चिनी यात्रेकरू लिहितो, की भगवान् बुद्ध इथे आला होता व त्याने इथे धर्मप्रवचनही केले होते. अशोकाने इथे अनेक स्तूप उभारले होते. युआन च्वांगच्या वेळी इथे शंभर संघाराम व दहा हजार महायानपंथी भिक्षू होते. पुढे द. भारतात शैव–वैष्णव पंथांचा प्रसार झाल्यानंतर इथले जैन व बौद्ध धर्माचे वर्चस्व हळहळू कमी झाले.

शिवकांचीतले प्रसिद्ध मंदिर कामाक्षीचे. हिची स्थापना शंकराचार्यांनी केली. तिच्यामुळे कांची हे एक शक्तिपीठ बनले. इथे तांत्रिकांचा फार मोठा अड्डा होता. शंकराचार्यांनी त्या तांत्रिकांना इथून हाकलून कामाक्षीची वेदोक्त पद्धतीने पूजा सुरू केली. देवीच्या समोर त्यांनी श्रीचक्राचीही प्रतिष्ठापना केली. कामाक्षी व शंकराचार्य यांच्यासंबंधी एक आख्यायिका सांगतात, ती अशी–

कामाक्षी ही वायुरूपिणी रुद्रशक्ती होय. ती रोज रात्रौ कराल रूप घेऊन नगरसंचाराला निघे. ती ज्याच्या नजरेस पडे, तो तिथेच गतप्राण होई. नुसत्या तिच्या छायेने बायकामुले अर्धमेली होत. त्यामुळे नगरजन भयभीत झाले. कांची ओस पडण्याची वेळ आली. हे वर्तमान शंकराचार्यांना समजले. मग त्यांनी कामाक्षीचे करुणस्तोत्र केले. देवी त्यांना ' वर माग ' म्हणाली. आचार्यांनी वर मागितला, की ' हे देवी, या उप्पर तू माझ्या आज्ञेवाचून मंदिरातून बाहेर पडता कामा नये. ' कामाक्षीने ' तथास्तु ' म्हटले. तिचा संचार बंद झाला व त्यामुळे होणारा उपद्रवही शमला.

हे शंकराचार्यांचे उपकार आजही तिथले लोक स्मरतात. वार्षिकोत्सवाच्या वेळी जेव्हा तिची नगरात मिरवणूक निघायची असते, तेव्हा मंदिराचे महाजन तिची पालखी तिथल्या शंकराचार्यांच्या मूर्तीपुढे उभी करून देवीच्या नगरसंचाराविषयी त्यांची अनुज्ञा घेतात.

कांचीतल्या अनेक मंदिरात एकांबरनाथाचे मंदिर विशेष प्रसिद्ध आहे. हे लिंग पृथ्वीतत्त्वाचे प्रतिनिधी समजतात. ब्रह्मांडपुराणात एकांबरनाथाविषयी पुढील कथा आहे –

एकदा सारीपाट खेळतांना शिव-पार्वतीचे भांडण झाले. त्यात ती शिवाला काही तरी लागट बोलली. शिवाने क्रुद्ध होऊन तिला शापले, की ' तुझे सुंदर रूपडे काळे-कुरूप होईल.' शाप देऊन शिव तिला टाकून निघूनही गेला. त्यामुळे पार्वती भयविव्हल झाली. फिरत फिरत कांचीला आली. तिथे एक आम्रवृक्ष पाहून त्याखाली तपश्चर्येला बसली. शिवालाही मग आपल्या रागावण्याचा पश्चात्ताप झाला. पण प्रसन्न होण्याच्या आधी त्याने उमेची सत्त्वपरीक्षा पाहायचे ठरविले. त्याने आपल्या जटेतली गंगा कांचीवर लोटून दिली. तात्काळ तिथे महापूर आला. पार्वती पुराच्या वेढ्यात सापडली. तिच्या उपासनेचे शिवलिंगही बुडण्याच्या बेतात आले. पण पार्वती ते हृदयाशी घट्ट कवटाळून त्याच्या रक्षणाला सिद्ध झाली. शिव तेवढ्यानेच प्रसन्न झाला. दुसऱ्याच क्षणी पूर ओसरला. शिव-पार्वती एकमेकांना भेटली. मग तिथे समस्त शिवभक्त जमले. त्यांनी शिवाची प्रार्थना केली, की ' तू या ठिकाणी आम्रवृक्षाच्या छायेत कायमचे वास्तव्य कर. ' शिवाने ठीक म्हटले व तो तिथे एकांबरनाथ या नावाने राहिला.

एकांबरनाथाचे मंदिर विशाल असून त्याला दोन प्राकार आहेत. प्राकारात अनेक तीर्थे व दैवते आहेत. महाद्वारावरचे गोपुर १८८ फूट उंच असून त्याला दहा मजले आहेत. सभामंडप हजार खांबांचा आहे. इथे लिंगाला जलाभिषेक होत नसून फक्त परिमलद्रव्यांचा लेप लावला जातो. वार्षिक रथोत्सव मोठ्या थाटाने होतो.

कांचीत १८ विष्णुस्थळे, १०८ शिवस्थळे व १००० गणेशस्थळे असल्याचे सांगतात. विष्णुकांचीत अनेक प्राचीन वैष्णव

मंदिरे आहेत. या सर्वांत वरदराजाचे मंदिर प्रमुख आहे. हे एका टेकडीवर असून त्याच्या भिंतींवर पुष्कळ लेख खोदलेले



एकांबरेश्वर मदिर – मदिर

आहेत. विजयनगरचे वैष्णव राजे या देवाचे उपासक असून तेच या मंदिराची व्यवस्थाही पाहत असत.

इथल्या वैकुंठपेरुमल मंदिराच्या चारी बाजूंच्या भिंतीवर पल्लवराजा नंदिवर्मन् याच्या वेळच्या ऐतिहासिक घटना क्रमवार चित्रित केल्या आहेत. विष्णुकांचीला ब्रह्मदेवाचे तपः-स्थान मानतात. रामानुजाचार्यांच्या तत्त्वज्ञानाचे उगमस्थानही हेच होय.

इथले कैलासनाथाचे मंदिर पल्लव राजांनी इ. स. ६७४ मध्ये बांधले आहे. याशिवाय इथे जैन व बौद्ध याचीही मंदिरे आहेत. पिल्लापलैथम् हे इथले अत्यंत प्राचीन जैन मदिर असून त्यातील कोरीव काम, चित्रकला व एकूण मदिरशिल्प प्रेक्षणीय आहे. चोळराजांनी आपल्या समृद्धीच्या काळात हे बांधले आहे.

पद्मपुराण, देवीभागवत, इ. अनेक पुराणांतून काचीचे उल्लेख येतात. काशी–कांची हे शिवाचे दोन नेत्र होत, असे ब्रह्मांड-पुराणात म्हटले आहे. कांची ही पल्लवांची राजधानी होती. शिवाय ते एक मोठे विद्यापीठही होते. **पाहा**– कांची विद्यापीठ [ भारती डिसेबर १९५९; कल्याण–तीर्थांक ]

(२) केतुमाल खंडातील एक नदी. [ पु. इं. ]

**कांची विद्यापीठ** (सनपूर्व २ रे शतक ते इ. स. १३ वे शतक). मोक्षदायक पुरी म्हणून कांची जशी प्रसिद्ध आहे, त्याप्रमाणे एक विद्याक्षेत्र म्हणूनही दोन हजार वर्षांपासून कांचीची ख्याती आहे. उत्तरेला जशी काशी तशी दक्षिणेला कांची होय. सनपूर्व १ ल्या शतकापासून बौद्धांचे व जैनाचेही हे दक्षिणेतील एक केंद्र होते.

दक्षिणेत जैन व बौद्ध या धर्माचा प्रसार होण्यापूर्वी इथे वेदविद्येच्या पाठशाळा होत्या. इथल्या या पाठशाळांना घटिका असे म्हणत असत. घटिकांसंबंधी अगदी प्राचीन उल्लेख काकुत्स्थवर्म्याच्या तालगुंड स्तंभावरील लेखात आढळतो. कदंब कुळाच्या भरभराटीला कारणीभूत झालेला मयूरशर्मा काची येथील घटिकेत वेदादी विषय शिकण्याकरिता गेला, असे त्यात म्हटले आहे. येथील घटिकांना पश्चिमेकडील क्षत्रपाचे आर्थिक साहाय्य होते. याशिवाय अनेक राजांकडूनही या घटिकांना जमिनी मिळाल्या होत्या व त्यावर कोणत्याही प्रकारचा कर आकारला जात नसे. पल्लवराजांचा कांची विद्यापीठाला फार मोठा आश्रय होता.

घटिकांत विद्वान आचार्य अध्यापनाचे कार्य करीत. वैदिक षड्दर्शने, चार्वाकादी नास्तिक दर्शने, बौद्ध व जैन तत्त्वज्ञान या सर्व विद्यांचे अध्ययन–अध्यापन इथे चाले.

कांची नगरात मोठमोठे आचार्य होऊन गेले. प्रसिद्ध बौद्ध-धर्माचार्य नागार्जुन हा कांची नगरीत राहिला होता. तमिळ देशात बौद्ध धर्माचा प्रचार त्यानेच केला. इथूनच तो नालंदा येथे गेला. दुसरा बौद्ध पडित बुद्धघोष हाही कांचीत राहिल्याचा उल्लेख आढळतो. न्यायभाष्यकर्ता वात्स्यायन हा कांचीतलाच प्रसिद्ध पंडित होता. नालंदाच्या कीर्तीत भर घालणारा प्रसिद्ध बौद्ध पडित धर्मपाल हाही कांचीचाच होय. एका वेळी हा नालंदाचा अध्यक्ष होता. बौद्ध तार्किक दिङ्नागही कांचीलाच राहिलेला होता.

काची ही तोंडैमंडलम्ची राजधानी होती. द. भारतातील त्रेसष्ट शैव संतांपैकी सहा संत तोंडैमंडलम्चे होते. त्याचप्रमाणे पोयीगई आळवार, पेई आळवार, इ. वैष्णव सत व तिरुमलिसइ, तिरुमंगइ इ. प्रसिद्ध गायक संत हेही काचीचेच रहिवासी होते. आळवार संतांनी व संस्कृत पडितांनी या ठिकाणी निर्मिलेले तमिळ व संस्कृत ग्रंथ आजही उपलब्ध आहेत. अशा अनेक विद्वानांच्या व संतांच्या वास्तव्यामुळे या विद्यापीठाची अविच्छिन्न भरभराट झाली. [ प्रा. भा. वि.; भारती ]

**कांचुलिया** एक संप्रदाय. हे नाव सं. कचुली (काचोळी) यापासून बनले आहे. द. भारतातले हे लोक वाममार्गी शाक्तांपैकी होते. याचा घटकंचुकी नामक एक समारंभ असे. यात स्त्री–पुरुष समान संख्येने भाग घेत. समारंभाच्या जागी एक घट ठेवीत. जमलेल्या सर्व स्त्रिया आपल्या

चोळ्या काढून त्या घटात टाकीत. मग मद्यमांसाचे सेवन होई. त्यानंतर प्रत्येक पुरुष त्या घटातील हाताला येईल ती चोळी उचली. ती चोळी ज्या स्त्रीची असेल, ती स्त्री त्या रात्री त्या पुरुषाबरोबर रममाण होई.

हे वर्णन जुन्या काळचे आहे. अलीकडे हे प्रकार बंद पडले आहेत. [ म. ज्ञा: को. ]

**कांजीअन्ल** ओडिसातील एक व्रत. हे मार्ग. शु. ९ मीच्या दिवशी घरातल्या सर्वांत मोठ्या स्त्रीने करायचे असते. ती सात वाळलेले मासे पिवळ्या फडक्यात घेते व त्याच्यामध्ये षष्ठीची प्रतिमा ठेवून तिची पूजा व उपवास करते. [ स्ट. ओ. फो. लो. ]

**कांजीबारस व्रत** एक जैन व्रत. भाद्र. शु १२ शीस उपवास. नमस्कार – मंत्राचा त्रिकाल जप. १२ वर्षानंतर उद्यापन. [ जै. व्र. वि. सं. ]

**कांठायन द्विज** कंठाचा पुत्र जो मेधातिथी, त्याच्यापासून ब्राह्मणाचा एक निराळा वर्ग उत्पन्न झाला. या वर्गाला काठायन द्विज असे म्हणू लागले. [ पु. इं. ]

**कांडप्लव** वृक्षाचे खोड पोखरून तयार केलेली छोटी नाव. 'तरति' या क्रियापदाच्या उदाहरणात काशिकाकाराने कांडप्लवाचा उल्लेख केला आहे (अष्टा० ४. ४–५)·

**कांडवीणा** वैदिक कालातील एक वाद्य. हे बोरूपासून बनवीत महाव्रत समारंभाच्या वेळी याचा उपयोग करीत असत. [ का. सं. ३४.५; लाटचा. श्रौ. सू. ४. २. ६ ]

**कांडानुसमय** यज्ञप्रयोगात यज्ञीय देवता व वस्तू यावर अनेक संस्कार करावे लागतात. उदा. एकादशिन पशुयागात अंजनापासून परिव्यानापर्यंत अनेक संस्कार यूपावर करायचे असतात. या संस्कारांच्या दोन पद्धती आहेत. अंजनापासूनचे सर्व संस्कार प्रथम एका यूपावर करून मग तसेच ते दुसऱ्या यूपावर करणे, ही पहिली पद्धत होय. अंजन हा संस्कार प्रथम सर्व यूपावर करणे व त्यानतरचे सर्व संस्कार प्रत्येक यूपावर करीत जाणे, ही दुसरी पद्धत होय. यातील पहिल्या पद्धतीला कांडानुसमय असे म्हणतात. देवपूजेतही गंधादी उपचार प्रथम एका देवतेला समर्पून नंतर ते तसेच दुसऱ्या देवतेस सर्मापणे, यालाही कांडानुसमयच म्हणतात. [ हि. ध.; सं. कौ. ]

**कांडू** उ. भारतातील भडभुंजे, हलवाई यांची एक जात. याच्यांत अनेक पोटजाती आहेत. प्रत्येक पोटजातीत आणखी निरनिराळे वर्ग किंवा कुरी असतात. एका पोटजातीत लग्ने होतात; पण एका कुरीत मात्र होत नाहीत. वराने वधूच्या भागात शेंदूर भरणे हा लग्नातला मुख्य विधी असतो. काडू लोकांपैकी काही शाक्त, काही वैष्णव, काही रामानंदी तर काही कबीरपंथी आहेत.

मैथिली व त्रिहुतिया हे ब्राह्मण यांचे पौरोहित्य करतात. हे लोक गोराया बंदी माई, कगाली साहू, सखा शिवनाथ, राम ठाकूर व पचपीर यांना भजतात. [ से. इं. १९५१; म. ज्ञा. को. ]

**कांतारदीपदान** यज्ञात ज्या वृक्षाचा उपयोग करतात, त्या वृक्षाच्या स्तंभावर आश्विन पूर्णिमेपासून कार्तिक पूर्णिमेपर्यंत किंवा आश्विन पूर्णिमा, आश्विन अमावास्या व कार्तिक पूर्णिमा या तीन रात्री किंवा फक्त कार्तिक पूर्णिमेस धर्म, रुद्र व दामोदर या देवताना उद्देशून आठ दिवे लावावे, असे सांगितले आहे (कृत्यरत्न). हे कृत्य पितरांच्या उद्धारासाठी करायचे असते.

**कांतारी** लाकडी कातकाम करणारी एक जात. याची वस्ती मुख्यत्वे गुजरात–काठेवाड मध्ये आहे. यांच्यातील बाटून मुसलमान झालेल्या कांताऱ्यांस खराडी म्हणतात. हे हनफी पंथाचे आहेत. [ सु. वि. को. ]

**कांतिव्रत** ( १ ) एक काम्य व्रत. कार्तिक शु. २ येस प्रारंभ. व्रतावधी एक वर्ष. बलराम, केशव व चद्रकोर याची पूजा. कार्तिकापासून ८ महिने तिलहोम व आषाढापासून ४ महिने घृतहोम. वर्षाच्या शेवटी चंद्राच्या रौप्यप्रतिमेचे दान. फल– कांतिप्राप्ती. [ हे. व्र. ]

( २ ) वैशाख महिन्यात प्रारंभ. त्या महिन्यात व्रतकर्त्याने मीठ वर्ज्य करायचे असते. व्रतावधी एक वर्ष. फल– एक कल्पपर्यंत विष्णुपदाजवळ वास; तसेच कांती आणि कीर्ती यांचा लाभ. [ मत्स्य पु. १००. ४५. ]

**कांदा** उग्र वासाचा एक कंद. धर्मशास्त्रात कांदा निषिद्ध मानला असून तो खाल्ल्यास पुनरुपनयन करावे, निदान चातुर्मास्यात तरी कांदा वर्ज्य करावा, असे सांगितले आहे. सोवळ्याने कांद्याला शिवत नाहीत. धार्मिक कार्यात

कांद्याचा संबंध आणीत नाहीत. अपवाद फक्त चंपाषष्ठीचा. त्या दिवशी खंडोबाच्या महानैवेद्यात कांद्याचे पदार्थ असावेच लागतात. कारण खंडोबाला कांदा ही वस्तू प्रिय आहे अशी समजूत आहे. चंपाषष्ठीला कांद्याचा नैवेद्य दाखवून जे कांदे खायाला सुरवात करतात, त्यांना त्याचा दोष लागत नाही, असे जेजुरीमाहात्म्यात म्हटले आहे.

**कांद्रा** ओडिसातील एक जात. मच्छीमारी हा या लोकाचा मुख्य व्यवसाय आहे. याशिवाय वरातीत दिवे वाहून नेणे, मजुरी करणे व चौकीदार होणे, ही कामेही ते करतात. पतित ब्राह्मण यांचे पौरोहित्य करतात. हे वैष्णव असून ग्रामदेवतानाही भजतात. [ ट्रा. का. बें. ]

**कांध** एक जात. बंगालमध्ये गोंडवनापासून ते समुद्रकिनाऱ्या-पर्यंत यांची वस्ती आहे. तसेच दक्षिणेकडे बस्तरपर्यंत ते पसरलेले आहेत. कांध या शब्दाच्या व्युत्पत्तीबद्दल मतभेद आहेत. कांद म्हणजे डोंगर या शब्दावरून काहीजण कांध शब्द व्युत्पादितात, तर काही कांद्र म्हणजे बाण या शब्दा-वरून त्याची व्युत्पत्ती लावतात.

कांध लोक शरीराने सुदृढ व वर्णाने काळे असतात. या जातीत वर्णसंकर झाला असण्याची शक्यता आहे. कारण पूर्वी यांच्यामध्ये आपल्या मुलींना ठार मारायची व परजातीतल्या स्त्रिया बायका म्हणून विकत घेण्याची चाल होती.

शेती हा या लोकांचा मुख्य व्यवसाय आहे. बडा व तारी हे यांचे दोन पंथ आहेत. बडा देवाला भजणारे ते बडा व तारी देवीचे उपासक ते तारी होत. या दोन्ही देवाना हे पूर्वी नर-बली देत असत, असे म्हणतात. त्यासाठी ते परजातीतली माणसे विकत घेत. पान किंवा पनवा हे लोक या कांधांना बळीसाठी माणसे विकत घेऊन किंवा पकडून पुरवीत असत असेही उल्लेख आहेत.

कांध लोकांच्या बेटिया, बेणिया व मालिया अशा तीन पोटजाती आहेत. बेटिया शेतमजुरी करतात. बेणिया खडाने शेती करतात, तर मालियांची स्वतःच्या मालकीची जमीन असते.

प्रत्येक खेड्यात एक जाणता वृद्ध मनुष्य असतो. त्याला अब्बाये असे म्हणतात. अनेक खेड्यांचा मिळून एक गट बनतो, त्यावरही आणखी एक अब्बाये असतोच. याशिवाय जातीच्या मूळ पुरुषाच्या वंशातीलही एक अब्बाये असतो. जातीत कोणी सगोत्र विवाह करीत नाही ना, हे पाहणे हे अब्बायेचे मुख्य काम. सर्व अब्बायेंची मिळून एक महासभा असते. आवश्यकते-नुसार ही बोलावली जाते. सभेत मालमत्तेसंबधीच्या व इतर गुन्ह्यांची चौकशी होते. खून व गंभीर दुखापत हे गुन्हे खासगी समजण्यात येऊन त्याबद्दलची शिक्षा नुकसानभरपाईच्या स्वरूपाची असते.



कांध वधू

वयात आलेल्या मुलामुलीसाठी प्रत्येक खेड्यात वेगवेगळी सामुदायिक शय्यागृहे असतात. वयात आल्यावरच मुलामुलीची लग्ने होतात. तरुण प्रेमिकांनी स्वतः ठरवलेल्या विवाहाला आईबापांनी संमती न दिल्यास ती दोघे पळून जातात. मूल जन्मल्यावर सातव्या दिवशी त्याचे बारसे करतात.

कांध लोक नृत्याचे फार शोकीन आहेत. स्त्रियाही नृत्यात भाग घेतात. पुरुषाचे एक संग्रामनृत्य असते, ते मोठे जोर-कस असते.

हे लोक प्रेते जाळतात. दहाव्या दिवशी श्राद्ध करतात. चितेजवळ एक झेंडा उभारतात व मृताचे नातेवाईक त्याच्या-भोवती नृत्य करतात. दहा दिवसपर्यंत अधूनमधून हे नृत्य चालते.

कांध लोकाना खोंड असेही म्हणतात. [ इ. स्ट. पा. प्रे. ]

**कांपिल्य** एक प्राचीन नगर. याला कांपिल व कांपील अशीही नावे होती. उ. प्रदेशातील फरुकाबाद जिल्ह्यात फत्तेगडाच्या वायव्येला २८ मैलावर गंगाकिनाऱ्यावर

हे नगर आहे. वैदिक वाङ्मयात याच्याबद्दल अनेक उल्लेख आहेत. इंद्राच्या अमरावतीइतके हे नगर सुंदर होते, असे वर्णन रामायणात आहे (बाल. ३३.५.१९). कांपिल्य हे दक्षिण पांचालाचे राजधानीचे शहर असून महाभारतकाळी तिथे द्रुपद राजा राज्य करीत होता. द्रौपदीचे स्वयंवर याच नगरीत झाले. द्रुपदाचा राजवाडा व स्वयंवराचे स्थान अद्याप तिथे दाखविले जाते. कापिल नावाच्या ऋषीने हे नगर वसविले अशी पौराणिक आख्यायिका आहे.

कांपिल्य हे जैनांचेही तीर्थ आहे. तेरावा तीर्थंकर विमलनाथ याच्या आयुष्यातील गर्भ, जन्म, राज्यारोहण, दीक्षा व जिनत्व या पाच शुभ घटना याच नगरात घडल्या होत्या. गंगा नदीपासून कांपिल्य येथील राजवाड्यापर्यंत दोन उत्तम बोगदे खणलेले होते असे जातकात म्हटले आहे. मोठा बोगदा खणायला साठ हजार व लहान बोगदा खणायला सातशे माणसे लागली असे सांगतात. बोगद्याच्या आतल्या भागावर हरतऱ्हेची चित्रे काढलेली होती. एकूण हा बोगदा देवाच्या सभागृहासारखा दिसत होता, असे महाउम्मग्ग जातकात म्हटले आहे.

वराहमिहिराचा जन्म याच नगरात झाला, असे काहींचे मत आहे. अनेक मोठमोठ्या राजांनी या नगरीत राज्य केले.

जैन वाङ्मयात कांपिल्याची तुलना स्वर्गातील अमरावतीशी केली आहे. ऋषभदेव व बाहुबली या तीर्थंकरांनी या जगाचा त्याग केला, तेव्हा कांपिल्याचे राजे त्यांच्याबरोबर गेले अशा कथा आहेत.

हरिषेण राजाने इथे जैनांचा रथयात्रा-उत्सव मोठ्या थाटाने सुरू केला, तो अजूनही दरसाल चालू आहे. त्यासाठी आजूबाजूच्या मैनपुरी, फरुखाबाद व कैमगंज इ. ठिकाणचे जैन लोक आपापल्या गावचे रथ घेऊन तिथे जातात.

कांपिल्य नगराच्या जवळच सिद्धपीठ, कपिलकुटी, कालेश्वर मंदिर ही स्थाने आहेत. खुद्द कांपिल्य शहरात सांप्रत दोन जैन मंदिरे असून त्यांतल्या काही जिनमूर्तींच्या बैठकीवर शिलालेख कोरलेले आहेत. [ वै. सा.; हि. जॉ. ए. इं.; म. ज्ञा. को.; बी. सी. लॉ. को. व्हॉ. ]

**कांबडनाच** हे वारल्यांचे लोकनृत्य आहे. भाद्रपदात नवे भात तयार झाल्यावर ते खाण्यापूर्वी हे नृत्य करतात. भाताच्या रासीवर नारन् देवाची स्थापना करून पुरुष फेर धरून नाचतात. या नाचात स्त्रियांना स्थान नाही. त्या सभोवती बसतात व नाचातल्या गाण्याला शेव लावतात. नाचणारे पुरुष कित्येकदा पानाफुलांनी देह शृंगारून विशिष्ट सोंगेही आणतात. मग दुसरे पुरुष त्या सोंगांना प्रश्न विचारतात व त्याची चेष्टाही करतात. घरात आणि शेतात धान्यलक्ष्मीची समृद्धी व्हावी म्हणून हे नृत्य असते. या नृत्यातले एक गाणे जगलचे राजे या पुस्तकात दिले आहे ते असे—

**तांबडे मालाला ग मैना तांबडे मालालाऽऽऽ**
**वनींत भंवरा फिरं ग मैना वनींत भंवरा फिरंऽऽ**
**मुगलेरी बाय त चालं गं मैना मुगलेरी बाय तं चालं**
**डोकेपर नारन् वहं ग मैना डोकेवर नारन् वहंऽऽ**
**डोकेवर पावशा वहं ग मैना डोकेवर पावशा वहंऽऽ**
**वरल्या दांडीं गेल्या र मैना, वरल्या दांडी गेल्याऽऽ**

**कांस्यकला** तांबे आणि कथिल याच्यापासून बनविलेल्या मिश्र धातूला कांसे म्हणतात. या धातूच्या प्रागैतिहासिककालीन वस्तू जगातील भिन्न देशांत सापडल्या आहेत. मनुष्याने कांसे तयार करण्याची कला आत्मसात कशी केली, हे सांगणे कठीण आहे. अनुमान असे, की या धातूच्या करागिराचा एक संघ प्रागैतिहासिक काळातच तयार झाला व



प्राचीन इराणी कांस्यमूर्ती – (हिंदी विश्वकोशावरून)

ते लोक काशाच्या कुऱ्हाडी, चित्रे व दागिने बनवू लागले. वेणीतल्या आकड्यांचे त्या काळातले कांस्यनिर्मित नमुने हराप्पा, मोहेंजोदडो या ठिकाणी सापडले आहेत. कांश्याचा रस

करून त्याच्या मूर्ती ओतण्याची कलाही सिंधु-संस्कृतीतल्या लोकांनी प्राप्त करून घेतली होती. याचे उत्तम उदाहरण म्हणजे मोहेंजोदडो येथे सापडलेली नर्तकीची मूर्ती होय. हराप्पा येथे खेळातली एक गाडी, दौत, चक्र, काठीची मूठ, इ. अनेक वस्तू मिळाल्या आहेत. सनपूर्व दुसऱ्या शतकातला एक काश्याचा चित्ता नागदा येथे सापडला आहे. त्या काळात इराण-मध्येही कांस्यवस्तू व प्रतिमा निर्माण होत होत्या; पण त्या काळातली भारतीय कांस्यकला या सर्वात अधिक प्रगत होती.

सुलतानगंज येथे साडेसात फूट उंचीची बुद्धाची कांस्यमूर्ती मिळाली आहे, ती इ. स. च्या १ ल्या शतकातली आहे. तक्ष-शिला व नागार्जुनकोंडा येथेही पहिल्या दुसऱ्या शतकातील बुद्धाच्या कांस्यमूर्ती मिळाल्या आहेत. कोल्हापूर येथील उत्खननात ज्या कांस्यमूर्ती सापडल्या, त्या सातवाहनकाळातील (२ रे शतक) आणि अमरावती येथे ज्या बुद्धमूर्ती भग्नावस्थेत मिळाल्या त्या ३ ऱ्या शतकातील असाव्या. त्या काळी भव्य मूर्ती (ध्रुवदेव) करण्याची प्रथा होती. धातूचा रस ओतून अशा मूर्ती बनविणे अतिशय कठीण काम होते. भारतीय शिल्पकारांनी त्यात प्रावीण्य मिळविले होते, यात संशय नाही.

गुप्तकाळात कांस्यकलेचा चांगलाच उत्कर्ष झाला होता, असे दिसते. भागलपूर येथे माणसाच्या उंचीची बुद्धाची एक कांस्यमूर्ती सापडली, ती बर्मिंगहॅम येथील संग्रहालयात ठेवली आहे. ती मूर्ती गुप्तकालीन असून तिची कारागिरी मन स्तिमित करणारी आहे.

लुरिस्तानात मिळालेला एक गळचातला ताईत.
(सन पूर्व १०००)
( हिंदी विश्वकोशावरून )

कांस्यमूर्तिकलेचा सार्वत्रिक विकास सुरू झाला, तो इ. स. ६०० च्या सुमारास. त्यापूर्वी देवतांच्या भव्य मूर्ती बनवून त्यांची प्रस्थापना मंदिरात केली जात असे. पल्लव राजांनी देवताची मिरवणूक काढण्याची प्रथा सुरू केली व त्यासाठी धातूच्या लहान मूर्ती बनविण्यासही प्रारंभ केला. त्या मूर्ती साध्या व अगदी थोडचा अलंकारानी विभूषित आहेत. साधेपणा हे पल्लव-युगातील मूर्तिकलेचे वैशिष्टच होय.



नागदा येथे सापडलेली काश्याची प्राणिमूर्ती
( हिंदी विश्वकोशावरून )

चोळांच्या राजवटीत (इ. स. १० ते १३ वे शतक) या कलेचा अधिक विकास झाला. त्या काळातील कांस्यमूर्ती अतिशय सुरेख व सुबक दिसतात. त्याचे अलंकार विशेष सुंदर व



चोळकालीन नटराजाची कास्यमूर्ती

दर्शनीय असतात. त्या वेळच्या ज्या अनेक कांस्यमूर्ती आहेत, त्यातील नटराजाची मूर्ती अप्रतिम मानली जाते. राम, कृष्ण,

विष्णू, शिव इ. अनेक देवतांच्या, त्याचप्रमाणे संतांच्या व दात्याच्याही मूर्ती दक्षिणेतील कलाकारांनी घडविल्या आहेत. या सर्वांत शिव-पार्वती व मध्ये स्कंद हे परिवारशिल्प फारच सौंदर्यपूर्ण व आकर्षक आहे.

विजयनगरच्या साम्राज्यात कांस्यकलेला एक निराळेच वळण लागले. त्या काळातील मूर्तींचे रूप सांकेतिक पद्धतीचे व जरा अवास्तव वाटते. त्यात अलंकरणाचे प्रमाण अधिक असून ते मूर्तीच्या सुबकपणाला मारक ठरले आहे.

त्यानंतरच्या काळातील कांस्यमूर्तींना काहीच वैशिष्ट्य नाही. त्यात कृत्रिमता अधिक आढळते. त्यातील थोड्याच मूर्ती सुबक वा सुरेख दिसतात.

काशावर सुबक कोरीव काम करता येते. त्याचे सुदर अलकारही केले जातात. मात्र त्यासाठी ही धातू बनविताना त्यात जस्त किंवा अल्युमिनियम या धातूचा अंश मिसळतात. तांबे व अल्युमिनियम याच्या मिश्रणाने जे कांसे तयार होते, त्याचा रंग सोनेरी असून नक्षीकामासाठी व भूषणे बनविण्यासाठी ते फार उपयुक्त असते.

कासे ही पवित्र धातू मानलेली आहे. कास्यपात्राचे दानही विहित आहे. [ हि. वि. को.; भा. क. सिं., इ. ब्रॉ. ]

**कांस्यताल** यालाच कांसाळू असे म्हणतात. या कांश्याच्या तेरा अंगुळे वर्तुळाच्या दोन चकत्या असतात. त्या एकावर एक आपटून वाजवितात. हे घनवाद्यांपैकी असून मुख्यत्वे ताल धरण्यासाठी असते.

**कांस्यदान** कांस्य = कासे. जीवनात शांती प्राप्त व्हावी, म्हणून काश्याचे दान करावे, असे सागितले आहे. कासे या धातूत ब्रह्मा, विष्णू, शिव वास्तव्य करतात, असेही म्हटले आहे. [ दा. चं. ]

**कास्यपात्रदान** पापनाशासाठी व अर्धोदयपर्वाच्या वेळी हे दान करतात. याचा मंत्र असा–

**यानि पापान्यनेकानि कामाकामकृतानि च ।**
**कांस्यपात्रप्रदानेन तानि नश्यन्तु मे सदा ।।**

अर्थ– इच्छेने वा अनिच्छेने मजकडून झालेली अनेक पापे या कास्यपात्राच्या दानाने नष्ट होवोत. [ दा. चं. ]

**काकती** आंध्रातली एक देवता. दुर्गेचे एक स्वरूप. आंध्रात हिची मंदिरे सर्वत्र आढळतात. वरंगळचे काकतीय राजे तिचे उपासक होते. काकतम्माकथा नावाची एक गाथा आंध्रप्रदेशात प्रचलित आहे. या देवीलाच जैन लोक कूष्मांडिनी असे म्हणतात. पाहा– काकतीय राजवंश.

**काकतीय राजवंश** ( इ. स. ११५०– १३२५ ) महाराष्ट्राच्या इतिहासात १२ व १३ या शतकांत होऊन गेलेल्या यादव राजांचे जे महत्त्व, तेच महत्त्व आंध्रातल्या काकतीय राजांचे आहे. हे राजे काकती देवीचे उपासक होते, म्हणून या वंशाला काकतीय असे नाव मिळाले. आंध्रात स्वतंत्र राजे म्हणून काकतीयांचा उदय झाला, तो इ. स. ११५० च्या सुमारास. पूर्वेस वेंगीचे चालुक्य व पश्चिमेस कल्याणीचे चालुक्य यांची सत्ता हळूहळू झुगारून काकतीयांनी वरगळ येथे स्वतंत्र राज्य स्थापले. प्रथम या घराण्याच्या ताब्यात वरंगळ व त्याच्या आसपासचा प्रदेश एवढाच भाग होता; पण त्यांची सत्ता हळूहळू वाढत जाऊन १३ व्या शतकाच्या मध्यापर्यंत उत्तरेस विजगापट्टण, दक्षिणेस चेट्टूर, पूर्वेस समुद्र व पश्चिमेस गुलबर्गा एवढा विस्तीर्ण प्रदेश त्यांनी व्यापला.

काकतीयाच्या पूर्ववृत्तावद्दल बरेच वाद आहेत. ते राजे स्वतःला सूर्यवंशी समजत. गारुवपाडु नावाच्या अग्रहाराच्या दानपत्रात काकतीय राजे सूर्यवंशी असल्याचा उल्लेख आहे. सूर्यवंशातील करिकाळ चोळदेव हा दक्षिणेत काकतीयपुरात येऊन राहिला व त्याच्या कुळातील दुर्जय राजाच्या वंशजांनी काकती राजू असे नाव धारण केले, इतका विस्तृत उल्लेख त्या दानपत्रात आहे.

काकतीय या नावाचा पहिला उल्लेख मागल्लूच्या ताम्रपटात आढळतो. हा ताम्रपट ९४५ इ. स. चा आहे. तो गुडनार्य याने एका ब्राह्मणाला मांगल्लु हे गाव दान दिल्याबद्दलचा आहे. गुंडनार्य व काकतीय यांच्यात काही संबंध असणे शक्य आहे. गुंडनार्याला नतवाटी देशाचा सामंत म्हटले आहे. नतवाटी देशाचे मुख्य गाव वरंगळ जिल्ह्यातील मेडपल्ली हे होय. मांगल्लूच्या दानपत्रात गुंडनार्याच्या बापाचे नाव राष्ट्रकूट यर्रय्या असे दिलेले आहे. काकतीय राजे राष्ट्रकूट असावे, यासंबधात डॉ. आळतेकर पुढीलप्रमाणे लिहितात–

निरनिराळी रट्ट अथवा राष्ट्रकूट घराणी ही सम्राट अशोकाच्या काळात माडलिक म्हणून या भागात राज्य करणाऱ्या रथिक घराण्यापासून बनलेली आहेत. आंध्र देशात चालुक्य काळात राष्ट्रकूट हे नाव मोठमोठ्या जमीनदारांना लावीत. त्यावरून काकतीय राजे वरील अर्थाने राष्ट्रकूट असणे असंभवनीय नाही (राष्ट्रकूट आणि त्यांचा काळ). या सर्व

उल्लेखांचा विचार करून काकतीयाची वंशावळ खालीलप्रमाणे दाखविता येते—




बेतराज (पहिला) याचे राज्य कोरवी प्रदेशावर होते. नळगुदा जिल्ह्याचा काही भाग त्याच्या राज्यात होता. त्याचा पुत्र प्रोळराज (पहिला) याने चालुक्यांच्या वतीने अनेक राजांशी संग्राम करून विजय मिळविले व त्या कामगिरीबद्दल त्याला अनमकोंडविषय हा प्रदेश (हनमकोंडाच्या भोवतालचा भाग) बक्षीस मिळाला. त्याचा पुत्र बेतराज (दुसरा) यानेही चालुक्य विक्रमादित्य (सहावा) याच्या वतीने लढाया मारल्या व सब्बिनाडू हा प्रदेश बक्षीस मिळविला. त्याने अनमकोंड येथे आपली राजधानी स्थापली. त्याचा पुत्र प्रोळ (दुसरा) याने विक्रमादित्याच्या मृत्यूनंतर चालुक्याचे मांडलिकत्व झुगारून देऊन स्वातंत्र्य पुकारले. त्याचा पुत्र रुद्र (पहिला) याने त्याच्या राजवटीत सामतानी केलेली बडे मोडून काढून राज्याचा उत्तम बंदोबस्त केला. याशिवाय कर्नूल हा नवा भागही जिकून आपल्या राज्याला जोडला. याने आध्रात अनेक मदिरे बाधली. त्याचा भाऊ महादेव हा शिवाचा परमभक्त होता. त्याच्या मागून त्याचा पुत्र गणपती गादीवर बसला. हा महापराक्रमी निघाला. त्याने बहुतेक सगळा आंध्रदेश जिकून आपला राज्यविस्तार केला. त्याने कांची व नेल्लेर हे तमिळनाडमधले प्रदेशही जिकून घेतले. यानेच आपली राजधानी अनमकोंड येथून हालवून वरंगळ येथे आणली. त्याने परदेशी व्यापाऱ्यांवरील कर कमी करून व्यापाराला प्रोत्साहन दिले. मोटुपल्ली हे बंदर त्याच्याच काळी भरभराटीस आले. गणपतीनेही अनेक मंदिरे बांधली.

त्याची कन्या रुद्राबा ही त्याच्यानंतर गादीवर आली. मार्कोपोलो हा प्रवासी तिच्याच कारकीर्दीत इ. स. १२९३ साली मोटुपल्ली बंदरात उतरला होता. त्याने तिच्या शासनव्यवस्थेची प्रशंसा केली आहे. पण याच रुद्रांबाबर यादवराज महादेव याने चाल करून तिचा पराभव केला. त्यामुळे तिची सत्ता दुर्बळ झाली व अनेक सामंतानी स्वातंत्र्य पुकारले. रुद्राबेच्या नतर तिच्या मानलेल्या मुलीचा मुलगा प्रतापरुद्र हा गादीवर आला. हा पुरुष पराक्रमी होता. रुद्रांबेच्या वेळी आपल्या राज्यातून फुटलेले बरेच प्रदेश त्याने परत जिकून घेतले. पण पुढे उत्तरेकडून आलेल्या मुसलमानी आक्रमणापुढे त्याचा टिकाव लागला नाही. १३२६ मध्ये उलुघखान याने वरंगळवर स्वारी करून प्रतापरुद्राला कैद केले व अशा प्रकारे काकतीयाचे राज्य समाप्त झाले.

काकतीयांच्या काळात आंध्रातले जैन–बौद्धांचे वर्चस्व कमी होऊन वैदिक धर्माचे पुनरुज्जीवन झाले. उत्तर व मध्य आंध्रात शैवपंथ व दक्षिण आंध्रात रामानुजांचा वैष्णवपथ याचा उदय झाला. याच काळात लिगायत पंथानेही आध्रात बरीच प्रगती केली. काकतीयाच्या काळात आध्रामध्ये रेड्डी, वेलमा व कम्मा या तीन लढाऊ जातीचा उदय झाला.

काकतीय राजे व त्यांचे सरदार विद्या-कलाचे भोक्ते होते. त्यांनी आध्रात प्रचंड देवालये बांधली. वरगळ येथील हजार खांबांचे देऊळ, पालमपेठ येथील रुद्रेश्वराचे मदिर, पिल्ललमर्री येथील रेड्डी सरदारांनी बाधलेली मदिरे, या सर्व वास्तू म्हणजे काकतीय शिल्पकलेची उत्कृष्ट स्मारकेच होत. पाखाल, रामचा व लखनारम येथील तलाव याच काळात बाधले गेले. प्रोळ राजापर्यतचे काकतीय वंशातले राजे जैन होते. त्यानी आंध्रात

अनेक जैनमंदिरे व तीर्थकरांच्या विशाल मूर्ती बनविल्या. पुढच्या राजांनी जैन धर्म त्यागून शैव धर्म स्वीकारला व काकती देवीची उपासना सुरू केली. [ व. का. रा.; ए. इं.;– मजुम. आं. सा. इ.; स्ट्र. एं. ]

**काकतुंडी** एक तांत्रिक देवता. हिची प्रतिमा पांढऱ्या चोचीची करावी, असे सांगितले आहे. [श्रीविद्यार्णवतंत्र].

**काकपक्ष** लहान मुलांच्या दोन्ही कानांवर जी झुलपे राखतात, त्यांना काकपक्ष म्हणतात. प्राचीन काळी विशेषेकरून राजकुमाराना काकपक्ष ठेवीत. रामाला काकपक्ष असल्याचे सूरदास व कालिदास हे दोघेही सांगतात (सू. सा. ४६४; रघु ११.१) गुप्तकालीन कार्तिकेयाच्या मूर्तीत काकपक्ष दिसतात.

**काकबली** कावळ्यांना द्यायचा बली. वैश्वदेव करून झाल्यावर उरलेल्या भाताचा लांबट पिंड करून तो बाहेर नेऊन टाकतात. त्या वेळी 'ये भूताः प्रचरन्ति' हा मंत्र म्हणतात. नंतर हातपाय धुवून व आचमन करून 'शान्ता पृथिवी' इ. मंत्र म्हणत घरात येतात.



काकबली

उत्तरक्रियेत यमाच्या द्वारी असलेल्या नाना दिशांच्या कावळ्यांसाठी बली देतात व त्या वेळी पुढील मंत्र म्हणतात—

**काक त्वं यमदूतोऽसि गृहाण बलिमुत्तमम् ।**
**यमलोकगतं प्रेतं त्वमाप्याययितुमर्हसि ।।**

अर्थ — हे काका, तू यमदूत आहेस. हा उत्तम बली घे व यमलोकी गेलेल्या प्रेताला संतुष्ट ठेव.

गयाक्षेत्रात एक काकशिला नावाची शिला आहे. त्या ठिकाणी यात्रकरू काकबली ठेवून प्रार्थना करतात— पूर्व पश्चिम, दक्षिण, नैर्ऋत्य व वायव्य या दिशांतले कावळे मी दिलेला हा बली ग्रहण करोत. [ वायु पु. ७ ]

**काकभुशुंडी** एक भगवद्भक्त. हा कावळ्याच्या स्वरूपात राहतो. याला कधीही मृत्यू नाही, असे तुलसी-रामायणात सांगितले आहे. हा पूर्वजन्मी ब्राह्मण होता; पण लोमश मुनीच्या शापाने काकयोनीत गेला. हा श्रीरामाच्या बालरूपाचा उपासक असून प्रकांड ज्ञानी आहे.

**काकमिथुनदर्शनशांती** काकयुग्म मैथुन करीत असता दृष्टीस पडल्यास ते अरिष्टसूचक समजतात. त्याचप्रमाणे कावळा अंगावर पडणे, डोक्यावर बसणे, किंवा रात्री कावळ्याचे ओरडणे ऐकणे, याही गोष्टी अशुभ समजतात. त्या अशुभाच्या निवारणासाठी शांती करायला सांगितली आहे. तिचा विधी पुढीलप्रमाणे—

संकल्पादी कृत्ये झाल्यावर कलशावर एक सुवर्ण प्रतिमा ठेवून तिच्यावर इंद्र देवतेचे आवाहन. इंद्राच्या भोवती लोकपाल आणि उत्तरेकडे नवग्रहांचे वेगळ्या पीठावर आवाहन. या देवतांची यथाविधी पूजा. प्रधान होमाच्या वेळी पळसाच्या समिधा, शिजलेला भात आणि तूप यांचे इंद्रदेवतेसाठी हवन. हे सर्व झाल्यानंतर अवशिष्ट चरूचा पिंड करून त्याचा मुख्य देवतेसमोर कावळ्यासाठी बली देणे व शेवटी यजमानास अभिषेक. [ शांतिरत्न ]

**काकर** पश्चिम किनाऱ्यावरची एक मुसलमान जात. हे अफगाणिस्तानातील काकरझाई वंशाचे असून हनफी पंथाचे सुन्नी आहेत. [ मुं. इ. जा. ]

**काकवंध्यादोषशांती** ज्या स्त्रीला एक अपत्य झाल्यानंतर पुनश्च अपत्यप्राप्ती होत नाही, तिला काकवंध्या म्हणतात. त्या दोषावर पुढील उपाय सांगितला आहे—

'ॐ नमः शक्तिरूपाय अस्याः गृहे पुत्रं कुरु स्वाहा' या मंत्राचा १०८ वेळा जप व रविवारी पुष्य नक्षत्र असेल, त्या दिवशी अश्वगंधा वनस्पतीची मुळी म्हशीच्या दुधात उगाळून प्राशन करणे. [ ध तं. शि. ]

**काकसार** मध्यप्रदेशातील बस्तर जिल्ह्यात असलेल्या अबूझमाड भागातील एक उत्सव. अबूझमाड हा भाग उंच, दुर्गम, डोंगरी आणि नदीनाले व दाट जंगले यांनी भरलेला आहे. या भागात माडिया आदिवासींची वस्ती आहे. पावसाळ्यापूर्वी, नवे बी पेरायच्या आधी थोडे दिवस ते लोक काकसार नामक उत्सव साजरा करतात. या वेळी गोत्रदेवतेची

प्रार्थना करतात. उत्सवाची विशिष्ट तिथी नसते. वेगवेगळच्या गावात भिन्न भिन्न दिवशी हा उत्सव केला जातो.

गावातील देवानच्या मंदिरात पयकोल व हुंगमुइतो या देवांच्या दोन मोठ्या मूर्ती दुसऱ्या गावातून आणतात. माडिया नवयुवक कोंबडे कापून त्यांचे स्वागत करतात व पीक चांगले यावे म्हणून त्यांची प्रार्थना करतात. नंतर नगाऱ्यांच्या नादात सामूहिक भोजन होते. दुसऱ्या दिवशी पयकोल व हुंगमुइतो या देवांना स्नानासाठी माडिन नदीवर नेतात. स्नान झाल्यावर त्यांना सजवून गावाच्या मध्यभागी आणून बसवितात. त्याच्याबरोबर देवानलाही आणतात. मग कोबडचा-बकऱ्यांचे बलिदान करतात. याच वेळी गावातले इतर लोकही आपले बलिदानाचे नवस फेडतात. नंतर मातादाई देवीच्या देवळात आणखी एक बलिदान होते. मग लोक खूप दारू पितात व समांस भोजन करतात. तिसऱ्या प्रहरी पुन्हा ते गावच्या मध्य भागी ठेवलेल्या देवांभोवती जमतात. त्या वेळी काही लोकांच्या अंगात येते व ते नाचू लागतात.

अंधार पडल्यावर उत्सवातल्या नृत्यात भाग घेणाऱ्या तरुणांची वेषभूषा सुरू होते. नर्तक चांगले कपडे घालून गळचात फुलांच्या व मण्यांच्या माळा घालतात, डोक्यावर मोराच्या किंवा कोंबडचाच्या पिसांची सजावट करतात आणि कमरेला मोठमोठी घुंगरे बांधतात. तरुणींनी आपल्याकडे आकृष्ट होऊन आपल्या बरोबर नृत्य करायला यावे, या हेतूने हे नर्तक आपली वेषभूषा शक्य तेवढी चांगली करतात. युवक अर्धगोल करून नाचू लागले, की तरुणी त्यांच्यापासून थोडचा अंतरावर नृत्य सुरू करतात व हळूहळू नर्तकांच्या जवळ येतात. रात्रभर नृत्य सुरू असते. काकसारच्या वेळी झालेल्या तरुण-तरुणींच्या परिचयाची अनेकदा विवाहात परिणती होते. काही वेळा एखादा तरुण एखाद्या तरुणीला घेऊन सरळ आपल्या घरी जातो व तिथे त्याचा एकदेसीना नामक एका विशिष्ट प्रकारे लगेच विवाहही होतो.

काकसार हा त्यामुळेच माडिया युवकांच्या जीवनातील एक अतिशय महत्त्वाचा उत्सव ठरला आहे. वर्षभर ते त्या उत्सवाची प्रतीक्षा करीत असतात. [ धर्मयुग ]

**काकळी** दक्षिणेतील सूक्ष्म स्वरांचे एक वाद्य. असे सांगतात, की चोर लोक घरातली माणसे गाढ झोपली की नाही, याची खात्री करून घेण्यासाठी या वाद्याचा उपयोग करीत. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**काकापंथ** गुजरातच्या इमामशाहाने १५ व्या शतकात स्थापन केलेला एक पंथ. याला पिराना पंथ असेही म्हणतात. याच्या आठ शाखा असून मूळ केंद्र कच्छमध्ये आहे. बहुतेक सर्व पाटीदार लोक याचे अनुयायी आहेत. पाटीदारांच्या चालीरीती हिंदूंच्याच असल्या तरी त्यांची उत्तरक्रिया मात्र मुस्लीम पद्धतीने होते. हे सर्व मुस्लीम गुरूचे चेले असतात. या गुरूच्या पातीदाराला काका म्हणतात. तो व इतर ब्राह्मण हे या लोकाचे पुरोहित असतात. सांप्रत काकापंथी लोक आपल्या मूळ हिंदू धर्माकडे वळू लागले आहेत. या पंथाचा गुरू निष्कलंक या नावाने ओळखला जातो. या पंथाचे लोक विष्णूचा दहावा अवतार कलंकी याची पूजा करतात. [ म. भा. सा. ]

**काकिनी** (१) एक तांत्रिक देवता. हिचे वर्णन असे– षड्दलपत्रावर बसलेली, चतुर्मुखी, चतुर्भुजा, पीतवर्णा, त्रिशिखा, पीतवर्ण दासींनी घेरलेली व दहीभात खाणारी. ब ते ल हे हिचे वर्ण होत. [ श्रीविद्यार्णवतंत्र ]

(२) अनाहत चक्राची शक्ती.

**काकीमुद्रा** हठयोगातली एक मुद्रा. हिचा विधी पुढील प्रमाणे असतो–

**काकचञ्चुवदास्येन पिबेद्वायुं शनैः शनैः।**
**काकीमुद्रा भवेदेषा सर्वरोगविनाशिनी ।।**

अर्थ– कावळचाच्या चोचीसारखे तोंड (जिह्वा) करून हळूहळू पूरक करावा. या प्रकाराला काकीमुद्रा असे नाव असून ती सर्व रोगांचा नाश करते. [ यो. सो. ]

**काक्केझी** पंजाबातील एक जात. हे मुसलमान असून लाहोर, फिरोजपूर, गुजरात व झेलम या जिल्ह्यांत आढळतात. हे धाडशी व्यापारी असून समाजात त्यांचे वजन बरेच आहे. इ. स. १९०१ पर्यंत या लोकांचा खालसा लोकांत समावेश होत होता. १९०१ च्या खानेसुमारीच्या वेळेस ही एक निराळी जात असे दाखविण्यात आले. इबट्सन म्हणतो, की 'हे पूर्वी कलाल असून पुढे त्याची सांपत्तिक स्थिती सुधारल्यावर काही लोकांनी कलालाचा धंदा सोडून दिला व त्यापैकी श्रीमंत व बाटलेल्या लोकांनी आपण पठाणांचे वंशज आहो असे म्हणवून घेण्यास सुरुवात केली. [ म. ज्ञा. को. ]

**कागझी** एक मुसलमान जात. हे लोक सुनी पंथाचे असून देशी कागद बनविण्याचा व्यवसाय करतात. नंदुरबारचा शहा घारिफ नवाझ व अहमदाबादचे चिस्ती

यांचे हे अनुयायी आहेत. [ मुं. इ. जा. ]

**काच** (इ. स. ३ रे शतक) एक वैदिक धर्माचा पुरस्कर्ता व पराक्रमी पुरुष. याच्या काळात उत्तर भारतातले बहुतेक क्षत्रिय राजे बौद्ध धर्माचे अनुयायी बनले होते. वैदिक धर्माला कोणी वाली उरला नव्हता. अशा स्थितीत हा पुरुष वैदिक धर्माचा त्राता म्हणून पुढे आला. याला ब्राह्मणांचे पाठबळ मिळाले. याने वन्य व पहाडी लोकांचे सैन्य निर्माण करून प्रथम मगधावर चाल केली. मगधदेश हस्तगत केल्यावर याने आसपासच्या राजांवरही हत्यार उपसले. असे अनेक विजय मिळवून याने सर्वराजोच्छेता असे बिरुद धारण केले. आपल्या नावाची सुवर्णनाणीही पाडली. याच्या ध्वजावर विष्णुचक्र असे. गुप्त सम्राटांचा मूळ पुरुष हाच होय, असे म्हणतात. पुराणे याचा उल्लेख विश्वस्फाणी या नावाने करतात. काहींच्या मते समुद्रगुप्त तो हाच असावा, तर काहींच्या मते तो समुद्रगुप्ताचा भाऊ असू शकेल. [ म. च. को. ]

**काचगार** कारवार जिल्ह्यात आढळणारी एक जात. हे लोक मूळ गोव्यातले असावे. हे मुलांच्या मुंजी करतात. हविक ब्राह्मण यांचे पौरोहित्य करतात. हे तांब्यापितळेची भांडी घडवितात. [ मुं. इ. जा. ]

**काचरू** पूर्व बंगालमधील एक जात. हे स्वत:ला कायस्थ म्हणवितात. लाखेच्या बांगड्या करणे, हा यांचा प्रमुख व्यवसाय आहे. काही लोक व्यापारही करतात. विश्वकर्मा हा यांचा देव आहे. [ से. इं. १९५१ वे. बें. ]

**काचारी** (१) आसामातली आदिवासी जमात. कचारी व काचारी ही बहुधा एकाच जातीची भिन्न नावे असावीत. याना बोडो असेही म्हणतात.

बहुसंख्य काचारी स्वत:ला सारोनिया (शुद्ध काचारी) म्हणवून घेतात. यांच्यावरूनच त्या प्रदेशाला काचार हे नाव पडले आहे. काचारमध्ये यांची हजाई (सखल प्रदेशात राहणारे) व पर्बतीया (उंच प्रदेशात राहणारे) अशी विभागणी आहे. उत्तर प्रदेशातील एका लांब पट्ट्याला तुळाराम सेनापतीचा प्रदेश म्हणतात. या प्रदेशात एका काळी काचारीचे राज्य होते व या प्रदेशातून वाहणाऱ्या धनश्री नदीच्या काठावर दीमपूर शहरात त्यांची राजधानी होती, असे म्हणतात. घटोत्कचापासून आपला राजवंश सुरू झाला, असे हे सांगतात.

काचारी राजघराण्याचें गोत्र बोडोसा असे होते. म्हणून लोक त्यांना बोडो म्हणू लागले. भीमाची अनार्य पत्नी हिडिबा हिची ही सगळी प्रजा होय. त्यावरून राजधानी दीमपूर हे मूळ हिडिबापूर असणे शक्य आहे. १५ व्या शतकात आहोमांनी काचारीवर अनेक आक्रमणे केली, म्हणून काचारींना नागा टेकड्यांच्या पायथ्याशी सरकावे लागले. दीमपूर सोडल्यावर या जमातीत ४० गोत्रे निर्माण झाली. त्यात स्त्रियाची १३ गोत्रे होती.

वास्तविक काचारीचे मूळ नाव रंगत्सा असे आहे. त्यांचा मूळ प्रदेश आसामच्या ईशान्येस आहे. परंतु ते आता सर्वत्र विखुरले आहेत आणि देशभेदानुसार त्यांच्यात फरकही पडला आहे. हे लोक हल्ली चहाच्या मळ्यात मजुरी करतात.

काचारीचा बांधा पिळदार असून वर्ण पिवळसर असतो. चेहेऱ्यावर मंगोलियन छटा असते. हे खूप मेहनती आहेत. यांचे केस काळे व विपुल असतात. स्त्रियांप्रमाणे पुरुषही केस लांब वाढवितात. त्यांच्या अंगावर आणि दाढीवर मात्र केस उगवत नाहीत.

स्त्रिया डोक्याला गडद करड्या रंगाचा रुमाल बांधतात व मागच्या बाजूने एक टोपली पाठीवर सोडतात. त्या पायघोळ घागरा नेसतात व छाती शालीने झाकतात. पुरुषांचा पोशाख बंगाल्यांप्रमाणे असतो. यांची भाषाही बंगालीच आहे. हे लोक स्वच्छंदी आणि उत्साही असून त्यांना नाचगाणी फार आवडतात.

**देव-धर्म**– बहुतेक काचारी लोकांनी हिंदूंच्या चालीरीती आत्मसात केल्या आहेत. जे आपल्या प्राचीन धर्माला अद्याप चिटकून आहेत, त्यांचा धर्म जवळ जवळ गारो लोकांच्या धर्मासारखा आहे. बाथो हा त्यांचा देव आहे. सीज नावाचे झाड त्याचे प्रतीक मानतात. ते आपल्या पुरोहिताला देवशी म्हणतात. एका काचारी टोळीचा देव ऋषी नावाचा असून तो फार वृद्ध समजला जातो. त्याच्या पत्नीचे नाव चारिपाक होय. आसाममध्ये या पतिपत्नींना बुरा-बुरी म्हणून ओळखतात. या ऋषीला वर्षातून एकदा डुक्कर व त्याच्या बायकोला बोकड द्यावा लागतो. बुरा-बुरी म्हणजे शिव-पार्वती असेही समजतात. धोर्मांग हा त्यांचा देव पृथ्वीवर राहतो. पाऊस पडावा म्हणून त्याला काळ्या बकऱ्याचा बळी देतात.

काचारी लोकामध्ये वैद्य-डॉक्टर नसतात. भूतपिशाचांच्या कोपामुळे रोग होतात, अशी त्यांची समजूत आहे. त्यांच्या भगताना ओझा म्हणतात. उत्तर आसाममधील हे लोक स्वत:ला मोसा आरुई म्हणजे वाघाचे बच्चे म्हणवून घेतात. त्यांच्या वस्तीच्या जवळपास कुणी वाघ मारला, तर एक दिवस ते

सुतक पाळतात. पश्चिम भागातले काचारी सर्रास हिंदूंच्या देवाना भजतात.

**सण–** या लोकाचे तीन मोठे वार्षिक सण आहेत. त्या दिवशी ते नदीवर जाऊन आपल्या देवाची पूजा करतात. एका सणाला बांबूउत्सव म्हणतात. त्या उत्सवात तेरा पुरुष बांबूच्या काठ्या नाचवितात. या तेरा माणसांमध्ये 'देवशी'व 'देवडा' अशी दोन माणसे असतात. देवडाच्या अंगात येते व देवशी त्याला बऱ्याभल्याचे प्रश्न विचारतो. शेजारचा एक सेवक देवडाच्या अंगावर अधूनमधून पाणी शिपडतो. प्रत्येक घरात बाथोची पत्नी मैनान हिच्या नावाची एक काठीं तांदुळाच्या पात्रात ठेवलेली असते. दर वर्षी हिला डुकराचा बळी देतात व घरातील स्त्रिया दर महिन्याला तिला अंडे देतात. नवीन तांदूळ खाणे व डामांना घालवून देणे हे त्याचे दोन घरगुती सण आहेत.

त्यांची घरे लाकडी खांबाची किवा बांबूची असतात. पुष्कळसे काचारी अजूनही भटके जीवन जगतात. ते जंगले तोडून तिथे शेती करतात. कुदळ हेच त्यांचे शेतकीचे मुख्य अवजार होय. याशिवाय मच्छीमारी व शिकार हेही त्याचे उपधंदे असतात. रेशमी कपडेही ते तयार करतात.

**विवाहप्रथा–** मुलाला त्याच्या आईच्या गोत्रातील मुलीशी व मुलीला तिच्या बापाच्या गोत्रातील मुलाशी लग्न करता येत नाही. यांचे विवाह प्रौढपणी होतात. विवाहामध्ये पानविडचाची अदलाबदल करणे, हे मुख्य कृत्य असते. पान फाडले, की त्यांच्यात काडीमोड होते. त्यांच्यात एकपत्नीत्वाची चाल आहे. प्रथम पत्नीस मूल होत नसले, तरच दुसरे लग्न करता येते. या लोकात राक्षसविवाहाचीही चाल आहे. वर आपल्या मित्रांसह वधूकडे जातो. दोन्ही पक्षात लुटुपुटीची लढाई होते. तिच्यात वराचा विजय होऊन तो वधूपक्षाला मेजवानी व वधूपित्याला देज म्हणून ६० रु. देतो. मग त्यांचे लग्न लागते.

**मर्तिकप्रथा–** हे मृतांना पुरतात. पण जाळायचे असल्यास स्त्रीची चिता सात थरांची व पुरुषाची पाच थरांची करतात. मृत्यू होताच मृताची बायको अथवा घरची वृद्ध स्त्री त्याच्या डोक्याजवळ कोंबडा कापते. त्या वेळी ती म्हणते, 'मृत आईबापांनो, तुमच्या लेकरास घेऊन जा.' मयताची विधवा अथवा दुसरी कुणी म्हातारी सोन्या-चांदीचा तुकडा एका लाकडी वाटीत टाकून तिच्यातले पाणी पानाने प्रेतयात्रेतील लोकांवर शिंपडते व म्हणते, 'मी शिंपडले आहे, जा.' घरातील विवाहित तरुण तरुणी थोडे भात एका चटईवर पसरून ते कांडतात शेजारी त्याचा भात शिजवून दुसऱ्या दिवशी तो मयताच्या घरी आणतात. सगळे लोक गोळा झाले, की डुक्कर, बोकड, कोंबडी आणि कासव या प्राण्यांची हत्या करतात. तिसऱ्या दिवशी सगळेजण स्मशानात जाऊन तिथे भात शिंपडतात. नंतर चितेवर पाणी शिपडतात. मग मयताच्या घरी मद्यपान होते. पाहा– कचारी [से. इं. १९३१; इं. फो. लो. १९५९; इं. स्ट. पा. प्रे १९६०]

(२) काचेच्या बांगड्या करणारी महाराष्ट्रातील एक जात. यांच्यांत मराठा व लिगायत असे दोन भाग आहेत. यांच्यामध्ये रोटी-बेटीव्यवहार होत नाहीत. [मुं. इ. जा.]

**काछी** एक जात. यांना काछी किंवा काछिया असेही म्हणतात. कक्ष म्हणजे कुंपण किंवा कर्ष म्हणजे तास, या संस्कृत शब्दापासून या जातिनामाची व्युत्पत्ती सांगतात. हे लोक शेतकरीपेशाचे आहेत. यांची सर्वांत मोठी वस्ती उ. भारतात आहे. अंधारिया व खत्री या पोटभेदाशिवाय बाकीचे सर्व हिंदू आहेत.

हे मुख्यत्वे अफू, फळे व ऊस पिकवितात. हळद, आले, फुले व जिरे यांच्या लागवडीवरून हरदिया काछी, आलिया काछी, फूलिया काछी, जीरिया काछी अशा यांच्या पोटजाती झाल्या आहेत. दुर्गादेवी, शीतलादेवी व बालाजी ही यांची उपास्य दैवते होत. धरित्री माता व तिचा पती म्हणून भूमिया यांचीही ते पूजा करतात. रोगनिवारण व धान्यसमृद्धी यांसाठी नागरसेन व चामर या स्थानिक देवताना भजतात. याच्या सामाजिक चालीरीती कुर्मी लोकांसारख्या आहेत.

**विवाहप्रथा –** एकाच आईबापांपासून झालेल्यांचा लग्नसंबंध तीन पिढ्यांपर्यंत होत नाही. मुलींची लग्ने दहा वर्षांच्या आतच होतात. वरात आल्यावर मुलीला फक्त एक फडके नेसवून उघडी ठेवतात व तिच्या हातात एक द्रोण देतात. वराचे वस्त्र पिवळे व वधूचे लाल असते. मेजवानीशिवाय लग्नाचा इतर सर्व खर्च वराचा बाप सोसतो. वराकडून वधूला तीन उत्तरीय वस्त्रे व तीन लेहेंगे मिळतात. नवरा मुलगा वधूच्या पाठीवर हात ठेवून लग्न स्तंभाभोवती चार प्रदक्षिणा घालतो व नंतर वधूचे तिसरे बोट धरून तीन प्रदक्षिणा घालतो. हा विधी होत असताना घरातील वडील मंडळी एका खोलीत स्वत:ला कोंडून घेऊन रडत बसतात. या प्रदक्षिणा झाल्यावर वधूला कुठेतरी लपवून ठेवतात. मग वर तिला शोधून काढतो. त्याला ती न सापडल्यास त्याच्याकडून तिला एक दागिना मिळतो. कधी कधी तिचा पोषाख तिच्या धाकट्या बहिणीला घालूनही वराला फसवितात. लग्न झाल्यावर वराचे बाशिंग घराच्या छताला टांगून ठेवतात. भाद्र० शुद्ध षष्ठीस

वर पुन्हा लग्नातला पोषाख घालून नदीकाठी जातो व ते बाशिंग नदीत विर्सजित करतो.

**प्रसूतिप्रथा** –– मुलगा झाला तर ५ दिवस व मुलगी झाली तर ४ दिवस जननाशौच पाळतात. मुलाची नाळ बाळंतिणीच्या खोलीत पुरून सुवेर असेपर्यंत त्या जागी दिवा जळत ठेवतात. १२ व्या दिवशी न्हावीण नवजात मुलाची नखे कापते. मुले चारपाच वर्षाची झाल्यावर त्यांचे कान टोचतात. रजोदर्शन-कालात मुलींना खोलीत कोंडून ठेवतात. त्याना मांस आणि मासे खाऊ देत नाहीत.

सर्व काची लोकात अहमदाबादी काचीचा दर्जा श्रेष्ठ मान-मात. [ म. ज्ञा. को. ]

**काचोळी** जिचे बद पाठीवर असतात, अशी चोळी. तिला गाठ किवा बिरडे नसते. ही तुकड्या तुकड्यांची करतात. मारवाडी, राजस्थानी व गुजराती स्त्रिया काचोळी वापरताना दिसतात. लग्नात नवऱ्या-मुलीसाठी पांढऱ्या रगाची अखड (गळा न कापता) काचोळी बनवितात.

**काचोळी पंथ** हा एका काळी गुजरातमध्ये प्रचलित होता. **पाहा**– कांचुलिया.

**काछिया** गुजरातमधली एक जात. या लोकांना पस्तागिया व कुंजरू अशीही अन्य नावे आहेत. याच्यांत अनेक गोल म्हणजे पोटभेद आहेत. समान गोलात लग्नसबंध होत नाहीत. लग्नात कन्यामूल्य द्यावे लागते. यांना मद्यमांस वर्ज्य आहे. हे लोक बिजपथ, वल्लभ, स्वामीनारायण व कबीर या संप्रदायाचे अनुयायी आहेत. याचा मुख्य धंदा भाजीपाल्याचा आहे. [ मु. इ. जा. ]

**काजला** लोकगीताचा एक प्रकार. याला कजरा असेही म्हणतात. स्त्री बाळंतीण असता सहाव्या दिवशी हे गीत गातात. या गीतात स्त्रीला तिच्या नणदेकडून व बाळाला त्याच्या आत्याकडून काजळ घालण्याचा उल्लेख असतो. विवाहसमारंभात जागरणाच्या रात्रीही हे गीत गातात. यात दिव्यावर काजळ धरून ते वराला लावण्याचा उल्लेख असतो. [ हि. सा. को. ]

**काजळ (सुरमा)** काजळ डोळचात घालण्याची पद्धत पुरातन आहे. सुश्रुत संहितेत काजळ बनविण्याचा विधी सांगितला आहे. देशपरत्वे काजळ बनविण्याचे अनेक प्रकार आहेत. काजळ किंवा सुरमा डोळचात घातल्याने डोळे मोठे व तेजस्वी होतात, असे सांगितले जाते. अजंटा लेण्यातील स्त्रियाचे डोळे मोठे व बदामी आकाराचे दाखविलेले आहेत. काजळाला भुते–खेते भितात, अशी समजूत आहे म्हणून मुजीत बटूला व लग्नात नवरा-नवरीला काजळ घालून त्याचे गालबोटही लावतात.

मुसलमानांत स्त्री व पुरुष दोघेही डोळचात सुरमा घालतात. त्यांच्या या प्रथेचा उगम एका कथेत आहे, तो असा–

सिनाई पर्वतावर सुईच्या नेढचाएवढचा छिद्रातून अल्लाने मुसाला दर्शन दिले. तेव्हा मुसा मूर्च्छित होऊन पडला. तो पर्वतही जळू लागला. मग अल्ला म्हणाला, 'आजपासून तुम्ही या पर्वताची माती बारीक दळा आणि तुमच्या डोळचात घाला.' **पाहा**– अजन.

**क़ाज़ी** इस्लामी राज्यातील न्यायाधीश. प्रारभी, खलिफांच्या अमदानीत क़ाजी केवळ न्यायदानाचेच काम करीत असत; पण नंतर त्यांच्याकडे इतर अनेक कामे सोपविण्यात आली. आंधळे, वेडे यांच्या संपत्तीची देखरेख, धर्मादाय संपत्तीची व्यवस्था, मृत्युपत्राप्रमाणे मालमत्तेची वाटणी, महत्त्वाच्या कागदपत्रांचे परीक्षण, इ. कामे ते करू लागले.

दिल्लीमधील मुख्य न्यायाधीशाला क़ाज़ि–उल–कुज़ज़ात म्हणत. न्यायाधीश होण्यासाठी मनुष्य वयस्क, स्वतंत्र बुद्धीचा, शहाणा व कलंकरहित असावा लागतो; त्या स्थानासाठी खट-पट करणे, हे कोणाही मुसलमानाला शोभत नाही, असे मुहम्मद पैगबराचे वचन आहे. काजीचे काम सार्वजनिक ठिकाणी चालावे, त्याने स्वतःच्या घरात काम चालविले, तर तिथे सर्वांना प्रवेश असावा, नातेवाईक किवा स्नेही यांच्याशिवाय इतरांकडून क़ाजीने कोणतीही देणगी स्वीकारू नये किंवा त्यांच्याकडे भोजन करू नये, अशी त्याच्यावर बंधने घातलेली आहेत.

न्यायदानाशिवाय विवाहप्रसगी किंवा अंत्यकर्माच्या वेळी उपस्थित राहून योग्य ते विधी करविणे, हेही क़ाजीचेच काम असते. प्रसंगी स्त्रीसुद्धा काजीचे काम करू शकते.

साप्रत क़ाजी हे रमजान व बकरी ईद या सणांत पुढाकार घेऊन बदगी करवितात. शादी व तल्लाक याची नोंदही तेच ठेवतात. [ डि. इ.; वि. मुं. रा. प.; हि. वि. को. ]

**काटवा** बंगालमधील बरद्वान जिल्ह्याच्या ईशान्येकडील भागातले एक प्रसिद्ध क्षेत्र. हे गंगा व अजय या नद्यांच्या संगमावर वसले आहे. महाप्रभू चैतन्यदेव ससाराचा

त्याग करून तापसदीक्षा घेण्यासाठी या ठिकाणी आले, म्हणून वैष्णव लोक हे स्थान पवित्र मानतात. [सु. वि. को.]

**काटिक** तेलुगू प्रदेशातील खाटिक. कुर्नूल जिल्ह्यात याच्या तीन शाखा आहेत. यांच्यापैकी गोमास विकणाऱ्याना गायी-कसाई हे नाव असून ते मुसलमान आहेत. हिंदूपैकी बाटविलेल्या खाटकाना सुलतानी हे नाव असून ते मटण विकतात. हिंदू खाटिकाना सुरसू असे नाव आहे. पूर्वी हे सर्व खाटिक हिंदू होते. नतर सक्तीने त्यांचे धर्मातर करण्यात आले.

सुलतानी व सुरसू याच्या सबधी एक कथा प्रचलित आहे, ती अशी—

टिपू सुलतानाला हिंदूच्या हातचे मटण घेणे आवडत नसे. कारण बकरा मारण्याच्या वेळी ते मुसलमान खाटकांप्रमाणे बिसमिल्ला करीत नसत. तेव्हा त्याने मटण विकणाऱ्या दोघा हिंदू बंधूना बोलावणे पाठविले. त्यापैकी मोठ्या भावाला त्याने सक्तीने बाटविले; पण धाकटा भाऊ मात्र तिथून पळून गेला. या दोघांचे वंशज पुढे अनुक्रमे सुलतानी व सुरसू या नावांनी ओळखले जाऊ लागले. सुरसू लोक अद्यापही आपल्याला आरि कटिकेळु किवा मराठा खाटिक म्हणवून घेतात.

सुलतानी खाटिक आपणास बाटविल्याच्या रागाने अद्यापपर्यंत मुसलमानाचे सर्व रीतिरिवाज पाळीत नसत; परंतु हल्ली मात्र ते पाळू लागले आहेत. **पाहा**— कसाई. [का. ट्रा. स. इं.]

**काटियाबाबा** (१७४६ इ. स.) पंजाबातल्या लोनाचमारी गावाजवळील एका खेड्यात यांचा जन्म झाला. गुरूच्या आज्ञेवरून यांनी सगळ्या तीर्थक्षेत्रांची यात्रा केली. वृंदावनातील सतमंडळीत काटियाबाबा हे वज्रविदेही या नावाने प्रसिद्ध होते. त्यांना जवळ जवळ पावणेदोनशे वर्षे आयुष्य लाभले, असे सांगतात. [भा. स. म.]

**काटुमुख** द. भारतातले एक प्राचीन वाद्य. एखाद्या राजाचा युद्धात विजय झाल्यानंतर हे वाद्य वाजविले जाई.

**काठक गृह्यसूत्र** या सूत्राला लौगाक्षी गृह्यसूत्र असेही म्हणतात. काश्मीरमधील परंपरागत समजूत अशी आहे, की लौगाक्षी या आचार्यानेच ते रचले. या सूत्राचे ५ अध्याय आहेत. काठकसंहितेतले मंत्र गृह्यविधींच्या वेळी विनियोजित असत, असे या गृह्यसूत्रावरून कळते. [इं. वे. क. सू.]

**काठकचयन** चयनाचा एक प्रकार. कठऋषीने प्रचारात आणले म्हणून याला काठक अशी सज्ञा मिळाली. सावित्र, नाचिकेत, चातुर्होत्र, वैश्वसृज आणि अरुणकेतू असे काठकाचे पाच प्रकार आहेत. सावित्रापासून वैश्वसृजापर्यंतचे प्रकार भूमीवर विटांच्या ऐवजी शिरगोळ्याचे (चुनखडी) खडे माडून सिद्ध करतात. पाचव्या प्रकारातल्या इष्टका (विटा) जलबिदुरूप असतात. काठकचयन कोणत्यातरी पशुयागाच्या अथवा सोमयागाच्या साहचर्याने करतात ज्या यागात उत्तरवेदी केली जाते, अशा चातुर्मास्ययागालाही काठकचयन जोडले जातात. काठकात मृत्युदेवतेसाठी पशूच्या मांसरसाचा ग्रह (पेला) अग्नीत अर्पण करायचा असतो. विटा म्हणून चुनखडीचे खडे माडणे, हा गौण पक्ष आहे. मुख्य पक्ष सोन्याच्या विटा माडणे हा आहे. सोन्याच्या विटा वापरण्याचे सामर्थ्य नसेल, तर चुनखडीचे खडे तुपात बुडवून मांडावे, असे सागितले आहे काठकचयनाच्या सांगतेसाठी सौत्रामणी अथवा मित्रावरुणदेवतात्मक असा आमिक्षेचा याग करायचा असतो. **पाहा**— अग्निचयन. [विद्याधरशास्त्री भिडे]

**काठकसंहिता** कठ शाखेची संहिता. या सहितेत अधूनमधून ब्राह्मणभाग मिश्रित आहे. मंत्रसंख्या १८००० आहे. ४० स्थानक, १३ अनुवचने, ८४३ अनुवाक किवा ५ ग्रथ (विभाग) अशी या संहितेची विभागणी आहे. पतंजलीच्या कालात काठक व कालाप या दोन सहितांचा फार प्रचार होता, असे दिसते. कठशाखा फक्त काश्मीरमध्येच अस्तित्वात आहे. श्री. श्रोडर या विद्वानाने १९१० साली जर्मनीत व प. सातवळेकर यांनी १९४३ साली महाराष्ट्रात काठकसहिता छापून प्रसिद्ध केली. **पाहा**— कठ.

**काठखेळ** महाराष्ट्रातले एक लोकनृत्य. कोकणात विशेषत: रत्नागिरीच्या उत्तर भागात, कुणबी लोक होळीच्या उत्सवात हा नाच करतात. या नृत्याचा विशिष्ट पोषाख असतो. पागोट्यावर तांबड्या काठाचे उपरणे गुंडाळून त्याचे सोगे मागे सोडतात. अंगात लांब बाह्यांचा अंगरखा घालतात व छातीला किनारीचे धोतर बांधतात. नाचताना हातात टिपऱ्या व पांढऱ्या सुताचा जुडगा घेतात. या नृत्याला मृदंग, झांजा व मांदळ याची साथ असते. नर्तक फेर धरून नाचतात. यातील बऱ्याच हालचाली टिपरी नृत्याप्रमाणे असतात. या नृत्याचे दक्षिणेतील कोलाटम् व कच्छमधील दडिया या नृत्यांशी साम्य आहे.

**काठी** सौराष्ट्रातील एक जात. यांच्यावरूनच त्या प्रदेशाला काठियावाड असे नाव पडले. हे लोक आपली उत्पत्ती पुढीलप्रमाणे सांगतात--

पांडव अज्ञातवासात असताना विराटाच्या नगरात राहिले होते. त्याच कालात कौरवांनी विराटाच्या गायी पळवायचे ठरविले. कर्ण त्या कामी पुढे झाला. त्याने आपल्या हातातली काठी आपटून जी एक जात निर्माण केली, तीच काठी लोकांची जात होय. कर्णाने त्या जातीला विराटाचे गोधन पळवायला सागितले. काठीनी ते काम केले. तेव्हापासून काठी हे दुसऱ्याची गुरे पळवून नेणे, हा आपला हक्क आहे, असे समजू लागले. काठी हे मूळचे मध्य आशियातील एखाद्या भटक्या जातीचे असावेत. ते पूर्वी सिंधू नदीच्या प्रदेशात राहत होते. त्या भागावर सुमरी वशाचा राजा राज्य करीत होता. त्या राजापुढे नृत्य करताना एका नर्तकीने राजाची मस्करी केली. राजाने क्रुद्ध होऊन तिला हद्दपारीची शिक्षा दिली. पण काठी लोकानी गुप्तपणे तिला आश्रय दिला. राजाला हे समजले. त्याने सगळ्या काठीनाच आपल्या राज्यातून हाकलून दिले. तिथून ते राजस्थानात आले. पुढे इ. स. १४०० साली दुष्काळाने पीडित होऊन ते सौराष्ट्रात प्रविष्ट झाले.

वाळा, खाचर व खुमाण या काठीच्या प्रमुख शाखा होत. ज्या वेळी हे लोक सौराष्ट्रात आले, तेव्हा उमरा पाटकर हा त्याचा सरदार होता. त्याला उमराबाई नावाची सुंदर कन्या होती. ढाकचा राजा धनवाळा हा तिच्यावर मोहित झाला. त्याने तिला मागणी घातली. उमराने त्याला एकच अट घातली ती ही, की तुमचे आमचे एका ताटात भोजन झाले पाहिजे. धनवाळा याने ती अट कबूल केली. त्यामुळे इतर राजपुतांनी धनवाळाला वाळीत टाकले. पुढे धनवाळा हाच काठी लोकाचा सरदार झाला. उमराबाईच्या पोटी त्याला खाचर, खुमाण व हरसूर वाळा असे तीन पुत्र झाले. त्या तिघांनी आपापल्या शाखा निर्माण केल्या म्हणून या तिघाना शाखायत म्हणतात व श्रेष्ठ मानतात. मूळ काठींच्या वंशजांना अवरतिया (खालच्या दर्जाचे) समजतात.

प्रारंभी सौराष्ट्रातही लुटारूपणा हाच त्यांचा धंदा होता. ते आपल्या आसपासच्या छोट्या-मोठ्या राजांना लढाईत मदत करून त्यांच्या आश्रयाने राहत. सुमारे १५० वर्षे हे असेच उपऱ्ये होते. पुढे मोगलांच्या सत्तेला उतरती कळा लागल्यावर त्यांनी जमिनी व जहागिरी मिळविल्या. काठेवाडात थान या गावी त्यांची पहिली वसती झाली. तिथून ते चोटिलाच्या डोंगरात आले. या दोन्ही ठिकाणी आजही त्यांची वसती मोठ्या प्रमाणात आहे.

काठी लोकांच्या मूलस्थानाबद्दल एकवाक्यता नाही. हे लोक आशियामायनरमधील कुर्दिस्तानातले असावे आणि असीरियाचा पहिला राजा तिग्लाथ पिलेसेर याने त्यांना तिथून हाकलले असावे, असे काही विद्वानाचे मन आहे. असीरियन अभिलेखात या लोकांना खट्टी म्हटले आहे. जुन्या करारात त्याना हिट्टिटी म्हटले आहे. याचे कारण हिट्टिटी हे यांचे मुख्य शहर होते. काठी लोक तिथून हळूहळू पूर्वेकडे सरकले आणि भटकत भटकत भारतात प्रविष्ट झाले.


काठी पुरुष

दुसरे एक मत असे आहे, की काठी लोक हे नेपाळमधून भारतात आले असावे. ते माळव्यात पुष्कळ वर्षे राहिले. तिथल्या एका गावाला मांडू (मांडव) हे नाव त्यानी काठमांडूवरून दिले असावे.

काठी लोकाच्या प्रत्येक जातीत दोन विभाग असतात. एक शाखायत आणि दुसरा अवरतिया. शाखायत काठी इतर पोटजातीच्या शाखायतांशी लग्नसंबंध करीत नाहीत. अवरतिया व शाखायत याच्यात लग्नसंबंध होतो; पण अवरतिया हे आपसात मुली देत नाहीत. शाखायत काठीच्या प्रमुख पाच जाती अशा–

(१) वाळा (२) खुमाण (३) खाचर (४) हाटी व (५) जोगिया खुमाण. अस्सल काठीच्या पोटजाती अशा — (१) माजरिया (२) टोहरिया (३) नरड किवा जातवडा (४) गरिया (५) गुलिया (६) पाडवा (७) नाटा व (८) पटगार. काठी व अहीर यांच्यांत लग्नसबंध होतात. त्याचे रीतिरिवाजही सारखे आहेत.

**देव-धर्म**– काठी लोक हत्ती, नाग, वाघ, वानर व वृक्ष यांचे पूजक आहेत. गुजरातेत वासुकी व धरणीधर या नागांची त्यांनी मंदिरे बांधली आहेत. ढाक येथे त्यांनी एक सूर्यमदिरही बांधले आहे. काठी हे सूर्योपासक आहेत.

काठी लोकात स्त्री-पुरुषांना समान हक्क आहेत. त्यांच्यात बायकांचा वरचष्माच असतो. काठी स्त्रिया दिसायला सुंदर असतात. त्याचा पोषाख काळा, पण नीटनेटका असतो. त्या बांगड्या घालीत नाहीत. मासिक रजोधर्म पाळीत नाहीत. काठी पुरुष सहसा एकाहून अधिक बायका करीत नाहीत. ते

सुस्वभावी, आतिथ्यशील पण सामान्यत: आळशी असतात. त्याना मद्य-मांस चालते. हे लोक घोड्यांची पैदास चांगली करतात. [ वि. मु रा. प. ]

**काठोनृत्य** बंगालमधील एक लोकनृत्य. नर्तक किंवा नर्तकी हाती टिपऱ्या घेऊन गोलाकार उभ्या राहतात. मदल (ढोल) वाद्याच्या साथीवर हे नृत्य सुरू होते व टिपऱ्याच्या तालावर गती घेते. नृत्याची लय वाढली, की नर्तकी नाचत नाचत निरनिराळ्या दिशांना पागतात व विविध आकृतिबंध तयार करतात. [ फो. लो. ]

**काठीवाले बलाई** हे लोक कोरकू आदिवासीपैकी आहेत. हे विशेष प्रसगी कोरकूच्या घरी जाऊन नाचगाणे करतात. याचा चौघांचा संघ असतो. एकाच्या हाती देवीची प्रतिमा बाधलेली काठी असते. दुसरा शकराचा शिष्य बनून त्या प्रतिमेपुढे गातो, नाचतो. उरलेले दोघे वाद्ये वाजवितात. या काठीवाल्यानी बिदागीच्या द्वारे उपजीविका करण्यासाठी आपापली गावे वाधून घेतली आहेत. ते आपल्या क्षेत्राच्या वाहेर दुसऱ्याच्या क्षेत्रावर आक्रमण करीत नाहीत. [ लोककला त्रैमासिक ]

**काठेवाड** सौराष्ट्र पाहा.

**काठेवाडी** महाराष्ट्रात तुरळक आढळणारी एक जात. हे लोक मूळचे गुजराथ-काठेवाडातले आहेत. यांचा मुख्य धदा विटा, कौले वगैरे मातकाम करण्याचा आहे. हे लोक मेहनती व शिस्तीचे आहेत. लहान लहान झोपड्या बाधून हे राहतात. अलिकडे सुतारकाम, गवंडीकाम व दगडीकामही करू लागले आहेत.

हे लोक खंडोबा, बहिरोबा व भवानी यांना भजतात. रामदेपीर हे यांचे आद्य दैवत होय. हे लोक मुलाचे नाव गुरूच्या संमतीने ठेवतात. मर्तिक झाले असेल त्या घरी समाचाराला येणाऱ्याना डाळ, खिचडी व विडी देतात. जातीतले तंटे जातिसभेमार्फत मिटवितात. [ म. ज्ञा. को ]

**काणिकर** केरळातली एक जंगली जमात. हे लोक दक्षिण त्रिवाकूरच्या पर्वतराजीत राहतात. यांची वसती सामान्यपणे डोंगराच्या उतारावर असते. त्यांच्या झोपड्या बांबूच्या असतात. डोंगरातला एखादा रानाचा तुकडा तोडून जाळायचा आणि त्या जागेत नांगरणी न करता धान्य पेरायचे, अशा प्रकारची त्यांची शेती असते. काही वर्षानंतर त्या जमिनीचा कस उतरला, की मग ते दुसरीकडे जातात व तिथे शेती करू लागतात. ही याची पूर्वीची पद्धत होती; पण अलिकडे जंगलविषयक कायद्यामुळे त्यांना जगल तोडता येत नाही. म्हणून ते कडधान्ये, बटाटे, गांजा व तंबाखू याची लागवड करू लागले आहेत.


काणिक्कर पुरुष

हे लोक शिकार करण्यातही तरबेज आहेत. ते कठीण अशा डोंगराळ भागात प्रवेश करून मध, दालचिनी व हस्तिदंत गोळा करतात.

हे लोक बरेच मागसलेले आहेत. त्यांच्या वसतीत एखादा परका मनुष्य आल्यास ते लोक आपल्या बायकांना दाट जंगलात पाठवून देत. अलिकडे ते बरेच माणसाळले आहेत. ते मध्यम उंचीचे व काटक आहेत. अजूनही ते बऱ्याच अंशी प्रामाणिक व सत्यप्रिय आहेत. याच्यात दहा पोटभेद असून त्यातले पाच स्वजातीय शरीरसबधापासून व पाच परजातीय संबंधापासून झालेले आहेत. हे लोक लहान लहान टोळ्या करून एका टोळीप्रमुखाच्या नियत्रणाखाली राहतात. तमिळ व मल्याळम् या दोन भाषाचे मिश्रण असलेली एक बोली बोलतात. पुरुष कपाळावर चंद्रकोर किंवा ठिपके गोंदून घेतात. कानात तांब्याची किंवा चांदीची कुंडले घालतात. खांद्यावर फडके घेतात. कमरेला कोयता व सुरी अडकवितात.


काणिक्कर स्त्री

बायका ताब्याच्या बांगड्या व तांबड्या मण्यांच्या माळा वापरतात. यांचा वारसाकायदा पिता-पुत्रपरंपरेचा आहे. मिळकत मुलगे आणि भाचे यांच्यांत समप्रमाणात वाटली जाते. पिढ्या

बापाकडून न सांगता आईकडून सांगतात.

**देव-धर्म** – या लोकांचे देव असंख्य आहेत; पण त्यातल्या त्यात ते म्हाजेस्यास्यन या देवाला विशेष भजतात. कारण तो त्याचा जगलाचा देव आहे. माघमासी कोडाई या ठिकाणी त्यांची जत्रा भरते व तिला बहुतेक सर्व काणिक्कर जमतात. जत्रेत कोवडी–बकरी बळी देतात. जत्रेचा शेवट दारू पिऊन गाण्या-नाचण्यात होतो. वर्षातून ते दोनदा आपल्या देवांना भजतात. अगस्त्य हाही त्यांचा एक उपास्य देव आहे.

**विवाहप्रथा** – लग्न नवरीच्या घरी न लागता नवऱ्याच्या घरी लागते. लग्नानंतर वधू-वर एकाच पानात जेवतात. या वेळी दोन बायका वधूचे डोके धरून ते वराच्या खाद्याला सात वेळा टेकवितात. नवऱ्याने नवरीला सात घास द्यायचे असतात. व्यभिचार होऊ न देण्याबद्दल यांचा कटाक्ष असतो. तसला गुन्हा उघडकीस आल्यास दोघांनाही फटक्यांची शिक्षा देतात. रजस्वलेला स्वतंत्र झोपडीत ठेवतात. गर्भारपणी सातव्या महिन्यात वयरू पोगळ नावाचा समारंभ करतात. त्या वेळी सूर्याला नैवेद्य दाखवितात. सोयर सोळा दिवस धरतात.



काणिक्कर शिकारी

कित्येक ठिकाणी अविवाहित तरुणांकरिता स्वतंत्र शयनगृह बांधलेले असते. तिथे बायका जात नाहीत. अविवाहित मुलीना झोपण्यासाठीही स्वतंत्र घर असते.

**मर्तिकप्रथा** – मृताच्या मुखात गांजा, तांदूळ व खोबरे घालतात. जाळणे व पुरणे अशा दोन्ही प्रथा आहेत. सातव्या दिवशी मृतासाठी लहानशी झोपडी उभारून तिच्यात तीन मापे तांदूळ ठेवतात. शक्य असल्यास ज्ञातीला कढी-भाताचे जेवण घालतात. मृताची रक्षा एखाद्या नदीत विसर्जितात. [ रज:कण; का. ट्रा. स. इं. ]

## काण्व

शुक्ल यजुर्वेदाचा एक भेद. दुसरा भेद माध्यंदिन हा होय. काण्व संहितेचे ४० अध्याय आहेत सुप्रसिद्ध शतपथ ब्राह्मण हे माध्यदिन वाजसनेयी शाखेचे असून काण्व शाखेचेही स्वतंत्र ब्राह्मण आहे. माध्यदिन ब्राह्मणात १४ व काण्व ब्राह्मणात १७ प्रपाठक आहेत. बृहदारण्यक उपनिषद हे या ब्राह्मणाचा शेवटचा भाग होय. या शाखेचे सूत्र कात्यायन हे आहे. काण्व ब्राह्मण विशेषेकरून विदर्भात आढळतात. त्याना तिथे काण्णव असे म्हणतात. [ पु. इ.; सु. वि को. ]

## काण्व राजवंश

(सनपूर्व ७३ ते २८) मगधातील एक राजवंश. याला काण्वायन असेही म्हणतात. शुग घराण्यातील शेवटचा राजा देवभूमी याला त्याचा अमात्य वसुदेव याने ठार मारले आणि तो स्वतः मगधाचा राजा झाला. तोच काण्व वंशाचा संस्थापक होय. या वंशात चार राजे होऊन गेले; त्याची नावे वसुदेव, भूमिमित्र, नारायण व सुशर्मा अशी आहेत. त्यानी एकूण ४५ वर्षे राज्य केले. हे राजे ब्राह्मण असून धार्मिक वृत्तीचे होते. शेवटचा राजा सुशर्मा याला ठार करून सातवाहन कुलातील एका राजाने त्याचे राज्य जिकले. [ भा. इ. रू.; भा. प्रा. रा. ]

## कातकरी

याना कातवडी, कातोडी, काथोडी, काठोडी, काथकरी व काथोडिया असेही म्हणतात. ही एक आदिवासी वन्य जमात आहे. यांची वस्ती मुख्यतः ठाणे व कुलाबा या जिल्ह्यांत आहे. कुलाबा जिल्ह्यात याची संख्या फार मोठी आहे. सुरत व रत्नागिरी जिल्ह्यातही याची तुरळक वस्ती आहे. यांच्या भाषेत भिल्लांच्या भाषेतील काही शब्द आढळतात, त्यावरून हे मूळचे भिल्ल असावे. रामाच्या वानरांपासून आपली उत्पत्ती झाली, असे हे सागतात.

सनपूर्व पाचसहा हजार वर्षापासून ही जमात सह्याद्रीच्या माच्यावर राहते. त्या वेळी सह्याद्रीच्या तळवटी व समुद्र किनाऱ्यावर मनुष्यवस्ती प्रायः नसावी. मात्र सह्याद्रीच्या कपाऱ्यांत व गुहांमध्ये ती तुरळक असावी. त्या गुहेतील मानवापेक्षा कातवडी जास्त सुधारलेला होता. गुहामानव नग्न हिंडत असे, तर कातोडी पशूची कातडी पांघरत असे. कृत्तिपट्टिन (कृत्ति = कातडे, पट्टिन = ते वापरणारा) या संस्कृत शब्दाचा अपभ्रंश होऊन कातवडी हे नाव पडले असावे, असे राजवाडे म्हणतात. पुढे कालांतराने या कातवड्यांच्या शेजाराला नाग, वारली, कोळी व ठाकूर हे लोक आले.

कात तयार करणे हा जुन्या काळी कातकऱ्यांचा मुख्य उद्योग होता आणि त्यावरूनच त्यांना कातकरी हे नाव पडले.

जंगलातील लाकडे व मध जमा करून विकणे, हाही उद्योग ते करतात. काहीजण ससे, हरणे, माकडे याची शिकार करून त्यावर पोट भरतात. मोराचे व रानकोंबडचाचे मास याना फार आवडते. हे रानउंदीरही खातात. शेती करून धान्य पिकविणारे कातकरी फार थोडे असतात. याच्यात चोरीची प्रवृत्ती बरीच आढळते.

कातकरी लोक लहान लहान टोळचा करून रानात राहतात व नेहमी वस्ती बदलतात. ते कारवीच्या व लाकडाच्या झोपडचा बांधून त्यांच्याभोवती दगड लावतात. त्यांच्या झोपडीत एक शेकोटी सदैव पेटलेली असते. तिला ते परसा म्हणतात.

कुलाबा जिल्ह्यात या लोकांच्या अनेक वाडचा आहेत. प्रत्येक वाडीचा एक नाईक किवा पुढारी असतो. हे पुढारीपण वंशपरपरेने चालते. हा नाईक त्यांच्या पचायतीचा मुख्य असतो. तो त्यांच्या सामाजिक व धार्मिक प्रश्नाचा निवाडा देतो व अपराधाबद्दल दंडही करतो.

या जमातीचे अथावर, धेड (ढोर), सिधी, सोन किवा मराठे व वरप असे पाच पोटविभाग असून त्यांच्यांत लग्नसंबध होत नाहीत. सोन कातकऱ्यांमध्ये एकच आडनाव असणाऱ्या दोन कुलांचा विवाहसंबंध होत नाही. त्यांना कुणब्याच्या घरात व देवळात जाण्याची मोकळीक असते. धेड हे सर्वात खालच्या श्रेणीचे असून त्यांची मोरे, वाघमारे, इ. आडनावे देवकांवरून पडलेली आहेत.

कातकरी जमातीत पूर्वीपासून प्रौढविवाह आणि विधवाविवाह रूढ आहे. लग्नापूर्वी गरोदर असलेली मुलगी लग्न केल्याने शुद्ध होते, असे हे समजतात. या लोकांत गांधर्वविवाहाची प्रथा आहे. विधिपूर्वक लग्नही करतात आणि फक्त त्या वेळी त्याना पुरोहित लागतो.

कातकरी मनुष्य राकट व ठेंगणा असून अत्यंत काटक असतो. जरूर पडते तेव्हा तो चपळतेने काम करतो; पण एरवी मात्र आळसात काळ घालवितो.

कातकरी कुटुबात स्त्रीची हुकमत असते. स्त्रियाना खोटे मणी व गुजांच्या माळा घालण्याची फार हौस असते. कानाच्या पाळचांना मोठी भोके पाडून त्यात त्या साखळचाही घालतात.

सोन लोकाचा लग्नविधी जातीतील एखादा धर्मशील मनुष्य करतो. त्याला गोतर्णी म्हणतात. नवरी मुलगी मंडपाच्या दारातच वराचे स्वागत करून त्याला माळ घालते. नंतर दोघांना समोरासमोर उभे करून मधे अंतरपाट धरतात. एका बाजूला गोतर्णी व दुसऱ्या बाजूला जातीतील चार शिष्ट बसतात. त्यांच्या हातात पैसा, सुपारी व अक्षता असतात. गोतर्णी एका घोंगडीवर विवक्षित तऱ्हेने अक्षता माडतो व मध्ये पैसा ठेवून त्यावर हातातील पैसासुपारी टाकतो. मग ते शिष्टही हातातले जिन्नस घोंगडीवर टाकतात. त्यानतर नवरानवरी मडपाभोवती ५ प्रदक्षिणा करून पाटावर बसतात आणि समोर ठेवलेल्या अक्षतांना डोकी लावतात. इथे लग्नविधी पुरा होतो.

वाघदेव हे त्यांचे कुलदैवत होय. मावल्या, म्हशा, चेडा, वेताळ, जरीमरी, इ. क्षुद्र देवतांनाही ते भजतात. मात्र त्यासाठी त्याना पुरोहित लागत नाहीत. जातीतील जाणते लोकच पूजेचे सर्व विधी करतात. हे लोक पितरांना फार मानतात व भुताखेतांचे भय बाळगतात. या लोकांना अनेक वनस्पती व त्याचा औषधी उपयोग माहीत असतो. तरीही अन्यजातीच्या भगताकडून ते अंगारेधुपारे घेतातच.

सर्वपित्री अमावास्या हा याचा मुख्य सण होय. त्या दिवशी एका मातीच्या परळात अन्न घालून ते छपरावर ठेवतात. ते अन्न कावळचाने खाल्यानंतरच त्यांचे भोजन होते.

कातकरी लोक सांप्रत प्रेते पुरतात; पण पूर्वी ते मृताना जाळीत होते. पुरतांना प्रेताबरोबर त्याचा कोयता, तिरकमठा, इ. आयुधे व चिलीम वगैरे उपकरणेही ठेवतात. त्या वस्तू मृताबरोबर परलोकी जातात, अशी त्यांची समजूत असते. [ म. ज्ञा. को.; य. रा. दाते; रा. ले. सं.; सह्याद्री ]

**कातंत्र व्याकरण** एक व्याकरणग्रथ. कातंत्र = सक्षिप्त. याला कालाप किवा कौमार असेही म्हणतात. कुमार कार्तिकेयानें शर्ववर्म्याला याची सूत्रे सागितली, म्हणून याला कौमार व्याकरण असे नाव पडले. कालाप ही संज्ञा कार्तिकेयाच्या मोरावरून आली. कारण त्या सूत्रोपदेशात मोराचेही अंग होते.

पूर्वी पाणिनीय व कातत्रिक वैयाकरणांत विलक्षण भाडण होते. गुप्तकालात बौद्धांमध्ये कातत्र व्याकरणाचा बराच प्रचार होता. श्री. विंटरनिट्झ याच्या मते कातंत्र व्याकरणाची रचना इ. स. च्या तिसऱ्या शतकात झाली व बंगाल आणि काश्मीर या प्रदेशांत याचा विशेष प्रचार झाला. [ शृं. हा. ]

**कातारी** काठेवाड व गुजरात या प्रदेशातली एक जात. लाकूड कातणे हा त्यांचा मुख्य उद्योग आहे. ते मेहनती व आतिथ्यशील असतात. त्यांची राहणी स्वच्छ असते. हे लोक मुलांची मुज करतात.

जातीची ज्ञातिसभा असून तिच्यापुढे आलेल्या तंटचाचा निवाडा बहुमताने केला जातो. यांच्यातील मुसलमान झालेल्या कातान्यांना खराडी म्हणतात. [ म. ज्ञा. को. ]

**कातिया** (१) एक जात. यांची मुख्य वस्ती विदर्भ व मध्यप्रदेश यांमध्ये आहे. नर्मदा खोऱ्यातील काही भागांतूनही हे लोक आढळतात. सूत कातणे व गावाची रखवाली करणे, हे याचे पूर्वीचे व्यवसाय होते. यांच्यांत सुमारे पन्नास कुळे आहेत. त्या कुळांना स्थाने, पशू व झाडे यांवरून नावे मिळाली आहेत. उदा० पथारी, मंडला, गधेवाल, वगैरे. काही कुलात पोटभेदही निर्माण झाले आहेत.

**विवाहप्रथा**— एका कुळात किंवा पोटकुळात लग्नसंबंध करीत नाहीत. आईच्या व आजीच्या कुळातलीही मुलगी करू नये असा नियम आहे. वधूशुल्क ९ रुपये देतात. वर विधुर असेल, तर त्याला वधूसाठी १८ रुपये द्यावे लागतात. लग्नस्तंभाभोवती वधू-वरांनी प्रदक्षिणा घालणे, हा मुख्य विधी असतो. लग्न लागल्यावर वधूची आई व इतर बायका सर्वासमोर नृत्य करतात. लग्न झाल्यावर वधू माहेरी येते व गर्भाधान विधी झाल्यावर मग सासरी जाते. लग्न व गर्भाधान यांच्या मधल्या काळात नवरा मेला, तर त्याचा धाकटा भाऊ किंवा दुसरा कोणताही भाऊ अथवा प्रसंगी तिऱ्हाईतही तिचे गर्भाधान करतो व मग ती त्याची बायको होते. अशा स्त्रियांना गोन्हायी म्हणतात. मुलींना एकदा लहानपणी व दुसऱ्यादा लग्न झाल्यावर गोंदतात.

**मर्तिकप्रथा**— हे लोक सोयीप्रमाणे प्रेते पुरतात किंवा जाळतात. मृताचा मुख्य नातलग त्याला उद्देशून म्हणतो, की 'अमुक दिवशी तू स्वर्गातल्या सतमंडळीत प्रवेश करशील. मग तू कुटुंबातल्या मंडळींना त्रास देता कामा नये.' प्रेतसंस्कार झाल्यावर त्याचा आत्मा एका मडक्यात घालून आणतात. मडक्यावर झाकण घालतात. अखेरचा विधी करण्याच्या दिवशी एका ओटयावर ते मडके ठेवून त्याला हार व फुले घालतात. जवळच एक तांदुळाचा ढीग करतात. त्यावर एक लवंग लोंबती बांधतात. जोरजोराने गाणी म्हणतात. कोंबडीची पिले कापतात. ती लवंग खालच्या तांदुळाच्या ढिगाला स्पर्श करील, असे काहीतरी करतात. मग मयताचा आत्मा स्वर्गात गेला असे समजून त्याच्याबद्दल कोणतेही श्राद्धादीकर्म करीत नाहीत. [म. ज्ञा. को.]

(२) एक वैष्णव पंथ. या पंथाचे लोक कमरेला लाकडाचा तुकडा बांधून तप करतात.

**कात्तेरी** अंकलम्माच्या परिवारातली एक भयानक देवता. तमिळनाडमधले लोक हिला फार घाबरतात व हिचा कोप होऊ नये म्हणून बलिदान करतात. हिच्या प्रतिमा लाकडाच्या केलेल्या असतात.

**कात्यायन** (१) व्याकरणशास्त्राचा एक महान आचार्य. याने पाणिनीच्या सुमारे १५०० सूत्रावर वार्तिके लिहिली आहेत. याच्या वार्तिकांचा मुख्य उद्देश पाणिनीच्या सूत्राचे विशदीकरण व्हावे व ती समजायला सोपी व्हावी, हा होता. पतंजलीने याला दाक्षिणात्य म्हटले आहे, त्यावरून हा विंध्याच्या खालचा कुठला तरी असावा. अष्टाध्यायीचे सुप्रसिद्ध वार्तिककार सात असून त्यांची नावे पुढीलप्रमाणे आहेत— कात्यायन, भारद्वाज, सुनाग, क्रोष्टा, वाडव, व्याघ्रभूती व वैयाघ्रपद्य. या सातांत काल व रचनानैपुण्य या दोन्ही दृष्टींनी कात्यायनाला प्रमुख स्थान आहे. त्रिकांडशेषकोशावरून कळते, की कात्यायन, मेधाजित व वररुची ही एकाचीच पर्यायवाचक नावे आहेत.

स्कंदपुराणात कात्यायनाच्या पित्याचे नाव याज्ञवल्क्य व पुत्राचे नाव वररुची असे दिले असून कात्यायनाला शाखाप्रवर्तक मानले आहे. कात्यायनाच्या कालाबद्दल विद्वानामध्ये मतभेद आहेत. कथासरित्सागरात व बृहत्कथामंजरीत कात्यायनाच्या गुरूचे नाव वर्ष असे दिलेले असून पाणिनी, व्याडी, इंद्रदत्त, इ. वैयाकरण कात्यायनाचे सहाध्यायी होते, असे सांगितले आहे; पण पाणिनी व कात्यायन याचे समकालीनत्व खरे वाटत नाही. त्या दोघात निदान २०० वर्षांचे तरी अंतर असले पाहिजे. डॉ. वासुदेवशरण अग्रवाल कात्यायनाचा काल सनपूर्व ११०० ते १२०० मानतात, तर जायस्वाल, कीथ, इ. पंडित तो सनपूर्व ४०० ते ५०० असा ठरवितात. काहींच्या मते तो सनपूर्व २०० वर्षे इतकाच आहे.

कात्यायन हा असामान्य प्रतिभेचा पंडित होता. पतंजलीने त्याला पाणिनीच्या बरोबरीने लेखले आहे. याच्या वार्तिकांची नेमकी संख्या किती होती, हे आजही निश्चित झालेले नाही. स्कंदपुराणात त्याला श्रौत, गृह्य, धर्म व शुक्लयजु:पार्षद, इ. सूत्रग्रंथांचा कर्ता मानले आहे. शौनकाच्या ऋक्प्रातिशाख्यानंतर स्वर, छंद व व्याकरण या विषयांवर महत्त्वपूर्ण प्रकाश टाकणारा ग्रंथ म्हणून कात्यायनप्रातिशाख्याचे नाव घेता येईल. शंखलिखित, याज्ञवल्क्य व पराशर यानी धर्मशास्त्रकार म्हणून कात्यायनाचा निर्देश केला आहे. व्यवहाराबद्दल लिहिताना याने नारद व बृहस्पती यांची मते ग्राह्य धरली आहेत परिभाषाही तशीच घेतली आहे. याने स्त्रीधनाचे अनेक प्रकार कल्पिले असून स्त्रियांचे अधिकारही नमूद केले आहेत. कात्यायनाची एक तेरा श्लोकी शिक्षा असून तिच्यावर जयतस्वामीने टीका लिहिली आहे. याचीच आणखी एक बेचाळीस श्लोकांची शिक्षा असून तिच्यात स्वरभक्तीचाच विशेष विचार केलेला आहे. याच्या नावावर पुढील ग्रंथ आहेत—

(१) श्रौतसूत्र, (२) इष्टिपद्धती, (३) कर्मप्रदीप, (४) गृह्यपरिशिष्ट, (५) त्रिकाण्डिकसूत्र, (६) श्राद्धकल्पसूत्र, (७) पशुबंधसूत्र, (८) प्रतिहारसूत्र, (९) भ्राजश्लोक, (१०) रुद्रविधान, (११) वार्तिकपाठ, (१२) कात्यायनी शांती, (१३) कात्यायनी शिक्षा, (१४) स्नानविधिसूत्र, (१५) कात्यायनकारिका, (१६) कात्यायनप्रयोग, (१७) कात्यायनवेदप्राप्ती, (१८) कात्यायनशाखाभाष्य, (१९) कात्यायनस्मृती, (२०) कात्यायनोपनिषद, (२१) कात्यायन गृह्यकारिका, (२२) वृषोत्सर्गादिपद्धती, (२३) आतुरसंन्यासविधी, (२४) मूल्याध्याय, (२५) गृह्यसूत्र, व (२६) शुक्लयजु:प्रातिशाख्य. याची वार्तिके सुमारे सहा हजार आहेत. [ अक्षर अमर रहे; प्रा. च. को. ]

(२) बुद्धघोषाने उल्लेखिलेला कात्यायन. याचे व्यक्तिनाम पकुध असून गोत्रनाम कात्यायन असे होते. हा एक तत्त्वज्ञ होता. त्याच्या मतानुसार पृथ्वी, आप, तेज, वायु, दुःख, सुख व आत्मा ही सनातन असून सामान्यपणे परिवर्तनशील आहेत. हा नदी पार करून जाणे पाप समजत होता व ते घडल्यास प्रायश्चित्त म्हणून मातीचा तिलक लावीत होता. [ प्रा. मौ. बि. ]

**कात्यायन ब्राह्मण** नासिक व नगर या जिल्ह्यांत यांची वस्ती आहे. हे मूळचे देवगिरीचे. पण अल्लाउद्दिनाच्या स्वारीच्या वेळी वरील जिल्ह्यांत आले. यादवांच्या राजवटीत हे शेती करून निर्वाह चालवीत. म्हणून यांना कास्त असे दुसरे नाव पडले. हे पारस्कर व कात्यायन या सूत्रांनुसार आपले संस्कार करतात. [ मु. इ. जा. ]

**कात्यायन वीणा** वीणेचा एक प्रकार. तिला शंभर तारा असल्यामुळे शततंत्री असेही म्हणतात. ही भारताबाहेर पर्शियातही सतिर (Santir) या नावाने आढळते. बायबलातही सॉल्टरी (Psaltery) म्हणून शततंत्रीचा उल्लेख येतो. हिच्यातूनच क्लॅव्हिकॉर्ड (Clavichord) हे पियानोच्या पूर्वीचे तंतुवाद्य निघाले, असे सांगतात. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**कात्यायन श्रौतसूत्र** शुक्ल यजुर्वेदाच्या श्रौतसूत्रास कात्यायन श्रौतसूत्र म्हणतात. या सूत्राचे २६ अध्याय आहेत. शतपथ ब्राह्मणाच्या पहिल्या नऊ कांडांत ज्या क्रियांचा विचार आलेला आहे, त्यावरच या सूत्रातले पहिले १८ अध्याय खर्ची पडले आहेत. १९ व्या अध्यायात सौत्रामणी, २० व्यात अश्वमेध, २१ व्यात पुरुषमेध, पितृमेध व सर्वमेध, २२ ते २४ या अध्यायांत एकाह, अहीन व सत्र, २५ व्यात प्रायश्चित्त व २६ व्यात प्रवर्ग्य यावर विचार केलेला आहे. [ हिंदुत्व; वै. सा. ]

**कात्यायन स्मृती** ही स्मृती २९ अध्यायांची असून तिच्यात पुढील विषयांचे विवेचन आले आहे— यज्ञोपवीतविधी, वृद्धिश्राद्ध, अग्नीचा आधानकाल, अरणी होमकाल, स्नानयोग्य जले, संध्योपासना, पितृतर्पण, पंचमहायज्ञ, बलिदान, यज्ञपात्रे, पितृयज्ञ, दर्श-पौर्णमास, स्त्रीचा अधिकार, अग्निहोत्र्याचे और्ध्वदेहिक, आशौच, ब्रह्मदंडादी, वृषोत्सर्गादी अन्वाहार्य, अनध्याय, इत्यादी.

कात्यायनाने आपल्या स्मृतीत स्त्रीधन या विषयाचे जे विवेचन केले आहे, त्याला कायद्याच्या क्षेत्रात उच्च दर्जा प्राप्त झाला आहे. स्त्रीधनाच्या प्रकारांची काळजीपूर्वक व्याख्या देणारा बहुधा हा पहिलाच ग्रंथकार असावा, असे डॉ. काणे म्हणतात. कात्यायनाने भृगूची मते अनेक वेळा उद्धृत केली आहेत. कायदा आणि न्यायालयीन कार्यपद्धती या बाबतीत कात्यायनाची मते नारद व बृहस्पती यांच्या मतापेक्षा अधिक प्रगत आहेत. व्यवहार, प्राड्विवाक, स्तोभक, धर्माधिकरण, अनुशिष्ट, सामंत, इ. न्यायालयीन विषयांच्या व तत्संबंधी व्यक्तीच्या व्याख्या त्याने दिल्या आहेत. कायद्याचे काही नवे पारिभाषिक शब्द तयार करणारा कात्यायन हा पहिला ग्रंथकार आहे. कात्यायनाने एक विशेष कडक नियम दिला आहे, तो असा– जर एखाद्या पक्षकाराने आपला बचावाचा किंवा विरोधाचा महत्त्वपूर्ण मुद्दा सोडून कमी महत्त्वाचा मुद्दा पुढे मांडला, तर न्यायाधीशाने निकाल दिल्यावर त्या पक्षकाराला आपला सोडून दिलेला मुद्दा न्यायाधीशापुढे मांडता येणार नाही. या कात्यायनाच्या मताचे साम्य सांप्रतच्या इंडियन सिव्हिल प्रोसीजर कोडमधील कलम १८ च्या चौथ्या स्पष्टीकरणाशी दाखविता येण्याजोगे आहे. [ हि. ध.; हिंदुत्व ]

**कात्यायनी** (१) सर्व देवांच्या सामूहिक तेजातून उत्पन्न झालेली एक देवता. त्या सामूहिक तेजात कात्यायन मुनीनेही आपले तेज मिसळले, म्हणून तिला कात्यायनी असे नाव मिळाले. हे दुर्गेचेच एक रूप होय. हिची मूर्ती त्रिनेत्र, चतुर्भुज, चक्र-शंख-खड्ग-त्रिशूल धारण करणारी अशी करावी, असे सांगितले आहे (श्रीविद्यार्णवतंत्र). ती दशभुजा, सिंहारूढ व महिषासुराला मारीत असलेली करावी, असे मत्स्यपुराणात सांगितले आहे (२६०.५५-५६). हिची प्रार्थना पुढीलप्रमाणे आहे–

**एतत्ते वदनं सौम्यं लोचनत्रयभूषितम् ।**
**पातु नः सर्वभूतेभ्यः कात्यायनि नमोऽस्तुते ।।**
(मार्कण्डेय पु. ९१.२३)

अर्थ– हे कात्यायनी, तुझे हे तीन नेत्रांनी भूषित झालेले मुख सौम्य आहे. आम्ही तुला नमस्कार करतो. तू आमचे सर्व भूतापासून रक्षण कर.

(२) याज्ञवल्क्याच्या दोन स्त्रियापैकी एक. याज्ञवल्क्याने संसारत्याग करण्याचे ठरविल्यावर मैत्रेयी व कात्यायनी या दोन्ही स्त्रियांना 'प्रापंचिक वस्तूची समान वाटणी करून घ्या,' असे सांगितले. पण मैत्रेयी ही सांसारिक वस्तूविषयी विरक्त असल्यामुळे याज्ञवल्क्याचा सर्व संसार कात्यायनीलाच मिळाला. **पाहा**– याज्ञवल्क्य, मैत्रेयी.

**कात्यायनीव्रत** एक काम्य व्रत नंदव्रजातील कुमारिकांनी श्रीकृष्ण पती मिळावा, म्हणून मार्गशीर्ष मासात महिनाभर हे व्रत केले. त्या प्रातःकाळी यमुनेत स्नान करीत व कात्यायनी देवीची वालुकामय मूर्ती बनवून तिची पूजा करीत.

या कुमारिकांच्या निष्ठेची परीक्षा पाहण्यासाठी कृष्ण एके दिवशी यमुनेवर गेला व नग्न अवस्थेत स्नान करणाऱ्या त्या गोपीची तीरावरील वस्त्रे उचलून घेऊन कदंबाच्या झाडावर चढून बसला. त्या गोपकुमारी स्नान आटोपून तीराकडे आल्यावर कृष्णाचा हा खटयाळपणा त्यांना कळून आला. वस्त्रे देण्याबद्दल त्या कृष्णाची प्रार्थना करू लागल्या. त्यावर कृष्ण त्यांना म्हणाला. 'दोन्ही हातांनी मला नमस्कार करा, म्हणजे वस्त्रे देईन.' गोपीनी निरुपाय होऊन लाजत लाजत तसे केले. मग कृष्ण त्यांची वस्त्रे परत करून त्याना म्हणाला. 'गोपीनो, तुम्ही आता घरी चला. मी काही रात्री तुमच्यासह लीलाविलास करून तुमचे मनोरथ पुरवीन.' [ भाग. पु. १०. २२ ]

**कात्यायनोपनिषद** हे उपनिषद नक्की कोणत्या वेदाचे ते कळत नाही. ब्रह्मदेवाने हे उपनिषद कात्यायनाला सांगितले, म्हणून त्याचेच नाव याला दिलेले आहे. यात ऊर्ध्वपुड्रधारणाची महती वर्णिलेली आहे. ब्रह्मदेव सागतो – विष्णुक्षेत्रातील पांढरी माती घेऊन प्रणवाचा जप करीत ती हातावर पाण्यात नीट मळावी व केशवादी चौव्वीस नामाचा उच्चार करीत ऊर्ध्वपुड्र लावावा. नाकापासून केसापर्यंत ऊर्ध्वपुड्राच्या ज्या दोन रेषा निघतात, ते विष्णूचे दोन पाय होत. मधली सूक्ष्म रेषा विष्णूच्या पादतरूचे मूळच समजावे. ही मध्यरेषा रेखताना बीजाचा मंत्र जपावा. अशा प्रकारे ऊर्ध्वपुड्राचे हे रहस्य जाणून जो ऊर्ध्वपुड्र धारण करील, त्याला विष्णुसायुज्याची प्राप्ती होईल. [ सी. ग. देसाई ]

**काथरवाणी** वाण्यातली एक पोटजात. याना कंथार किवा कथार अशीही नावे आहेत. हे मूळचे उत्तरभारततले. तिकडून गुजरातेत आले व नतर महाराष्ट्रात पोचले. याची वस्ती औरंगावाद, जळगाव व नासिक या जिल्ह्यात आहे. याच्यात नेवे, चितोडे, लाडमक्के व लिंगायत अशा चार पोटजाती आहेत. हे मराठी भाषा बोलतात. गृहकृत्ये यजुर्वेदी भिक्षुकाकडून करवितात. यांची पचायत असते. सभ्य व प्रतिष्ठित माणसे पंचायतीत असतात. पचायतीचा निर्णय बंधनकारक असतो. तो न मानणाऱ्याना वाळीत टाकतात. अपराध्याला दंड व प्रायश्चित अशी शिक्षा मिळते. वाणसवदा व सावकारी हे याचे मुख्य व्यवसाय आहेत. काहींना पाटीलकीचीही वतने आहेत. हे आपणास वैश्य म्हणवितात.

यांच्यांत बालविवाह रूढ आहेत. लग्नापूर्वी पाच पाच वर्षे सोयरीक जुळवून ठेवतात. क्वचित पाळण्यालाही बाशिंग बांधतात. घाटावरील व खानदेशातील काथरवाण्यांत लग्नसंबंध फारसे होत नाहीत. [ म. ज्ञा. को ]

**काथोटकाना** महाराष्ट्रातले एक लोकनृत्य. हे वैयक्तिक व सामुदायिकही असू शकते. यात फक्त स्त्रियाच भाग घेतात. त्या ओणव्या होऊन हातांनी पायांचे आगठे धरतात व शरीराला दोन्ही बाजूनी झोके देतात या नाचातली गाणी व हालचाली प्रसूतिवेदनांच्या द्योतक असतात या नृत्याचे गाणे पुढीलप्रमाणे––

**काथोटकाना । तेल्याचा घाणा**
**तेली गेला तिळाला । तेलात पडल पाखरू**
**तेच** × × × **चं लेकरू**

**कादंबरी** महाकवी बाणभट्टाची एक अमर साहित्यकृती. दिव्य लोक भूतलावर आणून उभा करणारी ही एक महान कलाकृती आहे. हिचे थोडक्यात कथानक असे–

चंद्रापीड व पुंडरीक हे दोघे नायक व उपनायक याच्या तीन जन्माशी या कथेचा संबंध आहे. प्रारंभी विदिशेचा राजा शूद्रक हा आपल्या राज्यसभेत बसला असताना एक चाडालकन्या वैशंपायन नामक एक पोपट राजाला अर्पण करण्याच्या हेतूने त्याच्या दरबारात घेऊन येते. हा पोपट तिथे मनुष्यवाणीने बोलू लागतो. तोच त्या राजदरबारात कादंबरीच्या कथेला प्रारंभ करतो. या कथेशी त्या पोपटाचाही संबंध पोचतो.

शुक कथा सागतो, ती अशी—

विंध्याटवीत एका शाल्मली वृक्षाच्या ढोलीत मी राहत होतो. एक दिवस सकाळी एक शबरसेनापती आपले सैन्य घेऊन त्या बाजूने गेला. त्या सैन्यातील एक म्हातारा शबर मागे राहिला व त्याने शाल्मली वृक्षावर चढून अनेक पोपटांना त्यांच्या घरट्यांतून बाहेर काढून मारले. या गडबडीत मी मात्र त्याच्या हातून खाली पडलो. एवढ्यात हारीत नावाच्या एका तापसकुमाराने मला उचलले व आपल्या आश्रमात नेले.

आश्रमात गेल्यावर हारीताचा पिता जाबाली त्या शुकाच्या पूर्वजन्माची कथा सागतो. इथून वैशंपायन शुकाच्या व शूद्रकाच्याही पूर्वजन्मकथेला सुरवात होते—

उज्जयिनी नगरीत तारापीड नावाचा राजा राज्य करीत होता. त्याच्या राणीचे नाव विलासवती. या राजदापत्याला चंद्रापीड नावाचा पुत्र झाला. त्याचा मंत्री शुकनास याला वैशंपायन नावाचा पुत्र झाला. चंद्रापीड व वैशंपायन हे दोघे गुरुकुलात अध्ययन करून परत घरी आले. नंतर चंद्रापीडाला यौवराज्याभिषेक झाला व तो इंद्रायुधावर बसून ससैन्य दिग्विजयार्थ बाहेर पडला. प्रथम तो उत्तरेला कैलास पर्वताजवळच्या हेमकूटनिवासी किराताच्या सुवर्णपुरनामक नगरीत गेला व तिथून अच्छोद सरोवराकडे निघाला. अच्छोद सरोवरासमीप गेल्यावर संगीताचे मधुर स्वर त्याच्या कानी पडले. त्या स्वरांच्या अनुरोधाने निघाल्यावर सरोवराच्या पश्चिम तीरावर असलेल्या एका शिवमंदिरात तो पोचला. तिथे त्याला महाश्वेता नावाची एक कन्या भेटली. तिने त्याचे स्वागत केले. पण महाश्वेता त्या प्रसंगी दुःखी असल्याचे त्याला दिसले. त्याच सरोवराच्या तीरावर पुडरीक नावाचा एक ऋषिकुमार राहत होता. त्याला पाहून महाश्वेता त्याच्यावर मोहित झाली होती. पुडरीकही तिच्यावर भाळला होता. पण अचानक उद्‌भवलेल्या मदनबाधेमुळे त्याचा मृत्यू ओढवला होता. महाश्वेता त्याच घटनेचा शोक करीत होती. चंद्रापीडाला तिची ती अवस्था पाहून दया आली व त्याने तिचे सांत्वन केले.

महाश्वेतेची एक सखी तरलिका ही तिच्याजवळच होती. चंद्रापीडाने तिची विचारपूस केली. त्या संदर्भात महाश्वेतेने त्याला आपली मैत्रीण कादंबरी हिची माहिती सागितली. त्याच वेळी केयूरक नावाचा एक गंधर्वकुमार महाश्वेतेसाठी कादंबरीचा संदेश घेऊन आला. 'जोपर्यंत महाश्वेतेचे पुडरीकाशी पुनर्मीलन होत नाही, तोपर्यंत मी अविवाहित राहण्याचा निर्धार केला आहे,' असा तो निरोप होता. तो ऐकल्यावर महाश्वेता स्वतः कादबरीची समजूत घालण्यासाठी तिच्याकडे जायला निघाली. चद्रापीडालाही तिने आपल्या समागमे घेतले.

हेमकूट पर्वतावर पोचल्यावर चंद्रापीड व कादंबरी यांची भेट होऊन ती परस्परांवर अनुरक्त झाली. नंतर चंद्रापीड तिचा निरोप घेऊन उज्जयिनीला परत आला. कादंबरी त्याच्या विरहाने व्यथित होऊन काल कंठू लागली.

कादंबरीची विरहाकुल अवस्था झालेली ऐकून चंद्रापीड गंधर्वलोकात जायला तयार झाला. एवढ्यात त्याची सेना दशपुरापर्यंत आल्याचे त्याला कळले. पण त्याचा मित्र वैशंपायन मात्र परत यायला असमर्थ ठरल्यामुळे अच्छोद सरोवराच्या तीरावरच राहिला आहे, असे त्याला समजले. तेव्हा चंद्रापीड वैशंपायनाला आणण्यासाठी अच्छोद सरोवराकडे गेला. तिथे गेल्यावर त्याला कळले, की वैशंपायनाने महाश्वेतेवर प्रेम करण्याचे धाष्टर्य केल्यामुळे तो मरण पावला आहे व त्याचे तिच्या शापाने एका पोपटात रूपांतर झाले आहे.

वैशंपायनाच्या मृत्यूची ही वार्ता ऐकून चंद्रापीडाचेही प्राणोत्क्रमण झाले. त्याच वेळी कादंबरीही तिथे आली व ही सगळी दुर्घटना पाहून प्राणत्यागाला उद्युक्त झाली. पण एवढ्यात एक दिव्य पुरुष तिथे आला. त्याने तिला पुढीलप्रमाणे आश्वासन दिले. 'चंद्रापीड हा चंद्राचा अवतार आहे. तू त्याच्या शरीराचे रक्षण कर. तो कालातराने पुन्हा जिवंत होईल.' चंद्रापीडाच्या वियोगाने दुःखित होऊन त्याची तांबुलकरंकवाहिनी पत्रलेखा हिने इंद्रायुध अश्वाला बरोबर घेऊन अच्छोद सरोवरात उडी टाकली. आजवर शापामुळे इंद्रायुध बनलेला पुंडरीकाचा मित्र कपिजल सरोवरातून बाहेर आला. त्याने सागितले, की पुडरीकाचे शरीर चद्रलोकात सुरक्षित आहे आणि पुंडरीकच वैशंपायनाच्या रूपाने अवतरला आहे.

चंद्रापीडाचा पिता तारापीड याला ही सर्व हकीगत समजली. तो राणी विलासवती, मंत्री शुकनास व त्याची पत्नी मनोरमा याना घेऊन अच्छोद सरोवराकडे गेला व तिथेच ती सर्व मडळी वैराग्याने आयुष्य घालवू लागली.

एवढी कथा सागून झाल्यावर जाबाली ऋषी म्हणाला, की 'शुकनासपुत्र वैशंपायन हाच महाश्वेतेच्या शापाने शुकयोनीत जन्मला आहे.' हे ऐकल्याबरोबर शुकाला आपल्या पूर्वजन्माचे स्मरण झाले.

नंतर भगवान श्वेतकेतूने पाठविलेला कपिंजल तिथे आला व आपण शापमुक्त झाल्याचे त्याने शुकाला सांगितले. नंतर कपिजल तिथून अदृश्य झाला. शुक काही दिवस त्या आश्रमात राहिला व पख फुटल्यावर तिथून उडून गेला. पुढे एका चांडालाने त्याला पकडले व आपल्या राजाच्या कन्येला भेट म्हणून समर्पिले. तो आणखी थोडा मोठा झाल्यावर चांडाल राजकन्या त्याला घेऊन शूद्रकाच्या दरबारात गेली.

नंतर शूद्रक राजाने चांडालकन्येला तिची माहिती विचारली व शुकाला बाधून घेऊन ती तिथे का आली, याबद्दल पृच्छा केली. तेव्हा ती राजाला म्हणाली , की 'चद्राचा अवतार चद्रापीड तो तूच आहेस. तूच कादंबरीचा जीवनाधार आहेस. मी या शुकाची माता लक्ष्मी आहे. मदनबाधेमुळे याची अशी अवस्था झाली आहे. याहून नीच गतीला हा जाऊ नये, म्हणून हा शापमुक्त होईपर्यंत मी याला बाधून ठेविले होते. आता हा शापमुक्त झाला आहे.' एवढे सांगून ती चाडाल राजकन्या अदृश्य झाली.

हे सर्व ऐकून शूद्रकालाही आपल्या पूर्वजन्माचे स्मरण झाले व कादबरीच्या विरहाने तो व्याकुळ झाला. वैशपायनही महाश्वेतेला भेटायला आतुर झाला.

त्याच वेळी वसत ऋतू अवतरला. कादंबरीने गंधर्व लोकात कामदेवाच्या उत्सवप्रसंगी त्याची पूजा केली व चद्रापीडाच्या देहाला आलिगन दिले. त्याबरोबर तो जिवंत झाला. 'शाप समाप्त झाल्यामुळे मी आता शूद्रकाचा मनुष्यदेह सोडून इथे आलो आहे. महाश्वेतेच्या प्रियकराचाही शाप आता संपला आहे.' असे त्याने सागितले. एवढ्यात कपिजलाचा हात धरून आकाशातून पुडरीक तिथे अवतीर्ण झाला. अशा रीतीने चद्रापीड व कादबरी आणि पुडरीक व महाश्वेता याचे पुनर्मीलन घडले.

कादंबरीचे कथासूत्र थोडक्यात हे असे आहे. डॉ. वासुदेवशरण अग्रवाल यानी कादंबरीच्या कथावस्तूची तुलना एखाद्या सुघटित देवप्रासादाशी केली आहे. बाणभट्टाच्या काळातील देवप्रासादाचे मुखमडप, रंगमडप, अंतरालमंडप व गर्भगृह असे मुख्य चार भाग असत. देवदर्शन घेऊ इच्छिणाऱ्या व्यक्तीला मुखमंडपातून रगमडपात व तिथून अतरालमंडपात असणाऱ्या गर्भगृहात प्रवेश करावा लागे. अशा प्रकारची रचना लक्षात घेऊन बाणाने कादंबरीच्या कथानकाची कल्पना केली आहे. शूद्रकाच्या सभेपासून जाबालिआश्रमापर्यंतची कथा ही या साहित्यिक प्रासादाचा मुखमंडप आहे. या मुखमंडपात चंद्रापीडाच्या जन्मातराचे प्रतीक म्हणून शूद्रक राजाची उपस्थिती आहे. यानंतरची कथा उज्जयिनीपासून सुरू होते व चंद्रापीडाच्या दिग्विजयापर्यंत येऊन थाबते. हा भाग म्हणजे या कथाप्रासादाचा रंगमडप आहे. यापुढचा अच्छोदसरोवरापर्यंतचा वृत्तात हा अतरालमड़प असून तिथून गर्भगृहात दृष्टिक्षेप टाकता येतो. अच्छोद सरोवराशी पोचल्यावर चद्रापीडाला प्रथमच कादबरीचे नाव कळते व तिच्याविषयी थोडी माहिती समजते. नतर तिथूनच तो कादबरीला भेटण्यासाठी महाश्वेतेबरोबर हेमकूट पर्वतावर जातो. बाणाच्या या विशाल वाङ्मयप्रासादाचे हेमकूट हे गर्भगृह आहे त्या ठिकाणी कादंबरीरूपी दिव्य ज्योतीचा निवास आहे. एखाद्या कुशल कारागिराने पर्वत खोदून एका पाषाणापासून सुदर मंदिर उभे करावे, त्याप्रमाणे बाणभट्टाने या कादंबरीच्या कथानकाची रचना केली आहे.

कादंबरीचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. पैकी पूर्वार्ध लिहून झाल्यावर बाणभट्टाचा मृत्यू झाला व उत्तरार्ध त्याचा पुत्र पुलिंदभट्ट याने बापाच्याच शैलीने व सामर्थ्याने पुरा केला.

बाणभट्टाने आपल्या पात्रांचे चित्रण इतक्या सजीवपणे केले आहे, की त्याच्या मूर्ती डोळ्यापुढे उभ्या राहतात. प्रजापालक व पराक्रमी राजा शूद्रक, सौम्य तापस हारीत, ज्ञानवृद्ध जाबाली, उदार राजा तारापीड, शास्त्र व व्यवहार यामध्ये कुशल असा अमात्य शुकनास, श्वेतवसना तपस्विनी महाश्वेता व लावण्यवती कादबरी ही व अशाच प्रकारची कवीने रंगविलेली विविध पात्रे वाचकाच्या मनावर आपला कायमचा ठसा उमटवितात. बाणभट्टाने जीवनात विविध प्रकारचा व सखोल अनुभव घेतला होता. जगाचे मार्मिक निरीक्षण त्याने केले होते. त्या सर्वांचा उपयोग त्याने आपल्या पात्रचित्रणात करून घेतला आहे.

पात्रचित्रणाबरोबरच निसर्गाचे वर्णन करण्यातही बाणभट्टाचा हातखंडा आहे. निसर्गातील रम्य व भयंकर दृश्ये त्याने सारख्याच तोलाने चित्रित केली आहेत. उपमा, उत्प्रेक्षा, विरोधाभास व परिसंख्या या अलकारांचा भरपूर उपयोग करून कवीने आपले निसर्गवर्णन सजविले आहे. परिसंख्या अलंकाराचा तर तो सम्राटच आहे. त्याच्या इतका श्लिष्ट परिसंख्येचा आश्चर्यकारक प्रयोग दुसऱ्या कोणत्याही कवीने केला नाही. विंध्याटवीच्या भयंकर रूपाचे वर्णन अप्रतिम आहे. महर्षी जाबालीच्या आश्रमाचे चित्र सात्त्विक आहे. प्रभातकाळ, संध्याकाळ, अंधकार, त्याचप्रमाणे चंद्रोदय, इ. सृष्टीतील विविध दृश्याचे वर्णन अगदी यथार्थ आहे.

बाणाने आपल्या पात्रांच्या अतरंगाचाही पुरता ठाव घेतला आहे. पुडरीकाचा वियोग झाल्यानंतर महाश्वेतेच्या मनात उमटलेल्या भावतरंगांचा त्याने रम्य आविष्कार केला आहे. चंद्रापीडाच्या जन्माने राजाला व राणीला जो आनद झाला, त्याचेही वर्णन हृदयंगम आहे. चद्रापीडाच्या प्रथम दर्शनानंतर कादंबरीच्या मनातील भावाचे विश्लेषण बाणाने एखाद्या मनोवैज्ञानिकाच्या तोलाने केले आहे.

प्रभावशाली गद्य लिहिण्यात बाण अत्यंत निपुण आहे. वर्ण्य विषय व व्यक्ती सजीव बनविण्यासाठी बाणभट्टाने समास-

बहुल व ओजोगुणमंडित शैलीचा जागोजाग अवलंब केला आहे; परंतु विषयाला साजून दिसेल, अशा प्रकारे त्याने आपल्या शैलीचे रूपही अनेक ठिकाणी बदलले आहे. विंध्याटवी किंवा संध्या याचे वर्णन करताना तो दीर्घ समासांचा उपयोग करतो; तर विरहवर्णनाच्या वेळी तो लहान लहान वाक्ये योजतो.

संस्कृत गद्यात किती ओजस्विता, किती मधुर ओधवत्ता व किती भावाभिव्यजकता असू शकते, त्याचा सुस्पष्ट प्रत्यय बाणभट्टाच्या कादंबरीत मिळतो. **पाहा**– बाणभट्ट [ सं. सा. इ.; कादं. ए. सां. अ. ]

## कादर

भागलपूर व संताळ परगणा या प्रदेशात राहणारी एक द्राविड जमात. शेती, मच्छीमारी व मजुरी हे याचे मुख्य व्यवसाय आहेत. रिस्लेच्या मते हे मूळ भुइया जमातीचे आहेत. यांचे पौरोहित्य न्हावी करतात. हे उंदीर, कोंबड्या व गाई-डुकराचे मांस खातात. त्याचा सामाजिक दर्जा कनिष्ठ मानला जातो. हे प्रेते जाळतात. [ ट्रा. का. बे. ]

## कादिर

एक जात. ही त्रावणकोरच्या उत्तरेकडील पर्वतात व अनैमलै ( हत्ती ) टेकड्यात आढळते. हे लोक ठेंगणे व काळे असतात. हे अजूनही असंस्कृत व अडाणी असून जंगलातच राहतात. रानातील लाकूडफाटा विकून हे आपली उपजीविका करतात. मेण, मध, वेलदोडे, आवळे, सुंठ, धूप, हरिणांची शिंगे, हत्तीचे सुळे, इ. पदार्थ गोळा करून विकण्याचा उद्योगही हे करतात. हे उत्तम शिकारी आहेत. सागूपासून अन्न तयार करून खातात. तसेच पशु-पक्ष्यांचे मांसही खातात.


कादिर स्त्री

**यांचे** दात ताशीव असतात. त्यामुळे सौंदर्य वाढते, असा त्यांचा समज आहे. बायका डोक्यांत बांबूच्या फण्या व कानांच्या पाळच्यांत ताडाच्या पानाची मोठी वेटोळी किंवा लाकडी तबकड्या घालतात. पुरुषांचेही नाक व कान टोचलेले असतात.

**विवाहप्रथा** — लग्नापूर्वी कादिर तरुणाला एक वर्षभर वधूच्या घरी राहून काम करावे लागते. त्यानंतर वराची आई किंवा बहीण वधूच्या गळचात ताळी बांधून तिला घरी आणते. उत्तम स्वयंपाक करता येणे, हा वधूचा मोठा गुण समजतात. वाईट स्वभाव, आज्ञाभंग, व्यभिचार, इ. कारणामुळे गुरुजनांच्या संमतीने लग्न मोडता येते. पुरुष अनेक बायका करू शकतात; पण वडील बायकोचा मान मोठा असतो. विधवाना पुर्नविवाह करायला मोकळीक नसते; पण त्याना एखाद्या पुरुषाची उपपत्नी म्हणून राहता येते.

**प्रसूतिप्रथा** —बाळंतपण घरी होत नाही. त्यासाठी वेगळी झोपडी बांधतात. अफू खाल्ल्याने बायकाना वाझपण येते, असा समज रूढ आहे. बाळंतपणाप्रमाणेच मासिक पाळीसाठीही स्त्रियांना स्वतंत्र झोपडीत राहावे लागते.

कादिर पुरुषांना अफूचे व तबाखूचे व्यसन असते. बायकाही तबाखू खातात. गोमास खाणाऱ्या मलसराबरोबर कादिर लोक जेवत नाहीत व गायीच्या कातड्याच्या बुटांना शिवत नाहीत.

**देव-धर्म**— हे लोक पैकुटलाय, अथुविसरिअम्मा, वनथवाथी इयप्पस्वामी व मासंन्याथ, इ. देवताना भजतात व कालीचीही उपासना करतात. हत्ती, बैल, इ. पशूतही देव आहे, असे मानतात. त्याच्यांत जादूटोणा करणारे लोकही असतात. मृतांना पुरतात. [ म. ज्ञा. को. ]

## कानगूजरी

राजस्थानातली एक जात. टोकदार टोपी, लहरता झगा, चुणीदार पायजमा आणि हातात रावणहथ्था नावाचे आयुध, अशा वेषात कानगूजरी गावोगावी फिरतो. तो आपल्या पेहरावात स्त्री आणि पुरुष ही दोन्ही रूपे दाखवितो व स्वतःला राधा-कृष्णाचा अवतार समजतो. राधा-कृष्णाची गाणी गाऊन घरोघरी नाचणे आणि भिक्षा मागणे हा यांचा धदा असतो. [ लोककला त्रैमासिक ]

## कानडा

हिंदुस्थानी संगीतातील एक राग. याचे लक्षण पुढीलप्रमाणे आहे –

**त्रिनिषादाऽथ संपूर्णा निषादो विकृतो भवेत् ।**
**मार्गी च मूर्च्छना ज्ञेया कानडेयं सुखप्रदा ।।**

अर्थ– हा राग संपूर्ण आहे याचे ग्रह, अश व न्यास हे स्वर निषाद आहेत. निषाद विकृत आहे. मूर्च्छना मध्यम ग्रामाची असून कानडा हा राग सुखप्रद आहे.

कानडा रागाचे १८ संमिश्र प्रकार आहेत. उदा० दरबारी कानडा, अडाणा कानडा, इत्यादी. मात्र कानडा अशा एकेरी नावाचा राग उपलब्ध नाही. त्या ऐवजी दरबारी कानडाच

गाण्याची प्रथा पडली आहे. हा राग गंभीर, उदात्त व उत्तेजक आहे. याचे मूर्तिध्यान पुढीलप्रमाणे–

**कृपाणपाणिर्गजदन्तखण्ड-**
**मेकं वहन्ती निजहस्तकेन ।**
**सस्तूयमाना सुरचारणौघैः**
**सा कानडेयं किल दिव्यमूर्तिः ।।**

अर्थ–ही रागिणी कृपाण व हस्तिदंताचा तुकडा स्वहस्ते धारण करते. देव व चारण यांचे समुदाय तिची स्तुती करतात. कानडा रागिणीची मूर्ती दिव्य आहे.

गानसमय– रात्रीचा दुसरा प्रहर. [ स. द.; क. सं. ]

## कानपिळ्याचा मान

महाराष्ट्रात विवाहहोमाच्या वेळी वधूचा भाऊ वराचा कान पिळतो व त्याबद्दल वरपक्षाकडून त्याला पागोटे मिळते. [ ल. वि. सो. ]

## कानफाटे

शैव वैरांग्याचा एक पथ. हे लोक कानाची पाळी चिरून त्यात मोठी वलये (कडी) घालतात, म्हणून त्यांना कानफाटे म्हणतात. गोरखपथी, गोरखनाथी व दर्शनी अशीही त्याना नावे आहेत.

हा पंथ केव्हा व कसा निर्माण झाला, याची समाधानकारक उपपत्ती लागत नाही. गोरखनाथाच्याही पूर्वी आपला पंथ अस्तित्वात होता व गोरखनाथाचा आजेगुरू आदिनाथ याने हा पंथ स्थापला, असे कानफाटयाचे म्हणणे आहे. या पंथाची तत्त्वे परिष्कृत करून व त्याच्यामध्ये संगती लावून त्यांचे पुनरुज्जीवन करण्याचे कार्य गोरखनाथाने केले व आपल्या नावाने एक स्वतंत्र उपपथ स्थापन केला.

दतकथा अशी आहे, की कानफाटे हे पूर्वी शंकराचार्यांचे अनुयायी होते. पण त्यानी मद्यसेवन सुरू केल्यामुळे आचार्यांनी त्यांना आपल्या सप्रदायातून हाकून लावले. हे बहिष्कृत अनुयायी म्हणजेच कानफाटे होत.

सामान्यतः असे दिसते, की उत्तर भारतात बौद्ध धर्माचा प्रसार झाला, त्या वेळीही कानफाटयाचा पथ अस्तित्वात होता. पुढे बौद्ध धर्म ऱ्हासोन्मुख होऊन वैदिक धर्माचा पुनश्च उदय झाला. त्या कालात या पंथालाही चागले दिवस आले असावे. पुढे गोरखनाथाने औपनिषदिक तत्त्वांना धरून या पंथाची तत्त्वे निश्चित केली असावी.

या पंथाच्या तत्त्वज्ञानासबंधी संपूर्ण व स्पष्ट अशी माहिती मिळत नाही. पथीय लोकांनाही ती नसते. बनारसीदास या कवीने गोरखबोध नावाचा एक ग्रंथ लिहिला असून त्यावरून या पंथाच्या तत्वज्ञानाची स्थूल मानाने माहिती मिळते. हा ग्रंथ म्हणजे मत्स्येंद्रनाथ व गोरखनाथ याच्यामधील प्रश्नोत्तरांचा संग्रह आहे. ही रचना चौदाव्या शतकातील आहे, असे मानतात.



कानफाटा

हा ग्रंथ हिंदीत असून त्यात ६० पद्ये आहेत. ग्रंथाची भाषा संक्षिप्त व दुर्बोध आहे. या ग्रथाच्या परिशीलनातून या पंथाचे तत्त्वज्ञान कळून येते, ते असे–

आत्मा हा नाभिचक्रातवास करतो व तो शून्याश्रित असतो. मानवाला चैतन्य प्राप्त होते, ते या आत्म्यामुळेच. मन, आत्मा व शून्य याच्यावर अनुक्रमे चंद्र, सूर्य व काल यांचे वर्चस्व असते. अंतःकरण, नामरूप व आकाश ही उत्पन्न होण्यापूर्वी मन हे शून्यात विलीन होते, आत्मा निराकार होता, चंद्र हा प्रकाश व पृथ्वी यांच्यामधील अंतराळात व शब्द अनुत्पन्न स्थितीत होता. सहज, अनुभव, परम व अतीत असे शून्याचे चार प्रकार आहेत. निद्रावस्थेत व मृत्यूनंतर प्राण हा शून्यात विलीन होतो. या विश्वात एकंदर पाच तत्वे असून दहा द्वारे आहेत. ही दहा द्वारे पूर्णावस्थेची साधने होत. परमतत्त्व हे शब्दातीत असते.

प्रस्तुत ग्रंथावरून पाहता या पंथाच्या अनुयायांना मठवासाचा निर्बंध नाही, असे दिसते. ते झाडाखाली अथवा रस्त्यावरही राहत असत. अन्नोदकाविषयीही त्यांना विशेषसे निर्बंध नाहीत.

कानफाटे सर्व भारतभर पसरलेले आहेत. सर्व ठिकाणच्या कानफाटयाच्या चालीरीती बहुतेक सारख्या आहेत. ते जातपात मानीत नाहीत. मास, मद्य, अफू इ. निषिद्ध वस्तूचेही सेवन करतात. यांच्यांत प्रापंचिक व भिक्षोपजीवी असे दोन वर्ग आहेत. प्रापंचिक लोक सावकारी, विणकाम, शेतकी, शिपाईगिरी, इ. व्यवसाय करतात. काही लोक मंत्र, तंत्र, चेटूक, इ. गोष्टी करून उदरनिर्वाह करतात. भिक्षा मागणाऱ्या कानफाटयांना जोगी किवा नाथ असेही म्हणतात.

कानफाटयांत वेषभूषेला फार महत्त्व आहे. संप्रदायविशिष्ट अशा शैली, शृंगी, कंथा व झोळी या वस्तू ते धारण करतात

पुंगीलाही त्यांच्यांत महत्त्व असते. ती वाजविल्याशिवाय त्यांना अन्नग्रहण करता येत नाही. मेखला, कौपीन, व्याघ्राबर, खडावा व विभूती याचाही ते वापर करतात. शैव असल्यामुळे याच्या गळ्यात रुद्राक्षांच्या माळाही असतात. हे कुका नावाचे एकतारी वाद्य वाजवून गाणी म्हणत भिक्षा मागतात. गाणी भर्तृहरी व गोपीचंद यांची असतात. 'आलख' व 'आदेश' हा त्यांचा उद्घोष असतो. एकमेकांना नमस्कार करताना व भिक्षा मागताना ते हा उद्घोष करतात. भिक्षेकऱ्यातले काही कानफाटे माकड किंवा साप बाळगतात, जनावराच्या नकला करतात व भविष्यही सांगतात.

कर्णकुंडले हे कानफाट्याना ओळखण्याचे मुख्य चिह्न होय. या कुडलांनाच दर्शने असेही म्हणतात. अशी समजूत आहे, की गोपीचंदाच्या प्रार्थनेवरून जालदरनाथाने प्रस्तुत पंथानुयायाना अन्य संप्रदायांपासून वेगळे दर्शविण्यासाठी या प्रथेचे प्रचलन केले. भर्तृहरीच्या कानात त्याच्या गुरूने मातीची कुडले घातली, असे सागतात. आजही अनेक कानफाटे योगी मातीची कुडले घालताना दिसतात. मातीचे कुडल फुटण्याची धास्ती असल्यामुळे पुढे धातूची किवा हरणाच्या शिगाची कुडले ते वापरू लागले. कुडलधारणाला ते मुद्राधारण म्हणतात. विधवा स्त्रियांप्रमाणे गृहस्थ जोग्यांच्याही स्त्रिया संप्रदायाची दीक्षा घेताना कुंडल धारण करतात. शुभदिनी किवा विशेषत: वसंतपंचमीस गुरूकडून मत्रसस्कारपूर्वक तो विधी होतो. दीक्षा घेणाऱ्याला प्रथम क्षौर करावे लागते. दीक्षेनंतर जमलेल्या लोकांना भोजन घालतात. कुडलासाठी चिरलेला कान स्त्रीदर्शनाने चिघळतो या समजुतीने जखम बरी होईपर्यंत ते बदिस्त जागेत बसून राहतात. कान फाटणे, हे अयोग्य समजतात. ज्या जोग्याचा कान खराब होतो, त्याला पंथातून बाहेर काढतात.

हे लोक मोळाच्या दोरीची किंवा काळ्या मेंढीच्या लोकरीची मेखला वापरतात. मुख्यत्वे लगोटी नेसण्यास त्यांना या मेखलेचा उपयोग होतो. याशिवाय आणखी एक मेखला असते. तिला 'हाल मटंगा' म्हणतात. ती धारण केल्यानंतर लगेच भिक्षेसाठी बाहेर पडावे लागते. या लोकाचे जानवेही काळ्या मेंढीच्या लोकरीचे असते. हे जानवे बनविणे, ही एक कला आहे. ती जाणणारे फार थोडे लोक असतात. या जानव्याला ते शिगीनाद जानवे, असे म्हणतात. कारण आपली शिगी (=हरणाच्या शिंगाची शिटी) ते आपल्या जानव्यालाच बांधून ठेवतात.

कच्छच्या रणात कानफाट्यांची पुष्कळ वस्ती आहे. त्या भागातले कानफाटे मठात राहतात व स्वत.ला धर्मनाथाचे अनुयायी समजतात. कच्छमध्ये असे त्यांचे पुष्कळ मठ आहेत. त्यांतले धीणोधर मठ व काठेवाडमधील गोरखमठीचा मठ हे दोन प्रसिद्ध आहेत. धीणोधरच्या मठात अतिथिगृह, पीर व मंदिरे असे विभाग आहेत. या मठाना पूर्वीच्या राजेरजवाड्यानी पुष्कळच देणग्या दिलेल्या असल्यामुळे तिथले मठपती श्रीमंत आहेत ते मठात येणाऱ्या कोणत्याही अतिथीला विन्मुख पाठवीत नाहीत. धीणोधर मठातले जोगी आजन्म ब्रह्मचारी राहतात. इतर मठांतले महंत मात्र गृहस्थाश्रमीही असतात. कच्छमधले कानफाटे व महाराष्ट्र–कर्नाटकामधील कानफाटे याच्यामध्ये फरक एवढाच, की महाराष्ट्र–कर्नाटकातले कानफाटे भिक्षेच्या वेळी हातात त्रिशूळ वागवितात. त्यांतलेच काही लोक डौरही (डमरू) बाळगतात. त्यावरून त्यांना डौरी गोसावी असे नाव पडले आहे. उत्तर व पूर्व भारतातले कानफाटे देवालयातले पुजारीपणही करतात स्थानपरत्वे भैरवनाथ, बाला सुंदरी, कालभैरव ही त्याची दैवते बनली आहेत. काशीतले कानफाटे कालभैरवाच्या देवळाभोवती राहतात. यांचा मुख्य उपास्य देव शिव असून गोरखनाथ व मच्छिद्रनाथ याना ते आपले गुरू मानतात. हे लोक मृताला बसलेल्या स्थितीत पुरतात व त्या स्थानावर समाधीही बाधतात. **पाहा–** नाथपंथ [ म. ज्ञा. को.; बॉ. बे. ऋा. ]

**कानबाई** एक सण. नाशिक जिल्ह्यात, विशेषत: मालेगाव, बागलाण या भागात कानबाई हा सण श्रावणमासाच्या शुक्ल पक्षात करतात. या सणास रविवारी आरंभ होतो. त्यासाठी नदीवरून एक नारळ धुवून पात्रात घालून आणतात व विधिपूर्वक त्याची कलशावर स्थापना करतात. कलशाच्या गळ्यात ऐपतीप्रमाणे सोन्याचे दागिने घालतात त्यावर नथ अडकवून वर खण पाघरवितात. त्याच दिवशी सवाई मापाने गहू दळून त्याचे रोट करतात. एका वर्षी हा सण टळला, तर दुसऱ्या वर्षी हे रोट दुप्पट करतात. कानबाईला दाखवलेला हा नैवेद्य कुटुबातले लोकच खातात.

कानबाईची पूजा ब्राह्मण, मराठे, सोनार, शिपी, सुतार, न्हावी, चांभार वगैरे जातीत होते. कोळी लोक स्वत:च्या घरी ती न करता जेथे कानबाई बसविली असेल, तिथे जाऊन रोटाचा नैवेद्य दाखवतात.

देवी बसते त्या घरी रात्री बायका जमून देवी जागवितात. दुसऱ्या दिवशी देवीची जलाशयात बोळवण करतात. ह्या प्रसंगी लाह्या, खोबरे व काकडी यांचा प्रसाद वाटतात कानबाईच्या मिरवणुकीत स्त्री-पुरुष भाग घेतात. कानबाईपुढे टिपऱ्या घेऊन नाचतात. विसर्जनानंतर पूजेचा नारळ नदीवर स्वच्छ धुवून पुन्हा घरी आणतात. पिढ्यान पिढ्या या एकाच नारळावर सण साजरा होतो.

या रोटाचा ‘उगत भान्या’ नावाचा आणखी एक प्रकार आहे. नवस केलेला असेल तरच तो करतात. याचा गहू शनिवारी दळतात व रविवारी सूर्य उगवण्यापूर्वीच त्याचे रोट बनवून देवीला नैवेद्य दाखवितात व ते खाऊन संपवितात.

कानबाईला ‘कानवाई–राणबाई’ असेही म्हणतात. **पाहा–** राणादेवी.

**कानमैल** उत्तरप्रदेशातील एक मुसलमान जमात. कानातला मळ काढणे, हा यांचा धंदा आहे व त्यावरूनच त्यांना हे नाव मिळाले आहे. याच्यांत पोटजाती नाहीत. याच्या जमातपचायती असतात. यांच्या लग्नविषयक चालीरीती बऱ्याच अशी हिंदूप्रमाणेच असतात. त्यावरून हे लोक अलिकडच्या काळात मुसलमान झाले असावे, असे वाटते. [ सें. इं. १९११ पु. १५ ]

**कानिफनाथ** नवनाथांपैकी एक व जालंदरनाथाचा शिष्य. हा भद्रदेशच्या सुरथ राजाचा पुत्र असून वर्णाने क्षत्रिय होता. याच्या आईचे नाव भामिनी होते. सुरथ राजाला जालंदरनाथाच्या प्रसादाने तो झाला. पुढे राज्य न करता आपल्या गुरूबरोबर तो वैराग्य वृत्तीने हिडू लागला. गोपीचंदाने जालंदरास लिदीत पुरले असता याने तिथे जाऊन त्याला बाहेर काढले, अशी कथा आहे.

कानिफनाथाने आपल्या नावाने एक स्वतत्र पंथ निर्माण केला. हा पंथ वामाचारी होता, असे म्हणतात. ‘वामारग’ अशी आजही त्याला पर्यायी संज्ञा वापरतात. या पंथात शक्तिपूजेला प्राधान्य आहे. गोपीचंद अथवा सिद्ध शृंगारी याच पंथाचा होता. बंगालमधील ‘सेपला’ किवा ‘सापुडे’ ही जात यातूनच निर्माण झाली. कानिफपंथी लोक भिक्षा मागतात, जटा वाढवितात, तंबोरी वाजवून नाग पकडतात व गोरखनाथांना गुरू मानतात. **पाहा–** गोरखनाथ; नाथपंथ. [म. ज्ञा. को.; वै. शै. म. व.]

**कानीन** अविवाहित कन्येच्या ठिकाणी जन्मलेला पुत्र. ती कन्या लग्न न होता पितृगृहीच राहिली, तर तो मातामहाचा पुत्र मानला जातो, असे याज्ञवल्क्य सांगतो. तिचे लग्न झाले, तर तो पुत्र तिच्या पतीचा मानावा, असे मनूचे मत आहे. महाभारतातले व्यास आणि कर्ण हे दोघे कानीन होते.

**कान्यकुब्ज ब्राह्मण** उ. भारतातील ब्राह्मणांची एक शाखा. तिचा अंतर्भाव पंचगौड ब्राह्मणांत होतो. फरुखाबाद जिल्ह्यातील प्राचीन कान्यकुब्ज किवा कनोज या गावचे हे रहिवासी होते, म्हणून त्याना कान्यकुब्ज किवा कनोजी ब्राह्मण असे नाव मिळाले. याना पूर्विया असेही म्हणतात. याचे सखरिया, सनाढच, जिझोतिया, भूमिहार व कनोजिया खास, असे पाच भेद आहेत.

कनोजी ब्राह्मणाची जातिविषयक घटना मोठी गुंतागुंतीची आहे. यासंबधी “काक सास उभा” असा यांचा सकेत आहे. का म्हणजे कात्यायन गोत्री, क म्हणजे कश्यप गोत्री, सा म्हणजे शाडिल्य गोत्री, स म्हणजे सस्कृत, उ म्हणजे उपमन्यु आणि भा म्हणजे भारद्वाज गोत्री ब्राह्मण असा या सकेताचा अर्थ आहे. या मूळच्या सहा कुलांतील लोकच अस्सल कनोजी ब्राह्मण होत. यावरून यांना षट्कुल असे एक नाव मिळाले आहे. षट्कुल कनोजी ब्राह्मणामध्ये विवाहाच्या काही विशिष्ट चाली आहेत. गोत्र भिन्न असल्यास पहिल्या बायकोच्या कुटुबातील व्यक्तीबरोबर दुसऱ्या बायकोच्या मुलांना विवाह करता येतो. यांच्यात साटे-लोटे करण्याचीही पद्धत आहे. दोन पुरुषाचे परस्परांच्या बहिणीशी लग्न होते. मुलगी एकदा परगोत्रात गेली, की पुढे पाच पिढ्यापर्यंत उभय कुटुबांना परस्परात विवाह करता येत नाही. षट्कुल पुरुषाला दुसरे लग्न करायचे झाल्यास त्याला पंचादरी नावाच्या कनिष्ठ जातीतील मुलीशीच ते करावे लागते. यांच्यांत पुनर्विवाहाची चाल नाही.

षट्कुलाखालोखाल पंचादरी व त्याच्याखाली धाकार अशा यांच्यांत जाती आहेत. याशिवाय षट्कुलांत बालाकीशुक्ल नावाची एक प्रतिष्ठित जात आहे. हे लोक सुरापान करतात व छिन्नमस्ता देवीला भजतात. कनोजी ब्राह्मणातील निरनिराळ्या पोटजातीचा सामाजिक दर्जा निरनिराळा असतो.

हे लोक आपल्या जातीच्या प्रथांचे काटेकोर पालन करतात. आपल्या जातीशिवाय अन्यजातीय लोकाकडे ते जेवत नाहीत. त्यामुळे यांच्या बाबतीत “आठ पूर्विया, नऊ चूल्हे” अशी म्हण पडली आहे. बहुतेक कनोजी ब्राह्मण शैव असून मांसाहार करतात.

हे ब्राह्मण उपाध्येगिरी, शेती, शिपाईगिरी, नोकरी, इ. धदे करतात. हे लोक लढवय्ये म्हणूनही प्रसिद्ध आहेत. [ म. ज्ञा. को.; रा. जा. ]

**कान्यकुब्ज राजवंश** पुरूरव्याचा पुत्र अमावसू याला कान्यकुब्जाचे (कनोज) राज्य मिळाले. त्याच्यापासून पुढे हा राजवंश सुरू झाला. अमावसू, भीम, कांचनप्रभ, सुहोत्र व जह्नु अशी ही वंशावळ पुराणात सापडते. [ ए. इं. हि. ट्रॅ. ]

**कॉन्व्हेंट** एक ख्रिस्ती मठसंस्था. हा मूळ लॅटिन शब्द आहे. कॉन्व्हेंट म्हणजे असेंब्ली, सभास्थान किंवा विशिष्ट धर्मपंथाचे स्त्री-पुरुष एकत्र येऊन झालेला संघ. पाश्चिमात्य देशात जेव्हा कोणतेच आश्रम अस्तित्वात नव्हते, तेव्हा भिक्षू आणि भिक्षुणी आपल्या प्रमुखाच्या सहवासात एकत्र राहत. त्या समुदायाला पुढे कॉन्व्हेंट म्हणू लागले. त्यानतर विशिष्ट धर्मपंथाचे लोक जिथे एकत्र राहतात, ती इमारत असा त्याला दुसरा अर्थ प्राप्त झाला. साप्रत त्या अर्थाचा संकोच होऊन ज्या इमारतीत विशिष्ट धर्मपंथाच्या स्त्रिया राहतात, त्या इमारतीला कॉन्व्हेट म्हणतात.

कॉन्व्हेटचा मुख्य हेतू एकातात प्रभूची प्रार्थना व ध्यानधारणा करणे, हा आहे. ज्या स्त्रियांनी संन्यस्त वृत्ती स्वीकारली, अशा स्त्रियांनाच कॉन्व्हेटमध्ये राहता येते. अलिकडे कॉन्व्हेंटचा उद्देश व आचारक्रमही बदलला आहे. परोपकार करणे, शिक्षण देणे, दवाखाने चालविणे, अनाथ–अपंगांची सेवा करणे इ. लोककल्याणाची कामे करण्याकडे हल्लीच्या धार्मिक लोकांचा ओढा आहे. पूर्वी हे संघ ख्रिश्चन सस्कृतीच्या प्रसारासाठी निष्ठेने झटत. आता ही कॉन्व्हेट्स् कॅथॉलिक चर्चची महत्त्वाची प्रचारकेंद्रे बनली आहेत. [ एन्सा. रि. ]

**कान्हरदास** रामानंद संप्रदायाचा एक प्रमुख प्रचारक व भक्त पवहारीबाबा याचा शिष्य. हा अग्रदासाचा समकालीन होता. [ हि. क. को. ]

**कान्हेरी लेणी** ठाणे शहराच्या पश्चिमेस व मुंबईच्या उत्तरेस १६ मैल अंतरावर साष्टी बेटातील दाट अरण्यात एका डोंगरावर १०२ गुहाचा जो एक समुदाय आहे, त्याला कान्हेरी लेणी म्हणतात. कृष्णागिरी या शब्दाचा कान्हेरी हा अपभ्रंश आहे. या लेण्यांतील जो भाग अद्यापि चांगल्या स्थितीत आहे, त्यावरून असे ध्यानात येते, की तिथे एक फार मोठा बौद्ध मठ असावा.

तिथली चैत्य लेणी गौतमीपुत्र सातकर्णी याच्या काळात (इ. स. १७३–२११) कोरली गेली, असा उल्लेख शिलालेखात आहे. दहाव्या क्रमाकाचे लेणे सभागृहासारखे आहे. बाकीची सर्व लेणी बौद्ध भिक्षूसाठी विहार आहेत. त्यात असंख्य लहान खोल्यांच्या रागा आहेत. उत्तरेकडील विस्तीर्ण गुहेत तीन दागोबा व ३४ स्तंभ असून तियेच बुद्धाच्या व अवलोकितेश्वराच्या प्रचंड मूर्ती आहेत. एका दागोबावरील छतात एक छत्री कोरलेली दिसते. डोंगराच्या माथ्यावरील खडकात पाण्याची कित्येक टाकी खोदलेली आढळतात. ही लेणी इ. स. १ ल्या, शतकापर्यंतच्या काळात खोदलेली असावी. मात्र काही भाग



बुद्धप्रतिमा– कान्हेरी लेणी

८ व्या किंवा ९ व्या शतकातलाही असण्याची शक्यता आहे. [ एन्सा. रि. ए.; हि. जॉ. ए. इं.; सु. वि. को. ]

**कान्हो पाठक** ज्ञानेश्वरकालीन एक संत. केंदूरचा राहणारा. ज्ञानेश्वराचा याच्यावर फार लोभ होता. ज्ञानेश्वरांनी आपल्या समाधीच्या वेळी आपली सगळी चीजवस्त कान्हो पाठकाला दिली, असा वारकरी मंडळीत समज आहे. अजूनही ज्ञानेश्वराच्या आरतीचे वेळी खिरापतीचा मान कान्हो पाठकाच्या वंशजाकडे असतो. याचे काही अभंग व 'गीतासार' या नावाचे एक लहानसे प्रकरण उपलब्ध आहे.

**गुरूपदेशु नागनाथू ॥**
**कान्हो पाठक विनवितु ॥**

असे त्यात म्हटले आहे. यावरून हा नागनाथाचा शिष्य असावा, असे दिसते. [ म. सा. ]

**कान्होपात्रा** (इ. स. १४६८ चा सुमार–वि. का. राजवाडे यांच्या मते) मंगळवेढ्याच्या श्यामा नामक वेश्येची ही मुलगी. तिला समज येताच आपल्या आईच्या व्यवसायाची किळस येऊ लागली. आपण तनुविक्रय करायचा नाही,

असे तिने ठरवून टाकले. कान्होपात्रा अत्यंत रूपमती होती. तिच्या जिवावर आपण श्रीमंती उपभोगू, असा तिच्या आईचा मनोदय होता. एके दिवशी ती कान्होपात्रेला म्हणाली. 'तू लावण्यखनी आहेस. या देशाचा राजा तुला वरील आणि पुष्कळ द्रव्य देईल.' त्यावर ती आईला म्हणाली. 'जो पुरुष माझ्यापेक्षा देखणा असेल, त्यालाच मी वरीन.' त्यामुळे राजाकडे जाण्याचा बेत रहित झाला.

पुढे तिला पंढरीच्या वारकऱ्यांची भजने ऐकण्याचा छंद लागला. त्यांच्याबरोबर तीही पंढरपुरास गेली. पांडुरंगाचे ते सावळे सगुण रूप पाहून तिला त्याचा लोभ जडला व तिने पांडुरंगालाच मनाने वरले. ती पंढरपुरातच राहून पांडुरंगाचे गुणगान करू लागली. पुढे एके दिवशी कोण्या एका गृहस्थाने बेदरच्या बादशहाकडे कान्होपात्रेच्या सौंदर्याची तारीफ केली. बादशहाने तिला आणण्यासाठी शिपाई पाठविले. त्यांनी तिच्यापुढे बादशहाच्या तारुण्याचे व वैभवाचे वर्णन केले व तिला म्हटले. 'तू सुखासमाधानाने आली नाहीस, तर आम्ही तुला जबरदस्तीने नेऊ.' कान्होपात्रा भविष्यार्थ उमगली. ती शिपायाना म्हणाली. 'तुम्ही इथे बसा, मी मंदिरात जाऊन देवाचा निरोप घेऊन येते. त्याप्रमाणे ती आत गेली. देवासन्मुख बसून तिने पाच अभंगांत पांडुरंगाची करुणा भाकली—

**पुरविली पाठ न सोडी खळ ।**
**अधम चांडाळ पापराशी ।।**
**वारितां नायके दुष्ट दुराचार ।**
**काय करू विचार पांडुरंगे ।।**
**तू माय माउली जगाची जननी ।**
**म्हणवोनि मिठी चरणी घालीतसे ।।**
**विनवी कान्होपात्रा जोडोनिया हात ।**
**आता देहअंत समय आला ।।**

देवाने तिची प्रार्थना ऐकली. त्याच क्षणी तिची आत्मज्योत देवाच्या ज्योतीत मिळाली व अचेतन देह देवाच्या पायाशी पडला. मग साधुसंतांनी तिचे प्रेत मंदिराच्या दक्षिणद्वारात पुरले. त्याच जागी पुढे एक तरटीचा वृक्ष उगवला. भाविकांनी त्या वृक्षाखाली बनवून ठेवलेली कान्होपात्रेची मूर्ती आजही त्या ठिकाणी दिसते.

## कापडी

(१) गंगेची कावड खांद्यावर घेऊन रामेश्वरी जाणारे यात्रेकरू. यांची वस्त्रे भगवी असतात व खांद्यावरची पताकाही भगवीच असते. यात्रा करताना ते गंगोदक, जपमाळा व जानवी विकतात.

(२) कच्छमधील एक पंथ. या पंथाचे लोक अविवाहित राहतात व अन्य जातीतल्या लोकांस पंथात घेऊन पंथ कायम ठेवतात. हे आशापुरा देवीचे उपासक असून भिक्षेवर निर्वाह करतात.

## कापणी

कृषिजीवी लोकांच्या आयुष्यात धान्याची पेरणी करण्यापासून त्याची कापणी करण्यापर्यंतचा काळ महत्त्वाचा असतो. या अवधीत ते अनेक विधि–विधाने करतात. कापणीला प्रारंभ करण्यापूर्वी भुताखेतांना काहीतरी अर्पण करणे, त्यांच्या नावाने जेवण घालणे, पहिली पेंढी देवाला अर्पण करणे, शेवटची पेंढी मुद्दाम तयार केलेल्या बाहुलीच्या गळ्यात घालून तिच्या भोवती नाचणे, अशा प्रकारचे विधी जगातील सर्व देशांत व सर्व मानवसमूहांत प्रचलित होते व आहेत. मेजवानी, उत्सव, नाच-गाणी, हा यातला भाग श्रमपरिहारासाठी असतो. हिंदू लोक बुध, मंगळ हे वार कापणीसाठी अशुभ व गुरू, शुक्र, शनी हे वार शुभ मानतात. पौर्णिमा, प्रतिपदा व ग्रहणदिन या दिवशी कापणी सुरू करीत नाहीत. केल्यास पिकाला अग्नीपासून भय निर्माण होते, असे मानतात. कापणीस सुरवात करण्यापूर्वी पिकाच्या एका पेंढीची पूजा करतात. कोकणात चार पाच भाताच्या लोंब्या एकत्र वळून देवघरावर किंवा दरवाज्यावर बांधतात. काही लोक शेताचा एक लहानसा तुकडा न कापता गुरेढोरे व गरीब वाटसरू यांच्यासाठी तसाच ठेवून देतात. अशा न कापलेल्या तुकड्याना दक्षिणेत वीजव्हड व कोकणात सीतादेवी म्हणतात. शेवटच्या कापलेल्या पेंढीस अनेक प्रदेशात अनेक नावे आहेत. कर्नाटकात तिला अरि, होलिगट्टू किंवा बेनप्पा; कोकणात सीतामाई, सीतादेवी किंवा सीतलदेवी; तर गुजरातेत देवाचा भाग म्हणतात. सामान्यपणे शेतकऱ्याची समजूत अशी असते, की शेवटच्या कापलेल्या मुठीतच सर्व धान्यलक्ष्मीचे सार असते. कुठे कुठे कापणी करताना पहिली पेंढी शुचिर्भूत माणसाला किंवा ब्राह्मणाला देतात. कापणी करताना अभद्र शब्द उच्चारायचा नसतो. [ की. पाँ. ]

## कापालिक

पाशुपतासारखा एक प्राचीन शैव पंथ. कापालिक हे वाममार्गी आणि उग्र प्रकृतीचे शिवोपासक आहेत. कपाली = माणसाची कवटी धारण करणारा शिव. त्याचे भक्त ते कापालिक होत. शिवाप्रमाणेच हेही माणसाची कवटी हाती वागवितात व तिच्यातूनच मद्य-मांसादींचे प्रकार सेवन करतात. नरहत्या, रक्तमांससेवन व स्मशानसाहचर्य ही कापालिकांची वैशिष्टचे होत. शिवपुराणात यांना महाव्रतधर म्हटले आहे. नरकपालात भोजन करणे, स्मशानात

बसणे, चिताभस्म लावणे, इ. अघोरी गोष्टी या महाव्रतात येतात.

कापालिकांचे आरभीच्या काळातले धार्मिक विधी व व्यवहार कसे किळसवाणे असत, त्याचे वर्णन वराहमिहिराने बृहत्संहितेत पुढीलप्रमाणे केले आहे – केसांचे जानवे, गळचात मानवी मणक्यांच्या माळा, हातात रक्ताने माखलेली शिरे व जटेत हाडांचे तुकडे अशी त्यांची आभूषणे असतात.

भवभूतीच्या मालतीमाधव नाटकात अघोरघंट नावाचा एक कापालिक व त्याची शिष्या कपालकुंडला यांचा प्रवेश आहे. नाटकातली नायिका मालती हिला कपालकुंडलेने चामुंडेला बळी देण्यासाठी धरून आणलेले असते. यावरून प्रारंभीच्या काळात कापालिकांमध्ये नरबली देण्याची पद्धत असावी, असे दिसते. श्रीशैल पर्वत हे कापालिकांचे केंद्र होते, असे सांगितले आहे. सौदामिनीनामक एक बौद्ध भिक्षुणी श्रीशैल पर्वतावर कापालिकसाधना शिकायला गेल्याचा उल्लेखही मालती-माधवात आहे.

कापालिक हे महाभैरव व चामुंडा या अत्युग्र दैवतांचे उपासक आहेत. त्यांची उपासनाही तशीच अघोरी आहे. प्रबोधचंद्रोदय नाटकात एक कापालिक आपल्या उपासना-मार्गाचा उद्घोष पुढीलप्रमाणे करतो–

**मस्तिष्कान्त्रवसाभिधारितमहामांसाहुतीर्जुह्वतां**
**वह्नौ ब्रह्मकपालकल्पितसुरापानेन नः पारणा ।**
**सद्यःकृत्तकठोरकण्ठविगलत्कीलालधारोज्ज्वलै-**
**रर्च्यो नः पुरुषोपहारबलिभिर्देवो महाभैरवः ।।**

(३. १३)

अर्थ— आम्ही मेंदू, आतडी व महामांस यांना वसेने (चरबी) अभिधारित करून त्यांचे अग्नीत हवन करतो. ब्राह्मणांच्या कवटीतून सुरापान करून आमची पारणा होते आणि नुकतेच ज्याचे मस्तक तोडले आहे व ज्याच्या कंठातून रुधिरधारा वाहत आहेत, अशा पुरुषाचा उपहार बली देऊन आम्ही महाभैरवाची अर्चना करतो.

शंकराचार्यांनी उज्जयिनी येथे कापालिकांशी वाद करून त्यांचा कसा पराभव केला, ते वर्णन माधवाच्या शांकरदिग्विजयात वाचायला मिळते. कित्येक कापालिकांना शंकराचार्यांनी त्यांचे मतपरिवर्तन करून आपल्या पंथात आणले. पण त्यातही उन्मत्तभैरवाचे अघोरी उपासक असे जे कापालिक होते, त्यांना मात्र त्याज्यच मानले. प्रबोधचंद्रोदयात एका बौद्ध भिक्षूची एका कापालिकाशी गाठ पडलेली दाखविलेली आहे. त्या वेळी तो भिक्षू त्या कापालिकाला मोक्षधर्माविषयी पृच्छा करतो आणि कापालिक त्याला सांगतो–

"विषयेन्द्रियांच्या संयोगावाचून सुख कुठून मिळणार! सुखशून्य आध्यात्मिक अवस्था हा काही मोक्ष नव्हे. शिवस्वरूप होऊन पार्वतीसम स्त्रीने दिलेल्या आलिंगनात बद्ध होऊन मुक्तपणे क्रीडा करणे, म्हणजेच मोक्ष होय" (३. १६).

त्यावर बौद्ध भिक्षू शंका प्रदर्शित करतो. "कामासक्त पुरुष मुक्त कसा होईल ?"

मग तो कापालिक एक चमत्कार करतो. दुसऱ्याच क्षणी एक उच्छृंखल कापालिनी पुढे येते. कापालिक तिला त्या भिक्षूला पकडण्यास सांगतो व ती त्याला धरून दृढालिंगन देते. भिक्षूला त्या गोष्टीचे सुख वाटते. मग तो कापालिकाला गुरू करून भैरवपंथाची दीक्षा घेतो

यावरून सहजयान व वज्रयान या दोन बौद्ध पंथांशी कापालिकांचा संबंध असावा, असे दिसते. कण्हपा हा बौद्ध सिद्ध आपण कापालिक असल्याचे सांगतो ( सिद्ध साहित्य). सहज-वज्रयानांच्या साधनेत स्त्रीसमागम अनिवार्य आहे. त्याचप्रमाणे कापालिक मतातही स्त्रीसाहचर्य अत्यावश्यक मान-लेले आहे. त्यांच्या साधनेतले काही संकेतही समान आहेत. बौद्धांच्या तांत्रिक आचारांत मानवी मनाच्या प्रवृत्तीचे जे किळसवाणे स्वरूप दिसून येते, तेच स्वरूप शैव पंथातील निकृष्ट अवस्थेस पोचलेल्या कापालिकांसारख्या पंथातही आढ-ळते. कापालिकांचा नाथपंथाशीही संबंध दिसतो. गोरक्षप्रणीत नाथसंप्रदायात कापालिकसाधनेचा समावेश झाला आहे. नाथ-पंथी साधनेत नाडी व चक्र या हठयोगातल्या कल्पनांना महत्त्व दिलेले आहे. त्याचप्रमाणे कापालिक मतातही त्यांचा स्वीकार केलेला आहे. यावरून संशोधकांना संशय पडला आहे, की कापालिक पंथाचा उगम वज्रयानी परंपरेतून झाला का गोरक्ष-प्रणीत नाथपरंपरेतून झाला ?

**कापालिकांचें तत्त्वज्ञान–** कापालिक हे माला, अलंकार, कुंडल, चूडामणी, भस्म व यज्ञोपवीत या सहा वस्तू अंगावर धारण करतात. त्यांना ते सहा मुद्रा मानतात. या षण्मुद्रांचे रहस्य समजले, की त्याला महासुखाची प्राप्ती होते. जो भगा-सनावर बसून आत्मचिंतन करतो तो निर्वाणाला पोचतो, असे ते समजतात. मद्याला ते पशुपाशसमुच्छेदकारण समजतात. कर्पूरमंजरीतल्या भैरवानंदाच्या मते मद्यपान व स्त्रीसंभोग यातूनच सहज मोक्षप्राप्ती होते. कापालिकांना हठयोगाच्या साधनेने अनेक सिद्धी प्राप्त असतात, असे सांगितले आहे.

कापालिकांचा पहिला उल्लेख मैत्री उपनिषदात सापडतो. त्यांना त्या ठिकाणी तस्कर (चोर) म्हटले असून त्यांच्या सहवासात कोणीही राहू नये, असे सांगितले आहे. पुराण-वाङ्मयात कापालिकांच्या मताची विस्तारपूर्वक चर्चा आढळते.

कथासरित्सागरात कापालिकांच्या कितीतरी गोष्टी आलेल्या आहेत. त्यानंतरच्या संस्कृत-प्राकृत वाङमयातही कापालिकांचा व त्याच्या बीभत्स साधनेचा तिरस्कारपूर्वक उल्लेख आढळतो. गाथासप्तशतीत कापालिक स्त्रीसंबंधी गाथा आहे, ती अशी–

**जारमसाणसमुब्भवभूइसुहफ्फंससिज्जिरङीए ।**
**ण समप्पइ णवकावालिआइ उद्धूलणारम्भो ।।**

(गा. स. ४०८)

अर्थ - तरुण कापालिका स्मशानात बसली आहे. पुष्कळ वेळ लोटला, तरी तिचे प्रसाधन संपत नाही; कारण ती आपल्या जाराच्या प्रेताची राख अंगाला लावीत आहे आणि त्यामुळे होणाऱ्या सुखाने तिच्या अंगाला घाम येत आहे.

आरंभीच्या काळात भारताच्या सर्व भागात कापालिकांचा संचार व प्रचार होता, असे दिसते. पण नंतरच्या काळात कापालिकांनी इतर सर्व प्रदेश सोडून मालव आणि आभीर या दोनच देशांत आपले बस्तान बसविले. नासिक येथे कपालेश्वराचे एक मंदिर आहे. त्या मंदिरात कापालिक लोक वास्तव्य करून असतात. त्यांच्या चरितार्थासाठी नागवर्धन या राजाने इगतपुरीजवळचे एक खेडे कापालिकांना दान दिले होते. [रि. लि. इं.; गो. च. प.; सि. सा.; प्र. वि.; रि. इं.; गा. स.]

**कापिशी** प्राचीन कपिशा प्रांताची राजधानी. हिंदुकुश पर्वताच्या दक्षिणेस बेग्राम नावाचे जे गाव आहे, तेच प्राचीन कापिशी होय. कपिश प्रांत हाच सांप्रतचा काफिरिस्तान समजला जातो. बाल्हिक देशातून बामियाँवरून काफिरिस्तानात प्रवेश करणाऱ्या मार्गावर आणि घोरबंद व पंजशीर नामक नद्यांच्या संगमावर कापिशी नगरी वसली होती. ती एक व्यापाराची उतारपेठ असून तिथे सांस्कृतिक केंद्रही होते. तिथे कापिशायन मधू नावाची विशिष्ट प्रकारची दारू बने व तिथून ती भारतात येई, असा कौटिल्याने उल्लेख केला आहे.

प्लिनी म्हणतो, की सनपूर्व सहाव्या शतकापूर्वी हखामनी वंशाचा इराणी सम्राट कुरुष याने कापिशीचा विध्वंस केला. कालांतराने ती नगरी पुनश्च वसली आणि हूणांच्या हातांनी पुनरपि उद्ध्वस्त झाली. या नगरीत सापडलेल्या शिक्क्यांवर हत्तीचे चिन्ह आढळले आहे. तो हत्ती इंद्राचा ऐरावत असावा, कारण इथे मिळालेल्या उत्तरकालीन शिक्क्यांवर ग्रीक देवता जियसची (भारतीय इंद्र) मूर्ती मिळाली आहे. [पा. भा.]

**कापू** द. भारतातली शेतकऱ्यांची एक मोठी जात. हिला रेड्डी असेही नाव आहे. तेलुगू प्रदेशात त्यांच्या मालकीच्या फार मोठ्या जमिनी असून समाजात त्यांना मोठा मान आहे. कापू शब्दाचा अर्थ पहारेकरी असा असून रेड्डी शब्दाचा अर्थ राजा असा आहे.

सालेम जिल्ह्यावर राज्य करणाऱ्या सूर्यवंशी कोंगू राजांशी या रेड्डीचा संबंध होता. या रट्टी किंवा रेड्डी जमातीच्या सात राजानी कोंगू राजांपूर्वी त्या भागावर राज्य केले. हे स्वतःला सूर्यवंशी समजतात व रामपुत्र कुशाशी आपला सबंध जोडतात. काही ठिकाणी ते स्वतःला चंद्रवंशी मानतात.

कापू जात कशी अस्तित्वात आली, याबद्दल पुढील आख्यायिका प्रचलित आहे–

प्रतापरुद्र राजा राज्य करीत असता, बेल्थी रेड्डीच्या पत्नीने तीव्र तप करून सूर्याकडून एक कर्णफूल मिळविले. प्रतापरुद्राला ते कर्णफूल आपल्या राणीसाठी मिळवावे, असे वाटले. त्याकामी त्याने आपल्या मंत्र्याची योजना केली. मंत्र्याने ते हिकमतीने चोरून आणले. बेल्थी रेड्डीच्या पत्नीला या गोष्टीचे दुःख झाले. तिने आपल्या मोठ्या मुलाला ते परत मिळवायला सांगितले; परंतु राजाशी प्रसंग असल्यामुळे मुलाने ती गोष्ट नाकारली. दुसऱ्या मुलानेही नकारच दिला. तिसऱ्या मुलाने मात्र धीर करून ते परत मिळविले. या तीन्ही मुलांच्या वंशजांना अनुक्रमे पंट, पाकनाटी व कम्म अशी नावे मिळाली.


कापू पुरुष

कापू हे प्राचीन काळी अयोध्येत राहत होते, असे म्हणतात. भरत अयोध्येवर राज्य करीत असताना पिल्लल मरी बेल्थी रेड्डी याने व त्याच्या मुलांनी भरताला कर म्हणून धान्य न देता गवत दिले. पुढे राम राज्यावर आल्यावर त्याने रेड्डीचे हे कपट

ओळखले व शिक्षा म्हणून त्याला दशरथाच्या श्राद्धासाठी तांबडे भोपळे आणायची आज्ञा केली. रेड्डीने त्यासाठी भोपळ्याचे वेल लावले; पण मारुतीने ते उपटून टाकले. त्यामुळे रेड्डीला भोपळे मिळाले नाहीत. तेव्हा भोपळ्याच्या वजनाइतके सोने रेड्डीने द्यायचे ठरविले. परंतु त्याच्याकडे पुरेसे सोने नव्हते. तेव्हा तेवढे वजन भरण्यासाठी रेड्डी स्त्रियानी आपली सौभाग्य-चिन्हे पारड्यात टाकली. तेव्हापासून पुढे मोटाटी व पेडकंटी या जातीनी बट्टू या सौभाग्यचिन्हाऐवजी हळदीने रंगविलेला दोरा सौभाग्यलक्षण म्हणून स्वीकारला. त्यानतर रेड्डीने आपली एक बायको व सत्याहत्तर मुले घेऊन अयोध्या सोडली. वाटेत त्याना शिला नदी ओलांडावी लागली. नदीच्या पात्रातून जर ते चालले असते, तर त्यांना शिळा होऊन पडावे लागले असते. म्हणून त्यांनी गंगादेवीची पूजा केली व त्या मूर्तीचे शिर नदी-तीरावर आणले. त्याबरोबर शिला नदी दुभंगली व रेड्डीना कोरडा रस्ता मिळाला. या घटनेची स्मृती म्हणून कापू लोक लग्नसमारंभाच्या वेळी गंगादेवीची पूजा करू लागले. नंतर ते ओरगंटी प्रतापरुद्राच्या राज्यात येऊन स्थायिक झाले आणि त्याच्यापासून पुढे इतर पोट जाती निर्माण झाल्या. त्यांपैकी प्रमुख जाती पुढीलप्रमाणे–

मदुरा व तिनेवेल्ली जिल्ह्यात अयोध्या किंवा औध यांची वस्ती आहे. लग्नसमारंभाच्या वेळी वधूपक्षाकडील लोक वर-पक्षाला विचारतात, की 'तुम्ही कोण?' त्यावर वरपक्ष उत्तर देतो, की 'आम्ही अयोध्या रेड्डी.' नंतर असाच प्रश्न वधूपक्षाला विचाल्यावर 'आम्ही मिथिला रेड्डी' असे वधूपक्ष उत्तर देतो. नंतर हे लोक वधूच्या गळचात सोन्याच्या ताळी-ऐवजी सूत वळून त्याची ताळी बांधतात.

बलिज हे लोक प्रारंभी व्यापार करीत असत, पण नंतर ते शेतीकडे वळले.

याशिवाय कापूंच्या भूमची, देसूर, गंदी कोट्टई, गाझुल, कम्मपुरी, मोरस, येरलम, इ. पोटजाती प्रसिद्ध आहेत.

मुलीला प्रथम ऋतुप्राप्ती झाली, की सोळा दिवस विटाळ पाळतात. मुलगी जे वस्त्र नेसलेली असते, ते मग धोबिणीच्या मालकीचे होते.

**विवाहप्रथा**– मुलीचे देज घेण्याची पद्धत आहे. लग्नात न्हावी, धोबी व देवदासी यांना महत्वाचे स्थान असते. यांच्या विवाहसमारंभात गणपतिपूजा, वधू-वरावर अक्षता टाकणे, अरुंधतीदर्शन, इ. विधी महाराष्ट्रातील लग्नसमारंभाप्रमाणे असतात. लग्नानंतर एका विशिष्ट झाडाचा खुट घराच्या मागच्या अंगणात पुरतात. त्याला जर पालवी फुटली, तर लग्नसंबंध यशस्वी होईल, असे मानतात.

तिनेवेल्ली जिल्ह्यातील रेड्डी लोक अनेकदा पंधरा–सोळा वर्षाच्या मुलीचे लग्न पाच–सहा वर्षाच्या एखाद्या मुलाशी लावतात. अशा वेळी ती मुलगी मुलाच्या मामाशी किंवा खुद्द सासऱ्याशी संबंध ठेवते. अशा संबंधापासून झालेली संतती त्या मुलाचीच मानण्यात येते. जेव्हा मुलगा वयात येतो, तेव्हा त्याची बायको म्हातारी झालेली असते. त्यामुळे तो दुसऱ्या एखाद्या लहान मुलाच्या तरुण बायकोशी सबंध ठेवतो व संतती निर्माण करतो.

कापू लोक शैव व वैष्णव या दोन्ही पंथाचे असून ते थालम्म, नागपम्म, पुतलम्म, मुनेश्वर, इ. अनेक देवतांना भजतात.

कापू समाजात स्त्रियांना फार मान आहे. याचे कारण असे सांगतात, की कापू लोक अयोध्येतून इकडे आले, तेव्हा त्याच्या बरोबर स्त्रिया नव्हत्या. मग त्यांनी या बाबतीत देवांचा सल्ला विचारला. देवांनी त्याना पांडवांच्या अनौरस कन्यांशी विवाह करायला सांगितले. या मुलीनी आपण भात सडणे, भांडी घासणे, पाणी आणणे, इ. श्रमाची कामे करणार नाही, असे सांगितले व कापू पुरुषांनी ते मान्य केले.

पंट रेड्डीच्या स्त्रिया नाकात नथ घालतात. या स्त्रियांना भरपूर स्वातंत्र्य असते. नवऱ्यावरही त्या हुकमत गाजवितात.

**मर्तिकप्रथा**— प्रेते जाळतात. अस्थींचे विसर्जन गंगेत किंवा एखाद्या अन्य नदीत करतात.

वऱ्हाड, चंद्रपूर या भागातील कापूंना कापेवार असे म्हण-तात. चांद्याचा किल्ला बांधण्यासाठी या लोकांना त्या भागात आणले गेले, असे सांगतात. या लोकात मुलीचे लग्न दहा वर्षाच्या आत न केल्यास आईबापांना वाळीत टाकतात; पण प्रायश्चित्त घेऊन त्यांना पुन्हा जातीत येता येते. गोदावरीच्या तीरावरील एखाद्या क्षेत्रात लग्न केल्यास मात्र अशी शिक्षा मिळत नाही. सर्वसाधारणपणे लग्न वरगृही होते. लग्नाच्या चौथ्या दिवशी वर नांगराचे सर्व भाग व वधू शिदोरी डोक्यावर घेऊन मंडपाच्या एका टोकाला जातात. तिथे वर बैलाच्या पराणीने जमीन खोदून तीत सरकी व जोंधळे पेरतो. मग सर्व लोक वधूने आणलेली शिदोरी खातात आणि धान्य टाक-लेल्या जागी हात धुतात. [का. ट्रा. स. इं.; म. ज्ञा. को.]

## कापूर
कर्पूरदान पाहा.

## काप्पिलियन
द. भारतातील कानडी बोलणाऱ्या शेतकऱ्यांची एक जात. नऊ कंबलम् जातीपैकी ही एक आहे. यांना करुंपुरथ्थाल असेही नाव आहे. तुंगभद्रेच्या तीरावरून तोत्तियनांच्या त्रासाला कंटाळून सहा-सात पिढ्यां-

पूर्वी हे लोक मदुरा जिल्ह्यात आले, असे सांगतात.

यांच्या धर्मकट्टू व मुनुकट्टू अशा दोन शाखा आहेत. या दोन शाखांत लग्नसबंध होतो. याशियाय काप्पिलियनांच्या अनेक उपशाखा असून त्यांच्यांत मात्र परस्पर लग्नसंबंध होत नाही.

हे जातीच्या प्रमुखाला गौड व उपप्रमुखाला सौदरी असे म्हणतात.

या जातीतील मुलीला प्रथम ऋतुप्राप्ती झाली, म्हणजे ती तेरा दिवस बाजूला बसते. ती घरातच राहणार असली, तर तिचा मामा पडदा लावून तिच्याभोवती आडोसा करतो व ती घराबाहेर राहणार असल्यास तिच्यासाठी एक तात्पुरती झोपडी उभारतो. या कामाबद्दल त्याला मेजवानी मिळते. तेराव्या दिवशी ती तळ्यावर स्नान करते आणि उंबऱ्याजवळ ठेवलेल्या मुसळ व भाकरी या वस्तू ओलाडून घरात प्रवेश करते. त्या वेळी घराच्या दरवाज्याजवळ कुत्र्यासाठी अन्न ठेवतात. तो ते खात असताना त्याला खूप मार देतात. त्या वेळी तो जर मोठमोठ्याने ओरडला, तर ऋतुमतीला पुष्कळ मुले होतील, असे मानतात. आणि तो ओरडला नाही, तर ती वाझ राहील, असे समजतात.

**विवाहप्रथा–** विवाह साधारणपणे मोठेपणी होतात. याच्यांत लग्नाच्या वेळी मुलीच्या गळ्यात ताळी बाधायचा प्रघात नाही. मुलीचे देज घेतात. लग्नसमारंभ तीन दिवस चालतो. वराने वधूला पीतवस्त्र देणे, वधूने काचेच्या काळ्या बागड्या घालणे व वधू-वरांची बोटे मामाने एकत्र बाधणे हे लग्नातील मुख्य विधी होत. मुलाने आतेबहिणीशीच लग्न केले पाहिजे, असा नियम आहे. त्यामुळे पुष्कळदा वधू वयाने मोठी आणि वर वयाने लहान असेही प्रसग उद्भवतात. जेव्हा लहान वयामुळे पती आपली गृहस्थधर्माची जबाबदारी पार पाडायला असमर्थ असेल, तेव्हा पत्नीला तिच्या दिराबरोबर राहायची परवानगी असते. अशा स्थितीत तिला झालेली संतती तिच्या नवऱ्याचीच मानली जाते. जातिबाह्य व्यभिचाराबद्दल स्त्रीला बहिष्कृत करतात व ती मेल्यासारखीच आहे, असे समजून तिच्या एखाद्या दागिन्यावर तिचा अंत्यसंस्कार करतात.

हे लोक लक्कम्म, वीर लक्कम्म, चेन्नराय, थिम्मप्प व सीरंग पेरुमल इ. देवताना भजतात.

**मर्तिकप्रथा –** मृताना जाळतात. अंत्यसंस्काराच्या शेवटच्या दिवशी नदीकिनारी मृताची एक प्रतिमा उभारतात व तिला अनेक वस्तू अर्पण करतात. अत्यसंस्कारात धोब्याची उपस्थिती आवश्यक असते.

मदुरा जिल्ह्यातले काप्पिलियन गुरे पाळीत असले, तरी गायीचे दूध मात्र काढीत नाहीत. गोठ्यातल्या बैलांपैकी एखाद्या पुष्ट बैलाला ' राजवृषभ ' म्हणून निवडण्याचा मोठा समारंभ करतात. त्या बैलाला मग नंदगोपाल किंवा वेणुगोपाल स्वामी असे नाव देतात. [ का. ट्रा. स. इं. ]

## काफिर

(१) याचा शब्दशः अर्थ सत्य लपविणारा असा आहे. परंतु मुसलमान लोक पैगंबर व कुराण यांच्यावर विश्वास न ठेवणाऱ्यांना हा शब्द लावतात. मुहम्मदाने कुराणात हा शब्द वापरला आहे. [ डि. इ. ]

(२) एक जात. हे लोक पेशावर खोऱ्याच्या उत्तरेस राहतात. त्या प्रदेशाचे अद्यापि नीट संशोधन झालेले नसल्यामुळे या लोकाविषयी फारशी माहिती मिळत नाही. काही अंशी ग्रीक संस्कृतीचे अवशेष त्यांच्यात आढळतात. काफिर स्त्री–पुरुष नृत्यप्रिय आहेत. पोलो हा त्याचा आवडता खेळ आहे. अपराधाच्या निवाड्यासाठी त्याच्यांत अग्निदिव्य करण्याची प्रथा आहे. [ रे. क. इं. ]

## काफी

हिंदुस्तानी संगीतातली एक रागिणी. ही संपूर्ण-संपूर्ण वर्गाची, सरळ व सर्वपरिचित आहे. सा, री, ग, म, प ही तिची प्रमुख मुद्रा आहे. पंचम हा हिचा वादी स्वर आहे. हिची गणना क्षुद्र रागात होते; त्यामुळे टप्पा, ठुमरी, होरी, पदे, दादरे वगैरे शब्दनिष्ठ गायनप्रकारात काफीचा बराच उपयोग करतात. क्षुद्र अलंकारांची हिला विशेष आवड आहे.

## काबा

या अरबी शब्दाचा अर्थ चौकोनी इमारत किंवा साही बाजूना सारखे चौकोन असलेली घन आकृती असा आहे. मक्का येथील मशिदीत मध्यभागी जो चौकोनी चबुतरा आहे त्याला काबा म्हणतात. त्याची लांबी, रुंदी व उंची सुमारे ३० फूट असून तो मोठमोठ्या राखी रंगाच्या दगडांचा बांधलेला आहे. खाली दोन फूट उंचीचा चौथरा आहे. या चबुतऱ्यातच पूर्व बाजूला हजरुल अस्वद नावाचा काळा पाषाण बसविलेला आहे.



काबा

दक्षिणेकडील कोपऱ्यात दुसरा एक साधा पाषाण (दीड फूट लाब व २ इंच रुंद) उभा ठेवलेला आहे. त्याला यमनस्तंभ म्हणतात. काबाभोवती फेरी घालताना प्रत्येक फेरीत या स्तंभाला उजव्या हाताने स्पर्श करण्याची प्रथा आहे.

काबाच्या वायव्य बाजूच्या भितीत एक सोन्याची तोटी आहे, तिला मिझाबुर रहमा (दया-मुख) म्हणतात. काबावर पडणारे पावसाचे पाणी या तोटीतून खाली येते व इस्माईलच्या कबरीवर पडते.

काबावर अर्धरेशमी गर्द काळ्या रंगाचे वस्त्र पसरलेले आहे; त्याला किस्वा म्हणतात. त्याला एक सोनेरी पट्टा जोडलेला असून त्यावर कुराणातील एक आयत लिहिलेले आहे.

आदमला स्वर्गातल्या नंदनवनातून बाहेर जाण्यास सागितल्यानंतर त्याने या ठिकाणी येऊन प्रथम प्रार्थना केली, अशी मुसलमानांची समजूत आहे. [ डि. इ. ]

## काबाडी

ही जात नसून एक वर्ग आहे. याचा अर्थ सावकाराच्या घरी ऋण फेडण्याकरिता नोकरी करणारा ऋणको असा आहे. हे कर्ज तो आपल्या लग्नासाठी म्हणून घेतो व ते फिटेपर्यंत त्या सावकाराच्या घरी राबतो. त्याच्या ह्यातीत कर्ज फिटले नाही, तर त्याच्या बायकोला व मुलांना ते फेडण्यासाठी सावकाराच्या घरी नोकरी करावी लागते. काबाडीला पैसे व कपडेलत्ते किती द्यायचे हे त्याच्या मालकाच्या मर्जीवर असते. काबाडीला आपल्या मालकाच्या आवारातच राहावे लागते व मालकाने हाक मारताच पुढे हजर व्हावे लागते. सांप्रत या पद्धतीच्या उच्चाटनाचे प्रयत्न सर्वत्र चालू आहेत.

## काबुली

गुजरातमधली एक जमात. अहमदाबादेत यांची संख्या जास्त आहे. हे पुश्तू व उर्दू बोलतात आणि काबुली मेवा विकून निर्वाह करतात. [ वि. मु. रा. प. ]

## काम

एक देवता. ब्रह्मयाचा मानसपुत्र. तो अत्यंत सुदर निपजला. जन्मतःच त्याच्या अंगाला सुवास येत होता. ब्रह्मदेवाला नमस्कार करून त्याने विचारले. ' त्रैलोक्यात माझे कार्य काय ? ' त्यावर ब्रह्मदेव त्याला म्हणाला. ' तुझ्या पुष्पबाणांनी तू स्त्री–पुरुषांना मोहित कर. मांझ्या वराने विष्णू, शंकर, इ. सर्व देवही तुला वश होतील. '

त्यावर लगेच कामदेवाने ब्रह्मदेवाच्या वराची प्रचीती पाहायचे ठरविले. त्याने धनुष्याला बाण जोडताच ब्रह्मदेवाचे दक्षादी मानसपुत्र विकाराने घायाळ झाले. ब्रह्मदेवाची कन्या संध्या हिच्यावर ते मोहित झाले; पण त्याहूनही आश्चर्याची गोष्ट म्हणजे ब्रह्मदेव स्वतःच प्रेमविव्हल होऊन आपल्या कन्येच्या मागे लागला. ती गोष्ट पाहून शंकराने ब्रह्मदेवाची निर्भर्त्सना केली. त्यामुळे ब्रह्मदेव खजील झाला व त्याने कामाला शाप दिला. ' शंकर तुला आपल्या नेत्राग्नीने जाळून भस्म करील. ' त्यावर कामदेव विधात्याला म्हणाला. ' तू मला शापणे योग्य नव्हे; मी फक्त तू दिलेल्या वराची प्रचीती पाहिली. ' त्यावर ब्रह्मदेवाने त्याला उःशाप देऊन म्हटले, की ' शिव जेव्हा पार्वतीचा पत्नी म्हणून स्वीकार करील, त्या वेळी तो तुला दुसरे शरीर देईल. '

त्यानंतर दक्षाने रतीनामक आपली कन्या कामाला दिली. रती ही सुद्धा मदनाप्रमाणेच अत्यंत रूपवती होती. त्या दिवसापासून जगांतल्या कोणत्याही सुंदर जोडप्याला रति-मदन हे उपमान योजले जाऊ लागले.

काम हा चिरतरुण असून वसंतऋतू हा त्याचा मित्र आहे. शिवाला मोहित करण्याच्या मोहिमेवर निघाला असता कामाने या आपल्या मित्रालाच पुढे घातले होते (कु. सं. ३). शुक हे कामाचे वाहन आहे. याला आणखी काही नावे आहेत ती त्यांच्या कारणासह पुढे दिली आहेत—



कामदेव

(१) **मदन –** कामाचा प्रवेश झाला, की स्त्री–पुरुषांच्या शरीरात मद उत्पन्न होतो.

(२) **मन्मथ –** कामाने जन्मतःच ब्रह्मदेवासह मरीच्यादी ऋषींच्या मनाचे मंथन केले, म्हणून तो मन्मथ झाला.

(३) **अनंग–** शिव तपश्चर्या करीत असता कामाने त्याच्यावर शरसंधान केले. ही गोष्ट लक्षात येऊन शिवाने आपला तृतीय नेत्र उघडला व त्यातून निघालेल्या अग्निज्वाळांनी कामाला जाळून भस्म केले. त्यावर रतीने विलाप मांडला. तेव्हा शंकराला तिची दया येऊन त्याने तिला वर दिला, की ' तुझा पति अनंग (शरीररहित) स्वरूपात मानवांच्या मनात जिवंत होईल.' तेव्हापासून काम हा वृत्ती किवा भाव या स्वरूपात सर्वत्र सजीव झाला.

(४) **पंचबाण–** इक्षुदंड (ऊस) हे कामदेवाचे धनुष्य असून

त्याचे पाच बाण पुढीलप्रमाणे आहेत–

**अरविन्दमशोकं च चूतं च नवमल्लिका ।**
**नीलोत्पलञ्च पञ्चैते पञ्चबाणस्य सायकाः ।।**

(अमर)

अर्थ– श्वेतकमल, अशोकपुष्प, आम्रमंजरी, नवमल्लिका व नीलकमल हे कामदेवाचे पाच बाण होत.

कामाच्या पंचबाणाची स्थूल, सूक्ष्म, प्रकृतिमय व भावमय अशी विविध रूपे कल्पिलेली आहेत. उन्मादन, तापन, शोषण, स्तभन व संमोहन ही त्यांची भावनामय रूपे होत.

(५) **प्रद्युम्न–** शिवाच्या नेत्राग्नीने भस्म झालेल्या मदनाने पुढे द्वारकेत श्रीकृष्णाचा पुत्र म्हणून जन्म घेतला व त्याला हे नाव मिळाले.

(६) **मकरध्वज–** कामदेवाच्या ध्वजावर मकराचे चित्र असते.

(७) **मनसिज–** कामाचा प्रादुर्भाव प्राण्यांच्या मनात होतो. स्वतःच्या अंतरातच त्याला कामाची अनुभूती घडते. मनुष्य कामवश झाला, की तो विवेकाला पारखा होतो आणि उन्मत्तही होतो. 'कामातुराणा न भयं न लज्जा' असे सुभाषितच आहे. कामोन्मत्त होऊन स्त्रियाच्या पाठीमागे लागलेल्या देव-ऋषी–मानवांच्या कितीतरी कथा पुराणातून भरलेल्या आहेत.

याशिवाय मार, मीनकेतन, कंदर्प, दर्पक, स्मर, पुष्पधन्वा, रतिपती, आत्मभू अशीही त्याची नावे आहेत.

प्राचीन काळी नगराबाहेरच्या उद्यानात आणि नगरवस्तीतही कामदेवाची मदिरे असत. असेच एक मंदिर उज्जयिनीत असल्याचा उल्लेख मृच्छकटिकात आला आहे. हर्षचरितात लिहिले आहे, की राज्यश्रीच्या कौतुकगृहाच्या द्वारावर एका अंगी काम व दुसऱ्या अंगि रती-प्रीतीची चित्रे काढलेली होती. मथुरेत मिळालेल्या एका मातीच्या खेळण्यावर पंचबाणधारी काममूर्ती उठावाने काढलेली आहे. त्याच्या पायांतळी आडवा पडलेला एक पुरुष दाखविलेला असून त्याला शूर्पक असे नाव असल्याचे एका लोककथेवरून कळते.

प्राचीन काळी वसंतोत्सवात नागरजन कामदेवाची पूजा करीत व तो दिवस आमोद-प्रमोदात घालवीत. कामदेवाला अप्सरांचा व ऋतूंचा अधिपती मानला आहे (ब्रह्मांड ३. ८. १५). तो वेश्या व गणिका यांचाही उपास्य देव असून त्यांनी त्याच्या प्रीत्यर्थ पूजन व अनंगदान करावे, असे हेमाद्री सांगतो. कामदेवाची प्रतिमा कशी बनवावी, ते विष्णुधर्मोत्तर पुराणात पुढीलप्रमाणे सांगितले आहे –

**कामदेवस्तु कर्तव्यो रूपेणाप्रतिमो भुवि ।**
**अष्टबाहुः प्रकर्तव्यः शङ्खपद्मविभूषणः ।।**
**चापबाणकरश्चैव मदोदञ्चितलोचनः ।**
**रतिः प्रीतिस्तथा शक्तिर्मदशक्तिस्तथोज्ज्वला ।।**
**चतस्रस्तस्य कर्तव्या. पत्न्यो रूपमनोहराः ।**
**चत्वारश्च करास्तस्य कार्या भार्यास्तनोपगाः ।।**
**केतुश्च मकरः कार्यः पञ्चबाणमुखो महान् ।**

अर्थ – कामदेव हा जगात रूपाने अप्रतिम ठरेल असा बनवावा. तो अष्टभुज असावा. त्याच्या हाती शंख, कमल, धनुष्य व बाण या वस्तू असाव्या. त्याचे नेत्र मदघूर्णित असावे. रती, प्रीती, शक्ती व मदशक्ती या त्याच्या चार स्त्रिया त्याच्याजवळ असाव्या. त्या सुदर व कातिमान बनवाव्या. कामाचे चार हात त्या स्त्रियांच्या स्तनावर ठेवलेले असावे. त्याच्या ध्वजावर पाच बाणांचे मुख बनविलेला मोठा मकर असावा.

कामदेवाचे आठ बाहू तो अष्टदिशा व्यापून असल्याचे सूचित करतात. त्याच्या हातातले कमल सकल सृष्टीवर त्याचे प्रभुत्व चालत असल्याचे निदर्शक आहे. **पाहा** – कामशास्त्र; मदनोत्सव; मदनद्वादशी; अनगदान. [शिव पु.; अ. अ.; भा. प्र. वि.; म. ज्ञा को.; हिं. वि. को.]

## कामकला

एक तांत्रिक कल्पना. शाक्त तत्त्वज्ञानात कामकला ही एक महत्त्वाची संज्ञा आहे. नाद व बिंदू हे सृष्टीचे आदिरूप असून त्याचेच विकसित व विस्तृत रूप म्हणजे हे नामरूपात्मक जगत होय. चेतनेच्या या महाविस्तारात नाद-बिंदूचे स्पंदन सुरू झाले, म्हणजे स्पंदन त्रिकोणाचे रूप ग्रहण करते. नाद, बिंदू व बीज असा तो त्रिकोण बनतो. या त्रिकोणालाच कामकला अशी संज्ञा आहे. त्यावरून इच्छा, ज्ञान व क्रिया या तीन शक्ती; सत्त्व, रज व तम हे तीन गुण; वामा, ज्येष्ठा व रौद्री या तीन देवी; ब्रह्मा, विष्णू व रुद्र या तीन देवता आणि सूर्य, चंद्र व अग्नी ही तीन तेजे अशा त्रितयांचा बोध होतो.

चिदानंदातून निर्माण झालेली क्रियाशक्ती ही सृष्टीचे कारण आहे. त्रिकोणाची ही क्रिया किंवा गती म्हणजे आलंकारिक भाषेत ब्रह्माचे मैथुनकर्म होय. ब्रह्माचे निष्क्रिय रूप निश्चल पडून राहिलेले असते. त्यावर त्रिकोणात्मक स्पंदन नृत्य करीत असते. हीच महाकालाबरोबर महाकालीची विपरीत गती होय. हिलाच कामकला असे म्हणतात. हिचे वर्णन पुढीलप्रमाणे आहे–

**बीजत्रितयशक्तित्रितयलिङ्गत्रितयमयं त्रिकोणं कामकलाक्षररूपम् ।**

अर्थ– तीन बीजे, तीन शक्ती, तीन लिंगे यांनी बनलेला त्रिकोण म्हणजे कामकला होय. हा त्रिकोण अक्षर (अविनाशी) असतो.

ही कामकला सर्व मंत्राचे मूळ समजली जाते. **पाहा**– त्रिकोण. [ स. पॉ.; भा. प्र. वि. ]

**कामकार** उत्तर प्रदेशातील मजुराची एक जात. या नावाची व्युत्पत्ती कर्मकार या शब्दावरून सागतात. कम्=पाणी. यावरून पाणी ओढणारे असाही अर्थ लावतात. प. बंगालमध्ये कहारांनाच कामकार म्हणतात. मगधराजा जरासंधापासून ते आपली उत्पत्ती मानतात. चंडावार व निकुभ अशा यांच्या दोन पोटजाती आहेत. राजेरजवाडे व उच्च वर्णीय लोक यांच्या घरी हे लोक नोकर म्हणून राहतात. हे विश्वासू, कुशल व उद्योगी आहेत. यांच्यापैकी काही लोक जमीनदारही आहेत. हे लोक शैव, वैष्णव किवा शाक्त असतात. महादेव, दुर्गा व काली या यांच्या आराध्य देवता आहेत. याना मद्यमांसाचा निषेध नाही. [ म. ज्ञा. को. ]

**कामकोटिपीठ** कांची येथील आद्य शंकराचार्यांचे मठसंस्थान. हे पीठ साक्षात शंकराचार्यांनीच स्थापिले, असे मानले जाते. इथले आचार्य सांगतात, की शंकराचार्यांच्या सर्व पीठांत प्रमुख पीठ हेच आहे. इथेच योगलिग व भगवती कामाक्षी यांची आराधना करीत शंकराचार्यांनी आपल्या आयुष्याचा अखेरचा काल घालविला व इथेच देह त्यागही केला, असे इथल्या आचार्याचे मत आहे. काचीचा मठाम्नाय पुढीलप्रमाणे आहे. आम्नाय–मौल, पीठ–कामकोटी, मठ–शारदा, आचार्य– शंकरभगवत्पाद, इत्यादी.

मठद्वारात प्रकाशित झालेल्या शिलालेखांवरून कळते, की हा मठ प्रथम विष्णुकांचीत होता. आजही त्या ठिकाणी ती जागा दाखवितात. कालांतराने हा मठ शिवकांचीत आला. आचार्यांनी सर्वज्ञ पीठाची प्रतिष्ठाही इथेच केली. कांचीनगरीच्या निर्मितीतही शंकराचार्यांचा हात होता. त्यानी कामाक्षी मदिराला बिंदुस्थानी मानून श्रीचक्राच्या रचनेप्रमाणे काचीची रचना करविली. त्यांनी कैलासाहून आणलेल्या पाच लिगापैकी योगलिंगाची स्थापना इथल्या कामकोटिपीठात केली. शंकराचार्य हे गृहस्थाश्रम न स्वीकारता ब्रह्मचर्यातूनच एकदम संन्यस्त झाले होते. अशाच प्रकारच्या संन्याशांनी इथल्या योगलिंगाची पूजा करावी, अशी प्रथा त्यांनी घालून दिली व ती आजतागायत चालत आली आहे. आजही कामकोटीचे पीठपती ब्रह्मचर्यातूनच संन्यास घेतलेले असतात. [ शंकराचार्य ]

**कामकोटिशास्त्री** त्यागराजानंतर झालेला द. भारतातील एक संगीतरचनाकार. तेलुगू व संस्कृत या दोन्ही भाषांत त्याच्या रचना असून मध्यमावती रागातील 'अंबा शिव' व भैरवीतील 'रमापते' या विशेष प्रसिद्ध आहेत. [ डि. सा. इ. म्यु. म्यु. ]

**कामकोष्ठ** (१) बत्तीस परिवारदेवतांच्या मंदिराला हे नाव आहे. देवालयातील मूर्तीच्या शय्यागृहालाही कामकोष्ठच म्हणतात. [ एन्सा. हिं. आ. ]

(२) कामाक्षीला प्रिय असलेले कामगिरीवरील एक पीठ. काची येथील कामाक्षीशिलेला कामगिरी म्हणतात. [ पु. इ. ]

**कामगायत्री** कामदेवासंबंधी गायत्रीछंदातील हा मंत्र सांगितला आहे, तो पुढीलप्रमाणे—

**कामदेवाय विद्महे पुष्पबाणाय धीमहि ।**
**तन्नोऽनङ्गः प्रचोदयात् ।।**

अर्थ— कामदेवाला आम्ही जाणतो. त्याचे आम्ही ध्यान करतो. तो अनंग आम्हाला प्रेरणा देवो.

**कामचंडाली** डोंबी या देवतेच्या एका रूपाला हे नाव आहे. ही अस्पृश्य असल्यामुळे चंडाली आहे व विभिन्न रूपात कार्य करीत असल्यामुळे कर्मकुशल आहे. बौद्ध तंत्रात हिची उपासना सांगितली आहे. [ तां. बौ. सा. सा. ]

**कामठा** इथे एक किल्ला आहे. पुरातत्त्व व इतिहास यांच्या दृष्टीने कामठाला फार महत्त्व आहे. कोण्या एका काळी हे फार मोठे शहर होते. इथे खोदकाम झाले, तेव्हा त्यातून कितीतरी जैन मूर्ती वर आल्या. [ खं. वै. ]

**कामड** एक जात. हे लोक मध्यप्रदेशातल्या होशंगाबाद व निमाड या जिल्ह्यांत राहतात. हे नजरबंदीचे खेळ करणारे गारुडी होत. यांचा पोशाख राजस्थानी पद्धतीचा व पिवळ्या किंवा भगव्या रंगाचा असतो. यांच्यांत चौहान, पनवार, गुडेसर, जोगपाल, इ. पोटजाती आहेत. विवाहसंबंध त्या त्या पोटजातीपुरताच मर्यादित असतो. हे रामदेव नावाच्या एका मारवाडी साधूच्या पादुकांची पूजा करतात व हिंगलाज देवीला भजतात. गृह्यसंस्कासाठी ब्राह्मण पुरोहिताला बोलावितात. याच्या बायका पायांना मागेपुढे अनेक झांजा बांधून व हातातही झांज घेऊन मोठ्या कौशल्याने नृत्य करतात. कित्येकदा नाचताना त्या उघडी तलवारही तोंडात धरतात. कामड पुरुष त्या नृत्याला एखाद्या तंतुवाद्याची साथ करतात.

हे लोक प्रेते बसलेल्या अवस्थेत पुरतात व प्रेताजवळ

कुस्करलेली भाकरी आणि भांडेभर पाणी ठेवतात. [ ट्रा. का. सें. प्रॉ. इं. ]

**कामड नृत्य** राजस्थानातील एक लोकनृत्य. कामड लोक जमीनदारांची कुळे म्हणून काम करतात व आपल्या मालकांना खूष करण्यासाठी नाचगाणे करतात. दोन स्त्रिया व दोन पुरुष मिळून हे नृत्य होते. पुरुष एकतारी वाजवून गातो व स्त्री त्या तालावर नाचते. या नृत्यात चरख्यावर सूत काढणे, सूत गुडाळणे, ताक घुसळणे, पोळ्या लाटणे, धान्य झोडपणे, कापणे इ. क्रियांचा अभिनय केला जातो. [ फोक लोअर ]

**कामणणा** कामदहनम् पाहा.

**कामतपूर** बंगालमधील कुचबिहारच्या नैर्ऋत्येस सुमारे १९ मैलांवरचे एक क्षेत्र. इथे कामतेश्वरीचे मंदिर व नगराच्या सभोवती ३०–४० फूट उच मातीचे तट होते. पठाणानी हे सर्व नष्ट केले. [ हि. जॉ. ए. इं. ]

**कामत्रयोदशी** चैत्र शु. १३ शी. या दिवशी मदनाचा प्रतिनिधी म्हणून दमनवृक्षाची पूजा करतात. **पाहा**– अनंगत्रयोदशी. [ हि. ध. ]

**कामंदक** एक राजनीतिविशारद व कामंदकीय नीतिसार या ग्रथाचा कर्ता. हा आपल्या ग्रंथात कौटिल्याचा उल्लेख करतो. त्यावरून हा कौटिल्योत्तर कालात झाला, हे सिद्ध होते. **पाहा**– कामंदकीय नीतिसार.

**कामंदकीय नीतिसार** गुप्तकालात अनेक शास्त्राप्रमाणेच अर्थशास्त्रानेही आपली प्रगती केली होती. कौटिल्याने अर्थशास्त्र लिहून राजनीतिशास्त्राचे मूळ सिद्धांत दृढ केले होते. नतरच्या ग्रंथकारानी चाणक्याच्या सिद्धांताचेच संक्षेप करून आपापले ग्रंथ सजविले. अशा ग्रंथांत कामंदकीय नीतिसाराचे स्थान बरेच वरचे आहे. काही लोक चंद्रगुप्ताचा प्रसिद्ध अमात्य शिखरस्वामी यालाच या ग्रंथाचा कर्ता मानतात. या ग्रंथाच्या कालाविषयी विद्वानांत बरेच मतभेद आहेत. दशकुमारचरितकर्ता दंडी व मालतीमाधवकर्ता भवभूती हे दोघेही या ग्रंथाचा उल्लेख करतात. त्यावरून हा ग्रंथ सहाव्या, सातव्या शतकापूर्वीचा असावा, हे निश्चित होते. डॉ. याकोबीने हा ग्रंथ चवथ्या शतकातला मानला आहे.

कामंदक कौटिल्याला आपला गुरू मानतो. त्याच्या या ग्रंथाचे १९ अध्याय आहेत. जरी तो कौटिल्याच्या ग्रंथाचा संक्षिप्त अनुवाद असला तरी, त्याच्या वर्णनात अनेक ठिकाणी मौलिकता दिसते. त्यात राज्याची सात अंगे, राजाचे कर्तव्य दायभागाचे अधिकारी, इ. राजकीय विषयाचे वर्णन पूर्ण रीतीने उपलब्ध होते. यातले श्लोक साधे आणि सरळ आहेत. टीकाकार या ग्रथाला महाकाव्यच म्हणतात. या ग्रथावर उपाध्याय निरपेक्ष, आत्माराम, जयराम, वरदराज व शकराचार्य यांच्या प्रमुख टीका आहेत.

कामंदकाने सामान्य राजधर्म सांगताना पुढील श्लोक लिहिले आहेत––

**दण्ड दण्डीव भूतेषु धारयन् धरणीसमः ।**
**प्रजाः समनुगृण्हीयात् प्रजापतिरिव स्वयम् ।।१।।**
**वाक् सूनृता, दया, दानं, दीनोपगतरक्षणम् ।**
**इति सङ्गः सतां साधु हितं सत्पुरुषव्रतम् ।।२।।**
**आविष्ट इव दुःखेन तद्गतेन गरीयसा ।**
**समन्वित करुणया परया दीनमुद्धरेत् ।।३।।**
**न तेभ्योऽभ्यधिकाः सन्ति सन्तः सत्पुरुषव्रताः ।**
**दुःखपङ्कार्णवे मग्नं दीनमभ्युद्धरन्ति ये ।।४।।**
**दयामास्थाय परमां धर्मादविचलन् नृपः ।**
**पीडितानामनाथानां कुर्यादश्रुप्रमार्जनम् ।।५।।**
**आनृशंस्यं परो धर्मः सर्वप्राणभृतां मतः ।**
**तस्माद् राजाऽनृशंस्येन पालयेत् कृपणं जनम् ।।६।।**
**न हि स्वसुखमन्विच्छन् पीडयेत् कृपणं नृपः ।**
**कृपणः पीडयमानो हि मन्युना हन्ति पार्थिवम् ।।७।।**

अर्थ– राजाने धर्मराजाप्रमाणे मानवमात्राला समान लेखून स्वतः प्रजापतीप्रमाणे वर्णाश्रमस्वरूप प्रजेवर अनुग्रह करावा. प्रिय व सत्य अशी वाणी, दया, दान, दीनदुबळ्यांचे सरक्षण व सज्जनांचा संग हे उभयलोकसाधक असे शुभतर सत्पुरुषव्रत आहे. प्रजेची व्याधी, क्षुधा, इ. गंभीर दुःखे ही जणू आपलीच दुःखे आहेत असे मानून व करुणेने युक्त होऊन दीनांचा उद्धार करावा. दुःखपकरूपी सागरात बुडालेल्या दीनाचा जे उद्धार करतात, ते सत्पुरुषव्रत धारण करणारे होत. त्यांच्यापेक्षा कोणी श्रेष्ठ नाही. धर्माच्या ठिकाणी स्थिर राहून आणि ( अंतरात ) श्रेष्ठ दया धारण करून पीडित व अनाथ याचे अश्रू पुसावे. सर्व प्राण्यांचा करुणा हाच परम धर्म आहे. म्हणून राजाने कृपाळूपणे दीनजनांचे पालन करावे स्वतःच्या सुखासाठी ( भोगविलासांसाठी ) दीन जनांना पीडा देऊ नये. पीडली गेलेली जनता जर क्षुब्ध झाली, तर ती राजाचा घात केल्याविना राहात नाही.

या ग्रंथाची प्रसिद्धी केवळ भारतापुरतीच मर्यादित राहिली

नाही. तर बलिद्वीपात (बाली) आपल्या वसाहती स्थापणाऱ्या हिंदूंनीही या ग्रंथाला आपला मुख्य राजनैतिक ग्रंथ मानले होते. आजही तिथल्या कविभाषेत या ग्रंथाचा अनुवाद उपलब्ध आहे. [ गु. सा. इ.; हि. वि. को. ]

**कामदाविधी** एक व्रत. मार्ग० शु. षष्ठीस रविवार येईल, त्या दिवशी सूर्याची रक्तचंदनाने व करवीर पुष्पांनी पूजा करणे, हा या व्रताचा विधी आहे. [ हि. ध. ]

**कामदहनम्** उत्तरेकडील होळीसारखा द. भारतातील एक उत्सव. हा फाल्गुन पौर्णिमेच्या दिवशीच करतात. या दिवशी कामदेवाची मूर्ती करून तिचे दहन करतात. कर्नाटकात या मूर्तीला कामण्णा असे म्हणतात. हा सण पाळल्याने वैवाहिक जीवन सुखाचे होते, अशी समजूत आहे. [ सा. इं. फे. ]

**कामदा एकादशी** (१) एक व्रत. चैत्र शु. ११ शीस उपवास व विष्णुपूजा असा याचा विधी आहे. फल– मनकामना पूर्ण होणे. या व्रताची कथा अशी––

नागपुरात पुंडरीक नावाचा राजा राज्य करीत होता. ललित-ललिता या नावाचे गंधर्वदांपत्य त्याच्या दरबारात होते. एके दिवशी ललित दरबारात गात असता, ललिता जवळ नसल्यामुळे त्याच्या गाण्यात चुका होऊ लागल्या. राजाला त्याविषयी क्रोध आला. त्याने त्याला शाप दिला, की 'तू राक्षस होशील'. त्याप्रमाणे तो राक्षस होऊन रानात फिरू लागला. ललिता त्याच्यामागून गेली. तिने एका ऋषीला उपाय विचारला. ऋषीने कामदा एकादशीचे व्रत सांगितले. तिने ते केले. त्या पुण्याने ललिताचा राक्षसयोनीतून उद्धार झाला. (पद्म पु. उ. खं. ४७).

(२) एक व्रत. अधिकमासातल्या शुद्ध ११ शीला हे करतात. या व्रताने विष्णुरूपता लाभते. (पद्म पु. उ. खं. ६३).

**कामदा सप्तमी** एक काम्य व्रत. फाल्गुन शु. ७ मीपासून व्रतारंभ. या व्रतात सात घोड्यांसह सूर्याची पूजा करतात. कंसाराचा ( कणकीचा शिरा ) नैवेद्य दाखवितात. व्रतावधी एक वर्ष. प्रतिमास शु. ७ मीस वरील प्रमाण पूजा. फल– धन, पुत्र, आरोग्य यांची प्राप्ती. [ हे. व्र. ]

**कामदेन्नी** रामायत व निमायत या संप्रदायाची एक शाखा. हे लोक लाल वस्त्रे धारण करतात. हे जी झोळी घेतात, तिला कामदेन्नी म्हणतात. या झोळीवरूनच त्यांच्या पंथाला हे नाव मिळाले आहे. यांच्या कमरेला पट्टा असतो. धनुर्धारी राम हा यांचा भिक्षेच्या वेळचा उद्घोष असतो. [ वै. शै. म. व. ]

**कामदेवपूजा** चैत्र शु. १२ शीस एका वस्त्रखंडावर कामदेवाचे चित्र काढून त्या चित्रापुढे एक भरलेला कलश आच्छादून ठेवतात. मग कलशाची व चित्राची पूजा करतात. या व्रतात पतीने आपल्या पत्नीचा सत्कार करायचा असतो. [ हि. ध. ]

**कामदेवव्रत** वैशाख शुद्ध १३ शीला प्रारंभ. व्रतावधी एक वर्ष. कामदेवाच्या सुवर्णमूर्तीची पूजा व मूर्तिदान. फल– रोगनिवृत्ती व आरोग्यप्राप्ती. [ हि. ध.; व्र. प. ]

**कामदेवानुयान** भासाच्या चारुदत्त या नाटकात कामदेवानुयान नामक एका मिरवणुकीचा उल्लेख आहे. कामदेवाचे चित्र घेऊन वाजत गाजत नागरिकांची मोठी मिरवणूक निघत असे. काशी नगरातही प्रतिवर्षी असाच उत्सव होत असे, अशी माहिती अवदानशतकात दिली आहे. या दिवशी सगळे नगर सुशोभित करीत व राज्यकर्तेही या उत्सवात भाग घेत. [ प्रा. भा. म. ]

**कामद्वादशी** एक व्रत. मार्ग शु. १२ शीस व्रतारंभ व्रतावधी एक वर्ष. प्रत्येक द्वादशीस कामदेवाची पूजा करणे हा या व्रताचा विधी आहे. [ हि. ध. ]

**कामधर** कामरूपातील मत्स्यध्वज पर्वतावरचे एक सरोवर. दग्ध झालेल्या मदनाला या ठिकाणी पुनश्च शरीर प्राप्त झाले. या सरोवरात स्नान केल्याने मनुष्य पापमुक्त होऊन शिवलोकी वास करतो. [ कालिका पु. ८१ ]

**कामधेनुदान** एक महादान. कमीत कमी तीन पल वजनाचे सोने घेऊन त्याची सवत्स कामधेनू करतात. तिला अलंकार घालून वेदीवर तिची स्थापना करतात. तिच्या अष्ट दिशांस मंगल कलश, फळे, इ. वस्तू ठेवतात. मग पूजा करून त्या धेनूचे दान देतात. दानफल– कैलासवास. [ मत्स्यपु. २७८ ]

**कामधेनुव्रत** व्रतावधी कार्तिक कृ. ११ शीपासून पाच दिवस. याच्या देवता श्री आणि विष्णू या आहेत. घर, गोठा, चैत्य, देवालय, रस्ता, स्मशानभूमी व तलाव या ठिकाणी दिवे लावणे, रात्रौ फाशांनी खेळणे, एकादशीस उपवास करून विष्णुमूर्तीला गायीच्या दुधाने किंवा तुपाने स्नान घालणे, असा याचा विधी आहे. फल– सकल पापांची निष्कृती. [ हि. ध. ]

**कामधेनू** काम = इच्छा. ती पूर्ण करणारी धेनू. हिच्या उत्पत्तीविषयी दोन कथा आहेत–

(१) देव-दैत्यांनी समुद्रमंथन केले, तेव्हा त्यातून कामधेनू वर आली.

(२) दक्षाला सुरभी नावाची एक कन्या होती. ती गायीची माता होती. ती त्याने कश्यपाला दिली. कश्यपापासून तिला सर्व काम पूर्ण करणारी कामधेनू नावाची कन्या झाली. हिला नंदिनी असेही म्हणतात.

शिवाचे वाहन झालेला वृषभ हा कामधेनूचाच पुत्र होय. ती (कामधेनू) एक दिवस मेरुपर्वतावर चरत असता वेतालाने तिला पाहिले व तो तिच्यावर आसक्त झाला. त्यांच्या समागमातून जो बैल जन्माला आला, तोच पुढे शिवाचे वाहन बनला.

कामधेनू वसिष्ठाच्या आश्रमात होती. तिचे वर्णन महाभारतात पुढीलप्रमाणे केलेले आहे–

**षडुन्नतां सुपार्श्वोरुं पृथुपञ्चसमावृताम् ।**
**मण्डूकनेत्रां स्वाकारां पीनोधसमनिन्दिताम् ।**
**सुवालधिं शङ्कुकर्णीं चारुशृङ्गां मनोरमाम् ।।**

(आदि. १७५. १३–१४)

अर्थ– (त्या कामधेनूचे) शिर, मान, जांघा, गळचाखालची पोळी, पुच्छ व स्तन हे सहा अवयव उंच होते. पार्श्वभाग आणि मांड्या सुदर होत्या. ललाट, दोन कान व दोन डोळे प्रशस्त होते. तिचे नेत्र बेडकासारखे होते. आकार मनोज्ञ होता. ओटी पुष्ट होती. रूप सुंदर होते. शेपूट दर्शनीय होते. कान शंकूसारखे होते. शिंगे सुंदर होती व ती सर्वांगी मनोरम होती.

ती वसिष्ठाचे यज्ञयाग सुसंपन्न करीत असे. एके दिवशी विश्वामित्र राजा ससैन्य वसिष्ठाच्या आश्रमपरिसरात आला असता, वसिष्ठाने त्या कामधेनूच्या प्रभावामुळे विश्वामित्राला षड्रसान्नाचे भोजन वाढले. कामधेनूचे ते सामर्थ्य पाहून विश्वामित्राला तिची अभिलाषा उत्पन्न झाली. त्याने ती धेनू वसिष्ठाकडे मागितली. वसिष्ठ देईना तेव्हा त्याने तिचे अपहरण चालविले. पण कामधेनूच्या मनात विश्वामित्राकडे जायचे नव्हते. तिने आपल्या अंगातून शक, यवन, शबर, किरात, बर्बर इ. जमातींचे सैन्य निर्माण करून विश्वामित्राचा पराभव केला.

सूर्यवंशातल्या दिलीप राजाने वसिष्ठाच्या आश्रमात येऊन कामधेनूची सेवा केली व तिच्या प्रसादाने त्याला रघू नामक दिग्विजयी पुत्र प्राप्त झाला, असे वर्णन कालिदासाने केले आहे (रघु. २).

**कामनकोट्टू** द. भारतातला एक नाट्यप्रकार. पौष महिन्यात होणाऱ्या पोंगळ सणातला हा एक भाग आहे. हे नाट्य काम-रतीच्या पौराणिक कथेवर आधारलेले आहे. यात दोन पुरुष कामदेव व दोन स्त्रिया रती होऊन नृत्य करतात. याला मृदंग व थपडी (तबल्याच्या वर्गातले एक वाद्य) यांची साथ असते. या साथीवरच कथेचे गायन होते. लकेतही दरवर्षी हा नृत्योत्सव करतात. याचा आरंभ उत्तररात्री होतो व सकाळपर्यंत तो चालतो. ही नाट्ये लिखित नसून मुखपरंपरेने चालत आलेली असतात. कथेच्या अनुरोधाने पात्रे आपले संवाद स्वयंप्रेरणेने बोलतात. **पाहा**– पोंगळ [ लो. ना. प. ]

**कामनाघट** ओडिसामधील एक पूजाप्रकार. याचा विधी असा– रात्री घटाची गावातून मिरवणूक काढतात. नंतर एक ब्राह्मण मिरवणुकीसह नदीवर जाऊन तो घट भरून आणतो. मग त्याला पानाफुलांनी शृंगारतात व एका पटांगणात पुरतात. त्यात शिव-पार्वती म्हणून दोन बांबू रोवतात. रात्री त्याला १०।१२ मण भाताचा नैवेद्य दाखवितात. पुरलेल्या घटाजवळ एका कुंडात अग्नी प्रज्वलित करतात. प्रत्येक भक्त त्या अग्नीवर एक दिवा पेटवितो. या समारंभाला खुंट जिवंत करणे असे म्हणतात. मग सर्वजण मोठ्याने 'ऋषिपुत्राऽऽ!' म्हणून ओरडतात. नंतर काही लोक सोंगे घेऊन नाचतात. या विधीची कथा अशी–

एकदा शंकर तप करीत असता कामना नावाची राक्षसीण त्याच्या पुढे आली. तिच्या रूपाला शिव भुलला. तिच्याशी कामक्रीडा झाल्यानंतर त्याला आपल्या दुष्कृत्याची लाज वाटली. तो तिचा त्याग करायला निघाला, तेव्हा राक्षसीण शिवाला म्हणाली. 'मी आता कुठे जाऊ? मला यापुढे कोण विचारील?' तेव्हा शिव तिला म्हणाला. 'हीन यातीचे लोक वर्षातून एकदा तुझी पूजा करतील!' तेव्हापासून ही पूजा रूढ झाली. [ स्ट. ओ. फो. ]

**काममंत्र** 'कामः शक्तिः' हा कामदेवाचा मंत्र आहे. यातील पहिले अक्षर वाणीपासून उत्पन्न झाले असून दुसरे

कामाचे बीजाक्षर आहे. तिसरे शक्तीचे बीजाक्षर असून चौथ्याचा वर्ण बालसूर्यासारखा आहे. ओंकाराला या मंत्राशी एकरूप मानले आहे. [ क्रि. स्ट. ले. उ. ]

**कामरतिमंत्र** 'क्लीं कामदेवाय नमः' व 'ऱ्हीं रत्यै नमः' हे दोन अष्टाक्षरी व पंचाक्षरी मंत्र काम व रती यांचे आहेत. एका पात्रात दवणा भरून त्या आसनावर काम-रतीची स्थापना करून वरील मंत्रांनी त्याची पूजा करतात. नंतर कामगायत्रीचा १०८ जप करून पुष्पांजली वाहतात. या विधानाने काम व रती प्रसन्न होतात. [ मं. म. ]

**कामराजकीलितोद्धार** हे आथर्वण शाखेचे लहानसे गद्य उपनिषद आहे. यात श्री व प्रभावी वाणी यांच्या प्राप्तीसाठी कामराजाची उपासना सांगितली आहे.

'कामशक्तिः ॐ' हा यातला पंचाक्षरी मंत्र आहे. हा मंत्र कवर्णाने कीलित आहे. शांभव व शाक्त अशी द्विविध कामोपासना यात सांगितली आहे. साधकाने या कामराजमंत्राचा सतत जप करावा, दिव्य अंगरागाने देह भूषवावा, सुगंधी माला गळ्यात घालाव्या, पंच मकाराचे सेवन व कौलिकव्रताचे आचरण करावे, मदनाचा भोग घेऊन शक्तीचा आनंद लुटावा व लाल फुलांनी शक्तिचक्राची पूजा करावी, असे यात सांगितले आहे. [ सी. ग. देसाई ]

**कामरी** एक वज्रयानी सिद्ध. कंबलांबरपा व हा बहुधा एकच असावा. कामरी हा बौद्ध तत्त्वज्ञानाचा महापंडित होता. प्रज्ञापारमिता या दर्शनावर भोट भाषेत याचे चार ग्रंथ आहेत. हा वज्रघंटापादाचा शिष्य व राजा इंद्रभूतीचा गुरू होता. राहुलजीच्या मते हा ओडिसाचा रहिवासी होता, तर हरप्रसादशास्त्री यांच्या मते तो बंगाली होता. याचा जन्म मगधात झाल्याचे सांगतात. हा युगनद्ध हेरूक या देवतेचा उपासक होता. **पाहा**– कंबलांबरपा. [ नाथसंप्रदाय ]

**कामरूप** आसाम राज्याचे प्राचीन नाव. पुराणे व तंत्रग्रंथ यांत कामरूपाला महापीठस्थान म्हटले आहे.

**तत्र गत्वा महापीठे स्नात्वा लौहित्यवारिणि ।**
**ब्रह्महाऽपि नरः सद्यो मुच्यते भवबन्धनात् ।।**
(देवी पु. १२.३२)

अर्थ– त्या महापीठात जाऊन लौहित्य नदीत स्नान केल्याने ब्रह्महत्या केलेला माणूसही संसारबंधनातून मुक्त होतो.

याचा विस्तार करतोया नदीपासून दिक्करवासिनीपर्यंत असल्याचे योगिनीतंत्रात सांगितले आहे. सांप्रत कामरूप हा आसाममधील एक जिल्हा आहे.

शिवाने कामाचे दहन केल्यावर पुन्हा त्याला या प्रदेशातच रूप प्राप्त झाले, म्हणून या प्रदेशाला कामरूप असे नाव मिळाले अशी कथा आहे.

गुप्त साम्राज्याच्या सरहद्दीबाहेर कामरूप देश होता, असे अलाहाबादच्या एका स्तंभलेखात सांगितले आहे. प्राचीन कामरूप देशात मणिपूर, जेंतिया, काछर, प. आसाम, मैमेसिंध व सिल्हेट यांचा काही भाग, एवढा प्रदेश समाविष्ट होता.

भारतीय युद्धाच्या वेळी कामरूपावर भगदत्त राजा राज्य करीत होता व तो भारतीय युद्धात कौरवांच्या बाजूने लढला होता. त्याच्या पुत्राचे नाव वज्रदत्त होते. वनमाल वर्मदेवाच्या ताम्रपटात मात्र वज्रदत्ताला भगदत्ताचा भाऊ व प्राग्ज्योतिषपुराचा राजा म्हटले आहे. वज्रदत्तानंतर तीन हजार वर्षांनी पुष्यवर्मा राजा झाला. त्याच्या नंतरच्या बारा राजांची नावे या ताम्रपटात दिली असून त्यातल्या शेवटच्या राजाचे नाव भास्करवर्मा किंवा कुमारवर्मा असल्याचे सांगितले आहे. हा राजा शैव धर्माचा मोठा पुरस्कर्ता होता. याच भास्करवर्म्याचा उल्लेख हर्षचरितात व युआन च्वांगच्या यात्रावर्णनातही आला आहे. भास्करवर्म्याने गौडांचा पराभव करून आपला राज्यविस्तार केला. याच्या मागून कामरूपात एक नवीनच राजवंश उदयाला आला. शालंभ किंवा प्रालंभ हा या वंशाचा संस्थापक होता. शालंभानंतर सुमारे एकवीस राजांनी इ. स. ८०० ते १००० या काळात कामरूपावर राज्य केले. १३ व्या शतकाच्या आरंभी आहोम राजांनी हा प्रदेश जिंकला

कामरूप हा जादूटोणा करणाऱ्यांचा देश म्हणून प्रसिद्ध आहे. तिथल्या स्त्रिया अशा कामात वाकबगार होत्या. कामरूपाच्या पश्चिम प्रदेशातील लोकगीतात या गोष्टीचे उल्लेख आढळतात. तिथल्या स्त्रिया आपल्या पतीला कामरूप, आसाम व बंगाल येथील जादूगार स्त्रियापासून सावध राहण्याची सूचना देताना आढळतात. कामरूपातल्या स्त्रिया दिवसा एखाद्या पुरुषाचे बकऱ्यात रूपांतर करतात व रात्री त्याला मानवी रूप देऊन त्याच्याशी रममाण होतात, अशी सर्वसाधारण समजूत आहे.

युआन च्वांगने कामरूपाबद्दल आपल्या यात्रावर्णनात पुढील माहिती दिली आहे–

कामरूप राज्याची सीमा दहा हजार ली ( = सुमारे

१७०० मैल ) लांब असून राजधानीचा विस्तार सुमारे ३० ली आहे. इथले लोक फणस व नारळ यांच्या बागा लावतात. नद्या व सरोवरे यातून निघालेले प्रवाह शहराच्या चारी बाजूना नेहमी वाहत असतात. इथले रहिवासी सरळ, प्रामाणिक पण तापट आहेत. त्यांचा वर्ण तांबूस पिवळसर असून बांध्याने ते ठेंगणे आहेत.

प्राचीन काळी हा देश शाक्तसंप्रदायाचा मोठा अड्डा होता. **पाहा–** आसाम. [ हिं. वि. को.; लौ. नी.; वै. वा. इ.; हि. जॉ. ए. इं.; म. ज्ञा. को.]

**कामली** चरकांचा तिसरा प्राच्य चरण. या चरणाच्या संस्थापकाचे नाव ब्रह्मांड पुराणात कामलायनी असे दिले आहे. **पाहा–** चरक. [ पा. भा. ]

**कामव्रत** (१) एक स्त्रीव्रत. कार्तिक महिनाभर हे व्रत करतात. महिनाभर एकभुक्त, सूर्यपूजा व सप्तमी-अष्टमीला उपवास असा याचा विधी आहे. हेमाद्रीने याला स्त्रीपुत्रकामावाप्तिव्रत असे नाव दिले आहे.

(२) पौष शु. १३ शी ला आरंभ करून प्रत्येक शु. १३ शीला नक्तभोजन व चैत्रात सोन्याचा अशोकवृक्ष व दहा बोटे लांबीची उसाची कांडी प्रद्युम्नाला समर्पण करतात.

(३) कोणत्याही महिन्याच्या ७ मीला सूर्यपत्नी सुवर्चला हिचे पूजन हा याचा विधी आहे.

(४) पौष शु. ५ मी ला व्रतारंभ करून कार्तिकेयाची पूजा, पंचमीला नक्त, षष्ठीला फलाहार व सप्तमीला पारणे करतात. व्रतावधी एक वर्ष. कार्तिकेयाची सुवर्णमूर्ती व दोन वस्त्रे ब्राह्मणाला दान देतात. [ हि. ध.; कृ. क. त.; मत्स्य पु.]

**कामशास्त्र** भारतीय धर्मशास्त्रात धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष असे चार पुरुषार्थ मानलेले आहेत. त्यावरून धर्म आणि अर्थ यांच्या इतकेच कामालाही प्राचीन आचार्यांनी महत्त्व दिले होते, हे दिसून येईल. ऐहिक जीवनातील सुखासमाधानासाठी अर्थ व काम यांची अत्यंत आवश्यकता आहे. त्यांचे योग्य प्रमाणात सेवन केल्यास जीवनातील आनंद वृद्धिंगत व्हायला मदत होते.

वैदिक आर्य हे तत्त्वचिंतन आणि धार्मिक कर्मकांड यात गढलेले असले, तरी व्यावहारिक जीवनाकडे त्यांनी पाठ फिरविलेली नव्हती. ऋग्वेदातील काही सूक्ते, अथर्ववेदाचे सर्वसाधारण स्वरूप आणि ब्राह्मणग्रंथांतील काही आख्यायिका यांच्या परिशीलनाने हे कळून येईल. अथर्ववेदात कामविषयक अत्यंत प्रगल्भ कल्पना पाहायला मिळतात. कामवासना हेच मनातील मूळ उत्पादक बीज असते ( अथर्व. १९. ५२. १ ). कामामुळे



लतावेष्टितक आलिंगन – मथुरा (२ रे शतक)

स्त्रीपुरुषांच्या अंतःकरणात परस्परांविषयी आकर्षण निर्माण होते व त्यातूनच प्रजोत्पत्ती होते. आदर्श वैवाहिक जीवनाचे मनोरम चित्र अथर्ववेदात आढळते ( १४. २. ७१. ) त्यात स्त्रियांना व पुरुषांना वश करण्याचे व पुत्रलाभाचे मंत्र दिले आहेत; त्याचप्रमाणे पुरुषाच्या वीर्यवृद्धीसाठी काही औषधी उपायही सांगितले आहेत.

वैदिक आर्य देवतांची उपासना करून त्यांच्याकडे धनधान्य, आरोग्य, इ. ऐहिक सुखे मिळावी, अशी प्रार्थना करीत. ऐहिक जीवनातील सुखांचा उपभोग घेण्याकडे त्यांची प्रवृत्ती होती. वेदात कामभावना ही मानवी मनाची एक मूलभूत व महत्त्वाची प्रेरणा असल्याचे मान्य केलेले आहे. ऋग्वेदातील एका सूक्तात काम शब्दाचा इच्छा अशा अर्थी प्रयोग केला आहे–

**कामस्तदग्रे समवर्तताधि ।**
**मनसो रेतः प्रथमं यदासीत् ।।**

(ऋ. १०. १२९. ४).

अर्थ – त्यानंतर जेव्हा प्रथम मनोरूप बीज उत्पन्न झाले, तेव्हा त्या मनाच्या ठिकाणी काम ( वासना, इच्छा ) उत्पन्न झाला.

श्री. आहिताग्नी राजवाडे म्हणतात, की या सूक्ताला नासदीय सूक्त या नावापेक्षा कामसूक्त हे नाव अधिक अन्वर्थक होईल.

ऋग्वेदातील पुरूरवा–उर्वशी व यम-यमी याच्या संवादात कामवासनेचे व प्रेमाचे वर्णन आले आहे.

वैदिक वाङ्मयातील कथा व आख्यायिका यांच्यावरून त्या कालातील सर्वसाधारण माणसाच्या जीवनातही कामभावनेला महत्वाचे स्थान होते, असे दिसते. त्या काळी स्त्रीला घरात मानाचे स्थान होते. बहुपत्नीत्वाची प्रथा असल्यामुळे सवतीमत्सरही चालू होता. समाजात क्वचित स्वैर प्रेमाचारही दिसून येत असे. वरुणप्रघासयागात यजमानपत्नीला तिच्या अन्य प्रियकरांविषयी प्रश्न विचारला जात असे. ऋग्वेदातील अक्षसूक्तात जुगारी माणसाच्या पत्नीवर कोणीही पुरुष हात टाकतात, असे वर्णन आहे (१०. ३४. ४). संकेतस्थळी आपल्या प्रियकराला भेटायला जाणाऱ्या स्त्रीची उपमा ऋग्वेदात अनेक ठिकाणी दिलेली आढळते. त्याचप्रमाणे जार व जारिणी या शब्दांचा प्रयोगही ऋग्वेदात दिसतो.



आलिंगन– अमरावती
(२ रे शतक)

वैदिक काळी विधवा स्त्रीला आपल्या दिराशी लग्न करण्याची परवानगी होती. परंतु पुष्कळ वेळा त्यात सामाजिक प्रथेपेक्षा प्रेमाचाच भाग अधिक असावा, असे ऋग्वेदातील एका उल्लेखावरून वाटते ( १०. ४२. २ )

अथर्ववेदात काम किंवा इच्छा ही एक महान वैश्विक शक्ती मानलेली असून, सर्व देवदेवतांपेक्षा तिला श्रेष्ठत्व दिलेले आहे. काही वेळा या वैश्विक शक्तीलाच अग्नी असे म्हटले आहे. काम हा आपल्या बाणांनी मानवी हृदये विद्ध करतो. याच्या बाणांना वेदनेचे पंख आहेत. त्यांचे अग्र अभिलाषेचे आहे आणि त्यांचा मागचा भाग इच्छेचा आहे ( अथर्व. ३. २५ ).

पुढील काळातील महाकाव्ये आणि त्यानंतरचे संस्कृत वाङ्मय यात हा कामदेव सुप्रतिष्ठित झाला आहे. वैदिक वाङ्मयात शृंगारदेवतेच्या पूजे-अर्चेचा कुठे उल्लेख आढळत नाही. पण ब्राह्मणग्रंथात वर्णिलेल्या काही फलोत्पादक विधीत शृंगारचेष्टांना स्थान तर आहेच; शिवाय अश्वमेध आणि महाव्रत यांमध्ये समागमक्रियाही विहित आहे. ऋग्वेदातील विवाहसूक्तात समागमक्रियेचा स्पष्ट शब्दात निर्देश केलेला आहे (१०. ८५. ३७ ). शतपथब्राह्मणातही यज्ञवेदीला स्त्री व अग्नीला तिचा पती असे म्हटले आहे ( १. २. ५. १५-१६ ). मात्र या सर्व ठिकाणी धार्मिक विधी मुख्य असून शृंगाराचे स्थान दुय्यम आहे.

चुंबन– खजुराहो

वैदिक कालात कामशास्त्र हा विशेष अभ्यासाचा विषय झाला नव्हता. उपनिषत्कालात प्रथमच प्रजननशास्त्राच्या दृष्टीने कामभावनेकडे ऋषींचे लक्ष गेलेले दिसते. कामवासना ही इतर सर्व इच्छा-आकांक्षांप्रमाणे महत्त्वाची आहे, असे बृहदारण्यकात म्हटले आहे (४. ४. २२ ). याच उपनिषदात पुढे पंचाल देशातील प्रवाहण जैवलीने केलेले स्त्रीपुरुषांतील परस्पर आकर्षणाचे विवेचन आले आहे ( ६. २. १२ ). उद्दालक आरुणीची



प्रणयाराधन– कुंभकोणम्

जिज्ञासा पूर्ण करण्यासाठी प्रवाहण जैवलीने हे विवेचन केले आहे. या विवेचनात समागमक्रियेचे प्रतीकात्मक वर्णन असून प्रजापतीने स्त्रीला त्याच हेतूने निर्माण केले असल्याचे सांगितले आहे. संभोग–क्रिया म्हणजे यज्ञातील एक विधीच असून स्त्रीरूपी अग्नीत पुरुष आपले बीज अर्पण करतो व त्यातून मानव जन्माला येतो, असे तिथे म्हटले आहे. युवतीशी जवळीक कशी करावी, पत्नीच्या प्रियकरांशी कसे वागावे आणि सुप्रजा कशी निर्माण करावी, याबाबतचे नियम यात सांगितले आहेत. उद्दालक आरुणी हा या कामविषयक गुप्त विद्येचा ज्ञाता होता, असा बृहदारण्यकात स्पष्ट निर्देश केलेला आहे. (६. ४. ४).

पंचाल देश हा या शास्त्राचे उगमस्थान होय. बाभ्रव्य हा या शास्त्राचा दुसरा एक प्रणेता पंचाल देशातलाच आहे. प्रवाहण जैवलीने सांगितलेले कामविषयक ज्ञान उद्दालक आरुणीने आपला पुत्र श्वेतकेतू याला उपदेशिले व श्वेतकेतूने पुढे ते वाढवून पंचाल देशात त्याचा प्रसार केला, असे असणे शक्य आहे.



प्रणयक्रीडा

यावरून धर्म किंवा धार्मिक विधी याच्या अनुषंगानेच कामशास्त्राचीही वाढ झाली असावी, असे अनुमानिता येते. परंतु पुढे कामशास्त्र हे धर्मशास्त्राच्या कक्षेतच न राहता ते समाजाच्या सर्व थरांत प्रसृत झाले. प्राचीन काळी धर्म व अर्थ या दोन शास्त्रांप्रमाणेच कामशास्त्राचेही प्राथमिक स्वरूपात अध्ययन केले जात असावे.

धर्म व अर्थ या दोन पुरुषार्थांचे प्राचीन आचार्यांनी जसे गंभीर विवेचन केले, तसेच वात्स्यायनाने अत्यंत काळजीपूर्वक व नेटकेपणाने कामशास्त्राचे प्रतिपादन केले आहे. वात्स्यायनाचे कामसूत्र हा काही कामशास्त्रावर लिहिलेला पहिलाच ग्रंथ नव्हे. या शास्त्राला पूर्वीची दीर्घकालीन परंपरा होती, हे त्या ग्रंथावरूनच दिसून येते. महादेवाचा अनुचर नंदी हा कामशास्त्राचा प्रणेता असल्याचे स्वतः वात्स्यायनाने सांगितले आहे. नंदीचे कामशास्त्र अत्यंत विस्तृत असून त्याचे एक सहस्र अध्याय होते, असे म्हटलेले आहे. ज्याप्रमाणे धर्मशास्त्राचा प्रणेता मनू व अर्थशास्त्राचा प्रणेता बृहस्पती; त्याचप्रमाणे कामशास्त्राचा प्रणेता नंदी होय. औद्दालकी श्वेतकेतू याने नंदीच्या ग्रंथाचा पाचशे अध्यायांत सक्षेप केला. श्वेतकेतूच्या ग्रंथाचा पांचाल बाभ्रव्याने पुन्हा दीडशे अध्यायांत संक्षेप करून त्याची पुढील सात अधिकरणांत विभागणी केली–

(१) साधारण (२) साप्रयोगिक (३) कन्यासंप्रयुक्त (४) भार्याधिकार (५) पारदारिक (६) वैशिक व (७) औपनिषदक.

दत्तकाचार्याने पाटलिपुत्र नगरातील वेश्यांच्या विनंतीवरून या सात विषयांपैकी वैशिक या विषयाचा अधिक अभ्यास केला व वैशिक नावाचा एक विस्तृत ग्रंथ लिहिला. दत्तकाचार्याचे अनुसरण करून चारणाचार्याने साधारणाधिकरणम्, सुवर्णनाभाने सांप्रयोगिक, घोटकमुखाने कन्यासंप्रयुक्तक, गोनर्दीयाने भार्याधिकारिक, गोणिकापुत्राने पारदारिक व कुचुमाराने औपनिषदक असे कामशास्त्राच्या विविध अंगोपांगांवर ग्रंथ लिहिले. या सर्व ग्रंथांत बाभ्रव्याचा ग्रंथ फार मोठा असल्याने तो अध्ययनाला अवघड होऊ लागला. तसेच दत्तकादी आचार्यांचे ग्रंथ कामशास्त्राच्या उपांगांवरच रचलेले असल्यामुळे मूळ कामशास्त्र नष्ट होण्याच्या मार्गाला लागले. म्हणून मग या सर्व ग्रंथांच्या आधारे साररूप पण समग्र माहितीने परिपूर्ण असा एक नवा ग्रंथ वात्स्यायनाने तयार केला. हा सूत्रमय संक्षेप अत्यंत चांगला झाला व त्याच्यापुढे इतर सर्व ग्रंथ फिके पडून कालोदरात विलीन झाले. पुढच्या काळात वात्स्यायनाच्या कामसूत्राचीच सर्वत्र ख्याती झाली.



मुग्ध वधू

या ग्रंथात जागोजागी वात्स्यायनाच्या व्यक्तिमत्त्वाची छाप दिसते. परंपरागत अध्ययन केलेल्या किंवा केवळ शास्त्रच जाणणाऱ्या विद्वानाचा हा ग्रथ नसून, सूक्ष्म निरीक्षण असलेल्या व्यवहारचतुर पडिताचा हा ग्रथ आहे. पूर्वसूरींची मते त्याने उद्धृत केली आहेत; पण त्याचबरोबर त्यावर स्वतःचे विचारही माडले आहेत. व्यवहारात प्रचलित असलेल्या गोष्टीकडे दुर्लक्ष करून तो त्यामागच्या शास्त्रीय तत्त्वांवरच केवळ भर देत नाही. शास्त्रज्ञ या नात्याने कामशास्त्रासारख्या नाजूक विषयाचे विवेचन करताना जे यमनियम सांभाळावे लागतात, ते त्याने पूर्णपणे सांभाळले आहेत. त्यामुळे त्याचा हा ग्रंथ केवळ माहितीवजा किंवा केवळ मनोरजनपर न होता, शास्त्रीय झाला आहे. त्याच्या ग्रंथाचा उद्देश रागाची वृद्धी हा नसून लोकयात्रेचा निर्वाह हा आहे. आपला उद्देश सफल व्हावा म्हणून त्याने समाधी व ब्रह्मचर्य यांचे पालन केले होते. तो म्हणतो.

**तदेतद् ब्रह्मचर्येण परेण च समाधिना ।**
**विहितं लोकयात्रार्थं न रागार्थोऽस्य संविधिः ।।**

( का. सू. ७. २. ५७ )

वात्स्यायनाच्या कामसूत्राचा परिचय पुढीलप्रमाणे –

पहिल्या साधारणाधिकरणात पाच अध्याय असून कामसूत्राची परंपरा व उत्पत्ती, जीवनाचे तीन पुरुषार्थ– धर्म, अर्थ व काम, स्त्रियांसाठी चौसष्ट कामकला, नागरकांचे जीवनकर्तव्य व नायिका–नायक भेद, अशी त्यांची नावे आहेत.



दूती – पहाडी शैली

दुसऱ्या अधिकरणात जननेंद्रियांच्या आकारभेदाने संभोगभेद, आलिंगनविधी, चुंबनविधी, नखक्षत, दंतकर्म, कामक्रीडेच्या पद्धती, रतिक्रीडेतील भिन्न भिन्न आसने, प्रहणन व सीत्कारादी ध्वनी, विपरीत रती व अन्यसंभोगविधी, औपरिष्टक ( मुखमैथुन ) व रतिक्रिया आणि प्रेमकलह असे दहा अध्याय आहेत.

तिसऱ्या अधिकरणात कन्यावरण व विवाहसंस्कार, पत्नीच्या ठिकाणी विश्वास उत्पन्न करणे, विवाह व्हावा म्हणून बालपणापासूनच करायची आराधना, मध्यस्थाशिवाय मुलगा व मुलगी यांची निवड आणि विवाहविधी असे अध्याय आहेत.

चौथ्या अधिकरणात पत्नीचे कर्तव्य व तिची दिनचर्या, सवतींशी मोठ्या पत्नीचे, विधवेचे व उपेक्षितेचे कर्तव्य, तसेच बहुपत्नीक पतीचे कर्तव्य, असे अध्याय आहेत.



लज्जित युवती
वेणुगोपालमंदिर–श्रीरंगम्

पाचव्या अधिकरणात रसिक नायक व परस्त्री, ओळखदेख व प्रेमकला, स्त्रीच्या मनोभावांची परीक्षा, दूतीची कामे व त्यांचे भेद, राजांचे आमोद-प्रमोद व राजस्त्रियांच्या क्रीडा, असे अध्याय आहेत.

सहाव्या अधिकरणात वेश्येचे स्वरूप, वेश्येचे पत्नीप्रमाणे आचरण, वेश्येची अर्थलालसा व विरक्ती, जुन्या प्रेमिकांशी वेश्येचे नवे नाते, वेश्येच्या लाभविशेषावर विवेचन व वेश्येच्या अर्थानर्थाची चर्चा, असे विषय आहेत.

सातव्या अधिकरणात वशीकरण व वाजीकरण, विषय व कामाचे विविध योग आहेत.

धर्म, अर्थ व काम या त्रिवर्गाचा प्रत्येक व्यक्तीने अंगीकार करावा, असे वात्स्यायन सांगतो व त्यांमध्ये कामाची महत्ता प्रतिपादितो–

**शरीरस्थितिहेतुत्वादाहारसधर्माणो हि कामाः। फलभूताश्च धर्मार्थयोः।**

( का. सू. १.२.४६–४७ )

अर्थ– काम हे शरीरधारणेस आवश्यक असल्याने आहाराशी त्यांचे साधर्म्य आहे. शिवाय धर्मार्थाचे अंतिम फल हे मुख्यतः कामात्मकच आहे.

त्यापुढे तो म्हणतो–

**बोद्धव्यं नु दोषेष्विव। न हि भिक्षुकाः सन्तीति स्थाल्यो नाधिश्रियन्ते। न हि मृगाः सन्तीति यवा नोप्यन्त इति वात्स्यायनः।**

( का. सू. १.२.४८ )

अर्थ– कामाचे दोषच तेवढे समजून घ्यावे. (दोष आहेत म्हणून कामच वर्ज्य किंवा निषिद्ध मानायचे कारण नाही.) याचक येतील म्हणून काही कोणी स्वयंपाक करायचे सोडीत नाही. किंवा जनावरे खातील म्हणून काही कोणी धान्य पेरायचे थांबत नाही.

दोषाचे निवारण करून कामाचे योग्य सेवन करणे इष्ट आहे, असा वात्स्यायनाचा सिद्धांत आहे.

कामप्रवृत्तीकडे दुर्लक्ष केल्यास उन्मादादी दोष उत्पन्न होतात व शरीराचे आरोग्य टिकत नाही, असे कामसूत्राचा टीकाकार यशोधर सांगतो.

काम शब्दाची व्याख्या वात्स्यायनाने पुढीलप्रमाणे केली आहे–

**श्रोत्रत्वक्चक्षुर्जिह्वाघ्राणानाम् आत्मसंयुक्तेन मनसाधिष्ठितानां स्वेषु स्वेषु विषयेषु आनुकूल्यतः प्रवृत्तिः कामः।**

(का. सू. १. २. ११)

अर्थ– मनाने अधिष्ठित केलेली श्रोत्र, त्वक्, चक्षु, जिह्वा व घ्राण ही ज्ञानेंद्रिये आत्म्याशी संयुक्त होऊन आपापल्या विषयांच्या ठिकाणी जी अनुकूल प्रवृत्ती दर्शवितात, तोच काम होय.

कामाची ही व्याख्या सर्वसंग्राहक आहे. शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध याचा कामवासना उत्पन्न करण्याच्या कामी किती उपयोग होतो, याची ज्यांना कल्पना आहे, त्यांना या व्याख्येची मार्मिकता कळून येईल.

ही झाली कामाची शास्त्रीय व्याख्या. पण तेवढ्याने कामशास्त्राचे कार्य भागत नाही. म्हणून त्याची विशेष व्याख्या दिली आहे, ती अशी–

**स्पर्शविशेषविषयेत्वस्याभिमानिकसुखानुविद्धा फलवती अर्थप्रतीतिः प्राधान्यात् कामः।**

(का. सू. १. २. १२)



अर्थ– स्पर्शविशेषामुळे ज्यात वांछित सुख आणि फलनिष्पत्ती आहे, त्यालाच प्राधान्याने काम अशी संज्ञा आहे.



चित्रिणी नायिका

या व्याख्येत लैंगिक व्यवहाराच्या आनंदावरोबरच गर्भधारणेच्या फलाची निष्पत्तीही अभिप्रेत आहे.

यानंतर वात्स्यायनाने कामशास्त्राला पूरक अशा संगीत, नृत्य, चित्रकला, इ. चौसष्ट शिल्पकलांचा व चौसष्ट कामकलांचा उल्लेख केला आहे. त्यापुढे रसिक नागरकाचे यथायोग्य चित्रण आहे. आकर्षक रीतीने सजविलेले त्याचे घर, घराभोवतीचे लताकुंज, त्याचा साजशृंगार व त्याची दिनचर्या, यांचे विस्तृत वर्णन वात्स्यायनाने केले आहे.

वात्स्यायनाने नायिकांचे कन्या, पुनर्भू व वेश्या असे तीनच प्रकार मानलेले आहेत. पण त्यानंतरच्या वाङ्मयात पद्मिनी, चित्रिणी, शंखिनी व हस्तिनी असे नायिकाचे अन्यही भेद केलेले आढळतात. या संज्ञांचा प्रथम उल्लेख रतिरहस्यात केलेला आहे. अनंगरंग व पंचसायक या ग्रंथांत त्यांची लक्षणे दिली आहेत. देशी भाषांतील कामशास्त्रावरील ग्रंथांतही त्यांची लक्षणे सांगितली आहेत. रतिरहस्यकाराने त्यांचा पद्मिनी, चित्रिणी, शंखिनी व हस्तिनी असा गुणक्रम लावलेला आहे. सर्वसाधारणपणे याची लक्षणे पुढीलप्रमाणे आहेत –



हस्तिनी नायिका

**पद्मिनी** – हिची काया पातळ पण मांसल असून उंची १०८ अंगुळे असते. हिचा वर्ण श्याम किंवा सुवर्णचंपकाप्रमाणे असतो. हिचे मुख पूर्ण चंद्रासारखे असते व स्तन अविरल, उत्तुंग, मांसल व बिल्वफलसदृश असतात. हिचे भाषण चतुर, मधुर व मर्यादशील असते.

**चित्रिणी** – हिचे शरीर सडपातळ असून उंची शंभर अंगुळे असते. हिचा वर्ण श्याम असून मुख कमलाप्रमाणे असते. हिचे

स्तन पुष्ट, विशाल व नारिकेलसदृश असतात. हिचे भाषण प्रिय,



पद्मिनी नायिका

मधुर, सत्य व स्निग्ध असते.

**शंखिनी** – ही स्थूल वा कृश व उंच असते. हिचा वर्ण पिंगट असून मुख त्रिकोणी, मोठे व लांबट असते. हिचे स्तन कठोर व खुरटे असतात. ही चुगलखोर असून खिकाळ-ल्यासारखे हसते व हसत बोलते.

**हस्तिनी** – ही शरीराने लठ्ठ असून हिची उंची ११४ अंगुळे असते. हिचा वर्ण गोरा किंवा सावळा असतो. हिच्या सर्वांगावर रोम असतात. हिचे स्तन पीन व वक्र असतात व हिचे भाषण अश्लील असते.



शंखिनी नायिका

कामसूत्रानंतरचा कामशास्त्रावरील महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे कोक्कोक पडिताचा रतिरहस्य हा होय. याच्या नावाचे कोक पडित असे रूप प्रचारात असून त्याच्या ग्रंथाला कोकशास्त्र असेही म्हणतात. कोक पडित ११ व्या शतकात होऊन गेला. याचा ग्रंथ कामसूत्रांवरच आधारलेला असला, तरी स्वतःच्या अनुभवावरून त्याने त्या ग्रंथात बरीच भर घातली आहे. कोक पंडित हा विलासी माणूस होता. त्याने जे शास्त्र लोकांना उपदेशिले ते त्याने स्वतः आचरणात आणले, असे म्हणतात. तो अतिशय वीर्यवान् पुरुष होता, अशी त्याची ख्याती आहे.

कोकपंडिताचा हा रतिरहस्य ग्रंथ हिंदू व मुसलमान या दोन्ही समाजांत लोकप्रिय झाला. या ग्रंथाची अरबी, फारसी इ. भाषांत भाषांतरे व रूपांतरे झाली आहेत.

कोक पडितानंतरचा कामशास्त्रावरील दुसरा ग्रथकार म्हणजे कल्याणमल्ल हा होय. त्याच्या ग्रंथाचे नाव अनंगरग असे आहे. या ग्रथाचा मुसलमान समाजात पुष्कळ प्रसार झाला. उर्दू, फारसी व अरबी भाषांत त्याची भाषांतरे झाली आहेत. (कल्याणमल्ल पाहा)

या महत्त्वाच्या ग्रंथांशिवाय कामशास्त्रावर इतरही काही पुस्तके आहेत. वात्स्यायनाच्या कामसूत्रावर यशोधर, भास्कर, मल्लदेव व राजा वीरभद्र या पंडितांच्या टीका व एका अनामिक लेखकाची एक टीका, अशा एकूण पाच टीका आहेत. यानंतर क्षेमेंद्र या काश्मीरी पंडिताने वात्स्यायनसूत्रसार या नावाने कामसूत्राचा साराश ग्रथित करणारा ग्रथ रचला आहे.

रतिरहस्य या ग्रंथावरही कांचीनाथ, आवंत्य रामचंद्र, कवी प्रभू व हरिहर या पंडितांनी टीका लिहिल्या आहेत. याशिवाय पदश्रीचा नागरसर्वस्व व ज्योतिरीश्वराचा पंचसायक हे ग्रंथही प्रसिद्ध आहेत. हरिहराचा रतिरहस्य किंवा शृंगारदीपिका, विजयनगरचा राजा प्रौढदेवराय (१४२२–४८) याचा रतिरत्नदीपिका, तंजाऊरचा राजा शाहजी (१६८४–१७१०) याचा शृंगारमंजरी, अनंताचा कामसुधा, मीननाथाचा स्मरदीपिका, इ. एतद्विषयक ग्रंथ अद्यापि अप्रकाशित आहेत. [ कामसूत्र; कामपुरुषार्थ; कामकल्प; एस. के. डे. – पी. के. गो. को.; भा. स. स्थि. (वात्स्या.); शृं. ना. ]

**कामषष्ठी** एक काम्य व्रत. व्रतारंभ माघ शु. षष्ठीला करतात. पंचमीला उपवास, षष्ठीला एक फळ खाणे, अग्निकार्य करून कार्तिकेयाची पूजा, सप्तमीला पारणे आणि षडाननाची सुवर्णप्रतिमा व दोन वस्त्रे याचे दान, असा याचा विधी आहे. एक वर्षभर प्रत्येक शु. षष्ठीला हे व्रत करतात. फल– कामनापूर्ती. [ कृ. क. त. ]

**कामळिया** पश्चिम किनाऱ्यावरील एक मुसलमान जात. हे मुळात ब्राह्मणवंशाचे आहेत. बाटविल्यावर यांच्या मुख्याला कमाल म्हणजे पूर्ण अशी संज्ञा दिली गेली व त्यावरून यांना हे नाव मिळाले. हे बहुचरा देवीला भजतात. देवीला जातात तेव्हा हे तिच्या नावाने भिक्षा मागतात. हे सुंता करीत नाहीत.

पाटील हा यांचा ज्ञातिप्रमुख असतो. तो या लोकांचे जातीय तंटे सोडवितो. हे लोक गुजरातीमिश्रित मराठी बोलतात.

मृताच्या हृदयावर डाग देऊन मग त्याला पुरतात. इतर सर्व विधी हिंदुपद्धतीनेच करतात. [ मुं. इ. जा. ]

**कामळी** ठाणे जिल्ह्यातील डहाणू व वाड या भागात आढळणारी एक जात. हे सुमारे ५०० वर्षांपूर्वी काठेवाडमधून इकडे आले व त्यांचे मूळ नाव कंब राजपूत होते अशी समजूत आहे. सध्या बहुतेकाचा व्यवसाय शेती हाच आहे. यांची राहणी स्वच्छ असते. हे इमानी, मेहनती, शात व आतिथ्यशील आहेत. अंगात लोकरी जाकीट व डोक्याला लहानसे पागोटे असा याचा वेष असतो.

मूल जन्मल्यावर सहावी पुजतात. १२ व्या दिवशी बाळंतीण मुलासह दहाबारा घरी जाऊन येते व मग मुलाचे नाव ठेवतात.

मुलीची लग्ने बारातेराव्या वर्षी करतात. उपाध्याय गुजराथी ब्राह्मण असतो. हे लोक दसरा, दिवाळी, शिमगा वगैरे सण पाळतात. मारुती, गणपती, महादेव ही यांची उपास्यदैवते आहेत.

यांच्या जातिप्रमुखाला पाटील म्हणतात. तो तंटचांचा निकाल करतो. यांची भाषा धेडगुजरी गुजराती आहे. [ म. ज्ञा. को. ]

**कामाइचो** एक वाद्य. हे सारंगीच्या जातीतले असून याला सत्तावीस तारा असतात. मात्र याची घडण सारंगीपेक्षा भिन्न असते. कामाइचोचा आकार गोल असून त्याची रुंदी सुमारे दीड फूट असते. हे वाद्य चामडचाने मढवितात व धनुकलीने वाजवितात. याच्या आवाजात भरदारपणा असतो. याच्या तरफांच्या खुंटचा वरच्या बाजूला असतात.

मुख्यत: शेख नावाचे मुसलमान लोक हे वाद्य वाजवितात. त्यांना मांगणियार असेही म्हणतात. याच्या साथीवर मुख्यत: भजने गातात. [ परपरा- लोकगीत ]

**कामाख्या** आसाम राज्यातील एक सुप्रसिद्ध देवी. गौहाटीपासून तीन मैलांवर असलेल्या नीलाचल पर्वतावर हिचे मंदिर आहे. हे एक प्रसिद्ध शक्तिपीठ आहे. कालिका पुराणात, सतीची योनी या डोंगरावर गळून पडली व तो निळा झाला, असे सांगितले आहे. हा पर्वत शिवाचे प्रतीक मानलेला आहे. इथल्या देवीला कामाख्या हे नाव पुढील कारणासाठी पडले—

**कामार्थमागता यस्मात्मया सार्द्धं महागिरौ ।**
**कामाख्या प्रोच्यते देवी नीलकूटे रहोगता ।।**
( कालिका पु. ६१ )

अर्थ– ( शिव म्हणाला ) नीलाचलावर देवी माझ्याशी रममाण होण्यासाठी गुप्त रूपाने येत असे, म्हणून तिला कामाख्या असे नाव मिळाले.



कामाख्या मंदिर– गौहाटी

कामाख्यामंदिर हे शक्तिपूजेचे एक प्रमुख स्थान आहे. आस्ट्रो-एशियाई परिवारातील खासी व गारो लोक ज्या टेकडचांवर राहतात, त्या टेकडचांमध्ये नीलाचल पर्वत आहे. खासी व गारो या लोकांत मातृसत्ताक कुटुंबपद्धती आहे व त्यांच्या मते कामाख्या ही मातेची प्रतिनिधी आहे. कामाख्या हे नावही ख्मोच ( Khmoch ), कोमोच ( Komoch ), इ. ऑस्ट्रिक शब्दाचे संस्कृतीकरण आहे, असे डॉ. काकती यांचे मत आहे.

इ. स. च्या आठव्या शतकात रचलेल्या हेवज्रतंत्रात व १० व्या शतकाच्या सुमारास लिहिलेल्या कालिका पुराणात सांगितले आहे, की कामरूपात कामाख्यामंदिर हे तांत्रिक पूजाकेंद्र म्हणून प्रतिष्ठित आहे.

**सर्वत्र विरला चाहं कामरूपे गृहे गृहे ।**
( तंत्रचूडामणी- पीठमाला )

अर्थ–( कामाख्या म्हणते, ) मी सर्वत्र दुर्लभ आहे; पण कामरूपात मात्र माझा प्रत्येक घरात वास आहे.

गौहाटी येथील कामाख्यामंदिरात देवीची मूर्ती नसून मंदिराच्या आतल्या गुंफेत एका दगडावर योनीची आकृती खोदलेली आहे. जवळच एक झरा असून त्याच्या वाहत्या पाण्याने हा दगड सदैव भिजलेला राहतो. या योनिप्रतीकावरचं

फूलपत्री वाहून तिचीपूजा करतात. इथला पूजाविधी कालीच्या पूजेसारखाच असतो.

आसामात अन्य ठिकाणी कामाख्येच्या मूर्ती आहेत. प्राचीन काळी गारो लोकच कामाख्येचे पुजारी होते. कालांतराने ब्राह्मणांना ती जागा मिळाली. नरक या राजाने प्रथम व कोच राजांनी नंतर ब्राह्मणाना या भागात आणले, असे सांगतात. कामरूपात शाक्त पंथाचा प्रचार नरक राजानेच केला. त्याने कामाख्येला कालीशी एकरूप मानून तिची उपासना सुरू केली. ब्राह्मणांचा या स्थानात अधिकार सुरू झाल्यावर कामाख्येचे हळूहळू आर्यीकरण झाले कालांतराने तिच्या स्वरूपातही बदल झाला. तिच्या भोवती नवनव्या कथा–आख्यायिकाही गुंफल्या गेल्या. कालिकापुराणातील सतीची कथा हे याचेच प्रत्यंतर होय.



कामाख्या– सुवर्णमूर्ती

मूळचे कामाख्यामंदिर आर्यपूर्व पद्धतीचे होते, असे सांगतात. हे मंदिर १६ व्या शतकात मुसलमानांनी उद्ध्वस्त केल्यावर १६६५ साली कोचराजा नरनारायण याने हिंदू शिल्पपद्धतीने सध्याचे मंदिर उभारले. इथे यात्रेकरूंची सदैव गर्दी असते. दरवर्षी आषाढ महिन्यात इथे अंबुवाची उत्सव साजरा होतो.

कामाख्येविषयी पुढील दोन आख्यायिका फार लोकप्रिय आहेत—

( १ ) राजा नरक देवीच्या रूपावर फार मोहित झाला व ती आपली पत्नी व्हावी असे त्याच्या मनाने घेतले. देवीला त्याचा हा बेत आवडला नाही. म्हणून तिने राजाला अट घातली, की एका रात्रीत माझे देऊळ बांधशील, तलाव खोदशील व डोंगर माथ्यापर्यंत दगडी रस्ता बनवशील, तर मी तुझी पत्नी होईन. राजाने तिची अट मानली व त्याप्रमाणे एका रात्रीत बांधकाम पुरे करीतही आणले. मग देवी घाबरली व तिने पहाट होण्यापूर्वीच कोंबडचाला आरवायला लावले व अशा रीतीने आपली सोडवणूक करून घेतली.

( २ ) देवी रोज संध्याकाळी धुपारतीच्या वेळी मंदिरात नृत्य करीत असे. त्या वेळी सर्व दरवाजे बंद असत. कोणालाही ते नृत्य पाहायची परवानगी नसे. पण त्या वेळच्या कोच राजाला देवीचे ते नृत्य बघायची फार तळमळ लागली व पुजाऱ्याशी संगनमत करून त्याने फटीतून ते पाहिले. देवीला हे समजताच ती फार संतापली व तिने पुजाऱ्याचे शिरच धडावेगळे केले. तेव्हापासून कोच राजे तिच्या मंदिराकडे कधी फिरकले नाहीत. **पाहा–** अंबुवाची; शक्तिपीठे. [ फे. फे. आ.; लौ. नी.; हि. जॉ. ए. इं.; भारती ]

**कामा गणेश** गुजराती सोनारांच्या घरी लग्नसाहित्य करण्यापूर्वी भिंतीवर गणपतीचे चित्र काढून त्याची पूजा करतात. याला कामा गणेश असे म्हणतात. या गणपतीबरोबरच व्याही व विहीण यांचीही चित्रे काढतात. [ ल. वि. सो. ]

**कामाठी** महाराष्ट्रात आढळणारी एक जात. हे लोक मद्रास व हैद्राबादकडून सुमारे १०० वर्षापूर्वी इकडे आले. त्यांची भाषा तेलुगू आहे; पण ते घरात मात्र मराठी बोलतात. त्यांच्यांत अनेक जातीचे लोक असतात. त्यावरून हा शब्द जातिवाचक नसून स्थलवाचक असावा, असे वाटते. ठाणे जिल्ह्यातील कामाठी लोकांचे अनेक वर्ग आहेत आणि त्यांच्यात परस्पर रोटी-बेटी व्यवहार होत नाही. हे लोक बहुतेक मजुरी करून पोट भरतात. मध्यप्रांतातले काही कामाठी गवंडीकामही करतात. काहीजण कलाकुसरीचे उद्योग करतात.

हे लोक उंच, धडधाकट व काळे असून वृत्तीने मेहनती व काटकसरी आहेत. त्यांची राहणी स्वच्छ असते. त्यांचा पेहराव कुणब्याप्रमाणे असतो. त्यांचे धार्मिक विधीही कुणब्यांच्या विधीसारखेच असतात.

मुलीस ऋतुप्राप्ती झाल्यानतर मुहूर्त पाहून तिला १०–१५ दिवस मखरात बसवितात आणि त्या कालात आप्तेष्ट तिला आहेर करतात.

हे लोक पढरपूर, काशी, नाशिक, जेजुरी, इ. क्षेत्रांच्या यात्रा करतात. त्यांच्यांत काही स्मार्त असतात, ते भस्म व गंध लावतात आणि भागवत असतात, ते नाम लावतात. त्यांच्यातील कोमटी, सोनार व सुतार या जाती मुलांचे मौंजीबंधन करतात. यांचा उपाध्या तेलंगी ब्राह्मण असतो. [ ट्रा. का. सें. प्रॉ. इं.; म. ज्ञा. को. ]

**कामावाप्तिव्रत** कार्तिक व. १४ शीस महाकालाची पूजा. फल– कामनापूर्ती. [ हि. ध. ]

**कामाश्रम** कामदेवाचा हा आश्रम सरयू व गंगा यांच्या दुआबात होता. शंकराने तृतीय नेत्रातल्या

अग्नीने याच ठिकाणी कामदहन केले असे सांगतात. [ वा. रा. बाल. २३ ]

**कामाक्षा** अहिच्छत्रा येथे सुमदाने स्थापलेले एक देवीचे स्थान. [ पद्म पु. ४. १२. ५४–६० ]

**कामाक्षी** गोमंतकातील शिरोडे या गावी असलेले देवस्थान. या स्थळाला रायक्षेत्र म्हणत; कारण पोर्तुगीजांनी केलेल्या धर्मछळापूर्वी हे साष्टी महालातील राय या गावी होते.

प्राचीन काळी कोण्या अग्निमुख नामक एका ब्राह्मणाने या देवीस काहूर देशाहून राय या गावी आणले, अशी कथा आहे. पुढे पोर्तुगीजांच्या भीतीने सुमारे तीन शतकांपूर्वी तिला रायहून शिरोड्याला आणण्यात आले.

ही देवी नवसाला पावते, अशी भाविकांची श्रद्धा असल्याने हिंदूप्रमाणे ख्रिश्चनही हिला भजतात. वसंतपूजा, आवळीभोजन, नवरात्र व महाशिवरात्री हे उत्सव इथे थाटामाटाने साजरे होतात.

या देवीचे माहात्म्य स्कंद पुराणात वर्णिले आहे. रामेश्वराच्या निमंत्रणावरून कामाक्षी देवी महिषासुराचा वध करण्यासाठी काहूर येथून राय क्षेत्री आली व भक्तांच्या आग्रहावरून तिथेच राहिली, असे सह्याद्रिखंडात वर्णन आहे.

हिचा कौल घेण्यासाठी करमलीच्या पिकलेल्या पानांचे तुकडे हिच्या अंगाला चिकटवतात. [गो. गौ. ब्रा. कु.; ज्ञानदूत १९६३]

**कामाक्षीअम्म** द. भारतातील एक देवता. हिचे डोळे मदनाच्या डोळ्यांसारखे आहेत, असे मानतात. ही एका ब्राह्मणाच्या पोटी जन्मली, अशी कथा आहे.

**कामिका एकादशी** आषाढ कृ. ११ शीचे नाव. श्रीधर या नावे विष्णूची पूजा व अहोरात्र तुपाचा दिवा लावणे, हा या दिवशी करावयाच्या व्रताचा विधी आहे. [ पद्मपु. उ. खं. ५४ ]

**कामिकाव्रत** एक काम्यव्रत. मार्ग० कृ. २ या ही व्रततिथी. श्रीविष्णूच्या सोन्याच्या किंवा चांदीच्या मूर्तीचे चक्रासह दान, हा या व्रताचा विधी आहे. [ हि. ध. ]

**कामेशीमंत्र** कामेशी ही एक तांत्रिक देवता असून 'ह्री क्लीं ऐं ब्लूं स्त्रीं,' असा तिचा पंचबीजात्मक मंत्र आहे. हिचे ध्यान असे—

**पाशाङ्कुशाविक्षुशरासबाणौ**
**करैर्वहन्तीं मसृणांशुकाढ्याम् ।**
**उद्यत्पतङ्गाभिरुचिं मनोज्ञां**
**कामेश्वरीं रत्नचितां प्रणौमि ।।**

अर्थ– पाश, अंकुश, उसाचे धनुष्य व बाण ही आयुधे हातांनी धारण करणारी, तलम वस्त्र नेसलेली, उगवत्या सूर्याप्रमाणे तेजस्वी, सुंदर व रत्नखचित अशा कामेश्वरीला मी प्रणाम करतो.

या मंत्राने ध्यान करून मग तिची पीठावर स्थापना, तिच्या अग्रभागी काम व चारी दिशांस पूर्वादिक्रमाने मनोभव, मकरध्वज, कंदर्प व मन्मथ यांची स्थापना, मग षोडशोपचार पूजा, पूजा पूर्ण झाल्यावर कामेशी मंत्राचा पाच लक्ष जप व नंतर त्याच्या दशांश संख्येने (अर्ध लक्ष) पळसाच्या फुलाचे हवन, असे हिचे विधान आहे. [ मं. म. ]

**कामेश्वरी** कामाख्येच्या पाच मूर्तींपैकी एक मूर्ती. तांत्रिक देवता. त्रिनेत्र, अर्धचंद्रधारिणी, रक्तवस्त्रा, दशभुजा, प्रेतसिंहासनाधिष्ठित, तसेच मुंडमाला व अक्षमाला धारण करणारी अशी हिची मूर्ती असते. या देवीची पूजा डाव्या हाताने करण्याची पद्धत आहे. [ श्रीविद्यार्णवतंत्र ]

**कामोद** एक राग. ही कामोदी नामक रागिणी असल्याचे कल्पून तिचे मूर्तीध्यान सांगितले आहे, ते असे–

**पीतांशुका सुकेशी शितिः ।**
**स्मरन्ती पतिं भयाकुलदृक् ।।**
**पिकनादेन विदूना ।**
**कामोदी कानने रुदती ।।**

(रागविबोधविवेक)

अर्थ–पीतवसना, सुकेशी, श्यामवर्ण, भयाकुल दृष्टीची, पतीचे स्मरण करणारी, कोकिलस्वराने त्रस्त झालेली व अरण्यात रुदन करणारी अशी (ही) कामोदी रागिणी आहे.

या रागिणीत मध्यम शुद्ध व तीव्र अशा दोन्ही प्रकारचा लागतो. अवरोहात शुद्धमध्यम व आरोहात तीव्रमध्यम घेतात. बाकीचे स्वर शुद्ध लागतात. ऋषभ व पंचम यांची संगती असते. गानसमय– रात्र.

**कामोदापूर** गंगातीरावरचे एक क्षेत्र. समुद्रमंथनातून रमा, वारुणी, कामोदा व वरा अशा चार अप्सरा निघाल्या. त्यांपैकी तीन विष्णूला मिळाल्या व वारुणी असुरांनी

घेतली ( नारदीय पु. २.६८ ). हे स्थान गंगाद्वारापासून दहा योजने वर आहे. [ हि. ध. ]

**काम्यक** सरस्वतीच्या तीरावरचे एक सुप्रसिद्ध वन. हे हस्तिनापुराच्या पश्चिमभागी कुरुक्षेत्राच्याही पश्चिमेस होते. पाडव वनवासात असता द्वैतवनातून काम्यक-वनात गेले, असे वनपर्वात म्हटले आहे (म. भा. वन. ३६.४१). काहीच्या मते, हे मथुरेजवळ आहे. [ हि. ध.; सु. वि. को. ]

**काम्यदान** याचे लक्षण गरुड पुराणात पुढीलप्रमाणे सांगितले आहे–

**अपत्यविजयैश्वर्यस्वर्गार्थं यत्प्रदीयते ।**

**दानं तत् काम्यमाख्यातं ऋषिभिर्धर्मचिन्तकैः ।।**

अर्थ– अपत्य, विजय, ऐश्वर्य, स्वर्ग, इ. च्या प्राप्तीसाठी जे दान दिले जाते, त्याला धर्मचितक ऋषीनी काम्यदान म्हटले आहे.

**काम्येष्टी** एखादी विशिष्ट इच्छा पुरी करून घेण्यासाठी जी इष्टी करायची, तिला काम्येष्टी म्हणतात. ऐश्वर्य, शत्रुनाश, अन्न, पशू, आरोग्य, राज्य, विजय, पर्जन्य, सन्मित्र, दीर्घायुष्य, इ. अनेक कामनांसाठी ब्राह्मणग्रथात इष्टी सांगितल्या आहेत. प्रत्येक इष्टीत प्रधानदेवता निरनिराळ्या असतात. पुरोडाश, चरू, आमिक्षा असे हवी असतात. याचे तंत्र सामान्यतः दर्श-पूर्णमासासारखे असते. [ विद्याधरशास्त्री भिडे ]

## कायमखानी मुसलमान

राजस्थानातली एक जात. मारवाडच्या शेखावाटी, डीडवाना, मूंडवा व नागौर या विभागांत यांची वस्ती आहे. हे मूळचे राजपूत चौहान होते; पण फिरोजखान तुघलकने यांना मुसलमान केले.


कायमखानी पुरुष

हे मुसलमान झाले असले तरी हिंदूच्या चालीरीती बऱ्याच पाळतात. विवाहस्थानी तोरण बांधणे, लग्न लागल्यावर फेरे घालणे, गळ्यात सोन्याचे दागिने घालणे, ब्राह्मणांना दक्षिणा देणे. इ. गोष्टी यांच्या समाजात रूढ आहेत. यांच्या स्त्री-पुरुषांचा पोषाखही हिंदूप्रमाणेच असतो. हे इतर परदेशी मुसलमानांबरोबर अन्नोदक संबंध करीत नाहीत; तसेच चुलत, मामे अथवा आतेबहिणीशी लग्न करीत नाहीत. [ रा. जा. ]

**कायव्य** क्षत्रिय पिता व निषादी माता यांच्यापासून झालेला पुत्र. त्याच्या नावाने पुढे एक जातच निर्माण झाली. कायव्य हा सर्व दस्यूचा अधिपती होता. तो शूर व धार्मिकही होता. त्याने आपल्या अनुयायांना आदेश दिला होता, की ‘ तुम्ही ब्राह्मण, बालके, स्त्रिया, भयभीत, पळून जाणारे व निःशस्त्र यांना मारू नका. ’ [ क्ला. डि. हि. मा. ]

**कायस्थ** उ. प्रदेश, बिहार, बंगाल, ओडिसा व मध्यप्रदेश या भागात प्रामुख्याने आढळणारी एक जात. यमाची खातेवही लिहिणाऱ्या चित्रगुप्तापासून आपली उत्पत्ती झाली, असे हे सागतात. चित्रगुप्त हा ब्रह्मदेवाच्या कायेपासून निर्माण झाला, म्हणून त्याला कायस्थ नाव पडले. कायस्थ शब्द संस्कृत वाङमयात पुष्कळ जागी आढळतो. त्याचा अर्थ लेखक असा आहे. कैथ शब्दावरून कायस्थ शब्द बनला असावा आणि कैथ ही कथा सांगणारी व गाणी म्हणणारी एक प्राचीन जात असावी, असे राजारामशास्त्री भागवत म्हणतात.

पद्म व बृहन्नारदीय या पुराणात व शुक्रनीतीत कायस्थ हे क्षत्रिय आहेत, असे म्हटले आहे.

गुप्त साम्राज्यात उपरिक, अधिकरणिक, साधनिक, इ. उच्च अधिकारपदे कायस्थांकडे होती. ७ व्या शतकात कर्णसुवर्ण देशात शशांकदेव राज्य करीत होता. तो क्षत्रप कायस्थ असून त्याच्या राज्यात सर्व बंगालमध्ये कायस्थाचे वर्चस्व होते. १२ व्या शतकापर्यंत कायस्थ हा शब्द जातिवाचक नसून अधिकारवाचक होता. ब्राह्मण, क्षत्रिय, इ. जे लोक अधिकारी किवा कर्मचारी म्हणून काम करीत, त्यानाही कायस्थ म्हणत. मोगल अमदानीत कायस्थांनी राज्यकर्त्यांची भाषा व लिपी आत्मसात करून त्या दरबारात नाव कमावले. ब्रिटिश अमदानीतही त्यांनी उच्च अधिकारपदे मिळविली. सांप्रतही या लोकांचा मुख्य व्यवसाय कारकुनी हाच आहे. त्यानी आपल्या अनेक गुणांच्या बळावर आपल्या जातीचा उत्कर्ष करून घेतला आहे.

एक कथा अशी आहे, की चित्रगुप्ताला बारा मुले होती व त्यांना आर्यावर्तातील निरनिराळ्या भागांत राज्यव्यवस्थेची कामे वाटून दिलेली होती. सांप्रत त्या त्या स्थानावरून त्यांच्या

बारा पोटजाती बनल्या आहेत, त्या अशा – माथुर, भटनागर, श्रीवास्तव, सक्सेना, सूर्यध्वज, अमिष्ट, गौड, करण, वाल्मिकी, कुलश्रेष्ठ, निगम व ऐथन. यांच्यांत पूर्वी परस्पर रोटीबेटी व्यवहार होत नसत.

शैव, शाक्त, वैष्णव, कबीरपंथी, नानकशाही, असे अनेक पंथ कायस्थांत आहेत. पण त्यामुळे त्यांच्या विवाहसंबंधाला बाध येत नाही. हे लोक आपल्या कुलदेवतेची म्हणजे चित्रगुप्ताची नियमित पूजा करतात. कार्तिक शु. २ येस त्यांचा सार्वजनिक उत्सव असतो. दुर्गा, जयती, लक्ष्मी, शांभवी, महादेव, विष्णू, राम, कृष्ण, गंगा, अनंत, नारायण, या देवतांचीही ते पूजा करतात.

बंगालमधील कायस्थांचे पूर्वज कनौजकडून तिकडे गेले होते, असे म्हणतात. त्यांचे धार्मिक आचार आणि संस्कार ब्राह्मणांप्रमाणेच असतात. तिथले बहुतेक कायस्थ लोक शाक्तपंथी आहेत.

कायस्थांच्या काही चालीरीती प्रांतपरत्वे भिन्न आहेत. सयुक्त प्रातातील कायस्थात पूर्वीपासून प्रौढविवाह रूढ आहे. लग्नापूर्वी वराची मुंज व सोडमुज झाली पाहिजे, असा निर्बंध असून कन्यादान, पाणिग्रहण, सप्तपदी, सिंदूरदान, इ. सर्व लग्नविधी ते करतात. अयोध्या प्रांतातील खेडेगावामध्ये वराला गौरीगणेश व नवग्रह यांचे पूजन करावे लागते. तिलक लावण्याचा समारंभ व कलशपूजन हे विधी मुख्य मानले जातात. सोहागबंधन (सौभाग्यबंधन) या समारंभाच्या वेळी वधूला सात घरे हिंडून कुंकू द्यावे लागते. बिहारमध्ये लग्नप्रसंगी सर्व देवांच्या बायकाची जी पूजा केली जाते, तिला मांत्रिक पूजा म्हणतात. ती शक्तीची पूजा असते. त्या वेळी स्त्रिया पितरांना पिंडदान करतात.

माथुर कायस्थांचे मूळ ठिकाण मथुरा हे असावे. मोगल सुभेदारांच्या बरोबर कारकून म्हणून हे गुजरातमध्ये आले असावे. त्यांच्यांतील लग्नाची तऱ्हा थोडी वेगळी आहे. लग्नापूर्वी एक दिवस वधू पुरुषी पोशाख करून व अश्वारूढ होऊन वराच्या घरी जाते. तिथे सर्वांत वडील माणूस तिचे स्वागत करतो. मग ती परत स्वगृही जाते. लग्नाच्या दिवशी वर वधूगृही जातो. तिथे वराचा चुलता वराला व वधूचा चुलता वधूला खांद्यावर घेऊन नाचतात. वधूच्या हातात झाडाच्या फांद्या असतात. त्यांनी ती वराला मारायचा प्रयत्न करते व वर त्या फांद्या ओढून घेण्याचा प्रयत्न करतो. अशा प्रकारे बराच वेळ खेळ झाल्यानंतर त्यांचे लग्न लागते. [म. ज्ञा. को.; कामरूप; से. इं. १९५१; इ. टी. डाल्टन– इं. स्ट. पा. प्रे., एप्रिल १९६०]

**कायस्थ प्रभू** महाराष्ट्रातील एक जात. **पाहा**– चांद्रसेनीय कायस्थ प्रभू.

**कायापलट** हठयोगातली एक विशेष क्रिया. या क्रियेत योगी लोक आपल्या साधनेच्या द्वारे शरीराचा कायाकल्प करतात. गोरखाने म्हटले आहे, की 'प्राणायामाच्या द्वारे नवद्वारे रुद्ध कर व सठीसामासी कायाकल्पाच्या द्वारे शरीर नवे करून घे; म्हणजे मग उन्मनी अवस्था प्राप्त होईल.' (गोरखबानी १९). [हिं. सा. को.]

**कायावरोहण** (१) सांप्रतचे कारवान. हे बडोद्याच्या दक्षिणेस १५ मैलावर डभोई तालुक्यात आहे. पाशुपत पंथाचा संस्थापक लकुलीश याचे हे ठिकाण होते.

(२) वाराणसीमधील एक शिवतीर्थ. तिथे देवीला माता म्हणतात. [मत्स्य पु. १३. ४८]

**कायोत्सर्ग मुद्रा** जैन तीर्थकरांच्या मूर्तीतील एक उभी अवस्था. याचा अर्थ सरळ, उभी, निश्चल, तपोमग्न व्यक्ती असा आहे. शब्दशः अर्थ मात्र देहत्याग किंवा देहावरील ममत्वत्याग असा होतो. दोन्ही बाजूंना हात सरळ खाली सोडलेली अशी ही ताठ उभी मूर्ती असते. अशाप्रकारे तप केल्यास सर्व प्रकारच्या पापांचा नाश होतो, असे महावीराने सांगितले आहे. [जै. इ.]

**कारकर किंवा क्षेत्रकर** शेतजमिनीविषयक विशेष अधिकाराची संज्ञा. पाणिनीने याचा उल्लेख केला आहे (अष्टा ३.२.२१). शेताची मोजणी करणाऱ्या अधिकाऱ्यांना क्षेत्रकर म्हणत. यानाच पाली साहित्यात रज्जुगाहक म्हटले आहे. हे दोन खुंटांच्यामध्ये दोरी बांधून शेत मोजीत. कारकर नामक अधिकारी राजकीय करांचीही वसूली करीत. [पा. भा.]

**कारंजा** विदर्भाच्या अकोला जिल्ह्यातील प्रसिद्ध गाव. हे फार पुरातन दिसते. कारंज ऋषीस झालेला रोग बरा करण्याकरिता अंबादेवीने इथे तलाव निर्माण केला, असे सांगतात. इथे बिंदुतीर्थ नावाचे एक कुंड आहे. औरंगजेबाने इथल्या एका देवळाची मशीद केली आहे. समर्थशिष्य रोकडा राम याची समाधी व मठ इथे आहे. हे जैनांचेही एक तीर्थस्थान आहे. इथे तीन प्राचीन जैन मंदिरे आहेत. एका मंदिरात सोन्या-चांदीच्या व हिऱ्याच्या मूर्ती आहेत. इथे भट्टारकाच्या

दोन गाद्या आहेत. बलात्कारगण व सेनगण अशी त्यांची नावे आहेत. सेनगणाच्या मंदिरात संस्कृत व प्राकृत भाषांतील जैन ग्रंथाचे समृद्ध भांडार आहे. महावीरब्रह्मचर्याश्रम नामक एक शिक्षणसंस्थाही इथे आहे. देवीच्या मंदिरापासून जवळच गाडीवानाच्या पडावात अनेक स्तंभ विखरून पडले असून खड्गासन व पद्मासन घालून बसलेल्या अनेक जिनमूर्तीही आहेत. [ खं. वै.; जै. ध.; म. प. ]

**कारंडव्यूह** महायानपंथाचे एक सूत्र. हे गद्य-पद्यात्मक आहे. यात आदिबुद्धाची कल्पना मांडलेली असून ती योगदर्शनातील नित्ययुक्त व सर्वज्ञ अशा ईश्वराच्या कल्पनेशी जुळणारी आहे. इतकेच नव्हे; तर या ग्रंथात आदिबुद्धाला जगताचा कर्ताही मानले आहे. सृष्टीच्या प्रारंभी आदिनाथ नामक आदिबुद्ध प्रकट झाला. त्याने समाधीतून विश्व निर्माण केले, त्याच्या सत्त्वातून अवलोकितेश्वराची उत्पत्ती झाली, त्याच्या शरीरातून देवांची सृष्टी झाली, इ. या ग्रंथातले वर्णन पुराणातल्या सृष्टिवर्णनाशी साम्य दर्शविते.

कारंडव्यूहात अवलोकितेश्वराच्या महाकरुणेचे वर्णन, तसेच तत्र व मंत्र या गोष्टीही आढळतात. 'ॐ मणिपद्मे हुं' हा मंत्र सर्वप्रथम त्या ग्रंथातच आढळतो. काही विद्वानांच्या मते मणिपद्मा ही अवलोकितेश्वराची अर्धांगी आहे. अशा प्रकारे या ग्रंथात मंत्रतंत्रात्मक बौद्धधर्माचे व भक्तिमार्गाचेही दर्शन होते. [ बौ. ध. द. ]

**कारणशरीर** वासनात्मक शरीर. **पाहा**– शरीर.

**कारले** एका वेलीचे कडू फळ. कारल्याचा वेल अशुभ समजला जातो. मुलाला बाधा होईल, या कल्पनेने पुत्रवती स्त्री कारलीच्या मांडवाखालून जात नाही. मुलाचे लग्न झाल्यावर मात्र ती कारलीच्या मांडवाखालून आपल्या विहिणीच्या घरी जाते.

**कारवाल** अवध प्रदेशातील एक जात. हे लोक कोलांपैकी आहेत. सामान्यतः हे लोक भटक्ये असतात. त्यांच्या टोळ्यांवर पोलिसांची नजर असते. हे लोक जहारपीर, पंचपीर, इ. पीरांचे उपासक आहेत. ते क्वचित काली व गंगा यांनाही भजतात. मुलाचे नाळ पुरताना त्याच्याबरोबर विंचवाची नांगी व दारू पुरतात. बेरियास या जातीशी विवाहसंबंध जोडतात. मृतांना जाळतात किवा पुरतात. [ से. रि. १९११ ]

**कारस्कर** एक प्राचीन जमात. यांचा उल्लेख बौधायन व आपस्तंब यांनी आपल्या सूत्रग्रंथांत केला आहे ( बौ. ध. सू. १.२.१४; आप. ध. सू. २२.६.१८). महाभारताततही यांचा उल्लेख आहे ( कर्ण ४४ ). या सर्व ठिकाणी कारस्कर हे रानटी असल्याचे सांगितले आहे. या लोकांच्या देशाचे नावही तेच आहे. तिथे जाणाऱ्याला व राहणाऱ्याला बौधायनाने प्रायश्चित्त सांगितले आहे. हे लोक विंध्याच्या दक्षिणेस राहत असल्याबद्दल पुराणांचे एकमत आहे ( ब्रह्मांड पु. ३.१४.३३; मत्स्य पु. ११४.४९; वायु पु. ७८.२३). पाणिनीला कारस्कर शब्द माहीत होता. कारस्कर देशातील वृक्ष तो कारस्करवृक्ष होय, असे पाणिनी सांगतो (अष्टा. ६.१.१५६).

कारस्कर म्हणजे महाराष्ट्रातील सध्याचे कातकरी होत, असे श्री. वि. का. राजवाडे सांगतात. कारस्कर-काचरकर काचकर-कातकर असा त्याचा अपभ्रंश झाला आहे, असे त्यांचे मत आहे. [ म. ज्ञा. को. ]

**कारागिरी** माणूस जेव्हा भ्रमंतीचे जीवन संपवून एका ठिकाणी स्थिर होतो, घर बांधतो व शेती करू लागतो, तेव्हापासून त्याच्या जीवनात कारागिरीचा प्रवेश होतो. व्यावहारिक उपयुक्तता आणि धार्मिक उपासना अशा दोन अंगांनी मानवी जीवनात कलाकौशल्याची वाढ होते. घर कशासाठी बांधायचे, तर निवारा मिळण्यासाठी व सुरक्षित निवासासाठी. पण माणूस तेवढ्यावरच संतुष्ट राहत नाही. आपले घर शोभिवंत बनवावे, त्यात जीवनोपयोगी नवी नवी उपकरणे निर्माण करावी, ती सुबक आणि सुंदर बनवावी, असे त्याला वाटू लागते. त्या दृष्टीने मग तो कल्पना लढवू लागतो. समाजाच्या विकासक्रमात विविध व्यवसाय निर्माण होतात आणि त्यांतही कलाकौशल्याला वाव मिळतो. धार्मिक कर्मकाड आणि देवतांच्या उपासना यांतही विविध उपकरणांची गरज असते. त्यामुळे त्या अंगानेही समाजात कलाकौशल्याची वाढ होऊ लागते. अशा प्रकारे कलाकौशल्य हे मानवी संस्कृतीचे एक महत्त्वाचे अंग बनते. किंबहुना एखादा मानवसमाज ज्या-प्रमाणात सुंदर व उपयुक्त अशा कारागिरीच्या विविध वस्तू निर्माण करतो, त्या प्रमाणात त्याच्या संस्कृतीचे मूल्यमापन होत असते.

कारूचे जे कर्म, ती कारागिरी होय. कारू हा शब्द कला व कारागिरी या दोन्ही अर्थांनी ऋग्वेदात वापरलेला आहे. कवी या अर्थानेही कारू शब्दाचा उपयोग केलेला आहे (ऋ. १. १६५.१४). 'कारवः कर्मकर्तारो ऋत्विजः,' = कारू म्हणजे यज्ञकर्म करणारे ऋत्विज, असा त्याचा अर्थ सायणाचार्यांनी

दिला आहे (तै. ब्रा. २.८.२.१२ वरील टीका).

अथर्ववेदपरिशिष्टात कारू शब्द कारागीर या अर्थाने वापरला आहे (१.८.८). श्रौतसूत्रे, धर्मसूत्रे व स्मृतिग्रंथ यांतही त्या शब्दाचा कारागीर असाच अर्थ केलेला आहे. बृहस्पतिस्मृती ( १.१.३४ ), मनुस्मृती ( १०.१०० ) व कौटिलीय अर्थशास्त्र (३.६३) यांत कारू व शिल्पी हे दोन शब्द जोडीने आढळतात. 'कारुः शिल्पी' असे अमरकोशातही म्हटले आहे. पण धर्मसूत्रांच्या काळात त्या दोघांच्या व्यवसायात भिन्नता आली व त्यांची व्यवसायक्षेत्रेही एकमेकांपासून अलग झाली. भरताच्या नाटयशास्त्रावरील टीकेत ( १७.७१ ) कारू व शिल्पी यांच्या मधील भेद स्पष्ट केला आहे, तो असा—

**कारुकाः सूपकारादयः शिल्पिनश्चित्रकारादयः।**

अर्थ— स्वयंपाकी इ. (लाखकाम, दगडकाम, लोखंडकाम व लाकूडकाम करणारे) हे कारू असून चित्रकार, (मूर्तिकार) वगैरे शिल्पी होत.

ब्रह्मवैवर्त पुराणात नऊ शिल्पकार सांगितले आहेत, ते असे—

**मालाकारः कर्मकारः शङ्खकारः कुविन्दकः ।।**
**कुम्भकारः कांस्यकारः षडेते शिल्पिनां वराः ।**
**सूत्रधारश्चित्रकारः स्वर्णकारस्तथैव हि ।**
(१०.२०–२१)

यांतील चित्रकार सोडून बाकीचे सारे कारूच होत. महाराष्ट्रात चौगुला, महार, सुतार, लोहार, चांभार, कुंभार, न्हावी, सोनार, जोशी, परीट, गुरव, कोळी यांना बारा कारू म्हणतात, असे गावगाडा या पुस्तकात म्हटले आहे.

यापुढे वेदकालापासून भारतातील कारागिरी कशा प्रकारे प्रगत आणि विस्तृत होत गेली, ते थोडक्यात पाहायचे आहे—

ऋग्वेदातले महत्त्वाचे कारागीर म्हणजे रथकार, तक्षा व कुलाल हे होत. वैदिक आर्यामध्ये युद्धकला बरीच प्रगत होती. ते लहानमोठ्या रथांवर आरोहण करून रणांगणात उतरत (ऋ. ३.५३; २.३९ ). त्यामुळे वैदिक कालात सुतारकामाला फार महत्त्व आले होते. वैदिक ऋषी आपल्या सूक्तांना सुताराकडून तासून घासून सुंदर बनविलेल्या रथाची उपमा देताना दिसतात. यजुर्वेदात या रथकारांसाठी एक स्वतंत्र इष्टीच सांगितली आहे. त्या कालात गृहनिर्माणकलाही वाढू लागली होती. त्यामुळे स्थपतीना विशेष मान्यता होती. ऋग्वेदात शतद्वारपुराचा किंवा प्रासादाचा उल्लेख मिळतो. यजुर्वेदात या स्थपतींसाठीही स्वतंत्र इष्टी सांगितलेली आहे. प्रासादनिर्मितीबरोबरच नौकानिर्मितीचेही ऋग्वेदात उल्लेख मिळतात. शंभर वल्हयांनी चालविल्या जाणाऱ्या नौकेचे वर्णन ऋग्वेदात आहे (ऋ. १. २५. ७; ७. ३-४; १. ११६. ५). वैदिक कालातले स्त्री-पुरुष विणकामातही तरबेज होते. ते विविध रंगाची जाडतलम वस्त्रे विणीत. विणकामाच्या कलेशी संबंधित असे अनेक दृष्टान्त ऋग्वेदात आढळतात. वैदिक ऋषी यज्ञक्रियेला विणण्याच्या क्रियेची उपमा देतात (ऋ. ५.२९.१५). ऋग्वेदाच्या ६ व्या मंडलातले ७५ वे सूक्त केवळ युद्धातली आयुधे आणि उपकरणे यांच्याविषयीच रचलेले आहे.

सूत्रकालात कुंभारकाम, सुतारकाम, धातुकाम, काचकाम, जवाहिराचे काम, विणकाम, चांभारकाम, इ. कित्येक कलाकौशल्याचे व्यवसाय वाढीस लागलेले दिसतात. हे कलाकौशल्याचे व्यवसाय घरगुती धंद्याच्या स्वरूपात असले, तरी अशा कारागिरांचे संघही निर्माण झालेले होते. संघातील सभासदांच्या आचाराबाबत काही नियमही तयार केलेले असत. हे संघनिर्मित नियम राजसंस्थाही मान्य करीत. त्या त्या विभागातले काम विनावेतन करणे, एवढाच कर या कारागिरांना राजाला द्यावा लागे.

**कुंभारकाम—** कुंभार घरकामासाठी व यज्ञयागासाठी लागणारी मातीची भांडी तयार करीत. बौधायन श्रौतसूत्रात सांगितले आहे, की राजा कुंभारांना बोलावून विटा, स्वयंपाकाची लहान-मोठी भांडी व अश्वमेधात लागणारी विविध पात्रे त्यांच्याकडून तयार करून घेत असे.

**सुतारकाम—** सुतार हा समाजाला अत्यावश्यक असा कारागीर होय. नांगर, गाड्या व घरकामासाठी लागणाऱ्या लाकडी वस्तू तो तयार करी. या सर्व सुतारांत रथकारांचा दर्जा मोठा असे. सूत्रकालात रथकारांचा एक स्वतंत्र वर्गच होता.

**धातुकाम—** लोहार व सोनार यांची नावे श्रौतसूत्रात आढळतात ( बौधा. श्रौ. सू. १५.१३ ). सोनार सोन्या-चांदीचे अलंकार घडवीत. अशा सोन्या-चांदीच्या अलंकारांची बरीच मोठी यादी सूत्रग्रंथात आहे. लोहार लोखंडाची व तांब्याची भांडी, तसेच नांगरांचे फाळ, कुदळी, कोयते, सुया, सुऱ्या व वस्तरे या महत्त्वाच्या वस्तू तयार करीत. त्याचप्रमाणे तलवारी भाले, कुऱ्हाडी, धनुष्य-बाण व चिलखते या वस्तूही लोहार बनवीत.

**काचकाम—** सूत्रकालात आरसे तयार करण्याचे काम तेजीत चालत असावे, असे वाटते. सूत्रकारांनी निरनिराळ्या धार्मिक प्रयोगात आरशांचा अंतर्भाव केला आहे. विवाहाच्या वेळी वधूला आरसा भेट म्हणून देत. चौल व सीमंतोन्नयन या संस्कारांतही आरसा वापरीत. यज्ञात दक्षिणा म्हणूनही आरसे देत. श्रौतसूत्रात काचेच्या अनेक अलंकारांचे उल्लेख आले आहेत.

**विणकाम—** वैदिक कालापेक्षा सूत्रकालात विणण्याच्या

कलेने बरीच प्रगती केलेली दिसते. वैदिक लोक केवळ लोक-रीचीच वस्त्रे विणीत; पण सूत्रकालात कापूस, ताग व अबाडी याच्या धाग्यांचीही वस्त्रे विणली जाऊ लागली होती. सूत्रकालात विणकामाची कला पवित्र मानली जात आहे. वस्त्रांचे अनेक प्रकार सूत्रग्रथात सागितले आहेत. पारस्कराने सूत कातायच्या टकळीचा उल्लेख केला आहे. विवाहसमयी वधूने उत्तरीय वस्त्र परिधान करताना म्हणायचा एक मंत्र पारस्कराने दिला आहे. त्या मंत्राचा अर्थ असा–

ज्या देवतेने सूत काढले आणि मागावर ताणे लावून त्यात आडवे धागे भरले, त्या देवतेने तुला वृद्धपणीही वस्त्रे पुरवावी. हे वधू, तू हे वस्त्र परिधान कर ( पार. गृ. सू. १.४.१३ ).

**चांभारकाम–** चामडयाच्या वस्तू तयार करणाऱ्या कारागिरांचा उल्लेख सूत्रग्रंथात आला आहे ( बौधा. श्रौ. सू. १५. १४). या कलेचाही त्या काळात बराच विकास झाला होता. हरिण, बकरे, गाय, बैल, इ. प्राण्याच्या कातड्याची उत्तरीय वस्त्रे, पादत्राणे, तेल-तूप इ. द्रवपदार्थ ठेवण्यासाठी मोठमोठ्या पिशव्या, धनुष्याच्या दोऱ्या, चिलखते, लगाम, धनुर्धराच्या हाताचे संरक्षण होण्यासाठी पट्टे इ. चर्मवस्तू त्या काळात तयार होत.

**गवंडीकाम व इतर कामे–** दगडांची भांडी, तेलघाण्याचे दगड, बत्ता व मुसळ यांचा उल्लेख सूत्रांत वारंवार येतो ( बौधा. ध. सू. २.१.२.१७ ). शिवलेल्या कपडयाचे व त्या कामी लागणाऱ्या सुयाचे उल्लेख श्रौतसूत्रात येतात. त्यावरून त्याकाळी शिवण्या-विणण्याचे काम होत असावे, असे दिसते. तार्प्य नावाच्या एका वस्त्राचा उल्लेख कात्यायन श्रौतसूत्रात येतो ( १५.५.११ ). त्या वस्त्रावर यज्ञीय उपकरणाची चित्रे काढीत. दोऱ्या व टोपल्या तयार करण्याच्या कामाचाही उल्लेख श्रौतसूत्रात आलेला आहे. या सर्व गोष्टीवरून सूत्रकालातील कला-कौशल्याची थोडीबहुत कल्पना येऊ शकते.

रामायण-महाभारताच्या कालात कला-कौशल्याचे क्षेत्र याहून व्यापक झालेले आहे. धूपक = धूप किवा सुगंधी पदार्थाचा निर्माता, दंतकार = हस्तिदंतावर कारागिरी करणारा, कंबलकारक = कांबळी बनविणारा, मणिकार=हिरे-माणकांचे काम करणारा, मायूरक = मोरपंखांच्या विविध वस्तू बनविणारा, रोचक = काचसामान बनविणारा, सूत्रकर्मविशारद = शिंपी किंवा तंबू बनविणारा, वेधक = मोत्यांना छिद्रे पाडून त्यांचे अलंकार बनविणारा, वंशकृत = वेळूच्या विविध वस्तू बनविणारा, इ. कलाकुशल लोक रामायण-महाभारतात दिसतात. त्या काली वल्कले धारण करणारा एक मोठा वर्ग समाजात होता. त्यामुळे कलाकुसरीची वल्कले तयार करणे, हा त्या काळातला एक प्रगत व्यवसाय असला पाहिजे.

सांप्रतही भारताच्या वेगवेगळ्या प्रदेशात वेगवेगळ्या कला-कौशल्याच्या वस्तू निर्माण होतात. बंगालमधील ग्रामीण जीवनात कथा (गोधडी) तयार करण्याची कला सर्वत्र आढळते. तिकडील स्त्रिया लहानमोठे कापडाचे तुकडे विशिष्ट पद्धतीने शिवून कंथा तयार करतात व त्यावर झाडे, वेली, पाने, इ. वस्तूचे व पौराणिक प्रसगाचे भरतकाम करतात. या भरतकामासाठी लाल, पिवळा, हिरवा व काळा या रंगांचे धागे वापरतात. बंगालमध्ये शिंकीही चांगली बनवितात. ही शिंकी बहुधा काथ्याच्या किंवा वाखाच्या धाग्यांच्या दोऱ्या वळून त्यापासून तयार करतात. त्यांना चिध्यांची रंगीत किनार लावतात. अशी अनेक शिंकी घराच्या आढ्याला टांगून त्यावर भांड्यांची उतरड रचायची पद्धत आहे. बंगालमध्ये मातीची चित्रे तर करतातच; शिवाय मिठाईचीही चित्रे बनवितात. लग्नाच्या वेळी नवऱ्या मुलाला जी मिठाई देतात, ती मासे, पक्षी, पशू यांच्या आकारात असते. कालीघाट, बरद्वान व मिदनापूर या ठिकाणी लाकडी बाहुल्या तयार करतात. कित्येक ठिकाणी भुते, राक्षस व जंगली जनावरे याचे रंगीत मुखवटेही बनवितात. दुर्गापूजा, कोजागिरी, इ. सणावाराच्या दिवशी विशिष्ट जातीचे लोक हे मुखवटे घालून पैसे व मिठाई मागायला जातात. हे मुखवटे पूर्वी माती व लाकूड यांचे बनवीत; पण ते अवजड होत असल्यामुळे हल्ली भोपळ्यासारख्या हलक्या वस्तूचे बनवितात. बंगालमध्ये कापडाचे पट तयार करतात व त्यावर राधा-कृष्ण, मनसा, फत्ते गाझी, इ. दैवतांची चित्रे काढतात. ही चित्रे दाखवून त्याची गीते गात भिक्षा मागणारे पटुआ नावाचे लोक बगालमध्ये आहेत. दुर्गापूजेच्या वेळी बाबूच्या आतील पट्टयांचे सुदर दागिने बनवितात आणि त्यांनी देवीला मढवितात.

बंगालमध्ये मनसादेवीचे चित्र असलेली काही मातीची भाडी व लक्ष्मीसरा म्हणून ओळखली जाणारी ताटासारखी उपकरणे बनवितात. या चित्रांतून दिसून येणारी कलात्मकता उल्लेखनीय असते.

ओडिसामध्ये धार्मिक चित्रे काढणारा एक वर्ग आहे. त्याना चित्रोकारो म्हणतात. ओडिसातील प्राचीन देवालये ज्या कलाकारांनी चित्रकलेच्या द्वारे सजविली, त्याचेच हे वंशज होत. यांच्या चित्रांचे विषय पौराणिक देवता व पुराणातील कथाप्रसंग हे असतात. दुसरा एक वर्ग दगडाचे काम करणाऱ्यांचा आहे. त्या लोकांना पोथुरिया म्हणतात. या लोकाच्याकडे ताडपत्रावर लिहिलेली मंदिररचनेसंबंधीची माहिती व मंदिरांचे नकाशेही असतात. ही ताडपत्रे जीर्ण झाली, की त्यावरचा

मजकूर व रेखाकृती दुसऱ्या ताडपत्रावर उतरून घेतल्या जातात. हे काम त्या त्या घराण्यातील मोठ्या माणसानी करायचे असते. चित्रोकारो व पोथुरिया या दोन्ही वर्गाचे लोक मुख्यत्वे जगन्नाथपुरीत आणि तिच्या आसपास आढळतात. हे लोक चित्रांसाठी कितान किंवा जुन्या साड्या वापरतात. त्याचे रंगही गावठीच असतात. रंग बनविण्याचे गुपित ते कोणालाच सागत नाहीत. सुविख्यात चित्रकार यामिनी राय यांच्या चित्रकलेवर ओडिसातील चित्रोकारोच्या शैलीचा प्रभाव असल्याचे सागतात. त्याचे हे परंपरागत व्यवसाय अलिकडे मंदावले आहेत. त्यामुळे त्या वर्गाचे बरेचसे लोक स्थलांतर करून अन्य व्यवसायांत शिरले आहेत. पण सांप्रत ओडिसा सरकारचे लक्ष या लोकांकडे गेले आहे. त्यांना शक्य ती मदत देण्यासाठी एक 'आर्टस् ॲण्ड क्राफ्ट्स् केंद्र' पुरी शहरात सरकारने उघडले आहे. चित्रोकारो आणि पोथुरिया यानी बनविलेल्या वस्तू योग्य भावात विकल्या जाव्या, म्हणून हे केंद्र खटपट करते व कलाकाराना मार्गदर्शनही करते.

भारतात प्राचीन काळापासून बांबूचा उपयोग विविध प्रकारे केला जातो. ग्रामीण जीवनात शेतकऱ्याला उपयुक्त अशा कितीतरी वस्तू बांबूच्या किंवा वेळूच्या बनविल्या जातात. झोपडीच्या भिंती, बैलगाडीचे छप्पर, भात साठविण्यासाठी कणगी, सामानासाठी हारे, टोपल्या, रोवळ्या व सुपे, हत्यारांच्या व उपकरणांच्या मुठी, अशा अनेक वस्तू बांबूपासून केल्या जातात. शंभर वर्षांपूर्वी बंगालमध्ये हरिकीर्तन व इतर सार्वजनिक कामे यासाठी चंदीमंडप नावाचा एक दिवाणखाना बांबू व त्याच्या पट्ट्या यांच्यापासूनच तयार करीत. त्यावर नीलकंठ नावाच्या पक्ष्यांची पिसे पसरून तो सुशोभित करीत. अलिकडे या चंदीमंडपकलेचा ऱ्हास झाला आहे. सांप्रत बांबूच्या कलाकृती निर्माण करण्याची एक नवीनच पद्धत उदयास आली आहे. भारतीय कारागिरांनी कल्पनाशक्ती व हस्तकौशल्य याच्या साहाय्याने बनविलेल्या कितीतरी नवीन सुंदर वस्तू बाजारात दिसतात. ही कला भारतीय लोकांनी जपानकडून घेतली आहे. टोपल्या, ठाणदिवे, पेले, पुष्पपात्रे, पुस्तकाधार, खेळणी, अशा अनेक सुबक वस्तू सांप्रत बांबूपासून बनविल्या जातात. १९५७ साली दिल्ली येथे बांबूच्या वस्तूंचे एक प्रदर्शनच भरले होते.

**रंगकाम** — भारतीय लोकांना कपडे रंगविण्याची विद्या प्राचीन काळापासून अवगत आहे. बुद्धाच्याही पूर्वकाळापासून आपले पूर्वज रंगविलेले कापड वापरीत. कापडावरचे हे रंग पक्के असत. अजंठा व बाघ येथील लेणी सनपूर्व पहिल्या शतकापासून सातव्या शतकापर्यंतच्या काळातली आहेत. या लेण्यांतल्या चित्राकडे पाहिले म्हणजे तत्कालीन लोक तांबड्या, निळ्या व पांढऱ्या पट्ट्यांचे कापड वापरीत, असे दिसते. हिंदू लोकांच्या लष्करात अनेक रंगांची निशाणे फडकत असत, असे इतिहासकारानी लिहून ठेवले आहे. 'हिंदू लोकांस आम्ल व अल्कली पदार्थ पुष्कळ माहीत आहेत; त्यामुळे एकाच रंगाचे त्यांना विविध रंग बनविता येतात,' असे श्री. गायलसाहेब म्हणतो. जुन्या काळी वेगवेगळे रंग देण्याचे काम भिन्न भिन्न जातीचे लोक करीत. गुळीचा रंग मुसलमान लोक करीत. सुरंगीपासून पक्का तांबडा रंग तयार करून जाजमे, रजया, इ. वस्तू रंगविण्याचे काम हिंदूकडे असे. रेशमाच्या कापडावर बांधणीचे काम करणारे लोक मुसलमान असत. सांप्रतही राजस्थानात बांधणीच्या साड्या तयार होत असतात. मुंबईत लोकर रंगविणारे काही रंगारी असत, त्यात मुख्यत्वे काश्मीरी व पंजाबी लोकांचाच भरणा असे. कातडे रंगविणारे लोकही आपल्या देशात होते. जाजम, रजई, चांदणी व साड्या यावर रंगीत नक्षी छापणारे जे लोक गुजरातमध्ये आहेत, त्याना भावसार म्हणतात. हे मूळ बऱ्हाणपुराकडचे आहेत. खत्री लोक मुख्यत्वे जाजमे छापण्याचा व्यवसाय करीत. मुसलमान खत्र्यास रंगरेज म्हणतात. काही वर्षांमागे कापडावर खडी छापण्याचा धंदा तेजीत होता. काश्मीर, पंजाब, उ. प्रदेश या प्रदेशांत चिटे छापण्याचे काम मोठ्या प्रमाणात चालत असे. राजस्थानातले चीटही प्रसिद्ध होते. केरळात कालिकत या शहरी फार वर्षांपासून कापडावर छापाशिवाय कलमाने नक्षी काढून ती रंगविण्याचा, अर्थात कलमदार चिटे तयार करण्याचा धंदा जोरात चालत होता. चिटाला इंग्रजीत कॅलिको असे म्हणतात. तो शब्द कालिकतवरूनच आलेला आहे.

गुंड्या, गोफ, गोटा, किनार, पालव, इ. कलाबतूचे प्रकार भारतात बऱ्याच काळापासून चालू आहेत. जरतारी कामाचे कारखाने तर भारतातल्या अनेक शहरात होते. अहमदाबाद सुरत, पुणे, येवले, इ. ठिकाणी किनखाबी बुट्टीचे शालू, खण, इ वस्त्रे तयार होत. वाराणसी, भावलपूर, मुलतान, इ. ठिकाणी किनखाब विणणारे कारागीर होते. आपल्याकडचे राजेरजवाडे किनखाबी अंगरखे घालीत, किनखाबी गाद्यावर निजत आणि घोड्याच्या खोगिरावरही किनखाबाचा गाशा टाकीत. औरंगाबादेस उत्तम प्रकारचा किनखाब तयार होत असे.

कशिदा म्हणजे सुईत धागा ओवून कापडावर हाताने काढलेली नक्षी. कशिदा हा रेशमी किंवा जरीच्या धाग्याचा असतो. जरीच्या कलाबतूत टिकल्या बसवून कशिदा काढणे, हा भरतकामाचा कशिदा होय. याशिवाय बादलानी नावाचा कशिद्याचा एक प्रकार आहे, तो बोहरी बायकांचा विशेष आवडता आहे. चांदीची बारीक तार बनवून ती ठोकून चपटी बनवतात, तिला

बादल असे नाव आहे. कच्छमध्ये रबारी स्त्रिया कशिद्यात मधूनमधून काचेचे तुकडे बसवून त्याच्या चोळ्या व घागरे करतात. गुजराती व पारशी लोकांत साडीच्या काठावर कशिदा काढण्याची पद्धत जुन्या काळी सर्वत्र होती. सावंतवाडीच्या भागातील कशिदा काढणाऱ्या लोकांना जिनगर म्हणतात. सिंध व पंजाब या प्रदेशांत कशिद्याचे काम पुष्कळच होते. काश्मीरी शालीवर कशिद्याचे काम होते, तितके बारीक आणि नाजूक काम दुसरे कोणतेही नसेल.

काश्मीरात दोन प्रकारच्या शाली तयार होतात. तिलीवाला किंवा कानीका हा एक प्रकार व अम्लीकल हा दुसरा प्रकार होय. पहिला प्रकार मागावर विणला जातो. दुसऱ्या प्रकारची शाल साधी असते. काश्मीरची शाल जगभर प्रसिद्ध आहे. रोमन सम्राट सीझरच्या प्रासादातही काश्मीरी शाल पोचली होती. काश्मीरच्या कलाप्रेमी राजानी हा व्यवसाय वाढीस लावण्यासाठी बरेच प्रयत्न केले होते. मीर सय्यद अली हम्दान (इ. स. १३७८) व सुलतान नाजुकशहाचा मंत्री मिर्जा हैदर (इ. स. १५४०) या दोन व्यक्ती शालीच्या कलेला प्रोत्साहन देणाऱ्यात प्रमुख होऊन गेल्या. शाल ही वस्तू विशेष प्रकारच्या बकरीच्या मुलायम लोकरीपासून बनते. तिला पश्म म्हणतात. या बकऱ्या तिबेट व लडाखमध्ये विपुल प्रमाणात आहेत.

वायव्य प्रांत, लखनौ, वाराणसी, आग्रा, इ. ठिकाणी मलमलीवर चपटच्या तारेचा कशिदा काढतात, त्याला कामदानी म्हणतात व मखमलीवर कलाबतूचे काम करतात, त्याला झरदोज म्हणतात. कराची व अहमदाबाद या गावी गालिचे उत्तम बनतात. उ. प्रदेशातही गालिचे विणणारे तरबेज लोक आहेत. लोकरीचे बुरणूस तयार करून त्यांवर रंगीत लोकरीची नक्षी वठविणारे कारागीर पंजाब, राजस्थान व काश्मीर या प्रदेशांत आहेत.

आसाम प्रांत हा विणकामासाठी प्रसिद्ध आहे. एका काळी तिथे घरोघरी बायका कापड विणीत. मणिपूरही तसेच. या भागात सुंदर मलमल तयार होत असे, तशीच ती तमिळनाडमध्येही होत असे. सुती कापडाबद्दल मध्यप्रदेशाची पूर्वापार ख्याती आहे. शेले, उपरणी, धोतरे, दुपेटे वगैरे कापडाचे प्रकार चंदेरी गावी उत्तम तयार होत. राजस्थानातल्या जयपूर विभागात मलमली पागोटी तयार करीत. अहमदाबाद, बडोदे, खंबायत, मुंबई, पुणे, येवले, अहमदनगर, सोलापूर बार्शी, नाशिक, भिवंडी, शहापूर, इ. ठिकाणे स्त्रियांच्या वस्त्राकरिता प्रसिद्ध होती व आहेत. पैठण येथे जरी-रेशमी पैठण्या उत्तम बनत. रेशमी वस्त्र आपल्या देशात रामायणकालापासून प्रसिद्ध आहे. वाराणसी व आग्रा या गावी रेशमी वस्त्रे विशेषेकरून तयार होतात. बनारसी शालू, शेले व दुपेटे यांची सर्व देशभर प्रसिद्धी आहे. दक्षिणेत मदुरा, सेलम, चिंगलपुट, तंजाऊर, म्हैसूर, बेंगळूर, इ. ठिकाणी रेशमी वस्त्रे उत्तम तयार होतात. रेशमी कापडाबद्दल औरंगाबादची फार वर्षांपासून प्रसिद्धी आहे. तिथे हिब्रू नावाचे गजनीसारखे नक्षीदार कापड तयार होते. श्रीमंत मुसलमान लोकांत त्या कापडाचा विशेष प्रचार आहे. येवल्यास रेशमी कद, पीतांबर, पैठण्या, लुगडी व खण उत्तम बनतात. मीरत, मुझफरनगर, अयोध्या, आग्रा, गया, सीतामढी ही शहरे लोकरीं कापडाविषयी प्रसिद्ध आहेत. काश्मीर व पंजाब या प्रदेशांत लोकरीचे कापड पुष्कळच तयार होते. मारवाडात धाबळ्या व दक्षिणेत घोंगड्या चांगल्या बनतात.

**मातीची भांडी**– अतिप्राचीन काळापासून आपल्या देशात मातीची भांडी बनत आली आहेत. सांप्रत ती चाकावर मातीचा गोळा ठेवून बनवितात; पण पुरातनकाळी ती हातानेच घडवीत. प्रागैतिहासिक काळातील कितीतरी मातीची भांडी मद्रास येथील संग्रहालयात ठेवलेली आहेत. नीलगिरीच्या गुहांमधून ही भांडी ब्रिटिश संशोधकांनी गोळा केलेली आहेत. त्यांवर मनुष्ये आणि पशू यांच्या आकृत्या काढलेल्या आहेत. त्यावरून त्या काळातल्या लोकाची वस्त्रे आणि शस्त्रे यावर चांगला प्रकाश पडतो. बौद्ध काळातील सांची, भरहूत, भुवनेश्वर या ठिकाणी जी मातीची भांडी आढळतात, त्यांचा आकार व नक्षी या गोष्टी आजच्या काळातही साधलेल्या नाहीत.

मातीची भांडी बनविण्याच्या धंद्यातील कलाकुसरीचा भाग पुढे पुढे कमी होऊ लागलेला दिसतो. मातीचे भांडे उष्टे झाले, की विटाळते, या समजुतीने लोक ते एकदा वापरल्यावर फेकून देऊ लागले व त्यामुळेच मग त्यांवर कलाकुसर करीनासे झाले. अर्थात शोभेची भांडी ही याला अपवाद समजायची. आजही लग्नादी मंगल कार्यात आवश्यक असणारी भांडी, तसेच खुजे, चिनी मातीची भांडी, यांवर रंगीत चित्रकारी केलेली आढळते.

पंजाबप्रदेश हा चिनी मातीच्या भांड्याबद्दल प्रसिद्ध आहे. सुरया, मोठाल्या थाळ्या, लोटे व भिंतीला बाहेरून लावण्याच्या विटा, या वस्तू विशेषतः पंजाबातून येतात. हे काम इराणी पद्धतीचे दिसते. या प्रकारची भांडी व पात्रे तयार करण्याची विद्या चीनमधून प्रथम इराणात गेली व तिथून ती भारतात आली, असे अनुमान आहे. गुजरातेत पाटण या गावी तयार होणाऱ्या मातीच्या मडक्याची प्रसिद्धी आहे. या मडक्याचा आकार चित्रविचित्र असतो. वायव्य प्रांतात खुजे चांगले बनतात. तिथली भांडी काळ्या रंगाची असून त्यांवर पांढऱ्या वर्खाची नक्षी चिकटविलेली असते. अमरोहा या गावी फार पातळ मडकी बनतात. त्यांना कागझी असे नाव आहे. जयपूर

व ब्ऱ्हाणपूर येथे चिनीमातीची मडकी चांगली बनतात.

**कातड्याचे काम** — थंडीवाऱ्यापासून संरक्षण करण्यासाठी माणसाने आपल्या आदिम अवस्थेत शोधून काढलेला पदार्थ म्हणजे चामडे हा होय. शंकर हा गजचर्म व व्याघ्रचर्म धारण करणारा आहे. ऋषिमुनी हरणाचे कातडे वापरीत. वल्कलांचा शोध हा त्यापुढचा आहे. आपले पूर्वज कातड्याच्या मोटेने काढलेल्या पाण्याचा विटाळ मानीत नसत. तेल व तूपही कातड्याच्याच बुधल्यांतून ठेवीत.

पंजाबात जरतारी जोडे व सपाता चांगल्या बनतात. त्यांवर मोत्ये, टिकल्या, सोन्या-रुप्याची तार, बेगड, इ. वस्तू जडवून त्यांना सौंदर्य आणतात. कशिद्याचे व जरतारी जोडे लखनौ, आग्रा, उज्जैन, इंदूर इ. ठिकाणी सुरेख तयार होत. अत्तराच्या बुधल्या मुख्यत्वे राजस्थानात होतात. पंजाबात पितळेच्या हुक्क्यावर कातड्याचे काम करतात. कातड्याच्या ढाली करण्याची चाल आपल्या देशात पुरातन आहे. उ. भारत, राजस्थान व कच्छमधील भूज या ठिकाणी बनणाऱ्या ढाली नक्षीदार असत. ढाली तयार करणारे लोक ढालगर या नावाने ओळखले जात. जयपूर येथे कातड्याच्या गंजीफा बनवितात. कांगडा प्रदेशात चामड्याच्या विजारी, अंगरखे, हातमोजे, टोप्या व पिशव्या, इ. वस्तू बनवितात. त्यांवर कशिदाही काढतात.

**बुरुडकाम** — बांबू, वेत, बोरू, देवनळ, गवत, ताड्माड, इ. वस्तूंच्या टोपल्या व पेटारे बनविण्याचे काम प्राचीन काळापासून भारतात चालू आहे. बायकांचे दागिने ठेवण्याचे व कुंकवाचे करंडे पूर्वी बांबूचे किंवा वेताचे असत. सुपे, टोपल्या, रोवळ्या, इ. बांबूच्या वस्तू आजही घरोघर दृष्टीस पडतात. मुलींच्या खेळांतही असल्या वस्तू असतात. बंगालमध्ये वेताचे पेटारे बनतात. खजुरीची कोवळी पाने सुकविली म्हणजे ती मऊ तर राहतातच; शिवाय त्यांवर तकतकीही येते. या खजुरीच्या पानांच्या सुरेख चटया बनतात. कूर्ग येथे वेताच्या करंड्या तयार होतात. आसामातही वेताचे पुष्कळ काम होते. बांबूचे तट्टे कुडासारखे उभे करून झोपडीची भिंत तयार करण्याची चाल भारतात पुष्कळ ठिकाणी आहे. बंगालमध्ये मादुर व सीतळपटी नावाच्या गवताच्या चटया फार सुरेख होतात. तमिळनाडमध्ये नदीतील लव्हाळ्याच्या चटया बनवितात. हे काम मुख्यत्वे बायका करतात. वारा घेण्याचे पंखे मुख्यत्वे बांबू, वाळा, गुंजगवत, खजूरी, मोरपिसे, हस्तिदंत, इ. वस्तूंचे बनवतात. ताडाचे मोठे पंखे तमिळनाडमध्ये बनतात. बांबूचे तर सर्वत्र बनतात. वाळ्याच्या पंख्यावर भरतकाम, टिकल्या, मोरपिसांची जडण, इ. प्रकारची नक्षी असते. बांबूच्या ताट्या बनवून त्यात दोऱ्याने वाळा शिवून टाकतात व त्यांवर तऱ्हेतऱ्हेची नक्षीही करतात. तमिळनाड व केरळ या भागांत ताडपत्र्या आणि ताडाच्या छत्र्या बनवितात.

**हस्तीदंती व शिंगाचे काम** — पूर्वी मोठमोठ्या संस्थानिकांच्या दरबारी हस्तीदंती काम करणारे कारागीर असत. मुर्शिदाबाद व त्रिवेंद्रम ही दोन गावे हस्तिदंताच्या कारागिरीविषयी विशेष प्रसिद्ध होती. द. भारतात प्राधान्येकरून हस्तिदंती कलेचा विकास झाला. श्रीरंगम् येथील श्रीरघुनाथ व अलगर कोइल येथील काल अलगर याच्या देवालयात सुंदर हस्तीदंती मूर्ती ठेवलेल्या आहेत. विजयनगर साम्राज्याच्या काळात या कलेला ऊर्जितावस्था आली. मदुरा येथील नायक राजांनी या कलेला फार मोठा राजाश्रय दिला. श्रीरंगम् व अलगर कोइल या ठिकाणच्या देवालयात शंभराहून अधिक हस्तिदंती मूर्ती आहेत. त्यांतील कित्येक पौराणिक प्रसंगांवर व नृत्यप्रसंगावर बनविलेल्या आहेत. अमृतसर, भरतपूर, अलवार, इ. ठिकाणी हस्तिदंताच्या फण्या, कागद कापावयाच्या सुऱ्या, लहान डबे, चुडे, इ. वस्तू बनवितात. अमृतसर येथे हस्तिदंतावर जाळीचे काम फार चांगले होते.

अर्घ्ये, संपुष्ट, वाद्ये, इ. शिंगाचे पदार्थ बनविण्याची चाल भारतात बरीच पुरातन आहे. चाकू व जंबिया यांच्या मुठी, बाणांची टोके हीही कधी कधी शिंगाचीच करतात. गेंड्याच्या शिंगाचा पेला पाणी पिण्यास पवित्र मानलेला आहे. त्याला खड्गपात्र म्हणत. कोकणात पुष्कळ ठिकाणी गव्याच्या शिंगाचे काम फार चांगले होत असे. बंगालमध्येही शिंगकाम चांगले करतात. इतिहासकाळात क्वचित शिंगाच्याही ढाली बनवीत. सांप्रत शिंगाच्या तपकिरीच्या डब्या, छत्र्यांच्या मुठी, टाकाचे दांडे, इ. वस्तू म्हैसूरला होतात.

शिंगाप्रमाणेच शंखाचेही काम उल्लेखनीय आहे. प्राचीन काळी शंखांची कंकणे बनवीत. आजही बंगालमध्ये शंखचुड्याची चाल आहे. हे काम करणारे शंखारी नामक लोक ढाका येथे बरेच आहेत. चपट्या अंगठीपासून तो व्याघ्रमुखी कड्यापर्यंत शंखकाम त्या ठिकाणी सुरेख होते.

**मिनाकाम** — मिन्याच्या कामाबद्दल जयपूर प्रसिद्ध आहे. तशा जातीच्या कारागिरांस तिथे राजाश्रय मिळाल्यामुळे त्यांनी मिनाकारीत खूप प्रगती केली. सोन्यारुप्याच्या भांड्यांवर हे लोक मिना चढवितात. जयपूरच्या खालोखाल मिन्याचे काम काश्मीरमध्ये होते. लोटे, ताटे, तबके, सुरया, गुलाबदाण्या, पुष्पपात्रे, इ. लहान-मोठ्या उपकरणांवर मिन्याचे काम करतात. दिल्लीस पानपुडे, चौफुले, हुक्के, इ. लहान वस्तूवरही मिना चढवितात. लखनौच्या मिनाकारीचीही प्रसिद्धी होती. तिथे बनलेला मिन्याचा एक जुना हुक्का कलकत्त्याच्या संग्रहालयात आहे.

तांब्याच्या किंवा पितळेच्या भांड्यांवर चांदीच्या पत्र्याच्या मूर्ती डाग लावून बसविणे, याला पत्रीकाम म्हणतात. हे काम तंजाऊर येथे चांगल्या प्रकारे होते. लोखंडाच्या भांड्यांवर बारीक नक्षी खोदून तिच्यात सोन्याच्या किंवा रुप्याच्या तारा ठोकून बसविणे, याला कुफ्तगारी म्हणतात. पंजाबातील सियालकोट व गुजरात या दोन स्थानाची या कारागिरीबद्दल प्रसिद्धी आहे. तिथे पेटचा, पुष्पपात्रे, हत्यारे, फण्या, इ. वस्तूंवर कुफ्तगारी होते. कुफ्तगारीसारखेच हुक्क्यावर एक प्रकारचे नक्षीकाम करतात, त्याला बिदरीकाम असे म्हणतात या कामाची कल्पना २०० वर्षांच्या अलिकडची आहे. बेदर, लखनौ, पूर्णिया, मुर्शिदाबाद ही गावे बिदरीकामासाठी प्रसिद्ध आहेत.

**खोदीव काम–** पूर्वकाळी राजाच्या आसनावर सिंह, हत्ती, हंस, हरिणे, घोडे, इ. चित्रे खोदीत. हत्तीच्या आकाराचे पाय असत, त्याला गजासन म्हणत. सिंहासन तर प्रसिद्धच आहे. कमलकलिकेसारख्या पायांच्या आसनाला पद्मासन म्हणत. अशा चित्रात सोन्याची नक्षी करून त्यात हिरेमाणके बसवीत. प्रस्तुतकाळीही पलंग, तक्तपोश, चौरंग या वस्तूवर खोदकाम केलेले आढळते. एका अहमदाबादेतच असे खोदीव काम करणाऱ्या लोकांची शेकडो कुटुंबे होती. गुजरातेत बिलिमोरा येथे चंदनी पेटचांवर उत्तम खोदीव काम होते. वायव्य प्रांतात नगीना या गावी खोदीव टेबले, पेटचा, इ. लाकडाच्या सुंदर वस्तू तयार करतात. कोकणात व खाली पश्चिम किनाऱ्यावर नारळाचे बेले खोदून त्यांची नक्षीदार भांडी तयार करतात. चंदनावरचे कोरीव काम मुख्यत्वे दक्षिणेत होते. होशियारपूर व राजस्थान येथे शिसवी लाकडावर खोदकाम करून त्यावर मोत्याचे शिंपले बसवीत. विजगापट्टम् येथे लाकडाच्या किंवा कासवकवटीच्या पेटचांवर हस्तिदंताचे जाळीकाम सुरेख होते. म्हैसूरभागात अबनूसची टेबले, खुर्च्या, व कपाटे तयार करून त्यांवर मोगली नक्षी काढतात व हस्तिदंतही जडवितात. लाकडावर कातारकाम व चितारकाम अशा दोन प्रकारे लाखेचेही काम करतात. सिंधप्रांत लाखेच्या कामाबद्दल प्रसिद्ध आहे. ते काम करणाऱ्यांना कातारी म्हणतात. कोकणात सावंतवाडीसही हे काम होते. पाट, चौरंग, गंजीफाच्या पेटचा, खेळणी, इ. लाखेच्या रंगीत वस्तू ते लोक तयार करतात.

**मणेरीकाम–** भारतातील मणिकारांच्या कौशल्याची प्राचीन काळापासून जगभर प्रसिद्धी आहे. भारतात पैलू पाडून तयार केलेले स्फटिक व इतर मणी प्राचीन काळापासून आजतागायत जगातील सर्व देशात जात आहेत. गुजरातेतील भरुच हे गाव अकीक मण्यांचे निरनिराळे अलंकार बनविण्यात निष्णात होते. अकीकाचे पेले ग्रीस व रोम या देशांतही जात असत. अकीकाचे दगड गुजरात व कच्छमध्ये सापडतात. खंबायत या गावी काही वर्षांपूर्वीपर्यंत मणेरीकामाचा धंदा मोठचा प्रमाणात चालत होता. जबलपूर येथे गारेचे मणी बनतात. जयपूरमध्ये याकूत नावाचा एक दगड सापडतो. त्याच्याही लोलक, गोकरूदार मणी, इ. वस्तू बनवितात.

**पच्चीकाम–** श्रीमंत लोक जडावाचे दागिने वापरतात, त्यांत हिरे, माणिक, लाल, पाच, पिरोज, अकीक, पुष्कराज, गोमेद ही रत्ने मुख्य असतात. जडावाचे हे दागिने तयार करणाऱ्याला पच्चीदार, मुरासियाकर किंवा कुंदनसाज म्हणतात. दिल्ली येथे पच्चीचे काम चांगले होते. पुष्कळशा तलवारींच्या मुठीवर पच्चीकाम आढळते. अकीकावर सोन्याची झाडे कोंदणात बसवून त्यावर माणिक, लालडी व हिरे या रत्नांची फुले जडवून तलवारीच्या मुठींना सौंदर्य आणतात.

**मूर्तिकला–** भारतात जयपूर हे मूर्तिकलेचे एक प्रमुख केंद्र आहे. भारतीय मंदिरांत ज्या देव-देवतांच्या मूर्ती प्रस्थापित दिसतात, त्यातल्या बहुतेक जयपूर येथे बनलेल्या आहेत. अकबराचा प्रधान सेनापती मानसिंह याच्या काळापासून जयपूरची मूर्तिकला विकासोन्मुख झाली. मानसिंहाने देशाच्या विविध भागांतून जे कलाकार आमेर येथील आपल्या राज्यात आणले, त्यात मूर्तिकारही होते. मांडू (दक्षिण), नारनौल (उत्तर), मंडावर ( पूर्व ) तसेच डीग या भागातले हे मूर्तिकार होते. इ. स. १७२८ साली सवाई मानसिंहाने जयपूर नगराची स्थापना केली, तेव्हा हे सगळे मूर्तिकार आमेर सोडून जयपूरला आले.

जयपूरच्या बऱ्याचशा मूर्ती संगमरवराच्या असतात हा दगड त्यांना मकराना येथील खाणीतून मिळतो. रंगीत व तुकतुकीत मूर्ती बनविण्याठी ते रियालोच्या खाणीतील दगड वापरतात. तिथले कलाकार छन्नी व हातोडी या दोन हत्याराच्या साहाय्याने या मूर्ती घडवितात. मूर्ती बनल्यावर एक विशेष प्रकारचा दगड तिच्यावर घासतात. त्यामुळे ती मूर्ती गुळगुळीत आणि तुकतुकीत होते. मूर्तिकाराने मूर्ती घडविली, की मग चितेरे लोक तिला रंग देण्याचे काम करतात. [ इं. वे. क. सू ; हि. दे. का. व.; म. क.; संयुक्त राजस्थान– जून १९५७; इं. फो. लो.– जाने.–मार्च १९५९; फो. आ. बें.; मार्च ऑफ इंडिया– सप्टें. ऑक्टो. १९५४, फेब्रु. १९५५, ऑक्टो. १९५७, फेब्रु. व मार्च १९५८; इलस्ट्रेटेड वीकली– ५ मे १९५७, २९ जून १९५८; इं. गॅ. व्हॉ. २ ]

## कारावर

एक प्राचीन जात. निषाद पुरुष व वैदेही स्त्री याची संतती. हे लोक चर्मकार होते. शूद्रकमला-

करात याना कहार किंवा भोई म्हटले आहे. हे लोक दुसऱ्यासाठी चुडण्या, मशाली व छत्र धरतात. पाहा– कहार. [ हि. ध.]

**कारिंट** एक प्रकारचे कडू फळ. याला चिरट असेही म्हणतात. हा नरकासुराचा प्रतिनिधी समजला जातो. दिवाळीच्या दिवशी स्नान झाल्यावर डाव्या पायाच्या अंगठ्याने हे चिरडून त्यातला थोडासा कडू रस जिभेला लावण्याची पद्धत कोकणात आहे. दिवाळीचे स्नानाचे पाणी तापविण्याच्या हंड्यालाही कोकणात कारिटाच्या माळा घालतात. पाडव्याच्या दिवशी शेणाचा गौळवाडा करून त्यात लहान मोठी कारिटे गाई-वासरे म्हणून ठेवतात. कारिट मधे कापून त्यातला गर काढून टाकतात व त्याचे अर्धुक दही घुसळण्याचा डेरा म्हणून त्या गौळवाड्यात ठेवतात.

**कारी** याचा अर्थ वाचक असा आहे. याचे बहुवचन कुरी होते. कुराणाचे शास्त्रशुद्ध वाचन करणाऱ्यांना कुरी म्हणतात. असे सात मान्यवर कुरी आहेत, ते असे– इमाम इब्न कसीर, इमाम आसिम, इमाम अबू उम्र, इमाम हम्झा, इमाम अल् किसाई, इमाम नाफि व इमाम इब्न आमिर. [ डि. इ. ]

**कारीतलाई** प्राचीन शिल्पकृतीचे एक मोठे केंद्र. हे मध्यप्रदेशात कटनीच्या ईशान्येस ३० मैलांवर आहे. इथे सुबक मूर्ती, कोरीव स्तंभ, इ. शिल्पकृती विपुल प्रमाणात सापडतात. उपलब्ध मूर्तीत दशावतार, गणेश, सूर्य, महावीर व कित्येक जैन मूर्ती उल्लेखनीय आहेत. या ऐतिहासिक स्थलाचा योग्यप्रकारे अभ्यास अजूनपर्यंत झालेला नाही. [ खं. वै. ]

**कारीरीष्टी** पाऊस चांगला पडावा, म्हणून ही इष्टी करतात. हिच्याविषयी मैत्रायणी संहितेत कथा आहे, ती अशी– वृष्टीने देवापासून अन्न पळवून नेले, त्यामुळे सर्वत्र दुष्काळ पडला. देव प्रजापतीकडे गेले. त्याने त्यांना कारीरीष्टी करायला सांगितले (मैत्रा. सं. २.४.७).

ही इष्टी करताना सर्वजण कृष्णवस्त्रे परिधान करतात. मध व करीरसक्तू (वेळूचे कोंब व यव) एकत्र कालवून त्याचे तीन पिंड करतात. ते एका कृष्णाजिनात बांधतात. अग्निशाळेजवळ एक गाडी उभी करतात. तिच्या वरच्या तट्ट्याच्या पुढील दांड्याला ते कृष्णाजिनाचे गाठोडे बांधतात. दुपारपर्यंत पावसाची वाट पाहतात. पाऊस पडला तर इष्टी करतात. नाहीतर एक आहुती देऊन ते कृष्णाजिनाचे गाठोडे गाडीच्या मागच्या दांड्याला बांधतात व एक दिवस पावसाची वाट पाहतात. पाऊस न पडल्यास पुन्हा एक आहुती देऊन त्याची वाट पाहतात. असे तीन दिवस करतात.

एकाच दिवसात तीन वेळा पावसाची वाट पाहून दुसऱ्या दिवशी इष्टी करावी, असे काही सूत्रात सांगितले आहे. पाऊस पडो वा न पडो, शेवटी इष्टी ही केलीच पाहिजे. या इष्टीत धामच्छद अग्नीसाठी अष्टाकपाल पुरोडाश, मरुतांसाठी सप्तकपाल पुरोडाश व सूर्यासाठी एककपाल पुरोडाश यांचा याग करतात. स्विष्टकृतापूर्वी एकेका मंत्राने एकेका करीरसक्तुपिंडाचा याग करतात. आश्वलायन श्रौतसूत्रात या यागाला पिंडीयाग म्हटले आहे (२.१३). या पिंडीयागाची देवता मरुत ही आहे.

या इष्टीत काही संकेत आहेत– काळ्या घोड्याला उत्तरीय वस्त्राने हाकलतात. पळताना त्याने मलमूत्र विसर्जन केले, तर पाऊस पडेल, असे समजतात. मेंढीच्या अंगावर तुपाची आहुती देतात. तिनेही पळताना मलमूत्र विसर्जिले तर, तसेच मातीचा जलकुंभ फुटला तर, पाऊस पडेल, असे समजतात. ही इष्टी केल्यावर यजमानाने एक वर्षपर्यंत करीराचे पीठ खाऊ नये, असे सांगितले आहे. [ विद्याधरशास्त्री भिडे ]

**कारुष** लोक व देश. करुष हा वैवस्वत मनूचा पुत्र असून कारुष हे त्याचे वंशज होत. हे उत्तरापथाचे राजे होते (भाग पु. ९.२.१६). कारुष ही एक क्षत्रिय जमात होती. वैदिक वाङ्मयात त्यांचा उल्लेख सापडत नसला, तरी तो महाभारतात सापडतो. निरनिराळ्या कालखंडांत त्याची निरनिराळ्या ठिकाणी राज्ये असल्याचे दिसते. रामायणावरून ते शशाद नावाच्या प्रदेशात राहत असल्याचे कळते. काशीच्या दक्षिणेस त्यांचे राज्य होते. त्यांच्या पश्चिमेस चेदी व पूर्वेस मगध देश होता, असे महाभारतावरून कळते. कारुषांचे आणि यादव, पांडव व चेदी यांचे नात्याचे संबंध होते, असाही उल्लेख आहे. कारुषांचे एक राज्य पुंड्र या नावाने बंगालच्या उत्तरभागात होते, असे भागवतात म्हटले आहे. वायु, मत्स्य व मार्कंडेय या पुराणांत कारुषांचे राज्य विंध्याच्या पायथ्याशी होते, असा उल्लेख आहे. मार्कंडेयात त्यांचा केरल व उत्कल यांच्या समवेत, तर ब्रह्मांडात त्यांचा मालव व उत्कल यांच्या समवेत उल्लेख आहे. हे लोक शूर व कडवे होते. भारतीय युद्धात ते पांडवांच्या बाजूने लढले. [ ट्रा. ए. इं.; पु. इं. ]

**कारैक्काल अम्मैयार** (इ. स. ४००–६०० च्या मध्यभागी ) तमिळनाडमधील त्रेसष्ट नायन्मारांपैकी एक भक्त स्त्री. पेरियपुराणात हिची कथा सवि-

स्तर आली आहे, ती अशी–

कारैक्काल हे एक समृद्ध बंदर होते. तिथे दानदत्त नावाचा एक व्यापारी होता. अम्मैयारने त्याच्या पोटी जन्म घेतला. बापाने तिचे नाव पुनीतवती ठेवले. ही मुलगी अप्रतिम रूपमती होती. तिचे वय वाढू लागले तसतशा तिच्या सौंदर्याच्याही कळा खुलू लागल्या. बापाने नागपट्टिणम् येथील परमदत्त नावाच्या एका वणिक्‌पुत्राशी तिचे लग्न लावून त्याला घरजावई केले.

अम्मैयार ही जशी शिवभक्त होती, तशीच ती पतिव्रताही होती. शैव साधु-संतांचा सत्कार करण्यातही तिला धन्यता वाटे.

एके दिवशी कोण्या एका गृहस्थाने परमदत्ताच्या पेढीवर जाऊन त्याला दोन आंबे भेट म्हणून दिले. त्याने ते घरी पाठविले. एवढ्यात कोणी एक संत दारी आला. अम्मैयारने त्यातला एक आंबा देऊन त्याची क्षुधा शांत केली. दुपारी एक आंबा नवऱ्याला वाढला. त्याला तो अतिमधुर लागला. त्याने म्हटले, ‘ दुसरा कुठे आहे तो आण. ’ अम्मैयार धर्मसंकटात पडली. घरात जाऊन तिने शिवाची प्रार्थना केली. ‘ पतीच्या इच्छेमाठी मला आणखी एक आंबा दे. ’ शिवाने तो दिला. परमदत्ताला तो पूर्वीच्याहून अधिक मधुर लागला. त्याने विचारले, की ‘ असे कसे झाले? ’ त्यावर अम्मैयार म्हणाली, की ‘माझ्या आराध्यदेवाची कृपा! ’ त्यावर परमदत्त म्हणाला. ‘ हे खरे असेल, तर शिवाकडून आणखी एक आंबा मागून घे. ’ पतीच्या आज्ञेचा अनादर करणे अम्मैयारला शक्य झाले नाही. नाखुशीनेच तिने शिवाची प्रार्थना केली आणि शिवाने आणखी एक आंबा परमदत्ताच्या हातात टाकला. मात्र तो आंबा पाहता पाहता अदृश्य झाला. मग परमदत्ताला आपल्या वर्तनाची खंत वाटली. या संत स्त्रीशी पती या नात्याने संसार करण्याची आपली पात्रता नाही, असे त्याच्या मनाने घेतले. लगेच त्याने गृहत्याग केला. दूर देशी व्यापार करून त्याने पुष्कळ धन मिळविले. मग मदुरेत येऊन एक पेढी थाटली. तिथे दुसऱ्या एका मुलीशी त्याने लग्नही केले. तिला मुलगी झाली. तिचे नाव त्याने पुनीतवती असेच ठेवले. पुनीतवती अर्थात अम्मैयार हिची तो देवीच्या रूपात नित्य पूजा करू लागला.

कालांतराने ही गोष्ट अम्मैयारला समजली. ती पतिदर्शनासाठी मदुरेत आली. परमदत्त प्रथम घाबरला.; पण मग धीर करून त्याने आपल्या मनातली पूज्य भावना अम्मैयारला विदित केली. हे सर्व पाहून आणि ऐकून अम्मैयारची अवस्था चमत्कारिक झाली. कारण तिचे रूपसौंदर्य किंबहुना तिचे समग्र जीवन परमदत्तासाठीच होते. तिने मग शिवाला प्रार्थिले, की ‘ आता मला प्रेतच्छायेसारखी बनवून टाक. ’

शिवाने तसे केले. ती कंकालरूप कृष्णच्छाया बनली. लोक तिला पाहून घाबरू लागले. सर्वांनीच तिचे दर्शन-स्मरण टाकले. मग अम्मैयारला पूर्ण एकान्त मिळाला. तिने काव्यरचनेला प्रारंभ केला. शिवप्रशंसेची १२० पदे तिने रचली.

मग ती कैलासाच्या यात्रेला निघाली. कैलासावर तिची आणि शिव-पार्वतीची भेट झाली. आश्चर्याची गोष्ट ही, की अम्मैयारने प्रणाम करण्यापूर्वी शिवानेच ‘आई’ म्हणून तिला नमस्कार केला. शिव तिला म्हणाला. ‘ तुला हवा तो वर माग. ’ त्यावर अम्मैयारने मागितले. ‘ प्रभो, तू जेव्हा तांडवनृत्य करशील, तेव्हा ते मला जवळून पाहायला मिळावे.’ शिवाने ‘तथास्तु’ म्हटले.

नंतर ती कैलासाहून परत तमिळनाडला आली व तिरुवालंगाडु क्षेत्रात राहिली. तिथेच ती अद्यापि नटराज शिवाचे शाश्वत तांडवनृत्य पाहत राहिली आहे, असे समजतात. तिने ते नृत्य पाहून प्रत्येकी ११ स्तोत्रांच्या दोन गीतमाला रचल्या आहेत. तिच्या पद्यांची अरपुदा तिरुवन्तादी व तिरु इरट्टै मणिमालै अशी दोन संकलने आहेत. पहिल्यात १०० व दुसऱ्यात २० पदे संग्रहीत आहेत. तमिळनाडमधल्या सर्व शैव संतांनी अम्मैयारचा गौरव केला आहे. ६३ नायन्मारांच्या प्रतिमांमध्ये तिचीही प्रतिमा पाहायला मिळते. [ पू. प. सं .म. ]

**कारोतर** कळकाच्या कामटयांपासून तयार केलेली रोवळी. याच्या बाहेरून कातडे लावलेले असते. सौत्रामणी यागामध्ये अथवा वाजपेयामध्ये सुरा तयार करावी लागते. ती तयार करण्यास लागणारे सर्व सामान या कारोतरात घालतात. नंतर अग्नीच्या जवळच एक खड्डा खणून त्यामध्ये हे कारोतर पुरून ठेवतात. तीन चार दिवसांनी त्यात दारू तयार होते. याला कारोत्तर असेही म्हटले आहे (सत्या. श्रौ. सू.२३. १.१०). [ विद्याधरशास्त्री भिडे ]

**कारो पणिक्कर** मलबारमधील देवळातल्या कर्मचाऱ्यांची एक जात. वेट्टकोरुमगन हा शिकारी देव व किरियट्टिल नायर स्त्री यांच्या संबंधापासून ही जात उत्पन्न झाली, असे सांगतात. वेट्टकोरुमगनच्या देवळात हे लोक कौल लावण्याचे काम करतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**कार्कल** दिगंबर जैनांचे तीर्थस्थान. द. कर्नाटकात सह्याद्रीच्या पायथ्याशी हे नगर आहे. येथील काळ्या पत्थरांमुळे याचे नाव कार्कल पडले. करिकल्लू = काळा पत्थर या शब्दाचा तो अपभ्रंश आहे. येथे १८ भव्य जैन मंदिरे आहेत.

चतुर्मुख बसदी = रामसमुद्र, आनेकेर, अनंतशयन, गोमटेश्वर, इ. येथील स्थाने प्रेक्षणीय आहेत.



गोमटेश्वर— कार्कल

गोम्मटबेट नावाच्या डोंगरावर गोमटेश्वराची विशाल प्रतिमा आहे. ही केवळ एकाच दगडाची बनविलेली असून साडे एकेचाळीस फूट उंच आहे. चतुमुख बसदी हे चैत्यालय आहे. एका चैत्यालयात विष्णूची मूर्ती असून आज ते हिंदुमंदिर म्हणून ओळखले जाते. [ धर्मयुग, २२ एप्रिल १९६२]

**कार्कोट राजवंश** इ. स. च्या ७ व्या शतकाच्या पूर्वार्धात दुर्लभवर्धन नावाच्या पुरुषाशी काश्मीरच्या राजकन्येचा विवाह झाला आणि तिच्या पित्याचे राज्य त्याला मिळाले. तोच पुरुष कार्कोट वंशाचा संस्थापक होय. त्याच्याच कारकीर्दीत युआन च्वांग काश्मीरमध्ये गेला होता. त्याने लिहून ठेवले आहे, की दुर्लभवर्धनाची सत्ता काश्मीरशिवाय पंजाबच्या काहीं भागावर सुद्धा होती. त्याचा पुत्र प्रतापादित्य याने काही वर्षे न्यायाने राज्य केले. प्रतापपूर हे नगर त्यानेच वसविले. त्याला तीन पुत्र होते. मोठा पुत्र चंद्रापीड हा अत्यंत दयाळू व न्यायी असा राजा होऊन गेला. त्याच्या पराक्रमामुळे इ. स. ७२० मध्ये चीनच्या सम्राटाने त्याच्या राजसत्तेला मान्यता दिली. त्याचा धाकटा भाऊ तारापीड याने त्याचा वध करून राज्य बळकावले. तारापीडाने चार वर्षांच्या राजवटीत अनेक दुष्कृत्ये केली. त्याच्यानंतर त्याचा धाकटा भाऊ ललितादित्य मुक्तापीड हा राजा झाला. हा कार्कोट वंशातील सर्वश्रेष्ठ राजा होय. त्याने कनोजच्या यशोवर्म्याच्या साहाय्याने तिबेटच्या राजाचा पराभव केला. नंतर त्याने काश्मीरच्या उत्तर सीमेवरील दरद, कांबोज, तुर्क, इ. डोंगरी जमातींनाही पराभूत केले. इ. स. ७४० च्या सुमारास त्याचा यशोवर्म्याशी संघर्ष होऊन त्यात यशोवर्मा पराभूत झाला. ललितादित्याने कनोज जिंकले आणि मगध, गौड, कलिंग हे प्रदेशही पादाक्रांत केले. त्यानंतर त्याने आपला मोर्चा दक्षिणेकडे वळिवला. चालुक्यांशीही त्याचा संघर्ष झाला असावा. माळवा व गुजरात हे प्रदेशही त्याने जिंकले होते, असे दिसते. सिंधमधील अरबांचाही त्याने पराभव केला होता. अशाप्रकारे ललितादित्य मुक्तापीड याने गुप्तसाम्राज्यासारखे विशाल साम्राज्य प्रस्थापित केले. त्याने आपल्या राज्यात अनेक सुंदर नगरे वसविली आणि मंदिरे, मठ, प्रासाद व देवतांच्या मूर्ती यानी ती सुशोभित केली. त्या वेळच्या शिल्पकामापैकी काश्मीरमधले मार्तडमंदिर फार प्रख्यात आहे.

ललितादित्य इ. स. ७६० साली मृत्यु पावला. त्याच्यानंतर त्याचे दोन पुत्र कुवलयापीड व वज्रादित्य व त्यानंतर वज्रादित्याचे तीन पुत्र पृथिव्यापीड, संग्रामपीड व जयापीड हे क्रमाने राजे झाले. जयापीड (इ. स. ७७० ते ८००) हा आपला आजा ललितादित्य याच्याप्रमाणेच पराक्रमी होता. आपल्या कारकिर्दीची पहिली काही वर्षे त्याने पूर्वेकडील प्रदेशांवर स्वाऱ्या करण्यात घालविली. तो तिकडे गुंतलेला असतांना त्याचा मेहुणा जज्जा याने काश्मीरचे राज्य बळकावले, असे कल्हण म्हणतो. जयापीड तीन वर्षांनी परत आल्यावर त्याने जज्जाचा पराभव करून आपले राज्य परत मिळविले. त्याच्या तीस वर्षांच्या राजवटीत त्याने अनेक पंडितांना आपल्या दरबारात आश्रय दिला. तथापि प्रजेवर जबर कर लादल्यामुळे शेवटी तो अप्रिय झाला आणि त्याच्याविरुद्ध ब्राह्मणवर्गाने रचलेल्या कटात मारला गेला.

जयपीडाचा पुत्र ललितापीड फार दुर्गुणी निघाला. त्याच्यानंतर त्याचा भाऊ संग्रामपीड (२ रा) आणि नंतर ललितापीडापासून जयादेवी नावाच्या वारांगनेला झालेला मुलगा बृहस्पती हा राजा झाला. बृहस्पती अल्पवयी असल्यामुळे जयादेवीचे पाच भाऊ राज्यकारभार चालवीत होते. त्यांनी शेवटी या आपल्या भाच्याला मारून राज्य बळकावले आणि अशा रीतीने नवव्या शतकाच्या पूर्वार्धात कार्कोट वंशाचा शेवट झाला. [ ए. इं. – मजुम.; ए. इं. क. ]

**कार्चिलंबू** दक्षिणेतील एक नृत्यसाधन. चांदीच्या कड्यात धातूच्या चकत्या बसवून नर्तक घुंगुरांच्या जोडीने ते कडे पायात घालतो. नृत्यात मागेपुढे होताना यातून मधुर नाद निघतो. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**कार्डिनल** रोमन कॅथॉलिक चर्चमध्ये पोपच्या खालोखाल असणारा श्रेष्ठ अधिकारी. चर्चच्या शासनव्यवस्थेत पोपला सल्ला देणे व मदत करणे, हे त्याचे मुख्य काम असते. असे अनेक कार्डिनल असतात.

जगामधील अनेक महत्त्वाच्या शहरातील चर्चच्या प्रमुखांची कार्डिनल म्हणून पोप नेमणूक करतो. पोप मृत्यू पावल्यावर हे सर्व कार्डिनल एकत्र जमून नवीन पोप निवडतात.

ख्रिती सनाच्या १५ व्या शतकात यांची संख्या २४ होती. ती १६ व्या शतकापासून ७० झाली. अलिकडे ती ८९ पर्यंत वाढविली गेली आहे. नियुक्तीनंतर प्रत्येक कार्डिनल पोपकडून अधिकारदर्शक लाल टोपी ग्रहण करतो. १९५३ साली मुंबईच्या आर्च बिशपची कार्डिनल म्हणून नेमणूक झाली. हाच पहिला भारतीय कार्डिनल होय. [ हि. वि. को. ]

**कार्तवीर्य** यदुपुत्र सहस्त्राजिताच्या वंशात जन्मलेल्या कृतवीर्याचा पुत्र. हा हस्तहीन जन्मला. याचे नाव अर्जुन होते. हा माहिष्मतीचा राजा होता. याने दत्तात्रेयाची उपासना करून चार वर मिळवले होते, ते असे—– (१) आपल्याला सहस्र बाहू असावे, (२) आपली वृत्ती अधर्माकडे वळल्यास वेदांनी व सज्जनांनी आपल्याला निवारावे, (३) समस्त पृथ्वीचे राज्य मिळावे व (४) लढता लढता वरिष्ठ योद्ध्याकडून मृत्यू यावा.

सहस्त्रबाहू प्राप्त झाल्यामुळे याला सहस्त्रार्जुन असेही नाव पडले.

कार्तवीर्याने जमदग्नीपाशी असलेल्या कामधेनूचे बलात्काराने हरण केल्यावरून जमदग्नीचा पुत्र परशुराम याने त्याच्यावर चाल केली. दोघांचे युद्ध झाले. त्यात परशुरामाने त्याचे सहस्र हात तोडले व त्याला ठार केले ( म. भा. शांति. ४९. ५३ ).

तंत्रविद्येत कार्तवीर्याला देवता म्हणून स्थान मिळाले आहे. उड्डामरेश्वरतंत्रात याची मूर्ती पुढीलप्रमाणे करण्यास सांगितले आहे—– सुवर्णमालाधारी, ५०० हातात तितकीच धनुष्ये व ५०० हातात तितकेच बाण धारण करणारा, रथारूढ व वीर पुरुषांनी वेढलेला.

गावाला गेलेली व्यक्ती सुखरूप परत येण्यासाठी, नष्टवस्तू परत मिळण्यासाठी व रानात हरवलेली गुरे परत येण्यासाठी कार्तवीर्याचा मंत्र पाटीवर लिहून ती पाटी तुळशीजवळ अथवा गोठ्यात ठेवण्याची चाल कोकणात आहे. तो मंत्र असा—–

**कार्तवीर्यार्जुनो नाम राजा बाहुसहस्रवान् ।**
**तस्य स्मरणमात्रेण गतं नष्टं च लभ्यते ।।**

अर्थ– एक हजार हात असलेला कार्तवीर्य नावाचा राजा होता. त्याच्या स्मरणाने हरवलेली व नष्ट झालेली वस्तू परत मिळते.

मंत्रमहोदधीत कार्तवीर्यार्जुनमंत्र दिला आहे तो असा–

ॐ फ्रों ब्री क्लीं भ्रूं आं ह्रीं क्रों श्रीं हुं फट् कार्तवीर्यार्जुनाय नमः ।

विष्णूच्या सुदर्शनचक्रापासून या मंत्राची उत्पत्ती झाली असे मानतात. त्याचा ऋषी– दत्तात्रय, छंद– अनुष्टुभ्, देवता– कार्तवीर्यार्जुन, बीज– ॐ व शक्ती– नमः आहे. इष्टफलप्राप्तीसाठी या मंत्राची साधना करतात. [ प्रा. च. को.; क्ला. डि. हिं. मा.; प्रा. ऐ. को; मं. म. ]

**कार्तिकइ व्रतम्** तमिळ लोकांचे एक व्रत. कार्तिकी पौर्णिमेस पंचमहाभूतांप्रीत्यर्थ हे व्रत करतात. यात अग्नीला प्राधान्य असते. त्यामुळेच सूर्यास्तानंतर घरी दारी दिवे लावून सर्वत्र प्रकाश करणे, हे या व्रताचे वैशिष्टच आहे.

द. अर्काट जिल्ह्यातील तिरुवन्नमलाईच्या शिवमंदिरात हा व्रतोत्सव थाटाने करतात. या वेळी त्या सर्व डोंगरावर रोषणाई होते व शिखरावर एक मोठी मशाल पेटविली जाते. या उत्सवात पालापाचोळा एकत्र करून जाळण्याचीही प्रथा आहे.

निचेंगोडू, पळणी, वेदारण्यम् व तिरुचेंदुर येथेही हा उत्सव करतात. याच्या कथेचे पर्याय पुढीलप्रमाणे—

(१) सर्वांगाचा दाह होत होता म्हणून बलिराजाने एकदा हे व्रत केले.

(२) महिषासुराशी लढताना शिवलिंग भग्न झाले म्हणून त्या पापाच्या क्षालनासाठी पार्वतीने हे व्रत केले. [ सा. इं. फे. ]

**कार्तिक गौरी देवी** द. भारतातील स्त्रियांचे एक व्रत. या व्रतात सुवासिनींना बोलावून त्यांना सौभाग्यालंकार व काजळाची डबी देतात. व्रताचे फल– दृष्टिदोष दूर होणे व अंधांना पुन्हा दृष्टिलाभ होणे. [ का. ट्रा. स. इं. ]

**कार्तिक चलिमिडी** द. भारतात केले जाणारे स्त्रीव्रत. या व्रतात तांदुळाचे पीठ साखरेच्या पाण्यात भिजवून ते वाटतात. यालाच चलिमिडी असे म्हणतात. हे व्रत ओळीने तीन वर्षे करतात. प्रत्येक वर्षी तांदुळाचे प्रमाण वाढते असते. पहिल्या वर्षी दीड शेर, दुसऱ्या वर्षी अडीच शेर व तिसऱ्या वर्षी सव्वीस शेर तांदूळ घेतात. व्रताचे फल– मृत मुलांना जीव मिळून त्यांचे आयुष्य सुखपूर्ण होणे. [ का. ट्रा. स. इं. ]

**कार्तिकमास** ज्या मासाची पूर्णिमा कृत्तिकानक्षत्रयुक्त असते, त्या मासाला कार्तिक म्हणतात. या मासात रवी तुला राशीत असतो. याला बाहुल, ऊर्ज, कार्तिकिक अशीही नावे आहेत. कार्तिकातील व्रतांची माहिती हेमाद्रीच्या व्रतखंडात सविस्तर दिलेली आहे. स्कंदपुराणाच्या वैष्णव खंडात कार्तिकमाहात्म्य नावाचा विषय असून त्यात कार्तिक मास हा सर्व तीर्थे आणि सर्व यज्ञ यांच्यापेक्षा अधिक पवित्र



कार्तिक मासाचे सांकेतिक चित्र

असल्याचे सांगितले आहे. कार्तिकातल्या कृत्यांत कार्तिकस्नान व दीपदान या दोन कृत्यांना विशेष महत्त्व आहे.

**कार्तिकमासकृत्ये** – कार्तिक मासात वेगवेगळ्या तिथींस भिन्न भिन्न देवतांना उद्देशून पुढील कृत्ये सांगितली आहेत––

शुद्ध १ दा – बलिप्रतिपदा. बलीची पूजा. गोक्रीडन, गोवर्धनपूजा, मार्गपालीबंधन, द्यूतक्रीडा.

शुद्ध २ या– यमद्वितीया. यमपूजन, स्त्रीने आपल्या भावाला भोजन घालणे.

शुद्ध ८ मी– गोपाष्टमी. गोपूजन.

शुद्ध ९ मी– कूष्मांडनवमी. युगादी तिथी. पिंडरहित श्राद्ध. विष्णुत्रिरात्र व्रत.

शुद्ध ११ शी– भीष्मपंचक व्रताचा प्रारंभ. श्रीविष्णूचा प्रबोधोत्सव. उपवास व जागरण.

शुद्ध १२ शी– प्रबोधिनी एकादशीची पारणा. तुलसीविवाह.

शुद्ध १४ शी– वैकुंठचतुर्दशी. विष्णुपूजा.

पौर्णिमा– त्रिपुरीपौर्णिमा. त्रिपुरविजयी शंकराच्या प्रीत्यर्थ दीपाराधना. कार्तिकस्वामीचे दर्शन.

सामान्य कृत्ये– तुलसीकाष्ठमाला धारण. धात्री व तुलसी यांची पूजा. द्विदल धान्याचा त्याग. सात्विक धान्यांचे सेवन इत्यादी. **पाहा**– कार्तिकस्नान [ नि. सिं. ]

**कार्तिकव्रत** एक स्त्रीव्रत. याचा विधी असा– प्रातःकाली स्नान करून विष्णुपूजा. प्रतिदिनी काहीतरी दान. तूप व मध घालून तयार केलेले अन्न देवपितरांना समर्पण व दीपप्रज्वालन. व्रताचे फल– सौभाग्य व गोलोक यांची प्राप्ती. या व्रताची कथा अशी–

सुराष्ट्रात शंकर नामक एक शूद्र होता. त्याची पत्नी भांडकुदळ होती. ती नवऱ्याला उष्टे माष्टे खाऊ घाली. एके दिवशी तिने नवऱ्याला ठार करून जाराबरोबर पळून जाण्याचा बेत केला. पण एकाएकी जाराला वाघाने खाल्ले. मग तिला पश्चात्ताप झाला. ती नर्मदेवर गेली. तिथे तिने कार्तिकव्रत केले. त्याच्या पुण्याने तिचा उद्धार झाला. [ हि. ध. ]

**कार्तिकस्नान** कार्तिकमासात महिनाभर नित्य पहाटे स्नान करतात, त्याला कार्तिकस्नान म्हणतात. आश्विन शु. १० मी, ११ शी किंवा पौर्णिमा या दिवशी या स्नानाचा प्रारंभ करून कार्तिक पौर्णिमेस याची समाप्ती करतात.

हे स्नान पहाटे दोन घटका रात्र उरली असता नदी किंवा तलाव यांच्यामध्ये करतात. प्रथम संकल्प करून अर्घ्य देतात. नंतर पुढील मंत्र म्हणून स्नान करतात–

**कार्तिकेऽहं करिष्यामि प्रातःस्नानं जनार्दन ।**
**प्रीत्यर्थं तव देवेश जलेऽस्मिन् स्नातुमुद्यतः ।।**

अर्थ– हे जनार्दना, देवेशा, मी तुझ्या प्रीतिसाठी या जलामध्ये कार्तिक मासात प्रातःस्नान करीन.

स्नानानंतर पुनश्च अर्घ्य देऊन स्नानविधी संपूर्ण करतात.

पुत्रप्राप्तीसाठी हे व्रत घेतलेले असेल, तर स्नानानंतर अभिलाषाष्टक नावाचे स्तोत्र पठन करतात. संपूर्ण महिनाभर प्रातःस्नान करणे शक्य नसल्यास कार्तिक शु. ११ शी पासून पौर्णिमेपर्यंत निदान पाच दिवस तरी ते करावे, असे सांगितले आहे. [ नि. सिं. ]

## कार्तिकस्वामी

कार्तिकेयाचे एक क्षेत्र. हे म्हैसूर राज्यात सोंडूरपासून ३ कोसावर आहे. ज्या पर्वतावर कार्तिकस्वामीचे मंदिर आहे, त्याला लोहाचल म्हणतात. इथली देवमूर्ती काळ्या पाषाणाची व ४ फूट उंच असून फार सुंदर आहे. कार्तिकस्वामी षण्मुख असला, तरी इथल्या मूर्तीला मात्र एकच मुख आहे. आसनाच्या जागी क्रौंचपक्षी आहे. कार्तिकेयाच्या उजव्या बाजूस शिवाचे व डाव्या बाजूस पार्वतीचे मंदिर आहे. याशिवाय आणखी कांही पवित्र स्थळे या पर्वतावर आहेत व ती बऱ्याच अवघड जागी आहेत.

कार्तिकेयाने आईचे दूध पोटात राहू नये म्हणून ओकून टाकले व ते पुढे पांढरे भस्म झाले. ती जागा अद्यापि तिथे दाखवितात. त्या जागी मोठाली पेवे केलेली आहेत. त्या पेवात दगड टाकतात व तीन वर्षांनी कार्तिक पौर्णिमेस ती पेवे उघडतात. त्यावेळी आत टाकलेल्या दगडांचे भस्म झालेले असते, असे सांगतात. ते भस्म यात्रेकरू घरी नेतात व बायका आपल्या मुलांना दूध पचावे, म्हणून ते पाण्यात उगाळून देतात. कार्तिकेयाने जिथे काजळ टाकले, तिथेही एक खाण आहे. त्या खाणीत काळे दगड सापडतात. अगस्तितीर्थ हे इथले मुख्य तीर्थ आहे. कार्तिकस्वामीच्या मंदिरात काही शिलालेखही आहेत. इथे कार्तिकपौर्णिमेस मोठी यात्रा भरते.

आपल्या आधी गणपतीचे लग्न झाले हे समजल्यावर कार्तिकस्वामी रागावला आणि दक्षिणेत येऊन या पर्वतावर वास्तव्य करून राहिला, अशी कथा आहे. [ म. ज्ञा. को. ]

## कार्तिकेय

शिव-पार्वतीचा पुत्र. कृत्तिका या त्याच्या माता ठरल्या म्हणून त्याला कार्तिकेय असे नाव पडले. याचा जन्म शरवनात झाला, म्हणून त्याला शरवणभव असे दुसरे नाव मिळाले. या शिवाय सेनानी, षडानन, विशाख, शिखिवाहन षाण्मातुर, कुमार, स्कंद, इ. अन्य नावेही त्याला आहेत. त्याच्या जन्माच्या विविध कथा पुराणांतरी आहेत. कार्तिकेय हा गंगा व अग्नी यांचा पुत्र होय, असे वाल्मीकिरामायणात म्हटले आहे ( १·३६ ). याच कथेचा विस्तार महाभारतात पुढीलप्रमाणे आढळतो—

एकदा सप्तर्षी यज्ञ करीत असता यज्ञीय अग्नी त्या ऋषींच्या भार्यावर मोहित झाला. पण त्यांची प्राप्ती अग्नीला अशक्य होती, त्यामुळे तो निराश होऊन देहत्यागाला सिद्ध झाला. हे स्वाहेला कळले. ती अग्नीची नावडती भार्या होती. तिने ही संधी साधायचे ठरविले. ती एकामागून एक सहा ऋषिपत्न्यांचे स्वरूप धारण करून अग्नीपुढे आली. आणि तितक्या वेळा अग्नीने तिच्याशी संभोग केला. प्रत्येक खेपेस स्खलित झालेले त्याचे वीर्य तिने एका कुंडात साठवून ठेवले व यथाकाल त्या वीर्यापासून सहा मस्तके असलेला एक पुत्र उत्पन्न झाला ( म. भा. वन. २२६-२२७ ).

याच कथेचा दुसरा पर्याय असा—

शिव-पार्वती एकांतात असता सर्व देवांसह विष्णू शंकराकडे गेला. देवांच्या आगमनामुळे शिवाच्या एकांताचा भंग होऊन त्याचे वीर्य स्खलित झाले. शिवाने ते वीर्य अग्नीला धारण करण्यास सांगितले. अग्नीने तसे केले; पण त्या वीर्याचा दाह



कार्तिकेय— षण्मुखमूर्ती (१९ वे शतक)

त्याला असह्य झाला. त्याच वेळी नारद अग्नीला भेटला. नारदाने अग्नीला सांगितले, की 'माघ महिन्यात पहाटे प्रयाग क्षेत्रात ऋषिस्त्रिया स्नान करायला येतील, त्यांच्या हवाली तू हे वीर्य कर.' अग्नीने तसे केले. त्यानंतर मार्ग० शु. षष्ठी या दिवशी सहा मुखे धारण करणाऱ्या अशा एका पुत्राचा जन्म झाला. सहा कृत्तिकांनी त्याचा प्रतिपाळ केला. पुढे शिवाने त्याला

बोलावणे पाठविले. तो आल्यावर सर्व देव त्याच्या दर्शनासाठी आले. त्यानी शिवाला म्हटले, " महादेवा ! तारकासुराच्या वधासाठी तू या कुमाराला सेनापती म्हणून पाठव. " शिवाने ते मान्य केले (शिव पुराण). कार्तिकेयाने जन्मल्यापासून सातव्या दिवशी तारकासुराला मारले (मत्स्य. पु.) व त्याआधी क्रौचपर्वताला बाणाने आरपार भोक पाडले. विश्वामित्राने याचे उपनयनादी संस्कार केले. विष्णूने त्याला गरुड, मयूर व कुक्कुट ही वाहने दिली. वायूने पताका व सरस्वतीने वीणा दिली. ब्रह्मदेवाने बोकड व शिवाने मेंढा दिला. मग सर्व देवांनी मिळून देवसेना या मुलीशी त्याचे लग्न लावले. शाख, विशाख व नैगमेय असे त्याला तीन पुत्र झाले.

तारकासुराला मारल्यानंतर कार्तिकेयाची मोठी कीर्ती झाली. त्यामुळे पार्वती त्याचे लाड करू लागली. त्या लाडांनी तो बिघडला व देवस्त्रियांवर हात टाकू लागला. देव पार्वतीकडे तक्रार घेऊन आले. पुत्राचा उच्छृंखलपणा नष्ट व्हावा, म्हणून पार्वती त्याला प्रत्येक स्त्रीच्या ठिकाणी आपले रूप दाखवू लागली. त्या साक्षात्कारामुळे कार्तिकेयाला पश्चाताप झाला व 'आजपासून मी जगातल्या प्रत्येक स्त्रीला मातेसमान मानीन' अशी त्याने शपथ घेतली ( ब्रह्म पु. ८१ ).

मार्ग० शु. पंचमीस देवसेनेशी त्याचा विवाह झाला. त्याच दिवशी शरीरिणी श्री त्याच्या आश्रयाला आली. ज्या दिवशी हे श्री-कार्तिकेय मीलन झाले, ती महातिथी लोकात श्रीपंचमी म्हणून प्रसिद्धी पावली ( म. भा. वन. २२९.५२ ). आणि षष्ठीस त्याने तारकासुराचा वध केला व म्हणून तीही महातिथी म्हणून गणली गेली.

कार्तिकेयाची मूर्ती पुढीलप्रमाणे करावी असे हेमाद्री सांगतो—

**कुमारः षण्मुखः कार्यः शिखण्डिकविभूषणः ।**
**रक्ताम्बरधरः कार्यो मयूरवरवाहनः ।।**
**कुक्कुटश्च तथा घण्टा तस्य दक्षिणहस्तयोः ।**
**पताका वैजयन्ती च शक्तिः कार्या च वामयोः ।।**

अर्थ— कार्तिकेय हा सहामुखांचा, मस्तकी मोरपीस धारण करणारा, रक्तवस्त्र व मयूरवाहन असा करावा. त्याच्या उजव्या दोन हातात कोंबडा व घंटा असावी व डाव्या दोन हातात वैजयंती व शक्ती असावी.

बृहत्संहितेत मयूर हे त्याचे प्रमुख चिन्ह सांगितले असून तो द्विभुज मानलेला आहे. तो मुलासारखा दिसतो व हाती भाला वागवितो, असेही म्हटले आहे (५७.५.४१). अंशुमद्भेदागमात षण्मुख स्कंदाचे द्विभुज, चतुर्भुज, षड्भुज व द्वादशभुज असे चार प्रकार सांगितले आहेत.

द. भारतात पाषाण व कांस्यधातू यांपासून बनविलेल्या त्याच्या विविध प्रकारच्या मूर्ती सापडतात. दक्षिणेत त्याला सुब्रह्मण्य किंवा मुरुग म्हणतात. हे तमिळ नाव आहे. त्यावरून



कार्तिकेय—गुप्तकालीन मूर्ती

ही देवता आर्येतर उगमाची असावी, असा काही विद्वानांचा तर्क आहे. पंतजलीच्या मते ही एक लौकिक देवता होती. कार्तिकेयाला शिव-पार्वतीचा प्रथम पुत्र मानतात. गणपती हा द्वितीय पुत्र होय. त्यावरून गणपतीच्याही आधी कार्तिकेयाची उपासना सुरू झाली असावी, असे वाटते. इ. स. च्या प्रारंभापासूनच कार्तिकेयोपासना उत्तरेकडे फार लोकप्रिय होती. तमिळनाडमध्येही मुरुग या नावाने हा देव प्रमुख मानला जात होता. कार्तिकेयाची जी अनेक नावे आहेत, ती मुळात भिन्न देवांची असावी, कालांतराने त्यांची उपासना कार्तिकेयाच्या उपासनेत विलीन झाली असावी आणि गुप्तकाळानंतर कार्तिकेयोपासनाही शिवोपासनेत विलीन झाली असावी, असा तर्क आहे. अर्धमानवी पशुमुखी शिवगणांशी कार्तिकेयाचा संबंध होता. दुसऱ्या अंगाने कुबेर व गुह्यक यांच्याशीही त्याचा संबंध दिसतो. फार प्राचीन काळापासून कार्तिकेयाला रणदेवता मानलेली आहे. नारदाला ब्रह्मविद्या शिकविणाऱ्या सनत्कुमाराला स्कंद म्हटले आहे ( छांदो. ७. २६ ). त्यावरूनच तो द. भारतात ज्ञानदेवता मानला गेला आहे.

मुळात असे दिसते, की लोकसमाजात ज्या मातृदेवतांची पूजा प्रचलित होती त्यांनी स्कंदाला आपला पुत्र म्हणून स्वीकारले व इतर जितके म्हणून ग्रह-उपग्रह होते, ते सगळे महासेन स्कंदाभोवती एकत्र जमविले. कार्तिकेयाच्या सहा मुखांपैकी एक मेषमुख आहे. अज म्हणजे बोकड. ते अग्नीचेही नाव

आहे. कार्तिकेय हा अग्निपुत्र असल्याचेही सांगितले आहे. त्याचा हा अग्निसंबंध कार्तिकेयाच्या सहा मुखांत एक मेषमुख कल्पून दाखविला गेला आहे. कुशाणकालीन मथुरेच्या मूर्तिकलेत मेषमुखी पुरुषदेवतेच्या मूर्ती आढळल्या आहेत. महाभारतात त्याना नैगमेय व जैन मूर्तिकलेत हरिणैगमेषी म्हटले आहे.

महाभारतात इंद्र-स्कंद संघर्षाची कथा आहे. इंद्राच्या वज्रप्रहाराने स्कंदाच्या कुशीतून अनेक घोर ग्रहांचा जन्म झाला. आयुर्वेदाच्या ग्रंथात ग्रह आढळतात. बालकांना पीडा देणाऱ्या अशा ग्रहांविषयी महाभारतकालीन समाजात भीती वसत होती. स्कद हाही एक ग्रह असून तो सर्व ग्रहांचा अधिपती मानला गेला आहे. स्कंदापस्मार या संज्ञेने आयुर्वेद त्याचा निर्देश करतो. काश्यपसंहितेच्या रेवतीकल्प प्रकरणात अशा अनेक दुष्ट ग्रहांचे व त्यांच्याकडून होणाऱ्या पीडेचे वर्णन आले आहे.


कार्तिकेय – तिरुवोट्रियुर

कार्तिकेयाने तारकासुराशी युद्ध करून त्याला ठार मारले, अशी कथा अनेक पुराणांत आहे. पण महाभारतात तो महिषासुराचा वधकर्ता मानलेला आहे ( वन. २३२.३ ). कुशाणकालीन लोककल्पनाही तशीच होती. तात्पर्य असे, की महाभारतात आलेल्या स्कंदोपाख्यानात वैदिक, पौराणिक व लौकिक अशा अनेक स्कंदविषयक समजुती एकत्र झालेल्या आहेत.

उत्तर भारतात बिलसाड येथे कुमारगुप्त (पहिला) याचा एक स्तंभलेख (इ. स. ४१५–१६) सापडला आहे. त्यात स्वामी महासेनाच्या अर्थात कार्तिकेयाच्या एका मंदिराचा उल्लेख आहे. गुप्तकालानंतर कार्तिकेयाची मंदिरे निर्माण झाली नाहीत. शिवमंदिरातच पार्श्वदेवता म्हणून त्याची योजना झाली. द. भारतात मात्र चोळ व इतर राजानी त्याची स्वतंत्र मंदिरे बांधली आणि त्यातली काही अद्यापि अस्तित्वात आहेत.

कुशाण सम्राट हुविष्क व काही प्राचीन गण यांच्या नाण्यांवर कार्तिकेयाचे चित्र आढळते. कालिदासाने कार्तिकेयाचे वाहन मयूर मानले आहे ( रघु. ६.४ ). कुमारगुप्ताच्या सुवर्णनाण्यांवरही मयूराचेच अंकन आहे. पण कुशाणकालीन यौधेयगणाच्या मुद्रांवर मात्र त्याच्या मूर्तीजवळ कोंबडा आढळतो. मयूरवाहन होण्यापूर्वी कार्तिकेय हा कुक्कुटवाहन असावा. महाभारतात मयूराच्या ऐवजी कुक्कुटाचाच उल्लेख आला आहे ( वन. २२९ ).

प्राचीन काळी अनेक राजवंशांची कार्तिकेय ही कुलदेवता होती. गुप्तकालीन व मध्ययुगीन शिल्पात याच्या अनेक सुंदर प्रतिमा आढळतात.

स्त्रियांनी कार्तिकेयाचे दर्शन घेऊ नये; घेतल्यास त्यांना वैधव्य येते, अशी महाराष्ट्रात तरी समजूत आहे. 'आपल्या दर्शनास येणाऱ्या स्त्रियांना सात जन्म वैधव्य येईल,' असा कार्तिकेयाने स्त्रीजातीला शाप दिल्याची कथा मराठी शिवलीलामृतात आहे. पण या गोष्टीला पुराणात कोठे आधार नाही, असे श्री. चित्रावशास्त्री सांगतात. महाराष्ट्रीय संकेतानुसार कार्तिकेय हा ब्रह्मचारी आहे; तर द. भारतात तो दोन स्त्रियांचा पती आहे. बंगालमध्ये कार्तिकमासात कार्तिकेयाची क्षणिका (मृण्मय मूर्ती) करून स्त्रिया पुत्रलाभासाठी त्याची पूजा करतात. **पाहा**— सुब्रह्मण्य, मुरुग [ डे. हिं. इ.; रि इ.; प्रा. च. को.; पु. इं.; भा. सा. ]

**कार्तिकेय षष्ठी** मार्ग० शु. षष्ठी. या दिवशी कार्तिकेयाच्या मूर्तीची पूजा करतात. **पाहा**— कार्तिकेय.

**कार्दमक वंश** इ. स. च्या २ ऱ्या शतकाच्या पूर्वार्धात अजमीरपासून नाशिक-पुण्यापर्यंतच्या विशाल प्रदेशावर शक क्षत्रप नहपानाचे राज्य होते. पण सातवाहन राजा गौतमीपुत्र सातकर्णी याने त्याचा पराभव केल्यानंतर काही कालाने चष्टन नामक पुरुषाने त्या प्रदेशावर कार्दमक वंशाची सत्ता स्थापन केली. उज्जैन ही त्याची राजधानी असून निदान नर्मदेपर्यंतचा प्रदेश तरी त्याने सातवाहनांकडून परत घेतला होता, असे दिसते. त्याचा नातू रुद्रदामन याने सातकर्णी ( पुलुमायी ) याचा पराभव करून दक्षिणेवरही आपली सत्ता स्थापिली. माळवा, गुजरात, कच्छ, काठेवाड, स्वभ्र, मरू, सिंधू आणि सौवीर हे सर्व प्रदेश रुद्रदामनाच्या सत्तेखाली होते. तो स्वतः विद्वान, कवी व लेखक होता.

रुद्रदामनचा पुत्र दामजदश्री याच्यानंतर या वंशात गृहकलह सुरू झाला. तथापि इ. स. ३०० पर्यंत या वंशाची सत्ता काही भागावर चालू होती. भर्तृदामन हा त्या वंशातील शेवटचा महाक्षत्रप होय. इ. स. ३०५ नंतर रुद्रसिंह नावाच्या पुरुषाने ते राज्य जिंकले.

वासिष्ठीपुत्र सातकर्णी याची राणी म्हणजेच महाक्षत्रप रूद्रदामन (प्रथम) याची कन्या होय. हिलाच 'कार्दमकवंशप्रभवा' असे कान्हेरी येथील एका शिलालेखात म्हटले आहे. पारसिक (पर्शिया) देशात कर्दम नावाची नदी असल्याचा उल्लेख अर्थशास्त्रात आहे. त्यावरून वरील वंशाचा संस्थापक हा पर्शियातील शकस्थानातला असला पाहिजे. त्यातील बाल्हीक किंवा सध्याच्या बल्ख या प्रदेशावर कर्दम नावाच्या प्रजापतीचे वंशज राज्य करीत होते, असा रामायणात निर्देश आहे. कार्दमेय हा त्यांचा मूळ पुरुष होय (उ. कां. १००.३.२९). या वंशाचा ऐल वंशाशी जवळचा संबंध होता. कालांतराने हा कार्दमक वंश बल्खमधून मध्यभारतात आला असावा. [ए. इं.— मजुम.; स्ट. इ. अॅ.]

**कार्निव्हल** रोमन कॅथॉलिक लोक ईस्टरच्या आधी जो उपवास करतात, त्याला लेंट म्हणतात आणि त्या उपवासापूर्वी जो उत्सव करतात, त्याला कार्निव्हल म्हणतात. तो रविवारी असतो. भिन्न देशात तो साजरा करण्याची रीत भिन्न असली, तरी अनिर्बंध व मनसोक्त मौज हेच त्याचे मुख्य लक्षण आहे. या उत्सवात मुखवटे घालून मिरवणुका, नाच प्रहसने, इ. मनोरंजनाचे कार्यक्रमही होतात. कार्नेव्हेल या शब्दापासून कार्निव्हल हा शब्द निघाला असून त्याचा अर्थ मनसोक्त चैन असाच आहे.

पूर्वी अथेन्समधील लोक नौकेच्या आकाराचा एक रथ डायोनिसस या देवतेच्या नावाने नगरातून मिरवीत आणि काहीजण त्या रथात बसून गाणी म्हणत. त्या रथाला क्यूरस नेव्हलिस हे नाव होते; त्यावरून कार्निव्हल हे नाव आले, असेही म्हणतात.

या उत्सवाच्या कार्यक्रमात अनेक विचित्र गोष्टीचा समावेश होतो. जुन्या समजुती व अंधश्रद्धा यांतून त्या गोष्टींचा उगम झालेला आहे. भुताखेतांचे भय व त्याचे निवारण या हेतूने अशा गोष्टी केल्या जातात. होळी पेटवून एखादे मांजर किंवा बाहुली जाळणे, हा त्यातलाच एक प्रकार होय. हाती झाडू घेऊन फिरणे व त्याने समोरच्या माणसाची पाठ झाडणे ही चेटुकविरोधी कृती मानली जाते. अग्नी व धूर यामुळे पिके चांगली येतात, गारांच्या माऱ्यापासून रक्षण होते व इतर संकटेही टळतात अशी त्यांची श्रद्धा आहे. [एन्सा. रि.; एन्सा. रि. ए.]

**कार्पासधेनू** एक भार कापूस घेऊन त्याची धेनू तयार करावी व तिचे दान करावे, असा याचा विधी आहे. जितक्या कापसाची धेनू केली असेल, त्याच्या चतुर्थांश कापसाचा वत्स करावा. ही धेनू दर्भ किंवा तिल यांच्यावर स्थापावी, तिची षोडशोपचार पूजा करावी व हिरण्यासह ती दान द्यावी. दानमंत्र असा—

**यथा देवगण: सर्वस्त्वया हीनो न वर्तते ।**
**तथा मामुद्धरेद्देवि पाहि संसारसागरात् ।।**

अर्थ— हे धेनू, सर्व देव हे तुझ्या आश्रयाने राहतात. तरी तू माझा उद्धार करून माझे संसारसागरातून रक्षण कर.

दानफल— सोमासह चंद्रलोकी वास्तव्य. [श. क.; दा. चं.]

**कार्पासाचलदान** कापसाच्या पर्वताचे दान. वीस भार कापसाचा मेरूपर्वत बनवून त्याच्या चतुर्थांशाने मेरूच्या चार बाजूस चार पर्वत रचतात. मग त्याची पूजा व पुढील मंत्राने प्रार्थना करतात—

**त्वमेवावरणं यस्माल्लोकानामिह सर्वदा ।**
**कार्पासाचल तस्मात्त्वमघौघध्वंसनो भव ।।**

अर्थ— हे कार्पासपर्वता, तू सार्वकाल या लोकी सर्वांचे आवरण आहेस. म्हणून तू (माझ्या) पातकाचा विनाशक हो.

कार्पासपर्वताचे दान सूर्योदयापूर्वी चार घटिका या कालात करायचे असते. फल— रुद्रलोकनिवास व भूलोकी राज्यप्राप्ती. [दा. चं.]

**कार्पासिक** देश व लोक. सांची येथील एका अभिलेखात कार्पासी ग्रामाचा उल्लेख आहे, त्यावरून या लोकांची ऐतिहासिकता मानावी लागते (मॉन्युमेंट्स ऑफ सांची, भा. १ पृ. ३१४). किपिर किंवा कार्पासिक हे काफिरीस्तानचे प्राचीन नाव असावे. लेवीच्या मते कफुस वा कप्पिस ही एकाच कोणत्यातरी शब्दाची रूपांतरे आहेत. जर कफुस शब्द कपिशा यासाठी व्यवहृत असेल, तर त्याची उत्पत्ती कार्पास शब्दावरून होणे शक्य आहे. युधिष्ठिराला राजसूयप्रसगी कार्पासिक (काफिर) देशातून नजराणे आले, त्यात कित्येक दासी होत्या. बकऱ्याची व हरणाची कातडीही त्यांनी नजराणा म्हणून आणली होती. कार्पासिकांनी युधिष्ठिराला दासीचा नजराणा द्यावा, ही गोष्ट शक्य वाटते. कारण अगदी अलिकडच्या काळापर्यंत काफिरीस्तानमधल्या स्त्रिया पशूंप्रमाणे बाजारात

विकल्या जात होत्या. कापिशायिनी सुरा ही कपिश देशातली वैशिष्टचपूर्ण वस्तू होय. अद्यापपर्यंत काफिरीस्तानात द्राक्षांची उत्तम दारू बनविली जाते. [ ना. प्र. प. ]

**कार्मुक** ग्रामरचनेचा एक प्रकार. असे गाव धनुष्याकृती म्हणजेच अर्धवर्तुळाकृती वसलेले असते. याचे तोंड नदी किंवा समुद्र यांच्याकडे असते. बाणासारख्या सुसाट अशा तीन मुख्य सडका अशा गावात असतात. कार्मुकाचे १५ भाग कल्पितात व प्रत्येक विभागात वेगवेगळ्या जातीची वसती असते. [ डॉ. पी. के. आचार्य– बी. सी. लॉ. को. व्हॉ. ]

**कार्यकारणभाव** भारतीय दर्शनांत कार्यकारणभावाचा विचार फार प्राचीन आहे. या कार्यकारण-भावसंबंधावर भिन्नभिन्न दार्शनिकांनी आपापल्या दृष्टिकोनातून विचार केला आहे. कार्य व कारण यांच्यामधील संबंध व कार्य कारणातच अव्यक्त रूपाने राहाते, का ते कारणापासून सर्वथा भिन्न असून त्याची उत्पत्ती नव्याने होते, या दोन प्रश्नांचा कार्यकारणभावात मुख्यत्वे प्रपंच केलेला असतो. याचे लक्षण पुढीलप्रमाणे–

**यत्किंचिन्निष्ठकार्यतानिरूपितकारणत्व**
**यत्किंचिन्निष्ठकारणतानिरूपितकार्यत्व**
**एतदन्यतरात्मको धर्मः।**
(न्यायकोश)

अर्थ – एखाद्या कार्याच्या कारणाच्या ठिकाणी राहणारा धर्म किंवा एखाद्या कारणाचे जे कार्य त्याच्या ठिकाणी राहणारा धर्म, या दोहोंपैकी एका धर्माला कार्यकारणभाव असे म्हणतात.

कार्यकारणसंबंध हा अन्वयव्यतिरेकावर आधारलेला आहे. कारण असले तरच कार्याची उत्पत्ती होते व कारण नसले तर कार्याची उत्पत्ती होत नाही, हा तो अन्वयव्यतिरेक होय. कारणाशिवाय जगात कोणत्याही कार्याची उत्पत्ती होऊ शकत नाही.

कारणाची व्याख्या अशी – ‘ कार्यनियतपूर्ववृत्ति कारणम् ’ = कार्याच्या पूर्वी नियतरूपाने जे असते, ते कारण होय. म्हणजे कारण हे कार्याच्या पूर्वी विद्यमान असले पाहिजे. ते नियमाने कार्याच्या पूर्वी असले पाहिजे व कार्य उत्पन्न होण्यासाठी त्याची नितांत आवश्यकता असली पाहिजे. याचा अर्थ असा, की कारणाचा अभाव असताना कार्य उत्पन्न होता कामा नये. उदा० मृत्तिका हे घटाचे कारण आहे व घट हे मृत्तिकेचे कार्य आहे. कारण मृत्तिका नसताना घट उत्पन्न होत नाही. तसेच पट (वस्त्र) हे तंतूंचे कार्य आहे व तंतू हे पटाचे कारण आहे. तंतू नसताना पटाची उत्पत्ती होत नाही.

काही वस्तू कार्याच्या नियतपूर्ववर्ती असतात; पण कार्योत्पत्तीसाठी त्या नितांत आवश्यक मात्र नसतात. अशा वस्तूना न्यायशास्त्रात अन्यथासिद्ध असे म्हटले आहे. घटाच्या बाबतीत अन्यथासिद्ध अशा पाच गोष्टी आहेत– कुंभार दंडाच्या साहाय्याने घट बनवितो. म्हणून दंड व कुंभार हे घटाचे कारण आहेत. तसेच दंड व कुंभार यांच्याशी (अर्थात् कारणाशी) संबद्ध अशा दंडत्व, दंडरूप व कुंभाराचा पिता या गोष्टी घटरूप कार्याच्या नियतपूर्ववर्ती असल्या, तरी त्या घटाला कारण मात्र नसतात. म्हणून या सर्वांना अन्यथासिद्ध म्हणतात. त्याचप्रमाणे आकाश सर्वच कार्याच्या पूर्ववर्ती असते. तसेच घटासाठी माती वाहून आणणारे गाढवही घटाच्या पूर्वी असते, तरी घटाला आकाश व गाढव यांची नितांत आवश्यकता नसते. म्हणून तेही अन्यथासिद्ध होत. म्हणून कारणाच्या लक्षणात ‘ अनन्यथासिद्धत्वे सति कार्यनियतपूर्ववृत्तित्त्वम् ’ असा परिष्कार केला गेला.

न्यायशास्त्रात कार्य ही कारणापेक्षा एक स्वतंत्र वस्तू मानलेली आहे. मृत्तिकेपासून घट निर्माण होतो, तेव्हा एका नवीन वस्तूची उत्पत्ती होते, असे नैयायिक मानतात. कुंभाराने घट बनविण्यापूर्वी मृत्तिका ही केवल मृत्तिकाच असते व घटाचे अस्तित्व नसते. कुंभाराच्या कृतीने त्या मृत्तिकेपासून नवीन घटाची उत्पत्ती होते, असे नैयायिकांचे म्हणणे. या सिद्धाताला आरंभवाद असे नाव आहे. न्याय व वैशेषिक ही दोन दर्शने या आरंभवादाची समर्थक आहेत.

कार्य व कारण यांच्यासंबंधी सांख्य-योग दर्शनांचे मत यापेक्षा निराळे आहे. मृत्तिकेपासून घट बनतो हे खरे; पण तो अव्यक्त स्वरूपात त्या ठिकाणी (मृत्तिकेत) विद्यमान असतो, असे सांख्यांचे व योग्याचे म्हणणे आहे. याला परिणामवाद असे नाव आहे. परिणामवादानुसार कारण हे कार्यरूपात परिणत होते. त्यामुळेच ते तत्त्वतः कार्यापेक्षा पृथक नसते.

कार्यकारणसंबंधाबाबत वेदान्तदर्शनाचे याहून वेगळेच मत आहे. वेदान्ताच्या मतानुसार कारण ही व्यापाररहित सत्ता आहे. कार्याच्या उत्पत्तीसाठी कारणात कोणताही व्यापार होत नाही. कारण हे कूटस्थ तत्त्व आहे. अज्ञानादी बाह्य उपाधीच्या योगाने कूटस्थ कारण आपल्या शुद्ध स्वरूपात कधीही दिसत नाही. भ्रमात ज्याप्रमाणे रज्जूच्या जागी सर्प दिसतो, त्याप्रमाणे कारणाच्या जागी कार्य दिसते एवढेच. त्यामुळे कारण व कार्य यांचा भेद हा तात्त्विक नसून औपचारिक आहे. याला विवर्तवाद असे म्हणतात. कार्यकारणाचा भेद हा भ्रांत भेद असून भ्रमाने उत्पन्न होणारे कार्य हे वस्तुतः

असत् आहे, असे वेदान्ती मानतात. जोपर्यंत दृष्टी दूषित आहे, तोपर्यंत व्यावहारिक दशेत कार्य व कारण ही दोन्ही भिन्न दिसतात. दृष्टिदोष नष्ट झाला, की कार्याचा विलय होतो व कारणाच्या शुद्ध रूपाच्या ज्ञानाचा उदय होतो, अशी त्या-विषयीची वेदान्त्यांची भूमिका आहे.

अशा रीतीने कार्यकारणभाव हा जरी सर्वांना मान्य असला, तरी त्याच्याकडे पाहण्याचा दार्शनिकाचा दृष्टिकोण मात्र भिन्न आहे. [ भा. द.; न्या. को.; हि. वि. को. ]

**कार्ले** पुणे-मुंबई रस्त्यावरील मळवली स्थानकापासून एका कोसावर हे गाव असून इथे एका डोंगरात कोरीव बौद्ध लेणी आहेत. याला विहारगाव असेही म्हणतात. कारण इथे बौद्ध भिक्षूंना राहण्यासाठी बांधलेले अनेक विहार आहेत. ही लेणी सनपूर्व पहिल्या शतकात किंवा इ. स. च्या पहिल्या शतकात खोदली गेली असावी. ही सर्वांत भव्य आणि या प्रकारच्या लेण्यांमध्ये सर्वोत्कृष्ट आहेत.

या लेण्यांतील मुख्य गुंफा म्हणजे एक चैत्य-गृह आहे. त्याच्या अंतर्गृहात एक घुमटाकृती दागोबा (धातुगर्भ) असून त्याच्यावर एक लाकडी छत्री दिसते. चैत्यासमोर एक भव्य सभामंडप आहे, त्याची लांबी १२५ फूट व रुंदी ४५ फूट आहे. ह्या मंडपाला अनेक उंच स्तंभ असून त्यांवर सुंदर चित्रे कोरलेली आहेत. तिथे ४५ फूट उंचीचा एक सिंहस्तंभ असून त्याची बैठक वर्तुळाकार आहे. या स्तंभाला सोळा बाजू आहेत. त्यावर ब्राह्मी लिपीत एक शिलालेख कोरलेला आहे.


चैत्यगृह – कार्ले

सभामंडपातील ओवऱ्यांच्या स्तंभांवर घोडेस्वारांच्या मूर्ती व भिन्न प्रसंगांची चित्रे कोरलेली आहेत. एका भिंतीवर तीन गजराज उभे असून त्यांच्या खाली आणि वर जाळीदार नक्षी कोरलेली आहे. सभामंडपाच्या कमानीत एक अर्धचंद्राकृती गवाक्ष असून त्यातून भरपूर प्रकाश मुख्य चैत्यावर नेहमी पडत असतो. अंतर्गृहातील मूळचे नक्षीकाम अगदी साधे आहे आणि त्याच्या भोवती दरवाजाच्या उंचीचे जाळीचे कुपण कोरलेले आहे. चैत्याच्या मागील बाजूस पाया व कळस नसलेले सात स्तंभ असून अगदी छताजवळही आणखी काही स्तंभ आहेत. त्यांवर घुमटाकृती छत आहे.

या गुंफेत बुद्धाच्या अनेक मूर्ती आहेत, तसेच भिंतीवर स्त्री-पुरुष नर्तकांची युगुले कोरलेली आहेत. इथले शिल्पकाम अप्रतिम आहे. मुख्य दरवाजाच्या उजव्या बाजूला सिंहासनावर बसलेला बुद्ध दिसतो. पडवी व गाभारा मिळून सर्व लेण्यात


महाद्वारावरील एक युग्मशिल्प – कार्ले

एकूण बावीस शिलालेख आहेत. अशा एका लेखात ' हे चैत्य-गृह जंबुद्वीपातील अद्वितीय शैलगृह ', असे म्हटले आहे.

चैत्यगृहाच्या दक्षिणेस एक मोठा विहार असून त्याच्या मागल्या भिंतीत एक बुद्धमूर्ती आहे. ती कमळाधिष्ठित असून कमळाखाली दोन हरिणांच्यामध्ये चक्र आहे. मागे दोन पूजक आणि वर दोन विद्याधर आहेत.

एका काळी इथल्या सर्व खांबांवर मातीच्या पातळ गिलाव्यावर काढलेली चित्रे असावी, असे वाटते. उजव्या बाजूच्या दहाव्या खांबावर असे एक चित्र आढळते. इतर काही खांबांवरही अशी चित्रे दिसतात.

या बौद्ध लेण्यांच्या जवळच एकवीरा देवीचे मंदिर आहे. ते लेण्यांपेक्षाही प्राचीन असावे, असे वाटते. ही देवी कोळी लोकांची कुलदेवता आहे. [ कार्ले गुंफा; सु. वि. को. ]

**कार्षापण** प्राचीन भारतातले सर्वांत प्रसिद्ध असलेले व भारतभर चालू असलेले एक नाणे. बुद्धाच्याही पूर्वीचे हे नाणे आहे. आजवर पन्नास हजारांहून अधिक चांदीचे कार्षापण सापडले आहेत. कौटिलीय अर्थशास्त्रात हेच चालू नाणे म्हणून सांगितले असून तिथे त्याचे 'पण' असे सक्षिप्त रूप वापरले आहे. मनूने या नाण्यांचा कृष्णल या नाण्यांशी संबंध दाखविणारे कोष्टक दिले आहे ते असे––

**द्वे कृष्णले समधृते विज्ञेयो रौप्यमाषकः ।**

(८. १३५)

अर्थ– २ कृष्णल=१ रौप्य माषक (कार्षापण) होय.

मनूच्या मताने चांदीच्या कार्षापणाचे वजन ३२ रत्ती होते. सोने व तांबे याचे कार्षापण ८० रत्तीचे असत. १ माष (मासा) म्हणजे कार्षापणाचा विसावा भाग व १ काकिणी म्हणजे माशाचा चौथा भाग होय, हे कोष्टक गौतम धर्मसूत्रात दिले आहे. द. भारतात चांदीचे कार्षापण वापरात होते, असे नारद स्मृतीत म्हटले आहे (परिशिष्ट ५७). [ इं. वे. क. सू.; हि. ध.; पा. भा. ]

**कार्ष्णाजिनी** एक प्राचीन आचार्य. याच्या नावाचा उल्लेख ब्रह्मसूत्र (३. १. ९) व मीमांसासूत्र (४. ३. १७; ६. ७. ३५) या दोन्ही ठिकाणी आला आहे. त्यावरून हा व्यास व जैमिनी यांच्या पूर्वी झाला असावा. पुनर्जन्माच्या विषयात याचे मत असे आहे, की अनुशयभूत कर्माच्या द्वारा प्राण्यांना नव्या योनीत जन्म मिळतो. अनुशय म्हणजे भोगून झालेल्या कर्माच्या व्यतिरिक्त शिल्लक उरलेली कर्मे होत. हा वेदान्ताचा आचार्य होता व बादरीचा समर्थक होता, असे दिसते.

याच्या नावावर एक स्मृतिग्रंथ असून पैठीनसी, हेमाद्री, इ. ग्रंथकार त्याचा उल्लेख करतात. मिताक्षरा, अपरार्क, स्मृतिचंद्रिका व श्राद्धविषयक इतर ग्रंथ यांतही याच्या स्मृतीचा उल्लेख येतो. राशींच्या चिन्हासंबंधी याचा एक श्लोक अपरार्कात (४२०) आला आहे. [ शंकराचार्य; हिंदुत्व; प्रा. च. को. ]

**काल** 'कलयति आयुः' = जो आयुष्य ग्रासतो तो; किंवा 'कलयति सर्वाणि भूतानि' = सर्व भूतांचा संहार करतो तो काल होय (श. क.). हारीतोक्त काललक्षण असे –

**कालस्तु त्रिविधो ज्ञेयोऽतीतोऽनागत एव च ।**
**वर्तमानस्तृतीयस्तु वक्ष्यामि शृणु लक्षणम् ।।**
**कालः कलयते लोकं कालः कलयते जगत् ।**
**कालः कलयते विश्वं तेन कालोऽभिधीयते ।।**
**कालस्य वशगाः सर्वे देवर्षिसिद्धकिन्नराः ।**
**कालो हि भगवान् देवः स साक्षात् परमेश्वरः ।।**
**सर्गपालनसंहर्ता स कालः सर्वतः समः ।**

अर्थ – अतीत, अनागत व वर्तमान असे कालाचे तीन प्रकार आहेत. मानवाला, जगाला व विश्वाला तो कवळतो म्हणजे त्याचा ग्रास घेतो, म्हणून त्याला काल असे म्हणतात. देव, ऋषी, सिद्ध, किन्नर, हे सर्व कालाच्या अधीन असतात. काळ हा देव आहे; तो साक्षात् परमेश्वर आहे. सृष्टी, स्थिती व लय करणारा काल हा सर्वांना सम आहे.

सृष्टिविषयक अनेक गूढ समस्यांमध्ये कालाची समस्या ही अतिगूढ आहे. तिचे रहस्य उकलण्याच्या बाबतीत दार्शनिकांना किंवा वैज्ञानिकांना पुरेसे यश आलेले नाही. काल हा अद्भुत असून त्याची शक्ती अनंत आहे. सृष्टीतील परमाणूपासून विराट ब्रह्मांडापर्यंत सर्व काही त्याच्यावरच आधारलेले आहे. अमूर्त असूनही त्याने चराचर व्यापले आहे. त्याच्या पलिकडे कोणत्याही वस्तूच्या अस्तित्वाची कल्पना करता येत नाही. काल हे जीवनातील कठोर सत्य आहे. प्राणिमात्रावर त्याची जी कृपा होते, तिला आयुष्य असे नाव असून त्याचा कोप म्हणजे मृत्यू होय.



महाकाल

काल अमूर्त असला, तरी सूर्याच्या द्वारा त्याच्या व्यक्त अवयवांचे ज्ञान होते. लव–निमेषापासून युगापर्यंतचा काल सूर्यावरून मोजता येतो. कालाचे दुसरे जे एकजिनसी रूप आहे, त्यात मास, ऋतू व संवत्सर यांची विरामचिन्हे आढळत नाहीत. कालाच्या या दोन स्वरूपांविषयी दर्शनांत जो विचार केलेला आहे, त्याला अहोरात्रवाद असे प्राचीन नाव आहे. ऋग्वेदातील नासदीय सूक्तात सृष्टीपूर्वीच्या अतर्क्य अवस्थेचे वर्णन करताना म्हटले आहे –

**न रात्र्या अह्न आसीत् प्रकेतः ।**

(ऋ. १०. १२९. २)

अर्थ – रात्र व दिवस यांच्या वेगळेपणाचे ज्ञान नव्हते.

कालाची प्रगती ही एका चक्रासारखी आहे, असे प्राचीन ऋषींनी म्हटले आहे. मनूने सांगितले आहे, की प्रलयानंतर कालच कालावर दडपण आणून सृष्टी निर्माण करतो.

अथर्ववेदात काल हे प्रथम तत्त्व मानलेले आहे –

**काले तपः काले ज्येष्ठं काले ब्रह्म समाहितम् ।**
**कालो ह सर्वस्येश्वरो यः पितासीत् प्रजापतेः ।।**
(अथर्व. १९. ५३.८)

अर्थ – कालाच्या ठिकाणी तप व ब्रह्म समाहित आहे. काल हा सर्वांचा स्वामी व प्रजापतीचा पिता होता.

कालाच्या गणनेचे आर्यांनी एक शास्त्र बनविलेले दिसते. त्यांनी मानुष, पित्र्य, दैव व ब्रह्म अशा चार प्रकारच्या दिनरात्रीची कल्पना केली असून महर्षी वार्कलीने कालाच्या परिमाणाचे एक कोष्टक लोकात रूढ केले, ते पुढीलप्रमाणे –

| | |
|---|---|
| १५ स्वेदयान | = १ लोमगर्त |
| १५ लोमगर्त | = १ निमेष |
| १५ निमेष | = १ अन |
| १५ अन | = १ प्राण |
| १५ प्राण | = १ इदम् |
| १५ इदम् | = १ एतर्हि |
| १५ एतर्हि | = १ क्षिप्र |
| १५ क्षिप्र | = १ मुहूर्त |
| ३० मुहूर्त | = १ अहोरात्र |

याच्यापुढे पक्ष, मास, ऋतू, अयन, संवत्सर ही युगकल्पाची परिमाणे दिली आहेत. महाभारतात कालाचा उल्लेख पुढीलप्रमाणे केला आहे –

**कालः सृजति भूतानि कालः संहरते प्रजाः ।**
(आदि. १. २४८)

अर्थ – काल हा प्राणिमात्रांना उत्पन्न करतो व तो सर्व प्रजांचा संहार करतो.

**पुराणें व आगमग्रंथ** – वेगवेगळ्या पुराणांत कालासंबंधी निरनिराळी मते दिली आहेत. त्यांपैकी विष्णुपुराणात सर्व व्यक्त व अव्यक्त सृष्टी, तसेच पुरुष व काल ही ब्रह्मचाची चार रूपे आहेत, असे सांगितले आहे. भागवत पुराणात कालाला विष्णूची शक्ती मानलेले असून ईश्वर जेव्हा त्या कालशक्तीला जागृत करतो, तेव्हा सृष्टी निर्माण होते, असे म्हटले आहे. त्याच पुराणात पुढे विष्णू हाच काल आहे, असे मत व्यक्त केले आहे. इतर पुराणात मात्र काल ही अनादी, अनंत व सर्वव्यापी अशी देवता मानलेली आहे. कालाला चार मुखे असून एकेक मुख म्हणजे एकेक युग होय, असे वायुपुराण म्हणते (३२. ८. ६७). आगमग्रंथांपैकी प्रत्यभिज्ञादर्शनात अनुभव घेणारा जो प्रमाता, त्याच्या बाहेर कालाला अस्तित्व नाही, असे मानलेले आहे.

मृगेंद्रागमात काल हा विनाशी, विविध व अचेतन मानलेला असून तो सर्वव्यापी नाही व अविच्छिन्नही नाही, असे मत दिले आहे. काल ही एक कल्पना असून वास्तवात त्याला अस्तित्वच नाही. या कल्पित कालाला सूक्ष्मत्व व दीर्घत्व नसते, असे त्रिपुरारहस्यात म्हटले आहे.

नकुलीशपाशुपत किंवा पंचार्थशास्त्र या पंथात पाच पदार्थ मानलेले असून त्यात कालाचा अंतर्भाव नाही. त्यांच्या मते सर्व सृष्टीचे कारण असणारा ईश्वर हाच काल म्हणजे विनाशक आहे. द्वैतवादी शाक्ताच्या मते काल हा अनादी, अनत व सर्वव्यापी असून क्षण व निमेष यांनी तो परिच्छिन्न आहे.

शंकराचार्यांनी प्रपंचसार नामक ग्रंथात द्रव्य, आत्मा व काल ही तीन तत्त्वे मानली असून प्रत्येकाचे पर व अपर असे दोन भेद सांगितले आहेत. प्रकृती ही सर्व सृष्टीची जननी असून कालाच्या प्रभावाने बिंदू, नाद व बीज यात तिचे विभाजन होते.

त्रिकसाहित्यात काल ही परमशिवाची स्वातंत्र्यशक्ती मानलेली आहे. तिलाच क्रियाशक्ती असे नाव असून तिच्या प्रभावाने शिवापासून सृष्टी वेगळी होते, असे त्रिकवादी म्हणतात.

पतंजलीच्या मते काल हा नित्य आहे. तो जगाचा आधार असून सर्व विश्वाला व्यापणारा आहे. त्याचा उगम ज्ञात नाही. त्याचे विभाजन करता येत नाही. आपल्या मताप्रमाणे तो कालाची व्याख्या पुढीलप्रमाणे देतो–

**येन मूर्तीनामुपचयाश्चापचयाश्च लक्ष्यन्ते तं कालमाहुः ।**
**तस्यैव कयाचित् क्रियया युक्तस्याहरिति भवति रात्रिरिति च ।**
( महाभाष्य २.२.५)

अर्थ– ज्याच्या योगाने पदार्थांची क्षय व वृद्धी प्रत्ययाला येते, तो काल होय. आदित्याच्या गतीशी संयुक्त झाल्यामुळे त्याचे दिवस व रात्र असे विभाग कल्पिले जातात.

योगवासिष्ठाच्या मते आकाश, अहंकार व काल यांची उत्पत्ती परमात्म्यापासून झाली असून काल हा सर्वशक्तिमान आहे.

दैवतशास्त्राच्या मताप्रमाणे काल ही एक देवता आहे. प्रारंभी मृत्यूची कल्पना या देवतेशी निगडित होती. पुढे काल म्हणजेच मृत्यू हे समीकरण दृढ झाले. त्या कालाला यम असे नाव मिळाले. शंकराला महाकाल म्हणजे महामृत्यू अशी संज्ञा आहे. पुराणात विष्णूशीही कालाचा संबंध जोडलेला आढळतो; पण संहारक कालाचे रुद्राशीच अधिक जवळचे नाते आहे.

भर्तृहरीच्या वाक्यपदीय नामक ग्रथात कालविषयक विविध कल्पना व तात्त्विक विचार चर्चिलेले आहेत. काल ही ब्रह्माची शक्ती होय, असे भर्तृहरी मानतो. ही शक्ती स्वतंत्र असून ती सर्व सृष्ट पदार्थांच्या उत्पत्ती, स्थिती व लय यांचे कारण आहे. प्रतिबंध व अभ्यनुज्ञा ही त्या शक्तीची दोन अंगे असून त्या

अंगांमुळेच विश्वातील घटना योग्यक्रमाने व व्यवस्थितपणे घडत असतात. काल हा मूलतः अविच्छिन्न असला, तरी सूर्यादिकाच्या गतीमुळे त्याचे विभाजन होते. काल हा स्वतः अपरिवर्तनीय असला, तरी सृष्टीतले सर्व बदल त्याच्यामुळेच घडून येतात.

**दर्शने आणि संप्रदाय–** सांख्य दर्शनात कालाविषयी पुढील अनेक मते माडलेली आहेत–

(१) काल नावाचा पदार्थ किंवा तत्त्व अस्तित्वात नाही. (२) काल हे प्रवृत्तीचे उत्क्रांत रूप आहे. (४) काल म्हणजे प्रकृतीच होय. (४) काल म्हणजे क्रियाच होय. (५) भूत, भवत्, भविष्यत् हे तीन पदार्थ कालस्वरूप असून त्यांच्या व्यतिरिक्त कालाला स्वतंत्र अस्तित्व नाही.

योगदर्शनात काल हा वास्तव न मानता विकल्परूप मानलेला आहे. वास्तव पदार्थाप्रमाणे अवास्तव पदार्थाचा पदद्वारा व्यवहार करणे, याला विकल्प असे नाव आहे. कालाची हीच स्थिती आहे. घटी, मुहूर्त, रात्र, दिवस हा सर्व कालसूचक व्यवहार योगदर्शनाच्या मते अवास्तव आहे. कारण दोन क्षणांचा कधीही समाहार होत नाही व समाहार झाल्याशिवाय हा व्यवहार उपपन्नच होत नाही. म्हणूनच योगी लोक कालाला वस्तू न म्हणता क्षणांचा क्रम असे म्हणतात.

मीमांसादर्शनातील भाट्टमतानुसार काल हे एक द्रव्य असून ते नित्य व सर्वव्यापी आहे. काल एक असला, तरी उपाधिभेदाने त्याचे क्षण, मास, इ. विभाग होतात. सहा इंद्रियांच्या योगाने कालाचे ज्ञान होते असे भाट्टांचे मत आहे प्राभाकरमताला मात्र वैशेषिक दर्शनांतील दृष्टिकोणच मान्य आहे.

वेदान्त्यांचे कालाविषयीचे मत असे–

**कालस्तु अविद्यैव तस्या एव सर्वाधारत्वात् ।**

(सिद्धान्तबिन्दु पा. ९६)

अर्थ– काल म्हणजे अविद्याच होय. कारण अविद्या हीच सर्वांना आधारभूत आहे.

न्याय-वैशेषिक दर्शनांत काल हे एक विभू व नित्य द्रव्य मानलेले आहे.

**जन्यानां जनकः कालो जगतामाश्रयो मतः ।**

(भाषापरिच्छेद)

अर्थ– उत्पन्न होणाऱ्या पदार्थांचा काल हा जनक असून तो जगताचा आश्रय आहे.

हा पारमार्थिक काल असून तो निरवयव व नित्य आहे. तो अनवच्छिन्न रूपाने सतत विद्यमान असतो. काल ही एक स्थिर पार्श्वभूमी असून तिच्यावर सर्व घटना घडत असतात व तिच्याच मुळे त्यांना क्रम लाभतो. कालाला रंग किवा रूप नसल्यामुळे तो इंद्रियांचा विषय होऊ शकत नाही. परंतु अनेक अनुमानांनी कालाचे अस्तित्व मात्र सिद्ध करता येते. परत्व, अपरत्व, यौगपद्य, अयौगपद्य, चिरत्व, क्षिप्रत्व, इ. कल्पनानी कालाच्या अस्तित्वाबद्दल अनुमान केलेले आहे.

भिन्न भिन्न संप्रदायांनीही कालाविषयी बराच विचार केला आहे.

रामानुज संप्रदायाने चित्, अचित् व ईश्वर ही तीन सत्ये मानून त्यांपैकी अचित्चे शुद्धसत्त्व, मिश्रसत्त्व, सत्त्वशून्य, असे तीन भाग पाडले आहेत.

**सत्त्वशून्यं कालः । अयं च प्रकृतिप्राकृतानां परिणामहेतुः कलाकाष्ठादिरूपेण परिणतो नित्य ईश्वरस्य क्रीडापरिकरः शरीरं च ।**

(तत्त्वत्रय)

अर्थ– सत्त्वशून्य म्हणजेच काल होय. प्रकृती व प्रकृतीपासून उत्पन्न होणारे प्राकृत यांचे काल हे कारण आहे. काल स्वतः कला, काष्ठा, इ. रूपांनी परिणत होतो. तो नित्य असून ईश्वराचे क्रीडास्थान आहे. त्याचप्रमाणे तो ईश्वराचे शरीरही आहे.

वल्लभ संप्रदायाच्या मतानुसार काल हा ब्रह्माहून निराळा नसून तो ब्रह्मच आहे. क्षण, मुहूर्त, इ. त्याचे उपाधिभेद असून ते सूर्याच्या गतीमुळे होतात.

माध्व संप्रदायाने काल हे दहा द्रव्यांपैकी एक द्रव्य मानलेले आहे. 'आयुर्व्यवस्थापकः कालः' = जीवांच्या आयुर्मानाला मर्यादा घालणे, हे कालाचे कार्य आहे. क्षण, लव, इ. त्याची अनेक रूपे आहेत. काल हा नित्य आहे. तो सर्व जगाचा आधार आहे. माध्वमताप्रमाणे कालाचे ज्ञान होऊ शकते.

निंबार्कसंप्रदायाच्या मते काल हा अचेतन, नित्य व सर्वव्यापी असून तो भूत, वर्तमान व भविष्य यांचे कारण आहे.

जैनाच्या मते काल हे एक अनस्तिकाय द्रव्य असून पदार्थाच्या रूपांतराचे सहकारी किवा असमवायिकारण आहे (कालद्रव्य पाहा).

बौद्धांनी मात्र कालाचे अस्तित्वच नाकारले आहे. बौद्ध आचार्यांनी क्षणभंगवादाचा पुरस्कार केला असून त्यांच्या मते क्षण पदाने कालाचा बोध न होता घटादी पदार्थांचा व्यवहार होतो.

चार्वाक किंवा लोकायत या दर्शनात पृथ्वी, आप, तेज व वायू अशी चारच भूते मानलेली आहेत. त्यात कालाचा अंतर्भाव नाही. परंतु 'इदानीं घटः' अशा वाक्यप्रयोगांवरून त्यांनी कालाचे अस्तित्व मान्य केले होते, असे अनुमान निघते.

भागवत, ब्रह्मांड, वायु या पुराणांत सूर्यावर आधारलेली

कालगणना दिली आहे, तिचे कोष्टक पुढीलप्रमाणे—

| | | |
|---|---|---|
| २ परमाणू | = | १ अणू |
| ३ अणू | = | १ त्रसरेणू |
| ३ त्रसरेणू | = | १ त्रुटी |
| १०० त्रुटी | = | १ वेधस् |
| ३ वेधस् | = | १ लव |
| ३ लव | = | १ निमेष |
| ३ निमेष | = | १ क्षण |
| ५ क्षण | = | १ काष्टा |
| १५ काष्टा | = | १ लघू |
| १५ लघू | = | १ नाडिका |
| २ नाडिका | = | १ मुहूर्त |
| ६ किंवा ७ नाडिका | = | १ प्रहर किंवा याम |
| ४ याम | = | १ दिवस किंवा रात्र |
| १५ दिवस व रात्री | = | १ पक्ष |
| २ पक्ष | = | १ मास किंवा पितरांचा एक दिवस व रात्र |
| २ मास | = | १ ऋतू |
| ६ मास | = | १ अयन |
| २ अयने | = | १ वर्ष |
| १ ब्रह्न्याचा दिवस | = | १ चौदा मनूचा कालखंड |
| १ ब्रह्न्याची रात्र | = | १ प्रलयाचा कालखंड |
| १ युग | = | ५ वर्षे |

पुरुषार्थचिंतामणी या ग्रंथात यापेक्षा थोडी निराळी कालगणना दिली आहे, ती अशी–

**लघ्वक्षरसमा मात्रा निमेषः परिकीर्तितः ।**
**द्वौ निमेषौ त्रुटिर्ज्ञेया प्राणो दशत्रुटिः स्मृतः ।।**
**विनाडिका तु षट् प्राणास्तत्षष्टया नाडिका स्मृता ।**
**अहोरात्रं तु तत्षष्टया नित्यमेव प्रकीर्तितम् ।।**

अर्थ– लघु अक्षराचा उच्चार करायला लागणाऱ्या कालाला निमेष म्हणतात. दोन निमेषांची एक त्रुटी होते. दहा त्रुटीचा एक प्राण; सहा प्राणांची एक विनाडिका (पळ), साठ विनाडिकांची एक नाडिका (घटका) व साठ नाडिकांचे एक अहोरात्र होते.

निमेषापासून ब्रह्मदेवाच्या अहोरात्रापर्यंतच्या कालगणनेचे कोष्टक विष्णुपुराणात (१.३.८-१६) दिले आहे.

आधुनिक विज्ञानाने काल हा वस्तूंच्या निर्मितीचे कारण मानला असून त्याला चतुर्थ परिमाण असे नाव दिले आहे. आयन्स्टायन हा या कल्पनेचा जनक आहे. सापेक्षतावादाच्या सिद्धान्ताच्या द्वारा त्याने त्याचे निरूपण केले आहे. पाहा– अहोरात्र [ वे. वि.; एस्. इं.; हि. ध.; पु. इं.; पु. चि.; भा. प्र. वि.; हिं. वि. को. ]

**कालकण्णी** एक देवता. जातकग्रंथात या देवतेचा उल्लेख मिळतो. हेमाद्रीने हिचे रूपध्यान पुढीलप्रमाणे सांगितले आहे — शुभ्र बैलावर आरूढ, गळ्यात रुद्राक्षमाळा, स्वभावाने भयंकर व कानाच्या पाळ्या कृष्णवर्ण.

**कालकवन** हा साकेतप्रदेशाचा एक भाग होता, असे डॉ. अग्रवाल म्हणतात. ही आर्यावर्ताची पश्चिम सीमा होती, असे पतंजलीच्या महाभाष्यात म्हटले आहे. [ हि. ध. ]

**कालका** उत्तर रेल्वेच्या मुख्य मार्गावर अंबाल्यापासून ४० मैलांवर कालका गाव आहे. इथे कलिका देवीचे प्राचीन मंदिर आहे. पार्वतीच्या शरीरातून जेव्हा कौशिकी देवी उत्पन्न झाली, तेव्हा पार्वतीचे शरीर श्यामवर्ण झाले. ती मग कालका येथे येऊन राहिली. इथे तिचे नाव काली अथवा कालिका असे पडले. [ कल्याण–तीर्थांक ]

**कालकाचार्य** (सनपूर्व २ रे शतक) एक जैन आचार्य व ग्रंथकार. याने आजीविकांकडून निमित्तशास्त्राचे सविशेष अध्ययन केले होते.

ही व्यक्ती ऐतिहासिक की काल्पनिक याविषयी विद्वानात मतभेद आहेत. पण निरनिराळे संदर्भ व कथानके कालकाचार्याच्या जीवनातल्या विशिष्ट गोष्टींचा उल्लेख करतात, त्यावरून मुनी कल्याणविजय यांनी त्याला ऐतिहासिक व्यक्ती ठरविले आहे. कालकाचार्याच्या जीवनातल्या सात प्रमुख घटना पुढीलप्रमाणे आहेत –

(१) दत्त राजाला त्याच्या मृत्यूविषयीचे भविष्यकथन.

(२) इंद्राच्या समोर निगोद व्याख्यान.

(३) आजीविकांकडून निमित्तशास्त्राचे अध्ययन व त्यानंतर सातवाहन राजाच्या तीन प्रश्नांचे निमित्तशास्त्राच्या ज्ञानाने उत्तर देणे.

(४) अनुयोग ग्रंथ निर्माण करणे.

(५) गर्दभिल्लराजाचे उच्छेदन.

(६) प्रतिष्ठानपुरात जाऊन तिथे सातवाहनाच्या विनंतीवरून पर्युषणपर्वाची पंचमी तिथी बदलून त्याऐवजी चतुर्थी तिथी करणे.

(७) अविनीत शिष्यांचा परिहार व सुवर्णभूमीत गमन.

कालकाचार्य व श्यामार्य (प्रथम कालक) ही दोन्ही नावे एकाचीच होत, असा जैन संशोधकांचा निष्कर्ष आहे. कालकाचार्याच्या गुरूचे नाव गुणसुंदर किंवा गुणंधर असे आढळते. प्राचीन काळी मलाया, सुमात्रा, इ. द्वीपांना सुवर्णभूमी किंवा सुवर्णद्वीप असे म्हणत. कालकाचार्य या द्वीपात धर्मप्रचारासाठी समुद्रमार्गे नव्हे, तर खुष्कीच्या मार्गाने गेला होता, असे उल्लेख मिळतात. आर्य कालक कोण्या साध्वीला वाचविण्यासाठी शक देशात गेला व तिथून त्याने शकांना भारतात आणून त्यांच्या करवी गर्दभिल्ल राजाचा उच्छेद केला, अशीही कथा आहे. हा गर्दभिल्ल राजा यवन असण्याचा संभव आहे. यवनांच्या उच्छेदासाठी कालकाचार्याने शकांना या देशात बोलावून आणले, असा त्या घटनेचा अर्थ जैन पंडित लावतात. भोजसागरगणी नावाच्या एका जैन विद्वानाने रमलविद्येवर संस्कृतात एक ग्रंथ लिहिला असून त्यात त्याने म्हटले आहे, की ही विद्या पहिल्याप्रथम कालकाचार्याने यवन देशातून भारतात आणली.

कालकाचार्य दिग्गजपंडित होता, त्याहीपेक्षा तो एक क्रांतिकारक पुरुष होता, असे म्हटले पाहिजे. त्याच्या जीवनातला प्रत्येक प्रसंग साधू स्थितीच्या सामान्य लक्षणांपेक्षा कितीतरी पुरोगामी आहे. शकांना आणण्यासाठी त्यांच्या देशात जाणे आणि सुवर्णद्वीपाचा स्थलमार्गे प्रवास करणे, या गोष्टी त्याच्या साहसी, निर्भय वृत्तीच्याच द्योतक ठरतात. [आ. वि. स्मा. ग्रं.]

**कालकांज** इंद्रशत्रू असुर. इंद्राने याचा पराभव केल्याची कथा वैदिक वाङ्मयात अनेक ठिकाणी आढळते. अथर्ववेदात याच्याविषयी पुढील उल्लेख आहे —

**ये त्रयः कालकाञ्जा दिवि देवा इव श्रिताः ।**

(६. ८०. २)

अर्थ — जे (हे) तीन कालकांज आहेत, ते दिव्य लोकात देवांप्रमाणे अवस्थित आहेत.

यावरून हा एक नक्षत्रपुंज असावा, असे वाटते. [वे. इं.]

**काल-काम** हे विश्वेदेवांपैकी आहेत. यांच्या मूर्ती कोकणातील परशुरामक्षेत्रात परशुरामाच्या उभय अंगी आहेत. तिथले लोक पूजेच्या संकल्पात परशुरामाबरोबर त्यांचाही उल्लेख करतात. याहून त्यांची अधिक माहिती मिळत नाही.

**कालकाराम** साकेतामधील एक प्राचीन उद्यान. बुद्धाने या ठिकाणी काही काल वास्तव्य केले होते. कालक नावाच्या पेढीवाल्याने ही बाग बुद्धाला अर्पण केली होती. [धम्मपद]

**कालकूट** (१) देवासुरांच्या समुद्रमंथनातून निघालेले विष. हे वर येताच सकल सृष्टीला जाळू लागले, तेव्हा सर्व देव शिवाला शरण गेले. मग शिवाने लोककल्याणासाठी ते प्राशन केले. त्यामुळे शिवाचा कंठ निळा झाला व त्याला नीलकंठ हे नवे नाव प्राप्त झाले.

(२) एक प्राचीन जनपद. हे कुलिंद प्रदेशात असल्याचे महाभारतात म्हटले आहे. दिग्विजयात अर्जुनाने हा देश जिकला होता (म. भा. सभा. २६.३–४). कुरुजांगल प्रदेशाच्या पलिकडे कालकूट हा देश लागतो, असे म्हटले आहे. पाणिनीने याचा उल्लेख केला आहे. ऐने अकबरीतही याचा उल्लेख आढळतो. सांप्रतचा देहरादुन, कालसी, मेरठ हा भाग प्राचीन कालकूटात मोडत असावा, असे वाटते. [पा. भा.; ए. से. ए. इं.]

**कालकेय** एक प्राचीन आर्येतर जमात. कालयवन हा कृष्णशत्रू याच जमातीचा असावा. या जमातीचे सध्याचे वंशज कोण हे मात्र सांगता येत नाही.

**कालंगडा** एक राग. याचे ध्यानस्वरूप उपलब्ध नाही. या रागात ऋषभ, धैवत हे स्वर कोमल व बाकीचे सर्व स्वर शुद्ध लागतात. याचा वादी पंचम व संवादी षड्ज आहे. याचे मुख्य अंग ' प ध म प ग म प ध प ' असे आहे. आरोह– ' सा रे ग-म प ग म प ध नि सा ' व अवरोह– ' सा नि ध प म प ध प म ग म ग रे सा ' असा आहे. ऋषभ व धैवत या दोन स्वरांवर आंदोलन केल्यास भैरव रागाचा भास होतो, म्हणून तसे करणे वर्ज्य समजतात. याचा न्यासस्वर गंधार आहे. गानसमय– रात्रीचा शेवटचा प्रहर.

**कालचक्र** (१) कालगतीचे चक्र किंवा ज्योतिश्चक्र. निमेषादी युगापर्यंतचा चक्राप्रमाणे फिरणारा काल म्हणजे कालचक्र होय. या कालचक्राचा संबंध सूर्याशी किंवा सूर्याच्या गतीशी आहे. याविषयी मत्स्यपुराण म्हणते–

**अहस्त्रिनाभिः सूर्यस्य त्वेकचक्रस्य वै स्मृतम् ।**
**अराः संवत्सराः पञ्च नेम्यः षड्ऋतवः स्मृताः ।।**

अर्थ– सूर्याच्या एकचक्राच्या पूर्वाह्ण, मध्याह्न व अपराह्ण या तीन नाभी आहेत. संवत्सर परिवत्सरादी हे पाच आरे आहेत. व सहा ऋतू हे त्याच्या कडेची सहा वलये होत.

हे कालचक्र पृथ्वी व स्वर्ग यांच्या मध्यभागी मेरू पर्वताच्या

उजव्या अंगाला स्थित असून अभिजितादी २८ नक्षत्रे या चक्रावर बसविलेली आहेत (भाग. पु. ५. २२·२–११). हे महाकालाचे आसन मानलेले आहे.

कालावर चक्राचे रूपक करण्याची कल्पना फार पुरातन आहे. ऋतू एकामागून एक ठराविक कालाने परत येतात, रात्र आणि दिवस एकामागून एक फिरत असतात व ठराविक अंतराने चंद्राच्या कला वाढत व कमी होत जातात; ही सर्व दृश्ये पाहून मनुष्याला कालचक्राची कल्पना स्फुरली असावी. ऋग्वेदात द्वादशार (बारा आरे = बारा महिने असलेल्या) चक्राचा उल्लेख आहे–

**त्रिनाभि चक्रमजरमनर्व**
**यत्रेमा विश्वा भुवनाधि तस्थुः ।।**

(१·१६४·२)

अर्थ– या चक्राला तीन तुंबे असून ते कधीही झिजत नाहीत किंवा मोडतही नाहीत. या चक्राच्या आधारावर सर्व भुवने व्यवस्थित ठेवलेली आहेत.

कालचक्रासंबंधी महाभारतात कथा आली आहे, ती अशी– उत्तंक आपल्या गुरुपत्नीसाठी कुंडले घेऊन जात असता वाटेत तक्षकाने ती चोरली व तो पाताळात घुसला. उत्तंकही त्याच्यामागून पाताळात गेला असता तिथे त्याला एक चक्र



बौद्ध कालचक्र – नेपाळी चित्र

दिसले. त्या चक्राला बारा आरे (बारा मास) असून सहा कुमार (सहा ऋतू) ते फिरवीत होते (आदि. ३.१४४). भारतातल्या बहुतेक सर्व धार्मिक पंथानी या ना त्या रूपात कालचक्राची कल्पना मांडलेली आहे.

(२) बौद्धधर्मातील कालचक्रयान या संप्रदायाची देवता. कालचक्र हा पुरुष देव असून त्याचे वर्णन पुढीलप्रमाणे आहे– नीलवर्ण, चतुर्मुख, द्वादशनेत्र, चौवीस हात, तीन माना व सहा खांदे. तो अनग व रुद्र यांच्या देहावर नृत्य करतो. व्याघ्रचर्म पांघरतो. त्याच्या हाती वज्रखड्गादी विविध आयुधे आहेत. वज्रहुंकार ही त्याची मुद्रा आहे. याच्या मूर्ती भारतात क्वचित आढळत असल्या, तरी त्या नेपाळ व तिबेटमध्ये पुष्कळ आहेत. त्या बहुधा यब्‌युम् (मिथुनीभूत) अवस्थेत असतात. [ इं. बु. इ.; गॉ. नॉ. बु. ]

## कालचक्रदान

रुप्याचे एक चक्र करून त्याला किरण म्हणून मोत्याचे सर लावतात. याला पूर्णचंद्राकृतिचक्र म्हणतात. मग त्याची पूजा करून ते ब्राह्मणाला दान देतात. दानमंत्र असा–

**इदं मे राजत चक्रमिन्दुरश्मिसमाकुलम् ।**
**अपमृत्युविनाशाय दत्तमायुर्विवृद्धये ।।**

अर्थ – हे चंद्रकिरणांनी युक्त असे रौप्यचक्र अपमृत्यूचा नाश व आयुष्यवृद्धी होण्यासाठी मी दान दिले आहे.

नंतर अग्नी सिद्ध करून घृतमिश्रित तिळाचे १०८ हवन करतात. बारा ब्राह्मणाना पायसान्नाचे भोजन देऊन व स्वतः लवणवर्जित अन्नाने एकभुक्त करून दानसमाप्ती करतात. [ दा. चं ]

## कालचक्रयान

वज्रयान, सहजयान व कालचक्रयान असे बौद्धधर्मातले तीन तांत्रिक संप्रदाय आहेत. काहींच्या मते प्रस्तुत संप्रदाय वज्रयान संप्रदायातून निघाला आहे, तर काहींच्या मते तो वज्रयानाचा पूर्ववर्ती संप्रदाय आहे. काहीच्या मते १० व्या शतकातल्या वैष्णव धर्माचीच ती एक बौद्ध शाखा आहे. विष्णूचे जसे सुदर्शनचक्र तसेच या संप्रदायाचे कालचक्र असल्याचे मानतात. कालचक्र ही या संप्रदायाची महादेवता आहे. भगवान् तथागताने धान्यकटकदेशात काल शब्दाची व्याख्या पुढीलप्रमाणे सांगितली आहे – धर्म, धातू व आकाश यांचे लक्षण असलेले परम अक्षर व अच्युतक्षण यांना काल म्हणतात. हा काल म्हणजेच वज्रज्ञान आणि कालचक्र म्हणजेच आदिबुद्ध होय. काल म्हणजे प्रज्ञा व चक्र म्हणजे उपाय. आणि त्या प्रज्ञोपायांचे ऐकात्म्य म्हणजेच कालचक्रयान होय अशी त्याची दुसरी व्याख्या आहे.

कालचक्रयान व वज्रयान यामध्ये फारसा फरक नाही.

दोहोंचाही मुख्य भर योगाभ्यासावर असून योगाचार व माध्यमिक तत्त्वज्ञान ही या दोन्ही यानांची स्फूर्तिस्थाने आहेत. त्यांना एकमेकापासून पृथक करणे कठीण आहे.

तिबेटी अनुश्रुतीप्रमाणे या संप्रदायाचा प्रारंभ शभल नामक देशात झाला. हा देश चिनी तुर्कस्थानच्या जवळ कुठेतरी असल्याचे अनुमान आहे. हा देश ४५ ते ५० अक्षांशांच्या मध्ये सीता नदीच्या बाहेर आहे, असे सिसोमा हा ग्रंथकार म्हणतो. त्या देशात बारा पशूंच्या सांकेतिक चिन्हांनी निर्माण केलेल्या कालचक्राचा प्रसार होता. त्या देशाचा राजा सुचंद्र यानेच पहिल्या प्रथम कालचक्रयानाचे प्रवर्तन केले, असे म्हणतात.

पंडित हरप्रसादशास्त्री यांनी कालचक्रयानाची व्याख्या पुढीलप्रमाणे सांगितली आहे. — काल = मृत्यू किंवा नाश, कालचक्र = नाशचक्र व कालचक्रयान = कालकृत नाशापासून रक्षण करणारे एक साधन होय. सेकोद्देशटीका हा कालचक्रयानाचा अधिकृत ग्रंथ आहे. त्यात कालचक्रातल्या चारी अक्षरांचा अर्थ पुढीलप्रमाणे सांगितला आहे—

**ककारात् कारणे शान्ते लकाराल्लय अत्र वै ।**
**चकाराच्चलचित्तस्य क्रकारात् क्रमबन्धनैः ।।**

अर्थ — क ने शान्तकारण, ल ने लय, च ने चचलचित्त व क्र ने क्रमबंधन असा अर्थ सूचित होतो.

याचे तात्पर्य हे की सांसारिक विषयांनी चंचल झालेल्या चित्तासह प्राणाचा परमशान्तकारण जो आदिबुद्ध त्याच्या ठिकाणी लय करणे म्हणजे कालचक्रयान होय.

डॉ. दासगुप्त यांच्या मते कालचक्रयान हे वज्रयानाचेच एक उपयान आहे. वज्रयानात महाभयंकर देवतांना प्राधान्य मिळाले. कालचक्रयानातही या भयानक देवी-देवतांना स्थान मिळालेले आहे. विद्वानांचे मत आहे, की असंगाच्या कालात महायान संप्रदायामध्ये तांत्रिक कल्पनांचा उगम झाला. असंग हाच तांत्रिक बौद्ध धर्माचा संस्थापक होय. कालचक्रयानाचा संपूर्ण विकास झाल्यावर बौद्ध धर्मात तांत्रिक तत्त्वानी कणखर पाय रोवला. श्री. वेडेल या पंडिताच्या मते कालचक्रयान म्हणजे आदिबुद्ध सिद्धान्ताचे तांत्रिक बीभत्सीकरण आहे. कालचक्रयानाचा प्रवेश मध्यभारतात १० व्या शतकाच्या पूर्वार्धात झाला. ११ व्या शतकाच्या उत्तरार्धात ते काश्मीरमार्गे तिबेटात शिरले. तिबेटी धर्म-संस्कृतीवर त्याने मोठाच प्रभाव पाडला. तिबेटात १४ ते १६ या शतकांत या यानावर अनेक भाष्ये व टीका लिहिल्या गेल्या. हे यान नालंदामध्येही प्रविष्ट झाले होते, असे पद्मचर्पो नामक एक पंडित सांगतो. नालंदा विहाराच्या महाद्वारावर ज्या आकृती कोरलेल्या होत्या, त्याचा कालचक्रयानाशी संबध होता, असे सांगतात. केंब्रिज विद्यापीठाच्या ग्रंथालयात कालचक्रयानतंत्र नावाचा ताडपत्रावर लिहिलेला एक ग्रंथ आहे. या ग्रंथावर विमलप्रभा या नावाची एक विस्तृत टीका उपलब्ध आहे. या दोन ग्रंथांवरून या संप्रदायाची माहिती मिळू शकते.

प्राण व अपान या दोहोंच्या संयोगाला तांत्रिक बौद्ध तत्त्वज्ञानात मोठे स्थान आहे. या संयोगाचा खरा अर्थ जाणून घेणे आवश्यक असते. कारण प्रत्येक तांत्रिक कृत्याच्या वेळी त्यांचा उपयोग करायचा असतो. कालचक्रयानात काल शब्दाच्या व्यावहारिक अर्थालाही हळूहळू महत्त्व दिले जाऊ लागले. काल म्हणजे वेळ. विश्वातील सजीव व निर्जीव प्राणिमात्रांना आपणात सामावून घेणारे जे मानवी शरीर, त्यात कालही आपल्या वर्ष, मास, दिन, इ. लहान-मोठ्या भागासह वास करून राहतो, अशी नवी कल्पना पुढे आली. या कालाचे विभाग होण्यास मानवशरीरातल्या मज्जातंतूना सर्वस्वी व्यापून टाकणारे प्राणापान हे दोन वायू कारणीभूत होतात, अशी या सांप्रदायिकांची समजूत आहे. योगाभ्यासाच्या द्वारे या वायूचे जो नियमन करू शकतो, तोच कालचक्राच्या फेऱ्यातून मुक्त होतो, अशी त्यांची धारणा आहे.

वज्रयान व कालचक्रयान या दोन संप्रदायांनी भारतातला तांत्रिक बौद्धधर्म पूर्णावस्थेस नेला. ११ व्या शतकाच्या उत्तरार्धापासून विशेषतः बंगाल, द. बिहार, नेपाळ व काश्मीर या भागात कालचक्रयानाने हळूहळू हातपाय पसरायला प्रारंभ केला. अनेक बौद्धविहारातून वज्र व काल या दोन्ही पथांवर साहित्यनिर्मिती होऊ लागली. त्याला अनुसरून शिल्पकारांनी या पथातल्या देव-देवतांच्या मूर्ती बनविल्या व पंथाच्या अनुयायांनी मंदिरे बांधून त्यांत त्या मूर्तींची स्थापना केली. [ऑ. इं. ओ. कॉ.; तां. बौ. सा. सा.; सि. सा.; स्ट्र. एं.]

## कालंजर

बुंदेलखंडातील बांदा जिल्ह्यात हा डोंगरी किल्ला आहे. इथे एक शिवमंदिर असून महाभारतात याचे माहात्म्य वर्णिले आहे (वन. ८५, ८७). प्राचीन काळापासून तिथे शैव तपस्व्यांचे वास्तव्य होते. महाभारतातील वर्णनावरून हा पर्वत प्रयाग, चित्रकूट याच्या जवळपास असावा, असे वाटते. भिटा येथे ज्या प्राचीन मुद्रा सापडल्या आहेत, त्यातील एका मुद्रेवर पर्वतावर शिवलिंग दिसत असून त्याच्या खाली ' कालंजर—भट्टारकस्य 'ही अक्षरे गुप्त लिपीत दिसतात. कालंजर हे शंकराचे एक नाव आहे. या पर्वतावर अनेक भव्य चतुर्मुख शिवलिंगे आहेत. इथल्या नीलकंठ महादेवाच्या मंदिरामुळे याला क्षेत्ररूपता प्राप्त झाली आहे.

पद्म शिव, कंद, इ. पुराणांत या स्थानाचे माहात्म्य

सांगितले असून तेथील देवह्रदात स्नान केल्याने सहस्र गोदानाचे पुण्य लाभते, असे म्हटले आहे. तिथे कालभैरवाची १८ भुजांची एक भव्य मूर्ती आहे. तिच्या जटेतील व गळ्यातील सर्प अत्यंत प्रेक्षणीय आहेत.

कालंजरच्या आजूबाजूच्या पहाडात कित्येक शिलालेखही आढळतात. त्यांतल्या एका शिलालेखावरून कळते, की पांडुवंशातला उदयन नामक राजा पाचव्या शतकाच्या आगेमागे इथे राज्य करीत होता. कालंजर प्रदेश नागभट्ट (द्वितीय) नामक प्रतीहारवंशी राजाच्या अमलाखाली होता. ९५४ साली चंदेल्यांनी पुनश्च तो जिंकून घेतला. अनुमान असे आहे, की १० व्या शतकात चंदेलराजे गुर्जरप्रतीहारांचे अंकित होते. पण कालंजरविजयानंतर ते स्वतंत्र झाले. राजा धंग व नंतरचे चंदेल राजे स्वतःला कालंजरचे राजे म्हणत असत. ११८२ साली पृथ्वीराज चौहान याने चंदेल्याची महोबा ही राजधानी जिंकली. पृथ्वीराजाने महोबातून त्यांना हाकलल्यानंतर त्यांनी कालंजर येथे आपली राजधानी आणली. पण पृथ्वीराजाने तिथवर त्यांच्यावर आक्रमण करून कालंजरवरही आपला अधिकार स्थापन केला.

कालंजरचा किल्ला केदारनाथ नामक राजाने ७ व्या शतकात बांधला, असे फरिष्ता सांगतो. या किल्ल्याचा परिघ सुमारे पाच मैलांचा आहे. वर जाण्यासाठी सात द्वारे आहेत. इथले नीलकंठ महादेवाचे मंदिर शेवटचा चंदेल राजा परमल ब्रह्म याने बाराव्या शतकात बांधले.

या पर्वताला कालिंजर असेही म्हणतात. मत्स्यपुराणात ज्या कालिंजर वनाचा उल्लेख आहे, ते वन या पर्वतावरच असावे. नर्मदेचा उगम या पर्वतावर झाला, म्हणून तिला कालिंजरी हे नाव पडले आहे.

या पर्वताच्या पायथ्याजवळ कालंजर नावाचे गाव असून त्याला सात दरवाजे आहेत. तिथून जवळ डोंगरात सीतासेज नावाचे दगडी पलंगाकृती स्थान आहे. त्या ठिकाणी काही काळ सीतादेवीचे वास्तव्य होते, अशी आख्यायिका आहे. नीलकंठेश्वराचे मंदिर, कोटितीर्थ व मृगधारा ही इथली स्थाने पवित्र व प्रेक्षणीय आहेत. मृगधारेत सप्तमृगांच्या प्रतिमा कोरलेल्या आहेत. इथे कौशिकाचे सात पुत्र हरिणांच्या रूपाने पुन्हा जन्माला आले व त्यांनी योगाभ्यास केला, असे मत्स्य पुराणात म्हटले आहे (२०.१५; २१.९, २८). कालंजर इथे दरवर्षी कार्तिकात मोठी यात्रा जमते. [ हि. ध.; पु. इं.; स. भा. प्र. व.; डे. हिं. इ.; कल्याण-तीर्थांक; भारती–१९६१; ए. इं.–मजुम. ]



**कालटी** आद्य शंकराचार्यांचे जन्मस्थान. केरळात पेरियार किंवा पूर्णा नदीच्या काठी हे गाव वसलेले आहे. प्रारंभी ही नदी कालटीपासून बऱ्याच दूर अंतरावरून वाहत होती. शंकराचार्यांची आई रोज त्या नदीवर स्नानाला जात होती. पुढे तिला वार्धक्य आले व नदीवर स्नानाला जाणे त्रासदायक होऊ लागले. म्हणून मग शंकराचार्यांनी तप करून नदीला प्रसन्न करून घेतले व तिचा एक प्रवाह आपल्या घराजवळून वाहील, असे केले. पुढे हाच नदीचा मुख्य प्रवाह बनला.



शंकराचार्यमंदिर – कालटी

या नदीच्या तीरावर श्रीकृष्ण, शंकराचार्य व शारदा या तिघांची मंदिरे आहेत. ही मंदिरे साधी व छोटी आहेत. श्रीकृष्णमंदिर मुळात आचार्यांनी बांधले आहे, असे म्हणतात.

आजमितीला इथल्या मंदिरात बरीच वाढ झाली आहे. इथल्या शारदामातेच्या मंदिरामध्ये शंकराचार्यांच्या मातेचे वृंदावन आहे. आचार्यांच्या जयंतीला कालटी येथे मोठी यात्रा भरते. याशिवाय इथे रामकृष्ण अद्वैताश्रम असून एक कॉलेजही आहे. या कॉलेजात साहित्य, विज्ञान, व्यापार यांबरोबरच वेदान्तदर्शनही शिकविण्याची व्यवस्था आहे. [ कालटी ]

**कालंदर** गुजरातमधील एक मुसलमान जात. हे सुन्नी फकीर असून भिक्षेवर निर्वाह करतात. हे वस्तऱ्याने अंगावरचे सर्व केस काढतात. दीक्षा घेतांना भुवयांचे केस काढलेच पाहिजेत, असा त्यांच्यांत नियम आहे. [ मुं. इ. जा.; वि. मु. रा. प. ]

**कालद्रव्य** जैनांची कालविषयक कल्पना. जैनमते काल हे एक द्रव्य आहे. ते वस्तुमात्राचे परिवर्तन करण्यात साहाय्यक होते; पण तेही वस्तूचे बलाने परिणमन करवीत नाही किंवा एका द्रव्याचे दुसरे द्रव्य या रूपातही परिणमन करवीत नाही; तर ते स्वत.च स्वत.चे परिणमन करणाऱ्या द्रव्याना केवळ साहाय्यक होते.

कालाचे प्रकार दोन – (१) निश्चयकाल व (२) व्यवहारकाल. लोकाकाशाच्या प्रत्येक प्रदेशावर निरनिराळे कालाचे अणू स्थित असतात. त्या कालाणूंनाच निश्चयकाल म्हणतात. त्या कालाणूंच्या निमित्तानेच विश्वात प्रतिक्षणी परिवर्तन होत राहिले आहे. त्यांच्याच निमित्ताने प्रत्येक वस्तूचे अस्तित्व कायम आहे.

आकाशाच्या एका प्रदेशात स्थित असलेला पुद्‌गलाचा एक परमाणू मंदगतीने जितक्या वेळात त्या प्रदेशाला लागून असलेल्या दुसऱ्या प्रदेशात पोचतो, तितक्या वेळाला समय म्हणतात. समयांच्या समूहालाच आवली, उच्छ्‌वास, प्राण, स्तोक, घटिका, अहोरात्र, असे म्हणतात. हा सगळा व्यवहारकाल होय. हा काल सौरमंडलाच्या गतीवरून जाणला जातो. याच्या द्वारेच निश्चयकालाच्या अस्तित्वाचे अनुमान होते. कालद्रव्य हे आकाशाप्रमाणेच अमूर्तिक आहे. अंतर एवढेच, की आकाश एक आणि अखंड आहे, तर कालद्रव्य अनेक आहेत –

**लोयायासपदेसे एक्केक्के जे ठिया हु एक्केक्का ।**
**रयणाणं रासिमिव ते कालाणू असंखदव्वाणि ।**

अर्थ – लोकाकाशाच्या एकेका प्रदेशावर रत्नाच्या राशीप्रमाणे जे एक एक करून स्थित आहेत, ते कालाणू होत. ते असंख्यात द्रव्य आहेत. [ जैनधर्म – पं. कैलाशचंद्रशास्त्री. ]

**कालनाडी** केरळातील आदिवासी जमात. कालाट्टम् नावाचे एक नृत्य हे करतात, त्यावरून हा शब्द निघाला असावा. हे लोक पिंगट रंगाचे असतात. हे मलयाळम् भाषा बोलतात. पुरुष कर्णकुडले घालतात. बायका धातूच्या बांगडया वापरतात. याची लोकसंख्या अत्यल्प आहे. यांचा पूर्वेतिहास अज्ञात आहे. असे सांगतात, की मध्यभारतात राहणारी ही जमात तिकडे सतत होणाऱ्या आक्रमणांमुळे दक्षिणेत उतरून दाक्षिणात्य बनली. ते पूर्वी मलबारच्या सैन्यात होते. हल्ली मुख्यत्वे शेतात मजूरी करतात. काही लोक जनावरेही पाळतात. थाईकेट्टु नामक नृत्याबद्दल त्याची प्रसिद्धी आहे.

कालनाडींची घरे सामान्यत: टेकडयांवर असतात. ती चिखलाची असतात. वारा वाहण्यासाठी त्या घरांना छोटे छोटे झरोके असतात. त्यांची देवासाठी बनविलेली झोपडी वैशिष्टयपूर्ण असते. ते नृत्यगायनाने देवाला संतुष्ट करतात त्याच्या बहुतेक नृत्यप्रकारात भद्रकालीचे माहात्म्य दर्शविलेले असते.

**विवाहप्रथा** – मुली वयात आल्यावर त्यांची लग्ने करतात. लग्नाच्या दिवशी वधू-वर देवळात जाऊन स्नान करतात व देवाची पूजा करून लग्नमंडपात येतात. ताळिबंधन हा लग्नातला मुख्य विधी असतो. पुरुषाला अनेक बायका करण्यास परवानगी असते. पुष्कळदा पत्नीच्या बहिणीशी विवाह होतो. जातीबाहेर संबंध ठेवणाऱ्या स्त्रीला बहिष्कृत करतात. सातव्या दिवशी बालकाचे नामकरण करतात. जननाशौच तीस दिवस पाळतात.

**मर्तिकप्रथा** – पंचवीस वर्षाखालील मुलास डोके दक्षिणेस करून पुरतात. त्यांचा जो जातिप्रमुख असतो, तो मेल्यावर त्याचे मात्र दहन करतात. पुरलेल्या जागी थडगे उभारतात. सात दिवस सुतक पाळून आठव्या दिवशी और्ध्वदेहिक करतात. [ ट्रा. के. ]

**काल-पाशयोग** रव्यादी सात वारी उत्तरेपासून उलट दिशेला काल फिरत असतो आणि पाश हा कालदिशेच्या समोरच्या दिशेला निरंतर असतो. उदा० रविवारी उत्तरेला काल आणि दक्षिणेला पाश असतो. तसाच सोमवारी वायव्य दिशेला काल आणि आग्नेय दिशेला पाश असतो. याच क्रमाने भौमादी वारी बाकी दिशांना काल व पाश मोजावे. हे दिवसाचे झाले. रात्रीस काल व पाश हे दिवसाच्या उलट असतात. म्हणजे ज्या वारी दिवसास ज्या दिशेला काल असतो त्या दिशेला रात्रीस पाश येतो व दिवसास पाश असतो त्या दिशेला रात्री काल येतो. जसा रविवारी रात्री उत्तरेला पाश व दक्षिणेला काल, सोमवारी रात्री वायव्येला पाश व आग्नेयील काल इत्यादी.

यात्रेला व युद्धाला जाताना काल व पाश हे दोन्ही संमुख वर्ज्य करावे, असे सागितले आहे. हे उजव्या डाव्या अंगी असावे त्यातही उजव्या भागी काल आणि डाव्या भागी पाश असे असतील, तर ते अतिशुभ होत. [ मु. चि. ]

**कालपुरुष** शुभाशुभ ज्ञानासाठी लग्नादी द्वादश राशीची कल्पित पुरुषाकृती. याविषयी श्लोक असा–

**शीर्षमुखबाहुहृदयोदराणि कटिबस्तिगुह्यसंज्ञकानि ।**
**ऊरूजानुकजङ्घेचरणाविति च राशयोऽत्राद्याः ।।**

(दीपिका)

अर्थ– शीर्ष, मुख, बाहु, हृदय, उदर, कटी, बस्ती (ओटिपोट), गुह्येंद्रिय, मांडी, गुडघा, जांघ व चरण या बारा अव-

यवांच्या ठिकाणी लग्नादी (जन्मकाली पूर्वक्षितिजावर उदित) राशीपासून क्रमाने बारा राशी माडून (शुभाशुभ फल पाहावे). [ श. क. ]

**कालपुरुषदान** सुवर्णाची कालपुरुषमूर्ती बनवून तिचे ४ थी, १४ शी किंवा भद्रातिथी या दिवशी दान करतात. कालपुरुषाची मूर्ती पुढीलप्रमाणे करतात– रुप्याचे दात, सोन्याचे डोळे, उजव्या हाती खड्ग, डाव्या हाती मांसपिड, कानात जास्वंदाची कुंडले, गळचात शंखमाळा, कमरेला सुरी, नेसायला रक्तवस्त्र व पांघरायला कृष्णाजिन.

मग यथाविधी त्या मूर्तीची व दान घेणाऱ्या ब्राह्मणाची पूजा. नतर दान व प्रार्थना. मूर्ती पाच निष्कापासून शभर निष्कांपर्यंतच्या परिमाणाची यथाशक्ती करावी व दक्षिणाही त्याच प्रमाणात द्यावी, असे सागितले आहे. दक्षिणा दिल्यावर ब्राह्मणाची पाठवणी करतात व पुन्हा त्याचे मुखावलोकनही करीत नाहीत. मग 'शान्ता पृथिवी' मंत्र म्हणून हात पाय धुतात व ब्राह्मणभोजन घालून दानसमाप्ती करतात. दानफल–व्याधी व अपमृत्यू यांचा निरास आणि ऐश्वर्याची प्राप्ती.[ दा. चं ]

**कालप्रिय** भवभूतीची नाटके कालप्रियनाथाच्या यात्रेच्या वेळी केली जात असत, अशी आख्यायिका आहे. उज्जयिनीचा महाकाल हाच कालप्रियनाथ होय, असे आजवर अनेक पंडितांचे मत होते. पण कोणत्याही कोशात किवा शिवसहस्रनामात कालप्रिय हे शिवाचे एक नाव म्हणून दिलेले नाही. उलट स्कंदपुराणाच्या प्रभासखंडात सूर्याच्या ६८ नावांमध्ये मात्र कालप्रिय हे एक नाव आहे. नागरखंडात म्हटले आहे, की सूर्याची तीन तीर्थे होती– मुण्डीर, कालप्रिय व मूलस्थान. त्यापैकी मुण्डीर हे पूर्व भारतात, कालप्रिय हे मध्यदेशात व मूलस्थान हे पश्चिमेस होते ( ना. खं. ७३). कालप्रिय हे स्थान यमुनेच्या दक्षिण तीरावर आहे, असे वराहपुराणात म्हटले आहे (१७८. ५५-५७). श्रीकृष्णाचा पुत्र सांब याने मूलस्थान (मुलतान) येथे सूर्याची आराधना केल्यानतर तो कुष्ठ रोगातून मुक्त झाला. मग त्याने सूर्यमूर्तीची स्थापना वरील तीन ठिकाणी केली.

कालप्रिय हे कनौजच्या दक्षिणेस होते, असे राजशेखरच्या काव्यमीमासेवरून दिसते. सध्याचे यमुनेच्या तीरावरील काल्पी हेच प्राचीन कालप्रिय होय, असे श्री. मिराशी यानीही सिद्ध करून दाखविले आहे. काल्पी व कालप्रिय या दोन शब्दात बरेच साम्य आहे. काल्पी शहराच्या बाहेर पश्चिमेच्या बाजूस जे भग्नावशेष आहेत, त्यांना चौऱ्यायंशी घुमट असे म्हणतात. इ. सनाच्या १० व्या शतकाच्या पूर्वार्धात राष्ट्रकूट वंशातील राजा इंद्र (तृतीय) याने कनौजवर स्वारी केली होती, त्या वेळी त्याने वाटेतील कालप्रियनाथाच्या देवालयाच्या परिसरात तळ दिला होता, असे वर्णन खंबायत व सागली येथे सापडलेल्या ताम्रपटातील श्लोकावरुन समजते. कोशाच्या प्रथम खडात उज्जैन या विषयात कालप्रियनाथ उज्जैन मध्ये असल्याचे लिहिले आहे. ते प्रस्तुत संशोधनाच्या अंती बाधित समजावे. **पाहा**– काल्पी. [ स. मु. १ ]

**कालभैरव** अष्ट भैरवापैकी एक. याला 'काशीचा कोतवाल' म्हणतात. शंकराच्या क्रोधातून याची उत्पत्ती झाली. शकराने ब्रह्मदेवाचे पाचवे मस्तक याच्याच हस्ते तोडविले. नंतर त्याला काशीत राहण्याची आज्ञा केली. काशीत गेल्यावर प्रथम याचे दर्शन घ्यावे लागते. काशीतून परतताना जो काळा गंडा हातात बाधतात, तो कालभैरवाचा असतो. याचा प्रार्थनामंत्र असा–

**कपालमालिकाकान्तं ज्वालापावकलोचनम् ।**
**कपालधरमत्युग्रं कलये कालभैरवम् ।।**

अर्थ– रुंडमाळांनी शोभित, ज्याच्या डोळचांतून अग्निज्वाला निघत आहेत, ज्याच्या हाती कपाल आहे व जो अत्युग्र आहे, अशा कालभैरवाला मी वंदन करतो.

उज्जैनपासून तीन मैलांवर भैरवगढ नामक एक कोट असून त्यात कालभैरवाचे भव्य मदिर आहे. इथली कालभैरवाची मूर्ती भव्य आणि प्रभावशाली आहे. [ वि. स्मृ. ग्रं. ]

**कालभैरवाष्टमी** मार्ग० कृ. ८मी. या दिवशी कालभैरवाची पूजा करतात. **पाहा** – कालाष्टमीव्रत.

**कालम्** दक्षिणेतील एक सुषिर वाद्य. याची नळी धातूची केलेली असते. एक्कालम् व गौरीकालम् असे याचे दोन भेद आहेत. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**कालमेघम्** एक तमिळ कवी. हा कुंभकोणम् येथे राहणारा वैष्णव ब्राह्मण असून श्रीरंगम् येथील मंदिरात आचारी होता. तिरुवानैक्कोविलच्या जबुकेश्वरमंदिरात एक देवदासी होती. तिच्या प्रेमात पडल्याने हा जंबुकेश्वरमंदिरात राहायला आला व वैष्णव होता तो शैव बनला. हा शीघ्रकवी होता. शिवाची वेगवेगळी क्षेत्रे याने काव्यविषय केली आहेत. [ त. सा. सं. ]

**कालरात्रिव्रत** आश्विन शु. ८ मी ही याची तिथी आहे. त्या तिथीपासून सात, तीन किंवा एक दिवस उपवास; गणेश, मातृदेवता, स्कंद व शिव यांची पूजा; नंतर शैव ब्राह्मणाकडून होम व आठ कुमारिका आणि आठ ब्राह्मण याना भोजन, असा याचा विधी आहे. [ हे. व्र.; हि. ध.]

**कालरात्री** कल्पांतकालीन रात्र. विश्वप्रलयाच्या वेळी संहारकारिणी पराशक्ती महाकालामध्ये विलीन होते. त्या वेळी सर्वत्र घोर अंधाराचे साम्राज्य पसरते. या प्रलयपूर्व अंधकाराचे प्रतीक म्हणून तंत्रशास्त्रात कालरात्रीची कल्पना केलेली आहे. यातला रात्री शब्द अंधकाराचा सूचक आहे. कालसंहिता नावाचा एक प्राचीन तंत्रग्रंथ आहे. त्यात कालरात्रीच्या उपासनेचे विधान दिलेले आहे. या कालरात्रीचे ८४ भेद मानलेले आहेत. त्यांचे पृथक मंत्र आहेत; यंत्रेही आहेत. त्यांच्या सिद्धीही वेगवेगळच्या आहेत.

**उपासनेचे प्रकार**– अमावास्येच्या रात्रीला कालरात्रीचे प्रतीक मानून तिचे मोहरात्री, दारुणरात्री, महारात्री व कालरात्री असे चार विभाग केलेले आहेत. निशासाधना, भैरवीसाधना, कालीसाधना व प्रकृतिसाधना अशा त्या चार विभागांच्या अनुक्रमे साधना सांगितलेल्या आहेत. कालरात्रीच्या उपासनेला कार्तिकी अमावास्या ही विशेषरूपाने सांगितली आहे. श्रीविद्यार्णवतंत्रात कालरात्रीचे स्वरूप पुढीलप्रमाणे सांगितलेले आहे–

रक्तवर्ण, चतुर्भुज, उजव्या हाती लिंग, दुसऱ्या उजव्या हाताची वरदमुद्रा, दोन डाव्या हाती भुवन व अधोदंड, त्रिनेत्र, मुक्तकेश, मस्तकी मयूरपत्र धारण करणारी व कामातुर.

**कालरात्रीचा मंत्र** –हा मंत्र शत्रूचे उच्चाटन, स्तंभन व नाश, तसेच संमोहन व आकर्षण करणारा आहे–

**ऐं ह्रीं क्लीं श्रीं काल्लेश्वरि सर्वजनमनोहरि सर्वमुखस्तंभनि सर्वराजवशंकरि सर्वदुष्टनिर्दलनि सर्वस्त्रीपुरुषाकर्षणि बन्दीशृङ्खलास्त्रोटय सर्वशत्रून् भञ्जय भञ्जय द्वेष्टॄन् निर्दलय सर्वं स्तम्भय स्तम्भय मोहनास्त्रेण द्वेषिण उच्चाटय उच्चाटय सर्वं वशं कुरु कुरु स्वाहा देहि देहि सर्वं कालरात्रिकामिनि गणेश्वरि नमः।**

**कालरात्रीचे यंत्र** – बाहेरच्या वर्तुळात सोळा पाकळ्या व आंतल्या वर्तुळात आठ पाकळ्या, त्याच्या आत षट्कोन, त्यात वर्तुळ व वर्तुळात बिंदू अशी या यंत्राची रचना असते. या यंत्रावर कालरात्रीची स्थापना व पूजा करतात आणि वरील मंत्र जपतात. कामनापरत्वे कालरात्रीची अनेक भिन्नभिन्न विधाने सांगितलेली आहेत. [ मं. म.; पं. अरुणकुमारशर्मा – भारती दिवाळी अंक, १९६३ ]

**कालवेला** कोणत्याही क्रियेला योग्य असा काल. याचे कोष्टक दीपिकेत पुढीलप्रमाणे आहे–

| वार | दिवा | | रात्रौ | |
|---|---|---|---|---|
| रवि | पाचवे | यामार्ध | सहावे | यामार्ध |
| सोम | दुसरे | ” | चौथे | ” |
| मंगळ | सहावे | ” | सातवे | ” |
| बुध | तिसरे | ” | सातवे | ” |
| गुरु | सातवे | ” | पाचवे | ” |
| शुक्र | चौथे | ” | तिसरे | ” |
| शनि | पहिले व आठवे | ” | पहिले व आठवे | ” |

याम म्हणजे एक प्रहर होय. [ श. क. ]

**कालवेलिय नृत्य** राजस्थानातील कालवेलिय लोकाचे नृत्य. हे साप बाळगतात व पुंगी वाजवून त्यांना नाचवितात. पायाला घुंगुर बांधून, डफाच्या साथीवर हे लोक स्वतःही नृत्य करतात. त्यात त्यांच्या स्त्रियाही भाग घेतात. नाचताना पुंगीवर इंडोरी व पनिहारी गीते वाजवितात. त्यांच्या चाली फार मोहक असतात. [ भा. लो. नृ. ]

**कालशिला** गृध्रकूट पर्वताच्या जवळ असलेली एक शिला. हिला पवित्र मानतात. कित्येक जैन साधूंनी इथे तप केले आहे. [ हि. जॉ. ए. इं. ]

**कालसंकर्षणी** नृसिंहाच्या पृष्ठभागापासून उत्पन्न झालेली एक देवता. वागीशीची अनुचरी. [ पु. इं. ]

**कालसूत्र** अठ्ठावीस नरकांपैकी एक. ब्राह्मण व पितर यांचा विश्वासघात करणारे लोक या नरकात जातात. हा पृथ्वीच्या खालचा नरक आहे. [ पु. इं ]

**कालहरमूर्ती** शिवमूर्तीचा एक प्रकार. मृत्यूपासून मार्कंडेयाचे संरक्षण करण्यासाठी या रूपाचा प्रादुर्भाव झाला. एक पाय लिंगावर, दुसरा कालाच्या छातीवर, क्रुद्ध दृष्टी, जटामुकुट, चतुर्भुज व मागे पार्वती उभी, असे या मूर्तीचे वर्णन आगमग्रंथांत मिळते. काल हा पाशधारी व

द्विभुज असतो. कालाला भ्यालेला मार्कंडेय शिवलिंगाला मिठी घालून बसलेला असतो.



कालहरमूर्ती – १९ वे शतक

१९ व्या शतकात बनविलेली कालहर–कांस्यमूर्ती अष्ट-भुज आहे. तिचा एक पाय चौथऱ्यावर असून दुसरा कालाच्या छातीवर लाथ मारण्यासाठी उचललेला दिसतो. दोन हातांत कालाला मारण्यासाठी त्रिशूळ धरलेला आहे. शिवाच्या एका पायाजवळ मार्कंडेय नम्रपणे उभा आहे. [ इ. ब्रॉ.; सा. इं. इ. गॉ. गॉ. ]

## कालहस्ती

तमिळनाडमधले एक शैव क्षेत्र. अर्काट जिल्हृचा-तल्या सुवर्णमुखी नदीच्या काठावर हे स्थान आहे. इथले शिवलिंग वायुतत्त्वाचे आहे. हे एक शक्तिपीठही मानतात. इथे सतीचा उजवा खांदा गळून पडला होता. इथे जवळच असलेल्या टेकडीला कैलासगिरी म्हणतात. नंदीश्वराने कैलासाची तीन शिखरे पृथ्वीवर आणली, त्यातले हे एक आहे. असेही सांगतात, की वायू व शेष यांच्या झगडचात मेरूचे तीन तुकडे झाले. त्यांतला एक तुकडा म्हणजे कालहस्ती होय. टेकडीच्या पायथ्याशीच कालहस्तीश्वराचे विशाल मंदिर आहे. तीर्थयात्रा करीत असता अर्जुन या ठिकाणी आला होता व त्यानेच इथले शिवलिंग स्थापले, अशी कथा स्कंदपुराणात आहे. याला कण्णपेश्वर असेही म्हणतात. हे नाव कण्णप्प या एका शिवभक्तावरून त्याला मिळाले. पाहा– कण्णप्प. [ कल्याण–तीर्थांक ]

## कालहोरा

प्रथम वारप्रवृत्ती आणावी. त्या वेळेपासून आपल्या इष्ट वेळेपर्यंत घटिका-पळे मोजावी. नंतर त्यांची दुप्पट करून तिला ५ नी भागावे. बाकी राहील ती पूर्वीच्या दुपटीतून वजा करावी. मग तीत १ मिळवून त्या बेरजेला ७ नी भागावे. बाकी राहील तिच्यावरून होरेचा अधिपती समजावा. ज्याचा वार असेल, तो पहिल्या होरेचा स्वामी होय. त्यापुढे वारक्रमाप्रमाणे ग्रह मोजावे. उदा०

रविवारी वारप्रवृत्तीपासून इष्टवेळेपर्यंत ६ घटिका आहेत, असे मानू. त्याची दुप्पट १२; तिला ५ नी भागले असता बाकी २ उरते. ही १२ या संख्येतून वजा केल्यावर बाकी १० राहते. त्यात १ मिळविल्याने बेरीज ११ येते. तिला ७ ने भागिले असता बाकी ४ उरते. म्हणजे इष्ट वेळेस चौथ्या ग्रहाची होरा आहे. त्या दिवशी रविवार. त्यापासून चौथा बुध येतो. याकरिता इष्ट वेळ ही बुधाची कालहोरा आहे, असे समजावे. [ मु. चि. ]

## काला

महाराष्ट्रातील एक वैष्णव नृत्योत्सव. विविध खाद्य पदार्थ, दही, दूध, लोणी हे सगळे एकत्र करून काल-विणे म्हणजे काला होय. म्हणूनच याला दहीकाला असेही म्हण-तात. श्रीकृष्णाने व्रजमंडलात गायी चारताना आपण व आपले सौंगडी या सर्वांच्या शिदोऱ्या एकत्र करून त्या खाद्यपदार्थांचा काला केला व सर्वांसह त्याचे भक्षण केले, अशी कथा आहे. या कथेला अनुसरून गोकुळाष्टमीच्या दुसऱ्या दिवशी काला कर-ण्याची व दहीहंडी फोडण्याची प्रथा पडली.

हा उत्सव विशेषत: कोकणात मोठ्या प्रमाणावर होतो. गावातली लहान मुले व तरुण त्या दिवशी एकमेकांच्या हातात हात घालून नाचत नाचत रस्त्याने जातात.

**गोविंदा आला रे आला ।**
**गोकुळात आनंद झाला ।**

हे त्यांच्या नृत्याचे पालुपद असते. हे खेळगडी जेव्हां घरो-घर जातात, तेव्हा त्यांच्या डोक्यावर घागरी भरून पाणी ओततात. शक्य झाले तर दही-दूधही ओततात. प्रत्येकाला दहचादुधात कालविलेले पोहे वाटतात. कोणी कोणी आपल्या घरापुढे शक्य तितक्या उंचीवर दहचाची हंडी बांधतात. मग हे खेळगडी त्या हंडीखाली माणसांचा पहाड उभा करतात व

त्यावर चढून एखादा हलक्या अंगाचा चपळ तरुण आपल्या मुठीने ती मातीची दहीहंडी फोडतो. त्यातले दही खालच्या



काला – दहीहंडी फोडणे

लोकांच्या अंगावर सांडते. खापऱ्या सर्वत्र विखुरतात. माणसे त्यांतली एखादी खापरी आपल्या घरी आणून ठेवतात. त्यामुळे गोरसाची समृद्धी होते, असे मानतात. कित्येकदा टांगलेल्या दही-हंडीवर नोटा किंवा नाणीही बांधून ठेवतात. दहीहंडी फोडल्यावर ते पैसे मग खेळगडी आपसात वाटून घेतात. दिवसभर असे नाचून खेळून झाल्यावर मग सगळे खेळगडी एखाद्या जलाशयात स्नान करून आपापल्या घराकडे येतात.

पंढरपुरात गोपाळपूर या वाडीत आषाढी–कार्तिकी पूर्णिमेस काला होतो. वारीला आलेली सगळी यात्रा त्या काल्याला जमते. काल्याचा प्रसाद घेतल्याशिवाय वारकऱ्यांना पंढरपूर सोडण्याची परवानगी नसते. या काल्यावर महाराष्ट्रसंतानी अभंग व पदे लिहिली आहेत. त्यातला जनाबाईचा एक अभंग पुढीलप्रमाणे आहे –

**असो थोरथोरांची मात । तूचि मिळालासी गोपाळांत ।।**
**त्यांच्या शिदोऱ्या सोडिसी । ग्रासोग्रासीं उच्छिष्ट खासी ।।**
**न म्हणे सोंवळे ओंवळे । प्रत्यक्षची तें ओंवळें ।।**
**स्वानंदाचे डोही हात । धुतले सर्वांही निश्चित ।।**
**हाती काठ्या पायीं जोडे । दासी जनी वाट झाडे ।।**

(नामदेवगाथा– पृ. ७४१)

गोमंतकात याच काल्याला गवळणकाला म्हणतात. हा काला तिथल्या कलावंतिणी करतात. त्यात एका मुलीला कृष्णाचे सोंग देऊन कृष्णलीलेची गाणी म्हटली जातात. शेवटी कृष्णाकडून दहीहंडी फोडवितात. हा गवळणकाला दशावतारी खेळानंतर किंवा देवस्थानाचा रथोत्सव झाल्यानंतर होतो. [ म. द. इ.; रत्ना. गॅझे. ]

**कालागोरा** हे कालिकेचे पुत्र भैरव होत. यांच्या समवेत बावन्न वीर व चौसष्ट योगिनी राहतात. चुडैल, डाकिणी, भूत, पिशाच, यांना हे आपल्या ताब्यात ठेवतात. हे शिवाच्या मुख्यगणांपैकी असून कुत्रा हे यांचे वाहन आहे.

भेदसर येथे यांच्यासाठी यात्रा भरते. माघमासाच्या चतुर्थीपासून अष्टमीपर्यंत यांच्यासाठी जागरण करतात. रविवार हा यांच्या पूजेचा दिवस होय. राजस्थानातील नाथसंप्रदायाचे लोक यांना विशेष मानतात. तिथे हा एक लोकोत्सव मानला जातो. [ राजस्थानी लोकोत्सव ]

**कालाग्निरुद्र** (१) याने सनत्कुमाराला आपल्या नावाचे उपनिषद व भुशुंडाला बृहज्जाबाल व रुद्राक्षजाबाल ही उपनिषदे शिकविली. [ क्रि. स्ट. ले. उ. ]

(२) शिवाचे कालाग्नीसारखे संहारक रूप. याच्या मूर्ती कुठे कुठे आढळतात. ढाल-तलवार व धनुष्य-बाण धारण करणारा व रक्तवस्त्रधारी असे याचे मूर्तिध्यान आहे. मूर्तीचे भैरवाशी बरेच साम्य दिसते. [ सा. इं. इ. गॉ. गॉ. ]

**कालाग्निरुद्रोपनिषद** हे कृष्णयजुर्वेदाचे लहानसे गद्य उपनिषद आहे. यात कालाग्निरुद्राच्या प्रसन्नतेसाठी भस्मत्रिपुंड्र धारणाचा विधी सांगितला आहे. या त्रिपुंड्राच्या तीन रेषा म्हणजे गार्हपत्य, दक्षिणाग्नी व आहवनीय असे तीन अग्नी; भूलोक, अंतरिक्ष व द्युलोक असे तीन लोक; क्रियाशक्ती, इच्छाशक्ती व ज्ञानशक्ती अशा तीन शक्ती आहेत. चारी आश्रमांत हा त्रिपुंड्रधारणविधी सर्वांना विहित आहे.

त्याने इहलोकी सर्वभोग व अंती शिवसायुज्य मिळते. [ सी. ग. देसाई ]

**कालाग्नी** (१) पंचमुख रुद्राक्ष. याचे माहात्म्य पुढीलप्रमाणे सांगितले आहे–

**पञ्चवक्त्रः स्वयं रुद्रः कालाग्निर्नामनामतः ।**
**अगम्यागमनाश्चैव अभक्ष्यस्य च भक्षणात् ।**
**मुच्यते सर्वपापेभ्यः पञ्चवक्त्रस्य धारणात् ।।**

(तिथ्यादितत्त्वम्)

अर्थ – पंचमुख रुद्राक्ष हा साक्षात कालाग्निरुद्र आहे. तो अंगावर धारण केल्याने अभक्ष्यभक्षण, अगम्यागमन, इ. सर्व पापे नष्ट होतात. [ श. क. ]

(२) सर्वसंहारक अग्नी. [ श. क. ]

**कालाप** हा चरकांचा उदीच्य चरण होता. वैशंपायनाचा शिष्य कलापी नामक एक आचार्य होता. त्याने या चरणाची स्थापना केली म्हणून त्याला कालाप असे नाव मिळाले. हरिद्रा, छगली, तुंबुरू व उलप हे त्याचे चार शिष्य होते. यांनीही आपापल्या नावे एकेक चरण स्थापिला. अष्टाध्यायीत त्याचा उल्लेख आहे (४. ३. १०८). **पाहा**– चरक, चरण. [ पा. भा. ]

**कालामुख** एक शैव पंथ. या पंथाचा सामान्यपणे कापालिकाबरोबर उल्लेख होतो. पण कापालिक जितके अघोरी होते, तितके कालामुख नव्हते. माणसाच्या कवटीतून भोजन, चिताभस्मचर्चन व मद्यपात्रात देवतेचे पूजन एवढ्याच गोष्टीत त्यांचे कापालिकाशी साधर्म्य होते. १० ते १३ या शतकांत हा पंथ दक्षिणेत बराच प्रभावी होता. तिकडील काही शिलालेखांवरून असे दिसते, की कालामुख पंथाचे लोक काश्मीरमधून दक्षिणेत आले. कालामुखांचा प्राचीन उल्लेख गोविंद (३ रा) या राष्ट्रकूट राजाच्या नंदी ताम्रपटात आहे (इ. स. ८०७). त्यात असे लिहिले आहे, की ईश्वरदास या राजाने नंदीच्या देवालयाचा मुख्य असलेल्या एका कालामुख पंथाच्या पुरुषाला एक गाव इनाम दिला.

या पंथाला कालामुख हे नाव पडण्याचे कारण, हे लोक आपल्या मुखावर तीन काळ्या रेषा काढीत हे होय. रामानुजाने आपल्या श्रीभाष्यात त्यांना महाव्रतधर व लगुडधर असे म्हटले आहे (२. २–३६). महाव्रत हे वास्तविक कापालिकांचे व्रत आहे. ते कालामुखांना का लागू केले ते मात्र समजत नाही. कालामुखांनी लकुलीशाचे तत्त्वज्ञान स्वीकारले होते, असे अनेक शिलालेखांत म्हटले आहे. कित्येक कालामुखांना लकुलेश्वरपंडित अशीही उपाधी होती. काही कालामुख शैव आगमाना अनुसरणारे होते, असे वर्णन आढळते. कुप्पनूर येथील कोटीश्वराच्या मंदिराचे प्रमुख हे कालामुख असून ते शैव आगमाचे अनुयायी होते. विशिष्ट प्रकारचा धार्मिक संस्कार केल्याने कोणत्याही जातीचा इसम ब्राह्मण होतो, असे कालामुखांचे मत होते.

कालामुखांचे पर्शे, अवली आणि संतली असे पोटभेद होते. त्याच्यात सस्त्रीक (विवाहित) व निस्त्रीक (नैष्ठिक ब्रह्मचारी) असे दोन्ही प्रकारचे लोक असत. निस्त्रीकांचा दर्जा श्रेष्ठ समजत. शक्ती, शिव, आभरण यापैकी एखादी उपाधी ते आपल्या नावापुढे लावीत. उदा० सर्वेश्वरशक्ती, रुद्रशक्ती, क्रियाशक्ती, इत्यादी. शक्ती ही उपाधी कालामुखपंथाखेरीज अन्य कोणताही पंथ वापरीत नसे. दक्षिणेतील हसन, कदूर, चितळदुर्ग, म्हैसूर, बंगलोर, तुमकुर, कोलार, शिमोगा, हनगल, गदग, श्रीशैल, ही गावे कालामुखांची महत्त्वाची केंद्रे होती. या सर्व भागातील बहुतेक शिवालये कालामुखाच्याच ताब्यात होती. हे लोक दक्षिणेतील अनेक राजांचे राजगुरुही होते.

इ. स. ११ व १२ या दोन शतकात कर्नाटकामध्ये कालामुखांनी फार मोठे शैक्षणिक कार्य केल्याचे इतिहासात नमूद आहे कालामुखांच्या अधिकारात असलेल्या बहुतेक मंदिराना जोडून मठ व पाठशाला असत. बेलगामे येथील मठ व रट्टांच्या कुंडी प्रातातील हुली या गावाचा मठ हे विद्यादानाबद्दल सुप्रसिद्ध होते. चालुक्यांच्या राज्यातही कालामुखांचे अनेक मठ होते. तिथे शैव ब्रह्मचाऱ्याची धार्मिक कृत्ये होत व त्यांना वेदशास्त्रपुराणाचे शिक्षणही मिळे. दक्षिणेतील अनेक राजांनी कालामुखांच्या या मठांना दानपत्रे दिलेली आढळतात. **पाहा**– लकुलीश, पाशुपत, कापालिक. [ य. इं. क.; रि. इं.; प्र. वि. ]

**कालाष्टक** आषाढ वद्य १ दा ते ८ मी पर्यंतचा काळ. या कालात कालभैरवाचे भक्त त्याची पूजा व उपवास करतात आणि आठ ब्राह्मणाना भोजन घालतात. **पाहा** – कालाष्टमीव्रत.

**कालाष्टमी** कृष्णपक्षातील अष्टमीचे नाव. ही शैवव्रतोत्सवासाठी अपराह्णव्यापिनी ( सूर्योदयानंतर १८ घटिकांपासून २४ घटिकापर्यंतचा काल) घेतात. नवमीयुक्त असल्यास प्रशस्त होय.

**कालाष्टमीव्रत** एक शैव व्रत. आश्विन कृ. ८ मीस हे व्रत विहित आहे. कार्तिक कृ. व भाद्र. कृ. ८ मी

या तिथीही व्रताला उक्त सांगितल्या आहेत व्रततिथीस दिवसभर उपवास व रात्रौ चंद्रोदय झाल्यावर भितीवर शेंदुराचा शिव आणि चंद्र काढून त्यांची पूजा. या पूजेत आठ दिवे लावतात. आठ पात्रांत वडे, पुऱ्या, पायस, इ. खाद्यवस्तू ठेवून त्यांचा नैवेद्य दाखवितात. ही पूजा कालभैरव–शिवाची असते. पूजेचा ध्यानमंत्र पुढीलप्रमाणे–

**अष्टकाल महाकालं भैरवाष्टगणान्वितम् ।**
**चन्द्रमासहितं शुक्लं मृत्युञ्जय नमोऽस्तु ते ।।**

अर्थ– अष्टकाल, महाकाल, आठ भैरव व चंद्रमा यांनी युक्त व शुक्ल अशा मृत्युञ्जया, तुला नमस्कार असो.

## कालिकंब

द. भारतातील त्रेसष्ट नायन्मारांपैकी एक. पेन्नागडम् येथील एका सधन व्यापाऱ्याच्या कुलात याचा जन्म झाला. ईश्वरभक्ती आणि अतिथिसेवा यांत त्याचा सारा वेळ जात असे. याच्याविषयी पुढील कथा सांगतात–

एकदा त्याने कामावरून काढून टाकलेला एक नोकर साधुवेषाने येऊन त्याच्याकडून सेवा घेऊ लागला. हे लक्षात येताच कालिकंबाच्या पत्नीने त्याच्या पायांवर पाणी घालण्यात खड पाडला. त्यामुळे कालिकंब फार चिडला. त्याने तात्काळ पत्नीचा शिरच्छेद केला व अतिथिसेवा पुढे चालू केली. यथाकाल या भक्ताचा उद्धार झाला. [ पे. पु. ]

## कालिकापुराण

एक उपपुराण. इ. स. च्या १० व्या शतकात हे निर्माण झाले, असे मानतात. यात ९३ अध्याय असून श्लोकसंख्या ९००० आहे. गिरिजा, देवी, काली, भद्रकाली, महामाया, इ. रूपे धारण करणाऱ्या शिवपत्नी अंबिकेची उपासना हा या पुराणाचा मुख्य प्रतिपाद्य विषय आहे.

कालिकापुराणाचे दोन खंड आहेत. शिव-पार्वतीविवाह, कामदेवाचा जन्म, दक्षयज्ञ, सतीचा मृत्यू, क्षिप्रा नदीचा उगम, वराह आणि शरभ यांचे युद्ध, त्यांनी कामरूपादेवीच्या दर्शनार्थ केलेले तीर्थाटन इ. कथा प्रथम खंडात आहेत.

दुसऱ्या खंडात विविध दैवतांची उपासना, त्यांची स्थाने, पीठस्थानांची उत्पत्ती, कामाख्या, पार्वती, त्रिपुरा, ताम्रेश्वरी, उग्रतारा या देवतांच्या प्रादेशिक व स्थानिक उपासना, इ. गोष्टींची तपशिलवार माहिती दिली आहे. कामरूपातील पर्वत व नद्या, कामाक्षीचे स्थान व शाक्त पंथातील भिन्न भिन्न संप्रदाय याविषयीही या खंडात बरीच माहिती आहे.

प्रस्तुत पुराणात भिन्न भिन्न मूर्तींचे जे तपशीलवार वर्णन आढळते, ते इतर ग्रंथांतल्या मूर्तिकलेच्या माहितीहून पुष्कळच निराळे आहे. त्यावरून असे वाटते, की कालिकापुराणातल्या देवतांना कालांतराने प्रादेशिक स्वरूप प्राप्त झाले असावे आणि कालिकापुराणाच्या कर्त्याने ते तिथल्या उपासनेच्या विशिष्ट संप्रदायासह तपशीलवार ग्रथित केले असावे.

कालिकापुराणातली मुख्य देवता म्हणजे महामाया किंवा अंबिका होय. ती मूलमूर्ती असून इतर सर्व देवता म्हणजे तिची विविध रूपे होत. ती चिरयौवना, सर्वावयवसुंदरी व कोटिसूर्यप्रभेइतकी तेजस्विनी आहे.

कालिकापुराणात देवीच्या शरदृतूतील पूजोत्सवाची (नवरात्र) माहिती विस्तृत रीतीने दिलेली आहे. पूर्वी तिला अनेक पशूंचे बलिदान करीत व क्वचित प्रसंगी नरबलीही देत. महाष्टमीच्या आणि नवमीच्या दिवशीही देवीची यथासांग पूजा करीत. दशमीच्या दिवशी देवीचे विसर्जन होत असे. त्या वेळच्या उत्सवाला शाबरोत्सव असे नाव असे. त्यात अश्लीलता आणि उच्छृंखलता यांचाही बराच भाग असे. त्याचे कालिकापुराणातले वर्णन असे–

देवीचे विसर्जन आटोपून परत आल्यावर पुरुषानी वेश्या, नर्तकी, इ. स्त्रियांशी रममाण व्हावे. त्या रतिक्रीडेला शंख, मृदंग, पटह या वाद्यांची साथ असावी. त्यावेळी नाना प्रकारचे झेंडे उभारावे. जमिनीवर फुले आणि लाह्या यांचा सडा टाकावा. प्रियाराधनयुक्त व कामोद्दीपक खेळ खेळावे. एकमेकांवर धूळ आणि चिखल उडवावा आणि स्त्री-पुरुषांच्या जननेंद्रियांची नावे घेऊन धांगडधिंगा घालावा.

कालिकापुराणात सरस्वतीची ६४ रूपे सांगितली आहेत. त्रिपुराभैरवीच्या श्वेतरूपाला सरस्वतीची मुद्रा म्हटले आहे. वृद्धासरस्वती म्हणून जिचा उल्लेख झाला आहे, ती एक तांत्रिक देवता आहे.

कालिकापुराणातील विविध देवीच्या पूजाविधानात मंत्र, तंत्र आणि मुद्रा यांना बरेच महत्त्व आहे. तिथे ५३ मुद्रांचे तपशीलवार वर्णन दिलेले आहे. विविध देवतांची पूजा त्याच्या विशिष्ट मुद्रांना धरून करायची असते व मुद्रेची जोड न मिळाल्यास ती पूजा निष्फळ होते, असे सांगितले आहे. नृत्य-वाद्य हाही पूजेचा अभिन्न भाग असतो. मध्ययुगात आसाममध्ये देवीच्या पूजोत्सवात स्त्रिया आणि देवदासी नृत्य करीत, अशी माहिती आढळते. [ बी. के. बरुआ– पी. के. गो. को. ]

## कालिकाव्रत

एक स्त्रीव्रत. हे अमावास्येच्या दिवशी करतात. अपराह्णकाली केळीच्या गाभ्याचे मखर करून त्यात कालिकेची स्थापना करतात. या व्रतात देवीची पूजा व

सुवासिनीला भोजन या गोष्टी मुख्य असतात. या व्रताची कथा अशी–

एके दिवशी इंद्राने अवघ्राण केलेले पारिजातकाचे फूल ब्राह्मणाला दिले. त्यामुळे ब्राह्मण संतापला. त्याने इंद्राला शाप दिला, की 'तू बारा वर्षे एका व्याधाच्या घरी बोका होऊन राहशील.' तो शाप लगेच फळाला आला. सर्व देव घाबरले. शची त्या ब्राह्मणाला शरण गेली. ब्राह्मणाने तिला कालिकाव्रत सांगितले. शचीने ते केले. कालिका तिला प्रसन्न झाली. शचीने तिच्याकडे आपल्या पतीबद्दल मागणे मागितले. कालिकेने इंद्राला मार्जाररूपातून मुक्त करून स्वर्गाला पाठविले (भविष्य पुराण ).

## कालिकोपनिषद्

हे उपनिषद आथर्वणातील सौभाग्यकांडांतर्गत आहे. यात श्रीचक्राच्या पूजेचे विधान सांगितले आहे, ते असे–

प्रथम कालिकेचे ध्यान. तीन, पाच किंवा नऊ कोणांनी युक्त अशा कमळावर देवीची स्थापना. नंतर पंचमकारांनी पूजा व भगोदकाने तर्पण. अशी पूजा करणारा पुरुष स्त्रियांचा आवडता होतो, असे तिथे म्हटले आहे. मूलाधारातील तेजस्वी अशा त्रिकोणात विद्युल्लेखेसारखी एक पिवळी ज्योत आहे, त्या ज्योतीच्या मध्यभागी परमात्मा राहतो, ब्रह्मादी देव वगैरे सर्व काही तोच आहे, अशा रीतीने त्याचे ध्यान केले असता साधक पापमुक्त होतो, असे तिथे सांगितले आहे.

शाक्त व शांभव या दोन्ही पंथाना धरून या ठिकाणी कालिकेचे वर्णन केले असून कुंडलिनी व कालिका एकरूपच असल्याचे सांगितले आहे. शेवटी कालिकामंत्र तंत्रशुद्ध पद्धतीने जपला असता पांडित्य, कवित्व व चतुर्विध पुरुषार्थ प्राप्त होतात, अशी फलश्रुतीही सांगितली आहे. [ सी. ग. देसाई ]

## कालिंगी

तमिळनाडमधील एक जात. आंध्रातही हे लोक आढळतात. कालिंगी म्हणजे कलिंगपुरस्थ, असा अर्थ केल्यास ते मूळ आंध्रातले असावे व तिथून बाहेर पसरले असावे, असे वाटते. हे लोक ओडिया व तेलुगू या भाषा बोलतात. या जातीत बहिष्कृतांची एक पोटजात आहे. तिला पंडिरी असे म्हणतात. कालिंगी हे शेतकरी आहेत. ते ज्या खेड्यात राहतात, तिथले उपाध्येपणही तेच करतात. यांच्यांत देवके आहेत. हे राधाकृष्ण व चैतन्य यांचे उपासक आहेत. नायडू, नायारलू, चौधरी, बिसोई, नायकू, इ. त्यांची आडनावे आहेत. यांच्या बायका कोपरापर्यंत बांगड्या घालतात. यांच्यांत मोहिरी–कालिंगी हा एकच पोटभेद आहे. या पोटभेदाचे लोक ओडिसात राहतात. कालिंगीच्या मुख्य पुढाऱ्याला संतो व दुय्यम पुढाऱ्याला पात्रो म्हणतात. याची जातपंचायत असते.

**विवाहप्रथा**– हे लोक पूर्वी वयात येण्याआधीच मुलींची लग्ने करीत. एखाद्या अविवाहिताला विधवेचे पाणिग्रहण कर्तव्य असेल, तर त्याला सोडो नामक झाडाशी प्रथम लग्न करावे लागते. याची लग्नपद्धती ओडिया लोकांसारखी आहे.

**मर्तिकप्रथा**– मृताच्या चितेतून एक हाड घेऊन ते पिंपळाखाली पुरतात. दहा दिवस त्यावर पाणी शिंपतात. दहाव्या दिवशी 'जोला जोला हंडी' नावाचा एक धार्मिक विधी करतात. [ का. ट्रा. स. इं.; म. ज्ञा. को. ]

## कालिजाइ संप्रदाय

ओडिसामधील कालिजाइ या जलदेवतेच्या भक्तांचा संप्रदाय. ओडिसातल्या चिल्का सरोवराची ही रक्षक देवता आहे. बालुगाव खेड्यापासून आठ मैलांवर हे तळे असून त्या तळ्यातील एका बेटावर हिचे मंदिर आहे. हिचे प्रतीक म्हणून तेल–शेंदुर फासलेला एक ओबड धोबड दगड ठेवलेला आहे. त्यावर काचेच्या बांगड्या, कवड्या, पैसे अशा वस्तू चिकटवलेल्या असतात.

या देवीला कालीचा अवतार मानतात. तेलुगू व उरिया जातीचे कोळी व नावाडी हे या देवीचे भक्त असतात. हिच्या पूजेला ब्राह्मण पुजाऱ्याची आवश्यकता नसते. ही देवी ज्याच्यावर कोपते, त्याचा नाश करते, तळ्यात वादळ उठवून होड्या बुडवते, प्रसन्न होईल त्याला तारते, पुत्रसंतान देते व भक्तांना रोगमुक्त करते, अशी या लोकांची श्रद्धा आहे. हिला कोंबडे, बकरी व मेंढे बळी देतात. पण त्यांचा वध न करता त्यांना बेटावर मोकळे सोडून देतात. भुतांना पळवून लावण्यासाठी देवीच्या अंगाला बांगड्या चिकटवितात. [ क. ले. गॉ. ओ. ]

## कालिदास

संस्कृत भाषेचा एक महाकवी व नाटककार. कालिदासाने स्वतःविषयी आपल्या ग्रंथांत कुठेच माहिती दिलेली नाही. त्याचे विश्वसनीय चरित्रही उपलब्ध नाही. त्यामुळे त्याच्या स्थलकालाविषयी विद्वानांत मतभेद निर्माण झाले आहेत. चिं. वि. वैद्य, प्रा. आपटे, शारदारंजन राय, इ. विद्वानांनी प्राचीन परंपरेला अनुसरून कालिदास ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकात होऊन गेला, असे मानले आहे. ते मानतात, की शकारी विक्रमादित्याच्या पदरी असलेल्या नवरत्नांपैकी तो एक होता. या विक्रमादित्याने सनपूर्व ५७ मध्ये आपल्या नावाचा विक्रमसंवत सुरू केला. उज्जयिनी ही त्याची राजधानी असून कालिदासाचे वास्तव्यही याच नगरीत होते. पण डॉ. भांडारकर, मिराशी, इ. पंडितांच्या मते कालिदास हा गुप्त

घराण्यातील द्वितीय चंद्रगुप्त विक्रमादित्य याच्या आश्रयाला होता. या विक्रमादित्याने इ. स. ३८० ते ४१३ या कालखंडात राज्य केले. म्हणून कालिदास चवथ्या शतकाच्या शेवटी व पाचव्या शतकाच्या आरंभी झाला असला पाहिजे, असे ते म्हणतात.

कालिदासाच्या कालाप्रमाणेच त्याच्या स्थलाबाबतही विद्वानात मतैक्य नाही. बंगाल, ओडिशा, मध्यप्रदेश व काश्मीर या चारी प्रदेशातले लोक आपापल्या भागात त्याचे वास्तव्य सागतात. पण मध्यप्रदेश किवा काश्मीर या दोनच प्रदेशात त्याचे वसतिस्थान असण्याचा सभव आहे. ऋतुसंहारातले वर्णन विशेषत मध्यप्रदेशातील ऋतूंशीच जुळणारे आहे. मेघदूतात मेघाला मार्ग सागण्याच्या मिषाने त्याने मध्यप्रदेशातील अनेक स्थळाचे व उज्जयिनीचे आत्मीयतेने वर्णन केले आहे. त्यावरून विद्वानांनी उज्जयिनी हेच कालिदासाचे वास्तव्यस्थान मानले आहे.

कालिदासाला हिमालयाचेही बरेच आकर्षण दिसते कुमारसंभवाचे सर्व कथानक व मेघदूताचा उत्तरार्ध हिमालयाशी संबद्ध आहे. रघुवश, शाकुंतल व विक्रमोर्वशीय यातही अनेक ठिकाणी हिमालयाचा संबंध आलेला आहे. म्हणून काही पडित त्याला काश्मीरचा निवासी मानतात. कालिदासाचा जन्म कदाचित पहाडी प्रदेशात झाला असावा व पुढे तो मध्यप्रदेशात येऊन स्थायिक झाला असावा, अशी उभयपक्षी त्यावर तोड सांगता येईल. मध्यप्रदेशात त्याचे वास्तव्य दीर्घकाल झाले असले पाहिजे, एवढे मात्र खरे.

कालिदासाच्या वैयक्तिक जीवनाबद्दलची माहिती अनुमानांच्या आधारेच मिळवावी लागते. त्याचा जीवनवृत्तांत, त्याचे कवित्व, चातुर्य व औदार्य यांबद्दल बऱ्याच दंतकथा प्रचलित असून, त्यांपैकी काही भोजप्रबंधात समाविष्ट केलेल्या आहेत. त्यांपैकी एक दंतकथा पुढीलप्रमाणे—

कालिदास हा ब्राह्मणाचा मुलगा. तो सुरूप, सुदृढ आणि बुद्धिमान होता. लहानपणीच आईबाप निवर्तल्यामुळे एका गवळ्याने त्याचे पालनपोषण केले. त्यामुळे त्याच्यावर विद्येचे संस्कार झाले नाहीत. जवळच्या नगरीतील एका राजकन्येचे लग्न तेथील प्रधानाने कपट करून त्या देखण्या पण विद्याविहीन मुलाशी लावून दिले. पुढे त्या राजकन्येने आपल्या मूर्ख पतीची निर्भर्त्सना करून त्याला काली देवीची उपासना करण्यास पाठविले. कालीच्या उपासनेमुळे त्याला कवित्व, विद्वत्त्व व कालिदास हे नाव मिळाले. तो परत आल्यावर पत्नीने त्याला विचारले. ' अस्ति कश्चिद् वाग्विशेष:? '= तुझ्या वाणीत काही विशेष गुण आले का? त्यासरशी त्याने ' अस्त्युत्तरस्यां दिशी देवतात्मा ' या आरंभाचे कुमारसंभव, ' कश्चित्कान्ताविरहगुरुणा ' या आरंभाचे मेघदूत आणि ' वागर्थाविव संपृक्तौ ' या आरंभाचे रघुवंश अशी तीन काव्ये उत्तरादाखल घडाघडा म्हणून दाखविली. पुढे तो आपल्या बुद्धिवैभवाचे निमित्त झालेल्या आपल्या पत्नीशी मातृभावनेनेच वागू लागला. त्यामुळे चिडून जाऊन तिने त्याला शाप दिला, की ' एका स्त्रीच्या हातूनच तुला मृत्यू येईल. '

यानंतर कालिदास स्वैरपणे वागू लागला. एकदा कुमारदास नावाच्या आपल्या मित्राला भेटण्यासाठी तो सिहलद्वीपात गेला असता तिथल्या एका गणिकेकडून त्याला समजले, की 'कमले कमलोत्पत्ति: श्रूयते न तु दृश्यते' = एका कमलावरच दुसऱ्या कमलाची उत्पत्ति होते, असे ऐकले आहे; पण कधी पाहिले नाही, या श्लोकार्धाची पूर्ती करणाऱ्याला राजाने मोठे बक्षीस जाहीर केले आहे. कालिदासाने लगेच पुढील श्लोकार्ध रचून ती समस्यापूर्ती केली—' बाले तव मुखाम्भोजात् कथमिन्दीवरद्वयम् ' = तुझ्या मुखकमलावर दोन (नेत्ररूपी) निळी कमळे दिसतात हे कसे ? त्यावर ती गणिका आश्चर्यचकित झाली. समस्यापूर्तीचे बक्षिस आपल्यालाच मिळावे म्हणून तिने कालिदासाचा खून करविला. पण तो गुन्हा उघडकीस आला. कुमारदासाला हे समजताच मित्रप्रेमामुळे त्याने कालिदासाच्या चितेवर स्वत:ला जाळून घेतले.

ऐतिहासिकदृष्टचा वरील आख्यायिकेत काही तथ्य नाही. त्यामुळे विश्वसनीय आख्यायिकांच्या अभावी, कालिदासाच्या ग्रंथांवरून त्याच्यासंबंधी माहिती गोळा करावी लागते. कारण प्रत्येक ग्रंथकाराच्या विद्वत्तेचे, मतांचे व स्वभावाचे प्रतिबिब त्याच्या ग्रंथात पडत असते, हे तत्त्व आता सर्वमान्य झालेले आहे. तदनुसार त्याच्या वाङ्मयातील उल्लेखांवरून त्याच्या चरित्राविषयी पुढील अनुमाने निघू शकतात.

कालिदासाचा जन्म ब्राह्मण कुळात झाला होता. तो माळव्यातील उज्जयिनी नगरीत राहत असे. तो राजकवी असून शिवभक्त होता. त्याचे शिक्षण त्या काळच्या एखाद्या गुरुकुलात झाले असावे. श्रुती, स्मृती, इतिहास, पुराणे, सांख्य, योग, वेदान्त, ज्योति:शास्त्र, कामशास्त्र, वैद्यक, व्याकरण, अर्थशास्त्र, सगीत, चित्रकला, इ. शास्त्रांचा आणि कलांचा त्याला उत्तम परिचय होता. युद्धे, संधि-विग्रह, राजशासन, राजदरबार व श्रीमंत लोक याची त्याला सूक्ष्म माहिती होती. विद्या व विद्यागुरू याच्याबद्दल त्याला नितांत आदर होता. त्याच्या नैसर्गिक प्रतिभेला शास्त्राभ्यासाची, कलापरिचयाची व सूक्ष्म अवलोकनाची जोड मिळाली होती. त्याची वृत्ती त्यातल्या त्यात शृंगारात रमत असे, हे खरे असले, तरी तो

स्वैराचारी नसावा. सर्वोपकारक्षम गृहस्थाश्रम व एकनिष्ठ पत्नीप्रेम यांचा त्याने अनेक ठिकाणी गौरव केला आहे. तो मोठा विनोदी, विनयसंपन्न, निरलस आणि वत्सल असावा. त्याचे आयुष्य थोर लोकांच्या सहवासात आणि संपन्न अवस्थेत गेल्यामुळे दीन, दरिद्री आणि दुर्बल अशा लोकाचा त्याने आपल्या काव्यांत आत्मीयतेने विचार केला नाही. एकूण जीवनातील सर्व सुखांचा, कीर्तीचा व आयुरारोग्याचा त्याने पूर्ण उपभोग घेतला असावा, असे दिसते.

भावकवी, महाकवी व नाटककार या तीनही भूमिका कालिदासाने सारख्याच यशस्वितेने वठविल्या आहेत. ऋतुसंहार हे निसर्गवर्णनपर काव्य, मेघदूत हे खंडकाव्य, कुमारसंभव व रघुवंश ही दोन महाकाव्ये आणि मालविकाग्निमित्र, विक्रमोर्वशीय व शाकुंतल ही नाटके या त्याच्या कलाकृती प्रसिद्ध आहेत.

कालिदासाच्या सर्व काव्यात ऋतुसंहार हे जरा कमी प्रतीचे मानले जाते. त्याचे सहा सर्ग असून प्रत्येक सर्गात सोळापासून अठ्ठावीसपर्यंत श्लोक आहेत. त्यात ग्रीष्मऋतू प्रथम धरून पुढे क्रमाने सहा ऋतूचे वर्णन केलेले आहे. प्रत्येक ऋतुवर्णनात त्या ऋतूचा वृक्षवेलींवर व पशुपक्ष्यावर होणारा परिणाम व ऋतुपरत्वे कामिजनाच्या चित्तवृत्तीत होणारा बदल या गोष्टी त्याने उत्तम प्रकारे दाखविल्या आहेत.

**नितम्बबिम्बैः सदुकूलमेखलैः**
**स्तनैः सहाराभरणैः सचन्दनैः ।।**
**शिरोरुहैः स्नानकषायवासितैः**
**स्त्रियो निदाघं शमयन्ति कामिनाम् ।।**

(ऋतुसंहार १·४)

अर्थ – (हे प्रिये, या ग्रीष्मऋतूत ) रमणी स्त्रिया सुदर रेशमी कपडे लेवून, नितंबावर मेखला बांधून, चंदन लावलेल्या स्तनांवर पुष्पमालांचे अलंकार धारण करून व उटण्यांनी आपले केशकलाप सुवासित करून प्रेमीजनांचा ग्रीष्मदाह शमन करतात.

कालिदासाने आपल्या काव्यलेखनाचा प्रारंभ ऋतुसंहारापासून केला, असे समजतात. परंतु हे काव्य कालिदासाचेच आहे किवा काय, याबद्दल टीकाकारांत मतभेद आहेत. कारण यात कालिदासाच्या कमनीय शैलीचा किंवा वाग्वैदग्ध्याचा प्रत्यय येत नाही, असे त्यांचे म्हणणे आहे.

कुमारसंभव हे काव्य निःसंशय कालिदासाचेच आहे. यात कवीने कुमार कार्तिकेयाच्या जन्मवर्णनाचा संकल्प केला होता. परंतु हे महाकाव्य त्याच्या हातून अपुरेच राहिले. याच्या सतरा सर्गांपैकी आठच सर्ग कालिदासाने लिहिलेले असून बाकीचे अन्य कोण्या तरी कवीने रचले आहेत. आलंकारिकांनी या पहिल्या आठ सर्गांतूनच आपल्या ग्रंथांसाठी उदाहरणे घेतली आहेत. पहिल्या आठ सर्गांत विषयाच्या दृष्टीने पूर्ण एकात्मता आहे. प्रारंभीचे हिमालयाचे वर्णन, तिसऱ्या सर्गातील अकाली आलेल्या वसंताच्या वनश्रीचे वर्णन, चौथ्या सर्गातील रतिविलाप, पाचव्यातील बटुवेषधारी शंकर व तपस्विनी गौरी याचे संभाषण, हे सारे प्रसंग अप्रतिम आहेत. त्याचप्रमाणे पाचव्या सर्गातील पार्वतीच्या कठोर तपश्चर्येचे व तिसऱ्या सर्गातील शिवाच्या समाधीचे वर्णनही जितके ओजस्वी, तितकेच उदात्त आहे.

मेघदूत हे खंडकाव्य म्हणजे कालिदासाच्या अनुपम प्रतिभेचा विलासच होय. वियोगिनी कांतेला यक्षाने मेघाच्या द्वारा प्रणयसंदेश पाठविणे, ही कल्पनाच अभिनव आहे. हे खंडकाव्य अत्यंत लोकप्रिय असून त्याच्यावर सुमारे पन्नास टीका लिहिल्या गेल्या आहेत. तिबेटी व सिंहली या भाषांतही याचे अनुवाद झाले आहेत. सस्कृत वाङमयात मेघदूताला आदर्श मानून संदेशकाव्यांची एक परपराच पुढे सुरू झाली. पूर्वमेघात कवीने रामगिरीपासून अलकानगरीपर्यंतचा मार्ग वर्णिताना उत्तर भारताच्या नैसर्गिक सौंदर्याचे नितांत रमणीय वर्णन केले आहे. चर्मण्वती नदीचे वर्णन करताना यक्ष मेघाला म्हणतो—

**त्वय्यादातुं जलमवनते शार्ङ्गिणो वर्णचौरे**
**तस्याः सिन्धोः पृथुमपि तनुं दूरभावात् प्रवाहम् ।**
**प्रेक्षिष्यन्ते गगनगतयो नूनमावर्ज्य दृष्टी-**
**रेकं मुक्तागुणमिव भुवः स्थूलमध्येन्द्रनीलम् ।।**

(मेघ. ४८)

अर्थ — नदीचा प्रवाह मोठा आहे, तरी आकाशातून पाहणाऱ्यांना तो अरुद दिसतो. त्यामुळे कृष्णाच्या वर्णाची चोरी करणारा (सावळा) तू (मेघ) त्या नदीचे जल प्राशन करण्याकरिता वाकलास, की गगनसचारी लोकांची दृष्टी तुझ्याकडे आकर्षित होईल व मध्ये इंद्रनील मणी गुंफलेला भूमीच्या गळ्यातला एक सरच जणू आपण पाहतो आहो, असे त्याना वाटेल.

पुढे तो यक्ष आपली पत्नी कशी ओळखायची ते मेघाला सांगतो—

**तां जानीथाः परिमितकथां जीवितं मे द्वितीयं ।**
**दूरीभूते मयि सहचरे चक्रवाकीमिवैकाम् ।**
**गाढोत्कण्ठां गुरुषु दिवसेष्वेषु गच्छत्सु बालां ।**
**जातां मन्ये शिशिरमथितां पद्मिनीं वान्यरूपाम् ।।**

(उ. मेघ. २३)

अर्थ– जिने बोलणे मर्यादित केले आहे, जी माझा जणू दुसरा प्राणच आहे, मी तिचा सहचर (शापामुळे) दूर झाल्यामुळे जी चक्रवाकीप्रमाणे एकटी पडली आहे आणि सांप्रतच्या मोठ्या दिवसात जिची उत्कंठा गंभीर झाली आहे, अशी ती बाला शिशिर ऋतूने झोडपलेल्या कमलिनीप्रमाणे काही तरी वेगळीच झाली असेल, असे मला वाटते. (अशी ती बाला ही माझी प्रिया आहे, हे तू जाण.)

भारतीय टीकाकारांनी रघुवंश हे कालिदासाचे सर्वोत्कृष्ट महाकाव्य मानले आहे. या काव्यामुळेच त्याला 'कविकुलगुरू' अशी उपाधी लाभली असली तरी टीकाकार त्याला 'रघुकार' म्हणणेच अधिक पसंत करतात. 'क इह रघुकारे न रमते' = रघुकार कालिदासाच्या ठिकाणी कोण बरे रमणार नाही ? अशी त्याविषयी उक्ती आहे. त्यावरून या काव्याची लोकप्रियता ध्यानी येते. रघुवंशात नायक अनेक असले, तरी त्या एकोणीस सर्गांच्या महाकाव्यातला एकसूत्रीपणा कोठेही ढळलेला नाही. त्यातला नव-रसांचा परिपोष पाहून 'उदयसुदरी'कार सोड्ढलाने कालिदासाला रसेश्वर अशी पदवी दिली आहे.

'उपमा कालिदासस्य' अशी एक उक्ती आहे. कालिदास हा खरोखरीच उपमासम्राट होता. त्याच्या उपमेत विविधता, रम्यता व मार्मिकता हे तीन गुण तर असतातच; शिवाय ती ध्वनिवाहक आणि रसाला उपकारकही असते. उदा० शकुंतलेला दिलेली पुढील उपमा पाहा–

**कास्विदवगुण्ठनवती नातिपरिस्फुटशरीरलावण्या ।**
**मध्ये तपोधनानां किसलयमिव पाण्डुपत्राणाम् ।।**

(अभिज्ञान शाकुन्तल ५.१३)

अर्थ – ( दरबारात पुढे आलेल्या शकुंतलेस पाहून दुष्यंत म्हणतो.) पांढऱ्या पानांच्या मध्ये असलेल्या कोमल पालवी–प्रमाणे तपोधन ऋषींच्या मध्यभागी उभी असलेली व जिचे शरीरलावण्य अतिपरिस्फुट झालेले नाही, अशी ही अवगुंठन धारण करणारी स्त्री कोण बरे असेल?

उपमेयाला सुंदर बनविण्याची त्याची किमया किती अपूर्व आहे, ते इंदुमतीला दिलेल्या दीपशिखा या उपमेवरून ध्यानी येईल–

**संचारिणी दीपशिखेव रात्रौ**
**यं यं व्यतीयाय पतिंवरा सा ।**
**नरेन्द्रमार्गाट्ट इव प्रपेदे**
**विवर्णभावं स स भूमिपालः ।।**

(रघु. ६.६७)

अर्थ – रात्रौ फिरणाऱ्या दीपज्योतीप्रमाणे ती पतीची निवड करण्यास निघालेली इंदुमती ज्या ज्या राजाला टाकून पुढे गेली, तो तो राजा राजरस्त्यावरील महालाप्रमाणे काळाठिक्कार पडला.

या उपमेतील अप्रतिम सौंदर्यामुळे रसिकांनी कालिदासाला 'दीपशिखा कालिदास' अशी नवी पदवी दिली आहे.

कालिदासाच्या दीर्घकालीन सांसारिक अनुभवाचा व व्यवहारनैपुण्याचा परिचय त्याच्या नाटकांवरून होतो. त्याच्या नाटकामध्ये मानवी हृदयात निरनिराळ्या वेळी उत्पन्न होणाऱ्या भाववृत्तीचा रमणीय आविष्कार केलेला आहे. तीन्ही नाटकांच्या कथावस्तू प्रेमात्मकच असल्या, तरी तीन्ही ठिकाणी त्यांच्या अवस्था मात्र भिन्न आहेत. त्याच्या तीन्ही नाटकात, किंबहुना सर्व सस्कृत नाटचसंभारात त्याचे अभिज्ञानशाकुंतल हे नाटक सर्वश्रेष्ठ मानले गेले आहे.

'काव्येषु नाटकं रम्यं तत्र रम्या शकुन्तला' ही लोकोक्ती सुप्रसिद्ध आहे. शाकुंतलाची कथा सुटसुटीत व शेवटपर्यंत उत्सुकता टिकविणारी असून त्यातला प्रत्येक प्रसंग सहेतुक आहे. या नाटकाचा प्रारंभ शृंगाराने होतो व शेवट शांतरसात होतो. मानवी जीवनातले प्रेमाचे स्थान आणि माहात्म्य कालिदास पुरेपूर जाणतो; पण ते प्रेम वासनाविकारातून मुक्त झालेले, शुद्ध अतएव आत्मिक असावे, असे त्याला वाटते. त्याग व तपस्या यांच्याद्वारेच प्रेमाला शुचित्व आणि दिव्यत्व प्राप्त होते, अशी त्याची धारणा आहे.

कालिदासाने रंगविलेली पात्रे ही त्यांच्या त्याच्या अधिकाराप्रमाणे आदर्शरूप ठरली आहेत. रघुवंशात त्याने अनेक आदर्शभूत राजांचे चित्रण केले आहे. देवा-ब्राह्मणांविषयी आदर, गुरुजनांवर श्रद्धा, प्रजारंजनासाठी शरीरनिरपेक्ष प्रयत्न, कुलाची कीर्ती निष्कलंक राखण्यासाठी कमालीचा त्याग, अशा अनेक लोकोत्तर गुणांनी त्याच्या महाकाव्यातले राजे विभूषित आहेत. स्त्रियांविषयी कालिदासाच्या मनात नितात आदर आहे. सीता, शकुंतला, पार्वती, इ. स्त्रियांची चित्रे रेखाटताना त्याने कमालीचा हळुवारपणा दाखविला आहे. त्याने पुरुष नायकांनाच नव्हे; तर उमा, सीता, शकुंतला या कोमलांगी नायिकांनाही तप करायला लावले आहे. तप, तपोवन आणि त्याग ही जणू त्याची आदर्शत्रयी आहे.

कालिदास हा भारतीय संस्कृतीचा प्रातिनिधिक कवी आहे. त्याच्या काव्यातला समाज श्रुतिस्मृतिप्रतिपादित नियमांना अनुसरणारा आहे. त्यागासाठी धनसंपदा, सत्यासाठी मितभाषण, यशासाठी जिगीषा आणि कुलपरंपरेचे सातत्य टिकविण्यासाठी संतती अपेक्षिणारा, असा तो समाज आहे. या समाजाला त्याने अनेक ठिकाणी दिव्य जीवनाविषयीचे संदेश जाता जाता देऊन ठेवले आहेत. कालिदासाची प्रत्येक कृती त्यागप्रधान प्रेमाची

प्रतिष्ठा सांगणारी आहे. त्याग व तपस्या यांच्याशिवाय कोणतीच गोष्ट उज्ज्वल होऊ शकत नाही, असाच जणू कालिदासाचा संदेश आहे. जीवनाची ध्येयभूत पण कठोर आध्यात्मिकता त्याने काव्याच्या मखरात बसवून आस्वादनीय आणि विलोभनीय केली आहे.

कालिदासाची सूक्ष्म निरीक्षणशक्ती त्याच्या काव्यात जागोजाग प्रत्ययाला येते. निसर्गाचे अवलोकन करून त्यातील मार्मिक अंश ग्रहण करणे, हे त्याचे वैशिष्टय आहे. मानव आणि निसर्ग हे जणू त्याच्या काव्यात एकात्म होऊन पुढे येतात. कालिदासाची प्रतिभा सर्वतोमुखी आहे. त्याची रसाभिव्यंजक शैली साहित्याचार्यांनी आदर्शभूत टरविली असून तिला वैदर्भी रीती असे नाव दिले आहे.

**वैदर्भी कविता स्वयं वृतवती श्रीकालिदासं वरम् ।**

अर्थ– वैदर्भी कवितेने कालिदास या वराला स्वतः होऊन वरले आहे.

त्याच्या काव्यात वाच्यार्थापेक्षा ध्वन्यर्थालाच अधिक महत्त्व प्राप्त झाले आहे. त्याने वापरलेले अर्थान्तरन्यास हे देखील सुटसुटीत; पण मोठा आशय व्यक्त करणारे असतात. उदा.–

**न हीश्वरव्याहृतयः कदाचित् पुष्णन्ति लोके विपरीतमर्थम् ।**

अर्थ– महात्म्यांची वचने कोणत्याही देश-काल-अवस्थेत कधीही विपरीत (मिथ्या) होत नाहीत.

**क्रियाणां खलु धर्म्याणां सत्पत्न्यो मूलकारणम् ।**

अर्थ– धार्मिक क्रियांना पतिव्रता स्त्री ही मुख्य साधन असते.

**प्रतिबध्नाति हि श्रेयः पूज्यपूजाव्यतिक्रमः ।**

अर्थ– पूज्य व्यक्तींच्या पूजेत (श्रेष्ठांना मान देण्यात) जर अतिक्रम झाला, तर तो अतिक्रम करणाऱ्या व्यक्तीच्या कल्याणाला प्रतिबंध करतो.

या आणि अशाच त्याच्या अनेक लोकोत्तर गुणांवर लुब्ध होऊन जयदेवाने कालिदासाला 'कविताकामिनीचा विलास' म्हटले आहे. बाणभट्टाने त्याच्या काव्याला 'मधुरसान्द्रमंजिरी'ची उपमा दिली आहे. राजशेखराने त्याला रससिद्ध सत्कवीच्या अग्रभागी नेऊन बसविले आहे. त्याच्या विषयीचे पुढील सुभाषित तर सुप्रसिद्धच आहे–

**पुरा कवीनां गणनाप्रसङ्गे**
**कनिष्ठिकाधिष्ठितकालिदासः ।**
**अद्यापि तत्तुल्यकवेरभावात्**
**अनामिका सार्थवती बभूव ।।**

अर्थ– पूर्वी कवीच्या गणनाप्रसंगी कनिष्ठिकेवर कालिदासाला अधिष्ठित केले गेले (पण) अद्यापि त्याच्या तोडीचा कवी निर्माण न झाल्याने पुढची अंगुली जी अनामिका ती खऱ्या अर्थाने अनामिकाच ठरली.

हा रससिद्ध कवीश्वर अशा प्रकारे रसिकाच्या हृदयात अजरामर झाला आहे. **पाहा–** रघुवंशकथा, कुमारसंभवकथा. [ कालिदास– मिराशी; सं. सा. इ.; सं. सा. सो. इ.]

**कालिय** द. भारतातील त्रेसष्ट शैव संतांपैकी एक. एकदा आरतीच्या वेळी दिव्यात घालायला तेल नसल्यामुळे हा स्वतःच्या रक्ताने दीप पाजळायला तयार झाला. याला यथाकाल ईश्वरी कृपेचा लाभ झाला. [ पे. पु. ]

**काली** (१) शिवाची पत्नी आदिमाया हिचे उग्र रूप. कालीची व्याख्या प्राणतोषिणी या ग्रंथात पुढीलप्रमाणे दिलेली आहे–

**कालसङ्कलनात् काली सर्वेषामादिरूपिणी ।।**
**कालत्वादादिभूतत्वादाद्या कालीति गीयते ।।**

अर्थ– हे देवी, तू आपल्या ठिकाणी कालाचे संकलन ( एकत्रीकरण ) करतेस. तू सर्वांना आरंभरूप आहेस. कालत्व अर्थात ज्या गुणांचा स्वीकार करून काल उत्पन्न होतो, ते गुण तूच आहेस. कालाचा प्रारंभही तुझ्यापासूनच होतो. म्हणून तुला आद्याकाली असे म्हणतात.

तंत्रालोकात दुसरी व्याख्या आढळते ती अशी –

**काली नाम परा शक्तिः सैव देवस्य गीयते ।**

( ६·७ )

अर्थ– ब्रह्माची नित्य क्रियाशक्तिरूप जी पराशक्ती आहे, तिलाच काली असे म्हणतात. ( निष्क्रिय ब्रह्माचे सक्रिय रूप म्हणजेच काली होय. )

कालीच्या उत्पत्तिकथा पुढीलप्रमाणे आहेत–

चंडमुंडांबरोबर चाललेल्या युद्धात जगदंबेच्या भुवया क्रोधाने चढल्या व त्यातून कालीची उत्पत्ती झाली ( मार्कं.पु. ८७. ५ ).

दारुक नावाचा असुर केवळ स्त्रीवध्य होता. त्याला मारण्यासाठी शंकराने आपल्या कंठातल्या विषातून कालीला उत्पन्न केले ( लिंग पु. ३९.७२ ).

महामायेच्या कुशीतून कालीचा जन्म झाला ( कालिकापुराण ).

देवासुराचे युद्ध झाले. त्यात देवांचा पराभव झाला. देव ब्रह्मा-विष्णु-महेशांना शरण गेले. या त्रिदेवांनी आपले सामर्थ्य तोकडे आहे, असे जाणून महाकालीची प्रार्थना केली. त्यासाठी महाकालीने ज्या बारा देवींची उत्पत्ती केली, त्यातली पहिली देवी म्हणजे काली होय ( बृहन्नीलतंत्र ४२ ).

कालीचे मूर्तिध्यान पुढीलप्रमाणे सांगितले आहे –

**देव्या ध्यानं प्रवक्ष्यामि सर्वदेवोपसेविताम् ।**
**अञ्जनाद्रिनिभां देवीं करालवदनां शिवाम् ।।**
**मुण्डमालावकीर्णांसां मुक्तकेशीं स्मिताननाम् ।**
**महाकालहृदम्भोजे स्थितां पीनपयोधराम् ।।**
**सद्यश्छिन्नशिरःखड्गवराभीतिकराम्बुजाम् ।**

( श्यामारहस्य )

अर्थ–कालीदेवीचे मी ध्यान सांगतो. ती सर्व देवानी सेवित आहे. ती काजळाच्या डोंगरासारखी आहे. तिचे मुख कराल आहे. तिच्या खांद्यावर मुंडमाला असून केस मोकळे आहेत. ओठावर स्मित आहे. ती महाकालाच्या हृत्कमलावर उभी आहे व तिचे स्तन पुष्ट आहेत. नुकतेच तोडलेले नरमुंड व खड्ग तिने धारण केले असून तिचे दोन हात वर व अभय मुद्रेत आहेत.


कालीमूर्ती– बंगाल

पुराणांतरीचे तिचे वर्णन असे –

कृष्णवर्ण व चतुर्भुज. एका हाती तलवार व दुसऱ्या हाती नरमुंड. गळयात नररुंडांचीच माला. कटीला मृत माणसाच्या हातांची बनविलेली मेखला. डोळे लाल, जीभ तोंडातून बाहेर आलेली. मुख व हृदय रक्ताने माखलेले. ती एक पाय शिवाच्या छातीवर ठेवून व दुसरा आपल्या दुसऱ्या मांडीवर ठेवून उभी आहे.

काली ही दशमहाविद्यांपैकी पहिली आहे, म्हणूनच तिला प्रथमाशक्ती किंवा आद्याशक्ती असे म्हणतात. कालीचे दक्षिणकाली, भद्रकाली, गुरुकाली, कामकलाकाली, धनकालिका, सिद्धिकाली, चंडकालिका, इ. नऊ भेद तंत्रवाङ्मयात सांगितले आहेत. कालीचे आध्यात्मिक तत्त्व मंत्रशास्त्रात पुढीलप्रमाणे विशद केलेले आहे–

कालीच्या एका हाती नुकतेच तोडलेले मुंड असून त्यातून रक्तबिंदू ठिबकत आहेत. हे मुंड मोहपुरुषाचे आहे. कालीने महिषासुर मारला, याचा तात्त्विक अर्थ तिने अज्ञान किंवा मोह याचे मस्तक तोडले, असा होतो. विद्या व अविद्या याच्या क्रियांमुळे सृष्टीचा संकोच व विकास होत राहतो. जीवनाचे प्रमुख उद्दिष्ट ब्रह्मप्राप्ती हे ठरलेले आहे. अविद्या ही त्या उद्दिष्टाला बाधक होते. म्हणून साधकांना आत्मदर्शन होण्यासाठी किंवा महानंद प्राप्त होण्यासाठी मोहपुरुषाचा शिरच्छेद होणे आवश्यक असते. शिरातून रक्तबिंदू ठिबकणे हे क्रियाशीलतेचे द्योतक आहे. काली ही स्मशानात नृत्य करते. वासनाविमुक्त अतएव जीवन्मुक्त साधक यांचे हृदय म्हणजेच स्मशान होय. त्या साधकाच्या कर्मबंधाचे प्रतीक म्हणून शवाचे हात तोडून तिने आपल्या कमरेभोवती त्याची मेखला केली आहे. काली हीच वेदान्त्याची निर्विकल्प समाधी, बौद्धाची शून्यता, शाक्त व वैष्णव याची समरसता व जैनांची केवलावस्था होय.

कालीच्या गळयात मुंडमाला आहे. ही शब्दब्रह्माची प्रतीक अशी वर्णमाला होय. कर्पूरादिस्तोत्रात ही कल्पना मांडलेली आहे. निरुत्तरतंत्रात या मालेतली मुंडे ५० असल्याचे सांगितले आहे. कामधेनुतंत्रात काली म्हणते –

**मम कण्ठे स्थितं बीजं पञ्चाशद्वर्णमद्भुतम् ।**

अर्थ – माझ्या गळयात ५० वर्णांच्या रूपाने अद्भुत असे सृष्टीचे बीज आहे.

देवीला ६ पशूंचे बलिदान द्यावे, असे सांगितले आहे–

**सलोमास्थि स्वैरं पललमपि मार्जारमसिते ।**
**परं चोष्ट्रं मेषं नरमहिषयोश्छागमपि वा ।**
**बलिं ते पूजायामपि विरलवक्त्रे वितरताम् ।**
**सतां सिद्धिः सर्वा प्रतिपदमपूर्वा प्रभवति ।।**

( कर्पूरादिस्तोत्र १९ )

अर्थ– हे विरलवक्त्रे काली, केश व अस्थी यांच्यासहित बोका, उंट, मेंढा, मनुष्य, रेडा व बकरा यांच्या मासाचे (तुझ्या) पूजाविधानात बलिदान करणाऱ्या साधकांना पावलोपावली अपूर्व सिद्धी प्राप्त होतात.

यावरची व्याख्या अशी– बोका म्हणजे लोभ, उंट म्हणजे मत्सर, मेंढा म्हणजे मोह, मनुष्य म्हणजे मद, महिष म्हणजे क्रोध व बकरा म्हणजे काम होय. हे मानवी जीवनातले षड्रिपू आहेत. देवीसमोर या पशूंचे बलिदान करायचे याचा अर्थ कालीच्या कृपेने षड्रिपूंचा नाश करायचा, असा आहे.

काली वस्तुतः अरूप आहे; पण गुण व क्रिया याना अनुसरून तिची रूपकल्पना केली जाते ( महानिर्वाण तंत्र ).

जेव्हा ती सृष्टिकर्मात निमग्न असते, तेव्हा ती रजोगुणी व रक्तवर्णी होते, विश्वस्थितीच्या उद्योगात असते, तेव्हा सत्त्वगुणी व गौर असते आणि संहारक्रियेत मग्न असते, तेव्हा तमोगुणी व काळी असते. कृष्णाकालीला तिरस्कारिणीविद्या असेही म्हणतात. या रूपाची कल्पना पुढीलप्रमाणे केलेली आहे–

**नीलं हयं समधिरुह्य पुरः प्रयान्ती ।**
**नीलांशुकाभरणमाल्यविलेपनाढ्या ।।**
**निद्रापुटेन भुवनानि तिरोदधाना ।**
**खड्गायुधा भगवती परिपातु भक्तान् ।।**

( भा. प्र. वि. )

अर्थ – काळ्या घोड्यावर स्वार होऊन अग्रभागी जाणारी, काळे वस्त्र, काळे अलंकार, काळी माला व काळे उटणे धारण करणारी, निद्रापुटाने सृष्टीला झाकणारी व खड्ग धारण करणारी भगवती काली भक्तांचे रक्षण करो

काली ही महाकाल अर्थात शिव याच्या हृदयावर उभी राहून नृत्य करते, हे तिचे वैशिष्टच होय. तिला कालीविलासतंत्रात शवासना किंवा शवारूढा असेही म्हटले आहे. तंत्रमार्गात शव व शिव ही एकाच तत्त्वाची नावे आहेत. निराकार ब्रह्माचे प्रथम साकार रूप म्हणजे शव होय. ते निश्चल असते. जेव्हा त्यात शक्तीचे स्पंदन सुरू होऊन ते सृष्टिरचनेच्या कार्यासाठी सक्रिय होऊन उठते, तेव्हा त्याला शिव म्हणतात. हेच निराळ्या भाषेत सांगायचे, तर शक्तिहीन ब्रह्म हे शव असून शक्तियुक्त ब्रह्म हे शिव होय. शिवामधला इकार हा शक्तिवाचकच आहे. महाशक्तीच्या क्रीडेला आधार झाल्याकारणाने त्यालाच शवासन असे म्हणतात. 'हसौः' हे शवबीज किंवा प्रेतबीज आहे. हेच प्रेत सृष्टिरचनेच्या काळी पद्मरूप ग्रहण करते व महामाया कालीचे आसन अथवा क्रीडास्थल बनते.



शवारूढा कालीमूर्ती – नेपाळ

यालाच कालीचे महाप्रेतपद्मासन म्हणतात. हाच आशय खालील श्लोकार्धात सांगितला आहे –

**प्रेतस्थां च महामायां रक्तपद्मासनस्थिताम् ।**

(कालीविलासतंत्र)

**कालीपूजा–** कालीपूजेचे वर्णन कालीतंत्र, श्यामारहस्य, बृहन्नीलतंत्र, देवीभागवत, कालिकापुराण, इ. ग्रथांत सविस्तर आढळते. या पूजेत सुरा ही अत्यावश्यक वस्तू मानलेली आहे. मंत्राने शुद्ध करून तिचे सेवन केले जाते. कालीपूजा कालीयंत्रावर करायची असते. हे यंत्र त्रिकोण, पंचकोन किंवा नवकोन करावे, असे कालिकोपनिषदात सांगितले आहे. काही वेळा ते पंधरा कोनाचेही करतात.




कालीयंत्र
(हिंदी विश्वकोशावरून)

कालीपूजा कार्तिक कृष्णपक्षात विशेषेकरून रात्रीच्या वेळी फलप्रद सांगितली आहे. या पूजेत कालीस्तोत्र, कवच, शतनाम व सहस्रनाम यांचा पाठ विहित आहे.

धन्वन्तरीतंत्रशिक्षा या ग्रंथात जपासाठी तिचा मंत्र पुढीलप्रमाणे दिला आहे–

**क्रीं क्रीं क्रीं ह्रीं ह्रीं हूं हूं दक्षिणेकालिके क्रीं क्रीं क्रीं ह्रीं ह्रीं हूं हूं स्वाहा.**

हा बावीस अक्षरी मंत्र आहे. या मंत्रातील निरनिराळ्या बीजानी 'दक्षिणेकालिके' ही पदे संपुटित करून मंत्रजप केल्यास निरनिराळी फळे प्राप्त होतात.

**काली-उपासना –** बंगालमध्ये काली उपासना प्राचीन कालापासून प्रचलित आहे. तिची पूजा विविध प्रसंगी, विविध नावांनी व विविध रूपांनी केली जाते. ही सर्व रूपे उग्रभयकर असून त्यातून तिची विध्वंसक वृत्ती प्रकट होते. कालीच्या उपासनेचा प्रपंच करणारे अनेक ग्रंथ उपलब्ध असून त्यातील पूर्णानंदाचा श्यामारहस्य आणि कृष्णानदाचा तत्रसार हे दोन ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहेत.

दक्षिणकाली हे देवीचे रूप बंगालमध्ये लोकप्रिय आहे. ती मूर्ती चतुर्भुज, कृष्णवर्ण व विकटहास्य करणारी आहे. तिच्या सिद्धकालीरूपात तिने आपल्या खड्गाने चंद्रमंडळाला भोक

पाडले असून त्यातून गळणाऱ्या अमृताने ती न्हाऊन निघत आहे. डाव्या हातातल्या कवटीने ती त्या अमृताचे प्राशनही



महाकाली – दक्षिणेतील धातुमूर्ती

करीत आहे. गुह्यकाली कृष्णवस्त्र नेसून सर्पशय्येवर पहुडली आहे. तिचे डोळे खोल, दात भयानक व जिव्हा लळलळती असून ती मद्यपान करीत आहे. भद्रकाली ही बुभुक्षित, खोल डोळ्यांची, काळ्या दातांची आणि रडणारी आहे. स्मशान-काली ही कृशांगी, भयानक व त्रिनेत्र आहे. शिवाय ती नग्न असून मद्यपानाने धुंद आहे. रक्षाकाली चतुर्भुज असून तिच्या जटाची बट स्वर्गाला स्पर्श करीत आहे. डावा पाय प्रेताच्या छातीवर व उजवा सिंहाच्या पाठीवर अशा अवस्थेत ती उभी आहे. तिच्या गळ्यात सर्पाचा कंठा व कमरेभोवती व्याघ्रचर्म आहे. महाकाली आसनस्थ असून, तिच्या मस्तकाभोवती अग्नि-प्रभावलय असते. तिच्या गळ्यात मुंडमाला आणि हातांत अनेक शस्त्रे असतात.

ज्येष्ठ, आश्विन व माघ या मासाच्या कृष्णचतुर्दशींना बंगालमध्ये कालीपूजा मोठ्या प्रमाणात होते. या तीन तिथीत दिवाळीच्या चतुर्दशीला विशेष महत्त्व आहे. नदियाचा राजा कृष्णचंद्र (१८ वे शतक) याने आपल्या प्रजाजनांना दिवाळीतला काली-उत्सव थाटाने साजरा करण्याची सक्ती केली होती, असे कळते.

माघ वद्य चतुर्दशीच्या पूजेस रटन्तीपूजा म्हणतात. या पूजेत अनेक लहान-मोठ्या विधींचा समावेश आहे.

ज्येष्ठातल्या तिच्या पूजेत विविध फळांचे महत्त्व असते. त्या पूजेला फलहारिणीपूजा असेच म्हणतात. विवाहसमारंभातही कालीची पूजा करण्याचा काही ठिकाणी प्रघात आहे. गावात पटकी आली असता तिची सार्वजनिक पूजा रक्षाकाली व स्मशानकाली या स्वरूपात केली जाते. नवसाची पूजा बहुधा तिच्या मंदिरात जाऊन करतात.

**कालीमंदिर–** कलकत्ता हे एक शक्तिपीठ मानलेले आहे. या ठिकाणी सतीच्या उजव्या पायाची बोटे गळून पडली, असे सांगितले आहे. त्या ठिकाणी कालीचे मंदिर बांधलेले आहे. ही काली कृष्णवर्ण, भयानक, रक्तलांच्छित, सर्पाभरण, मुंड-मालिनी आणि लळलळत्या जिभेची आहे. हे मंदिर काली-घाटावर असून पूर्वी तिथूनच गंगेचे पात्र वाहत होते, असे म्हणतात. साप्रत तिथून एक नाला वाहतो. त्यालाही गंगे-प्रमाणेच पवित्र मानतात. पूर्वीचे कालीमंदिर १५व्या शत-कात झालेल्या भूकंपामुळे नष्ट झाले. पुढे काही वर्षांनी जंगल-गीर नावाच्या एका साधूने ते स्थान शोधून काढून तिथे एक लहानसे लाकडी मंदिर बांधले. साप्रतचे कालीमंदिर ते हेच होय. हे मंदिर लहान आणि चौकोनी आहे. याचे शिखर अगदी वेगळ्या पद्धतीचे आहे. तिथे रत्न-जडित सिंहासनावर कालीचे उग्रचंडी रूप प्रतिष्ठित आहे. या देवीला रोज पशुबली लागतो. या ठिकाणी शाक्त संप्रदायाच्या साधिका अर्थात भैरवी रक्तचंदनाचा टिळा, लावून गळ्यात माला घालून हातात त्रिशूळ घेऊन, शुभ्र वस्त्र नेसून आणि केस मोकळे सोडून देवीच्या स्तोत्रांचे पठण करीत असलेल्या पाहा-यला मिळतात. इथले बलिदानाचे कृत्य पार पाडण्यासाठी कलकत्त्याचे एक लोहारकुल परंपरागत नेमलेले आहे. बलि-पशूचे शिर हे त्याला बिदागी म्हणून मिळते. नवरात्रात या कालीचा मोठा उत्सव होतो.



कालीमंदिर – कालीघाट

हे कालीमंदिर मोठे संपन्न आहे. देवीच्या पुढे दरवर्षी लाखो रुपये जमत असतात. देवीचे अलंकार रत्नजडित आहेत. इथे सदैव यात्रिकांची व भाविकांची गर्दी असते. बंगाली स्त्रियांची या देवीवर विलक्षण भक्ती आहे. मंदिराच्या एका भागात पाकशाला व दुसऱ्या भागात वाद्यशाला आहे.

बल्लाळसेन (११५८–११७०) या बंगाली राजाने सध्याचे काली क्षेत्र तांत्रिक ब्राह्मणांना दान दिले व लक्ष्मीकांत नामक ब्राह्मणाच्या आधिपत्याखाली तिथे कालीची उपासना सुरू झाली, असा इतिहास आहे. आजही या लक्ष्मीकांताचाच वंश हलदार या नावाने कालीच्या देवस्थानाचा अधिकार चालवितो.

द. भारतात कालीअम्म या नावाने हिची पूजा होते. तिकडेही पटकीच्या साथीपासून रक्षण करणारी म्हणूनच हिची प्रसिद्धी आहे. ती फासेपारध्यांची कुलदेवता आहे. गावाच्या सीमेचे रक्षणही तीच करते. हिचे प्रतीक म्हणजे लिबाच्या डहाळ्यानी शृंगारलेला कलश. काही ठिकाणी हे कलश एकावर एक सात असतात. क्वचित ही सीमेची देवता मानली जाते. हिच्या जत्रेत पशुबली देतात. [ चिंताहरण चक्रवर्ती–ऑ. इ. ओ. कॉ.; भा. प्र. वि.; हि. वि. को.; स. भा. प्र. व.; एन्सा. रि. ए. ]

(२) जैन दैवतसमूहातली एक यक्षिणी. (दिगंबरमते वज्रशृंखला). हिचे वर्णन पुढीलप्रमाणे—

**वरदा हंसमारूढा देवता वज्रशृंखला ।**
**नागपाशाक्षसूत्रोरुफलहस्ता चतुर्भुजा ।।**

(प्रतिष्ठासारोद्धार)

अर्थ– वर देणारी, हंसारूढ, चार हातांत नाग, पाश, माला आणि फल धारण करणारी. (श्वेतांबर मते कमलारूढ आणि वरदमुद्रा, नाग, पाश व माला धारण करणारी).

ही यक्षिणी तशीच विद्यादेवीही आहे. वज्रशृंखला या स्वरूपात ती सांखळी धारण करते. ही अभिनंदननाथ या तीर्थंकराची सेविका आहे. [ जै. इ. ]

(३) एक मानसजात मातृदेवता. ही नृसिंहाच्या अस्थींपासून निर्माण झाली (मत्स्य पु. १७८. ६३).

(४) कालंजर पर्वतावरील एक देवता. [ पु. इं. ]

(५) एक नदी. ही उ. प्रदेशातल्या सहाराणपुर जिल्ह्यातून वाहते. ही नेपाळ व सहाराणपुर या दोहोंच्या मध्ये आहे. मत्स्यपुराणात हिचे नाव आले असून त्या नदीवर श्राद्ध करावे, असेही सांगितले आहे (मत्स्य पु. २२. २०). [ हि. ध. ]

**काली कवी** (१९ व्या शतकाची अखेर) झाशी व माणिकपूरच्या दरम्यान असलेल्या उरई गावचा गुजराती ब्राह्मण. सपूर्ण नाव कालीदत्त. हनुमत्पताका, गंगागुणमंजरी, छविरत्न, व रसिक विनोद हे याचे ग्रंथ आहेत.

हनुमत्पताका या ग्रंथात हनुमान सीतेच्या शोधार्थ लंकेत गेला असता एका शिवालयात त्याने मदोदरीला शिवपूजा करताना पाहिले, त्या वेळचे कवीने केलेले वर्णन असे—



**स्वसन धूप, दीपक हसन, सुधानिवेदन बैन ।**
**कर कंजन, नख अक्षतन, पूजे पुजे त्रिनैन ।।**

अर्थ– श्वासाचा धूप, हास्याचा दीप, वाचारूप अमृताचा नैवेद्य, हस्तरूपी कमल, व नखरूप अक्षता यांनी मंदोदरी त्रिनयन शिवाची पूजा करीत आहे.

अशाच प्रकारे त्याने अनेक ऋतुवर्णने व नायिकावर्णने केली आहेत. [ भारती– एप्रिल १९५९ ]

**कालीघाट** काली पाहा.

**कालीबंगाँ** उत्तर राजस्थानातले एक गाव. या ठिकाणी घग्गर नदीच्या तीरावर थोड्याच कालापूर्वी उत्खनन झाले, त्यात एक प्राचीन नगर सापडले आहे. इथे सापडलेल्या अवशेषांवरून इथली घरे व रस्ते व्यवस्थित आखणी करून बांधलेले होते, याचा प्रत्यय येतो. भाजलेल्या विटा, अनेक खोल्या, ठाशीव जमिनी, कौले व कोळशाचे तुकडे वापरून ओलीपासून केलेले जमिनीचे संरक्षण, ही त्या घरांची वैशिष्टचे होती. काही ठिकाणी जमीन भाजक्या विटांची किंवा सपाट त्रिकोणी कौलांची केलेली दिसते. सांडपाण्यासाठी भाजक्या विटाची गटारे बांधलेली दिसतात. या ठिकाणी दोन उंचवटे आढळले आहेत. त्यावरून या शहराचे दोन भाग असावे, असे वाटते. मोठा उंचवटा हा मुख्य नगराचा भाग असावा. तिथे लोकांची साधी घरे असावी. लहान उंचवटा आहे त्या जागी नगररक्षणार्थ बांधलेला किल्ला असावा.

या उत्खननात मातीची भांडी सापडली आहेत. त्या भांड्यांवर लाल रंगाच्या रेघा आहेत. याशिवाय मणी, बांगड्या, आंगठ्या, कर्णभूषणे, इ. अलंकार व विशेषतः मातीची खेळणी सापडली आहेत. या सर्व वस्तूंचे हडप्पा येथे सापडलेल्या वस्तूशी साम्य आहे. हडप्पा व कालीबंगाँ या दोन्ही सिंधुसंस्कृतीच्या लोकांच्या राजधान्या असाव्या, असा अंदाज आहे. येथे सापडलेल्या नाण्यांवर एका बाजूला पशूचे चित्र व दुसऱ्या बाजूला मूठ आहे. कारागिराची अवजारे तांब्याची आहेत. मातीच्या खापरांवरची लिपी उजवीकडून डावीकडे लिहिली जाणारी असावी, असा संशोधकाचा कयास आहे. [ मार्च ऑफ इंडिया– डिसे. १९६१ ]

**कालीमेधादीक्षितोपनिषद** हे उपनिषद आथर्वणातल्या सौभाग्य कांडांतर्गत आहे. यात कालीची मेधादीक्षिता या स्वरूपात उपासना सांगितली आहे. याचा सारांश असा— साधकाने कालीच्या मेधादीक्षिता,

मेधास्पर्शमणी, इ. स्वरूपांशी एकरूप व्हावे. या दीक्षेहून दुसरी श्रेष्ठ दीक्षा नाही. जीवाला षट्‌चक्रभेदनाची शक्ती या उपासनेने लाभते व त्याला अनेक सिद्धी प्राप्त होतात. [ सी. ग. देसाई ]

**कालुमाई अम्मा** द. भारतातील एक ग्रामदेवता. हिचा पुजारी हिला बळी दिलेल्या पशूचे रक्त पितो, असे सांगतात.

**का-ले का-ले** कुमाऊं प्रदेशातल्या मुलांचा सण. हा मकर-संक्रांतीच्या दुसऱ्या दिवशी येतो. त्यासाठी आदल्या रात्री बायका घरोघरी वडे वगैरे पक्वान्ने तळून त्याच्या माळा करून ठेवतात. सणाच्या दिवशी मुले आंघोळ करून त्या पक्वान्नांच्या माळा गळ्यात घालतात व बाहेर येऊन ' का-ले का-ले' म्हणजे कावळ्या, ये आणि घे, असे म्हणतात. कावळे आले, की माळांतले खाद्यपदार्थ तोडून ते कावळ्यांना घालतात. पक्वान्नांच्या या माळा नातेवाइकांच्या घरी पाठविण्याचीही चाल आहे. [ वीणा जोशी ]

**कालेश्वर** नर्मदेवरील एक तीर्थ. इथे ललितादेवीचे पीठ आहे. [ पु. इं. ]

**कालना** बंगालमधील बरद्वान जिल्ह्यात असलेले एक पवित्र क्षेत्र. सूर्यदास, गौरीदास, जगन्नाथदास व भगवानदास हे वैष्णव संत या ठिकाणी राहत होते. [ हि. जॉ. ए. इं. ]

**काल्पी** झाशीपासून ९२ मैल अंतरावर यमुनेच्या दक्षिण तीरावर हे नगर आहे. इथे व्यासटील। व नृसिंहटीला या नावाच्या दोन टेकड्या आहेत. व्यासटीला येथे भगवान व्यासांचा आश्रम होता आणि नृसिहटीला येथे प्रल्हादाच्या रक्षणार्थ विष्णूने नृसिंहावतार घेतला, असे मानतात. काल्पी म्हणजेच पूर्वीचे कालप्रिय होय, असे आता सिद्ध झाले आहे. **पाहा–** कालप्रिय. [ कल्याण-तीर्थांक ]

**कावड** पाण्याच्या घागरी अथवा एखादा जड पदार्थ नेण्यासाठी बांबूच्या दोन टोकांना शिक्याच्या रचनेप्रमाणे दोऱ्या बांधून तयार केलेले एक साधन. कावडीला सांस्कृतिक महत्त्वही आहे. पूर्वी यात्रेकरू काशीच्या गंगेची कावड भरून घेऊन ती रामेश्वराला वाहण्यासाठी पायी यात्रा करीत होते. कित्येक धार्मिक संप्रदायातले लोक आपले देव कावडीत घालून गावोगाव हिंडवितात. दक्षिणेत सुब्रह्मण्याच्या उत्सवात त्याचे भक्त कावडी खांद्यावर घेऊन नाचतात. श्रवणकुमाराने आपल्या वृद्ध व अंध मातापितरांना कावडीत घालून



कावड

तीर्थयात्रेला चालविले होते, अशी कथा आहे. चैत्र महिन्यात गोदावरीचे पाणी कावडीने भरून आणून आपल्या गावातल्या ग्रामदेवतेला त्या पाण्याने स्नान घालण्याची प्रथा पैठणच्या आसपास आहे.

**कावडी** द. भारतातील तेलुगू लाकूडतोड्यांची एक जात. तिरुपतीच्या पेरुमाळस्वामीला जे कोरवा लोक कावडीतून नैवेद्य घेऊन जातात, त्यांनाही कावडी असेच म्हणतात. तमिळनाड प्रांतातील दही विकणाऱ्या कन्नडिगांनाही कावडी किंवा कावडिग असे म्हणण्याची वहिवाट आहे. [ का. ट्रा. स. इं. ]

**कावडीचिंडू** तमिळ लोकगीतांचा एक प्रकार. सुब्रह्मण्याला कावडी वाहायला जाणारे यात्रेकरू ही लोकगीते गात गात जातात. यात सुब्रह्मण्याचे स्तवन असते. ही गीते कर्नाटक संगीताच्या रागदारीत गायिली जातात. अन्नमलई रेड्डियार हा या गीतांचा कर्ता होय. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**कावडीनटम्** तमिळनाडमध्ये कावडी घेऊन केले जाणारे नृत्य. सुब्रह्मण्यासाठी कावडी वाहून नेणारे लोक हे नृत्य करतात. या नृत्यात कावडीच्या वेगवेगळ्या

अवस्था दाखविल्या जातात. खांदे, डोके, पाठ व हात यांच्यावर हात न धरता कलात्मक रीतीने कावड फिरविणे, हे या नृत्याचे वैशिष्टच आहे. या नृत्याला संगीताची साथ असते व जिथे जिथे सुब्रह्मण्याचे मंदिर आहे, तिथे तिथे कावडी वाहणारे भक्त समुदायाने हे नृत्य करतात. यातले संगीत उत्साहवर्धक असते. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]


कावडी नर्तक

**कावनई** महाराष्ट्राच्या नासिक जिल्ह्यातील इगतपुरीजवळचे एक पवित्र स्थान. इथे एका डोंगराच्या पायथ्याशी कपिलमुनीचे स्थान, कपिलधारातीर्थ व कामाई देवीचे मंदिर आहे. [ म. जि. ना. ]

**कावळा** मनुष्यवस्तीत हिंडणारा एक पक्षी. हा कृष्णवर्णाचा असल्यामुळे त्याचा अंधार व अशुभ यांच्याशी संबंध मानलेला आहे. तसेच वातावरणाशी संबंध असल्यामुळे विधात्याचे उत्पादनसामर्थ्य व आध्यात्मिक शक्ती यांचेही तो प्रतीक असल्याची समजूत आहे. अनेक आदिवासीच्या कथांत तो सृष्टीच्या उत्पत्तिकार्यात महादेवाला उपयोगी पडलेला आहे. याविषयी गोंडांची एक कथा अशी—

प्रलयजळातल्या कमळावर महादेव होता. त्याला पृथ्वी निर्माण करायची होती. त्याने आपल्या अंगमळापासून कावळा निर्मून त्याला मातीच्या शोधार्थ पाठविले. कावळा उडून एका ठिकाणी बसला. तो नेमका एका खेकडयाच्या आकडयात सापडला. खेकडा म्हणाला. ‘ बऱ्याच दिवसांनी भक्ष्य मिळाले.’ कावळा म्हणाला. ‘ माझ्या बापाने मला तुझ्याकडे मातीसाठी पाठविले आहे.’ मग कावळा व खेकडा मिळून सिंगारद्वीपात गेले. तिथे नलराजा होता व त्याच्याजवळ माती होती. नलराजाने त्यांना ती थोडीशी कर्जाऊ दिली. मग ती घेऊन कावळा महादेवाकडे आला आणि महादेवाने त्या मातीची पृथ्वी बनविली.

कावळयाच्या ठिकाणी दुर्ज्ञेय असे सामर्थ्य व भविष्यकालीन गोष्टीविषयी आगाऊ सूचना देण्याची पात्रता, हे दोन गुण असल्याची धारणा सर्वत्र आहे. त्यामुळे शुभाशुभ शकुनात कावळयाला महत्त्व प्राप्त झाले आहे. वसतराज नावाच्या शकुनग्रथात काकरुत (कावळयाचे ओरडणे) नावाचे एक प्रकरणच आहे. और्ध्वदेहिक क्रियेत मेलेल्या माणसासाठी दहाव्या दिवशी एक पिंड देतात. त्याला कावळा शिवला तरच मृताला स्वर्ग मिळतो, अशी समजूत आहे. त्यामुळे प्रत्यक्षात कावळा शिवला नाही, तर दर्भाचा कावळा करून त्या पिंडाला लावतात.

महाराष्ट्रात रजस्वला स्त्रीबद्दल बोलताना तिला कावळा शिवला आहे, असे म्हणतात. या म्हणण्याचा संबंध कावळयाच्या विटाळाच्या स्थूल कल्पनेपेक्षा एका लुप्तप्राय कथाबीजाशी जोडणे श्रेयस्कर होय, असे दुर्गा भागवत म्हणतात. मुलीला रजोदर्शन घडवून तिला तारुण्य प्राप्त करून देण्याचे काम कावळा करतो, अशी ती कथा आहे.

सकाळी उठताच दारात कावळा ओरडला, तर दुपारी कोणी तरी पाहुणा येणार आहे, असे समजतात. महाराष्ट्रातल्या सासुरवाशिणी मुली कावळयाच्या करवी आपल्या क्षेमकुशलाचा संदेश माहेरी पाठवितात. कावळा हा अशुभ पक्षी मानलेला आहे. तो घरात आल्यास किंवा मस्तकावर बसल्यास त्याबद्दल शांती करतात. कावळा अमर असतो, अशीही समजूत आहे. कावळा ओरडणे आणि त्यामुळे एका रात्रीत एखादे मोठे काम पुरे करण्याची केलेली प्रतिज्ञा फोल ठरणे, असा एक कल्पनाबंध लोकसाहित्यात आढळतो. कावळयाने सीतेचा अभिलाष धरला आणि रामाने बाण मारून त्याचा एक डोळा फोडला, अशीही एक कथा आहे. कावळयाला डोळयाचा एकच गोलक असून तोच त्याच्या दोन्ही डोळयांत फिरतो, असा जो लोकभ्रम आहे, तोही वरील कथेतूनच निर्माण झाला आहे. कावळयावरून कित्येक वाक्‌प्रचारही निर्माण झाले आहेत.

**कावुथियन** मलबारमधील न्हावी लोकांची एक जात. तियन व इतर खालच्या जाती यांचे ते नापित असून त्यांना कधी कधी कुरूप ही उपाधी दिलेली आढळते. त्यांच्या बायका सुइणीचे काम करतात. यांच्यांत अनेक पोटजाती असून ज्या जातीची ते सेवा करतात त्या जातीवरून त्यांना तच्छकावुथियन, तच्छकुरूप, कनिसकावुथियन, इ. नावे मिळाली आहेत. उ. मलबारमधील कावुथियन लोक मरुमक्कतायम् ही वारसापद्धती मानतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**कावेरी** (१) द. भारतातील एक नदी. हिला दक्षिणगंगा म्हणतात. ही नदी कूर्ग जिल्ह्यातल्या ब्रह्मगिरी पहाडात ब्रह्मकुंड तीर्थातून उगम पावते. या स्थळाला पुराणात कावेरीद्वार किंवा कावेरीमूळ म्हटले आहे. हे उगमस्थान समुद्रसपाटीपासून ४६७६ फूट उच आहे. हिची लांबी ४७५ मैल आहे. खडकाळ भागातून वाहत असल्यामुळे हिचे पात्र फार अवखळ आहे. हिला तिच्या प्रवासात कार्खांबे, कादानुमुर, कुन्नाहोले, मुट्टरामुडी, चिक्कहोले व सुवर्णावती या नद्या येऊन मिळतात. त्यांच्यामुळे तिचा प्रवाह जोरदार आणि मोठा होतो. म्हैसूरराज्यात उगम पावून ती पुढे तमिळनाडमध्ये प्रविष्ट होते व कोइंबतूर व तिरुचिरापल्ली या जिल्ह्यातून वाहत जाऊन अनेक छोटया मोठया नद्यांचे पाणी आपल्या पात्रात सामावून घेत घेत नागपट्टिणम्‌जवळ बंगालच्या उपसागराला मिळते.

या महानदीची उत्पत्तिकथा स्कंदपुराणात सांगितली आहे, ती अशी–

श्रीविष्णूने मुलगी म्हणून एक कन्या ब्रह्मदेवाला दिली. पुढे कवेर नावाचा एक ऋषी दक्षिणेतल्या ब्रह्मगिरीवर अपत्यप्राप्तीसाठी तप करू लागला. त्या तपाने ब्रह्मदेव संतुष्ट झाला. त्याने आपल्याला मिळालेली ती कन्या कवेर मुनीला देऊन टाकली. तिचे नाव लोपामुद्रा असे होते. पण कवेराची कन्या झाल्यामुळे लोक तिला कावेरी म्हणून ओळखू लागले. कावेरीला परोपकाराची इच्छा होती; म्हणून तिने तप केले व त्रिदेवांकडून नदीरूप घेण्याचा वर मिळविला.

पुढे एक दिवस अगस्त्य ऋषी ब्रह्मगिरीवर आला. कावेरीचे अप्रतिम लावण्य पाहून तो तिच्यावर भाळला व त्याने तिला मागणी घातली. कावेरी म्हणाली, की 'मी एका अटीवर तुमच्याशी लग्न करीन. ती अट ही, की तुम्ही मला एक क्षणही विसंबता कामा नये.' अगस्त्याने ती अट मान्य करून तिच्याशी लग्न केले. ब्रह्मगिरीवर त्या दोघांनी गृहस्थाश्रम थाटला. काही दिवस सुरळीत गेले.

पुढे एके दिवशी अगस्त्याला प्रवासाला जाण्याची वेळ आली. आपल्या शिष्यांना पत्नीचे रक्षण करण्यास सांगून तो निघाला. अशा रीतीने कावेरीची अट त्याने मोडली. कावेरीला तेवढेच निमित्त पुरले. ती लगेच नदीचे रूप घेऊन डोंगरावरून खाली वाहू लागली. अगस्त्य आपले काम आटोपून परत ब्रह्मगिरीवर येतो, तो हा प्रकार ! त्यामुळे त्याला फार दुःख झाले. त्याने कावेरीला परत येण्याबद्दल कळवळून प्रार्थिले. कावेरीला त्याची दया आली. तिने लगेच आपली दोन रूपे केली. एका रूपाने ती नदी म्हणून वाहत राहिली आणि दुसऱ्या रूपाने तिने लोपामुद्रा बनून अगस्त्याचा सहवास केला.

गंगेबद्दल उत्तर भारतीयात जो भक्तिभाव आहे, तोच दक्षिणेत कावेरीबद्दल आहे. कावेरीला पल्लवप्रिया असे म्हणतात. त्याचे कारण, पल्लव राजांचे राज्य कावेरीच्या तीरावरच होते आणि ते तिला भक्तिभावाने भजत होते. द. भारतातल्या कित्येक शिलालेखांत कावेरीचा संबंध चोळ राजांशी जोडलेला आहे. संघम्‌कालीन तमिळ वाङ्मयात कावेरीची प्रशस्ती करणे हा प्रत्येक कवीच्या बाबतीत एक संकेतच ठरून गेला होता. शिलप्पधिकारम्‌ या महाकाव्यात कोवलन्‌च्या मुखाने कवी कावेरीला म्हणतो–

'चंद्रासारखा छत्रधारी आणि मालांनी सुशोभित असा चोळ राजा आपला शासनदंड उन्नत करून उत्तरेला गेला. तुला सोडून तो गंगेत विहार करू लागला. तरीही तू त्याच्यावर रुसत नाहीस. कावेरी, तुझा जयजयकार असो! हे मीनलोचने, तू का रुसत नाहीस, हे मला ठाऊक आहे. उच्चकुलीन स्त्रिया आपल्या मनात परस्त्रीविषयी किल्मिष निर्माण होऊ देत नाहीत. कावेरी, तुझा विजय असो !'

पंपुट्टिनम्‌ किंवा पुहार ही चोळांची प्राचीन राजधानी कावेरीच्या दक्षिण तीरावरच वसली होती.

मणिमेखला या महाकाव्यात, अगस्त्यानेच कावेरीचा प्रवाह उत्पन्न केला, असे म्हटले आहे. बलरामाने कावेरीची यात्रा केली होती, असे भागवत पुराणात सांगितले आहे (१०. ७९. १४).



शिवसमद्रम्‌चा धबधबा

हिच्या तीरी पितृश्राद्ध करावे, असे ब्रह्मांड पुराण सांगते.

कावेरीवर अनेक धरणे बांधलेली आहेत. शिवसमुद्रम्

येथील हिचा धबधबा जगातला एक सुदर प्रपात समजला जातो. त्याचे दोन ओघ आहेत. त्यातल्या पश्चिमेकडच्या ओघाला गंगाचुक्की व पूर्वेकडच्या ओघाला भारचुक्की म्हणतात. या धबधब्याचा वीजनिर्मितीसाठी उपयोग करून घेतला आहे. कावेरीच्या पाण्याचा शेतीसाठी उपयोग करण्याची कल्पना केवळ अलिकडच्या काळातली नाही. फार प्राचीन काळी करिकाळ चोळ (इ. स. १ ले शतक) याने कावेरीवर अनेक कालवे व मुशी बांधल्या होत्या. चिक्कदेव या राजाने सतराव्या शतकाच्या अखेरीस हिच्यावर तीन धरणे बांधली, ती आजही शाबूत आहेत.

कावेरीच्या तीरावर बरीच तीर्थक्षेत्रे आहेत. श्रीरंगपट्टण, श्रीरंगम्, कुंभकोणम्, तंजाऊर, तिरुवैय्यार, कावेरीपट्टनम् अशी त्यांची नावे आहेत. यात्रेला जाणारे यात्रेकरू बहुतेक या सर्व क्षेत्रांची यात्रा करतात.

तुला राशीत सूर्य येतो, तेव्हा कावेरीच्या उगमाजवळ मोठा मेळा भरतो. यात्रेकरू उगमाच्या कुंडात स्नान करून जवळच असलेल्या कावेरीच्या पाषाणमूर्तीची पूजा करतात. कोडगू आदिवासी हे मुख्यत्वे त्या वेळी कावेरीस्नानाला तिथे येतात. तुला–संक्रमणाच्या काळात गंगा नदी गुप्त रूपाने कावेरीच्या प्रवाहात येते आणि जनांची पापे शिरी घेऊन आलेले मालिन्य कावेरीत धुवून टाकते, अशी कथा आहे. [पद्मिनी सेनगुप्ता– मार्च ऑफ इंडिया १९५५; एस. जी. ललिता– द. भारत १९६१; हि. ध.]

(२) राजपिपाला डोंगरात उगम पावणारी एक नदी. ही शुक्ल तीर्थाजवळ नर्मदेस मिळते. याच ठिकाणी शिवाची आराधना करून कुबेराने यक्षाधिपत्य मिळविले ( मत्स्य पु. १८८).

**काव्य** (१) बर्हिषद पितरांपैकी एक स्वतंत्र पितृगण (वायु पु. १.५६.१३). हे कवीचे पुत्र होत. यांना संवत्सर, आज्यप, पचाब्द अशी इतर नावे आहेत. काव्य हे अष्टकांच्या अधिष्ठात्री देवता होत. योगोत्पत्ती ही यांची मानसकन्या आहे. हे आज्यप व सोमप आहेत. [पु इं.; प्रा. च. को.]

(२) शुक्राचार्याचे एक नाव.

**काशकृत्स्न** अद्वैतवेदान्ताचा एक आचार्य ब्रह्मसूत्रात याच्या नावाचा उल्लेख आला आहे (१.४.२२). परमात्माच जीवात्म्याच्या रूपाने अवस्थान करतो, असे याचे मत आहे. पृथ्वी, आप, तेज इत्यादींची सृष्टी ब्रह्मापासूनच होते, जीवापासून नाही; त्यामुळे अविकृत ब्रह्मच सृष्टिकालात जीवरूपाने अवस्थित असते, असे हा मानतो. शंकराचार्यांनी या मताला श्रुत्यनुसारी मानले आहे. कारण 'तत्त्वमसि' इ. महावाक्यांनी या मताला पुष्टी मिळते. बादरायणानेही याच्या मताचे समर्थन केले आहे. [शंकराचार्य; हिंदुत्व]

**काशिका** पाणिनीच्या अष्टाध्यायीवर रचली गेलेली प्रसिद्ध वृत्ती. जयादित्य व वामन या दोन विद्वानांनी मिळून निर्माण केलेला हा ग्रंथ आहे. १,२,५ व ६ या अध्यायावरची वृत्ती जयादित्याची असून बाकीचा ग्रंथ वामनाचा आहे, असे शब्दरत्नव्याख्येत सांगितले आहे. पण अलिकडचे अभ्यासक, लेखनशैलीचा अभ्यास केल्याअंती पहिले पाच अध्याय जयादित्यविरचित व पुढचे तीन वामनविरचित मानतात. या ग्रंथात पुष्कळशा सूत्रांवरच्या वृत्ती व त्यांची उदाहरणे पूर्वकालीन आचार्यांच्या ग्रंथातून घेतलेली आढळतात. काशिकेत महाभाष्याहून भिन्न मताचेही प्रतिपादन झालेले आहे. प्राचीन वृत्तिग्रंथांत न आढळणारा गणपाठ काशिकेत आढळतो, हे या ग्रंथाचे वैशिष्टय होय. काशिकेवर अनेक विद्वानांनी व्याख्याग्रंथ लिहिले आहेत. [हि. वि. को.]

**काशी** सात मोक्षदायक पुऱ्यामधले एक महत्त्वाचे क्षेत्र. बारा ज्योतिर्लिंगामधले एक ज्योतिर्लिंगस्थान. तीर्थयात्रेतले महत्त्वाचे ठिकाण. विश्वनाथाचे वास्तव्य आणि गंगेची जवळीक या दोन गोष्टीमुळे काशीला सर्व तीर्थातले हे श्रेष्ठत्व प्राप्त झाले आहे. काशी हे शैव क्षेत्र आहे. ते शिवाच्या त्रिशूलावर वसले असून प्रलयकालीही त्याचा नाश होणार नाही, अशी त्याची पुराणांतरी ख्याती आहे.

काशीचे दुसरे नाव वाराणसी आहे. असी व वरुणा या दोन नद्यांच्या संगमावर वसल्यामुळे याला हे नाव प्राप्त झाले. हे शहर गंगेच्या उत्तरतीरावर उभारले गेले आहे. या ठिकाणी गंगेने सुमारे चार मैल दक्षिणोत्तर धनुष्याकृती वळण घेतले आहे. या वळणात हे शहर वसले आहे. प्राचीनता, पवित्रता व प्रशस्तता या बाबतीत काशीची बरोबरी कोणत्याही नगराला करता येणार नाही. धर्मपीठ व विद्यापीठ असा काशीचा दुहेरी महिमा आहे. संस्कृतीचे, विद्येचे व तत्त्वज्ञानाचे माहेरघर म्हणून या नगराची पुरातनकालापासून प्रसिद्धी आहे. साप्रतही ती प्रसिद्धी थोड्याफार फरकाने कायम आहे. वैदिक व बौद्ध हे दोन्ही धर्म या ठिकाणाहूनच सर्व भरतखंडात प्रसार पावले.

जनपदयुगात काशीचा समावेश सोळा महाजनपदांमध्ये होत

होता. पाणिनी व पतंजली या दोघांनीही काशीजनपदाचा उल्लेख केला आहे (अष्टा. ४.२.११६; महाभाष्य २.१.१). काशी किंवा काश्य या नावाचे जन या ठिकाणी वास्तव्य करून राहिले होते. अथर्ववेद (५.२२.१४ पैप्पलाद शाखेप्रमाणे), शतपथ ब्राह्मण (१३.५.४.१९), जैमिनीय ब्राह्मण (२.३.१९) व बृहदारण्यक (२.१.१) या ग्रंथांत काशी लोकांचे उल्लेख आहेत. ब्राह्मण-कालात या लोकांची फार प्रसिद्धी होती. यांचा उल्लेख वैदिक साहित्यात कोसल व विदेह यांच्या जोडीने होतो. मूळ काशीनगरी या काशी किंवा काश्य लोकांनी वसविली असावी. शतपथात इथल्या धृतराष्ट्र नामक राजाचा व बृहदारण्यकात अजातशत्रू या राजाचा उल्लेख आहे. वाल्मीकिरामायणात सुग्रीवाने सीताशुद्धीसाठी वानरसेनेला पूर्वदिशेकडे पाठविले, त्या संदर्भातही काशी जनपदाचा उल्लेख झालेला आहे (४.४०.२२). महाभारतात काशी जनपदाचे अनेक उल्लेख असून भीष्माने काशी राजाच्या कन्यांचे अपहरण केल्याची कथा तर सर्वश्रुतच आहे (आदि. १०२). भारतीय युद्धात काशीराजाने पांडवांना मदत केली होती. या सर्व प्राचीन उल्लेखांवरून काशीच्या पुरातनत्वा-विषयीची साक्ष पटते.



विश्वनाथमंदिर—काशी

काशीची राजपरंपरा हर्यश्वापासून सुरू होते. हर्यश्वाचा पुत्र सुदेव आणि त्याचा पुत्र दिवोदास होय. दिवोदास हा महा-पराक्रमी होता. स्कंदपुराणांतर्गत काशीखंडात त्याच्या परा-क्रमाचे सविस्तर वर्णन आले आहे. त्याने इंद्राच्या आज्ञेवरून काशीची स्थापना केली, असे महाभारतात म्हटले आहे (अनु. ३०.१६). या दिवोदासाचा पुढे वैतहव्य राजांनी पराभव केला व त्यानंतर त्याला झालेला पुत्र प्रतर्दन याने वैतह-व्यांना ठार मारून काशीचे राज्य परत मिळविले, अशी कथा त्याच ठिकाणी दिलेली आहे. दिवोदासाने निर्मिलेली ही नगरी निकुंभ नामक शिवगणाने नष्ट केली व दिवोदासाच्या वंश-जानी ती पुन्हा वसविली, अशी कथा वायुपुराणात आली आहे (९२). श्रीकृष्णाने सुदर्शन चक्र सोडून वाराणसी दग्ध केली, अशी कथा ब्रह्मपुराणात आहे (११).

काशी या नावाची व्युत्पत्ती काश् = प्रकाशणे, तळपणे या धातूवरून सांगितली जाते. परब्रह्माचा किंवा मोक्षमार्गाचा प्रकाश करणारी ती काशी होय. 'काश्यां तु मरणान्मुक्तिः' = काशीत जो प्राणी मृत्यू पावतो, तो मुक्त होतो, असा शास्त्रांचा उद्घोष आहे. या घोषणेवर श्रद्धा ठेवूनच भारताच्या कोना-कोपऱ्यांतले धार्मिक वृत्तीचे कित्येक लोक अंतकाळी देहत्यागासाठी काशीमध्ये येतात. हजारो वर्षांपासून ही परंपरा चालत आलेली आहे. शिवाच्या तेजाने ही नगरी प्रकाशित झालेली आहे, असे स्कंदपुराण सांगते (२६.६७). काशीला अन्यही काही नावे आहेत, त्यांचे स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे —



काशी—विश्वनाथ

**अविमुक्त** — न + विमुक्त = अविमुक्त. शिव-पार्वती हे स्थान कधीही विमुक्त करीत नाहीत.

**आनंदकानन** — शिवाला या ठिकाणी अत्यंत आनंद लाभतो.

**महाश्मशान** — श्म = शव (प्रेत). शान = शयन. जेव्हा प्रलय होतो, तेव्हा पंचमहाभूते शव (जड) रूपात इथे शयन करतात. पद्मपुराणात याहून निराळे स्पष्टीकरण दिले आहे — भगवान् शिव इथे राहूनच कल्पाती संपूर्ण विश्वसृष्टीचा संहार करतो, म्हणून या नगरीला महाश्मशान हे नाव मिळाले.

बौद्ध वाङ्मयात या नगराची ब्रह्मवद्धन्, सुरूंधन, सुदस्सन, पुप्फवती, रम्म, मालिनी, इ. अन्य नावे आढळतात.

जैनांच्या विविध तीर्थंकल्पांत काशीचे अर्थात वाराणसीचे पुढील चार निरनिराळे भाग मानले आहेत — (१) देववारा-

णसी (२) राजधानी वाराणसी (३) मदन वाराणसी व (४) विजय वाराणसी.

बौद्धांना व जैनांनाही काशी क्षेत्राचे महत्त्व वाटते. बुद्धाने पहिले धर्मप्रवचन केले, ते काशीजवळच्या मृगदाव किंवा सारनाथ येथे. काशीक्षेत्र हे धर्मक्षेत्र व विद्वानांचे आगर असल्यामुळे आपल्या धर्माचे प्रवर्तन तिथूनच करावे, असे बुद्धाला वाटले. बुद्धशिष्य आनंद याने बौद्ध भिक्षूना परिनिर्वाणास योग्य अशा मोठ्या नगरांची जी यादी दिली आहे, त्यात काशीचा समावेश आहे.

जैनांचा तेव्वीसावा तीर्थंकर पार्श्वनाथ याचा जन्म काशीतच झाला. सातवा तीर्थंकर सुपार्श्वनाथ याचेही जन्मस्थान काशी हेच आहे. महावीर आणि त्याचे शिष्य यांच्या कथातून काशीला खूप गौरविले आहे. काशीजवळच्या सारनाथाला जैन लोक सिंहपूर म्हणतात. ते त्यांचे अतिशयक्षेत्र आहे. श्रेयांसनाथ या तीर्थंकराची गर्भ, जन्म व तप ही तीन कल्याणके या ठिकाणीच झाली.

**काशीची पौराणिक कथा** – शिव-पार्वती हिमाचलावर राहत होती. हिमाचल हे पार्वतीचे माहेर. एके दिवशी पार्वतीला वाटले, की कायमचे माहेरी राहणे उचित नव्हे. तिने शिवाला तसे सांगितले. शिवाने विचार केला, की हिमालय सोडून एखाद्या सिद्धक्षेत्रात राहावे. त्या विचारात काशीक्षेत्र त्याच्या मनात भरले. मग त्याने निकुंभ नावाच्या आपल्या गणाला आदेश दिला, की काशीक्षेत्र निर्जन कर. निकुंभाने ती आज्ञा पाळली. तिथला राजा दिवोदास याला निकुंभाने प्रजेसह हद्दपार केले. मग शिव आपल्या गणांसह तिथे वसतीला आला. त्याच्या मागून स्वर्गातले देव आणि पाताळातले नागही तिथे आले.

नंतर दिवोदासाने तप केले. ब्रह्मदेव त्याला प्रसन्न झाला व 'वर मग' म्हणाला. दिवोदास म्हणाला, की 'देवांनी दिव्य लोकात जावे, नागांनी पाताळात राहावे आणि पृथ्वी केवळ मानवांसाठी मोकळी राहावी.' ब्रह्मदेवाने 'तथास्तु' म्हटले. त्या वरानुसार शिवासह सर्व देवांना काशी सोडावी लागली. काशीवर दिवोदासाचे राज्य पुनश्च प्रस्थापित झाले. तिथून शिव मंदराचलावर राहायला गेला; पण त्याला तिथे चैन पडेना. तो पुन्हा काशीत येण्याची इच्छा करू लागला. त्याने दिवोदासाला काशीतून बाहेर काढण्यासाठी ६४ योगिनींना पाठविले; पण त्यांचे काही चालले नाही. दिवोदासाने एका घाटावर त्यांना स्थापले. मग शिवाने सूर्य, ब्रह्मा, विष्णू यांना त्या कामगिरीवर पाठविले. त्यात विष्णू यशस्वी झाला. त्याने ब्राह्मणरूप घेऊन दिवोदासाला ज्ञानोपदेश केला. त्या उपदेशाने दिवोदास विरक्त झाला. त्याने काशीचा त्याग करायचे ठरविले. तो विमानात बसून शिवलोकाला गेला व नंतर शिव मंदराचलावरून खाली उतरून काशीत आला. मग काशी हे शिवाचे क्रीडाक्षेत्र बनले.

**काशीचा बौद्धकालीन इतिहास**– काशीच्या लोकांचे वर्णन विदेह आणि कोसल यांच्याबरोबर केले जाते. या तीन्ही राज्यांचे पुरोहित जातूकर्ण्य हे होते. पालिभाषेतल्या जातक कथांमध्ये कित्येक कथांचा प्रारभ पुढील वाक्याने होतो– 'अतीते बारानसीयं ब्रह्मदत्ते रज्जं करेन्ते।' = प्राचीन काळी वाराणसीत ब्रह्मदत्त नावाचा राजा राज्य करीत होता. यावरून असे सूचित होते, की काशीच्या राजाला **ब्रह्मदत्त** ही पदवी असावी. ही पदवी धारण करणारे राजे कोणत्या कुलातले होते, याचा नक्की बोध जातकावरून होत नाही; पण काही जातकांत मात्र ब्रह्मदत्त हे विदेहवंशी असल्याचे म्हटले आहे. महागोविंदसुत्तात काशीच्या राजाला धृतराष्ट्र म्हटले आहे. हा राजा भरतवंशी होता. महावग्ग व जातके यातील वर्णनावरून एक गोष्ट स्पष्ट दिसते, की बुद्धपूर्वकाली काशीचा राजा महाबलशाली असून त्याने कोसल व शेजारचे अन्यही काही प्रदेश जिंकून आपल्या राज्याला जोडले होते. हे राज्य काही काळापर्यंत इतके धनाढ्य व शक्तिशाली होते, की अन्य देशांचे राजे त्याचा हेवा करीत. पण हे त्याचे वैभव फार काळ टिकले नाही.

बुद्धाच्या काळात त्याची शक्ती आणि कीर्ती नष्ट होऊन ते कोसलांच्या अधीन झाले. पसेनदीचा बाप महाकोसल याने आपली कन्या कोसलदेवी मगध देशाच्या बिंबिसारराजाला दिली व त्या प्रसंगी काशी हे शहर त्याला आंदण दिले. पण कालांतराने काशीचे राज्य पुन्हा स्वतंत्र झाले. पुन्हा त्याला बरे दिवस आले आणि ते कोसलांच्या बरोबरीने उल्लेखिले जाऊ लागले. ते एक महत्त्वाचे व्यापारी केंद्रही बनले. तिथे बरेच श्रेष्ठीगण राहत असत. त्यांचा श्रावस्ती व तक्षशीला या नगरांशी व्यापारी संबंध होता. युआन च्वांग भारतात आला त्या वेळी काशीत ३० बौद्धविहार व १०० देवालये होती. पुढे जसजशी बौद्ध धर्माची अवनती होऊ लागली, तसतसा वैदिक धर्म पुन्हा सर्व अंगांनी तिथे वाढू लागला. त्या काळात काशीचे महत्त्व फार वाढले. वैदिक संस्कृती आणि संस्कृत भाषा यांचे ते पहिल्या दर्जाचे केंद्र ठरले. त्या काळात जी पुराणे लिहिली गेली, त्यात काशीचा मुक्त कंठाने गौरव केलेला आहे. आद्य शंकराचार्यांनी काही काळ काशीत वास्तव्य करून काशीला विद्या व संस्कृती यांचे आगर बनविले. त्यांच्या अद्वैत तत्त्वज्ञानाची परंपरा त्यांच्यामागूनही काशी क्षेत्रात अखंड चालू राहिली.

**अर्वाचीन इतिहास–** मध्ययुगात उत्तरप्रदेश हा मुसलमानी आक्रमणामुळे जर्जर होऊन गेला. तिकडील अनेक सांस्कृतिक क्षेत्रांची धूळधाण झाली. त्याबरोबरच काशीचेही दुर्दैव ओढवले. हे खरे असले, तरी दिल्लीच्या सुलतानी अंमलात उ. प्रदेशातील प्राचीन सांस्कृतिक परंपरा काशीतच थोडयाबहुत प्रमाणात संरक्षिल्या गेल्या. कबीर व रामानंद यानी त्या टिकविण्यासाठी बरेच परिश्रम केले. अकबराच्या काळात काशीला आणखी बरे दिवस आले. त्या काळात तुलसीदास, मधुसूदन सरस्वती, पंडितराज जगन्नाथ, इ. संतकवींनी व पंडितांनी काशीत वास्तव्य करून भारतीय संस्कृतीची ज्योत अधिक फुलविली. पण काशीचे दुर्दैव थोडा काळ दवले होते, ते पुनश्च औरंगजेबाच्या राजवटीत उसळून वर आले. औरंगजेब सत्तेवर येताच त्याने काशीवर धाड घातली. विश्वेश्वराच्या मंदिरासकट काशीतली अनेक मंदिरे त्याने मोडून उद्ध्वस्त केली. विश्वेश्वराच्या मंदिरावर तर त्याने मशीदच उभारली. आजही त्या ठिकाणी ती विद्यमान आहे.



एक घाट – काशी

पुढे काशी व प्रयाग ही क्षेत्रे मुसलमानांकडून परत घेण्याबद्दल पेशव्यांनी अखेरपर्यंत खटपट केलेली दिसते. थोरले माधवराव पेशवे यांनी आपल्या मृत्युपूर्वी राज्यातील प्रतिष्ठित मुत्सद्यांकडून एका नऊ कलमी यादीच्या अंमलबजावणीबद्दल शपथा घेतल्या होत्या. त्या यादीत पुढील कलम आहे– "श्री कासी प्रयाग ही दोन्ही स्थळे सरकारात यावी असा तीर्थरूपांचा हेतू होता, त्यास प्रस्तुत करावयाजोगे दिवस आहेत. दहावीस लक्षांची जहागीर मुबदला पडली तरी देऊन दोन्ही स्थले हस्तगत करावी..." पण पेशव्यांच्या या प्रयत्नाला अखेरपावेतो यश आले नाही.

इ. स. १७७५ नंतर काशीवर इंग्रजांचा अंमल सुरू झाला. इंग्रजांच्या अंमलात काशीला पुनश्च ऊर्जितावस्था आली. इंग्रजानी धार्मिक बाबतीत ढवळाढवळ न करण्याचे धोरण ठेवल्याने काशी हे पुन्हा विद्येचे माहेरघर म्हणून गाजू लागले. इंग्रजांच्या कारकीर्दीत इथे अनेक नवी मंदिरे बाधली गेली. आजमितीस काशीत १५०० हून अधिक मंदिरे आहेत. त्यातली जवळजवळ निम्मी इंग्रजांच्या अमदानीत बांधली गेली आहेत. १९ व्या शतकात काशीत वेदशास्त्रांचे नामांकित आचार्य होऊन गेले. त्यांनी तिथे अध्यापनाच्या परंपरा चालविल्या. काशी हे प्राच्यविद्याचे महापीठ बनले. १८९८ साली डॉ. ॲनी बेझंटच्या प्रयत्नाने इथे सेंट्रल हिंदू कॉलेजची स्थापना झाली. १९१६ साली श्री. मदनमोहन मालवीय यांनी इथे हिंदू युनिव्हर्सिटी स्थापिली. अशा प्रकारे काशी प्राचीन व अर्वाचीन विद्यांचे एक महाकेंद्र बनली.

काशी हे एक शक्तिपीठही आहे. इथे सतीचे उजवे कर्ण–कुंडल गळून पडले, अशी कथा आहे. पण काशीचा मुख्य देव म्हणजे विश्वेवर किंवा विश्वनाथ हाच होय. काशीला विश्वनाथाची नगरी असेच म्हणतात. काशीयात्रेला लोक जातात, ते या 'विश्वेश्वराच्या दर्शनासाठीच. औरंजेबाने जुने विश्वेश्वर मंदिर उद्ध्वस्त केल्यावर सुमारे शंभराहून अधिक वर्षे तिथे मंदिरच नव्हते. विश्वेश्वराचे लिंग कुठेतरी गुप्त ठिकाणी ठेवलेले असावे. अठराव्या शतकाचे अखेरीस अहिल्याबाईने सध्याचे मंदिर बांधले. हे मंदिर लहानसेच आहे. मध्यभागी एक चौरस कुंड असून त्यात विश्वेश्वरलिंगाची स्थापना आहे. यात्रेकरू अभिषेकाचे पाणी, फूलपत्री आणि पूजाद्रव्य त्या कुंडातच टाकतात व हाताने चाचपडून विश्वेश्वराला स्पर्श करतात. या मंदिरावर सोन्याचा कळस आहे. पंजाबचा महाराजा रणजितसिंग याने कळसाचे काम केले. विश्वनाथाला काशीचा सम्राट



श्मशानघाट – काशी

समजतात. त्याच्या परिसरात अनेक शिवलिंगे आहेत. त्यांपैकी हरेश्वर हा त्याचा मंत्री, ब्रह्मेश्वर हा कथावाचक, भैरव हा कोतवाल, तारकेश्वर हा धनाध्यक्ष, दंडपाणी हा चोपदार,

वीरेश्वर हा कोषाध्यक्ष, ढुंढिराज हा अधिकारी व अन्य अनेक शिवलिंगे ही आपापल्या भागात प्रजापालन करणारी आहेत.

**काशीतील तीर्थे**— काशीतील ५ मुख्य तीर्थे पुढीलप्रमाणे—

**तीर्थानां पञ्चकं सारं विश्वेशानन्दकानने ।**
**दशाश्वमेधं लोलार्कः केशवो बिन्दुमाधवः ।।**
**पञ्चमी तु महाश्रेष्ठा प्रोच्यते मणिकर्णिका ।**
**एभिस्तु तीर्थवर्यैश्च वर्ण्यते ह्यविमुक्तकम् ।।**

(मत्स्य पु. १८४.६६–६७)

अर्थ— काशीक्षेत्रात दशाश्वमेध, लोलार्क, केशव, बिंदुमाधव व पाचवी महाश्रेष्ठ मणिकर्णिका ही पाच तीर्थे श्रेष्ठ होत. या श्रेष्ठ तीर्थांनी काशी क्षेत्राचे वर्णन केले जाते.

याशिवाय आणखीही काही स्थाने अवश्य दर्शनीय आहेत, ती अशी—

(१) ज्ञानवापी — विश्वेश्वराच्या मंदिराजवळच ही एक विहीर आहे. कृतयुगात जटिल नामक योग्याने जमिनीत त्रिशूल खुपसून हा कूप निर्माण केला व शिवाने प्रसन्न होऊन त्या कूपाला वर दिला, की 'ज्ञानवापीत स्नान करणारा ज्ञानसपन्न होऊन मोक्षाला जाईल.' असे सांगतात, की औरंगजेबाने मदिराचा विध्वंस केल्यावर विश्वेश्वर या ज्ञानवापीत अतर्धान पावला होता.

(२) दंडपाणी — कनककुडला नामक यक्षिणीच्या पोटी हरिकेशव नावाचा एक पुत्र झाला. त्याने काशीत येऊन शिवाची आराधना केली. शिव त्याच्यावर प्रसन्न झाला व त्याच्या हातात दंड देऊन दुष्ट मार्गाने जाणाऱ्या जनांना दंड करण्यासाठी त्याने त्याची काशीत स्थापना केली. तोच हा दंडपाणी होय.

(३) अन्नपूर्णा — विश्वेश्वर मंदिरापासून थोडच्या अतरावर हिचे मंदिर आहे. हिची पितळी मूर्ती चांदीच्या सिंहासनावर विराजित आहे. या अन्नपूर्णेच्या पुढे सदैव मोठ्या प्रमाणावर अन्नदान होत असते. असे सांगतात, की काशीतला प्रत्येक माणूस जेवल्यानंतरच अन्नपूर्णा स्वतःच्या मुखात ग्रास घालते. हिच्या परिसरात कुबेर, सूर्य, गणेश, इ. अनेक मूर्ती आहेत.

(४) ढुंढिराज — हे गणपतीचे नाव आहे. हा अन्नपूर्णा मंदिराच्या पश्चिमेस आहे. असे सांगतात, की दिवोदास राजाने मडकीतून पाषाण आणून याची मूर्ती बनविली.

(५) मणिकर्णिका— हा तीर्थकूप विष्णूने आपल्या चक्राने उत्पन्न केला. मग विष्णू तिथे तप करू लागला. कालांतराने शिव विष्णूवर प्रसन्न झाला व त्याने विष्णूला दर्शन दिले. त्या वेळी चक्रतीर्थ पाहून शिव आनंदाने नाचू लागला. नाचता नाचता त्याच्या कानातला मणी त्या तीर्थात पडला. त्यावरून त्या तीर्थाला मणिकर्णिका हे नाव मिळाले.

(६) कालभैरव— याचे मदिर भैरवनाथ मोहल्ल्यात आहे. मूर्ती चतुर्भुज व चादीने मढविलेली आहे. हा काशीचा कोतवाल होय. यात्रेकरू याचे दर्शन घेऊन याचा सोटा पाठीवर घेतात व त्याच्या नावाचा काळा गंडा हातात बांधतात.

याशिवाय काशीस जाणाऱ्या यात्रेकरूला पंचक्रोशीची यात्रा करण्यास सांगितले आहे. मणिकर्णिका हा पंचक्रोशीचा मध्यबिंदू कल्पून पाच कोस त्रिज्येचे एक वर्तुळ काशीभोवती काढले, तर सुमारे पन्नास मैल लांबीचा तो रस्ता होतो. या रस्त्यावर शेकडो मंदिरे व तीर्थस्थाने आहेत. ती यात्रा ५–६ दिवसात पुरी करता येते. ती झाल्यावर पुन्हा मणिकर्णिका घाटावर येऊन स्नान करून साक्षी विनायकाचे दर्शन घ्यायचे असते. यात्रेकरूने पंचक्रोशी पुरी केली, याची साक्ष हा साक्षीविनायक देतो. काशी हे महातीर्थ असल्यामुळे तिथे गंगास्नान, श्राद्ध, इ. तीर्थविधी करतात.

काशीत एकंदर लहानमोठे ८४ घाट आहेत. त्यात असीसंगम, दशाश्वमेध, मणिकर्णिका, पंचगंगा व वरुणासंगम हे मुख्य आहेत. दशाश्वमेध घाटावर ब्रह्मदेवाने १० अश्वमेध केले, अशी कथा आहे. पण इतिहास थोडा वेगळा आहे. बघेलखंडाचे रहिवासी भारशिव राजे हे शिवभक्त व वैदिक संस्कृतीचे अभिमानी होते. त्यांनी कुशाण राजांचा पराभव करून काशीवर विजय मिळविल्यानंतर तिथल्या घाटावर १० अश्वमेध करून अवभृथस्नान केले, म्हणून त्या घाटाला दशाश्वमेध घाट नाव पडले.

मत्स्यपुराणात ईश्वर स्वमुखाने पार्वतीला वाराणसीचे माहात्म्य सांगत आहे —

**इदं गुह्यतमं क्षेत्रं सदा वाराणसी मम ।**
**सर्वेषामेव जन्तूनां हेतुर्मोक्षस्य सर्वदा ।।**
**ध्यायतस्तत्र मां नित्यं योगाग्निर्दीप्यते भृशम् ।**
**कैवल्यं परमं याति देवानामपि दुर्लभम् ।।**
**अकामो वा सकामो वा अपि तिर्यग्गतोऽपि वा ।**
**अविमुक्ते त्यजन् प्राणान्मम लोके महीयते ।।**
**एतदेव परं स्थानमेतदेव परं शिवम् ।**
**एतदेव परं ब्रह्म एतदेव परं पदम् ।।**
**वाराणसी तु भुवनत्रयसारभूता**
**रम्या सदा मम पुरी गिरिराजपुत्रि ।**
**अत्रागता विविधदुष्कृतकारिणोऽपि**
**पापक्षयाद्विरजसः प्रतिभान्ति मर्त्याः ।।**

अर्थ — हे पार्वती, वाराणसी हे माझे गुह्यतम क्षेत्र आहे, इथे सर्व जन्तूना मोक्ष प्राप्त होतो. इथे माझे ध्यान करणा-

त्याचा योगाग्नी नित्य प्रदीप्त होतो. देवांनाही दुर्लभ अशा परम-कैवल्याला तो प्राप्त होतो. सकाम असो वा निष्काम असो, किंबहुना तिर्यग्योनीतलाही जीव असो, जो काशी क्षेत्रात प्राण-त्याग करतो, तो शिवलोकी विराजमान होतो. हेच परमस्थान, हेच परममंगल, हेच परब्रह्म आणि हेच परमपद होय. वाराणसी ही त्रिभुवनाचे सार असलेली माझी रम्य नगरी आहे. नाना प्रकारची दुष्कृत्ये करणारे लोकही या क्षेत्रात येऊन पाप-क्षयाने निर्मल आणि तेजस्वी बनतात. [ हिं. वि. को.; म. ज्ञा. को.; ट्रा. ए. इं.; हि. जॉ. ए. इं.; उ. प्र. बौ. वि.; भा. वा.; हि. ध. ]

**काशीकापडी** तिरमाळी पाहा.

**काशी चित्रशैली** राजस्थानी, मोगल, कांगडा, इ. चित्र-शैलीप्रमाणे काशीचीही एक स्वतंत्र शैली मानली जाते. काशीत भित्तिचित्रांची परंपरा फार जुनी आहे. काशी हे एक महान विद्याकेंद्र आहे. या ठिकाणी विविध कलांचे शिक्षण फार प्राचीन काळापासून मिळत आलेले आहे. काशीच्या या माहात्म्यातूनच या चित्रशैलीचा विकास झाला आहे. या शैलीत विभिन्न चित्रशैलींचे मिश्रण आहे. तिथल्या लोककलेतूनही तिने प्रेरणा घेतली आहे. ही शैली वर्णनात्मक असली, तरी तिच्यात दार्शनिक, आध्यात्मिक व आदर्शवादी अशा सर्व प्रवृत्तींना स्थान मिळाले आहे. या चित्रशैलीत सामाजिक जीवनाविषयीची सुंदर चित्रे आढळतात. चालीरीती, उत्सव, पर्व, इ. च्या चित्रांत सजीवता दिसते. त्या दृष्टीने श्री. शुक्ल यांची 'वरात', 'प्रेमप्रसून', 'प्रतीक्षा' ही चित्रे; श्री. महेंद्रनाथ सिंह यांची 'गंगापूजन', 'झूमते हाथी', 'वियोग', 'बहिणी', 'स्नेहकी गोदमे' ही चित्रे; श्री. कमल-सिंह याचे 'झूला'; श्री. पाण्डेय यांचे 'खेळणी' व श्री. चतुर्वेदी यांचे 'वटसावित्री' इ. चित्रांत सामाजिक जीवनातल्या हर्षोल्हा-सांचे क्षण चिरंजीव केलेले आढळतात. या चित्रशैलीत हत्ती, घोडे, हरीण, बैल, इ. पशूंची सुरेख चित्रेही पाहायला मिळतात. चित्रांत वस्तूंची व पात्रांची गर्दी असते. ही चित्रे आकाराने मोठी असतात व दुरून पाहूनही आनंद देऊ शकतात. [ महेन्द्र-सिंह – अजन्ता, मार्च १९५७ ]

**काशीबाबा** बंगालमधील आदिवासींचा एक देव. हा एक ब्राह्मण होता. एके दिवशी त्याला नदीवर तोंड धुवून शंखातून आवाज काढताना पाहून एका अडाणी गव-ळ्याला तो काहीतरी चेटूक करीत आहे, असे वाटले व त्याने त्याला ठार मारले. त्या दिवसापासून तो भूत झाला आणि गुरांचे रोग उत्पन्न करू लागला, अशी समजूत आहे. त्याचे नाव काशीनाथ असे होते, म्हणून लोक त्याला काशीबाबा असे म्हणू लागले. जेव्हा गुरांना रोग होतो, तेव्हा याची पूजा करतात. [ फो. लो. नॉ. इं. ]

**काशीराजवंश** या राजवंशाचा प्रारंभ काशीराजापासून झाला. काशीराजा ज्या वंशात झाला, त्याच्या मूळ पुरुषाचे नाव क्षत्रवृद्ध असे होते. क्षत्रवृद्ध हा आयूचा सातवा पुत्र होय. पुराणांच्या मते क्षत्रवृद्ध, शुनहोत्र, काश व दीर्घतपा हे या वंशाचे पहिले चार पुरुष आहेत. हरिवंशात ही यादी थोडी निराळी आढळते. शुनहोत्र व सुहोत्र हे एकच अस-ल्याचे हरिवंशावरून कळते. [ ए. इं. हि. ट्रॅ. ]

**काशीरामदास** (१६ व्या शतकाचा उत्तरार्ध) एक बंगाली कवी. बरद्वान जिल्ह्यातील सिंगी या गावी याचे वास्तव्य होते. याच्या बापाचे नाव प्रियंकर, मोठ्या भावाचे नाव श्रीकृष्णदास व धाकट्या भावाचे नाव गदाधर होते.

काशीरामदासाने महाभारताच्या पहिल्या तीन पर्वांचा संपूर्ण व विराटपर्वाचा अधिकांश भाग बंगालीत अनुवादित केला आहे. प. बंगालमध्ये याचे महाभारत लोकप्रिय आहे. याने महा-भारताचा केवळ अनुवादच केला नाही, तर त्यात पुराणातली काही उपाख्यानेही समाविष्ट केली आहेत. हा प्रतिभावंत कवी होता. त्याच्या रचनेत माधुर्यादी गुण सर्वत्र आढळतात. बंगालचा लोककवी म्हणून याची कृत्तिवासाप्रमाणेच ख्याती आहे. याचे हे अपुरे महाभारत पुढे नंदरामदास नामक त्याच्या पुतण्याने पुरे केले. [ हि. वि. को. ]

**काशी विद्यापीठ** काशी हे भारतातले एक प्रसिद्ध विद्या-पीठ होते. युआन च्वांग हा काशीत आला, त्या वेळी त्याला तिथे ३० बौद्ध विहार व १०० हिंदू मंदिरे दिसली. या विहारांत व मंदिरांत विद्वान भिक्षू व मोठमोठे पंडित राहत व निरनिराळ्या देशांतून येणाऱ्या विद्यार्थ्यांना ज्ञानदान करीत. काशीतल्या हिंदू मंदिरांत विशेषत्वाने ब्राह्मण विद्यार्थ्यांचीच शिक्षणाची सोय होई. हे विद्यार्थी मुख्यत्वे वेद-वेदांगे व दर्शने शिकत. बौद्ध व जैन विहारांत मात्र सर्व जातींच्या विद्यार्थ्यांना प्रवेश मिळे व वेदवेदांगांशिवाय निर-निराळ्या कलांचेही शिक्षण दिले जाई. येथील विद्वान आचार्य तीन वेद व अठरा शिल्पे यांचे अध्यापन करीत, असे

तित्तिरिजातकात म्हटले आहे. बुद्धाने या ठिकाणी गायनकला अभ्यासिली, असा जातकात उल्लेख आहे.

पण काशी हे मुख्यत्वे धार्मिक चळवळीचे क्षेत्र होते. त्यामुळे तक्षशिला व नालंदा या ठिकाणच्या विद्यापीठाप्रमाणे काशीतील विद्यापीठे सुसंघटित नव्हती. समस्त काशी क्षेत्रात निरनिराळ्या पंडितांच्या घरीही विद्यार्थी राहत व तिथे शिक्षण घेत. इथल्या शिक्षणकार्याला प्रसेनजित, बिंबिसार, यांच्यासारख्या अनेक राजांनी मदत केल्यामुळे काशीतले शिक्षणकार्य निरंतर चालत राहिले. [ प्रा. भा. वि. ]

## काश्मीर

हा निसर्गरम्य प्रदेश हिमालयाच्या पश्चिम भागात असून तो चिनाब, झेलम व सिंधू या नद्यांच्या एकावर एक उंच अशा दऱ्यांनी बनलेला आहे. याचा दक्षिणेकडील जम्मू हा भाग बहुतेक सपाट असून त्याच्या उत्तरेस ८००० फूट उंचीची पर्वताची रांग लागते. हा प्रदेश समशीतोष्ण असून ओक, देवदार, इ. वृक्षांनी आच्छादलेला आहे. तिथून हिमालयाची पीरपजाल शाखा ओलांडल्यावर काश्मीरची सुंदर दरी लागते. हिलाच कोणी नंदनवन म्हणतात. या दरीच्या भोवती उंच हिमाच्छादित पर्वतशिखरे दिसतात. त्यानंतर १४।१५ हजार फूट उंच पर्वताची रांग ओलांडून गेले, की उत्तरेस अस्तर व बाल्तिस्तान आणि पूर्वेस लडाख हे प्रदेश लागतात. वायव्येस गिलगित प्रदेश असून त्याच्या आसपास हिंदुकुश पर्वताच्या रांगा पसरलेल्या आहेत. अगदी उत्तरेकडे अतिशय उंच असा काराकोरम पर्वत (२८००० फूट) आहे. पुराणप्रसिद्ध मेरू पर्वत या काराकोरमच्या खिंडीतच आहे.

काश्मीरमधील सर्वात उंच पर्वतशिखर गॉडविन ऑस्टेन (२८,२६५ फूट) हे असून नंगा पर्वताची उंची २६,६५६ फूट आहे. याशिवाय शिवालिक, पंजाल, ननकन, हरमुख, इ. अनेक लहानमोठे पर्वतही या प्रदेशात आहेत. नद्या व सरोवरे यांनी काश्मीरचा बराच भाग व्यापला आहे. चिनाब, झेलम (वितस्ता) व सिंधू या नद्या आग्नेय भागातील हिमालयाच्या पर्वतराजीत उगम पावून प्रथम उत्तरेकडे वाहत जातात आणि नंतर पश्चिम भागातून दक्षिणेकडे जाऊन पंजाबामध्ये शिरतात. रावी नदी काश्मीरच्या आग्नेय भागाला लागून वाहत गेली आहे. याशिवाय दहाबारा लहान नद्यांनी काश्मीरची भूमी भिजवली आहे. या प्रदेशात असंख्य सरोवरे आहेत. त्यापैकी दल व वुलर ही सर्वात मोठी आहेत. अनंतनाग, अच्छाबल, कोकरनाग, वेरीनाग, चश्माशाही ही ठिकाणे तिथल्या पाण्याच्या झऱ्यांबद्दल प्रसिद्ध आहेत. वेरीनाग हे झेलमचे उगमस्थान होय.

काश्मीरमधील डोंगर व दऱ्या वृक्षवल्लींनी भरलेल्या असून त्यात असंख्य प्रकारच्या वनस्पती आढळतात. या वनस्पतींपासून विविध रंगांची फुले, नाना जातींची फळे आणि सुगंधी द्रव्ये



झेलमचा उगम – वेरीनाग

मिळतात. चिनार वृक्ष हे काश्मीरचे प्रतीकच आहे. हे झाड तोडणे म्हणजे पाप मानले जाते. पूर्वी त्याला कायद्यानेही बंदी होती. काश्मीरमधील कलाकुसरीत चिनार पानाची आकृती नेहमी आढळते.

काश्मीरमध्ये ७५ ते १५० सें. मी. पाऊस पडतो. पण लडाखभागात त्याचे प्रमाण १० सें. मी. इतके असून पूंछच्या आसपास ते १५० सें. मी. इतके आहे. काश्मीरच्या दरीत मात्र सुमारे ८० सें. मी. पाऊस पडतो. हिवाळ्यात इथल्या पर्वतांवर अतोनात बर्फ पडते. लडाख हा प्रदेश विलक्षण थंडीचा आहे. काश्मीरच्या इतर भागातही हिवाळ्यात कडाक्याची थंडी पडते. त्या वेळी नुसते उबदार कपडे घालून भागत नाही, तर फिरनच्या आत कांगरी नामक मातीची, मोठ्या पेल्याच्या आकाराची शेगडी बाळगावी लागते. ती वेताच्या पिंजऱ्यात ठेवून, तिच्यात कोळशाचा चुरा घालून त्यावर थोडे निखारे ठेवतात. या शेगडीच्या उबेमुळेच तिथली कडक थंडी सुसह्य होते. जम्मूच्या सपाट प्रदेशात उन्हाळा बराच असतो. पूर, दुष्काळ, धरणीकंप, इ. नैसर्गिक आपत्ती काश्मीरमध्ये नित्याच्याच असतात.



कांगरी – काश्मीर

काश्मीरच्या उत्पत्तीसंबंधी नीलमतपुराणात एक आख्या-

यिका आहे, ती अशी— फार प्राचीन काळी तिथे एक विशाल जलाशय असून सती (पार्वती) त्यात नौकाविहार करीत असे. त्यावरूनच त्याला सतीसरोवर हे नाव पडले होते. त्या जलाशयात जलोद्भव नामक एक राक्षस आपल्या अनुचरांसह राहत असून आसपास राहणाऱ्या नाग लोकांना फार पीडा देत असे. त्यांच्या विनंतीस अनुसरून काश्यप मुनीने वराहमूलम् (बारामूला) या ठिकाणी पर्वताची राग फोडून त्या सरोवरातील पाणी बाहेर सोडून दिले. त्यामुळे त्या राक्षसाचे सामर्थ्य नष्ट झाले आणि तो मारला गेला. पुढे काश्यपाने सपाट प्रदेशातील लोकांना तिथे आणून वसविले आणि शेती सुरू केली. मीर म्हणजे पर्वत, सीमा, समुद्र किंवा पेय. काश्यपाने सरोवर आटवून निर्माण केलेली भूमी म्हणून तिला काश्यपमीर हे नाव मिळाले. या नावाचेच पुढे काश्मीर असे रूप झाले. काश्यपऐवजी कश्यप असेही म्हणतात त्यावरून काश्मीरप्रमाणेच कश्मीर हे रूपही प्रचलित आहे.

मोगल बादशाह बाबर याने या शब्दाची व्युत्पत्ती निराळ्या प्रकारे केली आहे. कश् किंवा खश् हे एका जमातीचे नाव असून ते लोक या प्रदेशात राहत होते. मीर हा पहाडी भाषेतला शब्द असून त्याचा अर्थ भूमी असा आहे. त्यावरून कशलोकांची भूमी ती कश्मीर होय.

काश्मीरचा उल्लेख अनेक संस्कृत ग्रंथांत आढळतो. शक्तिसंगमतंत्र या ग्रंथात काश्मीरची व्याप्ती पुढीलप्रमाणे दिली आहे.




**शारदामठमारभ्य कुङ्कुमाद्रितटान्तकम् ।**
**तावत्काश्मीरदेशः स्यात् पञ्चाशद्योजनात्मकः ।।**

अर्थ – शारदा मठापासून केशराच्या पर्वतापर्यंत ५० योजने (१ योजन = ४ कोस) विस्तृत असलेला प्रदेश तो काश्मीर देश होय.

महाभारतात याचा उल्लेख 'काश्मीरमंडल' असा आहे (भीष्म. ९.५३). बृहत्संहिता, नीलमतपुराण, राजतरंगिणी या ग्रंथांमध्ये काश्मीरविषयी बरीच ऐतिहासिक माहिती मिळते.

राजतरंगिणी हा ग्रंथ १२ व्या शतकातल्या कल्हण नावाच्या पंडिताने लिहिला असून त्यात त्याने प्राचीन काळापासून इ. स. ११४८ पर्यंतचा काश्मीरचा इतिहास लिहिला आहे. त्यानंतर इ. स. १४२० पर्यंतचा इतिहास जोनराज नामक कवीने, १४८६ पर्यंतचा श्रीधर कवीने आणि १५८८ पर्यंतचा प्रज्ञाभट्ट कवीने लिहिला आहे. त्यापुढचा इतिहास फारसी व इंग्रजी ग्रंथांवरून समजतो. त्यांपैकी अल् बिरूनीचा ग्रंथ विशेष उल्लेखनीय आहे. त्यात काश्मीरचे व तेथील लोकांचे सविस्तर वर्णन केलेले आढळते.

फार प्राचीन काळी गोनर्द नावाचा राजा काश्मीरवर राज्य करीत होता. तो मगधाधिपती जरासंध याचा नातलग असून त्याच्या बाजूने श्रीकृष्णाशी लढण्यासाठी सैन्य घेऊन गेला होता. त्या युद्धात तो बलरामाच्या हातून मारला गेला, असे

ल्हण म्हणतो. त्या वेळी काश्मीरमध्ये नाग लोक राहत असून याव्यतिरिक्त गंधारी, खस (कश), दरद, इ. जमातींचीही सती तिथे होती. पुरातन कालापासून काश्मीरात नागपूजा चलित आहे. तिथल्या अनेक सरोवराना व झऱ्यांना नागवताची नावे मिळालेली आहेत. उदा० नीलनाग, अनंतनाग, ासुकीनाग, तक्षकनाग इत्यादी. नाग ही त्याची संरक्षक देवता ाहे. अबुलफज़ल याने ऐने अकबरीत म्हटले आहे, की त्या देशात सुमारे सातशे ठिकाणी नागांच्या आकृती कोरलेल्या ाढळतात. विष्णूने वासुकीनागाला इथे सपरिवार राहण्याचा ादेश दिला होता व इथे त्याला कोणी मारणार नाही, असे भयही दिले होते (नील. पु. १०५.७).

काश्मीरात गोनर्दीय वंशाचे राज्य अनेक शतके चालू होते. जतरंगिणीत त्या वंशाच्या सुमारे ८० राजांचे वर्णन आहे. रतु ऐतिहासिक दृष्टीने महत्त्वाचा काळ म्हणजे सनपूर्व ३ रे तक होय. त्या काळात सम्राट अशोकाने तिथे बौद्ध धर्माचा सार केला. श्रीनगरची स्थापना त्यानेच केली. सनपूर्व २ ऱ्या तकात काश्मीरमध्ये तातारांची सत्ता होती आणि त्यानंतर ाही काळ सीथियनाची. मात्र अशोकानंतर तिथे ब्राह्मणी धर्म ऱ्हा प्रस्थापित झाला होता.

इ. सनाच्या १ ल्या शतकात कुशाण वंशातील राजा कनिष्क ने काश्मीर जिकले व कनिष्कपूर (सध्याचे बियास नदीरील कानीसपूर) नावाचे नगर वसविले. त्याने काश्मीरमध्ये ीय बौद्धसभा बोलावली होती. कनिष्क, हुविष्क व जुष्क राजांच्या अमदानीत तिथे पुन्हा बौद्ध धर्माचा प्रसार झाला रा; पण ब्राह्मणी धर्मही चालूच राहिला.

त्यानंतरच्या काश्मीरच्या इतिहासात हूण वंशातील मिहिरल याचे नाव विशेष उल्लेखनीय ठरते. त्याने इ. स. ५१५ त ाश्मीर जिकले. तिथे असताना त्याने शैव पंथ स्वीकारला ाणि मिहिरेश्वराचे मंदिर स्थापले. ( पहलगामचे मामलेश्वर देर ते हेच मंदिर असावे.) त्याच्यानंतर मेघवाहन व प्रवरा हे राजे झाले. प्रवरसेनाने सध्याचे श्रीनगर वसविले असे णतात; कारण अशोकाने वसविलेले ते नगर पूर्वीच नष्ट ले होते. त्या वेळी तिथे बौद्धधर्माला उतरती कळा लागून ा संप्रदाय बलवत्तर झाला होता.

**कार्कोट वंश–** गोनर्दीय वंशाचे राज्य काश्मीरमध्ये चालूच ते. त्या वंशातला शेवटचा राजा बालादित्य निपुत्रिक मरण ला आणि त्याचा जामात दुर्लभवर्धन याने कार्कोट वंशाची ापना केली. ललितादित्य मुक्तापीड (इ. स. ७२४–६०) त्या वशातला सर्वश्रेष्ठ राजा होता. त्याने नर्मदेपासून ब्रेटपर्यंत संपूर्ण उत्तर भारतावर आपले साम्राज्य प्रस्थापित केले होते. कार्कोट वंशाचे राज्य सुमारे २५० वर्षे चालू होते. हे घराणे शिवोपासक असून त्यानी तिथे अनेक शिवमंदिरे बांधली. त्यांनी काश्मीरचे राज्य बलाढ्य आणि वैभवसंपन्न केले व विद्येलाही उत्तेजन दिले. (कार्कोट राजवश पाहा).

**उत्पल घराणे–** कार्कोट वंशातील राजा ललितापीड हा फार विलासी व दुर्गुणी होता. त्याची जयादेवी नावाची दासी होती. तिच्या पाच भावानी शेवटी काश्मीरची सत्ता बळकावली. त्यांच्यापैकी उत्पल याचा नातू अवतिवर्मा हा या घराण्यातला पहिला राजा होय (इ. स. ८५५–८३). हा मोठा पराक्रमी व कर्तृत्ववान होता. त्याने शूर नामक प्रधानाच्या साहाय्याने राज्यात शांतता प्रस्थापित करून राज्याला चांगले दिवस आणले. अवंतिपूर हे नगर त्यानेच वसविले. त्याच्या राजवटीत सूय्य नामक एका स्थापत्यविशारदाने वितस्ता वगैरे नद्यांना बंधारे घालून अनेक कालवे बांधले. त्यामुळे महापुराचा धोका कमी होऊन शेतीचाही विकास झाला. सूर्यपूर हे नगर त्या पुरुषाचे स्मारकच आहे.

अवंतिवर्म्याचा पुत्र शकरवर्मा हाही पराक्रमी असून त्याने दार्वाभिसार, त्रिगर्त, गुर्जर (पंजाब) हे देश पादाक्रात केले. पण तो जुलमी निघाला. इ. स. ९०२ मध्ये त्याचा अंत झाला. त्यानंतर काही वर्षे काश्मीरमध्ये अराजक माजले. तंत्री नावाच्या एका सेनापथकाच्या हाती राजसत्ता गेली होती. त्या सेनापथकाने अनेक राजे गादीवर वसविले. त्यातील चक्रवर्मा हा त्याच्या भोगविलासासाठी आणि उन्मत्तावंती हा त्याच्या

१ 
२ 
३ 
४ 
५ 

१ व २ विनयादित्याची सुवर्ण नाणी
३ व ५ यशोवर्म्याची मिश्र सुवर्ण नाणी
४ राणी दिद्दा हिचे ताब्याचे नाणे

यिका आहे, ती अशी-- फार प्राचीन काळी तिथे एक विशाल जलाशय असून सती (पार्वती) त्यात नौकाविहार करीत असे. त्यावरूनच त्याला सतीसरोवर हे नाव पडले होते. त्या जलाशयात जलोद्भव नामक एक राक्षस आपल्या अनुचरांसह राहत असून आसपास राहणाऱ्या नाग लोकांना फार पीडा देत असे. त्यांच्या विनंतीस अनुसरून काश्यप मुनीनें वराहमूलम् (बारामूला) या ठिकाणी पर्वताची रांग फोडून त्या सरोवरातील पाणी बाहेर सोडून दिले. त्यामुळे त्या राक्षसाचे सामर्थ्य नष्ट झाले आणि तो मारला गेला. पुढे काश्यपाने सपाट प्रदेशातील लोकांना तिथे आणून वसविले आणि शेती सुरू केली. मीर म्हणजे पर्वत, सीमा, समुद्र किंवा पेय. काश्यपाने सरोवर आटवून निर्माण केलेली भूमी म्हणून तिला काश्यपमीर हे नाव मिळाले. या नावाचेच पुढे काश्मीर असे रूप झाले. काश्यपऐवजी कश्यप असेही म्हणतात त्यावरून काश्मीरप्रमाणेच कश्मीर हे रूपही प्रचलित आहे.




मोगल बादशाह बाबर याने या शब्दाची व्युत्पत्ती निराळ्या प्रकारे केली आहे. कश् किंवा खश् हे एका जमातीचे नाव असून ते लोक या प्रदेशात राहत होते. मीर हा पहाडी भाषेतला शब्द असून त्याचा अर्थ भूमी असा आहे. त्यावरून कशलोकांची भूमी ती कश्मीर होय.

काश्मीरचा उल्लेख अनेक संस्कृत ग्रंथांत आढळतो. शक्तिसंगमतंत्र या ग्रंथात काश्मीरची व्याप्ती पुढीलप्रमाणे दिली आहे.

**शारदामठमारभ्य कुङ्कुमाद्रितटान्तकम् ।**
**तावत्काश्मीरदेशः स्यात् पञ्चाशद्योजनात्मकः ।।**

अर्थ – शारदा मठापासून केशराच्या पर्वतापर्यंत ५० योजने (१ योजन = ४ कोस) विस्तृत असलेला प्रदेश तो काश्मीर देश होय.

महाभारतात याचा उल्लेख 'काश्मीरमंडल' असा आहे (भीष्म. ९.५३). बृहत्संहिता, नीलमतपुराण, राजतरंगिणी या ग्रंथांमध्ये काश्मीरविषयी बरीच ऐतिहासिक माहिती मिळते.

राजतरंगिणी हा ग्रंथ १२ व्या शतकातल्या कल्हण नावाच्या पंडिताने लिहिला असून त्यात त्याने प्राचीन काळापासून इ. स. ११४८ पर्यंतचा काश्मीरचा इतिहास लिहिला आहे. त्यानंतर इ. स. १४२० पर्यंतचा इतिहास जोनराज नामक कवीने, १४८६ पर्यंतचा श्रीधर कवीने आणि १५८८ पर्यंतचा प्रज्ञाभट्ट कवीने लिहिला आहे. त्यापुढचा इतिहास फारसी व इंग्रजी ग्रंथांवरून समजतो. त्यांपैकी अल् बिरूनीचा ग्रंथ विशेष उल्लेखनीय आहे. त्यात काश्मीरचे व तेथील लोकांचे सविस्तर वर्णन केलेले आढळते.

फार प्राचीन काळी गोनर्द नावाचा राजा काश्मीरवर राज्य करीत होता. तो मगधाधिपती जरासंध याचा नातलग असून त्याच्या बाजूने श्रीकृष्णाशी लढण्यासाठी सैन्य घेऊन गेला होता. त्या युद्धात तो बलरामाच्या हातून मारला गेला, असे

कल्हण म्हणतो. त्या वेळी काश्मीरमध्ये नाग लोक राहत असून त्याव्यतिरिक्त गंधारी, खस (कश), दरद, इ. जमातीचीही वसती तिथे होती. पुरातन कालापासून काश्मीरात नागपूजा प्रचलित आहे. तिथल्या अनेक सरोवराना व झऱ्याना नाग-देवताची नावे मिळालेली आहेत. उदा० नीलनाग, अनंतनाग, वासुकीनाग, तक्षकनाग इत्यादी. नाग ही त्यांची संरक्षक देवता आहे. अबुलफज़ल याने ऐने अकबरीत म्हटले आहे, की त्या प्रदेशात सुमारे सातशे ठिकाणी नागांच्या आकृती कोरलेल्या आढळतात. विष्णूने वासुकीनागाला इथे सपरिवार राहण्याचा आदेश दिला होता व इथे त्याला कोणी मारणार नाही, असे अभयही दिले होते (नील. पु. १०५.७).

काश्मीरात गोनर्दीय वंशाचे राज्य अनेक शतके चालू होते. राजतरंगिणीत त्या वंशाच्या सुमारे ८० राजाचे वर्णन आहे. परंतु ऐतिहासिक दृष्टीने महत्त्वाचा काळ म्हणजे सनपूर्व ३ रे शतक होय. त्या काळात सम्राट अशोकाने तिथे बौद्ध धर्माचा प्रसार केला. श्रीनगरची स्थापना त्यानेच केली. सनपूर्व २ ऱ्या शतकात काश्मीरमध्ये तातारांची सत्ता होती आणि त्यानंतर काही काळ सीथियनांची. मात्र अशोकानंतर तिथे ब्राह्मणी धर्म पुन्हा प्रस्थापित झाला होता.

इ. सनाच्या १ ल्या शतकात कुशाण वंशातील राजा कनिष्क याने काश्मीर जिकले व कनिष्कपूर (सध्याचे बियास नदी-वरील कानीसपूर) नावाचे नगर वसविले. त्याने काश्मीरमध्ये तृतीय बौद्धसभा बोलावली होती. कनिष्क, हुविष्क व जुष्क या राजांच्या अमदानीत तिथे पुन्हा बौद्ध धर्माचा प्रसार झाला खरा; पण ब्राह्मणी धर्मही चालूच राहिला.

त्यानंतरच्या काश्मीरच्या इतिहासात हूण वशातील मिहिर-कुल याचे नाव विशेष उल्लेखनीय ठरते. त्याने इ. स. ५१५ त काश्मीर जिकले. तिथे असताना त्याने शैव पंथ स्वीकारला आणि मिहिरेश्वराचे मदिर स्थापले. ( पहलगामचे मामलेश्वर मंदिर ते हेच मदिर असावे.) त्याच्यानंतर मेघवाहन व प्रवर-सेन हे राजे झाले. प्रवरसेनाने सध्याचे श्रीनगर वसविले असे म्हणतात; कारण अशोकाने वसविलेले ते नगर पूर्वीच नष्ट झाले होते. त्या वेळी तिथे बौद्धधर्माला उतरती कळा लागून शैव संप्रदाय बलवत्तर झाला होता.

**कार्कोट वंश**— गोनर्दीय वंशाचे राज्य काश्मीरमध्ये चालूच होते. त्या वंशातला शेवटचा राजा बालादित्य निपुत्रिक मरण पावला आणि त्याचा जामात दुर्लभवर्धन याने कार्कोट वंशाची स्थापना केली. ललितादित्य मुक्तापीड (इ. स. ७२४–६०) हा त्या वंशातला सर्वश्रेष्ठ राजा होता. त्याने नर्मदेपासून तिबेटपर्यंत संपूर्ण उत्तर भारतावर आपले साम्राज्य प्रस्थापित केले होते. कार्कोट वंशाचे राज्य सुमारे २५० वर्षे चालू होते. हे घराणे शिवोपासक असून त्यानी तिथे अनेक शिवमंदिरे बांधली. त्यानी काश्मीरचे राज्य बलाढ्य आणि वैभवसंपन्न केले व विद्येलाही उत्तेजन दिले. (कार्कोट राजवश पाहा).

**उत्पल घराणे**— कार्कोट वंशातील राजा ललितापीड हा फार विलासी व दुर्गुणी होता. त्याची जयादेवी नावाची दासी होती. तिच्या पाच भावांनी शेवटी काश्मीरची सत्ता बळकावली. त्याच्यापैकी उत्पल याचा नातू अवंतिवर्मा हा या घराण्यातला पहिला राजा होय (इ. स. ८५५–८३). हा मोठा पराक्रमी व कर्तृत्ववान होता. त्याने शूर नामक प्रधानाच्या साहाय्याने राज्यात शातता प्रस्थापित करून राज्याला चांगले दिवस आणले. अवंतिपूर हे नगर त्यानेच वसविले. त्याच्या राजवटीत सूय्य नामक एका स्थापत्यविशारदाने वितस्ता वगैरे नद्यांना बंधारे घालून अनेक कालवे बांधले. त्यामुळे महापुराचा धोका कमी होऊन शेतीचाही विकास झाला. सूर्यपूर हे नगर त्या पुरुषाचे स्मारकच आहे.

अवंतिवर्म्याचा पुत्र शंकरवर्मा हाही पराक्रमी असून त्याने दार्वाभिसार, त्रिगर्त, गुर्जर (पंजाब) हे देश पादाक्रात केले. पण तो जुलमी निघाला. इ. स. ९०२ मध्ये त्याचा अंत झाला. त्यानंतर काही वर्षे काश्मीरमध्ये अराजक माजले. तंत्री नावाच्या एका सेनापथकाच्या हाती राजसत्ता गेली होती. त्या सेनापथकाने अनेक राजे गादीवर बसविले. त्यातील चक्रवर्मा हा त्याच्या भोगविलासासाठी आणि उन्मत्तावंती हा त्याच्या

१ 
२ 
३ 
४ 
५ 

१ व २ विनयादित्याची सुवर्ण नाणी
३ व ५ यशोवर्म्याची मिश्र सुवर्ण नाणी
४ राणी दिद्दा हिचे तांब्याचे नाणे

क्रूरतेविषयी कुप्रसिद्ध आहे. शेवटी सेनापती कमलवर्धन याने राजधानी ताब्यात घेऊन तेथील ब्राह्मणसभेला राजा नियुक्त करण्याचा आदेश दिला. सभेने यशस्कर नावाच्या एका विद्वान गृहस्थाला सिंहासनावर बसविले (९३९). त्या थोर पुरुषाने शांतता व सुव्यवस्था प्रस्थापित करून काश्मीरचे राज्य पुनश्च समृद्ध केले. इ. स. ९४८ मध्ये तो मृत्यु पावल्यावर त्याचा पुत्र संग्रामदेव गादीवर बसला. पण त्याचा प्रधान पर्वगुप्त याने त्याला मारून राज्य बळकावले (९४९). त्याच्यानंतर त्याचा पुत्र क्षेमगुप्त राजा झाला. याने सिंहराज नामक लोहराधिपतीची कन्या दिद्दा हिच्याशी विवाह केला. तो ९५८ त मरण पावला. त्याच्यामागून त्याचा पुत्र अभिमन्यू राजा झाला; पण तो लहान असल्यामुळे दिद्दा राणीच राज्यकारभार पाहात होती. ती दुष्ट, संशयी, कठोर आणि विलासी असली, तरी तिच्या अंगी मुत्सद्देगिरी व शासनशक्ती होती. अभिमन्यू व त्याचे पुत्र या नामधारी राजांना ९८० पर्यंत तिने गादीवर ठेवले. नंतर ती स्वतःच राज्य करू लागली. तिच्या विरुद्ध अनेक उठाव झाले; पण ते तिने हाणून पाडले. शेवटी १००३ साली ती मरण पावली आणि काश्मीरचे राज्य तिच्या भावाचा मुलगा संग्रामराज याला मिळाले.

**लोहर घराणे**— या घराण्यातला पहिला राजा संग्रामराज कर्तबगार असल्यामुळे त्याच्या कारकीर्दीत काश्मीरला भरभराटीचे दिवस लाभले. त्याच्यानंतर हरिराज व अनंतदेव हे राजे झाले. अनंतदेवाची राणी सूर्यमती ही फार धार्मिक व कर्तबगार होती. तिने राज्यात शांतता व सुव्यवस्था ठेवून अनेक शिवालये बांधली. अनंतदेवाने आपला पुत्र कलश याला राज्य देऊन वानप्रस्थाश्रम स्वीकारला. पण कलशाचे दुर्वर्तन पाहून त्याला फार शोक झाला व त्याने आत्महत्या केली; राणी सूर्यमती सती गेली.

कलशानंतर त्याचा पुत्र हर्ष हा राजा झाला. तो स्वतः विद्वान व कवी असून विद्वानांचा पोशिंदा होता. पण शेवटी तो दुराचारी बनला व इ. स. ११०१ मध्ये त्याचा वध झाला. त्याच्यामागून लोहर घराण्यातलेच दोन भाऊ उच्छल व सुस्सल आणि नंतर सुस्सलाचा पुत्र जयसिंह यांनी ११५५ पर्यंत तिथे राज्य केले. जयसिंहाच्या कारकीर्दीतच कल्हण हा पंडित होऊन गेला. त्या वेळी काश्मीरात भिन्न सरदारांची यादवी चालू होती. त्यानंतर सुमारे दोनशे वर्षे काश्मीरवर हिंदू राजांची सत्ता असली, तरी ती आपसातील दुहीने दुर्बळ झाली होती. त्यामुळे तिथे मुसलमानी सत्तेला चंचुप्रवेश मिळाला. उदयनदेवाची विधवा कोटाराणी ही राज्य करीत असताना शाह मीर नावाच्या मुसलमान सरदाराने काश्मीरचे राज्य जिंकून तिथे मुस्लिम सत्ता स्थापन केली. त्याने शमसुद्दीन हे नाव धारण केले. इ. स. १३९४–१४१७ या काळात सुलतान शिकंदर नावाचा एक जुलमी राजा काश्मीरवर राज्य करीत होता. त्याने अनेक हिंदू मंदिरे फोडली व हिंदूंची कत्तलही केली. पण त्याचा मुलगा झैन उल् आबदीन (१४२०–७०) हा फार सहिष्णू व धोरणी पुरुष असल्यामुळे त्याने हिंदूंच्या देवालयांचा पुनरुद्धार केला. त्यानंतर १५८७ मध्ये अकबराने काश्मीर जिंकून ते मोगल साम्राज्याला जोडले.

औरंगजेबाच्या पश्चात मोगलशाहीस उतरती कळा लागली व १७५१ च्या सुमारास काश्मीर स्वतंत्र झाले. पण लवकरच अहमदशाह दुराणीने तो प्रांत जिंकला व तेव्हापासून त्यावर अफगाण सत्ता सुरू झाली. त्यांच्या अमलाखाली काश्मीरच्या प्रजेवर फारच जुलूम झाला. शेवटी शीख राज्याचा संस्थापक रणजितसिंग याने १८१९ त अफगाणांचा पराभव करून काश्मीर जिंकले. त्याच्या गुलाबसिंग नावाच्या डोग्रा राजपूत सरदाराने इ. स. १८४१ साली किस्तवार, लडाख, बाल्तिस्तान हे प्रांत काश्मीरच्या राज्याला जोडले. १८४५ मधील इंग्रज व शीख यांच्या युद्धात गुलाबसिंग तटस्थ राहिल्यामुळे इंग्रजांना जय मिळाला आणि इंग्रजांनी गुलाबसिंगाला काश्मीर प्रांत बहाल केला (१८४६). त्याने नंतर गिलगित प्रांतही शिखांच्याकडून जिंकून घेतला. अशा प्रकारे काश्मीर संस्थानाची स्थापना झाली.

ब्रिटिश साम्राज्यात काश्मीर हे एक पहिल्या प्रतीचे संस्थान होते. इ. स. १९४७ साली हिंदुस्थानची फाळणी झाली तेव्हा हे संस्थान भारतीय संघराज्यात सामील झाले. जम्मू, काश्मीर, लडाख व गिलगित हे त्याचे चार मुख्य भाग आहेत. संपूर्ण काश्मीरचे क्षेत्रफळ ८४,४७१ चौ. मैल होते. १९४१ च्या शिरगणनेप्रमाणे लोकसंख्या ४० लाखांवर होती. या प्रदेशाच्या पूर्वेस तिबेट, उत्तरेस चिनी तुर्कस्तान (सिंकीयांग), सोव्हिएट तुर्कस्तान व अफगाणिस्तान, पश्चिमेस पाकिस्तान व दक्षिणेस पंजाब हे प्रदेश सीमेला लागून आहेत. फाळणीनंतर लवकरच पश्चिम सीमेवरील टोळ्यांनी काश्मीरवर आक्रमण करून त्याचा काही भाग व्यापला व तो सध्या पाकिस्तानच्या ताब्यात आहे. या व्याप्त भागात गिलगित, दार्दिस्तान व बाल्तिस्तान हे प्रांत येतात. इ. स. १९५४ मध्ये काश्मीरी घटनापरिषदेने १९४७ मधील विलीनीकरणाला मान्यता दिली. इ. स. १९६२ मध्ये चीनने काश्मीरवर आक्रमण करून लडाखचा १४,००० चौ. मैल प्रदेश बळकावला आहे.

काश्मीरमध्ये श्रीनगर व जम्मू ही दोनच मोठी शहरे असून श्रीनगर ही त्याची उन्हाळी व जम्मू ही हिवाळी

राजधानी आहे. याशिवाय ५०।६० लहान शहरे असून लहान लहान खेड्यांची संख्या ९ ते १० हजार आहे.

काश्मीरी लोकाचा मुख्य उद्योग शेती हाच असून ८० टक्के लोक त्यावरच उपजीविका करतात. तांदूळ हे त्यांचे प्रमुख अन्न असून ते गहू, मका, जव ही धान्येही पिकवितात. या प्रदेशात फळांची विपुलता असून काश्मीरी सफरचंद विशेष प्रसिद्ध आहे. याशिवाय केशर, तंबाखू व कापूस हे पदार्थही इथे पुष्कळ उत्पन्न होतात. जंगलातील वृक्षांपासून उत्तम प्रकारचे लाकूड व इतर असंख्य पदार्थ मिळतात.

काश्मीर हे रेशमासाठी फार प्रसिद्ध असून रेशमाचे गालिचे व शाली इथे उत्तम तयार होतात. या प्रांतात सोन्याच्या व नीलम, लाल, इ. रत्नांच्या खाणी असून अलिकडे लोखंड, कोळसा अल्युमिनियम, चुनखडी, इ. खनिजेही मोठ्या प्रमाणात उपलब्ध होऊ लागली आहेत.

रेशमी शाली विणणे हा काश्मीरमधला प्रमुख व्यवसाय होय. तो मोगल काळापासून चालू आहे. लोकरीचे सुंदर गालिचेही इथे मोठ्या प्रमाणावर बनविले जातात. लोकरीपासून उबदार वस्त्रे बनविण्याचे कारखाने इथे निघाले आहेत. काश्मीरमधील नक्षीकाम तर सुप्रसिद्धच आहे.



शालविणकर—काश्मीर

काश्मीरमध्ये काश्मीरी, पहाडी व डोग्री याभाषा प्रमुख असून काश्मीरी भाषा काश्मीरची दरी, किस्तबार ( किस्तबाड ) व भदेरवाह ( भद्रवाह ) या भागात बोलली जाते. जम्मू प्रांतातले लोक डोग्री बोलतात, तर पहाडी ही विशेषतः डोंगराळ भागात प्रचलित आहे. लडाखमध्ये बोधी ही भाषा बोलली जाते. उर्दू ही राज्याची अधिकृत भाषा असल्यामुळे तिचे ज्ञान सर्वांनाच असते. सिधू नदीच्या दरीत तिबेटी भाषेचा वापर आढळतो. पंजाबीचाही प्रसार काश्मीरात बराच झाला आहे.

**काश्मीरातील धर्मपंथ—** प्राचीन काळी काश्मीरमध्ये वैदिक धर्मच प्रचलित होता. सम्राट अशोकाने तिथे बौद्ध धर्माचा प्रसार करण्यासाठी एक बौद्ध संघ पाठविला. त्याला त्या कामी यशही मिळाले. त्यामुळे तिथला वैदिक धर्म ऱ्हासोन्मुख झाला. परंतु अशोकाच्या मृत्यूनंतर काश्मीरमध्ये पुन्हा वैदिक धर्माची स्थापना झाली. ख्रिस्ती शकाच्या प्रारंभी कुशाण वंशातील राजे कनिष्क व जुष्क यानी बौद्ध धर्म स्वीकारला आणि अनेक स्तूप व विहार बाधले. तेव्हापासून अनेक शतके तिथे हिंदू व बौद्ध हे दोन्ही धर्म प्रचलित होते. हळूहळू हिंदू धर्म प्रभावी झाला आणि त्या काळात तिथे असंख्य हिंदू मंदिरे निर्माण झाली. या सर्व मंदिरात शिवमंदिरांची संख्या मोठी होती. त्यांचे अवशेष अजूनही तिथे सापडतात. इ. सनाच्या १४ व्या शतकात मुसलमानी अंमल सुरू झाल्यानंतर हिंदूचा अतोनात छळ झाला आणि हजारो काश्मीरी पडित त्या प्रदेशातून परागंदा झाले. त्यामुळे काश्मीरात मुस्लिम वर्चस्व प्रस्थापित झाले; तिथे ते बहुसंख्य (९०%) झाले.

काश्मीरी मुसलमानात शिया व सुन्नी हे दोन पंथ प्रमुख आहेत. वहाबी, अहमदी, नूरबक्षी, मौलवी व नक्षबंदी हे उपपंथही तिथे आढळतात. बौद्ध लोकांत लामांचा धर्म प्रचलित आहे. त्यांचेही रक्तवस्त्री व पीतवस्त्री असे दोन पोटभेद आहेत. रक्तवस्त्री हा मूळचा पथ असून त्याचाच प्रसार काश्मीरमध्ये आहे. ईश्वर, शैव, शाक्त, वैष्णव व गाणपत्य असे हिंदू लोकाचे पाच पंथ आहेत. पण शैव हाच मुख्य पंथ होय. काश्मीरी पंडित एकजात शैवपंथी असून, जम्मूमधील बहुतेक हिंदू शैवच आहेत.

जम्मू, जसोत्र, रैसी, मिरपूर, इ. भागात शिव, रघुनाथ, कृष्ण, महावीर, भैरवनाथ, राम, इ. देवतांची उपासना प्रामुख्याने होते. जम्मूप्रांतातल्या काही भागात ग्रामदेवता व कुलदेवता यांच्याप्रमाणेच सतीपूजाही चालू आहे. काश्मीर भागात गणेशजी, गजधर, शारदादेवी यांची व प्राचीन वीर व सत्पुरुष यांची पूजा केली जाते. डोंगराळ भागात नाग व काली यांची उपासना विशेषत्वाने प्रचारात आहे.

**सण व उत्सव—** काश्मीरात असंख्य तीर्थक्षेत्रे असून तिथे वार्षिक यात्रा व उत्सव होतात. त्यांपैकी अमरनाथाची यात्रा, त्रिकूटतीर्थ येथील विष्णु-देवीची जत्रा, चिनेनीमधील शिवजीची जत्रा या विशेष प्रसिद्ध आहेत. होळी, दिवाळी, दसरा या सणाचे महत्त्व जम्मू शहराशिवाय इतरत्र फारसे दिसून येत नाही. मात्र लोहरी, वसंतोत्सव, वैशाखी हे ऋतूत्सव सर्वत्र साजरे होतात. महाशिवरात्री व चैत्री पाडवा हे दोन सण विशेष महत्त्वाचे आहेत. पहिल्या सणाला हेरथ हे नाव असून तो दहा दिवस चालतो. पौष अमावास्येस खिचमावस हा सण साजरा केला जातो. मुसलमानातही पुष्कळ यात्रा व सण आहेत. सय्यद

अबदुल कादर जिलानी हा काश्मीरी मुसलमानांचा राष्ट्रीय संत होय. त्याशिवाय अनेक पीर व साधू यांची पूजा जम्मूमध्ये थाटाने केली जाते. मुसलमानांप्रमाणे हिंदू लोकही या पीरांना व फकिरांना भजतात.

**चालीरीती–** काश्मीरमधील बहुतेक मुसलमान मूळचे राजपूत असल्यामुळे त्यांच्यामध्ये अद्यापि पुष्कळ हिंदू चालीरीती आढळतात. तिथे जातकर्म, उपनयन आणि विवाह हे संस्कार विशेष महत्त्वाचे असतात. उपनयन व विवाह हे समारंभ बरेच दिवस चालतात. या सर्व समारंभातील प्रमुख आकर्षण म्हणजे स्त्रियांची गाणी. मुसलमान स्त्रियाही हिंदूंच्या समारंभात गाणी म्हणून आपला आनंद प्रकट करतात. विवाहाच्या वेळी वधूवरांना एका गोलाकार रंगीत ‘ व्यूग ’ नामक आकृतीवर उभे करून थोडी साखर खायला देतात. नंतर वैदिक पद्धतीला अनुसरून सप्तपदी होते.

वधूवरांची निवड बहुधा आईबापच करतात. जम्मूमध्ये पूर्वी अशी चाल होती, की लग्न ठरल्यावर वराच्या बापाने आपली मुलगी वधूच्या भावाला दिली पाहिजे. स्वतःला मुलगी नसली, तर दुसऱ्याची मुलगी विकत घ्यावी किंवा पैशाने भरपाई करावी. लडाखमधील मुसलमानांतही ही चाल आढळून येत असे. यालाच साटेलोटे विवाह म्हणतात. मेघ, ठक्कर, डोम, पहाडी, जाट, गद्दी, इ. जातींत विवाहेच्छू मुलाला आपल्या भावी सासऱ्याच्या घरी चाकरी करावी लागे. कृत्रिम विवाहाचीही एक चाल त्यांच्यात होती. मुलीचे लग्न प्रथम एका खांबाशी लावायचे आणि नंतर दुसरे लग्न नियोजित वराशी करायचे. लडाखमधल्या बौद्ध लोकांत बहुपतित्वाची प्रथा होती. बौद्ध लोकात अशी एक चाल होती, की एखादा मनुष्य म्हातारा झाला व त्याची मुले अज्ञान असली, तर तो त्या मुलांचे एखाद्या वृद्ध स्त्रीशी लग्न लावीत असे व ती स्त्री ती मुले सज्ञान होईपर्यंत त्यांचे पालन करीत असे.



काश्मीरी कन्या

**लोक** – काश्मीरी लोक मुख्यतः आर्यवंशी आहेत. गोरापान रंग, किंचित उभट चेहरा, सरळ रेखीव नाक वटपोरे सौंदर्याचे विशेष स्त्री-पुरुष, तरूण-वृद्ध सर्वांमध्ये सर्वत्र आढळतात. काश्मीरी स्त्रीच्या सौंदर्यात एक प्रकारची सात्त्विकता दिसते.

सामान्यपणे काश्मीरी माणूस नाजुक, हळवा व भित्रा असतो. शतकानुशतके राकट पंजाबी व क्रूर टोळीवाले यानी केलेल्या जुलमामुळे हा भित्रेपणा त्यांच्यांत आलेला आहे. त्यामुळेच काश्मीरी लोकांना बाहेरच्या माणसाविषयी नेहमी अविश्वास वाटतो. काश्मीरी हिंदू डोंगराळ प्रदेशात राहणारे असूनही काटक किंवा कष्टाळू नाहीत. तिथे शरीरश्रमाचा मक्ता जणू मुसलमानांच्या कडे सोपवलेला आहे. शेतात राबणे, मजुरी करणे, लाकडे गोळा करणे, अन्न व भाज्या उत्पन्न करणे, मान मोडून कलाकसुरीची कामे करणे या सर्व बाबतीत मुसलमान समाजच पुढे आहे. हिंदूना फक्त बाबूगिरी, खर्डेघाशी किंवा अंमलदारी प्रिय असते.



फुगडी नृत्य – काश्मीर

जीवनाचा पुरेपूर उपभोग घेण्याची काश्मीरी माणसाची धडपड पाश्चात्यांनाही लाजविणारी आहे. श्रमिक स्त्री-पुरुषाचे जीवन संघर्षमय असते; तरीही लग्नासारख्या समारंभात व जत्रांमध्ये सर्वजण मोठ्या उत्साहाने भाग घेतात. त्यांना नाचण्याची व गाण्याची खूप हौस आहे.

**पोषाख** – पूर्वी काश्मीरी हिंदू-मुसलमानांचे पोषाख सारखेच असत. पण सध्या त्यात भिन्नता आली आहे. चुस्त पायजमा (तंग तुमान), गुडघ्याखाली येणारा व हातापेक्षा लांब बाही असलेला लोकरीचा झब्बा (फिरन), त्यावर जाकीट किंवा अचकन (बंद गळ्याचा कोट), खांद्यावर उपरणे व डोक्याला पट्टी काढून बांधलेला रेखीव फेटा हा पंडिताचा ( ब्राह्मण ) पोषाख; तर चुणीदार ढिला पायजमा, अंगात खमीस व जाकीट, डोक्याला गोल टोपी किंवा मजुराची माकडटोपी हा

मुसलमानांचा पोषाख. स्त्रिया सलवार व खमीस किंवा फिरन घालून डोक्याला रुमाल बांधतात. हिंदू स्त्रिया डोक्याला जो पांढरा रुमाल बांधतात त्याला तरंगा असे नाव आहे. या चौकोनी रुमालावर सापासारखे दिसणारे मलमलीचे शेपूट वेणीप्रमाणे पाठीवर सोडलेले असते. मुसलमान स्त्रिया डोक्याला रंगीत रुमाल ( कसबा ) जरा वेगळ्या पद्धतीने बांधतात. स्त्रियांच्या कपड्यांवर कशिदा व नक्षी असतेच. शहरातील मुस्लिम स्त्रिया बुरखा वापरतात; पण ग्रामीण भागात पडदापद्धती प्रचलित नाही.



काश्मीरी स्त्री

काश्मीरातील श्रीमंत स्त्रिया सोन्याचे व गरीब स्त्रिया चांदीचे दागिने वापरतात; पण काश्मीरमध्ये मिळणाऱ्या रंगी-बेरंगी खड्यांच्या माळा, डूल, अंगठ्या वगैरे नाना प्रकारचे मोहक दागिने त्यांना फार प्रिय असतात.

काश्मीरी लोकांचा आहार अगदी साधा असतो. भात-भाजी किंवा मास-मासळी यावर त्यांचे भागते. कडम नावाची पालेभाजी त्यांना विशेष आवडते. काश्मीरी ब्राह्मणही मास खातात; कारण तिथल्या अतिथंड हवामानात त्यांना ते आवश्यक असते. त्याचप्रमाणे चहा व तबाखू लहानांपासून थोरापर्यंत सर्वजण पितात.

**कलाकुसर**– काश्मीर हे कलावंताचे माहेरघर आहे. लोकरी व रेशमी शालीवरील कशिदा, अक्रोडाच्या लाकडावरील कोरीव काम, वेताच्या करंड्या, कागदाच्या लगद्यापासून बनविलेल्या सुबक वस्तू व त्यावरील रंगीत कलाकुसर पाहून असे वाटते, की तिथल्या सुंदर निसर्गानेच तिथल्या मानवाला ही कलेची प्रेरणा दिली असावी. काश्मीरमधली ही कारागिरी प्राचीन काळापासून परंपरेने चालत आलेली आहे.

**निसर्गरम्य स्थळे**– काश्मीरला पृथ्वीवरील नंदनवन म्हणतात; कारण तिथले सृष्टिसौंदर्य अनुपम आहे. तिथे नैसर्गिक व मानवनिर्मित अशी अनेक प्रेक्षणीय स्थळे आहेत. गुलमर्ग, खिलनमर्ग, सोनमर्ग, पहलगाम, इ. निसर्गरम्य उपवने; अमरनाथ, हरमुख, नंगापर्वत, इ. उंच पर्वतशिखरे; वुलर, दल, मानसबल, शेषनाग, नीलनाग, गगाबल, कौसरनाग इ. सरोवरे; अच्छाबल, कोकरनाग, वेरीनाग, इ. झरे; बनिहाल, पीरपंजाल, जोजीला यांसारखे नयनरम्य घाट, ही त्यांपैकी प्रमुख ठिकाणे होत. याशिवाय श्रीनगरमध्ये व त्याच्या आसपास अनेक सुदर बागा आहेत. त्यांपैकी शालीमार, निशात, नसीम व चश्माशाही या विशेष प्रसिद्ध आहेत. मोगल काळात केवळ एका दल सरोवराच्या काठीच ७०० उद्याने बनविली गेली होती असे म्हणतात. पण आता त्यातली चार-पाचच उरली आहेत. नूरजहाँचा भाऊ आसफखान याने १६३० मध्ये बनविलेली निशात बाग सर्वांत सुंदर आहे. डोंगराच्या कुशीत एकापुढे एक अशा दहा थरांवर ही पसरलेली आहे. (उद्यान पाहा)

**तीर्थस्थाने**– काश्मीरात असंख्य पवित्र ठिकाणे आहेत. तिथली बहुतेक प्राचीन मंदिरे शिव व विष्णू यांचीच आहेत. मार्तंडाचे मदिर हे अपवादच समजले पाहिजे. अनंतनागपासून चार मैल अंतरावर मार्तंड-मंदिराचे भग्नावशेष आढळतात. अमरनाथ हे प्रख्यात तीर्थस्थान १२,७२९ फूट उंच पर्वतावर आहे. तिथल्या गुहेतील हिममय स्वयंभू शिवलिंग पाहण्यासाठी हजारो यात्रेकरू श्रावण पौर्णिमेला तिथे जातात. जम्मू प्रांतात ५,३०० फूट उंच पर्वतावर वैष्णव देवीची गुहा आहे. तिथे त्रिकुटा भगवतीची मूर्ती असून दरवर्षी शेकडो यात्रेकरू तिच्या दर्शनासाठी जातात. श्रीनगरपासून १४ मैलांवर तुलामुला किंवा क्षीरभवानी नावाचे एक प्राचीन तीर्थस्थान आहे. तिथे एक पवित्र निर्झर असून त्याच्या पाण्याचा रंग कधी निळा, कधी लाल, तर कधी हिरवा दिसतो.



शिवमंदिर– शंकराचार्य टेकडी

दल सरोवराच्या बाजूला १००० फूट उंच टेकडीवर एक

शिवमंदिर आहे. तिथे शंकराचार्यांनी काही काल वास्तव्य केले होते, म्हणून त्या टेकडीला शंकराचार्यटेकडी म्हणतात. तिथले मंदिर सनपूर्व २५५० च्या सुमारास संधीमत राजाने बाधले, अशी दंतकथा आहे. राखी पूर्णिमेस इथे मोठी यात्रा भरते. श्रीनगरपासून ७४ मैलांवर शारदा नामक पवित्र स्थान आहे. तिथे दुर्गा देवीचे मंदिर आहे. प्राचीन काळी या स्थानाचे फार माहात्म्य होते.

श्रीनगरपासून १५ मैलांवर ख्रिव नावाच्या गावात ज्वालामुखी देवीचे स्थान आहे. आषाढ मासात तिथे यात्रा जमते. याशिवाय कपालमोचन हे श्रीनगरपासून २४ मैलांवर असलेले स्थान श्राद्धासाठी पवित्र मानलेले आहे. गंगाबल हे सरोवर श्रीनगरपासून ३४ मैल दूर आहे. गंगानदी इथून उगम पावली अशी समजूत असून तिथे अनेक लोक मृतांच्या अस्थींचे विसर्जन व श्राद्ध करण्यासाठी येतात.

**काश्मीरी शिल्प** – प्राचीन काळी काश्मीरमध्ये बौद्धांनी अनेक स्तूप व विहार बांधले होते; पण त्यापैकी आता बहुतेक नष्ट झाले आहेत. उष्कर (हविष्कपुर) व हारवन येथे दोन बौद्ध स्मारके आहेत. त्यांच्यावर गांधार शिल्पशैलीची छाप दिसते. वैदिकधर्मीयांच्या शिल्पावरही त्या शैलीचा प्रभाव झालेला आढळतो. कार्कोट वंशाच्या काळात काश्मीरमध्ये अनेक मंदिरे



पांद्रेठण येथील एक मंदिर

बांधली गेली. त्याचे भग्नावशेष अद्यापही पाहायला मिळतात. तिथल्या बऱ्याच विष्णुमूर्ती त्रिमुखी अथवा चतुर्मुखी आहेत. त्यातील एक मुख मानवी, एक वराहाचे व एक सिंहाचे असते. चौथे मुख असल्यास ते राक्षसाचे असते. शिवाच्याही त्रिमुखी चतुर्मुखी किंवा पंचमुखी मूर्ती आहेत. शिव किंवा विष्णू यांच्या अशा मूर्तींना हात चारच असतात. अनंतनाग येथील मंदिरातली नृसिंहाची मूर्ती मात्र द्विभुज आहे.

मार्तंड, अवंतिपूर, सोपूर इ. ठिकाणची मंदिरे भव्य असून ती बहुधा पंचायतनाची असावी. पांद्रेठण, पयार, नरस्थान, इ. ठिकाणची मंदिरे लहान असून त्यांना चारी दिशांना द्वारे आहेत. पांद्रेठण येथील मंदिर हे जलमंदिरच आहे. या मंदिरांना शिखरे नसून छपरे असतात व ती दुपाखी, चौपाखी किंवा बहुपाखी व मोठा ढाळ दिलेली आढळतात.

श्रीनगर ही काश्मीरची राजधानी असून ते एक अत्यंत प्राचीन नगर आहे. ते झेलमच्या दोन्ही तीरांवर वसलेले असून झेलमवर नऊ पूल बांधलेले आहेत. दल सरोवर हे या नगरातील सर्वात सुंदर स्थान आहे. त्याच्या एका बाजूला शंकराचार्यटेकडी असून दुसऱ्या बाजूला हारीपर्वत आहे. जवळच डोंगराच्या उतरणीवर परिमहल नावाचे एक ठिकाण आहे.



शाह हमदान मशीद– श्रीनगर

तिथे दारा शुकोह याने इ. स. १६५० मध्ये एक ज्योतिःशाला

बांधली होती; तिचे अवशेष आजही दिसतात. १४०४ मध्ये बांधलेली जामा मशीद ही काश्मीरमधली सर्वांत मोठी मशीद होय. शाह हमदान ही मशीद हिंदू मंदिराप्रमाणे समकोन चबुतऱ्यावर बांधलेली असून वरचा भाग बौद्ध मंदिरासारखा आहे. ती बहुतेक सगळी लाकडाचीच बांधलेली असून लाकडावर सुंदर नक्षीकाम केलेले आहे. पत्थर मशीद नूरजहाँने बांधलेली आहे. हजरत बाल या मशीदीत मुहमद पैगंबराचा एक केस ठेवलेला आहे, असे सांगतात. शिकाऱ्यात (लहान होडी) बसून संपूर्ण श्रीनगरची सहल करता येते. हे शिकारे फारच कलात्मक व सुंदर बनविलेले असतात.

**संस्कृती–** प्राचीन काळापासून काश्मीरात उच्च संस्कृतीची जोपासना होत आली आहे. विद्या-कलांचा उत्कर्ष तिथे दोन हजार वर्षांपासून चालू आहे. ललितादित्य, अवंतिवर्मा, यशस्कर, हर्ष, जैन उल् आबदीन या राजांनी अनेक विद्वानांना व कलावंतांना आश्रय देऊन संस्कृतीच्या विकासाला हातभार लावला. अनेक भव्य, सुंदर मंदिरे बांधून शिल्पकलेची स्मारके करून ठेवली. क्षेमेंद्र, मम्मट, अभिनवगुप्त यांच्यासारख्या पंडितांनी अनेक विद्वत्तापूर्ण संस्कृत ग्रंथ निर्माण केले. धर्म व तत्त्वज्ञान या दोन्ही क्षेत्रांत काश्मीरी लोकांनी प्रशंसनीय कामगिरी केली होती. 'प्रत्यभिज्ञादर्शन' नामक एक नवीन दर्शन काश्मीरमध्येच निर्माण झाले.

काश्मीरच्या इतिहासात कितीतरी राजे विलासी, व्यसनी व दुष्ट निपजले. त्यांनी प्रजेवर खूप जुलूम-जबरदस्ती केली. तथापि न्यायी व प्रजावत्सल असेही अनेक भूपती काश्मीरात निर्माण झाले व त्यांच्या कारकीर्दीत प्रजेला सुख-समृद्धी प्राप्त झाली, यातही शंका नाही. दिद्दा, सुगंधा, सूर्यमती यांच्यासारख्या अनेक कर्तबगार राज्यकर्त्या स्त्रियाही काश्मीरच्या इतिहासात चमकून गेल्या. त्यांनी राज्यकारभार फार कुशलतेने केला व प्रजेला सुख दिले. [ म. ज्ञा. को.; म. का.; चि. छा; योजना– काश्मीर विशेषांक १९६२ ]

## काश्मीरक सदानंद यती

(१७ वे शतक) एक आचार्य. यांचा अद्वैतब्रह्मसिद्धी नामक एक ग्रंथ असून तो अद्वैत दर्शनावरचा एक प्रामाणिक ग्रंथ समजला जातो. यात एकजीववाद हाच वेदान्ताचा मुख्य सिद्धान्त असल्याचे प्रतिपादन आहे. [ हिंदुत्व ]

## काश्मीरी ब्राह्मण

काश्मीरातील सर्व हिंदू बहुधा ब्राह्मणच आहेत. या ब्राह्मणांना पंडित म्हणण्याची प्रथा असली, तरी भिक्षुक ब्राह्मणांना बचबत व गृहस्थ ब्राह्मणांना बाबू म्हणतात. ते पूर्ण मांसाहारी असून दिसण्यात सुंदर व गोरे आहेत. त्यांची चेहेरेपट्टी आर्यवंशीय आहे. हे कठ शाखेचे असून लौगाक्षिसूत्रानुसार आपले संस्कार करतात. यांच्यातील कौल नावाचा वर्ग सर्वांत उच्च मानला जातो. हे लोक फारसी भाषा चांगली जाणतात. [ म. ज्ञा. को. ]

## काश्मीरी भाषा व साहित्य

वितस्ता (झेलम) घाटी, जोजीला व बर्जलपर्यंतचा भाग आणि जम्मू प्रांतातील बनिहाल, रामबन व भद्रवाह हे प्रदेश, या सर्व ठिकाणी काश्मीरी भाषा बोलली जाते. हा क्षेत्रविस्तार दहा हजार चौरस मैलांचा असून ही भाषा बोलणारे लोक पंधरा लाखांपेक्षा जास्त आहेत. जम्मू प्रांताच्या कश्तवाड भागात बोलली जाणारी कश्तवाडी ही भाषा काश्मीरी भाषेची प्रमुख उपभाषा आहे.

काश्मीरी भाषेला स्थानिक लोक काशुर या नावाने उल्लेखितात. १७ व्या शतकापर्यंत ती 'देशभाषा' किंवा 'भाषा' या नावाने निर्दिष्ट होत असे. काश्मीरी हे नाव अन्य प्रांतातील लोकांनी दिले असावे व नंतर ते रूढ झाले असावे. ऐतिहासिक दृष्ट्या अमीर खुस्रवच्या (१३ वे शतक) नुह–सिपिह्र (सि.३) या ग्रंथात सिंधी, लाहौरी, तिलंगी व माबरी या भाषांबरोबर काश्मीरी भाषेचा सर्वप्रथम उल्लेख आढळतो. पंजाबी, सिंधी, गुजराती, मराठी, बंगाली, इ. इंडो-आर्यन भाषांचा उद्गम व विकास ज्या प्रकारे झाला, त्याच प्रकारे काश्मीरी भाषेचाही विकास झाला आहे.

काश्मीरी भाषा ही दारद परिवारातीलआहे, असे ग्रियर्सनचे म्हणणे आहे. परंतु तसे मानूनही काश्मीरी भाषेतील काही शंकांचे समाधान होत नाही. काश्मीरी भाषेत घोष महाप्राणाचा अभाव आहे, हा दारद प्रभाव म्हणता येईल. परंतु सिंधी पंजाबी, डोग्री या भाषांशिवाय पूर्वी बंगाली व राजस्थानी या भाषांतही हे वैशिष्ट्य दिसते. पण काश्मीरीतील क्रियापदांच्या संश्लेषणात कर्त्याशिवाय कर्माचे लिंग, वचन व पुरुष यांचा जो प्रभाव दिसतो, त्यावर दारद भाषा काही प्रकाश टाकू शकत नाही. काश्मीरी भाषेवर दारदचा प्रभाव आहे, एवढे फार तर म्हणता येईल; पण तिचा उद्गम मात्र दारदपासून मानता येणार नाही.

चौदाव्या शतकापर्यंत काश्मीरी भाषा शारदा लिपीत लिहीत असत; पण चौदाव्या शतकात फारसी ही काश्मीरची राजभाषा झाली व काश्मीरी लिहिण्यासाठी फारसी लिपीचा उपयोग होऊ लागला. आजही या लिपीचे एक रूप तिथे प्रचारात आहे. देवनागरी लिपीचा वापरही हळूहळू होऊ लागला आहे.

काश्मीरी ध्वनिमालेत एकूण ५२ ध्वनिमान (फोनिम) आहेत. पदाच्या शेवटी असलेल्या अति ऱ्हस्व इ, उ यांना मात्र स्वर असे म्हणतात. त्याचप्रमाणे पदारंभी असलेल्या इ, ई, उ, ऊ व ए यांचा उच्चार यि, यी, वु, वू व ये असा होतो. नपुसकलिंग फक्त काही सर्वनामातच आढळते. काश्मीरी क्रियापदात इंडो-आर्यन वैशिष्टचे स्पष्टपणे आढळतात. लिंग, वचन, पुरुष व काल यांच्या अनुसार एकेका धातूची अनेक रूपे होतात.

काश्मीरी साहित्याचा पहिला नमुना शितिकंठाच्या महानयप्रकाशाच्या (१३ वे शतक) 'सर्वगोचरदेशभाषे' त पाहायला मिळतो. शैव सिद्धांनी काश्मीरीला शैवतंत्राचे लोकसुलभ माध्यम बनविले व पुढे हळूहळू त्या भाषेत साहित्यनिर्मिती होऊ लागली. काश्मीरी साहित्याचा विकास हा त्याच्या इंडो-आर्यन परंपरेचा द्योतक आहे. काश्मीरी साहित्याच्या प्रगतीचे पाच टप्पे पुढीलप्रमाणे दाखविता येतात—

**आदिकाल** ( इ. स. १२०० ते १४०० ) — या कालात संतवाणीचा प्रभाव बराच दिसतो. संतांनी शैवदर्शन, तसव्वुफ, सहजोपासना, सदाचार, अध्यात्मसाधना, पाखंडप्रतिरोध, आडंबरत्याग, इ. धार्मिक विषयाचे प्रतिपादन केले. मात्र या वाङमयात संवेदनाशील अभिव्यक्तीला फारसा वाव मिळाला नाही. शितिकंठाचा महानयप्रकाश, ललद्यताचा वाख्य, नुदर्योशाचे श्लोक व दुसऱ्या येशोंची (ऋषीची) पदे, हे सर्व त्या काळातील प्रातिनिधिक वाङमय होय. शितिकंठाच्या मृत्यूनंतर शंभर वर्षांनी लल्लेश्वरी नावाच्या कवयित्रीने काश्मीरी साहित्यात मोलाची भर घातली. तिचे काव्य आध्यात्मिक व गूढगुंजनात्मक असून आपले स्वतःचेच अनुभव तिने त्यात ग्रथित केले आहेत.

चौदाव्या व पंधराव्या शतकात काश्मीरमध्ये राजकीय व आध्यात्मिक अशी मोठी स्थित्यंतरे घडली. याच काळात काश्मीरात मुसलमान राजवट प्रस्थापित झाली. तैमूरलंगाने याच अवधीत काही सय्यदांची काश्मीरात रवानगी केली. ते लोक काश्मीरात स्थायिक होऊन इस्लामी धर्माचे प्रचारक बनले. ही सय्यद मंडळी सूफी संप्रदायाची होती. स्थानिक पंडित व संत यांच्यावर त्यांच्या विचारसरणीचा मोठाच प्रभाव पडला व त्यातून गूढ तत्त्वज्ञानाचा एक नवीन संप्रदाय काश्मीरात निर्माण झाला. शेख नुरउद्दिन हा या संप्रदायाचा प्रणेता होय.

**प्रबंधकाल** ( इ. स. १४०० — १५५० ) — या कालात जैन—उल्—आब्दीन (बडशाह— इ. स. १४२० — ७०) या सुलतानाने काश्मीरी साहित्याला प्रोत्साहन दिले. त्यामुळे काही लौकिक, पौराणिक व ऐतिहासिक घटना या विषयांवर अनेक कवींनी काव्यरचना केली. सुलतानाच्या जीवनावरही एक खंडकाव्य व एक दृश्यकाव्य लिहिले गेले. परंतु यांपैकी बऱ्याचशा रचना साम्प्रत उपलब्ध नाहीत. केवल भट्टावतार याचे बाणासुरवध व गणक प्रशस्त याचे सुखदुःखचरित ही दोनच काव्ये तेवढी उपलब्ध आहेत. या काळात अनेक संगीत कृतीही निर्माण झालेल्या दिसतात.

**गीतिकाल** ( इ. स. १५५० — १७५० ) — लोकजीवनातील विरह, मीलन, हर्ष, खेद, विषाद व हास्य यांचे भावचित्रण हे या गीतिकालाचे वैशिष्टच आहे. या कालातील काश्मीरी भावकाव्यात हब्बा खातून हिचे काव्य बऱ्याच वरच्या दर्जाचे आहे. १६ व्या शतकात काश्मीरवर युसुफशहा याचे राज्य होते. हब्बा खातून ही त्याची राणी होती. अकबराने युसुफशहाला देशत्याग करायला भाग पाडले आणि त्याला परत कधीच काश्मीरमध्ये येऊ दिले नाही. हब्बा खातूनच्या मनावर या गोष्टीचा परिणाम झाला. तिच्या काव्यात जागोजागी वियोगाची आर्त व्यथा दिसून येते, ती यामुळेच. एका गीतात ती म्हणते—

**रूठिमितिस तस यारस, वन्यतोस म्योन वीलजार।**
**यी न त म्येनी द्रिय छसतै, करसै सर निसार ॥**

अर्थ— सखि, माझ्या प्रियकराला माझी विरहव्यथा सांग. तो आला नाही, तर माझ्या गळ्याची शपथ आहे म्हणून सांग. माझे मस्तक मी त्याच्यावरून ओवाळून टाकले आहे.

हब्बा खातूननंतर काश्मीरात १८ व्या शतकात अरणिमाल नावाची एक कवयित्री होऊन गेली. हिचे काव्यही काश्मीरमध्ये फार लोकप्रिय झाले. आजही लोकशाहीर तिची कवने गाऊन उदरनिर्वाह करतात. तिचा पती मुनशी भवानीदास हा मोठा फारसी पंडित व लेखक होता. त्याने अरणिमालचा त्याग केला होता. त्यामुळे तिच्याही काव्यात एकूण करुण रसाचेच प्रवाह वाहिले आहेत.

त्या काळातील गझल वगैरे काव्यावर फारसी साहित्याचा मोठाच ठसा उमटला आहे. गूढगुंजनपर व रहस्यवादी साहित्याची रचना त्याही काळात चालू राहिली; पण कवीचे संकेत मात्र बदलले. ते फारसी परंपरेनुसार मद्याची सुरई व मद्याची दुकाने यांची भलामण करू लागले. अझिज दरवेश वहाबखार, मिर्झा काक हबिबुल्लाह नौशहरी या व इतर अनेक कवींनी असल्या प्रकारचे रहस्यमय व धुंद असे काव्य लिहिले. इ. स. १६५० च्या सुमारास साहिब कौल याने कृष्णचरित हे काव्य रचले. यात कृष्णलीलांचे बहारदार वर्णन आहे.

**प्रेमाख्यानकाल** ( इ. स. १७५०—१८०० ) — या कालात पौराणिक प्रणय काव्ये व प्रेममार्गी मसनवी काव्ये यांची

प्रामुख्याने रचना झाली. एका बाजूने रामचरित, कृष्णलीला, पार्वतीपरिणय, दमयंतीस्वयंवर, इ. आख्यानांवर मार्मिक लीलाकाव्ये रचली गेली; तर दुसऱ्या बाजूने फारसी कथाकाव्यांचाही काश्मीरी भाषेत अनुवाद होऊ लागला. तत्कालीन कवी अरबी, उर्दू व पंजाबी भाषेतील प्रेमकथा घेऊन त्यांच्यावरही आख्याने रचू लागले. रमजान बटाचे अकनंदुन, प्रकाशरामाचे रामायण, महमूद गामीचे शीरी–खुसरव, लैला–मजनूं व युसुफ–जुलेखा, वलीउल्लाह् मत्तू व ज़रीफ़ या दोघांचे हीमाल, मक़बूल शाह् क्रालवारी याचे गुलरेज, अजीज़ुल्लाह् हक्कानीचे मुमताज़ बेनजीर व लख्ययन बठ नागाम 'बुलबुल' याचे नलदमन ही त्या काळातील विशेष महत्त्वाची काव्ये होत.

परमानंद हा लीलाकाव्य लिहिणाऱ्या कवीचा प्रतिनिधी आहे. त्याने रादास्वयंवर, शे'वलगन व सो'दामचर्यथ ही तीन दीर्घकाव्ये लिहिली. ही सर्वच काव्ये श्रेष्ठ प्रतीची आहेत. त्यातही सोदामचर्यथ अधिक सरस आहे.

परमानंदाशिवाय कृष्ण राजदान आणि लक्ष्मण झ्यू या दोन कवींचीही काव्ये आढळतात. लक्ष्मण झ्यू हा परमानंदाचा मित्र व शिष्य होता. त्याने विपुल काव्यलेखन केलेले असून नलदमयंती हे त्याचे दीर्घकाव्य विशेष प्रसिद्ध आहे.

कृष्ण राजदान हा भोगवादी कवी दिसतो. माणसाने जीवनात विपुल सुखोपभोग घ्यावे, असे त्याचे तत्त्वज्ञान होते. त्याचे काव्य साधे, पण रसपरिप्लुत आणि गूढगुंजनापासून अलिप्त आहे. परमानंदाच्या काव्याची सखोलता आणि व्यापकता मात्र त्याच्या काव्यात आढळत नाही.

या कालात काश्मीरची राज्ययंत्रणा भ्रष्ट झाली व अधिकारीवर्गही लाचलुचपतखोर बनला. त्यामुळे काश्मीरची आर्थिक आणि सामाजिक घडी पार विस्कटून गेली. काश्मीरी साहित्यात या परिस्थितीचे पडसाद उमटल्याशिवाय राहिले नाहीत. तिथल्या कवींनी त्या परिस्थितीवर अनेक विडंबनात्मक काव्ये लिहिली आहेत. लारी शहा हे त्यातील विशेष उल्लेखनीय काव्य होय.

**आधुनिक काल** ( इ. स. १९०० पासून पुढे )– या कालात आधुनिक सुधारणेचे वारे काश्मीरच्या सामाजिक व सांस्कृतिक जीवनाला स्पर्श करू लागले. भारताच्या इतर प्रांतांतील आणि विशेषत: पंजाबमधील साहित्याची प्रगती पाहून काश्मीरमधील कवी भारावून गेले. त्यानी या नव्या जागृतीचे स्वागत केले. वहाबपरे याचा शाहनामा, मकबूलचे ग्रीस्त्यनामा व रसूलमीर याच्या गज़ला यानी या नव्या युगाची पूर्व पीठिका तयार केली. गुलाम अहमद महजूरच्या उदयाने काश्मिरी साहित्यात एक नवीन कालखंड सुरू झाला.

महजूरच्या पूर्वी काश्मीरी कवितेच्या कक्षा सामान्य लोकगीते, अध्यात्मगीते व शाब्दिक कसरती यांतच मर्यादित होत्या. या काव्याला प्रतिष्ठित समाजात मानाचे स्थान मिळवून दिले ते महजूरने. त्याने जुन्या गीतपरंपरेचा त्याग न करता तिच्यात नवीन प्राण भरला. तो एका ठिकाणी म्हणतो –

**लोल साजस ताज लय ह्यथ**
**आयि महजूरनि गज़ल**

अर्थ– प्रीतीच्या ततुवाद्यावर नवीन लय घेऊन महजूरची गीते जन्मास आली.

गेयता हे महजूरच्या काव्याचे वैशिष्टय आहे. प्रेम हाच त्याच्या काव्याचा स्थायीभाव असला, तरी इतर विषयांवरही त्याने विपुल काव्य रचले आहे. त्याचे आपल्या मातृभूमीवर फार प्रेम होते; ते पुढील कवितेत दिसून येते –

**बुलबुल वनन छु पोशन,**
**गुलशन वतन छु सोनुय ।**
**यथ सानि रंग वारे,**
**फुल पोश वारि वारे ।**

अर्थ – बुलबुल वनात गातो. ही माझी मातृभूमी म्हणजे एक सुंदर उपवन आहे. या आमच्या बागेत नाना प्रकारची फुले फुलतात आणि वातावरणात आपला सुगध पसरवितात.

याच सुमारास काश्मीरमध्ये राष्ट्रप्रेमाची लाट उसळली आणि मिर्जा गुलाम हसनबेग आरिफ व अबदुल अहमद आझाद यांनी समाजवादाचा प्रचार करणारी राष्ट्रीय कविता लिहिली. पंडित दयाराम गंजू यानी समाजसुधारणेची तुतारी फुंकली. कौल यानी गूढगुंजनात्मक व भक्तिपर काव्य रचले.

काश्मीरी भाषेत गद्य साहित्य फारसे नाही. पण जें आहे, त्यात लोककथा व कहाण्या यांचा भरणा मोठा आहे. या कथाकहाण्यांचे जनक मात्र अज्ञात आहेत. पूर्वी त्या केवळ मुखपरंपरेने चालत होत्या; पण आता त्यांचे संकलन झाले आहे. बहुतेक लोककथा जुन्या परंपरा व धार्मिक समजुती यांवर आधारलेल्या असून त्यांत फकीर व साधुसंत यांचे जीवन केंद्रस्थानी असते. काही कथांमध्ये हिंदू व मुस्लिम संस्कृतीचे सुंदर मिश्रण झालेले आढळते. काश्मिरी गद्य साहित्यात बायबलचे भाषातर व मौलवी शहा याचा तफसीर–ई–कुराण नावाचा धार्मिक ग्रंथ प्रसिद्ध आहे.

चालू शतकाच्या सुरवातीला काश्मीरमध्ये नाटचाचे पुनर्जीवन करण्याची चळवळ सुरू झाली. त्यासाठी काही हिंदुस्थानी नाटकांचे काश्मीरी भाषेत अनुवाद करण्यात आले. नंदलाल कौल यांची प्रल्हाद भगत, रामू राज्य (रामराज्य) वगैरे नाटके याच काळात प्रकाशित झाली. काही सामाजिक

काश्मीरी ध्वनिमालेत एकूण ५२ ध्वनिमान (फोनिम) आहेत. पदाच्या शेवटी असलेल्या अति ऱ्हस्व इ, उ यांना मात्र स्वर असे म्हणतात. त्याचप्रमाणे पदारंभी असलेल्या इ, ई, उ, ऊ व ए यांचा उच्चार यि, यी, वु, वू व ये असा होतो. नपुसकलिंग फक्त काही सर्वनामातच आढळते. काश्मीरी क्रियापदात इंडो-आर्यन वैशिष्टचे स्पष्टपणे आढळतात. लिंग, वचन, पुरुष व काल यांच्या अनुसार एकेका धातूची अनेक रूपे होतात.

काश्मीरी साहित्याचा पहिला नमुना शितिकंठाच्या महानयप्रकाशाच्या (१३ वे शतक) 'सर्वगोचरदेशभाषे' त पाहायला मिळतो. शैव सिद्धांनी काश्मीरीला शैवतंत्राचे लोकसुलभ माध्यम बनविले व पुढे हळूहळू त्या भाषेत साहित्यनिर्मिती होऊ लागली. काश्मीरी साहित्याचा विकास हा त्याच्या इंडो-आर्यन परंपरेचा द्योतक आहे. काश्मीरी साहित्याच्या प्रगतीचे पाच टप्पे पुढीलप्रमाणे दाखविता येतात—

**आदिकाल** ( इ. स. १२०० ते १४०० ) — या कालात संतवाणीचा प्रभाव बराच दिसतो. संतांनी शैवदर्शन, तसव्वुफ, सहजोपासना, सदाचार, अध्यात्मसाधना, पाखंडप्रतिरोध, आडंबरत्याग, इ. धार्मिक विषयाचे प्रतिपादन केले. मात्र या वाङमयात संवेदनाशील अभिव्यक्तीला फारसा वाव मिळाला नाही. शितिकंठाचा महानयप्रकाश, ललद्यताचा वाख्य, नुदर्योशाचे श्लोक व दुसऱ्या येशोंची (ऋषीची) पदे, हे सर्व त्या काळातील प्रातिनिधिक वाङमय होय. शितिकंठाच्या मृत्यूनंतर शंभर वर्षांनी लल्लेश्वरी नावाच्या कवयित्रीने काश्मीरी साहित्यात मोलाची भर घातली. तिचे काव्य आध्यात्मिक व गूढगुंजनात्मक असून आपले स्वतःचेच अनुभव तिने त्यात ग्रथित केले आहेत.

चौदाव्या व पंधराव्या शतकात काश्मीरमध्ये राजकीय व आध्यात्मिक अशी मोठी स्थित्यंतरे घडली. याच काळात काश्मीरात मुसलमान राजवट प्रस्थापित झाली. तैमूरलंगाने याच अवधीत काही सय्यदांची काश्मीरात रवानगी केली. ते लोक काश्मीरात स्थायिक होऊन इस्लामी धर्माचे प्रचारक बनले. ही सय्यद मंडळी सूफी संप्रदायाची होती. स्थानिक पंडित व संत यांच्यावर त्यांच्या विचारसरणीचा मोठाच प्रभाव पडला व त्यातून गूढ तत्त्वज्ञानाचा एक नवीन संप्रदाय काश्मीरात निर्माण झाला. शेख नुरउद्दिन हा या संप्रदायाचा प्रणेता होय.

**प्रबंधकाल** ( इ. स. १४०० — १५५० ) — या कालात जैन—उल्—आब्दीन (बडशाह— इ. स. १४२० — ७०) या सुलतानाने काश्मीरी साहित्याला प्रोत्साहन दिले. त्यामुळे काही लौकिक, पौराणिक व ऐतिहासिक घटना या विषयांवर अनेक कवींनी काव्यरचना केली. सुलतानाच्या जीवनावरही एक खंडकाव्य व एक दृश्यकाव्य लिहिले गेले. परंतु यांपैकी बऱ्याचशा रचना साप्रत उपलब्ध नाहीत. केवल भट्टावतार याचे बाणासुरवध व गणक प्रशस्त याचे सुखदुःखचरित ही दोनच काव्ये तेवढी उपलब्ध आहेत. या काळात अनेक संगीत कृतीही निर्माण झालेल्या दिसतात.

**गीतिकाल** ( इ. स. १५५० — १७५० ) — लोकजीवनातील विरह, मीलन, हर्ष, खेद, विषाद व हास्य यांचे भावचित्रण हे या गीतिकालाचे वैशिष्टच आहे. या कालातील काश्मीरी भावकाव्यात हब्बा खातून हिचे काव्य बऱ्याच वरच्या दर्जाचे आहे. १६ व्या शतकात काश्मीरवर युसुफशहा याचे राज्य होते. हब्बा खातून ही त्याची राणी होती. अकबराने युसुफशहाला देशत्याग करायला भाग पाडले आणि त्याला परत कधीच काश्मीरमध्ये येऊ दिले नाही. हब्बा खातूनच्या मनावर या गोष्टीचा परिणाम झाला. तिच्या काव्यात जागोजागी वियोगाची आर्त व्यथा दिसून येते, ती यामुळेच. एका गीतात ती म्हणते—

**रूठिमितिस तस यारस, वन्यतोस म्योन वीलजार।**
**यी न त म्येनी द्रिय छसतै, करसै सर निसार ।।**

अर्थ— सखि, माझ्या प्रियकराला माझी विरहव्यथा सांग. तो आला नाही, तर माझ्या गळ्याची शपथ आहे म्हणून सांग. माझे मस्तक मी त्याच्यावरून ओवाळून टाकले आहे.

हब्बा खातूननंतर काश्मीरात १८ व्या शतकात अरणिमाल नावाची एक कवयित्री होऊन गेली. हिचे काव्यही काश्मीरमध्ये फार लोकप्रिय झाले. आजही लोकशाहीर तिची कवने गाऊन उदरनिर्वाह करतात. तिचा पती मुनशी भवानीदास हा मोठा फारसी पंडित व लेखक होता. त्याने अरणिमालचा त्याग केला होता. त्यामुळे तिच्याही काव्यात एकूण करुण रसाचेच प्रवाह वाहिले आहेत.

त्या काळातील गझल वगैरे काव्यावर फारसी साहित्याचा मोठाच ठसा उमटला आहे. गूढगुंजनपर व रहस्यवादी साहित्याची रचना त्याही काळात चालू राहिली; पण कवीचे संकेत मात्र बदलले. ते फारसी परंपरेनुसार मद्याची सुरई व मद्याची दुकाने यांची भलामण करू लागले. अझिज दरवेश वहाबखार, मिर्झा काक हबिबुल्लाह नौशहरी या व इतर अनेक कवींनी असल्या प्रकारचे रहस्यमय व धुंद असे काव्य लिहिले. इ. स. १६५० च्या सुमारास साहिब कौल याने कृष्णचरित हे काव्य रचले. यात कृष्णलीलांचे बहारदार वर्णन आहे.

**प्रेमाख्यानकाल** ( इ. स. १७५०—१८०० ) — या कालात पौराणिक प्रणय काव्ये व प्रेममार्गी मसनवी काव्ये यांची

लेखक एकत्र जमले आणि त्यांनी काश्मीर सास्कृतिक आघाडी स्थापन केली. त्या वेळी टोळीवाल्यानी काश्मीरवर क्रूर हल्ला केला होता. काश्मीर महान सकटात सापडले होते. या सांस्कृतिक आघाडीने काश्मीरच्या जनतेला टोळीवाल्यांच्या विरुद्ध निधडचा छातीने उभे करण्यात यश मिळविले. चित्रकारांनी टोळीवाल्यांच्या क्रौर्याची चित्रे रंगविली, शाहिरांनी वीरश्रीचे पोवाडे गायिले आणि नटानी शहीद-शेरवानी, स्वाली अशासारखी काही नाटके करून लोकात जोम उत्पन्न केला. या सांस्कृतिक आघाडीने आपली स्वतःची एक तुकडी लष्करभरतीसाठीही पाठविली. त्या लोकानी कलावंत आणि साधे शिपाई अशा दोन्ही भूमिका केल्या.

साप्रत काश्मीरमध्ये ज्या प्रमुख नाटचसंस्था आहेत, त्यात सरकारी महिला कॉलेजच्या नाटचसंघाचा प्रामुख्याने उल्लेख केला पाहिजे. या संस्थेने इतर संस्थांपेक्षा बरीच आघाडी मारली आहे. [ काश्मीरी ड्रामा– मोहनलाल आइमा– मार्च ऑफ इडिया, सप्टें. १९५७; योजना ]

## काश्मीरीय लोकसाहित्य

अशोकाच्या राजवटीत काश्मीरखोऱ्यात बौद्ध धर्माचा पुष्कळ प्रचार झाला. त्यापुढे नऊ शतके या प्रदेशात बौद्ध धर्म टिकला. काश्मीरी लोक सास्कृतिक दृष्टचा पुढारलेले असल्यामुळे त्यांनी बौद्धांच्या जातककथांत मोलाची भर टाकली आहे. काश्मीरचे चीनशी प्रारभापासूनच सांस्कृतिक संबंध होते. हे संबंध पुढे तिबेट व लडाख यामधील व्यापारी रस्ते व बौद्ध धर्म यांच्यामुळे दृढ झाले. त्यामुळे चीन आणि काश्मीर यांच्यामध्ये लोककथा व लोकसाहित्य याची देवाणघेवाण बरीच झाली आहे.

काश्मीरी भाषा ही पूर्वी काश्मीर खोऱ्यातील मूळ रहिवाश्यांची होती. प्राकृत भाषेचीच ती एक शाखा होती. पण नंतर संस्कृतच्या प्रभावामुळे तिच्यात बदल झाला. १४ व्या शतकात काश्मीरमध्ये मुसलमानी अंमल सुरू झाला आणि अरबी व फारसी या दोन्ही भाषांतील बरेच शब्द काश्मीरी भाषेत घुसले. महायानप्रकाश हा काश्मीरी भाषेतील सर्वात प्राचीन ग्रंथ होय. हा १५ व्या शतकात निर्माण झाला. त्यानंतरच्या कालात काश्मीरी पडितांनी पर्शियन भाषेत ग्रंथलेखन सुरू केल्यामुळे काश्मीरी भाषेला निव्वळ बोलीचेच स्वरूप प्राप्त झाले.

**लोककथा**— काश्मीरच्या लोककथांचा साठा फार मोठा आहे. हिमाल आणि नागराय, जोहराखोतन आणि हायाबंड, गुलालशहा, इ. लोककथा काश्मीरी भाषेतल्या प्राचीन लोककथा होत. कित्येक काश्मीरी लोककथांची बीजे जगातल्या अनेक लोककथांतही आढळनात. आपत्कालातही आपले दातृत्वाचे ब्रीद न मोडणारे हातीम आणि हरिश्चंद्र या राजांसारखे कित्येक राजे काश्मीरी लोककथात आढळतात. कल्हणाने विनयादित्य नावाच्या अशाच एका राजाचा परिचय घडविला आहे. हा राजा स्वत.च्या हातानी शेती करून तिच्यावर निर्वाह करीत असे. सतीने दिलेल्या शापांच्या कथाही बऱ्याच आढळतात. सतीच्या शापाने शिळा होऊन पडलेल्या व्यक्ती काश्मीरी लोककथातून पुष्कळ आहेत. अशा प्रकारच्या पुष्कळ शिळा काश्मीरच्या खोऱ्यात दुमत या नावाने दाखविल्या जातात. हिमालचा प्रियकर नागराय याच्या नावाचा पाम्पूर येथे एक झराच आहे.

काश्मीरी लोककथांचे गद्य हे लोकांच्या बोलभाषेतले आहे. त्याची शैली देखील काश्मीरच्या सौंदर्याइतकीच सुंदर आहे. एखादा शेतकरीसुद्धा कथा सांगताना तिच्यात मधूनच वर्णनात्मक काव्यपंक्तींची पेरणी करतो व ती विलक्षण प्रभावी ठरते. काश्मीरी भाषा म्हणीच्या बाबतीतही समृद्ध आहे. तिथले सर्व प्रकारचे लोकजीवन म्हणीच्या द्वारे जाणून घेता येते. तिथले एक मिशनरी रेव्ह. टी. हिटन नोल्स यांनी काश्मीरी म्हणीचा सग्रह प्रसिद्ध केला असून त्यानी त्या म्हणीचे उगम किवा कथासंदर्भही दिले आहेत.

**लोकगीते**— काश्मीरच्या लोकगीतांनी भूतकालीन चालीरीती, पुराणकथा, दतकथा आणि परंपरा याचे जतन केले आहे. काश्मीरमध्ये भटक्या शाहिरांचा एक वर्ग आहे. ते लोक खेडचापाडचात हिंडून लावण्या, गीते आणि पोवाडे गातात. काश्मीरातली लोकगीते जिती जागती ठेवून त्यांचा त्या प्रदेशात सर्वत्र प्रसार करण्याचे श्रेय याच शाहिरांना आहे. संगीतिका, नृत्यगीते, नाटचगीते, गोपाळगीते, ऋतुगीते, व्यवसायगीते, गूढार्थगीते, अशी विविध प्रकारची लोकगीते काश्मीर खोऱ्याच्या वातावरणात सदैव मुखरित होतात. प्रेमभग्न विरहिणीची गीते तर कितीतरी आहेत. ती साधी, सुस्पष्ट पण करुणाजनक आहेत. खेडचातील बायका पाणी आणताना किंवा शेतात काम करताना जेव्हा ती सामुदायिकपणे गातात, तेव्हा त्यातला आशय विलक्षण प्रभावी होतो.

संथ प्रवाहाने वाहणारी झेलम नदी अनेक लोकगीतांचा विषय बनली आहे. चिनार हा काश्मीरी लोकाचा लाडका वृक्ष आहे. त्याला मदनाने पृथ्वीवर धाडले, असे काश्मीरवासी समजतात. तसेच केशर हे काश्मीरचे लाडके फूल होय. ते प्रेमाचेही प्रतीक आहे. चिनार व केशर यांच्यावर काश्मीरात कितीतरी लोकगीते आहेत. श्रीनगरपासून ७ मैलांवर पाम्पूर येथे

केशराच्या प्रसिद्ध बागा आहेत. त्या बागांतील केशराची फुले तोडताना शेतकरी स्त्री-पुरुष केशरावरूनच प्रेमगीते गातात. उदा०—

**यार द्रायोम पोम्परी वत्ये**
**कोंग पोषण रोट तत्ये ।...**

अर्थ— माझा प्रियकर पाम्पूरच्या दिशेने निघून गेला. केशराच्या फुलांनी त्याला अचानक पकडून आलिंगन दिले. हाय ! तो तिथे आहे आणि मी इथे एकटी आहे. त्याचे मुख मला कधी पाहायला मिळेल ?

आणखी एक प्रेमाचे लोकगीत पुढीलप्रमाणे आहे—

**नेरी बालिये सोरी सामान लो लो**
**करी छ्वनि छ्वनी रोनि दामान लो लो ।।**
**गैम शरमन्द दखिनिक रूत अछि पोश**
**केंह छि शूबिदार केंह छि जानान लो लो ।।**
**दूर ग्रायन च्यान नूर फुलवान**
**सूर कोरथम स्वर्गिस्तान लो लो ।।**

अर्थ— माझ्या प्रियतमे, शृंगार करून आणि घुंगुरांचा नाद उठवीत माझ्याजवळ ये. तुझ्या सौंदर्यासमोर दक्षिणेचे सुंदर अछफूलही शरमून जाते. जेव्हा तू कानात बाळ्या घालतेस, तेव्हा सर्वत्र प्रकाश पसरतो. हे स्वर्गातून भूमीवर उतरलेल्या अप्सरे, माझे हृदय तुझ्यासाठी तळमळते आहे.

काश्मीरमध्ये विवाहगीतेही पुष्कळच आहेत. ती लग्नप्रसंगी सामुदायिकपणे गायिली जातात. ही लग्नगीते हिंदूप्रमाणेच मुसलमानांतही रूढ आहेत. वधूची पाठवणी करताना तिला पोचवायला जातात, त्या वेळचे एक गाणे असे—

**बोल मेरिये बागां दी कोयलिये,**
**बाग छोड़ी बन की चलीये ।**

अर्थ— माझ्या बागेतल्या बुलबुला, तू बाग ( माहेर ) सोडून कुठे चाललीस !

त्यावर कन्या उत्तर देते—

**बाबुल मेरे धर्म जे कीता,**
**धर्म दी बद्दी आँव चलीआँ ।।**

अर्थ— माझ्या बापाने मला दान म्हणून दुसऱ्याला दिले. त्या धर्माने बद्ध होऊन मी निघाले आहे.

काश्मीरची अंगाईगीतेही उल्लेखनीय आहेत. कर्णकुंडले हा काश्मीरी स्त्रीचा अत्यंत आवडता दागिना. अंगाईगीतातून बालकाला त्याचीच उपमा दिलेली असते.

काश्मीरी स्त्रीलाही युद्ध अपरिचित नाही. तरुण पतीने लढाईवर जायचे, तरुण पत्नीने त्याला निरोप द्यायचा आणि मग विरहात त्याचेच चिंतन करीत बसायचे, हे प्रसंग इतर ठिकाणच्या स्त्रियांसारखे काश्मीरी स्त्रीनेही अनुभविले आहेत. पुढील लोकगीतात अशाच एका युवतीच्या त्यागमय प्रेमाचा करुणापूर्व आविष्कार झाला आहे —

**जे चलियाँ तू नौकरी चनां चाकरी,**
**मेरी पखड़ी लई जायाँ ।**
**जे चनां लगे गर्मी जो गर्मी,**
**मेरी पखड़ी झोलि लईयाँ ।।**
**जे चलियाँ तू नौकरी चनां चाकरी,**
**मेरी ओढ़नी लई जायाँ ।**
**चनां लगे सर्दी जे सर्दी,**
**मेरी ओढ़नी लई लियाँ ।।**
**जे चलियाँ तू नौकरी चनां चाकरी,**
**मेरी आरसी लई जायाँ ।**
**ले चनां लगे पुखड़ी जे पुखड़ी**
**मेरी आरसी बेची खायाँ ।।**
**जे चलियाँ तू नौकरी चनां चाकरी,**
**मेरी चोलड़ी लई जायाँ ।**
**ले चनाँ लगे मण्डरा जे मण्डरा,**
**मेरी चोली गले लाईयाँ ।।**

अर्थ— माझ्या चांदा, नोकरीवर जातो आहेस, तर माझा पंखा बरोबर घेऊन जा. उकाडा होईल तेव्हा या पंख्याने वारा घे. माझ्या चांदा, नोकरीवर जातो आहेस, तर माझी ओढणी बरोबर घेऊन जा. थंडी वाजायला लागली, की ही अंगाभोवती लपेटून घे. माझ्या चांदा, नोकरीवर जातो आहेस, तर माझा आरसा बरोबर घेऊन चल. भूक असह्य झाली, तर हा विकून भोजन कर. माझ्या चांदा, नोकरीवर जातो आहेस, तर माझी चोळी बरोबर घेऊन जा. माझी आठवण सतावू लागेल तेव्हा ती छातीशी धर.

काश्मीरमध्ये हिमाल–नागराय, युसूफ–जुलेखा, लैला–मजनू, हातीम–ताई अशा प्रेमिकांच्या प्रेममय जीवनावर प्रदीर्घ लोकगीते आहेत. ते प्रेमाचे पोवाडेच आहेत म्हणाना. त्यातल्या अद्‌भुतरम्य वातावरणाने आजही काश्मीरचा लोकसमाज भारावून जातो. काश्मीरातले शाहीर ही गाणी परंपरेने गात आलेले आहेत. हिवाळ्यातल्या रात्री खेडूत लोक शेकोटी पेटवून तिच्या भोवती शेकत बसतात. अशा वेळी एखादा शाहीर सारंगी किंवा रबाब यांच्या साथीवर ही प्रेमगीते गातो. [ काश्मीरी फोकलोअर– सोमनाथ धार– मार्च ऑफ इंडिया, जुलै १९५६; म का. ]

**काश्मीरीय शैवदर्शन** एक प्राचीन दर्शन. काश्मीरमध्ये या दर्शनाचा प्रसार झाला म्हणून काश्मीरीय या नावानेच ते प्रसिद्ध झाले. याला प्रत्यभिज्ञादर्शन, त्रिकदर्शक, षडर्धदर्शन किंवा माहेश्वरदर्शन अशीही अन्य नावे आहेत. हा एक अद्वैतवादाचा पुरस्कार करणारा शैवागम आहे. हा अद्वैतवाद ईश्वराद्वयवाद या नावाने प्रसिद्ध आहे. वसुगुप्त हा काश्मीरी महापंडित या दर्शनाचा मूळ प्रवर्तक होय.

शैवदर्शनाचे साहित्य विपुल आहे. जम्मू–काश्मीर संस्कृत सीरीजमध्ये या दर्शनाचे साठ-सत्तर ग्रंथ प्रकाशित झाले आहेत. त्यामध्ये शिवसूत्रविमर्शिनी, प्रत्यभिज्ञाहृदय, तन्त्रालोक, तंत्रसार, प्रत्यभिज्ञाकारिका, ईश्वरप्रत्यभिज्ञा हे ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहेत. अभिनवगुप्त, कल्लट, सोमानंद, उत्पलाचार्य, भास्कर, क्षेमराज, जयरथ, इ. आचार्यांनी या मताचा खूप प्रचार केला.

या दर्शनात शिव हे एकमात्र तत्त्व मानलेले आहे. या तत्त्वापासूनच बाकीची सर्व तत्त्वे अभिव्यक्त होतात. या अभिव्यक्त तत्त्वांशिवाय सांख्यदर्शनातील स्थूल भूतांपासून प्रकृति–पुरुषापर्यंत पंचवीस तत्त्वे त्याच क्रमाने शैवदर्शनानेही स्वीकारलेली आहेत.

सांख्यदर्शनातील पुरुष व प्रकृती ही तत्त्वे नित्य व स्वतंत्र आहेत; तर शैवदर्शनात ती अनित्य व परतंत्र मानतात. प्रकृतीतत्त्वाला इथे माया असे नाव दिलेले असून कला, विद्या, राग, काल व नियती ही पाच तत्त्वे या मायेचे कंचुक मानलेले आहेत. या पाच कंचुकाचे ज्ञान झाल्यावर साधकाची मायेपासून सुटका होते. त्यानंतर साधक मायेहून सूक्ष्म अशा दुसऱ्या तत्त्वात प्रवेश करतो व त्याला शुद्धसत्त्वविशिष्ट पुरुष शुद्धविद्येच्या रूपात दिसतो. शुद्धविद्येलाच सद्‌विद्या असेही म्हणतात. हे सद्‌विद्यातत्त्व ईश्वरतत्त्वात लीन झाल्यावर साधकाला ईश्वरतत्त्वाचा अनुभव घडतो. हे ईश्वरतत्त्व सदाशिवतत्त्वात, सदाशिवतत्त्व शक्तितत्त्वात व शेवटी शक्तितत्त्व परमशिवतत्त्वात विलीन होते. तिथे पोचल्यावर साधक शिव–शक्तीच्या सामरस्याचा अनुभव घेतो. हीच पूर्णावस्था व हेच या दर्शनाचे परम लक्ष्य होय.

या दर्शनातील तत्त्वांचे वर्णन पुढीलप्रमाणे – प्रत्येक जीवाच्या ठिकाणी राहणारे शिवतत्त्व हेच आत्मतत्त्व आहे. हे चैतन्यरूप आहे. यालाच परा संवित्, परमेश्वर, शिव व परमशिव अशी नावे आहेत. याचे विश्वात्मक व विश्वोत्तीर्ण असे दोन भाव आहेत. विश्वात्मक रूपाने परमशिव प्रत्येक वस्तूला व्यापून राहतो व विश्वोत्तीर्ण रूपाने तो सर्व वस्तूंना व्यापूनही शिल्लक राहतो. नानाविचित्रतासंवलित जग हे परमशिवापासून अभिन्न असून ते त्याचेच स्फुरण आहे. परमेश्वर हा स्वेच्छया स्वभित्तीत जगाचे उन्मीलन करतो. जग हे पूर्वी अस्तित्वात होतेच. सृष्टीकालात शिवशक्तीच्या योगाने त्याचे फक्त प्रकटीकरण झाले एवढेच. जगद्रूपी चित्र बनविणाऱ्या कलाकार शंकराची लीला विचित्र आहे. कारण कोणतीही सामग्री किंवा आधार न घेता आपल्या इच्छाशक्तीने आपल्यातच तो या जगाचा आविष्कार करतो. तो भौतिक कलाकारापेक्षा विलक्षण असल्यामुळे त्याला कलानाथ किंवा कलाश्लाघ्य असे नाव मिळाले आहे.

हा परमेश्वर अनन्यशक्तिसंपन्न असला तरी त्याच्या चित्, आनंद, इच्छा, ज्ञान व क्रिया या पाच शक्ती विशेष प्रसिद्ध आहेत. चित्‌शक्ती ही प्रकाशरूप असून प्रकाश्यवस्तूचा अभाव असला, तरी तिच्या योगाने परमशिव स्वतःच प्रकाशित होतो. बाह्य वस्तूची अपेक्षा न करता जिच्या योगाने परमेश्वर निरतिशय आनंदाचा अनुभव घेतो, ती आनंदशक्ती होय. इच्छाशक्तीच्या योगाने परमेश्वर स्वतःला अविघात इच्छासंपन्न मानतो. ज्ञानशक्ती ही आमर्षरूप आहे. आमर्ष म्हणजे वेद्य पदार्थांचे साधारण ज्ञान होय. सर्व आकार धारण करण्याची जी योग्यता, तिचे नाव क्रियाशक्ती असे आहे.

याच पंचशक्तींच्या द्वारा परमशिव स्वतःला स्वभित्तीवर जगद्‌रूपाने परिणत करतो. मात्र इथे एक गोष्ट ध्यानात ठेवायला हवी, की शक्तीशिवाय शिव हा केवळ जड आहे. शक्तीचे साहाय्य मिळते, तेव्हाच शिवाला ‘ अहं ’ चा बोध होतो. याच आशयाने शंकराचार्य म्हणतात–

**शिवः शक्त्या युक्तो यदि भवति शक्तः प्रभवितुम् ।**
**न चेदेवं देवो न खलु कुशलः स्पन्दितुमपि ।।**

(सौंदर्यलहरी)

अर्थ –शिव जेव्हा शक्तीने युक्त असतो, तेव्हाच तो सृष्टीवर प्रभुत्व करण्यास समर्थ होतो. तोच जर शक्तीने विरहित असेल, तर त्याला आपल्या हृदयाचे स्पंदनही करता येत नाही.

या दर्शनात परमेश्वर हेच एकमेव तत्त्व असून अज्ञान, माया किंवा जगत् हे त्याने स्वेच्छेने घेतलेले रूप आहे. भूमिका अद्वैताची असली, तरी ब्रह्मवाद व प्रस्तुत दर्शनाचा ईश्वराद्वयवाद यांमध्ये फरक आहे. ब्रह्मवादात विश्वोत्तीर्ण, सत्य, निर्मल व निर्विकार ब्रह्माच्या ठिकाणी कर्तृत्व मानलेले नाही; तर ईश्वराद्वयवादात परमेश्वर हा कर्ता मानलेला आहे. परमेश्वर हा सृष्टी, स्थिती, संहार, अनुग्रह व विलय या पाच कृत्यांचा संपादक आहे; पण अद्वैत वेदान्त्यांचे ब्रह्म मात्र तसे नाही. त्यामुळे या दोन दर्शनाच्या सिद्धान्तांत भिन्नता आहे.

परमेश्वर व जगत् याच्या परस्परसंबंधाबाबत विचार करता तो दर्पणबिंबवत आहे, असे अभिनवगुप्ताने सांगितले आहे. ज्याप्रमाणे निर्मळ आरशात वृक्षादी पदार्थ प्रतिबिंबित झाल्यावर

त्या प्रतिबिंबापेक्षा अभिन्न असूनही ते आरशापेक्षा व परस्पर भिन्न दिसतात, त्याचप्रमाणे संविद्रूप परमेश्वरात प्रतिबिंबित झालेले हे विश्व अभिन्न असूनही घटपटादी रूपाने भिन्न अवभासित होते. वास्तविक प्रतिबिंबाची सत्ता बिंबावर अवलंबून असते. परंतु त्रिकदर्शनात परमेश्वराच्या स्वातंत्र्यशक्तीमुळे बिंबाशिवायच जगद्रूप प्रतिबिंब स्वतः उत्पन्न होते असे मानलेले आहे. अशा रीतीने या दर्शनात द्वैतभावना ही कल्पित असून अद्वैतभावना वास्तविक आहे. हा आभासाचा किंवा प्रतिबिंबाचा सिद्धान्त मानल्यामुळे प्रस्तुत दर्शनाला दार्शनिक आभासवाद असेही म्हणतात.

**तत्त्वविभाग** –प्रस्तुत दर्शनात एकूण छत्तीस तत्त्वे मानलेली आहेत. या तत्त्वांचे शिवतत्त्व, विद्यातत्त्व व आत्मतत्त्व असे तीन विभाग केलेले आहेत. शिवतत्त्वात ( १ ) शिवतत्त्व व (२) शक्तितत्त्व याचा समावेश आहे. विद्यातत्त्वात ( ३ ) सदाशिव (४) ईश्वर व (५) शुद्धविद्या यांचा अंतर्भाव होतो. आत्मतत्त्वात ३१ तत्त्वे समाविष्ट आहेत, ती अशी– (६) माया, (७) कला, (८) विद्या, (९) राग, (१०) काल, (११) नियती, (१२) पुरुष, (१३) प्रकृती, (१४) बुद्धी, (१५) अहंकार, (१६) मन, (१७–२१) श्रोत्र, त्वक्, चक्षु, जिह्वा, घ्राण, ही पाच ज्ञानेंद्रिये, (२२–२६) वाक्, पाणि, पाद, पायु, उपस्थ ही पाच कर्मेंद्रिये, ( २७–३१ ) शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे पाच विषय, (३२–३६) आकाश, वायू अग्नी, जल व भूमी ही पंचमहाभूते.

परमेश्वराच्या हृदयात विश्वाच्या सृष्टीची इच्छा उत्पन्न झाल्यावर त्याची शिव व शक्ती अशी दोन रूपे होतात. शिव हा प्रकाशरूप व शक्ती ही विमर्शरूप असते.

**विमर्शो नाम विश्वाकारेण विश्वप्रकाशेन विश्वसंहरणेन च अकृत्रिमाहमिति स्फुरणम् ।**

(परा प्रावेशिका)

अर्थ –विमर्श म्हणजे पूर्ण, अकृत्रिम अहंची स्फूर्ती. ही स्फूर्ती सृष्टिकालांत विश्वाकाररूप, सृष्टीच्या स्थितीत विश्वप्रकाशरूप व संहारकालात विश्वसंहरणरूप असते.

विमर्शलाच चित्, चैतन्य, स्वातंत्र्य, कर्तृत्व, स्फुरत्ता, सार, हृदय, स्पंद, इ. अनेक संज्ञा आहेत. प्रमेची अहमंश व इदमंश अशी दोन रूपे आहेत. यांपैकी अहमंशाने शिवाचा व इदमंशाने शक्तीचा बोध होतो. विमर्शाच्या द्वारा प्रकाशाचा अनुभव येतो व प्रकाशाच्या स्थितीत विमर्शाची कल्पना न्याय्य ठरते. ज्याप्रमाणे दर्पणाशिवाय मुखाच्या रूपाचे प्रत्यक्ष होत नाही, त्याचप्रमाणे विमर्शाशिवाय प्रकाशाचे रूप उपपन्न होत नाही. शिव हा चिद्रूप आहे; परंतु अचेतन आहे. मधात गोडी असते, परंतु मधाला ती चाखता येत नाही. त्याचप्रमाणे शक्तीशिवाय शिवाला आपल्या प्रकाशरूपाचे ज्ञान होत नाही. शक्तीशिवाय शिव हा शवच आहे.

**न शिवेन विना देवी न देव्या च विना शिवः ।**
**नानयोरन्तरं किञ्चित् चन्द्रचन्द्रिकयोरिव ।।**

अर्थ–शिवाशिवाय शक्ती व शक्तिविरहित शिव नाही. चंद्र व चंद्रिका याच्याप्रमाणे या दोघांत काहीही अंतर नाही:

**ईश्वरो बहिरुन्मेषो निमेषोऽन्तः सदाशिवः**

(ईश्वरप्रत्यभिज्ञा ३. १.३)

अर्थ– शिवशक्तीच्या आंतर निमेषाला सदाशिव व बाह्य उन्मेषाला ईश्वर असे म्हणतात.

हे उन्मेष व निमेष अनादी व अनंत आहेत. या उन्मेषामुळेच सदाशिवतत्त्वाची अभिव्यक्ती होते. याला सादाख्यतत्त्व असेही नाव आहे. या दर्शनात सृष्टी ही शक्तीचा उन्मेष मानलेली आहे. म्हणजे जी सृष्टी प्रथम अस्तित्वात असते, तिचाच आविष्कार होतो. या अवस्थेत अहमंश इदमंशाला आच्छादून राहतो. त्यामुळे ' अहमस्मि ' अशी प्रतीती येते व जगताचे अव्यक्त रूपाने भान होते.

विकासोन्मुख ज्ञानाच्या तिसऱ्या अवस्थेला ईश्वरतत्त्व म्हणतात. जगताची क्रमिक अभिव्यक्ती इथे स्पष्ट होते. इथे अहम् हा अंश गौण व इदम् हा अंश प्रधान असतो. म्हणजे ' इदम् अहम् ' अशी प्रतीती येते.

पाचव्या तत्त्वाला विद्या, सद्विद्या किंवा शुद्धविद्या म्हणतात. ज्ञानाच्या या दशेत अहम् व इदम् याचे पूर्ण सामानाधिकरण्य असते. म्हणजे दोघांची स्थिती समान असते. या अवस्थेत शिव सर्व जगत आपलेच आहे, असे मानतो साराश परा संवित्चे शिवशक्त्यात्मकरूप सर्गात्मक असते. शिवतत्त्वात अहम् असा विमर्श सदाशिवतत्त्वात अहमिदम् असा विमर्श व ईशरतत्त्वात इदमहम् असा विमर्श असतो.

मायातत्त्व हे अहम् व इदम् यांना पृथक् करते. इथे अहम् अंश पुरुषरूपात व इदम् अंश प्रकृतिरूपात व्यक्त होतो. शिवाला पुरुषरूपात आणण्यासाठी मायाही कला, विद्या, राग, काल व नियती या पाच उपाधींची सृष्टी करते. यांना कंचुक असे नाव आहे. कला जीवाच्या सर्वकर्तृत्वशक्तीला संकुचित करते व त्यामुळे तो किंचित्कर्तृत्वशक्तियुक्त बनतो. विद्येमुळे त्याच्या सर्वज्ञतेचा संकोच होऊन तो किंचिज्ज्ञ होतो. रागामुळे त्याच्या नित्यतृप्तित्वगुणाचा संकोच होतो आणि त्याची विषयावर आसक्ती जडते. कालामुळे त्याचे नित्यत्व संकुचित होऊन तो देहादिकांशी संबद्ध होतो आणि जीव स्वतःला अनित्य मानू लागतो. नियती त्याची स्वातंत्र्यशक्ती नियमित करते आणि

त्यामुळे तो नियमित कार्ये करायला उद्युक्त होतो.

त्रिकदर्शनातील त्रिगुणमय महत् तत्त्वापासून पृथ्वीपर्यंतच्या तत्त्वाचे मूलकारण पृथ्वी ही आहे. प्रकृतीपासून महदादी पृथ्वी-पर्यंत तत्त्वाची उत्पत्ती या दर्शनाने सांख्यांच्या रीतीनेच स्वीकारली आहे.

**साधनमार्ग** — त्रिकदर्शनाच्या साधनमार्गाचे एक वैशिष्टय आहे. हे दर्शन केवळ ज्ञानाचे किंवा केवळ भक्तीचे पक्षपाती नाही ज्ञान आणि भक्ती या दोहोंचाही त्यात मेळ घातलेला आहे. शंकराचार्यांच्या अद्वैतवादात चरमावस्थेत भक्तीला स्थान नाही. कारण भक्ती ही द्वैतवादावर आधारलेली असते. ती अज्ञानमूलक आणि साधनरूपही असते. अद्वैतज्ञानाचा उदय झाल्यावर जी साध्यरूप भक्ती आविर्भूत होते, तीच वस्तुतः नित्य आहे. मोक्ष म्हणजे या नित्यसिद्ध ज्ञानभक्तीचा आवरण-भंगजनित समुन्मेषच होय. त्रिकदर्शनात यालाच चिदानंदलाभ असे म्हटले आहे.

या दर्शनाला प्रत्यभिज्ञादर्शन असे नाव आहे, त्याचे कारण असे— प्रत्यभिज्ञा म्हणजे ज्ञात वस्तूला पुन्हा जाणणे. आणव, शाक्त, शांभव. इ. उपायाच्या द्वारा साधकाला आत्मचैतन्याचे ज्ञान झाले, तरी गुरूपदेशावरून शिवाच्या गुणांचे ज्ञान होऊन जेव्हा तो शिवाला जाणतो, तेव्हाच त्याला 'अहं महेश्वरः' असे ज्ञान होते. म्हणून या दर्शनात प्रत्यभिज्ञ मोक्ष हा शिव-त्वलाभाचे प्रमुख साधन असल्याचे मानले आहे.

शंकराचार्यांचा अद्वैतवाद व अभिनवगुप्तादी आचार्यांनी प्रतिपादलेला ईश्वराद्वयवाद या दोहोंत फरक असल्याचे मागे सांगितलेच आहे. अद्वैतवेदान्तातली मायेची मीमांसा प्रत्यभि-ज्ञादर्शनाला पूर्णतया मान्य नाही. अज्ञानाची प्रवृत्ती का होते व कुठून होते, त्याचप्रमाणे ज्या अज्ञानाला वश होऊन ब्रह्म जीव-रूपात आविर्भूत होते किंवा त्याच्यावर मात करून ईश्वर बनते, त्या अज्ञानाचा प्रथम आविष्कारच का होतो, या प्रश्नाला समर्पक उत्तर वेदान्तात दिलेले नाही. पण प्रत्यभिज्ञादर्शनाने ते दिले आहे. ईश्वराद्वयवादातही अज्ञान आहे, माया आहे. परंतु तिची प्रवृत्ती आकस्मिक नाही. आत्म्याने आपल्या स्वातंत्र्याच्या बळावर स्वेच्छेने घेतलेले ते रूप आहे. आपले स्वरूप आवृत करायला व प्रगट करायला तो समर्थ आहे, स्वतंत्र आहे. सूर्य आपणच उत्पन्न केलेल्या मेघांनी स्वतःला झाकून घेतो; परंतु त्या वेळीही तो अनाच्छादितच राहतो. अन्यथा मेघांना कोण प्रकाशित करणार ? परमेश्वराचीही अशीच अवस्था आहे. अज्ञान किंवा माया ही त्याच्याच स्वातंत्र्यशक्तीचे विजृंभण आहे. ही सृष्टी म्हणजे परमेश्वराची लीला आहे. ईश्वर हा स्वातंत्र्यमूलक, स्वातंत्र्यरूप व कर्तृत्वरूप आहे, असे ईश्वरवादी मानतात; तर ब्रह्मवादी ब्रह्माला शुद्ध साक्षी मानतात. त्याचा आत्मा सच्चिदानंदरूप, एक, अनंत असला, तरी त्याच्यात कर्तृत्व नाही. त्रिकदर्शनातील परमेश्वर कर्तृत्वरूप आहे. त्याच्यात ज्ञान व क्रिया ही दोन्ही आहेत. त्याची क्रिया म्हणजेच ज्ञान आहे, आणि तो कर्तृस्वभाव असल्यामुळे त्याचे ज्ञान म्हणजेच क्रिया आहे.

वास्तव अद्वैततत्त्वाचे स्वरूप काश्मीरीय शैवदर्शनातच पाहा-यला सापडते, शांकर किंवा अन्य वेदान्तात ते दिसत नाही, असे म्हणून म. म. गोपीनाथ कविराज हे या मताचे पुढील-प्रमाणे समर्थन करतात—

"शंकराचार्यांनी ब्रह्म हे सत्य व माया ही अनिर्वचनीय असे म्हटले आहे. मायेला सत्य न मानल्यामुळे त्यांचा अद्वैतभाव ग्रहणमूलक न होता व्यावृत्तिमूलक झाला आहे. माया ही ब्रह्माची शक्ती आहे. ती ब्रह्माश्रित आहे. परंतु ब्रह्म सत्य आहे आणि विचाराच्या दृष्टीने माया सदसद्विलक्षण आहे. शंकरा-चार्यांनी मायेचा स्वीकार करून तिला ब्रह्ममयी, नित्य व सत्य-स्वरूप जर मानले असते, तर ब्रह्म व माया यांची एकरसता झाली असती. मायेचा त्याग करून किंवा तिला तुच्छ लेखून ही एकरसता साधणार नाही.

ब्रह्म व माया ही एकच वस्तू आहे. ब्रह्म सत्य व माया मिथ्या असे म्हटल्याने द्वैताचा आभास निर्माण होतो. ज्या अवस्थेत माया मिथ्या आहे, त्या अवस्थेत ब्रह्मही मिथ्या आहे. कारण माया मिथ्या आहे असा अनुभव येत असतांनाही मायेचा स्वीकार करणे अपरिहार्य होते आणि एकदा मायेचा स्वीकार केला, की त्या अवस्थेत जो ब्रह्मबोध होतो, तीही मायाकल्पित वस्तूच असते. ही गोष्ट वेदान्त्यांना कोणत्या ना कोणत्यातरी स्वरूपात स्वीकारावीच लागली आहे. याउलट मायेलाच जर सत्य मानले तर ब्रह्मही सत्य होईल व सृष्टीतील सर्व पदार्थ ब्रह्मरूप भासतील. 'सर्व खल्विदं ब्रह्म' हे उपनिषद्वाक्य त्या वेळी सार्थ होईल."

त्रिकदर्शनातील शक्ती सत्य आहे. जीव व जगतही सत्य आहे. त्यामुळे सर्वच शिवमय आहे. सर्वत्र भासणारे वैचित्र्य हे त्या एकाचाच विलास आहे.

पुरुषापासून प्रकृती किंवा प्रकृतीपेक्षा पुरुष पृथक् नाही आणि होऊही शकणार नाही. भेद व अभेद असे एकाचेच दोन प्रकार आहेत. यालाच 'शिवशक्तीचे सामरस्य' किंवा चिदानंदाची प्राप्ती असे नाव आहे. [ भा. द.—उमेश मिश्र; बलदेव उपाध्याय ]

## काश्यप

(१) एक संहिताकर्ता. परशुरामाच्या यज्ञात याने आध्वर्यव केले व त्याबद्दल त्याला परशुरामाने

दक्षिणा म्हणून सर्व पृथ्वी दान दिली (ब्रह्मांड पु. २·३५). एक मंत्रकर्ता व ब्रह्मवादी (मत्स्य पु. १४४·९८ व १०६). सूत्रकार शांडिल्याने आपल्या ग्रंथात काश्यप व बादरायण यांच्या मताचा उल्लेख केला आहे. शांडिल्याच्या मते काश्यप भेदवादी व बादरायण अभेदवादी होता. काश्यपाला प्रजापती असे म्हटले आहे. सूर्योपनिषदात त्याला पश्यक म्हणजे सूर्य म्हटले आहे. गायत्री मंत्राच्या चौव्वीस ऋषीपैकी हा सतरावा ऋषी होय. तैत्ति. प्रातिशाख्यात याचा उल्लेख आहे. ज्योतिष शास्त्रावरील एक ग्रंथकार. उत्पलाने त्याच्या ग्रंथातून ३०० श्लोक उद्‌धृत केले आहेत.

वरील सर्व काश्यप म्हणजे एकच व्यक्ती असे समजता येणार नाही. हे सर्व लोक काश्यपाच्या वंशजांपैकी किंवा त्याच्या गोत्रातले असू शकतील. काश्यप हे कुल फार विस्तृत होते. प्रजापतीने उत्पन्न केलेल्या सर्व प्रजा काश्यप म्हणजे कश्यपकुलोत्पन्न होत, असे म्हटले आहे (श. ब्रा. ७. ५. १.५). अगस्त्य व परशुराम यांच्याप्रमाणे काश्यप हाही दक्षिणेतील वसाहतकार मानला जातो. दक्षिणेत स्वतःला काश्यप गोत्री म्हणवून घेणाऱ्या अनेक जाती आहेत. [ हि. ध.; पा. भा.; प्रा. च. को.; क्रि. स्ट. ले. उ.; हिंदुत्व ]

(२) गौतमबुद्धाचा एक प्रमुख शिष्य प्रथम हा एक यज्ञकर्ता ऋषी होता. त्याला जटिल काश्यप असे म्हणत. बुद्धाने आपल्या अंगीच्या अलौकिक शक्तीने त्याला वश करून घेतले व त्याला अग्नितत्त्वाचे खरे ज्ञान दिले. त्यामुळे काश्यपाचा यज्ञावरील विश्वास उडाला व आपली यज्ञपात्रे नदीत फेकून देऊन त्याने बुद्धाचे शिष्यत्व पत्करले. [ उ. प्र. बौ. वि. ]

**काश्यपपरिवर्त** एक बौद्ध ग्रंथ. यात बुद्धाचा महाकाश्यपाशी झालेला संवाद वर्णित आहे. बोधिसत्त्वयान व शून्यता याविषयी या ग्रंथात वारंवार उल्लेख येतात. बुद्धापेक्षाही बोधिसत्त्वाची पूजा अधिक फलप्रद असल्याचे यात सांगितले आहे. [ बौ. ध. द. ]

**काश्यप मातंग** गांधार देशातील एक बौद्ध भिक्षू. मिगती या चिनी राजाच्या निमंत्रणावरून हा बौद्ध धर्माचा उपदेशक म्हणून चीनमध्ये गेला. परदेशात धर्मोपदेशासाठी जाणारा हा पहिला धाडसी धर्मोपदेशक होय. धाडसी म्हणण्याचे कारण असे, की त्या वेळी भारतातून चीनला जाण्याचा मार्ग अतिदीर्घ व अत्यंत खडतर होता. ज्या वेळेस चीनच्या राजाचे निमंत्रण आले, त्या वेळी हा गांधार देशात होता. तिथून तिबेटमार्गे तो चीनच्या प्रवासाला निघाला. पुढे गोबीचे वाळवंट ओलांडून नाना प्रकारचे कष्ट सहन करीत हा चीनला पोचला. तिथे मिगती राजाने त्याला स्वतंत्र मठ बांधून देऊन दरबारातल्या अनेक पंडितांना त्याचे शिष्यत्व पत्करायला लावले. याने चिनी भाषा आत्मसात करून अनेक बौद्ध ग्रंथ त्या भाषेत अनुवादिले. अनेक शिष्यही पढवून तयार केले. त्याने आपला देहही चीनमध्येच ठेवला. त्याच्या नंतरच चीनमध्ये बौद्धधर्म वाढीस लागला. [ सु. वि. को.; म. च. को. ]


काश्यप मातंग (पश्चिम चीन)

**काश्यपीय** एक बौद्ध दार्शनिक पंथ. हे स्थविरवादी विचारकांना जवळचे होते, म्हणून त्यांना स्थावरीय असेही म्हणतात. तिबेटी परंपरेत काश्यपीयांना सुवर्षक असे नाव आहे. काश्यपीयांचे मत असे, की जे होऊन गेले व ज्याचे फल मिळाले, ते संपले. पण जे अद्याप पक्व झाले नाही, ते अजूनही अस्तित्वात आहे. सर्वास्तिवाद्यांच्या मतातली ही थोडी सुधारणा आहे. ते भूताला वर्तमानाप्रमाणेच सजीव मानीत. काश्यपीयांच्या बाबतीत असे सांगतात, की त्यांनी सर्वास्तिवादी व विभज्यवादी यांच्यांत समन्वय घडवून आणला. त्यांचे स्वतःचे एक त्रिपिटकही होते. [ बौद्ध धर्म के २५०० वर्ष– आजकल, वार्षिक अंक, १९५६ ]

**काषायपर्वत** अल्मोड्यापासून काही मैलावर हा पर्वत असून त्याच्यावर कौशिकीदेवीचे मंदिर आहे. शुंभ-निशुंभांना मारण्यासाठी कौशिकीदेवी इथेच प्रगट झाली, असे सांगतात. [ कल्याण– तीर्थांक ]

**काष्ठजिह्वास्वामी** रामावत संप्रदायाचा एक कवी. याने जानकीमंगल, राममंगल, इ. ग्रंथ लिहिले आहेत. हा राम–कृष्ण यांना अभिन्न समजून त्यांची उपासना करणारा होता. [ रा. भ. शा. ]

**काष्ठतरंग** जलतरंगाच्या धर्तीचे वाद्य. जलतरंगात लहान-मोठ्या आकाराचे जसे पेले असतात, तसेच पेले काष्ठतरंगातही असतात. जलतरंगातल्या पेल्यातले पाणी कमी किंवा जास्त करून हवा तो स्वर लावून घेता येतो. काष्ठ-तरंगात तशी सोय नसते. पेला घडवतानाच त्याचा स्वर निश्चित करावा लागतो. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**काष्ठशिल्प** अतिप्राचीन काळापासून आजतागायत सामान्य माणसापासून उच्च कोटीतील कलाकारापर्यंत सर्वांनी लाकडाचा उपयोग करून दैनंदिन जीवनातील अनेक कार्यांची पूर्ती केली आहे. काष्ठासारख्या निर्जीव द्रव्यापासून सजीव सृष्टीचा भास व्हावा, इतक्या सुंदर कलाकृती मानवाने निर्माण केल्या आहेत. वैदिक काळात यज्ञयागांना प्राधान्य होते. या यज्ञासाठी काष्ठांचाच भव्य मंडप उभारीत. प्रथम साध्या असलेल्या या मंडपावर पुढच्या काळात हळूहळू कलाकुसर चढू लागली. याच मंडप उभाणीतून पुढे मंदिर उभारणी सुरू झाली. मंदिरातही अनेक कारणांसाठी लाकडाचा उपयोग होऊ लागला. घराला किंवा मंदिराला जे लाकूड बसवायचे त्यावर कोणते तरी चित्र कोरलेले असले पाहिजे, ही कल्पना दृढमूल झाली. इथले कलाकार दाराच्या चौकटी, गवाक्षे, खांब, इ. लाकडी विभागांवर कोरीव काम करू लागले. ज्याच्यावर कोणत्याही प्रकारची कलाकुसर नाही, अशा चौकट, पाळणा, पलंग, चौरंग, पेटी, खेळणे, इ. वस्तू अशुभ समजल्या जाऊ लागल्या. वैदिक काळातली रथादी वाहने कोरीव कलाकुसरीची असत; त्याचप्रमाणे पुढच्या काळातल्या बैलगाड्यावरही यथाशक्ती कलाकुसर करू लागले. काष्ठनौकांचे पुढचे भाग कोणत्या तरी प्राण्यांच्या मुखाकृतीचे करू लागले. हंस हा एक सुप्रसिद्ध जलविहारी पक्षी होय. त्याचे सौदर्य लक्षात घेऊन कित्येक कारागिरांनी हंसाकृती नौकाही बनविल्या.


काष्ठस्तंभ

बिलासपूर जिल्ह्यातील एका खेड्यातल्या हीराबंध नामक जलाशयात सुमारे १८०० वर्षापूर्वीचा एक लाकडी यज्ञस्तंभ मिळाला आहे. त्यावर जी लिपी आहे, ती गुप्तकालापूर्वीची आहे. जैनांनी काष्ठशिल्पाचा भरपूर उपयोग केला आहे. महावीराच्या मूर्ती चंदनकाष्ठावर खोदीत असल्याचे अनेक उल्लेख जैन ग्रंथांत मिळतात. मूर्तिकलेत काष्ठमूर्ती हा प्रकारही शिल्पशास्त्राने चर्चिला आहे. प्राचीन पाटलिपुत्राचे उत्खनन झाले, त्यात अर्धवट जळलेल्या अनेक कोरीव फळ्या सापडल्या आहेत. पाटलिपुत्र शहरात एकदा भयंकर आग लागली होती, असा उल्लेख बौद्ध साहित्यात आढळतो. या अर्धदग्ध फळ्या पाहून त्या उल्लेखाची सत्यता पटते. तिथल्या अवशेषांत एक रथचक्र सापडले आहे, ते अशोकाच्या रथाचे असल्याचे सांगतात. ते खरे असो वा खोटे असो; पण त्या चक्राचे रचनाकौशल्य अद्‌भुत आहे, यात मात्र शंका नाही.


काष्ठतोरण

नेपाळात काष्ठमूर्ती फार सुंदर घडवीत. नेपाळने काष्ठशिल्पात बरीच आघाडी मारलेली आहे. सोमनाथाचे, गझनीच्या महंमदाने फोडलेले मंदिर काष्ठमय होते. त्याचे विशाल छत काष्ठस्तंभावर आधारलेले होते व त्याच्या दरवाजांसाठी वापरलेले लाकूड आफ्रिकेतून आणविले होते, असा दाखला मिळतो.

प्राचीन काळी भारताप्रमाणेच तिबेट व चीन या देशातही हस्तलिखित ग्रंथांच्या संग्रहासाठी लाकडी फळ्यांचा उपयोग करीत. त्या फळ्यांवर निरनिराळ्या प्रकारची नक्षी कोरलेली असे. या पुस्तकबांधणीसाठी चंदनी लाकडाचा उपयोग केला जात असे. पश्चिम भारतात जैनांनीही ताडपत्री ग्रंथांच्या संरक्षणासाठी लाकडी फळ्यांचा उपयोग करण्याची प्रथा सुरू केली. या फळ्यांच्या आतल्या अंगावर ते त्या ग्रंथातील तीर्थंकर देवता किंवा पूज्य आचार्य यांची चित्रे कोरू लागले. अशा लाकडी पट्ट्या आजही जेसलमीरच्या ग्रंथसंग्रहात आढळतात.

१५ व्या शतकाच्या नंतरच्या ज्या काष्ठपट्ट्या मिळाल्या आहेत, त्यांतील काही पट्ट्यांवर एका बाजूला वर्णमाला,

संख्या व जोडाक्षरे याचे लेखन केलेले आढळते. लहान मुलांना लिपीचे ज्ञान करून देण्यासाठी व संख्या शिकविण्यासाठी अशा पट्टयांचा उपयोग करीत.

नाशिक जिल्ह्यातील चांदवड या गावी अहिल्याबाई होळकर यांचा वाडा आहे. त्याला चारशेहून अधिक लाकडी खाब आहेत. त्या खांबांवर जी कोरीव कारागिरी आढळते, ती १८ व्या शतकातील कोरीव कामाचा उत्कृष्ट नमुना आहे. टिपू सुलतान याने श्रीरंगपट्टण येथे बांधलेला महाल देखील सपूर्ण काष्ठमय असून कलापूर्ण आहे. पाटणा येथील दि. ब. श्री.. राधाकृष्ण जालान यांच्या संग्रहालयात एक भव्य काष्ठसिहासन आहे. त्याच्या अग्रभागी बुद्धाच्या जीवनातील घटना व लामांच्या मठांच्या आकृती कोरलेल्या आहेत. हे सिंहासन तिबेटात निर्माण झालेले आहे व कलादृष्टया अप्रतिम आहे.



काष्ठगणगौर– बसी

ओडिसात कुठेही गेले, तरी जगन्नाथाचे लाकडी मंदिर पाहायला मिळते. अठराव्या शतकात हस्तलिखित ग्रथ सुरक्षित ठेवण्यासाठी ग्रंथाच्या आकाराच्या लाकडी पेटया तयार करीत. त्या पेटयांवरही पौराणिक घटनांची चित्रे कोरीत किवा रंगवीत.



कठपुतळीचा लाकडी बादशहा– बसी

राजस्थानमधील चितोडजवळचे बसी हे गाव तिथल्या कलेसाठी पूर्वीपासून प्रसिद्ध आहे. नाना प्रकारची खेळणी, तोरणे, स्तंभ, बाहुल्या, इ. वस्तू बनविण्यात इथले खरादी फार कुशल आहेत. ही कारागिरी परपरागत आहे. त्यांनी बनविलेल्या लाकडी बाहुल्या अगदी सजीव वाटतात. [कल्याण–संस्कृति-अंक; महेन्द्र भनावत– धर्मयुग, ४ नोव्हेंबर १९६२]

**कासलीवाल पं. दौलतराम** (जन्म १६८८ इ. स.) एक राजस्थानी जैन कवी. याला जयपूरच्या राजाने उदयपूर येथे राजदूत म्हणून पाठविले होते. त्या वेळी त्याने अध्यात्मबारहखडी नामक काव्य लिहून उदयपूरच्या धर्मात्मा पुरुषांचे वर्णन केले आहे. याचे पुढील ग्रथ उपलब्ध आहेत – पुण्यास्रव, क्रियाकोश, श्रावकाचारटीका, आदिपुराणटीका इत्यादी. [सौभागमल जैन – संयुक्त राजस्थान, जानेवारी १९५७]

**कासव** कूर्म पाहा.

**कासार** तांब्यापितळेची भाडी बनविणे, विकणे व बांगडया विकणे, हा धंदा करणारी एक जात. याच्यापैकी त्वष्टा कासार भांडी तयार करतात व बोगार कासार ती विकतात. बागडया विकण्याचे कामही बोगारच करतात. महाराष्ट्र, विदर्भ व मध्यप्रदेश या भागात याची बरीच वस्ती आहे. कास्यकार या संस्कृत शब्दापासून कासार शब्द बनला आहे, असे काहीजण मानतात. हे लोक आपल्याला त्वष्टा कासार म्हणतात व त्वष्टयापासून आपली उत्पत्ती मानतात. त्वष्टा हा विश्वकर्म्याच्या मुखापासून निर्माण झाला होता आणि त्याला व त्याच्या वंशजांना वैदिक संस्कार करायचा अधिकार होता, असे या ज्ञातीतील मंडळी समजतात.

पद्मपुराणातील कालिकामाहात्म्यात याच्या उत्पत्तीविषयी एक कथा आहे, ती अशी –

कार्तवीर्य सहस्रार्जुनाचा पुत्र धर्मपाल व चोळ राजकन्या चंद्रगुप्ता यांची पुत्रसंतती कालिका देवीच्या आज्ञेवरून कासे, ताबे वगैरे धातू बनविण्याची कला शिकली. त्यांनीच पुढे या कलेचा प्रचार केला. तेव्हापासून ते कांस्यकार किवा कासार या नावाने ओळखले जाऊ लागले.

उत्तरेच्या कासारांत देवके व दक्षिणेच्या कासारात गोत्रे आहेत. एकाच देवकात व गोत्रात विवाहसंबंध होत नाही. देशावरचे कासार मुलाची मुज करतात, तर कोकणातील करीत नाहीत.

हे स्मार्तमतानुयायी असून कालिकेला भजतात. याशिवाय बहिरी, चंडिका, एकवीरा, कुमारिका, खंडोबा, महालक्ष्मी या देवतांनाही भजतात. यांची धर्मकृत्ये ब्राह्मणाप्रमाणेच असतात.

त्वष्टा कासार स्वतःला पांचाल ब्राह्मण म्हणवितात. उ. प्रदेशातील कासारांना कासेरा असे म्हणतात. ते स्वतःला क्षत्रिय

मानतात. काही कासार जैनधर्मीही आहेत. [ मु. इ. जा.; म. ज्ञा. को. ]

**कासारवाणी** एक जात. उत्तर प्रदेश, बिहार, ओडिसा व मध्यप्रदेश या ठिकाणी यांची वस्ती आहे. कास्यकार वणिक् या शब्दावरून यांना हे नाव मिळाले आहे. याच्यांत दोन पोटभेद असून पूर्वेकडील लोकांना पुरभय्या व पश्चिमेकडील लोकांना पश्चिमवाह असे म्हणतात. पांच-सहा पिढ्यांपूर्वी आपण कारा माणिकपुराहून आलो, असे पूर्वभागातील कासारवाणी सांगतात.

याच्यांत बालविवाह रूढ होता व पहिली बायको हयात असताना तिच्या संमतीवाचून पुरुषाला दुसरे लग्न करता येत नसे. सगोत्रविवाह निषिद्ध होता. विधलेला दीराशी लग्न करण्याची परवानगी असे; पण सक्ती नसे.

याच्यापैकी बरेचसे लोक रामानंदी सप्रदायाचे असून ते पाचोव्रन पीर व महावीर याची उपासना करतात. पीराचे उपासक मासाशन करतात; पण महावीराचे उपासक मास निषिद्ध मानतात.

हे लोक व्यापारी असून मीठ, धान्य, तंबाखू, इ. वस्तूचा व्यापार करतात. [ म. ज्ञा. को. ]

**कासिया** कुशावती पाहा.

**कास्त** कात्यायन ब्राह्मण पाहा.

**काहला** पितळ, तांबे किंवा चांदी या धातूचे बनविलेले धोतऱ्याच्या फुलासारखे एक वाद्य. याची लांबी ३ हात असते. 'हाऽहूऽ' अशासारखा आवाज यातून निघतो (सं. शा.). हे वाद्य फार प्राचीन असावे. कारण योगवासिष्ठात मृदंग, शख, दुंदुभी यांच्याबरोबर काहलाचाही निर्देश आला आहे. हर्षचरितातही ' कूजत्काहले ' असा त्या वाद्याचा उल्लेख असून ते लढाईवर निघताना वाजवीत, असे म्हटले आहे. डॉ. वासुदेवशरण अग्रवाल याला ' तुरही '=तुतारी म्हणतात, ते यावरून खरे वाटते. कोशात मात्र मोठा ढोल व सुषिर वाद्य असे या शब्दाचे दोन परस्परविरुद्ध अर्थ दिले आहेत. कर्नाटकात कहल्ल नांवाचे एक अलगुजासारखे वाद्य प्रचारात असून ते अधिकारी व्यक्तीच्या आगमनाच्या वेळी व ग्रामदेवतेच्या वार्षिकोत्सवाच्या प्रसंगीही वाजविले जाते. या सर्व उल्लेखांचा विचार करता काहला किंवा कहल्ल हे एक सुषिर अर्थात फुंकून वाजवायचे वाद्य आहे, असाच निष्कर्ष निघतो. [ एस्. इं. ]

**काहूत** पंजाबातील एक जात. हे मुख्यतः मुसलमान असून वृत्तीने शेतकरी आहेत. हे मुख्यत्वे झेलम जिल्ह्यात आढळतात. एका काळी या प्रदेशावर याचे राज्यही होते.

**काळबेलिया** साप पकडणारी व सापाचे प्रदर्शन करून उपजीविका करणारी राजस्थानातली भटकी जात. हे भगवी वस्त्रे धारण करतात, डोक्याला साफा बांधतात आणि आपण नाथपंथी असल्याचे सांगतात. हे साप, विंचू यांच्या विषावर जडीबुट्टीही देतात. पुंगी आणि खजरी वाजवितात. या वाद्याच्या साथीवर इंडोरी व पनिहारी ही गीते गातात. यांच्या बायका शिमग्यात घरोघर गातात व नाचतात. [ लोककला त्रै. ]

**काळाई** कासार व इतर काही जाती यांची देवी. हिचे स्वरूप कालीसारखे असते.

**काळापूट्टू** केरळातील बैलाची शर्यत. काळा म्हणजे बैल आणि पूट्टू म्हणजे जोतणे. उन्हाळ्याच्या दिवसात हा खेळ होतो. कमीतकमी एक एकराचा शेताचा तुकडा हे या खेळाचे मैदान होय. त्यात पाऊलभर पाणीही अवश्य असावे लागते. एखाद्या गावी काळापूट्टूचे आयोजन झाले, की त्या गावाचा मुखड शेतकरी आसपासच्या गावच्या किसानांना



काळापूट्टू– बैलांची शर्यत

निमंत्रण धाडतो. ते मग आपापल्या खिलाडी बैलजोड्या घेऊन निमंत्रणाच्या जागी जातात. शर्यत सुरू करण्यापूर्वी सगळ्या

बैलांना शेताच्या बांधावर आणून हारीने उभे करतात. हे सगळे बैल नितळ, पुष्ट आणि भरदार आंगठणीचे असतात. मग बैलाच्या मानेवर जू ठेवतात व नांगराच्या जागी लोढण्यासारखे एक लांब लाकूड बांधतात. बैलजोडीचा मालक किंवा त्याचा गुमास्ता त्या लाकडावर उभा राहतो, आपला तोल संभाळण्यासाठी जुवाला बांधलेली एक दोरी हातात धरतो आणि योग्य तो इशारा मिळताच बैलजोडीला फटकारतो. त्यासरशी बैल धावू लागतात. काही वेळा बैल जोराने पळत असताही हे चाबूकस्वार, दोरीचे हात सोडून त्या लोढण्यावर उभे राहतात. त्यांचा जरा तोल गेला, तरी तोंडघशी पडण्याची भीती असते. हे कसब साध्य करण्यासाठी त्यांना वर्षवर्ष अभ्यास करावा लागतो. शर्यतीचे वर्तुळ पुरे झाले, की एक बैलजोडी विसावते व दुसरी रंगणात येते. दिवसभर ही शर्यत चालू राहते. विजयी मालकांना बक्षिसे मिळतात. बक्षीस देताना बैलाचा पळण्याचा वेग, लय, त्याचे ठाणमाण, सौंदर्य व आरोग्य या सर्व गोष्टींचा विचार करतात. शेतीला आवश्यक असलेल्या बैलांची निपज चांगली व्हावी आणि त्यांचे योग्य संगोपन व्हावे, हा या शर्यतीतला मूळ उद्देश आहे. प्राचीन काळापासून केरळात हा खेळ प्रचलित आहे. [ केरळ ]

**काळुराम वस्ताद** (इ. स. १९ व्या शतकाचा उत्तरार्ध) हा उज्जयिनीचा रहिवासी होता. बालमुकुंद गुरू याच्यापासून काळुरामाला प्रेरणा मिळाली. गुरूच्या मृत्यूनंतर सुमारे वीस वर्षांनी याने माच (लोकनाट्य) लिहायला सुरवात केली. उज्जयिनीच्या दौलतगंजांत याच्या माचाचे प्रयोग होत. प्रल्हादलीला, हरिश्चंद्र, मधुमालती, जीन आलम, ढोल सुल्तानी, छबीली भटियारिन, हीरामोती, इ. १८ माच त्याने लिहिले आहेत. काळुरामाचे टोपणनाव ' दुर्बल ' होते. लेखक या नात्याने त्याने चांगली कीर्ती मिळवली. त्याचा मृत्यू वयाच्या चाळिसाव्या वर्षी झाला. [ लो. ध. ना. ]

**काळूबाई** महाराष्ट्रातली एक लोकदेवता. हिची मूर्ती नसते, तर तांदळा असतो. काळूबाईच्या उपासकांचे एक केंद्र पुण्याजवळच्या शिरवळपासून ९ मैलांवर आहे. हे पर्वतशिखर असून त्याला मांढरदेव असे म्हणतात. दरवर्षी मार्गशीर्षात तिथे यात्रा भरते. [ मि. रि. ]

**किंकिणी** लहान घंटा अथवा घुंगूर यांना किंकिणी किंवा क्षुद्र घंटिका म्हणतात. स्त्रियांच्या पैंजणाला किंकिणी जडवितात. नर्तक कमरेभोवती घुंगूर लावलेला पट्टा बांधतो, त्याला किंकिणीजाल असे म्हणतात.

**किंक्रांत** मकर संक्रांतीच्या दुसऱ्या दिवसाला किंक्रांत म्हणतात. किंकर नांवाच्या दैत्याला देवीने या दिवशी मारले, म्हणून हा दिवस सणासारखा पाळतात. या दिवशी स्त्रियांनी शेणात हात घालू नये, भोगीच्या दिवशीची शिळी भाकर राखून ती खावी, घरातला केरकचरा काढण्यापूर्वी वेणी घालावी आणि दुपारी हळदी-कुंकू करावे, असा आचार महाराष्ट्रातल्या स्त्रीसमाजात रूढ आहे.

**किंपुरुष** अतिमानवी योनीतील एक वर्ग. ऐ. ब्राह्मणाच्या मते रानटी मनुष्य (२. ८). किंपुरुष व किन्नर हे पुष्कळदा एकच समजले जातात. हे ब्रह्मदेवाच्या छायेपासून जन्मले. हे वारंवार कैलासावर जातात. सप्तर्षींपासून यांनी धर्माचे ज्ञान मिळविले (भाग. पु. ११. १४. ६). **पाहा—** किन्नर.

**किंपुरुषवर्ष** जंबुद्वीपाच्या वर्षसंज्ञक नऊ भागांपैकी एक भाग. उत्तरेस हेमकूट पर्वत, दक्षिणेस हिमालय आणि पूर्व-पश्चिम दिशांना क्षारसमुद्र अशा त्याच्या चतुःसीमा आहेत. याचे हैमवतवर्ष असे नामान्तर आहे. इथे किन्नरांची वसती आहे. या ठिकाणी हनुमंताचे वास्तव्य असून तो रोज इथे रामाची पूजा करतो. आग्नीध्र हा या वर्षाचा अधिपती आहे. [ म. ज्ञा. को.; पु. इं. ]

**किकीचे पान** महाराष्ट्रातील लहान मुलींचा हा एक खेळ आहे. यात खेळणाऱ्या मुली एकमेकींपासून समान अंतरावर उभ्या राहतात. नंतर सर्वजणी टाळी वाजवून दोन्ही हातांच्या टिचा कानांच्या बाजूंना लावतात. तसे करून त्या पाच किंवा सहा हात पुढे जातात व पुन्हा तितक्याच मागे येतात. हा खेळ खेळताना मुली जे गाणे म्हणतात ते असे—



केतकीचे पान

**किकीचे पान बाई की की ।**
**सागर मासा सू सू ।**
**आल्या ग बाई गुजरणी ।**
**कापूस घ्या ग पिंजरणी ।।**

'केतकीचे पान बाई की की' असाही एक दुसऱ्या प्रकारचा खेळ आहे. यात दोन मुली समोरासमोर एक हात डोक्यावर व दुसरा हात कमरेवर ठेवून उभ्या राहतात. नतर गिरकी घेऊन आपल्या जागांची अदलाबदल करतात. एक बसते व दुसरी उभी राहते. त्या वेळी त्या 'केतकीचे पान बाई की की' हे गाणे म्हणतात. [ व्या. ज्ञा. को.; सु. वि. को. ]

## किचगार

द. कर्नाटकातील बुरुड व भिकारी यांची एक जात. हे लोक भीक मागताना जो एक प्रकारचा आवाज सतत करीत असतात, त्याला किचकु असे नाव आहे. त्या किचकु शब्दावरून या जातीला हे नाव मिळाले. [ का. ट्रा. स. इ. ]

## किच्छक

बंगालमधील एक जात. उ. भारतातील बाउरी जातीची ही पोटजात असल्याचे पोलिस खात्याच्या दप्तरावरून कळते. हे लोक रस्ते झाडण्याचे काम करतात; पण भंगीकाम करीत नाहीत. याशिवाय गुरे चोरणे, भीक मागणे, मंत्र–तंत्र करणे, इ. गोष्टी ते करतात. यांच्या घरची धार्मिक कृत्ये धोबी व न्हावी करतात. यांची भाषा काही अंशी गुजरातीसारखी आहे. [ से. इं. १९५१ ]

## कितव

बलुचिस्तानातला एक मानवसंघ. हे लोक राजसूय यज्ञात युधिष्ठिराला जो उपहार घेऊन आले, त्यात बकरे, मेंढे, गायी, उंट, गाढवे व फळांची दारू या वस्तू होत्या (म. भा. सभा ५१. १२. १३). चांगल्या जातीच्या उंटांची निर्मिती करणे, ही गोष्ट बलुची लोकाना आवडते. त्यांचे उंट वेगवान चालीसाठी प्रसिद्ध आहेत. त्यांनी जी फळांची दारू आणली होती, ती बहुधा खजुराची असावी. [ ना. प्र. प. ]

## कित्सम्म

द. भारतातील एक गौण स्त्रीदेवता. ही सतीवर्गापैकी आहे. [ द्र. गॉ. मॉ. हि. ]

## किनरी

एक तंतुवाद्य. नारळाची करवंटी चामड्याने मढवून तिच्यात दीड फूट लांबीची बांबूची काठी बसवितात आणि तिच्यावर एक किंवा दोन तारा एकतारीप्रमाणे ताणतात. हे वाद्य व्हायोलिनप्रमाणे धनुकलीच्या साहाय्याने



वाजवितात. याचे स्वर कर्णकटू निघतात. जोगी किंवा गोसावी हे वाद्य वाजवून भर्तृहरीची गाणी म्हणत भिक्षा मागतात. या वाद्याला रावणहस्त असे दुसरे नाव आहे.

## किनाराम अघोरी

(१६२७–१७६९ इ. स.) एक उत्तर भारतीय संत. वाराणसी जिल्ह्यातील चंदौली तालुक्यातील बाणगंगेच्या किनाऱ्यावरच्या रामगढ या गावी रघुवंशी क्षत्रिय कुलात याचा जन्म झाला. गृहसौख्य न मिळाल्याने तारुण्यातच विरक्त होऊन हा वैष्णव संत बाबा शिवराम यांचा शिष्य बनला. पुढे हा गिरनार पर्वतावर भ्रमण करीत असताना त्याला दत्तात्रेयाने दर्शन देऊन अवधूतपंथाची दीक्षाही दिली.

नंतर हा काशीस परत गेला, तेव्हा कालूराम अघोरीची व याची भेट झाली. कालूरामाने दाखविलेल्या चमत्कारांनी प्रभावित होऊन हाही अघोरी बनला व गुरूच्या मृत्यूनंतर त्याच्या गादीवर बसला. त्यानंतर त्याने शेवटपर्यंत अघोर पंथाचा खूप प्रचार केला.

हा जातपात मानीत नव्हता. हिंदू व मुसलमान या दोन्ही धर्मांचे लोक याचे शिष्य होते. सर्व जातींचे लोक याचे अनुयायी आहेत. ते रामाची उपासना करतात; पण मूर्तिपूजा करीत नाहीत. त्यांना औघड असेही नाव आहे.

वैष्णव धर्मानुसार याने मारुफपुर, नयी डीह, परानापूर व महुवर या ठिकाणी आपल्या गाद्या स्थापल्या आणि रामगढ, देवल, हरिहरपूर व कृमिकुंड येथे अघोरपथी मठांची स्थापना केली. याची मुख्य गादी काशीमध्ये कृमिकुंडावर आहे.

विवेकसार हा याचा मुख्य ग्रंथ असून त्यात याने एका ठिकाणी आपल्या उपदेशाचे सार सांगितले आहे, ते असे–

**साँच कहिय, साँचो सुनिय, साँचो करिय विचार ।**
**साँच समान न और कुछु साँचो संग सम्हार ।**

अर्थ– सत्य बोल, सत्य ऐक, सत्याचाच विचार कर. सत्यासारखे दुसरे काही नाही; सदैव सत्याचे पालन कर.

याने रामरसाल, रामगीता, रामचपेटा, राममंगल, इ. ग्रंथ रचले आहेत. **पाहा**– अघोरपंथ. [ भा. सं. म.; उ. भा. सं. प.; हिंदुत्व ]

## किन्नर

(१) अतिमानवी योनीतले प्राणी. यांचा उल्लेख शतपथ ब्राह्मणात आढळतो ( ७. ५. २. ३२ ). हे अश्वमुखी पण मानवशरीरी आहेत. हे प्राणी मनुष्य की पशू असा संभ्रम पडतो, म्हणून त्याना किन्नर हे नाव मिळाले, असे पुराणात सागितले आहे.

अश्वमुख किन्नर या पौराणिक कल्पनेपेक्षा बौद्धांची किन्नर-कल्पना वेगळी आहे. बौद्धमते ते अर्धपक्षी व मानवमुख आहेत.



किन्नर

यक्षांप्रमाणेच यांचीही उत्पत्ती ब्रह्मदेवाच्या अंगठ्यापासून झाली, असे काही पुराणांत लिहिले आहे.; तर इतर काही पुराणांत यांना कश्यपाची प्रजा म्हटले आहे. ते गंधमादन पर्वतावर वास करतात असा उल्लेख महाभारतात व चंद्रकिन्नर-जातकात आढळतो. ते हिमालयात राहतात व सुंदर गातात, असे कालिदास सांगतो (कुमार. १.८).

कैलासावर यांची शंभर नगरे आहेत, असे वायुपुराणात म्हटले आहे (४६. ४१).

किन्नर पुष्पप्रेमी व प्रणयासक्त असतात. किन्नरयुगुले एकमेकांवर नैष्ठिक प्रेम करतात. ते कधी एकटे नसतात. गायन व नृत्य यांत ते कुशल असतात. ते अत्यंत नाजूक व सुरेख असतात व त्यामुळेच माणसे त्यांना छळतात असे म्हटले आहे.

प्राचीन व मध्ययुगीन वाङ्मयात व कलाक्षेत्रात यांना गौणदेवतांचे स्थान मिळाले आहे. मानसारग्रंथात गंधर्व-किन्नरांचे वर्णन आहे, ते असे–



किन्नरांचा नाच

त्यांचे पाय पशूसारखे, शरीर मानवी आणि मुख गरुडासारखे असते. त्यांच्या दंडांना पंख असतात. त्यांचा वर्ण पुष्पासारखा असतो. ते कमल–मुगुट धारण करतात. त्यांना संगीत फार आवडते.

भरहूत येथील कठड्यावरील शिल्पात किन्नर–जातकातील प्रसगांचे चित्रण आहे. त्यात एका किन्नरयुग्माने झाडाची पाने कमरेभोवती गुंडाळलेली दिसतात.

किन्नरांना किंपुरुष, अश्वमुख व मयू अशीही नावे आहेत. ते वानर असावे, असे सायण, मॅकडोनेल् व कीथ यांचे मत आहे. हे एक महिना पुरुष व एक महिना स्त्री असतात, असेही उल्लेख आहेत. त्यांच्या अधिपतीचे नाव द्रुम असे आहे. [लो. सा. रू.; डे. हि. इ.; म. ज्ञा. को]



किन्नरी (रामेश्वरम्)

(२) भारताच्या उत्तर सीमेवर, हिमालयात किन्नरदेश नामक एक प्रदेश आहे. तिथले रहिवासी आर्यांप्रमाणेच सुस्वरूप व डौलदार बांध्याचे असून ते स्वतःला आर्यवंशीच मानतात. शेती व पशुपालन हा त्यांचा मुख्य व्यवसाय असतो. त्यांची गावे लहान लहान असतात. प्रत्येक गावात मध्यभागी एक विहार असून त्यात बुद्धाची चित्रे व त्याचे उपदेश कोरलेले असतात. तिबेटच्या सान्निध्यामुळे बहुतेक किन्नर लोक बौद्धधर्मी झाले आहेत. दलाई लामावर त्यांची श्रद्धा असते. गुरूच्या आदेशाप्रमाणे हे निष्ठापूर्वक तपःसाधना करतात. मंत्र–तंत्रावर यांचा विश्वास असतो. हे अतिथ्यशील असतात.

या लोकांचे जीवन साधे असते. हे निर्व्यसनी असतात. चोरी, व्यभिचार, असत्य भाषण व हिंसा या गोष्टीपासून ते अलिप्त

आहेत. त्यांच्यांत बहुपतित्वाची चाल आहे. सर्व भावांची मिळून एकच पत्नी असते.



किन्नर (हिमाचल प्रदेश)

किन्नरांची स्वतंत्र भाषा असून तिला हमस्कत म्हणतात. [भा. आ.]

**किन्नरयक्ष** जैन दैवतसमूहातला एक यक्ष. हा धर्मनाथाचा सेवक होता. याचे वर्णन असे–

**तत्तीर्थभूः किन्नराख्यः त्र्यास्यः कूर्मरथोऽरुणः ।**
**दक्षिणैस्तु मातुलिंगगदाभृदभयप्रदैः ।**
**वामैस्तु नकुलपद्माक्षमालामालिभिर्भुजैः ।**

(धर्मनाथचरित)

अर्थ – याचे नाव किन्नर असून तो तीर्थात जन्मलेला आहे. हा रक्तवर्ण व त्रिमुख आहे. हा कासवावर आरूढ होतो. याला सहा हात असून उजव्या तीन हातांनी तो मातुलिंग, गदा व अभयमुद्रा धारण करतो. आणि डाव्या तीन हातांत मुंगुस, कमल व अक्षमाला धारण करतो.

दिगंबर मते हा मत्स्यावर बसणारा असून सहा हातात चक्र, वज्र, अंकुश, मुद्‌गर, माला व वरमुद्रा धारण करणारा आहे. [जै. इ.]

**किन्नरी** एक तंतुवाद्य. हे फारसे प्रचारात नसले, तरी प्राचीन आहे. स्वर्गातील किन्नरांनी त्याचा शोध लावला अशी आख्यायिका आहे. संस्कृत ग्रंथांतून याचा उल्लेख किन्नरी-वीणा असा येतो. प्राचीन शिल्पकलेत किन्नरीचा अनेक ठिकाणी आढळ होतो. बेंगळूर येथील बसवनगुडी या मंदिरात किन्नरी वाजविणाऱ्या कलाकाराचे एक चित्र आहे. ते चित्र अप्रतिम



किन्नरी

असून रसिक प्रवाशांच्या कौतुकाचा विषय झालेले आहे. संगीतरत्नाकराच्या सहाव्या अध्यायात किन्नरीची सविस्तर माहिती दिली आहे, ती अशी –

किन्नरीच्या बांबूची किंवा लाकडाची लांबी सामान्यतः अडीच फूट असते. तो बांबू तीन भोपळ्यावर ठेवतात. मधला भोपळा मोठा व कडेचे दोन लहान असतात. किन्नरीला अकरा पडदे असतात व ते राळ, मेण व प्लॅस्टर ऑफ् पॅरिस यांच्या मिश्रणात घट्ट बसविलेले असतात. किन्नरीला दोन प्रमुख तारा असून एक पडद्यांना लागून व दुसरी अधिक उंचीवर खुंटीला बांधलेली असते. उजव्या हाताने तार छेडून व डाव्या हाताच्या अंगुलींनी स्वरस्थान दाबून हे वाद्य वाजवितात. किन्नरीचा आवाज किनरा असतो.

हिचे तीन भेद आहेत– बृहती, मध्यमा व लघ्वी. हे भेद आकाराधिष्ठित आहेत. द. भारतात म्हैसूर प्रदेशातल्या वन्य जमातीत किन्नरीचा वापर आहे. [श्री. आबासाहेब मुजुमदार, पुणे; म्यु. इं.]

**किब्बिसिय** एक प्राचीन धर्मपंथ. किब्बिसिय = किल्मिष, दोष काढणारा, यावरून या पंथाला हे नाव मिळाले. याचे अनुयायी इतर धर्मगुरू व साधुसंत यांच्याविषयी सदैव वाईट बोलतात. [स्कू. से. जै. लि.]

**किमया** हीण धातूपासून सोने बनविण्याची विद्या. हिचा उगम कुठे व केव्हा झाला, हे निश्चित सांगता येत नाही. पण ही विद्या फार प्राचीन असून कदाचित इजिप्तमध्ये तिचा प्रारंभ झाला असावा. किमया प्रथम चीनमध्ये उत्पन्न होऊन पुढे अरब लोकांनी तिचे संगोपन केले व नंतर अरबस्थानातून ती युरोपात गेली, असेही म्हणतात. युरोपातील

पुष्कळ ख्रिस्ती भिक्षू एका काळी किमयेच्या नादी लागले होते. त्यांचा तो नाद इतका पराकोटीला गेला, की शेवटी पोपला ही विद्या कोणी शिकू नये, अशी बंदी घालावी लागली.

बायबलच्या जुन्या करारांत परिसासंबंधी अद्‌भुत गोष्टी वर्णिलेल्या आहेत. परीस म्हणजे एक प्रकारचा दगड आहे, असे कोणी म्हणतात; तर कोणी त्याला द्रवरूप पदार्थ मानतात. तथापि ती एक कृष्णवर्ण भुकटी असते, अशी सर्वसाधारण समजूत आहे. दगडांना व धातूनाही आत्मा असतो, अशी किमयागाराची श्रद्धा होती. ज्याप्रमाणे बीजातून वृक्ष वाढतो, त्याप्रमाणे धातूंमध्येही वाढ होते, असे त्यांना वाटे आणि म्हणून परीस या अद्‌भुत दगडाच्या साहाय्याने हीण धातूचे सोने करता येईल, असे त्यांचे मत होते. या विद्येचा उत्कर्ष इ. स. ८ व्या शतकापासून विशेष झाला. पंधराव्या शतकात तर युरोपातल्या किमयागारांना परिसाचे वेडच लागले.

किमयेचा हव्यास प्राचीन काळच्या हिंदू लोकांना फारसा नव्हता. परंतु अरबांशी संबंध आल्यापासून तेही किमयेचे नादी बनले. त्यात मूळ हेतू फारसा साध्य झाला नसला, तरी रासायनिक क्रियांच्या तत्कालीन ज्ञानात मात्र निश्चित भर पडली. सुप्रसिद्ध नागार्जुन पंडित हा भारतीय रसायनशास्त्राचा प्रवर्तक मानला जातो. त्याला एका तपस्व्यापासून रसायनविद्या आणि सामान्य धातूंपासून सोने बनविण्याचे ज्ञान प्राप्त झाले होते, असे म्हणतात. त्याच्या रसरत्नाकर या ग्रंथात तांबे किंवा चांदी या धातूपासून सोने बनविण्याचे प्रयोग दिलेले आहेत.

कथासरित्सागरात किमयेने सोने बनविण्यासंबंधी अनेक कथा सांगितल्या आहेत. तथापि किमया व परीसाचा शोध या गोष्टींवर इतर देशातल्याइतका हिंदुस्थानात विशेष भर दिला गेला नाही.

किमयागारांमध्ये प्रामाणिक माणसांपेक्षा लबाड माणसांचेच प्रमाण अधिक असते व त्यांच्या हातचलाखीमुळे शहाण्या माणसांचीही सहज फसगत होते. परीसाच्या अस्तित्वाच्या खरेखोटेपणाची चौकशी करण्यासाठी युरोपात एक तज्ज्ञांची समिती नेमण्यात आली होती. १७७२ मध्ये जोफ्राय नावाच्या गृहस्थाने पॅरिस येथील सरकारी शास्त्रीय पाठशाळेपुढे त्यासंबंधी आपला अहवाल वाचला; त्यात त्याने किमयागारांच्या कित्येक लबाड्या उघडकीस आणल्या. हे किमयागार तांब्याच्या मुशीमध्ये एक मेणाचे पूड खुबीने बसवून त्याच्या आत काही सोने ठेवीत असत. प्रयोगाच्या वेळी उष्णतेने हे मेण वितळले, की त्या मुशीत सोने दिसू लागे. कांही किमयागार लोखंडी खिळा मागून घेऊन हातचलाखीने त्या खिळ्याच्या जागी सोन्याचा खिळा मुशीत टाकीत व लोखंडाचे सोने झाले, असे भासवीत. आधुनिक शास्त्रीय युगातही किमयेच्या नादाने फसणारे लोक बरेच आढळतात, ही आश्चर्य करण्यासारखी गोष्ट आहे. [ म. ज्ञा. को.; वै. वि. भा. प. ]

## किमिच्छक व्रत

एक व्रत. याचा विधी असा – आलेल्या अतिथीला ‘ तुझी काय इच्छा आहे ? ’ असे विचारणे व अतिथीने इच्छिले असेल, ते त्याला देणे. हे व्रत अवीक्षिताच्या मातेने घेतले होते. ते अवीक्षिताने पुरे करण्याचे तिला आश्वासन दिले. ती समग्र कथा मार्कंडेय पुराणात आहे (१२२).

## किमिन जातीयो बोंगा

मुंड जमातीत नववधूने करायचे एक कृत्य. हे लग्नाच्या दुसऱ्या किंवा तिसऱ्या दिवशी करतात. या विधीत नववधूचा सासरा आपल्या देवघरात पितर आणि ग्रामसंरक्षक भुते यांच्या नावाने एक कोंबडा कापतो. त्या दिवशीच्या नैवेद्याचा भात व कोंबड्याचे मांस नववधू रांधते. हे कृत्य केल्याशिवाय या वधूला नवऱ्याच्या घरी होणाऱ्या बलिदानाचा प्रसाद सेवन करणे, देवघरात जाणे व गोठ्यात शिरणे या गोष्टी वर्ज्य असतात. [ एन्सा. मुं. ]

## किराट

ह्या शब्दाचा अर्थ व्यापारी असा आहे. योगवासिष्ठात ‘ अत्यंतकृपणः कश्चित् किराटो धनधान्यवान् ’ असा त्याचा उल्लेख केलेला आहे. ‘तूप, तेल, इ. निषिद्ध पदार्थांचा क्रयविक्रय करणारा व्यापारी ’ असा या शब्दाचा अर्थ कृत्यकल्पतरूत दिला आहे. पंजाब व वायव्य सरहद्द प्रांतात हा शब्द बनिया ह्या अर्थाने अजूनही वापरला जातो. किरात नावाची वन्य जमात होती. त्या शब्दावरून हा तद्भव शब्द आहे, असे मानले तर किराट म्हणजे लबाड व्यापारी ठरतो. [ एस्. इं. ]

## किराड

एक शेतकरी जात. या लोकांची वस्ती मध्यप्रदेश, विदर्भ, राजस्थान व उत्तर प्रदेश या भागांत आहे. किराड व किरात हे एकच होत, असे एक मत आहे. इतर दस्युजातीबरोबरच ब्राह्मणांशी संपर्क न राहिल्यामुळे हे लोक वृषल (शूद्र) झाले, असे मनू म्हणतो (१०.४३–४४).

किराडांना किरार असेही म्हणतात. उ. प्रदेशातील किराडात जसावत, रावत, सेंगार, धाकरा, जादोन, इ. राजपूत नावे आढळतात. त्यावरून ते मुळात राजपूत असावे, असे वाटते. मध्यप्रदेशात नरसिंगपूर, हुशंगाबाद, बेतूल, सिवनी, छिंदवाडा

व नागपूर या जिल्ह्यांत यांची वस्ती आहे. ते या भागात ग्वाल्हेरप्रदेशातून आले असावे, असे म्हणतात. नर्मदेच्या खोऱ्यातील यांची वस्ती औरंगजेबाच्या काळात झाली असावी. या खोऱ्यात किरार, गुजर व रघुवंशी असे तीन जातीचे लोक आहेत. त्यांच्यांत एकमेकांचा उष्टा हुका चालतो, त्यावरून हे लोक एकाच वेळी तिथे वसाहतीस आले असावे, असे दिसते. आपण विधवाविवाहाची प्रथा सुरू केली म्हणून राजपुतांतून बहिष्कृत झालो, असे हे लोक सांगतात.

हे लोक नदीकिनारी शेती करीत, म्हणून यांना किराड हे नाव पडले असण्याचा संभव आहे. गोलक किराडांचा सावनेरिया किंवा विदुर या नावाचा एक वर्ग छिंदवाड्यात आढळतो. धाकड किराड यांच्याशी लग्नसंबंध करीत नाहीत. यांची काही नावे स्थलांवरून व काही धंद्यांवरून पडली आहेत. धाकड किराड ही जात आपणास सोमवंशी क्षत्रिय म्हणविते. यांच्यांत दुर्मद आणि धारष्ट्रक असे दोन भेद आहेत. धारष्ट्रकाचा अपभ्रंश धाकड झाला व दुर्मदापासून झाले त्याना दशेल म्हणू लागले.

**विवाहप्रथा–** लग्नाला निघताना यांच्यांतला नवरा मुलगा हातात कट्यार घेतो. ही चाल त्यांचे क्षत्रिय बीज दाखविते. हे लग्नातले सप्तपदी, कन्यादान, इ. विधी ब्राह्मणांकडून करवितात. लग्नाच्या वेळी यज्ञोपवीत घालतात. लग्नाआधी मयतमालगुजाराची पाटीलदेव या नावाने पूजा करतात. पाटिलकी हा मानाचा अधिकार समजतात. विजातीय पुरुषाबरोबर व्यभिचार करणाऱ्या स्त्रीला जातिबहिष्कृत करतात.

**देवधर्म –** हे देवीचे उपासक आहेत. वैशाखात नागाचीही पूजा करतात.

हे जातिबाह्यांना आपल्या जातीत घेत नाहीत. गुजर, रघुवंशी यांच्या हातची पक्की रसोई व महाराष्ट्रीय ब्राह्मणांची कच्ची रसोई यांना चालते. यांची जातपंचायत असते. जातीची मंदिरेही असतात. किराड हे गोरे, गोमटे व उंच असतात. ते डोक्याला पागोटे घालतात. यांच्या बायका विकच्छ नेसतात. स्त्रियांनी वडील दिराचे नाव घेऊ नये, त्याच्या कपड्यांना स्पर्श करू नये व त्याचे उष्टेही काढू नये, असा यांच्यांत संकेत आहे. हे लोक चांगले शेतकरी म्हणून प्रसिद्ध आहेत. [ म. ज्ञा. को. ]

## किरात

डोंगरांवर व गुहांमध्ये राहणारी प्राचीन जमात. किरातांचा उल्लेख ऋग्वेदात मिळत नसला, तरी तो वाज. संहिता (३०. १६), तै. ब्राह्मण (३. ४. १२. १) व अथर्ववेद (१०. ४. १४) यांत आढळतो. प्राचीन काळापासून किराताची हिमालयात वस्ती आहे. पश्चिमेला चंबा नदीपासून पूर्वेला नागा लोकांच्या भूमीपर्यंत आजही ही जमात आढळते. इंद्रप्रस्थाच्या पूर्वेस, पश्चिमेस व उत्तरेस तीन किरात देश होते, असे उल्लेख आहेत. पूर्वकिरातात त्रिपुरी म्हणजे सध्याचे टिपरा हे शहर येत होते. धवलगिरी व चंदगिरी ही हिमालयाची दोन शिखरे प्राचीन काळी उत्तर किरातात मोडत. किरात लोक भारताच्या पूर्वेस राहत होते, असे विष्णु पुराण सांगते; तर आर्यावर्ताच्या ईशान्येस किरातांचा प्रदेश होता, असे बृहत्संहिता म्हणते. ते उत्तरापथाच्या उत्तरेस राहत असत, असा उल्लेख रामायण–महाभारतात आढळतो.

काही संशोधक आजच्या मोन–ख्मेर या लोकांना किरात समजतात. मोन हे ब्रह्मदेशाचे व ख्मेर हे कंबोडियाचे पुरातन वसाहतकार होत. दोन्ही एक करून मोन–ख्मेर हा शब्द बनविला गेला आहे. चिनी, मंगोल आणि तिबेटी या मानववंशांशी किरातांचा संबंध आहे. लाहुली, कनौर, राजी, लिंबू असे याचे अनेक शाखाविभाग आहेत. त्यानी नेपाळ–खोऱ्यात प्राचीन काळी वस्ती केली, अशी आख्यायिका नेपाळात ऐकू येते. आभीरांच्या नंतर त्यांनी काही काळ नेपाळमध्ये राज्यही स्थापले होते. नेपाळच्या स्थानिक इतिहासात किरातवंशी राजांची २९ नावे आहेत, असे ज्ञानकोशात म्हटले आहे. इतकेच नव्हे, तर श्रीकृष्णाच्या काळी किरातांनी सर्व आसामच व्यापला होता. पण पुढे नरकासुराने त्यांना आसामातून पिटाळून लावले व ते तिथून पूर्वसमुद्राच्या काठी वस्ती करायला गेले. इ. स. च्या पहिल्या शतकात किरात हे यमुना नदीपर्यंत आले होते, असे दिसते.



किरात – अमरावती

पंजाबच्या कांगडा जिल्ह्यात साप्रत किरातांची वस्ती मुळीच नसली, तरी तिथल्या काही स्थलनामांवरून त्या भागातले किराताचे प्राचीन अस्तित्व कळून येते. सांप्रत वैजनाथाचे मंदिर ज्या ठिकाणी आहे, त्या गावाचा उल्लेख ११ व्या शतकातल्या एका शिलालेखात किरग्राम असा आढळतो. किरात लोक पूर्वी पशुपाल होते. आर्य लोकही पशुपालच असल्यामुळे त्यांनी किरातांना पंजाबातल्या समृद्ध चराऊ मैदानातून हुसकून

लाविले. त्यामुळे ते उत्तर दिशा धरून मागे हटले. आर्यांच्या सामर्थ्यापुढे त्यांचा निभाव लागला नसला, तरी हिमालयाच्या दुर्गम पहाडांचा आश्रय करून त्यांनीही खालच्या नव्या वसलेल्या आर्य ग्रामांवर सूडबुद्धीने हल्ले करायला सुरुवात केली. शंबर हा किरात होता. ऋग्वेदात वर्णिलेले शंबर–दिवोदास युद्ध हे आर्य–किरात संघर्षाचे मोठे उदाहरण होय, असे श्री. राहुल सांकृत्यायन म्हणतात.

रामायण व महाभारत यांतील वर्णनावरून किरातांचे दोन वर्ग होते, असे दिसते. त्यांपैकी डोंगरी गुहांमध्ये राहणारे किरात तांबूस गोरे व सुंदर होते; तर दलदलीच्या प्रदेशात राहून कच्चे मासे खाणारे किरात दिसायला उग्र होते. रामायणकालापर्यंत त्यांना लोखंडाचा उपयोग माहीत नव्हता. ते सुवर्णाचा उपयोग मोठ्या प्रमाणावर करीत व त्याचेच अलंकारही बनवीत. हे लोक अरण्यातून सोम नावाची वनस्पती आणून ती आर्यांना विकीत, असे ऐ. ब्राह्मणात म्हटले आहे (१.३.७). त्यांचा मुख्य जीवनव्यवसाय शिकार हा होय. अर्जुन पाशुपतास्त्र मिळविण्यासाठी तपश्चर्या करीत असताना एका रानडुकराच्या निमित्ताने शंकराने किराताचे रूप घेऊन अर्जुनाशी युद्ध केले, ही कथा प्रसिद्ध आहे (म. भा. वन. ३९). [ऋ. आ.; वे. इं.; सो. हि. का.; म. ज्ञा. को.; ट्रा. ए. इं.; हि. ध.]

## किरातकूट

राजस्थानमधील जोधपूर विभागात हाथमा नामक गावापासून सुमारे दीड मैल अंतरावर किराडू नावाचे ठिकाण आहे. तिथे सांप्रत वस्ती नाही. आहेत ते प्राचीन मंदिरांचे भग्नावशेष. प्राचीन काळी या स्थानाचे नाव किरातकूट किंवा किरातकूप असे होते. त्याचा मध्ययुगापूर्वीचा इतिहास अज्ञातच आहे. तिथे इ. स. च्या १३ व्या शतकातले जे शिलालेख सापडले आहेत, त्यावरून असे समजते, की हे स्थान गुजरातचा सोळंकी राजा कुमारपाल याच्या सत्तेखाली असून त्याचा सामंत अल्हणदेव चौहान हा तिथे कारभार करीत होता. इथले सोमेश्वराचे मंदिर सर्वांत भव्य असून त्यात आठ स्तंभांचा अष्टभुजाकार सभामंडप आहे. गाभाऱ्याच्या चौकटीत कीचकाच्या मूर्तीवर शंकर विराजमान झालेला दिसतो. त्यावरच्या भागात ब्रह्मा–विष्णु–शिव–सूर्य यांची एक संकीर्ण मूर्ती असून तिला बहुधा पूर्वी दहा हात असावेत. मंदिराच्या बाहेरच्या अंगाला कृष्णलीला, रामायणातील काही प्रसंग, समुद्रमंथन, इ. दृश्ये कोरलेली आहेत.

सध्या तिथे चार शिवमंदिरे आणि एक विष्णुमंदिर अशी पाचच मंदिरे उरली आहेत. या मंदिरांचा वरचा भाग अनेक देवतांच्या प्रतिमांनी नटलेला आहे. वेषभूषेच्या दृष्टीने किराडू येथील सर्व मूर्ती अनुपम आहेत. सोमेश्वरमंदिराजवळ भीष्म पितामह शरशय्येवर निजून मृत्यूची प्रतीक्षा करीत आहेत, असे शिल्प दिसते. विष्णुमंदिरात विष्णूची भव्य त्रिमूर्ती असून तिचे एका बाजूचे मुख वराहाचे व दुसऱ्या बाजूचे सिंहाचे आहे. समोरच एका लहानशा पहाडावर पाषाणाची त्रिपाद भैरवमूर्ती दिसते.

शिल्पशैलीच्या दृष्टीने ही किराडूची मंदिरे महत्त्वाची आहेत. शिखरांची लघु-गुरू शृंगे व स्तंभ यांवर जी घटपल्लवयुक्त नक्षी आहे, ती गुप्तकालीन कलेचा प्रभाव दर्शविते. [रत्नचंद्र अग्रवाल– धर्मयुग ५ सप्टेंबर १९५४]

## किरातार्जुन मूर्ती

शिवमूर्तीचा एक प्रकार. अर्जुनाची तपस्या आणि त्याला शिवाकडून पाशुपतास्त्राची प्राप्ती, या कथेशी या मूर्तीचा संबंध आहे. ही मूर्ती चतुर्भुज असते. तिच्या वरच्या दोन हातांत परशू आणि त्रिशूळ असतो, खालच्या दोन हातांपैकी उजव्या हातात पाशुपतास्त्र आणि वामांगी पार्वती असते. त्या दोघांच्या समोर अर्जुन नम्रपणे उभा राहून दोन्ही हातांनी पाशुपतास्त्र ग्रहण करतो. शिव आणि अर्जुन यांच्यामध्ये एक ठेंगू दाढीवाला दिसतो, तो बहुधा शिवाचा सेवक असावा. कडाप्पा जिल्ह्यातील पुष्पगिरी या गावी हे मूर्तिशिल्प आढळते. श्रीशैलम्‌च्या शिवमंदिरात अशा प्रकारची एक सुरेख मूर्ती आहे. तंजाऊर येथे एक चोळकालीन कांस्यमूर्ती सापडली आहे, ती केवळ किरातरूपी शिवाची आहे; शिवाच्या



किरातमूर्ती – तंजाऊर

हातांत शस्त्रे नसून ते भिन्न मुद्रा दर्शवितात. [ सा. इं. इ. गॉ. गॉ.; इ. ब्राँ. ]

**किरातार्जुनीय** संस्कृत पंचमहाकाव्यांपैकी एक महाकाव्य. भारवी हा या महाकाव्याचा कर्ता होय. या महाकाव्याचे १८ सर्ग असून त्याचा प्रारंभ श्रीकाराने झाला आहे. हा पहिला श्रीकार व प्रत्येक सर्गाच्या अंतिम श्लोकात मुद्दाम योजलेला लक्ष्मी हा शब्द, यांवरून या महाकाव्याला लक्ष्मीपदांक असे म्हणतात. या काव्याचा नायक अर्जुन असून वीररस हा त्यातला प्रधान रस आहे. अर्जुनाला झालेली पाशुपतास्त्रप्राप्ती हे या महाकाव्याचे फल आहे. याची कथा संक्षेपात पुढीलप्रमाणे—

बारा वर्षांसाठी वनवासाला गेलेले पांडव काही काळ द्वैतवनात राहिले होते. त्या वेळी धर्मराजाला इच्छा झाली, की हस्तिनापुरची हालहवाल कशी काय आहे, ते एकदा जाणून घ्यावे. म्हणून त्याने त्याच वनातल्या एका वनेचर भिल्लाला हस्तिनापुराला पाठवले. तिथली सर्व परिस्थिती पाहून तो परत आला व त्याने धर्मराजाला प्रणामपूर्वक सांगितले—

'महाराज, दुर्योधन फार चांगल्या प्रकारे राज्यकारभार करीत आहे. त्याने तुमच्यावर जो अन्याय केला, तो त्याला जाणवतो आहे. त्याचे परिमार्जन व्हावे, म्हणून तो सांप्रत नीतिन्यायाने राज्य चालवीत आहे. त्यामुळे त्याच्या राज्याचा सर्वप्रकारे उत्कर्ष होत आहे.'

वनेचराचे हे बोलणे ऐकून जवळच असलेल्या द्रौपदीच्या मनाचा क्षोभ झाला. भर सभेत आपली विटंबना करणारे दुर्योधन-दुःशासन सुखाने राज्यवैभवाचा उपभोग घेत आहेत, हे समजताच डिवचलेल्या नागिणीप्रमाणे ती चवताळली. तिने युधिष्ठिराला म्हटले—

'महाराज, हे सर्व ऐकूनही तुमच्या जिवाला स्वस्थता कशी लाभते? तुम्ही शांत कसे बसता? त्या कौरवांनी तुमच्या कुलवधूची विटंबना केली. तुमच्या बंधूंना दुर्दशा आणली. आणि तरीही तुम्ही क्रोधाने भडकून का उठत नाही? मला वाटते, तुमचे क्षात्रतेजच मंदावले आहे आणि म्हणूनच तुम्ही शांती आणि क्षमा यांचा जप करीत बसला आहा. तुम्हाला शांतिब्रह्म बनून राहायचे असेल, तर हे धनुष्य तरी खांद्यावर कशाला बाळगता? द्या ते फेकून!'

द्रौपदीचे हे तेजस्वी भाषण भीमसेनाला फार आवडले. तोही तिच्याच बोलण्याला अनुमती देऊन युधिष्ठिराला म्हणाला—

'दादा! तुम्हाला आत्मविश्वास वाटत नाही का? चार दिग्गजांसारखे तुमचे चार बंधू आहेत. चतुस्समुद्रांसारखे ते दुर्धर्ष आहेत. तुम्ही मनात आणायचा अवकाश, की आम्ही चौघेही कौरवांवर चालून जाऊ आणि त्यांचा निःपात करू.'

युधिष्ठिराने दोघांचेही बोलणे शातपणे ऐकले. त्यांनी अविनीत शब्दांनी ताडन केले असूनही युधिष्ठिराची शांती ढळली नाही. तो म्हणाला—

'भीमसेना, असा क्षुब्ध होऊ नकोस. कोणतीही गोष्ट अविचाराने करू नये. कारण अविवेक हा अनेक अनर्थांना कारणीभूत होतो. याउलट विवेकी पुरुषाला गुणलुब्ध संपदा आपणहून वरते. शत्रूला घातक व आपल्याला उपकारक असे क्षमा किंवा शांती हे एक मोठे साधन आहे. लक्षात ठेव, दुष्टबुद्धी दुर्योधनावर कालांतराने स्वजनही उलटतील आणि मग त्याला उलथून टाकणे आपल्याला सहज शक्य होईल.'

युधिष्ठिर भीमसेनाची अशी समजूत घालीत असता भगवान व्यासमुनी अचानक तिथे आले. त्यांनी आशीर्वादपूर्वक धर्मराजाला म्हटले—

'युधिष्ठिरा, पराक्रम करूनच तुझे राज्य तुला परत मिळेल. कौरवांच्या पक्षाला भीष्म, द्रोण, कर्ण यांच्यासारखे अतिरथी, महारथी आहेत. कौरवपक्ष तुमच्यापेक्षा अधिक सामर्थ्यवान आहे. अर्जुन हा तुमच्यातला श्रेष्ठ धनुर्धर होय. तोच तुमचे मोठे आशास्थान आहे. अर्जुन जर तपश्चर्या करून उत्कृष्ट बल संपादील, तर तो सर्व कौरवांना भारी ठरेल. असे असाधारण सामर्थ्य मिळवून देणारी एक मंत्रविद्या मजपाशी आहे. ती अर्जुनाला उपदेशिण्यासाठीच या वेळी मी इथे आलो आहे.'

एवढे बोलून व्यासांनी तो मंत्र अर्जुनाला उपदेशून त्या मंत्राच्या जपाने इंद्राला प्रसन्न करून घेण्यास सांगितले. व्यास निघून गेल्यावर लगेच तिथे एक यक्ष अवतीर्ण झाला. अर्जुनाला हिमालयात नेण्यासाठी तो आला होता. अर्जुनाला बरोबर घेऊन तो हिमालयातल्या इंद्रकील पर्वतावर गेला. तिथे अर्जुनाने उग्र तप आरंभिले. ते पाहून तिथले वनरक्षक हवालदिल झाले. देवलोकावर हे एक नवे संकट येऊ घातले आहे, अशी भावना होऊन ते इंद्राकडे गेले. देवेंद्राला त्यांनी अर्जुनाच्या तपाचा वृत्तांत सांगितला. त्या वनरक्षकांच्या बोलण्यावरून इंद्राला समजले, की आपला पुत्र अर्जुनच त्या ठिकाणी येऊन तप करतो आहे. इंद्राला त्यामुळे समाधान वाटले. पण ते उघड न दाखविता त्याने प्रथम अर्जुनाची थोडी परीक्षा पाहायचे ठरविले. स्वर्गातल्या अप्सरांना पुढे बोलावून त्याने आज्ञापिले, की तुम्ही इंद्रकील पर्वतावर जाऊन अर्जुनाच्या तपस्येचा भंग करा.

तदनुसार अप्सरा तिथे आल्या. त्यांनी अर्जुनापुढे आपले मायाजाल पसरले. पण अर्जुनाच्या मनावर अप्सरांच्या त्या

कामचेष्टितांचा मुळीच प्रभाव पडला नाही. तो त्या इंद्रकील पर्वतासारखाच अविचल राहिला. अर्जुनाचा तो मनोनिग्रह पाहून अप्सरा खट्टू झाल्या व देवलोकी निघून गेल्या.

पण एवढ्यावरच अर्जुनाची परीक्षा संपली नाही. इंद्राने त्यासाठी आणखीही एक कपट रचले. तो एका वृद्ध तापसाचे रूप घेऊन अर्जुनाच्या आश्रमात आला. अर्जुनाचा उद्देश विचारून घेऊन त्याने त्याला म्हटले—

' भल्या गृहस्था, युद्धात जय मिळावा म्हणून तप करणे, ही गोष्ट काही तितकीशी चांगली नाही. तप करायचेच तर ते मोक्षासाठी करणे, हेच श्रेयस्कर होय. '

त्यावर अर्जुन त्या वृद्ध तापसाला म्हणाला—

' मला मोक्षाची चिंता नाही. आमच्या वैऱ्यांनी अन्यायाने आमचे राज्य हिरावून घेतले आहे. त्यांचा नायनाट करून आमच्या कुलाची प्रतिष्ठा पुनश्च प्रस्थापित करणे, हीच गोष्ट मला अधिक प्रिय आहे. '

ते उत्तर इंद्राला पसंत पडले. लगेच त्याने तापसरूप टाकून निजरूप धारण केले. त्याने अर्जुनाला शाबासकी देऊन पुढील उपाय सांगितला—

' अर्जुना, तू आता शिवाची आराधना कर. तो प्रसन्न झाल्याने तुझा सर्व कार्यभाग साधेल. '

इंद्राच्या या उपदेशाने अर्जुन अधिकच उत्साहित झाला. त्याने शिवप्रसादासाठी पूर्वीपेक्षाही प्रखर तप सुरू केले. त्या तपाचे तेज त्याच्या शरीरातून ऊर्ध्व गतीने जाऊ लागले. त्यामुळे गगनसंचारी मुनी आणि देव यांना ताप होऊ लागला. त्याच्या तेजाने कृष्णपक्षातल्या रात्रीही प्रकाशाने उजळू लागल्या. ते उग्र तेज सहन न होऊन हिमाचलावरचे तपस्वी शंकराला शरण गेले. तेव्हा शंकर त्यांना म्हणाला—

' तापसजनहो, अर्जुन हा नरनारायणापैकी नराचा अवतार आहे. आपल्या शत्रूवर विजय मिळविण्याइतके सामर्थ्य प्राप्त व्हावे, म्हणून तो माझी आराधना करीत आहे. तो पाहा, मूक नावाचा एक दानव रानडुकराचे रूप घेऊन अर्जुनाला मारण्यासाठी त्याच्याकडे जात आहे. तेव्हा तुम्ही लवकर तिकडे चला आणि पुढे काय प्रकार घडतो ते पाहा.

मग शंकराने किरातराजाचा वेष धारण केला. शिवगणांना भिल्ल बनून आपले अनुचर होण्यास सांगितले. त्या सैन्याला बरोबर घेऊन किरातरूपी शिव त्या रानडुकराच्या शिकारीसाठी निघाला. तीक्ष्ण सुळे असलेला तो वनवराह अर्जुनाच्या आश्रमभूमीत शिरत असलेला त्याने पाहिला.

अर्जुनाने गांडीव धनुष्य सरसावून वराहावर शरसंधान केले. शंकरानेही आपल्या पिनाक नामक धनुष्यातून बाण सोडला. ते दोन्ही बाण एकदमच त्या वराहाच्या शरीरात घुसले. वराह जमीनीवर कोसळला आणि त्याच क्षणी गतप्राण झाला. आपली शिकार पाहण्यासाठी अर्जुन वराहाजवळ येतो, तो त्याला तिथे एक किरात दिसला. अर्जुन आपला बाण वराहाच्या शरीरातून उपसून काढायला जातो, तोच तो किरात अर्जुनाला म्हणाला—

' थांब ! हा बाण तुझा नसून आमच्या राजाचा आहे. तो तू घेऊ नकोस. भावी युद्धात जय मिळावा म्हणून तू तप करतो आहेस. तेव्हा तू आमच्या राजाशी सख्य कर. म्हणजे तुझे काम अनायासे साध्य होईल. '

अर्जुनाने त्याचे बोलणे धुडकावून लावले. तो किराताला म्हणाला. ' मी माझा बाण घेणारच; तुझ्या राजाची हिंमत असेल, तर त्याने मजकडून तो हिसकावून घ्यावा. ' त्या उत्तरासरशी सगळा देखावा पालटला.

ती सगळी किरातसेना अर्जुनावर चालून आली. पण अर्जुनाच्या माऱ्यापुढे तिची दाणादाण उडाली. मग साक्षात किरातवेषधारी शिवच अर्जुनापुढे उभा ठाकला. त्या दोघांचे तुमुल युद्ध जुंपले. कोणी कोणास हार जाईना. मग अर्जुनाने प्रस्वापन नामक अस्त्राचा प्रयोग केला. त्यासरशी सर्वत्र अंधार पडला आणि किरातसैन्य पेंगळून पडले. त्या क्षणी शंकराच्या मस्तकातून एक पिंगट ज्योत बाहेर पडली आणि तिने अर्जुनाचे प्रस्वापनास्त्र झाडून टाकले. नंतर शस्त्राऐवजी अस्त्राचेच युद्ध सुरू झाले. अर्जुनाने शंकरावर भुजगास्त्रादी अनेक अस्त्रे सोडली आणि शिवानेही प्रत्यस्त्रे सोडून त्यांचा प्रभाव नष्ट केला. नंतर धनुष्य, बाण, खड्ग, इ. अर्जुनाची सारी आयुधे शंकराने भग्न करून टाकली. मग दोघांचे मल्लयुद्ध सुरू झाले. त्यात अर्जुनाने दाखविलेले धैर्य व सामर्थ्य पाहून शंकर संतुष्ट झाला. त्याने लगेच हिमगौर व भस्मभूषित असे निजरूप प्रगट केले. अर्जुनाने त्याला प्रणिपात केला व धाष्टर्याबद्दल त्याची क्षमा मागितली. मग शिवाचे अनेक प्रकारे स्तवन करून त्याने त्याच्याकडे वर मागितला.

' हे प्रभो, माझा थोरला भाऊ युधिष्ठिर धर्माचे यथायोग्य पालन करणारा आहे. कौरवांनी अन्यायाने त्याचे राज्य हिरावून घेऊन त्याला वनवासी केले आहे. युधिष्ठिराच्या त्या शत्रूंवर मला विजय मिळवायचा आहे. तरी हे भूतनाथा, तू मला अस्त्रवैभवाने समृद्ध कर. '

त्यावर शंकर ' तथास्तु ' म्हणाला. त्याने आपले पाशुपत नामक अस्त्र अर्जुनाला बहाल केले. ' तू तुझ्या शत्रूंना जिंकशील ' असा आशीर्वादही दिला. त्यानंतर तिथे जमलेल्या इंद्रादी लोकपालांनीही त्याला आपापली अस्त्रे दिली. मग

अर्जुनाने शिवाची अनुज्ञा घेतली आणि तो हिमालयावरून खाली उतरला. तिथून द्वैतवनातल्या आपल्या आश्रमात येऊन त्याने धर्मराजाला नमस्कार केला.

महाकाव्याच्या लक्षणानुसार प्रस्तुत काव्यात ऋतू, पर्वत, सूर्यास्त, जलक्रीडा इत्यादिकांचे विस्तृत वर्णन आले आहे. चौथ्या सर्गात शरद ऋतू, पाचव्यात हिमालय, सहाव्यात युवतिप्रस्थान, आठव्यात अप्सरांचा विहार व नवव्यात सुरसुंदरी-संभोग वर्णिलेला आहे.

भारवीचे काव्य अर्थगौरवासाठी प्रसिद्ध आहे. थोडया शब्दांत विपुल अर्थ सांगणे, म्हणजे अर्थगौरव होय. युधिष्ठिराने भीमाच्या भाषणाची ज्या शब्दात प्रशंसा केली आहे, तेच शब्द भारवीच्या काव्यालाही लागू पडतात–

**स्फुटता न पदैरपाकृता ।**
**न च न स्वीकृतमर्थगौरवम् ।।**
**रचिता पृथगर्थता गिरां ।**
**न च सामर्थ्यमपोहितं क्वचित् ।।**

(किरात. २.२७)

अर्थ – पदांनी स्पष्टतेचा त्याग केला नाही. अर्थगौरवाचा स्वीकार करून वाणीत पुनरुक्ती येऊ दिली नाही आणि त्याचबरोबर वाणीचे सामर्थ्यही कुठे खंडित होऊ दिले नाही.

भारवीला कृत्रिम शब्द योजण्याचा फारसा सोस नाही. त्याची शब्दक्रीडा पाचव्या व पंधराव्या सर्गातच काय ती पाहायला मिळते.

भारवीचा कथाप्रवाह मात्र मधून मधून खंडित झालेला दिसतो. एखादा रोचक विषय सापडला, की तिथेच तो आपली प्रतिभा पणाला लावतो. चार, पाच, सहा, आठ व नऊ या सर्गातील अशाच वर्णनातिरेकाने कथानक अगदीच मंद गतीने पुढे सरकलेले आहे.

भारवीने आपले काव्य अलंकारादिकांनी नटविले आहे. ऋतू, जलक्रीडा, चंद्रोदय इत्यादींचे वर्णन त्याने प्रसन्न भाषेत केले आहे. निसर्ग व युवती यांच्या सौंदर्याचे निरीक्षण व चित्रण या दोहोंमध्ये तो सिद्धहस्त आहे. चौथ्या सर्गातील शरद् ऋतूचे वर्णन तर अप्रतिमच आहे. पुढील श्लोक पाहा–

**मृणालिनीनामनुरञ्जितं त्विषा**
**विभिन्नमम्भोजपलाशशोभया ।**
**पयः स्फुरच्छालिशिखापिशङ्गितम्**
**द्रुतं धनुःखण्डमिवाहिविद्विषः ।।**

(किरात. ४. २७)

अर्थ– कमलिनीच्या ( हिरव्या ) वर्णाने रंगलेले, कमल-दलाच्या ( अरुण ) कांतीने नटलेले व साळींच्या पिवळ्या लोंब्यांनी पिवळे दिसणारे जल हे जल नसून जणू इंद्रधनुष्य विरघळून वाहत आहे, असे वाटते.

आठव्या, नवव्या व दहाव्या सर्गात शृंगार रसाची सरस उदाहरणे आहेत –

**विहस्य पाणौ विधृते धृताम्भसि**
**प्रियेण वध्वा मदनार्द्रचेतसः ।**
**सखीव काञ्ची पयसा घनीकृता**
**बभार वीतोच्चयबन्धमंशुकम् ।।**

( किरात. ८. ५१ )

अर्थ– जलविहाराच्या वेळी नायिकेने आपल्या हातात प्रिय-कराच्या अंगावर उडविण्यासाठी पाणी घेतले. पण त्याने हसून तिचा हात धरल्यामुळे तिचे मन कामासक्त झाले. त्याबरोबरच तिचे नीवीबंधन सैल झाले. खरे म्हणजे तिचे नेसते वस्त्र गळून पडायचे; पण पाण्याने जड झालेल्या रशनेने एखाद्या सखी-प्रमाणे ते सावरून धरले.

भारवीच्या मते स्वाभिमान हा माणसाचा फार मोठा गुण आहे. त्याने आपल्या काव्यात अनेक ठिकाणी स्वाभिमानाची तरफदारी केली असून स्वाभिमानशून्य जीवन हे निःसार असल्याचे सांगितले आहे. उदा.–

**शक्तिवैकल्यनम्रस्य निःसारत्वाल्लघीयसः ।**
**जन्मिनो मानहीनस्य तृणस्य च समा गतिः ।**

( किरात. ११. ५९ )

अर्थ– शक्तीच्या अभावामुळे नम्र झालेल्या व दुर्बल असल्या-मुळे हलका ठरलेल्या मानहीन माणसाची व तृणाची अवस्था सारखीच होय.

भारवीचे कित्येक श्लोकचरण सुभाषितांसारखे पंडितांच्या तोंडी बसलेले दिसतात. उदा.–' हितं मनोहारि च दुर्लभं वचः ' = हितकर आणि मनोहर असे वचन दुर्लभ होय. 'विश्वास-यत्याशु सतां हि योगः ' = सज्जनांशी योग होताच ताबडतोब आत्मविश्वास उत्पन्न होतो. ' न वञ्चनीयाः प्रभवोऽनुजी-विभिः'= अनुचरानी आपल्या मालकांना कधीही फसवू नये, 'सहसा विदधीत न क्रियाम् ' = विचार न करता एकदम कोणतीही गोष्ट करू नये. ही सुभाषिते प्रसिद्ध आहेत.

भारवीची काव्यशैली दीर्घसमासयुक्त नाही. पण अनेक ठिकाणी त्याच्या काव्याला क्लिष्टत्व आले आहे, हे मात्र खरे. भारवीच्या काव्याचा अर्थ लावण्यासाठी बरीच खटपट करावी लागते. म्हणूनच मल्लिनाथाने त्याच्या काव्याला नारीकेल-पाकाची उपमा दिली आहे. **पाहा**– भारवी. [ सं. सा. इ.; सं. क. द.; भा. क. वि. ]

**किरांती** नेपाळमधील किराती जिल्ह्यातील रहिवाश्यांना हे नाव आहे. ही जमात फार प्राचीन आहे. या लोकांना अलिकडेच लढाऊ दर्जा प्राप्त झाला असून त्यांना सैन्यात भरती केले जाते. यांच्या चालीरीती गुरखा व इतर तत्सम जातीच्या प्रमाणेच आहेत. हे लोक मृतांना पुरतात. [ नेपाळ ]

**किरार** किराड पाहा.

**किरीट** मुकुटाचा पर्याय शब्द. किरीट व मुकुट यांच्यांतला फरक जीवगोस्वामी याने भागवताच्या टीकेत पुढीलप्रमाणे सांगितला आहे —

**किरीटं त्रिकोणपत्रावलीरूपं मुकुटं तु समस्तकचावरकमिति भेदः ।**

अर्थ– किरीट हा तिकोनी पत्रावलीरूप असतो (याने सगळे मस्तक झाकले जात नाही ) व मुकुट केसासह सगळे मस्तक झाकून टाकतो, हा त्या दोघांतला भेद आहे.

किरीटाच्या पुढच्या भागी उभ्या पानाच्या आकृतीसारखी उंच रचना असते व दोन बाजूना दोन लहान पत्ररचना असतात. खालच्या अंगाला पट्टी असते. अर्जुन किरीट वापरीत होता व श्रीकृष्ण मुकुट घालीत होता. **पाहा**– मुकुट. [ एन्सा. हिं. आ. ]

**किलकिला राजवंश** कुशाण राजवंशाचे वर्चस्व वाढू लागले, तेव्हा बुंदेलखंडातील पद्मावती येथे राज्य करीत असलेले विदिशानाग नावाचे राजघराणे विंध्याद्रीच्या पायथ्याजवळील अरण्यात आश्रयार्थ गेले व तिथे त्याने राज्य स्थापले. त्यांची राजधानी कांचनका किवा पुरीकाचनका म्हणजे सध्याचे नाचणा गाव या ठिकाणी होती. हे ठिकाण पन्ना शहराच्या ईशान्येस सुमारे २५ मैलांवर आहे. तिथे राज्य करणाऱ्या नागराजांनी भारशिव हे नाव धारण केले आणि पुढे हे घराणे वाकाटक वंशात विलीन झाले. वाकाटक वंशाचे मूलस्थान वागाट किंवा वाकाट हे बुंदेलखंडात असून त्याच प्रदेशात किलकिला नावाची नदी आहे. या नदीवरूनच त्या प्रदेशाला व तिथल्या राजवंशाला किलकिला हे नाव मिळाले असावे.

नाचणा येथे सापडलेली नाणी व शिलालेख यांच्या अभ्यासावरून किलकिला राजे भारशिव किंवा वाकाटक वंशातलेच होते, असे सिद्ध झाले आहे. हे घराणे नागवंशी असून त्याची मूळ भूमी पंजाबातील टंक देश ही होय. त्याने विदिशा प्रांतात पद्मावती येथे राज्य स्थापले होते. काही काळ विंध्य पर्वताच्या आश्रयाला राहून या राजांनी आपले बळ वाढवले व हळूहळू कुशाण साम्राज्य खिळखिळे करून पुनश्च नागवंशाचे राज्य सर्व आर्यावर्तावर स्थापन केले. अशा प्रकारे ‘ किलकिलानृपाः ’ या नावाने ओळखल्या जाणाऱ्या भारशिव व वाकाटक राजांनी प्राचीन नागराज वंशाची परंपरा पुनरुज्जीवित करून गुप्त साम्राज्याचा उदय होईपर्यंत ती टिकवून धरली.

किलकिला राजांच्या वेळी संस्कृत वाङ्मयाची बरीच वाढ झाली. नागरी लिपीही याच कालात प्रचारात आली. अजंटाची लेणी, भूमरा येथील मंदिर, नाचणा येथील शिल्प, ही किलकिला राजांची स्मारकेच आहेत. **पाहा**– भारशिव, वाकाटक. [ म. च. को. ]

**किलिकेट** कटबू पाहा.

**किलिक्कुंजू** लहान आकाराचा तंबोरा. याच्या तारांची अशी रचना असते, की त्यांच्यामधून फक्त स्थायी स्वरच निघावे. याच्या स्वरांचे पोपटाच्या आवाजाशी साम्य असल्याने याला हे नाव दिले आहे. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**किल्लेकोट** सभोवती तटबंदी करून म्हणजे मजबत भिती बांधून जे सुरक्षित स्थान निर्माण केले जाते, त्याला किल्ला म्हणतात. जमिनीवर बांधलेला तो भुईकोट व डोंगरावर बांधलेला तो किल्ला किंवा गड होय. पाण्यात बांधलेल्या किल्ल्याला जंजिरा म्हणतात. देशाच्या रक्षणार्थ किल्ले बांधण्याची चाल फार प्राचीन आहे. वेदामध्ये गड या अर्थी पुर शब्द योजलेला आढळतो. ऋग्वेदात अश्मन्मय (दगडी) पुरांचा उल्लेख आहे (ऋ. ४. ३०. २०). आर्यांच्या पूर्वी जे लोक



भरतपूर किल्ल्याचे प्रवेशद्वार

भारतात वसले होते, त्यांनी अशी पुरे बांधली होती आणि ती वैदिक आर्यांनी उद्‌ध्वस्त केली, असे काही संशोधकांना वाटते. रामायणात लंकेची तटबंदी, बुरुज, वेशी, इ. बांधकामाचे वर्णन केलेले आहे. सुवेळा, निकुंभिला, किष्किधा या ठिकाणीही मजबूत तटबंदी होती, हे रामायणावरून कळते. महाभारतातील कूटयुद्धाच्या वर्णनात किल्ल्याची व्यवस्था कशी ठेवावी व त्यांचा उपयोग कसा करावा, ते सांगितले आहे. श्रीकृष्णाच्या द्वारकेला उत्कृष्ट तटबंदी होती.

राज्याच्या सात अंगांत दुर्ग हे एक अंग आहे. चाणक्याच्या अर्थशास्त्रात किल्लेकोटांचे महत्त्व खूप वर्णिलेले असून औदक म्हणजे जंजिरा (समुद्रातला), पार्वत म्हणजे डोंगरी, धान्वन म्हणजे भुईकोट आणि वनदुर्ग असे त्याचे चार प्रकार सांगितले आहेत. त्यापुढे चाणक्य सांगतो – राज्याच्या सीमेवर प्रत्येक दिशेस मजबूत किल्ले असावेत, त्याभोवती खंदक खणून त्यात सुसरी, मगरी व कमळाचे वेल सोडावे. तट व खंदक यांत २४ फूट अंतर ठेवून तटाची उंची ७२ फूट व रुंदी ३६ फूट ठेवावी. पायथ्याशी निवडुंग व काटेरी झुडुपांची लागवड करावी. तटाचे



डोंगरी किल्ला – सिंहगड

बुरुज चौकोनी असावे व त्यातील अंतर १८० फूट असावे. तटावर इंद्रकोष म्हणजे झाकलेल्या बैठका असाव्यात (बहुधा तिथून तोफांचा किंवा बाणांचा मारा करण्यासाठी). किल्ल्यांच्या महाद्वाराला २४ अंगुळांचे टोकदार इंद्रकील (खिळे) असावेत. याशिवाय किल्ल्याची आतील रचना व व्यवस्था, शस्त्रास्त्र-संग्रह व इतर सामग्री यांचेही तपशीलवार वर्णन कौटिल्याच्या अर्थशास्त्रात आहे.

मध्ययुगात कालंजर, कनोज, मान्यखेत, मयूरखंडी, कपिश, त्रैकूटक, उज्जयिनी, राजगृह, इ. ठिकाणचे किल्ले प्रसिद्ध होते. उत्तर भारतात डोंगर थोडे असल्याने डोंगरी किल्ले थोडेच आहेत. त्याऐवजी भुईकोट अधिक आहेत. दक्षिणेत सह्याद्री, सातपुडा, पूर्वघाट वगैरे पर्वतावर असंख्य डोंगरी किल्ले बांधलेले आहेत. त्यामुळे मुसलमानांना द. भारत लवकर जिंकता आला नाही. दक्षिणेतले हे किल्ले भोज, शिलाहार व चालुक्य यांनी बांधले आहेत. महाराष्ट्रातील सिंहगड, पन्हाळा, विशाळगड, सातारा, माहुली, तोरणा, इ. किल्ले प्राचीन असून शिवाजी महाराजांनीही अनेक नवीन किल्ले बांधले. सिंधुदुर्ग हा प्रख्यात पाणकिल्ला (जंजिरा) त्यांनीच बांधला. याशिवाय मराठ्यांनी अर्नाळा, विजयदुर्ग, सुवर्णदुर्ग, अलिबाग येथील किल्ले व हबश्याने जंजिरा हा पाणकिल्ला बांधला.

भुईकोट किल्ले गंगा व सिंधू या नद्यांच्या काठी बरेच आहेत. दिल्ली, आग्रा, भरतपूर, प्रयाग या ठिकाणचे किल्ले विस्ताराने मोठे व मजबूत आहेत. त्यांच्याभोवती नदी किंवा खंदक आहे. विजापूरलाही एक भुईकोट किल्ला आहे. या मध्ययुगीन किल्यात अनेक भव्य इमारती किंवा त्यांचे भग्नावशेष आढळतात. या बहुतेक किल्ल्यांची तटबंदी अत्यंत मजबूत असून त्यांचे बांधकाम शिल्पकलेच्या दृष्टीनेही फार सुरेख आहे. आग्रा व अलाहाबाद येथील किल्ले या बाबतीत उत्कृष्ट वाटतात. [ म. ज्ञा. को.; ग्लो. उ. प्र. ]

## किलेक्यात

कळसूत्री बाहुल्यांचे खेळ दाखविणारी तेलुगू व कन्नड प्रदेशांतील एक मराठी जात. गावोगाव हिंडून हे लोक आपले खेळ करतात, हरणाच्या चांगल्या कमावलेल्या कातड्यावर रंगीत चित्रे काढतात व प्राण्यांचे आणि माणसाचे निरनिराळे कृत्रिम अवयव बारीक तारांनी त्यांना जोडून ते खेळातल्या आकृत्या बनवितात. मुख्यत: रामायण व महाभारत यांतील कथाच ते पडद्यावर दाखवितात. [ का. ट्रा. स. इं. ]

## किशनचंद

(१८ वे शतक) एक फारसी कवी. हा दिल्लीस राहत असे. आपल्या काव्यात याने स्वत:चे नाव इखलास असे लावले आहे. याने मेष व बहार नावाचा एक चरित्रग्रंथ लिहिला असून त्यात जहांगिरापासून महंमद-

शहाच्या कारकीर्दीपर्यंत झालेल्या भारतीय कवींची सुमारे २०० चरित्रे अकारानुक्रमाने दिली आहेत. हा कवी औरंगजेबाच्या हाताखाली नोकर होता. त्याची बादशहानामा नावाची एक बखरही याने लिहिली आहे. [म. ज्ञा. को.].

**किशोरीभजन** पू. बंगालमधील एक वैष्णव पंथ. विक्रम कालचंद विद्यालंकार हा या पंथाचा संस्थापक होय. श्रीकृष्णाच्या लीलांची प्रतिकृती केल्यानेच मुक्ती मिळते असा यांचा विश्वास आहे. पुरुष म्हणजे कृष्ण व स्त्री म्हणजे राधा असे हे मानतात. किशोरी (राधा) हीच या जगाचे मूलकारण समजून तिची पूजा करण्याची प्रथा या संप्रदायात आहे. या पंथाची दीक्षा रात्री दिली जाते. पूजा-अर्चाही रात्रीच करतात. या पंथाचे लोक तीर्थयात्रा करीत नाहीत, जातीची उच्चनीचता मानीत नाहीत. ते गौरांग प्रभूचा जप करतात. [वै. शै. म. व.]

**किष्किंधा** प्राचीन काळची वालीची राजधानी. ती दंडकारण्यात असून रामायणकाळी तिथे वानरांचे राज्य होते. तिथून जवळच पंपा सरोवर आहे. तुंगभद्रा नदीच्या उत्तर तीरावर हंपीजवळ आनेगुंदी नावाचे एक मध्ययुगीन गाव असून तीच प्राचीन काळची किष्किंधा नगरी असे समजतात. (आनेगुंदी पाहा).

सहदेवाने आपल्या दिग्विजयात किष्किंधा जिंकली होती. त्याच्या वेळी तिथे मैंद व द्विविद हे वानर राज्य करीत होते, असा उल्लेख आहे. [म. ज्ञा. को.; हि. ध.]

**किसा गौतमी** एक बुद्धशिष्या. किसा हा कृश शब्दाचा पाली अपभ्रंश आहे. ही स्त्री कृश होती, म्हणून तिला लोक किसा गौतमी म्हणू लागले. तिला सासुरवास फार झाला; पण तिच्या उदरी पुत्र जन्मल्यानंतर तिचा छळ थोडा कमी झाला. तिचा तो पुत्र बागेत खेळत असताना सर्पदंशाने मरण पावला. त्यामुळे किसा गौतमी शोकाकुल झाली. पुत्राचे शव हृदयाशी धरून त्याला जिवंत करील अशी जडीबुटी शोधीत ती वेड्यापिशाप्रमाणे भटकू लागली.

त्याच भ्रमंतीत तिला बुद्धाचे दर्शन झाले. तिने मृत पुत्राला बुद्धाच्या चरणावर घालून त्याला सजीव करण्याबद्दल प्रार्थिले. त्यावर बुद्ध म्हणाला 'ठीक आहे. ज्या घरात कधीही कोणाचा मृत्यू झाला नाही, अशा घरातून मूठभर मोहऱ्या घेऊन ये; म्हणजे मी तुझ्या मुलाला जिवंत करतो.'

किसा गौतमी शहरभर भटकली. पण तिला मृत्युमुक्त घरच सापडले नाही. निराश होऊन शेवटी ती बुद्धाजवळ परत आली. मग बुद्धाने तिला म्हटले—

'पाहिलेस ना, मृत्यूचे दुःख सगळीकडेच भरलेले आहे. जन्ममृत्यूचे हे चक्र सदैव फिरत असते. त्यातून कोणाचीही सुटका नसते. तेव्हा तू पुत्रशोक टाकून दे आणि धर्माला शरण जा.'

बुद्धाच्या या उपदेशाचा किसा गौतमीवर अनुकूल परिणाम झाला. तिने शोक आवरून पुत्राचा दाहसंस्कार केला आणि मग सर्वसंगपरित्याग करून ती भिक्षुणी बनली. हळूहळू तिच्या आध्यात्मिक ज्ञानाचा विकास झाला व शेवटी ती अर्हतपदाला पोचली.

किसा गौतमीच्या काही गाथा असून त्या मनोवेधक आहेत. त्यात तिने स्त्रियांचे जीवन किती खडतर असते, त्याचे शब्दचित्र रेखाटले आहे. यावर उपाय म्हणून ती सांगते—

'सत्पुरुषांना भजावे. त्यांना भजणाऱ्या लोकांची प्रज्ञा वाढते व ते सर्व दुःखांतून मुक्त होतात.' [पू. प. सं. म.; पा. वा. ते. भि. र.]

**किसान** मुख्यतः उ. प्रदेशात वसलेली एक जात. बंगाल, बिहार व ओडिसा या प्रांतांतही यांची वस्ती आढळते. संस्कृत कृशान (= नांगर चालविणारा) या शब्दावरून हे नाव पडले असावे. शेती हा त्यांचा मुख्य व्यवसाय होय. किसानांच्या ९ पोटजाती असून त्यांची नावे बाधाम, गद्धार, हर्दिय, हलदी, जारिय, खागी, लोधा, पतारिया व सकसेन अशी आहेत.

**विवाहप्रथा** — लग्नसंबंध त्या त्या पोटजातीतच केला पाहिजे, असा निर्बंध आहे. यांचे लग्नाचे तीन प्रकार आहेत. भांवर म्हणजे अग्नीभोवती प्रदक्षिणा घालणे. हा प्रकार सर्वात उच्च मानला जातो. दुसरा प्रकार डोला. यात सर्व समारंभ वराच्या घरीच केला जातो. तिसरा प्रकार धारौण. हा विधवांसाठी असतो.

किसान हे अमरोहा येथील मियाँसाधूला भजतात. देवी व मियाँ यांना बकरी बळी देऊन त्यांचे मांस फकिरांना वाटतात. यांच्यांत पितरांचे श्राद्ध करण्याची चाल आहे. हे लोक अन्य जातीबरोबर अन्नव्यवहार करीत नाहीत.

बंगालमधील किसानांना नागेशर असे म्हणतात. ते कोलांसारखे दिसतात. संतालांप्रमाणे ते वाघाला पुजतात व त्याची हत्या करीत नाहीत. ते पितृपूजक असून शिकारिया देवता व सूर्य यांनाही भजतात. कधीकधी सूर्याला पांढरा कोंबडा बळी देतात. बंगालमध्ये राहूनही हे हिंदी भाषा बोलतात. [म. ज्ञा. को.; से. इं. १९५१]

**किस्ती ब्राह्मण** हे वऱ्हाड–खानदेशात आहेत. ते व्याज-बट्टयाचा धंदा करतात, त्यामुळे त्याना हे नाव पडले आहे. रामाने तापीतीरावर यांची स्थापना केली, असे जातिभास्कर या ग्रंथात म्हटले आहे. हे शुक्ल युजुर्वेदाच्या वाजसनेयी शाखेचे असून पारस्कर सूत्राप्रमाणे संस्कारादी कृत्ये करतात. मामेबहिणीशी लग्न करीत नाहीत. [ब्रा. भि. वि. ]

**किस् बाई किस्** महाराष्ट्रातील मुलींचे एक समूहनृत्य किंवा खेळ. हरतालिका, मंगळागौर अशा देवीच्या पूजेच्या दिवशी रात्री जागरण करतांना मुली हा खेळ खेळतात. प्रथम मुली समोरासमोर जोडीने उभ्या राहतात. मग कमरेवर हात ठेवून समोरच्या मुलीला ओलाडून पुढे जातात व परत जाग्यावर येतात. कधीकधी डावा हात कमरेवर ठेवून व उजवा हात पुढे करून जागच्या जागीच दोन्ही पाय एकदम मागेपुढे हालवून उडी घेतात. याचे गाणे असे–

**किस् बाई किस्। दोडका किस्**
**दोडक्याची फोड। लागते गोंड**
**हळूच तोड बाई। हळूच तोड।**

गाण्याच्या ओळींना पदन्यासाचा ताल देतात.

**कीकट** प्राचीन देश व लोक. हे आर्य भरताचे शत्रू असून त्यांचा अधिपती प्रमंगद हा होता, असे ऋग्वेदात म्हटले आहे (३·५३·१४). यास्क म्हणतो, की कीकट हा अनार्यांचा देश आहे (निरुक्त ६.३२). श्री. वेबरच्या मते कीकट लोक हे मगधातलेच होते आणि ते आर्येतर नसून आर्य होते. मात्र ते इतर आर्यांपेक्षा काहीसे निराळे व पाखंडी असावे. याच कीकट (मगध) देशात व कीकट कुळात गौतमबुद्धाचा जन्म झाला. कल्की अवतार हा कीकट देशातच होणार असल्याचे भविष्य सांगितलेले आहे. (कल्की पाहा). कीकट म्हणजे कैकाडी होत व कीकट हा जिप्सी लोकांचा मूळ देश होय, असे राजवाडे म्हणतात.

या देशातील लोक हरीची भक्ती करून शुद्ध झाले, असे भागवतात म्हटले आहे (१·३·२४; ७·१०·१९). हा प्रदेश गयाक्षेत्र, राजगृह व च्यवनाचा आश्रम या तीर्थस्थानांमुळे प्रसिद्ध आहे आणि तिथे वैकुंठ, लोहदंड, गृध्रकूट व शोणक ही श्राद्धासाठी पवित्र अशी स्थाने आहेत (वायु पु. १०८.७४). [म. ज्ञा. को.; पु. इं.]

**कीचक** (१) आसामातली एक जात. यांची लोकसंख्या अत्यंत अल्प आहे. हे लोक पूर्वी दरोडेखोर होते, असे म्हणतात. पण साम्प्रत त्यांनी ती प्रवृत्ती सोडली असून, ते चहाच्या मळयात मजूरी करतात.

(२) केकय व मालवी यांचा पुत्र. याच्या धाकटया भावांना उपकीचक म्हणत.

**कीचकवन** याचा उल्लेख कथासरित्सागरात सूर्यप्रभलंबकात आला आहे. हे वन मानससरोवराजवळ आहे. कीचक म्हणजे वेळू. या वनांतील वेळू तोडून मानससरोवरात टाकले असता त्याची धनुष्ये बनतात, अशी कथा आहे. या वनाचा रक्षक चंडदंड नावाचा होता. सूर्यप्रभाचे सेवक या वनात गेले होते व त्यांनी मानससरोवरात तयार झालेली धनुष्ये मिळविली होती. [प्रा. म.]

**कीथ** (१८७९–१९४४ इ. स.) याचे संपूर्ण नाव डॉ. ऑर्थर बेरीडेल कीथ. हा इंग्रज राज्यघटनाशास्त्रज्ञ वैदिक वाङमय व संस्कृत भाषा याचा पंडित म्हणून प्रसिद्ध आहे. हा संस्कृतचा प्राध्यापक होता. याने सुमारे तीस वर्षे अखंडपणे अध्ययन, अध्यापन व लेखन केले. मॅक्डोनेलच्या सहकार्याने याने लिहिलेला 'वेदिक इंडेक्स' हा ग्रंथ याच्या सर्व ग्रंथांत महत्त्वाचा मानला जातो. वेदांच्या अभ्यासकाला तो एक आधारभूत ग्रंथ वाटतो. वैदिक भाषाशास्त्रावरील याचे लिखाणही महत्त्वाचे मानले जाते.

कृष्णयजुर्वेदाच्या तैत्तिरीय संहितेचे इंग्रजी भाषांतर व Religion and Philosophy of the Veda and the Upanishadas या ग्रथांमुळे याला पौर्वात्य धर्म व सस्कृती यांचे अखंड भांडार अशी कीर्ती मिळाली. याने भारतीय तत्त्वज्ञानावर अनेक लहान पुस्तिका लिहिल्या आहेत. उदा.– Sankhya System, Karma Mimamsa, Indian Logic and Atomism इत्यादी. याव्यतिरिक्त त्याने ऐ. ब्राह्मण, ऐ. आरण्यक, सां. आरण्यक व कौ. ब्राह्मण या ग्रंथांची इंग्रजीत भाषांतरे केली आहेत, ती त्याच्या चिकित्सक व व्यापक बुद्धिमत्तेची साक्ष देतात. Sanskrit Drama व History of Classical Sanskrit Literature हे याचे ग्रंथ त्याचे संस्कृत वाङमयावरील प्रभुत्व दाखविण्यास पुरेसे आहेत. याशिवाय संस्कृत व प्राकृत ग्रंथांची सूची करण्याचे कामही या विद्वान गृहस्थाने केले आहे.

संस्कृत भाषा, शास्त्र व वेद यांमधील अत्यंत क्लिष्ट प्रमेयांचा संशोधक व त्यांचे सम्यग ज्ञान प्राप्त करून देणारा चिकित्सक विद्वान या नात्याने याचे हिंदी जनतेवर फार मोठे ऋण आहे. [अ. च. को.]

**कीर** एक शेतकरी जात. यांची वस्ती उ. प्रदेश, मध्य प्रदेश, विदर्भ व राजस्थान या भागांत आहे. ईशान्य विभागातील एक राष्ट्र असे म्हणून बृहत्संहितेत कीरांचा उल्लेख आला आहे. साहिल्लदेवाने कीर लोकांना जिंकले, असा चंबा येथील दानपत्रात उल्लेख आहे. म. प्रदेशातील कीर आपण जयपुराहून इकडे आलो, असे सागतात. त्यांनी आपली मूळची मारवाडी भाषाही कायम ठेवली आहे. किराडांचा व यांचा निकट संबंध आहे. नमचुरिया, दैमा, बनिया, वामन, नायर, जाट, हुवाड, गाड्री, लोहारिया, हेकड्या, मोची व माळी अशी याच्यांत बारा गोत्रे आहेत. भिन्न भिन्न व्यवसायांवरून ही गोत्रे तयार झाली, हे स्पष्ट दिसते. भाट हे अर्धे गोत्र समजले जाते. हे स्वतःच्या किंवा मामाच्या गोत्रात लग्नसंबंध करीत नाहीत.

**विवाहप्रथा** — यांच्यांत बालविवाहाची चाल होती. लग्नाच्या दिवशी नवरा मुलगा रेड्यावर बसून वधूकडे जातो. गरीब मुलीच्या लग्नाला वर्गणी काढून मदत करतात. विधुराला प्रथमवराच्या दुप्पट लग्नखर्च करावा लागतो.

**प्रसूतिप्रथा** — मुलाचे नाव सातव्या दिवशी ब्राह्मणाकडून ठेवतात. मूल झाले, की धाकटा दीर बाळंतीण भावजयीचा लहंगा धरून बसतो व ती त्याला काही रुपये देईपर्यंत तो सोडीत नाही. कदाचित कोण्या प्राचीन काळी या लोकात सर्व भावांची मिळून एकच बायको असण्याची शक्यता आहे. ही प्रथा मोडत चालली, तेव्हा धाकट्या दिराने जन्मलेले मूल आपलेच म्हणून तंटा करू नये, यासाठी त्याला काहीतरी द्रव्यदान करून संतुष्ट करण्याची जी नवी रीत पडली असेल, तिचाच हा अवशेष असावा, असे डॉ. केतकर म्हणतात.

**देव-धर्म** — हे लोक भैरवी देवीचे उपासक आहेत. भिन्न भिन्न गोत्रांतले लोक या देवीच्या निरनिराळ्या रूपांची आराधना करतात. तिची प्रतिमा ताइतात घालून गळ्यात घालतात. गाय कसायाला विकीत नाहीत. दिवाळीनंतर शीतलाष्टमीस यांचा मोठा सण असतो. हे दधारिया ब्राह्मणांच्या हातचेच जेवतात. सामान्यतः नदीकाठीच राहतात. यांना बाजरी आवडते. हे रेड्यावर बसण्याचे फार शौकीन आहेत. यांची जातपंचायत असते आणि तीच जातीय तंट्यांचा निवाडा करते. हे लोक मृतांना जाळतात. **पाहा**— किराड. [म. ज्ञा. को.]

**कीर्तन** (१) नवविधा भक्तीपैकी दुसरा भक्तिप्रकार. भगवंताच्या मंगलमय लीला ज्यात वर्णिल्या आहेत, अशा कथा सांगणे, भगवच्चरित्र पठण करणे व भगवंताचे नामसंकीर्तन करणे, या गोष्टींचा अंतर्भाव कीर्तनभक्तीत होतो. भागवतपुराणाने कलियुगात केवळ नामसंकीर्तनालाच प्राधान्य दिलेले आहे —

**कलेर्दोषनिधे राजन्नस्ति ह्येको महान् गुणः ।**
**कीर्तनादेव कृष्णस्य मुक्तसङ्गः परं व्रजेत् ।।**
(१२. ३. ५१)

अर्थ — हे राजा, कलियुग हे दोषांचे भांडार आहे; पण याचा एक मोठा गुण असा, की या युगात केवळ कृष्णाच्या कीर्तनभक्तीनेच मनुष्य संगरहित होऊन परमपदाला जातो.

भगवंताचे चरित्रकथन व गुणगान हे जरी कीर्तनाचे मुख्य अंग असले, तरी तदनुरोधाने जगाला सन्मार्गाचा उपदेश करणे, हाही कीर्तनाचा एक हेतू असतो. तो साधण्यासाठी कीर्तनात देवाच्या व भक्तांच्या कथा सांगून भिन्न भिन्न क्षेत्रांतले उच्च आदर्श समाजापुढे ठेवण्याची प्रथा कीर्तनसंस्थेने अंगिकारलेली आहे.

कीर्तन हा महाराष्ट्रातला एक विशेष सांस्कृतिक प्रकार आहे. कीर्तन बहुधा देवळात करतात. कीर्तनकाराला हरिदास किंवा कथेकरीबुवा म्हणतात. तो अंगात पांढरा शुभ्र पायघोळ अंगरखा घालून वर उपरणे घेतो व डोक्याला पगडी किंवा पागोटे घालतो. त्याच्या हातात चिपळ्या असतात. त्याला



हरिदास

तालासुरावर गाता येणे आवश्यक असते. कीर्तनात तबला व पेटीची साथ अवश्य लागते. हरिदासाच्या मागे एखादा तरी त्याचा साथीदार उभा असतो. हरिदासाने सुरू केलेले पद

किंवा श्लोक तो स्वतः पुरा करतो व अधूनमधून हरिदासाच्या सुरात सूर मिसळतो.

कीर्तनाची दोन अंगे असतात. एक पूर्वरंग व दुसरे उत्तर-रंग. पूर्वरंगात एखाद्या पारमार्थिक विषयाचे निरूपण असते आणि उत्तररंगात त्याच विषयाचे उदाहरण म्हणून रामायण, महाभारत किंवा पुराणे यांतले एखादे आख्यान सांगायचे असते. कीर्तनकार प्रथम गणपती व इतर इष्ट देवता यांचे नमन करून मंगलाचरण म्हणतो. नंतर एखादे ध्रुपद गाऊन मग भजन करतो. त्यानंतर संतांचा एखादा अभंग किंवा पद्य म्हणून त्याच्या आधाराने भक्ति–ज्ञान–वैराग्याचे निरूपण करतो. गीता, पंचदशी, ज्ञानेश्वरी, तुकारामाची गाथा, इ. ग्रंथांतली अवतरणे देऊन तो आपला पूर्वरंग सजवितो. पूर्वरंग प्रभावी व रसाळ करणे, हे चांगल्या कीर्तनकाराचे लक्षण होय. पूर्वरंगानंतर मूळपदावर येऊन तो पुन्हा एकदा भजन करतो आणि नंतर आख्यान सुरू करतो. साकी, दिंडी, कटाव व पदे रागदारीत गाऊन कथेकरी आख्यानाला उठाव आणतो. आख्यान संपले, की पुन्हा मूळपदावर येऊन 'हेचि दान दे गा देवा' या अभंगाने कीर्तन संपवितो. त्यानंतर आरती होते आणि प्रसाद वाटला जातो.

महाराष्ट्रात जी असंख्य देवस्थाने आहेत, तिथे राम, कृष्ण, इ. अवतारांचे जन्मोत्सव कीर्तनाने साजरे करण्याची प्रथा आहे. अशा प्रसंगी त्या त्या अवताराचे जन्माख्यान लावतात. निरूपण हे कीर्तनाचे मुख्य अंग होय. पण तेवढ्यानेच भागत नाही. कीर्तन रसाळ व प्रभावी होण्यासाठी अनेक उपांगांचीही जरुरी असते.

**ताळ मृदंग हरिकीर्तन । संगीत नृत्य तानमान ।**
**नाना कथानुसंधान । तुटोंची नेदावें ।।**

असे समर्थांनी म्हटले आहे. कीर्तनात सर्व रसांचा परिपोष झाला पाहिजे. सभ्यतेच्या मर्यादेत राहणारा शृंगारही कीर्तनाला वर्ज्य नाही. तालासुराचे ज्ञान नसेल, तर कीर्तनाला उभे राहू नये. हरिदासाला संस्कृत भाषा, न्याय, वेदान्त, इ. दर्शने, इतिहास, पुराणे, मराठी व हिंदी काव्य यांचे ज्ञान अवश्य असले पाहिजे. शिवाय प्रचलित सामाजिक, धार्मिक व राजकीय विषय, तसेच पौर्वात्य व पाश्चात्य तत्त्वज्ञान यांचीही त्याला तोंडओळख अवश्य हवी. एकूण कीर्तनकार हा बहुश्रुत आणि व्युत्पन्न हवा असा याचा अर्थ आहे.

**वक्तृत्वाचा अधिकार । अल्पास न घडे सत्योत्तर ।**
**वक्ता पाहिजे साचार । अनुभवाचा ।।**

असे हरिदासाचे वर्णन समर्थांनी केले आहे. त्यावरून हरिदासाचा अधिकार केवढा मानलेला आहे, ते कळून येईल. भक्तिभाव, अल्पसंतोष, निःस्पृहपणा, सेवाभाव, ज्ञान आणि वक्तृत्व, इ. गुणांनी कीर्तनकार समाजाच्या उत्कर्षाला उपयुक्त होतो व समाजही सन्मानपूर्वक त्याचा प्रपंच चालवितो.

वारकरी कीर्तन याहून जरा वेगळे असते. त्याला निरूपण असेही म्हणतात. निरूपण करणारा मधे उभा राहतो व त्याच्या दोही अंगी कित्येक टाळकरी त्याच्या साथीला उभे राहतात. कीर्तनकाराने अभंगाचा चरण उच्चारला, की टाळकरी त्याची एका सुरात पूर्ती करतात. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम यांच्या वाङमयाच्या आधारेच मुख्यत्वे कीर्तन होते. भक्तिप्रधान अद्वैत हा सामान्यपणे प्रतिपादनाचा विषय असतो. यात आद्यंती निरूपणच असते, आख्यान नसते. अधूनमधून भजन, नामघोष आणि निरूपण असा हा कीर्तनरंग असतो.

**कृष्ण विष्णु हरि गोविंद । या नामांचे निखिल प्रबंध ।**
**माजी आत्मचर्चा विशद । उदंड गाती ।।**

(ज्ञाने. ९. २१०)

ही ज्ञानेश्वरांची ओवी वारकऱ्यांच्या निरूपणाचे लक्षण म्हणून सांगता येईल.

कीर्तन हे लोकजागृतीचे एक उत्तम साधन आहे. वर्तमानपत्रे, मासिके, व्याख्याने, या साधनांचा उपयोग फक्त सुशिक्षित समाजापुरताच मर्यादित असतो; पण अशिक्षित वा सामान्य जनसमूहाला आत्मकर्तव्याची जाणीव करून देण्यासाठी कीर्तनाचा फार उपयोग होतो. अशा प्रकारचे कीर्तन करणारा हरिदास हा देशाचा एक उत्तम सेवकच असतो. म्हणूनच लो. टिळकांनी एकदा म्हटले होते, की 'मी वृत्त-पत्राचा संपादक झालो नसतो, तर कीर्तनकार झालो असतो.'

या कीर्तनपरंपरेविषयी डॉ. प्र. न. जोशी यांनी पुढीलप्रमाणे विवेचन केले आहे—

महाराष्ट्रातील वारकरी संप्रदायाने या कीर्तनभक्तीस जोराची चालना दिली. नामदेवमहाराज हे महाराष्ट्राचे आद्य कीर्तनकार होत.

**सुंभाचा करदोटा । रकट्याची लंगोटी ।**
**नामा वाळवंटीं । कीर्तन करी ।।**

अशा प्रकारे नामदेवाचे वर्णन केले जाते. याही आधी कीर्तनपरंपरेचा उगम शोधता येण्याजोगा आहे. गुणसंकीर्तन, लीलासंकीर्तन व नामसंकीर्तन हे कीर्तनाचे प्रकार प्राचीन काळापासून प्रचलित आहेत. नारदमुनी हे कीर्तनसंस्थेचे आद्य प्रणेते मानले जातात. नारदपुराण, भागवतपुराण यांत कीर्तनमहिमा विस्ताराने गायिला आहे. प्रभूचे नामसंकीर्तन हे स्त्रीशूद्रादिकांना प्राचीन काळापासून उपलब्ध असल्याने याचाच महिमा उत्तरोत्तर वाढत गेला. परमेश्वराचे गुणगान करणे, ही प्रवृत्ती वैदिक काळातही दिसून येते. परमेश्वराचे नाम, चिंतन,

स्मरण, गुणसंकीर्तन या साधनमार्गास त्याच्या सुलभतेमुळे व रंजकतेमुळे पुढे लोकप्रियता मिळत गेली.

**महापापराशी तरले कीर्तनीं ।**
**प्रत्यक्ष पुराणीं वंद्य झाले ।**

अशा प्रकारे कीर्तनाने तरल्याची अनेक उदाहरणे एकनाथांनी दिली आहेत. प्रल्हाद, अजामिळ, वाल्याकोळी, गजेंद्र, बिभीषण, यांसारखे भक्त कीर्तनामुळेच सर्व सुखास पात्र झाले, असा दाखला साधुसंतानी दिलेला आहे. नारद, परीक्षिती, शुक, व्यास, वाल्मीकी यांची नावे या कीर्तनपरंपरेशी निगडित आहेत. भागवतादी पुराणातून कीर्तनमहिमा विस्तारून सांगितला असला तरी कीर्तनपरंपरा प्रवर्तित झाली, ती नारदाकडूनच.

कीर्तनकाराचे गुण व अवगुण आणि कीर्तन ऐकणाऱ्यांची पात्रता यांचेही वर्णन साधुसंतांनी केले आहे. कथाकीर्तन करणाऱ्यांनी द्रव्य घेऊ नये, यावर तुकोबाचा मोठाच कटाक्ष आहे.

**जेथे कीर्तन करावे ।**
**तेथे अन्न न सेवावे ।।**

अशी त्यांची आदर्श परंपरा आहे. इतकेच काय; पण

**तट्टा वृषभासी दाणा ।**
**तृण मागो नये जाणा ।।**

असा त्यांनी होतकरू कथाकारांस इशारा दिलेला आहे. तुकोबांनी कीर्तनाच्या श्रोत्यांनाही दोन गोष्टी सांगितल्या आहेत त्या अशा––

'कीर्तन चालू असताना कोणी अंग मोडून आळस झाडू नये, जांभई देऊ नये, तिरस्कार दाखवू नये, अंग खाजवू नये. तोंडात विडा घालून बसू नये व सात दिवसांचा उपास पडला तरी कीर्तन सोडू नये.

मराठी संतपुरुषांच्या वचनांचा व शिकवणुकीचा प्रसाद कथाकीर्तनाच्या द्वारेच सर्व महाराष्ट्रभर झाला. लौकिक शिक्षणाचा प्रसार कमी, मुद्रित पुस्तकांचा अभाव, वृत्तपत्रे तर नव्हतीच, अशा परिस्थितीत समाज सुस्थिर ठेवून त्याला सन्मार्गाला लावण्याचे फार मोठे कार्य कीर्तनपरंपरेने केले आहे. अनंतफंदी, रामजोशी, विठोबा अण्णा दप्तरदार, श्रीपत बोवा ब्रह्मनाळकर, सांगलीकर, नाशिककर, गणेशशास्त्री मोडक, रामचंद्रबोवा काशीकर, रामदीक्षित आफळे माहुलीकर, नारायणबुवा फलटणकर, काशीनाथबुवा मसूरकर अशी केवढी तरी कीर्तनकारांची परंपरा सांगाता येण्यासारखी आहे. [ म. ज्ञा. को.; कल्याण–साधनांक; वसंत, नोव्हेंबर १९६३ ]

(२) कर्नाटकातील भक्तिसंगीताचा एक प्रकार. यात पल्लवी, अनुपल्लवी व चरण अथवा पल्लवी व चरण असे भाग असतात. कीर्तनात चरणांची संख्या विपुल असते. त्यात साहित्याला म्हणजे शब्दरचनेला विशेष महत्त्व असते. त्यातील आशय पवित्र असतो. त्यातून कधी कधी ईशस्तवनही केलेले असते. या कीर्तनाचे दिव्यनाम, उत्सवसंप्रदाय, मानसपूजा व संक्षेपरामायण असे चार प्रकार आहेत.

कर्नाटकातील हरिदासकवींची हजारो कीर्तने (गेय पद्ये) प्रसिद्ध आहेत. हरिदास आपला समूह करून गावोगाव फिरत आणि आपली कीर्तने गात. म्हणून लोक त्यांना दासकूट म्हणू लागले. हरिदासांचे हे कीर्तनसाहित्य कन्नडिगांच्या सांस्कृतिक विकासाला मोठे उपकारक ठरले आहे. हरिभक्तीचा महिमा गाण्याचे अमोघ साधन म्हणून ते कर्नाटकात फार लोकप्रिय झाले. [ डि. सा. इं. म्यु. म्यु.; कर्नाटक ]



कीर्तननृत्य – मणिपूर

(३) संस्कृत शिल्प साहित्यात हा शब्द प्रासाद किंवा देवालय या अर्थी वापरलेला आहे. अग्निपुराणातील देवालयनिर्मितिनामक अध्यायात या शब्दाचा हाच अर्थ दिलेला आहे. आर्यशूरकृत जातकमालेतही कीर्तन शब्द याच अर्थाने आला आहे. वेरूळच्या कैलासमंदिराला तिथल्या एका शिलालेखात कीर्तन म्हटले आहे. सातव्या शतकात कोणत्याही सार्वजनिक धर्मार्थ वास्तूला कीर्तन म्हणत असत. [ का. ए. सां. अ. ]

(४) बंगालमधील लोकनृत्याचा एक प्रकार. हे नृत्य बरेच प्राचीन असले, तरी त्याचे सध्याचे स्वरूप चैतन्य महाप्रभूंच्या काळी प्रचलित झाले. यात नर्तक मृदंगाच्या साथीवर वाटोळे वाटोळे नाचतात व भावोन्मत्त झाल्याप्रमाणे भक्तिपूर्ण गीते गातात. नाचता नाचता ते भूमीवर पडतात व दुसऱ्याची चरणधूळ स्वतःच्या देहाला लावतात.

मणिपूरमध्येही हे भक्तिनृत्य प्रचलित आहे. तिथे त्याला मंजीर, करताळ व मृदंग या वाद्यांची साथ असते. नर्तक अर्धवर्तुळात उभे राहून नाचतात. त्यांच्या हातात मंजीर वा

करताळ असतो. या वाद्यांच्या तालावर ते अत्यंत लयबद्ध व मनोहर नृत्य करतात. [ भा. लो. नृ. ]

## कीर्तनिया

एक मैथिली भक्तिनाटच. मिथिला व बंगाल या देशांत चैतन्य महाप्रभूची वाणी कीर्तनद्वारे कृष्णलीला वर्णन करीत होती. तिच्यातूनच या नाटचाला प्रेरणा मिळाली. नेपाळच्या राजदरबारात व मिथिलेच्या लोकसमाजात या नाटचाचे अभ्युत्थान झाले. नेपाळचे मल्ल राजे नाटचप्रेमी होते. त्यांनी नाटकेही लिहिली व ती करण्यासाठी रंगभूमीही निर्माण केली. या कीर्तनिया नाटचात गद्य कमी होते व संगीत काव्यबद्ध संवाद अधिक होते. या नाटचात नृत्याला विशेष स्थान होते. इ. स. १७६४ मध्ये मल्ल राजांचे पतन झाले व त्यांच्याबरोबरच कीर्तनियाची परंपराही समाप्त झाली. मैथिली जनतेने ती परंपरा थोडयाबहुत प्रमाणात पुढे चालविलेली दिसते.

कीर्तनिया हे भक्तिप्रधान नाटच आहे. या नाटचाच्या द्वारे कृष्णचरित्र किंवा शिवचरित्र दाखविले जाते. [ लो. ध. ना. प. ]

## कीर्तिमुख

मंदिरात गाभाऱ्याच्या दरवाज्यावर, देवाच्या प्रभावळीत, उंबऱ्यावर अथवा शिखरापाशी एक विक्राळ सिंहमुख कोरलेले असते, त्याला कीर्तिमुख म्हणतात. प्राचीन संस्कृतीत सिंह हे सामर्थ्याचे प्रतीक मानलेले आहे. राजद्वारावर सिंहाच्या आकृती काढीत. राजाचे आसनही सिंहाच्या आकृतीने शोभवीत. सिंहाची आकृती असलेले कोणतेही भुवन सुरक्षित राहते, अशा भावनेने या प्रतीकाच वापर होत असे.


कीर्तिमुख

खडकात खोदलेल्या चैत्यमंडपाला प्रारंभी कीर्ती असे म्हणत आणि जिथे खोदकामास प्रारंभ केला जाई, त्या गवाक्षाला 'कीर्तिमुख' म्हणत. पुढे अशा प्रकारच्या गवाक्षात मानवी किंवा पशु-पक्ष्यांचे, विशेषतः सिंहाचे मुख कोरण्याची प्रथा सुरू झाली. असले कोरीव काम गुप्तकालीन शिल्पात पुष्कळ आढळते. ज्यात सिंहमुख कोरलेले आहे, असे कीर्तिमुख रुद्राच्या शक्तीचे प्रतीक म्हणून पुढे फार पवित्र मानले जाऊ लागले. शिवाची अष्टरूपे प्रसिद्ध आहेत. त्यांपैकी जड अर्थात पंचभूतात्मक रूपाचे प्रतीक म्हणजे सिंह होय. शिवाला पंचानन म्हणतात, त्याप्रमाणे सिंहालाही पंचानन असेच नाव आहे.

मध्ययुगीन देवालयांच्या प्रवेशद्वारावर अशी कीर्तिमुखे आढळतात. त्यांना पंचवक्त्र म्हणतात. तोरणाच्या दर्शनी भागावर पंचवक्त्र असावे, असे काश्यपशिल्पात सांगितले आहे (१४.२७). अशा तोरणाला वक्त्रतोरण, मकरतोरण वा चित्रतोरण म्हणत. मध्ययुगीन शिल्पातील काही कीर्तिमुखे मकरमुखीही आढळतात. शिवाची पाच मुखे ही पंच महाभूतांची प्रतीके आहेत. सृष्टीच्या स्थितिरूप अवस्थेत त्यांचा समन्वय साधलेला असतो. पण कालांतराने अशी एक अवस्था येते, की त्या वेळी या मूलतत्त्वांच्या कार्यात मेळ राहत नाही व त्यामुळे सगळीकडे अनवस्था माजते. अशा वेळी शिवाचे जे एकच भयानक रूप प्रतीत होते, तेच हे कीर्तिमुख होय.

पद्मपुराणात या कीर्तिमुखाविषयी एक कथा आहे, ती अशी—

असुरांचा राजा जालंदर याचा दूत राहू शंकराकडे गेला व त्याने पार्वतीबद्दलची जालंदराची अभिलाषा शिवाला सांगितली. तेव्हा शंकर संतप्त होऊन त्यान आपल्या जटांतून एक सिंहमुख महागण निर्माण केला. त्याला तीन मुखे, तीन पाय, तीन पुच्छे व सात हात होते. त्याने सगळचा दैत्यांना मारून खाल्ले; पण तरीही त्याची भूक शमली नाही. तेव्हा शिवाच्या आज्ञेने त्याने स्वतःचे शरीरच खाऊन टाकले व तो मुखमात्र शिल्लक उरला. मग शिवाने त्याला कीर्तिमुख हे नाव देऊन आपल्या मंदिरात मानाचे स्थान दिले.

शंकराच्या दर्शनाला जाणाऱ्याला प्रथम याचे दर्शन घ्यावे लागते. अन्यथा दर्शनेच्छूचा घात होतो, असे समजतात.

नरसिंह विष्णूच्या वरपूर्तीसाठी शिवानेच हे रूप घेतले, असे लिंगायत मानतात (अनुभवशिखामणि). हिंदू शिल्पाप्रमाणेच जैन व बौद्ध शिल्पातूनही हे चिन्ह आढळते. पुढे हे कीर्तिमुख अलंकारातही वापरू लागले. याला गुजरातेत ग्रास, ग्रासपती, ग्रासद अशी व दक्षिणेत सिंहललाट किंवा सिंहमुख अशी नावे आहेत. केयूर या बाहुभूषणाची दोन्ही टोके सिंहमुख करण्याची प्रथा होती.

केवळ भारतातच नव्हे; तर इंडोनेशियातही शिवमंदिराच्या प्रवेशद्वारावर कीर्तिमुखे कोरलेली आढळतात. [ डॉ. वासुदेव शरण अग्रवाल – पुराणम् भाग २, १९६० ]

**कीर्तिव्रत** एक काम्यव्रत. व्रतावधी एक वर्ष. याचे विधान व फल पुढीलप्रमाणे सांगितले आहे—

**अश्वत्थं भास्करं गङ्गां प्रणम्यैकत्र वाग्यतः ।**
**एकभक्तं नरः कुर्यादब्दमेकं विमत्सरः ।।**
**व्रतान्ते विप्रमिथुनं पूज्यं धेनुत्रयान्वितम् ।**
**वृक्षं हिरण्मयं दद्यात् सोऽश्वमेधफलं लभेत् ।।**
**एतत् कीर्तिव्रतं नाम भूतिकीर्तिफलप्रदम् ।।**

(मत्स्य पु. १००.२४)

अर्थ– अश्वत्थ, सूर्य व गंगा यांना रोज नमस्कार करणे; वाणीचा संयम करणे; मत्सर टाकणे व एकभुक्त करणे, असे वर्षभर रोज करावे. व्रताच्या अंती ब्राह्मण दंपतीला तीन धेनूंसहित सुवर्णाचा अश्वत्थवृक्ष दान करावा. असे केल्याने अश्वमेधाचे फल मिळते. याला कीर्तिव्रत असे नाव असून, हे ऐश्वर्य व कीर्ती मिळवून देणारे आहे.

**कीर्तिसंक्रांतिव्रत** एक काम्यव्रत. व्रतावधी एक वर्ष. प्रत्येक संक्रांतीला जमिनीवर सूर्याची आकृती काढून तिच्या मध्यभागी सूर्यप्रतिमेची स्थापना व पूजा करणे व दोन शुभ्र वस्त्रांचे दक्षिणेसहित दान करणे हा या व्रताचा विधी आहे. फल – कीर्ती, राज्यभोग, आरोग्य व दीर्घायुष्य यांचा लाभ. [ व्रतराज ]

**कीर्ती** सोमाची पार्श्वदेवता. जयंताची पत्नी. सोमासाठी हिने आपल्या पतीचा त्याग केला (मत्स्य पु. २३.२५) ललितादेवीच्या गेयचक्रात हिला स्थान आहे. [ पु. इं. ]

**कीलहॉर्न** (१८४०–१९०८ इ. स.) डॉ. फ्रान्झ कीलहॉर्न याचा जन्म जर्मनीत झाला. याला प्रथमपासूनच संस्कृत भाषा व व्याकरण यांची आवड होती. प्रा. माक्स म्यूलर याने सायणभाष्यासह ऋग्वेद-संहिता प्रसिद्ध केली, त्या कामी त्याने याचे साहाय्य घेतले होते. शांतनवाचार्यकृत फिट्सूत्रे प्रसिद्ध करून याने व्याकरणाचा सूक्ष्म अभ्यासक म्हणून नाव मिळविले होते. इ. स. १८६६ मध्ये याची पूना कॉलेजात संस्कृत व प्राच्यभाषा यांचा प्राध्यापक म्हणून नेमणूक झाली. नंतर याने इथल्या विद्वानांच्या साहाय्याने परिभाषेन्दुशेखरासारख्या कठिण ग्रंथाचे इंग्रजी भाषांतर केले आणि पतंजलीच्या महाभाष्याची आवृत्ती प्रसिद्ध केली. याने इतरही अनेक व्याकरणविषयक लेख लिहून पहिल्या प्रतीचा वैयाकरण व संस्कृत पंडित अशी ख्याती मिळविली.

इ. स. १८८५ नंतर याने प्राचीन लेखसाहित्याचे संशोधन करून शिलालेख, ताम्रपट इ. ऐतिहासिक साधनांचे शास्त्रीय पद्धतीने संपादन आणि त्यांच्या मदतीने इतिहासाची पुनर्घटना करण्याचा उपक्रम सुरू केला. याच्याच प्रेरणेमुळे हिंदुस्थान सरकारने एपिग्राफिया इंडिका हे त्रैमासिक सुरू केले. गुप्तकालापासून नंतरच्या राजवंशांचे काल बिनचूक ठरविण्यासाठी याने अविश्रांत यत्न केले. कलचूरी अथवा चेदी संवताचा आरंभकाल यानेच शोधून काढला. याने भारतात प्रसिद्ध झालेल्या सर्व लेखांची वर्षानुक्रमे यादी व राजवंशांची परिशिष्टे तयार करून भावी संशोधकांचा मार्ग सुलभ करून ठेवला.

भारतातील परंपरागत विद्या व शास्त्रे यांच्याविषयी आदर उत्पन्न करून या भूमीचे महत्त्व युरोपात प्रस्थापित करणे व इकडील संशोधकांस चिकित्सापद्धतीचे आदर्श घालून देणे ही दुहेरी कामगिरी डॉ. कीलहॉर्न व डॉ. बुल्हर या दोघांनी केली. [ अ. च. को. ]

**कीलाल** वेदकाळातले एक मधुर पेय. याचा उल्लेख ऋग्वेदात नाही; पण इतर संहितांमध्ये आहे (अथर्व. ४.११.१०; तै. ब्रा. २.६.१२.१३; वाज. सं. २.३४). पुरुषमेधात सुराकार व कीलाल यांचा संबंध दिसतो. त्यावरून कीलाल हे सुरेसारखे मादक पेय असावे. [ वे. इं. ]

**कीलेश्वर** सौराष्ट्रातले एक प्रसिद्ध शिवक्षेत्र. हे जामनगर पासून ६० मैलांवर कीलेश्वरी नदीच्या काठी आहे. पूर्वीचे मंदिर बरेच प्राचीन होते. पण जामसाहेबांनी त्याचा जीर्णोद्धार करून तिथे नवे लिंग स्थापिले आहे.

**कीलैयूर** तमिळनाडमधल्या मदुरा जिल्ह्यातले एक प्राचीन स्थळ. हे जैन लोकांचे मोठे आश्रयस्थान असावे, असे दिसते. इथल्या पांडव टेकडीवर अनेक निसर्गनिर्मित निवाऱ्याच्या जागा असून त्यात शय्यासने, जैन मूर्ती व काही शिलालेख आढळतात. [ मदुरा गॅझे. ]

**कील्हजी** (१६ वे शतक) राजस्थानातील एक संतकवी. याच्या पित्याचे नाव सुमरदेव असून तो गुजरातचा सुभेदार होता. कील्हजी हा कृष्णदास पयहारीचा शिष्य होता. हा रात्रंदिवस रामनामस्मरणात निमग्न असे. हा अत्यंत निरहंकारी होता. आपल्याला भेटायला येणाऱ्या माणसांना तो आधी नमस्कार करीत असे. अंत्यसमयी याने सर्व साधुसंतांना बोलावून त्यांचा सत्कार केला व मग देहत्याग केला.

कील्हजीने रचलेला एखादा स्वतंत्र ग्रंथ उपलब्ध नाही; पण त्याची काही फुटकळ पदे मिळतात. ही पदे विचारसौंदर्याने ओतप्रोत असून आध्यात्मिक प्रेरणा देणारी आहेत. त्यांची रचना ब्रजभाषेत असून तिच्यावर ढूंढाड़ीचा प्रभाव आहे. [रा. पिं. सा.]

**कील्हदास** रामावत संप्रदायातला एक भक्त व योगी. भक्तमाल या ग्रंथात याला इच्छामरणी म्हटले आहे. रामभक्तीत योगसाधनेला प्राधान्य देऊन याने रामानंदी वैष्णवांच्या तपसी शाखेला जन्म दिला. समालोचकाचे असे मत आहे, की याच तपसी शाखेच्या वैष्णवांनी आपले प्रामाण्य व प्राचीनत्व सिद्ध करण्यासाठी योगप्रतिपादक अशा अनेक ग्रंथांची रचना करून ते ग्रंथ रामानंदाच्या नावावर प्रचलित केले. याच्याविषयी नाभादासाने लिहिले आहे, ते असे—

'कील्हदास हा सदैव रामचिंतनात मग्न असे. सर्व भूतांच्या ठिकाणी तो नम्रत्वाने वागे. तो सांख्य–योगांचा प्रसिद्ध ज्ञाता होता व त्याने ब्रह्मरंध्रातून आपला प्राण बाहेर सोडला' [रा. भ. शा.; भा. सं.]

**कुंकुमक्रीडा** एक प्राचीन भारतीय मनोरंजनात्मक खेळ. पद्मपुराणाच्या उत्तर खंडात याचा पहिल्या प्रथम अप्रत्यक्ष रीत्या उल्लेख आला आहे. काश्मीरमंडलाच्या प्रशंसेत म्हटले आहे, की तिथे केशर इतके महामूर पिकते, की सकाळी घरांच्या अंगणात केशराचा जो चुरा पडतो त्यामुळे सूर्य व चंद्रबिंबही आरक्त होते (१८८.६). रत्नावली नाटिकेच्या पहिल्या अंकात मदनोत्सवाच्या संदर्भात सांगितले आहे, की तिथले नागरिक रंग तर खेळलेच; शिवाय त्यांनी केशराच्या चुऱ्याने सर्व नगरच पिवळे करून टाकले. देवयंतीच्या स्वयंवरप्रसंगी काश्मीरराजाचा परिचय करून देतांना तिच्या सखीने प्रसंगोपात्त कुंकुमक्रीडेचा उल्लेख केला आहे. [प्रा. भा. म.]

**कुंकुमदान** स्त्रियांनी सौभाग्यवृद्धीसाठी कुंकुमदान करावे, असे सांगितले आहे. त्या दानाचा मंत्र दानचंद्रिकेत दिला आहे, तो असा –

**कुंकुमं शोभनं रम्यं सर्वदा मङ्गलप्रदम् ।**
**दानेनास्य महत्सौख्यं सौभाग्यं स्यात् सदा मम ॥**

अर्थ – कुंकू हे शोभन, रम्य व सर्वदा मंगलप्रद आहे. याच्या दानाने मला महत्सौख्य व सौभाग्य प्राप्त व्हावे.

**कुंकुमपत्रिका** मंगलकार्याचा तिथिनिश्चय झाल्यावर आप्तेष्टांना ज्या निमंत्रणपत्रिका पाठवितात, त्यांना कुंकवाचे बोट लावतात किंवा त्यांच्यावर केशरी पाण्याचा शिडकाव करतात. ही चाल बरीच जुनी असावी. श्री. व्यंकटेशाच्या लग्नसमयी व सीता, दमयंती यांच्या स्वयंवरासाठीही देशोदेशी कुंकुमपत्रिका धाडल्या होत्या, असे उल्लेख जुन्या मराठी काव्यात आढळतात.

**कुंकू** हळद आणि कुंकू ही खास सौभाग्यद्रव्य समजली जातात. सौभाग्यवती स्त्रिया आपल्या कुंकवासाठी फार जपतात. ते त्यांचे सौभाग्यप्रतीकच असते. वैदिक काळापासून भारतीय स्त्रिया कुंकू लावीत असत असा जो सामान्य समज आहे, तो मात्र चुकीचा आहे. वेदकालीन स्त्रिया कुंकू लावीत नसत. सूत्रकाल व उपनिषत्काल, यांतही कुंकू लावण्याची प्रथा नसावी, असे दिसते. ही प्रथा महाभारतकाली अस्तित्वात आली असण्याची शक्यता आहे. साधारणपणे इ. स. च्या तिसऱ्या, चौथ्या शतकापासून वाङ्मयात कुकवाचे उल्लेख दिसू लागतात. रघुवंशात, भर्तृहरीच्या शृंगारशतकात व अमरुशतकात कुंकुमतिलकाचा उल्लेख आढळतो. पण तिसऱ्या, चौथ्या शतकात रंगविलेल्या अजंट्याच्या स्त्री-चित्रांमधूनही स्त्रियांच्या कपाळी कुंकू क्वचितच दिसते. विदुर-जातकाच्या चित्रीकरणात इरंधतीच्या कपाळी कुंकवाची टिकली दाखविलेली आहे. सातव्या, आठव्या शतकानंतरच्या वाङ्मयात कुंकवाचे उल्लेख मोठ्या प्रमाणात आढळतात. तंत्रवाङ्मयात तर कुंकुमतिलकाला विशेष महत्त्व आहे. ग्रामदेवतांना कुंकू फार प्रिय असल्याचे उल्लेख विपुल आहेत. दुर्गापूजेतही कुंकवाचे आधिक्य असते. सप्तमातृकांनाही कुंकू प्रिय आहे.



कुंकू

ही कुंकू लावण्याची पद्धत आर्य स्त्रियांनी आर्येतर स्त्रियांकडून उचलली असावी, असा तर्क आहे. गुप्तकालात आर्य-अनार्य यांचा संघर्ष बऱ्याच अंशी मिटलेला होता. त्या काळी अनेक आर्येतर जाती पौराणिक धर्मात दाखल झाल्या. आचारविचारांची देवघेव झाली. आर्येतरांची अनेक दैवते याच काळात

आर्यांनी आपल्या धर्मात सामावून घेतली. अशा या आर्य-द्रविड समन्वयाच्या कालात आर्येतरांचे कुंकू आर्यस्त्रियांनी सौभाग्य-चिन्ह म्हणून स्वीकारले असावे.

कुंकू हे आर्येतरांचे असावे, असे अनुमान काढायला आणखी काही कारणे देता येतील. त्यातले महत्त्वाचे कारण म्हणजे कुंकवाचा लाल रंग हे होय. अतिप्राचीन मातृप्रधान संस्कृती-मध्ये लाल रंगाला विशेष महत्त्व होते. आर्येतर लोक हे मातृप्रधान संस्कृतीचे होते, असा पुरावा मिळतो. मातृप्रधान संस्कृतीतली कित्येक दैवते रक्तवर्ण प्रिय असणारी अशी आहेत.

कुंकू लावण्याच्या प्रथेचा पशुबलीशीही संबंध दाखवितात. शाक्त उपासनेत देवीच्या कपाळी पशुबलीच्या रक्ताचा टिळा लावला जातो. स्त्री ही जगदंबेचीच अंशरूप असल्याचे मानले आहे. जेव्हा एखाद्या स्त्रीला गृहलक्ष्मी म्हणून घरात आणायचे असेल, तेव्हा शिकार करून एखादा पशू मारायचा व त्याच्या रक्ताचा टिळा वधूच्या कपाळी लावून मग तिच्यासह गृहप्रवेश करायचा, अशी प्रथा दक्षिणेतल्या आर्येतर जातीत एका काळी होती. आजही तिकडील कित्येक आदिवासी जमातीत या प्रथेचे अवशेष आढळतात.

कुंकू हे अशा प्रकारे सौभाग्यप्रतीक समजले गेल्यामुळे भारतीय संस्कृतीत त्याचा अनेक कार्यात वापर सुरू झाला. ते स्त्रियांचे अहेव लेणे ठरले. जिच्या कपाळी कुंकू नाही, ती अशुभ समजली जाऊ लागली. कुमारिका व सधवा स्त्रिया यांनाच कुंकू लावण्याचा अधिकार दिला गेला. देवपूजेत कुंकू आवश्यक ठरले. लग्नपत्रिकेला कुंकू लावून मग ती आप्तेष्टांना पाठविण्याची पद्धत रूढ झाली. हिंदू स्त्रिया नवे वस्त्र वापरायला काढताना त्याला प्रथम कुंकू लावतात. कुंकू हे सुवासिनीला सुवासिनीनेच लावायचे असते. लग्नप्रसंगी कित्येक जातीत वधूच्या कपाळी कुंकवाचा मळवट भरतात. सुवासिनी घरातून बाहेर पडताना घरची गृहिणी तिला कुंकू लावते. लग्नप्रसंगी वधू-वरांना कुंकू लावण्याची चाल पारशी लोकातही आहे. मांगलिक कार्यात पुरुषांनाही कुंकू लावले जाते. सधवा स्त्रीच्या प्रेतयात्रेत कुंकू उधळीत जाण्याची चाल आहे.

कुंकू लावण्याच्या अनेक पद्धती आहेत. कोकणातल्या मुली लग्न होईपर्यंत कुंकवाची टिकली लावतात, तर लग्न झाल्यावर त्याची आडवी चिरी लावतात. स्मार्तांमधल्या कित्येक स्त्रिया कुंकू अर्धचंद्राकृती लावतात तर वैष्णव स्त्रिया कुंकू चंद्रबिंबा-सारखे वाटोळे लावतात. लग्नप्रसंगी मराठा स्त्रिया कुंकवाचा कपाळभर मळवट भरतात.

आजच्या विज्ञानाच्या युगातही भारतात कुंकू लावण्याची पद्धत अद्यापि टिकून आहे. ते लावण्याच्या पद्धतीत मात्र काला-नुसार बदल होत गेला आहे. कुंकू हे हळकुंड व हिंगूळ यांच्या



कुंकू लावण्याच्या वेगवेगळ्या पद्धती

पासून तयार करतात. अलिकडे कुंकवाच्या जागी लाल गंधही वापरले जाते. मात्र अजूनही हळदीकुंकू व मांगलिक समारंभ यात अस्सल कुंकूच वापरतात. [प्र. न. देशपांडे– महाराष्ट्र टाईम्स; अमृत–डिसें. १९५६ ]

## कुंचन नंबियार

(इ. स. १७०५–१७४८) ओट्टम्‌थुळ्ळल या नृत्यप्रकाराचा जनक. याचा जन्म केरळात किळिक्कुरिशी (शुकपूर) या गावी एका नम्पूतिरी ब्राह्मण कुटुंबात झाला. मात्र तो सवर्णीय स्त्रीपासून झालेला नसून नङगियार पत्नीपासून जन्मला होता. त्याने अनेक गुरूंकडून विद्या प्राप्त करून घेतली. त्याला लहानपणापासूनच कवितेचा छंद होता. शास्त्राध्ययन आणि पूर्वसूरींच्या कलाकृतींचा अभ्यास यांच्या योगाने त्याची कविता प्रभावशाली झाली. राजा देवनारायण याच्या दरबारात त्याला ऐन तारुण्यातच राजकवी ही पदवी मिळाली. आयुष्याच्या मध्यकालात तो तिरुवितांकुरच्या चेम्पकशेरी राजाचा दरबारी कवी बनला.

एके दिवशी एका मंदिरात कूत्तूचा प्रयोग चालला होता. कूत्तू हे एक कथानृत्य असते. चाक्यार जातीचा पुरुष ते करतो. त्याला मिझाव नावाच्या घटाची साथ नंबियारने करायची, असा संकेत आहे. त्या दिवशी नेहमीच्या मिझाव –वादकाला काहीतरी अडचण आली म्हणून त्याने त्या कामी कुंचनची योजना केली. दुर्दैवाची गोष्ट अशी, की साथ करीत असता कुंचनला जरा डुलकी आली. त्यामुळे चाक्यारने भरल्या सभेत त्याची हजेरी घेतली. तो दंश कुंचनला असह्य झाला. त्या रात्री त्याने कल्याणसौगंधिकम् नावाचे एक आख्यान रचून दुसऱ्या दिवशी त्याच मंदिराच्या प्रांगणात आपला खेळ मांडला.

त्याच्या वाणीचा प्रभाव असा होता, की चाक्यारचे कूत्तू नृत्य पाहायला बसलेले सर्व लोक मंदिर ओस पाडून कुंचन नंबियारच्या खेळाचे प्रेक्षक झाले. (ओट्टम्‌थुळ्ळल पाहा). पुढे कुंचनने



कुंचन नंबियारचे घर

अशाच प्रकारची ६४ थुळ्ळल आख्याने रचली आणि ती रंगभूमीवर जनतेला सादर केली. त्याने आपले पुढील सर्व आयुष्य याच नृत्यप्रकाराला वाहून घेतले.

कुंचनच्या काव्यात समाजातील दुष्ट प्रवृत्तीचा उपहास आहे, दुर्जनांचा मर्मभेद आहे आणि स्फूर्ती देणारा जोषही आहे. उदा० भगवद्‌दूत या आख्यानातील श्रीकृष्णाचे संजयाला सागणे पाहा–

**एन्तु संजय**
**चोल्लु चोल्लु पितावु तन्नुटे शासनम्**
**चन्तमोटु वनतिळ वाजुक**
**धर्म्मजदिक लेन्नतो अन्धभूपति**
**तन्नुटे कृप नन्नुनन्नितु विस्मयम्**
**बंधुभाव मितेन्नथुम् तर्वाचितये हर शंकर**
**मानशालि सुयोधनन निजनाटु**
**बाणु सुखिक्कयुम् दीन भाव मियंतु**
**पांडवर काटुवाणु नटक्कयुम्**
**आ निरिक्के वरुन्नत लिलतु**
**वृद्धनोटुरचे थूकनी मानसे कपटम्**
**वेटिञ्जु नटक्केटो हर शंकर**

अर्थ– हे संजया, तू धृतराष्ट्राकडे जाऊन धर्मराजाचा संदेश सांग. वडिलांनी जो उपदेश दिला, तो चांगला आहे. युधिष्ठिरादी पांडवांनी वनात जाऊन राहावे, असा उपदेश देऊन त्यानी पांडवांवर अपार कृपा केली आहे. धृतराष्ट्र आणि कौरव यांची ही भावना मित्रभावनेहून भिन्न आहे. घमेंडखोर दुर्योधनाने चैन करावी आणि पाचही पाडवांनी जंगलात वणवण भटकत रहावे ? मी जिवंत असता हे होऊ शकणार नाही. तू जाऊन त्या म्हाताऱ्याला सांग, की असली कपटबुद्धी सोडून देणे, हेच तुझ्या हिताचे आहे.

कुंचन नंबियारविषयी केरळात अनेक आख्यायिका प्रचलित आहेत. त्यांपैकी एक आख्यायिका अशी––

एकदा चेम्पकशेरी या राजाच्या राज्यात एक परस्थ पंडित आला. तिथल्या विद्वत्सभेचा अध्यक्ष भट्टतिरी याला त्या पंडिताने वादाचे आह्वान दिले. भट्टतिरीने ते स्वीकारले. दोघांचा कित्येक दिवस वाद चालला; पण त्यात हार-जीत कोणाचीच होईना. सरतेशेवटी राजा कंटाळला. त्याने त्या वादाविषयी निर्णय दिला, तो असा––

उद्या सकाळी मणिप्रवाळ शैलीत रचलेले बारा सर्गाचे एक महाकाव्य दोघांनीही दरबारात रुजू करावे. हे जो करील त्याचा विजय झाला असे मी समजेन.

ते दोघेही पंडित होते; पण कवी नव्हते. यामुळे परस्थ पडित तर स्वस्थ बसलाच; शिवाय भट्टतिरीनेही हातपाय गाळले. कुंचन हा भट्टतिरीचा शिष्य होता. गुरूची मुखमुद्रा मलूल झालेली पाहून त्याने त्याचे कारण विचारले. गुरूने सर्व वृत्तांत सागितला. त्यावर कुंचन गुरूला म्हणाला––

'गुरुजी, बारा सर्गांचे काव्य मी एकटा स्वहस्ते लिहू शकणार नाही. तेव्हा तुम्ही तुमचे अकरा विद्यार्थी आजची रात्र माझ्या ताब्यात द्या आणि निश्चित झोपा. सकाळी काय घडते ते कळेल.'

कुंचनने त्या रात्री भट्टतिरीचे अकरा विद्यार्थी आपल्यासमोर हारीने बसविले. प्रत्येकाला एकेका सर्गातील एकेक श्लोक रचून तो सांगू लागला. बाराव्या सर्गाचे लेखन त्याने स्वतःकडे घेतले. एका रात्रीत बारा सर्गांचे ते महाकाव्य त्याने पुरे केले आणि सूर्योदयाच्या वेळी ते बाड गुरूच्या पुढे आणून ठेवले. अर्थात् दुसऱ्या दिवशी त्या स्पर्धेत भट्टतिरीचा जय झाला, हे सांगणे नकोच !

त्या काव्याचे नाव आहे 'श्रीकृष्णचरितकाव्यम्'. मलयाळम् साहित्यातली ही एक डौलदार अशी काव्यरचना आहे. शीघ्र कवित्वामुळे त्यात काही दोष राहिले असले, तरी अद्यापि त्याच्या लोकप्रियतेत उणेपणा आलेला नाही. [ हिं. म. कृ.; युगप्रभात १ जून १९६३; सी. एन्. राघवन नायर; कै. सा. द.]

**कुंचवक्कल** म्हशीची पैदास करणारी एक भटकी जात. यांना परेन्ना असेही म्हणतात. हे लोक मुख्यतः कर्नाटकात धारवाड जिल्ह्यात आढळतात. यांच्यात प्रचलित असलेल्या धारे विधीच्या व बळी देण्याच्या पद्धतीवरून हे मूळचे द्रविड असावे, असे वाटते. याच्यांत विधवाविवाह होत नाही. यांचा मुख्य देव बापराया व देवी तुप्पद ही आहे. याशिवाय भूतम्मा, सवडम्मा, बिरु, इ. गौण देवतांनाही हे लोक भजतात.

**मर्तिकप्रथा–** मृताच्या अंगावर काळे पाढरे ठिपके नसतील, तर त्याला पुरतात. मृतांच्या तृप्तीसाठी दर दुसऱ्या व तिसऱ्या वर्षी ज्ञातिभोजन घालतात. यांना मांस चालते; परंतु मद्य वर्ज्य आहे. [ मुं. इ. जा. ]

**कुंचिगर** सालेम जिल्ह्यातील एक शेतकरी जात. या लोकांना कुंचिटिग किंवा कुंचिलियन असेही नाव आहे. हे कानडी भाषा बोलतात. आपल्या उत्पत्तीविषयी हे पुढील कथा सांगतात––

तुंगभद्रेच्या उत्तरेकडे राहणाऱ्या एका नबाबाने बारा वर्षांच्या एका मुलाला तूप आणायला सांगितले. तो नदी-किनारी फिरत असता त्याला एक सुंदर मुलगी पाणी काढतांना दिसली. तिने त्याची तुपाची मागणी पुरविली. तिच्या सौंदर्यावर आकृष्ट होऊन त्याने तिची स्नानाची जागा पाहिली व तिथे पडलेला तिचा एक केस घेऊन तो त्याने नबाबाला दिला. नबाबाला त्या मुलीशी लग्न करावे, असे वाटले. त्याप्रमाणे वाटाघाटी होऊन मुलीकडचे लोक मुलीला घेऊन नबाबाच्या घरी आले. पण लगेच त्यांना त्या गोष्टीचा पश्चात्ताप झाला. व रात्री ते मुलीला घेऊन तिथून पळून गेले. वाटेत त्यांना तुंगभद्रा नदी लागली. तिला पुष्कळ पूर आला होता. त्या नदीतून पार घालणाऱ्या कुरुंबन नावाडचाला त्यांनी आपली मुलगी दिली व ते पैलपार गेले. कुंचिगर हे या मुलीचेच वंशज होत. [ का. ट्रा. स. इं. ]

**कुंजर भारती** ( इ. स. १८१०–१८९६ ) तमिळनाडचा प्रसिद्ध कवी. सुब्रह्मण्य भारतीचा हा पुत्र होय. स्कंदपुराणकीर्तन, पेरिब कीर्तनैगळ व अझगर कुरवंजी या ग्रथांमुळे याला विशेष कीर्ती मिळाली. शिवगंगचा राजा गौरीवल्लभ याने कुंजर भारतीला आपल्या दरबारी बोलाबून त्याचे काव्य ऐकले व त्याला कविकुंजरम् हा किताब देऊन ‘ समास्थानविद्वान ’ केले. याने रचलेली भक्तिगीते मधुर पदावली व सुंदर कल्पना यांच्याबद्दल प्रसिद्ध आहेत. ७२ मेल-रागकीर्तनांचा कर्ता कोटीश्वर अय्यर हा याचा नातू होय. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**कुंजरास** एक मणिपुरी नृत्यप्रकार. हे नृत्य दसऱ्याच्या दिवशी राधाकृष्णाच्या प्रीत्यर्थ करतात.

**कुंजरू** काछिया पाहा.

**कुंजिल्यकालय** तमिळनाडमधील एक नायन्मार. शिवाच्या मंदिरात हा नित्यनेमाने धूप जाळीत असे. त्यापायी त्याचे सारे धन खर्ची पडले. एकदा त्याच्या घरात धान्याचा कणही शिल्लक उरला नाही. त्या वेळी त्याच्या पत्नीने आपले मणि-मंगळसूत्र त्याच्याकडे दिले व ते विकून धान्य आणण्यास सांगितले. कुजिल्यकालयाने तो नग विकला; पण त्याचे धान्य न आणता धूप आणून तो मंदिरात जाळला. शंकर त्याच्या या एकान्तभक्तीने संतुष्ट झाला व त्याने त्याचे घर समृद्ध केले.

एकदा एका शिवमंदिरातले लिंग सरळ बसविण्याच्या कामी कोणालाही यश येत नव्हते; पण कुंजिल्यकालयाने अल्पशा प्रयत्नाने ते व्यवस्थित बसविले.

**कुंज्रा** एक मुसलमान जमात. हे सुन्नी पंथाचे असून यांची मुख्य वस्ती बिहार, ओडिसा व उ. प्रदेश यांत आढळते. यांचा मुख्य धंदा फळे विकणे, हा आहे. लखनौमध्ये यांना कुंज्रा, कबारी, अथवा खाटिक म्हणतात. कुंज्रा लोकांना अरैन अथवा बागवान अशीही नावे आहेत. बंगालच्या काही भागात कुंज्रा हा अपशब्द समजला जात असल्याने तेथील कुंज्रा लोक स्वतःला मेवा– फरोश, सब्ज–फरोश अथवा बेपारी म्हणवून घेतात.

कुंज्रा जमातीचे एकूण ९४ वर्ग आहेत. गोरखपुरी, जैन-पुरिया, काश्मीरी, पुरभैया, माळी, तंबाखूवाला, बागवान, राजपूत, मेहेतरिया, कहारिया इत्यादी. या नावांवरून ही वर्ग-वारी प्रांत व धंदा यांच्यावरून झाल्याचे दिसते.

**विवाहप्रथा–** यांच्यांत सवर्ग विवाह होत नाहीत. बहुपत्नी-त्वाला परवानगी असते. चार हौआ हा एक लग्नविधी आहे. त्यात मुसलमानी शराह गाइले जातात. ही जमात मुसलमान असूनही यांच्या काही चालीरीती हिंदूंप्रमाणे आहेत. वाङ-निश्चयाचे वेळी मुलाच्या हाताला लावण्यासाठी मेंदी पाठवितात. वर बैलावर बसून लग्नमंडपात जातो. लग्न पहाटे चार वाजता निकापद्धतीने होते. सासरा मुलीला मेहेर म्हणून

काही रुपये देतो. लग्नानंतर वराला एक पेला सरबत देतात. त्यातील अर्धे तो पितो व अर्धे वधूला प्यायला देतो.

**चालीरीती–** गाझीमियाँ व पीर या यांच्या देवता होत. या देवतांना फळे, मिठाई व सरबत समर्पितात. यांच्या स्त्रिया अतिशय सुंदर असतात. हल्ली यांच्यांतले काही लोक शेती करू लागले आहेत. हे लोक उद्योगी व सदाचरणी असतात. जन्मदिवशीच मुलाचे नाव ठेवतात. त्यासाठी ब्राह्मणाला बोलावतात. मुले जगत नसली तर एका मुलाला शेंडी ठेवतात. दोन बायकांच्या भांडणात नवऱ्याने मध्यस्थी केली, तर त्याला जातिबहिष्कृत करतात.

**मृतकप्रथा–** मृतांना इमामबाऱ्यामध्ये पुरतात. ईदच्या दिवशी शेवया व दूध आणि शबेबारातच्या वेळी हलवा, मिठाई व भाकरी हे पदार्थ मृतात्म्यास अर्पण करतात. मृताच्या तिसऱ्या व चाळिसाव्या दिवशी ज्ञातिभोजन घालतात. [म. ज्ञा. को.]

**कुंड** (१) अग्नीचे आयतन. घरात अग्निस्थापना करून अग्नीची नित्य उपासना करण्याची पद्धत अतिप्राचीन कालापासून भारतात चालू आहे. यज्ञ हा सर्व धार्मिक विधीचे केंद्र असल्यामुळे अग्नीला फारच महत्त्व आले होते. त्यामुळे हा अग्नी ज्या कुंडात ठेवायचा, त्याचाही विचार वैदिक आर्यांनी

वृत्तकुण्डम्




चतुरस्रकुण्डम्




गोल व चौकोनी कुंडे

बारकाईने केला आहे. शुल्बसूत्रात कुंडांची मापे काय असावी, कोणत्या अग्नींची कुंडे कशी असावी, ती तयार कशी करावी, त्याच्या मेखला कशा असाव्या, इ. गोष्टींची चर्चा केलेली आहे. श्रुतीमध्ये जे यज्ञयाग सांगितले आहेत, ते सर्व अग्निहोत्राच्या द्वारेच करता येतात. म्हणून अग्निहोत्रामध्ये प्रामुख्याने लागणाऱ्या गार्हपत्य, आहवनीय व दक्षिणाग्नी या तीन अग्नींच्या आयतनासंबंधी शुल्बसूत्रात प्रथम विचार केला आहे.

गार्हपत्याग्नीचे आयतन वर्तुळाकार असते. साधारणपण २७ अंगुलांचा व्यास घेऊन एक वर्तुळ तयार करतात व त्यावर हे कुंड बनवितात.

गार्हपत्याच्या पूर्वेला चार हात किंवा त्याहून अधिक अंतरावर आहवनीय अग्नीचे कुंड असते. हे कुंड चौकोनी असून २४ अंगुले लांब–रुंद व १२ अंगुले उंच असते. याचे कोपरे उपदिशांना असतात. याला सहा अंगुले उंचीवर दोन अंगुलांची व सर्वांत वर चार अंगुलांची मेखला करतात.

गार्हपत्याच्या आग्नेयीस दक्षिणाग्नीचे कुंड असते. ३८ अंगुले व्यास घेऊन एक अर्धवर्तुळ तयार करतात. हे कुंड अर्धचंद्राकृती असते. वरील तीन्ही अग्नींची कुडे चौकोनी असावी, असे एक मत आहे. सभ्य व आवसथ्य या अग्नींची कुंडे चौकोनी असतात.

अग्नीचे स्थंडिल हेही एक कुंडच आहे. त्यासाठी चारी बाजूंनी कमीतकमी १८ अंगुले लांब-रुंद असा एक ओटा तयार करावा, असे आश्व. गृ. सूत्रात सांगितले आहे. यालाच स्थंडिल म्हणतात. परतु अग्नी कायमचा ठेवायचा असल्यास किंवा हवन जास्त असल्यास स्थंडिलाऐवजी कुंड तयार करतात. आहुतीच्या प्रमाणात कुंडाचे प्रमाणही लहान-मोठे ध्यायचे असते. एक हजार हवन असेल, तर एका हाताचे, अयुत (दहा हजार) असेल तर दोन हातांचे, लक्ष असेल तर चार हातांचे, दहा लक्ष असेल तर सहा हातांचे व कोटी असेल तर आठ हाताचे कुंड करावे, असे कुंडार्कात सागितले आहे. यजमानाने हात वर केला असता त्याची जितकी उंची भरेल, त्याचा पाचवा भाग म्हणजे एक हात असे माप घेऊन कुंड तयार करतात.

कुंडांचे चतुरस्र, वृत्त, पद्म, योनी, अर्धचंद्र, त्रिकोण, पंचकोन षट्कोन सप्तकोन व अष्टकोन असे निरनिराळे आकार असतात. एक हात लांब, रुंद व खोल अशा चतुरस्र कुंडाचे जेवढे क्षेत्रफळ भरेल, तेवढेच क्षेत्रफळ बाकीच्या प्रकारच्या कुंडांचेही असावे लागते. ही सर्व कुंडे जमिनीत खणलेली असतात. जमिनीपासून वर कुंडाच्या भोवती दोन किंवा तीन मेखला करतात. तीन मेखलांचे कुंड श्रेष्ठ होय. पहिली मेखला नऊ अंगुले, दुसरी सहा अंगुले व तिसरी तीन अंगुले उंचीची असते. पद्मकुंड सोडून इतर सर्व कुंडांत नाभी करतात. एक अंगुल लांबी, रुंदी व उंची असलेला व कुंडाच्याच आकाराचा ओटा म्हणजे

नाभी होय. योनिकुंड वगळून बाकीच्या कुंडांना योनी करतात. मेखलेच्या आत कुंडापर्यंत पोचणारी, आठ अंगुले लांब व बारा




योनिकुंड

अंगुले रुद अशी योनी करावी व ती कुंडाच्या पश्चिमेला असावी, असे सांगितले आहे. [ विद्याधरशास्त्री भिडे ]

(२) तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी असणारे जलकुंड. भारतातली अशी अनेक कुंडे पवित्र मानलेली असून त्यात स्नान केल्याने पितराचा उद्धार होतो, असे सांगितले आहे. द्वारकेजवळ पिंडतारक नावाचे एक कुंड आहे. त्यात टाकलेले पिंड तरतात आणि पितरांच्या दोषामुळे उत्पन्न झालेल्या व्याधी दूर होतात, अशी समजूत आहे. जुनागडजवळच्या दामोदरकुंडात मृतांच्या अस्थी टाकल्याने त्यांना मोक्ष मिळतो, काशीतल्या ज्ञानवापीकुंडात स्नान केल्याने दिव्य ज्ञान प्राप्त होते व त्र्यंबकेश्वर येथील कनखल कुंडात स्नान केल्याने पुनर्जन्म टळतो, असे सांगितले आहे. झिंजूवाड्यानजीक असलेले छिलकाकुंड नलराजाने बांधले असून दरवर्षी भाद्रपद पौर्णिमेला गंगा नदी या कुंडाला भेट देते, असे म्हणतात. वढवाणजवळ चारणांच्या होल नावाच्या देवीचे एक कुंड आहे; त्यात तांबडेकाळ दोरे तरंगत असतात. चुडाजवळ भडकोन येथे गरीगावो नावाचे कुंड आहे. तिथे भृगू ऋषीचा आश्रम होता असे सांगतात. सुरतेच्या दक्षिणेस देवकी उनाई नावाचे कुंड आहे, ते रामाने उत्पन्न केल्याचे सांगतात. रत्नागिरी जिल्ह्यातील राजापूर येथे पंधरा कुंडे असून त्यात काशीची गंगा अधूनमधून प्रकट होते, अशी समजूत आहे. ठाणे जिल्ह्यातील निर्मळ येथे सात कुंडांचे मिळून एक तळे बनले आहे, ते विमलासुर नावाच्या दैत्याच्या रक्तापासून निर्माण झाले, अशी कथा आहे. नासिकचे रामकुंड रामाने तिथे स्नान केल्यामुळे पवित्र ठरले आहे.

(३) एक जात. विवाहित ब्राह्मण स्त्री व तिच्या पतीखेरीज अन्य ब्राह्मण पुरुष यांच्या संततीला कुंड म्हणतात (मनु. ३. १७४). सवर्ण, अनुलोम व प्रतिलोम यांपेक्षा हे लोक भिन्न असून मनूच्या काळी त्यांची गणना शूद्रातच केली जाई. यांना गौण उपनयन विहित आहे. श्राद्धासाठी ब्राह्मण म्हणून यांना बोलावू नये, असे मनू सांगतो. [ हि. ध. ]

**कुंडपाय्य** कुंडपाय्य व संचाय्य या विशिष्ट सत्ररूप सोमयागाच्या संज्ञा आहेत. द्वादशाह यज्ञाची कुंडपाय्य ही विकृती आहे. हे एका वर्षाचे सत्र असून कुडपायी ऋषींनी ते केले होते. त्यावरून या सत्राड कुंपायिनामयनम् असेही नाव पडले आहे. [ पा. भा. ]

**कुंडल** (१) कानातील एक वलयाकृती अलंकार. कानाला छिद्र पाडून त्यात विविध प्रकारचे अलंकार घालण्याची प्रथा फार प्राचीन आहे. मध्ययुगापर्यंत स्त्रियांप्रमाणेच पुरुषही कर्णभूषणे वापरीत असत. ब्राह्मणाच्या जीवनात कर्णवेध या सस्काराला फार महत्त्व होते. ब्रह्मचारी व गृहस्थाश्रमी पुरुष यांनी कुंडले घालणे, हे मानाचे समजले जाई.

विराटाच्या घरी अर्जुन बृहन्नडेच्या वेषात वावरत असता त्याच्या कानात कुंडले होती, असे महाभारतात सांगितले आहे. या कुंडलांना प्राकारवप्रकुंडल असे विशिष्ट नाव होते. याच्या दर्शनी भागाला चार पाकळ्यांच्या फुलांची कलाकुसर होती. भरहुत आणि सांची येथील कुबेर, यक्ष व यक्षिणी यांच्या शिल्पात हे कुंडल आढळते. श्रीकृष्णाला कुंडले फार प्रिय होती. राधेच्या कानात सूर्य किंवा बिजली यांच्याप्रमाण देदीप्यमान कुडले होती, असे सूरदासाने वर्णिले आहे.

कर्णभूषणे घालून कानाच्या पाळ्या लांब झाल्या, तर ते एक सौंदर्याचे लक्षण मानीत असत. भारताच्या भिन्न भिन्न भागात व भिन्न भिन्न काळात सापडलेल्या बुद्धमूर्तीच्या कानाच्या पाळ्या लोंबत्या असतात, त्या याच कारणामुळे होत. निरनिराळ्या देवतांच्या कानात निरनिराळ्या प्रकारची कुंडले आढळतात. कुंडलांचे पुढील प्रकार आहेत – (१) पत्रकुंडल– वृक्षाच्या पानाच्या आकाराचे कुंडल (२) नक्र किंवा मकरकुंडल– लाकूड, धातू किंवा हस्तिदंत यापासून बनविलेले मकराच्या आकाराचे कुंडल (३) शंखकुंडल (४) रत्नकुंडल (५) सर्पकुंडल व (६) मृष्टकुंडल– याचा आकार चंद्रकोरीसारखा असतो. गंधार शिल्पात ही दिसतात.

शिव व गणपती यांच्या कानांत सर्पकुंडले असतात. उमा व इतर स्त्रीदेवतांच्या कानांत शंखकुंडले व पत्रकुंडले दिसतात. विष्णुमूर्तीच्या कानांत मकरकुंडले असतात. ‘मकरकुंडले तळपती श्रवणी’ असा तुकारामाने आपल्या अभंगात त्याचा निर्देश

केला आहे. बृहत्संहितेत सूर्य, बलदेव व विष्णू या देवतांना कुंडलधारी म्हटले आहे. गुप्तकालीन शिल्पात मकरकुंडलांना महत्त्व आले. मकराच्या मुखातून मौक्तिकमाला खाली लोंबत आहेत, अशी कुंडले त्या शिल्पात बरीच आढळतात.

कुंडले हा अलंकार वजनदार असतो व स्त्रियांच्या सामान्य हालचालीनेही तो सारखा डोलत राहतो, असे कालिदासाने म्हटले आहे (रघु. ९.५१).

उ. भारतात काही ठिकाणी अजूनही स्त्रिया जुन्या प्रकारची कुंडले वापरतात.

नाथपंथी योगी आपल्या संप्रदायाचे वैशिष्ट्य म्हणून कानात मातीची, धातूची किंवा हरणाच्या शिंगाची कुंडले घालतात. [ डे. हिं. इ.; शृं. हा.; वा. श. अग्रवाल– सि. व्हॉ. भां. रि. १९४२ ]

(२) सातारा जिल्ह्यातले एक गाव. जुने कौंडिण्यपुर ते हेच असावे, असे काही संशोधक समजतात. ही हिंगणदेवाची राजधानी होती. हा राजा यादव वंशातील सिंघणदेव हाच असावा. गावाजवळ ब्राह्मणी शिल्पपद्धतीची १६ लेणी आहेत. त्यांतली पूर्वेकडील लेणी वैष्णव व पश्चिमेकडील शैव आहेत. [ म. प. ]

**कुंडलकेशी** एक तमिळ महाकाव्य. हे सांप्रत उपलब्ध नाही. पण दुसऱ्या ग्रंथांत या काव्याची संक्षिप्त कथा आढळते. या काव्याचा कर्ता एक जैन होता, एवढीच त्याच्याबद्दल माहिती मिळते. तत्कालीन जैन धर्म व जैनांचे सामाजिक जीवन यांच्याशी या काव्याचा संबंध आहे. याची कथा अशी–

एका धनिक वैश्याची कुंडलकेशी नावाची मुलगी होती. एक दिवस ती आपल्या घराच्या गच्चीत उभी असता एका सुंदर तरुणाला नगररक्षक शिपाई चोरीच्या आरोपावरून पकडून नेत आहेत, असे तिने पाहिले. कुंडलकेशी त्याच्या सुंदर रूपावर भाळली. नंतर तिला समजले, की तो कोण्या राजाच्या मंत्र्याचा पुत्र आहे. पुढे नातेवाईकांच्या प्रयत्नाने तो कैदेतून सुटला व कुंडलकेशीबरोबर त्याचा विवाह झाला. दोघांनीही काही काळ सुखाने संसार केला. पुढे एक दिवस कुंडलकेशीने त्याला थट्टेने चोर म्हणून हाक मारली. पण त्यामुळे त्याच्या मर्मावरच आघात झाला. कारण तो मुळात चोर व दरोडेखोरच होता. म्हणून त्याने आपल्या पत्नीचा सूड घ्यायचे ठरविले. मग तिचा कडेलोट करण्याचा हेतू मनात धरून तो तिला एका पर्वतशिखरावर घेऊन गेला. कुंडलकेशीला वाटले, की आपण सहलीला जात आहो. म्हणून ती नटून थटून त्याच्याबरोबर गेली. टेकडीच्या माथ्यावर पोचल्यावर त्याने तिच्या अंगावरचे सगळे दागिने काढून घेतले. नवरा आपला कडेलोट करायला निघाला आहे, हे तेव्हा कुंडलकेशीला उमगले. ती सावध झाली. दोघे कड्यावर येताच तिनेच घाई करून पतीला कड्यावरून लोटून दिले. त्यामुळे तो मेला. कुंडलकेशी विधवा झाली. मग तिने जैन संन्यासिनी बनण्याचे ठरविले. पण त्याचवेळी आपल्या सुंदर केसांचा तिला मोह उत्पन्न झाला आणि संन्यासिनी बनण्याचा विचार सोडून देऊन ती भिक्षुणी बनली.

या कथेवरून असे दिसते, की नायिकेचे केस कुरळे (कुंडल) असल्यामुळे या महाकाव्याला कुंडलकेशी असे नाव दिले असावे. [ त. सा. सं. ]

**कुंडलपूर** (१) हे सेंट्रल रेल्वेच्या कटनी–बीना मार्गावरच्या दमोह स्टेशनापासून २५ मैलांवर आहे. इथे कुंडलाच्या आकाराचा एक पर्वत आहे. त्यावरूनच कदाचित या क्षेत्राला कुंडलपूर नाव पडले असावे. इथे पर्वतावर व त्याच्या पायथ्याशी मिळून ५६ मंदिरे आहेत. इथे पहाड खोदून बनवलेली महावीराची मूर्ती असून ती सुमारे १० फूट उंच आहे. [ जै. ध. ]

(२) महावीराचे जन्मस्थान. याचे मूळचे नाव कुंडग्राम असे होते. बिहारमधील मुजफ्फरपूर जिल्ह्यातील बसाढ अथवा वैशाली या गावाची कुंडग्राम ही एक पेठ होती. हेच कुंडग्राम पुढे कुंडलपूर बनले. काही लोक यालाच महावीराचे जन्मस्थान मानतात; पण काही तसे मानीत नाहीत. एक जैन तीर्थ म्हणून मात्र ते प्रसिद्ध आहे. [ जै. सा. इ. ]

**कुंडलिनी** एक शक्ती. कुंडल = वेटोळे करून राहते, म्हणून हिला कुंडलिनी असे म्हणतात. तीन पूर्ण व एक अर्धे अशी तिची साडेतीन वेटोळी असतात. हिला कुलकुंडलिनी असेही म्हणतात. तंत्रसाहित्यात कुल व अकुल असे दोन शब्द अनुक्रमे शक्ती व शिव यांचे वाचक आहेत. कुलकुंडलिनी या शब्दावरून शक्तीची कुंडलित किंवा वक्रभावापन्न अवस्था विदित होते. ही शक्ती जेव्हा सरळ व स्वाभाविक रूपात प्रतिष्ठित असते, तेव्हा ती शिवाशी अभिन्न असते.

चिद्रूप आत्मा हा नित्य शक्तिसमन्वित असतो. तो सर्वकाल एकरस आणि निष्क्रिय असतो. पण त्याची शक्ती कधी सक्रिय तर कधी निष्क्रिय असते. या शक्तीचे चित् व अचित् असे दोन भेद आहेत. चित्शक्ती ही चित्स्वरूप असते. ती आत्म्याशी अभिन्न स्वरूपात राहते. अचित्शक्ती ही विशुद्ध जगताची उपादानकारण आहे. या शक्तीला वैष्णव लोक शुद्धसत्त्व व तांत्रिक लोक बिंदू किंवा महामाया म्हणतात. अशुद्ध अचित

शक्तीमुळे अनंत ब्रह्मांडे अर्थात सर्व मायिक जगत प्रकाशित होते. हिलाच कुलकुंडलिनी असे म्हणतात. जोवर क्रियारूप



कुंडलिनीचे सांकेतिक चित्र

चित्‌शक्तीची संमती मिळत नाही, तोवर ही कुंडलिनी सुप्तवत राहते. तिच्या ठिकाणी कोणत्याही प्रकारचा क्षोभ उत्पन्न होत नाही. ही सृष्टीची पूर्णावस्था होय. जेव्हा चित्‌शक्तीच्या आघाताने ही सुप्त महामाया कुंडलिनी जागृत होते, तेव्हा तिच्या ठिकाणी संकोच करून राहिलेली चिद् अणूची राशीही जागृत होऊन उठते.

चिद्रूप शक्तीचे निवासस्थान सहस्रारचक्रात – शिवसन्निध कैलासात– असते; तर तीच शक्ती जीवदेहात अचिद्रूपाने मूलाधारचक्रात गहन निद्रेच्या अवस्थेत पडून असते. तंत्रसारात तिचे स्थान व वर्णन पुढीलप्रमाणे दिलेले आहे––

**ध्यायेत् कुण्डलिनीं सूक्ष्मां मूलाधारनिवासिनीम् ।**
**तामिष्टदेवतारूपां सार्धत्रिवलयान्विताम् ।।**
**कोटिसौदामिनीभासां स्वयम्भूलिङ्गवेष्टिनीम् ।**

अर्थ– सूक्ष्म, मूलाधार चक्रात राहणारी, इष्ट देवतारूप, साडेतीन वेटोळी घालून बसलेली, कोटी विद्युल्लतांप्रमाणे प्रकाशित व स्वयंभू लिंगाला वेढून बसलेली, अशा त्या कुंडलिनीचे ध्यान करावे.

कुंडलिनी शब्दाच्या अनेक व्याख्या केलेल्या आढळतात– (१) प्राणशक्ती (२) शेष – अनंत ब्रह्मांडाची रचना करून शिल्लक उरलेली, जगाला आधाररूप (३) मानसिक शक्ती (४) प्रज्ञापारमिता (५) दिव्य आदिशक्तीचे व्यक्त रूप (६) विश्वव्यापी विद्युत् शक्ती (७) चित्‌शक्ती, ब्रह्मशक्ती किंवा जीवात्म्याची प्राणस्वरूप आदिशक्ती (८) आध्यात्मिक शक्ती (कुवलयानंद) व (९) शरीरांतर्गत सुप्त चेतना शक्ती (अरविंदबाबू).

ज्ञानेश्वरांनी आपल्या ज्ञानेश्वरीत कुंडलिनीला सर्पिणी म्हणून तिचे माहात्म्य वर्णिले आहे. त्यातल्या काही ओव्या अशा—

**नागाचे पिलें । कुंकुमे नाहलें ।**
**वळणे घेऊन आले । सेजे जैसे ।।**
**तैशी ते कुंडलिनी । मोटकी औटवळणी**
**अधोमुख सर्पिणी । निजैली जैसी ।।**
**ते कुंडलिनी जगदंबा । जे चैतन्यचक्रवर्तीची शोभा ।**
**जिया विश्वबीजाचिया कोंभा । साउली केली ।।**
**जे शून्य लिंगाची पिंडी । जे परमात्मया शिवाची करंडी ।**
**जे प्राणाची उघडी । जन्मभूमी ।।**

गुरुदत्तयोग या ग्रंथात श्री. खानवेलकर यानी कुंडलिनीचे विवेचन पुढीलप्रमाणे केले आहे––

कुंडलिनी ही एक शरीरांतर्गत शक्ती आहे. ती कुठे असावी याविषयी मात्र अनेक तर्क केले जातात. मानवशरीरात जी स्वतंत्र सहकारी तंतुसंस्था आहे, तिच्यात पाठीच्या कण्यामध्ये ज्ञानतंतूच्या दोन रज्जूचे वास्तव्य आहे. या रज्जूनाच इडा व पिंगला अशी नावे आहेत. इडा–पिंगलांच्या मधल्या पोकळीला सुषुम्ना म्हणतात. सुषुम्नेतून ज्ञानतंतू (Sensery nerves) वर जात असतात आणि शरीराला चालना देणारे कर्मतंतू (motor nerves) तिच्यातून खाली येत असतात. इडा–पिंगलातील तंतूचे सहकार्य या दोन्ही प्रकारच्या तंतूशी असते. इडा–पिंगलांच्या मार्गात पाठीच्या कण्याच्या खालच्या टोकापासून टाळूपर्यंत ठिकठिकाणी या मज्जातंतूची जाळी असतात. ही जाळी म्हणजेच योगशास्त्रातील चक्रे किंवा कमले होत. ही चक्रे कुणी सहा, कुणी नऊ तर कुणी वीस ते बाव्वीसपर्यंत सुद्धा मानतात. या चक्रांच्या स्थानाविषयी व नावाविषयीसुद्धा बरेच मतभेद आहेत. श्रीविष्णुतीर्थ महाराजांच्या मते ही चक्रे सुषुम्नेतच आहेत. थिऑसॉफिस्टांच्या मते ही चक्रे स्थूल शरीरात नसून ती चक्रे म्हणजे प्राणमय कोशातल्या ईथरच्या द्रव्यातले भोवरे होत. त्या कोशातून प्राण, अपान वगैरे प्राणप्रवाह वाहत असतात. हे भोवरे चक्राकार किंवा उत्फुल्ल कमलासारखे असतात, अशी त्यांची कल्पना आहे. या कमळांना अनेक पाकळ्या असून त्या कमळांची बीजे, तत्त्व, देवता, रंग, स्थान, मातृका, इ. गोष्टी ठरलेल्या आहेत.

कुंडलिनी शक्ती ही भुजंगीप्रमाणे असून ती साडेतीन वेटोळी घालून मूलाधारचक्रात स्वस्थ निद्रा घेत असते. या साडेतीन वेटोळ्यांचा संबंध कोणी ॐकाराच्या साडेतीन मात्रांशी लाव-

तात, तर कोणी तिचे साडेतीन वेढे तुर्येशी संबंधित अशा अवस्थात्रयाचे द्योतक मानतात. कुंडलिनी ही जप, तप, ध्यान, कीर्तन, भक्ती, ज्ञान, कर्म, मुद्रा, बंध, शक्तिचालन, प्राणायाम, शक्तिपात, पराकाष्ठेचे दुःख, दीर्घाभ्यास इ. प्रकारांनी जागृत होते, असे सांगतात. ही जागृत कुंडलिनी स्वाधिष्ठान, मणिपूर इ. चक्रातून वर जात टाळूतील सहस्रारचक्रात शिरते, तेव्हा साधकाला कैवल्य प्राप्त होते. कुंडलिनीची शक्ती जबरदस्त असल्यामुळे ती नीट वागविता आली नाही तर मृत्यूचेही भय असते. कुंडलिनी कशी जागृत करावी, कोणत्या क्रमाने निरनिराळ्या चक्रातून न्यावी, इ. गोष्टी गुरूकडूनच शिकाव्या लागतात.

ध्यानबिंदू, योगचूडामणी व योगकुंडली या उपनिषदांत कुंडलिनी जागृत करण्याचा उपाय दिलेला आहे. श्वसनक्रिया, शरीरातील अग्नी आणि मन याच्या साहाय्याने ती जागृत करतात. नियमित प्राणायामाने योग्याचे मन सुषुम्नानाडीत प्रवेश करते. मूलबंध केल्याने अपान वर खेचला जातो. तो अग्नीसह प्राणाच्या स्थानाहून वर जातो आणि मन, प्राण व अपान हे तीनही मिळून सुप्त स्थितीत असलेल्या कुंडलिनीपर्यंत जाऊन पोचतात. ही कुंडलिनी जागृत झाल्यावर सुषुम्नेच्या मुखापर्यंत आपल्या शरीराचा विस्तार करते आणि इथे असलेली रजोगुणनिर्मित ग्रंथी तोडून टाकते. नतर ती हृदयातील विष्णुग्रंथीत व तिथून पुढे भ्रूमध्यचक्रात असलेल्या रुद्रग्रंथीत शिरते. तिथल्या ग्रंथीचा विच्छेद केल्यावर ती अनाहतचक्रातील चंद्राच्या प्रदेशात जाते. जेव्हा ती चद्राच्या नाडीचक्रात प्रविष्ट होते, तेव्हा तिथे अमृताचा अविरत प्रवाह स्रवू लागतो. मग मन या अमृताचा आस्वाद घेत राहते. त्यामुळे त्याला बाह्य सुखे तुच्छ वाटू लागतात. अशा स्थितीत योगी श्रेष्ठ दर्जाचा आत्मानंद अनुभवितो.

ज्या योग्याची कुंडलिनी जागृत होते, त्या योग्याला कोणत्या सिद्धी प्राप्त होतात ते ज्ञानेश्वरानी पुढीलप्रमाणे सांगितले आहे —

त्याच्या देहाला सुवर्णकांती चढते. देह वायूसारखा हलका होतो. दृष्टी आकाशव्यापी बनते. तो पाण्यावर चालला, तरी त्याचे पाऊल पाण्यात शिरत नाही. तो समुद्राच्या पलीकडचे पाहतो, स्वर्गातले विचार ऐकतो व मुंगीच्या मनातील भाव ओळखतो. अशा अनेक सिद्धी त्याला प्रसंगानुसार प्राप्त होतात. (ज्ञाने. ६. २६०–२७०). [ पूजातत्त्व; क्रि. स्ट. ले. उ. ]

## कुंडली

बारा राशी व नऊ ग्रह मांडून तयार केलेली एक चौकट म्हणजे कुंडली होय. पंचांगात प्रत्येक महिन्याच्या पौर्णिमा व अमावास्या या दिवशीच्या सूर्योदयकालीन ग्रहस्थितीची कुंडली दिलेली असते. त्या कुंडलीत सूर्योदयाच्या वेळी पूर्व क्षितिजावर उदित असलेली राशी वरच्या मोठ्या चौकटीत माडून पुढील राशी क्रमाने लिहितात व तत्कालीन ग्रह ज्या राशीत असतील त्या आकड्यांवर त्यांची अद्याक्षरे लिहितात. या कुंडलीवरून कोणता ग्रह कोणत्या राशीत आहे, ते चटकन कळून येते.

माणसाच्या जन्मपत्रिकेत कुंडली अत्यावश्यक असते. सामान्यतः जन्मपत्रिकेत राशिकुंडली व लग्नकुंडली अशा दोन कुंडल्या माडतात. राशिकुंडलीत चंद्राची राशी वरच्या मधल्या चौकटीत मांडतात; तर लग्नकुंडलीत त्या चौकटीत जन्मकाली पूर्व क्षितिजावर उदित असलेली राशी मांडतात. अधिक सूक्ष्म भविष्य वर्तविण्यासाठी लग्नाच्या नवमांशकुंडली, द्वादशांश कुंडली, त्रिंशांशकुंडली अशाही अन्य कुंडल्या मांडतात.




कुंडली
(शके १८८५ सालच्या चैत्र पौर्णिमेच्या सूर्योदयाच्या वेळेची)

कुंडलीत बारा राशीचे बारा कोठे असून त्यात सूर्यचंद्रादी नवग्रह त्या त्या राशीत मांडतात. हल्ली नवग्रहांच्या जोडीने हर्शल, नेपचून व प्लूटो यांचाही समावेश कुंडलीत करतात. कुंडलीवरून माणसाचे भविष्य वर्तविले जाते. व्यक्तीप्रमाणेच देश, संस्था व प्राणी यांच्याही कुंडल्या मांडून त्यांचे भविष्य वर्तवितात. पृच्छक एखादा प्रश्न विचारायला येतो, त्या वेळची कुंडली मांडून ज्योतिषी त्याच्या प्रश्नाचे उत्तर सांगतात. कुंडली म्हणजे आयुष्याचा नकाशा होय, असे सामान्यपणे मानले जाते. पण ही कल्पना वराहमिहिराने त्याज्य ठरविली आहे. एखाद्या व्यक्तीचे भविष्य जाणण्यासाठी केवळ कुंडली पुरेशी होत नाही, तर त्याचा देश, जन्मस्थळ, जात, सामाजिक प्रथा या गोष्टींचाही विचार करावा लागतो, असे टॉलेमी म्हणतो. कुंडलीवरून माणसाची काही वैशिष्ट्ये सांगता येतील; पण भविष्य सांगता येणार नाही, असे अनेक जातकशास्त्रज्ञांचे मत आहे. वराहमिहिरादी भारतीय ज्योतिषशास्त्रज्ञांनी कर्म व पुनर्जन्म या सिद्धांताशी कुंडलीचा संबंध जोडलेला आहे. वाल्मीकिरामायणात प्रभु रामचंद्राची कुंडली दिलेली आहे (बाल. १८.

८–९). सर्वांत प्राचीन कुंडली मेसापोटेमियात सापडली आहे, असे डॉ. काणे सांगतात. पाहा– जन्मपत्रिका.

**कुंडलेष्टी** आयुष्यवर्धनासाठी व आरोग्य चागले राहावे यासाठी सोम, वरुण, सरस्वती आणि अग्नाविष्णू या देवतांना उद्देशून करायची एक इष्टी. या इष्टीत एका भांड्यात आज्य घेऊन त्यात सुवर्णाचे कुंडल घालतात. यजमान त्या आज्याकडे पाहतो व प्रधानयाग झाल्यानंतर ते आज्य पिऊन टाकतो. नंतर तो त्यातील सुवर्णकुंडल मंत्र म्हणून कानात घालतो. मग ऋत्विज यजमानाला आशीर्वाद देतात. या इष्टीचे सर्व तंत्र दर्शपूर्णमासयागाप्रमाणेच असते.

पाहा– आयुष्कामेष्टी. [ विद्याधरशास्त्री भिडे ]

**कुंडा** एक बौद्ध देवता. हिचा वर्ण रक्त असून ती कलश, माला व पुस्तक धारण करते. ही ध्यानमुद्रेत असून तिची चर्या सौम्य असते. [ गॉ. नॉ. बु. ]

**कुंडिका** मूर्तिनिर्माणशास्त्रात एखाद्या मूर्तीच्या हाती जलपात्र देतात, त्याला कुंडिका म्हणतात.

**कुंडिकोपनिषद्** हे सामवेदीय उपनिषद आहे. यात संन्यासव्रताची चर्चा केलेली आहे. संन्याशाने शरीराशी माझा संबंध नाही, मी आत्मरूप आहे, शरीराच्या उपाधी माझ्या आत्मस्वरूपाला अपाय करू शकत नाहीत, मी सर्वव्यापी आहे, सागराप्रमाणे अमर्याद आहे, अशा प्रकारची भावना करावी असे यांत सांगितले आहे. अशा प्रकारची भावना धरणारा मुनी खऱ्या अर्थाने आत्माराम होतो व जीवन्मुक्तीचा आनंद अनुभवितो. या उपनिषदाचे २८ श्लोक आहेत. [ सी. ग. देसाई ]

**कुंडिनपूर** प्राचीन विदर्भाची राजधानी. पाहा– कौंडिण्यपूर.

**कुंडिनपूर विद्यापीठ** (काल अदमासे सनपूर्व ६ वे शतक) कल्पसूत्र व नवतत्त्व या जैन ग्रंथांवरून या विद्यापीठासंबंधी माहिती मिळते.

वैशालीच्या परिसरात कुंडग्राम किंवा कुंडिनपूर नावाचे एक नगर होते. तिथे या विद्यापीठाची स्थापना झाली, म्हणून याला कुंडिनपूर विद्यापीठ असे नाव मिळाले. प्रारंभिक सर्व अभ्यासक्रम पूर्ण झाल्यावर म्हणजे वयाच्या सोळा वर्षांनंतर या विद्यापीठात विद्यार्थ्याला प्रवेश मिळत असे. इथे वेद, वेदांगे, इतिहास, आख्यान, तत्त्वज्ञान, गणित, व्याकरण, काव्य, ज्योतिष व धार्मिक ग्रंथ यांचे शिक्षण दिले जाई; वैदिक वाङ्मयाच्या अभ्यासाला जास्त महत्त्व मिळे व इतर अभ्यासक्रम त्या मानाने गौण मानण्यात येई. व्यायामशास्त्राचे यथासांग शिक्षण देणे हे या विद्यापीठाचे वैशिष्टय होते. [ प्रा. भा. वि. ]

**कुंडुवाडियन** कालिकत येथे आढळणारी एक जात. हे लोक कुंडिवाडीहून तिथे गेले म्हणून त्यांना कुंडुवाडियन म्हणू लागले. वास्तविक ते नायर आहेत. चिपाम्बम्, इरुलम्बम् व मनलुवयल या ठिकाणी त्यांची विशेष वस्ती आहे. यांचा रंग काळसर पिंगट असतो. स्त्री व पुरुष कर्णभूषणे वापरतात. कोट्टायम्च्या राजाच्या पदरी हे पूर्वी सेवाचाकरी करीत. हल्ली मुख्यत्वे भातशेती व अधून मधून शिकारही करतात. यांचा जातिप्रमुख मुप्पाथी नावाचा असतो व तोच त्यांच्या मंदिरांचीही व्यवस्था पाहतो. यांच्या देवांची नावे त्या त्या स्थानावरून पडलेली असतात.

हे लोक मुलगी वयात आल्यावर तिचे लग्न करतात. जननाशौच पंधरा व मृताशौच सोळा दिवस पाळतात. [ ट्रा. के. ]

**कुंडेर-खराडी** मध्यप्रदेशातील एक जात. हे लोक लाकडाचे कातीव काम करतात. यांची जात फार लहान आहे. याच्या चालीरीती बरेहे जातीसारख्या आहेत. कुंड या हिंदी शब्दापासून कुंडेर शब्द बनला आहे. खरात (कातकामाचा चरक) या अरबी शब्दापासून खराडी शब्द बनला आहे. स्वतःची जात उच्च समजली जावी म्हणून यांच्यांतील कांही लोक स्वतःला राजपूत म्हणवितात. हे जानवे घालतात व मद्यमांस निषिद्ध मानतात.

कुंडेर लोक दूधी झाडाची खेळणी तयार करतात, तर खराडी खैराच्या झाडापासून हुक्क्याच्या नळचा बनवतात. लाकडाच्या खेळण्यांवर राखेचा रंग लावणे, बुद्धिबळे, लाकडाच्या बासऱ्या व असेच इतर जिन्नस तयार करणे हा याचा व्यवसाय आहे. [ ट्रा. का. सें. प्रॉ. इं. ]

**कुंत** प्राचीन काळापासून युद्धात वापरले जाणारे भाल्यासारखे एक शस्त्र. पाहा– भाला.

**कुंतक** (इ. स. ९२५–१०२५) एक साहित्यशास्त्रज्ञ. आनंदवर्धनानंतर काव्य मीमांसेच्या क्षेत्रात ज्यांनी स्वतंत्र बुद्धीची चमक दाखवली, अशा प्रतिभाशाली ग्रंथकारांमध्ये प्रथम वक्रोक्तिजीवितकार कुंतकाचा निर्देश करायला हवा.

त्याने भामहाच्या काव्यालंकारातून वक्रोक्ती ही कल्पना उचलून ती मुळातल्याहून अधिक व्यापक बनविली आणि तिच्या आश्रयाने काव्याचा सारा प्रपंच विवेचिण्याचा चंग बांधला. कुंतकाच्या मते ही वक्रता मुख्यत: सहा प्रकारची आहे—

(१) वर्णविन्यासवक्रता (२) पदपूर्वार्धवक्रता (३) प्रत्ययवक्रता (४) वाक्यवक्रता (५) प्रकरणवक्रता व (६) प्रबंधवक्रता. यांपैकी पहिल्या तीन प्रकारांचे दुसऱ्या उन्मेषात, चौथ्याचे तिसऱ्यात आणि राहिलेल्या दोहोंचे चौथ्यात सविस्तर विवेचन केलेले आहे.

कुंतकाच्या प्रतिपादनाचे मुख्य सूत्र भामहाच्या काव्यविचारात आहे. भामहाने जे 'शब्दार्थौ सहितौ काव्यम्' (१.१६) असे काव्यलक्षण केले आहे, तेच परिवर्धित करून कुतकाने दिले आहे. यातल्या सहितौ या पदाचे आणि त्याच्या अनुषंगाने साहित्य या पदाचे जे अर्थपूर्ण विवेचन कुंतकाने केले आहे, ती त्याने काव्यविचारात घातलेली एक मोलाची भर समजली पाहिजे.

काव्यमीमांसेतील 'मार्ग' अर्थात् 'रीती' ही कल्पना कुंतकाने सर्वात सुसंगतपणे मांडली आहे. त्याने सांगितलेल्या सुकुमार, विचित्र व मध्यम या मार्गांच्या सामान्य आणि विशेष गुणांची एकूण संख्या दहा आहे.

कुंतकाची काव्यविषयक भूमिका ध्वनिसिद्धांताहून फारशी वेगळी नाही. या दोहोंमध्ये जो काही वेगळेपणा दिसतो, त्याचे मूळ कुंतकाने योजिलेल्या अभिनव परिभाषेत आणि तिला कारणीभूत झालेल्या 'अपूर्व अलंकार' (लक्षण ग्रंथ) निर्माण करण्याच्या त्याच्या मनीषेत आहे. [काव्यप्रकाश– मंगरूळकर, अर्जुनवाडकर]

**कुंतल** द. भारतातील एक प्राचीन देश. महाभारतात कुंतल लोकांचा निर्देश आहे. त्यांची वस्ती तीन भिन्न ठिकाणी होती असे दिसते. मध्य देशातील कुंतल लोक चुनार जवळ राहत असावे. दक्षिणेकडील कुंतलदेश कृष्णा नदीच्या उगमाजवळ होता. अनेक पुराणांत कर्नाटक देशालाच कुंतल हे नाव दिलेले आढळते. शातकर्णी वंशामधील एका राजाला कुंतल–शातकर्णी म्हटलेले आहे. कदंबांचे राज्य सुरू होण्यापूर्वी तिथे शातकर्णी राजांची सत्ता होती. वाकाटक नृपतींनी कुंतलेश्वरावर विजय मिळविल्याचा उल्लेख अजंटा येथील शिलालेखात आहे. राजकेसरी वर्मा राजेंद्र चोळदेव याने कुंतलाधिपतीच्या सेनेचा पराभव केल्याचा उल्लेख दुसऱ्या एका शिलालेखात आहे. पश्चिम चालुक्य वंशातील राजांना कुंतलप्रभू ही पदवी अनेक ठिकाणी दिलेली आढळते. म्हैसूर प्रदेशातील एका शिलालेखावरून वाटते, की म्हैसूर राज्याचा उत्तर भाग व महाराष्ट्र राज्याचा दक्षिण भाग यांचा समावेश कुंतल देशात होत होता. ११ व्या व १२ व्या शतकांतील शिलालेखांत कुंतल देशाचा उल्लेख वारंवार आलेला आहे. भीमा व वेदवती या नद्यांमधील प्रदेश आणि पश्चिमेकडील शिमोगा, चितळदुर्ग, बळ्ळारी, धारवाड, विजापूर इ. प्रदेश मिळून त्यावेळचा कुंतलदेश बनला होता. गोदावरीच्या काठचे प्रतिष्ठान ही कुंतलदेशाची राजधानी होती असे म्हणतात. [म. ज्ञा. को.; हि. जॉ. ए. इ.; क. हि. क.; ट्रा. ए. इं.]

**कुंतलम्** एक दक्षिणी वाद्य. यात पडघमासारखी दोन पात्रे असून ती खालच्या बाजूला निमुळती असतात.



कुंतलम्

त्यांची वरची तोंडे चामड्याने मढविलेली असतात. याचा उपयोग पुरवीआट्टम् अथवा बनावट घोड्यांचा नाच, या प्रसंगी करतात. [डि. सा. इं. म्यु. म्यु.]

**कुंताप** ऋग्वेदाच्या परिशिष्टातील निगदसंग्रहाला कुंताप अध्याय असे म्हणतात. पृष्ठ्यषळह, द्वादशाह इ. ऋतूंच्या सहाव्या दिवशी ब्राह्मणाच्छंसी नामक ऋत्विजाने पठण करायच्या वृषाकपी नावाच्या शस्त्रात, श्रौतसूत्रकारांनी या निगदांचा समावेश केलेला आहे. अथर्ववेदाच्या २० व्या कांडातही कुंताप निगदांचा संग्रह आढळतो. [म. ज्ञा. को.]

**कुंती** (१) एक जनपद. हे अवंती जनपदाच्या शेजारी होते. सहदेवाने आपल्या दक्षिणदिग्विजयात हा देश जिंकला होता. यमुना व चंबळ यांच्या काठावर हे वसले होते. ग्वाल्हेर विभागात कोतवार नावाचे एक गाव आहे. तेच पूर्वीचे कुंती जनपद होय. पाच मोठ्या जनपदांत याची गणना होत होती. पाणिनीने कुंति-सुराष्ट्र असे जोडनाव दिले आहे. प्रत्यक्षात ही

दोन जनपदे एकमेकांपासून दूर होती. असे असता त्यांचा जोडीने उल्लेख आला आहे, त्यामागे राजकीय कारण असले पाहिजे. पांडवांच्या काळात कुंतीजनपदावर दंतवक्राचे राज्य होते व सुराष्ट्रात कृष्णप्रमुख यादवाचे राज्य होते. कृष्णाने दंतवक्राला ठार मारल्यानंतर त्याचे राज्य सुराष्ट्राच्या राज्यकारभाराखाली आले. त्यानंतर सुराष्ट्रातले गोपाळ कुंती जनपदात वस्तीला आले. ग्वाल्हेरच्या आसपास त्यानी आपली वसती माडली. ग्वाल्हेरच्या किल्ल्याचे प्राचीन नाव गोपालगिरी असेच आहे.

(२) यादवांचे एक कुल. याने कृष्ण–रुक्मिणीच्या विवाहसमारंभात भाग घेतला होता. यादवी युद्धात इतर यादवांबरोबर हेही लढून मेले.

(३) यदुकुलोत्पन्न शूर राजाची कन्या व धर्म–भीम–अर्जुनांची माता. हिचे मूळ नाव पृथा होते. पण कुंतिभोजाने तिला दत्तक घेतल्यामुळे ती कुंती या नावाने प्रसिद्ध झाली. स्वयंवरात हिने पंडुराजाला वरले. कुरुयुद्धानंतर गांधारी, धृतराष्ट्र व विदुर हे महाप्रस्थानाला निघाले असता कुंतीही त्यांच्याबरोबर गेली व एका रानाला लागलेल्या वणव्यात जळून मेली. पाहा– महाभारतकथा.

**कुंथलगिरी** आंध्रमधील बार्सी रेल्वेस्टेशनापासून २१ मैलांवर हा एक लहानसा पर्वत असून त्यावर दहा जैन मंदिरे आहेत. माघ पौर्णिमेला दरवर्षी इथे जत्रा भरते. [ कल्याण–तीर्थांक; जै. ध. ]

**कुंथुनाथ** जैनांच्या २४ तीर्थंकरांपैकी सतरावा तीर्थंकर. याचा पिता शूरसेन उर्फ सूर्य व माता श्रीकांता किंवा श्रीदेवी. जन्मस्थान हस्तिनापूर. जन्मनक्षत्र कृत्तिका. लांछन मेष. ज्ञानवृक्ष तिलक. याच्या नावाची व्युत्पत्ती दोन प्रकारांनी दिली आहे—

**कुः पृथ्वी तस्यां स्थितवानिति कुंथुः। तथा गर्भस्थे भगवती जननी कुंथुराशिं दृष्टवतीति कुंथुः।**

अर्थ– हा जन्मताच पृथ्वीवर सरळ उभा राहिला म्हणून किंवा हा गर्भात असता याच्या आईने कुंथुराशि (रत्नांचा ढीग) पाहिली म्हणून याचे नाव कुंथू ठेवण्यात आले.

हा चक्रवर्ती होता. याच्या मेष या वाहनावरून याचे पौराणिक अग्नीशी साधर्म्य दिसते. अग्नी हा ऐश्वर्याचा स्वामी मानला आहे; तर कुंथुनाथही ऐश्वर्याचा स्वामीच आहे. बिहारमधल्या पारसनाथ पर्वताच्या सम्मेद शिखरावरून हा मोक्षास गेला. [ जै. इ. ]

**कुंदकुंदाचार्य** एक महान जैन आचार्य. दिगंबर संप्रदायात याला महावीर व गौतम गणधर यांच्या खालोखाल मानतात. याचे मूळ नाव पद्मनंदी होते. कोंडकुंडपुरचा रहिवासी असल्यामुळे पुढे त्याला लोक कुंदकुंदाचार्य असे म्हणू लागले. कुरळचा लेखक वल्लुवर व कुंदकुंदाचार्य हे दोघे एकच होत, असे काहीजण मानतात आणि त्यावरून इ. स. चे १ ले शतक हा त्याचा काल ठरवितात. परंपरागत समजूत अशी आहे, की कुंदकुंदाचार्य सनपूर्व १ ल्या शतकात होऊन गेला. तो भद्रबाहूचा परंपराशिष्य होता. श्रवणबेळगोळच्या शिलालेखात त्याचा तसा सन्मानपूर्वक उल्लेख आहे.

याचे प्रवचनसार, पंचास्तिकाय व समयसार हे तीन ग्रंथ अत्यंत प्रसिद्ध असून त्यांना नाटकत्रयी किंवा प्राभृतत्रयी असे म्हणतात. त्यांतला समयसार हा ग्रंथ सर्वश्रेष्ठ मानला जातो. त्यात आध्यात्मिक विवेचन केलेले आहे. प्रवचनसार या ग्रंथात ज्ञेय व ज्ञान यांची चर्चा व दीक्षा घेणाऱ्या साधकाला उपयोगी व आवश्यक असा उपदेश आहे. पंचास्तिकाय या ग्रंथात पाच अस्तिकायांविषयी चर्चा आहे. याशिवाय, त्याने अनेक प्राभृते (पाहुडे) म्हणजे लहान पुस्तके लिहिली आहेत. त्यांपैकी फक्त आठ उपलब्ध आहेत. दर्शन, चरित्र, सूत्र, बोध, भाव, मोक्ष, लिंग व शील या आठ विषयांवरील ही स्वतंत्र प्रकरणे आहेत. बारस अणुवेक्खा (द्वादशानुप्रेक्षा) या ग्रंथात ९१ गाथा असून त्यांत जैन धर्मातील प्रसिद्ध बारा भावनांचे विवेचन आहे. त्याच्या शेवटच्या गाथेत कुंदकुंदाचार्य हे नाव आहे. कुंदकुंदाचार्यांचे सर्व उपलब्ध ग्रंथ प्राकृत भाषेत आहेत. [ कुं. ती. र.; प्रा. सा. इ.; जै. ध. ]

**कुंदचतुर्थी** गौरीव्रत. माघ शु. ४ थीला कुंदचतुर्थी म्हणतात. या दिवशी स्त्रियांनी कुंद फुलांनी शिवगौरीची पंचोपचार पूजा करायची असते. या व्रतात दूध, आले, गूळ, मीठ व एक मातीचे भांडे या वस्तू सुवासिनीला देतात. पुरुषांनीही हे व्रत करण्यास हरकत नाही. व्रताचे फल– सौभाग्यप्राप्ती. [ व्रतराज ]

**कुंभ** (१) आकाशस्थ राशिचक्रातील अकरावी राशी. धनिष्ठांचा उत्तरार्ध, पूर्वा भाद्रपदा व उत्तरा भाद्रपदांचे तीन चरण मिळून ही राशी बनते. ही स्थिर राशी असून शनी हा हिचा स्वामी आहे. एक मानव एक जलकुंभ हातात घेऊन उभा आहे असे या राशीचे प्रतीक दाखविलेले असते. नामरूपात्मक विश्वाचाच नव्हे; तर ज्या शक्तीने नाना

घटकद्रव्ये एकत्र आणून हे विश्व निर्माण केले, त्या शक्तीचाही नाश या प्रतीकाने सूचित केलेला आहे. शक्तीचा नाश झाल्यावर सर्व घटकद्रव्ये अखिल विश्वाचे द्रावण करणाऱ्या आकाशात विलीन होतात. तो लय मीन या राशीने दर्शविला जातो. [ डि. सिं. ]

(२) वास्तुशिल्पाचा एक प्रकार. कुंभाच्या आकाराच्या राजवाड्याला मत्स्य पुराणात कुंभ असे म्हटले आहे. याला नऊ भूमिका व सोळा हातांचे एक तोरण असते. [ पु. इं. ]

(३) धान्य वगैरे मोजण्याचे एक माप. कुंभ म्हणजे २० द्रोण असे अर्थशास्त्रात सांगितले आहे. १० शेर म्हणजे एक द्रोण या हिशेबाने कुंभ म्हणजे पाच मण होतात. [ पा. भा. ]

कुंभ राशीचे एक साकेतिक चित्र

(४) कुंभाच्या आकाराचा एक ढोल. याचा उल्लेख रामायणात आहे. भेरी, पणव, आनक, गोमुख व शंख यांच्याबरोबर हा ढोल वाजवितात. याला कुंभमुख असेही नाव आहे. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

## कुंभकोणम्

द. भारतातील प्राचीन तीर्थक्षेत्रांपैकी एक प्रसिद्ध क्षेत्र. हे तंजाऊर जिल्ह्यात कावेरी नदीच्या तीरावर वसलेले आहे. द. भारतात केवळ याच ठिकाणी दर बारा वर्षांनी यात्रा भरते. त्या दृष्टीने कुंभकोणम्‌चे माहात्म्य प्रयागच्या खालोखाल मानतात. या क्षेत्रामध्ये २० एकर विस्तार असलेले महामखम् सरोवर आहे. गुरू सिंहस्थ असता गंगा, यमुना, सरस्वती, नर्मदा, गोदावरी, कावेरी, महानदी, पयोष्णी व शरयू या नऊ नद्या (नौगंगा) त्या सरोवरात स्नानासाठी येतात, अशी समजूत आहे. त्यामुळे त्या वेळी तिथे स्नान केल्याने सर्व पापांचे क्षालन होते, अशी भाविकांची श्रद्धा आहे.

इथले कुंभेश्वर महादेवाचे मंदिर सर्वांत प्राचीन आहे. त्या मंदिरावरूनच नगराचे नाव कुंभकोणम् असे पडले आहे. याविषयी पेरियपुराणात पुढील कथा आढळते—

जेव्हा सृष्टीचा प्रलय ओढवला, तेव्हा ब्रह्मदेवाने मातीत अमृत मिसळून तिचा एक घडा बनविला व त्या घड्यात सृष्टीतली सर्व बीजे घालून तो मेरु पर्वतावर उंच जागी टांगून



कुंभेश्वरमंदिर – कुंभकोणम्

ठेवला. त्यानंतर सप्तसागर खवळले. हा हां म्हणता जगबूड झाली. मेरुपर्वतही त्या महाप्रलयात गडप झाला व त्यावरचा तो बीजघट वाहत वाहत इथवर आला. मग शंकराने भिल्लवेषाने इथे येऊन बाणाने तो घडा फोडला. त्यातून अमृत वाहू लागले आणि तिथे एक मोठा तलावच बनला. या प्रसंगाची आठवण म्हणून शिवाने इथे स्वहस्ते एक लिंग स्थापले व त्याला कुंभेश्वर असे नाव दिले.

दर बारा वर्षांनी गुरू मघा नक्षत्रात येतो, तेव्हा या सरोवराचा महोत्सव करतात. तमिळलोक या उत्सवाला महामखम् किंवा मामांकम् असे म्हणतात.

इथले सुप्रसिद्ध मंदिर सारंगपाणीचे. ते रथाकृती आहे. याचे गोपूर १४७ फूट उंच असून त्याला बारा मजले आहेत. इथले रामस्वामीचे मंदिर १६ व्या शतकात तंजाऊरचा राजा रघुनायक याने बांधले. इथे ब्रह्मदेवाचेही एक मंदिर आहे. इथे शिवाची बारा व विष्णूची चार मंदिरे असून शिवमंदिरे विष्णुमंदिरांच्याही आधीची आहेत.

प्राचीन काळी कुंभकोणम् हे दक्षिणेतल्या ब्राह्मणी संस्कृतीचे मोठे केंद्र होते. इथल्या शंकराचार्यांच्या मठांत हस्तलिखित संस्कृत ग्रंथांचा फार मोठा संग्रह आहे. ७ व्या शतकात चोळ राजांनी इथे आपली राजधानी स्थापली आणि विद्या–कलांना राजाश्रय दिला. [ त. सा. सं.; भारती– फेब्रु. १९५८ ]

## कुंभनदास

पुष्टिमार्गी अष्टछाप कवींपैकी एक. वल्लभाचार्यांचा शिष्य. याचा जन्म इ. स. १४६८ साली गोवर्धनजवळ जमुनावतौ नावाच्या गावी झाला. हा जातीने क्षत्रिय असून व्यवसाय शेतीचा करी. श्रीनाथजीची कीर्तनसेवा

हा त्याचा छंद होता. गोवर्धन येथील श्रीनाथाचे दर्शन घेतल्यावाचून कुंभनदासाला चैनच पडत नसे. एकदा गोसाई विठ्ठलनाथ यांच्या आग्रहामुळे कुंभनदास द्वारकेच्या यात्रेला निघाला. पण श्रीनाथाचा वियोग त्याला सहन होईना. चालता चालता त्याच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहू लागल्या आणि त्याच अवस्थेत त्याने एक वियोगगीत रचले. त्याची ती दशा पाहून विठ्ठलनाथाने त्याला परत गोवर्धनाला पाठवून दिले.

त्याच्या सगळया पदात माधुर्यभक्तीची प्रचुरता आहे. त्यांतले एक पद पुढीलप्रमाणे—

**बनी राधा–गिरिधर की जोरी ।।**
**मनहुँ परस्पर कोटि ।**
**मदनरति की सुंदरता चोरी ।**
**नौतन स्याम नंदनंदन ।**
**वृषभानुसुता नव गोरी ।**
**मनहुँ परस्पर बदन ।**
**चंद को पिबत चकोर चकोरी ।**
**'कुंभनदास' प्रभु रसिकलाल ।**
**बहुविधिवर रसिक निहोरो ।**
**मनहुँ परस्पर बढयो ।**
**रंग अति, उपजी प्रीति न थोरी ।**

अर्थ— राधा-कृष्णांची जोडी जमली आहे. जणू काही कोटी मदन-रतींचे सौंदर्य यांनी चोरले आहे. वृषभानुसुता राधा गोरी व कृष्ण सावळा आहे. दोघेही एकमेकांच्या मुखचंद्रांचे अवलोकन करीत आहेत. जणू चकोर–चकोरीच चांदण्याचे पान करीत आहेत. कवी कुंभनदास म्हणतो, रसिकांच्या लाडक्या श्रीकृष्णाला रसिकजन न्याहाळीत आहेत. जणू काही दोघांच्या मनात प्रीतीचा रंग वृद्धिंगत झाला आहे.

कुंभनदास जन्मभर निर्धनच होता. त्याला कोणी काही भक्तिभावाने दिले, तरी तो ते घेत नसे. शेतीतून जे थोडेसे उत्पन्न मिळे, त्यावरच तो गुजराण करी. ११५ वर्षांचे जीवन श्रीनाथाच्या कीर्तनसेवेत घालवून हा भक्त इ. स. १५८३ च्या सुमारास मरण पावला.

कुंभनदासाची कृष्णलीला वर्णन करणारी अनेक स्फुट पदे आहेत. अष्टछाप कवींमध्ये हाच एक कवी असा होता, की ज्याने कृष्णाच्या बाललीलेपेक्षा युगललीलेचे अधिक वर्णन केले आहे. त्याच्या काव्यात मधुराभक्ती विशेषत्वाने दिसते. [अष्टछाप परिचय]

**कुंभपर्व** एक पुण्ययोग. दर बारा वर्षांनी हा योग येतो. सूर्य व चंद्र मकर राशीत, गुरू वृषभ राशीत आणि अमावास्या एवढया गोष्टी जमल्या, की प्रयागला कुंभयोग येतो. या दिवशी प्रयागतीर्थात स्नान केल्याने एक हजार अश्वमेध, शंभर वाजपेय व पृथ्वीभोवती एक लाख प्रदक्षिणा केल्याचे पुण्य मिळते, अशी समजूत आहे.

या मुख्य पर्वाची तीन उपपर्वे असून पहिले मकरसंक्रांतीला, दुसरे अमावास्येला आणि तिसरे वसंतपंचमीला येते. यांपैकी अमावास्येचा दिवस मुख्य असून त्याला पूर्णकुंभ असे नाव आहे. काहींच्या मते हे तीन दिवस म्हणजे मकरसंक्रांत, पौषपौर्णिमा व पौष अमावास्या हे होत.

प्रयागशिवाय हरिद्वार, नासिक व उज्जयिनी या ठिकाणी निरनिराळे कुंभयोग आहेत. कुंभ राशीत गुरू आणि मेष राशीत सूर्य असताना हरिद्वारला कुंभपर्व असते. नासिकचे कुंभपर्व गुरू सिंह राशीत आणि सूर्य-चंद्र कर्क राशीत असताना आणि उज्जयिनीचे सूर्य तुला राशीत आणि गुरू वृश्चिक



कुंभपर्वाचा मेळा – हरिद्वार

राशीत असताना येते. एकदा एका राशीत येऊन गेल्यावर पुन्हा त्या राशीत यायला गुरूला साधारणपणे बारा वर्षे लागतात. त्यामुळे कुंभपर्व दर बारा वर्षांनी एकदा येते. याची कथा अशी—

एकदा देव-दानवांनी अमृतासाठी क्षीरसागराचे मंथन सुरू केले. जेव्हा धन्वंतरी अमृतकुंभ हातात घेऊन समुद्रातून वर आला, तेव्हा देवांच्या मनात आले, की दानव अमृत पिऊन अमर झाले, तर मग आपली धडगत नाही. म्हणून त्यांनी इंद्रपुत्र जयंत याला खूण केली. त्यासरशी तो धन्वंतरीच्या हातांतला अमृतकुंभ घेऊन पळाला. मग देव-दानवांचे बारा दिवस व बारा रात्री युद्ध झाले.

त्या युद्धात बारा वेळा अमृतकुंभ खाली पडला. त्या वेळी बृहस्पती, सूर्य, चंद्र व शनी यांनी त्याचे रक्षण केले.

ज्या बारा ठिकाणी हा कुंभ पडला, त्या ठिकाणी वरील ग्रहांच्या विशिष्ट योगाने कुंभपर्व मानले जाते. या बारा स्थानांपैकी उपरिनिर्दिष्ट फक्त चार स्थाने पृथ्वीवर असून बाकीची स्थाने अन्य लोकात आहेत, असे म्हणतात.

कुंभपर्वाच्या वेळी प्रयागला गंगास्नानासाठी फार मोठी यात्रा भरते. साधुसंतांचे आखाडे हत्ती, घोडे, उंट अशा विविध सरंजामानिशी तिथे दाखल होतात. जेव्हा या साधुसंतांची मिरवणूक निघते, तेव्हा तिथले सर्व वातावरण गंगामैय्याच्या जयजयकाराने दुमदुमून जाते. [हि. ध.; देवीदयाल चतुर्वेदी–धर्मयुग १७–१–५४]

**कुंभपात्र** पिशाचांचा एक समूह. हे पिशाच आकाराने लहान, केसाळ व पिंगट वर्णाचे असतात (ब्रह्मांड पु. ३. ७. ३७८). हे अदृश्यपणे हत्ती व उंट यांच्या मस्तकावर वास करतात. [पु. इं.]

**कुंभराणा** (इ. स. १५ वे शतक) मेवाडच्या सीसोदिया राजवंशातील एक अत्यत कर्तृत्ववान पुरुष. हा मोकलसिंहाचा पुत्र होय. इ. स. १४३३ साली मोकलसिंहाचा खून झाल्यानंतर हा मेवाडचा महाराणा झाला. इ. स. १४३९ पर्यंतच्या सात वर्षांत त्याने आपल्या सर्व शत्रूंना नामोहरम करून अखिल राजस्थानावर आपली सत्ता प्रस्थापित केली. माळव्याचा सुलतान महंमूद खिलजी त्याच्या हातात सापडला होता; पण कुंभाने त्याच्याकडून काहीही खंडणी न घेता त्याला सोडून दिले. पुढे माळवा व गुजरात येथील सुलतानांनी मेवाडवर एकदम आक्रमण केले. तेव्हाही महाराणा कुंभाने त्या दोघांचा पराभव केला. या अद्वितीय विजयाचे स्मारक म्हणून त्याने चितोडगडावर एक विजयस्तंभ उभारला.

महाराणा कुंभाने दिल्लीच्या सत्तेवर आक्रमण करून काही बादशाही मुलुखही जिंकला होता. या त्याच्या शौर्यामुळे मुसलमानांनी त्याला हिंदुसुरत्राण (हिंदू सुलतान) ही पदवी दिली होती. राणा कुंभ याचा धर्माभिमान प्रखर होता. मुसलमानांनी हिंदूंवर केलेल्या अत्याचारांचा त्याने पुरेपूर सूड उगवला, असे म्हणतात. चितोडगडावरील कीर्तिस्तंभप्रशस्तीत त्याने मुसलमानांचा कसा उच्छेद केला, त्याचे यथायोग्य वर्णन आहे.

कुंभाच्या वेळी मेवाडचा भाग्यसूर्य मध्याकाशात तळपू लागला. महाराणा कुंभ केवळ एक पराक्रमी सेनापतीच नव्हता, तर एक थोर शासनकर्ताही होता. त्याचप्रमाणे तो वेद, स्मृती, दर्शने, व्याकरण इ. विषयांतला पंडित असून विद्वानांचा चाहता होता. तो कवी असून त्याला संगीताचेही चांगले ज्ञान होते. त्याला संस्कृताशिवाय मराठी, कन्नड इ. अनेक भाषा अवगत होत्या. चंडीशतक व गीतगोविंद यांवर त्याने टीका लिहिल्या होत्या. संगीतराज व संगीतमीमांसा हे ग्रंथ त्याच्याच नावावर मोडतात. त्याने कृषी, व्यापार, उद्योग, कला व विद्या यांना उत्तेजन दिले. त्याच्या काळात साहित्याचा व कलांचा खूप विकास झाला. त्याला इतिहासाची आवड होती. त्याने अभिलेख, दानपत्रे इ. साधनांवरून गुहिल राजांची वंशावळ शुद्ध करण्याचा प्रयत्न केला होता. मेवाडात त्याने ३२ किल्ले बांधले. तलाव व कोटही निर्माण केले. चितोडवरील कीर्तिस्तंभ व कुंभस्वामी व एकलिंगजी यांची मंदिरे, त्याच्याच काळातील आहेत. अबूपर्वतावरील कुंभश्याम व सह्री घाटांतील ऋषभदेव ही दोन मंदिरेही त्यानेच बांधली असून तेथील कुसरीची कामे अप्रतिम आहेत. अबूच्या शिखरावर त्याने बांधलेल्या एका किल्ल्यात कुंभाची स्वतःची ताम्रमूर्ती आहे. लोक तिची पूजा करीत, यावरून त्याच्याविषयी लोकांची किती भक्ती होती, ते कळून येते.



राणा कुंभाच्या ठायी बाप्पा रावळाचा पराक्रम व युद्धचातुर्य, हम्मीराची धडाडी व उत्साह, लाखा राण्याची कलाप्रियता, चुडाचा मुत्सद्दीपणा व प्रजाहितदक्षता हे सर्व सद्गुण एकवटले होते. याशिवाय त्याच्या बुद्धीची कुशाग्रताही विशेष होती.

महाराणा कुंभाला शेवटी उन्माद रोग जडला. त्या स्थितीतच त्याचा ज्येष्ठ पुत्र उदयसिंह (ऊदा) याने त्याचा वध केला (इ. स. १४६८). [म. ज्ञा. को.; ओ. स्मृ. ग्रं.; रा. रा. उ. न्हा.; ह. रा.]

**कुंभविवाह** कन्येला बालवैधव्ययोग असेल, तर उदकाने भरलेला कुंभ, अश्वत्थ वृक्ष, सुवर्णाची विष्णुप्रतिमा, इत्यादींशी प्रथम तिचा विवाह करून, नंतर तिचा नियोजित वराशी विवाह करावा, असे मार्कंडेय पुराणात सांगितले आहे. कुंभविवाहाचा विधी असा—

गणपतिपूजन, पुण्याहवाचन, मातृकापूजन व नांदीश्राद्ध ही कृत्ये करून कुंभाची स्थापना करावी. त्यावर वरुणाची व विष्णूची सुवर्णमूर्ती ठेवून त्यांचे पूजन करावे. घरात एकान्त स्थळी कन्येच्या अंगास व कुंभास हळद लावून चंद्रबळ व ताराबळ यांनी युक्त अशा मुहूर्तावर कन्येचा कुंभाशी विवाह करावा. कन्येच्या गळ्यात यज्ञोपवीतासारखे एक सूत्र बांधावे. कुंभ व कन्या यांना पीत वस्त्रांनी वेढून कन्यादान करावे. विवाहसमयी कुंभाची पूजा करून त्याची पुढील मंत्राने प्रार्थना करावी—

**वरुणाङ्गस्वरूप त्वं जीवनानां समाश्रय ।**
**पतिं जीवय कन्यायाश्चिरं पुत्रसुखं कुरु ।।**

अर्थ— वरुणाचा अंगरूप व पाण्याचा आश्रय असलेल्या हे कुंभा, तू या कन्येचा पती चिरंजीव कर व तिला पुत्रसुख दे.

नंतर तो कुंभ एखाद्या जलाशयात फोडावा. मग ब्राह्मणांनी शुद्धोदकाने कन्येला अभिषेक करावा. नंतर ब्राह्मणभोजन घालावे.

अशा विवाहाने कन्येला पुनर्विवाहाचा दोष लागत नाही. या विषयी वचन असे—

**स्वर्णाम्बुपिप्पलानां च प्रतिमा विष्णुरूपिणी ।**
**तया सह विवाहे च पुनर्भूत्वं न जायते ।।**

अर्थ— सोने, पाणी, पिंपळ व विष्णुप्रतिमा यांच्याशी कन्येचा विवाह केल्याने नंतरच्या विवाहाबद्दल तिला पुनर्विवाहाचा दोष लागत नाही. [ व्र. प. ]

**कुंभांड** दैत्य किंवा राक्षस यांच्या वर्गातील काल्पनिक प्राणी. यांना रुद्राचे सेवक मानलेले आहे. ते कुंभमुष्क होते म्हणजे त्यांचे अंडकोश कुंभाएवढे होते. मथुरा येथील शिल्पात यांच्या प्रतिमा आढळतात. संस्कृत बौद्ध ग्रंथांत कुंभांडांचा राजा विरुद्धक याला दक्षिण दिशेचा रक्षक असे म्हटले आहे. [ डे. हि. इ. ]

**कुंभार** मातीची भांडी घडविणारी एक जात. भारतातील सर्व भागांत यांची वसती असून सर्व धर्मांच्या लोकांचा त्यात समावेश आहे. कुंभकार या संस्कृत शब्दावरून कुंभार हा शब्द बनलेला आहे. या जातीच्या उत्पत्तीसंबंधी अनेक मते आहेत.

बंगालमध्ये कुंभाराच्या उत्पत्तीविषयी पुढील कथा प्रचलित आहे—

महादेवाचा जेव्हा दुर्गेशी विवाह निश्चित झाला, तेव्हा त्याने चार मंगल कलशांची मागणी केली. पण ते कलश बनवायला कुंभारच अस्तित्वात नव्हता. तेव्हा महादेवाने आपल्या दाढीचा एक केस उपटला व त्यापासून एक कुंभार निर्माण केला. दुर्गेने त्या कुंभारासाठी एक बायको निर्माण केली. पण ती स्त्री हुबेहुब दुर्गेसारखीच होती. त्यामुळे कुंभार घोटाळ्यात पडला. आपली बायको कोणती ते त्याला कळेना. ही आपली अडचण त्याने महादेवाला सांगितली. महादेव म्हणाला, की, 'जिच्या नाकात आणि डोक्यात कोणताच अलंकार नाही ती तुझी बायको समज.' कुंभाराला मग आपली बायको चटकन ओळखता आली.

तेव्हापासून आजतागायत राढी कुंभारांच्या बायका नाकात व केसात कोणताच दागिना घालीत नाहीत.

दुर्गेशी विवाह केल्यावर महादेवाने एक महिना राढी कुंभारांच्या घरी वास्तव्य केले. तो वैशाख महिना होता. त्यामुळे वैशाख महिन्यात बंगालमधील राढी कुंभार काम करीत नाहीत. ज्येष्ठ महिन्यात विश्वकर्मापूजा झाल्यावर ते आपल्या कामाला सुरवात करतात.

बंगाली कुंभारांत अनेक शाखा उपशाखा आहेत. त्या सर्वांचा सामाजिक दर्जा मात्र समान आहे.

प्रचलित असलेल्या अनेक दंतकथा ग्राह्य वा अग्राह्य मानल्या तरी, ऋग्वेदात मातीच्या भांड्यांचा उल्लेख आहे, त्यावरून कुंभारांचा धंदा अत्यंत प्राचीन काळीही चालू होता, एवढी गोष्ट सिद्ध होते.

महाराष्ट्रातील कुंभार अनेक प्राचीन राष्ट्रातून आलेले असून त्यांचे पूर्वीचे राष्ट्रीय वेगळेपण हल्ली भिन्न पोटजातीच्या स्वरूपात दिसून येते. यांच्यांत अहीर किंवा लहानचाके, बळदे, भाडू, चागभैस, गरेते, गुजर, गोरेमराठे, हातघडे, किंवा भोंडे किंवा भोंडकर, हातोडे, कडू, कन्नड, कर्नाटक अथवा पंचम किंवा लिंगायत, खंभाटी, कोकणी, लाड किंवा थोरचाके, लाडभुजे, माळवी, मराठा किंवा घाटी परदेशी, रजपूत, सोराठिया, वरिया व वाटलिया, अशा तेवीस कुळ्या आहेत. या सर्व कुळ्या मराठा, कोकणी, गुजराती व परदेशी या चार प्रकारात समाविष्ट होतात. यांतील काही नावे प्रांतांवरून पडली आहेत. लहान चाकावर काम करणारे म्हणून लहानचाके. केवळ हातांनी काम करतात, ते हातघडे. द. गुजरातचे (लाट देशाचे) ते लाड. हे थोर चाकावर काम करतात, पंचम हे गळ्यात लिंग धारण करतात; ते लिंगायत असून बहुधा कर्नाटकातले असतात. गवंडी काम करणाऱ्यांना कडिया असे नाव आहे. मराठा कुंभारांच्या अनौरस संततीला कडू असे नाव आहे. गुजराती कुंभार बहुतेक वैष्णवपंथी आहेत. उ. भारतातून महाराष्ट्रात आले ते आपल्याला कुमावत क्षत्रिय म्हणवितात. मेवाडच्या कुंभ राजाचे वंशज ते कुंभोज. त्यापासून कुंभावत–कुमावत अशी आपल्या नावाची व्युत्पत्ती ते सांगतात. तेलुगू कुंभार प्राचीन राजांच्या मुदपाकखान्यात स्वयंपाकी असत. हे जानवे घालतात व मांस खात नाहीत.

महाष्ट्रातील कुंभार हा बारा बलुत्यांपैकी एक आहे. तो गावाला गाडगी–मडकी पुरवितो व त्याबद्दल त्याला थोडी जमीन मिळालेली असते. काही ठिकाणीं त्याला कापणीच्या वेळी धान्यही मिळते. पूर्वी कानडी व कोकणी कुंभार इतर कुंभाराचे उपाध्येपण करीत. परंतु हल्ली बहुतेकांचे उपाध्याय ब्राह्मणच आहेत. काही ठिकाणी कोकणी कुंभार स्थानिक देवतांचे पुजारी असत. अद्यापही द. भारतात ते पुजारी आहेत.

अस्पृश्यांशिवाय बाकीच्या सार्‍या शूद्रांचे अंत्येष्टिकर्म कानडी कुंभार करतात. त्यांच्या या कर्माला कुंभारक्रिया असे नाव आहे.

हे लोक आपापल्या वर्गातच लग्न करतात. एकपत्नीव्रतावर यांचा भर असला, तरी काही अटींवर हे पुनर्विवाहाला परवानगी देतात. हे दोला, सगाई, वगैरे लग्नविधी पाळतात.

हे लोक पांचोनपीर, भवानी, सीतळा, समाई, हर्दिया वगैरे देवतांना भजतात व त्यांना बळी देतात. चक्र हे श्रीकृष्ण व प्रजापती यांचे निदर्शक असून ते उत्पत्तीचे प्रतीक आहे असे मानतात.

मद्रास राज्याच्या उत्तर भागातील कुंभार मातीचे व दक्षिण भागातील कुंभार लाकडाचे चाक वापरतात. हे कुंभार शैव असून त्यांपैकी काही लिंगायत आहेत. उ. अर्काट जिल्ह्यातील करीगेरी येथील कुंभार कलात्मक भांड्यांसाठी प्रसिद्ध आहेत. या भांड्यांवर वेगवेगळ्या रंगात सुबक नक्षीकाम केलेले असते. त्या वेळच्या इंग्रज अधिकार्‍यांनी त्यांना ही कला शिकविली आहे. द. कर्नाटकातील कुंभार तुळू भाषा बोलतात. हे लोक देवळात पुजारी म्हणून काम करतात. हे पंधरा दिवस सोयर पाळतात. यांच्यांत बापाचा वारसा मुलीकडे जातो.

म्हैसूर प्रातातील कुंभारात तेलुगू व कानडी असे दोन प्रमुख भेद आहेत. हे भांडी व विटा तयार करतात. तेलुगू कुभार स्वतःला शालिवाहनाचे वंशज समजतात. त्यांच्यांत शैव व वैष्णव या दोन्ही पंथांचे अनुयायी आहेत. गंजम जिल्ह्यातील वेंकटरायपल्ली येथील कुंभारांनी बनविलेली मातीची काही चित्रे तमिळनाडमधल्या समुद्रकिनार्‍यावरील देवळात आढळतात. कोळी लोक त्या चित्रांची पूजा करतात.

बंगालमधील कुंभार मातीच्या भांड्यांबरोबर बाहुल्या, मूर्ती, खेळणी, वाद्ये, कौले, इ. वस्तूही बनवितात. मात्र सगळेच कुंभार या सर्व वस्तू तयार करीत नाहीत. प्रत्येक घराण्याचे एकेक वैशिष्ट्य असते. गंगेच्या टापूतील कुंभार फक्त घरगुती उपयोगाची भांडी बनवितात; कुचोल कुंभार विवाहसमारंभाला लागणारी मातीची भांडी, रंगीत खेळणी व बाहुल्या बनवितात; तर पूर्व बंगालमधील कुंभार चित्रे, मूर्ती, खेळणी व सर्व प्रकारची भांडी तयार करतात. मूर्ती, बाहुल्या व खेळणी हातांनी बनवितात किंवा साच्यातूनही काढतात. मग ती उन्हात वाळवितात व त्यांना रंग देतात. या कामी त्यांना घरातील बायकाही मदत करतात.

पावसाळ्यात काम नसल्याने काही कुंभार शेती वगैरे किरकोळ धंदे करतात. [ मुं. इ. जा.; रे. क. इं.; म. ज्ञा. को.; का. ट्रा. स. इं. ]

**कुंभावत** एक धार्मिक संप्रदाय. याचा संस्थापक कुंभावत नावाचा कुंभार होता. त्याचेच नाव या पंथाला मिळाले. या पंथाचे अनुयायी राम-कृष्णाचे उपासक असून



कुंभावत साधू

मस्तकी टिळा लावतात. हे गृहस्थाश्रमी असतात. [ रा. जा. ]

**कुंभिपातिआ पंथ** ओडिसा प्रांतात मुकुंददास नावाच्या पुरुषाने या पंथाची स्थापना केली. या पंथाचे अनुयायी पिवळ्या कपाशीच्या वृक्षाची साल (कुंभीपात) अंगावर घेतात, म्हणून त्याना हे नाव मिळाले. या पंथाच्या अनुयायांनी जगन्नाथाच्या मंदिरावर एकदा हल्ला केला होता (इ. स १८७४); त्यामुळे या पंथाला जास्त प्रसिद्धी मिळाली. विशेषतः हिंदूंच्या ब्राह्मणधर्माला या पंथाचा विरोध असून, याचा कल बौद्ध धर्माकडे आहे. हे लोक लिंग पूजक आहेत. [ एन्सा. रि. ए. ]

**कुंभी** केरळातले एक कृषिनृत्य. मलबारात शेतीचे काम सुरू करण्यापूर्वी या नृत्याचे आयोजन करतात. केरळी शेतकरी या नृत्योत्सवाचा संपूर्ण दिवस व ती रात्रही नृत्यस्थळीच घालवितात. छोटा नागपूर व ओडिसा येथील आदिवासींमध्येही अशा प्रकारचे नृत्य प्रचलित आहे. [ आजकल– जून १९५२ ]

**कुंभीक** एक नरक. स्वकर्मापासून च्युत झालेले लोक या नरकात पडतात. [ पु. इं. ]

**कुंभीपाक** अठ्ठावीस नरकांपैकी एक नरक. याची व्याख्या शब्दकल्पद्रुमात दिली आहे, ती अशी–

**कुम्भ्यां उखायां पाक इव पाको यत्र ।**

अर्थ–थाळीत घालून कढविल्याप्रमाणे जिथे पाक होतो, तो कुंभीपाक होय.

ब्राह्मणाची मालमत्ता हरण करणारे, पशुहत्या करणारे आणि मांसाहार करणारे या नरकात जातात, असे पुराणात सांगितले आहे (भाग. पु. ५.२६. ७ व १३). याच नरकाला संप्रतापन असेही नाव आहे. [ पु. इं. ]

**कुअरबार अरॅगू** मुंडा लोकांच्या लग्नविधीतले एक कृत्य. यात वराला पत्रावळीवर बसवितात व नऊ आंब्याची पाने उभी चिरून त्यांच्या सुरळ्यांची एक माळ वराच्या पायाला अथवा मनगटाला बांधतात. या सुरळ्या वधू-वरांच्या भावी लैंगिक संबंधाच्या प्रतीकरूप असतात. सिंग बोंगा या त्यांच्या देवाने कुमार अवस्थेत मुलामुलींना ब्रह्मचर्य पाळण्याची सक्ती केलेली असते. या सुरळ्या वराच्या अंगाला बांधल्या, की त्याला बोंगाने लैंगिक जीवन सुरू करण्यास अनुज्ञा दिली, असा त्याचा अर्थ होतो. त्यानंतर तीन किंवा पाच पुरुष एकामागून एक उठतात व पत्रावळीत वरवंटा गुंडाळून ती पत्रावळ वराच्या अंगाला डोक्यापासून पायापर्यंत घासतात. वधूच्या घरीही असाच विधी होतो. वधूला आंब्याच्या पानांच्या सुरळ्या बांधल्यानंतर स्त्रिया तिच्या अंगावरून तो वरवंटा फिरवतात. मुंडांच्या विवाह समारंभातला हा अत्यंत महत्त्वाचा विधी असतो. [ एन्सा. मुं. ]

**कुऋल** मेंढपाळांचे एक वाद्य. यात भिन्न लांबीच्या अनेक नळ्या एकत्र केलेल्या असतात. त्याची फेक मर्यादित असली, तरी स्वरश्रेणी विविध प्रकारच्या असतात. हे वाद्य कर्कश असते. [ म्यु. ई. ]

**कुकडी डाव** गुजरातमधील एक खेळ. हा दगडांनी खेळतात. पाच किंवा दहा दगड घेऊन ते जमिनीवर टाकायचे. नंतर त्यातला एक एक दगड वर टाकीत राहायचे व हवेतला एकेक दगड झेलीत राहायचे. याप्रमाणे सगळे दगड हवेत टाकून झेलायचे. या क्रमात चूक झाली, की डाव जातो [ गुज. गॅझे. ]

**कुकरी** गुरख्यांचे एक घातक शस्त्र. याचे पाते वाकडे असून त्यावर दुहेरी रेघ व ठिपके असतात. पात्याच्या



कुकरी

आतल्या अंगाची धार तीक्ष्ण असते. हे शस्त्र इतिहासाच्याही पूर्वकाळातले आहे. [ प्रा. ऐ. श. ]

**कुकी** आसाम आणि आराकान यांमध्ये आढळणारी एक जमात. हे लोक लुशाई टेकड्यांत व काचार जिल्ह्यात राहतात. लुशाई टेकड्या आसामच्या उत्तर सरहद्दीवर आहेत. हे लोक वन्यधर्मी असून जुने व नवे असे त्यांचे दोन प्रमुख वर्ग आहेत. जुने कुकी हे शरीराने उंच व बळकट असतात, नीटनेटका पोषाख घालतात आणि बरेचसे सभ्यपणे वागतात. नवे कुकी हे ठेंगणे पण मजबूत बांध्याचे असतात. त्यांच्या बायका त्यांच्याहून खुज्या असल्या, तरी त्याही बळकट असतात. यांचे डोळे लहान व बदामाच्या आकाराचे असतात. यांचे नाक लहान व चपटे असून नाकपुड्या मोठाल्या असतात.

कुकी हे मोंगोलाइड वंशाचे आहेत. पण त्यांच्यांत बोंजुंग कुकी, बायटे कुकी, खेलमा कुकी असे अनेक पोटभेद आहेत. हे पोटभेद त्यांच्या कुळ्या किंवा गोरे यांच्यावरून पडले आहेत. कुकी व लुशाई यांचा निकट संबंध आहे. तेही मोंगोलाईडच आहेत. कुकी हे शिकारी व लढवय्ये आहेत. त्यांच्या अनेक टोळ्या असतात.

कुकींची खेडी दुर्गम पहाडात वसलेली असतात. त्यांना खुआ म्हणतात. सहा फूट उंचीच्या चौथऱ्यावर कुकी आपले घर बांधतात. चौथऱ्याखाली गुरे बांधण्याची व्यवस्था करतात. घरे रस्त्याच्या दुतर्फा असतात. कुटुंबात जितकी माणसे असतील, तितक्यांना राहायला पुरेल एवढेच घर बांधतात. सामान्यतः घरांची लांबी ५० ते ६० फूट व रुंदी १५ ते २० फूट असते. त्यांच्या सरदाराचे घर सर्वांत मोठे असते. त्याची लांबी

१५० फूट व रुंदी ५० फूट असते. खेड्यातली सर्व घरे बांधून झाली की प्रथम सरदाराच्या घराला मेढेकोट करतात व नंतर गावाभोवती लाकडी कोट उभारतात. गावातील तरुण रात्री आळीपाळीने तटाभोवती पहारा करतात. कुकीच्या वस्तीभोवती बहुतेक वेळूचे रान असते आणि त्यांची मासे पकडण्याची जाळी, जनावरे पकडण्याचे सापळे, विणण्याचे सामान, तंबाखूची चिलीम, त्यांचे घोसन नावाचे वाद्य इतकेच नव्हे; तर भाकरी करायचे तवे देखील वेळूचेच असतात. ते लोक



कुकींचे बांबूनृत्य

पाणीही वेळूच्या नळकांड्यातच साठवितात. जेव्हा कुकींना वस्त्र माहीत नव्हते, तेव्हा ते बांबूच्याच डहाळ्या कमरेभोवती बांधीत. हे लोक वेळूचे कोवळे कोंब उकडून भाताबरोबर खातात. थोडक्यात सांगायचे, तर कुकीचे भौतिक आणि गृह्य जीवन वेळूने व्यापलेले आहे. त्यांच्या सुतालम नामक नृत्यातही चार पुरुष जोडीने समोरासमोर उभे राहून दोन्ही हातांनी दोन वांबूंची टोके पकडून नाचतात. अशा रीतीने बांबूंची जी चौकट तयार होते, तिच्यात एक नर्तकी नृत्य करते.

हे लोक नागा जमातीपेक्षाही अधिक हिंसक असल्याचे समजले जाते. त्यांचे शेजारी जे बोंजुंग कुकी त्यांच्याशी जुन्या काळी यांची वारंवार युद्धे होत. जेव्हा ते आपल्या शत्रूविरुद्ध मोहिमा काढीत, तेव्हा ते झाडांना बांधलेल्या झोपाळ्यात झोपत. त्यावरून कुकी लोक झाडावर राहतात, अशा दंतकथा प्रचलित झाल्या. आपला हल्ला यशस्वी झाल्यास ते शत्रुपक्षातली लहान मुले वगळून मोठ्या माणसांची सरसकट कत्तल करीत. मुलांना आपल्या घरी आणून दत्तक घेत. जुन्या काळी कुकी जेव्हा शत्रूची कत्तल करून परत येत, तेव्हा त्यांच्या हाती शत्रूची रक्ताळलेली मुंडकी असत. गावाच्या सीमेवर येताच गावकरी लोक मद्याची नळकांडी भरून घेऊन त्यांना सामोरे जात. घरी आल्यावर मुंडके आणणाऱ्या कुकीची पत्नी मद्याने त्याचे हात धूत असे. तसे करण्याने तो खुनी पुरुष खुनाच्या पापातून मुक्त होतो, अशी समजूत असे.

सुमारे ८०–९० वर्षांमागे कुकींच्या चार मोठ्या टोळ्या आणि लुशाई टोळ्या यांचे युद्ध होऊन त्यात कुकींचा पराभव झाला. त्यामुळे आपले वसतिस्थान सोडून ते काचार विभागात पळून आले. तत्कालीन ब्रिटिश सरकारने त्यांना आश्रय दिला व त्यांच्या सरदारांच्या हाताखाली सुमारे २०० कुकींना लष्करी शिक्षण देऊन त्यांची सीमासंरक्षकदलात नेमणूक केली. उरलेल्या कुकींनी शेतीचा व्यवसाय पत्करला.

कुकी लोक आपल्या सरदाराचे हुकूम पाळणे, हा आपला धर्म समजतात. सरदार म्हणजे त्यांचा राजाच. त्याच्या ठिकाणी दैवी अंश असतो, अशी त्यांची समजूत आहे. म्हणून त्या राजांना ते पवित्र मानतात व त्यांचा कधीही अनादर करीत नाहीत. त्यांचा राजा त्यांना तोंडाने हुकूम करतो. विशेष प्रसंगी संकेतनाच्या (सिग्नलिंग) सहाय्यानेही आज्ञा दिल्या जातात. जेव्हा एखादी व्यक्ती राजाचा सुसज्जित भाला हाती घेऊन गावातून फिरते, तेव्हा ते लोक समजतात, की राजाने प्रत्येकाला ताबडतोब बोलावले आहे. त्यासरशी ते लगेच राजासमोर हजर होतात. राजाच्या स्त्रीने एखाद्या कुकीला आपला दत्तक पुत्र मानले, तर त्याचाही मोठा आदर होतो. त्या पुत्राने जमातीचा केवढाही मोठा अपराध केला, तरी त्याला माफी असते. टोळीतला प्रत्येक प्रजाजन दरवर्षी राजाला एक टोपलीभर भात, एक डुकर, एक कोंबडी, शिकारीत पकडलेल्या सावजाचा चौथा भाग व वर्षातल्या चार दिवसांची मजुरी एवढा करभार देतो.

राजाला मदत करण्यासाठी एक मंत्रिमंडळ असते. त्याला युस्पोआर असे म्हणतात. या मंत्रिमंडळाला बरोबर घेऊन राजा न्यायनिवाडे करतो. कुकींच्या कायद्यात विश्वासघाताच्या गुन्ह्याला मृत्यूची शिक्षा असते. खुनी इसम आणि त्याच्या कुटुंबातले लोक यांना गुलाम बनविण्यात येते. कुकी लोकांत स्त्रियांना स्वातंत्र्य नसते. त्यांच्यावरही राजाचा अधिकार चालतो.

कुकींचा पोशाख तिथल्या हवामानाला साजेसा अतएव हलका असतो. ते डोक्याला पगडी घालतात. श्रीमंत लोक पगडीत पक्ष्यांची पिसे लावतात व बकरीच्या केसांची लालरंगी फीत खोचतात. ते मण्यांचे अलंकार वापरतात. अंगठ्या, कडी, दंडकडी वगैरेही घालतात. कानाच्या पाळीला मोठे भोक पाडून त्यात चांदीचे कडे व कानभर सुंकलीही घालतात.

त्यांच्या खांद्यावर एक पिशवी असते व हातात दाव नावाचे एक तिकोनी हत्यार असते. ते भालाही वापरतात. गेंड्याच्या कातड्याचे चिलखत बनवून ते अगाभोवती लपेटतात. त्यांच्या ढाली रेड्याच्या कातड्याच्या असतात. कुकी लोक फणी ही पवित्र वस्तू समजतात. ती हरवणे अशुभ मानतात. पती-पत्नींनी एकच फणी वापरली तरी चालते. पण ती दुसऱ्या कोणी वापरता कामा नये. मृताला पुरताना त्याची फणीही त्याच्याबरोबर पुरतात. मृताचे नातेवाईक त्या वेळी आपल्या फण्या मोडून टाकतात व सुतक संपेपर्यंत केस विचरीत नाहीत.

**विवाहप्रथा** – वधूचे देज म्हणून वराकडून ३० रुपये घेतात. देज देणे शक्य नसल्यास नवरा मुलगा आपल्या सासऱ्याकडे दोन वर्षे नोकरी करतो. वाङ्‌निश्चय झाला, की वधूपिता इष्ट-मित्रांना मेजवानी देतो. दुसऱ्या दिवशी थिपू ( पुरोहित ) वधूवरांना दारू प्यायला देतो. नंतर वराच्या गळ्याला दोन सुताचे धागे बांधतो व त्या दोघांना एक फणी देऊन आशीर्वाद देतो.

**प्रसूतिप्रथा** – मुलाचे बारसे पाचव्या दिवशी व मुलीचे तिसऱ्या दिवशी करतात. माता आपल्या बालकाला तोंडचा घास देऊन त्याचे उष्टावण करते. मुलगा बारा वर्षांचा झाला, की त्याला रात्री घरी झोपू देत नाहीत. तो सामुदायिक शय्या-गृहात झोपायला जातो.

हे लोक आजारी माणसाला औषधपाणी करीत नाहीत. तर थिंपूकडे जाऊन त्याच्या सल्ल्याप्रमाणे देवाला कोंबडे-बकरे बळी देतात.

**देव-धर्म** – कुकीचा उथेन नावाचा परमेश्वर आहे. तो कन-वाळू असतो; पण माणसाला परलोकात त्याच्या बऱ्यावाईट कृत्याचे फळ भोगायला लावतो. नॉगजार ही परमेश्वराची बायको होय. तिच्या अंगी माणसाला आजारी पाडण्याचे व बरे करण्याचेही सामर्थ्य असते. त्या दोघांना थिला नावाचा एक मुलगा असतो, तो मात्र दुष्ट व सूड घेणारा असतो परमेश्वराची मुलगी हिलो हीदेखील मोठी खट्याळ असते. बळी देऊन कुकी लोक या दोघांना संतुष्ट करतात. खोमुंग्नो नावाचा त्यांचा गृहदेव आहे व जंगल, नदी, पर्वत, खडक यांमध्ये वास्तव्य करणारेही अनेक देव आहेत. कुकीचा स्वर्ग उत्तरेस आहे. तिथे फक्त कुकीच्याच छायांना वास्तव्य करण्या-चा अधिकार असतो. तिथे भाताचे पीक विपुल येते व शिका-रही मुबलक मिळते. मृत्युलोकी कुकीने ज्या ज्या शत्रूंना ठार मारलेले असते, ते ते स्वर्गात त्याच्या सेवेला हजर असतात. ज्या प्राण्यांचे त्याने मास खाल्लेले असते, ते प्राणी स्वर्गात त्याच्या खुराड्यात येतात.

**मर्तिकप्रथा** – कुकी लोक मृतांना पुरतात. पण तत्पूर्वी काही दिवसपर्यंत प्रेत तसेच ठेवतात. मोठ्या माणसाचे प्रेत मंदाग्नीवर ठेवतात व त्याचे मास वाळले, की त्याला कपडे घालून महिना दोन महिने तसेच ठेवून देतात. घरात मृत्यू झाल्यावर सर्व नातेवाईकांना आणि इष्टमित्रांना त्याची खबर पोचवितात. दुर्गम पहाडात ही खबर पोचायलाच कित्येक दिवस लागतात व तिथून ती माणसे मयतीच्या जागी पोचा-यला आणखी कित्येक दिवस लागतात. ही सर्व मंडळी एकत्र जमेपर्यंत प्रेताची विल्हेवाट लावीत नाहीत. मृताचे अंत्यदर्शन सर्व नातेवाइकांनी घेतले पाहिजे, असा त्यांचा संकेत आहे. माणसे जमली, की मेजवान्या होतात. दारूही पाजली जाते. अंत्यविधीच्या खास जेवणावळीसाठी जी जनावरे मारतात, त्यांची मुडकी मृताच्या खड्ड्याभोवती रचतात. कुकींना तंबा-खूचे भयंकर व्यसन आहे. म्हणून मृताला पुरताना त्याच्या-बरोबर तंबाखू आणि त्याची चिलीमही पुरतात. **पाहा**– लुशाई. [ से. इं. १९३१; भा. आ.; म. ज्ञा. को.; भा. लो. नृ. ]

## कुकुर

एक प्राचीन गण व देश. वृष्णींचीच ही एक शाखा होती. महाभारतात अंबष्ठ, तार्क्ष्य, वस्त्रपा व पल्लव या लोकांबरोबर कुकुरांचा उल्लेख आला आहे (सभा. ५२. १५). भागवतात या कुकुरांनी द्वारकेचे संरक्षण केले, असा उल्लेख आहे. त्यावरून हे लोक द्वारकेच्या प्रदेशात राहत होते, असे दिसते. उत्तर काठेवाडात आनर्ताजवळ कुकुर नामक देश होता, असे ल्यूडर्स सांगतो. बृहत्संहितेतही कुकुर लोक पश्चिमे-कडच्या प्रदेशात राहत होते, असे सांगितले आहे (१४.४). नाशिक येथील गौतमी बलश्रीच्या लेखात म्हटले आहे, की तिच्या पुत्राने सुरथ, मूलक, अपरान्त, विदर्भ, इ. देशांतील लोकांबरोबर कुकुरांनाही जिंकले होते. [ हि. जॉ. ए. इं.; पु. इं.; ना. प्र. प. ]

## कुक्कुट

एक प्रतिलोम जात. वैश्य पुरुष व निषाद स्त्री यांची संतती (बौ. ध. सू. १.८.८); किंवा शूद्र पुरुष व निषाद स्त्री यांची संतती (बौ. ध. सू. १.८.८; १.९. १५). तलवारी व इतर शस्त्रे तयार करणे व राजे लोकांच्या मनोरंजनासाठी कोंबड्यांच्या झुंजी लावणे, हे यांचे काम होय, असे आदित्य पुराणात सांगितले आहे. [ हि. ध. ]

## कुक्कुटपादगिरी

गयेच्या ईशान्येस सोळा मैलांवर सोम-नाथ नावाचा एक पर्वत असून त्याच्या तीन शिखरांपैकी सर्वात उंच शिखराचे हे नाव आहे. बौद्ध

लोक या स्थानाला पवित्र मानतात. कारण महाकाश्यप हा बौद्ध आचार्य या पर्वतावर राहिला होता व त्याने इथे काही चमत्कारही करून दाखविले होते. [ हि. जॉ. ए. इं. ]

**कुक्कुटमंत्र** राजभयाचे निवारण, अनेक संकटांपासून संरक्षण, शत्रूचे उच्चाटन व वशीकरण या गोष्टी साध्य होण्यासाठी कुक्कुटमंत्राची साधना करितात. हा मंत्र असा—

**आंयूंकोलियूंकोलिवाह्रींयूंकोलियूंकोलिचुवाक्रों ।**

या मंत्राचा ऋषी महारुद्र, छंद अतिजगती, देवता कोंबडा, बीज ह्रीं व शक्ती क्रों आहे. मंत्रातील अक्षरांचा षडंगन्यास केल्यावर इष्ट देवतेचे ध्यान करतात. वामादी शक्तींनी युक्त अशा शैव पीठावर, भूगृहाने वेष्टित अष्टदलपद्मयंत्रावर गौरीच्या हातात असलेल्या कुक्कुटाची पूजा करतात. मग नदीतीरावरील पर्वतशिखरावर किंवा शिवालयात बसून मंत्राचा एक लाख जप करतात व तिळाच्या दहा हजार आहुती देतात. अशा प्रकारे मंत्र सिद्ध झाल्यावर त्याचा प्रयोग करतात.

प्रयोग करण्यापूर्वीही मंत्राचा जप करतात व तांबूलासहित पायसाचा बली देतात. [ मं. म. ]

**कुक्कुटयुद्ध** कोंबडयांच्या झुंजीना कुक्कुटयुद्ध असे नाव आहे. खेळाचा हा प्रकार पुरातन आहे. जैनांच्या उत्तराध्ययनावरील टीकेत, कौशांबी येथे झालेल्या कोंबडयांच्या झुंजीचे वर्णन आहे. मोहेंजोदडो येथे आढळलेल्या एका शिक्क्यावर लढणाऱ्या दोन कोंबडयांचे चित्र आहे. यावरून या खेळाची लोकप्रियता व प्राचीनत्व कळून येते. पुरुषांप्रमाणे स्त्रियाही कोंबडयांच्या झुंजी लावीत. त्या काळच्या वेश्यांनाही कोंबडे लढविण्याचे व्यसन असे. वात्स्यायनाने कुक्कुटयुद्धाला चौसष्ट कलांमध्ये स्थान दिले आहे. प्राचीन राजपुत्र ही कला शिकत.

प्राचीन काळच्या राजांजवळ उत्तम दर्जाचे कोंबडे असत. त्यांची यथायोग्य व्यवस्था ठेवण्यासाठी माणसे नेमली जात. झुंजीचा दिवस ठरला, की दवंडी देऊन सगळ्या लोकांना तो कळवीत. शनिवारी रात्री जमीन सारवून तिच्यावर तांदुळाच्या पिठीचे अथवा शंखाच्या चूर्णाचे ‘ रतिमंडळ ’ काढीत. हा कुक्कुटयुद्धाचा आखाडा होय. हा तीस हात घेराचा असे. मग मंत्र म्हणून देवतांना आवाहन करीत. नंतर पूर्वीच्या विजयी कोंबडयाला प्रथम तिथे आणीत. त्याला दृष्ट लागू नये म्हणून त्याच्या तुऱ्याला काजळ लावीत. मग प्रतिस्पर्धी कोंबडयाला पुढे आणून त्या दोघांची झुंज सुरू करून देत. लढणाऱ्या कोंबडयाच्या पायांना पातळ सुऱ्या बांधलेल्या असत. नर्तक व वाद्यवादक नाचून गाऊन त्या झुंजीत रंग भरीत. या युद्धासाठी कार्तिक ते फाल्गुन हा काळ उचित समजला जाई. सतत पाच आठवडे प्रत्येक सोमवारी ही लढाई चाले. सहाव्या सोमवारी युद्धाचा निर्णय लावीत. जास्तीत जास्त बारा वेळा झुंज ठेवायची, असा नियम असे. जो कोंबडा प्रतिस्पर्धी कोंबडयाला जखम करील त्याचा जय मानला जाई. मग विजयी पक्ष पराजित पक्षाचा ध्वज काढून घेई. दक्षिणेत ‘ त्रिपदी ’ ची पद्धत होती. म्हणजे विजयी कोंबडयाच्या मालकाला पराभूत कोंबडयाचा मालक आपल्या पाठीवर घेऊन संगीताच्या तालावर तीन पावले चालत असे. विजयी कोंबडयाची हत्तीच्या पाठीवरून मिरवणूक काढीत. त्याच्यावर फुलेही उधळीत.

या युद्धात कोंबडे रक्तबंबाळ होत असल्याने अहिंसाप्रिय अशोकाने आपल्या साम्राज्यात ही प्रथा बंद केली होती. [ प्रा. भा. म.; नवनीत १९५७ ]

**कुक्कुटासन** एक योगासन. हे केल्याने हात व पोटातील स्नायू सशक्त बनतात. हे स्त्रियांनाही उपयुक्त आहे. याचे लक्षण असे—

**पद्मासनं समासाद्य जान्वोरन्तरं करौ ।**
**कर्पूराभ्यां समासीनो मञ्चस्थः कुक्कुटासनम् ।।**

अर्थ – पद्मासन घालून बसावे. नंतर मांड्या व पोटऱ्या यांच्यामधून दोन्ही हात कोपरापर्यंत आत घालून त्यांचे पंजे जमिनीवर टेकवावे. हातांच्या पंज्यावर शरीर अधांतरी तोलून धरावे. नंतर दोन्ही पाय हातांच्या कोपरांपर्यंत वर नेण्याचा प्रयत्न करावा. याला कुक्कुटासन असे म्हणतात.



कुक्कुटासन

या आसनाने जठराग्नी प्रदीप्त होतो व नाडी शुद्ध राहते. [ यो. सो.; उ. यो. द. ]

**कुक्कुटीव्रत** याला कुक्कुटव्रत व कुक्कुटी-मर्कटीव्रत अशीही नावे आहेत. याचा विधी असा –

भाद्र० शु. सप्तमीला एका वर्तुळात अंबिकेसह शिवाची मूर्ती रेखाटून तिची पूजा करतात. नंतर अष्टग्रंथियुक्त असा एक सोन्याचा वा रुप्याचा दोरा दुधाने भिजवून शिवाला वाहतात व मग तो डाव्या हातात बांधतात. हा दोरा आयुष्यभर हातात ठेवायचा असतो. यानतर वर्षभर प्रत्येक महिन्यातील शुद्ध किंवा वद्य सप्तमीला हे व्रत करतात व अष्टमीला तिळमिश्रित भाकरी, गूळ व भात यांचे ब्राह्मणांना भोजन घालतात.

हे व्रत केल्याने संततिविच्छेदन होत नाही, असे सांगितले आहे. याची कथा अशी –

नहुष राजाची राणी चंद्रमुखी व राजपुरोहिताची पत्नी माला या दोघी एकदा शरयूवर स्नानाला गेल्या असता काही स्त्रिया व्रत करीत असताना त्यांनी पाहिल्या. मग त्यांनी त्या व्रताची माहिती विचारली व आपणही ते व्रत केले. कालांतराने त्या दोघीही व्रत करायला विसरल्या. त्यामुळे पुढील जन्मात चंद्रमुखी वानरी व माला कुक्कुटी बनली. त्यानंतरच्या जन्मात चंद्रमुखी राणी झाली व माला राजपुरोहिताची पत्नी झाली. या जन्मात त्यांना ईश्वरी व भूषणा अशी नावे मिळाली. भूषणेला आठ पुत्र झाले. ईश्वरीला एक रोगी पुत्र झाला व तो पुढे मरण पावला. ईश्वरीला त्यामुळे मत्सर वाटू लागला व तिने भूषणेच्या पुत्रांना मारून टाकले. पण ते पुन्हा जिवंत झाले. तेव्हा ईश्वरीने भूषणेला या चमत्काराचे कारण विचारले. 'आचरीत असलेल्या कुक्कुटीव्रताचे हे फल आहे', असे भूषणेने सांगितल्यावर ईश्वरीनेही हे व्रत केले व तिला पुत्रप्राप्ती झाली.

छोटा नागपूरमधील आदिवासी जमातीत हे व्रत प्रचलित आहे. [ हि. ध.; श. क.; फो. रि. बें. ]

**कुक्कुटेश्वर** एक तांत्रिक देवता. हिचे वर्णन असे – वर्ण सोनेरी, पख दोन, तांबडा तुरा व तांबडी चोच. हिला गौरीने हातात धरलेले असते. [ श्रीविद्यार्णवतंत्र ]

**कुक्कुनडी** ओडिसातील एक जमात. हे लोक शेती व मासेमारी करतात. लांब भाल्यांनी मासे मारण्यात हे तरबेज आहेत. [ का. ट्रा. स. इं. ]

**कुक्कुरिपा** चौऱ्यायंशी सिद्धांपैकी एक. राहुल सांकृत्यायनांच्या मते हा कपिलवस्तू नगरातील एक ब्राह्मण होता. मीनपाचा गुरू चर्पटीपा हा कुक्कुरिपाचाही गुरू होता. पण तारानाथांनी याला मीनपाचा गुरू व चर्पटीपाचा शिष्य म्हटले आहे. लुंबिनीवनात ज्या स्त्रीकडून याला महामुद्रा सिद्धी प्राप्त झाली, ती पूर्वजन्मात एक कुक्कुरी (कुत्री) होती. म्हणून याला कुक्कुरिपा असे नाव मिळाले. याची मणिभद्रा नावाची शिष्या चौऱ्यायंशी सिद्धांपैकी एक आहे. पद्मवज्र हाही याचा शिष्य होता. तंजूरमध्ये याचे सोळा ग्रंथ उपलब्ध आहेत. त्यांपैकी तत्त्व - सुख - भावनानुसारियोगभावनोपदेश व स्रवपरिच्छेदन हे दोन हिंदीत असावेसे वाटतात. हा चर्पटीपाचा शिष्य होता, हे जर खरे असेल, तर १० व्या शतकाच्या सुमाराला हा होऊन गेला, असे म्हणता येईल. [ सि. सा.; पु. त. नि. ]



कुक्कुरिपा

**कुचिपुडी नृत्य** आंध्रातील एक नृत्यप्रकार. याला कुचिपुडी भागवतम् व आट भागवतम् अशीही नावे आहेत. हे नृत्य-नाटच म्हणजे भरतनाटचम्चाच एक प्रकार होय. या नृत्याचा जन्म आंध्र प्रदेशातच झाला. इ. स. १५०२ मध्ये लिहिलेल्या मचुपल्ली कैफियत या ग्रंथात कुचिपुडीचा उल्लेख आढळतो. एका नट-नर्तक मंडळीने विजयनगरचा राजा इम्मडी नरस नायक याच्या दरबारात कुचिपुडी नृत्य–नाटचाचा प्रयोग करून दाखविला, असे त्या कैफियतीत म्हटले आहे. सम्मेता गुरव राजू नामक एका संस्थानिकाने आपल्या संस्थानातील प्रजेवर जो जुलूम चालविला होता, त्याचे चित्र या मंडळीने कुचिपुडीच्या रूपाने विजयनगरच्या राजापुढे सादर केले. हेतू हा, की विजयनगरच्या राजाने राजूच्या छळापासून त्या संस्थानातील प्रजेची सुटका करावी.

सोमनाथाच्या पंडिताराध्यचरित्र या ग्रंथातही कुचिपुडी या नृत्याचा उल्लेख आला आहे. त्यावरून १६ व्या शतकाच्या पूर्वीही हा नृत्यप्रकार अस्तित्वात होता, असे अनुमान करता येते. १६ व्या शतकात या कलेची मोठीच भरभराट झाली. त्या पूर्वीही ८ व्या, ९ व्या व १० व्या शतकातील ताम्रपटांवरून कळते, की आंध्र, तमिळनाड व कर्नाटक या प्रांतांत नृत्यादी करमणुकीचे खेळ करून दाखविणाऱ्या मंडळ्या अस्तित्वात होत्या व त्यांना ब्राह्मणमेळ किंवा नट्टुवामेळ असे

म्हणत. याशिवाय शिवलीला, अरैयर नटनम्, तेरु कुथ्थू, वीथी नाटकम्, यक्षगान, इ. अनेक विशिष्ट नृत्यप्रकारही तमिळनाड, कर्नाटक, केरळ, इ. प्रदेशांत अस्तित्वात होते. परंतु कुचिपुडी नृत्याचा उगम वरील कलाप्रकारातून झाला, असे मात्र म्हणता येत नाही.



सिद्धेंद्रस्वामी योगी

कुचीपुडी हे नृत्य भक्तिरसप्रधान आहे. भक्तीच्या प्रचारासाठीच कुचीपुडीचा जन्म झाला व त्या कलेने तो हेतू सफलही केला. कीर्तन, हरिकथा व कालक्षेपम् यांच्याप्रमाणेच कुचिपुडीने लोकांच्या मनात भक्तीची भावना खोलवर रुजविली.

तीर्थनारायण यती व सिद्धेंद्रस्वामी योगी हे दोघे संतपुरुष कुचिपुडीचे जनक मानले जातात. परमेश्वराची भक्ती केवळ भजनाच्या द्वारे न करता तिला नृत्य आणि नाटच यांची जोड दिल्यास दुधात साखर पडेल, असे त्यांना वाटले आणि त्यांनी तशा प्रकारे भक्तीचा प्रसार करण्याची मोहीम काढली. त्यासाठी त्यांनी भागवत पुराणातून अनेक आख्याने निवडली. त्यावरूनच या भक्त कलावंतांना तमिळनाडमध्ये भागवतार व आंध्रमध्ये भागवतुलू असे म्हणू लागले.

तीर्थनारायण यतीचा जन्म तंजाऊर जिल्ह्यातील एका तेलुगू ब्राह्मण कुटुंबात झाला. लहानपणापासूनच त्याला संगीताचा आणि भरतनाट्यम्चा नाद होता. जयदेवाच्या गीतगोविंदातील अष्टपद्या तो तन्मयतेने गात असे. त्याची ही तन्मयता पाहून लोक त्याला जयदेवाचा अवतारच मानू लागले. तीर्थनारायण हा कृष्णभक्त होता. पुढे त्याला कृष्णलीलांचे वर्णन करण्याची इच्छा झाली. त्यासाठी त्याने कृष्णलीलातरंगिणी नावाची एक संगीतिका लिहिली व आपल्या काही शिष्यांसमवेत गावातल्या मंदिरासमोर त्या संगीतिकेचा प्रयोगही केला. या प्रयोगाच्या शेवटी श्रीकृष्णाने प्रसन्न होऊन तीर्थनारायणाला दर्शन दिले, अशीही आख्यायिका सांगतात.

सिद्धेंद्र योगी हा तीर्थनारायणाचा शिष्य होता. हाही तेलुगू ब्राह्मण असून कृष्णभक्त होता. याच्याविषयी अशी आख्यायिका सांगतात, की एकदा याला श्रीकृष्णाने दर्शन दिले व सांगितले, की 'तू जर शृंगारिक भाषेत पारिजातापहरण नावाचे काव्य लिहिशील, तर तुला मुक्ती मिळेल.'



रामलिंगेश्वर मंदिर – कुचिपुडी

भगवंताचा आदेश शिरसावंद्य मानून सिद्धेंद्र योग्याने पारिजातापहरण किंवा भामाकलापम् नामक काव्य रचले. आपल्या काव्याचा प्रसार करण्याच्या उद्देशाने तो कुचेलपुरम् या गावी गेला आणि त्याने तिथल्या ब्राह्मण मुलांच्या साहाय्याने आपल्या संगीत नृत्य-नाटचाचा प्रयोग सादर केला. हा प्रयोग अत्यंत यशस्वी झाला. ते पाहून त्याने त्या नृत्यात भाग घेतलेल्या मुलांकडून शपथ घेवविली, की 'वर्षातून एकदा तरी आम्ही या पारिजातापहरणाचा प्रयोग करू.'

एवढचा शपथेवरच ते कलावंत थांबले नाहीत. त्यांनी सिद्धेंद्र योग्याला वचन दिले, की 'आमचे पुत्रपौत्रही हे भक्तिनृत्य करीत राहतील, अशीही आम्ही तजवीज करू.' तेव्हापासून आजतागायत कुचेलपुरम्च्या रहिवाश्यांनी या परंपरेचे मोठ्या निष्ठेने पालन केले आहे.

सिद्धेंद्र योग्याने १६७५ साली गोवळकोंडचाचा नबाब अब्दुल हसन याच्यासमोर एकदा पारिजातापहरणाचा प्रयोग केला. तो प्रयोग पाहून नबाब फार खूष झाला व त्याने कुचेलपुरम् हे गाव तिथल्या ब्राह्मणांना दान दिले. कुचेलपुरम् म्हणजेच हल्लीचे कुचिपुडी होय. हे एक खेडेगाव असून मच्छलीपट्टम्पासून १८ मैलावर कृष्णा नदीच्या काठी आहे. रामलिंगम् हा त्या खेडचातील प्रमुख देव असून कुचिपुडी नृत्याचे प्रयोग पूर्वी या देवालयाच्या पटांगणात होत असत. पुढे त्या जागी त्यासाठीच एक रंगमंच उभारण्यात आला. विजयनगरच्या राजांचा कुचिपुडी व तत्सम इतर नाटच-नृत्यादी कला यांना आश्रय होता. पण विजयनगरच्या ऱ्हासानंतर या कलांचा

राजाश्रय सुटला व त्यांची मोठी हानी झाली. आज फक्त कुचिपुडी संप्रदाय तेवढा कुचिपुडी गावात कसाबसा तग धरून राहिला आहे.

कुचिपुडी नृत्य फक्त पुरुषच करतात. स्त्रियांना त्या नृत्यात भाग घ्यायला बंदी असल्यामुळे त्यातल्या स्त्री-भूमिकाही पुरुषांनाच कराव्या लागतात. कुचिपुडीचे प्रयोग बहुधा उघड्या पटांगणात तात्पुरत्या उभारलेल्या रंगमंचावर होतात. लोक जमा झाले, की कोन्नागी म्हणजे विदूषक रंगमंचावर प्रवेश करतो. आपल्या विनोदाने लोकांना गप्प बसविणे व त्यांची नजर खेळाकडे केंद्रित करणे, हे त्याचे मुख्य काम असते. तो निघून गेल्यावर ईशस्तवन होते. ईशस्तंवनासाठी गीतगोविंदातील एखादी अष्टपदी किंवा विनायक कवितेतील एखादी कविता म्हणतात. त्यानंतर सूत्रधार वृंदवादकासह रंगभूमीवर प्रवेश करतो. टाळ, बासरी आणि मृदग एवढीच वाद्ये व दोन पार्श्वगायक कुचिपुडीच्या साथीला असतात. त्यांपैकी टाळ सूत्रधाराच्याच हातात असतो. सूत्रधार प्रथम रामलिंगेश्वरमंदिरातील देवता बाला त्रिपुरीसुंदरी हिची प्रार्थना करतो. दशावतारी खेळातल्याप्रमाणे हा सूत्रधार खेळाच्या सुरवातीला एकदा जो रंगभूमीवर येतो तो खेळ संपेपर्यंत तिथून हालत नाही. तो पूर्वरंग आटोपतो, प्रयोगाचे कथानक सांगतो व खेळातील पात्रांचा साभिनय संवाद सुरू झाला म्हणजे स्वतः त्यांत भागही घेतो. नायिकेच्या बरोबर तो कधी नायक म्हणून तर कधी दूत म्हणून काम करतो. संवादाचे काम संपले, की पुढचे कथानक सांगण्यासाठी तो फिरून मृदंगवाल्याजवळ येऊन उभा राहतो.



उषापरिणयम् नृत्यनाटिकेतील उषा



भामाकलापम्‌मधील भामा

प्रयोगाच्या पूर्वरंगानंतर अबदागिरी व चवरी धरणारे व इतर सर्व सेवक आपली व्यवसायनिदर्शक निशाणी हातात घेऊन टाळ-मृदंगाच्या साथीवर लयबद्ध पदन्यास करीत एका बाजूने रंगमंचावर येतात व दुसऱ्या बाजूने रंगपटात निघून जातात. नंतर होतो गणपतीचा प्रवेश. सेवक वगैरे गौण पात्रे सरळ रंगमंचकावर प्रवेश करतात. परंतु देवदेवता, नायिका वगैरे मुख्य पात्रांनी रंगभूमीवर उघडा प्रवेश करू नये, असा संकेत आहे. त्यामुळे अशा पात्रांचा प्रवेश होताना एक पडदा दोन्ही बाजूंनी हातात धरून दोघे सेवक नाचतनाचत रंगमंचकावर येतात. या पड्याआडून मुख्य पात्र रंगभूमीवर दाखल होते. त्याने पड्याआडच थोडावेळ नृत्य केल्यावर सेवक तो पडदा बाजूला करतात. मग त्या पात्राचे प्रेक्षकांना समग्र दर्शन होते. पूर्वी रंगमंचकाच्या दोन्ही बाजूंना खोबरेल तेलाचे दिवे घेऊन दोघेजण उभे असत. एखाद्या प्रमुख पात्राच्या प्रवेशाच्या वेळी किंवा अटीतटीच्या प्रसंगी पड्याआडून या दिव्यावर राळ फेकीत. त्यामुळे प्रकाश एकदम भडक होई. हल्ली मात्र प्रकाशयोजनेसाठी आधुनिक साधनांचा उपयोग करतात.

या नृत्य-नाट्यातील प्रमुख पात्रे एखाद्या गाण्यावर आधारलेले लहानसे नृत्य करून आपला परिचय करून देतात, त्याला दारू असे नाव आहे. हा मुख्य खेळाचाच एक भाग असतो. दारूचे सहा प्रकार आहेत. त्यांपैकी प्रमुख दारूला पात्रप्रवेश-दारू असे म्हणतात. उदा० एखाद्या पात्राने 'भामनेसत्यभामने' असे म्हटले, की ते पात्र सत्यभामा असून खेळाचे नाव भामाकलापम् आहे, असे समजायचे. कुचिपुडीचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे पागती विशामुम् किंवा खेळातील विनोदी प्रसंग. हे प्रसंग मूळ नाटकात नसतात; तर प्रसंग पाहून आयत्या वेळी त्यात घुसडतात. नृत्यातील गंभीर प्रसंगांचा ताण कमी करण्यासाठी त्यांची योजना असते.

कुचिपुडीची वेशभूषा व नेपथ्यरचना अतिशय साधी असते. कथकळीतील पात्रांच्या रंगांची विविधता त्यात नसते. बहुतेक

सर्व पात्रांचा मुखरंग एकाच प्रकारचा असतो. पुरुषपात्रांना दाढीमिशा लावतात व स्त्रीपात्रे वेण्या घालतात. स्त्रीपात्रांचा पोशाखही साधाच असतो. सत्यभामेची रंगभूषा मात्र डोळे दिपविणारी असते. पूर्वी तत्कालीन राजघराण्यातील स्त्रिया वापरीत, ते सर्व दागिने सत्यभामेच्या भूमिकेकरिता आणीत. सांप्रत हे हलक्या लाकडापासून बनवितात व रंगीबेरंगी कागद लावून ते सुशोभित करतात. सांप्रत, भरतनाटचम्‌मध्ये नर्तकी ज्या तऱ्हेचा भरजरी व झळाळता पोषाख करतात, तसा पोषाख कुचिपुडीमध्ये रूढ होऊ पाहात आहे. कुचिपुडीतली पुरुषपात्रे धोतर, भरजरी कोट, जाकिट, मुकुट असा पोषाख करतात व अंगावर दागिनेही घालतात. कुचिपुडीचे संगीत हे शुद्ध कर्नाटक संगीत असते.



भस्मासुरमधील भस्मासुर

कुचिपुडी नर्तकसंघ वर्षातून सहा महिने गावागावात हिंडून आपले प्रयोग करतात. प्रयोगाच्या सामग्रीशिवाय त्यांच्याकडे स्वयंपाकाची भांडीकुंडीही असतात. कारण हे लोक दुसऱ्याच्या हातचे जेवीत नाहीत.

कुचिपुडीचे विषय महाकाव्ये व पुराणे यातून निवडलेले असतात. भागवतपुराण हे त्यांचे विशेष आवडते आहे. सिद्धेंद्र योग्याचे भामाकलापम् हे कुचिपुडी पद्धतीतील एक अत्यंत लोकप्रिय गीतिनाटच आहे. हे एक सर्वश्रेष्ठ शृंगारकाव्य आहे. भामा म्हणजे सत्यभामा आणि कलाप म्हणजे संवाद होय. ताल, स्वर, नृत्य या सर्वांचा यात उत्तम मेळ साधलेला आहे. या काव्यात जवळपास ८० कडवी असून प्रत्येक कडव्याचा शेवट नृत्याने होतो. या नृत्यनाटचात कृष्ण, सत्यभामा, रुक्मिणी, नारद व सखी अशी पाच पात्रे असतात. याचा संपूर्ण खेळ करायचा झाल्यास, त्याला सात रात्री लागतात. यातील सत्यभामेची भूमिका ही कुचिपुडी तंत्रातील सर्वात महत्त्वाची भूमिका समजली जाते. ही भूमिका करण्यासाठी कलावंतामध्ये चढाओढ लागलेली असते. आयुष्यात एकदा तरी ही भूमिका करीन, अशी महत्त्वाकाक्षा प्रत्येक कलावंत बाळगीत असतो. जुन्या काळातील श्रेष्ठ कलावंत हीच भूमिका करून प्रसिद्धीस आले होते.



कुचिपुडीमधील एक नृत्यमुद्रा

भामाकलापम्‌पासून स्फूर्ती घेऊन भागवत रामय्या (१९ वे शतक) याने गोल्लाकलापम् हे संगीत नाटक लिहिले. एक ब्राह्मण आणि एक गौळण यांच्यामधील हा संवाद तात्त्विक स्वरूपाचा आहे.

याशिवाय तिरुनारायणाचे प्रह्लादचरितम्, चिदंबर कवीचे उषापरिणयम्, वल्लभनेनि चौधरीचे सेशीरेखापरिणयम्, गयोपाख्यानम् व रामनाटकम्, तीर्थनारायण यतीचे रुक्मिणीकल्याणम्, कंसवधम् व रुक्मांगदचरितम् ही कुचिपुडीतील वैशिष्टचपूर्ण आख्याने होत.

वर उल्लेखलेल्या सांप्रदायिक संगीत नाटकाशिवाय कुचिपुडीत इतरही विविध नृत्य-नाटचांचा अंतर्भाव झालेला आहे. त्यात क्षेत्रय्याची पदे व त्यागराजाच्या कृती यांना महत्त्वाचे स्थान आहे. क्षेत्रय्या हा तेलुगू ब्राह्मण कुचिपुडीपासून जवळच असलेल्या मुव्वा या खेडेगावाचा रहिवासी होता. कुचिपुडी संप्रदायातील हा सर्वश्रेष्ठ पद्यकार समजला जातो. त्याने ४५०० पदे लिहिल्याचे सांगतात; पण सांप्रत त्यातली फक्त ७०० पदेच उपलब्ध आहेत. ही पदे म्हणजे शृंगारिक काव्याचा उत्कृष्ट नमुना आहे. क्षेत्रय्या हा त्याच्या गावातील गोपालाचा निस्सीम भक्त होता. त्यामुळे पदाच्या शेवटी ‘मुव्वा गोपाल’ अशी त्याची नाममुद्रा तो घालतो. त्यानंतर त्यागराजाच्या कृतीचा क्रम लागतो. कुचिपुडीत वैयक्तिक अभिनयासाठी त्यांचा उपयोग करतात. जयदेवाच्या गीतगोविंदातील अष्टपद्यांनाही कुचिपुडीत महत्त्वाचे स्थान आहे. कुठलीही एक अष्टपदी घेऊन कुचिपुडी कलाकार तिचा अभिनय करतात. पहिल्या अष्टपदीला दशावतार अष्टपदी म्हणतात. कुचिपुडी तंत्रात त्यावर खास नृत्य बसविलेले असून ते अत्यंत लोकप्रिय आहे. बहुतेक सर्व कार्यक्रमात या नृत्याचा समावेश असतो.

तीर्थनारायण यतीचे कृष्णलीलातरंगिणी हे संस्कृत साहित्यातील सर्वांत दीर्घ असे संगीत नाटक आहे. कृष्णजन्मापासून

सुरू झालेले हे नाटक रुक्मिणीविवाहाने समाप्त होते. कृष्णलीलातरंगिणीचा पहिला चरण बालगोपालतरंगम् या नावाने प्रसिद्ध असून त्यावर आधारलेले नृत्य फार लोकप्रिय आहे.

कुचिपुडी संप्रदायातील सांप्रतचे श्रेष्ठ कलावंत म्हणून पशुमूर्ती सीतय्या, चिताव्यंकटय्या, व्यंकटरामय्या, चिंतानारायणमूर्ती यांची नावे सांगता येतील. नुकतेच स्वर्गवासी झालेले वेदान्तम् लक्ष्मीनारायण शास्त्री हे कुचिपुडीचे महान आचार्य होते. त्यांचे वडील वेदान्तम् रमेशशास्त्री हेही मोठे कलावंत होते. कुचिपुडी गावाच्या ज्या ब्राह्मणांनी कुचिपुडी संप्रदाय सुरू केला, त्यांपैकी एका घराण्यात वेदान्तम् रमेशशास्त्री यांचा जन्म झाला होता. त्यांच्या नंतरचा कुचिपुडीतील दुसरा मोठा कलावंत म्हणून चिंताकृष्णमूर्ती यांचे नाव घेतले जाते. हेही कुचिपुडीचेच असून यांचे वडील व्यंकटरामय्या हे जुन्या पिढीतील एक अव्वल दर्जाचे कलावत होते. चिंताकृष्णमूर्ती यांनी पंधरा स्थानिक कलावंतांच्या साहाय्याने 'श्री व्यंकटराम नाट्यमडळी' या नावाची एक संस्था सुरू केली असून जत्रा, विवाह किंवा अन्य कोणत्याही सामाजिक उत्सवात या संस्थेचे खेळ होत असतात. [ मोहन खोकर– मार्ग, सप्टें. १९५७; सी. अखिलेश्वरी– स्त्री ( आंध्रविशेषांक ) ऑक्टो. १९६१; अजन्ता, डिसें. १९५८ ]

**कुच्चिल** एक खेळ. या खेळात वाळूच्या खड्ड्यात एखादी वस्तु लपवून ठेवायची व खेळणाऱ्यांनी ती शोधून काढायची असते. हा खेळ प्राचीन काळी आंध्रदेशात प्रचलित होता.

**कुझहल** (१) एक सुषिर वाद्य. याचा आकार बासरीसारखा असतो. द. भारतातील मेंढपाळ व गारुडी हे वाद्य वापरतात.

(२) तोरेयल लोकातील मिश्र संबंधापासून झालेली एक जात. हे लोक जेवताना पुंगीचा आवाज ऐकणे अशुभ समजतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**कुझिपंडू** केरळातील एक खेळ. हा खेळ ओणम् उत्सवात प्रामुख्याने खेळतात. त्यासाठी एक फूट खोल व सहा इंच व्यासाचे अनेक खळगे तयार करतात. प्रत्येक खळग्याजवळ एक एक खेळाडू उभा राहतो. मग एकजण चेंडू फेकतो. चेंडू खळग्यात पडला, की त्याच्या रक्षकाने तो इतरांच्या अंगावर फेकायचा. चेंडू कुणालाच लागला नाही, तर मारणाऱ्याची हार होते. एकच माणूस १२ वेळा हरला, तर त्याला चेंडूचा मार खावा लागतो. [ सो. चें. म. ]

**कुटरू** एक यज्ञीय उपकारण. हा एक दगड असतो. पाटा व वरवंटा स्वच्छ करण्यासाठी त्यांच्यावर याने ठोके मारतात. काही सूत्रांमध्ये याला वृषारव असेही म्हटले आहे. [ विद्याधरशास्त्री भिडे ]

**कुटी** पर्णशाला किंवा झोपडी. ही साधीसुधी गृहरचना असल्याने गोरगरीब अथवा ऋषि-मुनी अशा कुटीत राहत. अशा झोपड्या तीन प्रकारच्या असत. शालेसारख्या (लांब), कोष्ठासारख्या (चतुष्कोणी), व अर्धवर्तुळाकार. पानांचे किंवा वृक्षशाखांचे छप्पर असल्यास तिला पर्णकुटी अथवा पर्णशाला म्हणत. चाणक्य हा महान मुत्सद्दी एका पर्णकुटीतच राहत असे.

**कुटीचक** एक संन्यासिभेद. 'कुटचा क्लेशेन पुत्रान्नेन चकते तृप्नोति इति' = मुलाने घातलेल्या अन्नावर जो कष्टाने जगतो तो कुटीचक होय (त्रिकाण्डशेष). किंवा 'कुटचां पर्णकुटीरे चकते तृप्नोति वसतीति' = पर्णकुटीत राहतो, तो कुटीचक होय. महाभारतात याचा उल्लेख आला आहे, तो असा–

**चतुर्विधा भिक्षवस्ते कुटीचकबहूदकौ ।**
**हंसः परमहंसश्च योऽत्र पश्चात् स उत्तमः ॥**
(अनु. १४)

अर्थ – संन्याशांचे कुटीचक, बहूदक, हंस व परमहंस असे चार प्रकार आहेत. त्यांपैकी शेवटचा सर्वश्रेष्ठ होय.

**कुटुंबनियोजन** कुटुंबातल्या माणसांची संख्या योग्य मर्यादेत ठेवून संसार सुखाचा करणे,असा या शब्दाचा अर्थ आहे. यात सुप्रजाजनन व संततिनियमन या दोन्हींचा अंतर्भाव होतो. मनुष्यबळ कमी असेल, तेव्हा विपुल व सुदृढ अशा प्रजानिर्मितीसाठी प्रयत्न करावे लागतात आणि लोकसंख्या अतिशय वाढली, की प्रजोत्पादनावर नियंत्रण घालावे लागते. वैदिक युगात अन्नाची विपुलता होती व त्या मानाने मनुष्यसंख्या कमी होती. त्यामुळे आपल्याला पुष्कळ संतती व्हावी, अशीच सर्वांची कामना असे. त्यामुळेच पुत्रप्राप्तीवाचून स्वर्ग मिळत नाही, अशी धारणा निर्माण करण्यात आली. जास्तीत जास्त पुत्र उत्पन्न करणे हे प्रत्येकाचे कर्तव्य ठरले व तोच विवाहाचा मुख्य हेतू मानला गेला. (कुटुंबसंस्था पाहा)

त्या काळी बहुविवाह, नियोग, इ. प्रथांना समाजाने मान्यता दिली होती. विवाहाचे आठ प्रकार विहित मानले होते; इतकेच नव्हे तर ऋतुस्नात होताच कुमारी कन्येला स्वेच्छेने लग्न कर-

ण्याचा अधिकार दिलेला होता. अधिक प्रजोत्पादन व्हावे, हाच त्यामागचा हेतू होता. अथर्ववेदात प्रजावृद्धीसाठी अनेक मंत्र दिलेले आहेत. आपल्याला शंभर पुत्र व्हावेत, अशी प्रार्थना अनेक स्त्रिया करीत असत. सावित्रीने यमाकडे स्वतःला व आपल्या पित्याला शंभर पुत्र मागितल्याची कथा महाभारतात आहे. पुढे कालांतराने जनसंख्या इतकी वाढली, की तिच्या वाढीवर नियंत्रण घालण्याची आवश्यकता जाणत्यांना वाटू लागली. पूर्वी स्त्रीला दहा पुत्रांचा आशीर्वाद देत. त्यानंतर अष्टपुत्रा किंवा पंचपुत्रा असा आशीर्वाद देण्याची प्रथा सुरू झाली. नियोगाची चालही हळूहळू कमी झाली. महाभारतात तर असे सांगितले आहे, की तीनापेक्षा अधिक पुत्र प्रसवणे, हे धर्मशास्त्राला मान्य नाही.

तीन देवतांकडून तीन पुत्र प्राप्त झाल्यानंतर आणखी एखाद्या देवतेला आवाहन करून चौथा पुत्र उत्पन्न करण्याविषयी पण्डूने कुंतीला आज्ञा केली, तेव्हा तिने त्याला सांगितले—

**नातश्चतुर्थं प्रसवमापत्स्वपि वदन्त्युत ।**
**अतः परं स्वैरिणी स्याद् बन्धकी पञ्चमे भवेत् ।।**
(म. भा. आदि. १२३.७७)

अर्थ – आपत्कालातही चौथ्या पुत्राची कामना धरू नये, असे सांगितले आहे. चौथ्या पुत्राला जन्म देणारी स्वैरिणी व पाचव्याला जन्म देणारी बन्धकी ठरते.

प्राचीन काळी धर्मशास्त्राला अनुसरून समाजव्यवस्थेचे नियम केले जात. धर्मशास्त्राचे नियम युगमानाप्रमाणे बदलत असत. लोकसंख्या कमी होती तेव्हा अधिक संतती उत्पन्न करणे, हा धर्म मानला जात होता. पण लोकसंख्या फार झाली तेव्हा प्रजोत्पादन कमी व्हावे, म्हणून नियम करण्यात आले. पौराणिक कथांवरून असे कळते, की लोकसंख्या अतिशय वाढून तिच्या भारामुळे त्रस्त झालेल्या पृथ्वीने अनेक वेळा तो भार हलका करण्याविषयी परमेश्वराची प्रार्थना केली आहे आणि तिची दया येऊन भूभार कमी करण्यासाठी परमेश्वराने अवतार घेतले आहेत. जनसंख्या फार वाढली, की कोणत्या तरी मार्गाने जनसंहार होतो, अशी भारतीय लोकांची श्रद्धा आहे. महायुद्धे, रोगराई, महापूर, वादळे, अग्निप्रलय, इ. निसर्गप्रकोप हे लोकसंख्येचे नियंत्रण करण्यासाठीच होतात, ही कल्पना अनेक लोककथांमध्ये आढळते (एम्. भारती– त्रिपथगा, ऑक्टो. १९६२).

अशा प्रकारे प्राचीन संस्कृत साहित्यात कुटुंबनियोजनासंबंधी काही तुरळक विचार आढळत असले, तरी त्यात या विषयाचा सर्वांगीण विचार केलेला नाही. प्राचीन आयुर्वेदीय ग्रंथांतही संततिनियमन या कल्पनेचा स्वीकार किंवा शास्त्रीय विचार झाला होता, असे म्हणता येत नाही. चरकसंहितेत वाजीकरणाचे उपाय सांगितले असून अपत्यप्राप्तीची महती गायिली आहे. ज्याचा वंशविस्तार झाला, असा मनुष्य श्रेष्ठ असून अपत्यामुळे बल, सुख, यश, तुष्टी, इ. गोष्टींचा लाभ होतो, असे चरक सांगतो. कामोत्तेजक औषधिप्रयोग, शुक्रवृद्धीसाठी उपाय व कामोत्तेजक वातावरण यांचे वर्णन चरकसंहितेत केलेले आहे. आरोग्ययुक्त, प्रिय व पवित्र अशा वातावरणात स्त्री-पुरुषसमागम झाला, तर चांगली प्रजा निर्माण होते, असेही चरकाने प्रतिपादिले आहे. संयोगपूर्वकाळी स्त्री-पुरुषांनी कोणती पथ्ये पाळावी, गर्भाधान पवित्र मंत्रांनी कसे करावे, पुत्रप्राप्तीसाठी पुंसवनविधी कसा करावा, इ. विषयांची चर्चाही चरकाने केली आहे.

चरक, सुश्रुत वगैरे प्राचीन आचार्यांनी संततिनियमनाची आवश्यकता प्रतिपादिलेली नाही. मध्ययुगातील (इ. स. १४००-१७००) काही आयुर्वेदीय ग्रंथांमध्ये संततिनियमनाचे उपाय क्वचित सांगितलेले आढळतात. ऋतुसमयी पिंपळी, वावडिंग, टाकणखार ही औषधे दुधातून किंवा जास्वंदीच्या फुलांचा कल्क कांजीतून घेतल्यास गर्भधारणा होत नाही, असे भावप्रकाश, योगरत्नाकर, इ. ग्रंथांत सांगितले आहे. याशिवाय अनेक संततिनिवारक योग भिन्न भिन्न ग्रंथांत दिलेले आहेत. पण ते गर्भपातक व स्त्रीला अपायकारक असेच आहेत. गर्भपातनाचा चोरटा व्यवसाय करणारे वैदू त्यांचा अवलंब करतात. स्वैराचारी लोकांनाही अशा उपायाचा उपयोग होतो. मात्र प्राचीन आयुर्वेदाचार्यांनी असल्या व्यवहाराला संमती दिलेली नाही.

इ. स. १७९८ मध्ये माल्थस नामक पंडिताने प्रथम लोकसंख्येचे नियमन करण्याची आवश्यकता प्रतिपादिली. प्रजा भूमितीश्रेढीने वाढते, तर अन्न गणितश्रेढीने वाढते; तेव्हा लवकरच अशी वेळ येईल, की माणसांना खायला अन्न पुरणारच नाही. ही आपत्ती टाळण्यासाठी लोकसंख्येच्या वृद्धीवर नियंत्रण घालणे अत्यंत आवश्यक आहे, असे माल्थसने सांगितले.

पूर्वी रोगराई, दुष्काळ, इ. आपत्तींमुळे लोकसंख्येवर आपोआप नियंत्रण पडे. शिवाय अनेक देशात बालहत्येची चाल होती. हल्ली विज्ञानाने मनुष्याला रोगराई व दुष्काळ यांपासून बचावले आहे व बालहत्येची चालही बंद झाली आहे. त्यामुळे काही देशांतील लोकसंख्या आता पूर्वीपेक्षा पाचपटींनी वाढली आहे.

अलिकडे संततिनियमनाची चांगली साधने सापडली आहेत. पण ती वापरण्यास मनाची अनुकूलता आणि ती विकत घेऊन नियमितपणे वापरणे, या गोष्टी समाजातल्या सुशिक्षित माणसांनाच शक्य होतात. अज्ञ व्यक्तींना ते पटतही नाही व जमतही नाही. त्यामुळे सुशिक्षित व सुसंस्कृत लोकांची प्रजा

तेवढी कमी होऊ लागली आहे. अज्ञ व मंद लोकांची प्रजा पूर्वीप्रमाणेच वेगाने वाढते आहे. त्याचा परिणाम म्हणून समाजाची अधोगती होत असल्याची लक्षणे दिसू लागली आहेत. तेव्हा या बाबतीत मानवाने हात घालणे चूक आहे, असे काही पंडितांचे मत बनले आहे. रोगराई, दुष्काळ ही निसर्गाची नियमने योग्य आहेत. त्यांना प्रतिबंध करण्यामुळे समाजाची हानी होते, असे या पंडितांचे म्हणणे आहे.

आज या विषयावर अनेक विचार आपणास ऐकायला मिळतात. अन्नोत्पादनाचे प्रमाण शास्त्रीय शोधांमुळे पुष्कळ वाढले आहे, म्हणून वाढत्या लोकसंख्येला पुरेसे अन्न निर्माण करणे शक्य आहे, असे काही शास्त्रज्ञ म्हणतात. अन्न हवे तेवढे आहे; पण त्यांचे वाटप योग्य रीतीने होत नाही आणि म्हणून सर्व दुःख आहे, असे काही अर्थशास्त्रज्ञ प्रतिपादितात. संततिनियमन सर्वांनी मान्य केले, तर सर्व देशच नष्ट होईल, असे भय आणखी काही विचारवंत व्यक्त करतात. आपल्याप्रमाणे शेजारच्या राष्ट्राने नियमन केले नाही, तर त्याचे मनुष्यबळ वाढेल व त्या देशाशी युद्धाचा प्रसंग आल्यास आपला पराजय होईल असे काही राजकारणी लोकांचे मत आहे. धार्मिक दृष्टीने हे एक पापकृत्य आहे, अशी धर्मनिष्ठ लोकांची भावना आहे. पण जीवशास्त्र व सुप्रजाजनन शास्त्र यांच्या दृष्टीने विचार करून, कुटुंबनियोजन कोणत्याही काळी आवश्यक आहे, असा निष्कर्ष बहुतेक पंडितांनी काढला आहे. संख्यानियमन निसर्गावर सोपविणे युक्त नाही, कारण निसर्ग आंधळा असतो व त्याला युक्तायुक्तविवेक नसतो. म्हणून शास्त्राच्या आधारे मानवानेच ती व्यवस्था स्वतः केली पाहिजे; तरच भावी पिढी सुदृढ व कार्यक्षम होईल. राष्ट्राला प्रजा कमी करायची असेल, तेव्हा संततिनियमन तर आवश्यक आहेच; पण संख्या वाढवायची असली तरीही ते आवश्यक आहे. कारण जास्ती मुले होऊन त्यातील जितकी जगतात, त्यापेक्षा कमी मुले होऊन त्यातली अधिक जगतात. म्हणजे दहांपैकी चार मुले जगली तर सातांपैकी पाच जगतात. कारण दोन अपत्यांमध्ये कालाचे अंतर जास्त असेल, तर मातेची प्रकृती चांगली राहून ती अपत्यसंगोपन योग्य प्रकारे करू शकते.

राष्ट्राच्या संरक्षणासाठी लोकसंख्या वाढविणे, हा उपाय भ्रामक आहे. कारण या विज्ञानयुगात केवळ मनुष्यबळ निर्णायक ठरत नाही. अन्नाचा योग्य पुरवठा नसताना प्रजा वाढू देणे युक्त नव्हे. त्यामुळे युद्ध अपरिहार्य ठरते आणि युद्धात शूर, धाडसी व तरुण पुरुष तेवढेच मारले जातात व देशात दुर्बलांचे प्रमाण वाढते.

अशा प्रकारे सर्व दृष्टींनी विचार करता लोकसंख्येच्या वाढीवर नियंत्रण घालणे, हेच श्रेयस्कर आहे आणि त्यासाठी कुटुंबनियोजनाचीच कास धरणे अपरिहार्य आहे. मात्र हे कुटुंबनियोजन योग्य रीतीने व्हावे, अशी दक्षता अवश्य घेतली पाहिजे. [ शं. ग. वर्तक; वि. स. र. ]

## कुटुंबसंस्था

कुटुंब शब्दाचा अर्थ पत्नी, घर व घरांतली माणसे, असा दिलेला आहे. मराठी व्युत्पत्तिकोशात याविषयी पुढील विवेचन आहे— 'हा शब्द आस्ट्रोएशियाटिक असल्याचे प्रिझुलुस्की सांगतो. या शब्दाच्या अर्थात बराच फरक झाला आहे. त्याचे संस्कृतीकरण दोनदा झालेले दिसते. कु+स्तुंब > कुटुंब. कुटुंब शब्द पुनः संस्कृतमध्ये तत्सम म्हणून सामावला. प्रथम जमिनीची मशागत करणारा, त्यावर निर्वाह करणारी माणसे, स्त्री, मुले-बाळे-पत्नी अशी अर्थाची परंपरा आहे.

स्त्री-पुरुषांची जोडी व त्यांची मुले यांनी एकत्र राहावे, पुरुषाने निवारा व अन्नपाणी मिळवून देऊन स्त्रीचे व मुलांचे रक्षण करावे आणि स्त्रीने पुरुषाचे आराधन व मुलांचे संगोपन करावे, ही प्रथा प्राचीन काळापासून मानवी समूहात आढळून येते. अशी व्यवस्था पशुपक्ष्यांच्याही काही जातीत दिसते. मानवाची ज्यामधून उत्क्राती झाली असे समजतात, त्या वानरांमध्येही अशी प्रवृत्ती आढळते. यावरून ही प्रवृत्ती नैसर्गिक आहे आणि मानवजातीच्या आदिम अवस्थेपासूनच माणसात अशी कुटुबव्यवस्था अस्तित्वात असावी, असे काही शास्त्रज्ञांचे मत आहे. पण याविरुद्ध मत लुई मार्गन याने प्रतिपादिले आहे. तो म्हणतो— 'आदिमानवाला कुटुबसंस्था माहीत नव्हती. मानवांचा समूह एकत्र राहत होता व त्यातील स्त्री-पुरुषाचे लैंगिक संबंध स्वैर होते. त्या आदिम काळी प्रजोत्पादनात पुरुषाचा भाग किती असतो, याची स्पष्ट कल्पना माणसाला नव्हती. त्यामुळे ही माझी प्रजा अशी भावना पुरुषाच्या मनात असणे शक्य नव्हते. स्त्रीसमागमातले विषयसुख घेतल्यानंतर त्याच्या परिणामांची जबाबदारी त्या काळात पुरुषावर पडत नसे. अशा प्रकारच्या स्वैर संबंधाच्या जागी विवाहप्रथेचा उदय केव्हा झाला, ते निश्चित सांगता येत नाही.'

मात्र तो कसा झाला असेल, याची कल्पना करता येते. एखाद्या पुरुषाला विशिष्ट स्त्रीविषयी आकर्षण वाटू लागले व तिच्यावर त्याचे प्रेम बसले, की तिने दुसऱ्या पुरुषाशी समागम करू नये, असे त्याला वाटणे साहजिक आहे. तिने तसे केले, तर त्या दुसऱ्या पुरुषाविषयी या पहिल्या पुरुषाला मत्सर वाटू लागतो. ती स्त्री केवळ आपल्यासाठी असावी, अशी त्याच्या मनात भावना निर्माण होते. त्या स्त्रीलाही तसेच

वाटू लागले, तर ती दोघे एकमेकांशी निष्ठेने वागू लागतात. स्त्री–पुरुषांची एकनिष्ठा आणि त्यांच्या संबंधाचा शाश्वतपणा ही ज्या नात्यात प्रधान मानली जातात, तो विवाह होय. म्हणजे मत्सर किंवा असूया या भावनेतूनच विवाहसंस्थेचा जन्म झाला असावा.

केवळ वैषयिक भूक भागविण्यासाठी विवाहाची आवश्यकता नसते. सुप्रजेचे उत्पादन हा विवाहाचा दुसरा हेतू सांगितला जातो. पण जीवशास्त्राच्या दृष्टीने विचार केला, तर विवाहाचा व सुप्रजेचा मेळ बसत नाही. चांगल्या गुणांनी युक्त अशी प्रजा निर्माण करण्यास योग्य असे स्त्री-पुरुष थोडेच सापडतील. अनुरूप स्त्री-पुरुषांचा विवाह झाला, तरी त्यांना चांगली मुले होतीलच असे नाही.

पण विषयवासनेच्या तृप्तीसाठी किंवा सुप्रजेसाठी विवाहसंस्थेची जरुरी नसली, तरी त्यापेक्षाही श्रेष्ठ अशा ज्या एका सुखाची मानवी मनाला भूक असते, त्यासाठी विवाहाची आवश्यकता असते. मानवी मनाचा असा एक धर्म आहे, की आपल्या आणि केवळ आपल्याच सुखदुःखाची काळजी घेणारी, केवळ आपल्या एकट्याच्याच उत्कर्षाने हर्ष व अपकर्षाने खेद पावणारी कोणीतरी व्यक्ती असावी, असे त्याला वाटते. आपण मेलो तर समाज क्षणभरच हळहळेल; पण आपल्या मृत्यूमुळे 'आता जीवनात काही अर्थच उरला नाही,' असे वाटण्याइतके दुःख जिला होईल, अशी एखादी व्यक्ती असेल तरच माणसाला जगण्यात खरा आनंद वाटतो. आपल्यावर कोणाची तरी अनन्यसामान्य भक्ती आहे, ही जाणीव सुखप्रद तर आहेच; शिवाय मानवाच्या सर्व कर्तृत्वाचे ते उगमस्थानही आहे. पण अशी व्यक्ती समानलिंगी असून चालत नाही. पुरुषाला स्त्री व स्त्रीला पुरुष हवा असतो. मनोमीलन होण्यासाठी शरीरसंबंधाचीही आवश्यकता असते. मानवाच्या या विशिष्ट मनोधर्मातच विवाहसंस्थेचे बीज आहे.

विवाहसंस्थेच्या मुळाशी जे तत्त्व आहे, तेच गृहसंस्थेच्याही मुळाशी आहे प्रजेचा विचार करताना, उत्पन्न होणारी प्रजा ही सुप्रजा असावी, एवढीच समाजाची अपेक्षा असते; पण व्यक्तीची आकांक्षा व दृष्टी याहून भिन्न असते. आपल्याला पुत्र असावा आणि तो रूप–गुणांनी जरी कमी प्रतीचा असला, तरी त्याच्याच पालनपोषणाची आपण काळजी घ्यावी, ही भावना मानवाच्या ठिकाणी प्रबळ असते. या भावनेमुळेच पुरुष, त्याची पत्नी व त्यांची मुले, यांचे जे वेगळे अस्तित्व निर्माण होते तेच कुटुंब होय. मी, माझी पत्नी आणि माझी मुले हेच कुटुंबसंस्थेचे मूलसूत्र आहे.

मी चिरंतन राहावे, अमर व्हावे अशी माणसाला स्वाभाविक इच्छा असते; पण मानवाच्या भौतिक देहाला अमर करणारे असे रसायन अद्यापही उपलब्ध झालेले नाही. मात्र विवाह करून संततिरूपाने वंशसातत्य राखणे व त्या रीतीने अमर होणे, हा उपाय मानवाला सापडला आहे. यालाच प्रजामृतत्व असे म्हटले आहे. वसुश्रुत आत्रेय अग्नीची प्रार्थना करीत असता म्हणतो—

**प्रजाभिरग्ने अमृतत्वमश्याम् ।**

(ऋ. ५. ४. १०)

अर्थ–हे अग्ने, मी पुत्र-पौत्रांच्या योगाने अमृतत्व प्राप्त करून घेईन.

या वंशसातत्यासाठी पृथक कुटुंबाची आवश्यकता असते. वैदिक युगापासूनच भारतात कुटुंबसंस्था स्थापित झालेली दिसते. वैदिक ऋषींनी कुटुंबसंस्थेचे विशेष महत्त्व मानले आहे. विवाह करून प्रजोत्पादन केल्याशिवाय मनुष्याला पूर्णत्व येत नाही, असे शतपथात म्हटले आहे (श. ब्रा. ५. २. १. १०). प्रत्येक मनुष्य ऋणत्रय शिरावर घेऊनच जन्माला येतो. त्यात एक पितृऋण असते व प्रजोत्पादन केल्यावाचून ते फिटत नाही (बौ. ध. सू. २. ९. ७–८). विवाहामुळे पुत्रप्राप्ती, धर्माचरण व रतिसुखाचा लाभ हे तीन्ही उद्देश सफल होतात. कुटुंबसंस्थेमुळे केवळ वंशरक्षणच होते असे नव्हे, तर कुटुंबात मुलाच्या व्यक्तित्वाचीही जोपासना होते. प्रेम, दया, स्वार्थत्याग, परोपकार, इ. गुणांचे संस्कार मुलांच्या मनावर करण्यासाठी गृहसंस्था हे एकमेव साधन आहे. माता, पिता, भाऊ, बहीण, इ. नाती व प्रेममय वातावरण मिळाल्याशिवाय मनुष्याच्या मनाची योग्य वाढ होत नाही. याच्या उलट परिस्थितीत मानवी मन निराश, निरानंद, निरुत्साही व कर्तृत्वशून्य बनते. विशिष्ट कुटुंबात विशिष्ट गुणांचा प्रकर्ष दिसतो. ते गुण पुत्रपौत्रपरंपरेने पुढील संततीला लाभतात व त्यामुळे सामाजिक परंपराही अविच्छिन्न राहतात.

श्रुतिस्मृतिपुराणोक्त अशी जी हिंदू कुटुंबपद्धती आहे, तिची लक्षणे अशी — सयुक्त कुटुंबव्यवस्था, एकत्र वास्तव्य, एका चुलीवर स्वयंपाक, पितृसत्ता, पैतृक संपत्तीवर सर्वांची सामायिक मालकी, सर्वांना तिच्या उपभोगाचा हक्क व धार्मिक सहकार्य.

पितृसत्ताक कुटुंबपद्धतीत कुटुंबातला सर्वांत मोठा पुरुष हा कुटुंबप्रमुख असतो. त्याचे पुत्रपौत्रादी औरस वा दत्तक वंशज व त्यांच्या स्त्रिया हे सर्व घटक त्याची कुटुंबसत्ता मानतात. केवळ आर्थिक बाबतीतच नव्हे; तर धार्मिक, सामाजिक, नैतिक, इ. सर्व व्यवहारात कुटुंबप्रमुख हाच जबाबदार असतो. कुटुंबाच्या पालनपोषणाची जबाबदारी त्याच्यावरच असते. इतर पुरुष त्याच्या आज्ञेप्रमाणे चाकरी किंवा कामधंदा करून

त्याला मदत करतात. कुटुंबसंस्थेत सर्वांची कमाई एकत्र येते व तिचा उपयोग सर्वांसाठी योग्य त्या प्रमाणात केला जातो.

संयुक्त कुटुंबपद्धतीचे अनेक फायदे आहेत. या पद्धतीने अनेक माणसांचा चरितार्थ थोडक्या खर्चात भागतो. बेकार पुरुषानाही पोटाची विवंचना पडत नाही. अडीअडचणीत हक्काचे मनुष्यबळ मिळते. आई आजारी पडली, तर चुलत्या वगैरे स्त्रिया कुटुंबातच असल्यामुळे मुलांची आबाळ होत नाही. हे या संयुक्त कुटुंबपद्धतीतले फायदे असले, तरी तिचे काही तोटेही आहेत. अशा कुटुंबातील माणसांत परस्परांबद्दल जिव्हाळा व प्रेमभाव राहतोच असे नाही. कुटुंबात एकाच पुरुषाची सत्ता चालत असल्यामुळे इतरांना आपले कर्तृत्व दाखवायला संधी मिळत नाही. त्यामुळे सर्वांच्या व्यक्तित्वाचा विकास होत नाही. अशा कुटुंबातल्या स्त्रिया गृहकृत्यात प्रवीण होतात; पण स्वतंत्रपणे संसार करण्याचे शिक्षण त्यांना मिळत नाही. संयुक्त कुटुंबात दांपत्यप्रेम सर्वांगी विकसित व्हायला अनुकूल वातावरण नसते. मोठ्या माणसांचा सदैव डोळा असल्यामुळे तरुण पति-पत्नींना परस्परांशी मोकळेपणे बोलता-वागता येत नाही.

अशा प्रकारची ही संयुक्त कुटुंबव्यवस्था भारतात वैदिक युगापासून गेल्या शतकापर्यंत अबाधितपणे चालू होती. विसाव्या शतकात यंत्रयुगाच्या प्रभावामुळे सामाजिक व आर्थिक परि-स्थिती बदलली आणि कुटुंबे संयुक्त होती, ती विस्कळित होऊन विभक्त बनली. आई-बाप एका ठिकाणी, त्यांचा एक मुलगा दुसऱ्या ठिकाणी, दुसरा मुलगा तिसऱ्या ठिकाणी, अशी पांगा-पाग होऊन कुटुंबे छोटी छोटी बनली.

सांप्रतच्या छोटया कुटुंबात पति–पत्नी व त्यांची मुले एव-ढ्यांचाच प्रामुख्याने समावेश होतो. या छोटया संसारासाठी संयुक्त कुटुंबाच्या तुलनेने खर्च अधिक होतो; पण अशा कुटुं-बात जिव्हाळा व खेळीमेळीचे वातावरण नांदते. या विभक्त पद्धतीत प्रत्येक स्त्री-पुरुषाला स्वतंत्रपणे आपली कर्तबगारी दाखविता येते; तसेच स्वतःच्या मुलांची जोपासना स्वतंत्र बुद्धीने करणे शक्य होते.

दक्षिणेत कुटुंबसंस्थेचा दुसरा प्रकार आहे, तो म्हणजे मातृ-सत्ताक कुटुंब हा होय. या कुटुंबसंस्थेत स्त्री ही प्रमुख असते व तीच सर्व संपत्तीची मालकीण असते. तिचा वारसा तिच्या मुलीकडे जातो. मुलीच वंश चालवितात. कुटुंब म्हणजे आई, मुले व बहिणी. अशा कुटुंबात पतीला फारसे महत्त्व नसते. पत्नीच्या भरण-पोषणाची जबाबदारीही पतीवर नसते.

सिंध-पंजाबमधील प्राचीन सिंधुसंस्कृतीत मातृप्रधान कुटुंब-व्यवस्था असावी, असे कित्येक पंडितांचे अनुमान आहे. द. भारतात आर्यांचा प्रवेश होण्यापूर्वी तेथील द्रविडांची संस्कृती मातृसत्ताकच होती. आजही दक्षिणेतील नायरांत त्या पद्धतीचे अस्तित्व आढळते.

भारतीय समाजरचनेत कुटुंब, जात व भाषिक विभाग यांचा आजवर तरी निकट संबंध होता. कुटुंबातील सारी माणसे एकाच जातीची असत. जातीबाहेर लग्नसंबंध होत नसत. जातीच्या विस्ताराची कमालमर्यादा भाषिक प्रदेशाएवढीच असे.

उ. भारतात याहून एक विशिष्ट कुटुंबपद्धती आहे. प्राचीन काळी या कुटुंबपद्धतीतले नातेवाईक स्वक व श्वशुरक असे दोन प्रकारचे असत. स्वक म्हणजे रक्ताचा संबंध असलेले लोक व श्वशुरक म्हणजे लग्नसंबंधामुळे झालेले नातेवाईक होत. लग्न कोणाशी करावे व कोणाशी करू नये, याचे नियम कडक होते. ब्राह्मण सगोत्र व सपिंड विवाहाचा निषेध पाळीत. क्षत्रिय हे घराण्याला विशेष महत्त्व देत. स्वतःच्या प्रदेशा-बाहेर मुली देण्याचा व बाहेरून मुली आणण्याचा प्रघात नसे. पुरुषप्रधान कुटुंबपद्धतीत कुळाच्या कल्याणाचे साधन म्हणून स्त्रीकडे पाहिले जाई. स्वकांचे सर्जन, संगोपन व शुश्रूषा हेच स्त्रीचे कर्तव्य मानीत. तिला कुटुंबात स्वतंत्र व्यक्तिमत्त्व नव्हते. कुटुंबप्रमुख सोडल्यास अन्य पुरुषांनाही स्वतंत्र व्यक्ति-मत्व नसे. पिता, पुत्र, बंधू, पती, या नात्यांची कर्तव्ये पार पाडणे, एवढीच त्यांच्या कर्तृत्वाची कक्षा मर्यादित होती.

द्राविड लोकांची कुटुंबपद्धती याहून वेगळी आहे. द्राविडात गोत्रकल्पना नसून देवकाची (Totem) कल्पना आहे. देवक म्हणजे कुळी असे समजायलाही हरकत नाही. त्यांच्यांत रक्ताची नाती व लग्नाची नाती निराळी नसतात.

राजस्थान, गुजरात, ओडिसा, महाराष्ट्र हे उत्तर व दक्षिण यांच्यामधले प्रदेश होत. या प्रदेशात आर्य व द्रविड या दोन्ही संस्कृतींचा संगम झालेला दिसतो आणि त्यातही भिन्न भाषि-कांत दोन संस्कृतींची भिन्न मिश्रणे आढळतात. इतकेच नव्हे; तर एकभाषिक प्रांतांतही जातिपरत्वे भिन्न रूढी दिसतात.

आजमितीस सगळ्या जगातलीच कुटुंबसंस्था हळूहळू ऱ्हास पावताना दिसत आहे. श्री. रसेल या पाश्चात्य विद्वानाने त्याची कारणे दिली आहेत, ती अशी—

(१) स्त्रीच्या व्यक्तित्वाचा विकास (२) स्त्रीला मिळा-लेले आर्थिक स्वातंत्र्य (३) स्त्री-पुरुष समागम होऊनही गर्भ-संभव टाळण्याची शक्यता (४) विवाहविच्छेदाची सुलभता व (५) पुरुषाच्या द्रव्यार्जनाला उशीरा होणारी सुरवात. या-शिवाय धर्मशैथिल्य, प्रवासांच्या वेगात वाढ, शिशुसंगोपन व मुलांचे शिक्षण यांची जबाबदारी सरकारने घेणे, इ. कारणेही

अनेकांनी सांगितली आहेत. ही कारणे म्हणजे कुटुंबसंस्थेला लागलेले सुरुंगच होत. हजारो वर्षे स्थिरपद झालेली ही संस्था पुढील पाच-पन्नास वर्षांत नामशेष होईल की काय, अशी भीती पुष्कळांना वाटू लागली आहे.

युरोपातल्या अनेक पंडितांना कुटुंबसंस्था ही अत्यंत आवश्यक वाटते. काहींच्या मते ती मोडायचे कितीही प्रयत्न झाले, तरी ती मोडणार नाही. कारण ती मानवी स्वभावाशी अत्यंत निगडित आहे. विवाहसंस्था म्हणजेच पर्यायाने कुटुंबसंस्था मोडणे हे मुळीच हितप्रद नसून ती मोडली तर अपत्यसंगोपन नीट होणार नाही व पुरुषही कर्तृत्वशून्य होतील, असे रसेल म्हणतो.

पण वस्तुस्थिती मात्र अशी आहे, की पाश्चात्य देशात कुटुंबसंस्था ढासळत आहे व त्याचे दुष्परिणामही स्पष्ट दिसू लागले आहेत. कुटुंब भग्न होऊन पत्नी व मुले दुरावल्यामुळे जो मनस्ताप होतो, तो असह्य होऊन पुष्कळांना वेड लागलेले दिसते. प्रतिवर्षी अशा वेड्यांची व मानसिक रुग्णांची संख्या वाढते आहे. मुलांच्या मनावरही त्याचा परिणाम होऊन बालगुन्हेगारी बोकाळली आहे. यंत्रयुगाच्या प्रभावाने भारतीय समाजरचनाही बदलली असून, त्यामुळे इथल्या कुटुंबसंस्थेला विघातक अशा अनेक विरोधी शक्ती निर्माण झाल्या आहेत. देशात मोठमोठी गिरणगावे उभी राहिली आहेत; खेड्यांतील शेतकरी बायकामुलांना गावी ठेवून नोकरीसाठी तिकडे धाव घेत आहेत. शहरांत सहकुटुंब राहणाऱ्यांनाही कौटुंबिक सुख मिळत नाही. कारण बायको, मुले सर्वचजण भिन्न वेळी व भिन्न ठिकाणी कामाला जातात. शहरातील बकाली वातावरणात कुटुंबजीवनाला कसलाच अर्थ उरला नाही. याशिवाय दारू, जुगार, इ. व्यसनांमुळे माणसामाणसांतले सौहार्द नष्ट झाले आहे. अशा प्रकारे शेतकऱ्याचा कामकरी होताच त्याचे कौटुंबिक जीवन संपुष्टात आले आहे. बेकारी व महागाई यांमुळे सुशिक्षित मध्यमवर्गावरही तीच आपत्ती कोसळू लागली आहे. मध्यमवर्गात स्त्रीशिक्षणाचा प्रसार झाल्यामुळे स्त्रीच्या व्यक्तित्वाचा प्रश्न निर्माण होऊन, त्या बाजूनेही कुटुंबसंस्थेवर आघात होत आहेत.

कुटुंबसंस्था हा मानवाच्या मानवत्वाचा व सर्व उत्कर्षाचा पाया आहे. त्याग, सेवावृत्ती, प्रेम, भक्ती, उदारदृष्टी, विवेक, संयम, इ. अनेक सद्‌गुणांचे शिक्षण व संवर्धन या संस्थेत होत असते. म्हणून समाजाने या संस्थेला स्वतःचा प्राण समजून जपले पाहिजे.

गेल्या शे-दीडशे वर्षांत समाजाच्या स्थितीत, मानवी मनोभावांत व नैतिक मूल्यांत इतका बदल झाला आहे, की जुन्या तत्त्वावर आधारलेली कोणतीही संस्था यापुढील काळात टिकून राहणे अशक्य आहे. म्हणून कुटुंबसंस्था टिकवायची असेल, तर यापुढे ती विज्ञानाधिष्ठित करायला हवी. मानसशास्त्र, सुप्रजाजननशास्त्र, आरोग्यशास्त्र व अर्थशास्त्र यांना संमत नसलेली बंधने कितीही पवित्र व श्रुति-स्मृति-पुराणोक्त असली तरी ती देश-काल-विज्ञानाला अनुरूप अशी बनवून घेतल्याशिवाय कुटुंबसंस्थेचा तरणोपाय नाही. **पाहा–** विवाह संस्था. [एन्सा. रि. ए.; हिं. प. मी.; वि. म. र.; म. जी.]

## कुट्टगणित

गणिताचा एक प्रकार. ब्रह्मगुप्ताने याचा आविष्कार केला होता. कुट्टगणितातील अंक व अक्षरे दगडावर कोरीत व त्यांच्या आधारे ज्योतिषातील शुभाशुभ फलांचा विचार करीत. [ह. च. सां. अ.]

## कुट्टनीमत

एक संस्कृत प्रणयकाव्य. दामोदर गुप्त हा याचा कर्ता असून, तो काश्मीरच्या जयापीड राजाचा (इ. स. ७७९ ते ८१३) अमात्य होता, असे राजतरंगिणीत म्हटले आहे. या काव्याचे नाव चमत्कारिक असले, तरी त्यातील विषय फार मनोरंजक आहे. विनोद आणि शृंगार असे त्याचे संमिश्र स्वरूप आहे काव्याचे कथानक मात्र अत्यल्प आहे; ते असे—

मालती नावाच्या एका तरुण वेश्येकडे रसिक आकृष्ट होत नव्हते. म्हणून तिने विकराला नावाच्या कुट्टनीकडे याबाबत सल्ला विचारला. कुट्टनीने मग हारलता, मंजरी वगैरे वेश्यांनी प्रियकरांना आपल्याकडे आकर्षून घेऊन त्यांचे सर्वस्व कसे हरण केले, त्याची उदाहरणे तिला सांगितली व चिंतामणी नामक मोठ्या अधिकाऱ्याला वश करून घेण्याचा तिला सल्ला दिला.

या सर्व वर्णनात विनोद, परिहास, प्रणय, कामशास्त्र व एकंदर समाजाचे ज्ञान या गोष्टी भरपूर आढळतात. कामशास्त्र व वैशिक कला यांच्या अध्ययनाचा परिपाक कुट्टनीमतात झालेला दिसतो. या काव्यात हर्षाच्या रत्नावली नाटकाचा सारांश आलेला आहे. आपले काव्य जो मननपूर्वक वाचील, त्याला धूर्त, विट व वेश्या फसवू शकणार नाहीत, अशी हमी शेवटी कवीने दिली आहे.

हे काव्य साहित्यिक दृष्ट्या उच्च प्रतीचे आहे. अनेक साहित्यशास्त्रज्ञांनी आपल्या ग्रंथांत यातील पद्ये उद्धृत केली आहेत. संस्कृत साहित्यात विनोद फारसा आढळत नाही; त्यामुळे दामोदरगुप्ताच्या विनोद निर्माण करणाऱ्या प्रतिभेबद्दल विशेष कौतुक वाटते. [सं. सा. सो. इ.]

**कुट्टापरान्तक** अपरान्त म्हणजे कोकण. कुट्ट हा शब्द कुडाळ या अर्थी आहे. प्राचीन काळी अपरान्ताचे जे अनेक भाग होते, त्यापैकी एकाला हे नाव होते. सांप्रत तोच भाग कुडाळदेश या नावाने ओळखला जातो. पाहा— कुडाळदेशकर ब्राह्मण. [ म. ज्ञा. को. ]

**कुट्टालम्** द. भारतातील तेन्काशीजवळ तिरुकुट्टालम् नामक एक पर्वतश्रेणी आहे. तिच्या तीन शिखरांना त्रिकूट मलय म्हणतात. त्या ठिकाणी एक जलप्रपात आहे, त्याला कुट्टालम् असे नाव आहे. हे एक तीर्थस्थान मानले



कुट्टालेश्वरमंदिर – कुट्टालम्

जाते. इथे कुट्टालेश्वराचे मंदिर आहे. दुसरे एक चित्रसभा नावाचे मंदिर आहे, ते काष्ठशिल्पाबद्दल प्रसिद्ध आहे. इथे शिवाने नृत्य केल्याचे सांगतात. [ एन्. रामकृष्ण – धर्मयुग, १७ जुलै १९६० ]

**कुट्टालक कुरवंजी** तमिळ भाषेतील एक नृत्य-नाट्यात्मक आख्यान. तिरिकूट राजप्पक कविरायर याने १८ व्या शतकाच्या सुरवातीला हे लिहिले असून उपलब्ध कुरवंजी साहित्यात हे सर्वांत जुने आहे. वाङ्मयीन दृष्ट्या हे काव्य वरच्या दर्जाचे आहे. पूर्वी या नृत्यनाट्याचे अनेक प्रयोग होत असत. याचा प्रयोग असा—

सुरवातीला एक दूत रंगमंचावर प्रवेश करतो आणि तिरिकूटनाथरच्या म्हणजे शिवाच्या मिरवणुकीचे पद्यात वर्णन करतो. नंतर नायिकेच्या सख्या प्रवेश करतात व शिवाचे माहात्म्य वर्णितात. मग नायिका वसंतवल्ली चेंडू खेळत रंगमंचावर प्रवेशते. सख्याही तिच्या खेळात सामील होतात. वसंतवल्ली दुरूनच शंकराची भव्य मिरवणूक पाहते. ती शिवाच्या सौंदर्यावर मोहित होते व कामविव्हल होऊन धरणीवर कोसळते. तिची एक सखी मग शिवाकडे जाते व त्याच्या मदतीची याचना करते. शिव तिला मदतीचे आश्वासन देतो. काही वेळाने एक भविष्य सांगणारी स्त्री तिथे येते. नायिका तिला आपले भविष्य सांगण्याबद्दल विनवते. तेव्हा ती नायिकेला सांगते, की ' तू शिवाच्या प्रेमात पडली आहेस आणि तुझी इच्छा लवकरच पुरी होईल. ' नायिका तिला बक्षीस देते आणि मग हे नृत्य-नाट्य संपते. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**कुड** जम्मूतील एक लोकप्रिय नृत्य. भदरवाह जिल्ह्यातील कुड नर्तक या कलेत प्रवीण मानले जातात. पहाडी लोक रात्रीच्या वेळी हे नृत्य करतात. विवाहादी मंगल प्रसंगी, अन्य उत्सवाच्या वेळी व पिकांची कापणी करताना हे नृत्य करतात. स्त्रिया व पुरुष गोलाकार उभे राहतात. नाचणाऱ्या पुरुषांच्या हातात नंग्या तलवारी व स्त्रियांच्या हातात रेशमी रुमाल असतात. या नृत्याचे एक गीत पुढीलप्रमाणे—

**अजे दियाँ राते रवो मेरे गिदिया,**
**रवो मेरे गिदिया, अजे दियाँ राते रवो ।**
**छुल्लु भी दिनी आँ, बकरू भी दिनी आँ,**
**तेड़के भी दिनी आँ घयो ।**
**सावन भी दिनी आँ, तेल भी दिनी आँ,**
**साड़ी बोली बबर नो ।**
**साड़ी अबाडी अमरिग जो पोन्दा,**
**खल्ली आगी लगदा ई भौं ।**

अर्थ— सजणा, रात्री माझ्याजवळ राहा. मी तुला घोड्याचे आणि बकऱ्याचे पिल्लू देईन. स्वयंपाक करण्यासाठी तूपही देईन. आंघोळीला साबण आणि तेल देईन. तू आमच्याच झऱ्यावर आंघोळ कर. आमच्या शेतात रात्रीच्या वेळी वाघ येतो. त्यामुळे मला एकटीला भीती वाटते. तेव्हा तू थांब. मी तुला आटा आणि तांदूळही देईन. तू बाहेर अंगणातच रसोई शिजव. [ म. का. ]

**कुडतन मिरची** महाराष्ट्रातील मुलींचा एक सांघिक खेळ. मुली हातात हात घालून साखळीचे वर्तुळ करतात. जिच्यावर डाव असेल ती मुलगी हाताने टाळी वाजवीत या वर्तुळात नाचते व तोंडाने ' कुडतन मिरची ' अथवा ' खुर्ची का मिरची ' असा प्रश्न विचारते. वर्तुळातल्या मुली ' जाशील कशी ?' असा प्रतिप्रश्न तिला विचारतात. त्या वेळी ' सासू मारीते, नणंद मारीते ' असे प्रत्येक वेळी ती वेगळे नाव सांगते. प्रत्येक वेळी वर्तुळातल्या मुली ' बरं करीते '

असे म्हणतात. या वेळी त्याही फिरत असतात व तीही फिरत असते. जिच्यावर डाव असेल ती मुलगी रिंगणातून सुटण्याचा प्रयत्न करते. जिच्या हाताखालून ती निसटेल, तिच्यावर मग राज्य येते. [ सु. वि को ; व्या. ज्ञा. को. ]

**कुडता** सांप्रत सर्वसाधारणपणे अनेक लोक कुडता म्हणजे सदरा अंगात घालतात. पण भारतीय साहित्यात मात्र याचा उल्लेख कुठे आढळत नाही. लि-येन (८ वे शतक) याच्या संस्कृत-चिनी कोशात याचा निर्देश आलेला आहे. त्यात चिनी शब्द चान = कमीज, याचा संस्कृत पर्यायवाची शब्द म्हणून कुरतउ शब्द दिला आहे. हा शब्द कुठल्या भाषेतला आहे, ते मात्र अद्यापि समजलेले नाही.

पोर्तुगीज कुरता-कबाया आणि भारतीय कुडता हे शब्द समानार्थी आहेत. पोर्तुगीजांनी हा शब्द भारतीय भाषेतूनच घेतला आहे, हे निश्चित आहे. पोर्तुगीजमधील कुरता-कबाया हा जोडशब्द या दोन वस्त्रांचे सान्निध्य दर्शविणारा आहे. फारसी भाषेत लांब झग्यासारख्या वस्त्राला कबा असे नाव आहे. त्या कबाच्या आत कुडता घालीत असत. मोगल पेहेरावात या दोन वस्त्रांना विशेष स्थान होते. [ प्रा. भा. वे. भू. ]

**कुडबुडे** एक वाद्य. याचा आकार डौरासारखा असून हे दोही अंगी कातडयाने मढविलेले असते. याच्या मध्यभागी एक दोरीचा तुकडा बांधलेला असतो व त्याच्या टोकाशी चिकण मातीची किंवा मेणाची गोळी बसविलेली असते. हाताच्या हालचालीने ही गोळी दोन्ही बाजूंच्या कातडी भागावर आपटते व कुडबुड असा ध्वनी निघतो. पांगूळ नावाची भिकाऱ्यांची एक जात या वाद्याचा वापर करते. [ बॉं. बे. क्रा.; सु. वि. को. ]

**कुडबुडे जोशी** महाराष्ट्रातील एक भिक्षुक वर्ग. खेडेगावातून पंचांग पाहून लोकांना तिथि–वार कळविण्याचे काम करणाऱ्यांना जोशी ( जोइसी ) म्हणतात. पंचांग पाहून अथवा हातावरील रेषा पाहून ते भविष्यही सांगतात व कुडबुडे नामक वाद्य वाजवून भिक्षाही मागतात. एकनाथांनी आपल्या एका भारुडात कुडबुडे जोशाच्या भविष्य-कथनाची रीत पुढीलप्रमाणे सांगितली आहे. गावाच्या पाटलाला तो म्हणतो––

**नांव काय पाटीलबुवांचे ?**
**पुढील भविष्य सांगेन साचे ।**
**एका बायकोची संगत घडली ।**
**तेणे तुझी महिमा बुडाली…**

इथे बायको म्हणजे वासना समजायची. पाटलीणबाईस तो म्हणतो––

**तुझा हात पाहू दे बये––**
**फार बरवेपणा दोघात ।**
**स्त्री पुरुषात बहु गोडी बये ।**
**विघ्न दिसते वरले आळी ।**
**नाडू पाहाती थोर थोर बळी ।।**

इथे वरली आळी म्हणजे मस्तक समजायचे.

कुडबुडे जोशी हे बहुधा मराठा जातीचे असतात. हातात कुडबुडे, डोक्याला पांढरे पागोटे, लांब अंगरखा, जाकीट व कपाळाला पांढरे गंध असा यांचा वेष असतो. [ बॉं. बे. क्रा.; सु. वि. को. ]

**कुडली** कर्नाटकात शिमोग्याच्या ईशान्येस सुमारे आठ मैलांवर तुंगा आणि भद्रा या दोन नद्यांचा संगम होतो. या संगमाजवळ हे क्षेत्र आहे. इथे संगमेश्वराचे मंदिर आहे. विश्वेश्वर, रामेश्वर, इ. अन्यही काही शिवस्थाने या ठिकाणी आहेत. येथील नृसिंहस्वामींच्या मंदिरामुळे या स्थानाला नृसिंहक्षेत्र असेही म्हणतात. इथे शंकराचार्यांचा मठ आहे. [ स. भा. प्र. व. ]

**कुडवक्कल** महाराष्ट्र व म्हैसूर राज्यांतील एक शेतकरी जात. बेळगाव, धारवाड, विजापूर व सोलापूर या प्रदेशात यांची विशेष वस्ती आहे. कुडवक्कल हा कानडी शब्द असून त्याचा अर्थ कुदळ वापरणारा शेतकरी असा आहे. कुडवक्कल हे या जातीच्या मूळ पुरुषाचे नाव होते व तो कूर्ग-निवासी होता, असेही एक मत आहे.

हिंदू व लिंगायत असे यांचे दोन भेद आहेत. लिंगायत कुडवक्कलांचे धर्म व चालीरीतींच्या बाबतीत पंचमसाळी लिंगायतांशी बरेच साम्य आहे. दंडावती, मिनिगडीक, तद्देदी व यत्तिराक अशा यांच्या चार पोटजाती असून त्यांच्यांत परस्पर रोटीव्यवहार होतो.

**विवाहप्रथा ––** कुडवक्कल लोक समान गोत्रात विवाह करीत नाहीत. मुलींची लग्ने त्या वयात येण्यापूर्वीच होतात. लग्नाचें पौरोहित्य ब्राह्मण करतो. यांना विधवाविवाह व घटस्फोट वर्ज्य आहे.

हे लोक बसवण्णा, वीरभद्र, यल्लव्वा, दयामाव्वा, दुर्गव्वा, गुलकव्वा, चंगलकव्वा, इ. देवतांना भजतात.

हे ज्येष्ठ पौर्णिमेला करहनवी नावाचा बैलांचा सण पाळ-

तात. त्या वेळी बैलांना सजवून त्यांची मिरवणूक काढतात. शेती हाच याचा प्रमुख व्यवसाय असून त्याच्या बायका दूध-दुभते विकतात. हे मद्यमांस खात नाहीत.

**मर्तिकप्रथा**— हे मृतांना पुरतात. अंत्यविधीचे पौरोहित्य जंगम करतात. बाराव्याच्या दिवशी जंगमांना भोजन घालतात. सुतक पाळीत नाहीत. [ म. ज्ञा. को.; मुं. इ. जा. ]

## कुडा पंचमुखी

द. भारतात मुख्यत्वे वापरला जाणारा एक ढोल. हा पंचमुख वाद्याप्रमाणे पाच तोंडांचा असतो. **पाहा**— पंचमुख वाद्यम्. [ डि. सा. इं. म्यु. म्यु.]

## कुडा पंथ

आग्रा जिल्हयात तुलसीदास नावाचा एक अंध व्यापारी होता. त्याने या पंथाची स्थापना केली. हा पंथ जातिभेद मानीत नाही. निर्गुण-ईश्वरवादी असल्याने कुडापंथी मूर्तिपूजा करीत नाहीत. हे तुलसीरामायणाला प्रमाण ग्रंथ मानतात. [ वै. शै. म. व. ]

## कुडाळदेशकर ब्राह्मण

इ. स. च्या १ ल्या शतकात उ. भारतातील आद्यगौड ब्राह्मण समुद्रमार्गे कोकणात आले. ते प्रथम ज्या ठिकाणी स्थायिक झाले, ते स्थान देवगड होय. कुणकेश्वर हे त्यांचे देवस्थान आहे. पुढे या लोकांनी कर्ली नदीच्या काठी कुडाळदेशात वसाहत केली. म्हणून ते कुडाळदेशकर ब्राह्मण या नावाने प्रसिद्ध झाले. त्यानी कुडाळदेशावर सुमारे १५०० वर्षे राजकीय व धार्मिक सत्ता गाजविली. शस्त्रविद्या, नौकानयन आणि वैदिक धर्म-कृत्ये यात हे ब्राह्मण पारंगत होते. चालुक्यांच्या काळी धर्म-गुरुपद व राजगुरुपद यांच्याकडे असावे. चालुक्यांच्या व कदंबांच्या साम्राज्यविस्ताराला यांनी मोठाच हातभार लावला. यादवांच्या कारकीर्दीत कृष्णप्रभु या कुडाळदेशकर भारद्वाज गोत्री ब्राह्मणाला कोकणाचा सर्वाधिकारी नेमले होते.

विजयदुर्गापासून पेडणे महालापर्यंतच्या कोकणपट्टीच्या भागाला कुडाळदेश म्हणतात. प्राचीन कुडाळदेशाचे नाव कुट्टा-प्रांत असे होते. ११ व्या शतकापासून १७ व्या शतकापर्यंत चालुक्य, कदंब, यादव, बहामनी सुलतान यांचे मांडलिक म्हणून कुडाळदेशकरांनी या प्रदेशावर राज्य केले. गावाचा मुख्य (मतकरी), महालकरी (देसाई), परगणामुख्य (सरदेसाई), नाईक, इ. अधिकारपदे याच लोकांकडे होती. सरदेसाईपद वंशपरंपरेने चालत असे. या सरदेसायाचे मूळ वतनी गाव वाला-वली हे असून तेथील नारायणदेव हे त्यांचे कुलदैवत आहे. पुढे या सरदेसायांची सत्ता दुर्बळ झाली, तेव्हा माणगावच्या सावंताने ते अधिकारपद स्वत:च बळकावले. म्हणून त्या प्रदेशाला सावंतवाडी हे नाव मिळाले. हे लोक कान्यकुब्ज देशातून इ. स. च्या ११ व्या शतकात कुडाळदेशात आले, असे पं. महादेवशास्त्री दिवेकर म्हणतात. ( आद्यगौड ब्राह्मण पाहा )

कुडाळदेशकरांची भाषा कुडाळी ही मराठीची एक पोट-भाषा आहे असे वैद्य, ग्रियर्सन, इ. विद्वानांचे मत आहे. पण तसे नसून ज्या प्राकृत भाषांच्या मिश्रणाने मराठी भाषा उत्पन्न झाली त्या प्राकृत भाषांतूनच कुडाळी भाषा प्रथम उत्पन्न झाली आणि नंतर मराठी झाली असे आ. रा. देसाई म्हणतात. [ कुडाळदेशकर – गुं. फ. आजगावकर ]

## कुडिय

द. कानडा जिल्ह्यातील एक जात. यांना मले कुडिय असेही नाव आहे. वेलदोडयांचे मळे धारण करणाऱ्या जमीनदारांचे काम करण्यापुरते हे गुलाम आहेत. हे जंगलातल्या गुहांमध्ये किंवा लहान-लहान झोपडयांत राह-तात. यांची वस्ती कधीही स्थायिक नसते. हंगामाच्या दिवसात ते कुठेही कामासाठी जातात. यांचा जातप्रमुख असतो, त्याला गुरिकार म्हणतात. जातीचे नियम व्यवस्थित पाळले जातात की नाही, हे तो पाहतो.

**देव-धर्म** – हे लोक भैरव, कामदेवरू व पाच पांडव या देवतांना भजतात. भुताखेतांवरही यांचा विश्वास आहे.

**विवाहप्रथा** – मुलाचा बाप दोन बायकांना बरोबर घेऊन लग्न ठरविण्यासाठी मुलीच्या घरी जातो. जाताना तो आपल्या-बरोबर पानसुपारी व थोडे तेल नेतो. मुलीच्या आई-वडिलांना संबंध पसंत पडला तर ते तेल ठेवून घेतात; अन्यथा परत कर-तात. लग्नविधीतील महत्त्वाचा भाग म्हणजे वधू-वरांनी एक-मेकांचे हात धरून उभे राहणे व वधूपित्याने त्यांवर पाण्याची धार ओतणे, हा होय.

**मर्तिकप्रथा** – वसतीच्या जवळपास माणसाचा मृत्यू झाल्यास त्याला जाळतात व दूरच्या ठिकाणी झाल्यास पुरतात. तिसऱ्या दिवशी मृताचा पुत्र त्या ठिकाणी जाऊन दहनाच्या जागेभोवती तीन प्रदक्षिणा घालतो व तिथे तीनदा तादूळ शिंपडतो. और्ध्वदेहिकात हे लोक केळीची किंवा अन्य कसली तरी पाच पाने जमिनीवर मांडतात व त्यांवर कोंबडयाचे मांस, भात व भाज्या ठेवून नव्या आत्म्याला आपल्यात सामावून घेण्याविषयी मृत पूर्वजांची प्रार्थना करतात. मृताला पुरलेले असल्यास त्याची गवती प्रतिमा करून ती जाळतात. तिसऱ्या दिवशी ती रक्षा गोळा करून स्मशानात नेऊन पुरतात.

केरळ प्रांतातील कन्ननोर जिल्ह्यात यांची एक शाखा आहे.

यांनाही मलेकुडिय असे नाव आहे. ते त्याची व्युत्पत्ती पुढीलप्रमाणे सांगतात – कुडी म्हणजे कुटुंब व मला म्हणजे टेकडी; त्यावरून मलेकुडिय म्हणजे डोंगरावर राहणारे लोक. हे मध्यम बांध्याचे व सावळ्या रंगाचे असतात. याची मातृभाषा तुळू आहे. पण कानडी, कोडगू, मल्याळम् व तमिळ या भाषाही ते जाणतात. याची लोकसंख्या अतिशय कमी असून ते अद्यापि अशिक्षित आहेत.

याच्या उत्पत्तीसंबंधी विश्वसनीय अशी काहीच माहिती नाही. हे आपल्याला लिंगराजाचे वंशज मानतात. कूर्ग प्रांताचे हे आदिवासी होत. उरमले किंवा उरकुडिया अथवा पूमल्ली, व थीन मले कुडिया असे यांचे पोटभेद असून त्याचे आपापसात विवाह होत नाहीत.

गावांत स्थायिक झालेल्या कुडियांची घरे चिखल, बांबू व गवत यांची बनवलेली असतात. हे सुधारलेले असून त्यांच्या राहणीचे मानही चांगले आहे. हे लोक शेती करतात; गुरे, डुकरे व कोंबड्याही पाळतात.

यांचा धर्मगुरु अथवा पुढारी लोकनियुक्त असतो. ह्याला गुरिकर अथवा मलमुदिय म्हणतात. यांची जातपंचायत असते.

**विवाहप्रथा–** मुलगी ऋतुस्नात झाल्याच्या ११ व्या दिवशी शक्यतो तिचा विवाह करतात. विवाहात वरसंशोधनापासूनचा सर्व प्रमुख कार्यभाग मुलीची आईच करते. नवरा मुलगा लग्नमंडपात येण्यापूर्वी एक केळीचा खांब कापतात. उपाध्याय अथवा वधूपिता वधू-वरांच्या कपाळी चंदनाची उटी लावतो. जननाशौच सोळा दिवस मानतात. चौथ्या महिन्यात मुलाचे नाव ठेवतात.

**देव-धर्म–** हे लोक माती, दगड, धातू यांचे देव बनवून त्याची पूजा करतात. कल्लाती ही यांची मुख्य देवता असून कालीशी तिचे साधर्म्य आहे. पुनर्जन्मावर यांचा विश्वास आहे.

**मर्तिकप्रथा–** श्रीमंत लोक मृताचे दहन करतात व गरीब मृतांना पुरतात. अविवाहितालाही पुरतात. मृताशौच १४ दिवस पाळतात. [ट्रा. के.; का. ट्रा. स. इं.]

**कुडिव्वय** जैन धर्मातील एक पथ. हे लोक यात्रा न करता घरीच राहतात. क्रोध, लोभ, मोह, मद यांच्यावर जय मिळविणे, हे त्यांचे ध्येय असते. [स्कू. से. जै. लि.]

**कुडुबी** कानडा जिल्ह्यातील एक जात. हे लोक एका ठिकाणी स्थायिक न राहता वेगवेगळ्या ठिकाणी शेती करीत फिरतात. काही लोक कात तयार करण्याचाही धंदा करतात. तुळशीच्या रोपाला हे फार मानतात.

**विवाहप्रथा–** यांच्यांत मुलीचे लग्न लहानपणी किंवा ती वयात आल्यावर होते. लग्नसमारंभ पाच दिवस चालतो. विधवेला मृत पतीच्या गोत्राव्यतिरिक्त इतर गोत्रातील पुरुषाशी लग्न करता येते.

**मर्तिकप्रथा–** मृताला बसलेल्या स्थितीत पुरतात. पुरण्यापूर्वी त्याच्या तोंडात भाताचा घास घालतात. ११ व्या दिवशी श्राद्ध करतात. १२ व्या दिवशी ज्ञातिभोजन घालतात.

कात काढणारे कुडुबी ठेकेदाराच्या हाताखाली काम करतात. कात चागला निघावा म्हणून काम सुरू करण्यापूर्वी सिद्देदेवरू या देवाला कोंबड्याचा नवस करतात.

होस्थु सण झाल्याशिवाय ते नवीन तांदूळ खात नाहीत. शेताची कापणी करण्यापूर्वी काही रोपे कापून त्याची शेतात पूजा करतात व मग त्याच्या लोंब्या घराच्या खांबाला किंवा छपराला बांधतात.

आजारीपणात मांत्रिकाला बोलावितात. हा मांत्रिक आपले या विद्येतले कौशल्य दाखविण्यासाठी एका मोठ्या सुरीने तांदुळाच्या दाण्याचे दोन तुकडे करून दाखवितो. [का. ट्रा. स. इं.]

**कुडुमी** केरळातील एक शूद्र जात. यांना कुडुमिक्कर असेही म्हणतात. पूर्वी हे लोक गोव्यात राहत होते; पण पोर्तुगीजांच्या छळामुळे ते केरळात गेले. संस्कृतातील कुटुंब या शब्दाचा कुडुमी हा अपभ्रंश आहे. हे लोक मल्याळीमिश्रित कोकणी भाषा बोलतात. मुप्पन व इतायन असे यांचे दोन पोटभेद असून मुप्पन लोक शोभेची दारू तयार करतात व इतायन तांदूळ सडण्याचा धंदा करतात. हे लोक नाव चालविणे, शेतमजुरी करणे व विहिरी साफ करणे, हेही धंदे करतात.

**देव-धर्म–** रविवारी एकदाच जेवतात व माघ मासात नऊ दिवस ब्रह्म्याची पूजा करतात. रोज संध्याकाळी पिंपळाखाली पणती लावतात.

**विवाहप्रथा–** मुलगी वयात येण्यापूर्वी तिचे लग्न करतात. लग्नाच्या पाचव्या दिवशी वधूचे नाक टोचतात. विधवेचे विधुराशीच लग्न होते. [का. ट्रा. स. इं.; म. ज्ञा. को.]

**कुडुलम्म** द. भारतातील एक ग्रामदेवता. घागर डळमळू नये, म्हणून तिच्याखाली जी गवताची चुंबळ ठेवतात, तिला कुडुल म्हणतात. या चुंबळीतून ही देवता वर आली अशी दंतकथा आहे. [द्र. गॉ. मॉ. हिं.]

**कुडे** महाराष्ट्रातील कुलाबा जिल्ह्यात माणगावापासून १३ मैलांवर हे खेडे आहे. इथे सुमारे २५० फूट उंचीची

एक टेकडी असून तीत २६ बौद्ध लेणी व ११ कुंडे आहेत. त्यांतली १५ लेणी खाली असून तिथून सुमारे ४० फूट उंचीवर बाकीची लेणी आहेत. या २६ लेण्यांपैकी ५ चैत्य असून त्यांत दाघोबा आहेत; बाकीची राहण्याची म्हणजे विहार आहेत. त्यांत असलेल्या शिलालेखांत त्यांना लेणी हा शब्द लावलेला आहे. प्रत्येक लेण्यात साधारणतः पुढील गोष्टी असतात—

एक पडवी व दार, एक, दोन वा तीन खोल्या व त्यांत निजण्यासाठी दोन तीन दगडी ओटे. दाराच्या दगडी चौकटींना भोके, नरमाद्या वगैरे खुणा शिल्लक आहेत. त्यावरून तिथे लाकडी दारे असावी व त्या लेण्यांत केव्हातरी वस्ती असावी, असे वाटते. खोल्यांच्या बहुतेक दगडी भिंतींना मातीचा व भाताच्या तुसाचा गिलावा केलेला आहे. काही भिंतीवर काही चित्रेही अद्याप शाबूत आहेत.

पुष्कळ लेण्यांत शिलालेख आहेत. त्यांपैकी ५ लेख इ. स. च्या ५ व्या किवा ६ व्या शतकातील असून बाकीचे बहुतेक सनपूर्व १ ल्या शतकातील आहेत. त्यांत दात्याची व दानाची नावे (लेणे, चैत्य, कुंड इत्यादी) आढळतात. दात्यांमध्ये स्त्रियांची नावे बरीच आहेत. पुरुषांच्या नावांत शिव हा शब्द पुष्कळ ठिकाणी आला आहे.

लेणे क्र. १ च्या पडवीत दोन अष्टकोनी व चौकोनी स्तंभ असून त्यांवर चंद्र किंवा दोन शिंगे कोरलेली आहेत. ही खूण फार प्राचीन (सनपूर्व २०० – १००) काळातील असून, ती कान्हेरी वगैरे लेण्यांत आढळते. आत एक खोली व एक दिवाणखाना आहे. त्यापलिकडे गाभारा असून त्यात एक साधा दाघोबा आहे. या लेण्यातील पडवीच्या डाव्या अंगाला खोलीच्या दारावर एक शिलालेख असून, त्यात 'महाभोज सदगेरी विजय याचा पुत्र जो महाभोज खंडपालित मंडव त्याचा लेखक व सुलसदत आणि उतरदता यांचा पुत्र शिवभूती व त्याची बायको नंदा यांनी हे लेणे बांधले', असा मजकूर आहे. चौथ्या लेण्यात १ ल्या प्रमाणे दोन अष्टकोनी व चतुष्कोनी नक्षीदार स्तंभ असून, एक ३४ फूट औरसचौरस दिवाणखाना आहे. पाचव्या लेण्यातील भिंतींचा व छताचा गिलावा शाबृत आहे. पुढील पडवीत एक मोठे कुंड पाण्याने भरलेले आहे. आत पाच खोल्या आहेत.

सहाव्या लेण्यात प्रथम एक पटांगण व ११ फूट उंचीचे दोन हत्ती आहेत. डावीकडील हत्तीच्या मागे एक लहान बुद्धमूर्ती कमळावर पाय ठेवून बसलेली आहे. खाली धर्मचक्र, हरिणे व नागांच्या मूर्ती आहेत. बुद्धाच्या दोहो बाजूस चवरी वारणारे असून डोक्यावर मुकुट धरलेले दोन विद्याधर आहेत. खाली एक अस्पष्ट संस्कृत लेख कोरलेला आहे. पडवीत दोन अष्टकोनी स्तंभ असून, त्यांवर अनेक लहान बुद्धमूर्ती आहेत. डाव्या बाजूच्या भिंतीवर एक पाली भाषेतला शिलालेख असून त्यातील नावात शिव हा शब्द अनेक वेळा आला आहे. या पडवीच्या पलिकडे एक चौकोनी दिवाणखाना असून त्याच्या भिंतीवर ५ व्या किंवा ६ व्या शतकांतील खोदकाम आहे. त्यातील रंग अद्याप शाबूत आहे. तिथे ८–९ बुद्धमूर्ती आहेत. अष्टकोनी खांबांवर चंद्र कोरलेले आहेत. आतील खोलीत जाण्याच्या रस्त्याच्या कटिजनावर सिंह, वाघ, बैल, हत्ती, काळवीट वगैरे पशू व मागे त्यांना हाकणारी एक बटुमूर्ती आहे. भिंतीवर ज्या स्त्री-पुरुषांच्या द्वारपाळांसारख्या मूर्ती आहेत, त्यांचे अलंकार पाहण्यासारखे आहेत. आतील खोलीत एक साधा दाघोबा असून त्याच्यावर एक छत्री कोरलेली आहे.

सातव्या लेण्याच्या पडवीत एक कुंड व दोन अष्टकोनी स्तंभ आहेत. १५ व्या लेण्यात चार अष्टकोनी स्तंभ आहेत व आत एक दाघोबा आहे. १६ व्या लेण्यात दोन कुंडे व चार खोल्या आहेत. बाकीच्या लेण्यांत विशेष काही नाही. [ म. ज्ञा. को. ]

**कुडेकूत्तु** दक्षिणेकडील एक नृत्यप्रकार. सुब्रह्मण्याने एकूण अकरा प्रकारची नृत्ये केली, त्यातले हे एक नृत्य होय. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**कुणबी** महाराष्ट्रातील एक शेतकरी जात. पूर्वी कुणबी ही जात नव्हती, तर नुसता धंदा होता. कुलपती या शब्दावरून कुळपती-कुळवई-कुळवी-कुणबी असा हा शब्द बनला असावा. कुटुम्बिन् या संस्कृत शब्दावरून हा शब्द बनला असावा, असेही एक मत आहे. कुणबी व मराठे यांच्यांत फारसा फरक नाही. कुणबी श्रीमंत झाला, की मराठ्याप्रमाणे राहू लागतो व स्वतःला मराठा म्हणवितो. रत्नागिरी व गोवे या भागात यांना कुळवाडी म्हणतात. गुजरातेत यांना कणबी म्हणतात. (कणबी पहा).

यांचे मराठा, कोकणी, खानदेशी, तलहेरी व काळे कुणबी असे पाच भेद आहेत. या सर्वांत अकरमासे ही एक स्वतंत्र शाखा आहे. मल्हारी कोळीही आता स्वतःला कुणबी म्हणवू लागले आहेत.

**मराठा कुणबी–** यांच्यांत कुळे व देवके असतात. एकाच कुळात वा देवकात सोयरीक होत नाही. बालविवाह रूढ असला, तरी ऋतुप्राप्तीनंतरही मुलीचे लग्न होते.

काही मराठा कुणब्यात पाट लावणे कमीपणाचे मानतात. विधवेचे लग्न विधुराबरोबरच झाले पाहिजे, असाही नियम

आहे. यांच्यांत मामेबहिणीशी लग्न होते. लग्न लागल्यानंतर सूतवणे हा विधी होतो व नंतर कन्यादान करतात. नवरीला घरी आणल्यानंतर वराच्या घरी खंडोबाची तळी भरतात व घेंडा नाचवतात.

यांच्यापैकी बरेचजण वारकरी आहेत. हे पेरणी-कापणीच्या वेळी भैरवाला पूजतात. खंडोबा व देवी हीही यांची दैवते असतात. हे लोक कोण्या शत्रूवर रोग किंवा संकट घालायचे असेल, तर म्हसोबाला किंवा वेताळाला साकडे घालतात आणि हेतू पुरा झाल्यावर कोंबडे किंवा बकरे कापतात.


कुणबी

महाशिवरात्रीला यांची जत्रा असते. नागपंचमी हा कुणबी बायकांचा मोठा सण असतो. त्या दिवशी त्या वारुळाची पूजा करतात व त्याभोवती फेर धरून नाचतात. पुरुषांचा मोठा सण म्हणजे पोळा. भात कापण्यापूर्वी त्याची गरी घातल्यावर व ते झोडल्यावर प्रत्येक वेळी सात दगडांची (पाच पांडव व दोन वनदेव यांची प्रतीके) पूजा करून त्यांना बळी देतात. दुखणेबाणे आले असता देवाला कौल लावणे, गंडे-दोरे करणे व कोळ्याच्या हातचे पाणी पिणे, इ. उपाय करतात.

हे लोक प्रेते जाळतात. प्रेताच्या तोंडावर गुलाल व विड्याची पाने आणि शेजारी भात, भाकरी व पैसा ठेवून मग प्रेत श्मशानात नेतात. वाटेत विसाव्याच्या जागी प्रेत ठेवून भात, भाकरी व पैसा सर्व दिशांना फेकतात व तिथला एक दगड उचलून घेतात. त्या दगडाला जीवखडा म्हणतात. दुसऱ्या दिवशी राख भरून तिथे दोन भाकऱ्या व पाण्याने भरलेली दोन मडकी ठेवतात. १३ व्या दिवशी पुरोहिताला दक्षिणा देऊन कावळ्याला भात घालतात. दर महिन्याला पितर म्हणून एका माणसाला जेवायला वाढतात. असे पाच महिन्यापर्यंत जेवायला घालून नंतर आप्तेष्टांस जेवणावळ घालतात.

**कोकणी कुणबी**– यांची वस्ती मुख्यतः रत्नागिरी व कुलाबा या जिल्ह्यांत असून त्यांना तिळोरी असे म्हणतात. यांच्यांत कुळे नाहीत; पण एकाच आडनावाच्या घराण्यात लग्ने होत नाहीत. यांच्यांत घटस्फोट रूढ नाही. लग्न मराठा कुणब्याप्रमाणेच लावतात. बहिरी, झुगाई, नवलाई, ही यांची मुख्य दैवते होत.

कोकणातले कुणबी मुख्यतः शेतीवर उपजीविका करतात, पण जमिनीचे मालक मात्र फारच थोडे असतात. बहुतेक जण जमीनदारांच्या शेतावर मजुरी करतात. हे कुणबी देशावरच्या कुणब्यापेक्षा जास्त हालाखीत असतात. पूर्वी याच्या पंचायती असत व तिथेच सर्व भांडण–तंटे मिटवले जात. गौरी–गणपती आणि शिमगा हे यांचे मुख्य सण होत. त्या वेळी हे खूप मौज करतात.

**खानदेशी कुणबी**– यांच्यात पुढील सात शाखा आहेत–(१) घाटोळे – हे अजंटा घाटावरून आले (२) लोणी – गिरणा व तापी नद्याच्या काठी राहतात (३) कुंभार (४) वंजारी (५) पांजणे (६) तिडोळे किंवा तिरोळे – हे उत्तर हिंदुस्थानातून आले व (७) मदराज. या सातही शाखा एकमेकांच्या हातचे खातात. पण आपलीच शाखा श्रेष्ठ आहे, असे मानून इतरांशी लग्नव्यवहार करीत नाहीत.

**तलहेरी कुणबी** – ठाणे जिल्ह्यात घाटाखाली यांची मुख्य वस्ती आहे. याच्यांत काही स्थानिक, काही गुजरातमधून व काही घाटावरून आलेले लोक आहेत. स्थानिक कुणबी व सोनकोळी यांच्यांत फारसा फरक नाही. याच्यात रोटी-बेटी व्यवहार होतो.

**काळे कुणबी** – हे वर्णाने काळे असल्यामुळे त्याना हे नाव पडले. यांची वस्ती बेळगाव व कानडा या जिल्ह्यांत आहे हे मूळचे गोव्याकडील असून पोर्तुगीजांच्या धर्मच्छळामुळे १६ व्या शतकात तिकडे गेले असे म्हणतात. यांची बोली कोकणी आहे. यांच्या प्रत्येक गावात एक मिराशी व एक गावडा असतो मिराश्याचे काम धार्मिक व गावड्याचे सामाजिक असते. यांच्यांत पुष्कळ कुळे असून त्या प्रत्येकाची देवदेवता निराळी असते. एका कुळात सोयरीक होत नाही. लग्नासाठी लिंगायत किंवा ब्राह्मण पुरोहित लागतो. लग्नात वधू-वरानी जोडलेल्या हातांवर पाण्याची धार सोडतात, तिला धारे म्हणतात. हाच लग्नातील मुख्य व बंधनकारक विधी होय. हे पाट लावणे कमीपणाचे मानतात. यांच्यांत घटस्फोट रूढ नाही. यांचा धर्म बहुतेक पिशाचपूजेवर आधारलेला आहे. स्वर्गनरकादी कल्पना यांना माहीत नाहीत. मृत्यूनंतर प्रत्येक माणूस त्याच्या पाप-पुण्याप्रमाणे चांगले किंवा वाईट भूत बनतो, असे ते समजतात. सर्व दुःखे त्यांच्यामुळेच येतात अशी यांची कल्पना आहे.

या कुणब्यांपैकी काही लिंगायत पंथाचे असून ते जंगम उपाध्ये नेमतात आणि बसवेश्वर व नंदी यांची पूजा करतात.

हे लोक प्रेते पुरतात. गर्भारशी किंवा बाळंतीण मेली, तर

तिला दूर नेऊन पुरतात; कारण तिचे भूत जबरदस्त असते. तिला पुरल्या जागेपासून घरापर्यंत भाजलेले तांदूळ टाकतात आणि ' जोपर्यंत हे तांदूळ उगवणार नाहीत तोपर्यंत तू खड्ड्यातून उठू नकोस ' असे तिला सांगतात.

हे लोक वन्य पशुपक्ष्यांचे मांस खातात, पण पाळीव जनावराचे खात नाहीत. बदके, कोंबडी वगैरेंना हे फार अशुद्ध मानतात; त्यांचा स्पर्श झाला, तर स्नान करतात किंवा अंगावर गोमूत्र शिंपडतात. हे मद्यपान करीत नाहीत. हे फक्त ब्राह्मणांच्या हातचेच अन्न खातात.

**वऱ्हाडी कुणबी**– मध्य प्रदेश व वऱ्हाड या भागात कुणब्यांची वस्ती बरीच आहे. हे गुजरातमधून खानदेशात व तिथून या प्रदेशात इ. स. १४ व्या शतकात आले. त्यांच्या पुढील शाखा आहेत – (१) झाडे– यांच्यांत गोंड रक्ताचे मिश्रण आढळते (२) मानवा – यांच्यांत माना लोकाचे मिश्रण सापडते (३) खैरे (४) धानोरे (५) तिरोळे – हे उच्च दर्जाचे असून यांच्यांत देशमुखादी वतनदार आहेत (६) छिंदवाड्यात गाढव जातीचे कुणबी आहेत. हे पूर्वी गाढवे पाळीत. (७) नेमाडात गुजर कुणबी आहेत. या कुणब्यात लग्नप्रसंगी न्हावी व धोबी यांचे फार महत्त्व असते. न्हावी वधूवरांचे पाय धुवून सर्व वऱ्हाडाला कुंकू लावतो. या पोटजाती आपसात लग्ने करीत नाहीत.

खेड्यातले सर्व अलुतेबलुतेवाले शेतकरी कुणब्याला ' बळिराजा ' म्हणतात. कारण यांच्यामुळेच त्यांना निर्वाहासाठी अन्नधान्य मिळते. शेतीच्या कष्टामुळे शरीर बलिष्ठ होते, म्हणूनही कदाचित त्याला बळी (बलवान) म्हणण्याचा रिवाज पडला असेल. [ म. ज्ञा. को.; गां. गा. ]

## कुणिंद

देश व लोक. यमुनेच्या उत्तरेस देहरादूनपासून जगाधरीपर्यंत पसरलेला प्रदेश प्राचीन काळी कुणिंद या नावाने प्रसिद्ध होता. या प्रदेशात कुणिंद गणराज्याची अनेक नाणी सापडली आहेत. याच प्रदेशात कालकूट हे प्राचीन जनपद होते. अर्जुनाने दिग्विजयात कुणिंदांना पराभूत केले होते, असा उल्लेख महाभारतात आहे. यांची वसती शिवालिक पर्वतावर आणि यमुना, सतलज व व्यास या नद्यांच्या उत्तरेस होती, असे समजते.



कुणिंदगणांची नाणी

या लोकांना कुनिंद किंवा कुलिंद असेही म्हणत. टॉलेमी याचा कुलिंद्रिन असा उल्लेख करतो व यांची वसती व्यास, सतलज, गंगा व यमुना यांच्या उगमप्रदेशात असल्याचे सांगतो. [ भा. सा.; ना. प्र. प. – विक्रमांक १९४३; भा. इ. रू.; ट्रा. ए. इ. ]

## कुतप

(१) कु = पाप. तप् = तापविणे. यावरून पापाला तापविणाऱ्या (दूर करणाऱ्या) ज्या गोष्टी आहेत, त्यांना कुतप असे नाव आहे. यांची नावे पुढीलप्रमाणे–

**मध्याह्नः खड्गपात्रं च तथा नेपाळकम्बलः।**
**रूप्यं दर्भास्तिला गावो दौहित्रश्चाष्टमः स्मृतः ।**

अर्थ – मध्याह्न (८ वा मुहूर्त), खड्गपात्र, नेपाळी कांबळे, चांदी, कुश, तीळ, गाय व मुलीचा मुलगा हे आठ कुतप होत. त्यापैकी कुश व तीळ हे विष्णूच्या शरीरापासून झालेले असून ते श्राद्धांत वापरल्याने श्राद्धाचे रक्षण होते (मत्स्य पु. २२. ८७).

(२) वाद्यसमूह. प्राचीन काळी नाटकाला कुतपाची साथ घेत. वाद्यसंख्या व स्वरशक्ती यांच्या दृष्टीने याचे उत्तम, मध्यम, व कनिष्ठ असे तीन प्रकार मानलेले आहेत. भरताच्या नाट्यशास्त्रात, तसेच अभिनवगुप्ताच्या नाट्यशास्त्रावरील टीकेतही कुतपाचा उल्लेख आहे. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

## कुतबन

(जन्म १५१३ इ. स.) हिंदी कवी. प्रेमाख्यानकारांमध्ये याचे स्थान सर्वप्रथम मानतात. चिश्ती संप्रदायाच्या शेख बुरहानचा हा शिष्य होता. मृगावती हा याचा प्रसिद्ध ग्रंथ होय याचे काव्य अवधी ग्रामीण भाषेत आहे. [ अ. औ. उ. सा. ]

## कुतुब मिनार

दिल्लीपासून सुमारे १५ मैल अंतरावर हा मनोरा असून जवळच जुने दिल्ली शहर आहे. इ. सनाच्या १३ व्या शतकाच्या प्रारंभी हा मनोरा कुत्ब-उद्-दिन ऐबक याने बांधला व तो शम्स-उद्-दिन अल्तमश याने पूर्ण केला, असे म्हणतात. हा मनोरा पांच मजली असून त्याची उंची २३८ फूट आहे. त्याचे खालचे तीन मजले लाल दगडाचे आहेत. त्यावर सुंदर नक्षीकाम असून, त्यात कुराणातील आयतेही कोरलेले आहेत. वरचे दोन मजले संगमरवर आणि लाल दगडाचे आहेत. पूर्वी हा मनोरा सात मजली असून त्याची उंची ३०० फूट होती, असे म्हणतात.

हा मनोरा शेवटचा हिंदू सम्राट पृथ्वीराज चौहान याने बांधला, असेही एक मत आहे. आणि त्यावरूनच त्याला पृथ्वी-

लाट असेही म्हणतात. या मनोऱ्याचा पहिला दरवाजा उत्तराभिमुख आहे, मनोऱ्याखाली चबूतरा नाही आणि पहिल्या मजल्याच्या कगोऱ्यावर जी नक्षी आहे, तीत घंटा व इतर हिंदू प्रतीके आहेत. या गोष्टींवर वरील कल्पना आधारलेली आहे. कुत्ब-उद्-दिन ऐबक याने मनोऱ्याच्या मूळ बांधकामात बरेच फेरफार करून त्याला 'कुत्ब मीनार' हे नाव दिले.

जनरल कनिगहॅम याने आपला सहकारी बेगरल याला दिल्लीच्या आसपासच्या प्राचीन अवशेषांची पाहणी करण्यास सागितले होते. त्याने आपल्या अहवालात स्पष्ट म्हटले आहे, की हा मनोरा फार प्राचीन काळी बांधलेला असावा. त्याला मनोऱ्यावर जे आलेख सापडले, त्यात विक्रम संवत् १२०४ व१२५६ (इ. स. ११४७ व ११९९) चा उल्लेख आहे. हा काल कुत्ब-उद्-दिन च्या आधीचा आहे. सांप्रत ते लेख घासून गुळगुळीत केलेले आहेत. मनोऱ्याचा पहिला मजला तांबूस पाषाणाचा असून त्याला बारा बाजू आहेत. भिंती स्तंभांकित असून एक स्तंभ वृत्तचितीच्या आकाराचा, तर दुसरा कोनांकित आहे. दुसरा मजला गोलाकार स्तभांचा, तर तिसरा मजला कोनांकित स्तंभांचा आहे. त्यावरचे मजले मात्र भिन्न धर्तीचे व संगमरवरी पाषाणाचे असून, त्यांत चुन्याचा उपयोग केलेला आहे. यावरून हे स्पष्ट दिसते, की हे वरचे मजले ऐबक याने बाधले असावेत.



कुतुबमिनार – दिल्ली

कुत्ब हा शब्द अरबी असून त्याचा अर्थ जात्याच्या तळीची आरी किंवा आस असा होतो. मनार म्हणजे स्तंभ किंवा दीपगृह होय. या मनोऱ्याचे खरे नाव कुत्ब-मनार असून त्याचा अर्थ मध्यवर्ती स्तंभ असा आहे. तो ज्या भागात आहे, त्या भागाला 'मेहरौली' म्हणतात. हा मिहिरावली या शब्दाचा अपभ्रंश आहे. 'मिहिर' या संस्कृत व 'मेहर' या अरबी शब्दाचा अर्थ सूर्य आणि 'आवली' म्हणजे पंक्ती किंवा माला असा आहे. सूर्यमालेतला हा स्तंभ म्हणजे एका प्राचीन वेधशाळेचा मध्यवर्ती स्तंभ असला पाहिजे.

आजही वाचता येतील असे नागरी लिपीतले आलेख मनोऱ्यावर असून त्यांत पृथ्वीराज व गोविंदपाल यांची नावे सापडतात. त्यांनी बहुधा या मनोऱ्याची डागडुजी केली असावी.

हा मनोरा 'कुव्वत-उल्-इस्लाम' या मशिदीसमोर आहे. ही मशीद सत्तावीस हिंदू मंदिरे पाडून बांधण्यात आली, असा उल्लेख मशिदीवरच आहे. सत्तावीस या आकड्यावरून सत्तावीस नक्षत्रांचा बोध होतो. मनोऱ्याच्या बारा बाजू बारा राशीच्या द्योतक ठरतात. यावरून असे अनुमान निघते की, त्या ठिकाणी पूर्वी मोठी वेधशाळा असावी. [देहली – कपूरचंद प्रकाशचंद; डी. एस्. त्रिवेद – वसंत, ऑगस्ट १९६१]

**कुतूहलशाला** हलक्या-फुलक्या गप्पांनी मनोरंजन करण्याचे स्थान, असा याचा सामान्य अर्थ आहे. असे सांगतात, की श्रावस्तीच्या अशाच एका कुतूहलशालेत काही अन्य पंथीयानी एक कट रचला व बुद्धाचे जनमनातील आदराचे स्थान नष्ट करण्याचा प्रयत्न केला. बुद्धाच्या काळात अशा स्थानांना फार महत्त्व होते. [प्रा. भा. म.]

**कुत्ब** मुस्लिम साधुसंतापैकी अत्यंत श्रेष्ठ पुरुषाला ही पदवी देतात. आध्यात्मिक सामर्थ्य असलेली व्यक्ती, असा या शब्दाचा सामान्य अर्थ आहे. अशा व्यक्तीच्या पावित्र्याला हजरत मुहम्मदाच्या हृदयाची उपमा देतात. 'कुत्ब-उद्-दिन' म्हणजे धर्माचा आस किंवा आधार असाही अर्थ होतो. [डि. इ.]

**कुत्रा** मानवजातीचा मित्र ठरलेला एक प्राणी. कुत्रा हे जनावर फार प्राचीन काळी माणसाळले असे सांगतात. मेसोलिथिक काळात बाल्टिक समुद्राभोवतालच्या प्रदेशात कुत्र्याला पाळण्याची व माणसाळविण्याची पद्धत प्रथम सुरू झाली असावी. कुत्रा व मनुष्य यांची सांगड फार पूर्वीपासूनची दिसते. वैदिक वाङ्मयात कुत्रा हा माणसाळलेला प्राणी असल्याचे समजते (ऋ. २. ३९. ४). तो चोरांपासून आणि

परक्या माणसापासून घराचे रक्षण करी (ऋ. ७. ५५. ३). डुकराची शिकार करण्यास याचा उपयोग होई (ऋ. ७. ५५. ४). मात्र कुत्र्याची इतकी जवळिक असूनही तो यज्ञाच्या जागी अपवित्र मानला जाई (ऋ. ९. १०१. १). कुत्र्याचे मांस वैदिक लोक निषिद्ध मानीत.

ऋग्वेदात सरमा नावाची एक कुत्री आढळते. ती इंद्राची दूती होती. एकदा बृहस्पतीच्या गायी पणींनी चोरून नेल्या. बृहस्पतीने त्याबद्दलची तक्रार इंद्राकडे नेली. मग इंद्राने त्या गायीचा शोध करण्यासाठी सरमेची योजना केली. तिने पणींच्या प्रदेशात शिरून त्या गायींचा शोध लावला (ऋ. १०. १०८). श्याम–शबल नावाचे दोन कुत्रे यमराज्याचे संरक्षक होते. ते फेंदारलेल्या नाकाचे, धिप्पाड आणि प्राण्यांचा जीव घेऊनच तृप्त होणारे असे होते (ऋ. १०. १४. १२). ते मानवलोकात अदृश्यपणे संचार करतात व मानवांवर सतत आपली दृष्टी ठेवतात, असेही म्हटले आहे.

युधिष्ठिर स्वर्गारोहणाला निघाला असता एका इमानी कुत्र्याने स्वर्गद्वारापर्यंत त्याची सोबत केली होती. हा कुत्रा म्हणजे साक्षात यमच होता, असे महाभारतात सांगितले आहे (महाप्रास्थानिक ३).

मोहेंजोदडो येथील उत्खननात विविध प्रकारच्या भांड्यांवर कुत्र्याची चित्रे आढळली आहेत. त्यावरून सिंधुसंस्कृतीतल्या लोकांना कुत्रा प्रिय होता, हे कळते. अश्वमेधात घोड्याला



कुत्रा

पाण्यात सोडताना त्याच्याबरोबर एक कुत्राही सोडीत व त्याला ठार मारून त्याचे प्रेत घोड्याच्या पोटाखाली तरंगत ठेवीत.

वेदोत्तरकाळात कर्मकांड जसजसे बळावले, तसतसा कुत्रा हा प्राणी निषिद्ध मानला जाऊ लागला, असे दिसते. हाडके चघळणे वगैरे कुत्र्याच्या सवयी कर्मठ ब्राह्मणांना आवडेनात. या गोष्टीचे प्रत्यंतर महाभारताच्या आदिपर्वात आढळते. पारिक्षित जनमेजयाच्या दीर्घसत्रात सरमेचा पुत्र (कुत्रा) आला असता जनमेजयाच्या भावांनी त्याला मारून हाकलून दिले (म. भा. आदि. ३). यज्ञीय पशूंच्या यादीतूनही कुत्र्याला वगळण्यात आले. मनूने तर असा दंडकच घातला, की जातिबाह्य टोळ्यांनीच गाढव आणि कुत्रा हे दोन प्राणी बाळगावे.

**शुभाशुभकल्पना** – आसामातले गारो लोक त्यांचा प्रमुख मृत्यु पावला म्हणजे त्याच्या दासांना बळी देत. इंग्रजी राजवटीपूर्वी ही प्रथा त्यांच्यांत होती. पुढे हे लोक गुलामांच्या ऐवजी कुत्र्याला बळी देऊ लागले. कुत्रा हा मृतात्म्याला स्वर्गाची वाट दाखवितो, अशी त्यांची समजूत आहे. पारशी लोकात मरायला टेकलेल्या माणसाला कुत्र्याच्या दृष्टीस पाडण्याची चाल आहे. प्रवासाला निघाले असता तोंडात मांसखंड धरलेला कुत्रा पुढे आला, तर ते शुभ व तोंडात हाडूक धरलेला कुत्रा पुढे आल्यास ते अशुभ समजतात. कुत्रा रडू लागला, तर तो पावसाचे आगमन सुचवितो व पावसाळ्याव्यतिरिक्त अन्य ऋतूत तो रडू लागला, तर आगीची किंवा संकटाची सूचना देतो, असे समजतात. लग्नाच्या वाटाघाटी चालू असता कुत्र्याने वाटाघाटी करणाऱ्याच्या पाठीस स्पर्श करणे, हे वधू-वरांस अरिष्टसूचक व तोंडासमोर येऊन नाक पुढे करणे, हे शुभसूचक समजतात. कुत्र्याने घरात शिरून अन्न नेले, तर ते दारिद्र्यसूचक व घराजवळ त्याचे हेल काढून रडणे, हे मृत्युसूचक मानतात. धार्मिक कार्यात कुत्र्याचा स्पर्श हा विटाळ मानतात. कुत्र्याच्या पापण्यांच्या बाजूस दोन पिवळे ठिपके असल्यास त्याला चार डोळ्यांचा कुत्रा म्हणतात व तो भुतेखेते पाहू शकतो, असे समजतात.

नेपाळमध्ये किचीपूजेचा एक वार्षिक उत्सव असतो. त्या दिवशी कुत्र्याची पूजा करतात.

**दैवतपरिवारात स्थान** – कुत्र्याला भैरवाचे अनुचर मानले आहे. दत्तात्रेयाच्या समवेत चार कुत्रे दाखविलेले असतात, त्यांना चार वेदांचे प्रतिनिधी मानलेले आहे. खंडोबाच्या परिवारातही कुत्र्याला स्थान मिळाले आहे.

कुत्रा हा शहाणा प्राणी आहे; तसाच तो इमानीही आहे. मांजर घर ओळखते आणि कुत्रा माणसे ओळखतो, असा वाक्प्रचार आहे. कुत्र्याच्या इमानीपणाविषयी अनेक कथा आहेत. रायगडावर शिवाजी महाराजांच्या समाधीशेजारी एका कुत्र्याची समाधी आहे. हा महाराजांचा कुत्रा होता आणि त्याने

महाराजांच्या जळत्या चितेत उडी घेऊन आत्मबलिदान केले, अशी आख्यायिका सांगतात. [ ऋ. द.; की. पॉ.; म. ज्ञा. को.; रि. इं. ]

**कुत्स** एक सूक्तद्रष्टा. पहिल्या मंडलातील ९४ ते ९८ व १०१ ते ११५ ही सूक्ते याच्या नावावर आहेत. हा अंगिरसकुलोत्पन्न असून अर्जुनाचा पुत्र होता (ऋ. १. ११. २३). अर्जुन हा राजर्षी असून त्याला रुरु असेही म्हणत. कुत्सही राजाच होता. तो महाज्ञानी व उदार होता. उशनाकाव्य हा त्याचा पुरोहित असून त्याच्या मदतीनेच इंद्र कुत्साच्या घरी आला होता. कुत्स एकदा विहीरीत पडला असता त्याने इंद्राचा धावा केला. तेव्हा इंद्राने येऊन त्याचे रक्षण केले. इंद्राची व याची मैत्री होती. इंद्राने याच्यासाठी शुष्णाचा लोखंडी चक्राने वध केला. पण इंद्राची याच्यावर गैरमर्जी झाल्याचेही दिसते.

कुत्स, दिवोदास व आयू हे तिघे मित्र होते. काही कारणाने यांचे सुश्रवस राजाशी युद्ध झाले. त्या वेळी इंद्राने सुश्रवसाचा पक्ष घेतला व कुत्सादिकांचा पराभव करून त्यांना सुश्रवसाच्या ताब्यात दिले (ऋ. १. ५३. १०). त्याचप्रमाणे कुत्साला ताब्यात घेऊन इंद्राने वेतसूचे कल्याण केले, असेही ऋग्वेदात म्हटले आहे (१०. ४९. ४).

अश्वीनी कण्वाचे संरक्षण केले, शुचंतीला द्रव्यपूर्ण उत्तम घर दिले, अत्रीचा दाह शांत केला, अंध व पंगू असलेल्या परावृजाला पाहण्याची व चालण्याची शक्ती दिली आणि युद्धात लढत असलेल्या विश्पलेचा बचाव केला, अशी अनेक कथाबीजे याच्या सूक्तात आढळतात (ऋ. १. ११२). [ ऋ. द. ]

**कुथप्रावर्ण** एक प्राचीन पर्वतीय राज्य. या राज्यातून पावनी नदी वाहते. या राज्यात राहणाऱ्या लोकांनाही कुथप्रावर्णच म्हणत. [ पु. इं. ]

**कुथुमी** हा जटामालेचा पुत्र असून याला भगवंताचा अवतार मानले आहे. [ पु. इं. ]

**कुदंबै सिद्धर** तमिळनाडमधील एक सिद्ध. ३२ कडव्यांचे एक काव्य याच्या नावावर असून त्यात सिद्धांच्या सिद्धांतांचे प्रतिपादन आहे. [ द. द. ]

**कुद्रा बोंगा** मुंड लोकांचा एक देव. याची पूजा सार्वत्रिक नसून काही लोक विशिष्ट हेतूनेच त्याला भजतात. [ एन्सा. मुं. ]

**कुन्नुवन** द. भारतातल्या मदुरा जिल्ह्यातील पळणी टेकड्यांवर राहणारी एक शेतकरी जात. हे तमिळ भाषा बोलतात. वेल्लालन हे आपले पूर्वज असून कोइंबतूरच्या धारापुरम् व कांगायन या भागातून आपण शेकडो वर्षांपूर्वी पळणी टेकड्यांवर राहायला आलो, असे ते सांगतात. म्हणूनच ते आपल्याला कुन्नुव वेल्लाल असे म्हणवितात. दुसरी एक परंपरागत कथा आहे, ती अशी–

विरूपाक्षी व अय्यकुडी या दोघा जमीनदारांनी त्यांना या टेकड्यांवर वसाहत करायला मदत केली. पुढे तिथली जमीन ते कसू लागले व त्या जमीनदाराच्या दास्यात अडकले.

यांचे पेरिय कुन्नुवर, कुन्नुवर व चिन्न कुन्नुवर असे तीन पोटभेद आहेत. प्रत्येक गावात या जातीचा एक ज्ञातिप्रमुख असतो.

**विवाहप्रथा** – यांच्यात आतेबहिणीशी लग्न करण्याच्या नियमाची कडक अंमलबजावणी होते. त्यामुळे लहान मुलाला एखाद्या वेळी तरुण आतेबहिणीशी लग्न करावे लागते. अशा वेळी ती मुलगी जातीतल्या दुसऱ्या एखाद्या माणसाबरोबर राहते व त्याच्यापासून तिला मुले झाल्यास ती या लहानग्या नवऱ्याचीच समजली जातात. एखाद्या माणसाला एकच मुलगी असेल, तर मात्र तिचे मामेभावाशी लग्न होत नाही. घराच्या एखाद्या दाराजवळ एका खांबाशी तिचे लग्न लावतात. त्या वेळी तिच्या गळ्यात ताळी बांधण्या ऐवजी हातात चांदीची बांगडी घालतात. मग ती जातीतल्या एखाद्या माणसाबरोबर राहते. तिला मुलगा झाला, की तो संपत्तीचा वारस ठरतो.

हे लोक शैव असून वलपन या गिरिदेवाला भजतात. हे मृतांना जाळतात. [ का. ट्रा. स. इं ]

**कुफी** कोकणातील मुसलमान लोक. हे वर्णाने गोरे व चेहेऱ्याने अरबी आहेत. हे युफ्रातिसच्या खोऱ्यातून आलेल्या अरबांचे वंशज असावे. ते इ. स. ७०० च्या सुमारास इकडे पळून आले, असे म्हणतात. चिपळूण व बाणकोट खाडीजवळ यांची मुख्य वस्ती आहे. [ रत्ना. गॅझे. ]

**कुबुरिस** आसामातील एक लोकनृत्य. हे नृत्य फक्त स्त्रिया करतात. प्रथम त्या जमिनीवर बसून हातांनी काही भौमितिक आकृती दाखवितात. नंतर उभ्या राहतात, एक पाऊल पुढे टाकतात व दुसऱ्या पायाने नितंबावर आघात करतात. [ फो. लो. ]

**कुबेर** (१) उत्तर दिशेचा स्वामी व गुह्यक-यक्ष-किन्नरांचा अधिपती. वेदात कुबेराचे वर्णन पाताळ–लोकातील आत्म्यांचा स्वामी व अंधकाराचा राजा असे केले आहे. अथर्ववेद व शतपथ ब्राह्मण या ग्रंथात त्याला वैश्रवण या नावाने उल्लेखिले आहे. ब्रह्मदेवाचा मानसपुत्र पुलस्त्य; त्याचा पुत्र विश्रवा व विश्रव्याचा पुत्र कुबेर होय. म्हणून त्याला वैश्रवण हे नाव मिळाले, असा खुलासा रामायणात केला आहे. याच्या आईचे नाव इडविडा होते. तपश्चर्या करून कुबेराने ब्रह्मदेवाला संतुष्ट केले व त्याच्याकडून संपत्तीचा स्वामी व विश्वसंरक्षक हे अधिकार प्राप्त करून घेतले. नंतर त्याने विश्वकर्म्याने बांधलेल्या सुवर्णतटमंडित लंकेवर अधिकार मिळविला व तिथेच तो राज्य करू लागला.

महाभारतात कुबेराचा उल्लेख पुलस्त्याचा पुत्र असा केलेला असून जन्मत.च ब्रह्मदेवाने त्याला संपत्तीचा स्वामी व लंकेचा अधिपती नेमले, असे म्हटले आहे. नंतर कुबेराने पुष्पक विमानही मिळविले. कुबेराने ब्रह्मदेवाची फार स्तुती केली, म्हणून त्याचा पिता पुलस्त्य रागावला व त्याने आपल्या अर्ध्या शरीरातून रावणाची व इतर पुत्रांची उत्पत्ती केली. पुढे रावणाने कुबेराकडून लंका व पुष्पक विमान ही दोन्ही हिरावून घेतली. मग कुबेर गंधमादन पर्वतावर जाऊन राहिला.

हिमालयातील अलका ही कुबेराची नगरी होय. त्याचे चैत्ररथ उपवन म्हणजे एक प्रकारचा राजवाडाच होता, असे भागवत पुराणात सांगितले आहे. कैलास पर्वतावर विश्वकर्म्याने बांधलेल्या राजवाड्यात कुबेर राहतो, असेही एक मत आहे. कौबेरी ही त्याची भार्या, मणिग्रीव किंवा वर्णकवी व नलकूबर किंवा मयूरज हे त्याचे पुत्र व मीनाक्षी ही त्याची कन्या होती. हा शंकराचा सखा आहे.



कुबेर – द्विभुज

कुबेराचा वर्ण गोरा असून त्याला तीन पाय व आठच दात आहेत. तो मस्तकी मुकुट व हातात गदा धारण करतो. कुबेर मुळात फार सुंदर होता; पण एकदा त्याने पार्वतीकडे साभिलाष दृष्टीने पाहिल्यामुळे तिने त्याला 'तू कुरूप होशील' असा शाप दिला व तेव्हापासून तो कुरूप झाला.

कुबेराचे मूर्तिध्यान पुढीलप्रमाणे सांगितले आहे –

**कर्तव्यः पद्मपत्राभो वरदो नरवाहनः ।**
**चामीकराभो वरदः सर्वाभरणभूषितः ।।**
**लम्बोदरश्चतुर्बाहुर्वामपिङ्गललोचनः ।**

(हे. व्र.)

अर्थ– कुबेर हा कमलपत्राच्या कांतीचा, नर हे वाहन असलेला, सुवर्णाप्रमाणे तेजस्वी, सर्वालंकारांनी भूषित, लंबोदर, चार हात असलेला, डावा डोळा पिंगट असलेला व वरदमुद्रा धारण करणारा असा बनवावा.

त्याच्या वाहनाबद्दल मात्र मतभेद आहेत. हत्ती, घोडा, बकरा, रथ, सिंह किंवा नर अशी त्याची निरनिराळी वाहने निरनिराळ्या ठिकाणी सांगितली आहेत.

ब्रह्म-क्षत्रांच्या ऐक्याने राज्यसुखाची वृद्धी होते, या विषयावर त्याचा मुचकुंदाशी संवाद झाला होता (म. भा. शांति. ७४). याला सोम असे एक नाव आहे. त्यावरून उत्तर दिशेला सौम्या असे नाव मिळाले.

बौद्धांच्या मते कुबेर हा धर्मपाल, पीतवर्ण व त्रिशूलधारी आहे. पुष्पक, हत्ती किंवा सिंह हे त्याचे वाहन, वसुंधरा ही शक्ती व मुंगूस हे त्याचे अभिज्ञानचिन्ह आहे. त्याने नागांवर विजय मिळविल्याचे लक्षण म्हणून तो मुंगूस धारण करतो, असे लामा समजतात. कुबेरमूर्ती नेहमीच स्थूल दाखवितात. त्याचा उजवा पाय लोंबता असतो आणि त्याच्या खाली एक कमळ असते. प्राचीन काळी महाकोशलात कुबेरपूजा प्रचलित होती. त्या भागात कुबेराच्या मूर्ती बऱ्याच आढळतात. मद्यप्राशनाने धुंद झालेला कुबेर व त्याच्या दोन्ही अंगी दोन स्त्रिया अशी एक कुबेरमूर्ती उपलब्ध आहे.

जैनांनी कुबेर हा नेमिनाथ तीर्थंकराचा यक्ष मानलेला आहे. त्यांच्या मते कुबेराला चार शिरे व आठ हात असतात. [खं. वै.; गॉ. नॉ. बु.; प्रा. च. को.; पु. इं.; सु. वि. को.]

(२) केतुमाल खंडातील एक जनपद (वायु पु. ४४.१४)

**कुबेरतुंग** श्राद्धाला योग्य असे एक पवित्र स्थान. भारताच्या ईशान्येला हे स्थान आहे. हे एक सिद्धक्षेत्र असून इथे देवीचे व महादेवाचे अशी दोन मंदिरे आहेत. इथल्या देवीमंदिरात भगवंताने एका पायावर उभे राहून एक दिव्य युगपर्यंत तपश्चर्या केली, असे ब्रह्मांड पुराणात सांगितले आहे (३.१३.८०). [पु. इं.]

**कुबेरपंथ** कोळी जातीच्या कुबेर नामक एका साधूने या पंथाची स्थापना केली. या पंथाचे लोक मूर्तिपूजक असून ते भजन व कीर्तन ही देवसेवेची प्रमुख साधने मानतात. भजनाच्या योगाने मुक्ती मिळते, असे यांचे मत आहे.

**कुबेरमंत्र** 'यक्षाय कुबेराय वैश्रवणाय धनधान्याधिपतये धनधान्यसमृद्धि मे देहि दापय स्वाहा' असा हा पस्तीस अक्षरी कुबेरमंत्र आहे. या मंत्राचा ऋषी विश्रवा, छंद वृहती व देवता शिवमित्र कुबेर ही होय.

कुबेराची पूजा करून या मंत्राचा एक लक्ष जप करतात व तिळांच्या दशसहस्र आहुती देऊन तो सिद्ध करतात. शिवालयात बसून या मंत्राचा दहा हजार जप केल्याने धनवृद्धी होते व बिल्व वृक्षाखाली बसून एक लाख जप केल्यास अगणित सपत्ती मिळते, असे सांगितले आहे.

'ॐ श्रीं ॐ ह्रीं श्रीं ह्रीं क्लीं श्रीं क्ली वित्तेश्वराय नमः' हा मंत्रही कुबेरमंत्र म्हणून सागितला आहे. [ मं. म. ]

**कुबेरमूर्तिदान** एखाद्याच्या दानात विघ्न केल्याने जे दारिद्र्य येते, ते नष्ट व्हावे या इच्छेने कुबेरमूर्तीचे दान करतात. अडीच माषांपासून पन्नास माषांपर्यंत अथवा ऐपतीप्रमाणे सुवर्णाची कुबेरमूर्ती करून तादुळाच्या राशीवर तिची स्थापना करतात. राजाधिराज म्हणून तिची पूजा करतात आणि पुढील मंत्राने प्रार्थना करतात—

**उत्तराशापते देव कुबेर नरवाहन ।**
**पद्मशङ्खनिधीनां त्वं पतिः श्रीकण्ठवल्लभः ।।**
**दानविघ्नान्मया प्राप्तं दारिद्र्यं मम दुःखदम् ।**
**तत्सर्वं तव दानेन पापमाशु विनाशय ।।**

अर्थ – हे उत्तरदिशेच्या स्वामी नरवाहन कुबेरदेवा, तू पद्म व शंख या निधींचा पती व शिवाचा आवडता आहेस. दानात विघ्न केल्यामुळे मला जे दारिद्र्य आले आहे, ते सर्व आणि माझे पाप तू या दानाने नष्ट कर.

नंतर हवन करून ती मूर्ती दान देतात. [ दा. चं. ]

**कुबेर यक्ष** जैन दैवतसमूहातला एक यक्ष. मल्लिनाथाचा सेवक. याचे वर्णन असे–

**मल्लिनाथस्य यक्षेशः कुबेरो हस्तिवाहनः ।**
**सुरेन्द्रचापवर्णोऽयमष्टहस्तश्चतुर्मुखः ।।**

अर्थ– कुबेर हा मल्लिनाथाचा सेवक आहे. तो हत्तीवर बसतो. तो इंद्रधनुष्याच्या वर्णाचा असून त्याला चार मुखे व आठ हात आहेत.

त्यांपैकी एक वरदमुद्रेत व दुसरा अभयमुद्रेत आहे. बाकीच्या हातांत तो कुऱ्हाड, माला, मातुलिंग, शक्ती, मुद्गर आणि माला धारण करतो. दिगंबरमते तो फलक, धनुष्य, दंड, कमल, खड्ग, कुऱ्हाड, पाश व वरदमुद्रा धारण करणारा आहे. [ जै. इ. ]

**कुब्जक** राजधानीच्या रचनेचा एक प्रकार. राजाच्या दर्जानुसार राजधानीचे नऊ प्रकार सांगितलेले आहेत. त्यांपैकी कुब्जक हा एक प्रकार असून कनोज शहरातील कान्यकुब्जनामक प्राचीन नगराच्या अवशेषांवरून त्याची रचना पाहायला मिळते. अशा प्रकारचे नगर हे चौकोनी असून त्याच्या मध्यभागी बैलाच्या वशिंडासारखा उंचवटा असतो. अशा नगरात सोळा मुख्य सडका व बत्तीस पेठा किंवा आळ्या असतात. त्यामध्ये निरनिराळ्या जातींची वेगळी वसती असते.

कुबडाप्रमाणे वक्ररचना असलेल्या नगरालाही कुब्जक म्हणतात. नगराच्या सीमेवरील स्थान वा उपनगर याला कुब्ज म्हणावे, असे कामिकागमात सांगितले आहे (२०.१५). [ एन्सा. हिं. आ.; आचार्य– बी. सी. लॉ को. व्हॉ. ]

**कुब्जा** (१) आठ वर्षाच्या मुलीला कुब्जा अशी संज्ञा आहे. 'अष्टवर्षा च कुब्जिका' असे रुद्रयामलतंत्रात म्हटले आहे (६.९४). कुबड असलेली ती कुब्जा हा या शब्दाचा वाच्यार्थ होय. देवीभागवतात कुमारीपूजेच्या अंतर्गत हिच्या पूजेचा विधी सांगितला आहे. [ शं. हा. ]



कुब्जा परिचारिका

(२) एक स्त्री. बालपणी वैधव्य प्राप्त झाल्यावर पुढील साठ वर्षांचे आयुष्य हिने पुण्याचरणात घालविले. पुढे ही वैकुंठलोकात गेली. नंतर सुंदोपसुंदांचा नाश करण्याकरिता ही तिलोत्तमा नावाने अवतरली. ते दोघे आपसात भांडून मेल्यावर ब्रह्मदेवाने हिचे अभिनंदन केले व हिला सूर्यलोकात स्थान दिले ( पद्म पु. १२६ ).

(३) कंसाची दासी. हिचे शरीर तीन ठिकाणी वक्र होते. कृष्णाच्या अनुग्रहाने ते सरळ झाले ( भाग. पु. १०.४२ ).

(४) कैकेयीची दासी मंथरा हिचेही नाव कुब्जा होते. [ प्रा. च. को. ]

**कुब्जाम्रक** गंगाद्वाराजवळचे एक तीर्थ. हरिद्वार किंवा मायापुरी म्हणजेच कुब्जाम्रक होय, असे वराह-पुराणात म्हटले आहे. कूर्मपुराणाच्या मते कुब्जाम्रक म्हणजेच कनखल होय. या ठिकाणी श्राद्ध करतात. इथे रैभ्य ऋषीचा आश्रम होता (म. भा. वन. ८४.४०).

**कुभा** सिंधूला पश्चिमेच्या बाजूने मिळणाऱ्या नद्यांपैकी एक मोठी नदी. ऋग्वेदात हिचा उल्लेख आहे (५.५३.९; १०.७५.६). काही लोकांच्या मते ही नदी म्हणजे भरत-खंडाची पश्चिमेकडील सरहद्द होय. अर्वाचीन काबूल नदी, पुराणातील कुहू नदी व कुभा ही सर्व नावे एकाच नदीची आहेत. टॉलेमीने हिला टूमओस अथवा कोआ म्हटले आहे. कुभा नदी सुलेमान पर्वताच्या दरीतून उगम पावते. तिला स्वात व गौरी या दोन नद्या मिळतात. या नदीचा उल्लेख वायू व कूर्म या पुराणांतही आहे. [ हि. जॉ. ए. इं. ]

**कुम** पितळेची सरळ तुतारी. ही फार पवित्र व ब्राह्मणांनीही वाजविण्यास योग्य समजली जाते. [ म्यु. इं. ]

**कुमरगुरुपर** (१७ व्या शतकाचा मध्य) तमिळनाड-मधील एक विद्वान संतकवी. कैलाशपुरम् येथे याचा जन्म झाला. वयाला पाच वर्षे होईपर्यंत हा अजिबात बोलत नव्हता. पुढे कार्तिकेयाने त्याला वाचाशक्ती दिली व तो तमिळ भाषेचा पंडित बनला. याने अनेक प्रबंधकाव्ये रचली आहेत. 'मीनाक्षी पिळ्ळैतमिळ', 'तिरुमलै मुरुगन् पिळ्ळैतमिळ' या त्याच्या रचना त्याचे प्रगाढ भाषाज्ञान, कवित्व व पांडित्य यांच्या द्योतक आहेत. तिरुवारुर् नान्-मणिमालै हा ग्रंथ त्याच्या चिंतनशीलतेचा परिचायक आहे; तर नीतिनेरी विळक्कम् नामक सूक्तिग्रंथ त्याचे अनुभवज्ञान व उपमाचातुर्य व्यक्त करणारा आहे. त्याच्या रचनेत अपूर्व माधुरी प्रत्ययाला येते. तो आपल्या नीतिनेरि विळक्कम् या ग्रंथात सांगतो—

**वञ्चित्तल् मदियीनम्**
**वञ्चित्तु ओलुहुम् मदियिलिकाळ् यावरैयुम्**
**वञ्चित्तेम् एन्रु महिल्मिन्-वञ्चित्त**
**कङ्गुम् उळन् ओरुवन् काणुङ्गल् एन्रु अञ्जि**
**अङ्गम् कुलैवदु अरिवु.**

अर्थ — कपटी व धूर्त माणसांनो, तुम्ही जी कारस्थाने करता, त्याबद्दल गर्वाने फुगून जाऊ नका. अरे माणसा, भीती बाळग. तुझ्या हृदयात असणाऱ्या परमेश्वराचे तुझ्या सर्व गुप्त कारस्थानांवर लक्ष आहे.

धर्मपुरम् येथील मठाधीश माशिलामणी देशिकर नावाच्या स्वामीकडून याला उपदेश मिळाला. गुरूच्या आज्ञेनुसार शैव पंथाच्या प्रचारासाठी हा उ. भारतात गेला. उत्तर व दक्षिण भारताचे सांस्कृतिक संबंध दृढ करण्यात याचा बराच मोठा भाग आहे. काशीक्षेत्री याने केदारनाथाचे मंदिर बांधले व कुमारस्वामी मठाची स्थापना केली. काशीतच याचा अंत झाला. [ त. औ. उ. सा.; शी. त. म्यु.; के. के. कृष्णन् ]

**कुमरावत** मध्यप्रदेशातील एक जात. हे लोक तागाची लागवड करतात व त्याच्या दोऱ्यांपासून पोती विणतात. म्हणूनच छत्तीसगडमध्ये यांना पटविन असे नाव पडले आहे. कुमरावत स्वतःला राजपुताचे वंशज मानतात

**विवाहप्रथा**— या जातीत मुलींची संख्या कमी असल्यामुळे मुलींचे विवाह लहानपणी होतात. मुलाचा बाप काही मित्रांसह मुलीच्या बापाकडे जाऊन मुलीला मागणी घालतो. विवाह-विधीत प्रथम कुलदेवतांची पूजा करतात, नंतर स्त्रिया दळण घालतात. त्या वेळी कुटुंबातील पूर्वजांची नावे उच्चारून त्यांना लग्नसमारंभास येण्याचे निमंत्रण देतात. [ ट्रा. का. सें. प्रॉ. इं. ]

**कुमाऊं** उ. प्रदेशाचा हिमालयात पसरलेला भाग. यात अलमोडा, नैनीताल, गढवाल, टिहरी व देहरादून या जिल्ह्यांचा समावेश होतो. याच्या उत्तरेस तिबेट, पूर्वेस नेपाळ व पश्चिमेस शिवालिक टेकडया असून हा प्रदेश धौली-गंगा, अलकनंदा व शारदा ( काली ) या नद्यांनी वेढलेला आहे. याचे प्राचीन नाव कूर्माचल असे होते. दक्षाने यज्ञ केला त्या प्रसंगी पार्वतीचा अपमान झाल्यामुळे तिने अग्निप्रवेश केला असता शंकराने तिचे शव घेऊन कूर्माचलावर तांडवनृत्य केले, असे म्हणतात. पांडव स्वर्गाला गेले ते याच प्रदेशातून, असेही म्हणतात.

**इतिहास** — सनपूर्व २००० च्या सुमारास खश लोक या प्रदेशात आले. त्या आधी या भागात किन्नर, किरात व नाग राहत होते. टॉलेमीने या गढवाल-कुमाऊं प्रदेशाला किरातांचा व तंगणांचा देश म्हटले आहे. तंगण म्हणजेच खश लोक होत.

खशांच्या नंतर आर्य लोकांचे आगमन झाले. खश व आर्य या दोघांनी मिळून किरातांना पराभूत केले; आणि तेव्हापासून तिथे खशांची सत्ता प्रस्थापित झाली. त्यानंतर सनपूर्व १ ल्या शतकात शक लोक भारतात आले. गुप्त वा हूण यांनी त्यांचा पराभव केल्यानंतर कित्येक शक राजपुत्र व सरदार यांनी हिमालयातील भिन्न भिन्न दुर्गम स्थानांचा आश्रय घेतला असावा. खश व शक हे एकाच वंशातील लोक होते.



कुमाऊं युवती

शकांनी हिमालय – प्रदेशात आपली सत्ता स्थापन केली. तिथें ज्या असंख्य सूर्यमूर्ती आढळतात, त्या शकांच्याच आहेत. इ. स. च्या ५ व्या व ६ व्या शतकात हिमालयातील बहुतेक भाग तोरमाण व मिहिरकुल यांच्या सत्तेखाली होता. त्यानंतरचे कुमाऊं-गढवालचे राजे मौखरी व वर्धन राजांचे मांडलिक असावे. हर्षाच्या मृत्यूनंतर सुमारे दोनशे वर्षे आसामपासून गिलगितपर्यंतचा सारा हिमालय प्रदेश तिबेटच्या अधिसत्तेखाली होता.

इ. स. ९ व्या शतकाच्या मध्यास कनोज येथे प्रतीहार राजा भोज राज्य करीत असता तिबेटची हिमालय-प्रदेशावरील सत्ता नष्ट झाली आणि तिथे कत्यूरी राजवंशाची सत्ता स्थापन झाली. हे राजे सुमारे शंभर वर्षे प्रतीहारांचे सामंत असावे. ललितशूर हा या वंशातला सर्वांत प्रतापी राजा होता. कत्यूरी राजे शकवंशी होते, असे अनुमान आहे. त्यांची सत्ता तिथे इ. स. १०५० पर्यंत होती. त्यानंतरच्या तीनशे-साडेतीनशे वर्षात कुमाऊं प्रदेशात अनेक लहान लहान राज्ये निर्माण झाली. इ. स. १४०० च्या सुमारास तिथे चंद वंशाची सत्ता प्रस्थापित झाली. या वंशाने तिथे सुमारे ४०० वर्षे राज्य केले. १५ व्या शतकातील भारतीचंद, रतनचंद, किरातीचंद व माणिकचंद हे राजे पराक्रमी होते. १६ व्या शतकाच्या अखेरीस रुद्रचंद याच्या वेळी कुमाऊंचा राज्यविस्तार सर्वात मोठा झाला. १७ व्या शतकात बाजबहादुरचंद (इ. स. १६३८–७८) या राजाने तिबेटवर आक्रमण करून तिथपर्यंतचा सर्व प्रदेश आपल्या सत्तेखाली आणला. १८ व्या शतकात रोहिल्यांनी (रुहेला) कुमाऊंवर आक्रमण



जुने घर – कुमाऊं

करून तिथली असंख्य मंदिरे उद्ध्वस्त केली. पण त्यांनी तिथे सत्ता मात्र स्थापिली नाही. या शतकाच्या शेवटी चंदवंशाची सत्ता संपून तिथे गोरखावंशाची सत्ता आली. पण ती फार वर्षे टिकली नाही. इ. स. १८१५ साली इंग्रजांनी कुमाऊं वगैरे बराच प्रदेश नेपाळकडून जिंकून घेतला. १९४७ मध्ये हा प्रदेश स्वतंत्र होऊन भारतीय गणराज्यात समाविष्ट झाला.

**लोक–** कुमाऊं प्रदेशात ब्राह्मण, राजपूत व शिल्पकार (डोम) या मुख्य जाती असून त्या प्रत्येक जातीच्या अनेक उपजाती आहेत. ब्राह्मण व राजपूत या दोन्ही जातीचे लोक मूळ खश वंशाचे आहेत. डोम ही जात हीन मानली जाते.



एक मंदिर – कुमाऊं

इ. स. पू. २ ऱ्या शतकापासून इ. स. ६ व्या, ७ व्या शतकापर्यंत या भागात बौद्ध धर्माचे प्राबल्य होते. या वेळी बहुतेक खश

लोक आणि सर्व शिल्पकार बौद्धधर्मी झाले. तथापि कुमाऊं-मध्ये बौद्ध मूर्ती वा मंदिरे मात्र आढळत नाहीत. याचे कारण १२ व्या शतकानंतर तिथे ब्राह्मणी धर्म प्रस्थापित झाला आणि बौद्ध मूर्ती व मंदिरे यांचे हिंदूकरण झाले, हे असले पाहिजे. तेव्हापासून तिथले लोक सनातनी, शैव किंवा शाक्त झाले आहेत. उदासीन, नाथ (कानफाटे), जंगम, बैरागी संन्यासी, साधू हे सनातन धर्मातले मुख्य संप्रदाय होत. इथले हिंदू लोक सर्व पौराणिक व तांत्रिक देवताना भजतात. नंदा-देवी या नावाच्या एका शिखरावर विराजित असलेल्या पार्व-तीला कुमाऊंमधले लोक विशेषत्वाने भजतात. भुताखेतांचीही पूजा चालते. पाडवा, नवरात्र, दसरा, दिवाळी, संक्रांत, रामनवमी, वैशाखी, कृष्णजन्म, गणेशचतुर्थी, वसंतपंचमी, शिवरात्र, होळी, इ. सर्व हिंदू सण व उत्सव इथे साजरे केले जातात.

**बगवाली–** कुमाऊं प्रदेशात दीपावलीच्या उत्सवाला बग-वाली असे नाव आहे. हा केवळ दीपोत्सव नसून ते एक प्राचीन परंपरागत पर्व आहे. पूर्वी या प्रदेशावर बाहेरून येणाऱ्या आक्रमणाना तोंड देणे किंवा शेजारच्या देशावर आक्रमण करणे, यासाठी दिवाळीनंतर सैन्याची जमवाजमव व इतर धामधुम सुरू होत असे. या लष्करी परंपरेचे प्रतीक म्हणून हा बगवाली नावाचा उत्सव साजरा केला जातो. कुमाऊं सैनिक शत्रूवर गोफणीने दगडांचा मारा करण्यात फार तरबेज होते. अशा प्रकारची लढाई आता प्रत्येक गावात या उत्सवात करतात. अलमोडा जिल्ह्यातील सोमनाथ नावाच्या गावी ककनोइ व कुलोल नामक दोन राजपुत गटाचे युद्ध दरवर्षी होते. पूर्वी पुष्कळदा त्याचे पर्यवसान खऱ्या युद्धात होत असे. या दंगली पाहण्यासाठी आसपासच्या डोंगराळ प्रदेशातून बरेच लोक येतात.

या प्रदेशातील लोकांचा मुख्य उद्योग शेती हा असून भात व गहू ही इथली मुख्य पिके आहेत. या भागात चहाची लागवडही होते. लोकर कातून कपडे विणणे, बांबूच्या टोपल्या व चटया विणणे, पशुपालन, इ. व्यवसाय करणारे बरेच लोक या प्रदेशात आहेत.

**प्रेक्षणीय स्थळे–** अलमोडा हे कुमाऊंमधले एक प्राचीन नगर असून तिथे कत्यूरी राजांचा एक दुर्ग आहे. इ. स. १५६० मध्ये ही चंदवंशी राजांची राजधानी झाली. चंपावत ही त्यांची जुनी राजधानी अलमोडापासून ५४ मैलांवर आहे. तिथ कौटोलगढ नामक जुना किल्ला आहे. जवळच घटकू देवतेचे मंदिर असून तिथे दरवर्षी जत्रा भरते. स्कंदपुराणा-तील कूर्माचल तो हाच होय.

जागेश्वर हे कुमाऊंमधले एक तीर्थस्थान आहे. तिथे शंकराची अनेक मंदिरे आहेत.



जुने मंदिर – द्वाराहाट

उजैन येथे एक प्राचीन किल्ला असून युआन च्वांग याने वर्णिलेल्या गोविषाण नगराचे भग्नावशेष तिथे आहेत, असे कनिंगहॅमचे मत आहे. तिथे द्रोणसागर नावाचा एक मोठा तलाव असून त्याच्या काठावर अनेक मंदिरे आहेत.

नैनीताल हे थंड हवेचे व निसर्गरमणीय ठिकाण गेल्या शतकातच इंग्रज लोकांनी शोधून वसविले. तिथे एका तळ्याच्या काठी नैना देवीचे मंदिर आहे. पार्वतीचे नयन या तळ्यात पडले, म्हणून तिथे नैना देवीचे मंदिर बांधण्यात आले व त्यावरूनच या स्थानाला नैनीताल हे नाव पडले. याशिवाय कुमाऊंमधली दूनागिरी, द्वाराहाट, पिन्ननाथ, बागे-श्वर, वैजनाथ, सोमेश्वर, इ. अनेक ठिकाणे उल्लेखनीय आहेत. नंदादेवी, त्रिशूल, नंदाकोट, पंचचूली ही हिमालयातील पर्वतशिखरे याच प्रदेशात आहेत. [कुमाऊं; रमा बखले–साधना, १२ डिसें. ५३; यमुनादत्त वैष्णव – धर्मयुग, २८ ऑक्टो. १९६२]

## कुमाऊंनी लोकसाहित्य

कुमाऊंनी ही जनभाषा अल-मोडा व नैनीताल या पहाडी जिल्ह्यांत प्रचलित आहे. हिच्या काही उपभाषाही आहेत; त्यांची नावे अशी– अलमोडीया बोली, काली कुमाऊं की बोली, शोर की बोली, पालीपछाऊं की बोली, जोहार की बोली, दान-पुर की बोली, भाबर कुमाऊं की बोली, बोग्सा बोली, थारू बोली, इत्यादी.

या सर्व भाषांत बरेच लोकसाहित्य आहे व ते गद्यपद्यात्मक आहे. या साहित्यात लोककथा, लोकोक्ती, पवाडे व लोकगीते असे प्रकार आहेत.

**लोककथा** – कुमाऊंच्या लोककथांचे क्षेत्र विशाल आहे. जीवनाच्या सर्व पैलूंवर निर्माण केलेल्या या कथा आहेत. त्यातल्या पुष्कळशा उपदेशात्मक आहेत. हिमालय हे अप्सराचे निवासस्थान मानले जाते. या अप्सरांच्या अनेक कथा त्या भाषेत आहेत. या अप्सरा इंद्राच्या दरबारात नृत्य करतात, पर्वतशिखरांवर विहार करतात, नद्यांच्या प्रवाहांत जलक्रीडा करतात, रंगीबेरंगी फुले गोळा करतात व मृत्युलोकातून वीर आणि सुंदर तरुणांना उचलून आपल्या निवासस्थानात आणतात. काही लोककथात या अप्सरांना श्रीकृष्णाच्या गोपी असेही म्हटले आहे.

**पवाडे** – कुमाऊंच्या लोकसाहित्यात सर्वश्रेष्ठ स्थान पवाडे किंवा लोकगाथा यांना आहे. या लोकगाथांतून कुमाऊंचा इतिहास आणि परंपरा यांचे कण आढळतात. यांतल्या बऱ्याच गाथा या वीरगाथा असतात. हे वीर आपल्या कोटात राहतात, आसपासच्या गावांवर स्वामित्व करतात आणि आपसात लढतातही. या लोकगाथांतून सालवीर, अजीतबौरा व रणजीतबौरा या वीरांचे पवाडे विशेष प्रसिद्ध आहेत. सिदुवा–विदुवा हे दोघे कुमाऊंचे लोकप्रिय नायक आहेत. त्यांच्या पराक्रमाचे जे पवाडे गायले जातात, त्यांना रमौले म्हणतात.

**लोकगीते**— मालूशाही व रेंजुली तसेच गंगनाथ व माना या दोन तिथल्या लोकप्रिय प्रेमगाथा होत. मालूशाही हा कत्यूरी वंशातला राजा होता व रेंजुली ही भोट देशाच्या एका व्यापाऱ्याची कन्या होती. त्या दोघांचे प्रथम भेटीतच प्रेम जमते आणि दोघेही एकमेकांच्या प्रेमपाशांत बद्ध होतात. गंगनाथ हा दुसरा प्रेमी नायक. तो डोटीचा राजकुमार होता व त्याची प्रेयसी माना ही अदौली गावची ब्राह्मणकन्या होती.

कुमाऊंच्या देवी, देवता व भूतप्रेत यांच्या गाथांना जागर म्हणतात. सत्यनाथ, भोलानाथ, गंगनाथ, मसान, इ. देवतांवर अनेक जागर आहेत. पौराणिक गाथांत नंदादेवीचा जागर प्रसिद्ध आहे. त्यात सृष्टीच्या उत्पत्तीची कथा संक्षेपात दिली आहे–

**माली हो भूमि हो सों सों कार,**
**माली हो भूमि हो जल्लोकार ।**
**जल्लो हो कारो हो सों सों कार,**
**सों सों हो कारो हो धों धों कार ।**
**जल्ला हो माँजा हो गाजा जनम,**
**गाजा हो माँजा हो नला जनम ।**
**नला हो माँजा हो गाजा जनम,**
**गाजा हो पारा हो टुका जनम ।**
**टुका हो पारा हो फूला जनम,**
**फूला हो पारा हो फला जनम ।**

कुमाऊंच्या श्रमगीतांना हुडकिया बोल म्हणतात. शेतीची कामे करीत असताना बायका हे बोल गातात. ऋतुगीतांत रितुरैण नामक एक गीत आहे. त्याचा संबंध 'भैंटोली' प्रथेशी आहे. चैत्रमासात भाऊ आपल्या बहिणीच्या सासरी जाऊन तिला नवे वस्त्र व मिठाई भेट देतो. यालाच भैंटौली म्हणतात. इतर अनेक भाषांतल्याप्रमाणे कुमाऊंनी बोलीतही बारमासी गीत आहे. त्यात त्या त्या मासाचे वैशिष्ट्य सांगितलेले आहे–

**फुलैवो बिंदिया फुलै बुरुँशी ।**
**सबै फूला फूलीगो चैतोई मासा ।।**
**बैसाख मासा मुँवापनि बाता ।**
**सिरै को अँचला उड़ि उड़ि जालो ।।**
**जेठई मासा तपकी गे धूपा ।**
**हुरूकै दे बिजना ठंडी सरूपा ।।**
**असाड़ै धरतरी किरिले सिंगारा ।**
**गिरादिमा ऐगो मेघ बहारा ।।**
**सावन मासा गरजी गो यो मेघ ।**
**बरसना लागा सागरे तो ला ।।**
**भादोई भजन भयो घनघोरा ।**
**पिहु पिहु बोले बनका ई मोरा ।।**
**असोज मासा कुँवार कवायो ।**
**पंचनामा देवा करीलो औतारा ।।**
**कातिक मासा अघनी कवाई ।**
**घर घर दीपक जगै दिवाई ।।**
**मँगशीर मासा शितमा रितु आई ।**
**सौड़ सवेद को सेज बनायो ।।**
**पुसैई मासा पड़लो तुस्यारो ।**
**हियड़ो कँपलो अगनी अपारा ।।**
**माघई मासा घरमा रितु आई ।**
**घीऊँ खिचड़ी ले बरमा जिवाय ।।**
**फागुना मासा बादी गई चीर ।**
**चोया चंदनी को पैरी ले अबीर ।।**

कुमाऊं प्रदेश जत्रा आणि उत्सव यांच्याविषयी प्रसिद्ध आहे. यांतील काही जत्रा फार मोठ्या असतात व त्या जत्रांत दूरदूरचे लोक एकत्रित होतात. काही जत्रा धार्मिक महत्त्वाच्या, काही

व्यापारी महत्त्वाच्या, तर काही उभयविध महत्त्वाच्या असतात. या जत्राना कुमाऊनी बोलीत कौतिक म्हणतात व नटून थटून त्या जत्रांना जाणाऱ्या स्त्री-पुरुषाना कौतिकार म्हणतात. या जत्रांत जी अनेक नृत्ये होतात, त्यांतले चाचरी नृत्य सुप्रसिद्ध आहे. हे वृत्ताकार नृत्य असून या नृत्यप्रसंगी अनेक प्रकारची छोटी मोठी लोकगीते गायिली जातात. ऋषिपंचमी व भाद्र. शु. ७ मी व ८ मी हे तिथले तीन महत्त्वाचे सण होत. या दिवशी दूर्वापूजन, उमा-महेश्वरपूजा, धान्यपूजा व वृक्षपूजा होते. विवाहाच्या मगलप्रसंगीही अनेक गीते गायिली जातात आणि त्यात वधू-वरांचे रसभरित वर्णन असते. न्योलीगीते ही कुमाऊंची वनगीते होत. रानात गवत कापताना किवा लाकडे तोडताना ही गीते गायिली जातात. यांतली पुष्कळशी प्रेमगीतेच असतात. [ हि. सा. बृ. इ. भाग १६ ]

**कुमार** (१) ब्रह्मदेवाचा मानसपुत्र व प्रजापती (वायु पु. २. ४. ५३). ब्रह्मदेवाच्या सनक, सनंदन, सनातन व सनत्कुमार या पुत्रानाही ते लहान वयाचे दिसतात म्हणून कुमार अशी संज्ञा दिलेली आहे. कार्तिकेय अर्थात् स्कंद यालाही कुमार म्हणतात.

(२) २९ व्या कल्पात ब्रह्मदेवाने केलेल्या ध्यानापासून हा निर्माण झाला. याचा वर्ण गोरा व चेहरा तेजस्वी होता. पुराणपुरुष म्हणजे देवांचा देव म्हणून ब्रह्मदेवाने त्याची पूजा केली. हा योग्यांमध्ये श्रेष्ठ होता. [ पु. इं. ]

(३) एक जमात (वायु पु. ४७. ५२).

(४) एक राज्य. ह्लादिनी नदीने या राज्याला पाणी पुरविले होते (ब्रह्मांड पु. २. १८. ५५).

(५) जैन दैवतसमूहातला एक यक्ष. हा वासुपूज्याचा सेवक आहे. याचे वर्णन असे –

**त्रिमुखः षड्भुजः श्वेतः सुरूपो हंसवाहनः ।**

(प्रतिष्ठासारसंग्रह)

अर्थ– याला तीन मुखे व सहा हात असून हंस हे याचे वाहन आहे. तो गौर वर्णाचा व सुंदर आहे.

हा धनुष्य, मुंगूस, फल, मुद्गर व वरदमुद्रा धारण करतो. श्वेतांबरमते हा चतुर्भुज असून मातुलिंग, धनुष्य, बाण आणि मुंगूस धारण करणारा आहे. [ जै. इ. ]

**कुमारजीव** ( ३४४–४१३ इ. स.) – एक बौद्ध भिक्षू व ग्रंथकार. याचा बाप भारतातील एका राजाचा मंत्री होता. पण ते मंत्रिपद सोडून तो भारताच्या बाहेर पडला व चिनी तुर्कस्तानातल्या कूचा नामक राज्यात गेला. तिथल्या राजाने त्याचा सन्मान करून त्याला आपल्या राज्यातला कुलगुरू बनविले. राजवाड्यात राहत असतानाच जीवा नामक राजभगिनीचे त्याच्यावर प्रेम जडले. केवळ राजाच्या इच्छेसाठी त्याने जीवाशी लग्न केले. या दांपत्याला जो पुत्र झाला तोच हा कुमारजीव होय.

कुमारजीवाने विसाव्या वर्षी बौद्ध भिक्षूची दीक्षा घेतली. त्याने स्थविर विमलाक्ष याच्याकडून सर्वास्तिवादाचे अध्ययन केले. त्याच काळात चिनी राजाच्या सेनापतीने कूचावर आक्रमण केले. या सेनापतीचे नाव लूकाङ असे होते. कूचाच्या राजाला त्याच्यापुढे हार खावी लागली. लूकाङने कूचामधले अनेक लोक कैद करून चीनला नेले. त्यातच कुमारजीव हाही एक कैदी होता. त्या वेळी त्याचे वय ५६ वर्षांचे होते. कुमारजीव चीनमध्ये पोचण्याच्या पूर्वीच त्याची कीर्ती तिकडे जाऊन पोचली होती. चिनी सम्राट याओ हिन् याने कुमारजीवाचे स्वागत करून त्याला आपला राजगुरू बनविले. कुमारजीव राजाश्रयाला राहून चीनमध्ये बौद्ध धर्मावर व्याख्याने देऊ लागला. सम्राटाच्या प्रार्थनेवरून त्याने संस्कृत बौद्ध ग्रंथांचा चिनी भाषेत अनुवाद करण्याचे काम सुरू केले. तोपर्यंत चिनी भाषेत जे संस्कृत ग्रंथ अनुवादित झाले होते ते ठीक नव्हते आणि सरसही नव्हते. कुमारजीव कूचा येथे असतानाच चिनी भाषा शिकला होता. चीनमध्ये गेल्यावर त्याने त्या भाषेत प्रावीण्य मिळविले. त्यामुळे त्याने जे अनुवाद केले, ते सरस उतरले. आजही चीनमध्ये त्यांचेच प्रामाण्य मानले जाते. त्याने सुमारे १०० ग्रंथ चिनी भाषेत अनुवादिले. या अनुवादकार्यासाठी सम्राटाने कुमारजीवाच्या हाताखाली ८०० चिनी बौद्ध भिक्षू नियुक्त केले होते. या अनुवादग्रंथांत सुखावतीव्यूह, सद्धर्मपुंडरीक, सर्वास्तिवादप्रातिमोक्ष, सूत्रालंकार, ब्रह्मजालसूत्र, इ. ग्रंथांचे अनुवाद विशेष प्रसिद्ध आहेत. बौद्ध धर्माचे महान आचार्य अश्वघोष, नागार्जुन, आर्यदेव व वसुबंधू यांची चरित्रे सर्वप्रथम कुमारजीवानेच लिहिली. ही चरित्रे लिहून कुमारजीवाने वरील आचार्यांची कीर्ती चीनमध्ये चिरस्थायी केली. याओ हिन् या सम्राटाच्या राज्यात कुमारजीव केवळ बारा वर्षेच राहिला. पण त्या एका तपातच त्याने त्या देशात धार्मिक नवजीवनाचा संचार केला. चीनमध्येच त्याचे देहावसान झाले.

काओ सेङचङ या चिनी ग्रंथात कुमारजीवाचे संक्षिप्त जीवनचरित्र दिलेले आहे. हा ग्रंथ इ. स. ५१६ मधला आहे. कुमारजीव हा प्रथम सर्वास्तिवादी होता; पण पुढे तो महायान पंथाचा अनुयायी बनला असे कळते. [ गु. सा. इ.; बु. उ. अ. ]

**कुमारदास** (इ. स. चे ७ वे किंवा ८ वे शतक) एक संस्कृत कवी. जानकीहरण या महाकाव्याचा कर्ता. याला कुमारभट्ट असेही म्हणत. कुमारदासाने कालिदासाची शैली व परंपरा हिचे अनुकरण केले, असे राजशेखराने सांगितले आहे—

**जानकीहरणं कर्तु रघुवंशे स्थिते सति ।**
**कविः कुमारदासश्च रावणश्च यदि क्षमौ ।।**

(सूक्तिमुक्तावली)

अर्थ— रघुवंश (काव्य व सूर्यवंश)असतांना जानकीहरणाचे (काव्यग्रंथ रचण्याचे व सीताहरण करण्याचे) सामर्थ्य जर कोणात असेल, तर ते कुमारदास व रावण या दोघांतच आहे.

. या उक्तीवरून प्राचीन काळी पंडितसमाजात जानकीहरणाची बरीच प्रसिद्धी होती, असे दिसते. कुमारदासाने कालिदासाचे जे अनुकरण केले आहे, ते केवळ बाह्यांगापुरतेच नसून अंतरंगाचेही आहे. त्याचा परिणाम या उभयतांबद्दल अनेक दंतकथा निर्माण होण्यात झाला. या दंतकथा या दोन कवींना परस्परांचे मित्र व समकालीन ठरवितात. राजा मोग्गलायन ( मौद्गलायन ) कुमारदास याने सिंहल देशावर नऊ वर्षे राज्य केले व नंतर कालिदासाच्या चितेवर स्वतःला जाळून घेतले, असे सिंहल देशातील पूजावलीत सांगितले आहे. कुमारदासाचा मृत्यू इ. स. ५२४ मध्ये झाला, असा महावंशात निर्देश आहे. कवी कुमारदास व सिंहलराज कुमारदास या दोन्ही व्यक्ती एकच होत्या, असे काही जणांचे मत आहे, तर अनेकांना हे मत संशयास्पद वाटते. एक गोष्ट मात्र खरी, की जानकीहरणाच्या प्रती बहुंशी सिंहली लिपीत व सिलोन मध्येच सांपडल्या आहेत. आणि देवनागरीत आढळणाऱ्या प्रतींत मूळ सिंहली प्रतीचा आधार दिलेला आहे. त्यामुळेच बराच काळपर्यंत हे काव्य अज्ञात राहिले होते.

कुमारदास ७ व्या किंवा ८ व्या शतकात झाला असावा. वामनाने ( इ. स. ८०० ) जानकीहरणातील एक श्लोक उद्धृत केला आहे. राजशेखरानेही ( इ. स. ९०० ) त्याची कीर्ती गायिली आहे. कुमारदास अंध असल्याचे त्याने आपल्या काव्यमीमांसेत म्हटले आहे.

जानकीहरण ही कुमारदासाची एकमात्र रचना असून या काव्याचे २० सर्ग उपलब्ध आहेत. रामायणातील कथेला अनुसरून त्याने हे काव्य रचले असून मूळ कथेत फरक केलेला नाही. फक्त जिथे जिथे संधी मिळाली, तिथे तिथे त्याने आपले वर्णनकौशल्य मात्र प्रगट केले आहे. पहिल्या व सहाव्या सर्गात अनुक्रमे अयोध्या व मिथिला नगरींची वर्णने, सातव्यात सीतेची विवाहपूर्व प्रणयव्याकुळता, आठव्यात राम-सीता यांचा विवाह व प्रणयक्रीडा. नवव्यात वर्षावर्णन व दहाव्यात शरद्वर्णन या गोष्टी आल्या आहेत. या सर्व वर्णनांवर कालिदासाची छाप आहे. उदाहरणार्थ पुढील श्लोक पाहा—

दशरथाचा बाण लागल्यावर श्रावण त्याला म्हणतो—

**एकं त्वया साधयतापि लक्ष्यं**
**नीतं विनाशं त्रितयं निरागः ।**
**मच्चक्षुषा कल्पितदृष्टिकृत्यौ**
**वृद्धौ वने मे पितरावहं च ।।**

अर्थ – (हे राजा,) तू एकाच लक्ष्यावर शरसंधान केलेस, पण तीन निरनिराळ्या निरपराध जीवाचा नाश केलास. माझ्याच डोळ्यांनी आपल्या दृष्टीचे काम भागविणारे वनातील माझे वृद्ध आई-वडील आणि मी. (माझ्या मृत्यूनंतर माझे आईबाप जिवंत राहणार नाहीत, असा भावार्थ)

पुढे तो म्हणतो –

**वनेषु वासो मृगयूथमध्ये**
**क्रिया च वृद्धान्धजनस्य पोषः ।**
**वृत्तिश्च वन्यं फलमेषु दोषः**
**सम्भावितः को मयि घातहेतुः ।।**

अर्थ – वनात हरणांच्या कळपात माझा निवास असतो. वृद्ध माता-पित्यांचे पालन-पोषण हे माझे कर्म असते आणि रानात मिळणाऱ्या फळांवर माझी उपजीविका चालते. यांतले मला मारण्याजोगे असे कोणते कारण तूं मानलेस ?

आपल्या काव्यात याने लहान लहान वृत्ते योजिली असून अलंकारांचा उपयोगही योग्य प्रमाणात केला आहे. [ सं. सा. इ.; सं. सा. सो. इ. ]

**कुमारपाल** गुजरातचा एक प्रतापी जैन राजा. याने शाकंभरीच्या राजाला नमविले होते. त्याने मारवाडपर्यंत आक्रमण करून सर्व गढपतींना पराभूत केले होते. चितोडच्या किल्ल्यावर एक शिलालेख असून त्यात त्याच्या पराक्रमाचे वर्णन आहे [ जै. ध. ]

**कुमारभवन** राजकुमारांना वसती करण्यासाठी राजवाड्यापासून थोड्या अंतरावर बांधलेली वास्तू. अशा प्रकारच्या कुमारभवनाचे उल्लेख प्राचीन संस्कृत साहित्यात आढळतात. याचे बहुधा तीन भाग असून याची पुष्कळशी रचना राजवाड्याच्या धर्तीवरच असे. सगळ्यात प्रथम द्वारपद असे व राजवाड्याच्या महाद्वाराला हे मिळविलेले असे. पहिल्या भागात हत्ती-घोडे व लवाजमा असे. दुसरा विभाग म्हणजे श्रीमंडप होय. त्याच्या आतील तिसऱ्या विभागात कुमाराचे

शयनगृह असे. राम हा युवराज असताना त्याचे भवन दशरथाच्या वाड्यापासून विभक्त होते आणि त्याचे एकूण तीन भाग होते असे रामायणात म्हटले आहे. चंद्रापीडाच्या कुमारभवनाचे श्रीमंडप व शयनगृह असे दोनच भाग होते. युवराज हर्षाचेही कुमारभवन सम्राट प्रभाकरवर्धनाच्या प्रासादापासून विलग होते. [ कादं. ए. सां. अ. ]

**कुमारमणी भट्ट** एक कवी. याचा जन्म इ. स. १७४६ मध्ये झाला, असे ग्रियर्सन सांगतो. हा वत्सगोत्री तेलंगी ब्राह्मण होता. याच्या पित्याचे नाव हरिवल्लभ भट्ट असे होते. कुमारमणी संस्कृत व हिंदी या भाषांचा पंडित होता. कुमारमणीने सूक्तिसंग्रह, सप्तशती व रसिकरसाल असे तीन ग्रंथ रचले आहेत. त्यांपैकी पहिले दोन संस्कृतात व तिसरा हिंदीत आहे. रसिकरसाल हा ग्रंथ काव्यप्रकाशाच्या आधारे लिहिलेला एक रीतिग्रंथ आहे. यात काव्यकारण, शब्दशक्ती, काव्यभेद, रसभेद, इ. विषयांवर विस्ताराने विचार केलेला आहे. याने वात्सल्य धरून दहा रस मानले आहेत. [ हिं. सा. को. ]

**कुमार यामायन** एक सूक्तद्रष्टा. सर्व प्रजाजनांचा स्वामी व पिता जो यम त्याने आपल्या पूर्वजांवर कृपा करावी, असे याने यमाला प्रार्थिले आहे (ऋ. १.१३५).

**कुमारवाल्मीकी** (१६ वे शतक) एक कन्नड महाकवी. याचे मूळ नाव नरहरी असे होते; पण याने कन्नड भाषेत रामायणरचना केल्यामुळे याला लोक कुमारवाल्मीकी म्हणू लागले. हा कवी कानडी ब्राह्मण असून विजापूरजवळच्या तोरवे गावचा रहिवासी होता. तिथल्या नरहरि-मंदिरात याने आपले रामायण लिहिले. हा ग्रंथ भामिनीषट्पदी या छंदात आहे. कन्नड भाषेत रामायण रचणारा हाच पहिला कवी होय. याच्या काव्यात काव्यगुणापेक्षा भक्तिप्रेमाचा भागच अधिक दिसतो. याच्या रामायणाला तोरवे-रामायण असे म्हणतात. याच्या रामायणाच्या मागून कन्नड भाषेत रामायणरचनेची जणू अहमहमिकाच लागली. [ कर्नाटक; हिं. क. भ. तु. अ. ]

**कुमारव्यास** (इ. स. १६ वे शतक) कन्नड साहित्यातला एक युगनिर्माता महाकवी. कर्नाटकात याला पंपाच्या तोडीचा मान आहे. याचे मूळ नाव नार्णप्प असे असून जन्मस्थान कोळिवडू हे आहे. संस्कृत, कन्नड आणि मराठी या तीन्ही भाषा त्याला उत्तम प्रकारे अवगत होत्या. या कवीने महाभारताची पहिली दहा पर्वे कन्नड भाषेत अनुवादित केली आहेत. महाभारतातले मानवजीवन हे त्रिगुणात्मक अतएव बहुरंगी आहे. सज्जन, दुर्जन व तटस्थ अशा मानवविशेषांचा तो एक संघ आहे. श्रीकृष्ण ही या मानवसंघाची प्रेरक शक्ती होती. कुरुपांडवांचा इतिहास ही भगवंताची लीला आहे; त्या सर्व घटनांचा कर्ता-करविता तोच आहे. कुमारव्यासाने याच दृष्टीने महाभारताकडे पाहिले आहे. त्यामुळे त्याच्या महाभारताचा नायक अर्जुन किंवा धर्म न होता योगेश्वर श्रीकृष्ण झाला आहे. श्रीकृष्णाविषयी कवीच्या अंतरातला भक्तिभाव त्याच्या ग्रंथात ओतप्रोत दिसून येतो. महाभारताची प्रशस्ती गाताना तो म्हणतो—

**अरसुगळिगिदु वीरा द्विजरिगे ।**
**परम वेददा सारा, योगीश्वररा**
**तत्त्व विचारा, मंत्री जनके बुद्धि गुणा ।**
**विरहिगळ शृंगारा विद्या**
**परिणितरालंकारा काव्यके**
**गुरुवेनलु रचिसिद कुमारव्यास भारतवा ।**

अर्थ— हे महाभारत क्षत्रियांच्या हृदयात वीररस निर्माण करील. महाभारत हा ब्राह्मणांचा वेद आहे, योग्यांचा तत्त्वविचारग्रंथ आहे, मंत्रिजनांना बुद्धिचातुर्य देणारा आहे; तो विरहीजनांचा शृंगार, विद्वानांचा अलंकार आणि महाकाव्यांचा गुरू आहे.

सभापर्वात द्यूतप्रसंगी दुःशासनाने द्रौपदीच्या निरीला हात घातला, तेव्हा कवी तिच्या मुखाने श्रीहरीचा धावा करतो—

**श्री रमावर दैत्यकुल संहारा**
**हरिभवजनन मरण कुठारा**
**निगम विद्वरा सचराचर जगन्नाथा ।**
**चारु गुण गंभीर करुणाकार**
**विदित विचार पारावार हरि**
**मैदों रेनुता हळुबिदळू नळिनाक्षी ।।**

अर्थ— हे रमापते, दैत्यकुलसंहारका, जन्ममृत्युविधात्या जगन्नाथा, तू चराचर व्यापून आहेस. तू सकलगुणसंपन्न, करुणामूर्ती आणि विचारसागर आहेस. हे हरे, ये आणि माझी लज्जा राख.

उद्योगपर्वात कृष्णशिष्टाईच्या वेळी दुर्योधन जेव्हा ' गोपीजार ' या शब्दाने श्रीकृष्णाची निंदा करतो, तेव्हा विदुर क्रुद्ध होऊन त्याला म्हणतो—

कडुमुळिदु कलिभीम निन्नय
तोडेगळनु मुरिवा समयदलि
बिडदे निन्ननु कायवेके
दुळुहिदनु धनुव ।
केडु नुडिसिकोणिडन्नु कावेने
पोडु निपति केळेंदु विदुरनु
हिडिद बिल्लनु मुरिदना कुरुसेनेकळनळिसे ।

अर्थ– "दुर्योधना, ऐक. हे माझे धनुष्य मी अशा उद्देशाने जवळ बाळगले होते, की जेव्हा क्रोधाने उफाळणारा भीमसेन तुझा ऊरुभग करायला निघेल, तेव्हा तुझे रक्षण करावे; पण आताचे तुझे विषारी शब्द ऐकून मला आता तुझ्या संरक्षणाची आस्थाच उरली नाही." असे म्हणून विदुराने आपल्या धनुष्याचे दोन तुकडे करून ते फेकून दिले. हा धनुर्भंग पाहून सारे कौरव चिंतातुर झाले.

कुमारव्यासाचे हे महाभारत संपूर्ण कृष्णमय आहे. यातील प्रत्येक पात्राच्या द्वारे कवीने कृष्णचरित्र उज्ज्वल बनविले आहे. या महाभारताचे नाव कर्नाटक भारतकथामंजरी असे आहे. याची भाषाशैली सहज, सरल व कोमल आहे. गंगौघासारखा तिचा प्रवाह आहे. आपल्या रचनेत त्याने मूळ महाभारताचा अनेक ठिकाणी संकोच-विकास केला आहे. कन्नड साहित्यात षट्पदी नामक देशी छंद सर्वप्रथम कुमारव्यासानेच आणला. पंपभारत केवळ विद्वज्जनांपुरतेच मर्यादित राहिले, तर कुमारव्यासाचे महाभारत सामान्य जनतेपर्यंत जाऊन पोचले. कन्नड जनतेत काव्यरुची यानेच निर्माण केली. कन्नड जन त्याला व्यासपुत्र समजू लागले. त्यांनी त्याला 'कुमारव्यास' अशी पदवीच देऊन टाकली.

याची दुसरी पदवी म्हणजे रूपकसाम्राज्यचक्रवर्ती. याने आपल्या ग्रंथात एकनाथांप्रमाणे रूपक अलंकाराचा सढळपणे उपयोग केला असल्यामुळे त्याला ही पदवी मिळाली.

कुमारव्यास हा अद्वैती होता. त्यामुळे तो हरिहरात भेद मानीत नसे. कुमारव्यास हा जितका कवी होता, त्याहून काकणभर अधिक भगवद्भक्त होता. [एन्. रंगनाथ आणि एन्. एस्. दक्षिणामूर्ती; दक्षिण भारत– जाने. फेब्रु. १९६२; हिं. क. भ. तु. अ.]

## कुमारव्रत

हे व्रत चैत्र शु. षष्ठीस करतात. याची देवता कार्तिकस्वामी. या दिवशी मयूरवाहन कार्तिकस्वामीची सुवर्णमूर्ती करून तिची पूजा करतात. या व्रतांत उपोषण व ब्राह्मीचा रस आणि तूप यांचे प्राशन करायचे असते. फल–बुद्धिमत्ता व शास्त्रपांडित्य यांचा लाभ. [व्रतराज]

## कुमारसंभव

संस्कृत पंचमहाकाव्यांपैकी एक. याचा कर्ता कालिदास आहे. या काव्याच्या एकूण १७ सर्गांपैकी पहिले आठ सर्ग तेवढेच कालिदासाच्या हातचे असून ९ ते १७ हे सर्ग कोण्या अन्य कवीने रचले आहेत, असे आता सिद्ध झाले आहे. कालिदासाने आठव्या सर्गानंतर हे महाकाव्य का स्थगित केले, याविषयी एक दंतकथा सांगतात, ती अशी –

आठव्या सर्गात कालिदासाने शिव-पार्वतीच्या संभोगाचे वर्णन केल्यामुळे त्याला कुष्ठरोग जडला व त्यामुळे हे काव्य त्याला पुरे करता आले नाही. यावरून असे म्हणता येईल, की या संभोगवर्णनाबद्दल वाचक व टीकाकार यांनी नापसंती दर्शविली असावी व म्हणूनच कालिदासाने हे काव्य अर्धवट सोडले असावे. दुसरी कल्पना अशी की शिव-पार्वतीच्या एकांत समागमातच कुमारसंभवाचे सूचन झाले, म्हणूनही त्याने हे तिथेच पुरे केले असावे.

कुमारसंभवाची संक्षिप्त कथा पुढीलप्रमाणे –

उत्तर दिशेला हिमालय नावाचा एक पर्वतराज आहे. त्यावर देवतांचे वास्तव्य आहे. त्या ठिकाणी किन्नर मिथुनांचा विहार चालतो. चमरी नामक हरिणी फिरतात. यज्ञाला लागणाऱ्या अनेक वस्तू हा हिमालय धारण करतो. म्हणूनच ब्रह्मदेवाने त्याला यज्ञात हविर्भाग ठेवला व समस्त पर्वतांचे आधिपत्य दिले. मेना ही याची पत्नी होय. तिच्या उदरी हिमालयाला दोन संताने झाली. मैनाक नावाचा पुत्र व गौरी नावाची कन्या. ही कन्या दिवसेदिवस मोठी होऊ लागली. आईबापांची लाडकी ठरली. पर्वताची कन्या म्हणून पार्वती आणि तपाला जातेवेळी मेनेने तिला 'उमा' (हे मुली, तू तपाला जाऊ नको) असे म्हटले, म्हणून उमा अशी तिला आणखी दोन नावे मिळाली.

पार्वतीचा स्वर अमृतमधुर होता. डोळे विशाल होते. वाऱ्याने हलणाऱ्या निळ्या कमलाप्रमाणे दृष्टी तरळ होती. ती हसली, की तिच्या शुभ्र दंतकळ्यांची प्रभा आरक्त ओठावर पडत असे. विधात्याने विश्वातली सारी उपमाद्रव्ये एकत्र करून जणू तिला घडविले होते.

एक दिवस नारद हिमालयाकडे आला आणि उमेला पाहून भविष्यार्थ वदला, 'ही मुलगी शंकराची भार्या होऊन प्रेमाने त्याचे अर्धांग शोभवील.'

हे भविष्य ऐकून हिमाचलाने तिच्यासाठी अन्य वर शोधण्याची खटपट केली नाही. पण शिवही तिला मागणी घालीना. तो विरक्त होऊन व सर्वसंगपरित्याग करून हिमालयाच्याच एका शिखरावर तप करीत बसला होता. आपली कन्या दाखविण्यासाठी हिमाचल उमेला घेऊन तिथे गेला व शिवाच्या

सेवेसाठी तिची व तिच्या एका सखीची योजना करून परत आला. उमा भक्तिभावाने शिवाची परिचर्या करू लागली.

त्याच काळात दुसरीकडे देव आणि तारकासुर यांचे युद्ध झाले आणि त्यात देव पराभूत झाले. देवांना तो दैत्य अनेक प्रकारे छळू लागला. त्या छळामुळे वैतागून सगळे देव इंद्राला पुढे करून ब्रह्मदेवाकडे आले. त्यांनी ब्रह्मदेवाची प्रार्थना केली. ' हे प्रभो, आम्ही सर्व देव विपत्तीत सापडलो आहो. तारकासुराशी लढून त्याचा सहार करण्यासाठी आम्हाला एखाद्या उत्तम सेनापतीची गरज आहे.' त्यावर ब्रह्मदेव म्हणाला, ' देवहो, तुम्हाला सेनापती मिळेल; पण त्यासाठी काही काळ वाट पाहावी लागेल. शंकराच्या वीर्यापासून उत्पन्न होणारा पुरुष हाच तुम्हाला योग्य सेनापती ठरणार आहे. तेव्हा तुम्ही पार्वतीकडून शिवाचे मन जिंकण्याचा प्रयत्न करा. शिवाने पार्वतीचा स्वीकार केला, तर तिच्या उदरी जो पुत्र निर्माण होईल, तोच तुमचा सेनापती व तोच तुम्हाला विजयही मिळवून देईल.

त्यानंतर इंद्रादी देव शिवाचे मन कसे जिंकता येईल, याविषयी विचार करण्यासाठी एकत्र जमले. एवढ्यात मदन त्या सभेत प्रविष्ट झाला. इंद्राने मदनाचे गौरवपूर्वक स्वागत करून त्याला म्हटले, ' हे मदना, पार्वतीच्या बाबतीत शंकराचे मन आसक्त करण्याच्या कामी तूच एकटा समर्थ आहेस. शिवाने पार्वतीचा स्वीकार करणे ही गोष्ट केवळ देवांच्याच नव्हे; तर त्र्यैलोक्याच्या हिताची आहे. तेव्हा तू, तुझा मित्र वसंत याला सांगाती घेऊन शिवाच्या तपस्थानाकडे जा आणि शिवाला पार्वतीविषयी आसक्ती उत्पन्न होईल असे कर.'

इंद्राच्या आज्ञेप्रमाणे वसंत व मदन शंकराच्या आश्रमाकडे गेले. मदनाबरोबर त्याची पत्नी रतीही होती. वसंताने पहिल्याप्रथम ते सर्व वन फुलवून टाकले. वसंताच्या आगमनाने त्या रानातले मृगादी पशू व कोकिलादी पक्षी काममोहित झाले. ऋषीमुनींच्या मनाचीही चलबिचल झाली. एवढे झाल्यावर मदन पुढे झाला. त्याने शंकराच्या आश्रमभूमीत प्रवेश केला. लगेच नंदीने पुढे येऊन पार्वती सेवेला आली असल्याचे शंकराला सांगितले. शंकराने ' ठीक आहे ' असे केवळ डोळ्याच्या इशाऱ्याने सूचित केले. पार्वती आश्रमात आली. तिने प्रथम प्रणाम केला. मग ती सुकलेल्या कमलबीजांची माळ शिवाला अर्पण करण्यासाठी पुढे झाली. शिवानेही ती घेण्यासाठी हात पुढे केला आणि संधी नामी आहे असे समजून मदनाने आपल्या धनुष्यावर मोहनास्त्र चढविले. शिवाच्या वृत्तीत त्यामुळे क्षणभर प्रक्षोभ झाला. आपले मन एकाएकी असे विकृत व्हायला काय कारण घडले असेल, ते पाहण्यासाठी शिवाने चौफेर दृष्टी फेकली. त्यात त्याला शरसंधान करणारा मदन दिसला.

मदनाच्या त्या कृत्याने शंकर क्रोधाविष्ट झाला. एकाएकी त्याच्या तृतीय नेत्रातून अग्निज्वाला बाहेर उफाळली आणि त्या ज्वाळेने मदनाला भस्म करून टाकले. मग शंकराला वाटले, की मन अविचल राहायला हवे असेल तर आपण स्त्रीसहवास टाळला पाहिजे. म्हणून तो पार्वतीला तिथे टाकून क्षणात अंतर्धान पावला.

आपला पती एकाएकी भस्मीभूत झाला हे पाहून रतीला अत्यंत शोक झाला. धरणीवर लोळण घेऊन ती विलाप करू लागली.

' हे प्रियकरा, तुझा देह किती सुंदर होता. पण आज त्याची रक्षा होऊनही मी जिवंत राहिले आहे. तुला मृत्यू आला असताही मी मेले नाही. यावरून स्त्रियांचे हृदय कठीण असते म्हणतात, तेच खरे. हे वल्लभा, तू तर परलोकी गेलासच. पण तुझ्या मृत शरीराला अखेरचे सजविणे, नटविणे हे सुद्धा माझ्या नशिबी उरले नाही.'

त्यानंतर तिने वसंताला आपल्यासाठी चिता रचण्यास सांगितले. रती अशा प्रकारे प्राणत्याग करायला प्रवृत्त झाली असता एकाएकी आकाशवाणी झाली. ' हे मदनभार्ये, तुझा पती आज नष्ट झाला असला, तरी थोड्याच काळात तो पुनश्च तुला भेटेल. म्हणून तू प्राणत्याग करू नकोस'. त्या देववाणीवर विश्वास ठेवून रती आपल्या कृश शरीराने पतीच्या पुनर्जीवनाची वाट पाहत राहिली.

आपल्या डोळ्यांदेखत मदन भस्म झालेला पाहून व शिवही अंतर्धान पावलेला पाहून पार्वतीचे सारे मनोरथ भग्न झाले. ती आपल्या सुंदर रूपाचा तिरस्कार करू लागली. प्रियकराच्या अंतराला जे रिझवू शकत नाही, त्या सौंदर्याचा काय उपयोग? असे तिला वाटले. मग तिने शिवाच्या प्रसन्नतेसाठी उग्र तप करायचे ठरविले. आपल्या सखीला बरोबर घेऊन ती एका पर्वतशिखरावर गेली. तिने वल्कल परिधान केले, रेशमासारख्या मऊ केसांचा जटाजूट बांधला. तिने नित्य शिवनामाचा जप आरंभिला. तिच्या तपाचा असा विलक्षण परिणाम झाला, की हरणे जवळ येऊन निःशंक मनाने तिच्या हातचा चारा खाऊ लागली, पशू आपसातले जन्मजात वैर विसरले, वृक्ष आपल्या मधुर फलांनी अतिथिसत्कार करू लागले. असा काही काळ गेला. तेवढ्या तपाने शंकर प्रसन्न होत नाही, असे पाहिल्यावर तिने आपले तप अधिक कठोर केले. ती पंचाग्निसाधन करू लागली. ऐन थंडीच्या दिवसात रात्रभर पाण्यात उभी राहू लागली. सुरवातीला ती वृक्षपर्णाचा आहार करी. पण तोही तिने त्यानंतर सोडून दिला. म्हणूनच लोक तिला अपर्णा म्हणू लागले. असाही काही काळ गेला. शिवाच्या अंतःकरणात आता

तिच्याविषयी अनुकूल संवेदना उत्पन्न झाली. त्यान मनाशी ठरविले, की पार्वतीचा स्वीकार तर करायचाच; पण त्याआधी तिची थोडी परीक्षा पाहायची. म्हणून मग शिवाने एका ब्रह्मचारी तपोधन तरुणाचे रूप घेतले व तो तिच्या आश्रमात आला. पार्वतीने त्या अतिथीची विधियुक्त पूजा केली. मग त्याने तिला विचारले, की 'तुझी ही उग्र तपस्या कोणाच्या प्राप्तीसाठी चालली आहे ?' अतिथीच्या या प्रश्नाने पार्वती लज्जित झाली. तिला आपले मनोगत स्वमुखाने सांगायचा संकोच वाटला. तिने मग आपल्या सखीला खूण केली. सखीने अतिथीला सांगितले, की शंकराच्या प्राप्तीसाठी पार्वती आपली काया तपाने कष्टवीत आहे. त्यावर तो ब्रह्मचारी पार्वतीला म्हणाला.

'अरेरे ! तू त्या अमंगळ शिवाच्या प्राप्तीसाठी आपला देह कष्टवावास ही गोष्ट खरोखरच अप्रस्तुत आहे. शिवाशी तुझा विवाह झाला, तर तुझी घरभरणी कुठे लागेल माहीत आहे ? केसांची गुंतवळ इतस्ततः पसरलेल्या स्मशानभूमीवर ! तुला हत्तिणीवर बसवून खरे म्हणजे तुझी वरात निघायची. पण त्याऐवजी तू शिवासह एका म्हाताऱ्या बैलावर बसून मिरवीत जात असता तुला पाहून नगरवासी जन हसतील. हे त्रिभुवन-सुंदरी, काय पाहिलेस तू त्या शंकरात ? रूप पाहावे तर तीन डोळे ! त्याच्या कुळाचा तर पत्ताच नाही ! व तो दिगंबर राहतो, त्यावरून त्याच्या वैभवाची कोणीही कल्पना करावी.'

ब्रह्मचाऱ्याने केलेली ही शिवनिंदा पार्वतीला आवडली नाही. क्रोधाने तिचा अधरोष्ठ थरथरू लागला. ती त्या तरुणाला म्हणाली. 'शंकराचे यथातथ्य स्वरूप तुला कळले नाही, म्हणून तू अभद्र काहीतरी बरळलास. यापुढे इथे थांबून मला याहून अधिक शिवनिंदा ऐकायची नाही. महापुरुषांची निंदा करणाऱ्यालाच पाप लागते असे नव्हे; तर ती ऐकणारासुद्धा पापी ठरतो'.

असे म्हणून पार्वती जेव्हा तिथून जायला निघाली तेव्हा शिवाने ब्रह्मचारी रूप टाकून निजरूप प्रकट केले. पुढे होऊन त्याने जाणाऱ्या पार्वतीचा हात धरला. शिव तिला म्हणाला. 'हे विनयवती, आजपासून मी तुझा दास आहे. तू मला आपल्या तपाने विकत घेतले आहेस'.

त्यानंतर शंकराने सप्तर्षींचे स्मरण केले. त्यासरशी ते शिवापुढे येऊन उभे राहिले. शिवाने पार्वतीला मागणी घालण्यासाठी त्यांना हिमाचलाकडे पाठविले. हिमाचल त्यांना सामोरा गेला. राजवाड्यात आणून आणि विधियुक्त आतिथ्य करून त्यांना म्हणाला. 'ऋषिजनहो, आपण कोणत्या कारणासाठी माझ्या घरी पायधूळ झाडलीत, ते सांगा. त्यावर अंगिरा ऋषी बोलला. 'विश्वातल्या सर्व कर्मांचा साक्षी असा शंकर तुझ्या कन्येचे पाणिग्रहण करू इच्छितो. तो विश्वाचा पिता असल्यामुळे त्याला वरुन तुझी कन्या विश्वमाता होईल.' हिमाचलाला त्या मागणीचा परम आनंद झाला. त्याने पार्वतीला सप्तर्षींना प्रणाम करण्यास सांगितले. ती वाकली तेव्हा हिमाचल म्हणाला. 'ही शंकराची भावी पत्नी तुम्हा सर्वांना प्रणाम करीत आहे'.

त्यानंतर विवाहाचा तिथिनिश्चय झाला. हिमाचलाच्या राजवाड्यावर आणि ओषधिप्रस्थ या नगरात पताका-तोरणे बांधली गेली. आप्तेष्ट मंडळी जमा झाली. पुत्रवती स्त्रियांनी पार्वतीच्या देहावर वैवाहिक अलंकार चढविले. तिच्या केसात मधूक पुष्पांची वेणी माळली. तिला शुभ्र अगरूची उटी लावली. रेशमी वस्त्र नेसविले. कानात शुभ्र यवांकुर लोंबविले. मैत्रिणींनी तिची पावले रंगविली. मेना राणीने पुढे येऊन मनशीळ व हरताळ यांच्या कल्काचा टिळा तिच्या कपाळी लावला. कौतुक नामक लोकरीचा धागा तिच्या हातात बांधला. मग तिला तिथे जमलेल्या साध्वी स्त्रियांच्या पाया पडायला लावले.

इकडे कैलासावर सप्तमातृका जमा झाल्या आणि वराला योग्य अशी वस्त्राभरणे त्यांनी शिवाच्या पुढे ठेवली. पण शिवाने त्यापैकी कशाचाही स्वीकार केला नाही. नंदीवरून शिवाचे वरप्रस्थान निघाले. शिवगण मंगल तुरे वाजवीत पुढे चालू लागले. सूर्याने शिवावर छत्र धरले. सप्तर्षींनी जयशब्द उच्चारला. नवऱ्या मुलाचे आगमन होताच हिमाचलाला आनंद झाला. तो शिवाला सामोरा गेला. शिवाने सासरा म्हणून त्याला प्रणाम केला, तेव्हा तो लाजल्यासारखा झाला. फुलांचा सडा टाकलेल्या राजपथावरून हिमाचलाने त्याला विवाह-मंडपात आणले. सुमुहूर्ताच्या वेळी शिवासमोर पार्वतीला उभे करण्यात आले. पार्वतीचा हात म्हणजे जणु कामदेवाचा अंकुरच ! शंकराचा करस्पर्श त्याला होताच पार्वतीची काया पुलकित झाली. मग त्यांनी विवाह-होमाच्या अग्नीभोवती तीन प्रदक्षिणा घातल्या. पुरोहिताने त्यांच्याकरवी लाजाहोम करविला. मग शंकराने पार्वतीला ध्रुवदर्शन करविले. शिवासह पार्वतीने ब्रह्मदेवाला प्रणाम करताच, 'तुला वीरपुत्र होवोत' असा त्याने तिला आशीर्वाद दिला. मग वधू-वरे बोहल्यावर बसली. त्या वेळी साक्षात सरस्वतीने संस्कृत भाषेच्या द्वारे शंकराची आणि प्राकृत भाषेच्या द्वारे पार्वतीची स्तुती केली. अप्सरांनी वधू-वरांसमोर एक नाटक करून दाखविले. ते सपल्यावर इंद्रादी देव करसंपुट जोडून शिवाला म्हणाले, 'प्रभो, मदन पुनश्च जिवंत होऊ दे.' त्यावर शिव प्रसन्न चित्ताने म्हणाला, 'ठीक आहे. मदन पुनश्च जिवंत होऊ दे. मजवर शरसंधानही करू दे. मी त्याच्यावर क्रोध करणार नाही.'

विवाहविधी पूर्ण झाल्यावर शंकराची एकांती भेट घेण्याच्या प्रसंगी पार्वतीला बावरल्यासारखे झाले. प्रेम असूनही भय वाटले. तिची ही अवस्था शंकराला आवडली. त्यामुळे त्याची वृत्ति कामप्रवण झाली. मग शंकराने आपली प्रिय शिष्या समजून पार्वतीला एकांती रतिशास्त्र पढविले आणि तिनेही त्यात आपले प्रावीण्य दाखवून जणू शंकराला गुरुदक्षिणाच दिली. हिमाचलाची अनुज्ञा घेऊन कैलासावर आल्यानंतर तिथे त्याने अनेक चांदण्या रात्रीचे सुख अनुभविले. आकाशगंगेत उतरून त्या दोघांनी जलक्रीडाही केली. नंतर ती स्वर्गातल्या नंदनवनात गेली. तिथल्या पारिजात वृक्षावरची फुले खुडून पार्वतीचा साजशृंगार केला. गंधमादन पर्वतावर गेल्यानंतर शंकर सध्या विधीसाठी पार्वतीच्यापासून काही काळ दूर झाला. तेवढाही वियोग पार्वतीला सहन झाला नाही. तिने शंकराशी अबोला धरला आणि मग शिवाला तिचा अनेक प्रकारे अनुनय करून तिला प्रसन्न करावे लागले. नंतर एकदा शंकराने तिला कल्पवृक्षापासून निघालेले मद्य पाजले. त्या मद्याने पार्वतीला मदविकार उत्पन्न झाला व त्यामुळे ती अधिकच सुंदर दिसू लागली. मग ती शंकर आणि मदन या दोघांच्याही पूर्णपणे आधीन झाली. एकामागून एक अशी दीडशे वर्षे त्यांची एका रात्रीसारखी गेली. पण तरीही शंकराची रतिसुखाविषयीची आसक्ती कमी झाली नाही. समुद्रातल्या पाण्याने त्याच्या आतला वडवाग्नी कधी शमला आहे कां ? विषयवासनेचेही तसेच आहे. भोगाची इंधने जितकी घालाल तितकी वासना अधिकच वाढते.

ही आहे कुमारसंभवाची संक्षिप्त कथा. या महाकाव्यात अनेक रमणीय अशी सौंदर्यस्थळे आहेत. हिमालयाचे वर्णन, पार्वतीची तपस्या, ब्रह्मचारी बटूने केलेला शिवाचा अधिक्षेप, वसंतागमचे वर्णन, शिव–पार्वतींचा विवाहसमारंभ आणि आठव्या सर्गातले त्यांच्या रतिक्रीडेचे वर्णन ही स्थळे वाचताना वाचकाच्या अंतराला अननुभूत अशा सुखसंवेदना होतात. या काव्यात कालिदासाने पार्वतीचे उदात्त आणि मनोहारी असे समग्र चित्र रेखाटले आहे. बाला पार्वती, तपस्विनी पार्वती, विनयवती पार्वती आणि गार्हस्थ्य सुखाचा प्रसन्न मनाने अनुभव घेणारी प्रौढ व प्रगल्भ पार्वती अशी तिची एकाहून एक सरस रूपे कवीने दाखविली आहेत. बाला पार्वतीचे वर्णन करणारा पुढील एकच श्लोक पाहा –

**तया दुहित्रा सुतरां सवित्री**
**स्फुरत्प्रभामण्डलया चकासे ।**
**विदूरभूमिर्नवमेघशब्दा-**
**दुद्भिन्नया रत्नशलाकयेव ।।**

(१.२४)

अर्थ – ज्याप्रमाणे नवमेघगर्जनेने भूमीतून बाहेर पडलेल्या रत्नशलाकेने पर्वताची प्रांतभूमी शोभून दिसते, त्याप्रमाणे जिच्या देहाभोवती प्रभावलय फाकलेले आहे, अशा (बाला) पार्वतीमुळे तिची माता खुलून दिसली.

तारुण्यात पदार्पण करणाऱ्या पार्वतीचे चित्र पुढील श्लोकात खुलून उठले आहे—

**असंभृतं मण्डनमङ्गयष्टे-**
**रनासवाख्यं करणं मदस्य ।**
**कामस्य पुष्पव्यतिरिक्तमस्त्रं**
**बाल्यात् परं साथ वयः प्रपेदे ।।**

(१.३१)

अर्थ – नंतर काही दिवसांनी तिला अशी एक वयोवस्था प्राप्त झाली, की अलंकारावाचूनच तिची काया अलंकृत दिसू लागली, मद्य प्याल्यावाचूनच तिच्या ठिकाणी मदाचा प्रादुर्भाव झाला आणि कामदेवाला तिच्या रूपाने पुष्पाव्यतिरिक्त आणखी एक अस्त्र मिळाले.

तपस्विनी पार्वतीचे चित्र पुढील श्लोकात साकार झाले आहे –

**शिलाशयां तामनिकेतवासिनीं**
**निरन्तरास्वन्तरवातवृष्टिषु ।**
**व्यलोकयन्नुन्मिषितैस्तडिन्मयै-**
**र्महातपः साक्ष्य इव स्थिताः क्षपाः ।।**

(५.२५)

अर्थ – वर्षा ऋतूत पावसाच्या सरीवर सरी कोसळू लागत. मधूनमधून वाराही घोंगावे. अशा वेळी भर रात्री अंधारात पार्वती आश्रमातून बाहेर निघून एका शिळेवर झोपे (तो वारा आणि ती अविरत वृष्टी सहन करी) आणि तिच्या उग्र तपस्येला जणू साक्षीदार असलेल्या त्या रात्री विद्युद्रूपी नेत्रांनी तिला वारंवार पाहत असत.

विनयवती पार्वतीचे चित्र कवीने पुढील श्लोकात रेखाटले आहे –

**पत्युः शिरश्चन्द्रकलामनेन**
**स्पृशेति सख्या परिहासपूर्वम् ।**
**सा रञ्जयित्वा चरणौ कृताशी-**
**र्माल्येन तां निर्वचनं जघान ।।**

(७.१९)

अर्थ – (पार्वतीला वधू म्हणून सजवीत असता) सखीने तिची पावले रंगविली आणि तिची थट्टा केली –‘ पार्वती, याच पावलांनी नवऱ्याच्या डोक्यावर बसलेल्या चंद्रकलेला ताडन कर बरे का ! ’ मैत्रिणाचा हा परिहास ऐकून पार्वतीने काही न

बोलता हातातल्या पुष्पमालेने तिला ताडन केले.

प्रणयिनी पार्वतीचे चित्र पुढील श्लोकात पाहा —

**सस्वजे प्रियमुरोनिपीडनं**
**प्रार्थितं मुखमनेन नाहरत् ।**
**मेखलाप्रणयलोलतां गतं**
**हस्तमस्य शिथिलं रुरोध सा ।।**

(८.१४)

अर्थ — पार्वतीने शिवाला, उरोभाग दबला जाईल अशा प्रकारे आलिंगन दिले. शंकराने तिच्या मुखाची इच्छा दाखविली; पण तिने ते त्याला दिले नाही. तिच्या मेखलेविषयी प्रणय धारण करणाऱ्या शिवाच्या हाताला तिने मंदपणे रोधून धरले.

कुमारसंभवातील अशी कितीतरी रम्य, हृद्य स्थळे सांगता येतील. [ सं. सा. इ.; भा. क. वि.; कु. सं. ]

## कुमारिल भट्ट

(इ. स. ७ वे शतक) पूर्वमीमांसा शास्त्रावरील वार्तिककार. याला भट्टपाद असेही म्हणत. याने बौद्ध दर्शनाचे खंडन करून कर्ममार्गाचे पुनश्च प्रवर्तन केले. वैदिक धर्माच्या पुनरुज्जीवनाचे श्रेय यालाच दिले पाहिजे. त्याच्या नंतर शंकराचार्यांनी भारतात अद्वैत तत्त्वज्ञानाचा प्रचार केला. वेदान्तदर्शनाच्या इतिहासात शंकराचार्यांचे जे स्थान आहे, तेच मीमांसा दर्शनाच्या इतिहासात कुमारिल भट्टाचे आहे. मीमांसा शास्त्रात त्याने एक नवीनच संप्रदाय स्थापन केला, त्याला भाट्ट-संप्रदाय असे म्हणतात.

इ. स. ७ व्या शतकाचा उत्तरार्ध हा कुमारिल भट्ट याचा काल होय, असे आता सर्व पंडितांनी मान्य केले आहे. कुमारिल भट्टाच्या जन्मभूमीविषयी मात्र एकमत नाही. त्याच्या तंत्रवार्तिकात आर्यावर्ताची महती गायिली असून इतर प्रदेशांची निंदा केली आहे. यावरून तो उत्तर भारताचा रहिवासी होता, असे वाटते. त्याला संस्कृताव्यतिरिक्त द्राविडादी इतर दक्षिणी भाषा अवगत होत्या, यावरून तो दाक्षिणात्य होता असेही काही पंडितांचे मत आहे.

विद्यारण्यकृत शांकरदिग्विजयाच्या उपोद्घातात कुमारिल भट्टाला स्कंदाचा व शंकराचार्यांना शिवाचा अवतार म्हटले आहे. आत्मपुराणाच्या प्रस्तावनेत भट्टाबद्दल थोडीशीच माहिती आहे. जैन ग्रंथात याची माहिती मिळते, ती अशी—

आंध्र व उत्कल या देशांच्या सीमेवर महानदीकाठच्या जयमंगल गावी यजुर्वेदाच्या तैत्तिरीय शाखेच्या कुळात तैलंग जातीचा यज्ञेश्वर भट्ट नावाचा ब्राह्मण होता. कुमारिल हा त्याचा पुत्र होय. त्याच्या आईचे नाव चंद्रगुणा होते. जन्मदिवस वैशाख पौर्णिमा, रविवार, युधिष्ठिर शक २११०. हा कार्तिकस्वामीचा अवतार असून वेदोक्त कर्मकांडाचा समर्थक, श्रुत्यभिमानी व जैन लोकांचा साक्षात यम होता. याने निकेतन नामक जैनाचार्याजवळ छद्मवेषाने राहून जैनमत समजावून घेतले व पुढे त्या गुरूचा घात केला. याचा साह्यकर्ता राजा सुधन्वा हाही प्रथम जैन होता; परंतु याच्या शिकवणीमुळे नंतर त्याने जैनांचा फार छळ केला. कुमारिल भट्टाने प्रमाथी संवत्सरी माघ पौर्णिमेस वयाच्या ६३ व्या वर्षी प्रयाग येथील त्रिवेणी संगमावर अग्निप्रवेश केला. या कथेवरून कुमारिल भट्टाने सुधन्वा राजाकडून वैदिक कर्ममार्गाचा स्वीकार व प्रसार करविला असावा, असे अनुमान निघते.

विद्यारण्यकृत शांकरदिग्विजयात (सर्ग १) याच्याविषयी पुढील कथा दिली आहे—

सुधन्व्याच्या समेत भट्टाने बौद्ध व जैन पंडितांचा पराभव केला आणि राजाच्या आज्ञेप्रमाणे 'जर वेद खरे असतील, तर मला काही इजा होणार नाही ' असे म्हणून पर्वतावरून त्याने उडी मारली व तो सुखरूप राहिला. नंतर एका घागरीत सर्प घालून राजाने प्रश्न विचारला, तेव्हा बौद्ध व जैन पंडितांनी 'आत सर्प आहे ' असे सांगितले. परंतु भट्टाने सांगितले, की आत शेषशायीची मूर्ती आहे व तेच खरे ठरले. त्यामुळे राजाने सर्व बौद्ध व जैन पंडितांचा नाश केला. कुमारिल भट्टाच्या प्रखर विरोधामुळेच बौद्धधर्म भारतात नामशेष झाला, यात संशय नाही.

कुमारिल भट्ट हा एक प्रकांड पंडित, प्रतिभासंपन्न व मेधावी पुरुष होता. त्याचा वेदावर व ईश्वरावर दृढ विश्वास असून अग्निहोत्र व यज्ञादी कर्मे हाच खरा उपासनामार्ग असे तो मानीत होता. त्याला संन्यासमार्ग मुळीच पसंत नव्हता. आणि दुर्दैव असे, की त्याने ज्ञानमार्गाची उपेक्षा केली. याने प्रथम जैमिनीसूत्रभाष्य व मग जैनमतभंजन हे ग्रंथ लिहिले असे म्हणतात. त्याचे शाबरभाष्यावर लिहिलेले (१) श्लोकवार्तिक, (२) तंत्रवार्तिक (३) टुप्टीका हे तीन पाडित्यपूर्ण ग्रंथ मीमांसादर्शनाचे आधारस्तंभ मानले जातात. याशिवाय याने बृहट्टीका व मध्यटीका या नावाचे ग्रंथ रचले होते. पण ते अजून उपलब्ध झाले नाहीत. [ म. ज्ञा. को ; पू. म. भा. ]

## कुमारी

(१) बारा वर्षांच्या अविवाहित कन्येला कुमारी असे म्हणतात. तिचे स्मृत्युक्त लक्षण असे—

**अष्टवर्षा भवेद् गौरी दशवर्षा च कन्यका ।**
**सम्प्राप्ते द्वादशे वर्षे कुमारीत्यभिधीयते ।।**

अर्थ— मुलीला आठव्या वर्षी गौरी, दहाव्या वर्षी कन्या

व बारावे वर्ष लागले असता कुमारी असे म्हणतात.

प्राचीन काळी काही स्त्रिया आजन्म अविवाहित राहत असत. त्यांना त्याच्या पोक्त किंवा वृद्ध वयातही कुमारीच म्हणत असत, असे अष्टाध्यायीवरून कळते. उदा० वृद्धकुमारी, जरत्कुमारी (अष्टा. ६.२.९५).

कौमार्याची कल्पना ही मूलत: अत्यंत सुदर आहे. ती स्त्री जातीचे सौकुमार्य व निर्माणक्षमता व्यक्त करते. निष्कलक कौमार्य हे सर्वदा विकासोन्मुख असते. आपल्यापेक्षा उच्च अशा विभूतिमत्त्वात आत्मसमर्पण करण्यासाठी ते उत्सुक असते. तुळस ही कुमारिकेची प्रतीकरूप आहे.-ती बाळकृष्ण या दिव्य विभूतीशी तादात्म्य पावण्यासाठी उत्कंठित असते, अशी कल्पना केलेली आहे. त्यासाठीच दरवर्षी कार्तिक मासात तिचे लग्न करतात. महाराष्ट्रात कुमारिकेची केळी–कर्दळीशी व जाईच्या वेलीशी तुलना केलेली आढळते. रुईलासुद्धा कुमारिकेचेच प्रतीक मानतात. छिंदवाड्यातले भरिया आदिवासी कुमारीला रुईच्या झाडाची उपमा देतात. मध्यप्रांतातील एका ब्राह्मण जातीत कुमारीच्या चोळीवर तुळशीची मंजिरी आणि रुईफूल यांचा कशीदा काढतात (दुर्गा भागवत).

(२) ललितादेवीची कन्या. हिने भंडामुराच्या सर्व पुत्रांना ठार मारले. [पु. इं.]

(३) मायापुरीच्या देवालयातील देवता. [पु. इं.]

(४) शुक्तिमत् पर्वतातील एक नदी. [पु. इ.]

(५) शाकद्वीपातील एक नदी. [पु. इं.]

**कुमारीपुत्र** पौराणिक कथांमध्ये अनेक वीर पुरुषांचा जन्म दैवी शक्तीच्या प्रभावामुळे झाल्याची वर्णने आढळतात. हा दैवी अनुग्रह विवाहित स्त्रियावरही झालेला दिसतो. कधी एखादा देव मनुष्यरूप घेऊन त्या स्त्रीशी समागम करतो; तर कधी आपल्या अद्‌भुत सामर्थ्याने स्वत.चे बीज तिच्या गर्भाशयात संक्रांत करतो. काही वेळा एखाद्या मंत्राने किंवा ताईताने एखाद्या स्त्रीला पुत्रप्राप्ती होते. अनेक प्रकारची व्रतवैकल्ये करून किंवा प्रसाद भक्षण करून विवाहित स्त्रियांना गर्भधारणा झाल्याचे अनेक उल्लेख पुराणांतरी आढळतात. दशरथाच्या तीन्ही राण्यांना अग्नीने दिलेला पायस प्राशन केल्यामुळे पुत्रप्राप्ती झाली, हे प्रसिद्धच आहे.

विवाहित स्त्रियांप्रमाणे कुमारिकांनाही दैवी प्रसादाने गर्भ राहिल्याच्या कथा भिन्न भिन्न काळात व समाजाच्या भिन्न भिन्न स्तरात आढळतात. कधी विशेष प्रकारची वस्तू गिळल्यामुळे, कधी एखाद्या वस्तूच्या स्पर्शामुळे, कधी एखाद्या सरोवरात स्नान केल्यामुळे, तर कधी सूर्याच्या किरणामुळे कुमारीना गर्भधारणा झाल्याच्या या कथा आहेत. दुर्वासाने दिलेल्या मंत्राचा जप करून सूर्याचे स्मरण करताच कुंतीला कौमार्याचा भंग न होता, कर्ण हा पुत्र मिळाला अशी कथा महाभारतात आहे.

ख्रिस्ती धर्मातही येशू ख्रिस्त हा कुमारीपुत्र होता, ही कथा सर्वमान्य आहे. सर्व ख्रिश्चन लोकाची त्याच्या या दिव्य जन्मावर श्रद्धा आहे. जोसेफ हा त्याचा पिता होता, असे काही जणांचे म्हणणे आहे. कायद्याच्या दृष्टीने तसे असेलही. पण सर्वसाधारण लोक त्याच्या अलौकिक जीवनाला साजेसा त्याचा जन्मही गूढ अद्‌भुत असाच मानतात. तो देवाचा पुत्र होता, अशी ख्रिस्ती लोकाची दृढ श्रद्धा आहे. लोगोस या देवतेने हे मानवी रूप घेतले होते. त्यामुळे येशू ख्रिस्त हा अलौकिक पुरुष निपजला, अशी त्यांची धारणा आहे. [एन्सा. रि. ए.]

**कुमारीपूजा** नवरात्रात नऊ दिवस प्रत्येक दिवशी एक किंवा पहिल्या दिवशी एक, दुसऱ्या दिवशी दोन, नवव्या दिवशी नऊ अशा चढत्या पद्धतीने कुमारीना भोजन घालावे, असे विधान आहे. ही कुमारी दोन वर्षापासून दहा वर्षापर्यंतची बोलवतात. प्रत्येक वर्णाने आपापल्या वर्णाची कुमारी जेवायला बोलवायची असते. ती निर्दोष, निरोगी व अव्यंग असावी, असेही सांगितले आहे. देवीपूजन झाल्यावर कुमारीची पूजा करतात. प्रथम तिचे पुढील मंत्रांनी आवाहन करतात–

**मन्त्राक्षरमयीं लक्ष्मीं मातॄणां रूपधारिणीम् ।**
**नवदुर्गात्मिकां साक्षात् कन्यामावाहयाम्यहम् ।।**

अर्थ– मन्त्राक्षरमय, लक्ष्मीस्वरूप, मातृकाचे रूप धारण करणारी व साक्षात नवदुर्गात्मिका अशा कन्येचे मी आवाहन करतो.

प्रथम कुमारीचे पाय धुतात, तिला सुशोभित चौरंगावर बसवितात, गंध, पुष्प व परकर–चोळी देतात व तिच्या गळ्यात फुलांच्या माळा घालतात. तिला पंचामृत व मिष्टान्न समर्पितात. मग तिला नमस्कार करतात.

नवरात्राशिवाय अन्य काही योगांवरही कुमारीपूजन करावे, असे अन्नदाकल्पात सांगितले आहे–

**अष्टम्यां च चतुर्दश्यां कुहूवां वा रविसङ्क्रमे ।**
**कुमारीपूजनं कुर्याद् यथाविभवमात्मनः ।।**

अर्थ– अष्टमी, चतुर्दशी, अमावास्या किंवा सूर्यसंक्राती या दिवशी आपल्या वैभवाला साजेल अशा रीतीने कुमारीपूजन करावे.

देवीची कृपा, धनधान्य व सकलमंगल यांच्या प्राप्तीसाठी कुमारीपूजन सांगितले आहे. [व्रतराज; नि. सिं.]

**कुमारीव्रत** वंगालमधले कुमारिकाचे एक व्रत. अनेक मुली एकत्र जमून हे व्रत करतात. यात अलिपना काढून त्यांची पूजा केली जाते. व्रताचे फल – इष्ट वर, पुत्र व सुखसंपदा यांची प्राप्ती.

**कुमासाला** मुंड जमातीत वधूच्या मामाने आपल्या भाचीच्या विवाहप्रसंगी मागितलेले जादा देज. जर वधूला आई-बाप नसतील अथवा ते वृद्ध असतील, तर तिच्या माहेरपणाची व जावयाच्या सरबराईची जबाबदारी मामा घेतो. त्यासाठी साखरपुडयाच्या वेळीच खर्चाचा मोबदला म्हणून वरपक्षाकडे तो एका बैलाची मागणी करतो. हा बैल विवाहानंतर दिला तरी चालतो. मामा मृत झाला, तर त्याची जबाबदारी त्याचे मुलगे पार पाडतात. वर्षातून काही दिवस मुलगी व तिचा पती याना मामाच्या घरी पाहुणचार घेता येतो. [एन्सा. मु.]

**कुमी** कुलाडन प्रदेशाचे रहिवासी लोक. अराकान पर्वतातून वाहणारी कुलाडन ही एक प्रसिद्ध नदी आहे. कुमी हा आराकानी भाषेचा शब्द असून त्याचा अर्थ कुत्रा असा आहे. ही जात कुत्र्याला एक पवित्र प्राणी मानते; पण कुत्र्याच्या मांसाइतके इतर कोणत्याच प्राण्याचे मांस त्यांना प्रिय नसते.

हे लोक अत्यंत कमी कपडे वापरतात. कमरेभोवती एक कपडा व डोक्याला एक फेटा एवढा पुरुषांचा पोषाख; तर कमरेभोवतीचे एक वस्त्र एवढाच स्त्रियांचा पोषाख असतो.

हे आपली घरे टेकडीच्या माथ्यावर बांधतात. हेतू हा, की चौफेर लक्ष ठेवता यावे. यांची घरे लाकडी बांबूची असतात. हे स्वभावाने युद्धप्रिय आणि घमेंडखोर असून कोणापुढेही कधी माथा लववीत नाहीत.

यांची सृष्टिविषयक कथा अशी– ईश्वराने चंद्र-सूर्य बनवले, तशाच माणसाच्या दोन मृण्मय मूर्ती बनवल्या. तिथे कुठूनसा एक सर्प आला आणि त्याने त्या मूर्ती खाऊन टाकल्या. असे दोन तीन वेळा झाल्यावर त्यांची राखण करण्यासाठी ईश्वराने कुत्र्याला उत्पन्न केले. त्याने रक्षण केल्यावर स्त्री-पुरुष मूर्तीपासून पुढे सकल मानव सृष्टी निर्माण झाली. [भा. आ.]

**कुमुद** (१) शाल्मलिद्वीपातला प्रथम पर्वत. मेरूच्या अवष्टंभगिरींपैकी एक. किन्नरांचे निवासस्थान. इथे एक दिव्य वटवृक्ष आहे. तो कल्पवृक्षासारखा इच्छिले ते देणारा आहे (भाग. पु. ५.१६.११ व २४).

(२) भद्रखंडातील एक जनपद. [पु. इं.]

(३) श्वेतकमल. हे चंद्रविकासी असते.

**कुमुदा** योगमायेचे एक नाव. मानससरोवरात हिचे वास्तव्य आहे. [भाग. पु. १०.२.१२; मत्स्य पु. १३.२७]

**कुमुदेंदु** एक जैन कवी. हा विलक्षण प्रतिभावंत होता. कुमुदेंदुरामायण हा याचा ग्रंथ होय. यात त्याने जैन संकेतांच्या आधारे रामकथा लिहिली आहे. सिरीभूवलय या ग्रंथात त्याच्या अनेक काव्यगुणाचे दर्शन होते. जगातल्या सात आश्चर्याच्या जोडीला हा ग्रंथ म्हणजे आठवे आश्चर्य मानले जाते. [राष्ट्रभारती– सप्टेंबर १९५७]

(२) विंध्यमधून निघालेली एक नदी (ब्रह्मांड पु. २. १६. ३३).

**कुम्माडिचट्टी** उत्तर अर्काट जिल्ह्यातील वेल्लाळांची एक पोटजात. वेल्लाळ लोकांच्या अंत्यसंस्काराच्या वेळी मडक्यातून अग्नी नेण्याचे काम यांच्याकडे असते. ज्या भांड्यात अग्नी पेटलेला असतो, त्याला तमिळ भाषेत चट्टी असे नाव आहे. [का. ट्रा. स. इं.]

**कुम्मी** तमिळनाडमधील स्त्रियांचे एक समूहनृत्य. विवाहासारख्या मंगलप्रसंगी व सणासुदीला मुली व तरुण स्त्रिया हे नृत्य करतात. मुली फेर धरून उभ्या राहतात व ठेक्यात पावले टाकताना दोन्ही हातानी टाळ्या वाजवितात किंवा शेजारच्या मुलीच्या हातावर टाळी देतात. या वेळी कुम्मी नावाची गीते गातात. एकजण गाणे सांगते व बाकीच्या ते म्हणतात. मध्यभागी तेवती समई, कृष्णाची मूर्ती किंवा त्याचे चित्र ठेवतात.

कुम्मी नृत्यात गायिली जाणारी कुम्मी गीते पुराणे व मंदिरे या विषयांवरची असतात. त्यातली चिदंबरम्-कुम्मी, रामायण-कुम्मी व गजेंद्रमोक्ष-कुम्मी ही गीते फार प्रसिद्ध आहेत. [मोहन खोकर–मार्च ऑफ इंडिया–सप्टें. १९६२; डि. सा. इं. म्यु. म्यु.]

**कुरघोडी** एक खेळ. मुले दोन गट करतात. डाव देणाऱ्या गटातील एक मुलगा झाडाला (किंवा भिंतीला) आपले दोन्ही हात टेकवितो व झाडाकडे तोंड करून थोडा खाली वाकून घोड्याप्रमाणे उभा राहतो. नंतर त्याच्या

कमरेला घट्ट मिठी मारून दुसरा मुलगा वाकून उभा राहतो. याप्रमाणे त्या गटातील सर्व मुले एकमेकाच्या कमरेला मिठ्या मारून वाकून उभे राहतात. नंतर डाव घेणाऱ्या गटातील सर्व मुले काही अंतरावरून धावत येतात व एकामागून एक याप्रमाणे त्या घोड्याच्या पाठीवर बसतात. घोड्यावर बसलेला एक मुलगा मग आपल्या हाताची काही बोटे दुमडून व काही उभी करून तोंडाने 'किती ? किती ?' असे विचारतो. घोड्यांपैकी एक जण त्याला उत्तर देतो. उत्तर बरोबर येईपर्यंत स्वार प्रत्येक वेळी निरनिराळी बोटे धरून त्यांची संख्या विचारीत राहतो. अचूक उत्तर सांगितल्यावर घोड्यावरचा डाव जाऊन स्वारांवर डाव येतो. उडी मारून बसताना किंवा बसल्यावर घोड्यावरून पडल्यासही स्वारावर डाव येतो. [व्या. ज्ञा. को.]

## कुरत्ती आट्टम्

केरळमधील एक नृत्य. या नृत्यात भटक्या स्त्रिया भाग घेतात. काही वेळा उच्चवर्णीय स्त्रियाही हे नृत्य करतात. [डि. सा. इं. म्यु. म्यु.]

## कुरमवार

मध्यप्रदेशातील धनगरांची एक जात. तमिळ व तेलुगू धनगराचे भाईबंद म्हणून हे चादा जिल्ह्यात राहतात. घोंगड्या विणणे, हा याचा व्यवसाय आहे. हे आपल्याला जुन्या पल्लव घराण्याचे वंशज समजतात. हे कानडीची एक बोली बोलतात.

**विवाहप्रथा** – मुलीचे लग्न ती वयात येण्यापूर्वी झाले पाहिजे, असा यांच्यांत नियम आहे. तसे न झाल्यास पूर्वीच्या काळी नदीकाठी एका झोपडीत तिला ठेवीत व पूर आला, की तिला नदीला अर्पण करीत. पण हल्ली झोपडीत ठेवण्याचे नुसते सोंग करतात. मुलीच्या अंगावर शुभ भोवरे असल्यास मुलगी पसंत करतात. फाल्गुन शुद्ध व वद्य चतुर्थी, वद्य दशमी व अक्षय्य तृतीया या चार तिथींनाच विवाह होतात. वधू-वरांना कांबळे विणण्याच्या धोट्यावर बसवून लग्न लावतात. एका लहान बाहुलीला झोका देऊन ती वधूजवळ देतात. ती वराजवळ देताना वधू म्हणते, की 'हिला सांभाळ. मी स्वयंपाक करते.' ती बाहुली वधूला परत करताना वर म्हणतो, की 'तूच सांभाळ; मी कांबळे विणतो.'

**देव-धर्म** – हे गणेशचतुर्थीला आपल्या अवजारांची पूजा करतात. जो ही पूजा करीत नाही, त्याला जातिबहिष्कृत करतात. मल्लनदेव व मल्लनदेवी या त्यांच्या कळपांचे रक्षण करणाऱ्या देवता होत. पिंपळाखाली त्यांची मंदिरे असतात व वर्षातून एकदा हे लोक त्यांची पूजा करतात.

हे प्रवासाला निघाले म्हणजे पानावर अन्न ठेवून ते चाटून खातात व पाणी पिताना नदीच्या प्रवाहाला किंवा तळ्याला तोंड लावून ते पितात. [ट्रा. का. सें. प्रॉ. इ.; म. ज्ञा. को.]

## कुरमी

एक शेतकरी जमात. महाराष्ट्र सोडून भारतातील सर्व प्रांतांत हे लोक विखुरलेले आहेत. त्यांची वस्ती मुख्यतः उ. प्रदेश, बिहार, ओडिसा व छोटा नागपूर या प्रदेशात आहे. बिहारमधील कुरमी दिसायला चांगले असून ते आर्यवंशी असावे, असे डाल्टन म्हणतो. ओडिसा व छोटा नागपूरमधील कुरमी द्रविडवंशाचे असावे, असे रिस्लेचे मत आहे. कुरमी या नावाने ओळखले जाणारे हे सर्व लोक मूळ आर्यवंशी होते आणि भिन्न कर्मे व संकर यांमुळे त्यांच्यांत बदल झाला, असे मानणारा एक पक्ष आहे; तर दुसऱ्या पक्षाच्या मते हे लोक मुळात द्रविडवंशाचे असून, त्यातले काही आर्यांशी संबंध आल्यामुळे सुधारले व बाकीचे रानटी अवस्थेतच राहिले. कोईरी, कच्छी, साहणी व माळी या जाती कुरमी जातीपासूनच उगम पावल्या आहेत.

कुरमी लोकाचे ११ मुख्य वर्ग आहेत, ते असे – बाईस्वर, बार्डिया, गंगापारी, गुजराती, जईस्वर, कनौजिया, खरेबिध, प्रहारिया, राह, सेंटवार व सिगरार.

**विवाहप्रथा** – यांच्या लग्नसमारंभात फारसे विधी नसतात. प्रथम पिंपळाशी वधूचे लग्न लावतात. मग पाद्यपूजा, कन्यादान, सिंदूरदान हे विधी करतात. लग्न लावण्यासाठी ब्राह्मण पुरोहिताला बोलवतात. साधारणतः सरयूपारी व कनौजिया हे ब्राह्मण त्यांचे उपाध्याय असतात.

**देव–धर्म** – महावीर, ठाकुरजी व सीतलादेवी या त्यांच्या देवता होत. हे बाबीपीराचीही पूजा करतात. काही लोक महादेवाला व कुर्मीयानीनाथाला भजतात.

कुरमीचा सामाजिक दर्जा पुष्कळ वरचा आहे. राजपुतांच्या स्वारीपूर्वी आपण जमीनदार होतो, असे हे म्हणतात. काहीजण ब्राह्मणाच्या हातचेही खात नाहीत. पूर्वी काही ठिकाणी कुरमी स्त्रिया सती जात असत, असे सांगतात. यांच्यातील पुष्कळजण भगत असतात. ते मद्य-मांस निषिद्ध मानतात.

कुरमी लोकांची हवेलिया नावाची एक श्रेष्ठ जात होती. त्या जातीतले लोक गोंड राज्यात उत्कृष्ट शेती करून संपन्न झाले होते. पण आता ती जात आढळत नाही. सध्या उस्रेटे म्हणून जी जात आहे ती त्यांपैकीच आहे. हे लोक मद्य-मांसास स्पर्श करीत नाहीत. यांच्यांत आदरातिथ्य बरेच आढळते. हे लोक ब्राह्मणाला किंवा बैराग्याला गुरू करतात. धर्म बदलणे, गोमांस खाणे असे अपराध करणाऱ्यांवर हे संपूर्ण बहिष्कार घालतात.

बिहारमधील कुरमी हे हिंदू संस्कारात दाखल झाले असून ते स्वतःला क्षत्रिय मानतात; तर छोटा नागपूरकडील कुरमींच्या अनेक चालीरीती आदिवासीप्रमाणे आहेत. छोटा नागपूरमधील कुरमी भुताखेतांना व वेताळाला भजतात. बारपहाड, गारोआर, किचकेश्वरी, बोरमदेवी, दाक्मबुरी हे त्यांचे देव आहेत. ते ब्राह्मण पुरोहितांना सहसा बोलावीत नाहीत.

मिदनापूरमधील कुरमी लोकात घटस्फोट व विधवाविवाह यांना बंदी आहे. त्यांचे पुरोहित पतित ब्राह्मण असतात. त्यांचे एकही धार्मिक कृत्य ब्राह्मणावाचून पार पडत नाही. बंधन व अखण या जत्रा हे त्यांचे खास सण होत. महातो कुरमी मूळ छोटा नागपूरमधले असून स्वतःला क्षत्रिय समजतात. [ म. ज्ञा. को.; से. इं. १९५१ ]

**कुरव** (१) त्रिवांकुरमधील एक जात. मुळात कुरवांच्या कुंत कुरव, पूम कुरव, काक्क कुरव व पाडी कुरव अशा चार शाखा होत्या. त्यांपैकी पूम कुरवांची वेलन म्हणून व काक्क कुरवांची कक्कलन म्हणून स्वतंत्र जात बनली. पांडी कुरव हे प्रामुख्याने नंचिनाडमध्ये राहतात, म्हणून त्यांना नंचि कुरव असे म्हणू लागले. त्रिवांकुरमधील कुरव हे कुंत कुरव या शाखेचे आहेत.

प्राचीन काळी कुरवांना गुलाम म्हणून त्यांच्या जमिनीसह विकीत असत.

कुरव लोकात विवाहाच्या दोन पद्धती आहेत. एक म्हणजे मुलगी वयात येण्यापूर्वी तिच्या गळयात ताळी बांधणे व दुसरी संबंधम् करणे. यांच्यांत मरुमक्कतायम् ही वारसापद्धती आहे.

यांच्या जातिप्रमुखाना उराली व पनिक्कन अशी नावे आहेत. प्रत्येक धार्मिक प्रसंगाच्या वेळी याना दक्षिणा द्यावी लागते. यांची धार्मिक कृत्ये पुरोहित करतो. हे मृतांना पुरतात व बारा दिवस सुतक पाळतात. [ का. ट्रा. स. इं. ]

(२) अप्सरांच्या चौदा गणापैकी एक गण. सोमाच्या किरणांपासून या गणाची उत्पत्ती झाली आहे. [ पु. इं. ]

(३) कुरूंचा प्रदेश. हरिताश्वाच्या राज्याचा एक भाग. कुरुवंशालाही कुरव असे नाव आहे. [ पु. इं. ]

(४) प्लक्ष द्वीपातील एक क्षत्रियसदृश जात. [ पु. इं. ]

**कुरवंजी** आंध्र व तमिळनाड या प्रदेशातील एक नृत्यनाटय. तेलुगू रूपकांच्या विकासक्रमात पहिला टप्पा कुरवंजी किंवा कोरवंजी या लोकनाटयाचा आहे.

कुरवर (तमिळ) किंवा कुरवलु (तेलुगू) नावाची एक वन्य जात होती. हे लोक अतिशय नृत्यप्रिय होते. त्यांच्या नृत्याला कुरवंजी असे नाव होते. एखाद्या तीर्थक्षेत्रात पर्वकाळी भाविकांची गर्दी जमली, की तिथे जाऊन हे आपल्या नृत्याचे प्रयोग करीत व पैसे मिळवीत. सुरवातीला ही नृत्ये म्हणजे केवळ अंगविक्षेप असत. वेषभूषा किंवा गीताभिनय हा भाग त्यात नव्हता. कालांतराने त्यात गीतांचा अंतर्भाव झाला व मग गीतातील अर्थाला अनुसरून ते अभिनय करू लागले.

कुरवंजी नृत्यनाटयात प्रथम दोन पात्रे प्रवेश करतात. त्यातल्या पुरुषाला सिंगडु व स्त्रीला सिंगी असे म्हणतात. संस्कृत नाटकातील नटीसूत्रधाराप्रमाणे हे दांपत्य असते. ती दोघे प्रथम प्रत्येक नृत्यातील अर्थ विशद करून सांगतात. काही वेळा कोणंगी नावाचे तिसरे एक पात्र या नृत्यात येते. कोणंगी हा विदूषक असतो व तो लोकांना हसविण्याचे काम करतो. शिव-पार्वतीलीला किंवा लक्ष्मी-विष्णुलीला यांसारख्या पौराणिक विषयावर कुरवंजी नृत्यनाटये आधारलेली असतात. या नृत्यनाटयात प्रामुख्याने स्त्रिया भाग घेतात.

आंध्र प्रदेशात कुरवंजी हे प्रामुख्याने देवदासींचे नृत्य होते. देवळात किंवा देवाच्या उत्सवप्रसंगी बाहेरच्या बाजूला उभारलेल्या रंगमंचावर त्या नृत्याचे प्रयोग करीत. मंदिरात देवासमोर केल्या जाणाऱ्या नृत्यात त्याचा अभिजातपणा व धार्मिक स्वरूप टिकून राहिले; पण राजनर्तकी म्हणून देवदासीचा जेव्हा राजदरबारात प्रवेश झाला, तेव्हा त्या नृत्याचे धार्मिक मूल्य नष्ट होऊन दरबारी लोकांच्या करमणुकीचे साधन एवढेच त्याचे स्वरूप राहिले.

तमिळनाडमधील कुरवंजी नृत्ये निव्वळ करमणुकीसाठी असून त्यात शास्त्रीय संगीताबरोबर लोकगीतांचाही उपयोग केलेला असतो.

या कुरवंजीचे कथानकही जवळजवळ ठरलेलेच असते. एक स्त्री स्थानिक राजाच्या, त्याच्या मंत्र्याच्या किंवा देवाच्या प्रेमात पडते व शेवटी तिचे प्रेम सफल होते, असा कथाभाग यात असतो. या नाटयात कुरत्ती नावाच्या एका भटक्या जमातीतील स्त्रीचे पात्र हमखास असते. ही कुरत्ती नायिकेचा हात पाहून भविष्य वर्तविते, की तिच्या सर्व इच्छा पूर्ण होतील. मग प्रसंगाप्रसंगाने कुरत्ती आपल्या पहाडातील घराचे, आपल्या जमातीचे व आपल्या भविष्यज्ञानाचे वर्णन करते व नायिकेकडून मोठे बक्षीस मिळवून घरी जाते.

तमिळ भाषेत तिरुक्कुट्रालक, कुंबेसर, अझगर, अर्धनारीश्वर, स्वामिमलै इ. कुरवंजी प्रसिद्ध आहेत. [ डि. सा. इं. म्यु. म्यु.; ःमार्च ऑफ इंडिया – नटराज रामकृष्ण; साहित्य संदेश– न. वी. राजगोपालन ]

**कुरवर** केरळातील एक जात. हे लोक एका जागी न राहता आपले सामान घेऊन केरळभर फिरत असतात. हात पाहून भविष्य वर्तविणे, हा यांचा धंदा आहे. यांच्या स्त्रियाना कुरत्ती असे नाव असून त्यांच्या गाण्याच्या पद्धतीला कुरत्तिपाट्टू असे म्हणतात. काही विद्वान कवींनी त्यांच्या शैलीला अनुसरून 'रामायणम् कुरत्तिप्पाट्टू' 'भागवतम् कुरत्तिप्पाट्टू' अशी काव्ये रचली आहेत. [कै. सा. द.]

**कुरवा** मद्रास, त्रिवांकूर, म्हैसूर व महाराष्ट्र या भागात आढळणारी एक जात. हिला कोरवा, कोरजा, कोरमा, पल्ली, वेल्ला, कवरै, रड्डी इ. अनेक नावे आहेत. महाराष्ट्रात या लोकांना कैकाडी म्हणतात. सातेपाटी, कावडी, मेंद्रागुट्टी व मानपाटी असे कुरवांचे चार मुख्य वर्ग असून, त्यांपैकी पहिले दोन श्रेष्ठ दर्जाचे मानले जातात. या जातीत अनेक पंथ असून प्रत्येक पंथाची देवके निरनिराळी आहेत.

काही कुरवा वैदूगिरी करतात, काही ज्योतिष सांगतात, तर काही शेती व मजुरी करतात. काही लोक चोऱ्या करतानाही आढळतात. चोरी हे पाप आहे, असे ते मानीत नाहीत. काहीजण जंगलातून मुळ्या गोळा करून त्यांचे कुंचले बनवितात. यांच्या स्त्रिया गोंदण्याचा धंदा करतात. हात पाहून भविष्य वर्तविण्याच्या कामी या फार चलाख असतात.

**विवाहप्रथा** – वडील माणसे मुलांचे लग्न ठरवितात. वरपिता वधू-संशोधनाचे काम करतो व योग्य वधू सापडली, की वरपिता व वधूपिता ताडीच्या दुकानात जाऊन यथेच्छ ताडी पितात. लग्नाचा मुहूर्त ब्राह्मण ठरवितो.

वधू-वरांना एका कांबळ्यावर उभे करतात. नवरा मुलगा वधूच्या गळ्यात काळी पोत घालतो. मग अक्षता टाकल्यावर धार्मिक विधी पूर्ण होतो. लग्नात वधूच्या मामाचा मान मोठा असतो. कन्येचे देज त्याच्याचकडे द्यायचे असते. अनेकदा विधवा होऊन अथवा काडीमोड करून 'याचि देही' सात नवरे करणाऱ्या स्त्रीला लग्नसम रभात फार प्रतिष्ठा असते.

**प्रसूतिप्रथा** – कुरवा स्त्रीला प्रसववेदना सुरू झाल्या, की तिचा नवरा मळवट भरून व लुगडे पांघरून बाजेवर झोपतो. मूल जन्मल्याबरोबर ते बापाच्या जवळ बाजेवर नेऊन ठेवतात. बाळंतिणीप्रमाणे मुलाच्या बापालाही सर्व औषधे घ्यावी लागतात. पुरुषाने हे सोहाळे का करून घ्यायचे, याबद्दल कुरवा जातीत अनेक दंतकथा आहेत. नामकरणाच्या वेळी मुलाच्या खांद्याजवळ डाग देतात. अल् बिरूनी याने १०३९ साली त्यांची ही चाल नमूद करून ठेवली आहे.

कुरवा मुलांना लहानपणी 'मला माहीत नाही' हे वाक्य म्हणायला शिकवितात. नंतर चोरीच्या विविध पद्धतीचे त्याला शिक्षण देतात व भिंतीतून, खिडकीतून व दारातून घरात प्रवेश कसा करावा, तेही त्यांना शिकवितात, असे लिहून ठेवले गेले आहे.

कुरवा लोक शिव, विष्णू, कुमार, सुब्रह्मण्य, मारिअम्म, मारुती, येल्लम्म, हुलिगेव, पेरुमाळस्वामी, इ. देवतांना भजतात. मोथेवी ही गुन्हेगार कुरवांची मुख्य देवता असते. भविष्य सांगण्यापूर्वी हे लोक कोल्हापुरीअम्म व पोलेरम्म या देवतांची प्रार्थना करतात. देवतांना कोंबडा व बकरा बळी देतात.

कुरवांची पंचायत असून गुन्हेगारांना शासन करण्याचे काम त्या पंचायतीकडे असते. विधवेशी किंवा परजातीतील स्त्रीशी व्यभिचार घडल्यास पुरुषाला क्षौर करायला लावतात व त्याची गाढवावरून धिंड काढतात. गुन्हेगाराला ज्ञातिभोजन घालावे लागते. जातिभ्रष्टांची शुद्धी चेट्टी लोक करतात.

कुरवा लोकात अनेक वेडगळ समजुती प्रचलित असून शकुनावर त्यांचा फार विश्वास आहे. चोरी करायला निघाल्यावर विधवा, दुधाची भांडी, कुत्र्याचा मूत्रोत्सर्ग, इ. गोष्टी दिसल्या तर अशुभ व बैलाला झोडपणारा मनुष्य दिसला तर तो शुभशकुन मानतात. एखादे घर फोडण्यापूर्वी त्याच्यावर मूत्र शिंपडतात.

**मर्तिकप्रथा**– तमिळ भाषेत एक म्हण आहे, की मृत वानर व मृत कुरवा हे अद्याप कोणीच पाहिलेले नाहीत. कुरवा लोक मृतांची तत्काल व्यवस्था लावतात. त्यांच्यांत सुतक पाळणे, पिंड देणे वगैरे गोष्टी आहेत, असे म्हणतात. म्हैसूरमधील कुरवा लोकांत मृताच्या विधवेशी प्रथम कोणीतरी लग्न लावतो व मग मृताचे प्रेत जाळायला नेले जाते. बेळगाव, विजापूर, धारवाड या भागातील कुरवा प्रेते पुरतात.

बेळगाव, विजापूर, धारवाड या विभागातील कुरवा हिंदूंचे मोठे सण पाळतात. हे लोक अपराध्याला कोणतेतरी दिव्य करायला लावून गुन्हा शाबीत वा नाशाबीत ठरवितात. यांचे नऊ पोटभाग असून कानडी पोटभागातील लोक सर्वात श्रेष्ठ मानले जातात. यांच्या भाषेत तेलुगू, तमिळ व कानडी या भाषांचे मिश्रण आहे. [म. ज्ञा. को.]

**कुरवैकूत्तू** द. भारतातील खेड्यांत प्रचलित असलेले एक नृत्य. सात किंवा नऊ स्त्रिया किंवा मुली यात भाग घेतात. फेर धरून नाचताना एकमेकींच्या हातावर टाळी देतात. गावावर एखादे संकट येण्याचा संभव आहे, असे वाटल्यास देवाने त्या संकटाचे निवारण करावे या उद्देशाने हे नृत्य करतात. [डि. सा. इं. म्यु. म्यु.]

**कुरळ** निरुवल्लुवराचा तमिळ भाषेतील एक उत्कृष्ट धार्मिक ग्रंथ. दीड ओळीची एक कविता व दहा कवितांचा एक गुच्छ अशा प्रकारे १३३ अध्यायांत या ग्रंथाची मांडणी केलेली आहे. धर्म, अर्थ आणि काम असे या ग्रंथाचे तीन विभाग आहेत. प्रत्येक विभागात त्याने एकेका पुरुषार्थाची चर्चा केलेली आहे. चौथा पुरुषार्थ मोक्ष याविषयी मात्र त्याने काहीच लिहिले नाही. त्याचे म्हणणे असे, की मनुष्य निष्ठापूर्वक स्वधर्म आचरील, तर त्याला मोक्ष आपोआपच मिळेल. धर्मसिंहासनावर वज्रासन घालून बसणाऱ्या माणसाला मोक्षाची काळजी करण्याचे कारण नाही.

मदुरा येथील 'संघम्'च्या विद्वत्सभेपुढे वल्लुवराने आपल्या या ग्रंथाचे वाचन केले. ते ऐकून सर्व पंडित विस्मयचकित झाले. सर्वांनी त्या ग्रंथाला एकमुखी मान्यता दिली. त्याला तमिळ भाषेचा वेद असेच म्हटले आहे.

कुरळमधली काही वचने अशी—

**मनत्तुक्कण् माशिल नातल् अनैत्तरन् ।**
**आकुल नीर पिर ।।**

अर्थ — निष्कलंक बनून आपल्या मनासमोर उभे राहा. तोच खरा धर्म आहे. जर मनात किल्मिष असेल, तर बाकीचे सगळे केवळ अवडंबर होय.

**अन्बुम् अरनुम् उडैत्तायिन इल्वाळक्कै ।**
**पण्बुम् पयनु मदु ।।**

**अर्थ**— प्रेम आणि धर्म यांनी पूर्ण असलेले गृहस्थजीवनच श्रेष्ठ आणि सफल म्हणावे.

**चिरैकाक्कुङ्. काप्पॅवन शयथुम् महळिर्**
**निरैकाक्कुङ् काप्पे तलै ।।**

**अर्थ**— घराच्या चार भिंतीत बंद करून गृहिणीचे संरक्षण होऊ शकत नाही. तिचे मनोधैर्य हाच तिचा उत्तम संरक्षक होय.

**पयन्रुक्कार् शॅयद उदवि नयन्रुक्किन् ।**
**नन्मै कडलिर् पॅरिदु ।।**

**अर्थ**— प्रतिफलाची अपेक्षा न धरता केलेल्या उपकाराची महत्ता सागरापेक्षाही विशाल आहे.

वल्लुवराचा हा ग्रंथ कुरळ या छंदात आहे. पुढे मदुरेच्या विद्वत्सभेने त्या नावाच्या मागे 'तिरु' ही पूज्यतादर्शक उपाधी जोडली व मग लोक त्याला तिरुकुरळ म्हणू लागले. त्याचा कर्ता वल्लुवर यालाही 'तिरु' ही उपाधी जोडली गेल्यामुळे तो तिरुवल्लुवर झाला. या ग्रंथातील विचार सर्वंकष आहेत. ते देशकालातीत आहेत. तमिळ साहित्याचा तो एक अमृतकलशच आहे. [ तमिळनाडु ]

**कुराण** मुसलमानाचा धर्मग्रंथ. कुराण हा अरबी शब्द आहे. याचा शुद्ध उच्चार कुर्आन असा आहे; पण फारसी पंडितांनी 'कुरान' असेही लिहिले आहे, त्यामुळे तोही उच्चार शुद्ध मानला जातो. कुर्आन हा अरबी भाषेचा धातू असून त्याचा अर्थ पढणे, वाचणे असा आहे. पण पुढे तो संज्ञा या अर्थी प्रयुक्त होऊन या ग्रंथाचे नाव बनला.

सामन्यपणे कुराण शब्दाला शरीफ, पाक किंवा मजीद ही उपपदे जोडली जातात. लिहिताना किंवा बोलताना कुराने शरीफ़, कुराने पाक किंवा कुराने मजीद असे म्हणतात. शरीफ़चे अर्थ कुलीन, खानदानी, सज्जन, सुशील, असे अनेक आहेत. पाकचा अर्थ आहे पवित्र व मजीदचा अर्थ आहे पूज्य, मान्य किंवा प्रतिष्ठित. ज्याप्रमाणे आपण भगवद्‌गीतेला श्रीमत् उपपद जोडतो, त्याप्रमाणे वरील तीन शब्द कुराण शब्दाच्या पुढे जोडले जातात. आपण त्याला श्रीमत् कुराण असेही म्हणू शकतो.

**कुराणाची रचना** — कुराणात ३० पारे, लहानमोठी ११४ सूरते, ६६४० आयते व ५४० रुकूअ आहेत.

पार किंवा पारा हा फारसी शब्द आहे. त्याचा अर्थ भाग, अंश किंवा खंड असा आहे. त्यावरून असे वाटते, की कुराणाचे तीस खंडात झालेले विभाजन मुहंमदानंतर बऱ्याच कालाने झाले असले पाहिजे.

सूरा ( पुं. ) किंवा सूरत ( स्त्री. ) हा अरबी भाषेचा शब्द आहे. त्याचा मूळ अर्थ मोठेपणा असा आहे; पण कुराणात तो अध्याय या अर्थाने प्रयुक्त झाला आहे. कुराणाचा सर्वात मोठा व महत्त्वपूर्ण अध्याय सूरेबक्र (गौ-अध्याय) हा आहे. यात २८६ आयते व ४० रुकूअ आहेत. तीन किंवा चार आयतांचेही सुरे आहेत. सूरेनिसा (नारी—अध्याय), सूरेनहल (मधुमक्षिकाध्याय), सूरेनम्ल (पिपीलिकाध्याय), सुरेदुखान ( धूमाध्याय ), सूरेनज्म ( तारकाध्याय ), सूरेक़मर (चंद्राध्याय), सूरेतीन (अंजीराध्याय), सूरेफ़ील (गजाध्याय) हे सूरे विशेष महत्त्वपूर्ण समजले जातात.

आयत = निशाण किंवा चिन्ह. हा अरबी शब्द आहे. कुराणात आलेल्या वाक्यांनाही आयते म्हणतात. या वाक्यांच्या अंती पूर्णविरामसूचक जे गोल चिन्ह असते, त्यावरून आयताला हा विशेष अर्थ आला असण्याचा संभव आहे.

रुकूअ = नम्रतेने वाकणे, हाही अरबी शब्द आहे. नमाजात वाकण्याची जी अवस्था आहे, तिला रुकूअ म्हणतात. कुराणात या शब्दाचा प्रयोग विरामविशेष या अर्थाने केला आहे. ज्याप्रमाणे सांप्रतच्या लेखनपद्धतीत आपण एखाद्या मोठ्या विषयाच्या अंगभूत असलेल्या छोट्या विषयांची समाप्ती

झाल्यावर नवा परिच्छेद करतो, त्याप्रमाणे प्रत्येक रुकूअ हा एक स्वयंपूर्ण छोटा विषय असतो.

**कुराणाची उत्पत्ती** – कुराण हा एक अस्मानी किताब (आकाशातून आलेला ग्रंथ) आहे, अशी मुसलमानांची त्याच्याविषयी श्रद्धा आहे. वेदाप्रमाणेच तो अपौरुषेय ग्रंथ आहे. मुहंमद पैगंबर हा उम्मी होता. उम्मी म्हणजे जो कोणाकडूनही लिहिणे वाचणे शिकला नाही, असा मनुष्य. मुहंमदाचा बाप त्याच्या जन्मापूर्वीच मृत्यू पावला होता व मुहंमदाच्या जन्मानंतर थोड्याच कालात त्याची माताही मरण पावली होती. त्यामुळे मुहंमदाला लिहिण्या-वाचण्याचे शिक्षण मिळू शकले नाही. पण मुहंमदाला ख्रिस्ती, यहूदी, इ. भिन्न धर्मीय लोकांचा सहवास झाला होता. त्यामुळे कुराणात ते धर्म, त्या धर्माचे प्रेषित आणि त्या धर्मांचे अनुयायी यांच्या विषयीचेही उल्लेख मिळतात.

मुहंमदाच्या काळात अरबस्तानातल्या लोकांची अवस्था मोठी दयनीय झाली होती. तिथल्या मूर्तिपूजेने विकृत स्वरूप धारण केले होते. त्यामुळे तिथले लोक खरी भक्ती आणि परमेश्वर यांच्यापासून फार दूर गेले होते. धर्माच्या नावावर तिथे भयानक अत्याचार होत होते. लूटमार आणि तंटे-झगडे या तर नित्याच्या गोष्टी झाल्या होत्या. स्त्रियांना गुलामगिरीत पिचावे लागत होते. त्यांचे जीवन असह्य झाले होते. एखाद्याच्या घरी मुलगी जन्माला येणे, ही गोष्ट अशुभ आणि आपत्तिकारक मानली जात होती. त्यामुळे कित्येक लोक मुलगी जन्मताच तिला मारीत होते किंवा जिवंत गाडीत होते. एकेक पुरुष अनेक स्त्रियांशी लग्ने करीत होता आणि त्यांना निर्दयपणे वागवीत होता. स्त्री ही केवळ भोग्य वस्तू बनली होती.

ही सारी परिस्थिती मुहंमद हरघडी पाहत होता. त्याला या सर्व प्रकारांची चीड येत होती. हा सारा अमानुषपणा आणि धर्माला आलेले हे घाणेरडे स्वरूप कसे नष्ट होईल, याविषयी तो गंभीर चिंतन करीत होता. इतिहासलेखक सर विल्यम् मूर या संबंधात लिहितो –

मुहंमदाची वृत्ती नेहमीच गंभीर असे; पण त्या काळात तो अधिक मननशील आणि एकान्तसेवी बनला होता. त्याचे मन ध्यान–चिंतनात गढून गेले होते. त्याच्या जातभाईंचे जे अधःपतन चालले होते, त्याचा मुहंमदाच्या मनावर विलक्षण बोजा पडला होता. खरा धर्म काय आहे, याविषयी उत्पन्न होणारा संदेह त्याच्या आत्म्याला त्रस्त करीत होता. मक्केजवळच्या निर्जन पहाडात आणि घाटात तो पुष्कळदा एकटाच भटकत होता. एकान्तचिंतनाच्या द्वारे मनाला शांती मिळावी, या आशेने तो हा विजनवास पत्करी. हिरा नावाच्या टेकडीच्या तळवटी जी एक गुहा होती, ती त्याची सर्वांत आवडती जागा होती (लाईफ ऑफ मुहंमद).

मक्केपासून तीन मैलांवर वरील गुहा होती. पुष्कळदा पाणी व सातूचे पीठ बरोबर घेऊन मुहंमद त्या गुहेत जाऊन बसे. तिथे ईश्वराची स्तुती करी. पाणी आणि पीठ संपेपर्यंत तिथून परत येत नसे. पुढे हळूहळू त्याचे मन एकाग्र होऊ लागले. त्याला स्वप्नदृष्टान्त होऊ लागले. जे रात्री त्याने स्वप्नात पाहावे, ते दुसऱ्या दिवशी तसे घडावे, असे होऊ लागले. अशा प्रकारे साधना करीत असता त्याच्या वयाला चाळीस वर्षे होऊन एक दिवस अधिक झाला. त्या दिवशी रमजानचा अठरावा दिवस आणि शुक्रवार होता. त्या रात्री हजरत जिब्रील (= ईश्वराचे संदेश पैगंबरापर्यंत पोचविणारा एक फरिश्ता) मुहंमदाजवळ अल्लाचा पैगाम (संदेश) घेऊन आला.

**पढ़, तू साथ अपने रब्बके जिसने पैदा किया, बनाया आदमी को गोस्तके लोथड़े से; तू पढ़, और तेरा रब्ब बड़ा करीम है, जिसने सिखाया क़लमसे, सिखाया इन्सान को जो वह नही जानता था ।** (सूरे अलक : १.५)

अर्थ–घोषणा कर. आपल्या त्या ईश्वराच्या नावावर, की ज्याने सृष्टीची रचना केली; ज्याने घट्ट झालेल्या मांसापासून माणसाला बनविले; घोषणा कर. तुझा भगवान अत्यंत कृपाळू आहे, ज्याने मनुष्याला लेखणीच्या द्वारे ज्ञानदान केले व पूर्वी ठाऊक नसलेल्या गोष्टी त्याला शिकविल्या.

मुहंमदाच्या अंतरात पहिली ईश्वराची वाणी प्रकटली ती ही. हा संदेश मुहंमदाने आमजनतेपर्यंत पोचवला आणि म्हणून तो पैगंबर (संदेशवाहक किंवा प्रेषित) ठरला. प्रत्येक मुसलमानाने या घटनेवर श्रद्धा ठेवलीच पाहिजे, असा नियम आहे.

मुहंमदाच्या देहान्तापर्यंत म्हणजेच सुमारे २३ वर्षे त्याला अशा प्रकारचे दैवी वाणीचे साक्षात्कार होतच राहिले होते. या सर्व ईश्वरदत्त वचनांचा संग्रह म्हणजेच कुराण होय.

**विषयक्रम** – वर उल्लेखिलेल्या सूरे अलकमध्ये एकूण १९ आयते आहेत. यातली पहिली ५ आयते कुराणाच्या सर्व आयतांमध्ये पहिल्या प्रथम अवतीर्ण झाली. कुराणात या सूऱ्याचा क्रमांक ९६ आहे. याचा अर्थ ही पहिली ५ आयते कुराणाच्या अगदी शेवटी ठेवलेली आहेत. यावरून हे स्पष्ट होते, की कुराण ज्या क्रमाने आज उपलब्ध आहे, त्या क्रमाने ते अस्मानातून उतरलेले नाही. जशी मुहंमदाला आवश्यकता वाटली किंवा जसा प्रसंग उपस्थित झाला, तसे तसे ते अवतीर्ण झाले आहे. जेव्हा जेव्हा एखाद्या समस्येची ईश्वराकडून उकल करून घ्यावी असे मुहंमदाला वाटे, तेव्हा तेव्हा तो हिरा टेकडीतल्या त्या गुहेत जाऊन ध्यानस्थ बसे, उपवास करी, आशीर्वाद

मागे आणि आपल्या परवरदिगारासमोर मुक्तपणे अश्रूही ढाळी. त्यानंतर त्याला जो आदेश मिळे, तो नीट स्मरणात ठेवून एखाद्या लेखनिकाकडून तो त्याचे लेखन करी. त्याच वेळी तो लेखनिकाला सांगे की, हा सूरा तू अमुक सूऱ्याच्या नंतर लिही किंवा अमुक सूऱ्याच्या आधी लिही. याचा अर्थ असा होतो, की कुराणातल्या विषयांची क्रमवारी स्वतः मुहंमदानेच निश्चित करून दिली होती. काही मुसलमान विद्वानाचा या बाबतीत मतभेद आहे. ते म्हणतात, की कुराणाचे वर्गीकरण मुहंमदाच्या मृत्यूनंतर झाले आहे; पहिला खलीफा अबू बकर याने त्याच्या काळात उपलब्ध असलेल्या प्रतींच्या आधारावर विद्वानांकडून ते करवून घेतले आहे.

कुराणात चर्चिले गेलेले विषय केवळ आध्यात्मिकच नाहीत. भौतिक जीवनाशीही कुराणाचा संबंध आहे आणि तरीही त्याची सारी रचना ज्या एका सिद्धान्तावर आधारित आहे, तो सिद्धांत असा– ईश्वर एक आहे; तोच उपास्य आहे; त्याच्यावाचून कोणीही उपासनेला पात्र नाही.

कुराणात जिथे ईश्वराच्या एकतेवर जोर असतो, तिथेच संभवतः मूर्तिपूजेला विरोधही असतो. कुराणाला मूर्तिपूजा सर्वस्वी अमान्य आहे. मूर्तिपूजा हे नास्तिक्याचे सर्वांत मोठे लक्षण कुराणाने सांगितले आहे. मूर्तिपूजेचे जे विकृत स्वरूप मुहंमदाच्या काळात अरबस्तानामध्ये फैलावले होते, त्याची अशी जोरदार प्रतिक्रिया कुराणात दाखल झाली आहे.

कुराणाची शैली संभाषणपद्धतीची आहे. ती सामान्य जनतेलाही समजेल इतकी सोपी आहे. ती वाचताना असे वाटते, की जणू साक्षात परमेश्वर आपल्या प्रेषिताला संबोधित करून म्हणत आहे –

' हे पैगंबरा, तू ही गोष्ट विदित कर !'

आणि मग पैगंबर त्याच संदेशाची पुनरुक्ती करीत आहे.

कुराणात फरिश्ते (देवदूत) आणि सैतान यांचे उल्लेख वारंवार आले आहेत. मनुष्याला कुमार्गापासून परावृत्त करून ईश्वराकडे प्रेरित करणारी सद्बुद्धी आणि ईश्वराकडून खेचून दुष्ट मार्गाकडे नेणारी पापबुद्धी यांची ते प्रतीके आहेत. पावित्र्य, सच्चारित्र्य, व्रतोपवास (रोज़ा), प्रार्थना (नमाज़), अनाथांचे रक्षण, वृद्ध, स्त्रिया व अन्य धर्मांचे आचार्य यांच्या हत्येचा व त्यांच्यावर होणाऱ्या अत्याचारांचा निषेध, बलिदान, भक्ष्याभक्ष्य, तीर्थयात्रा (हज्ज-उम्रा), प्रायश्चित्त, दानपुण्य (जकात), शरणागतरक्षण, गुलामीला विरोध, भ्रातृभाव, समानता, हिंसा-द्यूत-मद्य इ. गोष्टींना विरोध, स्त्रियांना वारसाहक्क, रजोदर्शनकालात त्यांची अस्पृश्यता, सृष्टिरचना, कृपणता, अपव्यय, स्वाध्याय, उपासना, अतिथिसत्कार, इ. विषय व त्यासंबंधी कित्येक विधि-निषेध यांची चर्चा कुराणात ठायी ठायी आलेली आहे.



**कुराणाची भाषा** – कुराणाची अरबी भाषा मधुर व लालित्यपूर्ण आहे. गद्य असूनही अनुप्रासादिकांच्या विपुलतेमुळे ती काव्यमय बनली आहे. कुराणाची एखादी आयत ऐकत असताना कविता किंवा गीत ऐकत असल्याचाच भास होतो. अरब प्रदेशात कुराणाची भाषा आजही साहित्यिक दृष्ट्या विदग्ध समजली जाते. जे लोक कुराणाला अपौरुषेय मानतात, ते त्याच्या अपौरुषेयत्वाचे समर्थन पुढीलप्रमाणे करतात –

जो आपल्या आयुष्यात कधी लिहायला-वाचायला शिकला नाही, तो पुरुष अशी सुश्लिष्ट आणि साहित्यगुणांनी संपन्न भाषा कशी लिहू शकेल ! अतएव ही भाषा मुहंमदाची नसून ती खास परमेश्वराची आहे. अल्लाने मुहंमदाच्या मुखावाटे ती प्रकट केली इतकेच.

नमुना म्हणून कुराणातले काही लहान सूरे पुढे दिले आहेत–

**सूरे इख्लास** – (= खरे व निष्काम प्रेम) (३० वा पारा) हा सूरा मक्केत अवतीर्ण झाला. यात चार आयती व एक रुकूअ आहे – (१) अल्लाच्या नावाने जो क्षमाशील असतो, तो मेहेरबान आहे. (२) (हे पैगंबरा, तू) सांग, की तो अल्ला एक आहे. (३) तो निष्काम आहे. (४) त्याच्यापासून कोणी उत्पन्न झाला नाही. आणि (५) त्याची बरोबरी कोणीही करू शकत नाही.

**सूरे फ़लक** – (=प्रातःकालीन प्रकाश किंवा उषा) (३० वा पारा) हा सूरा मदीना येथे अवतीर्ण झाला. याच्यात पाच आयती आणि एक रुकूअ आहे–(१) (हे पैगंबरा, तू) सांग, की प्रभातकालच्या स्वामीजवळ आश्रय मागतो आहे, (२) तमाम सृष्टीतल्या वाईटपणापासून, (३) जेव्हा अंधःकार पसरतो, तेव्हा अंधाऱ्या रात्रीच्या वाईटपणापासून (४) जादूटोणा करणाऱ्या लोकांच्या वाईटपणापासून (५) जेव्हा लोक ईर्षा करू लागतात, तेव्हा त्यांच्या वाईटपणापासून.

**सूरे कौसर** – (= स्वर्गातले एक कुंड किंवा हौद) (३० वा पारा) हा सूरा मक्केत अवतीर्ण झाला. यात तीन आयती आणि एक रुकूअ आहे – (१) मी तुला कौसर दिला. (२) म्हणून तू आपल्या परवरदिगाराची नमाज पढ़ व कुर्बानी दे. (३) तुझ्या शत्रूची नामनिशाणीही राहणार नाही.

**सूरे अस्र** – ( = सूर्यास्त होण्यापूर्वीची वेळ) (३० वा पारा) हा सूरा मक्केत उतरला. यात तीन आयती आणि एक रुकूअ आहे–(१) अस्रची शपथ. (२) मानव संकटात आहेत. (३) पण जे श्रद्धावान् आहेत, जे सत्कर्म आचरीत आहेत, जे परस्परांना सत्याचे शिक्षण देत आहेत व जे एकमेकांना

सहिष्णुवृत्तीचे शिक्षण देत आहेत, ते संकटात नाहीत.

यावरून कळून येईल, की सामान्यपणे सूऱ्याच्या प्रारंभी जो शब्द येतो, त्यावरून त्या सूऱ्याला नाव दिलेले असते. सूऱ्याच्या अंतर्गत जे विषय येतात, त्यांचा त्या नावाशी संबंध असलाच पाहिजे, असा नियम नाही.

**कुराणात स्त्रीचे स्थान** – कुराणाने नारी जातीला तिचे उचित स्थान देण्याच्या कामी जो प्रयत्न केला आहे, तो लक्षात घेण्याजोगा आहे. वर सांगितलेच आहे, की मुहंमदाच्या काळात अरबस्तानामध्ये स्त्रियांची दशा अत्यंत दयनीय झाली होती. त्या विलास आणि सेवा याचे एक साधनमात्र राहिल्या होत्या. त्यांना पुरुषांच्या शब्दाला प्रतिशब्द देण्याचा काही अधिकार नव्हता. पुरुष एका वेळी अनेक बायका तर करीतच; शिवाय बाप मेल्यावर तिचे मुलगे पित्याच्या संपत्तीची वाटणी करताना त्याच्या स्त्रियाही आपसात वाटून घेत. या परिस्थितीवर कुराणाने पुढील विचार व्यक्त केला आहे –

ज्या स्त्रियांशी तुमच्या बापाने विवाह केला असेल, त्यांच्याशी तुम्ही विवाह करू नका; पण जे झाले ते होऊन गेले. ही मोठ्या लज्जेची आणि दु:खाची गोष्ट होती. ही चाल फारच वाईट होती (सूरे निसा २२.३).

अशा स्थितीत स्त्रियांना संपत्तीत उत्तराधिकार, विवाहविच्छेद, लग्नात पत्नीला दिले जाणारे देज आणि विवाहविधी या गोष्टींविषयी कुराणाने जे नियम घालून दिले, ते त्या काळाचा विचार करता मोठे क्रांतिकारक ठरतात. पुरुषाने आपल्या धर्मपत्नीशिवाय अन्य स्त्रीशी अनैतिक सबंध ठेवणे, हे कृत्य कुराणाने स्त्रीच्या व्यभिचाराइतकेच निषिद्ध व दंडनीय ठरविले. कुराण म्हणते –

स्त्री असो वा पुरुष असो; ज्याने व्यभिचार केला असेल, त्याला १०० फटक्यांची सजा दिली जावी. या शिक्षेबद्दल लोकांनी त्याची कीव करू नये; तर त्या प्रसंगी ते दृश्य पाहण्यासाठी तिथे एकत्र व्हावे. त्यामुळे ते लज्जास्पद दृश्य पाहिल्याने इतरांना आपोआप नैतिक धडा मिळेल.

**निष्काम कर्म** – काही लोकांच्या मते 'इख्लास' हेच इस्लामचे सार आहे. फलाची अपेक्षा न धरता ईश्वरार्पणबुद्धीने कायावाचामनाने आत्म्याला परमात्म्यात विलीन करणे, अशा अवस्थेला इख्लास म्हणतात. इख्लासला स्वर्ग व मोक्ष यांची कामनाही बाधक ठरते. कुराण म्हणते –

इख्लाससह माझी उपासना करणारा मला सर्वप्रथम प्राप्त करून घेईल. मानवमात्राची सेवा हेच प्रधान कर्म आहे. कोणाचाही अधिकार हिरावून घेणारा मनुष्य ईश्वराच्या एकत्वाविषयी कधीही विश्वास ठेवीत नाही. जिहाद (=धर्मासाठी विधर्मियांशी युद्ध) हे या निष्काम कर्माचेच रूप आहे. स्वत:ला विसरून स्वत:चा स्वार्थ त्यागून धर्ममार्गामध्ये कर्म करीत करीत स्वत:चे बलिदान करावे.

अशा प्रकारे कर्म ईश्वरार्पण करणाराच मुस्लीम ठरतो. हाच इस्लाम आहे. हाच इब्राहिम वगैरेंनी आचरिलेला सनातन धर्म आहे (हिंदी कुरान पृ. १२).

मुसलमान व कुराण यांच्या संबंधात एक गैरसमज पसरलेला आहे, की त्यांच्या ठिकाणी अन्य धर्मांविषयी काडीमात्र सहिष्णुता नाही. मुहंमदानंतर इस्लाममध्ये ज्या अनेक वाईट विपरीत गोष्टी शिरल्या, त्यामुळे असे वाटणे अगदी साहजिक आहे. पण मुहंमदाच्या वैयक्तिक जीवनात अशा असहिष्णुतेला स्थान नव्हते. मुहंमदाने अन्य धर्म आणि त्या धर्मांचे प्रेषित यांच्याविषयी जागोजागी आदराने लिहिले आहे –

तुमच्या मधल्या प्रत्येक समूहासाठी आम्ही (वेगवेगळे) धार्मिक नियम व (वेगवेगळे) मार्ग ठरवून दिले आहेत. जर खुदाच्या मनात असते, तर त्याने तुम्हा सर्वांसाठी एकच संप्रदाय निर्माण केला असता; पण त्याने तसे केले नाही. कारण हे, की जे काही तुम्हाला दिले गेले आहे, त्यातच तुमची परीक्षा करावी. तर तुम्ही नेकीच्या मार्गावर दुसऱ्याच्या पुढे जाण्याचा प्रयत्न करा. शेवटी तुम्हा सर्वांना अल्लाकडे परत जाणे आहे. पण तो तुम्हाला दाखवील, की ज्या गोष्टीत तुम्ही परस्परभिन्नता राखीत होता, त्यांचे अस्सलपण काय आहे (सू. पु. आ. ५२).

या जगात अशी एकही जात नाही, की ज्या जातीत (कुकर्मांच्या परिणामाविषयी) भिवविणारा (ईश्वराचा एखादा पैगंबर) उत्पन्न झाला नसेल (सू. ३५ आ. २५).

(हे पैगंबरा!) वस्तुत: तुझ्याशिवाय दुसरे काही नाही. तू केवळ (कुकर्मांच्या परिणामाविषयी लोकांना) भय उत्पन्न करणारा (रसूल) आहेस आणि या जगात प्रत्येक जातीसाठी आदेश देणारा निर्माण झालेला आहेस (सू. १३ आ. ९).

याचा अर्थ असा होतो, की अरबस्तानच्या बाहेर अन्य देशात जे जे प्रेषित उत्पन्न झाले, त्यांनाही कुराणाने मान्यता दिली आहे. पण कट्टर मुसलमान ही गोष्ट मानीत नाहीत. त्यांचे म्हणणे असे–

पैगंबरपद हे असे एक खास स्थान आहे, की जे खुदाकडून त्यानेच निवडलेल्या खास सेवकासाठी दान किंवा समर्पण म्हणून फर्मावले जाते. तेव्हा जोवर खुदाने अमुक अमुक व्यक्ती पैगंबर म्हणून फर्मावली असल्याचे इस्लामी धर्मशास्त्राच्या आधारे सिद्ध होत नाही, तोवर एखाद्या व्यक्तीला तो खुदाचा नबी आहे, असे आम्ही म्हणू शकत नाही. ज्याचे

पैगंबरपण धर्मशास्त्राच्या द्वारे स्वाधीन होते आणि कुराण-मजीद किंवा हदीस यात ज्याना पैगंबर म्हटले आहे, त्यांनाच आम्ही पैगंबर समजू ('तालीमुल इस्लाम', भाग ४ पृ. १२–१३ ).

पण मौलाना अबुल कलाम आज़ाद यांच्यासारखे प्रगतिशील मुस्लिम विद्वान वरील मताशी सहमत नाहीत. ते 'तर्जुमानल कुरआन' या आपल्या ग्रंथात म्हणतात– 'परमात्म्याचे जे रसूल आणि धर्मप्रचारक आहेत, त्यांतल्या काहींचे वर्णन कुराणात केलेले आहे, तर काहीचे नाही.'

ते पुढे म्हणतात–'कुराणाचे मत असे आहे, की कोणत्याही युगात आणि कोणत्याही देशात जेवढे म्हणून पैगंबर निर्माण झाले, त्या सर्वांचा मार्ग एकच होता आणि त्या सर्वांनी ईश्वराच्या एकाच विश्वव्यापी नियमाचा उपदेश केला. श्रद्धा-पूर्वक सत्कर्म हा तो नियम होय. याव्यतिरिक्त आणि याला विरोधी अशा ज्या गोष्टी धर्माच्या नावावर सांगितल्या जातात, तो खरा धर्म नव्हे ( कुरान और धार्मिक मतभेद, पृ. २१–२२ ).

मौ. आज़ादसाहेबांनी कुराणाचे सार पुढील शब्दात सांगितले आहे.–

कुराणाने ज्या महान गोष्टींवर जोर दिला, त्यामधल्या तीन सर्वांत स्पष्ट आहेत– (१) मनुष्याचे कल्याण आणि त्याची मुक्ती या गोष्टी त्याच्या श्रद्धेवर आणि त्याच्या कर्मावर अवलंबून असतात. त्या कुठल्याही संप्रदायविशेषावर अवलंबून नसतात. (२) मनुष्यमात्रासाठी ईश्वरप्रणीत धर्म एकच आहे व त्या धर्माची शिकवण सर्वांना समप्रमाणात दिली गेली आहे. विविध धर्मांच्या अनुयायांनी धर्माची एकता आणि त्याचे विश्वव्यापी तत्त्व यांची हानी करून अनेक विरोधी आणि परस्पर लढाया करणारे जथ्थे बनवणे, ही गोष्ट म्हणजे त्या लोकांची मार्गभ्रष्टताच होय. (३) धर्माचे मूळ एकेश्वरवाद हेच आहे. एकेश्वरवाद म्हणजे एका विश्वंभर प्रभूची सरळ-साधी उपासना. **पाहा** – इस्लाम, मुहंमद पैगंबर. [ तर्जुमा कुरान शरीफ़; तालीमुल कुरान; हज़रत मुहंमद; हमारे रसूल; हमारे नबी; दी प्रॉफेट ऑफ दी डेझर्ट; श्रीपाद जोशी ].

## कुरारियार

बिहारच्या पूर्णिया जिल्ह्यातील एक जमात. हिला ब्याध असेही नाव आहे. पाखरे पकडून ती विकणे हा या लोकांचा मुख्य व्यवसाय आहे. ते रानात राहतात व रानातील फळामुळांवरच जगतात. त्यांचा पुरोहित न्हावी असतो. लालमोहन पालवण हा त्यांचा मुख्य देव आहे.

## कुरिच्चन

मलबारमधील एक शिकारी जात. हे लोक निरनिराळ्या ठिकाणी हिंडून शेतीही करतात. हे उत्तम धनुर्धर आहेत.

तियन, कम्मालन व इतर डोंगरी जमाती यांचा हे विटाळ मानतात. मुलगी वयात येण्यापूर्वी तिचा नाळी बांधण्याचा समारंभ करतात. हे मरुमक्कतायम् ही वारसापद्धती पाळीत असले तरी त्यांच्यांत वराला वधूशुल्क द्यावे लागते व वधू आपल्या पतिसमवेत नव्या झोपडीत राहायला जाते.

हे मुत्तप्पन, करिंविल भगवती, मलकुरथी, अथिरल्लन, इ. देवतांना भजतात निरनिराळ्या कुटुंबांच्या प्रमुखांकडे जातीची सामाजिक व आर्थिक व्यवस्था सोपविलेली असते. [ का. ट्रा. स. इ. ]

## कुरिच्चियन

केरळातील एक जात. केरळच्या एका राजाच्या सैन्याशी या जातीचा घनिष्ठ संबंध होता. त्याच राजाने हे नाव आपल्याला दिले, असे हे सांगतात. यांच्या उत्पत्तीची कथा अशी–

वायनाडच्या वेदर राजाचा पराभव करण्यासाठी त्रिवांकुरच्या नायरांनी क्षत्रिय राजांना मदत केली. लढाई संपवून हे नायर जेव्हा परत गावी आले, तेव्हा तिथल्या नायरांनी त्यांना आपल्या जातीत घेण्याचे नाकारले. तेव्हा ते परत वायनाडला आले व पहाडात वस्ती करून राहू लागले. हल्लीचे कुरिच्चियन हे याच नायर योद्ध्यांचे वंशज होत.

कुरिच्चियन स्वतःला सर्व जातींपेक्षा श्रेष्ठ मानतात. यांचे सोवळेओवळे फार कडक आहे. पनियन किंवा कुरुमन यांचा चुकून स्पर्श झाला, तरी ते आंघोळ करतात. यांच्यांतले सनातनी लोक इतर जातीच्या लोकांना आपल्या घरात तर घेत नाहीतच; पण घराला स्पर्शही करू देत नाहीत. ते जातिबाह्यांच्या हातचे अन्न घेत नाहीत. कोणी घेतल्यास त्यांना लगेच जातिबहिष्कृत करतात.

आपल्या जमिनीच्या जवळच उंच डोंगरमाथ्यावर यांची झोपडी असते. स्वतः विटा बनवून ते घराच्या भिंती घालतात. या घरापासून सुमारे शंभर हातांवर दुसरी एक झोपडी असते. ती रजस्वला व बाळंतीण यांना राहण्यासाठी असते.

हे लोक शेती करतात व मिरी, सुपारी व काजू यांची लागवड करतात. यांना शिकारीचाही नाद असतो.

जातीच्या प्रमुखाला मोथपणिक्कर म्हणतात. तो नेहमी एक सुरा जवळ बाळगतो व त्यावरूनच त्याच्या अधिकाराची ओळख पटते.

**विवाहप्रथा**– मुलगी वयात येण्यापूर्वी तिचा ताळिकेट्टु-

कल्याणम् हा समारभ करतात. या वेळी मुलीचा बाप किंवा चुलता तिच्या गळचात ताळी बांधतो. मुलगी वयात आल्यावर तिचा खरा विवाह होतो. नियोजित वर आपल्या नातेवाईकांसह हातात धनुष्यबाण घेऊन वधूच्या घरी जातो व तिला काही वस्तू देऊन आपल्या घरी घेऊन येतो. तिथे मग ताळी बांधण्याचा समारंभ होतो. सर्वसाधारणपणे ११ रुपये मुलीचे देज असते. आते-मामे भावंडात लग्न होते. यांच्यांत मातृसत्ताक पद्धती रूढ असली तरी स्त्री नवऱ्याच्या घरीच राहते.

**प्रसूतिप्रथा**– जननाशौच ४१ दिवस पाळतात व त्यानतर बाप मुलाचे तोंड पाहतो. तीन वर्षे पूर्ण झाल्यावर मुलाचे नाव ठेवतात.

हे मुत्तप्पन व विष्णू या देवतांना भजतात. स्त्रिया व मुले यांना मात्र मुत्तप्पनचे दर्शन घ्यायला बंदी असते.

**मर्तिक प्रथा**– मृतांना पुरतात. अकरा दिवस सुतक पाळतात.

सामाजिक नियमांचा थोडा जरी भंग झाला, तरी हे आपल्या बायकामुलांना जातिबहिष्कृत करतात. [ ट्रा. के. ]

## कुरी आड

मुंड लोकांच्या लग्नसमारंभातील एक विधी. लग्न झाल्यावर नवरामुलगा व त्याच्या पक्षातील मंडळी नवरीला आपल्या गावी नेण्यासाठी म्हणून तिच्या घरी येतात. वराचा मोठा भाऊ तिला कडेवर घेतो व मेण्यात बसवितो. या वेळी वधूच्या मैत्रिणी तिच्या भोवती गोळा होतात व मेणा नेणाऱ्याचा मार्ग अडवितात. त्यांना बाजूला सारून मेणेवाले पुढे जातात. मेणा नसल्यास ती चालतच जाते. वराच्या गावाच्या सरहद्दीवर तिला उचलून घेतात. गावाच्या वेशीवर धनगर स्त्री वधूवरांच्या कपाळी दही लावते. घराजवळ आल्यावर स्त्रिया वधूला कडेवरून वा मेण्यातून उतरवून घेतात. मग वर आपल्या वाहनातून खाली उतरतो व दोघे बरोबर गृहप्रवेश करतात. नंतर जमलेल्या मंडळींना दारू व मांस वाटतात. [ एन्सा. मुं. ]

## कुरीर

स्त्रियांचा केसात घालायचा एक अलंकार. ऋग्वेदात याचा उल्लेख आहे (१०.८५.८). विवाहसमयी वधू तो धारण करीत असे, असे सायणाने म्हटले आहे. उव्वटाने कुरीर शब्दाचा अर्थ मुकुट असा सांगितला असून, महीश्वराने त्याला मस्तक शोभविणारा सुवर्णालंकार असे म्हटले आहे ( वाज. सं. ११.५० ). यजुर्वेदसंहितेत सिनीवालीचे वर्णन सुकुरीरा असे केले आहे. अथर्ववेदात अजाला कुरीरी असे म्हटले असून, तिथे त्याचा अर्थ शिंगे असलेला असा आहे. मुकुटाच्या शृंगाकार रचनेवरून अजाला हे नाव मिळाले असण्याचा संभव आहे. अनेक विद्वानांनी शृंगाकृती केशरचनेला कुरीर असेच म्हटले आहे. [ वै. सा. सं.; वे. इं. ]

## कुरुका

दक्षिणेतील पांड्य राजाची प्राचीन राजधानी. हिचे वर्णन दिव्यसूरिचरितात पुढीलप्रमाणे केले आहे—

**अस्ति पूर्वपयोराशेः कापि पश्चिमरोधसि ।**
**मण्डले पाण्ड्यभूपस्य नगरी कुरुकाह्वया ।।** (१.४)

अर्थ– पांड्य देशात पूर्वसमुद्राच्या पश्चिम किनाऱ्यावर कुरुका नावाची एक नगरी आहे.

त्यापुढे असे म्हटले आहे, की कौरवेंद्र राजाने द्वापरात या नगरीचा प्रतिपाळ केला, म्हणून तिला कुरुका असे नाव मिळाले.

यावरून कुरुका नगरी द्वापरयुगापासून प्रसिद्ध होती, असे दिसते. पांड्यांच्या वेळी ही दक्षिण भारताची मुख्य राजधानी होती. रोम व इतर देशाचे व्यापारी इथे व्यापारासाठी येत असत. साऱ्या जगभर इथून वस्त्रांची निर्यात होत असे. इथे ताम्रपर्णी व समुद्र यांच्या संगमावर मोत्यांचीही पैदास होई.

अशोक व चंद्रगुप्त याच्या काळातही पांड्य राजे प्रबळ होते. पुढे इ. स. च्या पहिल्या शतकात करिकाल चोळाने पांड्यांना कुरुका नगरीतून घालवून दिले. त्यामुळे कुरुकेचे माहात्म्यही कमी झाले. सांप्रत तिनेवेल्ली जिल्हयात श्रीवैकुंठम् नगरापासून बारा मैलांवर असलेले कोरकई हे गावच पूर्वीची कुरुका होय. [ भारती– जून १९६० ]

## कुरुकुल्ला

बौद्धांची एक देवता. तिला दोन, चार किंवा सहा हात असतात. पाच ध्यानी बुद्धांपासून हिची उत्पत्ती झाली असून वशीकरणासाठी हिची उपासना करतात. हिचा मंत्र असा–

**ॐ कुरुकुल्ले हुं ह्रीः स्वाहा।**


कुरुकुल्ला

हिचे शुक्ल, तारोद्भव, ओड्डियान व अष्टभुज असे आणखी काही भेद असून तंत्रविद्येत त्यांचा वेगवेगळ्या उद्दिष्टांसाठी उपयोग सांगितलेला आहे. [ इं. बु. इ. ]

(२) चौऱ्यायशी सिद्धांपैकी एक. महामुद्राभिगीती हा याचा ग्रंथ होय. [म. च. को.]

**कुरुगड्डी** एक दत्तक्षेत्र. प्राचीन नाव कुरवपुर. हे क्षेत्र आंध्र-राज्यात कृष्णा स्टेशनपासून १८ मैलांवर आहे. हे कृष्णेतले एक बेटच आहे. हे दत्तावतार श्रीपाद श्रीवल्लभ यांचे तपःस्थान असून तिथल्या एका गुहेत त्यांच्या पादुका व शिवलिंग आहे. गुरुद्वादशीला इथे मोठी यात्रा भरते. **पाहा**— श्रीपाद श्रीवल्लभ.

**कुरुजांगल** एक प्राचीन वनप्रदेश. हा प्रदेश हस्तिनापुरच्या उत्तरेस सांप्रतच्या पंजाबातील सरहिंद जिल्ह्यात होता. हा प्रदेश सरस्वती व दृषद्वती या नद्यांच्या मध्ये होता असे वामनपुराणात म्हटले आहे. हे जंगल कुरु राज्याचाच उत्तरेकडील भाग होता, असेही म्हटलेले आहे. काम्यकवन याच प्रदेशात होते. महाभारत, देवीपुराण, इ. ग्रंथांत याचे उल्लेख आहेत. हे क्षेत्र श्राद्धयोग्य असल्याचे मत्स्य पुराणात सांगितले आहे (२१.९).

**कुरुप** मलबारमधील कलरी या संस्थेशी म्हणजे व्यायाम-शाळेशी संबंधित असलेल्या जातीची एक उपाधी. कोल्ल कुरुप हे चंपी व मसाज करतात आणि चामड्याच्या ढाली बनवितात. विल कुरुप धनुष्य-बाण तयार करून तरुणांना त्याचे शिक्षण देतात. याशिवाय ते छत्र्याही बनवितात. छाय कुरुप लाखेचे, पलिरस कुरुप लाकडाचे व टोल कुरुप चामड्याचे काम करतात. कलरी चालविणाऱ्या नायरांनाही कुरुप अशी पदवी दिलेली आहे. [का. ट्रा. स. इं.]

**कुरुपण्णा** द. भारतातील ग्रामदेवतेचा सेवक. मदुरा जिल्ह्यातील अझागिरीच्या देवस्थानात याची पंचवीस फूट उंचीची मूर्ती असून ती शस्त्रास्त्रांनी सज्ज आहे. देवालयाच्या भांडाराची किल्ली या कुरुपण्णाच्या पायांशी ठेवलेली असते; पण चोरांना कुरुपण्णाची एवढी दहशत वाटते, की ते त्या किल्लीला स्पर्शही करीत नाहीत. तमिळनाडमध्ये कुरुपण्णाचा फारच वचक आहे. त्याची शपथ घ्यायला माणसे कचरतात. याचे पुजारी परिया जातीचे असतात.

**कुरुबा** सुधारलेल्या कुरुंबाना कुरुबा असे म्हणतात. कर्नाटक व मद्रास या भागात यांची वस्ती आहे. हे लोक मेंढ्या व बकऱ्या पाळतात. वनवासीचे कदंब राजे जातीने कुरुबा होते, असे म्हणतात. या जातीच्या उत्पत्तीसंबंधी लोकांत प्रचलित असलेली कथा पुढीलप्रमाणे—

मुळात कुरुबाना कापू असे नाव होते. मम्मी रेड्डी व नीलम्मा या दंपतीचे हे वंशज होत. या दंपतीला सहा मुलगे होते. लाकडे विकून ते कसेबसे आपली गुजराण करीत असत. पुढे शंकराला त्यांची दया आली व जंगमाचे रूप घेऊन तो भिक्षा मागण्यासाठी त्यांच्या घरी आला. शंकराने नीलम्माला थोडी विभूती दिली व सांगितले, की तुला आणखी एक पुत्र होईल व कृषिकर्मात तुमची ऊर्जितावस्था होईल.

त्याप्रमाणे शेतीचा व्यवसाय करून ते भरभराटीला आले. हे सहाही भाऊ शेतात काम करीत असत. पण सातवा मुलगा उंदाळ पदमन्न कधीच कामाला हात लावीत नसे. तेव्हा त्याचा कायमचा काटा काढावा म्हणून त्याच्या भावांनी त्याला काही झुडपे जाळायची कामगिरी सांगितली. त्या झुडपात सापाचे वारूळ होते. आगीचा चटका लागल्यावर साप बाहेर येईल व त्याला चावेल, अशी त्यांची कल्पना होती. पण त्यातून सापाच्या ऐवजी पुष्कळ मेंढ्या बाहेर आल्या. उंदाळ पदमन्नाला ते पाहून भीती वाटली व तो पळू लागला. त्या वेळी शंकर तिथे प्रगट झाला आणि त्याने सांगितले, की 'तू त्यांना सभाळ व त्याच्या दुधावर उदरनिर्वाह कर.' शिवाने मग त्याला दूध कसे काढायचे व कसे तापवायचे ते शिकविले. नंतर त्याने उंदाळला एका दूरच्या गावी विस्तव आणायला पाठविले. ते गाव राक्ष-सांनी व्यापलेले होते. त्या राक्षसांनी एका ब्राह्मण मुलीला पकडून ठेवले होते. त्या मुलीने उंदाळला पाहिले व त्याच्यावर तिचे प्रेम बसले. मग ती दोघे तिथून पळून आली.



कुरुबांचे मंदिर

उंदाळने त्या ब्राम्हण मुलीशी व आपल्या जातीतल्या एका मुलीशी अशी दोन लग्ने केली. पुढे दोघींनाही मुलगे झाले.

जातीच्या मुलाना लग्नाच्या वेळी सुताचे व ब्राह्मण स्त्रीच्या मुलांना लोकरीचे ककण बाधले गेले. त्यामुळे त्याना अनुक्रमे अत्ती कंकणदेवरू व उन्नी कंकणदेवरू अशी नावे मिळाली.

कुरुबाचा आंदे कुरुबा म्हणून आणखी एक भेद आहे. कुरुबापैकी काही लोक लिंगायत झाले आहेत.

याच्या प्रत्येक पोटजातीचा एक मुख्य असतो. तोच त्याचा उपाध्या व पुजारीही असतो. प्रत्येक घरातून दर वर्षी त्याला ठराविक रक्कम मिळते.

हे लोक बकऱ्या-मेंढ्याच्या लोकरीच्या घोंगड्या विणतात. काही लोक शेती करतात, तर काही गवंडीकाम करतात.

मुलीला प्रथम रजोदर्शन झाले, की तिला आठ दिवस बाजूला ठेवतात. नवव्या दिवशी तिला घोंगडी पांघरून चौरंगावर बसवितात व जमलेल्या स्त्रिया तिच्यावर अक्षता टाकतात.

**विवाहप्रथा**– पश्चिम बेल्लारी जिल्ह्यात वधू-वर काबळ्यावर उभे राहतात आणि पाच सुवासिनी त्याच्यावर अक्षता टाकतात. लग्नात जंगम किंवा ब्राह्मण, पुरोहिताचे काम करतो. लग्नाच्या तिसऱ्या दिवशी नवरा मुलगा वधूला कडेवर घेऊन मारुतीच्या मदिरात जातो. पाचव्या दिवशी वधूपिता वधूला वराच्या हवाली करतो. सहाव्या दिवशी रात्री एका घगाळात तूप, दही व साखर यानी कालविलेला भात ठेवतात व वधू-वराचे काही नातेवाईक शक्य तितक्या लवकर तो भात खातात. तो जर कोणाला बाधला तर ते अशुभ समजतात.

**प्रसूतिप्रथा**– मूल जन्माला आले, की दहा दिवस बाळ-बाळंतीण एका वेगळ्या झोपडीत राहतात. ११ व्या दिवशी गावातल्या स्त्रिया एकेक घागर गरम पाणी घेऊन येतात व बाळ-बाळंतिणीला आंघोळ घालतात. मुलाचे नाव येरूकलच्या (पुरोहित) सल्ल्याने ठेवतात.

**देव-धर्म**– हे लोक बिरप्पा, हुलीगम्म, मल्लप्प, केंचराय, मारिअम्म, इ. देवतांना भजतात. म्हैसूरमधील कुरुबा केलू देवरू किंवा मने हन्नू देवरू नामक एका देवतेला भजतात. ही देवी म्हणजे एक घट असतो. कुंभाराने व्रतस्थ राहून तो बनविलेला असतो. दसऱ्याला त्याची विशेष पूजा करतात. मदुरा जिल्ह्यातील कुरुबा वीर लक्कम्म या देवतेला पुजतात. कुरुबा लोक पितृपूजकही आहेत.

**मर्तिकप्रथा**– हे लोक प्रेते पुरतात. १० दिवस सुतक पाळतात व ११ व्या दिवशी कोंबड्या-बकऱ्यांचा बळी देऊन गावजेवण घालतात. [ का. ट्रा. स. इ.; मुं. इ. जा. ]

**कुरुंबा** मद्रास, म्हैसूर व कूर्ग या भागातील एक जात. या लोकाना कुरुमन असेही नाव आहे. हे जंगलात राहतात. जंगलात राहणारे कुरुंबा आणि मैदानात राहून मेंढपाळाचा धंदा करणारे कुरुबा या दोन्ही जाती एकच होत, असे काहीचे म्हणणे आहे.

१८९१ च्या मद्रास सेन्सस रिपोर्टात लिहिले आहे, की सध्याचे कुरुंबा हे प्राचीन काळी द. भारतावर राज्य करणाऱ्या पल्लवांचे वंशज आहेत. चोळ राजांनी त्यांचा पाडाव केल्यावर याच्यापैकी बरेचसे लोक डोंगरात पळून गेले. निलगिरी, वायनाड, कूर्ग व म्हैसूर या भागात आढळणारे कुरुंबा हे त्याचे वशज असून ते अद्याप मागसलेले आहेत. बाकीच्या भागांत आढळणारे कुरुंबा हे जास्त सुधारलेले असून ते मेंढपाळाचा व काबळी विणण्याचा व्यवसाय करितात.

म्हैसूरच्या काडू या वन्य कुरुंबाचे बेट्टा किंवा डोंगरावर राहणारे कुरुंबा व जेनू किंवा मध काढणारे कुरुंबा असे दोन वर्ग आहेत. बेट्टा कुरुंबा हे जमीन भाजून शेती करतात व लाकडे तोडतात. त्यांच्या बायका टोपल्या विणण्यात कुशल असतात. त्या आपला छातीचा भाग झाकण्यासाठी एक वस्त्र गुडाळतात. पुरुष डोक्यावरचे केस वाढवितात व मस्तकावर त्याची गाठ बांधतात. जेनू कुरुंबा मात्र केस कापून घेतात. बेट्टा कुरुंबा हे उत्तम माहूत म्हणून प्रसिद्ध असून, हत्तींना पकडण्याच्या कामी त्याचा चांगला उपयोग होतो.



कुरुबा पुरुष

बेट्टा आणि जेनू याच्यांत परस्पर विवाहसंबंध होत नाही. सज्जन लोक मेल्यावर उपकारकर्ते देव बनतात व दुर्जन अपकारकर्ते देव बनतात, अशी त्यांची धारणा आहे. हे बेट्टद चिक्कम्म नामक देवतेला भजतात.

मलबारच्या वायनाड, कालिकत व एरनाड तालुक्यांत राहणाऱ्या कुरुंबाचे मुल्लू, जेन किंवा तेन व उराळी किंवा बेट असे पोटभेद आहेत. जेन कुरुंबांना काडू किंवा शोल नायक्कर असेही नाव आहे. मुल्लू कुरुबा हे शेतकरी व शिकारी आहेत. जेन कुरुंबा लाकडे तोडतात व मध गोळा करतात. उराळी टोपल्या विणतात, शेतीची अवजारे तयार करतात व धातुकाम करतात. मुल्लूंच्या मुख्याला मुप्पन व तेनांच्या मुख्याला मुदाळी असे म्हणतात. तेन कुरुंबा मास्तीनामक देवतेला भज-

तात. उराळी कुरुंबा सुतक पाळीत नाहीत. मुल्लू हे मल्याळम् व तेन आणि उराळी कानडी बोलतात. काडू कुरुंबांत वधूचे देज द्यावे लागते. ते देणे शक्य नसल्यास मुलाला तिच्या बापाच्या घरी काम करावे लागते. वधूला वस्त्र देणे व तिच्या गळ्यात रंगीत मण्यांची माळ बांधणे, हे त्यांच्या लग्नातील मुख्य विधी होत. मुलाचे नाव विसाव्या दिवशी ठेवतात. जननाशौच दीड महिना पाळतात.

हे मृतांना पुरतात. सुतक सहा दिवस पाळतात. पुनर्जन्मावर त्यांचा विश्वास आहे.

निलगिरी टेकड्यांत राहणारे कुरुंबा डोंगराच्या पायथ्याशी राहतात. चार पाच झोपड्या मिळून त्यांचे एक गाव बनते. ते कंदमुळे खाऊन राहतात. रानातील मध, डिंक वगैरे गोळा करून, त्याच्या बदली ते इतर जिन्नस मिळवितात. हे बदगाचे पौरोहित्य करतात. आपल्यावर चेटूक करू नये म्हणून बदग लोक त्यांना देणग्या देऊन खूष ठेवतात. हे वाजंत्र्यांचाही व्यवसाय करतात.


शोल नायक्कर कुरुबा

हे लोक शिव, कुरिबट्र्य, मुस्नी, हिरिय देव, इ. देवतांना भजतात व त्यांना बळी अर्पण करतात.

हे अनेक भावांत मिळून एकच बायको करतात. त्यांच्यांत विवाहसंस्कार असा नसतोच. स्त्री व पुरुष एकत्र राहतात व त्यांना पति-पत्नी असे संबोधतात. क्वचित् एखाद्या कुटुंबात लग्नसमारंभ साजरा होतो. त्या वेळी वधू-वर एकमेकांवर पाणी ओततात व नवीन वस्त्रे नेसतात. शोल नायक्कर लोकांत वधू तंबाखूच्या पानांचा चिरूट तयार करते व दोन्ही पक्षांतील लोक आळीपाळीने त्याचे झुरके घेतात.

निलगिरीच्या कुरुंबांना औषधी वनस्पतींचे चागले ज्ञान असते. त्याच भागात राहणारे तोडा व बदग आदिवासी यांना यांच्या जादुगिरीची व चेटकांची फार भीती वाटते. आजार, अपमृत्यू इ. गोष्टी कुरुंबांमुळेच घडून येतात, अशी त्यांची समजूत आहे.

निलगिरीवरील जेन कुरुंबा व शोलग हे मधाची पोळी हुडकून मध काढतात. एखादे पोळे त्या वेळी काढण्यासारखे नसल्यास त्या ठिकाणी ते दोन काठ्या उभारून ठेवतात. या काठ्या दिसल्या, की दुसरा कोणीही त्या पोळ्याच्या वाटेला जात नाही. कुरुबा हे शूर असतात. शिकारीच्या वेळी घायाळ होऊन निसटलेल्या गव्याला रात्रीसुद्धा ते चुडण्या पेटवून शोधतात व मारतात.

निलगिरीवर राहणाऱ्या कुरुंबांच्या प्रत्येक खेड्यात एका ओट्यावर दोन उभे दगड पुरलेले आढळतात. त्यांतील एक पुरुषासाठी व दुसरा स्त्रीसाठी असतो. तिथे पूर्वजांचे वास्तव्य असते, अशी त्यांची समजूत आहे.

हे लोक मृतांना जाळतात. पण मुदाळी, त्याचे कुटुंबीय व लहान मुले यांना पुरतात. मृताची स्मृती म्हणून एक दगड ठेवतात. प्रत्येक खेड्यात असे दगड साठवून ठेवण्यासाठी एक खास गुहा असते.

हे हेरुगुडियन, मारी, महालिग, इ. देवतांना भजतात. [का. ट्रा. स. ई.; ट्रा. के.; से. इं. १९३१ व्हॉ. १ ]

**कुरुंबाई** द. भारतातील एक ग्रामदेवता. हिच्यासाठी एक चौथरा असतो; पण त्यावर मूर्ती नसते. जत्रेच्या दिवशी चौथऱ्यावर एक जलपूर्ण घट ठेवतात व तेच हिचे प्रतीक समजतात त्या घटाला करगम् म्हणतात. याचा पुजारी धोबी असतो. जत्रेच्या दिवशी पुजाऱ्याच्या डोक्यावर करगम् ठेवून त्याची मिरवणूक काढतात.

**कुरुमय्या** द. भारतातील एक ग्रामदेव. हा एका सावकाराचा मुलगा होता. पण भाऊबंदांनी नाडल्यामुळे तो एका शेतकऱ्याच्या घरी मेंढरे राखायला राहिला. पुढे एके दिवशी डोंगरातून हिंडत असता तो दरीत पडून मेला. गावचे लोक त्याला शोधायला गेले आणि त्यांनी त्याला हाका मारल्या. हाकांना प्रतिसाद आली. त्या अनुरोधाने लोक दरीत उतरले, तो त्याना कुरुमय्याचे प्रेत सापडले. केवळ प्रतिसाद दिल्याच्या चमत्कारामुळे लोकांनी त्याला देव बनविले [ द्र. गॉ. मॉ. हिं. ]

**कुरुमो** गंजम जिल्ह्यातील ओरिया शेतकऱ्यांची एक जात. तेलुगू लोक त्यांना कुडुमो असे म्हणतात. विजगापट्टम् जिल्ह्यातील श्रीकूर्मम् या गावातील शिवमंदिरात हे पुजारी म्हणून काम करीत असत, त्यावरून त्यांना हे नाव मिळाले, अशी दंतकथा आहे. अद्यापही यांच्यांतले लोक शिव-

मंदिरात पुजारी असून, त्यांना रावुळो असे म्हणतात. ते जानवे घालतात व ब्राह्मणाच्या घरी जेवतात.

कुरुमो लोकाचा कुजी कुरुमो म्हणून एक भेद आहे. त्यांचा सामाजिक दर्जा कुरुमोंपेक्षा कमी मानला जातो. प्रत्येक खेड्यात त्यांचा एक जातिमुख्य असतो. बेहरा नामक आणखी एक पुरुष त्याच्या वरचा अधिकारी असतो. हे दोन्ही अधिकारी वंशपरंपरागत असतात.

हे लोक बोडो, रावुळो, बाघदेवी, कुंभेश्वरी इ. ग्रामदेवतांना भजतात. एकच कुलदेव असलेल्या कुटुंबांत लग्नसंबंध होत नाहीत. प्रत्येक कुटुंबात कुलदेवाची पूजा होते. सोने, रूपे, लोखड, तांबे व शिसे यांच्या तुकड्यांनी भरलेल्या पाच सुपाऱ्या या स्वरूपात यांचे देव असतात.

**विवाहप्रथा** – अगदी लहान वयात मुलामुलींची लग्ने होतात. मुलगी वयात येईपर्यंत तिचे लग्न न झाल्यास, तिच्या आजोबाशी किंवा दुसऱ्या एखाद्या वडीलधाऱ्या माणसाशी तिचे खोटे लग्न लावतात.

लग्नाच्या आदल्या दिवशी सायंकाळी वराची आत्या पितळेची घागर घेऊन नदीवर किंवा तलावावर जाते. घागर काठावर ठेवून तिची पूजा करते व तिच्यात पाणी भरून आणते. दारात एक गौड हातात पाण्याचे भांडे घेऊन उभा असतो. तो त्या घागरीत आणखी थोडे पाणी ओततो. नंतर वधूची आत्या तीन किंवा पाच घरी जाऊन आपल्या घागरीत आणखी पाणी घालून घेते. नंतर ती घागर बोहल्यावर ठेवली जाते. लग्न वधूगृही होते. लग्नात नवरी मुलगी वराच्या डोक्यावर अक्षता टाकते.

**प्रसूतिप्रथा** – मूल जन्मल्यानंतर पांचव्या व आठव्या दिवशी मुलाला एका फडक्यावर ठेवतात व त्याच्या डोक्याशी भागवताची पोथी व एक लोखंडी सळई ठेवतात. ब्राह्मण पुराण वाचतो व जमलेल्या मंडळींना पानसुपारी वाटली जाते. पुढे २१ व्या दिवशीही असाच समारंभ करतात व पुरोहिताच्या सल्ल्याने मुलाचे नाव ठेवतात.

हे लोक अनेक व्रतवैकल्ये करतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**कुरुव** द. भारतातील गुलामांची एक जात. यांची वसती मुख्यत्वे त्रिवांकूर जिल्ह्यात आहे. त्यांचे चार पोटविभाग आहेत, ते असे–(१) कुंट कुरुवन (२) पूम कुरुवन (३) काक्क कुरुवन व (४) पांडी कुरुवन.

त्रिवांकूरमधील सर्व कुरुव हे पहिल्या पोटविभागापैकी आहेत. पूम कुरुवन ही कालांतराने वेगळी जात बनली व ते स्वतःला वेलान म्हणवून घेऊ लागले.

कुरुव हे जमीन धारण करणारे गुलाम आहेत. त्यांची विक्री होताना जमिनीसह होते. ते मांस खातात व मद्य पितात. त्यांच्या स्त्रिया डोक्यावरील केस मधोमध बांधतात. त्या गोंदूनही घेतात. कुरुव लोक उच्चवर्णीय हिंदूंपासून दूर राहतात. ते स्वतःला पुलिय व परैयनांपेक्षा वरच्या दर्जाचे समजतात.

**विवाहप्रथा** –– ताळिकेट्टू व संबंधम् अशा दोन्ही विवाहपद्धती यांच्यांत प्रचलित आहेत. विवाहप्रसंगी मुलीच्या मामाला देज द्यावे लागते. जातिप्रमुखाच्या संमतीने घटस्फोट मिळतो. यांच्यांत मातृसत्ताक वारसापद्धती आहे.

**देव-धर्म** –– त्यांच्या देवतांना कातियतिकल असे नाव आहे. दर अमावास्येला ते त्याना अन्नसमर्पण करतात. ते पितृपूजकही आहेत. पितरांच्या स्मरणार्थ ते लहान लहान झोपड्या बांधतात. तिथे फक्त त्यांचे भगतच पूजेला जातात. भगतांचा एक मुख्य असतो. त्याला उराळी किंवा पणिक्कन अशी नावे असून, सर्व धार्मिक कृत्याच्या वेळी त्याला दक्षिणा द्यावी लागते. त्यांच्या धर्मगुरूला कारिक्करन म्हणतात. ओणम्, चिंगम् व मकम् हे त्यांचे उत्सव आहेत.

**मर्तिकप्रथा** –– प्रेते पुरतात व बारा दिवस सुतक पाळतात.

**कुरुवर्ष** आग्नीध्राने आपल्या जंबुद्वीपाचे नऊ भाग करून नऊ पुत्रांस वाटून दिले, त्यात कुरूच्या वाट्याला आलेला प्रदेश. हा विभाग धनुष्याकार आहे. याला उत्तरकुरू व ऐरावतवर्ष अशी अन्यही नावे आहेत. [ म. भा. भीष्म ६; भाग. पु. ५. २ ]

**कुरुविकारन** दक्षिणेतील एक जात. हे पारधी व भिक्षेकरी आहेत. हे लांडग्यांची शिकार करतात व त्यांच्या कातड्याच्या पिशव्या बनवितात. तेलुगू लोक याना नक्कलवांडलू (लांडग्यांची शिकार करणारे) व तमिळ लोक कुरुविक्कारन (पक्षी पकडणारे) असे म्हणतात. हे स्वतःला वगिरी किंवा वगिरीवल म्हणतात. यांच्या उत्पत्तीविषयी पुढील आख्यायिका आहे–

तिघे भाऊ होते. ते एकदा भटकत असता त्यांना रामपत्नी सीता भेटली. तिच्याकडे पाहून ते कुचेष्टेने हसले. तेव्हा सीतेने त्यांना शाप दिला, की ' जर तुम्हाला पक्षी मिळाले, तर तुम्ही शिकारी व्हाल व न मिळाले तर भिकारी व्हाल. '

यांच्याविषयी आणखी एक कथा प्रचलित आहे ती अशी–

फार पूर्वी राजस्थानात दोघे भाऊ राहत होते. एकदा ते एका तळ्याच्या काठाने बैलाला हाकीत चालले होते. त्या वेळी सीता तिथे स्नान करीत होती. तिने त्या दोघांना पाहिले व

त्यांना दक्षिणेकडे हाकलले. मोठ्या भावाला तिने बैलांवरून माल वाहून नेऊन उपजीविका करायला फर्मावले व धाकट्याला दोन जाळ्यांनी पक्षी पकडायला सांगितले.

कुरुविक्कारन हे भटके असून, बैलांचे तांडे घेऊन ते फिरत असतात. काही कुरुविक्कारन लाकडे विकून, तर काही शेतात राखणदार राहून उपजीविका करतात. त्यांची बायकामुले रस्त्यात गाणी म्हणून भीक मागतात. याशिवाय ते कोल्ह्याची बनावट शिंगे तयार करून विकतात. ही शिंगे जवळ बाळगल्याने सर्व इच्छा पूर्ण होतात, अशी समजूत आहे. हे लोक पशुपक्ष्यांच्या आवाजाची हुबेहूब नक्कल करतात व त्यांना जाळ्यात पकडतात.

यांच्या स्त्रिया परकर नेसतात व चोळी घालतात. परकराच्या फाटून चिंध्या होईपर्यंत तो बदलत नाहीत. स्नानही परकरावरच करतात. गळ्यात मण्यांच्या व शंखाच्या माळा घालतात. विवाहित तरुणी दिवसा कुठेही असली, तरी रात्री तिने पतीजवळच राहिले पाहिजे, असा नियम आहे. अन्यथा तिला लोखंडाची तप्त सळई हातात घेऊन सोळा पावले चालायचे दिव्य करावे लागते.

**विवाहप्रथा** — मुलामुलीची लग्ने मोठेपणी होतात. लग्नसमारंभ पाच दिवस चालतो. या पाच दिवसात वधू आपला चेहरा ओढणीने झाकून घेते. लग्नात वरमाय वधूच्या गळ्यात काळी पोत बांधते.

**देवधर्म** — हे लोक कालीचे किंवा दुर्गेचे उपासक आहेत. देवीच्या वार्षिक उत्सवाचा दिवस जवळ आला, की गावाचा मुख्य एका धान्याचे पाच लहान पुंजके घालतो. पाचांतल्या बहुतेक ढिगात धान्याच्या दाण्यांची संख्या सम किंवा विषम असेल, असे काहीतरी तो भाकीत करतो. त्याचे भाकीत खरे ठरल्यास उत्सवाला देवीची मान्यता आहे, असे समजतात. अन्यथा त्या वर्षी उत्सव रद्द करतात. उत्सवाच्या दिवशी नऊ बकरे व एक रेडा यांचा बळी देतात. [का. ट्रा. स. इं.]

## कुरुविंद

एक जात. कुंभकार पुरुष व कुक्कुट स्त्री यांची ही संतती असल्याचे शूद्रकमलाकर सांगतो. सांप्रत यांना साळी म्हणतात. [हि. ध.]

## कुरुक्ष

मध्यप्रदेशाच्या बस्तर जिल्ह्यातील एक आदिवासी जमात. कुरुक्षांचे शारीरिक दृष्ट्या माडियांशी पुष्कळ साम्य आहे. हल्ली कुरुक्षांचे माडियांशी लग्नसंबंधही होतात. मागासलेल्या माडिया मुली कुरुक्ष नवरे अधिक पसंत करतात. हे लोक मासेमारी करतात.

## कुरुक्षेत्र

पंजाबमधील कर्नाळ जिल्ह्यात हे पवित्र क्षेत्र आहे. कुरूने इथली भूमी नांगरून तयार केली म्हणून हिला कुरुक्षेत्र असे नाव मिळाले कुरू हा कौरवांचा मूळ पुरुष होय. या राजाने इथे तप केले, तेव्हा इंद्र त्याला प्रसन्न झाला. त्यावर कुरूने वर मागून घेतला की, 'जितकी भूमी मी नांगरली आहे, तितकी धर्मक्षेत्र म्हणून माझ्या नावाने प्रसिद्ध होवो. इथे शिव आणि सर्व देवता वास करोत' (वामन पु. २२).

याच्या चतुःसीमा तरंतुक, अरंतुक, रामह्रद व मचक्रुक अशा दिल्या आहेत. याला उत्तरवेदी, अंतरवेदी, धर्मक्षेत्र व विनशनक्षेत्र अशी दुसरीही नावे आहेत. हे क्षेत्र सरस्वतीच्या दक्षिणेस व दृषद्वतीच्या उत्तरेस आहे, असे महाभारतात म्हटले आहे. तैत्तिरीय आरण्यकात कुरुक्षेत्राच्या मर्यादा दक्षिणेस खाडववन, उत्तरेस तुरघ्न व पश्चिमेस परीणह अशा दिल्या आहेत (५.१.१). याचा परीघ ८० कोस आहे.

शतपथ ब्राह्मण, बृहज्जाबालोपनिषद, यजुर्वेद आणि बहुतेक सर्व पुराणे यांत कुरुक्षेत्राचे माहात्म्य वर्णिले आहे. 'मी कुरुक्षेत्रात जाईन', 'मी कुरुक्षेत्रात राहीन' असे नेहमी बोलणारासुद्धा सर्व पापांपासून मुक्त होतो व जो श्रद्धापूर्वक कुरुक्षेत्राची यात्रा करतो, त्याला अश्वमेध व राजसूय हे दोन्ही यज्ञ केल्याचे फळ लाभते, असे महाभारतात म्हटले आहे (वन ८३. २–६; पद्म पु. २६. २–६). यजुर्वेदात या क्षेत्राला इंद्र, विष्णू, शिव, इ. देवतांची यज्ञभूमी म्हटले आहे.

इथे एका सूर्यग्रहणप्रसंगी कौरव, पांडव, यादव व गोपाळ एकत्र जमले होते, असे वर्णन भागवतात आहे. सांप्रतही सूर्यग्रहणात इथे मोठी यात्रा भरते. इथे युद्धात जो मरण पावतो,



गीता-निर्माणस्थल – कुरुक्षेत्र

तो स्वर्गात जातो, अशी त्या काळी समजूत होती. म्हणूनच भारतीय युद्धासाठी ही भूमी निश्चित केली गेली, असे समज-

तात. इथल्या ज्योतिसराजवळ श्रीकृष्णाने अर्जुनाला गीता सांगितली. इथे परशुरामाने स्यमंतपंचक नावाचा तलाव निर्माण केला. पुरूरवा-उर्वशीची वियोगानंतरची भेट इथेच झाली. हे कौशिक ऋषीचे निवासस्थान होते. या क्षेत्रात यात्रेकरूला क्षौर व उपवास करावा लागत नाही.

बुद्धपूर्व काळी कुरुक्षेत्र हे एक महाजनपद होते. सनपूर्व ३२२ पासून स.पू. १८५ पर्यंत हा प्रदेश मौर्य साम्राज्याचा एक भाग होता. इ. स. ५ व्या शतकात तो गुप्त साम्राज्यात गेला. सम्राट हर्षवर्धनाच्या काळापर्यंत हे क्षेत्र सास्कृतिक व सामाजिक दृष्टीने उन्नतीच्या शिखरावर होते. त्यानंतरचा कुरुक्षेत्राचा इतिहास परकीय आक्रमणे व त्यांमुळे झालेला विध्वस यांच्या वर्णनांनी भरलेला आहे. थानेश्वर, पानिपत, तरावडी, कैथल, कर्नाळ, इ. इतिहासप्रसिद्ध रणक्षेत्रे या प्रदेशातच आहेत.

कुरुक्षेत्रात पुढील पाच सरोवरे प्रसिद्ध आहेत–(१) ब्रह्मसर (२) संनिहितसर (३) ज्योतिसर (४) स्थानेसर व (५) कालेसर. त्याचप्रमाणे चंद्रकूप, विष्णुकूप, रुद्रकूप व देवीकूप हे चार कूपही प्रसिद्ध आहेत.

या क्षेत्रात पूर्वी काम्यकवन, अदितिवन, व्यासवन, फलकीवन, सूर्यवन, मधुवन व शीतवन अशी सात वने होती. पण त्यांचे फारसे अवशेष आढळत नाहीत. त्या जागी काम्यकतीर्थ अदितितीर्थ, फल्गुतीर्थ, सूर्यकुडतीर्थ ही तीर्थे मात्र विद्यमान आहेत.

कुरुक्षेत्रातच प्रजापतीने सहस्र वर्षांचे सत्र केले होते. त्यामुळे या क्षेत्राला प्रजापतीची उत्तरवेदी म्हणत असत. अंबरीष, ययाती, इ. राजांनीही इथे अनेक यज्ञ केले. अनेक राजर्षी, देवर्षी व ब्रह्मर्षी यानीही इथे सरस्वतीच्या तीरावर यज्ञ केले होते. सरस्वती व दृषद्वती या नद्यांना देवनद्या आणि त्यांच्यामधील प्रदेशाला ब्रह्मावर्त म्हणत असत. या देशातील आचार हाच सदाचार मानला जात असे (मनु. २. १७. १८). परंतु कालांतराने या क्षेत्राचे हे माहात्म्य कमी होऊन, ते आर्यांच्या निवासाला वर्ज्य मानले गेले. पुढे बाल्हीक देशाचा हा एक भाग बनला आणि त्या देशावर यवनसत्ता आल्यामुळे तिथली आर्यांची आचारपरंपरा नाश पावली. त्यामुळे तिथे एकाहून अधिक दिवस राहणे योग्य नव्हे, असे लोक मानू लागले ( म. भा. कर्ण. ३०.४३). सनपूर्व २ ऱ्या शतकात केवळ तीर्थस्नानासाठी तिथे जाऊन लगेच परत येण्याची प्रथा सुरू झाली. [ म. ज्ञा. को.; कल्याण–तीर्थांक; हि. जॉ. ए. इं.; भा. सा.]

**कुरू** एक देश. तिथल्या लोकांनाही कुरूच म्हणत. याच्या सीमा अशा—

**हस्तिनापुरमारभ्य कुरुक्षेत्राच्च दक्षिणे ।**
**पाञ्चालं पूर्वभागे तु कुरुदेशः प्रकीर्तितः ।।**

अर्थ– हस्तिनापुरापासून कुरुक्षेत्राच्या दक्षिणेला व पांचालांच्या पूर्वेला असलेल्या देशाला कुरुदेश असे नाव आहे.

ब्राह्मण वाङमयात कुरू लोकांना फार महत्त्व दिलेले आहे. कुरूंचा स्वतंत्र उल्लेख क्वचितच येतो. त्यांचा पांचालांशी निकट संबध असल्यामुळे कुरुपाचाल असा संयुक्त उल्लेखच बहुधा सर्वत्र आढळतो. गंगा व यमुना या दोन नद्यांच्या मधील प्रदेश कुरूंच्या आधिपत्याखाली होता व या प्रदेशाच्या दोन बाजूंना पांचालाची भूमी होती.

कुरुपांचाल हे एकच राष्ट्र होते, असाही पुष्कळ ठिकाणी उल्लेख आहे. कुरुपांचालचे राजे राजसूय यज्ञ करीत असत व त्यांची यज्ञ करण्याची पद्धती उत्तम होती, असे म्हटले आहे. शतपथ ब्राह्मणात पांचालांचे जुने नाव क्रिवी होते, असे सांगितले आहे. क्रिवी शब्द कुरू शब्दाचाच अपभ्रंश असावा. शाखायन श्रौतसूत्रात कुरूंनी केलेल्या वाजपेय यज्ञाचा उल्लेख असून, ज्यामुळे कुरूंना कुरुक्षेत्र सोडावे लागले, त्या शापाचाही उल्लेख आहे. महाभारतातील कौरवांच्या दुर्भाग्याचा याच गोष्टीमुळे उलगडा होतो.

ऋग्वेदात कुरूचा जन या अर्थाने उल्लेख नाही; पण कुरुश्रवण, कौरयाण असे मात्र उल्लेख आहेत. अथर्ववेदात परीक्षित हा कुरूंचा राजा होता असे म्हटले असून, शतपथात त्याचा मुलगा जनमेजय हा अश्वमेध यज्ञ करणाऱ्यात श्रेष्ठ होता, असे म्हटले आहे. ऋग्वेदातील तृत्सू व भरत हे नंतरच्या वाङमयात कुरुराष्ट्र बनविण्याकरिता एक झालेले आढळतात. ब्राह्मण ग्रंथांत भरतांचा उल्लेख प्राचीन लोकांत प्रमुख असा आहे. पण पुढील वाङमयात मात्र त्यांचा नामनिर्देशही आढळत नाही. यावरून ते कोणत्या तरी राष्ट्रात समाविष्ट झाले असावे, असे अनुमान निघते. पूर्वी ज्या देशात भरत राहत असत, त्याच देशात पुढे कुरूंची वसती झाली असल्याचा पुरावा आढळतो. वाजसनेयी सहितेत भरत हे कुरुपांचालांचेच दुसरे नाव असल्याचे लिहिले आहे. कुरूंची उत्तरकुरू नामक एक शाखा होती, असे कळते–

**तस्मादेतस्यामुदीच्यां दिशि ये के च परेण हिमवन्तं जनपदा उत्तरकुरव उत्तरमद्रा इति वैराज्यायैव तेऽभिषिच्यन्ते विराडित्येनानभिषिक्तानचक्षते ।**

(ऐ. ब्रा. ८. १४)

अर्थ – या उत्तर दिशेला हिमालयाच्या पलिकडे उत्तरकुरू, उत्तरमद्र असे जे जनपद आहेत, त्याच्या राजांना वैराज्यासाठी अभिषेक करतात व अभिषिक्त राजांना विराट असे म्हणतात.

हे उत्तर कुरूंचे जनपद तिबेटच्या पठारावर होते, असे म्हणतात.

महाभारतात संवरणपुत्र कुरुराजा याच्या वंशजांना सामान्यत: कुरू हे नाव देतात. पण विशेषत: पांडवांचे शत्रू व धृतराष्ट्राचे पुत्र यांनाच कुरू किंवा कौरव म्हणण्याचा प्रघात आहे. इ. स. च्या चौथ्या शतकापर्यंत कुरुवंशीय राजाचे साम्राज्य अस्तित्वात असल्याचे उल्लेख सापडतात. त्यानतर कौटिल्याने उल्लेख केल्याप्रमाणे कुरूंनी गणतंत्री राज्य स्थापन केले. कुरूंच्या घराण्यातील शेवटचा राजा धर्मपाल हा असावा व इ. स. चे ९ वे शतक हा त्याचा काळ असावा, असे म्हणतात.

सप्तसिंधूच्या प्रदेशातून आर्य हळूहळू दक्षिणेकडे व पूर्वेकडे सरकू लागले आणि ब्राह्मण–उपनिषदांच्या काळात कुरु-पांचाल व कोसल-विदेह हे देश त्यांची कर्मभूमी ठरले. कुरु-पाचालातील वाणी (भाषा) उत्तम असल्याचे सांगितले आहे–

**तस्मादुदीच्यां दिशि प्रज्ञाततरा वागुद्यत उदञ्च उ एव यन्ति वाचं शिक्षितुं यो वा तत आगच्छति, तस्य वा शुश्रूषन्ते।**

(कौषी. ब्रा. ७. ६)

अर्थ– उत्तर दिशेला प्रगल्भ वाणी बोलतात आणि म्हणून लोक उत्तरेला वाक् (भाषा) शिकायला जातात किंवा जो तिकडून येतो, त्याची सेवा करतात (व त्याच्याकडून शिकतात).

शतपथात उद्दालक आरुणी हा कुरुपांचालातील ब्राह्मण असल्याचे सांगितले आहे. विदेहाचा राजा जनक याने यज्ञ केला, त्या वेळी तिथे कुरुपांचालातील अनेक ब्राह्मण आले होते.

कुरू जनपदातील गार्हस्थ्यधर्म उच्च प्रकारचा होता. ते लोक नीतिधर्माचे कसोशीने पालन करीत असत. आदर्श गार्हस्थ्याचा द्योतक असा ‘कुरुगार्हपतम्’ हा शब्द त्यावरून प्रचारात आला असावा.

कुरुदेशाला धर्मक्षेत्र असेही म्हणत असत. दिल्लीजवळचे इंद्रप्रस्थ ही कुरूंची राजधानी होती. अंबाला, दिल्ली, मेरठ व बिजनौर यांच्या आसपासचा खडी बोलीचा प्रदेश प्राचीन कुरुजनपदाचा प्रदेश होता. या प्रदेशातील लोकांची बोली, राहणी व तिथल्या उपजाती ही सर्व वैशिष्ट्यपूर्ण होती. [हि. ध.; म. ज्ञा. को.; ओ. नि. सं.; ट्रा. ए. इं.; मध्यदेश; पा. भा.]

**कुर्णी** द. भारतातील एक जात. कुरी=मेंढी व वण्णी = लोकर या शब्दांवरून कुर्णी शब्द बनला आहे. पूर्वी हे लोक केवळ लोकरीचे कापड विणण्याचे काम करीत. पण हल्ली सुती व रेशमी कापडही विणतात. यांच्यात हिरे (मोठे) व चिक्क (लहान) असे मुख्य दोन भेद आहेत. हिरे कुर्णी लिंगायत व शाकाहारी आहेत. त्यांना मद्य-मांस चालत नाही. यांचे पौरोहित्य जंगम करतात. चिक्क कुर्णी मांसाहारी असून त्यांना मद्यही चालते. [का. ट्रा. स. इं.]

**कुर्तुंव** द. भारतातील त्रेसष्ट शैव संतांपैकी एक. हा कलंथई जातीचा प्रमुख असून अत्यंत शूर व कर्तबगार होता. याचा ईश्वरभक्तीचा आणि साधुसेवेचा छंदही विलक्षण होता. स्वत: राजा व्हावे, या इच्छेने त्याने थिल्लईच्या ब्रह्मवृंदाला आपल्याला राज्याभिषेक करण्याची विनंती केली. पण ब्राह्मणांनी ते नाकारले व तिथून पळ काढला. कुर्तुंवाने मग रात्रभर परमेश्वराची प्रार्थना केली व त्याच्या पादुका मस्तकी धारण करून राज्य केले.

**कुर्वंडी** आरती पाहा.

**कुऱ्हाड** एक प्राचीन हत्यार. कुऱ्हाडीला ऋग्वेदात वाशी म्हटले आहे (८·२९·३). हे त्वष्टयाचे हत्यार होते. हे हत्यार क्षुरकल्प म्हणजे वस्तऱ्यासारखे असते, असे अर्थशास्त्रात (१२२) म्हटले आहे. पुरातन मानवानेही कुऱ्हाडीचा उपयोग केल्याची माहिती आढळते. या कुऱ्हाडीची कालांतराने अनेक रूपांतरे झाली. हल्ली जी कुऱ्हाड वापरतात, तिला एक लाकडी दांडा असून, त्याच्या पुढे लोखंडाचा एका बाजूला निमुळता असलेला एक जड तुकडा बसविलेला असतो. याला चांगली धार असते. लाकूड तोडण्यासाठी व फोडण्यासाठी कुऱ्हाडीचा उपयोग होतो. [ऋ. द.; सु. वि. को.; डि. अॅं.].

**कुल** (१) कुल् = गोळा करणे, एकत्र येणे, या धातूवरून कुल शब्द बनलेला आहे. आप्तसंबंधाने एकत्र आलेले, एका रक्ताचे व संबंधी असे जेवढे लोक असतील, त्या सर्वांचे मिळून कुल बनते. मराठीत कुल शब्दाला घराणे असा प्रतिशब्द आहे, तो योग्य आहे. कुल म्हणजे कुटुंब नव्हे; किंवा जातही नव्हे.

जात-कुळी असा एक शब्द वापरात आहे. त्यावरून कुल हे जातीहून भिन्न असल्याचे व्यक्त होते. कुलीन, कुलस्त्री, कुलवधू, इ. शब्दावरून कुल शब्दाचा मूळ अर्थ शुद्धवंश असा असावा. यावरून विवाहसंस्था दृढमूल झाल्यावर कुल शब्द अस्तित्वात आला असण्याची शक्यता आहे (चित्पावन).

कुल शब्दात संबंधी माणसे व त्याचे राहण्याचे घर या दोन्ही गोष्टींचा समावेश होत असे. ऋग्वेदात कुलपा असा शब्द येतो (१०·१७९·२). त्याचा अर्थ गृहरक्षक अथवा गृहपती असा आहे.

कुलाला मिळणारे फायदे किंवा हितकारक गोष्टी यांचा उपभोग कुळातल्या प्रत्येक व्यक्तीला हक्काने प्राप्त होत असतो. कुलातला प्रत्येक इसम कुलनाम वापरतो आणि कुलाच्या सर्व कार्यक्रमात सहभागी होतो.

कुलपरंपरा दोन प्रकारची आढळते (१) पितापुत्रपरंपरा व (२) मातृ-कन्यापरंपरा. जिथे कुलातली मुख्य व्यक्ती पिता असतो, तिथे पहिली व जिथे कुलाचे नेतृत्व स्त्रीकडे असते, तिथे दुसरी परंपरा चालते. आर्यांची परंपरा पहिली आहे. केरळातील नायरांची व आणखी काही जातीची परंपरा दुसरी आहे. कुल म्हणजे कुटुंब नव्हे; कारण एका कुलात एकाच वेळी अनेक कुटुंबांचा समावेश असू शकतो. ही कुटुंबे एकमेकांशी सापिंड्य, समानोदक, इ. संबंधांनी निगडित असतात. गोत्र ही सस्था कुलाहून मोठी असते. एका गोत्रात अनेक कुले येतात.

कुल हा शब्द भारतीयांना अत्यंत प्रिय आहे. कुलाच्या प्रतिष्ठेकडे त्यांचे विशेष लक्ष असते. पूर्वी प्रतिष्ठित आणि यशस्वी कुलाला महाकुल म्हणत. अशा महाकुलांचे स्थान समाजात उच्च समजले जाई. कुलात उत्पन्न झालेल्या व्यक्तीला कुलीन व महाकुलात उत्पन्न झालेल्या व्यक्तीला महाकुलीन म्हणत. श्रोत्रिय कुलात उत्पन्न होणाऱ्या व्यक्तीला श्रोत्रियकुलीन म्हणत. याविषयी मनूने पुढील श्लोक लिहिला आहे–

**मन्त्रतस्तु समृद्धानि कुलान्यल्पधनान्यपि ।**
**कुलसङ्ख्यां च गच्छन्ति कर्षन्ति च महद्यशः ॥**

अर्थ – वेदाध्ययनाने आणि वेदार्थज्ञानाविषयी आकांक्षा असण्याने दरिद्री असलेली कुलेही उत्कृष्ट कुलांमध्ये गणली जातात व मोठी कीर्ती प्राप्त करून घेतात.

महाभारतात महाकुलांची खूप प्रशंसा केलेली आहे. धृतराष्ट्राने विदुराला महाकुल कोणत्या कुलाला म्हणावे याविषयी पृच्छा केली असता, विदुराने त्याला पुढील उत्तर दिले आहे –

**तपो दमो ब्रह्म वित्तं वितानाः पुण्या विवाहाः सततान्नदानम् ।**
**येष्वेवैते सप्त गुणा वसन्ति सम्यग्वृत्तास्तानि महाकुलानि ॥**
(म. भा. उद्योग ३६·२३)

अर्थ – तप, इंद्रियदमन, तत्त्वज्ञान, द्रव्य, यज्ञ, पुण्यविवाह व सतत अन्नदान हे सात गुण ज्यांच्या ठिकाणी चांगल्या प्रकारे असतात, त्यांना महाकुले म्हणतात.

याच्या उलट जे कुल वेदाध्ययनाला पारखे असे किंवा सदाचाराचा परित्याग करी, त्याला अकुल किंवा हीनकुल म्हणत (पा. भा.).

जैनांमध्येही कुलकल्पना आहे. जैन श्रमणांची कुले असत. ज्या श्रमणाचा ज्या कुलात समावेश असेल, त्याने त्या कुलाचे नियम पाळलेच पाहिजेत असा दंडक होता. जैन साधूने सल्लेखना घेण्यापूर्वी कुलाची आणि गणाची क्षमा मागितली पाहिजे, असे जैन ग्रंथात सागितले आहे. प्रत्येक कुलावर एकेक आचार्य असे. अनेक कुलांचा मिळून एक गण होत असे. गणावर गणाधराची सत्ता चाले (हि. जै. मो.).

(२) एका नांगराला सहा बैल जोडल्यावर अशा दोन नांगरांच्या साहाय्याने एका दिवसात जितकी जमीन नांगरली जाईल, तितक्या जमिनीला कुल असे म्हणत. दहा ग्रामांवरच्या अधिकाऱ्याला निर्वाहसाधन म्हणून एक कुल एवढी जमीन देत असत (मनु. ७.११९). यावरून कुल म्हणजे एका कुटुंबाच्या निर्वाहाला पुरेशी जमीन, असा अर्थ निष्पन्न झाला. अशा कुलावर उपजीविका करणाऱ्या संबंधी माणसांना कुल अशी संज्ञा पुढे लक्षणेने प्राप्त झाली असावी.

(३) तंत्रशास्त्रात कुल व अकुल या नावाची तंत्रे आहेत. कुलतंत्र द्वैतपर व शक्तिविषयक असून अकुलतंत्र अद्वैतपर व शिवविषयक आहे. या विषयी पुढील श्लोक आहे–

**कुलं शक्तिरिति प्रोक्तमकुलं शिव उच्यते ।**

अर्थ– कुल म्हणजे शक्ती असे म्हटले असून अकुल म्हणजे शिव असे म्हटले आहे.

कुल व अकुल अर्थात शक्ती व शिव यांचे सामरस्य म्हणजेच कौलज्ञान होय. (कौलमार्ग पाहा)

(४) या शब्दाला एक योगपर असाही अर्थ आहे. कु= पृथ्वी व ल = लीन होणे. पृथ्वीतत्त्व हे मूलाधारचक्रात राहते. म्हणून हठयोगात त्या चक्राला कुल म्हणतात. या चक्राला सुषुम्ना नाडी मिळालेली आहे. कुंडलिनी ही त्या नाडीतून उठून सहस्रारचक्रात प्रवेश करते व तिथे परमशिवाशी सामरस्य प्राप्त करून घेते. त्यावरून लक्षणेने सुषुम्नेलाही कुल म्हणतात. [सौभाग्यभास्कर पृ. ३५]

## कुलकर्णी

महाराष्ट्राच्या प्राचीन ग्रामसंस्थेतील एक अधिकारी. एकंदर जमिनीचा पंचविसावा हिस्सा पाटील, कुलकर्णी व चौगुले यांना इनाम देण्याची वहिवाट होती. या जमिनीवर सारा नसे.

गावच्या पाटलाचा लेखक–मदतनीस या नात्याने गावाच्या वसुलाचा हिशेब ठेवण्याचे काम याच्याकडे असे. हा शब्द कुल + करण या सामासिक शब्दावरून आला आहे. कुल

(कूळ) म्हणजे शेतकरी व करण म्हणजे लेखनिक होय. यालाच स्थलपरत्वे पटवारी अथवा पांड्या म्हणतात. कुलकर्णी बहुतेक ब्राह्मण असत. क्वचित प्रभू, मराठे, लिंगायत व मुसलमानही असत.

शिवकालीन कुलकर्ण्यांना दोन चवाळी, जोडा, मुंडासे, पासोडी, धोतरजोडी, रुमाल वगैरे हक्कबाबी असत.

यांशिवाय वेगवेगळ्या धंदेवाल्यांकडून मिळणारा, नवटाक तेल, पंचवीस पाने, सुपारी, गूळ, केळी इ. मुशाहिरा व हक्क-लाजिमा मिळून सालिना सहाशे रुपयापर्यंत कुलकर्ण्याची प्राप्ती असे. ग्रामसंस्थेत कुलकर्ण्याचा सामाजिक दर्जा चांगला असे. हल्ली सरकारने वतनदार कुलकर्णी काढून टाकून त्यांच्या जागी पगारी तलाठी नेमले आहेत. [ म. ज्ञा. को.; गां. गा. ]

## कुलकुंडलिनी

हे कुंडलिनीचेच दुसरे नाव आहे. कु=पृथ्वी-तत्त्वरूप मूलाधारचक्र. त्या ठिकाणी स्वयंभू लिंगाला साडेतीन वेढे घालून राहिलेली ती कुलकुंडलिनी होय. पूर्णानंदकृत षट्चक्रप्रकाशात हिचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे–

**कूजन्ती कुलकुण्डली च मधुरं मत्तालिमालाऽस्फुटम् ।**
**वाचः कोमलकाव्यबन्धरचनाभेदातिभेदक्रमैः ।।**
**श्वासोच्छ्‌वासविवर्तनेन जगतां जीवो यया धार्यते ।**
**सा मूलाम्बुजगह्वरे विलसति प्रोद्दामदीप्तावली ।।**

अर्थ– कोमल काव्यबंधाच्या रचनेचे जे भेद आणि अतिशय भेद, त्यांनी युक्त अशी जी वाणी, त्या वाणीने मधुर आणि मत्तभ्रमरमालेच्या गुंजनाप्रमाणे अस्फुट असे कूजन करणारी, तसेच श्वासोच्छ्‌वासांच्या आवृत्तींनी जिच्याकडून जगताच्या प्राणाचे धारण होते, अशी विद्युत्समूहरूप जी कुलकुंडलिनी ती मूलाधारचक्राच्या गुहेत वास्तव्य करते.

या कुलकुडलिनीची सिद्धी कशी करावी, ते धन्वंतरीतंत्र–शिक्षेत पुढीलप्रमाणे सांगितले आहे–

प्रथम गुरूची पूजा करून पुढील मंत्राचे ग्रहण करावे–

**ह्लं ह्लां ह्लीं ह्लूं ह्लैं ह्लौ ह्लः कुण्डलिनि जगन्मातः**
**सिद्धिं देहि देहि स्वाहा ।**

नंतर स्मशानात किंवा अरण्यात जाऊन तीन वर्षेपर्यंत प्रति-दिनी वरील मंत्राचा दहा हजार जप करावा. तो पूर्ण झाल्यावर सिद्धी प्राप्त होते व त्यायोगे षट्चक्रभेद कसा करावा त्याचे ज्ञान होते. **पाहा**– कुंडलिनी.

## कुलगोलम्मा

आंध्र प्रदेशातील एक देवता. या देवीची प्रसंगविशेषी जत्रा भरते. हिची कथा अशी– एक होता रेड्डी. तो नाचणी पिकवीत असे. एक दिवस एक व्यापारी त्याच्याकडे नाचणी खरेदी करण्यासाठी आला. रेड्डी कणगीतले नाचणे उपसू लागला. पण कितीही उपसले तरी ते संपेचनात. रेड्डीला त्याचे आश्चर्य वाटले. मग त्याने कणगीच पालथी केली. तसे करताच तिच्यातून एक दगड खाली पडला. तीच ही कुलगोलम्मा होय. मग रेड्डीने भगताला बोलावून आणून तिचे रहस्य विचारले. देवी त्याच्या अंगात सचारून रेड्डीला म्हणाली, "धान्य काढल्याचा आवाज माझ्या कानी पडणार नाही, अशा ठिकाणी गावाबाहेर माझे देऊळ बांध. मी तिथे राहून तुझे आणि गावाचे भले करीन." रेड्डीने तसे केले. [ द्र. गॉ. मॉ. हिं. ]

## कुलचिरई

त्रेसष्ट शैव संतांपैकी एक. हा पांड्य राजांच्या पदरी मुख्य प्रधान होता. याच्या काळी इतर अनेक धर्मपंथ शैव संप्रदायाला विरोध करीत होते. त्या धर्म-पंथांच्या आचार्यांशी वेळोवेळी वादविवाद करून हा त्यांना क्षीणतेज करून टाकी. मोठमोठ्या संतांबरोबर याचा स्नेह होता. [ पे. पु. ]

## कुलचूडामणितंत्र

शाक्त संप्रदायाचे एक छोटेसे तंत्र. सुषुम्ना नाडीचा सर्वांत वरचा भाग सहस्रारचक्र व शिवाचे स्थान, असे कुलचूडामणीचे अर्थ आहेत. हे तंत्र अपौरुषेय मानले जाते. यात भैरव-भैरवीचा संवाद असून त्यात भैरवाने विचारलेल्या प्रश्नांची भैरवीने उत्तरे दिलेली आहेत. या तंत्रात कुल ( शक्ती ) व अकुल (शिव) यांचे सामरस्य वर्णिले आहे. [ कुलचूडामणी निगम ]

## कुलटा

एक नायिकाभेद. हिचा सर्वप्रथम उल्लेख भानुदत्ताने केला आहे. कुलटा म्हणजे कामासक्त होऊन अनेक पुरुषांवर प्रेम करणारी स्त्री. गणिका व कुलटा यांच्यांत फरक इतकाच, की कुलटा कामवासनेमुळे पुरुषांवर प्रेम करते; तर गणिका धनाच्या लोभाने करते. [ हिं. सा. को. ]

## कुलंथालम्मा

द. भारतातील ग्रामदेवता. हिची वार्षिक जत्रा भरते. हिचा पुजारी शूद्र असतो.

## कुलदेवता

ग्रामदेवतेप्रमाणेच प्रत्येक कुलाची विशिष्ट अशी उपास्य देवता असते, तिला कुलदेवता असे म्हणतात. कुटुंबातल्या प्रत्येक मंगल प्रसंगी कुलदेवतेचे स्मरण किंवा पूजन करतात. वर्षातल्या ठराविक दिवशी कुलदेवतेला महानैवेद्य करण्याचीही पद्धत असते. कुलदेवतेची स्थापना

करण्याचा विधी पुढीलप्रमाणे मांगितला आहे—

उत्तरायण, शुक्लपक्ष, द्वितीया, तृतीया, पंचमी, षष्ठी, सप्तमी, दशमी, एकादशी, द्वादशी, त्रयोदशी यापैकी एखादी तिथी, शुभ वार, शुभ नक्षत्र, शुभ लग्न व गुरु-शुक्र अस्तंगत किंवा वक्री नसणे, अशा दिनशुद्धीवर कुलदेवतेची स्थापना करावी. आदल्या दिवशी यजमानाने एकभुक्त राहावे. स्थापनेच्या दिवशी स्नान करून संगम, पुण्यतीर्थ इ. सात पवित्र स्थलांतली माती आणून तिचा गोळा करावा. त्यात पंचरत्ने घालावी. मग घराच्या आग्नेयीस वेदी तयार करावी. नंतर त्या वेदीवर तो मातीचा गोळा ठेवावा. मग त्याची प्राणप्रतिष्ठा करावी. तो गोळा हीच कुलदेवता होय. मग तिच्या डाव्या अंगी शीतला व विषहरा या देवींची स्थापना व पूजा करून ब्राह्मण-भोजन घालावे.

## कुलद्वयदान

एक स्त्रीव्रत. हे व्रत मकर संक्रांतीच्या दिवशी करतात. घराच्या पुढच्या दाराजवळ दोन्ही बाजूंना धान्याच्या दोन राशी घालतात. नंतर पुढील मंत्राने त्यांचे दान करतात—

**द्वारोभयप्रदेशस्थं धान्यराशिद्वयं महत् ।**
**प्रकरोतु मया दत्तं पितृभर्तृकुलोदयम् ।।**

अर्थ— दाराच्या उभय भागी दोन मोठ्या धान्यराशी घालून मी त्यांचे दान करीत आहे. या दानाने माझ्या उभय कुलांचा भाग्योदय होवो. [ व्रतराज ]

## कुलनायिका

शाक्त लोक उत्सवप्रसंगी ज्या कन्यकांची पूजा करतात त्याना कुलनायिका अशी संज्ञा आहे. नटी, कपालिका, वेश्या, पुक्कशी, नापिताङ्गना, रजकी, रंजनी, सैरिंध्री, सुवासिनी, घटिका, खटिका व गोपालकन्यका या कुलनायिका होत (तत्रसार).

विशेष चतुर, गुरुभक्त, देवभक्त, घृणा व लज्जा यांनी विरहित, संगोपनरत व तरुण असणाऱ्या कुलनायिका सर्व प्रकारच्या सिद्धी प्राप्त करून देतात. धन्वन्तरीच्या मताप्रमाणे दौत्यकर्मासाठी जिची निवड करायची ती नायिका कुमारी, आचारसंपन्न, शीलवती, सुंदर, अनुष्ठानरत, सात्त्विक, भक्तिसंपन्न, निष्पाप, चतुर, उदार, ममताळू अशी असली पाहिजे.

शारीरिक व्यंग, चंचलता, प्रौढत्व, पापकर्मरती, उद्धटपणा, पाखंडीपणा, अर्थलोलुपना, भ्याडपणा असे कोणतेही दुर्गुण नसलेली कन्याच कुलनायिका म्हणून निवडावी. तिला अभ्यंग-स्नान घालून रक्तवस्त्र नेसायला द्यावे. विलेपने लावून अलंकारही द्यावे. मग तिचा थकवा गेल्यावर तिला पुष्पशय्येवर बसवून तिची यथाविधी पूजा करावी, असे सांगितले आहे. [ धन्वन्तरीतंत्रशिक्षा ]

## कुलपती

कुल = छात्रवर्ग. त्याचा पती = पालक. याचे लक्षण पुढीलप्रमाणे—

**मुनीनां दशसाहस्रं योऽन्नदानादि पोषणात् ।**
**अध्यापयति विप्रर्षिः स वै कुलपतिः स्मृतः ।।**

अर्थ— दहा हजार मुनीना (छात्रांना) अन्नदानादी पोषण देऊन अध्यापन करणारा विप्रश्रेष्ठ म्हणजे कुलपती होय.

## कुलपती मिश्र

(१७ वे शतक) राजस्थानातील एक कवी. हा प्रथम आगऱ्याला राहत असे. पुढे तिथून तो जयपूरचा महाराज रामसिह (प्रथम) याच्या आश्रयाला गेला.

जयपूरचा मिर्झा राजा जयसिंह याने याला कविवर ही पदवी व जहागिरी दिली होती, असे सांगतात. पण याबद्दल अजून विश्वसनीय प्रमाण उपलब्ध नाही. पंडितराज जगन्नाथाकडे याने सस्कृत भाषेचे अध्ययन केले.

कुलपतीने पन्नास ग्रंथ रचले, असे त्याच्या वंशजाचे म्हणणे आहे. परंतु त्याच्या पुढील दहाच ग्रंथाचा पत्ता लागतो— (१) रसरहस्य (२) दुर्गाभक्तिचंद्रिका (३) संग्रामसार (४) युक्तितरंगिणी (५) नखशिख (६) दुर्गासप्तशती-अनुवाद (७) सुरूप-कुरूप-संवाद (८) आसाम की बाढ़ (९) सेवा की बाढ़ व (१०) विष-अमृत का झगडा.

यांपैकी रसरहस्य, संग्रामसार व युक्तितरंगिणी हे तीन ग्रंथ उत्कृष्ट असून बाकीचे सामान्य आहेत. रसरहस्य या ग्रंथात काव्याच्या विभिन्न अंगांचे शास्त्रीय विवेचन आहे. सग्रामसार हा ग्रंथ म्हणजे महाभारताच्या द्रोणपर्वाचा पद्यानुवाद आहे. महाराजा रामसिंहाच्या आज्ञेवरून कुलपतीने हा ग्रंथ रचला. राजस्थानात तो फार लोकप्रिय आहे. युक्तितरंगिणीत सातशे दोहे असून शृंगारिक उक्तींनी ती भरलेली आहे. कुलपतीने शुद्ध व्रजभाषेत आपली रचना केली असून, ती ललित व प्रासादिक आहे [ रा. पि. सा. ]

## कुलपर्वत

भारताच्या दक्षिणेकडील महत्त्वाच्या सात पर्वतांना हे नाव आहे. भीष्मपर्वाच्या ९ व्या अध्यायात त्यांची नावे सांगितली आहेत, ती अशी—

**महेन्द्रो मलयः सह्यः शुक्तिमान् ऋक्षवानपि ।**
**विन्ध्यश्च पारियात्रश्च सप्तैते कुलपर्वताः ।।**

(१) महेन्द्र पर्वत पूर्वेस असून त्याच्यातून महानदी निघते. याच्यावर परशुराम तपश्चर्या करतो अशी समजूत आहे.

(२) मलय पर्वत पूर्व व पश्चिम हे दोन्ही घाट जोडतो. यावर नीलगिरी हे मोठे शिखर आहे.

(३) सह्य हा पश्चिम किनाऱ्यावरचा पर्वत त्र्यंबकेश्वरपासून मलबारपर्यंत पसरला आहे.

(४) शुक्तिमान हा नक्की कोणता पर्वत हे सांगता येत नाही; परंतु गिरनार हे शिखर असलेला काठेवाडातील हा डोंगर असावा.

(५) ऋक्षवान पर्वताला गंधमादन असेही नाव आहे. ही राजस्थानातील अरवली पर्वताची रांग असावी. यातील मुख्य पहाड म्हणजे अबू अथवा अर्बुद शिखर होय. याला हिमालय-पुत्र असे म्हटले आहे (म. भा. वन. २).

(६) विंध्य पर्वत नर्मदेच्या उत्तरेला पूर्व-पश्चिम पसरला आहे. यावर विंध्यवासिनी देवी आहे.

(७) पारियात्र पर्वताबद्दल मतभेद आहेत. कोणी याला विंध्याचा पश्चिम भाग मानतात; तर कोणी हल्लीचा सुलेमान पर्वत समजतात. महाभारतकाळी या पर्वतावर आर्यांची वसती होती.

## कुलपुत्र

स्वत.चे पुत्र मानून राजा व राणी ज्यांचे राजकुळात पालन–पोषण करीत, असे कुमार कुलपुत्र म्हणून ओळखले जात. बाणाने कुलपुत्राचा अनेक वेळा उल्लेख केला आहे. प्रभाकरवर्धन फार आजारी असता त्याच्या यातनांचे एका कुलपुत्राला अतिशय दु:ख झाले व ते सहन न होऊन, त्याने स्वत.ला जाळून घेतले, अशी कथा आहे. [ह. च. सां. अ.]

## कुलमा

बेळगाव जिल्ह्यातील एक जात. कानडीत भट्टीला कुलमा म्हणतात. पूर्वी हे लोक भट्टी लावून लोखंड गाळीत. त्यावरून या जातीला हे नाव पडले. हे यल्लम्माचे उपासक आहेत.

## कुलशेखर आळवार

दक्षिण भारतातील एक आळवार संत. मध्यकालीन आळवारांत याची गणना होते. हा केरळ देशाच्या दृढव्रत राजाचा पुत्र असून, मोठा भगवद्‌भक्त होता. सर्व राजकर्तव्यांचे पालन करीत असताही तो विद्याध्ययन व परमेश्वरचिंतन यात निमग्न असे. श्रीरंगम्‌मध्ये राहून त्याने मुकुंदमाला हे काव्य लिहिले. सगळे वैष्णव या स्तोत्राला फार मानतात. त्यातील एक श्लोक असा–

**जयतु जयतु देवो देवकीनन्दनोऽयं ।**
**जयतु जयतु कृष्णो वृष्णिवंशप्रदीप: ।।**
**जयतु जयतु मेघश्यामल. कोमलाङ्गो ।**
**जयतु जयतु पृथ्वीभारनाशो मुकुन्द: ।।**



कुलशेखर आळवार

त्याच्या तमिळ काव्याचा एक नमुना असा–

**मुलुदुम् वेण्णेय् अळैन्दु तोट्टु उण्णुम्**
**मुहिल् इळज शिरुत् तामरैक् कैयुम्,**
**एलिल् कोळ् ताम्बु कोण्डु अडिप्पदर्कु एळहु**
**निलैयुम् वेण्तयिर् तोय्न्द शेव्वायुम्,**

**अलुहैयुम्, अञ्जिनोक्कुम् अन्नोकुम्,**
**अणिहोळ्, शेञ्शिशुवाय् नेळिप्पदुवुम्,**
**तोलुहैयुम्, इवै कण्ड अशोदै**
**तोल्ले इन्बत्तु इरुदि कण्डाळे.**

अर्थ– कमलदलाप्रमाणे कोमल असे त्या कृष्णाचे सुंदर हात पाहा. त्या हातांनी तो लोण्याशी खेळतो आणि अधाशीपणाने ते खातो. आपल्या खोडयांमुळे आपल्याला फटके बसतील, या भयाने तो अनेकदा कापतो व दचकतो. त्याची भयभीत व अश्रुपूर्ण दृष्टी, पोवळयासारखे मनोहर ओठ, त्यांना दही लागलेले, सकंप वदन आणि जोडलेले हात, हे सर्व पाहून यशोदेचे हृदय स्वर्गीय आनंदाने अगदी भरून जाते. **पाहा**– आळवार. [भा. सं.]

**कुलात** देश व लोक. या लोकांना यवन म्हटले आहे. यांना कुलूत असेही म्हणत. यांचा उल्लेख मार्कंडेय पुराणात मिळतो. महाभारतात कोलूत अथवा कोलुका या नावाने येणारे उल्लेख याच लोकाचे आहेत. याचे गणराज्य होते. चिनी प्रवासी युआन च्वांगच्या वर्णनावरून ते हल्लीच्या कांगडा जिल्ह्याचे रहिवासी असावे, असे वाटते. [ट्रा. ए. इं.]

**कुलानंदतंत्र** एक संस्कृत तंत्रग्रंथ. यात भैरव व देवी यांच्या संभाषणाचे साठ श्लोक आहेत. देवीची जिज्ञासा पूर्ण करण्यासाठी भैरवाने पाशस्तोत्र, भेद, धूनन, कंपन, खेचर, समरस, वलीपलितनाशन, इ. यौगिक प्रक्रियांचे स्थूल वर्णन यात केलेले आहे. [गो. च. प.]

**कुलिक** (१) कालविशेष. रव्यादिवारी शुभकर्मासाठी निषिद्ध ठरविलेल्या कालाला कुलिक म्हणतात. यांचा क्रम पुढीलप्रमाणे– रविवारी सातव्या प्रहराचे अर्ध, सोमवारी सहाव्याचे, मंगळवारी पाचव्याचे, बुधवारी चौथ्याचे, गुरुवारी तिसऱ्याचे, शुक्रवारी व शनिवारी पहिल्याचे अर्ध हा कुलिक समजावा. राघवभट्टाच्या मते दिवसा प्रहराचा उत्तरार्ध व रात्रौ प्रहराचा पूर्वार्ध कुलिक होय [श. क.]

(२) अष्टनागांतला एक.

**कुलिश** कुऱ्हाडीच्या जातीचे एक वैदिक आयुध. ऋग्वेदात याचा उल्लेख आढळतो (३. २. १; १. ३२. ५). झाडे तोडण्यासाठी कुलिशाचा उपयोग होत असे.

**कुलिशी** बाल्हीक देशातली ही एक नदी असावी असा अंदाज आहे. ऋग्वेदात अञ्जसी व वीरपत्नी या नद्यांबरोबर हिचा उल्लेख आहे (१. १०४. ४).

**कुलुहा** बिहारच्या हजारीबाग जिल्ह्यात हुंतेरगंजच्या नैर्ऋत्येला सुमारे सहा मैलांवर असलेला एक डोंगर. त्याच्या माथ्याला आकाशलोचन म्हणतात. तिथे बरीच प्राचीन मंदिरे व भग्नावशेष आहेत. त्यातले कौलेश्वरी (दुर्गादेवी) चे मंदिर विशेष प्रसिद्ध आहे. वसंतपंचमी व रामनवमी या दिवशी हिची महापूजा होते व त्यासाठी तिथे मोठी यात्रा भरते.

तथापि फार पूर्वी हे जैनाचे तीर्थक्षेत्र असावे. त्यांच्या दहाव्या तीर्थंकराची ही जन्मभूमी असून त्याने इथे तप करून केवलज्ञान प्राप्त केले, असे म्हणतात. इथली बहुतेक मंदिरे जैनानी बांधलेली असून एका खडकावर दहा दिगंबर तीर्थंकरांच्या मूर्ती कोरलेल्या आहेत. एका गुहेत पार्श्वनाथाची मूर्ती आहे. ही मदिरे पांडवांनी बांधली अशीही आख्यायिका आहे. [हजारी. गॅझे.; जै. ध.]

**कुलू** हिमाचल प्रदेशातील बियास नदीच्या खोऱ्याला कुलू खोरे म्हणतात. कुलूचे संस्कृत रूप कुलूत असे आहे. कुलू व कांगडा या प्रदेशाचा त्यात अंतर्भाव होतो. प्राचीन त्रिगर्त देश तो हाच होय. अर्जुन दिग्विजयाला गेला असताना कुलूताच्या राजाने त्याचा मार्ग रोखला होता; पण अर्जुनाने त्याचा पराभव केला, असे महाभारतात सांगितले आहे (म. भा. सभा. २७.१८).


कुलू युवती

कुलू खोरे निसर्गसुंदर आहे. तिथे उष्णोदकाचे अनेक झरे आहेत. मणिकरण येथील झऱ्याचे पाणी अतिशय जोराने वर उसळते आणि ते उकळत्या पाण्यापेक्षाही अधिक उष्ण असते. हे पाणी रोगनिवारक आहे असे म्हणतात.

कुलूनगर पठाणकोटपासून १७६ मैल दूर असून तिथून २३ मैलावर मनाली आहे. तिथून १५ मैलांवर १३,४०० फूट उंच रोहटक खिंड आहे. तिथे कुलू खोरे संपते. कुलूजवळ एका

डोंगरावर बिजली महादेवाचे मंदिर आहे. या मंदिरावर एक ६० फूट उंच दंड असून, त्याच्यावर वीज पडली, की मंदिरातील शिवलिंगाचे तुकडे होतात. मग ते तुकडे जमवून पुजारी त्यांचे पुन्हा लिंग बनवितो. इथले बशेशर महादेवाचे मंदिर सुंदर नक्षीकामासाठी प्रसिद्ध आहे.

मनालीपासून जवळच एका डोंगरावर रामाचे व वसिष्ठ मुनीचे अशी दोन प्राचीन मंदिरे आहेत. रामाचा अश्वमेध यज्ञ झाल्यानंतर वसिष्ठ मुनी तपश्चर्या करीत असताना त्यांचा देह पाषाणाचा बनला आणि तीच मूर्ती सांप्रत या मंदिरात आहे, असे म्हणतात. जवळच एक कुंड व गंधकयुक्त उष्ण पाण्याचे झरे आहेत. राममंदिर दगडी असून, त्यात रामाची भव्य मूर्ती आहे. मंदिराच्यावर दत्तात्रेयाच्या मूर्ती आहेत.

तिथून जवळच देवदारांच्या दाट जंगलात हिडिंबेचे लाकडी देऊळ आहे. त्याच्या दारावरची नक्षी प्रेक्षणीय आहे. या देवळाचे छप्पर पागोडासारखे चारपाखी असून, देवदारी फळयांचे केलेले आहे. देवळात एका शिळेवर हिडिंबेच्या पावलाची खूण आहे. तिथे एक लहानसे कुंड आहे. संकटसमयी बकरे बळी देऊन त्यांचे रक्त त्या कुडात टाकतात. दसऱ्याच्या वेळी कुलू येथे ही देवी गेल्यावाचून निथला उत्सव पुरा होत नाही.

मनाली येथे मनूचेही एक मंदिर आहे. त्याची मूर्ती जमीन खणताना सापडली. तिला कुदळीचा घाव लागताच तिच्यातून रक्ताची धार वाहू लागली व मग त्या मूर्तीची स्थापना करून तिथे एक लहानसे लाकडी मंदिर बांधण्यात आले, अशी



कुलू खोऱ्यातील एक लाकडी पूल

आख्यायिका सांगतात. त्याला मनुरिखीचे मंदिर म्हणतात. तिथले लोक मनूला नरपाल असेही म्हणतात; कारण तो मानवाचा पिता व पालक मानला जातो.

या खोऱ्यात असंख्य देव असल्यामुळे याला देवतांचे खोरे म्हणतात. तिथे सुमारे ३६५ मंदिरे आहेत. त्यांपैकी काही मंदिरे प्राचीन भारतीय संस्कृती व शिल्पकला याचे दर्शन घडवितात. रघुनाथजी ही तिथली प्रमुख देवता होय. कुलू नगरात तिचे दोन उत्सव होतात. एक दसऱ्याला व दुसरा वसंतपंचमीला. दसऱ्याचा उत्सव विजयादशमीपासून सात दिवस



बशेशर महादेव मंदिर— कुलू

चालतो. त्यावेळी सुमारे शंभर देव आणि देवी तिथे जमा होतात. सातव्या दिवशी राम व सीता यांच्या मूर्ती रथात ठेवून त्यांची मिरवणूक बियास नदीपर्यंत नेतात.

नग्गर ही कुलू राज्याची प्राचीन राजधानी होती. तिथले शिवमंदिर कुलू खोऱ्यातील सर्व लोकाचे श्रद्धास्थान आहे. या मंदिराच्या भिंतीवरील प्राचीन शिल्पकाम दर्शनीय आहे. तिथून जवळच डोंगरमाथ्यावर असलेले मुरलीधराचे मंदिर पांडवांनी वनवासात असताना बांधले, असे म्हणतात. त्या काळातला एक दुर्बोध शिलालेख तिथे आढळतो. मंदिरात कृष्णाची सुंदर मूर्ती आहे. याच नगरात गुग्गा देवाचे भव्य मंदिर असून त्यातला देव अश्वारूढ आहे.

नग्गरपासून थोड्या अंतरावर एक डोंगर चढून गेल्यावर चंदेरखनी खिंड लागते. पलिकडे सुमारे तीन हजार फूट खाली मलाना गाव वसलेले आहे. तिथले रहिवासी पुष्कळ अंशी स्वतंत्रपणे आपला राज्यकारभार चालवतात. तो भाग मलाणा गणराज्य या नावाने ओळखला जातो. तिथली भाषा वेगळी असून लोकांच्या चालीरीतीही विचित्र आहेत. त्या गावात चामड्याचा वापर करण्यास बंदी आहे. तिथले लोक जमलू नामक एका स्वतंत्र देवाची उपासना करतात. कोणी त्याला राक्षस मानतात; तर कोणी पिशाच. त्याची मूर्ती नाही. एका माळावर एक शिळा पडलेली आहे, तेच त्याचे प्रतीक होय. हा देव

रघुनाथजी या कुलूमधील सर्वश्रेष्ठ देवाचेही वर्चस्व मानीत नाही. जमलूसंबंधी अशी एक दंतकथा प्रचलित आहे, की त्याच्या कोपामुळे अकबर बादशहाला कुष्ठ रोग जडला. जेव्हा अकबराने कुट्‌वातील सर्व माणसांच्या सुवर्णप्रतिमा जमलूला अर्पण केल्या, तेव्हाच तो रोगमुक्त झाला.

जमलू हाच गावातील सर्व शेतजमिनीचा धनी मानला जातो. त्याचा एक खजिनाही आहे व त्यात अगणित द्रव्य व अलंकार पडलेले आहेत. कोणत्याही सार्वजनिक कामासाठी धनाची आवश्यकता भासते, तेव्हा जमलूचा पुजारी खजिन्यातून जरूर तेवढे



शिवमदिर– नग्गर

द्रव्य बाहेर काढतो. जमलूचे भक्त औषधी झाडपाला जमा करून तो विकणे, एवढा एकच व्यवसाय करतात.

कुलू खोऱ्यातले लोक शरीराने बलवान व दिसायला सुरेख आहेत. शेती हा त्यांचा प्रमुख व्यवसाय आहे.

इथले बहुतेक लोक कनेत व डांगी जातीचे असून काही ब्राह्मण व थोडे राजपूतही आहेत. आर्यांच्या आगमनापूर्वी कनेत जातीने सबंध हिमालय प्रदेश व्यापला होता. संस्कृत साहित्यात यांना कुनिंद किंवा कुलिंद हे नाव आहे. यांचे खसिया व राव असे पोटभेद आहेत. खसिया यज्ञोपवीत घालतात.

डांगी लोकाना कोली हे दुसरे नाव आहे. हे शूद्र आहेत. यांना मृत पशूचे मांस चालते. इथल्या स्त्रियांना समाजात बरेच स्वातंत्र्य असते. त्या पुरुषांच्या बरोबर नाचगाण्यात भाग घेतात. कुलूमधील लोकांच्या जीवनात सामाजिक भावना विशेष आढळते. त्यामुळे समाजाच्या बहिष्काराला फार महत्त्व असते. त्याला डग्गू म्हणतात. सामाजिक व धार्मिक विधिनिषेधांना बंज म्हणतात. आपसातली भांडणे पंचाच्याकरवी मिटवली जातात. यांच्यांत क्वचित बहुपतित्व चालू आहे. [ कु. कां.; पं. जी. सा.; धर्मयुग, १० जाने. १९५४ व २ जून १९५८.; हि. पि.; भा. सा. ]

**कुल्माष** याचा अर्थ आंबट लापशी असा आहे ( वे. इं.). पाणिनीने कुल्माषाचा उल्लेख केलेला आहे ( अष्टा. ५. २. ८३ ). पाली साहित्यावरून कळते, की बौद्धकालात जे अन्नप्रकार प्रचलित होते, त्यात कुल्माषही एक होता ( विनय पि. ४.१७६ ). गहू, ज्वारी किंवा बाजरी ही धान्ये पाण्यात भिजत घालून त्यांच्यापासून कुल्माष बनवीत. कधीकधी त्यात गूळ किंवा काकवी घालून त्याची गोड लापशीही बनवीत. पण एकंदरीत कुल्माष हे निकृष्ट अन्नच मानीत ( निरुक्त १.४ ).

एका विशिष्ट पौर्णिमेला कुल्माष बनवून तो खाण्याची प्रथा होती. त्या पौर्णिमेला कौल्माषी पौर्णिमा म्हणत, असे पाणिनी सांगतो. पण ही पौर्णिमा कोणत्या महिन्यातली ते मात्र त्याने सांगितले नाही. [ पा. भा. ]

**कुल्ली संस्कृती** द. बलुचिस्तानातील कोलवा प्रदेशात असलेल्या कुल्ली या ठिकाणी झालेल्या उत्खननामुळे ज्या संस्कृतीचा शोध लागला तिला कुल्ली संस्कृती असे नाव दिलेले आहे. ही संस्कृती सिंधुसंस्कृतीहून वेगळी



भांड्यांवरील पशुचित्रण– कुल्ली संस्कृती

असली, तरी तिच्याशी आपला संपर्क दाखविते. उ. बलुचिस्तानातील झॉब संस्कृती व द. बलुचिस्तानातील इतर संस्कृती यांच्याहूनही ही भिन्न आहे. मातीच्या खापरांचे वैशिष्टपूर्ण आकार व नक्षीचे प्रकार, मानवी दफनाची आगळी पद्धती, तसेच मातीच्या स्त्री-मूर्ती व पशुमूर्ती यांची विविधता व विपुलता ही तीन कुल्ली संस्कृतीची वैशिष्टये मानली जातात.

कुल्ली संस्कृतीची खापरे मुख्यतः हिरवट रंगाची असून, त्यावर काळी नक्षी काढलेली आहे. याशिवाय फिकट तांबडचा किंवा पांढरट रंगाच्या लेपावरही काळ्या रंगाची नक्षी आढळते. काही मोठे रांजण राखी रंगाचे आहेत. इथे हिरवट

राखी रंगाची खापरे सापडली आहेत. थाळ्या, सरळ बाजू असलेले उंच पेले, गोल उदराचे गडवे, बाटलीच्या आकाराची भांडी, असे त्याचे प्रकार आहेत.

या खापरांवरील नक्षीत भरदार वशिंडाचे बैल, गायी, बोकड, पक्षी, वृक्ष, इ. आकृती अत्यंत अवास्तव स्वरूपात रंगविलेल्या आढळतात. पशूंचे डोळे वर्तुळात गडद काळी टिकली रंगवून दर्शविलेले आहेत, तर बोकडांची शिंगे अर्धवर्तुळाकृती व मागे झुकलेली आहेत. अशा चित्रांच्या वर व खाली चौकोन, त्रिकोण, अर्धवर्तुळे, वर्तुळे, टिंबे आणि पट्टे अशी नक्षी आढळते.



मातीच्या स्त्रीमूर्ती-कुल्ली संस्कृती

कुल्ली संस्कृतीत मातीच्या मडक्याप्रमाणे दगडाच्या कुप्याही वापरात होत्या. या कुप्या दोन–तीन इंच व्यासाच्या व सुमारे दोन इंच खोल असून, काही गोल, तर काही चौकोनी आहेत. काहींना आत चार कप्पे व बाहेरच्या अंगावर सुरेख नक्षी कोरलेली आहे.

अशी खापरे व दगडी भांडी वापरणाऱ्या या कुल्ली संस्कृतीच्या मानवाची घरे मात्र चांगल्या तऱ्हेने बांधलेली असत. ते लोक ओबडधोबड किंवा घडीव चौकोनी दगड पक्क्या चिखलात बसवून भिंती बांधीत. क्वचित मातीच्या विटाही वापरलेल्या आढळतात. काही ठिकाणी दगडी पायावर मातीच्या भिंती बांधलेल्या दिसतात. दगडी भिंतींना सफेद गिलावा केलेला आढळतो. घरातल्या जमिनी लाकडी फळ्यांच्या किंवा फरसबंदीच्या असत. जिने दगडी असत.



चार कप्प्यांची दगडी कुपी–कुल्ली संस्कृती

दफनासाठी मातीच्या भांड्यांचा उपयोग करीत. त्यात मृताची हाडे ठेवीत. नुसत्या जमिनीत प्रेते पुरण्याचीही प्रथा होती. मृताबरोबर तांब्याच्या वस्तू, मडकी व मातीच्या मूर्ती ठेवीत.

या लोकांनी बनविलेल्या मातीच्या स्त्रीमूर्ती व पशुमूर्ती वैशिष्ट्यपूर्ण होत्या. एक स्त्रीमूर्ती फक्त कमरेपर्यंतच बनविलेली असून, तिचे हात कमरेवर ठेवलेले आहेत. गळ्यात माळा, कानात कुंडले, कपाळावर बिंदी, डाव्या हातात खूप बांगड्या, तर उजव्या हातात थोड्या, प्रमाणबद्ध स्तन, विविध प्रकारची केशरचना अशी तिची घडण आहे. पशुमूर्तींत बैलांना प्राधान्य दिलेले आढळते. त्यांची वशिंडे भरदार असून, त्यांच्या अंगावर काळे पट्टे काढलेले आहेत. शेपटीला भोक असलेली व शिटीप्रमाणे वाजणारी पक्ष्यांची खेळणीही उल्लेखनीय आहेत.



रंगीत पशुमूर्ती-कुल्ली संस्कृती

कुल्ली संस्कृतीवर हराप्पा संस्कृतीचा व इराणमधील संस्कृतीचा थोडाफार प्रभाव पडल्याचे प्रत्यंतर उत्खनित वस्तूंवरून मिळते. गुलाबी रंगाची खापरे, टोकदार पाने असलेल्या पिंपळाचे चित्रण, वशिंडाला भोक असलेले मातीचे बैल, चाके, दगडी वजने व कुप्या या सर्व गोष्टी सिंधू संस्कृतीचा संपर्क दर्शवितात; तर वस्तीचे लहान स्वरूप व खापरावर रंगविलेल्या बैलांच्या आकृती त्या संस्कृतीचा इराण–मेसोपोटेमियाशी संपर्क सुचवितात.



मातीचे भांडे – कुल्ली संस्कृती

हराप्पा संस्कृतीच्या काही वैशिष्ट्यपूर्ण वस्तू कुल्ली संस्कृतीशी संलग्नपणे सापडल्यामुळे, या संस्कृतीचा कालही सिंधू संस्कृतीशी मिळताजुळता असावा असे अनुमान केले गेले आहे. तथापि कुल्ली संस्कृती शेतीप्रधान व अ–नागर स्वरूपातच राहिली असावी असे वाटते. [ शां. भा. देव. ]

## कुल्लूक भट्ट

(११५०–१३०० इ. स.) मनुस्मृतीवर टीका लिहिणारा प्रसिद्ध पंडित. याच्या या टीकाग्रंथाचे नाव मन्वर्थमुक्तावली असे आहे. ही टीका अत्यंत सुबोध

व मुद्देसूद असून, तिच्यात मनुस्मृतीचे संपूर्ण विवेचन थोडक्यात केलेले आहे. या ग्रंथात कुल्लूकाची स्वतःची मते मुळीच नाहीत. मेधातिथी व गोविंदराज यांचीच मते त्याने त्यांचा नामनिर्देश न करता दिली आहेत. असे असूनही स्वतःचे विवेचन सर्वोत्तम आहे अशी प्रौढी तो सांगतो. सर विल्यम जोन्स यानेही त्याचा टीकाग्रंथ विद्वत्ताप्रचुर, सखोल व सुबोध असल्याचे म्हटले आहे.

कुल्लूकाचा जन्म बंगालमधील नंदन गावी वारेंद्र ब्राह्मण कुळांत झाला होता. त्याच्या पित्याचे नाव भट्ट दिवाकर असे होते. स्मृतिसागर, श्राद्धसागर, विवादसागर व आशौचसागर हे ग्रंथही कुल्लूकाचेच आहेत असे म्हणतात. श्राद्धसागर या ग्रंथात पूर्वमीमांसेविषयी चर्चा व श्राद्धासंबंधी सर्व माहिती आहे. [हि. ध.]

## कुवरकलेवा

राजस्थानात विवाहप्रसंगी होणारा एक सोहळा. वधूगृही वराची आरती झाल्यावर त्याला पलंगावर बसवून रुखवताचे भोजन देतात. भोजन झाल्यावर सासू जावयाला घेऊन देवघरात जाते. तिथे वधूवर कुलदेवतेची पूजा करतात. मग पुरोहित वधूवरांच्या वस्त्राची गाठ मारून, त्यांना लग्न मंडपात घेऊन येतो. [मा. री.]

## कुश

एक प्रकारचे तृण. 'कु पापं स्यति नाशयति इति' = पापाचा नाश करते ते किंवा 'कौ भूमौ शेते राजते शोभते इति' = जे भूमीवर शोभते ते, अशा याच्या व्याख्या आहेत (श. क.). कुशाला दर्भ, कुथ, पवित्र, याज्ञिक, ऱ्हस्वगर्भ, बर्हि व कुतुप अशीही नावे आहेत. वैदिक वाङ्मयात याचा अनेक ठिकाणी उल्लेख येतो. अथर्ववेदात क्रोधशामक व अशुभनिवारक म्हणून त्याचा उपयोग सांगितला आहे आणि भूरिमूल, सहस्रपर्ण व शतकांड असे त्याचे वर्णन केले आहे (६.४३; ८.७–२०).

कुशाची उत्पत्ती कशी झाली ते पुढील श्लोकात सांगितले आहे—

**बर्हिष्मती नाम पुरी सर्वसम्पत्समन्विता ।**
**न्यपतन् यत्र रोमाणि यज्ञस्याङ्गं विधुन्वतः ।।**
**कुशकाशास्त एवासन् शश्वद्धरितवर्चसः ।**
**ऋषयो यैः पराभाव्य यज्ञघ्नान् यज्ञमीजिरे ।।**

अर्थ – बर्हिष्मती नावाची एक संपन्न नगरी होती. तिथे यज्ञाने आपले अवयव हालवले आणि त्यामुळे त्याचे केस खाली पडले व तेच कुशतृण झाले. कुशांच्या योगाने ऋषींनी यज्ञात विघ्न आणणाऱ्या राक्षसांचा पराभव करून यज्ञ संपन्न केला.

पूजेच्या वेळी हातात कुश धरावे असे सांगितले आहे. सधवांनी तिल व कुश यांना स्पर्श करू नये, असे हलायुधाने ब्राह्मणसर्वस्वात म्हटले आहे.

नित्यनैमित्तिक धार्मिक कृत्यांसाठी व श्राद्धादी कर्मांसाठी दर्भाची आवश्यकता असते. यज्ञयागादी कर्मांतही कुश किंवा दर्भ लागतात. अग्निष्टोमात हविर्धान मंडपाच्या दाराजवळच्या खांबांना दर्भ गुंडाळतात व ते टिकून राहण्यासाठी दाभणात दोरा ओवून त्या दर्भांना शिवण घालतात. सदोमंडपाचे खांबही असेच दर्भ गुंडाळून दाभणदोऱ्याने शिवायचे असतात. दर्शपूर्णमासयागामध्ये वेदीत अंथरण्यासाठी जे दर्भ कापून आणतात, त्यांचा भारा बांधण्यासाठी अध्वर्यू दर्भाच्याच दोऱ्या वळतो.

प्राचीन काळी यज्ञासाठी दर्भ कापताना सुरीऐवजी घोड्याच्या बरगडीची अस्थी उपयोगात आणीत, असे तै. ब्राह्मणावरून दिसते. पुढे त्यासाठी सुरी वापरू लागले. यज्ञकर्मासाठी लागणारे दर्भ कापण्यासाठी अध्वर्यू पूर्व किंवा उत्तर दिशेला असलेल्या दर्भांच्या बेटात जाई. दर्भ कापताना पशूंच्यासाठी काही दर्भ राखून ठेवण्याची पद्धत असे. हव्या तेवढ्या दर्भांच्या मुष्टी कापून झाल्यावर अध्वर्यू त्या शुल्बाने (दोरीने) बांधी व तो भारा डोक्यावरून घरी आणून यज्ञशाळेत योग्य स्थळी ठेवून देई.

पितरांना श्राद्धात कुशाचे आसन देतात व पिंडदान करतेवेळी पिंडांच्या खाली कुश अंथरतात. ग्रहयज्ञात केतूसाठी कुशांच्या समिधा वापरतात.

दर्भ आणि यज्ञोपवीत यांच्याशिवाय जर कोणतेही धार्मिक कृत्य केले, तर ते निरुपयोगी ठरते आणि इहलोकी वा परलोकी त्यापासून काही फळ मिळत नाही, असे कूर्मपुराणात सांगितले आहे. जप, होम, दान, स्वाध्याय व पितृतर्पण करताना सुवर्ण, रजत व कुश हातात ठेवावे, असे शातातपाने म्हटले आहे. आचमनाच्या वेळीही हातात दर्भाचे पवित्र असावे, असे सांगितले आहे.

श्रावण किंवा भाद्रपद अमावास्येला दर्भ गोळा केल्यास ते कधीही शिळे होत नाहीत व पुनःपुन्हा उपयोगात आणता येतात. या दिवशी दर्भ कापून आणताना पुढील मंत्र म्हणतात–

**विरिञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठि निसर्गज ।**
**नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव ।।**

अर्थ– हे दर्भा, तू श्रेष्ठ, निसर्गोत्पन्न व ब्रह्मदेवाबरोबर उत्पन्न झाला आहेस (तेव्हा) हे दर्भा, तू (आमची) सर्व पापे नष्ट करून (आमचा) कल्याणकर्ता हो.

ज्या वनस्पतींच्या योगाने पाण्याचा निश्चित ठावठिकाणा सांगता येतो, त्यांपैकी कुश ही एक होय, असे जातकात सांगितले आहे. कुश वनस्पतीपासून तेल काढतात आणि ते तेल

अग्नीवर ओतले तर वादळातसुद्धा अग्नी प्रदीप्त होतो असे कौटिल्याने सांगितले आहे.

एकाच कुशाची भिन्न अवस्थेत भिन्न नावे आहेत ती अशी–

**अप्रसूताः स्मृता दर्भाः प्रसूतास्तु कुशाः स्मृता : ।**
**समूलाः कुतपाः प्रोक्ताश्छिन्नाग्रास्तृणसंज्ञिता : ।।**

(वृद्धहारीत ५.४४)

अर्थ– ज्यांना अंकुर फुटलेले नाहीत, त्यांना दर्भ, ज्यांना अंकुर फुटलेले आहेत, त्यांना कुश, मुळासकट दर्भांना कुतप आणि ज्यांची अग्रे कापलेली आहेत, त्यांना तृण अशी नावे आहेत.

तिळांच्या शेतात वाढलेले आणि सात पाती असलेले दर्भ पवित्र समजतात. यज्ञात उपयोगात आणायचे दर्भ हिरवे, पाकयज्ञातले पिवळसर, पितृयज्ञातले समूळ व वैश्वदेवातले निरनिराळ्या रंगांचे असावे, असे सांगितले आहे. कुश मिळत नसल्यास त्याचे प्रतिनिधी म्हणून काश किंवा दूर्वा घ्याव्या, असेही सांगितले आहे. [ श. क.; वे. इं.; हि. ध.; क. हि. वा. पु.; म. ज्ञा. को. ]

**कुशग्रहणी** भाद्रपद अमावास्येचे नाव. या दिवशी दर्भ कापून धर्मकृत्यांसाठी त्यांचा संचय करावा, असे सांगितले आहे. **पाहा**– कुश.

**कुशद्वीप** एक पौराणिक प्रदेश. इथे कुशस्तंब नावाचा एक पर्वत आहे. त्यावरून या द्वीपाला हे नाव मिळाले आहे. याच्याभोवती घृतोद (तुपाचा समुद्र) आहे. हिरण्यरेताचा पुत्र प्रियव्रत हा याच्यावर राज्य करीत होता. याने आपले राज्य आपल्या सात पुत्रांना वाटून दिले. इथे अग्निपूजा प्रचलित आहे असे भागवतात म्हटले आहे (५.१.३२)

ब्रह्माण्ड पुराणात या द्वीपाचा पहिला राजा ज्योतिष्मत् असल्याचे सांगितले आहे. तिथे त्याच्या सात पुत्रांची, तसेच तिथल्या पर्वतांची व नद्यांचीही नावे दिलेली आहेत (२.१४.१२–३०). हे द्वीप जंबुद्वीपाच्या जवळ असल्याचे वायु पुराणात सांगितले आहे (४८.१४.३४). इथे कुशल नामक मानवसमाज राहतो असे म्हटले आहे (भाग. पु. २०. १६).

श्री. वि. का. राजवाडे यांच्या मते या द्वीपाला वेष्टून राहिलेला घृतोद म्हणजे अरल समद्र होय. त्यांच्या मते हिंदुकुश पर्वताच्या उत्तरेकडील कास्पियन व अरल या दोन समुद्रांमधील प्रदेशाला प्राचीन काळी कुशद्वीप म्हणत. सहारा, सुदान, गिनी, कामेरून, कांगो व पश्चिम आणि दक्षिण आफ्रिका एवढा भाग कुशद्वीपात मोडत होता असे श्री. चित्रावशास्त्री म्हणतात. [ पु. इं.; प्रा. च. को.– परिशिष्ट २ रे ]

**कुशरीर** वेदशिराचा पुत्र व पंधराव्या द्वापरातील एक अवतार. [ पु. इं. ]

**कुशलप्रश्न** एखादा माणुस बऱ्याच कालाने घरी आला किंवा बाहेर कुठेतरी भेटला, तर त्याला कुशलप्रश्न विचारणे हा शिष्टाचार आहे. ते सुसंस्कृतपणाचेही एक लक्षण आहे. चारी वर्णांच्या लोकांना कुशलप्रश्न विचारले जावे, मात्र त्यासंबंधीचे शब्द भिन्न असावे, असे मनू म्हणतो. त्याने या विषयी नियम दिला आहे तो असा––

**ब्राह्मणं कुशलं पृच्छेत्क्षत्रबन्धुमनामयम् ।**
**वैश्यं क्षेमं समागम्य शूद्रमारोग्यमेव च ।।**

(२. १२७)

अर्थ– ब्राह्मणाला ‘ कुशल ’ शब्दाने, क्षत्रियाला ‘ अनामय ’ शब्दाने, वैश्याला ‘ क्षेम ’ शब्दाने व शूद्राला ‘ आरोग्य ’ शब्दाने क्षेम–समाचार विचारावा.

आपस्तंबानेही हाच नियम सांगितला आहे (आप. ध. सू. १.४.१४.२६–२९).

**कुशलधीर** (इ. स. १७ व्या शतकाचा पूर्वार्ध) एक जैन कवी. हा सोजत नगराचा रहिवासी असून कल्याणलाभाचा शिष्य होता. याने जोधपूर, किमनगढ, साचौर, इ. राजस्थानातील शहरांत प्रवास केला होता. श्री. मोतीलाल मेनरिया यांनी त्याच्या पुढील तीन ग्रंथांचा उल्लेख केला आहे–(१) पृथ्वीराज राठोड याच्या वेलि क्रिसन रुक्मीणीरी या ग्रंथावरची टीका (२) केशवदासकृत रसिकप्रिया ग्रंथावरील टीका व (३) लीलावती रासौ. यांतील पहिले दोन ग्रंथ गद्यात असून तिसरा पद्यात आहे. डॉ. रामस्वरूप यांनी याचे आणखी पाच ग्रंथ अलिकडे उपलब्ध झाल्याचे लिहिले आहे. याची भाषा गुजरातीमिश्रित राजस्थानी आहे. [ रा. भा. औ. सा.; हिं. नी. वि.]

**कुशललाभ** (इ. स. १५२४ चा सुमार) राजस्थानातला एक जैन कवी. हा जैनाचार्य अभयधर्म याचा शिष्य होता. याचे काही ग्रंथ पुढीलप्रमाणे–– (१) ढोला मारूरी चौपई (२) माधवानल-कामकंदला चौपई (३) तेज सार रस (४) अगढ दत्त चौपई (५) पार्श्वनाथ स्तवन (६) गोड़ी छंद इत्यादी.

वरील ग्रंथांपैकी पहिला व दुसरा हे दोन ग्रंथ राजस्थानात अत्यंत लोकप्रिय आहेत. [ रा. भा. औ. सा. ]

## कुशस्थली

(१) आनर्त देशाच्या राजाचा पुत्र रैवत याने ही नगरी समुद्रात स्थापिली, असे भागवत पुराणात सांगितले आहे (१२. १२. ३६). हिलाच नतर द्वारका हे नाव मिळाले. ही आनर्त देशाची राजधानी होती. रैवत राजा ब्रह्मलोकात गेला असता यक्षराक्षसांनी ही नगरी उद्ध्वस्त केली. त्यानतर तिथे द्वारकेची स्थापना झाली. [म. ज्ञा. को.; हि. ध. ]

(२) जिथे बुद्धाचे निर्वाण झाले ती कुशावती किंवा कुशिनारा म्हणजेच कुशस्थली होय, असेही म्हणतात. [हि. ध.]

(३) रामपुत्र कुश याने स्थापलेली द. कोसलाची राजधानी.

## कुशाण राजवंश

सनपूर्व दुसऱ्या शतकात मध्य आशिया खंडातील युएची जातीला स्थलातर करावे लागले. सुमारे शंभर वर्षे इकडे तिकडे भ्रमंती करून हे लोक बल्खच्या आसपास स्थायिक झाले. त्याच्या पाच शाखा होत्या. त्यांपैकी एका शाखेचे नाव कुशाण होते. त्यांचा प्रमुख कुजुल कदफिसेस याने सर्व शाखाचे संघटन केले आणि काबूल व कंदाहार जिंकून सिधू नदीपर्यंत मजल मारली. पार्थियन राजा गोंडो फरेस याच्या मृत्यूनंतर त्याचे राज्य (तक्षशीला व आसपासचा प्रदेश) कुशाणांनी जिंकले. कुशाण हे एका व्यक्तीचे नाव असून, तो या लोकांचा राजा होता, असे जयचंद्र विद्यालंकार म्हणतात. कुशाण राजाचा उल्लेख अनेक अभिलेखांमध्ये आढळतो. तो इ. स. ४० च्या सुमारास मरण पावला. तेव्हा त्याचे वय ८० वर्षांचे होते. कदफिसेस ही त्याची पदवी होती व त्याचा पुत्र वेम यानेही ती पदवी धारण केली होती. त्यामुळे कुशाणाला कदफिसेस पहिला व वेमाला कदफिसेस दुसरा म्हणतात. वेमाने पंजाब जिकून गंगेच्या किनाऱ्यावरील वाराणसीपर्यंतचा प्रदेश पादाक्रांत केला होता. तो स्वतःला सर्वलोकेश्वर, महीश्वर, देवपुत्र म्हणवीत असे. त्याचा पिता बुद्धाचा अनुयायी होता. पण याने हिंदू धर्म स्वीकारला होता. तो शिवाची उपासना करीत असे. त्याच्या नाण्यांवर शिव, नंदी व त्रिशूळ दिसतात. त्याचे साम्राज्य कच्छ, काठेवाड आणि नर्मदा नदी इथवर पसरले होते. तो इ. स. ६५ च्या सुमारास मरण पावला असावा. त्यानंतर काही वर्षे त्याच्या अधिकाऱ्यांनी निरनिराळ्या प्रांतात त्याचे राज्य चालविले असावे.



कुशाण राजा – मथुरासंग्रहालय





कनिष्काची दोन नाणी

प्रसिद्ध राजा कनिष्क हा कुशाण वंशातलाच राजा होय. त्याचे साम्राज्य पाटलीपुत्रापर्यंत पसरले होते. त्याची राजधानी पुरुषपूर ( पेशावर ) येथे होती. पर्शिया, कापिश, गधार, काश्मीर, सिध, माळवा हे प्रदेश त्याच्या साम्राज्यात समाविष्ट होते. चीनचे प्रदेश काशघर, खोतान व यारकंद हेही त्याने जिंकले होते. त्याने बौद्ध धर्म स्वीकारला होता. तो इ. स. १०१ मध्ये मृत्यू पावला. (कनिष्क पाहा)

कुशाण राजांचा वंशानुक्रम ज्ञानकोशात पुढीलप्रमाणे दिला आहे– (१) कुझुलो कदफिसेस (२) ओइमो कदफिसेस (३) कनिष्क (४) हुविष्क व (५) वासुदेव.

कनिष्क व हुविष्क यांच्या दरम्यान वासिष्क नावाचा राजा होऊन गेला, असे नवीन शोधाअंती सिद्ध झाले आहे. हुविष्क व वासुदेव यांच्यामध्येही वासिष्काचा पुत्र कनिष्क (२रा) हा आणखी एक राजा होता, असे जयचद्र विद्यालंकार म्हणतात. कनिष्कानंतरच्या राजांनी त्यांचे साम्राज्य सुमारे शंभर वर्षे नीट संभाळले, या पलिकडे यांच्याविषयी काही माहिती उपलब्ध नाही. त्यानंतर कुशाणांचे साम्राज्य नष्ट झाले, तरी त्यांचे राज्य काबूलच्या आसपास पाचव्या शतकापर्यंत चालू होते. पुढे हूणांनी ते जिकले.

कुशाण राजे स्वतःला देवपुत्र म्हणवून घेत. या वंशाची मातृभूमी महाचीनच्या परिसरात कुठेतरी होती. कुशाण हे चिनी संस्कृतीचे होते. देवपुत्र ही पदवी त्यानी चीनमधूनच आणली होती (नवभारत, मार्च १९५६).

**कुशाणकालीन भारत** – कुशाणांच्या राज्यात ब्राह्मण, बौद्ध, जैन, इ. सर्व धर्मांचा उत्कर्ष चालू होता. त्यांच्या नाण्यांवर सर्व धर्मांच्या देवतांची चित्रे आढळतात. त्या काळी अनेक बौद्ध मठ आणि हिंदूंची व जैनांची अनेक मंदिरे भिन्न भिन्न दात्यांच्या साहाय्याने बांधली गेली होती, असे शिलालेखांवरून कळते. कनिष्काने बौद्ध धर्म स्वीकारल्यापासून महायान पंथाचा प्रसार भारतातच नव्हे; तर ब्रह्मदेश, सयाम, कंबोडिया, जावा, सुमात्रा इ. प्रदेशांतही झाला. कनिष्काच्या पूर्वी बुद्धाच्या मूर्ती बनविल्या जात नव्हत्या. महायान पंथाने ती नवी प्रथा सुरू केली. तिथूनच भारतातल्या मूर्तिकलेचा विकास झाला. कुशाण लोकांनी पाश्चात्य कलाप्रकार इकडे आणल्यामुळे भारतीय शिल्पकलेला नवीनच वळण लागले. मथुरेच्या कलाकारांची ब्राह्मणी व जैन कला तोपर्यंत स्वतंत्रपणे विकास पावत होती. तिच्यावर पुढे या गांधार पद्धतीचा प्रभाव पडला.



कुशाण राजप्रतिमा – मथुरा सग्रहालय



कनिष्ककालीन करंडक– कनिष्काने भरविलेल्या ४थ्या बौद्ध परिषदेचे निर्णय या करंडकात ठेवले होते

या काळात उच्च वर्गाचे लोक संस्कृत भाषेचा अधिक उपयोग करू लागले. अनेक तात्त्विक व धार्मिक ग्रंथ संस्कृत भाषेत लिहिले गेले.

कुशाण राजांनी सगळीकडे शांतता व सुव्यवस्था स्थापन केल्यामुळे भारताचा व्यापार खूपच वाढला. तलम वस्त्रे, माणके, मोत्ये सुगंधी द्रव्ये व मसाल्याचे पदार्थ भारतातून रोमपर्यंत जात होते. रोमहून उत्तम मातीची भांडी भारतात आयात केली जात होती. सोन्याची रोमन नाणीही पुष्कळ येत असत. कुशाण राजांनीही आपल्या सुवर्णमुद्रा पाडल्या होत्या.

कुशाणांची राज्यपद्धती राजाधिष्ठित होती. साम्राज्याचे (१) राष्ट्र (२) आहार (३) जनपद (४) देश वा वैश्य असे भाग असत. प्रांतावर क्षत्रप नेमण्याची प्रथा याच काळात सुरू झाली. [भा. इ. रू.; भा. प्रा. रा.; अ. हि. नॉ. इ.; ए. इं.–मुक. ]

## कुशावती

एक प्राचीन नगरी. बुद्धपूर्व काळातील मल्ल जनपदाची ही राजधानी होती. बुद्धाच्या काळी तिथे लोकसत्ताक राज्यपद्धती सुरू झाली. तेव्हा या नगरीचे नाव बदलून तिला कुशिनारा म्हणू लागले. हिची पूर्व–पश्चिम लांबी १२ योजने व दक्षिणोत्तर रुंदी ७ योजने होती, असे सांगतात. या ठिकाणी गौतमबुद्धाचे परिनिर्वाण व दहन झाले, अशी आख्यायिका आहे. त्यामुळे हे बौद्ध यात्रेकरूंचे एक महत्त्वाचे तीर्थक्षेत्र बनले आहे. चिनी यात्रेकरू फाहियान व युआन च्वांग या दोघांनी या स्थळासंबंधी दिलेली माहिती समान आहे. ११ व्या १२ व्या शतकात इथे कलचुरी राजांचे आधिपत्य होते. १३ व्या शतकात मुसलमानांच्या आक्रमणामुळे ही नगरी उद्ध्वस्त झाली. कनिंग हॅमच्या मते गोरखपूर जिल्ह्यातील कासिया गावाजवळचे प्राचीन अवशेष हे कुशिनाराचेच आहेत. सम्राट अशोकाने या नगरीला भेट दिली होती, असे दिव्यावदानात म्हटले आहे. तिथे प्राचीन स्तूपाचे अवशेष व बुद्धाची निर्वाणमूर्ती आहे. स्तूपात सापडलेल्या एका ताम्रपटातील मज



महापरिनिर्वाण स्तूप – कुशिनगर

कुरावरून पार्जिटरने कासिया हेच प्राचीन कुशिनगर होय, असे ठरविले आहे. या स्तूपाला ‘ माथ कुवरका कोट ’ (मृत कुमार स्तूप) म्हणतात. गेल्या शतकात तिथे जे उत्खनन झाले, त्यात हा स्तूप व निर्वाणमंदिर यांचा शोध लागला. भिक्षू महावीर याने १८९० साली या प्राचीन नगरीचा पुनरुद्धार सुरू केला. या शतकाच्या प्रारंभी तिथे परिनिर्वाण मंदिर व स्तूप आणि भिक्षूंना राहण्यासाठी एक विहार बांधण्यात आला आहे. सध्या हे ठिकाण एक सांस्कृतिक केंद्र बनले आहे. [ म. ज्ञा. को.; हि. जॉ॰ ए. इं.; उ. प्र. बौ. वि. ]

**कुशावर्त** त्र्यंबकेश्वर येथील एक प्रमुख तीर्थ. गौतमीगंगा अर्थात गोदावरी आपल्या उगमस्थानापासून भूगर्भ मार्गाने कुशावर्त कुंडात प्रकट होते, असे मानलेले आहे. या क्षेत्रातील तीर्थविधी कुशावर्तावरच होतात. कुशावर्तात स्नान करूनच त्र्यंबकेश्वराच्या दर्शनाला जायचे असते. कुशावर्तात



कुशावर्त तीर्थ – त्र्यंबकेश्वर

स्नान केल्याने पुनर्जन्म टळतो, असे वचन आहे. गौतम ऋषीने कुशांचा बांध घालून गोदावरीचे पाणी या ठिकाणी अडवून ठेवले, म्हणून याला कुशावर्त असे नाव पडले. या तीर्थाच्या जवळच गंगामंदिर, केदारेश्वर, इंद्रेश्वर, गायत्री, बल्लाळेश्वर, इ. देवांची मंदिरे आहेत. **पाहा–** त्र्यंबकेश्वर.

**कुशिक** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या तिसऱ्या मंडलातले ३३ वे सूक्त याच्या नावावर आहे. हा इषीरथाचा पुत्र व विश्वामित्राच्या कुलातला होता. कण्वकुलातही एक कुशिक असल्याचे सर्वानुक्रमणीवरून समजते. याच्या पित्याचे नाव सोभरी असे आहे. या सोभर्य कुशिकाने आपल्या सूक्तात रात्रीचे स्तवन केले आहे. [ म. ज्ञा. को.–बुद्धपूर्व जग ]

**कुशिनगर** कुशावती पाहा.

**कुशिनारा** कुशावती पाहा.

**कुशीलव** एक जात. बौधायनाच्या मते अंबष्ठ पुरुष व वैदेहिक स्त्री यांची व कौटिल्याच्या मते वैदेहिक पुरुष व अंबष्ठ स्त्री यांची संतती म्हणजे कुशीलव होत. अमरकोशात कुशीलवांनाच चारण म्हटले आहे. [ हि. ध. ]

**कुषंड** पिशाचाचा एक वर्ग. यांना कान व केस नसतात व मांस प्रिय असते. [ पु. इं. ]

**कुसवन** तमिळनाडमधील एक जात. हे मातीची भांडी, खेळणी व बाहुल्या बनवितात. हे जानवे घालतात. यांच्यांत शैव व वैष्णव असे दोन्ही पंथ आहेत. याचे पौरोहित्य ब्राह्मण करतात. काही ठिकाणी कुसवन लोक पिडारी मंदिरातले पुजारी असतात.

कुसवनांचे चोळ, चेर व पांड्य असे प्रादेशिक भेद आहेत. ब्रह्मदेवाचा पुत्र कुलालन याच्या तीन पुत्रांचे ते वंशज होत. कुलालनाने ब्रह्मदेवाला प्रार्थिले, की ब्रह्मदेवाप्रमाणेच आपल्यालाही रोज वस्तू निर्माण करण्याची व तिचा नाश करण्याची मुभा असावी. म्हणून ब्रह्मदेवाने त्याला कुंभार बनविले.

पुजारी नावाची कुसवनांची काही विशिष्ट कुटुंबे आहेत. मातीच्या पोकळ मूर्ती ते बनवितात व त्यांना रंग देतात. या मूर्ती करण्याचा मान मिळाल्याबद्दल ज्ञातिप्रमुखाला ते दर वर्षी काही रक्कम देतात. उत्सवाच्या वेळी ज्ञातिप्रमुख ती रक्कम खर्च करतो. जेव्हा एखाद्या दांपत्याला मुलगी व्हावी असे वाटते, तेव्हा ती दोघे देवाला नवस करतात, की मुलगी झाल्यास एका रांगेत बसलेल्या सात कुमारीमूर्ती तुला अर्पण करू. काही लोक आजारातून उठल्यावर गाय, बैल, शेळी, घोडा इ. प्राण्यांच्या प्रतिमाही देवाला अर्पण करतात. या सर्व मूर्ती पुजाऱ्यांनी बनविलेल्या असतात.

अय्यनार हा यांचा उपास्य देव असून, त्याचे पुजारीही हेच असतात. हे लोक शेतात मातीचा रंगीत घोडा उभारतात. रात्रीच्या वेळी अय्यनार या घोड्यावर बसून राक्षसांचा संहार करतो, अशी यांची समजूत आहे.

**विवाहप्रथा**— मुलींची लग्ने त्या वयात येण्यापूर्वी करतात. आते-मामे भावंडांत लग्न होते. वराची बहीण वधूच्या गळ्यात ताळी बांधते. लग्नसमारंभ तीन दिवस चालतो. यातील एक विधी असा– वराची बहीण एका परळात धान्य पेरते. लग्नाच्या

शेवटच्या दिवशी ते अंकुरलेले धान्य वाजतगाजत नदीवर नेतात व परळासह ते पाण्यात सोडतात.

अनेक जातीच्या लग्नसमारंभात कुंभारांची गरज असते. काही ब्राह्मण जातीत तेहतीस कोटी देवांच्या समक्ष वधूच्या गळ्यात ताळी बांधायची असते आणि हे देव म्हणजे निरनिराळी रंगीत गाडगीमडकी होत. लिंगायतांच्या विवाहप्रसंगी नवीन घट गाजावाजा करून आणतात व देवघरात ठेवतात. पटनूलकारन लोक विवाहप्रसंगी मातीची अनेक बोळकी एका खोलीत ठेवतात व विवाहसमारंभ चालू असेपर्यंत रोज त्या बोळक्यांची पूजा करतात.

कुसवन लोक मोडलेली हाडे बसविण्यात कुशल असतात. [का. ट्रा. स. इं.]

## कुसुंबानी बैठक

गुजरातेतील सोनारांचा एक लग्नविधी. वरात निघाली, की वधूपक्षाची मंडळी तिला पोचवायला गावाच्या सीमेपर्यंत जातात. सीमेवर पोचल्यावर सर्व मंडळी एकत्र बसून अफूचे पाणी पितात. याला कुसुंबानी बैठक असे नाव आहे. [ ल. वि. सो. ]

## कुसुम

जैन देवतासमूहातला एक यक्ष. पद्मप्रभ तीर्थंकराचा एक सेवक. याचे वर्णन पुढीलप्रमाणे—

**श्रीपद्मस्य कुसुमो यक्षो नीलवर्णः कुरङ्गवाहनश्चतुर्भुजो फलाभययुक्तदक्षिणपाणिद्वयो नकुलाक्षसूत्रयुक्तवामपाणिश्च ।**

(प्रवचन सारोद्धार)

अर्थ— कुसुम यक्ष, नीलवर्णाचा, हरिणवाहन, उजव्या दोन हातात फल व अभयमुद्रा धारण करणारा, डाव्या हातांत मुंगूस व अक्ष माला धारण करणारा असा आहे. दिगंबरांच्या मते हा बरची, वरदमुद्रा, टाळ व अभयमुद्रा धारण करतो. [जै. इ.]

## कुसुमा मेदिनी

हिमालयातील एक देवता. उमा तप करून परत येईपर्यंत या देवतेने तिच्या अंतःपुरावर पहारा ठेवला होता (मत्स्य पु. १५६. १–७).

## कुस्ती

एक राष्ट्रीय मर्दानी खेळ. या खेळातील व्यायामाने शरीरातील सर्व स्नायू व निरनिराळी इंद्रिये मजबूत व कार्यक्षम बनतात. ही विद्या जाणणारा कमी शक्तीचा मनुष्यदेखील जास्त शक्तीच्या प्रतिस्पर्ध्यावर जय मिळवू शकतो. कुस्ती खेळल्याने मनुष्याचे केवळ शरीरच तयार होते असे नाही, तर त्याचे मनही खंबीर होऊन, त्याचा आत्मविश्वास वाढतो. तसेच प्रसंगावधान, धैर्य, आक्रमणशीलता, चपळता इ. अनेक गुणांचे कुस्तीमुळे संवर्धन होते.

कुस्ती खेळणाऱ्या माणसास कोणत्याही साधनाची जरूरी नसते. पण या खेळात शारीरिक बळाप्रमाणे डावपेचाचे ज्ञानही आवश्यक असते.

कुस्तीची कला प्राचीन काळी अत्यंत उच्च कोटीला गेलेली होती. वेदकालापासून भारतात मल्लविद्येचा प्रचार आहे. कृष्ण, बलराम, भीम वगैरे पौराणिक पुरुषांनी या विद्येत उत्तम प्रावीण्य मिळविले होते. त्या काळी विशिष्ट उत्सवप्रसंगी कुस्तीचे आखाडे



कुस्ती

भरविले जात असत. मथुराधिपती कंसाने अशाच एका प्रसंगी कृष्ण व बलराम यांना कुस्तीसाठी निमंत्रण पाठवून आपल्या मल्लांच्या हस्ते त्यांचा निकाल लावण्याचे कारस्थान रचले होते. परंतु त्यात कृष्ण व बलराम यांनी कंसाच्या त्या चाणूर व मुष्टिक या मल्लांना नष्ट केले. पांडव अज्ञातवासात असताना विराट नगरीत वेष पालटून राहत होते. त्या वेळी तिथे ब्रह्मोत्सव साजरा केला गेला. त्या उत्सवात बल्लवाचार्य भीमाने आपले मल्लविद्येतले प्रावीण्य दाखवून जीमूत नावाच्या प्रतिस्पर्धी मल्लाला ठार मारले, अशी कथा महाभारतात आहे. भीम व जरासंध यांच्या मल्लयुद्धाचे सुरस वर्णन महाभारतात केलेले आहे (सभा. २३.४–१५). कुस्त्या पाहण्याचा नाद आज भारतातील पुष्कळ लोकांना आहे, तसा तो त्या काळीही होता.

जातक ग्रंथांत कुस्तीचे वर्णन आढळते. त्यात आखाडा, प्रेक्षकांना बसण्यासाठी जागा, तिथली सजावट, प्रत्यक्ष मल्लयुद्ध, इत्यादींची विस्तृत माहिती दिलेली आहे. त्या काळी स्त्रियाही मल्लयुद्धात भाग घेत असत. अशी एक मल्ल स्त्री शेवटी भिक्षुणी बनली, असे विनयपिटकात म्हटले आहे (पृष्ठ ५२९).

पुराणात मल्लक्रीडेविषयी जे उल्लेख आहेत, त्यांवरून त्या काळी लोकांना या विद्येबद्दल फार आदर होता असे दिसते.

पौराणिक काळी कुस्त्यांचे सामने राजदरबारात नेहमी होत आणि त्यासाठी प्रसिद्ध मल्लांना आमंत्रण पाठविले जाई. ते सामने पाहण्यासाठी सर्व थरांतील स्त्रीपुरुष जमत असत. कुस्तीचे मैदान उत्तम प्रकारे शृंगारीत व हारजीतीचा निर्णय करण्याकरिता चांगले मध्यस्थ नेमले जात.

मल्लयुद्ध होण्यापूर्वी प्रथम धनुर्यज्ञ करण्याची प्रथा होती. त्यात सामन्यांसाठी आलेल्या मल्लांना एका वळकट धनुष्याला दोरी चढवावी लागे. त्यावरून त्यांच्या शक्तीचा अंदाज येई.

कुस्तीच्या जागी गोवरीच्या राखेच्या व कावेच्या राशी घालीत आणि तिथे पाण्याने भरलेली पात्रे ठेवीत. अंगाला राख लावून ती धुऊन टाकणे व मग काव अंगाला लावणे अशी मल्लांची पद्धत होती. पण प्रतिष्ठित मल्ल अंगाला काव वगैरे पदार्थ लावणे असभ्य समजत.

बाहुयुद्धात सिद्धी प्राप्त होण्यासाठी संयम, स्थिरता, शौर्य, व्यायाम, सदाचार, बळ, इ. गुणांची आवश्यकता मानली जात असे.

ही कुस्तीची आवड पुढील काळातही चालू होती. हिंदू राजे व सरदार यांच्याप्रमाणेच मोगल बादशहा व नबाब हेही आपल्या पदरी अनेक मल्ल बाळगीत. विजयनगरच्या कृष्णदेवरायाच्या वेळी दरबारात रोज मल्लांच्या कुस्त्या होत असत, असे तिथल्या पोर्तुगीज वकिलाने लिहून ठेवले आहे. पेशवे घराण्यातील बहुतेक सर्व पुरुषांना मल्लविद्या अवगत होती, असे त्या वेळच्या कागदपत्रांवरून समजते. थॉमस ब्राउटन हा इंग्रज सेनाधिकारी इ. स. १८०९ साली दौलतराव शिंद्याच्या लष्कराबरोबर फिरत असताना, त्याने मराठा सैनिकांचा रोजचा दिनक्रम पाहून त्याचे तपशीलवार वर्णन लिहून ठेवले आहे. तो म्हणतो, की स्वारीवर असताना सुद्धा ते सैनिक झाडाखाली आखाडे बनवून त्यात आपली व्यायामाची व कुस्तीची हौस भागवीत. या गृहस्थाने पुढे असेही लिहिले आहे, की हिंदुस्थानातला प्रत्येक सरदार–दरकदार आपल्या पदरी पहिलवान बाळगण्यात भूषण मानीत असे. पेशवे काळात काही स्त्रियाही पुरुषांप्रमाणे शरीरे कमावून व वस्तादांकडून शिक्षण घेऊन खेडोपाडी तिथल्या पहिलवानांना आव्हान देत फिरत असत. पण नामांकित पहिलवान स्त्रीकडून पराभूत होण्याच्या भीतीने त्यांच्याशी कुस्ती खेळण्याचे नाकारीत.

भारतीय मल्लविद्येत जपानी जूजुत्सूप्रमाणे सामनेवाल्यास घायाळ करण्याचे किंवा त्याचा प्राण घेण्याचे अनेक डाव आहेत; पण त्या डावांचा रोज खेळण्याच्या कुस्तीत उपयोग करण्यास मनाई आहे. तसेच वाटेल त्या मल्लाला तसले डाव शिकविल्यास त्यांचा दुरुपयोग होण्याचा संभव असल्यामुळे योग्य विद्यार्थी पाहूनच त्याला हे डाव शिकविले जातात.

कुस्तीचे जे निरनिराळे डाव आहेत, त्यांचे मुख्य चार विभाग होतात ते असे –



युक्तीचा डाव – १ डगबेडी – पेच

(१) **भीमसेनी** – केवळ शक्तीच्या योगाने होणारे डाव.

(२) **हनुमंती** – शक्तीपेक्षा युक्तीच्या साहाय्याने केले जाणारे डाव.

(३) **जांबुवंती** – प्रतिस्पर्ध्यास चीत न करता त्याचे हातपाय बांधून त्याला आपल्या ताब्यात घेण्याचे डाव.

(४) **जरासंधी** – **(नेस्त्या)** – हातपाय मोडण्याचे व जीव घेण्याचे डाव.

ज्यांना वस्तादाकडून चांगले शिक्षण मिळालेले नाही, असे अडाणी पहिलवानच पहिल्या प्रकारची कुस्ती खेळतात. त्यांच्या खेळास डाव हे नाव देणेदेखील योग्य नाही. कुस्ती खेळणारे दोघेही पहिलवान कुशल असले म्हणजे ते एकसारखे डावामागून डाव (हनुमंती) करीत असतात, त्यांना साखळी म्हणतात. सध्या प्रचलित असलेल्या कुस्तीत दुसऱ्याला चीत करणे हेच ध्येय समजले जाते. म्हणून नुसत्या बांधाच्या (जांबुवंती) डावांना कोणी फारसे महत्त्व देत नाही. कारण त्या डावांनी प्रतिस्पर्धी बांधला गेला, तरी चीतपट होत नाही व कुस्ती संपत नाही. तथापि अशा प्रकारचे डाव ऐन प्रसंगी उपयोगी पडण्यासारखे असल्यामुळे तेही महत्त्वाचे आहेत.

जंबियाची कुस्ती, माडूची कुस्ती, बिनोट, लाठीबंदेश, तरवारबंदेश वगैरे खेळांत मुख्य भाग कुस्तीचाच असतो. कोणतेही

हत्यार कौशल्याने व तडफेने वापरता यावे म्हणून हातापायांस व नजरेस विशिष्ट प्रकारचे शिक्षण देणे आवश्यक असते. तसेच वार करणाऱ्या प्रतिस्पर्ध्याचा हात धरल्यानंतर त्याच्यावर



युक्तीचा डाव— २ डगबेडी—चीतपट

कुस्तीतील निरनिराळे डाव करण्याची जरूर पडते. म्हणून या खेळातही कुस्तीचे ज्ञान असावे लागते. स्वसंरक्षणासाठी हातात काहीही नसताना हिमतीने व युक्तीने स्वतःचा बचाव करणे याला बिनोट म्हणतात. यातही कुस्तीचे डावपेचच फार उपयोगी पडतात. अशा प्रकारे कुस्तीची विद्या बलसंवर्धना-प्रमाणेच स्वसंरक्षणाच्या दृष्टीनेही महत्त्वाची आहे. [प्रा. भा. म.; व्या. ज्ञा. को. ].

**कुहक** एक प्राचीन मानवगण. हे लोक सिंधू नदीच्या काठी राहत असत. मत्स्यपुराणात यांचा उल्लेख सापडतो; पण अधिक माहिती मिळत नाही.

**कुहू** (१) प्रतिपदायुक्त अमावास्येला कुहू म्हणतात. 'सा नष्टेन्दुकला कुहूः ' = जिच्या ठिकाणी चंद्रकला नष्ट होते, त्या अमावास्येच्या भागाला कुहू म्हणावे, असे अमरकोशात सांगितले आहे. कुहूला देवता मानून धनधान्य व पुत्रपौत्र यांच्या प्राप्तीसाठी तिची पूजा करतात. कुह = कुठे ? या शब्दावरून हा शब्द निघाला असावा. ऋग्वेदकालीन लोक आज चंद्र कुठे गेला, अशी या दिवशी पृच्छा करीत असावे म्हणून या तिथीला कुहू असे नाव पडले असावे. नैरुक्तांनी हिला देवपत्नी म्हटले आहे—

**सिनीवाली कुहूरिति देवपत्न्याविति**
**नैरुक्ता अमावास्येति याज्ञिकाः ।**

(निरुक्त ११. ३१)

अर्थ—सिनीवाली व कुहू या देवपत्नी आहेत, असे नैरुक्त म्हणतात; तर त्या अमावास्या आहेत, असे याज्ञिक मानतात.

कुहू ही अंगिरसांची कन्या मानलेली आहे (भाग पु. ४. १. २६).

(२) सोमाची सेवा करणाऱ्या नऊ देवींपैकी एक देवी. [पु. इं. ]

(३) एक शक्तिदेवता. [पु. इं. ]

(४) हिमालयातील एक नदी. [पु. इं. ]

(५) शाल्मली द्वीपातील एक नदी. [पु. इं. ].

**कुळवाडी** कुणबी पाहा.

**कू** चित्तगाँग जिल्ह्यातील एक जमात. शेम्र नदीच्या उगमाजवळ यांची वस्ती आहे. हे लोक अत्यंत क्रूर म्हणून प्रसिद्ध आहेत. बाहेरचा कुठलाच माणूस त्याच्या वस्तीत जायला धजत नाही.

सणावाराच्या दिवशी नृत्य करताना हे लोक एक बैल खुंटाला बांधून त्याच्याभोवती नाचतात. नाचताना मधे मधे आपल्या हातातले भाले बैलाच्या अंगात खुपसतात. त्याच्या अंगातून गळणारे रक्त बांबूच्या नळकांड्यात धरून स्त्रिया व मुले ते पितात. बाजरी हा या लोकाचा मुख्य आहार आहे. [ इं. स्ट. पा. प्रे. ]

**कूका** शीख लोकांचा एक धार्मिक पंथ. लुधियानाच्या आग्नेयीस सुमारे ७ मैलांवरील भैणी गावी रामसिंह नामक एक सुतार राहत असे (जन्म इ. स. १८२४). त्याला साक्षात्कार झाल्यामुळे शीख धर्म जास्त पवित्र करण्याकरिता तो गुरू बनला. शीख धर्माची त्या वेळी प्रचलित असलेली तत्त्वे रामसिंहाला मान्य नव्हती. गुरू नानकाच्या वेळी जी तत्त्वे प्रचारात होती, ती त्याला पुनश्च अमलात आणायची होती. म्हणून लोकांच्या सामाजिक व धार्मिक आचार-विचारात क्रांती घडवून आणण्याच्या हेतूने तो दुष्ट रूढींवर प्रखर टीका करू लागला. हळूहळू त्याचा एक मोठा संप्रदाय बनला. नामधारी अथवा कूका या नावाने तो प्रसिद्ध आहे.

या धार्मिक संप्रदायाला क्रांतिकारक राजकीय दलाचे रूप देण्याचे कार्य साधू रामदास या महाराष्ट्रीय पुरुषाने केले. त्याने पं. रामसिंह कूका याला स्वातंत्र्याचे महत्त्व पटवून दिले आणि त्यासाठी प्रबळ संघटना करण्याचा उपदेश केला. अशा संघटनेसाठी श्रद्धेचे अधिष्ठान म्हणून एका केंद्रबिंदूची आवश्यकता असते. रामसिंहाने गाईला ते स्थान दिले.

इ. स. १८६४ साली रामसिंहाने आपल्या अनुयायांना ब्रिटिश सरकारशी असहकार करण्याचा आदेश दिला. त्या आदेशाप्रमाणे या पंथाने १२ वर्षे पंजाबात स्वतंत्रपणे कारभार

केला. त्यामुळे सरकारने त्याच्यावर कडक निर्बंध घातले. मग रामसिंहाने उघड चळवळ थांबवून गुप्तपणे कार्य सुरू केले. शस्त्रास्त्रे जमवून व सैन्याला फितवून ब्रिटिश सरकारविरुद्ध उठावणी करणे हा त्याचा उद्देश होता. पण पाच वर्षे अशा प्रकारे गुप्त संघटना झाल्यानंतर सरकारला वाटले, की या पंथाची चळवळ पूर्ण थंडावली. म्हणून त्याने पंथावरील सर्व निर्बंध काढून घेतले. याचा परिणाम असा झाला, की गुरूच्या व आपल्या सामर्थ्यापुढे सरकार नमले अशा कल्पनेने पंथाचे अनुयायी फुशारले व जरा उन्मत्त झाले. इ. स. १८७२ मध्ये एके ठिकाणी काही मुसलमानांनी क्रूरपणे गोवध केल्यामुळे कूका पंथाचे लोक बिथरले आणि त्यांनी गुरूची आज्ञा न मानता अवेळी उठावणी केली. ब्रिटिश सरकारने लवकरच त्यांना नामोहरम करून, अनेक पुढाऱ्यांना तोफेच्या तोंडी दिले. नंतर रामसिंहालाही हद्दपार करून ब्रह्मदेशांत पाठवून दिले. तिथेच इ. स. १८८५ साली त्यांचा अंत झाला.



बाबा रामसिंग कूका

कूकापंथी लोकांचा लग्नविधी व अंत्यसंस्कार हिंदूंच्या पद्धतीहून वेगळा असतो. स्नान करण्यापूर्वी ते काही खात नाहीत. स्वपथाखेरीज इतराच्या हातचेही ते खात नाहीत. ते कान उघडे ठेवून फेटा बांधतात. दीक्षा देतेवेळी दीक्षार्थी स्नान करून आल्यावर त्याला माळ व कानमंत्र देतात. यांच्या पंथात स्त्रियांनाही प्रवेश मिळतो.

रामसिंह घोड्यावर बसून फिरायला जाई व त्याचे अनुयायी ‘अकाल अकाल’ असे ओरडून त्याला रस्ता करून देत. त्याने धर्मप्रसाराचे क्षेत्र व्यापक करून, ते पंजाब व सतलज नदीच्या आसपासच्या प्रदेशापर्यंत नेऊन भिडविले. याच्या पंथात सुतार, गवंडी, कोष्टी व जाट हे लोक येऊन मिळाले. शीख राजे व शीख समाज मात्र याच्या विरुद्ध राहिला. [म. ज्ञा. को.; एकता, वैशाख १८७९]

## कूचिमंची जग्ग कवी

(जन्म इ. स. १७०० चा सुमार) एक तेलुगू कवी. हा तिम्म कवीचा धाकटा भाऊ होता. याची काव्यप्रतिभा सामान्य दर्जाची असली, तरी चंद्ररेखाविलासमु या काव्यासाठी तो प्रसिद्ध आहे. या काव्याच्या उत्पत्तीची कथा अशी—

नीलाद्री राजू या राजाने या कवीस बोलावून सांगितले, की ‘माझी वेश्या चंद्ररेखा हिला नायिका कल्पून तिच्यावर तू काव्यरचना कर.’ त्याप्रमाणे कवीने चंद्ररेखाविलासमु नामक शृंगारिक काव्य लिहिले. परंतु राजाने त्याची योग्य संभावना न केल्याने कवीला राग आला व त्याने ते काव्य फाडून टाकले. नंतर चंद्ररेखाविलापमु नामक एक काव्य रचून त्याने त्यात त्या राजाची खूप निंदा केली. याशिवाय सुभद्रापरिणयमु व सोमदेवराजीयमु ही या कवीची आणखी दोन काव्ये आहेत. [म. ज्ञा. को; ते. उ. सा.]

## कूचिमंची तिम्म कवी

(जन्म इ. स. १६९० चा सुमार). एक प्रसिद्ध तेलुगू कवी. गंगनामात्य व लच्चमांबा यांचा हा पुत्र होय. हा जातीने नियोगी ब्राह्मण होता. याची ग्रंथरचना बरीच आहे. याचे काही प्रसिद्ध काव्यग्रंथ पुढीलप्रमाणे–(१) नीला सुंदरी परिणयमु (२) राजशेखर विलासमु (३) रसिकजन मनोभिराममु (४) शिवलीला विलासमु इत्यादी. [ते. उ. सा; म. ज्ञा. को.]

## कूट

कोडे, अंकगणितातील अवघड प्रश्न, गूढार्थ, गूढश्लोक व उखाणा असे या शब्दाचे अर्थ आहेत. वैदिक साहित्यात हा शब्द हातोडा, सापळा किंवा खोडा या अर्थी आलेला आहे. अडचणीत टाकणारे ते कूट असा अर्थ त्याला ब्राह्मण वाङ्मयात प्राप्त झाला. ऐतरेय ब्राह्मणात प्रजापतीच्या बारा विभूतीचे कूट दिलेले आहे. कूट व ब्रह्मोद्य हे समानार्थक शब्द आहेत. कारण प्रजापतीच्या विभूतीबद्दलची ऐतरेय ब्राह्मणातलीच प्रश्नोत्तरे कौषीतकी व शतपथ ब्राह्मण यांत ब्रह्मोद्य या नावाने दिलेली आढळतात.

कूटामध्ये प्रथम प्रश्न असतो व नंतर त्याचे उत्तर असते. प्रश्नात रूपकाच्या अंतर्गत सत्य लपविलेले असते आणि उत्तरात त्याचा आविष्कार असतो. ज्ञान देणे किंवा मनोरंजक रीतीने नैतिक उपदेश करणे, हा कूटाचा प्रमुख उद्देश असतो. म्हणींमध्येही व्यावहारिक उपदेशाला प्राधान्य असले, तरी म्हणीपेक्षा कूटांची सांस्कृतिक पार्श्वभूमी अधिक विस्तृत असते. कूटाची शब्दरचना सुश्लिष्ट व आकर्षक असते. शिवाय त्यातल्या गूढतेमुळे त्याला विशेष शोभा प्राप्त होते.

फार प्राचीन काळापासून रानटी व सुसंस्कृत अशा उभयविध

मानवसमाजात आनंद व शोक या दोन्ही प्रसंगी कूटांचा उपयोग होत आला आहे. कूटे ही जीवनातल्या महत्त्वाच्या प्रसंगी आणि संकटप्रसंगीही उपयोगी पडावी, हा संकेत प्राचीन काळापासून सर्व मानवसमाजात आढळून येतो. फ्रेझर या लोकसंस्कृतीच्या संशोधकाने जागतिक कूटवाङमयाचा अभ्यास करून त्याविषयी बरेच विवेचन केले आहे. एखाद्या गावावर, समाजावर किंवा कुटुंबावर संकट ओढवणार असे दिसू लागले, की ते संकट दूर करण्यासाठी धार्मिक विधीप्रमाणे कूटांचा उपयोग करण्याची प्रथा कित्येक मानवसमाजात आहे. पर्जन्यवृष्टीची आकांक्षा, शेतीची कामे, शिकार, विवाह व प्रेतसंस्कार हे सर्व प्रसंग कूटनिर्मितीला कारणीभूत झालेले दिसतात.

कूटांची भारतीय परंपरा फार प्राचीन आहे. यज्ञविधी, विवाहविधी व अंत्यविधी यांमध्ये कूटांचा उपयोग करण्याची प्रथा वेदपूर्व काळापासून भारतात चालत आली असावी. ऋग्वेदातील कूटांवरून असे सूचित होते, की ही कूटे वेदांच्याही पूर्वीची आहेत. धार्मिक व धर्मनिरपेक्ष असे कूटांचे उभयविध स्वरूप वैदिक वाङमयात आढळते. धार्मिक कूटे मुख्यत: विश्वोत्पत्ती किंवा तत्त्वज्ञान यासंबंधी असतात, तर धर्मनिरपेक्ष कूटे कलात्मक आणि उपदेशात्मक असतात. वेदातील कूटे पद्यमय व कल्पनाप्रचुर आहेत. त्यांत विश्वोत्पत्तिविषयक दृष्टांत व रूपके आहेत. या कूटात्मक ऋचांना स्वतंत्र नाव नसले, तरी त्यांची भाषा इतर स्तुतिपर ऋचांहून निराळी अर्थात गूढ असते. त्या ऋचांचा आशयही वेगळा असतो. अशा प्रकारच्या कूटांचे काही नमुने पुढील प्रमाणे आहेत—

**अपश्यं गोपमनिपद्यमानमा च परा च पथिभिश्चरन्तम् ।**
**स सध्रीचीः स विषूचीर्वसान आ वरीवर्ति भुवनेष्वन्तः ।।**

(ऋ. १. १६४. ३१)

अर्थ– एक गुराखी मी पाहिला. तो खाली पडत नाही. तो आपल्या मार्गांनी वर व खाली हिंडत असतो. जे एकत्र धावत जातात व ज्यांची पांगापांग होते, त्या वस्त्रांचे आवरण तो स्वत:वर घेतो आणि विश्वामध्ये वर्तुळाकार फिरतो.

या ऋचेतला गुराखी हा सूर्य असून त्याचे वस्त्र म्हणजे किरणजाल होय. 'एवढासा गुराखी एक लक्ष गायी राखी' असे मराठीत एक कूट आहे. त्याचेही उत्तर सूर्य व त्याचे किरण असेच आहे.

**द्वादश प्रधयश्चक्रमेकं त्रीणि नभ्यानि क उ तच्चिकेत ।**
**तस्मिन् साकं त्रिशता न शङ्कवोऽर्पिताः षष्टिर्न चलाचलासः ।।**

(ऋ. १. १६४. ४८)

अर्थ– चाक एकच, परंतु त्याला बारा धावा आणि तीन तुंबे आहेत, हे कसे ते कोण ओळखतो ? त्या चाकाला तीनशे साठ आरे आहेत आणि ते शंकूप्रमाणे गरगर फिरत असतात.

यातले चाक म्हणजे वर्षचक्र, बारा धावा म्हणजे बारा महिने, तीन तुंबे म्हणजे उन्हाळा, पावसाळा व हिवाळा हे ऋतू आणि तीनशे साठ आरे म्हणजे वर्षाचे तितके दिवस होत.

ही दोन्ही सृष्टिविषयक कूटे होत. ऋग्वेदातील तत्त्वज्ञानात्मक कूटाचे उदाहरण पुढीलप्रमाणे–

**द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परि षस्वजाते ।**
**तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्यो अभि चाकशीति ।।**

(१. १६४. २०)

अर्थ– सुंदर पंखाचे, एकत्र राहणारे व जिवलग मित्र असे दोन पक्षी एकाच वृक्षावर बसलेले आहेत. त्यातला एक त्या वृक्षाच्या मधुर फळाचा उपभोग घेतो; पण दुसरा मात्र स्वत: काहीएक न खाता फक्त पाहत राहतो.

या ऋचेतले दोन पक्षी म्हणजे विविध विषयांचा उपभोग घेणारा जीवात्मा व साक्षी असलेला परमात्मा हे होत.

यज्ञात उपयोजिले जाणारे आणखी एक कूट वाजसनेयी संहितेत (२३.९, १०) दिले आहे, ते असे—

प्रश्न :– एकटाच आपल्या मार्गाने कोण हिंडतो ?
सतत पुन:पुन्हा जन्माला कोण येतो ?
शीतनिवारणार्थ उपाय कोणता ?
धान्याच्या मोठ्या भांड्याचे नाव काय ?
उत्तर :– सूर्य एकटाच आपल्या मार्गाने भ्रमण करतो.
चंद्र सतत पुन:पुन्हा जन्माला येतो.
अग्नी हा शीतनिवारणाचा उपाय आहे.
पृथ्वी धान्याचे मोठे भांडे आहे.

जैमिनीय ब्राह्मणात कुरुपांचालांची कूटविषयक स्पर्धा दिलेली आहे. त्यामधले एक यज्ञविषयक कूट असे—

(यज्ञमंडपाजवळ एक कुत्रा आपले पुढचे पाय मागच्या पायांना टेकवून व आपल्या शरीराचे गाठोडे करून झोपला होता. हा कुत्राच कूटविषय बनवून पांचालांनी कुरूंना प्रश्न केला.)

या निद्रित श्वानाचे यज्ञाशी साम्य कोणत्या प्रकारचे आहे?

याचे उत्तर कुरूंनी द्यायचे होते. पण त्यांना ते देता आले नाही. म्हणून वसिष्ठ चैकितायनाने त्याचे उत्तर दिले–

ज्याप्रमाणे यज्ञायज्ञीयाची एकवीसावी ऋचा बहिष्पवमान ऋचांशी जोडलेली आहे, त्याचप्रमाणे हे श्वान आपल्या शरीराची दोन टोके (पुढचे व मागचे दोन पाय) एकमेकांना जोडून झोपलेले आहे. त्यामुळे या निद्रित श्वानाचे यज्ञाशी साम्य आहे (जै. ब्रा. १. २५८).

महाभारतात विवाद, प्रश्न व कूट मिळून सामान्यपणे कूट बनते. त्या काळी विद्वज्जनांत अशा कूटस्पर्धा चालत. त्या

स्पर्धांतले वातावरण इतके तप्त असे, की कूटयुद्धात जो हरेल त्याला पाण्यात बुडवून मारण्यापर्यंत मजल जाई. जनकाच्या राज्यात तर तसा नियमच होता. कहोळ नामक ऋषी जनकाकडे द्रव्य मागण्यास गेला असता, वरुणपुत्र बंदी याने त्याला वादात जिंकून पाण्यात बुडविले. त्यानंतर १२ वर्षांनी कहोळपुत्र अष्टावक्र याला आपल्या बापाच्या मृत्यूची वरील हकीगत समजली. त्याने पितृवधाचा बदला घ्यायचे ठरविले. तो जनकाच्या राज्यात आला. त्याने बंदीला विवादाचे आव्हान दिले. त्या दोघांचा वाद झाला. वादात बंदी हरला. जनकाने त्यालाही समुद्रात बुडवून आपल्या राज्यातील नियम पाळला (म. भा. वन. १३४–१३६).

वनपर्वातच यक्षाने युधिष्ठिराला विचारलेले कूटप्रश्न आहेत. ते यक्षप्रश्न या नावाने प्रसिद्ध आहेत. त्यातले काही कूटप्रश्न असे–

यक्ष विचारतो—

**केनस्विच्छ्रोत्रियो भवति केनस्विद्विन्दते महत् ।**
**केनस्विद् द्वितीयवान् भवति राजन् केन च बुद्धिवान् ।।**
(३१३. ४७)

अर्थ – कशाने श्रोत्रिय बनतो? कशाने महत्त्व मिळवितो? कशाने द्वितीयवान होतो? (कोणाची सोबत माणसाला उपकारक ठरते?) आणि हे राजा, कशाने बुद्धिमान होतो?

युधिष्ठिराने या प्रश्नाचे पुढीलप्रमाणे उत्तर दिले –

**श्रुतेन श्रोत्रियो भवति तपसा विन्दते महत् ।**
**धृत्या द्वितीयवान् भवति बुद्धिमान् वृद्धसेवया ।।**
(३१३. ४८)

अर्थ – वेदाभ्यासाने (मनुष्य) श्रोत्रिय बनतो. तपाने तो महत्त्व मिळवतो. धैर्य हेच माणसाचे खरे सोबती असते. वृद्धांच्या सेवेने मनुष्य बुद्धिमान होतो.

पुन्हा यक्षाचा प्रश्न –

**किं नु हित्वा प्रियो भवति किं नु हित्वा न शोचति ।**
**किं नु हित्वाऽर्थवान् भवति किं नु हित्वा सुखी भवेत् ।।**
(३१३. ७७)

अर्थ – काय टाकल्याने मनुष्य प्रिय होतो? काय टाकल्याने शोकरहित होतो? काय टाकल्याने अर्थवान होतो? (व) काय टाकल्याने सुखी होतो?

त्यावर युधिष्ठिराचे उत्तर –

**मानं हित्वा प्रियो भवति क्रोधं हित्वा न शोचति ।**
**कामं हित्वाऽर्थवान् भवति लोभं हित्वा सुखी भवेत् ।।**
(३१३. ७८)

अर्थ – अभिमान टाकल्याने मनुष्य प्रिय होतो. क्रोधत्यागाने तो शोकरहित होतो. काम टाकल्याने अर्थवान होतो. (व) लोभ टाकल्याने सुखी होतो.

यक्षाचा पुन्हा प्रश्न –

**धर्मश्चार्थश्च कामश्च परस्परविरोधिनः**
**एषां नित्यविरुद्धानां कथमेकत्र सङ्गमः ।।**
(३१३. १०१)

अर्थ – धर्म, अर्थ, व काम हे परस्परविरोधी आहेत. या नित्यविरुद्ध अशा गोष्टींचा संगम कसा होईल?

युधिष्ठिराचे त्याला उत्तर –

**यदा धर्मश्च भार्या च परस्परवशानुगौ ।**
**तदा धर्मार्थकामानां त्रयाणामपि सङ्गमः ।।**
(३१३. १०२)

अर्थ – जेव्हा धर्म व धर्मपत्नी ही दोघे परस्परानुगामी वा परस्पराधीन असतात, तेव्हा नित्य विरुद्ध अशा धर्मार्थकामांचा एकत्र संगम होतो.

हा यक्ष (यक्षरूपी यम) एका तळ्याचा राखणदार होता. युधिष्ठिराच्या चार भावांनी त्या यक्षाच्या प्रश्नांची उत्तरे न देता त्या तळ्याचे जल प्राशन केले. त्यामुळे यक्षाने त्यांना मृत्युदंड दिला. युधिष्ठिराने मात्र यक्षाच्या सर्व प्रश्नांची समाधानकारक उत्तरे देऊन यक्षाला संतुष्ट केले व त्याच्याकडून मृत झालेले चारी बंधू जिवंत करून घेतले.

महाभारतात अशी कितीतरी कूटे आहेत. व्यास महर्षी जेव्हा हा ग्रंथ रचायला बसले, तेव्हा त्यांनी गणपतीला आपला लेखक होण्याची विनंती केली. गणपती म्हणाला, की 'मी लिहीन; पण मधे थांबणार नाही.' त्यावर व्यासांनी त्याला प्रतिअट घातली, की 'अर्थ समजल्यावाचून कोणताही श्लोक लिहायचा नाही.' गणपतीने ती मान्य केली. मग व्यासांनी आपल्या रचनेत मधून मधून विचित्र कूटे घातली. गणपतीला त्या कूटांचा अर्थ जाणण्यासाठी बराच वेळ बुद्धीला ताण द्यावा लागे. तेवढ्या अवधीत व्यास पुढचे कित्येक श्लोक मनात रचून ठेवीत.

कूटांची ही लोकप्रियता जाणून बौद्धांनी आपल्या साहित्यातही कूटांना स्थान दिले आहे. यक्षाने बुद्धालाही काही कूट प्रश्न विचारले होते व बुद्धाने त्यांची यथायोग्य उत्तरे देऊन त्या यक्षावर मात केली होती, अशी कथा बौद्ध साहित्यात आढळते. त्याकाळी वधूच्या बुद्धीची परीक्षा करण्यासाठी तिलाही काही कूट प्रश्न विचारले जात, असे जातकांवरून दिसते (महाउम्मग जातक). महाजनजातकात राजकन्या शिवलीने तिच्या भावी पतीला असेच अवघड प्रश्न विचारले आहेत.

बौद्ध साहित्यातील ही कूटे म्हणजे महाभारतातल्या कूटांची नक्कलच होय.

या कूटवाङमयाला पुढे कूटकथानकांची जोड मिळाली. हे कार्य प्राकृत भाषेतील साहित्याने केले. बृहत्कथेत वेताळपंचविशीच्या रूपाने या कूटकथानकांचा प्रादुर्भाव झाला. वैदिक साहित्यात कूटे व कूटकथाही आहेत. पण महाभारताच्या कालापर्यंत हे दोन प्रकार स्वतंत्र राखले गेले आहेत. प्राकृत साहित्याने पुढे ही दोन्ही अंगे वाढविली व त्यांचे एकीकरणही केले.

या कूटकथानकांची दुसरी एक परिणती म्हणजे महाराष्ट्रात प्रचलित असलेल्या भेदिक लावण्या. या लावण्यांच्या फडात कलगीवाले व तुर्रेवाले असे दोन पक्ष असतात. फड उभा राहिला, की एक पक्ष एखादे कूट कथानक सवाल म्हणून पुढे टाकतो व दुसरा पक्ष त्याचे उत्तर देतो. या भेदिक लावण्या प्रामुख्याने पौराणिक व अध्यात्मपर असतात.

कूटसमुदायात मृत्युविषयक कूटे हा आणखी एक प्रकार असून, तो गंभीर चिंतनात्मक असतो. करसाळ गीते या नावाने गोंड आदिवासीत तो प्रचलित आहे. ही करसाळ गीते स्त्रियांची व पुरुषाची वेगवेगळी असतात. पाहा – ब्रह्मोद्य, करसाळ गीते. [फो. लो.–जुलै १९६२, मार्च १९६३; हि. ध.; लो. सा. रू.]

**कूटमाळी** एक जात. उत्तर प्रदेशात यांची वसती आहे. हे मूळचे मथुरा प्रदेशातील जिगनगडचे रहिवासी. जिगनगडच्या लुटालुटीच्या वेळी यांनी मुसलमानी धर्म स्वीकारला. पुढे ते लौकरच लालखानी झाले. स्थलांतर करीत असता ते एका फकिराच्या बागेत आश्रयाला थांबले व तिथे माळचाचा धंदा करू लागले. त्यानंतर त्यांनी भात कांडण्याचा धंदा सुरू केला. कूकच्या मते कुटणे व मळणे या दोन क्रियांपासून कूटमाळी हा संयुक्त शब्द बनला आहे. यांच्या पंचायतीत दोन सरदार, बाव्वीस प्रधान व बाव्वीस चक्रयात असून, या जागा वशपरंपरागत असतात. प्रत्येक खेडचात एक प्रधान व एक चक्रयात असून, जातीचे बारीकसारीक कज्जेखटले तोच निवडतो. [म. ज्ञा. को.]

**कूटशाला** इमारतीच्या माथ्यावर असलेली लहानशी खोली. तिचे छप्पर वाकदार वाश्याचे करीत. हिला कूटागार असेही म्हणत. [एन्सा. हिं. आ.]

**कूटसंक्रांती** मध्यरात्रीनंतर सूर्याचे एका राशीतून दुसऱ्या राशीत संक्रमण झाल्यास त्या संक्रांतीला कूटसंक्रांती असे म्हणतात. या संक्रांतीच्या वेळी स्नान, दान, तप आणि व्रत या गोष्टी कराव्या, असे सांगितले आहे. [श. क.]

**कूटस्थ** कूटस्थ = निर्विकार आत्मा. याची व्याख्या पंचदशीत पुढीलप्रमाणे दिली आहे—

**अधिष्ठानतया देहद्वयावच्छिन्नचेतनः।**
**कूटवन्निर्विकारेण स्थितः कूटस्थ उच्यते ॥**

(६.२२)

अर्थ— जो अधिष्ठानरूपाने स्थूल–सूक्ष्म देहांनी अवच्छिन्न झालेला आत्मा सोनाराच्या ऐरणीप्रमाणे निर्विकार रूपाने स्थित असतो, तो कूटस्थ म्हटला जातो.

स्थूल—सूक्ष्म हे देह अविद्याकल्पित आहेत. यास्तव त्यांच्या कल्पनेला काही तरी आधार हवा असतोच. आत्मा सर्वव्यापी असल्यामुळे तोच वरील देहद्वयाने परिच्छिन्न झाल्यासारखा वाटतो. पण तो सोनाराच्या ऐरणीप्रमाणे (कूट) निर्विकार असतो. ऐरणीवर पदार्थ ठेवून त्यावर हातोडचाचे कितीही प्रहार केले, तरी ऐरणीला काही विकार होत नाही. त्याचप्रमाणे आत्म्याच्या आधाराने राहणाऱ्या जीवाला विषयांच्या योगाने कितीही क्लेश झाले, तरी आत्म्याला कोणत्याही प्रकारचा विकार होत नाही. असा जो निर्विकार आत्मा, तोच कूटस्थ होय. [श क.]

**कूटियाट्टम्** केरळातील एक नृत्यनाटच. कूट = समूह, आट्टम् = नृत्यनाटच. यावरून कूटियाट्टम् म्हणजे समूहाने केलेले नृत्यनाटच. चाक्यार जातीचे लोक या नृत्याचे परंपरागत हक्कदार आहेत. मुळात हे संस्कृत नाटच होते. पुढे भास्कर रविवर्मा पेरुमाळ (इ. स. ९७८ ते १०५६) याने या मूळ संस्कृत नाटचप्रकारात पुष्कळ बदल केला. पुढे त्यात मल्याळम्चाही उपयोग होऊ लागला. मूळ नाटचाच्या तंत्रातही भास्कर रविवर्म्याने पुष्कळ फरक केला. नाटकाच्या प्रत्येक अंकात सुरवातीला एक प्रास्ताविक भाग त्याने दाखल केला व त्यात मागील अंकातील प्रमुख घटना पुन्हा रंगमंचावर साभिनय दाखविण्यात येऊ लागल्या. काही वेळा काही विशिष्ट संबंधित प्रसंग वाढविण्यात आले. त्यामुळे अंकाच्या प्रास्ताविक भागाच्या प्रयोगातच कित्येक दिवस जाऊ लागले.

या नाटकातील प्रत्येक श्लोकाचे शब्द नट अशा रीतीने उच्चारतो, की त्यामुळे लोकांना श्लोकाचा अर्थ चटकन समजावा. रंगभूमीवर आलेला नट प्रथम आपले भाषण बोलून दाखवितो. लोकांना त्याचे शब्दोच्चार स्पष्ट ऐकू यावे, म्हणून यावेळी संगीताची साथ बंद ठेवतात. नंतर त्याला सुसंगत अशा मुद्रा तो हातांनी दाखवितो. नंतर संगीत सुरू होते व नट

आंगिक अभिनयाने व चेहऱ्यावरील हावभावांनी त्या शब्दांचा अर्थ व्यक्त करतो. नंतर पुन्हा एकदा नट पहिल्याप्रमाणे हातांनी मुद्राभिनय करून आपला प्रवेश पुरा करतो.


सुभद्रा–धनंजयम्मधील अर्जुन

कूटियाट्टम्मध्ये आश्चर्य चूडामणि, अभिषेक नाटक, प्रतिमा नाटक, स्वप्न-वासवदत्तम्, तपती संवरणम्, शूर्पणखा, सुभद्रा– धनंजयम्, दूत–घटोत्कचम्, नागानंद, प्रतिज्ञा-यौगंधरायण, वाली-वधांकम्, मत्तविला-सम् इ. अनेक नाटकांतील अंक निवडून ते सादर केले जातात.

मोठ्या देवस्थानात मंदिराच्या महाद्वारापुढे कूटियाट्टम्चे नाट्यगृह उभारतात. नटमंडळी देवाकडे तोंड करून आपला प्रयोग सादर करतात. या नाट्यगृहाला कूथंबलम् असे नाव आहे. वालुकामय दगडाच्या जोत्यावर लाकडाची चौकट व त्याच्या भोवती लाकडी कठडा, अशी याची रचना असते.

रंगमंचाला लागूनच वेषभूषेची खोली असते. नृत्यप्रयोगाच्या दिवशी केळींनी व शहाळ्यांच्या घोसांनी रंगमंच सजवितात. रंगमंचावर एका बाजूला मोठी समई तेवत ठेवतात व तिच्याच प्रकाशात प्रयोग करतात. त्या वेळी नंबियार एक मोठा तांब्याचा ढोल वाजवितो. नङ्गियार स्त्री झांज वाजविते. नाटकातल्या स्त्री भूमिका नङ्गियार स्त्रियाच करतात. शूर्पणखेसारख्या राक्षसींच्या भूमिका मात्र पुरुष करतात. कूटियाट्टम्मध्ये गायनाला फार थोडा वाव असतो. प्रयोग नीरस होऊ नये, म्हणून त्याची उणीव वृंदवादनाने भरून काढतात. नाटकातले श्लोक संगीताच्या चालीवर न म्हणता मंत्रासारखे म्हणतात.

यातील पात्रांची वेषभूषा कथकळीप्रमाणे असते. वास्तविक कूटियाट्टम्ची वेषभूषाच पुढे कथकळीने उचलली व तिच्यात सुधारणा केली.

रात्री दहा वाजता नाट्याच्या प्रयोगाला सुरवात होते व सुरवातीच्या दिवसात तो सुमारे तीन तास चालतो. जेव्हा नाटकातील एखाद्या अंकाचा प्रयोग सुरू होतो, तेव्हा तो जवळ जवळ सहा तास चालतो. नेपथ्यगृहात पात्रे वेषभूषा करीत असता, बाहेर रंगमंचावर अनेक पूर्वरंग चालू असतात. प्रथम मोठा ढोल वाजवितात व नङ्गियार स्त्री वंदनाचे श्लोक म्हणते. नंबियार पुरुष रंगमंचावर पवित्र जलाचे सिंचन करतो. थोडा वेळ वृंदवादन झाल्यावर सूत्रधार प्रवेश करतो व तोही थोडा वेळ नृत्य करतो. मग पुढे सुरू होणार असलेल्या विशिष्ट अंकाचे स्तवन होते. सूत्रधाराने नाटकातील नायकाचा परिचय करून दिल्यावर पडदा वर जातो व वाद्यवृंदाच्या निनादात नायक प्रवेश करतो. उदा. वालीवधांकाचा जर प्रयोग असेल, तर श्रीरामचंद्र रंगमंचावर प्रवेश करतो. तो धीरोदात्त नायकासारखा दिसतो. प्रथम आपल्या धनुष्याकडे तो एक प्रेमळ दृष्टिक्षेप टाकतो. नंतर तो लक्ष्मण, सुग्रीव व हनुमान या पात्रांकडे वळतो. खरे म्हणजे ही पात्रे रंगमंचावर नसतातच. रामचंद्रच त्या त्या पात्रांचा अभिनय करतो.

दुसऱ्या दिवशी निर्वहणाचा म्हणजे नाटकाच्या पुढील भागाचा प्रयोग होतो. चालू प्रसंगापर्यंत मागील सर्व घटना त्यात दाखविल्या जातात. निर्वहणाचे अनुक्रम, संक्षेप व विस्तार असे तीन भाग असतात. यानंतर पुरुषार्थ नामक एक भाग असतो. त्या वेळी विदूषक प्रवेश करतो व चतुर्विध पुरुषार्थांचे


शूर्पणखा नृत्यनाट्यातील राम, लक्ष्मण व शूर्पणखा

निरूपण करतो. विदूषकाचे हे पुरुषार्थ म्हणजे विनोद, वंचना, अशन व राजसेवा हे होत. या वेळच्या आपल्या भाषणात तो



कूथबलम् – नाटचगृह

समाजातल्या दुष्ट रूढीवर आणि दंभ-लोभांवर यथेच्छ कोरडे ओढतो.

नंतर पुन्हा मूळ नाटकाला आरंभ होतो. या नाटकाला गती अशी नसतेच. सर्व घटना अगदी भावकाशपणे घडत असतात. प्रेक्षकांनाही त्याबद्दल फिकीर नसते. कारण त्यांना सर्व कथाभाग माहीतच असतो. त्यांना फक्त पात्रांचा अभिनय पाहायचा असतो आणि त्यासाठीच ते कित्येक रात्री जागरण करून प्रयोग पाहायला येतात. [ के. भरथ अय्यर– दि टाइम्स ऑफ इंडिया ॲन्युअल, १९६२ ]

**कूट्टडी** द. भारतातले डोंबारी, परियन अथवा कोरवा जातीचे लोक. हे दोरीवरील नाचकाम करतात. यांच्या धंद्यावरूनच यांना हे नाव पडले आहे. आर्यकूट्टडी हे मराठा डोंबाऱ्यांचे तमिळ नाव आहे. काही वैदूंनाही कूट्टडी म्हणतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**कूडलसंगम** कृष्णा व तुंगभद्रा या नद्यांच्या संगमाला कूडलसंगम म्हणतात. हे एक प्राचीन युद्धक्षेत्र आहे. चोळ व चालुक्य याच्या बऱ्याच लढाया इथे झालेल्या आहेत. इथे संगमेश्वराचे एक मंदिर असून, वीरशैव पंथाचा संस्थापक बसवेश्वर याचा हा आराध्य देव होता. [ म. ज्ञा. को. ]

**कूत्तू** तमिळ भाषेत नृत्यनाटचाला कूत्तू म्हणतात. अगक्कूत्तू, अभिनयकूत्तू, मर्गीकूत्तू, पुरकूत्तू, नाटककूत्तू, देसिक्कूत्तू, इ. वेगवेगळया कूत्तूची माहिती शिलप्पधिकारम् मध्ये दिलेली आहे.

केरळातही कूत्तूचे अनेक प्रकार प्रचलित आहेत. प्रबंधकूत्तू ( पौराणिक गीतांचे वाचन), नङ्गियारकूत्तू, ( साभिनय गीतगायन ), कूटियाट्टम्, तियाट्टम् अशी त्याची नावे आहेत. ही नृत्ये मंदिरातच मूर्तीसमोर केली जातात. त्यासाठी काही मंदिरांतून खास रंगमंच केलेला असतो. त्याला कूथबलम् असे म्हणतात. कूत्तूचे प्रयोग चाक्यार जातीचे लोकच करतात. यात रामायण-महाभारतांतील कथा सांगितल्या जातात. या नृत्याला मिझावू नामक वाद्याची साथ असते. [ मा. लो. नृ.; डि. मा. इं. म्यु. म्यु. ]



चाक्यार कूत्तू – नर्तक

**कूदन** केरळातील एक जात. यांना कूटन असेही म्हणतात. एखाद्या जमीनदाराकडे हे गुलामासारखे राहतात व रोजमजुरीवर त्याच्या शेतात काम करतात. सणासुदीच्या दिवशी जमीनदार त्यांना कपडे, भात, मीठ, नारळ, इ. वस्तू देतो. ते आजारी पडले तर जमीनदारच त्यांच्या औषधपाण्याची व्यवस्था करतो. बांबूच्या लहान झोपडया बांधून हे राहतात. यांची आर्थिक परिस्थिती अत्यंत हलाखीची असते.

हे लोक मुलीला प्रथम रजोदर्शन झाले की, तिला घरात एका कोपऱ्यात बसवून ठेवतात. चार किंवा सात मुली तिला पहिल्या दिवशी स्नान घालतात. सात दिवस विटाळ पाळतात. सातव्या दिवशी सात मुली तिला नदीवर नेऊन आंघोळ घालतात. नंतर या मुलींना जेवायला घालतात व एकेक आणा दक्षिणा देतात.

**विवाहप्रथा–** सर्वसाधारणपणे मुलगी वयात आल्यावर तिचे लग्न होते. कूदन पुरुष स्वजातीतील किंवा पुलय जातीतील स्त्रीशी संबंधम् करून राहू शकतो. पुलय स्त्रीच्या घरी रात्री राहिल्यावर परत आपल्या घरात येण्यापूर्वी त्याला स्नान करावे लागते. यांच्यांत मरुमक्कतायम् ही वारसापद्धती चालू आहे.

**देव–धर्म–** हे ग्रामदेवताना भजतात व मुताखेतांची पूजा करतात. देवी, पटकी, इ. साथीच्या वेळी भगवतीला कोंबडयाचा बळी देतात.

**मर्तिकप्रथा–** मृताच्या अंत्यसंस्काराची व्यवस्था जमीनदार करतो. मृताला जाळतात किंवा पुरतात. प्रेत जाळायच्यापूर्वी त्या जागेवर हळदीचे पाणी शिंपडतात. प्रेताच्या गळ्यात नारळ बांधतात. दहनानंतर प्रेतयात्रेला गेलेले सर्व लोक मृताच्या घरी जातात. तिथे त्यांना भाताची पेज व ताडी दिली जाते. सुतक चौदा दिवस पाळतात. पुरुषाच्या बाबतीत पुतण्या व स्त्रीच्या बाबतीत मोठा मुलगा व मुलगी हे अंत्यसंस्काराचे अधिकारी असतात. मृताला एक वर्षभर रोज सकाळी काही-तरी बळी दिला जातो. [ का. ट्रा. स. इ. ]

## कूनपिल्ली

द. भारतातील याचकांचा एक वर्ग. यांना पदिगराजुल असेही म्हणतात. हे लोक पद्मसाळी लोकांकडे भिक्षा मागतात. [ का. ट्रा. स. इं. ]

## कूपकर्ण

(१) एक रुद्रगण. बाणासुराच्या युद्धप्रसंगात बलरामाशी याचे युद्ध झाले होते (भाग. पु. १०.६३).

(२) बलीच्या प्रधानांपैकी प्रमुख. [ प्रा. च. को. ]

## कूपतडागादौ मृतदोषशांती

एखाद्या विहिरीत किंवा तलावात मनुष्य वा पशू पडून मृत झाल्यास, त्यातील पाणी अशुद्ध होते. त्या मृत प्राण्याला बाहेर काढल्यावर ते पाणी प्यायला किंवा स्नानाला शुद्ध व्हावे, म्हणून ही शांती करतात. त्यासाठी संकल्पपूर्वक कर्मारंभ केल्यावर अग्निस्थापना, सर्वतोभद्रमंडलदेवतास्थापना व कलशस्थापना करतात. कलशावर सुवर्णप्रतिमा ठेवून त्यावर वरुण देवतेचे आवाहन व पूजन करतात. प्रधानहोमाच्या वेळी तिल व आज्य यांच्या १०८ आहुती देतात. त्यानंतर पंचगव्य, सप्त मृत्तिका व गंगादी पवित्र नद्यांचे जल मंत्रपूर्वक विहिरीत किंवा तलावात टाकतात. प्रायश्चित्तसूक्त, पुरुषसूक्त, पवमानसूक्त, वरुणसूक्त, इ. सूक्तांचे पठण करतात व गाय दान देतात. [ ऋ. ब्र. क. ]

## कूरका

राजस्थानातील एक क्रीडाप्रकार. एखाद्या पिंपळाखाली हा खेळ खेळतात. प्रथम सगळे खेळाडू झाडाखाली जमतात. ज्याच्यावर राज्य आले असेल, त्याला जवळ उभा करून एक खेळाडू आपल्या दोन्ही पायांमधून एक लाठी दूर फेकतो. तिलाच कूरका म्हणतात. ही लाठी फेकण्यापूर्वीच सगळे गडी झाडावर चढतात. मग कूरका फेकणाराही झाडावर चढतो. राज्य आलेला गडी ती फेकलेली कूरका घेऊन झाडाजवळ येतो व ती मातीत पुरतो. नंतर तो आपले राज्य दुसऱ्या कुणाला तरी देण्याचा प्रयत्न करतो. एवढ्या वेळात झाडावरचा एखादा खेळाडू कूरकावर उडी मारून ती हस्तगत करतो व 'कुरा कुरां' म्हणतो. [ मरुभारती ]

## कूर्ग

पूर्वीचे म्हैसूर संस्थान व उ. मलबार यांच्यामध्ये असलेला लहानसा डोंगराळ प्रदेश. याचे मूळ नाव कोडगू असे होते. कूर्ग हा त्याचा अपभ्रंश आहे. याचे क्षेत्रफळ सुमारे १६०० चौ. मैल असून त्यातला $\frac{3}{5}$ भाग घनदाट अरण्याने व्यापलेला आहे. याच्या पश्चिम व दक्षिण सीमेवर पश्चिमघाटातील ब्रह्मगिरी, पुष्पगिरी, इ. उंच शिखरे आहेत. याचा उत्तर भाग म्हणजे मरकारा होय. हे ३–४ हजार फूट उंचीने उतरते पठार आहे. ब्रह्मगिरी पर्वतात उगम पावणारी कावेरी नदी कूर्गच्या मध्यातून पूर्वेकडे वाहत जाते. हिला हेमावती, लक्ष्मणतीर्थ, कक्वबे, इ. सात, आठ नद्या मिळतात.

हा प्रदेश फार दुर्गम आणि लहान असला, तरी त्यात सांस्कृतिक एकता दिसत नाही. सीमेवरील भागात शेजारच्या प्रदेशातील संस्कृतीचा प्रभाव बराच पडलेला दिसतो. मध्यभाग हे कूर्गसंस्कृतीचे केंद्र आहे.



पुरुषी वेषभूषा – कूर्ग

दाट वसतीची गावे कूर्गमध्ये आढळत नाहीत. प्रत्येक कुटुंब आपल्या पिढीजात क्षेत्रात स्वतंत्रपणे वसलेले असते. प्रत्येक कुटुंब स्वयंपूर्ण असते. सर्व घरे विखुरलेली असतात. पण गावातील लोकांचे जीवन संघटित असते. लग्नसमारंभ, कापणी, शिकार, नृत्य, अंत्यविधी अशा अनेक प्रसंगी त्यांचे परस्पर सहकार्य दिसून येते. कूर्गमध्ये मरकारा व वीरराजपेठ ही दोनच शहरे आहेत. या प्रदेशातील मुख्य भाषा कन्नड असून, कोडगी ही बोली तिच्या खालोखाल आहे. लिंगायत राजांच्या वेळी कन्नड हीच राजभाषा होती व सध्या तीच शिक्षणाचे माध्यम आहे.

**राजकीय इतिहास–** इ. स. ९ व्या शतकापूर्वीचा कूर्गचा इतिहास अज्ञात असून, ९ व्या ते १७ व्या शतकापर्यंतची

माहितीही थोडीच उपलब्ध आहे. साधारणपणे त्या वेळच्या पूर्वेकडील राजसत्तांचे वर्चस्व या प्रदेशावर होते. चंगनाड हा कूर्गचा एक भाग आहे. तिथले चंगाळ्व राजे म्हैसूरमधील तलकाडच्या गंग राजांचे माडलिक होते ( इ. स. ९ व १० वे शतक). ११ व्या शतकात उ. कूर्गमध्ये कोंगाळ्व राजे राज्य करीत होते. हे दोन्ही वंश जैन होते. तमिळनाडमधील चोळांनी ११ व्या शतकाच्या प्रारंभी गंगांचा पराभव केला. तेव्हा हे दोन्ही राजवंश चोळांचे माडलिक झाले. १२ व्या शतकात होयसळांनी चोळांचा पराभव करून म्हैसूर राज्य जिंकले आणि चंगाळ्वांचा पराभव करून कूर्गवरही आपली सत्ता स्थापली. त्या वेळी कर्नाटकात लिंगायत पंथाचा उदय झाला होता. तो पंथ चंगाळ्वांनी स्वीकारला. १४ व्या शतकात विजयनगरचे राज्य प्रस्थापित झाले, तेव्हा कूर्ग प्रदेश त्यांच्या सत्तेखाली गेला. १६ व्या शतकात विजयनगरची सत्ता दुर्बळ झाल्यामुळे कूर्गमध्ये चंगाळ्व राजे स्वतंत्र झाले. त्या शतकाच्या आरंभी नंजराज याने नंजराजपट्टण ही नवी राजधानी स्थापली. इ. स. १५८९ साली पिरियराज याने स्वतःच्या नावाची राजधानी शिरपट्टण येथे स्थापली. त्या वेळी कूर्गमध्ये अनेक राजे आपापसात लढत होते. १६४४ मध्ये म्हैसूरच्या राजाने पिरियपट्टण काबीज करून चंगाळ्व वंशाचा शेवट केला.



नवरा मुलगा – कूर्ग

इ. स. १६४६ साली बेदनूर किंवा इक्केरी येथील नायक वंशातील एक पुरुष जंगम (लिंगायत पुरोहित) म्हणून कूर्गमध्ये स्थायिक झाला आणि त्याने हळूहळू सर्व प्रदेशावर आपले वर्चस्व स्थापले. त्याचा नातू मुद्दुराज (इ.स. १६३३-८६) याने इ.स. १६८१ साली मरकारा (मदिकेरी) येथे राजधानी स्थापली. त्याचा पुत्र दोड्ड वीरप्प (वीरराज द्वितीय) याने आपल्या ५० वर्षांच्या राजवटीत राज्यव्यवस्था व राज्याचे रक्षणही चांगल्या प्रकारे केले. या लिंगायत घराण्याचे राज्य १८ व्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत चालू होते. इ. स. १७८० मध्ये हैदरअलीने तो प्रदेश ताब्यात घेतला. इ. स. १७८२ साली कूर्गच्या लोकांनी हैदरची सत्ता झुगारून दिली होती; पण १७८५ मध्ये टिपू सुलतानाने त्यांचे बंड मोडून काढले व हजारो लोकांना बाटवले. इ. स. १७८८ मध्ये वीरराज (४ था) हा टिपूच्या कैदेतून सुटून गेला व त्याने कूर्गमध्ये पुन्हा राज्य स्थापले. ते इ. स. १८३४ पर्यंत कसेबसे टिकले. नंतर ते ब्रिटिशांनी खालसा केले.

कूर्ग लोक स्वतःला क्षत्रिय मानतात. त्यांच्या अंगी अनेक गुण दिसून येतात. लिंगायत राजाच्या काळी राज्यकारभार व सेनादल यांतील उच्चपदे यानाच मिळत. कावेरीपुराणात कूर्ग लोकांना उग्र म्हटले आहे.

द. कूर्गमध्ये अम्म कूर्ग नावाची एक उपजात आहे. त्याचे आचार ब्राह्मणासारखे आहेत. त्यांची उत्पत्ती कूर्ग पुरुष व वायनाडमधील एक ब्राह्मणकन्या यांच्यापासून झाली, असे म्हणतात.

पूर्वेकडील कूर्ग लोकांचे सण्ण (लहान) व मल्ल (थोर) असे दोन पोटविभाग होते. सण्ण कूर्ग स्वतःला मल्लांपेक्षा उच्च मानीत. हा वर्ग श्रीमंत व उच्चाधिकारसंपन्न होता. याशिवाय बोड्डू कूर्ग नावाचा तिसरा वर्ग होता. इतर जमातींच्या संपर्कात राहणारे असे ते लोक होते. या तीन वर्गांचे परस्पर वैवाहिक संबंध क्वचितच होत. मात्र इतर प्रांतांतील उच्च जातींच्या लोकांना आपल्यात सामावून घेण्यास ते तयार असत.



कूर्गी स्त्री

कूर्गमधील सर्व देवालयांचे पुजारी ब्राह्मण असतात. प्रत्येक गावातील पुजारी ब्राह्मणाला गावचे

लोक कापणीच्या वेळी ठराविक भात घालतात. श्राद्ध, लग्न, इ. धार्मिक प्रसंगीही ब्राह्मणच पौरोहित्य करतात. कापणीच्या समारंभात ते सर्वांना मंत्रोदक देतात. एका काळी तंत्रमार्गी ब्राह्मणाची कूर्गांना फार भीती वाटे, कारण मनुष्यांची दृष्टी अथवा प्राण नष्ट करण्याची शक्ती त्यांच्या अंगी आहे, अशी यांची समजूत होती.

कणिय म्हणजे ज्योतिषी. हे लोक फार पूर्वी मलबारमधून कूर्गमध्ये आले. नांगरणी, पेरणी, कापणी, विवाह, इ. कार्यांसाठी शुभमुहूर्त पाहण्याचे काम यांच्याकडे असते प्रश्नज्योतिषही हेच पाहतात. यांच्या मदतीला बण्ण व पणिक जातीचे लोक असतात. कणियाने सांगितल्याप्रमाणे सर्व विधी करणे, ग्रामदेवतेच्या उत्सवात कौल लावणे, बळी कापणे, नृत्य करणे, इ. कामे ते करतात. ब्राह्मणांप्रमाणेच या सर्वांना कापणीच्या वेळी धान्य मिळते.

कूर्गसमाजात पितृप्रधान कुटुंबपद्धती प्रचलित आहे. त्यांच्या कुटुंबाला ओक्क म्हणतात. त्यात स्त्रियांना कसलाही अधिकार नसतो. यांची कुटुंबव्यवस्था नायरांच्या तरवाडाप्रमाणेच असते. ओक्क हा कूर्ग समाजाचा मूळ घटक होय. ग्रामप्रमुख, नाडप्रमुख, इ. अधिकारपदे काही घराण्यांकडे परंपरागत होती. ग्रामदेवतेचा उत्सव, रस्ते व पूल बांधणे, विवाहसमारंभ, इ. सामाजिक कार्यांसाठी प्रत्येक कुटुंबाचा प्रतिनिधी पाठवावा लागे.

**संस्कार** – कूर्ग लोक संस्कारांना मंगल म्हणतात. मुलगा वयात आल्यावर त्याचे कान टोचून कडी घालण्याचा समारंभ करतात. त्याला केम्मिकुट्टिमंगल म्हणतात. मुलगी ऋतुमती झाली, की पोलेकंडमंगल करतात. एखाद्या मनुष्याने वाघाची शिकार केली, तर नरिमंगल हा समारंभ करतात. कन्निमंगल म्हणजे विवाह होय. यात मूर्त हा विधी फार महत्त्वाचा असतो. घरातील सर्व नातेवाइकांनी वराला एका झारीतून दूध पाजणे आणि वरावर व लामण दिव्यावर अक्षता टाकणे, या विधीला मूर्त म्हणतात. वधूचाही मूर्त करतात. विवाहाचा दुसरा महत्त्वाचा भाग म्हणजे सम्मन्द होय. त्यात जबाबदार व्यक्ती आपल्या जबाबदाऱ्या व वधूला मिळणारे हक्क यांचा उच्चार करतात.

कूर्ग लोकात विवाहसंबंध स्थिर असतात. मात्र योग्य कारणांसाठी घटस्फोट मिळू शकतो. विधवांना पुनर्विवाह करता येतो. तिने शक्यतो धाकट्या दिराशी लग्न करावे, असा संकेत आहे. पत्नी मृत झाल्यास तिच्या लहान बहिणीशी लग्न करता येते.

**मर्तिकप्रथा** – प्रेत जाळणे किंवा पुरणे या दोन्ही प्रथा आहेत. मृताला जाळायचे असेल तर त्याला शुभ्र अंगरखा आतली बाजू वर करून घालतात. पुरायचे असेल, तेव्हा आंगरख्याची डावी बाजू उजवीकडे करतात. प्रेत स्मशानात नेताना हळद लावलेले तांदूळ रस्त्यावर टाकीत जातात. तिथे गेल्यानंतर कोड कुक्कुव नावाचा विधी करतात. मृत व्यक्तीचा संबंध तोडणे, हा त्याचा उद्देश असतो. मृताची पत्नी (किंवा पती) ज्येष्ठ पुत्र व भाचा या तीन व्यक्ती पाण्याने भरलेले मडके, नारळ व काशाची झारी घेऊन प्रेताला प्रदक्षिणा घालतात. मग वंदन करून, त्याच्यावर पाणी शिंपडून, जवळचे पात्र आपटून फोडतात. मृतात्म्याला अन्न अर्पण करणे फार अगत्याचे मानतात. ११ दिवस सुतक पाळतात. मृत्यूनंतर लगेच किंवा ६ महिन्यांनी क्षेत्राच्या ठिकाणी जाऊन पिंडदान करतात.

**दैवते** – कूर्ग लोकांत पितरांच्या पूजेला फार महत्त्व आहे. प्रत्येक घराच्या आवारात पितरांचे एक स्मारक असते. पूर्वी झाडाखाली एका ओटयावर साधे दगड ठेवीत; त्यांना कारणवतरे म्हणत. आता लहानसे घरकुल बांधून त्यात पितरांच्या बाहुल्या मांडतात. उत्सवप्रसंगी तिथे दिवा लावून अन्न ठेवतात.

नागपूजाही या लोकात प्रचलित आहे. झाडाखाली ओटयावर नागाचे प्रतीक म्हणून दगड मांडतात. ती जागा फार पवित्र मानतात. ऋतुमती स्त्री त्या जागेच्या जवळ गेली, तर संकट येते, अशी समजूत आहे.

पुष्कळदा दोनतीन गावे मिळून एक ग्रामदेवता असते. भगवती व अप्पय्य या ग्रामदेवता विशेष प्रसिद्ध असून, त्यांची व महादेव आणि चामुंडी याचीही उत्सवात पूजा केली जाते. काही लोक भद्रकाली, केत्रप्प (क्षेत्रपाल) यांनाही भजतात. मदेरप्प नामक देवता गावात आली, की फुले, मुले, बीजे यांचा नाश होतो, अशी समजूत आहे. ग्रामदेवतांचा उत्सव अनेक दिवस चालतो. त्या वेळी ग्रामस्थ लोक व्रतस्थ राहतात. उत्सवात नृत्यगायनादी कार्यक्रम होतात. शिवाय पूजा, कौल लावणे, अंगात येणे, नवस फेडणे, हे प्रकारही असतात. ग्रामदेवतांच्या उत्सवाप्रमाणेच कापणीचे उत्सव व शस्त्रोत्सवही केले जातात. प्रत्येक उत्सवानंतर सामुदायिक नृत्य व शिकार करतात. [ रि. सो. कू.; म. ज्ञा. को. ]

**कूर्च** (१) मूर्तीच्या अंगावरचा मळ दूर करण्यासाठी केशादी वस्तूंची केलेली कुंचली. कुंचलीने मूर्तीच्या अंगावरचा मळ दूर करणे, हा पूजेतला एक उपचार असल्याचे नरसिंहपुराणात सांगितले आहे (श. क.).

(२) एकत्र बांधलेले मूठभर दर्भ. श्राद्धात पितरांना उदक देण्यासाठी कूर्चाचा उपयोग करतात.

**कूर्चक संप्रदाय** जैनातला एक प्राचीन संप्रदाय. दर्भमुष्टी, मोरपिसाचा कुंचा व दाढीमिशा असे कूर्चक शब्दाचे अर्थ आहेत. प्राचीन काळी जटाधारी, शिखाधारी, कूर्चक इ. अनेक प्रकारचे जैनेतर साधू असत. त्यावरून वाटते, की जैनांतही दाढीमिशा (कूर्चक) राखणारा एखादा साधुसंप्रदाय असावा. कदंब राजांच्या दोन दानपत्रांत कूर्चक सम्प्रदायाचा उल्लेख आहे. त्यापैकी एकात पलाशिका नावाच्या नगरात निर्ग्रंथ व कूर्चक याना भूमिदान केल्याचा उल्लेख आहे. [ जै. सा. इ. ]

**कूर्चव्रत** एक काम्यव्रत. फाल्गुन शु. १४ शी च्या दिवशी उपवास, पूर्णिमेस पंचगव्यप्राशन आणि कृ. १ देस हविष्यान्नभोजन असा याचा विधी आहे. व्रताचे फल — त्या मासातल्या पापाचे निराकरण व इंद्राची प्रसन्नता. [ व्र. प.]

**कूर्पासक** एक वस्त्र. अमरकोशावरून स्त्रियांच्या काचोळीला कूर्पासक म्हणत असल्याचे कळते. पण कूर्पासक म्हणजे कमरेपर्यंत येणारा व बिनबाह्याचा असा एक वस्त्रप्रकार पुरुषही वापरीत असल्याचे प्राचीन भारतीय वेशभूषा या ग्रंथात सांगितले आहे. अजंटा येथील भित्तिचित्रांत शिपाई अशा प्रकारचे वस्त्र वापरताना दिसतात.

**कूर्म** दशावतारांपैकी दुसरा अवतार. हा कासवाच्या रूपाचा अवतार आहे. दुष्ट दैत्यांचा वध आणि भूभारहरण हे सामान्यतः अवताराचे प्रयोजन असते. पण कूर्मावतारात तसे काही घडलेले नाही. पुराणांनी या अवताराचा संबंध देव-दैत्यानी केलेल्या समुद्रमथनाच्या कथेशी जोडून दिलेला आहे.

वैदिक साहित्यात मात्र कूर्म व समुद्रमथन याचा संबंध दिसत नाही. कूर्मावताराची सूचना ब्राह्मण ग्रंथांत आढळते. तिथे प्रजापतीने कूर्मरूप धारण केल्याचे सांगितले आहे. तैत्तिरीय आरण्यकात कूर्मावताराची कथा पुढीलप्रमाणे दिली आहे —

प्रजापतीचा शरीररस कूर्मरूपाने जलात फिरत होता. तोच 'सहस्रशीर्षा पुरुषः' या स्वरूपात प्रजापतीपुढे प्रकट झाला. तेव्हा प्रजापतीने त्याला विश्व निर्माण करण्यास सांगितले. मग त्या कूर्माने प्रत्येक दिशेस जल फेकून आदित्यादी सृष्टी निर्माण केली ( १. २३. १-९).

शतपथ ब्राह्मणातही प्रजापतीने कूर्मरूप धारण केल्याचे सांगितले आहे —

**स यत्कूर्मो नाम । एतद्वै रूपं कृत्वा प्रजापतिः प्रजाअसृजत ।**
**यदसृजताकरोत्तद्यदकरोत्तस्मात् कूर्मः ।** (७.५.१.५.)

अर्थ — ते जे कूर्म नावाचे रूप, ते धारण करून प्रजापतीने प्रजांची सृष्टी केली. हे त्याचे कर्म झाले. कर्मावरूनच त्याला कूर्म असे नाव मिळाले.

पुढे त्याच ठिकाणी कूर्माला कश्यप म्हटले आहे. कश्यप हा प्रजापती म्हणजे प्रजाकारक होता. सकल सृष्टी ही काश्यपी (कश्यपनिर्मित) असल्यामुळे कश्यप हाच कूर्म मानला गेला. यावरून कूर्मरूपातली कृत्ये ही मूलतः प्रजापतीची आहेत, हे कळून येते. ब्राह्मणोत्तर काळात प्रजापतीला मागे टाकून विष्णू पुढे आला व प्रजापतीची सर्व कृत्ये विष्णूच्या नावावर जाऊन, कूर्मावतार हा विष्णूचा अवतार ठरला.

भागवत पुराणाने समुद्रमंथनाच्या कथेशी कूर्मावताराचा संबंध जोडून, त्याचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे —

**सुरासुरेन्द्रैर्भुजवीर्यवेपितं ।**
**परिभ्रमन्त गिरिमङ्गपृष्ठतः ।।**
**बिभ्रत्तदावर्तनमादिकच्छपो ।**
**मेनेऽङ्गकण्डूयनमप्रमेयः ।।**

(८. ७. १०)

अर्थ— देवदैत्यांच्या भुजवीर्याने कंपित झालेल्या व गरगर फिरणाऱ्या (मंदर) पर्वताला पाठीवर धारण करणारा, अप्रमेय आदिकच्छप (कूर्मावतार) मंदर पर्वताचे पृष्ठभागावर होणारे आवर्तन म्हणजे जणू अंग खाजविणे, असे मानता झाला.

जयदेवाने कूर्म हा कृष्णाचा अवतार मानून त्याचे एका अष्टपदीत पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे—

**क्षितिरतिविपुलतरे तव तिष्ठति पृष्ठे ।**
**धरणिधरणकिणचक्रगरिष्ठे ।।**
**केशव धृतकच्छपरूप जय जगदीश हरे ।**

(१. १. २)

अर्थ — हे जगदीश हरे, तुझ्या विस्तृत पृष्ठभागावर पृथ्वी उभी आहे. या पृथ्वीच्या धारणामुळे तुझ्या पाठीवर चक्राप्रमाणे घट्टा पडला आहे. हे कच्छपरूप धारण करणाऱ्या केशवा, तुझा जयजयकार असो.

वाल्मीकिरामायणात म्हटले आहे, की क्षीरसागराच्या मंथनाच्या वेळी मंदरगिरी पाताळात गेला असता, भगवंताने कूर्मरूप धारण करून त्या पर्वताला वर उचलले व नंतर तो त्या क्षीरसागरातच शयन करून राहिला (१. ४५. २९). ही घटना चाक्षुष मन्वंतरात घडली, असे भागवतात सांगितले आहे (८. ५. ७–१०).

कूर्मावताराचा एखादा संप्रदाय आढळत नाही. मात्र कूर्मपूजा संताळ, मुंड, इ. काही आदिवासीत प्रचलित आहे. परवर्ती कबीर संप्रदायातही कूर्मजीची पूजा प्रचलित असलेली आढळते.

या संप्रदायात अशा एका कूर्माचा उल्लेख आढळतो, की ज्याच्या पोटातल्या पदार्थाच्या योगाने, निरजन परमात्म्याने सृष्टीची रचना केली.

नृसिह आणि वराह यांच्या मूर्ती भारतात विपुल आढतात; पण स्वतंत्ररूपाने कूर्मावताराच्या मूर्ती मात्र विशेष आढळत नाहीत. दशावतारपट्टांत फक्त त्याची कासव आणि मानव अशा रूपात चतुर्भुज मूर्ती दिसते. [भा. सं.; म. सा. अ]

**कूर्मचक्र** रुद्रयामलतत्रात सांगितलेले कासवाच्या आकाराचे चक्र. यात कासवाची समग्र आकृती काढून त्यात पुढील अवयवांच्या ठिकाणी पुढील वर्ण लिहितात-- मुखावर स्वर, उजव्या पायावर 'क' वर्ग, डाव्या पायावर 'च' वर्ग, मागच्या उजव्या पायावर 'ट' वर्ग, डाव्या पायावर 'त' वर्ग, पोटावर 'प' वर्ग, हृदयावर 'य' ते 'व,' पाठीच्या मध्यावर 'श' ते 'ह,' शेपटीवर 'ळ' व लिगमध्यावर 'क्ष.'

मंत्रजपाच्या वेळी हे कूर्मचक्र आसनाखाली घेतात याशिवाय कृषिकर्मासाठी व यज्ञकर्मासाठीही वेगवेगळ्या प्रकारची कूर्मचक्रे निर्माण करतात.

**कूर्मदास** (इ. स. १३ व्या शतकाची अखेर) पैठण येथील एक कवी. हा थोटा व पागळा होता तशाही स्थितीत याला वाटले, की आपण पंढरीस जावे. कार्तिकी एकादशीच्या वारीचा उद्देश धरून तो पैठणहून खुरडत खुरडत निघाला व १० मीस लऊळ येथे पोचला. तिथून पढरपूर ९ कोस होते. कूर्मदासाला वाटले, की आपण काही एकादशीला पढरीस पोचत नाही; म्हणून त्याने देवाला निरोप धाडला, की तूच इथे येऊन मला दर्शन दे. त्याप्रमाणे विठ्ठलाने तिथे येऊन त्याची इच्छा पूर्ण केली. लऊळ येथेच हा कवी मरण पावला. याची काही स्फुट कविता उपलब्ध आहे. [म. ज्ञा. को.]

**कूर्मद्वादशी** पौष शु. १२ शी चे नाव. या तिथीस नारायणाप्रीत्यर्थ घृताचा कलश कासवाच्या व मंदार पर्वताच्या मूर्तीसह दान द्यावा, असे सांगितले आहे. [हे. व्र.]

**कूर्मपुराण** अठरा पुराणांपैकी पंधरावे पुराण. समुद्रमंथनाच्या वेळी ज्या ऋषींनी विष्णूची स्तुती केली, त्यांना विष्णूने आपल्या कूर्मावतारात हे पुराण प्रथम सांगितले, म्हणून याला कूर्मपुराण असे नाव मिळाले. हे पुराण पंचलक्षणयुक्त आहे. शिवाय विष्णूच्या अवताराच्या अनेक कथा यात आलेल्या आहेत. मधून मधून हिमवान पर्वत, पार्वती, देवीसहस्रनाम, दक्षाला शिवाने दिलेला शाप, सतीची कथा, वीरभद्राची उत्पत्ती, शंकरमाहात्म्य, शिवलिंगोत्पत्ती, शकराचे अठ्ठावीस अवतार, इ. शैव विषयही यात आलेले आहेत. यदुवंश, कलिदोष, वाराणसीमाहात्म्य, प्रयागमहात्म्य, गंगायमुनासंगममाहात्म्य, यमुनामाहात्म्य, नक्षत्र, तारका, सूर्य, चंद्र याचे भ्रमण व मार्ग, भुवनकोश, सप्तद्वीपे, मन्वंतरे, विष्णुमाहात्म्य, इ. अन्य विषयही यात विवेचले आहेत. या पुराणाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत.

पुराणाचे नाव व आरंभ यांवरून हे पुराण वैष्णवपुराण असावे, असे वाटते पण यातील विषय पाहता हे शैवपुराण असून, शिव व दुर्गा याचे माहात्म्य व त्यांची भक्ती हेच या पुराणाचे मुख्य उद्दिष्ट दिसते. शिवाच्या शक्तीना स्त्रीदैवते कल्पून त्याचे पूजाविधी यात सांगितले आहेत. या पुराणात पाखंडमते दिली असून त्यापैकी वाममार्गीयांची म्हणजे स्त्रीतत्त्वांच्या व स्त्रीदैवताच्या पूजकाची माहिती यात दिली आहे. या पथाचा धार्मिक ग्रंथ जो यामलतंत्र, त्याचेही वर्णन यात आले आहे. उत्तरार्धाच्या प्रारभी भगवद्गीतेच्या धर्तीवर ईश्वरगीता सागितली असून, ध्यानयोगाने शिवाचे ज्ञान कसे होते, ते विशदपणे सांगितले आहे. यानतर आलेल्या व्यासगीतेत संस्कार व पवित्राचरण याच्या योगाने सर्वश्रेष्ठ ज्ञान उत्पन्न होते, असे सांगून गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यासी यांचा आचारधर्म विवेचिला आहे. यापुढे पापांच्या प्रायश्चित्ताबद्दल विचार आहे. याच संदर्भात अनेक प्रायश्चित्ते सागितली असून, पुढे पातिव्रत्यधर्माची महती वर्णिताना सीतेची कथा दिली आहे.

विष्णुपुराणानुसार हे पुराण १७००० व मत्स्यपुराणानुसार १८००० श्लोकांचे असायला हवे; पण उपलब्ध पोथीत सुमारे ६००० श्लोक आहेत. नारदसूचीप्रमाणे पाहता या पुराणाच्या ब्राह्मी, भागवती, सौरी व वैष्णवी अशा चार संहिता असायला हव्या. पण तशा त्या उपलब्ध नाहीत. उपलब्ध पोथी केवळ ब्राह्मी संहिता असून, इतर तीन सहिता लुप्त झाल्या, असे अनुमान करावे लागते.

या पुराणात तंत्रमार्गाचे व तांत्रिक विधीचे वर्णन आहे. त्यावरून हे पुराण फार प्राचीन नसावे, असे एक मत आहे पण सनपूर्व २ ऱ्या शतकात होऊन गेलेल्या नागार्जुनाने आपल्या कक्षपुटीतही अनेक तत्रांचा उल्लेख केलेला असल्यामुळे, केवळ तंत्राचा उल्लेख आहे, एवढ्यावरून या पुराणाचे प्राचीनत्व बाधित होते, असे म्हणवत नाही. इ. स. चे २ रे शतक हा या पुराणाचा काळ होय, असे हरप्रसादशास्त्री मानतात. पुराण निरीक्षणकार काळे यांच्या मताने हे पुराण इ. स. ५०० पेक्षा प्राचीन आहे.

सुवर्णाच्या कूर्ममूर्तीसह या पुराणाचे दान दिल्याम एक हजार गायी दान दिल्याचे पुण्य लागते, असे मत्स्यपुराण सांगते (५३. ४७.४९).

तेन्‌काशीचा राजा अतिवीरराम पांड्य ( इ. स. १५६४ ते १५९६ ) याने संस्कृत कूर्मपुराणाचे तमिळ भाषांतर केले आहे. मात्र या तमिळ कूर्मपुराणात शिवमाहात्म्य हा भाग अधिक असून त्यात त्रिपुरदहन, जालंधरासुरवध, उपमन्यूची कथा, सुदेवाची कथा, इ. कथाभाग आहेत. यात एकूण ३७१७ श्लोक आहेत. [ वा. मो. कानिटकर; पु. इं.; पुराणम्, जुलै १९६० ]

## कूर्ममूर्ती

दशावतारपट्टात कूर्मावतार कासवाच्या आकाराचा काढलेला आढळतो, पण ग्वाल्हेरच्या किल्ल्यात कूर्मावताराचे एक सांगसपरिवार असे शिल्प आहे. खाली नागफणा, त्यावर कासव, त्याच्या पाठीवर मेरूची रवी, तिला वासुकी सर्पाची दोरी, रवीच्या माथल्याला टेकून बसलेला विष्णू आणि उभय बाजूंना देव-दैत्य उभे राहून त्यांनी चालविलेले समुद्रमंथन, असे त्या शिल्पाचे स्वरूप आहे. [ मू. वि. ]

## कूर्मवीणा

दक्षिणेतील एक ततुवाद्य. याचा आकार कासवासारखा असतो. काही ठिकाणी हे धनुष्याकृतीही आढळते. पालकुर्की सोमनाथ या कवीने या वाद्याचा उल्लेख केला आहे. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

## कूर्मशिला

(१) देवालयाच्या सभामंडपात कासवाच्या आकाराची एक शिला बसवितात, तिला कूर्मशिला म्हणतात. हा कूर्म कसा बनवावा, ते बृहत्संहितेत पुढीलप्रमाणे सांगितले आहे—

**स्फटिकरजतवर्णो नीलराजीवचित्रः ।**
**कलशसदृशमूर्तिश्चारुवंशश्च कूर्मः ।**
**अरुणसमवपुर्वा सर्षपाकारचित्रः ।**
**सकलनृपमहत्त्वं मन्दिरस्थः करोति ।।**

( अ. ६४ )

अर्थ—स्फटिकाच्या किंवा रुप्याच्या वर्णाचा, नीलकमलाप्रमाणे चित्रविचित्र, कलशासारख्या देहाचा, सुंदर पाठीचा, अरुणासारख्या शरीराचा, मोहरीसारखे ठिपके असलेला असा कूर्म मंदिरामध्ये स्थापन केल्यास, तो त्या देशाच्या राजाला महत्त्व प्राप्त करून देतो.

कूर्माने आपल्या पाठीवर मंदराचल उभा ठेवला व त्याला खचू दिले नाही, या कथेवरून, आपण उभारलेले मंदिर खचू नये, कूर्माने ते उभे, अभंग ठेवावे, या उद्देशाने प्राचीन वास्तुशास्त्रज्ञ मंदिराच्या सभामंडपात कूर्मशिला बसवू लागले असावे.

(२) मूर्तीच्या आधारासाठी तिच्या पायाखाली जो दगड असतो, त्यालाही कूर्मशिला म्हणतात ( पु. इं. )

(३) अग्निचयनामध्ये विटा माडण्यास सुरवात करण्यापूर्वी मध्यभागी एक जिवंत कासव ठेवण्यास सांगितले आहे ( तै. सं. ५.२.८ ). ते जिवंत राहण्यासाठी त्याच्या अंगाभोवती अवका नावाच्या गवताचे जाळे घालतात.

## कूर्माचल

पूर्व रेल्वेच्या हावडा-वाल्टेअर लोहमार्गावर श्रीकाकुलम् रोड स्टेशन आहे. तिथून सतरा मैलांवर हे क्षेत्र आहे. याला श्रीकूर्मम असेही म्हणतात. इथे पर्वत नाही; पण इथले कूर्ममंदिर मात्र फार प्राचीन आहे. यात कूर्मावताराची कासवाच्या रूपातली पाषाणमूर्ती आहे. त्याच्या



कूर्ममंदिर – श्रीकूर्मम्

जवळच गोविंदराजाची मूर्ती आहे. त्याच्या उभय अंगी श्रीदेवी व भूदेवी या दोन देवता उभ्या आहेत.

श्रीकूर्मम्‌च्या वाटेवरच आरसविल्ली नावाचे एक गाव असून, तिथे सूर्याचे एक विशाल मंदिर आहे. या मंदिरातली सूर्यमूर्ती सुरेख असून तिची तिथे नियमित पूजा अर्चा होत असते. [ कल्याण-तीर्थांक ]

## कूर्मासन

एक यौगिक आसन. यापासून अपान व वीर्य यांची उर्ध्वगती होऊन इंद्रियवृत्तीचे स्तंभन व बलवृद्धीही होते. याची क्रिया अशी—

**गुल्फौ च वृषणस्याधो व्युत्क्रमेण समाहितौ ।**
**ऋजुकायशिरोग्रीवं कूर्मासनमितीरितम् ।।**

अथ—प्रथम खुरमांडी घालून बसावे. घोटयांची आतील बाजू

भूमीस लागेल अशा प्रकारे दोन्ही टाचा एकमेकीस टेकवाव्या. त्या वृषणाच्या खाली लागतील असे करावे. मान व मस्तक



कूर्मासन

ताठ ठेवावी. नंतर गुडघे एकमेकांपासून लांब करून, त्यांच्यामध्ये छाती भूमीस टेकवावी, मान वर करून, दोन्ही कोपरे गुडघ्यांस लावावी आणि दोन्ही तळहातांचे पृष्ठभाग काखेत लावावे म्हणजे कूर्मासन होते. [ यो. सो. ]

**कूलधामय** एक प्राचीन जैन पंथ. नदीच्या तीरावर भोजन करीत असताना इतर लोकांनी जवळ येऊ नये, म्हणून हे शंख फुंकीत. [ स्कू. से. जै. लि. ]

**कूष्मांड** ( १ ) कोहळ्याचे संस्कृत नाव व्रतकौमुदीत याच्या वेलाची पूजा व पद्मपुराणात याच्या व्रताचे विधान सागितले आहे. दुर्गादेवीच्या विधानात कूष्मांड होम करतात. कोहळा हा मनुष्याच्या मस्तकाचा प्रतिनिधी मानलेला आहे. महाराष्ट्रात स्त्रिया कोहळा कापीत नाहीत. अथवा तो कापण्यापूर्वी त्याच्यावर पुरुषाकडून शस्त्राचा घाव करून घेतात. कोहळा पोखरून त्यात सुवर्ण, रत्नादी द्रव्य भरणे आणि त्याचे गुप्त दान करणे, ही कल्पना लोकविश्रुत आहे.

( २ ) शिवगणाचा एक वर्ग. हे शिवगण विविध रूपे घेऊन ऋषिमुनींचा समाधिभंग करतात ( विष्णू पु. १.१२.१३ ).

( ३ ) एक अतिमानवी योनी. याना कुमांड असेही म्हणतात. कथासरित्सागरात यांचा उल्लेख आहे. पाहा– कुंभांड.

( ४ ) एक पिशाचगण. हे पिशाच लहान मुलाना पीडा देतात ( भाग. पु. ६.८.२४ ). यानी ध्रुवाच्या समाधीत व्यत्यय आणला होता ( विष्णू पु. १.१२.१३ ).

( ५ ) यजुर्वेदातील एक सूक्त. तडागोत्सर्ग या विधीत याचे पठण करायचे असते. [ पु. इं. ]

**कूष्मांड दशमी** आश्विन शु. १० मीचे नाव. हिच्या व्रताचा विधी पुढीलप्रमाणे– शिव, दशरथ व लक्ष्मी यांची कोहळीच्या फुलांनी पूजा व चंद्राला अर्घ्य. व्रतावधी १० मी पासून त्याच महिन्याच्या व. ४ थीपर्यंत. [ हि. ध. ]

**कूष्मांड नवमी** कार्तिक शु. ९ मीस हे नाव आहे. या दिवशी कोहळा दान देण्याचे व्रत करतात. त्याचा विधी असा— कोहळा गाईच्या तुपात बुडवितात. त्याची पूजा करतात. मग तो पंचरत्ने, फळे, अन्न, दक्षिणा याच्यासह पुढील मंत्राने ब्राह्मणाला दान देतात—

**कूष्माण्डं बहुबीजाढ्यं ब्रह्मणा निर्मितं पुरा ।**
**दास्यामि विष्णवे तुभ्यं पितृणां तारणाय च ।।**

अर्थ– प्राचीन काळी ब्रह्मदेवाने निर्मिलेला, अनेक बीजानी युक्त असा कोहळा, हे विष्णो, मी पितरांच्या उद्धारासाठी तुला दान देत आहे.

या व्रताची कथा अशी—

द्वापरयुगात कूष्मांड नावाचा एक दैत्य होता. विष्णूने त्याचा वध केला. त्यासरशी त्याच्या रोमरंध्रातून वेली उत्पन्न होऊन त्यांना फळे धरली. ती फळे म्हणजेच कोहळे होत. ते भगवंताला प्रिय झाले. [ व्रतराज ]

**कूष्मांडफलदान** सकल मनोरथ पूर्ण होण्यासाठी कूष्मांडफलाचे म्हणजे कोहळ्याचे दान करावे, असे सागितले आहे. एका किंवा आठ फळांचे दान देतात. त्या आधी ब्रह्मा व सावित्री यांचे कूष्मांडफलावर आवाहन करून त्याची पूजा करतात. दान देताना पुढील मंत्र म्हणतात–

**ब्रह्महत्यादिपापघ्नं ब्रह्मणा निर्मितं पुरा ।**
**कूष्माण्डं बहुबीजाढ्यं पुत्रपौत्रादिवृद्धिदम् ।।**

अर्थ– ब्रह्महत्यादी पाप नाहीसे करणारे, पुरातन काली ब्रह्मदेवाने निर्मिलेले, अनेक बियांनी भरलेले व पुत्रपौत्रादींची समृद्धी करणारे असे हे कूष्मांडफल आहे. ( याचे मी दान करतो ).

मग ब्राह्मणाची पूजा करून तिल, मोती, प्रवाळ, विडा, वस्त्र, दिवा इत्यादींसह कूष्मांडाचे दान देतात. रथसप्तमीला हे दान द्यावे, असे भविष्यपुराणात सागितले आहे. [ऋ. ब्र. क.]

**कूष्मांडव्रत** एक व्रत. कार्तिकी पौर्णिमेला कूष्मांडवल्लीची लक्ष्मीनारायण म्हणून पूजा करणे, हा या व्रताचा मुख्य विधी आहे.

मृगशीर्ष नक्षत्रातून सूर्याचे भ्रमण चालू असता, एका शुभ दिनी कूष्मांडाची (कोहळ्याची) बी रुजत घालतात व फल-

धारणा होईपर्यंत वेलीची चांगली जोपासना करतात. नंतर कार्तिकी पौर्णिमेला यथाविधी व्रतसंकल्प करून, कूष्माड-वल्लीच्या ठिकाणी लक्ष्मीनारायणाची कल्पना करून, तिची षोडशोपचार पूजा करतात.

**कूष्माण्डवल्लीं सुभगां सुफलां विश्वरूपिणीम् ।**
**लक्ष्मीरूपां सुविस्तारां ध्यायामि हरिवल्लभाम् ।।**

या मंत्राने मग तिचे ध्यान करतात. नंतर आचार्याला ती वल्ली दान देतात.

नंतर शुभ दिन पाहून व्रताचे उद्यापन करतात. कूष्माडाच्या वेलीची व लक्ष्मीनारायणाची सुवर्णप्रतिमा करून त्याची पूजा करतात. रात्री मंत्रजागर करतात. दुसऱ्या दिवशी सकाळी होम करून आचार्याला प्रतिमा व गाय दान देतात. सोळा ब्राह्मण-दंपतींना भोजन घालून दक्षिणा देतात.

सकल पापांचा नाश व अविच्छिन्न संतती, हे या व्रताचे फल आहे. [ व्रतराज ]

## कूष्मांड होम

'यद्देवादेवहेडनम्' इ. तैत्तिरीय मंत्रांनी करायचा एक होम. याचा विधी असा– क्षौर करून स्नान, संकल्पपूर्वक अग्निस्थापना, एकावन्न समिधा अग्नीवर देऊन, प्रत्येक मंत्राने एकेक आज्याहुती, नंतर पुढच्या अनुवाकाने अग्नीचे उपस्थान.

प्रत्येक कर्माच्या आरंभी हा होम करावा, असे तैत्तिरीय आरण्यकात सांगितले आहे (२.७). हा होम केल्यानंतर आत्म-शुद्धी होऊन यजमानास स्वर्ग मिळतो, असेही तिथे म्हटले आहे.

हा होम करताना दीक्षिताप्रमाणे आचरण ठेवावे, मांस, मैथुन व असत्य भाषण वर्ज्य करावे, पलंगावर निजू नये व दूध किंवा सातूची कांजी पिऊन राहावे, असे सांगितले आहे. या होमाने यजमानाच्या महापातकाचे क्षालन होते ( बौ. ध. सू. ३. ७. १ ). [ हि. ध. ]

## कूष्मांडीव्रत

एक काम्यव्रत. स्त्रिया व पुरुष या दोघांनाही हे व्रत विहित आहे. कूष्मांडाची म्हणजे कोहळ्याची वेल ही या व्रताची देवता आहे. कूष्मांडी हे दुर्गेचे एक नाव आहे. त्यामुळे अप्रत्यक्षपणे हे दुर्गापूजेचेच व्रत आहे. या व्रताचा विधी असा––

वैशाख शु. १४ शीला कूष्मांडाची वेल लावतात व पुढे सहा महिने मासपरत्वे सौभाग्यदा, सर्वकामप्रदा, पुत्रदा, धनदा, फलदा व मोक्षदा अशा नावांनी रोज तिची पूजा करतात.

कार्तिकी पौर्णिमेला व्रताचे उद्यापन करतात. त्या वेळी फलासहित कूष्मांडाची सुवर्णाची वेल व सावित्री आणि ब्रह्मा यांच्या सुवर्णप्रतिमा करून त्यांची पूजा करतात व पुढील मंत्राने प्रार्थना करतात—

**कूष्माण्डयै कामदायिन्यै ब्रह्माण्यै सुखहेतवे ।**
**नमोऽस्तु शिवरूपायै सफलं कुरु मे व्रतम् ।।**

रात्री नृत्य, गायन व कथाश्रवण करतात. दुसऱ्या दिवशी घृत व तिल या द्रव्यांनी हवन करतात, ब्राह्मणभोजन घाल-तात व आचार्याला प्रतिमा दान देतात.

पुत्रपौत्रांची व महापुण्याची प्राप्ती हे या व्रताचे फल आहे. [ व्रतराज; ऋ. ब्र. क. ]

## कृच्छ्र

एक प्रायश्चित्त. साम ब्राह्मणात या प्रायश्चित्ताचे वर्णन दिलेले आहे, ते असे––

पहिले तीन दिवस फक्त दुपारी हविष्यान्नाचे भोजन करावे. रात्री काही खाऊ नये. नंतर तीन दिवस फक्त रात्री जेवावे. पुढचे तीन दिवस अयाचित जे मिळेल ते खावे आणि त्या-नंतरच्या तीन दिवसात संपूर्ण उपवास करावा. दिवस उभा राहून व रात्र बसून घालवली असता पापक्षालन लवकर होते. या प्रायश्चित्ताला प्राजपत्य असेही नाव आहे (१. २. १–४).

याशिवाय सत्य बोलावे, अनार्य स्त्रीपुरुषांशी बोलू नये, रोज तीनदा स्नान करावे, मार्जन व तर्पण करावे, सूर्यपूजा करावी, घृताच्या आहुती द्याव्या, तेराव्या दिवशी सोम, अग्नी, इंद्र, विश्वेदेव, ब्रह्मा, प्रजापती व अग्नी स्विष्टकृत् यांना चरूच्या आहुती द्याव्या व ब्राह्मणभोजन घालावे, असे गौतम धर्मसूत्रात सांगितले आहे (२६. २–१६).

हेमाद्रीने कृच्छ्राला व्रत असे संबोधले आहे. इतर काही कृच्छ्रे पुढीलप्रमाणे आहेत ––

**पैतामह कृच्छ्र**– कार्तिक व. ७ मी पासून चार दिवस अनु-क्रमे पाणी, दूध, दही व तूप यावर निर्वाह करावा व एकादशीला विष्णूची पूजा करून उपवास करावा.

**वैष्णव कृच्छ्र**–तीन दिवस मुन्यन्नावर (नीवारासारखे धान्य) व तीन दिवस यावकांवर राहावे व तीन दिवस उपवास करावा. [ हि. ध. ]

## कृच्छ्रचतुर्थी

एक व्रत. व्रताचा विधी असा– माघ. शु. ४ थीला गणपतीची पूजा करून एकभुक्त राह-तात. याप्रमाणे प्रत्येक ४ थीला वर्षभर हे व्रत करतात. दुसऱ्या वर्षी मार्ग. शु. ४ थीला गणपतीची पूजा करून नक्त-भोजन करतात. असे वर्षभर प्रत्येक ४ थीला करतात. तिसऱ्या वर्षी मार्ग. शु. ४ थीला अयाचित भोजन करतात. असे वर्षभर प्रत्येक ४ थीला करतात. चौथ्या वर्षी त्या तिथीला

उपवास करून, पुढे वर्षभर प्रत्येक चतुर्थीलाही उपवास करतात. चार वर्षे पूर्ण झाल्यावर श्वेतकमलावर कलश स्थापून त्यावर गणेशाच्या सुवर्णप्रतिमेची पूजा करतात. सवत्स गाय दान देतात, होम करतात व चोव्वीस दंपतींना भोजन घालतात.

सर्व विघ्नांचे निवारण व धनप्राप्ती हे या व्रताचे फल आहे. [ व्र. प. ]

**कृच्छ्र संवत्सर** एक वर्षभर अखंड कृच्छ्रव्रत पाळणे, याला कृच्छ्र संवत्सर असे नाव आहे. [ हि. ध. ]

**कृच्छ्रातिकृच्छ्र** एक प्रायश्चित्त. हे प्रायश्चित्त कसे करावे, याविषयी पुढील मते आहेत—

(१) एका हातात जेवढे पाणी मावेल तेवढे दिवसातून एकदाच पिऊन, नऊ दिवस राहणे व नंतर तीन दिवस उपवास करणे (वसिष्ठ).

(२) बारा दिवस निराहार राहणे (सुमतु).

(३) एकवीस दिवस सकाळ, दुपार, संध्याकाळ शीतल जल पिऊन राहणे व संयमाने वागणे (प्रायश्चित्त विवेक).

ब्राह्मणाच्या अंगातून रक्त काढण्याचे पातक घडल्यास कृच्छ्रातिकृच्छ्र हे प्रायश्चित्त करावे असे मनू सांगतो (११.३०८).

या प्रायश्चित्तामुळे सर्व पातकांचे क्षालन होते. [ हि. ध.; श. क. ]

**कृच्छ्रार्ध** सहा दिवसात साध्य होणारे एक व्रत किंवा प्रायश्चित. याचे विधान असे—

**सायं प्रातस्तथैकैकं दिनद्वयमयाचितम् ।**
**दिनद्वयं च नाश्नीयात् कृच्छ्रार्धः सोऽभिधीयते ॥**

(प्रायश्चित्तविवेक)

अर्थ– एक दिवस सकाळी व एक दिवस सायंकाळी भोजन. दोन दिवस अयाचित भोजन व दोन दिवस उपवास मिळून कृच्छ्रार्ध होतो.

ज्याला कृच्छ्रव्रत करण्याची शक्ती नसेल, त्याच्यासाठी हे कृच्छ्रार्ध सांगितले आहे. [ श. क. ]

**कृत** एक जात. वैश्य पुरुष व ब्राह्मण स्त्री यांची ही संतती होय, असे गौतम सांगतो. याज्ञवल्क्यादी स्मृतिकार या जातीला वैदेहक या नावाने ओळखतात. [ हि. ध. ]

**कृतघ्न** अहंकारादिप्रयुक्त दुष्ट बुद्धीने एखाद्याचे स्वत.वर झालेले उपकार न मानणे याला कृतघ्नता म्हणतात. कृतघ्न कोणाला म्हणावे त्याची यादी प्रायश्चित्ततत्त्वात पुढीलप्रमाणे दिली आहे—

**भर्तृपिण्डापहर्ता च पितृपिण्डापहारकः ।**
**यस्माद् गृहीत्वा विद्यां च दक्षिणां न प्रयच्छति ॥**
**पुत्रान् स्त्रियश्च यो द्वेष्टि यश्च तान् घातयेन्नरः ।**
**कृतस्य दोषं वदति सकामान् न करोति यः ॥**
**न स्मरेच्च कृतं यस्तु आश्रमान् यस्तु दूषयेत् ।**
**सर्वास्तानृषिभिः सार्धं कृतघ्नानब्रवीन्मनुः ॥**

अर्थ– स्वामी व पितर याच्या पिंडांचा अपहार करणारा, विद्यादात्या गुरूला दक्षिणा न देणारा, पुत्र आणि स्त्रिया याचा द्वेष करणारा, त्यांचा घात करणारा, त्यांच्या कृत्यात दोष काढणारा, त्यांच्या इच्छा पूर्ण न करणारा, एखाद्याने केलेले उपकार न स्मरणारा, आश्रम व ऋषी यांना दोष देणारा, या सर्वांना मनूने कृतघ्न म्हटले आहे.

कृतघ्नता हे महापाप असून त्याला निष्कृती नाही. कृतघ्नाच्या हातचे अन्न खाऊ नये, असे मनू सांगतो (४. २१४).

**कृतमाल** मलय पर्वतात उगम पावणारी एक नदी (वायु पु. ४५.१०५; मत्स्य पु. ११४.१०). मनूने हिच्या काठी तप केले व मत्स्यावताराला साहाय्य केले, असे भागवत पुराणात म्हटले आहे. सांप्रत हिला वैगा असे नाव असून, हिच्या काठी मदुराई शहर आहे. [ हि. ध. ]

**कृतयुग** चार युगांपैकी पहिले युग. रवी, चंद्र आणि गुरू हे तीन ग्रह एका राशीत असतात, तेव्हा या युगाचा प्रारंभ होतो. या युगात विष्णूच्या अवताराची ध्यानाने पूजा करतात. धर्माच्या प्रकटीकरणासाठी विष्णूने या युगात वृषभाचे रूप घेतले. त्यामुळे या युगात धर्म चतुष्पाद असतो. सर्व लोक धर्माचे यथायोग्य पालन करीत असतात. कृतयुगात हंस ही माणसांची एकच जात असते. पितरांचे पूजन हे या युगाचे वैशिष्टच आहे. ४००० दिव्य वर्षे ही या युगाची कालमर्यादा असून, यात संध्या आणि संध्यांश मिळून १०८ वर्षे असतात. या युगात वेद व ब्राह्मण यांना मान असतो. लोक फलमूलांचा आहार करून जगतात व सर्व सासारिक सुखे अनुभवितात.

पुराणात व महाभारतात युगाविषयी बरीच माहिती आहे. पण या युगकल्पनेची व्यवस्थित उपपत्ती मात्र कुठेही दिलेली नाही. कृतयुगात राजा नव्हता किंवा कोणतेही शासन नव्हते. त्या वेळी त्याची आवश्यकताच नव्हती. कारण मानवमात्र त्या वेळी आपापल्या धर्माप्रमाणे वागत होता. पुढे मात्र हळूहळू काम व क्रोध यांचा प्रभाव वाढून, धर्माची अधोगती सुरू

झाली (म. भा. शांति. ५९·१३). कृतत्रेतादिकल्पना ठराविक साच्याच्या नसून त्या वेळोवेळी बदलतात. एखादा राजा उत्तम रीतीने राज्य करून लोकांना सुख देत असेल, तर त्याच्या कारकीर्दीलाही कृतयुगच म्हणावे, असे मनूने सांगितले आहे (९·३०१).

काही शिलालेखांतही कृतयुगाचा निर्देश केलेला आढळतो. पुराणात वर्णिलेले कल्कीकृत कृतयुग किंवा सत्ययुग व हे शिलालेखातले कृतयुग ही दोन्ही एकच होत, अशी एक कल्पना डॉ. डी. आर. भाडारकर यांनी माडली होती. त्यांची ही कल्पना बरोबर होती, असे दाखविणारे पुरावे आता उपलब्ध झाले आहेत. मत्स्य पुराणात सांगितले आहे, की कल्की राजा अंतर्धान पावला व कलियुग संपल्यावर कृतयुग सुरू झाले. कल्कीच्या मृत्यूनंतर विशाखयूप राजाने आपल्या मुलाला गादीवर बसविले व तो वनात गेला अशी कथा आहे. कल्की पुराण सांगते, की कल्कीने विशाखयूपाच्या साहाय्याने बौद्ध, जैन व म्लेच्छ यांचा पराभव केला व कलियुगाचा शेवट झाल्यावर कृतयुग सुरू केले. विशाखयूप हा अवंती किंवा मालव प्रदेशाचा प्रद्योत वंशातील राजा होय. हा पालक राजाचा पुत्र होता. पालकाने सनपूर्व ५२८ ते ५०४ या अवधीत राज्य केले. आणि त्याचा पुत्र विशाखयूप याने सनपूर्व ५०४ ते ४५४ इतकी वर्षे राज्यकारभार केला. विशाखयूपाने सनपूर्व ५०४ ते ४४७ या अवधीत राज्य केले व कल्कीने याच कालात विशाखयूपाच्या साहाय्याने नव्या कृतयुगाचा आरंभ केला, असे मत्स्य पुराणाचे कथन आहे. कृतयुगाला मालवगणयुग असेही एक नाव आहे. याचे कारण असे दिसते, की विशाखयूपाने मालव देशाला गणराज्याचा दर्जा बहाल केल्यावर कृतयुगाचा आरंभ केला. श्री. धीरेन्द्र नाथ मुकर्जी यांनी हा आरंभ सनपूर्व ४५८ या वर्षी झाला, असे सिद्ध केले आहे. [न्यू. इं. अँ. भाग ५ – धीरेन्द्र नाथ मुकर्जी; हि. ध.; पु. इं.]

## कृत साहित्य

या श्रेणीच्या साहित्यात साधारण ग्रंथांचा समावेश केलेला आहे. ज्या ग्रंथाचे नाव त्यातील विषयाला अनुसरून किंवा त्याच्या लेखकाच्या नावावरून दिलेले असते, त्याला कृत ग्रंथ असे म्हणतात. सौभद्र (सुभद्रेच्या उपाख्यानावर आधारलेला ग्रंथ), यायात (ययातीच्या उपाख्यानावर आधारित ग्रंथ), वाररुचाः श्लोकाः (वररुचीने रचलेले श्लोक) ही सर्व उदाहरणे काशिकेत कृत साहित्याची म्हणून दिली आहेत. स्वतः पाणिनीने शिशुक्रन्दीय, इन्द्रजननीय व यमसभीय या तीन कृत ग्रंथांचा उल्लेख केला आहे. [पा. भा.]

## कृत्तिका

अश्विन्यादी गणनेतले तिसरे नक्षत्र. हा सात तारकाचा पुंज असून अंबा, दुला, नितत्नी, अभ्रयन्ती, मेघयन्ती, वर्षयन्ती व चुपुणीका अशी त्या तारकांची नावे आहेत (तै. ब्रा. ३.१. ४.१). कृत्तिकांना बहुला असेही दुसरे नाव आहे. या तारका अगदी जवळजवळ असून त्यांची आकृती देशी वस्तऱ्यासारखी दिसते. या सगळ्या तारका मंदप्रभ आहेत; पण गुच्छरूप असल्यामुळे त्या ठळकपणे दिसतात. कार्तिक पौर्णिमेस सूर्यास्ताच्या वेळी त्या पूर्व क्षितिजावर उगवतात. त्यांच्यावरूनच त्या मासाला कार्तिक हे नाव मिळाले आहे. कृत्तिकांविषयी शतपथ ब्राह्मणात (२.१.२.२–३) पुढीलप्रमाणे लिहिलेले आहे –

**एकं द्वे त्रीणि चत्वारीति वा अन्यानि नक्षत्राण्यथैता एव भूयिष्ठा यत्कृत्तिकास्तद्भूमानमेवैतदुपैति तस्मात् कृत्तिकास्वादधीत ।। एता ह वै प्राच्यै दिशो न च्यवन्ते ।**

अर्थ– इतर नक्षत्रे एक, दोन, तीन किंवा चार असतात. या कृत्तिका मात्र पुष्कळ आहेत. जो यावर अग्न्याधान करतो, त्याला विपुल मिळते. म्हणून कृत्तिकांवर आधान करावे. या पूर्व दिशेपासून चळत नाहीत.

सांप्रत आपण अश्विन्यादी नक्षत्रगणना धरतो. पण तैत्तिरीय ब्राह्मणात (१·१·२·१) नक्षत्रांचा प्रारंभ कृत्तिकांपासून धरलेला आहे. याविषयी वचन असे––

**मुखं वा एतन्नक्षत्राणां यत् कृत्तिका ।**

अर्थ–– कृत्तिका हे नक्षत्र, सर्व नक्षत्रांचे मुख आहे.

सुमारे साडेचार हजार वर्षांपूर्वी वसंतसंपात कृत्तिकापुंजाजवळ होता. त्या काळी सूर्य कृत्तिका नक्षत्रात प्रवेशला, की वर्षारंभ होत असे. म्हणूनच कृत्तिकांना नक्षत्रांचे मुख असे म्हटले गेले.

कृत्तिकांना सोमाच्या स्त्रिया मानलेले आहे. दक्षाच्या शापामुळे त्या निपुत्रिक राहिल्या. त्या स्कंदाच्या माता असल्याचे मत्स्य पुराणात सांगितले आहे.

अग्नी ही कृत्तिकांची देवता होय. अग्नीची तारका कृत्तिकांच्या जवळच आहे. मृगाचे तोंड व ब्रह्महृदय यांना जोडणारी रेषा काढली, तर अग्नी तिच्या मध्यावर आकाशगंगेच्या काठी सापडतो. कृत्तिका नक्षत्राचा स्वभाव मिश्र व साधारण आहे. कृत्तिकेचा पहिला चरण मेष राशीत येतो, तर पुढील तीन चरण वृषभ राशीत येतात. कृत्तिका नक्षत्राचे मूर्तिध्यान पुढीलप्रमाणे करावे, असे हेमाद्री सांगतो––

**छागस्था छागवक्त्रास्या पिङ्गभ्रूकेशलोचना ।**
**सूत्रं शक्तिं च बिभ्राणा पीनाङ्गजठरारुणा ।**
**कृत्तिका कीर्तिता चेयं स्वर्णमालाविभूषणा ।**

(हे. व्र.)

अर्थ-- मेषावर बसलेली, मेषमुखाप्रमाणे मुख असलेली, पिंगट वर्णाच्या भुवया, केस व डोळे असलेली, सूत्र व शक्ती धारण करणारी, पुष्ट अंग व आरक्त उदर असलेली आणि सुवर्णमाला गळयात घालणारी अशी कृत्तिकेची मूर्ती बनवावी.

वर कृत्तिकांतल्या सात तारकांची नावे दिली आहेत खरी; पण सांप्रत त्या सहाच दिसतात. सातवी चुपुणीका ही कोणत्या-तरी उत्पाताने लोप पावल्याचे ज्योतिःशास्त्रज्ञ सांगतात. [ पु. इं.; पा. भा.; म ज्ञा. को.; भा. ज्यो. इ.; न. लो. ]

**कृत्तिका महोत्सव** त्रिपुरीपौर्णिमा पाहा.

**कृत्तिकाव्रत** एक व्रत. व्रतारंभ कार्तिक शु. ११ शीपासून अथवा पूर्णिमेपासून करतात. कुरुक्षेत्र, प्रयाग पुष्कर, नैमिष, मूलस्थान, गोकर्ण किंवा दुसऱ्या कोणत्याही तीर्थामध्ये स्नान करणे व कृत्तिकांच्या सोने, चांदी, रत्ने, लोणी व पीठ यांच्या सहा मूर्ती करून व त्यांना सुशोभित करून, त्या ब्राह्मणांना दान देणे, असा याचा विधी आहे. [ हि. ध. ]

**कृत्तिकास्नान** एक व्रत. याचा विधी असा-- भरणी नक्षत्रा-वर उपवास. कृत्तिका नक्षत्राच्या दिवशी सुवर्णपात्रात अथवा मृत्तिकापात्रात वनस्पती व पवित्रजल घालून त्या पाण्याने स्नान व अग्नी, स्कंद, चंद्र, खड्ग व वरुण यांची पूजा. [ हि. ध. ]

**कृत्तिवास** (जन्म इ. स. १४३३) बंगाली भाषेतील रामा-यणाचा कर्ता. भागीरथीच्या तीरावरील फुलिया गावी याचा जन्म झाला. याच्या मातेचे नाव मालिनी, पित्याचे नाव वनमाली व उपनाव ओझा असे होते. बारा वर्षांचा अस-ताना कृत्तिवास पद्मा नदीच्या उत्तरेकडील प्रदेशात विद्याभ्यासा-साठी गेला. तिथे अनेक शास्त्राचे अध्ययन केल्यावर तो बंगालची राजधानी असलेल्या गौडनगरीत आला. राजवाडयात जाऊन त्याने पाच श्लोक रचले व द्वारपालाकरवी ते राजाकडे धाडून दिले. ते श्लोक वाचून राजा चकित झाला व त्याने कृत्तिवासाला आपल्यासमोर बोलाविले. त्या वेळी पुन्हा सात श्लोक रचून त्याने राजाला अभिवादन केले. त्याच्या पांडित्यावर व कवित्वा-वर खूष होऊन राजाने त्याची आदरपूर्वक संभावना केली. त्याच्याच आदेशावरून कृत्तिवासाने पुढे बंगाली भाषेत रामायणरचना केली.

कृत्तिवासाने या राजाचा नामोल्लेख केलेला नाही; पण त्याने राजसभेचे जे वर्णन केले आहे, त्यावरून व सभेतील सभासदांच्या नावांवरून १५ व्या शतकात कंस किंवा गणेश हा राजा गौड देशात राज्य करीत होता, असे कळते. तेव्हा या गणेश राजाच्याच आदेशावरून कृत्तिवासाने रामायण रचले, असे अनुमान करायला हरकत नाही. पाहा--कृत्तिवासी रामायण. [ बं. सा. क.; हि. बें. लॅ. लि.; बं. उ. सा ]

**कृत्तिवासी रामायण** कृत्तिवासकृत बंगाली भाषेतील रामायण. याचे सात खंड असून त्याचे नाव रामायणपांचाली असे आहे. हिंदी भाषेत तुलसीरामा-यणाला जे स्थान आहे, तेच स्थान बंगाली भाषेत कृत्तिवासी रामायणाला आहे. याची लोकप्रियता सार्वत्रिक आहे. बंगाली लोकसमाजाला या रामायणाने नैतिक शक्ती व आध्यात्मिक तृप्ती प्राप्त करून दिली, असे म्हणतात. वाल्मीकिरामायणा-सह अनेक संस्कृत रामायणांचे आलोडन करून कृत्तिवासाने बंगाली पद्यात रामायणाचे स्वैर रूपांतर केले आहे. त्यामुळे मूळ रामकथेपेक्षा याची कथा भिन्न झाली आहे. त्या काळात बंगालमध्ये वैष्णव धर्माचे प्राबल्य होते. त्यामुळे वैष्णव धर्माचा प्रभाव कृत्तिवासाच्या रामायणावरही पडलेला दिसतो. उदा. रावणाचा पुत्र वीरबाहू रामचंद्राशी युद्धाचा प्रसंग आला असता काय करतो, त्याचे वर्णन कृत्तिवासाने पुढीलप्रमाणे केले आहे--

**धरणी लुटाए रहे जुड़ि दुई कर।**
**अकिंचने कर दया राम रघुवर ।।**

अर्थ-- धरणीवर लोटांगण घालून व दोन्ही हात जोडून तो म्हणाला, ' हे रघुवर, या अकिंचनावर दया कर.

वाल्मीकीने या राक्षसवीराची अशा दीन वैष्णवाच्या स्वरू-पात कुठेही कल्पना केलेली नाही.

वाल्मीकीचा रामचंद्र वज्रबाहू आहे तर कृत्तिवासाचा रामचंद्र कोमलतनू आहे. तुलसीदासाने रामाला आदर्श पुरुषो-त्तम बनविले आहे, तर कृत्तिवासाने त्याला मानवी गुणांनी अलंकृत केले आहे. आपल्या ग्रंथात राम-लक्ष्मणाचे बंधुप्रेम, कौसल्येचा शोक, सीतेचे सौंदर्य, इ. गोष्टी कृत्तिवासाने मुळापेक्षा सरस वर्णिल्या आहेत.

कृत्तिवासाने १५ व्या शतकात रामायणाची रचना केली. परंतु उपलब्ध रामायणातील भाषा १५ व्या शतकातल्या भाषे-इतकी जुनी वाटत नाही. त्यामुळे कृत्तिवासाचे रामायण आज मूळच्या स्वरूपात उपलब्ध नाही, असे म्हणावे लागते. मूळ रामायणाच्या प्रती करणाऱ्यांनी त्याच्या भाषेत पुष्कळ बदल केले असावे. पुढील काळातील वैष्णव व शाक्त कवींनी त्यात आपापल्या पंथाच्या विचारसरणीची भर घातली, असेही एक मत आहे. या काव्याला अत्यंत लोकप्रियता मिळाल्यामुळे

लोकाच्या मुखात त्याची भाषा बदलत गेली, असेही काही जणांचे मत आहे. असे जरी असले, तरी त्याच्या मूळ काव्याचा गाभा व त्याची शैली आजच्या उपलब्ध प्रतीतही कायम आहे. कृत्तिवासाची भाषा साधी व प्रासादिक असल्यामुळे सामान्य लोकानाही त्याचे रसग्रहण करता येते. [बं. उ. सा.; हि. बें. लॅ. लि.; भा.वां.; प्रबोधकुमार मजुमदार– अजंता, डिसेंबर १९५४]

**कृत्यकल्पतरू** (इ. स. १२ वे शतक) लक्ष्मीधरकृत धर्मशास्त्रावरील एक महत्त्वाचा ग्रंथ. यात १४ काडे आहेत. लक्ष्मीधर हा कनोजच्या राज्यात न्यायाधीश होता व कनोजचा राजा गोविंदचंद्र याचा मुख्यमंत्रीही होता.

कृत्यकल्पतरूला धर्मशास्त्रावरील ग्रंथांत मानाचे स्थान आहे. विषयांची व्यवस्थित आखणी करून लक्ष्मीधराने याची रचना केलेली आहे. निवडक धर्मशास्त्रकारांची मतेच संक्षिप्त करून त्याने आपल्या विधानांच्या पुष्टचर्थ उद्धृत केली आहेत. विवाद्य प्रश्नांवर मात्र त्याने आपली मते स्वच्छ, निःसंदिग्ध व निर्णायक स्वरूपात मांडली आहेत. मोक्ष हेच जीवनाचे अंतिम ध्येय आहे, असे तो स्पष्टपणे सागतो.

धर्मशास्त्रावरील सर्व शंकांचे निरसन करणारा व सर्व प्रश्नाची उत्तरे देणारा ग्रंथ, असा आपल्या ग्रंथाविषयी त्याला अभिमान आहे. त्यामुळेच त्याने या ग्रंथाला कृत्यकल्पतरू हे नाव दिले.

या ग्रंथात धर्म, परिभाषा, सस्कार, आचमन, शौच, संध्याविधी, अग्निकार्य, इंद्रियनिग्रह, आश्रमव्यवस्था, गृहस्थधर्म, विवाहभेद, आपद्वृत्ती, कृषी, प्रतिग्रह, व्यवहारनिरूपण, सभा, भाषा, क्रियादान, दिव्ये, दान, ऋणादानविधी, स्तेय, स्त्रीपुंयोग, दायविभाग, तीर्थ, राजधर्म, मोक्षधर्म, इ. विषयांचे विवेचन आले आहे.

**कृत्या** (१) एक मारी देवता. हिची बाधा दूर होण्यासाठी शांती करावी असे सांगितले आहे (श. क.). ज्या घरात बहीण, पत्नी, मुलगी, सून अशा स्त्रिया अवमानिल्या जातात, ती घरे कृत्याहत (कृत्येची बाधा झालेली) होऊन सर्व बाजूनी नाश पावतात, असे मनुस्मृतीत सांगितले आहे (३. ५८).

हिचे ध्यान पुढीलप्रमाणे सांगितले आहे–

**क्रोधाज्ज्वलन्तीं ज्वलनं वमन्तीं**
**सृष्टिं दहन्तीं दितिजं ग्रसन्तीम् ।**
**भीमं नदन्तीं प्रणमामि कृत्यां**
**रोरूयमाणां क्षुधयोग्रकालीम् ।।**

अर्थ – क्रोधाने जळणारी, आग ओकणारी, सृष्टीला जाळणारी, दैत्याला ग्रासणारी, भयानक आवाज करणारी, भुकेने आक्रोश करणारी अशा उग्र कालीरूप कृत्येला मी नमस्कार करतो.

(२) एक यज्ञीय देवता.

**कृत्रिमपुत्र** द्वादशविध पुत्रांमधला एक पुत्र. याचे लक्षण मनूने पुढीलप्रमाणे सांगितले आहे–

**सदृशं तु प्रकुर्याद्यं गुणदोषविचक्षणम् ।**
**पुत्रं पुत्रगुणैर्युक्तं स विज्ञेयश्च कृत्रिमः ।।**

(मनु. ९.१६९)

अर्थ – श्राद्धादी पारलौकिक गोष्टी केल्याने आणि न केल्याने गुणदोष घडतात, हे जाणणारा समान जातीचा व पुत्रगुणांनी (माता-पित्यांची सेवा वगैरे) युक्त असा जो पुत्र (एखाद्या दपतीकडून) स्वीकारला जातो, त्याला कृत्रिमपुत्र म्हणावे.

**कृपानिवास** (जन्म इ. स. सुमारे १७५०) रसिक रामोपासनेचा एक प्रमुख आचार्य. द. भारतात याचा जन्म झाला. याच्या पित्याचे नाव सीतानिवास व मातेचे नाव गुणशीला असे होते. हा श्रीरंगाचा उपासक होता. लहानपणीच पित्याने याला रामानुजीय वैष्णव संत आनंदविलास याच्याकडून दीक्षा देवविली. पंधरा वर्षांचा असतानाच हा विरक्त झाला व घरादाराचा त्याग करून मिथिलेस गेला. तिथे त्याने रसिक संप्रदायाचा स्वीकार केला. पुढे चारी धामांची यात्रा करीत असता तो अग्रदासाचे आचार्यपीठ रेवासा येथे पोचला. तिथून अयोध्या, उज्जयिनी करून तो चित्रकूटावर आला व आमरण तिथेच राहिला.

याने लक्षावधी श्लोक रचले होते, असे युगलप्रियाने म्हटले आहे; परंतु त्याच्या सांप्रत उपलब्ध असलेल्या चोव्वीस ग्रंथांची श्लोकसंख्या पंचवीस हजारांहून अधिक भरत नाही. गुरुमहिमा, प्रार्थनाशतक, लगनपचीसी, रासपद्धती, भावनाशतक, जानकीसहस्त्रनाम, रामरसामृतसिंधू, रामसहस्त्रनाम, नित्यसुख, रससार, इ. त्याच्या काही ग्रथांची नावे आहेत.

कृपानिवास हा रूपासक्त रामभक्त होता, असे त्याच्या साहित्यावरून कळते. याचे बहुतेक ग्रंथ सांप्रदायिक स्वरूपाचे आहेत. त्यात कवित्वापेक्षा सिद्धान्तनिरूपणाला प्राधान्य दिलेले आहे. पण लगनपचीसी, रामरसामृतसिंधू, रासपद्धती या ग्रथातील पदे अत्यंत रसाळ व प्रेमरसाने ओथंबलेली आहेत. याने उर्दू व अवधी या दोन्ही भाषांत रचना केली आहे. [हिं. सा. को.; रा. भ. शा.]

**कृपाराम** (१) (इ. स. चे १५ वे शतक-उत्तरार्ध). एक गणितज्ञ. याने बीजगणित, मकरंद, यंत्रचिंतामणी, सर्वार्थचिंतामणी, पंचपक्षी, मुहूर्ततत्त्व या ग्रंथांवर टीका लिहिल्या आहेत. वास्तुचंद्रिका या नावाचा याचा एक स्वतंत्र ग्रंथही आहे. [ भा. ज्यो. इ. ]

(२) (१६ वे शतक) एक हिंदी साहित्यकार. १५४१ साली याने हिततरंगिणी हा ग्रंथ रचला. काव्यशास्त्रावर हिंदी भाषेतील हा पहिलाच उपलब्ध ग्रंथ आहे. नायिकाभेद हा या ग्रंथाचा मुख्य विषय असून, त्याची रचना दोहा छंदात आहे. यातील दोहे सरस व भावपूर्ण आहेत. [ हिं. सा. को.]

(३) (इ. स. १८०८ चा सुमार) एक चारण कवी. जोधपूर भागातल्या खराडी गावचा रहिवासी. हा मोठेपणी सीकरचा रावराजा लक्ष्मणसिंह याच्या आश्रयाला गेला. या राजाने याला एक गाव इनाम दिले होते, ते कृपाराम की ढाणी या नावाने प्रसिद्ध आहे.

याने सुमारे १७५ सोरठे लिहिले आहेत. हे सर्व सोरठे राजिया याला उद्देशून आहेत. राजिया हा कृपारामाचा आवडता नोकर होता. याच्या सोरठ्यांची भाषा डिंगल असून ते उपदेशपर आहेत. राजस्थानात ते अनेकांच्या जिव्हाग्री असतात. त्यातले दोन नमुने पुढीलप्रमाणे—

**कारज सरै न कोय बळ प्राक्रम हीमत बिना ।**
**हलकारयाँ की होय रंग्या स्याळाँ राजिया ।।**

अर्थ— बल, पराक्रम व धैर्य यांच्यावाचून कोणतेही काम पूर्ण होऊ शकत नाही. हे राजिया, रंगविलेल्या कोल्ह्याला हिमत दिल्याने काय होणार आहे ?

**पाटा पीड़ उपाव तन लगाँ तखरिया ।**
**बहै जीभ रा घाव रती न औषद राजिया**

अर्थ— शरीराला तलवारीचा घाव लागला तर मलमपट्टी करून त्याची पीडा कमी करता येते. पण हे राजिया, जिभेने केलेल्या घावांवर कोणतेही औषध नाही. [ रा. भा. औ. सा. ]

**कृमिभोजन** २८ नरकांपैकी एक नरक. हा एक कृमियुक्त खड्डा असतो. जे लोक पंचमहायज्ञ केल्याशिवाय भोजन करतात, ते या नरकात पडतात (भाग. पु. ५. २६. ७).

**कृमी** एक नरक. याला कीटलोह असेही नाव आहे. देव, ब्राह्मण, पूज्य व वडिलधारे लोक यांचा जे द्वेष व अवमान करतात, त्यांना हा नरक भोगावा लागतो. [ पु. इं. ]

**कृशाश्विन** नृत्यशास्त्राचा एक प्राचीन पंडित. याने सूत्रमय शैलीत नृत्यशास्त्राची तत्त्वे सांगितली आहेत. पाणिनीने याचा उल्लेख केला आहे. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**कृषिविद्या** कृष्=नांगरणे, या धातूपासून कृषी हा शब्द बनला आहे. जमीन नांगरून तिच्यात बी पेरणे आणि पेरलेल्या बियांची व त्यांच्या रोपांची काळजी वाहून त्यांच्यापासून धान्य मिळविणे म्हणजे शेती होय. ही विद्या मनुष्य केव्हा शिकला, ते सांगणे कठीण आहे फार प्राचीन काळी आदिम अवस्थेत मनुष्य रानटी स्थितीत होता. त्या वेळी तो जंगलातील श्वापदांची शिकार करून उदरनिर्वाह करी. त्यानंतर कंद, मुळे, फळे व आपोआप उत्पन्न होणारे धान्य यांच्यावर तो उपजीविका करू लागला. पुढे कालांतराने जमीन नांगरून व बी पेरून उगवलेल्या रोपांचे संवर्धन व संरक्षण केले असता पीक जास्त व अधिक चांगले येते, असा त्याला शोध लागला आणि त्याने शेतीला प्रारंभ केला.

फ्रान्समधील गुहांमध्ये केलेल्या उत्खननात असा पुरावा सापडला आहे, की पूर्वपाषाण युगातही मानवाला कृषिविद्या अवगत होती. मिसर, बाबिलोन व इतर प्राचीन देश यातील लोक कृषिकर्म जाणत होते, असाही पुरावा मिळाला आहे. बैलांनी ओढण्याचा नांगर प्रथम मिसर देशातच वापरला गेला. सनपूर्व तीन हजार वर्षांच्याही आधी शेतीसाठी कुदळीचा उपयोग केला जात होता, असे दिसते. काथवटी, हेटकरी, इ. वन्य लोक डोंगरी भागातल्या शेतीसाठी अजूनही कुदळीचा उपयोग करतात. कुदळीपासूनच पुढे नांगर तयार झाला असावा.

**वैदिक काल**— आर्यांना भारतात येण्यापूर्वीपासूनच कृषिविद्या अवगत होती. ऋग्वेद व अथर्ववेद यांत कृषिविषयक पुष्कळ उल्लेख आढळतात. उर्वरा=नांगरलेली जमीन, अप्नस्वती=खणणे, शिंपणे, इ. कर्मांनी युक्त भूमी, असे कृषिविषयक शब्द ऋग्वेदात आले आहेत (१. १२७. ६.). पाट किंवा कालवे काढून शेतीला पाणीपुरवठा करण्यासंबंधीची वचने वेदात आढळतात (ऋ ७ ४९. २.; अथर्व. १. ६. ४). क्षेत्रपती, सीता व शुनासीर यांना उद्देशून रचलेले एक सूक्त ऋग्वेदात आहे. त्यातील पुढील ऋचा वैदिक आर्यांची कृषिविषयक आवड व्यक्त करतात——

**शुनं वाहाः शुनं नरः शुनं कृषतु लाङ्गलम् ।**
**शुनं वरत्रा बध्यन्तां शुनमष्ट्रामुदिङ्गय ।।**
**शुनासीराविमां वाचं जुषेथां यद् दिवि चक्रथुः पयः ।**
**तेनेमामुप सिञ्चतम् ।।**

**अर्वाची सुभगे भव सीते वन्दामहे त्वा ।**
**यथा नः सुभगासति यथा नः सुफलासति ।।**
**इन्द्रः सीतां नि गृह्णातु तां पूषानु यच्छत ।**
**सा नः पयस्वती दुहामुत्तरामुत्तरां समाम् ।।**
**शुनं नः फाला वि कृषन्तु भूमिं ।**
**शुनं कीनाशा अभि यन्तु वाहैः ।।**
**शुनं पर्जन्यो मधुना पयोभिः ।**
**शुनासीरा शुनमस्मासु धत्तम् ।।**

(४·५७·४-८)

अर्थ– बैल आनंदाने, लोक मजेने आणि नांगर सहज रीतीने जमीन नागरोत. त्यांच्या जुंपण्या चांगल्या घट्ट बांधा. पुढे सुखोत्पत्ती व्हावी म्हणून आता (बैलावर) आसूड चालवा. शुनासीर हो, (=कृषिकर्माला सफल करणाऱ्या विभूती) आम्ही केलेली ही स्तुती ग्रहण करा. आकाशमंडलात जे उदक तुम्ही उत्पन्न केले आहे, त्यानेच ही जमीन भिजवा. भाग्यशालिनी सीते, इकडे आगमन कर. तुला आम्ही वंदन करतो. कारण तेणेकरून तू आम्हाला भाग्यदात्री होतेस. आम्हाला सफलार्थ करणारी होतेस. इंद्र सीतेचा स्वीकार करो. (तो) आमच्याकरिता दुधाने परिप्लुत होऊन वर्षानुवर्ष आम्हाला (धनधान्यरूप) दुग्ध देवो. नांगराचे फाळ जमीन सहज नांगरोत. शेतकरी सहजपणे (शेत नांगरीत) बैलासह फिरोत. सर्वांना सुख होईल अशा रीतीने पर्जन्य मधुर रसाने आणि उदकाने जमीन भिजवो. (याप्रमाणे) हे शुनासीरहो, आमच्या ठिकाणी सुखाची ठेव ठेवा.

ऋग्वेदात एका ठिकाणी ‘अक्षैर्मा दीव्यः कृषिमित् कृषस्व’ = फाशानी जुगार खेळू नको; तर शेतीच कर (१०.३४.१३), असा एका जुगाऱ्याला आदेश दिलेला आहे. अश्वमेधाच्या प्रसंगी जे वेदगीत गायले जाते, त्यात पुढील आकांक्षा व्यक्त केलेली आहे–

**निकामेनिकामे नः पर्जन्यो वर्षतु फलिन्यो न ओषधयः पच्यन्तां योगक्षेमो नः कल्पताम् ।**

(तै. सं. ७.५.१८)

अर्थ – योग्य वेळी, आवश्यकता असेल तेव्हा पाऊस पडावा. आम्हाला ओषधींची पक्व फले मिळावी आणि आमचा योगक्षेम उत्तम चालावा.

**कृषिर्वृष्टिर्यजमानाय कल्पताम् ।**

(तै. ब्रा. ३·१·२)

अर्थ– यजमानाची शेती समृद्ध होवो व त्या शेतीला आवश्यक असा पाऊस पडो.

यावरून वैदिक आर्य शेतीला किती महत्त्व देत असत, त्याची कल्पना येऊ शकेल.

शतपथब्राह्मणात धान्य विळयाने कापणे, त्याचे भारे बांधणे, ते खळयात नेऊन झोडणे, धान्य चाळून किंवा सुपाने झडपून माफ करणे, इ. कृषिकर्माचे वर्णन आहे. ऋग्वेदात यव (सातू) या धान्याचे नाव आढळते; पण पुढील संहितांमध्ये मात्र व्रीही (तांदूळ), यव, मुद्ग (मूग), माष (उडीद), इ. द्विदल धान्ये व तिल, गोधूम (गहू), नीवार (तृणधान्ये), प्रियंगू (राळे), इ. अनेक धान्यांचे उल्लेख असून, त्यांचे हंगामही दिलेले आहेत. अथर्ववेदात उंदीर, पाखरे, कीटक, अवर्षण, अतिवृष्टी, इ. आपत्तीपासून शेतीचे संरक्षण करण्याचे मंत्रही दिलेले आहेत (६·५०; ७·११).

वैदिक आर्य शेतीसाठी मुख्यत्वे पावसावर अवलंबून होते. त्यामुळे वेदात वृष्टिदेवतेला प्राधान्य मिळाले आहे. ऋग्वेदात वसिष्ठाचे एक पर्जन्यसूक्त आहे. त्यात तो पर्जन्याला उद्देशून म्हणतो–

**पर्जन्याय प्र गायत दिवस्पुत्राय मीळ्हुषे ।**
**स नो यवसमिच्छतु ।।**

(७·१०२·१)

अर्थ – आकाशपुत्र जलवर्षक जो पर्जन्य त्याच्या प्रीत्यर्थ स्तुतिगायन करा. आम्हाला धनधान्य देण्याची त्याला इच्छा होवो.

जोवर मानव कंदमुळावर आणि शिकारीवर जगत होता, तोवर तो भटक्या अवस्थेत होता. त्याला एका जागी कायम वस्ती करणेच शक्य नव्हते. कृषिविद्या अवगत होताच तो एका जागी वस्ती माडून स्थायिक झाला व भूमिसेवा करू लागला. या कृषिविद्येच्या संबंधातच मानवी संस्कृतीचा उगम झाला, असे बहुतेक पंडितांचे मत आहे. श्री. लुडविगच्या मते ऋग्वेदात कृषिविद्येचे जे वर्णन आहे, तेच सर्वांत प्राचीन होय.

पाणिनीच्या अष्टाध्यायीत कृषिकर्माचे अनेक उल्लेख असून, शेतकरी जमिनीची मशागत किती परिश्रमपूर्वक करीत, तेही दिलेले आहे. नदीचे पाणी कालव्याच्या द्वारे शेतात नेणे व विहिरीचे पाणी मोटेने वर खेचून शेतात सोडणे, असे उभयविध उल्लेख अष्टाध्यायीत सापडतात. त्या काळी पेरणीसाठी शुभमुहूर्त पाहण्याची प्रथा असल्याचेही कळते.

**सूत्रकाल** – या कालात शेती हा अत्यंत लोकप्रिय व्यवसाय होता. या कालात सामान्यतः वैश्य लोकच शेती करीत.

**कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम्**

(गी १८)

असे म्हणून गीतेने शेती हे वैश्यांचे स्वभावज कर्म असल्याचे सांगितले आहे. नांगरणी, पेरणी, कापणी, साठवणी, नवान्नभक्षण, इ. कृषिविषयक क्रियांना अनुलक्षून करायच्या धार्मिक विधीचे

**वर्णन** श्रौत व गृह्य सूत्रांमध्ये केलेले आहे. पर्जन्यवृष्टी होण्यासाठी करायची विधिविधानेही सूत्रकारानी सांगितली आहेत. कौशिकसूत्राने तर उंदीर, पक्षी, टोळ यांच्यापासून पिकाचे संरक्षण होण्यासाठी काही उपाय व धार्मिक विधी सांगितले आहेत. नांगराचा फाळ लाकडाचा होता, तो सूत्रकालातच लोखंडाचा झाला. त्या कालात यत्र आणि गहू यांची लागवड मोठ्या प्रमाणावर होऊ लागली. भात, ज्वारी, बाजरी, तीळ, मूग, उडीद ही त्या काळातली मुख्य पावसाळी पिके होती व गहू, यव आणि मोहरी ही हिवाळी पिके होती. या व्यतिरिक्त ऊस, कापूस, ताग यांची लागवडही त्या काळी भारतात होऊ लागली होती. गुरे-ढोरे व रानटी जनावरे यांच्यापासून पिकांचे रक्षण करण्यासाठी शेताला कुंपण घालण्याची प्रथा याच काळात रूढ झाली असावी.



कृषिविद्या – नांगरटीचे एक जुने चित्र

**मौर्य काल** – नांगराच्या फाळाने तयार झालेल्या चरीला सीता असे नाव होते. त्यावरून लक्षणेने नागरट केलेल्या जमिनीला म्हणजेच शेतीला सीता असे या काळात म्हणू लागले. मौर्यकाळात राज्यातील कृषिप्रमुखाला सीताध्यक्ष म्हणत. त्याला कृषितंत्र, गुल्मतंत्र, वृक्षतंत्र, आयुर्वेद, इ. विषयाचे ज्ञान आवश्यक मानले जाई. धान्ये, फळे, फुले, भाज्या, कंदमुळे, ताग, कापूस, इ. पदार्थाच्या बियाण्याचा संग्रह करून त्याची निगा राखणे व योग्य वेळी त्याची पेरणी करणे, हे सीताध्यक्षाचे काम असे. विविध प्रकारच्या शेतीला कोणते पर्जन्यमान योग्य असते, कोणते बी केव्हा पेरावे, ग्रहस्थितीवरून पावसाचे अनुमान कसे करावे, याविषयी त्या काळात काही आडाखे बसविलेले होते. त्या कालात दोन प्रकारचे देश मानीत. एक देवमातृक व दुसरा नदीमातृक. देवमातृक म्हणजे केवळ पावसावर अवलंबून असलेला व नदीमातृक म्हणजे नदीच्या पाण्यावर अवलंबून असलेला. राजाने आपला देश नदीमातृक बनवावा म्हणजे विहिरी, तलाव व नद्याचे पाट निर्माण करून राज्यातल्या शेतीला पाणी पुरवठा करावा, असे कौटिल्याने अर्थशास्त्रात सांगितले आहे. बियाण्याचे संरक्षण कसे करावे निरनिराळ्या पिकांना कोणकोणती खते द्यावी, धान्यसंग्रह करण्यासाठी ठिकाण कोणते असावे व त्याची व्यवस्था कशी ठेवावी, यासंबंधीही कौटिल्याने काही नियम सांगितले आहेत. कौटिल्याच्या काळात शेणखत (गोशकृत्), हाडखत (गोस्थि) व मासळीखत (अशुष्क कटुमत्स्य) ही खते वापरली जात.

**विधिनिषेध** – वेदांनी ब्राह्मणांना शेती करायला परवानगी दिली होती. पण पुढे धर्मशास्त्रात वेदाध्ययनाला प्राधान्य देऊन शेतीविषयी विकल्प सांगितला गेला.

बौधायन म्हणतो—

**वेदः कृषिविनाशाय कृषिर्वेदविनाशिनी ।**
**शक्तिमानुभय कुर्यादशक्तस्तु कृषिं त्यजेत् ।।**

(बौ. ध. सू. १.५.१०१)

अर्थ – वेदाभ्यासाकडे लक्ष दिल्यास शेतीकडे दुर्लक्ष होते. शेतीवर लक्ष केंद्रित केल्यास वेदाभ्यास होत नाही. ज्याला शक्य असेल त्याने दोन्ही करावी. पण दोन्ही जमत नसल्यास कृषिकर्म सोडावे.

बौधायनाने पुढे असेही म्हटले आहे, की ब्राह्मणाने भोजन होईपर्यंत सकाळच्या वेळात शेतीचे काम करावे. याविषयी मनूचे मत असे– ब्राह्मणाला किंवा क्षत्रियाला जर वैश्याचे व्यवसाय करण्याची पाळी आली, तर त्याने शेती वगळून अन्य व्यवसाय करावे. कारण शेती ही परावलंबी असून तीत जीवहत्या होते (१०.८३-८४).

मात्र वृद्धहारीत आणि इतर काही स्मृतिकार यानी कृषिकर्म सर्व वर्णाना विहित मानलेले आहे.

यवन (ग्रीक) लोक भारतात आले आणि इथली भूमी अत्यंत सुपीक असल्याचे पाहून प्रसन्न झाले. भारतीय कृषीवलाचे कौशल्य पाहून त्यांना आश्चर्य वाटले. मेगॅस्थिनीजने भारतातल्या कृषिकर्माचा गौरवाने उल्लेख केला आहे. गेल्या २००० वर्षाच्या काळात भारतात जे अनेक थोर राजे होऊन गेले, ते शेतीच्या उन्नतीसाठी नेहमी प्रयत्नशील राहिले. विस्तीर्ण तलाव, लांब लांब कालवे आणि पाटबंधारे बांधून

त्यांनी शेतीसाठी पाणीपुरवठ्याची व्यवस्था केली. कर्नाटक, तेलगण, महाराष्ट्र, गुजरात, इ. भागांत प्राचीन काळी बांधलेले काही तलाव व बंधारे अजूनही अस्तित्वात आहेत.

**पिके** — भारतात होणारी पिके म्हणजे भात, सातू, गहू, राळ, हरवरा, उडीद, मसूर, मूग, वाल, कुळीथ, तीळ, मोहरी, कारळा ही होत. सुपारी, विडयाची पाने, मिरी, कापूस, नीळ, ऊस, भांग, गांजा, इ. पदार्थ आणि नारळ, केळी, महाळुंग, डाळिंब, फणस, आंबा, संत्री वगैरे फळे ही फार पूर्वीपासून भारतीयाना माहीत असावी. कारण वरीलपैकी संत्र्याखेरीज बाकी सर्व नावे वाग्भटाच्या अष्टागहृदयात आली असून, त्यांचे गुणदोषही त्यात दिले आहेत. चरक, सुश्रुत यांच्या काळीही ही नावे माहीत असावी मुसलमानी काळात फळांच्या व फुलांच्या बागा वाढून त्यात बरीच सुधारणा झाली. पोर्तुगीजानी उत्तम जातीची आंबा व चिकू ही फळे प. भारतात आणली. कॉफी प्रथम इ. स. १६०० च्या सुमारास अरबस्तानातून भारतात आली. इ. स. १८४५ पर्यंत साखर ही भारतातून युरोपात जात असे. ७ व्या शतकात चीनचा बादशहा टाइटसंग याने साखर बनविण्याची कला शिकण्याकरता काही माणसे भारतात पाठविली होती, असा उल्लेख इ. स. १५५२ साली लिहिलेल्या चिनी ज्ञानकोशात आहे. काळी मिरी वगैरे मसाल्याचे पदार्थ फार पूर्वीपासून निर्यात केले जात होते. पुढे पोर्तुगीज व डच लोकांनी मिरी, नारळ, तीळ या पदार्थांचे उत्पन्न वाढवून त्यांची निर्यात मोठ्या प्रमाणावर सुरू केली.

**डोंगरी शेती** — नदीच्या काठी वा इतर सपाट प्रदेशात



कृषिविद्या – बोधगयेतील दृश्य

स्थायिक झालेले लोक वर्षानुवर्षे एकाच ठिकाणी शेती करतात. जमीन नागरून, तिची मशागत करून व खते घालून तिचा कस वाढविला, तर त्यांना एकाच क्षेत्रात पीक चांगले मिळू शकते. पण डोंगराळ प्रदेशात राहणारे लोक ज्या एका पद्धतीने शेती करतात, तिला कुमरी किंवा डाली म्हणतात. जंगलाच्या काही भागातील झाडे–झुडपे तोडून ती तिथेच आडवी घालणे व ती वाळली, की जाळून त्याच्या राखेतच न नांगरता धान्य पेरणे, अशी ती पद्धत आहे. उ. भारतात तिला झुम हे नाव आहे. अशा प्रकारची शेती एकाच ठिकाणी फार काळ करता येत नाही. २-४ पिके काढल्यानंतर ती जमीन सोडून देऊन दुसरीकडचे जंगल तोडावे लागते. कातवडी, वारली, काचारी, काणिक्कर, कमार, कुडुबी, कुरुंब, कुरिच्चन, इ. आदिवासी अशी शेती करतात. त्यामुळे त्यांना एका ठिकाणी कायम वस्ती करता येत नाही.

**कृषी आणि यातुविद्या (जादू)** — आजच्या विज्ञानयुगात शेतीचा यातुविद्येशी काही संबंध असू शकेल, यावर विश्वास बसणे कठीण आहे. पण मानवाच्या आदिम अवस्थेत धान्यनिर्मितीची क्रिया मंत्रतंत्राच्या सामर्थ्यावरच अवलंबून आहे, असा मानवाचा दृढ विश्वास होता. आजही वन्य लोकांच्या कृषिविषयक जीवनात या समजुतीला धार्मिक महत्त्व असल्याचे दिसून येते. तांत्रिक विधीशिवाय त्यांचे एकही शेतीचे काम होऊ शकत नाही. श्री. डी. एन्. मुजुमदार यांच्या 'अफेअर्स ऑफ ए ट्राइब' या ग्रंथात भारतातील वन्य जमातीच्या शेतीविषयक मत्रतंत्रात्मक विधींची माहिती दिलेली आहे. भारतातील 'हो' आदिवासी शेतीच्या सुफलीकरणासाठी सात धार्मिक सण पाळतात. संताळ लोक श्रावण महिन्यात हरियारसिम् नावाचा सण याच हेतूने साजरा करतात. भुंइया, कोल, भिंड हे उत्तर प्रदेशातील लोक बैगा जातीच्या उपाध्यायाकडून शेतीच्या सुफलीकरणाचा विधी करवून घेतात. यात पेरणीपूर्वी व कापणीनंतर भूमातेला मद्य-मासाचा नैवेद्य दाखवायचा असतो. नागर संस्कृतीतही श्रावण-भाद्रपदांतील बहुतेक सर्व व्रते भूमीच्या सुफलीकरणाशीच निगडीत आहेत. गौरी-गणपती, नवरात्र, चंपाषष्ठी, शाकंभरी या व्रताचा बारकाईने अभ्यास केल्यास त्यांचा व धान्यसमृद्धीचा संबंध ध्यानात येऊ शकेल. कौटिल्यानेही पेरणी करायची ती समंत्रक करावी, असे सांगितले आहे. वैदिक काळातही शेतीविषयक मंत्रविधी होतेच. वैदिक लोकांचे देव प्रामुख्याने पुरुष असूनही शेतीच्या देवता मात्र स्त्रीदेवताच आहेत. उर्वरा, सीता, अरदा, अनघा, यजा, समा, भूती, इ. कृषिविषयक देवता गोभिल व पारस्कर या गृह्यसूत्रांत सांगितल्या आहेत.

कृषिविद्येतल्या देवता जशा प्रामुख्याने स्त्रीदेवता आहेत,

त्याचप्रमाणे कृषिविधानात साक्षात मानवी स्त्रीलाही प्राधान्य मिळालेले आहे. प्राचीन काळी जगातील सर्वच देशात कृषि-विषयक विधिविधानात स्त्रीला फार महत्त्व होते. वन्य समाजात आजही ते आहे. स्त्री ही मनुष्याला जन्म देते. तिच्या ठिकाणी फल उत्पन्न करण्याची अद्‌भुत शक्ती आहे. तेव्हा भूमीचे सुफलीकरण करण्यासाठी स्त्रीच्या या शक्तीचा उपयोग केला पाहिजे, असे हे वन्य मानव समाजाचे साधे तर्कशास्त्र आहे. ज्या स्त्रीची संततिनिर्माणक्षमता अधिक, ती स्त्री या कामाला अधिक योग्य समजली जाते. जुळचा किंवा तिळचा मुलाना जन्म देणाऱ्या स्त्रीचे तर या क्षेत्रात विशेष माहात्म्य. अशा स्त्रीच्या हातूनच शेतात बी पेरले जाते किंवा जमिनीत रोप लावले जाते. फ्रेझर या मानववंशशास्त्रज्ञाने या संदर्भात कितीतरी जागतिक उदाहरणे दिली आहेत (Golden Bough).

मानवाची ही श्रद्धा याच्या उलट स्वरूपातही दिसून येते. ज्याप्रमाणे भूमीच्या सुफलीकरणाला अपत्यवती स्त्री साहाय्यक होते, त्याप्रमाणे अपत्यहीन स्त्रीच्या गर्भधारणेला हरितश्यामल भूमी साहाय्यक होते, ही ती श्रद्धा होय. पाऊस पडावा म्हणून स्त्रियांनी शेतात जाऊन नग्न अवस्थेत नृत्य करण्याची अथवा नांगरण्याची क्रिया अनेक देशात होती. स्त्रीच्या कमरेला कडुलिंबाचे टाळे गुंडाळून अर्धनग्न अवस्थेत तिची मिरवणूक काढण्याची प्रथा अगदी अलिकडच्या काळापर्यंत भारतात रूढ होती. आजमितीस अर्धनग्न अवस्था नष्ट झाली असली, तरी श्रावण महिन्यात स्त्रीच्या कमरेला कडुलिंबाचे टाळे बांधून तिची मिरवणूक काढण्याची प्रथा आजही महाराष्ट्रात आहे. इ. स. १८७४ साली गोरखपूर जिल्ह्यात दुष्काळ पडला असता अर्धनग्न स्त्रियांची सामुदायिक मिरवणूक काढली गेली होती, अशी नोंद आहे.

याउलट वंध्या स्त्रीला विवस्त्र अवस्थेत उघड्यावर स्नान घातल्यास अथवा तिच्यावर समंत्रक जलसिंचन केल्यास तिला गर्भधारणा होते, अशीही समजूत आहे. जलसिंचन हे पावसाचे प्रतीक आहे. पावसाने भूमी सुफलित होते तशीच स्त्रीही होते, या धारणेने या प्रकारचे विधी केले जात असत. अपत्यवती स्त्री भूमीला सुफलित करते व वंध्या स्त्री भूमीला वांझ बनवते, या समजुतीमुळेच वंध्या स्त्रीच्या हातून झाडे लावणे वर्ज्य मानतात.

प्राथमिक कृषिप्रधान समाजात भूमीच्या सुफलीकरणाचे तांत्रिक विधी प्रायः स्त्रीकडेच असत. याचे रहस्य वरील विवेचनावरून कळून येईल. प्राचीन काळातील अनेक देवी–संप्रदाय (Mother Cults) याच कृषिविषयक मंत्रतंत्रात्मक विधीतून उत्पन्न झाले आहेत. महाराष्ट्र, कर्नाटक, आंध्र, तमिळनाड या भागातील ग्रामीण समाजात स्त्रीदेवतांचे माहात्म्य विशेष आहे. शेतीचे सुफलीकरण, पर्जन्यवृष्टी, रोगराईचे निवारण, इ. कामे या देवता करतात, असे मानले जाते. पुष्कळ ठिकाणी या देवतांचे पुजारीपणही स्त्रीकडेच असते. पुरुषाने ते कार्य करायचे, तर त्याला केस वाढवून आणि लुगडे नेसून ते करावे लागते, असेही दाखले आहेत.

**कृषिविधान**– जमिनीची नागरणी, पेरणी, कापणी, इ. गोष्टी करण्याच्या वेळी सांप्रत देशपरत्वे निरनिराळे धार्मिक व तांत्रिक विधी प्रचलित आहेत, ते असे– नांगरणी व पेरणीसाठी मुहूर्त पाहतात. देवापुढे पैसा–सुपारी ठेवून नांगराची व बैलांची पूजा करतात. पेरणीच्या वेळी पाच दगडांना चुना लावून त्यांची पूजा करतात. एक मातीचा घडा पाण्याने भरून शेताजवळ ठेवतात. शनिवारी व मगळवारी पेरणी करीत नाहीत. काही शेतकरी पेरणीच्या आधी क्षेत्रपाल व भुते– खेते यांना बळी देऊन सतुष्ट करतात; तर कोणी म्हसोबाची पूजा करतात. काही ठिकाणी पिठाचे बैल करून व त्यांची पूजा करून ते पाण्यात सोडतात. पेरणीचे काम पुरे झाल्यावर बैलांचा सण पाळतात व त्यांची पूजा करून मिरवणूकही काढतात. कापणीस रविवार शुभ मानलेला आहे. पीक चागले यावे म्हणून आश्विन शु. ८ मीस किंवा कार्तिक शु. २ येस ग्रामदेवताना गोडा-धोडाचा नैवेद्य दाखवितात. कापणीच्या आधी टोपल्यांची पूजा करतात. मळणीच्या वेळी प्रथम खुंट्याची पूजा करून क्षेत्रदेवतांना कोंबडी-बकरी बळी देतात. मळणीनंतर धान्यातला काही भाग ग्रामदेवतांना अर्पण करतात. मुढ्यात पाच दगड ठेवून देवकाची डहाळी खुपसतात.

हस्तनक्षत्रात मेघगर्जना होते, तेव्हा घराच्या तुळईवर सात वेळा मुसळ आपटतात. त्यामुळे शेतावर पडणाऱ्या किडीचा नाश होतो, अशी समजूत आहे. काही ठिकाणी त्याचसाठी पंचाक्षऱ्याकडून दोरा मंत्रून घेऊन तो शेताभोवती गुंडाळतात. तापलेल्या तव्यावर धूप घालून शेताभोवती प्रदक्षिणा करण्यामुळेही किड़ीचा नाश होतो, असे समजतात. मंतरलेले तांदूळ शेताभोवती टाकण्याचीही चाल आहे. उसाचे रक्षण करण्यासाठी त्याच्याच सोपटांचा वाघ करून तो शेतात ठेवतात. फळबागेचे रक्षण करण्यासाठी कुठे कुठे शेतकरी नग्न होऊन एखाद्या पवित्र विहिरीचे पाणी बागेवर शिंपडतात. रानडुकरांनी पिकाची नासाडी करू नये म्हणून गणेशचतुर्थीस ऐनाच्या डहाळ्या शेतात रोवतात. मळलेले धान्य घरी आणल्यावर बैल व गाडीवान यांच्यापुढे आरती ओवाळतात.

**शेतीचा विकास**– भारतात कृषिव्यवसाय फार प्राचीन काळापासून चालत आला असला, तरी शास्त्र या दृष्टीने या विषयावर ग्रंथ रचले गेले नाहीत. शेतीचे सर्व ज्ञान अनुभवाने

व परंपरेने जे काही मिळाले असेल तेवढेच. पण पाश्चात्य देशातील संशोधकांनी प्रयोगांच्या साहाय्याने शेतीचे संपूर्ण शास्त्र बनविले आहे. मात्र हा विषय इतका व्यापक आहे, की त्याचा अभ्यास करणाऱ्याला इतर अनेक शास्त्रांचा अभ्यास करावा लागतो. भूस्तरशास्त्र, पदार्थविज्ञान, वनस्पतिशास्त्र, रसायनशास्त्र, कीटकशास्त्र, जंतुशास्त्र, पशुवैद्यक, पशुसगोपन, मंत्रशास्त्र, वातावरणशास्त्र, इ. विषयांचे ज्ञान असल्याशिवाय कृषिविद्या पूर्णपणे हस्तगत झाली, असे म्हणता येत नाही. पाश्चात्य लोकानी या ज्ञानाबरोबरच भुइमूग, बटाटे, रताळी, मका, श्रावणघेवडा, कोबी, नवलकोल, फुलकोबी, टमाटो, गिनी-गवत, लसूणघास, पुंड्या ऊस, तंबाखू, लांब धाग्याचा कापूस वगैरे नवीन पिकेही भारतात आणून जोपासली. नवीन प्रकारची खते वापरून जमिनीचा कस वाढविणे आणि भिन्न भिन्न औषधांच्या योगाने पिकांवरील रोग नष्ट करणे, याचे ज्ञान त्यांनीच भारतीय शेतकऱ्याला दिले. लोकसंख्येच्या मानाने पिकाऊ जमीन कमी पडू लागल्यामुळे जंगले तोडून जमीन लागवडीस आणण्याचा उपक्रम सुरू झाला, त्याचप्रमाणे समुद्र व खाड्या हटवून तिथे खारी शेती सुरू करण्यात आली. यांत्रिक नांगराचा उपयोग भारतात अजूनही फारसा केला जात नाही. शेतकरीवर्गात शिक्षणाचा अभाव व त्याची पुराणप्रियता यामुळे या देशात शेतीचा विकास व्हावा तसा झाला नाही.

**संस्कृतिसंवर्धन** – प्राचीन काळी बहुतेक सर्व संस्कृतीचा विकास नद्यांच्या काठीच झालेला दिसतो. याचे मुख्य कारण म्हणजे तिथे शेतीपासून भरपूर अन्न प्राप्त होत असे, हे होय. नाईल, तैग्रिस, सिंधू, गंगा या नद्यांनी महान संस्कृतीना जन्म दिला आहे. नद्यांनी पिकविलेल्या धान्याने उदरभरणाची विवंचना दूर झाल्यानंतर मग मानवाला काव्य, शास्त्र व कलाकौशल्य याच्याकडे लक्ष द्यायला अवसर मिळाला. आधुनिक विज्ञानयुगातही मानवी संस्कृतीचा विकास शेतीच्या विकासावरच अवलंबून असल्याचे मानले जाते. [ म. ज्ञा. को.; वे. इं ; वै. वि. भा. प.; इ. वे. क. सू.; पा. भा.; हि. ध.; सं. वि.; प्रा. गाडगीळ– नवभारत, फेब्रु. १९६४ ]

## कृष्ण

(१) दशावतारातील आठवा अवतार. याला पूर्णावतार म्हणतात. देवकी-वसुदेवांचा हा आठवा पुत्र होय. याचा जन्म मथुरेत कंसाच्या कारागृहात झाला. त्याची कथा पुढीलप्रमाणे आहे–

देवकी ही कंसाची भगिनी होय. तिचा विवाह वसुदेवाशी झाला. तिची वरात निघाली असता कंस स्वतः तिचा रथ चालवायला बसला. एवढ्यात आकाशवाणी झाली—

" हे कंसा, तू जिचे सारथ्य करीत आहेस, त्या देवकीच्या पुत्राच्या हातून तुझा वध होईल. "

ही आकाशवाणी ऐकताच कंसाचे मन फिरले. तो देवकीला मारायला निघाला. तेव्हा वसुदेवाने त्याला विनविले. 'कंसा, देवकी ही स्त्री आहे आणि तुझी बहीण आहे. तू तिच्या हत्येचे पातक करू नकोस.' पण कंस ऐकेना. शेवटी 'देवकीला होणारी मुले मी तुझ्या स्वाधीन करीन' या अटीवर वसुदेवाने देवकीला वाचविले. कंसाने मग वसुदेव-देवकीना आपल्या कैदेत ठेवले. देवकीला होणारे प्रत्येक मूल कंस ठार करीत असे. याप्रमाणे त्याने सहा मुले मारली. देवकीचा सातवा गर्भ बलराम हा होय. याला योगमायेने विष्णूच्या आज्ञेवरून वसुदेवाची दुसरी पत्नी रोहिणी हिच्या गर्भात प्रविष्ट केले. त्यामुळे बलराम वाचला. त्यानंतर देवकीला आठवा पुत्र झाला, तोच भगवान श्रीकृष्ण होय.

त्याचा जन्म श्रावण व. ८ मीच्या दिवशी बुधवारी मध्यरात्री रोहिणी नक्षत्रावर झाला. हा चतुर्भुज अशा महाविष्णुस्वरूपात देवकीपुढे प्रकट झाला. वसुदेव–देवकीनी त्याचे स्तवन केले. मग वसुदेवाने त्याला बालरूप धारण करण्यास सांगितले. कृष्ण लगेच अर्भक बनला. कंस हा त्याच्या वधासाठी टपलेलाच होता. त्याच्यापासून या दिव्य बालकाचे रक्षण कसे करावे, ही चिंता वसुदेव-देवकींना पडली. विचार करता, कृष्णाला गोकुळात नेऊन ठेवावे, असे ठरले. त्याप्रमाणे वसुदेवाने गोकुळात नेण्यासाठी कृष्णाला उचलले. त्यासरशी कारागृहाचा दरवाजा



कृष्णाची जन्मभूमी – मथुरा

आपोआप उघडला. पहारेकऱ्यांना गाढ झोप लागली. त्या अंधाऱ्या रात्री धूमधार पावसात वसुदेव कृष्णाला घेऊन गोकुळाच्या मार्गाला लागला. वाटेत यमुना नदी आडवी आली. तिचे पात्र दुथडी भरून वाहत होते. वसुदेव तसाच यमुनेत उतरला आणि यमुनेने आपले पाणी दुभंगून त्याला पायउतार दिला.

गोकुळातला नंदगोप हा वसुदेवाचा मित्र होता. त्याची भार्या यशोदा त्याच वेळी प्रसूत होऊन तिला मुलगी झाली

होती. यशोदेला त्या वेळी झोप लागली होती. त्या अवस्थेत वसुदेवाने कृष्णाला यशोदेच्या कुशीत ठेवून तिच्या कन्येला उचलून घेतले. ही कन्या म्हणजे साक्षात योगमाया होती. तिला घेऊन वसुदेव परत मथुरेच्या कारागृहात आला. मग त्याने देवकी प्रसूत झाल्याचा पुकारा केला. त्यासरशी सगळे खडबडून जागे झाले. कंस खड्ग घेऊन धावतच तिथे आला. ते पाहून देवकीने त्याला प्रार्थिले.

" दादा, ही मुलगी आहे; हिच्यापासून तुला भय नाही. एवढे तरी मूल मला राहू दे !"

पण कसाने तिला जुमानले नाही. कंस त्या मुलीला उचलून तिला शिळेवर आपटण्यास निघाला. पण तसे करताना ती त्याच्या हातून निसटली. आकाशात गेल्यानंतर तिने आपले खरे स्वरूप प्रकट केले आणि कसाला म्हटले.

" कंसा तुझा वैरी जन्मला असून तो सुखाने वाढतो आहे."

ते ऐकून कसाच्या मनाला धक्काच बसला. त्याने मग आस-पासची पुरे, ग्रामे, व्रज, इ. ठिकाणच्या मुलाना ठार करण्याचे ठरविले. प्रलंबादी असुरांना तशी आज्ञाही त्याने देऊन टाकली. मग का कोण जाणे; त्याला एकाएकी पश्चात्ताप झाला. त्याने देवकीची क्षमा मागून वसुदेव-देवकींना कारागृहातून मुक्त केले. पण ही त्यांची मुक्ती अल्पकालिकच ठरली. कंसाचा बेत पुन्हा बदलला व त्याने पुनश्च त्या दोघांना कारागृहात डांबले.

इकडे गोकुळात यशोदेला पुत्र झाला म्हणून सर्वत्र आनंदी आनंद झाला. नंदाने त्याचे जातकर्म करून गायी दान दिल्या. साऱ्या गोकुळभर महोत्सव सुरू झाला. मग वसुदेवाने रोहि-णीलाही तिच्या पुत्रासह गोकुळातच पाठवून दिले. पुढे एक दिवस यदूंचा पुरोहित असलेला गर्ग मुनी वसुदेवाच्या सांगण्या-


यशोदेचे प्रसूतिगृह — मल्लिकपूर

वरून गोकुळात आला. त्याने या दोन मुलांचे गुप्तपणे नामकरण केले. त्याने रोहिणीच्या पुत्राला राम व देवकीच्या पुत्राला कृष्ण अशी नावे ठेवली.

मग राम-कृष्ण ही दोन मुले गोकुळात वाढू लागली. थोड्याच दिवसात कंसाची बहीण पूतना ही आपल्या स्तनांत विष भरून घेऊन कृष्णाला मारण्यासाठी गोकुळात आली. कृष्णाने तिचे स्तनपान केले व ते विष पचवून, अखेर तिलाच ठार मारले. त्यानंतर कंसाने तृणावर्त नावाच्या दैत्याला कृष्णा-वर पाठविले. कृष्णाने त्याला दगडावर आपटून ठार मारले. त्याचप्रमाणे वत्सासुर, धेनुकासुर, प्रलंबासुर, अघासुर, बकासुर, केशी, इ. कंसप्रेषित दैत्यांनाही कृष्णाने यमलोकी रवाना केले.

कुबेराचे नलकूबर व मणिग्रीव हे दोन पुत्र नारदाच्या शापाने वृक्षरूप झाले होते. कृष्णाने त्यांचा उद्धार केला. एकदा बल-रामादी गोपांनी यशोदेला येऊन सांगितले, की 'कृष्णाने माती खाल्ली.' त्यावर यशोदेने कृष्णाला तोंड उघडण्यास सांगितले.


धेनुकासुरवध — बदामी गुंफा

कृष्णाने तसे करताच यशोदेला त्याच्या मुखात विश्वरूपदर्शन झाले. एकदा ब्रह्मदेवाने गोकुळातल्या गायी, वत्स व गोपाल यांना एक वर्षपर्यंत अदृश्य केले. त्याला कृष्णाच्या सामर्थ्याची परीक्षा पाहायची होती. ब्रह्मदेवाचे हे कृत्य जाणून कृष्ण स्वतःच गायी, वत्स व गोपाल या रूपांनी नटला आणि त्याने गोकुळातल्या लोकांना ब्रह्मदेवाने केलेल्या या अपहाराचा पत्ताही लागू दिला नाही. शेवटी ब्रह्मदेव हतगर्व होऊन कृष्णाला शरण आला.

यमुनेच्या डोहात कालिय नावाचा एक नाग राहत असे. त्याच्या त्या वास्तव्याने यमुनेचे पाणी विषमय झाले होते. कृष्णाने त्या कालियाचे मर्दन करून, त्याला तिथून हाकलून दिले. एकदा गोकुळाला दावाग्नीने ग्रासले असता, कृष्णाने तो दावाग्नी प्राशन करून लोकांना संकटमुक्त केले. कृष्णप्राप्तीसाठी

कात्यायनीव्रत करणाऱ्या आणि त्याकरिता यमुनेत विवस्त्र स्नान करणाऱ्या गोपींचे त्याने वस्त्रहरण केले व त्यांना वरही दिला. तसाच त्याने यज्ञपत्न्यांचाही उद्धार केला (भाग. पु. १०.२३).

गोकुळात प्रतिवर्षी इंद्राप्रीत्यर्थ मोठा उत्सव होत असे. पण इंद्राचा गर्व नष्ट करण्यासाठी कृष्णाने इंद्रोत्सव न करता गोवर्धन पर्वताचा उत्सव करायचे ठरवले. त्या उत्सवासाठी सारे गोकुळ गायी वासरांसह गोवर्धनावर गोळा झाले. तो सोहळा पाहून इंद्राला अपमान वाटला. अंतरी क्रुद्ध होऊन त्याने गोकुळावर अतिवृष्टी सुरू केली. त्यासरशी कृष्णाने गोवर्धन पर्वत उचलून व तो सात दिवस आपल्या करांगुलीवर धारण करून,

कृष्णाचे असे अलौकिक पराक्रम ऐकून कंस अस्वस्थ झाला. मग त्याने राम-कृष्णांना मथुरेत बोलावून घेऊन तिथे त्यांचा घात करायचे ठरविले. त्यासाठी त्याने एक धनुर्याग योजला. अक्रूर हा कंसाचा दानपती होता. कंसाने राम-कृष्णांना मथुरेत आणण्यासाठी त्यालाच गोकुळात पाठविले. अक्रूर त्या कामगिरीवर निघाला. तो गोकुळात पोचल्यावर नंदगोपाने त्याचे उत्तम प्रकारचे आतिथ्य केले. अक्रूराने आपल्या आगमनाचा हेतू नंदाला सांगितला. नंदाने अक्रूराबरोबर राम-कृष्णांना मथुरेत पाठवायचे ठरविले. कृष्ण मथुरेला जात आहे, हे गोकुळातल्या गोपींना समजताच त्यांना फार दुःख झाले कृष्णाची पावले पुनश्च गोकुळाला लागणार नाहीत, अशी काहीतरी अशुभ शंका


बालकृष्णाची गोचारणलीला

त्याच्याखाली सगळ्या गोकुळाचे रक्षण केले. मग इंद्र कृष्णाला शरण आला. कृष्णाच्या या पराक्रमाबद्दल त्याला गोवर्धनधारी असे बिरुद मिळाले.

पुढे शरद ऋतूतील एका चांदण्या रात्री कृष्णाने गोकुळातल्या गोपींसह रासक्रीडा केली. त्या एका रात्री त्याने गोपींना जन्मभर संस्मरणीय होईल असे अननुभूत आणि अलौकिक सुख दिले. नंतर एक दिवस एका देवयात्रेत एका सर्पाने नंदाला गिळण्याचा प्रयत्न केला. तो सर्प म्हणजे सुदर्शननामक विद्याधर होता आणि अंगिरसाच्या शापामुळे सर्पयोनीला प्राप्त झाला होता. कृष्णाने त्याला पदस्पर्श करून नंदाला सोडविले व त्या विद्याधराचाही उद्धार केला.

त्याच वेळी त्यांच्या मनात दाटून आली. कृष्णाने जाऊ नये म्हणून त्या सर्व जणींनी आकांत मांडला. कृष्णाने त्यांचे कसेबसे सांत्वन केले व तो गोकुळातून बाहेर पडला. राम-कृष्ण दोघेही अक्रूराच्या रथात बसून मथुरेत आले. अक्रूराने त्यांना आपल्या घरी उतरून घेतले.

त्या अवधीत कृष्णाने कोणालाही न कळवता गुप्तपणे वसुदेव-देवकींची भेट घेतली. राम-कृष्ण मग मथुरेच्या पर्यटणास निघाले. त्यांना वाटेत भेटला एक रजक. त्याच्याकडे कंसाचे उंची कपडे होते, ते त्यांनी मागितले. रजकाने ते दिले नाहीत म्हणून त्यांनी त्याला ठार मारले. एका फूलवाल्याने त्यांना पुष्पहार अर्पण केले. कुब्जा नामक कंसदासीने कृष्णाला चंदनाची

उटी लावली. त्यामुळे प्रसन्न होऊन कृष्णाने तिची काया वक्र होती ती सरळ केली. नंतर कसाच्या शस्त्रागारात जाऊन कृष्णाने तिथले एक भव्य धनुष्य मोडून टाकले. अशा प्रकारे कृष्णाने आपले मथुरेतले आगमन लोकांना जाणवून दिले.

दुसऱ्या दिवशी कंसाने धनुर्यागासाठी तयार केलेल्या मंडपाकडे राम-कृष्ण जायला निघाले. त्याच्या महाद्वारात कंसाने कुवलयापीड नावाचा मस्त हत्ती उभा करून ठेवला होता. त्या हत्तीने एकदम कृष्णावर चाल केली. कृष्णाने थोड्याच वेळात त्याला ठार केले. लगेच कंसाच्या इशाऱ्याप्रमाणे चाणूर नावाचा मल्ल कृष्णावर धावून आला. मुष्टिक नावाच्या दुसऱ्या मल्लाने बलरामावर आक्रमण केले. पण त्या दोघाही मल्लांना राम-कृष्णानी यमसदनास पाठविले एवढे झाल्यावर कृष्ण धावतच कंसाच्या सिंहासनाकडे गेला. त्याने कंसाचे केस धरून त्याला सिंहासनाखाली ओढले आणि एकाच घावात ठार मारले. कसासारखा दुर्जन जगातून नाहीसा केला म्हणून सर्व लोकांनी कृष्णाचा जयजयकार केला.


कृष्ण – कालियामर्दन

जो जिंकतो त्याचे राज्य या नियमानुसार कंसाला ठार मारल्यावर मथुरेचे राज्य हे कृष्णाचे राज्य ठरले होते. मथुरेतल्या सर्व प्रजेचे कृष्णावर इतके विलक्षण प्रेम होते, की कृष्णाने तशी इच्छा दर्शविताक्षणीच प्रजेने त्याला राजा म्हणून सिंहासनावर बसवले असते. कंसाचा पिता उग्रसेन याने हे जाणले आणि कृष्णाला विनविले, की 'हे संपूर्ण राज्य तुझे असून तू त्याचा स्वीकार कर.' त्यावर कृष्ण त्या वृद्ध उग्रसेनाला म्हणाला–

**न हि राज्येन मे कार्यं नाप्याहं नृपकाङ्क्षितः।**
**न चापि राज्यलुब्धेन मया कंसो निपातितः।।**
**किंतु लोकहितार्थाय कीर्त्यर्थं च सुतस्तव।**
**व्यङ्गभूतः कुलस्यास्य सानुजो विनिपातितः।।**

(हरिवंश ३२.४८–४९)

अर्थ– मला हे राज्य नको. राज्यपदाची मला कसलीही आकांक्षा नव्हती आणि राज्यलोभाने मी कंसाला मारलेही नाही. तुझा मुलगा कंस हा कुलकलंक होता. लोकांच्या हितासाठी आणि कुलाच्या इभ्रतीसाठी मी त्याला त्याच्या बंधूंसह ठार मारले.

कृष्ण एवढे बोलूनच थांबला नाही; तर त्याने उग्रसेनाला अभिषेक करून मथुरेचे राज्य त्याच्या ताब्यात दिले. नंतर राम–कृष्णांनी वसुदेव–देवकी यांची भेट घेतली. नंदादी गोपालाना मथुरेत आणून कृष्णाने त्यांचा सत्कार केला आणि


गोवर्धनधारी कृष्ण – महाबलिपुरम्

त्यांना परत गोकुळात पाठविले. तो मात्र पुनश्च गोकुळात गेला नाही. यशोदा आणि इतर गोपी यांचे सांत्वन करण्यासाठी त्याने फक्त उद्धवाला गोकुळात पाठवले.

मग वसुदेवाने राम–कृष्णांचे उपनयन केले. त्यानंतर राम–कृष्ण अध्ययनासाठी अवंती नगरीत सांदीपनी ऋषीकडे गेले. तिथे ते वेद–वेदांगे व धनुर्वेद शिकले. श्रीकृष्ण गुरुगृही चौसष्ट दिवस होता. अध्ययन संपल्यावर त्याने सांदीपनीला गुरुदक्षिणा मागण्यास सांगितले. त्यावर सांदीपनी त्याला म्हणाला.

"माझा एक मुलगा प्रभासपट्टणात समुद्रस्नानाला गेला असता त्याला शंख नामक दैत्याने समुद्रात ओढून नेले. तो मला परत आणून दे."

कृष्ण लगेच प्रभासपट्टणाला गेला. त्याने शंखासुराचा वध करून गुरुपुत्र परत आणला व गुरूला समर्पिला. गुरूचे आशीर्वाद घेऊन कृष्ण परत मथुरेस आला. मथुरेचे यादवराज्य हे गणराज्य होते. कृष्णाला आता त्या राज्याची घडी नव्याने बसवायची होती. पण एवढ्यात एक नवेच संकट त्याच्यापुढे दत्त म्हणून उभे राहिले.

मगधाधिपती जरासंध हा कंसाचा सासरा होता. कृष्णाने आपल्या जावयाला मारले, असे समजताच तो क्रोधाने खवळला आणि कृष्णावर चालून आला. आपल्या प्रचंड सैन्यासह त्याने मथुरेला वेढा दिला. पण कृष्णाने या अचानक आलेल्या संकटाला निर्धाराने तोंड दिले. यादवसैन्य संघटित करून त्याने जरासंधाचा पराभव केला. जरासंध फजित होऊन परत गेला खरा; पण त्याने मनात दंश धरला. त्याने मथुरेवर पुनश्च स्वारी केली आणि पुन्हाही हार खाल्ली. असे सतरा वेळा झाले.

अठराव्या स्वारीच्या वेळी जरासंधाचे बळ वाढले आणि यादवांचे बळ त्या मानाने तोकडे पडले. आपण आता सर्व बाजूंनी असुरक्षित आहो आणि शत्रूची ही स्वारी आपल्या अंगाशी येणार, हे भविष्य कृष्णाने जाणले. मग त्याने मथुरेची राजधानी तिथून उचलून दूरवर नेण्याचे ठरविले. त्याने त्यासाठी सौराष्ट्रात द्वारका नावाची नवी नगरी वसविली आणि मथुरेतल्या समस्त प्रजाजनांना त्यांच्या मालमत्तेसह सुखरूप त्या नगरीत नेऊन वसविले. मथुरावासी जनांना द्वारकेत पाठविताना कृष्ण त्यांना म्हणाला.

"मी स्वतः बलरामासह गोमंत पर्वताकडे जातो. जरासंधाची स्वारी ही मुख्यतः माझ्यावरच असल्यामुळे मी निघून गेल्यावर तो माझाच पाठलाग करील व त्या अवधीत तुम्हाला सुखरूप द्वारका गाठता येईल."



गोपीवस्त्रहरण – बसौली शैली

पण कृष्ण हा बेत ठरवतो, तोच आणखी एक नवे संकट पुढे आले. एका बाजूने जरासंध तर दुसऱ्या बाजूने कालयवन मथुरेवर चालून आला. मग मात्र कृष्णाने एक डाव खेळायचे ठरविले. त्याने भयाचा बहाणा करून पलायन आरंभले. कालयवन त्याचा पाठलाग करू लागला. कृष्ण एका गुहेत शिरताच कालयवनही त्याच्यामागोमाग आत गेला. तिथे मुचकुंद हा राजर्षी दीर्घ निद्रा घेत पहुडला होता. कालयवनाच्या आगमनाने त्याला जाग आली आणि त्याच्या नेत्रातील तेजाने कालयवन भस्म झाला.

कृष्ण मग तिथून बाहेर पडला आणि प्रवर्षण नामक

पर्वतावर गेला. जरासंध त्याच्या मागावर होताच. 'आता बरा सापडला' असे म्हणून जरासंधाने त्या पर्वताला चोहोबाजूंनी वणवा लावून दिला. त्या वणव्यात कृष्ण जळून मेला अशी त्याने कल्पना करून घेतली व तो आपल्या राजधानीला परत आला. कृष्णाला त्या वणव्याची बाधा झाली नाही. तो सुखरूप द्वारकेला पोचला.

अंधक व वृष्णी अशी यादवांच्या दोन शाखांची दोन गणराज्ये होती व कृष्ण त्या दोन्ही गणराज्याचा नेता होता. त्यांपैकी अंधक किंवा कुकुर या गणाचे राज्य मथुरा या प्रदेशावर होते व उग्रसेन हा अंधकांचा गणाध्यक्ष होता. अंधकांच्या गणाध्यक्षाला राजा ही पदवी असे. अंधकाच्या शेजारीच वृष्णीचे राज्य होते. याच वृष्णिकुलात कृष्णाचा जन्म झाला होता. वृष्णीमध्ये शूर नावाचा एक विख्यात पुरुष होऊन गेला. कृष्णाचा पिता वसुदेव हा शूराचा पुत्र होय. अंधक कुळातील देवकाची मुलगी देवकी ही वसुदेवाला दिली गेली व या विवाहसंबंधामुळे अंधक व वृष्णी ही दोन्ही संघराज्ये एकरूप झाली आणि पुढच्या काळात या उभय गणराज्यांचे प्रमुखत्व कृष्णाकडे आले.

कृष्णाने द्वारकेत वास्तव्य केल्यानंतर आणखी एक महत्त्वाचा प्रसंग उद्भवला आणि त्यामुळे त्याचे तेज तत्कालीन राजमंडळात सर्वत्र फाकले. तो प्रसंग म्हणजे रुक्मिणीस्वयंवर हा होय. रुक्मिणी ही विदर्भदेशाच्या भीष्मक राजाची मुलगी. पित्याच्या दरबारात बसलेली असताना कृष्णाचे शौर्य, धैर्य, सौंदर्य, इ. गुणविशेष तिच्या कानी वारंवार पडत. ऋषी-मुनींकडून अशी कृष्णप्रशंसा ऐकता ऐकता तिचे मन कृष्णावर जडले. भीष्मक व त्याचा थोरला पुत्र रुक्मी या दोघांनी रुक्मिणीसाठी चेदिदेशाचा राजा शिशुपाल हा वर नेमस्त केला होता; पण रुक्मिणीला तो पसंत नव्हता. तिने ध्यास घेतला होता तो कृष्णाचा. शिशुपालाचे हे संकट पुढे ठाकताच तिने सुदेव नावाच्या ब्राह्मणाच्या हाती कृष्णाला प्रेमपत्र धाडले व 'सत्वर येऊन माझा स्वीकार कर' असे त्याला विनविले. कृष्णाने रुक्मिणीची ती इच्छा पूर्ण करायचे ठरवले. तो रथात बसून कुंडिनपुराला आला. रुक्मिणी अंबिकेच्या मंदिरातून बाहेर पडत असता, कृष्णाने अचानक गर्दीत रथ घालून तिला आपल्या रथात ओढून घेतले आणि अंगावर चालून आलेल्या सर्व राजमंडळातून रस्ता काढीत तो रुक्मिणीसह द्वारकेत आला. तिथे कृष्ण-रुक्मिणीचा विवाहोत्सव थाटाने पार पडला.

हा कृष्णाचा पहिला विवाह होय. पुढे स्यमंतक मण्याच्या प्रसंगाने जांबवती व सत्यभामा या दोघींशी त्याचा विवाह झाला. त्यानंतर कालिंदी, मित्रविंदा, सत्या, भद्रा व लक्ष्मणा या सुलक्षणी कन्यांचे स्वपराक्रमाने हरण करून कृष्णाने त्यांच्याशी विवाह केले. कृष्णाच्या अष्टनायिका त्या याच होत. पुढे नरकासुराचा वध करून, त्याने बंदीत टाकलेल्या सोळा हजार कन्यांना कृष्णाने मुक्त केले आणि भार्या म्हणून त्यांचे पाणिग्रहणही केले. नरकासुराला मारून परत येताना कृष्णाने इंद्राचा पारिजात वृक्ष उपटून आणला आणि तो सत्यभामेच्या दारी लावला. तेव्हा इंद्राला क्रोध येऊन तो कृष्णाशी युद्ध करायला आला. पण कृष्णापुढे त्याचे काही चालले नाही. कृष्ण त्याला म्हणाला, की 'मी पृथ्वीवर असेपर्यंत हा वृक्ष येथे असू दे. मी निजधामास गेल्यावर तू हा परत ने.' इंद्राने ती गोष्ट मान्य केली. इथवरचे हे कृष्णचरित्र भागवत व हरिवंश या ग्रंथांच्या आधारे समजते.

कृष्णाची आणि पांडवांची पहिली भेट द्रौपदीच्या स्वयंवरप्रसंगी झाली. अर्जुनाने द्रुपदाचा पण जिंकल्यावर पाचही पांडवांशी द्रौपदीचा विवाह झाला आणि त्या प्रसंगी कृष्णाने पांडवांना अपार धन व राजवैभव दिले. धर्मराजाने त्या देणगीचा प्रेमाने स्वीकार केला. त्या देणगीमुळे यादवांची बलिष्ठ



उद्धव गोपींचे सांत्वन करतो

अशी सत्ताच जणू पांडवांच्या पाठीशी उभी राहिली. त्याचबरोबर पांडवांना कृष्ण हा श्रेष्ठ मित्रही लाभला. कृष्ण त्यानंतर पांडवांच्या बरोबरच हस्तिनापुरात आला. पुढे पांडव इंद्रप्रस्थाला राहायला गेल्यावर कृष्ण पुन्हा त्यांना भेटायला आला. अग्नीला खांडववन जाळायचे होते, त्या कामी त्याला कृष्णार्जुनांनी मदत केली. त्याबद्दल अग्नीने दिव्यचक्र व कौमोदकी गदा या दोन वस्तू कृष्णाला दिल्या. त्यानंतर कृष्णाची भेट घेण्यासाठी अर्जुन द्वारकेत गेला असता, कृष्णाची बहीण सुभद्रा ही अर्जुनाच्या मनात भरली. कृष्णाशी संगनमत करून अर्जुनाने तिला पळवून नेले व तिच्याशी लग्न केले. कृष्णाने बलरामाच्या मनाविरुद्ध ही सोयरीक जुळवून आणली आणि पांडवांशी नात्याचा संबंध जोडला.

पुढे युधिष्ठिराच्या मनात राजसूय यज्ञ करण्याचा विचार

आला. तो यज्ञ करायचा, तर प्रथम जरासंधाचा काटा काढला पाहिजे, असा कृष्णाने त्याला सल्ला दिला. धर्माने तो मानला. भीमार्जुन त्या मोहिमेवर निघाले. कृष्णही त्याच्याबरोबर मगधात गेला. त्याने भीमाकडून जरासंधाचा वध करविला. तेवढे करून त्याने पांडवांचा दिग्विजयाचा मार्ग तर मोकळा करून दिलाच; शिवाय तत्कालीन राजवर्तुळाला ज्या साम्राज्यसत्तेकडून पाठवळ मिळत असे, ती साम्राज्यसत्ताच उखडून टाकली.

कुरूषाधिपती पौंड्रक हा वासुदेव नाव धारण करून कृष्णाशी स्पर्धा करीत होता. तसेच करवीराधिपती शृगाल हाही कृष्णाचा द्वेष करीत होता. कृष्णाने त्या दोघांचाही वध केला. युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञात ब्राह्मणांचे पदप्रक्षालन करून कृष्णाने ब्राह्मण्याविषयी आपला नम्र भाव प्रकट केला. नंतर त्याच यज्ञाच्या सांगतेच्या वेळी सहदेवाने भीष्माच्या अनुमतीने कृष्णाची अग्रपूजा केली. त्यामुळे शिशुपाल अत्यंत खवळला. त्याने कृष्णाची भरसभेत निंदा आरंभली. कृष्णाला वाटले, की शिशुपालाचा काटा काढायला हीच योग्य वेळ आहे. लगेच तिथल्या तिथे सुदर्शन चक्र फेकून त्याने शिशुपालाचा वध केला. त्यानंतर शाल्व, दंतवक्र व विदूरथ या दुष्ट राजांनाही त्याने ठार केले. कौरव-पांडवांत द्यूत झाले, त्यावेळी धर्मराजाने द्रौपदी पणाला लावली. धर्मराज तो पण हरला. मग दुःशासनाने द्रौपदीला राजसभेत आणले व तो तिला विवस्त्र करू लागला. त्या प्रसंगी द्रौपदीने कृष्णाचा धावा केला व कृष्णाला तिची दया येऊन, त्याने तिला अनंत वस्त्रे पुरवून, तिची लाज राखली.

पांडव वनवासात असतानाही कृष्ण त्यांच्या भेटीस गेला होता. पांडवांचा वनवास व अज्ञातवास संपल्यानंतर उपप्लव्य नगरात अभिमन्यूचे उत्तरेशी लग्न झाले. कृष्ण त्या प्रसंगीही उपस्थित राहिला. त्या समारंभाला अनेक राजे जमा झाले होते. तो मोका साधून कृष्णाने पांडवांना त्यांच्या हक्काचे अर्धे राज्य मिळावे, याबाबत त्यांच्यापुढे प्रश्न काढला. पण दुर्योधनाकडून त्या गोष्टीला रुकार मिळाला नाही.

नंतर उभयपक्षी युद्धाचे विचार सुरू झाले. दोन्ही पक्ष निरनिराळ्या राजांना आपल्या पक्षाकडे येण्यासाठी पाचारण करू लागले.

अशा रीतीने दोन्ही पक्षांची युद्धसिद्धता झाली. धर्मराजाला वाटले, की कौरवाकडे शेवटचा एकदा शांतिप्रयत्न करून पाहावा. म्हणून त्याने कृष्णाला शिष्टाईसाठी हस्तिनापुरात पाठवले. तिथे जाऊन कृष्णाने तिथल्या राजसभेत धृतराष्ट्राला उद्देशून पुढीलप्रमाणे भाषण केले—

"हे धृतराष्ट्रा! कौरव-पांडव याच्यांत संधी होऊन शांतता नांदावी आणि क्षत्रियांचा विनाश टळावा, हे मागणे मागण्यासाठी मी तुझ्याकडे आलो आहे. जगातील सर्व राजवंशांत तुमचे कौरवकुल हे अत्यंत श्रेष्ठ असे आहे. ते विद्या व शील यांनी संपन्न आहे. कृपा, कारुण्य, सद्भाव, क्षमा व सत्य हे कुरुकुलाचे स्वभावसिद्ध गुण आहेत. अशा या कुलाचा सांप्रत तू आधारस्तंभ आहेस. तेव्हा तू राज्यावर असताना हा सर्वनाश ओढवावा, ही गोष्ट चांगली नव्हे. तेव्हा आपली जबाबदारी ओळखून व स्वतःचे सामर्थ्य उपयोगात आणून तू हा युद्धप्रसंग टाळावास, हे बरे! तुझे दुर्योधनप्रमुख पुत्र धर्माला व राजकीय नीतिमत्तेला पराङमुख होऊन घातकीपणाचे वर्तन करीत आहेत. त्यांच्या ठिकाणी सदसद्विवेकबुद्धी उरली नाही. आपल्याच कुलातल्या बांधवांशी अर्थात पांडवांशी ते कमालीचा दुष्टपणा करीत आहेत. त्यांच्या या दुष्टपणामुळेच जगाचा संहार होण्याची वेळ आली आहे. हे राजा, तू मनात आणलेस, तर हा संहार थांबू शकेल. तू आणि मी या दोनच व्यक्तींवर आज जागतिक शांतता अवलंबून आहे. तू आपल्या पुत्रांना आवर; मी पांडवांना आवरतो...."

पण दुर्योधनाच्या दुराग्रहापुढे धृतराष्ट्राचे काही चालले नाही. ती शिष्टाई अयशस्वी झाली. कृष्ण हस्तिनापुरातून पांडवांकडे यायला निघाला. त्याला पोचविण्यासाठी भीष्मादिक पुढे आले होते आणि त्यात कर्णही होता. कृष्णाने कर्णाला एकांती गाठून त्याचे जन्मवृत्त त्याला सांगितले व 'या युद्धात तू पांडवांच्या पक्षाला ये' असे त्याला म्हटले. पण कर्णाने ते कबूल केले नाही.

त्यानंतर थोड्याच दिवसात कौरव-पांडव युद्धासाठी कुरुक्षेत्रावर समोरासमोर उभे ठाकले. त्या प्रसंगी कृष्णाने अर्जुनाचे सारथ्य पत्करले. पण लढाई आता हातघाईवर येणार, इतक्यात अर्जुनाला व्यामोह उत्पन्न झाला. युद्धात भीष्म-द्रोणादी वडिलधाऱ्या मंडळींचा वध करणे आणि एकूण सगळ्या कुलाच्याच क्षयाला कारणीभूत होणे, हे महापाप आहे, असे त्याला वाटले. युद्ध करावे की न करावे, अशा संभ्रमात तो पडला. त्या वेळी कृष्णाने त्याला तत्त्वज्ञानाचा उपदेश करून त्याचा मोह दूर केला. हा उपदेश म्हणजेच सुप्रसिद्ध भगवद्गीता होय. तो उपदेश मनावर ठसवून अर्जुन युद्धाला म्हणजेच स्वकर्तव्याला सिद्ध झाला. या भारतीय युद्धात अनेक प्रसंगी कृष्णाने पांडवांचे संरक्षण केले.

पांडव युद्धात विजयी झाल्यावर त्यांच्यासह कृष्ण हस्तिनापुरात गेला. त्याने मग धर्मराजाकडून अश्वमेध यज्ञ करविला. युद्धात आप्तेष्टांचा वध झाल्यामुळे धर्मराजाचे मन फार अस्वस्थ झाले होते. कृष्णाने अनेक कथा सांगून ते शांत केले. पुढे

अश्वत्थाम्याच्या अस्त्रापासून उत्तरेच्या गर्भाचे संरक्षणही कृष्णानेच केले. अर्जुनाला केलेला गीतोपदेश त्याच्या हृदयात अस्पष्ट झाला, असे समजल्यावर कृष्णाने त्याला पुनश्च अनुगीता उपदेशिली.

पुढे एक दिवस सर्व यादव प्रभासक्षेत्री गेले. राम-कृष्णही त्यांच्याबरोबर होते. तिथे सर्व यादवांनी यथेच्छ मदिराप्राशन केले. मद्याने धुंद होऊन ते कलहाला प्रवृत्त झाले. त्यातून मारामारी सुरू झाली. यादव मंडळी एकमेकानाच ठार करू लागली. या यादवी युद्धात बहुतेक सर्व यादवाचा संहार झाला. ते पाहून बलरामाने समुद्रतीरी देहविसर्जन केले. एवढ्यात स्वर्गातल्या देवांनी कृष्णाला निजधामास येण्याची विनंती केली. उद्धवाला ही गोष्ट समजताच त्याने आपल्याला बरोबर नेण्याविषयी कृष्णाला प्रार्थिले. पण कृष्णाच्या मनात उद्धवाने आपल्यामागे भूलोकी राहावे, असे होते. म्हणून त्याने उद्धवाला अध्यात्माचा उपदेश करून आपल्यामागे ठेवून दिले.

मग एके दिवशी कृष्ण एका अश्वत्थ वृक्षाखाली, उजव्या मांडीवर डावा पाय ठेवून बसला असता, जरा नामक व्याधाने त्याला तशा अवस्थेत दुरून पाहिले. व्याधाला वाटले, की ते हरीण आहे. म्हणून त्याने बाण मारला. तो कृष्णाच्या डाव्या तळपायाला लागला. जवळ गेल्यावर व्याधाला आपली चूक कळून आली. व्याधाने कृष्णाची क्षमा मागितली. कृष्णाने त्याचे सांत्वन करून त्याला दिव्यलोकी पाठवून दिले. एवढ्यात कृष्णाचा सारथी दारुक तिथे आला. तो खाली उतरून कृष्णाला नमस्कार करतो, तोच त्याचा रथ नाहीसा झाला. ते पाहून कृष्णाला वाटले, की आपली भूलोकीची रहाटी संपली. मग त्याने शांतपणे आपला अवतार समाप्त केला. हा वृत्तांत द्वारकेत समजताच तिथे एकच हलकल्लोळ माजला. वसुदेव, देवकी व रोहिणी यांनी देहत्याग केला. कृष्णाच्या अष्टनायिकांनी अग्निप्रवेश केला. एवढ्यात अर्जुन तिथे आला. त्याला कृष्णाच्या अवतारसमाप्तीचे अपरंपार दुःख झाले. कृष्णाच्या उरलेल्या स्त्रिया व त्यांची मुले यांना घेऊन अर्जुन इंद्रप्रस्थाला चालला असता, द्वारका समुद्रात बुडाली.

मृत्युसमयी कृष्णाचे वय १२५ च्या वर होते, असे भागवतात म्हटले आहे (११.६.२५). दुसरे मत असे— अर्जुन वयाच्या १०६ व्या वर्षी मृत्यू पावला. कृष्ण व अर्जुन या दोघांच्या अंतकालात सुमारे पाच वर्षांचे अंतर असावे. त्या दोघांचे वय सारखे होते असे मानले, तर कृष्णाचा अंत १०१ व्या वर्षी झाला असावा. हे मत अधिक ग्राह्य वाटते. पण कृष्ण अर्जुनापेक्षा १८ वर्षांनी मोठा होता असे मानले, तर मात्र कृष्णाचे वय अंतकाळी ११९ होते, असे मानावे लागेल.

**कृष्णाचा कालनिर्णय**— कृष्ण ही एक ऐतिहासिक विभूती आहे, ही गोष्ट आता विद्वन्मान्य झालेली आहे. भारतीय युद्धाच्या कालासंबंधाने मतभेद असला, तरी त्या युद्धाचा मानलेला कोणताही काळ इतिहासाच्या आटोक्यातला आहे. भारतीय युद्धाचा काळ कित्येक लोक शालिवाहन शकपूर्व १२०० च्या सुमाराचा धरतात. तर कित्येक विद्वान तो शकपूर्व १४०० च्या सुमाराचा मानतात.

भारतीय युद्धाच्या वेळी कृष्ण ८३ वर्षांचा होता, अशी ज्योतिषशास्त्रात परंपरा म्हणा, कल्पना म्हणा, प्रचलित आहे. त्यावरून कृष्णाचा जन्म दिवस शकपूर्व ३२६३ श्रावण व. ८ मी हा ठरतो. त्या दिवशी बुधवार व रोहिणी नक्षत्र हा योग होता, असे पुराणात म्हटले असून, प्रा. दाजी नागेश आपटे यांनी केलेल्या गणितावरून ती गोष्ट सिद्ध ठरली आहे. अर्जुन हा कृष्णाहून अठरा वर्षांनी लहान होता व भारतीय युद्धाच्या वेळी त्याचे वय ६५ वर्षांचे होते, असे महाभारतावरून दिसते. कृष्णार्जुनाची ही वये प्रमाण मानून, श्री. वैद्य यांनी कृष्णचरित्रातील ठळक गोष्टींच्या कालाचे कोष्टक पुढीलप्रमाणे दिले आहे—

| काळ | | वृत्तांत |
|---|---|---|
| शालि. श. पू. = | इ. स. पू. | |
| ३२६३ श्रा. व. ८, | ३१८५ | कृष्णजन्म |
| ३२४४ | ३१६७ | कंसवध |
| ३२४१ | ३१६३ | अक्रूराचे हस्तिनापुरी गमन |
| ३२३८ | ३१६० | रुक्मिणीविवाह |
| ३२३६ | ३१५८ | प्रद्युम्नाचा जन्म |
| ३२२० | ३१४२ | द्रौपदीस्वयंवर |
| ३२१८ | ३१४० | इंद्रप्रस्थाची स्थापना |
| ३२१२ | ३१३४ | प्रद्युम्नाचे लग्न |
| ३२१० | ३१३२ | अर्जुनाची तीर्थयात्रा |
| ३१९८ | ३१२० | सुभद्राहरण |
| ३१९६ | ३११८ | अभिमन्यूचा जन्म |
| ३१९५ | ३११७ | राजसूय यज्ञ |
| ३१९३ | ३११५ | हस्तिनापुरी द्यूत |
| ३१८० (मार्ग.) | ३१०१ | भारतीय युद्ध |
| ३१८० (फाल्गुन) | ३१०१ | अनिरुद्धाचा विवाह |
| ३१४४ (मार्ग.) | ३०६५ | कृष्णाचे निर्याण ( वय ११९ ) |

ही शकवारी मुख्यत: भारतावरून, हरिवंश व भागवत यांच्या मदतीने ठरविलेली आहे.

**कृष्णाचे गुणविशेष**—कृष्णाच्या मानवी गुणांचे आणि दिव्य

सामर्थ्याचे दर्शन महाभारतात अनेक ठिकाणी घडते. त्याचा पहिला रूपगुण म्हणजे अद्वितीय सौंदर्य. रुक्मिणी आपल्या पत्रात त्याला भुवनसुंदर म्हणते. गोपींना तर तो साक्षात मदनच वाटत होता. गोकुळात असताना तो कसा दिसत होता आणि त्याचा वेष-परिवेष कसा होता, त्याचे वर्णन जयदेवाने गीत-गोविंदाच्या एका श्लोकात पुढीलप्रमाणे केले आहे——

**चन्दनचर्चितनीलकलेवर**
**पीतवसनवनमाली ।**
**केलिचलन्मणिकुण्डलमण्डित**
**गण्डयुगस्मितशाली ।।**

(१. ४. १)

अर्थ—— कृष्णाच्या सावळ्या तनूवर आरक्त चंदनाची उटी होती तो पीतवस्त्र नेसला होता. त्याच्या गळ्यात वनमाला होती. क्रीडा करीत असता त्याच्या कानातली मणिकुंडले डोलत आणि त्याच्या कपोलावर येऊन त्यांना शोभा देत. त्याच्या मुखावर सदैव स्मित असे.

कृष्णाच्या सौंदर्याचे वर्णन करताना भारतातल्या कवींची आणि संतांची वाणी कधीही थकली नाही. 'सगुण मेघश्याम लावण्यसुंदर' हेच त्याच्या सौंदर्याचे सार सर्वांनी आपापल्यापरी वर्णिले आहे.

कृष्ण हा केवळ रूपसुंदरच नव्हता; तर तो अनेक गुण-विशेषांचा पुतळा होता. त्याच्या या गुणविशेषांचे साधार विवेचन श्री. बाळशास्त्री हरदास यांनी आपल्या भगवान् श्रीकृष्ण या ग्रंथात केले आहे. त्याचा सारांश असा——

कृष्ण हा अलौकिक शूर आणि पराक्रमी होता. त्याच्या पराक्रमाचे वर्णन राजसूय यज्ञाच्या प्रसंगी भीष्मानेच केले आहे——

**अस्यां हि समितौ राज्ञामेकमप्यजितं युधि ।**
**न पश्यामि महीपालं सात्वतीपुत्रतेजसा ।।**

(म. भा. सभा. ३८·८)

अर्थ —— इथे जमलेल्या या विशाल राजसमूहात कृष्णाच्या तेजाने जिंकला गेला नाही, असा एकही राजा किंवा क्षत्रिय मला दिसत नाही.

खांडववनदाहाच्या प्रकरणात कृष्णाविषयी अग्नीला विश्वास देताना अर्जुन म्हणतो ——

**चक्रपाणिर्हृषीकेशो विचरन् युधि वीर्यवान् ।**
**चक्रेण भस्मसात्सर्वं विसृष्टेन तु वीर्यवान् ।**
**त्रिषु लोकेषु तन्नास्ति यन्न कुर्याज्जनार्दनः ।।**

(म. भा. आदि. २२५·३१)

अर्थ—— चक्रपाणी हृषिकेश रणक्षेत्रात उतरला म्हणजे तो वीर्यवान् (पुरुष) सोडलेल्या चक्राने सर्व काही भस्मसात करील. (हा) जनार्दन करू शकणार नाही, अशी त्रिभुवनात एकही गोष्ट नाही.

रुक्मिणीहरणाच्या प्रसंगी त्याने एकट्याने सर्व राजांचा पराभव केला. निषादराज एकलव्याला त्याने द्वंद्वयुद्धात ठार मारले. देवानाही अजिंक्य ठरलेल्या नरकासुराचा त्याने हां हां म्हणता वध केला. श्रीकृष्णाच्या भक्तांनीच नव्हे; तर शत्रूंनीही त्याच्या पराक्रमाची ग्वाही दिली आहे.

कृष्ण हा युद्धकलेत अत्यंत निष्णात होता. अर्जुनाने द्रौपदीच्या स्वयंवरप्रसंगी जसा मत्स्यभेद केला, तसाच मत्स्यभेद करून कृष्णाने लक्ष्मणा नावाची पत्नी मिळवली. गदायुद्धातही तो प्रवीण होता. वक्रदंताला त्याने गदायुद्धातच ठार मारले. शिष्टाईच्या प्रसंगी कृष्ण हस्तिनापुराला जायला निघाला असता युधिष्ठिर किंचित भयग्रस्त होऊन त्याला म्हणाला होता, 'कौरवाच्या राजसभेत तू एकटा गेलास, तर शत्रूच्या तावडीत सापडशील व ते तुला अपाय करतील.' त्यावेळी कृष्ण त्याला आश्वासन देऊन बोलला——

**अथ चेत्ते प्रवर्तेरन् मयि किञ्चिदसाम्प्रतम् ।**
**निर्दहेयं कुरून् सर्वानिति मे धीयते मतिः ।**

(म. भा. उद्योग. ७२·८७)

अर्थ—— जर ते (कौरव) मला काही अपाय करण्यास प्रवृत्त झाले, तर (त्या) सर्व कौरवांना मी जाळून टाकीन, असे माझी बुद्धी मला सांगते. (मग वेगळे युद्ध करायचे काही कारणच उरणार नाही).

**कृष्णाची तेजस्विता**— तेज या शब्दाचे दोन अर्थ होऊ शकतात——(१) अन्याय सहन न करण्याची प्रवृत्ती व (२) सभोवारच्या सर्व व्यक्तीत सूर्याप्रमाणे प्रकाशित होऊन राहणे. पहिल्या अर्थाने पाहिले, तर कृष्णाचे सर्व जीवन अन्यायाविरुद्ध झगडण्यातच गेले. त्याचे दुसऱ्या प्रकारचे तेज भीष्मार्जुन-युद्धाच्या प्रसंगी दिसून आले. अर्जुनाचे मृदु युद्ध आणि भीष्माचा वाढता प्रभाव पाहून कृष्ण संतापला. पांडवसैन्यावर तुटून पडणाऱ्या कौरववीरांकडे पाहून आणि पांडवसैन्यात झालेली पळापळ पाहून तो सात्यकीला म्हणाला——

"हे सात्यकी, जे पळाले त्यांना पळू दे. ज्यांना अजून पळून जायचे आहे, त्यांनाही खुशाल घरी जाऊ दे. मी आज भीष्म—द्रोणांना त्यांच्या गणांसहित ठार मारीन. मी गतप्राण करून रथातून फेकून दिलेला भीष्म आज सर्वांच्या दृष्टीला पडेल." असे म्हणून खवळलेला सिंह जसा मदोन्मत्त हत्तीवर तुटून पडतो, तसा कृष्ण भीष्माच्या अंगावर धावून गेला (म. भा. भीष्म. ५९·८३–८४).

**कृष्णाचे धैर्य**— कृष्णाचे धैर्य अपूर्व आणि अद्‌भुत होते. जरासंधाच्या १८ व्या स्वारीच्या वेळी आघाडीवर कालयवन व पिछाडीवर जरासंध अशा कात्रीत सापडल्यावर, त्या प्रसंगातून ज्या पद्धतीने त्याने स्वत:ला आणि यादवांना वाचविले, त्या पद्धतीवरून त्याच्या मनोधैर्याची साक्ष पटते. कृष्ण कोणत्या एखाद्या प्रसंगी डगमगला, असे कधीही झाले नाही. त्याच्या या निष्कंप मनोधैर्याचे एक प्रभावी उदाहरण स्त्रीपर्वात आढळते. युद्धात शंभरही कौरव मारले गेल्यामुळे त्यांची माता गांधारी शोकाकुल झाली. कृष्णाने मनात आणले असते, तर आपली मुले निश्चित वाचली असती, असे तिला वाटले आणि कृष्णाची भेट होताच क्षुब्ध होऊन तिने त्याला शाप दिला—

"हे कृष्णा, माझा कुलक्षय झाला, तसाच तुझाही होईल आणि आज ज्याप्रमाणे माझ्या सुना रडत आहेत, तशाच यादवस्त्रियाही ऊर पिटून रडतील !"

पण कृष्णाच्या मनावर या शापाचा लवमात्र परिणाम झाला नाही. तो धीरगंभीर वाणीने गांधारीला म्हणाला,

**जानेऽहमेतदप्येवं चीर्णं चरसि क्षत्रिये ।**
**दैवादेव विनश्यन्ति वृष्णयो नात्र संशयः ।।**
**संहर्ता वृष्णिचक्रस्य नान्यो मद्विद्यते शुभे ।**
**अवध्यास्ते नरैरन्यैरपि वा देवदानवैः ।।**
**परस्परकृतं नाशं यत: प्राप्स्यन्ति यादवाः ।**
(म. भा. स्त्री. २५.४८–५०)

अर्थ– हे गांधारी, जे मी ठरवले आहे, तेच तू मला सुचवीत आहेस. यादव हे त्यांच्या दैवानुसार निश्चितपणे नष्ट होणार, हे ठरलेले आहे. यादवसंघाचा संहार मीच करणार आहे. कारण दुसऱ्या कोणाला ती गोष्ट शक्य नाही. देव, दानव किंवा मनुष्य याच्यामध्ये यादवाना नष्ट करील, असा कोणीही नाही. त्यामुळे ते आपसात भांडूनच नष्ट होतील.

**कृष्णाची बुद्धिमत्ता**– गीतोपदेशक परमपुरुषाच्या अलौकिक बुद्धिमतेबद्दल जितके लिहावे तितके थोडेच होईल. तात्त्विक क्षेत्राप्रमाणेच व्यावहारिक क्षेत्रातही त्या बुद्धीने परिपूर्णता गाठलेली होती. प्रत्येक धर्मसंकटावर मात करणे, संकटात मार्गदर्शन करणे व संकट आणणाऱ्यावरच ते उलटवून स्वत:ची व स्वपक्षाची सुटका करून घेणे, अशी त्या बुद्धिमत्तेची वैशिष्टये सांगता येतील. कृष्णाने न सोडविलेला असा एकही बौद्धिक पेचप्रसंग नाही. या बाबतीतली दोनच उदाहरणे सांगितली, तरी पुरेसे होईल.

कौरव-पांडवांचा युद्ध करण्याचा निर्णय ठरला आणि दोन्ही पक्ष तत्कालीन राजमंडळाला आपल्या बाजूने लढायला आणण्याची खटपट करू लागले. द्वारकेचे यादव ही त्या काळातली एक दुर्दांत शक्ती होती. ही शक्ती आपल्या पक्षाला मिळावी म्हणून अर्जुन आणि दुर्योधन हे एकाच वेळी द्वारकेत पोचले.



बालकृष्ण– ओतीव मूर्ती

त्या वेळी कृष्ण झोपला होता. कदाचित कृष्णाची ती झोप मुत्सद्देगिरीचीच असावी. दुर्योधन कृष्णाच्या शयनागारात जाऊन त्याच्या उशाशी बसला आणि पाठोपाठ आत आलेला अर्जुन कृष्णाच्या पायागती बसला. कृष्ण मग अशा प्रकारे उठला, की त्याला प्रथम अर्जुनच दिसावा. आणि तसेच झाले. देवाने आगमनाचे कारण विचारताच अर्जुनाने त्याला आपले कारण सांगितले. एवढ्यात दुर्योधन पुढे येऊन म्हणाला, की 'कृष्णा, मी प्रथम आलो आहे आणि अर्जुनाच्या आधी माझे मागणे पुरे झाले पाहिजे. पांडवाच्याऐवजी तू माझ्या पक्षाला साहाय्य केले पाहिजेस. त्यावर कृष्ण म्हणाला.

'दुर्योधना, तू प्रथम आलास ही गोष्ट खरी; पण मी अर्जुनाला प्रथम पाहिले, हेही खरे. तेव्हा तुम्हा दोघांचाही माझ्यावर अधिकार सारखाच. पण अर्जुन तुझ्याहून लहान आहे आणि लहानांची इच्छा आधी पुरी करायची असा शिष्टसंकेत आहे. एका बाजूने नारायण नावाच्या माझ्या गोपांचे सैन्य आणि दुसऱ्या बाजूने शस्त्रसंन्यास घेतलेला मी एकटा, या दोहोतून अर्जुन आपल्याला हवे त्याची प्रथम निवड करील. त्याने घेतल्यावर उरेल ते तुझे.'

मग कृष्णाची अटकळ होती त्याप्रमाणे अर्जुनाने कृष्णालाच स्वीकारले आणि दुर्योधनाने त्याचे सैन्य घेतले. निर्णयाचा अधिकार शत्रूकडे न देता श्रीकृष्णाने तो आपल्या बुद्धिचातुर्याने अर्जुनाकडे दिला, ही त्याची या प्रसंगातली सावधानता समजली पाहिजे.

दुसरा प्रसंग अर्जुन युधिष्ठिरालाच ठार मारायला निघाला त्या वेळचा. अर्जुनाच्या धनुष्याचे नाव गांडीव असे होते. त्यावर अर्जुनाची विलक्षण श्रद्धा होती. 'ते दुसऱ्याला देऊन टाक'

असे जो म्हणेल त्याचा मी शिरच्छेद करीन, अशी अर्जुनाने प्रतिज्ञा केली होती. कुरुक्षेत्रावर युद्ध चालू असता कर्णाने युधिष्ठिराचा पराभव केला. युधिष्ठिर मग शिबिरात आला. तो रणक्षेत्रावर दिसेना, म्हणून अर्जुनही त्याचा शोध करीत शिबिरात पोचला. तो कर्णाला मारूनच परत आला असेल, अशी युधिष्ठिराने कल्पना केली. पण अर्जुनाने कर्णाला मारले नाही, असे समजताच युधिष्ठिर क्रोधाच्या भरात त्याला म्हणाला.

'तुझ्यापेक्षा जो अधिक कुशल असेल, त्याला तुझे गांडीव धनुष्य देऊन टाक.'

त्यावर अर्जुन खवळला व खड्ग उपसून युधिष्ठिराला मारायला निघाला. कृष्ण तिथे होताच. त्याने त्याला थांबवून विचारले, की 'हे काय चालविले आहेस ?'

त्यावर अर्जुन म्हणाला,

'मी माझी प्रतिज्ञा पूर्ण करण्यासाठी युधिष्ठिराला ठार मारणार आहे.'

त्यावर कृष्ण अर्जुनाचा धिक्कार करून त्याला म्हणाला.

'पार्था, आज मला कळले, की तू नुसता धर्मभीरू नसून महामूर्खही आहेस. अशी मूर्खपणाची प्रतिज्ञा तू आधी केलीसच कशी ? अरे, युधिष्ठिराला मारून तू केवढे संकट आपल्यावर ओढवून घेणार आहेस याची कल्पना आहे का ?'

त्यावर अर्जुन काकुळती येऊन म्हणाला.

'देवा, माझा हा मूर्खपणा झाला खरा. तेव्हा माझी प्रतिज्ञा पुरी होईल; पण युधिष्ठिर मरणार नाही, असा काहीतरी मार्ग मला सांग.'

त्यावर कृष्ण म्हणाला.

'सांगतो, ऐक. गुरुजनांशी नेहमी आदराने आणि सन्मानाने बोलायचे असते. गुरूची तोंडावर निर्भर्त्सना करणे, हा त्याचा वध होय. तेव्हा तू युधिष्ठिराची निर्भर्त्सना, कर म्हणजे तू प्रतिज्ञेतून मोकळा झालास.'

अर्जुनाने तसे केले. पण तरीही त्याच्या हातातले खड्ग खाली येईना. कृष्णाने विचारले, 'आता काय अडचण उरली ?'

त्यावर अर्जुन म्हणाला.

'जो युधिष्ठिराचा वध करील त्याचा मी शिरच्छेद करीन, अशी माझी दुसरी प्रतिज्ञा आहे. ती गोष्ट माझ्याच हातून घडली, तेव्हा आता मला माझेच मस्तक तोडले पाहिजे.'

कृष्णाला आपल्या मित्राची दया आली. तो म्हणाला.

'वेडया ! ज्या पद्धतीने तू युधिष्ठिराचा वध केलास, त्याच पद्धतीने स्वतःचाही करून घे.'

अर्जुन म्हणाला, 'म्हणजे कसे ?'

कृष्ण म्हणाला, 'तू स्वमुखाने तुझी प्रशंसा करून घे म्हणजे तुझाही वध होईल. स्वतःच्या गुणाची स्वतः प्रशंसा करणे, हाच मनुष्याचा खरा वध होय.'

कृष्णाचे आणखी काही गुणविशेष पुढीलप्रमाणे—

**निःस्वार्थी राजकारणी कृष्ण**— त्या काळच्या उत्तर भारतात जरासंध, कंस, शिशुपाल यांसारखे अन्यायी, जुलमी व मदांध असे अनेक राजे होते. अशा राजांच्या सत्ताचा उच्छेद करून सर्व क्षत्रियमंडळात एक शिस्त निर्माण करावी, त्यांच्यातील कलह नाहीसे करून व सख्य घडवून आणून सर्वत्र शांतता प्रस्थापित करावी आणि अशा रीतीने भारतीय समाजाची सुस्थिति राखावी, हे कृष्णाचे जीवितकार्य होते.



नवनीतकृष्ण – धातुमूर्ती

राजसूय यज्ञाचे आधी जरासंधाचा वध करणे अवश्य आहे, असे त्याने युधिष्ठिराला सांगितले, त्याचे कारण हेच होते. हा जरासंध पाशवी सामर्थ्याच्या जोरावर अनेक राजांना बंदिवान करीत असे, त्यांचे राज्य लुटत असे. असे ८६ राजे त्याने कैदेत टाकले होते व तसे शंभर झाल्यावर तो त्यांना शंकरापुढे बळी देणार होता. अशा वेळी आपल्या ज्ञातिबांधवांचे रक्षण करणे

आपले कर्तव्य आहे आणि ते करीत असता मृत्यू आला तरी तो पत्करला पाहिजे, अशी कृष्णाची भूमिका होती ( सभा. १५. २४–२५ ). क्षत्रियमंडळाचे रक्षण करणे ही आपली जबाबदारी आहे, ही गोष्ट त्याने जरासंधाशी बोलताना स्पष्ट करून सांगितली आहे. 'हे राजा, तू निरुपद्रवी राजांची हिंसा करीत आहेस. आम्ही धर्मरक्षण करण्यास समर्थ आहोत. आणि अशा वेळी ते आम्ही केले नाही, तर तुझे पातक आम्हाला लागेल' (सभा. २२.९).

जरासंधवधाच्या वेळी, पुढे कौरव-पांडवांच्या युद्धात व इतरही अनेक प्रसंगी कृष्णाने जे साम-दाम-दंडाचे प्रयत्न केले ते पूर्ण निःस्वार्थी हेतूने केलेले होते. भारतीय क्षत्रियमंडळाचे सार्वभौमपद आपण घ्यावे अशी इच्छा चुकून सुद्धा त्याने कधी केली नाही. बुद्धिमत्ता, सेनासामर्थ्य, धनसमृद्धी, इ. सम्राटपद जिंकण्यासाठी लागणारे सर्व गुण त्याच्या ठायी होते. जरासंधाला मारून ८६ राजांना त्याने बंधमुक्त केले, त्या वेळी त्यांनी 'आम्हास काही सेवा सांगा' असे अत्यंत कृतज्ञतापूर्वक विनविले. त्या वेळी तुम्ही सर्वांनी युधिष्ठिरास साहाय्य करावे, अशी त्याने त्यांना आज्ञा दिली आणि स्वत:ला अर्पण केलेली रत्नेही त्याने त्यांची दया येऊन मोठ्या कष्टाने स्वीकारली ( सभा. २४.३९). जरासंधाचे राज्यही त्याने खालसा केले नाही; ते त्याच्या पुत्राला दिले. कृष्णाची ही विशुद्ध बुद्धी त्याच्या प्रत्येक कृतीतून व्यक्त होते. कौरव–पांडवांना समेट घडवावा म्हणून बोलणी चालली असताना 'धर्मराजाच्या आज्ञेबाहेर मला जाता येणार नाही' असे इतरांना त्याने अनेक वेळा निक्षून सांगितले आहे. कर्णाने पांडवांकडे यावे म्हणून त्याचे मन वळवीत असतानाही 'तू इंद्रप्रस्थाचा स्वामी झालास तर समस्त यादवांसह मी तुझा अनुयायी होईन' असे अभिवचन कृष्णाने त्यास दिले होते.

समाजरक्षण हे त्याचे ध्येय होते आणि या हेतूच्या सिद्ध्यर्थ कंटकांचे व दुष्कृतांचे निर्दालन करणे अवश्य आहे, हे त्याने जाणले होते. दुष्कृतांचे निर्दालन सत्याच्या व एकांतिक पावित्र्याच्या आश्रयाने कधीच होत नाही, ही मानवी इतिहासातील दुःखद उणीव ध्यानात आल्यामुळे, सत्याच्या व पावित्र्याच्या रक्षणासाठीच त्यांना व्यवहारात मुरड घालणे अवश्य आहे, तसे न केल्यास या अनीतीमय जगात दुष्ट चांडाळाचे वर्चस्व होऊन समाज रसातळाला जातो, प्रजा उत्सन्न होतात, हा त्याच्या बुद्धीचा निश्चय झाला होता. यामुळेच 'कित्येक वेळा असत्य हे सत्यापेक्षा श्रेष्ठ असते', 'या वेळी धर्म सोडूनच लढणे अवश्य आहे', 'भीमसेन धर्माने लढेल, तर त्याला जय मिळणार नाही; अन्यायाने लढणे प्राप्त आहे,' असा अनेकदा त्याने उपदेश केला आहे. अशा वेळी त्याला स्वत:ला सार्वभौमपदाचा अभिलाष आहे, अशी शंका जरी कोणाला आली असती, तरी त्याच्या वाणीला कसलेच यश आले नसते. पण असे प्रतिपादन करीत असतानाही साऱ्या भरतभूमीत त्याच्या लोकहितबुद्धीविषयी कोणाला शंका आली नाही. 'जे लोकहिताला अनुकूल तेच सत्य', 'जे प्राण्यांना उत्कर्षकारक तेच धर्मपूत,' हे त्याचे विचार स्वार्थमूलक नसून त्यामागे समाजाच्या हिताची पराकाष्ठेची तळमळ आहे, हीच प्रतीती भारतीय प्रजांना त्या काळी येत होती. आणि म्हणूनच प्रत्यक्ष सार्वभौम न होताही तो तत्कालीन भारताचा अनभिषिक्त सम्राट झाला होता.



बैठी कृष्णमूर्ती – तिरुचेन्नूर

**वक्ता कृष्ण** – भरतखंडाच्या इतिहासात एक थोर वक्ता म्हणून कृष्णाची अग्रस्थानी गणना करावी लागेल. कृष्णाचे एकेक भाषण म्हणजे वाणीच्या शिल्पाचा एकेक नमुनाच असे. शिल्पकाराने एखादी घडीव मूर्ती आपल्यापुढे उभी केली आहे, असे त्याच्या श्रोत्यांना वाटत असे. मीमांसेत उपक्रमोपसंहाराचे जे महत्त्व वर्णिले आहे, ते कृष्णाच्या भाषणाचा आदर्श पुढे ठेवूनच वर्णिले आहे, असे म्हणायला हरकत नाही. कौरवसभेत उभा राहताच पहिल्याच वाक्यात त्याने आपल्या आगमनाचा हेतू व विचारांचा व्याप स्पष्ट करून सांगितला. 'कौरव आणि पांडव यांचा साम व्हावा, युद्ध होऊ नये, वीरांचा प्राणनाश होऊ नये, अशी प्रार्थना करण्यासाठी मी आलो आहे' असे त्याचे पहिले वाक्य आहे. आणि शेवटीही समारोप तसाच निःसंदिग्ध व सर्व भाषणाच्या सारार्थरूप आहे. 'पांडव तुझी सेवा करावयास सिद्ध आहेत किंवा तुझ्याशी युद्धही करायला तयार आहेत. हे धृतराष्ट्रा, यातले तुला काय रुचत असेल ते सांग.'

कृष्णाची महाभारतातली सर्वच भाषणे अशी सुबद्ध, आखीव व शिल्पयुक्त आहेत. स्वतः भारतकारांनी त्याच्या

वक्तृत्वाचे मोठे सुंदर वर्णन केले आहे. 'श्रीकृष्णाचा स्वर मेघासारखा गंभीर होता. स्वराची उंची कमी न होता तो एकसारखा बोलू शकत असे. त्याचे वर्णोच्चार योग्य त्याच स्थानातून होत. ते नेहमी हेतुयुक्त, अर्थसंपन्न असून, त्यात गोंधळ कधी नसे' (उद्योग ९१. १७-१८). स्वतः तो एक महान तत्त्ववेत्ता असल्यामुळे जगाला शाश्वत सत्ये सांगण्याच्या भूमिकेनूनच तो नेहमी बोलत असे. दीर्घकाल चिंतन करून मनाशी निश्चित केलेले सिद्धान्त त्याच्या वाणीच्या ओघातून मोठ्या प्रतिष्ठेने बाहेर पडत आणि जग त्यांना शिरसावंद्य मानी. कृष्ण बोलू लागला, की शाश्वदर्थसंपन्न असे एखादे सुभाषित त्याच्या मुखातून ऐकण्यास मिळणारच, अशी लोकांची खात्री असे. 'जो समर्थ असतो व जगाला वश करू शकतो त्यालाच



कृष्ण – नेपाळमधील मूर्ती

साम्राज्य प्राप्त होते.' 'हे राजा, बालिश पुरुष परिणामाकडे लक्ष न देता एकाएकी कार्याला हात घालतो, म्हणून अशा बालिश शत्रूचा कोणी विचारही करीत नाही.' 'कर्माला अनुकूल अशा ज्या विद्या त्याच सफल होत असतात.' 'कर्म न करता संन्यासच जो श्रेष्ठ मानतो त्या दुर्बल पुरुषाचे बरळणे व्यर्थ आहे.' अशा तऱ्हेची शाश्वत सत्ये श्रीकृष्णाच्या मुखातून नित्य बाहेर पडत आणि त्यांच्यामागे दीर्घ चिंतन व विपुल अनुभव यांची पुण्याई उभी असल्यामुळे ती आजही जगाच्या आदराला पात्र झालेली आहेत.

**आदर्श कृष्ण** – कृष्णाचा अनेक नात्यांनी अनेकांशी संबध आला. त्या सर्व सबंधांत व तद्विषयक कर्तव्यांत तो आदर्श ठरला आहे. कृष्ण हा आदर्श पुत्र होता. तो आपला पिता वसुदेव याच्या अंतःकरणाला सदैव जपत असे. पालनकर्ता नंद याच्यावरही त्याचे विलक्षण प्रेम होते. आपल्या आई-वडिलाच्या हृदयाला आनंद देण्यासाठी स्वतःचे दैवी सामर्थ्य प्रकट करून कृष्णाने त्याना आपल्या मृत बंधूचे दर्शन घडविले, अशी कथा भागवतात दिलेली आहे. जसा तो आदर्श पुत्र होता, तसाच तो आदर्श बंधूही होता. आपला बधू बलराम याच्यावर त्याने नितांत प्रेम केले. बलराम कौरवांच्या पक्षाला अनुकूल आहे, हे एका प्रसगी कृष्णाच्या ध्यानात आले; पण कृष्णाने त्याचा मान राखण्यासाठी त्याला विरोध न करता मौन स्वीकारून वागण्याचे धोरण ठेवले. तो आदर्श मित्र होता, याची कथा भागवताच्या दशम स्कंधातले सुदामचरित्र सांगते. अर्जुनालाही त्याने आपला मित्र मानले होते. अर्जुनाविषयीच्या आपल्या भावना एका प्रसंगी व्यक्त करीत असता कृष्णाने वसुदेवाला सागितले–

**योऽहं तमर्जुनं विद्धि योऽर्जुनः सोऽहमेव तु ।**
**यद् ब्रूयात् तत्तथा कार्यमिति बुध्यस्व भारत ।।**
(म. भा. मौसल. ६. २१–२२)

अर्थ— हे राजा, अर्जुन म्हणजेच मी व मी म्हणजेच अर्जुन होय. आम्हा दोघांच्यांत किंचिन्मात्रही भेद नाही. जे जे अर्जुन म्हणेल, तसे तसे सर्वांनी वागावे, असे तू जाण.

आदर्श पती किंवा वल्लभ म्हणूनही कृष्ण प्रशंसनीय आहे. अगणित स्त्रियाशी त्याने विवाह केले. त्यामुळे एका दृष्टीने त्याच्या कौटुंबिक जीवनात असंतोष धुमसत राहायला हवा होता. पण तसे घडले नाही. कृष्णावर त्याच्या स्त्रियाचे विलक्षण प्रेम होते. आपल्यावर त्याची कृपा व्हावी, ही एकमात्र इच्छा त्याच्या स्त्रियांच्या अंतःकरणात नांदत होती. कृष्णाच्या संसारातला असंतोष हुडकून काढण्यासाठी एकदा नारद मुनी द्वारकेत आला असता, तो कसा भांबावून गेला आणि शेवटी त्या पूर्ण पुरुषाची गृहस्थ जीवनातील परिपूर्णता पाहून त्याला धन्यवाद देत कसा निघून गेला, त्याचे मनोरम वर्णन भागवतातल्या दशम स्कंधाच्या ६९ व्या अध्यायात केलेले आहे.

श्रीकृष्णाने परिणीत केलेल्या अष्टनायिका सोडल्या, तर बाकीच्या त्याच्या सहस्त्रावधी स्त्रिया या नरकासुराच्या बंदीतून सोडविलेल्या तरुण कुमारी होत्या. त्या जर निराधार, नि:संग बनून मोकाट सुटल्या असत्या, तर त्यांचा अध:पात झालाच असता, शिवाय समाजातही त्याच्यामुळे अनेक अनर्थ घडून आले असते. हा सर्व विचार करून नरकासुराला मारल्यानंतर कृष्णाने या सर्व कुमारिकांशी विवाह करून त्यांना प्रतिष्ठित गृहजीवनाचा लाभ करून दिला. इतर कोणीही जी गोष्ट करायला धजला नसता, ती ही असामान्य गोष्ट कृष्णाने स्वत:च्या विभूतिमत्त्वाला अनुसरून केली.

**तत्त्वज्ञ कृष्ण**—भगवान कृष्ण हा जसा राजकारणी, तसाच तत्त्वज्ञ म्हणूनही प्रसिद्ध आहे. कुरुक्षेत्रावरच्या ऐन रणधुमाळीत भ्रान्त चित्त होऊन धर्मसंकटात सापडलेल्या अर्जुनाला त्याने गीतेच्या रूपाने एक समर्थ आणि चिरंजीव असे तत्त्वज्ञान उपदेशिले. त्याने आपल्या तत्त्वज्ञानात प्रवृत्ती आणि निवृत्ती यांची योग्य सांगड घालून दाखविली. यादिषयी श्री. चिंतामणराव वैद्य पुढीलप्रमाणे विवेचन करतात—



अर्जुनाचा सारथी कृष्ण

श्रीकृष्णाच्या काळी, वैदिक कर्मे करणे हीच मनुष्याची इतिकर्तव्यता असे म्हणणारे कित्येक लोक समाजास एकीकडे ओढीत होते; तर संसार सोडून अरण्यात जाऊन औपनिषदिक पुरुषाचा निदिध्यास करणे, हाच परम पुरुषार्थ मानणारे अन्य काही दुसरीकडे ओढीत होते. पुरुषमेध करू इच्छिणारा जरासंध किंवा दुर्योधन हा पूर्वोक्त मताचा निदर्शक होता, तर ऐन युद्धप्रसंगी अरण्यात जाऊन संन्यास घेऊ इच्छिणारा अर्जुन हा दुसऱ्या मताचा निदर्शक होता. कृष्णाने एकास बलाने, तर दुसऱ्यास भगवद्गीतेच्या दिव्य उपदेशाने ताळ्यावर आणले. पूर्वाचार्यांनी उपदेशिलेले सिद्धांत सर्व धर्मोपदेशकांप्रमाणे कृष्णानेही अमान्य केले नाहीत. वैदिककर्माभिन्याची कर्मनिष्ठा, सांख्यांची ज्ञाननिष्ठा, योगाभिमान्याचा चित्तनिरोध आणि वेदान्त्याचा संन्यास हे त्याने सर्व मान्य केले. पण इतिकर्तव्यता काय ती हीच, असे जे मत कित्येक प्रतिपादीत होते, त्यांचा त्याने निषेध केला. त्या त्या मतास योग्य महत्त्व देऊन सर्वांचा समन्वय करून त्याने त्याचा उपयोग आपल्या नव्या कर्तव्यसिद्धांताकडे म्हणजे निरपेक्ष फलेच्छारहित कर्माकडे केला. मनुष्याने आपले कर्तव्य कसे बजवावे, हे त्याने भगवद्गीतेत मुख्यत: प्रतिपादन केले. आपले कर्तव्य काय आहे हे शास्त्राने ठरवावयाचे आहे. पण ते ठरल्यावर ते कसे करावे, याची त्याने फारच उत्तम समजूत घातली. अडचणीस भिऊन किंवा मोहपाशात गुतून कर्तव्यपराङमुख होणे व अरण्यात जाऊन संन्यास घेणे, म्हणजे खऱ्या मोक्षमार्गास लागणे नव्हे, हे त्याने अर्जुनास चांगले समजाविले. साराश वेद, वेदान्त, सांख्य, योग यास योग्य सन्मान देऊन त्यांचा आपसातील वाद किंवा आपलीच शेखी मिरवण्याचा प्रयत्न मिटवून, प्रवृत्ती निवृत्तिरूप किंवा निवृत्ती प्रवृत्तिरूप कशी करावी आणि मनुष्याने आपले कर्तव्य कसे बजवावे, हे त्याने अर्जुनास भगवद्गीतेत सांगितले. तात्पर्य, एका दृष्टीने पाहता सर्वात जुने उपलब्ध व खरे सांख्यशास्त्र भगवद्गीता होय आणि योगशास्त्र व वेदान्तशास्त्रही भगवद्गीता होय. या शास्त्रांचे मान्य सिद्धान्त संकलित व ओजस्वी वाणीने कोठे सांगितले असतील, तर ते भगवद्गीतेत प्रथम सांगितले आहेत. आणि यासाठी भगवद्गीतेस उपनिषद्, ब्रह्मविद्या व योगशास्त्र ही विशेषणे यथार्थ लागू पडतात.

**ऐतिहासिक विवेचन**—परंपरागत इतिहासावरून पाहता

कृष्ण हा मनूपासून ९४ वा पुरुष असून तो चद्रवंशी यादवांच्या वृष्णिकुलातल्या सात्वत शाखेचा होता, असे कळते. काही पुराणे त्याला सूर्यवंशीही समजतात. सूर्य, चंद्र या दोन्ही वंशांना तो आपलाच वाटतो. सर्वसामान्य हिंदू मनुष्य हा कृष्णाच्या ऐतिहासिक अस्तित्वाची कधीही चौकशी करीत नाही. त्याला कृष्ण हा भगवान म्हणूनच उपास्य वाटतो. गेल्या २००० वर्षात केवळ त्याच्या नावाने असंख्य दीन-दु:खितांना धीर, आधार आणि समाधान लाभले आहे. म्हणूनच सर्वसामान्य श्रद्धाळू माणसाला कृष्णाची ऐतिहासिक विचिकित्सा करणे, हे पाप वाटते.

पण कृष्णाचे व्यक्तिमत्त्व इतके भव्योत्तुंग आणि व्यापक आहे, की विद्वान संशोधकांना त्याच्या चरित्राविषयी विलक्षण आकर्षण वाटले व त्यांनी पाश्चिमात्य संशोधन पद्धतीचे नियम लावून कृष्णविषयक संशोधन सुरू केले. त्यात पहिल्याप्रथम त्याना एकाऐवजी अनेक कृष्ण दृष्टोत्पत्तीस आले, ते असे—

(१) ऋग्वेदात कृष्ण नावाच्या एका ऋषीचे नाव येते. तो आठव्या मंडलाच्या ७४ व्या सूक्ताचा द्रष्टा आहे. त्या सूक्तात त्याने स्वत:च आपले नाव कृष्ण असल्याचे सांगितले आहे.

(२) ऋग्वेदात आणखी एक कृष्ण आढळतो. तो अनार्यांचा नेता होता व त्याच्या हाताखाली दहा हजार सैनिक होते. अंशुमती नदीच्या तीरावर त्याचे इंद्राशी युद्ध झाले व त्यात इंद्राने त्याचा पराभव केला.

(३) कौषीतकी ब्राह्मणात आणखी एक कृष्ण आढळतो, तो अंगिरसाचा वंशज आहे (३०.९).

(४) ऐतरेय आरण्यकात कृष्ण हारीत नावाचा आणखी एक कृष्ण आहे (३.२.६).

(५) छांदोग्योपनिषदात घोर आंगिरसाचा शिष्य असलेला देवकीपुत्र कृष्ण आहे (३.१७.४.६).

(६) महाभारतात गर्ग्य आणि सांदीपनी यांचा शिष्य असलेला देवकीचाच पुत्र असा आणखी एक कृष्ण आहे.

या सर्व कृष्णांपैकी छांदोग्यातील कृष्ण आणि महाभारतातील कृष्ण हे दोन्ही एकच, का भिन्न याबद्दल खरा विवाद आहे. काही लोक त्या दोघांना भिन्न मानतात; तर काही सशोधक अनेक पुराव्यांचा विचार करून, हे दोन्ही कृष्ण एकच असल्याचे सिद्ध करतात. छांदोग्यातील व गीतेतील तत्त्वज्ञानातल्या काही साम्यस्थळांवरूनही त्यांनी हे एकत्व सिद्ध केले आहे.

पण एवढ्यानेही हा वाद संपत नाही. छांदोग्यातला कृष्ण व महाभारतातला कृष्ण यांच्या जोडीला भागवतादी पुराणातील गोपीजनवल्लभ असा एक तिसरा कृष्ण आहे. पुराणांतला मुरलीधर, खोडकर व गोपीना वेड लावणारा कृष्ण आणि महाभारततला गीतावक्ता कृष्ण या भिन्न व्यक्ती असल्या पाहिजेत, असे मात्र अनेक विद्वानांना वाटते. कारण महाभारतात कृष्णाच्या बालपणाची हकीगत नाही व प्राचीन पुराणांत कृष्णाचा पांडवांशी कुठेही संबंध जोडलेला नाही, असे त्यांचे म्हणणे आहे. श्री. डे व डॉ. भांडारकर हे या मताचे आहेत. पण पुढील गोष्टींचा विचार करता त्यांचे हे मत बिनतोड वाटत नाही.

महाभारतात कौरवपांडवांचा इतिहासच मुख्यत: दिलेला आहे. त्यामुळे कृष्णाचा पांडवांशी संबध आल्यानतर घडलेला त्याचा जीवनक्रम आणि त्याने केलेली कृत्ये यांनाच महाभारतात प्राधान्य मिळाले. महाभारताची पुनर्रचना झाली, तेव्हाही कृष्णाच्या बालचरित्राची त्यात भर पडली नाही. पण सूक्ष्मपणे पाहिल्यास गोकुलवासी बालकृष्णाचे काही उल्लेख महाभारतातही आढळतात. युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञप्रसंगी शिशुपाल हा कृष्णाची निर्भर्त्सना करताना त्याला पशुपाल व गवळी म्हणतो. याशिवाय गोकुळातल्या त्याच्या काही पराक्रमांचाही कुचेष्टेने उल्लेख करतो. तसेच गोपीजनवल्लभ असे त्याला दिलेले विशेषणही महाभारतात आढळते. भारतीय युद्धातील कृष्णाची कामगिरी महाभारतात समग्र वर्णिली असल्यामुळे पुराणांनी तिची पुनरुक्ती केली नाही. हरिवंश ही महाभारताची पुरवणी होय. त्यात मात्र बालकृष्णाचे चरित्र संपूर्ण दिलेले आहे. भागवत पुराणात म्हटले आहे, की महाभारतात कृष्णासबधी जे जे लिहायचे राहून गेले, ते ते सर्व हरिवंशाने भरून काढले आहे. म्हणूनच भागवतादी पुराणांनीसुद्धा महाभारतात न आलेले कृष्णचरित्रच विस्ताराने वर्णिले.

महाभारताच्या रचनेचा व बौद्धांच्या जातक कथांच्या निर्मितीचा काल हा जवळचा आहे. जातक कथात घत नावाचे एक जातक आहे. त्यात वासुदेवालाच कण्ह (कृष्ण) म्हटले आहे. त्यात देवकीला देवगर्भा म्हटले आहे व देवगर्भेचीच मुले नंदगोपा हिने वाढविली, असे सागितले आहे. तिथे अंधकवृष्णी या दोन शब्दांचा अंधक–वेण्ह असा अपभ्रंश केलेला आहे. या उल्लेखांवरून देवकीने जन्म दिलेला वसुदेवपुत्र वासुदेव हाच यशोदेने पाळिलेला, अर्थात पुराणातला बाळकृष्ण असल्याचे सिद्ध होते. जैनांचे उत्तराध्ययनसूत्रही या दोन्ही कृष्णाचे एकत्व मानते. 'जघान कंसं किल वासुदेव: = वासुदेवाने कंसाला ठार मारले,' या महाभाष्यातल्या उदाहरणावरून पंतजलीलाही कंसाचा वधकर्ता कृष्ण आणि वासुदेव-कृष्ण हे एकच असल्याचे मान्य होते, असे दिसते.

मात्र तरीही अशी एक शंका घेतली जाते, की गीतेच्या रूपाने उच्च तत्त्वज्ञान सांगणारा कृष्ण आणि गोकुळात गोपींशी प्रणयक्रीडा करणारा 'चोर-जार' कृष्ण या दोन व्यक्ती एक

कशा असू शकतील ? पण इथे एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे, की कृष्णाचे गोपींशी असलेले संबंध अनैतिक होते, हेच मुळी निश्चितपणे सिद्ध झालेले नाही. कृष्णाने गोपींशी अश्लाघ्य वर्तन केले, हा आरोप कृष्णाच्या काळात त्याच्यावर नव्हता. कृष्णावर गोपी जे प्रेम करीत होत्या, ते निर्व्याज आणि विषयवासनेच्या पलिकडचे होते, अशीच कल्पना महाभारतात दिसते. द्रौपदीने वस्त्रहरणाच्या वेळी कृष्णाचा धावा केला, त्यात तिने त्याला गोपीजनप्रिय या विशेषणाने संबोधिले आहे. यात कृष्ण हा दीन अबलांचा कैवारी आहे, एवढाच अभिप्राय व्यक्त होतो. ' त्यात निंद्य संबंध अभिप्रेत असता, तर सती द्रौपदीस तिच्या पातिव्रत्याच्या परिक्षेच्या प्रसंगी तो आठवता ना ' असे श्री. चिं. वि. वैद्य म्हणतात. राजसूयप्रसंगी शिशुपालाने कृष्णाची मनसोक्त निर्भर्त्सना केली; पण त्या निर्भर्त्सनेत त्याने कृष्णावर व्यभिचारीपणाचा आरोप केलेला नाही. शिवाय गोकुळात असताना कृष्णाचे वय लक्षात घेता त्याच्यावर केलेले सर्व घाणेरडे आरोप व्यर्थ आहेत, असेच म्हणावे लागते. दुसरी गोष्ट अशी, की कंसवधाच्या प्रसंगी कृष्णाने गोकुळ जे एकदा सोडले ते कायमचे सोडले. तो गोकुळात पुनश्च कधी गेला नाही. खरे सागायचे, तर गोपीच त्याच्या रूपाला भुलल्या होत्या आणि त्याच्या मुरलीनादाने वेडावल्या होत्या. पुष्कळदा घरधंदा सोडून गोपीच त्याच्या मागे धावताना दिसतात. या सर्व गोष्टींचा विचार केल्याअंती कृष्णचरित्राला व्यभिचाराचा कलंक लावणे ठीक होणार नाही.



गोवर्धनधारी कृष्ण – मथुरा शैली

यादव समाजात त्या वेळी रास नावाचे एक महानृत्य प्रचलित होते. ते स्त्री-पुरुषांचे सामूहिक नृत्य होते. कृष्ण एकदा गोपींसगे रास खेळल्याचे भागवतात वर्णन आहे. हरिवंशातही त्याबद्दल विस्ताराने लिहिलेले आहे. कृष्ण हा अनेक कलांचा भोक्ता आणि मर्मज्ञ होता. त्याला नृत्य आणि संगीत यांची विशेष आवड होती. कृष्ण गोपींसंगे रास खेळला, तो गोपीच्या आग्रहावरूनच होय. पण या रासक्रीडेच्या प्रसंगातूनच कृष्णाच्या शृंगारिकतेला पालवी फुटली असावी. कालगतीने हा प्रवाद इतका वाढला, की भागवतासारख्या पुराणालाही त्याचा त्याग करता येईना. कृष्णाचा हा रसिक शृंगार पुढे रसिक कवीना हृद्य आणि आस्वादनीय वाटला व गोपी-कृष्ण किंवा राधा-कृष्ण यांच्या प्रणयक्रीडांची कवने रचण्यात त्यांची अहमहमिका लागली. जयदेवाचे गीतगोविंद गोपी-कृष्ण शृंगारावरच आधारलेले आहे. उत्तर भारतात सूरदासाने आणि महाराष्ट्रात एकनाथादी संतांनी राधा-कृष्णाच्या शृंगाराची कितीतरी पदे रचली आहेत. शृंगार गायचा तर तो गोपी-कृष्णांचाच, असा जयदेवानंतर जणू कविसंकेतच पडून गेला. त्यात पुष्कळ अतिशयोक्तीही झाली आणि हीच गोष्ट चिकित्सकांच्या मनात कृष्णाच्या विलासीपणाविषयी आशंका निर्माण होण्यास प्रामुख्याने कारणीभूत झाली. पण कृष्णावरील या आरोपाचे खंडन करताना श्री. चिं. वि. वैद्य म्हणतात–

' कंसाने त्यास (कृष्णाला) कुस्ती खेळण्याकरताच मथुरेस बोलाविले होते. असा बालमल्ल कधीही कामाच्या नादी लागत नाही आणि लागेल तर तो अमर्याद शक्तीही दाखवू शकणार नाही, हा सिद्धान्त होय. ईश्वराच्या कल्पनेने वाटेल ते संभवेल, पण कृष्णाने आपल्या अवतारात मानवी कृत्येच करून दाखविली आहेत; ईश्वरी सामर्थ्य उपयोगात आणले नाही; आणि कोठे आणिले असले, तरी ते असल्या निंद्य कृत्यात तर खचित आणले नसावे. सारांश, सर्व दृष्टीने विचार करता हा आरोप खरा नाही, असेच म्हटले पाहिजे. '

**काव्यविषय कृष्ण** — पंडित हजारीप्रसाद द्विवेदी यांनी लिहिले आहे, की कृष्णावताराची दोन मुख्य रूपे आहेत. एका रूपात तो यदुकुलातला श्रेष्ठ रत्न आहे, वीर आहे, राजा आहे आणि कंसारी आहे; तर दुसऱ्या रूपात तो गोपाल आहे, गोपीजनवल्लभ आहे व 'राधाधरसुधापानशाली वनमाली' आहे. त्याच्या पहिल्या रूपाची माहिती प्राचीन ग्रंथावरून मिळते; पण त्याचे दुसरे रूप पहिल्या रूपापेक्षा नवीन आहे. हळूहळू हे

दुसरे रूपच महत्त्व पावले आणि पहिल्या रूपाला गौणत्व आले. या त्याच्या दुसऱ्या रूपावरच भारतातील कवींनी आणि संतांनी



यशोदा आणि बाळकृष्ण – गुजराती लोकशैली

विशेषत्वाने काव्याची पुष्पांजली वाहिली आहे. कृष्णावर काव्यरचना करणाऱ्या कवींनी त्याला साक्षात परब्रह्म मानून शृंगार, वात्सल्य, सख्य आणि माधुर्य अशा भावनांचा त्याच्यावर साज चढवला आहे.

कृष्णविषयक काव्यात गोपालकृष्णाच्या बाललीलेचा संदर्भ सर्वप्रथम अश्वघोषाच्या बुद्धचरितात आढळतो (१. ५). बुद्धचरिताचा काल इ. स. च्या १ ल्या शतकातला मानतात. गाथासप्तशती हा सामान्यतः याच कालातला ग्रंथ आहे. त्यात कृष्ण, यशोदा, राधा, गोपी यांच्या संबंधात काही गाथा आढळतात. उदा० पुढील गाथा पहा–

**अज्जवि बालो दामोअरो त्ति**
**इअ जम्पिए जसोआए ।**
**कण्हमुहपेसिअच्छं णिहुअं**
**हसिअं वअवहूहिं ।।**

(२. १२)

अर्थ – 'बाळ दामोदर अजून लहान आहे. हो, आहेच लहान, ' असे यशोदा म्हणाली, तेव्हा कृष्णाकडे पाहून तरुण गोपी चोरून हसल्या.

**णच्चणसलाहणणिहेण**
**पासपरिसंठिआ णिउणगोवी ।**
**सरिसगोविआणँ चुम्बइ**
**कवोलपडिमागअं कण्हम्**

(२. १४)

अर्थ – नाचण्याच्या श्रमामुळे गोपींना घाम आला होता. त्याच्या ओल्या गालांवर कृष्णाच्या प्रतिमा उमटल्या होत्या. एक निपुण गोपी मागे (प्रेक्षकांच्या घोळक्यात) उभी होती. नर्तिकांच्या कौशल्याची प्रशंसा त्यांच्या कानात सांगण्याच्या निमित्ताने ती पुढे आली व त्यामुळे त्यांच्या गालांवर उमटलेल्या कृष्णाच्या प्रतिबिंबाच्या चुंबनाचे श्रेय तिला (अनेक वेळा) मिळाले.

गाथासप्तशतीतल्या अशा उल्लेखावरून कृष्ण आणि गोपी यांचे परस्पर प्रेम आणि तद्विषयक कल्पना या इसवी सनापूर्वीपासूनच लोकसमाजात प्रचलित होत्या, हे कळून येते. मात्र या उल्लेखात भक्तिभावनेचा संकेत मिळत नाही. त्यांचे वातावरण सर्वथा लौकिक शृंगाराचेच आहे. पण याच्या उलट तमिळनाडमध्ये आळवार संतांनी जी कृष्णविषयक पद्ये लिहिली, ती मात्र संपूर्णतया भक्तिभावनेने अनुप्राणित दिसतात. इ. स. ५ वे शतक ते ९ वे शतक हा आळवार संतांचा कालखंड होय. आळवारांच्या काव्यातून वर्णिलेले गोपालकृष्णाच्या ललितलीलेचे अनेक प्रसंग हेच पुढे उत्तर भारताच्या मध्यकालीन कृष्णभक्तिकाव्याचे विषय बनले आहेत. कृष्णजन्माने गोकुळात आनंदीआनद कसा झाला ते सांगून कृष्णाच्या खोडयांनी यशोदा कशी मेटाकुटीस आली त्याचे वर्णन पेरियाळवार या संताने पुढील पद्यात केले आहे –

**किडक्किल् तोट्टिल् किलिय उदैत्तिडुम् ।**
**एडुत्तुक कोळ्ळिल् मरुङ्गै इरुत्तिडुम् ।**
**ओडुक्किप् पुल्हिल् उदरत्ते पाय्न्दिडुम् ।**
**मिडुक्कु इलामैयाल्, नान् मेलिन्देन नङ्गाय**

अर्थ –– (यशोदा म्हणते) कृष्ण पाळण्यात निजला, की लाथा मारून तो पाळणाच खिळखिळा करतो. त्याला मांडीवर घ्यावे, तर माझी मांडी अगदी मोडून जाते. त्याला उराशी कवळले, तर तो जोराने उडया मारतो. अग दासी, मी काही त्याला आवरू शकत नाही. त्याच्या खोडया अगदी असह्य आहेत.

आंडाळ ही भक्त कवयित्री आळवारांतच गणली जाते. तिला गोकुळातल्या गोपीचे जीवन जगण्याची विलक्षण उत्कंठा होती. तिने नप्पिनै नावाच्या एका गोपीची कल्पना केलेली आहे. ही गोपी कृष्णाला जवळ घेऊन झोपते आणि भक्त स्त्रिया पूजेसाठी मंदिराच्या द्वारात येऊन उभ्या राहिल्या, तरी त्याला आपल्यापासून दूर करीत नाही. आंडाळची ही

नप्पिनै हीच पुढील काळातल्या पुराणातली राधा बनली असावी, असा एक तर्क आहे.

नवव्या शतकात निर्माण झालेल्या ध्वन्यालोक या ग्रंथात उद्धृत केलेले दोन श्लोक राधा-कृष्णांच्या मधुर प्रेमाची साक्ष पटवितात. कवीन्द्रवचनसमुच्चय नावाचा एक कवितासंग्रह दहाव्या शतकात निर्माण झालेला आहे. त्यात वर्णिलेला कृष्ण यशोदेचा वत्सल पुत्र, गोपांचा सुहृद, गोपींचा कांत



राधा–कृष्ण – कांगडा शैली

आणि राधेचे अनन्य प्रेमभाजन, या स्वरूपात दिसतो. दहाव्या शतकापर्यंत समस्त भारतात राधा-कृष्णाविषयी पूज्य भाव दृढ झाला होता. कृष्णाच्या व्यक्तित्वात आढळणारे लालित्य आणि माधुर्य यांच्याबरोबरच त्याचे दैवतरूपही १२ व्या शतकापर्यंत सुप्रतिष्ठित झाले होते. याची साक्ष लीलाशुकाचे कृष्णकर्णामृतस्तोत्र, ईश्वरपुरीचे श्रीकृष्णलीलामृत आणि जयदेवाचे गीतगोविंद या काव्यांवरून मिळते. कृष्णलीलामृतातल्या शृंगाराची पार्श्वभूमी निश्चितपणे माधुर्यभक्तीची आहे. गीतगोविंदात राधा-माधवांच्या ज्या उन्मुक्त शृंगाराचे वर्णन कवीने केलेले आहे, त्याच्या मागची प्रेरणाही धार्मिकच आहे.

राधा-माधवांच्या यमुनाकाठी होणाऱ्या एकांतक्रीडा जयदेवाने कशा ललितमधुर शब्दांत वर्णिल्या, त्याची वानगी पुढील श्लोकात मिळू शकते—

**धीरसमीरे यमुनातीरे वसति वने वनमाली ।**
**गोपीपीनपयोधरमर्दनचञ्चलकरयुगशाली ।। ध्रु० ।।**
**रतिसुखसारे गतमभिसारे मदनमनोहरवेषम् ।**
**न कुरु नितम्बिनि गमनविलम्बनमनुसर तं हृदयेशम् ।।**
**नामसमेतं कृतसंकेतं वादयते मृदुवेणुम् ।**
**बहु मनुते ननु ते तनुसंगतपवनचलितमपि रेणुम् ।।**
**पतति पतत्रे विचलति पत्रे शङ्कितभवदुपयानम् ।**
**रचयति शयनं सचकितनयनं पश्यति तव पन्थानम् ।।**
**मुखरमधीरं त्यज मञ्जीरं रिपुमिव केलिसुलोलम् ।**
**चल सखि कुञ्जं सतिमिरपुञ्जं शीलय नीलनिचोलम् ।।**
**उरसि मुरारेरुपहितहारे घन इव तरलबलाके ।**
**तडिदिव पीते रतिविपरीते राजसि सुकृतविपाके ।।**

(५·११·१–५)

अर्थ–वारा झुळझुळ वाहत आहे. यमुना तीरावर माधव बसला आहे. युवतींचे पुष्ट कुच मर्दून चंचल झालेले त्याचे हात शोभत आहेत. हे पृथुलजघन राधे, कुंजात बसलेल्या त्या कृष्णाकडे जायला तू विलंब करू नकोस. सत्वर तिथे जाऊन तू त्या मदनमनोहर हृदयेश्वराचे ईप्सित पूर्ण कर. त्यातून तो आपल्या मुरलीतून तुझ्या नांवाची अक्षरे काढीत आहे. तुझ्या तनूला स्पर्श करून वाऱ्याने उडालेला धूलिकणही त्याला बहुमोल वाटत आहे. पक्ष्यांच्या पंखांची सहजपणे फडफड झाली किंवा पान हालले तरी त्याला वाटते, तूच आलीस. लगेच तो शय्या रचतो आणि चकित नयनांनी तुझी वाट पाहतो. म्हणून म्हणते, हे राधे, तू त्याच्याकडे जा. जातांना तुझ्या पायातली नूपुरे मात्र काढून टाक. ती आवाज करून तुझा अभिसार जगजाहीर करतील. तू आपल्या तनूवरून निळे वस्त्र ओढून घे आणि त्या तमोवेष्टित कुंजात कृष्णाच्या भेटीला जा. तिथे जाऊन पुष्पहार घातलेल्या श्रीहरीच्या वक्षस्थळावर तू तुझी कृश आणि गौर तनू शोभव. बकपंक्तीने शोभणाऱ्या मेघात विजेची रेषा चमकून उठावी, तशी तू श्रीहरीच्या हृदयावर शोभून दिसशील.

१३ व्या व १४ व्या शतकात बोपदेवाची हरीलीला, वेदान्तदेशिकाचे यादवाभ्युदय, इ. अनेक कृष्णविषयक काव्ये निर्माण झाली. १६ व्या शतकात जवळजवळ संपूर्ण भारतात कृष्णभक्तीने आपली चरमसीमा गाठली. निरनिराळ्या देशी भाषांमध्ये कृष्णविषयक काव्यांना त्या शतकात जणू उधाण आले. या सर्व कवींना आपल्या काव्याची स्फूर्ती भागवत पुराणाकडून मिळाली असली, तरी या देशी भाषांच्या कवींनी लोकप्रचलित

अशा अनेक कथांचा आपल्या काव्यरचनेसाठी भरपूर उपयोग करून घेतला आहे.

१६ व्या शतकात महाराष्ट्रामध्ये एकनाथ, तुकाराम, वामनपडित हे संतपंत कवी होऊन गेले. एकनाथांनी कृष्णचरित्रावर सुमारे ३०० अभंग आणि पदे लिहिलीं आहेत. त्यात मुख्यत्वे कृष्णाच्या बालचरित्राचेच वर्णन आहे. कृष्णाच्या खोडचा, त्याचे मुरलीवादन, त्याने गोपीची केलेली थट्टामस्करी, गोपीचे कृष्णावरील अमर्याद प्रेम आणि गोपाल सवंगड्यांची कृष्णाविषयीची भक्ती या गोष्टी त्यांनी प्रामुख्याने आणि घोळून घोळून वर्णिलेल्या आहेत. नाथांची ही पदे गौळणी या नावाने प्रसिद्ध आहेत. कृष्णाच्या नानापरीच्या खोडचांनी त्रस्त झालेल्या गौळणी यशोदेला आपले गाऱ्हाणे सांगायला येतात, त्याचे वर्णन नाथांनी पुढीलप्रमाणे केले आहे—



राधा – कृष्ण

**गौळणी सांगती गाऱ्हाणी ।**
**रात्री आला चक्रपाणी ।**
**खाऊन दही दूध तूप लोणी ।**
**फोडिली अवघी विरजणी ।**
**हा गे बाई कोणासी आवरेना ।। १ ।।**

**यशोदे बाळ तुझा तान्हा ।**
**कोठवर सोसू धिंगाणा ।। ध्रु० ।।**

**दुसरी आली धावत ।**
**याने बाई काय केली मात ।**
**मुखाशी मुख चुंबन देत ।**
**गळ्यामधि हात घालीत ।**
**धरू जाता सापडेना ।। २ ।।**

**तिसरी आली धाउनी ।**
**म्हणे गे बाई काय केली करणी ।**
**पतीची दाढी माझी वेणी ।**
**दोहोंसी गाठ देऊनी ।**
**गाठ बाई कोणा सुटेना ।। ३ ।।**



कृष्णमूर्ती – बंगाली शैली

**मिळोनी अवघ्या गौळणी ।**
**येती नंदाच्या अंगणी ।**
**जातो आम्ही गोकुळ सोडोनी**
**अमुच्या सुना घेऊनी ।**
**हे बाई आम्हांसी पाहवेना ।। ४ ।।**
**ऐशीं ऐकता गाऱ्हाणी ।**
**यशोदेनयनी आले पाणी ।**
**कृष्णा खोड दे टाकूनी ।**
**एका जनार्दनी चरणीं ।**
**प्रेम तया आवरेना ।। ५ ।।**

वामनपंडिताने वेणुसुधानामक एक स्फुट प्रकरण लिहिले असून, त्यात कृष्णाचा मुरलीरव ऐकून गोप-गोपी, गाईवासरे

आणि स्वर्गातले देव यांची काय अवस्था झाली, याचे वर्णन प्रासादिक वाणीने केलेले आहे--

**अंग वक्र अधरी धरि पावा ।**
**गोप-वेष हरि तोचि जपावा ।।**
**वाम-बाहुवरि गालहि डावा ।**
**तो ठसा स्व-हृदयात पडावा ।। १ ।।**
**वेणु-ध्वनी तो सुर-गायकांनी ।**
**त्यांच्या विमानातहि बायकांनी ।**
**आश्चर्य कानी पडताचि केले ।**
**न तृप्त ज्यांचे मन हे भुकेले ।। २ ।।**
**मोहती व्रज-पशू मृग-गाई ।**
**आमुचे नवल काय अगाई ।**
**स्तब्ध होति लिखिते जसिं चित्रे ।**
**वेणुच्या ध्वनि-रसेंचि विचित्रे ।। ३ ।।**
**मातृ-स्तनींचा रस आननांत ।**
**तो होय वेणु-ध्वनि काननात ।**
**गळे गिळेना पय वासुरांते ।**
**आश्चर्य वाटे गगनी सुरांते ।। ४ ।।**

१५ व्या शतकात विद्यापतीने कृष्णाच्या शृंगारी आणि प्रणयी स्वरूपाचे काव्यमय वर्णन केले आहे. विद्यापती हा सौदर्य आणि प्रेम याचा कवी होता. राधा-कृष्णाना आलवन करून त्याने आपल्या काव्यसभारातला फार मोठा भाग त्याच्या सौदर्यचित्रणात सार्थकी लावला आहे. त्याचे राधा-कृष्णविषयक एक पद्य असे —

**पियाक पिरीति हम कहइ नइ पार,**
**लाख बयान विहि ना देह्य हमार ।**
**करे धरि पिया मोर वइठावल कोर,**
**सुगन्धि चंदने तनु लेपल मोर ।**
**आपन मालति माला हियासे उतारि,**
**कंठे पहिरावल यतने हमारि ।**
**फूयल कबरी बान्धई अनुपाम,**
**ताहे वेढचल चम्पक दाम ।**
**मधुर-मधुर दिठि हेरय वयान ।**
**आनंद जले परिपूरल नयान ।**
**मनय विद्यापति इह परसंग,**
**धनि भूलल कह इते रजनी क रंग ।**

अर्थ —— (राधा म्हणते) माझ्या वल्लभाचे माझ्यावर किती अपार प्रेम आहे, ते-मी सांगू शकत नाही. लाख सांगितले, तरी ते पुरे पडणार नाही. श्रीहरीने माझा हात धरून मला अकावर बसवले आणि माझ्या तनूला सुगंध आणि चंदन याचे उटणे लावले. आपल्या हृदयावरची मालतीपुष्पमाला उतरली आणि ती मी नको नको म्हणत असताही हट्टाने माझ्या गळयात घातली. माझ्या केसाची सुदर रचना करून त्याने त्यात चाफ्याच्या फुलांची वेणी माळली. आणि तो मग मधुर मधुर दृष्टीने माझे मुख निहाळू लागला. तसे करताना आनंदाश्रूंनी त्याचे डोळे भरून आले. विद्यापती म्हणतो, की या प्रसंगाचे वर्णन करीत असताना राधिका रात्रीच्या त्या रसरंगात स्वतः-लाच भुलून गेली

सूरदासाने आपल्या अनेक पद्यांतून जे कृष्णचरित्र वर्णिले ते मुख्यत्वे भावात्मक आहे. कृष्णाला वात्सल्य, सख्य आणि माधुर्य या भावांचे आलंबन बनवून त्याने त्या भावांचा उत्तम परिपोष केला. सूरदास हा कृष्णभक्त होता. त्याची भक्ती



गोपीसह कृष्ण – राजस्थानी चित्रशैली

त्याच्या काव्यात पदोपदी दिसून येते. कृष्णाचे मथुरागमन, तिथून पुढे द्वारकागमन व त्यामुळे गोपीना झालेला विरह, याच गोष्टी त्याने प्रामुख्याने वर्णिल्या असून, त्यात कृष्णाच्या लोकविलक्षण व्यक्तिमत्त्वाचे चित्रण प्रभावीपणे केले आहे. वरील पद्यावरून गीता सांगणाऱ्या योगेश्वर कृष्णाच्या अनासक्तीचा परिचय होतो. सूरदासाच्या काव्यात श्रीहरीच्या बाल आणि किशोर या रूपांचीही अनेक चित्रे आहेत. श्रीहरीच्या अंगप्रत्यंगांचे सौदर्य पाहून गोपींची कशी तन्मय अवस्था झाली, त्याचे वर्णन पुढील पद्यात पाहायला मिळते –

**श्याम अँग युवती निरखि भुलानी ।। ध्रु० ।।**
**कोऊ निरखति कुंडल की आभा**
**यतनेंहि माँझ बिकानी ।**
**ललित कपोल निरखि कोउ अटकी**
**शिथिल भई ज्यों पानी ।**
**देह गेह की सुधि नहिं काहू**

हरषन को पछतानी ।
कोउ निरखति रही ललित नासिका
यह काहू नहिं जानी ।
कोउ निरखति अधरन की सोभा
फुरत नहीं मुख बानी ।
कोउ चकृत भई दशन चमक पर
चकचौंधी अकुलानी ।
कोउ निरखति द्युति चिबुक चारू की
सूर तरूनि बिततानी ।

अर्थ – श्रीकृष्णाचे लावण्य पाहून तरुणी भुलल्या. प्रयत्न करूनही त्या स्वतःला सावरू शकल्या नाहीत. सुंदर अशा त्याच्या गालांवरच काहींची नजर खिळली. त्यांना देहगेहाची शुद्ध राहिली नाही. मग इतक्या आपण कशा वेडावलो, याचा त्यांना पश्चात्ताप झाला. कुणी त्याचे सुंदर नाकच पाहत पाहिल्या. कुणाला ते काय आहे तेच कळेना. कुणी अधराची शोभाच पाहू लागल्या आणि स्तब्ध झाल्या. कुणी दाताची चकाकी पाहून स्तंभित झाल्या, विव्हल झाल्या. कुणी सुदर हनुवटीची आभा पाहून चकित झाल्या. सूरदास म्हणतो, अशा प्रकारे श्यामसुंदराला पाहून त्या गोपतरुणी विव्हल झाल्या.

ज्या नटवर प्रौढ श्यामल कृष्णाच्या रूपसौंदर्यावर मीरेने आपला जीव ओवाळून टाकला आणि जे रूपध्यान आपल्या हृदयात ठसून राहावे याबद्दल भगवंताची प्रार्थना केली, ते परममोहक रूप असे आहे –

बसो मेरे नैननमें नंदलाल ।
मोहनी मूरत साँवरी सूरत नैना बने बिसाल।
अधर-सुधा-रस मुरली राजति उर बैजंति माल ।।
छुद्र घंटिका कटि-तट सोभित नूपुर शब्द रसाल।
मीरा प्रभु संतत सुखदाई, भगत बछल गोपाल ।।

अर्थ – हे नंदलाला, माझ्या डोळ्यात वास्तव्य कर. तुझे रूप मोठे मोहक आहे. तुझा रंग सावळा आणि नेत्र विशाल आहेत. तुझ्या मुरलीत अधर-सुधा रस आहे. तुझ्या वक्षावर वैजयंती माळ शोभते आहे. तुझ्या कमरेला लहान लहान घुंगुर बाधले असून, त्याचा मंजुळ आवाज येतो आहे. मीरेचा प्रभु भक्तवत्सल गोपाल सदैव सुख देणारा आहे.



गोवर्धनधारी कृष्ण – ओडिसा लोकशैली

**कृष्णमंगलकाव्ये**– बंगाली भाषेत कृष्णाचे यशोवर्णन करणारे बरेच काव्यग्रंथ आहेत. माधव आचार्य याने दशम स्कंधाच्या आधारावर आणि हरिवंश व विष्णुपुराण यातूनही कित्येक कथा घेऊन कृष्णमंगल लिहिले आहे. कृष्णदासाच्या मंगलकाव्यात दानखंड, नौकाखंड, मारखड, इ. प्रकरणे आहेत. गोविंदाचार्यांच्या श्रीकृष्णमंगलात कृष्णलीलेला धरून आणखीही

कित्येक आख्याने आहेत. बलरामदासाच्या कृष्णलीलामृतात बारा परिच्छेद असून, त्यात कृष्णाचे मथुरागमन आणि गोपींचा विरह वर्णित आहे. कविशेखरकृत गोपालविजय हे पाचाली काव्य आहे. याच्या कित्येक प्रती हस्तलिखित स्वरूपात आढळतात. यात मथुरागमनापर्यंतच कृष्णकथा वर्णित आहे. दुःखी श्यामदासकृत गोविंदमंगलात दानखंड व नौकाखंड हे भाग असून कुठेकुठे भागवतातली कथाही वर्णिलेली आहे.

चंडीदासाचे श्रीकृष्णकीर्तनही बंगाली भाषेत सुप्रसिद्ध आहे. त्यात ५०० हून अधिक गीते असून, संपूर्ण ग्रंथ १३ खंडात विभागलेला आहे. कृष्णजन्माने या ग्रंथाचा प्रारंभ होत असून, कृष्णवियोगानंतरच्या राधाविलापाने त्याचा शेवट होतो. यात राधा–कृष्णांचे प्रेम आध्यात्मिक भूमिकेवरून वर्णिलेले आहे.

**चित्र–शिल्पगत कृष्ण**– गोपालकृष्ण हा शूरसेन प्रदेशातल्या सात्वत कुलाचा कुलदेव झाल्यानंतर त्याच्या क्रीडा–कौतुकाच्या मनोरंजक कथा मौखिक परंपरेने लोकात प्रसृत झाल्या. पुढे हळूहळू त्याला शिल्पकलेतही स्थान मिळू लागले. मथुरेत मिळालेल्या एका खंडित शिलापट्टावर वसुदेव नवजात कृष्णाला एका सुपात ठेवून व ते सूप डोक्यावर घेऊन यमुना पार करीत असल्याचे दृश्य दिसते. हा शिलापट्ट इ. स. च्या पहिल्या शतकातला असावा, असे अनुमान आहे. मथुरेतच मिळालेल्या दुसऱ्या शिलापट्टावर गोवर्धनधारणाचे दृश्य अंकित आहे. आणि तिसऱ्यावर कालियमर्दनाचे चित्रण आहे. हे शिलापट्ट पाचव्या–सहाव्या शतकातले आहेत. बंगालमध्ये पहाडपूर या ठिकाणी सहाव्या शतकातल्या काही मृण्मयमूर्ती आढळल्या असून त्या धेनुकासुरवध, यमलार्जुनांचा उद्धार व चाणूर–मुष्टिकांशी कृष्णाचे मल्लयुद्ध ही दृश्ये दाखविणाऱ्या आहेत. इथेच आणखी एक कृष्णमूर्ती एका गोपीसह उभी असलेली सापडली आहे. अनुमान असे आहे, की ती राधा असावी आणि तीच राधेची सर्वात प्राचीन मूर्ती असावी. जोधपूरच्या जवळ मंदोर नामक गावी वाळूच्या दगडाचे दोन तोरणस्तंभ उपलब्ध झाले आहेत. त्यांवर गोवर्धनधारण, यशोदेचे दधिमंथन, कृष्णाची नवनीतचोरी, इ. दृश्ये अंकित केलेली आहेत. या मूर्तिशिल्पात दिसणाऱ्या कृष्णाच्या कमरेला सिंहचर्म, गळ्यात दोन हार, कानात मोठी कुंडले व दोन्ही हातात बाजूबंद असून, त्याचा केशसंभारही विपुल आहे. डॉ. भांडारकर यांनी हे शिल्प सामान्यतः ४ थ्या शतकातले ठरविले आहे. मध्यप्रदेशातील वेत्रवतीच्या तीरावरचे देवगढ हे ठिकाणही कृष्णशिल्पाच्या दृष्टीने उल्लेखनीय आहे. इथे कृष्णजन्म, कृष्णाने डाव्या पायाने दुग्धशकट ठोकरणे, सुदाम्यासहित कृष्ण, अशी दृश्ये कोरलेली आहेत. मध्य प्रदेशात पठारी नावाचे आणखी एक ठिकाण आहे. त्या ठिकाणचे कृष्णजन्माचे शिल्पही उल्लेखनीय आहे. वर उल्लेखिलेल्या स्थानांशिवाय दक्षिणेत महाबलिपुरम् व मध्य प्रदेशातील खजुराहो या ठिकाणीही कृष्णशिल्पे निर्माण केलेली आहेत. राजस्थान व गुजरात या प्रदेशात झालेल्या उत्खननांतूनही कित्येक कृष्णशिल्पे सापडली आहेत.

भारतीय चित्रकलेत कृष्णलीला चित्रित करण्याचा आरंभ गुजराती चित्रशैलीपासून होतो. गीतगोविंदाच्या हस्तलिखित पोथ्यांवर अशा प्रकारची चित्रे काढलेली असतात. राजपूत शैलीच्या चित्रकारांनीही कृष्णलीला अनेक प्रकारे चित्रित केली आणि आपली शैली कलासंपन्न केली. या शैलीतले उद्धव आणि गोपी हे चित्र सुप्रसिद्धच आहे. कांगडा शैलीने गोवर्धनधारी कृष्ण



बहुप्रियावल्लभ कृष्ण – बसौली शैली

रसिकांच्या समोर कलापूर्ण रीतीने उभा केला. बंगाली शैलीतही कृष्ण हाच प्रमुख चित्रविषय झालेला आहे. श्री. नंदलाल बोस आणि त्यांचे बंधू, तसेच यामिनी रॉय या आधुनिक कलाकारांनीही काही अप्रतिम कृष्णचित्रे काढली आहेत. काशी चित्रशैलीत कृष्णजीवनातले अनेक ललितमधुर प्रसंग भित्तिचित्रांतून प्रकट झाले आहेत. ओडिसाच्या लोककलेने कृष्णविषयक चित्रपट्ट निर्माण केले आहेत. रसेश्वर कृष्णाच्या रासक्रीडेची सुंदर चित्रे ओडिसा चित्रशैलीत पाहायला मिळतात.

**कृष्णमूर्ती**– विष्णुधर्मोत्तर पुराणात सागितले आहे, की पूजेसाठी कृष्णमूर्ती निर्माण करायची ती वर्ण सावळा, हातात चक्र, एका बाजूला निळे कमळ धारण करणारी रुक्मिणी आणि दुसऱ्या बाजूला गरुडवाहिनी सत्यभामा अशा प्रकारची करावी. कृष्णाच्या जीवनातील तीन अवस्था भारतीय मूर्तिकलेत प्रामुख्याने आविष्कृत झाल्या आहेत. पहिली अवस्था म्हणजे त्याचे बालपण. या अवस्थेत तो यशोदेच्या हृदयाशी बिलगून राहिलेला असतो. या त्याच्या रूपाला संतानगोपाल म्हणतात. रांगत्या कृष्णाला बालकृष्ण असे नाव आहे. प्रत्येक देवघरात याची मूर्ती असतेच. उडुपीला अशा बालकृष्णाचे एक मंदिरच आहे. कालियमर्दन करणाऱ्या मूर्तीला कालियकृष्ण असे नाव आहे. राधा–कृष्ण हे त्याचे संयुक्तरूप वैष्णवांचे परम उपास्य असते. या रूपात कृष्ण देहुडाचरणी उभा राहून मुरली वाजवितो व राधा त्याच्या शेजारी असते. या मूर्तीला वेणुगोपाल असे नाव आहे. दक्षिणेतल्या मुरलीधर मंदिरातून ही मूर्ती चतुर्भुज असते व तिच्या उभय अंगी राधेच्या ऐवजी रुक्मिणी–सत्यभामा असतात. हंपी येथील हजारा रामस्वामीच्या देवळात कृष्णाची षड्भुज मूर्ती आढळली आहे. सांप्रत ती थोडीशी खराब झाली असली, तरी तिचे मूळचे सुरेख व सुश्लिष्ट रूप लपत नाही. या मूर्तीच्या दोन हातात मुरली असून दोन बाजूंना दोन गाई आणि त्यांच्याच शेजारी दोन स्त्रिया उभ्या आहेत. कांची येथील वरदराजाच्या सभामंडपात अष्टभुज मुरलीधर असून त्याला मदनगोपाळ हे नाव आहे. गोवर्धनधारी हा कृष्णमूर्तीचा आणखी एक प्रकार आहे. या प्रकारचे उत्कृष्ट शिल्प महाबलिपुरम् येथे आहे. त्याचे पार्थसारथी हे स्वरूप तमिळनाडमध्येच आढळते. या रूपात कृष्ण अर्जुनाला गीतातत्त्वज्ञान उपदेशीत आहे, असे दृश्य दिसते.

**उपास्य कृष्ण** – 'कृष्णस्तु भगवान् स्वयम्' असे म्हणून भागवत पुराणाने कृष्णाला विष्णुरूप मानले आहे. महाभारतकालात जो कृष्ण यादवांचा नेता आणि पांडवांचा हितकर्ता अशा मानवी रूपगुणात दिसला, तोच पुढे मानवांचा उपास्यदेव बनला. पाणिनीच्या काळापूर्वीच कृष्ण हा पूजाविषय झाला होता, असे दिसून येते. पाणिनीने 'वासुदेवार्जुनाभ्यां वुञ्' असे एक सूत्र लिहिले असून, त्याचा अर्थ वासुदेवाच्या ठिकाणी ज्यांची भक्ती आहे, त्यांना वासुदेवक म्हणतात, असा आहे (अष्टा. ४.३.९८). सनपूर्व ३ ऱ्या शतकात भारतात आलेल्या मेगास्थनीज या ग्रीक वकिलाने मथुरा व कृष्णपुर या ठिकाणी कृष्णाची पूजा होत असल्याचे लिहिले आहे. महानारायणीय उपनिषदावरून (सनपूर्व २००) कळते, की त्या काळात कृष्ण हा विष्णूचा अवतार मानला जाऊ लागला होता. पतंजलीनेही वासुदेव कृष्णाचा उल्लेख आर्य जातीची देवता या स्वरूपातच केला आहे. बेसनगर येथे सनपूर्व ३ ऱ्या शतकातला



धेनुकासुरवध – गुजराती लोकशैली

एक शिलालेख आढळला आहे. त्या लेखात वासुदेवाला देवाधिदेव म्हटले आहे. वरील सर्व उल्लेखांवरून असे दिसते, की इसवी सनापूर्वीच कृष्णाची पूजा समाजात रूढ झाली होती व त्याची मंदिरेही बांधली गेली होती.

महाभारतकालातच विष्णूला परमेश्वराचे स्थान प्राप्त झाले होते आणि वासुदेव व विष्णू हे दोघे एकच मानले जात होते. भीष्मपर्वात परमपुरुषाला नारायण व विष्णू या दोन नावांनी संबोधिले असून, हे दोघे व वासुदेव एकच असल्याचे म्हटले आहे (नारायणीय धर्म पाहा). शांतिपर्वात युधिष्ठिराने कृष्णाची स्तुती केली असून, त्यानेही कृष्ण व विष्णू एकच असल्याचे सांगितले आहे. संजय व भीष्म या दोघांनीही कृष्णाला देवच मानले आहे. नारायणीय आख्यानात कंसवधाचा उल्लेख असून, त्यासाठी वासुदेवाने अवतार घेतला, असे स्पष्ट म्हटले आहे.

कृष्ण हा यादवांच्या सात्वत कुलात जन्म पावला होता. या सात्वतांनीच त्याला प्रथम आपले उपास्य मानले व चतुर्व्यूह स्वरूपात त्याची उपासना सुरू केली. पुढे जरासंधाच्या एकामागून एक झालेल्या आक्रमणामुळे हे सात्वत कुल मथुरा प्रदेशातून हटून भारताच्या पश्चिम व दक्षिण भागात गेले. त्या-ठिकाणी या सात्वतांनी आपल्या वसाहती स्थापल्या. त्यांच्याबरोबर कृष्णोपासनाही त्या प्रदेशात गेली. द्रविड देशातले कित्येक राजे आपला वंशसंबंध सात्वतवंशीय कृष्णाशी जोडतात. वैष्णव धर्माचा दक्षिणेत प्रचार झाला, तो या सात्वतवंशीय क्षत्रियांमुळेच होय, असे श्री. ऐयंगार सांगतात.

कृष्णभक्तीचे द्वितीय उत्थान झाले, तेही दक्षिण भारतातल्या तमिळनाडमध्येच होय. या भक्तियुगाचा प्रारंभ तिथल्या आळवार संतांनी केला. आळवारांच्या कृष्णभक्तिविषयक

साहित्यातूनच पुढे रामानुजाचार्य, मध्वाचार्य, निम्बार्काचार्य, इ. आचार्यांचे वैष्णव संप्रदाय निर्माण झाले. आळवारांपैकी



गीतावक्ता पार्थसारथी कृष्ण

कुलशेखर आळवार हा केरळ देशाचा राजपुत्र होता. त्याने राज्यत्याग करून भगवान श्रीरंगनाथाचा आश्रय घेतला व श्रीरंगम् येथे राहून मुकुदमालानामक काव्याची रचना केली. हे स्तोत्र दक्षिणेतील समस्त वैष्णवांना अत्यंत मान्य झालेले आहे. त्या स्तोत्रात कृष्णाचा जयजयकार करताना कुलशेखर पुढील श्लोक लिहितो–

**जयतु जयतु देवो देवकीनन्दनोऽयं**
**जयतु जयतु कृष्णो वृष्णिवंशप्रदीपः ।**
**जयतु जयतु मेघश्यामलः कोमलाङ्गो**
**जयतु जयतु पृथ्वीभारनाशो मुकुन्दः ।।**

निम्बार्क, वल्लभ, चैतन्य व राधावल्लभीय हे चार महत्त्वाचे वैष्णव संप्रदाय कृष्णालाच परम उपास्य मानतात. निम्बार्क संप्रदायातले हरिव्यास हे आचार्य लिहितात –

**तस्मात् कृष्ण एव परो देवः । तं ध्यायेत्**
**तं रसेत् तं भजेत् तं यजेत् ओं तत् सदिति ।।**

अर्थ– म्हणून कृष्ण हाच श्रेष्ठ देव आहे. त्याचे ध्यान करावे. त्याच्या ठिकाणी रस घ्यावा, त्याला भजावे आणि यजावे.

निम्बार्क मतात कृष्णाबरोबरच राधा ही त्याची आल्हादिनी शक्ती मानलेली असून शांत, दास्य, सख्य, वात्सल्य व उज्ज्वल हे पाच भाव कृष्णप्राप्तीचे साधन म्हणून सांगितले आहेत.

वल्लभाचार्य हे श्रीकृष्णाच्या बालरूपाचे उपासक आहेत. त्यांनीच प्रथम कृष्णाच्या वात्सल्यभक्तीचा महिमा वाढवला. त्यांनी आपल्या पुष्टिमार्गाचा सिद्धांत चतुःश्लोकीत पुढील श्लोकाने सांगितला आहे–

**सर्वदा सर्वभावेन भजनीयो व्रजाधिपः ।**
**स्वस्यायमेव धर्मो हि नान्यः क्वापि कदाचन ।।**

अर्थ– सर्व काळी सर्व भावाने व्रजाधिपती कृष्ण हाच भजनीय होय. स्वतःचा हाच धर्म आहे आणि दुसरा कोणताही नाही.

कृष्ण हा साक्षात् परब्रह्म आहे. त्याचे शरीर सच्चिदानंदमय आहे. तो आपल्या अनंत शक्तींनी वेष्टित होऊन भक्तांसह व्यापीवैकुंठात नित्य लीला करीत असतो. हा लोक वैकुंठाहूनही उच्च आहे आणि गोलोक हा या व्यापीवैकुंठाचा एक अंशमात्र आहे.

राधावल्लभीय संप्रदायात वृषभानुसुता राधा ही परमाराध्या असली, तरी तिचा अनन्य उपासक म्हणून कृष्णही उपास्य आहे. श्री राधावल्लभलाल हा सर्वतंत्रस्वतंत्र असून, ब्रह्माचेही ब्रह्म आहे. तो राधेसह नित्यविहार करीत आहे. हा त्याचा विहार अनादी अनंत रूपांनी दिव्यधाम श्रीवृंदावनात होत असतो. या वृंदावनाचे स्वरूप स्थूल, सूक्ष्म व कारण यांच्याही पलिकडचे अतएव अवाङ्मनसगोचर आहे. या पंथात राधाकृष्णांना युगलसरकार या नावाने संबोधतात.

चैतन्यसंप्रदायाचे तत्त्वज्ञान अचिंत्यभेदाभेद या नावाने प्रसिद्ध आहे. या पंथात भगवान कृष्ण हेच परमतत्त्व आहे. कृष्णाच्या शक्ती अनंत असल्या, तरी त्यातल्या अंतरंग, तटस्थ व बहिरंग या तीन प्रमुख आहेत. भगवान कृष्णाचीही स्वयंरूप, तदेकात्मरूप व आवेश ही तीन विशिष्ट रूपे आहेत. कृष्णाची रागात्मिका भक्ती हेच त्या पंथाचे एकमात्र लक्ष्य आहे. चैतन्य मताचे लोक कृष्णप्रेम हाच परमपुरुषार्थ मानतात.

महानुभाव पंथानेही कृष्ण हा एक उपास्य मानलेला आहे. महानुभाव पंथाच्या कित्येक कवींनी श्रीकृष्णचरित्र, रुक्मिणीस्वयंवर, रुक्मिणीहरण, वत्सहरण, इ. कृष्णविषयक काव्ये लिहिली आहेत. वारकरी संप्रदाय हा विठ्ठलपरक असून वारकऱ्यांचा विठ्ठल हा गोकुळात विविध प्रकारच्या लीला करणारा बालकृष्णच आहे. पंढरपुरातली घोषणा 'वासुदेव हरी' अशीच आहे. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, इ. वारकरी पंथाच्या अध्वर्यूंनी पदे, आख्याने, गौळणी, विराण्या, इ. काव्यप्रकारांच्या द्वारे गोकुळात क्रीडा करणाऱ्या मुरलीमोहन कृष्णालाच काव्याची कुसुमांजली वाहिली आहे. पंढरपूर क्षेत्रात गोपाळपुर नावाचा एक विभाग आहे तिथे होणारे वारकरी संप्रदायातले सर्व उत्सव कृष्णविषयकच असतात.

गुजरात व काठियावाड या भागात स्वामीनारायण नावाचा जो पंथ प्रचलित आहे, त्याचाही उपास्य कृष्णच आहे. 'सर्वाविर्भावकारण अक्षराधिपती पुरुषोत्तम' या रूपात या संप्रदायाची उपासना चालते. या पंथाच्या मंदिराना हवेली म्हणतात व अशा हवेलीतून कृष्णाच्या मूर्तीची प्रतिष्ठापना केलेली असते. द्वारका हे या पंथाचे प्रमुख क्षेत्र आहे. याशिवाय भारतातले कित्येक लहानमोठे पंथ कृष्णालाच उपास्य मानून त्याची उपासना करणारे आहेत.

**तंत्रेश्वर कृष्ण**– कृष्ण व त्याचे मूळ रूप श्रीविष्णू यांची उपासना तंत्रग्रथांतही आढळते. कुंडलिनीयोगाच्या परपरेत कृष्ण हा स्वाधिष्ठान चक्राची देवता मानलेला आहे. राधातंत्रात कृष्णाची तात्त्विक व्याख्या पुढीलप्रमाणे दिली आहे–

**ककारं च ऋकारं च कामिनी वैष्णवी कला ।**
**षकारं चन्द्रमा देवः कलाषोडशसंयुता ।**
**णकारं च सुतश्रेष्ठ साक्षान्निर्वृतिरूपिणी ।।**

अर्थ– कृष्ण या नावातले ककार व ऋकार हे कामिनी व वैष्णवी या दोन कला होत. षकार हा सोळा कलानी युक्त चंद्रमा आहे व णकार म्हणजे साक्षात आनंदरूपिणी (राधा) होय.

कृष्णविषयक कित्येक तंत्रग्रंथ आहेत व ते वैष्णव तंत्राहूनही जटिल आहेत. त्या ग्रंथातले ज्ञान गुप्त व गुरुगम्य आहे. या तात्त्विक साधनेत साधक राधा-माधवांच्या मीलनाचा एकांत उपभोग स्वत:च्या अंतरात घेऊ इच्छितो. कृष्णविषयक तंत्रात कृष्णाची अनेक ध्याने आणि भिन्नभिन्न मंत्र सांगितले आहेत. 'गोपीजनवल्लभाय स्वाहा' हा कृष्णाचा दशाक्षरी तांत्रिक मंत्र आहे. 'श्रीकृष्णाय गोविंदाय नमः स्वाहा' हा द्वादशाक्षरी मंत्र आहे. प्रत्येक मंत्राची स्वतंत्र ध्याने आहेत. याचे पुरश्चरण वैष्णव तंत्राप्रमाणेच करायचे असते. श्रीकृष्ण मंत्राची साधना गुरूच्या सान्निध्यातच करावी, असा आदेश आहे. कृष्णाची तीन यंत्रे सामान्यतः प्रचलित आहेत. 'क्लीं' हे कृष्णाचे एकाक्षरयंत्र होय.



कृष्णयंत्र

**दामोदराय विद्महे वासुदेवाय धीमहि ।**
**तन्नः कृष्णः प्रचोदयात् ।।**

ही श्रीकृष्णगायत्री आहे. स्तोत्र आणि कवच हीही कृष्णसाधनेची अंगे आहेत. कालीने स्वतः नौकेच्या रूपात प्रकट होऊन कृष्णाकडून तात्त्रिक साधना करून घेतली, असे राधातंत्रात म्हटले आहे. राधेनेही कृष्णाला कौलमत्राची दीक्षा देऊन त्याच्याकडून तांत्रिक साधना करून घेतली होती. राधातंत्राच्या मते कृष्णाने तांत्रिक साधना केली, म्हणूनच त्याला राधेची प्राप्ती झाली.

कृष्ण आपले अवतारकृत्य समाप्त करून निजधामाला गेला, त्याच दिवशी द्वापरयुग संपून कलियुग सुरू झाले, अशी कल्पना अनेक पुराणांनी व्यक्त केली आहे (वायु. ९९.४२८–२९; ब्रह्मांड ३.७४.२४१, विष्णु. ४.२४.४०). [ भगवान श्रीकृष्ण– बाळशास्त्री हरदास; श्रीकृष्ण–चरित्र– चि. वि. वैद्य; हिं. सा. को.; स्ट. ए. पु. इं.; श्रीकृष्ण– देवदत्त, भारती– श्रीकृष्ण लीला अंक, सप्टें. व ऑक्टो. १९६२; माझे चिंतन – पु. ग. सहस्रबुद्धे ] .

(२) केतुमाल खंडातील एक पर्वत. गंधर्वांचे निवासस्थान. [ पु. इं. ]

(३) सितोद सरोवराच्या पश्चिमेकडील एक पर्वत. [ पु. इं ]

(४) देवाचा एक वर्ग. [ पु. इं. ]

(५) शाल्मलिद्वीपातील शूद्र जात. [ पु. इं. ]

(६) एक नरक. व्यभिचार, दुसऱ्याच्या भूमीवर अतिक्रमण व जादूटोण्यावर उपजीविका करणारे या नरकात जातात. [ पु. इं. ]

(७) एक गणितशास्त्रज्ञ. विदर्भातील दहिगाव येथे राहणारा यजुर्वेदी ब्राह्मण. याने भास्कराचार्यांच्या बीजगणितावर बीजनवांकुर या नावाची टीका लिहिली आहे. श्रीपतिकृत जातकपद्धतीवरही याची टीका असून, छादकनिर्णय या नावाचा एक स्वतंत्र ग्रंथही याने लिहिला आहे. जहांगिर बादशहाच्या दरबारात याचे फार वजन होते. [ म. ज्ञा. को. ]

(८) (इ. स. चे १७ वे शतक) एक ज्योतिषशास्त्रज्ञ. करणकौस्तुभ या ग्रंथाचा कर्ता. ग्रहकौतुक, ग्रहलाघव व स्वतः घेतलेले वेध यांच्या आधारे याने हा ग्रंथ केला आहे. हा सह्याद्रीच्या परिसरातील मावळात राहणारा देशस्थ ब्राह्मण होता. [ भा. ज्यो. इ. ]

## कृष्णकमल

(इ.स. १८१० ते १८८८) यात्रागीते लिहिणारा बंगालमधील एक प्रमुख वैष्णव कवी. नदिया जिल्ह्यातील भजनघाट गावी वैद्य गोस्वामीच्या एका कुटुंबात

याचा जन्म झाला. सहा वर्षाचा असताना याचा पिता मुरलीधर याने त्याला वृंदावनात नेले व तिथेच याने संस्कृताच्या अध्ययनाला सुरवात केली. सहा वर्षे तिथे राहून तो भजनघाटाला परतला. मग आपल्या आईला खूष करण्यासाठी त्याने चैतन्यप्रभूवर एक नाटक रचले. गावातील लोकांना ते फार आवडले. कालांतराने तो तिथून डाक्क्याला गेला. तिथे त्याने स्वप्नविलास हे यात्रानाटच रचले. डाक्क्यातील लोकानी लगेच त्याचा प्रयोगही केला. या गीतनाटचाला अमाप लोकप्रियता मिळाली. यानंतर त्याने राइ उन्मादिनी, भरतमीलन, निमाइ संन्यास, इ. यात्रानाटके लिहिली. बंगालमधील जुन्या पिढीतील लोकांच्या तोंडी आजही त्याच्या यात्रानाटकांतील पद्ये घोळत असतात [ हि. बे. लॅ. लि. ]

**कृष्णघन बानर्जी** एक बंगाली संगीतज्ञ. याने गीतासूत्र या नावाचा एक संगीतविषयक ग्रंथ लिहिला असून, तो बंगाली भाषेत आहे. त्यात मूर्च्छना, ग्राम, राग, इ. सगीत विषयाचे सविस्तर विवेचन आहे. [ सं. शा. क. इ. ]

**कृष्णचतुर्दशी** एक तिथिव्रत. फाल्गुन व. १४ शीस शिवाच्या चौदा नावांचा जप करणे, असा याचा विधी आहे. व्रतावधी चौदा वर्षे. फक्त स्त्रीव्रत असा याचा दुसरा पर्याय आहे. यात त्या तिथीस स्त्रिया उपवास करतात. व्रतावधी एक वर्ष. [ हि. ध. ]

**कृष्णचतुर्दशीजननशांती** एक शांती. कृष्णचतुर्दशीचे सहा भाग कल्पून, त्यांपैकी पहिल्या भागात प्रसूती झाल्यास, ती शुभ मानतात. पण बाकीच्या कोणत्याही भागात ती झाल्यास, कुटुंबातील एखाद्या व्यक्तीला ती अनिष्ट मानून, तिच्या परिहारार्थ शांती करतात. हिचा विधी असा--

संकल्प करून एका वेदीवर एक कुंभ स्थापतात व त्यावर रुद्राची सुवर्णप्रतिमा ठेवतात. हीच या शांतीची प्रधान देवता होय. त्याच्या आग्नेयादी चार दिशांना चार कुंभ मांडून, त्यांवर वरुणाचे आवाहन करतात. मग यथाविधी पूजन झाल्यावर रुद्राध्याय, पुरुषसूक्त, आनोभद्रीय, इ. सूक्तांचा पाठ करतात. ग्रहांची स्थापना व पूजा करतात. नंतर अश्वत्थ, पळस, खैर या समिधांचा आणि चरू, आज्य, तिळ व उडीद या द्रव्यांचा होम करतात. प्रायश्चित्त होमानंतर बलिदान, यजमानदंपतीला अभिषेक व आचार्याला दक्षिणा देणे, ही कृत्ये करून शांतीचा विधी पूर्ण करतात. [ विद्याधरशास्त्री भिडे ]

**कृष्णजयंती** एक व्रत. श्रावण व. ८ मीस मध्यरात्री, रोहिणी नक्षत्रावर मथुरेत कंसाच्या बंदीशाळेत कृष्णाचा जन्म झाला; म्हणून त्या दिवशी जन्माष्टमीचे व्रत करण्याची प्रथा पडली आहे. या व्रताचा विधी असा--

सप्तमीच्या दिवशी एकभुक्त राहून, अष्टमीला पांढऱ्या तिळाचा कल्क अंगाला लावून स्नान करतात. व्रताचा संकल्प करून पूजास्थान लतापल्लवांनी सुशोभित करतात. त्या स्थानी देवकीचे सूतिकागृह तयार करतात. मंचकावर देवकी आणि कृष्ण यांच्या मूर्तींची स्थापना करतात. दुसऱ्या बाजूला यशोदा आणि तिची कन्या, वसुदेव, नंद यांच्या मूर्ती बसवितात. मध्यरात्री शूचिर्भूत होऊन

**श्रीकृष्णप्रीत्यर्थं सपरिवारश्रीकृष्णपूजां करिष्ये ।**

असा संकल्प करतात व सपरिवार श्रीकृष्णाची षोडशोपचार पूजा करतात. रात्री कथा, पुराण, नृत्य, गीत, इ. कार्यक्रमांनी जागरण करतात. अष्टमीच्या दिवशी उपवास करतात व देवालाही फराळाच्या जिन्नसांचाच नैवेद्य दाखवितात. नवमीच्या दिवशी पंचोपचारांनी उत्तरपूजा करून महानैवेद्य समर्पण करतात. मृत्तिकेच्या मूर्ती असल्यास त्याचे जलात विसर्जन करतात व कृष्णाची धातुमूर्ती असल्यास ती देव्हाऱ्यात ठेवतात किंवा ब्राह्मणाला दान देतात.

कृष्णजयंतीचा उत्सव भारतात सर्वत्र साजरा होतो. गोकुळ, मथुरा, वृंदावन, द्वारका, पुरी, इ क्षेत्रांत या उत्सवाचा विशेषच थाट असतो. या दिवशी कित्येकांच्या घरी गोकुळ-वृंदावनाचा देखावा तयार करून जन्मोत्सव साजरा करतात. वैष्णव लोक तर हा दिवस विशेष भक्तीने पाळतात. कित्येक वैष्णव देवस्थानांतून दीपाराधना, पालखी, आंदोलनोत्सव, कृष्णलीलेचे खेळ, भागवताचे वाचन, कीर्तन, भजन, नृत्य-गायन, इ. कार्यक्रम प्रतिपदेपासून अष्टमीपर्यंत चालतात. वृंदावनात या दिवसात दोलोत्सव होतो, तो फार प्रेक्षणीय असतो. महाराष्ट्रात विशेषतः कोकणात या उत्सवानिमित्त दहीकाला होतो. तेव्हा

**गोविंदा आला रे आला । गोकुळात आनंद झाला ।**

असे गाणे गात गात अनेक लहानथोर पुरुष घरोघरी नाचायला जातात व दहीहंड्या फोडतात. घरोघरची माणसे त्या नाचणाऱ्या गड्यांवर पाण्याच्या घागरी ओततात. कित्येक ठिकाणी गोपाळकाला करून कृष्णचरित्रातली सोंगेही आणण्याची प्रथा आहे (काला पाहा ).

हे व्रत केल्याने संतती, संपत्ती व अंती वैकुंठलोक याची प्राप्ती होते. [ हि. ध.; व्रतराज ]

**कृष्णडिंभ विराट** (सतराव्या शतकाचा प्रारंभ) एक महानुभावी कवी. उपाध्य आम्नायातील विराटदेशोपनाम (वाइदेशकर) मयंकराज याचा हा शिष्य असून, त्याने कृष्णमुनी उर्फ कविडिंभ हे नाव धारण केले होते. याने भगवद्गीतामाहात्म्य, ऋद्धिपुरमाहात्म्य, कृष्णजन्माष्टमी, इ. ओवीबद्ध प्रकरणे रचली आहेत. याची साधनामृतस्तोत्र, रंडिकास्तोत्र, तीर्थमालिका, इ. स्फुट रचनाही पुष्कळ आहे. पण रुक्मिणीस्वयंवर हा याचा सर्वांत प्रसिद्ध ग्रंथ असून, तो नवखंडात्मक आहे. म्हणून त्या ग्रंथाला नवखंडरुक्मिणीस्वयंवर असे नाव पडले आहे. [ म. वा. इ. ]

**कृष्णदयार्णव** (१६७४–१७४० इ. स.) एक मराठी संत कवी. याचा जन्म सातारा जिल्ह्यातील कोपर्डे गावी तेथील वतनदार जोशी-कुलकर्णी घराण्यात झाला. याच्या बापाचे नाव नारायण व आईचे बहिणाबाई होते. याचे मूळचे नाव नरहरी असे होते. पण कोरान्न मागत असता हा 'कृष्णदयार्णव' अशी ललकारी देई, म्हणून लोक त्यालाच कृष्णदयार्णव म्हणू लागले.

महाराष्ट्रात मुसलमानांचा जुलूम सुरू झाल्यामुळे त्याला त्रासून हा जोगाईच्या आंब्यास राहायला गेला. तिथे याने आनंदसंप्रदायी गोविंदगुरूकडून दीक्षा घेतली. गुरूने त्याला श्रीकृष्णाची उपासना करायला सांगितले व कोरान्न मागून उदरनिर्वाह करण्याची आज्ञा केली.

पुढे याने आपल्या गुरूबरोबर तीर्थयात्रा केल्या. परत आल्यानंतर याने अग्निहोत्र घेतले. त्यानंतर ६–७ वर्षांनी याला महारोग जडला. अशा स्थितीत एक दिवस एकनाथांनी त्याला स्वप्नदृष्टांत देऊन सांगितले, की 'तू भागवताच्या दशमस्कंधावर टीका लिही, म्हणजे तुझा रोग दूर होईल'.

मग कृष्णदयार्णव त्या लेखनकार्याला प्रवृत्त झाला. वयाच्या ५४ व्या वर्षी त्याने लेखनास आरंभ करून ६० व्या वर्षी हरिवरदा या नावे दशमस्कंधावरील टीकेचा पूर्वार्ध पुरा केला. त्यामुळे त्याचा महारोग दूर झाला. नंतर त्याने त्या ग्रंथाचा उत्तरार्धही लिहायला घेतला. पण तो पुरा होण्यापूर्वीच त्याचा अंत झाला. पुढे त्याचा शिष्य उत्तमश्लोक याने तो उत्तरार्ध पुरा करून ग्रंथसमाप्ती केली.

कृष्णदयार्णवाने दत्तजननोत्साह, विचारचंद्रिका, तन्मयानंदबोध, असे आणखीही ग्रंथ लिहिले आहेत. पण त्या सर्वांत हरिवरदा हाच ग्रंथ सर्वश्रेष्ठ ठरला आहे. भागवतकथा मराठीतून सांगणे, एवढाच त्याचा हेतू नसून, लोकांनी तो ग्रंथ वाचून, ऐकून भगवद्भक्त बनावे, असे त्याला वाटत होते. म्हणून त्याने भक्तीचे विवेचन हरिवरदेत ठायीठायी केले आहे. भक्तीच्या ओघात तत्त्वज्ञानाचे निरूपणही सहजपणे येऊन गेले आहे.



कृष्णदयार्णवाची उपास्य कृष्णमूर्ती

सरस्वती तर त्याच्या जिव्हाग्री नाचत होती. भाषा, तत्त्वज्ञान आणि काव्य या तीन्ही क्षेत्रांतले त्याचे सामर्थ्य हरिवरदेत प्रकट झाले आहे. रासक्रीडेच्या वर्णनात कृष्णदयार्णवाने कामशास्त्राचा आपला व्यासंगही निदर्शनास आणला आहे. गृहस्थजीवनात कामाचे धर्म्य स्थान मान्य करून, कामविषयक ज्ञानाची उपयुक्तता तो प्रतिपादितो. मात्र त्याच वेळी तो लोकांना एक सावधानतेचा इषाराही देऊन ठेवतो, की 'गोपीकृष्णांच्या नावाची ढाल पुढे करून स्वत.च्या विषयासक्तीचे पोषण करू नका.'

आपण हे दशमस्कंधाचे निरूपण प्रेमळ पण अव्युत्पन्न भक्तांच्या श्रवणसुखासाठी केले आहे, असे सांगून कवीने शेवटी सर्व साधकांना व सिद्धांनाही पुढील संदेश दिला आहे—

**अंतरीं असोनि निजात्मरत**
**बाह्य प्रवृत्ति कर्मासक्त ।**
**नाशों नेदितां परमार्थ**
**जनहितार्थ वर्तावें ।।**

(ह. व. ३३. ४५१)

परमात्म्याच्या ठायी रती जडली आहे आणि ज्यांचा सर्व जीवनव्यापार त्याच्याच चिंतनाने भारावून गेला आहे, अशा भक्तांच्या उद्धारासाठी व योगक्षेमासाठी परमेश्वर कसा निजांगे झटतो, त्याचे वर्णन कृष्णदयार्णव पुढीलप्रमाणे करतो—

**ज्यांची माझ्या ठायीं मनें । मज मीनले जीवें प्राणें ।**
**मन्निष्ठचि त्यांचीं करणें । विषयाचरणें मदर्थ ।।**
**मद्गुणश्रवणीं शब्दग्रहण । मम मूर्तीचें आलिंगन ।**
**देव ब्राह्मण गुरु सज्जन । निवती पूर्ण त्या स्पर्शें ।।**
**मन्मय पाहती अखिल जग । नेणती गुणदोषाचें लिंग ।**
**कीर्तन सुधारसाचा भोग । जिव्हेसी चांग दाखविती ।।**

**अथवा नामामृत रसपानें । जिव्हा सुरंग रंगली स्मरणें ।**
**कीं मत्प्रसादतीर्थ ग्रहणें । फावली रसने रसगोडी ।।**
**मदर्चनींच वेधले कर । मत्पर ज्यांचा पदव्यापार ।**
**मदर्थ करिती शौचाचार । अव्यभिचार मन्निष्ठ ।।**
**ऐसे जे कां सर्वापरी । मज कवळिती अभ्यंतरीं ।**
**त्यांची तैसीच मज अवसरी । मी संसारी त्यांसाठीं ।।**
**त्यांचा योगक्षेम मी वाहें । मागें पुढें उभा राहें ।**
**त्यांचें विषम मज न साहे । मी लवलाहें तें निरसीं ।।**
**त्यांची वाट झाडी हातें । कृपापीयुषें पोषी त्यांतें ।**
**आपुले शिरीं त्यांचीं दुरितें । घेऊनि सरतें त्यां करीं ।।**
(४६. ७७–८५)

हरिवरदा हा ग्रंथ ४२ हजार ओव्यांचा असून हे एक आख्यानक काव्य आहे. त्यात विदग्धता व आर्षता यांचा मधुर संगम झालेला आहे. प्रकांड पांडित्याबरोबरच भाषा, व्यापक जीवनानुभूती व चिंतनशीलता हे गुणही त्याच्या अंगी असल्यामुळे त्याच्या ग्रंथात हा संगम साधला आहे. त्याने कृष्णचरित्राच्या निमित्ताने परमार्थरंजित प्रपंचाचे व्यापक दर्शन घडविले आहे. त्यात नवरसाचे प्रवाहही खळाळून वाहत आहेत. [ हरिवरदा ]

**कृष्णदास** (१) (इ. स. १८ वे शतक) माधुर्यभक्तीचा पुरस्कार करणारा एक भक्त कवी. हा उ. प्रदेशातील मिर्झापूरचा रहिवासी व निंबार्क संप्रदायाचा अनुयायी होता, असे सांगतात. माधुर्यलहरी हा याचा प्रसिद्ध ग्रंथ होय. इ. स. १७९५–९६ च्या सुमारास याने हा ग्रंथ रचला. यात राधा–कृष्णांच्या नित्य विहाराच्या प्रसंगांचे अत्यंत सरस व सुश्लिष्ट वर्णन आहे. कृष्णदासाने आपल्या काव्यात बहुशः गीतिका छंदाचाच प्रयोग केला आहे. माधुर्यलहरीच्या भाषेवर संस्कृत भाषेचा बराच प्रभाव आहे. आजही वृंदावनात रासलीलेच्या प्रसंगी या ग्रंथातील पदे गायिली जातात. याने तयार केलेले मीर्जापुरवाली कुंज नावाचे एक ठिकाणही वृंदावनात दाखवितात. [ हिं. सा. को. ]

(२) (१४९६–१५७९ इ. स.) अष्टछाप कवींपैकी एक. गुजरातमधील चिलोतरा गावी कुणबी पाटील जातीत याचा जन्म झाला. लहानपणापासूनच हा धार्मिक प्रवृत्तीचा होता. १२–१३ व्या वर्षी याने आपल्या बापाला चोरीच्या आरोपावरून पकडून दिले व त्याचा परिणाम म्हणून बापाने त्याला घरातून हाकलून दिले. मग फिरत फिरत तो व्रजमंडलात आला व श्रीनाथाच्या दर्शनाने प्रभावित झाला. पुढे त्याने वल्लभाचार्यांची भेट घेऊन त्यांच्याकडून पुष्टिमार्गाची दीक्षा घेतली. कृष्णदासाची असाधारण बुद्धिमत्ता, व्यवहार-कौशल्य व संघटनाचातुर्य या गोष्टी पाहून वल्लभाचार्यांनी त्याला श्रीनाथजीच्या मंदिरावर अधिकारी नेमले. आपली ही जबाबदारी कृष्णदासाने मोठ्या नेकीने पार पाडली. नाथजीच्या मंदिरात गौडीय वैष्णव संप्रदायाच्या बंगाली ब्राह्मणांचे वर्चस्व वाढते आहे, असे दिसताच त्याने त्याचा भल्याबुऱ्या मार्गांनी काटा काढला. पुढे तर त्याने वल्लभाचार्यांचा पुत्र विठ्ठलदास याच्याकडूनही श्रीनाथजीच्या सेवेचा अधिकार काढून घेतला. कृष्णदासाच्या या अपराधाबद्दल महाराज बीरबलाने त्याला कैद केले. पण विठ्ठलदासाने कृष्णदासाच्या मुक्तीसाठी उपास करून त्याला सोडवून घेतले. विठ्ठलदासाचे हे औदार्य पाहून कृष्णदासाला आपल्या कृत्याबद्दल पश्चात्ताप झाला व त्याने विठ्ठलदासाकडे कृतापराधाची क्षमा मागितली. पुढे विठ्ठलदासाच्या प्रशस्तिपर अशी त्याने काही पदेही रचली.

कृष्णदासाने गुरुपरंपरेशी असे दुर्वर्तन केले असले, तरी त्याला सांप्रदायिक सिद्धांताचे चांगले ज्ञान होते. त्याचा उपदेश ऐकण्यासाठी भक्तगण नेहमी उत्सुक असत. पुष्टिमार्गाच्या प्रचारासाठी त्याने पुढे बरेच कष्ट घेतले. त्यामुळे त्या संप्रदायात त्याला फार मान मिळाला.

कृष्णदासाने कृष्णलीलेच्या प्रसंगांवर अनेक पदे रचली आहेत. या बाबतीत तो सूरदासाशी स्पर्धा करीत असे, असे सांगतात. तो जसा कवी होता, तसाच गायकही होता. श्रीनाथजीच्या समोर बसून तो आपली पदे गात असे. त्याच्या काव्याचा एक नमुना पुढीलप्रमाणे–

**लाल ! तेरे चपल नैन अनियारे ।**
**नंदकुमार सुरति-सुरति-रसभीने,**
**प्रेम रंग रतनारे ।।**
**कछु असरीझे चकित चहूँ दिसि,**
**नववर जोपन तारे ।**
**मानो सरद कमलपर खंजन,**
**मधुप अलक घुँघराले ।।**

अर्थ– हे प्रियतम, तुझे चंचल नयन तेजस्वी आहेत. नंदकुमार सुरतरसाने भिजून गेला आहे. त्याच्यावर प्रेमाचा लाल रंग चढला आहे. नवथर यौवन आणि विलासचातुर्य यांमुळे तो प्रसन्न दिसतो आहे. त्याला पाहून चारी दिशा चकित झाल्या आहेत. शरद ऋतूतल्या कमलावर खंजनपक्षी दिसावा, त्याप्रमाणे त्याच्या मुखकमलावर कुरळे केस भ्रमराप्रमाणे दिसत आहेत.

कृष्णदासाने जुगलमानचरित्र, भ्रमरगीत व प्रेमतत्त्व हे तीन

ग्रंथ रचले, असे म्हणतात. [ हि. सा. को.; भा. सं.; अष्ट-छाप परिचय ]

**कृष्णदास कविराज** एक बंगाली वैष्णव कवी. बरद्वान जिल्ह्यातील झामटपुर गावी याचा जन्म झाला. याच्या कालाबद्दल मतभेद आहेत. प्रा. दिनेशचंद्र सेन यांनी याचा काल इ. स. १५१७ ते १६१५ असा दिला आहे; तर बलदेव उपाध्यायांनी तो इ. स. १४९६ ते १५९८ असा सांगितला आहे. हा कायस्थ होता. लहानपणापासूनच याला वैराग्य आले होते. एकदा नित्यानंदाने त्याच्या स्वप्नात येऊन त्याला वृंदावनात जायला सांगितले. त्याप्रमाणे कृष्णदास तिथे गेला. तिथल्या वैष्णव सत्पुरुषाच्या सहवासात राहून त्याने संस्कृत ग्रंथांचे अध्ययन केले. पुढे तिथेच राहून भजन व ग्रंथरचना यांत तो आपला काळ घालवू लागला. त्याचे पुष्कळसे ग्रंथ संस्कृत भाषेतच आहेत. गोविंदलीलामृत या त्याच्या काव्यात वृंदावनातील राधा-कृष्णांच्या लीलांचे वर्णन आहे. याशिवाय याचे कृष्णकर्णामृतटीका, प्रेमरत्नावली, वैष्णवाष्टक, रागमाल, इ. संस्कृत ग्रंथही उपलब्ध आहेत.

पण याची सर्वश्रेष्ठ रचना म्हणजे चैतन्यचरितामृत ही होय. हा ग्रंथ वैष्णवसाहित्यातील हिराच समजला जातो. कृष्णदासाने वयाच्या ७९ व्या वर्षी हा ग्रंथ लिहायला सुरवात केली व सात वर्षांत तो पुरा केला.

या ग्रंथाचे आदिलीला, मध्यलीला व अंतलीला असे तीन खंड असून, त्यात चैतन्यप्रभूंचे चरित्र विस्ताराने कथन केलेले आहे. यात चैतन्यचरित्राबरोबरच वैष्णव मताच्या दार्शनिक रहस्यांचेही सुबोध व सांगोपांग वर्णन आहे. अशा रीतीने काव्य व तत्त्वज्ञान या दोन्ही दृष्टींनी हा ग्रंथ सरस उतरला आहे. चैतन्यप्रभू हा साक्षात कृष्णस्वरूप असल्याचे कृष्णदास मानतो.

चैतन्याची कथा केवळ श्रद्धायुक्त भक्ताला बोधगम्य आहे, असे सांगून कृष्णदास म्हणतो—

**अलौकिक लीलाय जार ना हय विश्वास ।**
**इह लोक परलोक तार हय नाश ।।**
(चै. च. मध्यलीला परि. १७)

अर्थ— चैतन्यप्रभूंच्या अलौकिक लीलांवर जो विश्वास ठेवणार नाही, त्याचे इहपरलोक नष्ट होतील.

**भक्तगण कोकिलेर सर्वदा वल्लभ ।**
**अभक्त उष्ट्रेर ना हय प्रवेश ।।**
(चै. च. आदिलीला परि. ४)

अर्थ— भक्त कोकिळाला या ग्रंथात सर्व काही मिळेल. पण अभक्त उंटाला मात्र काहीही मिळणार नाही.

हा ग्रंथ बंगालीत असला, तरी त्यात ब्रजभाषेचेही बरेच शब्द आहेत. या मिश्र भाषेला ब्रजबुली असे म्हणतात. [ हि. बे. लँ. लि.; भा. सं.; हिं. बं वै. क. ]

**कृष्णदास पयहारी** (इ. स. १६ वे शतक) जयपूर जवळच्या गलता येथे राहणारा एक प्रसिद्ध संतकवी. हा जातीने दाहिमा ब्राह्मण होता. हा केवळ दूध पिऊन राहत असे, म्हणून याला पयहारी हे नाव मिळाले. रामानंद-शिष्य अनंतानंद याचा हा शिष्य होता व आमेरच्या पृथ्वी-राजाची राणी बालाबाई हिचा गुरू होता. याच पृथ्वीराजाचा कापालिक संप्रदायातील गुरू चतुरनाथ याचा याने शास्त्रार्थात पराभव केला व म्हणून याला गलता येथील महतपद मिळाले, असे सांगतात.

हा संस्कृत भाषेचा पंडित होता. ब्रजभाषेवरही त्याचे प्रभुत्व होते. ब्रह्मगीता, प्रेमसत्त्वनिरूप व जुगलमानचरित हे तीन ग्रंथ याच्या नावावर आहेत. यांपैकी पहिले दोन ग्रंथ निश्चितपणे यानेच रचलेले असून, तिसऱ्या ग्रंथाबद्दल मात्र संदेह आहे. हा एक प्रतिभासंपन्न कवी असून, त्याची रचना मधुर व कोमल आहे. त्यात भावनेपेक्षा विचाराला अधिक प्राधान्य दिलेले आहे. याची काही फुटकळ पदेही उपलब्ध आहेत.

कृष्णदास पयहारी रामानंदी संप्रदायाचा एक प्रमुख आचार्य होता. [ रा. पि. सा. ]

**कृष्णदेवराय** (इ. स. १४८८–१५२९) हा विजयनगरचा महान कर्तबगार राजा होय. हा तुलुव वंशातील इम्मडी नरसिंह याचा पुत्र होता. याचे शरीर भव्य व पिळदार असून, रूप देखणे होते. तो पटाईत घोडेस्वार, शूर योद्धा व कुशल सेनापती होता.

वयाच्या २१ व्या वर्षी (इ. स. १५०९ साली) तो सिंहा-सनावर बसला. त्याने प्रथम राज्याची आर्थिक व्यवस्था सुस्थिर केली आणि सेनाबल संघटित केले. नंतर त्याने साम्राज्यातील नायकांचा बंदोबस्त करून सर्वत्र एकछत्री सत्ता निर्माण केली. त्यानंतर त्याने उत्तरेकडील मुसलमानी राज्यांवर आक्रमण केले. रायचूरच्या लढाईत त्याला प्रचंड विजय मिळाल्यामुळे मुसल-मानांवर त्याचा वचक बसला. त्याने ओडिसावर आक्रमण करून राजा गजपतीचाही पराभव केला. कृष्णानदीपासून रामेश्वरा-पर्यंत आणि पश्चिम समुद्रापासून पूर्वेस ओडिसापर्यंतच्या विस्तृत प्रदेशावर त्याची साम्राज्यसत्ता प्रस्थापित झाली होती. त्याने महाराजाधिराज, सिंहासनाधीश्वर, इ. पदव्या धारण केल्या होत्या.

कृष्णदेवराय हा एक थोर व न्यायी शासनकर्ता होता. तो स्वभावाने उमदा व मनाचा कोवळा होता. परकीय लेखकांनी त्याची फार प्रशंसा केली आहे. याने जमीनसुधारणा करून मुबलक पाणीपुरवठ्यासाठी धरणे व पाटबंधारे बांधले. पोर्तुगीजांशी चांगले संबंध ठेवल्यामुळे याच्या वेळी व्यापाराची भरभराट झाली. अनेक मंदिरांचा जीर्णोद्धार करून याने पुष्कळ दानधर्म केला. हा स्वत: वैष्णव असला, तरी याने वैष्णव आणि शैव या दोन्ही पंथांच्या देवालयांना देणग्या दिल्या.

कृष्णदेवरायाची राजवट म्हणजे तेलुगू साहित्याचे सुवर्णयुग मानले जाते. तो स्वत: कवी व पंडित असून त्याने तेलुगू व संस्कृत या भाषांमध्ये अनेक काव्यग्रंथ रचले आहेत. आमुक्तमाल्यदा हे त्याचे काव्य तेलुगू भाषेत रचलेले असून, त्यात गोदादेवी व विष्णुचित्त यांची कथा सांगितलेली आहे. विषय, छंद, अलंकार, शैली, इ. सर्व दृष्टींनी हे काव्य उत्कृष्ट असून, त्यात काही थोर वैष्णव पुरुषांचे जीवनचरित्र दिलेले आहे. त्याच ग्रंथात कवीने रामानुजाच्या तत्त्वज्ञानाचाही ऊहापोह केला आहे. त्या विवेचनात कृष्णदेवरायाची गाढ विद्वत्ता निदर्शनास येते. त्याने मदालसाचरित्र, सत्यभामापरिणय, जांबवतीपरिणय, सकलकथासारसंग्रह, ज्ञानचिंतामणी, रसमञ्जरी, इ. ग्रंथ संस्कृत भाषेत रचलेले आहेत.

कृष्णदेवराय हा विद्वानाचा आश्रयदाता होता. त्याच्या दरबारात अष्टदिग्गज नामक आठ पंडित होते. त्या सर्वांनी महाप्रबंधकाव्ये रचली आहेत. त्या काळी असंख्य प्रबंधकाव्ये निर्माण झाल्यामुळे त्या युगाला प्रबंधकाव्ययुग असे नाव मिळाले आहे. [ म. च. को.; वि. सा. इ.; आन्ध्र– भारती; इल. वीकली ऑफ इंडिया, ४ मार्च १९६२ ]

**कृष्णदोलोत्सव** चैत्र शु. ११ शीस लक्ष्मीसह कृष्णमूर्ती एका दोल्हाऱ्यात ठेवून तिची दवण्याने पूजा करणे व रात्री जागरण करणे, असा याचा विधी आहे. [ हि. ध. ]

**कृष्णद्वादशी** एक व्रत. आश्विन कृ. १२ शीस उपवास व वासुदेवाची पूजा. या तिथीस वासुदेवद्वादशी असेही नाव आहे. [ हि. ध. ]

**कृष्णद्वैपायन** वसिष्ठ ऋषीचा पणतू व पराशर ऋषीचा पुत्र. यालाच व्यास असेही म्हणतात. हा एका धीवरकन्येला (मत्स्यगंधा किंवा सत्यवती) कौमार दशेत पराशर ऋषीपासून झाला. यमुना नदी कृष्णवर्णाची असून तिच्यातल्या एका बेटात याचा जन्म झाला, म्हणून याला द्वैपायन अथवा कृष्णद्वैपायन असे नाव पडले. बदरीवनात तप केल्यामुळे बादरायण व वेदराशी विभक्त केल्यामुळे वेदव्यास अशी याला अन्य नावे मिळाली. याच्या पत्नीचे नाव अरणी असे होते. शुकाचार्य हा याचा पुत्र होता. विचित्रवीर्याच्या विधवा स्त्रियांच्या ठिकाणी सत्यवतीच्या आज्ञेने याने पुत्रोत्पत्ती केली. धृतराष्ट्र आणि पंडू हे ते पुत्र होत. तसेच याने एका दासीच्या ठिकाणी विदुर नावाच्या पुत्राचीही उत्पत्ती केली. हा द्वापर युगाचा व्यास मानलेला आहे. महाभारत व पुराणे यानेच रचली असे पुराणातरी म्हटलेले आहे. कृष्णद्वैपायनाला नारायणाचा अवतार मानलेले आहे. **पाहा–** व्यास [ म. ज्ञा. को.; पु. इं. ]

**कृष्णनाट्टम्** कथकळी पाहा.

**कृष्णपंचमीव्रत** एक जैनव्रत. ज्येष्ठ कृ. ५ मीस उपवास ५ वर्षानंतर उद्यापन. [ जै. व्र. वि. सं. ]

**कृष्णपाद** कण्हपा पाहा.

**कृष्णपुरम्** द. भारतात तिरुनेलवेली शहरापासून सात मैलांवर वसलेले एक गाव. इथे वेंकटाचलपतीचे भव्य मंदिर असून ते १५ व्या शतकात कृष्णप्पा नायकर याने बांधले, असे म्हणतात. या देवालयाचा मंडप प्रेक्षणीय असून त्यावरचे शिल्पकाम सुंदर आहे. इथे हंसारूढ रतिमूर्ती आहे, ती विशेष उल्लेखनीय आहे. [ एन्. रामकृष्णन् – इल. वीकली ऑफ इंडिया, १४ जून ५९ ]

**कृष्णभागवतर** (१) (१८४७–१९०३ इ. स.) एक संगीतज्ञ. हा तंजाऊर येथे राहत असे. अर्वाचीन कथाकालक्षेपम्‌चा हा जनक मानला जातो. हा व्हायोलिन व मृदंगम् वाजविण्यात प्रवीण होता. संस्कृत, मराठी, तेलुगू, तमिळ व हिंदुस्थानी या भाषा त्याला चांगल्या अवगत होत्या. दक्षिणेच्या व उत्तरेच्या कीर्तनपद्धतीचा अभ्यास करून त्याने त्या दोहोंच्या समन्वयातून एक नवी कीर्तनपद्धती सुरू केली. त्याची कीर्तने श्रोत्यांना मंत्रमुग्ध करीत.

एकदा कृष्णभागवतरने नंदनारचरित्रम् हे आख्यान सुरू केले. त्याचा कर्ता गोपालकृष्ण भारती हा त्या वेळी श्रोतृवृंदात बसला होता. कृष्णभागवतरला कोणीतरी त्या गोष्टीची जाणीव करून दिली. लगेच गोपालकृष्ण भारतीला नमस्कार करून

त्याने त्याचा आशीर्वाद मागितला. त्या वेळी गोपालकृष्ण भारतीने दिलखुलासपणे त्याला सांगितले, की 'तुमच्या प्रयोगातून माझ्या कथेला नवजीवन मिळत आहे.' [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

(२) त्यागराजाचा एक शिष्य उमैयाळपुरम्‌चा राहणारा. याने त्यागराज व इतर अनेक संत यांच्या कृतीचे अध्ययन केले होते. हा व याचा भाऊ दोघेही सुप्रसिद्ध गायक होते. [ डि. सा. इं. म्यु. म्यु ]

**कृष्णमुनी पंजाबी** (इ. स. १७ वे शतक) एक कवी. हा मूळचा पंजाबातला; पण याचे वास्तव्य खानदेशात खेरडी या गावी झाले. कवीश्वराम्नायातील दिवाकर मुनी यांचा हा शिष्य होता. हा शीघ्रकवी असून, याला अनेक भाषा अवगत होत्या. याचा कलगीतुऱ्याचा आखाडा होता. याने रचलेले ख्याल लोकांना इतके आवडले, की त्यांनी त्याला ख्यालीबहाद्दूर अशी पदवीच दिली. [ म. म. वा. ]

**कृष्णयजुर्वेद** ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, आणि अथर्ववेद हे चारही वेद एकाच वेदराशीतून निघाले असल्याचे म्हटले आहे. व्यास महर्षींनी वेदराशीचे चार विभाग करून, ते आपल्या निरनिराळ्या शिष्यांना शिकविले, असे म्हणतात. त्या शिष्यांनी त्यांच्या शिष्यांना ते शिकविले व अशा प्रकारे शिष्यपरंपरेने वेदांचे अध्ययन पुढे चालू झाले. पुढे देशभेदाने आणि कालभेदाने एका वेदाच्या अनेक शाखा उत्पन्न झाल्या. यजुर्वेदाचा मूळ आचार्य वैशंपायन होय. वैशंपायनाने हा वेद आपल्या शिष्यांना शिकविला.

याज्ञवल्क्य हा त्याचाच एक शिष्य होता. गुरूशी त्याचे भांडण झाल्यामुळे, आपण शिकविलेला वेद ओकून टाकण्यास वैशंपायनाने त्याला सांगितले. याज्ञवल्क्याने तसे केले. ते वेदाध्ययन फुकट जाऊ नये, म्हणून वैशंपायनाच्या इतर शिष्यांनी तित्तिरी पक्ष्याचे रूप घेऊन तो ओकलेला वेद पचविला. त्यामुळे तैत्तिरीयशाखा उत्पन्न झाली, असे समजतात. याज्ञवल्क्याने नंतर सूर्योपासना करून सूर्याकडून नवा वेद मिळविला. त्याने आपल्या या नव्या वेदाला शुक्लयजुर्वेद असे नाव दिले. अर्थात पूर्वीच्या वेदाला कृष्णयजुर्वेद असे नाव मिळाले. यासंबंधी प्रसिद्ध श्लोक आहे, तो असा —

**शुक्लं कृष्णमिति द्वेधा यजुश्च समुदाहृतम् ।**
**शुक्लं वाजसनं ज्ञेयं कृष्णं तु तैत्तिरीयकम् ।।**

अर्थ — यजुर्वेदाचे शुक्ल आणि कृष्ण असे दोन भाग आहेत. वाजसनेयी संहिता म्हणजे शुक्लयजुर्वेद आणि तैत्तिरीय संहिता म्हणजे कृष्णयजुर्वेद होय.



कृष्णयजुर्वेदामध्ये मंत्रभाग आणि ब्राह्मणभाग मिश्रित असल्यामुळे त्याला कृष्णयजुर्वेद अशी संज्ञा मिळाली, असेही म्हटले आहे. यजुर्वेदाच्या एकूण १०१ शाखा होत्या, असे पतंजली म्हणतो (यजुरेकशतात्मकम्). त्याच्या ८६ शाखा होत्या, असे चरणव्यूहात म्हटले आहे (यजुर्वेदस्य षडशीति भेदा भवन्ति ।). पण कृष्णयजुर्वेदाच्या सध्या चारच शाखा उपलब्ध आहेत तैत्तिरीय, मैत्रायणी, काठक आणि कपिष्ठल अशी त्याची नावे आहेत. श्वेताश्वतर ही कृष्णयजुर्वेदाचीच शाखा आहे; पण तिचे फक्त उपनिषदच उपलब्ध आहे. संहिता असावी असे वाटते; पण ती अजून उपलब्ध झाली नाही. तैत्तिरीयशाखेची बौधायन, भारद्वाज, आपस्तंब, हिरण्यकेशी, वैखानस आणि वाधूल अशी सहा सूत्रे आहेत. पूर्वी या निरनिराळ्या शाखा असाव्या, असे काही विद्वानांचे मत आहे. कृष्णयजुर्वेदाची कौडिण्य अथवा अग्निवेश नावाची एक शाखा होती, असे आनंदसंहितेत म्हटले आहे. या शाखेचे सध्या फक्त गृह्यसूत्रच उपलब्ध आहे. कृष्णयजुर्वेद्यांच्या तर्पणात कौडिण्याचा वृत्तिकार म्हणून उल्लेख येतो. यज्ञकर्मामध्ये अध्वर्यूने करायच्या कर्माचे विवेचन आणि त्यासंबंधीचे मंत्र यांचा समावेश प्रामुख्याने यजुर्वेदामध्ये होतो. त्यामुळे सर्व प्रकारच्या यज्ञाचे वर्णनच यजुर्वेदाच्या शाखांमध्ये केलेले असते.

तैत्तिरीयशाखेचे संहिता, ब्राह्मण, आरण्यक आणि उपनिषदे असे वेगवेगळे ग्रंथ उपलब्ध आहेत. तैत्तिरीयशाखेची कांडानुक्रमाने एक विभागणी असून, तिच्यामध्ये विषयानुक्रमाने संहिता, ब्राह्मण आणि आरण्यक यातील अनुवाकांची मांडणी केलेली आहे. एकूण कांडे पांच आहेत. दुसरी रचना सारस्वत पाठाची. या रचनेत संहितेची ७ कांडे, ब्राह्मणाची ३ कांडे आणि आरण्यकाचे दोन भाग अशी विभागणी आहे. वैदिकांच्या म्हणण्यात हीच पद्धत प्रचलित आहे. संहितेत मंत्रभाग व ब्राह्मणभाग दोन्हीही आहेत. डॉ. कीथ याने या संहितेचे इंग्रजी भाषांतर केले आहे.

मैत्रायणी शाखेचे संहिता, आरण्यक आणि मैत्र्युपनिषद हे ग्रंथ उपलब्ध आहेत. मैत्रायणी संहितेत चार कांडे आहेत. आदिम, मध्यम, उपरि आणि खिल अशी त्यांची नावे आहेत. या संहितेमध्येही सर्व प्रकारच्या यज्ञांचे विवेचन आहे. याज्ञवल्क्याने वेद ओकून टाकण्यापूर्वीची ही शाखा असल्यामुळे हिला आद्ययजुर्वेद असेही म्हटले जाते.

कठ आणि कपिष्ठल या संहितांना चरकसंहिता असे नाव आहे. 'चरक इति वैशंपायनस्य आख्या' = चरक हे वैशंपायनाचेच नाव होय, असे काशिकावृत्तीत म्हटले आहे (अष्टा. ४ ३.१०४ वरील वृत्ती). कठ आणि कपिष्ठल या संहितांमध्ये

पुष्कळच साम्य आहे. कपिष्ठल संहिता त्रुटित स्वरूपात मिळते. डॉ. रघुवीर यांनी ही संहिता छापली आहे. प. सातवळेकरांनी तैत्तिरीय, मैत्रायणी आणि काठक या तीन संहिता छापल्या आहेत. कठशाखेचे कठोपनिषद आणि श्वेताश्वतरशाखेचे श्वेताश्वतरोपनिषद अशी दोन उपनिषदे प्रसिद्ध आहेत. पाहा– यजुर्वेद. [ विद्याधरशास्त्री भिडे ]

**कृष्णयाज्ञवल्की** (इ. स. १६ वे शतक) एक मराठी संत कवी. हा कौंडिण्यगोत्री ब्राह्मण होता. याने कथाकल्पतरू नावाचा ३९००० ओव्यांचा एक पौराणिक ग्रंथ लिहिला आहे या ग्रंथात अनेक पौराणिक कथा असून, त्यात व प्रचलित पौराणिक कथांत बराच फरक आढळतो. या ग्रंथात कथाशिवाय भूगोल, खगोल, चारी वर्णाची व जातीची उत्पत्ती, इ. अनेक विषय आलेले आहेत. ग्रंथाची भाषा साधी व सरळ आहे.

कृष्णयाज्ञवल्कीने कथाकल्पतरूच्या लेखनास प्रारंभ केला खरा; पण तो ग्रंथ पूर्ण होण्याच्या आतच त्याचा मृत्यू ओढवला. त्यानंतर मधुकर कवी नामक त्याच्या शिष्याला स्फूर्ती होऊन, त्याने शेवटचे सात स्तवक लिहून ग्रंथ पुरा केला. [ म. वा. इ.; सु. वि. को. ]

**कृष्णरामपंथ** कृष्णराम नावाच्या एका ब्राह्मणाने अहमदाबाद येथे स्थापलेला एक पंथ. या पंथात कृष्णभक्ती प्रचलित आहे. भजन, कीर्तन व नामस्मरण यांच्या योगाने मुक्ती मिळते, असे या पंथाचे लोक मानतात.

**कृष्णलाल** (इ. स. १९ वे शतक) एक राजस्थानी कवी. हा बूंदीचा गोस्वामी गदाधरलाल याच्या वंशात जन्मला. याच्या बापाचे नाव मोहनलाल. याने कृष्णविनोद व रसभूषण या नावाचे दोन ग्रंथ अनुक्रमे इ. स. १८१५ व १८१७ मध्ये लिहिले. पैकी पहिला नायिकाभेद या विषयावरचा असून, दुसरा अलंकारशास्त्रावरचा आहे. याशिवाय त्याची भक्तमाल ग्रंथावरील टीकाही प्रसिद्ध आहे. याची भाषा अनुप्रासयुक्त असून, मधुर आहे. उदा०–

**सूखि सभेद भई विरहै जरि,**
**सोई गंगे गति ऊरध दैनी।**
**अंग मलीन अंगार के धूमसो,**
**सो जमुना जग जाहर रैनी।**
**ताहि समै भयो प्यारे को आवन,**
**सो अनुराग गिर गति लैनी।**
**कृष्ण कहै तबहो वर बालकै,**
**आय कढी ततकाल त्रिवेनी।**

भावार्थ– विरहाने कोळपून कृश व फिकट झालेल्या गंगेची गती उर्ध्व झाली; त्याचप्रमाणे वियोगामुळे यमुनेचे अंग मलिन होऊन, ती अग्नीच्या धुराप्रमाणे काळी ठिक्कर पडली, ही गोष्ट जगजाहीर आहे. अशा वेळी प्रियतमाचे आगमन झाले. त्याची भाषा प्रेममय होती. कवी कृष्ण म्हणतो, बालकश्रेष्ठ श्रीकृष्णाच्या आगमनानंतर लगेच त्रिवेणीचा उदय झाला.

**कृष्णलीलातरंगिणी** संस्कृत भाषेतील एक संगीतिका. नारायणतीर्थ या कवीने ही लिहिली आहे. या संगीतिकेत बारा तरंग असून रुक्मिणीहरणाच्या प्रसंगापर्यंतचे कृष्णचरित्र त्यात ग्रथित केलेले आहे. निरनिराळ्या ३६ दाक्षिणात्य रागांत या ग्रथाची रचना आहे. या संगीतिकेत विष्णू, ब्रह्मा, भूदेवी, सनकादी मुनी, देवकी, वसुदेव, कृष्ण, रुक्मिणी, इ. महत्त्वाची पात्रे आहेत. जयदेवाच्या गीतगोविंदाइतकाच दक्षिणेत या संगीतिकेला मान आहे. [ डि. सा. इ. म्यु. म्यु ]

**कृष्णवकक्कर** त्रिवांकुरमधील एक जात. कृष्णवकक्कर या नावाचा शब्दशः अर्थ कृष्णासंबंधी असा आहे. याच्याविषयी पुढील आख्यायिका प्रचलित आहे–

प्राचीन काळी, कृष्णाच्या अंबादी या गावातून बरेचसे लोक कांजीवरम्‌ला आले. तिथे काही दिवस राहिल्यावर त्यांच्यापैकी बाहात्तर कुटुंबे नव्या जमिनीच्या व कुरणाच्या शोधात केरळ प्रदेशात पोचली व तिथल्या उदयमार्तंडवर्मा नामक राजाला त्यांनी आपल्याबरोबर आणलेली कृष्णमूर्ती भेट दिली. त्यांची कृष्णभक्ती पाहून राजाने त्रिवेंद्रम्‌च्या कृष्णमंदिराची (तिरुवपती) सर्व व्यवस्था त्यांच्याकडे सोपविली. पण या बाहात्तर कुटुंबात सुवेर–सुतक या गोष्टी नित्याच्या होऊ लागल्या. त्यामुळे पूजेअर्चेत व्यत्यय येऊ लागला. म्हणून मग या लोकांना त्रिवेंद्रम्‌पासून दूर जायला सांगण्यात आले. तेव्हा ते एरनिएल व कालकुलम् तालुक्यात जाऊन स्थायिक झाले. या लोकांच्या पुढाऱ्याला राजाने अनंतपद्मनाभक्षेत्रपल्लवरायन् ही पदवी दिली होती.

पल्लवरायन् या पदवीवरून ते मुळात पल्लवांच्या देशातले असावे, असे वाटते. मुळात हे लोक गुरे चारीत असावे व कांजीवरम्‌हून पल्लवाची राजधानी असलेल्या त्रिवांकुर नगरीत गेले असावे.

हे लोक शिव, विष्णू, सुब्रह्मण्य, शास्ता, भूतत्तन, इ. देवताना भजतात.

हे गट करून राहतात. गटाच्या मुख्याला कार्यस्तन असे म्हणतात. कर्नटन किंवा आसान हा त्याचा पुरोहित असतो. त्याच्यांत पैतृक व मरुमक्कतायम् अशा दोन्ही वारसापद्धती प्रचलित आहेत.

**विवाहप्रथा**— बाहात्तर कुटुंबाची नावे ही गोत्राप्रमाणे मानली जातात व सगोत्र विवाह करीत नाहीत. मरुमक्कतायम् वारसापद्धती पाळणाऱ्या लोकांत मुलींना ताळी बांधण्याचा समारंभ लहानपणी होतो व मुलगी वयात आल्यावर तिचे लग्न होते. लग्नाच्या दिवशी वर वीरासारखा पोषाख करून, हातात तलवार घेऊन, मिरवत वधूगृही जातो. बहुधा रुक्मिणीच्या स्वयंवरासाठी गेलेल्या कृष्णाचे हे अनुकरण असावे. लग्नाच्या तिसऱ्या दिवशी वधूपक्षाकडील मंडळी रागाचा भाव आणून वरगृही जातात व वराकडील आतिथ्याचा स्वीकार न करता परत येतात. विधवेला धाकट्या दिराशीही लग्न करता येते व त्याच्यापासून झालेली संतती मृत भावाचीच, असे मानण्यात येते.

**मर्तिकप्रथा**— मृतांना जाळतात. आशौच सोळा दिवस पाळतात. [का. ट्रा. स. इं.]

## कृष्णवती

(इ. स. १९ वे शतक) एक हिंदी कवयित्री. हिचे नाव मिश्रबंधूंनी संपादिलेल्या अहवालात आढळते. हिने विवाहविलास नावाचे एक काव्य लिहिले असून, त्यात राधा–कृष्णाच्या विवाहाचे वर्णन केले आहे. या काव्याचा नेमका रचनाकाल मिळत नसला, तरी तो इ. स. १८४३ च्या पूर्वीचा असावा, असे वाटते. तिने या काव्यात कृष्ण व राधा याची तुलना करून राधेचे माहात्म्य वाढविलेले आहे. त्यावरून ती राधावल्लभसंप्रदायी असावी, असे वाटते.

कृष्णाचे वररूप, वरातीची धामधूम, स्त्रीवृंदाचा उत्साह–आनद याचे तिने केलेले वर्णन पुढीलप्रमाणे आहे–

**अँखियाँ भई मोरी चकोरी तहाँ**
**सो तो गोरी परीं सब प्रेमके फंदा ।**
**बारात बनी चहुँ ओरन छत्र**
**सुमोहन मित्र है आनंदकंदा ।**
**सबै गारी गावै वृजनारि तहाँ**
**कृष्णवती के मन होत अनंदा ।**
**अरी देख्यो है राधा जी को**
**दूलह भट्ट, मानो पूरनमासी को पूरन चंदा ।।**

अर्थ– गोरी राधा (कृष्णाच्या) प्रेमपाशात पडलेली पाहून माझ्या डोळ्यांची स्थिती चकोराप्रमाणे झाली आहे. वरात निघाली असून, चारी बाजूंनी छत्र धरलेले आहे. आनंदकंद श्रीकृष्णाची ही वरात असून, गोकुळातल्या स्त्रिया विवाहगीते गात आहेत. हे पाहून कृष्णवतीला आनंद होतो आहे. अहो, राधेला पाहा आणि वर तर जणू पौर्णिमेचा पूर्णचंद्रच प्रकाशला आहे !

## कृष्णवंशी

भाटिया पाहा.

## कृष्णवस्त्रदान

अरिष्टे, भय, पीडा व अपमृत्यू याच्या परिहारासाठी व मृत्युदेवतेच्या प्रीतीसाठी कृष्णवस्त्र दान देण्याची पद्धत आहे दानमंत्र असा–

**कृष्णं वासः प्रिय मृत्योः सर्वारिष्टविनाशनम् ।**
**भयपीडामृतिहरमतः शान्ति प्रयच्छ मे ।।**

अर्थ– कृष्णवस्त्र हे सर्वारिष्टविनाशक, भय, पीडा व मृत्यू यांना दूर करणारे आणि मृत्यूचे आवडते आहे. म्हणून मला शांती दे.

मग दक्षिणा देऊन दानसमाप्ती करतात. [दा. चं.]

## कृष्णाविषाणा

एक यज्ञीय उपकरण. हे काळवीटाचे शिंग असते. सोमयागात यजमान दीक्षा घेतो, त्या वेळी हे शिंग त्याच्या गळ्यात बांधतात. अंगाला कंड सुटली, तर यजमान या शिंगानेच अंग खाजवितो. याला तीन किंवा पाच वळ्या असाव्या, असे सांगितले आहे. [विद्याधरशास्त्री भिडे]

## कृष्णव्रत

(१) वर्षाच्या शेवटी व चैत्रमासी एकादशीस रात्रिभोजन करून सुवर्णाचे चक्र दान करणे, हा या व्रताचा विधी आहे. व्रताचे फल– वैकुंठाची प्राप्ती आणि वल्गाती राज्यलाभ. [कृ. क. त.]

(२) मार्ग० व. षष्ठी या तिथीस सूर्यपूजा. पुढे प्रत्येक महिन्याच्या वद्य षष्ठीस सूर्याच्या निरनिराळ्या नावांनी वर्षभर सूर्यपूजा करणे. [हि. ध.]

(३) दोन्ही पक्षांच्या वद्य षष्ठीला नक्त भोजन व कार्तिकेयाला उद्देशून अर्घ्य. [हि. ध.]

(४) या व्रतात कृष्णाच्या किंवा गणपतीच्या मंदिरात, गोशाळेत किंवा अश्वत्थाच्या अथवा कदंबाच्या मुळात बसून, पुढील मंत्राचा जप करायचा असतो–

**देवकीसुत गोविन्द वासुदेव जगत्पते ।**
**देहि मे तनयं कृष्ण त्वामहं शरणं गतः ।।**

वरील मंत्राचे एक लक्ष पुरश्चरण झाल्यावर हवन व ब्राह्मण भोजन करायचे असते. फल– पुत्रप्राप्ती [ व्र. प. ]

**कृष्णसूत्र** एक नरक. याला कालसूत्र असेही म्हणतात. [ पु. इं. ]

**कृष्णस्वामी भागवतर** ( इ. स. १९ वे शतक ) त्यागराजाच्या प्रमुख शिष्यापैकी एक. वेंकटराम भागवतरचा पुत्र. या पिता–पुत्रानी मिळून त्यागराजाच्या कृतींचे संकलन केले. वलजपेट हे याचे गाव होते. याने आपल्या बापाकडेच संस्कृताचे व संगीताचे अध्ययन केले. त्यागराजाच्या कृतींचे संकलन करीत असता त्याने असा नियम केला, की रोज पूजा झाल्यावर देवापुढे दहा कृतीचे गायन करायचे. याप्रमाणे एका वर्षात त्याने ३६०० कृतीचे संकलन केले व ते काम तसेच पुढे चालविले. त्याच्यामुळेच वलजपेटपाटम् नामक संगीतसंप्रदाय अस्तित्वात आला. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**कृष्णा** द. भारतातील एक पवित्र नदी. पुराणात उल्लेखिलेली कृष्णावेण्णा किंवा योगिनीतंत्रात सांगितलेली कृष्णावेणी या नद्या आणि अर्वाचीन कृष्णा नदी या एकच होत. जातकग्रंथात ही नदी कण्हपेण्णा या नावाने ज्ञात असून, खारवेलच्या हाथीगुंफेत कण्हपेम्णा असा तिचा निर्देश केलेला आहे.

पश्चिम घाटात सह्याद्रीच्या कडेकपारीत महाबळेश्वर येथे कृष्णेचा उगम होतो. तिथून ती महाराष्ट्रात आग्नेय दिशेला वाहत जाते व दख्खनचे पठार ओलांडून बंगालच्या उपसागराला जाऊन मिळते.

महाबळेश्वरला ज्या ठिकाणी तिचा उगम होतो, तिथे एक महादेवाचे मंदिर आहे. मंदिरात एक लहानशी पुष्करणी असून, तिच्यातून एक झरा झुळझुळत असतो. हाच कृष्णेचा उगम मानलेला असून, त्या झऱ्याला कृष्णाबाई असे नाव आहे. इथे कृष्णाबाईचे एक मंदिरही आहे. या तीर्थक्षेत्रात दरवर्षी अनेक यात्रेकरू स्नानाला येतात.

कृष्णेचे कुटुंब बरेच मोठे आहे. माहुली गावी तिला वेण्या नदी भेटायला येते. कराडच्या पलीकडे थोडचा अंतरावर तिला कोयना व त्यापुढे पंचगंगा या नद्या येऊन मिळतात. बेळगाव जिल्ह्यातून, दख्खनच्या पठारावरून वाहत असता विजापूर जिल्ह्यात तिला घटप्रभा आणि मलप्रभा या दोन नद्या भेटतात. रायचूर जिल्ह्यात भीमा, कुर्नूल जिल्ह्यात तुंगभद्रा व नालगोंडा जिल्ह्यात मुसी या नद्या तिला येऊन मिळतात. गुंटूर जिल्ह्यातून ती दोन मुखांनी बंगालच्या उपसागरात शिरते. कृष्णेची एकूण लांबी ८०० मैल आहे.



कृष्णाघाट – वाई

महाराष्ट्रातील वाई, नरसोबाची वाडी व औदुंबर ही क्षेत्रे कृष्णेच्या तीरावरच आहेत. कृष्णेच्या काठावरील दक्षिणेकडील सर्वात मोठे शहर म्हणजे विजयवाडा हे होय. या ठिकाणी कृष्णेवर एक मोठे धरण असून, त्याचे कालवे नेल्लोर, मद्रास व उत्तरेकडे गोदावरीपर्यंत गेलेले आहेत.

विजयवाड्यापासून थोड्या अंतरावर कृष्णेच्या दक्षिणेला उडावलेची प्रख्यात लेणी आहेत. अमरावती आणि नागार्जुनकोंडा ही दोन प्राचीन बौद्ध केंद्रेही कृष्णेच्याच तीरावर आहेत.

पं. टेंबेस्वामीनी कृष्णालहरी नामक एक काव्य रचलेले असून, त्यात कृष्णेचे महत्त्व प्रतिपादिलेले आहे. कृष्णेची एक विशाल मूर्ती कल्पून ते तिच्या अवयवांची स्थाने सांगतात–

**मुखं ते सह्याधः सदयहृदयं ते नरहरेः ।**
**पुरेऽप्यान्ध्रे नाभिः प्रपदयुगलं प्राच्यविषये ॥**

अर्थ–हे कृष्णे, तुझे मुख सह्याद्रीच्या पायथ्याशी वाईक्षेत्रात आहे, तुझे हृदय नरसोबाच्या वाडीला आहे. आंध्र प्रदेशात कुरुगड्डी येथे तुझी नाभी आहे आणि भरतखंडाच्या पूर्व भागात तुझे पदयुग्म आहे.

भारतातील पवित्र नद्यांत कृष्णेची गणना होते. कृष्णा नदी ही विष्णुरूप मानलेली आहे. कृष्णामाहात्म्यपुराण व कृष्णामाहात्म्यवर्णन या ग्रंथात तिच्या तीरीच्या तीर्थाचे वर्णन आहे. गुरू कन्याराशीत आला असता गंगा नदी कृष्णेला भेटायला येते, अशी समजूत असून, त्या कालात गंगातीरी करायचे क्षौर-श्राद्धादी विधी कृष्णातीरी करतात. [ पद्मिनी सेन गुप्ता– मार्च ऑफ इंडिया, जून १९५५; ती. म.; सु. वि. को.; हि. जॉ. ए. इं. ]

**कृष्णाजिन** काळविटाचे कातडे. हे पवित्र मानलेले आहे. विविध संस्कारांत त्याचा कसा उपयोग करायचा ते त्या त्या ठिकाणी सांगितले आहे. यज्ञकर्मात ते पश्चिमेकडे मान करून उत्कराच्या मागे पसरतात व त्यावर हविर्द्रव्य काडणे, वाटणे, इ. विधी करतात. तपोधन ऋषी कृष्णाजिन पांघरतात व बसायलाही घेतात. कृष्णाजिनाचे दान करण्याचा विधी असा–

हे दान ग्रहणकाली, पौर्णिमा, उत्तरायण, द्वादशी अशा पुण्यतिथीवर करतात. प्रथम दान घेणाऱ्या ब्राह्मणाची निवड करतात. मग यथाशक्ती सुवर्णनाण्यासह कृष्णाजिन त्याला दान देतात. ब्राह्मणाची पाठवणी केल्यावर दाता सचैल स्नान करतो व स्नानाच्या वेळचे वस्त्र आणि स्नानाच्या पाण्याचे मडके चवाठ्यावर नेऊन टाकून देतो. दानाचे फल– ब्रह्मलोकप्राप्ती व भार्यापुत्रांचा अवियोग.

कृष्णाजिन दान घेणारा ब्राह्मण पतित होतो. त्याला त्यानंतर अन्य दान घेण्यासाठी व श्राद्धकर्मासाठी निमंत्रण देऊ नये, असे गरुडपुराणात सांगितले आहे. [ दा. चं. ]

**कृष्णात्रेय** आयुर्वेदाचा एक आचार्य. हा कायचिकित्सेत निष्णात होता. शालाक्यतंत्रावर याने एक ग्रंथ लिहिला आहे. [ आ. इ. ]

**कृष्णानंद** (१७९२ ते १८७६ इ. स.) एक भक्तकवी. हर्दा तहसीलातील नजरपूर गावी याचा जन्म झाला. याच्या पित्याचे नाव काशीराम असे होते. कृष्णानंद सतरा वर्षांचा असतानाच त्याचा बाप स्वर्गवासी झाला. त्यामुळे प्रपंचाची सर्व जबाबदारी याच्यावर पडली. पुढे एक दिवस गंगागीर नावाचा एक संन्यासी याच्याकडे आला व भागवताची कथा सांगण्याबद्दल याला आग्रह करू लागला. आपल्याला ती कथा अवगत नसल्याचे याने सांगितले. तरीही संध्याकाळी गंगागीराने भागवतकथा ऐकण्यासाठी लोकांना याच्या घरी बोलावून आणलेच. आणि आश्चर्याची गोष्ट अशी, की कृष्णानंदाला संपूर्ण भागवताची कथा एकदम ज्ञात झाली व तो ती विद्वत्तापूर्ण भाषेत लोकाना सांगू लागला.

या घटनेनंतर कृष्णानंदाने गंगागीराकडून संन्यासदीक्षा घेतली व रकनाथ हे नाव धारण केले. मग तो कृष्णाची आराधना करू लागला. याने व्रज, निमाडी, गुजराती, मराठी व राजस्थानी या भाषांत अनेक भक्तिपर पदे रचली आहेत. आपले उपास्य दैवत कृष्ण याला याने निमाडी भाषेत लिहिलेले एक पत्र प्रसिद्ध आहे. [ नि. उ. सा. ]

**कृष्णानंद वेदव्यास** (इ. स. १९ वे शतक) एक संगीतज्ञ. दिल्लीचा राहणारा. याने रागकल्पद्रुम नावाचा एक संगीतविषयक ग्रंथ लिहून, तो इ. स. १८४२ मध्ये कलकत्त्याला छापून प्रसिद्ध केला. त्यात त्याने ध्रुपद, धमार, ख्याल, टप्पा, ठुमरी वगैरे विषयांची मौलिक माहिती दिली आहे. ही माहिती गोळा करण्यासाठी सतत तीस वर्षे तो देशभर हिंडला होता. [ सं. शा. क. इ. ]

**कृष्णान्वक** त्रिवांकुर जिल्ह्यात आढळणारी एक जात. हे मूळचे काजीवरम् तेथील रहिवासी होत. यांचे आचार-विचार वेल्लाळ व नायर यांच्यासारखे आहेत. यांच्या बायका गोंदवून घेतात. हे मरुमक्कतायम् ही वारसापद्धती पाळतात. यांच्यात नियोगाची पद्धत असल्याचे थर्स्टन सांगतो. [ म. ज्ञा. को. ]

**कृष्णाष्टमीव्रत** एक व्रत. मार्ग. कृ. ८ मीला प्रारंभ करून कार्तिक कृ. ८ मीला याची समाप्ती करतात. या व्रताची देवता शिव आहे. मार्गशीर्ष महिन्यापासून आरंभ करून दर कृ. ८ मीस अनुक्रमे शंकर, शंभू, शिव, पशुपती, उग्र, शर्व, त्र्यंबक, ईश्वर, ईशान इ. नावानी शिवाची षोडशोपचार पूजा करतात. मार्गशीर्ष महिन्यापासून दर कृ. ८ मीस अनुक्रमे गोमूत्र, आज्य, गाईचे दूध, आज्य, भाजलेले यव, कुशोदक, गोशृंगोदक, गोमय, अर्कपत्र, बिल्वपत्र, तंडुलोदक व पंचगव्य या द्रव्यांचे भक्षण करतात. असे केल्याने अनुक्रमे अतिरात्र, वाजपेय, गोमेध, राजसूय, अश्वमेध, इ. यज्ञ आठ वेळा केल्याचे फळ मिळते, असे सांगितले आहे.

वर्षअखेर व्रताचे उद्यापन करतात. प्रथम लिंगतोभद्रमंडल काढून त्यावर मंडलदेवतांची, शिवपार्वतीच्या सुवर्णप्रतिमेची व नंदीच्या रौप्य प्रतिमेची पूजा करतात. दुसऱ्या दिवशी होम करून तिळ व घृत यांच्या १०८ आहुती देतात. ब्राह्मणांना पायसान्नाचे भोजन वाढतात. गाय दान देतात.

विष्णू, इंद्र, कुबेर, इ. देवतांना या व्रतामुळेच देवत्व प्राप्त झाले, असे पुराणांतरी सांगितले आहे. [ व्रतराज; कृ. क. त. ]

**कृष्णैकादशीव्रतोद्यापन** या उद्यापनाचा विधी असा— मुख्यदेवता लक्ष्मीनारायण. संकर्षणादी बारा नावांनी विष्णूचे आवाहन. प्रधान देवतेसाठी घृताक्त तिळाच्या आहुती. आचार्याला काळी गाय दान देणे. **पाहा**– शुक्लैकादशीव्रतोद्यापन. [ ऋ. ब्र. क. ]

**कृष्णोपनिषद्** हे उपनिषद अथर्ववेदाचे आहे. विष्णूच्या रामावतारानंतर त्याचा कृष्णावतार का झाला, त्याचे कारण यात सांगितले आहे. याचा थोडक्यात आशय असा–

रामावतारातील विष्णूचे अप्रतिम सौंदर्य पाहून त्याला आलिंगन देण्याची इच्छा सर्व मुनींना झाली. तेव्हा राम त्यांना म्हणाला, की कृष्णावतारात तुम्ही गोपिकांच्या रूपाने जन्म घ्या म्हणजे तुम्हाला आलिंगनसुखाचा अनुभव घेता येईल. त्याप्रमाणे त्यांनी मानवी रूपे घेतली. त्याबरोबरच इतर काही तत्त्वांनीही त्याच कारणासाठी मानवी देह घेतले. ब्रह्मानंद हा नंद झाला. मुक्ती यशोदा झाली. माया देवकी बनली. वेद वसुदेव झाला व राम–कृष्ण याच्या रूपाने वेदार्थ भूतलावर आला. त्याच प्रमाणे द्वेष चाणूर झाला. मत्सर मुष्टिक झाला. दर्प कुवलयापीड झाला इत्यादी. थोडक्यात म्हणजे वैकुंठच पृथ्वीतलावर अवतरला.

ज्याला हे रहस्य समजेल, तो देहबंधातून मुक्त होईल, असे हे उपनिषद म्हणते. [ सी. ग. देसाई ]

**केंदुली** गीतगोविंदकार जयदेव या कवीचे जन्मस्थान. वंगालमध्ये बीरभूम जिल्ह्यात अजय नदीच्या तीरावर हे गाव आहे. जयदेव मरण पावल्यावर त्याच्या मृतदेहाचे दहन न करता तो पुरण्यात आला व त्यावर एक समाधी बांधण्यात आली. या समाधीच्या दर्शनाला मुख्यतः वैष्णव यात्रेकरू इथे येतात. माघ महिन्यात इथे मोठी यात्रा भरते. पाहा– जयदेव. [ हि. जॉ. ए. इं.; स. भा. प्र. व. ]


जयदेवाचे समाधिमंदिर– केंदुली

**केंद्रयोग** जन्मकुंडलीत लग्नापासून चौथे, सातवे व दहावे या स्थानांना केंद्र अशी संज्ञा आहे

**आपोक्लिमगते चन्द्रे केन्द्रस्थे सुरपूजिते ।**
**योगः केन्द्र इति ख्यातो यातुरिष्टार्थसिद्धिद. ।।**

(श. चिं. )

अर्थ– लग्नापासून तिसरी, सहावी, नववी व दहावी या राशींत चंद्र व केंद्रस्थानी गुरू अशा योगाला केंद्र असे म्हणतात. या योगावर प्रवास करणाऱ्याचा इष्ट हेतू साध्य होतो.

**केक** केक हे ख्रिस्ती धर्मात एक प्रतीक मानले जाते. ख्रिस्ती लोकांच्या विवाहविधीत एक मांगलिक केक भाजतात. वाढदिवसाच्या दिवशीही केक बनविण्याची पद्धत आहे. ज्याचा वाढदिवस असेल, त्याने तो कापायची असते. तिचे आकार वेगवेगळे असतात. वेगवेगळ्या धार्मिक प्रसंगी वा सामाजिक समारंभाच्या वेळी त्याची सजावटही वेगवेगळी असते.

**केकय** भरतखंडातील एक प्राचीन देश. या देशाच्या राजाला कैकय म्हणत. दशरथाची राणी व भरताची माता कैकयी ही अश्वपती कैकय राजाची कन्या होती. वैदिक वाङ्मयात याचा उल्लेख कैकयराज अश्वपती असा आढळतो (श. ब्रा. १०. ६. १. २; छांदो. ५. ११. ४).

पांडवांच्या वेळी केकय देशात धृष्टकेतू राजा राज्य करीत होता. गिरिव्रज (जलालपूर) ही त्याची राजधानी झेलम नदीच्या काठी होती. भारतीय युद्धात केकयाचे पाच राजे पांडवाच्या बाजूने लढले होते (भाग. पु. १०.७८).

केकय देशात कैकय नावाची एक प्राचीन जमात होती. रामायणातील उल्लेखावरून कळते, की त्याचे राज्य विपाशा नदीच्या पलिकडे गांधार देशापर्यंत पसरले होते.

कैकय लोक अनार्य होते असे ब्रह्मांडपुराणात म्हटले आहे. पण जैन ग्रंथांवरून कळते, की ते आर्यवंशी असून, त्याची राजधानी सेयावीय या नावाने प्रसिद्ध होती.

पाणिनीच्या काळी पंजाबातील झेलम, शहापूर व गुजरात या प्रदेशाला केकय जनपद असे नाव होते. हे जनपद राजाधिष्ठित होते. कैकय राजवंशाची एक शाखा दक्षिणेत म्हैसूर प्रदेशात जाऊन स्थायिक झाली होती. या लोकांनी तिथे आपले राज्यही स्थापले होते. नागार्जुनकोंडा व जग्गय्यपेठ येथील उत्खननात सापडलेल्या शिलालेखांवरून या कैकयांचे म्हैसूरच्या इक्ष्वाकू घराण्याशी जवळचे संबंध होते, असे कळते. [ म. ज्ञा. को.; ट्रा. ए. इं.; पा. भा. ]

**केतकर, डॉ. श्रीधर व्यंकटेश** ( १८८४ — १९३७ इ. स.) एक समाजशास्त्रज्ञ, ज्ञानकोशकार व कादंबरीकार. यांचा जन्म मध्यप्रांतातील रायपूर येथे झाला. उमरावतीच्या हिंदू हायस्कूलात त्याचे शिक्षण झाले. त्यांची बुद्धिमत्ता विलक्षण होती व स्मरणशक्ती तीव्र होती. त्यांना वाचनाचा मनस्वी नाद होता. त्यांच्या बहुश्रुतपणामुळे त्यांच्या एका गुरुजींनी त्यांना 'चालता बोलता

ज्ञानकोश ' असेच नाव दिले होते. जणू भावी ज्ञानकोशकाराची बीजे लहानपणीच त्यांच्या बुद्धीत अंकुरली होती. त्याना कविता करण्याचाही छंद होता. नव्या-जुन्या कवीच्या काव्याचा त्यानी अभ्यास केला होता. घरातील जुन्या हस्तलिखित पोथ्या वाचून त्यावर त्यानी एक लेखही लिहिला होता.

मुबईच्या विल्सन कॉलेजमध्ये बी. ए. च्या वर्गात असताना केतकरानी वाङमय, इतिहास, राजकारण, इ. अनेक विषयाची पुस्तके वाचली. त्यांना योगाचाही नाद लागला होता. पण त्या वेळच्या गरम राजकीय वातावरणाचाही त्याच्या मनावर प्रभाव पडला आणि त्यांचे मन कॉलेजच्या अभ्यासावरून उडाले. त्यामुळे त्यांना पदवी मिळू शकली नाही. अभ्यास सोडून ते जहाल मताकडे झुकले व सशस्त्र क्रांतीकडे वळले. इंग्रजांविरुद्ध सशस्त्र उठावणी करण्यासाठी त्यांनी एक गुप्त संघ स्थापण्याचाही प्रयत्न केला.

पुढे त्याना वाटले, की लष्करी शिक्षण घेण्यासाठी आपण अमेरिकेस जावे. तो विचार कृतीत आणायलाही त्यांनी विलंब लावला नाही. उमरावतीचे आपले घरदार विकून त्यांनी द्रव्य गोळा केले व १९०६ मध्ये ते अमेरिकेस गेले. तिथे गेल्यानंतर त्यांना वाटू लागले, की सशस्त्र क्रांतीचा मार्ग वेडेपणाचा असून, ज्ञानार्जन हाच देशसेवेचा खरा मार्ग होय. विचार बदलताच त्याचा जीवनक्रमही बदलला. ते सपाटून अभ्यास करू लागले. ५ वर्षात बी. ए, एम. ए., पीएच. डी. या तीन पदव्या त्यानी अमेरिकेत सहजपणे मिळविल्या. तिथे त्यांना पोटासाठी व विद्येसाठी अतोनात कष्ट करावे लागले. त्याच



डॉ. केतकर

कालात त्यांनी अनेक विषयाचे अपार वाचन केले व अनेक शास्त्रांचाही अभ्यास केला. पुढच्या ज्ञानकोशाची ही पूर्वतयारीच झाली. तिथे त्यांचा कोशनिर्मितीच्या कामाशीही थोडा परिचय झाला अमेरिकेत असतानाच त्यांनी ' दि हिस्टरी ऑफ कास्ट इन इडिया ' या नावाचा एक प्रबंध लिहिला. या प्रबधाची अनेक अमेरिकन पंडितांनी मुक्तकंठाने प्रशसा केली. त्यांच्या विद्वत्तेमुळे त्याना तिथल्या एखाद्या विद्यापीठात प्राध्यापकाची जागा सहज मिळाली असती. परंतु स्वदेशी परत जाऊन लोककल्याणाच्या कार्याला वाहून घेणे हेच आपले खरे कर्तव्य, असे ठरवून त्यानी अमेरिकेत राहण्याचा मोह सोडला. तिकडून परत येताना ते दीड वर्ष इंग्लंडमध्ये राहिले. त्या अवधीत त्याचा कु. ईडिथ कोहन या जर्मन ज्यू तरुणीशी परिचय झाला. ती स्वत बहुभाषापडिता असून, तिने अनेक धर्माचा अभ्यासही केला होता. श्री. केतकरांची बुद्धिमत्ता व विद्वत्ता यावर ती लुब्ध झाली; पण केतकरांनी तिच्या विवाहविषयक इच्छेला मान दिला नाही.

भारतात परत आल्यावर केतकराना मोठ्या पगाराची सरकारी नोकरी सहज मिळू शकली असती. पण त्यांनी तसा प्रयत्नच केला नाही. त्यांनी एखादा राजकीय पक्षही स्वीकारला नाही. सामाजिक, आर्थिक, राजकीय, शैक्षणिक, इ. सर्व अंगानी राष्ट्राची सुधारणा व्हावी, म्हणून त्यानी लोकाना ज्ञानी बनविण्याचा खटाटोप सुरू केला. राष्ट्रगुरूच्या उच्च भूमिकेवरून ते लेख लिहू लागले व त्याच्या द्वारे सर्वांना निर्भीड शब्दांचे फटकारे मारू लागले. त्याचे लेख तिखट व मर्मभेदी असत. त्या वेळच्या रूढ कल्पनाना त्यांनी फार मोठे धक्के दिले. त्यांच्या लिखाणात मुख्यत्वे ऐहिकाच्या उपासनेवर भर असे. ईश्वर मोक्ष, इ. पारमार्थिक कल्पनांवर त्यांचा विश्वास नव्हता.

इ. स. १९१४ च्या डिसेबरमध्ये मद्रास येथील कॉंग्रेसच्या अधिवेशनात त्यांनी भाषावार प्रांतरचना, देशी भाषांतून राज्यकारभार व देशी भाषेतून शिक्षण या सुधारणात्रयीचा पुरस्कार केला.

इ. स. १९१५ च्या अखेरीस केतकरांनी मराठी ज्ञानकोशाचे काम हाती घेतले. १९१६ साली त्यासाठी त्यांनी एक मर्यादित मंडळी (लिमिटेड कंपनी) स्थापली. दुर्दम्य आत्मविश्वास, अफाट विद्वत्ता व अवाढव्य उद्योग यांच्या बळावर ते प्रचंड कार्य त्यानी १२ वर्षांत पुरे केले. ज्ञानकोशात सर्व ज्ञानाचा संग्रह करायचा असला, तरी तो ज्या समाजासाठी असेल, त्या समाजाच्या गरजांप्रमाणे संग्रहाचे स्वरूप ठेवले पाहिजे, हे तत्त्व केतकराना अमेरिकेत असतानाच उमगले होते. म्हणून त्यांनी महाराष्ट्रीय ज्ञानकोश महाराष्ट्राच्या दृष्टीनेच लिहिण्याचे ठर-

विले. नव्या संशोधनात न पडता, उपलब्ध ज्ञान संकलित करून ते वर्णक्रमानुसार मांडायचे, अशी योजना त्यांनी प्रथम आखली. त्यासाठी त्यांनी प्रथम सर्व ग्रंथांची एक सूची तयार केली. ज्ञानकोश हा केवळ ज्ञानसंग्रह नव्हे; तर भाषिक, सांस्कृतिक, आर्थिक व राजकीय उत्थापनाचे ते एक प्रधान साधन आहे, असे ते समजत होते. त्या दृष्टीने पुढे त्यांनी आपली योजना थोडीशी बदलून, प्रस्तावनाखंड व शरीरखंड असे कोशाचे दोन मुख्य विभाग केले. प्रस्तावनाखंडासाठी त्यांनी प्राचीन वाङमयाचे सखोल संशोधन करून, त्यावर पाच वेगळे ग्रंथ तयार केले आणि ते पहिल्या विभागात प्रसिद्ध केले.

एकाही प्रथितयश विद्वानाचे सहकार्य मिळाले नसताना केतकरांनी ज्ञानकोशाचे कार्य सिद्धीस नेले. याचे श्रेय जसे त्यांच्या विद्वत्तेला व संघटनचातुर्याला आहे, तसेच ते त्यांच्या सहकाऱ्यांच्या निष्ठेला व विद्याप्रेमालाही आहे. केतकरांनी दुय्यम संपादकांना उत्तम प्रकारचे शिक्षण देऊन तयार केले. त्यांच्याशी ते मनमोकळेपणाने वागत. पांडित्याची वा अधिकाराची आढ्यता त्यांच्या वागणुकीत दिसत नसे.

संशोधन व संपादन याबरोबरच ज्ञानकोशाच्या मुद्रणाचे व विक्रीचे कामही केतकरांनी स्वतःच्या हिंमतीवर पार पाडले. ग्रंथविक्रीसाठी घरोघर हिंडणे, हे काम त्यांनी हलके मानले नाही. त्यांचा वेष बावळा असला तरी आनंदीपणा, विनोदी बोलणे, नानाप्रकारचे युक्तिवाद, विपुल माहिती, सूक्ष्म निरीक्षण आणि लोकविलक्षण विचार, यांमुळे त्यांची ग्राहकावर चटकन छाप पडे.

इंग्लंडमध्ये केतकरांना भेटलेल्या कु. कोहन यांनी केतकरांचा नाद सोडला नव्हता व केतकरही त्यांना विसरले नव्हते. ज्ञानकोशासाठी जर्मन व फ्रेंच ग्रंथांतील माहिती संकलित करण्याचे काम केतकरांनी त्यांच्याकडे सोपविले व ते त्यांनी अतिशय आनंदाने पत्करले. पुढे इ. स. १९१९ साली त्या भारतात आल्या व केतकरांबरोबर कोशाचे काम करू लागल्या. प्रत्यक्ष सहवासात दिसून येणाऱ्या त्यांच्या उत्कट प्रेमामुळे पुढे केतकर त्यांच्याशी विवाह करायला तयार झाले. प्रथम त्यांनी त्या पाश्चात्य विदुषीला व्रात्यस्तोमनामक विधीने हिंदू करून घेतले व नंतर त्यांच्याशी विवाह केला. लग्नानंतर सौ. शीलवतीबाईंनी कोशमंडळ सोडले व आपले सर्व लक्ष संसारात घातले. त्या केतकरांच्या जीवनाशी एकरूप झाल्या. पतीची एकनिष्ठपणे सेवा करावी, हीच त्यांची इच्छा होती.

ज्ञानकोशाचे काम संपत आले, तेव्हा कोशाला पूरक असे विद्यासेवक नावाचे मासिक केतकरांनी सुरू केले. त्यात त्यांनी विविध विषयांवर शे-पाऊणशे स्फुट लेख लिहिले. ज्ञानकोशापूर्वी राष्ट्रगुरूची जी भूमिका त्यांनी घेतली, ती त्यांच्या अंगात पुन्हा संचारली, असे म्हणायला हरकत नाही.

गोंडवनातील प्रियंवदा, परागंदा, आशावादी, ब्राह्मणकन्या, गांवसासू, विचक्षणा, भटक्या, इ. कादंबऱ्याही केतकरांनी लिहिल्या आहेत. त्या सर्व विचारप्रधान आहेत. सौंदर्यापेक्षा सत्य त्यांना अधिक प्रिय होते. त्यांच्या कादंबऱ्यातील दाहक सत्यामुळे वाचकांना काव्यानंदाचा अनुभव घडेना. त्यामुळे त्या कादंबऱ्यांवर चौफेर टीका होऊ लागली. तेव्हा आत्मसमर्थनासाठी केतकरांनी 'महाराष्ट्रीयांचे काव्यपरीक्षण' हा एक ग्रंथच लिहिला. साहित्य व साहित्यशास्त्र यांसंबंधी जे विचार त्यांच्या डोक्यात वर्षानुवर्षे घोळत होते, त्यांना या ग्रंथात त्यांनी आकार दिला.

इ. स. १९३१ साली हैद्राबाद येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद केतकरांनी भूषविले. त्याच वर्षी त्यांनी प्राचीन महाराष्ट्राचा इतिहास या ग्रंथाची काही प्रकरणे प्रसिद्ध केली. प्रस्तुत ग्रंथाचा उर्वरित भाग १९६३ साली प्रकाशित झाला आहे.

इतर प्रादेशिक भाषांमध्ये ज्ञानकोशाचे भाषांतर प्रसिद्ध करण्याची योजना केतकरांनी आखली होती. त्याप्रमाणे गुजरातीत दोन भाग प्रसिद्धही झाले; पण द्रव्याभावी ते काम पुढे स्थगित झाले. हिंदीतही त्यांनी ज्ञानकोशाचा एक भाग १९३५ साली प्रसिद्ध केला. त्यांचा शेवटचा ग्रंथ 'भारतीय समाजशास्त्र' १९३६ साली प्रसिद्ध झाला. या ग्रंथात त्यांचा हिंदुधर्माभिमान स्पष्ट दिसून येतो. आपल्या जीवनात त्यांनी दारिद्र्य तर भोगलेच; शिवाय कष्टही अपार अनुभवले. त्यापायीच पुढे ते खचले व १९३७ साली १० एप्रिल रोजी मरण पावले. त्यांच्या इच्छेप्रमाणे त्यांचा देह मुठा नदीच्या काठी पुरण्यात आला. त्या वेळी ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील मंत्र म्हणण्यात आले. [ डॉ. केतकर– द. न. गोखले, ].

**केतकी** एक सुवासिक पुष्प. या झाडाच्या पांढऱ्या व पिवळ्या अशा दोन जाती असतात. त्यांना अनुक्रमे केवडा व केतकी अशी नावे आहेत. या झाडाला कणीस येते, तेच फळ होय. श्रावणात केवड्याच्या कणसांचा भर असतो. त्यांचा सुवास सर्वत्र दरवळतो. त्या वासासाठी केवड्याच्या बनात साप राहतात, अशी समजूत आहे.

कर्नाटकात केवड्याच्या पातीच्या छत्र्या व चटया बनवितात. केवड्याच्या पातीचे तंतू काढून त्यापासून कुंचले, जाळी, पिशव्या वगैरे जिन्नसही तयार करतात. केवड्यापासून तेल व अत्तरही काढतात.

गणपत्यादी देवांना केवडा वाहतात; पण शंकराला मात्र वाहत नाहीत. त्याविषयी कथा अशी—

एकदा ब्रह्मा व विष्णू यांनी ज्योतिर्लिंगरूप शिवाच्या आद्यंताचा शोध करायचे ठरविले. त्याप्रमाणे विष्णू पाताळ-लोकात गेला व ब्रह्मा सत्यलोकात गेला. विष्णूला पाताळात कुठेही शिवलिंगाचा अंत सापडला नाही व त्याने आपली हार कबूल केली. पण ब्रह्मदेवाने खोटेच सांगितले, की शिवलिंगाचे



केतकी

अग्र मी पाहिले. हे आपले म्हणणे सत्य आहे असे सिद्ध करण्यासाठी त्याने सुरभी गाय व केतकीचे पुष्प यांची साक्ष काढली आणि सांगितले, की हे केतकीपुष्प शिवलिंगाच्या अग्रभागी होते. एवढ्यात ब्रह्मदेवाच्या असत्याचरणाची निंदा करणारी आकाशवाणी झाली. ती ऐकून ब्रह्मदेव, सुरभी व केतकी यांना शिवाने शाप दिला. त्या शापामुळे शंकराच्या पूजेतून केतकीपुष्पाला वगळण्यात आले.

स्त्रियांच्या अलंकारात केतकी-पत्र असते. ते सोन्याचे असते व बायका ते केशबंधाच्या वरच्या भागी घालतात.

**केतन्न** (इ. स. १३ वे शतक) एक तेलुगू कवी. हा कौडिण्यगोत्री असून याचे आडनाव मूलघाटिक असे होते. केतन्न हा वेंगी देशातील वेंतिरल अग्रहाराचा प्रमुख होता. याने दंडीच्या दशकुमारचरित्राचे 'दशकुमारचरितमु' या नावाने तेलुगूत पद्यमय रूपांतर केले आहे. केतन्नाचा हा सर्वश्रेष्ठ ग्रंथ समजला जातो. दंडीच्या मूळ कथेत याने अनेक ठिकाणी बदल केला असून कित्येक ठिकाणी आपले स्वतःचे नवीन विचार प्रकट केले आहेत. मुळातील काही कथांचा व वर्णनांचा त्याने संक्षेप केला आहे, तर काही वर्णने नवी घातली आहेत. त्यामुळे मुळापेक्षा केतन्नाचा ग्रंथ सरस उतरला असल्याचे सांगतात. प्रस्तुत ग्रंथाची भाषा कोमल व मधुर आहे. या ग्रंथानंतर लोक केतन्नाला अभिनवदंडी असे म्हणू लागले.

यानंतर केतन्नाने भाषाभूषणमु नामक पद्यमय ग्रंथ रचला. तेलुगू भाषेतील हा आद्य व्याकरणग्रंथ होय. याने विज्ञानेश्वरम् नामक एक धर्मशास्त्रांतर्गत कायद्याविषयीही ग्रंथ रचला आहे. [ज. आ. हि. रि. सो. १९६०–६१; ते. उ. सा.]

**केतुब्रह्म** बंगालमधील एक क्षेत्र. हे नतद्वीपधामापासून २४ मैलावर आहे. इथले देवीमंदिर ५१ शक्तिपीठांत गणले जाते. इथे सतीचा वाम बाहू गळून पडला होता. [कल्याण–तीर्थांक]

**केतुमाल** जंबुद्वीपाच्या नवखंडापैकी एक खंड. समुद्रमंथन चालू असता इंद्राने आपली माला टाकून दिली, ती या खंडातील एका वृक्षावर पडली. म्हणून या खंडाला केतुमाल असे नाव पडले. महाभारतात या खंडाचा उल्लेख आहे—

**मेरोस्तु पश्चिमे पार्श्वे केतुमालो महीपते ।**
**जम्बुखण्डे च तत्रैव महाजनपदो नृप ।।**

(म. भा. भीष्म. ६. ३२)

अर्थ– हे राजा, मेरूच्या पश्चिम भागी जंबुद्वीपात केतुमाल खंड असून, तिथे महाजनपद आहे.

केतुमाल खंडाच्या एका सीमेला लागून माल्यवान पर्वत आहे. हे म्लेच्छांचे खंड असून पनस वृक्षांसाठी प्रसिद्ध आहे. इथे विष्णू स्वतः कामदेवाच्या रूपाने प्रकट झाला, तेव्हा लक्ष्मीने त्याची स्तुती केली. विष्णूचा वराह अवतारही याच ठिकाणी झाला. परीक्षिताने हे खंड जिंकले होते. [पु. इं.; श. क.]

**केतुशृंग** भृगूचा एक पुत्र व भगवंताचा अवतार. [पु. इं.]

**केतू** नवग्रहांपैकी एक. याला राहूचे धड मानतात. हा दानव असून, विप्रचिती व सिंहिका यांचा पुत्र आहे. काही ठिकाणी याला दनू व कश्यप यांचा पुत्र म्हटले आहे.

हा कामरूप, जैमिनी गोत्राचा, मध्यदेशेश्वर, धूम्रवर्ण, द्विभुज व चित्रकपोतवाहन आहे. ग्रहयज्ञात याच्यासाठी दर्भाच्या समिधा सांगितल्या आहेत. याचा मंत्र असा–

**केतुं कृण्वन्नकेतवे पेशो मर्या अपेशसे ।**
**समुषद्भिरजायथाः ।।**

(ऋ. १.६.३)

हा पापग्रह आहे. कुंडलीत याला स्थान असले, तरी याच्या

मालकीची एखादी राशी नाही. नवग्रहस्तोत्रात केतूचा श्लोक दिला आहे, तो असा–

**पलाशपुष्पसङ्काशं तारकाग्रहमस्तकम् ।**
**रौद्रं रौद्रात्मकं घोरं तं केतुं प्रणमाम्यहम् ।।**

अर्थ– पळसाच्या फुलाप्रमाणे दिसणारा, तारका व ग्रह याच्या शिरोभागी असणारा, भयंकर व रौद्रस्वभावी अशा केतूला मी नमस्कार करतो.

जैनमते केतू हा सर्पारूढ व सर्पधारी आहे.

हा दृश्यग्रह नाही. पृथ्वी व चंद्र यांच्या कक्षा ( क्रांतिवृत्त व शरवृत्त ) एकमेकाना जिथे छेदतात, त्या छेद किंवा पात-बिंदूना राहू व केतू म्हणतात. केतू एका राशीला सामान्यत: १८ महिने राहतो. तो उलटचा गतीने म्हणजे मीन, कुंभ, मकर अशा प्रकारे राशिचक्रातून फिरतो. **पाहा**– राहू, धूमकेतू.

**केदार** एक राग. याला केदारिका रागिणी असे समजून, तिचे ध्यान पुढीलप्रमाणे वर्णिले आहे–

**जटां दधाना शुभचन्द्रमौलिः ।**
**नागोत्तरीया धृतयोगपीठा ।।**
**गङ्गाधरध्याननिमग्नचित्ता ।**
**केदारिका दीपकरागिणीयम् ।।**

अर्थ–जटा धारण करणारी, जटेत शुभचंद्र धारण करणारी, नागरूपी उत्तरीय वस्त्र धारण करणारी, योगासनावर बसून शिवाच्या ध्यानात चित्त निमग्न करणारी, अशी ही केदारिका दीपक रागाची स्त्री होय.

या रागिणीत मध्यम शुद्ध व कोमल दोन्ही प्रकारे लागतो. शुद्ध मध्यम प्राधान्याने व तीव्र मध्यम गौणत्वाने लागतो. कोमल निषादही अल्पत्वाने लागतो. हिचा अंशस्वर मध्यम आहे. आरोहात ऋषभ व गंधार वर्ज्य असून, अवरोहात गंधार व निषाद अल्पत्वाने लागतात. गानसमय– रात्र.

**केदारगौरीव्रत** एक व्रत. याचा प्रारंभ कार्तिकी अमावास्येला करतात. त्या दिवशी गौरी व केदार यांची पूजा करतात. हे व्रत दक्षिणेत प्रसिद्ध असून, त्याविषयीची कथा पद्मपुराणात आली आहे. [ हि. ध. ]

**केदारदर्शन** एक व्रत. हे चैत्र कृ. १४ शीस करतात. या दिवशी केदारनाथाची ध्यानधारणा व मानसोपचार पूजा करतात. तसेच शक्य झाल्यास गंगास्नान करून एकभुक्तही राहतात. फल– मोक्ष. [ व्र. प. ]

**केदारनाथ** हिमालयातील प्रसिद्ध शिवक्षेत्र. उ. प्रदेशातील गढवाल जिल्ह्यात हे स्थान आहे. याची उंची समुद्रसपाटीपासून ११७६० फूट आहे. केदारनाथ व बदरीनाथ या नावाच्या दोन हिमाचलशिखरांच्यामध्ये हे क्षेत्र वसले आहे. याला केदारपुरी असेही म्हणतात. मंदाकिनी ओलांडून केदारपुरीत प्रवेश करावा लागतो. हे लहानसेच गाव आहे, पण इथे यात्रा फार मोठी येते. केदारनाथाचे देऊळ गावाच्या टोकास आहे ते रस्त्यापासून दोन–अडीच पुरुष उचीवर आहे. वर जायला पायऱ्या आहेत. देवळापुढे प्रशस्त फरसबंदी पटांगण आहे. महाद्वारापुढे चौथऱ्यावर नंदी आहे. नंदीच्या मागे मोठी घंटा आहे.

गुडघाभर उंचीच्या चौथऱ्यावर केदारनाथाचे चिरेबंदी मंदिर बांधलेले आहे. देवळाची बांधणी पाहिली असता वाटते, की याचे शिखर व सभामंडप एकाच वेळी बांधलेले नसावेत.



केदारनाथमंदिर

सभामंडपाची दोन दालने आहेत. शिखर ब्राह्मी पद्धतीचे आहे ते उंच असले, तरी औरस चौरस रुंदीमुळे ठेंगणे वाटते. मंदिराचे महाद्वार प्रशस्त आहे. त्याच्या दोन बाजूस दोन मोठे द्वारपाल आहेत. मंदिराच्या डाव्या-उजव्या अंगांनाही मोठाले दरवाजे आहेत.

केदारनाथाचे लिंग शाळुंका–पिंडी या आकाराचे नसून, ते कैलासशिखराप्रमाणे किंवा धान्याच्या शिगेप्रमाणे घुमटाकार आहे. हे लिंग स्वयंभू मानतात त्याच्या तळाचा घेर १०–१२ हातांचा असून लिंगाची उंची सुमारे दोन हात आहे. गाभाऱ्यात अंधार असतो; पण तिथे तुपाचे नंदादीप अहोरात्र तेवत असतात. सभामंडपातील भिंतीत पाच पांडव, द्रौपदी, कुंती, पार्वती,

लक्ष्मी इत्यादींच्या पाषाणमूर्ती बसविलेल्या आहेत. मंदिरप्रदक्षिणेची वाट खडबडीत आहे.

**पूजाविधी**— इथे देवाला अभिषेक करीत नाहीत किंवा लिंगावर पाणीही घालीत नाहीत. त्याऐवजी लिंगावर तुपाचे गोळे थापतात. लिंग उंच असल्यामुळे इथले पंडे देवाच्या अंगावर बसून यजमानाचे उपचार देवाला समर्पितात. सर्व पूजा झाल्यानंतर लिंगाला हृदयस्पर्श करून त्याची भेट घ्यायची असते. इथे थंडी कडाक्याची असल्यामुळे सोवळ्याओवळ्याचा विधिनिषेध नाही. यात्रेकरू व पंडे कपडे घालूनच देवाची पूजा—अर्चा करतात.



शिवलिंग— केदारनाथ

केदारनाथाच्या मुख्य पुजाऱ्याला रावळ म्हणतात. हा नंपूतिरी ब्राह्मण आहे, असे कळते. त्या रावळाचे एक संस्थानच बनले आहे. तो देवाची पूजा स्वत: न करता शिष्यांकरवी ते काम करवितो. उखीमठ या ठिकाणी तो राहतो. थंडीच्या दिवसात बर्फ पडते, तेव्हा सहा महिने केदारनाथाची गादी उखीमठ येथेच असते. गढवाल, अलमोडा व नैनीताल या जिल्ह्यातल्या कित्येक जमिनी केदार देवस्थानाच्या मालकीच्या आहेत.

**केदारनाथाचा परिसर**— मंदिराच्या बाहेरील प्रदक्षिणेच्या वाटेवर अष्टदिशाना आठ कुंडे लागतात व ती पवित्र मानली जातात. इथे जवळच भैरवझाप किंवा भृगुपतन नावाचा एक उंच कडा आहे. तिथून उडी घेऊन देहपात केल्यास आत्महत्येचा दोष न लागता, पुनर्जन्मात या जन्मीच्या अतृप्त इच्छांचा फलभोग मिळतो, असे क्षेत्रमाहात्म्यात सांगितले आहे. पूर्वी कित्येक लोक इथून देहपात करीत; पण इंग्रजांनी ती चाल बंद केली.

पवाली, रुद्रकुंड, वासुकी गंगा, गौरीकुंड, उष्णकुंड, गौरीदेवी, उदककुंड, रेतकुंड, भृगुपतन, स्वर्गारोहण, महापथ, इ. कित्येक तीर्थे व देवस्थाने केदार क्षेत्राच्या अंतर्गत मानलेली आहेत. यांतली बहुतेक क्षेत्रे व स्थाने केदारनाथाच्या वाटेवरच आहेत.

केदारनाथ हा बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक आहे. पाच पांडवांपैकी भीमाने याचे मंदिर बांधले, अशी आख्यायिका आहे. इथे भीमाला शंकराचे महिषरूपात दर्शन झाले, असे सांगतात. भीम व त्याचे भाऊ यांनी पूजासमयी शिवलिंगाला स्पर्श करण्याचा प्रयत्न केला; पण शिवाने महिषरूप घेऊन जमिनीत सूर मारला. त्यामुळे त्याचा पृष्ठभाग फक्त इथे दिसतो. शिरोभाग नेपाळमध्ये पशुपतिनाथ या रूपाने वर आला आहे. केदारनाथाचे शिवलिंग महिषाच्या पृष्ठभागाप्रमाणे दिसत असल्यामुळे ही आख्यायिका निर्माण झाली असावी.



उखीमठ— केदारनाथ

**पंचकेदार**— इथे केदार महापुरुषाची पाच अंगे पंचकेदार या नावाने प्रसिद्ध आहेत, ती अशी— बदरीकेदार, मध्यमहेश्वर, तुंगनाथ, रुद्रनाथ व कल्पेश्वर

मध्यमहेश्वर हे स्थान केदारनाथाहून सुमारे ४० मैल आहे. बदरीनारायणाच्या रस्त्यानेच पुढे जाताना थोडचा आडवळ-

णाला हे स्थान आहे. तिथे जाताना वाटेत कालीमठ लागतो. हे देवीचे सिद्धपीठ असून, इथे शवारूढ कालीमूर्ती आहे. मध्य-महेश्वराचे देवालय सुदर असून, तिथले शिवलिंग स्वयंभू आहे.

केदारनाथाच्या वाटेवर चोपताचट्टीपासून पायवाटेने गेल्यावर तुगनाथ लागतो. उखीमठापासून हे स्थान २२ मैलांवर आहे. या पर्वतशिखराची उंची १२००० फुटांवर आहे. तुगनाथाचे मंदिर मोठे असले, तरी लिंग मात्र लहानच आहे.

तुंगनाथावरून रुद्रनाथाला जाण्याची वाट आहे. इथे मंदिर नसून गुफा आहे. तिच्यात स्वयंभू शिवलिग आहे. जवळच वैतरणी नदीचा उगम आहे. गोपेश्वर येथे रुद्रनाथांची हिमकालीन गादी आहे.

जोशीमठाच्या अलिकडे हेलंगचट्टीजवळ कल्पेश्वर आहे.



गौरीकुंड – केदारनाथ

तिथून कर्मनाशा नदी उगम पावते. कल्पेश्वराकडे जाणारा रस्ता अलकनंदेच्या डाव्या काठाने जातो.

पंचकेदाराचे दर्शन घेतल्यावाचून केदारनाथाची यात्रा सांग होत नाही, असे क्षेत्रमाहात्म्यात सांगितले आहे.

बौद्धकाळात केदारनाथ हे त्या धर्माचे मोठे केंद्र होते; पण शंकराचार्यांनी पुनश्च ते स्थान हिंदुधर्माच्या कक्षेत आणले. शंकराचार्यांनी इथेच देह ठेवला, असे सांगतात. देवीपुराणात या क्षेत्राचे माहात्म्य पुढीलप्रमाणे सांगितले आहे–

**केदारमुदकं पीत्वा पुनर्जन्म न विद्यते ।**
**न योनिषु नियुञ्ज्येत स गच्छेच्छाश्वतं पदम् ।।**

अर्थ– केदार येथील जल प्राशन केल्यामुळे पुनर्जन्म टळतो. तो प्राणी कोणत्याही योनीत न जाता शाश्वत पदाला जातो.

हे शिवाचे स्वयंव्यक्त क्षेत्र असल्याचे कृत्यकल्पतरूत म्हटले आहे. [ हि. ध.; हिमालय दर्शन– शं. स. दाते ]

**केदारभट्ट** (इ. स. १६ वे शतक) वृत्तरत्नाकर या संस्कृत ग्रंथाचा कर्ता. हा ग्रंथ महत्त्वाचा असल्यामुळे, याच्यावर विसाहून अधिक टीका लिहिल्या गेल्या आहेत. [ म. च. को. ]

**केदारीव्रत** ओडिसात केले जाणारे एक शैव स्त्रीव्रत. हे आश्विन महिन्यातल्या प्रत्येक सोमवारी करतात. एकभुक्त राहून शिवपूजा करणे, हा या व्रताचा विधी आहे. याची कथा अशी–

कृतयुगात एका ब्राह्मणाला भाग्यवती व पुण्यवती नावाच्या दोन मुली होत्या. त्या रानात गोवऱ्या वेचून बापाच्या संसाराला मदत करीत. एकदा त्या रानात गेल्या असता तिथे गंधर्व-किन्नर हे केदारीव्रत करीत असल्याचे त्यांनी पाहिले. त्यांच्याबरोबरच त्या दोन मुलींनीही ते व्रत केले. त्या व्रताच्या प्रभावाने त्यांच्या बापाला खूप संपत्ती मिळाली. पुढे त्या ब्राह्मणाने भाग्यवतीचे राजपुत्राशी व पुण्यवतीचे प्रधानपुत्राशी लग्न लावून दिले. पुढे राजाची राणी व्रत करायला विसरली, तेव्हा तिचे राज्यच नष्ट झाले. नंतर व्रताचे स्मरण होताच तिने पश्चात्तापपूर्वक शिवाची क्षमा मागून पुनश्च हे व्रत केले. त्यामुळे तिला राज्यादी सुखे परत मिळाली. [ स्ट. ओ. फो. ]

**केद्री-चाचरी** या दोन अप्सरा असून, कुमाऊं प्रदेशात त्यांची पूजा केली जाते. पूजेच्या वेळी याना सिंदूर व फुन (रंगीत दोरा) वाहतात. या अप्सरा रावणाच्या कन्या असून, रावणाने त्या शिवाला सर्मपित केल्या होत्या. शिवाने त्यांना आपल्या शिष्या बनवून कुमाऊच्या पहाडात विहार करायला सोडून दिले, अशी कथा आहे. त्यामुळे त्या कुमाऊंमध्ये पुजल्या जाऊ लागल्या. [ आजकल, जुलै १९५८ ]

**केनोपनिषद** हे उपनिषद सामवेदाच्या तलवकार ब्राह्मणात अंतर्भूत आहे. याच्या प्रारंभी ‘ केनेषितं पतति ’ असा केन हा शब्द असल्यामुळे याला हे नाव मिळाले आहे. याला तलवकार उपनिषद किंवा ब्राह्मणोपनिषद असेही म्हणतात. हा तलवकार ब्राह्मणाचा नववा अध्याय आहे.

याचे चार खंड असून पहिले दोन पद्यात्मक व पुढचे दोन गद्यात्मक आहेत. दोन्ही खंडातील विचारही भिन्न भिन्न आहेत. पहिल्या मत्रात शिष्याचा प्रश्न आहे आणि पुढे त्याचे उत्तर आहे. शिष्याने पहिल्या मंत्रात एकूण चार प्रश्न विचारले आहेत, ते असे–

(१) मन कोणाच्या प्रेरणेने आपल्या विषयापर्यंत पोचते ?

(२) कोणाच्या प्रेरणेने प्राण चालतो ?

(३) कोणाच्या द्वारा वाणी क्रियाशील होते ? आणि

(४) चक्षुश्रोत्रांना आपापल्या विषयात कोण नियुक्त करतो ?

याला गुरूने उत्तर दिले, ते असे– मन, प्राण व इंद्रिये यांचे प्रेरक परब्रह्म आहे. त्याच्या शक्तीनेच सर्व इंद्रिये आपापले कार्य करण्यास समर्थ होतात. त्याला जाणून ज्ञानी लोक जीवन्मुक्त होऊन अमृतस्वरूप बनतात.

याच्या दुसऱ्या खंडात ब्रह्माचे ज्ञान व अनुभव कसा होतो, ते सांगून त्यापासून अमृतत्व कसे प्राप्त होते, ते दाखविले आहे. या खंडात परस्परविरोधी शब्दांनी एक प्रकारचा आध्यात्मिक अज्ञेयवाद सांगितला आहे. उदा० –

**यस्यामतं तस्य मतं मतं यस्य न वेद सः ।**
**अविज्ञातं विजानतां विज्ञातमविजानताम् ।।**

( २·३ )

अर्थ–ज्याला वाटते, की मी ब्रह्म जाणले नाही (अमतम्), त्याने ते जाणलेले असते आणि ज्याला वाटते, की मी ब्रह्म जाणले (मतम्), त्याने ते जाणलेले नसते. आम्हाला ब्रह्माचे विशेष स्वरूप समजले, असा अभिमान धरणाऱ्यांना ते समजलेले नसते आणि आम्हाला ब्रह्मस्वरूपाचे विशेष ज्ञान झाले नाही, असे ज्याना वाटते, त्यांना त्याचे विशेष ज्ञान झालेले असते.

प्रस्तुत उपनिषदाच्या गद्यविभागात इंद्र आणि उमादेवी यांची कथा दिली असून, देवांनी असुरांवर जो विजय मिळविला त्याच्या मागे परब्रह्माचीच शक्ती होती, असे सांगितले आहे. सृष्टीच्या उत्पत्तीविषयी विचार केला असता तिच्या मुळाशी अपरिमेय अशी अध्यात्मशक्ती असली पाहिजे, असे सिद्ध करून, ज्याच्या अंगी नम्रता नाही, त्याला या शक्तीचे ज्ञान होत नाही, असेही सांगितले आहे. त्या शक्तीची अधिष्ठाने सांगताना पुढील मंत्र दिला आहे–

**तस्यै तपो दमः कर्मेति प्रतिष्ठा वेदाः**
**सर्वाङ्गानि सत्यमायतनम् ।**

(४·८)

अर्थ– तप, इंद्रियदमन व कर्म ही त्या शक्तीची अधिष्ठाने आहेत. वेद हे तिचे अवयव असून, सत्य हे आश्रयस्थान आहे.

या मंत्राचा सारांश असा – ब्रह्मविद्येचा प्रासाद उभारण्यासाठी तप, इंद्रियनिग्रह आणि वेदविहित नित्यनैमित्तिक कर्मे याचा आधार घ्यावा लागतो. या तीन गोष्टी योग्य प्रकारे सिद्ध झाल्याशिवाय ब्रह्मविद्या प्राप्त झाली, असे म्हणता येणार नाही.

या उपनिषदाचा काल व कर्ता या संबंधात डॉ. दप्तरी यांनी पुढील विवेचन केले आहे– याचा काल व कर्ता यांचा पत्ता लागत नाही. कारण यात एखाद्या काल्पनिक व्यक्तीचेही नाव आलेले नाही. हे छंदोबद्ध असल्यामुळे गीतेच्या पूर्वीचे असावे. ‘ऋषिभिर्बहुधा गीतं छन्दोभिर्विविधैः पृथक्’ (गीता १३·४), या वचनावरून निश्चितपणे दिसते, की कमीत कमी तीन तरी छंदोबद्ध उपनिषदे गीतेच्या पूर्वी झाली असावी. छंदोबद्ध उपनिषदे ईश, केन, कठ, मुंडक आणि प्रश्न अशी पाचच आहेत. त्यांपैकी ईशोपनिषद हे गीतेनंतरचे ठरते. इतर चार उपनिषदे गीतेच्या पूर्वीची असून, केन हे त्यातलेच एक आहे. या उपनिषदांची भाषा दुर्बोध आहे. [ उ. र ; उपनिषदर्थव्याख्या ]

## केपुमारी

द. अर्काटमधील एक गुन्हेगार जमात. हे लोक इतर प्रांतांतून या ठिकाणी आले आहेत. आगगाड्या, जत्रा अशा गर्दीच्या ठिकाणी जाऊन हे लोक चोऱ्या करतात. त्यांच्या दिसण्यावरून व वागण्यावरून ते संभावित वाटतात; पण तसे ते नसतात. हे लोक तेलुगू बोलतात. अलगर या देवाला हे दर वर्षी आपल्या चोरीच्या मिळकतीपैकी काही रक्कम अर्पण करतात. त्यावरून यांना अलगिरी केपुमारी हे नाव पडले आहे. [ का. ट्रा. स. इं. ]

## केयिरन

आंध्र प्रदेशात काही ठिकाणी प्राचीन काळची थडगी सापडतात, त्यांना केयिरन असे नाव आहे. या केयिरनांच्या साहाय्याने आंध्राच्या प्राचीन संस्कृतीवर बराच प्रकाश पडतो. त्या काळी इथले लोक जमिनीच्या खाली मंदिरासारखी रचना करून त्यात मृतांना ठेवीत असत. यावरून फार वर्षांपूर्वीही इथले लोक सुधारलेले होते, हे कळून येते. पाणी व लाकूड ज्या ठिकाणी विपुल प्रमाणात उपलब्ध असे, त्याच ठिकाणी हे लोक वस्ती करीत. [ ते. उ. सा. ]

## केयूर

दंडात घालायचा एक रत्नजडित सुवर्णालंकार. याच्यावर सुंदर कलाकुसर केलेली असते. हा अलकार प्राचीन काळापासून प्रचारात आहे. रामायणात केयूराचा उल्लेख आहे–

**नाहं जानामि केयूरे नाहं जानामि कुण्डले ।**
**नूपुरे त्वभिजानामि नित्यं पादाभिवन्दनात् ।**

(वा. रा. किष्किंधा.६.२२)

अर्थ–(लक्ष्मण म्हणतो) मी सीतेची केयूरे ओळखीत नाही किंवा कुंडलेही ओळखीत नाही. रोज पादवंदन केल्यामुळे नूपुर तेवढे माझ्या परिचयाचे आहेत.

स्त्री आणि पुरुष दोघेही हा अलंकार घालीत असत. बंगाल

आणि आसाम या प्रदेशात या अलंकाराचा विशेष प्रचार होता व अजूनही आहे.

**केरलवर्मा कोइत्तंपुरान** (१८४५–१९१४ इ. स.) केरळातील एक कवी. हा केरळकालिदास म्हणून प्रसिद्ध आहे. एका राजकुलात याचा जन्म झाला. लहानपणीच याने काव्य, नाटक, अलंकार, इ. विषयाचे अध्ययन करून त्यात प्रावीण्य मिळविले. पुढे व्याकरण, तर्क, मीमांसा या शास्त्रांचा अभ्यास करून तो पंडित बनला. याला इंग्रजी, मराठी, हिंदी, तमिळ व तेलुगू या भाषा चांगल्या अवगत होत्या व्यायाम व मृगया याचा त्याला छंद होता. त्याने मृगयास्मरणानामक एक संदेशकाव्य रचले आहे. याशिवाय मल्याळम् भाषेत याने आख्यायिका, आट्टकथा व स्फुट काव्य अशा प्रकारचे वाङमय लिहिले आहे. याने बालोपयोगी पुस्तकेही लिहिली आहेत. याचे मयूरसंदेशम् नामक खंडकाव्य आहे. त्यामागची घटना अशी–

केरलवर्मा हा तिरुवितांकूरच्या तत्कालीन राजाच्या भाचीचा पति होता व याच्यावर राजाची खूप मर्जी होती. पण पुढे काही कारणाने राजा याच्यावर रुष्ट झाला व त्याने याला बंदिवासात टाकले. हर प्रयत्न करूनही त्याची सुटका होईना. मग केरलवर्म्याने क्षमापणसहस्रम्नामक हजार श्लोकांचे काव्य रचून राजाकडे पाठविले. पण त्याचाही काही उपयोग झाला नाही. त्यानंतर त्याने यमप्रमाणशतकम् नावाचे दुसरे एक काव्य लिहून राजाकडे धाडले. तरीही राजावर त्याचा काही परिणाम झाला नाही. कालांतराने केरलवर्म्याला तिरुअनंतपुराहून हरिप्पाट्टू येथील राजमंदिरात नजरकैदेत ठेवण्यात आले. तिथून त्याने आपल्या प्रियतमेला काव्यमय संदेश पाठवायचे ठरवून त्याचा प्रारंभ पुढीलप्रमाणे केला—

**श्रीमान् वञ्चिक्षितिपति भुजङ्गर्क्षजन् लक्ष्मियाकुं**
**सामान्य विट्टेडु, मुरुगुणाभोगयां भागिनेयीं ।**
**प्रेमावासप्रियतमवियोगत्तिनालार्तयाक्कि–**
**सीमातीते कदनजलधौ केरलं तल्लिविट्टान् ।**

अर्थ– भुजंग नक्षत्रावर जन्मलेल्या श्रीमान् वञ्चि राजाने आपल्या सर्वगुणसंपन्न व प्रेमळ भाचीला प्रिय पतीच्या वियोगाने व्याकुळ बनविले आहे आणि त्यामुळेच केरळाला (केरळ राज्य, पक्षी केरळवर्मा ) असीम दुःखसागरात लोटले आहे.

हा संदेश त्याने मोराच्या करवी प्रियेकडे धाडला आहे. संस्कृत व शुद्ध मलयाळम् अशा दोन भाषांचा संमिश्र विलास या काव्यात पाहायला मिळतो. उदा० पुढील श्लोक पाहा–

**पालिप्पानाय् भुवनमखिलं भूतले जातनाया–**
**कालिक्कूट्टं कलितकुतुक कान्त कण्णन्नु भक्त्या ।**
**पीलिक्कोलोन्न टिमलरिल् नी काल्चयाय् वेच्चुवेन्नाल्**
**मौलिक्केट्टिल् तिरुकुमतिने तीर्चयाय् भक्तदासन् ।।**

अर्थ– हे मयूरा ! तू अनंतपुरात प्रवेश करून पद्मनाभाचे दर्शन घेशील तेव्हा, अखिल भुवनाचे पालन करण्यासाठी भूतलावर अवतरलेल्या व ( गोकुळात ) गाई–बैलाचेही रक्षण करणाऱ्या कृष्णाच्या चरणावर तू जर तुझे एखादे पीस भक्तिपूर्वक अर्पण करशील, तर तो भक्तदास निश्चितपणे आपल्या मस्तकी ते धारण करील.

या काव्याची भाषाशैली प्रौढ व गंभीर असून ती अलंकारानी नटलेली आहे.

राजाच्या मृत्यूनंतर याची बंदिवासातून सुटका झाली. त्यानंतर तिरुअनंतपुरम् येथे राहून त्याने आपले उर्वरित आयुष्य साहित्यसेवेत व्यतीत केले [ कै. सा. द ]

**केरसुणी** केर काढण्यासाठी बनविलेली कुंच्यासारखी वस्तू केरसुण्या मोहळाच्या, ताडाच्या पात्याच्या अथवा माडाच्या हिराच्या बनवितात. केरसुणी उभी ठेवू नये अथवा पायानी तुडवू नये, अशी समजूत आहे. उभी ठेवली, तर घरात नवरा–बायकोचे भांडण होते, असे मानतात. सकाळी सर्वांत आधी केरसुणी दिसली, तर तो दिवस वाईट जातो व केरसुणीने मारल्यास काखेत गाठ येते, असे समजतात. काही जातीत लग्नाच्या दिवशी केरसुणीची पूजा करतात. दिवाळीत लक्ष्मीपूजनाच्या दिवशी लक्ष्मी या नावाने केरसुणी विकत घेतात.

**केरळ** भारतीय संघराज्यातील एक घटक राज्य. त्रिवाकुर ( त्रावणकोर ), कोच्चिन व मलबार या प्रदेशाचा समावेश केरळात होतो. सह्याद्री आणि पश्चिम सागर याच्यामध्ये, गोकर्णापासून कन्याकुमारीपर्यंत लांबच लांब पसरलेल्या भूपट्टीला केरळ म्हणतात. हा सारा प्रदेश सदैव हिरवागार असून, फार सुंदर दिसतो. पूर्वभागातील डोंगराच्या रांगा घनदाट अरण्यांनी झाकलेल्या असतात. केरळातील वनप्रदेश सागवान व शिसवी या वृक्षांसाठी प्रसिद्ध आहे. नारळीचे झाड म्हणजे केरळाचा कल्पवृक्षच होय. केरळात जिकडे तिकडे नारळीच्या बागा पसरलेल्या दिसतात. काळी मिऱ्ये हे केरळचे आणखी एक वैभव आहे. इतिहासकाळी केरळ म्हणजे मिऱ्याचा प्रदेश असेच समजले जाई.

काश्मीरप्रमाणेच केरळाचे सौंदर्य जळीस्थळी दृग्गोचर होणारे आहे. अनेक लहानमोठ्या नद्या घाटातून निघून केरळच्या भूमीवरून खळाळत जाऊन पश्चिम सागराला मिळतात. पण केरळ प्रदेश प्रसिद्ध आहे, तो तिथल्या कायलासाठी. समुद्राचे

पाणी या प्रदेशात अनेक ठिकाणी दूरपर्यंत आत घुसले आहे; त्याचे प्रवाह किनाऱ्याला समांतर असे वाहतात. त्यांना कायल असे म्हणतात. अधूनमधून लहानमोठी सरोवरे व बेटेही या जलमार्गांना भेटतात. या कायलांतून होड्या व मचवे यांची वहातूक चालते.

केरळाच्या उत्तर भागातील पर्वतराजीला अनैमलै म्हणतात. तिच्या दक्षिणेस वेल्ची पर्वत असून, त्यातील एका शिखराची उंची ७९०० फूट आहे. केरळ हे वेलचीचे मूळ स्थान आहे.

या प्रदेशाला प्राचीनकाळी भार्गवक्षेत्र म्हणत असत. भार्गवक्षेत्र म्हणजे भार्गव रामाने निर्माण केलेली भूमी. केरळमाहात्म्य नावाच्या ग्रथात या विषयी एक कथा आहे, ती अशी—

परशुरामाने क्षत्रियांचा संहार केल्यानंतर समस्त आर्यावर्ताची भूमी त्याच्या सत्तेखाली आली. एका यज्ञात ती त्याने कश्यपाला दक्षिणा म्हणून दिली. त्यानतर लगेच कश्यपाने त्याला आर्यावर्ताच्या बाहेर जाण्याची आज्ञा केली. तेव्हा तो दक्षिणेकडे वळला. आणि सह्याद्रीचा घाट ओलांडून गोकर्णक्षेत्राला पोचला. त्या काळी गोकर्ण हीच द. भारताची सीमा होती. तिथे त्याने वरुणाचे ध्यान केले व तो प्रसन्न होताच त्याच्याकडून नवीन भूमी मागून घेतली. वरुणाच्या आदेशाप्रमाणे परशुरामाने आपला परशू दूर फेकला. तो जिथे पडला, तिथपर्यंतची म्हणजे कन्याकुमारीपर्यंतची भूमी सागराच्या तळातून वर आली. मग परशुरामाने आर्यावर्तातून अनेक ब्राह्मण कुटुंबे आणून तो भाग नांदता वसता केला.




**नागवंश—** वरील पौराणिक कथेवरून एवढे ध्यानात येते, की परशुरामाच्या प्रेरणेने आर्यावर्तातले ब्राह्मण केरळात येऊन स्थायिक झाले मात्र त्यापूर्वीच इथे काही नागपूजक लोक वसलेले होते अर्जुनाने ज्या नागलोकात जाऊन उलूपी नामक नागकन्येशी विवाह केला, तो हाच प्रदेश होय, असे म्हणतात. या नागाची विशिष्ट संस्कृती होती. याच्यात वर्णभेद वा जातिभेद नव्हता. युद्धविद्येचे शिक्षण सर्वांना दिले जात असे. त्या वेळी केरळात गणतंत्र पद्धतीचे राज्य होते जनता आपले प्रतिनिधी निवडून देत असे आणि त्यांची समिती आपल्या आदिम कायद्याप्रमाणे राज्य चालवीत असे.

ही राज्ये लहान म्हणजे पंचक्रोशीएवढीच होती कालांतराने ती मोडून, तिथे एकमुखी राजसत्तेचा उदय झाला. त्यातील चेर वंशाची सत्ता सबंध केरळावर प्रस्थापित झाली. प्रल्हादाचा पुत्र बळी या वंशाचा आदिपुरुष समजला जातो. तृक्कारूरकरा ही त्याची राजधानी होती. सध्याच्या एर्णाकुलम्‌पासून हे ठिकाण शंभर मैलांवर आहे. याच वंशातील चेरन् नामक प्रतापी पुरुषाने द. भारताच्या विस्तृत भागावर आपले साम्राज्य प्रस्थापित केले होते. त्याची राजधानी तिरुवंचिकुलम् इथे होती. कोडुंगल्लूर हे बंदर साम्राज्याच्या समृद्धीचे केंद्रस्थान होते. त्या बंदरातून दूरदूरच्या

देशाशी केरळाचा व्यापार चाले. या चेरवंशी राजाची भूमी म्हणून तिला चेरनाडू किंवा चेरतल असे नाव मिळाले. कालांतराने चेरतलमधला त लुप्त होऊन त्याचे चेरल आणि नतर केरल हे रूप बनले. या प्रदेशाला मलैनाडू असेही म्हणतात. त्याचा अर्थ पर्वताचा प्रदेश असा होतो.

**ब्राह्मणांची सत्ता**– आर्यावर्तातून केरळात आलेले ब्राह्मण बुद्धिमान तर होतेच; शिवाय सत्तालोलुपही होते. त्यांनी आपल्या शक्ति-बुद्धीच्या बळावर नागलोकांना नामोहरम केले. त्यांच्या राजांना ब्राह्मणाचे वर्चस्व मानणे भाग पडले. मग सर्व केरळाचे चार भाग पाडण्यात आले व प्रत्येक भागावर एकेक रक्षापुरुप नेमण्यात आला. हा रक्षापुरुष ब्राह्मणच निवडला जावा, अशी व्यवस्था झाली. तीन वर्षानंतर प्रत्येक रक्षापुरुपाने निवृत्त व्हावे असेही ठरले. या प्रत्येक विभागाला कडकम् असे म्हणत. त्याची नावे पेरिचेल्लूर, पय्यन्नूर, पेरम्पूर व चेङ्ङन्नियूर अशी होती. रक्षापुरुषाचा मंत्री म्हणून नागपुरुषाची योजना करीत; पण त्याच्या हाती फारशी निर्णायक सत्ता नसे. प्रत्येक कडकम्‌मध्ये धर्मसभा, शासनसभा, व्यापारसभा व कृपिसभा अशा चार सल्लागार समित्या असत. त्यातील सभासद लोकांनी निवडलेले असत. अशा प्रकारे राजसत्ता व लोकसत्ता या दोहोंचा मिलाफ होऊन एक अभिनव शासनपद्धती केरळात निर्माण झाली.

प्रारंभी जे रक्षापुरुष निवडले गेले, ते न्यायी, निःस्वार्थी व कर्तबगार होते. त्यांनी देशात शांतता, सुव्यवस्था व समृद्धी निर्माण केली. पण कालांतराने स्वार्थी पुरुष त्या अधिकारावर आले व त्यानी सत्तेचा दुरुपयोग आरंभला. मग त्याचा व जनतेच्या प्रतिनिधीचा संघर्ष सुरू झाला. त्यात रक्षापुरुषांचा जय झाला खरा; पण त्यांची शक्ती इतकी क्षीण झाली, की त्याना सत्तेचा भार पेलणे कठीण होऊ लागले. शेवटी दोन्ही पक्षांनी संगनमत करून तमिळनाडमधील केयपुरम्‌च्या राजाला केरळाची राजसत्ता हाती घेण्यासाठी निमंत्रण दिले. त्या राजाचे नाव उदयबाणवर्मा असे होते. तो केरळात आला व तिथल्या सिंहासनावर बसला. त्याला पेरुमाळ म्हणजे महान शासक ही पदवी देण्यात आली.

**सुवर्णयुग**– पेरुमाळ राजाने आपल्या साम्राज्याचे चार शासनविभाग केले आणि प्रत्येक भागावर सामंत म्हणून एकेक ब्राह्मण नियुक्त केला. या सामंतांना त्याने तलियातिरी अशी उपाधी दिली. अशा प्रकारे ब्राह्मण व क्षत्रिय या दोन्ही वर्णांकडून ती भूमी शासित होऊ लागल्यामुळे लोक तिला ब्रह्मक्षत्रभूमी म्हणू लागले. पेरुमाळांनी इ. स. च्या नवव्या शतकापर्यंत राज्य केले. हा काळ म्हणजे केरळाचे सुवर्णयुगच होय. त्यात केरळाची सर्व प्रकारे भरभराट झाली. शेती समृद्ध झाली, परदेशाशी व्यापार वाढला, इतर व्यवसायही उत्कर्ष पावले आणि साहित्य व संगीत यांचाही विकास झाला.

पेरुमाळ वंशातील भास्कररविवर्मा नावाच्या सम्राटान केरळात एक नवा राजकीय उत्सव सुरू केला. त्याचे नाव महामखम् किंवा मामाकम् असे होते. प्रजेकडून व सामंत-सरदारांकडून राजनिष्ठेचे जाहीरपणे प्रदर्शन करविणे, हा त्याचा उद्देश होता. या उत्सवात केरळचा सम्राट एका उच्च वेदीवर उभा राहून सामंत, सरदार व मंडलेश्वर इ. अधिकारी यांच्याकडून नजराणे स्वीकारीत असे. त्या प्रसंगी विद्वत्सभा भरे आणि कलावंतांची नाटचनृत्येही होत. केरळाधिपती सर्वांनमुक्त हस्ताने बिदागी देई.

इ. स. च्या सातव्या शतकात भास्कररविवर्मा याचा अंत झाला. त्याच्यानंतर राजशेखर चक्रवर्ती नावाचा एक सम्राट केरळात गाजला. तो थोर शास्त्रज्ञ आणि संस्कृत व तमिळ या भाषांचा पंडित होता. तो शकराचार्यांचा समकालीन मानला जातो. त्याच्याच राजवटीत केरळात कोल्लम् शक सुरू झाला. शंकराचार्यांच्या निर्याणानंतर पाच वर्षांनी त्याने समस्त केरळाची एक धर्मसभा कोल्लम येथे बोलावली. त्या परिषदेला केरळातले शास्त्री, पंडित व महाजन उपस्थित झाले होते. त्या परिषदेत अनेक महत्त्वाचे निर्णय करण्यात आले. केरळीय जनतेने आपला आचार व व्यवहार शंकराचार्यांच्या वेदान्तमताला अनुसरून चालवावा, हा त्यातला मुख्य ठराव होता. ही परिषद इ. स. ८२५ साली झाली. तिची स्मृती कायम राहावी, म्हणून जी नवीन वर्षगणना चालू करण्यात आली तिला कोल्लम् शक हे नाव दिले गेले.

पेरूमाळाच्या नंतर राजा म्हणून वल्लुवनाडच्या वल्लुवकोनामीची निवड झाली. त्याच्या वंशजांनी ते स्थान सुमारे शंभर वर्षे कसेबसे संभाळले. त्या अवधीत केरळाच्या अधिपत्यासाठी निरनिराळचा राजांची आपसात स्पर्धा चालू होती. त्या संघर्षातून सामूतिरी हा राजा वर आला व त्याने महामखम्‌च्या एका उत्सवात केरळाचे स्वामित्व स्वत:कडे घेतले. यातून वल्लुवाकोनामी व सामूतिरी यांचे जे वैर निर्माण झाले, ते दीर्घकाल चालू राहिले.

**इतिहासाचा मागोवा**—प्राचीन केरळीय साहित्यात वर वर्णिलेले केरळाचे भव्य व दिव्य दर्शन घडते, पण त्याला फारसा ऐतिहासिक आधार मात्र सापडत नाही. सम्राट अशोकाच्या शिलालेखात प्रथमच केरलपुत्र हे नाव आढळते. त्याच्या साम्राज्याच्या दक्षिण सीमेवरील राज्यकर्ते म्हणून त्यांचा उल्लेख केलेला आहे. सनपूर्व ३०० च्या आधी केव्हा तरी उत्तरेकडून

आर्य ब्राह्मण या प्रदेशात आले असावे त्यांच्याही आधी काही नागपूजक लोक इथे येऊन स्थायिक झाले होते. इथल्या मूळ रहिवाश्यांना जिंकून त्यांना नागलोकानी जमीन कसायला लावले होते. या नागलोकानाच पुढे नाकर→नायर हे नाव मिळाले. पुराणांतले नाग तेच आजचे नायर समजले जातात. त्याच्यानंतर आलेले ब्राह्मण आज नंपूतिरी या नावाने प्रसिद्ध आहेत. नायर व नंपूतिरी याच्यामध्ये पुढे संघर्ष निर्माण झाला. त्यात नायरांकडे जमिनीचे स्वामित्व व राजकीय सत्ता आली आणि नंपूतिरींना धार्मिक व सामाजिक क्षेत्रात श्रेष्ठत्व दिले गेले.



कायल वाहतुककेंद्र – केरळ

ख्रिस्तपूर्व काळातच पॉलिनेशियामधून लंकामार्गे एझवा लोक केरळात आले व त्यानी आपल्या बरोबर नारळ व नौका या वस्तू केरळात आणल्या, असे म्हणतात.

इ. स. च्या १ ल्या शतकात चेर या प्रबळ राजवंशाची सत्ता सवंध केरळावर प्रस्थापित झाली होती. चेरांची राजधानी क्रंगनोरजवळ तिरुवंचिक्कुलम् येथे होती. करिकाल चोळ याने एका चेर राजाचा पराभव केला होता, असे म्हणतात; पण त्याने आपली कन्या चेर राजाला देऊन त्याच्याशी सख्य केले, असाही उल्लेख आढळतो. त्या चोळ राजकन्येचा पुत्र चेरन शेगट्टुवान हा फार पराक्रमी होता. त्याने पालघाटातून स्वारी करून कोइंबतूर हा प्रदेश जिंकला.

इ. स. च्या २ ऱ्या शतकापासून तो ९ व्या शतकापर्यंत केरळात पेरुमाळ राजवंशाची सत्ता होती. पण त्यांचे आलेख, नाणी वगैरे काहीच उपलब्ध नसल्यामुळे त्याच्या नामावली-व्यतिरिक्त त्यांचा इतिहास गवसत नाही. केय नावाचा त्याचा मूळ पुरुष होता. ५ व्या शतकातले हरिश्चंद्र व कुलशेखर हे दोन राजे प्रसिद्ध आहेत. ८ व्या शतकात होऊन गेलेला भास्कर रविवर्मा याचा एक आलेख सापडला असला, तरी ९ व्या शतकाच्या मध्यापर्यंतचा केरळाचा राजकीय इतिहास धूसरच आहे.

इ. स. ८६४ साली पांड्य राजा वरगुण याने केरळावर आपली सत्ता स्थापन केली होती. चेरमन पेरुमाळ याने त्या सत्तेविरुद्ध बंड उभारले म्हणून त्याचे नाव केरळाच्या इतिहासात गाजले. चोळ राजानीही केरळावर अनेकदा आक्रमण केले होते आणि त्रिवेंद्रमच्या दक्षिणेकडील भाग आपल्या साम्राज्याला जोडला होता. त्यांचे त्या काळातले आलेख केरळात सापडले आहेत.

त्यानंतरचा सुमारे पाच शतकांचा इतिहास म्हणजे भिन्न भिन्न राजाच्या सत्तास्पर्धेचाच इतिहास होय. त्या काळात तिथे अनेक लहान लहान राज्ये नांदत होती. त्यांतील वेनाड, वंबिलनाड, एर्नाड, वल्लुवनाड, नेडुंगनाड या राज्यांचा उल्लेख एका दानपत्रात आढळतो. दक्षिणेकडील प्रदेशावर वेनाडच्या राजांची सत्ता होती. पुढे वेनाड, देसिंगनाड व तिरुवेल्ल यांचे मिळून एक राज्य झाले, तेच त्रिवाकुरचे राज्य होय. त्याचा विस्तार क्विलॉनपासून कन्याकुमारीपर्यंत होता. १३ व्या शतकात देसिंगनाडचा राजा वीर रविवर्मा संग्रामधीर याने आजूबाजूची राज्ये जिंकून आपली सत्ता प्रबळ केली आणि चोळ व पाड्य यांच्या प्रदेशांवरही आक्रमण केले. इ. स. १३१० च्या सुमारास त्याने कांची येथे स्वतःला राज्याभिषेकही करून घेतला, असे म्हणतात. पण त्याचे हे वर्चस्व त्याच्यानतर टिकले नाही.

१५ व्या शतकाच्या अखेरीपर्यंत केरळमध्ये राजकीय अस्थिरताच होती. त्रिवाकुर, कालिकत व कन्ननोर ही तीनच राज्ये त्यातल्या त्यात बलवान होती. एर्नाडच्या सामूतिरी (=सागर–स्वामी) राजानी आपल्या राज्याचा विस्तार बराच वाढविला होता. अरब व्यापाऱ्यांशी त्यांचे चांगले संबंध असल्यामुळे



केरळी नौका

कालिकत बंदराला फार महत्त्व आले आणि मसाल्याचे पदार्थ, उंची कापड, इ. वस्तूंच्या निर्यातीमुळे ते राज्य समृद्ध झाले.

पुढे आजूबाजूची अनेक लहान राज्ये सामूतिरीच्या (झामोरिन) अंकित झाली व त्याने स्वतःला कुन्नलैक्कोन (पर्वत व सागर यांचा स्वामी) ही पदवी घेतली. त्याचे नौकादल प्रबळ असून, ते गुजरातपासून लंकेपर्यंत संचार करीत असे.

कालिकतच्या उत्तरेस कन्ननोरच्या कोलथिरी राजाची सत्ता नेत्रवती नदीपासून कोराप्पुझापर्यंत होती त्याचे कालिकतच्या राजाशी कायमचे वैर होते. आणखीही अनेक लहान संस्थाने केरळमध्ये होती. त्यांपैकी कोच्चिन हे संस्थान विशेष उल्लेखनीय होते तिथला राजा क्षत्रिय असून, स्वतःला पेरुमाळ घराण्याचा वंशज समजत असे. याने पुढे पोर्तुगीजांच्या मदतीने झामोरिनच्या सत्तेला शह दिला.

याशिवाय तिथे अनेक नायर सरदारही होते व त्याच्यावरच वरील राजसत्तांची सारी मदार असे. ते सरदार स्वत.चे सैन्य बाळगून कोणत्याही राजाला मदत करीत. ते जमिनीचे मालक असून अगदी स्वतंत्रपणे तिचा उपभोग घेत.

**परदेशी व्यापारी** – प्राचीन काळापासून केरळाचा चीनशी व पाश्चात्य देशांशी व्यापारी संबंध होता. त्यातही रोम व इजिप्त याच्याशी विशेष दळणवळण होते. केरळमध्ये प्राचीन रोमन नाणी पुष्कळ सापडली आहेत. त्यावरून या गोष्टीची साक्ष पटते. क्रँगनोर (कोडगल्लुर) किंवा मुझिरिस (मुयिरिक्कोडू) हे बंदर त्या वेळचे मुख्य व्यापारी केंद्र होते. अनेक प्रकारची रत्ने, उत्तम मोत्ये आणि काळी मिऱ्ये या पदार्थांची तिथून निर्यात होत असे. हा व्यापार 'मणिग्रामम्' नावाच्या एका व्यापारी संस्थेच्या हाती होता. ही संस्था चेट्टी लोकांची असून ती केरळभर पसरलेली होती.

अरबस्थानाशीही केरळाचा व्यापारी संबंध फार पूर्वीपासून होता. अनेक अरब व्यापारी मलबारात येऊन स्थायिक झाले होते. मध्ययुगात केरळमधील बहुतेक सर्व व्यापार त्यांच्या ताब्यात गेला. १२ व्या शतकात कालिकत हे व्यापाराचे मुख्य केंद्र बनले. झामोरिनशी अरबी व्यापाऱ्यांचे खूपच सख्य होते. त्यांच्या मदतीने सबंध केरळाचे एकाधिपत्य मिळविण्याची आकांक्षा त्याने धरली होती. परंतु १५ व्या शतकाच्या अखेरीस पोर्तुगीजानी मलबारात प्रवेश केला आणि कोच्चिनच्या राजाला हाताशी धरून झामोरीनच्या वाढत्या सत्तेला पायबंद घातला. त्यामुळे केरळात एकछत्री राजसत्ता प्रस्थापित होऊ शकली नाही. पोर्तुगीजांनी बहुतेक मांडलिक राजांशी सख्य करून व्यापाराच्या सवलती मिळविल्या आणि त्यांना आर्थिक व शस्त्राचे साहाय्य देऊन झामोरीनशी लढण्यास प्रवृत्त केले.



कायलातील नौका – त्रिवेंद्रम्

पोर्तुगीजानी केरळाच्या व्यापारातही खूप वाढ केली. मसाल्याचे पदार्थ सहज मिळतील तेवढे विकत घेऊन त्याची अरब व्यापारी निर्यात करीत. पण पोर्तुगीजांनी मिऱ्ये व नारळ याचे उत्पादन वाढवून अधिक माल परदेशी नेण्यास प्रारंभ केला. व्यापारवृद्धीमुळे केरळी जनतेचे जीवन काही अंशी सुधारले हे खरे; पण केरळाचा अरबस्तानाशी व इजिप्तशी असलेला जुना सबंध तुटला आणि व्यापारातील मक्तेदारीमुळे पोर्तुगीजाना केरळातील सपत्तीची लूट करणे शक्य झाले. केरळावर त्यांचे वर्चस्व सुमारे १५० वर्षे चालू राहिले.

१६ व्या शतकाच्या शेवटी डचलोकही मलबारमध्ये व्यापारासाठी घुसले. तिथे त्यांचा जम बसायला सुमारे ५० वर्षे लागली. कोच्चिनच्या राजघराण्यात दुफळी झाली, तेव्हा डचानी एका पक्षाला मदत देऊन, पोर्तुगीजांना केरळातून बाहेर काढण्याचा चंग बांधला. कालिकतच्या झामोरीनचेही त्यांना पाठबळ मिळाले आणि त्या सर्वांनी मिळून इ. स. १६६२ मध्ये पोर्तुगीजांचा पराभव करून कोच्चिनचा किल्ला जिंकला. त्यानंतर डचांनी मिऱ्ये व अफू यांच्या व्यापाराची मक्तेदारी मिळविण्याचा प्रयत्न केला; परंतु त्यात त्यांना फारसे यश आले नाही. कारण त्याच वेळी इंग्लिश व फ्रेंच लोकांनीही केरळमध्ये आपला पाय रोवण्यास सुरवात केली होती. झामोरिनशी



सेंट फ्रांसिस चर्च – कोच्चिन

डचाचे सख्य फार दिवस टिकले नाही. कोच्चिनच्या राज्यातील व्यापार डचांच्या हाती होता आणि तो त्यांनी सुमारे ५० वर्षे निर्वेधपणे चालविला होता. पण १८ व्या शतकाच्या प्रारंभी केरळमध्ये इंग्लिश व फ्रेंच यांचे बळ वाढल्यामुळे डचांचा व्यापार घटू लागला. त्याच सुमारास त्रिवांकुरमध्ये मार्तंडवर्मा नावाचा पराक्रमी राजा गादीवर आला (इ. स. १७२९). त्याने केरळ-मधील बरीच राज्ये आपल्या सत्तेखाली आणली आणि डचाचे सामर्थ्यही नष्ट केले. तेव्हापासून केरळमधील सर्व छोटी संस्थाने नष्ट होऊन त्रिवांकुर, कालिकत व कोच्चिन ही तीनच राज्ये शिल्लक उरली. नायर सरदारांचे प्रस्थही नष्ट झाले.

**म्हैसूरचे आक्रमण**– परंतु ही स्थितीही फार काळ टिकली नाही. इ. स. १७६६ मध्ये म्हैसूरच्या हैदर अलीने मलबारवर स्वारी करून कोच्चिनपर्यंतचा प्रदेश सहज पादाक्रांत केला. मात्र त्याला त्रिवाकुरचे राज्य जिंकता आले नाही. तिथला त्या वेळचा राजा रामवर्मा याने हैदर व टिपू या दोघांच्याही आक्रमणाना खंबीरपणे तोंड दिले व त्रिवांकुरच्या स्वातंत्र्याचे रक्षण केले. हैदर व टिपू या दोघांनीही केरळाच्या बाकीच्या जिंकलेल्या भागांत भयकर अत्याचार केले. त्यामुळे शेवटी लोक खवळले. दबलेल्या राजसत्ताही खवळल्या आणि टिपू-विरुद्ध बंड करून उठल्या. इंग्रजही टिपूच्या विरुद्धच होते. त्यांनी ही वेळ साधून केरळमधील टिपूच्या सैन्यावर हल्ला करून सर्व प्रांत काबीज केला (इ. स. १७९१). त्यापैकी त्रिवांकुर व कोच्चिन ही दोन संस्थाने स्वायत्त ठेवून बाकीचा उत्तरेकडील मलबारचा भाग इंग्रजांनी आपल्या ताब्यात घेतला. १९ व्या शतकात इंग्रजी शासनाखाली न्याय, शिक्षण, राज्यकारभार, आरोग्य, इ. सर्व दृष्टीनी केरळाची पुष्कळ प्रगती झाली. मात्र २० व्या शतकात मापिळ्ळा लोकांचे बंड व त्यांनी हिंदूवर केलेले अनन्वित अत्याचार या गोष्टी इंग्रजांच्या राजवटीला लांछनास्पदच ठरल्या.

१९४९ मध्ये त्रिवांकुर व कोच्चिन ही संस्थाने भारतीय संघराज्यात विलीन झाली आणि १९५६ साली केरळ राज्य सध्याच्या स्वरूपात निर्माण झाले. सांप्रत त्रिवेंद्रम ही त्याची राजधानी आहे. पूर्वीच्या त्रिवांकुर संस्थानाची राजधानीही हीच होती. या नगराचे मूळ नाव तिरुअनंतपुरम् असे होते. अनंत म्हणजे पद्मनाभस्वामी. पूर्वीचे अधिपती या अनंताचे प्रतिनिधी म्हणून त्या संस्थानाचा कारभार पाहत.

**केरळातील धर्मपंथ** – केरळातले हिंदू शिव, विष्णू किंवा देवी यांचे उपासक आहेत. इथे पंथीय अभिनिवेश फारसा आढळत नाही. दुर्गा किंवा भद्रकाली ही केरळाची मातृदेवता म्हटली पाहिजे. नागपूजा हे केरळाचे खास वैशिष्टच होय. नाग हे गृहसरक्षक आहेत, अशी तिथल्या लोकांची धारणा आहे. शिव व विष्णू या विशिष्ट भक्ताच्या उपास्यदेवता; सर्प ही नायरांची व विशिष्ट कुलांची देवता; भगवती ही ग्रामदेवता; पण केरळातील आमजनतेचा श्रद्धेय देव म्हणजे शास्ता किंवा अय्यनार हा होय. हा शिव-मोहिनीचा पुत्र आहे. त्रिवांकुरच्या पर्वतराजीत साबरीमलै नावाच्या एका अवघड पहाडात त्याचे मंदिर आहे.

केरळात ख्रिस्ती धर्माचा प्रवेश इ. स. च्या १ ल्या शत-कातच झाला. येशूचा शिष्य थॉमस हा त्या धर्माचा भार-तात आलेला अग्रदूत समजला जातो. त्याने मलबारात सात चर्चे उभारली. त्याने थोडेच लोक बाटवले; पण ते अव्वल दर्जाचे होते. चेर राजा पल्लिबाण पेरुमाळ हाही त्या बाटले-ल्यांत होता. त्यानतर उत्तरेकडून जैन व बौद्ध हेही मल-बारात आले. त्यांनी मठ–विहार निर्माण करून आपापल्या धर्माचा खूप प्रचार केला. पण शंकराचार्यांच्या ज्ञानसूर्यापुढे ते सारे हतप्रभ झाले. टिकून राहिले ते ख्रिस्ती व इस्लामी. पण तेही त्यांच्या मूळ स्वरूपात तिथे राहू शकले नाहीत. त्यांना एतद्देशीय वळण लावून घ्यावे लागले. केरळातील हिंदू, मुसल-मान, ख्रिस्ती हे सर्व धर्माचे लोक नेहमी सलोख्याने राहत होते. कोणीही परधर्मीयांना तुच्छ लेखीत नसत किंवा त्यांच्या-वर आक्रमण करीत नसत. केरळातील राजेही परधर्मसहिष्णू होते. त्यांनी परधर्मीयांना उदार आश्रय दिला होता. मात्र १६ व्या शतकात सेंट फ्रासिस झेवियर या पोर्तुगीज धर्म-प्रसारकाने इथे छळ व अत्याचार करूनच कॅथॉलिक धर्म वाढविला.

**केरळ-संस्कृती** – नंपूतिरी ब्राह्मण व नायर क्षत्रिय या केरळातल्या दोन प्रमुख जाती आहेत. इतर अनेक जाती-पोट-जाती या दोहोंच्यामध्ये येतात. त्यांना अंतराळ जाती म्हणतात. नंपूतिरी ब्राह्मण मूळ उत्तरेकडचे व आर्यवंशी. ते आपल्या श्रेष्ठत्वाच्या कल्पना व संस्कृतीच्या विशिष्ट विचारधारा घेऊन तिथे गेले होते. प्रथम त्यांनी आपले वेगळेपण टिकवून धर-ण्याचा खूप प्रयत्न केला; पण आपल्या महत्त्वाकांक्षा सफल करण्यासाठी त्यांना स्थानिक द्रविड वंशाच्या जनतेशी समरस व्हावेच लागले. पुढे त्यांनी राजकारणाची सूत्रेही आपल्या हाती घेतली. पोर्तुगीजांचा पाय केरळच्या भूमीला लागेपर्यंत तिथल्या समाजावरचे नंपूतिरीचे वर्चस्व अबाधित राहिले.

नंपूतिरींची कुटुंबव्यवस्था वैदिक आर्यांच्या सारखी म्हणजे पितृसत्ताक आहे. मलयाळम्‌भाषेत तिला इल्लम् म्हणतात. त्या व्यवस्थेत फक्त थोरला मुलगा पैतृक संपत्तीचा वारस व कुटुंबाचा सर्वाधिकारी होतो. केवळ त्यालाच जातीतल्या

मुलीशी विवाह करता येतो. इतर भावांना नायरांच्या मुलीशी 'संबधम्' करावे लागते. संबंधम् म्हणजे वैदिक संस्कारा-शिवाय केलेले लग्न. त्यात पति-पत्नींना केव्हाही विभक्त होण्याची मोकळीक असते. या सबंधात पत्नी नेहमी माहेरीच राहते.

नंपूतिरींच्या धार्मिक समजुती बऱ्याच तीव्र आहेत. त्यांच्यांत सोवळ्या-ओवळ्याचे प्रस्थही फार आहे. स्त्रियांच्या बाबतीत त्यांच्या कल्पना अगदी मनुप्रणीत आहेत. घराबाहेर तर त्यांना पडदा पाळावा लागतोच; शिवाय घरातल्या दीर वगैरे पुरुषा-पुढेही पडदानशीनच राहावे लागते.

त्यांच्यांत पूर्वी बहुपत्नी-प्रथा होती; कारण कुटुंबातील मोठा मुलगाच फक्त लग्न करू शकत असे. त्यामुळे बऱ्याच मुलींना कुंवार राहण्याची पाळी येई. त्यांना संबंधम् करायचा मार्गही उपलब्ध नसे. आता नवीन हिंदू कायद्याप्रमाणे एक-पत्नीत्व सक्तीचे झाल्यामुळे तर कुंवार मुलींची संख्या वाढतच चालली आहे. याच कारणाने हा समाज हळूहळू घटत चालला आहे. पण आता नंपूतिरी तरुणांच्या मनांत जातीतील तरुणीशी विवाह करण्याची आकांक्षा बळावत चालली असून, त्यामुळे इल्लम् या जुन्या कुटुंबसंस्थेला धक्के बसू लागले आहेत.

केरळातील दुसरी मोठी जात नायरांची. त्यांच्या उत्पत्तीचा इतिहास ज्ञात नसला, तरी एवढे सर्वमान्य आहे, की हे नाग-वंशी असून, केरळाचे मूळ वसाहतकार आहेत. त्यांची कुटुंब-व्यवस्था मातृप्रधान आहे. त्यांच्यांत संपत्तीचा वारसा मातृ-परंपरेने चालतो. म्हणजे पुरुषाचा वारसा त्याच्या मुलाकडे न जाता बहिणीच्या मुलाकडे जातो. या पद्धतीचे नाव मरुमक्क-तायम् असे आहे. मरु = बहीण, मक्क =मुलगा व तायम् = दाय. त्रिवांकुर–कोच्चिनची राजपरंपरा अशाच पद्धतीने चालत आली आहे. (मरुमक्कतायम् पाहा)

नायराचा सध्याचा मुख्य व्यवसाय शेती असला, तरी ते पूर्वीपासून लढाऊ वृत्तीचे आहेत. केरळात ब्रिटिश सत्ता प्रस्थापित होईपर्यंत तिथले लष्कर नायरांचे होते. त्यांच्या या सैनिकी संघटनेने केरळाच्या राजकीय इतिहासात महत्त्वाची भूमिका बजावली आहे. त्यांनी अनेकदा केरळाचे संरक्षण केले आहे. उन्मत्त राजे प्रजेला छळू लागले, तर हे नायर सरदार त्यांच्या प्रतिकारासाठी निर्भयपणे उभे राहत.

मलबारी हिंदूतली आणखी एक मोठी जात म्हणजे थिया किंवा एझवा ही होय. हे लोक लंकेतून केरळात आले, असे म्हणतात. ते स्वच्छतेचे भोक्ते, विचारांनी पुरोगामी व शिक्ष-णात पुढारलेले असून, त्यांच्या स्त्रियातही शिक्षणाचा बराच प्रसार झाला आहे. या जातीने जीवनाच्या सर्व क्षेत्रात नाव काढणारी माणसे निर्माण केली आहेत. श्री नारायण गुरुस्वामी हा थोर पुरुष त्यापैकीच एक होय. १९ व्या शतकापर्यंत हे



त्रिवेंद्रम् येथील संग्रहालय

अस्पृश्य गणले जात होते. शेती व नारळाची लागवड हे त्याचे मुख्य उद्योग आहेत.

केरळाच्या डोंगराळ भागात पंदरम्, उरळी, उल्लादन, मुद्रन, इ. आदिवासी जमातींची वसती आहे. सूर्य हा त्याचा सर्वश्रेष्ठ देव होय. त्या खालोखाल चामुंडी, भद्रकाली, मल-मुथन, चवर, अयिरवल्ली, गणपती, अप्पुपन, इ. देवतांना व काही वनदेवतांनाही ते भजतात.

मुसलमानांचा वर्गही केरळात बराच मोठा आहे. हे लोक मोपला किंवा मापिळ्ळा या नावाने ओळखले जातात. अरब व्यापाऱ्यांनी केरळातील स्त्रियांशी लग्नसंबंध जोडल्यावर, त्यातून जी संतती निर्माण झाली, ते हे मोपले होत. केरळातील कनिष्ठ जातीतल्या हिंदूनी मोठ्या प्रमाणावर इस्लामी धर्म स्वीकारल्यामुळे यांची संख्या वाढली. पण त्यांच्यांतही उच्च-नीचता आहेच. उच्चवर्णी मोपले व्यापारात पुढे आहेत. कनि-ष्ठांनी शेती व मच्छिमारी अशी उभयविध जीविका पत्करली आहे ही जमात कष्टाळू व हरहुन्नरी आहे.

केरळातील ख्रिश्चन समाजात काही सीरियन ख्रिश्चन आहेत. ते ख्रिस्ताला मानतात, पण कॅथॉलिक चर्चला मानीत नाहीत. कॅथॉलिक पंथाची पाळेमुळे केरळात खोलवर रुजविली ती पोर्तुगीजांनी. केरळातले कॅथॉलिक लोक व्यापारात व शिक्षणातही आघाडीवर आहेत. केरळात आधुनिक पद्धतीचे शिक्षण पहिल्याप्रथम पोर्तुगीजांनीच आणले. त्याबरोबरच मुद्रणकलाही आणली. ते तिथली मलयाळम्‌भाषा शिकले व तिच्या आधारेच त्यानी केरळात धर्मप्रचार केला.

मात्र याचा असा अर्थ नव्हे, की पाश्चात्याच्या आगमना-पूर्वी केरळीय लोक विद्याविमुख होते. केरळ ही प्राचीन काळापासूनच विद्याभूमी आहे. तिथल्या पाठशाळांमध्ये वेदां-बरोबरच लेखन, वाचन, गणित, ज्योतिष हे विषयही शिक-

विले जात. त्यानंतर संस्कृत काव्याचे अध्यापन होत असे. शहरातील सभामट्टातून अध्यापनाचे कार्य चाले. तिथे विद्यार्थ्यांना भोजन मिळे. त्याहीवर मोठी गुरुकुले असत. तिथे शिस्त व चारित्र्य याची जोपासना केली जाई. केरळात कोडंगल्लुर व पैच्चुर या ठिकाणी दोन विद्यापीठे होती. केरळी राजकुमार त्या विद्यापीठांत अध्ययन करीत आणि काही विद्यासपन्न राजे स्वतः तिथे ज्ञानदानाचेही कार्य करीत. अशा शिक्षणसंस्थातून अनेक कवी व पंडित निर्माण झाले आणि त्यांनी श्रेष्ठ ग्रथ रचले. नपूतिरी ब्राह्मणांप्रमाणेच नायर पुरुषही या क्षेत्रात चमकले. बौद्ध साहित्य व दर्शन यांचाही त्यानी अभ्यास व प्रचार केला. वैद्यकशास्त्रही केरळात बरेच प्रगत झाले होते. तिथले अष्टवैद्य प्रसिद्ध आहेत. व्यायाम व युद्धकला यांचे शिक्षण देणाऱ्या तिथल्या कलरीनामक शाळाही प्रसिद्ध आहेत. केरळीय लोकांनी ग्रीकांकडून खगोलविद्या घेतली व अरबांकडून नौकानयनाची कला संपादिली. सीरियन ख्रिश्चनाकडून त्यांना वैद्यकशास्त्राचे व वनौषधींचे ज्ञान मिळाले. मच्छीमारीचे शास्त्र ते चिनी लोकांकडून शिकले. पोर्तुगीजांनी त्याना मिरी व नारळ यांचे मोठ्या प्रमाणावर उत्पादन करण्यास शिकविले. ख्रिस्ती व मुसलमान झालेल्या मलबारी लोकाना समुद्रप्रवास निषिद्ध नव्हता. त्यामुळे ते उत्तम खलाशीही बनले.

**लोकजीवन** – केरळभूमी सुपीक व समृद्ध खरी; पण ती लोकाचे दारिद्र्य दूर करू शकली नाही. कारण भूमीच्या मानाने तिथे लोकवस्ती बेसुमार आहे. आपण ज्यांना गावे म्हणतो, तशी ती केरळात नाहीतच. तिथे घरे आणि वाड्या अखंडपणे वसलेल्या दिसतात. वसती कुठे सपतच नाही.

केरळातली माणसे वर्णाने सावळी असली, तरी त्यांची स्वच्छता त्यांच्या वर्णाला कांती देणारी असते. त्यांना कपड्याचा फारसा हव्यास नसतो. पुरुष मुंटू म्हणजे लुंगी नेसतात, तोर्तू नावाचे कुडते घालतात किंवा उपरणेवजा पंचा पांघरतात. एका काळी ते बायकांप्रमाणे लांब केस ठेवून त्यांचा कपाळावर नागफणीसारखा बुचडा बांधीत. डोक्याचे केस कापणे पाप समजले जाई. तिथल्या स्त्रियाही मुटूच नेसतात व त्याच्याच एका पदराचा कासोटा कसतात. त्या आणखी एक मुटू उत्तरीय म्हणून पांघरतात. पुराणकाळी केरळीय नारी कमरेच्यावर काही वस्त्रच घेत नसत. पण आता त्या चोळी घालतात; कधी साडीही नेसतात. तिकडच्या ललना विविध प्रकारची केशरचना करण्यात तरबेज आहेत. त्यांचे केसही मऊ, तुकतुकीत, लाब व विपुल असतात. केरळी लोकांना रंगीत कपड्यांची हौस दिसत नाही. पुरुषांप्रमाणे स्त्रियाही शुभ्र वस्त्रेच पसंत करतात.

केरळातील सगळीच राहणी साधी आहे. भात हे त्यांचे मुख्य अन्न. त्याना निजायला एक चटई पुरेशी असते. छत्रीचे



केरळी छत्री

मात्र सर्वांना फार वेड असते. तिथे बांबूचा दांडा बसविलेल्या ताडपत्री छत्र्या वापरल्या जातात.

**उद्योगधंदे** — केरळात मच्छीमारीचा धंदा तेजीत चालतो. तिथली कायले त्या दृष्टीनेही फार उपयोगी पडतात. या कामी चिनी जाळी वापरण्याची जुनी प्रथा आहे. सर्वात मोठा उद्योग नारळाचा काथ्या व त्यापासून दोरखंड वगैरे अनेक वस्तू बनविण्याचा आहे. चहाच्या व रबराच्या मळ्यांनी डोंगरी विभागातली हजारो एकर जमीन व्यापलेली आहे. काजू व वेलची याचीही लागवड बरीच होते. मात्र केरळातील मुख्य पीक म्हणजे मसाल्याचे पदार्थ. पोर्तुगीजांच्या प्रेरणेमुळे तिथले मिऱ्यांचे व नारळाचे उत्पन्न अनेक पटीनी वाढले. त्यानी तबाखूचीही लागवड सुरू केली. डचांनी मलबारी नीळ शास्त्रीय पद्धतीने विपुल प्रमाणात पिकविण्यास सुरवात केली. कपडे रंगविणे व मिठागरे चालविणे हे उद्योगही



चहाची पाने खुडणारी स्त्री – केरळ

त्यांनीच सुरू केले. याशिवाय हस्तिदंतावरचे कोरीव काम, जरीचे भरतकाम, चिनी मातीची सुदर भांडी, इ. कलाकुसरीची कामे करणारे कारागीरही केरळात आहेत.

**सण व उत्सव** — ओणम्, विषू आणि तिरु आतिरा हे केरळातल्या लोकाचे मुख्य सण आहेत. ओणम् हा एक जातिधर्मनिरपेक्ष असा राष्ट्रीय उत्सव असून, त्याला सहस्रकांची परपरा आहे. एका अंगाने तो महाबळीची पुण्यस्मृती म्हणून केला जातो; तर दुसऱ्या अंगाने तो ऋतूत्सवही असतो. त्या वेळी मोठ्या प्रमाणावर नौकास्पर्धा होतात. ओणम् हा स्त्री-पुरुषांचा समिश्र उत्सव असून ते एक विष्णुपर्व आहे; तर आतिरा हा स्त्रियांचा खास सण असून ते शैवपर्व आहे. उमा भगवती ही या पर्वाची देवता होय. विषू म्हणजे केरळातला वर्षपाडवा. हा आनंदोत्सव एप्रिल महिन्यात येतो. या व्यतिरिक्त केरळात शिवेली, परयुत्सव, पूरम् तालप्पिली, इ. देवोत्सव निरनिराळ्या मासातल्या विशिष्ट नक्षत्रांवर होत असतात. या प्रसंगी हत्तीवरून देवाची मिरवणूक काढतात. या उत्सवात नृत्य-गायनाला फार महत्त्व असते. भारतीय नृत्य-नाट्याचे स्वरूप मुळात धार्मिक आहे. देवतेला प्रसन्न करणे ही कल्पना त्याच्या मुळाशी असते. दक्षिणेत या कल्पनेला विशेष प्राधान्य आहे. ग्रामदेवतेच्या जत्रेतही नृत्य-नाट्य आवश्यक असते. कूटियाट्टम्, कथकळी, यात्रकळी, ओट्टम् थुळ्ळल, मोहिनी आट्टम् अशी अनेक प्रकारची नृत्यनाट्ये केरळात प्रचलित आहेत.

**शिल्प कला**— केरळातील मदिरे म्हणजे वास्तुकलेचा एक निराळाच प्रकार आहे. मोठ्या मंदिराच्या चारी दिशांना उत्तुंग गोपुरे असतात आणि त्या गोपुरावर वेगवेगळ्या पशूंची चित्रे दिसतात. माणसांचीही चित्रे असतात; पण ती विचित्र



केरळातील एक मंदिर

आकाराची व चमत्कारिक तोंडावळ्याची. तिथली काही मदिरे चौकोनी, तर काही वाटोळी असतात. गाभारा मात्र नेहमी चौकोनीच असतो. काही मंदिरे खूपच प्रशस्त असून, त्यांच्या सभोवती काळ्या दगडांचा प्रदक्षिणामार्ग बांधलेला असतो. त्यानंतर विस्तीर्ण प्राकार व भोवती उंच तट असतो. मध्यभागी असलेल्या मुख्य मंदिराला श्रीकोविल म्हणतात. त्याच्या समोर एक दगडी चौथरा (बलिकलपुरा) असतो. त्यावर धातूचा ध्वजस्तंभ उभारलेला असतो.

नेपाळातील मंदिराप्रमाणे केरळातील काही मंदिरांची छपरे लाकडी व दुपाखी आढळतात. दुसरा प्रकार वक्राकृती छपरांचा. त्यात शिखरे व खिडक्याही वक्र असतात. अशा शिखरांना नासाकृती म्हणतात.



पद्मनाभस्वामीचे मंदिर – त्रिवेंद्रम्

त्रिवांकुर मधील लाकडी शिल्पकाम फार प्रेक्षणीय आहे. त्रिवेंद्रम् येथील पद्मनाभस्वामीचे भव्य मंदिर म्हणजे द. भारतीय शिल्पाचे सुंदर उदाहरणच होय. त्याचे गोपुर सात मजली आहे. हे मंदिर ख्रिस्तपूर्व काळी बांधलेले आहे, असे सांगतात. या मदिराच्या प्रदक्षिणामार्गाला ३६८ स्तंभ आहेत. शुचींद्रम्च्या मंदिरातील नवरात्री मंडप व वैकोम देवालय ही केरळी शिल्पाची पराकाष्ठाच होय. सुरेख कोरीव नक्षीकाम हे त्याचे वैशिष्ट्य आहे. १६ व्या शतकापासून १९ व्या शतकापर्यंत केरळमध्ये जी चित्रकलेची जोमदार शैली विकास पावली, तिचे नमुने अनेक प्रासादांच्या व मंदिरांच्या भिंतीवर दिसून येतात. भित्तिचित्राची प्राचीन परंपरा या काळात फक्त केरळातच जोपासली गेली.

**प्रेक्षणीय स्थळे** – त्रिवेंद्रम् आणि क्विलॉन यांच्या मधोमध वरकल हे जनार्दनक्षेत्र आहे. तिथे श्रीनारायण गुरूंची समाधी आहे. समुद्रतीरावर उंच कडा असून, त्यात औषधी पाण्याचे झरे आहेत.

क्विलॉन हे अत्यंत प्राचीन बंदर असून फार पूर्वी फिनिशिया, पर्शिया, ग्रीस, रोम, अरबस्तान व चीन या देशातील व्यापारी आपली जहाजे या बंदरात नांगरीत असत. दुसरे प्राचीन बंदर म्हणजे कोच्चिन. तिथे ज्यू लोकांच्या फार जुन्या वसाहती

आहेत. हे लोक तिथे सनपूर्व ६ व्या शतकापासून आहेत, असे म्हणतात. मट्टनचेरी येथे त्यांचे एक जुने मदिर आहे. इ. स. १६ व्या शतकात इथे पोर्तुगीज दर्यावर्दी येऊन पोचले. त्यांनी



ज्यूमंदिर – मट्टनचेरी

उभारलेले सेंट फ्रासिस चर्च हे सर्वात जुने युरोपियन चर्च आहे. तिथे वास्को–द–गामाचे थडगेही आहे.

अल्वाये नदीच्या तीरावरील कालटी हे शंकराचार्यांचे जन्मस्थान आहे. तिथे आचार्यांचे मंदिर आहे.

कोडंगल्लुर (क्रंगनोर) हे केरळातले सर्वात जुने बदर होय. तिथेच प्रथम परदेशी व्यापाऱ्यांची जहाजे लागली. चेर राजवशाची राजधानी तिथेच होती. याच नगरात भारतातली सर्वात जुनी मशीद आहे. तिथली तिरुवंचिक्कुलम् व भगवती ही मदिरे दर्शनीय आहेत.

कालिकत ( कोझिकोड ) ही झामोरिनची राजधानी. तिची स्थापना इ. स. १०४२ मध्ये झाली. इ. स. १४८७ मध्ये पहिला पोर्तुगीज खलाशी कोविलहो तिथे येऊनं उतरला, असे म्हणतात.

केरळाचा सांस्कृतिक इतिहास उज्ज्वल आहे. या प्रदेशातील संस्कृत आणि मलयाळम् साहित्य समृद्धआहे. केरळात संस्कृत-साहित्याची परंपरा १८ व्या शतकापर्यंत अप्रतिहत चालू होती. शंकराचार्य, मल्पथुर नारायणभट्टतिरी, शक्तिभद्र, लीलाशुक, कुलशेखर, उद्दण्डशास्त्री, कक्कश्शेरी भट्टतिरी, इ. अनेक सस्कृत पंडितांचे वेदान्त, व्याकरण, तंत्र आयुर्वेद, ज्योतिष, इ. विषयांवरील ग्रंथ उपलब्ध आहेत. मीमांसाविषयक ग्रंथही पुष्कळ आहेत. [ कै. सा. द.; रं. ऐ. को. व्हॉ.; हि. के.; संस्कृति; सो. चें. म.; द्र. के. आ. त्रा.; केरळ ]

**केरळमाहात्म्य** एक संस्कृत ग्रथ. केरळात परशुरामाने नवीन वसाहत स्थापन केली व त्यामुळे तिथे परशुराम क्षेत्र निर्माण झाले, त्याची कथा यात दिली आहे. [ सो. चें. म. ]

**केरार वीर** भारताच्या वायव्येकडील प्रदेशातील केरार या गावाचा एक पिशाचदेव. आज ज्या ठिकाणी जौनपूरचा किल्ला आहे, त्या ठिकाणी तो राहत असे आणि तिथून लोकांना उपद्रव देत असे. रामाने त्याला ठार मारले, असे सांगतात. मेल्यानंतर तो पिशाच बनला व त्या भागातले लोक त्याला भजू लागले. [ फो. लो. नॉ. इं. ]

**केरेय पद्मरस** वीरशैव साहित्याचा एक आचार्य. वीरशैव संप्रदायाचा याने खूप प्रचार केला. वीरशैव पंथाच्या तत्त्वांचे प्रतिपादन करणारा दीक्षाबोधे नामक एक ग्रंथ याने लिहिला आहे. [ वैजयंती भा. वर्णेकर – राष्ट्रभारती, सप्टें. १९५७ ]

**केलझर** विदर्भातील एक क्षेत्र. येथे एका किल्ल्यात गणपतीचे प्राचीन मदिर आहे. किल्ल्याच्या एका लहान दरवाज्यावर निरनिराळ्या देवताच्या मूर्ती खोदलेल्या आहेत. तसेच किल्ल्यात काही जैन मूर्तीही कोरलेल्या आहेत. प्राचीन साहित्यात याला चक्रनगर असे म्हटलेले आहे. [ ख. वै. ]

**केलसी** द. कर्नाटकातील नापितांची जात. ज्या जातीच्या लोकांचे ते श्मश्रुकर्म करतात, त्या जातीवरून किंवा ते जी भाषा बोलतात, तिच्यावरून त्याना अनेक नावे पडली आहेत. उदा० तुळू केलसी किंवा भंडारी, कोकणी केलसी किंवा म्हालो, हिंदुस्थानी केलसी किंवा हजाम, लिंगायत केलसी व नापिळ्ळ. या सर्वात तुळू केलसींची संख्या जास्त आहे. जर उच्चवर्णीय नापिताने खालच्या वर्णाच्या माणसाचे श्मश्रुकर्म केले, तर तो जातिभ्रष्ट होतो आणि पुन्हा जातीत येण्यासाठी त्याला दंड भरावा लागतो किंवा प्रायश्चित्त घ्यावे लागते.

काही शूद्रांच्या घरी तुळू केलसी हे पुरोहिताचे काम करतात. बारशाच्या दिवशी तो त्याच्या मुलाच्या कमरेभोवती दोरा बांधतो व माणूस मेल्यावर स्मशानात अग्नीही तोच घेऊन जातो. मृताच्या अस्थी गोळा करण्याचे कामही तोच करतो.

आपल्या प्रथम पूर्वजाविषयी हे लोक पुढील आख्यायिका सांगतात—

शंकर जेव्हा ब्रह्मचारी होता, तेव्हा तो जटा वाढवीत असे.

पुढे त्याचे लग्न ठरले. तेव्हा आपल्या वधूला आपली वाढलेली दाढी व जटा आवडणार नाहीत, असे वाटून त्याने आपली श्मश्रू करण्यासाठी एका नापिताची उत्पत्ती केली.

काही नापित उपजीविकेसाठी शेतीचाही जोडधंदा करतात. ते कधीही उपाशी राहणार नाहीत, असा परशुरामाने त्याना वर दिलेला असल्याचे सागतात.

मुलाचे लग्न सोळा ते पंचवीस वयाच्या दरम्यान होते. मुलीचे ती वयात येण्यापूर्वी किंवा नंतरही होते. मुलीचे देज घेण्याची पद्धत आहे. दोन निरनिराळ्या बळीतील किंवा देवकांतील विवाहसंबंधच कायदेशीर मानला जातो. लग्न वधूच्या घरी होते व लग्नसमारंभ तीन दिवस चालतो.

एखाद्याचा मृत्यू झाल्यास लगेच नापिताला बोलावणे धाडतात. तो प्रेतावर पाणी शिपडतो व पुरुष असल्यास त्याला वस्तऱ्याने स्पर्श करतो. श्रीमंत लोक प्रेते जाळतात व गरीब लोक पुरतात. सासर्गिक रोगाने मेलेल्याला मात्र पुरतात.

उडुपीचा कृष्ण हे केलसीचे आराध्य दैवत आहे. कृष्णाची पूजाअर्चा करणाऱ्या संन्याशाला हे फार मान देतात. जात आणि धर्म यांच्या संबंधात विवाद उत्पन्न झाल्यास, या संन्याशाचे आदेश प्रमाण मानतात. केलसी भुताखेतांना फार भितात व त्यांना संतुष्ट करण्यासाठी कोबड्या-बकऱ्यांचा बळी देतात.

जातीचा कारभार ग्रामपंचायतीमार्फत चालतो. दंडाची रक्कम उडुपीच्या देवस्थानात जमा होते.

तुळू केलसी अलिय संतानम् (पैतृक) ही वारसापद्धती चालवितात. भूताल पांड्य नामक एका राजाने ही वारसापद्धती त्याना स्वीकारायला लावली, अशी पारंपरिक कथा आहे. [का. ट्रा. स. इं ]

**केवट** एक जात. यांची वस्ती उ. प्रदेश, बिहार, मध्य प्रदेश व ओडिसा या भागात आहे. हे स्वतःला प्राचीन कैवर्ताचे वंशज मानतात. हे लोक शेतीवर उपजीविका करतात. भेदिया, बिल्व, जोक, खोट्टिआ, कैवर्त अथवा दास, लियारी, चुडीटिया, दोस्सा, इ. केवट जातीचे पोटविभाग आहेत. नागो, मागो, कोचिपो, इ. त्यांची गोत्रे आहेत.

मध्य प्रदेशात लडिया व उडिया असे केवटांचे दोन मुख्य वर्ग आहेत. यांचा व ढीमरांचा निकट संबंध आहे. छत्तीसगढातील ढीमर होड्या चालवीत नाहीत व केवट शिगाडे पेरीत नाहीत. रामाने वनवासाला जाताना आपल्या हातचे पाणी पिऊन आपल्याला शिगाडे पेरण्याची मनाई केली, असे हे सांगतात. ब्राह्मणांनी यांच्या हातचे पाणी पिण्यात दोष मानू नये, म्हणून ही गोष्ट निर्माण केलेली असावी. तूमा, करसयाल, भलवा, घूघू, इ. यांच्यांत देवके आहेत. समान देवकात विवाह निषिद्ध आहे. आते-मामे भावंडांच्या लग्नाचाही निषेध आहे.

**विवाहप्रथा**— मुलीची लग्ने लहान वयात करतात. लहानपणी मुलीला वर मिळाला नाही, तर जो कोणी लग्नाचा खर्च सोशील, त्याला मुलगी द्यायची अशी यांच्यांत पूर्वी चाल होती. संबलपूर भागात मुलीचे लग्न फुलाबरोबर लावतात. बिहारमधल्या केवटात वधूपेक्षा वर उच असला पाहिजे, असा सकेत आहे. मग तो वयाने लहान असला तरी चालेल. हे लोक लग्नासाठी एक स्तंभ उभारतात व वधू-वरांना त्या स्तंभाला प्रदक्षिणा घालायला लावतात. नवरामुलगा वधूचा भांग काढतो व तिला पदर घालतो. वधूच्या बोटाचे थोडे रक्त काढून ते तादुळांवर टाकणे व ते तादूळ वधू-वरांनी खाणे, अशी चाल बंगालमधल्या केवटात आहे.

**देव-धर्म**—केवट लोक काली, भगवती व नौका यांना भजतात. कालीला बकरे बळी देतात. यांच्या होड्याचे रक्षण करणारी चौरासी देवी नावाची एक देवता आहे. हे लोक धार्मिक कृत्यासाठी सर्वारिया ब्राह्मणांना बोलावतात. हे त्रैवर्णिकांच्या हातची पक्की रसोई खातात.

**मर्तिकप्रथा**— प्रेताचे पाय दक्षिणेकडे करून ते पुरतात. प्रेताशेजारी तीळ, कापूस व मीठ ठेवतात. कोणत्याही सोमवारी किंवा शनिवारी पितरांसाठी कोबडा बळी देतात. **पाहा**– कैवर्त [ म. ज्ञा. को. ].

**केवडा** केतकी पाहा.

**केवडात्रिज** एक व्रत. भाद्र० शु. ३ येस गुजराती स्त्रिया हे व्रत करतात. या दिवशी त्या शकराची पूजा करून फलाहारावर राहतात. संध्याकाळी केवडात्रिजची कहाणी ऐकतात व रात्री जागरण करतात. महाराष्ट्रातील हरितालिकाव्रताप्रमाणेच हे व्रत आहे. [ सुरत गॅझे. ]

**केवडेश्वर** इंदूरपासून १२ मैलांवरचे एक क्षेत्र. इथूनच क्षिप्रा नदीचा उगम होतो. इथे एका गुहेत केवडेश्वर देवाची मूर्ती असून, तिच्यावर सदैव थेंब थेंब पाणी पडत असते. तिथेच जवळ क्षिप्रेच्या उगमाचे कुंड आहे. सोमवती अमावास्येला इथे यात्रा जमते. [ कल्याण-तीर्थांक ]

**केवलानंद सरस्वती** (१८७७-१९५५ इ. स.) महाराष्ट्रातील वाई येथील प्राज्ञ पाठशाळेचे संस्थापक, थोर आचार्य व तपस्वी. पूर्वाश्रमीचे नाव नारायण

सदाशिव मराठे. कुलाबा जिल्ह्यातील सुडकोली गावी यांचा जन्म झाला. त्यांचे वडील सदाशिवपंत हे रत्नागिरी जिल्ह्यातील पडेल गावचे राहणारे होते; पण पुढे ते गाव सोडून त्यांनी सुडकोली येथे वास्तव्य केले.

पाच मुलगे व एक मुलगी अशी एकूण या दांपत्याची सहा अपत्ये होती. त्यातले नारायणशास्त्री हे सर्वांत धाकटे होत. लहानपणापासूनच ते हुशार व तरतरीत होते. त्यांचे प्राथमिक शिक्षण व नित्यकर्म शिक्षण हे सगळे घरीच झाले. दहाव्या-अकराव्या वर्षी अलिबागला श्री. केशवशास्त्री देव यांच्याकडे त्यांना संस्कृताच्या अध्ययनासाठी पाठविण्यात आले. तिथे ते मधुकरी मागून जेवत पण देवशास्त्र्यांकडे अध्ययनापेक्षा घरकामातच वेळ जाऊ लागल्यामुळे देवांच्या समोर नव्याने राहायला आलेले दामोदरशास्त्री लोंढे यांच्याकडे ते अध्ययनासाठी गेले. लोंढेशास्त्र्यांकडे व्युत्पत्ती व थोडी सिद्धांतकौमुदी एवढे त्यांचे अध्ययन झाले. तिथेच ते गाणेही शिकले. कीर्तन करण्यासाठी म्हणून त्यांनी तीस–पस्तीस आख्याने पूर्वरंगासह पाठ केली. पण तेवढ्याने त्यांचे समाधान होईना. म्हणून ते तिथून निघाले व मिरजेला आले. तिथे श्री. विष्णुशास्त्री देवधर यांच्याकडे पाचसहा महिने अध्ययन झाल्यावर मिरजेला प्लेग सुरू झाला, म्हणून ते वाईला गेले.

वाईला पोचल्यावर मात्र नारायणशास्त्र्यांच्या उच्च अभ्यासक्रमाला व जीवनक्रमालाही सुरवात झाली. विष्णुशास्त्री करंदीकर यांच्याकडे ते व्याकरण पढले. विष्णुशास्त्री मेणवलीकर यांच्याकडे त्यांनी षडंगसहित वेदाचे अध्ययन केले. यजुर्वेदाचे अध्ययन त्यांनी बाळभटजी तात्या रानडे या घनपाठी वैदिकाकडे केले. त्यांचे न्यायशास्त्राचे अध्ययन बाळशास्त्री डेंगवेकरांकडे झाले. यानंतरचे नारायणशास्त्र्यांचे गुरू म्हणजे प्रज्ञानंद सरस्वती स्वामी हे होत. प्रस्थानत्रयीचे पाठ त्यांनी यांच्याकडे घेतले व प्रज्ञानंद सरस्वतींच्या निर्याणानंतर वाईत प्रस्थानत्रयीवर नित्य प्रवचन करण्याचाही परिपाठ ठेवला.

नारायणशास्त्र्यांना लाभलेली ही गुरुपरंपरा पांडित्यापेक्षा आध्यात्मिक निष्ठेला अधिक महत्त्व देणारी होती. अपरिग्रहवृत्ती, तप, ध्यान व तत्त्वचिंतन यांत आयुष्य व्यतीत करून परमार्थाची साधना करणे, हा त्या परंपरेचा ध्येयवाद होता. पण नारायणशास्त्र्यांचे वैशिष्ट्य हे, की त्यांनी त्या परंपरेला अध्यापनाचीही जोड दिली. विद्यार्थ्याने गुरूची सेवा करीत अध्ययन करावे या विद्यार्थीधर्माबरोबरच गुरूने विद्यार्थ्याची पित्याप्रमाणे काळजी घेऊन, त्याच्या योगक्षेमाला हातभार लावावा आणि त्याच्या दैनंदिन जीवनक्रमावरही गुरूची देखरेख राहावी, अशा आचार्यधर्माचा १९०१ सालापासून त्यांनी अंगिकार केला. प्रथम त्यांच्याजवळ तीन–चारच विद्यार्थी शिकत होते. पुढे हळूहळू ही संख्या वाढू लागली.



स्वामी केवलानंद सरस्वती

नारायणशास्त्र्यांनी प्राचीन परंपरेला धरून शिक्षणपद्धती आखली होती; पण तिच्यातली दोषस्थळे मात्र वगळली होती. प्राचीन पद्धतीत पाठांतराला फार महत्त्व दिलेले असे, ते त्यांनी निवडक संस्कृत वाङ्मयापुरते मर्यादित केले. जुन्या शास्त्रीपंडितांच्या शिक्षणात इतिहास, भूगोल, इ. व्यावहारिक शिक्षणाचा व नव्या गद्याचा समावेश नव्हता, तो त्यांनी आपल्या शिक्षणपद्धतीत केला. देशकालानुरूप विचार करणारे व्यवहारज्ञ शास्त्री व धर्मोपदेशक तयार करणे, हे त्यांच्या पाठशाळेच्या शिक्षणपद्धतीचे ध्येय होते. या आपल्या शाळेला त्यांनी आपल्या गुरूच्या–प्रज्ञानंदस्वामींच्या–नावावरून प्राज्ञमठ असे नाव दिले.

पुढे या प्राज्ञमठाचे प्राज्ञपाठशाळेत रूपांतर झाले. ती एक संस्था निर्माण झाली. १९२०–२१ च्या असहकारितेच्या चळवळीच्या वेळी सरकारी संस्था सोडून अनेक विद्यार्थी प्राज्ञपाठशाळेत दाखल झाले. या विद्यार्थ्यांतून राष्ट्रभक्तीने भारलेले धर्म-शिक्षक व धर्मप्रचारक निर्माण करण्यासाठी नारायणशास्त्री व त्यांचे सहकारी यांनी आपल्या आयुष्यातील ऐन उमेदीची वर्षे खर्च केली.

धार्मिक व सामाजिक सुधारणेचा पुरस्कार करणाऱ्या विचारवंतांचे केंद्र म्हणून प्राज्ञपाठशाळेने नारायणशास्त्री यांच्या मार्गदर्शनाखाली प्रथमपासूनच महत्त्वाची कामगिरी केली आहे. भारतात व महाराष्ट्रात भरलेल्या अनेक पंडित-परिषदा, ब्राह्मणपरिषदा व हिंदुधर्मपरिषदा यांचे वैचारिक नेतृत्व नारायणशास्त्री व त्यांचे शिष्य यांनी प्रभावीपणे केले आहे. १९२६ साली खानदेशात सोनगीर येथे एक पंडितपरिषद भरली होती. सर्वश्री कुर्तकोटी, गोकुलनाथ महाराज, भारती कृष्णतीर्थ हे निरनिराळ्या पीठांचे आचार्य तिथे उपस्थित होते. या वेळी पंडितांचे दोन पक्ष पडले. प. लक्ष्मणशास्त्री द्रविड, राजेश्वरशास्त्री द्रविड, अनंतकृष्णशास्त्री, काशीशेष-व्येंकटाचलशास्त्री, इ. पंडित स्मृत्युक्त धर्मशास्त्रात व चालू रूढीत कसलाही फेरबदल न करता हिंदूंनी सामाजिक व धार्मिक आचार चालवावे, या मताचे होते; तर नारायणशास्त्री व त्यांचे शिष्य या बाबतीत परिवर्तनवादी होते. म. म. श्रीधर-शास्त्री पाठक, गीतावाचस्पती सदाशिवशास्त्री भिडे, विद्या-निधी सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, इ. पंडितांचा त्यांना पाठिंबा होता. परिवर्तनवादी पक्षाने मुख्यतः पुढील सिद्धान्त मांडले होते—

(१) देशकालपरिस्थितीप्रमाणे निरनिराळ्या युगात धर्माचे स्वरूप बदलत आले आहे. मूलभूत तत्त्वे बदलत नाहीत. त्यांचे नवे संशोधन होते. त्या मूलभूत नैतिक तत्त्वांच्या अनुसार वेळोवेळी परिस्थितीला धरून आचारांचे नियमन आणि संस्कारांचा विधी ठरविला जातो.

(२) ऐतिहासिक दृष्टीने धर्मशास्त्राचा व धर्मग्रंथांचा अर्थ लावणे योग्य आहे. वेद हे पौरुषेय आहेत. स्मृती व पुराणे यांच्यामध्ये वेळोवेळी परिवर्तने झाली आहेत.

(३) धर्मभ्रष्टांचे शुद्धीकरण धर्मशास्त्रात प्रत्यक्ष विहित नसले तरी केले पाहिजे. देवल स्मृतीत त्याला काहीसा आधार मिळतो.

(४) ब्राह्मण व शूद्र या दोनच वर्णांचे कलियुगात किंवा वर्तमानकालात अस्तित्व आहे, असे मत अनादरणीय होय. चारही वर्ण म्हणजे क्षत्रिय व वैश्यसुद्धा अस्तित्वात आहेत. ज्या क्षत्रिय-वैश्यात संस्कारलोप झाला आहे, त्यांचा व्रात्य-संस्कार करून त्यांचे उपनयनादी संस्कार करावे.

(५) युरोपादी परदेशात जाऊन आलेल्या कोणत्याही वर्णातील हिंदूचा बहिष्कार करू नये.

पुढे आपल्या धर्मपरिवर्तनाच्या विचारसरणीला पोषक असे धर्मशास्त्राचे स्वरूप मांडता यावे, या मुख्य उद्देशाने नारायण-शास्त्र्यांनी धर्मशास्त्रसंग्रह किंवा धर्मकोश करण्याचे योजिले. कोशाची आर्थिक बाजू सांभाळण्याचे आश्वासन श्री. वामनराव नाईक यांनी त्यांना दिले होते.

नारायणशास्त्री यांचा धार्मिक व सामाजिक सुधारणेच्या बाबतीतला वरील दृष्टिकोण मध्यम किंवा सौम्य आहे. अकोला येथे १९२७ साली भरलेल्या ब्राह्मणपरिषदेच्या अध्यक्षपदा-वरून त्यांनी असे उद्घोषित केले, की ब्राह्मण म्हणवून घेणाऱ्या



स्वामींचे निवासस्थान – वाई

सर्व पोटजातींचा परस्पर अन्नोदकव्यवहार व विवाहसंबंध व्हावा. सर्व जाती समान आहेत, असेही त्यांनी प्रतिपादन केले. वेदोक्त प्रश्नांच्या बाबतीत त्यांनी असा निर्णय घेतला, की महाराष्ट्रातले मराठे, माळी वगैरे लोक हे खरेखुरे क्षत्रिय असून त्यांचे वेदोक्त संस्कार अवश्यमेव व्हायला पाहिजेत.

नारायणशास्त्री यांनी २२ ऑक्टोबर १९३१ रोजी संन्यास दीक्षा घेतली. त्यांचा संन्यासाचा संकल्प वयाच्या २३ व्या वर्षीच झाला होता. या चतुर्थाश्रमात त्यांनी केवलानंद सरस्वती हे नाव धारण केले. संन्यास घेण्याच्या आधी त्यांनी प्राज्ञपाठशाळेशी असलेला आपला संबंध तोडून टाकला. संन्यास घेतल्यानंतरही त्यांचे अध्ययन-अध्यापन चालूच राहिले; पण या कालात त्यांनी लेखनावर अधिक भर दिला.

१९३३ साली म. गांधींनी येरवडा तुरुंगात अस्पृश्यता-निवारणाच्या चळवळीवर विचारविनिमय करण्यासाठी भारतातील संस्कृत पंडितांना पाचारण केले होते. त्या वेळी स्वामी केवलानंद सरस्वतींनी म. गांधींच्या मताला पुष्टी दिली. त्यानंतर स्वामींच्या नेतृत्वाखाली धर्मनिर्णयमंडळ ही संस्था स्थापन झाली. या मंडळाचे पहिले नाव तत्त्वनिष्ठ परिवर्तन-वादी परिषद असे होते. या मंडळाने धार्मिक व सामाजिक सुधारणेच्या बाबतीत मोठी भरीव कामगिरी केली आहे. या

मंडळाच्या वतीने होणाऱ्या संस्कारांचे प्रयोग मुख्यत्वे नारायण शास्त्र्यांनीच तयार केले आहेत.

वैशाख शु. पंचमी शके १८७३ (दि. ११–५–५१) या दिवशी सौराष्ट्रातील प्रभासपट्टण क्षेत्रात श्रीसोमनाथाची पुनः प्रतिष्ठा करण्याचे ठरले होते. या प्रतिष्ठापनेचे नेतृत्व स्वामी केवलानंद व तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्याकडे सोपविलेले होते. हे प्रतिष्ठापनेचे काम स्वामींनी तर्कतीर्थांच्या हस्ते यथासांग, यथाशास्त्र, दहा दहा तास स्वतः उभे राहून व आलेल्या सर्व वैदिकांची व विद्वानाची चोख व्यवस्था ठेवून उत्तम रीतीने पार पाडले.

स्वामींनी यावज्जीव स्वदेशी व्रताचे पालन केले. प्रतिदिन विश्रांतीच्या वेळी ते सूत कातीत व त्याचेच कपडे वापरीत. स्वामींनी आपले सर्व आयुष्य अध्ययन, अध्यापन, विद्याव्यासंग, तपःस्वाध्याय, ध्यान, धारणा, समाधी व ईश्वरभक्ती यांत व्यतीत केले. प्रसिद्धीची यत्किंचितही अभिलाषा न धरता, वाईसारख्या गावात राहून त्यांनी डोंगराएवढे कार्य केले. विद्याव्यासंगात निमग्न असूनही ते समाजापासून अलग राहिले नाहीत सामाजिक सुधारणांचा त्यांनी योग्य तो पुरस्कारच केला. प्राज्ञपाठशाळेचे स्वयंपाकघर अस्पृश्याला दाखविण्यासाठी नेणारा, विधवावपनाचा विकल्प सांगणारा, अखिल हिंदूंना वेदाधिकार देऊन, सर्व हिंदूत सांस्कृतिक साम्य उत्पन्न व्हावे असे म्हणणारा, पोटजाती मोडून जातीचे जंजाल कमी करायला सांगणारा व कर्त्या शिष्यांची परंपरा निर्माण करणारा असा हा ऋषी महाराष्ट्राच्या सामाजिक क्रांतीचा द्रष्टा होता, असे म्हटल्यास त्यात अतिशयोक्ती होणार नाही.

आ. विनोबांनी या ऋषितुल्य माहात्म्याबद्दल लिहिले आहे, ते असे—

'स्वामींनी सारे जीवन जनसेवेला वाहिले, धर्मकोशाचे कार्य आरंभिले, सुधारणेला चालना दिली. हे सगळे त्यांचे कार्य मोठे आहे; पण त्याहीपेक्षा मोठे आहे त्याचे अंतरंग. शत्रू आणि मित्र, उदासीन आणि मध्यस्थ, परके आणि सख्ख, सर्वांना समान लेखणारे हृदय, ही जीवनातली मोठ्यात मोठी कमाई. ती त्यांनी सिद्ध केली. अशाच्या शुभसंकल्पाने जगात विविध कार्ये होत असतात. त्यांच्या स्थूल देहाकडून घडलेली कार्ये मोजत बसणे आंधळेपणाचे लक्षण होईल.'

स्वामींनी अभ्यासपूर्वक अनेक ग्रंथ लिहिले असून, त्यांची नावे पुढीलप्रमाणे आहेत– (१) मीमांसादर्शनम् – संशोधनपूर्वक तयार केलेली आवृत्ती. अकारादी वर्णानुक्रमे पदसूची, सूत्रसूची व अधिकरणसंज्ञांची चर्चा. (२) अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (३) ऐतरेयविषयसूची (४) कौषीतकी ब्राह्मणाची विषयसूची (५) तैत्तिरीयमंत्रसूची (६) तैत्तिरीय शाखेची विषयसूची (७) सत्याषाढसूत्रविषयसूची (८) अद्वैतवेदान्तकोश (९) मीमांसाकोश. [ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी–श्रीस्वामीकेवलानंद अभिनंदन ग्रंथ, १९५२ ]

**केवली** जैन दर्शनात विशुद्धतम ज्ञानाला केवलज्ञान म्हणतात. मोहनीय, ज्ञानावरण, दर्शनावरण व अंतराय ही चार प्रकारची कर्मे केवलज्ञानाला प्रतिबंधक असतात. त्यांचा क्षय झाल्यावर केवलज्ञानाचा उदय होतो. सर्वद्रव्य व सर्वपर्याय हा केवलज्ञानाचा विषय आहे (तत्त्वार्थसूत्र १·३०). याचे तात्पर्य असे की केवलज्ञान झालेल्या पुरुषाला कोणती वस्तू किंवा कोणता पर्याय यांचे ज्ञान नसते असे नाही. केवल ज्ञानात आत्म्याच्या ज्ञानशक्तीचा पूर्णतम विकास किंवा आविर्भाव होत असतो. याचा उदय होताच मती, श्रुती, इ. अपूर्णतायुक्त ज्ञाने कायमची नष्ट होतात व हे एकमेव ज्ञान शिल्लक राहते म्हणून त्याला केवलज्ञान असे म्हणतात.

हे केवलज्ञान ज्याला होते त्याला केवली म्हणतात. केवलीचे लक्षण पुढीलप्रमाणे केलेले आहे—

**कसिणं केवलकप्पं, लोगं जाणंति तह य पासंति ।**
**केवलिचरित्तनाणी, तम्हा ते केवली होंति ।।**

(आव. नि.)

अर्थ– सपूर्ण, केवलतुल्य अशा पंचास्तिकायात्मक लोकाला जे विशेषरूपाने जाणतात व सामान्यरूपाने पाहतात, ते केवल ज्ञानवान लोक केवली होत.

केवलीचे सयोगकेवली व अयोगकेवली असे दोन भेद आहेत—

**सयोगकेवली**— ज्ञानावरण, दर्शनावरण व अंतराय या तीन घातिया कर्मांचा नाश करून क्षीणकषाय झालेल्या मुनीला सयोगकेवली म्हणतात. त्यालाच जिन, जीवन्मुक्त, अर्हत, इ. अन्य नावे आहेत. तीर्थंकर हे सयोगकेवलीची अवस्था प्राप्त करून घेऊन जैन धर्माचे प्रवर्तन करतात. सयोगकेवली हा आपले आयुष्य एका मुहूर्ताहून कमी उरले आहे, असे समजताच सर्व व्यापार बंद करून ध्यानस्थ होतो.

**अयोगकेवली**— जेव्हा केवली ध्यानस्थ होऊन मन, वचन आणि देहव्यापार बद करतो तेव्हा त्याला अयोगकेवली म्हणतात. अयोगकेवली हा शिल्लक उरलेल्या चार अघातिया कर्मांचेही ध्यानाग्नीने भस्म करून सर्व बंधांतून सुटतो व मोक्ष मिळवितो.

याशिवाय केवलीचे भवस्थ केवली, सिद्ध केवली, श्रुत केवली. अर्हत केवली असे आणखीही प्रकार मानलेले आहेत. [ जैनधर्म अभि. रा.; हिं. वि. को.]

**केवली गौ** वेदात विश्वाला जन्म देणाऱ्या मूलशक्तीची कल्पना गायीच्या रूपात केलेली असून, तिला अदिती, कामदुघा, केवली, विश्वधाया, सुरभी, इ. कित्येक नावानी निर्दिष्ट केले आहे. [पृ. पु.]

**केवुटो** ओडिसामधील गंजम जिल्ह्यातील कोळ्यांची एक जात. बंगालमधील कैवर्त कोळ्यांचे हे वंशज आहेत. यापैकी काही लोक व्यापारही करतात. भेट्टिय, बिल्व, जोंक, खोट्टिअ, कैवर्त, लियारी, चुडितिय व ठोस्स या त्यांच्या पोट-जाती आहेत. यापैकी ठोस्स हे शेतकरी असून, लियारी हे लाह्या व चुडितिय हे पोहे भाजण्याचा व्यवसाय करतात. धंदा बदलल्यामुळे हे आपली जातही वेगळीच मानतात.

ओडिया ब्राह्मण व बैरागी हे या लोकांचे पौरोहित्य करतात. मूल जन्मल्यानतर पाचव्या दिवसापासून एकवीस दिवस-पर्यंत ओडिया ब्राह्मण त्यांच्या घरात भागवतपुराण वाचतात आणि शेवटच्या दिवशी मुलाचे नाव ठेवतात. विवाहित स्त्रिया व विधवा बाहेर जाताना तोंडावर बुरखा घेतात.

लग्नविधी रात्रीचा होतो व त्या वेळी वधूपिता वराच्या गळयात सोन्याचा मणी बांधतो.

हे लोक दसराज व गंगादेवी यांना भजतात. दसऱ्याला दसराजाची पूजा करतात. [का. ट्रा. स. इं.]

**केशप्रसाधन** शरीराच्या वेगवेगळ्या भागी उगवणाऱ्या रोमांना वेगवेगळी नावे आहेत. ‘ कचः केशः शिरोरुहः ’ (अमर) = डोक्यावर उगवणाऱ्या रोमांना केस म्हणतात. सहिता व ब्राह्मणे यांत केसांचा उल्लेख वारंवार आलेला आहे. आर्य लोक केसांची विशेष काळजी घेत असत. केसाची चांगली वाढ व्हावी म्हणून अथर्ववेदात अनेक मंत्रही दिलेले आहेत (६. १३६; ६. १३७; ५. १९. ३). त्या काळी पुरुषाने लांब केस ठेवले, तर तो स्त्रीलंपट आहे, असे समजत असत.

जगातील सर्व धर्मांत केशविषयक काही ना काही संकेत रूढ आहेत. केसांची लाबी व त्यांचे वळण या गोष्टी माण-साचा स्वभाव दर्शवितात, असे काहीजण मानतात. सॅमसनचे केस त्याच्या बळाचे निदर्शक होते, असे समजत. ग्रीक लोक केसांमध्ये आयुष्य असते, असे मानतात.

केसाच्या जादूच्या गोष्टी लोकसाहित्यात पुष्कळ आढळतात. प्राचीन लोक आपले केस शत्रूच्या हाती पडू नयेत म्हणून फार दक्षता घेत. लहान मुलांवर केसांच्या जादूचा परिणाम लवकर होतो अशी समजूत आहे. म्हणून काही जाती–जमातीत लहान मुलांचे केस बरीच वर्षेपर्यंत कापीत नाहीत. नवसाच्या मुलाचे केस नवस फेडीपर्यंत न कापण्याची चाल जगात सर्वत्र आहे.

बऱ्याच प्रदेशांत मुलाचे जावळ एखाद्या देवस्थानात जाऊन काढण्याची प्रथा आहे. लहान मूल आजारी पडल्यास एखाद्या वेळी तसा नवसही करतात. काही ठिकाणी कापलेले केस केळीच्या पानात गुंडाळून पाण्यात सोडतात. केस वाहून गेले, की दुखणेही वाहून जाते, अशी समजूत आहे. काही ठिकाणी लाब केसांची देवाला चवरी करण्याचीही पद्धत आहे.


प्रवेणी केशरचना – अमरावती

प्राचीन काळापासून स्त्रिया व पुरुष वेगवेगळ्या तऱ्हेची केशरचना करीत आलेले आहेत. सिधू नदीच्या खोऱ्यातील पुरुष आपले केस कपाळापासून उलटे मागे फिरवून पाठी-वर नेत आणि ते कापून आखूड करीत किंवा वाटोळे गुंडाळून त्यांना गाठ मारीत. स्त्रिया मात्र आपले केस पाठीवर मोकळे सोडीत.

प्राचीन काळी केसांच्या वेणीबंधाला कपर्द म्हणत. वेदकाळी पुरुषही केसांची वेणी घालीत किंवा बुचडा बाधीत, असे दिसते. ऋग्वेदात रुद्र व पूषा हे कपर्दधारी असल्याचे सांगितले आहे (१ ११४.१; ६.५५.२). वसिष्ठ कुळातले लोक आपला कपर्द डोक्याच्या उजव्या अंगाला बांधीत. म्हणून त्यांना ‘ दक्षिणत-स्कपर्दाः ’ म्हटले आहे ( ऋ. ७.३३.१ ). तत्कालीन स्त्रिया कपर्दरचनेत कुशल होत्या. त्या कित्येकदा आपल्या केसाचे चार कपर्द बांधीत. ऋग्वेदात अशा ‘ चतुष्कपर्दा ’ युवतीचा उल्लेख आहे ( १०. ११४. ३ ). वाज. सहितेत सिनीवाली देवीला ‘ सुकपर्दा ’ म्हटले आहे (११. ५६).

सूत्रांमध्ये केशरचनेच्या अनेक पद्धती सांगितल्या आहेत. या पद्धती निरनिराळ्या घराण्यांत निरनिराळ्या असाव्या, असे दिसते. आश्व. गृह्यसूत्रात चूडाकरण विधीचे वर्णन करताना सागितले आहे, की मुलगा आपली केशरचना आपल्या कुळातील चालीला अनुसरून करीत असे. निरनिराळ्या घराण्यात चालू असलेल्या विविध केशरचनापद्धतींची उदाहरणे देताना काठक गृह्यसूत्र सांगते, की अत्री आणि काश्यप यांचे वशज डोक्याच्या दोन्ही अगाना वेण्या घालतात. अगिरसाचे वंशज केसांना पाच निरनिराळ्या गाठी मारतात. भृगूचे वंशज डोक्यावरील केस साफ काढून टाकतात व काहीजण शेंडी ठेवून तिला गाठ मारतात.

सूत्रकालात अशा निरनिराळ्या केशरचना अस्तित्वात होत्या, तरी त्या काळात शिखा ठेवून तिला गाठ मारण्याची प्रथा विशेपत्वाने चालू झाली होती. हे झाले पुरुषांचे. स्त्रिया विशेषत: मुली केसाचे दोन पेड करून डोक्याच्या दोन्ही बाजूना सोडीत.

केसांची मनोहर रचना करणे व ती शृंगारणे, या गोष्टींना रामायणकालात बरेच महत्त्व होते असे दिसते. सुंदर व कुरळ्या केसांचे त्या काळात लोकांना आकर्षण वाटे. नितंबापर्यंत नागिणीप्रमाणे रुळणारी एक वेणी हा त्या काळातील स्त्रियांच्या केश-सौदर्याचा आदर्श होता (नील-नागाभया वेण्या जघनं गतयैकया । वा. रा. ५. १५. २४). केश-शृंगाराची उपेक्षा ही चिंता किंवा क्रोध यांची सूचक मानली जाई (एकवेणीधरा दीना त्वयि चिन्ता-परायणा। वा. रा. ५. ६५. १४). प्रोषितभर्तृका स्त्रिया केशप्रसाधन करीत नसत. रावणाने सीतेचे अपहरण केले, त्या दिवसापासून तो तिची सुटका होईपर्यंत सीतेने आपले केस विंचरले नव्हते. लंकेत हनुमान जेव्हा सीतेला भेटला, तेव्हा त्याने तिला आश्वासन दिले, ते असे–



पुष्पमाला व मुक्तामाला यांनी सुशोभित कबरीबंध – अमरावती

**अचिरान्मोक्ष्यते सीते देवि ते जघनं गताम् ।**
**धृतामेकां बहून् मासान् वेणीं रामो महाबल: ।।**

(वा. रा. ६.३३.३१)

अर्थ – नितंबापर्यंत रुळणारी व अनेक महिने बांधून ठेवलेली तुझी एक वेणी हे देवी सीते, महापराक्रमी रामचंद्र लवकरच येऊन सोडील.

पुढील काळात कालिदासानेही या एकवेणीचा अनेकवार उल्लेख केला आहे. मारीचाश्रमातील शकुंतलेचे वर्णन त्याने धृतैकवेणी असेच केले आहे.

रामायणकालीन पुरुष आपले केस कापीत नसत; तर ते त्यांची वलये करून ती मस्तकी धारण करीत. राम व लक्ष्मण यांनी वनात जाताना तापसवेष धारण केला, त्या वेळी त्यांनी आपले केस कापले नाहीत; तर न्यग्रोधवृक्षाचा चीक लावून त्यांच्या जटा बांधल्या. वनातून परत आल्यावर रामचंद्राने जटा सोडून केसांना पुन्हा पूर्वीचे वळण दिले. त्या काळचे ब्राह्मण शिखा ठेवीत व राजकुमार किशोरावस्थेत काकपक्ष (दोन्ही कानांवर झुलपे) धारण करीत. तपस्वी व तपस्विनी आपल्या मस्तकावर जटा धारण करीत व त्या बांधून ठेवीत.

अमरावतीच्या शिल्पात स्त्रियांच्या वेणीचे अनेक प्रकार दिसतात. केसांची वेणी घालून किंवा निराळ्या प्रकारे त्यांची रचना करून व त्याच्यावर रत्नाचे सर लोंबते ठेवून, ते खाली नितंबापर्यंत रुळविणे, याला प्रवेणी असे नाव होते. प्रवेणीच्या अग्रभागी सोन्याच्या वाटीत मोती जडवून त्यांचा गोंडा लोंबवीत असत.



अवतंसकासारखी केशरचना – अमरावती

केशपाश हा केशरचनेचा एक निराळा प्रकार होता. त्यात केसांची रचना फासासारखी करीत. काही वेळा केस पुढे वळवून मस्तकाजवळ हा पाश बांधीत. केशपाशावर फुलांची माळ गुंडाळण्याची प्रथा होती.

कबरीबंध हा केशपाशाहून आणखी एक वेगळा प्रकार होता. यात केस वाटोळे वर वळवून घेत. धम्मिल या प्रकारात केस मुकुटासारखे मस्तकावर उभे बांधीत व त्याच्या भोवती फुलाच्या किंवा रत्नांच्या माळा गुंडाळीत. शिखंड या प्रकारात केसांना अंड्याच्या आकाराची लांबट गाठ देत. ही पद्धत विशेषत: मुलांच्यासाठी असे.

प्राचीन काळी स्त्रिया व पुरुष केसांची विशेष निगा ठेवीत असत. लांब, काळेभोर व मृदू अशा केसांची वाङ्मयात प्रशंसा केलेली आढळते. केस काळे व मृदू होण्यासाठी आवळ्याचे चूर्ण व अगुरुधूप यांचा उपयोग करीत. केस सुगंधित करण्याचीही त्या काळी चाल होती. ग्रीष्मकाळात केसांना सुगंधी तेल लावीत व थंडीच्या दिवसात कालागुरूचा किंवा धूपाचा धूर देऊन केस सुगंधित करीत. वसंत ऋतूत सुगंधी फुलांना तोटा नसतो. नवमल्लिकेची एखादी माला किंवा लाल अशोकपुष्पांचा एखादा तुरा ते काम सहजपणे पार पाडी.



धम्मिल केशरचना

कोणत्या स्त्रियांनी कशी केशरचना करावी याविषयी

भरताने नाटयशास्त्रात पुढील नियम दिले आहेत– मुनिकन्यांची भूमिका घेणाऱ्यांनी एकच वेणी घालावी. विद्याधरीचे किंवा यक्ष स्त्रियांचे केस मस्तकाभोवती फिरवून, फणा उभारून बसलेल्या सापाच्या आकाराप्रमाणे बांधावे किंवा यक्ष स्त्रियाचे केस मोकळे सोडावे. भारतवर्षातील स्त्रियांची केशरचना निरनिराळ्या प्रदेशातील पद्धतीना अनुसरून करावी. उदा० गोपीच्या दोन वेण्या घालाव्या. गौड देशातील स्त्रियाचे केस कुरळे करावे. पूर्वेकडील व उत्तरेकडील स्त्रिया आपले कपाळावरील केस कापून, बाकीचे केस उलटे फिरवीत असल्यामुळे या स्त्रियांची भूमिका करणाऱ्यांनी त्याना अनुरूप अशी केशरचना करावी. अवंतीकडील स्त्रिया शेपूट सुटलेला अंबाडा घालीत व दक्षिणेकडील स्त्रिया वेणीचा गाडा घालून कपाळावर केसांची चापून पट्टी करीत. पट्टी करताना केस खाली आणून वर न्यावे लागतात. म्हणून त्याच्या केशरचनेला आवर्तललाटकम् हे विशेषण लावलेले आहे.

पुरुषांनी आपले केस कसे ठेवावेत, याविषयीही भरताने थोडी माहिती दिली आहे – विद्याधर, सिद्ध, दीक्षित, मुनी व वानर यांनी आपल्या जटा डोक्यावर वर्तुळाकार फिरवून म्हणजे त्यांना वेढे देऊन त्यांचे मुकुट तयार करावे. एखाद्या मनुष्याने प्रतिज्ञा केली असेल, तर ती पुरी होण्यापूर्वी त्याने आपल्या शिखेला गाठ मारू नये; तर ती मोकळी सोडावी. मुलांच्या व चेटांच्या डोक्यावर तीन ठिकाणी केस ठेवावे.



जटाजूटसदृश केशरचना – राजघाट

डॉ. वासुदेवशरण अग्रवाल यांनी काशी येथील राजघाटावर मिळालेल्या खेळण्यांचे संशोधन केले आहे. यातील बहुताश खेळणी गुप्तयुगातील आहेत. या खेळण्यात काही स्त्रीमस्तके आहेत. ऐतिहासिक कलात्मक दृष्टीने ही स्त्रीमस्तके महत्त्वाची आहेत. केशरचना हे या स्त्रीमस्तकांचे वैशिष्टय आहे. केशरचनेच्या दृष्टीने डॉ. अग्रवाल यांनी त्यांचे पुढीलप्रमाणे वर्गीकरण केले आहे –

(१) कुरळे केस – कुरळ्या केसांना संस्कृतात अलक असे नाव आहे. गुप्तकालात केस कुरळे करायची विशेष चाल होती, असे दिसते. कालिदासाच्या केशवर्णनात अलकरचनेचा वारवार उल्लेख येतो. बाणभट्टाच्या ग्रथातही अलकावलीचे वर्णन अनेकवार आले आहे.

अमरकोशात अलकांचे वर्णन 'अलकाश्चूर्णकुन्तला:' असे केले आहे. केस कुरळे करण्यासाठी चूर्णाचा उपयोग केला जात असे, हे त्यावरून कळते. केशर, कापूर, इ. पदार्थांचे सुगंधी चूर्ण लावून केस कुरळे करीत असत.

कालिदासाने रघुवशात इंदुमतीच्या केसांचे वर्णन करताना अलकाचे स्पष्ट वर्णन केले आहे –

**कुसुमोत्खचितान् वलीभृत–**
**श्चलयन् भृङ्गरुचस्तवालकान् ।**
**करभोरु करोति मारुत–**
**स्त्वदुपावर्तनशङ्कि मे मन. ।।**

(८.५३)

अर्थ – हे करभोरू, फुलानी वेष्टिलेले कुरळे व भ्रमराप्रमाणे वर्ण असलेले तुझे केस वाऱ्याने हलू लागले म्हणजे तू पुन्हा जिवंत होशील, असे माझ्या मनाला वाटू लागते.

गुप्तकालीन कवीनी अलकाचे वर्णन मुक्ताजालग्रथित असे केले आहे. गुप्तकालातील चित्रात व शिल्पात मस्तकाची सजावट मोत्यांचे घोस व सर लोंबवून केलेली आढळते.



मौलिबंध केशरचना – प्रकार २ रा

या कुरळ्या केसांचेही काही प्रकार राजघाटावरील खेळण्यात दृष्टीला पडतात, ते असे–

(अ) शुद्ध कुरळे केस – भांगाच्या दोन्ही बाजूना केसाच्या वलयदार बटा समांतर सोडलेल्या असतात.

(आ) छत्रीच्या आकाराचे वेल्लित केस – मस्तकावर कुरळ्या केसांच्या वलयाची अर्धगोलाकार रचना. मस्तकाच्या

दोन्ही बाजूना ती वलये खाली सोडलेली असतात. ही केशरचना उघडलेल्या छत्रीसारखी दिसते.



छत्रीच्या आकाराचे वेल्लित केस – राजघाट

(इ) चटुल कुरळे केस– भांगात एक अलंकार घालून तो सजविलेला असतो. बाकीची रचना शुद्ध कुरळ्या केसांच्या वलयाप्रमाणे असते. हल्ली या प्रसाधनाला सिरबोर असे म्हणतात.

(ई) पाटीच्या आकाराचे कुरळे केस– भांगाच्या दोन्ही बाजूना प्रथम साधे केस आडवे विंचरलेले असतात व त्यापुढे वलये सुरू होऊन ती कानांच्या खालपर्यंत पोचतात.

(२) वक्र पाटीप्रमाणे केशरचना – भांगाच्या दोन्ही बाजूंना केस सरळ कानापर्यंत खाली विंचरून मग ते उलटून



पाटीच्या आकाराचे कुरळे केस – राजघाट

त्याची वलये बनवितात. कालिदासाने मोराच्या पिसाऱ्याशी ज्या केशरचनेची तुलना केली आहे, ती हीच असावी.

(३) चूडापाश–केसांचा भांग पाडून केस सरळ खाली विंचरतात व डोक्याच्या मागच्या बाजूला त्यांचा अंबाडा बांधतात.

(४) मधुपटल किंवा क्षौद्रपटल विन्यास – भांगाच्या दोन्ही बाजूंना मधाच्या पोळ्याप्रमाणे जाळीदार केशरचना. प्राचीन



वक्र पाटीप्रमाणे केशरचना – राजघाट

रोमसाम्राज्यात ही रचना स्त्रियाना अत्यंत प्रिय होती. गुप्त-कालीन स्त्रियांतही या रचनेचा बराच प्रचार होता.

(५) बटांची केशरचना– यात केसांच्या बटा खाली खांद्यापर्यंत सोडलेल्या असतात.

(६) ओढणी घेतलेली रचना– यात केशरचना कुठल्याही



ओढणी घेतलेली केशरचना – राजघाट

प्रकारची असते व तिच्यावरून डोक्यावर एक ओढणी घेतलेली असते. त्यामुळे मस्तकावरचे पुढचे थोडेच केस दिसतात.

(७) मौली– यात केसांचा जूडा बाधतात व भोवती फुलाची माला बांधतात. मौलीच्या आतही फुलांची माला गुफलेली असते. कालिदासाने मुक्तागुणोन्नद्ध अतर्गतस्रज मौलीचा उल्लेख केला आहे. काही चित्रात मधे एक व दोन्ही बाजूना दोन असा त्रिमौलिविन्यास दिसतो. अजंटा येथील



त्रिविभक्त मौलिविन्यास – राजघाट

काही चित्रात स्त्रियांच्या मस्तकावर एक मोठा जूडा बांधलेला दिसतो. त्याला धम्मिल असे नाव आहे. काही वेळा स्त्रीमस्तकावर मध्यभागी शृंगाटक किवा शिंगाडयाप्रमाणे त्रिमौली रचना केलेली दिसते. भांगाच्या मध्यभागी शिरोमणी असतो व दोन्ही बाजूंना बटांची वलये सोडलेली असतात. याशिवाय मस्तकावर गोल टोपीप्रमाणे मौलिबंध व त्याच्या दोन्ही बाजूंना त्यातून निसटलेल्या दोन फुलांच्या माळा अशीही एक केशरचना आढळते.



शृंगाटकाकार त्रिमौली केशरचना – राजघाट

या व अशाच प्रकारच्या अनेक केशरचना गुप्तकालात स्त्रियांमध्ये प्रचलित होत्या.

केशप्रसाधनाच्या हजारो शैली आजवर अस्तित्वात होत्या व अद्यापही नव्यानव्या केशरचनांचा स्त्रियामध्ये प्रचार होत आहे. आजकाल लहान मुली बहुधा दोन वेण्या घालतात व स्त्रिया जूडा बांधतात किवा तत्सदृश एखादी केशरचना करतात. द. भारतात वेणीवर किंवा अंबाड्यावर फुले माळण्याचा जास्त प्रघात आहे. फुलांचा शृंगार न केलेली केशरचना तिकडे क्वचितच दिसते. तिथल्या स्त्रियांनी केशरचनेची एक कला बनविली आहे. [ वै. सा स.; क. हि. वा. पु., इं. वे. क. सू.; रा स.; भ. ना.; अ. स्क. म. ग. म्यु.–सी. शिवराम मूर्ती; प्रा. भा. क. वि.; प्रा. भा. प्र.; राजघाटके खिलौनोका एक अध्ययन–डॉ. वासुदेवशरण अग्रवाल–कला और संस्कृति ]

**केशर** एक सुवासिक द्रव्य. याला कुंकुम असेही नाव आहे. केशराचे झाड लहान असते. याचे कंद असतात व ते जमिनीत चार इंच खणून लावतात. एका जागी साधारणपणे दहा वर्षे केशराची लागवड करता येते. त्यानंतर आठ– दहा वर्षे त्यात गहू, यव, इ. अन्य पिके काढतात व पुन्हा केशराची लागवड करतात. जुलै महिन्यात कंद लावल्यावर ऑक्टोबर महिन्यात त्याला फुले येतात. फुले अगदी जमिनीसपाट लागतात. फुलाचा रग जाभळा असतो. प्रत्येक फुलात काळसर लाल रंगाचे तीन केसर असतात. हे केसर म्हणजेच केशर होय. ते फुलांतून काढून उन्हात सुकवितात. याला मोग्रा केशर असे म्हणतात. हेच शुद्ध केशर होय. याला मधुर सुवास असतो.

काश्मीरातले पांपूर हे केशराच्या मळ्याचे मोठे ठिकाण होय केशराचा हंगाम असतो, तेव्हा किसान स्त्रिया या पांपुराविषयी पुढील गीत गातात—

**कुंग पोश पाम्पोर गछवइ वेसिए**<br>
**गछवइ वेसिए कुंग पोश पाम्पोर**<br>
**कुंग पोश दिल म्योंन तम्बलावान**<br>
**गछवइ वेसिए कुंग पोश पाम्पोर**

अर्थ––हे सखी, चल, आपण केशरपुष्पांची भूमी पापूर इथे जाऊ या. केशराच्या फुलांनी माझ्या हृदयात अस्वस्थता निर्माण केली आहे. तर चल, आपण केशरभूमी असलेल्या पांपुराला जाऊ.

केशराचा सुंदर रंग पाहून किसान त्याची प्रशंसा करताना म्हणतो––

**सन हचु, प्रज़लान वारि मंज़ कुंग पोश**<br>
**लग्यो परि हा कुंग पोश**<br>
**चोंग हचु प्रज़लान जुन पछल अन्दर**<br>
**लग्यो परि हा कुंग पोश**

**कइम चे दितनई रंग हा कुंग पोश**
**रंग हा ग्रेस्तयो खुदायम दितनम**

अर्थ–– हे केशराच्या फुला, माझ्या शेतात तू सोन्याप्रमाणे चमकत आहेस. मी माझे तन, मन, धन तुला अर्पण करीन. या शुक्ल पक्षात तू एखाद्या दिव्याप्रमाणे प्रकाशत आहेस. मी माझे तन मन तुला अर्पण करीन. हे केशरपुष्पा, तुला हा रंग कोणी बहाल केला ? माझे तनमन मी तुला अर्पण करीन. (त्यावर केशर म्हणते) हे किसान, परमेश्वराने मला हा रंग दिला आहे.

कल्हणाने आपल्या राजतरंगिणीत केशराच्या उत्पत्तीविषयी एक कथा सांगितली आहे, ती अशी––

पदमपुर ( हल्लीचे पांपुर ) नगरात एक प्रसिद्ध वैद्य राहत होता. एक दिवस तिथल्या नागांचा राजा आजारी पडला व त्याच्याकडे उपचारासाठी गेला. वैद्याने त्याला बरे केले. त्याबद्दल कृतज्ञता म्हणून नागराजाने वैद्याला केशराचा एक कंद दिला. त्याची लागवड करूनच हळूहळू पापुर हे केशरासाठी प्रसिद्धीला आले.


केशराचे रोप

काश्मीरवर हिंदू राजे राज्य करीत होते, तेव्हा केशरापासून त्यांना पुष्कळ उत्पन्न मिळत होते. पण पुढे हळूहळू केशराची पैदास कमी होऊ लागली. मोगल राजांनी मग केशराची लागवड करण्याविषयी शेतकऱ्यांना प्रोत्साहन दिले. पठाणांच्या कारकीर्दीत पुन्हा केशराचे उत्पन्न कमी झाले. दुष्काळी व अस्थिर परिस्थितीत भुकेल्या लोकानी केशराचे कदच खाऊन टाकले. पुढे डोगरा राजा रणवीरसिंह याने केशराचे महत्त्व ओळखून किश्तवारहून काही कंद पांपुर येथे आणविले व त्यांची लागवड करविली.

प्राचीन काळापासून केशराला फार महत्त्व आहे. काश्मीरचे हिंदू राजे आपल्या मुकुटात केशराचे फूल खोवीत. राजकुमारी ते आपल्या वेणीत माळीत आणि शीतलतेसाठी केशराची उटी अगाला लावीत. आजही फाल्गुन महिन्यात लहान मुलांचा शीतळशिमगा साजरा करतात, त्या वेळी त्याच्या अंगाला केशराची उटी लावतात व केशरी रंगाने रंगविलेले झबले त्यांच्या अंगात घालतात. प्राचीन काळी रंगपंचमीला एकमेकांच्या अंगावर रंग उडवीत तो केशरापासूनच तयार करीत असत.

मंदिरातून देवाला केशराची उटी व केशरी गंध लावण्याची प्रथा आहे.

पक्वान्नात केशराचा उपयोग करतात. वैद्य लोक औषधासाठीही केशर वापरतात. [ म. का.; म. ज्ञा. को.; बेला फुले आधी रात – देवेंद्र सत्यार्थी ]

**केशरियाजी** उदयपूरहून सुमारे चाळीस मैलांवर हे क्षेत्र आहे. केशरियाजी म्हणजे जैनांचा आद्य तीर्थकर ऋषभदेवच होय. या क्षेत्रात त्याचे विशाल मदिर आहे. त्याला अठ्ठेचाळीस उंच उंच शिखरे आहेत. सभोवती कोट आहे. मंदिरात सुमारे चार हात उंचीची पद्मासन घालून बसलेली केशरियाजीची मूर्ती आहे. या मूर्तीला केशरलेपन करण्याची प्रथा आहे. सारी मूर्तीच केशरलिप्त करीत असल्यामुळे तिला केशरियाजी असे नाव मिळाले आहे. श्वेतांबर जैन या मूर्तीला सिंदुर वाहतात व अंगरखा आणि मुकुटही घालतात. दिगंबर व श्वेतांबर असे उभयपंथी जैन केशरियाजीची पूजा करतात. [ जै. ध. ]


केशरियाजी

**केशलोच** केस उपटून काढण्याला हे नाव आहे. जैन साधू स्वतःचे केस उपटून काढतात, त्या विधीला केशलोच म्हणतात. ‘स च नियमेन वीरमहापद्मयोस्तीर्थकृतोर्धर्मः’ = केशलोच हा महावीर व पद्मप्रभ या तीर्थकरांचा नियत धर्म होय, असे स्थानांगसूत्रात म्हटले आहे. जैन मुनींच्या २८ मूळ गुणांत केशलोच हा प्रकार येतो. बौद्ध साधूंप्रमाणेच जैन साधूनाही वस्तरा जवळ ठेवण्याचा निषेध आहे. त्यासाठी कमीतकमी दोन व जास्तीत जास्त चार महिन्यांनी जैन साधू आपल्या शिरावरचे केस हाताने उपटून काढतात. या विधीचे जैन संस्कृतीत मोठे माहात्म्य सांगितले आहे. या वेळी त्या केशलोच

करणाऱ्या मुनीचे भक्त व शिष्य तिथे गोळा होतात. केशलोच हे एक कठिण तप मानलेले आहे. [ हिं. वि. को.; पा. वा. ते. भि. र.; अभि. रा. ]

**केशव** (१) (१४७८ इ. स. च्या आधीचा) एक ज्योतिष-शास्त्रज्ञ. हा भारद्वाज गोत्री, औदीच्य ब्राह्मण होता. याने विवाहवृंदावन व करणकंठीरव असे दोन ग्रंथ लिहिले आहेत. पहिला उपलब्ध आहे; दुसरा अनुपलब्ध. [भा.ज्यो. इ.]

(२) ग्रहलाघवकार गणेश दैवज्ञ याचा पिता. हाही मोठा ज्योतिषशास्त्रज्ञ होता. ग्रहकौतुक हा त्याचा करणग्रथ आहे. मुंबईच्या दक्षिणेस वीस कोसांवर असलेले समुद्रतीरावरचे नांदगाव हे याचे राहण्याचे ठिकाण होय. याचे गोत्र कौशिक होते. वैजनाथ या गुरूकडे त्याने विद्या मिळविली. जातकपद्धती व ताजकपद्धती हे त्याचे ग्रंथ सांप्रत प्रसिद्ध आहेत. ते केशवी या नावाने ओळखले जातात. मुहूर्ततत्त्व हाही ग्रथ याचाच आहे. हा ग्रहांचे वेध घेत असे. याने आपण घेतलेल्या वेधाची हकीगत ग्रहकौतुक या ग्रंथावरील स्वकृत टीकेत लिहून ठेवलेली आहे. वेधशास्त्रात याची योग्यता फार मोठी होती, असे श्री. दीक्षित मानतात. [ भा. ज्यो. इ. ]

(३) नामदेवाचा एक शिष्य. हा तारापूरचा राहणारा महाराष्ट्रीय वारकरी होता. नामदेवाने याला पंजाबात धर्मप्रसारासाठी पाठविले होते. हा प्रथम शरीराने कुबडा होता, पण नामदेवाने याला घूमान (पंजाब) येथील जथोरा नामक तळचात स्नान करायला लावून त्याचे कुबड घालविले. याने पंजाबातील भावलपुरात एक मोठे रुग्णालय काढले होते. याने तिथे स्थापिलेल्या पीठाला केशवकलधरकी गद्दी असे म्हणतात. [ म. च. को. ]

(४) (१८ वे शतक) मध्वनाथाचा शिष्य. याने एकनाथाचे चरित्र लिहिले आहे. [ म. च. को. ]

**केशवकाश्मीरी** (इ. स. १३ वे शतक) वैष्णव संप्रदायातला एक प्रकांडपंडित असे सांगतात, की वादविवादाच्या बाबतीत याने तीन वेळा दिग्विजय केला होता आणि त्यामुळे याला दिग्विजयी अशी पदवी मिळाली होती. बहुत काल काश्मीरमध्ये वास्तव्य झाल्याकारणाने हा काश्मीरी या नावाने विख्यात झाला. तत्त्वप्रकाशिका, कौस्तुभप्रभा, प्रकाशिका, भागवतटीका, क्रमदीपिका हे याचे ग्रंथ असून भागवत संप्रदायाची ती अतुलनीय ज्ञानसंपदा मानली जाते.

मथुरेत नारदटीला या टेकडीवर याची समाधी आहे. ज्येष्ठ शु. ४ थीस याचा तिथे जन्मोत्सव करतात. [ भा. सं. ]

**केशवचैतन्य** (१५२४-१५७२ इ. स. ) एक मराठी सत कवी. याचा जन्म पुण्यात झाला. मूळ नाव विश्वनाथ. याचा थोरला भाऊ त्रिंबक हा मुसलमानांच्या सेवेत होता. त्याने याच्यावर बऱ्याच आपत्ती आणल्या. त्या त्रासाला कटाळून हा सकुटुंब त्र्यंबकेश्वरी जाण्यास निघाला. वाटेत ओतूर या गावी राघवचैतन्य या स्वामीचे दर्शन घेऊन याने त्याना स्वत.ला सन्यासदीक्षा देण्याबद्दल प्रार्थिले. पण स्वामी म्हणाले, की 'पुत्रसंतती झाल्यावाचून तुला संन्यास घेता येणार नाही.' पुढे त्याला मुलगा झाला व तो तेरा वर्षाचा होताच याने सन्यास घेतला. केशवचैतन्य हे याचे सन्यासाश्रमातले नाव होय.

केशवचैतन्याने भक्तिप्रकाश, गीताभागवतसार, परमार्थ-विचार, इ. ग्रंथ लिहिले आहेत. ओतूर येथेच याने समाधी घेतली. तुकाराम महाराजाना स्वप्नात उपदेश करणारा गुरू केशवचैतन्य हाच होय.

**केशवदास** (१) (१५५५ इ. स. चा सुमार) एक हिंदी कवी. सूरदास आणि तुलसीदास याच्या मागोमाग कवी म्हणून याचेच नाव घेतले जाते. याचा जन्म बुदेलखडात वेत्रवतीच्या तीरावर वसलेल्या ओरछा नगरात झाला. हा सनाढ्य ब्राह्मण होता. याच्या पित्याचे नाव काशीनाथ असे होते. केशवदासाच्या बाल्यकालासंबधी काहीच माहिती उपलब्ध नाही. त्याच्या काव्याच्या अत:साक्षीवरून तो गृहस्थ होता व त्याला मुलेबाळेही होती, एवढी माहिती मिळू शकते केशवदासाला मिळालेला राजाश्रय वशपरंपरागत होता. ओरछाचा राजा महाराज राजसिंह याचा कनिष्ठ बंधु इद्रजितसिंह हा केशवदासाविषयी विशेष आदर बाळगीत होता. इंद्रजित-सिंह हा अकबराचे एक लाख रुपये देणे लागत होता. पण याने बिरबलाच्या मध्यस्थीने ते देणे माफ करून घेतले. ओरछाच्या दरबारात नृत्य, सगीत, काव्य, इ. कलांची मोठी चलती होती. तिथे कलावंतांची नेहमीच वर्दळ असायची. केशवदासाने त्या राज्यात अमाप सुख भोगले व त्याबरोबरच उदड कीर्तीही मिळवली

केशवदास हा उत्तम संस्कृतज्ञ होता. प्रतिभेचे देणे त्याला बाळपणापासूनच लाभले होते. त्याने रसिकप्रिया नावाचा ग्रंथ इद्रजितसिंह महाराजाच्या इच्छेवरूनच लिहिला. या ग्रंथाचे सोळा प्रकाश असून, त्यात शृगाराचे व नायक-नायिकांचे भेदोपभेद वर्णिले आहेत.

इंद्रजिताच्या खालोखाल वीरसिहदेव हा ओरछा नरेशाचाच बंधू त्याचा आश्रयदाता होता. केशवदासाने त्याचे वीरसिंह-

देवचरित या नावाने समग्र चरित्र लिहिले आहे.

रामचंद्रिका हा याचा आणखी एक प्रसिद्ध ग्रंथ होय. त्या काळातली ही एक प्रसिद्ध कृती मानतात. हा ग्रंथ तुलसीदासाच्या सांगण्यावरून कवीने लिहिला, अशी आख्यायिका आहे. रामचरित्रावरचे हे एक महाकाव्य आहे. या महाकाव्याच्या निर्मितीसाठी त्याने अनर्घराघव, प्रसन्नराघव, हनुमन्नाटक, वाल्मीकिरामायण, इ. ग्रंथांचा आधार घेतलेला आहे. वैष्णव संप्रदायातल्या रामभक्तिशाखेच्या साधकात केशवदासाचे स्थान फार मोठे मानले जाते, ते याच ग्रंथामुळे. त्याच्या या रामचंद्रिकेत उच्चतम जीवन आणि अध्यात्म याचा ठायी ठायी साक्षात्कार घडतो. या ग्रंथातला एकच उतारा द्यायचा, तर तो सीता आणि तिच्या सख्या याच्या बहारदार वर्णनाचा देता येईल. तो असा—

**को है दमयंती इंदुमती, रति रात दिन,**
**होहि न छबीली छन छबि जो सिंगारिये ।**
**केशव लजात जलजात जातवेद ओप,**
**जातरूप बापुरो विरूप सो निहारिये ॥**
**मदन निरुपम निरूपत निरूप भयो,**
**चन्द बहुरूप अनुरूप कै बिचारिये ।**
**सीताजूके रूपपर देवता कुरूप को है,**
**रूप ही के रूपक तो बारि बारि डारिये ॥**

अर्थ— नलपत्नी दमयंती, अजपत्नी इंदुमती व कामपत्नी रती, तसेच विद्युत्सुंदरी यांना जरी कितीही शृंगारले, तरी त्या सीतेइतक्या सुंदर दिसणार नाहीत. केशवदास म्हणतो, सीतेपुढे कमल व सूर्य यांचीही कांती लाजते. बिचारे सुवर्ण तर हिच्यापुढे कुरूपच ठरते ज्याच्या सौदर्याला उपमाच देता येत नाही, अशा मदनाच्या सौदर्याचे निरूपण केले, तरी तोसुद्धा रूपहीन वाटू लागतो. सीतेला चंद्रमुखी म्हणावे, तर अनेकरूपी चंद्राचीही तिच्याशी तुलना करता येत नाही. सीतेच्या रूपापुढे देवतांचे रूपही कुरूप ठरते. सौदर्याची जेवढी म्हणून उपमाने आहेत तेवढी सगळी सीतेवरून ओवाळून टाकावी.

एकूण १६ ग्रंथाचे कर्तृत्व केशवदासाकडे जाते. हे १६ ग्रंथ पुढीलप्रमाणे— (१) रसिकप्रिया (२) नखशिख (३) कविप्रिया (४) रामचंद्रिका (५) वीरसिंहदेवचरित (६) रतन–बावनी (७) विज्ञानगीता (८) जहाँगीर जस-चंद्रिका (९) जैमुनिकी कथा (१०) हनुमानजन्मलीला (११) बालिचरित्र (१२) आनन्दलहरी (१३) रसललित (१४) कृष्णलीला (१५) अमी घूंट (१६) रामालंकृतमंजरी.

केशवदासाला हिंदी काव्यशास्त्राचा प्रवर्तक मानतात. [ क. कौ.; रा. भ. शा.; भा. का. शा. प. ]

(२) (१५५३-१६४० इ. स. ) राजस्थानातला एक कवी. हा गाडण शाखेचा चारण होता व चिडिया या गावी राहत होता. हा गृहस्थ असूनही काषाय वस्त्रे परिधान करीत असे. याने डिंगल भाषेत काव्यरचना केलेली आहे. गुणरूपक, राव अमरसिहजी रा दूहा व विवेकवार्ता हे त्याचे तीन काव्यग्रंथ प्रसिद्ध आहेत. या सर्वात गुणरूपक हा ग्रंथ मोठा आहे. यात जोधपूरचा महाराजा गजसिंह याच्या राज्यवैभवाचे व त्याने केलेल्या अनेक युद्धांचे वर्णन आहे. १००० छंदांत त्याने हा ग्रंथ समाप्त केलेला आहे. राव अमरसिंहजी रा दूहा या ग्रंथात नागौरच्या अमरसिंहाच्या वीरतेचे वर्णन असून, विवेकवार्ता या ग्रंथात वेदांताचे निरूपण आहे. [रा. भा. औ. सा]

## केशवदास जैन

(१८ वे शतक) एक जैन कवी. खरतरगच्छाचे मुनी लावण्यरत्न यांचा हा शिष्य असून, याचे दीक्षानाम कुशलसागर असे होते. केशव बावनी व वीरभान–उदयभान रास असे याचे दोन ग्रंथ उपलब्ध आहेत. केशव बावनी हे नीतिकाव्य असून त्यात ५७ पद्ये आहेत. दानधर्म, परोपकार, मूर्खाची लक्षणे, इ. अनेक विषय त्यात आलेले असून त्याची भाषा प्रवाही आहे. [ हिं. नी. वि. ]

## केशवपन

मस्तकावरचे आणि चेहऱ्यावरचे केस वस्तऱ्याने काढून टाकणे, याला केशवपन असे म्हणतात. केशवपनाचे दोन प्रकार आहेत. एक साधी हजामत आणि दुसरे विशिष्ट प्रसंगी केले जाणारे क्षौर. वपनात वस्तरा चालवताना केसांना पाणी लावायचे असते, तर क्षौरात ते लावायचे नसते. वपनाविषयी पुढील ठिकाणे आणि पुढील प्रसंग सांगितले आहेत—

**प्रयागे भास्करक्षेत्रे पितृमातृवियोगतः ।**
**आधाने सोमपाने च वपनं पञ्चसु स्मृतम् ।।**

अर्थ— प्रयागक्षेत्री, भास्कर क्षेत्रात, माता–पित्यांचा मृत्यू झाला असता, अग्न्याधानप्रसंगी व सोमपानाच्या वेळी अशा पाच प्रसंगी वपन करावे, असे सांगितले आहे.

जन्ममासात व जन्मनक्षत्रावर क्षौराचा निषेध आहे. पण राजाची आज्ञा झाल्यास, पत्नीपरिणय करायचा असता, मृताशौचात, तुरुंगातून सुटका झाल्यावर व यज्ञदीक्षेच्या प्रसंगी कुठल्याही नक्षत्रावर क्षौर करायला हरकत नसते. ब्राह्मणांनी रोहिणी, विशाखा, अनुराधा, उत्तरा, मघा व कृत्तिका या नक्षत्रांवर केशवपन करू नये, तसेच वपन केल्यावर देव–पितृतर्पण करू नये, असे सांगितले आहे. नापिताच्या घरी जाऊन क्षौर करू नये, असाही नियम आहे. क्षौरानंतर स्नान अवश्य

विहित आहे. कोणत्या वारी क्षौर केल्यास कोणते फल मिळते, त्याविषयी पुढील श्लोक आहे—

**रवौ दुःखं सुखं चन्द्रे कुजे मृत्युर्बुधे धनम् ।**
**मानं हन्ति गुरोर्वारे शुक्रे शुक्रक्षयो भवेत् ।**
**शनौ च सर्वदोषाः स्युः क्षौरमत्र विवर्जयेत् ।**

अर्थ— रविवारी क्षौर केल्यास दुःख, सोमवारी सुख, मंगळवारी मृत्यू, बुधवारी धन, गुरुवारी अपमान, शुक्रवारी शुक्रक्षय व शनिवारी सर्व दोष प्राप्त होतात. हे लक्षात घेऊन ज्या वारी वाईट फल असेल, त्या वारी क्षौर करू नये.

देवकार्य आणि पितृश्राद्ध ज्या दिवशी असेल, त्या दिवशीही क्षौर करू नये, असे तिथ्यादितत्त्वात सांगितले आहे. क्षौर करताना पुढील गोष्टीचे स्मरण करायचे असते—

**केशवमानर्तपुरं पाटलिपुत्रं पुरीमहिच्छत्राम् ।**
**दितिमदितिं च स्मरतां क्षौरविधौ भवति कल्याणम् ।।**

अर्थ— केशव, आनर्तपुर, पाटलिपुत्र, जगन्नाथपुरी, अहिच्छत्र, दिती व अदिती यांचे क्षौरकर्माच्या वेळी स्मरण केले असता कल्याण होते.

केशवपनामागची कल्पना पुढील श्लोकात व्यक्त झालेली आहे—

**यानि कानि च पापानि ब्रह्महत्यादिकानि च ।**
**केशानाश्रित्य तिष्ठन्ति तस्मात् केशान् वपाम्यहम् ।।**

अर्थ— (वपन करून घेणारा म्हणतो) जी काही ब्रह्महत्यादी पापे आहेत, ती केसांच्या आश्रयाने राहतात. म्हणून मी केसाचे वपन करतो.

**काही विधिनिषेध**—पुष्य, रेवती, अश्विनी, मृग, ज्येष्ठा, हस्त, चित्रा, स्वाती, पुनर्वसू, श्रवण, धनिष्ठा, शततारका ही नक्षत्रे हजामतीला चांगली. स्नात, भुक्त, भूषित, तैलाभ्यक्त व प्रवासाला किंवा युद्धाला निघालेला, यांनी हजामत करू नये. रात्री, सायंकाळी, नवव्या दिवशी, व्रतदिवशी, व्यतीपातादी दुष्ट योगांवर, प्रतिपदा, रिक्ता व भद्रा या तिथीस हजामत निषिद्ध आहे. पूर्वाभिमुख किंवा उत्तराभिमुख होऊन हजामत करावी. धर्मासाठी वपन कर्तव्य असता ते उजव्या कानापासून व पापनाशासाठी असता शिखेपासून सुरू करावे. नवीन संस्कार असता वपन शिखेपासून सुरू करून परत शिखेशी आणून समाप्त करावे (नि. सि ). मनू, गोभिल, बौधायन, इ. धर्मशास्त्रकारांनी हजामतीच्या विधिनिषेधाविषयी तपशीलवार लिहिले आहे. गोभिल म्हणतो, की दाढी, मिशा, नखे, मस्तकावरील केस व गुह्यांगावरील केस अवश्य काढले पाहिजेत. शिखा मात्र काढू नये.

**केशवपनाचा इतिहास**— ऋग्वेदकालापासून वपनासंबंधीचे उल्लेख मिळतात. ऋग्वेदकालात केस व दाढी वाढविणे आणि हजामत करणे, या दोन्ही प्रथा दिसतात. इंद्र हा दाढी वाढविणारा होता, तर तृत्सू व वसिष्ठ हे कधी दाढी वाढवीत, तर कधी हजामत करीत. ऋग्वेदात वप्ता म्हणजे नापित हा शब्द आढळतो; पण त्या वेळी क्षौरकर्म करणारी नापितांची स्वतंत्र जात असेल, असे वाटत नाही. कारण मुलाच्या चूडाकर्मसंस्कारात त्याच्या बापानेच मुलाचे वपन करावे, असे सांगितले आहे. तैत्तिरीय संहितेत दाढी–मिशा वाढविणे, हे पौरुषाचे चिन्ह मानलेले आहे. तथापि वेदोत्तर काळात दाढी वाढविण्याची चाल हळूहळू लोपत गेली व हजामत रूढ झाली.

सूत्रकालात वपनाला शास्त्रोक्त विधीचे रूप दिले गेले असावे, असे दिसून येते. कोणत्याही श्रौतयागास प्रारंभ करताना यजमानाने वपन करून स्नान करावे आणि नंतर यज्ञसंकल्प करावा, असे सांगितले आहे. अग्निहोत्री यजमानाने पूर्णिमा व अमावास्या या दिवशी वपन करायचे असते, म्हणून वपनाला पर्वणी असेही म्हणतात. हा वपनविधी मंत्र न म्हणताच नापिताकडून करवावा, असे सर्व सूत्रकारांनी सांगितले आहे.

सोमयागासारख्या मोठ्या यज्ञास आरंभ करताना यज्ञशाळेच्या उत्तरेस, बंदिस्त जागेत अध्वर्यूने यजमानाचे वपन करायचे असते. अध्वर्यूने समंत्रक काही केसांचे वपन केल्यानंतर उरलेले काम नापिताने करावे, असे बौधायनश्रौतसूत्रात (६·२) सांगितले आहे.

चातुर्मास्ययागात चार पर्व (= भाग) असतात. प्रत्येक पर्वाच्या शेवटी किंवा तीन पर्व झाल्यावर यजमानाचे वपन करावे, असे कात्यायन श्रौतसूत्रात (५·२·१३) म्हटले आहे. हा विधी समंत्रक असतो.

श्मश्रुकर्मात दाढी व मिशा दोन्हीचे वपन करतात. यावरून मिशा ठेवण्याची पद्धत नसावी. मस्तकावरील संपूर्ण केस काढून टाकणे उचित मानलेले दिसत नाही. शिखा म्हणजे शेंडी ठेवूनच बाकीचे केस कापावे, असे सर्व सूत्रकारांनी सांगितले आहे. बौ श्रौ. सूत्रात (२१·२) यासबंधी निरनिराळे पक्ष सांगितले आहेत. त्यावरून वपन करण्याचे भिन्न प्रकार संभवतात, ते असे— केवळ दाढी व मिशा काढून मस्तकावरील केस ठेवणे, मस्तकावरील केस अर्धवट कापणे, शेंडी राखून केस कापणे, इत्यादी. सत्याषाढ व वैखानस या सूत्रांमध्ये असा एक विकल्प आला आहे, की सर्वच केस काढून टाकावे, म्हणजे सबंध मुंडन करावे.

चरकाने लिहिले आहे, की प्रत्येक पाचव्या दिवशी हजामत करणे व नखे काढणे आवश्यक आहे. वेदोत्तरकाळात ब्राह्मणामध्ये हजामतीची पद्धत रूढ झाली. राजे व सरदार मात्र दाढी

ठेवीन असत, असे मानायला सबळ आधार आहे.

संन्यासी, बौद्ध भिक्षू व जैन श्रमण हे केसांचे मुंडन करतात. बौद्ध भिक्षुणी व जैन साध्वीही मुंडन करतात. हिंदूत विधवांच्या केशवपनाची चाल रूढ झाली ती बौद्ध–जैनांच्याकडूनच आली असावी, असे म्हणतात. **पाहा**–विधवा. [ श. क. ]

**केशवपनीय** राजसूयातर्गत एक सोमयाग. राजसूयातील मुख्य सोमयाग म्हणजे अभिषेचनीय हा होय. या यागात यजमानाला ( = राजाला ) अभिषेक करायचा असतो. यानंतर यजमानाने एक वर्ष, दीड महिना किंवा निदान बारा दिवस तरी व्रतस्थ राहायचे असते. व्रताचा कालावधी संपल्यावर सोमयाग करून वपन करायचे असते. वपना-संबंधीचा याग म्हणून या सोमयागास केशवपनीय असे नाव आहे. हा याग अतिरात्राप्रमाणे करतात. या यागाची सुरवात ज्येष्ठ महिन्याच्या पूर्णिमेस करावी, असे सांगितले आहे. **पाहा**–राजसूय.

**केशवप्रयाग** हिमालयातील एक क्षेत्र. वसुधारेपासून एक कोस खाली उतरल्यावर, अलकनंदेत सरस्वतीचा प्रवाह मिळतो, त्यालाच केशवप्रयाग म्हणतात. इथेच अलकनंदेवर एक ठेवलेली आहे, तिला भीमशिळा असे नाव आहे. ही शिळा प्रवाहावरच्या पुलाचे काम करते. शिळेजवळच दोन मोठ्या जलधारा अलकनंदेत पडतात. त्या स्थानाला मानसोद्‌भेदतीर्थ असे नाव आहे. इथेच जवळ सरस्वतीच्या तीरावर शम्याप्रासनामक तीर्थ आहे. जवळच व्यासांचा आश्रम आहे. याच आश्रमात बसून व्यासांनी महाभारत व अठरा पुराणे लिहिली, असे सांगतात. व्यासगुंफेजवळच गणेशगुंफा आहे व तिथेच जवळ मुचकुंदगुंफा आहे. श्रीकृष्णाच्या आज्ञेवरून मुचकुंदाने इथे राहून तप केल्याचे सांगतात. या क्षेत्रात जो पर्वत आहे, त्याला नरपर्वत म्हणतात. त्याच्यावरून चार जलधारा खाली वाहतात. त्यांना चतुर्वेदधारा असे म्हणतात. [ कल्याण-तीर्थांक ]

**केशवमिश्र** (१) (१३ व्या शतकाचा उत्तरार्ध) एक न्यायशास्त्रज्ञ. हा मिथिलेचा रहिवासी होता. याने तर्कभाषा नावाचा न्यायशास्त्रावरचा एक ग्रथ लिहिला आहे. [ म. च. को. ]

(२) (१६ व्या शतकाचा उत्तरार्ध) एक अलंकारशास्त्रज्ञ. हा कांगडयाच्या माणिक्यचंद्र या राजाचा आश्रित होता. याचा अलंकारशेखर नावाचा ग्रंथ असून कारिका, वृत्ती व उदाहरणे असे त्याचे तीन भाग आहेत. याशिवाय याचे आणखी सात ग्रंथ असल्याचे कळते. [ सं. सा. इ. ]

**केशवराय पाटण** राजस्थानातील एक प्राचीन क्षेत्र. हे कोटा विभागात येते. हे पूर्वी जंबूअरण्य-क्षेत्र या नावाने प्रसिद्ध होते. या स्थानाजवळून चंबळ नदी धनुष्याचा आकार घेऊन दक्षिणेकडून पूर्ववाहिनी होते. इथे चबळवर पक्के घाट बांधलेले आहेत. इथले केशवरायाचे मदिर इ. स. १६४२ साली शत्रुशल्य नावाच्या राजाने बांधले. इथले प्राचीन नगर भूमीत गडप झाले असून, सांप्रतचे नगर नवीन वसले आहे. या क्षेत्राविषयीच्या पौराणिक कथा पुढीलप्रमाणे आहेत–

पांडव अज्ञातवासासाठी विराटनगरात जातेवेळी वाटेत काही काळ इथे राहिले होते. त्यांनी इथे पाच शिवलिंगे स्थापिली. त्यांच्या इथल्या वास्तव्याची जागा यज्ञशाला या नावाने आजही दाखवितात.

रंतिदेव राजाला एके दिवशी स्वप्न पडले. तो चंबळच्या काठाकाठाने इथे आला. चंबळमध्ये शोध करता करता त्याला दोन पाषाण मिळाले. त्यावर हातोडा मारताच त्यातून केशव-राय व चारभुजा या दोन मूर्ती निघाल्या. रंतिदेवाने मग एक मंदिर बांधून त्यात त्याची स्थापना केली.

परशुरामाने क्षत्रियसंहारानंतर इथे येऊन तपश्चर्या केली. त्यामुळे हे स्थान पवित्र मानले जाऊ लागले. देव आणि ऋषीही इथे येऊन तप करू लागले. [ कल्याण-तीर्थांक ]

**केशवव्यास** (इ. स. १३ वे शतक) महानुभाव पंथातला एक ग्रंथकार. याला केशवराजसूरी असेही म्हणतात. हा नागदेवाचार्याचा शिष्य होता. याला चक्रधराचा सहवास बालपणापासूनच लाभला होता. याने महीभट्टाच्या लीळाचरित्रातील सूत्रे एकत्र करून सिद्धान्तसूत्रपाठ तयार केला. ही एकूण १६०९ सूत्रे आहेत. यांना आचार्यसूत्रे असेही म्हणतात. संप्रदायातल्या प्रत्येक माणसाला या ग्रंथाचा नित्यपाठ करावा लागतो. पुढे कित्येक वर्षांनी रामेश्वर नावाच्या ग्रंथ-काराने या सूत्रपाठाचे ११ भाग पाडले. या ग्रंथात सांप्रदायिक लोकांना उपदेश आहे. या ग्रंथावर अनेक ग्रथकारांनी स्थळ, दृष्टान्त, इ. ग्रंथरचना केलेली आहे.

केशवव्यासाचा दुसरा महत्त्वाचा ग्रंथ मूर्तिप्रकाश हा होय. यात चक्रधराचे वर्णन असून, त्याच्याविषयी बरीच माहिती दिलेली आहे. हा ग्रंथ ओवीबद्ध आहे. त्यातला एक उतारा पुढीलप्रमाणे––

ब्रह्मविद्येची कसवटी ।
पाहती सकळ शास्त्राते दळवटी ।
कीं ज्ञानरत्नाची उघडली पेटी ।
सार ग्राहकांलागी ।।
की ते परब्रह्माची निजकीर्ती ।
जीव उद्धरावया आली व्यक्ती ।
ती परवाचा ईश्वर प्रवृत्ती ।
मूर्ती जाह्ली ।।
की भरौनि नित्य सुखाचा ताठी ।
मिया ठेविली ब्रह्मरसाची वाटी ।
तै सुमने लावोनि वोठी ।
पान करितु ।।
की कारुण्यशक्ति आपण ।
निफजविले प्रेमाचे पक्वान्न ।
ते आर्ती करावे भोजन ।
आवडीपूर्वक ।।
की ते कृपेची कामधेनू ।
सर्व सुखे जिया पासुनू ।
ते ग्रंथवेषे अवतरौन ।
स्रवे षड्रसाते ।।

केशवव्यासाने सस्कृत व मराठी मिळून १५–१६ ग्रंथ लिहिल्याचे कळते. [ म. म. वा. ]

## केशवस्वामी

( समाधिकाल १६८६ इ. स. ) रामदास पंचायतनातील एक संत कवी. यांना भागानगरकर असेही म्हणत. याचे वडील मोगलाईतील कल्याणी गावचे कुलकर्णी होते. केशवस्वामीही पूर्ववयात भागानगरच्या तानशा कुत्बशा या जमीनदाराच्या पदरी कारभारी होते. काशीराजस्वामी हे यांचे गुरू होत. यांची शिष्यशाखा बरीच मोठी होती. केशवस्वामींनी व त्यांच्या शिष्यांनी मराठी भाषेची पुष्कळच सेवा केलेली आहे.

केशवस्वामी हे गृहस्थ होते, तरी ते संसारात विरक्त व निःस्पृह होते. ते आपला बराचसा काळ भगवद्‌भक्तीत सार्थकी लावीत. एकादशीचरित्र नावाचा त्यांचा एक ओवीबद्ध ग्रंथ आहे. पण त्यांची प्रसिद्धी प्रासादिक व सरस पद्यरचनेबद्दल आहे. केशवस्वामीची सुमारे ५००–६०० पदे छापलेली आहेत. त्यांच्या पदांची आणखी काही बाडे हैदराबादेत एका गृहस्थाजवळ असल्याचे सांगतात. त्यांची ३० पदे हिंदी भाषेत रचलेली आहेत. त्यांच्या हिंदीत अरबी व फारसी शब्दांचे मिश्रण आहे. त्यांच्या हिदी पद्याचा एक नमुना पुढीलप्रमाणे –

लागी हो गोविंदा से पिरती
हृदयकमल में जब जब देखूं ।
परम सुंदर परी श्याम की मूरती ।
धन सुत संपति कछु नहि आवत,
निशिदिन सुखरूप हरिगुण गावत,
आदि पुरुष हरिनंद का सुत,
निरखत नयरो डरे जमदुत ।
आनंदघन मनमोहन श्याम,
रहत केशव मोकुं मिलाया राम ।

केशवस्वामीचा गुरुभक्तीवर विशेष भर होता. गुरुभक्तीनेच ब्रह्मज्ञान प्राप्त होऊन कैवल्याचा अनुभव घडतो, अशी त्याची धारणा होती. याविषयीचे एक मराठी पद असे–

श्रवणाचे चाडे हे धरिले ।
गुरुमुखे निजबीज पेरिले ।। ध्रु० ।।
निजधैर्य नांगर धरुनी ।
भेदखुंट काढिले खणुनी ।
भक्तिज्ञानवैराग्य तिफणी ।
अतिशुद्ध केलेली मेदिनी ।। १ ।।
स्वानंदाचा वर्षला निजघन ।
परिपूर्ण पिकले चैतन्य ।
तेथे सत्व सोकारा राखण ।
कर्मपक्षी हाकितो आपण ।। २ ।।
निजबोधे पिकले शेत वो ।
स्वानंदाच्या घुमऱ्या येत वो ।
कैवल्याची राशी हे हेत हो ।
गुरुकृपे केशव घेत हो ।। ३ ।।

शेतीतील विविध प्रक्रियांचे रूपक करून वरील पद्य लिहिलेले आहे.

केशवस्वामींची समाधी हैदराबाद येथे मुसा नदीच्या तीरी आहे. तिथे जवळच एक जुनाट घर आहे. त्यात केशवस्वामी राहत होते, असे सांगतात. [ म. वा. इ. ]

## केशवादी नामे

कोणत्याही नित्यनैमित्तिक धार्मिक कर्माच्या प्रारंभी आचमन सांगितलेले आहे. या आचमनाच्या वेळी विष्णूच्या पहिल्या तीन नावांनी तीन वेळा पाणी पोटात घेतल्यानंतर विष्णूची २१ नावे उच्चारतात. ती एकूण २४ नावे अशी –

**केशवाय नमः। नारायणाय नमः। माधवाय नमः। गोविन्दाय नमः। विष्णवे नमः। मधुसूदनाय नमः। त्रिविक्रमाय नमः।**

**वामनाय नमः । श्रीधराय नमः । हृषीकेशाय नमः । पद्मनाभाय नमः। दामोदराय नमः। सङ्कर्षणाय नमः। वासुदेवाय नमः । प्रद्युम्नाय नमः । अनिरुद्धाय नमः । पुरुषोत्तमाय नमः। अधोक्षजाय नमः। नारसिंहाय नमः। अच्युताय नमः। जनार्दनाय नमः। उपेन्द्राय नमः। हरये नमः। श्रीकृष्णाय नमः।**

वरील विष्णुनामाच्या वेगवेगळ्या मूर्तीही केलेल्या आढळतात. आयुधांचा क्रम २४ प्रकारे बदलणे यापलिकडे त्या मूर्तींत कसलाही फरक नसतो. अग्निपुराण, पद्मपुराण, चतुर्वर्गचिंतामणी, रूपमंडन, इ. ग्रथांत चतुर्विंशतिमूर्तींचे वर्णन आहे. या मूर्ती पांचरात्र संप्रदायातील प्रमुख तत्त्वाची रहस्यमय प्रतीके होत, असे मानले जाते. [ डे. हि. इ. ]

**केशवीयम्** एक मलयाळम् महाकाव्य. याचा कर्ता केसी केशव पिळ्ळै हा आहे. त्याच्या नावावरूनच या काव्याला हे नाव पडले आहे. मलयाळम् महाकाव्यात याला श्रेष्ठ स्थान आहे. भागवतातली स्यमंतक मण्याची कथा हा या महाकाव्याचा विषय आहे. याचे बारा सर्ग आहेत. प्रत्येक सर्गाचे नाव त्यातील विषयानुरूप ठेवले आहे. या महाकाव्याचा आस्वाद केवळ स्वानुभवगम्य आहे, असे श्री. रत्नमयीदेवी दीक्षित सांगतात. [ कै. सा. द. ]

**केशान्त** एक पुरुषसंस्कार. हा चौलसस्काराप्रमाणे असतो. पाहा—गोदान.

**केशिराज** (इ. स. १३ वे शतक) एक जैन व्याकरणकार. याने कन्नड भाषेत शब्दमणिदर्पण नावाचे श्लोकबद्ध व्याकरण लिहिले आहे. याचे घराणेच कवीचे होते. याने आपल्या ग्रंथाचे नऊ भाग केले असून, पहिल्या आठ भागात व्याकरणविषयक चिकित्सा व नवव्या भागात थोर कवींच्या गूढ शब्दप्रयोगांचे स्पष्टीकरण केले आहे. त्या ग्रंथावर त्याची स्वतःचीच वृत्ती आहे. नृपतुंग व नागवर्म या पूर्वीच्या कन्नड व्याकरणकारांपेक्षा याचे व्याकरण विस्तृत, क्रमबद्ध आणि शास्त्रशुद्ध असल्याचे सांगतात. [ म. च. को. ]

**केसपुत्त** कोसलातले एक प्राचीन ठिकाण. या ठिकाणी कालाम् गणाचे गणराज्य होते (अंगुत्तर १.१८८). आळार नावाचा एक विद्वान आचार्य या गणात जन्मला. तो बुद्धाचा समकालीन असून, केसपुत्त या गावी राहणारा होता. [ हि. जॉ. ए. इं. ]

**केसरिया कुँवर** राजस्थानातला एक देव. हा गोगाजी चौहान याचा पुत्र किंवा संबधित असावा, असे मानतात. राजस्थानी स्त्रिया भाद्र० कृ. ८ मीच्या दिवशी त्याची पूजा करतात. केसरिया हा नागप्रतिमेच्या रूपात आढळतो. याला खीर व चुरमा यांचा नैवेद्य दाखवितात. शेखावटीच्या बहुतेक सर्व कसब्यात केसरियाच्या पूजेचा प्रघात आहे. ' पदमा नागणका जाया ' असे म्हणून स्त्रिया याला वदन करतात. [ राजस्थानी लोकोत्सव; मरुभारती ]

**केसरीनाथ** (१८ व्या शतकाचा पूर्वार्ध) हा उद्‌बोधनाथाचा प्रमुख शिष्य असून, गागिन येथे मामलतीच्या हुद्यावर होता. उद्‌बोधनाथांच्या ज्ञानेश्वरीवरील प्रवचनांनी याला मोहिनी घातली व याने त्यांच्याकडून गुरुमंत्र घेतला. त्याच क्षणी याने नोकरीही सोडली. सिद्धान्तसारनामक ग्रंथ व काही पदे एवढी याची ग्रथरचना आहे. सिद्धान्तसार हा ग्रंथ म. म. पोतदार यांच्या सग्रहात आहे. ग्रंथारंभी याने गुरुवंदन केले आहे. तेवढेच पाहिले तरी त्याच्या शैलीची आणि विचारघनतेची कल्पना येईल——

**ॐनमो चिद्विलास विलसतीया ।**<br>
**नमो तुज अपरमितवीर्या ।**<br>
**नमो चिद्घनैका प्रसवतिया**<br>
**आनंदकंदा ।। १ ।।**<br>
**तू जगद्‌रूपे विलससि ।**<br>
**परि जगद्रूपा नातळसि ।**<br>
**समत्वे जग नांदविसि ।**<br>
**नांदनुके नेणोनिया ।। २ ।।**<br>
**आपुलीये स्वसते करूणि ।**<br>
**करिसि हरिसि नांदउणि ।**<br>
**परि अकर्तेपणाची रहणी ।**<br>
**थंगलीच ना ।। ३ ।।**<br>
**ऐसा तू जगदीश्वरू ।**<br>
**जगि असोनि जगा अगोचरू ।**<br>
**त्या तुझाहि गोचरत्वप्रकारू ।**<br>
**तुझीया कृपा लाहिजे ।। ४ ।।**<br>
**तो तू श्रीसद्‌गुरु कृपादानी ।**<br>
**दाता येकु त्रिभुवनी ।**<br>
**उद्‌बोधनाथा दिनमणि ।**<br>
**सच्चिदानंद घना ।। ५ ।।**

केसरीनाथांनी मार्ग० शु. २ या शके १६४६ (इ. स. १७२४)

या दिवशी आळंदी येथे ज्ञानेश्वरांच्या चरणाजवळ समाधी घेतली. [ गो. च. प. ]

**केसोदास** (इ. स. १९ वे शतक) एक संतकवी. बिहारमधील चंपारण्य जिल्ह्यातल्या पंडितपुर या गावी हा राहत होता. हा कबीरपंथी साधू होता. छत्तरराम हा याचा गुरू होता. केसोदासाची काही पदे प्रसिद्ध आहेत. त्याचा एक नमुना असा——

**आजु मोरा गुरु के अवनवाँ ।। ध्रु० ।।**
**जब मै सुनलो गुरु के अवनवाँ ।**
**चंदन लिपलों रे अँगनवाँ ।**
**गगन मण्डलसे गुरु मोरा अइले ।**
**बाजे अनहद निसनवाँ ।।**
**सिरी पंडित पुरवा मे मोरा ।**
**गुरु गडिया उतरा वेला हो रामा ।।**

अर्थ——आज माझ्या गुरूचे आगमन झाले आहे. जेव्हा मी त्यावद्दल ऐकले, तेव्हा मी अंगणात चंदनाचा सडा घातला. जेव्हा माझा गुरू गगनमंडलातून उतरला, तेव्हा अनहद शव्दाचा गजर सुरू झाला. माझा गुरू गाडीतून उतरत आहे. [ भो. क. का. ]

**केस्सरिया** बिहारमधील चंपारण्य जिल्ह्यातील एक गाव. याच्या दक्षिणेस एका कोसावर एक टेकडी असून, तिच्या माथ्यावर बौद्ध स्तूपाचा अवशेष आहे. या प्राचीन स्मारकाला तिथले लोक राजा बेन का देवर असे म्हणतात. हा बेन (वेन) भारतातला एक चक्रवर्ती होता. गौतम बुद्धाने एका ठिकाणी असे सांगितले आहे, की 'पूर्वजन्मात बोधिसत्व असताना मी या नगरावर चक्रवर्ती म्हणून राज्य करीत होतो.' या स्थळाविषयी स्थानिक दंतकथा आहे, ती अशी——

बेन राजाला तपश्चर्येने सम्राटपद प्राप्त झाले. त्याची राणी तिथल्या तलावात कमलपत्रावर उभी राहून स्नान करीत असे. हा राजा प्रत्येक शेतकऱ्याकडून करादाखल सूपभर धान्य घेत असे. पुढे त्याला हाव सुटली आणि त्याने नवा हुकूम काढला, की प्रत्येक शेतकऱ्याने कर म्हणून सातूच्या दाण्याएवढे सोने द्यावे. पण त्यामुळे राजाचे अलौकिक सामर्थ्य नष्ट झाले आणि त्याची राणी कमलपत्रावर उभी राहून स्नान करीत असता तलावात बुडून मरण पावली. राजाने पंडितांना बोलावून या दुर्घटनेचे कारण विचारले. पंडित म्हणाले, की 'तू जमिनीवरील कर वाढवल्यामुळे असे घडले.' राजाला त्या गोष्टीचे फार दुःख झाले. मग त्याने तिथे एक स्तूप अर्थात देवर बांधला. आपल्या सर्व कुटुंबियांसह तो त्या स्तूपात शिरला आणि त्यानं त्याचे दार बंद करून घेतले. तिथे तो सर्वांसह मरण पावला.

या गावाच्या जवळ राजा बेन का तालाब व गंगेयतल नावाचे दोन तलाव आहेत. टेकडीवर रनिवास अर्थात राणीचा राजवाडा म्हणून एक ठिकाण दाखवितात; पण वास्तविक तो एक जुना बौद्ध मठ आहे. १८६२ साली इथे उत्खनन झाले. त्यात एका बौद्ध चैत्याचे अवशेष सापडले. एक मोठी बुद्ध प्रतिमाही आढळली. [ चंपा. गॅझे. ]

**केळ** केळीचे झाड भारतात सर्वत्र आढळते. लांब व हिरव्यागार पानांनी ते शोभिवंत दिसते. याचा खुंट सोपटाचा बनलेला असतो. केळीच्या पानांचा उपयोग जेवणासाठी व घरे शाकारण्यासाठीही करतात. मंगलप्रसंगी दारापुढे केळीचे तोरण उभारतात. सुफलता आणि सौंदर्य या गुणांमुळे केळीला मांगलिक कार्यात स्थान मिळाले आहे. केळीच्या झाडात देवाची वसती असल्याचेही मानतात. दक्षिणेतला तिरुमल हा देव वाहत्या जलात केळीच्या पानावर बाल्यावस्थेत पहुडत असल्याची कल्पना आहे. ध्यानधारणा व समाधी यांच्यासाठी केळीची सावली फलप्रद मानतात.



केळीचे झाड

महाराष्ट्रात केळीला पतिव्रता मानलेले आहे. तिच्याविषयीचा लोकसंकेत असा—

**जन्मामध्ये जन्म केळीबाईचा चांगला ।**
**भर्तारावाचून गर्भ नारीला राहिला ।।**
**श्रेष्ठ पतिव्रता केळीबाई म्हणू तुला ।**
**विनाभोग गर्भ, मरणाचा ग सोहाळा ।।**

केळ पसवल्यावर मरून जाते. जन्मात एकदाच तिला गर्भारपण व बाळंतपण येते.

तरुण आणि घवघवीत अशा स्त्रीला केळीची उपमा देतात.

केळीला संस्कृतात रंभा असे नाव आहे. रंभा हे बिरुद यौवन-पुष्ट स्त्रीला दिले जाते. रंभोरू हे स्त्रीचे एक प्रसिद्ध विशेषण आहे. पातिव्रत्य व पुरुषनिरपेक्ष मातृत्व हे दोन कल्पनाबंध केळीच्या ठिकाणी एकत्र झालेले आढळतात.

मूल जन्मल्यानंतर अकराव्या दिवशी त्याला सुवेर संपण्याचे स्नान घालून केळीच्या पानावर ठेवायचे आणि मग दुसऱ्या कोण्या स्त्रीने त्याला सोवळयात उचलून घ्यायचे, अशी प्रथा कोकणात कित्येक ठिकाणी आहे.

एखाद्या गृहस्थाने लावलेली केळ पूर्वेस तोंड करून पसवल्यास ती धन्याला सौख्य देते, दक्षिणेस अर्थनाश व संताप देते, पश्चिमेस ग्रामातून उद्‌वासन करते व उत्तरेस शुभप्रद होते, असे मानले आहे. आग्नेय्यादी उपदिशांना पसवल्यास तिचे फल मध्यम असते. केळीच्या दुष्टप्रसवाबद्दल शांती करायला सांगितली आहे. या शांतीचा विधी असा—

केळीला वस्त्राभरणांनी सुशोभित करावी. मग तिची पूजा करावी. तिल, आज्य व दूर्वा यानी १०८ हवन करावे. 'अतो देवा' या सूक्ताचा पाठ करावा. मग ती केळ ब्राह्मणाला दान द्यावी. नंतर कांस्यपात्रात तिळाचे तेल घालून यजमानाने त्यात आपले प्रतिबिंब पाहावे व तेलासह ते पात्र दान द्यावे. [ शांतिकमलाकर; लो. सा. रू.; ट्री-वर्शिप ]

**केळवण** एखाद्या मुलाची मुंज व मुलाचे किंवा मुलीचे लग्न ठरले, की त्या शुभतिथीच्या आधी काही दिवस आप्तेष्टमंडळी मुजामुलाला, वधूला किंवा वराला आपल्या घरी जेवायला बोलावून त्यांना द्रव्य, वस्त्र, पात्र, इ. वस्तू देतात. हा सोपस्कार संस्कार्य व्यक्तीच्या अभिनदनाचा असतो. घरचे केळवण सर्वात शेवटी होते. ते झाल्यावर मग इतरांच्याकडे केळवणासाठी जात नाहीत. केळवण हा मराठी शब्द असून, कर्नाटकाच्या उत्तर भागात त्याला गडगनेर असे म्हणतात.

**कैकाडी** कर्नाटक, द. महाराष्ट्र व मध्यप्रदेश या विभागांत आढळणारी एक जात. हे लोकभ टके असून, गावाबाहेर झाडाखाली आपला मुक्काम करतात. गाढवे, शेळ्या, कुत्री, कोंबडया हे सर्व प्राणी त्यांच्याबरोबर असतात. तेलुगूमिश्रित कानडी ही यांची भाषा आहे. धनताळे, कामाठी, गावरानी, कुंचेकरी, माकडवाले, उरूकैकाडी वगैरे यांच्या नऊ पोटजाती आहेत. तेलंगण हे आपले मूळ ठिकाण असल्याचे ते सांगतात.

काही कैकाडी कुंचे, केरसुण्या, टोपल्या, पिंजरे, पक्षी–हरिणे पकडण्याची जाळी व मुलांची खेळणी तयार करतात; तर काही गाढवांवरून माती, वाळू, विटा वगैरे वाहून नेण्याचा उद्योग करतात. काही शेती व मजुरी करतात. काही माकडे किंवा



कैकाडी स्त्री–पुरुष

साप पाळून भिक्षा मागतात; तर काही जादूगिरी करून पोट भरतात. हे लोक पूर्वी चोऱ्यामाऱ्या करण्याबद्दल प्रसिद्ध होते.

**देव-धर्म–** हे लोक बहिरोबा, भवानी, मरीआई, फिरंगाई, तुकाई, यमाई याचे टाक घरात ठेवून पुजतात; मारुती, खंडोबा यानाही भजतात. गोसाव्याना गुरू मानतात. शकुन, जादू, चेटुक, कौल इत्यादीवर यांची श्रद्धा असते.

**विवाहप्रथा–** धनताळे पोटजातीत लग्न पंचामार्फत ठरविले जाते. एका घटात पिंपळाची डहाळी व पाणी घालून तो वधूवरांसमोर ठेवतात. लोकांनी अक्षता टाकल्यानंतर लग्नविधी पूर्ण होतो. अविवाहित पुरुषास विधवेशी लग्न करायचे असेल, तर त्याला प्रथम शमीवृक्षाशी लग्न करावे लागते.

मध्यप्रदेशातील यांच्या एका पोटजातीत व्यभिचारी स्त्रीला पुढीलप्रमाणे शिक्षा दिली जाते– तिचे संपूर्ण क्षौर करतात. मग नदीकाठी दोन दारांचे एक झोपडे तयार करून त्यात तिला शिरायला लावतात. ती आत गेल्यावर ते झोपडे पेटवून देतात. ती स्त्री काही वेळ आत थांबून दुसऱ्या दाराने बाहेर पडते.

**मर्तिकप्रथा–** हे लोक मृतांना जाळतात किंवा पुरतात. मग ज्ञातिभोजन घालतात. श्राद्ध करीत नाहीत. मृताचा टाक करून तो फक्त दसरा–दिवाळीला पुजतात. [ मुं. इ. जा.; म. ज्ञा. को.; गां. गा. ]

**कैकोट्टिकळी** केरळातील एक नृत्यप्रकार. हे स्त्रियांचे नृत्य असते. स्त्रिया फेर धरून नाचतात व गाणी म्हणतात. नृत्याला टाळीचा ठेका धरतात. हे नृत्य शिवान

कामदहन केल्याचे स्मारक आहे, असे म्हणतात. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**कैकोलन** तमिळनाडमधील एक कोष्टी जात. कैकोलन या तमिळ शब्दाचा अर्थ वीरबाहू असा आहे. हे लोक वीरबाहू हाच आपला मूळ पुरुष समजतात. कै=हात व कोल= धोटा अशी कैकोलनची दुसरी व्युत्पत्ती सागतात. हातमागाच्या भिन्न भिन्न भागाना हे लोक भिन्न भिन्न देवता व ऋषी मानतात. बहुतेक कैकोलन शैव असून, काही थोडे लिंगधारी व काही वैष्णव आहेत. मुत्तयालम्म, मरीअम्म, अय्यनार, मुनेश्वर, अंकलम्म, इ. देवतांना व भूत–पिशाचांना हे भजतात.

याना सेनगुडार असेही म्हणतात. सेनगुडार म्हणजे रक्त-खंजीर होय. या नावाविषयी एक आख्यायिका आहे, ती अशी–

पृथ्वीवरील लोकाना काही राक्षसानी त्रस्त केले म्हणून ते शिवाला शरण गेले. त्या वेळी शिवाने आपल्या नेत्रातून सहा स्फुलिंग सोडले. ते पाहून पार्वती भयभीत झाली आणि पळू लागली. पळताना तिच्या पैजणांचे नऊ घुगुर गळून पडले. शिवाने त्या नऊ घुंगुरांच्या नऊ स्त्रिया बनवल्या. पुढे त्या स्त्रियांना नऊ पुत्र झाले. त्यांच्या हातांत खजीर होते. सुब्रह्मण्यम्‌च्या नेतृत्वाखाली त्यांनी त्या राक्षसाना ठार मारले. नंतर शिवाने त्यांना आज्ञा दिली, की 'तुम्ही संगीतज्ञ व्हा आणि काही निरुपद्रवी उद्योग करा.' म्हणून मग ते विणकाम करू लागले.

या जातीचा एक प्रमुख असतो. त्याला पेरिदंडकरर अथवा पट्टकरर म्हणतात. त्याच्या हाताखाली ग्रामणी व उरल हे दोन अधिकारी असतात. त्यांचा महानाट्टन् नामक पुढारी कांजीवरम् येथे राहतो. तो जातीतील तटे मिटवतो व अपराध्याला जातिबहिष्कृत करतो.

यांच्यांत नट्टुकट्टाद नायन्मार नावाचा एक भिक्षुकवर्ग असून हे लोक महानाट्टन्‌चे प्रतिनिधी म्हणून काम पाहतात. हे एका वेळूवर चढून काही शकुनात्मक धार्मिक विधी व कसरती करतात. हे कामाक्षी देवीची उपासना करतात. हेही स्वतःला वीरबाहूचे वशज समजत असले, तरी कैकोलन लोक यांना हलके मानतात.

**विवाहप्रथा** – वराने वधूच्या गळयात ताळी बांधली, की लग्न ठरले, असे मानतात. या विधीला सिरुतालीकेट्टू म्हणतात. आते– मामे बहिणीशी लग्न करण्याची प्रथा आहे. वधूला मागणी घालण्यासाठी वराचा पिता वधूच्या घरी जाऊन तिच्या पित्याला विडयाची पाने, फुले, परियम् (देज), दूध, नारळ, इ. वस्तू देतो. वधूच्या मामाच्या संमतीशिवाय तिचा विवाह होत नाही.

विवाहसमयी वधू-वराना तेल व पीठ लावून स्नान घालतात व त्यांच्या मनगटाला दोरे बाधतात. लग्नातही ताळी बाधण्याचा कार्यक्रम असतोच. तो झाल्यावर नवरा मुलगा वधूचा पाय उचलून एका जात्यावर ठेवतो. नंतर ते दोघे बोहल्याला तीन प्रदक्षिणा घालतात. मग दोघांना ध्रुव व अरुंधती हे तारे दाखवितात. अपत्यहीन विधवांना पुनर्विवाह करता येतो.

**देव-धर्म**– या जातीत प्रत्येक कुटुबातली एक मुलगी देवाला वाहण्याची प्रथा पूर्वी होती. हे लोक गगम्म देवीचा वार्षिकोत्सव मोठ्या थाटाने करतात. त्यात भाग घेणारे भक्त रोज विविध प्रकारचे पोशाख घालतात आणि देवीपुढे जीव दमेपर्यंत नाचतात. काही जण नाचता नाचता रगात आल्यावर आपल्या जिभेतून एक सळई खुपसून घेतात. देवीची साथ येऊ नये म्हणून हा तोडगा केला जातो.

यांच्यात अशी एक चाल आहे, की अंत्यविधीच्या शेवटच्या दिवशी एक झोपडी बांधून, तिथे न्हाव्याने आणलेल्या दगडाची रास करायची व त्या राशीलाच सर्व उपचार अर्पण करायचे. [ म. ज्ञा. को.; मदुरा गॅझे.; का. ट्रा. स. इं. ]

**कैथल** पंजाबातले एक क्षेत्र. हे कर्नाळ जिल्ह्यात येते. पुराणात याला कपिस्थल म्हटले आहे (कपी=वानर अर्थात हनुमान). हे हनुमंताचे स्थान आहे. महाभारतात याचा उल्लेख आहे. युधिष्ठिराने कौरवांशी साम करण्यासाठी जी पाच गावे मागितली होती, त्यात कपिस्थल हे एक होते. कर्नाळवरून या क्षेत्राला जाता येते. [ कल्याण -तीर्थांक ]

**कैयट भट्ट** (इ. स. १००० चा सुमार) एक काश्मीरी वैयाकरण पंडित. याने पतंजलीच्या महाभाष्यावर प्रदीप नावाची टीका लिहिली आहे. ही टीका नसती, तर महाभाष्य कित्येक ठिकाणी दुर्बोध राहिले असते. भाष्यकाराने नुसता उल्लेख केलेल्या किंवा थोडक्यात प्रतिपादिलेल्या सिद्धान्तांचे त्याने मुद्देसूद विवरण केले आहे. याचे आडनाव उपाध्याय होते. सर्वदर्शनसंग्रहात याचा उल्लेख केलेला आहे.

काश्मीरी पडितांच्या पारपरिक मतानुसार कैयट हा पाम्पूरचा राहणारा होता. पाणिनीय व्याकरण महाभाष्यान्त त्याला मुखोद्‌गत होते. पण त्याची आर्थिक स्थिति मात्र दयनीय होती. एकवार काश्मीरात गेलेल्या कृष्णभट्ट या दक्षिणी पंडिताने तिथल्या राजाला सांगून कैयटासाठी धनधान्य मिळवले व कृष्णभट्ट ते धनधान्य कैयटाला देण्यासाठी गेला; पण कैयटाने त्याचा स्वीकार केला नाही. पुढे तो काश्मीर सोडून काशीला गेला. तिथेच त्याने प्रदीपाची रचना केली. याने आपल्या ग्रंथात

जागोजाग स्फोटवादाचे विवेचन केले आहे. [पा. पा. व्या. सं.; हिं. वि. को.]

**कैलावत** एक प्राचीन मानवगण. काबूल खोऱ्याच्या पश्चिम भागातील लोकांना कैलावत या नावाने ओळखीत असावेत, असे वाटते. [ए. से. ए. इं.]

**कैलाशपुरी** राजस्थानात उदयपुरच्या उत्तरेस सुमारे १४ मैलांवर असलेले एक शैव क्षेत्र. हे गाव एका खिंडीत वसले आहे. त्याच्या सभोवती उंच टेकड्या आहेत. इथे एकलिंगजीचे प्रसिद्ध मंदिर आहे. हे मंदिर बाप्पा रावळने बांधले. महाराणा हम्मीरने त्याची दुरुस्ती केली व त्याच्या भोवतीचा तट महाराणा मोकलने बांधला, असे सांगतात. मंदिरात चतुर्मुख शिवलिंग असून, त्यालाच एकलिंगजी म्हणतात. तो मेवाडच्या राण्यांचा कुलदेव आहे. इथला पुजारी गोसावी जातीचा ब्रह्मचारी असतो.

एकलिंगजीच्या आवारात दक्षिणबाजूस लकुलीशाचे एक प्राचीन मंदिर आहे. त्याला नाथांचे मंदिर असेही म्हणतात. हे मंदिर पाशुपत सप्रदायाच्या वेदांग नामक महंताने बांधल्याचे सांगतात. सांप्रत ते भग्न स्थितीत दिसते.

एकलिंगजीच्या उत्तरेस एका मोठ्या चौथऱ्यावर विंध्यवासिनी व बाणमाता यांची मंदिरे आहेत. विंध्यवासिनीच्या समोर हारीत ऋषीचे मंदिर आहे. या ठिकाणी हारीताने तपश्चर्या केली, असे सांगतात. या मंदिरावर इ. स. १४४३ चा एक शिलालेख आहे.

एकलिंगजीच्या आवारातच महाराणा कुंभाने बांधलेले एक विष्णुमंदिर आहे. त्याला मीराबाईचे मंदिर असे म्हणतात. त्यातील विष्णू त्रिमूर्ती या स्वरूपात आहे. मधले मुख विष्णूचे असून बाजूची दोन वराह व नृसिह यांची आहेत. हा विष्णू गरुडारूढ आहे. अशा प्रकारच्या अनेक मूर्ती राजस्थानात व गुजरातेत आढळतात. विष्णूची त्रिमूर्ती प्रथम गुप्तकालात मथुरा शैलीमध्ये निर्माण झाली व राजस्थानात ती विशेष लोकप्रिय झाली. या मंदिरात इतरही अनेक सुंदर मूर्ती आहेत. एकलिंगजीच्या पूर्वेस एक तलाव आहे. भोज नामक गुहिलवंशी राजाने इथे डोंगरात बांध घालून हा तलाव निर्माण केला, अशी आख्यायिका आहे. म्हणून याला 'भोजेसा तालाब' असे म्हणतात. या तलावात स्नान केल्याने इंद्राची सहस्र भगे नष्ट झाली, अशीही आख्यायिका आहे. त्यामुळे याला इंद्रसागर असेही म्हणतात. तलावाच्या पूर्वेस एका टेकडीवर राष्ट्रसेना नावाच्या देवीचे प्राचीन मंदिर आणि तलावाच्या उत्तरेच्या टेकडीवर अर्बुदा देवीचे मंदिर आहे.

कैलाशपुरीपासून एका मैलाच्या अंतरावर नागदा नावाचे एक स्थान आहे. तिथे हिंदूंची व जैनांची प्राचीन मंदिरे आहेत. नागदा ही मध्ययुगात गुहिलांची राजधानी होती. जुन्या शिलालेखांत तिचा नागदराह किंवा नागद्राह या नावाने उल्लेख आढळतो. इथे इ. स. ६६१ सालातला एक शिलालेख काही वर्षांपूर्वी सापडला आहे. अपराजित नावाच्या एका गुहिल राजाचा त्या शिलालेखात उल्लेख आहे. त्या शिलालेखावरून कळते, की सुमारे १३०० वर्षांपूर्वी नागदा येथे वासुदेवकृष्णपंथ फार लोकप्रिय झाला होता.

कैलाशपुरीजवळच अदबाद नावाचे आणखी एक ठिकाण आहे. तिथली जैन व वैष्णव मंदिरे प्रेक्षणीय आहेत. त्यांवरील कोरीवकाम अप्रतिम आहे. येथील जैन मंदिरातली शांतिनाथाची नऊ फूट उंचीची मूर्ती म्हणजे शिल्पकलेचा एक सुंदर नमुनाच आहे. तिथे इ. स. १४३७ मधला एक शिलालेख आहे. त्यावरून हे मंदिर महाराणा कुंभाच्या राजवटीत निर्माण झाल्याचे कळते. या ठिकाणच्या वास्तू आज भग्नावस्थेत आहेत. दिल्लीचा सुलतान शमसुद्दीन अल्तमश याने या वास्तूंची मोडतोड केली असे म्हणतात एका काळी हे स्थान जैन व वैष्णव यांचे प्रसिद्ध क्षेत्र होते. [रामनारायण शर्मा– धर्मयुग, जून १९५२; आर. सी. आगरवाल– मार्च ऑफ इंडिया, मार्च १९५७]

**कैलास** हिमालयातील तिबेट भागात असलेले एक तीर्थक्षेत्र. कैलासाला गणपर्वत व रजतगिरी अशीही नावे आहेत. कैलास व मानससरोवर ही दोन हिमालयातील अत्यंत पवित्र तीर्थक्षेत्रे होत. उ. प्रदेशातील अलमोड्यापासून सुमारे २४० मैलांवर ही स्थाने येतात. कैलासाचे बर्फाच्छादित शिखर २२,०२८ फूट उंच आहे. कैलास पर्वताची परिक्रमा ३२ मैलांची आहे. मानससरोवर हे जगातील अत्यंत प्राचीन सरोवर होय. उत्तरेला कैलास व दक्षिणेला गुर्ल मांधाता या दोन पर्वतांमध्ये तिबेटच्या पठारावर हे सरोवर पसरलेले आहे.

कैलास व मानससरोवर ही ज्या प्रदेशात आहेत, त्या प्रदेशाला मानसखंड असे म्हटले आहे. कैलासाला प्राचीन काळी मेरू असे म्हणत असत. शिव आणि ब्रह्मा यांनी व मरीच्यादी ऋषींनी; तसेच त्रेतायुगात रावण व भस्मासुर यांनीही इथे तप केल्याचे पुराणांतरी सांगितले आहे. रामायणात कैलास व मानस या दोहोंचाही उल्लेख आहे.

पांडवांच्या दिग्विजयात अर्जुनाने हा प्रदेश जिंकून घेतला होता. युधिष्ठिराने राजसूय यज्ञ केला, त्या वेळी तिथल्या

माडलिक राजाने उत्तम घोडे, सोने, रत्ने व काळ्या व पांढऱ्या याक जनावराच्या केसाच्या चवऱ्या असा नजराणा युधिष्ठिराला पाठविला होता. महर्षी व्यास, भीम, श्रीकृष्ण व दत्तात्रेय हे या प्रदेशात गेले होते. याशिवाय अनेक ऋषी, मुनी व साधक यांनी या प्रदेशात वास्तव्य केले होते.

पुराणांतरी कैलासाचे वर्णन आढळते, ते असे–

कैलास हा स्वर्गलोकाच्या वर आहे. हा शिवलोक आहे. एका त्रिकोणी मैदानावर त्याची उभारणी झाली आहे. हा लोक समृद्ध आणि सुंदर आहे. पार्वतीसह शिव तिथे वास्तव्य करून त्या लोकाचे पालन करतो. शिव-पार्वती ही दोघे त्या ठिकाणी सुखमग्न असतात. त्यांचा मोठा मुलगा गणेश हा सदैव ध्यानमग्न असतो, तर धाकटा पुत्र कार्तिकेय हा शस्त्रास्त्रांची



कैलास पर्वत

सिद्धता करून सदैव युद्धाचेच विचार करीत असतो. शिवाचे भूत–प्रेतपिशाचादी अनेक गण आहेत. नंदी हा त्यांचा मुख्य असून शृंगी–भृंगी हे त्याच्या हाताखालचे गणाधिकारी आहेत. या सर्वांच्या मुखमुद्रा भयानक असतात. भैरव, भीम आणि दर्शन हे तिथे कैलासनगराचा कारभार पाहतात. शिवगण हे महाभयंकर असून ते सदैव भांडत असतात. किल किलं अशा त्यांच्या कोलाहलावरूनच या लोकाला कैलास असे नाव पडले आहे. शिवभक्त मृत्यूनंतर याच लोकात वास्तव्याला येतात. कुबेर व यक्ष यांचेही कैलास हेच निवासस्थान मानलेले आहे.

भागवतात कैलासाचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे–

**जन्मौषधितपोमन्त्रयोगसिद्धैर्नरेतरैः ।**
**जुष्टं किन्नरगन्धर्वैरप्सरोभिर्वृतं सदा ।।**

(४. ६)

अर्थ– जन्म, औषधी, तप, मंत्र व योग यांनी सिद्ध असे जे मानवेतर योनीतले गंधर्व-किन्नर त्यांनी सेवित व अप्सरांनी युक्त असा हा कैलास पर्वत आहे.

काही इतिहासकारांच्या मते अशोकाने कुमाऊंचा कत्यूरी राजा नदीदेव याला आपल्या वतीने पश्चिम तिबेट जिंकण्यासाठी पाठविले होते. त्याप्रमाणे त्याने तो प्रदेश जिंकून भारतीय राज्याला जोडला. परत येताना नदीदेव हा कैलास व मानससरोवर यांचे दर्शन घेऊन आला. दुसरे कत्यूरी राजे ललितसूरदेव व देशतदेव यांनी तिबेटातील मानसखंड जिंकून घेतले, असा उल्लेख पाडुकेश्वरमंदिरातील एका ताम्रपटात आहे. इ. स. च्या सहाव्या शतकात कुमाऊंचे कत्यूरी राजे पश्चिम तिबेटावर राज्य करीत होते, असे युआन च्वांग या चिनी यात्रेकरूने लिहिले आहे.

आद्य शंकराचार्यांनी कैलासाच्या जवळपासच कुठेतरी आपला देह ठेवला, असे काहीजणांचे मत आहे.

जैनांनीही कैलास–मानसाला पवित्र क्षेत्र मानले आहे. ते कैलासाला अष्टापद असे म्हणतात. जैनांचा पहिला तीर्थंकर ऋषभदेव याला कैलासावरच निर्वाण प्राप्त झाले. इ. स. च्या ११ व्या शतकात सिद्ध मिलरेपा याने या प्रदेशात अनेक वर्षे वास्तव्य केले होते. विक्रमशिला विद्यापीठाचा प्रमुख आचार्य दीपंकर श्रीज्ञान (इ. स. ९८२ ते १०५४) हा पश्चिम तिबेटातील एका राजाच्या निमंत्रणावरून बौद्ध धर्माच्या प्रचारासाठी तिथे गेला होता.

त्यानंतरच्या काळातही अनेक लोकांनी कैलास–मानसाची यात्रा केली आहे. प्रत्येकाने आयुष्यात एकदा तरी कैलास–मानसाची यात्रा करावी, असे पुराणांचे मत आहे.

बौद्ध ग्रंथात मानससरोवराचे वर्णन अनवतप्त असे केलेले आहे. पृथ्वीवरील हा स्वर्गच होय, असे तिथे म्हटले आहे. तिबेटी कैलासपुराण सांगते, की सर्व जगाच्या मध्यभागी कैलास



कैलास शिखर

पर्वत उभा असून, त्याच्या उपत्यकेवर कल्पवृक्ष आहे आणि तो रत्नखचित आहे. तिबेटी बौद्ध मताप्रमाणे डेमचोक (धर्मपाल) ही कैलासाची अधिष्ठात्री देवता आहे. तो व्याघ्रचर्म पांघरतो, गळ्यात रुंडमाळा रुळवितो व हातात डमरू आणि त्रिशूळ वागवितो. वज्रवाराही ही त्याची शक्ती आहे.

कैलासाची पर्वतश्रेणी काश्मीरपासून भूतानपर्यंत पसरलेली आहे. त्यांपैकी ल्हा चू (Lha chhu) झोंग चू (zhong chhu) या टेकड्यांनी वेढलेल्या पर्वताला कैलास असे नाव असून त्याच्या उत्तर टोकाला कैलासशिखर म्हणतात. कैलासशिखराला चार बाजू असून त्याची आकृती एका विराट शिवलिंगाप्रमाणे आहे. पर्वतानी बनलेल्या एका षोडशदल कमलामध्ये ते लिंग ठेवलेले आहे, असे दिसते. कैलासपर्वत हा काळ्या पाषाणांचा बनलेला असून तो सदैव बर्फाच्छादित असतो. या शिखराभोवती प्रदक्षिणा करायची, तर कैलास पर्वतालाच प्रदक्षिणा घालावी लागते. भाविक तिबेटी लोक कैलास व मानस यांच्या तीन किंवा तेरा परिक्रमा करतात. त्यातले काही यात्रेकरू तर साष्टांग दंडप्रणिपात करीत परिक्रमा पुरी करतात. एक परिक्रमा केल्याने एका जन्माचे व दहा परिक्रमांमुळे एका कल्पाचे पाप नष्ट होते आणि १०८ परिक्रमा केल्याने याच जन्मी निर्वाण प्राप्त होते, अशी तिबेटी जनांची समजूत आहे.

कैलास शिखराच्या पूर्वेला गौरीकुंड आहे. हे एक लहानसे सरोवर असून त्याच्यावर सदैव बर्फाचा थर असतो. हा थर फोडूनच यात्रेकरूला या कुंडात स्नान करावे लागते.

कैलास-मानस सरोवर ज्या प्रदेशात आहे, तो प्रदेश तिबेटचा एक भाग आहे. या प्रदेशाची हवा अत्यंत थंड व कोरडी असून, इथे सतत वारे वाहत असतात. या भागात पावसाचे प्रमाण अत्यल्प आहे. पण जेव्हा पाऊस पडतो, तेव्हा तो मुसळधार पडतो. उन्हाळ्यात दुपारी हवा चांगली गरम असते. पण आकाशात ढग जमले, की ती एकदम थंड होते. आषाढ-श्रावणात यात्रेकरू या ठिकाणी येतात, तेव्हा अनेकदा कैलास व मांधाता ही दोन्ही शिखरे ढगांनी झाकळलेली असतात.

इथला संधिप्रकाश बराच काल टिकतो. हा प्रदेश बराच उंचीवर असल्यामुळे इथल्या विरळ व धूलिविरहित हवेत लांबच्या वस्तू जवळ आल्यासारख्या भासतात.

कैलास-मानसाकडे जाण्यासाठी अनेक मार्ग आहेत. त्यांपैकी उ. प्रदेशातील अलमोडा, अस्कोट, खेल, गर्बिअँग, लिपूलेह खिंड (उंची १६,७५० फूट), तक्लाकोट व कैलास हा सर्व मार्ग सोयीचा असून त्याची लांबी २३८ मैल आहे. हा रस्ता पर्वतराजीतून जात असल्यामुळे वाटेत अनेक कष्टप्रद चढ-उतार लागतात. जाताना सुमारे ४४ मैल सरळसोट उभी चढण चढावी लागते आणि सुमारे ४६ मैल ती उतरावी लागते. या मार्गावर वाटेत अनेक धर्मशाळा व आश्रम आहेत. आश्रमातील महंत स्थानिक लोकांच्या उन्नतीसाठी झटत असतात व यात्रेकरूंनाही मदत करतात. गर्बिअँग येथे पुढच्या सर्व प्रवासासाठी याक, खेचरे, तट्टे, वाटाडे व नोकर यांची व्यवस्था करावी लागते. लिपू लेह खिंड ओलांडल्यावर सुमारे अकरा मैलांवर तक्लाकोट हे तिबेटातील पहिले गाव लागते. या ठिकाणी दरवर्षी ज्येष्ठापासून कार्तिकापर्यंत मोठा बाजार भरलेला असतो. तक्लाकोटहून तारचेनला जाताना वाटेत मानससरोवर लागते. कैलास शिखराची परिक्रमा तारचेनहून सुरू होते व तिथेच येऊन संपते. तक्लाकोटपासून सुमारे २५ मैलांवर मांधाता पर्वतराजीत गुर्ले ला ही खिंड लागते. तिची उंची १६,२०० फूट आहे. इथे दगडाचे अनेक मोठमोठे ढीग आहेत. गुर्ले ला खिंडीच्या माथ्यावरून पाहिले असता उजव्या बाजूला मानससरोवर, डाव्या बाजूला राक्षसताल व दूर उत्तरेला पांढऱ्या शुभ्र बर्फाने आच्छादलेला कैलास पर्वत असे अत्यंत रमणीय दृश्य दिसते. खिंडीतून पुढे गेल्यावर वाटेत तीर्थपुरी येथे अनेक गरम पाण्याचे झरे लागतात. या झऱ्यांच्या आसपासच्या प्रदेशात चुनखडीचे प्रचंड ढीग आहेत. यात्रेकरू



गौरीकुंड



चुनखडीचे ढीग – कैलास

हीच चुनखडी भस्म म्हणून नेतात. भस्मासुराने याच ठिकाणी शिवाला प्रसन्न करून घेण्यासाठी तप केले व पुढे येथेच त्याचा देह भस्मीभूत झाला, अशी आख्यायिका सागतात. तीर्थपुरीला गेल्याशिवाय कैलासाची यात्रा पुरी होत नाही. या पुढच्या मार्गात डोल्माला किंवा देवीखिड ही सर्वात उंच खिड लागते. तिची उंची १८,६०० फूट आहे. इथून जवळच गौरीकुंड आहे. या सर्व मार्गात ठिकठिकाणी गोंपा किवा तिबेटी लामांचे मठ आहेत.

सर्वसाधारणपणे ज्येष्ठमासी अलमोडचाहून पुढे निघाले असता वाटेतील पाऊस टाळता येतो. साधारणपणे दोन महिन्यात कैलास-मानसाची यात्रा पुरी होते. हिमालयाची ही यात्रा केल्याने शरीर चिवट होते व मन शांत होते, असे सांगतात.

या यात्रेचा प्रसाद म्हणून यात्रेकरू कैलास-मानसखंडात उगवणारी एक सुवासिक वनस्पती कैलासधूप म्हणून बरोबर आणतात. याशिवाय कैलासविभूती, कैलासतीर्थ, गौरीकुंड-तीर्थ, मानसतीर्थ, दवणा, इ. वस्तूही प्रसाद म्हणून आणण्याची प्रथा आहे.

भगवान शंकराचे निवासस्थान असलेला दिव्य कैलासलोक तो हाच का दुसरा, हा वाद आहे. ज्याप्रमाणे साकेताचे प्रतिरूप, अयोध्याधाम व गोलोकाचे प्रतिरूप व्रजधाम मानले गेले त्याचप्रमाणे त्या शिवलोकाचे पृथ्वीवरील प्रतिरूप म्हणजे कैलासपर्वत होय, अशी भाविकांची श्रद्धा आहे. **पाहा**– मानस सरोवर. [ पु. इं.; हि. जॉ. ए. इं.; कल्याण–तीर्थांक; हि. कै. मा. ]

## कैलासगौरीव्रत

एक स्त्रीव्रत. एकटीने गुप्तपणे एक माप हळद दळून ती १०१ सुवासिनीना वाटायची, असा या व्रताचा विधी आहे. फल– सौभाग्यप्राप्ती. [ का. ट्रा. स. इं. ].

## कैलासपुराण

शिवमहापुराणाचा एक भाग. यात शिवाद्वैत वर्णिले आहे. शिव हे सर्वश्रेष्ठ तत्त्व आहे. त्याच्या ज्ञानाने मोक्ष मिळतो, असे याचे प्रतिपादन आहे. **पाहा** – शिवमहापुराण.

## कैवर्त

एक जात. ही जात संकरजन्य असल्याचे सांगितले आहे. ब्रह्मवैवर्त पुराणात म्हटले आहे, की क्षत्रियाने वैश्य स्त्रीच्या ठिकाणी उत्पन्न केलेला तो कैवर्त होय. प्राचीन काळी कैवर्त हे नौकानयनाचे काम करीत. कैवर्तांची उत्पत्ती निषाद पिता व आयोगवी माता याच्यापासून झाली, असे मनू म्हणतो (१०. ३४).

सांप्रत बिहार, ओडिसा, आसाम आणि विशेषत: बंगाल या प्रदेशात कैवर्त लोक आढळतात. हे लोक बंगालचे मूळ रहिवासी असून बिहारमधील केवट लोक यांच्याचपैकी असावे, असे रिस्ले म्हणतो. कामरूपात केवट व कैवर्त लोकाचे चासी व जलिया असे दोन पोटभेद झाले आहेत. चासी कैवर्त शेती करतात, तर जलिया मासे धरण्याचा धंदा करतात. या दोन वर्गात लग्नसबंध किवा अन्नव्यवहार मुळीच होत नाही.

**इतिहास** – बगालच्या पाल वंशातील दुसरा महीपाल याने प्रजेवर फार जुलूम केल्यामुळे प्रजेने त्याच्या विरुद्ध बंड केले. त्या बंडाचा नायक दिव्योक नामक एक चासी कैवर्त होता (इ. स. ११ वे शतक). त्या वेळी ही कैवर्त जात शूरपणासाठी प्रख्यात होती बंडखोरांनी महीपालाला ठार मारून दिव्योकाला गादीवर बसविले. त्याच्यानंतर त्याचा मुलगा भीम हा राजा झाला. पुढे महीपालाचा भाऊ रामपाल याने राष्ट्रकूटाची मदत घेऊन आपले राज्य परत मिळविले (इ. स. १०८४). १२ व्या शतकात बल्लाळ सेन याने याच कैवर्तांच्या मदतीने उ. बंगाल काबीज केला (इ. स. ११७१) व त्याची सुधारणाही केली.

जलिया कैवर्त सुशिक्षित झाला व सुधारला, की स्वत:ला चासी म्हणवून घेतो व इतर जलियांशी संबध ठेवीत नाही. सुशिक्षित व सुधारक चासी कैवर्तांची गणना महिष्य या नावाखाली होते. महिष्याने चासी कैवर्ताशी लग्न केले, तर त्याला वाळीत टाकतात. महिष्य जलिया कैवर्तांना फारच हलके समजतात.

क = पापी आणि वृत्ति = धंदा यावरून कैवर्त शब्दाची व्युत्पत्ती सांगतात. किवर्त म्हणजे हलका धंदा करणारा यावरूनही कैवर्त हे नाव पडले असावे. [ म. ज्ञा. को.; श. क.]

## कैवल्य

केवल = एक. त्याचा जो भाव ते कैवल्य. हा शब्द मोक्ष या अर्थी प्रयुक्त होतो. आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक अशा दु:खत्रयांचा आत्यंतिक वियोग म्हणजे कैवल्य होय (सांख्यप्रवचनभाष्य). आत्मसाक्षात्कार झाल्यानंतर कर्तृत्वादी अभिमान गळून पडून कर्माची निवृत्ती होते. त्यानंतर विवेकज्ञानाचा उदय होऊन आत्मा चित्स्वरूपात अवस्थित होतो, त्याला कैवल्य म्हणावे, असे पातंजलदर्शनात सांगितले आहे. 'अद्वितीयब्रह्मभावापत्ति:' = एकमेव अशा ब्रह्मभावाची प्राप्ती म्हणजे कैवल्य होय, असे वेदान्त्याचे मत आहे. 'ज्ञानादेव तु कैवल्यम्' =ज्ञानामुळेच कैवल्याची प्राप्ती होते, असे वेदान्ती म्हणतात. **पाहा**– मोक्ष. [ न्या. को. ]

**कैवल्योपनिषद** शांतिपाठावरून हे उपनिषद कृष्णयजुर्वेदीय दिसते; पण शेवटी 'अथर्ववेदीया कैवल्योपनिषत्समाप्ता' असा उल्लेख आहे. याचे दोन खंड असून पहिल्यात २३ श्लोक आहेत; तर दुसऱ्यात ४–५ ओळींची फक्त फलश्रुती आहे. हे उपनिषद ब्रह्मदेवाने आश्वलायनाला सांगितले आहे. त्याचा सारांश असा—

श्रद्धा, भक्ती व ध्यान यांच्या योगाने ब्रह्मविद्या प्राप्त होते. त्यागानेच अमृतत्व लाभते. म्हणून संन्यासाश्रम स्वीकारून इंद्रियसंयमपूर्वक परम तत्त्वाचे ध्यान करावे. नीलकंठ शिव हेच परम तत्त्व होय. जीव हा जागृती, स्वप्न व सुषुप्ती या त्रिपुरांत खेळत असतो; पण शिवाच्या कृपेने या पुरत्रयाचा लय होऊन जीवाला शिवस्वरूपाचा साक्षात्कार होतो. हे उपनिषद अद्वैतपरक असून त्याचा कल शैव संप्रदायाकडे आहे. [सी. ग. देसाई]

**कोंग वेल्लाळ** द. भारतातील एक जात. नावाखेरीज वेल्लाळांशी यांचे कोणतेही साम्य नाही. लहान खेड्यांत गवताच्या झोपड्या बांधून हे राहतात. शेती हा याचा मुख्य व्यवसाय आहे. कोंग पुरुष कानात वलये व मुरुगू (भिकबाळी) घालतात. स्त्रियांच्या दंडात ताईत असतो. यांचा तोंडन किंवा हक्कनबन कुरम् असा पोटभेद आहे.

**विवाहप्रथा—** आते-मामे भावंडांत लग्न होते. साखरपुड्याच्या वेळी वधूच्या पदरात एक फळ व विड्याचे पान बांधतात. त्या प्रसंगी वधूच्या व वराच्या मामाची उपस्थिती आवश्यक असते. लग्नाच्या दिवशी नवरा मुलगा मुद्दाम रोवलेल्या दगडाची पूजा करतो. मग त्याची आई त्याला तीन घास भरविते. मग न्हाव्याने त्याला ओवाळल्यावर तो वधूगृही जातो. तिथे त्याच्या कानातील वलये काढून ती वधूच्या कानात घालतात. मग ताळीबंधन होते.

मामाची मुलगी वरापेक्षा वयाने मोठी असली, तरी तिच्याशीच लग्न लावतात. यांच्यांत विधवाविवाह रूढ नाही. एखाद्या पुरुषाने विधवेशी अनैतिक सबंध ठेवल्यास त्याला जातिबहिष्कृत करतात. जर विधवा त्याला सोडायला तयार असली आणि त्याने तिला पोटगी दिली, तर त्याला पुन्हा जातीत घेतात. जातीत घेताना त्याला छड्या मारतात व त्याच्याकडून जातिभोजनासाठी एक मेंढी घेतात.

**मर्तकप्रथा—** मृतांना जाळतात. त्याच दिवशी मृताच्या अस्थी गोळा करून नदीत टाकतात. मग न्हावी दूध व तूप यांचे मिश्रण त्या जागेवर ओततो. अंत्यसंस्कारासाठी पुरोहिताला बोलावितात. [का. ट्रा. स. इं.]

**कोंगुनाडू** एक देश. याला कोंगु, कोंगुमंडलम् किंवा कोंगू देश अशीही नावे आहेत. कोईंबतूर व सालेम या तमिळनाडमधील जिल्ह्यांना प्राचीन काळी कोंगू देश असे म्हणत. तमिळ भाषेत कोंगू शब्दाचा एक अर्थ मध असा आहे. या प्रदेशात मध विपुल प्रमाणात मिळतो. त्यामुळे या प्रदेशाला हे नाव मिळाले असावे. इ. स. च्या प्रारंभी कोंगूच्या भोवती चोळ, पांड्य व केरळ ही राज्ये होती, असे कोंगुदेशराजक्कल या ग्रंथात सांगितले आहे. त्याच्या आग्नेय दिशेला कावेरी नदी वाहते. कोंगुनाडूचा सर्व प्रदेश डोंगराळ असून त्यात सुमारे पन्नास गिरिशिखरे आहेत.

प्राचीन काळी या प्रदेशात दाट लोकवस्ती होती. त्या वेळी इथले लोक पशुपालनाचा व्यवसाय करीत असावे, असा पुरातत्त्ववेत्त्यांचा तर्क आहे. संघम्साहित्यात या लोकाच्या संबधी काही उल्लेख आले आहेत. त्यांवरून असे दिसते, की हे लोक मुख्यतः शिकारी व लढवय्ये होते आणि तरीही त्यांना कृषिविद्या अवगत होती.

इ. स. च्या प्रारंभी या प्रदेशात मळवर, कोशर, कोंगर व वेदर या जमाती होत्या. त्यांपैकी कोशर लोक मौर्यकाळात उत्तरेकडून निघाले आणि त्यानी तुळू देशात प्रथम वसाहत केली. तिथून ते कोंगू देशान आले आणि त्यांनीच तिथे इ. स. च्या २ऱ्या शतकात प्रथम स्वतंत्र राज्य स्थापिले. कोशर लोक अत्यत सुसंस्कृत होते. मळवर लोक शूर, लढवय्ये होते. कोंगर लोक पशुपालक होते. वेदर लोक अतिशय नृत्यप्रिय असून, त्यांना पुष्कळ नृत्यप्रकार अवगत होते. या सर्व लोकांपैकी कोंगर लोकांनी या देशात कायमची वस्ती केली.

कोंगू देशाच्या राजकीय इतिहासात चेर वशाचे नाव प्रथम येते. याच्या काही भागांवर दोन–तीनशे वर्षे चेर वंशाची सत्ता होती. त्या काळात पश्चिमेकडील देशांशी कोंगूचा मोठा व्यापार चालत असे.

इ. स. च्या ३ ऱ्या शतकात चेर वशाची सत्ता कमजोर झाली आणि वीररायनामक रेट्टी किंवा रट्ट वंशातील राजाने तिथे आपली सत्ता प्रस्थापित केली. त्याने सर्व कोंगू देश आपल्या अमलाखाली आणला. हा रट्ट वंश म्हणजे राष्ट्रकूट वंशच होय. त्यांनी साधारणपणे इ. स. २५० ते ४०० या कालात कोंगू देशावर राज्य केले. हा काळ एकूण सुखसमृद्धीचा होता. या वंशातील शेवटचा राजा तिरुविक्रमदेव चक्रवर्ती हा पराक्रमी निघाला. त्याने चोळ, पांड्य, केरळ, मलयाळ व कर्नाटक या सर्व देशांवर आपली सत्ता स्थापिली. त्या काळात द. भारतात जैनधर्माचा प्रसार मोठ्या प्रमाणावर झालेला होता. तिरुविक्रमदेव हाही प्रथम जैन होता. पण पुढे त्याने

जैन धर्माचा त्याग करून शैव धर्माची दीक्षा घेतली, त्यामुळेच त्याच्या सत्तेचा ऱ्हास झाला. रट्ट वंशाच्या कारकीर्दीत कोंगू देशाचा फार उत्कर्ष झाला होता. स्कंदपुरम् ही त्यांची राजधानी होती. त्यांची राज्यव्यवस्था उत्तम होती.

रट्टवंशानंतर कोंगू देशावर जैन आचार्य सिंहनंदी याने गंग वंशाची सत्ता स्थापन केली. या वंशातील दुर्विनीत, कोंगनी (तृतीय) व गंगदेव हे राजे विशेष पराक्रमी होते. त्यांनी चोळ, पांड्य, आंध्र, द्रविड, कलिंग, वराड, महाराष्ट्र, इ. देश जिंकून घेतले. इ. स. ४६० मध्ये गंग राजांनी स्कंदपुरम्‌हून तलकाद येथे आपली राजधानी नेली. ६१० साली दुर्विनीत गादीवर आला. तेव्हापासून एका शतकाचा काळ कोंगुनाडूला अत्यंत भरभराटीचा गेला. या काळात बदामीच्या चालुक्य राजाशी त्याचे सख्य झाले. दुर्विनीत हा पुलिकेशी (द्वितीय) याचा सासरा व विक्रमादित्य (प्रथम) याचा आजा होता. त्याने कोंगू व गंगवाडी हा प्रदेश आपल्या सत्तेखाली आणला आणि चालुक्य राजा विक्रमादित्य (प्रथम) याला गादीवर बसविले. दुर्विनीत व त्याच्या नंतरचे दोन–तीन राजे यांची कारकीर्द पल्लवांशी झगडण्यात खर्ची पडली. पण कोंगनीवर्मन् (तृतीय) याची कारकीर्द (इ. स. ६८० ते ७२५) मात्र शांततेची व समृद्धीची ठरली. त्याने आपल्या राज्याचे दोन भाग करून त्यांवर आपल्या दोन पुत्रांना राज्यपाल नेमले. कोंगनीवर्मन्‌च्या मृत्यूनंतर गंग वंशाच्या सत्तेला उतरती कळा लागली आणि ९ व्या शतकाच्या उत्तरार्धात तिथे चोळ वंशाचे राज्य सुरू झाले.

इ. स. ८९४ च्या सुमारास चोळ राजा आदित्य याने कोंगू देश जिंकला. त्याचा पुत्र परातक हा ९०७ साली तंजाऊर येथे सिंहासनावर बसला. ९१५ साली त्याने सर्व पांड्य राज्य जिंकून घेतले. पण ९४९ साली राष्ट्रकूट राजा कृष्णदेव (तृतीय) याने त्याचा मोठा पराभव केला आणि त्याच वेळी कोंगू देश परांतकाच्या हातातून गेला. पण पंधरा-वीस वर्षांत चोळ राजांनी पुनश्च आपली सत्ता सर्वत्र प्रस्थापित केली. त्यानंतर राजराज चोळ याची कारकीर्द बरी गेली. त्याने कोंगूमध्ये राज्यकारभारासाठी नेमलेले प्रतिनिधी त्याच्या मृत्यूनंतर स्वतंत्र होऊन राज्य करू लागले. अशा परिस्थितीत इ. स. ११०० च्या सुमारास होयसळ राजा बल्लाळ (प्रथम) याने कोंगू देश जिंकून घेतला. यानंतर चोळ व होयसळ यांच्यांत परस्पर संघर्ष होतच राहिले आणि कोंगूवर आलटून पालटून त्या दोघांची सत्ता चालू राहिली. १२२४ सालानंतर पांड्य राजांनी तिथे आपले वर्चस्व स्थापिले. पण १२९१ सालानंतर होयसळ राजा बल्लाळ (तृतीय) याने पुन्हा कोंगू देश जिंकला व १३५२ पर्यंत तिथे राज्य केले.

चोळ राजांनी दक्षिणेतल्या शैव व वैष्णव पंथांना प्रोत्साहन दिले. त्यांच्या काळात अनेक मंदिरे, विशेषत: शिवमंदिरे बांधण्यात आली. त्या वेळची ती देवस्थाने म्हणजे विद्येची केंद्रेच होती. याशिवाय चोळांच्या राज्यात अनेक मठ, विहार व पाठशाळा विद्यादानाचे कार्य करीत होत्या.

१५व्या शतकाच्या प्रारंभी कोंगुनाडू विजयनगरच्या वर्चस्वाखाली गेला. इ. स. १५२९ मध्ये कृष्णदेवरायाचा मृत्यू झाला. त्यानंतर कोंगू देशात यादवी युद्धे माजली. या संधीचा फायदा घेऊन मदुरेच्या नायकांनी कोंगुनाडूवर आपला अंमल चालू केला. त्यांची सत्ता सुमारे १५० वर्षे टिकली. नायक राजे प्रारंभी विजयनगरचे प्रतिनिधी होते; पण पुढे ते स्वतंत्रपणे राज्य करू लागले.

विजयनगरच्या वर्चस्वाच्या काळात कोंगू देशात शेतीची सुधारणा झाली व अनेक उद्योगधंद्यांचा विकास झाला. शैव व वैष्णव पंथांच्या प्रसाराबरोबरच १७ व्या शतकात तिथे ख्रिस्ती धर्माचाही शिरकाव झाला.

१७ व्या शतकाच्या उत्तरार्धात कोंगू देशावर म्हैसूरच्या राजांची सत्ता सुरू झाली. चिक्कदेवरायाच्या कारकीर्दीत (इ. स. १६७२ ते १७०४) कोंगूमध्ये उत्तम राज्यव्यवस्था सुरू झाली. चिक्कदेवरायाने जमिनीची नीट पाहणी करून पाटबंधाऱ्यांचीही चांगली व्यवस्था केली. म्हैसूराधिपतींची सत्ता कोंगू देशाला फारच उपकारक ठरली. त्यांनी या देशाचा पुष्कळच विकास घडवून आणला. १७९९ साली म्हैसूरचे राज्य इंग्रजांच्या ताब्यात गेले. त्याबरोबर कोंगूचाही ताबा त्यांच्याकडे गेला. [ कों. क. ]

**कोंड** ओडिसामधील आदिवासी लोकांपैकी सर्वांत प्रसिद्ध व बहुसंख्य जमात. आंध्र, बंगाल व मध्य प्रदेश या भागातही त्यांची वस्ती आहे. को किंवा कु म्हणजे पर्वत होय. त्यावरून डोंगराळ भागात राहणाऱ्या लोकांना कोंड किंवा कोंढ हे नाव पडले असावे. हे लोक स्वत:ला कु असे म्हणतात आणि म्हणून त्यांच्या भाषेला कुई हे नाव आहे. हे द्रविड वंशाचे आहेत.

याचे तीन गट आहेत, ते असे – (१) कुट्टिया कोंड – गंजमच्या वायव्येकडील डोंगराळ भागात राहणारे रानटी लोक, (२) सुधारलेले कोंड – कलहंडी, कोरापुट व गंजमचा सपाट भाग यांत वसलेले आणि (३) कोंड दोरा – आंध्र प्रदेशातील डोंगराळ भागातले कोंड.

कुट्टिया कोंड दरवर्षी वस्ती बदलतात आणि नवीन जागी शेती करतात.

सुधारलेले कोंड स्थायिक झालेले असून तिथेच शेती करतात.

सर्व कोंड लोकांत सामुदायिक शयनगृहांची प्रथा आहे. मुलासाठी स्वतंत्र शयनगृहे असतात.

**देव-धर्म** – मानवी रक्ताच्या योगाने जमीन फार सुपीक होते, असा या लोकांचा समज आहे. त्यासाठीच पूर्वी यांच्यांत नरबलीची चाल होती. त्यांच्या कथामध्ये तिचा उल्लेख वारवार येतो. आता मनुष्याऐवजी रेडा बळी देतात. पण त्यालाही मेरिया हे जुनेच नाव आहे.



कोंड स्त्री

बुरा पिन्नू व दर्नी पिन्नू (धरतीमाता) या दोन देवता सर्व सृष्टीची निर्मिती व पोषण करतात, असे त्यांच्या लोककथांत म्हटलेले आहे. दर्नी पिन्नू हिच्या ठायी दैवी शक्ती असूनही ती मानवी व्यक्ती वाटते. परमगुट्टी हा तिचा पती तिला मदत करीत असतो. हे लोक असंख्य देवतांना व भुताखेतांना मानतात. त्यांना शांत ठेवण्यासाठी मांत्रिक व पुरोहित यांची त्यांना नेहमी आवश्यकता भासते. यांच्या मांत्रिक स्त्रियांना इतर जमातीचे लोक चेटकी समजतात. कोंडांचा जादुटोणा फार प्रभावी असतो अशी समजूत आहे. या लोकांना रंगीबेरंगी कपडे व नाना प्रकारचे दागिने घालण्यांची आवड आहे. पण सर्वसाधारण कोंड मनुष्य दरिद्री असल्यामुळे ती आवड त्याला भागवता येत नाही.

हे लोक कुमेरी पद्धतीने भातशेती करतात व जंगलातून मध व मेण गोळा करून आणतात. शिकार करण्यात हे तरबेज आहेत. त्यासाठी ते धनुष्यबाण व टांगी नावाची लहानशी तीक्ष्ण कुऱ्हाड वापरतात.

कुट्टिया कोंडांच्या स्त्रिया डोक्याला फेटयासारखा कपडा बांधतात व कमरेला एक वस्त्र गुंडाळतात. छातीचा भाग मण्यांच्या माळा घालून झाकतात. त्या पितळेच्या जड बांगडया कोपरापर्यंत घालतात.

आंध्रप्रदेशातील विशाखापट्टणम् व गोदावरी जिल्हयातील डोंगराळ भाग यात वसलेल्या कोंडांना कोंड दोरा किंवा कोंड कापू म्हणतात. हे तेलुगू भाषा बोलतात. यांचे पेद्द कोंडलू व चिन्न कोंडलू असे दोन मुख्य भेद आहेत. हे स्वत.ला पांडवरेड्डी, राजरेड्डी किंवा सूर्यवंशीरेड्डी असे म्हणवितात.



याच्यांतले काही शैव, तर काही वैष्णव आहेत. शिवाय हे लोक पाडवांना, भुताखेतांना आणि पोट्टराझू, सारलम्म व उनमललम्म या देवतांना भजतात.

**विवाहप्रथा** – मुलीला पळवून नेऊन तिच्याशी लग्न करण्याची प्रथा या लोकांत आहे. मामेबहिणीशी किंवा बहिणीच्या मुलीशी लग्न करता येते. हे मुलीचे देज घेतात.

या लोकांच्या स्वतःच्या जमिनी नसून, तेलुगू लोकांच्या शेतात हे मजुरी करतात.

मृत माणूस पुन्हा त्याच कुटुंबात जन्म घेतो, अशी यांची समजूत आहे. कोंड लोकांत पूर्वी बालहत्त्येची चाल होती. विशेषतः हे मुलीची हत्त्या करीत असत. पण आता ती बंद झाली आहे.

**मर्तिकप्रथा** – हे लोक मृतांना जाळतात. दुसऱ्या दिवशी दहनभूमीवर भात ठेवतात. तिसऱ्या दिवशी मृताची तृणप्रतिमा करून घराच्या छपराला टांगतात व सर्व नातेवाईक तिथे जमून शोक करतात. शेवटी ज्ञातिभोजन होते.

हे लोक उत्सवसमारंभात व रेडा बळी देण्याच्या प्रसंगी बेहोष होऊन नाचतात. [ ट्रा. मि. ओ.; का. ट्रा. स. इं. ]

## कोंड्र

द. भारतातील एक जात. या लोकांना कोंडार असेही म्हणतात. समुद्राखेरीज इतर जलाशयांत हे लोक मासे पकडतात. यांच्यांतले काही लोक स्वतःला दास धीवर म्हणवून घेतात. दशरथाच्या मृत्यूची बातमी रामाला सांगण्यासाठी भरत होडीतून निघाला असता ज्या कोळचाने ती होडी वल्हविली, त्या कोळचाचे आपण वंशज असल्याचे हे सांगतात. याशिवाय यांच्या मच्छ कोंड्र व दंडासी कोंड्र अशा दोन पोटजाती आहेत. कावळा, कोल्हा, गाय, गिधाड, इ. त्यांची देवके आहेत. यांच्या जातिप्रमुखाला बेहरा असे म्हणतात. लग्नाच्या व अंत्यसंस्काराच्या वेळी त्याला दक्षिणा द्यावी लागते. हे गंगादेवी, चामुंडा, कालिका, इ. देवतांना भजतात. मृतांना जाळतात. मृताच्या अस्थीचा एक तुकडा घरी नेतात व दहा दिवस त्याला अन्न अर्पण करतात. [ का. ट्रा. स. इ. ]

## कोंदिवटी लेणी

ठाणे जिल्ह्यात अंधेरी स्टेशनापासून दोन कोसांवर एका टेकडीमध्ये ही लेणी आहेत. यांना महाकाळाची लेणी असेही म्हणतात. ही बौद्ध लेणी इ. स. च्या २ ऱ्या ते ६ व्या शतकाच्या दरम्यान कोरलेली आहेत. यांची संख्या १९ आहे. पहिल्या समूहातील चार

लेणी चौथ्या-पाचव्या शतकातील असून, ती राहण्यासाठी बाधलेली दिसतात. त्यात निजण्याच्या खोल्या, ओटे, दिवाणखाने, पाण्याची टाकी वगैरे आहेत. तिथून जवळच दोन पडके स्तूप आहेत.

या स्तूपांच्या वरच्या अंगाला १५ लेण्याचा दुसरा समूह आहे. त्यातील ४ थे लेणे देवळासारखे असून, त्याच्या अंगणातील उजव्या बाजूच्या भिंतीवर एक मोठा सातमुखी नाग कोरलेला आहे. ९ वे लेणे सर्वांत जुने असून, त्यात पडवीच्या पुढे एक भव्य सभामंडप आहे. तिथे एक शिवलिंग आहे, त्याला महाकाळ म्हणतात. या लेण्यांना महाकाळाची लेणी हे नाव त्यावरूनच पडले आहे. ब्राह्मणधर्माच्या भरभराटीच्या काळात हे निर्माण झाले असावे.

सभामंडपाच्या उजव्या बाजूच्या भिंतीत कोरीव मूर्ती आहेत. मागील भितीत २० फूट लांबीचा अर्धचंद्राकार गाभारा कोरलेला आहे. त्याचे शिखर १५ फूट उच आहे. त्याच्या मधोमध ८ फूट उचीचा दागोबा आहे. अशा प्रकारचे गाभारे बिहार प्रांतातील दोन लेणी सोडल्यास, उभ्या भारतात इतरत्र कुठेही नाहीत. पूर्वेकडील भितीवर उपदेशक बुद्धाची मूर्ती कोरलेली आहे. बुद्धाचे कमलासन पाचफडी नागाने उचललेले असून, त्याच्या दोन्ही बाजूंना दोन नागकन्या व दोन सेवक आणि वर दोन विद्याधर आहेत. जवळच आणखी सात बुद्धमूर्ती व एक अवलोकितेश्वराची मूर्ती आहे. बाकीची लेणी राहण्याची असून, ती सर्व पडकी आहेत. जवळच दोन टाकी आहेत. [ म. ज्ञा. को. ]

## कोंबडा

(१) एक बलियोग्य पक्षी. कोंबडयाचे उल्लेख ऋग्वेदात आढळत नाहीत; पण अथर्ववेदात मात्र आढळतात. तिथेच तो पाळीव पक्षी असल्याचेही कळते. आपल्या घरच्या कोंबडयावर राक्षसानी किंवा शत्रूनी जादूटोणा करू नये, म्हणून अथर्ववेदातील ऋषींनी प्रार्थना केली आहे. कोंबडा पहाटे आरवतो व उषःकालाचे सूचन करतो, म्हणून त्याला सूर्याचे प्रतीक मानलेले आहे. हा संबंध वेदकालाइतका जुना आहे. अश्वमेधात सवितृदेवतेसाठी कोबडयाचा बळी द्यावा, असे सांगितले आहे.

पुढील काळात कोंबडा यज्ञसंस्थेतून बहिष्कृत केलेला दिसतो; पण असे असले, तरी कोंबडयाचे बलिदान मात्र थांबले नाही. समस्त ग्रामदेवतांना कोंबडयाचा बळी फार आवडतो. भूत-पिशाचांना संतुष्ट करण्यासाठीही कोंबडा बळी देण्याची प्रथा सर्वत्र आहे.

पुराणात कोंबडयाविषयी पुढील विधि-निषेध आढळतात— कोंबडयाला श्राद्धातला पिंड खायला देऊ नये (ब्रह्मांड पु. ३. ७. ४५५). कोंबडयाला मारतो, तो नरकात जातो (ब्रह्मांड पु. ४. २.१६५). प्रदोषकाळी कोंबडा आरवल्यास ते त्या स्थानाला अशुभ समजावे (मत्स्य पु. २३६.५ ). कोंबडयापासून कोणते गुण घ्यावे, ते वृद्ध चाणक्याने पुढील श्लोकात सांगितले आहे—



कोंबडा

**युद्धं च प्रातरुत्थानं भोजनं सह बन्धुभिः ।**
**स्त्रियमापद्गतां रक्षेत् चतुः शिक्षेत कुक्कुटात् ॥**

( अ. ६ )

अर्थ— युद्ध, प्रातःकाळी उठणे, बांधवांसह भोजन आणि संकटात सापडलेल्या स्त्रीचे रक्षण, या चार गोष्टी कोंबडयापासून शिकाव्या.

कोंबडा हे स्कंदाचे चिह्न असून, ते त्याला वायूने दिले आहे. पाहा— कुक्कुटयुद्ध.

(२) मुलींचा एक खेळ. यात मुली डाव्या पायाच्या गुडघ्यावर उजवा पाय चढवून उकिडव्या बसतात, दोन्ही तळहात जुळवून गुडघ्यावर ठेवतात व कोंबडयाप्रमाणे उड्या मारीत जातात. तसे करताना त्या पुढील गाणे म्हणतात—

**सईबाईचा कोंबडा आला माझ्या दारी,**
**घालीन चारा, पाजिन पाणी**
**हाकलीन वारा बिलमोगरा,**
**बिलाचे काटे सागर गोटे,**
**सासरच्या वाटे कुचकुच काटे**
**माहेरच्या वाटे हरिख दाटे ॥**

पंखाचा कोंबडा व उडतकोंबडा असे याचे आणखीही प्रकार आहेत. पाहा—उडतकोंबडा.

## कोइरी

उत्तर प्रदेश, बिहार, ओडिसा, बंगाल व आसाम या प्रदेशांत वसलेली एक जात. हा शब्द संस्कृत कृषि-

कार या शब्दावरून बनला असावा. कूर्मी जातीशी यांचे बरेच साम्य आहे. मात्र बंगालमधील कोइरी कूर्मींशी अन्नव्यवहार करीत नाहीत. कर्नल डाल्टनच्या मते कोइरी लोक हे बंगालमधील प्राचीन आर्यांचे वंशज असावे. मात्र त्याच्यांत काही अनार्य रक्तही असणे शक्य आहे. शेती हा याचा मुख्य व्यवसाय आहे.

या लोकांच्या अनेक पोटजाती असून निरनिराळ्या जिल्ह्यांतील त्याची नावे भिन्न आहेत. एकूण पोटजातीची संख्या १४० असून त्यातील सर्वारिया, प्रयाग, कनौजिया, इलाहाबादी, ब्रिजवासी, पुरभैया, दक्षिणी, बनारसीय, मगही, कच्छवाह, नाराईगण, भक्तिया, साक्रिया, इ. जाती मुख्य आहेत.

**विवाहप्रथा**— या पोटजातीची चटई नावाची मडळे असतात व त्याच्या जातिविषयक सभा होतात. प्रत्येक चटईचा एक चौधरी म्हणजे पुढारी असतो. याच्या समतीनेच लग्नसबध ठरविले जातात. यांच्या लग्नात प्रथम वराच्या कपाळाला तिलक व अक्षता लावतात. मग वधूला नवीन वस्त्र देतात. लग्न समारंभात कन्यादान, तेलहळद, इ. सर्व कृत्ये केली जातात. लग्ने लावण्याचे काम ब्राह्मण करतात. लग्न लागल्यावर बायका विवाहगीते म्हणतात.

**देव-धर्म**— कोइरी लोक वैष्णव पंथाचे आहेत. काही जण पांचोपीर व महावीर यांनाही भजतात. मात्र या दोन देवांचे उपासक परस्परांशी लग्नव्यवहार करीत नाहीत.

परमेश्वरी व हनुमान ही यांची ग्रामदैवते आहेत. खांब व वृंदावन ही या दैवतांची प्रतीके प्रत्येक घराच्या अंगणात असतात. याशिवाय मारांग बुरू, बारा पहाड, बंदी, गोराया, धरमराज, रामठाकूर, इ. देवांनाही हे लोक भजतात.

हे लोक उत्तम शेतकरी असून अफू, तंबाखू, सर्वप्रकारची धान्ये, फळे व भाजीपाला या पदार्थांचे उत्पादन करतात. हे उद्योगी व स्वावलंबी आहेत. त्यामुळे सहसा नोकरी करीत नाहीत. यांचे सामाजिक जीवन बरेच शुद्ध असते.

गोरखपूर भागातले सर्व कोइरी चांभार आहेत. पण ते स्वत.ला कोइरी न म्हणवता कोरी म्हणवतात. या लोकांच्या हातचे पाणी ब्राह्मणांना चालते.

हे लोक मृताचे दहन करून पिंडदान करतात. यांच्यांत श्राद्ध करण्याची चाल नाही. [ म. ज्ञा. को.; से. इं. १९५१ ]

## कोइल तंपुरान

द. भारतातील एक लहान जमात. हे लोक मुळात क्षत्रिय होते, असे सांगतात. चेरमान पेरुमाळाशी या लोकांचा संबंध होता, असे परंपरा सागते. यांच्यापैकी काही पुरुषांना त्रिवांकुर येथे बोलावण्यात येऊन, त्यांना राजघराण्यातील मुली देण्यात आल्या. या स्त्रियांपासून पुढ जी संतती निर्माण झाली, तिला कोइल तंपुरान असे नाव मिळाले. निरनिराळ्या सात गावी यांचे वंशज आहेत.

कोइल तंपुरान जातीतील सर्व लोक एकमेकांचे नातेवाईक मानले जातात. याच्यांत मातृसत्ताक कुटुंबपद्धती आहे. नंपूतिरी ब्राह्मण यांच्या मुलींशी विवाह करतात. ब्राह्मण लोकाप्रमाणेच यांच्यांत जातकर्म, नामकरण, अन्नप्राशन, इ. संस्कार केले जातात. प्रथम जन्मलेल्या मुलाचे नाव मात्र नेहमी राजराजवर्मा असे ठेवतात. सोळाव्या वर्षी मुलाची मुंज करतात.

चित्रकार राजा रविवर्मा हा याच जातीचा होता, असे म्हणतात. [ का. ट्रा. स इं. ]

## कोइलोलुगू

तमिळ भाषेतील एक काव्यग्रंथ. इ. स. च्या १३ ते १६ या शतकातील द. भारतातल्या राजांचा इतिहास या ग्रंथात कथन केलेला आहे. श्रीरंगम् येथील श्रीरंगनाथाच्या मंदिराला मिळालेल्या देणग्या व मंदिराची दुरुस्ती यांचीही प्राचीन काळापासूनची माहिती यात दिलेली आहे. तिचा तपशील असा—

ब्रह्मा रंगनाथाची पूजा करीत असता इक्ष्वाकूने त्याच्याकडून ती मूर्ती अयोध्येला नेली. पुढे रामचंद्राने ती बिभीषणाला दिली. त्याने ती श्रीरंगम् बेटात स्थापिली. पुढे धर्मवर्मा या चोळ राजाने तिच्यावर मुख्य मदिर बांधले. कालांतराने हे मंदिर रेतीने झाकले गेले व बेटावर जंगल वाढले. पुढे किल्ली या चोळ राजाने रेती दूर करून त्या मंदिराचा पुनरुद्धार केला. त्यानंतर एका चोळ राजाच्या पापाचरणामुळे पुन्हा त्या भागावर रेती चढली आणि त्या गावाचा नाश झाला. [ म. ज्ञा. को. ]

## कोकण

सह्य पर्वत आणि अरबी समुद्र यांच्यामधील अरुंद पट्टीला कोकण म्हणतात. ठाणे, कुलाबा व रत्नागिरी हे जिल्हे, मुंबई व तिची उपनगरे, गोमंतक व त्याच्या दक्षिणेकडील काही भाग याचा सांप्रत कोकणात समावेश होतो.

**प्राचीन उल्लेख**— प्राचीन काळी भडोचच्या दक्षिणेकडील भूप्रदेशाला अपरात हे नाव होते. कोकण हे अपरांताचेच समानार्थक नाव होय. काही ठिकाणी त्याचा उल्लेख कुंकण किंवा कुंकुण असाही आहे. सातव्या शतकातील प्रपंचहृदय या ग्रंथात कूपक, केरळ, मूषक, आळुक, पशुकोकण व परकोकण अशी कोकणाचीं नांवे दिली आहेत. सह्याद्रिखंडातही सात कोकणे सांगितली आहेत, ती अशी—

**केरलाश्च तुलंगाश्च तथा सौराष्ट्रवासिनः ।**
**कोंकणाः करहाटाश्च करनाटाश्च बर्बराः ।।**
**इत्येते सप्त देशा वै कोंकणाः परिकीर्तिताः ।**
( सह्याद्रिखंड उत्तरार्ध ६.४७–४८ )

ही सात कोकणे लाट देशापासून केरळापर्यंत पसरलेली होती.

चिनी प्रवासी युआन च्वांग याच्या वर्णनावरून कोकणात वनवासी, बेळगाव, धारवाड, इ. घाटापलिकडच्या प्रदेशांचाही अतर्भाव होत होता, असे कळते. मध्ययुगात कोकणाचे तीन भाग मानले गेले होते, ते असे—तापीपासून वसईपर्यंत बर्बर, तिथून बाणकोटपर्यंत विराट व पुढे देवगडपर्यंत किरात.

चेर देशास कांग किंवा कोंग म्हणत असत. त्यावरून कोंगवत हा शब्द व त्यापासून कोकण हे नाव पडले असावे, असे श्री. भागवत म्हणतात. कोण-कोण ( कोण = डोंगरमाथा ) या शब्दावरून कोकण हा शब्द आला असावा, असे एक मत आहे. किंवा परशुरामाची माता कुंकणा हिच्यावरून कोकण हे नाव या प्रदेशाला मिळाले असावे, असेही म्हणतात. डांगमधील लोक या कुंकणा किंवा कोकणदेवीला भजतात. हरसुळापासून दोन कोसांवर नळदुणे गावी या देवीचे स्थान आहे. जमदग्नी, परशुराम व रेणुका यांच्या मूर्ती कोकणदेव या नावाने या भागात पुजण्यात येतात. त्यांच्या वास्तव्याने पवित्र ठरलेली अनेक तीर्थे सबंध पश्चिम किनाऱ्यावर आहेत. परशुरामाच्या कर्तृत्वाशी विशेष संबद्ध अशी वज्रेश्वरी, शूर्पारक (सोपारा), चिपळूण व गोवे ही चार स्थाने कोकणातच आहेत.



कोकणाचा नकाशा

डॉ. एस्. कृष्णस्वामी ऐयंगार यांच्या मते कोकण हा शब्द तमिळ भाषेतून निर्माण झाला आहे. सधम् कालातील तमिळ साहित्यात या शब्दाचा उल्लेख येतो. कोकण हे रूप कोळ् व काणम् या दोन शब्दांच्या संयोगापासून झाले आहे, असे त्याचे म्हणणे आहे. कोळ् म्हणजे जबरदस्तीने ताबा घेतलेले; अर्थात् जबरदस्तीने ज्या प्रदेशाचा ताबा घेतला, असा प्रदेश असा याचा अर्थ होतो. तमिळ वाङ्मयात पळिनाडु प्रदेशावर राज्य करणारा नन्नन् याला कोकणाचा अधिपती मानले जाते. तथापि ह्या प्रदेशातून कावेरी नदी वाहते असा उल्लेख आहे. तेव्हा कावेरी नदीच्या सभोवतीचा प्रदेशही कोकण याच नावाने ओळखला जात असावा असे वाटते.

सनपूर्व ४ थ्या शतकापासून कोकण हे नाव प्रसिद्ध आहे. बृहत्संहिता, राजतरगिणी व चालुक्यांचे शिलालेख यात कोकणाचे उल्लेख आढळतात. पेरिप्लस, प्लिनी, टॉलेमी, स्ट्रॅबो, अल्बिरूनी, इ. प्राचीन परदेशी ग्रंथकारांनीही कोकण या नावाचा उल्लेख केला आहे. यावरून प्राचीन काळापासून हा प्रदेश ग्रीस, ईजिप्त, चीन, इ. देशांत माहीत होता, असे दिसते. सनपूर्व ५ व्या शतकापासून बाबिलोन, रोम, इ. दूरच्या देशांचा कोकण प्रांताशी व्यापार चालत होता. भडोच, चेऊल, बनवासी, नवसारी, सोपारा, बलेपाटण, चंद्रपूर, कल्याण ही त्या वेळची प्रसिद्ध व्यापारी केंद्रे होती.

**इतिहास**— सनपूर्व ३ ऱ्या व २ ऱ्या शतकात कोकण प्रांत मौर्यांच्या ताब्यात होता. १ ल्या

शतकात महाराष्ट्र व कोकण या प्रदेशांवर सातवाहनांचे आधिपत्य होते. हे सातवाहन म्हणजे पुराणातील आंध्रभृत्य होत. यांची सत्ता तिथे सनपूर्व ७३ ते इ. स. २१८ पर्यंत नांदली. इ. स. च्या ४ थ्या व ५ व्या शतकात हा प्रांत कलचुरी राजांच्या अमलाखाली गेला. ६ व्या शतकात तिथे पुन्हा मौर्यांची सत्ता आली. ७ व्या शतकात चालुक्य पुलिकेशीने मौर्यांचे उच्चाटन करून तिथे आपली सत्ता स्थापिली. त्यानंतर तिथे शिलाहारांचा अंमल चालू झाला. तेव्हापासून ४५० वर्षांच्या कालावधीत २० शिलाहार राजांनी कोकणावर राज्य केले. इ.स. १२६० साली देवगिरीचा राजा महादेव याने कोकणावर स्वारी करून तो प्रांत आपल्या राज्याला जोडला. त्याने तिथे आपले प्रतिनिधी नेमले



पोफळीची बाग — कोकण

होते. त्यांना सर्वाधिकारी किंवा महाप्रधान अशी पदवी होती. इ.स.१३१८ मध्ये देवगिरीचे राज्य कोलमडले, तरी यादवांच्या वंशातील नागरदेव हा १३४७ पर्यंत कोकणावर राज्य करीत राहिला. त्या वर्षी गुजरातच्या सुलतानाने नागरदेवाचा पराभव करून कोकण प्रांत जिंकला. मुसलमानी सत्ता तिथे १५ व्या शतकाच्या अखेरीपर्यंत चालू होती. १६ व्या शतकाच्या प्रारंभी पोर्तुगीजांनी कोकणात प्रवेश केला व तिथे आपली सत्ता हळूहळू वाढवली. त्यांनी भयंकर धर्मच्छल केला व हजारो लोकांना बाटवून ख्रिस्ती केले. शिवाजी महाराजांनी जंजिरा सोडून सर्व दक्षिण कोकणात आपली सत्ता स्थापिली होती. पण उत्तर कोकणात पोर्तुगीजांचा अंमल इ. स. १७३९ पर्यंत अव्याहत चालू होता. त्या वर्षी चिमणाजी अप्पाने वसईचा किल्ला सर करून पोर्तुगीजांची तिथली सत्ता नष्ट केली व कोकणावर पेशव्यांची सत्ता स्थापिली. पण पुढे लवकरच तो प्रांत इंग्रजांच्या ताब्यात गेला.

इंग्रजी अंमलाखाली कोकणचा राज्यकारभार अधिक सुरळीत चालू झाला. तथापि या प्रदेशाच्या वैभवाला त्यापुढे उतरती कळा लागली. डोंगराळ प्रदेश, खारी व नापिक जमीन आणि उत्पादनाच्या इतर साधनांचा अभाव, या कारणांमुळे कोकणची आर्थिक प्रगती मंदावली. त्याचबरोबर शेतसारा आणि कराचे प्रमाणही बरेच वाढले.

अलेक्झांडर नैरन यांच्या मते मराठी सत्तेचा लोप झाल्याबरोबर कोकणच्या आर्थिक पीछेहाटीस सुरुवात झाली, त्याला तीन महत्त्वाची कारणे आहेत. पहिले कारण असे, की मराठ्यांच्या सैन्यात अधिकांश भरती कोकणप्रातातूनच होत असे. मराठी राज्याच्या अस्ताबरोबर लक्षावधी सैनिक मायदेशी परतले. त्यांना उपजीविकेस शेतीशिवाय कोणतेही साधन राहिले नाही. त्यामुळे जमिनीवरील बोजा अतोनात वाढला आणि प्रतिवर्षी दारिद्र्यात भर पडू लागली. दुसरे कारण असे, की पुणे येथील राज्यासन नष्ट झाले आणि मराठी सैन्य नाहीसे झाले म्हणून कोकणच्या शेतीमालाची मागणी घटली. याचा कोकणच्या बाजारपेठेवर फार दूरगामी परिणाम झाला. तिसरे कारण असे, की मराठी राज्याच्या उत्तर कालात सत्ताधिकार पेशवे घराणे आणि त्यांचे आप्तस्नेहीमंडळ यांचेकडे होते. या सत्ताधारी वर्गाचा कोकणाशी निकटचा संबंध होता. त्या वर्गाचा लोप झाल्यामुळे कोकणचे महत्त्वही नष्ट झाले. पुढे इंग्रजी राज्यकारभारातही कोकणाच्या विकासाकडे योग्य ते लक्ष्य पुरविले गेले नाही. सह्याद्रीच्या पश्चिमेकडील हा प्रदेश अत्यंत डोंगराळ व उंचसखल असा असल्याने, तिथे लोहमार्ग बांधले गेले नाहीत. लोहमार्गाचा अभाव हे कोकणाच्या पीछेहाटीचे अत्यंत महत्त्वाचे कारण मानलेले आहे.

**प्रसिद्ध स्थाने**— कोकणात बौद्ध व ब्राह्मणी लेणी आणि खोदकामे बरीच आहेत. ठाणे जिल्ह्यातील कान्हेरी, कोंदिवटी, जोगेश्वरी, मंडपेश्वर, मागाठण, घारापुरी, करंज, जंब्रुग, कोंडाणे व चंदनसार; कुलाबा जिल्ह्यातील पाल व कुडे आणि रत्नागिरी जिल्ह्यातील चिपळूण, खेड, दाभोळ, संगमेश्वर, गव्हाणे, वेळगाव व वाडे पडेल ही ठिकाणे तेथील शिलालेखांमुळे महत्त्वाची ठरली आहेत. कारण त्या शिलालेखात बरीच ऐतिहासिक माहिती मिळते.

चिपळूणचा परशुराम, कोळथऱ्याचा कोळेश्वर, राजापूरची गंगाकुंडे, इ. कोकणातील देवक्षेत्रे व तीर्थक्षेत्रे प्रसिद्ध आहेत. यांच्याविषयी कोकणातील स्त्रियांच्या तोंडी पुढील ओव्या आढळतात—

**भार्गवराम देव उभे कड्यावरी**
**निळ्या घोड्यावरी स्वार झाले ।**
**गंगाबाई आली चौदा कुंडे ती वहात**
**यात्रा येतसे धावत राजापुरा ।**
**कोळथऱ्या कोळेश्वर दाभोळे दाभोळेश्वर**
**पंचनदी सत्तेश्वर ज्योतिर्लिंग ।**
**सोमेश्वर देवाजीच्या पटांगणी चिरा**
**लोटांगण घेतो हिरा गोपुबाळ ।**
**पालगड गांवाची किती आहे लांबीरुंदी**
**स्वयंभू आहे पिंडी शंकराची ।**

कोकणातील ऐतिहासिक महत्त्वाची ठिकाणे म्हणजे तिथले किल्ले होत. शिवाजी महाराजांनी कोकणातले काही जुने किल्ले दुरुस्त केले; तर काही नवे बांधले. त्यातील विजयदुर्ग, सुवर्णदुर्ग, सिंधुदुर्ग, मालवण, पद्मगड, रायगड, विशाळगड हे किल्ले विशेष प्रसिद्ध आहेत. पद्मगडास महाराजांचा जहाजे



सिंधुदुर्ग — मालवण

बांधण्याचा कारखाना होता. कुलाबा व मालवण येथे आरमाराची मुख्य ठाणी होती. किल्ले व आरमार यांच्या बळावरच मराठ्यांनी कोकणात आपला दाब ठेवला होता.

**लोक** — कोकणात मुख्यत: महाराष्ट्रीय लोकांची वस्ती आहे. उत्तर कोकणात गुजराती व काही आदिवासी जमाती आहेत. पूर्वी परदेशातून इथे आलेले पारशी, ज्यू, हबशी व अरब यांचे वंशजही अद्यापि तिथे आढळतात. पारशी लोक व्यापार करून श्रीमंत झाले आहेत. पोर्तुगीज व हबशी यांनी हजारो हिंदूंना बाटविल्यामुळे कोकणात ख्रिस्ती व मुसलमान यांचीही वस्ती बरीच आहे. कोकणातील हिंदूंच्या चित्पावन (कोकणस्थ), सारस्वत, कऱ्हाडे, देवरुखे, वाणी, लिंगायत, कुणबी, मराठे, भंडारी, गावित, महार, चांभार इ. मुख्य जाती आहेत. त्यांच्या चालीरीती व संस्कार इतर प्रदेशातील त्या त्या जातींप्रमाणेच आहेत. हे लोक शिव, विष्णू, दुर्गा, गणपती, दत्त या देवताव्यतिरिक्त भैरोबा, भैरीदेवी, भवानी, चंडिका, भूतनाथ, जखमाता, काळकाई, क्षेत्रपाल, खेमराज, महाकाली, पांढर, रवळनाथ, वाघजई, मारुती, राम, विठोबा, अंबाबाई, खंडोबा, महालक्ष्मी, म्हाळसा, मंगेश, नागेश, रामनाथ, शांतादुर्गा या देवतांना भजतात. वेताळ, समंध, देवचार, मुंजा, खविस, गिऱ्हा, चेटक, झोटिंग, म्हसोबा, जखीण, हडळ, लावसट, इ. भुताखेतांना भजण्याचीही प्रथा आहे.

**सण व उत्सव** — गुढी पाडवा, दसरा, दिवाळी, संक्रांत वगैरे सण इतर प्रांतांप्रमाणेच कोकणातही साजरे होतात. मात्र नागपंचमी, नारळी पौर्णिमा, गौरी—गणपती, गोकुळाअष्टमी व शिमगा या उत्सवांना कोकणात विशेष महत्त्व असते. उत्सवात आणि जत्रेच्या वेळी दशावतारी खेळ होतात. अशा प्रसंगी विविध प्रकारची नृत्येही केली जातात. त्यातील गौरीचा नाच, राधानृत्य, काठखेळ, रोमट, इ. प्रकार विशेष उल्लेखनीय आहेत.

कोकणातील ख्रिस्ती लोक म्हणजे बाटलेले हिंदूच असल्यामुळे त्यांच्या बऱ्याच चालीरीती हिंदूंच्या प्रमाणेच आहेत. त्यांच्यातील जातिभेदही अजून पूर्वीसारखाच आहे. हे लोक चर्चमध्ये जातात आणि येशू, मेरी व ख्रिस्ती संत यांना भजतात, एवढेच त्यांचे वेगळेपण.



फणस

कोकणातील मुसलमान शेकडो वर्षांपूर्वी इथे येऊन स्थायिक झालेल्या अरबी व इराणी लोकांचे वंशज आहेत. बाकीचे बाटलेले हिंदू असून त्यांच्या चालीरीती बव्हंशी हिंदूंच्यासारख्याच आहेत.

**भूप्रदेश** — कोकणातील जमीन मध्यम प्रतीची असली, तरी तिथे पाऊस भरपूर पडत असल्यामुळे भाताचे

पीक चांगले येते. शेती हा इथल्या लोकांचा मुख्य व्यवसाय आहे. भाताशिवाय नागली, वरी, वाल वगैरे धान्ये व कडधान्ये इथे पिकतात. मात्र नारळ, सुपारी, फणस, आंबे, काजू, कोकंब, इ. फळे ही कोकणाची प्रमुख फलसंपदा होय. माड हा कोकणचा कल्पवृक्ष आहे; कारण त्यापासून अनेक पदार्थ बनतात. आंबे व फणस यांवर बरेच लोक उन्हाळ्यात आपली गुजराण करतात. काजू, सुपारी, कोकंब व कलमी आंबे यांची कोकणातून निर्यात होते.

मुंबईच्या उत्तरेकडील किनारा सखल व वालुकामय असून, नद्या उथळ असल्यामुळे तिकडे महत्त्वाची बंदरे नाहीत. पण मुंबईच्या दक्षिणेकडील किनारा चांगला असून नद्याही सोयीच्या असल्यामुळे तिथे अनेक चांगली बंदरे निर्माण झाली आहेत. कोकणात मच्छीमारी व सागरी मालवाहतूक बऱ्याच प्रमाणात चालते. त्यामुळे तिथे गाबीत, कोळी, भंडारी अशा काही जाती दर्यावर्दीपणात वाकबगार झाल्या आहेत. अशा लोकांच्या तोंडी असणारी नाखवा गीते कोकणात विपुल आहेत. नाखव्यांचे चकवे विशेष प्रसिद्ध आहेत. त्यातला एक नमुना असा—

**दरियात मचवा झुलताय लाडके**
**सांवळा दीर तुजा येताय गोऽ ऽ ।।**
**पायांत सांकळचा आनताय लाडके**
**सांवळा दीर तुजा–· ।।**
**नाकांत मोती आनताय लाडके**
**सांवळा दीर तुजा– ।।**
**दंडांत येलः आनताय लाडके**
**सांवळा दीर तुजा– ।।**

उत्तरकोकणात दाट जंगले बरीच असून त्यात ताड व खजुरी पुष्कळ आहेत. तिथे कोळशाचे उत्पादन मोठ्या प्रमाणावर होते. त्या भागात विरळ वस्ती आहे. दक्षिणेकडील जमीन सामान्यतः खडकाळ असली, तरी तिथे नद्या व खाड्या पुष्कळ असून, त्यांच्या काठची जमीन सुपीक बनली आहे.

इंग्रजी राज्य सुरू होण्यापूर्वी कोकणातले पुष्कळ लोक लष्करात नोकरी करीत होते. अलिकडे गिरण्यात व घरगुती कामे करण्यासाठी कोकणातले लोक मोठ्या संख्येने मुंबईस येतात.

कोकण प्रदेशात उत्तरेकडील तक्षशिला, नालंदा, इ. विद्यापीठांसारखी विद्यापीठे निर्माण झाली नसली, तरी तिथल्या काही विद्वानांनी आपल्या बुद्धिमत्तेची छाप उभ्या भारतावर पाडली होती. कोकणचक्रवर्ती अपरादित्य याने याज्ञवल्क्यस्मृतीवर जी विद्वत्तापूर्ण टीका १२ व्या शतकात लिहिली, ती काश्मीरमध्ये प्रमाणभूत मानली गेली. ग्रहलाघव या ग्रंथाचा कर्ता गणेश दैवज्ञ याचा जन्म याच भूमीत झाला. धर्मसिंधुकार पाध्ये हेही याच भूमीत जन्मले.

भटकुलोत्पन्न पेशवे, भानू, पटवर्धन, गोखले, इ. घराण्यातील वीर पुरुषांनी मराठी राज्याच्या उत्तरकालात अत्यंत महत्त्वाची कामगिरी बजावली. त्याचप्रमाणे पश्चिम हिंदुस्थानात इंग्रजांच्या राजवटीस जेव्हा तीव्र आणि कडवा विरोध होऊ लागला, तेव्हा तिला बुद्धिवादी बैठक देऊन क्रियाशील कामगिरी ज्या व्यक्तींनी केली, त्यातील बहुसंख्य पुढारी हे कोकणातून निर्माण झाले. त्यामुळे कोकणची भूमी ही स्वदेशाभिमानी नेत्यांची जनकभूमी म्हणून ओळखली जाऊ लागली व त्यामुळे तिच्यावर ब्रिटिश राजवटीचा विशेष राग स्पष्ट दिसून येऊ लागला. विद्रोही चळवळीचा अभ्यास करून त्यावर उपाययोजना सुचविण्यासाठी १९१८ साली जस्टिस रौलट यांच्या अध्यक्षतेखाली जी कमिटी नेमण्यात आली त्या कमिटीने सादर केलेल्या आपल्या अहवालात वरील मत मुद्दाम नमूद केले आहे. हा अहवाल सेडिशन कमिटी रिपोर्ट १९१८ या नावाने प्रसिद्ध आहे.

त्याचप्रमाणे आपल्या विद्वत्तेने, देशभक्तीने व स्वार्थत्यागाने अग्रगण्य ठरलेले सर्वश्री टिळक, गोखले, कर्वे, भांडारकर, इ. श्रेष्ठ पुरुषही याच भूमीत जन्माला आले. **पाहा**— अपरान्त.
[म. ज्ञा. को.; सह्याद्रि; उ. कों. प्रा. इ.; प्राचीन कोंकण— पां वा. काणे, म. सा. प वर्ष ९ अंक ४, डिसेंबर १९२१; रत्ना. गॅझे.; हि. ऑ. को.; से. क. रि., हि. मि.]

## कोकणस्थ ब्राह्मण

चित्पावन ब्राह्मण पाहा.

## कोकणस्थ वैश्य

कोकणातील त्रैवर्णिकांपैकी एक वर्ग. हे लोक पूर्वी गोदावरीच्या काठी मुंगीपैठण येथे वसलेले होते. दुर्गादेवीच्या दुष्काळामुळे यांना स्थलांतर करावे लागले. यांच्यापैकी जे लोक कोकणात उतरले, ते कोकणस्थ वैश्य म्हणून ओळखले जाऊ लागले. रत्नागिरी, कुलाबा व कोल्हापूर या जिल्ह्यांत यांची वस्ती विशेष आढळते. पूर्वी या प्रदेशांतील बहुतेक व्यापार मुख्यतः यांच्या हाती होता. त्यासाठी ज्या प्रमुख व्यापाऱ्यांना सरकारकडून सनदा मिळाल्या होत्या, त्यांना शेटचे म्हणतात. कोकणात या वर्गातील बहुतेक सर्व लोक शेतकी, गोरक्षण आणि व्यापार करतात. यांच्या कित्येक ज्ञातिसंस्था असून, त्या जातीतल्या सामाजिक व शैक्षणिक कार्यांना मदत करीत असतात.

सुमारे शंभर वर्षांपूर्वी यांच्यांतील बरेच लोक मुंबई, अहमदाबाद, हैद्राबाद, इ. शहरांत स्थायिक झाले व तिथे त्यांनी मुद्रण, ग्रंथप्रकाशन, ग्रंथविक्रय, इ. व्यवसाय सुरू केले. संस्कृत

भाषेतील अनेक जुने ग्रंथ (पोथ्या, पुराणे, इ.) छापून यांनी संस्कृत साहित्याची मोठीच सेवा केली आहे. [ म. ज्ञा. को. ]

**कोकणा** एक आदिवासी जमात. यांना कुकणा किंवा कोकणी असेही म्हणतात. यांची वस्ती ठाणे, नासिक, सुरत, बडोदे, धरमपूर, बांडा या भागात आहे. हे मूळचे रत्नागिरीकडचे होते. तिथून त्यांना जव्हार तालुक्यातील गंभीरगडाच्या संरक्षणासाठी आणण्यात आले, असे सांगतात. इ. स. १४०० च्या सुमारास पडलेल्या दुर्गादेवीच्या प्रसिद्ध दुष्काळाच्या वेळी हे गुजरातेत गेले. यांची मूळची भाषा मराठीच आहे. गुजरातमधील कोकणे मात्र मराठी-गुजराती अशी मिश्र भाषा बोलतात. याच्या मूळ चालीरीतींवर आसपासच्या जातींच्या चालीरीतींचा बराच प्रभाव पडलेला दिसतो. याचा लग्नविधी ब्राह्मण चालवितो. त्याबद्दल त्याला दक्षिणा व जातिप्रमुखाला शेला-पागोटे मिळते.

**देव-धर्म** – खंडोबा, देवी, चंद्र, सूर्य, चेदा, हिरवा ही त्यांची दैवते होत. ब्रह्मा व वाघदेव यांची हे पूजा करतात. सामडी (शमी) वृक्षाजवळ एक दगड ठेवतात व त्याला ब्रह्मदेव मानतात. त्याच्या शेजारी मातीचा घोडा, दिवा व निशाण ठेवतात. वाघदेव म्हणजे एका लाकडी खांबावर वाघाचे चित्र असते व त्याला शेंदूर फासलेला असतो.

**मर्तिकप्रथा** – हे लोक प्रेते जाळतात. श्मशानात नेण्यापूर्वी प्रेताला स्नान घालतात. दहनानंतर सर्वजण स्नान करून घरी येतात. चौथ्या दिवशी राख भरून आप्तांना जेवण घालतात. वर्षअखेरीस मृताची मूर्ती करून तिच्यापुढे दिवा लावतात. यांच्या उत्तरक्रियेला ब्राह्मण लागत नाही.

यांचा मुख्य व्यवसाय शेती हा आहे. ज्यांना बैल घेण्याची ऐपत नसते, ते स्वतःच नांगर ओढतात. अशा शेतकऱ्यांना हाथोडिया म्हणतात. काहीजण मजुरीही करतात. या जमातीत साक्षरतेचे प्रमाण बरेच आहे. त्यामुळे शिक्षक किंवा तलाठी म्हणून नोकरी करणारेही बरेच आढळतात. काही लोक दुकानदारीसारखे उद्योगही करतात. यांच्यांत सुमारे वीस कुळे असून, त्यांतली भोया, महाले, गाबीत ही श्रेष्ठ मानली जातात.

कानडा जिल्ह्यात व त्रिवांकुरमध्येही यांची वस्ती आहे. कानडातील कोकणे स्वत.ला क्षत्रिय समजतात. ते निरंकार, महामाई, रवळनाथ, खेत्री व विठोबा या दैवतांना भजतात. तुकारामाचे अभंग म्हणून भजन करतात. हे मुख्यतः शेती करतात. याचे आचार-विचार सावंतवाडीकर मराठ्यांप्रमाणे आहेत. हे आपल्या पंचायतप्रमुखाला बुधवंत म्हणतात.

त्रिवांकुरमधील कोकणे मलबारी लोकांप्रमाणे पोषाख करतात. यांचा मुख्य धंदा व्यापार हा आहे. यांचा विवाहविधी जवळ जवळ ब्राह्मणांसारखाच असतो. यांच्यांत बरीच गोत्रे आहेत. [ म. ज्ञा. को.; मुं. इ. जा.; रज:कण ]

**कोकणी** कोकणपट्टीत ज्या अनेक आर्यवंशोद्‌भव बोली बोलल्या जातात, त्या सर्वांना कोकणी ही सामान्य संज्ञा आहे.

ऐतिहासिक घटना व सांस्कृतिक संबंध यांच्या अनुरोधाने उत्तर कोकणी, मध्य कोकणी व दक्षिण कोकणी असे कोकणीचे तीन मुख्य भाग पडतात. रत्नागिरी जिल्ह्यापासून वरची कोकणपट्टी मराठी भाषिक प्रदेशाशी निगडित आहे. उत्तर कर्नाटक जिल्ह्यात बोलल्या जाणाऱ्या दक्षिण कोकणीचा कानडी भाषेशी जवळचा संबंध आलेला आहे. मध्य कोकणीची परिस्थिती यांहून वेगळी आहे. ती जिथे बोलली जाते, तो गोवा प्रांत अनेक शतके पोर्तुगालच्या स्वामित्वाखाली होता. पोर्तुगीजांनी तिथल्या लोकांचे सक्तीने धर्मांतर केले व त्यांना आपल्या मूळ संस्कृतीपासूनही तोडले. पण एवढे सगळे झाले, तरी त्या लोकांनी आपल्या मायबोलीचा त्याग केला नाही. उलट परकीय धर्मोपदेशकांनाच ख्रिस्ती धर्माच्या प्रचारासाठी त्या बोलीत ग्रंथरचना करावी लागली. धर्मांतरित नवख्रिस्ती समाजात जे अशिक्षित होते, त्यांना त्यांच्याच बोलीभाषेत ख्रिस्ती धर्मतत्त्वे समजावून सांगण्यासाठी पोर्तुगीज पाद्र्यांनी कोकणीचा अवलंब केला. जुन्या काळी, गोव्यातील साष्टी भागात जी बोली बोलली जाते, तिला अस्सल कोकणी समजत. तिला गोमंतकी असेही म्हणत. तथापि इ. स. १६ व्या शतकापर्यंत तिचे विशिष्ट नाव रूढ नव्हते. पोर्तुगीज लोक सुचेल तसा या बोलीचा नामनिर्देश करीत. इ. स. १५५३ सालच्या जेजुइतांच्या कागदपत्रांत तिला कानारी हे नाव दिलेले आढळते. १७ व्या शतकातील फादर स्टीफन्सचे दौत्रीन क्रिश्तां हे पुस्तक कानारीमध्ये लिहिले असल्याचे खुद्द लेखकाने नमूद केले आहे. त्याने लिहिलेल्या गोमंतकीच्या व्याकरणाचे नाव 'कानारी भाषेचे व्याकरण' असेच आहे. कानारी हा शब्द कानडी या शब्दाशी सबद्ध नसून, तो फारसीतील कानार किंवा किनार या शब्दावरून आला असावा, असे श्री. प्रियोळकर म्हणतात.

तॉमे पीरिश या पोर्तुगीज प्रवाशाने आपल्या 'सूम ऑरिएंताल' या ग्रंथात (इ. स. १५१५) गोव्यातील बोलीचा उल्लेख 'कोकोंनी' असा केला आहे. गोव्यामध्ये पोर्तुगीजांनी धर्मच्छळ सुरू केला, तेव्हा तिथले सारस्वत ब्राह्मण गोव्यातून परागंदा झाले. त्यांच्यापैकी काहीजण कोच्चिन व त्रिवांकुर

या भागांत जाऊन वसले. ते कोंकणातून तिकडे गेले असल्यामुळे त्यांना व त्यांच्या भाषेलाही कोंकणी हे नाव कोच्चिनमध्ये रूढ झाले, असे म्हणतात. जेजुईत पाद्री मिगेल द आल्मैद याने इ. स. १६५८ साली गोमंतकीसाठी कोंकणिये हा शब्द वापरला आहे.

कोंकणीची ध्वनिरचना मराठीच्या ध्वनिरचनेपेक्षा फारशी वेगळी नाही. ज्या स्थित्यंतरातून परिवर्तित होत संस्कृतची ध्वनिरचना मराठी ध्वनिरचनेपर्यंत येऊन ठेपली, त्याच मार्गाने संस्कृतचे ध्वनी कोंकणीपर्यंत येऊन पोचले असले पाहिजेत. बहुसंख्य ध्वनिविषयक घटनांच्या बाबतीत कोंकणीचे भारताच्या नैर्ऋत्य भागातील आर्य भाषांशी, विशेषतः मराठीशी असणारे साम्य डोळ्यात भरण्यासारखे आहे. ध्वनिविचारांप्रमाणेच कोंकणीचा शब्दसंग्रह इतर कोणत्याही भारतीय आर्य भाषेच्या शब्दसंग्रहापेक्षा मराठीलाच अधिक जवळचा आहे. भाषांच्या परस्पर संबंधाच्या बाबतीत अत्यंत निर्णायक बाब म्हणजे भाषेचे व्याकरण किंवा त्यापेक्षाही त्यातील रूपविचार हा भाग होय. या बाबतीत तपशीलवार तुलना केली, तर असे आढळून येते, की रूपविचारांच्या बाबतीतही कोंकणी ही इतर कोणत्याही आर्य भाषेपेक्षा मराठीलाच अधिक जवळची आहे. कारण या दोन भाषांचे मूळ एकच असून अनेक वर्षे त्या एकमेकींच्या शेजारी उत्क्रांत होत गेलेल्या आहेत.

कोंकणी ही मराठीची एक बोली आहे, असे विधान बऱ्याच लेखकांनी केले आहे; तर ही एक स्वतंत्र भाषा आहे, असाही प्रचार काही लोकांनी सुरू केला आहे. या बाबतीत एक भाषाशास्त्रीय व दुसरी सांस्कृतिक अशा दोन कसोट्या लावता येतील. भाषाशास्त्रीय कसोटी परस्पर आकलनाच्या तत्त्वावर आधारलेली असते. ध्वनिविषयक आणि रूपविषयक भेदातले अंतर एका विशिष्ट प्रमाणापलिकडे गेले, की आकलनाची अडचण निर्माण होते. हे अंतर व्यक्तीच्या, संस्कारांच्या व शिक्षणाच्या प्रमाणात कमी-अधिक होऊ शकते. त्याला निश्चित असा एकच बाह्य निकष लावणे कठीण आहे. वरील कसोट्या लावून कोंकणी ही मराठीहून वेगळी भाषा आहे, असे डॉ. कत्रे म्हणतात. सांस्कृतिक दृष्टीने पाहिले, तर जे कोंकणी लोक मराठीचा उपयोग करतात त्यांची बोली ही मराठीचीच उपभाषा आहे, असे ना. गो. कालेलकर म्हणतात. मात्र हा नियम कानडीचा उपयोग करणाऱ्या दक्षिण कोंकणी बोलणाऱ्या लोकांना लावता येणार नाही. कारण ही दक्षिण कोंकणी आणि कानडी या दोहोंचे मूळ एक नाही.

कोंकणीचे विभक्तिप्रत्यय पुढीलप्रमाणे आहेत——

**प्रथम**— कोणताही प्रत्यय लागत नाही. अकारान्त शब्द उकारान्त व ओकारान्त करण्याची प्रवृत्ती आहे. उदा०— मोर—मोरू, वेळ—वेळु, राव—रावो इत्यादी.

**द्वितीया व चतुर्थी**— क हा प्रत्यय लावून या दोन्ही विभक्तींचे रूप साधले जाते. उदा०— देवाक भज=देवाला भज. क, का आणि कां असे गोमंतकी कोंकणीत चतुर्थीचे प्रत्यय आहेत. क हा प्रत्यय सगळ्या नामांना लावता येतो. का एकवचनी सर्वनामांना व कां अनेकवचनी सर्वनामांना लावतात. उदा० तुका— तुला, तुमकां— तुम्हाला. लागी हा प्रत्ययही चतुर्थीसाठी योजतात. उदा० तुम्हालागी. चतुर्थीचा प्रत्ययलोप करण्याची प्रवृत्ती गोमंतकी कोंकणीत आढळते. उदा० झाडा (क) उदक घालता.

**तृतीया**—— न आणि नीं हे तृतीयेचे एकवचन आणि अनेकवचन यांचे प्रत्यय आहेत. उदा० देवान वर दिलो (ए. व.), मनुश्यानी पुण्य केले (अ. व.).

**पंचमी**—— च्यान, सान, थान, थावन, सून, थाकून, साकून व पासून हे गोमंतकी कोंकणीतले पंचमीचे प्रत्यय होत. उदा० फातरप्पासून—साकून गोंय लागी. याशिवाय पासावत किंवा पासोत असेही पंचमीचे प्रत्यय प्रचारात आहेत.

**षष्ठी**—— चो, ची, चें, लो, ली, लें किंवा गेलो, गेली, गेलें हे गोमतकी कोंकणीत आढळणारे षष्ठीचे वैशिष्टयपूर्ण प्रत्यय होत. उदा० देवाचो, देवालो किंवा देवागेलो. षष्ठीचा प्रत्यय गाळण्याचीही प्रवृत्ती आहे. उदा० झाडां (ची) पानां, वाघा (चे) चामडें, इत्यादी.

**सप्तमी**—— ईं हा सप्तमीचा प्रत्यय आहे. उदा० दरियाचे तटाकीं आसिलो. गोमंतकी कोंकणीत संस्कृत 'गृहे'वरून आलेला गेर किंवा गेरि हा प्रत्यय आढळतो. उदा० तुमगेर, आमगेर. मराठीतल्या वर या सप्तमीच्या शब्दयोगी अव्ययाबद्दल कोंकणीत 'र' येतो. उदा० घरावर—घरार, पाटावर—पाटार, इत्यादी.

**संबोधन**— रे, आरे, गो, गे, आगो हे कोंकणीतले संबोधनार्थक उद्‌गार आहेत. नो हा उद्‌गार अनेकवचनासाठी आणि बहुमान दर्शविण्यासाठी वापरतात. उदा० भुरग्यांनो—मुलानो व सेणैनो—शेणवी (= शिक्षक) यासाठी बहुमानदर्शक.

सर्वनामात हांव (मी) हे गोमंतकी कोंकणीतले वैशिष्टयपूर्ण सर्वनाम होय. हे संस्कृतमधील 'अहम्'पासून आले आहे. याचे अनेकवचन मात्र आमी (आम्ही) असेच होते.

मराठीत सामान्यतः वापरात नसलेले गोमतकी कोंकणीचे काही खास शब्द आहेत. उदा० आयदन (सं. आयतन=भांडे), इस्टागति (मैत्री), उजो (आग), उलवणे (बोलणे), कळाव (उशीर), दवरणे (ठेवणे), म्हालगडो (म्होरक्या, पुढारी),

लागिसार (जवळपास), सुवात (जागा) इत्यादी.

डॉ. विल्सन, रा. सा. चव्हाण, डॉ. कुन्हा, श्री. वालावलीकर, डॉ. सालडाणा, इ. विद्वानाच्या मते कोकणी ही एक स्वतंत्र भाषा आहे. पण डॉ. प्रभुदेसाई यांनी या मताचे व्यवस्थित खंडन केले आहे. कोणत्याही भाषेचे आद्य स्वरूप जुन्या शिलालेखांत व ताम्रपटांत आढळते. गोमंतकातील जुने शिलालेख व ताम्रपट मराठीत लिहिलेले आहेत. जेजुईत मिशनऱ्यांच्या संग्रही जी जुनी कथापुराणे सापडली आहेत, तीही ग्रांथिक मराठीत लिहिलेली आहेत. १७ व्या शतकापूर्वीचे कोकणी लिखित साहित्य गोव्याबाहेर मिळालेले नाही, हे डॉ. कत्रे यांनी मान्य केले आहे. यावरून अगदी प्राचीन काळापासून गोव्यात कोकणीचा वापर केवळ तोंडी व्यवहारासाठीच होत असून, लेखनासाठी ग्रांथिक मराठीचा उपयोग केला जात असे, हे सिद्ध होते. ग्रिअर्सन व डॉ. भाडारकर हे गोमंतकीला मराठीची एक बोलीच मानतात.

कोकणीचा लेखनासाठी उपयोग करून त्या बोलीभाषेत प्रथम वाङमयनिर्मिती केली, ती ख्रिस्ती मिशनऱ्यांनी. सेंट झेवियरच्या वेळेपासूनच पोर्तुगीज मिशनरी गोमंतकी बोली शिकून त्या बोलीत प्रवचने करू लागले होते. मात्र स्टीफन्सचे दौत्रीन क्रिश्तां हेच त्या भाषेत जेजुइतांनी प्रसिद्ध केलेले (इ. स. १६२२) पहिले पुस्तक होय.

दौत्रीन क्रिश्तां या ग्रथातील कोकणीचा एक नमुना पुढे दिला आहे–

"परमेस्परान फर्माइलां, कि आमीं कोनिइ तरि रचिलल्ये रचणेक परमेस्परुसो मानु नयें म्होणु; ह्या भागारि कोकणे चुकताति, कित्या ते केवल परमेस्पराक नवोळखता, वेवेगाळि‍् रचणेक, म्हणजे सुरिया, चद्राक, वा पित्राक देवसे मानुं भजताति. तेणेप्रमाणी घाडी, आणी घाडिणी, वा कोपटाळी पचाकरी, वा जाण, पारखी पापांतु आसति, कित्या परमेस्पराक दिउंक फाव, तो मानु इंफेर्नाच्या सैतानांक दिताति म्होणु (४५ पु.)."

त्यानंतर त्यानेच गोमंतकी बोलीचे एक व्याकरण १६४० त प्रसिद्ध केले. त्याचे नाव 'आर्ति द लिंग्व कानारी' असे असून, ते पोर्तुगीज भाषेत लिहिलेले आहे. मात्र इ. म. १५६३ च्या आधीच गोव्यात कानारी बोलीचे एक व्याकरण तयार झाले होते व ते एका एतद्देशीय धर्मांतरित गृहस्थाने तयार केले होते, असा निर्देश आढळतो. पुढे या बोलीतील शब्दांचे कोशही जेजुइतांनी प्रसिद्ध केले. याशिवाय अनेक धार्मिक स्वरूपाचे ग्रंथ त्यानी या भाषेत लिहिले आहेत, ते वेगळेच. [ भा. आ. सं.; स. श. गो. बो. ]

**कोक पंडित** कामशास्त्र पाहा.

**कोकामुख** बंगालमधील पूर्णिया जिल्ह्यात त्रिवेणी नदीच्या तीरावर हे तीर्थ–क्षेत्र आहे. याला वराहक्षेत्र असेही म्हणतात. हे एक विष्णुतीर्थ आहे. महाभारतात याचा उल्लेख आहे ( वन. ८२. १५८ ). वराहपुराणात या क्षेत्राचे माहात्म्य वर्णिलेले आहे, ते असे–

**नास्ति कोकामुखात् क्षेत्रं नास्ति कोकामुखाच्छुभम् ॥**
**नास्ति कोकामुखात् स्नानं नास्ति कोकामुखात्प्रियम् ॥**
( १४०. १०–११ )

अर्थ– कोकामुखाहून श्रेष्ठ व शुभ असे क्षेत्र नाही. कोकामुखातल्या स्नानाहून श्रेष्ठ स्नान नाही व त्याहून काही प्रिय नाही.

पूर्वी एका काळी पितृगण कोकानदीच्या जलात बुडू लागले. त्या वेळी विष्णूने वराहरूप घेऊन त्यांना वर काढले व त्यामुळे हे क्षेत्र निर्माण झाले, असे ब्रह्मपुराणात सांगितले आहे. म्हणूनच हे क्षेत्र विष्णूच्या वराहावताराचे स्थान मानले जाते. वराह आणि मही किंवा छाया याच्यापासून नरकासुराचा जन्म या ठिकाणी झाला, असे म्हणतात.

कोकामुख हे क्षेत्र कोका व कौशिकी या नद्यांच्या संगमाजवळ आहे असे डी. सी. सरकार म्हणतात. ही कौशिकी नदी म्हणजे नेपाळमधील सन–कोशी किंवा सुवर्ण–कौशिकी होय. तिच्या तीरावरील हे स्थान बराहक्षेत्र ( वराहक्षेत्र ) या नावाने प्रसिद्ध आहे. या वराहक्षेत्रात विष्णुधारा, विष्णुपद, विष्णुसर, सोमतीर्थ, तुंगकूट, ब्रह्मसर, धर्मोद्भव, विष्णुतीर्थ, सर्वकामिका, मत्स्यशिला, इ. वीस पुण्यस्थले आहेत.

बुद्धगुप्ताच्या दामोदरपुर येथील शिलालेखात कोकामुखस्वामी नावाच्या देवतेचा उल्लेख आहे. बंगालच्या धार्मिक इतिहासात या शिलालेखाला फार महत्त्व आहे. गुप्त काळात ( इ. स. ५ वे शतक ) बंगालमध्ये विष्णूच्या वराहावताराची उपासना चालू होती, असे त्यावरून दिसते. कोकामुख तीर्थ बंगालच्या उत्तर सरहद्दीवर आहे, असे रायचौधरी म्हणतात. [ हि. ध.; बी. सी. लॉ. को. व्हॉ.; जॉ. ए. मे. इ. ]

**कोकावसही( ती )** एक जैन तीर्थक्षेत्र. हे अणहिलवाडजवळ आहे. इथे पार्श्वनाथाची प्रतिमा स्थापन केलेली आहे. [ वि. ती. क. ]

**कोकिलापंचमीव्रत** एक जैन व्रत. व्रतकाल आषाढ कृ. ५ मी ते कार्तिक कृ. ५ मी. प्रत्येक

मासाच्या कृष्णपंचमीला उपवास. हे व्रत ५ वर्षे करून त्याचे उद्यापन करावे, असे सांगितले आहे. याची कथा अशी—

गंगा नदीच्या तीरी कुरुजांगल देशात राजनगर नावाचे गाव होते. तिथे धनपाल श्रेष्ठाचा पुत्र धनभद्र व जिनभक्त श्रेष्ठीची कन्या जिनवती यांनी हे व्रत केले व इहलोकी उत्तम सुखे उपभोगून अंती अविनाशी पद मिळविले. [ जै. व्र. वि. सं. ]

**कोकिलार्गल** दाराला अडसर असतो, त्यावर कोकिलेचे चित्र कोरतात, तेव्हा त्याला कोकिलार्गल म्हणतात. [ एन्सा. हिं. आ. ]

**कोकिलाव्रत** स्त्रियांचे आवश्यक व्रत व पुरुषांचे काम्यव्रत. आषाढ हा अधिक मास आला असता, त्या मासाच्या पौर्णिमेस या व्रताची सुरुवात व श्रावण शु. पौर्णिमेस समाप्ती करतात. कोकिलारूपी गौरी ही या व्रताची प्रधान देवता आहे. नक्तभोजन व पूजा ही याची प्रधान अंगे आहेत. हे व्रत सपूर्ण एक महिना करणे शक्य नसेल, तर कमीत कमी सात दिवस, निदान तीन दिवस तरी करावेच, असे शास्त्रकार सागतात. याचा विधी असा—

पौर्णिमेच्या दिवशी जलाशयावर जाऊन स्नान. सूर्याला त्रिवार अर्घ्य. सायंकाळी आम्रवृक्षाजवळ जाऊन व्रताचा संकल्प. मग षोडशोपचार पूजा. नंतर प्रार्थना करून सुवासिनीची संभावना करणे व रानात जाऊन कोकिलस्वर ऐकणे. नंतर घरी येऊन नक्तभोजन. कोकिलस्वर कानी न पडल्यास त्या रात्री उपोषण व श्रावण पौर्णिमेच्या दिवशी कोकिलारूपी गौरीच्या प्रतिमेचे विसर्जन.

तीन वेळा व्रत केल्यानंतर त्याचे उद्यापन करतात. उद्यापनाच्या वेळी कोकिळेची प्रतिमा करून तिची पूजा करतात. हविर्द्रव्याचे हवन करतात. सुवासिनींना सौभाग्यद्रव्याचे वायन देतात ब्राह्मणभोजन घालून व्रताची सांगता करतात. व्रताचे फल-अक्षय सौभाग्याची प्राप्ती व पुत्रपौत्र, धन-धान्य यांची समृद्धी या व्रताची कथा अशी—

पूर्वी दक्ष प्रजापतीने यज्ञ केला. त्यासाठी त्याने सर्व देवांना निमंत्रण केले; पण शिवाला मात्र वगळले. ही गोष्ट नारदाने कैलासावर जाऊन शिवाला सांगितली. ती ऐकून शिवाला क्रोध आला. शिवपत्नी सती ही दक्षाची कन्या होती. तिने आपल्या बापाकडे जाण्याचा निश्चय केला. ती दक्षाच्या यज्ञमंडपात प्रविष्ट झाली; पण दक्षाने तिची दखलही घेतली नाही. सतीला हा अपमान वाटला व तिने यज्ञकुंडात उडी घेऊन स्वतःला जाळून घेतले. ही गोष्ट कैलासावर शिवाला कळली. त्यामुळे त्याचा क्रोधाग्नी भडकला. त्याने दक्षयज्ञाचा विध्वंस करण्यासाठी वीरभद्राला उत्पन्न केले. वीरभद्राने यज्ञ विध्वंसून दक्षाचाही शिरच्छेद केला. मग ब्रह्मा-विष्णू हे शिवाचा कोप शमविण्यासाठी कैलासावर आले. शिवाने प्रसन्न होऊन दक्षाला पुनश्च सजीव केले व त्याच्या यज्ञात विघ्न केल्याबद्दल सतीला शाप दिला, की 'तू पक्षियोनीत जन्म घे.' त्याप्रमाणे पुढील जन्मी सती कोकिळा झाली व नदनवनात राहू लागली. त्या प्रसंगी शिवाने तिला वर दिला, की 'ज्या स्त्रिया अधिक आषाढमासात तुझे पूजन करतील, त्याना कधीही वैधव्य येणार नाही.' त्या दिवसापासून कोकिलाव्रत भूलोकी प्रचलित झाले. [ व्रतराज ]

**कोच** आसाम, बंगाल, बिहार व ओडिसा या प्रदेशांत आढळणारी एक प्राचीन जमात. कामरूप व मत्स्यदेश (रंगपूर, आसामचा सखल भाग व पूर्णिया जिल्हा) या भागात याची वसती बरीच आहे. याच्या उगमाविषयी विशेष माहिती उपलब्ध नाही. इ. स. १६ व्या शतकात त्यानी कामरूप देशात आपली सत्ता प्रस्थापित केली व ती २०० वर्षे टिकली. त्यानंतर मुसलमान व आहोम यानी त्यांना तिथून हाकलून दिले; पण कुचबिहार या भागातली त्याची सत्ता मात्र टिकून राहिली.

कोच लोकाना कोछ, कोच्छ, कुच अशीही अन्य नावे आहेत. त्यांच्यात मंगोलियन रक्ताचे मिश्रण असावे, असे काही पंडिताचे मत आहे. काहीच्या मते हे मूळचे अनार्य असावे; पण उत्तर बंगालमधील कोच स्वत.ला राजवंशी व क्षत्रिय समजतात. परशुरामाच्या भयाने जे क्षत्रिय इकडे पळून आले, त्याचे आपण वंशज आहो, असे हे म्हणतात.

राजवशी कोच वर्णाने काळे आहेत. त्यांचे नाक चपटे व आखूड असून, गालांची हाडे वर आलेली असतात. यांच्यात पूर्वी बालविवाह प्रचलित होता. मागसलेल्या कोच लोकात मात्र प्रौढ विवाहाची चाल होती. जी विधवा कुटुबप्रमुख असते, तिला कोणत्याही पुरुषासह राहण्याचे स्वातत्र्य असते. अस्सल राजवंशी जातीत विधवाविवाहाची चाल नाही; पण घटस्फोटाची मात्र आहे. घटस्फोटाला पचायतीची मान्यता मिळवावी लागते. बायको व्यभिचारी ठरली, तर तिच्या केसांचे वपन करून तिला जातिबहिष्कृत करतात.

काही राजवंशी कोच वैष्णव पंथी आहेत; तर काही तंत्रमार्गी आहेत. हे लोक काली, मनसा, ग्रामी, तिस्तू, बुरी, हनुमान, बिंदुर, तुलसी, रिषी, किस्थू, बलिभद्र, ठाकुर, कोरा-कुरी, इ. देवतांना भजतात. मात्र या सर्व देवतांत कालीलाच प्राधान्य

आहे. मातीच्या एका गोळ्याला शेण सारवून तो एका बांबूच्या बुंध्याशी ठेवलेला असतो, त्याला बाहुस्थो म्हणतात. हा यांचा कुलदेव होय. वैशाखात त्याची दिवसातून दोन वेळा पूजा करतात. नवीन घरात प्रवेश करतानाही त्याची पूजा करून त्याला भाताचा नेवेद्य दाखवितात. तो कोपला, तर कुटुंबात रोगराई पसरते, अशी समजूत आहे. ठाकूरदेवाचा सण पेरणीच्या हंगामात करतात. बैल जुंपलेले औत हे त्याचे प्रतीक असते.

अवर्षण पडते, तेव्हा राजवंशी स्त्रिया हुडुमदेवाच्या शेणाच्या दोन मूर्ती बनवून रात्री शेतात नेऊन ठेवतात. नंतर नग्न होऊन त्याच्या भोवती फेर धरून नाचतात व अश्लील गाणी म्हणतात. कोरा-कुरीची उपासना फक्त स्त्रिया व मुलेच करतात. पौष महिन्यात घटपूजा करतात. ही घटस्थापना अंगणात करतात व घटाला दर्भ, केळी व हळद अर्पण करतात.

पलिया, देशी, पाणी या कोचांच्या पोटजाती आहेत. पाणी कोचांची कुटुंबपद्धती मातृसत्ताक आहे. त्यांच्या स्त्रिया फार उद्योगी असतात. या लोकांत तरुण-तरुणी आपले विवाह स्वतःच ठरवितात. यांची लग्ने बरीच खर्चाची असतात.

**देव-धर्म–** ऋषी हा यांचा मुख्य देव होय. त्याच्या बायकोचे नाव जागो. पावसाळा संपण्याच्या सुमारास सर्वजण या देवताना बळी अर्पण करतात. संकटकाळीही यांना बळी द्यावा लागतो. हे लोक सूर्य, चंद्र, तारे आणि जंगले, डोंगर, नद्या, इ. ठिकाणी वास्तव्य करणारी दैवते, यांना भजतात. सुगीच्या सुरवातीला हे आपल्या पितरांना नवे धान्य अर्पण करतात. अशा प्रसंगी देवशी ब्राह्मण याचे पौरोहित्य करतात.

पाणी कोच हे कोचांपैकी सर्वांत पुरातन लोक मानले गेले आहेत. पण हे मत सर्वमान्य नाही. गारो व राभा लोकांशी यांचे बरेच साम्य आहे. हे लोक त्यांच्याच वंशातले असण्याचाही संभव आहे. जेव्हा कोच लोक राज्यकर्ते होते, तेव्हा त्यांची मर्जी संपादन करण्यासाठी यांनी पाणी-कोच हे नाव धारण केले असावे, असेही म्हणतात.

डाल्टनच्या मते कोच हे मूळ गंगेच्या खोऱ्यातील कृष्णवर्णी द्रविड होत. त्या प्रदेशात मिथिला व मगध या देशातील चंद्रवंशी व सूर्यवंशी राजांनी राज्य स्थापले, तेव्हा कोच लोक तिथून बंगाल व आसामकडे निघून गेले.

बंगालमध्ये कोचांचे अनेक वर्ग असून, प्रत्येक वर्गाचा एक पुढारी नेमलेला असतो. त्याला महत म्हणतात. ही जागा वंशपरंपरेने चालते. सर्व महतांच्यावर एक मुख्य असतो, त्याला दिगरी महत म्हणतात.

**मृतिकप्रथा –** हे लोक प्रेत दोन दिवस घरात ठेवतात. त्या काळात घरातील माणसे शोक करतात, तर मयताचे नातेवाईक व शेजारी खाणे-पिणे, नाच-गाणे यात दंग असतात. दोन दिवसांनंतर प्रेत नदीकाठी पुरतात. [ म. ज्ञा. को.; से. इं. १९५१ ]

**कोच राजवंश** इ. स. १६ व्या शतकाच्या प्रारंभी विशू ( विष्णू ) नावाच्या एका पराक्रमी कोच पुरुषाने विश्वसिंह हे नाव धारण करून आसामच्या काही भागावर आपली सत्ता स्थापन केली. हा विश्वसिंह हाच कोच राजवंशाचा संस्थापक होय. करतोया नदीपासून बर्नादीपर्यंतचा सर्व प्रदेश त्याच्या ताब्यात होता. तो मुख्यतः शैव होता, पण दुर्गा देवीचाही भक्त होता. नीलाचल पर्वतावरचे कामाख्या देवीचे मंदिर यानेच दुरुस्त केले, असे म्हणतात. त्याच्याच वेळी या देवीची उपासना लोकप्रिय झाली.

याची राजधानी कुचबिहार येथे होती. 'मेच' कुलांचे प्रतिनिधी निवडून याने एक मंत्रिपरिषद निर्माण केली होती. याने इ. स. १५३३ पर्यंत राज्य केले. त्याच्या नंतर त्याचा पुत्र नरनारायण हा गादीवर आला. त्याचे मूळ नाव मल्लदेव होते. हाच या वंशातील सर्वश्रेष्ठ राजा होय. तो पराक्रमी होता. त्याने आहोम व काचारी या राजांचा पराभव केला. मणिपूर व जयंतिया येथील राजांनीही त्याचे वर्चस्व मानले होते. याची शासनव्यवस्था उत्तम होती. त्याने कला व साहित्य यांच्या विकासालाही हातभार लावला. त्याच्या काळात वैष्णव कला व साहित्य यांचा फार उत्कर्ष झाला.

नरनारायणाचा भाऊ शुक्लध्वज हा पराक्रमी होता. त्याने राज्यविस्ताराच्या कामी नरनारायणाला पुष्कळ साहाय्य केले. त्याचा अद्‌भुत पराक्रम व साहस यामुळे त्याला 'चीलराज' हे नाव मिळाले व ते आसामातील घराघरांतून दुमदुमले. पण त्याचा पुत्र रघू याने इ. स. १५८१ साली बंड केल्यामुळे नरनारायणाने त्याला सोनकोई ( सोंकोश ) नदीच्या पूर्वेकडील काही भागाचे राज्य देऊन शांत केले.

नरनारायण १५८४ साली मरण पावल्यावर त्याचा पुत्र लक्ष्मीनारायण राजा झाला. पण तेव्हापासून हे राज्य हळूहळू दुर्बल होत गेले. लक्ष्मीनारायण याने मोगलांची मदत घेऊन रघूचा पुत्र परीक्षित याच्याशी युद्ध केले. तेव्हापासून तो मोगलांचा अंकित झाला. नंतर राज्याचा पूर्वभाग आहोमांनी व पश्चिम भाग मोगल व भूतानमधील भूतिया लोक यांनी बळकावला. फक्त कुचबिहार प्रदेश तेवढा कोच राजाच्या हाती राहिला. पण १८ व्या शतकाच्या शेवटी तोही इंग्रजांनी बळकावला. [ म. ज्ञा. को.; लौ. नी. ]

**कोचुवेलन** केरळ प्रदेशात क्विलोन व कोट्टायम यांच्या आसपासच्या भागात वसलेली एक आदिवासी जमात. वेल म्हणजे बाण व त्याचे लघुतादर्शक रूप वेलन होय. अरण्यात राहणाऱ्या लोकाना कोचुवेलन म्हणतात. केरलोत्पत्ति-नामक ग्रंथात या जमातीला वेलकरुप्पन असे नाव आहे. यांची उत्पत्ती शिवापासून झाली, असे त्यात सांगितले आहे. काही लोक अय्यप्पन या देवापासून त्यांची उत्पत्ती झाल्याचे सागतात. पांचालीच्या संरक्षणासाठी परमेश्वराने याना निर्माण केले, अशीही एक दतकथा आहे.

हे मुळात पशुपूजक होते. आता हिंदू देवतांनाही भजतात. वेलन थुळ्ळल व वेलन प्रवती ही त्यांची दोन नृत्ये आहेत. या नृत्यांनी देव प्रसन्न होतो, अशी यांची श्रद्धा आहे.

जादूटोण्यावर यांचा विश्वास असून, त्याचे प्रयोग करणारे लोकही यांच्यांत पुष्कळ आहेत.

**विवाहप्रथा** – वधू-वरांचे आई-बाप विवाह ठरवितात. यांच्यांत हुडा घेण्याची चाल नाही. विवाहसमारंभ वधूच्या झोपडीत रात्रीच्या वेळी केला जातो. नृत्य ही लग्नातली महत्त्वाची बाब असते. यांच्या लोकगीतात सीता, सुभद्रा व पांचाली यांची नावे वारंवार येतात.

**मर्तिकप्रथा** – हे लोक मृतांना पुरतात. स्वत.ला हिंदू मानणारे लोक प्रेताचे दहन करतात. यांचा पुनर्जन्मावर विश्वास आहे. [ ट्रा. के. ]

**कोच्चिन** मलबारच्या किनाऱ्यावरील एक प्रसिद्ध बंदर व माजी संस्थान. या संस्थानाचे एकमेकांपासून वेगळे असे दोन मुख्य भाग आहेत. मोठा भाग तीन बाजूंनी मलबार व त्रिवाकुर यांनी वेढलेला आहे. दुसऱ्या भागाला मलबार व कोइंबतूर या दोन जिल्ह्यांनी वेढले आहे. याला चित्तूर म्हणतात. या प्रदेशाचा पूर्वेकडील अर्धा अधिक भाग डोंगर, दऱ्या व दाट जंगले यांनी व्यापलेला असून, पश्चिमेकडील किनाऱ्यालगतचा भाग सपाट मैदानाचा आहे. त्यातून अनेक नद्या वाहतात. त्यांतील मुख्य नद्या म्हणजे अलवाये, चालकुडी, करुमाली, पोन्नानी, अनैमलै व पेरियर या होत. किनाऱ्यावर समुद्राशी समांतर अशी आखातांची साखळी आहे. या प्रदेशात एनमाक्कल व मनक्कोडी नावाची दोन मोठी गोडया पाण्याची सरोवरे असून, ती तेथील आखातांना मिळालेली आहेत.

कोच्चिन हे गाव पूर्वी पेरियर नदीच्या काठी होते. इ. स. १३४१ साली या नदीला महापूर आला आणि त्यामुळे मुखाजवळच्या प्रदेशाचे स्वरूप अगदी बदलून गेले. या घडामोडीत कोच्चिन येथे एक मोठे बंदर निर्माण झाले.

इ. स. च्या १५ व्या शतकापर्यंत कोच्चिन हे एक लहानसे सस्थान होते. तिथला राजा क्षत्रिय असून स्वत:ला पेरुमाल घराण्याचा वशज समजत असे. पण त्याची सत्ता प्रबळ नव्हती. कालिकतच्या सामुतिरी (झामोरिन) राजाचे तिथे वर्चस्व होते. कालिकत व कोच्चिन याचे कायमचे वैर होते. पोर्तुगीज दर्यावर्दी काब्राल इ. स. १५०० साली कोच्चिन बंदरात उतरला. तिथल्या राजाने त्याचे स्वागत केले. १५०२ मध्ये वास्को द गामाने तिथे एक वखार बांधली. १५०३ साली अल्बुकर्क आला व त्याने झामोरिनविरुद्ध कोच्चिनच्या राजाला मदत केली. त्यामुळे पोर्तुगीजांना तिथे एक किल्ला बांधण्यास परवानगी मिळाली. अशा रीतीने कोच्चिनच्या राजाने झामोरिनच्या सत्तेला शह दिला.

पण त्यानंतर सुमारे १५० वर्षे कोच्चिनचा राजा पोर्तुगीजांच्या हातचे बाहुले म्हणून राज्य करीत होता. त्याच्या हाती कसलीही सत्ता नव्हती. मात्र पोर्तुगीजांची सत्ता तिथे लहानशाच प्रदेशावर होती. संस्थानातील इतर भागात नायर सरदार स्वतंत्रपणे कारभार करीत होते. त्यांचा ओढा कालिकतच्या झामोरिनकडे होता. केरळात एक संघराज्य स्थापन करण्याचे झामोरिनचे स्वप्न पोर्तुगीजांनी कोच्चिनच्या राजाला वश केल्यामुळे भग्न झाले. त्यांच्या मदतीमुळे कोच्चिनचा राजा इतर राजांशी भांडण्यासाठी समर्थ बनला. पोर्तुगीजांनी व्यापाराची फार मोठी उलाढाल केल्यामुळे कोच्चिन बंदराचे महत्त्व खूपच वाढले.

इ. स. १६६३ साली डचांनी पोर्तुगीजांचा पराभव करून कोच्चिन जिंकले. त्यावेळी तिथल्या दोन राजघराण्यांचा तंटा चालू होता. त्या मुळेच डचांना तिथे प्रवेश करता आला. वरिष्ठ शाखेच्या राजपुत्राला हाताशी धरून डचांनी कोच्चिनवर सत्ता मिळविली. पण तो लवकरच मरण पावला. नंतर वीर केरळवर्मा गादीवर बसला. मग मात्र लवकरच सर्व संस्थानांत डचांची सत्ता प्रस्थापित झाली. पुढे १८ व्या शतकाच्या उत्तरार्धात डचांची सत्ता दुबळी झाल्यावर झामोरिनने कोच्चिनवर स्वारी केली. त्या वेळी त्रिवांकुरचा राजा रामवर्मा याने कोच्चिनच्या राजाला मदत केल्यामुळे झामोरिनला परत जावे लागले. पण लवकरच हैदर अलीने केरळावर स्वारी करून झामोरिनचे राज्य जिंकले आणि कोच्चिनवर स्वामित्व प्रस्थापित केले. हे स्वामित्व १७९१ मध्ये नष्ट होऊन तिथे इंग्रजांची सत्ता सुरू झाली.

कोच्चिन हे मलबार किनाऱ्यावरील तिसऱ्या प्रतीचे बंदर आहे. इथून मुख्यत्वे खोबऱ्याचे तेल, काथ्याचे दोर, सुंठ, मिरी, चटया, इ. वस्तूची निर्यात होते.

कोच्चिन संस्थानात शिव, विष्णू व देवी यांची मदिरे आहेत. देवीच्याच मंदिराची संख्या सर्वात अधिक आहे. त्यांत काही दुर्गेची, तर काही भद्रकालीची आहेत. देवीच्या मदिराना भगवतीकावू हे नाव आहे. प्रत्येक गावात असे एक मंदिर आढळतेच. या मंदिरात वास्तुकला, मूर्तिकला व चित्रकला यांचे उत्कृष्ट दर्शन घडते. यांच्या चारी बाजूना गोपुरे व ध्वजस्तंभ असतात. गर्भगृहाला श्रीकोविल म्हणतात. त्यात फक्त पुजारी प्रवेश करू शकतो.

कोच्चिनमधील बहुतेक घरांच्या अंगणांत सर्पकावू नावाची एक जागा असते. तिथे एका छोटया चबुतऱ्यावर नागराज व नाग पक्षी याच्या तीन चार मूर्ती असतात. तिथे रोज संध्याकाळी दिवा लावतात. तिथल्या सर्पाला गृहरक्षक देवता समजतात. [ म. ज्ञा. को.; हि. के.; दक्षिण भारत, मार्च १९५६ ]

## कोच्चेंगट चोळ

त्रेसष्ट नायन्मारांपैकी एक. याचा जन्म राजकुलात झाला होता. तिरुवनक्क या क्षेत्रात हा राहत असे. हा पूर्वजन्मी कोळी होता, असे पंचभूतस्थलपुराणात म्हटले आहे. याला गतजन्माची स्मृती होती, असे सांगतात. याने तिरुवनक्क येथे एक शिवमदिर बांधून त्याची नीट व्यवस्था ठेवली होती.

## कोजागरी पौर्णिमा

आश्विन पौर्णिमेला हे नाव आहे. या दिवशी करायच्या व्रतात रात्री लक्ष्मी व ऐरावतावर बसलेला इद्र यांची पूजा करतात. उपोषण, पूजन व जागरण या तीन्ही अंगांना या व्रतात सारखेच महत्त्व आहे. या रात्री मंदिरे, घरे, उद्याने, रस्ते,- इ. ठिकाणी दिवे लावतात. या रात्री जितके दिवे लावावे, तितके कल्प मानवाला सूर्यलोकात प्रतिष्ठा मिळते, असे शास्त्र सांगते.

या व्रतात रात्रीच्या पहिल्या प्रहरी लक्ष्मी व इंद्र याच्या प्रतिमांची पूजा करतात व मग पुढील मंत्रानी त्या दोघाना पुष्पाजली समर्पितात––

**नमस्ते सर्वदेवानां वरदाऽसि हरिप्रिये ।**
**या गतिस्त्वत्प्रपन्नानां सा मे भूयात् त्वदर्चनात् ।।**

अर्थ – हे हरिप्रिये लक्ष्मी, तू सर्व देवांना वर देणारी आहेस. तुला नमस्कार असो. तुला शरण येणाऱ्यांना जी गती लाभते, ती तुझ्या पूजेने मला प्राप्त होवो.

**विचित्रैरावतस्थाय भास्वत्कुलिशपाणये ।**
**पौलोम्यालिङ्गिताङ्गाय सहस्राक्षाय ते नमः ।।**

अर्थ – चित्रविचित्र ऐरावतावर बसलेल्या, तेजस्वी वज्र हाती धारण करणाऱ्या व पौलोमीने आलिंगन दिलेल्या अशा सहस्राक्ष इंद्राला नमस्कार असो.

अशी पूजा झाल्यावर पोहे व नारळाचे पाणी देव-पितरांना समर्पून व आप्तेष्टांना देऊन स्वतः सेवन करतात. चंद्राला आटीव दुधाचा नैवेद्य दाखवतात. रात्री जागरण करून फाश्यानी द्यूत खेळतात. या दिवशी मध्यरात्री लक्ष्मी चद्रमडलातून भूतलावर उतरते व ' को जागर्ति, ' = कोण जागा आहे, असे विचारते. जो जागृत असेल, त्याला ती धनधान्य देते, अशी कथा आहे दुसऱ्या दिवशी प्रातःकाळी इद्र-लक्ष्मीची पूजा करून व ब्राह्मणभोजन घालून पारणा करतात.

ब्रह्मपुराणात या व्रताची कृत्ये थोडी निराळी सांगितली आहेत, ती अशी––

रस्ते झाडावेत घरे सुशोभित करावीत. दिवसा उपवास करावा. गृहद्वाराजवळ अग्नी प्रदीप्त करून त्याची पूजा करावी. चद्राची पूजा करून त्याला दूध व खीर यांचा नैवेद्य दाखवावा. भार्येसह रुद्र, स्कद, नदीश्वर, ज्यांच्याकडे गायी असतील त्यांनी सुरभी, मेंढे बाळगणाऱ्यानी वरुण, हत्ती बाळगणाऱ्यानी विनायक व घोडे पाळणाऱ्यांनी रेवंत व निकुंभ या देवताची पूजा करावी.

या व्रताची कथा अशी ––

मगध देशात वलिक नावाचा एक ब्राह्मण होता. तो यदृच्छेने जे मिळे, त्यावर निर्वाह करी. त्यामुळे त्याच्या घरी दारिद्र्यच असे. त्याच्या पत्नीचे नाव महाचंडी होते. ती भांडखोर होती. दारिद्र्याने पीडल्यामुळे नवरा सांगेल त्याच्या विरुद्ध वागायचे, असा तिचा स्वभाव बनला होता. अशा स्थितीत एके दिवशी ब्राह्मणाच्या वडिलांचे श्राद्ध आले. श्राद्ध कसे होणार या विवचनेत तो असता, त्याच्या मित्राने त्याला पुढील सल्ला दिला. ' तुझी बायको सगळे प्रतिकूल करीत असेल, तर तिला प्रतिकूलच सांग म्हणजे ती आपोआप अनुकूल ते करील. ' ब्राह्मणाने त्याप्रमाणे तिच्याकडून स्वयपाकादी सर्व गोष्टी यथास्थित करून घेतल्या. नंतर तो अनवधानाने म्हणाला, की ' पिंड नेऊन नदीत सोड. ' ते ऐकताच प्रतिकूल वागण्याच्या स्वभावामुळे त्याच्या पत्नीने ते पिंड शौचकूपात नेऊन टाकले.

त्यामुळे ब्राह्मण वैतागला आणि लक्ष्मी प्रसन्न होईपर्यत घराचे आणि बायकोचे तोंड पाहायचे नाही, अशा निर्धाराने वनात गेला. तिथे आश्विन पौर्णिमेला काही नागकन्या कोजागरव्रत करीत असलेल्या त्याला दिसल्या. पूजा आटोपल्यावर त्यांना द्यूत खेळायचे होते. त्यासाठी त्यांनी या ब्राह्मणाला बोलावले. ब्राह्मण द्यूत खेळला आणि जवळ असलेले सगळे हरला. लक्ष्मीने ही गोष्ट पाहिली. तिला त्या ब्राह्मणाची दया येऊन तिने

त्याला श्रीमंत केले तो जसा श्रीमंत तसाच सुंदरही बनला. त्यामुळे त्या नागकन्या त्याच्यावर मोहित झाल्या. त्यांच्याशी गांधर्व विवाह करून तो त्यांच्यासह घरी परतला. पूर्वपत्नी महाचंडी हिच्यावरही त्याने प्रेम केले. पुढे त्याचा संसार सुखाचा झाला.

आश्विन महिन्यात पावसाळा संपून आकाश निरभ्र होते. त्यामुळे चांदणेही स्वच्छ पडते. अशा वेळी इष्टमित्रासह चांदण्या रात्रीची मौज अनुभवता यावी, म्हणून हा उत्सव प्रचारात आला असावा. या दिवशी इष्टमित्रांना केशरी दूध देण्याचा प्रघात आहे राजस्थानातल्या स्त्रिया या दिवशी शुभ्र वस्त्र नेसून चांदीचे दागिने घालतात. धार्मिक वृत्तीचे राजपूत या रात्री चंद्राची पूजा करून ब्राह्मणांना शर्करायुक्त दूध देतात. पाहा– कौमुदीमहोत्सव. [ व्रतराज ]

**कोटपुली** त्रेसष्ट नायन्मारांपैकी एक. चोळ राजाचा एक सेनाधिकारी. याला साधुसेवेचा फार ध्यास होता. आपल्या कोठारातील सर्व धान्य तो साधूंच्या भोजनासाठी राखून ठेवीत असे. एकदा तो घरात नसताना त्यातील काही धान्य त्याच्या कुटुंबियांनी स्वतःसाठी वापरले. तो परत आल्यानंतर त्याला ही गोष्ट कळताच, त्याने कुटुंबातील सर्व आबालवृद्धांना मृत्युदंड दिला. अशा एकनिष्ठ उपासनेमुळे त्याला यथाकाल शिवकृपेचा लाभ झाला. [ पे. पु. ]

**कोटप्पा कोंडास्वामी** द. भारतातील डोंगरावर राहणारा एक देव. याचे मूळ नाव कोटिया असे होते. हा शूद्र जातीचा माणूस होता. दुसऱ्या एका दंतकथेत त्याला ऋषी म्हटले आहे. याने एका गवळ्याच्या पत्नीशी अनैतिक संबंध केला. त्याचा सूड म्हणून गवळ्याने याला ठार मारले. पण त्याचे रक्त जिथे सांडले, त्या डोंगरावरून आवाज उठू लागला, की ' माझे देऊळ बांधा; नाही तर मी गाव उद्ध्वस्त करीन. ' गावच्या लोकांनी तो आवाज ऐकला. ते भ्याले. त्यांनी त्याचे देऊळ बांधले व त्याला कोटप्पा कोंडास्वामी असे नाव देऊन त्याची वार्षिक जत्रा सुरू केली.

ही जत्रा शिवरात्रीला भरते. त्या वेळी शेतकरी आपापली गुरेढोरे त्या डोंगराभोवती आणतात. अनपत्य जोडपी संततीच्या प्राप्तीसाठी त्याच्या डोंगराला प्रदक्षिणा घालतात. वस्तुतः हा प्रेतदेव आहे; पण कालांतराने लोक त्याला शिवाचा अवतार समजू लागले. गवळ्याने त्या कोटियाबरोबरच स्वतःच्या बायकोचाही खून केला होता. गुंटूर जिल्ह्यात त्या जागी तिचेही मंदिर आहे. लोक तिला शक्ती मानतात. [ द्र. गॉ. मॉ. हिं. ]

**कोटल** प. बंगालमधील बरद्वान जिल्ह्यात आढळणारी द्रविडियन जात. ही चांडाळ जातीची एक शाखा असावी, असे रिस्ले म्हणतो. हे लोक गुहकाला आपला पूर्वज मानतात. खेड्यातून गस्त घालणे, हा यांचा व्यवसाय आहे. याच्यांत विधवाविवाह व घटस्फोट रूढ नाही. यांचा पुरोहित पतित ब्राह्मण असतो. काली व लक्ष्मी या यांच्या प्रमुख देवता आहेत. हे अभक्ष्य भक्षण करीत नाहीत. [ से. इं. १९५१ ]

**कोटवी** एक देवता. ' नग्ना विवस्त्रा योषित् मुक्तकेशी ' असे तिचे लक्षण अभिधानचिंतामणीच्या टीकेत दिले आहे. दक्षिण देशात कोट्टवै नामक एक नग्न मातृदेवता आढळते, तीच कोटवी या नावाने उत्तर भारतात प्रविष्ट झाली असावी. बाणाने आपल्या हर्षचरितात तिचा उल्लेख केला आहे. गुप्तकालात उत्तर भारताला दक्षिणेतल्या या देवतेचा परिचय झाला असावा. बाणाच्या काळात ही देवी दुर्भाग्यसूचक ठरली. त्या काळी कोट्टक्रियामह या नावाने या देवीचा उत्सव करीत. अहिच्छत्रा येथील खेळण्यात तर्जनी दाखविणाऱ्या एका नग्न स्त्रीचे चित्र आहे, ती कोटवीच असावी. कोटवीची पूजा साऱ्या उत्तर भारतात प्रचलित आहे. काशीजवळ कोटमाईचे एक मंदिर आहे. अलमोडा जिल्ह्यातल्या लोहाघाटाजवळ कोटलगढ नावाचे एक ठिकाण आहे, तो याच देवतेचा दुर्ग होता.



कोटवी देवी

कोटवी ही बाणासुराची माता होती. तिचे कमरेच्या वरचे शरीर कवचाने झाकलेले व कमरेच्या खालचे नग्न असते, अशी समजूत आहे. तिच्याविषयी एक कथा सांगतात ती अशी–

एकदा बलिपुत्र बाणासुराचे विष्णूशी युद्ध झाले. त्या युद्धात जितके असुर मारले जात, त्याहून अधिक उत्पन्न होत. मग देवांच्या प्रार्थनेने महाकाली निर्माण झाली. तिने असुरांचा व त्याबरोबरच कोटवीचाही वध केला. कोटवीला कोटरा असेही म्हणतात. [ हृ. च. सां. अ. ]

**कोटा** नीलगिरीच्या पठारावर राहणारी एक जात. तोडा व कोटा या दोन्ही जाती पूर्वी एकच होत्या. हे लोक म्हशी व रेडे पाळीत असत. एकदा एक कोटा एका मेलेल्या रेड्याचे मांस खाताना तोडांनी पाहिले व त्यांना त्या गोष्टीची शिसारी आली. त्यांनी मग सगळ्या कोटांना आपल्यांतून हाकलून दिले, अशी दंतकथा आहे.

नीलगिरीच्या पठारावर कोटागिरी, कील कोटागिरी, तोडानाड, शोलूर, केथी कुंडा, इ. गावांत त्यांची वस्ती आहे. कोटांच्या खेडचांत सर्वसाधारणपणे तीन केरी किंवा रस्ते असतात. एका रस्त्यावर तेरकारन किंवा देवादी व दुसऱ्या दोन रस्त्यांवर पुजारी व इतर लोक राहतात. एका केरीतल्या लोकात विवाहसंबंध होत नाही.

हे लोक कन्नडमिश्रित तमिळ भाषा बोलतात.

हे लोक उत्तम कारागीर आहेत. यांच्यांत लोहार, सोनार, सुतार, कातडी कमावणारे, दोर वळणारे, कुंभार, धोबी, शेतकरी, इ. सर्व प्रकारचे कारुनारू असतात. यांच्या स्त्रिया टोपल्या विणतात व मातीची मडकी बनवितात. या लोकांचा मुख्य व्यवसाय म्हणजे पशुपालन होय.


कोटा – दंपती

यांच्या पुजाऱ्याला मुंथकन्नान म्हणतात. तो गृहस्थाश्रमी असावा लागतो. बायको मेली, की त्याचे पुजारीपण जाते. याला म्हशीचे दूध पिण्यास बंदी असते; पण तिचे मांस खायला मात्र बंदी नसते. गायीचे दूध पिता येते; पण मांस खाण्यास बंदी असते. हे लोक घर्षणाने उत्पन्न केलेला अग्नी सतत घरात बाळगतात.

गावातील गाईचे दूध काढणे, देवपूजा करणे व धान्य पेरणीच्या व कापणीच्या समारंभात भाग घेणे, ही मुंथकन्नानची कामे असतात.

माघ किंवा फाल्गुन महिन्यात यांचा पेरणीचा समारंभ होतो. समारंभाच्या आधीच्या रविवारी पुजारी गावातील अनेक गायींचे दूध काढतो. समारंभाच्या दिवसापर्यंत जर ते दूध नासले नाही, तर तो शुभ शकुन मानतात व नासले तर त्याचा दोष पुजाऱ्यावर ठेवतात. समारंभाच्या दिवशी देवपूजा केल्यावर पुजारी थोडेसे धान्य पेरतो. या दिवशी गावातील लोक देवळात जमून देऊळ स्वच्छ करतात. तीन महिन्यानंतर एखाद्या शुभ दिवशी असाच समारंभ करून पीक कापतात.

**देव-धर्म–** कोटांची देवळे म्हणजे पुढे–मागे उघडचा असलेल्या गवती छपराच्या झोपडचाच असतात. त्यात कामतराय नामक शिवाचे व कालिकई नामक पार्वतीचे वास्तव्य असते, अशी त्यांची समजूत आहे. या मंदिरात त्यांच्या कायमच्या मूर्ती नसतात. फक्त उत्सवाच्या वेळी त्यांच्या प्रतिमा म्हणून दोन चांदीचे पत्रे खांबाला टांगतात. कामतरायाचा वार्षिकोत्सव थाटात साजरा करतात. जेवण व नृत्य हे या उत्सवाचे वैशिष्टय असते. या दिवसात ते लोक स्वच्छंद वागतात. दर


कोटांचे मंदिर

पौर्णिमेला कोटा लोक देवळात जाऊन पूजा करतात. कोटा लोकांची अशी धारणा आहे, की कामतरायाच्या तीन धर्मबिंदूपासून तोडा, कुरुंब व कोटा या प्राचीन पहाडी जातीची उत्पत्ती झाली.

**विवाहप्रथा–** मुलगी आठ-दहा वर्षांची झाली, की तिच्या लग्नाचा वाङ्‌निश्चय करतात व पुढे बारा ते सोळा वर्षाच्या अवधीत तिचे लग्न होते. लग्नसमारंभ अगदी साधा असतो. वर आपल्या आप्तासह वधूगृही जातो. तिथे सर्वांना मेजवानी मिळते. मग लग्नतिथी निश्चित करतात. लग्नाच्या दिवशी कन्याशुल्क देऊन नवरा मुलगा वधूला घेऊन स्वगृही येतो व तिथे त्यांचे लग्न लागते.

गावाच्या पंचायतीमार्फत घटस्फोट व चोरी, मारामारी, इ. गुन्हे याचा निवाडा होतो.

स्त्रियांना मासिक रजोदर्शन काळात राहण्यासाठी व बाळंतपणासाठी वेगळी झोपडी बांधलेली असते. मूल जन्मल्यापासून शुद्ध प्रतिपदा येईपर्यंत बापाला आशौच पाळावे लागते. पहिल्या बाळंतपणाच्या वेळी स्त्री तीन महिने त्या झोपडीत राहते. त्या पुढच्या खेपांना मात्र शुद्ध प्रतिपदेपर्यंतच ती तिथे थांबते.

**मर्तिकप्रथा–**मृताच्या घरी एक खांब पुरून त्याला तांबडे कापड गुडाळतात. नंतर प्रेताला नवे कपडे व हार घालून ते एका सजविलेल्या गाडीत ठेवतात. मग पुरुष त्यांच्याभोवती नाचतात. गाडीला तीन बैल जोडतात. प्रेत नेल्यावर त्यांपैकी दोन बैल सोडून देतात व एका बैलाला ठार मारतात. ती

गाडी प्रेतावरोबरच जाळून टाकतात. वर्षातून दोनदा श्राद्ध करतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**कोटितीर्थ** भारतात या नावाची अनेक तीर्थक्षेत्रे आहेत. त्यांचा निर्देश भिन्न भिन्न पुराणांत आढळतो. पृथूदकतीर्थाजवळ कोटितीर्थ आहे, असे वामन पुराणात म्हटले आहे (५१.५३; ८४.११–१५). तिथे शिवदर्शनासाठी कोटच-वधी ऋषी जमले असता शिवाने एक कोटी रूपे घेऊन त्यांना दर्शन दिले, अशी कथा आहे. महाभारतात म्हटले आहे, की हे तीर्थ भर्तृस्थानाजवळ आहे (वन. ५५.६१). वराह पुराणात मथुरेजवळील एका स्थानाला कोटितीर्थ म्हटले आहे (१५२. ६२). हे तीर्थ गोदावरीच्या द तीरावर आहे, असे ब्रह्म पुराणात सागितले आहे (१४८.१). गयेतील एका स्थानालाही हे नाव आहे (अग्नि पु. ११६ ६). पंचनद देशात एक कोटितीर्थ आहे (पद्म पु. १.२६ १४). तिथे शंकराने कोटी तीर्थाचे जल एकत्रित केले होते (वामन पु. ३४.२८). प्रयागजवळच्या एका स्थानालाही हे नाव आहे (मत्स्य पु. १०६.४४). पण मुख्य कोटितीर्थ हे नर्मदेच्या तीरावर आहे, असे अनेक पुराणांत सांगितले आहे (कूर्म पु. २.४१.३४; पद्म पु. १.१३.३३). तिथे शंकराला कोटीश्वर हे नाव आहे. त्याने तिथे एक कोटी असुरांचा संहार केला, असे म्हणतात. तिथल्या कुंडात स्नान करणाऱ्या पुरुषाला राजपद लाभते आणि स्त्रीला गौरीची योग्यता येते, असे मत्स्य पुराणात म्हटले आहे (१९१.७–१३).

नर्मदा (रेवा) नदीच्या उगमस्थानी एक ११ कोनी कुंड बांधलेले आहे, त्याला कोटितीर्थ म्हणतात. त्याच्या पश्चिम काठावर एक गोमुख असून, त्यातून थोडे थोडे पाणी कुंडात पडत असते. या कुंडाच्या उत्तरेस नर्मदेश्वर व अमरकंटकेश्वर ही मंदिरे आहेत. याच्या आसपास इतरही अनेक मदिरे आहेत.

काश्मीरमधील बारामूला जवळचे कोटीसर म्हणजे एक कोटितीर्थच होय.

आंध्र प्रदेशातील गोदावरी जिल्ह्यात कोटिपल्ली नावाचे एक तीर्थ गोदावरी नदीच्या तीरावर आहे. त्यालाही कोटितीर्थ म्हणतात. तिथे गोदावरी नदीत स्नान केल्याने कुष्ठरोग नष्ट होतो, अशी आख्यायिका आहे. [ हि. ध.; टें. ली. आं. प्र. ]

**कोटिप्पट्टन** मलबारमधील तमिळ ब्राह्मणांची एक पतित मानलेली जात. प्राचीन काळी यांनी पानवेली लावण्याचा प्रमुख व्यवसाय स्वीकारल्यामुळे समाजाने यांना पतित मानले. हे मलयाळम् भाषा बोलतात, जानवे घालतात व ब्राह्मणासारखाच पोषाख करतात. सांप्रत तमिळ ब्राह्मण यांचे पौरोहित्य करतात. यांचा अंत्यविधी अमंत्रक होतो. हे वार्षिक श्राद्ध करतात. बापाचा वारसा मुलाकडे येतो. शास्ता ही यांची देवता आहे. [ का. ट्रा. स. इं. ]

**कोटिशिला** मगध देशातले एक तीर्थ. हे तीर्थ कलिंग देशात असल्याचेही एक मत आहे. इथे अनेक जैन मुनींनी तपश्चर्या करून केवलज्ञान मिळविले. [ वि. ती. क.; जै. सा. इ. ]

**कोटिसंवत्सरव्रत** भाद्र० शु. ३ येस हे व्रत करतात. व्रतावधी– चार वर्षे. एक लक्ष तांदूळ किंवा तीळ दुधात घालून वाटतात व त्या गोळ्याची पार्वतीची मूर्ती बनवितात. त्या दिवशी उपवास करून तिची पूजा करतात. व्रताचे फल– दारिद्र्यनाश. चागला पती व चागली सतती याचा लाभ व्हावा म्हणूनही स्त्रिया हे व्रत करतात. याला लक्षेश्वरीव्रत असेही म्हणतात. [ हि. ध. ]

**कोटिहोम** ग्रहांची बाधा व अशुभ भविष्य यांच्या निरासासाठी कोटिहोमयुक्त ग्रहयज्ञ करावा, असे सांगितले आहे. हा होम झाल्यावर बारा ब्राह्मणांची पूजा, रात्रिसूक्ताचा पाठ, वसोर्धाराविधान, इ. गोष्टी करायच्या असतात (मत्स्य पु. ९३). दिव्य उत्पात टळावे, म्हणूनही कोटिहोम करतात (बृ. सं. ४५ ६). प्रभाकरवर्धन हा राजा मृत्युशय्येवर पडला असता त्याच्यासाठी कोटिहोम केल्याचे हर्षचरितात नमूद आहे. हा कोटिहोम शक्य तर नृसिंहाच्या किंवा शंकराच्या मंदिरात करावा, असे सांगितले आहे. [ शां. क. ]

**कोटी रानी** मिर्झापूर जिल्ह्यातील आदिवासींची एक देवता. ही डोंगरात राहते.

**कोटेगर** कर्नाटकातली एक जात. यांच्यात अनेक कुळे आहेत. हे लोक मैला, गुल्यम्म, यल्लम्म, मरिअम्म, इ. देवतांना भजतात. अनाथ प्रेते पुरणे, रस्ते झाडणे, वाटाड्याचे काम करणे, या गोष्टीसाठी या लोकांची योजना होते. [ मु. इं. जा. ]

**कोट्टाई वेल्लाळ** तमिळनाडमधल्या तिनेवेल्ली जिल्ह्यातल्या श्रीवैगुंटम् गावातील एक जात. इथे एक किल्ला असून, त्याच्या भोवती मातीचा तट आहे. या किल्ल्यात

हे लोक राहतात. बाहेरच्या वेल्लाळांशी यांचा संबंध तुटल्यामुळे यांची संख्या रोडावत चालली आहे. पूर्वी हे लोक वैगाई नदीच्या खोऱ्यात राहत होते. सुमारे हजार वर्षापूर्वी राजकीय चळवळीमुळे त्यांना या किल्ल्याचा आश्रय घ्यावा लागला, असे सांगतात. मदुरेच्या पांड्य राजांचे ते खजिनदार होते व त्याना नवीन राजाला राज्याभिषेक करण्याचा परंपरागत अधिकार होता. या घटनेची स्मृती म्हणून दर वर्षी यांचे कुटुंबप्रमुख एका ठराविक मंदिरात जातात व तिथल्या देवाच्या मस्तकावर मुकुट घालतात.

यांच्या स्त्रिया कधीही किल्ल्याच्या तटाबाहेर येत नाहीत. कोणत्याही परक्या पुरुषाला या किल्ल्यात जाता येत नाही; पण परक्या स्त्रियांना मात्र किल्ल्यात प्रवेश मिळतो. कोट्टाई वेल्लाळांच्या विवाहित स्त्रिया नवरा, बाप, भाऊ व मामा यांच्या खेरीज अन्य पुरुषाच्या दृष्टीस पडत नाहीत.

**विवाहप्रथा** — यांच्यात आतेबहिणीशी लग्न करण्याची पद्धत आहे. वर आपल्या आप्तेष्टांसह वधूगृही जातो. होम वगैरे झाल्यावर वराची बहीण वधूच्या गळ्यात ताळी बांधते. लग्नानंतर नवरा पत्नीच्या घरी राहायला जातो. हे लोक विवाहप्रसंगी जमलेल्या लोकांना जेवणाऐवजी शिधा देतात.

कोट्टाई वेल्लाळांच्या स्त्रिया मध्यम वयापर्यंत नेहमीचे दागिने घालतात. त्यानंतर त्या पाच फडांच्या नागाची आकृती असलेला सोन्याचा एक पत्रा गळ्यात घालतात. त्याला नागपदम् असे नाव आहे. याच्या मागे एक स्मारक घटना आहे, ती अशी—

तेन्नवरायन नामक एका पांड्य राजाने आपल्या खऱ्या वारसदार मुलाला राज्य न देता अनौरस मुलाला ते देण्याचे ठरविले. पण सेझुवैमानगरम् येथील कोट्टाई वेल्लाळांनी त्याला राज्याभिषेक करण्याचे नाकारले. तेव्हा राजाने त्यांचा छळ सुरू केला. त्यामुळे त्यांनी वैतागून अग्निकुंडात उडी घ्यायचे ठरवले. त्या वेळी एक पंचमुखी नाग तिथे प्रकटला व त्याने त्यांना त्या आत्मघातापासून परावृत्त केले. ही घटना ऐकून तिनेवेल्ली येथे राज्य करणाऱ्या पांड्य राजाने त्यांना आपल्या राज्यात बोलावले व श्रीवैगुटम् येथे स्थान दिले. पुढे या लोकांतूनच पांड्य राजे आपले मंत्री व खजिनदार नेमू लागले.

हे लोक प्रेते जाळतात. [ का. ट्रा. स. इं. ]

## कोट्टुमणी

नऊ अथवा अकरा क्षुद्र घंटिकांचा जुडगा. याच्या मधोमध एक घंटी जडवून बाकीच्या सभोवती जडविलेल्या असतात. मंदिरातील उत्सवांच्या वेळी हे वाद्य वाजवितात. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

## कोडिमंगलम्

मदुरेच्या वायव्येस आठ मैलांवर वसलेले एक क्षेत्र. इथल्या शिवमंदिरावर बरेच लेख कोरलेले आहेत. इथे नागमलै पर्वतावरून एक जलप्रवाह खाली पडतो, त्याला गायमुख जोडलेले आहे. हा प्रवाह पवित्र मानलेला आहे. तिथे जवळच एक स्तूप आहे. आषाढ अमावास्येस इथे मोठी जत्रा भरते. [ मदुरा गॅझे. ]

## कोडीधज

(सं. कोटिध्वज) प्राचीन काळी करोडपती असलेले व्यापारी किंवा सावकार आपल्या घरावर जो एक ध्वज सदैव उभारून ठेवीत, त्याला कोडीधज असे नाव होते. उज्जयिनी नगरात कोडीधज उभारणारे कित्येक श्रेष्ठी आणि सावकार होते, असे तत्कालीन लोककथांवरून कळते [ मरुभारती, जुलै १९५८ ]

## कोडी मड्डलम्

दक्षिणेतील एक प्रकारचा ढोल. याचा आकार सामान्यपणे मृदंगासारखा असतो. नीलगिरी प्रदेशातील लोक मरीअम्माच्या उत्सवाच्या वेळी हे वाद्य वाजतात. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

## कोणंगी दासरी

दक्षिणेकडील नृत्य-नाट्यातील विदूषक. नाट्याच्या प्रारंभी तो रंगभूमीवर प्रवेश करून विचित्र प्रकारे नृत्य करतो व त्यामुळे प्रेक्षकांत खूप हशा पिकतो. या त्याच्या नृत्याला कोणंगी कूतू असे म्हणतात. नृत्य संपल्यावर तो सूत्रधाराशी थोडा वेळ विनोदी संभाषण करतो. शेवटी सूत्रधार कोणंगीला सागतो, की तू आजचा खेळ यशस्वी होण्यासाठी देवाची प्रार्थना कर. कोणंगी तसे करतो व निघून जातो. [ डि. सा. इं. म्यू. म्यु ]

## कोणार्क

एक सूर्यक्षेत्र. ओडिसा राज्यात भुवनेश्वराच्या आग्नेय दिशेला सुमारे ४० मैलांवर व जगन्नाथ-पुरीपासून सुमारे २० मैलांवर हे क्षेत्र आहे. पुरी हे चक्रक्षेत्र असून, त्याच्या ईशान्येस हे स्थान असल्यामुळे त्याला कोणार्क (=कोणस्थ अर्क किंवा सूर्याचा कोपरा) हे नाव प्राप्त झाले असावे. याला कोनार्क, कोनारक, कोणादित्य, अर्कक्षेत्र, पद्मक्षेत्र अशीही अन्य नावे आहेत.

पुराणात वर्णिलेले मैत्रेयवन याच जागी होते, असे म्हणतात. पण आता तो सर्व प्रदेश वालुकामय झाला आहे. प्राची नदीची एक शाखा असलेली चंद्रभागा पूर्वी या प्रदेशातून वाहत होती; ती आता पूर्णपणे सुकून गेली आहे. तिच्या त्या कोरड्या पात्रातच एका भव्य सूर्यमंदिराचे भग्नावशेष आज पाहायला

मिळतात. मंदिराचा गाभारा उद्ध्वस्त झालेला असून, आतील सूर्यमूर्तीही जागेवर नाही. मात्र त्याच्या बाहेरील बाजूंवर सूर्याच्या ज्या मूर्ती कोरलेल्या होत्या, त्यांपैकी एक अद्याप अभंग आहे. तिचे भव्य आणि दिव्य रूप पाहून भोवतालच्या भग्न वास्तूचा क्षणभर विसरच पडतो.

याचा सभामंडप (जगमोहन) तेवढा संपूर्ण उभा आहे. त्याची उंची १३० फूट आणि लांबी-रुंदी १०० फूट असून, तो उंच जोत्यावर बांधलेला आहे. त्याची वरची रचना शिखर-पद्धतीची नाही; तर एकावर एक ठेवलेल्या पायऱ्यांप्रमाणे



सूर्यमंदिराचा सभामंडप

आहे. कळसापर्यंत क्रमाक्रमाने अरुंद व निमुळती होत जाणारी अशी ही रचना असून, ती तीन टप्प्यांची आहे. प्रत्येक टप्प्यातून पुढे आलेल्या पीठावर सुंदर मानवी पाषाणमूर्ती दिसतात. त्यात नाना प्रकारची वाद्ये वाजविणाऱ्या अप्सरांच्या मूर्ती अत्यंत रेखीव आणि प्रमाणबद्ध अशा आहेत. सभामंडपाच्या पूर्वेस ३० फूट अंतरावर नटमंदिर दिसते, तेही भग्नावस्थेतच. मंदिराच्या प्रांगणात अन्य काही देवताची लहान लहान मंदिरे होती. त्यांपैकी मुख्य मंदिराच्या मागे असलेले मदिर सूर्यपत्नी संज्ञा हिचे होते, असे म्हणतात.

या सूर्यमंदिराची रचना अशी आहे, की विमान (गर्भगृह) व सभामंडप मिळून तो एक भव्य रथ आहे, असे वाटते. त्याला उत्तर व दक्षिण बाजूना बारा बारा मोठाली चाके आहेत आणि पूर्वेला सात घोडे जोडलेले आहेत. सात घोडे म्हणजे सात वार किंवा सात रग यांची प्रतीके समजली जातात. २४ चाके ही वर्षातील २४ पक्ष किंवा १२ मास व १२ राशी यांतून सूर्याचे भ्रमण दर्शवितात. प्रत्येक चाकाला ८ आरे आहेत, ते दिवसातील ८ प्रहरांचे प्रतीक होत. या सर्व चाकांवर मनोहर नक्षीकाम आणि मानवांच्या व पशूंच्या लहान लहान सुरेख आकृती कोरल्या आहेत.

**भव्यता** – या सूर्यमंदिराचे शिखर २२७ फूट उंच असावे, असा स्थापत्यशास्त्रज्ञांचा अंदाज आहे. त्याच्या कळसाचे वजन ५६ मण असून, तो एकाच अखंड शिळेचा बनविलेला होता, असे म्हणतात. तिथे एका शिळेवर नवग्रहांचे अप्रतिम शिल्प आहे. ती शिळा एवढी प्रचंड आहे, की तिचा लहानसा भागही तिथून कलकत्त्याला नेणे अशक्य ठरले. शेवटी त्या शिल्पातील सूर्यमूर्ती तेवढी काढून कलकत्त्याला नेली गेली. सभामंडपाच्या समोरील मोकळ्या जागेत ३४ फूट उंच व १६ बाजू असलेला एक स्तंभ होता. तो सध्या पुरीच्या जगन्नाथमंदिराच्या पूर्वद्वारासमोर आहे. तो स्तंभ एकाच अखंड शिळेपासून बनविलेला आहे.



सूर्यमूर्ती – कोणार्क

मंदिराच्या विस्तीर्ण प्रांगणाभोवती एक उंच तट असून, त्याला तीन दिशांना तीन महाद्वारे आहेत. त्यांपैकी पूर्वेकडील महाद्वाराच्या दोन बाजूंना दोन विक्राळ सिंह दोन हत्तींवर झेप घेताना दिसतात, उत्तरेकडील महाद्वाराजवळ दोन प्रचंड गजराज उभे दिसतात; तर दक्षिणद्वाराजवळ दोन महाकाय, रणमस्त अश्व उडी घेताना दिसतात. या सर्व शिल्पांची भव्यता व प्रमाणबद्धता पाहून मन स्तिमित होते. हे सर्व शिल्पकाम अवाढव्य असले, तरी त्यावरील कलाकुसर मात्र अत्यंत नाजूक आहे.

**विविधता** – मंदिराच्या सभामंडपावर आणि इतर उद्ध्वस्त भागावर भिन्न भिन्न प्रकारची असंख्य चित्रे कोरलेली आहेत.

त्यात मानवी जीवनाच्या विविध अंगाचे दर्शन घडते. कुठे राजदरबारचे दृश्य आहे, तर कुठे चतुरंग सैन्याचे युद्ध चाललेले आहे. कुठे योगी योगसाधना करीत आहेत, भक्त देवाची पूजा करीत आहेत आणि गुरू शिष्यांना पढवीत आहेत. कुठे




सूर्यरथाचे चाक

प्रेमीयुगुलांचे मीलन, तर कुठे मृगयेचा देखावा. कुठे पशुपक्ष्यांची चित्रे, तर कुठे वृक्षवेलींची आणि फळाफुलांची चित्रे. तशाच मंदिराच्या चारी बाजूवर अप्सरांच्या सुदर मूर्ती. याशिवाय रामायण, महाभारत व पुराणे यांतील अनेक प्रसंगांची चित्रेही जागोजागी कोरलेली दिसतात. ओडिसाची मूर्तिकला व स्थापत्य-कला यांचा परमोच्च विकास या शिल्पकलेत झालेला दिसतो. ही शिल्पे पाषाणाची असूनही अत्यंत सजीव आणि चैतन्यपूर्ण वाटतात. त्यांच्या जिवंतपणाचे मर्म त्याच्या लयबद्धतेत आहे.

**निर्मिती–** हे सूर्यमदिर नागर शिल्पशैलीच्या कलिंग नामक उपशैलीचे आहे. गग वंशातील राजा नरसिंहदेव याने इ. स. १२७८ साली याची उभारणी केली. भोवतालच्या प्रदेशांवर आक्रमण करून त्याने जे विजय मिळविले होते, त्यांचे हे स्मारक त्याने करून ठेविले. त्याच्या रचनेसाठी १२०० कारागीर सतत १६ वर्षे खपत होते. राजाने आपले १२ वर्षाचे उत्पन्न (३६ कोटी रुपये) या मंदिराच्या निर्मितीसाठी खर्च केले, असे ऐने अकबरीत म्हटले आहे. मात्र अबुल फजलच्या मते हे मंदिर इ. स. ९ व्या शतकातले असून, १३ व्या शतकात नरसिंहदेवाने त्याची नवी रचना केली. एका भूर्जपत्रावर अशी नोंद आढळते, की हे मंदिर केसरी वंशातील एका राजाने ९ व्या शतकाच्या उत्तरार्धात बांधले. मंदिराच्या आसमंतात २५ मैल दूरपर्यंत मोठ्या शिळा आढळत नाहीत. मग त्या काळी अशा प्रचंड शिळा कोठून व कशा आणल्या असतील, हा एक मोठाच प्रश्न आहे. नरसिंहदेवाने बांधलेल्या या मंदिराविषयी एक दंतकथा प्रचलित आहे, ती अशी––

सर्व मंदिर ज्या कारागिरानी पूर्ण केले, त्यांना त्याचे शिखर पूर्ण करणे जमेना. मुख्य कारागिराचा १२ वर्षांचा धर्मपाद नावाचा मुलगा होता, त्याने मग ते काम अगावर घेतले. तो साहस करून वर चढला आणि त्याने ते शिखराचे काम तडीस नेले. पण लगेच त्याला स्फुरले, की आपल्या या अघटित कृत्या-मुळे सर्व कारागिराची अपकीर्ती होईल व राजा त्याच्यावर



गजसिंह– कोणार्क

नाराज होईल. त्यासरशी त्या मुलाने शिखरावरून नदीत उडी टाकून आत्महत्या केली. त्याला शिखरावरून नदीत ढकलून देण्यात आले, असाही एक प्रवाद आहे.

काला पहाड या नावाने प्रसिद्ध असलेल्या मुसलमान सर-दाराने हे मदिर उद्ध्वस्त केले, असे काही इतिहासकाराचे मत आहे. पण काहीजण असे म्हणतात, की ते वीज पडल्यामुळे किंवा भूकपामुळे कोसळले असावे. नदीच्या पात्रातील खोल पाण्यात मोठमोठे पाषाण टाकून, त्या पायावर हे मंदिर बांध-लेले होते. तो पाया केव्हातरी भग्न झाल्यामुळे मदिर पडले असावे, असेही एक अनुमान आहे.

दर्यावर्दी लोक या मदिराला काळा पागोडा म्हणत असत. त्याच्या शिखरावर एक विलक्षण शक्तीचा पाषाण होता. त्याच्या प्रबळ आकर्षणामुळे समुद्रातील जहाजे त्याच्याकडे

ओढली जात. पुढे काही खलाश्यांनी तो पाषाण तिथून काढून टाकला आणि त्यानंतर ते मंदिर कोसळले, अशी एक दंतकथा ओडिसात प्रचलित आहे.

इ. स. १२७८ च्या नंतर होऊन गेलेल्या वाचस्पतिमिश्राने तीर्थचिंतामणीनामक ग्रंथात कोणार्क येथील सूर्यपूजेची पद्धती दिली आहे. त्यावरून आणि पुरी येथील बखर वृत्तातावरून असे निश्चित कळते, की हे सूर्यमंदिर पूर्ण होऊन त्यात सूर्यमूर्तीची प्राणप्रतिष्ठा झाली होती.

**पूर्वेतिहास** – या पवित्र क्षेत्राचे वर्णन कपिलसंहिता, ब्रह्म पुराण, भविष्य पुराण, साव पुराण, वराह पुराण, इ. ग्रंथांत आढळते. याच्याविषयी पुराणात कथा आहे, ती अशी —

श्रीकृष्ण व जांबवंती याचा पुत्र सांब हा अत्यंत सुदर होता. नारदमुनीने त्याला एकदा कृष्णाच्या स्त्रिया जिथे स्नान करीत होत्या तिथे नेले. त्याला पाहून त्या स्त्रिया मोहवश झाल्या आणि त्याच्याशी प्रेमचेष्टा करू लागल्या. ही गोष्ट चालू असता नारदमुनी तिथून श्रीकृष्णाकडे गेला व त्याला तिथे घेऊन आला. सांबाचे ते चाळे पाहून श्रीकृष्ण संतापला व त्याने साबाला शाप दिला, की 'तुला कुष्ठरोग होईल.' मग आपण कसे निर्दोष आहो, ते साबाने श्रीकृष्णाला सांगितले. तेव्हा कृष्णाने त्याला मैत्रेयवनात जाऊन सूर्याची आराधना करण्याचा आदेश दिला. साबाने त्याप्रमाणे केल्यावर सूर्य प्रसन्न झाला व त्याने सांबाला आपल्या २१ नावांचा जप करून चंद्रभागा नदीत स्नान करण्याची आज्ञा दिली. स्नान करीत असताना सांबाला नदीच्या पात्रात सूर्याची एक कमलासनमूर्ती सापडली. त्या मूर्तीची सांबाने तिथेच प्रतिष्ठापना केली व तिथे एक मंदिरही बांधले. पुढे त्या देवतेची पूजा केल्यामुळे सांब कुष्ठरोगातून मुक्त झाला.

चंद्रभागा नदी आता तिथे वाहत नसली, तरी भाविक लोक अजूनही कोणार्क येथे जातात आणि रथसप्तमीच्या दिवशी तिथे स्नान करतात. कारण त्याच दिवशी सांबाने चंद्रभागेत स्नान केले होते, अशी त्याची श्रद्धा असते. सागरस्नान, कल्पवृक्षपूजा आणि नारायणाची व नवग्रहांची पूजा, ही तिथल्या यात्रेची मुख्य अंगे आहेत.

**शृंगारचित्रे** – कोणार्कच्या सूर्यमंदिरात अशी अनेक चित्रे आहेत, की जी सांप्रतच्या नीतिकल्पनेप्रमाणे असभ्य समजली जातात. जीवनाच्या विविध अंगांपैकी स्त्री-पुरुषसमागम हे अंगही त्या वेळच्या शिल्पकारांनी तिथे साकार केले आहे. कलावंताच्या दृष्टीला काहीही अश्लील वाटत नसले, तरी मंदिराच्या पवित्र वातावरणाला असली चित्रे शोभत नाहीत, असे लोकमत आहे. प्राचीन काळी ओडिसात तंत्रमार्गाचा बराच प्रभाव होता. या पंथाचा उपासनात्मक भोगवाद कोणार्कच्या मंदिरातील मिथुन-शिल्पात प्रकट झाला, असे प्रो. झिमर म्हणतो. दुसरी कल्पना अशी आहे, की यात्रेकरूनी ही चित्रे पाहून आपल्या अंतरातील भोगविषयक वासनेपासून विरक्त व्हावे आणि शुद्ध मनाने मदिरात प्रवेश करावा, या हेतूने ही चित्रे तिथे कोरलेली आहेत. अशा चित्रांमुळे नैसर्गिक उत्पातांपासून मंदिराचे रक्षण होते, या श्रद्धेनेही कारागीर अशा कृत्याला प्रवृत्त झाले असतील. श्री. रवींद्रनाथ ठाकूर म्हणतात, की 'जग कसे चालले आहे, हे दर्शविण्याव्यतिरिक्त अन्य कोणताही हेतू या चित्राच्या निर्मितीमागे असेल, असे वाटत नाही.'



गंधर्वी – कोणार्क

[भ. को.; स. भा प्र. व.; इं टें. स्क; अजन्ता, डिसें. १९५७; चक्रवर्ती – मार्च ऑफ इंडिया, जुलै १९५८]

## कोतवालिया

गुजरातमधील एक जात. हे लोक कृष्णवर्णीय आहेत. यांच्यांत तरुण-तरुणी स्वयंवर पद्धतीने लग्न ठरवितात. मुलीचा बाप लग्नासाठी मुलीला मुलाच्या घरी घेऊन जातो. वधू-वरांचे हात एकमेकांच्या हाती देणे, हाच लग्नातला प्रमुख विधी असतो. मग काही माणसे वधू-वरांना खांद्यावर घेऊन नाचतात. लग्नात मद्यपान मोठ्या प्रमाणावर चालते. हे लोक आते–मामे बहिणीबरोबर लग्न करतात, पण मावस बहिणीबरोबर करीत नाहीत. [रज:कण]

## कोदंडराम

ललितादेवीने भंडासुरावरोबर युद्ध केले, तेव्हा तिने त्या लढाईत निर्मिलेल्या श्रीरामाला हे नाव आहे. [पु. इं.]

**कोदंडरामस्वामी** कुंभकोणम्‌जवळील मरुदानल्लुर येथील मठाचा धर्माधिकारी. त्यागराजाला राममंत्राचा उपदेश यानेच दिला होता. अद्यापही दाक्षिणात्य संगीताचे विद्यार्थी वरील मठात जाऊन उपदेश घेतात. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**कोनशिला** इमारतीच्या उभ्या–आडव्या भिंतींना मजबुती आणण्यासाठी खाली जोत्यात किंवा वरील भिंतीत जी घडीव शिला बसवितात तिला कोनशिला असे नाव आहे. वास्तू निर्विघ्नपणे उभारली जावी व ती ज्या कार्यासाठी कल्पिली असेल ते कार्य चांगल्या रीतीने व्हावे, म्हणून वास्तूची कोनशिला एखाद्या पूज्य, प्रतिष्ठित व्यक्तीच्या हातून बसविण्याचा प्रघात आहे. अशा कोनशिलेवर, ती ज्या श्रेष्ठ व्यक्तीच्या हातून बसविली असेल, तिचे नाव कोरतात.

**कोनाई** बंगालमध्ये आढळणारी एक जमात. यांना काही ठिकाणी मातीयाळ असे म्हणतात. यांचा चासी या नावाचा एक पोटभद आहे. हे लोक शेती, मच्छीमारी, शेत-मजुरी, कातडी कमावणे, इ. धंदे करतात. हे मनसा आणि धर्मराज यांना भजतात. यांच्यांत मांस खाणारे आणि मास निषिद्ध मानणारे असे दोन्ही प्रकारचे लोक आहेत. [ से. इं. १९५१ ]

**कोनियाम्म** द. भारतातील एक ग्रामदेवता. ही पूर्वी केवळ तिथल्या आदिवासींची देवता होती. त्या जमातीत कोयान नावाचा एक प्रसिद्ध पुरुष होता व तो हिचा भक्त होता. पुढे हिला ग्रामदेवतेचे स्वरूप येऊन हिचे देऊळ बांधले गेले. काही वर्षांनी माथे नावाचा एक राजा शिकारीस गेला असता ही देवी ज्या प्रदेशात होती, तो प्रदेश त्याला सुपीक वाटला. त्याने तिथे वसाहत निर्माण केली. मग त्या वसाहतीची हीच देवता ठरली. पुढे तो प्रदेश टिपू सुलतानाने जिंकून घेतला आणि तिचे देऊळ पाडून मूर्तीही फोडली. कालांतराने पुन्हा हिचे देऊळ बांधले गेले. ही देवता प्रेमळ आहे, असे मानतात.

**कोपिया** एक प्राचीन सांस्कृतिक केंद्र. उत्तर प्रदेशातल्या तराई प्रदेशात गोंडा, बस्ती, गोरखपूर, इ. जिल्हे आहेत. हा सर्व भाग प्राचीन काळी एक सांस्कृतिक केंद्र म्हणून प्रसिद्ध होता. या भूभागावर शाक्य, मल्ल, कोलीय, इ. राजांच्या सत्ता नांदून गेल्या. या भागात मातीचे मोठमोठाले ढीग आहेत आणि त्यांच्या पोटात तत्कालीन संस्कृतीचे अवशेष दडून राहिले आहेत. त्यापैकी एक मातीचा ढिगारा किंवा टेकडी कोपिया या गावात आहे. हे गाव अनोमा नदीच्या तीरावर आहे. बस्ती या शहरापासून ते सुमारे तीस मैलांवर आहे.


मातीची स्त्रीमूर्ती – कोपिया

कोपियाचे प्राचीन नाव अनुपिया असे होते. ती मल्लांची राजधानी होती. या ठिकाणी एक मोठी आमराई होती. गौतमाने राज्यत्याग केल्यावर पहिला मुक्काम केला, तो इथल्या आम्रवनात. तो या ठिकाणी एक आठवडा राहिला व इथेच त्याने आपल्या राजचिन्हांचा त्याग करून भिक्षुवस्त्रे स्वीकारली, असे बुद्धचर्येवरून कळते.


विदेशी पुरुषशिर – कोपिया

या ठिकाणी जी टेकडी आहे, तिचे क्षेत्रफळ सुमारे तीन-चार चौ. मैल आहे. तिची उंची सुमारे ६० फूट भरेल. ही सगळी टेकडीच्या टेकडी विटा व दगडांचे तुकडे यांनी भरलेली आहे. त्यावरून संशोधकांना असे वाटते, की मौर्यकालात

या ठिकाणी काही इमारती असाव्या. टेकडीच्या मधोमध रस्त्याच्या काही खुणा दिसतात. हा रस्ता २० फूट रुंदीचा आहे. टेकडीच्या पश्चिम अंगाला एक वर्तुळाकार स्मारक दिसते. तो बहुधा स्तूपाचा अवशेष असावा. या ढिगातून कित्येक नाणी व मातीच्या मूर्ती संशोधकांनी बाहेर काढल्या आहेत. भारतातल्या सर्वांत प्राचीन अशा रौप्यमुद्रा या ठिकाणी सापडल्या आहेत. त्यांव्यतिरिक्त कोसल, पांचाल, इ. राजांचे व कुशाण राजाचेही शिक्के मिळाले आहेत. इथल्या मृण्मय मूर्ती सनपूर्व तिसरे शतक ते इ. स. ५ वे शतक या काल-खंडातल्या आहेत. यांत तिथे वसलेल्या तत्कालीन विदेशी लोकांची मृण्मय शीर्षेही आढळतात.

टेकडीच्या पूर्व अंगाला एक मैदान आहे. तिथे छोटे मोठे शिशाचे तुकडे व शिशाचे मणी विखरून पडलेले आहेत. त्यावरून अनुमान होते, की तिथे शिशाचा कारखाना असावा. इथले शिशाचे मणी चमकदार व सुंदर आहेत. त्यांची छिद्रे अत्यंत सूक्ष्म आहेत. त्यांचे रंगही अनेक आहेत. पिपरवा येथील बौद्ध स्तूपात असेच काही मणी सापडले आहेत. हे मणी अडीच हजार वर्षाइतके प्राचीन आहेत.



शिशाच्या मण्यांची माला

त्या मण्यांत व कोपिया येथील मण्यांत विलक्षण साम्य आहे. त्यावरून अनुमान होते, की कोपिया येथील हा मण्यांचा कार-खाना अडीच हजार वर्षाइतका जुना असावा व श्रद्धाळू बुद्ध-भक्तांनी इथूनच मणी नेऊन, ते इथून ४० मैलांवर असलेल्या पिपरवा येथील स्तूपात ठेवले असावे. [ मदनमोहन नागर— संपूर्णानंद अभिनंदन ग्रंथ ]

## कोमटी

मद्रास, आंध्र, म्हैसूर, महाराष्ट्र व मध्यप्रदेश या भागांतील एक व्यापारी जात.

गोदावरीच्या तीरावर कोमटी लोकांची पुष्कळ वस्ती आहे. गोदावरीचे एक स्थानिक नाव गोमती असे आहे. त्यावरून या लोकांना गोमती असे नाव मिळाले व त्याचे तेलुगूत कोमटी असे रूपांतर झाले, असे सांगतात.

तेलुगू ही या लोकांची मातृभाषा असून, हे सर्वत्र तीच भाषा बोलतात. ज्या प्रांतात राहतात, तिथली भाषाही ते शिकतात. याशिवाय त्यांची व्यापाराची एक स्वतंत्र सांकेतिक भाषा असते ती वेगळीच.

कोमटी लोकांचे गवर किंवा गौर व कलिंग असे मुख्य दोन भेद आहेत. गवर हे नाव पडायचे कारण असे, की प्राचीन काळी या लोकानी आपली कुलदेवता कन्यकाम्म हिच्याबरोबर अग्निकुंडात प्रवेश केला व जातीचा गौरव कायम राखला. ते गौरीला भजतात, म्हणूनही त्याना हे नाव मिळाले असावे. कन्यकाम्मेला गौरीचाच अवतार मानलेले आहे. कलिंग प्रांतात राहणाऱ्या कोमटयांना कलिंग कोमटी असे नाव आहे. दक्षिणेत विजयनगरपर्यंत राहणाऱ्या कोमटी लोकांना गवर व त्याच्या उत्तरेला राहणाऱ्यांना कलिंग असे म्हणतात.



कोमटी स्त्री

गवर कोमटयांत अनेक पोटभेद असून त्यापैकी काही शैव, काही वैष्णव, तर काही माध्व आहेत. धंद्यावरूनही त्यांच्यात अनेक पोटजाती निर्माण झाल्या आहेत गौर व कलिंग यांच्यात परस्पर लग्नसंबंध होत नाही. गौर मद्यमांस निषिद्ध मानतात; तर कलिंगांना मद्यमांस चालते. धंद्यावरून पडलेल्या जातीं-तही परस्पर रोटीबेटी व्यवहार होत नाही. प्राणी व वनस्पती ही यांची देवके आहेत. कोमटी स्वतःला वैश्य समजतात व आपले गोत्रप्रवर सांगतात.

कोमटी व मादिग (पूर्वास्पृश्य) यांचा पुरातन काळापासून जवळचा संबंध आहे. मादिगांच्या संकटप्रसंगी कोमटी त्यांना मदत करतात. याचे कारण असे सांगतात, की विष्णुवर्धन राजाने जेव्हा कोमटयांचा छळ सुरू केला, तेव्हा ते पळून गेले व मादिगांच्या आश्रयाला राहिले.

**विवाहप्रथा** — कोमटी लोकांत बालविवाहाची चाल होती.

वेदोक्त व पुराणोक्त अशा दोन्ही पद्धतींनी हे लोक लग्ने करतात. कलिंग कोमटयांचे उपाध्याय ओडिया ब्राह्मण असल्यामुळे त्यांच्यात ओडियाच्या चाली शिरल्या आहेत. याच्यात विधवाविवाहाची चाल नव्हती.

उ. भारतात राहणाऱ्या लिंगायत कोमटी लोकांत पूर्वी एक विलक्षण प्रथा होती. एखादा पुरुष व स्त्री लग्न न करता एकत्र राहत असली व तो पुरुष मेला, तर त्याच्या प्रेताशी त्या स्त्रीचे लग्न लावीत व मग त्याची प्रेतयात्रा काढीत.

**देव-धर्म** – सर्व कोमटी जात कन्यकापरमेश्वरी या कुमारी देवतेला भजते. त्यांनी जागोजाग तिची मंदिरे बांधलेली आहेत. य.शिवाय, अन्य देवताचीही ते उपासना करतात.

धार्मिक विधी करण्यासाठी ते ब्राह्मण पुरोहिताला बोलावतात. त्यालाच ते आपला गुरु मानून भास्कराचार्य या नावाने संबोधितात. सोळाव्या शतकापूर्वी होऊन गेलेल्या संस्कृत कन्यकापुराणाच्या तेलुगू भाषांतरकाराचे हे नाव असून, त्यानेच कोमटयाना रोजच्या आचाराचे काही नियम घालून दिले आहेत.

**मर्तिकप्रथा** – सर्वसाधारणपणे कोमटी लोक प्रेते जाळतात. लहान मुले व लिंगायत कोमटी यांना मात्र पुरतात. सोळा दिवस सुतक पाळतात. गवर कोमटी श्राद्धही करतात.

मोठे व्यापारी, वाणी आणि सावकार म्हणून कोमटी प्रसिद्ध आहेत. हे लोक सुशिक्षित असून हुशार, मेहनती, मितव्ययी व श्रीमंत असतात. हे संघटित असून आपल्या जातभाईपैकी कोणी अडचणीत आल्यास त्याला मदत करतात. दानधर्माकडेही याची प्रवृत्ती असते. त्यांचे कन्यकापरमेश्वरीचे प्रत्येक देऊळ म्हणजे दानगृहच असते. या पैशातून ते स्त्रीशिक्षण, अनाथसंगोपन इ. कार्यांसाठी संस्था चालवितात. वैश्य जातीची नैतिक, धार्मिक, शैक्षणिक, सामाजिक व औद्योगिक उन्नती करण्यासाठी १९०५ साली 'दक्षिण हिंदुस्थान वैश्यसंघ' नामक एक संस्था यांनी स्थापन केली व त्यांतून लायक कोमटी विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्या देण्यास सुरवात केली.

शेट्टी किंवा चेट्टी ही यांची पदवी असून, हल्ली काहीजण स्वत:ला अय्य म्हणवितात.

नाशिक जिल्ह्यातील कोमटी जुन्या कपडयाचा व्यापार करतात. यांच्या धर्मगुरूचे नाव कृष्णाचार्य असून, हैदराबादनजीक वर्सुबार्गल येथे त्याचा मठ आहे. यांच्यांत जातिसभा असते व ती आचार्यांनी नेमलेल्या मानकऱ्यांच्या संमतीने जातीचे प्रश्न सोडविते. यांच्यात यज्ञ, पट्टी, जैन व विडुर अशा पोटजाती आहेत. [का. ट्रा. स. इं.; म. ज्ञा. को.]

## कोमार पाइक

कर्नाटकात आढळणारी एक जात. पाइक किंवा पैक म्हणजे योद्धा. यावरून हे एका काळी शिपाईगिरी करीत असावे, असे वाटते. आता शेती व ताडी बनविणे, हे याचे मुख्य धंदे आहेत.

यांच्यांत हिंदू व लिंगायत असे दोन पोटभेद असून, त्यांचा परस्परांशी लग्नसंबंध होत नाही. हिंदू कोमार पाइकात १८ कुळे आहेत. यांच्यात मावसभाऊ व मामेबहीण यांच्याशी लग्न करता येते. साटेलोटे करण्याचीही चाल आहे. याच्यात पुनर्विवाहाची चाल आहे; पण घटस्फोट रूढ नाही. तिसरे लग्न करण्यापूर्वी पुरुषाचे केळीच्या झाडाशी व स्त्रीचे कोंबडयाशी लग्न लावतात.

बसव, व्यंकटरमण, काळभैरव, म्हालपुरा (कुळातील पूर्वज) व म्हास्ती (कुळातील सती) याना हे भजतात.

पूर्वी हे प्रेते पुरीत होते; पण आता जाळू लागले आहेत.

यांच्या प्रत्येक पंचायतीवर बुधवंत नावाचा अधिकारी नेमलेला असतो. त्याचप्रमाणे खेडयांच्या एका गटावर कल्ला नावाचा दुसरा एक वरिष्ठ अधिकारी असतो. जातीच्या सभेत महत्त्वाच्या प्रश्नांचा न्यायनिवाडा होतो. निकालाप्रमाणे न वागणाऱ्याला जातीबाहेर टाकले जाते. मोठा अपराध असेल, तर पंचगव्य घेऊन प्रायश्चित्त करावे लागते. फार महत्त्वाचे धार्मिक प्रश्न शृंगेरीच्या मठाधिपतीकडे नेतात व मठाधिपतीचा निर्णय अखेरचा समजतात. [म. ज्ञा. को.; मुं. इ. जा.]

## कोयी

एक डोंगरी आदिवासी जमात. ओडिसा, आंध्र, तमिळनाड व मध्यप्रदेशातील बस्तर जिल्हा या भागात यांची वस्ती आहे. यांना कोया असेही म्हणतात. हे लोक गोंड वंशाचे असावे. कोयी भाषा ही गोंडी भाषेची एक बोली आहे, असे ग्रियर्सनने म्हटले आहे. गोदावरी जिल्ह्यातील कोयी लोकांच्या बोलीत मात्र तेलुगू शब्दांचा जास्त भरणा आहे. बस्तरच्या डोंगरी भागातील कोयींना गुट्ट कोयी व गोदातीरावरच्या कोयींना गोम्मु कोयी म्हणतात. यांच्यात मूडो, नालो, आइडो, इ. गट्ट (गोत्रे) आहेत. कपाळावरील भिन्न खुणांमुळे हे वर्ग ओळखता येतात. याचे अनेक पोटभेद असून, राच किंवा डोरा कोयी आपल्याला इतरांपेक्षा श्रेष्ठ समजतात.

यांच्या वसाहती अगदी लहान असतात. जंगलातील झाडे तोडून ती जाळणे व मग त्या जमिनीत शेती करणे, असा याचा व्यवसाय आहे. जमिनीचा कस कमी झाला, की ते तिथून उठून दुसऱ्या प्रदेशात जातात व तिथे झोपडया उभारून वरील पद्धतीनेच शेती सुरू करतात. शेतीच्या कामात हे आळशी असले, तरी इतर कष्ट करण्यात निरलस असतात. धनुष्यबाण, भाले, कुऱ्हाडी, इ. हत्यारांनी हे जंगली जनावरांची शिकारही

हे लोक दिसायला नीटनेटके व आकर्षक आहेत; पण त्याचा बांधा सुदृढ नसतो. दुर्गम प्रदेशात राहिल्यामुळे याची राहणी साधी आहे, नीतिमत्ताही शाबूद आहे. याना नृत्याची व गाण्याची फार आवड आहे.

**विवाहप्रथा** – मुलीची लग्ने साधारणपणे त्या वयात आल्यावर होतात. मुलीच्या लग्नाचा सर्व अधिकार तिच्या मामाकडे असतो व तो बहुधा आपल्याच एखाद्या मुलाशी तिचे लग्न लावून मोकळा होतो. पण काही वेळा एखादा तरुण गावच्या मुख्याला पैसे व दारू देऊन वश करून घेतो व अपेक्षित मुलीला मित्राकरवी पळवून आणून तिच्याशी लग्न करतो.

यांचा लग्नविधी अगदी साधा असतो. वधू आपले मस्तक खाली वाकविते आणि वर तिच्यावर ओणवा होतो. नंतर वराचे मित्र त्याच्या मस्तकावर पाणी ओततात. एवढे झाले, की लग्न पुरे होते. काही वेळा लग्नविधी याहून जरा वेगळा असतो. वधूवर एकत्र येऊन परस्पराशी एकनिष्ठ राहण्याची शपथ घेतात व थोडे दूध पितात. मग पुन्हा एकनिष्ठतेची शपथ घेऊन पानात वाढलेला भात जेवतात. त्यानतर एका लहान मंडपात ठेवलेल्या मातीच्या ढिगाला प्रदक्षिणा घालतात. नंतर भोजनसमारंभ होऊन लग्नविधी समाप्त होतो. वर श्रीमत असेल, तर समारंभ अनेक दिवस चालतो. विजगापट्टनम्‌मध्ये वराचे आईबाप वधूच्या घरी दारू, कापड व डुक्कर घेऊन जातात. नंतर दुसऱ्या दिवशी वधूला वरगृही घेऊन येतात व तिथे त्याचे लग्न लावतात.

**देव-धर्म** – कोयी लोक कोम्मलम्म, काटुरूडू, अदमराझू, पीडा, मामिली किंवा पेले, इ. देवतांना भजतात. नूतन वर्षाच्या सुरवातीला मामिली देवतेची पूजा न केल्यास पिके चांगली येत नाहीत, अशी त्यांची समजूत आहे. पांडवाना आणि विशेषतः अर्जुन व भीम याना ते फार मानतात. लाडगे हे भीमार्जुनाचे दूत आहेत, अशी त्यांची समजूत आहे. भीम आणि हिडिबा याच्यापासून आपल्या जमातीची उत्पत्ती झाली, असे हे सागतात भीमाचा उत्सव पाच दिवस करतात.

याच्या लोककथांमध्ये देऊर नावाचा एक देव आढळतो. तो निर्माता व नियंता असून लोकांच्या अनेक पापांकडे दुर्लक्ष करणारा आहे.

प्रत्येक कुटुंबाचा एक वेल्पू असतो. वेल्पू म्हणजे एक मोठे त्रिकोणी लाल कापड होय. त्यावर रगीत कापडाने पूर्वजांच्या आकृती शिवलेल्या असतात. कुटुंबातील प्रमुख पुरुष दिवंगत झाल्यावर त्याची आकृती त्या वेल्पूवर शिवतात. कुटुंबातल्या ज्येष्ठ पुरुषाच्या ताब्यात हा वेल्पू असतो व दर वर्षी कुटुंबातील सर्व मंडळीकडे तो फिरवला जातो. त्या वेळी कुटुंबातील लोक नाचून-गाऊन आनंदोत्सव करतात. साथीच्या वेळी वेल्पूला बैलाचा बळी देतात. याशिवाय सबंध कोयी जमातीचाही एक मुख्य वेल्पू असतो. याच्यांतले काही लोक शिवपूजकही आहेत.

**मर्तिकप्रथा** – लहान मुले, तरुण व तरुणी यांची प्रेते पुरतात. इतर मृताना जाळतात. गाय किंवा बैल मारून त्यांची शेपटी तोडतात व जाळण्यापूर्वी ती मृताच्या हातात ठेवतात. मर्तिकाला जमलेल्या लोकांना जेवण देतात. नैसर्गिकरीत्या एखाद्याला मृत्यू येतो, ही गोष्ट त्यांना मान्य नाही. शत्रूच्या प्रेरणेवरून एखादे दुष्ट पिशाच माणसाला रोग जडविते व त्यामुळे त्याचा मृत्यू ओढवतो, असे हे मानतात.

चेडिपे नामक एक चेटकी रात्री वाघावर बसून हिंडते व नावडत्या माणसाचे रक्त पिते, अशी याची समजूत आहे. म्हणून हे या चेडिपेचा मांत्रिकाकडून बंदोबस्त करून घेतात.

कोयीच्या मुख्याला समतू डोरा असे म्हणतात. जमातीचे तंटे सोडविणे व अपराध्याना दंड करणे, हे याचे काम असते.
[ का. ट्रा. स. इ.; ट्रा. मि. ओ.; म. ज्ञा. को. ]

**कोरकू** एक आदिवासी जमात. सातपुडा पर्वत आणि पूर्वीच्या मध्यप्रांतातील बैतुल, हुशंगाबाद, नेमाड व खांडवा हे जिल्हे या प्रदेशात यांची वस्ती आहे. हे मुंडा वंशाचे आहेत. कोरकू या शब्दाचा अर्थ मनुष्यजात एवढाच आहे. गोंड व कोरकू हे शतकानुशतके एकत्र राहिल्यामुळे त्यांच्या रीतीभातींत पुष्कळ साम्य आले आहे. मात्र कोरकू स्वतःला उच्च व गोंडांना आपले दास मानतात. हे आपली उत्पत्ती चौहान या राजपूत वंशापासून झाल्याचे सांगतात.

एकदा हे युद्धभूमीवरून पळाले व जंगलात लपले. मुसलमानांनी त्यांचा पाठलाग केला आणि त्यांना विचारले की, ‘ तुम्ही कोण ? ’ तेव्हा त्याच्यापैकी एकाने तोंडात आला तो, म्हणजे कोरकू हा शब्द उच्चारला. तेव्हा हे राजपूत नव्हेत, असे समजून मुसलमानांनी यांना सोडून दिले. तेव्हापासून याना कोरकू हे नाव पडले, अशी दंतकथा प्रचलित आहे.

मोवासी, बावरिया, रूमा व बोंडई अशा याच्या चार पोटजाती आहेत. पहिल्या दोन पोटजाती उच्च असून, त्यांना राजकोरकू असेही म्हणतात. हे मुख्यतः जमीनदार आहेत. याच्या हातचे पाणी ब्राह्मणांना चालते. मोवासी हे आपण नागवंशी असल्याचे सांगतात. गोत्रांतर विवाहामुळे या प्रत्येक पोटजातीच्या पुन्हा अनेक उपजाती झाल्या आहेत. त्यांची नावे झाडे, पशुपक्षी किंवा इतर प्राणी वा वस्तू यांवरून पडलेली आहेत. या लोकात देवकपूजा प्रचलित होती; पण सांप्रत ती लुप्तप्राय झालेली दिसते.

मेळघाटातील कोरकू लोक स्वतःला रावणाचे वंशज मानतात. काहींच्या मते महाभारतकालीन कौर्मवंशी राजांचे हे वंशज आहेत. त्या नावाचा अपभ्रंश होऊनच कोरकू हे नाव यांना मिळाले असावे.

पूर्वी हे लोक एका ठिकाणी कायमचे वास्तव्य न करता लहान लहान गट करून भटकत असत. पक्क्या घरात राहणे,

ही गोष्ट निषिद्ध समजून हे लहान झोपड्या बांधून त्यात संसार मांडीत. आता ते स्थायिक झाले असले, तरी पक्की घरे न बांधता झोपड्यातच राहतात.

सर्वसाधारण कोरकू डोक्याला फाटके मुंडासे आणि कमरेला लंगोटीवजा वस्त्र गुंडाळलेला आढळतो. डोक्यावर काही नसणे हे अशुभ समजले जाते; म्हणून फाटकी चिंधी का होईना, पण ती प्रत्येकाच्या डोक्याला गुंडाळलेली असतेच. कोरकू स्त्रिया प्रायः अर्धनग्नच असतात. सुधारलेले पुरुष क्वचित कोट किंवा शर्ट वापरतात किंवा अंगावर नुसतेच दुहेरी धोतर घेतात. त्यांच्या बायका लुगडे नेसतात, पण चोळी मात्र घालीत नाहीत. स्त्रीच्या गळ्यात पोवळ्याच्या, कवड्यांच्या किंवा रंगीत काचमण्यांच्या दोनचार माळा व काशाच्या सऱ्या आणि हातात चांदीचे गोठ दिसले, की ती मालदार कोरकूची बायको किंवा पाटलीण म्हणून ओळखावी. तिच्या हातापायात पितळी किंवा काशाची कडी, बोटात तांब्यापितळेच्या अंगठ्या व जोडवी, कानात पितळी बाळ्या असे आणखीही दागिने असतात. हे लोक चांदीचे दागिने वापरतात. त्यांची नावे सुतरा, पायरी, बिच्छा, मुंडी, काडा, बिगडी अशी आहेत. या लोकांना फुले माळण्याची फार आवड आहे. तरुण मुली फुलांच्या सुंदर माळा गुंफून डोक्यात घालतात. सणासुदीच्या दिवशी पुरुषही आपल्या पागोट्यावर रानफुलांचा तुरा खोवतात. यांच्या जीवनात दिवाळी, होळी, रांडभवई, आखाडी, पोळा व जिरोती हे सहा सण मुख्य आहेत. हे सर्व सण फार थाटाने साजरे केले जातात. त्या वेळी मद्याचा पूर वाहतो. नृत्यालाही बहर येतो. होळीच्या सुमारास यांचे विवाहसमारंभ होतात.



कोरकू – मेळघाट

मूल जन्माला येताच कोरकूंच्या घरात सुतकी वातावरण पसरते. हे तीन दिवस जननाशौच पाळतात. नंतर बाळंतिणीला स्नान घालण्याचा सार्वजनिक विधी करतात. मग सर्व गावकऱ्यांना जेवण घालतात व त्याच वेळी मुलाचे नाव ठेवतात.

**विवाहप्रथा** – या लोकांत विवाहाच्या अनेक पद्धती रूढ आहेत. होळीच्या सणात तरुण मुली स्वयंवर करतात. आवडत्या मुलीला पळवून नेणे, ही दुसरी व तरुणाने घरजावई होणे, ही तिसरी पद्धत होय. आईबापांनी लग्न ठरविणे, ही प्रथाही चालू आहे. काही पोटजातीत विधिपूर्वक विवाह करणे अमंगल समजतात. पण इतर लोक तसे मानीत नाहीत. यांच्यांत मुलाचा बाप मुलीला मागणी घालतो व कन्यादानाबद्दल मुलीच्या बापाला दक्षिणा देतो. लग्नासाठी वरपक्ष वधूच्या गावाकडे निघण्यापूर्वी वर आणि त्याच्या थोरल्या भावाची बायको हे एका कांबळ्यावर उभे राहून एकमेकांना सात वेळा आलिंगन देतात. नंतर वराच्या हातात एक चाकू देतात. त्या चाकूला लिंबू टोचलेले असते. भुताखेतांना भिवविण्यासाठी त्याचा उपयोग होतो, असे म्हणतात.

वधूच्या घराच्या अंगणात बांबूचा मांडव घालून त्यावर वेली सोडलेल्या असतात. त्यांच्या मध्यभागी छपरातून वर गेलेला एक उंच बांबू असतो. त्याला भनवार म्हणतात. त्याच्यासमोर एक दिवा व पाटा ठेवतात. पाट्यावर सात चिमट्या तांदूळ व हळद ठेवतात. नंतर वधू-वर भनवाराला सात फेऱ्या घालतात. प्रत्येक फेरीच्या वेळी वधू तांदूळ व हळदीची एक चिमूट या वस्तूंना पायाने लाथाडते. एवढे झाले, की लग्न लागले, असे समजतात. हे लोक स्त्रियांना मानाने वागवितात.

**देव-धर्म** – महादेव हे कोरकूंचे मुख्य दैवत होय. पंचमढीच्या डोंगरात याचे एक देवालय असून, त्याची व्यवस्था पाहण्याचे काम या जमातीतील दोन जमीनदारांकडे वंशपरंपरागत आहे. याशिवाय डोंगरदेव, मुठवादेव, कुनवरदेव, रावणदेवी, दैय्यत बाबा, मेघनाथ, हनुमान, भैरव, इ. अनेक दैवतांची हे पूजा करतात व त्यांना कोंबडी, बकरी बळी देतात. सूर्य ही सर्वश्रेष्ठ शक्ती मानतात.

हे लोक मूळचे भूतपूजक होते, असे काही पंडितांचे मत आहे. दगडाचा ढीग करून त्यावर एक गारेचा तुकडा ठेवला, की ते त्यांचे दैवत होते. या लोकांचे स्वतंत्र पुरोहित असतात. त्यांना भुमका म्हणतात.

पूर्वी या लोकांची उपजीविका शिकार, कंदमुळे, मध, इ. पदार्थांवर चाले. पण आता ते शेती करू लागले आहेत.

कोरकू, कुरकू, कुर, मुआसी हे सर्व एकच होत. वेगवेगळ्या ठिकाणी त्यांची वेगवेगळी नावे प्रचलित आहेत. यांची भाषा कोर्कू या नावाने ओळखली जाते. या भाषेवर उर्दूप्रमाणेच वऱ्हाडी बोलीचाही प्रभाव आहे. यांच्या व कोरवांच्या भाषेत बरेच साम्य असले, तरी यांचा व कोरवाचा काही संबंध नाही.

हे लोक कोरवांपेक्षा बरेच सुधारलेले आहेत.

नृत्याच्या वेळी कोरकू मुली लयबद्ध गीते गातात, त्यातला एक नमुना पुढीलप्रमाणे—

**लावा लावा लवाबाई ।**
**लवा आचे फूले बाई लवा आचे फूले ।।**
**डाडा बोयू डारोमेन ।**
**नाचे बो चिटे ना, चेबो नेवले लावा ।।**

अर्थ — पळसाच्या वृक्षावर फुले फुलली आहेत; पण मेहुण्याच्या अंगणात जे झाड उगवले आहे, त्या झाडावरची फुलेच अधिक सुंदर दिसतात.

**मर्तिकप्रथा** — काही कोरकू मृतांना जाळतात, तर काही पुरतात. मृताला पुरलेल्या जागी लाकडी खांब उभा करतात; त्यावर घोडेस्वारांची चित्रे कोरलेली असतात. तीन दिवस मृताशौच पाळतात. त्यानंतरचे धार्मिक विधी दोन प्रकारचे आहेत. एकाचे नाव आहे फुलजागनी व दुसऱ्याचे आहे शिडोली.



कोरकू मृतांचे स्मारक
लाकडी स्तंभ

फुलजागनीत सर्व आप्तेष्ट जमून मनसोक्त भोजन, मदिरापान व नाचगाणे करतात. त्या प्रसंगी गायिली जाणारी गाणी अत्यंत अश्लील व बीभत्स असतात.

शिडोली हा विधी घरात मृत्यू झाल्यानंतर केव्हातरी करतात. त्या वेळी मृताच्या आत्म्याला आवाहन करून त्याला एका वाटोळ्या पाटीखाली विश्रांती घ्यायला सांगतात. हा विधी वैशाख किंवा पौष महिन्यातील सोमवारी सुरू करतात. त्यात पिंडदान असते. [ लोककला त्रैमासिक; म. ज्ञा. को.; एन्सा. रि. ए.; म. सा. प.; सर्वोदय – आदिवासी विशेषांक, जाने. १९६०; डाल्टन– इं. स्ट. पा. प्रे., एप्रिल १९६०; फो. लो , मार्च १९६३ ]

## कोरडी सवाशीण

जेवण न घालता ओटी भरून व कुंकू लावून जिची बोळवण करतात, अशी सवाशीण म्हणजे कोरडी सवाशीण. ब्राह्मणेतरांच्या घरी अशी सवाशीण बोलविण्याची प्रथा आहे. [ म. श. को. ]

## कोरवा

एक द्राविड जमात. छोटा नागपूर, सिरगुजा व जशपूर यांनी वेढलेल्या प्रदेशात कोरवांची वस्ती आहे. हा प्रदेश जंगले, पहाड व मैदाने यांनी व्यापलेला असून, तिथे कच्चे लोखंड बरेच मिळते. कोरवाचे आगरिया कोरवा, दांड कोरवा, दिह कोरवा व पहाडी कोरवा असे चार पोटभेद आहेत. रसेलने मात्र कोरवांचे दिहारिया कोरवा व पहाडी कोरवा असे दोनच पोटभेद सांगितले आहेत. या दोन्ही पोटभेदाचे लोक उदेपूर व जशपूर यामध्ये आढळतात. त्यांचे परस्पर विवाहसंबंध होत नाहीत. दिहारिया कोरवा पहाडी कोरवांच्या हातचे अन्नपाणी घेत नाहीत. पहाडिया मात्र त्याच्याकडचे अन्नोदक घेतात.

**पहाडी कोरवा**— हे अतिशय रानटी असून, दिसायलाही भयानक असतात. त्यांच्याविषयी एक आख्यायिका सांगतात, ती अशी—

सिरगुजामध्ये ज्या पहिल्या मानवांनी वस्ती केली, त्याच्या शेतीचे जंगली श्वापदांपासून नुकसान होऊ लागले. तेव्हा त्यांना भिवविण्यासाठी माणसांनी आपल्या शेतात बुजगावणी उभी केली. ज्या वेळी त्या भागातील मोठ्या भुताला ती बुजगावणी दिसली, तेव्हा त्याने आपल्या भक्तांचा त्रास वाचविण्यासाठी व पक्षुपक्ष्यांना भिवविण्यासाठी ती बुजगावणी सजीव केली. ही जिवंत बुजगावणी म्हणजेच कोरवांचे पूर्वज होत.

पहाडी कोरवा हे बुटके, बळकट व काळे असतात. त्यांच्या स्त्रिया खुजट व कुरूप असतात. त्या आपल्या कमरेभोवती चिंध्या गुंडाळतात. कोरवा स्त्रिया शेतात काम करतात, जंगलातून कंदमुळे आणतात, दुरून पाणी आणतात व बाजारहाटही करतात.

पहाडी कोरवा दुल्हादेवाला भजतात. सिरगुजातील पहाडी कोरवा खुरिया राणी या देवीला भजतात; तर जशपूरमधील पहाडी कोरवा फक्त आपल्या पितरांना भजतात. कडधानामधले पहाडी कोरवा मुधरवुरी व बारेंदा भूत यांचे भजक आहेत. कार्तिक महिन्यात या देवतांच्या नावे तांदळाचे पुंजके घालतात, ते तांदूळ दोन कोंबड्यांना खायला देतात व नंतर त्या कोंबड्यांना देवतांच्या नावे बळी देतात. कुटुंबातील लोकांना आयुरारोग्य प्राप्त व्हावे, म्हणून हे बलिदान असते. त्याच वेळी हे पितरांचीही पूजा करतात.

मुलींचे विवाह त्या वयात आल्यावर होतात. विवाहाच्या आदल्या दिवशी वर आपल्या आप्तांसह दारू व काही वस्तू घेऊन वधूच्या घरी जातो. हे दारूचे भांडे फुटल्यास तो अप-

शकुन समजला जातो. रात्रभर अविवाहित मुली वधू-वरांना हळद लावतात. लग्नविधी अगदी साधा असतो. वधू-वरांच्या आया त्यांच्या कपाळाला तेल चोळतात व त्यांना भाताची दारू प्यायला देतात. वधू-वर एकमेकाची उष्टी दारू पितात. मग ती दोघे नातेवाईकांना नमस्कार करतात. एवढे झाल्यावर विवाहसमारंभ संपतो. यांच्यांत दर खेड्यागणिक विवाहपद्धतीत थोडाफार फरक असतो.


कोरवा स्त्री

यांच्यातला घटस्फोट सोपा असतो. एखाद्या पुरुषाला आपल्या बायकोला नांदवायची नसल्यास तो तिला 'मला तुझी गरज नाही' असे सांगतो. यानतर दोघेही पुन्हा लग्न करायला मोकळे होतात. स्त्रीला मात्र आपण होऊन घटस्फोट घेता येत नाही.

पहाडी कोरवांच्या घराच्या मागच्या भितीत रजस्वला स्त्रीला जाण्यायेण्यासाठी एक लहान दार असते. बाळतिणीला दोनमहिने सुवेर असतो, असे मानतात. दोन महिने झाल्यावर मुलाचे व तिचे पाय भाताच्या दारूने धुतात.

**दिहारिया कोरवा**– पहाडी कोरवांच्या मानाने बरेच सुधारलेले आहेत. हे दुल्हा-देव, महादेव व पितर याना भजतात. गावातील बैगा जमातीचा पुरुष महादेवाची पूजा करतो. गावातल्या भुताखेताना संतुष्ट ठेवण्याचे कामही बैगाकडे असते.


भविष्य सागणारी कोरवा स्त्री

बैगाने कोंबड्याचा बळी देऊन भूमिपूजा केल्याशिवाय आणि स्वतःचे शेत पेरल्याशिवाय कुणीही आपल्या शेतात पेरणी करीत नाही. गावात रोगराई आल्यास कोंबडी व एरंडाची फळे देवाला अर्पण करून बैगा त्या रोगराईला घालवून देतो.

**विवाहप्रथा** – लग्नमंडपात एका काठीशेजारी जात्याची तळी ठेवतात व त्यावर भाताचे पुजके घालतात. पुंजक्यांवर पैसा, हळद व सुपारी ठेवतात. वराच्या शेजारी वधू एका हातात टोपली घेऊन उभी राहते. तिचा भाऊ त्या टोपलीत भाजलेले भात टाकतो. नवरा मुलगा वधूच्या हाताना हात लावतो व दोघेजण जात्याच्या तळीभोवती टोपली हालवीत पाच प्रदक्षिणा घालतात. दर प्रदक्षिणेच्या वेळी वर तळीवरील भाताचा पुजका ठोकरतो. त्यानंतर तेल-हळद लावण्याचा विधी होतो. काही खेड्यात लग्नविधी जरा निराळा असतो. वधू बसलेली असते व वर तिच्या उजव्या पायावर आपला डावा पाय ठेवून उभा राहतो व तिच्या डोक्याला पाच वेळा तेल लावतो. वधूही नंतर तसेच करते.

**मर्तिकप्रथा** – मृताना पुरतात व त्याच्या डोक्याजवळ भात, कडधान्य, कापूस, इ. वस्तू व पाणी ठेवतात. दहा दिवसपर्यंत अशा वस्तू ठेवण्याची चाल आहे.

खुरियाच्या पठारावरील कोरवा लहान लहान वाड्या करून राहतात. एका वाडीत जास्तीत जास्त चार झोपड्या असतात. मोठ्या वाड्या करून राहिले, तर त्याच्यात भाडणे होतात

शेती हा सर्व कोरवांचा प्रमुख व्यवसाय आहे. डोंगरावर ते अन्हार नावाचे कडधान्य पिकवितात व जगल तोडून लागवडीला आणलेल्या जमिनीत भात, तूर, भोपळा, काकडी, मिरची, रताळी, इ. पिके काढतात. ते आपले धान्य पानाच्या पुडक्यात बाधून खड्ड्यात पुरून ठेवतात. अशा रीतीने साठविलेले धान्य वर्षवर्ष खराब होत नाही, असे ते सागतात. मार्गशीर्षात पीक निघाल्यावर कोरवा तीन-चार दिवस मजा करतात. त्या काळात नाच, गाणे, सुरापान याना ऊत येतो. कोरवाना नृत्याची फार आवड असते. एकमेकाच्या हातात हात गुफून ते वर्तुळाकार नाचतात. पुरुषाच्या आत स्त्रियाचे वर्तुळ असते. नृत्याला गाण्याचे स्वर व ढोलाची साथ असते.

कोरवा पुरुष केसाचा पाठीमागे बुचडा बाधतात. त्यात ते आपले शिकारीचे बाण खोचून ठेवतात. स्त्रिया ताब्यापितळेचे किवा मण्याचे दागिने घालीत नाहीत. लाल सुताचे गोंडे त्या केसात घालतात व खूप फुले माळतात.

कोरवा हे निष्णात धनुर्धारी आहेत. त्यांचे बाण काटेरी असतात. आपले बाण ते स्वतःच बनवितात.

हे लोक मध, मेण, तवकील, राळ, गोंद, लोखंड, इ. पदार्थांचा व्यापार करतात. ते स्वतः लोखंड वितळवितात. हे लोखड कुऱ्हाडी इ. हत्यारे बनवायला चागले असते.

[से. इ. १९३१; डाल्टन- इं. स्ट. पा. प्रे. १९६०]

## कोरा

बंगालमधील आदिवासी जमात. ही बरद्वान जिल्ह्यात मोठ्या प्रमाणात आढळते. काओरा, खैरा, कारा आणि कोरा या सगळ्या जमाती एकच होत असे रिस्ले व गेट हे मानववंशशास्त्रज्ञ म्हणतात. या जमातीचे मूलस्थान छोटा नागपूर हे होते

छोटा नागपुरमधले कोरा हे धार्मिक कृत्यासाठी ब्राह्मणाना बोलावीत नाहीत. याच्यात प्रौढविवाह प्रचलित आहे. गाय, डुक्कर व कोंबडी यांचे हे मास खातात. प्रेताचे दहन किंवा दफनही करतात.

बंगालमधल्या कोरा जमातीत बालविवाह प्रचलित आहे. विधवाविवाह रूढ नाही. याचे पौरोहित्य पतित ब्राह्मण करतात. हे गोमांस खात नाहीत. मनना, भादू, उद्रा व भैरवठाकूर या देवांना हे भजतात. हे लोक शेती, तलाव खोदणे, रस्ते बनविणे, इ. उद्योग करतात. हे डोक्यावरून माती वाहत नाहीत. [से इं. १९५१]

## कोराग

एक आदिवासी जमात. केरळ, मद्रास व म्हैसूर या प्रदेशांत याची वस्ती आहे. कोरा = सूर्य. हे सूर्यपूजक असल्यामुळे यांना हे नाव मिळाले आहे. हे लोक काळे, जाड ओठाचे व कुरळ्या केसाचे असतात. त्यामुळे हे हबशी वंशाचे असावे, असे म्हणतात. काही लोकांच्या मते शूद्र पुरुष व ब्राह्मण स्त्री यांच्यापासून उत्पन्न झालेली ही संकरजमात आहे. यांची लोकसंख्या अत्यल्प आहे.


कोराग दंपती

हे लोक भिक्षा मागतात, टोपल्या विणतात व भंगीकामही करतात. हे सुसरी पकडण्यात पटाईत आहेत. यांची भाषा तुळू भाषेचाच एक प्रकार आहे. हे लोक पशू व वनस्पती यांचे पूजक आहेत. हे सूर्याची पूजा करतात व कत आणि मरीअम्म या देवतांनाही भजतात.

**विवाहप्रथा**– वराचा बाप विवाह ठरवितो. विवाहसमारंभ रविवारी रात्री वधूगृही होतो. वधूच्या गळ्यात धरमणी (मंगळसूत्र) बांधणे, हा लग्नातला मुख्य विधी असतो.


कोराग पुरुष

मूल जन्माला आल्यावर ८ व्या दिवशी त्याचे नामकरण करतात. सोमवारी जन्मलेल्या मुलाला तोमा, मंगळवारी जन्मलेल्याला अंगोरा अशी नावे ठेवतात.

**मर्तिकप्रथा** – मृताना पुरतात. स्मशानाची जागा वस्तीपासून दूर असते. पुरताना मृताचे डोके दक्षिणेला करतात. स्त्रिया व मुले प्रेतयात्रेच्या बरोबर जातात व शेवटपर्यंत स्मशानात थाबतात. सोळा दिवस आशौच पाळतात. [ट्रा. के.]

## कोरी

उ. प्रदेश, विदर्भ व मध्य प्रदेश या भागात वसलेली एक जात. यांच्या उत्पत्तीसंबंधी एक दतकथा सांगतात, ती अशी—

एकदा कबीर गंगास्नानाला जात असता त्याला एक मुलगी भेटली. तिला त्याने 'पुत्रवती भव' असा आशीर्वाद दिला. पण ती होती कुमारी. आता कबीराचा आशीर्वाद खरा कसा व्हायचा? पण त्या बाबतीत एक चमत्कार घडला. त्या कुमारीच्या हातावर एक फोड आला व त्यातून एक पुत्र निर्माण झाला. तिने त्याला गगाकिनारी सोडून दिले व तिथल्या एका कोळ्याने त्याला वाढविले.

हा मुलगाच आपल्या जातीचा मूळ पुरुष असे ते मानतात. कारण तो 'कोरी' (कुमारी) पासून जन्मला होता. अहारवार, बैस, भडौरिय, भाइनहार, बंकार, धामन, जइसवार, जाटवा, ज्युरिया, करीरबन्सी कैथिया, कामारिया, कनौजिया, कोरचामरा, कुष्टा, माहुरे, परसूतिया, साकरवार, संखवार, इ. यांच्या मुख्य पोटजाती असून, त्यांच्या एकूण पोटजातीची संख्या हजारावर आहे.

यांच्या चालीरीती चमारांच्या सारख्याच आहेत. हे लोक हिंदू असून, फैजाबादचे कोरी रामदासी किंवा शिवनारायणी पंथाचे आहेत; तर बिजनोरचे कोरी कबीर पंथी आहेत. यांच्यातले काही लोक झाहिर पीराची उपासना करतात, काही मियाणाची करतात, तर काही पंचावन पीर व सीतला माता यांना भजतात.

जाडेभरडे कापड विणणे, हा यांचा व्यवसाय होय. काही नोकरी करतात; तर काही जमिनीचे मालकही असतात. [ म. ज्ञा. को. ]

**कोरोनो** ओडिसा व तमिळनाड या प्रदेशांतील एक जात. किरानी म्हणजे लिहिणारा किंवा कारकून या शब्दापासून कोरोना शब्दाची व्युत्पत्ती सांगतात. या लोकाना कर्णम् असेही नाव आहे.

कोरोनोंच्या उत्पत्तीबद्दल मतभेद आहेत. उ. भारतातले कायस्थ म्हणजेच कोरोनो होत, असे एक मत आहे. कोरोनो हे क्षत्रिय व्रात्यांपैकी असल्याचे मनूचे मत आहे, असे श्री. दत्त म्हणतात.

ययातिकेसरी (इ. स. ४४७ ते ५२६) या ओडिसाच्या राजाने आपल्या राज्यातील कारकुनांची व लेखनिकाची तूट भरून काढण्यासाठी उ. भारतातून यांच्या पूर्वजांना आपल्या देशात आणले, असे सांगतात.

कोरोनो हे वैष्णव असून त्यांचे पुरोहित ब्राह्मण असतात. हे मांस व मासे खातात. ओडिसातील कोरोनो स्त्रिया गोषा घेतात. मुलगी वयात आल्यावर तिने आपल्या मोठ्या भावासमोरही येता कामा नये, असा यांच्यांत दंडक आहे. पटनाईक व महंती अशा यांच्या पदव्या आहेत. हे लोक हिशेब लिहिण्याचे काम करतात.

कोरोनोंचे शिष्ट किंवा श्रेष्ठी, वैश्य, मज्जुळ व मटिहंस असे पोटभेद आहेत. यापैकी काही लोक जानवे घालतात. यांच्या लग्नविधीत भंडारी स्त्रीची आवश्यकता असते. [का. ट्रा. स. इं.]

**कोर्वरू** कर्नाटकातील एक भटकी जमात. हे गावोगाव भिक्षा मागत, वाद्ये वाजवीत हिंडतात. यांच्या बायका भविष्य सांगण्याचे काम करतात. त्यांना कुर्वजी म्हणतात. हातावरील रेषा पाहून भूतकाळातील घटनाही त्या सांगू शकतात. [ बॉ. बे. क्रा. ]

**कोल** एक द्राविड जमात. नर्मदा, शोण, गंगा व चंबळ या नद्यांच्यामधील प्रदेशात यांची वस्ती आहे. हे लोक रेवा संस्थान ही आपली मायभूमी मानतात.

भारतीय आदिवासींच्या जनसंख्याविषयक प्रारंभीच्या वृत्तांतात मुंडा भाषा बोलणाऱ्या सर्व जमातींना सामूहिक रूपाने कोल अशी संज्ञा दिली जात होती; पण कालांतराने त्यांना मुंडारी जमाती असे नाव मिळाले व मध्य प्रदेश आणि उ. प्रदेशाचा दक्षिण भाग या प्रदेशात वस्ती करून राहणाऱ्या जमातींनाच तेवढे कोल असे म्हणू लागले. छोटा नागपूरमधील कोल लडाका कोल या नावाने प्रसिद्ध आहेत. इ. स. १९४१ च्या जनगणनेनुसार भारतातील सर्व कोलांची संख्या दोन लाखांवर होती. बहुतेक कोल दुसऱ्याची जमीन नांगरण्याचे काम करतात. काही थोड्या लोकांकडेच स्वत.च्या मालकीची जमीन असते.

सप्तशतीत कोलाचा उल्लेख आला आहे (१.५). हे लोक डुकराची शिकार करीत. संस्कृत भाषेत डुकराला कोल असे नाव आहे. त्यामुळे लक्षणेने या जातीलाही कोल असेच नाव मिळाले. कोलांचे राज्य ज्या प्रदेशात होते, त्याला कोळवण म्हणत. नाशिक, पवनमावळ, इ. प्रांतांतील काही डोंगराळ भागाला अद्यापीही कोळवणच म्हणतात. कोल्हापूर हाही मूळचा कोलांचाच प्रदेश होता. कोल्हापूरच्या जगदंबेला ‘कोलासुरभयंकरी’ असे विशेषण आहे. या जगदंबेने कोलाला मारून तो प्रदेश त्याच्या ताब्यातून सोडविला, अशी कथा आहे (करवीरमाहात्म्य). कोल्हापूरचे मूळ नाव कोलापूर असेच होते.



कोल पुरुष

चांद्रवंशी ययातीच्या दहाव्या पिढीत कोल नावाचा एक राजा होऊन गेला. त्याच्या मुलाची प्रजा म्हणजेच सांप्रतचे कोल लोक होत, अशी त्यांच्याविषयी दंतकथा आहे.

खेडेगावात लहान झोपड्या उभारून ते राहतात. त्यांच्या झोपड्यांच्या भिंती कुडाच्या असतात. वर गवताचे छप्पर असते. चकमकीने किंवा घर्षणाने ते अग्नी उत्पन्न करतात व तो घरात कायमचा ठेवतात. तांदूळ व गहू हे त्यांचे मुख्य अन्न असून, ते मांसाहारही करतात.

रौतिया, ठाकुरिया, खंगर, कथरिया, खैरवार, इ. यांचे

अनेक पोटभेद असून, त्यांच्यांत परस्पर लग्नसंबंध होत नाहीत. यांपैकी रौतिया हे श्रेष्ठ दर्जाचे मानले जातात. रावत (= राजपुत्र) या शब्दापासून ते आपली व्युत्पत्ती सांगतात. ठाकुरिया हे राजपूत पुरुष व कोल स्त्री यांच्यापासून आपली उत्पत्ती मानतात. त्याना ठाकूर या शब्दावरून ठाकुरिया हे नाव मिळाले असावे. खंगर या नावाची व्युत्पत्ती खड्गहर म्हणजे क्षत्रिय या नावापासून लावतात. हे लोक घरफोडी करण्यात पटाईत असतात. कथरिया हे नाव कथ्री म्हणजे गोधडी यावरून पडले आहे. कारण हे लोक नेहमी गोधड्या वापरतात. जे कोल खैरापासून कात तयार करतात, त्यांना खैरवार म्हणतात.

कोलांच्या ग्रामप्रमुखाला महत असे नाव आहे. त्यांच्या गावाचा सर्व कारभार पंचायतीकडे असतो. पंचायतप्रमुखाला चौधरी म्हणतात. त्याचा अधिकार वंशपरंपरेने असतो. हे गुन्हेगाराला जातिबहिष्कृत करतात. सबध जमातीच्या संबंधात चर्चा करायची असते, तेव्हा अनेक ग्रामप्रमुख व पुढारी एकत्र जमून विचार करतात.

कोल लोक सठी व उष्टावण हे दोन सस्कार महत्त्वाचे मानतात. त्या प्रसंगी मेजवानी देतात. हिंदूच्या संपर्कामुळे आणखीही काही संस्कार त्यांनी स्वीकारले आहेत. यांच्यांत स्त्रियांचे नाक-कान टोचण्याची पद्धत आहे. त्या अगावर गोंदवूनही घेतात. ज्या स्त्रीच्या हातावर गोंदलेले असेल, तिला मृत्यूनंतर भगवान वैकुंठात घेऊन जातो, अशी त्यांची समजूत आहे.

**विवाहप्रथा** – मुलामुलीचे विवाह सामान्यतः लहान वयात होतात. गणगोत पाहून लग्न जुळवितात. लग्नासाठी पुरोहिताला बोलावतात. लग्नात वधू-वरांनी अग्नीला सात प्रदक्षिणा घालायच्या असतात. त्यांपैकी पाच लग्नात व उरलेल्या दोन ती दोघे वयात आल्यावर घालतात. मेजवानी हे समारंभाचे मुख्य अंग असते. आई-बापांचा विरोध असला, तर एखादे प्रणयी जोडपे पळून जाऊन एकत्र राहू लागते. काही काळाने ते परत आल्यावर त्याने गावजेवण दिले, की त्याला पतिपत्नी म्हणून गावात राहता येते. कोल पुरुष अनेक बायका करतात; पण त्यांतली एकच लग्नाची असून बाकीच्या ठेवलेल्या असतात. सर्व स्त्रियांच्या मुलांचा दर्जा मात्र समान असतो. नांगर धरणे व छपरावर चढणे, या दोन गोष्टी कोल स्त्रीला वर्ज्य असतात.

**देव-धर्म**– कोल लोक वृत्तीने धार्मिक असून, त्यांचा देवाइतकाच भुताखेतांवरही विश्वास असतो. हे लोक भगवान, खेरमाई, बडादेव, शक्तिदेवी, शीतलामाई, वाघदेव, दुल्हादेव, इ. देवतांना भजतात. या देवतांच्या पूजेसाठी त्यांचा नेमलेला पुरोहित असतो. ग्रामदेवतांची पूजा मात्र ते स्वतः करतात. पेरणीपूर्वी हे हरियरी देवीला पुजतात.

जादूटोणा, चेटूक, दृष्टबाधा, इ. गोष्टीवर कोलांचा विश्वास असून, काचेच्या बांगड्या, मणी, राख, मंत्र, सूप, इ. वस्तूंच्या साहाय्याने ते या गोष्टीचे निवारण करतात.

कोल लोक चैत्र व कार्तिक या दोन महिन्यात जवर नावाचा एक सण पाळतात. त्या वेळी खाणे-पिणे व नाचगाणे या गोष्टींना ऊत येतो. कोल लोकांना संगीत फार प्रिय आहे. ढोल, नगारा व झांज या वाद्यांच्या साथीवर ते रात्रभर गातात, नाचतात. हे लोक दसरा, दिवाळी, होळी हे सणही पाळतात.

**मृतिकप्रथा**– माणूस मरताना त्याच्या तोंडात गंगाजल किंवा तुलसीजल घालतात. सर्वसामान्यपणे प्रेते पुरतात. पुरायच्या खड्डयात खाली कापड व मीठ घालून त्यावर प्रेत ठेवतात. त्याच्यावर पुन्हा कापड घालतात व वर माती लोटतात. थडग्यावर मीठ-मोहरी टाकतात. त्यामुळे भुतांखेतांपासून प्रेताचे रक्षण होते, अशी समजूत आहे. प्रेताचे दहन केल्यास ते हिंदूपद्धतीने करतात. पुरुषाचे व स्त्रीचे अनुक्रमे दहा व नऊ दिवस सुतक पाळतात. दहाव्या दिवशी ज्ञातिभोजन घालतात. [ ट्रा. का. सें. प्रॉ. इं.; से. इं. १९५१; म. ज्ञा. को.; रा. ले. सं.; हिं. वि. को. ]

## कोलघा

गुजरातेतील एक जात. सुरतेच्या आग्नेयेकडील प्रदेशात यांची वस्ती आहे. हे मोलमजूरी करून किंवा लाकडे विकून उपजीविका करतात. हे हनुमान, भिल्लदेव व काकाबळिया या दैवतांना भजतात. यांना ब्राह्मण उपाध्याची गरज लागत नाही. यांच्यांत बहुपत्नीत्व व बालविवाह रूढ आहे. मुलीच्या बापाला तीन रुपये देऊन मुलाचा बाप वधूला मागणी घालतो.

**विवाहप्रथा**– वधू-वरांना जाजमावर बसवून त्याच्या पदराला गाठ मारतात व उभयतांना नावे घ्यायला लावतात. मुख्य लग्नविधी म्हणतात तो एवढाच असतो. त्यानंतर उभय पक्षातील जोडपी नृत्य करतात. वधू-वरही त्या नृत्यात भाग घेतात. वधूवरांच्या पदराची गाठ सोडल्यावर वधूचा गृहप्रवेश होतो. लग्नात मिरवणुका काढतात व देवधेवही बरीच करतात.

**मृतिकप्रथा** – मृतांना जाळतात. दहन करून घरी आल्यावर दारू पितात. मृताची रक्षा गोळा करून तिच्यावर ताडी शिंपडतात. शक्य असेल, तर मृतासाठी ज्ञातिभोजन घालतात. [ मुं. इ. जा.; म. ज्ञा. को. ]

**कोलब्रुक** (इ. स. १७६५ ते १८३७) याचे सपूर्ण नाव हेन्री टॉमस कोलब्रुक. प्रख्यात इग्लिश प्राच्यविद्यापडित· हिंदी इतिहाससंशोधनशास्त्राचा जनक. हा बुद्धिमान गणिती, ज्योतिर्विद व संस्कृताचा पडित होता. कलकत्ता येथे मुख्य न्यायाधीश असताना याने वेद, सस्कृत व्याकरण, जैन आचार, हिंदू विधी, भारतीय दर्शने, ज्योतिष, बीजगणित, इ. विविध विषयावर लेख लिहिले असून ते प्रमाणभूत मानले जातात. हिंदूंचे पवित्र ग्रंथ आणि दर्शने यांचा युरोपियन जनतेला प्रथम परिचय यानेच करुन दिला. याच्याजवळ अनेक संस्कृत हस्तलिखितांचा बहुमोल संग्रह होता; तो याने इ. स. १८१८ साली ईस्ट इडिया कंपनीला दान केला. हा बगाल एशियाटिक सोसायटीचा अध्यक्ष व रॉयल एशियाटिक सोसायटीचा सचालक होता. [अ. च. को.; हि वि. को.]

**कोलम** (१) तमिळनाडमधील रांगोळीला कोलम असे नाव आहे. तांदुळाच्या पिठाने ही रागोळी रेखाटतात. कोलम हा तांदुळाचा एक प्रकार आहे. त्यावरून रांगोळीला कोलम असे नाव पडले असावे. तमिळनाडमध्ये स्त्रिया रोज सकाळी दारापुढे सडा घालून त्यावर कोलम काढतात. काही वेळा तांदुळाचे पीठ पाण्यात कालवून त्याने किंवा दुसऱ्या एखाद्या द्रवानेही कोलम काढतात.



अननस, चक्र व षट्कोन – कोलम

मद्रासमध्ये देवीची मिरवणूक निघण्याच्या वेळी मार्गावर सडे घालतात व साधारण चारशे फूट लांबीच्या कोलमच्या सुंदर रचना रेखाटतात. सणासुदीच्या व उत्सवाच्या दिवशी तर कोलमला विशेष महत्त्व असते. कृष्णजन्माच्या दिवशी तमिळ ललना घरात प्रवेश करणारी बालकाची पावले चित्रित करतात; तर संक्रांतीच्या दिवशी त्या अनेक प्रेक्षणीय रचना रेखतात सूर्याचा रथ हा त्यापैकी एक असतो. या दिवसाच्या कोलमचे आणखी एक वैशिष्टय असे, की प्रत्येक स्त्री आपल्या दारापुढील कोलमची रेषा दुसऱ्या घरापर्यंत नेऊन सोडते. त्या घरातली स्त्री त्या रेषेला जोडून एखादी आकृती काढते व पुन्हा तीच रेषा



ठिपक्यांच्या आकृती – कोलम

पुढच्या घरापर्यंत नेऊन सोडते. यामुळे सर्व गावात अखंड कोलम तयार होते. कोलममध्ये अननस, नारळ, नाग, शंख, चक्र, पदमुद्रा, समया, दिवे, इ. आकृत्याही काढतात. तमिळ स्त्रिया कधी एकच रेषा इकडून तिकडून फिरवून कोलम काढतात; तर कधी त्या विविध आकृतिबंध निर्माण करतात. कोलममध्ये वक्र रेषेइतकेच सरळ रेषेलाही महत्त्व असते. चित्रकलेत तरबेज असलेल्या काही स्त्रिया यात पौराणिक प्रसंगही चितारतात.



ठिपक्यांची कूर्माकृती – कोलम

तमिळनाडमधले लोक मुलगी पसंत करताना तिला कोलमची कलाकुसर किती प्रमाणात येते, त्याची चौकशी करतात. धार्मिक

परंपरेबरोबरच गृहसजावटीचे एक साधन म्हणूनही कोलमचा विचार करतात. त्यामुळे फुरसतीच्या वेळी तमिळ मुली कोलम घटवीत असताना दिसतात [अ. दि. कोकड– केसरी दिवाळी अंक, १९६३].

(२) एक आदिवासी जमात. यांची वस्ती मुख्यत. विदर्भातल्या यवतमाळ जिल्ह्यात आहे. हे लोक गोंड वंशातले आहेत; पण ते इतर गोंडांशी मात्र लग्नसंबंध करीत नाहीत. यांची कुलनामे गोंडांच्या कुलनामांसारखी नसून, मराठ्यांच्या कुलनामांप्रमाणे आहेत. यांची लोकगीते मराठीच आहेत. यांचा चेहरा व पोषाख कुणब्यांसारखा असतो व राहणीही तशीच असते. यांच्या भाषेला कोलामी म्हणतात. ही गोंडी भाषेहून भिन्न असून, तिचा नीलगिरीवर राहणाऱ्या तोडांच्या भाषेशी बराच संबंध आहे.

हे लोक अत्यंत मागसलेले असून यांना स्वतःच्या वंशाविषयी किंवा आजूबाजूच्या जगाविषयीही फारशी माहिती नसते. यांची वस्ती दुर्गम डोंगरात असते. यांचा व्यवसाय शेती हा होय. डोंगराच्या उतारावर नुसत्या कुदळीने जमीन खणून तिथे हे धान्य पेरतात. त्यांच्या या शेतीला पोद्दू असे नाव आहे. ज्वारी, मका, डाळी, इ. धान्ये हे पिकवितात आणि घरातले धान्य संपले, की कंदमुळे खाऊन राहतात. हे नेहमी वसतीची जागा बदलतात. यांना जादूटोणा व मंत्रतंत्र यांचे ज्ञान असल्यामुळे इतर गोंड यांना बराच मान देतात.



कोलम पुरुष

पूर्वी सर्व कोलमांना लिहिणे-वाचणे येत असे, असे म्हणतात. पण आता सर्व लोक निरक्षर झाले आहेत. पूर्वी यांच्या नायकाला बरेच अधिकार होते. या जमातीत सर्वसाधारण गुन्ह्यासाठी जातिबहिष्काराची शिक्षा दिली जाते. अशा माणसाला जातीत परत घेताना पुढील विधी करतात —

अपराधी मनुष्य (पुरुष असो वा स्त्री) नदीत डोके बुडवून येतो. मग त्याचे मुंडन होते. नंतर तो शेकोटीजवळ बसतो. एवढे झाल्यावर तो शुद्ध होतो व मग स्नान करून जातभाईच्या अंगठ्याचे तीर्थ घेतल्यानंतर तो पंक्तिपावन होतो.

हे लोक कुत्रा व मांजर या प्राण्यांना मारणे हा गुन्हा समजतात. तसेच ते या प्राण्यांची शपथही घेत नाहीत. या लोकांना झाडपाल्याच्या औषधांची चांगली माहिती असते. बांबूचे विणकामही हे उत्तम करतात.

**देव-धर्म**— गोंडाप्रमाणे हे लोक भीमसेन या दैवताला भजतात; पण यांची मुख्य देवता सीता होय. जगाचा निर्माता व रक्षणकर्ता असा कोणी देव आहे, असे हे मानीत नाहीत. ग्रामरक्षक देवीला कोंबडा व बोकड बळी देतात. चैत्र महिन्यात शेवटच्या दिवशी शेतीच्या अवजाराची पूजा करतात. याव्यतिरिक्त भिमन किंवा अय्यक (पिता) व अवल (देवी) यांनाही हे भजतात. हे गोंडांच्या सर्व सणासमारभांत आत्मीयतेने भाग घेतात.

**विवाहप्रथा**– लग्नाच्या दृष्टीने यांच्यांत अनेक गट आहेत. एका गटात लग्ने होत नाहीत. हे फक्त बुधवारी व शनिवारी सायंकाळीच लग्ने लावतात. यांच्यांत राक्षसविवाह रूढ आहे. म्हणजे मुलाला वधू मिळत नसेल, तर इष्ट ती तरुणी पळवून आणून तिच्याशी त्याचे लग्न लावले जाते. उलट मुलीचे लग्न जमत नसेल, तर एखाद्या तरुणालाही पळवून आणून त्याच्याशी तिचे लग्न लावतात. ठरवून केलेल्या लग्नातही पळवून नेण्याची व लुटुपुटीची लढाई करण्याची चाल आहे. यांचा लग्नसमारंभ कुणब्यांसारखाच असतो. फक्त यांच्यांत नवऱ्यामुलाने वधूला मांडीवर घेणे व दोघांच्या वस्त्रांना दोन ठिकाणी गाठी मारणे, या गोष्टी तेवढ्या भिन्न आहेत.

विधवा स्त्री डोक्यावर पाण्याचे भांडे घेऊन ज्या पुरुषाच्या घरात शिरेल, त्याला तिचा स्वीकार करावा लागतो. काडीमोड करायची असेल, तेव्हा पति-पत्नी पंचायतीसमोर एक मद्याचे भांडे ठेवतात, त्याच्यावर एक काडी ठेवतात व तिची दोन्ही टोके धरून परस्परांना बहिणभाऊ म्हणतात.

याच्यांत मासिक रजोदर्शनाच्या वेळी स्त्रियांना गावाबाहेर शेतातील झोपडीत राहावे लागते.

हे लोक मृतांना पुरतात व १ ते ५ दिवस सुतक पाळतात. पौष मासातील सोमवारी पितरांची पूजा करतात. [म. ज्ञा. को.; ट्रा. का. सें. प्रॉ. इं.; अ. गों. अ.]

## कोलमप्पाट्टू

दक्षिणेत रांगोळीला कोलम म्हणतात. ही रांगोळी काढताना काही गीते तालासुरावर गायली जातात, त्यांना कोलमप्पाट्टू असे नाव आहे. कोलम

काढणे व गीत गाणे, या दोन्ही गोष्टी एकदम सुरू होतात व एकदमच थाबतात. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**कोलाघाट** एक क्षेत्र. हे कलकत्त्यापासून ३४ मैलांवर आहे. पाचव्या शतकात इथे बौद्धाचे दहा विहार होते व त्यात दहा हजार बौद्ध भिक्षू राहत असत, असे सांगतात. इथे सुमारे दोनशे फूट उचीचा अशोकाने बाधलेला एक स्तंभ आहे.

महाभारतकाळी इथे मयूर वंशातील क्षत्रिय राजे राज्य करीत होते. युधिष्ठिराच्या अश्वमेधाचा घोडा धरून ठेवल्यावरून मयूरवशी राजा ताम्रध्वज व कृष्णार्जुन यांची इथे लढाई झाली होती. या प्रसंगाची स्मारक अशी भीम व कृष्णार्जुन यांची प्राचीन मंदिरे इथे आहेत. भीममंदिरावरील कोरीव काम सुबक आहे. दुसऱ्यातील कृष्णार्जुनांच्या मूर्ती सुरेख आहेत. कृष्णजन्माच्या वेळी इथे मोठी यात्रा भरते. [ स. भा. प्र. व. ]

**कोलाट्टम्** आंध्र व कर्नाटक या प्रदेशातील एक लोकनृत्य. सोळा माणसे एकात एक अशी दोन वर्तुळे करून व हातात टिपऱ्या घेऊन नाचतात. नृत्यसंचालकाला कथक म्हणतात. तो मध्यभागी उभा राहून मुरली वाजवितो. ताल, गीत व नृत्य असा त्रिविध योग या खेळात होतो. या नृत्याला कोपू, चित्राशी, इ. अनेक गती असतात. नृत्य करताना लोकगीते ( कुम्मी गीते ) गायिली जातात. प्रथम गणपतीला वंदन करून मग नृत्याला प्रारंभ करतात. या नृत्यात जे कथासंगीत योजिले जाते, त्याला कोलट्ट दरू असे नाव आहे. नौकाचरित्रम् या त्यागराजाच्या समूहगीतांत अशी गाणी आहेत. [ मार्च ऑफ इडिया, सप्टें. १९५७; डि. सा. इं. म्यु. म्यु.; अजंता मासिक ]

**कोलायन** एक जात. हे लोक तमिळनाड, मलबार, कूर्ग व कानडा या भागात आढळतात. द. मलबारात याना उराळी म्हणतात. गाई पाळून देवस्थानांना दुधातुपाचा पुरवठा करणे, हा यांचा परंपरागत उद्योग आहे. सांप्रत मात्र बहुतेक कोलायन गवंडीकाम करतात. गोल्ला या तेलुगू शब्दाचा अर्थ गवळी असा आहे; त्यावरूनच यांना कोलायन हे नाव पडले असावे.

**विवाहप्रथा–** आयन व एरुमन असे यांचे दोन पोटभेद आहेत. यांचे परस्परांत लग्नसंबंध होत नाहीत. पण दोन्ही पोटजातीच्या स्त्रिया नायरांशी सबंधम् करू शकतात. मात्र त्यांच्या सततीला हीन समजले जाते. मुली वयात येण्यापूर्वीच त्यांची लग्ने ताळिकेट्टुकल्याणम् पद्धतीने करतात. एखाद्या शुभ दिवशी मुलीचा बाप तिच्या मस्तकावर अक्षता व फुले टाकतो आणि तिच्या गळ्यात ताळी बांधतो. एवढे झाल्यावर मग तिचे खरे लग्न केव्हाही झाले तरी चालते.

**मर्तिकप्रथा –** हे लोक मृतांना जाळतात. पहिले दहा दिवस रोज थोडे अन्न मृतात्म्यासाठी ठेवतात. १२ व्या दिवशी दहनाच्या जागी एक मनुष्याकृती काढून तिची पूजा करतात. त्या वेळी मृताला अन्न देतात. नतर सर्वजण स्नान करून शुद्ध होतात [ म. ज्ञा. को. ]

**कोलाहल** एक पर्वत. गयासुराचे तपस्थान. महाभारतात या पर्वताचा संबंध शुक्तिमती नदीशी दाखविला आहे (आदि. ६३.३५). शुक्तिमती किंवा केन ही नदी बुंदेलखंडातील भांडेर पर्वतात उगम पावली आहे. तो भांडेर म्हणजेच पूर्वीचा कोलाहल होय, असे श्री. डे यांचे मत आहे.

**कोलिय** एक प्राचीन मानवगण. शाक्यांच्या जोडीने यांचा उल्लेख येतो. शाक्य व कोलिय यांच्यामधला संघर्ष बुद्धाने शमविला, असे जातकावरून कळते. या कोलियगणात राम नावाचा एक राजा झाला. त्याने कोलनगर नावाचे एक शहर वसविले आणि आपल्या बत्तीस पुत्रांशी शाक्य राजकन्यांचे विवाह घडवून आणले. [ रामकथा कामिल बुल्के. ]

**कोलियन** द. भारतातील कोष्टी जात. तंजाऊर व मदुरा जिल्ह्यांत या लोकांची वस्ती जास्त आहे. मुळात हे लोक परैयन होते. परंतु हल्ली हे परैयनाशी अन्नोदकादी व्यवहार करीत नाहीत. हे लोक जाडेभरडे पांढरे कापड विणतात. यांच्यापैकी काही लोक शेतीही करतात. ईश ही या लोकांची पदवी असून, लग्नकार्याच्या वेळी व्यक्तीच्या नावामागे ईश अशी पदवी लावूनच त्याला हाक मारली पाहिजे, असा नियम आहे.

मुलीला प्रथम ऋतुप्राप्ती झाली म्हणजे पंधरा दिवस विटाळ पाळतात. सोळाव्या दिवशी तिचे स्नान झाल्यावर न्हावी वेलीचा फास करून तिच्या शरीराभोवती तीन फेऱ्यांनी तो, गुंडाळतो. हा विधी न झाल्यास ऋतुमती शुद्ध होत नाही असे मानतात.

**विवाहप्रथा–** याच्यांत लग्नाचे चिन्नकल्याणम् व पेरियकल्याणम् असे दोन प्रकार आहेत. चिन्नकल्याणम् या प्रकारात एखाद्या शुभ दिवशी वराची बहीण वधूगृही जाते व तिच्या

गळ्यात ताळी बांधून तिला वरगृही घेऊन येते. परंतु अशा प्रकारे लग्न झालेल्या स्त्रियांना आपल्या मुलांच्या लग्नात मात्र भाग घेता येत नाही.

पेरियकल्याणम् या विवाहप्रकारात नवरा मुलगा घोड्यावर बसून वधूगृही जातो. तिथे वधूचा माऊ घोड्यावर बसूनच त्याचे स्वागत करतो. वधूपिता त्याच्या हातात नारळ देतो. वर तो नारळ बाकावर बसलेल्या वधूच्या हातात देतो॰ व तिच्या गळ्यात ताळी बांधतो. नंतर वधू-वर एकमेकांच्या गळ्यात हार घालतात. हे सर्व विधी घोड्यावर बसल्या-बसल्याच केले जातात.

सणासुदीच्या दिवशी व पूजेअर्चेच्या वेळी कोलियन लोक शैव मुद्रा धारण करतात. शिवाबरोबरच ते अय्यनार, पट्टवनस्वामी व पोथिअम्म यांनाही भजतात.

मृताला बसल्या स्थितीत जाळतात. त्यापूर्वी एखादी विधवा स्त्री प्रेताला प्रदक्षिणा घालते व भरलेले मडके पायाने फोडते. दहनाच्या दुसऱ्या दिवशी मृताच्या अस्थी गोळा करून, त्यांची एक मनुष्याकृती बनवतात व तिला नैवेद्य अर्पण करतात. सोळाव्या दिवशी श्राद्ध करतात. [का. ट्रा. स. इं.]

**कोलीदियाली** पंजाबातले लोक पौषमासात हिर्मा देवीच्या नावाने हा दीपोत्सव करतात. नागरच्या जुन्या किल्ल्यातल्या एका देवळात प्रथम दिवा लागतो. तो दिसला, की गावोगावी दिवे पेटवितात. त्या रात्री पुरुष मंडळी फेर धरून नृत्य करतात. त्यानंतर दोन दिवसांनी नागर गावात मोठी जत्रा भरते. पेंढ्याचा एक मोठा नाग बनवून त्याला ओढीत आणि लोटीत नदीत नेऊन टाकायचे, हा त्या जत्रेतला महत्त्वाचा कार्यक्रम असतो. कोण्या एका काळी एका सरपटणाऱ्या प्राण्याने त्या गावाला पीडा दिली होती आणि गावकऱ्यांनी संघटित होऊन त्या प्राण्याला नदीत ढकलून दिले होते, या घटनेची स्मृती म्हणून ही जत्रा भरते.

**कोलुवू** तमिळनाडमधील स्त्रियांचा व मुलींचा एक उत्सव. नवरात्रात तमिळ स्त्रिया आपल्या घरी मातीच्या किंवा धातूच्या बाहुल्यांची आरास करतात. त्यासाठी त्या वर्षभर बाहुल्या जमवून नवरात्रात त्यांचे प्रदर्शन मांडतात. त्यासाठी मंडप घालतात व रंगीबेरंगी पताकांनी तो सजवितात. काही-वेळा या बाहुल्यांपुढे किल्ले, उद्याने, नद्या, इ. निसर्गदृश्येही उभारतात. विविध प्रकारच्या रांगोळ्याही घालतात. या सगळ्या आराशीच्या मध्यभागी एका मंगल कलशावर सरस्वतीची स्थापना करून, नऊ दिवस तिची पूजा करतात. संध्याकाळी सुवासिनींना बोलावून हळदीकुंकू करतात. आंध्र



कोलुवू आरास

प्रदेशातही हा समारंभ घरोघरी केला जातो. [तमिळनाडू]

**कोल्टा** एक जात. हे लोक मध्य प्रदेशातील संबळपुर जिल्हा व ओडिसामधील काही भाग यात आढळतात. हे वृत्तीने शेतकरी आहेत. यांच्या उत्पत्तीविषयी अनेक दंतकथा प्रचलित आहेत. चस नावाचे जे लोक कुळीथ पिकवू लागले, त्यांना कोल्टा हे नाव पडले असावे, असे हिरालाल म्हणतात. या जातीच्या उपजाती नाहीत. ही गोष्ट या अनुमानाला पुष्टी देते. यांची कुलनामे प्राणी किंवा वस्तू यांवरून पडलेली आहेत. उदा० दीप, हस्ती, नाग, पिंपळ, भारद्वाज इत्यादी. यांचे जे वर्ग आहेत, त्यांची नावे गावावरून किंवा अधिकारपदांवरून पडली आहेत.

**विवाहप्रथा**—एकाच वर्गातील स्त्री-पुरुषांचे लग्न होत नाही; पण एका गोत्रात लग्न होऊ शकते. वयात येण्यापूर्वीच मुलीचे लग्न झाले पाहिजे, असा नियम आहे. योग्य वर न मिळाला, तर प्रथम म्हाताऱ्या पुरुषाशी तिचे लग्न लावून, पुढे विधवाविवाहपद्धतीने तिचे इष्ट वराशी लग्न करतात. विवाहसमारंभात वधू-वरांना बोहल्यावर बसवून त्यांच्यावर तांदूळ व मूगडाळ टाकतात; कुमारिकांनी कातलेल्या सुताने त्यांचे हात बांधतात; मग वधूचा भाऊ ती गाठ सोडतो आणि त्यानंतर पुन्हा दोघांवर अक्षता टाकतात. एवढे झाले, की लग्न पुरे होते.

**देव-धर्म**— हे लोक रामचंडी देवीला भजतात. तिचे मंदिर बौद संस्थानातील सरसर या गावी आहे. हे लोक तिथून थोडी

माती आणून देवीचे प्रतीक बनवितात व त्याची पूजा करतात. रामचंडी म्हणजे भूमातेचेच मूर्त स्वरूप होय. श्रावणमासात हे लोक नागराची पूजा करतात. आषाढ, भाद्रपद, कार्तिक व माघ या मासांतील दशमीला आपल्या कुलदेवतांची व देवकाची पूजा करतात. सणासमारंभासाठी पुरोहित म्हणून ब्राह्मणाला बोलावतात.

प्रत्येक कोल्टाचा एक गुरू असतो. लग्नापूर्वी सर्वांना त्या गुरूकडून दीक्षा घ्यावी लागते. [ ट्रा. का. से. प्रॉ. इं. ]

**कोलकर** कोच्चिनमधील एक लहानशी जमात. सुमारे दोनशे वर्षांपूर्वी त्रिवांकुरमधील क्विलॉन येथून हे लोक इथे आले व स्थायिक झाले. यांच्यापैकी बरेचसे लोक बोटींवर हमाली व मच्छीमारी करतात. काथ्याच्या दोऱ्या वळणे व मासे पकडण्यासाठी जाळी तयार करणे, हे व्यवसायही काही लोक करतात. हे रोमन कॅथॉलिक असून, पोर्तुगीजांनी आपल्याला बाटविले, असे सांगतात. [ का. ट्रा. स. इ. ]

**कोलपाकमाणिक्यदेव** आंध्रातील एक जैन तीर्थक्षेत्र. इथे माणिक्यदेवाची प्रतिमा आहे. [ वि. ती. क. ]

**कोलप्पन हब्ब** कर्नाटकात हंपी येथे होळीसारखा एक सण साजरा करतात, त्याला हे नाव आहे. त्या वेळी एक मनुष्य राक्षसाचा वेष करून गावाच्या मध्यभागी उभा राहतो. त्याला सर्व लोक खूप मारहाण करून गावाबाहेर हाकलून देतात. तसे करताना त्याचे तोंड कोणीही पाहायचे नसते. तो मनुष्य रात्रभर जंगलातच राहतो. गावात होळी पेटवून तीत कोल्लप नामक राक्षसाची मोठी प्रतिमा जाळतात. घराघरांतून जुने कपडे जमवून ही प्रतिमा केलेली असते. हाकलून दिलेल्या राक्षसाचे तोंड पाहण्याचा प्रसंग आल्यास, तो माणूस संभाव्य संकट बाधू नये म्हणून त्या जळणाऱ्या राक्षसाची प्रार्थना करतो. [की. पॉ.]

**कोलम शक** याला संस्कृतात कोलंब वर्ष व तमिळ भाषेत कोल्लम आंडु म्हणजे पश्चिमेकडील वर्ष असे म्हणतात. हा शक कोणी व कशासाठी सुरू केला याविषयी निश्चित माहिती मिळू शकत नाही. केरळाधिपती चेरुमान पेरुमाळ याने मक्केस प्रयाण केले, तेव्हापासून या शकाचा आरंभ झाला असावा, असे कोणी मानतात. पण या मताला ऐतिहासिक आधार नाही. आद्य शंकराचार्यांच्या निर्याणापासून हा शक सुरू झाला, असेही काही लोकाचे म्हणणे आहे. तथापि वरील समजुतीला मलबारातील एका दंतकथेशिवाय दुसरा काही आधार नाही.

उपलब्ध शिलालेखांतील उल्लेखांवरून बर्नेल, हॉर्न, पिल्ले या विद्वानांनी कोल्लम शक इ. स. ८२४ किंवा ८२५ मध्ये सुरू झाला असल्याचा निष्कर्ष काढला आहे.

इ. स. च्या ९ व्या शतकात वेणारचा (तिरुवितांकूर) राजा राजशेखर चक्रवर्ती याने शंकराचार्यांच्या निर्याणानंतर कोल्लम नामक नगरात महाजनाची एक परिषद भरविली होती. त्या परिषदेत, आचार्यांच्या अद्वैतमताला अनुसरून सबंध केरळात आचार-व्यवहार रूढ व्हावा, असा एक महत्त्वाचा निर्णय घेण्यात आला व त्यासाठी अनेक नियमही करण्यात आले. या परिषदेची स्मृती म्हणून कोल्ल वर्ष किंवा कोल्लम शक सुरू करण्यात आला, असेही म्हणतात.

हा शक मलबारपासून कन्याकुमारीपर्यंत तसेच तिन्नेवेली जिल्ह्यात अद्यापही चालू आहे. याचे वर्ष सौर असून महिन्याचा आरंभ सूर्यसंक्रांतीपासून होतो.

मलबारात या शकाला परशुरामाचा संवत असेही म्हणतात. [ म. ज्ञा. को.; कै. सा. द. ]

**कोल्हा** कुत्र्याच्या वर्गातला एक प्राणी. कुत्रा, लांडगा व कोल्हा यांच्यांत बरेच साम्य असते. कोल्हा हा रात्रिचर प्राणी आहे. कोल्हे दिवसा झाडीत दडून बसतात व सायंकाळी झुंडीनें बाहेर पडतात. कोल्ह्याच्या ओरडण्याला कोल्हेकुई असे नाव आहे. कोल्हा हा धूर्तपणा व लुच्चेगिरी यांबद्दल प्रसिद्ध आहे. कसल्याही अडचणीतून अनेक युक्त्या योजून पार पडण्याचे ज्ञान कोल्ह्याला उपजतच असते, असे म्हणतात. कोल्ह्याच्या चातुर्याच्या गोष्टी सर्व देशांतल्या वाङ्मयात आढळतात. पचतंत्रात व इसापच्या नीतिकथांतही कोल्ह्याला प्रमुख स्थान मिळाले आहे. कोल्हा 'कुई' का घालतो, याविषयी एक कथा आहे, ती अशी –

कुत्रे आणि कोल्हे हे एका काळचे भाऊ भाऊ. पूर्वी कोल्हे गावात राहत व कुत्रे जंगलात राहत. एकदा कुत्र्यांनी कोल्ह्यांना म्हटले, की 'आमच्या एका मुलीचे लग्न आहे, म्हणून आम्ही शहरात येतो, तोवर तुम्ही रानात चला.' कोल्हे या बोलण्याला फसले व शहरातून रानात गेले. कुत्रे मात्र शहरात आले ते परत रानात गेलेच नाहीत. त्या दिवसापासून कोल्ह्यांना वाटते, की आपला शहरात राहण्याचा अधिकार आपण पुनश्च प्रस्थापित करावा. म्हणून ते संघटित होऊन गावाच्या सीमेवर येतात; पण कुत्रे त्यांना हाकून लावतात. मग कोल्हे 'कुई कुई' ओरड-

तात. त्या कुईचा अर्थ हा असतो, की 'आम्ही शहरचे राजे केव्हा होऊ ?'



कोल्हे

कोल्ह्याच्या मादीला भालू म्हणतात. ही कोल्ह्यापेक्षाही वस्ताद असते. याविषयी एक कथा आहे, ती अशी–

एकदा एका कोल्ह्याने एका तळ्याच्या काठी एक चौथरा बनविला व तो शेणाने सारविला. कोल्हा आपल्या कानात वाहणांचे तळ लटकावून त्या चौथऱ्यावर बसला. पाणी प्यायला आलेल्या प्रत्येक पशूला तो म्हणू लागला, की 'आधी माझी स्तुती कर आणि मग पाणी पी.' त्यावर ते पशू त्याची स्तुती करू लागले, ती अशी–

**सोनेका चबुतरा कोओी चंदन लीपौ है**
**कानोंमें दो कुंडल पहिरें कोई राजा बैठो है**

अर्थ– सोन्याचा चौथरा, तो चंदनाने सारविलेला आहे व कानात कुंडले घालून कोणी राजा त्याच्यावर बसला आहे.

सर्वात शेवटी पाणी प्यायला आली ती भालू. कोल्हा तिलाही म्हणाला, की 'तू माझी प्रशंसा कर.' भालू त्याला म्हणाली. 'माझा घसा सुकला आहे. आधी पाणी पिते आणि मग स्तुती करते.' कोल्हा कबूल झाला. भालू पाणी प्याली आणि दूर जाऊन म्हणाली–

**माटी कौ मदूलना कोई गोबरू लीपौ है**
**कानोंमें दो लितरे कोई गीद्दड बैठो है**

अर्थ– मातीचा चौथरा. तो शेणाने लिपला आहे आणि कानात तुटक्या वाहणाचे तळ बांधून त्यावर कोणी कोल्हा बसला आहे.

**शुभाशुभ कल्पना** – धान्य मापून घेत असताना किवा नांगरणी चालली असताना कोल्हेकुई ऐकू येणे शुभदायक समजतात. सकाळी कोल्ह्याचे तोंड पाहणे लाभदायक मानतात. भुते-खेते सर्व प्राण्यांच्या आकृती धारण करू शकतात; पण कोल्ह्याची आकृती त्यांना घेता येत नाही.

दृष्टबाधा घालविण्यासाठी कोल्ह्याच्या मांडीचे हाड जनावराच्या गळ्यात किंवा पायाला बांधतात. प्रवासाला जाताना कोल्हा डावीकडून उजवीकडे गेला, तर तो शुभ शकुन. सूर्यप्रकाशात कोल्ह्याचे गळा काढून रडणे, हे संकटसूचक मानतात.

बौद्ध सिद्धांच्या तत्त्वज्ञानात कोल्ह्याला ज्ञानवान मनाचे प्रतीक मानतात. तांत्रिक बौद्ध साधनेत मरणादी गोष्टींनी भयभीत राहणाऱ्या सांसारिक चित्ताला शृगालाची उपमा दिलेली आहे. [ की. पॉ.; म. ज्ञा. को.; हि. सा. को. ]

## कोल्हाटी

एक जात. हे लोक महाराष्ट्र व कर्नाटक यात आढळतात. कर्नाटकात याना डोंबारी म्हणतात व नगर जिल्ह्यात खेळकरी म्हणतात. ही भ्रमणशील जात आहे. इतर अनेक जातीतून या जातीत भरती होत असते. मराठी, गुजराती, डुकरे किंवा पोटरे, पाळ किंवा काने, हरका, वले किंवा वलियर, गोपालगणी व अरे अशा यांच्या पोटजाती आहेत. या पोटजाती निरनिराळ्या भागात राहतात. यांच्यातले काही मुसलमानही झालेले आहेत.

बार्शी तालुक्यातले माणकेश्वर हे यांचे मूळ गाव होय. नाट अर्थात कोला या नावाच्या पुरुषापासून हे आपली उत्पत्ती सांगतात. या कोलावरूनच या जातीला कोल्हाटी असे नाव मिळाले आहे. या नाटाचा बाप तेली व आई क्षत्रिय होती, अशी दंतकथा आहे. गुजराती कोल्हाटी स्वतःला राजपुतांचे वंशज समजतात.

हे लोक गावाबाहेर चटयांच्या झोपड्या उभारून आपला तात्पुरता मुक्काम करतात. दोरावरून चालणे, नाचणे, उड्या मारणे वगैरे कसरतीचे खेळ करून व भिक्षा मागून हे लोक आपला निर्वाह करतात. शिंगांच्या फण्या, चाके व चिंध्यांच्या बाहुल्या तयार करणे, हाही या लोकांचा एक जोडधंदा असतो. यांच्या बायका गोंदण्याच्या कलेत तरबेज असतात.

कोल्हाट्यांत मुलीचे लग्न केलेच पाहिजे, असा निर्बंध नाही. यांच्यांतल्या पुष्कळशा स्त्रिया कसबीपण अर्थात वेश्यावृत्ती पत्करून राहतात. मुलगी वयात आल्यावर तिला विचारतात. 'लग्न

करणार की कसबीण होणार ? ' 'कसबीण होणार ' असे तिने उत्तर दिले, तर जातपंचायतीच्या संमतीने व जातीला भोजन घालून तिची वेश्यावृत्ती जाहीर करतात. अशा स्त्रिया नाच-गाणेही शिकतात. कोल्हाटी पुरुष त्यांच्या नाच-गाण्याला वाद्याची साथ करतात. अन्य जातीतील मुलींना पळवून आणून त्यांना वेश्यावृत्ती करायला लावणे, असाही धंदा या लोकांत चालतो. कोल्हाटिणीने एकदा वेश्यावृत्ती पत्करली, की मग जातीतले लोक तिच्याशी अन्नोदक व्यवहार तोडून टाकतात. कोल्हाट्यांपैकी गोपालगणी या पोटजातीतील स्त्रिया पुरुषांना फार नादी लावतात, अशी त्यांची ख्याती आहे. त्यांच्यातल्या निवडक व उत्तम कसबिणींना सोनचेडी म्हणतात.

वऱ्हाडात कोल्हाट्यांचे डुकर कोल्हाटी व खाम कोल्हाटी असे दोन पोटभेद आहेत. पहिल्या वर्गाचे लोक रानडुकराना मारण्यात पटाईत आहेत. हे लोक दरोडे घालतात, पण गुरे मात्र चोरीत नाहीत. खाम कोल्हाटी हे बहुधा बायकांच्या वेश्यावृत्तीवर आपला निर्वाह चालवितात. खानदेशात ' उघड्या मांडीचे ' कसब अर्थात् राजरोस वेश्यावृत्ती आचरणारी हरदास नावाची एक कोल्हाटी पोटजात आहे डुकर कोल्हाट्यांत आणखी काही पोटभेद आहेत. त्यांच्यांत परस्पर रोटीबेटी व्यवहार होत नाहीत. एकूण कोल्हाट्यांत पुरुषांपेक्षा बायकांचीच संख्या जास्त असते. गरती स्त्रियानी व्यभिचार केल्याची शंका आल्यास हे लोक त्यांना काही दिव्ये करायला लावतात. अविवाहित स्त्रियांच्या मुलांना जातिबाह्य समजतात. यांच्यांत विधवाविवाह रूढ आहे; पण सोडचिठ्ठी देण्याची मात्र पद्धत नाही.

हे लोक मारुती, खडोबा, मरीआई, बहिरोबा, जनाई, जोखाई, म्हसोबा, इ. देवतांना भजतात.

**विवाहप्रथा** – समान पोटजातीत किंवा कुळीत लग्न करीत नाहीत. लग्न मुलीकडे लागते. मुलीचे देज साठ रुपये असते. लग्नाला ब्राह्मण पुरोहिताची आवश्यकता असते. लग्नापूर्वी जातीतले एक दांपत्य आंब्याचा टाळा आणून लग्नमंडपात रोवते. त्या वेळी त्या दोघांच्या पदराला गाठ मारतात. लग्न लावण्यापूर्वी प्रत्येक सुवासिनीला नारळाची एक वाटी व दोन आणे तसेच कुमारिकेला अर्धी वाटी व एक आणा देण्याची वहिवाट आहे. लग्नाला निघताना नवरा मुलगा मोह (रेघ धरून हजामत) करतो. वरातीच्या वेळी नवरामुलगा पायी चालत जातो. लग्न लावण्याच्या अगोदर मुलामुलीचे नाते विचारून घेतात; त्याचप्रमाणे मुलाच्या बापाच्या सद्वर्तनाविषयीही प्रश्न विचारतात. रजोदर्शन होण्यापूर्वी मुलीचे लग्न झाल्यास ती वयात येईपर्यंत बापाच्याच घरी राहते. बापाच्या घरी असताना ती मृत्यू पावल्यास मुलीच्या बापाने स्वखर्चाने जावयाला दुसरी बायको करून दिली पाहिजे, असा निर्बंध आहे. लग्नानिमित्त मेजवानी घालायची ती शिजविलेल्या अन्नाची न घालता तिच्याऐवजी जमलेल्या मंडळीना धान्य वाटतात.

लग्ने सकाळी किंवा सायंकाळी होतात. पुरोहित जिचे नाव सांगेल ती बाई मुलामुलीला हळद लावते. लग्नात नवरामुलगा वधूच्या घरी जात असता पुढील गाणे म्हणतात–

**आले आले मारुती ।**
**डफ डफ वाजती नवरदेव ।।**
**नवरा चालला नवरीसाठी ।**
**वऱ्हाडणी चालल्या पोटासाठी ।**
**पालखी नव्हे सुपारी ।**
**सांगुनि धाडा दुपारी नवरदेवास ।**
**आमचे वऱ्हाड देहू कस ।**
**माणिक मोती रस ।**
**त्यांचे वऱ्हाड येवो कस ।**
**हातात दाढ्या बोकड कस ।।**

**प्रसूतिप्रथा** – मुलाला बाराव्या दिवशी पाळण्यात घालतात. त्या अगोदर बायका जलाशयावर जाऊन सटवाईची पूजा करतात व तिथेच जेवतात. तिसऱ्या दिवशी न्हाणीपूजन म्हणजे मोरीची पूजा करतात.

**मर्तिकप्रथा**– मृतांना पुरतात; पण प्रेतापुढे विस्तव नेण्याची चाल आहे. बारा दिवस सुतक पाळतात. तेराव्या दिवशी स्नान करतात. [ मुं. इ. जा.; म. ज्ञा. को.; रज:कण ]

## कोल्हापूर

करवीर पाहा.

## कोल्हुआ

बिहारच्या मोंघीर जिल्ह्यातील एक गाव. इथे प्राचीन बौद्ध संस्कृतीचे काही अवशेष आहेत. इथे एकसंध पाषाणाचा एक स्तंभ असून, त्याच्यावर एक सिंह कोरलेला आहे. नेपाळ–यात्रा करताना सम्राट अशोकाचा वाटेत जिथे जिथे मुक्काम पडला, तिथे तिथे त्याने एकेक स्तंभ उभारला. कोल्हुआ येथील स्तंभही त्यांपैकीच होय. त्याच्याजवळच एका टेकडीवर काही बौद्ध मूर्ती असून, त्यातली एक बौद्धाची बैठी मूर्ती सुरेख आहे. याशिवाय इथे भीमसेनाच्या टोपल्या नावाच्या दोन टेकड्या, एक विटांचा उद्ध्वस्त स्तूप आणि प्राचीन इमारतीचे काही अवशेष आहेत. [ मोंघीर गॅझे. ]

## कोवुरकिलर

(इ. स. चे २ रे शतक) तमिळनाडमधील एक कवी. हा चोळ राजाच्या दरबारात

होता. याने अनेक संग्रामगीते रचली आहेत. नलंककिल्ली याच्या कारकीर्दीत नलंक आणि त्याचा भाऊ या दोघांमध्ये युद्ध पेटले असता याने त्या दोघात सख्य निर्माण करण्याचा प्रयत्न केला. नेडुककिल्ली हा राजा एकदा एका कवीला शत्रूचा हेर समजून ठार मारायला निघाला, तेव्हा याने त्याला वाचविले. नलवनकिल्लीच्या कारकीर्दीत त्या राजाने मलयमनाचे दोन पुत्र पकडून आणून त्यांना हत्तीच्या पायी देण्याचा हुकूम सोडला, तेव्हा यानेच तो हुकूम रद्द करविला. [ म. ज्ञा. को. ]

**कोवूर** मद्रासच्या वायव्येस तीन कोसावर असलेले एक क्षेत्र. इथे सुंदरेश्वर व सौदरनायकी या दोन दैवतांची मंदिरे आहेत. सुंदरेश्वर हा त्यागराजाचा उपास्यदेव होता. त्यागराजाने इ. स. १८३९ साली या स्थळाला भेट देऊन इथल्या सुंदरेश्वरावर पाच कृती रचल्या होत्या. या कृतीना कोवूरपंचरत्नम् असे नाव आहे. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**कोश** (१) खजिना किंवा द्रव्यसंग्रह असा याचा अर्थ आहे. राजाच्या कोशात सर्व प्रकारचे धन असावे, मात्र ते धर्मशास्त्रातील नियमांप्रमाणे प्राप्त केलेले असावे, असे कामदकीय नीतिसारात सांगितले आहे (४.६२–६४). प्रजेचे रक्षण, राज्यव्यवस्था, धर्मपालन, संकटनिवारण, इ. गोष्टींसाठी राजाने कोशाचा उपयोग करावा, असे धर्मशास्त्रात म्हटले आहे.

कोश भरण्याचे मुख्य साधन म्हणजे कर. राजाने स्वतःच्या लहरीप्रमाणे कर आकारणी न करता, त्यासंबंधी जे नियम केलेले आहेत, त्यांना अनुसरून करवसुली करावी, असे स्मृतींनी सांगितले आहे. साधारणपणे शेतमालाचा $\frac{1}{6}$ भाग कर म्हणून घ्यावा, असा नियम होता ( गौ. ध. सू. १०.२४; वि. ध. सू. ३.२२–२३; मनु. ७.१३०). परंतु आपत्काली तिसरा किंवा चौथा भाग घेण्यास हरकत*नाही, असेही म्हटले आहे (अर्थ. ५.२; मनु. १०.११८; शुक्र. ४.२.९–१०). मात्र $\frac{1}{6}$ भागापेक्षा अधिक द्रव्याची मागणी करायची असेल, तर प्रजेवर जबरदस्ती न करता, तिला विनंती (प्रणय) करून, एकदाच वसुली करावी, असे कौटिल्याने सांगितले आहे. परचक्र आले असता, ' शत्रू तुमच्या धनाचेच नव्हे, तर स्त्रियांचेही अपहरण करील, तुम्ही सर्वस्वाला मुकाल; त्यापेक्षा अधिक कर देऊन कोश समृद्ध करा', अशी विनंती लोकांना करावी, असे महाभारतात सांगितले आहे (शान्ति. ८७.२६-३३).

कोश भरण्याचे आठ मार्ग कामंदकीय नीतिसारात (५.७८–७९)सांगितले आहेत, ते असे– शेती, व्यापारी मार्ग, मांडवल, बंधारे, हत्ती पकडणे, खाणीतून सोने काढणे, श्रीमंतांकडून धन मिळविणे व नवीन ग्रामे आणि नगरे वसविणे. संकटकाली कोश रिता झाला, तर नेहमीचे नियम बाजूस ठेवून, इतर मार्गांनी धन जमा करावे. विशेषतः अधार्मिक व पाखंडी लोकांचे धन घ्यावे, असे कौटिल्याने सांगितले आहे (अर्थ. ५.२).

महाभारतात कोशाचे महत्त्व वर्णिले आहे, ते असे –

**कोशश्च सततं रक्ष्यो यत्नमास्थाय राजभिः ।**
**कोशमूला हि राजानः कोशो वृद्धिकरो भवेत् ।।**

(शान्ति. ११९ १६)

अर्थ– राजानी मोठ्या दक्षतेने कोशाचे सतत रक्षण करावे. राजांचे राजेपण हे कोशावरच अवलंबून असते. कोशामुळेच राजाची (व राज्याचीही) भरभराट होते.

राज्यसंस्थेचे जे सात घटक असतात, त्यांमध्ये कोशाचाही समावेश कौटिल्याने केला आहे. (अर्थशास्त्र पाहा). [ हि. ध. ]

(२) अद्वैत दर्शनाने जीवाच्या शरीरात पाच कोश मानलेले असून, अन्नमय, मनोमय, प्राणमय, विज्ञानमय व आनंदमय अशी त्यांची नावे आहेत.

हे कोश क्रमाने एकाच्या आत एक असे आहेत. अन्नमय हा सर्वात बाहेरचा व आनंदमय हा सर्वांत आतला कोश आहे. म्यानाने जशी तलवार आच्छादित होते, तसा या पाच कोशांनी आत्मा आच्छादित होतो व त्यामुळे स्वस्वरूप विसरून जाऊन जन्ममरणरूपी संसारात पडतो. कोळी स्वतःच स्वतःभोवती कोश निर्माण करतो व तो कोश त्या कोळ्यालाच आवळून टाकून क्लेश देतो, तद्वत् हे कोशही आत्म्याला असह्य क्लेश देतात. त्यामुळेच त्याना कोश असे नाव मिळाले आहे. प्रस्तुत पंचकोशांचे विवरण पुढीलप्रमाणे–

**स्यात् पञ्चीकृतभूतोत्थो देहः स्थूलोऽन्नसंज्ञकः ।**
**लिङ्गे तु राजसैः प्राणैः प्राणः कर्मेन्द्रियैः सह ।।**

(पञ्चदशी १.३४)

**अर्थ**– पचीकृत भूतांपासून उत्पन्न झालेल्या स्थूल देहाला अन्नमय कोश असे नाव आहे आणि सूक्ष्म शरीरात कर्मेंद्रियांसह राजस प्राणानी प्राणमय कोश बनला आहे.

**सात्त्विकैर्धीन्द्रियैः साकं विमर्शात्मा मनोमयः ।**
**तैरेव साकं विज्ञानमयो धीर्निश्चयात्मिका ।।**

( पञ्चदशी १.३५ )

**अर्थ**– संशयात्मक मन सात्त्विक ज्ञानेंद्रियासह मनोमय कोश बनते व निश्चयात्मक बुद्धी त्याच ज्ञानेंद्रियांसह विज्ञानमय कोश होते.

**कारणे सत्त्वमानन्दमयो मोदादिवृत्तिभिः ।**
**तत्तत्कोशैस्तु तादात्म्यादात्मा तत्तन्मयो भवेत् ।**

( पञ्चदशी १.३६ )

**अर्थ**– कारणशरीरात जे सत्त्व असते, त्याचा मोदादिवृत्तीसह आनंदमय कोश होतो व आत्मा त्या त्या स्थूलादी कोशाशी तद्रूप झाल्यामुळे तन्तन्मय होतो.

याचा तात्पर्यार्थ असा – पंचीकृत स्थूल देहाला अन्नमय कोश, लिंगशरीरातील कर्मेंद्रिये आणि प्राण यांच्या समूहाला प्राणमय कोश, पाच ज्ञानेंद्रिये आणि मन याना मनोमय कोश, पाच ज्ञानेंद्रिये आणि बुद्धी यांना विज्ञानमय कोश व कारणशरीरात मोदादिवृत्तीसह असलेल्या सत्त्वाला आनंदमय कोश असे म्हणतात. कारणशरीर हे आनंदमय आहे. सूक्ष्म किंवा लिंगशरीर हे प्राणमय, मनोमय व विज्ञानमय असे कोशत्रयात्मक आहे व स्थूलशरीर हे अन्नमय आहे. अशा रीतीने तीन शरीरात पाच कोशांचा अतर्भाव झालेला आहे.

या पंचकोशापासून आत्म्याला विभक्त केले असता, तो ब्रह्मरूप होतो. **पाहा** – अद्वैतदर्शन.

## कोशपान

एक दिव्य. याचा तपशील असा – आदित्यादी उग्र देवतांची पूजा करून त्यांच्यावर अभिषेक करतात. ते अभिषेकजल अभिमंत्रित करतात. मग जमिनीचा एक तुकडा शेणाने सारवून दिव्य करणाऱ्या पुरुषाला त्या मंडलावर सूर्याभिमुख बसवतात. या विधीला एक न्यायाधीश लागतो. तो दिव्य करणाऱ्या पुरुषाला अभिमंत्रित पाणी प्यायला देतो. पाखडी, नास्तिक आणि पापी अशा माणसाकडून हे दिव्य करवू नये, असा नियम आहे. दिव्य केल्यापासून चौदा दिवसाच्या आत त्याला राजभय किंवा दैवी आपत्ती उत्पन्न झाली नाही, तर दिव्य करणारा निर्दोष आहे, असे समजतात.

कोशपानाचा दुसरा प्रकार असा – ज्यात देवीची प्रतिमा प्रतिबिंबित झाली आहे, असे जल दिव्य करणाऱ्याला प्यायला देतात. आपले सध्येवर प्रेम नसून गौरीवरच आहे, याबद्दल गौरीची खात्री करण्यासाठी शंकर कोशपानाचे दिव्य करीत असल्याचा उल्लेख गाथासप्तशतीत आहे (४४८). [गा. स.; श. क ]

## कोशवाङ्मय

या शब्दाचा मूळ अर्थ शब्दसंग्रह असा आहे. एखाद्या भाषेतील शब्द अक्षरानुक्रमाने किंवा दुसऱ्या कोणत्यातरी ठराविक पद्धतीने देऊन, त्या शब्दांचे त्याच भाषेत अथवा दुसऱ्या भाषेत विवरण करणारा ग्रंथ असा अर्थ त्याला नंतर प्राप्त झाला.

निघंटू हे भारतीय कोशाचे प्राचीन रूप होय. तो वैदिक ऋचांच्या स्पष्टीकरणार्थ रचण्यात आलेला असून, त्यात केवळ दुर्बोध व आर्ष शब्दाचा संग्रह केलेला आहे. यास्काचा निरुक्त हा ग्रंथ त्या निघटूवरील भाष्य आहे. धातुपाठ, उणादिसूत्रे, गणपाठ व लिंगानुशासन अशा क्रमाने कोशाचे स्वरूप पुढे बदलत गेले.

कवींना काव्यरचनेसाठी उपयोगी पडावा, या हेतूने वाङमयातील सर्वच शब्दाचा संग्रह केलेले कोश मुरारी, मयूर, बाण, श्रीहर्ष, बिल्हण, इ. कवींनी रचले आहेत. श्रीहर्षाचा श्लेषार्थपदसंग्रह हा श्लेषोपयोगी शब्दाचा कोश आहे.

**प्राचीन कोश**– मध्य आशियात काशगर येथे सापडलेले एक आठ पानाचे चोपडे हाच जगातला सर्वात प्राचीन कोश होय. तोही संपूर्ण उपलब्ध नाही. त्याचा कर्ता बौद्धधर्मीय असावा, असे अनुमान आहे. काशिकेत नानार्थ कोशाचा उल्लेख आहे. कात्यायनाची नाममाला, वाचस्पतीचा शब्दार्णव, विक्रमादित्याचा संसारावर्त, व्याडीची उत्पलिनी, इ. प्राचीन कोशांची नावे निरनिराळ्या ग्रंथांत आढळतात. पण या सर्वांहून श्रेष्ठ कोश म्हणजे अमरसिंहविरचित नामलिंगानुशासन किंवा अमरकोश हा होय. हा समानार्थवाची शब्दांचा संग्रह आहे.

अगदी प्राचीन असे कोश संपूर्णपणे उपलब्ध नाहीत. जे उपलब्ध आहेत, त्यांत शब्दांची मांडणी विशिष्ट पद्धतीने केलेली नसून, शब्दांचे अर्थही संक्षिप्त तऱ्हेने दिलेले असतात. संस्कृत कोश बहुधा पद्यमय असून, त्यांचे दोन वर्ग पडतात — (१) समानार्थी शब्दांचा संग्रह व (२) अनेकार्थवाची शब्दांचा संग्रह. मात्र बहुतेक कोशांत या दोन्ही प्रकारच्या शब्दांची सरमिसळ झालेली आढळते शब्दांची व्यवस्था भिन्न कोशात भिन्न पद्धतींनी केलेली आहे. ज्या वस्तूला पर्यायशब्द पुष्कळ असतील, ती वस्तू आधी आणि जिला पर्यायशब्द कमी ती नंतर घ्यायची, अशी पद्धत काही कोशांत आढळते. काही कोशांत अक्षरानुक्रमाने रचना केलेली दिसते. काही कोशांत शब्दातील अक्षरांच्या कमीअधिक संख्येवरून त्यांची मांडणी केलेली आढळते. काही कोशांत या सर्व पद्धती एकदम वापरलेल्या दिसतात. काही ठिकाणी लिंगाप्रमाणे शब्दांची मांडणी केलेली सापडते.

**मध्ययुगातील कोश** – अनेकार्थवाची शब्दकोशात शाश्वताचा अनेकार्थसमुच्चय हा कोश प्राचीन व महत्त्वाचा आहे. ज्या शब्दाच्या अर्थाला एक सबंध श्लोक लागेल, ते शब्द आधी; त्यानंतर अर्धी ओळ ज्याला पुरेल असे शब्द, अशी त्याची रचना आहे. त्याच्या खालोखाल महत्त्वाचा कोश म्हणजे हलायुधाचा अभिधानरत्नमाला हा होय. हा कोश लहान असून, इ. स. च्या १० व्या शतकात तयार झाला असावा. त्यानंतर सुमारे १०० वर्षांनी यादवप्रकाश याने वैजयंती नावाचा एक

विस्तृत कोश रचला. यात प्रथम अक्षरांच्या कमी-अधिक संख्ये-प्रमाणे शब्दांची मांडणी केलेली असून, नंतर ती लिंगपद्धतीने केली आहे. शिवाय प्रत्येक प्रकरणात अक्षरक्रमाने शब्द दिले आहेत. या कोशात पुष्कळ नवीन शब्दांचा भरणा केलेला आढळतो.

इ. स. च्या १२ व्या शतकाच्या पूर्वार्धात धनंजय या दिगंबर जैन कवीची नाममाला व महेश्वर कवीचा विश्वप्रकाश हे दोन कोश तयार झाले. विश्वप्रकाश हा नानार्थ कोश असून, त्यातील प्रस्तावनेत महेश्वराने आपल्या पूर्वी होऊन गेलेल्या भोगींद्र, कात्यायन, साहसाक, वाचस्पती, व्याडी, विश्वरूप, अमरमंगल, शुभांग, वोपालित व भागुरी या कोशकारांचा उल्लेख केला आहे. त्याच शतकात मंख याने एक अनेकार्थ कोश रचला; पण तो काश्मीरच्या बाहेर फारसा प्रसिद्ध झाला नाही. हेमचंद्र हा प्रसिद्ध कोशकार त्याच काळात होऊन गेला ( इ. स. १०८८ ते ११७२ ). त्याचे चार शब्दकोश आहेत– ( १ ) अभिधानचिंतामणिमाला– एकार्थशब्दकोश, ( २ ) अनेकार्थ-संग्रह, (३) देशीनाममाला व (४) निघंटुशेष. हे चारही कोश त्याने आपल्या व्याकरणाचे परिशिष्ट म्हणूनच लिहिले आहेत.

अमरकोशाला पुरुषोत्तमदेवाने त्रिकाडशेष नावाची पुरवणी जोडली आहे. या पुरवणीत बौद्ध सस्कृत वाङमयातील महत्त्वाचे शब्द दिलेले आहेत. त्यानेच हारावली नावाचा आणखी एक कोश लिहिला असून, त्यात वरील पुरवणीपेक्षाही अधिक महत्त्वाचा शब्दसंग्रह आहे. हा कोशकार इ. स. च्या १० व्या व १३ व्या शतकाच्या दरम्यान होऊन गेला असावा.

इ. स. १२०० च्या सुमारास केशवस्वामीने नानार्थार्णवसंक्षेप नावाचा कोश लिहिला. त्यात शब्दाची माडणी अक्षरसंख्याक्रमाने, अक्षरक्रमाने व लिंगानुक्रमाने केलेली आहे. १४ व्या शतकात मेदिनीकर याने रचलेला मेदिनी नावाचा नानार्थशब्दकोश फार प्रसिद्ध आहे. याच्या शेवटच्या श्लोकात साधनीभूत ग्रंथांची व कोशकारांची यादी आहे.

वरील कोशांव्यतिरिक्त संस्कृत भाषेत एकाक्षरकोश, द्विरूप-कोश, त्रिरूपकोश, तसेच वनस्पतिविषयक व ज्योतिषविषयक असे अन्यही कोश आहेत. शिवाय बौद्ध संस्कृत ग्रंथांच्या स्पष्टीकरणार्थ त्यांतील शब्दाचे बरेच कोश लिहिलेले आहेत. त्यापैकी महाव्युत्पत्तिकोश फार प्रसिद्ध आहे. यात बुद्धाची सर्व नावे असून, बौद्धधर्मातील विशिष्ट सज्ञांचे स्पष्टीकरण आहे. शरीराचे अवयव, प्राणी, वनस्पती, रोग इत्यादींची नावेही या कोशात दिलेली आहेत.

प्राकृत कोशातील सर्वात प्राचीन कोश म्हणजे धनपालाचा पैयलच्छीनाममाला ( इ. स. ९७२ ) हा होय. याचा उपयोग हेमचंद्राने देशीनाममाला लिहिताना केला आहे. प्राचीन कोशांपैकी मोग्गलान याचा अभिधानप्पदीपिका हा इ. स. च्या १२ व्या शतकातील कोश उपलब्ध आहे. हा अमरकोशासारखाच आहे.

अकबराच्या कारकिर्दीत कृष्णदासाने पारसीप्रकाश नावाचा फारसी-संस्कृत कोश लिहिला. शहाजहानच्या वेळी वेदांगराय याने ज्योतिषविषयक शब्दाचा पारसीप्रकाशनामक कोश लिहिला. त्याच काळात क्षेमेंद्र याने रचलेला लोकप्रकाश हा ग्रंथ व्यवहारोपयोगी शब्दकोश व ज्ञानकोशही आहे.

शालिवाहन शकाच्या १२ व्या शतकापासून १९ व्या शत-पर्यंतच्या काळात मराठी भाषेत जे कोश झाले आहेत, त्यांत अत्यंत जुना म्हणजे महानुभावानी रचलेला मध्ययुगीन मराठी शब्दाचा संग्रह होय. त्यात जुन्या मराठी शब्दाना सुबोध प्रति-शब्द दिले आहेत. हा कोश गद्य आहे. त्यानंतरचा, ३०० वर्षापूर्वीचा एक मराठी कोश श्री. राजवाडे यांना मिळाला आहे; त्यात ज्ञानेश्वरीतील दुर्बोध शब्दांना मराठी प्रतिशब्द दिलेले आहेत.

मुसलमानी अमलात महाराष्ट्रात फारसी-मराठी कोश निर्माण झाले. त्यात व्यावहारिक शब्दकोशांबरोबरच वेदान्त-परिभाषेचा सूफी कोशही आहे. पुढे मराठी राज्यात राज्य-व्यवहार कोश व अमरकोशाचे मराठी भाषांतर हे महत्त्वाचे ग्रंथ निर्माण झाले. पेशव्यांच्या व पोर्तुगीज, इंग्रज, फ्रेंच, इ. परकीय लोकांच्या दप्तरखान्यातही मराठी, कानडी, तमिळ, फारशी, इंग्रजी वगैरे भाषांतील शब्दांचे कोश असत.

**अर्वाचीन कोश** — इंग्रजी राज्य सुरू झाल्यानंतर मराठी भाषेचे कोश तयार करण्याचे काम सरकारने हाती घेतले. मोल्सवर्थ व कँडी यांनी शास्त्रीमंडळींच्या मदतीने जे इंग्रजी-मराठी व मराठी-इंग्रजी कोश तयार केले, ते फार चांगले झाले आहेत. मिशनरी लोकांना जेव्हा येशूचा धर्म सामान्य लोकांना समजावून सांगणे कठीण पडू लागले, तेव्हा त्यांच्यांतील विद्वानानी मोठया परिश्रमाने सर्व देशी भाषाचा अभ्यास करून त्यांची व्याकरणे व कोश तयार केले. आता आपले लोक आपापल्या भाषांचे विस्तृत कोश करू लागले आहेत. हिंदी शब्दसागर, महाराष्ट्र शब्दकोश, गोंडलचा गुजराती कोश, कन्नड साहित्य सभेचा कानडी शब्दकोश, त्याचप्रमाणे बंगाली, उडिया, तमिळ, इ. भाषांचेही कोश आता तयार झाले आहेत. बायबलावरचा पवित्र धर्मशास्त्रविषयक कोश, प्रा. वेलिंगकर यांचा ज्ञानेश्वरीचे शब्दभाण्डार हा कोश, असे आणखी बरेच कोश महाराष्ट्रात निर्माण झाले आहेत व होत आहेत.

**व्युत्पत्तिकोश** — केवळ शब्दांचे अर्थ न सांगता त्यांची

व्युत्पत्ती सांगणारे कोशही आहेत. विग्रहकोश हा अशा प्रकारचा कोश आहे. प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांचा व्युत्पत्तिकोश हा त्यानंतरचा मोठा कोश होय. न्यायकोश हा दार्शनिक शब्दांचे विवरण देणारा संस्कृत कोश असून, शब्दकल्पद्रुम, वाचस्पत्यम्, अभिधान राजेंद्र हे सविवरण शब्दकोश आहेत.

**चरित्रकोश** — थोर व्यक्तींचा थोडक्यात परिचय करून घेण्यासाठी अशा कोशांचा फार उपयोग होतो गेल्या शतकात कै. र. भा. गोडबोले यांनी अशा प्रकारचे दोन कोश परिश्रमपूर्वक रचले आहेत, ते या दृष्टीने फार महत्त्वाचे आहेत. चालू शतकात श्री. चित्रावशास्त्री यांनी प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन अशा तीन खंडांत चरित्रकोश प्रकाशित केला आहे.

**ज्ञानकोश** — ज्ञानकोशात विशिष्ट पद्धतीने ज्ञानाचा संग्रह केलेला असतो. महाभारत व पुराणे हे ज्ञानसंग्रहच आहेत. सायण, माधव, इ. पंडितानी रचलेले भाष्यग्रंथ त्या त्या विषयाचे ज्ञानकोशच म्हणता येतील. इंग्रजी अमदानीत बाबू नगेन्द्रनाथ बसू यानी जो विश्वकोश रचला, तो पहिला मोठा ज्ञानकोश होय. त्याचे हिंदीत रूपांतर झाले आहे. 'आंध्रविज्ञानसर्वस्वम्' नावाचा तेलुगू ज्ञानकोश आहे. गुजरातीत ज्ञानचक्र नावाचा कोश आहे. मराठीत संपूर्ण ज्ञानकोश रचण्याचे कार्य डॉ. श्री. व्यं. केतकर यांनी केले (**पाहा** – केतकर). सुलभ विश्वकोश म्हणजे केतकरांच्या महाराष्ट्रीय ज्ञानकोशाची सुधारलेली संक्षिप्त आवृत्तीच आहे. श्री. ग. रं. भिडे यांचा व्यावहारिक ज्ञानकोश, अभिनव मराठी ज्ञानकोश हे संक्षिप्त ज्ञानकोश असून, त्यात व्यवहारोपयोगी ज्ञानाचा संग्रह आहे. हिंदी विश्वकोशाची रचना सध्या वाराणसी येथे चालू आहे. या सर्व ज्ञानकोशांत विषयांची मांडणी अक्षरक्रमाने केलेली आहे.

याशिवाय वाक्संप्रदायकोश, स्थलनामकोश, परिभाषाकोश, व्यायाम ज्ञानकोश, भारतीय व्यवहारकोश, पदनामकोश, साहित्यकोश, संकेतकोश, संख्याकोश, ग्रंथसूची असे नानाविध कोश भारतात रचले गेले आहेत. भारतीय व्यवहारकोश हा संस्कृत, इंग्लिश, हिंदी, मराठी, गुजराती, इ. सोळा भाषांचा शब्दकोश असून, तो श्री. विश्वनाथ नरवणे यांनी केला आहे. भारताच्या भिन्न प्रांतांतील लोकांना परस्परांशी सुलभपणे बोलता यावे या हेतूने या व्यवहारकोशाची रचना केलेली आहे. विशिष्ट विषयावरील ज्ञानाचा संग्रह करण्याची ही प्रथा भारतात सुरू झाली आहे. प्रस्तुत भारतीय संस्कृतिकोश हा अशाच प्रकारचा कोश आहे.

या शिवाय वैदिकसंशोधनमंडळ, पुणे या संस्थेच्या वतीने श्रौतकोश, वाई येथील प्राज्ञमहामंडळाच्या वतीने धर्मकोश व मीमांसाकोश या विशिष्ट विषयांना वाहिलेल्या संस्कृत ज्ञानकोशांची निर्मिती महाराष्ट्रात चालू आहे. पुणे येथे श्री. चित्रावशास्त्री स्थलकोश रचीत आहेत. प्रा. वाडेकर हे तत्त्वज्ञानकोश निर्माण करण्याच्या प्रयत्नात आहेत. त्याचप्रमाणे मराठी विश्वकोश नावाचा एक महान ज्ञानकोश वाई येथे महाराष्ट्र सरकारच्या विद्यमाने चालू आहे. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी हे त्या कोशाचे प्रधान संपादक आहेत.

## कोष्टी

एक विणकर जात. विदर्भ व मध्यप्रदेश यांत यांची पुष्कळ वस्ती आहे. मराठी व तेलुगू कोष्टी नागपूर व छत्तीसगड या भागात राहतात. तेलुगू कोष्टयांना सालेवार असे म्हणतात. मार्कंडेय ऋषीला हे आपल्या व्यवसायाचा मूळ पुरुष मानतात. कारण या ऋषीने कमलततूपासून कपडे तयार करून देवांना दिले होते, असे सांगतात. याला सूर्याची कन्या दिली होती. तिच्याबरोबर एक राक्षस व एक वाघ याला आंदण दिलेला होता. राक्षस उन्मत्त झाल्यामुळे त्याला मारून मार्कंडेयाने त्याच्या हाडांपासून विणण्यासाठी लागणारी आयुधे बनविली, अशी आणखी एक आख्यायिका हे लोक सांगतात.

या लोकांची वाघावर फार भक्ती आहे. आतापर्यंत वाघाने एकही कोष्टी मारला नाही, अशी यांची समजूत आहे. लग्नप्रसंगी हे वाघाची मूर्ती जवळ ठेवतात.

यांच्यात हळबी, लाड, कोष्टी, गधेवाल, देशकर, देवांग, पटवी, इ. अनेक उपजाती आहेत. मध्यप्रदेशातील कोष्टयांत हिंदू, लिंगायत, कबीरपंथी व गुरुमुखी असे चार पंथ आहेत. तेलुगू किंवा साळेवार कोष्टयांत सूतसाळी व पद्मसाळी असे दोन वर्ग आहेत.

**विवाहप्रथा** – नागपूरच्या बाजूला लग्नात वधू-वरांभोवती सणाचा दोरा सात फेऱ्यांनी गुंडाळतात. वधूची आई वराला ओवाळते व वरमाय जमिनीवर पाणी टाकते. सालेवारात लग्न वरगृही होते. वधूला मध्यरात्री वरगृही आणतात. विणकामाच्या एका लाकडावर वराचा उजवा व वधूचा डावा पाय ठेवून त्यांच्या भोवती कांबळे गुंडाळतात. दोघांच्यामध्ये अंतरपाट धरतात व वधू-वर एकमेकांवर पाचदा अक्षता टाकतात. मग दोघे त्या लाकडावर बसतात व एवढे झाल्यावर लग्नविधी पुरा होतो. यांच्यांत विधवाविवाह रूढ आहे. हे लोक शक्यतो बायकोला घटस्फोट देत नाहीत. कारण त्यांना कामासाठी बायका हव्या असतात.

गणपती हा या लोकाचा प्रमुख देव आहे. नागरपूरच्या कोष्टयांचा गुरुमुखी नावाचा एक पंथ आहे. धापेवाडयाच्या कोळीबाबाचे हे शिष्य असून, ते आपल्या गुरूच्या नावाने घरी एक नारळ ठेवून त्याची पूजा करतात. आपल्या विणकामाच्या

आयुधांना हे पवित्र मानतात. यांच्यापैकी काही लोकाना मद्य-मांस चालते; तर काहीना चालत नाही. याचे पुरोहित ब्राह्मण असतात. हे लोक धोतरे व लुगडी विणण्याविषयी प्रसिद्ध आहेत. महाराष्ट्रातल्या कोष्टयांची देवता चावंडेश्वरी ही आहे. महाराष्ट्रातील व कर्नाटकातील कोष्टयांना देवांग असे नाव आहे.

**मतिकप्रथा** – लिंगायत व कबीरपथी लोक प्रेते पुरतात; बाकीचे जाळतात. श्राद्ध करीत नाहीत. अक्षय्यतृतीयेच्या दिवशी कर्ता पुरुष आपल्या मित्राला बोलावतो व त्याला विचारतो, की 'तू माझा कोण आहेस ?' त्यावर तो उत्तर देतो, की 'मी तुझा आजा किंवा पणजा आहे.' मग तो कर्ता त्याला जेवायला घालतो.

बगालमधील बऱ्याच कोष्टयांनी मुसलमानी धर्म स्वीकारला आहे. पण त्याचे देव मात्र हिंदूचेच आहेत. **पाहा** – देवांग. [ म. ज्ञा. को. ]

**कोष्ठागार** कोठार किंवा कोठी. चतुर्मुखी शिवलिंग असते, त्या कोठारालाही कोष्ठागार असे म्हणतात. हा बौद्ध चैत्याचाही एक प्रकार असतो.

**कोस** रस्ता मोजणीचे एक माप. संस्कृत क्रोश या शब्दाचा कोस हा अपभ्रंश होय. प्राचीन कालापासून भारतात कोस हे माप प्रचारात आहे. चद्रगुप्त मौर्याच्या काळी हे माप प्रचारात होते. अर्ध्या कोसाला रस्त्याच्या कडेस दगड पुरण्याची त्या काळी चाल होती. मोगल राज्यातही कोसाचेच प्रमाण प्रचारात होते व दर कोसाला दगड पुरण्याची पद्धत होती. मोगल कोस म्हणजे इग्रजी ४५५८ यार्ड होत. अशोकाच्या आठव्या शिलाशासनात 'अढकोसिक्य' असा कोस शब्दाचा उल्लेख आला आहे. [ म. ज्ञा. को. ]

**कोसल** भारतातल्या सोळा महाजनपदांपैकी एक. याचे लक्षण व स्थान पुढील श्लोकात सांगितले आहे–

**कोसलो नाम मुदितः स्फीतो जनपदो महान् ।**
**निविष्टः सरयूतीरे पशुधान्यसमृद्धिमान् ।।**

अर्थ– कोसल नावाचा आनंदी, प्रशस्त व पशुधान्यसमृद्धीने युक्त असा महान जनपद सरयूच्या तीरावर वसला आहे.

या जनपदाचे नाव पाणिनीच्या अष्टाध्यायीत आढळते. पूर्वेस सदानीरा (गंडक) नदी, पश्चिमेस पांचाल देश, उत्तरेस नेपाळची पर्वतमाला आणि दक्षिणेस स्यदिका नदी अशा या जनपदाच्या चतुःसीमा होत्या. सांप्रतचा अवधप्रात हाच प्रायः प्राचीन कोसल होय. कोसलाचे राजे सूर्यवशी आर्य होते. मनू, इक्ष्वाकू यांच्यापासून कोसलांची राजपरंपरा अनुस्यूतपणे आढळते.

कोसलाची पहिली राजधानी अयोध्या ही होती. सांप्रतही सरयूच्या तीरावर एक महाक्षेत्र म्हणून ती प्रसिद्ध आहे. रामायणकालात या देशाला फार महत्त्व प्राप्त झाले. रामचंद्र हा कोसलाच्या राजपरंपरेतला मुकुटमणी होय. त्याच्यानंतर लव आणि कुश या रामपुत्रानी कोसल साम्राज्याचे दोन विभाग केले. कुश हा दक्षिण कोसलाचा राजा झाला व त्याने आपली राजधानी अयोध्येहून हालवून कुशस्थली येथे नेली.

महानदीच्या खोऱ्यातला, गोदावरी व महानदी याच्यामधला पूर्वेकडील प्रदेश, अर्थात सांप्रतचा छोटा नागपूर हा दक्षिण-कोसल होय, असे एक मत आहे; तर सांप्रतचा छत्तीसगढ, अमरकटक व कांकर हा विंध्याचा तटप्रदेश म्हणजे दक्षिण-कोसल होय, असे दुसरे मत आहे. छत्तीसगढालाच पुढे महा-कोसल असे म्हणू लागले.

लव हा उत्तर कोसलाचा राजा झाला व त्याने आपली राजधानी श्रावस्ती नगरीत उभारली. ही नगरी राप्ती नदीच्या काठी असून हल्लीचे सहेत–महेत हीच प्राचीन श्रावस्ती असल्याचे सागतात. पांडवांच्या दिग्विजयात भीमाने उत्तर कोसल देश जिकल्याचा उल्लेख महाभारताच्या सभापर्वात आहे.

यानतरचा कोसलाचा इतिहास बौद्ध व जैन ग्रंथांवरून कळतो. कोसल देशातील स्त्री-पुरुषांच्या कितीतरी कथा बौद्ध वाङ्मयात आढळतात. त्यापैकी पुष्कळशा कथांचा सबध पसेनदी (प्रसेनजित्) या राजाशी आहे. त्यानंतरच्या काळात उत्तर कोसल हे दक्षिण कोसलापासून निराळे समजले जावे, म्हणून उत्तर कोसलाला श्रावस्ती असे म्हणू लागले.

प्राचीन वैदिक वाङ्मयात कोसल लोकांचा उल्लेख आढळत नाही. शतपथब्राह्मणात आर्य संस्कृतीच्या विस्ताराची हकीकत दिली आहे. तिच्यावरून असे वाटते, की कोसल लोक कुरुपांचालांच्या नंतर वैदिक आर्यांना भेटले असावे. कोसलाचा एक राजा हैरण्यनाभ याने अश्वमेध यज्ञ केल्याचा उल्लेख शतपथात आढळतो ( श. ब्रा. १३.५.४.४ ). शांखायन श्रौत-सूत्रात कोसल-विदेह असे जोडनाव येते व त्या दोन प्रदेशाची सीमारेषा म्हणून सदानीरा नदीचा उल्लेख येतो. प्रश्नोपनिषदात आश्वलायन नावाच्या एका पुरोहिताचे वर्णन येते, तो पुरोहित कोसलातलाच होता.

रामायण-महाभारताच्या कालापूर्वी कोसलाला महत्त्व प्राप्त झालेले नव्हते. कारण त्या काळी कोसल हा काशी जनपदाच्या प्रभुत्वाखाली होता. विनयनिकायात कोसलाचे वर्णन दरिद्री आणि अन्नाचा व सुखसाधनांचा अभाव असलेला देश असेच

केलेले आहे ( १.१०.२.३ ). रामायणकालात त्याला थोडे महत्त्व आले. या प्रदेशावर इक्ष्वाकुवंशाचे राज्य होते. बृहद्वल हा त्या वंशातला राजा भारतीय युद्धात कौरवांच्या बाजूने लढला होता. याच वंशात प्रसेनजित् हा राजा होऊन गेला. तो महाकोसल या राजाचा पुत्र असून बुद्धाचा समकालीन होता. हा विद्वान, कर्तबगार आणि मुत्सद्दी होता. त्याने आपले राज्य बरेच विस्तृत केले. त्याच्या राज्याची पूर्वसीमा गडकी नदी व पश्चिम सीमा गोमती नदी होती. त्याच्या राज्याची दक्षिण सीमा सई (स्यंदिका) नदीला भिडली होती व उत्तर सीमा नेपाळच्या पहाडी प्रदेशाला स्पर्श करीत होती.

काशी व कोसल या दोन राज्यांचा वारंवार सघर्ष होत असे. केव्हा केव्हा त्या दोन राज्यांची मैत्रीही होई. त्यांच्यांत विवाहसंबंधही होत. काही वेळा तर एकच राजा दोन्ही देशांवर राज्य करी. ब्रह्मदत्त हा काशीचा राजा होता. त्याने दीधिती या कोसल राजाचा पराभव केला. पुढे त्याचा पुत्र दीर्घायू याने ब्रह्मदत्ताचा विश्वास संपादन करून कोसलाचे राज्य मिळविले. त्यानंतर हीच गोष्ट उलटी घडली. मल्लिक या कोसल राजाने काशीच्या राजाचा पराभव करून ते राज्य जिंकून घेतले आणि तो काशी-कोसलाचा महाराजा झाला.

प्रसेनजित् मरण पावल्यानंतर कोसलांचे राज्य फार काळ टिकले नाही. [ उ. प्र. बौ. वि.; वे. ए.; वै. सा.; ट्रा. ए. इं.; पा. भा.; म. दे.; हि. जॉ. ए. इं. ]

**कोहलाचार्य** दट्टिल कोहनियम् या नावाच्या ग्रंथाचा एक कर्ता. हा ग्रंथ दाक्षिणात्य संगीतावरील एक पुरातन ग्रंथ आहे. त्याचा दुसरा कर्ता दट्टिल हा आहे. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**कोहली** विदर्भ-मध्यप्रदेशातील एक जात. भंडारा व चांदा जिल्ह्यांत यांची बरीच वस्ती आहे. चांद्याच्या गोंड राजाने आपल्याला काशीहून इकडे आणले, असे हे सांगतात. वैनगंगेच्या खोऱ्यात यांनी मोठी तळी बांधली आहेत. त्यामुळे इथल्या शेतीला पाण्याचा पुरवठा होतो. हे लोक शेती व विशेषतः उसाची लागवड करतात.

यांची काही कुळे व पोटजाती असून त्यांची नावे स्थळांवरून पडली आहेत.

**विवाहप्रथा** – यांच्यांत भावाची मुलगी बहिणीच्या मुलाने केलेली चालते; पण उलट संबंध मात्र करता येत नाही. वराने वधूच्या गळ्यात मंगळसूत्र बांधणे व वधू-वरांनी एकमेकांच्या गळ्यात पुष्पहार घालणे, एवढाच यांचा लग्नविधी असतो. ब्राह्मण नसल्यास त्यांच्या जातीतील वृद्ध पुरुष त्याचे काम करतो. शेतीच्या कामासाठी कोहलींना मनुष्यबळाची गरज असते, म्हणून ते अनेक बायका करतात. यांच्यांत विधवेचे लग्न मध्यरात्री लावतात. काही वेळा विधवेचा नियोजित वर लग्नाच्या वेळी स्वतः हजर नसेल तेव्हा एक तलवार किंवा कट्यार पुढे ठेवतात व त्या तलवारीशी विधवेचे लग्न होते. काही वेळा पाच विधवा तिला नियोजित वराच्या गावी नेतात. कोहली लोकांना नेहमी घराबाहेर राहावे लागत असल्यामुळे आपल्या बायकांच्या हातून एखाद्या वेळी अनैतिक वर्तन घडल्यास त्याकडे ते काणाडोळा करतात.

कोहली पुरुषांना लग्नाखेरीज इतर स्त्रिया रखेल्या म्हणून ठेवता येतात. माहेराहून मिळालेल्या स्त्रीधनावर कोहली स्त्रीचीच मालकी असते.

हे लोक चागले मालगुजार आहेत. हे मांस खातात; पण मद्य पीत नाहीत.

हे मृतांना पुरतात किंवा जाळतात. [ म. ज्ञा. को. ]

**कोहळा** वेलीला येणारे एक मोठे फळ. तांत्रिक विधीत बलियोग्य वस्तू म्हणून कोहळ्याचा विनियोग करतात. **पाहा** – कूष्मांड.

**कोळी** एक जात. मध्यप्रदेश, द. महाराष्ट्र, गुजरात व कोकण या ठिकाणी या लोकांची वस्ती आहे. पश्चिम सातपुड्याच्या डोंगराळ प्रदेशात राहणाऱ्या कोळ्यांना नाईक म्हणतात. प्राचीन काळी हे लोक सातपुडा पर्वताच्या खिंडीत व अजंटा डोंगरावर पहारा करीत आणि लुटारू लोकांपासून गावाचे संरक्षण करीत. या कामाबद्दल त्यांना जमिनी नेमून दिलेल्या होत्या.

मध्यप्रदेशात यांच्या पाच पोटजाती आहेत, त्या अशा – सूरजवंशी (राजपूत), मल्हार किंवा पानभरी, भिलवफाडे, सिंगाडे व मुसलमान कोळी. यांपैकी मल्हार हे मल्हारी देवाला भजतात. हे पाणी भरण्याचा व्यवसाय करतात, म्हणून त्याना पानभरी हे नाव मिळाले आहे. भिल्व (बिल्व) फळापासून तेल काढणाऱ्यांना भिलवफाडे असे म्हणतात. म्हशी मेल्यावर त्यांची शिंगे गाडणारे कोळी सिंगाडे म्हणून ओळखले जातात.

निमाडमधील कोळी भवानी देवीला पुजतात. प्रत्येक घरी तिची मूर्ती असते.

हे लोक मृतांना पुरतात व दहा दिवस सुतक पाळतात. तिसऱ्या दिवशी प्रेताला खांदा देणाऱ्यांचे खांदे तूप चोळून शुद्ध करतात. अकराव्या दिवशी जातीच्या लोकांना जेवण घालतात.

महाराष्ट्रात कोळ्यांचे साधे कोळी व डोंगरी कोळी असे प्रमुख दोन भेद असून, सोनकोळी, महादेवकोळी वगैरे पोटभेद आहेत. डोंगरी कोळी हे पूर्वीच्या कोल लोकांचे वंशज आहेत.


कोळी

कोळी हे बारा बलुतेदारांपैकी एक हक्कदार आहेत. कोळी लोक उच्चवर्णीयांकडे पाणी भरतात व मासे पकडून उदरनिर्वाह करतात. काही लोक नदीवर होड्यांतूनच वस्ती करतात; तर काही नदीकाठी झोपड्यांत राहतात. डोंगरी कोळी सह्याद्रीतील मावळ व कोकण या भागात राहतात. हे जंगलातील कंदमुळे व शिकार यावर उपजीविका करतात. जे लोक शेती करतात, ते आता इतर शेतकरी जातींत मिसळून गेले आहेत. जे कोळी शेती करतात, त्यांना आगरी कोळी व जे मळे लावतात, त्याना माळी कोळी म्हणतात.

महाराष्ट्रातील कोळ्यांत मराठा लोकांप्रमाणे कदम, पोवार, क्षीरसागर, दळवी, गायकवाड, जाधव, इ. आडनावे आहेत. मराठा व कोळी या लोकांत पूर्वी विवाहसंबंध होत असत, असे सांगतात.

कोकणात समुद्रकिनारी राहणाऱ्या कोळ्यांना समुद्र कोळी किंवा सोनकोळी असे नाव आहे. सोनकोळी या नावाबद्दल शिवनिबंध नामक ग्रंथांत पुढील कथा आहे –

परमेश्वराच्या सोहम् या ध्वनीपासून एक पुरुष निर्माण झाला. त्याला सोहं, सोम किंवा मयात अशी नावे मिळाली. त्याची अचिंता नामक मुलगी कश्यपाला दिली होती. तिला मार्धन म्हणून मुलगा झाला. यालाही सोम हे नाव मिळाले. हा तपश्चर्या सोडून हिंसेकडे वळला; म्हणून मयात ऋषीने त्याला मासे मारून निर्वाह करायला सांगितले. त्याप्रमाणे तो करू लागल्यावर त्याला व त्याच्या वंशजांना सोन किंवा सोनकोळी हे नाव मिळाले.

यांची वस्ती प्रथम कुलाबा जिल्ह्यात होती. तिथून ते ठाणे


कोळीण

व रत्नागिरी जिल्ह्यात गेले. कोकणात आंग्ऱ्यांचे प्राबल्य असतांना त्यांनी सोनकोळी स्त्रियांवर जोबनपट्टी किंवा चोळीपट्टी

बसविली होती. बायकांनी अंगात चोळचा न घालता अंगावरून पदर घ्यावा व ज्यांना चोळचा घालायच्या असतील, त्यांनी काही ठराविक कर आंग्रे सरकारात भरावा, असा या कराचा प्रकार होता. पण हा नियम जाचक झाल्याने कुलाबा जिल्हातील थळ वगैरे गावातील लोकांनी मुंबई ठाणे, वेसावे या बाजूला स्थलांतर केले. हे लोक आपल्याला थळकर सोनकोळी म्हणवितात. जेजुरीचा खडोबा व कार्ल्याच्या लेण्यातील एकवीरा देवी ही यांची कुलदैवते आहेत.

सोनकोळी जातीत पंचायतीसंघ आहेत. प्रत्येक गावात एक किंवा अनेक तट, थळे किंवा जमाती असतात. त्या प्रत्येकाला गाव पंचायत म्हणतात. यात खाजगी निवाडे होतात. अनेक गावांचा एक सघ होतो. संघाच्या पंचायतीत सार्वजनिक निवाडे होतात. प्रत्येक पचायतीकडे थोडी स्थावर मालमत्ता व रोकड रक्कम असते. पचायतीच्या खर्चासाठी प्रत्येक घरातून दरवर्षी काही रक्कम वसूल करतात.

या लोकांचा प्रमुख व्यवसाय म्हणजे मासे पकडणे व ते विकणे, हा होय. याशिवाय शेती करणे, जाळी विणणे, व्यापार करणे, इ. व्यवसायही ते करतात. मच्छीमार सोनकोळी महिन्यातील वीस दिवस समुद्रावर असतात. त्यामुळे त्यांच्या बायकाच सारा घरसंसार पाहतात.

मूल जन्माला आल्यावर पाचव्या दिवशी त्याची पाचवी करतात. मुलगा असल्यास पाचवीला खूप खर्च करतात. मुलामुलीचे विवाह ती वयात येण्यापूर्वी करतात. लग्नप्रसंगी धवळारी स्त्री गाणी म्हणते. लग्नात हे खूप खर्च करतात.



धवळारी स्त्री

मुंबई शहरात वस्ती करून राहिलेल्या कोळी जातीचे उल्लेख हजार वर्षापूर्वीच्या वाङ्मयातही सापडतात. इतिहासाचार्य राजवाडे यांनी प्रसिद्ध केलेल्या महिकावतीच्या बखरीत मुंबई बेटावर कोळी लोक राहत असल्याचे उल्लेख आढळतात.

महाराष्ट्रातील बहुतेक कोळी मराठी भाषा बोलतात. सोनकोळचाशिवाय याच्या इतर उपजाती पुढीलप्रमाणे आहेत—

मराठवाड्यात व सह्याद्रीच्या पूर्वेकडील भागात मराठे कोळी यांची वस्ती आहे. शेती करणे, पाणी भरणे व नावा हाकणे, हे यांचे धदे आहेत. विदर्भातील पूर्णा नदीकाठचा प्रदेश व खानदेश या भागात मराठे खार कोळी यांची वस्ती आहे. यांच्यात बरेचसे वतनदार लोक होते. इग्रजी अमदानीपूर्वी हे लोक मीठ पिकवीत असत. त्यावरूनच त्यांना खार हे नाव मिळाले असावे.

मालुतारण नामक ग्रंथात सांगितले आहे, की शालिवाहन राजाच्या एका कोळी सरदाराने पढरपूर हे गाव वसविले. या सरदाराचे वशज अद्यापही पंढरपूरच्या पुंडलीक व मल्लिकार्जुन या देवांची पूजा करतात व तिथले उत्पन्न घेतात.

नाशिक जिल्ह्यात मल्हार, ढोर व राज अशा कोळचाच्या तीन जाती आहेत. हे लोक बहुतेक शेती करतात. हे स्वभावतःच चपळ व धाडसी असल्याने एके काळी यांची चोऱ्या करण्याकडे प्रवृत्ती होती. इ. स. १८४५ साली राघोजी भांगऱ्या याने नाशिक जिल्ह्यात सर्वत्र लुटालूट करून बराच धुमाकूळ घातला होता. मल्हारी हे सर्व कोळचात उच्च व निर्मळ समजले जातात. गावकऱ्यांना व प्रवाशांना हे पाणी पुरवितात म्हणून यांना पानभरी म्हणतात. डोक्यावर चुंबळ घेतात म्हणून चुंबळी व कुणब्यांशी क्वचित रोटीव्यवहार करतात म्हणून कुनम अशी यांची दुसरी नावे आहेत.

ठाणे जिल्ह्यात मुख्यतः महादेव कोळचांची वस्ती आहे. यातील जव्हार संस्थान हे महादेव कोळचांच्या मालकीचे होते. महादेव व बालाघाट या सह्याद्रीच्या श्रेणी हे त्याचे मूळ स्थान असावे. पापेरा नावाचा त्यांचा एक नाईक एका सिद्धाच्या आज्ञेने जव्हार गावी आला आणि तिथल्या वारली राजावर स्वामित्व मिळवून तो त्या प्रदेशाचा अधिपती बनला. त्यानतर त्याने तिथला गंभीरगड ताब्यात घेतला व मोगलांकडून या भागातील बाव्वीस किल्ले व त्यालगतचा प्रांत जहागीर म्हणून मिळविला, अशी एक दंतकथा आहे. या जातीची एकूण चौव्वीस घराणी असून, त्यांच्या दोनशेहून जास्त शाखा आहेत. यांच्या स्त्रिया सुरेख असतात. यांचा मुख्य धंदा शेतीचा व शिपाईगिरीचा आहे. हे लोक खंडोबा, भैरोबा व भवानी यांचे उपासक आहेत. बायकोने नवऱ्याला सोडून परजातीत प्रवेश केल्यास तिची उत्तरक्रिया करून नवरा दुसरे लग्न करतो. हे लोक रोगाने किंवा आकस्मिकपणे मेलेल्याला जाळतात; इतराना पुरतात.

याशिवाय ठाणे जिल्ह्यात मेटा, ठाणकर, इ. कोळचांच्या

पोटजाती आहेत. हे कोळी मराठी राज्यात नावाजलेले दर्यावर्दी असून, मराठ्यांच्या आरमारात नोकरीला होते. यांच्यांत देवके



कोळीण–मासे निवडताना

असून, लग्ने ठरवताना त्यांचा विचार केला जातो. एका देवकात लग्नसबंध होत नाही.

गुजरातेत कोळ्यांच्या अनेक जाती व पोटजाती आहेत. उच्च वर्गातील कोळी आपल्या मुली राजपुताकडे देतात. खांत, वारिया, पटेलिया, पाटणवाडिया, धाराळ, इ. यांच्या पोटजातीची नावे असून, त्यांच्यांत परस्पर विवाहसंबंध होत नाही.

कच्छ ते दमण या समुद्रकिनाऱ्यावरील कोळ्यांना मच्छी असे नाव आहे. पूल बांधण्याच्या कामी हे विशेष उपयुक्त असतात. गुजरातेत चुंव्वाळिया म्हणून कोळ्यांची एक जात आहे. ती मूळची चाळीस खेड्यांच्या एका प्रदेशातील रहिवासी असल्याने तिला चुंव्वाळिया



कोळी–जाळे उचलताना

हे नाव मिळाले. पेशवाईच्या काळात हे लोक लुटारू म्हणून प्रसिद्ध होते. यांच्या पुढाऱ्याला ठाकोरदास म्हणत. हे आपल्या वस्तीभोवती निवडुंगाचे दाट कुंपण घालीत व क्वचित तटबंदीही करीत. सौराष्ट्रातील खाट या पोटजातीचे लोक सर्वसाधारणपणे दऱ्याखोऱ्यात राहतात. क्षत्रिय पुरुष व भिल्ल स्त्री याच्यापासून हे आपली उत्पत्ती मानतात. यांचा एक पुढारी धाधलखाट याने धधुकाप्रांत जिकून धांदलपूर वसविले व दुसरा एक पुढारी पाटलखाट याने पेटलाद प्रांत जिकला, असे सागतात. महमद तघलखाच्या वेळी याच्या जेस किंवा जर्यासिग या नायकाने मुसलमानाना जुनागड घेण्याच्या कामी मदत केली व त्याबद्दल त्याला गिरनार पर्वतावरील प्रदेश व विलख चोवीसी म्हणून चौव्वीस खेडी मिळाली. महंमूद बेगड्याने गुजरात घेईपर्यंत हे लोक गिरनार पर्वताच्या आसपास राहत होते. पाटणवाडिया जातीचे कोळी मराठेशाहीत सैन्यात होते. त्यापूर्वी ते लुटालूट करीत असत. १८ व्या शतकाच्या आरंभी हे लोक दर्यावर्दीपणा करीत इराणच्या किनाऱ्यापर्यंत जात.

तलवदा नावाची कोळ्यांची दुसरी एक जात या भागात आहे. हे जमिनदार आहेत. याना धाराळ म्हणजे खड्गधारी असेही म्हणतात. हे आपल्याला धारच्या परमार राजपुतांचे वंशज म्हणवितात. दोही नावाच्या फळांवर हे उपजीविका करतात, म्हणून यांना दोही असेही नाव मिळाले आहे. यांच्यांत कुलीन व अकुलीन असे दोन भेद आहेत हे आपल्याला सर्व कोळ्यात श्रेष्ठ मानतात व इतर कोळ्याशी रोटीबेटी व्यवहार करीत नाहीत. यांच्या चूडासमा, जादव, सर्वाय, इ. बाव्वीस पोटजाती आहेत.

गुजरातेतील बहुतेक सर्व कोळी अशुद्ध गुजराती बोलतात. सर्वसाधारणपणे, पुरुष गळ्यात ताईत घालतात व बायका हस्तिदंती बांगड्या, सोन्याची नथ, चादीच्या वेळा, इ. दागिने घालतात. बहुतेक सर्व कोळ्यांना मद्यमांस चालते. हे लोक इंद्र, हातमल, हिंगलाजदेवी, खोडिआर, कुकुडी वेराई, मेराडी, इ. देवतांना भजतात. एकादशी व त्रयोदशी हे यांचे सुट्टीचे दिवस असतात. सौराष्ट्रातील कोळी मोहोतीमार्गी असून, ते द्वारका, प्रभासपाटण वगैरे ठिकाणी यात्रेला जातात. हे ब्राह्मणांना पूज्य मानतात व त्यांच्याकडून राखी पौर्णिमेला राखी बांधून घेतात. यांचे पौरोहित्य श्रीमाळी व औदिच्य ब्राह्मण करतात. यांचा भुताखेतांवर, जादुटोण्यांवर व पंचाक्षऱ्यांवर विश्वास असतो. मूल जन्मल्याबरोबर त्याला थोडा गूळ चाखवतात व नंतर सर्वांना वाटतात. सहाव्या दिवशी सटवीबरोबर ब्रह्मदेवाचीही पूजा करतात व त्याच दिवशी मुलाचे नाव ठेवतात.

गुजरातेतील कोळ्यांत वराने लग्नमंडपात प्रवेश करण्यापूर्वी वधूची आई वरावरून नागर, रवी, बाण, इ. जिन्नस

ओवाळून टाकते. लग्नाच्या वेळी नवरीच्या एका हातात बाण व दुसऱ्या हातात माळ असते. ठाकूर कोळ्यांत मुलीचे लग्न प्रथम तलवारीशी लावतात. विधवेला विधुराशी लग्न करता येते. त्याला नात्र असे नाव आहे. नात्र समारंभ साधा असतो. तो विधवेच्या बापाच्या घरी होतो. वधू-वर समोरासमोर बसतात व ब्राह्मण उपाध्याय त्यांचे हात नात्राने (तांबड्या दोऱ्याने) बांधून त्यांना मध्ये ठेवलेल्या मडक्यातील दिव्याकडे पाहायला सांगतो. एवढ्यानेच हा समारंभ आटपतो.

गुजरातमधील कोळी प्रेते जाळतात. मृताचा पुत्र लहान अगर दरिद्री असल्यास तो दहाव्या, अकराव्या व बाराव्या दिवशी श्राद्धादी विधी न करता घराबाहेर येऊन नुसते हात चोळतो. एक वर्ष होईपर्यंत मृताच्या घरातील वडील स्त्री तोंडावर ओढणी घेऊन रोज सकाळी थोडा वेळ रडते.

सर्वसाधारणपणे कोळी समाजात जुन्या पद्धतीने लग्ने होतात. कामसू मुलीला चांगल्या घराण्यातील मुलाकडून मागणी येते. देज वगैरे ठरले, की घटित पाहून मुहूर्त ठरवितात. मग साखरपुड्याचा मोठा समारंभ होतो. या वेळी मुलीला सजवून तिची ओटी भरतात व बायका पुढील गाणे म्हणतात–

**गोरान गोरु गो साखर गोरु कारा**
**गाईयांची दूध**
**त्या दुधी वारविली सुनंदाबाई नऊरी**
**खेळत होती**
**तलीयाच्या पाली खेळता खेळता**
**आईनी पाहिली**
**लेक माजी वरा जोगी झाली ।**

जुन्या पद्धतीचे लग्न तीन दिवस चालते. पहिल्या दिवशी देवी बसवितात, वधूला हळद लावून आंघोळ घालतात व देवदर्शन करवितात. दुसऱ्या दिवशी संध्याकाळी चौकाचा विधी करतात. वधूला हळद लावतात व आखलेल्या चौदा चौकांतून फिरवितात. प्रत्येक चौकात तिला उभी करून गाणे म्हणतात. या गीतात तिच्या अवयवांचे सौंदर्य वर्णन केलेले असते. तिसऱ्या दिवशी लग्नविधी होतो.

हल्ली या जातीचे लोक शिक्षण घेऊ लागले असून सरकारी नोकऱ्यातही शिरले आहेत. [ ट्रा. का. सें. प्रॉ. इं.; म. ज्ञा. को.; सह्याद्री; म. लो. सा. पु. ३ रे; गिरिजा जोशी–नवशक्ती ]

## कोळीनृत्य

हे नृत्य कोकणातील कोळी करतात. नाचणारे दोन रांगा करतात. नाखवा आणि कोळीण ही दोघे मध्यभागी उभी राहतात. कोळीण डावा हात कमरेवर घेऊन उजव्या हाताने रुमाल हालवते व लयबद्ध पावले टाकते. नाखव्याच्या एका हातात दारूची बाटली व दुसऱ्या हातात पेला असतो. तो मद्य पिऊन झिंगल्याचा अभिनय करतो व दोन्ही रांगांतले नर्तक हातात वल्ही घेऊन होडी वल्हविण्याचा अभिनय करतात. नृत्य करताना ते पुढील गाणे म्हणतात–

**आयानं बायानं जाते मुलखाला**
**सासऱ्याच्या गावाला निघोनि गो**
**माझ्या सासरसुन कागद ऐलाय**
**धन्यानं माझ्यायला बोलायली गो ।**

या नृत्याला विलक्षण जोष असतो. [ फो. डा. म. ]

## कौंडिण्यपूर

विदर्भातल्या अमरावती जिल्ह्यात वर्धा नदीच्या काठी हे क्षेत्र आहे. रुक्मिणी व दमयंती या दोघींचे हे माहेर होय. इथेच त्या दोघींचे स्वयंवर झाले. वर्धा नदी या गावाजवळूनच वाहते. तिच्या पात्रात एक लहानसे कुंड आहे. त्याला पुंडलीक कुंड म्हणतात. तीरावरच विठ्ठलाचे भव्य व सुंदर देवालय आहे. त्याच्या गाभाऱ्यात श्रीसदाराम महाराज, बैरागी महाराज, इ. संतांच्या समाध्या आहेत.

या नगरीला तीर्थस्वरूप दिले ते सदाराम महाराजांनी. हे क्षेत्र वसविण्याचा आदेश साक्षात पांडुरंगाने त्यांना दिला व त्याबरोबरच आपली एक धातुमूर्तीही दिली. सदाराम महाराजांनी त्याच मूर्तीची इथे स्थापना केली व तिचे मंदिर बांधले. त्यांच्या या कृत्याने एक नवे विठ्ठलक्षेत्र निर्माण झाले व कौंडिण्यपुराला विदर्भाची पंढरी म्हणायचा प्रघात पडला.


गिरिजामंदिर – कौंडिण्यपूर

विठ्ठलमंदिराजवळच चौरंगीनाथाची समाधी आहे. जवळच दत्त, महादेव व लक्ष्मीनारायण यांची मंदिरे आहेत. तिथे एक जैन मंदिरही आहे. ज्येष्ठ शु. १ देस इथून रुक्मिणीची पालखी निघते व ती आषाढी ११ शीस पढरपूरला जाते. तिथून परत निघून गोकुळाष्टमीस कौंडिण्यपुराला माघारी येते.

इथे गावाच्या बाहेर गिरिजेचे मंदिर आहे. लग्नाच्या

आदल्या दिवशी रुक्मिणी ज्या देवीच्या दर्शनाला गेली होती, ती देवी हीच होय. इथे जवळच भीमकाच्या उद्यानाची जागा दाखवितात. कुंडिनपुर या प्राचीन राजधानीच्या काही खुणाही तिथे दिसतात.

महाराष्ट्र सरकारच्या उत्खनन विभागातर्फे इथे नुकतेच उत्खनन झाले. त्या उत्खननात महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासावर प्रकाश टाकणारा बराच पुरावा उपलब्ध झाला आहे. हे नगर प्राचीन असल्याचे त्या उत्खननावरूनच सिद्ध झाले आहे. [ विदर्भ पंढरी–कौडिण्यपुर ]

**कौंडिन्य** एक वृत्तिकार आचार्य. हिरण्यकेशी शाखेच्या पितृतर्पणात याचे नाव आहे. बृहदारण्यकात याला शांडिल्याचा शिष्य म्हटले आहे. [ म. ज्ञा. को.; प्रा. च. को. ]

**कौंधनी** (सं. कायबन्धनी) कमरेत घालायचा एक दागिना. हा सोन्याचा किंवा चांदीचाही असतो. याला तगडी किंवा पेटी असेही म्हणतात. छोटया छोटया कडया जोडून लडया तयार करतात व पाच किंवा सात लडया एकत्र



कौंधनी

करून हा अलंकार बनवितात. मधेमधे मासोळी किंवा पर्णाकृती यांनी या लडया जोडल्या जातात. मधेमधे या अलंकाराला गुच्छही लटकावतात. बेंबीजवळ या दागिन्याला जो एक रुंद आणि भारी पत्ता लावतात, त्याला थप्पा म्हणतात. मुले व स्त्री-पुरुष हा अलंकार घालतात. [ कृ. जी. ब्र. श. ]

**कौटिल्य** (सनपूर्व ४ थे शतक). याचे मूळ नाव विष्णुगुप्त असे होते. हा निःस्पृह आणि बुद्धिमान असा राजकारणी पुरुष होता. याला चाणक्य असेही म्हणतात. याचा अर्थशास्त्रावरील ग्रंथ कौटिलीय अर्थशास्त्र या नावाने प्रसिद्ध आहे. **पाहा** – अर्थशास्त्र; चाणक्य.

**कौडा छपाकी** पंजाबातील एक गंमतीदार खेळ. यात सर्व खेळाडू एक वर्तुळ करून, आतील बाजूस तोंड करून बसतात. एक मुलगा हातात कवडी घेऊन वर्तुळाच्या बाहेरून वेगाने फेरी मारतो. पळता पळता तो हातातील कवडी एखाद्या मुलाच्या पाठीमागे ठेवतो. तिथून त्याची फेरी पूर्ण व्हायच्या आत जर त्या मुलाला ही गोष्ट समजली, तर तो कवडी घेऊन पहिल्या मुलाच्या पाठीमागे धावू लागतो आणि तो मोकळ्या झालेल्या जागेवर बसेपर्यंत त्याला मारीत राहतो. कवडी मागे ठेवली आहे हे बसलेल्या मुलाच्या ध्यानात आले नाही, तर धावणारा मुलगा फेरी पुरी झाल्यानंतर त्याला मारीत सुटतो; त्याची फेरी पुरी होऊन तो पुन्हा आपल्या जागेवर बसेपर्यंत मारणे चालू राहते. [ पं. जी. मा ]

**कौतुक** दूर्वा, बाजरीचा कोंब, वालक, आंब्याची पाने, दोन प्रकारची हळद, मोहरी, मोराचे पीस व सापाची कात या नऊ वस्तूंना कौतुके म्हणतात. विवाहसमयी ही कौतुके कंकणांना बांधतात ( हे. व्र. १.४९ ). याला विवाहकौतुक असेही नाव आहे (रघु. ८.१). [ हि. ध. ]

**कौतुकबंध** विवाहादी शुभकार्यात कौतुकबंध हा विधी करतात. त्याचा प्रयोग असा–

प्रथम स्थंडिल करतात. त्यावर भाताची रास घालतात. तिच्यावर जलपूर्ण कुंभ ठेवतात. त्या कुंभावर अक्षतायुक्त कांस्यपात्र ठेवतात. त्यात कापसाचे पाच पदरी सूत ठेवतात. या सुताचेच नाव कौतुक होय. मग यजमानाला त्या कुंभातल्या मंत्राने अभिषेक करतात. अभिषेकाच्या वेळी 'अग्निमीळे', 'आपो हि ष्ठा', 'स्वादिष्ठया', 'रात्रीव्यख्य', 'विष्णोर्नुकम्', 'अतोदेवा' इ. सूक्ते म्हणतात. नंतर कौतुकसूत्रालाही अभिषेक करतात. मग ते पुरुषाच्या उजव्या व स्त्रीच्या डाव्या हातात बांधतात. मग यजमानाला ब्राह्मण आशीर्वाद देतात. [ प्रयोगरत्न ]

**कौतुकसूत्र** विवाहात पिवळ्या सुतात हळकुंड व लोकर बांधून ते दोरीसारखे वळतात व वधू-वर ते एकमेकांच्या हातांत बांधतात. याला लग्नकंकण असेही म्हणतात.

**कौथुमी** एक वैदिक ऋषी. हा सामवेदाच्या एका प्रचलित शाखेचा प्रवर्तक होता. हा गोत्रकार आहे. याची अधिक माहिती मिळत नाही. [ तर्पण ]

**कौथुमी शाखा** सामवेदाची एक शाखा. या शाखेचे अध्ययन करणारे ब्राह्मण गुजरातमध्ये आहेत

सामवेदाच्या उपलब्ध असलेल्या इतर शाखांपेक्षा या शाखेनुसार साम म्हणण्याची पद्धती भिन्न आहे. **पाहा**– सामवेद.

**कौपुई** मणिपूर प्रदेशातील एक जात. हे लोक मणिपूर भोवतालच्या टेकड्यांवर लहान लहान खेडी वसवून राहतात. त्यांची ही खेडी कायमची असतात व ते ती सोडून जाण्यास नाखूष असतात. यांच्या घरांची बांधणी मजबूत असते. घराच्या पुढील बाजूपेक्षा मागील बाजूचे केंबळी छप्पर फारच खाली येते व ते जमिनीला भिडते.

हे लोक धान्याची कोठारे गावाबाहेर स्वतंत्र जागी बांधतात व त्यात धान्याबरोबरच इतर अनेक मौल्यवान वस्तूही ठेवतात. सर्व लोक अत्यंत विश्वासू असल्याने या कोठारांची राखण केली नाही तरी चालते. ऐन दुष्काळातसुद्धा कुणी कुणाचे धान्य चोरीत नाही. हे आपली शेती झूम पद्धतीने करतात.

**सण-उत्सव**— कौपुई लोक वर्षातून अनेक सण साजरे करतात. पौष महिन्यात त्यांचा रेइंगनाई हा सण येतो. तो तीन दिवस चालतो. या सणात स्त्री-पुरुष स्वतंत्रपणे पाणी आणून मांस शिजवितात. पुरुषमंडळी डुकरे मारून त्यांचा एक भाग स्वतःसाठी ठेवतात व एक भाग बायकांना देतात. केळीपासून बनविलेली एक मानवप्रतिमा एका झाडावर टांगतात. त्या प्रतिमेवर ते अणकुचीदार टोकाचे बांबू किंवा काठ्या फेकतात. याच सणात मग पूर्वजांच्या थडग्यांवर दारू शिंपडतात. आगामी वर्षासाठी शेतजमीन व सामान्य कल्याणासाठी शकुनप्रश्न पाहतात.

पुढच्याच म्हणजे माघ महिन्यात तीन दिवसांचा आणखी एक सण येतो. यात वर्षाच्या मुलांचे म्हणजे शेवटच्या सणानंतर जन्मलेल्या मुलांचे कान टोचण्यात येतात. या सणानतरच नवीन शेतीसाठी जंगल तोडतात.

ते काम आटोपले, की मग त्यांचा उदोययुंग नावाचा सण येतो. यात ते आल्याचा रस पितात. आषाढात गावातील रस्ते साफ करतात. या प्रत्येक सणात नृत्य-गायन होते व त्याला ढोलक्यांची साथ असते.

या लोकांना धूम्रपानाचे फार व्यसन आहे. त्यांच्या तोंडांत सतत चिलीम असते.

तरुण मुले-मुली स्वतंत्र सामुहिक शेजघरात झोपत असली, तरी त्यांच्या वरचेवर भेटी होतात. या बाबतीत त्याचे छोटा नागपूरमधील उराँवांशी साम्य दिसते.

या लोकामध्ये एक विलक्षण चाल आहे, ती अशी—एखाद्या मनुष्याची बायको मरण पावली, तर तिचा बाप किंवा जवळचा नातेवाईक तिच्या नवऱ्याकडे तिच्या हाडांची किंमत मागतो, याला मुंडू म्हणतात. पण ज्या वेळी एखादी स्त्री शत्रूकडून अगर जंगली श्वापदाकडून मारली जाते, तेव्हा मात्र ही मागणी केली जात नाही. कौपुई लोक विशिष्ट प्रसगी आपले गाव अथवा एखादे घर दुसऱ्या लोकांना वर्ज्य ठेवतात. त्याला ते नेइना म्हणतात. [ डाल्टन– इं. स्ट. पा. प्रे. १९६० ]

**कौमार** (१) एक वर्ष. हव्याचा पुत्र कुमार याच्या नावावरून या वर्षाला हे नाव पडले आहे. इथे कुमारीतीर्थ आहे. त्या तीर्थाचे संरक्षण नाग करतात. हे वर्ष रैवत पर्वताच्या समोवती आहे. [ पु. इं ]

(२) विष्णूचा एक अवतार (भाग. पु. १.३.६).

**कौमारसप्तमी** एक जैनव्रत. भाद्र० शु. ७ मीस खजरीमंडपात जिनपूजा करणे, असे याचे विधान आहे. [ जै. व्र. वि. सं. ]

**कौमारी** सप्तमातृकापैकी एक. ही कार्तिकेयाची शक्ती असून, तिने दैत्यांशी संग्राम केला होता, असे देवीमाहात्म्यात सांगितले आहे. हिचे वर्णन मार्कंडेय पुराणातल्या



कौमारी – जगन्नाथपुरी

देवीमाहात्म्यात (८१.१६३) पुढीलप्रमाणे केले आहे—

**कौमारी शक्तिहस्ता च मयूरवरवाहना ।**

अर्थ– कौमारीच्या हातात शक्ती हे आयुध आहे आणि तिचे वाहन मोर हे आहे.

ती रक्तवस्त्रे नेसते व शक्तीबरोबरच शूलही धारण करते, असे मत्स्य पुराणात सांगितले आहे (१७९.९ व २२). **पाहा**– मातृका.

**कौमुदीमहोत्सव** आश्विन पौर्णिमेस होणारा प्राचीन लोकोत्सव. वात्स्यायनाने याला कौमुदीजागर व वामन पुराणाने याला दीपदानजागर म्हटले आहे. बौद्धकालात हा उत्सव कशा प्रकारे साजरा होत असे, त्याचे वर्णन उन्मादयंन्तीजातकावरून कळते.

या दिवशी साऱ्या नगरात उत्साहाचे वातावरण पसरे. लोक गावातले रस्ते स्वच्छ करीत. घरावर ध्वज लावीत. घरेदारे पुष्पमालानी शृगारीत. रात्रौ दीपाराधना करीत. स्त्रीपुरुष रात्रीच्या वेळी वस्त्राभूषणांनी नटून शहरात हिंडत. जागोजाग नृत्यगीताच्या मैफली चालत. लोक रात्रभर जागरण करीत व जुगारही खेळत. या दिवशी बलिराजाची पूजा करावी, असे वामन पुराणात सागितले आहे.

**कौमुदीव्रत** एक विष्णुव्रत. आश्विन शु. १२ शीस व्रताचा प्रारंभ. त्या दिवशी कमळांनी विष्णुपूजा, १३ शीस वैष्णवक्षेत्राची यात्रा, १४ शीस उपवास व जागरण, पौर्णिमेला विष्णुपूजा व ॐ नमो नारायणाय, ॐ नमो वासुदेवाय, या मंत्राचा जप, असा या व्रताचा विधी आहे. फल– वैकुंठप्राप्ती. [ हि. ध. ]

**कौमोदकी** विष्णूच्या हातातील गदेचे नाव. हिच्या संबंधीची कथा पुढीलप्रमाणे–

पूर्वी लवणासुर नावाचा एक दैत्य होता. त्याला श्रीविष्णूने मारले. त्या वेळी लवणासुराची पत्नी गर्भवती होती. पुढे तिला पुत्र झाला. त्याचे नाव गद असे ठेवले गेले. मोठा झाल्यावर त्याने आईकडे आपल्या बापाची चौकशी केली. आईने घडला वृत्तांत त्याला सांगितला. मग गदाने विष्णूचा सूड घेण्याचा निश्चय केला. त्यासाठी त्याने तप करून शिवाला प्रसन्न करून घेतले. शिवाकडे त्याने वर मागितला, तो असा–

ज्याने माझ्या पित्याचा प्राण घेतला त्या विष्णूचा माझ्याकडून पराभव व्हावा व त्रिभुवनभाराचे शस्त्र जो आपल्या हाती वागवील, त्याच्याकडून माझा नाश व्हावा.

शिवाने ‘ तथास्तु ’ म्हटले. मग गद विष्णूचा शोध करीत त्याच्यावर चालून गेला. गदासुराचे व विष्णूचे युद्ध जुंपले. त्या वेळी विष्णू त्याच्यावर सुदर्शन चक्र फेकू लागला. तेव्हा ब्रह्मदेवाने येऊन विष्णूला सागितले. ‘ हे देवाधिदेवा, हे चक्र गदासुरावर सोडू नकोस. त्रिभुवनभाराच्या शस्त्रावाचून दुसऱ्या कशानेही गदासुराचा नाश होणार नाही. ’

विष्णूने मग एक युक्ती केली. त्याने एक कमळ (कुमुद) तोडून घेतले व त्या कमळात त्रिभुवनातली शक्ती एकत्र केली. मग ते कमळ गदासुरावर फेकताच गदासुराचा नाश झाला. त्या दिवसापासून विष्णू ते आयुध अक्षय आपल्या हातात बाळगू लागला. कुमुद म्हणजे रात्री फुलणारे कमळ. त्याची ती गदा बनली, म्हणून लोक तिला कौमोदकी म्हणू लागले. त्या गदेमुळे विष्णूलाही गदाधर असे नाव पडले. [ कृ. क. त. ]

**कौर** एक जमात. हे लोक छोटा नागपूर, ओडिसा व छत्तीसगढ या प्रदेशात राहतात. यांना कौरव असेही म्हणतात. हे लोक स्वत.ला कौरवांचे वंशज म्हणवितात. भारतीय युद्धात पांडवांनी कौरवांना मारल्यानंतर त्या रणांगणात जे जिवंत राहिले, त्यांनी तिथून पळ काढला व मध्य प्रदेशात येऊन तिथल्या पहाडी प्रदेशाचा आश्रय घेतला, असे हे लोक सांगतात. यांच्यांत पुढील पोटविभाग आहेत–

**दूधकौरव–** हे सनातनी वृत्तीचे असून याचे पुरोहित ब्राह्मण असतात.

**पैकर–** याना दूधकौरवांपेक्षा खालच्या दर्जाचे मानतात.

**रट्टिया कौरव–** हे लोक उदेपूर विभागात आहेत. यांचा पुरोहित न्हावी असतो. हे लोक जनन, विवाह आणि मृत्यू या प्रसंगी मुंडन करतात.

**चेरवा–** यांची वस्ती सर्वत्र आहे; पण तुरळक आहे. हे बरेच मागसलेले आहेत.

दूधकौरवानी आपले वंशशुद्धत्व अजून कायम राखले आहे. इतर कौरवांमध्ये, ते अन्य आदिवासींच्या संपर्कात आल्याने रक्तमिश्रण झाले आहे. कौर लोक हे स्वच्छ, कष्टाळू, हुषार व टापटिपीचे असतात. त्यांची घरे प्रशस्त असतात. याच्यांत काही लोक जमीनदारही आहेत.

प्राचीन काळी सिरगुजामधील कौर लोकांत सतीची चाल होती. अशा सती स्त्रियांची स्मारके त्या भागात पुष्कळ आढळतात. काही सतींना दरवर्षी कोंबड्याचा व दर तीन वर्षांनी रेड्याचा बळी दिला जातो. [ डाल्टन– इं. स्ट. पा. प्रे. १९६० ]

**कौर्म** १५ वा कल्प. याचा प्रारंभ पौर्णिमेला धरतात ( मत्स्य पु. २९०.६ ).

**कौल मार्ग** एक तांत्रिक संप्रदाय. कुल शब्दाचा अर्थ मूलाधारचक्र असा दिलेला आहे. 'कुः पृथ्वीतत्त्वं लीयते यस्मिन् तदाधारचक्र कुलम्' कु म्हणजे पृथ्वीतत्त्व; ते ज्याच्या ठिकाणी लीन होते, ते आधारचक्र म्हणजे कुल होय (श. क.). या कुलासंबंधीचे शास्त्र ते कौल होय.

कुल याचा दुसरा एक अर्थ महानिर्वाणतंत्रात दिला आहे, तो असा–

**जीवः प्रकृतितत्त्वं च दिक्कालाकाशमेव च ।**
**क्षित्यप्तेजोवायवश्च कुलमित्यभिधीयते ।।**

अर्थ– जीव, प्रकृती, दिक्, काल, आकाश, पृथ्वी, आप, तेज व वायू यांना कुल असे म्हणतात.

कुलालाच त्रिकोण आणि योनी अशा दुसऱ्या संज्ञा आहेत. योनीची प्रत्यक्ष रूपाने पूजा करणाऱ्या तांत्रिकाना कौल म्हणतात. कौल मतात दोन भेद आहेत. त्यांना पूर्वकौल व उत्तरकौल असे म्हणतात. पहिले श्रीचक्राच्या अंतर्गत असलेल्या त्रिकोणाची अर्थात योनीची पूजा करतात; तर दुसरे सुंदर तरुणीच्या वास्तव योनीची पूजा करतात.

कुल व अकुल असे दोन शब्द शाक्ततंत्रात येतात. त्यापैकी कुल म्हणजे शक्ती असून अकुल म्हणजे शिव आहे. यांच्या समरसीकरणाचा जो मार्ग तो कौलमार्ग होय. सौभाग्यभास्कर नामक ग्रंथात या मताची व्याख्या पुढीलप्रमाणे केली आहे–

**कुलं शक्तिरिति प्रोक्तमकुलं शिव उच्यते ।**
**कुलेऽकुलस्य सम्बन्धः कौलमित्यभिधीयते ।।**

अर्थ– कुल म्हणजे शक्ती असून अकुल म्हणजे शिव होय. कुलाच्या ठिकाणी अकुलाचा संबंध, यालाच कौल (मार्ग) असे म्हणतात.

शिवाला कोणतेही कुलगोत्र नसल्यामुळे त्याची अकुल ही संज्ञा यथार्थ आहे. शिवाची सिसृक्षा (सृष्टी करण्याची इच्छा) म्हणजेच शक्ती होय. समस्त जगाच्या पसाऱ्याची ती प्रवर्तक असल्यामुळे तिला कुल (वंश) ही संज्ञा मिळाली आहे. कौल मतात शिवशक्तीचे अभिन्नत्व मानले आहे –

**न शिवेन विना शक्तिर्न शक्तिरहितः शिवः ।**
**अन्योन्यं च प्रवर्तेते अग्निधूमौ यथा प्रिये ।।**
**न वृक्षरहिता छाया नच्छायारहितो द्रुमः ।**

(कौलज्ञाननिर्णय ७.८-९)

अर्थ– शिवावाचून शक्ती व शक्तीवाचून शिव हे प्रवृत्त अर्थात् कार्यक्षम होत नाहीत. अग्नि-धूम यांच्यासारखा त्यांचा संबंध आहे. वृक्षावाचून छाया नाही व छायारहित वृक्ष नाही.

**कुलद्रव्ये**– योगी लोक इंद्रियनिग्रह करून यम-नियमांच्या आचरणाने अष्टांग योग साधून, अखेर ज्या समाधिसुखाचा लाभ घेतात, तेच सुख मद्य-मांसादी कुलद्रव्यांचे सेवन करून तांत्रिक प्रक्रियाच्या द्वारे आम्ही मिळवतो, असा कौलमार्गीयाचा दावा आहे. कौल साधकाच्या जीवनात भोग ही त्यागाची पाऊलवाट मानलेली आहे. कौलज्ञाननिर्णयात तांत्रिकांच्या पंच मकारांप्रमाणे पंच पवित्राची चर्चा आहे. विष्ठा, धारामृत, शुक्र, रक्त आणि मज्जा ही ती पंच पवित्रे होत. या प्रत्येक शब्दाचा तांत्रिक अर्थ वेगळा आहे. गोमांस, गोघृत, गोरक्त, गोदुग्ध आणि गोदधी हे त्यांनी उत्तम भोज्य पदार्थ मानलेले आहेत. मांजर, उंट, घोडा, कूर्म, डुकर, बगळा, खेकडा, शलाकी (साळ), शेरक ( घोडा ), हरिण, रेडा, गेंडा आणि सर्व प्रकारचे मासे यांचा त्यानी उत्तम भक्ष्यात समावेश केला आहे. तसेच पौष्टी, माध्वी व गौडी या मदिरांनाही गौरविले आहे. कौल साधक हा भक्ष्याभक्ष्याचा विधिनिषेध मानीत नाही. कुलार्णवतंत्रात मद्यपानाच्या आध्यात्मिक प्रभावाची चर्चा पुढीलप्रमाणे केली आहे–

**सुरादर्शनमात्रेण सर्वपापैः प्रमुच्यते ।**
**तद्गन्धघ्राणमात्रेण शतक्रतुफलं लभेत् ।।**

अर्थ– मद्याच्या केवळ दर्शनाने मनुष्य सर्व पापापासून मुक्त होतो. त्याचा केवळ वास घेतल्याने शंभर यज्ञ केल्याचे फल मिळते.

मद्यपानाने उत्पन्न होणारे सात उल्लास (आनंदश्रेणी) कुलार्णवतंत्रात सांगितले आहेत, ते असे–

(१) **आरंभ**– यात साधक तीन चुळक्यांपेक्षा अधिक मद्य पिऊ शकत नाही. (२) **तरुण**– यात मनामध्ये नव्या आनंदाचा उदय होतो. (३) **यौवन** (४) **प्रौढ**– यात मन चळते व वाक्ये स्खलित होतात (५) **तदंत**– यात पुरती नशा चढते. (६) **उन्मनी**– यात अत्यधिक मद्यप्राशनाने मनोविकार दूर होऊन चित्त अंतर्निरुद्ध होते व (७) **अनवस्था**– यात जीवात्मा परमात्म्यात विलीन होऊन ब्रह्मानंदाचा अनुभव घेऊ लागतो.

पंच मकारांपैकी मैथुन या अंतिम आणि सर्वश्रेष्ठ मकाराचे माहात्म्य कुलार्णवतंत्रात प्रत्यक्ष शिवमुखाने वदविले आहे. या माहात्म्याचा शेवटचा निष्कर्ष हा, की सारे जग भगलिंगात्मक अर्थात् शक्ति-शिवात्मक असून, मैथुन हे शिव-शक्तीचे समरसीकरण आहे.

कौलनिर्णयाच्या १४ व्या पटलात रोमकूपादी, वृषणोत्थ, वह्नी, कौलसद्भाव आणि पदोत्तिष्ठ या नावांच्या कौल उपशाखांचा उल्लेख आहे. याशिवाय महत्कौल, सिद्धामृतकौल व मत्स्योदरकौल अशा आणखी तीन शाखांचा उल्लेख १६ व्या पटलात आला आहे.

**गोमांस व वारुणी**– परवर्ती नाथ संप्रदायात वर उल्लेखि-

लेल्या पंच पवित्रादी वस्तूचा आध्यात्मिक अर्थ सांगितलेला आढळतो. जो नित्य गोमांसभक्षण करतो व अमरवारुणीचे प्राशन करतो, तोच खरा कौल साधक होय, असे हठयोगप्रदीपिकेत म्हटले आहे. तिथे गो शब्दाचा अर्थ जिव्हा असा दिला असून, ती जिव्हा उलटी करून तालुदेशात नेणे (खेचरी मुद्रा करणे), या गोष्टीला गोमांसभक्षण म्हटले आहे. तसेच ब्रह्मरंध्रातल्या सहस्रारपद्माच्या मुळात चंद्रम्याचे स्थान आहे. तिथून सर्वकाळ अमृत झरत असते. हे अमृत प्राशन करणे, म्हणजेच अमरवारुणीचे प्राशन होय.

कौलाचाराचा विरोधी मार्ग म्हणजे समयाचार होय. शंकराचार्य व त्याचे अनुयायी हे समयाचार मार्गाचे अनुयायी होते; तर अभिनव गुप्त व गौडीय शाक्त हे कौलमार्गी होते. समयाचारात अंतर्योगाला (हृदयस्थ उपासना) महत्त्व असते; तर कौल मार्गात ते बहिर्योगाला असते. दोन्ही मार्गात पंच मकार प्रचलित आहेत; पण समयाचारात पंच मकारांचा प्रत्यक्ष प्रयोग न करता त्यांच्या जागी प्रतिनिधिभूत अशा अन्य वस्तू घेतात; तर कौल मार्गात पंच मकारांचा वास्तवरूपात प्रयोग होतो.

नाथयोग्यांच्या काही सप्रदायांतही वामाचाराचा प्रभाव आहे व पंच मकारांचेही प्रचलन आहे. श्री. ब्रिग्ज म्हणतो, की कानफाटे योगी भग-लिंगाची पूजा करतात व त्यांची अशी श्रद्धा आहे, की वैषयिक वासनांचे नियमन करणे, हे साधनमार्गाला विघातक आहे. या संप्रदायात कौलज्ञाननिर्णय या ग्रथात सांगितलेल्या विधीप्रमाणे चक्रपूजा चालते. मात्र हे लोक आपली साधना रहस्यमय व गौप्य समजतात.

कौल साधनेचे उद्दिष्ट कुडलिनीचे उद्बोधन करणे, हे आहे. कुडलिनी व प्राणशक्ती या दोघींना बरोबर घेऊनच जीव मातेच्या उदरात प्रवेश करतो. सर्व जीव सामान्यपणे जागृती, सुषुप्ती व स्वप्न या तीन अवस्थात राहतात. अशा स्थितीत त्यांची कुंडलिनी शक्ती निश्चेष्ट असते. तिला उद्बुद्ध करण्यासाठीच ही कौल साधना आहे.

**तीन अवस्था**— कौलसाधनेत साधकांच्या पशू, वीर व दिव्य अशा तीन अवस्था मानलेल्या आहेत. एखादा साधक संसारादी आसक्तीत किंवा मोहपाशात गुरफटलेला असतो, तेव्हा त्याला पशू म्हणतात. जो साधक अद्वैतज्ञानाच्या केवळ आभासाने साधनमार्गात उत्साहित होतो व प्रयत्नपूर्वक आपला मोहपाश छेदतो, त्याला वीर म्हणतात. जो साधक सहजपणे अद्वैतज्ञान आत्मसात करतो, अशा उत्तम साधकाला दिव्य म्हणतात. हे तीन्ही प्रकारचे साधक एकाहून एक श्रेष्ठ होत. त्यांच्या साधनाही त्यांच्या दर्जाप्रमाणे वेगवेगळ्या असतात.

महानिर्वाणतंत्रात सांगितले आहे, की सर्वांना या कौल मार्गात अधिकार नाही. ज्यांनी इंद्रियजय केला आहे, त्यांनीच हा मार्ग स्वीकारावा. जे लोक देवींची कौलाचाराच्या द्वारे सेवा करतात, त्याना कलीची बाधा होत नाही (४.६३).

कौल मार्ग व अन्य मार्ग यांच्यांतला फरक कौलरहस्यातल्या पुढील श्लोकात सांगितला आहे, तो असा —

**यत्रास्ति भोगो न च तत्र मोक्षो**
**यत्रास्ति मोक्षो न च तत्र भोगः ।।**
**श्रीसुन्दरीसेवनतत्पराणां**
**भोगश्च मोक्षश्च करस्थ एव ।।**

**अर्थ**— जिथे भोग आहे, तिथे मोक्ष नाही व जिथे मोक्ष आहे, तिथे भोग नाही; पण श्रीसुंदरीदेवीच्या सेवेत तत्पर असणाऱ्यांना भोग-मोक्ष हे हातात असल्यासारखे स्वाधीन असतात.

कौलसाधना जाणणारा पुरुष चांडाळ असला, तरी ब्राह्मणापेक्षाही श्रेष्ठ असल्याचे व हा धर्म यज्ञयागापेक्षाही उत्तम असल्याचे कुलार्णवतंत्रात म्हटले आहे. या तंत्राच्या आचरणात ज्या पाच अंगांची आवश्यकता असते, ती अंगे अशी — (१) त्रैकालिक पूजा, (२) नित्य जप, (३) तर्पण, (४) होम व (५) ब्राह्मणभोजन. कौलसाधनेत स्त्रीला फार महत्त्व दिलेले आहे —

**स्त्रियो देवाः स्त्रियः प्राणाः स्त्रिय एव हि भूषणम् ।**
**स्त्रीणां निन्दा न कर्तव्या न च ताः क्रोधयेदपि ।।**

**अर्थ**— स्त्रिया या देव आहेत, त्या प्राण आहेत व त्याच भूषण आहेत. स्त्रियाची निंदा करू नये आणि स्त्रियांना रागही आणू नये.

**इतिहास** — कौल पंथाचा उदय बंगालमध्ये झाला. सर्व कुलशास्त्रांत यावद्दल म्हटले आहे, की बंगालमध्ये कौल पंथाची स्थापना बल्लाळसेनाने केली. हा राजा १२ व्या शतकात बंगालमध्ये राज्य करीत होता. त्याने आचारविनयादी नऊ गुणांना अनुसरून ब्राह्मणांचे तीन वर्ग पाडले. ज्या ब्राह्मणांच्या अंगी सर्व गुण होते, त्यांना मुख्य कुलीन, थोडेसेच गुण कमी असलेल्यांना गौणकुलीन व ज्यांच्या अंगी गुण फारच कमी, त्यांना श्रोत्रिय अशी नावे दिली. त्यांच्या लग्नसंबंधावरही निर्बंध घातले. पुढे १५ व्या शतकापर्यंत बंगालमध्ये या कुलीन अर्थात कौल ब्राह्मणांचे प्रस्थ फारच वाढले. ते स्वतःच्या उच्चतेचा हिरीरीने प्रचार करू लागले. त्यामुळे कुलीनेतर मुलीचे बाप कुलीन वर्गातील जावई मिळविण्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा करू लागले. कुलीन पुरुष शंभरापर्यंत बायकांशी लग्ने करीत व त्या स्त्रियांना माहेरीच ठेवीत. जेव्हा ते त्यांना भेटायला जात, तेव्हा सासुरवाडीकडून भरपूर द्रव्य उकळीत. बिहार-

खेरीज भारताच्या दुसऱ्या कोणत्याही प्रांतात या पंथाचा प्रचार झाला नाही.

इ. स. च्या १३ व्या शतकात बंगालवर मुसलमानांची सत्ता प्रस्थापित झाली. मुसलमानांनी जेव्हा हिंदूंचा छळ आरंभिला, तेव्हा तिथल्या ब्राह्मणांनी पंथभेद बाजूस सारून आपली एकजूट केली व कसाबसा पंथ टिकविला. पुढे १५ व्या शतकात पंथाच्या लोकांनी देवीवरवद्य या एका पुरुषाची कुलाचार्य म्हणून नेमणूक केली. त्याच्या काळात बहुतेक कुलग्रंथ नष्ट झाले होते; पण देवीवराने कामरूप येथे जाऊन कामाख्या देवीची आराधना केली व कौल मार्गाविषयी दिव्य ज्ञान मिळविले. मग त्याने त्या पंथाची व्यवस्था लावून ब्राह्मणांचे नवे गट निर्माण केले. या व्यवस्थेमुळे ब्राह्मण जातीतच नव्हे; तर इतर जातीतही अनेक उपजाती निर्माण झाल्या. **पाहा**– कौलोपनिषद. [ हि. ध.; ना. सं.; प्र. वि.; गो. च. प.; हि. वि. को; स्टडी ऑफ कुलिनिझम् इन बेंगॉल – एस्. सी. चक्रवर्ती, फो. लो. ऑगस्ट-सप्टें. १९६२. ]

**कौल लावणे** कौल हा शब्द अरबी असून त्याचा अर्थ परवानगी किंवा खात्री देणे असा आहे. माणसाने विचारलेल्या प्रश्नाला मिळणारे दैवी उत्तर शकुन किंवा कौल या नावाने ओळखले जाते

कौल लावण्याची प्रथा जागतिक आहे. इजिप्शियन, ग्रीक व रोमन हे लोकही कौलावर विश्वास ठेवणारे आहेत. भारतातही देवाला कौल लावण्याची प्रथा आहे. महाराष्ट्रात विशेषत: कोकणात कौल लावण्याचा प्रघात मोठ्या प्रमाणावर आहे. त्याला ' देवाचा प्रसाद घेणे ' असे म्हणतात. प्रस्तुत कौलाचा कोकणातील प्रकार असा––

पृच्छक देवळात जाऊन पुजाऱ्याला आपला हेतू सांगतो. मग पुजारी तांदुळाचे दाणे किंवा फुलाच्या पाकळ्या मूर्तीच्या डाव्या-उजव्या अंगांना पायांपासून डोक्यापर्यंत चिकटवितो. या पाकळ्यांची संख्या पाच किंवा नऊ असते. मग पुजारी देवाला पृच्छकाचा उद्देश समजावून सांगतो आणि कौलाचा प्रसाद मागतो. प्रत्येक अवयवाच्या पाकळीला विशिष्ट सांकेतिक अर्थ असतो. उजवी पाकळी झडली, तर देवाची अनुज्ञा मिळाली व डावी झडली, तर देवाने नकार दिला, असे समजतात.

**कौलज्ञाननिर्णय** यौगिनीकौलमताचा एक प्रमुख ग्रंथ. हा संस्कृत भाषेत असून, यात भैरवी व देवी यांच्या संवादद्वारा सृष्टिसंहार, कुललक्षण, जीवलक्षण, अजरामरता, चक्र, शक्तिपूजा, ध्यानयोगमुद्रा, परमवज्रीकरण, भैरवावतार, ज्ञानसिद्धी, क्रियासिद्धी, यौगिनीकौलमत व इतर कौल परंपरा यांचे विवरण केले आहे. याचे २४ पटल असून, त्यांत एकूण ५६७ श्लोक आहेत. याची भाषा बरीच सदोष आहे. [ गो. च. प. ]

**कौलेशभैरवी** एक तांत्रिक देवता. श्रीविद्यार्णवतंत्रात भयविध्वंसिनी, सकलसिद्धिदा, भोगमोक्षदा, भुवनेश्वरी, इ. नावांनी तिचे वर्णन केले आहे.

**कौलोपनिषद** एक तांत्रिक उपनिषद. हे उपनिषद सूत्ररूपात लिहिलेले आहे. यातील विवेचन असे– प्रथम ब्रह्मविचार. त्यानंतर ब्रह्मशक्ती अर्थात् धर्म याची जिज्ञासा. ज्ञान व बुद्धी ही दोन्ही धर्माची रूपे आहेत. ज्ञान हेच मोक्षाचे कारण आहे. सर्वात्मतासिद्धी म्हणजेच मोक्ष होय. योग व मोक्ष हे दोन्ही ज्ञान आहेत व अज्ञान हे अधर्माचे कारण आहे. पण हे अज्ञानही ज्ञानाहून अभिन्न आहे. प्रपंच (पंचविषय) हाच ईश्वर आहे व अनित्यही नित्यच आहे. कारण नित्यानित्य ही दोन्ही ब्रह्मशक्तीचीच रूपे आहेत.

जीवाची पाच बंधने पुढीलप्रमाणे आहेत– (१) अनात्म्याच्या ठिकाणी आत्मबुद्धी, (२) आत्म्याच्या ठिकाणी अनात्मबुद्धी, (३) जीवामध्ये परस्परभेदाचे ज्ञान, (४) उपास्य व उपासक यांच्यामध्ये भेदबुद्धी व (५) चैतन्य अर्थात् परब्रह्म याच्यापासून आत्म्याला वेगळा समजण्याची बुद्धी.

वरील पाच बंधनेही ज्ञानरूपच आहेत. कारण ही बंधने म्हणजे ब्रह्मशक्तीचे विलासच होत. या बंधनांच्यामुळे मनुष्य जन्ममरणाच्या चक्रात सापडतो. साधकाला याच देहात मोक्ष मिळतो. समस्त इंद्रियांमध्ये आत्मा प्रधान आहे, हे समजणे हे ज्ञान होय. जे धर्माला विरुद्ध ते करणीय; जे धर्मविहित ते अकरणीय. ( कौल मार्गात धर्मशास्त्राचे विधिनिषेध मान्य नाहीत. ) सर्व काही शांभवीचे ( शक्तीचे ) रूप आहे. या मार्गातल्या साधकाला वेदादिकाचा त्याग करावा लागतो. या मार्गातल्या साधकाने आपले रहस्य कोणालाही सांगता कामा नये. कौल साधकाचा आचार कसा असावा त्याचे सूत्र पुढीलप्रमाणे–

**अन्त: शाक्ता बहि: शैवा: सभामध्ये च वैष्णवा: ।**
**नानारूपधरा: कौला विचरन्ति महीतले ।।**

अर्थ– आतून शाक्त, बाहेरून शैव आणि लोकांमध्ये वैष्णव, अशा प्रकारे नाना रूपे धारण करून कौलमार्गी पृथ्वीतलावर संचार करतात.

कौल साधकाने लोकनिंदा वर्ज्य मानावी. व्रताचरण करू नये. नियमपालन करू नये. संप्रदाय स्थापू नये. सर्वांच्या ठिकाणी समत्वबुद्धी धरावी. असे जो करतो, तोच मुक्त होतो. पाहा– कौल मार्ग. [ना. स.; रामभक्तिसाहित्यमें मधुर उपासना.]

**कौवडोलगिरी** पाटणा-गया रेल्वेमार्गावरील बेला स्टेशनापासून पूर्वेला सहा मैलावर असलेली एक टेकडी. हिची उंची सुमारे ५०० फूट असून हिच्या टोकावर कावळा बसला, की ते टोक हालू लागते, असे म्हणतात. म्हणून या टेकडीलाच कौवडोल म्हणजे कावळ्याचा झोपाळा हे नाव मिळाले.

इथे बंगालच्या राजघराण्यातील शीलभद्र नावाच्या विद्वान बौद्ध पंडिताचा मठ होता. त्याने एका प्रख्यात नास्तिकाला वादात जिंकल्यामुळे त्याला एका नगराचा काही महसूल बक्षीस मिळाला. त्या महसुलाच्या रकमेतून त्याने हा मठ बांधला, असे सांगतात.

या टेकडीच्या पायथ्याशीच बौद्धांचे एक देवालय असून, त्यात बुद्धाची प्रचंड बैठी मूर्ती आहे. आणखीही काही मूर्ती तिथेच खडकात कोरल्या असून, त्या हिंदू देवताच्या आहेत. त्यांचा काळ ८ वे ते १२ वे शतक असावा. [गया– गॅझे.]

**कौशांबी** एक प्राचीन नगरी. शतपथ ब्राह्मण (१२.२.२.१३) व गोपथ ब्राह्मण (१.२.२४) यात कौशांबेय असा येथील लोकांचा उल्लेख आढळतो. वैदिक व बौद्ध साहित्यात या नगरीचे महत्त्व वर्णिलेले आहे. रामायणातही हिचा उल्लेख आहे. पुरूरव्याचा १० वा वंशज कुशाव याने ही नगरी वसविली, असे म्हणतात. हस्तिनापूर वाहून गेल्यानंतर अर्जुनाचा आठवा वंशज निमिचक्र इथे राहायला आला होता. पांडव वंशातील प्रसिद्ध राजा उदयन किंवा वत्सराज याचीही हीच राजधानी होती, म्हणून हिला वत्सपत्तन असेही नांव पडले होते. जैनांचा सहावा तीर्थंकर याची ही जन्मभूमी होती, असे म्हटले आहे. भगवान महावीराचाही या नगरीशी संबंध आलेला आहे. या नगरीत वृषभदास नामक श्रेष्ठीच्या घरी चंदनबाला नावाची एक राजकन्या आश्रयार्थ राहत होती. भगवान महावीराने तिच्या भक्तीने प्रसन्न होऊन तिचा उद्धार केला व तीच त्याची पहिली शिष्या झाली.

हे एक पुण्यक्षेत्र असून इथे सात रात्री उपवास केल्याने देववंशात जन्म मिळतो, असे कृत्यकल्पतरूत सांगितले आहे.

इथे अशोकाचा एक स्तंभ आहे व त्यावरील आज्ञापत्रात या नगरीच्या महामात्रांची नावे दिलेली आहेत. गौतमाला बोधी प्राप्त झाल्यानंतर त्याने इथे काही काळ वास्तव्य केले होते.

प्रयाग क्षेत्राच्या नैर्ऋत्येस ३० मैलांवर यमुनेच्या काठी कोसाम नावाचे एक खेडे आहे. तीच पूर्वीची कौशांबी होय, असे कनिंगहॅम व बेली यांचे मत आहे.

युआन च्वांग याने इ. स. च्या ७ व्या शतकात या नगरीला भेट दिली होती. त्या वेळी तिथे १०–१५ बौद्ध मठ व ५० हून अधिक देवालये होती, असे तो सांगतो.

या ठिकाणी अलिकडे जे उत्खनन करण्यात आले आहे, त्यावरून असे समजते, की सनपूर्व १००० वर्षे या सुमारास गंगा-यमुनांच्या काठी जी नगरे होती व जे गढ बांधलेले होते, त्यांवर सिंधुसंस्कृतीची छाप होती. इथे किल्ल्याच्या भोवती सुमारे ४०० फूट रुंद व २८ फूट खोल खंदक होता. किल्ल्याचा तट व खंदक यांच्यामध्ये आणखी एक भिंत होती, हे इथल्या किल्ल्याचे वैशिष्टय होय.



मृण्मय देवीमूर्ती – कौशांबी

या उत्खननात पुरुषमेधाची श्येनचिती सापडली आहे. वाजसनेयी संहिता, शतपथ ब्राह्मण, श्रौतसूत्रे यांमध्ये पुरुषमेधासाठी लागणाऱ्या चितीचे जे वर्णन आहे, तशाच प्रकारचे हे चितीचे अवशेष आहेत. इथे मातीच्या काही मूर्तीही सापडल्या आहेत.

इथे जी मातीची भांडी सापडली आहेत, त्यांच्या साह्याने तिथल्या प्राचीन संस्कृतीसंबंधी काही माहिती मिळते. या भांड्यांचे चार वर्ग पाडता येतात. (१) लाल मातीची मजबूत भांडी. त्यावर कुठे कुठे काळी चित्रे आहेत. ही भांडी कांस्य-पाषाणयुगीन परंपरेतली आहेत. (२) काळ्या व लाल मातीची भांडी, (३) राखी रंगाची भांडी व (४) स्थानिक लाल मातीची भांडी. या भांड्यांच्या अभ्यासावरून कळते, की सनपूर्व १००० च्या सुमारास या प्रदेशात आर्य व अनार्य या दोन्ही संस्कृतींचे मिश्रण झाले होते. शासकवर्ग आर्य होता; पण बहुसंख्य शासित लोक आर्येतर होते. [म. ज्ञा. को.; हि. ध.; कृ. क. त; हि. जॉ. ए. इं.; भारतवाणी, डिसें. १९५९]

## कौशिक

एक गोत्रऋषी. कौंडिण्याचा शिष्य व गोपवन आणि शांडिल्य यांचा गुरू (बृहदा. ३·२·६·१; ४·६·१). पाणिनीच्या मते हा एक शाखाप्रवर्तक होता. याच्या नावावर पुढील ग्रंथ आहेत––

(१) कौशिकसूत्र, (२) कौशिकस्मृती (हेमाद्रीने व नीलकंठाने हिचा उल्लेख केला आहे), (३) कौशिकशिक्षा व (४) कौशिकपुराण.

कुशिक हा विश्वामित्राचा पूर्वज होता. वैदिक साहित्यात याचे उल्लेख आहेत (ऋ. ३·२६·१; ऐ. ब्रा. ७·१८). शुनःशेपाच्या कथेत कुशिकाचे नाव येते. कुशिक हा भरतांचे पौरोहित्य करीत होता. कुशिकाचा पुत्र गाधी व गाधीचा पुत्र विश्वामित्र अशी ही वंशपरंपरा आहे. कुशिकाच्या कुलाला कौशिक हे सामान्य नाम आहे. या कुलात पुढील ऋषी झाले आहेत––

(१) कुशिक (२) गाधी (३) विश्वामित्र (४) देवरात (५) उद्गल (बल) (६) मधुच्छंदा (७) अघमर्षण (८) अष्टक (९) लोहित (१०) कत (११) कील (१२) देवश्रवा (१३) रेणु (१४) पूरण व (१५) धनजय.

मत्स्य पुराणाने शिशिर व शालंकायन अशी दोन आणखीही नावे दिली आहेत.

विश्वामित्राचा पिता गाधी यालाही कौशिक हे नाव आहे. हा काही ऋचांचा (ऋ. ३.१९-२२) द्रष्टा होता. [प्रा. च. को.; वै. वा. इ.]

## कौशिकसूत्र

हे अथर्ववेदाच्या शौनकशाखेचे सूत्र आहे. हे सूत्र रूढार्थाने गृह्यसूत्र नाही. यात इतर गृह्यसूत्रात येणारे गर्भाधानादी सर्व संस्कार दिलेले असले, तरी त्यांना प्राधान्य दिलेले नाही. विधीच्या विस्ताराच्या दृष्टीने कौशिकसूत्र हे इतर सूत्रांहून वेगळे वाटते. यात गृह्यविधीच्या माहितीशिवाय अथर्ववेदातल्या ऋचांशी संबंध असलेल्या मंत्रविद्येची व जादूटोण्याचीही माहिती आहे. विषय, भाषा आणि रचना या तीन्ही बाबतीत हे इतर गृह्यसूत्रांहून अलग पडते. या सूत्रात पुढील विषय आलेले आहेत––

दर्शपूर्णमास, मेधाजनन, ब्रह्मचारीसंपद, ग्राम–दुर्ग–राष्ट्रादी लाभ, पुत्र–पशु–धन–धान्य–प्रजा इ. सर्व संपत्साधक समूह व मानवसमाजात ऐकमत्य होण्याच्या उद्देशाने सौमनस्यादी उपाय [इं. वे. क. सू.]·

## कौशिक ह्रद

कौशिकी नदीवर हा ह्रद असून तिथे विश्वामित्राला श्रेष्ठ सिद्धी प्राप्त झाली, असे पद्म पुराणात सांगितले आहे (१·३८·५८). [हि. ध.]

## कौशिकी

(१) एक शाक्त देवता. हिच्या उत्पत्तीविषयी कालिकापुराणात पुढील श्लोक दिलेले आहेत––

**कायकोषान्निःसृता या कालिकायास्तु भैरव।**
**सा कौषि (शि) कीति विख्याता चारुरूपा मनोहरा॥**
**निःसृता हृदयाद्देव्या रसनाग्रेण चण्डिका।**
**नैतस्याः सदृशी मूर्त्या चारुरूपेण विद्यते॥**

अर्थ––हे भैरवा, कालिकेच्या देहकोशातून जी (देवता) निघाली, ती कौशिकी या नावाने प्रसिद्ध झाली. ती सुंदर व मनोहर आहे. ती चंडिका कालिकेच्या हृदयातून वर निघून जिभेच्या टोकावरून बाहेर पडली. आकाराने इतकी सुंदर देवता हिच्यासारखी दुसरी नाही.

ही सिंहारूढ असून हिने पीत वस्त्रे परिधान केलेली आहेत. हिच्या हाती शूल, वज्र, चाप, बाण, खड्ग, शक्ती, गदा, घंटा, शंख व चर्म या वस्तू आहेत.

हिच्या उत्पत्तीविषयी दुसरी एक कथा शिवपुराणात दिली आहे ती अशी––

पार्वती प्रथम काली म्हणजे वर्णाने काळी होती. शिव त्याबद्दल तिची चेष्टा करी. मग तिने गौरी म्हणजे गोरी होण्याचे ठरविले आणि विंध्य पर्वतावर जाऊन तप केले. त्यामुळे तिच्या देहावरची काळी त्वचा अलग झाली. त्या त्वचारूप देवतेलाच पुढे विंध्यवासिनी आणि कौशिकी अशी दोन नावे मिळाली (शिव पुराण ५.२१.३१०). [श. क.; बी. कॆ. बरुआ–पी. के. गोडे को. व्हॉ.]

(२) एक नदी. हिचा उगम हिमालयात होत असल्याचे रामायणात म्हटले आहे (बाल. ५.८). विश्वामित्र हिच्या उत्पत्तीविषयी रामाला सांगतो 'हे रामा, सत्यवती नावाची माझी ज्येष्ठ भगिनी होती. ती ऋचीकाला दिलेली होती. ती आपल्या पतीच्या मागून सदेह स्वर्गाला गेली आणि तीच पुढे लोकहितासाठी एका महानदीच्या रूपाने प्रवाहित झाली' (वा. रा. बाल. ३४.७ –११).

जमदग्नीची माता सत्यवती हिला या नदीचे रूप प्राप्त झाले, असे ब्रह्माण्ड पुराणात सांगितले आहे (२.१६.२६). बलराम या नदीवर यात्रेसाठी गेला होता (भाग. पु. १·१८·३६). ही हव्यवाहन अग्नीची एक पत्नी असून पितराना प्रिय आहे (वायू पु. २९.१४). कालीने आपला कृष्णकोश टाकून दिला व ती गोरी झाली आणि त्या टाकलेल्या कोशाचीच ही नदी बनली, असे वामन पुराणात म्हटले आहे (५४.२२).

पुराणांतरीची ही कौशिकी म्हणजेच सांप्रतची कोसी नदी होय. बिहारमधील पूर्णिया जिल्ह्यातून वाहत जाऊन ही गंगेला मिळते. या नदीने आपला प्रवाह वारंवार बदलला आहे, असे

दिसते. पूर्व नेपाळच्या दक्षिण भागात चार नद्या एकत्र मिळून जो प्रवाह बनतो, त्याला कौशिकी असे नाव आहे. हिला करतोया नदी मिळाली आहे. [पु. इं.; हि. ध.; हि. जॉ. ए. इं.]

**कौशिकी द्वार** एक तीर्थ. महाभारतात याचा उल्लेख आहे. या क्षेत्रात ९ रात्री समाधी लावून बसणारा पुरुष गंधर्वनगराला जातो, असे सांगितले आहे. [कु. क. त.]

**कौशीकानडा** हिंदुस्थानी संगीतातला एक राग. हा राग स्वतंत्र नसून कानडा रागाचाच एक प्रकार आहे. आसावरीच्या थाटातून हा निघतो. याचे आरोहावरोह सप्तस्वरांनी होतात, म्हणून याची जाती संपूर्ण–संपूर्ण मानतात. याचा वादी मध्यम व संवादी षड्ज आहे. यात कानड्याप्रमाणेच मालकंसाचेही मिश्रण आहे. पंचम लावल्याने धनाश्री रागाचेही अंग दिसते; पण उत्तरागात मालकंसाचे रूप स्पष्ट होताच धनाश्रीचे अंग दूर होते. यातील मध्यम व धैवत यांची संगती फार मनोहर असते. [सु. वि. को.]

**कौशेयपट** रेशमी कापडाचा एक प्रकार. 'कौशेयं कृमिकोशोत्थम्'=किडयाच्या कोशातून निघालेल्या तंतूपासून बनलेले ते कौशेय होय (अमर). प्राचीन काळी हे कापड लेखनासाठी वापरले जाई. काबूलच्या हिंदू राजांची वंशावली अशा एका कौशेयपटावर शाईने लिहिली असून ती नगरकोटच्या किल्ल्यात असल्याचे अल् बिरुनी सांगतो. जेसलमीरच्या ग्रंथसंग्रहालयात जैनसूत्रांची सूची आढळते, तीही कौशेयपटावरच आहे, असे डॉ. बुल्हरने म्हटले आहे. मुद्दाम विणलेल्या रेशमी कापडावरच्या काही पोथ्या भारत इतिहास संशोधक मंडळात आहेत. सोवळ्यातही त्यांचा वापर करता यावा, यासाठी ही सोय केलेली असे. [सु. वि. को.]

**कौषीतकी** ऋग्वेदाच्या कौषीतकी ब्राह्मणाचा कर्ता. छांदोग्य उपनिषदात याचा उल्लेख आहे. याच्या मते प्राण म्हणजेच ब्रह्म, मन म्हणजे त्याचा निरोप्या, वाणी ही सेवक, डोळा हा संरक्षक आणि कान हे त्याचे श्रवणेंद्रिय होय. या सर्व देवता प्राणाला न भिता आहुती अर्पण करतात. यज्ञोपवीत धारण, आचमन व उगवत्या सूर्याचे पूजन अशी त्रिविध उपासना याने सांगितली आहे. कौषीतकीच्या नावावर आरण्यक, उपनिषद, सांख्यायन श्रौत व गृह्यसूत्रे, इ. ग्रंथ आढळतात. लुशाकपीने याला व याच्या शिष्यांना शाप दिला होता अशी कथा आहे (पं. ब्रा. १७.४.७.३). कौषीतकीलाच सांख्यायन असेही म्हणत. सर्वजित हा याचा शिष्य होय. [क्रि. स्ट. ले. उ.; प्रा. च. को.]

**कौषीतकी आरण्यक** याचे तीन खंड आहेत. पहिले दोन खंड कर्मकांडाने भरलेले असून ३ऱ्या खंडाला कौषीतकी उपनिषद असे म्हटले आहे. या आरण्यकाच्या १ ल्या अध्यायात आनंदाचा विचार केलेला असून, २ ऱ्या अध्यायात गृह्यकृत्याचे रोचक वर्णन आहे. ३ ऱ्या अध्यायात इतिहास व काही उपाख्याने आहेत. ४ था अध्याय अनेक आख्यानांनी भरलेला आहे. यात कित्येक भौगोलिक गोष्टीही आढळतात. [हिंदुत्व]

**कौषीतकी उपनिषद्** हे उपनिषद ऋग्वेदाच्या कौषीतकी शाखेचे आहे. कौषीतकी हा याचा कर्ता असावा. हे उपनिषद बृहदारण्यक व छांदोग्य याच्यापूर्वी झाले असावे, असे डॉ. दप्तरी म्हणतात. प्राणाचे व प्राणोपासनेचे महत्त्व वर्णन करणे, हाच या उपनिषदाचा विषय आहे. याचे चार अध्याय आहेत. पहिल्यात देवयान व पितृयाण या दोन मार्गाचे सविस्तर वर्णन आहे. २ रा व ३ रा या दोन अध्यायात चार ऋषींची मते ग्रथित केली असून, तत्कालीन समाजात रूढ असलेल्या अनेक चालीरीतीचे वर्णन दिलेले आहे. उदा०–(१) धन मिळविण्याची इच्छा असेल, तर पौर्णिमा, अमावास्या, शुक्लपक्ष किंवा पुष्यनक्षत्र या योगावर अग्नीचे आधान करावे आणि घृतावर संस्कार करून व उजवा गुडघा जमिनीवर टेकवून स्रुव्याने किंवा चमसाने त्याची अग्नीत आहुती द्यावी. (२) स्त्री-पुरुषांना परस्पर प्रिय होण्याची इच्छा असेल, तर सुमुहूर्तावर अग्न्याधान करून ज्याला प्रिय व्हायचे असेल, त्याचे नाव घेऊन अग्नीत घृताची आहुती द्यावी.

शेवटच्या अध्यायात बालाकी व अजातशत्रू यांची गोष्ट दिलेली आहे.

यातील इंद्र–प्रतर्दनांच्या संवादातच पहिल्याप्रथम प्राण हे जीविततत्त्व असल्याचे सांगितले आहे त्याचा सारांश असा—

प्राणच वायु आहे. तोच ब्रह्म आहे. तोच अमृत आहे व तोच षड्भावविकाररहित आहे. प्राणाचा संचार सर्वत्र आहे. प्राणापासून देवता आणि देवतापासून लोक उत्पन्न झाले.

**एष प्राण एव प्रज्ञात्मानन्दोऽजरोऽमृतो न साधुना कर्मणा भूयान् नो एवासाधुना कनीयान् ।।**

(३.९)

**अर्थ**––प्राण हाच प्रज्ञात्मा होय. तो आनंद देणारा आणि अजर, अमर असा आहे. तो चांगल्या कर्माने वाढत नाही व वाईट कर्माने क्षीणही होत नाही.

इंद्र प्रतर्दनाला म्हणतो––

**प्राणोऽस्मि प्रज्ञात्मा, तं मामायुरमृतमित्युपास्स्व, आयुः प्राणः, प्राणो वा आयुः, प्राण उवाचामृतं यावद्धयस्मिन् शरीरे प्राणो वसति तावदायुः प्राणेन ह्येवामुष्मिन् लोकेऽमृतत्व-माप्नोति ।।**

(३. १)

अर्थ–– मी प्रज्ञेचा म्हणजे जागृतीतील चैतन्याचा आत्मा अर्थात आधार असलेला प्राण आहे. त्या मला आयुष्य व आनंद असे समजून माझी उपासना कर. कारण आयुष्य हे प्राण असून प्राण हेच आयुष्य होय. प्राण हाच अमृत म्हणजे आनंद आहे. जोपर्यंत या शरीरात प्राण असतो, तोपर्यंतच आयुष्य असते. प्राणानेच त्या लोकात म्हणजेच ब्रह्मलोकात आनंद मिळतो.

याला कौषीतकी ब्राह्मणोपनिषद असेही म्हणतात. या उपनिषदाकडे टीकाकारांचे लक्ष कमी गेल्यामुळे याचे पाठ फार भ्रष्ट झाले आहेत, असे डॉ. दप्तरी म्हणतात. [उप-निषदर्थव्याख्या; उ. र.]

**कौषीतकी गृह्यसूत्र** ऋग्वेदाच्या कौषीतकी शाखेचे गृह्य-सूत्र. हे शांबव्याने रचले, म्हणून त्याला शांबव्यसूत्र असेही म्हणतात. याचे पाच अध्याय असून त्या गृह्यसूत्राचे शांखायन गृह्यसूत्राशी निकटचे साम्य आहे. यातला अधिकांश भाग शांखायनातूनच जसाच्या तसा घेतलेला आहे. यातला पाचवा अध्याय और्ध्वदेहिकासंबंधी असून, कर्ण-वेध संस्काराचा प्रयोग हे या गृह्यसूत्राचे वैशिष्टच आहे. [ इं. वे. क. सू. ]

**कौस्तुभ** चौदा रत्नांपैकी एक. हा तेजस्वी मणी श्रीवि-ष्णूच्या हृदयावर रुळतो. हा कोटिसूर्यांइतका तेजस्वी असल्याचे भागवतामृतात सांगितले आहे याची कथा भागवतपुराणात सांगितली आहे, ती अशी–

**कौस्तुभाख्यमभूद्रत्नं पद्मरागो महोदधेः ।**
**तस्मिन् हरिः स्पृहां चक्रे वक्षोऽलङ्करणे मणौ ।।**

(८·८·५)

अर्थ–(समुद्रमंथनप्रसंगी) महासागरातून कौस्तुभ नावाचा पद्मरागमणी वर आला. (त्याला पाहून) विष्णूला वाटले, की हा आपल्या हृदयावर दागिना म्हणून चांगला शोभेल. म्हणून विष्णूने त्या मण्याची इच्छा धरली (व तो स्वत:साठी घेतला).

कथाकल्पतरूत याची वेगळी कथा दिली आहे, ती अशी–

देवासुरांनी समुद्रमंथनासाठी जो दोर आणला होता, तो मंथन संपल्यावर त्यानी भूमीवर टाकून दिला. त्याच्या भाराने पृथ्वी दुभंग झाली व त्यामुळे तिच्या उदरातला एक तेजोमय मणी खाली पाताळात पडला व तो शेषाने आपल्या मस्तकी धारण केला. तो मणी पृथ्वी व मंदराचल यांच्या संयोगापासून बनलेला होता. शेषाने त्याचे नाव कौस्तुभ असे ठेवले व पुढे तो मणी विष्णूला समर्पित केला.

**क्युरेशी** पंजाबातील एक मुस्लीम जात. महमद पैगंबर हा कुरेश वंशातील होता. त्या वंशाशी या जातीचा संबंध असल्यामुळे तिला मोठा मान दिला जातो. हे लोक प्रामुख्याने जालंदर, लाहोर, रावळपिंडी, मुलतान व भावलपूर या भागात आढळतात. शेतकी हा त्यांचा मुख्य धंदा आहे. परंतु त्यांचा उदरनिर्वाह पुष्कळ अंशी आपल्या शिष्यवर्गाकडून मिळालेल्या देणग्यावर चालतो. [ म. ज्ञा. को. ]

**क्रंगनोर** केरळात त्रिचूरपासून २५ मैलावर असलेले एक शहर व बंदर. या शहराला ऐतिहासिक महत्त्व आहे. पेरियर नदी पश्चिम सागराला मिळते, तिथेच हे वसल्या-मुळे याला व्यापारीदृष्टचा महत्त्व आले आहे. फार जुन्या काळापासून केरळाचा पाश्चात्य देशांशी व्यापार याच बदरातून चाले. चेर सम्राट कुलशेखर याने इथे आपली राजधानी केली होती, हे याचे राजकीय महत्त्व होय.

प्राचीन तमिळ कवीनी याला मूचिरी म्हटले आहे. मूचिरी हा मसूरीचा अपभ्रंश असावा. कारण तिथे मसूरी देवतेचे प्राचीन मंदिर आहे. त्याशिवाय तिरुवचिकुलम् व कुरुंब भग-वती ही इथली दोन मंदिरेही प्राचीन आहेत. भारतात पहिली मशीद उभारली गेली, ती या ठिकाणी. मात्र तिचे प्रवेशद्वार मक्केकडे तोंड करून नसून पूर्व दिशेस आहे. सेंट थामसने बाधलेले केरळातील सर्वात जुने चर्च याच ठिकाणी आहे. [ त्रिचूर गॅझे. ]

**क्रकच** वार व तिथी यांच्या योगाने बनणारा एक योग. शनिवारी षष्ठी, शुक्रवारी सप्तमी, गुरुवारी अष्टमी, बुधवारी नवमी, मंगळवारी दशमी, सोमवारी एकादशी, रवि-वारी द्वादशी अशा प्रकारे शनिवारपासून उलट वार मोजून त्या दिवशी षष्ठीपासून पुढील तिथी आल्या असता क्रकच योग होतो. हा योग शुभ कृत्यांना वर्ज्य आहे. [ मु. चिं. ]

**क्रतू** (१) ब्रह्मदेवाचा मानसपुत्र. एक प्रजापती. हा ब्रह्मदेवाच्या हातापासून उत्पन्न झाला. क्रिया ही याची पत्नी होय. ती कर्दम प्रजापतीची कन्या होती. क्रतूला या भार्येपासून ६० हजार पुत्र झाले. तेच वालखिल्य ऋषी होत. त्यांचा आकार अंगुष्ठाएवढा होता. हा क्रतू वैवस्वत मन्वंतरातला होता.

(२) स्वायंभुव मन्वंतरात हा ब्रह्मदेवाच्या अपानापासून उत्पन्न झाला.

(३) फाल्गुन महिन्यात पर्जन्य नावाच्या सूर्याबरोबर फिरणारा एक यक्ष.

(४) स्वायंभुव मन्वंतरातील सप्तर्षींपैकी एक.

(५) अगस्त्यकुलातील गोत्रकार. [प्रा. च. को.]

(६) 'यूपसहितः सोमसाध्यो यज्ञः' = ज्या यज्ञामध्ये यूप उभारून सोमरसाचे हवन करतात त्याला क्रतू म्हणतात. [श. क.].

**क्रमपाठ** एक वेदविकृती. यात प्रथम वेदमंत्राची दोन पदे जोडीने म्हणतात. नंतर पहिल्या पदाचा त्याग करून मंत्रातले पुढचे पद घेऊन ती जोडी बनवितात. अशा रीतीने संहितेचा जो पाठ करतात त्याला क्रमपाठ असे नाव आहे. उदा० पुढील ऋचेचा क्रमपाठ होईल तो असा–

**यज्ञेन यज्ञमयजन्त देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन् ।**
**ते ह नाकं महिमानः सचन्त यत्र पूर्वे साध्याः सन्ति देवाः ॥**
(ऋ. १०.९०.१६)

या ऋचेचा क्रमपाठ–

**यज्ञेन यज्ञं–यज्ञमयजन्त– अयजन्त देवाः–देवास्तानि– तानि धर्माणि–धर्माणि प्रथमानि– प्रथमान्यासन्–आसन्नित्यासन् । ते ह–ह नाकं–नाकं महिमानः –महिमानः सचन्त – सचन्त यत्र–यत्र पूर्वे– पूर्वे साध्याः– साध्याः सन्ति– सन्ति देवाः– देवा इति देवाः ॥**

ज्याने संहितेचा क्रमपाठ मुखोद्गत केला त्याला क्रमात वैदिक म्हणतात. पाहा– वेदविकृती.

**क्रमवंत ब्राह्मण** एक जात. कुलाबा जिल्ह्यातल्या अष्टागरात, रत्नागिरी जिल्ह्यात व गोमंतकात या नावाचा एक ब्राह्मण समूह आहे. तो ऋग्वेदी शाकलशाखीय टिल्लू घराण्याचा वंशविस्तार होय. आंबेजोगाई हे त्याचे मूलस्थान होते. दुर्गादेवीच्या दुष्काळात यांचा मूळ पुरुष घाट उतरून कुलाबा जिल्ह्यात आला. हे मूळचे देशस्थ असून इतिहासकाळात आंगऱ्यांचे कुलगुरू होते. यांच्या सद्ब्राह्मण्याविषयी शंका घेऊन, इतर ब्राह्मणांनी पेशवाईच्या काळात यांच्याविरुद्ध बरीच ग्रामण्ये केली. पण प्रत्येक वेळी क्रमवंतांचाच पक्ष सिद्ध झाला.

क्रमवंतांना किरवंत असेही म्हणतात. यांच्यांत सांप्रत उपाध्येपण, सावकारी व शेतकी असे तीनही धंदे आहेत. महाराष्ट्र भाषेचा कोश या नावाचा पहिला मराठी कोश जगन्नाथशास्त्री या एका क्रमवंत पंडितानेच रचला. [ब्रा. भि. वि.; सु. वि. को.]

**क्रमू** एक नदी. ऋग्वेदात हिचा उल्लेख आहे (ऋ. ५.५३.९; १०.७५.६). सध्याची कुर्रम नदी हीच प्राचीन क्रमू होय. ही सिंधूच्या पश्चिम बाजूने वाहत जाऊन इसाखेलजवळ सिंधूनदीला मिळते. ही नदी सुलेमान पर्वतामधून वाहते. [हि. जॉ. ए. इं.]

**क्रय** विकत घेणे, विकणे, अदलाबदल करणे, भाड्याने देणे व घेणे, असे क्री धातूचे अर्थ आहेत. क्रय हा शब्द ऋग्वेदात नसला, तरी त्याचा मूळ धातू क्री हा त्यात सापडतो (४.२४.१०). वैदिक संहितांमध्ये क्रय व क्री हे दोन्ही शब्द वारंवार आलेले आहेत. वैदिक काळात वस्तूची अदलाबदल करून व्यवहार करीत होते. हुज्जत घालून सौदा पटविण्याचीही पद्धत होती (ऋ. ४.२४.९; अथर्व. ३.१५). वस्तूच्या किंमतीला निश्चित परिमाण नव्हते; पण बहुतेक व्यवहारात गायीची संख्या आधारभूत असे (श. ब्रा. १३.४.२.१). सहस्रार्ह = सहस्र गायींच्या किंमतीची वस्तू, असा उल्लेख येतो.

सोमयोगात सोम विकत घेण्याच्या प्रसंगी गाय, वस्त्र, शेळी, इ. वस्तू देऊन त्याच्या मोबदल्यात सोमाची खरेदी होत असते. या विधीला सोमक्रय असे नाव आहे.

**क्रव्याद** क्रव्य = मांस. वेदात राक्षस व नरमांसभक्षक यांना क्रव्याद म्हटले आहे. क्रव्य + अद = क्रव्याद. क्रव्य खाणारा तो क्रव्याद होय. चितेवर ठेवलेल्या प्रेताला खाऊन टाकतो, म्हणून अग्नीलाही क्रव्याद म्हटले आहे.

**क्रिमिश** एक नरक. जो जादूटोणा करून निर्वाह करतो, तो या नरकात जातो. [पु. इं.]

**क्रिया** कृती, पूजादी धर्मकृत्ये, मृताचे और्ध्वदेहिक, प्रायश्चित्त, साधन, उपाय, इ. अनेक अर्थ क्रिया शब्दाचे आहेत. भावप्रकाशात नऊ प्रकारांना क्रिया म्हटले आहे; तो श्लोक असा–

**आरम्भो निष्कृतिः शिक्षा पजनं सम्प्रधारणम् ।**
**उपायः कर्म चेष्टा च चिकित्सा च नव क्रियाः ।।**

व्यवहारतत्त्वात मानुषी व दैविकी असे क्रियेचे दोन प्रकार सांगितले आहेत. साक्ष्य, लेख्य व अनुमान अशी मानुषी क्रिया त्रिविध होते. दैविकी क्रिया म्हणजे घट, अग्नोदक, विष, कोश, इ. नऊ प्रकारची दिव्ये होत. वैद्यकशास्त्रात रोगचिकित्सेलाही क्रिया म्हटले आहे.

बौद्ध धर्मात साधकाच्या पात्रतेप्रमाणें चार साधनापद्धती निर्माण झाल्या व त्यावरून वज्रयान पंथात चार तत्रे निघाली, ती अशी– क्रियातंत्र, चर्यातंत्र, योगतंत्र व अनुत्तरतंत्र. यांपैकी पहिले क्रियातंत्र हे अविकसित मनाच्या साधकासाठी उपयुक्त असते. दान, शील, क्षमा, वीर्य, ध्यान व प्रज्ञा यांचे सेवन ही क्रियासाधना आहे. [ हि. सा. को.]

## क्रियायोग

'क्रियैव योगः उपायः' = क्रिया हाच योग अर्थात मोक्षसाधक उपाय, म्हणजे क्रियायोग होय (श. क.). देवालय निर्माण करणे, देवप्रतिमा निर्माण करणे, देवाची आराधना करणें, इ. गोष्टींना अग्निपुराणात क्रियायोग म्हटले आहे. क्रियायोग हा एक धर्म असून, तो गृहस्थांना सुलभ आहे. तो धर्म आचरणारा साक्षात नारायण-स्वरूप होतो, असे वैष्णवांचे मत आहे.

'तपःस्वाध्यायेश्वरप्रणिधानानि क्रियायोगाः' = तप, स्वाध्याय व ईश्वराची ध्यानधारणा म्हणजे क्रियायोग होय, असे पातंजलयोगसूत्रात म्हटले आहे (२.२). क्रियायोग हा योगसिद्धीचे आरंभिक साधन मानलेले आहे. त्यात मोक्ष-शास्त्राचे अनुशीलन आणि सगळी कर्मे ईश्वराला समर्पण करणे, या गोष्टी अभिप्रेत आहेत.

## क्रियायोगसार

एक उपपुराण. वास्तविक हे एक स्वतंत्र पुराण आहे. पण त्याच्या शेवटच्या श्लोकात त्याला उपपुराण म्हटले आहे, म्हणूनच त्याला आपण तसे म्हणायचे. कालांतराने ते स्वतंत्र न राहता पद्मपुराणाचे एक खंड मानले गेले. या पुराणात जगदुत्पत्तीचे वर्णन करताना लिहिले आहे—

महाविष्णूच्या शरीराच्या तीन भागांपासून ब्रह्मा, विष्णू व रुद्र हे उत्पन्न झाले व त्यांच्या आद्य प्रकृतीने ब्राह्मी, लक्ष्मी व अंबिका ही रूपे घेऊन त्या तिघांना त्यांच्या कार्यात मदत केली.

हे उपपुराण वैष्णव आहे. यात विष्णूचे पराक्रम आणि वैष्णवांचे गुण यांचे वर्णन केले आहे. यात ध्यानयोगापेक्षा क्रियायोगाचे श्रेष्ठत्व सांगितले आहे. या क्रियायोगाची सहा अंगे पुढीलप्रमाणे आहेत—

(१) गंगा, श्री व विष्णू यांची पूजा (२) दान (३) ब्राह्मणावर श्रद्धा (४) एकादशी व्रताचे पालन (५) तुलसी व धात्री (आवळी) यांची पूजा व (६) अतिथिसत्कार.

यांत गंगायात्रा, विष्णुपूजापद्धती, वैष्णवांची दैनिक कर्तव्ये, पुरुषोत्तमक्षेत्र, एकादशीव्रत, तुलसीमाहात्म्य, इ. विषय व त्या-संबंधी अनेक कथा दिलेल्या आहेत. एकनिष्ठ भक्तीनेच कैवल्य प्राप्त होते, असा या पुराणाचा दावा आहे. भागवत सप्रदायाचे पुढील तीन मंत्र यात आले आहेत—'ॐ नमो नारायणाय', 'ॐ नमो भगवते वासुदेवाय' व 'ॐ नमो रामाय'.

हे पुराण बंगालमध्ये इ. स. ९०० च्या सुमारास लिहिले गेले असावे. त्या काळात बंगालमध्ये बौद्धांचा बराचसा वर-चष्मा होता. जनतेला त्या बौद्ध प्रभावापासून मुक्त करून वैदिक धर्माकडे तिचे मन वळविणे, हा या पुराणाचा प्रमुख उद्देश दिसतो. [ स्ट. उ. ]

## क्रियावादी

एक तत्त्वज्ञानात्मक पंथ. जैन साहित्यात ज्या अनेक पंथांचा उल्लेख आहे, त्यातला हा एक आहे. महावीराने पाखंडी पथांचे चार वर्ग केले आहेत, त्यातला क्रियावादी हा पहिला आहे.

या पंथाचे लोक जीव, अजीव, आस्रव, बंध, संवर, निर्जरा, पुण्य, अपुण्य आणि मोक्ष ही नऊ तत्त्वे मानतात. मनात पापी विचार आला पण क्रिया घडली नाही, तर त्याचा दोष नाही; तसेच तसा हेतु नसता हातून पाप घडले, तरीही त्याचा दोष नाही, असे हे लोक मानतात. मनातला उद्देश आणि प्रत्यक्ष आचार ही दोन्ही मिळून पाप घडते व त्याचे वाईट फळ भोगावे लागते, असे क्रियावादी पंथाचे मत आहे. मनुष्याचे दुःख हे त्याच्या कर्माचेच फल होय. त्याच्याशी दैव किंवा ईश्वर यांचा संबंध नाही. केवळ कर्मामुळेच मोक्षप्राप्ती होते; मग त्या कर्माला ज्ञान किंवा श्रद्धा यांची जोड नसली तरी काही प्रत्यवाय नाही, असे हे लोक मानतात. [ स्कू. से. जै. लि.]

## क्रिवी

एक प्राचीन जात. सिंधू व चिनाब या नद्यांच्या प्रदेशात क्रिवी लोक राहत होते, असा ऋग्वेदात उल्लेख आहे ( ८.२०.२४ ). क्रिवी हे पांचालाचे प्राचीन नाव होते, असा शतपथ ब्राह्मणात उल्लेख आहे ( १३.५.४.७ ). [ वै. सा. सं. ]

## क्रिस्तपुराण

एक मराठी ओवीबद्ध ग्रंथ. फादर स्टीफन्स हा या ग्रंथाचा कर्ता होय. फादर स्टीफन्स हा इ.

स. १५७९ साली ख्रिस्ती धर्माच्या प्रचाराच्या हेतूने गोमंतकात प्रविष्ट झाला. सहा महिन्यांच्या आत त्याचा धर्मोपदेशक म्हणून दीक्षाविधी झाला व सासष्टीच्या धर्मप्रचारकेंद्रात त्याची योजना झाली. तिथे जाताच त्याने तिथल्या लोकाच्या भाषेचा व लिपीचा अभ्यास केला. त्याने थोड्याच कालावधीत तिथे बोलल्या जाणाऱ्या कोकणी बोलीचे एक व्याकरणही रचले. त्या भाषेवर प्रभुत्व मिळवून त्याने 'कानारी ब्राह्मणी भाषे'त दौत्रीन क्रिस्तां ( क्रिस्ती धर्मतत्त्व ) या नावाचे एक पुस्तक गुरुशिष्यसंवादाच्या रूपाने लिहिले.

या क्रिस्तपुराणाची पहिली आवृत्ती इ. स. १६१६ साली मुद्रित झाली. ग्रंथकाराने आपल्या ग्रथाच्या पहिल्या प्रास्ताविक अवस्वरात ग्रंथनिर्मितीच्या मागची आपली भूमिका चातुर्याने मांडली आहे. आपला काव्यग्रंथ तत्कालीन सामाजिक गरजेतून निर्माण झाला आहे, असे प्रतिपादन करणारा एक संवादप्रसंग कवीने निवेदक पाद्री व नवख्रिस्ती ब्राह्मण यांच्यांत घडवून आणला आहे. क्रिस्तपुराणाच्या या भूमिकेविषयी डॉ. स. गं. मालशे पुढील निष्कर्ष सांगतात–

(अ) गोव्यातील नवक्रिस्ती लोक पूर्वी जे मराठी पुराणग्रंथ वाचीत असत, ते वाचण्यास त्यांना बंदी करण्यात आली होती. अर्थात त्या ग्रंथांची जागा भरून काढण्यासाठी हे क्रिस्तपुराण रचिले गेले.

(आ) नवक्रिश्चनांनी 'भक्तिपंथेचि जावे', अविद्येचे सांगाती बनू नये, म्हणून त्यांना मनोविनोदनासाठी भक्तिकथारसयुक्त ग्रंथरचना देणे अवश्य होते, त्यासाठी हे पुराण लिहिले गेले.

(इ) त्या काळी नवक्रिस्ती ब्राह्मणांमध्ये फिरंग्याची भाषा जाणणारे लोक नव्हते. त्यामुळे गोमंतकाची ग्रंथभाषा जी मराठी, तीत हे पुराण रचण्यात आले.

या पुराणाचे पैले पुराण (जुना करार) व दुसरे पुराण (नवा करार) असे दोन भाग आहेत. पैल्या पुराणाचे ३६ अध्याय असून दुसऱ्या पुराणाचे ५९ अध्याय आहेत. हे पुराण बायबलावर आधारलेले आहे. याला कर्त्याने जरी पुराण असे नाव दिले असले, तरी ऐतिहासिक दृष्टीने वास्तव घटनाचे वर्णन करणे, हीं क्रिस्तपुराणाची भूमिका आहे. पहिल्या भागात जगदुत्पत्ती व जलप्रलय यांची भरघोस वर्णने आहेत. नंदनवनात मानवाच्या आद्य माता-पित्यांच्या हातून आज्ञाभंगाचे जे पाप घडले त्याचे वर्णन व ज्यू लोकांच्या प्राचीन इतिहासातील सम्राट्, योद्धे व संत यांच्या चरित्रांचे वर्णनही याच भागात आले आहे.

येशू ख्रिस्ताचे बाळपण, त्याने केलेले चमत्कार, त्याला क्रूसावर चढविणे, त्याचे पुनरुत्थान व स्वर्गारोहण या घटनाचे विस्तृत वर्णन दुसऱ्या भागात आहे. याशिवाय अदांव, मोइजे व येशू यांच्या धार्मिक व नैतिक उपदेशाचे कथनही क्रिस्तपुराणात विस्ताराने केले आहे.

'जगदुद्धारक क्रिस्ताचे या लोकी आगमन' हे या पुराणाचे मुख्य सूत्र आहे. त्यात क्रिस्तागमनावर व क्रिस्तचरित्रावर प्रकाशझोत कायम ठेवून, त्या अनुरोधाने मूळ बायबलातल्या अन्य घटनांचा संकोच–विस्तार केलेला आहे. वक्ता व श्रोता यांच्या संवादातून या पुराणाचा विस्तार होत गेलेला आहे.

बायबलाव्यतिरिक्त अन्य ग्रंथांतून मिळविलेले असे काही कथाप्रसंगही या पुराणात आले आहेत. मेरीच्या बाळपणाची हकीगत कवीने युरोपातल्या लोकसाहित्यातून उचलली आहे. येरुशलेमच्या विनाशाचे भीषण वर्णन 'दि ज्युइश वॉर' या ग्रंथातून घेतलेले आहे. बायबलातील रानटी आणि दुर्वर्तनी राजांच्या जीवनाची वर्णने कवीने सक्षिप्त केलेली असून, ज्या घटनानी ख्रिस्ताविषयीचा भक्तिभाव वाढीस लागेल, अशा घटना त्याने विस्ताराने रंगविल्या आहेत. ख्रिस्ती धर्मतत्त्वांचे मंडन करतानाच हिंदुधर्मतत्त्वांचे खंडन करण्याचाही त्याचा रोख दिसून येतो.

क्रिस्तपुराण कोणत्या छंदात लिहिले आहे, हा एक विवाद्य विषय झाला होता. क्रिस्तपुराणात दोन ठिकाणी 'अभगु' असे उल्लेख आहेत. त्यावरून हा संदेह निर्माण झाला. पण श्री. अ. का. प्रियोळकर यांनी सदर पुराण ओवीछंदातच लिहिले असल्याचे साधार मत व्यक्त केले असून, प्रा. बंडेलू यांनीही ते मान्य केले आहे.

एका परदेशी धर्मोपदेशकाने अल्पावधीतच मराठी भाषेवर प्रभुत्व मिळवून सहजसुंदर व ओवीबद्ध अशी काव्यरचना करावी, याचे मोठे कौतुक वाटते. फादर स्टीफन्स हा केवळ मराठीचा अभ्यासकच नव्हता, तर त्याचे मराठीवर प्रेमही होते, हे त्याच्या पहिल्याच अवस्वरावरून कळते. मराठी भाषेची प्रशंसा करताना तो लिहितो–

**जैसी हरळांमाजि रत्नकिळा । कि रत्नांमाजि हिरा निळा**
**तैसी भासांमाजि चोखळा । भासा मराठी ।।**
**जैसी पुस्पांमाजि पुस्प मोगरी । कि परिमळांमाजि कस्तुरि ।**
**तैसी भासांमाजि साजिरी । मराठिया ।।**
**पखिआंमधें मयोरु । वृखिआंमधें कल्पतरु ।**
**भासांमधे मानु थोरु । मराठियेसि ।।**

(१.१२२–१२४)

क्रिस्तपुराणाच्या रचनेत कविप्रतिभेचा रमणीय विलास ठायी ठायी आढळतो. शृंगाररस वगळून इतर सर्व रसांचे

आवे या पुराणात पाहायला मिळतील. कवीची वर्णनशैलीही मनोवेधक आहे. पैल्या पुराणाच्या चौथ्या अवस्वरात त्याने नंदनवनाचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे–

**तेथ भ्रांति सांडोनि मोनजाती । सुखे चारा घेती ।**
**नाना रळिया करिती । हुंबरिया घालोनि ।।**
**सेळिया बोकडिया तेथें । न भियेती व्याग्रांसिहांथें ।**
**तेयांचे भये जिवाथें । न धरिती काही ।।**
**तवं मोनजाती तेथें । देखोनि आपुले राणियेथें ।**
**रळिया करिति तियेथें । मातु देउनि ।।**
**येकी भोंवतिया येउनि । उडती प्रदख्यणा करोनि ।**
**येकी पाहांती दुरउनि । उचलोनि माना ।।**
**वृखेआंचियां टाळियां । पाखुरुवें बैसोनियां ।**
**काव्य करिती नाना छाया । आपापुलेयां भासा ।।**
(४.८२,८४,८६,८८ व ८९)

दुसऱ्या पुराणातील १४ व्या अवस्वरात बालतपस्वी योआवुओच्या तपस्येचे जे वर्णन कवीने केले आहे, ते भागवत पुराणातल्या ध्रुवाच्या तपश्चर्येशी जुळणारे आहे. अंतःकरणाचा थरकाप उडविणारी भीषण परिस्थिती पुढे उभी राहिली असताही तो बालतपस्वी आपल्या ध्येयापासून रतिमात्र विचलित होत नाही—

**चौंमेरीं भयानक वन । बाळकाचे कांपे मन ।**
**न दिसे उदेवो अस्तमान । झाडांचे अंधकारें ।।**
**तेथे व्याघ्र दाडांत । जंबुक भालुवा भोंकित ।**
**वन-माजर मेमात । गर्ज्जती सिंह ।।**
**भिर्बुटियांचेआ कोडी मेळुनि ।**
**विकट नादें रुणझुणती वनी**
**नाइकावे पडले कर्नीं । मग काये जाहालें ।।**
(१४.४८–५०)

पैल्या पुराणाच्या १ ल्या अवस्वरात कवीने पवित्र त्र्यैकाला (पिता, पुत्र व पवित्र आत्मा) केलेले आवाहन व मरियेची प्रार्थना, ७ व्या अवस्वरातील जलप्रलयाचे भव्य-भीषण वर्णन, पुढच्या अवस्वरातील मानवी दुःखाची मीमांसा, मोझेसच्या मातेचा पुत्रत्यागाच्या वेळचा हृदयद्रावक शोक; दुसऱ्या पुराणात आलेली ख्रिस्तजन्माची कथा व त्या प्रसंगाच्या आनंदमयतेचे वर्णन, इ. अनेक काव्यसौंदर्याची स्थळे अतिशय सरस उतरली आहेत.

या पुराणात कवीच्या केवळ प्रतिभेचाच विलास दिसत नसून ख्रिस्ती संतांच्या वाङमयाचे त्याने किती सखोल अध्ययन केले होते, त्याचाही प्रत्यय येतो. [क्रिस्तपुराण]

**क्रूरवश्यकर यंत्र** धनी क्रूर बनून सेवकांना त्रास देऊ लागतो व कितीही आर्जवे केली, तरी त्यांच्याविषयीचा दुराग्रह सोडीत नाही, अशा वेळी त्याला ताळ्यावर आणून वशीभूत करण्यासाठी या यंत्राचा प्रयोग करतात. त्यासाठी भूर्जपत्रावर गोरोचनाने दीर्घ चतुष्कोण काढून त्यात ज्याला वश करायचे, त्याच्या नावाची जेवढी अक्षरे

| ह्रीं (दे) ह्रीं (व) ह्रीं (द) ह्रीं (त) ईं |
| --- |

क्रूरवश्यकर यंत्र

असतील तितक्या वेळा ह्रीं हे बीज लिहून शेवटी ईं हे बीजाक्षर लिहितात. नंतर मातीची एक प्रतिमा करून तिच्या पोटात ते यंत्र घालतात. मग त्या प्रतिमेची पूजा करून चुलीजवळ एक खड्डा खणतात व त्यात ती पुरतात. हा विधी कृष्ण चतुर्दशीच्या मध्यरात्री करतात. नंतर भातात बकरीचे रक्त मिसळून त्याचे वडे बनवतात व ते अष्टदिक्पालांना अर्पण करतात. त्याचप्रमाणे त्या भातात रक्तमिश्रित घृत व रक्तपुष्प घालून 'महाकालाय स्वाहा' या मंत्राने त्याच्या १०८ आहुती देतात. याला क्रूरवश्यकर कालानलयंत्र असेही म्हणतात. [यं. चिं.]

**क्रोध** एक मनोविकार. साहित्यदर्पणात याचे लक्षण दिले आहे, ते असे– 'प्रतिकूलेषु तैक्ष्ण्यस्यावबोधः क्रोध इष्यते' = प्रतिकूल विषयांच्या ठिकाणी तीक्ष्णतेचा उद्‌बोध होणे, याला क्रोध म्हणतात (३.१७७). असामान्य अपराध, विवाद, अपमान, इ. गोष्टींपासून उत्पन्न होणारा क्षोभरूप मनोविकार म्हणजे क्रोध होय.

अंतःकरणाला प्रिय व अनुकूल असलेल्या भावनांवर आघात होण्याने क्रोधाचा प्रादुर्भाव होतो.

क्रोध हा रौद्र रसाचा स्थायीभाव आहे. भृकुटीभंग, ओठ चावणे, उग्रता, डोळे लाल होणे, इ. गोष्टी हे क्रोधाचे अनुभाव समजावे.

भगवद्‌गीतेत क्रोध हा रजोगुणापासून उत्पन्न होतो, असे सांगितले आहे. संगापासून काम उत्पन्न होतो व कामाला अभिघात किंवा विरोध झाल्याने क्रोध उत्पन्न होतो, असेही गीतेचे सांगणे आहे (२.६२). मनूने क्रोधापासून उत्पन्न होणारे व्यसनाष्टक सांगितले आहे, ते असे–

**पैशुन्यं साहसं द्रोह ईर्ष्यासूयार्थदूषणम् ।**
**वाग्दण्डजं च पारुष्यं क्रोधजोऽपि गणोष्टकः ।।**
(४.४८)

अर्थ– नसलेले दोष दाखविणे, साहस, द्रोह, दुसऱ्याचे गुण सहन न होणे, दुसऱ्याच्या गुणांच्या ठिकाणी दोषाविष्करण करणे, अर्थाचे अपहरण, आक्रोशादी वाणीची कठोरता व ताडनादी दु.ख देणे, हा आठ व्यसनांचा समुदाय क्रोधापासून उत्पन्न होतो.

क्रोधाच्या आहारी जाऊ नये, तो अनर्थकारक आहे आणि आत्मघातकही आहे, असे साधुसंतांचे सांगणे असते. 'राग खाई आपल्याला; संतोष खाई दुसऱ्याला' अशी मराठीत एक म्हणच आहे.

**क्रोधशमनयंत्र** या यंत्राचा प्रयोग असा – सोमवारी ताडपत्रावर गोरोचनाच्या द्रवाने, लोखंडाचा काटा घेऊन हे यंत्र लिहितात. मग कुंभाराकडची माती आणून तिचा गोळा करतात व त्या गोळ्यात हे यंत्र ठेवतात. पुढील मंत्राने यंत्राची पूजा करतात–

**अक्रोधनः सत्यवादी जमदग्निर्दृढव्रतः ।**
**रामस्य जनकः साक्षात् सत्वमूर्ते नमोऽस्तु ते ।।**

अर्थ– क्रोध न करणारा, सत्यवादी, दृढव्रती, परशुरामाचा जनक असा जमदग्नी ऋषी आहे. हे साक्षात सत्वमूर्ते, तुला नमस्कार असो.




क्रोधशमन यंत्र

या यंत्राची सात दिवस पूजा करून सातव्या दिवशी ब्राह्मणाला भोजन घालतात. या व्रताचे फल – साध्याचा (ज्याला राग आला असेल तो) राग मावळणे व ती व्यक्ती प्रसन्न होणे. या यंत्रात जमदग्नीची पूजा असल्यामुळे याला क्रोधशमनजामदग्न्ययंत्र असेही म्हणतात. [ यं. चि. ]

**क्रौंच** (१) हिमालयातील एक खिंड. हा कैलास पर्वताचाच एक भाग आहे. परशुरामाने कैलासाहून दक्षिणेकडे जाण्यासाठी आपल्या बाणाने ही खिंड निर्माण केली. या खिंडीला क्रौंचदारण असेही दुसरे नाव आहे. [ श. क. ]

(२) एक पर्वत. मैनाकाचा पुत्र व हिमाचलाचा नातू. याच्यावर नाना प्रकारची रत्ने असल्याचे हरिवंशात सांगितले आहे (१८.१३–१४).

(३) एक पक्षी. याला कुरर किंवा राजस्थानी भाषेत कुंजरिया असेही म्हणतात. राजस्थानी स्त्रियांनी याच्या करवी आपल्या प्रियकराला अनेक संदेश पाठविले आहेत––

**उड़ती कुंजरियां, सनेसो म्हारो । लेती जाज्यो ओ उड़ती कुंजरियां सासूजी ने कहियो । कूंजां पगे ओ लागणा ।**

**छोटे से देवरिया ने प्यार कहिज्यो । ओ उड़ती कुंजरियां परणथोड़े ने कहीज्यौ । कूंजां जाझा ओलभा**

**साथ अबै तो लेती आज्यो । ओ उड़ती कुंजरियां ।**

अर्थ– हे उडणाऱ्या कुंजरिया (क्रौंच पक्ष्या), माझा संदेश माझ्या पतीकडे घेऊन जा. माझ्या सासूला नमस्कार सांग. माझ्या छोटया दिराला माझे प्रेम सांग. हे पक्ष्या, तू माझ्या पतीची (मला विरहदुःख भोगायला लावल्याबद्दल ) भरपूर कानउघाडणी कर. आणि जर तो येत असेल, तर त्याला तुझ्याबरोबर घेऊन ये.

कावळा, पोपट आणि चातक यांच्याप्रमाणे राजस्थानी विरहिणीचा हा अत्यंत प्रिय पक्षी आहे. [ श्री. प्रसाद – संयुक्त राजस्थान, एप्रिल, १९५५ ]

**क्रौंचद्वीप** पृथ्वीच्या सप्तद्वीपांपैकी पाचवे. हे घृतोदाच्या पलिकडे असून दधिमंड समुद्राने वेढलेले आहे. याचा विस्तार सोळा लक्ष योजने आहे. इथे क्रौंच नावाचा एक प्रचंड पर्वत असून, त्याला कार्तिकेयाच्या बाणाने आरपार भोक पाडले असल्याचे वायुपुराणात सांगितले आहे.

प्रियव्रत राजर्षीचा पुत्र घृतपृष्ठ हा या द्वीपाचा अधिपती होता. या प्रदेशात चातुर्वर्ण्य पद्धती रूढ असून, येथील लोक शिवपूजक होते, असे पुराणांतरी सांगितले आहे. सांप्रतची समरकंद व बुखारा ही शहरे ज्या भागात वसली आहेत, त्या भागाला प्राचीन काळी क्रौंचद्वीप म्हणत असावे, असे अनुमान आहे.

इथे शुक्ल, वर्धमान, भोजन, उपबर्हिण, नंद, नंदन, सर्वतोभद्र असे सात पर्वत आणि अभया, अमृतोघा, आर्यका, तीर्थवती, वृत्तिकारूपवती, पवित्रवती व शुक्ला या नावाच्या सात नद्या आहेत. घृतपृष्ठाने या द्वीपाचे सात भाग करून ते आपल्या सात पुत्रांना विभागून दिले. [ म. ज्ञा. को.; रा. ले. सं.; क्रि. स्ट. नै. च. ]

**क्रौंचव्यूह** संस्कृतात बगळ्याला क्रौंच म्हणतात. क्रौंच-व्यूह हा प्राचीन युद्धशास्त्रातला एक व्यूह आहे. यात सेनापती आपली सैन्यरचना बगळ्याच्या आकाराची करतो. भारतीय युद्धात पांडवांच्या बाजूने क्रौंचव्यूह रचला गेला होता. [ प्रा. भा. सां. ].

**क्रॉस** उभ्या रेषेला आडव्या रेषेचा छेद दिल्याने जी फुली-सारखी आकृती बनते, तिला क्रॉस किंवा क्रूस म्हणतात. क्रॉस हे ख्रिस्ती धर्माचे पवित्र प्रतीक आहे. ख्रिस्ताला क्रूसावर खिळवून त्याचा वध करण्यात आल्यामुळे ख्रिस्तानुयायांची क्रूसावर विलक्षण भक्ती आहे.

प्रारंभापासूनच ख्रिस्ती लोकाचा असा विश्वास आहे, की ख्रिस्ताने मनुष्यजातीच्या पापांचे प्रायश्चित करण्यासाठी क्रॉसवर ठोकून घेऊन वधदंड स्वीकारला. पण सुरवातीच्या काळात आपल्या प्रेषिताचा असा क्रूर मृत्यू चित्रित करणे आणि ते आपल्या धर्माचे चिन्ह बनविणे, या बाबतीत त्यांना संकोच वाटत होता, असे दिसते. कारण पहिल्या तीन शतकात क्रूसावर खिळविलेल्या ख्रिस्ताची अवघी तीनच चित्रे मिळाली आहेत. रोमन सम्राट कान्स्टंटाईन ( ४ थे शतक ) याने ख्रिस्ती धर्म स्वीकारल्यानंतर पुढील काळात क्रॉसविषयीची कल्पना बदलली. त्याच्यातला क्रूरता हा भाव लुप्त होऊन ते पावित्र्य आणि उदात्तता यांचे प्रतीक ठरले. जे जे काही भव्य आणि पवित्र असेल, ते ते सर्व क्रॉसमध्ये समाविष्ट आहे, असाही प्रचार ख्रिस्ती धर्माचार्यांनी सुरू केला.

पुढच्या काळात ‘ क्रॉसवर खिळविलेला ख्रिस्त ’ हा विषय युरोपातील चित्रकारांचा अत्यंत आवडता ठरला. तशा अवस्थेतल्या ख्रिस्त-मूर्तींचेही प्रचलन झाले. ख्रिस्ती लोकाच्या घराघरामध्ये अशा प्रकारची चित्रे वा मूर्ती दिसू लागल्या. पुढे सोन्या-चांदीचे किंवा हिरेजडित क्रॉस बनवून ते अलंकार म्हणून गळयात घालण्याचीही प्रथा सुरू झाली. प्रत्येक धर्म-संस्कारात ख्रिस्ती पुरोहित क्रॉसच्या चिन्हाचा उपयोग करू लागले. प्रत्येक धार्मिक कृत्याच्या वेळी ख्रिस्ती लोक डोक्यापासून छातीपर्यंत उभी रेघ आणि डाव्या दंडापासून उजव्या दंडापर्यंत आडवी रेघ हाताच्या हालचालीने दाखवून क्रॉसचे चिन्ह व्यक्त करतात. तो एक प्रकारचा अंगन्यासच असतो.

क्रॉस हा रोमन लोकांमध्ये गुलामांच्या साठी वधस्तंभ म्हणून उपयोगात आणला जात असे. क्रूसावर खिळविणे, ही गुन्हेगाराला अपमानास्पद व यातनामय अशी शिक्षा होती. त्या शिक्षेत गुन्हेगाराला तात्काळ मरण येत नसे; तर कमालीच्या यातना आणि वेदना भोगीत, अन्नपाण्यावाचून सुकत, तळमळत त्याला मरावे लागे. त्यामुळे क्रूसावर चढविणे, या शिक्षेचे लोकाना फार भय वाटे. गुन्हेगाराला क्रूसावर चढवून खिळयांनी ठोकल्यानतर त्याच्या डोक्यावर त्याच्या गुन्ह्याचा लेख चिकटवीत असत. क्रूसाचे उभे लाकूड पुरलेले असे. त्याचे आडवे लाकूड गुन्हेगाराला वधस्थळी स्वतःच्या खांद्यावरून वाहून न्यावे लागे. रोमन बादशहा कान्स्टंटाईन याने ख्रिस्ती धर्म स्वीकारल्या नतर क्रूसिफिकेशन हा वधदंड रद्दबातल केला.

१

२

३

४

५

६

रोमन लोक क्रॉस हा वधस्तभ म्हणून उपयोगात आणीत असले, तरी क्रॉस हा रोमनांनी शोधून काढलेला नाही. तो त्यांच्यापूर्वी आणि ख्रिस्ताच्याही पूर्वी हजारो वर्षे अस्तित्वात होता आणि जगाच्या कोनाकोपऱ्यात एक धार्मिक प्रतीक म्हणून पुजला जात होता. मिसर देशाची संस्कृती ही प्राचीन संस्कृतींपैकी एक आहे. त्या संस्कृतीत आइसिस नावाची एक महान देवता आहे. ती गाईच्या शिंगांचा मुकुट मस्तकी धारण करून उभी असते व तिच्या डाव्या हाती काठी व उजव्या हाती क्रॉस असतो. असीरियाची संस्कृती हीही एक जगातील प्राचीन संस्कृती होय. हिलाच आपण असुरसंस्कृती म्हणतो. त्या संस्कृतीतही क्रॉसला धर्मप्रतीक म्हणून मान्यता आहे. ब्रिटिश म्युझियममध्ये सस्सी राम्मानू नामक एका प्राचीन असीरयन राजाची पाषाणमूर्ती ठेवलेली असून तिच्या मानेवर आणि हृदयावर क्रॉस कोरलेला दिसतो.

वरील चित्रातल्या क्रूसांचे अनुक्रमाने वर्णन पुढील प्रमाणे — (१) मूळचा साधा क्रॉस. (२) संत अँड्र्यूजचा क्रॉस— हा अधोर्ध्व लोकांचा संयोग दर्शवितो. (३) बाणाग्रे असलेला

क्रॉस – हा केंद्रोत्सारिणी शक्ती दर्शवितो. (४) स्वस्तिकाकृती क्रॉस. (५) दुहेरी क्रॉस – हा समांतर दिशेने जाणाऱ्या शक्ती दर्शवितो. (६) अष्टाग्र क्रॉस – हा माल्टा बेटात वापरला जाणारा क्रॉस केंद्राकर्षिणी शक्ती दर्शवितो.

क्रॉसचे मुख्य प्रकार दोन – पहिला सरळ क्रॉस. यात उभ्या आडव्या रेषा किंवा पट्ट्या समान लांबीच्या असतात. तो गणितातल्या + अधिक चिन्हासारखा असतो. त्याला ग्रीक क्रॉस म्हणतात. दुसऱ्या प्रकारच्या क्रॉसमध्येही दोन्ही पट्ट्या समान लांबीच्याच असतात. पण त्या रोमन वर्णमालेतल्या × या अक्षराच्या आकारात म्हणजे तिरप्या जोडलेल्या असतात. याला संत अँड्र्यूजचा क्रॉस म्हणतात. याच सरळ किंवा तिरप्या क्रॉसच्या चारी टोकांना भुजा फोडल्या म्हणजे ते भारतीय स्वस्तिक बनते. असीरियन संस्कृतीत क्रॉस आणि स्वस्तिक अशा दोन्ही चिन्हांचा संयोग असलेले एक चित्र आहे.



विविध क्रॉस

डिक्शनरी ऑफ सिंबॉल्स या ग्रंथात क्रॉसविषयी खूप विचार केला आहे. त्याचा साराश असा–

खिळवून वध करणे, हा क्रूसाचा वाच्यार्थ आहे व सांसारिक यातना किंवा क्लेश हा त्याचा ध्वन्यर्थ आहे.

स्वर्गातील वृक्षाची अधरोत्तर अवस्था म्हणजे क्रॉस अशी या शब्दाची आणखी एक उपपत्ती आहे. म्हणून मध्ययुगात क्रॉसचे चित्र रेखाटताना त्याला रोमन Y या अक्षराचा आकार देऊन त्याला पेरे, फांद्या व कधी कधी काटेही दाखवीत. क्रॉस म्हणजे जीवनवृक्ष ही दुसरी कल्पना होय. तो विश्वाच्या दुर्ज्ञेय अशा केंद्रस्थानी आहे आणि तो जणू काय स्वर्लोक आणि भूलोक यांना जोडणारा सेतूच आहे.

वरील चित्रातील क्रूसाचे वर्णन पुढीलप्रमाणे–

(१) स्वस्तिकयुक्त असीरिअन क्रॉस. (२) धार्मिक सैनिकांचा क्रॉस. (३) एका रेषेने बनविलेला क्रॉस. (४) चार दिशा दर्शविणारा, अग्रभागी बोंडे असलेला क्रॉस. व (५) अर्धचंद्राकृती टोके असलेला क्रॉस.

क्रॉसमधल्या आडव्या, उभ्या रेषा एकत्र येऊन त्या भौतिक व आध्यात्मिक अशा परस्पर विरोधी तत्त्वांचा संयोग घडवून आणतात. कधी कधी क्रॉस हा रोमन वर्णमालेतल्या 'टी'-सारखा काढलेला असतो. त्या वेळी तो परस्पर विरोधी तत्त्वांचा समतोल दर्शवितो.

वेदना, धडपड, प्रयत्न आणि स्वमताच्या सिद्धयर्थ प्राणार्पण, असाही अर्थ क्रॉसमधून व्यक्तविलेला आहे.

विस्तव पाडण्यासाठी एकावर एक घासल्या जाणाऱ्या लाकडाच्या दोन ओंडक्याशी आदिम मानवाच्या दोन्ही हाताचा संबंध येत असे. टीचा आकार दर्शविणारे हे दोन ओंडके म्हणजे पुरुषतत्त्व आणि स्त्रीतत्त्व होत. भारतीय यज्ञसंस्थेत दोन अरणीच्या साहाय्याने घर्षणातून अग्नी निर्माण करतात, तिथेही हीच स्त्री-पुरुषतत्त्वांची कल्पना आहे. त्यावरून क्रूस हे अग्नी व जीवनातील व्यथा यांचे प्रतीक होय असे जंग (Jung) या ग्रंथकाराने म्हटले आहे. तथापि क्रॉस या शब्दातून अनेक अर्थ ध्वनित होत असले, तरी त्याचा प्रधान अर्थ दोन विरोधी तत्त्वाचा संयोग हाच होय.

युरोपात निरनिराळे लष्करी हुद्दे दर्शविण्यासाठी काही चिन्हे उपयोगात आणतात. त्या चिन्हांतला सर्वसामान्य प्रकार म्हणजे स्वस्तिक होय. स्वस्तिक हा क्रॉसचाच एक प्रकार आहे आणि तो पृथ्वीच्या पाठीवरील बहुतेक देशात आढळतो.

क्रूसिफिकेशन याचा लाक्षणिक अर्थ वैरभाव अनुभवणे, असा आहे. हा वैरभाव म्हणजे आयुष्यात अनुभवाला येणाऱ्या तीव्र यातना, शक्याशक्य गोष्टीत लागणारी तीव्र झुंज आणि उत्पत्ती व विनाश यांचा चक्रनेमिक्रम होय. **पाहा**– स्वस्तिक. [ सं. प्र.; डि. सिं.; प. ध. शा. को.; एन्सा. रि.; हिं. वि. को. ]

**क्लेश** याचा अर्थ दु.ख किंवा तत्पर्याय असा आहे. हा पंचविध आहे. अविद्या, अस्मिता (मी आहे असा अहंकार), राग (इच्छाविशेष), द्वेष व अभिनिवेश (मरणभय) हे ते पाच प्रकार होत (यो. सू. २.२–३). या पचविध क्लेशापासून जो मुक्त होतो, तो ईश्वरच समजावा.

**क्वादियानी** एक मुसलमानी धर्मपंथ. पंजाबातील गुरुदासपूर जिल्ह्यातील क्वादियान गावचा मिर्झा गुलाम अहमद याने हा पंथ स्थापला. १९०० सालच्या शिर-

गणतीत या पंथाच्या अनुयायांच्या मागणीवरून त्याची अहमदिया मुसलमान म्हणून नोंद झाली. या पंथाचे भारताबाहेरही काही तुरळक अनुयायी आहेत.

या पंथाने रिव्ह्यू ऑफ् रिलिजन्स् नावाचे एक मुखपत्र चालविले होते. आजही त्याने काही ठिकाणी वृत्तपत्रे व शाळा चालविल्या आहेत. [ एन्सा. रि. ए. ]

**क़िब्ला** या शब्दाचा अर्थ पूज्य स्थान असा असून, प्रामुख्याने हा शब्द मक्केतील काबा मंदिराच्या संबंधात वापरला जातो. कोणताही मुसलमान कुठेही प्रार्थना करीत असला, तरी काबाच्या अर्थात् मक्केच्या दिशेला त्याचे तोंड असते. [ डि. इ ]

**खंगार** (१) उ. भारतातली एक जात. यांना कंगार किंवा खागार अशीही अन्य नावे आहेत. यांचे वास्तव्य प्रामुख्याने बुंदेलखंडात आहे. यांचा राजपूत वंशाशी निकट संबंध असल्याने यांना रावत किंवा रावखंगार असेही म्हणतात. यांचा मुख्य व्यवसाय खेडेगावांची राखण करण्याचा असल्यामुळे त्यांना कोतवाल म्हणूनही ओळखतात.

खंगार शब्दाची व्युत्पत्ती हिंदी खख किंवा संस्कृत खड्ग शब्दावरून लावली जाते. आपण क्षत्रियकुलोत्पन्न असल्याचे हे सांगतात व त्याच्या पुष्टचर्थ राजपुतांप्रमाणे आपल्याही विवाहसमारंभात तलवार बक्षीस देण्याची चाल असल्याचा दाखला देतात. सकृद्दर्शनी त्यांचे हे म्हणणे खरे वाटले, तरी त्यांच्या गोत्रपद्धतीकडे पाहता ते द्राविड वंशाचे असावे, असे वाटते.

स्वर्दू, भार्ता, पर्सतिया, बिसोरा, हटगोविया, मालनिया, कुररीया, धोरगोतिया, भिलगोतिया, विजातिया, भारद, नाहरगोतिया, नाग्गोतिया, कुसुमगोतिया व भर्गोतिया, इ. त्यांच्या पोटजाती आहेत. राय, मिरधा किंवा नकीब, करवाळ व दहाईत असे यांचे चार प्रमुख पोटभेद आहेत,

यांच्या कुलांची नावे अशी – बच्छा, वराह, बेलगोटिया, चंदन, चिरई, धुरगोतिया, ग्वा, हकमान, हार्या, कसगोतिया, महियर, मांडगोतिया, तांवागोतिया वगैरे.

**विवाहप्रथा**– एकाच कुलनावाच्या लोकात,त्याचप्रमाणे आतेमामेभावंडातही विवाह होत नाहीत. पिवळा झगा, लाल पायजमा व पांघरायला शेला असा लग्नाच्या वेळी वराचा पोषाख असतो. वराच्या डोक्यावर खजुरीच्या पानाचा मुकुट असतो. गळचात बायकांच्या वापरातली चांदीची सरी असते. कुठे कुठे रुपयांची माळही गळ्यात असते. वधू-वरांना मुगाच्या वेलाभोवती सहा व बोहल्याला एक अशा सात प्रदक्षिणा घालायला लावतात. वधू अगदीच लहान असली, तर गर्भाधानाच्या वेळी वरील विधी करतात. लग्नात वराच्या बापाला लुगडे नेसवून वधूच्या आईबरोबर नाचवितात व ती दोघे एकमेकांवर हळदीचे पाणी शिपडतात.

**देव-धर्म** – हे लोक दुल्हादेवाला भजतात. डांगी लोकानी खंगारांबरोबर पाच वेळा भोजन केले, त्याच्या स्मरणार्थ पंचघर देवाची पूजा करण्याची प्रथा रूढ झाली. नागबाबा आणि कानेरियाबाबा हे त्यांचे आदर्श सत्पुरुष होत. त्यांचीही ते पूजा-अर्चा करतात. कुरार येथे जाऊन गिडवाणसा देवीचे दर्शन घेतात. लग्नप्रसंगी वधू गुडमेहरापूजा या नावाने एक पूजा करते. त्यांच्यांत वृक्षपूजाही रूढ आहे. हे लोक मुलाच्या जन्मसंस्कारप्रसंगी घरात स्वस्तिके काढून षष्ठीपूजन करतात.

हे इतरांना आपल्या जातीत घेत नाहीत. पण खंगार पुरुष व उच्च जातीची स्त्री यांच्या संततीला आपल्यांत स्थान देतात. विजातीयांबरोबर व्यभिचार करणाऱ्या स्त्रीला वाळीत टाकतात. आपल्या ब्राह्मण पुरोहिताकडे हे कच्ची रसोई खातात. चौका पद्धतीने भोजन करतात. आपल्या नावामागे सिंग शब्द लावतात. मध्यप्रदेशात यांची वस्ती सागर, दमोह, नरसिंगपूर, जबलपूर वगैरे भागात आहे. [ म. ज्ञा को. ]

(२) मुडा जमातीपैकी एका वर्गाचे नाव. [ म. ज्ञा. को. ]

**खंजन** एक पक्षी. याला खंजरीट, खंडलिच, खिडलिच अशीही अन्य नावे आहेत. हिंदी साहित्यात चंचल नेत्रांच्या संबंधात उपमान म्हणून याचा उल्लेख येतो.



खंजन पक्षी

आपल्या सेनेला शौर्य प्राप्त व्हावे, म्हणून राजाने नीराजनविधी केल्यावर खंजनपक्ष्याचे दर्शन घ्यावे, असे तिथितत्व या ग्रंथात सांगितले आहे. [ हि. ध.; हिं. वि. को. ]

**खंजिरी** डफासारखे एक वाद्य. याला खजरी असेही म्हणतात. सुमारे सहा इंच रुंद व अर्धा इंच जाड लाकूड घेऊन त्याचे गोल कडे बनवितात व ते एका बाजूने चामड्याने मढवितात. कड्यात चार-पाच ठिकाणी पत्र्याच्या चकत्या बसवितात. हे वाद्य डाव्या हातात धरून उजव्या हाताने वाजवितात. जंगम, वाघ्ये, गोसावी, इ. लोक तोंडाने पदे म्हणतात व त्यांना खंजिरीची साथ देतात. [ सु. वि. को.; परंपरा–– लोकगीत.; सं. शा. ]


खंजिरी

**खंड** महाद्वीपाच्या लहान भागाला वर्ष म्हणतात; तसेच वर्षाच्या लहान भागाला खंड म्हणतात. आपण राहतो त्या भारतवर्षात कुशावर्त, इलावर्त, ब्रह्मावर्त, मलय, केतू, भद्रसेन, इंद्रस्पृक्, विदर्भ आणि कीकट अशी नऊ खंडे आहेत. मत्स्य पुराणात या नवखंडाची नावे वेगळी दिली आहेत, ती अशी– इंद्रद्वीप, कसेर, ताम्रपर्ण, गभस्तिमान, नाग, सौम्य, गंधर्व, वारुण व भरत.

अलिकडच्या भौगोलिक परिभाषेत पृथ्वीवरील जमिनीच्या मोठ्या भागास खंड म्हणतात. आफ्रिका, आशिया, अमेरिका, युरोप आणि ओशियानिया ही विद्यमान भौगोलिक खंडे होत.

**खंडकाव्य** प्रबंधकाव्याचे एक विशेष रूप. साहित्यदर्पणात याचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे–

**भाषाविभाषानियमात् काव्यं सर्गसमुत्थितम् ।**
**एकार्थप्रवणैः पद्यैः सन्धिसामग्र्यवर्जितम् ।**
**खण्डकाव्यं भवेत् काव्यस्यैकदेशानुसारि च ।**

(६.३२८–३२९)

अर्थ– भाषेत किंवा विभाषेत नियमबद्ध रीतीने सर्गबद्ध, त्याचप्रमाणे एका कथेचे निरूपक, पद्यात्मक आणि संधिसामग्र्याने वर्जित असे जे काव्य, त्याला खंडकाव्य म्हणावे. हे काव्य महाकाव्याच्या एका अंशाचे अनुसरण करते.

सामान्यपणे आठ सर्गापेक्षा अधिक सर्ग असलेल्या काव्याला महाकाव्य आणि आठापेक्षा कमी सर्गाच्या काव्याला खंडकाव्य मानतात. पण हे विभाजन शास्त्रीय नाही. संस्कृत साहित्यशास्त्रात वर उल्लेखिलेल्या साहित्यदर्पणातील व्याख्येव्यतिरिक्त खंडकाव्याचे लक्षण किंवा विवेचन आढळत नाही. पण संस्कृत साहित्याच्या देशी व विदेशी समीक्षकांनी मेघदूत, घटकर्पर, चौरपंचाशिका व मेघदूताचे अनुकरण करून लिहिलेली संदेश–काव्ये यांना खंडकाव्ये म्हटले आहे. [ हि. सा. को. ]

**खंडगिरी** ओडिसातल्या पुरी जिल्ह्याच्या खुर्दा पोटविभागातील एक डोंगर. याच्या दोन जुळ्या टेकड्यांना खंडगिरी व उदयगिरी असे म्हणतात. या संबंध डोंगराचेच खंडगिरी असे नाव आहे. खंडित गिरी या अर्थाचे ते द्योतक आहे. हाथी गुंफेतील शिलालेखात या दोन टेकड्यांना कुमारी टेकड्या असे म्हटले आहे. या दोन्ही टेकड्या वालुकामय खडकाच्या आहेत. खंडगिरीचा माथा हे सर्वात उंच शिखर असून, त्याची उंची १२३ फूट व उदयगिरीच्या शिखराची उंची ११० फूट आहे. **पाहा**– उदयगिरि-खंडगिरी.

इथेच आणखी एक नीलगिरी नावाची टेकडी आहे. या टेकड्या प्राचीन गुंफांसाठी प्रसिद्ध आहेत. खंडगिरीत १९, उदयगिरीत ४४ व नीलगिरीत ३ गुंफा आहेत. या सर्व गुंफा खडक पोखरून बनविलेल्या आहेत. [ हि. जॉ. ए. इं.; जै. ध. ]

**खंड महादेव** पंजाबातील नूर्मुडा या गावापासून ३३ मैलांवर एक गुंफा असून, त्यात खंड महादेवाची मूर्ती आहे. हा मार्ग अत्यंत दुर्गम आहे. या गुंफेला दोन प्रचंड शिळांची दारे असून ती भीमाने लावल्याचे सांगतात. इथे सप्तर्षींच्या मूर्ती आहेत. इथून तीन मैलांवर कार्तिकस्वामीचे मंदिर व नयनसर नामक एक तलाव आहे. भस्मासुर इथे तप करीत होता. त्याला पाहून पार्वती भ्याली व रडू लागली आणि पुढे तिच्या अश्रूपासून हा तलाव निर्माण झाला, अशी दंतकथा सांगतात. [ पं. जी. सा. ]

**खंडाईत** ओडिसातील एक लढाऊ जमात. वास्तविक हे लोक शूद्र आहेत; पण ते स्वतःला शुद्ध क्षत्रियांचे वंशज म्हणवून घेतात. खंडाइतांमध्ये अनार्य रक्ताचे बरेच मिश्रण आहे, असे बीम्स हा मानववंशशास्त्रज्ञ म्हणतो; तर हे लोक दक्षिण भुइया गटापैकी आहेत, असे रिस्ले मानतो. ओडिसामध्ये यांचा दर्जा राजपुतांच्या खालोखाल आहे. पूर्वी ओडिसाच्या राजाच्या सैन्यात अनेक जातीचे लोक शिपाई म्हणून काम करीत असत. त्या सर्व लढवय्यांची पुढे एक स्वतंत्र जात बनली. खड म्हणजे तलवार, या शब्दावरून यांना खंडाईत हे नाव मिळाले. हल्ली हे लोक शेतीमाती करून राहतात.

छोटा नागपूरमधील खंडाइतात विधवाविवाहाची पद्धत होती; पण ओडिसामधील खंडाइतांत ती नव्हती मध्य प्रदेशातील या लोकांत कच्छप व नाग अशी दोन गोत्रे आहेत. यांच्यात बालविवाहाची चाल आहे. मुलगी रजोदर्शनापूर्वी न उजवल्यास तिचे बाणाबरोबर लग्न लावतात. वधू-वराचे हात कुशाने बांधणे व वधूला कडेवर घेऊन वराने बोहल्याभोवती सात प्रदक्षिणा घालणे, हे लग्नातले मुख्य दोन विधी असतात. हे लग्नासाठी ब्राह्मण पुरोहिताला बोलावतात. यांच्यांत बहुपत्नीत्वाची चाल आहे. पण अशा पुरुषाला मैपखिया म्हणजे पत्नीभक्षक असे म्हणतात. [डाल्टन– से. इं. १९५१; ट्रा. का. सें. प्रॉ. इं.]

## खंडारी

एक गायनपद्धती. ध्रुपद गाणारा प्रसिद्ध राजा सन्मुखसिंग हा खंडार गावी राहत असे, म्हणून त्याच्या ध्रुपदगायनपद्धतीस खंडारी असे नाव पडले आहे. [म. श. को.]

## खंडिता

एक नायिकाभेद. सर्वप्रथम भरताने हिचा उल्लेख केला आहे. हिचे लक्षण असे– 'अन्योपभोगचिह्नितः पतिः प्रातरागच्छति यस्याः सा'= जिचा पती दुसरीच्या उपभोगाची चिन्हे धारण करून सकाळी घरी येतो, तिला खंडिता असे नाव आहे (रसमंजरी).


खंडिता नायिका

अस्फुटालाप, चिंता, संताप, निःश्वास, मौन व अश्रुपात अशा तिच्या चेष्टाही रसमंजरीत सांगितल्या आहेत. अमरुशतकात खंडितेविषयी पुढील श्लोक आहे. त्यात ती आपल्या पतीचा उपालंभ व स्वतःच्या जीवनाचा तिरस्कार करून म्हणते–

**भवतु विदितं व्यर्थालापैरलं प्रिय गम्यतां**
**तनुरपि न ते दोषोऽस्माकं विधिस्तु पराङ्मुखः।**
**तव यदि तथारूढं प्रेम प्रपन्नमिमां दशां**
**प्रकृतितरले का नः पीडा गते हतजीविते ।।**

अर्थ– असू दे. मला काय ते कळले. व्यर्थ बडबड पुरे! हे प्रियकरा, तू आता जा. तुझा काही दोष नाही. आमचेच दैव वाईट आहे. तुझ्या उत्कट प्रेमाची जर ही तऱ्हा होणार असेल, तर या प्रकृतिचचल दुर्दैवी जीवनाचा अंत झाला, तरी काय बिघडणार आहे!

## खंडे नवमी

आश्विन शु. ९ मीस हे नाव आहे. या दिवशी महाराष्ट्र, राजस्थान, इ. प्रदेशांत शस्त्रपूजा करण्याची प्रथा आहे. कुठल्याही देशातल्या लढाऊ जातीजमाती आपल्या शस्त्राला देव मानून वर्षातून एकदा त्याची पूजा करीत असतात. आपल्या देशात त्यासाठी आश्विन शु. ९ मी ही तिथी ठरविलेली आहे. मराठे लोक खड्गाला अत्यंत पवित्र मानतात. इतिहासकाळी शपथ घ्यायची तर ती ते खड्गाचीच घेत. राजस्थानात खड्गपूजेचा महोत्सव होई व नवरात्राचे नऊही दिवस तो चाले. या उत्सवात खड्गाची मिरवणूकही काढीत. निर्णयसिंधूत निरनिराळ्या शस्त्रांच्या पूजेचे मंत्र दिले आहेत. तसेच निरनिराळ्या शिल्पकारांनी आपापल्या कारागिरीतल्या हत्यारांची व उपकरणांची त्या दिवशी पूजा करावी, असेही सांगितले आहे. [नि. सि.; अॅ. अं. रा.]

## खंडेलवाल

ब्राह्मणातली एक जात. यांची सर्वात अधिक वस्ती राजस्थानात आहे. शेखावाटीच्या सीमेवर असलेल्या खंडेला शहरावरून यांचे नाव पडले आहे. हे पंच गौडांपैकी आहेत. खंडेल महर्षीपासून आपली उत्पत्ती झाली, असे हे सांगतात. यांच्यांत बाव्वन पोटभेद आहेत. हे मुख्यत्वे शेती करणारे आहेत. काही लोक श्रीमंतांच्या घरी नोकरीही करतात.

याशिवाय खंडेलवाल या नावाची बनियांची एक पोटजात असून तिच्या हिंदू व जैन अशा दोन शाखा आहेत. [रा. जा.]

## खंडेला

राजस्थानातील एक प्राचीन क्षेत्र. याला खंडिल्ल व खंडेलपुर अशीही नावे होती. सिकारपासून हे २८ मैलांवर येते. सनपूर्व ३ ऱ्या शतकातला एक शिलालेख इथे सापडला आहे. शिवाय इथे प्राचीन मंदिराचे भग्नावशेषही पुष्कळ आहेत. खंडेलवाल जातीचे मूलस्थान हेच होय.

इ. स. च्या सातव्या शतकापर्यंत हे शैव पंथाचे मोठे केंद्र होते. धूसर वंशातील धूसर आदित्यनाग या राजाने तिथे अर्धनारीश्वराचे मंदिर बांधले, असे इ. स. ६४४ च्या तिथल्या एका शिलालेखावरून कळते. सांप्रतचे तिथले खंडेलेश्वराचे मंदिर वरील मंदिराची जुनी सामग्री वापरूनच बांधलेले आहे.

जैन संस्कृतीच्याही दृष्टीने या क्षेत्राला बरेच महत्त्व आहे. ८ व्या शतकात जिनसेनाचार्याने तिथल्या चौहान राजाला जैन धर्माची दीक्षा दिली, असे जैन साहित्यावरून कळते. १३ व्या शतकात जिनप्रभसूरीने तिथे राहून तिथल्या अनेक लोकांना जैन धर्मात घेतले, असे सांगतात. सिद्धसेनसूरीने आपल्या सकलतीर्थसूत्रात याचा तीर्थ म्हणून उल्लेख केला आहे. खंडिल्लगच्छ या जैन गच्छाचे नाव या स्थानावरूनच पडले असावे. [के. सी. जैन– इं. हि. ज. १९६१]

**खंडोबा** महाराष्ट्र व कर्नाटक या दोन्ही प्रदेशातील बहुसंख्य जनतेचे कुलदैवत. यालाच मल्लारी, मल्लारिमार्तंड, म्हाळसाकांत, मैलार, मैराळ अशी अन्य नावे आहेत. महाराष्ट्राच्या बाबतीत सांगायचे, तर याच्या इतके लोकप्रिय दैवत महाराष्ट्रात दुसरे नाही. याची एकूण बारा स्थाने महाराष्ट्र-कर्नाटकात आहेत.

(१) जेजुरी (२) निमगाव (३) पाली पेंबर (सातारा) (४) नळदुर्ग (धाराशीव) (५) शेगुड (नगर) (६) सातारे (औरंगाबाद) (७) माळेगाव (नांदेड) (८) मैलारपूर पेंबर (बिदर) (९) मंगसुळी (बेळगाव) (१०) मैलारलिंग (धारवाड) (११) देवरगुड्ड (धारवाड) व (१२) मण्मैलार (बेळ्ळारी).

याशिवाय मद्रासचे उपनगर असलेले मैलापूर याचे मूळ नाव मैलारपूर असल्याचे नमूद आहे. दक्षिणेतही खंडोबाच्या उपासनेचा बराच प्रसार आहे.

खंडोबाचे मुसलमान भक्त त्याला मल्लुखान या नावाने ओळखतात. जेजुरीस भक्त नवसफेडीची भिक्षा मागतात, तिला मल्लुखानाची गदा असे म्हणतात. फारसी भाषेत गदा या शब्दाचा अर्थ भीक असा आहे. औरंगजेबाने खंडोबाला अजमतखान (=पवित्र पुरुष) हे नाव दिले होते, असेही म्हणतात.

हा बहुजनसमाजाचा लोकप्रिय देव आहे. त्याची लोकप्रियता एवढी व्यापक आहे, की धनगर-रामोशापासून ब्राह्मणांपर्यंत समाजाच्या सर्व थरात त्याची उपासना होत असते. कर्नाटक व महाराष्ट्र यांच्या सांस्कृतिक अनुबंधाचे ते एक प्रकट प्रतीक आहे. हा मूळचा कर्नाटकातला मैलार देव होय. या कन्नड मैलाराचे प्राकृत रूप ढळू न देता त्याला संस्कृत चरित्र देण्याचा प्रयत्न मल्लारिमाहात्म्य नामक ग्रंथाच्या द्वारे महाराष्ट्राने केला. त्या ग्रंथातली खंडोबाच्या चरित्राची कथा अशी–

कृतयुगात मणिचूल पर्वतावर धर्मपुत्र सप्तर्षी तप आचरीत होते. मणी व मल्ल या दैत्यांनी त्या पर्वतावर हल्ला करून त्या ऋषीचे तपोवन उद्ध्वस्त केले. घडलेल्या प्रकाराने शोकाकुल झालेले ऋषी इंद्राकडे दाद मागायला गेले. इंद्र म्हणाला, की 'मणि-मल्ल हे दोघे दैत्य ब्रह्मदेवाच्या वरप्रसादाने अजिक्य ठरले आहेत. त्यामुळे मी त्याचा वध करायला असमर्थ आहे. म्हणून तुम्ही विष्णूकडे चला.' ऋषी त्याप्रमाणे विष्णूकडे गेले. विष्णूनेही त्यांची दाद घेतली नाही. मग ते शिवाकडे गेले. ऋषींच्या तोंडून मणि-मल्लांच्या अत्याचाराच्या कथा ऐकून शिव मात्र संतप्त झाला. त्याने मणि-मल्लांच्या विनाशासाठी मार्तंड-भैरवाचे रूप घेतले. कार्तिकेयाच्या नेतृत्वाखाली आपल्या सात कोटी (येळकोट) गणांचे सैन्य एकत्र करून तो मणिचूल पर्वतावर उतरला. मार्तंड-भैरवाच्या सैन्याचे आणि मणि-मल्लाचे तुवळ युद्ध झाले. मार्तंडभैरवाने अखेर मणीचे वक्षस्थळ विदीर्ण करून त्याला जमिनीवर पाडले. एवढ्यात त्याच्या पायाला स्पर्श करून मणी दैत्याने त्याची स्तुती केली व त्याच्याकडे एक वर मागितला.


खंडोबा – जेजुरी

'प्रभो, माझे शिर तुझ्या पायाखाली नित्य असू दे आणि माझे अश्वारूढ रूपही तुझ्या सान्निध्यात राहू दे.'

मार्तंडभैरवाने तथास्तु म्हटले. व त्याच्या मस्तकी पाय ठेवला. पुढे जेव्हा मल्ल दैत्याला त्याने खाली पाडले, तेव्हा मरण्यापूर्वी तोही मार्तंडभैरवाला म्हणाला.

'देवा माझे नाव तुझ्या नावाच्या आधी असावे (अर्थात लोकांनी तुला मल्लारी, मल्ल + अरि असे संबोधावे)'. मार्तंड भैरवाने त्यालाही तथास्तु म्हटले.

नंतर भयमुक्त झालेल्या त्या सात ऋषीनी मार्तंडभैरवाला स्वयंभू लिंगरूपाने प्रेमपूर (पेंबर) येथे राहण्याबद्दल विनंती केली व मार्तंडभैरवाने ती मानली.

खंडोबाला म्हाळसाकांत असेही म्हणतात. कारण त्याच्या पत्नीचे नाव म्हाळसा आहे. कर्नाटकात म्हाळसा हे नाव प्रचलित नाही. तिथे तिला माळज, माळची, माळवी, माळव्व या नावांनी ओळखतात.

म्हाळसेला मोहिनीचा अवतार समजतात. ती तिम्मशेट वाण्याच्या घरी जन्मली. तिम्मशेटीने तिचे खंडोबाशी लग्न लावून दिले. हा विवाह पौष पौर्णिमेला झाला. ती तिथी विवाहदिन म्हणून पाली येथे प्रतिवर्षी उत्साहाने साजरी होते.

खडोबाला दुसरी एक पत्नी आहे, तिचे नाव बाणाई. ती धनगराची पोर होती. ती काळ्या वर्णाची; पण जणू सळसळती वीज होती. बापाची मेंढरे राखीत असताना एके दिवशी ती खंडोबाला दिसली. खंडोबा तिच्या पुष्ट यौवनावर भाळला व तिच्यासाठी धनगर तरुण बनून तिच्या बापाकडे मेंढरे वळायला राहिला. त्या दोघाचे तिथे प्रेम जमले. मग त्याने सातान्यास तिच्याशी गांधर्वविवाह केला.

बाणाईला महाराष्ट्रात खंडोबाची दुसरी बायको समजत असले, तरी कर्नाटकात तिला ' देवाची राख ' अर्थात ठेवलेली बाई असे समजतात. म्हणूनच तिला त्याच्या मदिरात स्थान नाही. ती गावाबाहेर असते. खडोबा अधूनमधून तिच्याकडे जातो. तिचा भाऊ हेगडे किंवा हेगडी हा खडोबाचा प्रधान होता, अशी समजूत आहे. बाणाईला शेळ्या-मेंढ्या प्रिय, हे खंडोबाच्या भक्तांना ठाऊक आहे. ते तिला नवस बोलतात आणि ती पावली, की शेळ्या-मेंढ्यांच्या प्रतिमा करून तिला वाहतात.

म्हाळसा व बाणाई या दोघी सवतींच्या भाडणाचे एक गाणे खंडोबाचे वाघ्ये म्हणत असतात. त्या गाण्यात म्हाळसा बाणाईला बजावते –

**आईक मी सांगते तुजला**
**चित दे माझ्या बोलाला**
**का ग तू भुललिस द्येवाला ?**
**जा तू आपल्या देशाला**
**झाकल्या पाठीन जाई म्हणती घे तू ऐकून**
**एक्या घडीमंधि तोंड बाणाई ! टाकिन उतरून ।।**

पण बाणाई म्हाळसेहूनही तिखट असते. ती म्हाळसेचेच नव्हे; तर तिच्याबरोबर देवाचेही उणेदुणे काढायला तयार असते––

**इक्तं ऐकुनश्यानी बाणाईला राग आला फार**
**रतिमातर तुमच्या घरी न्हाई इच्यार**
**तू वाण्याची हायेस म्हूण करशील पडिभार**
**आम्ही धनगरणी जशा नागिणी मोठ्या शिरजोर**
**तुज्या द्येवानं आमच्या घरीं वळिलीं खिल्लारं**
**लेंड्या लोकर कन्या मिसळी तुझाच भर्तार ।।**

खंडोबा आणि स्कंद या दोन नावातल्या सादृश्यावरून काही लोक खंडोबाला स्कंदाचा अवतार समजत असत. पण संशोधनाच्या अंती ती कल्पना खोटी ठरली आहे. तो शिवाचा किंवा त्याच्या भैरवरूपाचा अवतार आहे, हे आता सिद्ध झाले आहे.


म्हाळसेसह अश्वारूढ खंडोबा

खंडोबाच्या परिवारात कुत्र्याला स्थान आहे आणि कुत्रा हा भैरवाचा आवडता प्राणी आहे. याच्या चार आयुधापैकी खड्ग हे विशेष महत्त्वाचे आहे. त्या खड्गाला खांडा म्हणतात. खांडा ज्याच्या हाती आहे तो खंडोबा, असे हे नाव रूढ झाले.

खंडोबा हा मुळात ऐतिहासिक वीर पुरुष असावा आणि त्यालाच कालांतराने देवस्वरूप आले असावे, या कल्पनेला एका जैन ग्रंथाचा आधार मिळतो. समयपरीक्षा या कन्नड जैन ग्रंथात खंडोबा हा मुळात ऐतिहासिक वीर पुरुष असल्याचे सूचित केले आहे.

वाघ्या आणि मुरळी हे खंडोबाचे सेवेकरी होत. वाघ्ये स्वत:ला खंडोबाचे कुत्रे समजतात. मुरळी म्हणजे खंडोबाच्या उपासनेतली देवदासी होय. वाघ्ये व मुरळ्या सर्व दक्षिण महाराष्ट्रभर हिंडतात व भिक्षा मागून उदरनिर्वाह करतात.

खंडोबाच्या उपासनेत भडाराला फार महत्त्व आहे. हळदीच्या चूर्णाला भडार म्हणतात खंडोबाच्या जत्रेत भंडार उधळतात व वाघ्ये लोक भक्तांच्या कपाळी भंडार लावून दक्षिणा मागतात. बगाड घेतल्यावर पाठीला ज्या जखमा होतात, त्या भंडारानेच बऱ्या करण्याचा प्रघात आहे.

मल्लारिमाहात्म्यात खंडोबाचे ध्यान वर्णिले आहे, ते असे––

**ध्यायेन्मल्लारिदेवं कनकगिरिनिभं म्हालसाभूषिताङ्कम् ।**
**श्वेताश्वं खड्गहस्तं विबुधबुधगणैः सेव्यमानैः कृतार्थैः ।।**
**युक्ताङ्घ्रिं दैत्यमूर्ध्नि डमरुविलसितं नैशचूर्णाभिरामम् ।**
**नित्यं भक्तेषु तुष्टं श्वगणपरिवृतं नित्यमोङ्कारगम्यम् ।।**

अर्थ––सुवर्ण पर्वताच्या कांतीचा, ज्याच्या मांडीवर म्हाळसा बसली आहे असा, ज्याचा घोडा पांढरा आहे असा, ज्याच्या हातात खड्ग आहे असा, कृतार्थ अशा देव आणि ज्ञानी यांच्याकडून सेविला जाणारा, दैत्याच्या मस्तकावर ज्याचा पाय आहे असा, डमरूने शोभणारा, हळदीने सुंदर दिसणारा, भक्तावर सदैव संतुष्ट असणारा, नेहमी कुत्र्यांनी वेढलेला व ओंकाराने गम्य अशा मल्लारिदेवाचे ध्यान करावे.

खंडोबाची उपासना कर्नाटकातून महाराष्ट्रात आली, हे निर्विवाद आहे. मैलार हे खंडोबाचे नाव तर कन्नड आहेच, शिवाय येळकोटी, हेगडे, भंडार, कोठंबा, लंगर, बगाड हे त्याच्या उपासनेशी संबद्ध असलेले शब्दही कन्नडच आहेत. खंडोबाचे उपासक आणि उपासना याचे स्वरूप पाहता तो मूलतः समाजाच्या निम्न स्तरात प्रिय असलेला देव आहे, हे उघड दिसते. अशा देवतांची लोकप्रियता वाढली, की त्यांचे उदात्तीकरण करण्याची प्रवृत्ती हिंदुधर्मात प्राचीन काळापासून प्रचलित आहे. खंडोबाच्या बाबतीतही तसेच घडले आहे. १४ व्या शतकाच्या पूर्वीपासून खंडोबाच्या मूर्ती अस्तित्वात असाव्या, असे दिसते. मल्लारिमाहात्म्यात 'महीमयी मूर्ती'चा (मातीची मूर्ती) उल्लेख आहे. सांप्रत खंडोबाच्या मूर्ती बैठ्या, उभ्या व अश्वारूढ अशा विविध अवस्थेत आढळतात.

**खंडोबाचा कुळधर्म**– खंडोबा हा ज्यांचा कुलदेव असतो, त्यांच्या देव्हाऱ्यात त्याचा टाक असतो. अशा घरात चंपाषष्ठीच्या निमित्ताने खंडोबाचे नवरात्र (अर्थात पंचरात्र) सुरू होते व षष्ठीच्या दिवशी कुळधर्म होतो. त्या दिवशी खंडोबाला महानैवेद्य दाखवतात. त्यात ठोंबरा (जोंधळे शिजवून त्यात दही, मीठ घालून केलेला पदार्थ), कणकेचा रोडगा, वांग्याचे भरीत, पातीचा कांदा व लसूण हे पदार्थ असतात. तसेच गव्हाच्या लोंब्या, हुरडा, तीळ व गूळ हे पदार्थ एकत्र कांडून त्यांचा दिवा करतात व त्यात फुलवात लावतात. महानैवेद्य दाखविण्यापूर्वी तळी भरतात. एका ताम्हनात पाने, पैसा, सुपारी, भंडार व खोबरे हे पदार्थ ठेवून येळकोट असा उद्घोष करून ते ताम्हन तीनदा उचलणे, याला तळी भरणे म्हणतात. ताम्हन उचलताना प्रत्येक वेळी भंडार भरलेली खोबऱ्याची वाटी मोडतात. मग दिवटी बुधली घेऊन आरती करतात. मग जेजुरीच्या दिशेने चार पावले जाऊन देवाला ओवाळतात व भंडार उधळून पुनश्च जागेवर येतात. लाक्षणिक अर्थाने याला 'जेजुरीला जाऊन येणे' असे म्हणायचे. नंतर दिवटी दुधाने विझवतात. ही दिवटी बुधली दर पिढीला नवे जोडपे जेजुरीस देवदर्शनाला जाते तेव्हा बदलतात. घरात लग्न-मुंजीसारखे मंगल कार्य झाल्यानंतर देवदर्शनाला जाणे आणि वाघ्या-मुरळ्यांचे जागरण करणे, याही गोष्टी काही कुटुंबांत कुलधर्म म्हणून पाळतात. याशिवाय आहाळातून चालण्याचा कुलाचारही काही घरात आहे. **पाहा**– म्हाळसा, जेजुरी, पाली, वाघ्या-मुरळी. [खंडोबा–रा. चि. ढेरे; म. चा. दै.; ती. म.]

**खंडोलिया ब्राह्मण** ब्राह्मणांची एक पोटजात. यांची वस्ती मुख्यत्वे काठेवाडात आढळते. खंडोल गावावरून त्यांना हे नाव पडले. हे पूर्वी राजपूत राजांकडे आचारीपण करीत. [मु. इ. जा.]

**खंबावती** हिंदुस्थानी संगीतातील एक रागिणी. ही रागिणी महानना जातीची असून, गेल्या ४०–४५ वर्षांत हिचा विशेष प्रचार होऊ लागला आहे. हिचे लक्षण असे–

**धैवतांशग्रहन्यासा षाडवा त्यक्तपञ्चमा ।**
**खम्बावती च विज्ञेया मूर्च्छना पौरवी मता ।।**

अर्थ– खंबावती रागिणी धैवत स्वर, अंश, ग्रह व न्यास यांनी युक्त असते. ही रागिणी पंचमस्वररहित असून, षाडव आहे. हिची मूर्च्छना पौरवी मानलेली आहे.

खंबावतीची दोन रूपे प्रचारात आहेत. एक मांड व झिंझोटीच्या मिश्रणाचे आणि दुसरे रागेश्रीच्या वळणाचे. दुसऱ्या प्रकारात पचम सर्वस्वी वर्ज्य असून ऋषभ अत्यल्प आहे. या खंबावतीचे ध्यान पुढीलप्रमाणे–

**खम्बावती स्यात् सुखदा रसज्ञा ।**
**सौन्दर्यलावण्यविभूषिताङ्गी ।।**
**गानप्रिया कोकिलनादतुल्या ।**
**प्रियंवदा कौशिकरागिणीयम् ।।**

(संगीतदर्पण)

अर्थ– खंबावती ही रसज्ञ व सुखद आहे. तिचे अंग सौंदर्य व लावण्य यांनी युक्त आहे व ती गानप्रिय आहे. तिचा स्वर कोकिळाप्रमाणे आहे. ती मधुरभाषिणी असून कौशिकरागाची रागिणी आहे.

रात्रीचा दुसरा प्रहर हा हिचा गानसमय आहे. ही रागिणी शृंगार व करुणरसप्रधान आहे. [सं. द.; क. सं.]

**ख** व्यंजनांतला दुसरा वर्ण. कंठ हे याचे आधारस्थान होय. आकाश, इंद्रिय, सुख, ब्रह्म, ज्ञान, इ. याचे अनेक अर्थ आहेत. कामधेनुतंत्रात याला शंख किंवा कुंद यांच्यासारखा शुभ्र म्हटले असून, त्रिगुण, पंचदेव व त्रिशक्ती यांनी युक्त मानले आहे. प्रचंड, कामरूपी, ऋद्धी, वह्नी, सरस्वती, अशी याची अनेक नावे तंत्रग्रंथात दिली आहेत.

ख = [letter forms] ख

ख – अक्षरविकास

**अक्षरविकास**– पहिल्या अवस्थेत हा वर्ण खालसा येथील

सनपूर्व ३ ऱ्या शतकातल्या शिलालेखात आढळतो. या ठिकाणी त्याची खालची गाठ वाटोळी व बरीच मोठी आहे. १ ल्या शतकातील कुशाणकालीन मथुरेतल्या लेखात त्याची दुसरी अवस्था दिसते. ७ व्या शतकातील झालारापाट येथील लेखात तिसरी अवस्था दिसते. चौथी अवस्था जाजल्लदेवाच्या कारकीर्दीतल्या लेखात अंकित झाली आहे. आजचा ख व त्यावेळचा ख यातला फरक म्हणजे त्या वेळच्या ख मधील पहिला अर्धा जो र, तो अर्ध्या ग सारखा दिसतो. [ म. ज्ञा. को.; श. क. ]

**खक्खर** बौद्ध भिक्षूंचे एक आयुध. प्रत्येक बौद्ध भिक्षूने हे आपल्याजवळ बाळगलेच पाहिजे, असा भगवान बुद्धाचा आदेश आहे.

सुमारे हात-दीड हात लांबीच्या लाकडी दंडुक्याच्या टोकाला एक धातूचे वाटोळे कडे अडकवून हे आयुध बनवतात. या कड्यात धातूच्या आणखी लहान लहान कड्या घातलेल्या असतात. खालीवर हालवताना या आयुधाचा जो आवाज होतो, त्यावरून याला खक्खर हे नाव पडले आहे.

चीन, कोरिया व जपान या देशांत बौद्ध धर्माचा प्रसार होत असतानाच खक्खराचाही प्रसार झालेला दिसतो. हे आयुध जवळ का बाळगायचे, याची निरनिराळी कारणे निरनिराळ्या ठिकाणी दिलेली आहेत, ती अशी–


खक्खर

शिबुन रित्सु (Shibun Ritsu) या ग्रंथात म्हटले आहे, की बुद्धाचे शिष्य सचारार्थ फिरत असताना वाटेत सर्प, विंचू, गोमी यांसारखे विषारी प्राणी भेटल्यास त्यांची त्यांना भीती वाटे. ही गोष्ट त्यांनी आपल्या गुरूंच्या नजरेस आणून दिली. त्यावर बुद्धाने त्यांना खक्खर जवळ बाळगून तो वाजविण्यास सांगितले. त्याचप्रमाणे भिक्षा मागतांना कोणत्याही घराजवळ जाताच आपले आगमन सूचित करण्यासाठी भिक्षू हा खक्खर वाजवीत. भौतिक जगातील मनाला आकर्षित करणाऱ्या अनेक गोष्टी टाळण्यासाठी खक्खराचा मोठा आवाज करीत चालावे, असेही बौद्ध धर्मग्रंथात सांगितले आहे. काही ठिकाणी वृद्ध भिक्षूंना चालताना मदत व्हावी, म्हणूनही खक्खराचा उपयोग करावा, असे सांगितले आहे. खक्खराचे असे अनेक उपयोग आहेत.

खक्खर हा सदाचार, सद्धर्म, ज्ञान, इ. गोष्टींचा सूचक आहे. भूत–पिशाचाचे निराकरण करण्यासाठी करायच्या मंत्रप्रयोगातही खक्खराला स्थान आहे. विशेषत: तिबेटात गूढविद्येच्या प्रभावावर उपाय म्हणून खक्खराचा फार लौकिक आहे. नादयुक्त असल्याने विषारी बीजाचे निर्मूलन करणारी शक्ती म्हणूनही तो ओळखला जातो. धर्मावर हल्ला करणाऱ्या शत्रूचा निःपात व धर्मरक्षण ही दोन्ही कार्ये खक्खराचीच होत. पितरांना मोक्षप्राप्ती व्हावी, म्हणून करायच्या संस्कारात चीनमध्ये खक्खराचा उपयोग करतात. [ मुद्रा ]

**खखूंद** एक जैन क्षेत्र. गोरखपूरपासून ४२ मैलांवर हे वसले आहे. या नगराचे प्राचीन नाव किष्किधा असल्याचे सांगतात. इथे पुष्पदंत या तीर्थंकराचा जन्म झाला. इथल्या मंदिरात त्याची मूर्ती पाहायला मिळते. [ जैनधर्म ]

**खगोलशास्त्र** ज्योतिषशास्त्र पाहा.

**खजुराहो** मध्य प्रदेशातील छत्तरपुर जिल्ह्यात, महोबाच्या दक्षिणेस ३४ मैल अंतरावर, निनोराताल नामक सरोवराच्या काठावर वसलेले एक गाव. इ. स. च्या ९ व्या शतकापासून १३ व्या शतकापर्यंत जेजाकभुक्ती (बुंदेलखंड) वर राज्य करणाऱ्या चंदेल वंशाच्या राजपूत राजाची राजधानी इथे होती. त्यांच्या राजवटीत १० व्या, ११ व्या व १२ व्या शतकात तिथे जी हिंदू व जैन मंदिरे बांधली गेली, त्यामुळे हे स्थान फार प्रसिद्ध झाले. यांची संख्या सुमारे ८०-८५ होती; पण आता त्यातली केवळ २५–३० च उरली असून, तीसुद्धा सगळी चांगल्या स्थितीत नाहीत. गावाभोवती त्यांचे भग्नावशेष सर्वत्र विखुरलेले आढळतात.

चंदेलांच्या राजवटीत बांधली गेलेली इथली मंदिरे शिल्पकलेच्या दृष्टीने समृद्ध व प्रेक्षणीय आहेत. त्यातले कोरीव काम अत्यंत सुरेख असून आकृती प्राणवान वाटतात. इथल्या मूर्तिकारीत सामान्य मनुष्याचे जीवन व त्याला पूज्य अशा देवता यांचे दर्शन घडते. शिकार, नृत्ये, उत्सव, पूजा, कामक्रीडा, युद्धे अशी अनेकविध दृश्ये इथे आढळतात. काही मंदिरांतील मुख्य मूर्ती बहुधा नष्ट झालेल्या असल्या, तरी उंच जागी खोदलेल्या मूर्ती सुरक्षित राहिल्या आहेत. त्यांचे बारकाईने निरीक्षण केल्यास तिथे मूर्तिकलेचा परमोत्कर्ष झालेला दिसतो.

एक हजार वर्षांपूर्वी हे एक विशाल नगर होते. त्याच्या सिंहद्वारावर सुवर्णाचे दोन खजूरवृक्ष उभे केलेले होते. म्हणून

त्याला खजूरवाहक हे नाव पडले व त्याचेच पुढे खजुराहो असे रूपांतर झाले, असे म्हणतात.



कंदरिया महादेवमदिर– खजुराहो

इथली बरीच मंदिरे शैव पंथाची असली, तरी काही वैष्णव पथी असून, एका कोपऱ्यात जैन मंदिरेही आहेत. इथले कंदरिया महादेवाचे मंदिर सर्वात भव्य असून, त्याची लांबी व उंची १०२ फूट आणि रुंदी ६७ फूट आहे. त्याच्या गाभाऱ्यात शिवलिंग आहे. प्रवेशद्वारावर सुंदर तोरण आहे. आतील अर्धमंडप, मडप व महामडप यांच्या छतांवर सुंदर नक्षीकाम असून चारी बाजूच्या भिती, सर्व स्तंभ व गाभाऱ्याचे द्वार सुंदर कलाकृती व देवतांच्या मूर्ती यांनी सुशोभित केलेले आहे. आतील भागाप्रमाणेच मंदिराच्या बाहेरील पृष्ठभागावरही देवता, मगर, कीर्तिमुख, मिथुन, तपस्वी, अप्सरा, सिंह, इ. नानाविध मूर्ती खोदलेल्या दिसतात. हे मंदिर १० व्या शतकात बांधले गेले.

कंदरिया मदिराच्या जवळच देवी जगदंबेचे मदिर आहे. ते मुळात विष्णूचे मदिर असावे, असे वाटते. कारण गाभाऱ्याच्या प्रवेशद्वारावर विष्णूची मूर्ती दिसते. पण साप्रत गाभाऱ्यात काळ्या रंगाने माखलेली देवीची मूर्ती असून लोक काली किंवा जगदंबा म्हणून तिची पूजा करतात. गाभाऱ्यावर एका बाजूला यमाची मूर्ती असून, दुसऱ्या बाजूला त्रिमुख व अष्टभुज शिवमूर्ती आहेत. या दोन मूर्ती व बाहेरच्या बाजूचे नक्षीकाम फारच प्रेक्षणीय आहे.

इ. स. १००२ मध्ये बांधलेल्या विश्वनाथ मंदिरात शिवलिंग आहे. गाभाऱ्याच्या प्रवेशद्वारावर वृषभारूढ शंकराची मूर्ती आहे. तिच्या डाव्या व उजव्या बाजूंना ब्रह्मा व विष्णू यांच्या मूर्ती आहेत. मंडपाचे छत फारच सुंदर आहे. भिंतीवर शिवपार्वती, ब्रह्मा, विष्णू व त्याचे अवतार, नर्तकी व अप्सरा यांच्या मूर्ती आहेत. मंडपात एक संस्कृत शिलालेख असून तो विक्रम संवत १०५९ (इ. स. १००२) मधला आहे.

इथले लक्ष्मणमदिर हे पंचायतन शैलीचे असून, कलापूर्ण



लक्ष्मणमंदिर – खजुराहो

आहे. मंडपात एक शिलालेख आहे, त्यावरून समजते, की चंदेल राजा लक्ष्मवर्मन याने हे बांधले व म्हणूनच याला लक्ष्मणमंदिर हे नाव मिळाले. कनोजचा राजा देवपाल याच्याकडून मिळालेल्या विष्णुमूर्तीची स्थापना त्याने या मंदिरात केली. ही मूर्ती चतुर्भुज व त्रिमुख आहे. मधले मुख मानवी, एका बाजूचे वराहाचे व दुसऱ्या बाजूचे नरसिंहाचे आहे. या मंदिराच्या प्रवेशद्वारावर सुंदर तोरण आहे व छतावर मनोहर कोरीव काम आहे. गाभाऱ्याच्या दारावर मधे लक्ष्मीची मूर्ती आणि बाजूला ब्रह्मा व शिव यांच्या मूर्ती दिसतात. त्यांच्यावरील पट्टीवर नवग्रहमाला असून द्वार-स्तंभावर समुद्रमंथनाचा देखावा, विष्णूचे अवतार आणि वेलबुट्टी कोरलेली आहे. महामडपात व अंतराळमार्गात सिंहस्तंभशिखरांच्यामध्ये ज्या किन्नरी स्त्रीमूर्ती आहेत, त्यांचे शिल्पकाम अद्‌भुत आहे.

लक्ष्मणमंदिराजवळच मातगेश्वराचे आणि वराहाचे अशी दोन लहान मंदिरे आहेत. मातंगेश्वराचे मंदिर साधे आहे; पण सर्व मंदिरात हेच विशेष पूज्य मानले जाते. वराहमंदिरात वराहरूपी विष्णूची अखंड पाषाणाची ६ फूट उंच व ९ फूट लांब अशी एक मूर्ती आहे. त्या मूर्तीच्या शरीरावर सर्वत्र ब्रह्मा, विष्णू, शिव, सरस्वती, गंगा, गंधर्व, दिक्पाल, नवग्रह, इ. देवतांच्या मूर्ती खोदलेल्या दिसतात.

कंदरिया मंदिराच्या दक्षिणेस चौसष्ट योगिनींचे मंदिर आहे, ते १८ फूट उंच चबुतऱ्यावर बांधलेले आहे. त्याच्या प्रांगणाभोवती ६५ खोल्या आहेत. त्यातली एक मोठी खोली

कालीची व बाकीच्या तिच्या सहचरी असलेल्या चौसष्ट योगिनींच्या असाव्या, अशी कल्पना आहे. मोठ्या खोलीत महिषासुरमर्दिनीची मूर्ती आहे आणि बाजूच्या दोन खोल्यांपैकी एकीत माहेश्वरी व दुसरीत ब्राह्मी या मातृका आहेत. हे मंदिर इ. स. ९०० च्या सुमारास बांधलेले आहे. खजुराहोमधले सर्वांत प्राचीन मंदिर हे असावे, असे अनुमान आहे.



माता – बालमूर्ती – खजुराहो

खजुराहोच्या आग्नेय कोपऱ्यात जी जैन मंदिरे आहेत, त्यातले मुख्य मंदिर पार्श्वनाथाचे आहे. तिथल्या शिल्पकामात विष्णू, लक्ष्मी व इतर हिंदू देवता यांचेही दर्शन जागोजागी होते. त्या मंदिराची रचनाही हिंदू मंदिराप्रमाणेच आहे. इथले शिल्पकाम साधे आहे आणि त्यात कामुकतेचे दर्शन होत नाही. इथली पार्श्वनाथ, आदिनाथ, व शांतिनाथ यांची मंदिरे विशेष उल्लेखनीय आहेत. त्यात अनेक जैन देवतांच्या मूर्ती आहेत. पार्श्वनाथाचे मंदिर सर्वांत मोठे व सुंदर आहे. शांतिनाथमंदिरात काही प्राचीन जैन मूर्ती असून त्यातली ऋषभदेवाची मूर्ती १४ फूट उंच आहे.



घंटामंदिर – खजुराहो

गावाच्या दक्षिण भागात घंटामंदिर नावाचे आणखी एक जैन मंदिर आहे. त्याला हे नाव मिळण्याचे कारण असे, की त्याच्या स्तंभांवर सर्वत्र घंटा व साखळ्या यांचे नक्षीकाम केलेले आहे. त्यात तापसी, विद्याधर आणि मिथुनमूर्तीही आहेत. शिवाय अनेक दिगंबर जैन मूर्तीही इथे सापडल्या आहेत. प्रवेशद्वारावर एक गरुडारूढ अष्टभुजा जैन देवी आहे. द्वारावरच्या पट्टीवर सोळा लाक्षणिक चित्रे आहेत, ती महावीराच्या मातेच्या सोळा स्वप्नांची प्रतीके आहेत, असे म्हणतात.

खजुराहोमध्ये जी काही अत्यंत चांगली मंदिरे आहेत, त्यांतले दुल्हा देवीचे मंदिर हे एक आहे. आरंभी हे एक शिव मंदिर असावे. कारण गाभाऱ्याच्या द्वारावर एक शिवमूर्ती दिसते. आत शिवलिंग आहे, ते मात्र नवीन आहे. काही लोक याला नीलकंठमंदिर म्हणतात. यात अप्सरा, विद्याधर, किन्नर, शालभंजिका इत्यादींच्या अनेक मनोहर मूर्ती आढळतात.

इथल्या संग्रहालयात खजुराहोच्या आसपासच्या प्रदेशात सापडलेल्या १० व्या व ११ व्या शतकातल्या सुमारे दोन हजार मूर्ती ठेवलेल्या आहेत. त्यात हिंदुमूर्तींची संख्या अधिक असून, त्यांपैकी उमा-महेश्वर, लक्ष्मी-नारायण, विष्णू व त्याचे विविध अवतार, नृत्तगणेश, कुबेर, सदाशिव या देवता विशेष दर्शनीय आहेत. जैन तीर्थंकर व जैनदेवता यांच्याही मूर्ती पुष्कळ आहेत. बुद्धाची मात्र एकच मूर्ती आहे.

इथली बरीच मंदिरे मुळात पंचायतन शैलीची होती. मुख्य मंदिराभोवती चार कोपऱ्यांत चार उपमंदिरे, या शैलीला पंचायतनशैली म्हणतात. पण सांप्रत ही बहुतेक उपमंदिरे नष्ट झालेली आहेत. मुख्य मंदिरांच्या बाहेरच्या भिंतीवर मूर्तींच्या दोन किंवा तीन रांगा खोदलेल्या दिसतात त्यात देवतांप्रमाणेच दिक्पाल, अप्सरा, सुरसुंदरी, मिथुने, विद्याधर, नाग, सिंह इत्यादींची चित्रेही आढळतात. त्यातील अप्सरा व शालभंजिका या नाना प्रकारच्या काम-मुद्रांचे प्रदर्शन करतात. इथे मिथुनमूर्तींची संख्या बरीच मोठी आहे. इथल्या कामोन्मत्त मूर्तींच्या निर्मितीच्या मुळाशी काही धार्मिक रहस्यही असण्याची शक्यता आहे, असे म्हणतात.

या कामचित्रांविषयी दुसरी एक कल्पना आहे, ती अशी– खजुराहो हे शैव क्षेत्र आहे. इथली मंदिरे क्रमाने चढत्या शिखरांची आहेत. या रचनेवरून तिथल्या स्थापत्यविशारदांना हिमालयाची कल्पना अभिप्रेत असावी, असे वाटते. हिमालय हा देवतात्मा आहे आणि त्यावरच कैलास हे शिवस्थान आहे. हिमाचलावरील निरनिराळ्या शिखरांवर व अधित्यकांवर देव, ऋषी, मुनी, गंधर्व, किन्नर, इ. देवा–मानवांची वसती आहे. तिथे ऋषींचे तप, योग्यांची ध्यानधारणा व देवांच्या लीला

चालतात; त्याचप्रमाणे गंधर्व-किन्नरांच्या कामक्रीडाही चालतात. गंधर्व–किन्नराचा हा शृंगार केवळ दोघांपुरता मर्यादित नसून तो सामुदायिक असतो. म्हणजे अनेक पुरुष आणि अनेक स्त्रिया मिळून ती उन्मुक्त कामक्रीडा चालते. या गोष्टीचा उल्लेख कालिदासाने कुमारसंभवात केला आहे (१.१०). या दृष्टीने विचार केल्यास खजुराहो येथील संभोगचित्रे ही गधर्व-किन्नरांच्या कामक्रीडेची चित्रे असे म्हणता येईल. त्यामुळे जसे ऋषी, मुनी आणि देव यांचे चित्रण इथल्या मदिरावर झाले आहे, त्याचप्रमाणे यक्ष-गंधर्वांची शृंगारलीलाही त्या कलाकारानी इथे साकार केली आहे, असे मानावे लागते.



भिंतीवरील सिंहाच्या आकाराचे शिल्पकाम – खजुराहो

खजुराहो हे सांप्रत भारतातले एक प्रमुख कलाक्षेत्र ठरले आहे. जगातले कलावंत आणि कलाप्रेमी लोक इथल्या मूर्तींच्या दर्शनासाठी व अभ्यासासाठी इथे येतात व महिनोन्‌महिने इथे वास्तव्य करतात. दर रविवारी दिल्लीहून खजुराहोला जाण्यासाठी विमान सुटते. भारतसरकारने या क्षेत्रात आता अनेक प्रकारच्या सुखसोयी निर्माण केल्या असून, मंदिरांच्या अंतर्बाह्य भागातल्या मूर्तीही स्वच्छ धुवून काढल्या आहेत. त्यामुळे मूर्तीचा तपशील आता अधिक बारकाईने कळू शकतो. [खजुराहो– भारतीय पुरातत्त्व विभाग; धर्मयुग, ३१ मे ५३; इलस. वीकली, २९ जून ५८]

**खजूर** एक ताडमाडाच्या जातीतले झाड. याच्या उत्पत्तीची कथा तै. संहितेत दिली आहे, ती अशी–

प्राचीन काळी यती हे इंद्राला आहुती देत नसत. म्हणून इंद्राला त्यांचा राग आला व त्याने यतीची शिरे तोडून त्यांचे तुकडे तुकडे करून ते कुत्र्याला खाऊ घातले. भुकेल्या कुत्र्यांनी यतींच्या कवटयांचे तुकडे केले व ते इतस्ततः पसरून दिले. त्यांनाच पुढे मुळे फुटली व त्यांतून खजुरीची झाडे उत्पन्न झाली (२.४.९.२).

अशीच कथा थोडयाफार फरकाने वायुपुराणात आली आहे, ती पुढीलप्रमाणे–

वरुत्रिन हे भृगूचे वंशज इद्राला उद्देशून यज्ञ करीत नसत. म्हणून इंद्राने त्यांचा शिरच्छेद केला. ती शिरे खाली पडली व त्यांतून खजुरीची झाडे उत्पन्न झाली.

खजूर वृक्षाच्या उत्पत्तीशी वरुत्रिनांचा हा जो संबंध दिसतो, त्यावरून असे अनुमान केलेले आहे, की भृगुकुलातले हे लोक खजूर वृक्षांची भूमी असलेल्या देशातले म्हणजेच इराण देशातले रहिवासी असावे आणि आर्यांनी भारतात प्रवेश करून तिथे स्थायिक व्हावे, या गोष्टीला त्यांचा विरोध असावा.

शंकराला व गुरूला खजुराच्या जेवढया बिया अर्पण केल्या असतील, तितकी हजार वर्षे रुद्रलोकात भक्ताचा सन्मान होतो, असे नव्य उपनिषदात सांगितले आहे. [क. हि. वा. पु.; क्रि. स्ट. ले. उ.]

**खजूरसाहेब** अमृतसरपासून २० मैलांवर असलेल्या खजूरसाहेब या गावात गुरू अंगददेवाची समाधी असून महाराजा रणजितसिंहाने इ. स. १८१५ मध्ये ती बांधली आहे असे म्हणतात. [पं. जी. सा.]

**खट** हिंदुस्थानी संगीतातला एक राग. या रागात ऋषभ, धैवत, निषाद हे स्वर शुद्ध व कोमल असे दोन्ही प्रकारे लागतात. गंधार मात्र कोमलच लागतो. षड्ज व पंचम हे बाकीचे दोन स्वर अचल स्वर असतात. तिसरा स्वर मध्यम हा शुद्ध लागतो. याचा वादी स्वर पंचम असून, संवादी षड्ज आहे. हा राग म्हणजे आसावरी, सुहा, कानडा, सारंग, देशी, गांधारी व सुधराई या सहा राग–रागिण्यांचे मिश्रण आहे. त्यामुळे हा गायला अवघड आहे. याचा आरोह– रे नि सा म ग म प नी ध नी सा व अवरोह – रे सा नी ध प नी म प म ग म रे सा याप्रमाणे आहेत. नादविनोद या ग्रंथात याचें ध्यान दिले आहे, ते असे–

**जटाओंका जुडा सिरपै जिसके, कैलास पर्वत पै बैठा हुआ, चिताके भस्म शरीरसे लगी मुसकराता हुआ, प्रात.काल गाने योग्य वे खट राग नाम भैरवका पुत्र है।।**

अर्थ–मस्तकी जटाजूट, कैलास पर्वतावर बसलेला, अंगाला चिताभस्म, मुखावर मंदस्मित, प्रातःकाळी गानयोग्य असा हा खट राग भैरवाचा पुत्र आहे.

**खटतार** लाकूड आणि लोखंड यांपासून बनवलेला बाजा. हा बाजा दोन काठ्यांनी वाजविला जातो. त्याला काष्ठताल असेही म्हणतात. होळीच्या वेळी कथात्मक लोकगीते गाताना ढोलाबरोबर हा वाजवतात. [ कृ. जी. ब्र. श ].

**खट्वांग** (१) शिवाच्या हातातील एक आयुध. चौपाईच्या खुराच्या आकाराचा दांडा व त्यावर माणसाची कवटी किंवा क्वचित नदी, असे याचे स्वरूप असते. योगी व संन्यासी यांच्या हातातही खट्वांग असते.

लोकसंस्कृतीत याला जादूची कांडी असेही म्हणतात. या कांडीवर वज्र, कपाल, त्रिशूल किंवा ध्वज यांपैकी एखादे आयुध जडविलेले असते.



खट्वांग

(२) सूर्यवंशातील विश्वसह राजाचा पुत्र. देव-दैत्यांच्या युद्धप्रसंगी स्वर्गात जाऊन याने देवांना पुष्कळ साहाय्य केले. विजय मिळाल्यावर देवानी त्याला वर मागायला सांगितले. तेव्हा त्याने आपले आयुष्य किती शिल्लक आहे, असे विचारले. देवांनी 'फक्त एक तास' असे उत्तर दिल्यावर खट्वाग लगेच पृथ्वीतलावर आला त्याने आपल्या मुलाला गादीवर बसविले व तो विष्णुस्वरूपी लीन झाला. खट्वांगासारखा पुरुष पृथ्वीतलावर पुन्हा होणे नाही, अशी वायुपुराणात त्याची स्तुती केली आहे. [ क्ला. डि. हि. मा.; प्रा. च. को. ]

**खडदह** वैष्णवपंथी लोकाचे एक यात्रास्थान. कलकत्त्याच्या उत्तरेला १२ मैलांवर हुगळी नदीच्या तीरावर हे गाव आहे. चैतन्याचा एक प्रमुख शिष्य नित्यानंद याने इथे राहून काही काल तप केले होते. [ हि. जॉ. ए. इं. ]

**खडावा** लाकडाच्या पादत्राणांना खडावा किंवा पादुका म्हणतात. या चपटचा व उंच अशा दोन्ही प्रकारच्या असतात. लाकडाच्या चपटचा पट्टीला पावलाचा आकार देऊन आंगठ्याच्या जागी एक खुटी ठोकणे, हा खडावांचा एक प्रकार व थोड्या उंच अशा लाकडी तळावर कापडी किंवा कातड्याची पट्टी ठोकून खडावा बनविणे, हा दुसरा प्रकार होय. सामान्यपणे साधु-संन्यासी खडावा वापरतात. त्यांच्या खडावांना कातड्याची पट्टी असल्यास ती मृगचर्माची असते. त्यामुळे अशा खडावा सोवळ्यातही चालतात. एखादा संत, महंत किंवा सद्गुरू मृत झाल्यावर त्याचे शिष्य-प्रशिष्य त्याच्या पादुकांची पूजा करतात. दत्ताच्या मूर्तीपेक्षाही त्याच्या पादुकाची पूजा विशेष प्रचलित आहे. नरसोबाची वाडी, औदुंबर व गाणगापूर या तीन्ही महत्त्वाच्या दत्तक्षेत्रांत दत्ताच्या पादुकाचीच पूजा होते.

**खडी** एखाद्या व्यक्तीला होणारे दुःख पिशाचबाधेपासून आहे किंवा काय, हे ठरविण्यासाठी करायचा एक विधी. पिशाच पाहण्यासाठी गहू व तांदूळ यांची एकीबेकी करून पाहतात. ती समसंख्या आल्यास बाधा आहे व विषम आल्यास नाही, असे समजतात. [ म. श को. ]

**खडी बोली** हिंदी भाषेचे एक रूप. ही भाषा बिहार, उ. प्रदेश, मध्य प्रदेश व राजस्थान या प्रदेशांत विशेष प्रचलित असून, भारताच्या बहुतेक सर्व भागांत हिचा प्रचार आहे. सर्व भारतीय भाषांमध्ये ही अधिक प्रचलित, सरळ व सुबोध आहे आणि म्हणूनच तिला भारताची राष्ट्रभाषा व राज्य भाषा (सरकारी कामकाजाची भाषा) मानण्यात आले आहे. हिला हिंदुई, हिंदवी, दक्खिनी, हिंदुस्तानी, इ. अनेक अन्य नावे आहेत. डॉ. ग्रियर्सनने हिला 'व्हर्नाक्युलर हिंदुस्तानी' हे नाव दिलेले असून, डॉ. सुनीतिकुमार चाटुर्ज्या हिला 'जनपदीय हिंदुस्तानी' म्हणतात. खडी बोलीच्या साहित्यिक रूपाला डॉ. चाटूर्ज्यानी 'साधू हिंदी' किंवा 'नागरी हिंदी' हे नाव दिले आहे. भाषाशास्त्राच्या दृष्टीने खडीबोली ही आदर्श हिंदी, उर्दू व हिंदुस्तानी या भाषांचा मूलाधार असल्याचे मानले जाते. खडी बोली या नावाविषयी अनेक विद्वानांनी भिन्न मते व्यक्त केली आहेत. काही जण खडी या शब्दाचा अर्थ कर्कश, खडबडीत असा करतात. व्रजभाषा मधुर व कोमल आहे; तिच्या मानाने ही कर्कश असल्यामुळे हिला खडी बोली हे नाव पडले, असे त्याचे म्हणणे आहे. उलट उर्दूपेक्षा शुद्ध व सरळ बोली म्हणून हिला खडी हे नाव पडले, असे दुसरे मत आहे. काही विद्वान खडीचा अर्थ सुसंस्कृत, परिष्कृत, किंवा परिपक्व असा करतात; तर काहीजण व्रज वगैरे बोलीना पडी व त्याच्या उलट या बोलीला खडी म्हणतात.

प्राचीन काळी मध्यदेशात जी शौरसेनी अपभ्रंश बोली

प्रचलित होती, तिच्यातून खडी बोली (हिंदी) उगम पावली, असे मानले जाते. भोज व हम्मीर देव यांच्या काळी जी अपभ्रंश काव्याची परंपरा सुरू झाली, त्या परपरेत खडी बोलीचे प्राचीन रूप दृष्टीस पडते.

डॉ. प्रेमप्रकाश गौतम यांच्या मते खडी बोली व्रजभाषेइतकी प्राचीन असून, तिचा उपयोग इ. स. च्या १४ व्या शतकापासून सुरू झालेला आहे. नाथपंथी सिद्धांच्या अनेक गद्य व पद्य रचनांमधून व्रजभाषा, राजस्थानी व पंजाबी भाषांबरोबर खडी बोलीचाही उपयोग केलेला आढळतो.

इ. स. च्या १३ व्या शतकात दिल्लीच्या आसपासच्या गावातील लोक जी भाषा बोलत होते, तीच खडी बोली होय, असे डॉ. कृष्णचंद्र म्हणतात. त्या काळात दिल्लीवर राज्य करणाऱ्या मुसलमानांनी याच भाषेचा व्यवहारात उपयोग केला. पुढे तिला रेख्ता हे नाव मिळाले. पं. राहुल सांकृत्यायन यांनी या भाषेला कौरवी हे नाव दिले आहे; कारण ही भाषा ज्या प्रदेशात बोलली जाते, तो सर्व पूर्वी कुरुक्षेत्राचा एक भाग होता.

खडी बोली हे नाव इ. स. १८०० पर्यंत कोठेही वापरलेले आढळत नाही. १९ व्या शतकाच्या प्रारंभी लल्लूजी लाल याने ‘प्रेमसागर’ व पंडित सदल मिश्र याने ‘नासिकेतोपाख्यान’ व ‘रामचरित्र’ ही पुस्तके प्रथमच या भाषेत लिहिली असे डॉ. ग्रियर्सन म्हणतात. या दोन्ही लेखकांनी खडी बोलीच्या विकासाला चालना दिली आहे. मुसलमान कवींनी फारसी मिश्रित खडी बोलीत कविता रचून या भाषेच्या प्रसाराला पुष्कळच मदत केली आहे.

गोरखवाणी व बाबा फरींद शररगंजवाणी यात खडी बोलीचा उपयोग केलेला आहे. निर्गुण संतांनीही ही भाषा वापरलेली आहे. आधुनिक हिंदी साहित्य याच भाषेत लिहिलेले आहे. या भाषेतील गद्य साहित्याची परंपरा भारतेंदू हरिश्चंद्र व राजा शिवप्रसाद यांनी प्रस्थापित केली. [हिं. सा. को.; ब्र. ख. तु. अ.]

## खड्ग

तलवार. हे एक प्राचीन शस्त्र आहे. प्राचीन युद्धात मुख्यत्वे तलवार किंवा खड्ग याचाच प्रयोग करीत. मूठ व लांब पाते असे तलवारीचे दोन भाग असतात. तिचा उपयोग छाटण्यासाठी किंवा खुपसण्यासाठी करतात. खड्गाच्या उत्पत्तीची कथा अशी–

दक्ष प्रजापतीला साठ कन्या होत्या. या कन्यांपासून पुढे सकल सृष्टी निर्माण झाली. त्यात देवर्षी, गंधर्व, अप्सरा यांच्याबरोबर हिरण्याक्ष व हिरण्यकशिपू यांच्यामारखे दैत्यही उत्पन्न झाले. या दैत्यांनी सर्वांना छळायला सुरवात केली. तेव्हा सर्व देवांनी हिमालयावर यज्ञ केला. त्या यज्ञाग्नीच्या ज्वालेतून नीलवर्ण, कृशोदर, तीक्ष्णदंत व तेजःपुंज असे एक आयुध निर्माण झाले. त्याच्या योगाने पृथ्वी थरारली. मग ब्रह्मदेवाने सांगितले, की ‘लोकांच्या रक्षणासाठी मी हे खड्ग निर्माण केलेले आहे. याच्या योगाने असुरांचा संहार होईल.’



खड्ग

या खड्गाची अनेक नावे आहेत. त्यांचा जप केल्याने युद्धात जय मिळतो. ती नावे अशी –

**असिर्विशसनः खड्ग**
**स्तीक्ष्णधारो दुरासदः ।**
**श्रीगर्भो विजयश्चैव**
**धर्मपालस्तथैव च ॥**

ऋग्वेदात खड्गाचा उल्लेख आहे (१०. १०३. ३); पण तिथे त्याला खड्ग न म्हणता निषङ्गी असे म्हटले आहे. असी या नावानेही तलवारीचा निर्देश केलेला आढळतो (ऋ. १. १६२.२०) महाभारतातही तलवारीचा उल्लेख आहे.

उत्तम तलवार कशी असावी, ते पुढील श्लोकात सांगितले आहे–

**शुद्धाङ्गः शुद्धवर्णश्च सुनेत्रः सुस्वरश्च यः ।**
**मृदुस्पर्शः सुसन्धेयस्तीक्ष्णधारो महागुणः ॥**

अर्थ – शुद्ध अंग, शुद्ध वर्ण, चांगला नेत्र, चांगला स्वर व मृदु स्पर्श असलेले, तसेच मोडले असता सहज सांधले जाणारे व तीक्ष्ण धारेचे खड्ग उत्तम होय.

याशिवाय किंचित वक्र, चार अंगुळे रुंद, उभे केले असता नाभीपर्यंत पोचणारे व मजबूत मूठ असलेले खड्ग चागले मानतात.

खड्गाचे तीन प्रकार आहेत– (१) कमलपत्राप्रमाणे गोल (२) मंडलाग्र = वाकदार टोकाचे व (३) असियष्टी = कण्हेरीच्या पानाप्रमाणे सरळ.

५० अंगुळे लांब असलेले खड्ग उत्तम होय, असे वराहमिहिर सांगतो. ३० अंगुळांपेक्षा जास्त लांबीच्या खड्गाला निस्त्रिंश असे म्हणतात. यापेक्षा कमी कमी लांबीच्या खड्गांना अनुक्रमे तलवार, दीर्घक (सुरा), नारसिंहक (कटचार),

कात्यायन (जंबिया), ऊना, भुजाली, करौली, लालक (वाघनखे), इ. नावे आहेत.

तलवार कशी धरावी व वापरावी त्याबद्दल युद्धशास्त्रविशारदांनी सात पवित्रे सांगितले आहेत, ते असे– शिखरक, कापोलक, ग्रीवास्थान, भूमंडल, तीक्ष्णाग्र, मुनय व पंचघात.

तलवारीच्या मुठीला सोन्याचे पाणी देऊन मुठीवर रत्ने बसवावी, म्यानात चंदनाचे चूर्ण टाकून त्यात तलवार ठेवावी, दिवसा तलवारीची पूजा करावी, निजताना डोक्याजवळ तलवार ठेवू नये, तलवारीत रूप पाहू नये, तिची किंमत व ठेवायची जागा कोणाला सांगू नये, असे तलवारीबाबत काही नियम सांगितलेले आहेत. तलवार आपोआप म्यानातून वर येणे, हे युद्धसूचक, आपोआप चमकणे, हे विजयसूचक व तिच्यातून आपोआप आवाज येणे, हे मृत्युसूचक आहे, असे बृहत्संहितेत सांगितले आहे.

तलवार किंवा खड्ग हे देवीच्या हातातील मुख्य आयुध आहे. बौद्ध मंजुश्रीच्या हाती असलेल्या खड्गाला प्रज्ञाखड्ग असे नाव असून, त्यातून निघणाऱ्या किरणांनी अज्ञानाचा अंधकार नष्ट होतो, असे मानतात.

तलवारींना नावे देण्याची पद्धत प्राचीन काळापासून होती. विष्णूच्या खड्गाचे नाव नंदक असे आहे. सिंह झालेल्या एका यक्षाजवळ मृगांक नावाची एक तलवार होती व तिच्यात जगज्जेतृत्वाचे सामर्थ्य होते, असे कथासरित्सागरातील मृगांकवतीच्या कथेत सांगितले आहे. छत्रपती शिवाजीमहाराजांची तलवार भवानी या नावाने प्रसिद्ध आहे.

प्राचीन काळी तांब्याच्या तलवारी बनवीत. सनपूर्व २०० च्या सुमारास ब्राँझ धातूच्या व सनपूर्व १००० ते ७०० च्या दरम्यान लोखंडाच्या तलवारी बनवू लागले. भारत व इराण या देशात तलवारी तयार होत.

पूर्वी तलवार बनविण्याची कला महत्त्वाची समजली जात असे आणि त्या कलेतली गुपिते कारागीर कोणालाही सांगत नसत. त्यात पुढे जादूटोणाही शिरला होता. काही तलवारी तर मांत्रिक आणि जादूगारच बनवून देत असत.

एकाच बाजूला धार असलेल्या तलवारीला एकतोधार व दोन्ही बाजूंना धार असलेल्या तलवारीला उभयतोधार असे म्हणत. तलवारीच्या मुठी गेंड्याच्या किंवा रेड्याच्या शिंगाच्या, हस्तिदंताच्या किंवा लाकडाच्याही बनवीत. तलवार ठेवायचे म्यान कातड्याचे असून ते कमरेला लटकावीत.

सांप्रतच्या युद्धात तलवारीला स्थान नाही. तिची जागा आता रायफलने घेतली आहे. [क. क.; ऋ. द.; व्या. ज्ञा. को.; डि. सिं.; म. ज्ञा. को; श. क.; ह. च. सां. अ.]

**खड्गनृत्य** एक नृत्यप्रकार. यामध्ये नाचताना हातात तलवार घेऊन तिचे हात करतात. विवाहाच्या वेळी किंवा उत्सवप्रसंगी अशा प्रकारचे नृत्य करतात.

**खड्गबहादुर मल्ल** ( मृत्यू इ. स. १९२० ) हिंदी व भोजपुरी भाषेचा एक कवी. हा गोरखपूरचा राजा होता. याचे आडनाव लाल होते. याचे भोजपुरीत सुधाबूंद नामक कजली गीतांचे पुस्तक प्रसिद्ध आहे. याच्या भाषेवर पछाही भोजपुरी व गोरखपूरिया अवधी यांचा प्रभाव आहे. याच्या काव्याचा नमुना पुढीलप्रमाणे –

**सखी ! बाँसे की बसुँरिया**
**जियरा मारे रे हमार ।**
**नीच जाति मोहन मुँह लागलि**
**बोले नाहि संसार ।**
**लाल अधर रस पान करति है**
**बिख उगिलति निरधार ।।**

याचा भावार्थ असा– हे सखी, ही बांबूची एक साधी मुरली; पण तीच माझा जीव घायाळ करते आहे. ही अगदी सामान्य असूनही हिला कृष्णाच्या अधराचा संपर्क झाल्यामुळे जग हिच्यापुढे निःशब्द होते. ही कृष्णाच्या अधररसाचे पान करते आहे. [ भो. क. का. ]

**खड्गवाहिनी** खड्ग धारण करणाऱ्या स्त्रीला हे नाव आहे. प्राचीन काळी राजे व युवराज यांच्याबरोबर खड्गवाहिनी सेविका असत, असा बाणभट्टाच्या कादंबरीत उल्लेख आहे. अमरावतीच्या शिल्पात राजाचे खड्ग आपल्या खांद्यावर घेऊन खड्गवाहिनी त्याच्याजवळ उभी आहे, अशी बरीच दृश्ये आहेत. राजांच्या या सेविका व विशेषतः त्यांच्या शरीरसंरक्षक खड्गवाहिनी स्त्रिया अमेझॉन जातीच्या असत, असे कौटिल्याने लिहिले आहे. [ अ. स्क. म. ग. म्यु.– सी. शिवराममूर्ती ]

**खड्गासन** जैनांची मूर्तिकलेतील आसनकल्पना. दोन पायात दोन अंगुळे अंतर ठेवून उभे राहणे व दोन्ही हात शरीराला स्पर्श न करतील अशा बेताने सरळ खाली सोडणे म्हणजे खड्गासन होय. अजितनाथ, संभवनाथ व अभिनंदननाथ या तीर्थंकरांच्या मूर्ती खड्गासनात खोदलेल्या आढळतात. [ जै. इ. ]

**खतिब** एक मुस्लीम प्रवचनकार. याला खातिब असेही म्हणतात. ज्या ठिकाणी काझी नसेल, त्या ठिकाणी खुदबा वाचण्याचे काम हा करतो. [ वि. मुं. रा. प. ]

**खत्तर** मुसलमानांची एक जात. यांची वस्ती मुख्यत्वे अटक व रावळपिंडी या जिल्ह्यांत आढळते. यांच्या बऱ्याचशा चालीरीती हिंदूप्रमाणेच आहेत. यावरून हे लोक मुळात हिंदू असावे, असे वाटते. [ से. रि. १९११ पंजाब ]

**खत्तिविज्जा** ( सं. क्षत्रियविद्या ) पाली बौद्धग्रंथात दंडनीतीला खत्तिविज्जा असे म्हटले असून, नीच कलांच्या समूहात तिचा अंतर्भाव केला आहे. खत्तिविज्जा म्हणजे राजनीती नव्हे; तर सूक्तासूक्ताचा विचार न करणारी केवळ कूटनीती होय, असा बौद्ध ग्रंथांचा आशय दिसतो. त्या काळी राजनीतिज्ञ पुरुष व कारस्थानी पुरुष या दोघात भेद केला जात होता आणि केवळ कारस्थानी पुरुष बौद्ध आचार्यांच्या मते निंद्य ठरला होता. [ जा. का. भा. सं. ]

**खत्ना** एक मुस्लिम संस्कार. पुरुषाच्या जननेंद्रियावरील कातडचाचा थोडासा अग्रभाग कापून टाकण्याच्या क्रियेला हे नाव आहे. यालाच खितान, सुन्नत किंवा मराठीत सुंता म्हणतात. या क्रियेचा उल्लेख कुराणात कुठेही नाही. त्याचप्रमाणे स्वत. मुहंमद पैगंबरानेही आपला खत्ना करून घेतल्याचा पुरावा सापडत नाही.

ही प्रथा हजरत इब्राहिम याच्या काळापासून अरबस्तानात प्रचलित होती. परंतु मुहंमद पैगंबर व त्याच्या पूर्वीचे सोळा पैगंबर (प्रेषित) खत्ना केलेल्या स्थितीतच जन्मले होते, अशी समजूत आहे.

मुलगा सात दिवसांचा झाला, की अकीका व नामकरण या संस्कारांबरोबरच खत्नाही करण्यात येतो. या वेळी खत्ना करणे राहून गेल्यास वयाच्या ७ व्या किंवा १२ व्या वर्षापर्यंत केव्हा तरी तो करून घ्यावा, असा संकेत आहे. हे काम करणारे विशिष्ट न्हावी असतात. त्यांना खलीफा म्हणतात. हा विधी मुसलमानात अपरिहार्य मानला जातो. [ मु. स. सं. –श्रीपाद जोशी ]

**खत्री** एक कोष्टी जात. यांची वस्ती बंगाल, बिहार, ओडिसा पंजाब, उ. प्रदेश, काश्मीर व महाराष्ट्र या प्रदेशांत आहे. खत्री लोकांत क्षत्रियखत्री व छत्रीखत्री (कोष्टी) असे दोन पोटभेद आहेत.

महाराष्ट्रात याची संख्या बरीच असून, हे स्वतःला क्षत्रिय मानतात व जानवे घालतात. जर व कलाबतू काढणे आणि पीतांबरासारखी रेशमी वस्त्रे विणणे, हा यांचा पूर्वीचा व्यवसाय होता. परंतु या धंद्याला सांप्रत बरकत नसल्यामुळे हे सावकारीकडे वळले आहेत.

खत्री मुलांच्या मुंजी करतात. मराठा खत्र्यात कुळे व गोत्रे असून विधवाविवाह व सोडचिठ्ठी रूढ आहे. यांना मद्यमांस चालते. महाराष्ट्रातील खत्री हे आपल्या विणकामाच्या व्यवयाबद्दल एक दंतकथा सांगतात, ती अशी– परशुरामाच्या भयाने क्षत्रियांच्या गर्भवती स्त्रिया कालीच्या आश्रयाला गेल्या. त्यांना मुले झाल्यावर कालीने त्यांच्या हाती चरखे दिले व तेव्हापासून ही जात विणकाम करू लागली.

महाराष्ट्रातील खत्री शैव असून, रेणुका ही त्यांची कुलदेवी आहे. यांच्या लग्नात ब्राह्मण पुरोहित आवश्यक असतो. याचा लग्नविधी सात दिवस चालतो. या सात दिवसात ते मांसाहार करीत नाहीत. लग्नानंतर देवीचा गोंधळ घालतात. यांच्या पुढाऱ्याला ग्रामणी असे म्हणतात.

कर्नाटकातील खत्री गणपती, महादेव व येल्लम्म या देवतांना भजतात व शंकराचार्यांना आपला धर्मगुरू मानतात.

मद्रासच्या बाजूला या जातीला पटनूलकर व मुजराज क्षत्रिय अशी दुसरी नावे आहेत. यांच्या चालीरीती तिकडील पटवेगार जातीप्रमाणे आहेत. याच्यांतील भाट नामक एका पोटजातीत सर्व खत्रींची वंशावळ असते.

गुजरातेतील खत्री स्वत.ला ब्रह्मक्षत्रिय म्हणवितात व आपण १६ व्या शतकाच्या सुमारास सिंधमधून व्यापारासाठी गुजरातेत आलो, असे सांगतात. यांचा नीटस चेहेरा व गौरवर्ण यांवरून ते ब्रह्मक्षत्रिय असावे, असे मत आहे. हे हिंगलाजदेवीला भजतात. हे वैष्णवपंथी आहेत. सुरत जिल्ह्यात यांच्या दोन पंचायती असून त्यातील सभासदांना शेटिया किंवा कारभारी असे म्हणतात. पंचायतीकडून दिल्या जाणाऱ्या शिक्षा साधारणपणे दंड व बहिष्कार या स्वरूपाच्या असतात.

राजस्थानातील खत्री शेती करतात. सूर्य, भाग, कोच्चिमो व नाग अशा यांच्या चार पोटजाती आहेत. यांच्यांत लग्नाच्याच वेळी मुलाची मुंज करतात. यांना पात्रो असे दुसरे नाव असून हे उडिया भाषा बोलतात.

काश्मीरातील खत्री हिंदू, शीख व जैन धर्माचे असून, वर्णाने वैश्य आहेत. यांच्या स्त्रिया सुरेख असतात. या लोकांच्या गौर वर्णावरून व घाऱ्या डोळ्यांवरून हे लोक क्षत्रियोत्पन्न असावे, असे क्रूकचे मत आहे. परशुरामाने क्षत्रियांचा संहार सुरू केला, तेव्हा एक गर्भवती क्षत्रिय स्त्री एका सारस्वत ब्राह्मणाच्या

आश्रयाला राहिली. परशुरामाची खात्री करण्यासाठी त्या ब्राह्मणाने ही मुलगी आपली असल्याचे सांगितले व तो तिच्या बरोबर एका ताटात जेवला. पुढे या मुलीच्या मुलापासून खत्री जन्मले, असे हे सांगतात. सारस्वत ब्राह्मण यांच्या हातची कच्ची रसोई खातात.

पजाबातील खत्री हे व्यापारी पेशाचे आहेत. फार पूर्वी हे लोक काबूल, कंदाहार व तुर्कस्तान या प्रदेशात व्यापारासाठी गेले. भारताच्या विभाजनापूर्वी सीमाप्रांत, पंजाब व सिंध या भागातील व्यापार याच लोकांच्या हातात होता. पंजाबातील खत्री प्रायः हिंदू व काही शीख आहेत. यांचे सरळ नाक, रुंद कपाळ व गौर वर्ण यांवरून एखाद्या आर्यवंशी जातीपासून यांची उत्पत्ती झाली असावी, असे वाटते. काही विद्वानांचे असे मत आहे, की खत्री हा संस्कृत क्षत्रिय या शब्दाचा अपभ्रंश असून, इतिहासकाळी केव्हा तरी या लोकांनी सैनिकी पेशा सोडून व्यापारी पेशा पत्करला असावा. सनपूर्व चौथ्या शतकात शिकंदराबरोबर भारतात आलेल्या ग्रीक इतिहासकारांनी सिंधूच्या खोऱ्यातील जथराई (एतरोई) जनपदाचा उल्लेख केला आहे. तो बहुधा क्षत्रिय किंवा खत्री जनपदासाठी असावा.

पंजाबात खत्री जातीला मोठा मान आहे. तिथे ते शिखांचे पौरोहित्य करतात. शिखांचे गुरू गोविंदसिंघ आणि नानक हे दोघे खत्री होते. अकबराचा अर्थमंत्री तोडरमल हा खत्री जातीचाच होता. यांच्या छत्रपती, बाहरी, बावनजाती, खुरवरैन, इ. पोटजाती आहेत. शेर किंवा शेरा नावाची यांची एक पोटजात आहे. शेर पुरुष अनेक दासी आपल्या पदरी बाळगतात. या दासींपासून होणाऱ्या संततीला गोळक असे नाव आहे.

पंजाबातील खत्री लोकांत एक वैशिष्टयपूर्ण विवाहविधी आहे, तो असा – नवरा मुलगा लग्नमंडपात आल्यावर एका बंद पालखीला सात प्रदक्षिणा घालतो व प्रत्येक प्रदक्षिणेच्या वेळी वधूचा भाऊ त्याला एका फांदीने फटकारतो. या पालखीत वधूला बसविलेली असते. लग्नाच्या दिवशी वधू सबंध दिवसभर डोळे मिटून बसते व बोहल्यावर चढल्यावर वराला पाहण्यासाठी म्हणून डोळे उघडते. वधूला लपवून ठेवण्याचा व वराने तिला शोधून काढण्याचा आणखी एक प्रकारही या लग्नविधीत आहे.

हे लोक सुतक पाळतात व छाती पिटून रडतात. विधवेला वर्षभर वरणाबरोबर राळ्याची भाकरी खावी लागते. [ का. ट्रा. स. इं.; म. ज्ञा. को.; हि. वि. को.; पं. जी. सा. ]

## खदाल

ओडिसा प्रदेशातील एक द्राविड जात. यांना नायक व बेहेर अशा सन्माननीय नावांनी ओळखतात. हे लोक पालख्या वाहणे व शेतात मोलमजुरी करणे, ही कामे करतात. खोरे, खुरपे या हत्यारांनी हे शेतकाम करतात. त्यावरून यांना खदाल असे नाव पडले असावे. पाटण्यातील खदालांना हे आपले जातभाई मानतात. यांच्या कुलचिह्नावरून निरनिराळ्या पोटजाती बनल्या असून, त्यांचे आपापसात विवाहसंबंध होतात.

**विवाहप्रथा** – विवाहाच्या वेळी आपापल्या कुलचिह्नाची पूजा करून त्यांना वधूकरिता केलेले अलंकार व वस्त्राभरणे अर्पण करतात. मुले-मुली लग्नापूर्वी वयाने फार वाढली, तर त्या मुला-मुलीचा विवाह प्रथम आंबा, कापूस किंवा जांभूळ या झाडांशी लावतात. विधुराने पुन्हा लग्न करताना दुसऱ्या बायकोसाठी रु. १० किंवा ठराविक देजाच्या दुप्पट रक्कम द्यायची असते. असे केले, म्हणजे तिला त्याच्या मृतपत्नीची भूतबाधा होत नाही, अशी समजूत आहे.

**मर्तिकप्रथा** – प्रेते जाळतात किंवा पुरतात. मृताशौच पाळणारा प्रत्येक मनुष्य आंब्याचा एकेक टाळा घेऊन त्याने गवतावर आघात करीत स्मशानातून परत येतो. असे केल्याने गवतातील नाकतोडे उडू लागतात. मग त्यातला एक नाकतोडा पकडून आणतात व त्याला नव्या फडक्यात बांधून कुलदेवतेपाशी ठेवतात. या योगाने मृतात्मा परत आणला गेला व देवाजवळ ठेवल्याने त्याला मुक्ती मिळाली, असे समजतात. [ ट्रा. का. सें. प्रॉ. इं. ]

## खदिर

एक वृक्ष. याला मराठीत खैर म्हणतात. याचे लाकूड अत्यंत कठिण असते. प्राचीन काळी यज्ञात आहुती टाकण्यासाठी खदिरापासून केलेली पळी (स्रुव) वापरीत असल्याचा तैत्तिरीय संहितेत उल्लेख आहे (३. ५. ७. १). गायत्रीच्या रसापासून या वृक्षाची उत्पत्ती झाल्याचे सांगितले आहे. याच्या लाकडापासून ताईतही बनवीत. [ वे. इं. ]

## खदिरवनी तारा

एक बौद्ध देवता. खदिरवनी म्हणजे खैर वृक्षांच्या वनात राहणारी असा त्या शब्दाचा अर्थ होतो. हिचा वर्ण– हरित, मुद्रा– वरद व चिन्ह– कमल आहे. अशोककांता आणि एकजटा या हिच्या सहचरी होत. [ इं. बु. इ. ].

## खद्र

ओडिसा प्रदेशातील एक जात. यांना खदूर, खरूर अशीही अन्य नावे आहेत. हे कटकहून ओडिसामध्ये आले, असे सांगतात. पितळेचे दागिने तयार करणे, हा यांचा धंदा आहे. आपली उत्पत्ती देवांचा शिल्पकार विश्वकर्मा

याच्यापासून झाली, असे यांचे म्हणणे आहे.

जगन्नाथपुरीच्या मंदिराचा कळस बनविण्यासाठी विश्वकर्म्याने एक पुरुष निर्मिला. त्याला दोन मुले झाली. त्यापैकी एकाचे वंशज हे खद्र व दुसऱ्याचे वंशज कासार होत. यांची नाग, सिंह, काश्यप व कच्छप अशी चार गोत्रे असून, पात्र (सन्माननीय), दास (गुलाम), सओ (सावकार) व महारना (कारागीर) अशी आडनावे आहेत.

**विवाहप्रथा** – हे मुला-मुलींची लग्ने अल्पवयात करतात. मुलगी ऋतुस्नात होण्यापूर्वी तिचे लग्न न झाल्यास तिला कायमची बहिष्कृत करण्याची चाल पूर्वी होती. सांप्रत विवाह जमवताना गोत्रे अगर आडनावे विचारात घेत नाहीत. विवाहविधी ओडिसातल्या इतर जातीप्रमाणेच असतो. मात्र यांच्या विवाहसमारंभात एक चमत्कारिक चाल आजही रूढ आहे,



खदिरवनी तारा

तिचे नाव बंदोपानी. बंदोपानी म्हणजे ब्रह्मचर्य मोडणे. त्यासाठी सात घरांतील थोडे पाणी आणून ते वराच्या अंगावर ओततात. मग त्याचे ओले वस्त्र काढून घेऊन त्याला नग्न करतात. तशा स्थितीत तो घराकडे पळू लागतो, तेव्हा वाटेत मुद्दाम उभे राहिलेले त्याचे मित्र त्याला नवे वस्त्र देतात. लगुन (विवाहमुहूर्त) एका ताडपत्रावर लिहितात. नंतर ते ताडपत्र व काही मामुली रक्कम देज म्हणून मुलीच्या बापाकडे नेतात. एवढे झाले, की वाङनिश्चय झाल्याचे मानतात. अविवाहित इसमाने विधवेशी लग्न करण्यापूर्वी फुलानी भरलेल्या पानांच्या द्रोणाशी विवाह करावा व विधवेशी पुनर्विवाहाचे बोलणे करायचे ते तिच्या सासरी न करता माहेरी करावे, असा यांच्यांत संकेत आहे.



हे लोक मासे व जनावरांचे मांस खातात; पण पक्ष्यांचे मांस खात नाहीत. मद्यपानही करीत नाहीत. [ट्रा. का. सें. प्रॉ. इं.]

**खनक** एक जात. आयोगव पुरुष व क्षत्रिय स्त्री यांच्या संततीला हे नाव आहे. हे लोक खणण्याचे काम करून आपली उपजीविका करतात, असे वैखानस सांगतो [हि. ध.]

**खना** ज्योतिषाचार्य वराहदेवाची सून व मिहिराची पत्नी. ही ज्योतिषशास्त्रात पारंगत होती व कृषिपंडितही होती.

वराहदेव हा विक्रमादित्याच्या दरबारातील नवरत्नांपैकी एक होता. आपला पुत्र मिहिर याचे आयुष्य एका वर्षापेक्षा जास्त नाही, असे वराहदेवाला कळल्यावर त्याने मिहिराला एका तांब्याच्या पेटीत घालून समुद्रात सोडून दिले. ती पेटी वाहत, वाहत लंकेला पोचली. तिथल्या लोकांनी मिहिराला त्या पेटीतून बाहेर काढून त्याचे पालनपोषण केले. पुढे खना नामक एका मुलीशी त्याचे लग्नही लावून दिले.

खना स्वतः ज्योतिषशास्त्रात प्रवीण होती. तिच्याकडून आपल्या जन्माची हकीकत समजताच मिहिर तिच्यासह समुद्रमार्गे उज्जयिनीला निघाला. एकदा एका नुकत्याच जन्मलेल्या बालकाच्या आयुष्यगणनेत आपली चूक झाली, असे वाटल्यावर मिहिराने आपले सर्व ज्योतिषग्रंथ समुद्रात फेकून दिले. तेव्हा खनाने गणित मांडून मिहिराचे गणित बिनचूक असल्याचे सिद्ध केले व त्याला आपले ग्रंथ समुद्रातून वर काढायला लावले.

उज्जयिनीला पोचल्यावर तिने मिहिराच्या आयुष्यगणनेत आपल्या सासऱ्याची चूक झाल्याचे सप्रमाण सिद्ध केले. एकदा विक्रमादित्याने वराहदेवाला नक्षत्रांची गणना करायला सांगितले असता तो चिंतेत पडला. तेव्हा खनाने त्याला नक्षत्रगणनेची रीत सांगितली. खनाची विद्वत्ता कळल्यावर विक्रमादित्याने तिचा सन्मान करण्याच्या हेतूने तिला आपल्या दर-

बारात बोलाविले. यात आपला अपमान आहे, असे वाटून वराहदेवाने मिहिराला खनाची जीभ छाटून टाकायला सांगितले. मिहिराने या गोष्टीला विरोध केला; पण खनाने सागितले, की ' माझे आयुष्य सपलेले आहे, तेव्हा तू माझी जीभ छाटलीस तरी हरकत नाही. ' मिहिराने त्याप्रमाणे करताच तिचा अत झाला. हिच्या विषयी अनेक दतकथा बंगालमध्ये प्रचलित आहेत. कुणी तिला काल्पनिक व्यक्तीही मानतात.

खनाच्या कृषिविषयक उक्ती व म्हणी बंगालध्ये फार लोकप्रिय आहेत. हिच्या वचनाचा संग्रह ' वराहमिहिर खना ज्योतिषग्रंथ ' या बंगाली पुस्तकात केलेला आहे.

धान्याच्या बाबतीत ती म्हणते—

**खना डेके बोले जान । रोदे धान छायाय पान ।।**
**दिने रोद्र राते जल । ताते बाडे धानेर बल् ।।**

अर्थ— खना म्हणते, की उन्हात धान्य होते व छायेत पान होते. दिवसा ऊन व रात्री पाणी असेल तर धान्याची जोरदार वाढ होते.

पावसासंबंधी ती म्हणते—

**यदि वरषे अगने । राजा जान मॉगने ।।**
**यदि वरषे पौषे । कडि हय तुषे ।।**
**यदि वरषे माघैर शेष । धन्य राजा पुण्य देश ।।**

अर्थ— मार्गशीर्षात पाऊस पडला, तर राजालाही भीक मागण्याची पाळी येईल. पौषात बरसात झाली, तर तुसाचेही पैसे होतील. आणि माघाच्या शेवटी पाऊस पडला, तर तिथला राजा धन्य व तो प्रदेश पुण्य.

याशिवाय तिने वादळ व पाऊस, धान्याची पेरणी व कापणी, मोहरी, कापूस, पडवळ, वांगे, हळद, नारळ, केळे इत्यादींची लागवड, अशा अनेक महत्त्वाच्या गोष्टींसबधी माहिती दिली आहे.

खतांविषयी ती म्हणते, की सडक्या कुजक्या गोष्टी मानवाला अहितकारक; पण झाडांना उपकारक आहेत. यात सध्याच्या कंपोस्टखताच्या पद्धतीचे सूचन आहे. सरसू, उडीद, व मूग एकदम पेरावे, असे सांगून तिने सध्याच्या नायट्रोजन स्थिरीकरणाच्या प्रक्रियेचेही पूर्वसूचन केले आहे. झाडाला कीड लागली, तर राख टाकणे, सुपारीच्या झाडाला शेणखत घालणे, माडाच्या मुळात मीठ घालणे, इ. ज्या गोष्टी तिने सांगितल्या आहेत, त्यावरून ती कृपिशास्त्रज्ञ स्त्री होती, हे समजते. [ हिं. क. को.; बं. उ. सा.]

## खमाज

हिंदुस्थानी संगीतातला एक राग. हा राग षाडव संपूर्ण आहे. याचा वादी स्वर गंधार व संवादी निषाद आहे. आरोहात ऋषभ स्वर वर्ज व निषाद शुद्ध आणि अवरोहात कोमल व बाकी सर्व स्वर शुद्ध लागतात. हा राग शृंगारप्रधान आहे. यालाच पूर्वी कांबोज म्हणत असत. संगीत-प्रवेशिकेत याचे ध्यान पुढीलप्रमाणे वर्णिले आहे—

**काम्बोजा चन्द्रवदना नीलोत्पलविभूषणा ।**
**रमणी सुस्तनाम्भोजा पुष्पबाणावतंसिनी ।।**

अर्थ— कांबोज ही रागिणी चंद्रमुखी, नीलकमल अंगावर धारण करणारी, कमलासारखे स्तन असणारी, पुष्पबाण कानात घालणारी अशी रमणी आहे.

गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर. [ श्री. आबासाहेब मुजुमदार. ]

## खयरवाल राजवंश

इ. स. च्या १२ व्या शतकात बिहारमधल्या शहाबाद जिल्ह्यात खयरवाल राजवंश राज्य करीत होता. इतिहासाला ज्ञात असलेला या घराण्यातला पहिला राजा साधव हा होता. साधवाचा मुलगा रणधवल व त्याचा मुलगा प्रतापधवल हा होय. प्रतापधवलाचे काही शिलालेख उपलब्ध आहेत. याने गहडवालांचे वर्चस्व मान्य केले होते. प्रतापधवलाचा पुत्र साहस व त्याचा पुत्र इंद्रधवल हे दोघे एकामागून एक गादीवर आले. इ. स. ११९७ साली इंद्रधवलाची कारकीर्द सुरू झाली. तो त्या वंशातला महानृपती गणला गेला. त्यापुढच्या राजवंशाची माहिती उपलब्ध नाही. [ स्टू. एं. ]

## खरकरी व्रत

गंजम जिल्ह्यात चैत्रामध्ये दर रविवारी उपवर कुमारिका इष्टवरप्राप्तीसाठी हे व्रत करतात. या दिवशी खरकरी देवीची पूजा करायची असते. [ स्ट. ओ. फो. ]

## खरतरगच्छ

जैनाचा एक उपपंथ. या गच्छाची पट्टावली ज्ञानकोशात दिलेली आहे. तिच्यात महावीराचा पहिला शिष्य गौतम हा प्रथम असून, जिनमुक्ती हा ७२ वा आचार्य आहे. या गच्छाविषयी जिनेश्वरसूरिविरचित कथाकोषप्रकरणाच्या प्रस्तावनेत पुढील माहिती दिलेली आहे—

जिनेश्वरसूरीचा एक प्रशिष्य जिनवल्लभसूरी या नावाचा एक आचार्य होऊन गेला (इ. स. १११२ ते ११५४). त्याचा जिनदत्तसूरी नावाचा एक पट्टधर होता. हे दोघेही प्रकांडपंडित चारित्र्यवान होते. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या प्रभावाने मारवाड, मेवाड, बागड, सिंध, दिल्लीमंडल व गुजरात या प्रदेशांत कित्येक लोक जैन बनले. त्यांनी ठिकठिकाणी आपल्या

पक्षाची अनेक जिनमंदिरे व जैन उपाश्रय निर्माण करविले. त्यांनी आपल्या पक्षाचे नाव विधिपक्ष असे जाहीर केले व त्यांच्या उपदेशाने श्रावकानी जितकी म्हणून जिनमंदिरे उभारली, त्या सर्वांना विधिचैत्य असे नाव ठेवले. पण पुढच्या काळात त्या समुदायाचे विधिपक्ष हे नाव मागे पडून त्याला खरतरगच्छ असे नवे नाव मिळाले. आजपर्यंत त्याच नावाने या गच्छाची परपरा अविच्छिन्नपणे चालू आहे.

या गच्छात मोठमोठे विद्वान व प्रभावशाली आचार्य निर्माण झाले. त्यांनी आपल्या ज्ञानाने व आचरणाने जैन समाजाच्या उन्नतीला मोठाच हातभार लावला. भाषा, साहित्य, इतिहास, दर्शन, ज्योतिष, वैद्यक, इ. विविध विषयावर संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश व देश्य या भाषांतून लहानमोठे हजारो ग्रथ त्यांनी निर्माण केले. खरतरगच्छीय पंडित धर्म व संप्रदाय एवढ्या मर्यादित क्षेत्रातच वावरत नव्हते, तर त्यानी जैन व जैनेतर अशा उभयविध साहित्याचे अध्ययन व अध्यापन सातत्याने केले असल्याचे कळते. जैनेतर ग्रंथांवर त्यांनी ज्या टीका लिहिल्या आहेत, त्या पांडित्यपूर्ण व मूळग्रंथ समजायला उपकारक ठरल्या आहेत. खरतरगच्छीय विद्वानांची ही वाङमयोपासना केवळ जैन धर्माच्याच दृष्टीने महत्वाची नसून, ती समस्त भारतीय संस्कृतीला गौरव प्राप्त करून देणारी आहे.

जिनेश्वरसूरीच्या शिष्यपरंपरेत अन्यही कित्येक छोटेमोठे गणगच्छ प्रचलित झाले व त्यांत कित्येक ग्रंथकार, वादी, तपस्वी, साधू, किंवा यती निर्माण झाले. [ क. का. प्र.; म. ज्ञा. को. ]

## खरनाद

आयुर्वेदाचा एक प्राचीन आचार्य. हा भरद्वाज गोत्रातला होता. पाणिनीय गणपाठात (४·१·९६) व तदुत्तरकालीन चांद्रव्याकरणात (२.४·२०) याचा उलेल्ख आला आहे. याची एक वैद्यकशास्त्रावरील संहिता होती. तिच्यातली कित्येक वचने टीकाग्रंथातून उद्‌धृत केलेली आढळतात. ही सहिता चरकाचा टीकाकार भट्टार हरिश्चंद्र याच्यापूर्वी रचली गेली होती. खरनादाच्या संहितेच्या सर्वात अधिक भाग हेमाद्री व अरुणदत्त यांनी सुरक्षित ठेवला आहे. गिरींद्रनाथाने खरनादाचे तीन योगही उद्‌धृत केले आहेत. [ आ. इ. ]

## खरवार

एक आदिवासी जमात. यांची वस्ती मुख्यत्वे बंगाल उ. प्रदेश, बिहार, मध्यप्रदेश व छोटा नागपूर येथे आढळते. खर नावाचे गवत ते आपल्या घराच्या छपरासाठी वापरतात व खैर (खदिर) या झाडापासून कात बनवितात, म्हणून यांना खरवार किंवा खैरवार असे म्हणू लागले. करुष, करुवार या नावावरूनही यांची व्युत्पत्ती सांगतात. रामगड व जशपूर येथील राजे याच जमातीतले होते.

हे मुळात गोंड असावे. महाराष्ट्रातील कातकरी व खरवार एकच असावे, असे क्रुकचे मत आहे. भोगता, महतो, रावत व मांझी अशा यांच्या पोटजाती असून, त्यांच्यातही पुन्हा पोटविभाग आढळतात. त्यांची नावे पोपट, कासव, डुकर, वानर, पिंपळ, इ. देवकावरून पडलेली आहेत. धान (भात), नोन (मीठ), डिल (नागर) अशीही यांची नावे आढळतात.

**विवाहप्रथा** – याच्या पोटजातीत परस्पर लग्नसंबंध होत नाही. वधूशुल्क घेण्याची पद्धत असून लग्नसमारंभ हिंदुपद्धतीनेच होतो. लग्नापूर्वी वर व वधू यांचा प्रथम आम्रवृक्षाशी विवाह लावतात. लग्नात रक्त व शेंदूर यांच्या मिश्रणाचा त्यांना टिळा लावतात. वराने वधूच्या कपाळी शेंदूर लावणे, हा लग्नातला मुख्य विधी असतो.

**देवधर्म** – मुइया, कोरवा, इ. लोक या प्रदेशातले आद्य रहिवासी असल्याने खरवार लोक यांनाच स्थानिक देवतांच्या पूजेसाठी बोलावतात. स्थानिक देवतेला दर तीन वर्षांनी एक रेडा बळी देतात. खरवार हिंदुदेवताना मानीत नाहीत; तरी पण संकटकाळी सूर्याची पूजा करतात. मध्यप्रदेशात मात्र सर्व लोक हिंदुधर्माचे पालन करतात. ज्वालामुखीदेवी नावाची यांची एक मुख्य देवता आहे. हे लोक कनोजच्या जयचंदाचा पुत्र लखण याला देवस्वरूप मानतात. छोटा नागपूरमधील खरवार मूचकराणी या चांभारदेवीची पूजा करतात व तिला बळीही देतात. तिचे वार्षिक लग्नही लावतात.

**मर्तिकप्रथा**– हे मृतांना पुरतात. त्यापूर्वी प्रेत सात वेळा खड्ड्याभोवती फिरवतात. उत्तरेकडे पाय करून प्रेत पुरतात. दहा दिवस सुतक पाळतात. सुतकात मद्य–मांस घेत नाहीत. [ एन्सा. रि. ए.; ट्रा. का. से. प्रॉ. इं. ]

## खराडा

सौराष्ट्र आणि गुजरात या प्रदेशातली एक मुसलमान जमात. हे लोक मूळचे कातारी जातीपैकी होते; परंतु पुढे ते मुसलमान झाले. याना सघाडिया असेही म्हणतात, हे काश्यपापासून आपली उत्पत्ती सांगतात व मुसलमान होऊनही भारद्वाज, कौडिण्य ही गोत्रे लावतात. यांच्यापैकी काही जैनही आहेत. यांचा मुख्य व्यवसाय लाकडावर खोदकाम करणे, हा आहे.

याच्यात परदेशी व पूर्विया या नावाचे दोन प्रमुख पोटभेद आहेत. तसेच गौरमाल, जाट, बेराडी वगैरे पोटजातीही आहेत. यांची आडनावे खेड्यांवरून पडलेली आहेत.

**विवाहप्रथा**– श्रीमंत लोक बहुधा मुलगी वयात येण्यापूर्वी

तिचा विवाह करतात. अविवाहित माणसाला विधवेशी लग्न करायचे असल्यास प्रथम त्याने गुलाबाच्या झाडाशी लग्न लावावे, असा संकेत आहे.

**देव-धर्म–** हे लोक विश्वकर्म्याची पूजा करतात. दसऱ्याच्या दिवशी शस्त्रपूजा करतात. मुंगूस आणि पांढरे डुक्कर यांना शुभ प्राणी समजतात. [मुं. इ. जा.; ट्रा. का. सें प्रॉ. इं.]



खराडी पुरुष

**खरोल** राजस्थान, पंजाब व उ. प्रदेश या प्रदेशांतली एक जात. यांना खरवाल, नूनगर, नुनिया अशी आणखीही नावे आहेत. पूर्वकाळी आपण राजपूत असल्याचे हे सांगतात. मोगलांच्या राजवटीत काही कारणावरून अकबराची यांच्यावर इतराजी झाली व त्यामुळे यांनी शेती सोडून मीठ तयार करण्याचा व्यवसाय पत्करला. सोनिग्रा, ह्यादा, चौहान, मछेलिया, गामती, सिसोदिया, इ. यांचे पोटभेद आहेत.



खरोल पुरुष

हे लोक शक्तीची उपासना करतात. मोरनमाता, अभयाजी, सांभराजी ही यांची कुलदैवते होत. [रा. जा.]

**खरोष्ठी लिपी** इराणी लोकांच्या अरमाइक (सेमिटिक) लिपीपासून ही लिपी उत्पन्न झाली असावी, असे म्हणतात. प्राचीन काळी पंजाबावर इराणची सत्ता होती, तेव्हा त्यांनी अरमाइक लिपीचा वापर तिथे सुरू केला. या लिपीत ऱ्हस्वदीर्घ असा भेद नाही. आ, इ, ऊ, ए, अशी स्वरमालाही नाही. अ या स्वरास भिन्न चिन्हे जोडूनच सर्व स्वर बनवतात. या लिपीत नवीन अक्षरे व स्वर यांची भर घालून खरोष्ठ नामक पंडिताने सामान्य जनांसाठी एक कामचलाऊ लिपी बनविली व तिलाच पुढे खरोष्ठी हे नाव मिळाले. महामायुरीमध्ये खरपोस्त नामक देवतेचा उल्लेख आहे. या खरपोस्त शब्दावरून खरोष्ठी हा शब्द आला असावा, असे पर्जिलुस्कीचे मत आहे. पोस्त या इराणी शब्दाचा अर्थ कातडे असा आहे.

या लिपीत जोडाक्षरे फारशी नाहीत. ती उजवीकडून डावीकडे लिहिलेली असते. अशोकाचे काही शिलालेख, इराणी लोकांची चांदीची नाणी, त्याचप्रमाणे शक, क्षत्रप, पार्थियन व कुशाण वंशांच्या काळातील बौद्ध आलेख यांत ही लिपी वापरलेली आढळते. असे लेख मुख्यतः पंजाबातच सापडले आहेत. भारताच्या इतर भागात तिचा विशेष प्रसार नसावा. इ. स. च्या ३ ऱ्या शतकापर्यंत या लिपीचा प्रचार पंजाबात व आसपासच्या प्रदेशात होता. त्यानंतर मात्र ती भारतातून लुप्त झाली व तिची जागा ब्राह्मी लिपीने घेतली. [सु. वि. को.; भा. प्रा. लि.]

**खर्जस्वर** स्वरसप्तकातील अगदी खालचा स्वर. यास खालचा सा असेही म्हणतात. मंद्र सप्तकासही खर्ज म्हणतात. संगीत स्वरलेखनपद्धतीत मंद्र सप्तकातील स्वरासही ही संज्ञा देण्यात येते. [सु. वि. को.]

**खलारी माता** रायपूर जिल्ह्यातील एक देवता. हिला सती देवता असे मानतात. त्या ठिकाणी तिच्या नावाचा एक खांब आहे. ती मानवरूप धारण करून जवळपास भरणाऱ्या जत्रांमध्ये भाजीपाला विकायला जाते, असे समजतात.

**खलीफा** या अरबी शब्दाचा अर्थ वारस, उत्तराधिकारी किंवा प्रतिनिधी असा आहे. मुहंमद पैगंबराच्या गादीवर बसणाऱ्या व्यक्तीला मुसलमान लोक खलीफा म्हणतात आणि त्याला आपला राजकीय व धार्मिक नेता मानतात. एका वेळी एकच खलीफा असावा, असे मुहंमद पैगंबराने सांगितले आहे.

सुन्नी पंथाच्या मते वयात आलेला, शहाणा, स्वतंत्र बुद्धीचा,

विद्वान, धर्मज्ञ, प्रबळ शासनकर्ता व न्यायी असा कोणताही पुरुष खलीफापदाला योग्य असतो. मात्र तो कुरेश जमातीतच जन्मला असला पाहिजे आणि त्याने कुराणातील सर्व धर्मनियम पाळले पाहिजेत. मुहंमदाचा जन्म कुरेश जमातीत झाला होता.

शिआपंथी लोकांचे म्हणणे असे, की मुहंमद पैगंबराच्या कुटुंबातील पुरुषालाच हे पद मिळावे. पण सुन्नी व वहाबी लोकांनी हे मत मानले नाही. वंशपरंपरेने खलीफांची गादी चालवू नये; तर बहुमताने निवडलेल्या योग्य पुरुषाला ती मिळावी, असेच सर्वांनी ठरविले. त्यावेळीच असेही ठरले, की इस्लामच्या संरक्षणासाठी खलीफाची अत्यंत आवश्यकता आहे.

पाहा— इमाम, इस्लाम. [ डि. इ. ]

**खवास** एक जात. यांची वस्ती मुख्यत्वे गुजरात व सौराष्ट्र या प्रदेशांत आढळते. यांना हजुरी, वजीर, गोला, लुंडा अशीही नावे आहेत. राजपूत कोळी व मुसलमान यांच्या मिश्रणाने ही जात बनल्याचे सांगतात. हे पूर्वी गुलाम म्हणून गणले जात होते. यांच्या मुली राजकन्येच्या लग्नानंतर बटकी म्हणून तिच्यापाशी राहत. त्यांच्या चालीरीती खालच्या



खरोष्ठी लिपी

दर्जाच्या राजपुतांप्रमाणे आहेत [ मुं. इ. जा. ]

**खस** एक जमात. यांना खश असेही म्हणतात. मनूच्या मताप्रमाणे मुळात ही क्षत्रिय जात असून, सस्कारलोपामुळे व ब्राह्मणाशी संपर्क न राहिल्यामुळे शूद्र बनली. सभापर्वात, तसेच मार्कंडेय व मत्स्य या पुराणात खसांचे अनेक उल्लेख आहेत. काही इतिहासकाराच्या मते पांडवाच्या काळात याचे राज्य हिमालय पर्वतावर पूर्व–पश्चिम पसरलेले होते.

नेपाळातल्या गुरख्यांना व त्यांच्या भाषेलाही खस म्हणतात. काश्मीरच्या नैर्ऋत्येच्या पहाडी प्रदेशात अर्थात नेपाळमध्ये हे लोक राहत होते, असे राजतरंगिणीवरूनही कळते. सिल्वा लेवीच्या मतानुसार खश ही विशिष्ट जात नसून, हिमालयात राहणाऱ्या अनेक अर्धसंस्कृत जातींना खश म्हणत असत. यानी हिंदुधर्म स्वीकारलेला होता. काशगर या मध्य आशियातल्या प्रदेशालाही खश असे म्हटले आहे. त्यावरून खश हे मुळात मध्य आशियातले असावे, ते म्लेच्छ असावे व तिबेटमार्गे नेपाळात व भारतात आले असावे, असे वाटते.

नेपाळमधील मूळ रहिवाशांपैकी ज्या लढाऊ जमाती आहेत, त्यात या जमातीला बरेच महत्त्व आहे. राज्यातील बरेच अधिकारी या जमातीतून निवडलेले असतात. हे वर्णाने क्षत्रिय असले, तरी हिंदूंची आचारबंधने विशेषशी पाळीत नाहीत. खसांच्या काही सामाजिक प्रथा पुढीलप्रमाणे आहेत–

(१) हे घरजावई करतात. पण संपत्तीवर मुलीचाच अधिकार राहतो. मुलाला दानपत्राच्या द्वारेच पैतृक संपत्ती मिळू शकते. वैध-अवैध दोन्ही प्रकारच्या संततीला वारसाहक्क सारखेच असतात.

(२) काही ठिकाणी थोरल्या भावाला धाकट्या भावाहून संपत्तीचा अंश थोडा अधिक मिळतो. याला जेठो म्हणतात.

(३) एखाद्या स्त्रीने पहिल्या घरची मुले बरोबर घेऊन दुसरा घरोबा केल्यास त्याना दुसऱ्या घरच्या पैतृक संपत्तीचा वाटा मिळतो.

(४) विधवा किंवा अविधवा आपल्या घरी एखाद्या पुरुषाला पती म्हणून स्वीकारते. त्याला टेकुवा म्हणतात. टेकुवाला घरच्या संपत्तीत वाटा मिळत नाही; पण त्याच्या मुलांना मिळतो.

हे लोक अतिथिसत्काराबद्दल प्रसिद्ध आहेत. अतिथीला पानावर बसवल्यानंतर त्याच्या ताटात वाढलेल्या पदार्थांपैकी प्रत्येक पदार्थ घरची स्त्री आधी स्वतः चाखून पाहते आणि मग अतिथीला भोजनाची विनंती करते. या प्रकारातला अर्थ असा, की जर भोज्य पदार्थात आपल्या हातून विष मिसळले गेले असेल, तर ते आपल्याला आधी बाधावे व तसे काही नसल्याची अतिथीची खात्री व्हावी.

खस व राजपूत हे मूळ एकाच वंशातले असावे. खस लोक जातपात मानीत नाहीत. ब्राह्मण व राजपूत यांच्याशीही विवाहसंबंध करतात. एक स्त्री अनेक पुरुषांची पत्नी बनून राहू शकते. खसांच्या बायका मोठ्या साहसी असतात. त्या पुरुषांच्या बरोबरीने शेतात काम करतात. झाडावर चढतात. नद्या उतरून जातात आणि दारूही पितात.

**देवधर्म–** हे लोक शिवाला आपले परमदैवत मानतात. त्याच बरोबर अन्य देवदेवतांचीही पूजा करून त्यांना बकऱ्याचा बळी देतात. बळी देण्याच्या पूर्वी बकऱ्यावर पाण्याचे तुषार उडवतात. त्या तुषारांनी बकरा शिरशिरला, तर देवीला त्याचा बळी पसत आहे, असे समजतात. एकाच घावात बकऱ्याचे मुंडके उडाले पाहिजे, असा संकेत आहे. हे लोक हरियालीतीज हा सण हर्षाने साजरा करतात.

**विवाहप्रथा–** याच्यात पूर्वी बालविवाहाची चाल होती; पण आता ती बद झाली आहे. यांचा लग्नविधी काही अशी क्षत्रियाच्या लग्नविधीप्रमाणे असतो. त्यात तांदुळाच्या अक्षता व दही यांना महत्त्व असते.

**मृतिकप्रथा–** मृताला नदीकाठी नेऊन जाळतात. मृताचा मुलगा या वेळी क्षौर करतो. हे लोक सुतक १३ दिवस पाळतात. [ नेपाळ; भा. आ.; कुमाऊँ; ट्रा. ए. इं.; ना. प्र. प. ]

**खसर्पण** बोधिसत्व अवलोकितेश्वर याच्या अनेक रूपांपैकी एक रूप. साधनमालेत याचे ध्यान पुढीलप्रमाणे सांगितले आहे–

याच्या देहातून कोटी चंद्रकिरण बाहेर पडत आहेत. याने जटामुकुट धारण केला आहे. याच्या मुकुटात अमिताभाची मूर्ती आहे. हा विविध अलंकारांनी विभूषित आहे. याच्या मुखावर स्मित विलसत आहे. याचा वर्ण शुभ्र असून, याने वरदमुद्रा धारण केली आहे. हा अर्धपर्यंकासनावर बसला असून, याचे अभिज्ञानचिन्ह कमल आहे. तारा, सुधनकुमार, भ्रकुटी व हयग्रीव हे याचे सहचर आहेत.

तिबेटी बौद्धांत हा देव बराच लोकप्रिय होता, असे दिसते. याच्या मूर्ती नेपाळ व तिबेट या भागात विशेष आढळतात. पूर्व बंगालमधील विक्रमपूर परगण्यात याची एक उत्कृष्ट मूर्ती सापडली आहे. बंगाली शिल्पकलेचा तो उत्तम नमुना आहे. [ इं. बु. इ. ]

**खसषष्ठी** बंगालमधील एक व्रत. खस नावाचे एक तृण असते. त्याला बेन (Bena) असेही म्हणतात

त्याला षष्ठीदेवीचे प्रतीक मानून पौष शु. ६ ष्ठीस त्याचीपूजा करतात. त्या दिवशी उपासही करायचा असतो. मुलांना दीर्घायुष्य लाभावे, म्हणून हे व्रत केले जाते. याची कथा अशी–

एका ब्राह्मणाची सून खटचाळ होती. ती देवाच्या नैवेद्याचे पदार्थ चोरून खात असे. त्यामुळे तिची मुले अल्पवयातच मरत. एक दिवस तिच्या सासूने तिला षष्ठीच्या दिवशी उपास घालायचे ठरविले. तिने सुनेला बरेच कपडे देऊन नदीवर ते धुवायला पाठविले. धुणे पुरे होईपर्यंत सध्याकाळ झाल्याने तिला सहजगत्या उपास घडला. घरी येते तो सासूने षष्ठीदेवीच्या पूजेची तयारी केली होती. तळे म्हणून लहानसा खड्डा खणून त्याच्या कडेला खसतण लावले होते. ते सर्व पाहून सुनेला आनंद झाला. तिने षष्ठीदेवीची मनोभावे पूजा केली. मग देवीच्या कृपेने तिची मुले जगू लागली. [ हिं. हॉ. से. ]

## खळे

कापणी केलेल्या पिकाची मळणी करण्याची जी जागा, तिला खळे असे नाव आहे. हिंदू लोक या जागेला पवित्र मानतात. खळ्याची जागा काळजीपूर्वक निवडतात. कर्नाटकात बहुधा शमीच्या किंवा रुईच्या झाडाजवळची जागा पसत करतात. भिल्ल व कोकणी लोक नवख्या माणसाला एकदम खळ्यावर जाऊ देत नाहीत; तर त्यापूर्वी त्याच्या अगावर गोमूत्र शिंपडून त्याला शुद्ध करतात. काही मराठा लोक लग्नाच्या मांडवात देवक बसविण्यापूर्वी ते खळ्यावर नेऊन आणतात. काही जाती दिवाळीच्या दिवसात गवत, पाने, फुले व शेणगोळे यांनी खळे सजवितात व लक्ष्मी म्हणून त्याची पूजा करतात. बहुतेक सगळ्या खळ्यांच्या मध्यभागी एक खांब पुरलेला असतो, त्याला तिवडा असे म्हणतात. हा खांब कोणत्या झाडाचा असावा, यालाही फार महत्त्व आहे. काही विशिष्ट दिवसात खांब तोडल्याने व शुभ दिवशी तो जमिनीत पुरल्याने त्याची शक्ती वाढते, अशी समजूत आहे. खळ्यावरच्या धान्यात वटघट करण्याचे सामर्थ्य त्या खांबात असते, अशीही कल्पना आहे. एखाद्याच्या वाईट नजरेपासून खळ्यावरील धान्याचे रक्षण व्हावे, म्हणून एखाद्या झाडाची फांदी त्याच्याजवळ ठेवतात, वहाण पालथी ठेवतात, राशीत लोखंडाचा तुकडा पुरतात किंवा हळदीने रंगविलेले ज्वारीचे दाणे व बिब्बे त्या राशीवर टाकतात. कर्नाटकात धान्य खळ्यावर असेपर्यंत तिथे मंतरलेला नारळ, शेळी, मेंढी किंवा कोंबडा ठेवतात; तर गुजरातेत खळ्याभोवती शेणाचे निमुळते ढीग घालतात.

दुसऱ्याचे वाईट व्हावे, म्हणून श्रौतसूत्रात श्येन, इषू यांसारखे सोमयाग सागितले आहेत. हे याग खळ्यावरच करायचे असतात. या यागांत खळ्याला उत्तरवेदी समजावे आणि खळ्याच्या मध्यभागी असलेला खांब यूप मानावा, असे आश्वलायन श्रौतसूत्रात (९.७) सागितले आहे. खळ्याचा उल्लेख ऋग्वेदातही आला आहे (१०.४८.७). [ वे. इ. ]

**खळे मागणे**— धान्याची मळणी झाल्यावर खळ्यावर धान्य असेपर्यंत भिकारी तिथे धान्य मागायला जातात, त्याला खळे मागणे, असे नाव आहे. त्या वेळी ते गाणे म्हणतात, ते असे—

**नंदी ढवळा महादेव झाला ईश्वर स्वारी ।**
**बी भरून पेरले एका भूमिकेच्या पदरी ।।**
**गण्या वर्षला मेघराजा पिकल्या धुंबरी ।**
**पांचा कणसांसाठी महादेव करून गेला चोरी ।।**

हे गाणे बरेच लाबलचक असते. [ गा. गा.; की. पॉ. ]

## खांडववन

भारतातल्या प्रसिद्ध वनापैकी एक. हे कुरुक्षेत्राच्या सीमेवर व यमुनेच्या तीरावर होते. कृष्ण व अर्जुन यांच्या मदतीने अग्नीने हे वन भस्मसात केले. मयासुर हा सुप्रसिद्ध शिल्पकार याच वनात होता. तो कृष्णार्जुनांना शरण आल्यामुळे त्या वणव्यातून बचावला. खांडववन जळाल्यावर त्याच ठिकाणी पांडवानी इंद्रप्रस्थ नगर वसविले व तिथेच आपली राजधानी केली. पांडव दिग्विजयासाठी बाहेर पडले, ते इथूनच. आणि युधिष्ठिराचा रायसूय यज्ञ झाला, तोही इथेच.

## खांडवायन

परशुरामाने एक यज्ञ केला. त्या यज्ञात सुवर्णाची वेदी बनवून ती त्याने कश्यपाला दान दिली. कश्यपाच्या अनुमतीने जे ब्राह्मण यज्ञभागाचे अधिकारी म्हणून त्या वेदीवर बसले, त्यांना पुढे खांडवायन असे म्हणू लागले. [ हि. क. को. ]

## खांडा

एक ऐतिहासिक लढाऊ शस्त्र. पृथ्वीराज चव्हाणाचा सरदार खाडेराय याने त्या काळी ते तयार केले. पानिपतावरील युद्धात या शस्त्राचा मोठ्या प्रमाणात उपयोग केला गेला, असे सांगतात. जव्हेरदार पोलादापासून हे बनवतात. याच्या मुठीच्या आतून मखमलीचे कापड लावलेले असते. या हत्याराचे पाते अत्यंत धारदार व तीक्ष्ण असते. या विषयीची एक कथा अशी–

पूर्वी राजपूत राजे अनेक स्त्रिया करीत. एखादा राजपूत राजा लग्न ठरल्यावर युद्धावर गेला आणि तो लग्नासाठी उपस्थित राहू शकला नाही, तर अशा वेळी तो वधूकडे आपला खांडा पाठवीत असे. मग ती नियोजित वधू त्या शस्त्राला आपल्या पतीचा प्रतिनिधी मानून माळ घाली. अशा प्रकारे

लग्न झालेल्या राणीला खांडारानी असे म्हणत. [ प्रा. ऐ. श. ]

**खांडिकीय** तैत्तिरीयांचा एक चरण. याच चरणापासून आपस्तंब, हिरण्यकेशीय व भारद्वाज या चरणांचा विकास झाला. [पा. भा.]

**खांप्टी** आसाममधील एक जमात. सुमारे शंभर-दीडशे वर्षांपूर्वी, इरावती नदीच्या उगमाजवळच्या बोरखाप्टी या त्यांच्या प्रदेशात यादवी युद्ध झाल्यामुळे हे लोक आसामात आले व तिथल्या राजाच्या परवानगीने स्थायिक झाले. याची मूळ वसाहत तेंगापाणी नदीच्या काठी होती. इ. स. १७८० ते १७९० या कालात आसामात जे यादवी युद्ध झाले, त्या वेळी खांप्टी लोकांनी पूर्वीच्या आसामी सुभेदाराला आपल्या प्रांतातून हाकलून दिले व त्याचा किताब आपल्या नेत्याला दिला. आसाम सरकारनेही त्यांच्या या नेत्याला मान्यता दिली. इंग्रजांनी आसाम प्रांत जिकल्यावरही त्यांच्या सुभेदाराचा अधिकार चालू ठेवला. पण इ स १८३९ साली जेव्हा खांप्टीनी इंग्रज सत्तेविरुद्ध बंड केले, तेव्हा मात्र इग्रजांनी खांप्टीना त्यांच्या प्रदेशातून हाकलून लावले. त्यानंतर बरेच दिवस ते भटकत राहिले. पुढे कालांतराने त्यांनी इंग्रजांकडून आपल्या जुन्या खेड्यांच्या आजूबाजूला स्थायिक होण्याची परवानगी मिळविली.

धर्म, कला आणि संस्कृती या बाबतीत ईशान्य सरहद्दीवरील टोळ्यांमध्ये खांप्टी लोक फार सुधारलेले आहेत. ते धर्माने बौद्ध असून, त्यांचा धर्मशास्त्रात पारंगत असा पुरोहितवर्गही आहे. खाप्टी लोकांत साक्षरतेचे प्रमाणही मोठे आहे.

खांप्टी लोकांच्या अनेक टोळ्या असतात व त्या प्रत्येक टोळीचे एक स्वतंत्र गाव असते. गावाचा एक प्रमुख पुढारी असतो. या लोकांची घरे लाकडी असतात. घराचे छप्पर केंबळी असले, तरी घर चांगले प्रशस्त असते. इतर लोकांची घरे टोळीप्रमुखाच्या घराच्या मानाने लहान असतात. टोळीप्रमुखाला व त्याच्या कुटुंबीयांना दोन वेगवेगळी घरे असतात.

यांची मंदिरेही मजबूत लाकडाची व केंबळी छपराची असतात. मंदिरातील नक्षीकाम सुंदर असते व त्यातील स्वच्छताही वाखाणण्यासारखी असते.

यांचे पुरोहित बौद्ध भिक्षूंसारखा पोषाख करतात. कोण्याही पुरुषाला पुरोहित होता येते; पण त्यासाठी त्याला पुरोहिताच्या आश्रमात राहून शिक्षण घ्यावे लागते व ब्रह्मचर्यही स्वीकारावे लागते. रोज सकाळी त्यांचा पुरोहित भिक्षा मागण्यासाठी गावात हिंडतो. त्या वेळी एक मुलगा घंटा वाजवीत त्याच्याबरोबर जातो. तो आवाज आला, की स्त्रिया भिक्षा वाढण्यासाठी बाहेर येतात.



खांप्टी स्त्री

खांप्टी लोकाचे मगोलियन लोकाशी बरेच साम्य आहे. त्यावरून हे तार्तर वंशाचे असावे, असा काही मानववंशशास्त्रज्ञांचा तर्क आहे. आसाममध्ये येऊन स्थायिक झाल्यावर खांप्टी टोळीप्रमुखांनी आसामी स्त्रियांशी विवाह करण्यास सुरुवात केली आणि त्या स्त्रियांपासून निर्माण झालेल्या खांप्टी प्रजेची ठेवण वेगळी व रेखीव होऊ लागली.

**सण**– खांप्टी लोक दर वर्षी दोन मोठे सण साजरे करतात. एक गौतम बुद्धाच्या जयंतीचा व दुसरा त्याच्या पुण्यतिथीचा. गौतमजयंतीच्या दिवशी एक मुलगा मुलीचा पोषाख करून एका खोलीत झोपतो व प्रसववेदनांचा बहाणा करतो. बाहेर मुलींचा पोषाख करून आणखी काही मुलगे उभे असतात. काही वेळाने आतून नवजात बालकाचे रडणे ऐकू येते व प्रसववेदनांचा बहाणा करणाऱ्या मुलाच्या कपड्यातून कुत्र्याचे एक पिल्लू किंचाळत बाहेर येते. या कुत्र्याला मग नवजात बालकाप्रमाणे आंघोळ घालतात. या दिवशी व गौतमपुण्यतिथीच्या दिवशी मुलगे मुलीचा पोषाख करून नृत्य करतात.

**विवाहप्रथा** – खांप्टी लोकात बहुपत्नीत्वाची चाल असली तरी घरात मात्र सर्वाधिकार पहिल्या पत्नीचाच असतो. खांप्टीच्या गावाच्या दोन्ही सीमांवर मुलांमुलींसाठी दोन स्वतत्र शय्याघरे असतात. मुली व मुलगे वयात आले, की या घरात रात्री झोपण्यासाठी जातात. मुलांच्या शय्यागृहात मुलीना व मुलींच्या शय्यागृहात मुलाना प्रवेश नसतो.

खांप्टी लोक सामुदायिक शेती करतात. पीक निघाल्यावर शेतात काम करणाऱ्यांना ते सारखे वाटून देतात व उर्वरित सर्व धान्य एका कोठारात साठवून ठेवतात.

खांप्टीचा पोषाख साधा व सुटसुटीत असतो. पुरुष निळ्या

रंगाचे घट्ट कपडे घालतात व डोक्याला मलमलीचा रुमाल बाधतात. ते कमरेभोवती रगीत कपडा गुंडाळतात व डोक्यावर केसांचा बुचडा बाधतात. खांप्टी स्त्रिया छातीपासून पायापर्यंत एकच वस्त्र नेसतात. त्यावर रेशमी रंगीत कमरपट्टा बाधतात व अंगात लांब बाह्यांचे जाकीट घालतात. त्या आपल्या केसांचा डोक्यावर उच आवाडा बांधून त्याच्याभोवती नक्षीदार पट्टा आवळतात. गळ्यात पोवळ्यांच्या व तैलस्फटिकांच्या माळा आणि कानांत तैलस्फटिकाचे तुकडे घालतात.

खांप्टी पुरुष लाकूड, हाडे किंवा हस्तिदंत यांवर नक्षीकाम करण्यात तरबेज असतात. विशेषतः हत्याराच्या हस्तीदती मुठीवर ते सुंदर कोरीव काम करतात. ते सोने, चांदी, लोखंड वगैरे धातूच्या वस्तूवरही कोरीव काम करतात व आपल्या बायकाचे दागिनेही स्वत:च घडवतात. त्याचप्रमाणे ते गव्याच्या गेंड्याच्या कातड्याच्या मजबूत ढालीही बनवतात. खांप्टी स्त्रिया कशिदा व भरतकाम करण्यात तरबेज असतात.

जगदुत्पत्तीबद्दल यांच्यांत पुढील कथा प्रचलित आहे – आधी सर्वत्र पाणी होते. परमेश्वराने एका माशाच्या पाठीवर थोडी माती टाकली व एका मासोळीला अंडे घालायला सागितले. देवाने मग अड्याचे दोन तुकडे केले. एका तुकड्याची बनली पृथ्वी व दुसऱ्या तुकड्याचे बनले आकाश. सुरुवातीला एक झाड होते. त्याला फूल आले आणि त्यातून स्त्री-पुरुष जोडपे निर्माण झाले. पुढे त्या दपतीपासून मानव प्रजा वाढली. [ इं. स्ट. पा. प्रे. १९६०; इं. नॉ. ई. फ्रॉ. ]

## खांब-खांबोळ्या

मुलांचा एक खेळ. पुष्कळ खांब असलेल्या जागी हा खेळ खेळतात. या खेळात जितके खाब असतील त्यापेक्षा एक गडी जास्त घेतात. मग मुले खाब पकडायला धावतात. ज्याला खांब मिळत नाही, त्याच्यावर राज्य येते. मग इतर मुले पळून खांबांची अदलाबदल करीत राहतात तसे करताना राज्य घेतलेला मुलगा पटकन् एखाद्याचा खांब पकडतो. मग ज्याचा खांब धरला असेल, त्याच्यावर राज्य येते. राज्य आलेला मुलगा खांबाला उद्देशून ‘ खांब खांबोळचा, दे रे आंबोळचा ’ असे म्हणत राहतो व खेळ सुरू राहतो.

## खांबालिम

नागा लोकांचे एक नृत्य. या नृत्यात मुले-मुली एकत्र नाचतात. नृत्यारंभी ती दोन ओळीत वेगवेगळी उभी राहतात आणि सबंध नृत्यात या ओळी कधीही मोडू देत नाहीत. याचे निरनिराळे प्रकार आहेत व त्यात एकापासून अनेक नर्तकांपर्यंत प्रत्येकाला भाग घेता येतो. शिकारनृत्याच्या प्रकारात नर्तक भाले नाचवीत आपल्या शिकारीवर घाव घालतात. या वेळी होणारा त्यांचा पदन्यास युद्धाच्या पवित्र्यातला असतो. नूइरिलिम नावाच्या नृत्यप्रकारात दोन गट परस्परांशी लुटुपुटीचे युद्ध खेळतात. आसामच्या उत्तरेकडील डोंगराळ भागात हे युद्धनृत्य फार प्रसिद्ध आहे. आणखी एका प्रकारात नर्तक पशुपक्ष्यांच्या हुबेहूब हालचाली करून दाखवितात. उ. काचारमधील झेमी आदिवासीही हे नृत्य करतात. [ भा. लो. नृ. ].

## खाई

हिमालयातील एक लहानसा भूप्रदेश. हा उत्तर काशीच्या सीमेवर आहे. खाईचा सर्वांत उंच भूभाग जम्नोत्रीच्या ईशान्येला येतो. हा सर्व प्रदेश निसर्गसौदर्याने नटलेला आहे.

इथले लोक स्वच्छंदी, विलासी व सौदर्यप्रेमी आहेत. इथल्या स्त्रिया अत्यंत सुंदर असतात. त्यांना अंगावर दागिने घालण्याची फार हौस असते. इथल्या कुटुंबात स्त्रीचीच सत्ता चालते. तिने आपल्याला सोडून जाऊ नये, म्हणून पुरुष तिला वचकून असतो. कारण विवाहविच्छेद ही इथे अत्यंत मामुली गोष्ट आहे. बहुधा स्त्रियाच पुरुषांना सोडून जातात. ‘ छूट ’ अर्थात घटस्फोट घेतलेल्या स्त्रीशी लग्न करणाऱ्या पुरुषाला बरेच पैसे खर्चावे लागतात. कारण त्याला तिच्या पहिल्या नवऱ्याला व बापालाही काही रक्कम द्यावी लागते. एखादी स्त्री जितके अधिक नवरे करील, तितकी ती भाग्यवती समजली जाते व उत्तरोत्तर तिचे मूल्य वाढते.

हे लोक अतिथी घरी येणे हे फार भाग्याचे मानतात. घरातील स्त्रिया व मुली पाहुण्याचे हातपाय धुतात व त्याला जेवायला वाढतात.

फार प्राचीन काळी खाई, गढवाल या प्रदेशांचा किरात, नाग, यक्ष इ. लोकांशी संबंध होता. नागसंघर्षाची अनेक आख्याने त्यांच्या लोकगीतांत आढळतात. हे लोक कृष्णाची नागराजाच्या रूपात पूजा करतात. याशिवाय, हे नगेलो, नाग, कलिंगनाथ, जाख, महासू, पांडव, सिद्धनाथ, इ. देवतांना भजतात. गिरिशिखरांनाही हे पूज्य मानतात. फतेह पर्वतातले लोक नागदेवतेच्या भीतीने दूध पीत नाहीत व पाण्याला विष्णूचा अवतार मानून ते स्वच्छतेसाठी वापरीत नाहीत.

दिवाळी, बिसू, हरयाली, माघ, इ. उत्सव हे लोक उत्साहाने साजरे करतात. माघ महिन्यात तर यांचे महिनाभर खाणेपिणे व नाचगाणे चालते.

**मर्तिकप्रथा** – माणूस मेल्यावर त्याची शवपेटी सजवितात व वाजत गाजत शेताच्या सीमेवर नेऊन त्याला पुरतात.

पुरल्या जागी सातूचे पिंड ठेवतात व त्याला सीमेवर लक्ष ठेवण्याची व पिंड खाण्याची प्रार्थना करतात. [ गोविंद चातक — आजकल, डिसेंबर १९५८ ]

**खाकीपंथ** उ. भारतातील एक वैष्णव पंथ. कृष्णदास पयहारीचा शिष्य कील्ह याने इ. स. च्या १६ व्या शतकात या पंथाची स्थापना केली, असे म्हणतात. खाकी हे नाव फारसी हाक (खाक) = राख या शब्दापासून बनले आहे. रामचंद्र वनात जाण्याच्या वेळी लक्ष्मणाने दु:खी होऊन अंगाला राख फासली, म्हणून त्याला खाकी हे नाव पडले व त्याच्या अनुयायांनी पुढे तेच नाव धारण केले. तेव्हापासून हा पंथ अस्तित्वात आला, असे काहींचे मत आहे.

नबाब सुजाउद्दौल्याच्या कारकीर्दीत दयाराम नामक एका पुरुषाने चित्रकूटावर या पंथाचा एक आखाडा स्थापन केला. इ. स. १९०५ साली या आखाड्यात १८० लोक होते. त्या वेळचा महंत हा संस्थापकापासून अकरावा पुरुष होता. याशिवाय, पूर्वीच्या रेवाकाठा संस्थानातील लुनावाडा येथेही त्यांचा एक आखाडा असून त्याची शाखा अहमदाबाद येथे आहे.

या पंथाच्या रूढी व परंपरा इतर पंथांपेक्षा निराळ्या आहेत. हे लोक मृत्तिका व राख यांनी आपली वस्त्रे रंगवितात. राम, सीता व हनुमान ही यांची आराध्यदैवते असून हनुमानगढ येथे त्यांचा प्रमुख मठ आहे. हे लोक वैष्णव असले तरी शैव पंथीयांप्रमाणे जटा धारण करतात व अंगाला भस्मलेपन करतात. हे फार कमी कपडे घालतात व लहान लहान संघ करून फिरत असतात. वाहत्या नदीप्रमाणे साधूनेही सतत भ्रमणशील असणे आवश्यक आहे, अशी यांची धारणा आहे. [ म. ज्ञा. को.; उ. भा. सं. प.; वै. शै. म. व. ]

**खाज़** सारंगीसारखे एक वाद्य. हे गजाने न वाजविता नखीने वाजवितात. याला एकूण बारा तारा असून, त्यातील चार मुख्य तारा तांतीच्या असतात. बाकीच्या आठ तारा तरफांच्या जागी बसवतात. राजस्थानातील राव व भाट हे लोक हे वाद्य वाजवितात. [ परंपरा—लोकगीत. ]

**खाटिक** एक जात. उ. प्रदेश, बिहार, मध्यप्रदेश व महाराष्ट्र या प्रदेशात यांची वस्ती आहे. खट्टिक या संस्कृत शब्दावरून खाटिक हा शब्द बनलेला असून, त्याचा अर्थ कसाई किंवा व्याध असा आहे. उ. प्रदेश व बिहार या भागातील खाटिक हे शेतकरी व माळी आहेत. अयोध्यावासी, संखर, बकरकसाब, चलनमहाराव व घोरचराव अशा यांच्या मुख्य पोटजाती असून बकरकसाब किंवा कसाई हे मांस विकतात, चलनमहाराव कातड्याचे काम करतात व घोरचराव हे पोतदार असतात. हे सर्व हिंदू आहेत.

**विवाहप्रथा—** यांच्यांत बालविवाह प्रचलित आहे. लग्नात यांच्या जातीतलेच पुरोहित असतात. लग्न ठरविताना दोन्ही पक्ष दारू पितात. मिरवणूक, कलशपूजा, वराचे पाय धुणे, सीमांतपूजन, इ. विधी लग्नात होतात.

जोनपूरचा करारबीर हा यांचा मुख्य देव आहे. करारबीर हा अहीर जातीचा पुरुष होता. इस्लाम धर्म स्वीकारण्याची वेळ आली तेव्हा त्याने प्राणत्याग केला, असे सांगतात. याशिवाय ते बामट, बाभण किंवा ब्राह्मण, भवानी, शीतलादेवी, इ. देवतांना भजतात.

मध्यप्रदेशातील खाटिक लोकांमध्ये एकाच आडनावात लग्ने होत नाहीत. यांच्यांत देवके आहेत. वर लग्नाला निघाला म्हणजे त्याची आई त्याला स्तनपान करविते. उच्च जातीशी व्यभिचार केल्याने झालेल्या संततीला जातीत घेतात; पण नीच जातीपासून झालेल्या संततीला जातीत घेत नाहीत. **पाहा—** कसाई. [ म. ज्ञा. को.; से. इं. ]

**खाडायन** एक चरण. शौनकादी गणात याचा उल्लेख येतो. कात्यायन आणि पतंजली हे दोघेही याचा पाठ प्रमाण मानतात. पतंजलीच्या मते वैशंपायनाचा अंतेवासी कठ व कठाचा अंतेवासी खाडायन होय. [ पा. भा. ]

**खादिर गृह्यसूत्र** हे गृह्यसूत्र सामवेदाच्या द्राह्यायण शाखेचे असून त्यातील माहिती गोभिल गृह्यसूत्रातून संक्षिप्त करून मांडलेली आहे. कोणत्याही विषयाचा व्यवस्थित संक्षेप करणे, हे जे सूत्रग्रथांचे वैशिष्टच, ते या सूत्रात उत्तमपणे पाळले आहे. **पाहा—** गोभिल गृह्यसूत्र. [ इ वे. क. सू. ]

**खान** मुसलमानातील एक बहुमानाची पदवी. क़ाग़ान किंवा अरबी खाकान शब्दापासून हा शब्द बनलेला आहे. मध्य आशियातील इलेक्‌खान नावाचा एक तुर्की वंश होता. इ. स. च्या १० व्या शतकात खान शब्दाचा प्रथम प्रयोग त्या वंशासाठी करण्यात आला. इ. स. च्या १२ व्या किंवा १३ व्या शतकात तुर्क लोक राज्यातील सर्वोच्च अधिकाऱ्याला खान असे म्हणत. मध्य आशियातील मोगलांच्या राज्यकालात सम्राटाला खान असे म्हणण्याची पद्धत होती. सांप्रत इराण व अफगाणिस्थान यांतील कोणत्याही सभ्य मुसलमान गृहस्थाला ही पदवी लावण्यात येते. ब्रिटिश सरकारकडून पारशी किंवा मुसलमान

समाजातील सरकारच्या हितकर्त्या लोकांना खानसाहेब, खानबहादूर अशा पदव्या दिल्या जात असत. [ हि. वि. को.; सु. वि. को. ]

**खानकाह** मुसलमान गूढवादी संतांचे निवासस्थान. महंमद पैगंबराने ख्रिस्ती धर्मात प्रचलित असलेल्या साधूच्या सांघिक जीवनाचा निषेध केला होता. पण मुसलमानात जेव्हा गूढ विद्येचा किंवा तसव्वुफचा विकास झाला, तेव्हा अशा विद्येच्या साधकांना एकांतवासात एकत्र राहण्याची आवश्यकता वाटू लागली. इ. स. च्या ८ व्या शतकात कोण्या ख्रिश्चन राजाने मुसलमान गूढवाद्यासाठी ईराकमध्ये एक खानकाह निर्माण केला होता, असे मौलाना जामीने म्हटले आहे. ९ व्या व १० व्या शतकात लोकांनी बांधलेल्या खानकाहांचे उल्लेख मिळतात. पण पुढे एखादा गूढवादी शेख, पीर किंवा गुरू आपल्या निवडक शिष्यांसह ज्या घरात राहत असे, त्या घराला खानकाह असे म्हणू लागले. अविवाहित शिष्य बहुतकरून एका मोठ्या खोलीत राहत असत. लोकांनी दिलेल्या अयाचित दानावर खानकाहामधील साधूचा निर्वाह होत असे. [ हिं. वि. को. ]

**खानजादा** एक मुसलमान जात यांची वस्ती मुख्यत्वे उ. प्रदेशात आढळते. खानाचे वंशज व गुलामाचे वंशज म्हणूनही यांना ओळखतात. हे मूळचे जादोन राजपूत असून, तहानगड येथील लखनपाल व सुमित्रपाल हे याचे पूर्वज होत. फिरोजशहाच्या कारकीर्दीत ते मुसलमान झाले. त्याचे उच्च कुल लक्षात घेऊन फिरोजशहाने त्यांना मेवाडचे अधिपती केले आणि त्यांना खानजादा ही पदवी बहाल केली. मेओ लोकांशी त्यांचा संबंध असावा, असे वाटते. यांच्या बिलखीरया व भालेसुलतान अशा दोन पोटजाती आहेत. ते आपल्या जातीतच विवाह करतात. स्वतःस शेख म्हणवतात. मुसलमान असूनही याच्या स्त्रिया देवीची उपासना करतात. पंजाबातही यांची थोडीफार वस्ती आढळते. [ सु. वि. को. ]

**खानदेश** महाराष्ट्र राज्याचा एक भाग. प्राचीन काळी हा भाग ऋषिकदेश या नावाने ओळखला जात असे. रामायण व महाभारत यांतले ऋषिकदेशाचे उल्लेख एकत्र केले असता त्याच्या पूर्वेस प्राचीन विदर्भ, उत्तरेस मालव व दक्षिणेस अश्मक म्हणजे सांप्रतचा मराठवाडा हे देश असल्याचे कळते. त्यावरून या भौगोलिक परिस्थितीशी जुळणारा भूभाग म्हणजे खानदेशच ठरतो. प्राचीन काळी उत्तर चीनमध्ये एक ऋषिकदेश होता, तो याहून वेगळा समजावा.

या देशाचे ऋषिक हे नाव लुप्त होऊन खानदेश हे नाव केव्हा रूढ झाले, त्याची माहिती मिळत नाही. खानदेश या नावाची व्युत्पत्ती कोणी यादवराजा कान्हेरदेव याच्यावरून, तर कोणी सेउण देश या नावावरून लावतात. अकबराच्या कारकीर्दीत याला दानदेश असेही म्हणत असल्याचे समजते.

धुळे जिल्ह्यात प्रकाशे येथे काही वर्षांपूर्वी उत्खनन झाले आहे. त्यात ज्या वस्तू सापडल्या, त्यांवरून ताम्राश्म युगांत या भागात मानवाची वस्ती होती, ही गोष्ट कळून आली. धुळे जिल्ह्यातच तोरणमाळ नावाचे एक गाव आहे. भारतीय युद्धात पांडवांच्या बाजूने लढलेल्या युवनाश्व राजाचे ते गाव होय. तिथला अशीरगड हा अश्वत्थाम्याचे स्थान मानतात.

सनपूर्व २ ऱ्या शतकात या प्रदेशावर सातवाहनांची सत्ता होती. पुढे इ. स. च्या १ ल्या शतकात हा प्रदेश शकांच्या ताब्यात होता. २ ऱ्या शतकात काही वर्षे तिथे गौतमीपुत्र शातकर्णी याने राज्य केले. इ. स. ४०० च्या सुमारास खानदेशावर आभीराची सत्ता होती. खानदेशातली अहिराणी भाषा ही या आभीराचीच भाषा होय. फार मोठ्या संख्येने आभीर लोक या प्रदेशात राहत होते. पुढे चालुक्य, राष्ट्रकूट, यादव या राजाचा त्याच्यावर अंमल चालला. अलाउद्दीन खिलजीने इ स. १२९६ साली खानदेशावर स्वारी केली. तेव्हापासून तो १७६० साली पेशव्यानी अशीरगड जिंकीपर्यंत खानदेश मुसलमानी वर्चस्वाखाली राहिला. शिवाजी, संभाजी व औरंगजेब या तिघांनीही आपापल्या कारकीर्दीत खानदेशावर स्वाऱ्या केल्या होत्या.

खानदेशात तळी आणि विहिरी जिकडे तिकडे दृष्टीस पडतात. तिथली जुनी मंदिरे हेमाडपंती आहेत. खानदेशात हेमाडपंताला गवळी राजा म्हणतात. फरकांडे येथील हालते मनोरे हे खानदेशातले सुप्रसिद्ध मुस्लिम शिल्प होय. चाळीसगाव तालुक्यातील पितळखोऱ्यात बौद्धकालीन चैत्य व विहार आढळतात. हे चैत्य-विहार सनपूर्व २ ऱ्या शतकातले असावेत. पितळखोऱ्याजवळच पाटण नावाचे एक ओसाड खेडे आहे. त्या ठिकाणी भास्कराचार्य या सुप्रसिद्ध ज्योतिषाच्या नातवाचे ज्योतिर्विद्यापीठ होते. अजंठ्याची लेणी ही खानदेश व विदर्भ यांच्या सीमेवरच आहेत. [ म. ज्ञा. को.; म. जि. —धुळे ]

**खापरी** फुटक्या मडक्याचा एक भाग. पूर्वीच्या काळी भिक्षेकरी लोक याचा भिक्षेसाठी उपयोग करीत. सांप्रत नारळाच्या कवटीची अशी खापरी बनवतात. अनेक योगी काश्याचीही खापरी वापरतात. तिला काँसा असे म्हणतात.

**खार** बिहारमधील एक जात. आर्यांची ही एक मिश्र जात असावी, असे म्हणतात. बिहारी खार, रावणी खार व बंगाली खार-दुलिया अशा यांच्या पोटजाती आहेत. हे शेती व पालख्या वाहणे हे व्यवसाय करतात. रावणी खार हे स्वतःला जरासंधाचे वंशज म्हणवितात. पतित ब्राह्मण हे यांचे पौरोहित्य करतात.

हे कोंबडीचे मांस वा क्वचित उंदीरही खातात. गणेश, गोराई, बंदी, धर्मराज, रामठाकुर, इ. देवताना भजतात. त्यांचा सामाजिक दर्जा कुणबी व गोआला यांच्याप्रमाणे मानतात. बिहारी खार व बंगाली खार-दुलिया यांच्यांत वैमनस्य आढळते. हे मृतांना जाळतात. [से. इं. १९५१]

**खारक** सौराष्ट्रातील एक जात. हे स्वतःला क्षत्रिय म्हणवतात. हे पूर्वी खरावर (गाढवावर) माल लादून गावोगावी व्यापार करीत असल्यामुळे यांना खारक असे नाव मिळाले. पूर्वी हे जैन होते; पण आता वैष्णव झाले आहेत. ठाकोरजी आणि खोडियारदेवी ही यांची प्रमुख दैवते आहेत. हे मद्य-मांस वर्ज्य मानतात. [मुं. इ. जा.]

**खारवा (वी)** एक जात. यांची वस्ती मुख्यत्वे कच्छ, सौराष्ट्र, खंबायत, गुजरात, ठाणे, रत्नागिरी व मुंबई या भागात आढळते. खारवा (वी) हा फारसी शब्द असून त्याचा अर्थ खलाशी असा आहे. हे लोक दर्यावर्दीपणा व शेती करतात. शेती करणाऱ्या खारव्याना खारपाटील असेही म्हणतात. मुंबई व गुजरात या ठिकाणी हे घरे शाकारण्याची कामेही करतात. यांच्या बायका काथ्याच्या दोऱ्या व मासे विकतात. उत्तम पूल बाधणारे म्हणून खारव्यांची प्रसिद्धी आहे. राजपूत, कोळी, खंबायती, हाणसाठी, सुरती व भडोची अशा यांच्या सहा पोटजाती असून, त्यांच्यात परस्पर लग्नसंबंध होत नाहीत.

**विवाहप्रथा–** याच्यांत मुलामुलींच्या लग्नासंबंधी विशिष्ट नियम नाहीत. सप्तपदी हा लग्नातला महत्वाचा विधी मानतात. यांच्यांत कन्याशुल्क घेण्याची चाल आहे.

**देवधर्म–** हे लोक अंबाजी, बहुचरा, भद्रकाली, आशापुरा, इ. देवतांना भजतात. याचे पौरोहित्य ब्राह्मण करतात. कोकणी खारवी हे अम्मा, जतका, म्हास्ती यांना पुजतात. काही खारवी स्वामीनारायण व कुबेर या पंथांचे अनुयायी आहेत; तर कच्छमधले खारवा वैष्णव आहेत.

यांची पंचायत असते. सुरत येथील खारव्यांच्या दोन पंचायती असून, पोरबंदर येथील पंचायत सर्वश्रेष्ठ मानतात. तिथल्या पंचायतीत जातीचे महत्वाचे कज्जे सोडवले जातात.

हे मृतांना जाळतात व श्राद्धही करतात. [मुं. इ. जा.; सु. वि. को.]

**खारवेल** (सनपूर्व १७४) मौर्य साम्राज्याच्या अवनतीच्या काळात जेव्हा दक्षिणेत सातवाहन वंशाने डोके वर काढले, त्याच सुमारास ओडिसामध्ये एक नवा राजवंश उदयाला आला. हा राजवंश चैद्य क्षत्रियांचा होता. त्याचे मूलस्थान चेदी जनपद अर्थात बुंदेलखंड हे होते. तिथून ओडिसापर्यंत मजल मारून या राजवंशाने तिथे आपले राज्य स्थापले. या राजवंशातला तिसरा पुरुष खारवेल हा होय. त्या काळातला तो कलिंगचक्रवर्ती समजला जातो. उदयगिरी येथील हाथीगुफेतल्या शिलालेखावरून खारवेल हा जैन असल्याचे कळते. त्याच्या काळात ओडिसामध्ये जैन धर्माचा उत्कर्ष होता. उदयगिरीवर जैन अर्हतांची मंदिरेही होती.

खारवेलाला वयाच्या १५ व्या वर्षी युवराजपद मिळाले. २४ व्या वर्षी त्याला महाराज्याचा अभिषेक झाला. त्यानंतर दुसऱ्याच वर्षी त्याने सातकर्णीची पर्वा न करता पश्चिम दिशेला आपले सैन्य पाठवले व मूषिक राज्य जिकले. चौथ्या वर्षी फिरून पश्चिमेवरच चढाई करून त्याने भोजकांना शरण आणले. महाराज्याभिषेकानंतर सहाव्या वर्षी त्याने राजसूय यज्ञ केला.

बाख्त्रीचा यवन राजा दिमित्र भारी सैन्य घेऊन मध्यदेशावर चालून आला असता, खारवेलाने त्याच्याशी सामना देऊन त्याला पिटाळून लावले. दिमित्राचा पराजय केल्यावर खारवेल हा तत्कालीन राजमंडळात श्रेष्ठ ठरला. त्याने महाराष्ट्र व मगध यांच्यावरही आक्रमणे केली. उत्तर व दक्षिण या दिशांना त्याने अनेक दिग्विजय केले. मगधाचा राजा पुष्यमित्र याला त्याने शरण आणले. पूर्वी नंदराजाने कलिंगावर विजय मिळवून तिथली जिनमूर्ती विजयचिन्ह म्हणून मगधात नेली होती. ती खारवेलाने पुष्यमित्राला जिंकून पुनश्च हस्तगत केली व तिची कलिंगात पुनःप्रतिष्ठा केली. पुढे शुंग सातवाहन व उत्तरापथाचे यवन यांना आपल्या प्रभावाने नमवून मग त्याने जैन धर्माचे महानुष्ठान केले. त्याने अखिल भारतातल्या जैन यतीमुनींना व पंडितांना बोलावून एक धर्मसंमेलनही भरविले. त्या प्रसंगी जैनसंघाने खारवेलाला खेमराजा, भिखुराजा व धर्मराजा अशा पदव्या दिल्या. [अ. हि. नॉ. इं.; जै. ध.; भा. इ. रू.; हि. जै. मो.]

**खारिया** एक आदिवासी जमात. बिहार, ओडिसा, आसाम, बंगाल व मध्यप्रदेश या प्रदेशात या जमातीची

वस्ती आहे. छोटा नागपूर व बंगाल या भागात ते मोठ्या सख्येने वसले आहेत. यांना खरिया, करिया व कारिया असेही म्हणतात. मोंघीर जिल्ह्यात यांचे मूलस्थान असावे, असा अंदाज आहे.

रिस्ले याने खारियाचे वर्णन केले आहे. त्यावरून एका काळी त्यांची आर्थिक स्थिती चांगली होती, असे दिसते. सांप्रत ती स्थिती उरली नाही. बंगालमधील या खारियांपैकी निम्मे लोक आता ख्रिश्चन झाले आहेत व निम्मे हिंदू संस्कृतीच्या क्षेत्रात आले आहेत. अन्यत्र वास्तव्य करणारे खारिया मात्र रानटी जीवन जगत आहेत. त्यांची संख्या हळूहळू घटत चालली आहे.

डाल्टन व रिस्ले यांनी सुधारलेल्या खारियांची मोजमापे घेऊन त्यांचे मुंडा लोकांशी बरेच साम्य असल्याचे दाखविले आहे. जगली खारिया मात्र त्यांच्यापेक्षा निराळे आहेत. वर्ण काळा, केस कुरळे, नाक रुंद, चपटे व वरचा भाग खोलगट अशी त्यांची शारीरिक ठेवण आहे. त्यांची ही चेहेरेपट्टी व शारीरिक ठेवण द्रविडपूर्व लोकांशी जुळणारी आहे. त्यांच्या लोककथांवरूनही, त्यांचा द्रविडपूर्व लोकांशी संबंध असावा, असे वाटते.

**स्वभावधर्म** – हे लोक सदा दुर्मुखलेले असतात. यांना जगण्यात आनंद वाटत नाही व तो मिळवण्यासाठी ते मुळीच धडपडत नाहीत. ते सदैव दैवाला शरण असतात. त्यांच्या जीवनात इतर आदिवासींप्रमाणे नाच-गाण्यालाही स्थान नाही ते भुताखेतानाच भितात असे नाही; तर सुसंस्कृत मानवालाही भितात· त्यांच्यांत खून, मारामाऱ्या व चोऱ्या हे प्रकार फारसे घडत नाहीत. भविष्यकालाच्या तरतुदीविषयी त्यांना आस्था नसते आणि स्वच्छतेचीही फारशी आवड नसते. हे लोक अतिशय संशयी असतात. त्यांचा विश्वास संपादणे महाकठीण असते. पण एकदा का एखाद्यावर त्यांचा विश्वास बसला, की मग मात्र ते त्याला कधीही अंतर देत नाहीत.

**निर्वाहसाधने** – पुष्कळसे खारिया लोक शेतीवर जगतात; पण त्याची शेतीची उपकरणे मात्र जुनाट पद्धतीचीच असतात. घरातले धान्य संपल्यावर हे लोक कंदमुळांवर भूक भागवतात. कंदमुळे उकरण्यासाठी प्रत्येकाजवळ लोखडी पाते लावलेले बांबूचे किंवा लाकडाचे दांडके असते. झाडावर चढण्यात ते पटाईत असतात. मधाची पोळी गोळा करण्यासाठी वाटेल तसल्या दुर्गम ठिकाणी व कडेकपारीत ते लीलेने चढतात. पाखरांची शिकार व मासेमारी या गोष्टीही स्थानपरत्वे त्यांच्या उपजीविकेचे साधन ठरल्या आहेत. बागाईत ही गोष्ट त्यांना जवळजवळ माहीतच नाही. कित्येक खारिया आसामातल्या चहाच्या मळचात मजूर झाले आहेत.

खारियाची गावे डोंगराच्या पायथ्याशी असतात. पाच-दहा झोपडयांचे एक गाव बनते. लाकडाचे डामे जवळजवळ पुरून ते आपल्या झोपडीच्या भिंती बनवतात व त्यावर मातीचा गिलावा करतात. झोपडीची दारे अगदी लहान असतात व त्यांना खिडक्या मुळीच नसतात. झोपडीवर गवती छप्पर असते. जंगली खारिया दुधासाठी जनावरे पाळीत नाहीत. मात्र काही लोक कोंबडचा किंवा शेळ्या पाळतात. कुत्रा मात्र प्रत्येकाजवळ असतो.

कमरेला गुंडाळलेले फडके एवढाच खारिया पुरुषाचा पोशाख असतो. कंगाल खारिया तर केवळ लंगोटी नेसूनच असतात. सुस्थितीतले पुरुष मात्र अंगावर उपरण्यासारखा दुसरा एक कपडा घेतात. बायका एक साडी कमरेला गुंडाळून तिचाच अर्धा भाग अगाभोवती लपेटून घेतात. काचेच्या किंवा शंखाच्या बांगडचा हाच त्यांचा मुख्य अलंकार होय.

**सामाजिक व कौटुंबिक जीवन** – खारिया लोकांचे अनेक पोटभेद असून त्यांना गोष्ठी म्हणतात. या लोकात देवके मानण्याची चाल आहे. खारियाना दत्तक मुलांचा फार सोस असतो. मुले असलेले लोकही अन्य मुले दत्तक घेतात औरस व दत्तक या दोघात भेद केला जात नाही. या दत्तविधानाला गावच्या पंचायतीची मात्र मान्यता असावी लागते. ती नसेल, तर दत्तक पुत्राला त्याच्या नवीन पित्याच्या मालमत्तेत वाटा मिळत नाही. मुलगी दत्तक घेतलेली असेल, तर दत्तक पित्याला तिचे देज घेण्याचा अधिकार असतो.

बाप हा कुटुंबप्रमुख असतो. कुटुंबातल्या सर्वांवर त्याचा दबदबा असतो. कुटुंबाच्या मालकीचे जे काय असेल, त्याची त्याला स्वतःच्या अधिकारात हवी तशी विल्हेवाट लावता येते. त्याच्या मृत्यूनंतर त्याची विधवा कुटुंबप्रमुख बनते. बापाच्या देण्याघेण्याची जबाबदारी मुलांवर असते. कुटुंबप्रमुख घरसंसार चालवून उरलेले द्रव्य घरात किंवा घराबाहेर पुरून ठेवतो. तो सज्जन असला तर मृत्युसमयी त्या गुप्त धनाचा पत्ता मुलांना सांगतो. लोभी असल्यास सांगत नाही. कारण त्याला वाटते, की हे गुप्त धन परलोकी आपल्याला उपयोगी पडेल.

खारियांमध्ये सामुदायिक शेजघराची पद्धत नाही. हे लोक शक्य तो एकच बायको करतात. कुटुंबातल्या मुलीला सासऱ्याचे धन समजतात. म्हणून जेव्हा ती उपवर होते, तेव्हा तिला गोठचात प्रवेश करायला व कौटुंबिक पूजेत बळी दिलेल्या जनावराचे मांस खायला बंदी असते. मुलगी लग्न होऊन घरी गेली, की तिला तिच्या बापाच्या किंवा भावाच्या घरी स्वैपाक करता येत नाही. तसेच नवऱ्याला घेऊन तिला बापाकडे झोपताही येत नाही.

**देवधर्म**– खारिया लोक परमेश्वर मानतात; पण त्याची उपासना मात्र करीत नाहीत. सूर्योदयाच्या वेळी ते पूर्व दिशेला हात जोडून सूर्याला म्हणतात. 'तू माझा देव आहेस.' ते चंद्राला सूर्याची बायको मानतात. दरवर्षी वैशाखात किंवा ज्येष्ठात ते आपल्या ईश्वराला पांढरा कोंबडा व दर तीन वर्षांनी एकदा पांढरा बकरा बळी देतात.

हे लोक जीव आणि त्याची छाया अशी दोन तत्त्वे मानतात. खारिया आपल्या पितरांच्या छायाना भजतात. या छाया स्वैपाकघरातल्या कोपऱ्यात किंवा भाताच्या मुडचांवर बसून असतात, अशी त्यांची श्रद्धा आहे. भुताखेतांवरही त्यांचा विश्वास असतो. म्हणून ते त्यांना वेळोवेळी बळी देऊन संतुष्ट करतात. भुताखेताची घरगुती पूजा कुटुंबप्रमुख करतो; तर सामुदायिक पूजा पहान व त्याचा मदतनीस पुजार हे दोघे मिळून करतात. पहानाचा अधिकार वंशपरपरेने चालतो. त्याला गावातली शेत-जमीन इनाम असते.

**सण–उत्सव**–– खारिया लोक भाद्रपद व पौष अमावास्येस पितराना कोंबडी व खाद्यपदार्थ अर्पण करतात. पौष अमावास्येस प्रत्येक घरी धरमदेवांची पूजा केली जाते. माघ महिन्यात सर्व गावकरी डोंगरमाथ्यावर जाऊन पाटदेवतेची व बरामदेवाची पूजा करतात. त्या वेळीही कोंबडचाचे बलिदान होते. बाघूतदेवाला लाल कोंबडा बळी दिला जातो. करमपूजा हा भाद्रपदातला महत्त्वाचा सण होय. त्यात घरोघरी करमवृक्षाची फांदी पुरून तिची पूजा करतात. करमवृक्षालाही कोंबडचा-बकऱ्यांचे बलिदान होते. त्यावेळी इष्टमित्र एकत्र जमून नाच-गाणे, मद्यपान व मेजवानी या प्रकारांनी आनंदोत्सव करतात. याशिवाय काडलेटापूजा, सोहराईपूजा, गोहरपूजा, दोहोरपूजा असेही आणखी काही खारियाचे मोठे सण आहेत. काडलेटापूजा हा नवे धान्य खाण्याचा सण असतो. सोहराई हा गुरांचा सण असतो. दोहोर हा सण वैयक्तिक स्वरूपाचा असतो. मकर परब हा पौषातला सण केवळ आनंदोत्सवाचा असतो. त्या दिवशी पोहे व काकवी यांची मेजवानी असते.

**विवाहप्रथा**–– एका देवकात लग्नसंबंध होत नाहीत. सर्व पोटजातीत परस्पर लग्नसंबंध होऊ शकतो. बालविवाह रूढ नाही. कन्याशुल्काची चाल आहे. एखाद्या तरुणाने एखाद्या विवाहित मुलीस फूस लावून पळवून नेले, तर त्याला तिच्याशीच लग्न करावे लागते. असे प्रसंग पुष्कळ येतात. लग्नाला मुहूर्ताची गरज नसते. लग्नविधी रात्रीच होतो. सिंदूरदान म्हणजे इष्टमित्रांच्या देखत वधूवरांच्या कपाळी शेंदूर लावणे, एवढाच लग्नातला मुख्य विधी असतो.

विवाहित पुरुषाने विवाहित स्त्रीशी व्यभिचार केल्यास किंवा खारिया स्त्री-पुरुषांचा परजातीतल्या स्त्री-पुरुषांशी व्यभिचार घडल्यास त्यांना जातिबहिष्कृत करतात. ज्या जातीच्या हातचे पाणी खारियाना चालते, त्या जातीतील स्त्रीपासून एखाद्या खारिया पुरुषाला अनौरस मूल झाले, तर त्याला औरस मुलाप्रमाणे त्या मुलाचा प्रतिपाळ करावा लागतो.

**प्रसूतिप्रथा**––पत्नी गरोदर असल्याचे सिद्ध झाले, की नवरा तिच्याशी समागम वर्ज्य करतो. पत्नी प्रसूत होऊन एक महिना लोटल्यावर त्यांचा दांपत्यसंबंध पुनश्च सुरू होतो. गरोदरपणात स्त्रीला महुवाच्या फुलांची दारू वर्ज्य असते. प्रसूतीच्या वेळी तिच्यासाठी खास खोली बनवितात. त्या खोलीत पुरुषाला कोणत्याही परिस्थितीत जाता येत नाही. मुलाची नाळ बाणाच्या टोकाने कापतात. वार पुरण्याचा खड्डा केसात घालण्याच्या आकडचाने खणावा लागतो. बाळंतिणीला पहिले तीन दिवस उपाशी ठेवून तिला नुसते हळदीचे पाणी प्यायला देतात. सुवेर नऊ दिवस पाळतात. त्यानंतर घरदार तुळशीपत्राच्या पाण्याने शुद्ध करतात. सर्व आप्तेष्टाना बोलावून सहाव्या दिवशी मुलाचे नाव ठेवतात. क्वचित हा नामकरणविधी बाराव्या दिवशीही करतात. नाव ठेवण्याच्या आदल्या दिवशी घरातली मोठी माणसे कडक उपवास करतात.

**मर्तिकप्रथा**–– हे लोक प्रेते पुरतात. प्रेताचे सर्व कपडे त्याच्यावर आच्छादितात. मग आप्तेष्ट सभोवती बसून शोक करतात. उत्तरेकडे डोके करून प्रेत पुरतात. पुरल्या जागी अन्न ठेवतात. मग प्रेतयात्रेला गेलेले सगळे लोक स्नान करून अग्नीला स्पर्श करतात. त्या दिवशी मोठी माणसे जेवत नाहीत; तर कडुनिंबाची एक दोन पाने खातात. दुसऱ्या दिवशी ज्ञातिभोजन घालतात. नऊ दिवस सुतक पाळतात. दहाव्या दिवशी पुरुष क्षौर करतात व स्नानानंतर हळद व मोहरीचे तेल अंगाला लावतात. तुळशीची पाने घातलेल्या पाण्याने घरादाराची शुद्धी करतात. हळदीच्या पाण्यानेही शुद्धी केली तरी चालते. मयताच्या घरी जमलेले लोक निघून जाण्यापूर्वी एखादा नातेवाईक मयताच्या नावाने लालसर काळचा कोंबडचाचा बळी देतो. [एन्सा. मुं.; भू. स. वा. ख. ध.; से. इं. १९५१]

## खारी

एक प्राचीन परिमाण. कौटिल्याच्या मते सोळा द्रोण म्हणजे एक खारी होय (५.१.३३). आजच्या भाषेत बोलायचे तर एक खारी म्हणजे चार मण होतात. [पा. भा.]

## खालपा

चांभारांची एक जात. यांची वस्ती मुख्यत्वे भडोच व रेवाकाठा येथे आढळते. हे कातडी कमावतात व चामडचाच्या वस्तू बनवतात. राजपूतांना शूद्र जातीच्या स्त्रिया-

पासून झालेली संतती म्हणून या जातीचा उल्लेख करतात. यांच्यात सहा पोटभेद असून, त्यांत परस्पर लग्नसंबंध होत नाहीत. यांच्या निवासस्थानावरून कुळेही निर्माण झाली आहेत. त्यांपैकी काही कुळांना राजपूत नावे दिलेली आढळतात.

यांच्यांत लहान वयातच मुलामुलींची लग्ने लावतात. मुलगा पाच वर्षांचा असतानाच त्याचा विवाह करतात. गारुड किंवा कलातिया ब्राह्मण यांचे पौरोहित्य करतात. यांना मद्यमांस चालते. हे लोक महार, मांग, भंगी यांच्या हातचे अन्नोदक घेतात. [ म. ज्ञा. को. ]

## खालसर

एक सरोवर. हे हिमाचल प्रदेशात मंडीपासून आग्नेयेस २० मैलांवर आहे. या सरोवरात अनेक लहान लहान बेटे आहेत. वैशाख महिन्यात येथे मोठी यात्रा भरते. त्या वेळी हिंदू, शीख, इ. सर्व धर्मांचे लोक तिथे जमतात. इथे बौद्धांचे मानीपानी नावाचे प्रसिद्ध मंदिर आहे. लोमश ऋषीचे स्थान म्हणूनही या सरोवराचा उल्लेख करतात. इथल्या मंदिरात बुद्धाची मूर्ती असून, रात्रंदिवस तिथे दिवा जळत असतो. सरोवराच्या परिसरात आजही विचित्र भाषेत लेख असलेले अनेक पाषाण आढळतात. गुरू नानकदेवाचे ते एक गुरुद्वार असून तिथे शंकराचेही एक मंदिर आहे. [ धर्मयुग १९५४ ]

## खालसा

पंजाबातील एक शीख पंथ. खालिस = शुद्ध, या अरबी शब्दापासून हा शब्द बनला आहे. मुसलमान राज्यकर्त्यांनी केलेल्या छळाला एकजुटीने उत्तर देण्यासाठी व स्वधर्मातील अंतर्गत भेदांना मूठमाती देण्यासाठी शीखांचे दहावे गुरु गोविंदसिंघ यांनी या पंथाची स्थापना केली.

इ. स. १६९९ साली आनंदपूर येथे वैसाखी जत्रेच्या दिवशी भरलेल्या सभेत गोविंदसिंघानी आपली नंगी तलवार उंचावून आपल्या शिष्यांना विचारले, की ‘ तुमच्यापैकी किती जण आत्मबलिदानाला सिद्ध आहेत ? ’ गुरूच्या या प्रश्नाला उत्तर म्हणून त्यांचे पाच अनुयायी पुढे झाले. गोविंदसिंघांनी त्या प्रत्येकाला निरनिराळ्या दालनात नेले व पाच बकऱ्यांना मारून त्यांच्या रक्ताने भरलेली तलवार घेऊन ते पुनश्च सभेत आले. नंतर त्यांनी आपली ती दुधारी तलवार फिरवीत पाची पाठ म्हटले व एका लोखंडी पात्रातल्या जलात ती तलवार फिरवीत फिरवीत सबंध विरवली. मग त्या पात्रात त्यांच्या पत्नीने आणलेले काही बत्तासे टाकले गेले. या बत्तासे मिश्रित जलाचे नाव पाहोल ऊर्फ परमामृत असे ठेवण्यात आले. मग ते पाहोल गोविंदसिंघांनी वरील पाच शिष्यांना प्यायला दिले व ‘ खालसा पंथाचे पंच प्यारे ’ असे त्यांचे नवे नामकरण केले. मग गुरू गोविंदसिंघानी त्या पंच प्याऱ्यांकडून स्वतः दीक्षा घेतली. याच वेळी गोविंदसिंघानी या खालसापंथाची तत्त्वे उद्घोषित केली, ती अशी— (१) प्रत्येक खालसापंथीयाने आपल्या नावापुढे सिंघ (सिंह) हा शब्द जोडावा. (२) केस, कंघा, कच्छ, कडे आणि कृपाण हे पाच ककार अवश्य धारण करावे. (३) ‘ वाह गुरुजी का खालसा, वाह गुरुजी की फतेह ’ ही या पंथाची विजयघोषणा असावी.

गोविंदसिंघांच्या मृत्यूनंतर खालसा पंथाचे नेतृत्व बंदा वैरागी याने स्वीकारले. बंदा मरण पावल्यावर या पंथाला अत्यंत वाईट दिवस आले. सीमेवरील अफगाण टोळ्यांनी आणि मुसलमानी सत्ताधिकाऱ्यांनी खालसापंथीयांचा अनन्वित छळ केला; पण तरीही त्यांनी आत्मविश्वास ढळू दिला नाही. ते साऱ्या शक्तीनिशी संकटावर मात करीत जिवाच्या करारानें लढतच राहिले. त्या लढाईत त्यांना यशही मिळाले. इ. स. १८०१ साली महाराजा रणजितसिंघाच्या नेतृत्वाखाली पंजाबात खालसा शीखांचे स्वतंत्र राज्य स्थापन झाले.

रणजितसिंघाच्या अस्तानंतर मात्र या पंथाला केवळ एक धार्मिक पंथ एवढेच स्वरूप उरले. आजही हा पंथ एक धार्मिक पंथ म्हणूनच विद्यमान आहे. [ हिं. वि. को. ]

## खाल्या

एक जात. यांची वस्ती मुख्यत्वे गुजरातमध्ये आढळते. यांना चमाडिया, चमाम, छडिया आणि डबगार असेही म्हणतात. ते कातडी कमावण्याचा व्यवसाय करतात. यांच्यांत सहा पोटभेद आहेत व काही कुळेही आहेत. पोटजातीत परस्पर लग्नसंबंध होत नाहीत. गारुडा ब्राह्मण हे यांचे पौरोहित्य करतात. हे गोमांस खातात. हे मृतांना जाळतात किंवा पुरतात. श्राद्धही करतात. [ मुं. इ. जा. ]

## खाशिया

एक जात. या लोकांची वस्ती कुमाऊं व टेहरीगढवाल या प्रदेशांत आहे. या लोकांचा उल्लेख महाभारत, पुराणे, इतर प्राचीन साहित्य आणि इ. स. च्या १२ व्या शतकातील कल्हणाची राजतरंगिणी यांत आढळतो.

प्राचीन काळी खश लोकांनी हिमालयप्रदेशावर आक्रमण करून, काश्मीरपासून नेपाळपर्यंतच्या टापूवर आपली सत्ता प्रस्थापित केली होती. याच कारणाने पूर्वी कुमाऊं प्रदेशाला खासदेश म्हणत. या प्रदेशातील डोम लोकांना त्यांनी आपले गुलाम बनवले होते. ही घटना आर्यांच्या आगमनापूर्वी घडली असावी, असा अंदाज आहे.

मूळ खश लोक आणि नंतरचे आक्रमक लोक मिळून

खाशिया बनले आहेत. या खाशियांना पूर्वी बिठ असे म्हणत. पण नंतर आर्यवंशी ब्राह्मण व राजपूत यांनाही बिठ असेच म्हणू लागले. खाशिया लोकांत खास राजपूत व खास ब्राह्मण याचाही समावेश होतो. कत्यूरी राजांनी सखल प्रदेशातून काही ब्राह्मण व राजपूत येथे आणून वसविले होते. त्यांचा पुढे स्थानिक खाशियांशी रोटीबेटी व्यवहार होऊन खास ब्राह्मण व खास राजपूत हे पोटभेद अस्तित्वात आले.

प्राचीन खाशिया हे हिमालयात गढ्या बनवून राहत असत. अनेक खेड्यांचा मिळून त्यांचा एक गट बने व त्यावर एक गटप्रमुख असे. तो गटप्रमुख आपल्या लोकांसह शेजारच्या टोळ्यांशी युद्ध करी. अशा प्रकारे त्यांचे आजूबाजूच्या गढ्यांशी संघर्ष चालत. प्रत्येक खेड्यात एक ग्रामपचायत असे. पचायतीच्या अध्यक्षाला ठोकदार किंवा पधान म्हणत. एखाद्या व्यक्तीला बहिष्कृत करणे किंवा प्रायश्चित्त देऊन जातीत घेणे, हे सर्व अधिकार पंचायतीकडे असत.

**देवधर्म** –– घनदाट जंगले, उत्तुग पर्वत आणि घोंगावत वाहणाऱ्या नद्या यांच्या सान्निध्यात वास्तव्य करावे लागल्यामुळे खाशिया हे निसर्गपूजक बनले आहेत. प्रत्येक टेकडीवर व प्रत्येक जलाशयावर त्यांच्या एखाद्या देवतेचा निवास असतोच. नागराज हा त्यांचा प्रमुख देव आहे. याशिवाय ग्रामदेवता, जलदेवता, भुतेखेते व मृतात्मे यांनाही हे भजतात व प्रसंगी बकरा वा रेडा बळी देतात.

गढवालमधील खाशिया सूर्य व चंद्र याना देव मानतात. त्यांच्या मते सूर्य पुरुष व चद्र स्त्री होय. ताऱ्यांना ते ऋषी म्हणतात.

खाशियानी हिंदूंच्या बहुतेक चालीरीती उचलल्या आहेत. हे लोक हल्ली स्वतःला राजपूत ब्राह्मण म्हणवून घेतात व जानवेही घालतात. पहिल्या महायुद्धात गढवाली रायफली जवानांनी सर्वत्र मर्दुमकी गाजविल्यामुळे खाशियांचा सामाजिक दर्जा आता वाढला आहे.

**विवाहप्रथा** – खाशिया लोक विवाहविधी हा धार्मिक समजत नाहीत. मुलगी विकण्याचा आणि विकत घेण्याचा तो एक साधा व्यवहार असतो. मुलींची किंमत त्यांच्या वयावर आणि सौंदर्यावर अवलंबून असते. वधूने वरगृही प्रवेश केल्यावर गणेशपूजा करणे हाच त्यांच्या लग्नातील एकमेव धार्मिक विधी होय.

कुमाऊं प्रदेशात दळणवळणाच्या सोयी वाढल्यामुळे खाशिया लोकांचा आता सुधारलेल्या लोकांशी पुष्कळच संबंध येऊ लागला आहे. त्यांच्यांत शिक्षणाचा प्रसार वाढत आहे तसतसे त्यांचे सामाजिक जीवनही बदलत आहे.

कुमाऊंमधील राजपूत आणि ब्राह्मण यांच्यामध्ये अनेक पोटजाती आहेत. राजपुतामध्ये बंगारी, बिस्त, उंगवाल, कथयाट, मनरळ, पडचार, राऊतेला आणि रावत या पोटजाती प्रमुख आहेत टेहरी – गढवालमधील ब्राह्मणांमध्ये सुमारे ३८० पोटजाती आहेत. सरोळा, गंगारी, ननगोत्री, इ. त्याची बहुतेक आडनावे त्यांच्या पूर्वजांवरून किंवा मूळ खेड्यावरून पडली आहेत.

टेहरी–गढवालमधील राजपुताचे ठाकूर, राजपूत आणि खास-राजपूत असे तीन पोटभेद आहेत. याशिवाय पहाडी प्रदेशात आणखीही काही लहान लहान जाती आहेत, त्यात वैश्य जात ही प्रमुख आहे. कत्यूरी आणि चंद राजवशाच्या कारकीर्दीत सखल प्रदेशातील बरीच वैश्य कुटुंबे तिकडे जाऊन स्थायिक झाली, तेच हे वैश्य होत. [ से. इं. १९३१ ]

## खासा

कुमाऊं प्रदेशातील एक जमात. खासा हे मूळ आर्य वशाचे असून, भारतात सुरवातीला आलेल्या आर्य लोकांपैकी होत. नंतर आलेल्या आर्यांनी त्यांना कुमाऊं टेकड्यांत हाकलून दिले. डोंगराळ प्रदेशात अशा प्रकारे अलग पडल्यामुळे खासा लोकाचे धर्माकडे दुर्लक्ष झाले. पण कुमाऊं टेकड्यांत दळणवळणाची साधने उपलब्ध झाल्यावर सखल प्रदेशातील हिंदू लोकांशी त्यांचा संबंध आला व हिंदू धर्मातील रीतीरिवाज व व्रतवैकल्ये त्यांनी स्वीकारली.

डेहराडून जिल्ह्यातील जौनसार-बावरमधील खासा लोकांत एकत्रकुटुबपद्धती आहे. कुटुबातले सर्व बंधू एकाच घरात राहतात. त्या सर्वांत मिळून एक किंवा त्यापेक्षा जास्त बायका असतात. त्यांना जी मुले होतात, त्यांतला मोठा मुलगा कुटुबातील पहिल्या पिढीतील वडील भावाचा मुलगा मानला जातो. दुसरा मुलगा दुसऱ्या भावाचा व तिसरा तिसऱ्या भावाचा समजतात. ही मुले पहिल्या पिढीतील मोठ्या भावाला बडी बाबा असे म्हणतात. दुसरा भाऊ गुराखी असल्यास त्याला डंगर बाबा व तिसरा शेळ्या चारणारा असल्यास त्याला भेडीबाबा असे म्हणतात. अशा रीतीने कुटुबात जितके भाऊ असतील, त्या सर्वांना त्यांच्या पेशाच्या नांवाने संबोधतात. मुलांचा पालनपोषणाचा खर्च सर्व बंधू विभागून घेतात. एकत्रकुटुंबपद्धती नसल्यास थोरल्या भावाला लहान भावाच्या लग्नाचा खर्च करावा लागतो.

खासांच्या वारसा कायद्यानुसार थोरल्या भावाला एक शेत अधिक मिळते. त्याच प्रमाणे कनिष्ठ भावालाही शेताचा अर्धा तुकडा जास्त मिळतो. बाकीची मालमत्ता सर्व भावांत समान विभागली जाते. जौनसार बावरमध्ये सामायिक घर, मळा,

शेळ्या वगैरे सगळे मोठ्या भावाला मिळते आणि बायकामुलांच्या पालनपोषणाचा खर्च त्यालाच करावा लागतो. त्यामुळे सर्व कुटुंबावर त्याचाच अधिकार चालतो. एखाद्या कुटुंबात एकच मुलगा असला व तो कितीही सुखवस्तू असला, तरी एखादी मुलगी सहजासहजी त्याच्याशी लग्न करीत नाही. कारण घरातील सर्व काम आपल्याला एकटीलाच करावे लागेल व यदाकदाचित वैधव्य आल्यास दुसऱ्या कोणाचा आधार मिळणार नाही, असे तिला वाटते. त्यामुळे असा एकुलता मुलगा प्रथम आपल्या चुलत भावांना किंवा इतर नातेवाइकांना घरात आणून ठेवतो व मग विवाहाच्या तजविजीला लागतो. [से. इं. १९३१]

**खासी** एक जमात. आसाममधील खासी व जैतिया या जिल्ह्यातील डोंगरात या जमातीचे वास्तव्य आहे. हे लोक फार प्राचीन काळी ब्रह्मदेशातून इकडे आले असावे, असा अंदाज आहे. यांची भाषा, उपकरणे व स्मारके आणि ब्रह्मदेश व मलायामधील मोनख्मेर वंशातील लोकांची भाषा, उपकरणे व स्मारके यांत बरेच साम्य आहे. हे लोक तपकिरी वर्णाचे आहेत. यांची नाके रुंद व बसकी असतात. हे ठेंगणे असले, तरी यांची शरीरे धष्टपुष्ट व पिळदार असतात. हे कष्टाळू, उद्योगप्रिय, मोकळ्या मनाचे व आनंदी वृत्तीचे आहेत. याना मुले, फुले व पाखरे फार आवडतात. सुधारलेल्या जगापासून दूर राहणारे हे लोक सुस्वभावी व प्रामाणिक आहेत.


खासी पुरुष

खासी पुरुषांचा पोषाख म्हणजे आखूड धोतर, बिनबाह्यांचा कोट व डोक्याला कानटोपी किंवा पागोटे एवढाच असतो. स्त्रिया दोनतीन प्रकारचे कपडे एकदम घालतात, त्यामुळे त्यांचे शरीरसौष्टव झाकले जाते. त्याना रंगीत कपड्यांची फार हौस असते. स्त्री-पुरुष सोन्याच्या व पोवळ्याच्या मण्यांच्या माळा गळ्यात घालतात. चांदीच्या गळपट्ट्या, साखळ्या, बांगड्या, कर्णफुले इ. अनेक प्रकारचे अलंकार हे लोक वापरतात. स्त्रियाप्रमाणे पुरुषही केस लांब राखतात.

धनुष्यबाण, ढाल-तलवार व भाले ही या लोकांची आयुधे आहेत. याच्या तलवारी अखंड लोहाच्या असतात. त्यांची मूठ वेगळी नसते. तिरंदाजीत हे लोक निष्णात आहेत. तो त्यांचा सर्वात आवडता खेळ आहे. दरवर्षी गावागावांमध्ये त्या खेळाच्या स्पर्धा होतात. याशिवाय सुळखांब, कुस्ती, लाठीखेच, भोवरा, गोट्या, कवड्या इ. खेळही या लोकांत प्रचलित आहेत.

**व्यवसाय**– खासी लोकांचा मुख्य उद्योग शेती हा आहे. तांदूळ, बटाटे, सत्री, सुपारी व विड्याची पाने, हे पदार्थ मुख्यत्वे ते पिकवितात. तांदुळापासून दारू बनविण्याचा धंदाही मोठ्या प्रमाणावर चालतो. बरेच स्त्री-पुरुष मोलमजुरी करतात. हे घरकामात कुशल असतात. रानातील मधाची पोळी आणून व कृत्रिम पोळी बनवून मध गोळा करणे, हा उद्योगही बऱ्याच लोकाचा असतो. शिवाय शिकार व मासेमारीही चालते. पूर्वी, कापड विणणे व लोखंड शुद्ध करून त्यापासून खोरी, कुदळी, इ. हत्यारे बनविणे हे उद्योग हे लोक करीत; पण सांप्रत ते बंद पडले आहेत.

खासी लोकाची गावे डोंगराच्या माथ्यापासून जरा खाली आणि वादळापासून संरक्षण होईल अशा जागी वसलेली असतात. घरे ठेंगणी पण चौथऱ्यावर बांधलेली, भिंती दगडी


खासी घर

किंवा लाकडी व छपरे गवती असतात. तांबडी माती व शेण यानी सारविल्यामुळे ती स्वच्छ व सुंदर दिसतात. घराजवळच डुकरे व जनावरे यांचा गोठा असतो. नवीन घर बांधले, की देवाची पूजा करून त्याला पशुबळी देतात.

या लोकाचे मुख्य अन्न भात, सॅगोचे पीठ व मासे हे आहे. यांच्यांतील काही उपजाती विशिष्ट प्रकारचे मांस वर्ज मानतात. यांना मद्य व पानसुपारी यांची फार आवड आहे.

**कुटुंबव्यवस्था** – या जमातीत मातृसत्ताक कुटुंबव्यवस्था प्रचलित आहे. स्त्री कुटुंबप्रमुख असते आणि कुटुंबाच्या मालमत्तेचा

वारसा तिच्या सर्वांत लहान मुलीकडे जातो. लग्न झाल्यावरही स्त्री माहेरीच राहते. तिचा पतीच तिच्या घरी येऊन राहतो किंवा फक्त रात्री तिला भेटायला येतो.

**विवाहप्रथा–** मातृप्रधान पद्धतीमुळे कुटुंबाचा पसारा वाढत जातो. तसा तो वाढून अनावर झाला की त्याचे भाग पाडून एकाची अनेक कुटुंबे बनवितात. त्या सर्व कुटुंबाचे मिळून एक घराणे समजतात. अशा एका घराण्यात लग्नसंबंध होत नाहीत. यांच्यांत बालविवाह रूढ नव्हता व नाही. वधू-वर परस्पराच्या पसंतीने पूर्व परिचयानंतर लग्न करतात. वडील मंडळी वधू-वरांची निवड करतात तेव्हा कुलगोत्र वगैरे पाहतात आणि वधूची संमती घेऊन मगच लग्न ठरवितात. त्यावेळी वधू-वर एकमेकांच्या हातात अंगठी घालतात.

लग्नसमारंभात पुरोहित सर्व देवतांना पाचारण करून, त्यांच्या साक्षीने लग्न लागल्याचे जाहीर करतो आणि वधू-वरांना शक्ती व चैतन्य देण्याबद्दल पूर्वजांची प्रार्थना करतो. सर्व समारंभात वेळोवेळी मद्य शिंपडणे हा महत्त्वाचा कार्यक्रम असतो.

**देवधर्म –** यु ब्लाय नोंग थाब या नावाचा एक परमेश्वर हे लोक मानतात. त्याला का लाय स्यिशार असे एक स्त्रीवाचक नावही आहे. त्याची नित्य पूजा केली जात नाही. फक्त संकट-समयी त्याची आराधना करतात. हे लोक मूर्तिपूजा करीत नाहीत. पण अलिकडे काही लोक काली व महादेव या हिंदू देवतांची उपासना करू लागले आहेत. उथ्लेन नामक सर्पदेवतेला हे फार भितात. तिला मनुष्यबळी देण्याची प्रथा पूर्वी होती. या लोकांची सर्पदेवतेवर श्रद्धा असते, तसाच भुताखेतांवरही विश्वास असतो. संकटकाळी त्याना शरण जाणे हाच याचा धर्म आहे. त्यांची काही भुते सुस्वभावी असून ती राज्य, ग्राम, धन, जल इत्यादीचे रक्षण करतात; तर बाकीची दुष्ट असून भिन्न भिन्न रोग उत्पन्न करतात. या सर्वांना कोंबडा किंवा बकरी बळी देऊन प्रसन्न करावे लागते.



खासी – युवती

पूर्वजांची पूजा करण्याची प्रथा या लोकांत आहे. त्यामुळे सर्व कुटुंबाचे रक्षण होऊन कुटुंबाला वैभव प्राप्त होते, अशी यांची समजूत आहे. हिंदूंच्या पिंडदानाप्रमाणेच खासी लोक पूर्वजांना अन्न अर्पण करतात. का ऐव बाय नामक मूळ स्त्रीला सर्व पूर्वजांत श्रेष्ठ मानून तिची विशेष आराधना करतात.

खासी धर्मगुरूला लिंगडोह म्हणतात. तो फक्त गावाचे किंवा राज्याचे पौरोहित्य करतो. खासीच्या कौटुंबिक विधींना पुरोहित लागत नाही. प्राचीन काळी या लोकांत धर्मगुरूचे काम बायका करीत. सध्या धर्मगुरू पुरुष असतो व त्याची मदतनीस म्हणून स्त्री काम करते. धर्मगुरुपद वंशपरंपरेने चालते. सर्व प्रकारचे बलिदान धर्मगुरूच्या उपस्थितीतच के जाते.

अलिकडे बरेच खासी स्वतःला हिंदू समजतात. ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या प्रयत्नांमुळे या लोकांत त्या धर्माचाही बराच प्रसार झाला आहे. ख्रिस्ती झालेले खासी अधिक स्वच्छ असतात, चांगला पोषाख करतात व मानाने राहतात. धर्माविषयी ते बरीच आस्था बाळगतात व रविवारी उत्साहाने चर्चमध्ये जातात.

कौल लावण्याचे अनेक प्रकार यांच्यात प्रचलित आहेत. अंडे फोडणे, धनुष्याची दोरी मधोमध धरून धनुष्याला झोका देणे, मूठभर कवड्या घेऊन त्या मोजणे (एकी–बेकी), दोन पाने एका दगडावर टाकून कोणती बाजू वर येते ते पाहणे, असे कौल पाहण्याचे विविध प्रकार असतात. कौल लावण्याच्या कृतीला खान म्हणतात व ती करणाऱ्याला नोंगखान म्हणतात.

**सण–उत्सव –** पोम ब्लांग हा खासी लोकाचा सर्वांत मोठा उत्सव होय. त्यात राज्यदेवतेची आराधना होते. हा उत्सव बहुधा मे महिन्यात होतो. त्यापूर्वी १०–१५ दिवस देवताची पूजाअर्चा चालू असते. उत्सवात नृत्य व बलिदान याना प्राधान्य असते.

**नृत्य –** यांचा मिश्र नाच फार प्रेक्षणीय असतो. सुंदर रेशमी वस्त्रे परिधान केलेल्या तरुणी मध्यभागी फेर धरतात व पुरुष हाती चवऱ्या घेऊन त्यांच्याभोवती नाचतात. मुलीच्या मस्तकावर चांदीचा किंवा सोन्याचा जिरेटोप असतो व त्याचे सर्व शरीर अलंकारांनी सजविलेले असते. पुरुषही सुंदर वेषभूषा करून डोक्याला पिसाचे तुरे लावतात आणि हाती ढाल–तलवार घेऊन द्वंद्वाचे नाटक करतात. या नृत्याला तंगमुरी, ढोल, झांजा, इ. वाद्यांची साथ असते.

खासी लोकाचे खासी, सिंतेंग, वार, भोई व लिंग्गम असे पोटभेद आहेत. या प्रत्येक पोटभेदात राजा, पुरोहित, मंत्री व सामान्य माणसे असे चार वर्ग असतात. याची अनेक संस्थाने असून, प्रत्येक संस्थानातील एका कुटुंबातून राज्याचा वारस निवडला जातो. राजपद बहुधा राजाच्या बहिणीच्या मुलाला मिळते. राजाला सीम म्हणतात. त्याची सत्ता मर्यादित असते.

तो मंत्रिमंडळाच्या साह्याने कारभार चालवितो. लोकांकडून त्याला करभार मिळत नाही. त्याच्या खास जमिनीचे उत्पन्न, लोकांनी खुशीने दिलेला नजराणा आणि व्यापारकर, यांवर त्याचा कारभार चालतो. न्यायदानासाठी सर्व सज्ञान माणसांचा दरबार भरवला जातो. प्राचीन काळी जलदिव्याच्या मदतीने न्यायनिवाडा होत असे. वादी-प्रतिवादींपैकी जो मनुष्य अधिक वेळ पाण्यात बुडी मारून राहील, त्याचा पक्ष खरा असे मानले जाई.



नृत्यवेषातील खासी युवती

**मृतिकप्रथा**— खासी लोक प्रेते जाळतात. मृत्यूनंतर तीन दिवस प्रेत घरातच ठेवतात. प्रथम त्याला गरम पाण्याने स्नान घालून मग कपडे व काही अलंकारही घालतात. नंतर त्याच्या मस्तकाला कच्चे सूत गुंडाळतात. दहनाच्या वेळेपर्यंत प्रेताला अन्न व पशुबली दिला जातो. मृताला परलोकाच्या प्रवासात उपयोगी पडावे म्हणून चितेवरही अन्न व द्रव्य ठेवतात. स्मशानातून परत जाण्यापूर्वी मृताला सुपारी देतात. त्यावेळी ' देवाकडे जाऊन सुपारी खात बैस, ' असा त्याला निरोप देतात. हे लोक मृताच्या अस्थीचे विसर्जन करीत नाहीत, तर त्या मडक्यात घालून जपून ठेवतात. तीन दिवस सुतक पाळतात व शेवटी स्नान करून शुद्ध होतात.

प्रत्येक घराण्यातील सर्व मृताच्या अस्थी एकत्र करून त्या एका मोठ्या थडग्यात ठेवण्याचा समारंभ काही वर्षांनी पार पाडला जातो. त्यातही नाचगाणे व बलिदान असतेच.

**दगडी स्मारके**— या लोकांनी तीन प्रकारची स्मारके बनविलेली आहेत — (१) स्तंभ— हे २ ते १४ फूट उंच असून वर निमुळते असतात. हे एका रांगेत उभे करतात. मधला स्तंभ सर्वात उंच असतो. (२) सपाट दगड — हे १५ ते ३० फूट लांब, १५ ते १६ फूट रुंद व १ ते २ फूट जाड असतात. (३) बुरूज— हे दगडावर दगड रचून बांधलेले असतात. त्यांत पूर्वजाच्या अस्थी ठेवतात.



खासींची दगडी स्मारके

**खासी भाषा**— हिंदुस्थानातील इतर मूळ देशी भाषांहून खासी ही अगदी निराळी भाषा आहे. मूळ धातू व शब्दांचे उच्चार या बाबतीत तिचे मंगोलियन भाषांशी साम्य आहे. खासी व हिंदुस्थानातील इतर अनार्य भाषा, यांत मुख्य फरक पुढीलप्रमाणे आहे—

खासी भाषेत प्रत्येक नामाचे लिंग ठरलेले असते; मग स्त्रीपुरुष—भेद त्या वस्तूत असो वा नसो. असाच लिंगभेद विशेषणे व क्रियापदे यांतही उपसर्ग लावून दर्शविला जातो. या भाषेत शब्दयोगी अव्यये शब्दाच्या पूर्वी उपसर्गाप्रमाणे जोडतात. षष्ठीचा संबंध दर्शविताना दोन शब्दातला षष्ठ्यन्त शब्द पुढे येतो. या सर्व नियमांमुळे वाक्यातील शब्दांचा क्रम फार बदलतो. खासी भाषेत संबंधी सर्वनाम आहे. हे सर्व नियम मोन—ख्मेर वर्गातील भाषांना धरून आहेत.

खासी भाषा इंडो—चिनी भाषांपैकी एक आहे, असे काही पंडितांचे मत होते; पण श्री. कूहन याने तिचा संबंध मोनख्मेर भाषांशी असल्याचे सिद्ध केले आहे.

इ. स. च्या १८ व्या शतकात खासी भाषा बंगाली लिपीत लिहिली जात असे. परंतु १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात ख्रिस्ती धर्मप्रसारकांनी ती भाषा रोमन लिपीत लिहिण्यास प्रारंभ केला व त्या भाषेत वाङ्मय निर्माण करून तिला स्थैर्य आणले. [ दि खासीज; भा. आ.; म. ज्ञा. को. ]

## खिचिंग

ओडिसातील भंज राजवंशाची प्राचीन राजधानी. भंज राजे हे चितोड येथील राजपुतांचे वंशज समजले जातात. यांची दोन घराणी होती. उत्तरेस खिचिंग या ठिकाणचे एक व दक्षिणेस खिजली या ठिकाणचे दुसरे. खिचिंगच्या घराण्याचा संस्थापक वीरभद्र याला आदिभंज समजतात. हा लांडोरीच्या अंड्यातून जन्मला व वसिष्ठ ऋषीने त्याचे पालनपोषण केले, अशी आख्यायिका सांगतात.

खिचिंग येथे दोन प्राचीन गडाचे अवशेष आढळतात. त्यांच्याभोवती तटबंदीही दिसते. त्यांपैकी एकाला विराटगड व दुसऱ्याला कीचकगड म्हणतात. भंज राजघराण्याची मुख्य देवता कीचकेश्वरी हिची इथली मूर्ती प्रेक्षणीय आहे. इथले नीलकंठेश्वराचे मंदिर ही प्राचीन काळातील एक मौल्यवान शिल्पकृती समजली जाते. इंडो-आर्यन पद्धतीचे ते एक छोटेसे मंदिर असले, तरी कलाकृतीच्या दृष्टीने ते भुवनेश्वर येथील मंदिराच्या तोडीचे आहे, असे म्हणतात. खिचिंग येथील बऱ्याचशा वास्तू ११ व १२ या शतकातल्या असाव्या. [भं. डा. म. खि.]

**खिद्दो** पंजाबात खेळला जाणारा मुलीचा एक खेळ. या खेळात एक मुलगी चेंडूला जमिनीवर कायम टप्पे देत राहते व त्यांची संख्याही मोजते. टप्पा चुकला, की तिचा डाव संपतो. अशा प्रकारे प्रत्येकी चार खेळाडू असलेल्या दोन विरुद्ध संघांत हा खेळ खेळला जातो. ज्या संघाच्या टप्प्यांची संख्या अधिक तो विजयी ठरतो. महाराष्ट्रात या खेळाला टप्प्यांचा चेंडू असे म्हणतात. [ पं. जी. सा. ]

**खिद्दो गुंडी** हॉकीप्रमाणे खेळला जाणारा एक खेळ. यामध्ये एका लाकडी दंडुक्याने चेंडू विरुद्ध पक्षाच्या गोलात पार करायचा असतो. हा खेळ मैदानी असल्याने याच्यामुळे शरीराला बराच व्यायाम होतो. यामध्ये प्रत्यक पक्षात ४ ते १२ खेळाडू असतात. साधारणपणे १०० फूट लांब व ५० फूट रुंद असे या खेळाचे क्षेत्र असून, गोलाची रुंदी २० फुटांपर्यंत असते.

प्रथम नाणेफेक करून प्रत्येक पक्ष खेळाची योग्य ती बाजू स्वीकारतो. पहिल्या प्रथम चेंडू मध्यावर ठेवला जातो आणि खेळाडूपैकी एकजण त्याला टोलवतो. जर चेंडू मर्यादेच्या बाहेर गेला, तर विरुद्ध पक्षाचा खेळाडू प्रतिपक्षाच्या गोलाच्या समोर चेंडू ठेवतो व गोलाच्या दिशेने तो मारतो. चेंडूला हाताचा व पायाचा स्पर्श होऊ न देण्याची दक्षता या खेळात घ्यावी लागते. ज्या पक्षाचे अधिक गोल होतील, तो विजयी ठरतो. [ पं. जी. सा. ]

**खिलजी राजवंश** (इ. स. १२९०–१३२०) गुलाम वंशानंतर दिल्लीवर राज्य करणारा एक वंश. अफगाणिस्थानातील खल्ज प्रांतात वसलेल्या लोकांना खल्जी किंवा खिलजी म्हणतात. हे लोक मूळचे अफगाण नसून तुर्की होते; पण खल्ज प्रांतात दीर्घकाळ वास्तव्य केल्यामुळे ते अफगाण मानले गेले. गजनीचा महंमूद व महंमद घोरी यांनी भारतावर स्वाऱ्या केल्या त्या वेळी बरेच खल्जी लोक भारतात येऊन स्थायिक झाले.

गुलामराजवटीत तुर्कांचे वर्चस्व होते. पण बंगाल प्रांत जिंकण्याच्या कामी ख़िलजी लोकांचे शौर्य बरेच उपयोगी पडले आणि त्यामुळे ते शिरजोर झाले. गुलाम घराण्यातील शेवटचा राजा कैकोबाद हा फार जुलमी होता. म्हणून खिलजी लोकांचा नेता जलालुद्दीन याने त्याचा खून करविला आणि त्याचा अल्पवयी मुलगा शमसुद्दीन याला गादीवर बसविले पण लवकरच त्याचाही खून करून जलालने दिल्लीचे तख्त स्वत च बळकावले (इ. स. १२९०). फिरोजशाह हे नाव धारण करून तो गादीवर बसला. त्यावेळी तो ७० वर्षांचा होता. तो शरीराने व मनानेही दुबळा असल्यामुळे त्याचा कारभार ढिला ठरला. त्याने ५–६ वर्षेच राज्य केले. त्याच्या अतिदयाळूपणामुळे राज्यात अंदाधुंदी माजली आणि अनेक सरदार त्याच्या विरुद्ध कारस्थाने करू लागले.

जलालचा जावई अलाउद्दीन हा महत्त्वाकांक्षी होता. तो कडामाणिकपूर प्रांताचा सुभेदार असताना त्याने भिलसावर स्वारी करून बरीच लूट मिळविली. तेव्हा जलालुद्दिनाने त्याला अयोध्या प्रांताची सुभेदारी दिली. इ. स. १२९६ च्या प्रारंभी त्याने अचानक देवगिरीवर स्वारी करून रामदेवरावाचा पराभव केला आणि त्याच्याकडून पुष्कळ खंडणी घेतली. नंतर त्याने आपल्या सैन्यात बरीच वाढ केली आणि जलालुद्दिनाला कपटाने ठार मारून तो दिल्लीचा अधिपती बनला.



अलाउद्दीन खिलजी

सत्ता हाती येताच अलाउद्दिनाने जलालुद्दिनाचा विश्वासघात करणाऱ्यांना जबर शिक्षा दिल्या आणि इतर लोकांना सढळ हाताने बक्षिसे देऊन वश केले. त्याच्या कारकिर्दीत अनेक बंडे झाली; पण ती त्याने लगेच मोडून काढली. जलालुद्दिनाच्या मुलाचाही त्याने पूर्ण बंदोबस्त केला.

अलाउद्दिनाच्या वेळी मोगलांनी भारतावर चार स्वाऱ्या केल्या. पण प्रत्येक वेळी अलाउद्दिनाच्या सरदारांनी त्यांचा पराभव केला व त्यांची खूप कत्तलही केली.

इ. स. १२९८ साली अलाउद्दीनाने उलुघखान व नुस्रतखान यांना गुजरातवर पाठवले. आपल्यावर चढाई होते असे पाहताच अणहिलवाडचा राजा कर्णराय पळून गेला व त्याची राणी कमलादेवी शत्रूच्या हाती सापडली. तीच पुढे अलाउद्दिनाची पट्टराणी झाली. या स्वारीत मुसलमानांनी सोमनाथाचे मंदिर पुन्हा लुटले व तिथल्या मूर्तीचे तुकडे दिल्लीस नेऊन मशिदीच्या पायासाठी वापरले. त्यानतर इ. स. १३०१ साली अलाउद्दिनाने स्वतः राजस्थानातील रणथंभोरच्या किल्ल्यावर स्वारी केली. तिथल्या हंबीरदेवाचा प्रधान फितुर झाल्यामुळे अल्लाउद्दिनाला तो किल्ला सर करता आला. किल्ला हाती येताच त्याने तिथल्या राजासह सर्व लोकांचा संहार केला.

अलाउद्दिनाच्या कारकिर्दीतली सर्वांत महत्त्वाची घटना म्हणजे त्याची चितोडगडावरची स्वारी ही होय (इ. स. १३०३). चितोडची राणी पद्मिनी हिच्या सौंदर्याची ख्याती

ऐकून, तिच्या अभिलाषेमुळेच त्याने हे साहस केले होते, असे म्हणतात. पण या कथेला फारसा ऐतिहासिक आधार मिळत नाही. राजपुतांनी त्याला निकराचा प्रतिकार केल्यामुळे सुमारे सात महिनेपर्यंत अलाउद्दिनाला यश मिळाले नाही; पण पुढे लढाईचे पारडे फिरले आणि हजारो राजपूत वीराचा सहार करून अलाउद्दिनाने चितोडगड काबीज केला.

देवगिरीचा रामदेवराव खंडणी पाठविनासा झाला म्हणून इ. स. १३०७ मध्ये अलाउद्दिनाने आपला सरदार मलिक काफूर याला दक्षिणेत पाठविले. काफूरने त्या स्वारीत सर्व महाराष्ट्रभर लुटालूट केली व रामदेवरावाला पकडून दिल्लीस नेले. मात्र अलाउद्दिनाने रामदेवरावाचा सन्मान केला व त्याला छत्र, राजाधिराज हा किताब व एक लाख रुपये बक्षीस देऊन प्रतिष्ठेने स्वदेशी जाऊ दिले. इ. स. १३०८ साली अलाउद्दिनाने सर्व राजस्थानावर आपली सत्ता स्थापन केली.

इ. स. १३१० साली मलिक काफूरने आंध्र देशाची राजधानी वरगळ जिंकून घेतली आणि १३११ साली द्वारसमुद्रम् येथील बल्लाळाचे राज्य बुडविले. त्यानतर त्याने थेट मदुरेपर्यंत धडक मारली. पांड्य राजांनी त्याला पुष्कळच विरोध केला; पण त्याच्या रेटचापुढे त्याचा टिकाव लागला नाही. या स्वारीत मलिक काफूरने चिदंबरम्, श्रीरंगम्, वीरधूल, मदुरा, इ. अनेक ठिकाणची मदिरे उद्ध्वस्त केली आणि अपार सपत्ती लुटून दिल्लीस नेली. इ. स. १३१३ मध्ये काफूरने पुन्हा एकदा देवगिरीवर स्वारी केली व रामदेवरावाच्या मुलाला ठार मारले. अशा प्रकारे अलाउद्दिनाच्या कारकिर्दीत सबध महाराष्ट्र मुसलमानाच्या ताब्यात गेला.

अलाउद्दीन खिलजी याने वीस वर्षे दिल्लीवर राज्य केले; पण शेवटची चार वर्षे तो मलिक काफूरच्या आहारी गेल्यामुळे राज्यात अदाधुदी माजली. शेवटी इ. स. १३१६ मध्ये अलाउद्दीन मरण पावला. तो छांदिष्ट, कपटी व निर्दय असला, तरी त्याचा राज्यकारभार प्रशंसनीय होता. तो शूर व कुशल सेनानीही होता. त्याला विद्येचा गंधही नव्हता; पण त्याची बुद्धी मात्र तीक्ष्ण होती. त्यामुळे त्याला प्रत्येक कामात यश मिळत गेले. पुढे त्या यशामुळेच तो उद्दाम बनला. त्याने दुसरा शिकंदर असे नाव धारण केले. आपण पैगंबर व्हावे असेही त्याच्या मनात होते.

अलाउद्दिनाच्या पश्चात् मलिक काफूर याने त्याच्या बेगमेस हाकलून दिले आणि त्याचा मुलगा व भाऊ यांना आंधळे केले. नंतर काफूरने अलाउद्दिनाच्या शहाबुद्दीन नावाच्या दुसऱ्या भावास तख्तावर बसविले. परंतु पुढे लवकरच काफूरचाही खून झाला आणि इ. स. १३१७ मध्ये अलाउद्दिनाचा दुसरा मुलगा मुबारकशहा याने शहाबुद्दिनाला पदच्युत करून स्वतः राज्य बळकावले. त्याने हसन नावाच्या आपल्या एका आवडत्या गुलामाला मलिक खुश्रू ही पदवी आणि वजीरीही दिली.

मुबारकशहाने गुजरात व देवगिरी येथील बडे स्वतः मोडून काढली. अलाउद्दिनाने निष्कारण कैदेत टाकलेल्या लोकाना त्याने सोडून दिले. त्याने रयतेच्या जप्त केलेल्या जमिनीही सोडून दिल्या व जाचक करही बद केले. त्यानंतर तो व्यसनाधीन झाला व सर्व कारभार खुश्रू पाहू लागला.

खुश्रूने करडा अमल गाजविला. त्याने मलबारवर स्वारी करून खूप लूट आणली. पुढे राज्यात बेबंदशाही सुरू झाली. सर्वत्र महागाई वाढली व ठायी ठायी बंडाचे उठाव होऊ लागले. खुश्रूने ती बडे मोडण्यासाठी खूप दडपशाही केली आणि शेवटी इ. स. १३२० त त्याने मुबारकचा खूनही केला.

खुश्रू हा मूळचा हिंदू होता. त्याने नासिरुद्दीन या नावाने एक वर्षभर दिल्लीवर राज्य केले. त्याच्या आश्रयाने त्याच्या जातीचे हजारो हिंदू गुजरातमधून दिल्लीस आले होते. त्यानी मुसलमानांविरुध्द उचल केल्यामुळे बरेच मुसलमान चिडले व त्यांनी बंड केले. शेवटी पंजाबचा सुभेदार गाजीबेग तुगलक याने दिल्लीवर स्वारी करून खुश्रूला ठार मारले आणि तो स्वतः गयासुद्दीन तुगलक या नावाने गादीवर बसला. अशा प्रकारे खिलजी वंशाचा शेवट झाला. [ म. ज्ञा. को.; दे. सु. ]

**खिलात** याचा मूळ अर्थ बहुमानाचा झगा किंवा पोषाख असा असून, तो बादशहाकडून सरदारास बक्षीस मिळत असे. या पोषाखाबरोबरच घोडा, हत्ती, तलवार, पागोटे, अंगरखा, शेला, शिरपेच, कठा इ. वस्तूही देत. थोरल्या बाजीरावाला व सवाई माधवरावाला दिल्लीच्या मुसलमान राज्यकर्त्यांनी खिलात पाठवली होती. [ म. ज्ञा को. ]

**खीचपुरी** महानुभावांचा एक पूजावसर. शक्य होतील तेवढी पक्वान्ने करून पंचकृष्णांना नैवेद्य दाखविणे, याला खीचपुरी म्हणतात. हा उत्सव महानुभाव पथातले महंत करतात. त्या प्रसंगी मंडप उभारून त्यात सिंहासन मांडतात व त्यावर विशेषांची स्थापना करून त्या निमित्त मोठे अन्नदानही करतात.

**खुजा** ठेंगण्या स्त्री-पुरुषांना संस्कृतात कुब्ज असे नाव आहे. त्याचाच मराठी अपभ्रंश खुजा होय. प्राचीन काळी राजे, युवराज व युवराज्ञी यांच्या लवाजम्यात खुजे स्त्री-पुरुष मुद्दाम ठेवलेले असत ( अर्थ. पृ. ४४). त्यांचे

चमत्कारिक दिसणारे शरीर व उग्र चेहरा यामुळ ते लोक नजरेत भरत. वाङमयात त्यांचे उल्लेख आढळतात. शिल्पातही त्यांच्या प्रतिमा कोरलेल्या दिसतात. अमरावती येथील बौद्ध स्तूपाच्या कठड्यावर खुजे कोरलेले आहेत. तांबूल-करडक, आरसा, दागिन्याची पेटी, छत्रचामरे, इ. वस्तू नेण्याआणण्याचे काम या खुज्यांकडे असे.

**खुट** मुंड खेड्यात राहणाऱ्या एकाच देवकाच्या लोकांची एक शाखा. या शाखेचे दोन पोटभेद असून त्याची नावे पहाडखुट व पदखुट अशी आहेत. गावचा पाटील हा कनिष्ठ शाखेचा म्हणजे पदखुट असतो. या दोन्ही शाखांच्या लोकांना पितरांच्या पूजेत एकत्र भाग घेता येत नाही. एखादा खुट आपल्या पितरांची पूजा करून त्यांना बळी अर्पण करतो, तेव्हा दुसऱ्याला त्या पूजेतील तांदळाची दारू अगर मास स्वीकारता येत नाही. या दोन्ही खुटांचे देवक एकच असल्याने त्यांच्यांत विवाहसबध होत नाहीत.

नागुरी प्रदेशातील खेड्यात महतो नावाचा तिसरा खुट असतो. मुड आणि पहाण या लोकाना मदत करणे, हे त्याचे काम असते. [ एन्सा. मुं. ]

**खुड़ियो खाती** राजस्थानातील एक खेळ. खेळणाऱ्या मुलांपैकी कुणी तरी स्वेच्छेने स्वत:वर राज्य घेतो. त्या मुलाला खुडियो खाती म्हणतात. मग इतर मुले त्याचा एक हात त्याच बाजूच्या पायाला बांधतात व दुसऱ्या रिकाम्या हाती डोका नावाचे एक लाकडी भाडे देऊन त्याला इकडे तिकडे ढकलतात. तो डोक्याच्या साहाय्याने प्रत्येकाला शिवायचा प्रयत्न करतो. त्या वेळी बाकीची मुले त्याच्या डोक्यावर चापट मारतात व 'खुडियो खाती गऊ चरावै ले ले, लाठा मारण आवै' असे वारंवार म्हणून त्याला चिडवतात. नंतर तो ज्याला शिवेल, त्याच्यावर खुडियो खाती बनण्याची पाळी येते. [मरुभारती]

**खुतबा** याचा अर्थ धार्मिक उपदेश असा आहे. मशिदीत नमाज पढल्यावर दर शुक्रवारी दुपारच्या प्रार्थनेच्या वेळी जे प्रवचन केले जाते, त्याला खुतबा म्हणतात. जुम्म्याच्या दिवशी प्रार्थना करणे व प्रवचन ऐकणे याला कुराणात महत्त्व दिलेले आहे (सूरा ६२.९). स्वत: मुहंमद पैगंबर अशी प्रवचने देत असे व ती अहादीस या ग्रंथात संग्रहीत केलेली आहेत. प्रवचन करणाऱ्या व्यक्तीला खतीब किंवा खित्वा म्हणतात. इदुल-फित्र व इदुल-अझहा या सणांच्या दिवशी खुतबा पढला जातो. या प्रकारात मुहंमद पैगंबर, त्याचे सहकारी आणि खलीफा यांची स्तुती गायलेली असते. मुसलमान बादशहा राज्यारूढ होताना खुतबा पढतात.

मुहंमद पैगंबराच्या जीवनावर आधारित इब्न इसहाक या ग्रंथात पैगबराने स्वत: दिलेल्या खुतब्यावरून याचे मूळरूप समजून येते. त्याच्या अंतिम भाषणाला खुत्बत-अल्-विदा म्हणतात. यामध्ये पैगंबराने सर्व धर्मसिद्धांतांची चर्चा केलेली आहे. खुतबा हा सक्षिप्त असावा, असे पैगंबराचे मत होते. सध्या अरबी भाषेत खुतबा सांगतात. त्याचे विषयही ठराविकच असतात. [ हिं. वि. को.; सु. वि. को.; डि. इ. ]

**खुदुर्कुनी ओसा** ओडिसातले एक स्त्रीव्रत. भावजयानी आपल्याला छळू नये, म्हणून कुमारिका हे व्रत करतात. ओडिसातील ब्राह्मणेतर जातीत या व्रताची चाल आहे. भाद्रपदातील प्रत्येक रविवारी सकाळी कुमारिका नदीवर किंवा तळ्यावर स्नान करतात. मग मंगलादेवीची मृण्मय प्रतिमा बनवून तिची पूजा करतात. त्या दिवशी उपवास करतात. या व्रताची कथा अशी—

एका व्यापाऱ्याला सात मुलगे व एकुलती एक मुलगी होती. तो मेल्यावर सातही भाऊ व्यापाराच्या निमित्ताने बाहेरगावी गेले. इकडे त्याच्या बहिणीला सर्वात धाकट्या भावजयीशिवाय इतर सर्व भावजया छळू लागल्या. तिला शेळ्या राखण्याचे काम करावे लागे. एकदा घरमोई नावाची तिची शेळी हरवली असता, तिने मगलादेवीची प्रार्थना केल्यावर ती परत आली. परंतु तिचा छळ काही कमी झाला नाही. तिचे भाऊ परत घरी आल्यावर त्यांना ही सर्व हकीगत समजली. त्यांना आपल्या वायकांचा राग आला व त्यांनी त्यांची नाके कापून त्यांना हाकलून दिले. त्या वेळेपासून कुमारिका हे व्रत करू लागल्या. [ स्ट. ओ. फो. ]

**खुद्दकनिकाय** सुत्तपिटकाच्या पाच निकायांपैकी एक. यात धम्मपद, उदान, इतिवुत्तक, सुत्तनिपात, थेर-थेरीगाथा, जातक, इ. सोळा ग्रंथांचा समावेश आहे. यातल्या काही ग्रथांत बुद्धवचनांचा अधिकृत संग्रह केलेला आहे.

**खुमान बंदीजन** (इ. स. १८ व्या शतकाचा उत्तरार्ध) एक कवी. छतरपुर राज्यातल्या खरगवा या गावचा रहिवासी. हा जातीचा बंदी होता. महाराज विक्रमसाही या राजाचा त्याला आश्रय होता. कोणी म्हणतात, की खुमान हा जन्मांध होता व एका यतीच्या कृपेने त्याला कवित्वस्फूर्ती

झाली होती. याने संस्कृत व हिंदी या दोन्ही भाषांत ग्रंथरचना केली आहे.

खुमानाने पुढील ग्रंथ लिहिले आहेत– अमरप्रकाश– अमरकोशाचा अनुवाद, अष्टजाम– आश्रयदात्या राजाची दिनचर्या, नृसिहचरित्र, नीतिविधान, हनुमतपचीसी, हनुमतनखशिख, हनुमानपंचक, समरसार व लक्ष्मणशतक. शेवटचा ग्रंथ खुमानचा कीर्तिस्तंभ मानला जातो. याने आपल्या हिंदी रचनेत व्रज भाषेचा वापर केला आहे. [ हि. सा. को.–२ ]

**खुसी विश्वासी** मुसलमानांचा एक पंथ. कृष्णनगरात राहणाऱ्या खुसी विश्वास या मुसलमान माणसाने हा पंथ स्थापला. या पंथाचे लोक औरंगदेवाचा जप करतात व सगुण ईश्वराची पूजा करीत नाहीत. [ वै. शै. म. व. ]

**खेचरीमुद्रा** (१) योगसाधनेतील एक मुद्रा. या मुद्रेत चित्त व जीभ ही दोन्ही खे = आकाशात राहतात, म्हणून हिला खेचरी असे नाव मिळाले आहे. या मुद्रेची साधना करतात, ती अशी–

प्रथम पद्मासन घालून बसतात. मग दृष्टी दोन्ही भुवयांच्या मध्ये स्थिर करण्याचा प्रयत्न करतात. तो साध्य झाल्यावर जीभ दुमडून तिचे टोक टाळूमध्ये पडजिभेजवळच्या रंध्रात खुपसतात. ही गोष्ट सहजासहजी साध्य होत नाही. त्यासाठी प्रथम जिभेची लांबी वाढविणे आवश्यक असते. ही लांबी वाढविण्याचे उपाय पुढीलप्रमाणे असतात–

धार काढताना गाईचा आचळ ओढतात, त्याप्रमाणे जीभ रोज थोडीथोडी ओढीत राहणे.

जिभेला मध व मिरपूड लावून ती पुढे ओढणे.

जिभेच्या खालच्या सांध्यातला पडदा कापणे.

लोखंडाच्या सळईने दाबून दाबून जीभ वाढविणे.

अशा प्रकारे जीभ लांबवून तिला पडजिभेजवळच्या रंध्रात घुसविल्याने खेचरी मुद्रा साध्य होते. ही मुद्रा साध्य झाली, की योग्याला सहस्रारकमलातून नित्य पाझरणाऱ्या अमृताचे प्राशन करता येते. त्यामुळे त्याला दिव्य आनंदाचा अनुभव घडतो. मृत्युसमयी त्याचा प्राणही ब्रह्मरंध्रातून प्रयाण करीत असल्यामुळे त्याला मोक्षगती सहजपणे प्राप्त होते. ही मुद्रा साध्य झाल्यानंतर योग्याला क्षुधातृषेची बाधा होत नाही.

कौलमार्गात या खेचरी मुद्रेलाच सांकेतिक अर्थाने गोमांसभक्षण म्हणतात. गो=इंद्रिय किंवा जीभ आणि तिला उलटी करून टाळूला लावणे म्हणजे गोमांसभक्षण होय. [ हिं. सा. को; शिवसंहिता; गा. म. वि. ].

(२) डावा हात उजव्या तळहातावर ठेवणे, कनिष्ठिकेने अनामिका धरणे, मध्यमा तर्जनीने दाबणे व दोन्ही अंगठे सरळ ठेवणे, असाही खेचरी मुद्रेचा एक वेगळा प्रकार आहे. [ क्रि. स्ट. ले. उ. ]

(३) एक वर्णशक्ती व मुद्रादेवी [ पु. इं. ]

**खेटक** (१) देवीच्या हातातले काठीसारखे एक आयुध. दुर्गापूजेत तिच्या खेटकाचीही पूजा सांगितली आहे. त्याविषयी श्लोक असा–

**यष्टिरूपेण खेट त्वमरिसंहारकारकः ।**
**देवीहस्तस्थितो नित्यं मम रक्षां कुरुष्व च ।।**

अर्थ – हे खेटा, तू यष्टिरूपाने शत्रूचा संहार करणारा आहेस. तू नित्य देवीच्या हातात असतोस. तू माझे रक्षण कर.

(२) ढालीचा एक प्रकार. ही गेंड्याच्या किंवा रानरेड्याच्या कातड्यापासून बनवतात.

**खेट–खर्वट** प्राचीन काळी विशिष्ट पद्धतीने वसलेल्या खेड्यांना खेट व खर्वट म्हणतात. मानसार ग्रंथात दुर्गयुक्त वस्तीला खेट–खर्वट म्हटले आहे. खेट म्हणजे खेडेगाव आणि खर्वट म्हणजे त्याचाच एक प्रकार होय. ग्रामीण प्रदेशातील घरांच्या छोट्या समुदायाला खेडेगाव म्हणतात. खेडेगाव हा स्थायिक वस्तीचा अतिप्राचीन नमुना होय.




खेट
(१) नदीकिनारा. (२) बंदर. (३) बाजार.
(४) धान्य- कोठारे. (५) सरदाराचा निवास.
(६) टेहळणीसाठी मनोरे

**खेट**–याचा भूप्रदेश व रचना विशिष्ट प्रकारची असते. राणीखेट हे अलमोडा जिल्ह्यातले एक गाव आहे. त्याच्या रचने-

वरून खेटपद्धतीची वस्ती टेकडीच्या माथ्यावर, टेकड्यांच्या दरीत किंवा टेकडीच्या पायथ्याशी असे, असे वाटते. खेट ज्या जागेवर वसले असेल, त्याला सोयिस्कर अशी त्याची रचना असे. तथापि स्थापत्यग्रंथात त्याची रचना सांगितली आहे, ती अशी— खेट हे धनुष्याकार वसलेले असते. त्याचे तोंड नदीकडे किंवा पाणी पुरवणाऱ्या कोणत्याही जलाशयाकडे असते. याच्या अर्धवर्तुळाचे भाग अर्धदशकोणाच्या पाच बाजूंप्रमाणे करतात. बाणाच्या आकाराच्या तीन मुख्य सडकाच्यामुळे खेटाचे सुमारे पंधरा भाग होतात आणि त्यामध्ये निरनिराळ्या जातीची पृथक् पृथक् वस्ती मांडलेली असते.

**खर्वट** – या प्रकारच्या रचनेची वस्ती सांप्रत उपलब्ध नाही; पण स्थापत्यशास्त्राच्या ग्रंथावरून खर्वटाची रचना समजते, ती अशी— खर्वट हे वर्तुळाकार वसलेले असते. त्याच्या मध्यबिंदूवर देवालय असते आणि सगळी वस्ती त्या देवालयाभोवती मांडलेली असते. खर्वटात मध्यवर्ती वर्तुळाच्या परिघाशी संपणारे असे आठ रस्ते असतात आणि चार वाटोळ्या




खर्वट

(१) मंदिर. (२) स्थापत्यविशारद व कारागीर. (३) सार्वजनिक इमारती. (४) क्षत्रिय. (५) राजवाडा. (६) सरदार. (७) मंत्री. (८) पुरोहित. (९) वैश्य. (१०) चौकीदार (११) डोंगर.

मुख्य सडका असतात. हे रस्ते आणि मोठ्या सडका यांच्यामुळे खर्वटाचे बाव्वीस भाग होतात. त्याच्यासभोवती तट असतो आणि तटाच्याभोवती खंदक असतो. खर्वट अरण्यात असेल, तर त्याच्याभोवती खंदक असण्याची जरुरी नसते.

खर्वटाच्या संरक्षणासाठी त्यात चतुर्भुज कुमाराची स्थापना करावी, असे मत्स्यपुराणात सांगितले आहे.

**खेड ब्रह्मा** गुजरातमधील एक देवस्थान. हे ठिकाण अहमदाबादपासून सुमारे ९० मैलावर हिरण्याक्षी किंवा हरणाव या नदीच्या तीरावर आहे. इथे ब्रह्म्याचे मंदिर असून, आत ब्रह्मदेवाची चतुर्मुख मूर्ती आहे. जवळच एक कुंड आहे. महाशिवरात्रीला इथे जत्रा भरते व ती १५ दिवस चालते. इथे हिरण्याक्षी, कोसंबी व भीमाक्षी या तीन नद्यांचा संगम झाला आहे. ब्रह्मदेवाच्या मंदिरापासून अर्ध्या मैलावर अंबाजीचे मंदिर व धर्मशाळा असून पलीकडच्या तीरावर भृगुऋषीचा आश्रम आहे. [ वि. मुं. रा. प. ]

**खेडावाळ ब्राह्मण** गुजरातमध्ये आढळणारी ब्राह्मणाची एक जात. त्यांच्यांत बाज व भितरे अशा दोन पोटजाती आहेत. त्याच्या उत्पत्तीविषयी कथा पुढीलप्रमाणे—

सुमारे हजार वर्षांपूर्वी श्रीरंगपट्टणाहून शंकर जोशी आणि शोड दवे हे दोघे ब्राह्मण खेडा या गावी येऊन राहिले. त्यावेळी तिथे मोरध्वज नावाचा राजा राज्य करीत होता. त्याला पुत्र नव्हता. तो व्हावा म्हणून त्याने ब्राह्मणांना दान देण्याचे ठरवले. परंतु काही थोड्यांनीच ते दान घेतले व बाकीच्यांनी ते घेण्याचे नाकारले. दान न घेणारे लोक खेडा सोडून सुरेली, घुमतेली, खडाली, सांडली, इ. चौव्वीस गावात जाऊन राहिले. त्यांना बाज असे म्हणू लागले. दान घेणारे खेड्यातच राहिले. म्हणून ते भितरे ( भितर = आत राहिलेले ) ठरले.

भितरे भिक्षुक आहेत. त्यांच्यात व बाज ब्राह्मणांत रोटीव्यवहार होतो; पण बेटीव्यवहार होत नाही. बाज हे जमीनदार व सावकारी करणारेही आहेत. ते बंगाल, मद्रास या ठिकाणी राहून जवाहिराचा व्यापार करतात. गुजरातशीही त्यांनी अद्यापि संबंध कायम ठेवला आहे. त्यांच्या स्त्रिया जातिभोजनास जात नाहीत. बाजांची वस्ती मुख्यत्वे उमरेठ येथे असून, भितऱ्यांची डभोई, सुरत व बडोदा या ठिकाणी आहे. [ वि. मुं. रा. प. ]

**खेतसी** एक भाट. जोधपूरचा महाराजा अभयसिंह याच्या आश्रयाखाली हा होता. याने महाभारताच्या १८ पर्वांचा डिंगल भाषेत साराशरूपाने अनुवाद केला असून, भाषाभारत या नावाने तो प्रसिद्ध आहे. याचा रचनाकाल इ. स. १७३३ असून, डिंगल भाषेतील ग्रंथांत हा ग्रंथ प्रथम श्रेणीचा मानला जातो. [ रा. भा. उ. सा. ]

**खेत्री** एक जात. यांची वस्ती मुख्यत्वे कर्नाटकात आढळते. संस्कृत क्षेत्र = शेत, यावरून यांना हे नाव मिळाले असावे. कारण शेती हा यांचा प्रमुख व्यवसाय आहे. यांच्या लग्नाच्या वेळी देशस्थ ब्राह्मण, कट्टिमनी (जातीतील माणूस) आणि ओष्टमा ब्राह्मण या तीन व्यक्ती आवश्यक असतात. खेत्रींना मद्य-मांस चालते. हे मृतांना जाळतात. श्राद्ध करीत नाहीत. [ मु. इ. जा. ]

**खेमदास** ( १ ) (१७ व्या शतकाचा उत्तरार्ध) एक दादूपंथी संत. हा रज्जबजीचा शिष्य होता. याचे कर्म-धर्मसंवाद, सुखसंवाद, चितवणीयोगसंग्रह व साखी असे चार ग्रंथ आहेत. राजस्थानी भाषेचा हा पंडित समजला जातो. याची भाषा प्रौढ व परिष्कृत आहे. याहून याची अधिक माहिती मिळत नाही. [ रा. भा. उ. सा. ]

( २ ) (१८ व्या शतकाचा उत्तरार्ध) एक संत कवी. जातीचा कान्यकुब्ज ब्राह्मण. याच्या चरित्राविषयी माहिती मिळत नाही. एवढेच कळते, की हा हरिसंकरी गावात राहत होता. याने बारा वर्षे घोर तप केले व नंतर जगजीवनदास याच्याकडून दीक्षा घेतली. काशीखड, तत्त्वसार, दोहावली व शब्दावली असे याचे ग्रंथ असल्याचे सांगतात. [ उ. भा. स. प. ]

**खेमप्पकरण** एक बौद्ध ग्रंथ. परमत्थदीप असे याचे दुसरे नाव आहे. हा ग्रंथ खेमगुरूने लिहिला असून, त्यात चित्त या विषयावर छोटी छोटी प्रकरणे आहेत. कुशल व अकुशल धर्माच्या व्याख्याही यात दिल्या आहेत. अभिधम्ममधील पदाचा अर्थ देणारी अठ्ठावीस श्लोकाची ही एक टिपणीच आहे. सिलोनमध्ये या ग्रंथाला नाम-रूप–समास अशी सज्ञा आहे व तीच अधिक यथार्थ वाटते. सिलोनमधील वाचिस्सर महासामीने इ. स. च्या बाराव्या शतकात या ग्रंथावर भाष्य लिहिले आहे. [ ए. इं. क. ]

**खेर** पंजाबमधील एक देवता. हिला भूमिया देवाची बायको समजतात. ही शेतांचे संरक्षण करते, अशी समजूत आहे. [ फो. लो. नॉ. इं. ]

**खेरिया** एक जात. बंगालमधील मानभूम जिल्ह्यात ही आढळते. सवार खेरिया व पहाडिया खेरिया असे खेरियांचे दोन पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर लग्नसंबंध होत नाही. खेरियाची अकरा गोत्रे असून ते सगोत्रविवाहही करीत नाहीत. खेरिया स्वत.ला वालीपुत्र अगदाचे वंशज समजतात. हे सपाटीची व डोंगरावरची अशी उभयविध शेती करतात. यांची जातपचायत असते. पचायतीची आज्ञा न मानील त्याला हे बहिष्कृत करतात. खेरिया सूर्याला धर्म समजतात प्रत्येक वर्षी प्रत्येक खेरिया एका तरी कोंबड्याचा अथवा कबुतराचा देवाला बळी देतो.

**मर्तिकप्रथा**— प्रेते जाळतात किंवा पुरतात. प्रेत पुरायचे झाल्यास त्याच्या उजव्या हाताची करांगुळी तोडतात व ती एका मातीच्या भाड्यात ठेवून देतात. मृतासाठी स्तंभ उभारतात आणि तोडलेली करांगुळी ठेवलेले ते पात्र दहाव्या दिवशी त्या स्तभाखाली पुरून टाकतात. प्रेत जाळले असल्यास त्याच्या कवटीची हाडे बाजूला काढून ठेवतात व ती स्मृतिस्तंभाखाली पुरतात. प्रत्येक घराण्याला स्मृतिस्तंभासाठी गावाबाहेर वेगवेगळी जागा असते. खेरियांची समजूत आहे, की मृतात्मे इंद्रपुरीला गेल्यावर तिथे त्याच्या पाप-पुण्याचा अखेरचा निवाडा होतो. [ से. इं. १९३१ ]

**खेलमा कुकी** कुकी जमातीचा एक पोटभेद. हे लोक उत्तर काचार टेकड्यांमध्ये राहतात. यांच्यांत तेराहून अधिक गोत्रे आहेत. सर्व गोत्रे समान आहेत. प्रत्येक गोत्राचा एक प्रमुख असतो, त्याला खलिम म्हणतात. जातीचे सर्व प्रश्न तो आपल्या अधिकारात सोडवतो.

खेलमा कुकीची घरे लाकूड आणि बांबू यांची असतात. छप्पर केंबळी असते.

**विवाहप्रथा**— यांच्यांत सगोत्रविवाह सक्तीचा आहे. गोत्रांतरविवाह होत नाहीत, असे नाही; पण ते अधार्मिक समजले जातात. अशा विवाहितांना आपल्या आईबापांचा अंत्यविधी करता येत नाही. त्यामुळे प्रत्येक कुटुंबातल्या एका मुलाचे तरी त्याच्याच गोत्रातल्या मुलीशी लग्न होते. ती अन्य गोत्राची असेल, तर तिला नवऱ्याच्या तेलाला व फणीला स्पर्श करता येत नाही. मुलांना तेलपाणी करायचे, तर तेही नणंदेकडून करून घ्यावे लागते.

**मर्तिकप्रथा**—श्रीमंत लोक प्रेते जाळतात व गरीब पुरतात. पुरल्यानतर त्या खड्डयावर एक बाबू रोवतात व त्याच्या टोकाला पाढरे फडके टांगतात. माणूस अपघाताने मेला असल्यास लाल फडके टांगतात. मृतात्मे मार्सी नावाच्या विशिष्ट लोकात वास्तव्य करतात, अशी त्यांची समजूत आहे. [ से. इं. १९३१ ]

**खेलवना** पुत्रजन्माच्या वेळी सोहर गीतांप्रमाणे म्हटला जाणारा एक गीतप्रकार. पुत्रप्राप्तीसाठी आसुस-

लेली माता, गर्भवेदनांनी व्याकुळ झालेली तरुणी, सुनेच्या मंगलकार्यात मग्न झालेली सासू, इ. विषय सोहरगीताच्या क्षेत्रात येतात; तर नवजात शिशूचे रडणे, मातेला झालेला पुत्रजन्माचा आनंद, कुळात प्रथमच पुत्र जन्मल्यामुळे पित्याला होणारा आनंद, हे खेलवना गीताचे विषय आहेत. सोहर व खेलवना ही गीते उ. भारतात प्रचलित आहेत. [ हि. सा. को. ]

**खेळ** मानवी जीवनात खेळांना फार महत्त्वाचे स्थान आहे. मनुष्याला पुष्कळदा चिंता व अडचणी याचा त्रास होत असतो. अशा त्रासदायक स्थितीतून थोडा वेळ तरी सुटका होण्यासाठी खेळ खेळणे हाच एक उत्तम मार्ग होय. खेळण्यात मन रमले, की अडचणीचा विसर पडतो आणि मनाला विसावा मिळून ते ताजेतवाने होते. नित्याच्या श्रमामुळे शरीर थकते, तसे चिंतेमुळे मनही थकते. मनाला विश्रांती मिळाली नाही, तर त्याचा परिणाम शरीरावरही होतो व आरोग्य बिघडते. म्हणून आरोग्यरक्षणासाठी मनोरंजक खेळाची आवश्यकता नेहमीच असते.

मनोरंजनाप्रमाणेच व्यायामाच्या दृष्टीनेही खेळाचे महत्त्व आहे. नमस्कार, जोर, बैठका, इ. व्यायामांमुळे शरीर सुदृढ होते, यात शंका नाही. तथापि मैदानी खेळ खेळताना त्यात व्यायामाबरोबरच उत्साहही लाभतो. कबड्डी, खोखो, टेनिस, फुटबॉल हे खेळ मोकळ्या हवेत खेळले जातात. त्यामुळे शरीराला प्राणवायूचा भरपूर पुरवठा होतो आणि शरीरातील स्नायूंची सहजगत्या हालचाल होत असल्यामुळे ते काटक व बळकट होतात.

खेळात यश मिळविण्यासाठी चिकाटी, धीटपणा, चापल्य, नेतृत्व, इ. गुणांची आवश्यकता असते. नियमितपणे खेळ खेळण्याने हे गुण खेळाडूच्या अंगी निर्माण होतात. सांघिक खेळामुळे संघवृत्तीची जोपासना होते व संघशक्तीचे महत्त्वही कळते. वर उल्लेखिलेल्या सर्व गुणांची समाजधारणेसाठी नितांत आवश्यकता असते. त्यात वैयक्तिक विकासाबरोबरच संघाचा व खेळाचाही दर्जा वाढतो आणि त्यामुळे देशाचीही प्रतिष्ठा वृद्धिंगत होते. म्हणून मैदानी खेळ हे राष्ट्रीय जीवनाचे एक महत्त्वाचे अंग समजले जाते.

लहान मुलांना खेळ व खेळणी अत्यंत प्रिय असतात. खेळ हाच त्यांच्या जीवनाचा महत्त्वाचा भाग असतो. त्यातूनच त्यांच्या शरीराची व मनाची वाढ होत असते. म्हणून खेळता खेळता त्यांना ज्ञान द्यावे, या कल्पनेला बरीच मान्यता मिळाली आहे.

खेळाची प्रवृत्ती ही मनुष्यमात्रात स्वभावत:च आहे. अगदी प्राथमिक अवस्थेत असलेल्या मानवसमाजातही खेळाचे विविध प्रकार आढळतात. कवड्या, सोंगट्या, फासे, अशा बैठ्या खेळापासून तो शिकार, कुस्ती, लुटुपुटीची लढाई, इ. मर्दानी खेळापर्यंत सर्व प्रकारचे खेळ ते लोक खेळतात. बहुतेक आदिवासी जमातींना नृत्याची फार आवड असते. तीही एक प्रकारचा खेळच होय.

वैदिक काळी फाशांचा खेळ म्हणजे द्यूत खेळण्याचा प्रघात सर्वत्र होता असे दिसते. ऋग्वेदात एका जुगारी माणसाच्या दुरवस्थेचे वर्णन आढळते ( १०.३४ ). त्या काळी यज्ञाच्या वेळी किंवा समन नामक उत्सवात घोड्यांच्या व रथांच्या शर्यती लावीत; तसेच रात्री सामूहिक नृत्येही होत असत.

महाभारत व पुराणे यांच्या काळात द्यूतक्रीडेला खूपच महत्त्व प्राप्त झाले होते. नळ आणि पांडव यांची द्यूतामुळे झालेली दुर्दशा ही त्या कथांतील प्रमुख घटना आहे. त्या काळी धनुर्विद्या व मृगया या खेळाचाही खूप विकास झालेला दिसतो. वेदकालानंतर लवकरच चतुरंग नावाचा खेळ प्रचारात आला असावा. तो खेळ म्हणजे अर्वाचीन बुद्धिबळाच्या खेळाचे मूळ स्वरूप होय. या खेळांप्रमाणेच कवड्या, सोंगट्या व फासे हे खेळ प्राचीन काळापासून आजतागायत मनुष्याचे मनोरंजन करीत आले आहेत.

कबड्डी, खोखो, विटीदांडू, इ. मैदानी खेळही भारतात हजारो वर्षे प्रचलित असावे. कुस्ती किंवा मल्लयुद्ध हा खेळ तर भारतात फार प्राचीन काळापासून प्रसिद्ध व लोकप्रिय आहे. बैलांची वा हत्तींची साठमारी, एडके किंवा कोंबडे यांची झुंज, सापमुंगुस लढाई, अस्वले, माकडे, इ. प्राण्यांची कसरत वगैरे खेळामुळे समाजाच्या भिन्न भिन्न थरांतील लोकांची करमणूक होते. जादूचे खेळही असेच लोकप्रिय असतात. पतंगाचा खेळ भारतात सर्वत्र प्रचलित आहे. कठपुतळीचा खेळ तर सर्व जगात प्रसार पावला आहे.

सध्या प्रचलित असलेल्या खेळांचे वर्गीकरण बैठे खेळ व मैदानी खेळ असे करता येईल. स्त्रियांचे खेळ व पुरुषांचे खेळ, मुलांचे खेळ व तरुणांचे खेळ, सांघिक खेळ व वैयक्तिक खेळ इ. सुमारे २५० खेळांचे वर्णन व्यायाम ज्ञानकोशात दिलेले आहे. बैठ्या खेळांमध्ये पत्त्यांचा खेळ हा एकच खेळ असा आहे, की तो लहानापासून वृद्धांपर्यंत आणि रावापासून रंकापर्यंत सर्वांना रिझवितो. त्याचा उदय केव्हा झाला, ते मात्र सांगता येत नाही.

इंग्रजी राज्य सुरू झाल्यापासून भारतात विदेशी खेळांचा प्रसार वेगाने सुरू झाला. त्यांतील क्रिकेट, टेनिस, फुटबॉल, हॉकी, इ. खेळ बरेच लोकप्रिय झाले आहेत. हे खेळ आणि

अनेक देशी खेळ सांप्रत शिक्षणसंस्थामधून शिकविले जातात. त्या-या स्पर्धाही होतात आणि यशस्वी व्यक्तीना व संघाना पदके किंवा ढाली बक्षीस दिल्या जातात. अशा स्पर्धाचे भव्य स्वरूप सध्याच्या ऑलिंपिक सामन्यांत दिसून येते. हे सामने सनपूर्व ८ व्या शतकात ग्रीस देशात सुरू झाले. ते दर चार वर्षांनी नियमितपणे होत असत. ग्रीक लोकांचा तो पवित्र राष्ट्रीय सणच समजला जात असे. हे सामने इ. स. च्या ४ थ्या शतकाच्या अखेरीस बंद झाले. त्यानंतर इ. स. १८९६ पासून ते पुन्हा सुरू करण्यात आले. त्या साली हे सामने अथेन्स येथे भरले. नतर ते दर चार वर्षांनी निरनिराळ्या शहरी भरविले जाऊ लागले. महायुद्धामुळे १९१६, १९४० व १९४४ या साली त्यांत खंड पडला होता. ऑलिंपिक खेळ म्हणजे जगातील सर्व देशाच्या खेळाडूसाठी एक मोठी आनंदाची महापर्वणीच असते. यात टेनिस व क्रिकेट या खेळांव्यतिरिक्त बहुतेक सर्व खेळांचा समावेश केलेला आहे. भारतीय कुस्तीही यात समाविष्ट आहे. [ म. ज्ञा. को.; हि. वि. को.; क्रीडांगणावर ]

**खेळणी** लहान मुलांच्या करमणुकीसाठी जी रंगीबेरंगी विविध साधने वा उपकरणे असतात, त्यांना खेळणी म्हणतात. लहान मुलांशी संबंध असल्यामुळे आणि सर्व काळी व सर्व देशांत लहान मुले असल्यामुळे खेळण्यांचा प्रचारही सार्वकालिक व सार्वदेशिक आहे. अश्मयुगापासून जगात खेळणी तयार होत आली आहेत. निरनिराळ्या वस्तुसग्रहालयातून तत्कालीन खेळण्याचे नमुने ठेवलेले आहेत. जगातल्या अत्यंत प्राचीन अशा संस्कृतीचे जे उत्खनन झाले, त्यात दगड, माती, लाकूड, धातू, कापड, गवत, शिंगे, हाडे, मौल्यवान रत्ने, इ. वस्तूपासून बनविलेली विविध प्रकारची खेळणी सापडली आहेत.



डुक्कर — मोहेंजोदडो

अशा खेळण्यात मानवी आकृतीबरोबरच गाय, बैल, हत्ती, घोडे, कुत्रे, शेळचा, माकडे, डुक्कर, वाघ, सिंह, मोर, इ. प्राण्यांच्या आकृतीही आढळतात.

भारतीय साहित्यात प्राचीन कालापासून खेळण्यांचा उल्लेख आढळतो. ऋग्वेदात बाहुल्यांचा निर्देश आलेला आहे. अति प्राचीन काळी बाहुल्यांचा उपयोग खेळण्यासाठी व अभिचारकर्मासाठीही करीत असत, असे दिसते.

मोहेंजोदडो व हडप्पा या ठिकाणी केलेल्या उत्खननात जी खेळणी सापडली आहेत, ती सनपूर्व २५०० वर्षाइतकी प्राचीन आहेत. ही सर्व खेळणी मातीची आहेत. त्यात काही बाहुल्याही आहेत. या बाहुल्या केवळ खेळण्यासाठी बनविलेल्या होत्या, की पूजेसाठीही त्यांचा उपयोग होत असे, हे सागणे कठीण आहे. प्राङ्मौर्य व मौर्य या कालात भाजलेल्या पक्क्या मातीची खेळणी पुष्कळ प्रमाणात तयार होत. पाटणा, मथुरा, कौशाबी, इ. ठिकाणी केलेल्या उत्खननांत अशी अनेक खेळणी उपलब्ध झाली असून, ती निरनिराळ्या वस्तुसंग्रहालयात सुरक्षित ठेवलेली आहेत. साच्यात ओतून किंवा दाबून खेळणी बनविण्याची कलाही त्याच काळात अस्तित्वात आली होती. कारण काही ठिकाणच्या उत्खननात खेळण्यांचे साचेही सापडले आहेत. शुंगकालीन खेळण्यात शेळचा, बोकड व स्त्रीमूर्ती अशा प्रकारची साच्यातून बनविलेली खेळणी अत्यंत आकर्षक आहेत. शुंगकालात मेंढे जुपलेल्या गाडचांची खेळणी फार प्रचारात होती. कौशाबी येथील उत्खननात त्या काळातील बैलगाडचाचे नमुने मिळाले आहेत. कुशाणकालातल्या मातीच्या बाहुल्यांचे वैशिष्टच असे, की त्या सर्वतोभद्र म्हणजे चारी बाजूंनी कोरलेल्या आहेत. गुप्तकालातील मातीच्या बाहुल्या दिसायला सुदर असतात.



खेळणे — नागार्जुनकोंडा



घोडा — विशाखापट्टणम्

त्यांचे चेहरे लांबट असतात व त्याच्या पाठीवर खाद्यापर्यंत कुरळे केस मोकळे सोडलेले असतात. या खेळण्याच्या पाठीमागचा भाग सपाट असतो व त्यांच्या मस्तकावर एक छिद्र असते. त्यात दोरा अडकवून ही चित्रे भिंतीवरही टांगण्याची सोय केलेली असे. या खेळण्याना निरनिराळे रंग दिलेले असत. अशा प्रकारच्या रंगीत मोराच्या खेळण्याचा कालिदासाच्या शाकुंतलात उल्लेख आहे (७ वा अंक). कुमारसंभवात (१.२९) पार्वती लहानपणी कृत्रिमपुत्रक म्हणजे बाहुल्या घेऊन गंगेच्या काठी खेळ खेळत होती, असे वर्णन आले आहे –


घोडा – राजस्थान

**मन्दाकिनीसैकतवेदिकाभिः**
**सा कन्दुकैः कृत्रिमपुत्रकैश्च ।**
**रेमे मुहुर्मध्यगता सखीनां**
**क्रीडारसं निर्विशतीव बाल्ये ।।**

**अर्थ–** पार्वती बालसुलभ क्रीडारसाचा आस्वाद घेत मदाकिनीच्या तीरावर कधी वाळूचे चौथरे रचून, कधी चेंडू घेऊन, तर कधी बाहुल्या घेऊन, आपल्या सख्यासह खेळत असे.

कादंबरीच्या महालात चकवा-चकवीची (चक्रवाक) एक जोडी होती व रत्नांच्या अनेक बाहुल्या होत्या, असे बाणभट्टाने वर्णन केले आहे. कथासरित्सागरात अनेक मनोरंजक खेळ व खेळणी याचे वर्णन असून, त्यात उडणाऱ्या लाकडी बाहुल्यांचाही उल्लेख आहे. या बाहुल्या कळ दाबल्यावर काही उंच उडत, काही गात, काही नाचत, तर काही आवाजही करीत.

भारतातील अनेक सण–उत्सवांशी बाहुल्याचा संबंध जोडलेला आहे. तमिळनाड, म्हैसूर व आंध्र या प्रदेशात नवरात्रात बाहुल्यांना सजवून त्यांची आरास मांडण्याची पद्धत आहे. उत्तर प्रदेशाच्या पूर्व भागात नागपंचमीच्या दिवशी बाहुल्यांची मिरवणूक काढून त्यांचे नदीत विसर्जन करतात. याला बाहुल्यांची जत्रा असे नाव आहे. कांगडा व गुजरात या प्रदेशांत रल्ली व गोरवा या सणांच्या दिवशी मुली आपल्या बाहुल्या व इतर खेळणी शृंगारतात. महाराष्ट्रात चैत्रगौरीचे हळदीकुंकू करतात, त्यावेळी गौरीची आरास करण्याची पद्धत आहे. या


गाय वासरू – खेळणे (बनारस)

आराशीत प्रामुख्याने बाहुल्या व खेळणी याच वस्तू माडल्या जातात महाराष्ट्र, उ. प्रदेश, पंजाब, राजस्थान व मध्य प्रदेश या प्रातात मुली भातुकली माडून बाहुला–बाहुलीचे लग्न लावतात. भारतात काही ठिकाणी मुलीच्या लग्नाच्या वेळी बाहुल्या, भातुकलीची भाडी, खेळातला पलग, वगैरे वस्तू मुलीला आंदण म्हणून देण्याचीही चाल आहे.


गारुडी – विजयवाडा

सर्वसाधारणपणे भारतीय खेळणी पाहिली, तर वेगवेगळ्या प्रांतातील लोकांचा पेहराव व त्याचे अलंकरण त्या त्या प्रातात तयार होणाऱ्या खेळण्यांत दिसून येते. राजस्थानी स्त्रियांचे सौष्ठव, बंगाली महिलाचे सौंदर्य आणि महाराष्ट्रातील स्त्रियांचा करारीपणा याची छाप त्या त्या प्रांतातील बाहुल्यावर पडलेली दिसते. महाराष्ट्रात तयार होणाऱ्या लाकडी बाहुलीला ठकी, बंगालमध्ये कालिचंडिका व राजस्थानात गंगावती अशी नावे आहेत. राजस्थानी ललनेप्रमाणे त्यांची गंगावतीही रंगीबेरंगी सुंदर पोषाख व दागिने यांनी नटलेली असते.

काही खेळणी इतिहासाशी संबद्ध असतात. काशीतल्या बाजारात लाल आणि निळा गणवेष घातलेल्या अनेक बाहुल्या मिळतात. पूर्वी ईस्ट इंडिया कंपनीत काम करणाऱ्या माणसाच्या त्या प्रतिकृती आहेत. तसेच मयूरपखी नाव सम्राट अशोकाच्या कालाची स्मारक आहे. महाराष्ट्रातील मुले दिवाळीत मातीचे किल्ले करतात व त्यांत शिवाजीमहाराज आणि मावळे वीर यांच्या मातीच्या प्रतिमा बसवतात. शिवाजी-महाराजांनी जिंकलेल्या अनेक किल्ल्यांची स्मृती या खेळाच्या मुळाशी आहे. काशी व मथुरा येथे मिळणाऱ्या गौळणी या प्राचीन गोपीची प्रतीके होत. झाजा घेत-लेली बाहुली ही संत मीराबाईची प्रतिकृती असते.



ठकी

इतिहासाप्रमाणेच त्या त्या प्रांतातील धार्मिक परंपराही खेळण्यांवरून अजमावता येतात. गुजरात, सौराष्ट्र व मध्य



बैल

प्रदेश या भागात श्रीकृष्णाच्या खेळातल्या अनेक मूर्ती मिळ-तात; तर बंगालमध्ये कालीमातेच्या खेळातल्या मूर्ती दिसतात.

सर्वसाधारणपणे त्या त्या प्रदेशातल्या मानवी जीवनाचे प्रतिबिंब तिथल्या खेळण्यांत पाहायला मिळते. गवळी, सुतार, लोहार, व्यापारी, शेतकरी इ. व्यावसायिक लोक खेळण्यांतही दिसतात. बैलगाडी, टांगा, मोटार, बस, आगगाडी, विमान



सौराष्ट्रातील खेळणे – हत्ती

या व्यावहारिक जगातल्या वस्तू खेळण्यांच्याही विश्वात आढळतात. गाय, बैल, घोडा, सिंह, चिमणी, पोपट, मोर, कोंबडा, इ. पशुपक्षीही खेळ-ण्यांच्या रूपाने मुलांच्या अंगा-खांद्यावर वावर-ताना दिसतात.



खेळणे – बंगाल

बाजारात मिळणारी ही खेळणी कापड, कागदाचा लगदा, लाकूड, शिंपा, धातू, इ. पदार्थांची बनविलेली अस-तात. शहरात खेळण्यांची कायमची दुकाने असतात; पण खेडेगावात मात्र

जत्रा, उत्सव अशा प्रसंगीच तेवढी खेळण्याची दुकाने लागतात. काशी, प्रयाग, पुरी, नासिक, तिरुपती, रामेश्वर इ. तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी मंदिराच्या बाहेरच बाहुल्या व इतर खेळणी विकायला मांडलेली असतात. प्रत्येक ठिकाणच्या खेळण्यात काहीतरी वैशिष्टच असते. याशिवाय लखनौ, मथुरा, आगरा, कलकत्ता, कृष्णनगर (बंगाल), बहरामपूर, मुर्शिदाबाद, मद्रास, म्हैसूर, ओडिसा, कोंडापल्ली, तिरुचिरापल्ली व सावंतवाडी ही स्थाने रंगीत खेळणी व बाहुल्या यांच्या निर्मितीसाठी प्रसिद्ध आहेत.



खेळणे – कालीघाट

खेळणी ही केवळ मुलांची करमणूकच करीत नाहीत; तर ती त्यांच्यांत जिज्ञासा उत्पन्न करतात व त्याची कलात्मक प्रवृत्तीही वाढवतात. खेळण्यात केवळ बाहुल्याच असतात किंवा पशुपक्षीच असतात, असे नव्हे; तर नाना आकाराचे ठोकळे, यंत्रे, कोडी, निरनिराळे डाव, पट, इ. वस्तूही असतात यंत्रयुगाची जसजशी प्रगती होते, तसतशी खेळणीही. त्याला धरून वाढतात, बदलतात. सर्व प्रदेशांतील खेळणी एकत्र करून त्यांचे प्रदर्शन भरवले, तर ते पाहून त्या त्या प्रदेशाच्या संस्कृतीचीही स्थूल मानाने कल्पना येऊ शकेल. खेळणी ही मुलांसाठी बनवली जात असली, तरी मोठ्या माणसांना त्यात रस वाटत नाही असे नाही.



डोलणारी बाहुली – राजस्थान

आधुनिक युग हे प्लॅस्टिकच्या खेळण्यांचे युग आहे. तरीही कापडापासून बनविलेल्या आणि सुंदर पोषाख व दागिने घालून सजविलेल्या भारतीय बाहुल्यांना परदेशात बरीच मागणी आहे. [प्रा. भा. म.; हिं. वि. को.; जर्नी थ्रू टॉयलँड–डोंगरकेरी]

## खैयंग

अराकान भागातली एक जात. चित्तगाव टेकड्यात व बंदाबन सर्कलच्या काही भागातही यांची वस्ती आहे. यांचे कुरळे केस व चेहऱ्याची ठेवण यावरून हे निग्रॉइड वंशाचे असावे असे वाटते; परंतु या प्रदेशात आपण अनादिकालापासून राहत आहो, असे हे सांगतात. याच्या चालीरीतीवर माघ व चकमा या जातीचा बराच प्रभाव आहे. हे लोक बौद्धधर्मी असून यांच्यांत गोत्रेही आहेत.

यांच्यातले पुरुष पूर्वी दोन्ही टोके लाल असलेले एक अरुंद पांढरे वस्त्र कमरेभोवती गुंडाळीत; परंतु आता ते धोतर नेसतात. तसेच केसांचा आंबाडा डाव्या बाजूला घालून त्यात एक हाडाचा आकडा खोवतात. स्त्रिया पांढऱ्या वस्त्राचा घागरा नेसतात. त्याचे उत्तरीयही पांढरेच असते; पण त्यावर लाल रेघा असतात. त्या डोक्यावर कशिद्याची पांढरी पगडी घालतात.

यांची घरे उंचवटचावर असून एक मोठी खोली व तिच्यामागे स्वैपाकघर अशी त्यांची रचना असते.

यांच्यांत सगोत्र विवाह होत असले, तरी दोन भिन्न टोळचांत ते होत नाहीत. बापाच्या मालमत्तेतला मोठा वाटा धाकटचा मुलाला मिळतो. [से. इं. १९३१]

## खैरा

बंगालमधल्या हजारीबाग जिल्ह्यात आढळणारी एक छोटीशी जमात. रिस्लेच्या मते हे लोक खदवार वंशाचे असावे. हे भाजीपाला विकतात व मजुरीही करतात. पूर्वी यांना अस्पृश्य समजत. [से. इं. १९५१]

## खोंग

अराकान प्रदेशातील एक जात. या लोकाची स्वतंत्र भाषा आणि अराकानी नावाची स्वतंत्र लिपीसुद्धा आहे. या त्यांच्या भाषालिपीचे स्वरूप पाहता हे लोक जुन्या काळी सुशिक्षित असावे, असे विद्वानांचे मत आहे.

**विवाहप्रथा–** वरपिता वधूच्या बापाकडे जाऊन मुलीला मागणी घालतो. उभयपक्षी संबंध पसंत असला, तर चार प्रतिष्ठित गावकऱ्यांच्या समक्ष विवाहाची बोलणी होतात. या प्रसंगी वधूपित्याकडून एक कोंबडा मागवून तो कापला जातो. नंतर त्याची जीभ काढून तिच्यावर असलेल्या शुभाशुभ चिन्हांचा विचार करून, विवाहसंबंध करणे किंवा न करणे, ही गोष्ट ठरते. लग्न वधूच्या घरी होते. बौद्ध पुरोहित (पुंगई) विवाहाचे पौरोहित्य करतो. या वेळी वधूवरांना एका पवित्र स्थानी उभी करून पुंगई आपल्या मुठीत वाफाळलेले तांदूळ घेऊन दोन्ही तळवे एकमेकावर स्वस्तिकाकार दाबून धरतो. नंतर तेच तांदूळ वधू-वराना सात वेळा खायला देतो.

**वेषभूषा–** खोंग स्त्री-पुरुषांची वेषभूषा समान असते; त्यामुळे

त्यांच्यांतील स्त्री-पुरुष भेद चटकन ओळखता येत नाही. स्त्री-पुरुष दोघेही लुंगी नेसतात, हाता-पायांवर गोंदवून घेतात व केस मागे वळवून त्यांचे बुचडे बांधतात. याविषयी त्याच्यांत एक दनकथा आहे, ती अशी—

प्राचीन काळी अराकानमध्ये एक राजा होता. त्याची राणी अत्यंत रूपवती होती. त्यामुळे राजा सदैव तिच्या नादात निमग्न असे. राणीने हे जाणले; पण राजाला काहीही न बोलता ती स्वतः राज्यकारभार चालवू लागली. त्यामुळे प्रजा राणीला देवासमान मानू लागली एकदा राणीला कळले, की पुरुष स्त्रीला आपल्यापेक्षा कनिष्ठ दर्जाचे मानतात. राणीला हे आवडले नाही. तिने हा स्त्री-पुरुष भेद मिटविण्यासाठी प्रजेला फर्माविले, की 'आजपासून स्त्रियांनी लुंगी नेसावी आणि पुरुषानी केस वाढवावे. तसेच पुरुषांनीही हात-पाय गोंदवून घ्यावे.' प्रजेने राणीची ही आज्ञा मानली. अशा प्रकारे राणीने हे स्त्री-पुरुषातले द्वैत दूर केले.

**सण-उत्सव**— वसंत ऋतूत यांचा विशू नामक एक सण येतो. या वेळी हे लोक गौतमबुद्ध, लक्ष्मी, दुर्गा वगैरे देव-देवताची पूजा करतात. या वेळी स्त्री-पुरुषांचे सामूहिक नृत्य-गायनही होते.

**मर्तिकप्रथा** — यांच्यांत एखादा सरदार किंवा प्रतिष्ठित गावकरी मरण पावला, तर त्याचे प्रेत सजवून मोठया थाटाने एका रथात घालतात व तो रथ श्मशानात नेल्यावर त्याला दोन बाजूना दोन दोर बांधतात. या दोन बाजू म्हणजे स्वर्ग व नरक अशी कल्पना करून ते दोर ओढण्याची स्पर्धा लागते. स्वर्गाच्या बाजूच्या लोकांचा दोर ओढण्यात विजय झाला, तर मृतात्मा स्वर्गाला गेला व नरकाच्या बाजूच्या लोकांनी जिकले, तर तो नरकाला गेला असे मानतात. नंतर प्रेत जाळतात अगर पुरतात.

हे लोक अत्यंत फूलवेडे असून, त्याना फुलाशिवाय दुसऱ्या कशाचेही महत्त्व वाटत नाही. याची घरे बांबूच्या पट्ट्यांची बनवलेली असतात. या घरातच एक लहानसे देवघर असते व त्यात बुद्धाची लाकडी मूर्ती ठेवलेली असते. प्रत्येक घरात एक पुजारी असतो. तो या देवाची पूजा व इतर धार्मिक विधि-विधाने करतो. [ भा.आ. ]

**खोंड** एक आदिवासी जमात. बिहार, ओडिसा व तमिळनाड या प्रदेशांत हिचे वास्तव्य आहे. हे लोक स्वत.ला कुई किंवा कुईजु म्हणवतात. कु=डोंगर यावरून किंवा खांड=खड्ग यावरून या जमातीच्या नावाची व्युत्पत्ती लावतात. दंतकथा-वरून वाटते, की कोण्या एका काळी हे लोक त्या त्या प्रदेशा-तले सत्ताधारी असावे. राज्याभिषेक होणाऱ्या पुरुषाला खोंड जमातीतला वृद्ध माणूस मांडीवर घेऊन बसे. केसरीसिंहदेव या राजापर्यंत ही चाल होती. खोंड लोकात पूर्वी नरमेधाची पद्धत होती.

खोंडात दोन मुख्य वर्ग आहेत—(१) कुटिया खोंड व (२) मैदानात राहणारे खोंड. राजखोंड म्हणून आणखी एक वर्ग आहे, तो स्वत.ला श्रेष्ठ समजतो. या वर्गातले लोक मालगुजार किंवा जमीनदार असतात. राजखोंडाने नीच वर्गातील मुलगी केली, तर तो निच्या वर्गाचा समजला जातो. दलखोंड, आदिखोंड किंवा वालुसुदिया नावाचा आणखी एक खोंडातला वर्ग आहे. हा वर्गही उच्च दर्जाचा समजला जातो. जमातीचे पौरोहित्य याच्याकडेच असते. हे कोंबड्याचे व रेड्याचे मांस खात नाहीत. देवाला तुळशी वाहतात. खोंडांची सुमारे ३२ हून अधिक देवके आहेत. समान देवकात विवाहसंबंध होत नाही. सामान्यत: एका वर्गातले लोकच एका ठिकाणी राहतात.

शेती व शिकार याखेरीज इतर धंदे या लोकांना आवडत नाहीत. या लोकांना मद्याची विशेष आवड असते. धनुष्यबाण, लांब पात्याची तलवार व कुऱ्हाड ही यांची शस्त्रे असतात. यांच्या अनेक देवता असून, त्यांना ते बळी देतात. पूर्वी तारी-पेन्न या भूदेवीला नरबलीही देत, असे फ्रेझर सांगतो.

**विवाहप्रथा** — लग्ने मोठेपणी होतात. वधूशुल्क म्हणून १२ पासून २० पर्यंत जनावरे घेतात. वधू-वर आपल्या मित्रांच्या खांद्यावर बसून विवाहस्थळी येतात. मग नवरा मुलगा वधूला आपल्याजवळ ओढतो. त्यानंतर त्या दोघांवर एक वस्त्र टाकून त्याच्याभोवती सुताचे सात फेरे गुंडाळतात. एक कोंबडा बळी देतात. जळक्या पोळीने वधूवराचे गाल चोळतात. त्या दिव-साची रात्र दोघे घराच्या सोप्यात घालवतात. दुसऱ्या दिवशी त्याना तळ्यावर नेतात तिथे वराच्या हाती धनुष्यबाण देऊन त्याला गोवऱ्यांवर बाण सोडायला लावतात. प्रत्येक बाण सोड-ल्यावर वधू त्याचे कपाळ धुते व दात घासण्यासाठी त्याला एक काडी देते. एखाद्या मुलाने लग्नापूर्वी अनिषिद्ध नाते संबं-धात एखाद्या मुलीशी समागम केला असल्यास हे लोक त्याला क्षमा करतात. मुलीने एकाशी संग करून दुसऱ्याशी लग्न केले तर तिचा पहिला मित्र तिच्या नवऱ्याला काही रुपये देतो. काही ठिकाणी या लोकात प्रेमविवाहही होतात. अशा विवा-हास आई-बापानी विरोध केल्यास ती दोघे पळून जातात व काही दिवसानी नवरा-बायको बनून परत येतात. सदर मुलगी दुसऱ्या कोणाला देण्याचे आधीच ठरले असल्यास, तिच्याशी प्रेमविवाह करणारा हा नवरा पूर्वीच्या ठरलेल्या वराला काही रक्कम देतो. अशा विवाहाला पेसामोली म्हणतात. धाकट्या

भावाला त्याचे लग्न होईपर्यंत वडील भावाच्या बायकोशी संबंध ठेवता येतो.

**मृतिकप्रथा** – इतकी वर्षे हे लोक प्रेते पुरीत होते; पण आता त्याच्यात दहनाची प्रवृत्ती वाढत आहे. प्रेत पुरताना कपड्यात एक पैसा बांधतात. दहाव्या दिवशी चवाठ्यावर दाणे टाकतात. ते दाणे कोंबड्याने खाल्ले, तर मृताचा प्राण परत आला असे समजतात. **पाहा** – काध [ म. ज्ञा. को. ]

**खो** एक जमात. भारताच्या वायव्य सरहद्दीवरील चित्रळ खोऱ्यात व पामीरच्या दक्षिणेकडील प्रदेशात यांची वस्ती आहे. बिड्डल्फच्या मते हे लोक आर्यवंशी असावे. ते उंचेपुरे, देखणे, उभट चेहऱ्याचे व मोठ्या डोळ्यांचे असतात. लांब केसांविषयी त्यांची प्रसिद्धी आहे व त्याबद्दल त्यांना अभिमानही आहे.

यांच्यांतले पुरुष टोपी घालून तिच्याभोवती बारीकसा फेटा गुंडाळतात. अंगात सदरा, पायात सैल विजार, रंगीत पायमोजे आणि मऊ कातड्याचे बूट, असा यांचा पोषाख असतो. यांच्या बायका डोक्याला पांढरी रेशमी कलाबतूची टोपी, अंगात गुडघ्यापर्यंत पोचणारा सैल खमीस आणि रुंद विजार असा पेहेराव करतात. प्रवासाच्या वेळी पुरुषांच्याप्रमाणे त्या बूटपायमोजेही घालतात. यांच्यांतल्या तरुण मुली कोळशाच्या चूर्णाने आपली तोंडे काळी करतात. असे केल्याने उन्हाचा त्रास होत नाही व कातडीही मऊ पडते, असा त्यांचा समज आहे.

भेटीच्या वेळी स्नेही असतील ते एकमेकांना आलिंगन देतात व कनिष्ठ मनुष्य ज्येष्ठाच्या हाताचे चुंबन घेतो. हे पोलो खेळतात. त्यासाठी प्रत्येक गावात जनाली नावाचे एक क्रीडांगण असते. अश्वारोहण, शिकार, नृत्य-गायन हे यांचे करमणुकीचे प्रकार होत.

याच्यांतले काही लोक बौद्ध व काही मुसलमान आहेत.

**विवाहप्रथा**– पुरोहिताने विवाहमंत्र म्हटल्यावर वधूची आई वधूला वराच्या हाती देऊन त्याच्याकडून काहीतरी बक्षीस मिळवते. यांच्यांत बहुपत्नीत्वाची चाल रूढ आहे. [म. ज्ञा. को]

**खोकर** हिंदुस्थानी संगीतातील एक राग. खमाज, बिहागडा व बिलावल अशा तीन रागांच्या मिश्रणाने हा राग बनलेला असून, तो महानना जातीतील आहे. दोन्ही निषाद व कोमल मध्यम या रागात येतात. [ क. सं. ]

**खोखो** भारतातला एक लोकप्रिय खेळ. मैदानी खेळांमध्ये कबड्डी, आट्यापाट्या व खोखो हे खेळ विशेष महत्त्वाचे समजतात. पण त्या सर्वांमध्ये सर्व दृष्टींनी खोखो सरस ठरतो. हा खेळ केव्हापासून सुरू झाला ते नक्की सांगता येत नाही; पण याचा प्रारंभ बडोदे संस्थानात झाल्याचे सांगितले जाते. गुजरात, महाराष्ट्र, मध्यप्रदेश इ. भागात हा खेळ मोठ्या प्रमाणात खेळला जात असला, तरी भारतात सर्वत्र याचा प्रचार आहे.

या खेळास १११ फूट लांब व ५१ फूट रुंदीचे क्रीडांगण आवश्यक असते. लांबीच्या दोन्ही बाजूंना १०-१० फूट अंतर सोडतात व क्रीडांगणाच्या मध्यावर एका सरळ रेषेत ठराविक अंतरावर चार फूट उंचीचे दोन खांब पुरतात यांना खुंट असे म्हणतात. इतर खेळाप्रमाणे या खेळात प्रत्येकी ९ खेळाडू असलेले दोन संघ आवश्यक असतात. नाणेफेक झाल्यावर संघनायकाच्या इच्छेनुसार आठ खेळाडू दोन खुंटांमध्ये ठराविक अंतरावर विरुद्ध दिशेला तोंडे करून वीरासनात बसतात. त्या वेळी एकजण खुंटाजवळ उभा रहातो. पंचांनी सूचना दिल्यावर विरुद्ध पक्षाचे ठराविक गडी खेळण्यासाठी येतात व ते क्रीडांगणावर मर्यादेच्या आत कुठेही उभे राहतात. त्यानतर खुंटा-


खोखो

जवळील पाणी पाजणारा किंवा पिटाळणारा खेळाडू विरुद्ध पक्षाच्या गड्यांना बाद करण्याचा प्रयत्न करतो. तसे करताना तो बसलेल्या एखाद्या खेळाडूच्या पाठीमागे येऊन ' खो ' म्हणतो व त्याला उठवून आपण त्याच्या जागी बसतो. या खेळाचा एक डाव आठ मिनिटांचा असतो. प्रत्येक संघाला दोन वेळा खेळायला मिळते व तेवढ्या वेळातच त्या पक्षाने विरुद्ध पक्षाचे सर्व गडी बाद करायचे असतात. खेळाच्या शेवटी ज्या संघाचे गुण अधिक तो विजयी ठरतो. या खेळात दौडीचा व बैठकीचा चांगला व्यायाम होतो.

काही ठोकळ नियम सोडल्यास या खेळाला पन्नास वर्षांपूर्वी नियमबद्ध असे स्वरूप नव्हते. त्यामुळे पुष्कळदा खेळात बराच गोंधळ निर्माण होत असे. परंतु इ. स. १९१४ च्या सुमारास

पुणे येथील डेक्कन जिमखाना या संस्थेने अनेक मैदानी खेळांचे नियम तयार केले, त्याबरोबरच खोखोचेही नियम बनवले. तेव्हापासून थोडाफार स्थानिक फरक सोडल्यास, हा खेळ डेक्कन जिमखान्याच्या नियमांनुसार खेळला जातो. [ व्या. ज्ञा. को.; सु. वि. को.; हि. वि. को.; गुज. गॅझे. ]

**खोजा** एक मुसलमान जात. यांची वस्ती मुख्यत्वे पंजाब व महाराष्ट्र राज्यांत आढळते. खोजा शब्द ख्वाजा ठाकूर या शब्दाचा समानार्थक आहे. हे इजिप्तच्या इस्माइली पंथाचे अनुयायी आहेत. यांना शिया म्हणतात. हे मूळचे सिंधमधील लोहाणा जातीचे लोक होत. १२ व्या शतकात नूर सतागूर या फकिराकडून यांनी मुसलमान धर्म स्वीकारला.

बोहरी आणि खोजे हे दोन्ही इस्रायली पंथाचे असून, बोहरी मुसताली वर्गाचे, तर खोजे नझारी वर्गाचे आहेत. इ.स. १०९४ मध्ये ते एकमेकांपासून अलग झाले. पुढे इ.स. १२५५ मध्ये हलाकू नावाच्या तार्तराने इस्रायली लोकांची सत्ता नष्ट केली. त्या वेळी रूमच्या प्रदेशात खेख येथे त्यांनी आपल्या इमामाची गादी नेली. ना. आगाखान यांनी पुढे आपला नातू प्रिन्स करीमखान याची इमामाच्या गादीवर नेमणूक केली. सिंधमधील काही खोजे इराणातून पळून आलेल्या लोकांचे वंशज असून, बरेचसे पूर्वीचे हिंदू आहेत. ४०० वर्षांपूर्वी नझारी उपदेशक नसरुद्दीन याने त्यांना बाटवले. यांची बोलण्याची व लिहीण्याची भाषा गुजरातीच आहे. काही खोजे मात्र कच्छी व हालाई या भाषा बोलतात.

खोजा लोकांवर वैष्णवपंथाची बरीच छाप आहे. इस्माइलिया पंथाच्या गुरूने खोजा पंथाची स्थापना केली. खोजा जमातीतले भक्त आपल्या गुरूला कृष्णाचा अवतार मानतात व वल्लभाचार्यांच्या अनुयायांप्रमाणे त्याच्याशी आज्ञाधारकपणे वागतात. पूर्वी यांच्या चालीरीती हिंदूंसारख्याच होत्या. परंतु पुढे हळूहळू ते इस्लामकडे वळले.

११ व्या शतकात हसन सबाह नावाच्या एका इराणी माणसाने फिदवी पंथ स्थापला. याने इजिप्तच्या खलिफाची सत्ता झुगारून दिली व तो स्वतःला शेखुल जबल म्हणवू लागला. लोक त्याला डोंगरातील म्हातारा म्हणत. याचा तिसरा वंशज हसन अली (इ.स. ११६३) हा होता. पुढे होणारा इमाम मीच असून, माझ्यावर विश्वास ठेवणाऱ्यांचे कोणतेही कृत्य पापरूप असणार नाही, असे तो सांगत असे. त्याच्याच पंथापैकी पीर नसरुद्दीन यानेही लोहाणा हिंदूंना हसन हाच विष्णूचा १० वा अवतार असल्याचे सांगितले. आदाम हा विष्णू, मुहंमद हा शिव, पांच इमाम हे पांडव, असा फेरबदल करून याने



लोकांना आपला धर्म स्वीकारण्यास सांगितले. पुढे हसन अली याने हिंदुस्थानात कायमचे वास्तव्य केले. सध्याचे आगाखान हे याचेच वंशज आहेत.

खोजे लोक व्यापारी असून, सिलोन, सिंगापूर, चीन, जपान, इराणी आखातातील बंदरे, अरबस्तान व पूर्व आफ्रिका, इ. देशांशी यांचा व्यापार चालतो. भारताबाहेर अरबस्तान, झांजीबार या देशांतही खोजाची वस्ती आढळते.

**धार्मिकप्रथा**— हे आपल्या मुलांचे कान टोचतात व शेंडीही राखतात. ही शेंडी पुढे कोणत्यातरी पिराच्या थडग्यावर काढायची असते. सुंता करणे किंवा दाढी करणे हे व्यक्तीच्या इच्छेवर अवलंबून असते. करबल्याहून आणलेल्या मातीच्या १०१ मण्यांची माळ करून ते आपल्या पिराचे नामस्मरण करतात. महिन्याच्या शुद्ध द्वितीयेला लग्ने ठरवितात. यांच्या पंथात त्रिमूर्ती असून, ते हिंदूचे अवतारही मानतात. पुष्कळ हिंदू हे या पंथाचे अनुयायी असून आगाखान हे त्याचे धर्मगुरू आहेत.

**मर्तिकप्रथा** — मरणोन्मुख माणसाची इच्छा असली तर त्याच्या आत्म्याला शांती मिळावी म्हणून समर छंट नामक विधी करतात. एक मनुष्य करबल्याची माती पाण्यात कालवतो व मरणोन्मुख माणसाच्या ओठावर तिचा लेप लावतो. काही लोक ती माती त्याच्या तोंडावर शिंपडतात किंवा गळचाला व छातीला लावतात. आसन्नमरण माणूस म्हातारा असेल, तर त्याचे केस मेंदीने रंगवतात व त्याच्या गळचात करबल्याच्या मातीच्या पुतळचांची माळ घालतात. हुसेनच्या थडग्यावरील कापडाचे दोन तुकडेही त्याच्या डोळचांवर ठेवण्याची प्रथा आहे. श्रीमंत खोजे आपल्या नातेवाईकांचे शव हवाबंद पेटीतून समुद्रमार्गे बगदादवरून करबल्यास पाठवतात. [ मे. मि. इं.; मुं. इ. जा.; वि. मुं. रा. प.; म. ज्ञा. को. ]

**खोडियो** राजस्थानातला एक नृत्यप्रकार. विवाहसमारंभात स्त्रिया पुरुषवेष धारण करून हे नृत्य रात्रभर करतात. [ रा. लो. नृ. ]

**खोत ब्राह्मण** जवळ ब्राह्मण पाहा.

**खोतानी रामायण** याचा रचनाकाल इ. स. चे ९ वे शतक मानला जातो. यातील रामकथा तिबेटी रामायणाशी मिळती-जुळती आहे. पण तिबेटी रामायणाहून याची काही वैशिष्टचेही आहेत. याचा आरंभच गौतमबुद्धाच्या आत्मकथेच्या स्वरूपात होतो. बौद्ध धर्मातल्या

कित्येक व्यक्तींशी रामकथेतली पात्रे अभिन्न दाखवलेली आहेत. या कथेत बुद्ध हा स्वयं राम आहे व मैत्रेय लक्ष्मण आहे. या रामायणात रावणाचा वध होत नाही. इथे सहस्रबाहू अर्थात सहस्रार्जुन हा दशरथाचा पुत्र मानलेला आहे. राम-लक्ष्मण हे सहस्रबाहूचे पुत्र होते आणि त्यांच्या आईने बारा वर्षे त्यांना भूमीत लपवून ठेवले होते. आपल्या बापाची गाय बलात्काराने हरण केलेली पाहून परशुरामाने जेव्हा सहस्रबाहूचा वध केला, तेव्हा रामाने पृथ्वीतून वर येऊन परशुरामाला ठार मारले.

या रामायणात सीता ही राम व लक्ष्मण या दोघांचीही पत्नी असल्याचे सांगितले आहे. तिथल्या प्रचलित बहुपतिप्रथेला धरून असे लिहिले गेले असावे.

भारत व हिंद-चीन यांचा संबंध इ. स. च्या १ ल्या शतकापासूनच प्रस्थापित झाला होता. चंपा राज्यात आढळलेल्या ७ व्या शतकातील शिलालेखांवरून कळते, की त्या देशात वाल्मीकि-रामायणाचा प्रचार बराच झाला होता. तत्कालीन एका मंदिरात वाल्मीकीची मूर्तीही खोदलेली आढळली आहे. अंगकोरवट ही कंबोडियाची प्राचीन राजधानी होय. तिथल्या अतिविशाल मंदिरात रामकथेची पाषाणचित्रे कोरलेली आहेत. हिंद-चीनच्या अनाम प्रदेशात १८ व्या शतकातले एक रामायण उपलब्ध झाले आहे. हे रामायण वाल्मीकीच्या आधारेच लिहिलेले आहे. अनाम प्रदेशाच्या उत्तर भागात दशरथाचे राज्य होते व रावणाने त्या राज्यावर आक्रमण करून सीतेचे अपहरण केले, असे ते लोक सांगतात. [ भा. सा. सां. रे. ]

## खोदत

ओडिसामध्ये आढळणारी एक जात. यांची वस्ती मुख्यत्वे मिदनापूर व बालासोर या जिल्ह्यांत आढळते. भाजीपाला विकणे, पालख्या वाहणे व मजुरी करणे हे यांचे व्यवसाय होत.

## खोदूर

द. भारतातील एक जात. खोदू = बांगडी, यावरून हे नाव पडले आहे. हे लोक कासे व पितळ या धातूंच्या बांगड्या व अंगठ्या तयार करतात. यांच्या मुख्याला नहको साहू म्हणतात. जातीचा कारभार पंचायतीमार्फत चालतो. ज्यांना इच्छा असेल त्यांना ही पंचायत सेनापती, महापात्र, सुबुद्धी, अशा सन्मानदर्शक पदव्या विकते व मिळालेला पैसा पुरी व प्रतापपूर इथल्या मंदिरांकडे पाठविते.

मुळात हे लोक ओडिसातले; पण पुरीचे महाराज पुरुषोत्तम देव यांच्याबरोबर हे गंजम जिल्ह्यात वास्तव्यासाठी आले. का. ट्रा. स. इं. ]

## खोपडी उठवणे

खानदेशात केला जाणारा एक पूजाविधी. ज्यांच्या घरी कुलदेवतांचे टाक, गणपती इ. देव असतात, असे शेतकरी कार्तिक शु. एकादशीस ही पूजा करतात. त्यासाठी सायंकाळी दारापुढे सडासमार्जन करून रांगोळ्या घालतात. नंतर त्या ठिकाणी चौरंग मांडून त्यावर बाळकृष्ण ठेवतात. त्या देवावर चार पाच उसांचे एक खोपटे उभारतात, त्याला खोपडी म्हणजे घरकुल असे म्हणतात. त्यावर नवे धोतर किंवा उपरणे गुंडाळतात. मग ब्राह्मणाकरवी त्याची पूजा करतात. हरभऱ्याच्या झाडाची अग्रे खुडून ती आधी वाळवून ठेवतात व पूजेत नैवेद्यासाठी त्यांची भाजी करतात. बोरे व आवळे हेही नैवेद्यात असतात.

पूजा व आरती आटोपल्यावर ब्राह्मण उसाचे खोपटे हाताने हालवतो. त्या वेळी घरातील मुले व यजमान हातात घंटा, ताट, ताम्हन इ. वस्तू घेऊन त्या वाजवीत खोपडीभोवती प्रदक्षिणा घालतात व तोंडाने पुढील गाणे गातात—

**उठ देव सांवळा, बोर भाजी आवळा ।**
**उठ देव सांवळा, बोर भाजी आवळा ।।**

काही शेतकरी अशा वेळी देवाचा चौरंगच उचलून धरतात. हा प्रबोधोत्सवाचाच एक प्रकार होय.

## खोरदाद साल

एक पारशी सण. हा फर्वरदिनाच्या ६ व्या तिथीला (१० सप्टेंबरला) करतात. या दिवशी पारशी धर्माचा संस्थापक झरथुष्ट्र याचा जन्म झाला. म्हणून याला झरथुष्ट्र-जयंतीचा उत्सव असेही म्हणतात.

## खोल

(१) बंगालमध्ये आढळणारे एक वाद्य. या वाद्याचा आकार मृदंगाप्रमाणे असून धार्मिक उत्सवात हे वाजवतात.



खोल

(२) एक शिरोरक्षक टोपी. खोल शब्द इराणी कुलह या शब्दाचे रूपांतर आहे. पूर्वीच्या काळी काही राजे डोक्याला केशरी रंगाचे रुमाल बांधीत, तर काही तागाच्या कापडाचे बनवलेले खोल वापरीत. या खोलांवर चूडामणी बसवीत. अजंटा

येथील नागराज-द्रविडराज संवाद नामक चित्रात अशा प्रकारे वेषभूषा केलेले दोन सेवक आढळतात. त्यांपैकी एकाची वेषभूषा इराणी पद्धतीची असून, त्याने खोल अर्थात कुलहटोपी घातलेली आहे; ती गोल आकाराची आहे. दुसरा चिनी असून त्याने केशरी रंगाचा रुमाल बांधलेला आहे. [ ह. च. सां. अ. ]



खोल टोपी

**ख्यॉंग** एक आदिवासी जमात. आसामातील अराकान पर्वतात वाहणाऱ्या कुलाडन नदीच्या जवळ यांचे वास्तव्य आहे. हे लोक घराच्या ऐवजी गुहा तयार करून त्यांत राहतात. गुहांतल्या अंधाराची त्यांना भीती वाटत नाही. गुहात राहून ते ऊन, वारा, पाऊस आणि वन्य श्वापदे यांपासून आपले रक्षण करतात.

हे लोक परमेश्वराची दोन रूपे मानतात. त्यांपैकी खोजिंग नामक देव अराकान पर्वताच्या उंच शिखरांवर वास्तव्य करतो व सिंह त्याच्या घरावर पहारा करतो, अशी यांची समजूत आहे. संकटकाळी किंवा साथीच्या वेळी ते खोजिंगला वन्य पशूचा बळी देऊन संतुष्ट करतात.

यांच्या दुसऱ्या देवाचे नाव पैंती असे आहे. तो दूर पश्चिमेला एका महालात राहतो. सूर्य हा त्याचा सचिव असून, तो दिवसभर लोकांच्या हालचालींवर बारीक नजर ठेवतो व संध्याकाळी पैंतीला प्रत्येकाच्या पापपुण्याचा हिशेब सांगतो.

ख्यॉंग लोक फक्त एखादे जाडेभरडे वस्त्र किंवा जनावराचे कातडे कमरेभोवती गुंडाळतात. ते अत्यंत कष्टाळू आहेत. आपल्या देशाचा त्याग करणे हे पाप आहे असे ते समजतात. आपल्या निबिड अरण्याशिवाय पृथ्वीवर दुसरीकडे कुठेही आपले संरक्षण होणार नाही, अशी त्यांची धारणा असते. मानवाची उत्पत्ती कशी झाली, याबद्दल त्यांची कथा अशी—

करोडो वर्षांपूर्वी आदिमानव तलंद्रकपा हा एका गुहेतून बाहेर आला व याच आदिमानवापासून सर्वांची उत्पत्ती झाली. प्रथम हा आदिपुरुष एकटाच होता. मग त्याने आपले सामर्थ्य दाखवून परमेश्वराच्या मुलीशी लग्न केले. नंतर परमेश्वराने आपल्या महालापासून तो तलंद्रकपाच्या गुहेपर्यंत जाणारा एक मार्ग तयार करण्याची सर्व प्राण्यांना आज्ञा केली. पण काही प्राण्यांनी त्या कामी चुकारपणा केल्यामुळे ईश्वराने त्यांना शाप दिला, की ' सूर्यास्तानंतर तुम्हाला काही दिसणार नाही.' माकड हा त्यांपैकीच एक प्राणी आहे.

लुशाई पर्वतावरील एका अत्यंत घनदाट जंगलात तलंद्रकपाची पूर्वीची ती गुहा आजही आहे, असे ते मानतात. [ भा. आ. ]

**ख्यातिवाद** प्रशंसा, प्रसिद्धी, कथन, प्रकाश, ज्ञान असे ख्यातीचे अर्थ आहेत. दार्शनिकांनी निरनिराळ्या पाच ख्याती मानल्या आहेत, त्या पुढीलप्रमाणे—

(१) **आत्मख्याती**– आत्मा म्हणजे बुद्धी. तिची ख्याती म्हणजे विषयरूपाने प्रतिभास होय. उदा. शिंपीला पाहून हे रुपे आहे असा भ्रम निर्माण होणे. या भ्रमात बुद्धीच तदाकार भासते. अशा वेळी दुसऱ्या बाह्य विषयाची अपेक्षा नसते. विज्ञानवादी बौद्ध ही ख्याती मानतात.

(२) **असत्ख्याती**– ही शून्यवादी बौद्धांची ख्याती आहे. यात असत् (= नसलेल्या) रुप्याची शिंपीवर प्रतीती होते. वाचस्पतिमिश्रानेही असत्ख्यातीचा अंगीकार केला आहे.

(३) **अख्याती**– उदा. इदं रजतम् (= हे रुपे आहे) या वाक्यातला इदं हा अंश प्रत्यक्ष प्रतीतीचा विषय असतो. रुपे हा अंश प्रत्यक्ष प्रतीतीचा विषय नाही. कारण नेत्रादिकांशी त्याचा संबंध झालेला नसतो. यास्तव रुपे ही प्रतीती स्मरणरूप आहे; पण हा भेद मात्र लक्षात येत नाही. हीच अख्याती होय. मीमांसक हे अख्यातिवादी आहेत.

(४) **अन्यथाख्याती**– एका वस्तूची अन्य वस्तूच्या आकाराने प्रतीती येणे, असे हिचे स्वरूप आहे. उदा. शिंप पुढे असताना सदोष इंद्रियांच्या योगाने ती अन्य प्रदेशी व अन्य काळी पाहिलेल्या रुप्याच्या आकाराने भासणे. नैयायिक ही ख्याती मानतात.

(५) **अनिर्वचनीय ख्याती**– जिला सत् व असत्ही म्हणता येत नाही, अशा वस्तूची प्रतीती येणे, हे हिचे स्वरूप आहे. उदा. शिंपीच्या ठिकाणी भासलेल्या रुप्याला सत् म्हणता येत नाही. प्रमाणतः निरूपण करताना सत् वस्तूचा बाध होता कामा नये. पण इथे तो होतो. म्हणजे प्रमाणांनी ते रुपे नाही, असे ठरते. त्याचप्रमाणे त्याला असत्ही म्हणता येत नाही. कारण जे असत् आहे त्याची प्रतीती संभवत नाही. इथे तर शिंपीवर रुप्याची प्रतीती येते. याचा अर्थ भ्रामक पदार्थांची प्रतीती येणे, ही अनिर्वचनीय ख्याती होय. वेदान्ती लोक ही ख्याती मानतात. [ भा. द. सं. ]

**ख्याल** (१) हिंदुस्थानी संगीताच्या गायकीतला एक प्रकार ख्याल = कल्पना. हा फारसी शब्द आहे. ख्यालाचे रूप ध्रुपदाहून काहीसे सूक्ष्म आहे. ख्यालात भावनेला प्राधान्य असते व विस्तार करण्यास योग्य अशा मुख्य मुख्य रागांतच ख्यालांची रचना झालेली असते. ख्याल गाताना त्याचा विस्तार करण्यासाठी स्थायभंजनी, रूपकभंजनी, प्रतिग्रहणिका, इ. रूपकालापभेदांचा अधिक प्रमाणात प्रयोग होतो. ख्यालाचा मुख्य रस सामान्यपणे विप्रलंभ शृंगार हा असतो. ख्यालात नायकनायिकांचे भेद व त्यांचे गुण वर्णिलेले असतात. ध्रुपदानंतर बऱ्याच काळाने ख्याल जन्माला आला. ध्रुपद ही केवळ भारतीय रचना आहे; तर ख्याल हा भारतीय व फारसी संगीताचा संगम आहे.

**इतिहास**– भारतात ख्याल केव्हापासून प्रचलित झाला, हे निश्चित सांगणे कठीण आहे. प्राचीन काळी प्रबंध व रूपक अशा दोन गानशैली प्रचलित होत्या. प्रबंधशैलीतून पुढे ध्रुपद उगम पावले आणि रूपकशैलीतून ख्याल व ठुमरी आविष्कृत झाल्या. अमीर खुस्रव याने ख्याल गायकी शोधून काढली, असे म्हणतात.

ख्यालाच्या विकासात कव्वाल व भजनी यांनी मोठाच हातभार लावला आहे. आजचा ख्याल हा ‘ कव्वालबानी ’ चा तरी असतो अथवा भजनशैलीचा तरी असतो. १४ व्या शतकात जौनपुरचा सुलतान हुसेनशाहा शर्की याने ख्यालगायकीला विशेष प्रोत्साहन दिले; पण त्याच्या कालात ख्याल हा अविकसित अवस्थेतच राहिला. त्याला प्रगल्भता आली, ती १८ व्या शतकातल्या मोगल सम्राट महंमदशहाच्या कारकीर्दीत. त्याच्या दरबारात सदारंग व अधारंग नामक दोन गायक बंधू होते. ते तानसेनाचे वंशज होते, असे सांगतात. त्या दोघांनी हजारो ख्याल रचले व ते आपल्या शिष्यांना पढविले. आश्चर्याची गोष्ट ही, की त्या दोघांनी स्वतः मात्र कधीही ख्याल गायला नाही व आपल्या वंशजांनाही गाऊ दिला नाही. याचे कारण ख्यालाला ते शास्त्रीय गायन मानीत नव्हते हे होय. पण त्या दोघांच्या शिष्यपरपरेने मात्र ख्यालाला विलक्षण लोकप्रियता मिळवून दिली. ख्यालाचा प्रचार-प्रसार करण्यात ज्यांनी मोठे यश मिळविले अशा गायकांत पं. भातखंडे, पं. विष्णू दिगंबर पलुस्कर, उस्ताद करीमखाँ, उस्ताद फैयाजखाँ पं. वझेबुवा, इ. नावे उल्लेखनीय आहेत.

**ख्यालाचे प्रकार**– विलंबित व द्रुत असे ख्यालाचे दोन प्रकार आहेत. ज्या ख्यालांची रचना ध्रुपदशैलीवर असते, असे ख्याल विलंबित लयीत व तिलवाडा, झूमरा, आडा चौताल किंवा एकताल या तालात गायिले जातात. यांना हिंदीत ‘ बडा खयाल ’ म्हणतात. जे ख्याल चपल चालीचे असतात व जे त्रिताल, एकताल अथवा झपताल यात गायिले जातात, ते द्रुत होत. त्याना ‘ छोटा खयाल ’ म्हणतात. बडचा ख्यालांची रचना सदारंग व अधारंग यांनीच केली. त्यांच्यापूर्वी शास्त्रीय संगीतात ध्रुपद-धमार व छोटा खयाल हेच गायिले जात होते. सांप्रत कोणताही गवई मैफलीला बसला, की तो प्रथम बडा खयाल आणि नंतर छोटा खयाल हटकून गातो. भारतात ख्यालगायकीची कित्येक घराणी आहेत आणि प्रत्येक घराण्याची गायनशैली वेगवेगळी आहे.

अस्ताई व अंतरा असे ख्यालाचे दोन भाग असतात. गायक प्रथम बंदीशीला धरून ख्यालाचे शब्द म्हणतो व आलाप व ताना यांच्या द्वारे स्वरविस्तार करून त्या त्या रागाची इमारत उभारतो. रागाच्या शुद्धतेला बाध न आणता जो गायक आपल्या प्रतिभेच्या साहाय्याने ख्यालाची कल्पनापूर्ण सजावट करतो, तो श्रेष्ठ मानला जातो.

भक्तिकालीन कवी, तसेच सदारंग, अधारंग व मनरंग हे गायक, यांचे ख्याल संगीत व काव्य या दोन्ही दृष्टींनी सुंदर आहेत. पण अशिक्षित गायकांच्या हाती पडल्यामुळे साप्रत त्यांचे शब्द विकृत झाले आहेत. पुष्कळशा ख्याल-गायकाना चीजेचा अर्थच कळत नाही आणि त्यामुळे ते आपल्या गायनात चिजेतील भावनेची योग्य अभिव्यक्ती करू शकत नाहीत. ख्याल श्रवणसुभग व्हायला हवा असेल, तर गायकाने त्यातले शब्द आणि स्वर या दोहोंवरही योग्य ते ध्यान दिले पाहिजे.
[ सं. शा.; डॉ. समरबहादुरसिंह– सा. हिंदुस्थान २३-२-६४ ]

(२) महाराष्ट्रातल्या दशावतारांप्रमाणे राजस्थानातले एक लोकनाटच. याचे प्रयोग खुल्या मैदानात होतात. चारी बाजूनी माणसे बसतात. मधे थोडीशी जागा रंगभूमीसाठी मोकळी ठेवतात. ख्यालाचा प्रयोग करणारी मंडळी त्या ठिकाणी येऊन बसतात. नगारा, ढोलके, सारंगी आणि बाजाची पेटी ही ख्यालाला साथ करणारी वाद्ये होत. ती वाजवणारे तिथेच एका कोपऱ्यात बसतात. ख्यालाची आख्याने लावणी, दूहा, दोहा, चौबोला, दुबोला, चौपाई, छंद, शेर, उडान कबित्त, छप्पय्य, इ. पिंगल आणि मेरठी छंदांत असतात. पांड, सोरठ, कालंगडा, आसावरी इ. काही विशिष्ट राग-रागिण्यांतूनच हे ख्याल गायिले जातात. गाणारा उंच आवाजात गातो व गाता गाता त्या त्या भूमिकेला अनुरूप अभिनय करतो. यात गाण्यापेक्षाही अभिनयालाच प्राधान्य असते. रात्ररात्र हे खेळ चालतात.

ख्यालाच्या सुरवातीला सगळी पात्रे रंगून दुसऱ्या कुठल्यातरी जागी गणपती व सरस्वतीचे पूजन व स्तवन करतात. मग रंग-

भूमीवर पहिले पात्र प्रवेश करते, ते भंग्याचे. तो भंगी रंगभूमीची झाडलोट करून त्याचबरोबर गाणेही म्हणतो. नंतर येतो भिस्ती. तो रंगभूमीवर पाण्याचा शिडकाव करतो. नंतर हलकारा येतो. त्यानंतर ख्यालाचे जे आख्यान लावायचे असेल त्यातला मुख्य नायक प्रवेशून आत्मपरिचय घडवतो. ख्यालाची आख्याने पौराणिक, ऐतिहासिक आणि प्रेमकथात्मक असतात. ख्याल हा लोकनाटचाचा प्रकार मुख्यतः वीरपूजेच्या उद्देशाने निर्माण झालेला आहे. राजस्थानातील वीरपूजेची भावना तीव्र असून, त्या त्या नाटचात पात्रांच्या द्वारा होणारे ऐतिहासिक वीरपुरुषांचे दर्शन हे जणू त्यांना प्रत्यक्ष दर्शन वाटते.

अनेक कवींनी रचलेले शेकडो ख्याल राजस्थानी साहित्यात उपलब्ध आहेत. राजस्थानातल्या बहुतेक वीरपुरुषांवर, इतकेच नव्हे; तर श्रीमंतांना लुटून गरिबांना मदत करणारे डूल्लो, दयाराम, बलजी, इ. धाडी म्हणजे दरोडेखोर याच्यावरही ख्याल रचलेले आहेत. वर्तमानकालीन ख्याल रचणारे कवीत नानूलालचे नाव फार लोकप्रिय आहे. याची स्वतःची ख्यालमंडळी होती. याने राजस्थानाबाहेरही ख्यालनाटचाचा परिचय घडविला. [ मनोहर शर्मा ]

## ख्रिस्ती धर्म

येशू ख्रिस्त याच्या नावाने प्रचलित झालेल्या संप्रदायाला ख्रिस्ती धर्म म्हणतात. हा धर्म कोणत्याही शास्त्रावर, सिद्धांतावर किंवा सूत्रावर आधारलेला नसून, येशू ख्रिस्ताविषयी दृढ श्रद्धा हाच त्याचा पाया आहे. येशू ख्रिस्त सदासर्वकाळ जिवंत राहणार आहे व तो देवच असून मानवाच्या तारणाकरता या जगात आला आहे, असा ख्रिस्ती लोकांचा विश्वास आहे.

ख्रिस्त हा शब्द ग्रीक भाषेतील ख्रिस्तोस या शब्दावरून बनला असून, त्याचा अर्थ अभिषिक्त असा आहे. हिब्री भाषेत अभिषिक्त याला मशीहा असे म्हणतात. स्वर्गातून पवित्र आत्म्याने येशूचा अभिषेक केला, अशी ख्रिस्ती जनांची धारणा आहे.

'मी ईश्वराचा दूत आहे व मानवजातीच्या कल्याणासाठी व पतितांच्या उद्धारासाठी पृथ्वीवर अवतरलो आहे' असे येशू ख्रिस्त सांगत असे. तो सर्वांचा तारक आहे; श्रीमंत, गरीब, काळा, गोरा, सुधारलेला, रानटी, असा कोणताही भेदभाव त्याच्याजवळ नाही. जो आपली पापे कबूल करतो व त्याबद्दल पश्चात्ताप करतो, त्याचे तो तारण करतो, असे त्याचे अनुयायी मानतात.

**ईश्वरकल्पना**— ईश्वर एकच असला तरी आकाशातील पिता, त्याचा पुत्र येशू व पवित्र आत्मा अशी त्याची तीन रूपे असून, या तीन्ही व्यक्ती मिळून एकच ईश्वर होय, असा ख्रिस्ती धर्माचा सिद्धांत आहे. याला ते त्रिक-सिद्धांत म्हणतात. ज्याप्रमाणे समुद्र, ढग व पाऊस ही एकाच पाण्याची भिन्न भिन्न रूपे असतात, त्याचप्रमाणे पिता, पुत्र व सर्व जगात भरून राहिलेले आत्मतत्त्व ही एकाच ईश्वराची भिन्न रूपे होत, असे ख्रिस्ती लोकांचे मत आहे.

ईश्वर सनातन व स्वयंभू आहे. तो अनादी, अनंत असून, त्यानेच सर्व सृष्टी निर्माण केली. मनुष्यालाही त्यानेच निर्मिले. तो आपला पिता आहे. तो सर्वज्ञ व सर्वशक्तिमान असून, सर्वत्र आहे. तो पवित्र, दयाळू व न्यायी आहे. अन्यायाचा तो द्वेष करतो व पापाला योग्य अशी शिक्षाही देतो. म्हणूनच येशूने त्याला क्षमाशील पिता म्हटले आहे. मनुष्य कितीही पापी असला तरी त्याला जर पश्चात्ताप झाला, तर ईश्वर त्याला क्षमा करतो, हे ख्रिस्ती धर्मातील एक महत्त्वाचे तत्त्व आहे.

**पाप आणि मुक्ती**— मनुष्य मुळारंभी पापी नव्हता; पण ईश्वराची आज्ञा मोडल्यामुळे तो पापी झाला आणि त्यामुळे सर्व माणसे जन्मतःच पापी असतात, अशी त्या धर्मात कल्पना आहे. दीक्षेमध्ये मिळणाऱ्या प्रसादामुळे तो मोक्षाचा अधिकारी बनतो. आणि मोक्ष देण्याचा अधिकार मात्र एकटचा येशूलाच आहे. दानधर्म, सत्कर्म, इ. पापक्षालनाचे इतर उपाय व्यर्थ आहेत. माणसाचे तारण दुसऱ्या कोणाकडून होत नाही. येशूने सर्वांचे पाप स्वतःवर घेतले आणि तो पापी लोकांसाठी मरण पावला, म्हणून ख्रिस्तरूपी ईश्वराला शरण गेले असता मनुष्याला मुक्ती मिळते. त्यासाठी चर्चमध्ये राहून म्हणजे ख्रिस्ती मंडळात सामील होऊन परमेश्वरी कृपा मिळवावी लागते. जे देवाच्या पुत्रावर विश्वास ठेवतात, त्याचे तारण होते.

**पश्चात्ताप**— ख्रिस्ती धर्मशास्त्रात या शब्दाला फार महत्त्व आहे. पापाबद्दल दुःख करणे व ते ईश्वराजवळ कबूल करून क्षमा मागणे याला ते मन पालटणे असे म्हणतात. पश्चात्तापाने मनुष्य नवा बनतो आणि त्याची खूण म्हणून तो येशूच्या नावाने बाप्तिस्मा घेतो. पश्चातापाने त्याला स्वर्गाचे दार उघडते व तो सार्वकालिक जीवन व अक्षय्य आनंद प्राप्त करून घेतो. मात्र पश्चाताप न केल्यास त्याचा नाश हा ठरलेलाच ! म्हणूनच ख्रिस्ती धर्मात पश्चातापाला असाधारण महत्त्व दिलेले आहे. नुसती पापाची कबुली म्हणजे पश्चात्ताप नव्हे; तर त्याबद्दल त्याला दुःख झाले, त्याने क्षमायाचना केली व पुन्हा पाप आचरले नाही, तरच तो खरा पश्चाताप होय.

**नवीन जन्म** — ख्रिस्ती आईबापांच्या पोटी जन्मास आल्याने कोणी ख्रिस्ती होत नाही. प्रभू येशूने स्पष्ट सांगितले आहे, की 'तुम्हास नव्याने जन्मले पाहिजे.' पश्चात्तापपूर्वक आणि अंतः-

करणात प्रभू येशूचा स्वीकार करून जो बाप्तिस्मा घेतो, त्याचा नवीन जन्म होतो. शिक्षण, सुधारणा, प्रगती किंवा तत्त्वज्ञानाचा अभ्यास यांमुळे नवीन जन्म होऊ शकत नाही. धर्मसंस्कार, विधी, दानधर्म, पोथीवाचन, प्रार्थना यांच्यामुळेही नवीन जन्म होत नाही; तर जो येशू ख्रिस्ताकडे येतो व आपली पापे कबूल करून पश्चात्ताप करतो, त्याच्याच मनोवृत्तीत पुढे बदल होऊन त्याला नवीन जन्म प्राप्त होतो.

ख्रिस्त हा देवदूत मानलेला आहे. देवाचे आदर्श राज्य पृथ्वीवर लौकरच प्रस्थापित होईल, असे त्याने भाकीत केले होते आणि तशी श्रद्धा प्रारंभी त्याच्या अनुयायांच्या अंतःकरणात होतीही ! पण रोमन साम्राज्यात सर्वत्र या संप्रदायाचा प्रसार झाल्यानंतर ती श्रद्धा कमी कमी होत गेली. देवाचे राज्य म्हणजे ख्रिस्ताच्या तत्त्वांचा जगभर प्रसार आणि ख्रिस्ताचे पुनरुत्थान म्हणजे त्याच्या आत्म्याचे अमृतत्व, असा त्याचा नवा अर्थ लावण्यात आला. जगाच्या अंती म्हणजेच प्रलयकाली सर्व लोक पुन्हा जिवंत होऊन त्यांच्या पापपुण्याचा निवाडा होईल, ही कल्पना मात्र नाहीशी झाली नाही. पापी मनुष्याला नेहमी यातना भोगाव्या लागतात, अशी कल्पना ख्रिस्ती लोकात पूर्वी होती. पण ती पुढे नाहीशी होऊन तिच्या जागी, परमेश्वर परमकारुणिक असल्यामुळे तो कोणालाही कायमचे नरकात ठेवीत नाही, ही कल्पना रूढ झाली.

**भक्तिभावना** – परमेश्वराची अनन्य भक्ती हे ख्रिस्ती धर्माचे प्रमुख अंग आहे. अनन्य भक्ती म्हणजे अहंभाव विसरून परमेश्वराला सर्वस्वी शरण जाणे होय. येशू ख्रिस्त हा या तत्त्वाचा मूर्तिमंत आदर्श होता. मनुष्यजात ही परमेश्वराची संतती असल्यामुळे प्रत्येक मनुष्याने परमेश्वरावर जसे मनःपूर्वक प्रेम करायचे, तसेच आपल्या बांधवांवर व शेजाऱ्यांवरही केले पाहिजे, हे उच्च तत्त्व या धर्मात आढळते. इतकेच नव्हे; तर स्वतःच्या शत्रूवर किंवा अपकारकर्त्यावरही प्रेमच करण्याचा उपदेश येशूने केला आहे. ज्यांनी त्याला सुळावर चढविले, त्यानासुद्धा क्षमा करण्याविषयी त्याने देवाची प्रार्थना केली आहे.

**भिक्षुवृत्ती** – सर्वसामान्य बंधुभावाची ही कल्पना चर्चच्या पूर्वेतिहासात आढळून येते; पण पुढे ही व्यापक व उच्च भावना हळूहळू लोप पावली आणि वैयक्तिक उन्नतीकडे लोकांचे लक्ष लागले. संसाराचा त्याग करून, भिक्षुवृत्तीने एखाद्या मठात राहावे व शुद्धाचरणाने आत्मोन्नती साधावी, या पलिकडे जगात उच्च कर्तव्य नाही, अशी भावना पुढच्या काळात बळावली. ४ थ्या शतकाच्या अखेरीस ही मठसंस्था सर्व युरोपभर मान्यता पावली. भिक्षू व भिक्षुणी यांना समाजात फार मान मिळू लागला. त्यामुळे लोकांच्या आचार-विचारातही पवित्र जीवनाचा प्रभाव दिसू लागला. आत्मशुद्धीसाठी लोक उपवास, दानधर्म, इ. व्रतांचे पालन करू लागले. ब्रह्मचर्यालाही महत्त्व मिळाले.

**उपासना** – ख्रिस्ती धर्मोपासनेत प्रार्थनेला अतिशय महत्त्व आहे. प्रार्थना म्हणजे देवाशी संभाषण असे ते मानतात. स्वार्थबुद्धीने, ढोंगीपणाने किंवा दिखाऊपणाने प्रार्थना करणे, हे मात्र योग्य नव्हे. मनोभावे व नम्रतेने प्रार्थना केली; तरच तिचा उपयोग होईल. ज्याला पापाबद्दल दुःख झाले आहे, ज्याला क्षमा हवी आहे, जो देवाला भितो, त्याची आज्ञा पाळतो व येशूवर विश्वास ठेवतो, त्याचीच प्रार्थना देव ऐकतो. या प्रार्थनेची पद्धत अशी–

प्रथम देवाला धन्यवाद देतात. त्याच्या अनंत उपकाराबद्दल स्तवन करतात. देवाचे राज्य त्वरित यावे, येशूचे दुसरे येणे लवकर व्हावे, अशी इच्छा व्यक्त करतात. नंतर आपल्याला नवीन जीवन, नवी शक्ती व नवे धैर्य प्राप्त व्हावे, अशी प्रार्थना करतात.

प्रार्थनेचे दोन प्रकार आहेत – एक वैयक्तिक व दुसरा सामुदायिक. वैयक्तिक प्रार्थना व्यक्तिगत हितासाठी; तर सामुदायिक प्रार्थना सर्वांच्या हितासाठी असते. येशू ख्रिस्ताने सामुदायिक प्रार्थनेवर भर दिला आहे; कारण सर्वांचे कल्याण साधावे, हाच त्याचा उद्देश होता. केवळ आप्तेष्टांसाठीच नव्हे; तर शत्रूसाठीही प्रार्थना करावी, असे त्याने सांगितले आहे. म्हणून मग यहुदी लोक सिनेगॉगमध्ये प्रार्थना करीत, त्याचप्रमाणे ख्रिस्ती लोक चर्चमध्ये सामुदायिक प्रार्थना करू लागले.

रोज सकाळी, दुपारी व रात्री प्रार्थना करावी; एवढेच नव्हे, तर नेहमी, सर्व ठिकाणी, चांगल्या वा वाईट स्थितीत असतानाही प्रार्थना करावी, सर्व जीवनच प्रार्थनामय व्हावे, असे ख्रिस्ती धर्म सांगतो. इतर कशानेही असाध्य ठरणाऱ्या गोष्टी प्रार्थनेने साध्य होतात, असा तिचा महिमा ख्रिस्ती धर्मात मानलेला आहे. मात्र सर्व काही ईश्वराच्याच इच्छेप्रमाणे घडो, हा प्रार्थनेचा मूल मंत्र असला पाहिजे, असेही ख्रिस्ती धर्माचे तत्त्व आहे.

परमेश्वर व भक्त यांचा संबंध वैयक्तिक स्वरूपाचा मानल्यामुळे सुरवातीस प्रत्येकाला स्वतःच्या इच्छेप्रमाणे उपासना करण्याचे स्वातंत्र्य होते. पण त्याचा दुरुपयोग होऊन उपासनेचे असंख्य प्रकार सुरू झाले. उपासना हा एक खेळच होऊन बसला. तिचे गांभीर्य कमी होऊ लागले. त्यामुळे चर्चच्या धर्मगुरूंनी उपासनेच्या बाबतीत बरेच निर्बंध जारी केले. धर्मगुरूंच्या विधानाप्रमाणे प्रार्थना केली, तरच परमेश्वर मनुष्याचे

पाप जाळून टाकतो, ही कल्पना त्यांनीच प्रसृत केली आणि त्यामुळे त्या विधीला दबदबा व पावित्र्य प्राप्त झाले.

**पूजा** – येशू ख्रिस्ताने ईश्वराला मनुष्यमात्राचा पिता मानले व त्याच्यावर मनःपूर्वक प्रेम करण्याचा उपदेश केला. अखिल मानवजात ही ईश्वराची प्रजा म्हणून तिच्यावर प्रेम करणे, हीच त्याची पूजा होय. पूजेच्या बाह्य विधीला ख्रिस्ती धर्मात महत्त्व नसून प्रार्थनेला महत्त्व आहे. परोपकार, बंधुभाव यामुळेच परमेश्वर प्रसन्न होतो. त्याला दुसरे काहीही अर्पण करण्याची आवश्यकता नसते.

ख्रिस्तापूर्वीच्या यहुदी धर्माचा मूर्तिपूजेला विरोध होता आणि येशू ख्रिस्तानेही मूर्तिपूजा अमान्य ठरवली. त्यामुळे रोमन साम्राज्यात त्याच्या संप्रदायाचा प्रसार होताच मूर्तिपूजा कायद्याने बंद करण्यात आली. प्राचीन काळी येशू, मेरी, सेंट पॉल, इ. धर्मधुरीणांची जी चित्रे काढण्यात आली होती, ती कलात्मक आविष्कार या दृष्टीने व केवळ प्रतीके म्हणून काढलेली होती. त्यांना धार्मिक महत्त्व नव्हते. ४ थ्या शतकापासून मात्र अशा चित्रांकडे व मूर्तींकडे पाहण्याची दृष्टी बदलली. पूज्य विभूतींच्या प्रतिमांना भक्तिभावाने वंदन करण्यास प्रत्यवाय नाही, असे ठरले. त्याच सुमारास ख्रिस्ती संप्रदायात अवताराची कल्पना प्रसृत झाली. त्यामुळे मेरी व येशू यांचे दिव्यत्व त्यांच्या प्रतिमांमध्ये साकार झाले आहे, ही भावना उत्पन्न झाली असावी. क्रॉस हे ख्रिस्ती धर्मातले एक पवित्र चिन्ह आहे. आत्म्याचे पुनरुत्थान व मोक्ष यांचे ते प्रतीक आहे. काही लोक त्याला ख्रिस्ताचेही प्रतीक मानतात.

**धार्मिक संस्कार** – मनुष्याला ईश्वरी कृपेचा लाभ होण्यासाठी साहाय्यक म्हणून येशू ख्रिस्ताने सात संस्कार करण्यास सांगितले होते, ते असे– बाप्तिस्मा, दृढीकरण, तप, प्रभुभोजन, अधिकारदान, विवाह व तैलाभ्यंग. यातील बाप्तिस्मा व प्रभुभोजन हे दोनच संस्कार प्रोटेस्टंट लोक महत्त्वाचे मानतात.

बाप्तिस्मा– ख्रिस्ती महामंडळात प्रवेश मिळविण्यासाठी आवश्यक असलेला पहिला धार्मिक विधी म्हणजे बाप्तिस्मा होय. हा नवीन जन्माचा निदर्शक आहे. ज्याचे अंतःकरण पालटले व पापमय जीवन नष्ट झाले, त्याच्यामध्ये पवित्र आत्मा वास करू लागतो, म्हणजेच त्याचे ख्रिस्ताशी मीलन होते, याचे हे प्रतीक होय. प्रारंभी या विधीत दीक्षा घेणाऱ्याने सर्वांगस्नान करण्याची प्रथा होती. पण पाणी दुर्मिळ असेल तेव्हा मस्तकावर पाणी शिंपडणे किंवा मस्तकाला बोटांनी पाणी लावणे, एवढे केले तरी पुरे, असे कालांतराने ठरविण्यात आले. दृढीकरण नामक विधीने (पुरोहिताने मस्तकावर हात ठेवणे) हा संस्कार पूर्ण होतो.

प्रभुभोजन – येशूला क्रॉसवर खिळवले त्यापूर्वी तो व त्याचे शिष्य यांनी मिळून जे भोजन केले, त्या घटनेवरून पुढे हा विधी सुरू झाला. त्यात येशूचे आत्मसमर्पण व त्याचे अस्तित्व या दोन कल्पना विशेष महत्त्वाच्या आहेत. शिवाय ईश्वराने येशू ख्रिस्ताला जगाच्या उद्धारार्थ भूतलावर पाठविले त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करणे, ही भावनाही या विधीत असते. येशूने वापरलेले शब्द उच्चारून देवाला भाकरी व द्राक्षरस हे पदार्थ अर्पण करणे आणि नंतर त्यांचे भक्षण व प्राशन करणे, असा हा विधी आहे. या दोन पदार्थांचे रूपांतर ख्रिस्ताचे शरीर व रक्त यांत होते, असे रोमन कॅथॉलिक मानतात; तर लुथरेन पंथाचे लोक त्या पदार्थातच ख्रिस्ताचे अस्तित्व मानतात. मात्र त्या पदार्थांच्या रूपाने ख्रिस्ताची प्राप्ती होते, याबद्दल दोन्ही पंथांचे एकमत आहे. तिसरा दृष्टिकोन असा, की हा विधी ख्रिस्त व त्याचे आत्मबलिदान यांचे केवळ स्मारक आहे. या पदार्थांच्या सेवनाने श्रद्धावान मनुष्याचा ख्रिस्ताशी अत्यंत निकट संबंध येतो, असेही एक मत आहे.

तप – पुरोहितासमोर स्वतःच्या पापांची कबुली देणे व ईश्वराने क्षमा केली आहे, असे पुरोहिताकडून वदविणे, असा हा विधी आहे.

तैलाभ्यंग– आजारी किंवा मरणोन्मुख मनुष्याला तेल लावणे. त्यावेळी पुरोहिताने प्रार्थना म्हणायची असते.

**विवाहसंस्कार** – ख्रिस्ती धर्माने आधीची विवाहसंस्थाच थोडी सुधारून स्वीकारली आहे. नव्या करारात विवाहाविषयी फारशी चर्चा केलेली नाही; पण त्यात एकपतिपत्नीव्रत आणि पतिपत्नींची परस्पर निष्ठा यांवर भर दिलेला आहे. स्त्री-पुरुषांचे मीलन अपवित्र आहे किंवा ब्रह्मचर्य त्याहून श्रेष्ठ आहे, ही कल्पना नव्या करारात कुठेही आढळत नाही. विवाह म्हणजे ख्रिस्त व चर्च यांच्या गूढ मीलनाचे प्रतीकच होय असे संत पौलाने प्रतिपादिले आहे. त्यामुळे विवाहाची कल्पना अत्यंत पवित्र व उदात्त झाली आहे. पुरोहितांनी विवाह करू नये, असेही बंधन नाही.

ख्रिस्ती धर्माची स्थापना झाली, त्या काळी ज्यू, रोमन व ग्रीक या लोकांत स्त्री ही पतीची गुलामच मानली जात होती. ख्रिस्ती धर्माच्या प्रसारानंतर ही स्थिती पालटली आणि स्त्रीला मानाचे स्थान प्राप्त झाले. पूर्वी विवाहबाह्य संबंधाला धर्माचा फारसा विरोध नव्हता; नव्या करारात मात्र त्याचा निषेध केलेला आहे.

ख्रिस्ती विवाहसंस्कारात प्रथमपासूनच धार्मिक विधीला महत्त्व आहे. पुरोहिताच्या आशीर्वादाने स्त्री-पुरुषांचा संबंध जुळविणे हाच विवाहाचा सर्वश्रेष्ठ प्रकार मानला जातो. पूर्वे-

कडील ख्रिस्ती महामंडळे विवाहसमारंभात पुरोहिताचे आशीर्वचन, धार्मिक विधी व पवित्र आत्म्याला आवाहन, ही कृत्ये आवश्यक मानतात.

सर्व जगातील ख्रिस्ती लोक गेली अनेक शतके विवाहसमारंभात जे विधी करतात, त्यांचा उगम प्राचीन विवाहप्रथेतच सापडतो. एकनिष्ठेची शपथ घेणे, हात मिळविणे, एकमेकांना अंगठी देणे, वधूने ओढणीत मुख लपविणे, वधूवरांना मुकुट घालणे, वधूपित्याने वधूला वराच्या स्वाधीन करणे, विवाहाचा करार पूर्ण झाल्याची घोषणा करणे आणि वराने वधूला वाजत गाजत आपल्या घरी नेणे, असे त्या समारंभाचे साधारण स्वरूप असते.

प्रारंभी ख्रिस्ती धर्मात काडीमोड व पुनर्विवाह यांना मान्यता नव्हती. कारण एकनिष्ठेच्या तत्त्वाशी ते विसंगत मानले जाई. परंतु पतिपत्नींपैकी एकाने व्यभिचार केला, तर त्यांनी काडीमोड करण्यास हरकत नाही, असे पुढे ठरले. त्यानतर इतर कारणांमुळेही काडीमोडीस परवानगी मिळू लागली. त्याचबरोबर पुनर्विवाहालाही पुढे मान्यता मिळाली. रोमन कॅथॉलिक पंथाचा मात्र वरील दोन्ही गोष्टींना विरोध आहे.

**ख्रिस्ती सण** – येशू ख्रिस्ताच्या जीवनातील भिन्न भिन्न प्रसंगांवर आधारलेले काही महत्त्वाचे सण पुढीलप्रमाणे—

(१) रविवार – येशू ख्रिस्ताचे जे पुनरुत्थान झाले, त्याचे स्मरण सतत व्हावे म्हणून पाळला जाणारा दिवस. त्या दिवशी उपासना, ईशस्तवन, प्रार्थना व दानधर्म करतात.

(२) नाताळ – २५ डिसेंबरला ख्रिस्तजयंती साजरी करतात.

(३) गुडफ्रायडे – ज्या दिवशी येशू ख्रिस्ताने सर्व जगाकरता प्राणार्पण केले, तो शुक्रवार.

(४) ईस्टर– येशू ख्रिस्ताला सुळी दिल्यानंतर तिसऱ्या दिवशी म्हणजे रविवारी त्याचे पुनरुत्थान झाले, त्याच्या स्मरणार्थ हा सण पाळतात.

(५) झावळ्याचा सण (पामसन्डे) – पुनरुत्थानाच्या आधीचा रविवार. त्या दिवशी येशूने येरुशलेमात विजयाने प्रवेश केला होता.

(६) पन्नासावा दिवस (पेंटेकोस्ट) – पुनरुत्थानापासून सात आठवड्यानी हा सण येतो. हा ख्रिस्ती मंडळीचा जन्मदिन होय. त्या दिवशी येशू ख्रिस्ताचा आत्मा मंडळीत वास्तव्य करू लागला म्हणून त्याला पवित्र आत्म्याचा सण असेही म्हणतात. या दिवशी उपास करीत नाहीत व उभे राहून प्रार्थना करतात.

(७) गृह–सण– या सणाची सुरवात चीनमध्ये झाली. गृहसंजीवन हा याचा उद्देश असतो. 'प्रभू येशू जगाचा प्रकाश आहे' या वचनावर हा सण आधारलेला आहे. या दिवशी ख्रिस्तीगृहाला क्रॉसची निशाणी लावतात. भारतात हा सण ऑक्टोबर किंवा मे महिन्यात पाळतात.

(८) हंगामाचा सण – शेतातील पहिले पीक देवाला अर्पण करण्याच्या वेळी हा सण प्राचीन काळापासून पाळला जातो.

(९) स्वर्गारोहण – ईस्टर नंतर ४० व्या दिवशी येशू स्वर्गात गेला, त्याच्या स्मरणार्थ हा सण सर्व जगात पाळला जातो.

**मर्तिकप्रथा** – यहुदी लोकांची प्रेते पुरण्याची चालच ख्रिस्ती लोकांनी पुढे स्वीकारली. मृत्यू म्हणजे निद्रा व दफनभूमी म्हणजे विश्रांतिस्थान अशी त्यांची कल्पना असल्यामुळे त्याना मृत्यूचे वा दफनाचे भय वाटत नाही. मृताचे शरीर हे पवित्र आत्म्याचे मदिर होय, ही कल्पना आणि मृतजीवाचे पुनरुत्थान होण्याची आशा यामुळे मृताच्या देहाविषयी ख्रिस्ती लोकाना आदर वाटतो.

मनुष्य मेल्यानंतर त्याचे डोळे बंद करणे, त्याला स्नान घालून सर्व अवयवांना पट्ट्या बांधणे आणि सुवासिक पदार्थ टाकून सर्व शरीर शुभ्र वस्त्रात गुंडाळणे, अशी मूळची पद्धत होती. प्रत्येक कुटुंबाची दफनभूमी स्वतंत्र आहे. एकाच थडग्यात निरनिराळे कोनाडे करून त्यात कुटुबीय प्रेते ठेवीत. इ. स. च्या ३ ऱ्या शतकापर्यंत अंत्यविधीचे रूप असे साधे होते. पण ४ थ्या शतकापासून प्रेक्षणीय थडगी बांधणे, तिथे प्रार्थना व स्तोत्रे गाणे, प्रभुभोजन करणे, मेणबत्त्या लावणे, असे त्यात बरेच बदल झाले. मृताचे अलंकार व नित्योपयोगी वस्तू प्रेताबरोबर पुरण्याचीही चाल पडली. दफनभूमीवर स्मारके किंवा चर्चे बांधण्यात येऊ लागली. पुढे तर चर्चच्या आवारातच दफन करण्याची प्रथा सुरू झाली.

**धर्मग्रंथ** – बायबल किंवा पवित्र शास्त्र हा ख्रिस्ती लोकांचा धर्मग्रंथ होय. त्याचे दोन भाग आहेत. पहिला भाग म्हणजे जुना करार व दुसरा भाग म्हणजे नवा करार होय. जुना करार यहुदी लोकांचा धर्मग्रंथ होता. नवा करार येशू ख्रिस्ताच्या वधानंतर सुमारे शंभर वर्षाच्या काळात ग्रीक भाषेत रचला गेला. त्यात प्रभू येशूच्या चरित्राची चार पुस्तके, त्याची वचने व त्यासंबंधी त्याच्या शिष्यांची पत्रे आहेत. या पवित्र शास्त्रात तारणाचा मार्ग दाखविला आहे. (बायबल पाहा).

**ख्रिस्ती महामंडळाचा इतिहास** – हल्ली ज्याला पॅलेस्टाईन म्हणतात, त्या मध्यपूर्वेतील प्रदेशात यहुदी लोक राहत असत. या लोकांचे ईश्वरविषयक ज्ञान चांगले प्रगल्भ होते.

परंतु तिथे सुमारे दोनशे वर्षे अंदाधुंदी माजली होती. यहुदी राजसत्ता नष्ट झाली होती आणि ख्रिस्तपूर्व ६३ च्या सुमारास यहुदिया प्रांत हा रोम साम्राज्याचा एक सुभा बनला होता. रोमच्या बादशहाने तिथे शांतता व सुव्यवस्था प्रस्थापित केली खरी; पण त्या पारतंत्र्यात यहुदी धर्माला मात्र वाव राहिला नाही. ते लोक एकाच आशेवर जगत होते, की जगाला तारणारा मशीहा स्वर्गातून लवकरच अवतरेल व आपला उद्धार करील. त्याप्रमाणेच पुढे घडले. येरुशलेमजवळच्या बेथ्लेहेम गावी कुमारी मेरीच्या उदरी एका तेजस्वी मुलाचा जन्म झाला व तोच पुढे मशीहा ठरला. रोग, मृत्यू व पाप यांच्यावर मात करणारी अशी अद्वितीय शक्ती आपल्या ठायी आहे व आपणच ईश्वर आहो, असे तो ठासून सांगे व त्याची लोकांना प्रचीती यावी, म्हणून नाना प्रकारचे चमत्कारही करून दाखवी. त्यामुळे लोकांची त्याच्यावर दृढ श्रद्धा बसली. स्वार्थी व ढोंगी मात्र त्याचा द्वेष करू लागले, कारण तो त्यांच्या कर्मकांडाला विरोध करीत असे. त्यांच्या चिथावणीमुळेच रोमन अधिकाऱ्यांनी येशूला पकडून सुळी दिले.

ख्रिस्ताने आधीच सांगितल्याप्रमाणे वधानंतर तीन दिवसांनी त्याचे पुनरुत्थान झाले व त्याने अनेक शिष्यांना सजीव दर्शन दिले. चाळीस दिवसांनंतर तो स्वर्गात गेला. त्याच्या पुनरुत्थानावर विश्वास ठेवणाऱ्या यहुदी लोकांनी येरुशलेममध्येच एक लहानसे मंडळ सुरू केले. ख्रिस्त हा आपला प्रभू आहे, असे ते मानीत. हेच आद्य ख्रिस्ती मंडळ म्हणून प्रसिद्ध आहे. यहुदी धर्माधिकाऱ्यांनी त्या ख्रिस्तानुयायांचा छळ करून त्यांना देशोधडीला लावले. ख्रिस्ताच्या पुनरुत्थानाचा सिद्धांत हेच त्या ख्रिस्तभक्तांच्या श्रद्धेचे केंद्रस्थान व उपदेशाचे सार होते. त्याची अशीही अपेक्षा होती, की पृथ्वीवर आपले राज्य स्थापन करण्यासाठी तो पुनः परत येईल.

**युरोपात प्रसार** – त्यानंतर पौल नामक धर्मोपदेशकाने पॅलेस्टाईनच्या बाहेर या संप्रदायाचा उपदेश सुरू केला. त्याने ख्रिस्ती धर्म केवळ यहुदी लोकांचा नाही, तर तो सर्वांचाच आहे, असे प्रतिपादिले. इ. स. ६५ पर्यंत भूमध्य समुद्राच्या सभोवार बरीच ख्रिस्ती मंडळे अस्तित्वात आली. पौलाने त्यांना उद्देशून जी पत्रे लिहिली, ती बायबलाच्या नव्या करारात समाविष्ट आहेत. त्यात ख्रिस्ती धर्माचे तत्त्वज्ञान व आचार या दोहोंचेही विवेचन आहे. त्याने सीरियातील अंटिओख शहरी आपल्या कार्याला सुरवात केली. लौकरच अंटिओख हे ख्रिस्ती महामंडळाच्या कार्याचे प्रमुख केंद्र बनले. याच ठिकाणी प्रथम ख्रिस्ताच्या अनुयायांना ख्रिस्ती हे नाव मिळाले (इ. स. ४४ ते ५८).

इ. स. च्या ३ ऱ्या शतकाच्या अखेरपर्यंतच्या रोमन साम्राज्यात ख्रिस्ती लोकांचा भयंकर छळ झाला. हा नवीन संप्रदाय सामान्य लोकांना पसत पडला, तरी राजसत्तेला व राजधर्माला तो अप्रियच होता, कारण सम्राटाच्या प्रतिमेचे पूजन करण्याचे त्यांनी साफ नाकारले होते. त्यामुळे रोमचे सम्राट व त्यांचे अधिकारी यांनी हजारो ख्रिस्तानुयायांना हालहाल करून ठार मारले. त्यांत संत पेत्र व संत पौल हेही होते. तथापि तो संप्रदाय नष्ट न होता त्याचे बळ वाढतच गेले आणि ४ थ्या शतकाच्या पूर्वार्धात रोमचा सम्राट कॉन्स्टटाईन यानेच स्वतः ख्रिस्ती धर्म स्वीकारला. त्यानंतरच्या ७–८ शे वर्षांत बहुतेक सर्व युरोपखंडात ख्रिस्ती धर्माचा प्रसार झाला. २ ऱ्या शतकाच्या प्रारंभीच या धर्माचा प्रसार आशिया खंडात सुरू झाला होता. नंतरच्या चारपाच शतकात तो आर्मेनिया, इराण, अरबस्तान, इ. देशात पसरत गेला.

**पोप** –प्रारंभी चर्च ही अध्यात्मिक संस्था असून त्या वेळच्या धर्मोपदेशकांना अपॉसल ही संज्ञा होती. हे लोक ईश्वरी इच्छेचे व स्वरूपाचे ज्ञान देणारे मिशनरी असत. इ. स. १०० च्या आत प्रत्येक शहरात एक महागुरु–स्वामी (बिशप) नावाचा कायमचा अधिकारी नेमण्याची प्रथा सुरू झाली. ३ ऱ्या शतकात या बिशप किंवा धर्माध्यक्षाची सत्ता प्रांतातील अनेक ठिकाणच्या चर्चवर चालू झाली. तो राजधानीतील धर्माध्यक्ष असे. नंतर अनेक प्रांतातील मंडळांचा एक मोठा संघ बनविण्यात येऊन, सर्वांत मोठ्या राजधानीतील बिशपला त्याचा प्रमुख ठरविण्यात आले. पाचव्या शतकात रोमचा सम्राट आपला सर्व धर्मविषयक पत्रव्यवहार रोमच्या बिशपमार्फत करीत असे. त्यामुळे त्या बिशपची सत्ता इतर बिशपांवर चालू लागली. ही त्याची सत्ता हळूहळू इतकी वाढली, की मध्ययुगात रोमचे चर्च केवळ मोक्षाच्या बाबतीतच नव्हे; तर राजकीय व सामाजिक बाबतीतही प्रभाव गाजवू लागले. अशा प्रकारे पोप म्हणजे रोमचा धर्माध्यक्ष सर्वसत्ताधीश झाला. देवाच्या खालोखाल त्याची सत्ता मानली जात असे. ही पोपची सत्ता युरोपखंडात १५ व्या शतकापर्यंत अबाधित चालू होती.

त्या काळात ख्रिस्ताच्या अनुयायांचे आपसातील झगडे अगदी विकोपाला गेले. ख्रिस्ताचे देवत्व आणि त्रयीची कल्पना याबद्दल वादविवाद सुरू झाले. प्रत्येक पंथ आपल्याहून भिन्न मताच्या लोकांना पाखंडी म्हणू लागला व त्यांचा छळ करू लागला. अशा प्रकारे ख्रिस्ताचे अनुयायी एकमेकांशी लढू लागले व त्या लढ्यात कितीतरी लोक प्राणास मुकले.

ख्रिस्ती धर्मात विविध पंथ निर्माण झाले. त्यातले काही पंथ पुढीलप्रमाणे—

**रोमन कॅथॉलिक पंथ** – या पंथाचे लोक पोपची धार्मिक सत्ता मानतात. त्यांची प्रार्थना व शास्त्रवाचन लॅटिन भाषेत होते. त्यांच्या उपासनालयात येशू व मेरी यांचे पुतळे वा चित्रे असतात. ते त्यांच्या भोवती मेणबत्त्या लावतात. त्यांच्या धर्मपीठांनी गरीब, दुबळ्या लोकांना मदत करणे व त्यांना शिक्षण देणे, या बाबतीत चांगले कार्य केले आहे. तथापी त्यांच्या धर्मगुरूंनी १५ व्या शतकापर्यंत आपल्या निरंकुश सत्तेचा दुरुपयोग करून विचित्र धर्माचारांचे थोथांड माजविले आणि धर्माच्या नावावर वाटेल ते अन्याय–अनाचार सुरू केले. विक्लिफ, हस वगैरे धर्मसुधारकांनी पोपच्या या निरंकुश सत्तेला विरोध करण्याचा प्रयत्न केला; पण त्यांना त्यात फारसे यश प्राप्त झाले नाही.

**प्रॉटेस्टंट पंथ**– १६ व्या शतकाच्या प्रारंभी मार्टिन लूथर नावाच्या जर्मन धर्मगुरूने जे आंदोलन सुरू केले, ते मात्र बरेच यशस्वी झाले. ते आंदोलन केवळ धार्मिक स्वरुपाचे नसून, त्यात सामाजिक, शैक्षणिक, राजकीय व आर्थिक सुधारणांचाही समावेश होता. लूथरच्या अनुयायांनी प्रॉटेस्टंट (विरोध करणारे) हे नाव धारण केले. त्या पंथाचा प्रचार जर्मनी, इंग्लंड वगैरे सुधारणावादी देशात फार वेगाने झाला. त्यामुळे पोपच्या सत्तेला बराच पायबंद बसला. प्रॉटेस्टंटांच्या या चळवळीचा रोमन कॅथॉलिक चर्च या पुराणमतवादी पंथावर इष्ट असा परिणाम झाला व त्या पंथात बरीच सुधारणा झाली. प्रॉटेस्टंट लोकांच्या प्रार्थना व उपासना त्यांच्या मातृभाषेत होतात. ते येशू व मेरी यांच्या प्रतिमांपुढे मेणबत्त्या जाळीत नाहीत.

**जेसुईट पंथ** – लूथरच्या चळवळीची प्रतिक्रिया म्हणून इ. स. १५३४ मध्ये लोयोलाचा संत इग्नाती (इग्नेशियस) याने हा पंथ सुरू केला. कॅथॉलिक चर्चचे पाखंडांपासून रक्षण करणे, हे या पंथाचे एक उद्दिष्ट होते. या पंथाने सत्य, प्रार्थना सदाचार, तप, इ. गोष्टीवर भर दिला. परंतु त्याचे मुख्य कार्य तरुण पिढीला सुशिक्षित करणे, हेच राहिले.

**क्वेकर पंथ** – इ. स. १६५० साली जॉर्ज फॉक्स याने इंग्लंड मध्ये स्थापलेला क्वेकर पंथ प्रॉटेस्टंट पंथाप्रमाणेच सुधारणावादी असून, त्याला बाप्तिस्मा, प्रभुभोजन वगैरे बाह्यसंस्कार मान्य नाहीत. धंदेवाईक उपाध्यायवर्ग, शपथविधी, युद्धे या गोष्टींना क्वेकर पंथाचा कडवा विरोध आहे. हे लोक अंतःस्फूर्तीला फार महत्त्व देतात. राजनिष्ठेची शपथ घेण्याचे नाकारल्यामुळे त्या लोकांना इंग्लंडमध्ये फार छळ सोसावा लागला. मग त्यांनी अमेरिकेत जाऊन तिथे नवीन वसाहती स्थापल्या. परोपकार हे त्या पंथाचे ब्रीद आहे.

प्रॉटेस्टंट पंथातही आँग्लिकन, प्रेस्बिटेरियन, बॅप्टिस्ट, मेथडिस्ट, इ. आणखी काही उपपंथ आहेत. अशा प्रकारे ख्रिस्ती धर्माचे अनेक उपपंथ असले, तरी ते सर्व पंथ जगात सर्वत्र ख्रिस्ताचा संदेश पोचवून हीन-दीन लोकांची सेवा व उन्नती करण्यासाठी झटत आहेत.

ख्रिस्ती धर्म व बौद्ध धर्म यांचा तौलनिक अभ्यास केल्यानंतर अनेक पाश्चात्य विद्वानांचे असे मत झाले आहे, की ख्रिस्ती धर्म हा बौद्ध धर्मातून उगम पावला आहे. या दोन्ही धर्मातील मूलतत्त्वे, काही विधी आणि काही कल्पना यांत विलक्षण साम्य आढळून येते. सर्व ऐश्वर्याचा त्याग करावा, दैन्य धारण करावे, शांती राखावी, नम्रता ठेवावी, न्यायाने वर्तावे, दयाशीलता अंगी बाणवावी, अंतःकरण शुद्ध असावे, हत्या करू नये, व्यभिचार करू नये, खोटे बोलू नये, द्वेष करू नये, दारू पिऊ नये, असा बुद्धाचा उपदेश होता आणि तोच बायबलातही आढळतो. बौद्ध धर्माची दीक्षा देताना जो अभिषेकविधी केला जातो, त्याच जातीचा ख्रिस्ती धर्मातील बाप्तिस्मा हा विधी असतो. पापनिवेदनविधीचा प्रकारही ख्रिस्ती धर्माने बौद्ध धर्मातूनच घेतला आहे, असे दिसून येते. बौद्ध धर्मातील त्रिमूर्तीची कल्पना (बुद्ध, धर्म व संघ) ख्रिस्ती धर्मानेही घेतली आहे. फक्त त्यातली तीन रूपांची नावे तेवढी बदलली आहेत (पिता, पुत्र व पवित्र आत्मा). जन्मांतर व कर्म ह्या कल्पनाही ख्रिस्ती धर्माने बौद्ध धर्मातूनच घेतल्या आहेत.

बौद्ध धर्माप्रमाणेच हिंदू धर्माचाही ख्रिस्ती धर्मावर पुष्कळ प्रभाव आहे आणि ते साहजिकच आहे. नोतोविच नामक रशियन संशोधकाला तिबेटात एक पाली ग्रंथ सापडला असून, त्यात येशू ख्रिस्ताच्या चरित्रावर नवा प्रकाश टाकणारी माहिती आढळली आहे. वयाच्या १३ व्या वर्षापासून २९ व्या वर्षापर्यंत येशूचे वास्तव्य भारतात होते. त्या काळात त्याने संस्कृत भाषेचे व वेदांचे अध्ययन केले. नंतर तो बौद्ध मठात राहू लागला. इतकेच नव्हे; तर त्याने बौद्ध धर्माची दीक्षाही घेतली. त्यानंतर तो मूर्तिपूजेचा निषेध करीत स्वदेशी परत गेला, अशी माहिती त्या ग्रंथावरून मिळते.

बौद्ध धर्म व ख्रिस्ती धर्म यांतील ईश्वरविषयक कल्पना मात्र अगदी विरुद्ध आहेत. बौद्ध धर्मात ईश्वराला स्थान नाही, उलट ख्रिस्ती धर्म ईश्वराचे अस्तित्व मान्य करून, त्याची अनन्य भक्तीही करायला सांगतो.

**भारतात प्रसार** – इंग्लंडमध्ये ख्रिस्ती धर्माचा प्रवेश होण्यापूर्वी ५०० वर्षे भारतात त्याचा प्रसार सुरू झाला होता. येशू ख्रिस्ताचा एक शिष्य सेंट थॉमस (तोमास) इ. स. ५२ साली

भारतात मलबारच्या किनाऱ्यावर उतरला. त्याने मलबार प्रांतात अनेक चर्चे स्थापली. त्याला इ. स. ७२ साली ठार मारण्यात आले. तथापि त्याला जे शिष्य मिळाले होते, त्यांनी भारतात ख्रिस्ती धर्माचा प्रसार पुढे चालू ठेवला. ४ थ्या व ९ व्या शतकात इराण व आशियामायनर येथे जो धर्मच्छल झाला, त्याला भिऊन तिथले पुष्कळ ख्रिस्ती लोक भारतात येऊन स्थायिक झाले. प्रारंभीचे लोक 'सेंट थॉमसचे ख्रिश्चन' या नावाने ओळखले जात होते; पण नंतर ते सर्व 'सीरियन ख्रिश्चन' या नावाने प्रसिद्ध झाले. सीरियन म्हणण्याचे कारण येशू ख्रिस्त व सेंट थॉमस यांची भाषा सीरियाक होती आणि ख्रिस्ती शकाच्या आरंभापूर्वीच जे ज्यू लोक मलबारात येऊन वसले होते, त्यांचीही तीच भाषा होती. त्याचप्रमाणे पूर्वेकडील सीरियन चर्चशीही त्यांचा संबंध होता. मलबारच्या हिंदू राजाने या ख्रिस्ती लोकांना उदार आश्रय दिला आणि तिथली हिंदू प्रजाही त्यांच्याशी फार सहिष्णुतेने व प्रेमाने वागली, असे इतिहास सांगतो.

६ व्या शतकापासून १६ व्या शतकापर्यंतच्या काळातील मलबारच्या सीरियन ख्रिश्चनांविषयी फारशी माहिती उपलब्ध नाही. त्या काळात त्यानी इथे आपले व्यापारी बस्तान चांगले बसविले होते, एवढेच कळते. १६ व्या शतकात रोमन कॅथॉलिक लोक भारतात आल्यानंतर इथल्या सीरियन चर्चला पोपची सत्ता नाइलाजाने मान्य करावी लागली. पण पुढे लवकरच सीरियन चर्चला डचांचा पाठिंबा मिळाला. त्या आधारावर १६५३ साली त्या पंथाच्या बहुसंख्य लोकांनी पोपचे आधिपत्य झुगारून दिले. त्यानंतर अंटिओखहून पाठविण्यात आलेल्या बिशपच्या नेतृत्वाखाली या चर्चची पुनर्घटना करण्यात आली. पूर्वी हे चर्च नेस्टोरियन म्हणून ओळखले जात होते. ते आता जॅकोबाईट म्हणून ओळखले जाऊ लागले. साक्षरताप्रसार, स्त्री-शिक्षण, स्त्री-दास्यविमोचन, घरगुती धंद्यांना प्रोत्साहन वगैरे बाबतीत या चर्चने मलबारी लोकांची फार मोठी सेवा केली आहे. तसेच मलयाळम् साहित्याचा विकास, शिक्षणप्रसार, इ. क्षेत्रांतही या लोकांनी पुष्कळ कार्य केले आहे.

सीरियन चर्चचा विशेष हा, की त्याची उपासनापद्धती शुद्ध पौर्वात्य आहे.

मलबारमधील सीरियन ख्रिस्ती लोकांच्या चालीरीतींवर तिथल्या नायर लोकांच्या चालीरीतीचा प्रभाव पडलेला दिसतो. ते ख्रिस्ती हिंदूप्रमाणेच जातीभेद मानीत असत. या जातीभेदाचे निर्मूलन करण्यासाठी चर्चला मोठा लढा द्यावा लागला. पण तरीही जातिभेदाचे पूर्ण उच्चाटण झाले नाही ते नाहीच. हिंदू व ख्रिस्ती या दोन्ही संस्कृतींच्या संगमाचे प्रतिबिंब मलबारमधल्या साहित्य, संगीत व इतर कलांमध्येही दिसून येते.

१५ व्या शतकाच्या अखेरीस वास्को द गामा भारतात आला. १६ व्या शतकात पोर्तुगीज भारतात आले व त्यांनी पश्चिम किनाऱ्यावर प्रथम व्यापार सुरू केला. पुढे त्या किनाऱ्यावरचा काही प्रदेश हस्तगत करून धर्मप्रसारालाही सुरवात केली. गोवे, कोच्चिन व तुतिकोरीन ही त्यांची मुख्य धार्मिक केंद्रे होती. पोर्तुगीजांनी हिंदुस्थानात धर्माचा प्रसार केला, तो तरवारीच्या जोरावर. त्यांनी एतद्देशीय लोकांचा अनन्वित छळ करून त्यांना बाटविले. अर्थात अशा प्रकारचा धर्मच्छल युरोपखंडात सुद्धा झाला होताच. ( इन्क्विझिशन पाहा. )

फ्रान्सिस झेवियर (१५०६–५२) हा हिंदुस्थानात येणारा पहिला जेसुईट मिशनरी होय. एक महान धर्मप्रसारक म्हणून तो पाश्चात्त्यांच्या इतिहासात प्रसिद्ध आहे. रॉबर्ट द नोबिली (१५७७–१६५६) नावाचा दुसरा एक इटालियन मिशनरी भारतात येऊन एखाद्या हिंदू संन्याशासारखा राहू लागला व त्यानेही बरीच बाटवाबाटव केली. जेसुइटांनी भारतात शिक्षणप्रसाराला हातभार लावला, छापखाने सुरू केले आणि देशी भाषांतून धार्मिक पुस्तकेही छापून काढली.

डेन्मार्कच्या राजाच्या आदेशावरून झिगेन बॉल्ग व प्लुश्चाव हे दोन जर्मन प्रॉटेस्टंट मिशनरी इ. स. १७०६ साली त्रांकेबार बंदरात उतरले. तेथील डनिश गव्हर्नरने त्यांचा प्रथम खूप छळ केला; पण त्यांनी लवकरच तिथे चर्च स्थापण्याचा उद्योग यशस्वी केला आणि झिगेन बॉल्ग याने तमिळ भाषा शिकून त्या भाषेत नव्या कराराचे भाषांतर केले. त्यानंतर सी. एफ्. श्वार्टझ (१७२६–९७) याने सुमारे अर्धे शतकभर द. भारतात खूप कार्य केले. तो तंजाऊरच्या राजाचा स्नेही व सल्लागार होता. त्याने घातलेल्या पायावर १९ व्या शतकात अनेक धर्ममंडळे स्थापन झाली. आदिवासी लोकांची उन्नती करून त्यांना ख्रिस्ती धर्माची दीक्षा देण्याचे कार्य त्याच मंडळांनी सुरू केले.

**उ. भारतात प्रसार**— सेंट थॉमस हा प्रथम उ. भारताच्या वायव्य भागातील 'गोंडो फरेज' नामक राजाच्या दरबारात गेला होता, असे म्हणतात. तिथे त्याने काही काळ ख्रिस्ती धर्माचा प्रसार केला होता. परंतु त्यानंतर अनेक शतके उ. भारतातील ख्रिस्ती धर्माच्या हालचालींची माहिती मिळत नाही. मार्को पोलो हा प्रवासी १३ व्या शतकात भारतात आला होता. त्याने मध्य भारतात तीन ख्रिस्ती राजे असल्याचा उल्लेख केला आहे. त्या वेळी बिहारमध्ये पाटणा येथेही एक चर्च होते, असा उल्लेख सापडतो. पुढे पोर्तुगीज मिशनरी मंडळींनी

१७व्या शतकात बंगाल व ओडिसा या प्रदेशांत ख्रिस्ती धर्माची केंद्रे स्थापन केली. १६ व्या शतकात गोव्याच्या जेसुईट मिशनला अकबर बादशहाने आपल्या राज्यात धर्मप्रसाराची परवानगी दिली. पंजाबात लाहोर येथे जहागीर बादशहाने ख्रिस्ती धर्मप्रसाराला मोकळीक दिली. तथापि १८ व्या शतकात मारवाड, जयपूर, आग्रा येथे प्रत्येकी एक व दिल्ली येथे दोन अशी पाचच नवी चर्चे उ. भारतात स्थापन झाली. त्या काळात अनेक ठिकाणी ख्रिस्ती लोक वसलेले होते. व्यापार हा त्यांचा मुख्य व्यवसाय होता.

इ. स. १७९३ साली विल्यम केरी हा प्रॉटेस्टंट मिशनरी भारतात आला आणि त्याने उ. भारतातील ख्रिस्ती धर्ममंडळांच्या कार्याला निराळे वळण लावले. बंगालच्या अर्वाचीन इतिहासात त्याला विशेष स्थान आहे. त्याने १८१८ साली सेरामपोरला सुरू केलेले विद्यापीठ आशिया खंडात सर्वात जुने आहे.

केरीने बंगाली व संस्कृत या भाषा आत्मसात केल्या. सुमारे ४० भारतीय भाषांमध्ये त्याने बायबलचे भाषांतर करवून घेतले. त्याच्या मिशनने १८१८ पर्यंत १२६ बंगाली शाळा स्थापन केल्या. समाजसुधारक म्हणूनही केरीने बरीच उपयुक्त कामगिरी केली प्रथम ईस्ट इंडिया कंपनीचा या कार्याला विरोध होता; पण पुढे तिने आपले धोरण बदलले व धर्मपीठांना आर्थिक साहाय्य देणे सुरू केले.

गेल्या दोनतीन शतकांत भारतातील ख्रिस्ती धर्मप्रसारकांनी इथल्या भाषा व साहित्य याची मोठीच सेवा केली आहे. बायबल व इतर ख्रिस्ती धार्मिक पुस्तकांची देशी भाषातरे होताच, देशी भाषांच्या विकासाला चालना मिळाली. बहुतेक सर्व देशी भाषांचे कोश आणि व्याकरणे याच ख्रिस्ती मिशनऱ्यांनी तयार केली. एवढेच नव्हे; तर स्वतः त्या भाषांमध्ये गद्य–पद्य रचनाही केली. प्राचीन संस्कृत साहित्याचे भाषांतर करून भारतीय संस्कृतीचा परिचय पाश्चात्यांना करून देणे, हे बहुमोल कार्यही या लोकांनी केले. याशिवाय शिक्षणाचा प्रसार हे त्यांचे कार्यही लहानसहान नव्हते. देशी भाषांप्रमाणेच इंग्रजी भाषेचे शिक्षणही त्यांनी देशाच्या कोनाकोपऱ्यापर्यंत नेले. यामुळे भारतीय जनतेचा फार मोठा लाभ झाला यात शंका नाही.

ख्रिस्ती धर्मप्रसारकांचे आणखी एक महत्त्वाचे कार्य म्हणजे गिरिजनांना माणुसकीचा लाभ करून देणे, हे होय. पशुतुल्य जीवन जगणाऱ्या लाखो माणसांना त्यांनी नवीन जगाची ओळख करून दिली, त्यांच्या सेवेसाठी रुग्णालये सुरू केली व अनाथ वा पतित स्त्रियांना आसरा देण्यासाठी आश्रमही स्थापले. [ म. ज्ञा. को.; ज. वि. ध.; ख्रि. ध.; ख्रि. म. इ.; सं. ख्रि. सि.; ख्रि. प.; वा. तों. ओ.; क. हे. इं.; डा. फे.; ख्रि. म. सं. इ.; एन्सा. रि. ए. ]·

**ख्वाज खिज्र** मुस्लीम संस्कृतीतून आलेला एक देव किंवा संत. भिस्ती लोक याला आपला संरक्षक मानतात. मुसलमान याला जलदेव समजतात. हिंदूनीही त्याच स्वरूपात याचा स्वीकार केला आहे. सोनपताजवळ याचे मुख्य स्थान आहे. मासा हे याचे वाहन असून, अमृताच्या विहीरीवर याचे स्वामित्व होते, अशी मुस्लीम कल्पना आहे. उ. भारतातले मुसलमान लोक मुलाचे जावळ काढताना याच्या नावाने एक लहानशी होडी पाण्यात सोडतात. [ फो. लो. नॉ. इं. ]

**गंग** अकबराच्या दरबारातील एक प्रतिभाशाली कवी. याचे मूळ नाव गंगाप्रसाद असून, हा ब्राह्मण कुलात जन्मला होता. याचा जन्म व मृत्यू केव्हा झाला, ते निश्चित सागता येत नाही. तथापि हा इटावा जिल्ह्यातील इकनौर गावी इ. स. १५३८ साली जन्मला असावा, असे मानले जाते. त्याच्या जीवनाविषयी फारशी माहिती उपलब्ध नाही.

अकबर बादशहा आणि त्याच्या दरबारातील रहीम, बिरबल, मानसिग, तोडरमल, इ. श्रेष्ठ व्यक्तींना गंग कवीविषयी फार आदर होता असे म्हणतात. त्याच्या एका छप्पयमुळे प्रसन्न होऊन रहीमने त्याला ३६ लाख रुपये दिले होते, अशी आख्यायिका सांगतात. ती छप्पय पुढीलप्रमाणे आहे–

**चकित भँवर रहिं गयो गमन नहिं करत कमल बन।**
**अहि फ़नि-मनि नहिं लेत जेत नहिं बहत पवन घन।।**
**हंस मानसर तज्यो, चक्क चक्की न मिले अति।**
**बहु सुंदरि पद्मिनी, पुरुष न चहे न करे रति।।**
**खल भलित सेस कबि 'गंग' भनि अमित तेज रवि रथ खस्यो**
**खानानखान बैरम-सुवन जिदिन कोप करि तँग कस्यो।।**

अर्थ– भृंगे आश्चर्यचकित झाल्यामुळे कमलवनात गेलेच नाहीत. नाग फणा उभारून मणी दाखवीत नाही. वारा जोराने वाहत नाही. हंसाने मानस सरोवराला सोडले. चकवा-चकवी यांचे मीलन होत नाही. सुंदर पद्मिनी स्त्री पुरुषाची इच्छा करीत नाही, त्याच्या बरोबर रममाण होत नाही. शेषाची खळबळ उडाली आहे. तेजःपुंज अशा सूर्याचा रथही खचला आहे. कवी गंग म्हणतो, बैरमाचा पुत्र खानानखान रहीम ज्या दिवशी रागावून लढाईवर निघाला, त्या दिवशी सगळी अशी परिस्थिती झाली.

अकबर आपल्या दरबारी कवीपुढे विविध समस्या ठेवीत असे. अशा समस्यांची पूर्ती गंग कवी करीत असे. या कवीची

जी फुटकळ कविता उपलब्ध आहे तीवरून असे समजते, की हा कृष्णभक्त होता. याचे बरेच काव्य नीतिपर आहे.

जहांगिराच्या राजवटीत याने बादशहाच्या विरुद्ध काही काव्य रचले असावे आणि त्यामुळे जहांगिराने याला हत्तीच्या पायी देऊन ठार मारले असावे अशी आख्यायिका आहे. ते काही असले तरी आयुष्याच्या अखेरीस त्याची फार दुर्दशा झाली होती, असे त्याच्या काही कवितांवरून कळते.

गंगपदावली, गंगपचीसी व गंगरत्नावली या त्याच्या तीन रचना उपलब्ध आहेत. 'चन्द छन्द वर्णनकी महिमा' या नावाची त्याची खडी बोलीतली एक गद्य रचना आहे. तीत अकबराचा प्रत्यक्ष उल्लेख आढळतो. त्यावरून तो अकबराच्या दरबारात होता हे सिद्ध होते. त्याचे काव्य अलंकारिक, वैचित्र्यपूर्ण, विदग्ध, सरस आणि मार्मिक आहे. मध्ययुगीन-हिंदी कवीमध्ये त्याचे स्थान उच्च आहे. [ अ. द. हिं. क.; हिं. नी. वि.; हिं. सा. को. २ ]

**गंगदत्त** जैनांचा नववा वासुदेव. हा मल्ल असून, आई-वडिलांनी याचा त्याग केला होता. सदाचरणाने याने आपली उन्नती करून घेतली आणि अंती वासुदेवपद मिळविले. [ अभि. रा. ]

**गंगम्म** द. भारतातील धनगरांची प्रमुख देवता. ही जलदेवता म्हणूनही ओळखली जाते. धनगराचा गंगराझू नावाचा एक पूर्वज होता. त्यावरूनच या देवतेला गंगम्म असे नाव मिळाले असावे. हिची कथा अशी–

कलियुगात आकाशातून गंगम्माचे पृथ्वीवर आगमन झाले. तिने मदुरेत जन्म घेतला. काही कारणाने तिथला राजा तिला मारायला उठला. त्या वेळी आकाशात उडून तिने अंभोजी नावाच्या गुहेचा आश्रय घेतला. पुढे काही धनगराना ती सापडली. ते धनगर शिवपूजक होते. एक दिवस त्यांच्या शिवपूजेत गंगम्माने विघ्न आणले. तेव्हा ते धनगर तिला दोरखंडाने मारू लागले. त्याच क्षणी तिचे पाषाणमूर्तीत रूपांतर झाले. तेव्हापासून धनगर तिची पूजा करून तिला पशुबळी देऊ लागले. [ द्र. गॉ. मॉ. हिं. ]

**गंग राजवंश** म्हैसूर प्रदेशातील जो प्रदेश गंगवाडी या नावाने ओळखला जातो, त्या प्रदेशावर गंग वंशाचे राज्य इ. स. च्या ४ थ्या शतकात सुरू झाले. या वंशातील कोंगणिवर्मा नावाच्या पुरुषाने या राज्याची स्थापना केली. त्याची राजधानी कोलार येथे होती. तो काण्वायन वंशाचा होता. या वंशातील राजांना धर्माधिराज ही पदवी होती. हे पल्लवांचे मांडलिक होते. इ. स. ४५० च्या सुमारास राज्य करणारा हरिवर्मन याने आपली राजधानी कावेरी नदीच्या तीरावरील तलकाड येथे नेली. ६ व्या शतकाच्या उत्तरार्धात सदर वंशातील दुर्विनीत राजाने पल्लवांची सत्ता झुगारून दिली आणि पुन्नाड व कोंगू हे प्रदेश जिंकले. त्याचे चालुक्यांशी सख्य होते. तो स्वतः संस्कृत भाषेचा पंडित असून, त्याचे अनेक ग्रंथ उपलब्ध आहेत.

इ. स. च्या ७ व्या शतकात या वंशातील राजा शिवमार व त्याचा पुत्र पृथुयश यानी बऱ्याच विस्तृत प्रदेशावर सत्ता प्रस्थापित केली. त्यानंतरचा प्रसिद्ध राजा श्रीपुरुष (इ. स. ७२८–७८८) हा होय. तो पांड्य राजांचा मित्र होता. त्यांच्या साहाय्याने त्याने नंदिवर्मन पल्लवमल्ल याचा पराभव केला. मग त्याने आपली राजधानी मान्यपूर येथे नेली आणि कोंगुणिराजाधिराजपरमेश्वर ही पदवी धारण केली. त्याच्या राज्यात सर्वत्र समृद्धी असल्यामुळे ते श्रीराज्य या नावाने प्रसिद्ध झाले.

श्रीपुरुषाचा पुत्र शिवमार ( दुसरा ) याचा राष्ट्रकूटांनी दोनदा पराभव केला व गंगांच्या राज्यावर आपले प्रभुत्व स्थापले. पण अमोघवर्ष राष्ट्रकूटाच्या वेळी गंग राजे पुन्हा स्वतंत्र झाले. इ. स. ९३७ साली राष्ट्रकूट राजा कृष्ण ( तिसरा ) याच्या मदतीने त्याचा मेहुणा बूतुग हा गादीवर बसला. तेव्हापासून गंग राजे परतंत्र झाले. बूतुगाचा पुत्र मारसिंह ( तिसरा ) याने इ. स. ९६० ते ९७४ पर्यंत राज्य केले. त्याचा सेनापती चामुंडराय हा फार शूर होता. मारसिंहाचा पुत्र राजमल्ल (इ. स. ९७४–९८५) याचाही तो सेनापती व मंत्री होता. इ. स. १००४ मध्ये चोळ राजांनी तलकाड जिंकल्यावर गंग राजांनी त्यांचे सार्वभौमत्व मान्य केले. त्यानंतर हळूहळू हा राजवंश नामशेष झाला.

श्री. कैलाशचंद्र शास्त्री यांनी या वंशाविषयी जी माहिती दिली आहे, ती अशी–

या वंशाची स्थापना इ. स. च्या २ ऱ्या शतकात जैनाचार्य सिंहनंदीने केली. या वंशातील पहिला राजा माधव किंवा कोंगणिवर्मा हा होय. बहुतेक सर्व गंग राजे जैन धर्माचे पुरस्कर्ते होते. त्यांनी अनेक जैन मंदिरे निर्माण केली, जैन मूर्तींची स्थापना केली, जैन मुनीसाठी गुहा तयार केल्या व जैन आचार्यांना दानेही दिली.

या वंशातील राजा मारसिंह जैनधर्मी होता. त्याने आपल्या वैभवशाली राज्याचा त्याग करून, आपले गुरु अजितसेन यांच्या समक्ष प्राणत्याग केला. त्याचा सेनापती चामुंडराय हा जसा शूर तसाच विद्वानही होता. त्याने इ. स. ९८३ साली

श्रवण बेळगोळ येथे गोमटेश्वराचा भव्य पुतळा तयार करून तो तिथे उभा केला.

या वंशातील शेवटचा राजा गंगराज (इ.स.चे१२ वे शतक) हा विष्णुवर्धन होयसळ राजाचा मंत्री व सेनापती होता. तो चामुंडरायापेक्षाही धार्मिक व शूर होता. त्याला जिनधर्मरत्न, महाप्रचंड-दंडनायक, इ. पदव्या मिळाल्या होत्या.

कलिंगदेशावरही एक गंग राजवंश इ. स. च्या ५ व्या शतकापासून राज्य करीत होता. **पाहा**– ओडिसा. [ ए. इं.– मजुम.; जै. ध. ]

## गंगा

भारतातील सात पवित्र नद्यांपैकी पहिली अर्थात पवित्रतम नदी. हिच्या नावाच्या पुढील दोन व्युत्पत्ती सांगितल्या आहेत –(१) 'गमयति भगवत्पदमिति गङ्गा '= जी ( स्नानकर्त्या जीवाला) भगवत्पदाप्रत पोचवते ती व (२)' गम्यते प्राप्यते मोक्षार्थिभिरिति गङ्गा ' = मोक्षार्थी अर्थात मुमुक्षू जिच्याकडे जातात, ती गंगा होय ( श. क. ).

गंगेची आणखी काही प्रसिद्ध नावे आहेत, ती अशी ––

(१) **विष्णुपदी** — ब्रह्मदेवाने आपल्या कमंडलूतल्या जलाने विष्णूचे पाय धुतले आणि तिथून गंगेचा उगम झाला, म्हणून तिला हे नाव मिळाले.

(२) **त्रिपथगा** – स्वर्ग, मृत्यू, पाताळ अशा तीन्ही लोकांतून तिचे तीन प्रवाह वाहतात, म्हणून तिला त्रिपथगा असे म्हणतात.

(३) **भागीरथी** – 'हरगंगे भागीरथी' असा गंगास्नानातला उद्घोष आहे. गंगेच्या बरोबरीने भागीरथी हेही तिचे नाव उच्चारले जाते. भगीरथाने हिमालयातून गंगेला भूतलावर आणले आणि त्यामुळे ती जणू भगीरथाची कन्याच ठरली. या संबंधीची कथा अशी–

सूर्यवंशातल्या सगर या राजाने अश्वमेध यज्ञ आरंभिला. दिग्विजयासाठी यज्ञीय अश्व सोडून त्याने आपल्या साठ हजार पुत्रांना त्या अश्वाच्या रक्षणासाठी त्याच्यामागून पाठविले. हा यज्ञ पुरा होता कामा नये, असे इंद्राच्या मनात आले आणि त्याने सगराचा यज्ञाश्व चोरून कपिल मुनीच्या आश्रमात नेऊन बांधला. सगरपुत्र त्याचा शोध करीत करीत तिथवर पोचले. कपिलानेच आपला अश्व चोरला, असे समजून ते त्याच्यावर हल्ला करायला निघाले. कपिल मुनी ध्यानस्थ बसला होता. तो या प्रकाराने भानावर आला आणि त्याने आपले डोळे उघडताच त्यांतील तेजाने ते साठ हजार सगरपुत्र भस्मसात झाले.

पाठीमागून सगराचा नातू अंशुमान हा सगरपुत्रांचा शोध करायला निघाला. कपिल मुनीच्या आश्रमात पोचताच त्याला वरील सर्व हकीगत समजली. मग त्याने कपिलाची प्रार्थना केली. कपिल त्याच्यावर प्रसन्न होऊन म्हणाला, की ' स्वर्गातली गंगा भूतलावर आण. तिचा प्रवाह सगरपुत्रांच्या राखेवरून वाहिला म्हणजे त्यांचा उद्धार होईल. '

अंशुमान माघारी आला आणि गंगेला भूतलावर आणण्यासाठी हिमालयात जाऊन तप करू लागला. अंशुमानाला ती गोष्ट साध्य झाली नाही आणि त्याचा पुत्र दिलीप यालाही साध्य झाली नाही. दिलीपाचा पुत्र भगीरथ. तोही त्याच कार्यासाठी सिद्ध झाला. त्याच्या तपस्येने मात्र गंगा प्रसन्न झाली व पृथ्वीवर येण्याचे तिने कबूल केले. पण तिच्या प्रवाहाचा वेग असामान्य होता. खाली उडी घेताना तिचा तो वेग कोणी तरी मध्येच अडवायला हवा होता. अन्यथा ती सरळ पाताळात घुसली असती. भगीरथाने मग त्यासाठी शंकराची प्रार्थना केली. शंकर त्या गोष्टीला कबूल झाला. त्याने गंगेला आपल्या जटेत धारण करून तिचा वेग कमी केला व सप्तधारांनी तिला खाली सोडले. मग भगीरथ पुढे आणि गंगा मागे अशा रीतीने ती भूतलावर अवतरली. भगीरथ तिला कपिलाच्या आश्रमापर्यंत घेऊन गेला. तिथे तिच्या जलाने सगरपुत्रांचा उद्धार झाला (म. भा. वन. १०८; वा. रा. १. १. ४१–४४; भाग. पु. ९.९).


गंगावतरण– कैलास लेणे, वेरूळ

(४) **जान्हवी**–गंगा हिमालयातून खाली उतरत असता तिने वाटेत जन्हू ऋषीची यज्ञभूमी वाहून नेली. जन्हूला या गोष्टीचा राग आला आणि त्याने तिचा सगळा प्रवाह पिऊन टाकला. भगीरथापुढे हे एक नवेच संकट उभे राहिले. मग त्याने जन्हू ऋषीची प्रार्थना केली. तेव्हा जन्हूने गंगेचा प्रवाह आपल्या कानातून बाहेर सोडला. त्यावरून पुढे तिला जान्हवी (अर्थात जन्हूची कन्या) हे नाव मिळाले (वायू पु. ९१.५४–५८).

**गंगावतरणाची तिथी**– धरित्रीवर हे गंगावतरण कोणत्या

दिवशी झाले, याविषयी पुराणात एकवाक्यता नाही. काही पुराणात वैशाख शु. ३ या ही तिथी मानलेली आहे; तर काही पुराणात कार्तिक पूर्णिमा सांगितली आहे. पण लोकप्रसिद्धी आणि अनेक पुराणे यांच्या आधारे ज्येष्ठ शु. १० मी ही गंगावतरणाची तिथी ठरते. याविषयीचा प्रसिद्ध श्लोक असा—

**दशमी शुक्लपक्षे तु ज्येष्ठे मासि कुजेऽहनि ।**
**अवतीर्णा यतः स्वर्गात् हस्तर्क्षे च सरिद्वरा ।।**

अर्थ– ज्येष्ठ मास, शुक्ल पक्ष, दशमी तिथी, मंगळवार व हस्त नक्षत्र या योगावर गंगा स्वर्गातून धरणीवर अवतीर्ण झाली.

**गंगा–गौरी** – गंगा व गौरी या दोघी हिमाचलाच्या कन्या होत. त्यांतली गंगा ज्येष्ठ व गौरी कनिष्ठ. गौरीने ज्याप्रमाणे शिवाला वरले, त्याप्रमाणे गंगेनेही त्यालाच वरले. याविषयीची पुराणांतरीची कथा अशी–

गंगा ही गर्विष्ठ नदी होती. प्रलयाच्या वेळी जग बुडून गले, तरी ती आपली वाहतच राहिली आणि तिने मोठ्या अभिमानाने आपले भिजलेले केस झाडले. त्यातला एक केस कैलासावर तप करणाऱ्या शिवाच्या अंगावर जाऊन पडला. शिवाला त्या गोष्टीचा राग आला. त्याने गंगेला पृथ्वीवर जन्म घेण्याचा शाप दिला. तो शाप ऐकून गंगा घाबरली व तिने शिवाची करुणा भाकली. शिवाने मग तिला उःशाप दिला, की 'पृथ्वीवर मी तुझे पाणिग्रहण करीन.'


गगामूर्ती– देवपूर, बंगाल

त्याप्रमाणे गंगा पृथ्वीवर अवतरली आणि शंकराची भार्याही झाली. पण पुढे पार्वतीला आपल्या या सवतीचा मत्सर वाटू लागला. ती नाना प्रकारे गंगेला त्रास देऊ लागली. गंगेने त्याही वेळी शिवाची करुणा भाकली. मग शिवाने तिला आपल्या जटेत स्थान दिले. गंगेविषयी पार्वतीचा मत्सर व्यक्त करणारे एक सुभाषित आहे, ते असे–

**शिरसि धृतसुरापगे स्मरारौ**
**अरुणमुखेन्दुरुचिर्गिरीन्द्रपुत्री ।**
**अथ चरणयुगानते स्वकान्ते**
**स्मितसरसा भवतोऽस्तु भूतिहेतुः ।।**

अर्थ– स्मरारी शिवाने गंगेला मस्तकी धारण केल्यावर हिमाचलकन्या पार्वती हिचे मुख रागाने लाल झाले. शिव ते पाहून घाबरला व त्याने तिच्या चरणावर मस्तक नम्र केले. ते पाहून पार्वतीचा राग गेला व तिने स्मित केले. (अशा प्रकारे ज्याच्या बाबतीत ही घटना घडली, तो शिव ) तुमच्या ऐश्वर्याला कारणीभूत होवो.

गंगा व गौरी यांना सवती मानून त्यांच्या कलहावर मराठी स्त्रियानी एक गीत रचले आहे, ते 'गंगा–गौरीचे भांडण' या नावाने प्रसिद्ध आहे. त्यातला एक नमुना असा–

**दोघि सवती भांडती पति भांगट भुंगा ।**
**आपसात वर्म बोलती गौरी आणि गंगा ।।**
**पार्वती म्हणे गंगे तु पाटकरणी**
**तू अखंड होतिस विष्णूच्या चरणी**
**भुलविले शिवाला कशि केलिस करणी**
**राहिलिस मस्तकी मजला चोरोनी**
**तू अमंगळ ग सवती**
**तुज नाही मूळ कुळ जाती**
**नरनारि तुझ्यामधे न्हाती**
**मी आद्य शक्ति आदिमाया अर्धांगा**
**घररिघे जारिणी किती करिसी दंगा ।।१।।**
**गंगा म्हणे पार्वती तू दूर हो परती**
**ऐकिल्या मुळापासून तुझ्या कीर्ती**
**कसि अगोचर तू रुसलीस शिवावरती**
**भिल्लिणिचा वेष तू धरिला अपकीर्ती**
**टाकिली उडी होमात**
**केला दक्षपित्याचा घात**
**काय झालिस उत्तम जात**
**मी असे मस्तकी तू असती अर्धांगा**
**घररिघे जारिणी किति करिसी दंगा ।।२।।**

पण शंकराने गंगेला मस्तकी धारण केल्याचा परिणाम असा झाला, की पृथ्वी पाण्याच्या अभावी कोरडी पडली आणि पृथ्वीवरचे प्राणिमात्र पाण्यासाठी आक्रोश करू लागले. तो आक्रोश ऐकून पार्वतीचे मन कळवळले. तिने मग शंकराची क्षमा मागितली. त्यावर शंकराने गंगेला पुनश्च पृथ्वीवर वाह-

ण्याची आज्ञा केली. ही गंगा सात प्रवाहांनी पृथ्वीवर वाहिली आणि ज्या ज्या प्रदेशातून ती गेली ते ते प्रदेश व तिथले लोक यांना तिने पावन केले (भाग. पु. ९.९.१–१३). ही घटना घडल्यानंतर पुढे गंगा व गौरी यांचा सलोखा झाला.

**भीष्माची माता–** गंगेला मानवाची पत्नी म्हणूनही पृथ्वीवर यावे लागले आहे. ती कथा अशी––

एकदा सगळे देव ब्रह्मदेवाकडे गेले. त्याच्याबरोबर गंगा होती व इक्ष्वाकुकुलातला महाभिष राजाही होता. त्या प्रसगी गंगेचे वस्त्र वाऱ्याने उडाले. ते पाहून सर्व देवानी माना खाली घातल्या. एकटा महाभिष राजाच तेवढा तिच्या अनावृत सौंदर्याकडे टक लावून पाहत राहिला. त्याचा हा उच्छृंखलपणा ब्रह्मदेवाला आवडला नाही. त्याने महाभिषाला शाप दिला, की 'तू मृत्युलोकी जन्म घेशील व त्या जन्मात गंगा तुझी पत्नी होईल आणि ही पत्नी तुला अप्रिय अशाच सर्व गोष्टी करील.'

शंतनू राजा हाच तो शापित महाभिष होय. त्याची व गगेची गाठ पडली आणि त्याने तिच्याशी लग्न केले. शंतनूपासून तिला एकंदर आठ पुत्र झाले. ते आठ पुत्र म्हणजे अष्ट वसूंचे मानवावतार होत. झालेल्या प्रत्येक मुलाला ती पाण्यात बुडवून नष्ट करी आणि शंतनूला तिचा काहीही प्रतिकार करता येत नसे. असे सात मुलांना तिने बुडवले. आठवा झाला तो भीष्म. त्याला मात्र शंतनूने बुडवू दिले नाही. गंगेने शंतनूचा तेवढा प्रतिकार मानला. मग ती भीष्माला घेऊन स्वर्गात गेली. तिथे भीष्माला सर्व प्रकारचे शिक्षण देऊन तिने परत त्याला मृत्युलोकी आणले व शंतनू मृगयेला आला असता त्याच्या स्वाधीन केले (म. भा. आदि. १०२–१०६).

**गंगेचे भिन्न प्रवाह–** मार्कंडेय पुराणात हिला त्रिपथगामिनी म्हटले आहे· पूर्व दिशेने चैत्ररथ वनाकडे जाणाऱ्या हिच्या प्रवाहाला सीता म्हणतात. तो प्रवाह पुढे वरुणोद सरोवराला मिळतो. सुमेरू पर्वताच्या दक्षिणेकडून गंधमादन पर्वताकडे जाणाऱ्या प्रवाहाला अलकनंदा म्हणतात. ब्रह्मपुराणात सागितले आहे, की गंगेचा जो प्रवाह विंध्याच्या दक्षिणेस वाहतो त्याला गौतमी गंगा म्हणत असून, उत्तरेकडे वाहणाऱ्या प्रवाहाला भागीरथी म्हणतात. गंगा नदी वटोदका, नलिनी, सरस्वती, जंबुनदी, सीता, गंगा व सिधू अशा सात प्रवाहांनी सागराला मिळते व हा गंगासागरसंगम अत्यंत पवित्र आहे, असे पद्मपुराणात म्हटले आहे (स्वर्ग. २.५.६८).

विष्णुपुराणात तिच्या चार दिशांना वाहणाऱ्या चार प्रवाहांना सीता, अलकनंदा, चक्षू आणि भद्रा अशी नावे दिली आहेत (१.९.१०३; २.२.३३४).

गंगा-यमुना संगमावर प्रजापतीने यज्ञ करून त्या संगमात अवभृथ स्नान केले. गंगेच्या काठावर भरताने अश्वमेध केला (भाग. पु. ४.७.६३–६४). युधिष्ठिराने राजसूय यज्ञ केल्यावर गंगेतच अवभृथ स्नान केले (भाग. पु. १०. ७५. १९). द्रौपदीच्या पाचही मुलांचे और्ध्वदेहिक गंगेच्याच किनाऱ्यावर झाले. परीक्षितीने गंगेच्याच काठी प्रायोपवेशन केले. 'रुद्राचे बीज धारण कर' असे अग्नीने गंगेला सांगितले व ते तिने मान्य करून कुमाराला (स्कन्द) जन्म दिला (ब्रह्मांड पु. ३.७.३५५). गंगा व अग्नी यांच्या समागमातूनच सुवर्णाची उत्पत्ती झाली. अगस्त्याने समुद्राचे पाणी पिऊन तो कोरडा केल्यावर गंगेनेच तो पुनश्च भरून टाकला (ब्रह्मांड पु. ३.६३.१६७). गगेने हस्तिनापूर बुडवून नष्ट केले. गंगेवर साडेतीन कोटी तीर्थे आहेत. गंगा ही महासागराची पत्नी आहे. ती वेदाची उजवी बाजू आहे (वायू पु. ९८.११७).

**भौगोलिक प्रवाह–** गंगेचा उगम टेहरी-गढवालमध्ये समुद्रसपाटीपासून १३,८०० फूट उंचीवर गंगोत्रीजवळ एका हिमनगामध्ये होतो. या ठिकाणाला पुराणात गोमुखी म्हटले आहे. ही इथे भागीरथी या नावाने ओळखली जाते. तिच्या प्रवाहाला पुढे जान्हवी आणि अलकनंदा या दोन नद्या येऊन मिळतात. या स्थानाचे प्राचीन नाव मंदरगिरी असे आहे. हिमालयाच्या अधित्यकेत गंगेच्या कित्येक शाखानद्या आहेत. हिच्या सप्तशाखांमुळेच या प्रदेशाला प्राचीन भूगोलात सप्तगंगम् असे म्हटले आहे. यामुन (बंदरपूछ) पर्वतापासून नंदादेवीपर्यंत गंगेचे प्रस्रवणक्षेत्र पसरलेले आहे. पूर्व व पश्चिम असे त्याचे दोन भाग होतात. पूर्व क्षेत्रात बदरीनाथावरून विष्णुगंगा येते, तिलाच सरस्वती असेही म्हणतात. पश्चिम भागात द्रोणगिरीच्या जवळ धौली-गंगा ही धारा येते आणि ती जोशीमठाजवळ विष्णुगंगेला मिळते. विष्णुप्रयागानंतर या संयुक्त धारेला अलकनंदा म्हणतात. तिथून पुढे नंदप्रयाग लागते. तिथे मंदाकिनी अलकनंदेला भेटली आहे. त्यापुढे येते कर्णप्रयाग. तिथे पिंडरगंगा त्या प्रवाहात दाखल होते. त्या पुढच्या रुद्रप्रयागात मंदाकिनी अलकनंदेला भेटते. तिथून पुढच्या प्रदेशात म्हणजेच टेहरी-गढवालमध्ये गंगोत्रीहून आलेली भागीरथी अलकनदेशी संगम करते. मग त्या संयुक्त धारेला गंगा हे नाव प्राप्त होते. तिथून ती हृषिकेष क्षेत्रातून पुढे येऊन कनखल क्षेत्रात भूतलावर उतरते. कनखलालाच गंगाद्वार असे म्हणतात.

तिथून ती दक्षिणवाहिनी होते व मीरत, रोहिलखंड, फरुकावाद, अवध, प्रयाग, मिर्झापूर, वाराणसी, बलिया या मार्गे पश्चिम बंगालमध्य शिरते. फरुकाबाद येथे तिला रामगंगा नदी भेटते. तिथे जवळच अलमोडा, राणीखेत व नैनीताल ही शहरे आहेत. हिमालयाखालच्या गंगा-यमुनांच्या संगमापर्यंतच्या

मध्य प्रदेशाला अतर्वेदी असे म्हणतात. हा प्रदेश धनधान्यसमृद्ध व वैदिक सस्कृतीचे महत्त्वाचे केंद्र म्हणून ओळखला जातो. प्रयाग-पासून वाराणसीपर्यंत गगानदी पूर्ववाहिनी आहे. पाटण्याजवळ शोण नदीशी तिचा संगम होतो. तिथेच पुढे तिला गंडकी व कोशी या नद्या येऊन मिळतात. बगा-लच्या सरहद्दीवर तिला गाग्रा नदी भेटते. मग तिचे गंगा हे नाव जाऊन तिला पद्मा हे नाव प्राप्त होते. त्यापुढे तिला ब्रह्मपुत्रा येऊन भेटते. या सगमाच्या ठिकाणी तिचे पात्र कित्येक मैल रुंद होते व त्याची अनेक खाड्यांमध्ये विभागणी होते. या विशाल संगमात पुढे मेघना नदी येऊन मिळते व ही अतिविस्तृत गंगा शेवटी बंगालच्या उपसागराला आत्मार्पण करते.



गंगा–यमुना संगम–उदयगिरी
६ वे शतक

गगा नदी तिच्या उगमापासून १५५० मैलांच्या वर प्रवास करते. हुगळी, माटला, रायमंगल, मालच व हरिघाट ही तिची समुद्राला मिळणारी इतर मुखे होत. या सर्वात हुगळी हे मुख महत्त्वाचे आहे. हुगळीच्या काठावरच कलकत्ता शहर वसले आहे. मुर्शिदाबाद येथे गंगेला जे फाटे फुटतात, ते नडिया जिल्ह्यातून हुगळीला येऊन मिळतात.

तिच्या मुखावरील बेटाचे नाव सागर असे आहे. हे ठिकाण कलकत्त्याच्या दक्षिणेस ९० मैलांवर आहे. कपिल मुनीचा आश्रम याच ठिकाणी होता व साठ हजार सगरपुत्र कपि-लाच्या तेजाने इथेच भस्म झाले होते, असे सांगतात. पांडव आपल्या वनवासात या ठिकाणी आले होते, अशी कथा आहे. गंगासागरसंगम हे एक महान क्षेत्र बनल्यामुळे या ठिकाणी मकर संक्रांतीस तीन दिवस स्नानयात्रा भरते.

**गंगामाहात्म्य** – ऋग्वेदात गंगेचा दोन वेळा उल्लेख आला आहे (१०.७५.५ व ६.४५.३१). पण गंगेला तिथे महत्त्व मिळालेले दिसत नाही. तिथे सिंधू व सरस्वती या नद्यांचे माहात्म्य आढळते. वैदिक कालात आर्यांचा मुख्य निवास पंजाबमध्ये सिंधू व सरस्वती या नद्यांच्या प्रदेशात होता. त्या-मुळे ऋग्वेदातल्या आर्यांना गंगेचे नाव ठाऊक होते; पण तिचे माहात्म्य परिचित नव्हते. ऋग्वेदोत्तर काळात ते तिथून हळू-हळू पुढे सरकू लागले आणि गंगा-यमुनांच्या अंतर्वेदीत दाखल झाले. त्यामुळेच शतपथ ब्राह्मण, जैमिनीय ब्राह्मण व तैत्ति-रीय आरण्यक यांत गंगाविषयक चर्चा आढळते. त्यापुढचा काळ पुराणांचा. पुराणांनी मात्र गंगेच्या वर्णनाइतके दुसऱ्या कोणत्याही नदीचे वर्णन केले नाही. सिंधू व सरस्वती या दोन नद्या तर पुराणवाङ्मयात विस्मृतप्रायच आहेत.

काही पुराणांत गंगेच्या विविध कथा आणि तिचे माहात्म्य विस्तारपूर्वक सांगितले आहे. ब्रह्मपुराण व बृहन्नारदीयपुराण यांत तर अनेक अध्याय गगावर्णनाचेच आहेत. पण त्यातल्या-त्यात ब्रह्मपुराणापेक्षा बृहन्नारदीयपुराणातल्या गंगाकथा सुसं-गत आणि एकरस अशा आहेत. पद्म, विष्णु, शिव, मत्स्य, भागवत, देवीभागवत, मार्कंडेय, अग्नी, ब्रह्मवैवर्त, लिंग, वराह, भविष्य, स्कंद, ब्रह्मांड व वामन या पुराणांत गगाविष-यक अनेक कथा दिलेल्या आहेत. या सर्वात देवी भागवतातल्या कथा चमत्कृतिपूर्ण आहेत.

गंगा ही भारतवर्षाचे राष्ट्रीय महातीर्थ आहे. आध्यात्मिक क्षेत्रात जे स्थान गीतेचे तेच स्थान धार्मिक क्षेत्रात गंगेचे आहे. ज्याच्या चरणकमलापासून ती उत्पन्न झाली, त्या भगवदवतार श्रीकृष्णाने 'स्रोतसामस्मि जाह्नवी' (सर्व प्रवाहात मी गंगा आहे) असे म्हणून एकाच वाक्यात तिचे माहात्म्य सांगितले आहे (गीता १०.३१). गंगेचा महिमा सांगताना महाभारतात पुढील श्लोक आले आहेत–

**न गङ्गासदृशं तीर्थं न देवः केशवात् परः ।**
**ब्राह्मणेभ्यः परं नास्ति एवमाह पितामह ः ।।**
**यत्र गङ्गा महाराज स देशस्तत्तपोवनम् ।**
**सिद्धिक्षेत्रं च तज्ज्ञेयं गङ्गातीरसमाश्रितम् ।**

(म. भा. वन. ८५.९६–९७)

अर्थ – गंगेसारखे तीर्थ नाही, विष्णूसारखा देव नाही, ब्राह्मणापेक्षा कोणी श्रेष्ठ नाही, असे ब्रह्मदेवाने सांगितले. हे महाराजा, जिथून गंगा वाहते तो देश व गगातीरावर अस-लेले तपोवन हे सिद्धिक्षेत्र आहे असे जाणावे.

**सर्वत्र सुलभा गङ्गा त्रिषु स्थानेषु दुर्लभा ।**
**गङ्गाद्वारे प्रयागे च गङ्गासागरसङ्गमे ।।**
**तत्र स्नात्वा दिवं यान्ति ये मृतास्तेऽपुनर्भवाः ।**

अर्थ– गंगा ही भूतलावर अवतरल्यापासून पूर्वसागराला मिळेपर्यंत सर्वत्र सुलभ असली, तरी गंगाद्वार, प्रयाग व गंगा-सागरसंगम या तीन ठिकाणी ती दुर्लभ आहे. या ठिकाणी जे स्नान करतात, ते स्वर्गाला जातात आणि जे देह टाकतात,

त्यांचा पुनर्जन्म टळतो.

गंगेला गंगामाता किंवा गंगामैया म्हणण्याची वहिवाट आहे. भाविक हिंदुमनाने तिच्याशी मातेचे नाते जोडून आपल्या उद्धाराचा मार्ग सोपा करून टाकला आहे. म्हणूनच गंगामैयाचे दर्शन व तिचे स्नान या गोष्टीची हिंदुमनाला विलक्षण ओढ असते. आयुष्यात गंगास्नान घडले नाही, तर आपला जन्म व्यर्थ अशी भाविक हिंदूंची धारणा असते. हे जाणूनच प्रयोग-कारानी स्नानविधीत पुढील श्लोक समाविष्ट केला आहे –

**गङ्गा गङ्गेति यो ब्रूयात् योजनानां शतैरपि ।**
**मुच्यते सर्वपापेभ्यो विष्णुलोकं स गच्छति ।।**

अर्थ– शेकडो योजने दूर राहूनही गंगा, गंगा असे जो उच्चारील तो सर्व पापां-पासून मुक्त होईल आणि अंती विष्णु-लोकाला जाईल.



गंगा – विजयनगर, १५ वे शतक

**सर्वपूज्य गंगा** – भार-तात सकल संतांनी, आचार्यांनी आणि महा-पुरुषांनी गंगाजलाचे पावित्र्य मान्य केले आहे. सर्व धर्म आणि सकल संप्रदाय यांच्या अनु-यायांनी गंगेचा समान आदर केलेला आहे. शंकराने मस्तकी धरल्या-मुळे शैवांना व विष्णूच्या चरणकमलापासून उत्पन्न झाल्यामुळे वैष्णवांना ती परम पावन वाटते. शाक्तांनीही गंगेला आदिशक्तीचे एक रूप मानून तिची आराधना केलेली आहे. शंकरा-चार्यापासून तो चैतन्य महाप्रभूपर्यंत अनेक महा-पुरुषांनी गंगेचे स्तवन करून स्वतःला धन्य मानले आहे.

वाल्मीकिरचित गंगा-ष्टक नावाचे एक स्तोत्र प्रसिद्ध आहे. भाविक संस्कृतज्ञ लोक स्नानाच्या वेळी त्याचा पाठ करून आपल्याला गंगास्नान घडले, अशी धारणा करतात. गंगेच्या तीरावर ज्या मृताचे दहन होते, तो स्वर्गाला जातो, असे समजतात. ज्यांना शक्य असेल, ते लोक पितरांच्या अस्थी गंगेत विसर्जित करतात. यात्रेला गेल्यानंतर हरिद्वार किंवा प्रयाग येथून यात्रेकरू गंगाजल आपल्या घरी आणतात. घरी आल्यावर समारंभाने गंगापूजन करतात व आप्तेष्टाना बोलावून-त्यांना ते तीर्थ देतात. आसन्न-मरण माणसाच्या मुखात गंगेचे पाणी घालतात. कुठे कुठे नवविवाहित जोडप्यावरही गंगाजलाचा अभिषेक करतात नवीन विहीर किंवा जलाशय खोदल्यावर त्यात गंगेचे पाणी टाक-तात. काही लोक गंगाजल हाती घेऊन शपथ कर-तात. बंगालमध्ये काही स्त्रिया प्रसूतीनंतर गंगेची पूजा करतात. ग्रहण, अर्धोदय, महोदय, इ. पर्व-प्रसंगी पुष्कळ माणसे गंगा-स्नानासाठी यात्रा करतात. पित-रांचा उद्धार व्हावा, या हेतूने गंगातीरावर श्राद्धही करतात.



गंगा – महानाड, १२ वे शतक

गंगेचे पाणी धार्मिक दृष्टीने तर पवित्र आहेच; शिवाय ते वैज्ञानिक दृष्टचाही दोष-रहित आहे. चरकाने ते पथ्यकर असल्याचे सांगितले आहे;

तर चक्रपाणिदत्ताने ते रोगनिवारक असल्याचे म्हटले आहे. गंगाजलाचे शास्त्रीय दृष्टीने पृथक्करण करण्यात आले, तेव्हा त्यात शरीरशक्ती वाढवणारी व रोग्याची दुर्बलता घालवणारी द्रव्ये असल्याचे सिद्ध झाले. गंगेच्या पाण्यात महामारीचे रोगजतू टिकू शकत नाहीत, ते काही तासातच मरून जातात, असे शास्त्रीय शोधाअंती सिद्ध झाले आहे. याचे कारण असे सांगतात, की रोगजंतूंना पोषक असे खाद्य गंगाजलात नाही. पाश्चात्य प्रवाशानी व शास्त्रज्ञांनीही गगाजलाच्या शुद्धतेची महती गाइली आहे. इब्नबतूता या प्रवाशाने लिहिले आहे, की गगाजलाची ही रोगहारक शक्ती जाणून महंमद तघलख हा गंगा नदीचे पाणी मुद्दाम आणवून पीत असे अकबर बादशाहाही गंगाजलाला अमृत समजे व घरी आणि प्रवासात शक्य तो त्याचाच वापर करी. औरगजेबही जेवताना गंगेचे पाणी प्राशन करी. मोगलांच्या काळात बहुतेक सर्व राजघराण्यात गंगा नदीचे पाणी पिण्याची पद्धत होती. भाविक लोकांची तर अशी समजूतच आहे, की 'औषधं जाह्नवीतोयम्' = गंगाजल हेच खरे औषध आहे.

**गंगाध्यान** – भविष्य पुराणात गगेचे ध्यान पुढीलप्रमाणे सांगितले आहे—

**चतुर्भुजां त्रिनेत्रां च सर्वावयवभूषिताम् ।**
**रत्नकुम्भां सिताम्भोजां वरदामभयप्रदाम् ।।**
**श्वेतवस्त्रपरीधानां मुक्तामणिविभूषिताम् ।**
**ततो ध्यायेत् सुरूपां च चन्द्रायुतसमप्रभाम ।।**

अर्थ– चतुर्भुज, त्रिनेत्र, सर्वावयव सुंदर, रत्नकुंभ व श्वेतकमल धारण करणारी, वर व अभय देणारी, श्वेत वस्त्र नेसणारी, मोत्ये व रत्ने यांनी विभूषित झालेली, अयुत चंद्राच्या कांतीची व सुस्वरूप, अशा गंगा नदीचे ध्यान करावे.

**गंगामूर्ती** – स्त्रीरूपात गंगेची कल्पना सर्वप्रथम गुप्तकालीन शिल्पात दिसते. मध्य प्रदेशातल्या उदयगिरी येथील गुहेमध्ये भव्य अशा वराहमूर्तीच्या मागे गंगेची पहिली प्रतिमा खोदली गेली. या दृश्यात ती जलधारांच्यामध्ये मकरारूढ अशी दिसते. पश्चिम भारतातील पुष्कळ गुहांच्या प्रवेशद्वारावर गंगामूर्ती कोरलेल्या आढळतात. बेसनगर येथील गंगामूर्ती अत्यंत सुरेख असून ती मकरारूढ आहे. तिने आपल्या एका हाताचा कोपर एका दासीच्या खांद्यावर ठेवला आहे. दक्षिण भारतात ती अर्धस्त्री, अर्धमत्स्य अशा स्वरूपात दिसते. बंगालमधल्या मूर्तिकलेत ती मकरवाहिनी, मुकुटधारिणी व सालंकृत अशी दिसते. राजशाही संग्रहालयातील गंगामूर्ती उन्मादक वाटेल अशी आहे.

**गंगापूजनपद्धती** – सर्व प्रकारचे सुखोपभोग प्राप्त व्हावे म्हणून गंगेची पूजा पुढीलप्रमाणे करतात– प्रथम जयादी शक्तीने युक्त असे पीठ तयार करणे; त्यावर पूजनयंत्र काढणे; त्यावर गंगामूर्तीची स्थापना, मग षोडशोपचार पूजा व त्यानंतर



गंगापूजनयंत्र

गंगामंत्राचा जप. हा वीस अक्षरी मंत्र पुढीलप्रमाणे आहे—

**ॐ नमः शिवायै नारायण्यै दशहरायै गंगायै स्वाहा**

या मंत्राचा ऋषी वेदव्यास, छंद कृती व देवता गंगा आहे. याचा एक लक्ष जप व त्याच्या दशांश संख्येने घृतमिश्र तिलांचे हवन करतात. विशेषतः ज्येष्ठ शु. १० मी च्या दिवशी गंगापूजेसह तिच्या मंत्राचे अनुष्ठान करून दहा ब्राह्मणांना तिलदान करतात (मं. म). [ भारती, १० फेब्रु. १९५७; एन्सा. रि. ए.; अ. अ.; सु. वि. को.; वै. सा.; नवनीत, नोव्हें. १९५६; भा. वा.; भा. सा ; हि. जॉ. ए. इं.; मार्च ऑफ इंडिया, सप्टें. ऑक्टो. १९५४; क्ला. डि. हिं. मा.; पुराणोंमे गंगा ]

## गंगाजलवस्त्र

बंगालमध्ये या नावाचे एक वस्त्र प्रचलित आहे. गंगाजलाप्रमाणे फिक्कट असे हे काषायवस्त्र असते, म्हणून त्याला गंगाजलवस्त्र असे म्हणतात. बंगाली स्त्रियांच्या अनेक प्रकारच्या साड्यांत एक गंगाजल साडीही असते. बंगाली लोकगीतात या वस्त्राचा व साडीचा अनेकदा उल्लेख येतो. वीर पुरुषही गंगाजलवस्त्र धारण करीत असत व त्याला वीरधटी म्हणत, असे कृत्तिवासी रामयणात म्हटले आहे.

**वीरधटी परे कहे नाम गंगाजल**
**वीर परिधाने परे नेतेर जे फालि**
**तिनशत फेर दिया बाँधिल काँकालि ।**

भावार्थ– वीर योद्धे कमरेभोवती गंगाजल वस्त्र कसतात व युद्धासाठी रणभूमीवर जायला निघतात.

**गंगादास** (इ. स. १६ वे शतक) रामानंदी संप्रदायातील एक प्रमुख भक्त. पयहारीच्या चौव्वीस प्रधान शिष्यांपैकी हा एक होता. हा नाभाजीचा गुरू व अग्रदासाचा गुरुबंधू होता. [ हि. क. को. ]

**गंगादेवी** (इ. स. १४ वे शतक) द. भारतातील एक कवयित्री. विजयनगर राज्याचा संस्थापक बुक्क याची स्नुषा व त्याचा पुत्र कंपण याची ही पट्टराणी होती. ती अत्यंत बुद्धिमती होती. कपणाने इ. स. १३६१ व १३७१ या वर्षी मदुरेवर-स्वारी केली, तेव्हा ती त्याच्या बरोबर गेली होती. परत आल्यावर तिने मधुराविजय किवा वीरकम्पराय-चरित्र नामक एक संस्कृत काव्य रचले. त्यात तिने आपल्या पतीच्या पराक्रमाचे सुरेख वर्णन केले आहे. साहित्यिक व ऐतिहासिक अशा दोन्ही दृष्टीनी या काव्याला महत्त्व आहे.

हे काव्य संपूर्ण उपलब्ध नाही. याचे फक्त आठ सर्ग मिळतात. हे वैदर्भी शैलीत आहे. साधेसुधे विचारही तिने अत्यंत सुंदर शब्दात व्यक्त केले आहेत. तिचे काही दृष्टान्त अत्यंत सुंदर असतात. उदा०—

**घटमानदलाररीपुटं**
**नलिनं मन्दिरमिन्दिरास्पदम् ।**
**परिपालयति स्म निक्वणन्**
**परितो यामिकवन्मधुव्रतः ।।**

अर्थ– ज्याप्रमाणे एखादा पहारेकरी अमूल्य निधी ठेवलेल्या घराभोवती फेऱ्या मारतो व मधेच काहीतरी गुणगुणतो, त्याप्रमाणे कमळामध्ये असलेल्या मधाच्या रक्षणासाठी भ्रमर कमळाभोवती घिरट्या घालतो व गुंजन करतो.

दुसऱ्या एका पद्यात तिने एक अत्यंत कलात्मक कल्पना मांडलेली आहे, ती अशी–

**वनभुवः परितः पवनेरितै–**
**र्नवजपाकुसुमैः कुलदीपिकाः ।**
**प्रथममेव नृपस्य निदेशतो**
**विजयिनस्तुरगाननिराजयन् ।।**

अर्थ– वनस्थलीनी राजाज्ञेवरून जणू वाऱ्याने डोलविलेल्या जास्वंदीच्या फुलांच्या वातीनी विजयी अश्वांना आरती ओवाळल्या.

अनेक दिवे एका ताम्हणात ठेवून त्यांची आरती ओवाळतात. इथे डोलणाऱ्या जास्वंदीच्या फुलांवर ओवाळल्या जाणाऱ्या दीप-वर्तिकांची कल्पना केलेली आहे [सं. सा. इ.; ग्रे. वी. इं.]

**गंगाद्वार** हरिद्वारालाच गंगाद्वार असे नाव आहे. महाभारतात गंगाद्वाराचा उल्लेख आहे ( वन. ८१.१४; अनु. २५.१३). इथेच विष्णू वामन रूपाने बळिराजाकडे गेला. हे एक शैवक्षेत्र आहे. **पाहा**– हरिद्वार. [ हि. ध.; पु. इं. ]

**गंगाधर** (१) एक कवी. बिल्हणाच्या विक्रमांकदेवचरितावरून हा कर्ण राजाच्या दरबारी होता, असे कळते. याचे कित्येक श्लोक श्रीधर कवीने आपल्या सदुक्तिकर्णामृत या ग्रंथात घेतले आहेत. [ क. नृ. का. ]

(२) माध्यदिन शाखेचा एक प्राचीन स्मार्त पंडित. याने कात्यायनसूत्रावर टीका, आधानपद्धती, इ. संस्कृत ग्रथ लिहिले आहेत. [ हि. वि. को. ]

(३) एक जोतिषी (१५ वे शतक). श्रीशैलाच्या पश्चिमेस संगर नावाच्या नगरात हा राहत होता. याने चांद्रमान नावाचे तंत्र लिहिले आहे. याच्याच वशात पुढे चदर नामक ज्योतिषी झाला. [ भा. ज्यो. शा. ]

(४) मुहूर्तमार्तडकार नारायण याचा पुत्र. याचे गोत्र कौशिक असून हा वाजसनेयी शाखेचा होता. घृष्णेश्वराच्या उत्तरेस टापर नावाच्या गावी हा राहत असे. याने ग्रहलाघवावर मनोरमा नावाची टीका लिहिली आहे. [ म. ज्ञा. को. ]

**गंगाधरनाथ** (इ. स. १८ व्या शतकाचा उत्तरार्ध) सोपानपरंपरेतील रघुनाथाचा हा शिष्य होता. गोरक्षगीतानिरूपण हा ग्रंथ याने लिहिला असून, तो फक्त १२१ ओव्यांचा आहे. [ गो. च. प. ]

**गंगाधरमंत्री** वरंगळच्या रुद्रदेवाचा अमात्य. हा विद्वान, कवी व मुत्सद्दी होता. प्रोळ राजाच्या कारकीर्दीतच तो वरंगळ येथे आला. पुढे रुद्रदेवाने त्याला पालखी, छत्र, इ. मानमरातब देऊन आपला मंत्री नेमले. याने अनमकोंडा नगराचे वैभव वाढविले, विद्वानांना अग्रहार दिले व अनेक मंदिरेही बाधली. याने बांधलेल्या मदिरात प्रसन्नकेशवमंदिर, केशवदेवमंदिर, बुद्धमदिर, गौरीवल्लभमंदिर व त्रिनयनमंदिर ही प्रसिद्ध आहेत. [ व. का. रा. ]

## गंगाधरमूर्ती

भगीरथ गंगेला भूतलावर आणीत असता प्रथम शिवाने तिला मस्तकी धारण केले व ती त्याच्या जटाजूटातच घोटाळून राहिली. शिवाच्या या रूपाला गंगाधर म्हणतात. तमिळनाडमधल्या गंगैकोंडचोलपुरम् येथील देवालयात अशी गंगाधरमूर्ती आहे. हा गगाधर चतुर्भुज असून मागच्या उजव्या हाताने तो आपल्या जटेतून गंगेची धार खाली सोडीत आहे आणि पुढील उजव्या हाताने उमेला कुरवाळीत आहे. कारण इथे उमा गंगेच्या मत्सराने रुसलेली दिसते. शकराचे हे गंगाधररूप अत्यंत मनोवेधक आहे.दुसऱ्या एका प्रकारची गंगाधरमूर्ती शेजारच्या चित्रात दाखविली आहे. [ डे. हिं. इ. ]



गंगाधरमूर्ती – त्रिचनापल्ली गुहा, ७ वे शतक

## गंगाधर सरस्वती

(इ.स.१५व्या शतकाची अखेर) नरसिंह सरस्वती यांचा शिष्य. आडनाव साखरे. याने गुरुचरित्र नावाचा मराठी ओवीबद्ध ग्रंथ लिहिला आहे.

हा ग्रंथ सिद्ध व नामधारक यांच्या संवादरूपाने लिहिला आहे. त्याची भाषा विवेकसिंधूशी जुळणारी आहे. हा ग्रंथ महाराष्ट्रात फार आदरणीय ठरला आहे. **पाहा** – गुरुचरित्र.

## गंगानाथ

उ. प्रदेशातील डोंगराळ भागातील एक देव. हा भूतयोनीतून देवत्व पावला अशी समजूत आहे. त्याची कथा अशी—

गंगानाथ हा राजपूत होता. बापाशी त्याचे न पटल्याने तो जोगी बनला. नंतर एका ज्योतिषाच्या बायकोशी त्याचा संबंध आला. त्यामुळे ज्योतिषी रागावला व त्याने त्या दोघांनाही ठार केले. मेल्यावर गंगानाथ पिशाच बनला. लोक त्याला घाबरू लागले. त्यांनी त्याच्या नावाने अनेक ठिकाणी मठ्या उभारल्या. पुढे हळूहळू तो देव बनला.

दुर्जनांपासून त्रास होऊ लागल्यास त्यांना गंगानाथाने शिक्षा द्यावी, म्हणून आजही उ. प्रदेशातले लोक त्याला भजतात [ फो. लो. नॉ. इं. ]

## गंगाबाई

(जन्म १५७२ इ. स.) अष्टछाप कवीपैकी विट्ठलदासाची ही शिष्या होती. ही क्षत्रिय कुलात जन्मली होती व मथुरेजवळच्या महावन नामक क्षेत्रात राहत होती. श्रीकृष्णाच्या बालरूपाची ती आराधना करीत असे. तिने कृष्णाच्या बाललीलांवर अनेक गीते रचली असून, ती 'गंगाबाईके पद' या नावाने उपलब्ध आहेत. तिच्या दानलीलेच्या गीतांत एक गीत असे आहे— श्रीकृष्ण गोपीकडे दान मागत आहे. त्याने दान मागताक्षणीच ते द्यायला त्या पुढे येत आहेत. कारण त्यांनी कृष्णचरणी आपले सर्वस्व केव्हाच समर्पून टाकले आहे. मग दही-लोणी यांच्या दानाची ती काय कथा ! हाच आशय गगाबाईच्या पुढील पद्यात व्यक्त झाला आहे—

**ग्वालिनी दान हमारो दीजे ।**
**अति मनमुदित होय ब्रजसुंदरि कहत लाल हसिलीजे ।।**
**दीजे मन मेरो अब प्यारे निरखि निरखि मुख जीजे ।**
**अति रस गलित होत वह भामिनी मनमानें सो कीजे ।।**
**चलि न सकत अति ठठकि रहत पग रूप रासि अब पीजे ।**
**श्रीविट्ठलगिरिधरन लाल सों नवल नवल रस भीजे ।।**

अर्थ—हे गौळणी, माझे दान मला देऊन टाक. श्रीकृष्णाने असे म्हणताच तिला फार आनंद झाला. हे लाडक्या, माझे मन मला परत कर. कारण तुझ्या मुखाचे निरीक्षण करीत करीतच मी जगते आहे. रसमग्न झालेली ही भामिनी मनाला वाटेल तसे करते आहे. श्रीकृष्णाचे रूप प्याल्याने ती चालू शकत नाही. मधे मधे तिची पावले थबकत आहेत. श्रीकृष्णामुळे नवनवीन रसात ती भिजली आहे.

कृष्णाच्या मधुर लीलाचे वर्णन तिने मर्यादित पण सौंदर्यपूर्ण शब्दांत केले आहे. पुष्टिमार्गी संप्रदायात गंगाबाईला महत्त्वाचे स्थान आहे. [ ब्र. कृ. मा. भ. ]

## गंगा-यमुनासंगम

वास्तवात हा सगम प्रयाग क्षेत्रात होतो; पण बौद्ध सिद्धाच्या साहित्यात व हठयोगाच्या परंपरेत इडा-पिंगला यांना गंगा-यमुना किंवा ललना-रसना म्हटले असून, सुषुम्नेला सरस्वती किंवा अवधूती म्हटले आहे. इडा-पिंगला या दोन नाड्यांचा संगम म्हणजे हठयोगात शिव-शक्तीचे मीलन होय. भौतिक जगात यमुना गंगेला मिळते; पण हठयोगात मात्र गंगा (इडा किंवा शक्ती) ही यमुनेला (पिंगला किंवा शिव) मिळण्यासाठी प्रवा-

हित होत असते. म्हणूनच या साधनेला उलटी साधना असे म्हटले आहे. [ सि. सा. ]

**गंगालहरी** पंडितराज जगन्नाथ याने गंगेवर रचलेले एक स्तोत्र. याचे बावन्न श्लोक असून, त्यात गंगेच्या लोकोत्तर अशा विविध गुणांचे वर्णन व स्वतःच्या उद्धाराविषयी कळवळ्याची प्रार्थना आहे. या स्तोत्राला अखिल भारतीय मान्यता मिळालेली आहे. या स्तोत्राच्या निर्मितीविषयीची आख्यायिका अशी––

लवंगी या एका यवनकन्येशी जगन्नाथाचे लग्न झाले. दिल्लीच्या मोगल दरबारात त्याने तिच्यासह बराच काल सासारिक सुखे अनुभवली. उतारवयात तिला घेऊन तो काशीस आला; पण यवनकन्येशी त्याचा संबंध पाहून काशीतल्या पंडितानी त्याला बहिष्कृत केले. हा अपमान सहन न होऊन जगन्नाथ आपल्या प्रिय पत्नीसह गंगेच्या घाटावर बसला आणि आत्मोद्धारासाठी त्याने गंगेचे स्तोत्र आरंभिले. गंगेला ते आवडले. ती प्रसन्न होऊन प्रत्येक श्लोकाला एकेक पायरी वर चढू लागली व बावन्न श्लोकांना बावन्न पायऱ्या चढून तिने जगन्नाथाला त्याच्या पत्नीसह आपल्या पोटात घेतले.

गंगालहरीचा प्रारंभ पुढील श्लोकाने झाला आहे–

**समृद्धं सौभाग्यं सकलवसुधायाः किमपि तन्–**
**महैश्वर्यं लीलाजनितजगतः खण्डपरशोः ।**
**श्रुतीनां सर्वस्वं सुकृतमथ मूर्तं सुमनसां**
**सुधासोदर्यं ते सलिलमशिवं नः शमयतु ।।**

अर्थ– हे गंगे, तुझे हे जल म्हणजे साऱ्या पृथ्वीचे जणू महासौभाग्यच. लीलेने जगाची निर्मिती करणाऱ्या शंकराचे ते महदैश्वर्यच आहे. वेदांचे सर्वस्व, देवांच्या पुण्याचे मूर्त स्वरूप आणि अमृताचें सहोदर भावंड असे हे तुझे जल आमचे अशुभ नष्ट करो.

तिचा शेवटचा श्लोक पुढीलप्रमाणे आहे–

**विभूषितानङ्गरिपूत्तमाङ्गा सद्यःकृतानेकजनार्तिभङ्गा ।**
**मनोहरोत्तुङ्गचलत्तरङ्गा गङ्गा ममाङ्गान्यमलीकरोतु ।।**

अर्थ– मदनरिपू अशा शिवाचे उत्तमांग भूषित करणारी, अनेक जनांच्या दुःखांचा त्वरित नाश करणारी व जिच्या लाटा मनोहर असून उंच उडत आहेत, अशी गंगा माझी अंगे निर्मल करो.

कित्येक भाविक पंडित गंगालहरीचा नित्य पाठ करतात. ज्येष्ठात दशहराच्या उत्सवात दहा दिवस पुराणिक लोक देवालयात किंवा गंगेच्या घाटावर गंगालहरीवर प्रवचन करतात. **पाहा––** जगन्नाथ पंडित.

**गंगासप्तमी** वैशाख शु. ७ मीला हे नाव आहे. या दिवशीं काशीत मोठी स्नानयात्रा भरते. खेडोपाडीची मंडळी समुदायाने गंगेची गीते गात गात त्या दिवशी काशीत येतात.

या दिवशी स्त्रिया गंगाव्रत करतात, त्याचा विधी असा– गंगास्नान, सूर्यपूजा व दहा ब्राह्मणांना अन्न-वस्त्रदान. फल- पापनाश व एकवीस पिढ्यांचा उद्धार. [ व्रतराज ]

**गंगासागर** एक क्षेत्र. कलकत्त्यापासून दक्षिणेस सुमारे ९० मैलावर हे क्षेत्र आहे. पूर्वी गंगा याच ठिकाणी समुद्राला मिळत होती; पण हल्ली तिचे मुख मागे हटले असून, एक लहानसा गगाप्रवाह इथे समुद्राला मिळतो.

गंगासागर हे एक बेट असून त्याचे क्षेत्रफळ १५० चौ. मैलांचे आहे. या द्वीपावर घनदाट जंगल असून, ते जवळजवळ निर्जन आहे. इथे मकरसंक्रांतीच्या वेळी यात्रा भरते. इथे कपिलमुनीचे मंदिर होते; पण ते समुद्राच्या लाटांनी वाहून नेले. साप्रत तिथली कपिलमुनीची मूर्ती कलकत्त्यात ठेवलेली आहे. यात्रेच्या पूर्वी काही दिवस ती सागरद्वीपात नेतात. इथे यात्रिक लोक समुद्रस्नान, क्षौर व श्राद्ध करतात आणि नंतर कपिलमुनीचे दर्शन घेतात.

या तीर्थासंबंधी एक जैन कथा आहे, ती अशी––

सगराचा जन्हू नावाचा एक पुत्र होता. तो एक दिवस मोठे सैन्य बरोबर घेऊन प्रवासाला निघाला. वाटेत त्याला अष्टापद पर्वत लागला. त्या पर्वतावर मणिकनकमय चौव्वीस जिनप्रतिमा आणि शंभर स्तूप यानी युक्त असे एक जिनालय त्याने पाहिले लोकांनी आक्रमण करून त्या स्थानाची नासधूस करू नये, यासाठी त्याच्याभोवती एक खंदक खणावा, अशी आज्ञा त्याने सैनिकांना दिली. राजसैनिक अष्टापदाभोवती खंदक खणू लागले. खणता खणता ते पाताळापर्यंत गेले. मग जन्हूने गंगेचा प्रवाह आणून तो खंदक भरून टाकला. पण ते जल पाताळापर्यंत गेले व त्यामुळे नागांना त्रास होऊ लागला. नागराजाला त्या गोष्टीचा क्रोध आला. मग त्याच्या आज्ञेने सगळे नाग वर आले व त्यांनी आपल्या विषपूर्ण दृष्टीने जन्हूसह त्याचे सर्व सैनिक भस्मसात करून टाकले. ती वार्ता एका ब्राह्मणाने येऊन सगराला सांगितली. ती ऐकून राजा बहुत दुःखी झाला.

एवढ्यात अष्टापदाच्या आसमंतातले लोक आक्रोश करीत सगराकडे आले. ते राजाला म्हणाले. ' महाराज, खंदकात साठलेले गंगेचे पाणी खंदकाबाहेर पसरून अवतीभोवतीची सर्व गावे आणि शहरे बुडवीत चालले आहे. तेव्हा या जलापासून आमचे संरक्षण करा. '

मग सगराने आपला नातू भगीरथी याला बोलावून सांगितले, की ‘ तू आपल्या दंडरत्नाने खंदक फोडून अष्टापदाभोवतीच्या गंगाप्रवाहाला बाहेर काढ व समुद्रात नेऊन सोड.’ ‘आज्ञा प्रमाण’ म्हणून भगीरथी निघाला. त्याने प्रथम नागांची पूजा केली आणि आपल्या दंडाने गंगाप्रवाहाला वाट करून देत देत तो पूर्वसागराकडे निघाला. ज्या ठिकाणी गंगा समुद्रात प्रविष्ट झाली, त्या ठिकाणी गंगासागर नावाचे तीर्थ निर्माण झाले. [कल्याण-तीर्थांक; अभि. रा.]

**गंगेड्डू** एक भिक्षेकरी जात. हे लोक नंदीबैल घेऊन भिक्षा मागत हिडतात. यांच्या गळचात एक ढोलकेवजा वाद्य असून, हातातल्या काठीने त्यावर आघात केला, की त्यातून बुगुबुगू असा आवाज निघतो. या नंदीबैलाबरोबर कधीकधी गायही असते. तिच्या पायात घुगरू बांधलेले असतात. हा भिक्षेकरी दात्याच्या भविष्याबद्दल नंदीबैलाला प्रश्न विचारतो व बैल माना हालवून ‘होय’, ‘नाही’ अशी उत्तरे देतो.



गंगेड्डू व नंदीबैल

व्यंग-विकृती असलेला बैल किवा वासरू घरात ठेवणे अशुभ समजतात व असे जनावर गंगेड्डूला मोफत मिळते. गंगेड्डूला भिक्षा घालण्यापूर्वी स्त्रिया दूधपाण्याने नंदीबैलाचे पाय धुतात व त्याच्या कपाळी कुंकू लावतात. मग गंगेड्डूला फाटके कपडे व पैसे देतात.

गंगेड्डूची भाषा तेलुगू आहे. हे वैष्णवपंथी असून यांचे गुरू ब्राह्मण असतात. हे गुरू श्रीरंगम्, तिरुपती वगैरे ठिकाणी राहतात व दीक्षाप्रसंगी शिष्याच्या खांद्यावर डाग देतात. यांच्या कपाळावर जातीची खूण असते. आगभर कपडे व डोक्याला पागोटे, असा यांचा वेश असतो.

भिक्षेला जाताना दोघे मिळून जातात. एकजण नदीबैलाची व्यवस्था पाहतो व दुसरा वाद्य वाजवितो. हे लोक आपल्या बैलाला राम, लक्ष्मण यांसारखी मंगल नावे ठेवतात. गंगेड्डूला जी भिक्षा मिळते, त्यातला ½ भाग तो आपल्या बैलासाठी ठेवतो.

महाराष्ट्रात ठाकर नावाची एक जात आहे, तीही असे नंदीबैल बाळगून भिक्षा मागते. एखाद्या यजमानाने वृषोत्सर्गविधीत सोडून दिलेले बैल यांना विनामूल्य मिळतात. [का. ट्रा. स. इं.]

**गंगेशोपाध्याय** (१३ वे शतक) मिथिलेतील एक सुप्रसिद्ध नैयायिक. तत्त्वचिंतामणी हा ग्रंथ लिहिल्यामुळे तो चिंतामणिकार म्हणूनही ओळखला जातो. गौतमसूत्रांतील ‘प्रत्यक्षानुमानोपमानशब्दाः प्रमाणानि’ या एकाच सूत्रावर याने तत्त्वचिंतामणी या ग्रंथाची रचना केली व त्यात प्रत्यक्ष, अनुमान, उपमान व शब्द या चारही प्रमाणांचे विवेचन केले. अवच्छेद्य-अवच्छेदक, निरूप्य-निरूपक, अनुयोगी-प्रतियोगी, इ. पारिभाषिक शब्दांचा उपयोग करून याने आपली स्वतंत्र लेखनशैली निर्माण केली. पुढे इतर दार्शनिकांनीही या शैलीचे अनुकरण केले. तत्त्वचिंतामणीनंतर न्यायशास्त्रावर जे ग्रंथ निर्माण झाले, त्याना नव्यन्याय म्हणू लागले व त्यांच्या अपेक्षेने तत्त्वचिंतामणीच्या आधीच्या ग्रंथाना प्राचीनन्याय म्हणू लागले.

**गंगोत्री** टेहरी-गढवालमधील एक क्षेत्र. हे स्थान हिमालयात असून, इथून कैलासपर्वत १४२ मैल आहे. इथे गंगेचे एक मदिर असून, तिथली गंगामूर्ती शंकराचार्यांनी स्थापन केली, असे सांगतात. इथले गगामंदिर इ. स. च्या १८ व्या शतकात एका गुरखा अधिकाऱ्याने बांधले. त्याच्या शेजारीच भैरवनाथाचे मंदिर आहे. हे भगीरथाचे तपःस्थान होय. ज्या शिलेवर बसून त्याने तप केले, ती शिला भगीरथशिला या नावाने प्रसिद्ध आहे. यात्रेकरू या शिलेवर पिडदान करतात. गंगोत्रीत सूर्य, विष्णू, ब्रह्मा, इ. देवांची कुंडे आहेत.

भगीरथशिलेच्या पलिकडे रुद्रशिला आहे. याच शिळेवर उभे राहून शिवाने गंगाप्रवाह आपल्या मस्तकी धारण केला होता, असे सांगतात. इथे जवळच केदारगंगा ही नदी गंगेला मिळाली आहे. इथून अर्ध्या मैलावर पाषाणमय पहाड फोडून भागीरथीचा प्रवाह २५ हात उंचीवरून खाली पडतो. या प्रपातस्थानाला गौरीकुंड म्हणतात. याच्या मध्यभागी शिवलिंग असून, सदर प्रपात नेमका त्याच्या मस्तकावर पडतो.

गंगोत्री हे गंगेच्या उगमाचे स्थान मानले जात असले,

तरी गंगेचा खरा उगम गंगोत्रीच्या वर १८ मैलावर आहे. तिथे श्रीमुख नावाच्या पर्वतात गोमुखाच्या आकाराचा एक



गंगामंदिर – गंगोत्री

खडक आहे. त्यातून गंगानदी अवतीर्ण होते. पण ही यात्रा खडतर असल्यामुळे फार थोडे यात्रेकरू तिथवर जातात. या गोमुखस्थानाला गंगोद्भेदतीर्थ म्हणतात. याच्या माहात्म्याचा श्लोक आहे तो असा –



गंगाप्रवाह व गंगोत्री

**गङ्गोद्भेदं समासाद्य त्रिरात्रोपोषितो नरः ।**
**वाजपेयमवाप्नोति ब्रह्मभूतो भवेत् सदा ।।**

(म. भा. वन. ८४. ६५)

अर्थ – गंगोद्भेदतीर्थावर येऊन जो मनुष्य त्रिरात्र उपोषण करतो, त्याला वाजपेयाचे फल लाभते व तो सार्वकाल ब्रह्मरूप होतो.

गंगोत्रीला वर्षातून सहा महिने यात्रा चालते. कार्तिकात तिथे बर्फ पडू लागते. म्हणून कार्तिक पौर्णिमेला गंगाद्वार बंद होते. मग तिथले पंडे गंगेची मूर्ती घेऊन खाली सुमारे १४ मैलावर असलेल्या मार्कंडेय क्षेत्रात येतात. तिथेच सहा महिने गंगेची पूजा-अर्चा चालते. वैशाख मासात अक्षय्य तृतीयेला पुनश्च ती मूर्ती गंगोत्रीला नेऊन गंगाद्वार उघडतात. [ स. भा. प्र. व.; कल्याण – तीर्थांक ]

**गंजीफा** पत्त्यांच्या खेळासारखा एक बैठा खेळ. याचे अनेक प्रकार आहेत. महाराष्ट्रात दशावतारी गंजीफा प्रसिद्ध आहेत. बाबरनाम्यात गंजीफाचा उल्लेख आहे. कानूने इस्लाम, ऐने अकबरी, गिरिधरकृत गंजीफालेखन, श्रीतत्त्वनिधी, इ. ग्रंथांत या खेळाचे वर्णन आहे. मात्र प्रत्येक ठिकाणी त्याची माहिती वेगवेगळी दिली आहे. गंजीफांच्या काही डावांत ९६ पाने असून, त्यांचे चंग, बरात, किमाश, समशेर, इ. आठ गट असतात. श्रीतत्त्वनिधीत १३ प्रकार दिले आहेत. काही ठिकाणी गंजीफांना छंद असेही म्हटले आहे. त्यांतील नवग्रहछंद म्हणजे नऊ ग्रहांच्या राशींच्या गंजीफा होत. गंजीफांत चंगकांचनी नामक आठ रंगांचा आणखी एक प्रकार आहे.









गंजीफाची पाने

दशावतारी गंजीफांच्या खेळात मत्स्य, कच्छ, वराह, नरसिंह,

वामन, परशुराम, राम, कृष्ण, बुद्ध व कलंकी या दहा अवताराची, राजा, वजीर आणि एक्का ते दश्शा अशी प्रत्येकी १२ पाने मिळून १२० पाने वापरतात. तीन खेळाडू ती पाने सारखी वाटून घेतात. दिवसा खेळ सुरू करताना, ज्याच्या हातात राम राजा असेल, तो डाव सुरू करतो आणि रात्री, ज्याच्या हाती कृष्ण राजा असेल, तो डाव सुरू करतो. त्याला सुर्क्या म्हणतात. तो प्रथम राम राजा व त्याच रंगाचे एक हलके पान खाली उतरतो. बाकीचे खेळाडू आपल्या हातातील दोन हलकी पाने त्यावर टाकतात. अशा प्रकारे जमलेली सहा पाने सुर्क्याला मिळतात. अशा पद्धतीने अनेक प्रकारे पाने मिळवता येतात. एकाचा डाव सपल्यावर दुसरा त्याच पद्धतीने पाने मिळवितो. शेवटी ज्याच्याकडे अधिक पाने जमतात, त्याला इतराकडून पाने ओढण्याचा अधिकार प्राप्त होतो. [ सु. वि. को ]

**गठंवा** कच्च्या दोऱ्याला सोन्याचा मणी, हळकुंड आणि घोगडीची दशा बाधतात, त्याला गंठवा म्हणतात. प्रसूतीनतर बाराव्या दिवशी बाळतिणीची ओटी भरताना तिची जाऊ हा दोरा तिच्या गळयात बांधते. कोकणात काही ठिकाणी ही प्रथा आहे. [ बदलापूर ]

**गंडक** (१)एक देशविशेष. महाभारताच्या सभापर्वात याचा केवळ नामोल्लेख आहे (२९.४). विदेह देशाच्या जोडीने त्याचा उल्लेख आला आहे त्यामुळे तो देश मगधातच कुठेतरी असावा.

(२) मगाहिया डोमाचा पोशिदा असा एक देव. तो एक दरोडेखोर होता. पण आज कित्येक जातीजमाती त्याला देव म्हणून भजतात. [ फो. लो. नॉ. इं. ]

**गंडकी** एक महानदी. हिला चक्रनदी, शालग्रामी, नारायणी व सदानीरा अशीही नावे आहेत. ही नदी तिबेटच्या दक्षिणेकडील टेकडयांतून निघते व नेपाळमार्गे हिमालय उतरून खाली येते. नेपाळच्या प्रदेशात तिला डाव्या बाजूने चार व उजव्या बाजूने दोन नद्या मिळाल्या आहेत. बिहारमधल्या सोनपूर गावी ही गगेला मिळते. हिच्या वेगवेगळचा सात प्रवाहांना सप्तगंडकी असे नांव आहे. ही नदी १९२ मैल लाब असून, बाराही महिने नौकानयन चालेल, अशी जलसमृद्ध आहे. इमारती लाकूड, धान्य वगैरे माल या नदीतून जलमार्गाने पाठविला जातो. हिला त्रिवेणी व खारण असे दोन कालवे काढलेले आहेत.

पापहारक अशा सात पवित्र नद्यांत गंडकीची गणना होते ( म. भा. आदि. १७० ). तिच्या पात्रात जे गोटे आढळतात त्यावर चक्र असते, असे पद्मपुराणात सागितले आहे ( १.३८. ३० ). विष्णूच्या गालावरील घर्मबिंदूपासून ही नदी उगम पावली, असे वराहपुराणात म्हटले आहे ( १४४ ). गंडकीने विष्णूला प्रसन्न करण्यासाठी दीर्घकाळ तप केले. मग विष्णू तिला प्रसन्न झाला व ‘ वर माग ’ म्हणाला. त्यावर गडकीने विष्णूकडे मागितले की, ‘ तू माझा पुत्र हो ’ विष्णूने ‘ तथास्तु ’ म्हटले आणि तिला सागितले—

**शालग्रामशिलारूपी तव गर्भगतः सदा ।**
**तिष्ठामि तव पुत्रत्वे भक्तानुग्रहकारणात् ।।**
**मत्सान्निध्यान्नदीनां त्वमतिश्रेष्ठा भविष्यसि ।**

अर्थ— हे गडकी, शालिग्राम शिलेच्या रूपाने मी तुझ्या उदरात पुत्र म्हणून सदैव राहीन व भक्तावर अनुग्रह करीन. माझ्या सान्निध्यामुळे तू सर्व नद्यामध्ये अतिश्रेष्ठ होशील.

लहान गडकी नावाची आणखी एक नदी असून, ती नेपाळच्या लहान पहाडातून उगम पावते व गोरखपूर जिल्ह्यातून वाहत जाऊन बगालच्या सारण जिल्ह्यात घाग्रेला मिळते. **पाहा**— शालिग्राम. [ म. ज्ञा. को ; श. क.; हि. जॉ. ए. इं ]

**गंडकुसूल** प्राचीन कालातील धान्य साठविण्याचे एक पात्र. दोन-अडीच फूट व्यासाची व सहा इच उचीची अशी पक्या मातीची चक्रे बनवीत व ती एकावर एक ठेवून गडकुसूल तयार करीत. अहिच्छत्रा, हस्तिनापूर, राजघाट, इ. प्राचीन स्थानाच्या उत्खननात अशा प्रकारचे काही गंडकुसूल सापडले आहेत. अहिच्छत्राजवळील खेडचात अद्यापि अशा गंडकुसूलांची पद्धत आहे. तिथे त्याना गॉड़ म्हणतात; तर बगालमध्ये मांडल म्हणतात. पाणी साठविण्यासाठी व शौचकूप म्हणूनही याचा उपयोग करीत असत. [ ह च. सां. अ. ]



गडकुसूल

**गंडभेरुंड** एक काल्पनिक पक्षी. याचा आकार गरुडासारखा असतो; पण त्याच्या एका धडातून दोन चोची फुटलेल्या असतात. अशा या दोन चोचीच्या गंडभेरुडाला सर्व

पक्ष्यांत श्रेष्ठ समजतात. त्याच्या दोन्ही चोचीत आणि पावलाच्या पंज्यांत एकेक हत्ती पकडलेला दाखवितात.

हिरण्यकशिपूला मारल्यावर नरसिहाचा क्रोध कशानेही शात होईना, त्या वेळी गंडभेरुंडाने नरसिहाला आकाशात उडवून नेले, अशी दंतकथा आहे. दक्षिणेतल्या शैव मंदिरांतून उत्सवमूर्तीची मिरवणूक काढतात, तेव्हा तिला जी वाहने करतात, त्यात गंडभेरुडाचे एक वाहन असते. ही म्हैसूर नरेशाची राजमुद्रा आहे. हे प्रतीक म्हैसूरच्या राजप्रासादावर व बेगळूरच्या नव्या विधानसौधावरही दिसते. [सा. इं. इ. गॉ. गॉ; कर्नाटक]



गडभेरुंड

**गंडव्यूह** बौद्ध धर्मातील महायान संप्रदायाचा एक महत्त्वपूर्ण ग्रथ. यात बोधिसत्त्वाचा गुणगौरव केलेला असून त्याची उपासनाही सांगितली आहे. याचा प्रारंभ झाला आहे, तो असा–

एकदा भगवान बुद्ध श्रावस्तीच्या जेतवनात विहार करीत होता. त्याच्याबरोबर समंतभद्र, मंजुश्री, इ. पाच हजार बोधिसत्त्व होते. ते सर्वज्ञतेचा अभिलाष धरणारे होते. त्यानी बुद्धाला तशा प्रकारचे ज्ञान देण्याविषयी प्रार्थना केली. मग बुद्धाने त्यांना बोधिसत्त्वाची उपासना सागितली.

या ग्रथात बोधिसत्त्वाचे लक्षण पुढीलप्रमाणे सागितले आहे. बोधिप्राप्तीसाठी ज्याचा निर्धार झाला आहे, तो बोधिसत्त्व होय. समस्त जीवांवर प्रेम आणि करुणा करणे, त्यांच्या दुःखनिवृत्तीसाठी प्रयत्न करणे व जीवांना स्वर्गमार्ग दाखविण्यासाठी उपदेश करणे, ही बोधिसत्त्वाची कर्तव्ये होत.

या ग्रंथाच्या अंती भद्रचारीप्रणिघातगाथा नावाचे एक मनोहर स्तोत्र आढळते. त्यात महायान पथाच्या तत्त्वज्ञानाला धरून बुद्धाची स्तुती केलेली आहे. [बौ. द. मी.; ता. बौ. सा. सा.; बौ. ध. द.]

**गंडा** एक कोष्टी जात. बंगाल, बिहार, ओडिसा व मध्यप्रदेश या प्रांतांत यांची वस्ती आहे. कापड विणण्याशिवाय, हे गावाच्या रखवालीचे व ढोलकी वगैरे वाजविण्याचेही काम करतात. ओरिया, लारिया, कंधरिया व कवरिया असे याचे चार पोटभेद आहेत. ओरिया व लारिया यांचा आपसात रोटीबेटीव्यवहार होतो. हे लोक परजातीच्या मनुष्याला स्वजातीत घेतात. परतु चांभार, घासी, मनगन, मेहतर, इ. लोकाना मात्र स्वीकारीत नाहीत.

**विवाहप्रथा**– पशू, पक्षी व वृक्ष याच्यावरून यांची कुलनामे पडलेली असतात. समान देवककुलात विवाह होत नाही. मुलगी ऋतुस्नात होऊनही तिला वर न मिळाल्यास अंगणात भाला रोवून त्याच्याबरोबर तिचे लग्न लावतात. नतर तिला जो कोणी ठेवून घेईल, त्याच्या घरी तिला पाठवतात.

याच्या लग्नात एक विचित्र प्रथा आहे, ती अशी– लग्नानंतर वधू-वर घरी आले म्हणजे गवताचा एक हरीण वधूच्या कानामागे ठेवतात. मग वर गवताच्या सात बाणात त्या हरणाला उडविण्याचा प्रयत्न करतो. ते न जमल्यास वधूचा भाऊ तो हरिण घेऊन पळून जातो व मग वर त्याला पकडून आणतो.

स्वजातियाशी व्यभिचार करणाऱ्या मुलीचे लग्न विधवाविवाहासारखे होते व तिच्या आई-बापाना ज्ञातिभोजन घालावे लागते. जातीबाहेरच्या माणसाबरोबर व्यभिचार केल्यास मुलीला जातिबहिष्कृत करतात. व्यभिचारिणी स्त्रीशी नवऱ्याला जातपंचायतीसमोर काडीमोड घेता येते. त्या स्त्रीने आपल्या जाराबरोबर लग्न केल्यास त्याला तिच्या पहिल्या नवऱ्याला लग्नानिमित्त झालेला खर्च भरून द्यावा लागतो.

हे लोक दुल्हादेवाला भजतात व त्याला बकरा बळी देतात. दसऱ्याला ते आपल्या हातमागांची व वाद्यांची पूजा करतात. [म. ज्ञा. को.]

**गंडांत** जातकशास्त्रातला एक योग. तिथी, नक्षत्र व लग्न असे तीन प्रकारचे गंडात सांगितले आहेत. पंचमी, दशमी, पूर्णिमा व अमावास्या याच्या शेवटची एकेक घटिका व षष्ठी, एकादशी व प्रतिपदा यांच्या प्रारंभीची एकेक घटिका यांना तिथिगंडात म्हणतात. आश्लेषा, ज्येष्ठा, रेवती याच्या शेवटच्या दोन दोन घटिका व मघा, मूळ व अश्विनी यांच्या पहिल्या दोन दोन घटिका यांना नक्षत्रगडांत म्हणतात. कर्क, मीन, वृश्चिक या लग्नांची शेवटची अर्धी अर्धी घटिका व सिह, मेष, धन याची पहिली घटिका यांस लग्नगंडात म्हणतात. गडात हा एक अशुभ योग आहे. या योगावर जन्म होऊ नये, असे म्हणतात; झाल्यास त्याच्या दोषशांतीसाठी धेनू, वृषभ, सुवर्ण, इ. दाने सांगितली आहेत. यात्रेलाही हा योग निषिद्ध मानतात. [सं. कौ.; नि. सि.]

**गंत्रीरथदान** गंत्री हा रथाचा एक प्रकार आहे. त्याला चार किंवा आठ हत्ती, घोडे किंवा बैल जोडून

त्याचे राजाने दान करावे, असे सांगितले आहे. फल– मनोरथ-पूर्ती. [ दा. चं. ]

**गंध** (१) सुवासाला गध म्हटले आहे. गंधात काही शक्ती असते, असे समजतात. जेव्हा देवाला फुले वाहतात, तेव्हा परमेश्वराच्या आत्यंतिक सान्निध्यामुळे त्याच्यांत विशिष्ट शक्ती निर्माण होते व सुगधाच्या द्वारे ती आजूबाजूला पसरते. म्हणून देवाला वाहिलेल्या फुलांचा वास घेतल्याने बरकत येते, असे समजतात. [ की. पॉ. ]

(२) षोडशोपचार पूजेतला एक उपचार. चंदनाचे खोड सहाणेवर घासून जे विलेपन तयार होते, त्याला गंध असे म्हणतात. देवपूजेत देवाला लावण्यासाठी गंध आवश्यक असते. हा उपचार समर्पिताना पुरुषसूक्तातला ' तस्माद्यज्ञात्सर्वहुत: ' हा वैदिक मंत्र म्हणतात. याचा पुराणोक्त मंत्र असा–

**श्रीखण्डं चन्दनं दिव्यं गन्धाढ्यं सुमनोहरम् ।**
**विलेपनं सुरश्रेष्ठ चन्दनं प्रतिगृह्यताम् ।।**

देवाला गध लावतात. तसेच पुरुषही कपाळावर गंध लावतात. प्रत्येक सप्रदायात गध लावण्याची पद्धत वेगवेगळी असते. शैव लोक आडवे, तर वैष्णव उभे गध लावतात. वैष्णव कानशिलावर, खाद्यावर, छातीवर व पोटावर गधाच्या किंवा गोपीचदनाच्या मुद्रा लावतात. राधावल्लभसप्रदायी व वल्लभाचार्यांचे अनुयायी त्रिपुड्र लावतात, तर माध्वसंप्रदायी उभ्या गधात मधोमध कोळशाची एक बारीक रेघ ओढतात. वारकरी सप्रदायाचे लोक कपाळावर व कानशिलावर गंधाचे टिळे लावतात.

चैत्र महिन्यात गंध लावणे वर्ज्य करावे व गधाने भरलेली एक शिंप आणि दोन पांढरी वस्त्रे ब्राह्मणाला दान द्यावी, असे व्रतराजात सागितले आहे. फल– सर्वकामसिद्धी.

**गंधकुटी** बुद्ध, तीर्थंकर किंवा केवली यांचे विहारस्थान म्हणजे गंधकुटी होय. तीर्थंकरासाठी इद्र एक विशाल सभा निर्माण करतो, तिला समवसरण म्हणतात. त्याच्या मध्यभागी उच्च स्थानी तीर्थंकरासाठी कुटी असते. तिथे चदन, कालागुरू, इ. सुवासिक द्रव्ये जळत असतात. म्हणूनच तिला गंधकुटी म्हणतात. समवसरणाचे प्रतीक असलेल्या जिनमंदिरात गधकुटीच्या जागी गर्भगृह असते व त्यात मूर्ती बसवलेल्या असतात. भगवान बुद्धाच्या वसायच्या जागेलाही दिव्यावदानादी ग्रंथात गंधकुटी म्हटले आहे. त्रिलोकप्रज्ञप्ती या ग्रंथात निरनिराळ्या गंधकुटीचे वर्णन आहे (गाथा ८८७ ते ८९२). ऋषभदेवाच्या गंधकुटीची लांबी, रुंदी व उंची अनुक्रमे ६००, ६०० व ९०० दड होती. ऋषभदेवानतर नेमिनाथापर्यंत वरील परिमाणात क्रमाने २५, २५ व ३७।। दंड कमी झाले. पार्श्वनाथाची गधकुटी ६२।। दड लाब, ६२।। दंड रुंद व ९३।।। दंड उच होती. महावीराच्या गंधकुटीची लांबी रुदी प्रत्येकी ५० दड व उची ७५ दड होती. सारनाथ येथे बुद्धाची गधकुटी आहे, तिला मूलगंधकुटी म्हणतात. [ हिं. वि. को. ]

**गंधमादन** एक दिव्य पर्वत. याची व्याख्या अशी–' गन्धै: आत्मोपरि सञ्जातौषधीविशेषसौरभै: मादयति सन्निहितस्थान् इति'=आपल्या अंगावर उगवणाऱ्या औषधीच्या गंधाने जो आसपासच्या प्राण्याना किवा देवदेवतांना मद उत्पन्न करतो, तो गंधमादन होय (श. क.). हा पर्वत इलावृताच्या पूर्वेस आणि मेरूच्या व उत्तर कुरूच्या पश्चिमेला आहे हा दक्षिणोत्तर पसरलेला असून त्याच्या दक्षिणेला नील आणि उत्तरेला निषध पर्वत आहे. हा आणि पश्चिम समुद्र याच्या मधल्या प्रदेशाला भद्राश्ववर्ष असे नाव आहे. याचे स्थान महाविदेहवर्षात असून याला गजदंत असे दुसरे नाव आहे. हे नरनारायणांचे निवासस्थान आहे. वानरही इथे वास्तव्य करून असतात. विष्णूने धर्मसुत या नावाने या ठिकाणी तपश्चर्या केली व त्यानेच उर्वशीलाही इथेच निर्माण केले. पुढे पुरूरवा उर्वशीसह याच पर्वताच्या पायथ्याशी दहा वर्षे राहिला. मुचकुद आपली पूर्वीची शयनगुहा सोडून या पर्वतावर आला होता (भाग. पु. १०. ५२. ३). या पर्वतावरच्या बदरिकाश्रमात उद्धव तप करण्यासाठी गेला होता (विष्णू पु. ५. ३७.३४).

हा पर्वत पाषाणमय आहे, असे म्हटले असून, वेस्संतर राजा आपली पत्नी व मुले यांच्यासह इथे आला होता, असे जातकात सांगितले आहे. या पर्वतावर सुगंध नामक एक तीर्थ व एक मोठे शिवलिग असल्याचे कळते. गौतम बुद्ध या पर्वतावर येऊन गेला होता, अशीही कथा आहे. बाणभट्टाने गधमादन हे हिमालयाचे एक शिखर आहे, असे म्हटले आहे. वनवासात असताना युधिष्ठिर या ठिकाणी काही काल राहिला होता. इंद्रलोकातून परत आल्यावर अर्जुनाने इथेच युधिष्ठिराची भेट घेतली होती. [ अभि. रा.; हि. जॉ. ए. इ.; हि. ध.; पु. इं.; सु. वि. को. ]

**गंधमाळी** बिहार व ओडिसा या प्रदेशात आढळणारी एक जात. संबळपूर व उडिया येथे महादेवाच्या मंदिरातील पुजारी म्हणून हे काम करतात. हे मूळचे माळी असून, व्यवसायावरून यांचा निराळा वर्ग निर्माण झाला आहे.

राजपुतांशी आपला संबंध असल्याचे हे सांगतात. हे जानवे घालतात व स्वत ला थानापत्ती म्हणवतात. पुजारी, बांधादिया, मुडझूल, सोमलाई अशा यांच्या पोटजाती आहेत.

याच्यात सवर्ग विवाह होत नाही. विवाहाच्या वेळी बोहोल्याजवळ वधू वराच्या गळयात विवाहमाला घालते. ऋतुप्राप्तीच्या पूर्वी मुलीचे लग्न करतात व त्या वेळी तिला वर न मिळाला तर थानापत्ती लोक तिच्या बहिणीच्या नवऱ्याबरोबर किवा एखाद्या झाडाशी तिचा विवाह लावतात. मग तिचा घटस्फोट होतो व अशा प्रकारे ती स्त्री विधवा होऊन पुनश्च दुसऱ्या विवाहाला पात्र ठरते.

शिव व नाग यांची हे पूजा करतात. प्रेते जाळतात वा पुरतात. श्राद्धविधीही करतात. [ म. ज्ञा. को. ]

**गंधर्व** (१) 'गन्धं सङ्गीतवाद्यादिजनित प्रमोदं अर्वति प्राप्नोति इति' = गंध म्हणजे संगीत व वाद्य यानी निर्माण होणारा आनंद; तो ज्याला प्राप्त आहे, त्याला गधर्व म्हणतात (श. क.). गंधर्व ही अतिमानवी योनीपैकी एक असून, देवाहून गधर्वाचा दर्जा तीन पायऱ्यांनी खाली आहे, असे म्हटले आहे. कश्यप व अरिष्टा याच्यापासून गंधर्वाची उत्पत्ती झाली, असे मत्स्यपुराण सागते (५.१); तर गंधर्व हे ब्रह्मदेवाच्या शिकेतून उत्पन्न झाले, असे हरिवंश म्हणतो. ऐतरेय ब्राह्मणात (१.५) गधर्वाचा राजा सोम असल्याचे सागितले असून, महाभारतात चित्ररथ हा गंधर्वाधिपती व इंद्र हा त्यांचा स्वामी आहे, असे म्हटले आहे.



गधर्व – अप्सरा – ऐहोळ

गंधर्व शब्दाच्या कित्येक व्युत्पत्ती प्राचीन व अर्वाचीन विद्वानानी दिल्या आहेत; पण त्या बहुतेक क्लिष्ट आहेत. सायणाने दोन ठिकाणी दोन प्रकारच्या व्युत्पत्ती दिल्या आहेत–

'गानुदकं धारयतीति गन्धर्वो मेघः' = गा म्हणजे उदक, त्याला धारण करणारा, तो गधर्व म्हणजे मेघ होय (ऋ. ८.७७.५ वरील भाष्य) व 'गवा रश्मीनां धर्तार सूर्यम्' = गो म्हणजे किरण, ते धारण करणारा तो गंधर्व म्हणजे सूर्य होय (ऋ. १.१६२. २ वरील भाष्य). अथर्ववेदात (८.६) गधर्वाना 'गर्दभनादिन्' असे म्हटले आहे व गर्दभाप्रमाणेच गधर्वाच्याही कामुकतेचे वर्णन केले आहे.

गधर्वाचे आठ भेद पुढीलप्रमाणे सांगितले आहेत–

**हाहा हूहूश्चित्ररथो हंसो विश्वावसुस्तथा ।**
**गोमायुस्तुम्बुरुर्नन्दिरेवमाद्याश्च ते स्मृताः ।।**

अर्थ–हाहा, हूहू, चित्ररथ, हंस, विश्वावसू, गोमायू, तुंबुरू, नदी असे गधर्वाचे भेद सागितले आहेत.

अग्निपुराणात गंधर्वाचे अकरा गण सागितले आहेत, ते असे– अभ्राज, अंगारी, वंभारी, सूर्यवच, क्रधू, हस्त, सुहस्त, मूर्धन्वान, महामना, विश्वावसू व कृशानू.

देव आणि मर्त्य असे आणखी दोन गंधर्वभेद सागितले आहेत, ते असे–

**अस्मिन् कल्पे मनुष्यः सन् पुण्यपाकविशेषत ।**
**गन्धर्वत्वं समापन्नो मर्त्यगन्धर्व उच्यते ।।**
**पूर्वकल्पकृतात् पुण्यात् कल्पादावेव चेद् भवेत् ।**
**गन्धर्वत्वं तादृशोऽत्र देवगन्धर्व उच्यते ।।**

अर्थ – प्रस्तुत कल्पात मनुष्य विशेष पुण्याच्या परिपाकाने गंधर्वयोनीत प्राप्त होतो, त्याला मर्त्यगंधर्व म्हणतात. पूर्वकल्पात केलेल्या पुण्यामुळे चालू कल्पाच्या प्रारंभी जो गंधर्वपदाला प्राप्त होतो, त्याला देवगंधर्व म्हणतात.

ऋग्वेदातल्या पुढील ऋचेत मानवकन्येला सोम, गंधर्व व अग्नी हे देव प्रथम उपभोगतात व मनुष्य हा तिचा चौथा पती असतो, असे म्हटले आहे (१०.८५.४०).

ऋग्वेदात गंधर्वाचे उल्लेख आहेत; पण त्याची सख्या दिलेली नाही. यजुर्वेदात ती २७ सागितली आहे. पुढे अथर्ववेदात ती ६३३३ इतकी फुगलेली दिसते. बारा मासाचे बारा गंधर्व सूर्याचा मार्ग दाखवीत गगनमंडळात फिरतात व आळीपाळीने त्याची स्तुती करतात. हे वारंवार कैलासावर जातात. हे बर्हिषद पितरांची पूजा करतात.

ते गायन-वादन कलेत निष्णात असतात. स्वर्गातल्या इंद्रसभेत त्यांच्याकडे गाण्याबजावण्याचेच काम असते. चाक्षुषीविद्या, संमोहनास्त्र अशा काही दिव्य विद्या त्यांना अवगत असतात.

अंतरिक्षातला जलसंचय गंधर्वांच्याच ताब्यात असतो. इंद्र सोमाच्या शोधात असता, गंधर्वानीच त्याला त्याचा सुगावा

सागितला. मग त्याना इंद्राकडून सोमाचे आधिपत्य मिळाले. पण आपला अत्यत प्रिय असा सोम गधर्वांच्या हाती असणे, ही गोष्ट देवाच्या मनाला लागून राहिली. देवानी मग एक युक्ती केली. गधर्व हे स्त्रीलंपट आहेत, हे देवांना ठाऊक होते. म्हणून एके दिवशी त्यानी वाग्देवतेला शृंगारून गंधर्वाकडे पाठविले. गधर्व त्या वाग्देवतेच्या विभ्रमाना भुलले आणि त्यानी सोमाचा साठा तिच्या हवाली केला. वाग्देवता तो घेऊन पसार झाली.



उडणारा गंधर्व – वेरूळ

गंधर्व हे सुंदर तर असतातच; शिवाय त्याची वेशभूषाही भपकेबाज असते. म्हणूनच सौंदर्याची इच्छा धरणारी माणसे त्याची पूजा करतात ( भाग. पु. २. ३. ६ ). त्याची शस्त्रे विजेसारखी तेजाळ व घोडे वाऱ्यालाही मागे टाकणारे असतात. पाण्यात बुडून राहिले, तरी त्याचा श्वास कोडत नाही. दुसरे काही मिळाले नाही, तर पाण्यातले शेवाळ खाऊन हे आपली भूक भागवतात.

गंधर्वांना फुलाचे विलक्षण वेड असते. कुदपुष्पे तर त्यांना विशेषच प्रिय असतात. रुक्मागदाच्या पुष्पोद्यानातील ताजी सुवासिक पुष्पे गधर्व पहाटेच चोरून नेत, असे एकादशीमाहात्म्यात सागितले आहे.

अप्सरा या गंधर्वाच्या स्त्रिया होत. त्या अप्रतिम लावण्यवती म्हणून प्रसिद्ध आहेत. पण अशा स्त्रियाचा नित्य सहवास असूनही गधर्वाना मानवी स्त्रियांचे आकर्षण फार असते. मानवी रमणीना वश करण्यासाठी ते नाना प्रकारचे इंद्रजाल रचतात.

घोषयात्रच्या प्रसगी चित्ररथ गधर्वाने पांडवाच्या मैत्रीसाठी दुर्योधनादी कौरवाना बदिवान करून आपल्या लोकी चालवले होते, अशी कथा महाभारतात आहे. मानवाना भुरळ घालून संकटात पाडण्याचीही त्याना वाईट खोड आहे. तशी भुरळ पडू नये, म्हणून पूर्वीचे लोक अजशृंगी नावाची एक वनस्पती अथर्ववेदातल्या एका मत्राने भारून जवळ बाळगीत.

बौद्ध अवदानकथा व जातके यात गधर्वाचे बहुविध उल्लेख आहेत. पुराणात ते देवगायक आहेत; तर जैन परंपरेत ते किपुरुषासह व्यतर लोकातले देव आहेत. भारतीय कथावाङमयात गधर्वविषयक कथाची सृष्टी बरीच मोठी आहे.

**गंधर्वाचे ध्यान**—गधर्वमूर्ती कशी करावी, याविषयी हेमाद्रीने पुढील तपशील सागितला आहे—

**वरदो भक्तलोकानां किरीटी कुण्डली गदी ।**
**कार्यस्तु रूपी गन्धर्वो वीणावाद्यरतस्तथा ।।**

अर्थ— गंधर्व हा भक्ताना वर देणारा, किरीटकुंडलधारी, गदाधारी व वीणा वाजविण्यात तत्पर असा करावा.

विष्णुधर्मोत्तरपुराणात ( ३. ४२ ) असे सांगितले आहे, की त्याना मुकुट न घालता त्याच्या केसांची शिखर रचना करावी. मथुरा, गंधार, गुप्त, चालुक्य व पल्लव या कलाशैलीत गधर्वप्रतिमा वेगवेगळ्या रूपात पाहायला सापडतात. [ म. ज्ञा. को.; हि वि. को.; गा. दै.; पु. इं.; लो. सा. रू. ]

(२) जैन दैवतसमूहातील एक यक्ष. हा कुथुनाथाचा सेवक आहे याचे वर्णन असे–

**कुन्थुनाथजिनेन्द्रस्य यक्षो गन्धर्वसंज्ञकः ।**
**पक्षियानसमारूढः श्यामवर्णश्चतुर्भुजः ।।**

( प्रतिष्ठासारसंग्रह )

अर्थ— गंधर्व नामक यक्ष कुंथुनाथाचा सेवक असून, तो श्यामवर्ण व चतुर्भुज आहे. तो पक्ष्यावर बसून जातो.

हा सर्प, पाश, धनुष्य व बाण ( श्वेतांबरमते वरदमुद्रा, पाश, मातुलिग व अंकुश) धारण करतो. [ जै. इ. ]

(३) एक जात. उ. प्रदेशातील वाराणसी, अलाहाबाद व गाझीपूर या भागात आणि राजस्थानात या लोकांची वस्ती आहे. हे लोक गायक व नर्तक आहेत. याच्यांत अरारव, सितळ, रामसी, शाहिमल, हिवार, पंचभैया व उधोमन अशी सात गोत्रे आहेत.

**विवाहप्रथा**—याच्यांत सगोत्र विवाह होत नाहीत. बालविवाहाची चाल असून, बहुपत्नीत्वही रूढ आहे. जुन्या काळी याच्यांत पुढील चाल होती. गाण्याचे अंग असलेल्या व सुंदर अशा मुलीची लग्ने न करता हे लोक त्यांना वेश्या व्यवसाया-

करिता राखून ठेवीत. मात्र प्रथम पुरुषाबरोबर यांचे लग्ना-सारखे सर्व संस्कार करीत.

यांचे पुरोहित ब्राह्मण असतात. लग्नासबंधीच्या सर्व तंटयांचा निवाडा पंचायतीच्या मार्फत होतो.

गाणे-बजावणे व नाचणे हा गंधर्व लोकांचा प्रमुख व्यवसाय आहे. वाराणसी जिल्ह्यात यांच्यापैकी कित्येक लोक शेती करतात. खसखशीची लागवड करणे, हा यांचा आवडता व्यवसाय आहे.

यांच्यांत औरस मुलीला वारसा हक्क मिळत नाही, पण वेश्या नर्तकीच्या मुलीला मुलाच्या बरोबरीने वाटा मिळतो. धंदा चालविण्यासाठी मुलगी दत्तक घेतल्यास तीच मालमत्तेची वारसदार ठरते.

**देवधर्म**—गधर्व लोक वैष्णव आहेत. पण त्यांच्या विवाहित स्त्रिया महादेवाला पूजतात व नर्तकी गणेशाला भजतात. याशिवाय हे ठाकूरदेवाला व बाबा किनाराम याला पूज्य मानतात.

राजस्थानातील गंधर्व हे मूळ वैश्यांपैकी, पण व्यवसायाने नर्तक आहेत. अंजनासुंदरी व मैनासुंदरी ही यांची दोन महत्त्वाची संगीत नाटचे असून त्यांचे खेळ करीत हे वर्षातील आठ महिने गावोगाव फिरतात. यांचे खेळ जैनांना विशेष प्रिय असतात. द. गुजरातमध्ये राहणाऱ्या गंधर्वांना गंध्रप म्हणतात. **पाहा**—गंध्रप. [ म. ज्ञा. को; लोककला त्रैमासिक ]

## गंधर्वनगर

संध्याकाळच्या वेळी आकाशात एक नगर दिसते, त्याला हे नाव आहे. ते चक्रवर्ती किंवा इतर राजांच्या नगरांचा उत्पात सुचविणारे असते. नगर ज्या वर्णाचे असेल, त्याला अनुलक्षून त्याचे पुढीलप्रमाणे फल सांगितलेले आहे–

**कपिलं सस्यघाताय, माञ्जिष्ठं हरणं गवाम् ।**
**अव्यक्तवर्णं कुरुते बलक्षोभं न संशयः ।।**
**गन्धर्वनगरं स्निग्धं, सप्राकारं सतोरणम् ।**
**सौम्यां दिशं समाश्रित्य राज्ञस्तद्विजयंकरम् ।।**

[ अभि. रा. ]

अर्थ— गंधर्व नगराचा रंग पिगट असेल तर धान्याचा नाश, लाल असेल तर गोधनाचा अपहार, अव्यक्त असेल तर बलाचा क्षोभ, आणि ते तोरणे, प्राकार यांनी युक्त असेल व उत्तरेला दिसेल तर ते राजाला विजय मिळवून देणारे असते.

## गंधर्ववेद

सामवेदाचा उपवेद, 'गन्धर्वाणां संङगीतविद्योपजीविनां वेदः' = संगीत विद्येवर उपजीविका करणाऱ्या गंधर्वाचा वेद, तो गधर्ववेद होय, असे त्याच्याबद्दल सांगितले आहे ( श. क. ) हा ग्रंथ सांप्रत उपलब्ध नाही. पण हा संगीतावरील ग्रंथ असून, त्यात ३६,००० अनुष्टुभ श्लोक होते, असे एका तात्रिक ग्रंथात सांगितले आहे. [ श. क.; डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

## गंधव्रत

एक व्रत. वर्षभर प्रत्येक पौर्णिमेस उपवास व वर्षाच्या शेवटी विष्णुमूर्तीला सुगंधी द्रव्याचे विलेपन करून ती ब्राह्मणाला दान देणे, असा याचा विधी आहे. [ हि. ध. ]

## गंधशास्त्र

प्राचीन भारतीय लोक धर्म व अध्यात्म याचे जसे उपासक होते, तसेच ते सुदर व सुवासिक वस्तूंचे रसिक व चोखंदळ भोक्ते होते. गधशास्त्राचे स्वरूप व प्रयोजन याविषयी एका श्लोकात जे वर्णन आले आहे, त्यावरून भारतीयांची या शास्त्राकडे पाहण्याची दृष्टी काय होती, ते कळून येते. तो श्लोक असा—

**देवानां शुभगन्धधूपसहितस्यार्चाविधेरर्पकं**
**नृणां पुष्टिकरं त्रिवर्गफलदं स्वस्याप्यलक्ष्मीहरम् ।**
**राज्ञां तोषकरं विदग्धवनिताचित्तप्रमोदप्रदं**
**शास्त्रं सच्छुभगन्धशासनमतो दिङ्मात्रमत्रोच्यते ।।**

अर्थ– देवांची शुभ गंधधूपांनी जी पूजा-अर्चा करावी लागते, तिला पूर्णता आणणारे, लोकाना आनंददायक आणि धर्म, अर्थ व काम या त्रिवर्गाच्या फलाची प्राप्ती करून देणारे, असुंदरता नष्ट करणारे, राजाना संतोष देणारे, निपुण व रसिक अशा प्रमदांच्या चित्तांना प्रमुदित करणारे असे हे शुभ-गंधशास्त्र आहे.

देवांच्या षोडशोपचार पूजेमध्ये सुगंध हा उपचार अत्यंत आवश्यक मानलेला आहे. म्हणूनच रोजच्या देवपूजेत सुवासिक उदबत्ती लावण्याचा आणि विशेष प्रसंगी कापूर लावण्याचा प्रघात आहे. निसर्गातील सुगधी वस्तूंनी आकृष्ट होऊन प्राचीन भारतीयांनी नैसर्गिक सुगंधी वस्तूंचा व तदुद्भव अनेक समिश्र सुगंधांचा उपभोग घेतला आहे, असे अनेक जुन्या ग्रंथांवरून दिसते. अष्टभोगांमध्ये सुगधभोग नावाचा एक भोग असून, त्याचे शास्त्र जे गंधशास्त्र व त्याची कला जी गधयुक्ती, त्याचा पाया भारतीयांनी प्राचीन काळी घातला होता, असे काही ग्रंथांच्या आधारे म्हणता येते—

चरकसंहितेत वातरक्तासारख्या विकारावर अमृताद्यतैल, सुकुमारकतैल, महापद्मकतैल, इ. औषधी तेले गुणकारी ठरतात, असे म्हटले आहे. ही तेले तयार करताना त्यात चदन, उशीर,

केशर, तगर, मजिष्ठा, कुकुम, पत्रैला, अगुरू यासारखी सुगधी द्रव्ये घालीत असत. अशी सुगधद्रव्यमिश्रित औषधी तेले तयार करता करता सुगधी तेले तयार करण्याचे शास्त्र व कला प्रगत झाली असावी, असे वाटते. वात्स्यायनाच्या कामसूत्रात, नागरिकाला ज्या चौसष्ट कला अवगत असाव्या असे सागितले आहे, त्यात गंधयुक्तीचा म्हणजे सुवासिक तेले व उटणी तयार करण्याच्या कलेचा अतर्भाव आहे.

प्राचीन भारतीयानी अशा प्रकारे गधशास्त्राचा व गंधयुक्तीचा विचार केलेला असला, तरी त्यावर प्राचीन काळचा स्वतत्र ग्रंथ मात्र उपलब्ध नाही. गंधशास्त्रावरचे स्वतंत्र ग्रथ १२ व्या किवा १३ व्या शतकानतरचे उपलब्ध आहेत. त्यापूर्वीच्या काळातील जुन्या ग्रथात गध-शास्त्रावर काही त्रोटक प्रकरणे व टिपणे आढळतात. वराहमिहिराच्या (इ. स. ५००) बृहत्सहितेत गंधयुक्ती नावाचे एक प्रकरण आहे. त्यानंतर अग्निपुराणाच्या (इ. स. ९ वे शतक) २२४ व्या अध्यायात स्त्रीरक्षादिकामशात्र या प्रकरणात गधयुक्तीबद्दल थोडे वर्णन आले आहे, त्यात सुगधी वस्तू तयार करताना आठ प्रकारच्या प्रक्रिया आवश्यक असल्याचे सागितले आहे. त्या प्रक्रिया अशा– (१) शौच किवा शोधन (२) आचमन (३) विरेचन (४) भावन (५) पाक (६) बोधन (७) धूपन व (८) वासन. ज्या द्रव्यानी धूपन करायचे, अशी एकवीस द्रव्ये अग्निपुराणात सागितली आहेत. त्याचप्रमाणे स्नानाला योग्य अशी तगर, कर्पूर, कस्तूरी इ. द्रव्ये; तोड सुवासिक व्हावे म्हणून वेलदोडे, लवंग, कंकोळ, जायफळ, इ. द्रव्यांचे मुखवासक चूर्ण व गुटिका; फुलाचा भरपूर वास दिलेल्या तिळांपासून गाळलेले गंधतैल, इ. सुगंधी वस्तूचाही निर्देश तिथेच केलेला आहे. अशाच प्रकारचा सौगंधिक पदार्थाचा निर्देश विष्णुधर्मोत्तर पुराणातील गंधयुक्ती प्रकरणातही आढळतो. कालिकापुराणात देवपूजेत जी सुगधी द्रव्ये वापरायची, त्यांचे पाच प्रकार दिले आहेत, ते असे–(१) चूर्ण केलेली द्रव्ये (२) घासलेली किवा उगाळलेली (३) जाळातून उद्भवणारी किंवा पसरणारी (४) चुरडून तयार केलेली व (५) प्राण्यांच्या अंगातून उत्पन्न झालेली.

यानंतर सोमेश्वर राजाच्या (इ. स ११३०) मानसोल्लास ग्रंथात गंधभोग नावाचे एक प्रकरण आहे. त्याचप्रमाणे नित्यनाथ सिद्ध (इ. स. १३ वे शतक) याच्या रसरत्नाकर नामक ग्रंथात गंधवाद नावाचे एक प्रकरण असून, त्यात सुगधी वस्तू तयार करण्याच्या अनेक प्रक्रिया सागितल्या आहेत.

यानंतर इ. स. १३०० ते १६०० या कालखंडात गंधशास्त्रावर स्वतंत्र ग्रंथ निर्माण झाले. या ग्रथांची हस्तलिखिते भाडारकर प्राच्य विद्यामंदिरात आहेत. हे दोन ग्रथ म्हणजे गंधवाद व गंगाधर नायकक्रत गधसार हे होत. गधवादाच्या लेखकाचे नाव आढळत नाही. त्या ग्रथावर मराठी टीका आहे. हा ग्रंथ इ. स. १५३० ते १५५० या कालात रचला गेला असावा.

गगाधराने सुगंधी द्रव्याचे आठ वर्ग केले आहेत, ते असे– (१) पाने (२) फुले (३) फळे (जायफळ, वेलदोडे) (४) झाडांच्या साली (कापराच्या, लवगाच्या वगैरे झाडाच्या) (५) लाकूड (चदनादी) (६) मुळे (७) वनस्पतीचा स्राव (कापूर) (८) प्राणिज पदार्थ (कस्तूरी, मध, लाख, इ.)

गगाधराने आपल्या ग्रंथात सुगंधी द्रव्ये तयार करण्याच्या सहा प्रक्रिया वर्णिल्या आहेत, त्या अशा– (१) भावन = चूर्ण द्रवात घालून ते चांगले मुरवणे (२) पाचन = भावनाने तयार झालेला द्रव पकवणे किवा उकळणे (३) बोध = एखाद्या सुगधाच्या साहाय्याने मिश्रणातील सुवास अधिक जागृत करणे (४) वेध = बोधाचीच पुढची पायरी (५) धूपन = धूर देणे व (६) वासन = फुलाच्या सुवासाचा वास देणे.

गंधवाद ग्रंथात दारुचिनीचा किवा दालचिनीचा उल्लेख असून, सुगंधी द्रव्ये तयार करताना काचेच्या कुप्या वापरीत व सुगंधी अर्क कांबळचातून गाळून घेत, असेही निर्देश केलेले आहेत.

मानसोल्लासात अनेक भोगांचे व भोग्य वस्तूचे वर्णन केले आहे. त्या ग्रथातील चार प्रकरणात राजाने कोणती सुगधी द्रव्ये वापरावी, ते सागितले आहे. तसेच राजाच्या अंगसंवाहनाकरता वापरायचे तेल तयार करण्याची पद्धतही त्यात सांगितली आहे, ती अशी– तिळांना केतकी, जाती (जाई), पुन्नाग आणि चंपक या फुलांचा भरपूर वास देऊन ते तीळ यंत्रात घालून त्यांचे तेल गाळावे. या तेलाला त्या फुलांचा मधुर सुवास येतो.

राजाच्या अंगाला जे उटणे लावायचे, ते पुढीलप्रमाणे तयार करीत असत–पालक, तगर, मांसी, अश्वगंधा, पुष्कर, कोष्ठ, पटोलक, मुस्तानिशाद्वय (दोन प्रकारची हळद) व ग्रंथिपर्णी या औषधी वनस्पती सावलीत वाळवून त्याची पूड करून मिश्रण तयार करीत व निंब, राजवृक्ष, तुलसी व आर्जक यांची पाने वाटून ती वरील मिश्रणात मिसळीत. मग या मिश्रणात एला (वेलदोडा), जाती, सर्षप (मोहरी), तीळ, कुस्तुंबर, बाकुची आणि चक्रमर्द यांच्या दाण्याची पूड; लवंगा, पद्मक, लोध्र, चदन, सुरदारू, अगुरू आणि सरल याची पूड आणि नागकेशर, पुन्नाग, कात, कुंकुम (केशर) व चंपक या फुलाची पूड मिसळीत. नंतर गुग्गुळू, सैंधव, बोल व सर्जरस या पदार्थाचा पाण्यात किंवा तांदळाच्या कांजीत कोळ करून तो त्या मिश्रणात घालीत. अशा तऱ्हेने तयार झालेले उटणे

राजाच्या अंगाला चोळून लावीत असत.

या उटण्यामुळे अंगाला आलेला चिकटा घालवण्याकरता एक खली म्हणजे साबणाच्या वडीसारखी वडी वापरीत असत. कणिक, तांदळाची दाट आबवलेली काजी, मदननामक वनस्पतीच्या मुळाची पूड व केशर यांपासून ही खली तयार करीत असत.

यानतरच्या काळात गुलाबपाणी व सुवासिक फुले व द्रव्ये यांपासून तयार केलेली अत्तरे यांचा उपयोग लोक करू लागले.

रघुनाथ गणेश नवहस्त नावाचे एक गृहस्थ समर्थ रामदासांच्या समकाली होऊन गेले. त्याच्या भोजनकुतूहल या ग्रंथात पानीय वर्ग या नावाचा एक विभाग असून, त्यात निरनिराळ्या पाण्याचे गुणधर्म दिले आहेत. त्यात गुलाबपाणी कसे तयार करावे व त्याचे औषधी गुण कोणते, ते सांगितले आहेत.

फ्रॅन्सिस बुकॅनन नामक एका इंग्रजाने आपल्या पाटणा-गया रिपोर्ट (इ. स. १८११–१८१२) या पुस्तकात त्या वेळी भारतात गुलाबपाणी व सुवासिक तेले व अत्तरे याचे उत्पादन कसे होत असे, त्यांचा व्यापार केवढा चालत असे व गुलाबाचे मोठमोठे बगीचे कसे राखले जात, त्यांचे वर्णन केले आहे. त्यावरून कळते, की त्या काळी गंधी लोक गुलाबपाणी, सुवासिक तेले व अत्तरे यांचा व्यापार करीत. एकटया पाटणा शहरात गुलाबपाणी व सुवासिक अर्क याचे आठ आणि चमेलीच्या तेलाचे तीन कारखाने होते. तिथून चार हजार रुपयांच्या सुवासिक तेलांची व अर्कांची निर्यात होत असे.

तसेच या कारखान्यात गुलाब, केवडा आणि लिंबू याचे सुवासिक पाणी तयार करीत. गुलाबपाण्याचे एकदा आटवून गाळलेले व दुसऱ्यांदा आटवून गाळलेले, असे दोन प्रकार असत. एकदा गाळलेल्या गुलाबपाण्याची किंमत घाऊक १२ ते १३ रु. मण (सुमारे ७६ पौंड) व किरकोळ १६ ते २० रु. मण असे. काहींच्या मते एक मण पाणी एकदा गाळायचे म्हणजे त्यासाठी बाव्वीस हजार गुलाब व छप्पन्न शेर पाणी लागे. निरनिराळे सुवासिक अर्क काढून ते चंदनी तेलात मिसळीत. काही वेळा तिळांना फुलांचा वास देऊन मग त्यांचे सुवासिक तेल गाळीत.

मोगल बादशहांना सुगंधी द्रव्यांची फार आवड होती. अकबराने सोने, पारा, रेशीम व कस्तूरीसारखी सुगंधी द्रव्ये पारडयात टाकून आपली तुला केली होती, असे ऐने अकबरी (इ. स. १५९०) या ग्रंथात लिहिले आहे. अकबराला सुगधी द्रव्ये फार आवडत. त्यामुळे ऐने अकबरीत सुगंधी द्रव्यांचे अनेकदा उल्लेख आलले आहेत.

अबुल फजलने नैसर्गिक सुगंध म्हणून माशांच्या पोटातल्या भागापासून तयार होणारे अंबर, सायप्रस बेटातल्या झाडांपासून तयार केलेले लौदन, कापूर, मांजरासारख्या प्राण्यांच्या शरीरात तयार होणारे कस्तूरीसारखे सिव्हेट, तशाच प्रकारचे कौरा, मिद व अगुरूच्या झाडाचे मूळ, अगुरूचे तेल, चंदन, सुगधी शिपा, इ. द्रव्यांचा निर्देश केला आहे.

गुलाबपाणी व गुलाबाचा अर्क काढण्याची पद्धत इराणमध्ये उत्पन्न झाली, असे दिसते. खलीफा मामूनच्या (इ. स. ८१० – ८१७) कारकीर्दीत त्याच्या राज्यातील फार्मीस्तान नावाच्या मुभ्याच्या सुभेदाराला दर वर्षी बगदादच्या खजिन्याकडे गुलाबपाण्याच्या तीन हजार बाटल्या पाठवाव्या लागत. अकबराच्या वेळी इराणमधून गुलाब आणून भारतात त्याची मोठ्या प्रमाणावर लागवड केली गेली असावी.

शहाजहानच्या दरबारात गुलाबपाण्याचा क्रीडामहोत्सव साजरा होत असे.

जहांगीरची राणी नूरजहान हिला अत्तराचा शोध लागला, असे म्हणतात. तिच्या विवाहप्रसंगी राजवाडयाभोवतालच्या उपवनात गुलाबपाण्याचे पाट वाहत होते. त्या पाटावरून तिला तेलाचे तवंग दिसले. त्याच्या सुगधाने लोभावून तिने ते तवग भांडयात गोळा करायला लावले. त्यालाच मग इत्र–इ–जहांगिरी असे नाव देण्यात आले.

शिवाजीमहाराजांनी करविलेल्या राज्यव्यवहारकोशात अत्तराचा निर्देश आहे. रघुनाथ पडिताने तिथे अत्तराचा अर्थ पुष्पसार असा दिला आहे.

पेशवाईच्या काळातही गुलाबपाण्याचे व अत्तराचे उल्लेख सापडतात. साताऱ्याच्या शाहू महाराजानी इ. स. १७२३ मध्ये कान्होजी आंग्र्याकरवी इग्रजांकडून गुलाबपाण्याच्या वीस बाटल्या मागविल्याचा निर्देश आहे.

प्राचीन काळी देखील लोकांच्या सुगंधप्रियतेचा फायदा घेणारे सुगंधी वस्तूचे व्यापारी पुष्कळ होते. या विषयी एक संस्कृत सुभाषित आहे, ते असे—

**पण्यानां गान्धिकं पण्यं किमन्यैः काञ्चनादिभिः ।**
**तत्रैकेन च यत् क्रीतं तच्छतेन प्रदीयते ।।**

**अर्थ**– सगळ्या व्यापारात उत्तम व्यापार म्हणजे सुगधी द्रव्यांचा होय. त्याच्यापुढे सोन्यामाणकांची काय कथा ! या सुवासिक द्रव्यांच्या व्यापारात एक पटीने विकत घेऊन ते शंभर पटींनी विकत दिले जाते.

रसरत्नाकरनामक ग्रंथात (१३ वे शतक) तर हिरेमाणके व सुगंधी पदार्थ तयार करून विकणे, हे अलोट संपत्ती मिळवण्याचे मार्ग होत, असे सांगितले आहे.

सांप्रतच्या काळात सुगंधी द्रव्यांचा प्रसार सर्वत्र झालेला आहे. पूर्वी राजेरजवाडे व श्रीमंत लोक यांच्यापुरताच सुगधी

जले, तेले, अत्तरे. इ. वस्तूचा छंद मर्यादित होता; पण हल्ली सर्वसाधारण माणसापर्यंतही हा छंद पोचला आहे. हळदीकुंकू, लग्न-मुजी, इ. समारंभात जमलेल्या लोकांना अत्तर लावणे व त्याच्यावर गुलाबपाणी शिंपडणे, हे दोन आवश्यक उपचार मानलेले आहेत. [प्राचीन भारतीय गंधशास्त्र – प. कृ. गोडे.]

## गंधहस्ती

एक बोधिसत्त्व. निष्पन्नयोगावलीत याची दोन भिन्न रूपे वर्णिली आहेत–(१) याचा वर्ण हिरवा (श्याम) असून, याने डाव्या हाती कमलारूढ हत्तीची सोंड धरली आहे व उजव्या हाताने हा वरदमुद्रा दर्शवितो. आहे (२) याचा वर्ण सितश्याम (फिकट हिरवा) असून, याने उजव्या हाती गंधयुक्त शंख धारण केला आहे व डाव्या हाताची मूठ याने कमरेवर ठेवली आहे.



गंधहस्ती

याच्या प्रतिमा दुर्मिळ आहेत. याचे एक नेपाळी चित्र उपलब्ध आहे. [इं. बु. इ.]

## गंधार

(१) भारताच्या वायव्य सरहद्दीवरील कंदाहार प्रांताचे प्राचीन नाव. याला गांधार असेही म्हणतात. यात काबूल (प्राचीन कुभा) नदीच्या दक्षिणेकडील खोरे म्हणजे अफगाणिस्तानाचा काही भाग आणि पेशावर व रावळपिंडी हे जिल्हे यांचा समावेश होत असे. हा प्रदेश पश्चिमेस लघमान व जलालाबादपर्यंत, उत्तरेस स्वातच्या खोऱ्यापर्यंत, पूर्वेस सिंधू नदीपर्यंत आणि दक्षिणेस सफेतकोह व कोहात पर्वतापर्यंत पसरलेला होता.

ऋग्वेदात या प्रदेशातील मेंढ्यांच्या मऊ लोकरीची प्रशंसा केली असून, तिथल्या रहिवाशांना गंधारी हे नाव दिलेले आढळते (१. १२६. ७). अथर्ववेदात (५. २२.१४) गंधारांचा उल्लेख मूजवंत, अंग, मगध या लोकासमवेत केलेला आहे. यांच्याविषयी अथर्ववेदात द्वेषबुद्धी व्यक्त केलेली आहे.

गधार म्हणजे गंधर्व लोकांचा प्रदेश अशीही एक कल्पना वाल्मीकिरामायणात आढळते (उत्तर. १०१.११). याच्या पूर्वेला केकय जनपद होते. तिथला राजा युधाजित याच्या सांगण्यावरून भरताने गधार देश जिंकून तक्षशिला नगरी वसविली व भरताचा पुत्र पुष्कर याने पुष्करावती (पुष्कलावती) वसविली असे म्हणतात. महाभारतकाळी गंधार देशाचा मध्यदेशाशी निकटचा संबध जुळला होता. गंधारचा गंधर्ववंशी राजा सुबल याची कन्या हीच धृतराष्ट्राची पत्नी गांधारी होय आणि तिचा भाऊ शकुनी हा गंधारचा राजपुत्र होय.

प्राचीन काळी तक्षशिला ही गंधार देशाची राजधानी होती. जातकग्रंथांत या नगरीचे अनेक उल्लेख आहेत. त्या काळी तिथे एक प्रख्यात विद्यापीठ होते. जैनांच्या उत्तराध्ययनसूत्रात गंधारचा जैन राजा नग्नजित याचा उल्लेख आढळतो. पाली वाङ्मयात बुद्ध काळातील सोळा महाजनपदांची नावे आहेत, त्यात गंधार हेही एक नाव आहे.

सनपूर्व ५ व्या शतकात इराणचा सम्राट दरियस याने हा देश जिंकून आपल्या साम्राज्यास जोडला होता. शिकंदराने भारतावर स्वारी केली तेव्हा गंधार देशात बरीच स्वायत्त राज्ये होती. तक्षशिला व अभिसार ही त्यांतली प्रमुख राज्ये होत. पुढे हा प्रदेश अशोकाच्या साम्राज्यात समाविष्ट झाला. त्यानंतर काही काळ हा प्रदेश ग्रीक व इंडोपार्थियन यांच्या सत्तेखाली होता. पुढे तो जेव्हा कुशाण साम्राज्याचा एक भाग बनला, तेव्हा पुरुषपूर (पेशावर) ही त्याची राजधानी बनली.

गुप्त काळी गंधार देशावर यवन, शक, इ. परकीयांची सत्ता होती. इ. स. च्या ६ व्या शतकात तिथे साही वंशाचे राज्य प्रस्थापित झाले होते. हे राजे मूळचे तुर्की होते; पण त्यांनी बौद्ध धर्म स्वीकारला होता. या वंशाची सत्ता तिथे इ. स. च्या १० व्या शतकाच्या अखेरपर्यंत होती. त्यानंतर गझनीच्या महमुदाने हा प्रदेश जिकला. तेव्हापासून १८ व्या शतकाच्या अखेरपर्यंत या भागावर निरनिराळ्या मुसलमानी वंशांनी राज्य केले. १९ व्या शतकाच्या प्रारंभी रणजितसिंघाने हा प्रदेश आपल्या राज्यास जोडला आणि नंतर इ. स. १८४९ साली तो इंग्रजांच्या ताब्यात गेला.

इ. स. च्या ४ थ्या शतकात या देशात बौद्ध धर्माचा बराच प्रसार झाला होता, असे समजते. तिथे एक हजार बौद्ध मठ होते, असे युआन च्वाग म्हणतो. चार बौद्ध स्तूपांचे अवशेषही अलिकडे त्या भागात सापडले आहेत. अभिधर्मकोशाचा कर्ता वसुबंधू हा गंधार देशात जन्मला होता, असे युआन च्वांग याने लिहून ठेवले आहे.

गंधार देशाचे रहिवासी कांबळी व शाली विणण्यात कुशल होते. ते शालींवर सुबक जरीकाम करण्याबद्दल प्रसिद्ध होते. शिल्प, चित्र, काव्य, नाटक, इ. ललित कलांचाही या देशात

बराच विकास झाला होता. तिथले लोक अश्वविद्येतही प्रवीण होते. काटक, चपळ व देखण्या घोड्यांचा ते व्यापार करीत. सर्व भारतभर हा व्यापार चाले.

इ. स. च्या ९ व्या किंवा १० व्या शतकातली गांधाराची नाणी दोन्ही बाजूंना छाप असलेल्या तत्कालीन नाण्यांमध्ये उत्कृष्ट समजली जातात.

पूर्वी हा प्रदेश अत्यंत सुपीक व समृद्ध होता, असे म्हणतात. पण सांप्रत तो ओसाड व दरिद्री बनला आहे. [ वे. इं.; हि. जॉ. ए. इं.; ट्रा. ए. इं.; एन्सा. रि. ए.; ओ. नि. स.; म. ज्ञा. को.; हिं. वि. को. ]

(२) सयामच्या उत्तर भागात असलेल्या युनान नामक प्रदेशाचे प्राचीन भारतीय नाव. सनपूर्व २ ऱ्या शतकात इथे भारतीय लोकांनी वसाहती स्थापन केल्या होत्या. इ. स. च्या १३ व्या शतकापर्यंत या प्रदेशाचे गंधार हेच नाव प्रचलित होते. इ. स. १२५३ मध्ये चिनी सम्राट कुबला खॉं याने हा गंधार देश जिंकून घेतला व तिथले हिंदू राज्य नष्ट केले. [ हि. वि. को. ]

## गंधारशिल्प

गंधार देशात सम्राट अशोकाच्या नंतरच्या ५–६ शतकांत जी बौद्ध शिल्पकला विकास पावली, ती गंधारशिल्प या नावाने प्रसिद्ध आहे. या शिल्पकलेचे तंत्र व तिच्यातील आशय यांवर ग्रीक संस्कृतीची छाप स्पष्ट दिसते. अशोकानंतर काही काळ गंधारवर ग्रीक व इंडो–पार्थियन यांची सत्ता प्रस्थापित झाली होती.


वीणावादक – गंधारशिल्प

त्या काळी ग्रीक कला व भारतीय विषय यांचे मिश्रण होऊन ही शैली निर्माण झाली. या शिल्पशैलीतूनच बुद्धाची प्रतिमा उगम पावली, अशी कल्पना आहे. या प्रतिमेत भारतीय मूर्तिकलेतील अभय व ध्यान या मुद्रा विशेषेकरून आढळतात. गंधारशिल्पातील बुद्धमूर्ती कलेच्या दृष्टीने उच्च प्रतीची असली, तरी तिच्या मुखावर आध्यात्मिक भाव दिसत नाही. ग्रीक शिल्पकार वीर पुरुषाच्या शरीरसौष्ठवाकडेच विशेष लक्ष देत होते आणि त्याच पद्धतीने त्यांनी बुद्धमूर्ती बनवली आहे.

पेशावर, स्वात, बुन्नेर, अटक व त्याच्या आसपासचा प्रदेश यांत गंधारशिल्पाचे अनेक प्राचीन नमुने सापडले आहेत. त्यात बुद्धाच्या जीवनातील प्रसंगांची शिल्पे आणि बुद्धाच्या व बोधिसत्त्वांच्या उभ्या किंवा बसलेल्या मूर्ती आहेत. स्वात, बुन्नेर व पेशावरचा उत्तरेकडील प्रदेश यांत सापडणारा मऊ व निळसर पाषाण या शिल्पकामासाठी वापरलेला आहे. यातील पोषाख व प्रभावलये ही ग्रीक वळणाची आहेत. ब्रह्मा, शक्र, वज्रपाणी, मार, सरस्वती, नाग इत्यादींच्या ज्या मूर्ती गंधार देशात सापडल्या आहेत, त्या सर्वांत पाश्चात्य वळण स्पष्ट दिसून येते. त्यातल्या राजे, स्त्री–पुरुष, सैनिक यांच्या पेहरावात हिंदू व ग्रीक पद्धतीचे मिश्रण झालेले आढळते. बुद्धनिर्वाणाची बरीच शिल्पे गमतीदार वाटतात.

चेहऱ्याची ठेवण – गंधारशिल्प

गंधारशिल्पाचा विकास इ. स. च्या ४ थ्या शतकापर्यंत चालू होता. ५ व्या शतकात त्याचा लोप झाला. [ सु. वि. को.; रजपूत – इलस. वीकली, ३ जुलै, १९६० ]

**गंधाष्टक** आठ सुगंधी द्रव्यांचे मिश्रण. हे गंधाष्टक देवतांना उपचार म्हणून समर्पितात. यांतले आठ गंध असे— चंदन, अगुरू, देवदार, कोष्ठकोळिंजन, कुंमुम, शैलज (शिलाजित), जटामासी व सुरगोरोचन. देवताभेदाने गंधही थोड्याफार फरकाने बदलतात.

**गंधेरिया** एक जात. यांची वस्ती मुख्यत्वे गुजरातमध्ये आहे. यांचे पाच पोटभेद आहेत. हे लोक स्वामी-

नारायण, कबीर किंवा रामानंद या पंथांचे अनुयायी असतात. हे मच्छीमारी, नौकानयन, इ. व्यवसाय करतात.

यांच्यात आते–मामे बहिणीशी लग्न करीत नाहीत. कित्येक ठिकाणी मूल जन्मण्यापूर्वी त्याचा वाङ्निश्चय करतात. लग्न खबायत या गावीच करायचे, असा याच्यांत नियम आहे. हे शिवोपासक आहेत. हे मृतांना जाळतात. [ मुं. इ. जा. ]

**गंध्रप** एक जात. याना गंधर्व असेही म्हणतात. हे लोक गुजरातमध्ये आढळतात. आपण पूर्वी चितोडचे नागर ब्राह्मण असल्याचे हे सांगतात. हे कलावंतिणीच्या नाचाला वाद्यांची साथ करतात. औदीच्य ब्राह्मण यांचे पौरोहित्य करतात. हे मुलाच्या मुंजी करतात. यांच्यात विधवाविवाहाला बंदी आहे. हे मद्य-मांस निषिद्ध मानतात.

याच नावाची बाटलेल्या मुसलमानांची एक स्वतंत्र जात आहे. त्यांनी सुन्नी पंथाचा स्वीकार केला आहे. [ रज.कण ]

**गंभीरनाथ** (१९ वे शतक) एक नाथपंथी योगी. याचा जन्म काश्मीरातील एका सधन कुळात झाला. लहानपणापासूनच हा वीतराग होता. पुढे गोरखपूर येथील गोपालनाथ या गुरूकडून याने नाथपंथाची दीक्षा घेतली.

गंभीरनाथाने आपल्या आयुष्यात चारी धामांची यात्रा पायी केली. त्याची प्रगाढ बुद्धिमत्ता व आध्यात्मिक क्षेत्रातील अधिकार पाहता तो सर्वश्रेष्ठ योगी वाटतो. गंभीरनाथाने हठ, राज व लय या तीन्ही योगांत सिद्धी मिळवली होती. [ भा. सं. म.]

**गंभीरा** (१) लोकनाटयाचा एक प्रकार. हा बंगालमध्ये प्रचलित आहे. शैवपंथी लोक याचे प्रयोग करतात.



गंभीरा – मुखवटे

या प्रयोगाला रंगमंचाची आवश्यकता नसते. जमिनीवरच एखादी सतरंजी वगैरे घालतात व मागे एक साधा पडदा लावतात. या खेळात भक्तगण वेगवेगळे मुखवटे घालून शिवाच्या विविध लीला प्रेक्षकांना दाखवितात. यातील नटांना आपल्या सोयीनुसार पडद्याच्या मागेपुढे जाण्याची व प्रेक्षकापैकी कोणाशीही बोलण्याची मुभा असते. यात नृत्यही करतात. सगळे मिळून उच्च आवाजात गातात. या प्रयोगाचे नाव गंभीरा असले, तरी त्यात गांभीर्य मात्र मुळीच नसते. [ भा. लो. सा ; लो. ना प. ]

(२) एक नदी. ही वितस्ता नदीला मिळते. [ हि. ध. ]

**ग** मराठी वर्णमालेतील तिसरे व्यंजन. कंठ हे याचे उच्चारणस्थान आहे. सस्कृत भाषेत ग शब्दाचे गाय, गौरी, गणेश, गोकुळेश्वर, गधर्व, इ. अनेक अर्थ आहेत.

या वर्णाची पहिली अवस्था अशोकाच्या गिरनार येथील शिलालेखात दिसते. मोडी लिपीतही ही अवस्था आढळते. वर्तुळांशासारखी दिसणारी ग ची दुसरी अवस्था व बाराखडीतील दीर्घ ईकाराच्या चिन्हासारखी दिसणारी तिसरी

ग = ∧ ∩ ⩙ ग ग

ग – अक्षरविकास

अवस्था इ. स. च्या पहिल्या व दुसऱ्या शतकातील मथुरा येथील लेखात पाहायला मिळतात. चौथी अवस्था जपानात होर्युजीच्या मठात सापडलेल्या उष्णीषविजयधारिणी ग्रंथाच्या ताडपत्री पुस्तकात आढळते. या पुस्तकाचा काळ इ. स. चे ६ वे शतक मानतात. यानंतर एक-दोन शतकांतच आजचा वळणदार ग तयार झाला. [ श. क.; म. ज्ञा. को. ]

**गक्खर** एक यवनदेश. झेलम व चिनाब या नद्यांच्या मधील प्रदेशाला मध्यकाळात गक्खर देश म्हणत. देशनामावरून इथल्या रहिवाशाना गक्खरी म्हणतात.

तबकात-इ-अकबरीमध्ये सिंधू नदीवरील नीलाब प्रांत हा गक्खरांचा प्रदेश असल्याचे सांगितले आहे. शिवालिक टेकड्यांपासून तो काश्मीरच्या सरहद्दीपर्यंतचा सर्व प्रदेश एका काळी गक्खरांच्या ताब्यात होता, असे कळते. बाबराने तूझक-इ-बाबरी मध्ये या लोकांचा उल्लेख केला आहे. बाबराच्या वेळी तिथे तातार व हाती हे त्याचे चुलत बंधू राज्य करीत होते. काश्मीरवर जैन उल् आबदीन याची सत्ता असताना गझनीचा एक सरदार मलिक कंद याने झेलम व सिंधू या नद्यांमधील प्रदेश

जिंकून घेतला. तातार व हाती हे याच मलिक कंदाचे वंशज होते.

तातार हा परहाला किल्ल्यावर व हाती जवळच्या डोंगराळ मुलखात राहत होता. पुढे हातीने तातारास ठार मारून त्याचे राज्य घेतले. यानंतर बाबराने परहाला किल्ला घेतल्यावर हाती त्याला शरण आला. त्यानंतर शेरशहाने गक्खरांचा राजा सारंग याचा पराभव करून त्याचा मुलगा कमालखान याला कैद केले.

इ. स. १५४८ मध्ये सुलतान इस्लाम ऊर्फ सलीम शाहसूर याने निआझी लोकांचा पराभव केल्यामुळे ते गक्खर प्रांतात सुलतान आदम याच्याकडे आश्रयासाठी गेले. मग सलीम शाहसूरने गक्खर प्रांतावर स्वारी केली. त्या वेळी सुलतान आदम त्याला शरण आला. सलीमने कमालखानाला कैदेतून मुक्त केले व पंजाबच्या सुभेदाराच्या मदतीने गक्खर प्रांत त्याला आपल्या ताब्यात ठेवण्यास सांगितले. पुढे हुमायूनने सुलतान आदमचे अर्धे राज्य कमालखानाला दिले व आदमखानाला कैद करून कमालाच्या स्वाधीन केले. अकबराच्या कारकीर्दीत सिंधसागर दुआबातील ४२ महालांपैकी ७ महाल गक्खर लोकांच्या ताब्यात होते.

फेरीस्ताने गक्खर लोकांना खकर असे नांव दिले आहे. श्री. कीर्तने याच्या मते वीरनारायण व वागभट चव्हाण यांच्या कारकीर्दीत खकर लोकांनी भारतावर स्वारी केली होती. हे लोक मोगल लोकांचीच एक शाखा असून न्यायचंद्रसूरीच्या हम्मीर काव्यात ज्या लोकाना खर्पूरास असे म्हटले आहे, ते हेच लोक असावे, असेही कीर्तने म्हणतात. [ओ. नि. सं; म. ज्ञा. को.]

**गगनगंज** एक बोधिसत्त्व. हा रत्नसंभव नामक ध्यानी बुद्धाचा पुत्र होय. याचा वर्ण सोनेरी आणि चिन्ह कल्पवृक्ष आहे. निष्पन्न योगावली या ग्रंथात याचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे–

**गगनगञ्जः पीतः सव्येन चिन्तामणिभृद् ।**


गगनगंज

**वामेन भद्रघटावलम्बितकल्पवृक्षं दधानः ।।**

अर्थ – हा पिवळा, उजव्या हाताने चिंतामणी व डाव्या हाताने भद्रघटेने अवलंबित असा कल्पवृक्ष धारण करणारा आहे.

साधनमालेत याचे वर्णन जरा निराळे आहे, ते असे–तो रक्तवर्णाचा असून त्याच्या हातात नीलोत्पल आहे आणि त्याने वरदमुद्रा धारण केलेली आहे. [इं. बु. इ.]

**गच्छ** समुदाय, एका जैन आचार्याचा परिवार व एकाच आचार्याकडून प्रणीत झालेला साधुसमुदाय, असे या शब्दाचे विविध अर्थ आहेत. गच्छात कमीतकमी तीन पुरुष असले पाहिजेत, असा नियम आहे. तिघांच्या गच्छाला जघन्य गच्छ समजतात. चार, पाच किंवा त्याहून अधिक साधुपुरुष असलेला गच्छ हा मध्यम व महस्रावधी साधुपुरुष असलेला तो उत्तम गच्छ समजावा. भगवान ऋषभसेनाच्या गच्छात बत्तीस हजार साधू होते, असे सांगितले आहे.

जैनातील निरनिराळ्या साधूंच्या किंवा आचार्यांच्या धार्मिक मतांत फरक होत गेले, तसतसे त्यांचे निरनिराळे संप्रदाय बनले. अशा संप्रदायांनाच पुढे गच्छ असे म्हणू लागले.

प्रत्येक गच्छाची गुरुपरंपरा असते. तिला गच्छावली किंवा पट्टावली असे म्हणतात. या गच्छावलीत भगवान महावीरापासून गच्छसंस्थापकापर्यंतची माहिती त्रोटक स्वरूपात व त्यापुढच्या सूरींची विस्तृत स्वरूपात दिलेली असते. ज्या गुरूकडून शिष्याला दीक्षा मिळते, त्या गुरूच्या गच्छात तो शिष्य सामील होतो. जैनांचे असे सुमारे चौऱ्यायंशी गच्छ अस्तित्वात होते, असे जैनधर्म या ग्रंथात श्री. कैलाशचंद्र शास्त्री यांनी सांगितले आहे. पण हिस्टरी ऑफ जैन मॉनकिझ्म या ग्रंथात गच्छांची एक फार मोठी नामावळी दिली आहे, तिची संख्या १७३ एवढी भरते.

या गच्छांपैकी काहींची नावे गावांच्या नावावरून व काहींची आचार्यांच्या नावावरून पडलेली आहेत.

गावावरून पडलेली नावे – भिन्नमाळ, चित्रकूट, घोषपुरीय, हर्षपुरीय, कूर्चपुर इत्यादी.

आचार्यांवरून पडलेली नावे – आनंदसूरी, चंद्रप्रभ, देवाचार्य, धर्मघोष, पार्श्वचंद्र इत्यादी.

इह-परलोकी कल्याण व्हावे, अशी इच्छा असणाऱ्याने सदाचारसंपन्न अशा गच्छात निदान पंधरा दिवस तरी अवश्य राहावे, असे जैन धर्मशास्त्रात सांगितले आहे.

गच्छामध्ये वास केल्याने श्रमणाला उत्तम ज्ञान प्राप्त होते व तिथे आचार्यसहवास लाभत असल्यामुळे त्याचे चारित्र्य

विशुद्ध राहते, त्याला सेवेची गोडी लागते, तो आपल्या विकारांचा उपशम करू शकतो, शिवाय त्याला धर्माचरणाचीही गोडी लागते, असे बृहत्प्रकल्पभाष्यात म्हटले आहे.

गच्छातील साधुपुरुष साध्वी स्त्रियांशीही संभाषण करीत नाहीत; मग इतर स्त्रियांची गोष्टच नको. गच्छातले साधू खजुरीच्या पानांच्या केरसुणीने आपली राहण्याची जागा झाडतात. ते क्रय-विक्रय करीत नाहीत.

श्वेतांबर पंथात उपकेश, खरतर, तपा, पार्श्वचंद्र, सार्धपौर्णमीयक, अंचल व आगमिक असे सहा गच्छ असल्याचे सांगितले आहे. पण आजमितीस त्यांतले खरतर, तपा व अंचल एवढेच गच्छ विद्यमान आहेत. मात्र त्यांच्यामधला भेद हा वरवरचा आहे. कोणी कल्याणकदिन सहा मानतात; तर कोणी पाच मानतात. कोणी पर्युषणाचा अंतिम दिवस भाद्र० शु. चतुर्थी धरतात; तर कोणी तो पंचमी मानतात.

उपाध्याय विजयसिंह हा अंचलगच्छाचा संस्थापक होय. यालाच पुढे आर्यरक्षितसूरी असे नाव मिळाले. या गच्छातील साधू मुखपट्टीऐवजी अंचलाचा म्हणजे वस्त्राच्या पदराचा उपयोग करतात. [अभि. रा.; जै. ध.; म. ज्ञा. को.; हि. जै. मॉ.]

## गजगौरी व्रत

गजपर्व पाहा.

## गजच्छाया पर्व

भाद्रपद महिन्याच्या अमावास्येला हस्त नक्षत्र असता सूर्य व चंद्र यांचा योग होणे, याला गजच्छाया पर्व म्हणतात. या दिवशी दान, श्राद्धादी कर्मे केली असता अनंत फलाची प्राप्ती होते.

कृष्णपक्षातील १३ शीस चंद्र मघा नक्षत्रात आणि सूर्य हस्त नक्षत्रात असेल, तर त्या योगालाही गजच्छाया म्हणतात. सूर्यग्रहणाच्या वेळीही गजच्छाया योग असतो. [व्रतराज; पु. चिं.; हि. ध.; श. क.]

## गजदान

हत्तीचे दान. या दानामुळे स्वर्गलोकात प्रतिष्ठा प्राप्त होते, असे कूर्मपुराणात सांगितले आहे. कक्षा, रज्जू, स्थिरासन (अंबारी किंवा हौदा) वगैरे रुप्याचे साहित्य आणि गंडस्थळावर मोत्याची जाळी, अशाप्रकारे हत्तीला शृंगारून त्याचे दान करणे उत्तम होय. प्रत्यक्ष हत्तीचे दान करणे शक्य नसेल, तर पाचशे सुवर्णमाषाचे दान करावे, असा पर्याय सांगितला आहे. या गजदानाचा विधी असा—

प्रथम हत्तीची, शिवाची व ब्राह्मणाची पूजा करून गजदानाचा संकल्प करतात. नंतर दान ग्रहण करणाऱ्या ब्राह्मणाच्या गोत्राचा व नामाचा उच्चार करून, हत्तीची सोंड व सुवर्ण दक्षिणा समंत्रक त्याच्या हातात देतात. मग ब्राह्मण हत्तीवर बसून दानाचा प्रतिग्रह केल्याचे सांगतो व यजमानाचे कल्याण चिंतितो. त्यानंतर पुढील मंत्र म्हणून हत्तीची प्रार्थना करतात—

**ऐरावतश्चतुर्दन्तो गजानां जायकस्तु यः ।**
**दिग्दन्तिनां पूज्यतमः पापं क्षयतु नः प्रभुः ।।**
**गजेन्द्र मत्त मातङ्ग दैत्यसैन्यविनाशक ।**
**तव दानेन मे शान्तिः सर्वदास्तु महत्सुखम् ।।**

अर्थ — चार दाताचा, गजजातीचा जनक, दिग्गजांना पूज्य असा ऐरावत माझे पाप नष्ट करो. हे गजेंद्रा, मस्त गजा, दैत्य सैन्याच्या संहारका, तुझ्या दानाने मला सदैव सुख व शांती लाभू दे.

मग ब्राह्मणांना दक्षिणा देऊन दानसमाप्ती करतात.

## गजन

बंगालमधील एक लोकोत्सव. या प्रांतात सुमारे सत्तर प्रकारचे उत्सव प्रचलित असून तंत्र आणि मंत्र या बाबतीत प्रत्येकाचे वैशिष्टय भिन्न आहे. या सर्व लोकोत्सवात गजन हा फार प्राचीन आहे.

गजनचे दोन प्रकार आहेत—(१) धर्मगजन व (२) शिवगजन. धर्मगजन मूळ बौद्ध लोकांचा होता. या प्रसंगी काही लोक धर्मराजाची, तर काही कूर्ममूर्तीची पूजा करतात. धर्मराजाचे प्रतीक म्हणून एक साधा दगड ठेवलेला असतो. काहीजण बाणेश्वरी या नावाने एका लाकडी फळीची पूजा करतात. धर्मगजन वैशाख, ज्येष्ठ किंवा आषाढ या मासांच्या पौर्णिमेला करतात.

शिवगजन चैत्र महिन्यात होतो. हा उत्सव शिवभक्तांचा असून वनराजाने तो सुरू केला, असे पुराणांत सांगितले आहे. एकदा अवर्षण पडले असता शिवाला प्रसन्न करण्यासाठी त्याने बाणरूपी शिवाची पूजा सुरू केली. ती प्रथा अजूनही चालू आहे. ही पूजाप्रथा विक्रमादित्याच्या वेळी सुरू झाली, असेही म्हणतात.

गजनउत्सव पाल राजांनी सुरू केला, असे काही विद्वानांचे मत आहे. काहीच्या मते हा एक सूर्योत्सव आहे. चैत्र अमावास्येच्या दिवशी सूर्य जेव्हा आकाशात मध्यान्ही येतो, तेव्हा सूर्याचे उपासक स्वतःला चरक वृक्षास बांधून घेऊन हवेत गिरक्या घेतात. या गिरक्या सूर्याच्या भ्रमणाचे प्रतीक होत.

हा उत्सव सामान्यत. कनिष्ठ वर्गातील हिंदू करतात. या उत्सवातला पुरोहित ब्राह्मण नसतो; तर हाडी, बागडी, डोम, धीवर, इ. जातीतला असतो. हे पुजारी फक्त चैत्र महिन्यात यज्ञोपवीत धारण करतात व नेमधर्माने वागतात. त्या

काळात ते ब्रह्मचर्य पाळून भिक्षान्नावर एकभुक्त राहतात. या काळात ते केस कापून घेत नाहीत वा केसाना तेलही लावीत नाहीत.

गजनपूजेच्या मंत्रांना साबरी मंत्र म्हणतात. ते संस्कृत भाषेत नसून, प्रादेशिक बोलीत असतात. हे मंत्र शबरनामक प्राचीन जमातीचे असून ते सर्पविष किंवा भूतबाधा दूर करणाऱ्या मंत्रांसारखे असतात.

गजनपूजा करणारा पुजारी नदीवर स्नानाला जाताना व परत येताना दुसऱ्या माणसाच्या खांद्यावर बसतो. त्याचे पाय जमिनीला लागू नयेत, असा संकेत आहे.

या उत्सवात 'श्मशान खेले' नामक एक विधी असतो. त्यात काही भक्त माणसांच्या कवटचा हाती घेऊन नाचतात. या उत्सवात मध्यरात्री हर-गौरीची पूजा करतात. ही एक प्रकारे भूतपूजाच असते. श्मशानभोग, निषाद-आचार, बध-तंत्र इ. तांत्रिक व आत्मक्लेशाचे विधीही या उत्सवात केले जातात. अंगात भाला खुपसून घेणे, पाठीत गळ अडकवून झोके घेणे, काटचांवरून किंवा आगीतून चालणे, असे त्याचे प्रकार आहेत. शिवाला प्रसन्न करणे वा नवस फेडणे, हा त्यातला हेतू असतो.

या उत्सवात अनेक प्रकारची लोकगीते गायिली जातात. निलगान, अष्टकगान, बोलनगान अशी त्यांची नावे आहेत. निलगान हे शिवपार्वतीच्या विवाहप्रसंगावर रचलेले असते. मात्र हा शिव पौराणिक शिव नसून लोकशिव होय त्याचे व पार्वतीचे भाडण होते आणि तो तिला खूप करण्यासाठी जत्रेला घेऊन जाऊन साडी व बांगडचा विकत घेऊन देतो. या गाण्यात बंगालमधील बहुसंख्य लोकांच्या सुखदुःखांचे प्रतिबिंब उमटलेले दिसते. अष्टकगानात राधा-कृष्ण, अभिमन्यूचा वध, गौरांग प्रभू, इ. विषय असतात. बोलनगाणी ही राधा-कृष्णांच्या लीलांवर रचलेली असून, त्यात सामाजिक दोषांचा उपहास केलेला असतो. या उत्सवात ग्रामीण विषयावर आधारलेली लहान लहान नाटकेही करतात.

या उत्सवात नृत्याला महत्त्वाचे स्थान असते. कालिकनच या नृत्यात नर्तक कालीचा मुखवटा घालतो. तो मुखवटा मंत्र म्हणून शुद्ध केलेला असतो तो धारण करणारा मनुष्य अंगात संचारल्यागत धुंद होतो. हे नृत्य फक्त रात्री करतात. शिव, पार्वती, महिषासुर वगैरे नृत्ये मुखवटचाशिवाय करतात. दशावतारनृत्ये मुद्राभिनयांसह करतात. त्यातले पदन्यास वेगवेगळचा प्रकारचे असतात.

गजननृत्याच्या तंत्राला खोल अर्थ असतो. एका प्रकारात कालीमातेच्या विधायक शक्तीचा आविष्कार होतो; तर दुसऱ्या प्रकारात शिवाची संहारक शक्ती व्यक्त होते.

गजनउत्सवात अनेक वंशाच्या लोकांच्या संस्कृती, श्रद्धा, धर्म, विधी, उपचार, इत्यादींचे मिश्रण झालेले आढळते, कारण तो खास बहुजनसमाजाचाच उत्सव आहे. [वर्धन- अमृत बझार पत्रिका, ३० सप्टेंबर, १९५८]

**गज़नीचा महमूद** इ. स. च्या १० व्या शतकाच्या उत्तरार्धात कनोजच्या प्रतिहारांची सत्ता केवळ कनोज व त्याच्या भोवतालचा काही प्रदेश एवढचावरच उरली होती आणि त्यांच्या साम्राज्याची अनेक राज्ये होऊन, ती राज्ये आपसात झगडत होती. शाही वंशातील राजा जयपाळ याचे राज्य मात्र प. पंजाब, वायव्य सरहद्द प्रांत आणि पूर्व अफगाणिस्तान एवढचा विस्तृत प्रदेशावर चालू होते. त्याच सुमारास अफगाणिस्तानातील गजनी येथे सबुक्तगीन नावाचा एक तुर्क गुलाम राज्य करीत होता. इराणातील सामानी वंशातला राजा अबदुल मलीक याच्या पदरी अल्पतिगीन नावाचा एक गुलाम होता, त्याने या राज्याची स्थापना केली होती. सबुक्तगीन हा अल्पतिगीनचा आवडता गुलाम होता. त्याने पुढे अल्पतिगीनच्या मुलीशी लग्न केले व गजनीचे राज्यही बळकावले (इ. स. ९७७). नंतर तो जयपाळाच्या राज्यावर आक्रमण करू लागला. तेव्हा जयपाळाने उलटून त्याच्या राज्यावर स्वारी केली. पण त्याला सबुक्तगीनशी तह करून परत यावे लागले. पुढे इ. स. ९९१ साली सबुक्तगीन याने भारतावर फार मोठी चढाई केली. जयपाळाने प्रतिहार, चाहमान, चंदेल वगैरे राजाना आपल्या मदतीस बोलावले होते. पण सबुक्तगीनने त्या सर्वांचा पराभव करून सिंधू नदीपर्यंत आपली सत्ता प्रस्थापित केली.

इ. स. ९९७ मध्ये सबुक्तगीन मरण पावला आणि त्याचा दासीपुत्र महमूद याने गज़नीचे राज्य बळकावले. त्या वेळचा सामानी राजा दुर्बल होता. महमूद याने त्याचे अनेक प्रांत जिंकून घेतले आणि स्वतःला सुलतान ही पदवी घेतली. खलिफाने त्याच्या सत्तेला मान्यता देऊन त्याला यमीन उद्दौला ही पदवी दिली. बल्ख ही त्याने आपली राजधानी केली.

गज़नीचा सुलतान महमूद याने इ. स. १००१ मध्ये भारतावर पहिली स्वारी केली. जयपाळाने त्याचा प्रतिकार केला खरा; पण अखेरीस त्याचा पराभव होऊन तो शत्रूच्या हाती सापडला. तेव्हापासून इ. स. १०३० पर्यंतच्या काळात महमूद याने भारतावर एकूण १७ स्वाऱ्या केल्या. भारतीय प्रदेश जिंकून आपले साम्राज्य वाढवावे, हा त्याचा हेतू नव्हता; तर इस्लामचा प्रसार करावा, हिंदूंची मंदिरे, मूर्ती यांचा विध्वंस करावा आणि अपार संपत्ती लुटून स्वदेशी आणावी, अशी त्याची

इच्छा होती. इ. स. १००९ साली त्याने भारतावर स्वारी केली, ती पाचवी होती. त्या वेळी जयपाळाचा पुत्र आनंदपाळ याने उ. भारतातील अनेक राजांना मदतीला बोलावून प्रचंड सेना उभी केली आणि पेशावरजवळ भटिंडा येथे महमुदाच्या तळावर निकराचा हल्ला केला. प्रारंभी हिंदूचा जय झाला आणि महमुदाचे हजारो घोडेस्वार मारले गेले; पण या यशाने हिंदुसेना बेसावध झाली. पुढे आनंदपाळाच्या हत्तीला तीर लागून तो पळू लागल्याबरोबर सर्व सेनेचा धीर खचला आणि महमुदाने त्या परिस्थितीचा फायदा घेऊन हिंदुसेनेवर प्रखर प्रतिहल्ला चढवला. वीस हजार हिंदू सैनिक त्याने त्या हल्ल्यात कापून काढले व ती लढाई जिंकली. नतर त्याने नगरकोटवर हल्ला करून तिथले मंदिर लुटले. तिथे त्याला अपार संपत्ती मिळाली.

त्यानंतर महमुदाने ज्या स्वाऱ्या केल्या, त्यात त्याला कोणीही फारसा प्रतिकार केला नाही. इ. स. १०१८ पर्यंत तो पजाबच्या अलिकडे आला नव्हता. १०१९ मध्ये मात्र त्याने कनोजवर स्वारी करून ते नगर जिंकले आणि तिथे भयकर लुटालूट केली. पुढील वर्षी त्याने सबध पंजाब आपल्या राज्यास जोडून टाकला. १०२५ साली महमुदाने सोमनाथावर स्वारी केली. त्या वेळचा तिथला चालुक्यवंशी राजा भीमदेव (१ ला) महमुदाच्या भयाने पळून गेला. सोमनाथाच्या मंदिरात महमुदाला अपरंपार द्रव्य मिळाले. इतकी लूट त्याला पूर्वी कधीच मिळाली नव्हती.

इ. स. १०३० साली महमूद गजनी येथे मरण पावला. तो शूर, साहसी व कुशल सेनानी होता. भारताच्या दृष्टीने तो क्रूर व लुटारू असला, तरी त्याच्या अंगी काही गुण होते, असे सागतात. त्याला विद्येची व काव्याची आवड होती त्याने गज़नी येथे एक पाठशाळा व पदार्थसग्रहालय याची स्थापना केली होती. अल् बिरूनी हा प्रख्यात पंडित व इतिहासकार त्याच्याच दरबारी होता. विद्येच्या प्रसारासाठी तो दरवर्षी पुष्कळ द्रव्य खर्च करीत असे. भारतातील कारागीर नेऊन त्याने गजनी येथे सुदर इमारती बांधल्या.

या सुलतानाने भारतात वास्तव्य केले नसले, तरी त्याच्या स्वाऱ्यांमुळे भारताचे भवितव्य मात्र निश्चितपणे काळवंडले. त्याने इथल्या अनेक नगराचा नाश केला, भयंकर मनुष्यसंहार केला आणि इथली अगणित संपत्ती लुटून नेली. त्यामुळे भारताचे सामर्थ्य खच्ची झाले आणि त्याच्या नंतर येणाऱ्या आक्रमकांचा मार्ग सोपा झाला. पंजाब हे तर त्यांचे प्रवेशद्वारच ठरले [ म. ज्ञा. को.; ए. इं.– मजुम. ]

**गजपंथगिरी** नाशिक शहरापासून ४ मैलांवर मसरूळ गावाजवळ जो एक लहानसा डोंगर आहे, त्याला जैन वाङमयात गजपंथगिरी असे म्हटले आहे.

कवी असग याने आपल्या शांतिनाथचरितात गजध्वज पर्वताचा उल्लेख केला आहे. हा गजध्वज पर्वतही नाशिकजवळ असल्याचे त्याने सांगितले आहे (७ वा सर्ग). यावरून गजपंथगिरीलाच गजध्वज म्हणत असावे, असे वाटते. आचार्य श्रुतसागर याने आपल्या पल्यविधानव्रतकथेत स्वतः गजपंथगिरीची यात्रा केल्याचे लिहिले आहे.

गजपंथगिरीवर ज्या गुहा व मूर्ती आहेत, त्यांचे इतके रूपांतर झाले आहे, की त्यावरून प्रस्तुत स्थानाच्या प्राचीनत्वाविषयी काहीही अनुमान करता येत नाही. बलभद्र, यदुवंशी राजे व आठ करोड मुनी या पर्वतावरून मोक्षाला गेले, असे क्रियाकलाप ग्रंथातील दुसऱ्या गाथेवरून कळते.

प्रस्तुत क्षेत्राचा पुनरुद्धार नागौर येतील भट्टारक क्षेमेंद्रकीर्तीने गेल्या शतकाच्या अखेरीस केला. साप्रत त्या ठिकाणी जैन मंदिरे व धर्मशाळा आहेत. [ जै. सा. इ. ].

**गजपर्व** द. भारतातील एक उत्सव. अय्यंगार ब्राह्मणांच्या स्त्रिया कार्तिक पौर्णिमेपासून तीन दिवस हा उत्सव करतात. पौर्णिमेस सकाळी मातीचा हत्ती बनवून व त्याला फुलानी सजवून, त्याची पूजा करतात. त्या हत्तीला गजलक्ष्मी म्हणतात. पूजेनतर दानधर्म करून ब्राह्मणभोजन घालतात व सायंकाळी हळदीकुकू करतात.

चौथ्या दिवशी सायंकाळी हत्तीच्या विसर्जनाचा समारभ होतो. सर्व स्त्रिया हत्तीची प्रतिमा चादीच्या तबकात ठेवून गाणी गात एका बागेत जातात. तिथे ती प्रतिमा एखाद्या वृक्षतळी ठेवून सर्व जणी फराळ व नृत्यगायन करतात. या उत्सवाची कथा अशी –

एकदा महर्षी व्यास हस्तिनापुरी येऊन गांधारीला भेटले. गांधारीने त्यांना इष्टसिद्धीसाठी व्रत विचारले. तेव्हा त्यांनी तिला इंद्राच्या ऐरावतासारख्या एखाद्या हत्तीची पूजा करण्यास सांगितले. मग तिने आपल्या मुलांना तसा हत्ती आणण्याची आज्ञा केली. पण कौरवांना तसा हत्ती कुठेही मिळाला नाही. म्हणून त्यानी मातीचाच एक प्रचंड हत्ती बनवून तो गांधारीपुढे उभा केला. मग गांधारीने नगरातील सर्व स्त्रियांना बोलावून त्या हत्तीची पूजा केली.

मात्र गांधारीने कुतीला त्या समारंभाचे निमंत्रण दिले नाही. त्यामुळे कुतीला वाईट वाटले. तिचे दु.ख जाणून अर्जुनाने इंद्राकडे साक्षात ऐरावताचीच मागणी केली. इंद्राने ती

मागणी मान्य केली. मग अर्जुनाने बाणांची शिडी उभारून ऐरावताला खाली आणले. कुंतीने गांधारीसह सर्व स्त्रियांना निमंत्रण देऊन त्यांच्या समक्ष ऐरावताची यथासांग पूजा केली. त्या समयी कृष्णाने कुंतीला सांगितले, की 'प्रतिवर्षी ज्या स्त्रिया गजपूजा करतील, त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतील.' [अजन्ता, डिसें. १९५४]

**गजपूजाविधी** एक व्रत. यात अश्विनी पौर्णिमेला सायंकाळी हत्तीला ओवाळतात. याला गजनीराजनविधी असेही म्हणतात. ऐश्वर्याची प्राप्तीं व्हावी, या हेतूने हे व्रत केले जाते. [हि. ध.]

**गज़ल** एक पद्यप्रकार. हा मूळचा अरबी आहे. अरबी भाषेतून तो फारसीत, तिथून उर्दूत आणि उर्दूमधून मराठीत आला आहे. छंद, जाती व अक्षरगणवृत्त याप्रमाणेच हा चौथा वृत्तप्रकार होय. अक्षरगणवृत्तांत तीन अक्षरांचा गण मानतात, तर गजलात चार अक्षरांचा गण असतो. संस्कृतातील भुजंगप्रयात, शार्दूलविक्रीडित, वसंततिलका, इ. वृत्ताप्रमाणेच गजलातही अनेक वृत्ते असून, अक्षरगणवृत्तांप्रमाणेच ही गज़लवृत्ते मात्रांच्या व लगक्रमाच्या नियमानी बद्ध असतात. ही वृत्ते अष्टमात्रिक, सप्तमात्रिक, षण्मात्रिक, पंचमात्रिक व चतुर्मात्रिक अशा आवर्तनाची असतात. म्हणून गज़ल हे त्या आवर्तनाच्या अनुरोधाने दीपचंदी, तेवरा, दादरा, झपताल व केरवा या तालात गाता येतात. पण गवई मात्र गजल गाताना मात्रा जुळवून घेऊन तो कवालीत गातात. कवाली म्हणजे केरवा तालाचाच एक विशिष्ट ढंग होय.

गज़लाचे सर्व चरण वृत्तदृष्टचा सारखे असतात आणि त्यांत प्रारंभापासून शेवटपर्यंत त्याच अक्षराचे यमक आले पाहिजे असा नियम असतो. गज़लातील द्विपद्यांना शेर म्हणतात. अशा पाच ते सतरा शेरांच्या समूहाला गज़ल म्हणतात.

गजल याचा अर्थ प्रेमालाप असा आहे. अर्थात शृंगार हाच गज़लाचा मुख्य रस होय. काही गज़ल सृष्टिवर्णनपर, काही बोधपर, तर काही ध्येयस्तुतिपरही असतात. सूफी कवींच्या गज़लांत वैराग्य आणि भक्तिरस यांचा आढळ होतो. याशिवाय देशभक्ती, कौटुंबिक प्रेम, यावरही अनेक कवींनी गज़ल रचले आहेत. मात्र गजलात या भावनांचे वर्णन प्रतीकांच्या रूपाने केलेले असते.

उ. भारतात ख्वाजा मुईनुद्दीन चिश्ती याने अगदी प्रथम फारसी व भारतीय भाषांमध्ये गज़ल रचले. दक्षिणेत प्रथम गज़ल रचणारा कवी विजापूरचा इब्राहीम आदिलशाह हा होय. पण त्याची रचना उपलब्ध नाही. त्याच्या नंतरच्या मुहंमद कुली कुतुबशाहपर्यंतच्या कवीचे फारसी गज़ल उपलब्ध आहेत. त्यात विषयवैचित्र्य आढळत नाही. तसेच एकयमकाच्या बंधनामुळे त्यातील शेरही विलग व असंबद्ध वाटतात.

सुप्रसिद्ध सूफी कवी अमीर खुस्रव याचा एक प्रसिद्ध फारसी गज़ल पुढीलप्रमाणे—

**काफ़िरे इश्क़म् मुसलमानी मरा दरकार नीस्त ।**
**हर रगे मन तार गश्तो हाजते जुन्नार नीस्त ।।**
**अज़ सरे बालीने मन बरख़ीज़ ऐ नादान तबीब ।**
**दर्दमंदे इश्क़रा दारू बजुज़ दीदार नीस्त ।।**
**नाखुदा दर किश्तिए गर मा न बाशद गू मबाश ।**
**माख़ुदा दारीम, मारा नाखुदा दरकार नीस्त ।।**
**ख़ल्क़ मी गूयद कि ख़ुसरौ बुतपरस्ती मी कुनद ।**
**आरे आरे मी कुनम बा ख़ल्के आलम कार नीस्त ।।**

अर्थ—मी प्रीतीचा काफिर आहे. मला इस्लामची मुळीच पर्वा नाही. माझ्या शरीराची प्रत्येक नस हा पवित्र धागा आहे. मला यज्ञोपवीताची गरज नाही. अरे वेड्या वैद्या, माझ्या उशापासून तू दूर हो पाहू. मला प्रीतीचे दुखणे झाले आहे व त्यावर (प्रियकराच्या) दर्शनाखेरीज दुसरे औषध नाही. माझ्या नौकेवर नावाडी नाही. नसेना का! परमेश्वर माझ्याबरोबर असताना मला नावाडी काय करायचा? जग म्हणते, की खुसरौ मूर्तिपूजा करतो. हो, हो, मी करतो. मला जगाशी काय करायचे आहे?

अरबी व फारसी भाषांपेक्षां ऊर्दू भाषेतच गज़लचा विकास अधिक झाला आहे. ऊर्दू भाषेत वली, मीर, ग़ालिब, ज़ौक यानी बरेच गज़ल रचले आहेत. मीर हा गज़लांचा सम्राट मानला जातो. हिंदी भाषेत भारतेंदू यांनी जे गज़ल रचले ते खडी बोलीत आहेत. त्यानंतर जयशंकरप्रसाद, निराला, दिनकर या कवींनीही हिंदीत गज़ल रचले आहेत. गज़लसम्राट मीर याचा पुढील गज़ल प्रख्यात आहे—

**जो इस शोरसे 'मीर' रोता रहेगा ।**
**तो हमसाया काहे को सोता रहेगा ?**
**मैं वह रोनेवाला जहाँसे चला हूँ ।**
**जिसे अब्र हरसाल रोता रहेगा ।।**
**मुझे काम रोनेसे अक्सर है नासिह ।**
**तु कबतक मेरे मुँह को धोता रहेगा ?**
**बस ऐ गिरया आँखें तेरी क्या नहीं है ?**
**जहाँको कहाँतक डुबोता रहेगा ?**
**बस ऐ 'मीर' मिज़गाँसे पूछ आँसुओंको ।**
**तु कबतक ये मोती पिरोता रहेगा ?**

अर्थ--हे मीर, तू इतक्या जोरजोराने रडत राहिलास तर तुझा शेजारी कशाला झोपून राहील ? मी असा रुदन करणारा या जगातून निघून चाललो आहे, की ज्याची आठवण काढून दरवर्षी मेघ रडत राहील. हे उपदेशका, मी असाच सतत रडत राहणार. तू माझे तोंड कुठवर धूत राहशील ? हे रुदना, तुला डोळे नाहीत काय ? तू जगाला कुठवर बुडवीत राहणार ? पुरे, पुरे ! 'मीर', तू आपले अश्रू पुसून टाक. तू हे मोती कुठवर ओवीत राहणार ?

मराठीत या काव्यरचनेला गज्जल म्हणतात. प्राचीन मराठी कवीत मोरोपंत आणि आधुनिक नाटककारांत किर्लोस्कर, डोंगरे, कोल्हटकर, खाडिलकर, इ. संगीत नाटककारांनी गज्जलाचा पुरस्कार केला आहे. पण त्याची रचना काहीशी शिथिल झाली आहे. कवी माधव ज्यूलियन यांनी मात्र फारसी भाषेचा व वृत्तांचा विशेष अभ्यास करून गज्जल रचले आहेत.

अरबी-फारसी वृत्ते शुद्ध स्वरूपात मराठीत आणावीत या हेतूनेच कवी माधव ज्यूलियन यानी ही भावगीते रचली. पण शास्त्रोक्त गज्जलास अवश्य असणारे एकयमकीपणाचे बंधन एखाद्या क्लिष्ट लगक्रमाप्रमाणेच भावगीताच्या रचनेस जाचक होते. म्हणून त्यानी सर्व भावगीतांत हे बधन पाळलेले नाही. [ हि. सा. को ; गज्जलाञ्जलि ]

**गजलक्ष्मी** लक्ष्मीचे एक रूप. ही कमळावर बसलेली किंवा उभी असते. तिच्या हातात एक कमळ व सभोवती अनेक प्रफुल्ल कमळे व दोन्ही बाजूंना आपल्या सोंडेने तिच्यावर जलवृष्टी करणारे दोन हत्ती असतात. अशा प्रकारच्या मूर्ती भरहूत, सांची, बोधगया, अमरावती, इ. ठिकाणच्या बौद्ध शिल्पांत व मध्ययुगीन शिल्पांत पुष्कळ आढळतात. इतर देवतांच्या मंदिरांच्या द्वारावरील शिल्पकामात किंवा भितींवरील कोनाड्यांतही गजलक्ष्मीच्या आकृती कोरलेल्या आढळतात. वेरूळ येथील कैलासलेण्यात प्रवेश करताच गजलक्ष्मीची एक भव्य आणि मनोहर शिल्पाकृती दृष्टीस पडते. त्या शिल्पात लक्ष्मीच्या कमलासनाखाली आधारभूत असे दोन नाग आहेत. खिचिंग (मयूरभंज) येथील विश्वपद्मावर बसलेली गजलक्ष्मी आणि मद्रासच्या वस्तुसंग्रहालयात ठेवलेली कावेरीपक्कम् येथील लक्ष्मीची मूर्ती या फार सुरेख आहेत. मथुरा वगैरे ठिकाणच्या शिल्पांतही गजलक्ष्मीच्या सुदर मूर्ती आढळतात.



गजलक्ष्मी — वेरूळ

शुंग व कुशाण कालातील काही मृण्मय मूर्ती सापडल्या आहेत, त्यांतील गजलक्ष्मीच्या आकृती अत्यंत कलात्मक आहेत. अशीच एक गजलक्ष्मीची मृण्मय मूर्ती कौशांबी येथेही सापडली आहे.



गजलक्ष्मी — सांची

प्राचीन नाणी व मुद्रा यांवरही गजलक्ष्मीच्या आकृती आढळतात. इ. स. च्या ६ व्या, ७ व्या शतकांतील ताम्रपटांवर गजलक्ष्मीयुक्त राजमुद्रा दिसून येतात. कलचुरी राजांपर्यंत अशा मुद्रा प्रचलित होत्या.

लक्ष्मीबरोबर गजयुग्म कोरण्याची कल्पना केव्हा उगम पावली, ते निश्चित सांगता येत नाही. श्रीसूक्तात 'हस्तिनादप्रबोधिनीम्'=हत्तीच्या आवाजाने जागी होणारी, असा तिचा व हत्तीचा संबंध सांगितला आहे. हत्ती हा वैभवाचे प्रतीक व

लक्ष्मी ही समृद्धीची देवता होय. म्हणून त्या दोघांचा शिल्पकलेत संयोग दाखविला असावा समुद्रमंथनातून लक्ष्मी वर आली तेव्हा तिच्यावर दिग्गजांनी सुवर्णकलशातून जलाभिषेक केला, असे वर्णन विष्णुपुराणात आले आहे (९.१०२). [ खं. वै.; डे. हिं. इ.; भा. क. प. ]

**गजशैल** मानस सरोवराच्या दक्षिणेला असलेला एक पर्वत (वायू पु. ३६.२४). इथे रुद्रांचे निवासस्थान होते, असे म्हणतात (वायू पु. ३९.४७). [ पु. इं. ]

**गजहामूर्ती** शिवमूर्तीचा एक प्रकार. शिव गजासुराला मारीत आहे असे दृश्य यात दिसते. दक्षिणेत अशा प्रकारच्या मूर्ती अनेक ठिकाणी आढळतात. **पाहा—** गजासुरमर्दनमूर्ती. [ सा. इं. इ. गॉ. गॉ. ]

**गजानन महाराज** ( समाधिकाल इ स. १९१० ) एक सत्पुरुष. विदर्भातील खामगाव तालुक्यातील शेगाव या ठिकाणी २३ फेब्रुवारी १८७८ रोजी हे अकस्मात प्रगट झाले. दिगंबर अवस्थेत, एका मठाच्या बाहेर पडलेल्या उष्ट्या पत्रावळीतील अन्न खाताना लोकानी त्याना प्रथम पाहिले. सिद्ध पुरुषाची सर्व लक्षणे त्या वेळी त्याच्या ठिकाणी दिसत होती. हे कोण, कुठले, कुठून आले, कसे आले व त्याचा जन्म कोणत्या कुलात झाला, याबद्दल काहीही



गजानन महाराज

माहिती मिळत नाही. ते वेदातील मंत्र शुद्ध म्हणत व तेलुगू बोलत. त्यावरून ते तेलंगी ब्राह्मण असावे, असे वाटते.

ते उंच होते. त्यांचे शरीर पिळदार व तेजस्वी होते. ते आजानुबाहू होते. ते नेहमी दिगंबर अवस्थेत व आत्मानंदात निमग्न असत आणि 'गण गण गणात बोते' हे भजन म्हणत. त्यांना चिलीम मात्र नेहमी लागे. नसेल तिथे पाणी उत्पन्न करणे, नुसत्या तीर्थोदकाने मरणोन्मुख रुग्णाला बरे करणे, पेटलेल्या पलंगावर बसूनही अक्षत राहणे, यांत्रिक वस्तूवर सत्ता चालविणे, इ. अनेक चमत्कार त्यानी करून दाखविले, असे त्यांच्या चरित्रात म्हटले आहे. आपला समाधी घेण्याचा दिवसही त्यानी आधी मागितला होता. त्याप्रमाणे भाद्रपद शु ५ मी शके १८३२ ( ८ सप्टेंबर १९१० ) रोजी ते समाधिस्थ झाले.

शेगाव येथे त्यांच्या आज्ञेवरून एक भव्य राममंदिर बांधण्यात आले आहे. या मंदिराचे बांधकाम सात वर्षे (१९०७ ते १९१४) चालू होते. महाराजांनी दर्शविलेल्या स्थानी उत्खनन केले असता राम, सीता व लक्ष्मण यांच्या ज्या मूर्ती मिळाल्या, त्यांची स्थापना प्रस्तुत मंदिरात केली आहे. मंदिराच्या पूर्वभागी महाराजांची समाधी आहे. इथे रामनवमीला आणि महाराजांच्या पुण्यतिथीला मोठा उत्सव होतो. [ शेगाव—संस्थान; श्री गजानन महाराज यांचे चरित्र. ]

**गजासुरमर्दनमूर्ती** शिवमूर्तीचा एक प्रकार. काशीतल्या ब्राह्मणांना त्रास देणाऱ्या गजासुराचा शंकराने वध केला व त्याचे कातडे उत्तरीय म्हणून पांघरले, अशी कथा कूर्मपुराणात आली आहे. या प्रसंगाची मूर्ती कशी असावी, ते अंशुमद्‌भेदागमात पुढीलप्रमाणे सांगितले आहे—



गजासुरमर्दनमूर्ती

शिवाच्या डाव्या पायाखाली गजाचे मस्तक, मुकुटावर गजाचे पुच्छ, उजवा पाय वर उचललेला, डाव्या बाजूस स्कंद व पार्वती व आठ हात. सामान्यतः या शिल्पात मृत हत्तीच्या डोक्यावर

शिव नृत्य करीत असतो व दोन हातानी त्याचे कातडे पृष्ठभागी ओढून घेत असतो. त्याच्याभोवती ब्रह्मा, विष्णू व महेश असतात. या लक्षणाबरहुकूम नव्हे; पण तशा प्रकारच्या एका मूर्तीचे चित्र येथे दिले आहे. [ मू. वि. ]

**गजेंद्र** सहजिया सिद्धाचे गजेंद्र हे प्रिय प्रतीक आहे. कान्हपाद किवा कृष्णपाद या सिद्धाने गजेंद्राला अविद्येचे प्रतीक मानले आहे. दुसऱ्या एका चर्यापदात त्याला साधकांच्या चित्ताचे प्रतीक मानलेले आहे. गजेंद्राचा घन घन असा आवाज म्हणजे अनाहत ध्वनी किवा शून्यता शब्द आहे. गजेंद्राला प्रमत्त बनविणारे आसव म्हणजे ज्ञानासव होय. त्याचे सरोवर म्हणजे महासुख सरोवर किवा गगन आहे. ज्या दोन खांबांना हा बांधलेला असतो, ते संसारपाश होत आणि त्याची शृंखला ही अविद्या होय. [ तां. बौ. सा. सा. ]

**गजेंद्रमोक्ष** चित्रकूट पर्वतावर एक गज राहत होता. पूर्वजन्मी तो इंद्रद्युम्न नामक राजा होता. अगस्त्य ऋषीचा योग्य प्रकारे मान ठेवला नाही, म्हणून अगस्त्याने



गजेंद्रमोक्ष – देवगढ

त्याला शाप दिला, की ' तुला गजयोनीत जन्म घ्यावा लागेल. ' तो हत्तीच्या रूपात जन्मल्यावर एका तलावात जलक्रीडा करीत असताना एका मगरीने त्याचा पाय धरला. हत्तीने खूप धडपड केली; पण त्याचा पाय काही केल्या सुटेना. मग त्याने विष्णूचा धावा केला व विष्णूने प्रकट होऊन त्याला सोडवले. त्याचवेळी तो पशुयोनीतूनही मुक्त झाला. अशी कथा भागवतात आहे ( ८. २-४ ) या प्रसंगाला गजेंद्रमोक्ष म्हणतात. गजेंद्रमोक्षाची शिल्पे अनेक ठिकाणी आढळतात. भक्तिमार्गात हे गजेंद्रमोक्षाचे आख्यान आदरणीय ठरले आहे.

**गडगनेर** केळवण पाहा.

**गडमुक्तेश्वर** ( गर्हमुक्तेश्वर ) उत्तर प्रदेशात गंगेच्या काठावर मीरतपासून २६ मैलांवर असलेले प्राचीन तीर्थक्षेत्र. हस्तिनापूरचा एक भाग म्हणून याचा उल्लेख करतात. या ठिकाणी मुक्तेश्वराचे व गंगादेवीची चार प्रमुख देवालये आहेत. मुक्तेश्वरासह शंकराची सात मंदिरेही या



मुक्तेश्वरमंदिर

ठिकाणी आढळतात, ती अशी– गणमुक्तेश्वरनाथ, केदारनाथ, गंगेश्वरनाथ, भूतेश्वरनाथ, आमलीश्वरनाथ, मुक्तेश्वरनाथ आणि मुक्तिनाथ. गणमुक्तेश्वराजवळ स्वर्गद्वारतीर्थ असून, चक्रतीर्थ, नागकूप आदी अन्य काही तीर्थेही आढळतात. अगस्त्य ऋषीच्या शापाने अजगराचा देह प्राप्त झालेल्या नहुष राजाला धर्मराजाच्या हातून पापमुक्ती होऊन पूर्वावस्था प्राप्त झाली, ती इथेच, अशी महाभारतात कथा आहे.

कार्तिकी पौर्णिमेला या ठिकाणी मोठी यात्रा भरते. त्या वेळी गंगेत स्नान करणे, पवित्र मानतात. तसेच मृत मनुष्याची रक्षा



गंगामंदिर

या ठिकाणी गंगेत टाकतात. या ठिकाणी सुमारे ८० सतीस्तंभही आहेत. [ स. भा. प्र. व.; एन्सा. रि. ए. ]

**गडरिया** एक मेंढपाळ जात. यांची वस्ती मुख्यत्वे मध्य प्रदेश व उत्तर प्रदेश या भागात आढळते. याना गडेरी असेही म्हणतात. गधार, गाडर तसेच गंगाधर किंवा कंदाहार या शब्दावरूनही गडरिया शब्दाची व्युत्पत्ती सागतात. यांच्या उत्पत्तीविषयी एक कथा आहे, ती अशी—

मार्कंडेय ऋषीच्या आश्रमात पार्वती एकटीच असता तिने आपल्या शरीराच्या मळापासून पाच लहान जीव निर्माण केले. मग ती त्यांच्या बरोबर खेळू लागली. हे जीव स्त्रीयोनी होते. शंकराने आपल्या अंगमळापासून पाच पशू उत्पन्न केले व त्यांना पुरुषयोनी दिली. गात्रमळापासून उत्पन्न झाल्याने त्यांना गात्रज म्हणत. पुढे या शब्दाचा अपभ्रंश गाडर अथवा गडरिया असा झाला.

गडरिया हे यादववंशी क्षत्रिय आहेत.

यांच्या नीखर व ढेंगर या दोन मुख्य शाखा आहेत. त्या विषयीची कथा अशी—

लोहागढ येथील करमदेव हा गडरियांचा आदिपुरुष होता. त्याला नानाहंस व घनाहंस असे दोन मुलगे होते. घनाहंसाने धनगरकन्या शक्तिवती हिच्याशी लग्न केले. त्यांच्या संततीला ढेंगर असे नाव मिळाले. नानाहंसाने नीरजा नामक स्त्रीशी लग्न केले. त्यांच्या प्रजेला नीखर म्हणू लागले. ढेंगराचे उपाध्ये ब्राम्हण असतात, तर नीखरांचे त्यांच्याच जातीतले असतात. यांच्यांत अनेक देवके आढळतात. उदा० मोरिया (मोर), बघौइया (वाघ), हिरनवार (हरिण), सफ (साप), फुलसुंघ (फूल) इत्यादी. केसरिया देवकाचे लोक पिवळ्या घोड्यावर बसत नाहीत व फुलसुंघा देवकाचे लोक फुलाचा वास घेत नाहीत.

उ. प्रदेशात बाघेल, ब्राह्मनिय, चंडेल, धिनगर, हरनवाल, कच्छवाह, निखर, फुलसिधिय, राणेर, रौटेल, सागर, सरस्वार जोनपुरी, अलाहाबादी, बकरफसाब, नामदाकला व चिकला अशा त्याच्या पोटजाती आहेत. त्यापैकी काही मेंढपाळाचा व्यवसाय करतात, तर काही घोंगड्या विणण्याचे काम करतात. चिकला हे मुसलमान जातीचे आहेत. याशिवाय भराशिया, बैकर, तासेल्हा, चाक, बारिया, पँवार व भैयातार अशाही अन्य पोटजाती आहेत. पश्चिमेकडून उ. प्रदेशात आलेले गडरिया स्वतःला मराठे म्हणवतात.

**विवाहप्रथा—** साखरपुड्याला हे लोक डला-डली म्हणतात. त्या वेळी एक नारळ, एक रुपया, एक सुपारी व हळकुड ठेवतात. याला 'नेति नारियल' असे म्हणतात. या दिवशी नातेवाईकांना भोजन देतात. त्यानंतर वराकडील लोक वधूच्या घरी एक कावळे, काही द्रव्य व थोडे धान्य नेऊन देतात. याला 'पवनई' म्हणतात. नेति नारियल झाल्यावर २–४ दिवसांनी हा विधी करतात. याच्यांत एकाच कुळात लग्ने होत नाहीत. मुलीचे लग्न कोणत्याही वयात करतात व विवाहसमयी पुरुष वयाने लहान असला तरी चालतो. विवाहस्तंभाभोवती प्रदक्षिणा घालणे, हा लग्नातला महत्त्वाचा विधी असतो. लग्नमंडप मोडून टाकून फक्त एक मध्यखांब तेवढा ठेवतात व तो भाद्रपद शु. ६ ला उपटतात. वधूला कपटाने व बळजबरीने नेऊन लग्न लावण्याची चाल काही प्रमाणात आजही आढळते. मध्य प्रदेशातील गडरियांच्या पोटजातीत देवकांप्रमाणे लग्ने होतात.

**देव-धर्म—** यांची काली ही मुख्य देवता आहे. त्याशिवाय चमार व चोखाई या देवतांना हे भजतात. त्यांना डुकरे व बकरे यांचा बळीही देतात. हे दिशइ देवी (मेंढळाणाची देवता) हिलाही भजतात. मेंढ्यांची लोकर कापून जमिनीवर ठेवून तिच्यावर शेळीचे दूध व तांदूळ एकत्र करून शिंपडतात. या विधीला जमइ असे म्हणतात.

**मर्तिकप्रथा—** हे मृताना शक्य असल्यास जाळतात व मृताच्या अस्थी गंगेत किंवा नर्मदेत विसर्जन करतात. श्रीमंत गडरिया ब्राह्मणाकरवी वरील विधी करतात, तर गरीब स्वतःच करतात. या अंत्यसस्कारात पिंडदान व श्राद्ध हे विधीही केले जातात. [ म. ज्ञा. को.; ट्रा. का. सें. प्रॉ. इं. ]

**गडेली** उ. भारतातला गळ्यात घालायचा एक अलंकार. हा अंड्याच्या आकाराचा एक छोटा दागिना असतो. [ कृ. जी. सं. ब्र. श. ]

**गढवाल** उ. प्रदेशातील कुमाऊं विभागातला एक जिल्हा. याच्या उत्तरेस तिबेट, पूर्वेस नेपाळ व दक्षिणेस अलमोडा जिल्हा आहे. या प्रदेशात कामेत, त्रिशूळ, बदरीनाथ, दूनगिरी व केदारनाथ ही हिमालयाची शिखरे आहेत. रामगंगा, धवलगगा, विष्णुगगा, अलकनंदा व मंदाकिनी या इथल्या मुख्य नद्या होत. या प्रदेशाला प्राचीन काळी उत्तराखंड, केदारखंड, तपोभूमी, इ. नावे होती. या प्रदेशात यक्ष, गंधर्व, किन्नर व अप्सरा यांचे वास्तव्य होते, असे म्हणतात. ही ऋषि-मुनींची तपोभूमी होती, असेही सांगतात. या प्रदेशाच्या सौंदर्यामुळे मुग्ध होऊन महाकवी कालिदासाने याला देवभूमी हे नाव दिले आहे.


गढवाली स्त्री व याक जनावर

गढवाली लोक मुख्यत: शेतीवर उपजीविका करतात. काही जण मजुरीही करतात. हे लोक अत्यंत मागसलेले आहेत. मात्र ते श्रद्धाळू असून, त्यांना शुद्धाचरण, तीर्थयात्रा, पापक्षालन, देवताची पूजा या गोष्टी प्रिय असतात. यांची राहणी साधी असली, तरी यांच्या स्त्रियांना मात्र दागिन्यांची खूप हौस असते.

वसंत ऋतूत स्त्री-पुरुषांचे नृत्य होते. त्या वेळी हे लोक रंगीबेरंगी कपडे घालून सजतात. त्यांचे अनेक विवाहसंबंध या नृत्योत्सवात जुळून येतात. वधूची निवड करताना कुरळे केस व मस्तकावरील चक्र ही शुभचिन्हे समजतात. यांच्यांत एकच स्त्री अनेक भावांची पत्नी होते. वरपक्षाला वधूसाठी बरेच देज द्यावे लागते. पाहा– कुमाऊं. [ म. ज्ञा. को.; ग. लो.; इं. फो. लो. ]

**गढवाली चित्रकला** या चित्रकलेची जी काही विशेष लक्षणे आहेत, त्यांमुळे ही इतर पहाडी चित्रकलांहून वेगळी दाखविता येते. गढवाली चित्रांत उच्च कुळातील स्त्रियांच्या मस्तकावर चंदनाचे टिळे लावलेले असतात. या शैलीचे दुसरे लक्षण असे, की वनाच्या नैसर्गिक देखाव्यात वृक्ष, लता, नदी याचे चित्रण फार खुबीने केलेले असते. सर्वच पहाडी शैलीची निसर्गचित्रे नयनमनोहर असतात खरी; पण त्यांतही गढवाली चित्रे अधिक रमणीय दिसतात. या चित्रांचा आणखी एक विशेष हा, की त्यांत अलकनंदा नदी व नरनारायण पर्वत यांचे चित्रण प्राय: सर्वत्र केलेले असते.

इतर पहाडी चित्रकारांप्रमाणे गढवाली चित्रकारांनीही नायिकाभेदावर आधारित अशी चित्रे, तसेच दशावतार, रुक्मिणीहरण, अष्टदुर्गा व अष्टग्रह यांची चित्रे काढली आहेत. गढवाली चित्रकारांत मोलाराम हा सर्वश्रेष्ठ कलाकार असून, त्याची कला गढवाली चित्रकलेचे प्रतीक मानली जाते. गढवाली कलाकारांनी सताची आणि गुरुनानकासारख्या थोर पुरुषांची चित्रे काढलेली आहेत; त्याचप्रमाणे मोर, चकोर, सारस, इ. पक्ष्यांची चित्रेही पुष्कळच चितारली आहेत.


गढवाली चित्रशैली

इतर पहाडी कलाप्रमाणेच गढवाली चित्रकलेचा उगम अजंटाकलेतूनच झालेला आहे. अजंटाकला प्रथम राजस्थानात पसरली आणि इ. स. च्या १६ व्या शतकात मोगलांच्या बरोबर आलेल्या पर्शियन कलाकारांनी तिला आत्मसात करून मोगल शैलीचा विकास केला. पुढे औरंगजेबाच्या कारकिर्दीत अनेक हिंदू चित्रकार परागंदा होऊन हिमालयातील स्वतंत्र राजाच्यां आश्रयाला गेले. तिथे त्यांनी ज्या चित्रकलेचा विकास केला, तिला पहाडी शैली म्हणून ओळखतात. आश्रयदात्या राजाच्या आवडीला अनुसरून त्या कलाकारांनी राधाकृष्णांच्या प्रेमलीलांना आणि रीतिकालीन कवींच्या नायिकाभेदाना आपल्या चित्रांत प्राधान्य दिलेले आढळते. त्यांच्या चित्रांत पुरुषांचा पोषाख मोगली पद्धतीचा असतो. कृष्णाच्या जीवनातील प्रसंगांत मात्र त्याची वस्त्रे हिंदू पद्धतीची दिसतात. गढवाली चित्रकला इ. स. च्या १७ व्या शतकापासून १९ व्या शतकापर्यंत विकास पावली. इ. स. च्या २० व्या शतकाच्या

उत्तरार्धात तिचा ऱ्हास झाला. [ त्रिपथगा नोव्हेंबर, १९६२ ]

## गढवाली लोकगीते

गढवाली लोकगीतांचा बराचसा भाग त्यांच्या कष्टमय जीवनाने व्यापलेला आहे. गाईने दूध जास्त द्यावे, पीक चांगले निघावे, पाऊस योग्य वेळी पडावा, रोगराई नष्ट व्हावी या गोष्टींसाठी त्यांच्या लोकगीतांतून देवदेवता, भुतेखेते व अप्सरा यांची प्रार्थना असते. गढवाली माणसे आपल्या नातेवाईकांवर जसे प्रेम करतात, तसेच ते वन, पर्वत, नदी, पशू यावरही करतात.

गढवाली गीते प्रबंधात्मक, वर्णनात्मक व भावात्मक अशी त्रिविध असतात. आशयानुकूल अशा विविध शैलीत ती रचलेली असतात. छोपती, लामण, छूडे, बाजूबंद, झुमैलो, चौफुला, तांदी, थाड्या, इ. अनेक प्रकार त्या गीताचे आहेत. छोपती, लामण व छूडे ही खाई जौनपूर क्षेत्रातील विशिष्ट लोकगीते आहेत.

त्यांच्या विवाहगीतांत केवळ माणसांनाच आमंत्रण असते असे नाही; तर वेदमुखी ब्रह्मा, मंगलवाद्ये वाजविणारे वाजंत्री आणि काळीभोर शेते, यांनाही ते असते. लग्नाच्या मंगल स्नानापूर्वी सुवासिनी स्त्रिया दोन्ही हातांत दूर्वांच्या जुड्या घेऊन त्या पाण्यात बुडवतात व वधूचे पाय, गुडघे, खादे व मस्तक यावर अभिषेक करतात. स्नानाच्या या पूर्वतयारीला ' बाँद देना ' असे नाव आहे. याचे गीत असे—

**बाँद देली दीदी स्वागीण,**
**बाँद देली बौजी स्वागीण,**

अर्थ — सौभाग्यवती बहीण मला बाँद देईल, सौभाग्यवती वहिनी मला बाँद देईल.

वधूची ओटी भरताना तिला पुत्रप्राप्ती व्हावी म्हणून लक्ष्मी, सावित्री, पार्वती यांची प्रार्थना करतात. या प्रथेला ' अंचला ' म्हणतात. याचे गीत असे—

**औंदो छऊं मैं औंदो छऊं**
**नाती पूतन गोद भरी लौन्दू ।**
**सबी देवी ऐन पार्वती आऍ**
**औंदो छऊं मैं औंदो छऊं ।**
**नाती पूतन गोद भरी लौन्दू ।**

भावार्थ — पुत्रानी आणि नातवंडांनी तुझी कूस भरून देईन. सगळ्या देवी आल्या; परंतू पार्वती आली नाही.

गढवालमध्ये वधूचा बाप कन्याशुल्क घेत असतो. त्याबद्दल वधूला होणारे दुःख त्यांच्या अनेक लोकगीतांतून व्यक्त झाले आहे—

**सौकर को जो बढटो नी व्याज**
**नी जादा स्वामी परदेश आज ।**
**तिन कनी करी मेरा विधाना,**
**बाबान भरेन रूपेऊँ पाया ।**
**सैंत्यऊँ यांकहि केवल मांजीन,**
**खौलो रूप्यऊँ हजारी तीन ।**

अर्थ — सावकाराचे व्याज वाढले नसते, तर माझा स्वामी परदेशाला गेला नसता. परमेश्वरा, हे तू काय केलेस ? बाबा, तुम्ही पण पैशाची थैली भरलीत ना ? आईनेही माझा प्रतिपाळ यासाठीच केला, की तीन हजार रुपये खायला मिळावे.

झुमैलो, चौफुला, छोपती, तांदी, थाड्या ही गढवाली लोकांची नृत्यगीते आहेत.

स्त्री-पुरुषांच्या नृत्याच्या वेळी छोपती गीते गातात. या गीतांत प्रणयाची माधुरी असते. या वेळी स्त्रिया व पुरुष एकमेकांना सवाल-जबाब करतात. लामण, बाजूबंद व छोपती यांचाही प्रेम हाच विषय असला, तरी बाजूबंद रानावनात गातात; तर छोपती व लामण नृत्यप्रसंगी गातात. लामण गीतांचा एक नमुना असा—

**दुशुगो औंडो नैंगो गौडिया घाटा,**
**फूल मिले शोनेरो नाणी मिली आदडी बाटा।**
**तेरो मेरो नाणिये बाऊबी लगिगो लाड़,**
**चोडी नाइ देण खरी जीण घोणरू खाड़ ।**

अर्थ—सूर्य अस्ताला चालला होता. तेव्हा कुठे सुवर्णाचे फूल मिळाले आणि अर्ध्या वाटेत ही सुंदरी भेटली. हे सुंदरी, तुझी आणि माझी घनिष्ठ प्रीती आहे. म्हणूनच धनुष्य जसे तुटलेल्या दोरीला टाकून देते, तसे तू मात्र मला टाकून देऊ नकोस.

' फ्यूली रौतेली ' ही त्यांची चैत्रगीते आहेत. त्याचेही विषय मुख्यत्वे प्रणय, सौंदर्य व तारुण्य हे असतात. त्याचा एक नमुना असा—

**वीं का रंग मा मैलो होन्दो घुमैलो सुरीज,**
**वीं की मुखडी से बुरांसी कर्दी रीस ।**
**वीं की बांकी धौपेली काला नाग—सी लंबी,**
**नाकडी तरतरी—खांडाधार सी पैंडी ।**

भावार्थ — तिच्या रंगापुढे सूर्यही फिका पडे. तिचे मुख पाहून सुंदर स्त्रियाही हेवा करीत. तिची वेणी नागिणीप्रमाणे लटकत होती. तिचे नाक चाफेकळीसारखे; परंतु धारदार होते.

गढवाली लोकगीतांचा आणखी एक विषय म्हणजे दीर—भावजयांचे प्रेम, त्यांची परस्पर थट्टा व त्यांचा खोडसाळपणा. त्याचा एक सुंदर नमुना असा—

**मेरी नजर बौ की नथूली, बौ की नजर का च ?**
**मेरी नजर बौ की आँख्यों, बौ की नजर का च ?**
**मालू मात रूम झुम निम्बू डाली खेंच**
**मेरी नजर बौ की मुखडी बौ की नजर का च ?**

अर्थ– माझी नजर वहिनीच्या नथीवर आहे. पण तिची नजर कुठे आहे कोण जाणे ! माझी नजर वहिनीच्या डोळ्या- वर आहे. परतु तिची नजर कुठे आहे कोण जाणे ! धान्याची रोपे डोलत आहेत. लिबाची फादी पाण्याने भिजली आहे. माझी नजर तर वहिनीच्या मुखावर आहे; परंतु तिची नजर कुठे आहे देव जाणे !

शैली, विषय, प्रसग व सृष्टिसौंदर्य यानी गढवाली लोकगीते समृद्ध आहेत. या गीतांमधून तिथल्या लोकाचे जीवन, त्यांचे मनोभाव, त्याची संस्कृती, या सगळ्या गोष्टीच्या सुस्पष्ट छटा दिसतात. [ ग. लो.; आजकल, फेब्रु. १९५८ ]

**गण** (१) समूह किवा समुदाय. 'गण्यते गणयति वा' = मोजतो किवा मोजला जातो, तो गण होय (हलायुध).

ऋग्वेदात गण हा शब्द व्रात शब्दाला धरून येतो (ऋ. ३.२६.६). ऋग्वेदात ब्रह्मणस्पतीला गणाचा गणपती, असे म्हटले आहे (ऋ. २.२३.१). बौद्ध साहित्यात गण शब्द लोक- शाही सस्था या अर्थाने वापरला आहे (महावग्ग २.१८). पाणिनीने गण शब्दाला प्रतिशब्द म्हणून संघ हा शब्द दिला आहे. 'सङ्घोद्धौ गणप्रशंसयो:' = संघ व उद्ध हे शब्द अनु- क्रमे गण व प्रशंसा या अर्थी वापरावेत, असे तो म्हणतो (अष्टा. ३.३.८६). धर्मशास्त्रातही पाणिनीला अनुसरूनच गण शब्दाचा अर्थ दिलेला आहे. जातकात आलेली गणविषयक माहिती अधिक बोधप्रद व सुस्पष्ट आहे. गण ही एक लोक- संस्था होती व ती स्वयबद्ध होती, असे जातकावरून कळते.

श्री. राधाकुमुद मुकर्जी यानी 'हिंदू सभ्यता' या ग्रंथात गणाबद्दल माहिती दिली आहे, ती अशी–

गण ही एक राजकीय संघाची संज्ञा होती. गणात सर्व वर्गातले लोक सामावले जात. त्यात शासक क्षत्रियांचा एक विशेप वर्ग असे. या वर्गाला राजन्य असे म्हणत. राजन्य श्रेणीचे क्षत्रियच सघाच्या शासनसमितीचे सदस्य होऊ शकत. संघशासनात राजनैतिक दलेही असत. त्यांना वर्ग असे म्हणत. या वर्गांची नावे त्यांच्या नेत्यांच्या नावावरून पडत. उदा० अंधक–वृष्णी या संघातील वासुदेववर्ग्य, अक्रूरवर्ग्य अर्थात वासुदेव आणि अक्रूर वर्गाचे अनुयायी. गणात अधिकारासाठी स्पर्धाही चालत असे. अशी स्पर्धा अंधक-वृष्णी या गणातही चालत होती व सदर सघ या कारणामुळे द्विदल बनला होता असे अष्टाध्यायीवरून कळते (६.२.३४).

पाणिनीने यौधेय व क्षुद्रक-मालव अशा काही संघांचा नामो- ल्लेख केला आहे. त्याने गणांच्या समुदायाचाही उल्लेख केला आहे. उदा० त्रिगर्तषष्ठ, अर्थात त्रिगर्त देशाच्या सहा संघांचा समुदाय (अष्टा. ५.३.११६). अंधक–वृष्णी प्रमाणेच क्षुद्रक– मालव हाही सयुक्त संघच होता (अष्टा. ४.२.४५).

महाभारतात अंधक, वृष्णी, यादव, कुकुर व भोज अशा पाच गणाचा उल्लेख आला आहे (शांति. ८१). अंधक–वृष्णीचा नेता श्रीकृष्ण होता प्रत्येक संघ आपल्या अधिपतीच्या अधीन राहत असे. वर्गगत शासनातही अधिकारासाठी संघर्ष होत असे. उदा० बभ्रूने कृष्णाविरुद्ध आपला वर्ग संघटित केला होता. अक्रूरानेही कृष्णाशी सत्ताविषयक स्पर्धा केली होती.

गणाचे विविध प्रकार असत. काही गण आयुधजीवी (शस्त्रावर जगणारे); तर काही गण वार्ताशास्त्रोपजीवी (शेती, पशुपालन, व्यापार, इ. वर जगणारे) असत. काही गण राजाधिष्ठित असत; तर काही लोकाधिष्ठित असत.

गण शब्दाचा अर्थ अनेक पाश्चात्य विद्वानांनी ट्राइब (= टोळी किवा जथा) असा दिला होता. पण सदर अर्थ चुकीचा असल्याचे श्री. जयस्वाल यांनी महाभारताच्या आधारे सिद्ध केले आहे. **पाहा**– गणराज्य.

(२) तीन अक्षराच्या समूहाला छंद:शास्त्रात गण अशी संज्ञा आहे. य–र–त–न–भ–ज–स–म असे आठ गण पिङ्गलाच्या छंदोग्रंथात सागितले आहेत. लघु-गुरूंच्या फरकाने ते बनतात. याविषयी पिङ्गलाने नियमश्लोक दिला आहे, तो असा—

**आदिमध्यावसानेषु यरता यान्ति लाघवम् ।**
**भजसा गौरवं यान्ति मनौ तु गुरुलाघवम् ।।**

अर्थ – य, र, त, हे गण अनुक्रमे आदी, मध्य व शेवट यात लघू अक्षराचे असतात. व भ, ज, स हे गण अनुक्रमे आदी, मध्य व शेवट या ठिकाणी गुरू अक्षराचे असतात. म गण हा सर्व गुरू असतो व न गण हा सर्व लघू असतो.

संस्कृत व प्राकृत काव्यातली कित्येक वृत्ते निरनिराळ्या गणानुक्रमावर आधारलेली असतात. त्यांना मंदाक्रांता, शार्दूल- विक्रीडित, शिखरिणी, उपजाती, वंशस्थ, इ. नावे आहेत.

(३) 'एकवाचनाचारक्रियास्थानां परस्परसापेक्षाणाम् अनेककुलानां साधूनां समुदाय:' = ज्यांचे वाचन, आचार व क्रिया या समान असतात अशा व परस्परसापेक्ष अशा अनेक कुलांतील साधूचा समुदाय म्हणजे गण होय, अशी जैन ग्रंथात त्याची व्याख्या आहे (अभि. रा.).

गणकल्पना ही महावीराच्याही पूर्वी अस्तित्वात होती, असे कळते. श्रमणाला कमीत कमी सहा महिने तरी एकाच गणात

राहावे लागत असे. सहा महिन्यांच्या आत त्याने गण बदलला, तर त्याला गाणंगणिक असे म्हणत (उत्त. १७). सहा महिन्यानंतर ज्ञानसाधना किंवा नेमधर्म या कारणांसाठी जैन साधूला गण बदलता येत असे. पण त्यासाठी गणप्रमुखाची अनुज्ञा मात्र आवश्यक असे.

(४) सेनासंख्याविशेष. एका गणात २७ रथ २७ हत्ती, ८१ घोडे आणि १३५ पायदळ याचा समावेश होतो, असे महाभारतात सांगितले आहे (आदि. २.२१).

(५) अश्विन्यादी जन्मनक्षत्रानुसार प्राप्त होणारा देव, मनुष्य किंवा राक्षस गण. (गणमैत्री पाहा).

(६) शिव आणि विष्णू यांचे अनुचर. त्यांना अनुक्रमे शिवगण व विष्णुगण असे म्हणतात.

## गणक

(१) दैवज्ञ किंवा ज्योतिषी. याची व्याख्या अशी– ' गणयति शुभाशुभग्रहभोगजनितफलं निरूपयतीति ' =शुभाशुभ ग्रहांच्या भोगातून निर्माण होणारे फल सांगतो, तो गणक होय.

गणक हा संकरजातीचा मानला जातो. देवलापासून वैश्य स्त्रीच्या ठिकाणी झालेल्या पुरुषाला गणक म्हणावे; तिथी, वार, इ. गोष्टी सांगणे, हे त्याचे कर्म असावे व तो अस्पृश्य समजला जावा, असे धर्मशास्त्रात म्हटले आहे. ज्योतिषशास्त्रात गणकाची निंदा केलेली आहे; पण ती केवळ नक्षत्रसूचकापुरतीच मर्यादित समजावी. गणितावर आधारलेले ज्योतिषशास्त्र हे वेदांग असल्यामुळे ते द्विजांनी अवश्य अभ्यासावे, असे सिद्धांतशिरोमणीत सांगितले आहे. राजाच्या परिवारात एक गणकही असावा, असे युक्तिकल्पतरू म्हणतो—

**ज्योतिःशास्त्रविशेषज्ञः सुन्दराङ्गः सभापटुः ।**
**कुलक्रमागतः शुद्धो गणकः स्यान्महीपतेः ।।**

अर्थ–ज्योतिषशास्त्राचे विशेष ज्ञान असलेला, सुंदर अवयव असलेला, सभापटू, कुलपरंपरेने आलेला व शुद्ध असा गणक राजाच्या पदरी असावा.

(२) प्रजापतीचे पुत्र असलेले ताराविशेष किंवा धूमकेतू. यांची संख्या आठ आहे (बृ. सं. ११.२५).

## गणगौर

राजस्थानातील कुमारींचा व सौभाग्यवती स्त्रियांचा एक उत्सव. कुमारी चांगला वर मिळावा म्हणून आणि सौभाग्यवती स्त्रिया सौभाग्यवृद्धी व्हावी, म्हणून गणगौरीचा पूजोत्सव करतात. होळीच्या दुसऱ्या दिवसापासून चैत्र शु. ३ येपर्यंत हे पूजापर्व चालते. होळीची राख व शेण घेऊन मुली त्यांच्या आठ पिंडचा बनवितात. मग सकाळी उठून, साज-शृंगार करून आपल्या मैत्रिणीबरोबर गीते गात गात पूजेसाठी पाणी व दूर्वा आणायला निघतात. घरी आल्यावर एका दालीत दूर्वा ठेवतात व त्यांच्यावर त्या पिंडचा ठेवतात. मग त्यांची व ईश्वर-पार्वतीच्या मूर्तींची पूजा करतात.



गणगौरीची बाहुली

अशा प्रकारे अठरा दिवस मोठ्या उत्साहाने ही पूजा चालते. ज्यांना अठरा दिवस पूजा करणे शक्य नसते, त्या तीन दिवस पूजा करतात. प्रथम मातीच्या परळात यव पेरतात. शेवटच्या दिवशी सर्व मुली व सुवासिनी गौरीची विशेष रीतीने पूजा करतात. त्या दिवशी त्या दिवसभर उपवास करून रात्री चंद्रदर्शनानंतर फलाहार करतात. या दिवशी पुरुष, स्त्रिया व मुले त्या पेरलेल्या यवांचे अंकुर मस्तकावर धारण करतात.

अठरा दिवस रोज रात्री गावातल्या मुली जमून गणगौरीची गीते गातात व नाचतात. पूजेच्या वेळी जी गीते गातात, त्यांपैकी एक गीत असे—

**चौको दे, चौको दे, ईशर की भाण चौको दे ।**
**चौको दे, गोकुलचंदकी भाण चौको दे ।**
**गौर ए ! गौर माता खोल कींवाडी**
**बाहर उबी थारै पूजणवाली**
**पूजो ए ! पूजावो सैय्यो कायूँ जो मांगो ?**
**अन मागाँ, धन मॉगाँ, लाछ मागाँ लिछमी**
**जलहर जामी बाबल मागाँ, राता देई मायड**
**कान कँवर सो बीरो मागाँ रोई सी भौजाई ।**

या गीतात पूजक स्त्रियांनी गणगौरीकडे धनदौलत, चांगला पती व सत्पुत्र मागितलेला आहे.

चैत्र शु. ३ येला संध्याकाळी गणगौरीची मिरवणूक काढतात व नदीत किंवा तलावात त्या मूर्तीचे विसर्जन करतात. या मिरवणुकीत मोठमोठे लोक, सरदार व राजेही सामील होतात.

या उत्सवाला राजस्थानात फार महत्त्व आहे. या वेळी घरातल्या मुलीबाळींना मेवामिठाई व नवीन वस्त्रे मिळतात. राजस्थानात सर्व मोठ्या शहरात उत्सवाच्या वेळी मोठमोठे मेळे लागतात. जयपूरमध्ये तर हा उत्सव फारच थाटामाटाचा होतो. दूरदूरचे लोक हा उत्सव पाहण्यासाठी त्या वेळी जयपूरला येतात. या संबधीच्या व्रताची कथा अशी––

एक राजा व एक माळी यांनी एकदा शेती करायचे ठरविले. राजाने यव व हरभरे पेरले, तर माळ्याने दूर्वा लावल्या. राजाचे पीक चांगले वाढू लागले. पण माळ्याच्या दूर्वा मात्र रोजच्या रोज खुरटू लागल्या. माळ्याला चिंता उत्पन्न झाली. असे का होते, याचे कारण शोधण्यासाठी तो एके दिवशी बागेत लपून बसला. तेवढ्यात रोजच्या प्रमाणे नगरातील मुली दूर्वा तोडण्यासाठी तिथे आल्या. माळ्याने त्यांना हटकल्यावर त्या घाबरल्या. पण त्यांनी माळ्याला सांगितले :



मिरवणूक – गणगौर

‘ आम्ही गणगौरीची पूजा करीत आहो आणि आम्हाला त्यासाठी दूर्वा लागतात. म्हणून आम्ही रोज इथल्या दूर्वा खुडून नेतो. आजही तू आम्हाला दूर्वा नेण्याची परवानगी दे. आम्ही तुला आमच्या पूजेचा प्रसाद आणून देऊ. ’

माळ्याने त्यांचे म्हणणे मान्य केले. पूजा संपल्यावर त्या माळ्याकडे प्रसाद घेऊन गेल्या; पण माळी त्या वेळी घरी नव्हता. त्याच्या आईच्या सांगण्यावरून मुलींनी त्याच्या खोलीत तो प्रसाद ठेवला. काही दिवसानी माळी परत आला. खोली उघडून पाहतो, तो आत ईश्वर व गणगौर ही दोघे बसली होती. त्यांच्या दर्शनाने माळी कृतार्थ झाला.

उत्तर प्रदेशातही गणगौरीचे व्रत प्रचारात आहे. पण प्रदेश-परत्वे त्यात थोडा भेद आहे. उत्तर प्रदेशातील स्त्रिया चैत्र शु. तृतीया ही पार्वतीची जन्मतिथी मानतात. त्या दिवशी सौभाग्यवती स्त्रिया वाळूची गौर करतात, तिची पूजा करतात व तिला सौभाग्यवस्तू अर्पण करतात. मग तिची कहाणी ऐकतात. कथा ऐकून झाल्यावर गौरीवर वाहिलेला शेंदूर आपल्या भांगात घालून व्रत समाप्त करतात. त्या दिवशी स्त्रिया एकभुक्त राहतात. या व्रताचा प्रसाद फक्त स्त्रियांना देतात; पुरुषांना देत नाहीत. [ झाबरलाल शर्मा–मरुभारती, ऑक्टो. १९५६ उदयवीर शर्मा– वरदा, जाने. १९५८; रा. क. अ.; आशारानी जैन–साप्ताहिक हिंदुस्थान, १२ एप्रिल १९६४ ]



गणगौरीच्या व्रतासाठी सजलेली राजस्थानी रमणी

**गणदेवता** समूह किंवा गण करून राहणाऱ्या देवता. त्यांची नावे पुढीलप्रमाणे – बारा आदित्य, दहा विश्वेदेव, आठ वसू, त्रेसष्ट तुषित, चौसष्ट आभास्वर, एकोणपन्नास अनिल, दोनशेवीस महाराजिक, बारा साध्य, अकरा रुद्र इत्यादी.

**गणधर** एक जैन उपाधी. याची व्याख्या अशी–‘ अनुत्तरज्ञानदर्शनादिधर्मगणं धरतीति गणधरः ’= अनुत्तर, ज्ञान, दर्शन, इ. धर्माच्या गणांचे धारण करतो, तो गणधर होय (अभि. रा.). सूत्रकर्ता, तीर्थकराचा शिष्य, गणनायक असेही त्याचे अन्य अर्थ आहेत.

गणधर हे द्वादश अंगे व चतुर्दश पूर्वे यामध्ये पारंगत असतात. ते वरील विषयांचे प्रवचनकारही असतात. प्रत्येक तीर्थकराचे अनेक गणधर होते.

शेवटचा तीर्थंकर महावीर याचे ११ गणधर होते. त्यांना

ऐतिहासिक दृष्टचा महत्त्व आहे. त्यांचे नाव, गोत्र व ठिकाण यांचे कोष्टक पुढीलप्रमाणे—

| नाव | गोत्र | ठिकाण |
|---|---|---|
| १ इंद्रभूती | गोतम | गोर्वरग्राम |
| २ अग्निभूती | ,, | ,, |
| ३ वायुभूती | ,, | ,, |
| ४ व्यक्त | भारद्वाज | कोल्लक सन्निवेश |
| ५ सुधर्म | अग्निवेश्यायन | ,, |
| ६ मंडिकपुत्र | वासिष्ठ | मौर्य सन्निवेश |
| ७ भौमपुत्र | कासव | ,, |
| ८ अकंपित | गोतम | मिथिला |
| ९ अचलभ्राता | हरियाण | कोसल |
| १० मेतार्य | कौडिण्य | तुगिक सन्निवेश |
| ११ प्रभास | ,, | राजगृह |

वरील सर्व गणधर हे ब्राह्मण होते. यावरून महावीराच्या काळात ब्राह्मणातही वैचारिक क्रांती सुरू झाली होती, असे दिसते. महावीराने समाजातल्या सर्व थरातील लोकाना आपल्या धर्मात आणले होते.

महावीराच्या वरील गणधरांपैकी बहुतेक सर्व एका महिन्याच्या सल्लेखनेनंतर राजगिर येथे निर्वाणाला पोचले. इंद्रभूती व सुधर्म हे दोघे महावीराच्या नंतर निर्वाणाला गेले. या वरील ११ जणात इंद्रभूती हा महावीराचा आवडता शिष्य होता. तो महावीरानंतर १२ वर्षे जगला. दुसरा सुधर्म हा महावीरानंतर मठाधिपती होऊन २० वर्षे जगला. सांप्रत निर्ग्रंथ-श्रमण म्हणून ओळखले जाणारे लोक हे सुधर्माच्याच परंपरेतले होत. [अभि. रा.; हि. जै. मो.]

## गणपतिपूजन

गणपती हा विघ्नहर्ता असल्यामुळे प्रत्येक शुभकार्याच्या आरंभी त्याचे पूजन करण्याचा शिष्टसंप्रदाय आहे. हे पूजन मूर्तीऐवजी तांदुळाच्या पुंजीवर सुपारी ठेवून तिच्यावर गणपतीचे आवाहन करून करायचे असते. दक्षिण कोकणात सुपारीऐवजी नारळ ठेवण्याची प्रथा आहे. 'ॐ भूर्भुवः स्वः महागणपतये नमः' या नाममंत्राने ही षोडशोपचार पूजा करतात. मग पुढील मंत्राने प्रार्थना करतात—

**कार्यं मे सिद्धिमायातु प्रसन्ने त्वयि धातरि।**
**विघ्नानि नाशमायान्तु सर्वाणि सुरनायक ।।**

अर्थ–हे विधात्या देवनायका गणपते, तू प्रसन्न होऊन माझे कार्य सिद्धीस जावो. तसेच सर्व विघ्ने नष्ट होवोत.

ज्या धार्मिक कृत्यासाठी गणपतिपूजन केले असेल, ते कार्य पूर्ण झाल्यावर मग त्या गणपतीचे विसर्जन करतात. लहान-सहान शुभकार्यात पूजनाऐवजी नुसते स्मरणच केले जाते. या स्मरणाचा मंत्र असा–

**वक्रतुण्ड महाकाय कोटिसूर्यसमप्रभ ।**
**निर्विघ्नं कुरु मे देव सर्वकार्येषु सर्वदा ।।**

अर्थ– वाकडी सोंड असलेला, मोठ्या देहाचा, कोटिसूर्याप्रमाणे कांती असलेला, अशा हे देवा, तू मला सर्वदा सर्व कार्यात निर्विघ्न कर.

## गणपतिहृदया

एक बौद्ध देवता. ही गणपतीची शक्तिदेवी असून, एकमुखी व द्विभुज आहे. ही नृत्यासना असून अभय आणि वरद या तिच्या मुद्रा आहेत.

## गणपती

(१) शैव परिवारातील एक प्रमुख देवता. धड मानवाचे व शिर हत्तीचे असा हा एक विचित्र व वैशिष्टयपूर्ण देव आहे. गणपती हा भारतातील एक प्राचीन देव आहे. त्याचे स्पष्ट उल्लेख अतिप्राचीन वाङमयात सापडत नसले किंवा पाचव्या शतकापूर्वीच्या त्याच्या मूर्ती सापडत नसल्या तरी त्याच्या प्राचीनत्वाला बाध येत नाही, असे प्रो. फौचर याचे मत आहे.

गणपती ही मूळची आर्येतर देवता असल्याबद्दल बहुतेक संशोधकांचे एकमत आहे. प्रो. फौचर यांनी ही कल्पना विस्ताराने मांडली आहे. काही आर्येतर गण किंवा समूह हत्तीची पूजा करीत आणि त्या पूजेतूनच गणेशपूजा विकास पावली, असे त्यांचे मत आहे. त्यांच्या मते गणेश ही प्रथम आर्येतरांची एक ग्रामदेवता होती. तशा प्रकारच्या इतर देवतांबरोबर ती खेड्यात एखाद्या झाडाखाली असे. तिचे पूजक तिच्यापुढे नरबळी देऊन त्या रक्ताचा तिच्यावर अभिषेकही करीत असतील, अशीही शक्यता आहे. आजही गणेशाला सिंदूरचर्चन चालतेच. अशी ही आर्येतरांची ग्रामदेवता पुढे वैदिकांना आपली म्हणावी लागली आणि 'गणानां त्वा गणपतिं हवामहे' या वैदिक मंत्राने तिची पूजा-अर्चा करावी लागली.



गणपती – पट्टीश्वरम्

करीत ते स्थान हत्तीविषयी प्रसिद्ध आहे. म्हणूनच गणपती किंवा विनायक याला गजानन हे अभिधान देण्यात आले.

शिवाच्या गजचर्मावरून एक गजोपासक अनार्य संघ शिवभक्तांत होता, असे दिसते. गज हे त्याचे चिन्ह होते. भृशुंडीच्या कथेवरून आर्येतरात गजानुयायी लोक होते व ते हत्तीचे रूपडे आपल्या तोंडावर घालीत हे कळून येते. गजमुख गणपती हा प्रारंभी याच लोकाचा देव असावा.

दिवसेदिवस आर्येतरांचा आर्य सस्कृतीत अधिकाधिक प्रवेश होऊ लागला व आर्यांनी या आर्येतरांना व्रात्य या नावाने आपल्या आर्य संघाचे अवयव बनवले. अशा या संयोगकालात गणपती या देवतेचे प्रस्तुत रूप तयार झाले असावे. या संबधाची एक उपपत्ती लो. अणे यांनी पुढीलप्रमाणे माडली आहे—

गणपत्यथर्वशीर्षात गणपतीला 'नमो व्रातपतये' असे नमन केलेले आहे. व्रातपती म्हणजे व्रात्यांचा पती होय. व्रतप्रधान व यज्ञविरहित अशा आर्येतरांच्या संघाला आर्यांनी व्रत हे नाव दिले. या व्रतसंघातील लोक ते व्रात होत. 'व्रात इव व्रात्यः' व्रातासारखे ते व्रात्य समजावेत. संस्कारहीन द्विजाला व्रात्य म्हणत. गृत्समद हा एक वैदिक ऋषी असून तो सर्वश्रेष्ठ गणपतिभक्त मानला जातो. त्याची जन्मकथा विचारात घेतली, तर तो वर्णसंकरातून उत्पन्न झाला होता, हे स्वच्छ कळते. वर्णसंकरातून उत्पन्न झालेल्या जातीला व्रात्य म्हणावे, अशी बौधायनाने त्या शब्दाची व्याख्या दिलेली आहे. व्रात हे वन्य श्वापदांची शिकार करून उपजीविका करीत. गृत्स, व्रात, गण, विरूप, असे शब्द रुद्राध्यायात येतात. हे शब्द त्या त्या नावांच्या मानवसंघाचे सूचन करतात. या शब्दांचा गणपतिदेवतेशी निकटचा संबंध आहे. गणपतीला कुठे कुठे गृत्समद असेही म्हटले आहे. या शब्दाने मदस्राव करणाऱ्या हत्तीचे सूचन होते. व्रात म्हणजे व्रत-वैकल्यादी देहदंडनात्मक धर्म आचरणारे लोक होत. विरूप या शब्दाने निरनिराळ्या प्राण्यांची रूपडी घालून किंवा त्यांची सोंगे घेऊन हे लोक मिरवीत असत, असे दिसते.

गणेश ही देवता अवैदिक आहे, आर्येतरांची आहे, असे मत बहुतेक पाश्चात्य विद्वानानी प्रतिपादिले आणि आपल्याकडील आंग्लविद्याविभूषित पडितांनीही पुष्कळ अंशी त्याचाच अनुवाद केला. पण सनातनी पंडितांना हे प्रतिपादन रुचले नाही. त्यानी गणेश ही संपूर्णतया वैदिक देवता आहे, असे मत आग्रहाने प्रतिपादण्यास सुरुवात केली. या बाबतीत त्यानाही परंपरेचा आधार सापडला. अथर्ववेदात गणपत्यथर्वशीर्ष नावाचे एक उपनिषद विद्यमान आहे. गणपतीचे समग्र स्वरूप त्यात दिलेले आहे. आणि त्या दृष्टीने गणेश ही देवता वैदिक ठरते. इतकेच नव्हे; तर ऋग्वेदातले ब्रह्मणस्पतिसूक्त हेही गणपतीचेच सूक्त आहे, असे सनातनी पंडितांचे म्हणणे आहे. ब्रह्मणस्पती ही एक वैदिक देवता आहे. तिच्या सूक्तात तिला गणपती या नावाने आवाहन केलेले आहे अथर्वशीर्षातला गणपती लोकमान्य झाल्यानंतर हा वैदिक ब्रह्मणस्पती त्याचा पूर्वावतार समजला गेला. गणपती हा जसा ज्ञानदाता देव आहे, तसाच ऋग्वेदातला ब्रह्मणस्पतीही आहे. गणपतीच्या हातात जसा सुवर्णपरशू आहे, तसाच तो ब्रह्मणस्पतीच्याही हातात आहे. कार्यारंभी जसे आपण गणपतीचे आवाहन करतो, तसेच आवाहन ब्रह्मणस्पतीलाही केलेले आहे आणि त्याचाच मंत्र परंपरेने गणपतीच्या पूजेत स्वीकृत झाला आहे. तो मंत्र असा –

**गणानां त्वा गणपतिं हवामहे**
**कविं कवीनामुपमश्रवस्तमम् ।**
**ज्येष्ठराजं ब्रह्मणां ब्रह्मणस्पत**
**आ नः शृण्वन्नूतिभिः सीद सादनम् ।।**

(ऋ. २. २३. १)

अर्थ—समुदायाचा प्रभू म्हणून तू गणपती. ज्ञानी जनांत तू अत्यंत ज्ञानी. कीर्तिवंतांमध्ये तू वरिष्ठ. तूच राजाधिराज. तुला आम्ही आदराने बोलावतो. तू आपल्या सर्व शक्तींसह ये आणि या आसनावर विराजमान हो.

तात्पर्य हे, की इतिहासाच्या ओघात अनेक जमातींच्या देवतांचे एकीकरण होत होत अथर्वशीर्षोक्त गणपती सिद्ध झाला. पुढे त्याच्यामध्ये वैदिक ब्रह्मणस्पतीचेही काही धर्म बेमालूमपणे मिसळले गेले. वेदकाली ब्रह्मणस्पतीला गणपती म्हणत. त्यानंतर वैदिकांनी त्याच आधारे गणपतीला ब्रह्मणस्पती म्हटले आणि गणेश देवतेचा वैदिक परंपरेशी सांधा जोडला. तमिळनाडमध्ये आजही गणपतीला ब्रह्मणस्पती म्हणण्याचा प्रघात आहे.

**शिव-गणपती** – सांप्रत गणपतीला आपण शिव परिवारातला आणि शिवपुत्र मानतो. पण अशी एक कल्पना आहे, की शिव आणि गणेश या देवता पूर्वी एकरूपच होत्या. म्हणजे जो शिव तोच गणेश आणि जो गणेश तोच शिव होता. अथर्वशीर्षात गणेशाला उद्देशून 'त्वं ब्रह्मा त्वं विष्णुस्त्वं रुद्रः' असे जे म्हटले आहे, ते केवळ तात्त्विक दृष्टीनेच खरे आहे असे नव्हे; तर दैवतशास्त्राच्या दृष्टीनेही ते खरे असले पाहिजे, अशी संशोधकाची धारणा आहे. गणेश व शिव यांचे साम्य व साधर्म्य सहज कळावे इतके ठळक आहे. भालचंद्र, तृतीय नेत्र व नागभूषणे ही तीन शिवाची वैशिष्ट्ये होत. ही तीन्ही गणेशमूर्तीतही आढळतात. गणेशाला भालचंद्र असे नाव आहे. 'गजवदनमचिन्त्यम्' या गणेशाच्या ध्यानश्लोकात त्याला

करीत ते स्थान हत्तीविषयी प्रसिद्ध आहे. म्हणूनच गणपती किंवा विनायक याला गजानन हे अभिधान देण्यात आले.

शिवाच्या गजचर्मावरून एक गजोपासक अनार्य संघ शिव-भक्तांत होता, असे दिसते. गज हे त्याचे चिन्ह होते. भृशुंडीच्या कथेवरून आर्येतरात गजानुयायी लोक होते व ते हत्तीचे रूपडे आपल्या तोंडावर घालीत हे कळून येते. गजमुख गणपती हा प्रारंभी याच लोकांचा देव असावा.

दिवसेदिवस आर्येतराचा आर्य संस्कृतीत अधिकाधिक प्रवेश होऊ लागला व आर्यांनी या आर्येतरांना व्रात्य या नावाने आपल्या आर्य संघाचे अवयव बनवले. अशा या संयोगकालात गणपती या देवतेचे प्रस्तुत रूप तयार झाले असावे. या संबधाची एक उपपत्ती लो. अणे यांनी पुढीलप्रमाणे मांडली आहे—

गणपत्यथर्वशीर्षात गणपतीला 'नमो व्रातपतये' असे नमन केलेले आहे. व्रातपती म्हणजे व्रात्यांचा पती होय. व्रत-प्रधान व यज्ञविरहित अशा आर्येतरांच्या संघाला आर्यांनी व्रत हे नाव दिले या व्रतसंघातील लोक ते व्रात होत. 'व्रात इव व्रात्यः' व्रातासारखे ते व्रात्य समजावेत. संस्कारहीन द्विजाला व्रात्य म्हणत. गृत्समद हा एक वैदिक ऋषी असून तो सर्वश्रेष्ठ गणपतिभक्त मानला जातो. त्याची जन्मकथा विचारात घेतली, तर तो वर्णसंकरातून उत्पन्न झाला होता, हे स्वच्छ कळते. वर्णसंकरातून उत्पन्न झालेल्या जातीला व्रात्य म्हणावे, अशी बौधायनाने त्या शब्दाची व्याख्या दिलेली आहे. व्रात हे वन्य श्वापदाची शिकार करून उपजीविका करीत. गृत्स, व्रात, गण, विरूप, असे शब्द रुद्राध्यायात येतात. हे शब्द त्या त्या नावांच्या मानवसंघाचे सूचन करतात. या शब्दांचा गणपति-देवतेशी निकटचा संबंध आहे. गणपतीला कुठे कुठे गृत्समद असेही म्हटले आहे. या शब्दाने मदस्राव करणाऱ्या हत्तीचे सूचन होते. व्रात म्हणजे व्रत-वैकल्यादी देहदंडनात्मक धर्म आचरणारे लोक होत. विरूप या शब्दाने निरनिराळ्या प्राण्यांची रूपडी घालून किंवा त्यांची सोंगे घेऊन हे लोक मिरवीत असत, असे दिसते.

गणेश ही देवता अवैदिक आहे, आर्येतरांची आहे, असे मत बहुतेक पाश्चात्य विद्वानांनी प्रतिपादिले आणि आपल्याकडील आंग्लविद्याविभूषित पंडितांनीही पुष्कळ अंशी त्याचाच अनुवाद केला. पण सनातनी पंडितांना हे प्रतिपादन रुचले नाही. त्यांनी गणेश ही संपूर्णतया वैदिक देवता आहे, असे मत आग्रहाने प्रति-पादण्यास सुरुवात केली. या बाबतीत त्यांनाही परंपरेचा आधार सापडला. अथर्ववेदात गणपत्यथर्वशीर्ष नावाचे एक उपनि-षद विद्यमान आहे. गणपतीचे समग्र स्वरूप त्यात दिलेले आहे. आणि त्या दृष्टीने गणेश ही देवता वैदिक ठरते. इतकेच नव्हे; तर ऋग्वेदातले ब्रह्मणस्पतिसूक्त हेही गणपतीचेच सूक्त आहे, असे सनातनी पंडिताचे म्हणणे आहे. ब्रह्मणस्पती ही एक वैदिक देवता आहे. तिच्या सूक्तात तिला गणपती या नावाने आवा-हन केलेले आहे अथर्वशीर्षातला गणपती लोकमान्य झाल्या-नंतर हा वैदिक ब्रह्मणस्पती त्याचा पूर्वावतार समजला गेला. गणपती हा जसा ज्ञानदाता देव आहे, तसाच ऋग्वेदातला ब्रह्मणस्पतीही आहे. गणपतीच्या हातात जसा सुवर्णपरशू आहे, तसाच तो ब्रह्मणस्पतीच्याही हातात आहे. कार्यारंभी जसे आपण गणपतीचे आवाहन करतो, तसेच आवाहन ब्रह्मणस्पती लाही केलेले आहे आणि त्याचाच मंत्र परंपरेने गणपतीच्या पूजेत स्वीकृत झाला आहे. तो मंत्र असा —

**गणानां त्वा गणपतिं हवामहे**
**कविं कवीनामुपमश्रवस्तमम् ।**
**ज्येष्ठराजं ब्रह्मणां ब्रह्मणस्पत**
**आ नः शृण्वन्नूतिभिः सीद सादनम् ।।**

(ऋ. २. २३. १)

अर्थ—समुदायाचा प्रभू म्हणून तू गणपती. ज्ञानी जनांत तू अत्यंत ज्ञानी. कीर्तिवंतांमध्ये तू वरिष्ठ. तूच राजाधिराज. तुला आम्ही आदराने बोलावतो. तू आपल्या सर्व शक्तीसह ये आणि या आसनावर विराजमान हो.

तात्पर्य हे, की इतिहासाच्या ओघात अनेक जमातीच्या देव-तांचे एकीकरण होत होत अथर्वशीर्षोक्त गणपती सिद्ध झाला. पुढे त्याच्यामध्ये वैदिक ब्रह्मणस्पतीचेही काही धर्म बेमालूमपणे मिसळले गेले. वेदकाली ब्रह्मणस्पतीला गणपती म्हणत. त्या-नंतर वैदिकांनी त्याच आधारे गणपतीला ब्रह्मणस्पती म्हटले आणि गणेश देवतेचा वैदिक परंपरेशी सांधा जोडला. तमिळ-नाडमध्ये आजही गणपतीला ब्रह्मणस्पती म्हणण्याचा प्रघात आहे.

**शिव-गणपती** — सांप्रत गणपतीला आपण शिव परिवारातला आणि शिवपुत्र मानतो. पण अशी एक कल्पना आहे, की शिव आणि गणेश या देवता पूर्वी एकरूपच होत्या. म्हणजे जो शिव तोच गणेश आणि जो गणेश तोच शिव होता. अथर्वशीर्षात गणेशाला उद्देशून 'त्वं ब्रह्मा त्वं विष्णुस्त्वं रुद्रः' असे जे म्हटले आहे, ते केवळ तात्त्विक दृष्टीनेच खरे आहे असे नव्हे; तर दैवतशास्त्राच्या दृष्टीनेही ते खरे असले पाहिजे, अशी संशोधकांची धारणा आहे. गणेश व शिव यांचे साम्य व साधर्म्य सहज कळावे इतके ठळक आहे. भालचंद्र, तृतीय नेत्र व नागभूषणे ही तीन शिवाची वैशिष्ट्ये होत. ही तीन्ही गणेशमूर्तीतही आढळतात. गणेशाला भालचंद्र असे नाव आहे. 'गजवदनमचिन्त्यम्' या गणेशाच्या ध्यानश्लोकात त्याला

त्रिनेत्रही म्हटले आहे. गणेशाच्या कमरेभोवतीही नागबंध आहे. शंकराने हालाहल प्राशन केल्यानंतर तज्जन्य दाह शांत करण्यासाठी त्याने सूर्यभूषणे घातली व मस्तकी चंद्र धारण केला, अशी कथा आहे. गणेशाबद्दलही अशीच कथा गणेशपुराणात आढळते. अनलासुर अग्निरूपाने जग जाळीत सुटला, तेव्हा त्याचे गणेशाने भक्षण केले. मग त्याचा दाह शांत करण्यासाठी देवांनी गणेशावर सर्प, चंद्र, इ. शीतलोपचार केले. डॉ. संपूर्णानंद यानी शिव आणि गणेश यांच्यामधील आणखी काही समान वैशिष्टचे दाखवली असून हे दोन देव मुळात अभिन्न असावे, असा तर्क मांडला आहे. तो असा—



अष्टभुज गणपती — नृत्यमुद्रेत (पुरुषार्थ)

तैत्तिरीय आरण्यकात रुद्रगायत्री व गणेशगायत्री यांच्याशी साम्य असलेला एक मंत्र आहे. तो असा— 'तत्पुरुषाय विद्‌महे वक्रतुण्डाय धीमहि। तन्नो दन्तिः प्रचोदयात्।' या मंत्रातील तत्पुरुष हे रुद्राचे नाव आहे; तर वक्रतुड आणि दन्ती ही नावे सांप्रत गणेशाची म्हणूनच ओळखली जातात. यावरून तैत्तिरीय आरण्यकाच्या काळात तत्पुरुषाला म्हणजे शिवाला वक्रतुंड आणि दन्ती असेही म्हणत असत, असे दिसते.

रुद्र व गणेश यांच्या प्राक्कालीन अभिन्नत्वाचा आणखी एक पुरावा तै. संहितेत आढळतो. हा पुरावा उंदरासंबंधीचा आहे. उंदीर हा गणेशाचा पशू आहे, असे गणेशविज्ञानात सांगितले आहे. पण संहितेतील मंत्र सांगतो, ते असे— 'हे रुद्रा, उंदीर हा तुझा पशू आहे.' (तै. सं. १·८·६). या मंत्रावरून असे वाटते, की तत्पुरुष रुद्रापासून वक्रतुंड, दंती असा गणेश जेव्हा भिन्न मानला जाऊ लागला, तेव्हा उंदीर हा रुद्राऐवजी गणेशाचा पशू ठरला असावा.

पुराणांतरीही या अभिन्नत्वाचे काही उल्लेख सापडतात. वराहपुराणात विनायकाला शिवाने उत्पन्न केले व विनायक हा साक्षात रुद्रच आहे, असे सागितले आहे. अग्निपुराणात गणेशाला त्रिपुरान्तक म्हटले आहे; तर वायुपुराणात शिवाला लंबोदर व गजेन्द्रकर्ण म्हटले आहे. गणेश हा वास्तविक शिवच आहे, असे सौरपुराणही म्हणते. श्री. पु. रा. बेहरे म्हणतात, की शिव–गणेशांचे हे ऐक्य गणेशाच्या उपासनेतही प्रकट झाले आहे. शिवाप्रमाणेच गणेशाचीही लिंगरूपाने पूजा होते. गं हा गणेशाचा बीजमंत्र आहे. तेच अग्नीचेही बीज आहे आणि 'अग्निर्वै रुद्रः' म्हणून अग्नि–रुद्रांना अभिन्न मानलेले आहे. तंत्रशास्त्रात गणेशाचे तत्त्व तेज हेच मानलेले आहे. तेजस्तत्त्व यंत्रशास्त्रात त्रिकोणाने दाखवतात. गणेशयंत्रात गणेशमूर्ती त्रिकोणात दाखविलेली असते.

श्री. पु रा. बेहरे यानी पुढील लौकिक चालीरीतीतल्या काही गोष्टी दाखविल्या आहेत, त्याही शिव-गणेशांच्या अभिन्नत्वाला पोषक ठरतात— दक्षिण कोकणात गणपतीच्या पूजेपूर्वी गणेशमूर्तीच्या आसनाखाली शिवाची पूजा करतात. शीमंतकातल्या बारदेश भागात काही कुटुंबात गणेश चतुर्थीच्या दिवशी गणेशमूर्तीची पूजा न करता शिवमूर्तीचीच पूजा करतात.

**गणपतीची नावे**— सायंकालीन स्तोत्रपाठात गणपतीचे स्तोत्र प्रारंभी म्हणायचा प्रघात आहे. या स्तोत्रात गणपतीची बारा नावे पुढीलप्रमाणे दिली आहेत—

**प्रथमं वक्रतुण्डं च एकदन्तं द्वितीयकम्।**
**तृतीयं कृष्णपिङ्गाक्षं गजवक्त्रं चतुर्थकम्॥**
**लम्बोदरं पञ्चमं च षष्ठं विकटमेव च।**
**सप्तमं विघ्नराजेन्द्रं धूम्रवर्णं तथाष्टमम्॥**
**नवमं भालचन्द्रं च दशमं तु विनायकम्।**
**एकादशं गणपतिं द्वादशं तु गजाननम्॥**

या प्रत्येक नावामागे काहीतरी इतिहास आहे आणि त्याच्या काही कथाही पुराणांतरी आहेत. त्यातील नावांचे विवेचन पुढीलप्रमाणे —

एकदंत — गणपतीच्या अनेक लोकप्रिय नावांपैकी हे एक नाव आहे. गणपतीचा एक दात मोडलेला आहे; इतकेच नव्हे, तर मोडलेला दात एक आयुध म्हणून त्याने आपल्या हाती धरून ठेवलेला आहे. गणपतीला प्रथम दोन दात होते आणि पुढे तो एकदंत झाला, असे सांगणाऱ्या खूप कथा आहेत—

(अ) शंकराने क्रुद्ध होऊन त्याचा एक दात मोडला.

(आ) गणपतीशी युद्धप्रसंग आला असता परशुरामाने आपला परशू फेकून गणपतीचा एक दात मोडला.

(इ) गणपतीने स्वतःच स्वतःवर क्रुद्ध होऊन स्वतःचा एक दात मोडला (आणि आपल्याकडे उपहासाने) पाहून हसणाऱ्या चंद्रावर फेकून मारला.

(ई) गजमुख नावाच्या असुराशी गणेशाचे युद्ध चालू असता त्या असुराने गणेशाचा एक दात मोडला व तो मोडलेला दात हाती घेऊन गणेशाने गजमुखासुरावर प्रहार केला.

(उ) विनायक अवतारात देवांतकाशी युद्ध सुरू असता त्या असुराने गणपतीचा एक दात मोडला. मग तोच मोडलेला दात घेऊन गणपतीने देवातकाच्या मस्तकाचे सहस्रशः तुकडे केले.

गणपतीच्या एकदंताची आणखीही एक उपपत्ती सागतात– गणपती ही कृषिदेवता आहे. ती निरनिराळ्या कृमिकीटकादी उपद्रवापासून शेतीचे रक्षण करते, असे समजतात. गणपतीचे शूर्पकर्ण म्हणजे धान्य पाखडण्याची साधने व त्याचा तो एकदंत म्हणजे शेतीचे मुख्य अवजार असलेल्या नांगराचा फाळ होय, अशी कल्पनाही काही लोकांनी केलेली आहे.


नटेश गणेश – वेदारण्यम्

गजवक्त्र – गणेशाचे मुख हे हत्तीचे मुख आहे. त्या विषयीच्या कथा व विवेचन वर आलेले आहे.

विनायक – विनायक हे गणेशाचे एक लोकप्रिय नाव आहे. लोकांत विघ्ने उत्पन्न करण्यासाठी विधात्याने विनायकाला उत्पन्न केले, अशी कथा पुराणात आहे. या नावाचे सहा गण यज्ञवल्क्यस्मृतीत सांगितले आहेत, ते पुढीलप्रमाणे–

**मितश्च संमितश्चैव तथा शालकटङ्कटौ ।**
**कूष्माण्डो राजपुत्रश्चेत्यन्ते स्वाहासमन्वितैः ।।**

(१.२८५)

अर्थ – मित, संमित, शाल, कटकट, कूष्मांड, व राजपुत्र, या सहा नावांच्या शेवटी स्वाहा अशी अक्षरे जोडून (हवन करावे).

विनायकगणांची सहा ही संख्या सर्वमान्य आहे. मानवगृह्यसूत्र व बौधायनगृह्यसूत्र या सूत्रात विनायकाची माहिती आलेली आहे, तिचा सारांश असा–विनायकगण विघ्नकारी, उपद्रवकारी आणि क्रूर असे आहेत. त्यांचा उपद्रव सुरू झाला, की माणसे वेड्यासारखी वागू लागतात. त्याना दुष्ट स्वप्ने पडतात व सतत भय वाटत राहते. या विनायकगणाची बाधा नष्ट होण्यासाठी धर्मशास्त्रात अनेक शांतिविधी सांगितले आहेत. गणपती हा विनायक म्हणजेच या विनायकाचा अधिपती होय. विनायक आणि गणेश यांचा संबंध कसा जुळला, त्याची कथा वराहपुराणात दिली आहे, ती पुढीलप्रमाणे–

सज्जनाच्या कार्यात विघ्ने येतात आणि दुष्टांची कार्ये निर्विघ्न पार पडतात, यावर काय उपाय करावा, अशी चिंता एकदा देवांना व ऋषींना उत्पन्न झाली. मग ते रुद्राकडे गेले. रुद्राला त्यांनी आपली चिंता सांगितली. ती ऐकून रुद्र उमेकडे टक लावून पाहू लागला. त्यासरशी त्याच्या मुखापासून एक सुंदर व तेजस्वी कुमार निर्माण झाला. तो जणू प्रतिरुद्रच दिसत होता. त्याला पाहून उमा क्रुद्ध झाली. त्याचे ते प्रतिरुद्ररूप तिला आवडले नाही. तिने त्याला शाप दिला, की 'तू गजमुख, लंबोदर व सर्पवेष्टित होशील.' शंकराला उमेच्या या शापाचा राग आला. त्याने आपले शरीर हाताने घासले. त्यासरशी शिवाच्या शरीरातून गजमुख, वक्रतुंड, नीलवर्ण, नानाशस्त्रधारी असे विनायकगण उत्पन्न झाले. ते पाहून देव घाबरले. इतक्यात ब्रह्मदेवाने आकाशवाणीच्या द्वारे देवांना सांगितले. 'देव हो, तुमच्या कल्याणासाठीच शंकराने हे विनायक उत्पन्न केले आहेत.' मग तो शंकराला म्हणाला. 'तुझ्या मुखापासून जो कुमार उत्पन्न झाला आहे, त्याच्या अधिकारात हे गण राहू देत. तू सर्वांना वर दे.' त्यावर शंकर आपल्या पुत्राला म्हणाला. 'तुला गजमुख, गणेश व विनायक अशी नावे प्राप्त होतील. क्रूर असे हे विनायकगण तुझे सेवक होतील. यापुढे यज्ञादी कार्यात तुझी पूजा प्रथम होईल. जो कोणी ती करणार नाही, त्याच्या कार्यसिद्धीस तू खुशाल विघ्ने आण.'

त्या दिवसापासून कार्यारंभी गणपतिपूजन होऊ लागले. विनायकगण हे विघ्नरूप होते; पण विनायक हा विघ्नहर्ता ठरला. भक्तांना अभीष्टसिद्धी प्राप्त करून देणारा तो सिद्धिविनायक बनला.

विघ्नकर्त्या विनायकाचे विघ्नहर्त्या गणेशात रूपांतर होण्याची ही प्रक्रिया गुप्तकालात घडून आली, असा म. म. काणे यांचा अंदाज आहे. गुप्तकालात सर्व पुराणग्रंथांना नवा उजळा मिळाला. त्यात गणपतीचे हे नवे स्वरूप पुढे आले. स्मृतिकारांची गणपतिनिंदा लोकांच्या स्मरणातून विलुप्त झाली आणि लोकमानसात गणपतीला पूज्य देव म्हणून स्थान

प्राप्त झाले. गुप्तकालापुढच्या सर्व पुराणवाङ्मयात गणपतीची एकमुखी प्रशंसा आढळते.

मूषकवाहन – गणपतीला मूषकवाहन किंवा मूषकध्वज अशी नावे आहेत. मूषक म्हणजे उंदीर. हा छोटासा प्राणी लंबोदर महाकाय गणपतीचे वाहन बनावा, हे विस्मयजनक आहे. गजाननाला हे वाहन कसे प्राप्त झाले, याबद्दल पुराणात निरनिराळ्या कथा आहेत. त्यापैकी गणेशपुराणातली कथा अशी––

क्रौंच नावाचा एक गंधर्व होता. तो इंद्रसभेत वावरत असता चुकून त्याची लाथ वामदेवाला लागली. वामदेवाने क्रुद्ध होऊन त्या गंधर्वाला 'तू मूषक होशील,' असा शाप दिला. लगेच तो गंधर्व उंदीर बनला व पराशराच्या आश्रमात आला. त्याने त्या आश्रमातले पदार्थ खाऊन पराशराला सतावून सोडले. पराशराने गणेशाची प्रार्थना केली. गणेश प्रकट होऊन त्याने त्या उंदरावर पाश टाकला. उंदीर शरण आला. तेव्हा गणपतीने प्रसन्न होऊन त्याला म्हटले, की 'तुला हवा तो वर माग.' पण लगेच उंदीर चढेल बनला. त्याने गणपतीला म्हटले, की 'तूच माझ्याकडे वर माग.' त्याचा हा उद्दामपणा पाहून गणपती त्याला म्हणाला, की 'आजपासून तू माझे वाहन हो.' त्या दिवसापासून उंदीर हा गणपतीचे वाहन बनला.


शक्तिसहित हेरंब – तिबेट (पुरुषार्थ)

या मूषकवाहनाचा सामाजिक अर्थ श्री. अ. ज. करंदीकर यांनी सांगितला आहे, तो असा– गजमुखाचे वाहन मूषकच का, याचा उलगडा कनिष्काच्या इतिहासावरून होऊ शकतो. कनिष्काच्या वेळी उत्तर-सिंध प्रांताला मूषकजनपद म्हणत असत. या मूषकांचे गजजनपदाशी सख्य असल्याने गणेश जेव्हा गजमुख बनला, तेव्हाच त्याचे वाहन म्हणून मूषकही त्याच्या शेजारी येऊन बसला.

गणपत्यथर्वशीर्षात गणपतीला मूषकध्वज म्हटले आहे. त्यावरून ज्या जनपदात गजमुख गणेशाला प्रतिष्ठा मिळाली, त्या जनपदाचा ध्वज मूषक-चिन्हांकित असावा. गणपतीचे मूर्तीकरण होताच ध्वजावरचा मूषक त्याचे वाहन म्हणून त्याच्या आसनाखाली आला असावा.

मूषक व गणपती यांचा तात्त्विक अर्थ एलिस गेअटी यांनी आपल्या श्री गणेश या ग्रंथात सांगितला आहे. दिवसा पृथ्वीच्याखाली लपलेला अंधार हाच मूषक होय. सूर्य मावळताच तो लपत छपत पृथ्वीवर येतो व पृथ्वीवर भ्रमण करतो. गणेश म्हणजेच सूर्य होय. गणपती उंदरावर स्वार होतो याचा अर्थ, सूर्य उगवताच अंधार त्याच्या खाली दबतो, असा आहे.

**आध्यात्मिक गणपती** – गणेशाचे स्वरूप ऐतिहासिक दृष्टीने कसे सिद्ध होते किंवा त्याच्या स्वरूपाचा ऐतिहासिक अर्थ कसा लागतो, हे वरील विवेचनावरून कळते. पण त्याचे महत्त्व गणेशभक्तांना मुळीच वाटत नाही. ते त्याचे आध्यात्मिक स्वरूपच तेवढे खरे मानतात. गणपत्यथर्वशीर्षात त्याच्या आध्यात्मिक स्वरूपाचे सार सांगितले आहे, ते असे –

हे गणेशा, तू तत्त्व आहेस. तू प्रत्यक्ष ब्रह्म आहेस. तू आत्मा आहेस. तू ज्ञानमय आणि विज्ञानमय आहेस. एवंच तू सर्व काही आहेस.

वेदान्त्यांनी आणि तत्त्वचिंतकांनी तर गणपतीला वाङ्मयाच्या तळाशी आणि नादाच्या मुळाशी नेऊन बसविले आहे. योगविद्येत तो जसा मूलाधारचक्रावर अधिष्ठित आहे, तसा वाग्विद्येत तो ॐकाररूप आहे. ॐकार हे सर्व शब्दांचे मूळ असून ते गणेशाचे एक विशेष नाम आहे. ॐ आडवा असतो, तो जर उभा केला, तर तिथे गजवदनाची प्रतीती येते. प्रणवोपासना ही गणेशोपासना आणि गणेशोपासना ही साक्षात ब्रह्मविद्या मानलेली आहे. गणपत्यथर्वशीर्ष वरवर ऐकले, तरी या गोष्टीची कल्पना येऊ शकते. मुद्‌गलपुराणात गज शब्दाचा अर्थ दिला आहे, तो असा– ग = जिथे सर्वांचा लय होतो, ते तत्त्व आणि ज = ज्याच्यापासून सर्वांचा जन्म होतो, असे तत्त्व होय. अर्थात गज म्हणजे ब्रह्मच असून ते गणेशाचे मस्तक आहे.

चिंतामणी हे गणपतीचे आणखी एक नाव आहे. क्षिप्त, मूढ, विक्षिप्त, एकाग्र व निरोधक अशा चित्ताच्या पाच भूमिका आहेत. त्यांना प्रकाशित करणारा, तो चिंतामणी होय. चिंतामणीच्या भजनाने चित्तपंचकाचा नाश होऊन पूर्ण शांतीचा लाभ होतो. ही उपपत्ती मुद्‌गलपुराणात दिलेली आहे. गणपतीच्या इतर अनेक नावांचाही तात्त्विकांनी अध्यात्मपरच अर्थ लावला आहे. एकनाथ महाराजांना गणपती पार्थिव स्वरूपात न दिसता ब्रह्मस्वरूपातच प्रतीत झाला आहे. वक्रतुंड या नावातले वक्र ती माया व तुंड ते ब्रह्म होय. वक्रतुंड म्हणजे

मायेचा अधिष्ठाता परमेश्वर असा अर्थ नाथांनी सांगितला आहे. लंबोदर शब्दाची व्युत्पत्ती ते पुढीलप्रमाणे सांगतात–

**तुजमाजी वास चराचरा। म्हणोनि बोलिजे लंबोदरा।**
**यालागी सकळांचा सोयरा। साचोकारा तू होसी॥**
**सुखाचे पेलले दोंद। नाभी आवर्तला आनंद।**
**बोधाचा मिरवे नागबंद। दिसे सन्निध साजिरा॥**

गणपतीला रक्तवस्त्र, रक्तपुष्प व रक्तचंदन यांचीच आवड का, तसेच तो रक्तवर्णही का, या गोष्टीचीही उपपत्ती लावलेली आहे. ज्या मूलाधार चक्राचा तो स्वामी, ते चक्र आणि तिथले कमल ही दोन्ही लाल आहेत. गणपतीचे ज्योतिःस्वरूप पाहिले तर अग्नी आणि उदयारूढ सूर्य यांच्या वर्णात लाल रंगच प्रमुख आहे. गणपती हा सृष्टिकर्ता म्हणजे रजोगुणी असून रजाचा रंग तांबडाच आहे. मुद्गलपुराण सांगते, की गणेशाने आपल्यासारखे व्हावे, म्हणून रक्तवर्णाने कठोर तप केले आणि गणेशाने कृपावंत होऊन त्या वर्णाचा स्वीकार केला. सिंदुरासुराचे रक्त गणेशाने आपल्या अंगाला माखले व तो रक्तवर्ण बनला, अशी दुसरी एक कथा आहे. ऐतिहासिकाचा तर्क असा, की गणपती आणि तत्सम वन्य देव हे बलिदान केलेल्या पशूच्या रुधिराने रंगले आहेत.

**चतुर्थी**– चतुर्थी ही गणेशाची प्रिय तिथी आहे. शुक्ल पक्षातल्या चतुर्थीला विनायकी चतुर्थी व वद्य चतुर्थीला संकष्टी चतुर्थी म्हणतात. या दोन्ही तिथींना गणेशाचे व्रत सांगितले आहे. गणेशचतुर्थी ही भाद्रपद शुक्ल पक्षातली तिथी गणेशोपासनेतली प्रमुख तिथी मानतात. तात्त्विकांना या चतुर्थीतही एक रहस्य सापडले आहे. चतुर्थी म्हणजे जागृती–स्वप्न–सुषुप्तीच्या पलिकडची तुरीया अवस्था तेच जीवाचे परम साध्य होय. त्या दिवशी चंद्र पाहायचा नाही, कारण चंद्र ही मनाची संतती आहे. ग्रहमालेत चंद्र चंचल तसे शरीरात मन चंचल आहे. हे मन जेव्हा उन्मन होईल, तेव्हाच तुरीयावस्था सिद्ध होईल.

चंद्राला प्रत्यक्षच गणेश मानणारी एक कल्पना आहे. गणेश हा पार्वतीचा पुत्र होय. पार्वती म्हणजे पर्वत धारण करणारी पृथ्वी. पृथ्वीतून चंद्र निघाला हे शास्त्रीय सत्य आहे. तेव्हा चद्र हा पार्वतीपुत्र ठरला. गणपती हा पार्वतीच्या मळातून म्हणजे मातीतूनच निर्माण झाला आहे. गणेश चतुर्थीच्या दिवशी चंद्रदर्शन करू नये, याचे कारण असे, की गणपतीच्या पार्थिव मूर्तीचे पूजन झाले असता, त्या मूर्तीवरची नजर काढून मूळ जो चंद्ररूपी गणेश त्याला पाहू नये. उत्सवमूर्ती रथात किंवा पालखीत ठेवल्यानंतर मूळ मूर्तीचे दर्शन घेऊ नये, अशी दक्षिण भारतात समजूत आहे. म्हणूनच पालखी किंवा रथ निघतेवेळी देवाच्या गाभाऱ्याचे दार बंद करतात किंवा त्याच्यावर पडदा सोडतात.

**दूर्वा-शमी-मंदार**– या तीन वनस्पती गणपतीला प्रिय आहेत. यातील दूर्वा ही साक्षात ब्रह्मदेवाच्या शरीरातून निर्माण झालेली एक सुंदर देवता होय. ब्रह्मदेवाने तिचे दूर्वा हे नाव ठेवले. तिने पुढे तप केले व ती गणेशाला प्रिय ठरली.

कालांतराने तिला आपल्या ऐश्वर्याचा गर्व झाला. ती जगदंबेहूनही स्वतःला श्रेष्ठ समजू लागली. तेव्हा पार्वतीने तिला तृणरूपाने पृथ्वीवर जन्म घेण्याचा शाप दिला. पुढे तप करून तिने त्या शापातून मुक्ती मिळवली. ती अंशरूपाने पृथ्वीवर राहून गणेशाच्या पूजेत आवश्यक बनली व उर्वरित अंशांनी स्वर्गात देवीरूपाने राहिली.

और्वऋषीला शमिका नावाची मुलगी होती. धौम्य ऋषीचा पुत्र मंदार याच्याशी तिचा विवाह झाला. त्यांच्या आश्रमांत एकदा भृशुंडी ऋषी आला असता त्याचे मोठे पोट व स्थूल शरीर पाहून ती दोघे त्याला हसली. तेव्हा भृशुंडीने त्यांना शाप दिला, की 'तुम्ही दोघे वृक्षयोनीत जन्म घ्याल.' त्याप्रमाणे ती दोघे शमी व मंदार बनली. पुढे मंदाराचा गुरू शौनक आणि सासरा और्व यांनी ज्ञानदृष्टीने त्या दोघांची ही दशा पाहिली. मग त्यांनी गणेशाला प्रसन्न करण्यासाठी तप आरंभिले. गणेश प्रसन्न झाला, तेव्हा ते म्हणाले, की 'शमी-मंदाराला पूर्व देह प्राप्त व्हावे.' त्यावर गणपतीने म्हटले, की 'भृशुंडीचा शाप खोटा ठरणार नाही. पण आजपासून मी मंदार वृक्षाच्या मुळाशी वास करीन व शमीपत्रे मला प्रिय होतील.' मंदार वृक्षाच्या मुळाची गणेशमूर्ती करतात आणि हा मांदारगणेश भक्तांना लवकर प्रसन्न होतो, अशीही समजूत आहे.

**तांत्रिक गणेश**– तंत्रशास्त्रात विघ्नराज गणेशाची मोठीच महती आहे. तंत्रशास्त्राच्या द्वारेच गणपती हा बौद्ध धर्मात प्रविष्ट झाला आहे. सर्व मंगल कार्यांच्या प्रारंभी नवग्रह व मातृका यांच्यासह गणेशपूजन केले पाहिजे, असा तंत्राचार्यांचा आदेश आहे. तंत्रशास्त्रात गुरुदीक्षा घेण्यापूर्वी एक दिवस गणपतीचे पूजन करावे लागते व गं या बीजमंत्राने षडंगन्यास करावा लागतो. तंत्रमार्गात गणेशाबरोबरच त्याच्या शक्तीचेही पूजन करतात. या शक्तीची नावे तीव्रा, ज्वालिनी, नंदा, भोगदा, इ. आहेत. वाममार्गी तांत्रिक अश्लील पद्धतीने गणपतीची उपासना करतात. तंत्रग्रंथामध्ये एकाच गणपतीचे अनेक प्रकार करून त्यांची विविध ध्याने सांगितली आहेत. शारदातिलक ग्रंथात एकाच महागणपतीच्या चारशे चाळीस ध्यानमूर्ती वर्णिल्या आहेत. महागणाधिपती, कुमारगणपती, हेरबसुत

नवनीतगणपती, स्वर्णगणपती, संतानगणपती, महागणपती, स्वर्गगणपती, ऊर्ध्वगणपती, हरिद्रागणपती, उच्छिष्टगणपती, लक्ष्मीगणपती, पिंगलगणपती, इ. त्यांची नावे आहेत. वाममार्गातील गणेशमूर्तीबरोबर त्याची शक्तीही असते व शक्तिसहित गणेश हा बहुधा नग्नच असतो.



शक्तिसहित गणेश

गं हा गणेशाचा बीजमंत्र आहे; पण गजानन, गणनाथ, गणनायक, गणपती, गणेश, गणेश्वर, या नावाचे वेगवेगळे बीजमंत्र तंत्रग्रंथांतून दिलेले आहेत. तंत्रशास्त्रात चौरगणपती नावाचा गणपती असून त्याचे माहात्म्य विशेषच आहे. या चौरगणपतीचा चौरमंत्र आहे. हा मंत्र जपल्याशिवाय आपल्या इष्ट देवतेचे पूजन केल्यास त्या पूजेतले तेज गणपती हरण करतो, असे सांगितले आहे. मानवशरीराला ११ द्वारे आहेत. प्रत्येक द्वाराच्या ठिकाणी चौरमंत्राचे दहा दहा पाठ केले, की ती द्वारे बंद होतात आणि मग त्या द्वारावाटे तेजाची चोरी होऊ शकत नाही.

याशिवाय तंत्रमार्गात गणेशाचे विविध मंत्र सांगितले असून त्यांची विधानेही दिली आहेत.

विघ्नेशमंत्र —'वक्रतुंडाय हुं' हा षडक्षरी मंत्र विघ्नेशाचा आहे. या मंत्राचा ऋषी भार्गव, छंद अनुष्टुभ, देवता विघ्नेश, बीज वं व शक्ती यं आहे. या मंत्राचा सहा लक्ष जप केल्याने मंत्र सिद्ध होतो व त्यामुळे सर्व विघ्नांचे निवारण होऊन इष्ट सिद्धी प्राप्त होतात.

शक्तिविनायकमंत्र — 'ॐ ह्रीं ग्रीं ह्रीं' हा चार अक्षरी मंत्र शक्तिविनायकमंत्र म्हणून सांगितलेला आहे. या मंत्राचा ऋषी भार्गव, छंद विराट, देवता शक्ति–विनायक, बीज ग्रीं व शक्ती ह्रीं आहे. याच्या चार लक्ष जपाने मंत्र सिद्ध होतो व जपकर्त्या पुरुषाला धनसंपदा, स्त्रिया व राज्य या गोष्टी प्राप्त होतात.

लक्ष्मीगणेशमंत्र — 'ॐ श्रीं गं सौम्याय गणपतये वरवरद सर्वजनं मे वशमानय स्वाहा' हा अठ्ठावीस अक्षरी मंत्र लक्ष्मी–गणेशमंत्र म्हणून प्रसिद्ध आहे. याचा ऋषी अंतर्यामी, छंद गायत्री, देवता लक्ष्मी–गणेश, बीज श्रीं व शक्ती स्वाहा आहे. छातीइतक्या खोल पाण्यात उभे राहून व सूर्यमंडळात मंत्रदेवतेची कल्पना करून तीन लक्ष जप केल्याने किंवा बिल्ववृक्षाच्या मुळाशी बसून तितकाच जप केल्याने मंत्र सिद्ध होतो व जपकर्त्याला धनसंपदा प्राप्त होते.

'कलौ चंडिविनायकौ' असे एक वचन आहे. त्याचा अर्थ कलियुगात अन्य देवतापेक्षा चंडी व गणपती हीच दैवते फलप्रद होतात, असा आहे. म्हणून भारतात आणि विशेषत्वाने महाराष्ट्रात गणपतीची अनेक प्रकारे उपासना होते. ग्रहबाधा, विघ्नबाधा, रोगबाधा, इ. दूर होण्यासाठी व मनकामना पूर्ण होण्यासाठी माणसे संकष्टीचे व्रत करतात, विनायकाची पूजा करतात, अथर्वशीर्षाची सहस्र आवर्तने करतात, मोदकांचे हवन करतात, लक्ष दूर्वा वाहतात आणि जपजाप्यादी गोष्टीही करतात.

**बौद्ध गणेश** — बौद्धाच्या तंत्रग्रंथातही गणेश ही देवता म्हणून सांगितली आहे. बुद्धाने आपल्या आनंद नावाच्या शिष्याला



गणेशी – शुचीद्रम्

रहस्यमय गणपतिहृदय नावाचा मंत्र सांगितला आहे. श्री. पु. रा. बेहेरे यांनी बौद्धधर्मातील गणपतीचे विवेचन केले आहे, ते पुढीलप्रमाणे—

बौद्ध धर्माबरोवर गणश भारताबाहेर अनेक देशात गेला. तिथे गणेशदेवतेच्या पूज्य अशा अनेक मूर्ती सापडतात, तशाच काही विचित्र मूर्तीही आहेत. तिबेट व तुर्कस्तान या प्रदेशात



गणपती–चिनी तुर्कस्थान (पुरुषार्थ)

गणेशमूर्ती मठाच्या द्वारावर रक्षक म्हणून बसवलेल्या दिसतात. भृकुटी, तारा, पर्णेश्वरी, अपराजिता आणि महाकाल या बौद्ध देवता गणेशावर पाय देऊन उभ्या आहेत अशाही मूर्ती तिबेट, तुर्कस्तान, चीन या प्रदेशात सापडतात. बौद्ध धर्माचा वैदिक किंवा हिंदू धर्मावर विजय दाखविण्याचा हेतू या मूर्तीच्या स्वरूपात स्पष्ट दिसतो. म्हणजे बौद्ध आचार्य गणेश ही सुरवातीला हिंदूची देवता म्हणून मानीत होते; पण तेच महायान बौद्ध अखेर 'गणपतिहृदय' मंत्र म्हणून गणेशाची उपासना करू लागले.

चिनी विद्वान भारतात आले, नालंदासारख्या विद्यापीठात शिकले आणि त्यांनी बौद्ध धर्माबरोबर भारतीय संस्कृती आणि गणेश यांना आदराने चीनमध्ये नेले. चीनमध्ये आणि जपानमध्ये गणेशाला कागि–तेन म्हणतात. गजमुख असलेल्या स्त्री-पुरुष प्रतिमा एकमेकांना दृढालिगन देत आहेत, असे या मूर्तींचे स्वरूप आहे. ही मूर्ती म्हणजे गणेश आणि त्याची शक्ती यांची जी ध्याने तंत्रशास्त्रात वर्णन केली आहेत, त्यांचेच एक स्वरूप आहे. या वाममार्गाच्या उपासनेचा संप्रदाय चिनी सम्राट चेनत्सुंगने आज्ञापत्र काढून बंद केला. तंत्रशास्त्रातील वाममार्गीय उपासना आज भारतातही नामशेषच झाली आहे.

गणपती ब्रह्मदेश, सयाम, कंबोडिया, जावा, बाली, बोर्निओ, तुर्कस्थान, चीन, जपान, मेक्सिको, इ. देशातही आढळतो. उपर्युक्त देशात त्याच्या असंख्य मूर्ती आहेत. मलायाद्वीपात पाषाणाच्या तशाच धातूच्याही गणेशमूर्ती आढळतात. जावामध्ये अनेक गणेशमूर्ती नदीच्या घाटावर आणि अन्य भयाण जागी आहेत. बालीमध्ये गणेशाची पूजा होते व तिथल्या राजाराणीचा मृत्यू झाल्यानतर त्याच्या मूर्ती बनवून त्या गणेशमूर्तीच्या उजव्या बाजूला स्थापन करतात.

**गणेशाचे अवतार** – गणपतीचे महोत्कट विनायक, गुणेश गणेश व धूम्रकेतू असे चार अवतार झाल्याचे गणेशादि पुराणात वर्णिले आहे –

महोत्कट विनायक – याचा जन्म कृतयुगात कश्यप-अदिती यांच्या पोटी झाला. या अवतारात त्याने देवान्तक व नरान्तक या राक्षसाना ठार मारून धर्मपरित्राण केले व अवतारसमाप्ती केली. या अवतारात इतरही अनेक पराक्रम त्याने केले आहेत. हे सर्व करीत असता त्याचे वाक्चातुर्य, संघटनकौशल्य, युद्धनीती, शौर्यधैर्य हे गुणविशेष प्रत्ययाला आले ( गणेश पु. क्रीडा. १ ).

गुणेश – त्रेतायुगात गणपतीने उमेच्या पोटी भाद्रपद शु. ४ थीस गुणेश नावाने जन्म घेतला. या अवतारात गणपतीने सिंधू दैत्याला ठार केले व सिद्धी-बुद्धी या ब्रह्मदेवाच्या कन्याशी विवाह केला.

गणेश – द्वापरयुगात पुनश्च पार्वतीच्याच पोटी गणपतीने गणेश या नावाने जन्म घेतला. पण जन्मतःच हा कुरूप निपजल्याने पार्वतीने त्याला रानात टाकून दिले आणि पराशर मुनीने त्याचा प्रतिपाळ केला. या गणेशाने सिंदुरासुराचा वध करून त्याने बंदीत टाकलेल्या अनेक राजाना आणि वीरांना मुक्त केले. याच अवतारात गणपतीने वरेण्य नामक आपल्या भक्ताला गणेशगीतेच्या रूपाने शाश्वत तत्त्वज्ञान उपदेशिले (गणेशगीता पाहा).



नृत्यगणपती – खजुराहो

धूम्रकेतू – कलियुगात धूम्रकेतू किंवा धूम्रवर्ण नावाचा

गणेशाचा चौथा अवतार होणार असून तो म्लेच्छांचा नाश करणार आहे, असे भविष्यपुराणान्तरी वर्णित आहे.

**गाणपत्य वाङ्मय** – व्यासरचित अठरा महापुराणाची दैवतवार विभागणी आहे. या पुराणात गणेशासंबंधीची पुराणे नाहीत. गणेशविषयक पुराणे ही उपपुराणे म्हणून ओळखली जातात. गणेशसंप्रदाय वाढू लागल्यानंतर गणेशाचे माहात्म्य ग्रथित करणारे साहित्य गणेशभक्तानी निर्माण केले. यात गणेशपुराणे, गणेशगीता, गणेशसहस्रनाम, गणेशस्तोत्रे, गणेशमंत्र-तत्रविधाने, इ. वाङमय येते. या सर्व वाङमयात गणेशपुराण हा गाणपत्यसंप्रदायाचा सर्वश्रेष्ठ ग्रंथ आहे. मुद्गलपुराणाचा क्रमांक दुसरा लागतो. याशिवाय ब्रह्मवैवर्तातील गणेशखंड, भविष्यातील ब्राह्मखंड, गणेशतापिनी, अथर्वशीर्ष, गणेश-हेरंबोपनिषद, स्कंद पुराणातील काशीखंडान्तर्गत विनायकमाहात्म्य, गणेशभागवत, गणेशदर्शन, इ. फार मोठे गणेशविषयक साहित्य उपलब्ध आहे. यातले बरेचसे साहित्य अद्यापि अप्रकाशित आहे.

**मूर्तिविज्ञान** – गणेशाचे मूर्तिध्यान गणपत्यथर्वशीर्षात दिले आहे, ते पुढीलप्रमाणे –

> **एकदन्तं चतुर्हस्तं पाशमङ्कुशधारिणम् ।**
> **रदं च वरदं हस्तैर्बिभ्राणं मूषकध्वजम् ।**
> **रक्तं लम्बोदरं शूर्पकर्णकं रक्तवाससम् ।**
> **रक्तगन्धानुलिप्ताङ्गं रक्तपुष्पैः सुपूजितम् ।**
> **भक्तानुकम्पिनं देवं जगत्कारणमच्युतम् ।**
> **आविर्भूतं च सृष्टयादौ प्रकृतेः पुरुषात्परम् ।**
> **एवं ध्यायति यो नित्यं स योगी योगिनां वरः ।**

अर्थ – एकदंत, चतुर्भुज, पाश व अंकुश धारण करणारा, एका हाती (मोडलेला) दात धारण करणारा व दुसऱ्या हाताची वरदमुद्रा असलेला, ज्याचा ध्वज मूषकचिन्हांकित आहे असा, रक्तवर्ण, लंबोदर, सुपासारखे कान असलेला, रक्तवस्त्र नेसलेला, अंगाला रक्तचंदनाचा अनुलेप लावलेला, रक्तपुष्पांनी पूजिलेला, भक्तावर दया करणारा, अच्युत, जगताचे कारण, सृष्टीच्या प्रारंभी प्रकट झालेला, प्रकृति-पुरुषांच्या पलिकडचा, अशा गणपतिदेवाचे जो ध्यान करतो, तो योगिजनांमध्ये श्रेष्ठ होय.

भारतीय चित्रकलेत व शिल्पकलेत गणपतीच्या मूर्तीला क्वचित दोन, तीन, चार व पाच मस्तके दाखवली जातात. त्याला एक ते तीन दांत दाखवतात. सामान्यतः त्याचे डोळे दोन; पण तंत्रमार्गात त्याला तिसरा भालनेत्र असतो. त्याच्या कपाळावर पांढऱ्या रंगाच्या तीन आडव्या रेषा आढळतात. त्याच्या डाव्या मांडीवर शक्तिरूपिणी स्त्री बसलेली असते व तिचा उजवा हात गणेशाच्या गळाभोवती असून डाव्या हातात बत्ताशांचे भांडे असते.

प्रारंभी गणपती हा द्विभुज होता व त्याच्या एका हातात परशू व दुसऱ्या हातात मूलक (मुळा) होता. पुढे मूर्तिविज्ञानाच्या विस्तारात त्याला चार, आठ, दहा व सोळा हात लागले. पुण्यात कोथरूड रस्त्यावर दशभुज गणेशाचे व मंगळवार पेठेत त्रिशुंड गणपतीचे मंदिर आहे. कित्येकदा गणपतीच्या हातात डाळिंब दाखविलेले असते. ते प्रजनन व समृद्धी याचे प्रतीक समजतात. शिवाय त्याच्या दुसऱ्या दोन हातात मोदक व परशू दाखवतात.

त्रिमुख गणपतीच्या मूर्ती जपानमध्ये, तर चतुर्मुख मूर्ती कंबोडियात आढळतात. क्वचित त्याच्या गळ्यात, तर क्वचित कमरेमध्ये सर्पवेष्टण असते. तिबेटात गणेशाला नारीरूपात भजतात. लॅटिन संस्कृतीतली जानुस ही देवता आणि भारतीय गणेश याच्यातले वर्णसाम्य उपेक्षणीय नाही. आपण जसा घराच्या वा मंदिराच्या मुख्य द्वारावर गणपती कोरतो, त्याप्रमाणे लॅटिन संस्कृतीतले लोकही जानुसची मूर्ती घरादारावर कोरीत असत.



शशिविकळु गणेशमूर्ती – द. भारत

उदीर हे गणपतीचे नित्याचे वाहन; पण त्याची इतरही वाहने आहेत. हेरंब गणपतीचे वाहन सिंह; तर मयूरेश्वराचे मोर आहे. गणपती कधी समभंग मुद्रेत, कधी पद्मासनस्थित, तर कधी नृत्यमुद्रेतही आढळतो. हरिद्रागणपती व ऊर्ध्वगणपती हे पिवळे असतात. पिंगलगणपती पिंगट वर्णाचा, तर लक्ष्मीगणपती शुभ्र वर्णाचा असतो हिमालयात एक मुंडकटा गणेश आहे. या मूर्तीला शिर नाही, हे नावावरूनच कळेल. पार्वतीने अंगमळापासून बनवलेल्या पुत्राचा शंकराने शिरच्छेद केला ती ही मूर्ती असल्याचे सांगतात.

गणेशाच्या मृण्मय मूर्तींची पूजा होते, हे सर्वांना माहीत आहे; पण इतरही अनेक स्वरूपात त्याची पूजा होत असते. द. भारतात पिळ्ळेयार या नावाने एका यज्ञकुंडाच्या स्वरूपात त्याची पूजा करतात. शंकराचार्यांनी पंचायतनात गणपतीला

स्थान दिले आहे. या पचायतनात नर्मदेतला तांबडा गोटा गणपती म्हणून ठेवतात. कित्येक ठिकाणी स्वयमू गणपतीही आहेत. त्यांना महासिद्धिदायक मानले आहे. अशा स्वयमू मूर्ती महाराष्ट्रात आणि काश्मीरमध्येही आहेत. शिवलिंगाप्रमाणेच गणपतीचेही लिंग असते. त्याला गाणपत्यलिंग म्हणतात. ते डाळिंबाच्या, लिंबाच्या, कोहळ्याच्या किंवा जांभळाच्या आकाराचे असते. डाव्या सोंडेची आणि उजव्या सोंडेची असे गणेशमूर्तीचे दोन प्रकार आहेत. सर्वसामान्य लोक डाव्या सोंडेची मूर्तीच पूजतात. उजव्या सोंडेचा गणपती कडक मानलेला असून, काही ठराविक घराण्यांतच त्याची पूजा होते. ज्ञानदेवांनी षड्भुज गणेशाचे स्तवन केले आहे (ज्ञाने. १. १०). हे ध्यान केवळ काल्पनिक नसून ते त्रेतायुगातील गणेश अवताराचे स्वरूप आहे, असे गणेशपुराणावरून कळते. कांगडा जिल्ह्यात वैजनाथ गावी षड्भुज गणेश आहे. इतरत्रही अशा मूर्ती सापडल्या आहेत.



द्विभुज गणपती – चादवड

हिमालयातील मुंडकटा गणेश इथपासून तो रामेश्वरापर्यंत सबंध भारतात गणपतीची लहानमोठी सहस्रावधी स्थाने आहेत. महाराष्ट्रात कुलाबा, पुणे व नगर या जिल्ह्यात अष्टविनायकांची क्षेत्रे आहेत. त्याशिवाय कळंब, सिदखेड, तिवरी, चिंचवड, गणपतीपुळे, इ. अनेक गणपतिक्षेत्रे महाराष्ट्रात आहेत.

**गणपतिमहिमा** – गणेशदेवतेचे सांप्रतचे स्वरूप हे अथर्वशीर्षाच्या रचनाकाळी निश्चित झाले. पुराणानी पुढे त्याच्या स्वरूपात काही भर घातली असली, तरी ‘एकदन्तं चतुर्हस्तं’ हे अथर्वशीर्षोक्त ध्यानच आसेतुहिमाचल पूज्य ठरले आहे. सहाव्या शतकाच्या प्रारंभीपासूनच गणेशमूर्ती आढळतात. पण गणपतीच्या स्वरूपाची जडणघडण त्यापूर्वी कित्येक शतके चालू होती. या संबंधात श्री. पु. रा. बेहेरे यांनी जे विवेचन केले आहे, त्याचा सारांश पुढीलप्रमाणे—

गृत्साचा गृत्सपती, गणाचा गणपती, व्राताचा व्रातपती, विरूपांचा विरूप अशा सर्वांचा वैदिक ब्रह्मणपतीमध्ये एकत्र समावेश होऊन गणेशाचे आजचे विशाल स्वरूप बनले असले पाहिजे. गणेशाची जी विविध लक्षणे आहेत, ती निरनिराळ्या लोकसमूहांच्या देवतांची वैशिष्ट्ये होती. गणेशाला गजमुख मागाहून मिळाले, ही गोष्ट अनेक पुराणानी स्वच्छ शब्दात सांगितली आहे. विनायकगणांची पूजा करणाऱ्या लोकसमूहाचा विनायक हा कालांतराने गणेशाशी एकरूप झाला. रुद्रदेवतेचे विनायकाशी सारूप्य असल्यामुळे शिव आणि गणेश यांचा अभेदही संभवनीय आहे.

ही एकीकरणाची प्रक्रिया हजारो वर्षे चालत आली असेल. अथर्वशीर्षाच्या पूर्वीच्या वाङ्मयात शोध घेता गणपतीची विविध रूपे आढळतात. एकीकरण झाल्यानंतर ती गणेशाची विविध वैशिष्ट्ये ठरली. अथर्ववेदात गणेशाचे स्वरूप व्यक्त झाले व त्याला आद्य मानही प्राप्त झाला. गणेशाच्या बाह्य



दशभुज हेरंब—नेपाळ. उजवा पाय सिंहावर, डावा उंदरावर (पुरुपार्थावरून)

स्वरूपाबरोबर त्याचे आध्यात्मिक स्वरूपही घडत गेले. नंतरच्या कालात गणेशाने नवी नवी क्षेत्रे पादाक्रांत केली.

महाभारताच्या लेखनासाठी तो व्यासमहर्षींचा लेखनिक झाला. तंत्रशास्त्रात त्याची उपासना विविध रीतीने प्रविष्ट झाली. पुराणांचे नवे संस्करण झाले, त्यात गणेशमाहात्म्य कळसाला पोचले. 'त्वं प्रत्यक्षं ब्रह्मासि' हे अथर्वशीर्षाने गणेशाला दिलेले ब्रह्मरूपत्व समाजाच्या सर्व थरात बिंबविण्याचे कार्य पुराणांनी केले. याच काळात गणेशोपासकांचे संप्रदायही वाढले. महागणाधिपती, कुमारगणपती, हेरंबसुत, नवनीतगणपती, स्वर्णगणपती व संतानगणपती असे हे गाणपत्य संप्रदाय होत. आज मितीस या संप्रदायाचा प्रसार फारसा नसला, तरी गणेशाचे माहात्म्य मात्र अबाधित आहे. सांप्रत गणपती हा मंगलमूर्ती अतएव सकल मंगलांचे मंगल ठरला आहे आणि म्हणूनच ग्रंथाच्या प्रारंभी त्याच्या नावाने मंगल करतात. या विषयीचा प्रसिद्ध श्लोक असा—

**विद्यारम्भे विवाहे च प्रवेशे निर्गमे तथा ।**
**सङ्ग्रामे सङ्कटे चैव विघ्नस्तस्य न जायते ।।**

अर्थ — विद्यारंभ, विवाह (व इतर सस्कार), प्रवेश, यात्रा, संग्राम व संकटकाल या वेळी जो विघ्नेश गणपतीचे पूजन वा स्मरण करील, त्याचे विघ्न दूर होईल. [म. ज्ञा. को.; ती. म.; अ. ते. का.; हिं. वि. को.; श्रीमगलमूर्ती; —पं. सातवळेकर; मं. मू. श्री.; श्रीगणेश — एलिस गेअटी; श्रीगणेश-डॉ. संपूर्णानंद; पुरुपार्थ-गणेशांक; मं. मू. मो.; गणेशमीमांसा]

(२) (१६ वे शतक) एक गुजराती कवी. भडोचजवळच्या आमोद गावाचा हा रहिवासी होता. हा जातीने कायस्थ असून याने माधवानल-कामकंदलादोग्धक नावाचे काव्य रचले आहे. या काव्याचे आठ विभाग असून त्यात एकूण पंचवीस हजार श्लोक आहेत. तत्कालीन सामाजिक प्रथांचे या काव्यात प्रतिबिंब पडलेले आहे. [मा. गु. लि.]

**गणपतीमुनी** (१८७८—१९३६ इ. स.) एक विद्वान ग्रंथकार. तमिळनाडमधील विशाखापट्टणम् जिल्ह्यातील कवलरायी गावच्या अय्यल सोमयाजीच्या कुटुंबात याचा जन्म झाला. पित्याचे नाव नरसिंहशास्त्री व मातेचे नाव नरसांबा. वयाच्या ६ व्या वर्षापर्यंत याचे शरीर रोगग्रस्त होते व त्याला वाचाही प्राप्त झाली नव्हती. पण पुढे वयाच्या १४ व्या वर्षापर्यंत त्याने संस्कृत, गणित, ज्योतिष, पंचमहाकाव्य, साहित्यशास्त्र या विषयांचा अभ्यास पूर्ण केला. त्याने स्वतःच्या आईची जन्मपत्रिका पाहून तिचा मृत्युदिन वर्तविला आणि तो अचूक ठरला. त्याच काळात त्याने सहस्रावधी संस्कृत श्लोक रचले आणि सरळ सोप्या भाषेत प्रवचने करण्यास प्रारंभ केला. नरसिंहशास्त्री श्रीविद्येचे उपासक होते. त्यांनी आपल्या मुलाला महागणपतीमंत्र, श्रीविद्या, पंचाक्षरी, नारायणाष्टाक्षरी, वाराही, चंडीनवाक्षरी, इ. अनेक मंत्रोपासना शिकवल्या.

छात्रावस्थेतच गणपतीचा विवाह झाला होता. पण त्याचे चित्त संसारात रमले नाही. १८ व्या वर्षी तो गोदातीरी पेरमा नामक अग्रहारात गेला व तिथे तप करू लागला. पुढे काशीस जाताना त्याने आपल्या बुद्धिवैभवाचे अनेक चमत्कार लोकांना दाखविले. मध्यंतरी कांही काळ त्याने संसारात घालविला आणि तेवढ्यात त्याला एक पुत्रही झाला. त्यानंतर तो बंगालमधील नवद्वीपात गेला. तिथे शास्त्री—पंडितांच्या साहित्य-परिषदेत प्रख्यात शीघ्रकवी अंबिका दत्त याचा वाग्युद्धात पराजय करून त्याने काव्यकंठ ही पदवी मिळविली.

गणपतीमुनीचे त्यानंतरचे जीवन प्रवास, तपश्चर्या व काव्यरचना यांत व्यतीत झाले. एकदा इंग्रज सरकारला त्याच्याविषयी राजद्रोहाचा संशय आला होता; पण तो निराधार ठरला. त्याने वैदिक वाङ्मयाचा अभ्यास केला, वैदिक मंत्र व देवता यांवर सूत्ररचना केली आणि उपनिषदातील उपासना-पद्धतीवर व्याख्यानेही दिली. त्याचे उर्वरित आयुष्य गोकर्ण-क्षेत्रात कदंबवंशी मयूरवर्मा महाराजांच्या आश्रयाखाली गेले. गणपतीमुनीच्या असाधारण काव्यशक्तीसंबंधी अनेक सत्यकथा कपालशास्त्री या त्यांच्या शिष्याने 'वसिष्ठवैभवम्' नामक संस्कृत ग्रंथात संकलित केल्या आहेत.

वयाच्या अठ्ठावन्नाव्या वर्षी गणपतीमुनीने आंध्रमधील त्रिपुरा येथील वैदिक संघाच्या आश्रमात देहत्याग केला. उमासहस्रम्, इंद्राणी, सप्तशती, शिवशतकम्, इ. नऊ स्तोत्रे; विश्वमीमांसा, महाविद्यासूत्रम्, राजयोगसारसूत्रम्, शब्दप्रमाणचर्चा (वेदांच्या अपौरुषेयत्वाचे खंडन), विवाहधर्मसूत्रम्, ईशोपनिषद्भाष्यम्, हे ग्रंथ; आयुर्वेद व ज्योतिष यांवर ५।६ ग्रंथ आणि महाभारतविमर्श हा प्रचंड ग्रंथ एवढी गणपतीमुनीची ग्रंथरचना आहे. [प्रा. वर्णेकर—विवेक, विजयादशमी विशेषांक शके १८८२]

**गणपत्यथर्वशीर्ष** हे एक नव्य उपनिषद असून ते अथर्ववेदाशी संबंधित आहे. यात गणेशविद्या सांगितली असून गणेशोपासकात या उपनिषदाला मोठा मान आहे. यात प्रथम गणपतीच्या सगुणब्रह्माची उपासना सांगून शेवटी तो गणपती म्हणजे परब्रह्मच होय, असे त्याचे उदात्तीकरण केले आहे. गणपती हा देहत्रयातीत असला, तरी 'ग' हे त्याचे तांत्रिक शरीर असून तोच त्याचा महामंत्रही आहे. या महामंत्राबरोबरच गणेशगायत्रीही दिलेली आहे—

**एकदन्ताय विद्महे वक्रतुण्डाय धीमहि ।**
**तन्नो दन्ती प्रचोदयात् ।।**

नंतर गणपतीचे दोन ध्यानश्लोक दिलेले आहेत. त्यापुढे गणपतितत्त्व सांगितले आहे, ते पुढीलप्रमाणे–

गणपती हा विश्वाधार असून तोच कर्ता, धर्ता व संहर्ता आहे. तो ज्ञान–विज्ञानमय आहे. ब्रह्मा, विष्णू, रुद्र, इ. सर्व काही तोच आहे. व्रातपती, गणपती, इ. सर्व प्रकारचा असलेल्या गणपतीला आमचा नमस्कार असो.

यापुढचा भाग फलश्रुतीचा आहे. त्यात या उपनिषदाची सहस्रावर्तने केल्याने अभीष्ट ते प्राप्त होईल, असे सांगितले आहे. त्याचे शुचित्व राखले जावे म्हणून हे उपनिषद, अशिष्याला शिकवू नये, असे सांगितले आहे.

हे जरी अथर्ववेदाचे उपनिषद असले, तरी याचे शांतिमंत्र ऋग्वेदातले आहेत. त्यापैकी 'भद्रं कर्णेभि:' या मंत्रांत 'आम्ही चांगले पाहावे, चांगले ऐकावे' अशी आकांक्षा व्यक्त केली आहे, तर दुसऱ्या 'स्वस्ति न इंद्रो' या मत्रात इंद्र, पूषा, इ. आमचे कल्याण करोत, अशी आकाक्षा दर्शविली आहे. [ सी. ग. देसाई; श्री. चित्रावशास्त्री ]

**गणमैत्री** जातकशास्त्रात देव, मनुष्य व राक्षस असे तीन गण मानलेले आहेत. २७ नक्षत्रांचे असे गण ठरलेले असतात. त्याविषयीचा श्लोक असा––

**दे म रा म द मं दे दे रा रा म म द रा द रा ।**
**दे रा रा म म दे रा रा म म देति गणत्रयम् ।।**

भावार्थ– दे म्हणजे देवगण, म म्हणजे मनुष्यगण व रा राक्षसगण होय. अश्विन्यादी २७ नक्षत्रांचे दे, म, रा, या क्रमाने गण ठरतात.

वधू-वरांचे घटित पाहताना गणमैत्रीही पाहतात. वधू-वराचा समान गण असला किंवा वर देवगणाचा आणि वधू मनुष्यगणाची असली, तर सहा गुण देतात. देवगणाचा वर व राक्षसगणाची वधू असता एकच गुण मिळतो. अर्थात या दोघांचा संयोग कमी प्रतीचा मानला गेला आहे. मनुष्यगणी वराला देवगणी कन्या कर्तव्य असता पाच गुण देतात. म्हणजे हाही संबंध पहिल्या प्रतीचा लेखला गेलेला नाही. या गणमैत्रीविषयी श्री. ना. गो. चापेकर यांनी समाजशास्त्राच्या दृष्टीने विवेचन केले आहे, ते पुढीलप्रमाणे––

देव, मनुष्य व राक्षस असे तीन समाज प्राचीन काळी अस्तित्वात होते. हे तीन निरनिराळे मानववंश असावे. असुर आणि राक्षस एक नव्हत. असुर हे देवांप्रमाणेच यज्ञ करणारे होते; पण राक्षस यज्ञ करणारे नसावे. देवासुरांचा लढा यज्ञसंबंधात चाले; पण देव-राक्षस यांचे वैमनस्य मात्र उपास्य देवतेवरून पडले होते. राक्षसांचा उपास्य देव महादेव किंवा शंकर होता.

ब्रह्मा, विष्णू व महेश हे तीन समाजांचे तीन देव होते. मनुष्याचा देव ब्रह्मा, देवाचा विष्णू व राक्षसाचा महेश होय. पुढे तीन समाजाचे एकीकरण झाल्यावर सर्वांना उपास्य असा त्रिमूर्ती देव बनवावा लागला.

वरील तीन्ही समाजात थोड्याबहुत प्रमाणाने विवाहसंबंध घडत असत. देवांना वश न झालेल्या अशा राक्षसांबरोबर देवाचे विवाहसंबंध मोठ्या प्रमाणात न होणे स्वाभाविक होते. इंद्राचा सारथी मातली हा आपल्या कन्येला वर शोधण्यासाठी नारदाबरोबर सर्व जग हिंडला. त्याने नागजातीचा वर पसंत केला; पण राक्षसपुत्र नाकारला. मातलीच्या या कथेवरून एवढे व्यक्त होते, की देवसंस्कृतीचे अनुयायित्व मान्य करणारे लोक देवात मिसळून गेले, त्याची मैत्री झाली व संबंधही जडले. पण राक्षसानी प्रतिक्रिया सुरू केल्यामुळे ते मात्र अमित्र ठरले. अर्थात त्याच्याबरोबर देवाची किंवा मनुष्याची गणमैत्री कशी जमावी ?

विवाहघटितातील गणमैत्रीचे मूळ कोठे आहे, हे वरील विवेचनावरून सहज समजण्यासारखे आहे. गण म्हणजे लोकसमूह. गणमैत्री पाहणे म्हणजे वधू-वर हे आपल्या समाजापैकी अथवा आपल्या मित्र समाजापैकी आहेत किंवा नाहीत, हे पाहणे होय. मूळ संस्कृती देवांची. देव उत्तरेकडून खाली आले. पुढच्या मार्गक्रमणात ज्यांनी त्यांची संस्कृती मान्य केली, ते मनुष्य आणि ज्यांनी त्या संस्कृतीला विरोध केला ते राक्षस, असे असण्याचा संभव आहे. म्हणूनच देवांनी मनुष्याशी विवाहसंबंध मान्य करून राक्षसांशी तो नाकारला, असे असण्याची शक्यता आहे. मात्र पुढच्या काळात देव, मनुष्य आणि राक्षस हे सगळे एक झाले, यात संशय नाही. देवांनी राक्षसांना वेदानुयायी केले व राक्षसांनी आपला महादेव देवांच्या गळी उतरविला. अर्थात ही देवघेव उभयपक्षी झाली आहे. [ वै. नि. ]

**गणयाजी** गणयाग म्हणजे बौधायन धर्मसूत्रात वर्णिलेला गणहोमच असावा, असे डॉ. बुल्हरचे मत असून ते डॉ. मिराशी यांना मान्य आहे. गणहोम हे प्रत्येकाने स्वत:च करावयाचे असतात. एखाद्याने आपले माता, पिता व गुरू यांच्यासाठी ते केल्यास हरकत नसते. पण दुसऱ्या कोणासाठी ते करू नयेत. केल्यास तो ब्राह्मण पापी होतो व विषभक्षण केलेल्या मनुष्याप्रमाणे नाश पावतो, असे धर्मशास्त्रात सांगितले आहे.

श्रीमान मनुष्याने ब्राह्मणाला धन देऊन त्याच्याकडून गण-होम केल्यास करविता पापमुक्त होतो; पण कर्त्याला पाप लागते. पुष्कळसे लोक द्रव्यलोभाने हे पाप करीत, असे दिसते. म्हणून गणयाग करणाऱ्या ब्राह्मणाला तो पापी असल्यामुळे श्राद्धाला बोलावू नये, असे मनूने म्हटले आहे ( ३. १६४ ). [ वा. नृ. का. ]

## गणराज्य

गण शब्दाचा मुख्य अर्थ समूह असा आहे. त्यावरून गणराज्य शब्दाचा अर्थ समूहाने चालवलेले राज्य किंवा अनेक लोकांच्या द्वारे होणारा शासनप्रबंध असा होतो. वैदिक युगाच्या आरंभी आर्यांमध्ये सर्वत्र राजतंत्र प्रचलित होते. या काळात आर्य लोक नवे नवे प्रदेश पादाक्रांत करीत चालले होते आणि म्हणून त्यांना एकमुखी नेतृत्वाची फार मोठी आवश्यकता होती. मेगॅस्थेनीजने लिहिले आहे, की या देशात राजतंत्राच्या नंतरच गणराज्य पद्धतीचा विकास झाला. पुराणात बुद्धपूर्व राजांची जी वंशावळी मिळते, तिच्यावरून ख्रिस्तपूर्व सहाव्या शतकातले मद्र, कुरू, पांचाल, शिबी आणि विदेह हे गणराज्य चालवणारे देश प्रथम राजाधीनच होते, असे दिसते.

ऋग्वेदात गणराज्य पद्धतीच्या अस्तित्वाचे पुरावे सापडत नाहीत ते यामुळेच; पण त्यापुढील ऐतरेय ब्राह्मण, यजुर्वेदाच्या संहिता, तैत्तिरीय ब्राह्मण, इ. वाङ्मयात मात्र गणराज्यांचे उल्लेख स्पष्टपणे सापडू लागतात. बौद्ध अवदानशतकात एक गोष्ट सांगितली आहे, ती अशी——

मध्यप्रदेशाच्या काही व्यापाऱ्यांना दक्षिणेतल्या एका राजाने विचारले, की 'तुमच्या देशावर कोण राजा राज्य करीत आहे?'

त्यावर त्यांनी उत्तर दिले –

**देव केचिद्देशा गणाधीनाः केचिद्राजाधीनाः ।**

अर्थ– महाराज, आमच्यामध्ये काही देश गणाच्या अधीन आहेत. तर काही देश राजाच्या अधीन आहेत.

जैनांच्या आचारांगसूत्रात जैन साधूंनी कोणत्या देशात जाऊ नये, ते सांगताना पुढील विभिन्न राज्यपद्धतीचा उल्लेख केला आहे –

**अरायणि वा गणरायणि वा जुवरायणि वा**
**दोरज्जणि वा बेरज्जणि वा विरुद्धरज्जणि वा ।**

अर्थ– जिथे राजा नाही, जिथे गणराज्य आहे, जिथे यौवराज्य आहे, जिथे द्वैराज्य, वैराज्य अथवा दोन विरुद्ध राजे अगर पक्ष यांच्याकडून चालविले जाणारे राज्य आहे ( अशा देशात जैनांनी जाऊ नये).

गण शब्दाला एक राजकीय अर्थ आहे. त्यावरून अशा एका शासनपद्धतीचा बोध होतो, की जिथे सत्ता एका माणसाच्या हाती न राहता ती गणाच्या अर्थात अनेक व्यक्तींच्या हातात राहते. अशा शेकडो मुद्रा उपलब्ध झाल्या आहेत, की ज्यावर यौधेय, मालव आणि अर्जुनायन या राजाचा नव्हे, तर त्या गणाचा नामलेख लिहिलेला आहे.

तत्कालीन ग्रीक इतिहासकारांनी प्राचीन भारतातल्या राजसत्ता आणि गणसत्ता या दोन्ही पाहिल्या होत्या. ते स्वतः गणराज्यांचे समर्थक होते. त्यांनी तत्कालीन इतिहासावर पुष्कळच लिहून ठेवले आहे. त्या लेखनाच्या अभ्यासावरून असे सिद्ध होते, की भारतातील राज्यपद्धतींच्या विविधतेचे त्यांनी फार सूक्ष्म अध्ययन केले होते. ज्या पौरसावर सिकंदराने स्वारी केली, त्या पौरसाचा देश म्हणजे एक गणराज्यच होते, असे ग्रीक इतिहासकार सांगतात. सबरक नावाची एक प्रबल भारतीय जात होती, तिचेही गणराज्यच होते. व्यासनदीच्या पूर्वेस असेच एक शक्तिशाली गणराज्य होते. आणि त्याचे शासन उच्च वर्गाच्या हाती होते. सिंधू नदीच्या प्रदेशात अशी अनेक गणराज्ये होती.

सांप्रत ज्या राज्यांना आपण प्रजातंत्र किंवा लोकतंत्र म्हणतो, त्या अर्थाने प्राचीन भारतातील यौधेय, शाक्य, मालव आणि लिच्छवी या राज्यांना लोकतंत्र राज्ये म्हणता येणार नाही. कारण या गणराज्यातही शासनाचे अधिकार सामान्य जनतेच्या अधीन नव्हते. यौधेयांमध्ये शासनाधिकार ५ हजार व्यक्तींच्या परिषदेच्या हातात होते आणि यातील प्रत्येक व्यक्तीला राज्यासाठी एक हत्ती देणे आवश्यक होते. यावरून स्पष्ट होते, की यौधेय परिषदेतले सदस्य अमीर किंवा उच्च वर्गीय होते आणि राज्यासाठी एकेक हत्ती देण्याचे सामर्थ्य त्यांच्यात होते.

शाक्य व कोलिय यांच्या गणराज्यांतही हीच स्थिती होती. समस्त जनतेच्या जीवनाशी संबंधित असणाऱ्या महत्त्वपूर्ण प्रश्नाचा निर्णयही थोडेसे शाक्य व कोलिय सरदारच स्वतःच्या मनाप्रमाणे करीत होते. सामान्य शेतकरी किंवा मजूर यांच्या हाती अधिकारीवर्गाचे निर्णय मानणे व त्याच्या आज्ञा पूर्ण करणे, एवढेच होते. पण असे असूनही आपण या राज्यांना प्रजातंत्र किंवा गणतंत्र म्हणू शकतो, कारण ज्या राज्यात सर्वोच्च शासनाधिकार राजाप्रमाणे एका व्यक्तीच्या हातात न राहता समूह, गण किंवा परिषद यांच्या हातांत असतो, त्याला गणराज्य म्हणावे, असे राजनैतिक ग्रंथ सांगतात. तदनुसार सामंततंत्र, उच्चवर्गतंत्र आणि प्रजातंत्र ही सर्व राज्ये गणराज्याच्या श्रेणीतच धरली पाहिजेत.

ज्या प्रकारे प्राचीन इटली व ग्रीस या देशातील राज्ये प्रजातंत्र होती, त्याचप्रमाणे शास्त्रीय व ऐतिहासिक या दोहोंच्या

आधारे प्राचीन भारतीय गणराज्येही प्रजातंत्र होती, असे स्पष्ट म्हणता येते. या गणराज्यात शासनाधिकार एका व्यक्तीच्या किंवा मूठभर लोकांच्या हाती नसून एका मोठ्या वर्गाच्या हातात होता. वैशाली येथे असलेले लिच्छवींचे गणराज्य सांप्रतच्या दोन जिल्ह्याहून मोठे नव्हते. पण तरीही त्याचे शासनकर्ते ७७०७ होते. हे सगळे लोक राज्यसंस्थापकाचे वंशज होते आणि यांतल्या प्रत्येकाला राजा या पदवीचा अधिकार होता. उ. भारतातल्या बहुसंख्य गणाचे शासक राजा ही पदवी धारण करणारे होते. पुढे हळूहळू समस्त क्षत्रियवर्गाला राज्यसंचालनाचा अधिकार प्राप्त झाला, तेव्हा पुढील दोन प्रकारची गणराज्ये अस्तित्वात आली—

(१) राजक— जिथे केवळ राज्यसंस्थापक क्षत्रियाच्या वंशजांच्या हाती सत्ता होती, असे गणराज्य.

(२) राजन्यक— जिथे सर्व क्षत्रियांच्या हाती राज्यसत्ता होती व त्यातला प्रत्येक क्षत्रिय स्वतःला राजा म्हणवून घेत असे, असे गणराज्य.

अमरकोशात राजक व राजन्यक याचा अर्थ अनुक्रमे राजे व क्षत्रिय यांचा गण असाच दिला आहे. राजा ही उपाधी धारण करणारे संघ कौटिल्याने पुढीलप्रमाणे सांगितले आहेत—

लिच्छिविक, वृजिक, मल्लक, मद्रक, कुकुर, कुरू, पंचाल इत्यादी.

वृष्णींचे राज्य हे दुसऱ्या प्रकारचे गणराज्य होते. त्यांच्या शिक्क्यावर 'वृष्णि–राजन्य–गणस्य जयः' असा अभिलेख मिळतो.

प्रायः बहुसंख्य गणराज्ये क्षत्रियप्रधान होती व राजसत्ता क्षत्रियातील उच्च जनांच्या हाती होती. त्यांचा निर्देश करण्यासाठी भाषेत विशिष्ट शब्दही रूढ झाले होते. मालव व क्षुद्रक या गणराज्यांत सत्ताधारी क्षत्रियवर्गातल्या व्यक्तीला मालव व क्षुद्रक या नावांनी संबोधीत व तदितरांना मालव्य व क्षुद्रक्य म्हणत (अष्टा. ५.३.११४ वरील काशिका).

गणराज्यांच्या विकासक्रमाचा मागोवा घ्यायचा, तर तो ऋग्वेदाच्या अंतिम सूक्तापासून घेतला पाहिजे. त्या सूक्तात आकांक्षा व्यक्त केली आहे, की 'समितीची मसलत एकमुखी व्हावी, सदस्यांची मने परस्परानुकूल व्हावी व निर्णयही सर्वसंमत व्हावा (ऋ. १०. १९१. ३). या सूक्ताचा संकेत गणराज्यातल्या गणसमितीकडे होऊ शकत असला, तरी सामान्यपणे समितीचा संबंध राजाशीच असे. तेव्हा केवळ या सूक्तावरून ऋग्वेदकालात गणराज्याचे अस्तित्व होते, ही गोष्ट सिद्ध होऊ शकणार नाही. दुसऱ्या एका स्थळी राजे लोक समितीत एकत्र झाल्याचे वर्णन आहे (ऋ. १०.९७.६). अन्य एका ठिकाणी म्हटले आहे ते असे—

**यस्मै वै राजानो राज्यमनुमन्यन्ते**
**स राजा भवति, न स यस्मै न ।**

(श. ब्रा. ९. ३. २५)

अर्थ— ज्याला राजे लोक राज्य करण्याविषयी मान्यता देतात, तो राजा होतो. ज्याला अनुमती देत नाहीत, तो होत नाही.

इथे अन्य राजे याचा अर्थ विश्पती असण्याचा संभव आहे. हाही एक गणराज्याचाच प्रकार होता. सामान्य जनतेच्या हाती न राहता तिच्या गटप्रमुखांच्या हाती राजशक्ती असणारा असा हा गणराज्याचा मामला होता. जर या विश्पतींनी स्वीकारलेला अधिपती वंशपरंपरेने गादीवर बसू लागला, तर ते राज्य पुढे राजतंत्र होत असे आणि जर विश्पतींनी स्वीकारलेल्या अधिपतीची कालमर्यादा निश्चित असेल व त्याचे पद आनुवंशिक नसेल, तर तेच राज्य पुढच्या काळात क्षत्रिय गणराज्याच्या रूपात विकसित होत असे.

ऐतरेय ब्राह्मणात एका ठिकाणी सांगितले आहे, की प्राच्यांच्या राजाला सम्राट म्हणत. सात्वतांच्या राजाला भोज म्हणत. पश्चिमेकडील नीच्य व अपाच्य यांच्या राजाला स्वराट म्हणत. उत्तरमद्र व उत्तरकुरू या हिमालयाच्या उत्तर प्रदेशातील लोकांना विराट म्हणत (८.१४). या वेगवेगळ्या गणराज्यपद्धतीच होत्या.

प्राचीन भारतातील उत्तर व पश्चिम भागांतील गणराज्याचा वृत्तांत मुख्यतः ग्रीक लेखकांच्या लेखनावरून कळतो; तर उत्तर व पूर्व दिशेच्या गणराज्यांचा वृत्तांत बौद्ध ग्रंथांवरून कळतो. पाणिनी, कात्यायन, पतंजली, इ. वैयाकरणांकडूनही काही माहिती मिळते. महाभारतातील शांतिपर्वातल्या दोन अध्यायांत या गणराज्याचे विधान व त्यांचे गुण-दोष यांविषयी बरेच विवेचन आढळते (शांति. ८१ व १०७). कौटिल्याच्या अर्थशास्त्रात मुख्यतः गणांची आणि संघांची शक्ती मोडून कशी काढावी, याविषयी विचार केलेला असला, तरी त्या विवेचनात गणराज्यांविषयी पुष्कळशा गोष्टी आपोआप कळतात.

सनपूर्व ५०० ते इ. स. ४०० पर्यंत पंजाब व सिंधू नदीचा तटप्रांत या भागात गणराज्ये असल्याचे कळते. त्यांतल्या काही गणराज्यांची नावे तेवढीच व्याकरणग्रंथावरून समजतात. त्यांच्याविषयी इतर माहिती काहीच मिळत नाही. वृक, दामणी, पार्श्व व कंबोज ही गणराज्ये त्यांपैकी होत. पाणिनीच्या काळात त्रिगर्त (पंजाब) देशात सहा गणराज्यांचा एक संघ (त्रिगर्तषष्ठ) होता व त्यांची नावे कौंडोपरथ, दंडकी, कौष्ठकी, जालमानी, ब्राह्मगुप्त व जानकी अशी होती. सांप्रतच्या

आग्रा-जयपूर प्रदेशात अर्जुनायन नावाचे गणराज्य होते. त्याच्या मुद्राही मिळाल्या आहेत आणि त्यावर कोण्या राजाचे नाव नसून 'अर्जुनायनानां जय:' असा गणांचा जयजयकार आहे. याचा आणि यौधेयांचा घनिष्ठ संबंध होता. यौधेयांचे गणराज्य फार मोठे होते. त्यांच्या मुद्रा ज्या भूभागात सापडल्या, त्याचा विचार करता या गणराज्याचा विस्तार पूर्वेस सहारणपूरपासून पश्चिमेस भावलपुरापर्यंत आणि वायव्येस लुधियानापासून तो आग्नेयीस दिल्लीपर्यंत असावा, असे वाटते. यौधेय हे आपल्या अतुल शौर्याबद्दल प्रसिद्ध होते. ते कार्तिकेयाला आपली कुलदेवता मानीत होते. इ. स. च्या १ ल्या शतकात कुशाणसम्राट कनिष्क याने एकवार त्यांचा पराभव केला होता; पण कुशाण लोक त्यांना कधीच आपल्या ताब्यात ठेवू शकले नाहीत. पुढे यौधेयानी आपले गेलेले स्वातंत्र्य तर परत मिळवलेच, शिवाय कुशाण साम्राज्यालाही असा काही जबरदस्त तडाखा दिला, की ते कोसळूनच पडले. मध्य पंजाबात मद्रांचेही एक गणराज्य होते. स्यालकोट ही त्याची राजधानी होती. त्यानी शिकंदरापुढे मान झुकवली नाही; तर त्याच्याशी सामना देता देता मरून जाणे पत्करले. शिकंदराविरुद्ध ज्यांनी ईर्षेने दंड थोपटले, अशा गणराज्यांपैकी मालव आणि क्षुद्रक ही दोन राज्ये अग्रगण्य होती. मालवांचे गणराज्य चिनाब व रावी याच्या मध्यप्रदेशात होते. क्षुद्रक हे त्यांचे दक्षिणचे शेजारी होते. मालव लोक स्वत:ला इक्ष्वाकुवंशज समजत. त्यांच्या ताम्रमुद्राही बऱ्याच सापडल्या आहेत. त्यांवर 'मालवानां जय:' अशी अक्षरे आहेत.

शिवींचे राज्य प्रथम नृपतंत्र होते; पण पुढे ते गणराज्यात परिवर्तित झाले. क्षुद्रकांचे शेजारी अंबष्ठ होते. त्यांच्या सैन्यात ६०,००० पायदळ, ६००० घोडेस्वार व ५००० रथ होते. काठियावाडमध्ये अंधक-वृष्णी यांचे संयुक्त गणराज्य होते. श्रीकृष्ण हा त्याचा प्रमुख पुढारी होता, असे महाभारतावरून कळते.

वर्तमान गोरखपूर व बिहार या प्रदेशातही अनेक गणराज्ये अस्तित्वात असल्याचे बौद्ध ग्रंथांवरून कळते. त्यातली भग्ग, बुली, कोलिय आणि मोरिय ही राज्ये अगदीच छोटी म्हणजे एखाद्या तालुक्याएवढी असतील, नसतील. शाक्य, मल्ल, लिच्छवी आणि विदेह ही राज्ये थोडी मोठी होती. पण ही सगळी राज्ये एकत्र करूनही त्यांचे क्षेत्र २०० मैल लांब आणि १०० मैल रुंद याहून अधिक भरले नसते. पश्चिमेस गोरखपूर, पूर्वेस दरभंगा, उत्तरेस हिमालय व दक्षिणेस गंगा एवढा त्या सर्वांचा मिळून भूविस्तार होता.

भगवान बुद्धाचा जन्म शाक्यगणात झाला, हे प्रसिद्ध आहे. बुद्ध हा शाक्यगणांच्या सभापतीचा पुत्र होता. अट्टकथेमध्ये लिच्छवीच्या या गणराज्याची विशेष माहिती मिळते. राजा, उपराजा, सेनापती व भांडागारिक असे चार अधिकारी लिच्छवीच्या राज्यव्यवस्थेत सर्वश्रेष्ठ असत. या चौघांचे मिळून मंडळ बने. वैशाली ही त्यांची राजधानी होती. ज्या वेळी ते लोक आपल्या संथागारात (सभाभवन) एकत्र जमून राज्यकारभाराची चर्चा करीत, त्या वेळी दंडविधानाबरोबरच शेती आणि व्यापार यांसंबंधीही विचार करीत. सभापती हाच त्यांचा न्यायाधीशही असे. न्याय करते वेळी नागरिकांच्या व्यक्तिस्वातंत्र्याचे डोळ्यात तेल घालून रक्षण केले जात असे. राजा, उपराजा आणि सेनापती यांनी एकमताने अपराधी ठरविल्यावाचून कोणालाही शिक्षा किंवा दंड होत नसे.

**कार्यपद्धती**— गणराज्यांच्या कार्यपद्धतीबद्दल सुसूत्र माहिती मिळणे कठीण जाते. जी गणराज्ये लहान असत त्यांची कार्यपद्धती मोठ्या गणराज्यापेक्षा निराळी असे. लहान गणराज्यात एक मध्यवर्ती सभा असून तिचे सभासद राजधानीतच राहत. या सभासदांना राजा व त्यांच्या मुलांना उपराजा असे म्हणत.

एखाद्या गोष्टीचा वा प्रकरणाचा विचार करण्यासाठी ज्यांना सभेत बसण्याचा अधिकार असे, असे सदस्य संथागारात एकत्र जमून आपापल्या आसनावर बसत. मग ज्या विषयावर विचार करायचा असेल, त्या विषयीची ज्ञप्ती पुढीलप्रमाणे सभेच्या पुढे उपस्थित केली जात असे—

'आदरणीय संघाने माझी गोष्ट ऐकावी. जर संघाला वेळ असेल, तर संघाने अमूक अमूक कार्य करावे. ही ज्ञप्ती (अर्थात सूचना) आहे.'

ज्ञप्ती झाल्यानंतर जो ज्ञापक असेल तो त्या विषयाचा प्रस्ताव सभेपुढे ठेवी. त्याला प्रतिज्ञा म्हणत. प्रतिज्ञेनंतर सभेतल्या लोकांना सांगितले जाई—जे लोक या प्रतिज्ञेच्या (प्रस्ताव) बाजूचे असतील, त्यानी मौन धरावे आणि ज्यांना हा प्रस्ताव संमत नसेल, त्यांनी बोलावे. प्रत्येक प्रतिज्ञा तीन वार वाचून लोकांना ऐकवली जात असे. तीन्ही वेळा सगळे सदस्य मूक राहिले, तर प्रस्ताव स्वीकृत झाला, असे समजत.

सभेचे कामकाज चालू व्हायला गणपूर्तीची आवश्यकता असे. आवश्यक गणसंख्या सभेस उपस्थित करणे, हे काम ज्या एका सदस्यावर सोपवलेले असे, त्याला गणपूरक म्हणत. सभेत सभासद मतदान करीत, त्याला छंद असे नाव होते. जे लोक आजारी असल्यामुळे किंवा अन्य काही कारणामुळे सभेला उपस्थित राहू शकत नसत, त्यांचे छंद (मते) काळजीपूर्वक एकत्र केले जात. छंदप्रदान करण्याची क्रिया विशिष्ट प्रकारच्या रंगीत शलाकांच्या द्वारे होत असे. ज्या वेळी एखाद्या प्रस्तावावर मतमोज-

णीची वेळ येई, त्या वेळी सभेकडून त्या कामासाठी एक पुरुष नेमला जाई. त्याला शलाकाग्राहक म्हणत. तो खुलेपणाने किंवा गुप्तपणाने शलाका ग्रहण करी, त्यांची संख्या मोजी व संघाला निर्णय सादर करी.

कधी कधी निरर्थक चर्चा किंवा चर्वितचर्वण यांपासून सभेचा वेळ वाचावा म्हणून एखादी उपसमिती नेमीत व तिला विवाद्य विषयाचा निर्णय करण्याचा अधिकार देत. त्या उपसमितीकडून निर्णय होऊ शकला नाही, तर फिरून त्या गोष्टीचा निर्णय करण्याचा अधिकार संघाच्या हाती येत असे. संघाने एकदा एखाद्या विषयावर निर्णय दिल्यानंतर तो विषय चर्चेसाठी पुनश्च सभेपुढे कधीही येत नसे. सभेत गैर किंवा निंदास्पद बोलणाऱ्यावर निर्बंध घातला जात असे. सभेच्या अधिवेशनात जे प्रस्ताव किंवा निर्णय होत, ते लेखकांकडून लिहून ठेवले जात. लिच्छवी लोक तर न्यायासनापुढील कज्जे-खटल्यांचे समग्र विवेचन लेखकांकडून लिहून ठेवीत.

गणराज्यांच्या कार्यकारी मंडळाची संख्या त्यांच्या लोकसंख्येवर अवलंबून असे. मल्लांचे मंडळ चौघांचे, लिच्छवींचे नवांचे व विदेह–लिच्छवी यांच्या संयुक्त गणराज्याचे अठरांचे होते. या कार्यकारी मंडळाची निवड मोठ्या सभेकडून होत असे. मोठ्या गणराज्यातील शहरांना स्वायत्तता दिलेली असे. त्यांची मंडळे असत. खेड्यांनाही पंचायती दिलेल्या असत. शिकंदराला विरोध करण्यासाठी कित्येक गणराज्ये पुढे सरसावली, यावरून त्यांच्या तत्कालीन सामर्थ्याची व कार्यक्षमतेची कल्पना येते.

सौभूती व कठ या गणराज्यांची घटना अगदी वेगळ्या धर्तीची होती. डायोडोरस हा ग्रंथकार त्याविषयी लिहितो–

त्यांच्या राज्यातल्या सर्व नगरांची व्यवस्था व निर्बंध या गोष्टी प्रजेला हितकर व प्रशंसनीय होत्या. त्यांचे एक वैशिष्ट्य असे, की आपली प्रजा अधिकाधिक बलिष्ठ व सुंदर निपजावी, म्हणून त्यांनी राष्ट्रीय प्रजननावर नियंत्रण ठेवलेले होते. वधू–वरांचे शरीरसौष्ठव आणि निकोप संतती निर्माण करण्याची त्यांची पात्रता या गुणांवरच त्यांच्यातल्या विवाहाचे घटित जुळवले जाई. आपल्या गणराज्याचे पुढारी निवडण्यातही ते शरीरसौष्ठव व बळ या गुणानाच विशेष प्राधान्य देत. मूल जन्मल्यानंतर तीन महिन्याच्या आत त्याची राज्याधिकाऱ्याकडून शारीरिक परीक्षा केली जाई. एखादे मूल व्यंगयुक्त किंवा रोगपीडित दिसले, तर त्या मुलाला ते लोक जगू देत नसत (भारतीय इतिहासातील सहा सोनेरी पाने, भाग १ ).

महाभारतात आदर्श गणराज्याचे वर्णन मिळते, ते असे–

अशा गणराज्यात नव्या पिढीला उत्तम प्रकारे शिक्षण दिले जात असे. विशेषतः तरुणांना सच्चरित्र व सदाचारी बनवणे, यावर कटाक्ष असे. ज्यांच्या ठिकाणी बुद्धी, शौर्य व कार्यक्षमत्व हे गुण दिसतील, अशा लोकांना गणमुख्य बनवून त्यांच्याकडे राज्याधिकार सोपवले जात असत. असे लोक मग आपल्या साऱ्या शक्ती पणाला लावून त्या गणराज्याला आपत्तीतून वाचवण्याचा प्रयत्न करीत. राज्याच्या अतिगंभीर समस्येवर आमसभेत वादविवाद होत नसे. त्यांचा निवाडा करण्याचा अधिकार अनुभवी पुढाऱ्यांना दिला जाई. मंत्रिमंडळाचे सदस्य देशहित डोळ्यांपुढे ठेवून परस्पर सहकार्याने राजकाज चालवीत. ते देशाच्या आर्थिक उन्नतीवरही भर देत असत. राजदूतांची नियुक्ती त्या माणसाच्या लायकीचा पूर्ण विचार करून केली जाई (शांति. १०७).

भारतातील गणराज्यांची परंपरा श्रीकृष्णाच्या पूर्वकालापासूनही चालू होती, ती इ. स. च्या ४ थ्या शतकाच्या अखेरीपर्यंत चालू राहिली. इ. स. च्या ५ व्या शतकात या गणराज्यांचा संपूर्ण नाश झाला. ही संस्था अशी सर्वार्थी नाश का पावली, याविषयी महाभारतात जे मुख्य कारण सांगितले आहे, ते असे–

**भेदमूलो विनाशो हि गणानामुपलक्षये ।**
**मन्त्रसंवरणं दुःखं बहूनामिति मे मतिः ॥**

(शांति. १०७.८)

अर्थ–(युधिष्ठिर म्हणतो) गणराज्यांचा नाश त्यांच्यांतल्या अंतर्गत फुटीरपणावर अवलंबून आहे, असे मला वाटते. त्याचप्रमाणे गणराज्यात (राज्याच्या स्थैर्याला आवश्यक त्या महत्त्वाच्या) मसलतीही गुप्त ठेवणे हे दुःखकारक आहे, असे मला वाटते.

युधिष्ठिराच्या या मताला पुष्टी देताना भीष्मांनी सिद्धान्तवजा निष्कर्ष सांगितला, तो असा–

रूपाचा वा द्रव्याचा मोह दाखवून अथवा आक्रमणाचा प्रयत्न करून संघराज्य कधीच नष्ट होऊ शकत नाही. संघराज्यात आपापसात फूट उत्पन्न करून व तिला उत्तेजन देऊनच शत्रूंनी संघराज्ये नष्ट केलेली आहेत. म्हणून संघजीवन हाच संघराज्याचा प्राण आहे, हे नेहमी लक्षात ठेवले पाहिजे व ज्यांना संघराज्य टिकवायचे असेल, त्यांनी तेथील संघजीवन कसे नष्ट होणार नाही, याविषयी पूर्णपणे दक्षता घेतली पाहिजे.

लिच्छवींचा पराभव करण्याकरिता अजातशत्रूने आपल्या प्रधानाला त्याच्या राज्यात दुफळी निर्माण करण्यासाठी पाठविले होते, असा इतिहास आहे.

पुष्कळ वेळा गणराज्ये विशिष्ट कुटुंबाचीच बनलेली असत. त्या कुटुंबात भांडणे सुरू झाली, की ती राज्ये दुर्बळ होऊन मोठ्या प्रबल सत्तेच्या अधीन होत व नाश पावत. गणराज्याचे

अधिकारी आर्थिक व्यवहार चोख ठेवीत नसत; त्यामुळेही कलह माजून ते राज्य विलयास जाई. गौतमबुद्धाने लिच्छवींच्या गणराज्याचा नाश, ते लोक कशा रीतीने वागले असता होणार नाही, हे सांगताना अप्रत्यक्ष रीत्या त्याच्या नाशाची कारणेच दिली आहेत. बुद्ध म्हणतो–

'जोवर लिच्छवींची लोकसभा नियमाने भरत जाईल, वारवार भरत जाईल, जोवर तिचे सभासद एकदिलाने राज्यकारभार करतील; वृद्ध, अनुभवी व योग्य पुढाऱ्यांचा आदर करून त्यांच्या सल्ल्याने वागत जातील; जोवर ते तुच्छ स्वार्थ व मानापमान यांच्याकरिता भांडत राहणार नाहीत, तोवर लिच्छवी गणराज्य शक्तिशाली राहील. ज्या वेळी याच्या उलट होईल, त्या वेळी त्याचा नाश होईल.'

भारतातील गणराज्यांचे सर्व अंगानी परीक्षण करून त्यांचे मूल्यमापन करताना डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांनी जे विवेचन केले आहे, ते असे–

हिंदुस्थानातील प्राचीन प्रजासत्ताकांची ही परंपरा सुमारे हजार वर्षे अव्याहत चालून पुढे हळूहळू ऱ्हास पावू लागली. इ. स. च्या ५ व्या शतकात ही गणराज्ये पूर्णपणे नामशेष झाली. मौर्य, शुंग या साम्राज्यांच्या काळातच त्यांना उतरती कळा लागली होती; पण गुप्त साम्राज्यात तो विनिपात पुरा झाला आणि सर्वत्र राजसत्ता रूढ झाली.

या गणराज्यांच्या विनाशाचे एक कारण म्हणजे, प्रातिनिधिक सत्तेच्या तत्त्वाचा अभाव हे होय. या राज्यात मताधिकार कुलानुसार प्राप्त होत असे. सर्व उच्च कुले समान दर्जाची मानीत आणि प्रत्येक कुलाचा प्रमुख हा आमसभेचा सभासद असे. त्यामुळे अशा गणराज्यात विशाल प्रदेशाचा अंतर्भाव होणे शक्य नव्हते. त्यामुळे या राज्यांचा जीव नेहमी लहानच राहिला. त्यामुळे त्यांच्या सामर्थ्याच्या वाढीलाही मर्यादा पडल्या आणि मग भारतात मोठमोठी साम्राज्ये स्थापन होऊ लागताच त्यांच्या सामर्थ्यापुढे या गणराज्यांचे बळ लंगडे पडले.

आपसातील कलह, भेद, फुटीरपणा हे या गणराज्यांच्या विनाशाचे दुसरे कारण होय. राजसत्तेत ऐक्य व संघटना टिकविणे जसे सुलभ असते, तसे ते लोकसत्तेत नसते. प्राचीन गणराज्यांना हा आपसातील फुटीरपणा टाळता आला नाही.

'ना विष्णुः पृथिवीपतिः' = राजा हा विष्णूचा अवतार आहे, हे तत्त्व भारतात हळूहळू प्रभावी होऊ लागले व तेही गणराज्यांच्या विनाशाचे एक कारण होते. अराजकाला लोक उबगतात. त्यांना शांतता हवी असते. ती एखाद्या राजाने प्रस्थापित केली म्हणजे त्यांना तो राजा म्हणजे परमेश्वराचा अवतार वाटू लागतो.

समता हा लोकशाहीचा मूलाधार होय. मागल्या काळात जगात कुठेही समभाव नव्हता, कुठेही लोकशाही नव्हती आणि आजही तिचे काहीसे त्या प्रकारचे स्वरूप ब्रिटन व अमेरिका या देशातच आढळते. मागल्या काळी अथेन्स व रोममध्ये लोकसत्ता होती; पण तिथेही नागरिकत्वाचे हक्क अगदी अल्पसंख्य लोकांनाच होते. बाकीचे बहुसंख्य लोक केवळ गुलाम होते. लोकशाहीच्या मूलतत्त्वांच्या दृष्टीने पाहिले, तर ही विषमता अत्यंत अन्याय्य अशीच म्हटली पाहिजे.

चातुर्वर्ण्य व जातिभेद या प्रकारांनी ही विषमता भारतीय गणराज्यांतही जारी होती. त्रैवर्णिकांतले जातिभेद त्या काळी आजच्या इतके कडक नसतील, पण शूद्र व अस्पृश्य यांच्यावरील बंधने मात्र अतिशय जाचक होती. एकंदर वर्णाश्रमव्यवस्थेचे संरक्षण करणे, हे त्या काळी कोणत्याही सत्तेचे आद्य कर्तव्य मानले जात असे. प्राचीन व मध्ययुगीन युरोपातही अशीच विषमता होती, असे डॉ. आळतेकरांनी म्हटले आहे. त्या विषम व्यवस्थेवर तिकडील तत्त्ववेत्यांनी प्रखर हल्ले केले आणि ती नाहीशी करून समता निर्माण केली. भारतात असे प्रयत्न झाल्याचे किंवा अशा तऱ्हेने विचार सांगितले गेल्याचेही कुठे आढळत नाही.

प्राचीन गणराज्यातील लोकसत्तेच्या दृष्टीने दुसरी मोठी उणीव म्हणजे त्या राज्यातील लोकसभांना कायदे करण्याचा अधिकार मुळीच नव्हता. धार्मिक क्षेत्रातील सर्व नीतिनियम हे परमेश्वरप्रणीत असतात, अशी लोकांची श्रद्धा होती व व्यावहारिक शासने ही रूढिप्रणीत होती. या बाबतीत श्रुतिस्मृती प्रमाण मानल्या जात आणि राजांना व धर्माधिकाऱ्यांना तदनुसार न्यायद्यावा लागे. आपल्या काळाच्या समाजाची शासने ठरविण्याचा अधिकार आपल्याला आहे, ही धारणा हे लोकशाहीचे मुख्य लक्षण होय. पण गणराज्यात त्या धारणेचा अभावच दिसून येत असल्यामुळे त्यांचे लोकायत्त स्वरूप क्षीण ठरते.

पण याहीपेक्षा जास्त मोठा आक्षेप असा, की प्राचीन गणराज्ये खरीखुरी लोकायत्त नव्हतीच. या सर्व गणराज्यांच्या इतिहासात आणि एकंदर भारताच्या इतिहासातच लोकसत्तेसाठी, मानवाच्या आर्थिक किंवा सामाजिक समतेसाठी व मानवाच्या मूलभूत हक्कासाठी कधीही आणि कुठेही संग्राम झालेला नाही. गणराज्यात तर सत्ता मूठभर क्षत्रियांच्या हाती केंद्रित झालेली होती. शूद्र–चांडालांची स्थिती अत्यंत निकृष्ट दर्जाची होती. त्यांना सत्ता, धन व इतर सुखे यांचा अंशही कधी प्राप्त होत नसे. पण असे असूनही या शूद्र–चांडालानी किंवा त्यांच्या वतीने इतरानी भारतात कधीही वरिष्ठ सत्ताधारी लोकांशी

संग्राम केला नाही. सत्तासंपादनासाठी व प्रस्थापित शासनावर नियंत्रण ठेवण्यासाठी अखंड संग्राम करणे, हा लोकशाही जीवनातील पहिला घटक होय. त्यामुळेच लोकशाही या शब्दाला अर्थ निर्माण होतो. भारतात लोकांनी अशी जागरूकता ठेवून सत्ताधिष्ठित वर्ग मदमत्त होताच त्याच्याशी सग्राम करून त्याला वेसण घातल्याचे एकही उदाहरण नाही. ही राजकीय प्रबुद्धता व तज्जन्य लढा या गोष्टी जोवर एखाद्या समाजात दिसत नाहीत, तोवर केवळ बाह्य रूपावरून एखाद्या शासनाला लोकायत्त म्हणणे व त्या राज्यपद्धतीला प्रजासत्ताक म्हणणे, याला मुळीच अर्थ नाही. पण याला दुसरी एक बाजू आहे तीही सांगितली पाहिजे––

व्यक्तीचे मन, बुद्धी, भावना आणि श्रद्धा यांच्या विकासाला व त्या व्यक्तीच्या एकंदर कर्तृत्वाच्याही विकासाला ज्या समाजव्यवस्थेत पूर्ण अवसर मिळतो, ती समाजव्यवस्था खरीखुरी लोकायत्त होय. या दृष्टीने पाहता भारतात प्राचीन काळी धर्म, विद्या, कला व तत्त्वज्ञान याच्या क्षेत्रात लोकांना विचार, उच्चार व आचार याचे जवळ जवळ अनिर्बंध स्वातंत्र्य होते आणि तेवढ्यापुरती तरी इथली व्यवस्था लोकायत्त होती, असे म्हणायला हवे. अशा स्वातंत्र्यामुळेच या भूमीत सांख्य वेदान्त, न्याय, मीमासा इ. दर्शनांनी अतुलनीय असे विचारवैभव निर्माण केले. हे स्वातंत्र्य असल्यामुळेच इथे बौद्ध, जैन, इ. विविध धर्म व पंथ उदय पावून व शेजारी राहून बऱ्याच अंशी अविरोधाने आपला विकास करून घेऊ शकले. ख्रिस्ती धर्माने युरोपात पहिल्या हजार–बाराशे वर्षात मानवी जीवनाच्या सर्व अंगोपागांवर अत्यंत कडक नियंत्रण ठेवले होते. शब्दप्रामाण्याची पराकाष्ठा करून तत्त्वज्ञान, नीती, विज्ञान व कला या प्रत्येक क्षेत्रात मानवी बुद्धीला त्याने पंगू करून टाकले होते. कोपरनिकस, केप्लर, गॅलिलिओ या विज्ञानवेत्त्यांच्या शिरावरही ख्रिस्ती धर्मसत्तेने शस्त्र धरले होते. अशा तऱ्हेची मानवी बुद्धीची गळचेपी प्राचीन काळी भारतातील गण-राज्यात तर नव्हतीच; पण एकतंत्री अशा राजसत्तेतही नव्हती. आणि, म्हणूनच तत्त्वज्ञानाप्रमाणे विज्ञानाच्या क्षेत्रातही या भूमीत नागार्जुन, आर्यभट्ट, वराहमिहिर यांसारखे थोर शास्त्रवेत्ते निर्माण होऊ शकले. धर्म, विद्या, कला यांचा हा विकास गणसत्तेप्रमाणेच राजसत्तेच्या काळातही झालेला असला, तरी विद्या-कलांच्या क्षेत्राला राजसत्तेने स्पर्श करायचा नाही, हे गणसत्तेने आखून दिलेले स्तुत्य धोरण राजसत्तेनेही पुढे चालविले. त्यामुळे भारतातील विद्या–कलावैभवाचे श्रेय काही अंशी तरी भारतीय गणराज्यांना दिले पाहिजे. **पाहा**– राज्यघटना; जनपदे.
[ हिंदुराज्यतंत्र – डॉ. जायसवाल; भारतीय शासनपद्धती – अ. स. आळतेकर; म. भा. व्या.; भारतीय लोकसत्ता ]

**गणस्थविर** जैन उपाधी. लौकिक व अलौकिक या दोहोंची व्यवस्था करणारा व ती व्यवस्था मोडणाऱ्याचा निग्रह करणारा जो गणप्रमुख, त्याला हे नाव आहे. [ अभि. रा. ]

**गणिका** कलावती स्त्री. अमरकोशात 'वारस्त्री गणिका वेश्या' हे तीन्ही शब्द समानार्थक दिलेले असले, तरी गणिकेचे स्थान वारागनेपेक्षा वरच्या दर्जाचे मानलेले आहे. वेश्या ही 'कलारूपगुणान्विता' असली, तरच तिला गणिका म्हणत. प्राचीन काळी राजांच्या पदरी नृत्य–गायन करण्यासाठी अशा गणिका नेमलेल्या असत. गणिकेला या कामी एक हजार 'पण' इतके वेतन मिळत असे. राजा सिंहासनावर, रथात किंवा पालखीत बसला असता त्याच्यावर छत्र धरणे, त्याला पंख्याने वारा घालणे, इ. राजसेवेची कामे अशा गणिकाकडे असत. राजदरबारात तिला मान मिळे, हे नाट्यशास्त्रात पुढीलप्रमाणे सांगितले आहे––

**पूजिता च सदा राज्ञा गुणवद्भिश्च संस्तुता ।**
**प्रार्थनीयाभिगम्या च लक्ष्यभूता च जायते ।।**

(पृ. ६३७)

अर्थ –– गणिका ही राजाकडून सन्मानिली व गुणिजनांकडून प्रशंसिली जात असे. ती प्रार्थनीय ( पुरुषाला वांछनीय ), अभिगम्य (पुरुषाला अभिगमनास योग्य) व चिंतन करण्यास अथवा टक लावून पाहण्यास योग्य अशी होते.

वेश्याभिसारिका व गणिकाभिसारिका असे सामान्य अभिसारिकेचे दोन भेद सांगितले आहेत. वेश्या ही केवळ रूपाजीवा व अधम नायकांसाठी तनुविक्रय करणारी, म्हणून तिचा समावेश नायिकांत केला नाही. गणिका ही गुणवंती. म्हणून तिच्या अनेक गुणांचा उल्लेख करून भरत म्हणतो––

**प्रियवादी प्रियकथा स्फुटा दक्षा जितश्रमा ।**
**एभिर्गुणैस्तु संयुक्ता गणिका परिकीर्तिता ।।**

अर्थ –– प्रिय बोलणारी, प्रियकथा सांगणारी, स्पष्ट बोलणारी, प्रियकराची मर्जी राखण्याविषयी दक्ष, जी कधी कंटाळत नाही, दमत नाही, अर्थात कोणत्याही प्रकारे प्रियकराचा विरस होऊ देत नाही, एवंगुणविशिष्ट ती गणिका होय.

ललितविस्तर या ग्रंथात राजकुमारीला, ती गणिकेसमान शास्त्रज्ञ होती, असे म्हटले आहे. यावरून तत्कालीन गणिका काव्य–कलाशास्त्र जाणणाऱ्या होत्या, असे दिसते. राजशेखराने आपल्या काव्यमीमांसेत कित्येक गणिका कवी होऊन गेल्याचे सांगितले आहे. त्या काळी गणिकांच्या मुलींना नागरपुत्रांच्या-

बरोबर विद्याध्ययन करण्याचा अधिकार मिळाला होता.

गणराज्यांच्या कालात गणिका ही समस्त राष्ट्र किंवा गण याची संपत्ती मानली जात होती. बौद्ध साहित्यावरूनही ही गोष्ट कळते. संस्कृत नाटकात तिला नगरश्री म्हटले आहे. शूद्रकाने आपल्या मृच्छकटिकात वसंतसेना या एका गणिकेला नायिका बनविले असून तिच्याविषयी अत्यंत आदर दाखविला आहे. वैशाली येथील अंबपाली ही गणिकाही वसंतसेनेप्रमाणेच समस्त नगरीची अभिमानवस्तू होती. पण गणराज्यांचा ऱ्हास झाला व भारतात प्रबल साम्राज्यसत्ता प्रभाव गाजवू लागली, तेव्हा गणिकेचाही मान–आदर लुप्त झाला. त्यापुढच्या काळात गणिका आणि वारांगना हा भेद नष्ट झाला. गणिका ही वारांगनेइतकीच दूषणीय ठरली. तिच्याकडचे अन्न घेऊ नये असा निषेध मनूने घातला (४·२०९).

मात्र काव्य–नाटकातील शृंगारप्रधान वातावरणात गणिकेची इतकी प्रशंसा पाहून एखाद्याने असे समजू नये, की गणिकेला कधी अवमान व निर्भर्त्सना प्राप्त होतच नव्हती. त्याच्या स्त्रीत्वाचा अनेक प्रकारे उपमर्द होत असे. कधी कधी राजे आणि अमीर–उमराव त्यांना भयंकर दुर्गतीत लोटीत असत. या बाबतीत मथुरेतल्या वासवदत्तेचे उदाहरण सुप्रसिद्ध आहे.



राजा नर्तकीला शासन करीत आहे.

अजंट्याच्या दुसऱ्या गुंफेत एक करुण चित्र आहे. त्यात एक शस्त्रधारी राजा रागाने डोळे वटारून एका नर्तिकेला शासन करीत आहे. त्या हतभागिनीची दीनता, लज्जा आणि ग्लानी त्या चित्रात स्पष्टपणे अभिव्यक्त झाली आहे. तिच्याशिवाय आणखी तीन स्त्रिया त्या चित्रात आहेत. त्या सर्वांच्या मुद्रेवर भय आणि दैन्य स्पष्टपणे उमटले आहे.

सत्ताधारी पुरुषाची प्रेमयाचना झिडकारणाऱ्या गणिकेची काय अवस्था होत असेल, त्याची कल्पना मृच्छकटिकातल्या शकाराच्या वर्तनावरूनही कळून येण्यासारखी आहे. **पाहा–** देवदासी, वेश्या. [ प्रा. भा. क. वि.; हि ध.; शृंगारनायिका ]

## गणिग

द. भारतातली एक जात. गाणुग = तेलाचा घाणा, या मूळ तेलुगू शब्दापासून गणिग शब्द व्युत्पादितात. यांना गंडला, ज्योतिपण किंवा ज्योतिनागरम् ( प्रकाशाच्या नगरात राहणारे ) अशीही अन्य नावे आहेत. हे लोक प्रामुख्याने तेल गाळण्याचा व्यवसाय करतात. हेग्गणिग, किरगणिग व ओटियेड्डुगणिग अशा यांच्या तीन शाखा आहेत. हेग्गणिग हे आपल्या घाण्याला दोन बैल जोडतात, किरगणिग स्वतःच घाणा ओढतात व ओटियेड्डुगणिग फक्त एकच बैल जोडून घाणा फिरवतात. तेल गाळण्याशिवाय ते ताडाच्या छत्र्या करणे, शेती व मोलमजुरी करणे यांसारखे इतरही व्यवसाय करतात.

आनेगुंदी येथील व्यासरायमठाचा प्रमुख आचार्य हा यांचा गुरू असून त्याला धर्मशिवाचारस्वामी असे म्हणतात. हे मांस व मासे खातात; परंतु मद्यप्राशन मात्र करीत नाहीत. चेट्टी ही यांची पदवी असून, शैव व वैष्णव अशा दोन्ही पंथांचे लोक यांच्यात आहेत. विष्णूचा रथ ओढायला मिळणे, हा आपला बहुमान समजतात. लिंग धारण करणारा मनुष्य सज्जन मानतात.

ओटियेड्डुगणिग स्वतःला श्रेष्ठ समजतात. ते शैव असून, लिंगायत ब्राह्मणांचे शिष्य आहेत. त्यांच्यात जानवे घालण्याची व तांबडे गंध लावण्याची प्रथा दिसते.

चौडेश्वर व मल्लिकार्जुनस्वामी ही यांची दैवते आहेत. हे लोक घाण्यात बी घालताना डावा हात वापरतात. काही पाप घडले, तर सोन्याच्या तुकड्याने जिभेला चटका देऊन प्रायश्चित्त घेतात.

**विवाहप्रथा** – यांचा लग्नविधी तेलुगू लोकांसारखाच असतो. कंकणबंधनानंतर वधू-वर हातात मीठ घेतात. वराच्या एका हाती खंजीर असतो. संबंध समारंभ पुरा होईपर्यंत तो तसाच ठेवला जातो. लग्नाच्या दिवशी वर जानवे घालतो. वधूच्या गळ्यात जी ताळी बांधतात, ती म्हणजे १०१ पातळ धाग्यांचा गोफ असतो. तिसऱ्या दिवशी वधू–वर शमीवृक्षाची पूजा करतात व त्या वेळी नवरा मुलगा गळ्यातले जानवे झाडाला समर्पण करतो.

**मर्तिकप्रथा**– यांच्यांत सामान्यपणे प्रेते पुरतात. अविवाहित पुरुष मेला असल्यास त्याचे प्रथम रुईच्या झाडाशी लग्न

लावतात व मग त्याला जाळतात अगर पुरतात. अंत्यविधीच्या वेळी कावळ्याला अन्न देतात व विधवेच्या बांगड्या फोडतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**गणितशास्त्र** याचे शुद्ध आणि नियोज्य किंवा व्यावहारिक असे दोन प्रकार आहेत. पहिल्यात अंकगणित, बीजगणित, भूमिती व संख्यासिद्धान्त हे विषय येतात; तर दुसऱ्यात यंत्रशास्त्र, भूमापन, भूपदार्थविज्ञान, ज्योतिष, इ. विषय येतात. हे शास्त्र फार प्राचीन काळापासून भारत, इजिप्त, बाबिलोनिया, फोनिशिया इ. देशांत प्रगत झाले होते. भरतखंडात वेदकाली यज्ञसंस्थेच्या अनुषंगाने आणि नंतर ज्योतिषशास्त्राच्या आधाराने या शास्त्राची वाढ झाली. आर्यभट्ट व ब्रह्मगुप्त यांनी संख्यालेखनात जी प्रगती केली, ती आजच्या गणितपद्धतीचा पाया ठरली आहे. अरबांनी भारतीयांकडून हे ज्ञान मिळविले आणि युरोपात त्याचा प्रसार केला, हे आता सर्वमान्य झाले आहे. **पाहा**– अंकगणित, बीजगणित, इ.

**गणिविद्या** गणी = आचार्य; त्याची जी विद्या, ती गणिविद्या होय. जैनांची प्रव्राजन, सामयिक, आरोपण, उपस्थापन, श्रुतोद्देशानुज्ञा, दिशानुज्ञा, विहार, इ. कर्मे करायची असतात, ती प्रशस्त तिथी, करण, मुहूर्त, नक्षत्र इ. पाहून मगच करतात. हे शुभदिन, शुभयोग पाहण्याची जी विद्या तिला गणिविद्या म्हणतात. [ अभि. रा. ]

**गणेशगीता** गणेशपुराणाच्या क्रीडाखंडात अध्याय १३८–१४८ पर्यंत गणेशगीता आलेली आहे. भगवद्गीतेच्या अनुकरणाने ज्या १७ गीता निर्माण झाल्या, त्यांत या गीतेचे स्थान बरेच वरचे आहे. या गीतेचा श्रोता वरेण्य व वक्ता श्रीगणेश आहे. युद्धारंभी अर्जुनाची ज्या प्रकारची संमूढावस्था झाली होती, तशी इथे वरेण्याची झालेली नाही. त्यामुळे या गीतेतील उपक्रमोपसंहार भगद्गीतेपेक्षा भिन्न झाले आहेत. राजा वरेण्य विरक्त व मुमुक्षू होऊन श्रवणोत्सुक स्थितीत बसलेला आहे व गणपती त्याला ज्ञानोपदेश करीत आहे, असा तिचा उपक्रम झालेला आहे.

योगसाधन, कुंभक-पूरक-रेचक इ. योगांची अंगे, पंचायतनपूजा, मानसपूजा इ. विषय गणेशगीतेत भगवद्गीतेहून अधिक विस्ताराने दिलेले आहेत. परंतु विभूतिवर्णन, विश्वरूपदर्शन, इ. विषय मात्र संक्षेपाने सांगितले आहेत. गणेशगीतेच्या एकूण ११ अध्यायात सांख्यसारार्थयोग, कर्मयोग, ज्ञानप्रतिपादनयोग, इ. विषय आहेत. या विषयांच्या नावांवरूनही भगवद्गीतेतल्या तत्सदृश विषयाची ओळख पटते. भगवद्गीता व गणेशगीता यात अनेक साम्यस्थळे आहेत. त्यातले काही श्लोक पुढीलप्रमाणे––

**नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।**
**न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः ।।**
**भ. गीता** (२.२३)

**अच्छेद्यं शस्त्रसङ्घातैरदाह्यमनलेन च ।**
**अक्लेद्यं भूपभुवनैरशोष्यं मारुतेन च ।।**
**ग. गीता** (१.३१–३२)

**अन्नाद् भवन्ति भूतानि पर्जन्यादन्नसम्भवः ।**
**यज्ञाद् भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ।।**
**भ. गीता** (३.१४)

**ऊर्जो भवन्ति भूतानि देवादन्नस्य सम्भवः ।**
**यज्ञाश्च देवसम्भूतिस्तदुत्पत्तिश्च वैधतः ।।**
**ग. गीता** (२.१४)

भाद्रपद शु. चतुर्थीच्या दिवशी गणेशाची वाहनायुधयुक्त मूर्ती तयार करून जो तिची विधिपूर्वक पूजा करील व सात वेळा गणेशगीता वाचील, त्याला पुत्रपौत्र, धनधान्य, पशू, रत्न, इ. संपत्ती मिळेल अशी फलश्रुती ग्रंथाच्या शेवटी दिलेली आहे. [ ग. गी. ]

**गणेशचतुर्थी** भाद्र० शु. ४ थीला हे नाव आहे. या दिवशी गणपतीचा पूजोत्सव बंगाल व गुजरात वगळून भारतात सर्वत्र होतो. हिला वरदचतुर्थी व शिवा असेही म्हणतात. ही चतुर्थी रविवारी किंवा मंगळवारी आल्यास तिचे माहात्म्य अधिकच कमते.

या दिवशी गणपतीची मृण्मय व रंगीत मूर्ती घरी आणून सिद्धिविनायक या नावाने तिची पूजा करतात. गणपतीला एकवीस मोदकांचा नैवेद्य दाखवतात. या प्रसंगी त्याची दहा नावे गुंफलेला पुढील मंत्र म्हणून त्याला एकवीस दूर्वा अर्पण करतात–

**गणाधिप नमस्तेऽस्तु उमापुत्राघनाशन ।**
**एकदन्तेभवक्त्रेति तथा मूषकवाहन ।।**
**विनायकेशपुत्रेति सर्वसिद्धिप्रदायक ।**
**कुमारगुरवे तुभ्यं पूजनीयाः प्रयत्नतः ।।**

हा उत्सव प्रामुख्याने दीड दिवस असतो. म्हणजे गणेशचतुर्थीच्या दिवशी माध्यान्ही पूजिलेला गणपती दुसऱ्या दिवशी सायंकाळी विसर्जित करतात. कित्येक घरी पाच, सात, नऊ व दहा दिवसही गणपती ठेवून त्याची पूजा करतात. कित्येक कुटुंबांत ज्येष्ठागौरीच्या बरोबर गणपतीचे विसर्जन

होते. ही प्राणप्रतिष्ठा करून बसवलेली मूर्ती उत्तर पूजा करून देव्हाऱ्यातून खाली काढतात व तिचे जलात विसर्जन करतात.

गणेशचतुर्थीच्या दुसऱ्या दिवशी म्हणजे ऋषिपंचमीस गणपतीचे वाहन असलेल्या उंदरास खिरीचा नैवेद्य दाखवतात. गणेशचतुर्थीच्या दिवशी चंद्रदर्शन करू नये; केल्यास चोरीचा आळ येतो, अशी समजूत आहे. श्रीकृष्णाला असे चंद्रदर्शन घडले व त्याच्यावर स्यमतक मणी चोरल्याचा आळ आला, अशी कथा आहे. या दिवशी ज्याला चंद्रदर्शन घडते, त्याने चोरीचा आळ न येण्यासाठी स्यमतक मण्याचा पुढील श्लोक म्हणावा, असे तिथितत्व या ग्रंथात सांगितले आहे–

**सिंहः प्रसेनमवधीत् सिंहो जाम्बवता हतः ।**
**सुकुमारक मा रोदीस्तव ह्येषः स्यमन्तकः ।।**

(विष्णूपु. ४. ४३. ४२)

अर्थ– सिंहाने प्रसेनाला मारले, सिंहाला जांबवताने मारले. हे सुकुमारा, तू रडू नको, हा स्यमंतक मणी तुझाच आहे.

वरील श्लोक म्हणताना पाणी प्यावे व स्यमंतक मण्याची कहाणी ऐकावी, असेही सागितलेले आहे. यासबधी कोकणात एक लोकाचार आहे, तो असा – ज्याला चंद्रदर्शन घडते, तो शेजाऱ्याच्या घरावर दगड मारतो किवा शेजाऱ्याच्या परसातले एखादे झाड कापून टाकतो. शेजाऱ्याने शिवीगाळ केली, की आपल्यावरचा आळ टळला, असे त्याला वाटते.

गणेशचतुर्थीच्या दिवशी चंद्रदर्शन का करू नये, या विषयीची कथा अशी––

एकदा गणपती उंदरावर स्वार होऊन वेगाने जात असता खाली पडला. हे चंद्राने पाहिले व त्याला हसू आले. त्यामुळे गणपती रागावला. त्याने चंद्राला शाप दिला, की 'आजपासून कोणीही तुझे मुखावलोकन करणार नाही.' मग चद्राने गणपतीची करुणा भाकली. तेव्हा गणपतीने उःशाप दिला, की 'फक्त गणेशचतुर्थीच्या दिवशी तुला कोणी पाहणार नाही.' त्या दिवसापासून चंद्र हा गणेशचतुर्थीस अदर्शनीय ठरला. (गणपती पाहा)

**गणेशचतुर्थीची कथा** –– एक गरीब क्षत्रिय होता. त्याने कुटुंबपोषणासाठी अनेक व्यवसाय केले; पण त्याला द्रव्यप्राप्ती काही होईना. शेवटी संसाराला कंटाळून तो रानात गेला. तिथे त्याला सौभरी ऋषीचे दर्शन झाले. त्या ऋषीने त्याला श्रावण शु. ४ थींपासून भा० शु. ४ थींपर्यंत गणपतीची आराधना करायला सांगितले. त्याने त्याप्रमाणे करताच त्याला संपदा प्राप्त झाली व पुढील जन्मी तो कर्दम नावाचा ऋषी झाला (गणेश पु. उपा. ५२–५३).

लिगायत लोक गणेशचतुर्थीच्या दिवशी बैलाची मृण्मयमूर्ती करून तिची पूजा करतात. महाराष्ट्रात पेशव्यांच्या कारकीर्दीत भाद्रपदातला गणेशोत्सव चतुर्थीपासून दशमीपर्यंत थाटाने साजरा होत असे. लो. टिळकांनी यालाच पुढे राष्ट्रीय उत्सवाचे स्वरूप दिले. सार्वजनिक गणपती बसवावे, त्याच्यापुढे ज्ञान–विज्ञानाची व्याख्याने करवावीत, राष्ट्रीय जागृतीचे पोवाडे गाणारे मेळे काढावे, कथा–कीर्तने–प्रवचने याच्या द्वारे राष्ट्रात देशभक्तीचा प्रचार करावा, त्या निमित्ताने सघटना बांधाव्या आणि अशा प्रकारे दहा दिवस उत्सव करून अनंतचतुर्दशीच्या दिवशी मिरवणुकीने गणपतीचे विसर्जन करावे, अशी प्रथा लो. टिळकांनी सुरू केली. भारताच्या स्वातंत्र्य–आंदोलनात या सार्वजनिक गणेशोत्सवाचे कार्य दृष्टीआड करण्यासारखे नाही. महाराष्ट्रात तर तो एक चैतन्यदायी उत्सव ठरला.

## गणेशचतुर्थीव्रत

भाद्र० शु. ४ थीस गणेशाची सुवर्णमूर्ती करून तिची प्राणप्रतिष्ठेसह पूजा करावी, नंतर हवन करावे आणि ती मूर्ती ब्राह्मणाला दान द्यावी, असा या व्रताचा विधी आहे. फल– ऐश्वर्यप्राप्ती. [व्रतराज]

## गणेश दैवज्ञ

(१४९८–१५७८ इ. स.) महाराष्ट्रातील एक विख्यात ज्योतिषी. हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होता. याचा पिता केशव दैवज्ञ हाही नामांकित ज्योतिषी होता. याचे काही वशजही विद्वान निघाले. हे घराणे कौशिक गोत्री असून नांदगाव येथे राहणारे होते.

गणेश दैवज्ञाचे ग्रहगणिताचे ग्रथ सांप्रत भारतात सर्वत्र प्रचलित आहेत. महाराष्ट्र, गुजरात व कर्नाटक या प्रदेशातील ज्योतिषी याच्या ग्रहलाघव नामक ग्रंथावरूनच पचागातील ग्रहांचे गणित करतात. इतर प्रदेशांतही हा ग्रंथ बराच वापरला जातो. याशिवाय लघुतिथिचितामणी, बृहत्तिथिचिंतामणी, सिद्धान्तशिरोमणीटीका, लीलावतीटीका, विवाहवृंदावनटीका, मुहूर्ततत्त्वटीका, श्राद्धनिर्णय, छंदोर्णवटीका, तर्जनीयंत्र, कृष्णाष्टमीनिर्णय, होलिकानिर्णय, पर्वनिर्णय असे याचे अन्यही ग्रंथ आहेत.

हा शोधक व कल्पक होता. तो केवळ गणिती नसून, वेध घेणाराही होता. त्याने काही युक्त्या बसवून गणित सुलभ केले.

असे सांगतात, की गणपतीने केशव दैवज्ञ याला स्वप्नात दृष्टांत देऊन सांगितले की 'मी तुझ्या पोटी अवतार घेईन.' नंतर त्याला जो पुत्र झाला त्याचे नाव त्याने गणेश हे ठेवले. [म. ज्ञा. को.; म. च. को.]

**गणेशपुराण** एक उपपुराण. हे गाणपत्य संप्रदायाचे सर्वश्रेष्ठ पुराण आहे. पण सर्ग, प्रतिसर्ग, इ. पुराणपंचलक्षणे यात आढळत नाहीत. हे पुराण ब्रह्मदेवाने व्यासांना, व्यासांनी भृगू ऋषीला व भृगूने सोमकांत राजाला सांगितले, अशी त्याची परपरा सांगितलेली आहे. उपासनाखंड व क्रीडाखंड असे या पुराणाचे दोन विभाग आहेत.

उपासनाखंडात गणेशमाहात्म्य, गणेशोपासनेचे विविध प्रकार, व्रतवैकल्ये आणि त्यांच्या अनुषंगाने काही पौराणिक कथा सांगितल्या आहेत. सोमकांत राजाच्या कथेत राजाने पुत्राला केलेला नीतिशास्त्राचा उपदेश मननीय आहे. नंतरच्या अध्यायात व्यासांच्या गर्वाचे निरसन कसे झाले, ती कथा आहे. त्यानंतर गजाननाने ब्रह्मदेवाला आपल्या उदरात अनंत ब्रह्मांडे दाखवून त्याचा गर्वभार उतरवल्याची कथा सांगितली आहे. अध्याय १०५ मध्ये विष्णू व गणेश यांचे अभेदत्व, अध्याय १०६ मध्ये गणेशाचे गणांचा स्वामी या अर्थाने केलेले विवेचन, अध्याय १०८ मध्ये इंद्र व यम याचे गर्वहरण, इ. विषय आहेत. या खंडात सृष्टीची निर्मिती, मधुकैटभ, त्रिपुरासुर, तारकासुर, कार्तवीर्य, रुक्मागद, अनलासुर, सिधुदैत्य, यांच्या कथा इतर पुराणांतून घेऊन त्यांत गणेशमाहात्म्याची भर घातलेली आहे. गृत्समद व भृशुंडी याच्या कथा मात्र स्वतंत्र आहेत. ते गणेश संप्रदायाचे प्रवर्तक होते. या खंडात गणेशसहस्रनामही आहे ते गणेशाने स्वतः शंकराला कथन केले, असे तिथे म्हटले आहे.

क्रीडाखंडात गणेशाच्या चार अवताराच्या कथा सागितल्या असून, सदाचरण व गणेशाची अनन्य भक्ती यांचे माहात्म्य वर्णिले आहे. यातील महोत्कट विनायक, मयूरेश्वर गजानन आणि गणेश या तीन कथांचे मूळस्वरूप स्वतंत्र आहे. त्या परंपरेने आलेल्या प्राचीन कथा असाव्या. कृतयुगात विनायक हा सिंहारूढ व दशभुज आहे; त्रेतायुगात मयूरेश्वर हा मयूरारूढ व षड्भुज आहे; द्वापारयुगात तो मूषकवाहन, चतुर्भुज व गजानन आहे आणि कलियुगात तो धूम्रवर्ण या नावाने अवतार घेणार आहे. याच खंडात भगवद्गीतेच्या धर्तीवर रचलेली गणेशगीता आहे. पुराणाच्या शेवटी त्याची फलश्रुतीही सांगितली आहे. [म. ज्ञा. को.; मं. मू. श्री.]

**गणेशपूजाव्रत** एक काम्य व्रत. हे स्त्री व पुरुष दोघांनाही करता येते. हे व्रत एकवीस दिवसांचे असते. व्रतारंभ श्रावण शु. ४ थींस व व्रतसमाप्ती श्रावण कृ. १० मीस होते. या व्रताचा विधी असा–

तीळ व आवळे एकत्र वाटून तो कल्क अंगास लावून सूर्योदयाच्या वेळी जलाशयात स्नान करतात. मग कलशार्चनादी करून गणपतीच्या मूर्तीची स्थापना करतात. पुढील मंत्राने गणपतीचे ध्यान करतात–

**एकदन्तं शूर्पकर्णं गजवक्त्रं चतुर्भुजम् ।**
**पाशाङ्कुशधरं देवं मोदकं बिभ्रतं भजे ।।**

अर्थ– एकदंत, सुपासारखे कान असलेल्या, गजमुख, चतुर्भुज पाश, अंकुश व मोदक धारण करणाऱ्या, अशा गणपती देवाचे मी भजन करतो.

मग षोडशोपचार पूजा करतात. या पूजेत मधुपर्क, अंगपूजा, पत्रीपूजा, नामपूजा, दुर्वापूजा व एकवीस प्रदक्षिणा या विशेष गोष्टी असतात. पूजेनंतर वायनदान, ब्राह्मणभोजन, कथाश्रवण, हविष्यान्नभोजन, इ. गोष्टी करून व्रतपूर्ती करतात.

या पूजेत एकवीस मोदकांचा महानैवेद्य असतो. त्यातील एक देवाला व दहा स्वतःसाठी ठेवून दहा ब्राह्मणांस देतात. भोजनाच्या वेळी मौन धारण करतात. ब्रह्मचर्य व भूमिशयन हे नियम या व्रतात कटाक्षाने पाळावयाचे असतात. या व्रताची कथा अशी–

एकदा नर्मदातटाकी शंकर-पार्वती विहार करीस असता पार्वतीला द्यूत खेळण्याची इच्छा झाली. पण द्यूतातली हारजीत सागण्यासाठी कोणी त्रयस्थ साक्षी हवा होता. त्यासाठी पार्वतीने तृणापासून एक बालक निर्माण केला. मग त्यांचा डाव सुरू झाला. त्या खेळात शिव हरला; पण त्या बालकाने पार्वती हरली, असे सांगितले. त्या असत्य भाषणाने पार्वती रागावली व तिने त्याला शाप दिला, की 'तुझे पाय निकामी होतील व तू चिखलात लोळत पडशील.'

त्या शापाप्रमाणे तो बालक लुळापागळा होऊन पडला. पुढे काही दिवसांनी काही नागकन्या कोण्यातरी देवाची पूजा करीत असताना त्याला दिसल्या. ती पूजा नर्मदागणपतीची होती. सदर बालकाने त्या व्रताचे विधिविधान नागकन्याकडून विचारून घेतले व त्याप्रमाणे स्वतः पूजा केली. त्या पूजेच्या पुण्याईने त्या बालकाचे गेलेले पाय त्याला परत मिळाले. नंतर त्या बालकाने कैलासावर जाऊन शिव-पार्वतीना त्या व्रताची माहिती सांगितली. त्या दिवसापासून हे व्रत लोकांत प्रचलित झाले. [व्रतराज]

**गणेशयोगी** एक महागाणपत्य. याने गणेशविजय नामक एक ग्रंथ लिहिला असून, त्यात २२ अध्याय व ४५२२ ओव्या आहेत. तसेच याने सस्कृतमध्ये गणेशगीतेवर टीका लिहिली असून, त्याची प्राकृत समओवी टीकाही लिहिली आहे. याशिवाय याने गणेशगुह्यस्तोत्र, मयूरेशचरित्र, ललिताची व इतर अनेक पदे, अभंग, श्लोक, इ. रचना केली आहे.

याचा शिष्यसंप्रदाय मोठा आहे. मोरगाव येथे याची समाधी आहे. [ म. च. को. ]

**गणेशोत्सव** गणेशचतुर्थी पाहा.

**गदग** धारवाड जिल्ह्यातील एक ठिकाण. याला प्राचीन काळी त्रिकूटाचलक्षेत्र असे म्हणत. या ठिकाणी त्रिकूटेश्वर महादेव व वीरनारायण ही दोन प्रेक्षणीय मंदिरे आहेत. त्रिकूटेश्वराच्या देवळात शाळुंकेवर हातभर उंचीची ब्रह्मा, विष्णू आणि महेश याची स्वयंभू लिंगे आहेत; म्हणून याला त्रिगुणात्मक स्थान म्हणतात. त्याचप्रमाणे देवालयाच्या मागील भितीस टेकून असलेल्या पाषाणावर एक शिलालेख असून, त्यात होयसळ राजा वीरवल्लभ याने मंदिराला इनाम म्हणून जमीन दिल्याचे नमूद केले आहे [ स. भा. प्र. व.; हि. जॉ. ए. इं. ]

**गदब** द. भारतातील एक आदिवासी जमात. यांची मुख्य वस्ती विजगापट्टम् जिल्ह्यात आहे. मध्यप्रदेशातील बस्तर जिल्हा व ओडिसामधील कोरापुट जिल्हा या भागातही यांची थोडी वस्ती आढळते. हे लोक स्वतःला गुथौ म्हणवितात. गदब म्हणजे ओझे वाहणारा मनुष्य. यांची स्वतत्र भाषा असून, ती मुंडारी किंवा कोलरियन गटातली आहे.

बडो, गुटोब, पारेंग, ओलार, कथ्थिरी व कापू अशा यांच्या सहा मुख्य शाखा आहेत. याशिवाय जे अनेक पोटभेद आहेत, त्यांना त्यांच्या त्यांच्या देवकांची नावे आहेत. उदा० गुताल, (कुत्रा), अंगवान (अस्वल), डुंग्र (कासव), सुरंगै (वाघ), गूमाल (साप) इत्यादी. हे समान देवकात लग्नसंबंध करीत नाहीत.

**विवाहप्रथा**— याच्यात बालविवाह कधीच प्रचलित नव्हता. मुलीला कापड विणता आल्या शिवाय तिचे लग्न होत नाही म्हटले तरी चालेल. कन्याशुल्क एक रुपया असते. लग्न वराच्या घरी होते. तिथे दोघांना जात्याच्या तळीवर बसवून हळदीच्या पाण्याने स्नान घालतात. नंतर पाणिग्रहण होते. रात्री नाच होतो. दुसऱ्या दिवशी नवविवाहित वधू–वर इतर लोकांवर चिखल फेकतात. त्यानंतर सर्वांचे स्नान, भोजन व नृत्य होते. या नृत्यात वधू–वर भाग घेत नाहीत.



गदब वधू

शेती व मजुरी हे यांचे व्यवसाय होत. यांची शेती झूम पद्धतीची असते. काही लोक पालखी, मेणे वगैरे वाहून नेण्याचे काम करतात. यांना शिकारीचीही फार आवड असते. स्त्रिया झाडांच्या सालीपासून धागे काढून स्वतःच वस्त्र विणतात. हे वस्त्र चांगले टिकाऊ असते. त्याचे कपडे वेगवेगळ्या रंगीत पट्ट्यांचे असून, त्यावरील नक्षीकाम फार मोहक असते. स्त्री-पुरुष कानांत मोठाली कडी घालतात. स्त्रियांची कर्णकुंडले खांद्यापर्यंत लोंबणारी असतात. त्यांच्या गळ्यांत काचेच्या मण्यांच्या व पोतीच्या माळा असतात. पायांत पितळी व चांदीच्या तोरड्या किंवा कड्या असतात. त्याची केशरचना आकर्षक असते.

**देव–धर्म**— यांच्या मुख्य देवता बुढी किंवा ठकुराणी माता, ईश्वर, भैरव व झंकर या होत. झंकर हा भूदेव, पर्जन्यदेव व धान्याचा देव असतो. त्याला गाईचा बळी देतात. ईश्वराला म्हशीचा बळी देतात. इतर देवतांना कोंबडे व बकरे देतात. ठकुराणी ही रोगांची देवी आहे. साथ आली, की प्रथम हे लोक तिला फुले वाहून तिच्यापुढे धूप जाळतात. पण साथ लवकर थाबली नाही, तर मात्र पूजा बद करून तिला शिव्या देतात. भडारिण ही यांची कृषिदेवता, तर धरणी ही आरोग्यदेवता असते. भरवान ही पशुरक्षक देवता, तर दंडदेवी जंगली पशूपासून माणसांचे रक्षण करणारी देवता असते. मातीदेव हा त्यांचा शिकारीचा देव होय. ओडिसामधील गदबांच्या लोककथात इसपूर महाप्रभू हा मुख्य देव आणि विर्कमदाई, गिरगिरमेता सिमदाई, भीमो, इ. दुय्यम देव यांच्या कथा आहेत. मांत्रिक स्त्रीचे ग्रामदेवतेशी लग्न लावण्याची पद्धत यांच्यांत आहे. या देवताची मदिरे नसतात.

यांना नाचगाण्याची फार आवड आहे. यांच्या नाचाला भूतनृत्य असे म्हणतात. हे दसरा, होळी, इ. सणाच्या प्रसंगी केले जाते. त्याला बासरी व ढोलाची साथ असते. स्त्री-पुरुष मिश्रनृत्य करतात. ते हातात हात घालून, कधी फेर धरून, तर कधी सरळ रांगा करून नाचतात.

हे लोक घोडा, गाढव आणि माकड या प्राण्यांचे मास खात नाहीत. घोड्याला तर शिवतही नाहीत.

**मर्तिकप्रथा**— मृत पुरुषांना जाळतात आणि स्त्रियांना व मुलाना पुरतात. पुरताना प्रेताचे पाय पश्चिमेकडे ठेवतात. सुतक तीन दिवस पाळतात. मध्य भारतातील गदब ९ दिवस सुतक पाळतात व मृताच्या नावाने एक दगड उभा करून त्याला अधूनमधून बळी अर्पण करतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**गदा** एक प्राचीन आयुध. रामाचा सेवक हनुमान गदाधारी व गदायुद्धात प्रवीण होता. महाभारतात भीम, दुर्योधन, जरासंध, बलराम, इ. अनेक गदाधारी पुरुष आढळतात. भीम व दुर्योधन हे बलरामाजवळ गदायुद्ध शिकले. त्या काळी धनुष्याच्या खालोखाल गदेचे महत्त्व असून, खड्गापेक्षा गदेचा अधिक उपयोग केला जात असे. प्रत्येक योद्धयाच्या गदेला विशिष्ट नाव असे. गदायुद्धात कमरेखालच्या भागावर गदेचा प्रहार करू नये असा नियम होता. पण भीमाने दुर्योधनाशी युद्ध करताना तो पाळला नाही, अशी कथा आहे.

गदेचा दांडा पन्नास अंगुळे लांब असून त्याला एका टोकाला एक लहान बोंड व दुसऱ्या टोकाला मोठा गोळा असतो. या गोळ्याचा व्यास दहा अंगुळे असून, त्याला खाली आणि वर सोळा पाकळ्यांची कमळे असतात.


गदा

हे शस्त्र सिंधुसंस्कृतीच्या लोकांना माहीत होते, असे दिसते. कारण हडप्पा व मोहेंजोदडो येथे पाषाणाच्या व तांब्याच्या गदा सापडल्या आहेत. वेदकालीन आर्यही गदा वापरीत होते. शिकंदराचा प्रतिकार करणाऱ्या शिवी लोकांनी त्या युद्धात मुख्यतः गदेचाच उपयोग केला होता, असे कळते.

सांप्रत व्यायामाचे साधन म्हणून गदेचा उपयोग करतात. एका जाड बांबूच्या टोकाला लोखंडी अथवा दगडी गोळा बसवून ही गदा तयार करतात. एका किंवा दोन्ही हातांनी पाठीमागे धरून गदा फिरविण्यामुळे हाताचे व छातीचे स्नायू चांगले तयार होतात. उ. भारतातील आखाड्यात गदेचा उपयोग विशेष केला जातो. [ क. हि. वा. पु.; व्या. ज्ञा. को.; सु. वि. को. ]

**गदादेवी** गदा या आयुधाची स्त्रीरूपी प्रतिमा. (आयुधपुरुष पाहा ) अशा प्रतिमा काही विष्णुमूर्तींच्या जवळ आढळतात. अशा शिल्पात विष्णूचे हात गदादेवी व चक्रपुरुष याच्या मस्तकावर ठेवलेले असतात. [ डे. हि. इ. ]

**गदाधर** विष्णूचे एक नाव. ब्रह्मदेवाच्या आज्ञेवरून विश्वकर्म्याने गद नामक असुरांच्या अस्थीची गदा बनवली व इंद्रादी देवांना पराजित करणाऱ्या हेती नामक राक्षसाला विष्णूने या गदेने ठार मारले. म्हणून त्याला गदाधर हे नाव मिळाले. **पाहा**– कौमोदकी [ अ. अ. ]

**गदाधरभट्ट** ( १ ) ( इ. स. चे १७ वे शतक ) न्यायशास्त्राचा एक प्रकांडपंडित. याचा जन्म पूर्व बंगालमध्ये झाला. त्याच्या पित्याचे नाव जीवाचार्य. वाडिआ येथील हरिराम तर्कवागीश हे याचे गुरू होते. याने रघुनाथ शिरोमणीच्या दीधितीवर एक उत्कृष्ट टीका लिहिली, ती गादाधरी या नावाने प्रसिद्ध आहे. या ग्रंथामुळे त्या काळातला सर्वश्रेष्ठ तर्कज्ञ म्हणून याची कीर्ती झाली. याशिवाय याने उदयनाचार्यांच्या आत्मतत्त्वविवेक नामक ग्रंथावर व्याख्या लिहिली आहे. याने सुमारे ५२ ग्रंथ लिहिले असून, त्यांपैकी पुढील ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहेत- (१) तत्त्वचिंतामणिदीधितिप्रकाश, (२) तत्त्वचिंतामणिव्याख्या, (३) तत्त्वचिंतामण्यालोकटीका, (४) मुक्तावलीटीका, (५) रत्नकोशवादरहस्य, (६) अनुमानचिंतामणिदीधितिटीका, (७) आख्यातवाद, (८) कारकवाद, (९) नयवाद, (१०) प्रामाण्यवाददीधितिटीका, (११) बुद्धिवाद, (१२) मुक्तिवाद, (१३) विधिवाद, (१४) व्युत्पत्तिवाद, (१५) शक्तिवाद, (१६) स्मृतिसंस्कारवाद व ( १७ ) शब्दप्रामाण्यवादरहस्य. [ म. च. को.; भा. द. ]

(२) एक हिंदी कवी. हा दक्षिणी ब्राह्मण चैतन्य महाप्रभूंचा शिष्य व जीवगोस्वामी याचा समकालीन होता. मात्र याचा जन्म कोणत्या साली व कुठे झाला, ते कळले नाही. हा संस्कृत पंडित असून ब्रजभाषेवरही याचे प्रभुत्व होते. 'सखी हौं स्याम रंगरंगी' हे याचे पद ऐकून जीवगोस्वामी मुग्ध झाले आणि त्यांनी याला वृंदावनात वास्तव्य करण्यासाठी बोलावले. तदनुसार हा तिकडे गेला व अखेरपर्यंत तिथेच राहिला.

हा चैतन्य महाप्रभूंना भागवतकथा ऐकवीत असे. ती कथा ऐकून अनेक जण विरक्त झाले, असे म्हणतात. हा स्वभावाने अत्यंत सज्जन होता. प्राणिमात्राच्या ठिकाणी ईश्वराचे अस्तित्व मानून हा सर्वांचा आदर करीत असे. दुसऱ्याचे सद्गुणच त्याला दिसत.

वृंदावनवासी राधा–कृष्ण हे याचे उपास्य दैवत होते. याचे काव्य मधुराभक्तीचे आहे. त्यात राधा–कृष्णांच्या विविध लीलांचे मनोहर वर्णन असून, मायामोहाचा त्याग करून कृष्णलीलेत रममाण होण्याचा उपदेशही आहे.

या कवीचा एखादा स्वतंत्र ग्रंथ अजून उपलब्ध झालेला नाही. स्फुट पदे मात्र पुष्कळ आहेत. त्याने भक्तांचे दैन्य,

वात्सल्य, यमुनास्तुती इ. विषयांवरही काही पदे रचली आहेत. याच्या पदांची भाषा सहजसुदर असून, त्याने अलंकारांचा उपयोग क्वचितच केलेला दिसतो. भावानुरूप शब्दयोजना हेच त्याच्या भाषेचे सौदर्य होय. [ भा. सं. म.; ब्र. कृ. मा. भ. ]

**गदीर** शियापंथी मुसलमानांचा एक सण. जू उल-हिज्जा या महिन्याच्या १८ व्या दिवशी अबूबक्र, उमर व उस्मान या तीन खलीफाच्या पिठाच्या मूर्ती करून, त्यांत मध भरतात आणि नंतर त्याना चाकूने भोसकून त्यातून येणारा मध त्यांचे रक्त म्हणून पितात.

गदीरखूम नामक तळचाजवळ मुहंमदाने अली याला आपला वारस नेमले. परंतु पुढे, बहुमताने जो निवडून येईल, तोच खलीफा व्हावा असे ठरले. अबूबक्र, उमर व उस्मान हे तिघे पहिले तीन खलीफा झाले. अलीचे अनुयायी या तिघांना मानीत नाहीत व आपला राग ते वरील पद्धतीने प्रकट करतात. [ डि. इ. ]

**गद्दारा** शिखाचे एक हत्यार. याचे पाते अडीच फूट लांब व टोकाला निमुळते होत गेलेले असते. या पात्याला तीक्ष्ण धार असते. पात्यावर दोन पन्हाळी असतात. हे हत्यार पोलादी असून वजनदार असते. गेंडचासारखे मोठे प्राणी याने सहज मारता येतात. [ प्रा. ऐ. श ]

**गद्दी** हिमालय प्रदेशातील कागडा व चंबा याच्यामधील धौलाधार डोंगरावर वसलेली एक आदिवासी जमात. यांना गादी असेही म्हणतात. यांच्या वास्तव्यामुळेच या प्रदेशाला गद्देरन असे नाव मिळाले आहे. चंबा जिल्ह्यातील भरमौर तालुक्यात याचे मुख्य वसतिस्थान आहे, त्याला गदरिया म्हणतात. प्राचीन काळी चंबा या प्रदेशाची राजधानी भरमौर येथे होती. तिथे सुमारे १४०० वर्षापूर्वीचे एक शिवमंदिर व नृसिहमंदिर अजून चांगल्या स्थितीत आहे. चौऱ्यायंशी सिद्धांची मंदिरेही तिथे आहेत. भरमौरपासून २० मैलांवर मन्महेश नामक प्रसिद्ध तीर्थस्थान आहे.

राजा साहिल वर्मा (इ. स. चे १० वे शतक) याने आपली कन्या चबावती हिच्या नावाने चंबा नगरीची स्थापना केली. भरमौर हे सुरक्षित स्थान असल्यामुळे ११ व्या शतकात काही राजपूत लोक तिथे जाऊन स्थायिक झाले आणि तिथल्या मूळच्या लोकांवर राज्य करू लागले. औरंगजेबाच्या कारकीर्दीत पंजाबच्या सखल प्रदेशातील हिंदू धर्मभयामुळे तिकडे पळून गेले असावे, असे काही इतिहासपंडितांचे अनुमान आहे. मात्र मूळचे आदिवासी आणि बाहेरून आलेले हिंदू याच्यांत आता भाषा, वेषभूषा व चालीरीती या बाबतीत काही फरक राहिलेला नाही.

हे लोक शेळयामेढचा पाळण्याचा व्यवसाय करतात. ग्रीष्म



गद्दी मेढपाळ

ऋतूत ते लहोलच्या बाजूला डोंगरमाथ्यावर जाऊन राहतात आणि हिवाळचात कांगडा व गुरुदासपूर येथील मैदानी प्रदेशात उतरतात. एकंदरीत याचे जीवन अस्थिर व कष्टमय असते.

गद्दी स्त्रिया लोकरीची वस्त्रे विणतात. त्यांना लाल, पिवळा, निळा, काळा, इ. गडद रंगाच्या कपडचांची फार आवड असते. त्यांच्या अंगावर चांदीचे अलंकार विपुल असतात. त्या धष्टपुष्ट, सुडौल व सुंदर असतात. लोकरीचा लांब कोट (चोला) व डोक्याला रंगीबेरंगी दुपट्टा असा त्याचा पोषाख असतो. कोटावर लाल फुले काढलेली असतात. त्या पांढरा कुरता, ओढणी, चोळी व लेहेंगा वापरतात. त्यांच्या गळचात लाल, हिरव्या, शुभ्र अशा मण्यांच्या माळा असतात. पुरुषही काचेच्या मण्यांच्या माळा घालतात. गद्दी पुरुष लोकरीचा लांब कोट वापरतात व डोक्याला लोकरीची गोल टोपी घालतात. हिवा-

ळ्यात ती कानापर्यंत ओढता येते. त्यांच्या कोटाचा खिसा एवढा मोठा असतो, की त्यात नवजात कोकरूही मावते. हे बहुधा पादत्राण वापरीत नाहीत. सर्व स्त्री-पुरुष व मुले कमरेला १०० हात लांबीची दोरी बाधतात. त्याला गायत्री म्हणतात. ती फक्त झोपताना सोडून ठेवतात. सिद्धांच्या रक्षणार्थ सर्वांनी कमरेला दोरी बांधावी, या शकराच्या आज्ञेमुळे ही प्रथा सुरू झाली, अशी यांची श्रद्धा आहे.

**देव-धर्म** – शिव हा गद्दीचा मुख्य देव आहे. इतर अनेक देवी–देवता, भुते–खेते, डाकिणी यांच्यावरही त्यांची श्रद्धा असते. हे लोक देवताची पूजा करीत नाहीत किवा इतर काही धार्मिक कृत्यही करीत नाहीत. ते फक्त देवताना लोकर किंवा लोकरी वस्त्रे वाहतात आणि बकरा बळी देतात.

यांच्यांत ब्राह्मण, खत्री, राजपूत व हरिजन असे भेद आहेत. सर्वजण शेंडी ठेवतात. यांच्या भाषेला भरमौरी भाषा म्हणतात. तिची स्वतंत्र लिपी नाही. ही भाषा लोकगीते व म्हणी यांनी संपन्न आहे.

**विवाहप्रथा** – हे लोक मुले-मुली वयात आल्यानंतरच त्यांचा विवाह करतात. विवाहाचे दोन प्रकार आहेत. पहिल्या पद्धतीत ज्या घरातून मुलगी आणायची, त्या घरात आपली मुलगी द्यायची असते. ते शक्य नसल्यास मुलीच्या बापाला भरपूर देज देऊन तिच्याशी लग्न करावे लागते. किंवा वराला वधूपित्याच्या घरी सात वर्षे दास म्हणून काम करावे लागते. त्या काळात त्याला तिथे फक्त दोन वेळा जेवण मिळते. कपडे स्वतःचे आणावे लागतात. नोकरीच्या कालावधीत भावी पत्नीशी त्याला बोलताही येत नाही. हे सर्व नियम तो पाळतो व लग्न झाल्यावर बायकोला गुरासारखे राबवून त्या गोष्टीचा बदलाही घेतो.

या प्रकारामुळे म्हातारा पुरुष व तरुण स्त्री किवा लहान मुलगा व तरुण स्त्री असे विजोड विवाहही त्या भागात आढळून येतात. विवाहाचा आणखी एक प्रकार रूढ आहे, त्याला झंझराडा म्हणतात. एखादा तरुण स्वतःला प्रिय अशा विवाहित स्त्रीला, तिचे आईवडील व पती यांच्या इच्छेविरुद्ध, पण तिच्या स्वतःच्या संमतीने पळवून नेतो आणि एखाद्या मंदिराला प्रदक्षिणा घालून तिच्याशी विवाह करतो. अशा विवाहाला त्यांच्या समाजाची मान्यताही मिळते. मात्र या दुसऱ्या नवऱ्याला पहिल्या नवऱ्याचे आर्थिक नुकसान भरून द्यावे लागते.

गद्दी लोकांच्या जीवनात विवाहाला फार महत्त्वाचे स्थान असते. अविवाहित स्थितीत मरणे म्हणजे कुत्र्यासारखे मरणे, असे ते समजतात. या भावनेमुळे पुरुष २५ वर्षेपर्यंत वधूपित्याच्या घरी गुलामगिरी करण्यासही तयार होतो.

लग्नानंतर एक वर्षभर नवरी माहेरीच राहते. नंतर पती तिला घेऊन जातो. तिच्याबरोबर माहेरची पुष्कळ माणसेही जातात. त्यांना बकरे व लुगडी नामक मद्य यांची मोठी मेजवानी दिली जाते, तिला सदनोज म्हणतात.

**मर्तिकप्रथा** – मृताची लाकडी स्मारके बांधण्याची यांच्यांत प्रथा आहे. अशी अनेक स्मारके प्रत्येक गावात आढळतात. त्यांना बंगलोड म्हणतात. पचायत सभा भरविण्यासाठी किंवा प्रवाश्यांना बसण्यासाठी यांचा उपयोग केला जातो.

**नृत्य** – गद्दी लोकांना नृत्य-गायनाची फार आवड आहे. ते लुगडी नामक मद्य पिऊन रात्रभर बेहोषपणे नाचतात. स्त्रिया व पुरुष एकत्र नाचत नाहीत. दोघांचे नृत्य वेगवेगळे असते. नाचताना हे लोक गोलाकार उभे राहतात, हातपाय विविध प्रकारे फिरवतात आणि चकरा घेतात. हात पसरून चक्कर घेताना त्यांचा चोला पसरत असल्यामुळे ते दृश्य फार आकर्षक वाटते. याचा नाच म्हणजे लोकनृत्याचा एक सुंदर नमुना असतो. त्याला ढोल व नगारे यांची साथ असते. पुरुषाचे नृत्य स्त्रियांच्या नृत्यापेक्षा अधिक जोरदार असते. याच्या स्त्रियाही नाचताना लुगडी पितात आणि टाळ्या व चुटक्या वाजवून गाणी म्हणत नाचतात.

जम्मू-काश्मीरच्या भद्रवाह जिल्ह्यात कैलास सरोवरावर वासुकी नागाप्रीत्यर्थ एक जत्रा भरते. तिथे हे नृत्य करतात. बासरी व टोल यांच्या साथीवर संथ गतीने या नृत्याला सुरवात होते आणि उत्तरोत्तर त्याची लय वाढत जाते. नाचताना नर्तक टाळ्या वाजवितात आणि वासुकी नागाचा जयजयकार करतात. नृत्याबरोबर जी गीते गातात, त्यात या लोकाच्या जीवनाचे वर्णन आढळते. [आदिवासी गद्दी; पं. जी. सा.; देवेंद्र सत्यार्थी– आजकल, एप्रिल १९५७; ए. हो. रा.]

**गधापिधा** ओडिसामधील एक पूजाविधी. पौष शु. १४ शीला स्त्रिया घरातील स्वयंपाकाची सर्व भांडी लख्ख घासून रंगवितात व त्यांची पूजा करतात. ओडिसामध्ये काही ठिकाणी या दिवशी कुलदेवतेचीही पूजा केली जाते. [स्ट. ओ. फो. लो.]

**गनछा** राजस्थानातील एक जात. या जातीचे लोक टोपल्या विणण्याचा व्यवसाय करतात. आपण पूर्वी राजपूत होतो व आपल्या नऊ जाती होत्या, असे हे लोक सांगतात. पण या नऊ जातीपैकी सुलखी, परिहार, भाटी, सिसौदिया, पवार व राठौर या सहा जातींचाच साम्प्रत पत्ता लागतो.

हे लोक गुजरातमधून इकडे आले, असे सांगतात. हे शैव



गनछा पुरुष

असून बिछरा मातेचे उपासक आहेत. यांच्यापैकी काही लोक शेतीही करतात. [ रा. जा. ]

**गनरार** पूर्व बंगाल आणि कुचबिहार या प्रदेशांत आढळणारी एक जात. रिस्ले याच्या मते प्लीनीने उल्लेखिलेले गंगारिडाई हेच असावेत. हे स्वतःला भागलपूरमधील काडूचे वंशज म्हणवतात. हे लोक नावा चालवणे, मासेमारी, दुकानदारी इ. व्यवसाय करतात. यांच्यांत विधवाविवाह व घटस्फोट रूढ नाही. पतित ब्राह्मण याचे पौरोहित्य करतात. हे खालकुमारी, खाजा खिगर, सत्यनारायण, मानसा, बुराबुरी, इ. देवतांना भजतात. [ से. इं. १९५१ ]

**गनसाम** विंध्य पर्वतश्रेणीतील गोंडांचा एक देव. हे लोक वर्षातून दोन वेळा याचा उत्सव करतात. संकटप्रसंगी व साथीच्या दिवसात याला नवसही करतात. मध्यप्रदेशात याच्या नावाने एक तांबडे किंवा पिवळे निशाण फडकवतात. [ फो. लो. नॉ. इं. ]

**गबर** बस्तर प्रदेशातील माडिया गोंडांत प्रचलित असलेले एक लोकनृत्य. शेतात नवे पीक आल्यावर त्यातले काही देवताना अर्पण करतात, त्या प्रसंगी व विवाहाच्या वेळीही हे नृत्य केले जाते.

गबर म्हणजे रानरेडा. याची शिकार करणे अत्यंत धाडसाचे व म्हणूनच पुरुषार्थाचे काम असते. या रेड्याची शिकार केल्यानंतर त्याच्या शिंगाचा एक मुकुट बनवतात व त्याला कवड्या व कोंबड्याची पिसे लावून तो सुशोभित करतात. या मुकुटाला कौवडा असे नाव आहे. हा मुकुट घालून हे गबर नृत्य करायचे असते. या लोकात कौवडा हे प्रतिष्ठाचिन्ह मानतात व त्याची वर्षातून एकदा पूजाही करतात.

नृत्याच्या प्रारंभी एक जण वेळूची बासरी वाजवून नृत्याचे आवाहन करतो. बासरीचा स्वर कानी पडताच धोतर नेसून आणि कौवडा घालून वस्तीतले सर्व पुरुष आपापल्या झोपडीतून बाहेर पडतात. त्यांच्या हातांत मोठमोठे ढोल असतात. नृत्याच्या साथीसाठी लोखंडी सळयांनी हे ढोल वाजवतात. या प्रसंगी माडिया स्त्रिया मौल्यवान दागिने घालतात व कमरेखाली धोतर किंवा चादर वेढतात. त्यांच्या पायात चकचकीत धातूंची वलये असतात. नृत्य करताना या वलयांचा आणि ढोलाचा जो एक संमिश्र ध्वनी उत्पन्न होतो, तो स्फूर्तिदायक



गबर–नृत्य

असतो. या नृत्यात एक बासरीवादक असतो, तो मधून मधून नृत्याचेही निर्देशन करतो. [ भा. लो. नृ. ]

**गब्दिका** एक प्राचीन देश. पतंजलीने हा तत्कालीन आर्यावर्ताच्या बाहेर होता, असे म्हटले आहे. कांगडा व चंबा यांच्यामधील धौलाधार डोंगरावर जो गद्देरन प्रदेश

आहे, त्याला प्राचीन काळी गब्दिका म्हणत, असे अष्टाध्यायी-वरून कळते. [पा. भा.]

**गमल्ल** आंध्र प्रदेशातील एक जात. हे मूळचे ईडिग होते; पण त्यांच्यांतून वेगळे होऊन यांनी आपली प्रगती केली. हे स्वतःला गोंडल वंशाचे मानतात आणि बलिज म्हणवतात. यांचा मुख्य व्यवसाय ताडी काढणे हा आहे. गरीब लोक



गमल्ल जोडपे व ताडीची मडकी

ताडी काढतात व श्रीमंत लोक ती विकतात काही जण कापूच्या घरी घरगडी किंवा आचारी म्हणून नोकरीही करतात. यांच्यांत कौंडिण्य, कारुण्य, वाचल्य व सुरापांडेश्वर अशी गोत्रे आहेत.

**सण** – यांच्यात संक्रांतीच्या दिवशी घरोघर पूर्वजांची पूजा केली जाते. दिवाळीच्या दिवशी पहाटे उठून हे आंघोळ करतात व ओलेत्याने मुंग्याच्या वारुळाजवळ जाऊन त्यावर थोडे पाणी ओततात. मग वारुळाभोवती सुताचे पाच वेढे घालून घरी परत येतात. नंतर हाती दिवा घेऊन पुन्हा वारुळाला तीन प्रदक्षिणा घालतात व त्यात डाळ टाकतात. दिवसभर उपवास करतात. दुसऱ्या दिवशी पुन्हा तिथे जाऊन वारुळावर दूध ओततात.

हे लोक शैव पंथाचे असून पोथुराजू, काटमय्या, गंगम्म, मयम्म व थल्लम्म यांनाही भजतात. दरवर्षी घराघरातून दारू जमा करून ती देवापुढे ओततात व जमलेल्या लोकांना प्रसाद म्हणून वाटतात.

**मर्तिकप्रथा**– हे लोक मृतांना पुरतात. त्या वेळी मृत पुरुषाची पत्नी हातातल्या एकदोन बांगड्या फोडून टाकते. मृताच्या डोक्याजवळ मातीचे व राखेचे ढीग ठेवतात. रुद्र, यम व मृताचा आत्मा यांची ती प्रतीके असतात मग त्यांना अन्न अर्पण करतात. एक पान जंगमाला, एक धोब्याला व एक कावळ्याला देतात. नऊ, दहा व अकरा या दिवशी एक समारंभ करतात, त्याला पेड्डिनम असे म्हणतात. त्या वेळी घरात पान वाढतात व मृताची पत्नी त्या पानाजवळ बसून शोक करते व स्वतःच्या एकदोन बांगड्या फोडते. नंतर ते अन्न तळ्यावर नेतात. तिथे जमिनीवर मृताची आकृती काढून तिला अन्न अर्पण करतात. मग विधवेच्या उरलेल्या बांगड्या फोडून टाकून तिला विधवेचा पोषाख देतात. या पोषाखाला मुड कोका असे म्हणतात. त्या वेळी जमिनीवर रंगीत रांगोळ्या काढून तिथे नारळ, भात व विड्याची पाने ठेवतात आणि कोंबड्याचा बळी देतात. या प्रसंगी अनकम्म देवीची कहाणी सांगतात. [का. ट्रा. स. इं.]

**गय आत्रेय** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलातील नऊ व दहा ही सूक्ते याच्या नावावर आहेत. ही दोन्ही सूक्ते अग्निस्तुतीपर आहेत.

**गय प्लात** एक सूक्तद्रष्टा. प्लतीचा मुलगा म्हणून याला प्लात असे नाव पडले आहे (ऐ. ब्रा. ५. २). ऋग्वेदाच्या १० व्या मंडलातील ६३ व ६४ ही सूक्ते याच्या नावावर आहेत. याने आदित्यांचे वर्णन अत्यंत मनोहर केले आहे, ते असे––

**येभ्यो माता मधुमत् पिन्वते पयः**
**पीयूषं द्यौरदितिरद्रिबर्हाः ।**
**उक्थशुष्मान् वृषभरान् स्वप्नसस्ताँ**
**आदित्याँ अनु मदा स्वस्तये ।।**
**नृचक्षसो अनिमिषन्तो अर्हणा**
**बृहद्देवासो अमृतत्वमानशुः ।**
**ज्योतीरथा अहिमाया अनागसो**
**दिवो वर्ष्माणं वसते स्वस्तये ।।**

(ऋ. १०. ६३. ३-४)

अर्थ – ज्यांच्यासाठी भूमाता मधुर असे उदक तुडुंब भरून सोडते, द्युलोक अमृतमय पर्जन्याचा वर्षाव करतो आणि अनिर्बंध असे आकाश मेघरूप पर्वतांनी विशाल दिसू लागते, जे सामगायनात सामर्थ्य उत्पन्न करणारे आणि (इच्छिताची) वृष्टी करणारे पुण्यचारित्र्य आदित्य, त्यांच्या स्वभावाला अनुसरून तूही स्वकल्याणासाठी आनंदवृत्ती ठेव.

जे सर्व मानवांचे निरीक्षण करतात, जे कधीही निद्रिस्त असत

नाहीत, असे दिव्य विबुध (देव) आपल्या (स्वाभाविक) योग्यतेने श्रेष्ठ अशा अमरत्वास पावले. त्यांचा रथ प्रकाशमय असतो, ते सर्वांची माया जाणतात; पण स्वतः निष्पाप राहून मानवाच्या कल्याणासाठी आकाशाप्रमाणे (मनाचा) मोठेपणा धारण करतात.

वैदिक ऋषी हे उत्साहाचे मूर्तिमंत झरे होते. हा उत्साह प्रस्तुत ऋषी आणि त्याच्याबरोबरचे इतरही ऋषी यांच्यामध्ये ओतप्रोत भरलेला आहे. उदा० पुढील ऋचा पाहा—

**ऋतूयन्ति ऋतवो हृत्सु धीतयो**
**वेनन्ति वेनाः पतयन्त्या दिशः ।**
**न मर्डिता विद्यते अन्य एभ्यो**
**देवेषु मे अधि कामा अयंसत ।।**

(ऋ. १०. ६४. २).

अर्थ – आमच्या कर्तृत्वशक्ती प्रकट होण्यासाठी उतावीळ झाल्या आहेत. अंत.करणात विचार उचंबळत आहेत. आकांक्षा उत्कठित झाल्या असून चारी दिशांकडे धाव घेत आहेत. या (इंद्रादी) देवाव्यतिरिक्त दुसरा कोणी दयाळू दिसत नाही. म्हणून माझ्या सर्व कामना त्या (इंद्रादी) देवांमध्येच एकत्रित झाल्या आहेत.

गय प्लाताची वरील दोन्ही सूक्ते विलक्षण ओजस्वी व काव्यमय आहेत. त्यांत त्याने इंद्रादी देवांविषयी, त्याचप्रमाणे सरस्वत्यादी नद्याविषयीही आदर दाखविला आहे. आपल्या कवनाने सर्व देवता हर्षित होतील, असा विश्वासही त्याने प्रकट केला आहे.

**गया** भारतातील त्रिस्थळी यात्रेतले शेवटचे तीर्थ. हे पितृतीर्थ आहे. बिहार राज्यात फल्गू नदीच्या तीरावर गया शहर वसलेले आहे. जुनी व नवी गया असे या शहराचे दोन भाग आहेत. जुन्या गयेत बहुतेक सर्व तीर्थे असून, नव्या गयेत सरकारी कचेऱ्या, न्यायालय, विद्यालये वगैरे वास्तू आहेत.

गया हे अतिप्राचीन क्षेत्र आहे. अथर्ववेदात गय नावाच्या एका जादुगाराचा उल्लेख येतो (१. १४. ४). तिथला हा जादुगार गय पुढे पुराणातील गयासुर बनला असण्याची शक्यता आहे.

गयेत गयशीर्ष असे एक स्थान आहे. गयशीर्ष ही कल्पना पुराणाहूनही प्राचीन आहे. 'इद विष्णुर्वि चक्रमे त्रेधा निदधे पदम्' या ऋचेवर यास्कांने और्णवाभाची व्याख्या दिली असून 'त्रेधा' शब्दाने त्याने समारोहण, विष्णुपद व गयशीर्ष अशा तीन भौगोलिक स्थानांचा निर्देश केला आहे. महाभारतात तीर्थरूप गयेचे वर्णन आहे. पांडवांच्या तीर्थयात्रेच्या प्रसंगानेही गयेचा उल्लेख आलेला आहे–

**ततो गयां समासाद्य ब्रह्मचारी समाहितः ।**
**अश्वमेधमवाप्नोति कुलं चैव समुद्धरेत् ।।**

(वन. ९५. ९)

अर्थ – गयेला गेल्यानतर ब्रह्मचाऱ्याला अश्वमेध केल्याचे फल मिळते आणि त्याच्या कुलाचाही उद्धार होतो.

अश्वघोषाच्या बुद्धचरितात गयेचा उल्लेख आहे. राजर्षी गय याच्या नावावरून या नगरीला गया हे नाव मिळाले, असे अश्वघोष म्हणतो. गौतम बुद्ध या नगरीत गेला होता, असेही त्यात सांगितले आहे.

सुद्युम्न किंवा इल याच्या गय नावाच्या मुलाला पूर्वेकडील देशाचे राज्य मिळाले होते. श्वेतवाराहकल्पात या राजर्षीने गयानगरी ही आपली राजधानी म्हणून वसविली. गया व उत्कल या प्रदेशाला पूर्वी धर्मारण्य असे नाव होते.

वायू पुराणात गयेच्या उत्पत्तीसंबंधी कथा दिली आहे, ती अशी –

गयासुर नामक एक महापराक्रमी असुर होता. त्याची उंची १२५ योजने आणि रुंदी ६० योजने होती. कोलाहल पर्वतावर त्याने हजार वर्षे उग्र तपश्चर्या केली. तेव्हा सर्व देव घाबरले. मग विष्णू सर्व देवासह गयासुराकडे गेला व त्याने गयासुराला 'वर माग' म्हटले. गयासुराने आपण सर्वात जास्त पुण्यवान असावे, असा वर मागितला. विष्णूने 'तथास्तु' म्हटले. त्यामुळे गयासुराच्या शरीराला स्पर्श करून लोक पुण्यात्मे बनून स्वर्गात जाऊ लागले. त्यामुळे यमपुरी ओस पडली. तेव्हा सचित होऊन यम विष्णूकडे गेला. त्याने विष्णूला सर्व वृत्तांत सांगितला. विष्णू मग भूमीवर उतरला. त्याने यज्ञ करण्यासाठी गयासुराचे शरीर मागितले. गयासुराने ते देतो म्हटले व तो आडवा पडला. ब्रह्मदेवाने त्याच्या अंगावर सर्व यज्ञसामग्री एकत्र केली. पण गयासुराचे शरीर स्थिर नव्हते. ते सारखे थरथरत होते. तेव्हा ब्रह्म्याने यमाला त्याच्या अंगावर एक शिला ठेवायला सांगितले. पण तरीही त्याच्या शरीराचे स्पंदन थांबेना. मग शंकरादी देव त्याच्या अंगावर उभे राहिले. पण त्याचाही काही उपयोग झाला नाही. मग विष्णू आणि इतर देव निरनिराळ्या रूपांनी गयासुराच्या देहावर उभे राहिले, तेव्हा कुठे गयासुर स्तब्ध झाला. त्या वेळी प्रसन्न होऊन देवांनी त्याला वर मागायला सांगितले. त्यावर गयासुर म्हणाला.

'जोपर्यंत पृथ्वी, सूर्य, चंद्र व तारे अस्तित्वात आहेत, तोपर्यंत सर्व देवांनी माझ्या शिलेवर वास करावा व हे क्षेत्र माझ्या नावाने प्रसिद्ध व्हावे. ज्याचे इथे सपिंड श्राद्ध होईल, ते

लोक ब्रह्मलोकाला जावे आणि इथे येणाऱ्याच्या ब्रह्महत्यादी महापापांचाही नाश व्हावा.'

त्यावर देवांनी 'तथास्तु' म्हटले. अशा प्रकारे गयासुर शांत झाला व गयाक्षेत्रही प्रसिद्धीला आले.

द्वापरयुगात रामचंद्राने गयाक्षेत्रात जाऊन आपल्या पितरांसाठी पिंडदान केले होते व तिथल्या गयावळ ब्राह्मणांना रुप्याचा आणि सोन्याचा असे दोन पर्वत व मधुपेयाच्या दोन नद्या दानदक्षिणा म्हणून दिल्या होत्या. पण पुढे त्या ब्राह्मणांनी मिथ्याचार केल्यामुळे ते पर्वत पाषाणाचे झाले आणि नद्या गुप्त रूपाने वाहू लागल्या. मधू नदीच्या उगमस्थानाला हल्ली मधुस्त्रावतीर्थ व त्या दोन पर्वतांना प्रेतपर्वत आणि रामपर्वत असे म्हणतात.

गयाक्षेत्रात श्राद्ध केल्याने पितराना अक्षय्य तृप्ती प्राप्त होते, असे धर्मशास्त्र सांगते. 'गयाश्राद्धमस्तु । पितॄणामक्षय्या तृप्तिरस्तु', असा सामान्य श्राद्धातही आशीर्वाद असतो. त्यामुळे आपल्या वशातील एखाद्या तरी पुत्राने गयाक्षेत्री जाऊन श्राद्ध करावे, अशी पितर कामना करीत असतात.

गयेतील एक कोस भागाला गयाशिर किंवा गयशीर्ष, अडीच कोस भागाला गया व पाच कोसांपर्यंतच्या भागाला गयाक्षेत्र मानलेले आहे. या एवढ्या प्रदेशात गयेतली सर्व तीर्थे येतात.

गयेला जाण्यापूर्वी यात्रेकरूने तिथून जवळच असलेल्या पुनपुन नदीच्या तीरावर श्राद्ध केले पाहिजे, असा नियम आहे. गयेत पोचल्यावर त्याने क्षौर करून व काषायवस्त्रे परिधान करून पितरांना निमंत्रण द्यावे, सुगंधी जलाची किंवा दुधाची



गयेतील पिंडदान

धार गळवीत सबंध नगराची व नगराच्या स्मशानाची परिक्रमा करावी, त्यानंतर घरी न जाता गावापासून कमीत कमी चार मैल दूर जाऊन पितृश्राद्ध करावे, रात्री तिथेच मुक्काम करावा व दुसऱ्या दिवशी सकाळी स्नान करून पुढे जावे, असा तीर्थविधी आहे.

गयेत यात्रेकरूला सात दिवस श्राद्धादी कृत्ये करावी लागतात. पितृपक्षात इथे श्राद्ध करण्यासाठी यात्रेकरूंची फार गर्दी होते. गयाशिराच्या ठिकाणी शमीपत्रप्रमाणाने पिंडदान केले असता पित्याच्या, मातेच्या, भार्येच्या, बहिणीच्या, कन्येच्या, आत्याच्या व मावशीच्या अशा सात कुलांतील एकशेएक पुरुषांचा उद्धार होतो, असे निर्णयसिंधूत सांगितले आहे.

गयेतील मुख्य मंदिर म्हणजे विष्णुपदमंदिर होय. फल्गूच्या किनाऱ्यावर हे विशाल मंदिर असून, आत अष्टकोनी खोलगट भागात विष्णुपद आहे. मंदिराच्या बाहेर सभामंडप व श्राद्धविधीसाठी दोन मोठे मंडप आहेत. जवळच एक गरुडमंदिर आहे. अहल्याबाई होळकर हिने हे मंदिर बांधले असून, त्यासाठी जयपूरहून कारागीर आणले होते, असे सांगतात.



विष्णुपद मंदिर—गया

गयेतील दुसरे दर्शनीय स्थान म्हणजे अक्षय्य वट होय. हा ब्रह्मसरोवराच्या जवळ असून त्याच्या सभोवती भिंत आहे. याच्या उत्तरेला वटेश्वर महादेवाचे मंदिर आहे. याशिवाय इथे सूर्यकुंड व तलावाच्या पश्चिमेस एक सूर्यमंदिर आहे. सात अश्वावर आरूढ झालेली इथली सूर्यमूर्ती सुंदर आहे.

गयेपासून जवळच धर्मारण्य आहे. इथे एक विहीर असून यात्रेकरू श्राद्धाचे पिंड या विहिरीत टाकतात. इथे धर्म व भीम यांची लहान मंदिरे आहेत. धर्म हा भीमासह इथे पित्याचे श्राद्ध करण्यासाठी आला होता व त्याने इथे काही दिवस तप केले होते, असे सांगतात.

गयेत सुमारे ४५ श्राद्धवेदी असून प्रेतशिला, रामशिला, रामकुंड, ब्रह्मकुंड, काकबळी, धर्मपृष्ठ, ब्रह्मसर व गृध्रकूट या त्यांपैकी प्रमुख आहेत.

गया हे बौद्धांचेही धार्मिक केंद्र आहे. गयेच्या दक्षिणेला सात मैलांवर बुद्धगया असून तिथे बोधिवृक्ष आहे. इ. स. च्या

५ व्या शतकात फा हैन हा चिनी प्रवासी गयेला गेला असता त्याला ती नगरी उजाड दिसली होती. इ. स. च्या ७ व्या शतकात युआन च्वाग तिथे गेला, त्या वेळी मात्र त्या नगराला चांगले स्वरूप प्राप्त झाले होते आणि तिथे सुमारे शंभर ब्राह्मणांची घरे निर्माण झाली होती.

महाभारतात गयेचे माहात्म्य सांगितले आहे, ते असे—

**अश्मपृष्ठे गयायां च निरविन्दे च पर्वते ।**
**तृतीयां क्रौञ्चपद्यां च ब्रह्महत्या विशुध्यते ।।**

(अनु. २५.४२)

अर्थ — अश्मपृष्ठावर, गयेत, निरविंद पर्वतावर आणि तिसऱ्या क्रौंचपदीवर (श्राद्धादी विधी केल्याने) ब्रह्महत्येचे पातक नष्ट होते.

पद्मपुराण म्हणते——

**एष्टव्या बहव. पुत्रा यद्येकोऽपि गयां व्रजेत् ।**
**यजेत वाश्वमेधेन नीलं वा वृषमुत्सृजेत् ।।**

(स्वर्ग. ३८.१७)

अर्थ — माणसाने पुष्कळ पुत्रांची कामना करावी, म्हणजे त्यापैकी एखादा तरी गयेत जाऊन श्राद्ध करील, अश्वमेध यज्ञ करील किंवा काळचा बैलाचा उत्सर्ग करील.

**यत्राक्षय्यवटो नाम त्रिषु लोकेषु विश्रुतः ।**
**पितॄणां तत्र वै दत्तमक्षयं भवति प्रभो ।।**
**महानद्यामुपस्पृश्य तर्पयेत्पितृदेवताः ।**
**अक्षयानाप्नुयाल्लोकान् कुलं चैव समुद्धरेत् ।।**

(म. भा. वन. तीर्थयात्रा ८४)

अर्थ — गयेत अक्षय्यवट असून तो तीन्ही लोकात प्रख्यात आहे. पितरांसाठी तिथे दिलेले सर्व काही अक्षय्य होते. तिथे महानदीत स्नान करून जो देवता व पितर यांचे तर्पण करील, त्याला अक्षय्य लोक मिळतील व त्याच्या कुलाचाही उद्धार होईल. **पाहा** — बुद्धगया. [ गया गॅझे.; हि. जॉ. ए. इं.; पु. इं.; म. ज्ञा. को.; हिं. वि. को.; भा. वा.; कल्याण-तीर्थांक ]

**गयावळ** प्राचीन काळापासून गया क्षेत्रात राहणारे ब्राह्मण. गयेत येणाऱ्या यात्रेकरूंची धार्मिक कृत्ये संपादणे, हा यांचा परंपरागत व्यवसाय आहे. गयेतील श्राद्धसंकल्प गयावळांनीच सांगावा लागतो. अन्यथा श्राद्ध करून निष्फळ होते. गयेतील सर्व तीर्थयात्राविधी पुरे झाल्यावर यात्रेकरूला गयावळाची पूजा करून त्याला दक्षिणा द्यावी लागते. ती पुरेशी मिळाल्यावरच श्राद्ध सुफल झाले, असा ते आशीर्वाद देतात. गयावळाच्या मुखातून हे वाक्य बाहेर आल्यावाचून मृतात्म्याला मोक्ष प्राप्त होत नाही, अशी भाविकांची श्रद्धा असते.



गयावळ आपल्या उत्पत्तीविषयी कथा सांगतात. ती अशी— गयासुराला मारल्यानंतर ब्रह्मदेवाने एक मोठा यज्ञ केला. त्या वेळी मदत करण्यासाठी त्याने जी चौदा कुळे उत्पन्न केली, त्याचेच वंशज म्हणजे गयावळ होत.

गयावळांपैकी काही ब्राह्मण, तर काही अब्राह्मणही असतात. गयावळांची काही कुटुंबे एका ठराविक मंदिरात पूजा-अर्चा करून राहतात; तर काही एकाच धन्याच्या अनेक मदिरात पूजा-अर्चा करून पोट भरतात. काही जण घरातच यात्रेकरूचे धार्मिक विधी करून आपली गुजराण करतात.

गयावळांपैकी धामी हे अब्राह्मण असून ते प्रेतशिला, रामशिला, काकबळी, ब्रह्मकुड व रामकुंड या पाच ठिकाणी यात्रेकरूचे श्राद्धविधी पार पाडतात. गयावळ लोकांचे आचार-विचार सनातन पद्धतीचे आहेत. त्यांना कोणत्याही प्रकारची सुधारणा आवडत नाही. श्राद्धादी कर्मे करण्यासाठी गयेत भारताच्या सर्व भागातून लोक येत असतात. म्हणून गयावळांत पंचगौड, पंचद्राविड व शाकद्वीपी असे तीन्ही जातीचे ब्राह्मण आहेत.

गयावळांची सर्वच्या सर्व म्हणजे १२० कुटुबे गयेच्या दक्षिण भागात फल्गू नदीच्या तीरावर विष्णुमंदिराच्या जवळपास राहतात. स्थानिक मागधीपेक्षा यांची बोली निराळी असून तिला गयवाली असे नाव आहे.

खाण्या-पिण्याच्या बाबतीत यांचे विधि-निषेध फार असतात. ते शाकाहारी असून कांदा, लसूण, मद्य हे पदार्थ वर्ज्य मानतात. ते भांग मात्र पितात. दक्षिणी ब्राह्मण सोडून इतरांच्या हातचे अन्न ते घेत नाहीत.

गयावळ उपाध्यायाच्या वंशपरंपरेने चालत आलेल्या नावांना वंशनामे म्हणतात. याच नावाने त्यांचे यजमान त्याना ओळखतात. एका वशाची अनेक कुळे असून, त्यांच्या नात्याला भाइवी (भाऊबंद) असे नाव आहे.

गयावळ लोकांत एकत्र कुटुंबपद्धती असून, मोठ्या कुटुंबात तीन चार पिढ्या एकत्र नांदताना दिसतात. कुटुंबात पुरुषाचाच अधिकार असतो. यांचे लग्नसंबंध जातीतल्या जातीतच होतात.

गयावळांच्या जीवनात धार्मिक सणासमारंभांना फार महत्त्व असते. यजमानांच्या सणासमारंभांतही हे लोक आस्थेने भाग घेतात. याशिवाय तीर्थयात्रा, धार्मिक जत्रा व दानधर्म या गोष्टीही ते आवर्जून करतात. गयावळ लोक मध्वाचार्यांचे अनुयायी आहेत.

गयावळ ब्राह्मणांची संख्या दिवसेदिवस घटत चालली आहे. त्याचे कारण मुलींना भिक्षुकीचा व्यवसाय हीन दर्जाचा वाटतो

व त्या भिक्षुक वराशी लग्न करायला तयार होत नाहीत. त्यामुळे अनेक गयावळ तरुणांना अविवाहित राहावे लागते. परिणामी त्यांची संख्या कमी होत चालली आहे. गयावळांच्या स्त्रियांची नवी पिढी थोडीशी शिकलेली असल्यामुळे त्या स्त्रिया स्त्री–यात्रेकरूंची सोय करतात. पण गयेत अक्षयवटाखाली श्राद्ध केल्याशिवाय तीर्थयात्रा यथासांग होत नाही, म्हणून घराबाहेरचे हे पौरोहित्य करण्यासाठी त्यांना पुरुषांचीच गरज असते. त्यामुळे अशा स्त्रिया एखादा प्रौढ गयावळ दत्तक घेतात. त्याचे दत्तविधान धार्मिक पद्धतीने न करता रजिस्टर पद्धतीने करतात. दत्तक इसम गैरवर्तनी निघाल्यास दत्तकपत्र रद्द समजतात. [ गया गॅझे.; से. का. हि. ग.; हि. ध. ]

**गयाशिर** गयेतील मुख्य टेकडी. विनयपिटकात हिला गयासीस असे म्हटलेले आहे. ही टेकडी गयेच्या दक्षिणेस असून तिची उंची सुमारे ४०० फूट आहे. गयाशिर हे यात्रेचे ठिकाण आहे. योगिनीतंत्रातही गयाशिराचा निर्देश आहे. वामन पुराणात याला ब्रह्मयाची पूर्ववेदी असे म्हटले आहे. गयाशिराचा विस्तार एक कोस असून, तिथे श्राद्ध केल्याने शंभर पिढयांचा उद्धार होतो, असे वायू पुराणात सागितले आहे. [ हि. जॉ. ए. इं.; पु. इं.; हि. ध. ]

**गर** मुंडा लोकांचा एक विधी. सिन बोंगा याचा रोष झाला असता तो शमविण्यासाठी पांढरा कोंबडा किवा पांढरा बकरा बळी देतात, त्याविधीला गर असे नाव आहे. एखाद्या माणसाच्या जखमेत किडे झाले असता, तो सिन बोगाचा कोप आहे, असे समजून त्या माणसाला बहिष्कृत करतात. त्याला शुद्ध करून घ्यायचे तर हा बलिदानाचा विधी करावा लागतो.

थोरला दीर व धाकटी भावजय यांचा एकमेकांना स्पर्श झाला असता, स्त्रीने मोठ्या दिरासमोर केस सोडले असता किंवा नवऱ्याने बायकोचे किंवा बायकोने नवऱ्याचे नाव घेतले असता, सिन बोंगाचा अपमान होतो, अशी मुंडांची समजूत आहे. अशी एखादी गोष्ट घडल्यास कोंबडा किंवा बकरा बळी द्यावा लागतो. [ एन्सा. मुं. ]

**गरबा** गुजरातेतील एक लोकनृत्य. गुजरातेत याचा उच्चार गरबो असा करतात. आज हे नृत्य आपल्या काही वैशिष्टयांनी आधुनिक नृत्यकलेत स्थान मिळवून बसले असले, तरी त्याचे वास्तविक स्वरूप लोकनृत्यात्मकच आहे. गरबा राजस्थान आणि माळवा या प्रदेशातही प्रचलित आहे. पण त्याची जन्मभूमी मात्र गुजरात हीच आहे. गरबा शब्दाची व्युत्पत्ती अशी ––

पूर्वी नवरात्रात देवीजवळ सच्छिद्र घटात अखंड दीप लावून ठेवीत. त्याला दीपगर्भघट म्हणत. या दीपगर्भ शब्दातील काही वर्णाचा लोप होऊन गरबा हा शब्द राहिला. सांप्रत गुजरातेतल्या मुली नवरात्राच्या दिवसात पाढऱ्या मातीचा एक सच्छिद्र घडा फूलपत्तीने सजवून त्याच्याभोवती फेर धरतात व तो डोक्यावरही घेऊन नृत्य करतात, म्हणून या नृत्याला गरबा नृत्य असे नाव मिळाले.

गरबा हे एक सौभाग्यप्रतीकही आहे. आश्विनमासात नवरात्राच्या दिवसात गरबा हा नृत्योत्सव होतो. बायकांचा गरबा नवरात्रात नऊ दिवस होतो; तर पुरुषांचा गरबा दसऱ्यापासून पुढे सुरू होतो. नवरात्रीच्या पहिल्या रात्री गरब्याची स्थापना होते. मातीचे दोन लहान–मोठे घट एकावर एक ठेवतात व वरच्या घटावर पणती ठेवून त्यात चार ज्योती पाजळतात. गरब्याची स्थापना झाल्यावर स्त्रिया त्याच्या भोवती टाळया वाजवीत फेर धरतात.



गरबा नृत्य

या खेळाचे चुटकीचा, टाळीचा, ओजलचा, खंजिरीचा, मंजिरीचा, गडव्यांचा असे अनेक प्रकार आहेत. वर्तुळात फिरताना जोडचा चौकडचा असे विविध प्रकारचे स्त्रियांचे गट बनतात. फेर धरताना बायका गाणीही म्हणतात. प्रत्येक रात्री कमीत कमी पाच तरी गाणी गायिलीच पाहिजेत, असा नियम आहे. गरब्याच्या वेळी देवीची गीते गातात, त्याचप्रमाणे कृष्णलीलेचीही गातात. मीरेप्रमाणे एखादी सामान्य स्त्रीही गोकुळातल्या कान्ह्याला ‘ कलेजारी कोर ’= काळजाचा तुकडा समजते. उदा०––

**तांबा का लोटचा भरया जलसे रे ।**
**पीवानो बालो परदेश छे रे ।**

**बई, म्हारो कान्हो कलेजा री कोर छे रे ।**
**कोर छे, कोर छे, कोर छे रे ।**
**बई, म्हारी सोना री अंगूठी ऊपर मोर छे रे ।**

अर्थ— ताब्याचा लोटा पाण्याने भरला; पण ते जल पिणारा मात्र परदेशात आहे. माझा कान्हा माझ्या काळजाचा तुकडा आहे. बाई, माझ्या सोन्याच्या अंगठीवर मोर आहे. माझा कान्हा ‘ कलेजारी कोर ’ आहे.

गरबा व गरबी असे गरब्याचे दोन प्रकार आहेत. मध्ययुगीन व अर्वाचीन गुजराती वाङ्मयात हे दोन्ही शब्द नेहमी येतात. गरबी हा शब्द सर्वप्रथम १७ व्या शतकात भाणदास याने वापरला. नरसी मेहताची पदे गरबी या सदरातच मोडतात. गरबी ही सामान्यतः वैष्णवाची असल्यामुळे त्या गीतात राधा-कृष्णाचे वर्णन असते. दयाराम या कविश्रेष्ठाने बहुसंख्य गरब्या लिहिल्या आहेत. त्याला गरबीसम्राट म्हणतात.

गरबा हा सामान्यतः शाक्त-शैवाचा समजतात. त्याची गीते अंबाजी, बहुचरा, काली, या दुर्गारूपांच्या स्तवनाची असतात. गरबा-गरबी यांच्या गानपद्धतीतही भेद आहे. कित्येक वेळा स्त्री-पुरुष एकत्र एका सुरात गरबे गातात.

गरबा हे गुर्जर–सौराष्ट्राचे सर्वप्रिय नृत्य-गीत आहे. समाजाच्या सर्व थरांत गरब्याची वेगवेगळी गाणी आहेत. गरबा हा गुजरातच्या लोकजीवनाचा सामूहिक उल्लास आहे. लोकजीवनाचे प्रत्येक अग या गीतातून मुखरित झाले आहे. सामाजिक, राजकीय, ऐतिहासिक, पौराणिक असे अनेक विषय गरब्यामध्ये शब्दांची लेणी लेवून झंकारले आहेत. [ गुजरात; वि. मु. रा. प. ]

## गरसी बोंगा

मुंडा लोकाचे एक भूत. याला अक्रेल बोंगा आणि मंडुल बोंगा असेही म्हणतात. पण ही नावे असुर-दंतकथेत आढळत नाहीत. या भूताविषयी ठिकठिकाणी परस्पर विरोधी गोष्टी ऐकायला मिळतात; पण त्यातील सर्वसामान्य गोष्टी अशा–

या बोंगाची नवविवाहित स्त्रीवर नजर असते. ज्या वेळी नवरी आपल्या नवऱ्याच्या घरी जाते तेव्हा तो तिच्या वेषभूषेवरून तिला ओळखतो व तिचा पाठलाग करीत तिच्या घरी जातो. वधूने आपल्या आईवडिलांच्या इच्छेविरुद्ध एखादी गोष्ट सासरी नेली तर हा तिला हटकून पकडतो. हा स्त्रीला बाळंतपणात फार त्रास देतो. म्हणून स्त्री जेव्हा गरोदर राहते, तेव्हा नवरा सासुरवाडीस जाऊन वडीलधाऱ्या मंडळीना आपल्या घरी घेऊन येतो व त्यांच्या करवी बोंगाला बलिदान करतो. हा बोंगा स्त्रीला पछाडणार की काय हे शकुन बघणारे लोक लग्नापूर्वीही सागतात. एखादी मैना उजवीकडून डावीकडे गेली, तर बोंगा मुलीला पछाडणार असे नक्की समजतात व त्याला त्याच वेळी बळी वगैरे देऊन तृप्त करतात. [ एन्सा. मु. ]

## गरीबदास

(इ. स. १७१७–१७७८; मेनरियांच्या मते जन्म १७७५ इ. स.) एक पंथसंस्थापक. याचा जन्म रोहतक जिल्ह्यातील छुडानी नामक खेडेगावात वैशाखी पौर्णिमेला झाला. याच्या पित्याचे नाव दादूदयाळ असे होते. गरीबदास हा यांचा सर्वात थोरला मुलगा. हा जातीने जाट; परंतु व्यवसायाने जमीनदार होता. आख्यायिका अशी आहे, की गरीबदासाला वयाच्या १२ व्या वर्षी कबीराने दर्शन दिले होते. दुसऱ्या जनश्रुतीप्रमाणे गरीबदासाला स्वप्नात कबीराचे दर्शन झाले होते व तो कबीराला गुरू मानू लागला होता. सत्यघटना अशी, की गरीबदास कबीराला आपला प्रथप्रदर्शक समजे. तो त्याच्या सिद्धान्तांनी भारावून गेला होता. गरीबदासाने तोवर कोणत्याही संप्रदायाचा पेहेराव चढवलेला नव्हता. त्याचप्रमाणे त्याने गार्हस्थ्याचाही त्याग केलेला नव्हता. तो आमरण छुडानीतच राहिला. तिथे राहून त्याने सदैव सत्संग केला.

गरीबदासाच्या मृत्यूनंतर त्याचा शिष्य सलोत हा गादीवर बसला. आपल्या जीवनकालात गरीबदासाने छुडानी गावी एक यात्रा भरवली होती. तिची परंपरा आजतागायत चालू आहे.

गरीबदासाने गरीबपंथाची स्थापना केली. साप्रत पूर्वपंजाब, दिल्ली, अलवर, नारनोल, बिजेसर, ही गरीबपंथाची केंद्रे आहेत. विशेषतः पूर्वपंजाबात हा पंथ फारच लोकप्रिय आहे. या पंथाच्या अनुयायात सर्व वर्गाचे, वर्णाचे व जातीचे लोक आहेत. हिंदू–मुसलमान हा भेदही या पंथाने मानलेला नाही. स्वामी दयालुदास नावाचा गरीबदासाचा एक शिष्य फार प्रसिद्ध झाला. त्याने या पंथाची सारी व्यवस्थाच बदलून टाकली. त्याने भक्तमंडळीत कडक शिस्त निर्माण केली, ब्रह्मचर्यावर जोर दिला व मठांना आश्रम म्हणण्याची प्रथा पाडली. सांप्रत या पंथाचे सुमारे १२५ मठ किंवा गढचा असून, त्या उत्तरप्रदेश व पंजाब या प्रदेशांत आहेत. आपल्या मंदिरांना ते गुरुद्वार म्हणतात व तिथे गरीबदासाच्या ग्रंथाची पूजा–अर्चा करतात. या पंथाचा प्रमुख मठ छुडानी येथे असून, इतरत्र पसरलेल्या त्याच्या शाखांना डेरा अशी संज्ञा आहे.

गरीबदास हा पंडित, तसाच भावनाशीलही होता. गानविद्येतही तो निपुण होता. याचा हिखरबोध नामक एक पद्यसंग्रह असून त्यात २४ हजार साख्या व पदे आहेत. या संग्रहा-

तील १७ हजार कविता याची व शेषकविता कबीराची समजतात. या १७ हजार ग्रंथरचनेतील काही पदांची निवड करून 'गरीबदासकी बानी' या नावाचा एक ग्रंथ प्रकाशित केलेला आहे. शिवाय अनभैप्रबोध, अध्यात्मबोध इ. त्याचे अन्य ग्रंथही प्रसिद्ध आहेत.

गरीबदासकी बानी या त्याच्या ग्रंथातून काही निवडक दोहे पुढे दिले आहेत––

**मै सौदागर नाम का, टाँडे पडा बहीर ।**
**लदते लदते लादिये, बहुर न फेरा बीर ।।**

अर्थ– मी हरिनामाचा व्यापारी आहे. माझ्याबरोबर इतर वंजारी (व्यापारी) आपापला माल घेऊन मुक्कामासाठी बाहेर पडले आहेत. बंधनो, तुम्हाला जास्तीत जास्त जितका माल भरून घेता येईल तेवढा घ्या, म्हणजे पुन्हा फेरी (पुनर्जन्म) पडणार नाही.

**एते करता कहा है, वह तो साहिब एक ।**
**जैसे फूटी आरसी, टूक टूक मे देख ।।**

अर्थ– इतके अनंत सृष्टिकर्ते असतील तरी कोठून ? साऱ्या विश्वाचा निर्माता तो एकच आहे. परंतु ज्याप्रमाणे फुटलेल्या आरशाच्या प्रत्येक तुकड्यामध्ये प्रतिबिंब दिसते, त्याप्रमाणे प्रत्येक वस्तूत तो परमेश्वर भरून राहिल्याप्रमाणे दिसतो.

**दिल के अंदर देहरा, जा देवल में देव ।**
**हर दम साखीभूत है, करो तासु की सेव ।।**

अर्थ– तुमच्या अंत:करणातच देव्हारा आहे व त्यात तुमचा देव निवास करीत आहे. तो देव सदासर्वदा सर्व काही पाहत असतो. त्याचीच सेवा तुम्ही करा.

**साचे कूं संका नहीं, झूठे भय घर माहिं ।**
**कोट किले क्या चुनत है, झूठा छूटै नाहिं ।।**

अर्थ– खऱ्याला मरण नसते आणि खोट्याला स्वत:च्या घरात देखील भय भेडसावीत असते. अरे, असत्याचा आश्रय करणाऱ्या, तू हे तट आणि किल्ले कशाला बांधतो आहेस ? कारण त्या किल्ल्यामध्ये देखील खोटा माणूस सुरक्षित राहू शकणार नाही.

गरीबदासाच्या जीवनाशी अनेक चमत्कारकथा निगडित आहेत. बादशहाच्या कैदखान्यातून पळून जाणे, श्रद्धाविहीन व्यक्तींच्या जीवनांत श्रद्धेचा अंकुर निर्माण करणे, इ. त्याचे चमत्कार प्रसिद्ध आहेत.

गरीबदास शब्दातीत, निर्गुण परब्रह्माचा उपासक होता. तो म्हणतो की हे ब्रह्मांड (भूलोक) त्या ब्रह्मांडापासून (स्वर्ग लोक) कोणत्याही प्रकारे भिन्न नाही. सामान्य माणसाला जो वेगळा आभास उत्पन्न होतो, त्याचे कारण माया हे आहे.

**दास गरीब वह अमर निज ब्रह्म है ।**
**एक ही फूल, फल, डाल है रे ।।**

अर्थ– ते परब्रह्म नित्य आहे, अमर आहे. फूल, फळ, फांदी, मिळून जसा एकच वृक्ष, तसेच सर्व मिळून हे एकच ब्रह्म आहे.

स्वानुभूतीसाठी चांगल्या–वाईट गोष्टीचा परिचय आवश्यक असल्याचेही तो प्रतिपादितो. [ हिं. सा. को. भाग २; रा. भा. औ. सा.; सतवाणी– श्रीपाद जोशी ]

## गरीब पंथ

गरीबदास पाहा.

## गरुड

(१) एक पक्षिश्रेष्ठ. कश्यप व विनता यांचा पुत्र. अरुणाचा कनिष्ठ बंधू. वालखिल्य ऋषींनी नवा इंद्र निर्माण करण्याकरिता जे तप केले, त्या तपाचे फळ त्यांनी कश्यपाला दिले व कश्यपाने ते विनतेला दिले. विनतेने मग जे अंडे घातले, ते या गरुडाचे होय. जन्माला येताच गरुडाने गगनभरारी मारली. ते पाहून वालखिल्यांनी पक्ष्यांचा इंद्र म्हणून त्याला अभिषेक केला. अग्नीमुळे जसे लोकांचे प्राण कासावीस होतात, तसेच ते गरुडाच्या उड्डाणामुळेही होऊ लागले. त्याचे तेज इतके प्रखर होते, की लोक त्यालाच अग्नी समजू लागले. आपल्यामुळे लोकांना त्रास होतो हे जाणून मग गरुडाने आपले तेज संकुचित केले.

विनता व कद्रू या दोघी सवती होत. त्यातली कद्रू ही सर्पाची माता होती. त्या दोघीमध्ये वैर होते. एका प्रसंगाने विनतेला कद्रूचे दास्य करावे लागले व त्याच कारणामुळे गरुडाला सर्पाची सेवा करणे भाग पडले. गरुडाला आपल्या मातेच्या दास्याचे दु:ख झाले व त्याने त्यातून मुक्त होण्याचा उपाय कद्रूला विचारला. कद्रू म्हणाली, की 'मला स्वर्गातले अमृत आणून दे.'

त्यासरशी गरुडाने अमृतासाठी स्वर्गावर झेप घेतली. देवांना ही वार्ता समजली. ते यक्ष-गंधर्वासह गरुडाशी युद्ध करायला आले, पण त्या युद्धात देवांचा पराभव झाला. मग गरुड अमृतस्थानाकडे गेला. त्या अमृताचे रक्षण करणारे दोन नाग तिथे होते. त्यांच्या डोळ्यांत धूळ फेकून गरुडाने तो अमृतकलश मिळविला. तो कलश घेऊन पृथ्वीवर येत असता वाटेत त्याची व विष्णूची गाठ पडली. एवढा अमृतकलश हातात असून गरुडाने त्यातला एक थेंबही चाखला नाही, याचे विष्णूला नवल वाटले. त्यामुळे विष्णू प्रसन्न होऊन गरुडाला 'वर माग' असे म्हणाला. 'मी तुझ्याहून उंच जागी असावे व अमृत न पिताही अमर व्हावे' असे दोन वर गरुडाने मागितले. विष्णूने ते दिल्यावर गरुडाने त्याला विचारले, की 'मी तुझी कोणत्या प्रकारे सेवा

करू ?' तेव्हा विष्णू म्हणाला, की 'तू माझे वाहन हो आणि ज्या वेळी मी रथात असेन त्या वेळी तू माझ्या ध्वजावर बस.' गरुडाने ती गोष्ट मान्य केली.



गरुड – विष्णुमूर्तीपुढे उभा असणारा

नंतर गरुडाने अमृतकलश आणून तो सर्पांना दिला व आपल्या आईची कद्रूच्या दास्यातून मुक्तता करून घेतली.

पुढे गरुडाला एकदा गर्व झाला, की ज्या अर्थी मी विष्णूला पाठीवर वाहून नेतो, त्या अर्थी मी विष्णूपेक्षाही बलवान आहे. विष्णूला हे समजले व त्याने सहज म्हणून आपला हात गरुडाच्या अंगावर टाकला. त्या भाराने गरुडाचा जीव कासावीस होऊन तो विष्णूला शरण गेला.

इंद्राने सुमुख नावाच्या एका नागाला अमरत्व दिले होते. त्यामुळे गरुडाचे व इंद्राचे भांडण झाले होते. विष्णूने त्याच सुमुख नागाला अंगठ्याने उडवून गरुडाच्या छातीवर बसविले. तेव्हापासून तो नाग गरुडाच्या छातीवर कायमचाच बसला आहे.

गरुडाला भासी, क्रौंची, शुक्री व धृतराष्ट्री अशा चार भार्या होत्या. या भार्यांपासून त्याला उलूक, काक, कुक्कुट, इ. अनेक पुत्र झाले.

**गरुडमूर्ती**– भारतात अनेक ठिकाणी गरुडाच्या मूर्ती आढळतात आणि त्या बहुतेक सर्व मानवी स्वरूपातच दिसतात. द्विभुज, चतुर्भुज, अष्टभुज असे त्यांचे विविध प्रकार आहेत. नालंदा येथे एक गरुडमूर्ती सापडली असून तिचे मुखही मानवी आहे.

बंगालमध्ये राखी रंगाच्या पाषाणाचे एक गरुडशिल्प सापडले आहे. त्या शिल्पात गरुडाच्या पसरलेल्या पंखांवर विष्णू ललितासनात बसलेला आहे. त्याने मागच्या दोन हातांत कमळे धरलेली असून, कमळांवर गजलक्ष्मी व सरस्वती यांच्या छोट्या प्रतिमा आहेत. पुढच्या हातांत चक्रपुरुष व गदादेवी या मूर्ती आहेत. त्याच्या किरीटमुगुटावर योगासनविष्णूची लहान प्रतिमा आहे. गरुडासन विष्णूची कोरीव चित्रे मध्ययुगानंतरच्या काळात बऱ्याच ठिकाणी निर्माण झाली. त्यांत विष्णूच्या मांडीवर लक्ष्मी बसलेली आहे.

वैष्णव धर्मात गरुडाला बरेच महत्त्व मिळालेले आहे. गरुड ही वैष्णव परिवारातील एक प्रमुख देवता आहे. शिवापुढे जसा नंदी तसा विष्णूपुढे गरुड उभा केलेला असतो. कित्येक वैष्णव मंदिरातून एक विशिष्ट खांब उभा केलेला असतो, त्याला गरुडखांब असे म्हणतात. विष्णूपुढची गरुडमूर्ती बहुधा पाषाणाची व क्वचित प्रसंगी लाकडाचीही असते. आकृती मानवाची व चोच आणि पंख तेवढे पक्ष्याचे अशी ही मूर्ती असते. ही मूर्ती नमस्कारमुद्रेत असते. शिल्परत्न या ग्रंथात त्याचे दोन्ही हात अभय व वरद या मुद्रेत असावेत आणि प्रसंगवशात त्याच्या उजव्या हाती अमृतकलश असावा असे सांगितले आहे. ज्या वेळी गरुडाची उत्सवमूर्ती तयार करतात, तेव्हा ती, डावा गुडघा दुमडलेला, उजवा पाय सरळ व मस्तकी सर्पभूषण अशा प्रकारची असते. अष्ट हस्तांनी अष्टनाग धारण करणारा व दातांचे सुळे बाहेर आलेला असा गरुड बनवावा, असे शिल्पसंग्रह या ग्रंथात सांगितले आहे. गरुड ज्या वेळी चतुर्भुज असतो त्या वेळी त्याला वैनतेय म्हणतात.



चंदनकाष्ठनिर्मित गरुड – मंगोलिया

चयनसंस्थेत याच्या नावाचे एक चयन आहे. त्याला गरुड



गरुड – तंजाऊर ( १७ वे शतक )

चयन किंवा सुपर्णचयन असे म्हणतात. यात गरुडाच्या आकाराची वेदी तयार करून तिच्यावर आहुती देतात.

**गरुडमानव**– महाभारताच्या मते गरुड व नाग या दोन मानवी जमाती असून, त्यांचे वास्तव्य पाताळात होते. त्याचप्रमाणे या दोन जमातीत हाडवैर असल्याचेही तिथेच म्हटले आहे. पाश्चात्य तत्त्वज्ञ ऑल्टम याचे मतही महाभारताप्रमाणेच आहे. कबोडिया वगैरे देशातल्या शिल्पात नाग हे मानवी रूपातच काढलेले दिसतात. त्यावरूनही या मताला पुष्टी मिळते.

नागांहून श्रेष्ठ ठरलेली ही गरुड जमात अखेर नामशेष कशी झाली, हा एक प्रश्नच आहे. नागांनी मोठमोठी राज्ये स्थापल्याचे उल्लेख मिळतात व अजूनही भारतात त्या नावाची जमात अस्तित्वात आहे. पण गरुडांनी मात्र राज्य स्थापल्याचे कुठेच उल्लेख नाहीत.

**गरुडविद्या**– संस्कृत साहित्यात सर्पविद्या नावाची एक विद्या आहे. तिला विषविद्या व गरुडविद्या अशीही नावे आहेत. शंकराचार्यांनी हिला गारुडविद्या म्हटले आहे. सर्पविद्या म्हणजे सर्पाला वश करण्याची विद्या होय. गरुड ही त्या विद्येची देवता आहे. गणेश पुराणात गरुड शास्त्राचा उल्लेख आढळतो. वायू पुराणात सुग्रीव नावाच्या गारुड्याला सर्प भीत असत असे म्हटले आहे. स्कंद पुराणात एका गरुडशिलेचा उल्लेख येतो. तिच्या दर्शनानेच सर्पबाधा नष्ट होते, असे तिथे म्हटले आहे. सर्पविद्या किंवा गरुडविद्या ही सर्पाची गुप्त विद्या आहे. सर्पांपैकी किंवा कश्यपपुत्रांपैकी ज्याना ही विद्या अवगत होती, त्यांनाच काश्यपेय किंवा गारुड हे नाव मिळाले.

**गरुड–गायत्री** – गरुडाची उपासना बरीच प्राचीन आहे. महानारायण उपनिषदात (३·१५) गरुड–गायत्री दिली आहे ती अशी–

**तत्पुरुषाय विद्महे सुपर्णपक्षाय धीमहि ।**
**तन्नो गरुड : प्रचोदयात् ।।**

(२) जैन दैवत समूहातला एक यक्ष. शांतिनाथाचा सेवक. प्रतिष्ठासारसंग्रहात याचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे–

**गरुडो नामतो यक्षः शान्तिनाथस्य सेवकः ।**
**वराहवाहनः श्यामो वक्रवक्त्रश्चतुर्भुजः ।।**

अर्थ– शांतिनाथाचा सेवक गरुड नामक यक्ष श्याम वर्णाचा, वाकडया तोंडाचा, डुकरावर बसलेला, चतुर्भुज, तसेच मातुलिंग, कमल, मुंगूस आणि माला धारण करणारा (दिगंबरमते कमल, फल, वज्र व चक्र धारण करणारा) असावा.

याची मूर्ती देवगढच्या शिल्पात आढळते. [ जै. इ.; हि. वि. को.; प्रा. च. को. ]

## गरुडध्वज

ज्या स्तंभाच्या शिरोभागी गरुडाकृती असते, त्याला गरुडध्वज असे म्हणतात. अशा प्रकारचे ध्वज वासुदेव–विष्णूच्या मंदिरांसमोर उभारण्याची प्रथा होती. गुप्त सम्राटांच्या सुवर्ण नाण्यावर अशा प्रकारची आकृती आहे. गरुडध्वज भारतात अनेक ठिकाणी आढळतात.

याला गरुडस्तंभ असेही म्हणतात. अशा प्रकारचा एक स्तंभ ओडिसा राज्यातल्या एका अरण्यात आढळतो. या स्तंभाची उभारणी इ.स. च्या १० व्या शतकात केसरी राजघराण्यातल्या राजांनी केली. त्याच्या आसपास इंद्राणी, काली, वसुंधरा इत्यादीच्या प्रचंड मूर्तीही आढळतात. त्यावरून त्या वेळच्या हिंदूच्या शिल्पकलेच्या भव्यतेची कल्पना येते. [ म. ज्ञा. को.; डे. हि. इ.]

## गरुडपंचमीव्रत

एक जैन व्रत. व्रतावधी ५ वर्षे. प्रत्येक वर्षी श्रावण शु. ५ मीस ‘ ओं ऱ्हीं अर्हद्भ्यो नमः’ हा मंत्र जपायचा, दिवसभर उपास करायचा व व्रत पूर्ण झाल्यावर उद्यापन करायचे असा याचा विधी आहे. फल– मोक्षप्राप्ती. याची कथा अशी—

चारित्रमतीने या व्रताचे पालन केले. त्यामुळे तिच्या वडिलांची मूर्च्छा नाहीशी झाली व तिला मोक्ष मिळाला. [ जै. व्र. वि. सं. ]

**गरुड पुराण** अठरा महापुराणांतील एक. हे पुराण वैष्णव पंथाचे आहे. यात गरुडाने विष्णूच्या आज्ञेवरून वैष्णव तत्त्वाचे वर्णन केले आहे. पुराणाच्या पंचलक्षणांना धरून याची रचना नाही. यात जगदुत्पत्ती, आदित्यरूप विष्णूची भक्ती, विष्णूची निर्गुणपूजा, शिव आणि इतर देवता यांची पूजा, उत्सव, इ. गोष्टी सागितल्या आहेत, सूर्यवंशी व सोमवंशी राजांच्या वंशावळी दिल्या आहेत. तसेच रामायण, महाभारत व हरिवंश यांतील कथा साररूपाने वर्णिल्या आहेत. याशिवाय व्याकरण, साहित्यशास्त्र, वैद्यक, इ. शास्त्रांचीही माहिती यात आली आहे. तसेच गयामाहात्म्य व प्रेतकल्प (प्रेतोद्धारक विधी) हेही सागितले आहेत.

गरुड पुराणाचे आचारकांड व धर्मकांड असे दोन विभाग असून आचारकांडाचे एकूण २४० अध्याय आहेत. धर्मकांडाचेही प्रेतखंड व ब्रह्मखंड असे दोन पोटविभाग असून प्रेतखंडात ४९ अध्याय व ब्रह्मखंडात २९ अध्याय आहेत. मत्स्य पुराणाच्या मते या पुराणाची श्लोकसंख्या १८ हजार, तर नारद पुराणाच्या मते ती १९ हजार आहे. पण हल्ली जे पुराण उपलब्ध आहे, त्यातली श्लोकसंख्या मात्र ७ हजाराहूनही कमी आहे. कलकत्ता येथे एक गरुड पुराण छापलेले आहे. त्यात या पुराणाची श्लोकसंख्या ८८०० दिली आहे.

प्रचलित गरुड पुराणातील भविष्यराजवंशाख्यानाच्या पूर्वभागावरून असे दिसते, की हे पुराण मुळात जनमेजयाच्या काळात संकलित झालेले असावे. उत्तरभागातील भविष्यराजवर्णनात राजा शूद्रकापर्यंतची नावे आली आहेत.

विष्णू,.मत्स्य इ. पुराणांत आंध्र, गुप्त, इ. पुढील राजांचा उल्लेख असल्यामुळे त्याच्या अपेक्षेने प्रचलित गरुड पुराण प्राचीन मानता येईल. डॉ. हजरा यांच्या मते या पुराणाचा काल इ. स. ८०० ते इ. स. १००० असा आहे.

याचा मंगलाचरण श्लोक असा —

**अजमजरमनन्तं ज्ञानरूपं महान्तम् ।**
**शिवममलमनादिं भूतदेहादिहीनम् ।।**
**सकलकरणहीनं सर्वभूतस्थितं तं ।**
**हरिममृतमयं तं सर्वगं तं नमामि ।।**

(१.१.१)

अर्थ — जन्म, जरा व मृत्यू नसणाऱ्या, ज्ञानमय, महान, शुभ, पवित्र, अनादी, भौतिक देह नसणाऱ्या, अवयवहीन, सर्व प्राणिमात्रांत वास करणाऱ्या, अमृतरूप अशा त्या सर्वगामी विष्णूला मी नमस्कार करतो.

आचारखंडाच्या दुसऱ्या अध्यायात, या पुराणाला गरुड पुराण हे नाव का पडले, याची कथा दिली आहे ती अशी —

पूर्वी एकदा गरुडाने विष्णूला प्रार्थना केली की आपण मातेला सोडविण्यास व आपल्या नावाची पुराणसंहिता रचण्यास समर्थ व्हावे. तेव्हा विष्णूने त्याला आपले ध्यान करून पुराण रचण्यास सांगितले. गरुडाने तसे केले. कश्यपाने हे गरुड पुराण ऐकून त्या श्रवणाच्या प्रभावाने वठलेल्या वृक्षाला फलपुष्पांनी समृद्ध केले. ग्रंथाच्या उपसंहारात या पुराणाची फलश्रुती दिली आहे, ती अशी ——

**यदुक्तं गारुडं पुण्यं पुराणं यः पठेन्नरः ।**
**सर्वकाममवाप्याथ प्राप्नोति परमां गतिम् ।।**

अर्थ — हे पुण्यकारक गरुड पुराण जो पठण करील, त्याच्या सर्व कामना सिद्धीस जाऊन तो परम गतीला प्राप्त होईल.

आचारकांडात विष्णूपासून कल्कीपर्यंत भगवंताच्या अवतारांचे वर्णन करून प्रस्तुत पुराणाच्या उत्पत्तीचे हेतू वर्णिले आहेत. तसेच यात ज्या अनेक जन्मकथा सांगितलेल्या आहेत, त्यांत ब्रह्मदेवापासून सप्तर्षींची उत्पत्ती व मरीचाच्या अंगठ्यापासून दक्ष व त्याची पत्नी याची उत्पत्ती दिली आहे. यापुढे सतीची कथा, तिचा हिमालयाच्या पोटी जन्म व विनायकाची उत्पत्ती या कथा सागितल्या आहेत.

१२ ते ४८ या अध्यायांत विष्णुपंजरस्तोत्र, विष्णुसहस्रनाम, इ. स्तोत्रे आहेत. मात्र महाभारतातील विष्णुसहस्रनाम व इथले विष्णुसहस्रनाम यांत थोडा फरक आहे. त्याचप्रमाणे विष्णू, शिव, सूर्य, इत्यादींचे तांत्रिक पूजनप्रकार, विषनिवारणाचे मंत्र व रोग-ग्रहपीडानिवारक मंत्रही दिलेले आहेत. ५४ ते ५८ या अध्यायांतून भूगोल व खगोल यासंबंधी सर्व पौराणिक कथा-कल्पना दिलेल्या आहेत. ५९ ते ६७ या अध्यायांतील मुख्य विषय फलज्योतिष व सामुद्रिक हे आहेत. ६८ ते ८० या अध्यायांत मूल्यवान रत्नांची उत्पत्ती कशी होते, त्यांचे मूल्यमापन कसे करावे व त्यांची शुभाशुभ लक्षणे कोणती, याविषयी उपयुक्त विवेचन आहे. ९३ ते १०० या अध्यायांतील मजकूर याज्ञवल्क्यस्मृतीतून अनुक्रमभेदाने घेतला आहे. १०७ वा अध्याय पाराशर स्मृतीवरून घेतलेला दिसतो. ११६ ते १३७ या अध्यायांत बारा मासातील निरनिराळ्या व्रतांचे निरूपण आहे. १४६ ते १९४ या अध्यायांत वैद्यकशास्त्राचे विवेचन आहे. २०५ ते २१२ या अध्यायांत व्याकरण, छंदःशास्त्र हे विषय आहेत.

धर्मकांडाच्या प्रेतखंडात मृताचे और्ध्वदेहिक कसे करावे,

हे सांगून नंतर रोरव, कलसूत्र, अतिशीत, इ. नरक कोणत्या पातकांनी प्राप्त होतात व चौऱ्यायंशी लक्ष योनींची प्राप्ती का होते, याचे विवेचन आहे. पुढे और्ध्वदहिक क्रियेस अधिकारी नसेल, तर जिवंतपणी आत्मश्राद्धादिकर्मे कशी करावीत, याचे निरूपण आहे. क्रियाधिकारी कोणी आप्त नसल्यास राजाला तो अधिकार आहे, असेही सुचविले आहे. त्याचप्रमाणे पिशाच-बाधेपासून मुक्त होण्यासाठी अयुत गायत्रीजप किंवा विष्णुबली, इ. विधी कसे करावेत, तेही सांगितले आहे.

ब्रह्मखंडामध्ये विष्णूचा श्रेष्ठपणा वर्णिला आहे. तसेच सूत्र नामक वायूपासून गरुडाची उत्पत्ती सांगून शेषावताराचे वर्णन दिले आहे. पुढे नंदादीपमाहात्म्य, कुमारीतीर्थमाहात्म्य, इ. माहात्म्ये सांगितली असून, अखेरीस जगताच्या धारणाचे स्वरूप व भागीरथ्यादी देवतांचे तारतम्य सांगितले आहे. पुढे विष्णुसंतोषकर धर्म वर्णिले आहेत. नंतर भगवत्तत्त्वाचे निरूपण करून ग्रंथ समाप्त केला आहे.

नीतिपर सुभाषिताचा संग्रह हे या पुराणाचे एक वैशिष्टच आहे. राजधर्म, स्त्रीधर्म, पुरुषधर्म, सामान्यनीती यांविषयी बरीच सुभाषिते प्रस्तुत पुराणात आढळतात. त्यांतील काही पुढे दिली आहेत—

**तर्कोऽप्रतिष्ठः श्रुतयो विभिन्नाः ।**
**नासावृषिर्यस्य मतं न भिन्नम् ॥**
**धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायां ।**
**महाजनो येन गतः स पन्थाः ॥**

अर्थ– तर्काला (न्यायशास्त्र) प्रतिष्ठा नाही. श्रुतीत ऐकमत्य नाही. ज्याचे मत भिन्न नाही, असा ऋषीच नाही. धर्माचे तत्त्व तर रहस्यमय आहे. म्हणून महान लोक ज्या मार्गाने गेले, तोच मार्ग अनुसरावा.

**सर्वः सर्वं न जानाति सर्वज्ञो नास्ति कश्चन ।**
(आ. का. ११०.२९)

अर्थ– सर्वांना सर्व गोष्टी माहीत नसतात. सर्व गोष्टी जाणणारा कोणीच नाही.

**अपवित्रः पवित्रो वा सर्वावस्थां गतोऽपि वा ।**
**यः स्मरेत् पुण्डरीकाक्षं स बाह्याभ्यन्तरः शुचिः ॥**
(ध. का. ४७)

अर्थ– अपवित्र असो वा पवित्र असो, किंवा सर्व अवस्थांतून गेलेला असो, जो कोणी कमलनयन विष्णूचे स्मरण करील, तो अन्तर्बाह्य शुद्ध होतो.

एखाद्या वृद्ध स्त्रीचा वा पुरुषाचा मृत्यू झाल्यानंतर दहा दिवस घरी ब्राह्मणद्वारा गरुड पुराणाचा पाठ करण्याची काही ठिकाणी पद्धत आहे. या पुराणाचे श्रवण हे और्ध्वदेहिकातील विधींचे एक अंग समजले जाते. [म. ज्ञा. को.; पुराण-निरीक्षण; हिंदुत्व; गरुड पुराण]

**गरुडबसवी**

विष्णूच्या नावाने देवास वाहिलेल्या स्त्रीला हे नाव आहे. अशा स्त्रियांच्या छातीवर गरुडाचे चित्र गोंदलेले असते. गरुडबसवी म्हणजे गरुडाची बायको असाही सांकेतिक अर्थ आहे.

**गरुडमत**

याविषयी भारतीय मतदर्पण या पुस्तकात पुढील माहिती दिलेली आहे–या पंथात अंत्यज लोक सामील आहेत. यांतले काही मंदिर बनवून त्यात रामचंद्राची मूर्ती बसवतात. यांची उपासना मात्र निर्गुण असते. काही तुळशीचाही रोपा लावतात आणि त्याला पाणी घालतात. या पंथाचे लोक प्रेते पुरतात व त्यातील धनिक लोक ती जाळतात.

**गरुडव्यूह**

सैन्यरचनेचा एक प्रकार. यात गरुडाच्या आकाराची सैन्यरचना केलेली असते. भारतीय युद्धात भीष्म सेनापती असताना त्याने हा व्यूह रचला होता–

स्वतः भीष्म या गरुडाच्या मुखाशी, द्रोण व कृतवर्मा हे डोळ्याच्या जागी, अश्वत्थामा व कृप हे शीर्षस्थानी, त्रिगर्त, मत्स्य, कैकेय, भूरिश्रवा, शल्य, भगदत्त हे ग्रीवेच्या ठिकाणी, दुर्योधन आपल्या भावांसह पृष्ठभागी, आवत्य, कांबोज व शक हे पंखांच्या टोकाला, शूरसेन हे उजव्या पंखाच्या जागी आणि कारुष, विकुंज, मुंड व बृहद्बल हे डाव्या पंखाच्या जागी होते. [श. क.]

**गरुडासन**

एक योगासन. याच्या अभ्यासाने पायांच्या स्नायूत जोम येतो. शिवाय मन एकाग्र होण्यासाठीही याचा उपयोग होतो. या आसनाची प्रक्रिया अशी–

जमिनीवर सरळ उभे राहावे. डावा पाय सरळ ठेवून, उजवा पाय गुडघ्याजवळ मोडून घ्यावा व तो डाव्या पायाभोवती लपेटावा. दोन्ही हातांचे अंगठे नासाग्रभागी लावावे. डोळे उघडे ठेवावेत. अशाच प्रकारे उजव्या पायावर उभे राहूनही करावे. [उ. यो. द.]

**गरोडा**

राजपुताना व बडोदा या भागात आढळणारी एक जात. यांच्यांतील दवे, जोशी, नागर, इ. नावांवरून ते मूळचे ब्राह्मण असावे, असे वाटते. परंतु यांच्यात गोहे, गांधिया अशी राजपूत नावेही आढळतात. आपल्या कुलपुरुषाने गुरुभगिनीशी विवाह केल्यामुळे आपला ऱ्हास झाल्याचे हे सांगतात. द. गुजरातेतील भंगी सोडून इतर सर्व अस्पृश्य

जातीचे उपाध्येपण हे करतात. जातीतील भाडणे पंचायती मार्फत सोडवतात.

**विवाहप्रथा** – लग्नात बाजरीच्या पिठाचे स्थंडिल करून त्यावर एखाद्या सौभाग्यद्रवाने नवग्रह मांडण्याकरिता नऊ घरे बनवतात. या स्थंडिलास चौशी असे म्हणतात. चौशीजवळ एक गोधडी आंथरून त्यावर वधूवरांना बसवतात. त्यांच्यापुढे पाण्याचे भांडे, तुपाची वाटी व तुपाचा दिवा लावून ठेवतात. नंतर वधूचा सख्खा भाऊ किंवा आतेभाऊ वधूवरांच्या हातात मनगटाजवळ मीढल नावाचे फळ सुताच्या दोऱ्यात ओवून बांधतो. त्यानंतर वधू-वर एकमेकांच्या हातांत हात घालून तुपाच्या दिव्याभोवती चार प्रदक्षिणा घालतात. वधूचा पिता वधूच्या व वराचा पिता वराच्या पदरात एक एक पैसा बांधतो आणि दोघांच्या वस्त्रांची एकत्र गाठ बांधतो. एवढे झाले, की लग्नविधी संपतो.

**देव-धर्म** – राम, देवी व तुळस या देवतांना हे भजतात. ब्राह्मणाप्रमाणे व्रत व उपवासही करतात. कित्येक गरोडा रामानंदी व परिणायी पंथांचे अनुयायी आहेत.

**मृतकप्रथा** – हे मृतांना जाळतात व श्राद्धविधीही करतात. [ म. ज्ञा. को. ]

## गर्ग भारद्वाज

(१) एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या सहाव्या मंडलातले ४७ वे सूक्त याच्या नावावर आहे. या सूक्तात सोमाचे स्तवन आहे. इंद्राने शंबराची नव्याण्णव पुरे उद्ध्वस्त केल्याचे हा सांगतो. इंद्राने काळ्या दासांना हाकलून देणे, वर्ची व शंबर यांना आणि त्यांच्या भाडोत्री सैन्याला ठार मारणे, आर्यांचे नापिक मुलखात आगमन, इ. काही कथाबीजे व देणग्यांचे उल्लेख याच्या सूक्तात आढळतात. याने रणदुंदुभीचे जे वर्णन केले आहे, ते फार उत्साहवर्धक आहे–

**उप श्वासय पृथिवीमुत द्यां**
**पुरुत्रा ते मनुतां विष्ठितं जगत् ।**
**स दुन्दुभे सजूरिन्द्रेण देवैः**
**दूराद् दवीयो अप सेध शत्रून् ।।**
**आ क्रन्दय बलमोजो न आ धा**
**निः ष्टनिहि दुरिता बाधमानः ।।**
**अप प्रोथ दुन्दुभे दुच्छुना इत**
**इन्द्रस्य मुष्टिरसि वीळयस्व ।।**

(६. ४७. २९–३०)

**अर्थ** — हे रणदुंदुभे, पृथ्वी आणि नक्षत्रमंडळ यांना धीर दे. गोंधळून गेलेले जग अनेक प्रकारे तुझी आठवण करील, असे कर. इंद्र व (त्याच्या) दिव्य विभूती यांच्याशी प्रेमैक्य साधून तू शत्रूंना देववेल तितके दूर पिटाळून दे. जोराने आवाज कर आणि आमच्यामध्ये बल व आवेश यांचा संचार कर. तू संकटांना हुसकून देणारा आहेस, म्हणून तुझा गभीर निनाद होऊ दे. हे दुदुभे, तू आपल्या धुम्‌धुम् आवाजाने संकटांना उडवून लाव. तू इंद्राचे मनगट आहेस, तर आता जोर धर.

यावरून वैदिक काळात लढाईच्या वेळी भेरी–नगारे वाजवीत असत, हे कळून येते.

गर्गाला श्रौतसंस्थेत विशिष्ट स्थान असल्याचे दिसते. गर्ग त्रिरात्र नावाचा एक सोमयाग श्रौतग्रंथात वर्णित आहे. याज्ञवल्क्याबरोबर अध्यात्मावर वादविवाद करणारी गार्गी ही विदुषी बहुधा वैदिक गर्गाची किंवा त्याच्या कुलातली मुलगी असावी· [ म. ज्ञा. को.; हि. ध. ]

(२) बृहस्पतीच्या वंशातला एक ऋषी. हा वितथाचा पुत्र होता, असे हरिवंशात सांगितले आहे (अ. ३२). [ हि. ध. ]

(३) एक ज्योतिषी. मत्स्य पुराण, महाभारत व भागवत या ग्रंथांत ज्योतिषी गर्गाचा निर्देश आढळतो. श्री. कर्न याने बृहत्संहितेच्या भूमिकेत या गर्गाविषयी विचार केला आहे. तो म्हणतो– सनपूर्व ५० साली हा होऊन गेला. याला राशिपद्धती, ग्रहांचे उच्चनीचत्व व ग्रहांची दृष्टी या गोष्टी ठाऊक होत्या. जातक व ज्योतिष या विषयांवर गार्गीसंहिता नावाचा याचा एक ग्रंथ आहे. बृहत्संहितेत याच्या ग्रंथातले कित्येक श्लोक उद्धृत केले आहेत. सर्व शुभाशुभ शकुनांचा जाणकार म्हणून विष्णू पुराणाने याचा निर्देश केला आहे. मयूरचित्रक व वारिशास्त्र या नावाचे याचे ज्योतिषविषयक ग्रंथ उपलब्ध आहेत.

याच्या नावावर एक मुहूर्त आहे. त्याला गर्गाचार्यांचा मुहूर्त म्हणतात. या मुहूर्तावर प्रयाण करणे, शुभ मानलेले आहे. [ हि. ध.; सु. वि. को. ]

(४) भागवतामध्ये (१०.८) उल्लेखिलेला गर्ग हा यदुवंशाचा पुरोहित होता. वसुदेवाच्या विनंतीवरून हा गोकुळात आला व यानेच रोहिणीपुत्राचे संकर्षण व देवकीपुत्राचे कृष्ण असे नामकरण केले. [ हिं. क. को. ]

(५) आयुर्वेदाचा आचार्य. हा अश्वशास्त्रज्ञ होता. हा सोमवंशात भुमन्यूचा पुत्र म्हणून जन्मला. हा दीर्घायुषी होता. याने शालिहोत्राकडून अश्ववैद्यक मिळवले. [आ. इ.]

(६) वास्तुशास्त्रविशारद. अठरा वास्तुशास्त्रोपदेशकात याची गणना केलेली आहे (मत्स्य पु. २५२). अग्नी पुराणात गर्गविद्येचा उल्लेख आहे (६५·७). ही विद्या म्हणजे गृहनिर्माण कला होय. बृहत्संहिता, सनत्कुमार वास्तुशास्त्र व विश्वकर्मप्रकाश या ग्रंथांत गर्गाच्या वास्तुशास्त्राचा उल्लेख येतो. याचा

काळ सनपूर्व २ रे किंवा १ ले शतक हा मानतात. हा कृषि-शास्त्रवेत्ताही होता. [ हिं. वि. को.]

## गर्दभ

एक पशू. मराठीत याला गाढव असे म्हणतात. वैदिक वाङमयात याला घोड्यापेक्षा हीन मानले असले (ऋ. ३.५३.२३; ऐ. ब्रा. ४.९; तै. सं. ५.१.२.१), तरी तो श्रेष्ठ भारवाहक असल्याचे तै. सहितेत सांगितले आहे. तिथेच त्याला द्विरेतस असेही म्हटले आहे. गाढवाचे पिल्लू लहान असले तरी खूप खाते असेही तै. सहितेत वर्णन आहे. अथर्ववेदात त्याच्या भेसूर ओरडण्याचा उल्लेख आहे (८.६.१०); तर ऋग्वेदात बदसूर गायकाला गर्दभ हे विशेषण लावलेले आहे. याशिवाय गर्दभ व गर्दभी यांचे अनेक उल्लेख वैदिक वाङमयात आहेत.

मुसलमान लोक गाढवाला शापित प्राणी समजतात. कुराणाने गाढवाचे ओरडणे निषिद्ध मानलेले आहे. सैतान गाढवाच्या शेपटीवर बसतो आणि ख्रिस्तविरोधी लोक गाढवाच्या पाठीवर बसतात, असे ख्रिस्ती लोक मानतात. कामाला निघताना गाढव दिसल्यास काम होणार नाही, अशी काही लोकांची समजूत असते. गाढवांची झुंज पाहणे, म्हणजे संकटाला बोलावण्यासारखे आहे, असे काही लोक समजतात. गरोदर स्त्रीने गाढव नरमादी एकत्र पाहिल्यास तिची मुले शक्तिमान निपजतात, अशीही एक कल्पना आहे.



गर्दभ (गाढव)

गाढव हा शब्द अनेक लाक्षणिक अर्थाचा सूचक ठरलेला आहे. दुसरा सूर्य म्हणून जेव्हा शनीचा उल्लेख करतात, तेव्हा त्याचे चिन्ह गाढव असते. यजमान व्रतस्थ असताना त्याने स्त्रीगमन केल्यास प्रायश्चित्त म्हणून गाढवाचा बळी द्यावा, असे धर्मशास्त्रात सागितले आहे [ वे. इं; की. पॉ.; डि. सिं. ]

## गर्भगृह

याला गर्भागार किंवा गाभारा असेही म्हणतात. हा मदिराचा मुख्य भाग असून, यात देवमूर्तीची स्थापना केलेली असते.

**तदेव गर्भगेहं तु वृत्तं वाऽथ युगांशकम्**

अर्थ – गर्भगृह हे वाटोळे किंवा चौकोनी असते.

गर्भगृहाचा विस्तार प्राचीन स्थापत्यशास्त्रात नऊ प्रकारचा सागितला आहे. स्त्रीच्या शरीरातील गर्भस्थानाप्रमाणेच वास्तूमधील गर्भगृहाचे स्थान समजले जाते. वास्तू बांधतांना याच भागात प्रथम गर्भविन्यासविधी करून मग मंदिराची उभारणी करीत. मूर्तीपासून चारी बाजूना अर्धदंडप्रमाणाने भिती घालाव्या, असे सांगितले आहे.

पूर्वी याला केवळ गर्भगृह न म्हणता देवगृह असे म्हणत. पण त्याच्या भोवती प्रदक्षिणामार्ग बनवू लागल्यानंतर देवगृह हे त्याच्या पोटात येऊ लागले व म्हणून त्याला गर्भगृह अशी संज्ञा मिळाली. गर्भगृहाला सभामडपाच्या अंगाने एक द्वार असते व तीन्ही बाजूनी भिती असतात. गर्भगृहाचे द्वार कोरून किंवा मढवून अलङ्कृत करण्याचीही पद्धत आहे. याला जे पार्श्वस्तंभ असतात, त्यांवर द्वारपाल अंकित केलेले असतात. गर्भगृहाच्या दाराच्या डोक्यावर एक छोटी मूर्ती बसवतात तिला ललाटबिंब म्हणतात. ही मूर्ती मंदिरातल्या देवतेच्या मुख्य परिवारातील एक असते. विष्णुमंदिर असेल, तर विष्णूच्या एखाद्या अवताराचे ललाटबिंब असते. गुप्तकालातील मंदिराच्या पार्श्वस्तंभावर मकरवाहिनी गंगा व कच्छपवाहिनी यमुना यांच्या मूर्ती अंकित दिसतात.

गर्भगृहाच्या तीन भितीवर किंवा भिंतीत बाहेरच्या अंगाने तीन देवमूर्ती बसविलेल्या असतात, त्याना रथिकाबिंब म्हणतात. गर्भगृहाला प्रदक्षिणा करताना या मूर्तीना नमस्कार करण्याची रीत आहे. गर्भगृह हे मंदिराचे हृदयस्थान मानतात. त्याला ब्रह्मस्थान असेही म्हणतात. [ श्री. एकनाथ कुलकर्णी; हि. वि. को. ]

## गर्भधातू

बौद्धांच्या योगाचारपंथात या शब्दाने बीजमत्र सूचित होतो. एका मंडलाच्या अर्ध्या भागाला गर्भधातू म्हणतात व तो भौतिक विश्वाचा निदर्शक मानतात. **पाहा**– वज्रधातू.

## गर्भनासंक्रांती

ओडिसात तुला संक्रांतीला हे नाव आहे. या सुमारास तिकडे भात पोटरीला (गर्भात) आलेले असते. या दिवशी भाताच्या रोपट्यांना लक्ष्मी मानून लोक त्याची पूजा करतात. या दिवशी ते थोडेसे तांदूळ व डाळ

हे पदार्थ मापात घेऊन मोजतात. त्यामुळे वर्षभर आपल्याला खूप धान्य मोजायला मिळेल, अशी त्यांची समजूत असते. त्याचप्रमाणे या दिवशी गोडधोडाचे भरपूर जेवण केल्याने वर्षभर आपल्याला गोड खायला मिळेल, अशीही त्यांची श्रद्धा असते [स्ट. ओ. फो.]

**गर्भरक्षाकरयंत्र** गर्भिणीच्या गर्भाचे रक्षण व्हावे, म्हणून हे यंत्र करतात. भूर्जपत्रावर हत्तीच्या मदस्रावाने यंत्र काढावे, त्यात साध्यनाम लिहावे व मग त्याची




गर्भरक्षाकरयंत्र

यथाविधी पूजा करून ते लोखंडी ताइतात घालून गर्भिणीच्या गळ्यात बांधावे, असा याचा विधी आहे. [यं. चि.]

**गर्भवतीचे संस्कार** स्त्री प्रथम गर्भवती झाली, की ती सर्वांच्या कौतुकाचा विषय बनते. तिचे सासर-माहेर तिची विविध कौतुके करायला प्रवृत्त होते. गर्भवतीला तिसरा महिना लागला, की तिची चोरओटी भरतात. चोरओटी याचा अर्थ तिचा गाजावाजा करायचा नाही. ही ओटी भरताना तिच्या हातात एक खण देतात आणि त्याच दिवशी त्या खणाची तिला चोळी शिवतात. या चोळीलाही चोरचोळी असे नाव आहे. या दिवशी डोहाळतुलीला गव्हल्यांची खीर व गुळाची पोळी करून घालतात. पाचव्या महिन्यात तिला हिरव्या बांगड्या भरतात. सातव्या महिन्यात तिच्या डोहाळजेवणांना सुरवात होते. जेवणाच्या वेळी मालत्या, फणवल्या, शेवया, नखोले व गव्हले यांच्या पाच खिरी करतात. या खिरीच्या वाट्यांवर पुऱ्या झाकतात व त्या डोहाळतुलीच्या ताटात ठेवतात. मग तिला त्यातली एक वाटी उघडायला सांगतात. त्या वाटीत गव्हल्याची किंवा नखोल्यांची खीर असली, तर तिला मुलगा होईल, असे मानतात व मालत्यांची, फणवल्यांची किंवा शेवयांची खीर असली, तर मुलगी होईल असे समजतात. मग ती खीर तिला खायला सांगतात. त्याच वेळी दुधातुपात अंगठी बुडवून ती तिच्या उजव्या कुशीला लावतात. कूस शांत राहावी, म्हणून हा प्रयोग असतो. महाराष्ट्रात झोपाळ्यावरचे, बागेतले, चांदण्यातले, वाडी भरलेले, इ. अनेक प्रकारची गर्भिणीची डोहाळजेवणे करण्याची प्रथा आहे.

स्त्रीला गर्भधारणा झाली, की काही गोष्टी तिने वर्ज्य करायच्या असतात. कोळसे, भस्म, हाडे, चूल, मुसळ, जाते, केरसुणी, इ. वस्तू असलेल्या ठिकाणी गर्भिणीने बसू नये, असे गृह्यकारिकेत सांगितले आहे. त्याचप्रमाणे जमिनीवर रेघोट्या ओढणे, भांडणे, तिन्हीसाजा जेवणे वा झोपणे, झाडाखाली जाणे, पाण्यात बुडी मारणे, हत्ती, घोडा, पर्वत यांवर चढणे, जलद चालणे, इ. गोष्टीही तिने करू नयेत, असे सांगितले आहे. चौथ्या, सहाव्या व आठव्या महिन्यात तिला प्रवास वर्ज्य असतो. गर्भिणीच्या पतीनेही श्राद्धभोजन, पिंडदान, मुंडन, प्रेतकर्म, समुद्रस्नान, लांबचा प्रवास, शिकार, इ. गोष्टी वर्ज्य कराव्या असे सांगितले आहे. गर्भिणीला सातवा महिना लागल्यावर समागम वर्ज्य करावा, असेही सांगितले आहे.

गर्भधारणा झाली, की स्त्रीला विशेष शक्ती प्राप्त होते, अशी समजूत आहे. अशा वेळी तिच्या ठिकाणी तिच्या पतीची, मुलाची व तिची स्वतःची अशा तीन शक्ती वास करीत असतात, अशी कल्पना आहे. पेरणीच्या वेळी, धान्य पोटरीला आले असता व मळणी चालू असता गर्भिणी स्त्रियांना जेवायला घालतात, ते त्यासाठीच. त्यामुळे शेतात पीक भरपूर येईल, अशी समजूत असते.

प्राचीन काळी काही प्रसंगी गर्भवती स्त्रियांचे बलिदान करण्याचीही प्रथा होती. कर्नाटकात हंपी येथे भाविक यात्रेकरू अजूनही एका भिंतीची पूजा करतात. ही भिंत बांधता बांधता सारखी ढासळत असे, म्हणून भिस्तकाय याने आपली गर्भवती कन्या तिथे बळी दिली, अशी कथा सांगतात.

काही लोकांत शपथ घेताना मृत गर्भिणीची हाडे हाती घेतात. मृत गर्भिणीची कवटी एखाद्या काठीला अडकवून ती शेतात पुरल्यास त्यापासून धान्याचे रक्षण होते, अशी समजूत आहे. गर्भिणीचा पदर कापून घेऊन त्याची राख करून ती खाल्ली असता गर्भिणीचा गर्भपात होतो व राख खाणाऱ्या स्त्रीला गर्भधारणा होते, अशीही समजूत आहे.

गर्भिणीची नजर सर्पावर पडली असता ती बाळंतीण होईपर्यंत सर्प आंधळा होतो, असे काही लोक मानतात. काही लोक गर्भवती स्त्रीचे दर्शन अशुभ मानतात.

प्राचीन काळी पारशी लोक गर्भिणी स्त्रीच्या खोलीत एक शेकोटी पेटवून ठेवीत असत. झरतुष्ट्राची आई गर्भवती असता शेकोटीमुळे तिचा भुताखेतांपासून बचाव झाला, अशी कथा आहे. नागा लोक गर्भिणीचे बाळंतपण सुलभ व्हावे, म्हणून निरनिराळ्या भुताखेतांची पूजा करून त्यांना संतुष्ट ठेवतात. द. भारतातील एड्डा लोकांमध्ये गरोदर स्त्री सुखरूप राहावी म्हणून याकू नामक भुतांची पूजा करतात व त्यांच्या नावाने नृत्ये करतात.

मुसलमान लोकांतही गर्भिणी स्त्रीचे विविध विधी असतात. तिसऱ्या, पाचव्या व सातव्या महिन्यात मुसलमान लोक गर्भिणीचे सोहाळे करतात.

पंजाबी खत्री लोकात गर्भाच्या पाचव्या महिन्यात त्याच्या पित्याचे और्ध्वदेहिक करण्याची पद्धत आहे. 'आत्मा वै पुत्रनामासि' म्हणजे पित्याचा आत्मा पत्नीच्या ठिकाणी पुत्ररूपाने जन्माला येतो, या सिद्धान्ताशी या और्ध्वदेहिकाचा संबंध आहे. पाचव्या महिन्यात गर्भाला आकार येतो, म्हणजे गर्भिणीचा नवरा मरतो, अशी त्यांची समजूत असते. मूल जन्माला आल्यावर पुनश्च त्या माता–पित्यांचे लग्न होते, असे ते समजतात. गर्भाधान, पुंसवन व सीमंतोन्नय असे गर्भवतीचे तीन संस्कार गृह्यसूत्रांमधून सांगितले आहेत. **पाहा**–गर्भाधान, पुंसवन, सीमंतोन्नयन [नि. सि.; की. पॉ.; एन्सा. रि. ए.]

## गर्भस्थिरीकरणविधी

कोणत्याही प्रकारच्या शारीरिक वा नैतिक दोषांनी ज्या स्त्रीचा गर्भ स्थिर राहत नाही, म्हणजेच जिचा गर्भस्राव होतो, त्या स्त्रीचे ते दोष नष्ट होण्यासाठी व गर्भ स्थिर राहण्यासाठी पुढील विधी करावा, असे सांगितले आहे––

सोन्याचे यज्ञोपवीत करावे. त्याच्या ग्रंथीच्या ठायी मोती बसवावे. त्याचप्रमाणे सोन्याच्या निम्म्या प्रमाणाने चांदीचे उत्तरीय तयार करावे. त्याच्या ग्रंथीच्या ठिकाणी हिरा बसवावा. मग त्या दोन्ही वस्तूंचे गायत्री मंत्र म्हणून पंचगव्याने प्रक्षालन करावे. मग एका ताम्रपात्रात दही आणि तूप घालून त्यांत त्या दोन्ही वस्तू ठेवाव्यात. त्याची पूजा करावी. मग ब्राह्मणांकरवी तूप व मधमिश्रित तिळांचे गायत्री मंत्राने किंवा व्याहृतिमंत्रानी १०८ हवन करावे. मग त्या दोन्ही वस्तूंचे पुढील मंत्राने ब्राह्मणास दान करावे––

**उपवीतं परिमितं ब्रह्मणा विधृतं पुरा ।**
**भव नौकास्य दानेन गर्भं सन्धारये ह्यहम् ।।**

अर्थ– पूर्वी ब्रह्मदेवाने धारण केलेले, योग्य परिमाणाचे हे उपवीत (हे ब्राह्मणा,) मी तुला दान करीत आहे. तू गर्भस्रावजनित दुःखाच्या सागरातून मला तारून नेणारी नौका हो. या दानाने माझा गर्भ स्थिर राहो.

मग दान घेणाऱ्या ब्राह्मणाला काही अंतर पोचवायला जावे व यथाशक्ती ब्राह्मणभोजन घालावे.

याशिवाय गर्भस्थिरीकरणासाठी आणखी काही विधी सांगितले आहेत, ते असे–

विधानपूर्वक एकवासविधी, ग्रहणात सुवर्णधेनूचे दान, चार प्राजापत्य प्रायश्चित्ते, सारस्वत मंत्राचा लक्ष जप, हरिवंशाचे श्रवण, कमलपुष्पांनी सहा महिने शंकराची पूजा किंवा घृतपूर्ण ताम्रकलशाचे दान. [सं. कौ.]

## गर्भाधान

सोळा संस्कारांपैकी पहिला संस्कार. शौनकाने या संस्काराची व्याख्या दिली आहे, ती अशी–

**निषिक्तो यत्प्रयोगेण गर्भः सन्धार्यते स्त्रिया ।**
**तद्गर्भालम्बनं नाम कर्म प्रोक्तं मनीषिभिः ।।**

अर्थ– ज्या कर्माच्या पूर्तीने स्त्री (पतिद्वारा) प्रदत्त अशा गर्भाचे धारण करते, त्याला विद्वान लोक गर्भालंबन (गर्भाधान) म्हणतात.

वेदपूर्वकालात अपत्यजन्माविषयी लोकांची धारणा काय होती, हे समजायला मार्ग नाही. मानवजातीच्या आदिमकालात गर्भधारणा किंवा प्रसूती हे एक नैसर्गिक कर्म होते. विषयोपभोगाची इच्छा होताक्षणी स्त्री-पुरुषानी एकत्र येणे व संतानप्राप्तीची आकांक्षाही न धरता परस्परांनी समागम करून इंद्रियतृप्ती मिळवणे, यापलिकडे त्या विषयाला काही सांस्कारिक बाजू नव्हती. गर्भाधान हा एक संस्कार असू शकतो, ही कल्पना मानवजात आदिम अवस्थेतून बाहेर पडल्यानंतरची आहे. घर, गृहस्थाश्रम, संततीची आकांक्षा आणि अपत्यप्राप्तीसाठी देवतांची कृपा आवश्यक असते अशी श्रद्धा, इतक्या गोष्टी आजच्या गर्भाधान संस्काराच्या मुळाशी आहेत.

गर्भाधान संस्काराचा प्रत्यक्ष उल्लेख संहिताग्रंथांतून नाही. पण गर्भधारणा कशी होते, तसेच गर्भाच्या देवता कोणत्या, यासंबंधी मात्र काही मंत्र ऋग्वेद (१०·१२४) व अथर्ववेद (५·२५) या संहितांतून आढळतात. अथर्ववेदातले वरील सूक्त गर्भाधानविषयकच आहे.

सूत्रपूर्वकालात हा संस्कार अगदी साधा होता. पती आपल्या ऋतुस्नात पत्नीकडे जात असे, तिला गर्भाधानासाठी पाचारीत असे, तिच्या गर्भाशयात गर्भाची स्थापना व्हावी, म्हणून देवांची प्रार्थना करीत असे आणि मग समागमक्रिया पूर्ण करीत असे. याहून त्या संस्काराला अन्य विधि-विधानांची जोड मिळाली नव्हती. गर्भाधानाचा सुव्यवस्थित प्रयोग बनला, तो सूत्रकालात.

सांप्रत प्रचलित असलेला गर्भाधानाचा प्रयोग हा सूत्रकारांनी बांधलेला आहे. बहुतेक सूत्रकारांनी थोडा-फार फरक ठेवून आपापल्या गृह्यसूत्रात हा प्रयोग समाविष्ट केलेला आहे. आश्वलायनसूत्रात याचा स्पष्ट निर्देश नसल्यामुळे आश्वलायन परिशिष्टकारांनी तो सविस्तर दिला आहे. हा संस्कार प्रथम ऋतुस्नात झालेल्या स्त्रीच्या पाचव्या दिवसापासून सोळाव्या दिवसापर्यंतच्या एखाद्या शुभदिनी करायचा असतो. सत्याषाढ-सूत्र चवथा दिवसही प्रशस्त मानते. या संस्काराला उक्त तिथिनक्षत्रे व त्यांची शुभाशुभ फले यांचे विस्तृत विवेचन मनू, याज्ञवल्क्य, इ. स्मृतिकारानी, तसेच धर्मसिंधू, निर्णयसिंधू, या ग्रंथांच्या कर्त्यानी केले आहे. गर्भाधानाला कोणत्या रात्री वर्ज्या-वर्ज्य ते सांगताना मनू म्हणतो––

**तासामाद्याश्चतस्रस्तु निन्दितैकादशी च या ।**
**त्रयोदशी च शेषास्तु प्रशस्ता दशरात्रयः ।।**
**युग्मासु पुत्रा जायन्ते स्त्रियोऽयुग्मासु रात्रिषु ।**
**तस्माद्युग्मासु पुत्रार्थी संविशेदार्तवे स्त्रियम् ।।**

(३.४७–४८)

अर्थ– रजोदर्शनापासून सोळा रात्रीपैकी पहिल्या चार रात्री, तसेच अकरावी व तेरावी या रात्री गर्भाधानासाठी वर्ज्य आहेत. उरलेल्या दहा रात्री शुभ होत. समरात्री पुत्र व विषमरात्री कन्या उत्पन्न होतात. म्हणून पुत्रार्थी असेल त्याने समरात्री ऋतुकाली भार्येच्या ठिकाणी गमन करावे.

ज्या तिथिनक्षत्रादी योगावर प्रथम रजोदर्शन घडते, त्याचीही शुभाशुभ फले असतात. दुष्ट योगांवर रजोदर्शन झाल्यास त्याचा दोष नष्ट होण्यासाठी भुवनेश्वरी नामक शाती करतात. ही शांती बौधायन गृह्यसूत्रात पठित आहे.

प्रथम समागमाच्या प्रसंगी गर्भधारणा झाल्यास त्या गर्भाला पावित्र्य येण्यासाठी हा संस्कार करायचा असतो; पण गर्भाधान संस्कार होताच त्याच पाळीला पत्नी गर्भवती होते, असा नियम नाही. अशा स्थितीत हा संस्कार गर्भाचा समजावा का जिथे गर्भधारणा व्हायची, त्या क्षेत्राचा, असा प्रश्न शास्त्र-कारांनी उपस्थित केला आहे. गौतम, मनू, याज्ञवल्क्य यांच्या मते हा संस्कार गर्भाचा आहे व इतरांच्या मते तो स्त्रीचा म्हणजे पर्यायाने क्षेत्राचा आहे आणि म्हणूनच कित्येक शास्त्र-कारांनी हा संस्कार प्रथम रजोदर्शनाच्या वेळी एकदाच करावा, प्रत्येक गर्भधारणेच्या वेळी करण्याची गरज नाही, असे सागि-तले आहे. कोणत्याही कारणाने का होईना; पण गर्भाधानादी उपनयनान्त संस्कार, त्रैवर्णिकांना आवश्यक सागितले आहेत.

**गर्भाधानप्रयोग**– यजमान अर्थात पती पुण्याहवाचन व नांदीश्राद्ध करतो. नंतर गृह्याग्नीत विष्णूला उद्देशून सहा व प्रजापतीला उद्देशून एक अशा चरूच्या आहुती देतो. नंतर 'उदी-र्ष्वात: पतिवती० ' ...(ऋ. १०.८५.२१) या मत्राने भार्येच्या उजव्या नाकपुडीत अश्वगंधेचा किंवा दूर्वेचा रस पिळतो. त्या वेळी पत्नीला पूर्वेकडे तोंड करून बसविले जाते व पती तिच्या पाठीमागे उभा राहून वरील रससेचनाचे काम करतो. मग पत्नीच्या करवी ब्राह्मणांना पाच फळांचे दान करतो.

रात्रौ समागमाच्या वेळी पत्नीच्या योनीला स्पर्श करून पुढील तीन मंत्र म्हणावे व मग समागम करावा, असे सागितले आहे–

**विष्णुर्योनिं कल्पयतु त्वष्टा रूपाणि पिंशतु ।**
**आ सिञ्चतु प्रजापतिर्धाता गर्भं दधातु ते ।।**
**गर्भं धेहि सिनीवालि गर्भं धेहि सरस्वति ।**
**गर्भं ते अश्विनौ देवावाधत्तां पुष्करस्रजा ।।**
**हिरण्ययी अरणी यं निर्मन्थतो अश्विना ।**
**तं ते गर्भं हवामहे दशमे मासि सूतवे ।।**

(ऋ. १०. १८४. १–३)

अर्थ – तुझी कूस विष्णू सुव्यवस्थित ठेवो आणि तुझ्या गर्भाचे स्वरूप व आकार यांची रचना त्वष्टा घडवो. परतु बीजोदकाचे सिचन मात्र प्रजापती करो, म्हणजे तुझ्या गर्भाची उत्पत्ती (आणि स्थैर्य) यांची व्यवस्था विधाता करील. हे सिनीवाली, (या क्रियेमध्ये) गर्भाची उत्पत्ती कर. हे सरस्वती, तूही तेच कार्य कर. आणि कमलपुष्पांची माला धारण करणारे अश्विदेव देखील तुझ्यामध्ये गर्भ (स्थिर) राहील, अशी योजना करोत. या अरणी हिरण्मय (अविनाशी) आहेत, म्हणूनच त्या मंथन करून अश्विदेव ज्याला उत्पन्न करतात, तो तुझा गर्भ वृद्धिंगत होऊन त्याने दहाव्या महिन्यात (बालक-रूपाने) निपजावे, असे आम्ही त्याला पाचारण करून सांगत आहो.

समागमानंतर पुरुषाने स्नान करावे, असे सांगितले आहे. स्त्रीला स्नानाची गरज नाही.

**लौकिक विधी**–– गर्भाधानाच्या रात्री पति-पत्नींना शेजारी बसवून पत्नीकडून पतीची पूजा करवितात. पत्नीची ओटी भरतात. शेज सजवितात. तिथे समई तेवत ठेवतात. शेजेपाशी मिठाईचे ताट व तांबूलकरंडक ठेवतात. दुसऱ्या दिवशी पति-पत्नीना एकत्र बसवून आरती करतात. तिला शिळी कुर्वंडी म्हणतात. [ध. सि.; सं. कौ.; म. ज्ञा. को.; हिं. सं.]

## गर्भासन

एक योगासन. मातेच्या पोटात असताना बालकाची जशी स्थिती असते, तशी या आसनात कर्त्याची स्थिती असते. म्हणून याला गर्भासन म्हणतात. जिभेवरचे फोड,

जिभेचा दाह, आंत्रपुच्छरोग व संग्रहणी या विकारांवर हे आसन उपयुक्त असल्याचे सांगितले आहे. याचा विधी असा–



गर्भासन

जमिनीवर बसावे. दोन्ही पाय गुडघ्यात वाकवून पोटाशी ठेवावे. दोन्ही पायाच्या पिंढऱ्यातून हात घ्यावे व ते कोपरात वळवून उजव्या हाताच्या बोटांनी उजवा कान व डाव्या हाताच्या बोटांनी डावा कान पकडावा. शरीर ताठ व स्थिर ठेवावे. सुरवातीला या आसनासाठी एखाद्या भितीचा आधार घ्यावा. [ उ. यो. द. ]

## गर्विता

एक नायिकाभेद. प्रियकराचे आपल्यावर असामान्य प्रेम आहे, म्हणून किंवा आपले रूप असामान्य आहे, म्हणून त्यावर प्रेम करणारी ती गर्विता होय. हा भेद सर्वप्रथम भानुदत्त या काव्यशास्त्रज्ञाने दाखविला आहे. गर्वितेचा हा गर्व कधी तिच्या मुखाने प्रकट होतो, तर कधी दुसऱ्याच्या उक्तीतून त्याचे दर्शन घडते. [ हिं. सा. को. ]

## गलग्रहतिथी

गलग्रह याचा अर्थ गळा पकडणारी असा आहे. प्रतिपदा, चतुर्थी, सप्तमी, अष्टमी, नवमी, त्रयोदशी, चतुर्दशी, पौर्णिमा व अमावास्या या तिथीना गलग्रह अशी संज्ञा आहे. कित्येक जण षष्ठीलाही गलग्रह मानतात. [स. कौ.]

## गलता

जयपूरच्या पूर्वेस एका पहाडावर असलेले एक प्रेक्षणीय स्थान. या ठिकाणी सूर्याचे एक प्रसिद्ध मंदिर आहे. हे क्षेत्र म्हणूनही प्रसिद्ध आहे. या ठिकाणी गालव ऋषीने तप केल्याचे सांगतात. रामानंद संप्रदायाचे हे एक महत्त्वाचे केंद्र आहे. इथून ७० फूट उंचीचा एक धबधबा खाली कोसळतो.

## गलंतिका

मराठीत हिला गळती म्हणतात. मातीच्या गाडग्याला खाली एक छिद्र पाडून ते गाडगे पाण्याने भरतात व ते तुळशीवृंदावनात एका खांबाला लटकवितात. त्यातून एक धार सतत तुळशीच्या मुळात गळत राहते. ग्रीष्म ऋतूत तुळशीवृंदावनात व शिवलिंगावर अशी गळती लावावी, असे सागितले आहे. त्यामुळे देवांचा ग्रीष्मताप शमतो व गळती लावणाऱ्याला पुण्य लाभते. तुळशीवृंदावनात लावली जाणारी गळती सकाळी सूर्योदयी लावतात व अस्तमानी काढून घेतात.

## गलपल बिहीर

एक प्रकारचे काटेरी गवत. मुड लोक करमा सणाच्या दिवशी त्याचे देठ काढून आपल्या मुलांच्या दंडाला बांधतात. त्याला ते कंकण असे म्हणतात. करमा उत्सवात करमवृक्षाच्या डहाळ्यांनाही हे गवत टांगतात. [ एन्सा. मुं. ]

## गवंडी

गवंड्याचे काम करणारी एक जात. यांची वस्ती मुख्यत्वे महाराष्ट्रात व थोडीफार कर्नाटक व सौराष्ट्र या प्रदेशांतही आहे. या जातीतले काही लोक स्वतःला क्षत्रिय मानतात व जानवे घालतात. ते सोवळ्याने जेवतात. यांच्यांत पुढीलप्रमाणे पोटजाती आहेत–

**मराठा गवंडी** – याचे रीतीरिवाज कुणब्याप्रमाणे आहेत. यांच्या धंद्यावरून यांची वेगळी जात बनली आहे.

**जिरे गवंडी** – पंढरपूर व सोलापूर या ठिकाणी मुख्यत्वे यांची वस्ती आढळते. विजापूरच्या राजाचा प्रसिद्ध गवंडी जिरे यावरून याना हे नाव पडले. हे मातीच्या देवमूर्ती करून विकतात.

**सागर गवंडी** – सोलापूर जिल्ह्यात मुख्यत्वे यांची वस्ती आढळते. हे मूळचे वाराणसीचे रहिवासी होते. मातीच्या देवमूर्ती करून विकणे, हा यांचा व्यवसाय आहे.

**कानडी गवंडी** – यांना धारवाडमध्ये सागरचक्रवर्ती म्हणून संबोधितात. लिंगायत धर्माची यांच्यावर बरीच छाप पडलेली आहे. लिंगायत उपाध्ये (जगम) याचे धार्मिक विधी करतात.

**काडिया गवंडी** – याचे संस्कार व चालीरीती कारागीर लोकांप्रमाणे असून सौराष्ट्रामध्ये यांची वस्ती आढळते. याची जातपंचायत असते व ती जातीचे तंटे सोडवते. हे लोक अपराध्याकडून मिळालेला दंड देवळांसाठी व साधूंना भोजन देण्यासाठी खर्च करतात.

पुणे जिल्ह्यात गुजराती, जाट, कामाटी, लिंगायत व परदेशी अशा यांच्या आणखीही पोटजाती आहेत. त्यांच्यांत परस्पर लग्नसंबंध होत नाहीत. [ म. ज्ञा. को ; मुं. इ. जा.]

**गवरीनाच** उदयपूरमधील भिल्ल लोकांचे एक नृत्य. हे लोक शक्तीचे उपासक आहेत. हे नृत्य करणाऱ्या माणसांना भोपा म्हणतात. प्रारंभी हे नृत्य केवळ शिव व शक्ती यांच्याशी सबंधित होते. त्यात शिवकृत राक्षससंहाराची दृश्ये दाखवीत. पण कालांतराने यात लौकिक कथानकाचाही समावेश केला गेला. साधेपणा व सरलता ही या नृत्याची वैशिष्टचे आहेत. **पाहा**– भोपा. [ वरदा ]

**गवरीबाई** (१७५८–१८०८ इ. स.) एक संत स्त्री. हिचा जन्म राजस्थानात डुंगरपूर येथे नागर ब्राह्मणाच्या कुलात झाला. वयाच्या ५ व्या वर्षी तिचे लग्न झाले आणि त्याच वर्षी तिला वैधव्य आले. तिला थोडे समजू लागल्यावर जेव्हा कोणीतरी म्हटले, की 'तू विधवा झाली आहेस', तेव्हा गवरी ताडकन उत्तरली, 'भगवान श्रीकृष्ण माझा पती आहे. मी विधवा होईनच कशी ?'

लौकिक वैधव्याच्या जाणिवेनंतर प्रथम काही वर्षे तिने एकांतवास पत्करला. त्या अवधीत ती लिहायला वाचायला तर शिकलीच; शिवाय तिने गीता-भागवतादी ग्रंथाचे अध्ययनही केले. ज्ञान आणि चिंतन या गोष्टींनी ती परमसात्त्विक बनली. तिच्या अंतःकरणात कृष्णभक्तीचा जिव्हाळा उत्पन्न झाला. हळूहळू तिची कीर्ती आजूबाजूला पसरू लागली. त्या काळी महारावळ शिवसिह हा राजा डुंगरपुरावर राज्य करीत होता. गवरीची कीर्ती ऐकून तो तिच्या भेटीस गेला व तिच्या भक्तिज्ञानाच्या गोष्टी ऐकून प्रभावित झाला. लगेच त्याने तिच्यासाठी डुंगरपुरात एक कृष्णमंदिर बांधून दिले.

हळूहळू अनेक भक्तलोक तिच्या दर्शनार्थ येऊ लागले. तिचे कीर्तन ऐकून ते भक्तिसुखाने डोलू लागत. असे सांगतात, की एके दिवशी दोन अज्ञात साधूंनी येऊन तिला ज्ञानोपदेश केला आणि तेव्हापासून तिची 'शून्यसमाधी' लागू लागली. आपल्या या समाधीचा अनुभव तिने कित्येक पदांतून व्यक्त केला आहे.

आयुष्याच्या अखेरीस तिने अंतिम प्रस्थानाची घोषणा केली आणि ती डुंगरपूर सोडून काशीस आली. तिथेच तिने देहत्याग केला.

गवरीबाईच्या पदांची संख्या ६१० इतकी भरते. या पदांतून तिने अनेक देवतांचे व अवतारी पुरुषांचे स्तवन केले आहे. तिची कित्येक गीते नीतिपर असून, ती तिने ३६ रागांत गायिली आहेत. कृष्णविषयक तिच्या एका पद्याचा नमुना पुढीलप्रमाणे –

**प्रभु मोकुँ एक बेर दरसन दइये ।। ध्रु ।।**
**तुम कारन मैं भइ रे दिवानी।**
**उपहास जगत की सहिये ।।**
**हात लकुटिया कंधे कमळिया।**
**मखपर मुरली बजैये ।।**
**हीरा मानिक गरथ भंडारा।**
**माल मुलक नहिं चाहिये ।।**
**गवरी के ठाकर सुखके सागर,**
**मेरे उर अंतर रहिये ।।**

अर्थ– हे प्रभो, मला एकवार दर्शन दे. तुझ्यासाठी मी दिवाणी बनले आहे. जगाने केलेला उपहास मी सहन करीत आहे. तुझ्या हाती काठी, खांद्यावर कांबळ व अधरावर मुरली असून ती वाजत आहे. हिरे, माणके, खजिना, माल-मुलूख यापैकी मला काहीही नको. हे सुखसागरा, तू (फक्त) माझ्या हृदयात भरून राहा.

गवरीबाईला मीराबाईचा अवतार मानतात. तिची साधना सगुण भक्तीतून सुरू होऊन निर्गुण भक्तीत तिचे पर्यवसान झालेले दिसते. मीराबाईप्रमाणेच गवरीलाही लोकापवाद सहन करावे लागले; पण ते तिने मोठ्या धैर्याने सहन केले. हिंदी क्षेत्रातल्या निर्गुण भक्त मंडळीत गवरी ही श्रेष्ठ दर्जाची मानली जाते. [ डॉ. विनयमोहन शर्मा– संमेलन पत्रिका; रा. भा. औ. सा. ]

**गवळा** दैवज्ञ ब्राह्मणांत मुंजामुलाला गवळा म्हणतात. त्यांच्या एकवीरा या कुलदैवताच्या कुलाचारात गवळ्यांची पूजा करणे हा एक विधी असतो. [ बदलापूर ]

**गवळी** दूधदुभत्याच्या व्यवसायावरून ओळखली जाणारी एक जात. हे श्रीकृष्णापासून आपली उत्पत्ती सांगतात. महाराष्ट्र, कर्नाटक, आसाम व बिहार या प्रदेशांत यांची वस्ती आढळते.

यांच्या आठ पोटजाती आहेत. त्यांच्यांत परस्पर विवाहसंबंध होत नाहीत. कानडी गवळ्याच्या चालीरीती लिगायत लोकांप्रमाणे आहेत.

गवळी लोकात पुनर्विवाह व घटस्फोट रूढ नाहीत. बिहारमध्ये ब्राह्मण यांच्या हातचे पाणी घेतात; परंतु बंगालमध्ये यांना नवसखा जातीपेक्षाही हलके समजतात. खंडोबा, महादेव, कृष्ण, विठोबा, इ. यांची कुलदैवते आहेत.

हे मृतांना जाळतात किवा पुरतात. श्राद्धपक्षही करतात. [ मुं. इ. जा.; म. ज्ञा. को. ]

**गवामयन** एक सत्र. सोमयागांचे एकाह, अहीन व सत्र असे प्रमुख तीन प्रकार आहेत. ज्या यागांमध्यें बारा दिवसांपासून एक वर्षपर्यंत रोज सोमाचे हवन असते, अशा यागांना सत्र म्हणतात. एक वर्ष किंवा त्याहून अधिक काळ चालणाऱ्या सत्रांना संवत्सरसत्र असे म्हणतात. गवामयन हे अशा संवत्सरसत्रांची प्रकृती आहे. हे सत्र दहा किवा बारा महिने चालते. यातले सर्व ऋत्विज अग्निहोत्री असतात व सर्वानाच सत्राची दीक्षा घ्यावी लागते.

गवामयनात प्रायणीय, विषुवत्, अभिजित्, महाव्रत यांसारखे एकाह व अभिप्लव, पृष्ठ्य, द्वादशाह, यांसारखे अहीन याग यांचे अनुष्ठान करायचे असते.

या सत्राला गवामय का म्हणतात, याविषयीची आख्यायिका तैत्तिरीय संहिता (७. ५. २·१), तांड्यब्राह्मण (४·१) व ऐतरेय ब्राह्मण (४·१७) यांमध्ये आली आहे, ती अशी–

पूर्वी एकदा गायींनी आपल्याला शिंगे (ऐ. ब्रा. च्या मते शिंगे व खूर) येण्यासाठी सत्र आरंभिले. दहा महिन्यांतच त्यांना खूर व शिंगे आली· पण त्यांपैकी काही गायींनी असा विचार केला, की वर्ष सपेपर्यंत आपण अनुष्ठान करीत राहावे. त्याप्रमाणे त्यांनी केले. फळ मिळूनही पुन्हा यागानुष्ठान चालू ठेवल्यामुळे त्या गायींची शिंगे मोडून पडली. मात्र संपूर्ण वर्ष अनुष्ठान करीत राहिल्यामुळे वर्षाच्या सर्व ऋतूत त्या पुष्ट राहू लागल्या.

गायी सत्र करू शकत नाहीत, ही वस्तुस्थिती असल्यामुळे ही कथा अर्थवादरूप मानावी लागते. सत्र गायींनी केले नसून मनुष्यांनीच केले होते. याविषयी डॉ. संपूर्णानंद पुढीलप्रमाणे लिहितात–

मनुष्यांनी पाऊस पडावा, म्हणून हे सत्र आरंभिले. दहा महिन्यांनंतर आकाशात काही ढग दिसू लागले. त्या ढगांचे स्वरूप खूर व शिंगे असलेल्या गायींसारखे होते. आता पाऊस नक्की पडेल, असे समजून सत्र करणारे काही लोक उठून गेले; पण काही लोकानी विचार केला, की आपण वर्ष संपेपर्यंत सत्र करावे. म्हणून त्यांनी अनुष्ठान पुढे चालू ठेवले. थोड्याच काळात आकाशातले तात्कालिक ढग विखरून गेले. याचा अर्थ गायींची शिंगे व खूर मोडले. पण वर्ष पुरे होताच सगळे आकाश मेघांनी भरून गेले. भरपूर पर्जन्यवृष्टी झाली आणि पृथ्वी धनधान्याने समृद्ध झाली. गायी सर्व ऋतूंत पुष्ट झाल्या, याचा अर्थ धान्यसमृद्धी झाली, हा होय.

या सत्रासंबंधी वेदातले उल्लेख विचारात घेऊन लो. टिळकांनी आर्यांच्या मूळ वसतिस्थानासंबंधी काही अनुमाने काढली आहेत, त्याचा सारांश असा––

गवामयन ही वर्षाची प्रतिमा होय, असे एक विधान आहे. हे सत्र दहा महिन्यांत संपले, असे सागितले आहे. त्यावरून प्राचीन काळी दहा महिन्याचेच वर्ष मानीत असावे, असे दिसते. प्राचीन रोमन लोकाचे वर्षही दहा महिन्यांचे म्हणजे तीनशे चार दिवसांचे होते. अवेस्त्यातही दहा महिने उन्हाळा असल्याचे वर्णन आहे. दहा महिन्यांनंतर दोन महिने दीर्घरात्र येई. असे दिनरात्रीचे विभाग ज्या उत्तरध्रुवाजवळील प्रदेशात होते, त्या ठिकाणी आर्यांचे मूळ वसतिस्थान होते, असे समजायला हवे.

गायींनी सत्र केले, या वैदिक आख्यायिकेतील गायी म्हणजे प्रकाशधेनू होत, असा त्याचा अर्थ लो. टिळक सांगतात. ऋग्वेदात पणींनी इंद्राच्या गायी चोरल्याची कथा आहे. पणींच्या कचाट्यातून निसटलेल्या गायी म्हणजे दीर्घ रात्रीनंतर येणारा प्रकाश होय. **पाहा** – द्वादशाह, महाव्रत. [ हि. ध.; आ. आ. दे.; आ. लो. मू. ]

**गवाशिर-यवाशिर** गाईचे दूध सोमरसात मिसळल्यावर त्या मिश्रणास गवाशिर म्हणतात. सोमात यव मिसळल्यास त्याला यवाशिर म्हणतात.

**इममिन्द्र गवाशिरं यवाशिरं च नः पिब ।**

(ऋ. ३.४२.७)

अर्थ – हे इद्रा ! इथे (यज्ञभूमीत) येऊनहे आमचे गवाशिर व यवाशिर याचे प्राशन कर.

**गवाक्ष** गायीच्या डोळ्याच्या आकाराची जाळीदार खिडकी म्हणजे गवाक्ष होय (गरुड पु. ४७.३६; मानसार



जालगवाक्ष

२०.८१). याला वातायन (वारा आत येण्याचे साधन)

असेही दुसरे नाव आहे. गंगैकोंडपुरम् येथील मंदिरात अनेक ठिकाणी अशी गवाक्षे कोरलेली आहेत.

डॉ. आनंद कुमारस्वामी यानी गवाक्षाचा अर्थात खिडक्याचा विकास वास्तुशास्त्रात कसा झाला, ते पुढीलप्रमाणे सांगितले आहे– शुंगकालात व कुषाणकालात वेदिकावातायन, जालवाता-



शलाका – गवाक्ष

यन व शलाकावातायन असे गवाक्षांचे तीन प्रकार होते. गुप्त-युगाच्या वास्तुकलेत तोरणांच्या मध्यभागी गोल वातायने बनवू लागले. तेव्हाच त्यांना गवाक्ष (गायीचा डोळा) असे अन्वर्थक



मनुष्याकृतियुक्त कमानदार गवाक्ष

नाव मिळाले. गुप्तकाळात या झरोक्यात प्राय: स्त्रीमूर्ती किंवा स्त्रीमुखे कोरलेली आढळतात. [ह. च. सां. अ.; एन्सा. हिं. आ.]

**गहिनीनाथ** (इ. स. १२०० चा सुमार) एक नाथसिद्ध. गोरक्षनाथाचा शिष्य व निवृत्तिनाथाचा गुरू. गयनी, गैनी, गहनी किंवा गहिनी अशा नामपर्यायांनीही हा ओळखला जातो. महाराष्ट्रात नाथसंप्रदायाची परंपरा निर्माण करणारा हा पहिला पुरुष होय. नवनाथभक्तिसाराच्या १० व्या अध्यायात याची जन्मकथा दिली आहे, ती अशी–

कनकग्रामात बाल गोरक्ष मत्स्येंद्रनाथाबरोबर हिंडत असता एकदा त्याने मुलाच्या बरोबर मातीच्या मूर्ती करण्याचा खेळ आरंभिला. गुरूने दिलेल्या मंत्राच्या सहजोच्चारणाने त्याच्या हातातील ज्या मातीच्या पुतळ्यात चैतन्य संचारले, तोच हा गहिनीनाथ होय.

या कथेवरून हा अयोनिसंभव ठरतो. नवनाथभक्तिसारात गहिनीला करभंजन नारायणाचा अवतार मानले आहे. अशा या अयोनिसंभव बालकाचा प्रतिपाळ मत्स्येंद्रनाथाच्या आज्ञेने त्याच गावातील मधू नामक ब्राह्मण व त्याची पत्नी गंगा यांनी केला.

गहिनीनाथाचे गहिनीप्रताप व गोरक्षगीता हे दोन ग्रंथ उपलब्ध आहेत. गहिनीप्रताप या ग्रंथात तो गुरूविषयी लिहितो–

**गोरखसुत गहिनी कहे नाथपंथकी बानी ।**
**ग्यानी जानत गुरुपुत होत सोहि चढे तिरबानी ॥**

अर्थ–(नाथपंथाचे तत्त्वज्ञान सांगताना) गोरक्षपुत्र गहिनीनाथ म्हणतो, की ज्याला गुरुपुत्र ही पदवी लाभते तो निर्वाण पदाला पोहोचतो, हे ज्ञानी जनांना माहीतच आहे.

गोरक्षगीतेत योगाभ्यासाचे आणि त्यात येणाऱ्या अनुभवांचे वर्णन आहे. श्री. वि. ल. भावे यांनी महाराष्ट्रसारस्वतात गोरक्षगीता व ज्ञानेश्वरीचा ६ वा अध्याय यातील काही साम्यस्थळे दाखवून दिली आहेत. सोपानपरंपरेतील गंगाधरनाथ नामक एका नाथपंथीयाने गोरक्षगीतानिरूपण या नावाची एक टीकाही या ग्रंथावर लिहिलेली आढळते.

श्री. पांगारकरांनी ज्ञानेश्वरांची प्रभावळ या ग्रंथात गहिनीनाथाचे तीन अभंग संकलित केले आहेत. त्यांतला एक असा–

**आकाश तडतडी, मेरु हा कडाडी ।**
**तरी आत्मसुखगोडी सांडू नये ॥**
**वायु जरी सुटे, ब्रह्मांड हे आटे ।**
**तरी आत्मनिष्ठे भंगो नेदी ॥**

दुसरा अभंग गुरुदत्त तत्त्वरहस्याचा असून तिसरा अभंग निवृत्तिनाथाला कळिकाळ जिंकण्याचा मार्ग सांगणारा आहे.

गहिनीनाथाविषयी अशी एक समजूत आहे, की नगर जिल्ह्यातील गैबीपीर तो गहिनीनाथच होय. नगर जिल्ह्यात या गैबीपीराची अनेक स्थाने आहेत. **पाहा**– नाथपंथ. [गो. च. प.; ज्ञा. प्र.; नवनाथ कथासार; म. सा.]

**गळ घेणे** भिल्ल वगैरे काही आदिवासी लोकांतील एक प्रथा. एखाद्या आदिवासी स्त्रीला मूल होत नसेल, एखाद्याच्या शेतात धान्य भरपूर होत नसेल किंवा त्याची आणखी एखादी इच्छा असेल, तर तो गलदेवतेला नवस करतो आणि आपले मनोवांछित पुरे केल्यास दहा किंवा वीस गळ घेण्याचा नवस बोलतो.

होळीच्या दुसऱ्या दिवशी हा गळ घेतात. त्यापूर्वी सात दिवस गळ घेणारा व्रतस्थ राहतो. तो मद्य–मांसाला स्पर्श करीत नाही व घराच्या बाहेर झोपतो. प्रत्यक्ष गळ घेण्याच्या दिवशी तो सकाळपासून मौन धरतो. मग गावातील लोक त्याच्या घरी जमतात. सर्वजण एक बकरा घेऊन नवस बोलणाऱ्या माणसासह ढोल वाजवीत आणि गात-नाचत गलदेवतेच्या स्थानाजवळ जातात.

तिथे गेल्यावर देवीचा बडवा किंवा पुजारी बकऱ्याच्या अंगावर गार पाणी शिंपडतो. बकरा अंग झटकायला आणि मान हालवायला लागला, की गलदेवता त्या बळीवर खूष आहे, असे समजतात.

गलविधीसाठी पंधरा-वीस फूट उंचीचे चार खांब जमिनीत पुरून एक मचाण बांधतात आणि त्याच्यावर एक आढे ठेवतात. या आढ्याला एक दोरी बांधतात आणि दोरीत एक हूक अडकवतात. नंतर गळ घेणारा माणूस तो हुक आपल्या पाठीत खुपसून घेऊन त्याला लटकतो. हुकाची दोरी गोल फिरवल्यावर तो माणूसही गोल गोल फिरू लागतो. हे कृत्य अघोरी असते. माणूस गळाला लटकत असता जमलेले लोक मोठमोठ्याने ढोल वाजवतात.

नंतर पुजारी बकरा बळी देतो. बकऱ्याचे डोके स्वत:साठी ठेवून बाकीचा भाग तो लोकांना प्रसाद म्हणून वाटतो. गळ घेणारा मग गावजेवण देतो. लोक महुवाचे मद्य पितात व रात्रभर गातात आणि नाचतात.

हल्ली या प्रथेत बदल झाला आहे. गळ घेणारा माणूस त्या हुकाला नुसता स्पर्श करतो आणि हूक आपल्या पाठीत खुपसून न घेता कमरेच्या वस्त्रात अडकवूत त्याला लटकतो. एका काळी जेजुरीच्या खंडोबापुढेही गळ घेण्याचा असाच प्रकार होत असे. त्याला बगाड घेणे, असे म्हणत.

**गागाणी** मारवाडमधील एक प्राचीन तीर्थक्षेत्र. जोधपूरपासून दक्षिणेस १८ मैलांवर हे स्थान आहे. या ठिकाणी एक जैन मंदिर असून, सम्राट संप्रतीने २२०० वर्षांपूर्वी ते बांधले असावे, असे जैनाचार्य श्रीसमयसुंदरजी गणी यांचे मत आहे. मंदिराची उंची ७२ फूट असून, भारतीय कलेचा आदर्श म्हणून त्याची प्रशंसा होते. पूर्वी या मंदिरात भगवान आदीश्वराची शुभ्र पाषाणाची मूर्ती होती. परंतु सध्याची मूर्ती पंचरसधातूची आहे. प्रतिवर्षी माघ शु. षष्ठीला इथे मोठी यात्रा भरते. [ धर्मयुग ]

**गागुली माणिक** एक बंगाली कवी. धर्मठाकुर या बौद्ध देवतेसंबंधी याने बंगाली भाषेत प्रदीर्घ काव्य रचले आहे. हे काव्य त्याने इ. स. १५४७ मध्ये पूर्ण केले. [ हि. बं. लॅ. लि. ]

**गांगेय शक** एक कालगणना. याला गंग कदंब शक असेही नाव आहे. या कालगणनेचे उल्लेख पौर्व गंग व कदंबवंशी राजपुरुष याच्या लेखांत येतात. हा शक कोणी व केव्हा सुरू केला, याविषयी पुष्कळ चर्चा झालेली असली, तरी त्यातून निश्चित असे काहीही उपलब्ध झालेले नाही. याचे कारण, एक तर या शकाचे उल्लेख असलेले लेख थोडे मिळाले आहेत आणि दुसरे म्हणजे त्या उल्लेखांत एखाद्या परिचित कालाशी त्याचा संबंध जोडलेला आढळत नाही. श्री. आर्. सुब्बाराव यांच्या अगदी अलिकडच्या मताप्रमाणे शके ४१६–१७ किंवा इ. स. ४९४–४९५ हे या कालाचे आरंभवर्ष आहे. श्री. कृष्णराव हा काल शके ४१९ (=इ. स. ४९७) च्या श्रावण किंवा भाद्रपद या महिन्यात सुरू झाला, असे मानतात. [ सं. मि. ]

**गांगो** कोकणातला एक क्षुद्र देव. कुळवाडी याला भजतात. या देवाचे बलिदान घाड्याच्या करवी होते. हा देव मूळचा कानडी मुलखातला असावा, असे श्री. चापेकर म्हणतात.

**गांडीव** गांडी=ग्रंथी ज्याला आहे, ते (श. क.). अर्जुनाचे धनुष्य. हे धनुष्य ब्रह्मदेवाने निर्माण केले व एक हजार वर्षेपर्यंत स्वत: धारण केले. त्यानंतर ते क्रमाने प्रजापती, इंद्र, सोम, वरुण व अर्जुन यांच्याकडे आले. खांडव वन जाळण्याच्या प्रसंगांत अग्नीने ते वरुणाकडून मागून घेऊन अर्जुनाला दिले, अशी कथा आहे (म. भा. सभा. २२५).

गांडीव धनुष्यावर कोणत्याही शस्त्राचा इलाज चालत नसे. ते रंगीबेरंगी असून फार सामर्थ्यवान होते. देव-दानव-गंधर्वांनी अनेक वर्षे त्याची पूजा केली होती. अर्जुनाने आपल्या महाप्रस्थानापूर्वी हे विशालकाय धनुष्य पुन्हा वरुणराजाला समर्पित केले. कृष्ण इहलोक सोडून गेल्यावर गांडीवाचे सामर्थ्य नष्ट झाले, असे विष्णू पुराणात सांगितले आहे. [ हिं. सा. को. ]

**गांता** मध्य प्रदेशातील भिलाले वगैरे आदिवासी आपल्या जातीतल्या वीर पुरुषाच्या स्मृतीसाठी जी शिळा पुरतात, त्याला गाता असे म्हणतात. ही शिळा गावाच्या बाहेर बसवतात. त्या वेळी अनेक स्त्री-पुरुष नटून-थटून - त्या ठिकाणी जमतात व नृत्यही करतात. [ लोककला त्रैमासिक ]

**गांद** छोटा नागपूर व उरिया या जिल्ह्यांत आढळणारी एक जमात. मध्य प्रदेशातील रायपूर, बिलासपूर व रायगई या ठिकाणीही याची वस्ती आढळते. तेथील गांद रखवालदारी, कापड विणणे व वाद्ये वाजविणे, इ. व्यवसाय करतात. वाद्ये वाजवताना यांच्यांतले दोन तरुण स्त्री-वेष घेऊन नृत्य करतात. यांना आजवर अस्पृश्य मानीत.

व्यवसायांवरून यांच्यांत अनेक पोटजाती निर्माण झाल्या आहेत, त्या अशा– बाजन किंवा बाजगरी हे उत्सवात किंवा विवाहप्रसंगी वाद्ये वाजवतात. मांग किंवा मंगी हे पडदे व चटया विणतात. डोम हे मृत जनावरांची कातडी कमावतात. धोलिया टोपल्या विणतात. नगारची नक्कर हे नगारे वाजवतात. बंगालमध्ये याची पत्रदी म्हणून एक पोटजात आहे. हे लोक घरकामे करतात.

**विवाहप्रथा** – या जमातीच्या पोटजातींना वनस्पती, जनावरे व निर्जीव पदार्थ यांच्यावरून नावे दिलेली आढळतात. समान नावाच्या पोटजातीत विवाहसबंध होत नाहीत. मुलगी ऋतुस्नात होऊनही तिचा विवाह जमला नसेल, तर जेव्हा लग्न जमेल, तेव्हा अंगणात एक भाला उभा करून, प्रथम त्याच्याशी त्या मुलीचा विवाह लावतात. परजातीच्या व्यक्तीशी एखाद्या मुलीचा संबंध आल्यास त्या मुलीला बहिष्कृत करतात. विवाहसमारभ सर्वसामान्यपणे श्रावण, भाद्रपद किंवा आश्विन या महिन्यातल्या कृष्णपक्षात करतात. विवाहाच्या वेळी महुवा झाडाचा विवाहस्तंभ उभा करून त्याच्या मुळात सात कवडया व सात हळकुंडे ठेवतात. त्याच जमातीमधील सेठिया ही प्रौढ व्यक्ती लग्नाचे पौरोहित्य करते. वधू-वर त्या स्तंभाला सकाळी पाच व संध्याकाळी तीन, अशा आठ प्रदक्षिणा घालतात. त्यानंतर वधूच्या कानामागे हरिणाची प्रतिमा लटकावतात व वर बांबूच्या किंवा गवताच्या बाणाने सात वेळा हरिणाचा लक्ष्यवेध करतो. वराकडून लक्ष्यवेध न झाल्यास वधूचा भाऊ तो बाण घेऊन पळतो व वर त्याचा पाठलाग करतो.

हे लोक दूलिया देवाला भजतात. वृक्षपूजा निषिद्ध मानतात. जन्मलेल्या बालकाचे सहाव्या दिवशी नामकरण करतात.

**मर्तिकप्रथा**– हे मृताला पुरतात. पुरुषाचे प्रेत उपडे व स्त्रीचे उताणे पुरतात. तीन दिवस सुतक पाळतात व चवथ्या दिवशी ज्ञातिभोजन घालतात. जेवतेवेळी मृताचे नातेवाईक आपल्या भोजनातील काही भाग मृताच्या वारसाच्या द्रोणात घालतात व दुसऱ्या द्रोणात पाणी भरून ते दोन्ही द्रोण घराच्या बाहेर ठेवतात. त्या वेळी 'तुझ्यासाठी इथे अन्न ठेवलेले आहे' असे मृताचा वारस मृतात्म्याला सागतो. [ ट्रा. का. सें. प्रॉ. इं ]

**गांदली** चांदा, नागपूर व भंडारा या जिल्ह्यांत आढळणारी तेल गाळणाऱ्यांची एक तेलुगू जात. गोदावरी जिल्ह्यातून हे मध्य प्रदेशात आले व तिथे स्थायिक झाले. पुढे यांनी आपला पूर्वीचा व्यवसाय सोडला हे जमीनदार, व्यापारी व सावकार बनले. आता हे स्वतःला तेली न म्हणता बनिया म्हणवतात. तेलुगू व मराठी या दोन्ही भाषा हे चागल्या प्रकारे बोलतात. डोक्याला रुमालही तेलुगू पद्धतीने बाधतात.

रेड्डी, चेट्टी व तेलकल अशा यांच्या पोटजाती असून तेलकल लोक तेल गाळण्याचा व्यवसाय करतात. रेड्डी या शब्दाचा अर्थ रेडु-एद्दू म्हणजे घाण्याला दोन बैल जुंपणारे असा आहे; तर चेट्टी याचा अर्थ व्यापारी असा आहे. कोष्टी व इतर जाती चेट्टी ही पदवी आपल्या नावापुढे लावतात.

**विवाहप्रथा**– गावाच्या नावांवरून यांच्यांत पोटजाती निर्माण झाल्या असून त्यांच्यांत परस्पर विवाहसंबंध होतात. लग्नात ब्राह्मण याचे पौरोहित्य करतो. याचा लग्नविधी मराठ्यांप्रमाणे असतो.

**मर्तिकप्रथा** – हे प्रेते जाळतात किवा पुरतात. सुतकात खिचडी खात नाहीत व केळीच्या पानावर जेवत नाहीत. [ ट्रा. का. सें. प्रॉ. इं. ]

**गांधर्व विवाह** विवाहाच्या आठ प्रकारांपैकी एक. स्त्री-पुरुषानी परस्परांवर अनुरक्त होऊन एकमेकांच्या संमतीने, धार्मिक संस्कारांशिवाय केलेला जो विवाह, त्याला गांधर्व विवाह असे म्हणतात. गंधर्व योनीतील व्यक्तीचा स्वभाव शृंगारप्रधान असल्यामुळे त्याच्या नावावरून प्रेमविवाहाला गांधर्व विवाह अशी संज्ञा मिळालेली आहे. मनूने याचे लक्षण सांगितले आहे, ते असे–

**इच्छयाऽन्योन्यसंयोगः कन्यायाश्च वरस्य च ।**
**गान्धर्वः स तु विज्ञेयो मैथुन्यः कामसम्भवः ॥**

(३.३२)

अर्थ– इच्छा म्हणजे प्रेम. अन्योन्य संयोग म्हणजे परस्पर संयोग अर्थात मैथुनकर्म. प्रबल कामवासनेच्या आहारी जाऊन कन्या व वर यांच्यामध्ये विवाहविधीच्या पूर्वी मैथुनाचरणाचा संयोग घडतो, तो गांधर्वविवाह होय.

'स्त्रीकामा वै गन्धर्वाः' = गंधर्वांना स्त्रीची कामना (विशेष) असते, असे ऐ. ब्राह्मणात (१·२७) म्हटले असून, 'तीक्ष्णकामास्तु गन्धर्वाः' = गंधर्वांचा कामविकार तीव्र असतो, असे वाल्मीकीचेही वचन आहे. म्हणूनच मनूने या प्रकाराला कामसंभव असे म्हटले आहे.

गांधर्व विवाह हा अशा प्रकारे अमंत्रक आणि अविधी असतो; म्हणून तो झाल्यावरही वरलेल्या कन्येच्या भार्यात्वसिद्धीसाठी पाणिग्रहण, विवाहहोम, इ. विधी केले पाहिजेत, असे देवल-स्मृतीत म्हटले आहे. गांधर्व विवाह हा ब्राह्मण आणि क्षत्रिय या दोघानाही उक्त असला, तरी क्षत्रियांमध्येच तो विशेष रूढ होता, असे दिसते. कथासरित्सागरात अनेक ठिकाणी याचे उल्लेख आढळतात आणि तेथे सर्व वर क्षत्रिय कुलातलेच दिसतात. हा प्रकार स्वयंवरपद्धतीशी मिळताजुळता आहे. महाभारतामधला दुष्यंत–शकुंतला यांचा विवाह गांधर्वपद्धतीनेच झालेला आहे. शकुंतलेला या विवाहासाठी प्रवृत्त करीत असताना दुष्यंत मागचे दाखले देऊन तिला सांगतो –

**गान्धर्वेण विवाहेन बह्व्यो राजर्षिकन्यकाः।**
**श्रूयन्ते परिणीतास्ताः पितृभिश्चाभिनन्दिताः ।।**

(शाकुं. ३·२०)

अर्थ – कित्येक राजर्षींच्या कन्या गांधर्व विधीने परिणिल्या गेल्या व वडीलधाऱ्या माणसांनी त्याबद्दल त्यांचे अभिनंदन केले, असे ऐकिवात आहे.

मनूने गांधर्व विवाहाचे दोन भेद मानलेले आहेत, ते असे–

**पृथक् पृथग्वा मिश्रौ वा विवाहौ पूर्वचोदितौ ।**
**गान्धर्वो राक्षसश्चैव धर्म्यौ क्षत्रस्य तौ स्मृतौ ।।**

(३.३६)

अर्थ – गांधर्व विवाहाचे मिश्र व शुद्ध असे दोन प्रकार सांगितलेले आहेत. क्षत्रियाला गांधर्व व राक्षस हे दोन विवाहप्रकार धर्म्य आहेत.

राक्षस विवाहासहित गांधर्व विवाह म्हणजे अनुरक्त कन्येला पळवून नेऊन केलेला विवाह. हा क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांना विहित मानलेला आणि याहून अन्य गांधर्व विवाह फक्त ब्राह्मणांनाच विहित ठरवलेला आहे. पण मनुस्मृतीनंतरच्या काळात गांधर्व विवाह हा सदोष विवाहातच गणला गेला.

गांधर्व विवाह हा ग्राह्य मानावा का नाही, याबद्दल धर्मशास्त्रकारांत एकमत नाही. ही पद्धती उत्कृष्ट असून अनुकरणीयही आहे, असे बौधायनादीचे मत आहे; तर ती अगदी निषेधार्ह असून तिला मान्यता देऊ नये, असे अन्य काहीचे म्हणणे आहे. बालविवाहाची प्रथा रूढ झाल्यानंतर गांधर्व विवाह व स्वयंवर हे दोन्हीही प्रकार हळूहळू मागे पडले. कालांतराने जनमनावरील धार्मिक संकेतांची व रूढींची पकड दृढ होत गेल्यामुळे गांधर्व विवाहाची गणना विवाहाच्या निषिद्ध प्रकारात होऊ लागली.

सर्वसाधारणपणे गांधर्व विवाह आर्येतर जातीत अधिक प्रचलित होता. काही स्त्रिया कामासक्त होऊन स्वेच्छेने रावणाकडे आल्या व त्याच्या पत्न्या बनून राहिल्या, असा रामायणात उल्लेख आहे. रामचंद्राचे रूपसौंदर्य पाहून शूर्पणखा कामासक्त बनली व तिने रामचंद्राला आपला पती होण्याविषयी विनविले, अशीही रामायणात कथा आहे. [ पो. वी. हिं. सि.; वि. स्मृ. ग्रं.; रा. का. स. ]

## गांधर्वी माया

एक देवता. हिचे वर्णन स्कंदपुराणांतर्गत कार्तिक माहात्म्यात आहे. शंकराचे जालंधराशी युद्ध चालू असता, शंकराला मोह घालून पकडण्यासाठी जालंधराने या देवीचा उपयोग केला. तिच्या प्रभावाने शेकडो गंधर्व-अप्सरा युद्धक्षेत्रात उतरून गाऊ, नाचू लागल्या. शंकरही किंचित काल स्तंभित होऊन या गांधर्वी मायेकडे पाहत राहिला. शेवटी या देवतेला शिवाकडून पराभूत व्हावे लागले. [ प्रा. भा. म. ]

## गांधार

(१) सप्त स्वरांतला तिसरा स्वर. तो बोकडाच्या स्वराप्रमाणे असतो, असे म्हटले आहे. याचे वर्णन पुढीलप्रमाणे दिलेले आहे ––

**वायुः समुत्थितो नाभेः कण्ठशीर्षसमाहतः ।**
**नानागन्धवहः पुण्यो गान्धारस्तेन हेतुना ।।**

अर्थ – नाभीतून निघालेला वायू गळा व डोके यांच्यावर आघात करतो. तो पुण्यरूप असून अनेक गंध वाहून आणतो. म्हणून त्या वायुरूप स्वराला गांधार म्हणतात.

(२) एक राग. त्याचे रूपध्यान असे—

**जटां दधानः कृतभूतिभूषणः**
**काषायवासास्तनुदेहयष्टिः ।**
**सयोगपट्टः कृतनेत्रमुद्रो**
**गान्धाररागः कथितस्तपस्वी ।।**

(संगीत दामोदर)

अर्थ – जटाधारी, भस्म हेच भूषण असलेला, काषाय वस्त्रधारी, सडसडीत अंगकाठीचा, योगपट्टधारी, नेत्रमुद्रा करणारा असा हा गांधारराग तपस्वी म्हटलेला आहे.

हा भैरवरागाचा पुत्र असून त्याचा गानसमय सकाळचा आहे.

**गाधारी** (१) जैन दैवत समूहातील एक यक्षिणी व शासनदेवी. दिगंबरमते चामुंडा. नमिनाथाची सेविका. हिचे वर्णन पुढीलप्रमाणे—

**तथैव देवी गान्धारी श्वेताङ्गी हंसवाहना**
**दोर्भ्यां वरदखड्गिभ्यां दक्षिणाभ्यां विराजिता ।**
**वामाभ्यां बीजपूरिभ्यां बाहुभ्यामुपशोभिता ।।**

(हेमचंद्र)

अर्थ – गांधारी देवी ही गौरवर्णाची, हंसारूढ, चतुर्भुज, उजव्या दोन हातांत वरदमुद्रा व खड्ग, व डाव्या दोन हातांत दोन मातुलिंगे धारण करणारी ( दिगंबर मते सुसरीवर बसणारी व माला, दंड, ढाल आणि खड्ग धारण करणारी) आहे.

ही एक महाविद्याही आहे. [ जै. इ.; अभि. रा. ]

(२) गांधार देशाधिपती सुबल याची कन्या. धृतराष्ट्राची भार्या. हिला दुर्योधनादी शंभर कौरव व दुःशला ही कन्या अशी १०१ अपत्ये झाली. आपला पती अंध आहे, असे समजताच हिने स्वतःच्या डोळ्यांवर कायमची पट्टी बांधली व कोणाचेही मुखावलोकन केले नाही. भारतीय युद्धानंतर ही धृतराष्ट्राबरोबर वनात गेली व तिथे तिने पतीसह देहत्याग केला. [प्रा. च. को.]

(३) पार्वतीची सहचरी.

(४) गायत्रीस्वरूप महादेवी.

(५) एक नाडी. [श. क.] .

**गांधी म. मोहनदास करमचंद** (१८६९–१९४८ इ. स.) सामान्यांतून असामान्यत्व संपादून, गांधीजी हे ' महात्मा ' या पदाला चढले. त्यांची बुद्धी सामान्य, व्यासंग बेताचा व वक्तृत्व तर अगदीच फिके; पण सुमारे ऐंशी वर्षांच्या आयुष्यात, त्यांनी सूक्ष्म आत्मनिरीक्षणाने, सतत चिंतनाने व विशाल अनुभवाने भारतातील कोटचवधी जनसमुदायावर तसेच भारताबाहेरीलही असंख्य लोकांवर आपली विलक्षण छाप बसविली. गांधीजी स्वतःच स्वतःचे गुरू होते. स्वतःच्या स्वभावाची घडण त्यांनीच केली होती.

गुजरातमधील पोरबंदर या संस्थानाचे सत्यनिष्ठ व बाणेदार दिवाण म्हणून मोहनदासांच्या वडिलांनी व आजोबांनीही लौकिक कमावलेला होता. तो सत्यनिष्ठेचा व बाणेदारपणाचा वारसा गांधीजींनी स्वप्रयत्नाने अमाप वाढविला. सत्य व अहिंसा ही त्यांच्या जीवनातील प्रधान तत्त्वे होत. त्यांच्या बळावर आत्मसाक्षात्कार करून घेण्याचे ध्येय त्यांनी निश्चित केले होते आणि त्यासाठी ते अनासक्त बुद्धीने अविरत जनसेवा आचरीत होते. तुकाराम-तुळशीदासांच्या इतकीच त्यांची ईश्वरावर



कीर्तिमंदिर – म. गांधींचे जन्मगृह–पोरबंदर

असीम श्रद्धा होती आणि त्या ईश्वराच्या साक्षात्कारासाठी त्यांचा जीव तितक्याच तीव्रतेने तळमळत होता. ' सत्याचे प्रयोग ' या आपल्या आत्मकथेच्या प्रस्तावनेत ते लिहितात—

' गेली तीस वर्षे ज्या ध्येयाच्या प्राप्तीसाठी मी झुरत व झगडत आहे, ते ध्येय म्हणजे आत्मसाक्षात्कार — ईश्वराचे प्रत्यक्ष दर्शन — म्हणजेच मोक्षप्राप्ती.' या ईश्वराविषयी स्वतःची कल्पना सांगताना गांधीजी त्याच प्रस्तावनेत पुढे म्हणतात—' शुद्ध केवल सत्य म्हणजेच माझा परमेश्वर. केवळ वाचिक सत्य म्हणजे सत्य नव्हे; तर वैचारिक सत्य, किंबहुना विश्वाची धारणा करणारे सत्य म्हणजे परमेश्वर होय. ' ईश्वराची अशी व्याख्या करून गांधीजींनी प्रांजळपणे असे सांगितले, की ' अद्यापि मला ईश्वराची प्राप्ती झालेली नाही; पण मी त्याचा शोध करीत आहे आणि त्यासाठी आपला प्राणही अर्पण करण्यास सिद्ध आहे. '

या ईश्वरशोधाच्या मार्गात व या सत्याच्या उपासनेत, बालपणापासूनच गांधीजींवर कसोटीचे अनेक प्रसंग आले. हायस्कुलातील पहिल्याच वर्षी परीक्षा चालू असताना गांधीनी



बाल गाधी, वय वर्षे ८

एका इग्रजी शब्दाचे स्पेलिंग चुकीचे लिहिले. अशी चूक पुन्हा त्याच्याकडून होऊ नये, म्हणून शिक्षकाने त्यांना पुढील विद्यार्थ्याची नक्कल करण्याचा इशारा दिला. पण तसे असत्य आचरण गांधींनी त्या बालवयातही केले नाही. पुढे काही उनाड मुलांच्या संगतीने मासाहाराकडे त्यांची प्रवृत्ती झाली आणि त्यासाठी आपल्या हातातील सोन्याचे कडे चोरून विकण्याचे कृत्यही त्याच्या हातून घडले. पण त्यामुळे त्यांचेच मन त्यांना खाऊ लागले. त्या पापाचे प्रायश्चित्त म्हणून आत्महत्या करावी, असाही विचार त्याच्या मनात आला. शेवटी त्यांनी आपला अपराध कबूल करणारे एक पत्र लिहून ते वडिलांच्या हाती दिले, तेव्हा त्यांचे मन शांत झाले. १८८७ साली ते मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले आणि नंतर बॅरिस्टर होण्यासाठी इंग्लंडला रवाना झाले. तेव्हा त्यांच्या आईने — पुतळाबाईने त्यांच्याकडून शपथ घेवविली, की 'मी इंग्लंडात मांसाहार, मदिरापान व स्त्रीसंग यांपासून अलिप्त राहीन.'

ही प्रतिज्ञा गांधींनी काटेकोरपणे पाळली. ऐन विशीच्या वयात असताना आणि इंग्लंडसारख्या विलासी देशात राहत असतानाही गांधी त्या तीन पापांपासून अलिप्त राहिले. ते स्वत: तर शाकाहारी राहिलेच; पण त्याबरोबरच तेथील एका वृत्तपत्रात नऊ लेख लिहून त्यांनी शाकाहाराचा प्रचारही केला. एवढेच नव्हे; तर त्यांनी तिथे शाकाहारी लोकांचे एक मंडळही स्थापले.

शाकाहाराप्रमाणेच धर्माच्या अभ्यासावरही गांधीनी इंग्लंडात भर दिला. रामायण-महाभारतातील कथा त्यांना आपल्या मातेच्या मुखातून ऐकायला मिळाल्या होत्या. हरिश्चंद्राच्या नाटकाने त्यांच्या बालमनावर सत्यनिष्ठा ठसविली होती पुढे काही थिऑसॉफिस्ट मित्राच्या आग्रहाने त्यांनी गीतेचे इग्रजी भाषांतर वाचले आणि तेव्हापासून गीतामाउलीने त्यांच्या मनाची पकड घेतली. सर एड्विन आर्नोल्ड यांनी केलेले गीतेचे भाषांतर गांधीजीना जसे जीवनाधार म्हणून उपयोगी पडले, तसेच 'दि लाईट ऑफ एशिया' हे आर्नोल्डचेच बुद्धचरित्र गाधीजीच्या मनोविकासाला उपकारक ठरले. ख्रिस्ती धर्म, इस्लाम धर्म, इ. अन्य धर्माचाही अभ्यास त्यानी श्रद्धेने केला. त्यांच्या मनावर बायबलचा विशेष प्रभाव पडला. त्यातील 'गिरिप्रवचनाने' तर त्याना आध्यात्मिक आचरणाचे धडेच दिले. द्वेषाऐवजी प्रेमाने व भोगाऐवजी त्यागाने वागण्यास त्या गिरिप्रवचनानेच त्यांना प्रोत्साहित केले.

गांधीजी स्वत:ला सनातनी हिंदू म्हणवून घेत. हिंदुधर्मातील उदात्त तत्त्वज्ञानावर त्याची गाढ श्रद्धा होती. त्याच्या अनेक ख्रिस्ती मित्रांनी त्यांना, स्वत:च्या व जगाच्या उद्धारासाठी, ख्रिस्तीधर्माचा अंगीकार करण्याचा परोपरीने आग्रह केला, पण 'ज्याचा धर्म त्याला योग्य' असे म्हणून त्यानी तो आग्रह बाजूस सारला. 'ईश्वर हा काही एका पेटीत कोंडून ठेवलेला नाही आणि त्या पेटीच्या एकाच छिद्रातून त्याच्याकडे जाता येते असेही नाही; अनत मार्गानी ईश्वराकडे जाता येते' असा त्याचा सिद्धान्त होता. हिंदुधर्मावरील त्याची नितांत श्रद्धा अखेरपर्यंत कायम होती. मात्र धार्मिक आचार करताना त्या आचाराला तर्क व नीती या दोन कसोटचा लावायला ते चुकत नसत. जी धर्माज्ञा तर्काला पटत नाही आणि नीतीशी सुसगत नाही, ती झुगारून देण्यास त्यांना संकोच वाटत नसे. अस्पृश्यतानिवारण, पतितपरावर्तन, इ. आदोलनांत त्याची ही दृष्टी असे.

इंग्लंडमध्ये बॅरिस्टरची पदवी संपादन करून गांधी १८९१ साली स्वदेशी परत आले. मुंबई येथे बॅरिस्टरी चालविण्याचा प्रयत्न त्यांनी एक-दोन वर्षे करून पाहिला. पण त्यात त्यांना यश आले नाही. मात्र १८९३ साली एक खटला चालविण्याचे काम त्यांच्याकडे आले आणि त्यासाठी त्याना आफ्रिकेत जावे लागले.

आफ्रिकेत गेल्यावरही गांधींनी गीतेचा अभ्यास नियमित सुरू ठेवला. त्यासाठी त्यांनी एक जिज्ञासुमंडळही स्थापले. गीतेचे तेरा अध्याय त्यांनी पाठ केले. गीतेतील अपरिग्रहतत्त्वाने तर त्यांच्या जीवनात क्रांतीच केली.

ईश्वर आपला संभाळ करतो, या विश्वासाशी विमा उतरणे हे विसंगत आहे, असे त्यांच्या मनाने घेतले आणि त्यांनी



बॅरिस्टर गाधी

आपली दहा हजार रुपयांची पॉलिसी बंद केली. त्याचप्रमाणे आपले बंधू लक्ष्मीदास यांना पत्र लिहून त्यानी आपल्या वारसा हक्काच्या मिळकतीवरही पाणी सोडले.

गीतेप्रमाणेच दुसऱ्या एका ग्रंथानेही गाधीच्या जीवनात क्रांती केली. तो ग्रथ म्हणजे आंग्ल तत्त्वज्ञ रस्किन याचा 'अन् टु धिस् लास्ट' हा होय. इ. स. १९०४ साली एके दिवशी सध्याकाळी गांधी आफ्रिकेतील जोहान्सबर्ग या शहरापासून डर्बन या शहरी रेल्वेने चालले होते. प्रवासात वाचायला म्हणून हे पुस्तक त्याचे मित्र पोलक यांनी त्यांना दिले. गांधींनी रात्रभर जागून ते पुस्तक अथपासून इतिपर्यंत वाचून काढले. त्यातील विचारांनी गांधीचे मन अतिशय भारून गेले. त्यांना ज्या पद्धतीचा वैयक्तिक जीवनक्रम व सामाजिक व्यवस्था पाहिजे होती, तिचे



द. अफ्रिकेतील सत्याग्रहाचे संचालक गांधी

सयुक्तिक चित्रण त्यांना त्या पुस्तकात आढळले. नीतिशास्त्र हा अर्थशास्त्राचा प्राण आहे, अंत्यजालाही समाजात जगण्याचा हक्क आहे, धनाइतकीच श्रमालाही प्रतिष्ठा आहे आणि वकील, न्हावी, शिक्षक या सर्वांची योग्यता सारखी आहे, हे त्या पुस्तकातील विचार गांधींना ततोतंत पटले. सर्वोदय या

नावाने त्यांनी त्या पुस्तकाचे भाषांतर तर केलेच; शिवाय त्याप्रमाणे स्वतः आचरण करण्याचेही ठरविले. त्यासाठी त्यांनी आफ्रिकेत दोन आश्रम स्थापले. या आश्रमांचे मुख्य उद्देश त्यांनी लिहिले होते, ते असे –

(१) रस्किन व टॉलस्टॉय यांचा उपदेश आचारात आणणे व त्याचा प्रचार करणे.

(२) केवळ श्रमाने केलेल्या शेतीवर व कामावर यंत्रांच्या मदतीवाचून उपजीविका करणे.

(३) नैसर्गिक उपायांनी रोगनिवारण करणे व

(४) मानवजातीच्या सेवेसाठी सिद्ध असणे.

वरील उद्देशांना धरून चालणारा 'फिनिक्स् आश्रम' १९०४ साली आणि 'टॉलस्टॉय फार्म' या नावाचा दुसरा आश्रम १९१० साली गांधींनी स्थापन केला. 'दि किंगडम् ऑफ गॉड इज विदिन यू' या टॉलस्टॉयच्या ग्रंथाने गांधीजींच्या सत्याग्रहाच्या तत्त्वज्ञानाची इमारत उभी झाली.

टॉलस्टॉय यांनी समाजातील हिंसेचा आपल्या ग्रंथात तीव्र निषेध केला आहे. एवढेच नव्हे; तर त्या हिंसेच्या प्रतिकारासाठी असहकाराचा मार्गही तपशीलवार रीतीने सुचवला आहे. शाकाहार, उपोषण व प्रार्थना यांचे माहात्म्य त्यांनी वर्णिले असून क्षमा व दया याचा प्रभावही ठसविला आहे. टॉलस्टॉयचा युद्धसंस्थेलाही कडकडीत विरोध होता. गांधीजींच्या भावी आंदोलनाचे जणू काही स्पष्ट नकाशेच टॉलस्टॉयनी आपल्या ग्रंथात रेखाटले होते. गांधींनी १९१० साली 'हिंद स्वराज्य' हे आपले पुस्तक टॉलस्टॉयना रशियात पाठविले, त्या वेळी गांधींनी स्वतःचा उल्लेख 'निःसीम निष्ठावंत भक्त' असा केला आहे. त्या वेळी गांधीजींनी चाळिशी ओलांडली होती; तर टॉलस्टॉय ऐंशीची वयोमर्यादा ओलांडून पुढे गेले होते. त्यांना गांधींच्या कार्याचे मोठे कौतुक वाटले; 'एका हिंदूस पत्र' या नावाचे एक लांबलचक पत्र गांधींना लिहून त्यांनी त्यात सत्याग्रहाची मीमांसा केली.



गांधी टोपीधारी म. गांधी

इंग्लंडातील रस्किन व रशियातील टॉलस्टॉय या द्रष्ट्यांप्रमाणेच अमेरिकेतील थोरो या तत्वज्ञान्याचीही गांधीजींच्या मनावर मोठी छाप पडली. हा अमेरिकन कवी अमेरिकेतील निग्रो लोकांच्या गुलामगिरीविरुद्ध लेख लिहीत असे. राजसत्ता व धर्मसत्ता यांनी चालविलेल्या गुलामगिरीविरुद्धही त्याचे रक्त उसळत असे. काही काळ तो एकांतवासात राहिला होता. स्वहस्ते एक घर बांधून व स्वतःचे अन्न स्वतः पिकवून, शिजवून तो खात असे व एकटा राहत असे. पण पुढे समाजात येऊन त्याने उपदेश चालविला तो असा 'कोणत्याही अन्यायाशी सहकार करू नका. आपल्याला जे न्याय्य वाटते, त्याचेच आचरण करा. मग त्यासाठी कायदा मोडावा लागला, तरी चालेल.'

तदनुसार स्वतः थोरोने कर देण्याचे नाकारले आणि म्हणून त्याला एक दिवस तुरुंगवासही सोसावा लागला. त्या तुरुंगातील अनुभवातून 'सविनय कायदेभग' हे त्याचे पुस्तक बाहेर पडले. ते वाचण्यापूर्वीच गांधींनी आफ्रिकेतील कायदे मोडण्यास सुरवात केली होती; पण त्या पुस्तकाने गांधींच्या कृतीला तत्त्वज्ञानाचे अधिष्ठान मिळवून दिले. थोरोचे विचार असे होते––

"फक्त १००० माणसे; नव्हे १०० माणसे; फार काय १० प्रामाणिक माणसे; छे! एक सच्चा माणूस जरी गुलाम बाळगण्याची रूढी प्रत्यक्ष कृतीने मोडायला पुढे आला आणि त्यासाठी तुरुंगात गेला, तर सर्व अमेरिकेतील गुलामगिरीचा नायनाट झालाच समजा. केवळ शब्दांनी व मतांनी काम होत नसते; त्यासाठी रोकडचा कृतीची गरज असते."

गांधींना हे विचार दीपस्तंभाप्रमाणे मार्गदर्शक ठरले. त्यामुळेच 'सारे जग विरुद्ध एकटा मी' असा लढा खेळण्यासही ते सिद्ध व समर्थ बनले.

रस्किन काय, टॉलस्टॉय काय, थोरो काय हे मोठे द्रष्टे असले, तरी आपल्या तत्त्वाप्रमाणे प्रत्यक्ष कृती त्यांच्या हातून फारच थोडी घडली. तशी कृती गांधीजींनीच केली आणि तीही सतत साठ वर्षे व कोटयवधी जनतेचे प्रश्न सोडविण्यासाठी. सामुदायिक साधुत्वाचे लढे युरोपातील क्वेकर पंथाने पूर्वी दिले होते. पण गांधीजींनी ज्या व्यापक प्रमाणात सत्याग्रहाचा सात्त्विक लढा दिला, त्या प्रमाणात दुसऱ्या कोणीही तो दिल्याचे जगाच्या इतिहासात नमूद नाही.

असा लढा देण्याचे पाचारण आफ्रिकेतल्या परिस्थितीनेच गांधीजींना केले, असे म्हटले पाहिजे. तिथे सोन्याच्या व

हिऱ्याच्या खाणी होत्या आणि कापूस, कॉफी, तंबाखू, नीळ, रबर, इ. पदार्थ पिकत होते. त्यांच्या लोभाने युरोपियन व्यापा-



काठियावाडी वेषातील गांधी

ऱ्यांची स्वार्थी, साहसी दृष्टी तिकडे वळली; पण त्या खाणीतील किंवा शेतांतील उत्पन्न काढण्यासाठी मजूर कुठून मिळणार, हा प्रश्न होता. त्यासाठी १८६० सालापासून हिंदी मजूर तिथे पाठविले जाऊ लागले. पण त्या मजुरांना हमालाप्रमाणे किंवा गुलामाप्रमाणे नव्हे; तर कुत्र्या-डुकरांप्रमाणे वागविण्यात येऊ लागले. गोरे व काळे यांच्यातील विषमतेचे विराट स्वरूप गांधीजीना तिथे प्रत्ययास आले. आपल्या तिथल्या देशबांधवांच्या कपाळी मूर्तिमंत गुलामगिरीच आलेली त्याना दिसली.

रस्ते, रेल्वे, विद्यालये, उपाहारगृहे, नोकऱ्या, व्यापार, फार काय निवासस्थाने देखील, हे सर्व तिथल्या काळचा हिंदी लोकांसाठी वेगळे व घाणेरडे असे. युरोपियनांच्या रस्त्यावरून चालल्याबद्दल खुद्द बॅ. गांधीना लाथा बुक्क्या खाव्या लागल्या. रेल्वेचे पहिल्या वर्गाचे तिकीट जवळ असतानाही त्यांचे सामान फेकून देण्यात आले. ते बगीत बसलेले असताना गोऱ्यांच्या मर्जीखातर त्यांना बगीवाल्याच्या पायाशी बसावे लागले आणि कोर्टातही त्यांना तुच्छतेने वागविण्यात आले.

हिंदी मजुराचे सारे कुटुंबच गोऱ्या व्यापाऱ्याकडे किंवा मळेवाल्याकडे जन्मभर गुलामाप्रमाणे राबत असे. अचेतन वस्तूप्रमाणे त्या गुलामांची देवघेवही होत असे. हिंदी व्यापाऱ्यानी 'महारवाड्या' सारख्या दूरच्या वस्तीतच राहिले पाहिजे व व्यापार-उदीम करायचा तो तिथूनच केला पाहिजे, अशी त्यांच्यावर सक्ती होती. पुढे या नित्याच्या जुलमावर कळस करणारे आणखी चार कायदे तिथल्या ब्रिटिश सरकारने केले, ते असे– (१) प्रत्येक प्रौढ हिंदी मजुराने दरमाल तीन पौंड कर दिला पाहिजे (२) हिंदी रहिवाश्याना मतदानाचा हक्क मिळणार नाही (३) ख्रिस्ती पद्धतीने ज्याचे विवाह झाले नसतील अशा हिंदी स्त्रियाचे धर्मपत्नीत्व मान्य केले जाणार नाही व (४) प्रत्येक हिंदी माणसाने आपल्या दोन्ही हातांच्या दहा बोटांचे ठसे उठवून दिले पाहिजेत.

या चतुर्विध अन्यायाविरुद्ध गांधीजीचा आत्मा बंड करून उठला. त्यांनी तिथल्या हिंदी लोकांना या अन्यायाची जाणीव करून दिली, त्याचा प्रतिकार करण्यासाठी त्याना संघटित केले, त्या संघटनेसाठी स्वार्थत्याग करण्यास शिकवले आणि त्या संघटनेमार्फत सनदशीर मार्गांनी अर्ज, विनंत्या, शिष्टमंडळे अशा नेमस्त उपायांचाही आटोकाट प्रयत्न केला. पण त्या गोष्टींचा काहीही उपयोग झाला नाही. बुद्धिबलाने यश येत नाही, असे पाहून मग त्यांनी आत्मबलाची ज्योत पेटवायचे ठरवले व हजारो हिंदी स्त्री-पुरुषांना कायदेभंगाच्या शस्त्राने सत्याग्रहाचे युद्ध चालविण्यास प्रवृत्त केले. या सत्याग्रहयुद्धात कोवळ्या वयाच्या मुला–मुलींनीसुद्धा अपार हाल सोसले. सत्याग्रही सैनिकांनी तुरुंगवास भोगला, लाठ्या, गोळ्या खाल्ल्या व कित्येकांनी तर आत्मबलिदानही केले ! या लढ्यात खुद्द गांधींनी व त्यांच्या पत्नी कस्तुरबा यांनीही अनेक वेळा खडतर तुरुंगवास सोसला आणि अखेरीस तिथल्या सरकारला न्याय देण्यास भाग पाडले. तिथल्या सरकारचे प्रमुख जनरल स्मटस् यांनी, इतर साम्राज्यशहांप्रमाणेच, गांधींना दिलेल्या वचनांचा भंग केला, सत्याग्रहीचा छळ केला आणि दडपशाहीची पराकाष्ठा केली. पण तरीही अंती सत्याचा विजय झालाच. गांधीचा सत्याग्रह यशस्वी झाला ! त्यामुळे जगाच्या इतिहासात एक नवा अध्याय सुरू झाला ! शस्त्रास्त्रसंपन्न सरकारलाही नमविण्याचे एक नवेच शस्त्र दीन, दलित व निःशस्त्र अशा जनतेला प्राप्त झाले.

सतत आठ वर्षे चाललेल्या दक्षिण आफ्रिकेतील या सत्याग्रहसंग्रामात गांधीजीच्या अंतःकरणाचा सर्व बाजूनी विकास झाला. फार काय; त्यांनीच म्हटल्याप्रमाणे, त्यांना तिथे 'आपल्या जीवनाचा व्यवसाय सापडला.' त्यांच्या आयुष्याचा मार्ग निश्चित झाला. निद्रिस्त व पीडित समाजाला जागृत, संघटित व प्रतिकारशाली करण्यासाठी एक नवे शास्त्रच

त्यांनी आपल्या आचाराने निर्माण करून जगापुढे ठेवले. त्यांनी ‘नाताळ इंडियन काँग्रेस’ स्थापन केली. कार्यकर्त्यासाठी आश्रम काढले, त्यांच्या मुलांसाठी शाळा चालविल्या, कार्यकर्त्यांचे एक कुटुंब तयार करून त्यामार्फत ‘इंडियन ओपिनियन’ हे वृत्तपत्र चालविले, त्यासाठी व आश्रमासाठी आपल्या जवळील सर्वस्व म्हणजे पाऊण लाख रुपये अर्पण केले, कृतज्ञ जनतेने दिलेल्या हिऱ्या मोत्यांच्या नजराण्यांचा ‘विश्वस्त निधी’ बनविला, इग्लंडमध्ये व हिंदुस्थानामध्ये स्वतः शिष्टमंडळे नेऊन तेथील जनतेचा आपल्या चळवळीला पाठिंबा मिळविला व आपले राजकीय गुरू ना. गोखले यांचा आफ्रिकेत दौराही घडविला. थोडक्यात म्हणजे, केवळ आपल्या स्वार्थत्यागाने व सत्याग्रहाने एक नवाच मानवसमाज गांधींनी आफ्रिकेत निर्माण केला आणि त्याच्याकरवी सरकारच्या सर्व अन्यायांचा बीमोड केला. त्यामुळे तेथील हिंदी लोकांना मतदानाचा हक्क मिळाला, त्यांच्यावरील तीन पौडांचा जिझियाकर गेला, हिंदी स्त्रियांच्या हिंदी पद्धतीच्या विवाहाला मान्यता मिळाली आणि अंगठ्यांचे ठसे देण्याची गुलामगिरीही रद्द झाली.



म. गाधीचे हस्ताक्षर



म. गाधीची एक भावमुद्रा

आपल्या अभिनव मार्गाने हे यश मिळविताना गांधीनी सत्याग्रहतत्त्वाचे काटेकोर पालन केले. तिथल्या युरोपियन रेल्वे-कामगारांनी संप केला असताना त्यांनी आपला सत्याग्रह तहकूब ठेवला आणि बोअर युद्धात हिंदी लोकांचे शुश्रूषापथक उभारून ब्रिटिश सरकारची सेवाही केली. त्यासाठी त्यांना सरकारने ‘केसर–ई हिंद’ सारखी गौरवाची पदके दिली. त्यांचा विरोध ब्रिटिश व्यक्तीवर नव्हता; तर ब्रिटिश राज्यपद्धतीवर होता. कारण सत्याग्रहशास्त्रात व्यक्तिद्वेषाला स्थानच नाही. अन्याय सोसणाऱ्याप्रमाणेच अन्याय करणाऱ्याचेही हृदयपरिवर्तन करून त्याच्या चित्ताचे शुद्धीकरण करणे, हे सत्याग्रहाचे मुख्य तत्त्व होय. अन्यायाचे निर्दाळण करणे, हे गांधीवादाचे अतिम ध्येय होते. मात्र हे निर्दाळण द्वेषाने किंवा हिंसेने न करता स्वतः क्लेश सोसून प्रतिपक्षाच्या हृदयात परिवर्तन घडवून त्यांना करायचे होते. म्हणून जनरल स्मटस् विषयीमुद्धा गांधीनी द्वेषभाव धरला नाही. उलट, त्याने तुरुंगात घातले असताही त्याच्यासाठी चपलांचा जोड स्वतः बनवून गांधीनी तो त्याला पाठविला. त्यामुळे ज. स्मट्सच्या चित्ततही गाधीविषयी आदरभाव निर्माण झाला व पुढे १९४४ साली गांधीवर ‘पंचमस्तंभी’ असल्याचा आरोप करण्यात आला असताना त्याचा निषेध करण्यास ज. स्मटस् हेच पुढे सरसावले. स्मटस्प्रमाणेच इतर इंग्रज अधिकाऱ्यांशीही गांधीचे संबंध

स्नेहाचे होते. ब्रिटिश साम्राज्यावर तर तेव्हा त्याचा फार विश्वास असे. लोकशाहीच्या मार्गाने जाणारे, व्यक्तिस्वातन्त्र्याला वाव देणारे व उदारमतवादित्वाचा आदर्श जगापुढे ठेवणारे राष्ट्र म्हणून गाधीजी इंग्लंडकडे पाहत. आफ्रिकेतील वीस वर्षाचे वास्तव्य व आठ वर्षाचे सत्याग्रहयुद्ध संपवून गांधी जेव्हा १९१४ साली इंग्लंडला गेले, तेव्हा पहिले महायुद्ध सुरू झाले होते. त्या युद्धात गांधीनी ब्रिटिश सरकारला पाठिंबाच दिला. एवढेच नव्हे; तर इंग्लंडातील ८० हिंदी स्वयंसेवकांचे एक शुश्रूषापथक त्यांनी तयार केले. ते स्वतः दोन मैल पायी चालत जाऊन त्या पथकाच्या कवायतीत भाग घेत. या अतिश्रमाने ते आजारी पडले आणि तिथून मायदेशी येण्यास निघाले.

दि. ९ जानेवारी १९१५ रोजी गांधी मुबईस येऊन पोचले. तिथे त्यांचे स्वागत करून बॅ. जीना, ना. गोखले प्रभृतीनी त्यांचा मोठा गौरव केला. गोखल्यांनी गांधीविषयी म्हटले आहे. ‘ गाधीचा पिड वीर व हुतात्मा याचा आहे, किबहुना आपल्या भोवताली असलेल्या सामान्य माणसातून वीर व हुतात्मे निर्माण करण्याचे अद्‌भुत आध्यात्मिक सामर्थ्य त्यांच्या ठायी आहे. या पृथ्वीच्या पाठीवर गांधीजीहून अधिक निर्मल, अधिक निर्भय आणि अधिक उदात्त जीव कधी वावरलाच नाही.’

ना. गोखले यांच्या उपदेशाप्रमाणे गाधीनी एक वर्ष कान व डोळे उघडे ठेवून, पण तोंड मिटून सर्व भारताचे निरीक्षण केले. त्यासाठी त्यांनी रेल्वेच्या तिसऱ्या वर्गाने सगळा प्रवास केला. या निरीक्षणात गांधींना हिंदी राजकारणाचे जे दर्शन झाले, ते असे—

स्वराज्यप्राप्तीसाठी क्रातिकारक पक्ष प्राणान्तिक त्याग करण्यास सिद्ध आहे; पण वैयक्तिक हिंसेचा मार्ग त्याने स्वीकारलेला आहे. नेमस्त पक्ष इंग्रज अधिकाऱ्यांशी युक्तिवाद करून स्वराज्याचे हक्क मिळविण्याचा सनदशीर प्रयत्न करीत आहे; पण तो जनताभिमुख नाही. तिसरा राष्ट्रीय पक्ष. त्यात स्वार्थत्याग आहे, जनसेवा आहे, स्वावलंबन आहे आणि तुरुंगात जाण्याची निर्भयताही आहे. पण तेवढ्याने सरकार बधले नाही, तर काय करावे, याचे उत्तर या पक्षापाशी नाही. म्हणून त्याचा मार्ग कुंठित झाला आहे.

गांधीजींचा भर साधनशुचितेवर होता. साध्याइतकेच साधनालाही ते महत्त्व देत. चळवळीतील गुप्तता, हिसा, द्वेष, इ. दोष त्यांना निषिद्ध होते. सत्यासाठी स्वराज्यावरही पाणी सोडण्यास ते तयार असत. त्यामुळे वरील तीन्ही पक्षांपेक्षा निराळा कार्यक्रम गांधीना इंडियन नॅशनल काँग्रेसमध्ये आणावा लागला.

हिंदुस्थानात आल्यावर आपण राजकारणात पडावे, अशी उताविळी गांधीना नव्हती; पण परिस्थितीनेच त्यांना राजकारणात ओढले.



म. गाधीची आत्मचिंतनमुद्रा

२५ मे १९१५ रोजी त्यांनी अहमदाबाद येथे ‘ सत्याग्रहाश्रम ’ स्थापन केला. मातृभूमीची सेवा हे जरी त्याचे ध्येय होते, तरी सत्य, अहिंसा, अपरिग्रह, अस्तेय, ब्रह्मचर्य, इ. यमनियमांकडेच आश्रमाचे विशेष लक्ष असे. आश्रम म्हणजे सामुदायिक धार्मिक जीवन, अशी गांधीची व्याख्या होती. आश्रम केवळ आपल्या देशाच्या सेवेसाठीच नाही; तर अखिल मानवजातीची सेवा व त्या सेवेच्या द्वारा आत्मसाक्षात्कार करून घेणे यासाठीही आहे, अशी त्यांची धारणा होती. त्यामुळे या आश्रमात वैराग्याचे वातावरण पसरलेले असे. त्यातील साधक स्त्री-पुरुष सुतारी, लोहारी, विणकाम, चांभारकाम, भंगीकाम असे उद्योग करीत. तिथे सामुदायिक स्वयंपाकगृह असे व प्रार्थनाही सामुदायिक असे. अस्पृश्यतेला तिथे स्थान नव्हते व कोणताही जातिभेद तिथे पाळला जात नसे. ‘ आश्रम ही माझीच मूर्ती आहे ’ असे गांधी म्हणत, त्यावरून त्यांच्या जीवनाची दिशा स्पष्ट होते.

पण १९१६ साली लखनौ येथील काँग्रेसला गांधी गेले

असताना त्यांना बिहारमधील एका कार्यकर्त्याने तेथील शेतकऱ्याची दुर्दशा निवेदन केली. ती आपल्या डोळ्यांनी पाहावी, म्हणून गांधी १० एप्रिल १९१७ रोजी पाटणा येथे गेले. तिथून पुढे जाऊन चंपारण्य जिल्हा त्यानी नजरेखाली घातला. तेथील शेतकऱ्यांची अवस्था आफ्रिकेतील हिंदी मजुरांसारखीच होती. त्याच्यावर ५५ तऱ्हेचे कर गोऱ्या मळेवाल्यानी लादले होते आणि त्यांच्या छळाला तर सीमाच नव्हती. एका एकरात तीन कठ नीळ लावला पाहिजे, अशी सक्ती मळेवाले त्या शेतकऱ्यांवर करीत. अशा सुमारे ८००० शेतकऱ्यांच्या जबान्या गाधीनी लिहून घेतल्या आणि त्यांचे हाल थांबविण्याची सरकारला विनंती केली. ती विनंती मान्य करण्याऐवजी सरकारने गांधींनाच पकडून तुरुंगात टाकले. डॉ. राजेंद्रप्रसाद, महादेवभाई देसाई यांसारखे निष्ठावंत कार्यकर्ते त्या आंदोलनात सामील झाले आणि सत्याग्रहाची चळवळ फोफावत गेली. तिचा परिणाम म्हणजे दि. १८ ऑक्टोबर १९१७ रोजी सरकारने तीन कठिया पद्धत रद्द केली आणि अशाप्रकारे सहा महिन्यात त्या सत्याग्रहाला यश आले.

हा जसा किसानाचा लढा तसाच कामगारांचा लढाही गांधींकडे चालून आला. अहमदाबाद येथील गिरणीकामगारानी आपल्याला महागाईभत्ता मिळावा, म्हणून १९१८ मध्ये संप पुकारला व त्याचे नेतृत्वही गांधीजीकडेच आले. संपाच्या बाविसाव्या दिवशी गाधींनी कामगारांच्या सभेत जाहीर केले, की ‘ आपली मागणी पूर्ण होईपर्यंत तुम्ही जर संप टिकवू शकत नसाल, तर मी उपोषण करीन. ’

त्याप्रमाणे गांधीनी उपोषण सुरूही केले. मग तीन दिवसांनंतर गिरणीवाल्यांनी तडजोड केली आणि संप समजुतीने मिटला. गाधीनी मागितलेली शेकडा ३५ टक्के पगारवाढ गिरणीमालकांनी मान्य केली. एवढेच नव्हे; तर पुढे केव्हाही मालक–मजूर तंटा उत्पन्न होऊ नये, म्हणून ‘ मजूर–महाजन ’ नावाची संस्थाही स्थापन केली. तिचे कार्य आतापर्यंत सतत आदर्श पद्धतीने चालले आहे.

त्याच वर्षी मार्चमध्ये गुजरातमधील खेडा जिल्ह्यात गांधीना सत्याग्रह करावा लागला. तेथील शेतकरी युद्धजन्य महागाईने हैराण झाले होते, तरी सरकार आपला सारा सक्तीने वसूल करीत होते व त्यासाठी त्यांच्या जमिनी जप्त करीत होते. ४ लाख रुपये सारा वसूल करण्यासाठी सरकार ३ कोटी रुपयांची जमीन जप्त करायला तयार झाले होते; पण गांधीच्या सत्याग्रहापुढे सरकारला नमते घ्यावे लागले आणि सहा महिन्यांच्या चळवळीनंतर सरकारने शेतकऱ्यांना सारा तहकुबी दिली. पण त्याहीपेक्षा शेतकऱ्यांना मुख्य लाभ झाला, तो म्हणजे आत्मसामर्थ्याचा प्रत्यय आणि गांधीना लाभ झाला, तो म्हणजे वल्लभाईसारखा ‘ सरदार ’.

सत्याग्रहाचे असे बारीकसारीक लढे गांधी देत असतानाच, त्यांच्यापुढे एक राष्ट्रव्यापी भयानक प्रश्न १९१९ साली उभा राहिला. दि. ११ नोव्हेंबर १९१८ रोजी पहिले महायुद्ध समाप्त झाले. त्या महायुद्धात हिंदुस्थानने आपल्या रक्ताच्या व द्रव्याच्या धारा ओतल्या. म्हणून त्याला आशा वाटत होती, की ‘स्वराज्य’ हा आपला जन्मसिद्ध हक्क इंग्लंड आपल्याला देईल. पण तसे न होता उलट इंग्रजसरकारने हिंदुस्थानवर रौलट ॲक्ट लागू करून दडपशाहीचा वरवंटा फिरवायला सुरवात केली. अमृतसर इथे ६ एप्रिल १९१९ रोजी जालियनवाला बागेत हजारो स्त्री–पुरुषांची सभा भरली असताना जनरल डायरने, आगाऊ सूचना न देता व काही कारण नसता केवळ सरकारचा वचक बसविण्यासाठी त्या सभेवर मशिनगनचा मारा सुरू केला आणि शेकडो निष्पाप नागरिकांना नाहक ठार केले. या प्रकरणाची चौकशी करण्यासाठी कॉंग्रेसने एक समिती नेमली व तीत गांधीना घेतले. या चौकशीसमितीच्या कार्यातून गांधीना ब्रिटिश राजवटीचे जे क्रूर दर्शन झाले, त्यामुळे त्यांचा ब्रिटिश साम्राज्यावरील विश्वास पार उडाला. तसेच ब्रिटिश सरकारने वचनभंग करून तुर्कस्थानचा फडशा पाडला व मुसलमानांचे धर्मगुरु खलिफा याची सत्ताही खच्ची केली, हेही गांधीना कळले. या खिलाफत प्रकरणामुळे, हिंदुस्थानातील सारा मुसलमान समाज प्रक्षुब्ध झाला आणि त्याचा कैवार घेण्यासाठी गांधी लगेच पुढे झाले.

पंजाबप्रकरण व खिलाफतप्रकरण या दोन अन्यायांविरुद्ध लढण्याचे गांधीनी ठरविले. आणि दि. १ ऑगस्ट १९२० रोजी असहकारितेचे रणशिग फुंकले. सरकारी नोकऱ्या, पदव्या, कर, कॉलेजे, कोर्टे, कौन्सिले या सर्वांवर बहिष्कार टाकून जनतेने सरकारशी असहकार करावा आणि राज्यकारभाराचा गाडाच मोडून टाकावा, असा आदेश गांधीनी राष्ट्राला दिला. आणि राष्ट्रानेही तो शिरसावंद्य मानून कृतीत उतरविला. कलकत्ता येथे सप्टेंबरमध्ये भरलेल्या कॉंग्रेसच्या अधिवेशनात गांधीनी घोषणा केली, की ‘ राष्ट्राने असहकारितेचा कार्यक्रम पूर्णपणे अमलात आणला, तर त्याला एक वर्षात स्वराज्य मिळेल ! ’ या घोषणेने सारे राष्ट्र चैतन्यमय झाले आणि त्याने सार्वत्रिक निवडणुकांवर कडकडीत बहिष्कार टाकला. त्या वर्षीच्या डिसेंबरात नागपूर येथे भरलेल्या कॉंग्रेसने पंजाबप्रकरण, खिलाफतप्रकरण आणि त्याबरोबरच स्वराज्यप्राप्ती या तीन उद्दिष्टांसाठी असहकारिता अमलात आणण्याचे एकमुखाने ठरविले. गाधींच्या या आंदोलनाला दासलालाजीप्रभृती जुन्या कॉंग्रेसपुढाऱ्यांनी पूर्वी विरोध केला

होता; नागपूर येथे त्यांनीही त्याला पाठिबाच दिला. गांधीनी कॉंग्रेसची घटना व्यापक करून 'न्याय्य व शाततापूर्ण साधनानी स्वराज्य मिळविणे' हे तिचे साध्य ठरविले. खेड्यापासून तालुका-जिल्हा-प्रांत-राष्ट्र येथपर्यंत कॉंग्रेसकमिटचांची बांधणी गांधीनी मजबूत व शिस्तबद्ध केली आणि त्या राष्ट्रव्यापी व स्वराज्याकांक्षी संस्थेला सुव्यवस्थित व कार्यक्षम स्वरूप दिले.

सुमारे दोन वर्षे सारा हिदुस्थान देश असहकारितेने पेटला होता. पण १९२२ च्या फेब्रुवारीत सयुक्त प्रांतातील चौरीचुरा गावी लोकांनी वीस पोलिसांना जाळून ठार केले आणि देशातही हिंसेचे वातावरण पसरू लागले. ते वातावरण आटोक्यात आणणे भाग होते. म्हणून गांधीनी बार्डोली तालुक्यातील करबंदीचा संकल्पित लढा बंद ठेवला. सरकारने गांधीना १० मार्च रोजी पकडून सहा वर्षाची शिक्षा ठोठावली. पण १९२४ च्या फेब्रुवारीत ते आजारी पडले त्यामुळे सरकारने त्यांना बंधमुक्त केले.

१९२० सालच्या असहकारितेच्या चळवळीने गांधीनी सर्व देशात जे तेज उत्पन्न केले, त्यामुळे गांधीजी हे सर्व राष्ट्राचे एकमेव नेते बनले. किसान-कामगार, विद्यार्थी, व्यापारी, शिपाई-सैनिक, सारे वर्ग स्वराज्याच्या भावनेने थरारून गेले आणि त्यासाठी आत्यंतिक त्याग करायला सिद्ध झाले. सर्व राष्ट्राचा आत्माच गांधीनी जागृत केला आणि खेड्यापाड्यातील मूक जनतेलाही निर्भय बनविले. १९२४ साली बेळगाव येथे भरलेल्या कॉंग्रेसचे अध्यक्षपद गांधीकडे आले, त्या वेळी कॉंग्रेसची दोन शकले होण्याचे संकट पुढे होते; पण गांधीजीनी ते टाळले. नेहरू-दास प्रभृतीनी कौन्सिलप्रवेशासाठी निराळा 'स्वराज्य पक्ष' स्थापन केला; पण गांधीनी आपल्या समावेशक धोरणाने त्या पक्षाला कॉंग्रेसच्या अंतर्गत ठेवले. त्याचप्रमाणे स्वत:ची श्रद्धा असलेली विधायक कार्ये त्यानी खेड्यांचा कायापालट व्हावा, म्हणून सर्वत्र चालू केली. खादी, ग्रामोद्योग, अस्पृश्यता-निवारण, दारुबंदी, हिंदु-मुस्लिमऐक्य, इ. अठरा विधायक कार्ये म्हणजे जनतेने सघटनेसाठी आचरायचे तपच होय, असे गांधी मानीत. त्या तपाने राष्ट्राच्या अंगी पुरेशी शक्ती निर्माण झाली आहे, अशी जेव्हा गांधीना खात्री वाटली, तेव्हा १९३० साली जानेवारीत त्यांनी 'स्वराज्याचा गाभा' म्हणून सरकारकडे ज्या ११ मागण्या सादर केल्या, त्यातील प्रमुख अशा—

(१) मिठाचा कर रद्द करावा.
(२) शेतसारा शे. ५० ने कमी करावा.
(३) देशात पूर्ण दारुबंदी करावी.
(४) लष्करी खर्च निम्म्यावर आणावा.
(५) हुडणावळीचा भाव १६ पेन्स ठेवावा.

सरकारने या मागण्या फेटाळून लावल्या, तेव्हा गांधीनी कायदेभंगाचे ब्रह्मास्त्र सरकारवर सोडले. कोणत्याही सरकारचा



म. गांधींची दांडीयात्रा

खरा आधार म्हणजे त्याने केलेले कायदे हा होय. ते कायदे जोपर्यंत लोक मानतात, तोपर्यंतच सरकार टिकून राहते. म्हणून गांधीनी सरकारच्या पायाखालील कायद्याची फळीच काढून घेण्याचा उद्योग आरंभिला. १२ मार्च १९३० रोजी ते आपल्या ७९ अनुयायांसह मिठाचा कायदा मोडण्यासाठी अहमदाबादेहून निघाले आणि २०० मैलांची पदयात्रा करून दांडी येथे ६ एप्रिल रोजी पोचले. तिथे त्यांनी 'नमकका कायदा तोड

दिया !' त्यासरशी साऱ्या राष्ट्रात लोकांनीही मिठाचा व जंगलचा कायदा तोडायला प्रारंभ केला. त्या आदोलनात ब्रिटिश सरकारचे अस्तित्वच जणू नाहीसे झाले.

या आव्हानाला सरकारचे उत्तर म्हणून सरकारने गाधीना व त्यांच्या हजारो अनुयायाना तुरुंगात टाकले आणि लाखो लोकांवर लाठीहल्ले व गोळीबार केले. पण जागृत जनशक्ती अभंग राहिली, अजिक्य ठरली. तेव्हा मग सरकारने नमते घ्यायचे ठरवून गांधींना बिनशर्त मुक्त केले व त्याच्याशी ४ मार्च रोजी दिल्लीच्या व्हाइसरायने समान भूमिकेवरून एक इंग्लंडच्या सरकारने गांधींच्या पुढे उभा केला. पण ब्रिटिश मुत्सद्यांच्या या राजकीय डावपेचात न सापडता गांधी दि. ५ डिसेंबर रोजी इंग्लंडहून निघाले. मुंबईस येताच त्यांना अटक झाली व त्यांना येरवडचाच्या तुरुंगात ठेवण्यात आले.

ब्रिटिश सरकारने अस्पृश्य समाजाला स्वतंत्र मतदारसंघ देणारा आपला ' जातिनिर्णय ' दि. १७ ऑगस्ट १९३२ रोजी जाहीर केला. तो बदलून घेण्यासाठी गांधीनी सरकारशी पत्र-व्यवहार केला. पण त्यांचा तो प्रयत्न फोल ठरला, तेव्हा गांधींनी पुनश्च आपले आत्मबलाचे निर्वाणीचे शस्त्र उपसले.



म. गांधीचा नित्य सूत्रयज्ञ

करार केला. हिंदी स्वातंत्र्याची मागणी लंडनमधील गोलमेज परिषदेत मांडण्याचे स्वातंत्र्य गांधींनी या कराराने मिळविले. आणि ते कार्य करण्यासाठी दि. २९ ऑगस्ट १९३१ रोजी ते मुंबईहून इंग्लंडला जायला निघाले.

दि. १४ सप्टेंबर रोजी त्यांनी गोलमेज परिषदेत हिंदी स्वातंत्र्याची मागणी करणारे भाषण केले. त्या वेळी इंग्लडमध्ये मजूरपक्ष सत्तारूढ होता; पण पुढे त्याच्या जागी हुजूरपक्ष आला आणि त्याने हिंदी स्वातंत्र्याला खो देण्याचे ठरविले. त्यासाठी अस्पृश्य वर्ग व अल्पसंख्य जमाती यांचा बागुलबुवा दि. २० सप्टेंबर रोजी येरवडचाच्या तुरुंगात त्यानी प्राणांतिक उपोषण आरंभिले. त्यासरशी सारे राष्ट्र गदगदा हलले आणि ब्रिटिश सरकारला अस्पृश्यांचा वेगळा मतदारसंघ रद्द करावा लागला. कोटचवधी लोकांचा हा प्रश्न एकही गोळी झाडली न जाता केवळ आत्मबलाने सोडविल्याचे असे उदाहरण जगाच्या आतापर्यंतच्या इतिहासात दुसरे नाही.

यानंतर गांधीजीनी अस्पृश्यता निवारणाच्या कार्याला स्वतःला वाहून घेतले. त्यासाठी त्यांनी हरिजन नावाचे इंग्रजी साप्ताहिक दि. ११ फेब्रुवारी १९३३ पासून सुरू केले आणि

देशाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत दौरे काढले. त्यामुळे हजारो मंदिरे हरिजनांना खुली झाली; तशीच विद्यालये, उपहारगृहे, पाणवठे हे सुद्धा त्यांना खुले झाले. पुढे या कार्याला व्यवस्थित स्वरूप देण्यासाठी गांधींनी 'हरिजन सेवक संघ' स्थापन केला. १९३४ च्या ऑक्टोबरमध्ये तर ते काँग्रेसमधून निवृत्तच झाले आणि त्यानी हरिजन सेवेकडेच एकाग्रतेने लक्ष पुरवले.

खेड्याचा कायापालट झाला, तरच हिंदुस्थानचा उद्धार होईल, असा गांधीजींचा सिद्धांत होता. त्यासाठी खादी–ग्रामोद्योगादी विधायक कार्यावर त्यांनी भर दिला. म्हणूनच काँग्रेस ही खेड्यातच भरवावी, असा त्यांचा आग्रह असे. त्याप्रमाणे महाराष्ट्राने १९३६ साली फैजपूर या खेड्यात काँग्रेसचे अधिवेशन भरवले व त्याला जोडून ग्रामोद्योगाचे प्रदर्शनही भरवले. पुढील वर्षी कौन्सिलच्या ज्या निवडणुका झाल्या, त्यांत काँग्रेसने आठ प्रांतांत घसघशीत यश मिळविले. त्या यशाचे फल म्हणजे त्या त्या प्रांतात काँग्रेस सत्तारूढ झाली व राज्यकारभार करू लागली. राज्यसत्तेशी युद्ध खेळण्यात काँग्रेस जितकी यशस्वी झाली, तितकीच ती राजसत्ता चालविण्यातही झाली. दारुबंदी, खादीप्रसार, मूलोद्योग, शिक्षण, शेतकऱ्यांचे कर्जनिवारण, हरिजनांचा उद्धार, इ. राष्ट्रीय हिताची कार्ये, या प्रांतिक स्वराज्यात फोफावू लागली. पण १९३९ च्या सप्टेंबर मध्ये युरोपात दुसरे महायुद्ध पेटले आणि ब्रिटिश सरकारने हिंदुस्थानला न विचारताच त्याला त्या युद्धाच्या खाईत लोटले. त्यानंतरच्या युद्धपरिस्थितीत लोकहिताची कामे करणेही अशक्य झाले असते, म्हणून काँग्रेसने आठही प्रांतांतील मंत्रिमंडळांचे राजिनामे एकाच वेळी शिस्तीने दिले. १९४० च्या नोव्हेंबरमध्ये गांधींनी युद्धविरोधी घोषणा करण्याचा वैयक्तिक सत्याग्रह सुरू केला. सरकारने हिंदुस्थानापुढे क्रिप्स योजनेचे तुकडे टाकले; पण त्याने कोणत्याच पक्षाचे समाधान झाले नाही. सर्व राष्ट्र त्या वेळी असंतोषाने, संतापाने शिजत होते. राष्ट्राची ही नाडी गांधींनी अचूक ओळखली आणि सरकारला अंतिम लढ्याची सूचना दिली.

गांधींनी १९२० साली असहकारितेचे रणशिंग फुंकले, त्यानंतर दहा वर्षांनी १९३० साली कायदेभंगाचा लढा चालविला आणि १९४२ च्या ऑगस्टमध्ये 'चले जाव' चा संग्राम सुरू केला. त्याबरोबर सरकारने त्याना पकडून पुण्याजवळील आगाखानवाड्यात स्थानबद्ध करून ठेवले. तिथे त्यांचे दोन प्राण – महादेवभाई व कस्तुरबा गमावले. दि. ६ मे १९४४ रोजी गांधीजीना त्यांच्या आजारीपणामुळे सरकारने सोडून दिले. त्या वर्षी सप्टेंबरमध्ये त्यांनी बॅ. जीनांशी वाटाघाटी करून हिंदु-मुसलमानांचे भंगलेले ऐक्य पुनः सांधण्याचा जिवापाड प्रयत्न केला; पण तो फोल ठरला. बॅ. जीनांनी 'मुसलमानासाठी स्वतंत्र राष्ट्र असावे' असा हट्ट धरला आणि पाकिस्तानची मागणी अट्टाहासाने चालू ठेवली. एवढेच नव्हे;



म. गांधींच्या नित्योपयोगी वस्तू

तर तिला जोर चढावा, म्हणून त्यांनी सर्व देशात जातीय दंगेही पेटविले. त्यामुळे देशातील शहराशहरात, रस्त्यारस्त्यावर, भर दिवसा, हिंदूंचे खुनामागून खून होऊ लागले व रक्ताचे पाट वाहू लागले. मुस्लिम लीगच्या वर्चस्वाखाली असलेल्या बंगाल प्रांतात विशेषतः नोआखली जिल्ह्यात तर खून, बलात्कार, धर्मांतर, जाळपोळ, इ. गोष्टींचा कहरच झाला.

नोआखलीत पेटलेला हा नरकाग्नी शमविण्यासाठी ८० वर्षांच्या घरात गेलेले गांधीजी शांतिप्रेमाचे अमृतसिंचन करीत १९४६ साली एकटे अनवाणी फिरू लागले. दि. १५ ऑगस्ट १९४७ रोजी इंग्रजसरकारने हिंदुस्थानला स्वातंत्र्य दिले; पण ते भारत व पाकिस्तान अशी दोन राष्ट्रे निर्माण करून. त्या स्वातंत्र्यदिनी गांधी कलकत्त्यात होते. राष्ट्राची फाळणी व पाकिस्तानची निर्मिती गांधींना पूर्ण नापसंत होती. पण अपरिहार्य म्हणून राष्ट्राने ती मान्य केल्यानंतर पाकिस्तानशी आपण

न्यायाने वागले पाहिजे, असे त्यांचे धोरण होते. म्हणूनच त्यांनी पाकिस्तानशी केलेल्या कराराप्रमाणे भारताने त्याला ५५ कोटी



म. गांधींची समाधी – राजघाट, नवी दिल्ली

रुपयांचे देणे त.त्काल देऊन टाकावे, असा आग्रह धरला व त्यासाठी उपवासही सुरू केला. त्यांचा शब्द भारतसरकारने खरा केला; पण त्यामुळे देशातील काही विशिष्ट मनोवृत्तीचे लोक नाराज झाले आणि गांधींच्या हत्त्येचा कट रचू लागले. गांधी दिल्लीस राहून निर्वासित मुसलमानांची मने शांत करीत होते व त्यांची राहण्याची सोय लावीत होते. यामुळेही काही तरुणांची माथी भडकली व ते गांधींच्या प्रार्थनासभेत अडथळे आणू लागले. दि. २० जानेवारी १९४८ रोजी संध्याकाळी गांधींची प्रार्थना चालू असताना, अशाच एका माथेफिरूने गांधीजीवर बॉंब फेकला; पण त्या वेळी गांधींना काही दुखापत झाली नाही.

तशाच दुसऱ्या एका माथेफिरूने दि. ३० जानेवारी १९४८ रोजी गांधीजी प्रार्थनास्थानी आले असताना त्यांच्यावर पिस्तुलातून तीन गोळ्या झाडल्या; त्या मात्र निर्णायक ठरल्या.

'राम राम' असे उद्‌गार काढून महात्मा गांधी लगेच गतप्राण झाले ! एका युगप्रर्वक महात्म्याचे अशा प्रकारे महानिर्याण झाले ! [दा. न. शिखरे]

## गांधीवाद

म. गांधींनी जीवनाचे संपूर्ण शास्त्र किंवा दर्शन अथवा तत्त्वज्ञान लिहून ठेवलेले नाही. उलट 'गांधीवाद' अशी काही वस्तूच नाही आणि 'माझ्या पश्चात माझा एखादा पंथ चालू राहावा' असेही मला वाटत नाही..' असे ते नेहमी म्हणत. महात्मा या पदवीबद्दलही त्यांना मोठा उबग असे; पण ती त्यांना अनन्यसाधारणपणे चिकटली. त्याचप्रमाणे त्यांच्या विचारांतून व कृतीतून प्रगट झालेले जीवनाचे संपूर्ण तत्त्वज्ञान गांधीवाद या नावाने सर्व जगभर ओळखले जाऊ लागले.

गांधींनी एखादे नवे तत्त्व शोधून काढले असे नव्हे. जुनीच तत्त्वे त्यांनी नव्या स्वरूपात मांडली आणि ती स्वतः आचरून व्यापक प्रमाणावर इतराकडूनही आचरविली. भौतिक क्रांती व आध्यात्मिक क्रांती यांचा मेळ त्यांच्याइतका दुसरा कोणी क्वचितच घातला असेल.

सत्य व अहिंसा ही तत्त्वे अनादी व सनातन आहेत; पण ती नव्या अर्थाने भारतातील कोटयवधी लोकांच्या राजकारणात आणण्याचे श्रेय गांधींनाच आहे. तसेच यम-नियमादी योगसाधने व प्रार्थना-उपोषणादी धर्माचार हेही सर्व धर्मांत प्राचीन काळापासून उपदेशिलेले आहेत; पण व्यावहारिक प्रश्न सोडविण्यासाठी सामुदायिक प्रमाणावर त्यांचा आचार करण्याचे व करविण्याचे प्रयत्न गांधींनी जन्मभर केले. त्यासाठी त्यांनी पाच आश्रम स्थापिले, अकरा व्रते सांगितली आणि अठरा विधायक कार्ये आखून दिली. त्या सर्वांचा उद्देश स्वतःला व आपल्या देशबांधवांना ईश्वरी साक्षात्कार व्हावा, हाच होता.

'माझ्या दृष्टीने सत्य हाच ईश्वर आहे आणि त्या सत्याची प्राप्ती करून घेण्यास अहिंसेविना अन्य मार्ग नाही,' हा त्यांच्या तत्त्वज्ञानाचा आद्य सिद्धान्त आहे. या सिद्धान्तावर त्यांची इतकी निःसीम श्रद्धा होती, की सत्य व अहिंसा या दोन तत्त्वांचा त्याग मी अखिल जगतासाठीही करणार नाही, असे ते निश्चयाने सांगत. आरंभी ते ईश्वराला सत्य मानीत; पण पुढे सत्य हाच ईश्वर आहे, असा विचार ते मांडू लागले. त्यामुळे ईश्वरावर श्रद्धा न ठेवणाऱ्या नास्तिकालाही सत्य अभिमत असल्याकारणाने त्याचाही अंतर्भाव गांधींच्या तत्त्वज्ञानात होऊ शकला. 'सहस्र सूर्य एकत्र केले, तरीही सत्याची बरोबरी होणार नाही' असे सार्वभौम महत्त्व गांधी सत्याला देत.

सत्य व अहिंसा या प्राचीन तत्त्वांमध्ये गांधींनी नवा आशय भरला आणि ती तत्त्वे वैयक्तिक पातळीवरून सामुदायिक आचारात रूढ करण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या मताने केवळ सत्य शब्दोच्चार म्हणजे सत्य नव्हे. विश्वाच्या बुडाशी असणारे सनातन तत्त्व म्हणजे सत्य होय. या सत्यामध्ये न्यायाचाही अंतर्भाव होतो आणि अधर्म किंवा अन्याय यांचे निवारण करणे, हेही त्यात समाविष्ट होते.

अन्यायाचा प्रतिकार करणे, हा तर गांधीवादाचा प्राणच होता. 'अन्यायाचा प्रतिकार करू नका' या येशू ख्रिस्ताच्या सिद्धान्ताच्या पलिकडे गांधींनी पाऊल टाकले होते. 'अन्यायाचा प्रतिकार अहिंसेने अवश्य करा', असा त्यांचा आदेश होता.

या बाबतीत रशियन तत्त्वज्ञ टॉलस्टॉय यांच्याशी त्यांचे विलक्षण साधर्म्य होते. या दोन्ही तत्त्वज्ञाना हिंसेची घृणा वाटत असे आणि हिंसेवर व भोगावर उभारलेल्या पाश्चात्य संस्कृतीचा तिटकारा वाटत असे. व्यक्तीची आंतरिक सुधारणा झाली, की समाजाची सुधारणा आपोआप होते, असा विश्वास दोघानाही वाटे. म्हणूनच दोघांचाही भर साध्याइतकाच साधनांच्या शुचितेवर ही असे. ब्रह्मचर्य, साधी राहणी व श्रमप्रतिष्ठा या गुणांनी व्यक्तीचा नैतिक विकास होतो, असे दोघांचे प्रमेय होते. अहिंसेच्या कल्पनेबाबत आणि अन्यायाच्या निवारणाबाबत मात्र या दोघांच्या विचारांत किंचित मतभेद होता. गांधीचा सारा जन्म अन्यायाशी झगडण्यात गेला. हे अन्यायाशी केलेले झगडे म्हणजे ईश्वरप्राप्तीच्या पायऱ्या होत, असे गांधी मानीत.

आस्तिक्यबुद्धी म्हणजे ईश्वरावर श्रद्धा हा गांधीवादाचा पाया आहे. ' माझ्या जीवनाच्या अणुरेणूत ईश्वराची प्रतीती मला होते, ' असे ते म्हणत. ते द. आफ्रिकेत खटला चालविण्यासाठी म्हणून गेले असता समाजसेवेमध्ये तन्मय झाले, याचे कारण त्यांची आत्मदर्शनाची अभिलाषा हेच होते. ' ईश्वराची ओळख जनसेवेनेच होईल, असे समजून मी सेवाधर्माचा स्वीकार केला, ' अशी त्यांनी कबुली दिली आहे. आपली ईश्वरावरील श्रद्धा व आपण आचरलेली जनसेवा यांचा कार्य–कारणभाव व्यक्त करताना ते म्हणतात––

' मानवाचे अंतिम साध्य ईश्वरी साक्षात्कार हेच आहे. तो साक्षात्कार करून घेण्यासाठी आपण कनिष्ठांतील कनिष्ठ जीवावरही स्वतःइतकेच प्रेम करण्यास शिकलें पाहिजे. त्यासाठी आपण जीवनाच्या कोणत्याहि क्षेत्रापासून स्वतःला अलिप्त ठेवता कामा नये '

गाधीची ईश्वरावर केवढी प्रगाढ श्रद्धा होती, त्याची कल्पना त्यांच्या पुढील शब्दावरून येईल––

' मी हवापाण्याशिवाय जगू शकेन; पण ईश्वराशिवाय नाही, हे मी सिद्ध करून दाखवू शकतो. तुम्ही माझे डोळे बाहेर ओढून काढले, तरी मी मरणार नाही; पण तुम्ही माझी ईश्वरावरील श्रद्धा उद्ध्वस्त करा, की मी मेलोच ! '

ईश्वराच्या सगुण–साकार स्वरूपावर त्यांची श्रद्धा नव्हती. मूर्तिपूजेचा आधार साधकाला हितप्रद असतो, असे ते मानीत; पण खुद्द त्यांना त्याची गरज वाटत नसे. ते म्हणत––' ईश्वर म्हणजे सर्व वस्तुमात्राला व्यापून राहिलेली एक गूढ शक्ती होय. आपल्या इंद्रियाना गम्य असणाऱ्या पदार्थापेक्षा ती शक्ती इतकी भिन्न आहे, की तिच्या विषयीचा कोणताच पुरावा इंद्रियांपुढे ठेवता येत नाही.'

गाधीच्या दृष्टीने ईश्वर हा दयासिंधू आहे. ते म्हणतात. ' मी पाहतो, की मृत्यू घडत असताही जीवन टिकते. असत्याच्या राशीतही सत्य तगते. अंधाराच्या राज्यातही तेज प्रकाशते. म्हणून मी मानतो, की ईश्वर हा चैतन्यमय, सत्यमय व प्रकाशमय आहे. तो प्रेममय, मंगलाचे मंगल असा आहे.'



साबरमती आश्रममें रक्खा हुआ गांधीजीके सत्याग्रहके सिद्धान्तोंको समाविष्ट करनेवाला

**जीवन-चक्र**

गुरुत्वाकर्षणासारख्या ज्या अनंत शक्ती विश्वाची धारणा करीत आहेत, त्या सर्वांचे नियमन करणारी सच्चिदानंदस्वरूप अशी एक ईश्वरी शक्ती आहे असा गांधीना गाढ विश्वास वाटे. त्या ईश्वराचा ' आतला आवाज ' आपल्याला ऐकू येतो, असेही ते सांगत. माणसाने यम-नियमादीचे पालन करून आपले जीवन शुद्ध केले, तर ईश्वराचा ' आतला आवाज ' प्रत्येकाला ऐकू येईल, असे ते निश्चयाने म्हणत.

ईश्वरी साक्षात्काराचे साधन म्हणूनच गांधीनी अहिंसेचे व्रत स्वीकारले. केवळ प्राणिमात्राची हिंसा टाळणे म्हणजे अहिंसा, अशी त्यांची स्थूल व्याख्या नव्हती. अहिंसा म्हणजे अपार प्रेम, असा तिचा विधायक अर्थ ते लावीत आणि हे अपार प्रेम व्यक्त होण्याचे साधन म्हणजे जनसेवा व त्या जनसेवेचे परिस्थितिप्राप्त स्वरूप म्हणजे राजकारण, असे ते म्हणत. ' अखिल मानवजातीशी ऐक्य साधल्याविना मी आध्यात्मिक जीवन जगू शकत नाही, असे दिसून आल्यामुळेच मला राजकारणात भाग घ्यावा लागला ', असे त्यांनी स्वच्छ सांगितले आहे. ' पापाशी प्राणपणाने मी झगडा केला नाही, तर मला

ईश्वराचे दर्शन कधीच होणार नाही,' असा ते निर्वाळा देत. सत्य-अहिंसेच्या मार्गाने आपली मनोवृत्ती शुद्ध अर्थात रागद्वेषरहित करून जनसेवा अनासक्तपणे केल्याने आपल्याला ईश्वरप्राप्ती होईल, असे ते मानीत. ' जसजसा मी शुद्ध बनत जातो, तसतसा मी परमेश्वराच्या समीप जात आहे असे मला वाटते, ' असे त्यांचे म्हणणे होते.

' राजकारण अध्यात्ममय करावे,' असे ना. गोखले म्हणत. लबाडीशिवाय व्यापार होत नाही व कपटाशिवाय राजकारण साधत नाही, अशी आजवरची जगाची समजूत; पण गांधीजींनी आपल्या आयुष्यात जे जे म्हणून राजकीय संग्राम चालविले, ते ते सर्व अशा अध्यात्मवृत्तीने व धर्मबुद्धीनेच चालविले. त्यात त्यांनी द्वेषाला, कपटाला, गुप्ततेला किंवा हिंसेला स्थान दिले नाही. १९३० साली त्यांनी कायदेभंगाचे जे नवेच शांतियुद्ध पुकारले, त्यापूर्वी त्यांनी व्हाइसरॉयला एक निर्वाणीचा खलिता पाठविला होता. त्यात आपल्या चळवळीचे आध्यात्मिक अधिष्ठान स्पष्ट करताना त्यानी म्हटले होते, की ' हे धर्मयुद्ध आहे आणि ते ईश्वराचे नाव घेऊनच मी चालविणार आहे. त्यात गुप्तता नाही, लबाडी नाही, असत्य नाही. '

हा खलिता गांधींनी इंग्रज व्हाइसरॉयकडे पाठविला तो एका इंग्रज माणसाबरोबरच. इंग्रज व्यक्तीशी त्यांचे भांडण नव्हते; तर ते इंग्रजांच्या साम्राज्यशाहीशी होते. आणि ती साम्राज्यशाही हिंदुस्थानाचे केवळ द्रव्यशोषणच करीत नाही; तर सामाजिक, नैतिक व सांस्कृतिक अशा सर्वबाजूनी त्याचा अधःपात घडवून आणते, असे ते समजत. अशा या परतंत्र व पतित मानवतेला मुक्त करणे, हाच ईश्वरप्राप्तीचा एकमेव मार्ग आहे, अशी गांधीची श्रद्धा होती. आपले राजकारण व अध्यात्मसाधन यांचा कार्यकारणभाव त्यांनी एकदा पुढील शब्दांनी विशद केला होता—

' मानवाचे अंतिम साध्य ईश्वरी साक्षात्कार हे आहे. राजकीय, सामाजिक व धार्मिक अशा त्याच्या सर्व क्रिया ईश्वरी साक्षात्काराच्या अंतिम ध्येयाने प्रेरित झालेल्या असल्या पाहिजेत. ईश्वराचा साक्षात्कार करून घेण्याचा एकमेव मार्ग म्हणजे त्याला त्याच्या सृष्टीत पाहणे व त्या सृष्टीशी समरस होणे. यामुळे मानवाची सेवा करणे, हे त्या साक्षात्काराच्या प्रयत्नाचे एक अवश्य अंग ठरते. सर्व मानवाची सेवा स्वदेशाच्या सेवेविना करता येणार नाही. माझे देशबांधव हे माझे निकटचे शेजारी होत. ते इतके चेतनाशून्य, साधनशून्य बनले आहेत, की त्यांची सेवा करण्यावरच मी माझी शक्ती केंद्रित केली पाहिजे. हिमालयाच्या गुहेत मला ईश्वर सापडेल, असे मी माझ्या मनाला जर पटवून देऊ शकलो, तर मी तिकडे तत्काळ कूच करीन; पण मानवतेला वगळून अन्यत्र कुठे मला ईश्वर सापडेल, असे वाटत नाही. '

ईश्वरप्राप्तीसाठी जनसेवा व जनसेवेचे जवळचे साधन म्हणून राजकारण अशी गांधीची धारणा असल्यामुळे त्यांचे सारे राजकारण अध्यात्माच्या अधिष्ठानावरून चाले. आत्मबलावर त्यांची असामान्य श्रद्धा होती. आत्मबलाने भौतिक समस्या सोडविण्याचा गांधीचा हा मार्ग जगाच्या इतिहासात नवाच म्हटला पाहिजे. चातुर्वर्ण्याची रचना करून महर्षी मनूने मानवसमाजाला पूर्वी जसे एक अधिष्ठान मिळवून दिले किंवा अर्थप्रधान समाजरचनेचा नवा नकाशा काढून कार्ल मार्क्सने जसे मानवजातीला दुसरे अधिष्ठान प्राप्त करून दिले, त्याप्रमाणे आत्मक्लेशाने दुसऱ्याचे हृदयपरिवर्तन करून अन्यायाचे निवारण करण्याचे सत्याग्रही शस्त्र गांधींनी मानवजातीच्या हाती दिले. त्यापूर्वी आपल्यावरील अन्याय किंवा आक्रमण दूर करण्याचा एकच उपाय मानवाला माहीत होता आणि तो म्हणजे शस्त्राचा.

शस्त्रबलाचा अपुरेपणा ज्यांच्या ध्यानी पूर्वीच आला, त्यांनी बुद्धिबलाने मानवी संघर्ष मिटविण्याचा एक मार्ग शोधून काढला. एकाचे बुद्धिबल अपुरे पडते म्हणून अनेकांच्या बुद्धीने आपल्यापुढील प्रश्न सोडविण्याचा उपक्रम सुरू झाला. ' पाचामुखी परमेश्वर ' या न्यायाने ग्रामपंचायती आपल्या अडचणी सामुदायिक बुद्धिबलाने सोडवू लागल्या. या पद्धतीचा विकास होता होता सर्व राष्ट्राला व्यापून टाकणारी लोकशाही अवतीर्ण झाली. राष्ट्रातले लोक आपल्या बुद्धिबलाने आपले प्रश्न सोडवू लागले आणि आपण निवडून दिलेल्या प्रतिनिधींमार्फत आपला राज्यकारभार चालवू लागले. बंदुकीच्या गोळीऐवजी मतपेटी (Ballot Box instead of Bullet) हे लोकशाहीचे मुख्य साधन होय. पण जिथे बुद्धिबल-असमर्थ ठरते, तिथे मानवाने काय करावे, एखादी गोष्ट बुद्धिवादाने, युक्तिवादाने, तर्कवादाने योग्य व न्याय्य असल्याचे पटले तरी स्वार्थाने, मोहाने, लोभाने ती गोष्ट आचरणात येत नाही, तेव्हा काय करावे, हा प्रश्न सर्वांना कुंठित करणारा होता. आयर्लंड किंवा हिंदुस्थान यांना स्वातंत्र्य देणे न्यायाचे आहे, असे इंग्रज मुत्सद्यांना बुद्धीने पटले, तरी स्वार्थामुळे त्यांच्या हातून ते स्वातंत्र्यदान घडत नव्हते. ' कळते पण वळत नाही ' म्हणतात, तशी ही स्थिती होती. या कोंडीतून बाहेर पडण्यासाठी गांधींनी एक नवेच आत्मबलाचे शस्त्र शोधून काढले.

शस्त्रबल किंवा बुद्धिबल जिथे अपुरे पडते, तिथे गांधींनी आत्मबल खडे केले. द्वेषाला प्रेमाने व हिंसेला अहिंसेने उत्तर देण्याचा सत्याग्रही मार्ग गांधींनी भारताला दाखवून दिला. म्हणूनच भारताच्या स्वातंत्र्यसंग्रामात जे अल्पस्वल्प रक्त

सांडले गेले, ते स्वकीयांचे; परकीयाचे नव्हे. इ. स. १९२० च्या डिसेंबरात नागपूर येथे भरलेल्या काँग्रेसमध्ये असहकारितेचा जो ठराव मंजूर झाला, त्याचे उद्दिष्ट आरंभी पंजाबप्रकरण व खिलाफतप्रकरण, या दोन राष्ट्रीय आपत्तीचे निवारण करणे हाच होता. पण सर्व आपत्तीचे मूळ जे पारतंत्र्य त्याचे निराकरण करण्यासाठी 'स्वराज्य मिळावे' हाही उद्देश त्या ठरावात ऐन वेळी घातला गेला. गांधींनी त्या ठरावाला संमती दिली व त्यामुळेच ते राजकारणात अधिकाधिक ओढले गेले. तथापि त्यांच्या कार्याचे अधिष्ठान असलेले अध्यात्म व त्यातील अहिंसा यांना ते कधीच विसरले नाहीत. १९२० साली नागपूर – काँग्रेसमध्ये त्यांच्याच प्रेरणेने कायदेशीर व शांततापूर्ण मार्गांनी स्वराज्य मिळविणे, हे काँग्रेसचे ब्रीदवाक्य ठरले होते; पण ते बदलून 'सत्यपूर्ण व अहिंसामय मार्गांनी स्वराज्य प्राप्त करून घेणे' असे ब्रीद काँग्रेसने स्वीकारावे अशी सूचना गांधींनी १९३४ सालच्या मुबई– काँग्रेसमध्ये केली. संयुक्त प्रातात लोकांनी हिंसा केली म्हणून गांधींनी १९२२ साली गुजराथ प्रांतातील कायदेभंगाचा लढा का थांबविला, याचे कारण त्यांच्या या आध्यात्मिक अधिष्ठानात आहे. या आपल्या मनोवृत्तीवर व धोरणावर स्वच्छ प्रकाश टाकणारा पत्रव्यवहार त्यांनी लो. टिळकांशी १९२० साली केला होता.

असहकारिता व कायदेभंग या दोन रूपांनी गांधींचा सत्याग्रह भारतीय राजकारणात प्रगट झाला व यशस्वीही झाला. १९२२ च्या करबंदीच्या चळवळीपासून १९४२ च्या 'चले जाव'च्या चळवळीपर्यंत गांधींनी हिंदुस्थानाला अहिंसेचाच मार्ग आक्रमायला लावले. स्वतः गांधींप्रमाणे राष्ट्राची किंवा काँग्रेसची अहिंसेवर अचल श्रद्धा नसली, तरी एक धोरण, एक व्यवहार्य साधन म्हणून राष्ट्राने किंवा काँग्रेसने अहिंसेचा स्वीकार केला होता. दुसऱ्या महायुद्धाच्या वेळी काँग्रेसच्या पुढाऱ्यांना अहिंसेचे धोरण अनुपयुक्त वाटले म्हणून त्यांनी ते बाजूस सारले, तेव्हा गांधी स्वतःच काँग्रेसपासून दूर झाले. यावरून गांधींची व एकंदर गांधीवादाची भूमिका सर्व जगाला स्पष्ट दिसून आली.

अहिंसेच्या धोरणामुळे हिंदुस्थानातील हजारो, लाखो स्त्री-पुरुष, उघडपणे व बेडरपणे, गांधींच्या चळवळीत भाग घेऊ लागले. आणि त्यामुळेच त्यांच्यापुढे ब्रिटिश सरकारचे शस्त्रबळ लुळे पडले. कोणत्याही परतंत्र राष्ट्रातला कोणताही नेता सर्वांत मोठी देणगी देऊ शकतो, ती म्हणजे स्वातंत्र्याची आकांक्षा व वृत्तीची निर्भयता ! गांधींनी हिंदुस्थानातील कोट्यवधी लोकांच्या अंतःकरणात, एखाद्या प्रखर ज्योतीप्रमाणे ती पेटवून दिली. त्यामुळे निःशस्त्र खेडूतही शस्त्रसंपन्न साम्राज्यशाहीशी टक्कर देण्यास उभा राहिला आणि त्याच्यापुढे बलाढ्य ब्रिटिश साम्राज्यशाहीलाही नमते घ्यावे लागले.

गांधींच्या अहिंसेचा याहीपेक्षा व्यापक व चिरकालिक उपयोग लोकशाहीच्या कारभारात दिसून येतो. लोकशाहीचे यश समता व सहिष्णुता या दोन तत्त्वांवर अवलंबून असते. आणि ही दोन तत्त्वे म्हणजे अहिंसेचीच दोन स्वरूपे आहेत. प्रतिपक्षाचे डोके उडविण्याऐवजी त्याच्या डोक्यातील विचार बदलणे व त्याला आपल्या मताकडे वळविणे, हे लोकशाहीचे आद्य सूत्र होय. दुसरा मानव आपल्यासारखाच आहे आणि दुष्टांतील दुष्टामध्येही चांगुलपणा वास करीत असतो. त्याच्या 'हृद्देशात' ईश्वरी अंश असतो आणि तो अंश आपल्या प्रेमाने, सेवेने व क्लेशाने जागृत केला, तर त्याच्या हातून अन्याय घडणार नाही, ही मानवी चांगुलपणावरची श्रद्धा जशी गांधीवादाला तशीच लोकशाहीलाही आधारभूत आहे.

स्वराज्य याचा अर्थ, गांधीजींच्या दृष्टीने, केवळ परसत्तेपासून मुक्तता, एवढाच नव्हता. स्वतःवर राज्य – आंतरिक शासन– म्हणजे स्वराज्य असे ते मानीत. राष्ट्राचे सामर्थ्य इतके वाढले पाहिजे, की त्याला आपल्या जीवनासाठी व विकासासाठी सरकारी नियंत्रणाची आवश्यकता वाटूच नये. ते म्हणत, की 'सरकार परके असो किंवा स्वकीय असो; त्याच्या सत्तेपासून मुक्त राहण्याचा अखंड प्रयत्न करणे, म्हणजे स्वराज्य होय. आपल्या जीवनातील प्रत्येक बाबीचे नियंत्रण करावे, म्हणून लोक जर स्वराज्य–सरकारच्या तोंडाकडे पाहत राहतील, तर ती दुःखाची गोष्ट होय. शासनसंस्थेची सत्ता वाढणे, हे मला भयप्रद वाटते, कारण त्यामुळे लोकांचे व्यक्तिमत्त्वच नष्ट होते. आणि हे व्यक्तिमत्त्वच तर सर्व प्रगतीचे मूळ होय.'

अशी विचारसरणी असल्यामुळे, गांधींचा भर सहजच साधनशुचितेवर असे. स्वराज्य म्हणजे आत्मराज्य. हे आत्मशुद्धीविना कसे प्राप्त होईल ? आणि ही आत्मशुद्धी शुद्ध साधनाविना कशी लाभेल ? अशुद्ध किंवा अमंगल साधनांनी शुभ व मंगल साध्य चुकून हस्तगत झाले, तरी ते चिरस्थायी तर राहू शकतच नाही; उलट ते अशुभ शक्तींना वाट मोकळी करून देते. द्वेषातून अधिक द्वेष आणि हिंसेतून अधिक हिंसा निर्माण होते. द्वेष, हिंसा, कपट, इ. अशुभ साधनांनी संपादिलेली राज्ये त्याच दोषात बुडाल्याची असंख्य उदाहरणे जगाच्या इतिहासात आढळतात. शुद्ध साधनांची उपासना करताकरताच साधकाला साध्य प्राप्त झाले, म्हणजे तो स्वतःच शुद्ध बनतो आणि त्याच्या भोवतालचे वातावरणही शुद्ध होते. साध्य–साधनांचा संबंध वृक्ष–बीजासारखा आहे, असा दृष्टांत देऊन गांधी म्हणतात.

' माझ्या जीवनविषयक तत्त्वज्ञानात साधनें व साध्य या संज्ञा परस्परांच्या पर्यायवाचक आहेत. साधनांची काळजी आपण घेतली, म्हणजे साध्य आपल्याला आगेमागे पण निश्चितपणे प्राप्त होतें. '

या आपल्या तत्त्वज्ञानास अनुसरूनच, गांधी सर्व जन्मभर निष्काम कर्मयोगच आचरीत राहिले. दक्षिण आफ्रिकेतील सरकार असो, चंपारण्यातील गोरे मळेवाले असोत, अहमदाबादचे गिरणीमालक असोत किंवा सर्व हिंदुस्थानाला व्यापून टाकणारी ब्रिटिश साम्राज्यशाही असो; त्या सर्वांशी गांधी सत्य, अहिंसा, प्रेम, सेवा या शुद्ध साधनांनीच लढले आणि त्या सर्वांचे सौहार्द संपादून त्यांनी मधुर यश मिळविलें. सतत आठ वर्षे मुरलेल्या अहिंसाशक्तीचा व सत्याग्रहबलाचा पूर्ण व शुद्ध आविष्कार त्यांच्या जीवनाच्या अखेरीस त्यांच्या अंगी पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणे प्रगट झाला. इ. स. १९४७ सालापासून त्यांनी बंगालमधील नोआखली जिल्ह्यातील जातीय दंगलीचा वणवा शमविण्यासाठी जी एकाकी पदयात्रा काढली, ती त्यांच्या जीवन–ग्रंथाचा कलशाध्याय म्हणून शोभण्यासारखी आहे. केवळ अहिंसाशक्तीनें, प्रेमबलानें, सेवाभावानें एका व्यक्तीला किती उत्कट जनसेवा करता येते व जनतेच्या जीवनात किती क्रांती करता येते, याचा जणू वस्तुपाठच त्या शांतियात्रेनें जगाला दिला.

मानसिक तपश्चर्येबरोबरच कायिक तपश्चर्याही प्रत्येकाने करावी, म्हणून गांधींनी अठरा विधायक कार्ये सांगितली व त्यांत वेळोवेळी नवीन कार्याची भरही घातली. विधायक कार्यक्रमावर त्यांनी एक स्वतंत्र पुस्तकच लिहिले आहे. या विधायक कार्याच्या ग्रहमालेत चरखा हा सूर्यासारखा आहे, असा दृष्टांत ते देत. दरिद्री नारायणाच्या उद्धारार्थ त्यांना खादी ही कामधेनूसारखी वाटे. हिंदुस्थानातील उपाशी, उघडया, बेकार देशबांधवांना खादीच दोन घास खाऊ घालील व दोन हात कपडा पुरवू शकेल, असा त्यांचा दृढ विश्वास होता. यंत्राला त्यांचा विरोध असे, तो याच भूमिकेवरून. एक यंत्र शंभर–हजार कामगारांचे उच्चाटन करते आणि त्यांना बेकारीच्या व उपासमारीच्या खाईत लोटतें. म्हणूनच त्याला त्यांचा विरोध होता. तसा अनिष्ट परिणाम न घडविणाऱ्या, घडयाळ, मोटार, रेल्वे, इ. यंत्रांचा स्वीकार त्यांनी स्वागतपूर्वक केलेला होता. तसाच त्यांनी विद्युत्‌शक्तीचाही स्वीकार केलेला होता. ते म्हणत, 'यंत्रे आली आहेत, ती इथे कायम राहण्यासाठी. त्यांना समाजजीवनात स्थान आहे. माझा विरोध यंत्रांना नसून यंत्रांच्या वेडाला आहे. वेळ वाचविणारी यंत्रे निघाल्यामुळे मूठभर लोक लाखो लोकांच्या उरावर बसतात आणि थोडी राष्ट्रे पुष्कळ राष्ट्रांचे शोषण करू लागतात. त्यांना आळा बसणे अवश्य आहे, असे माझे मत आहे. '

खादीप्रमाणेच इतर ग्रामोद्योगांवरही गांधींचा भर असे. आर्थिक समानता निर्माण होण्यासाठी हिंदुस्थानासारख्या खेडयांनी गजबजलेल्या देशात ग्रामोद्योग वाढले पाहिजेत. त्याचप्रमाणे श्रीमंत लोकांमध्ये विश्वस्तपणाची ( ट्रस्टीशिप् ) भावना वाढली पाहिजे, असे ते म्हणत. खेडयातील सफाई व आरोग्य हेही एक त्यांनी विधायक कार्य मानले होते. दारुबंदीला त्यात महत्त्वाचे स्थान होते. जातीय ऐक्य, अस्पृश्यतानिवारण, राष्ट्रभाषा, मूलोद्योगशिक्षण व प्रौढशिक्षण याचाही समावेश त्यांनी विधायक कार्यातच केलेला आहे. स्त्रियांची, शेतकऱ्याची, आदिवासींची, महारोग्यांची सेवा करणे, हीही विधायक कार्येच होत. ' विधायक कार्यक्रमावाचून कायदेभंगाचा लढा चालविणे, हे पक्षाघात झालेल्या हाताने चमचा उचलण्याचा प्रयत्न करण्यासारखे आहे, ' असे ते म्हणत. विधायक कार्याची साधना ही ते राष्ट्राची तपश्चर्या मानीत. त्या तपश्चर्येतून निर्माण होणारे सामर्थ्य त्यांनी राजकीय स्वातंत्र्यासाठी उपयोजिले. किंबहुना स्वातंत्र्यप्राप्तीनंतर काँग्रेसने ' लोक–सेवक–संघाच्या ' स्वरूपात जनसेवेचे कार्य पुढे चालवावे, या उद्देशाने आपल्या अंतकालाच्या पूर्व दिवशी म्हणजे २९ जानेवारी १९४८ रोजी, या तपोवृद्ध राष्ट्रपित्याने जो आराखडा लिहून काढला, त्यात खादी, दारुबंदी, अस्पृश्यतानिवारण व जातीय ऐक्य यांवर श्रद्धा असणाऱ्या कार्यकर्त्यांवरच त्यांनी भर दिला आहे. या संघाने विधायक कार्ये पुढे चालविण्यासाठी चरखा संघ, ग्रामोद्योग संघ, हिंदुस्तानी तालिमी संघ, हरिजन सेवक संघ व गोसेवा संघ, या स्वायत्त संस्था संलग्न करून घ्याव्या, असेही त्यांनी सुचविले होते.

या विधायक कार्यांच्या पूर्ततेमुळे जो समाज निर्माण होईल तो उच्चनीचभावरहित व शोषणरहित असा सर्वोदयी समाज असेल, असे ते समजत. आणि म्हणूनच सर्व जगाला साम्यवादाऐवजी सर्वोदयवादच उपयोगी पडेल, असे ते मानीत. ' हिंसा वजा केलेला साम्यवाद म्हणजे सर्वोदयवाद ' अशी भोंगळ कल्पना त्यांची नव्हती. शोषणशून्यता व शासनशून्यता ही दोन अंतिम तत्त्वे या दोन दर्शनात समान असली, तरी त्यांचे तत्त्वज्ञान व आचारधर्म यांत दोन ध्रुवांइतके अंतर आहे. एकंदर मनोवृत्तीचाच हा फरक आहे. भौतिक समृद्धी व यौद्धिक सामर्थ्य यांची सिद्धी साम्यवादी राष्ट्रांनी दाखविली असली, तरी व्यक्तिस्वातंत्र्य व जागतिक शांतता यांना त्यांच्यामुळे धोकाच निर्माण झाला आहे. म्हणून साम्यवादाचे गुण असलेला; पण त्यापेक्षा उदात्त प्रवृत्तीचे पोषण करणारा

गांधीवाद हाच जगाला तारक ठरेल, अशा विचारांचे वारे बऱ्याच तत्त्वज्ञांच्या मनात वाहू लागले आहेत. अमेरिकेतील निग्रो लोकांची अस्पृश्यता नष्ट करण्यासाठी डॉ. मार्टिन किंग यांच्यासारखे कार्यकर्ते गांधीजींच्याच सत्याग्रहमार्गाने जात आहेत आणि अण्वस्त्रांना बंदी घातली जावी, म्हणून नित्याचे सनदशीर उपाय योजल्यानंतर व ते फोल असल्याचे प्रत्ययास आल्यानंतर, इंग्लंडातील वयोवृद्ध शास्त्रज्ञ लॉर्ड बर्ट्रांड रसेल यांनीही सत्याग्रहाचीच कास धरली. कायदेभंग करून व तुरुंगवास सोसून साऱ्या जगाचे लक्ष आपल्या न्याय्य कार्याकडे वेधले. म्हणून मानवजातीच्या हाती आत्मोद्धाराचे हे नवेच अस्त्र देणारा गांधीवाद देशोदेशीच्या अशा प्रयोगानी विकसित होईल व मानवाला मानव्याने जगू देण्यास समर्थ बनेल, अशी आशा वाटते. आचार्य विनोबा भावे यांनी भारतात सतत बारा वर्षे चालविलेला भूदानयज्ञ हा गांधीवादातील सत्याग्रहाचेच विकसित स्वरूप होय. अखिल मानवजातीच्या सर्व समस्या सोडविण्यास तो समर्थ ठरेल, असा विश्वास वाटत आहे. [ दा. न. शिखरे ]

**गागाभट्ट** (इ. स. चे १७ वे शतक) एक विद्वान धर्मशास्त्रकार. याचे घराणे मूळचे पैठणचे. तिथून तो काशीला जाऊन स्थायिक झाला. याच्या घराण्यात अनेक विद्वान पुरुष निपजले. त्यांपैकी गागाभट्ट हा दिनकरभट्टाचा पुत्र होय. गागाभट्टाचे खरे नाव विश्वेश्वर असे होते. पण वडिलांनी कौतुकाने त्याचे नाव गागा असे ठेवले व तेच पुढे रूढ झाले.

गागाभट्टाने उत्कृष्ट विद्या संपादन करून आपल्या घराण्याच्या लौकिकात भर घातली. मीमांसा, न्याय, अलंकार व वेदान्त या शास्त्रांत तो अत्यंत निष्णात होता. त्याने अनेक शास्त्रांवर ग्रंथ रचले खरे; पण त्याचा मुख्य भर मीमांसा व धर्मशास्त्र या विषयांवर होता. याच्या ग्रंथांची नावे अशी –

(१) मीमांसाकुसुमांजली – पूर्वमीमासावृत्ती (२) भाट्टचितामणी–यात पूर्वमीमांसेतील प्रमुख सिद्धांतांचा विचार आहे. (३) राकागम किंवा सुधा – जयदेवाच्या चंद्रालोकावर टीका. (४) दिनकरोद्योत – गागाभट्टाचा धर्मशास्त्रावरील हा फार मोठा ग्रथ आहे. याचा प्रारंभ त्याचे वडील दिनकरभट्ट यांनी केला होता. याचे, आचार, आशौच, काल, दान, पूर्त किंवा इष्टापूर्त, प्रतिष्ठा, प्रायश्चित्त, वर्षकृत्य, इ. भाग आहेत. (५) निरूढपशुबंधप्रयोग – बौधायनसूत्रानुसारी. (६) पिंडपितृयज्ञप्रयोग. (७) कायस्थधर्मप्रदीप – शिवाजी महाराजांना राज्याभिषेक केल्यावर हा ग्रंथ लिहिलेला आहे. बाळाजी आवजीने त्याला हा ग्रंथ लिहायला सांगितले. (८) सुज्ञानदुर्गोदय – सोळा संस्कारांवरील ग्रंथ. (९) शिवार्कोदय – शिवछत्रपतींच्या आज्ञेवरून पूर्व मीमासेच्या बारा अध्यायावर हा ग्रंथ लिहिलेला आहे. या ग्रंथांतील एका श्लोकावरून गागाभट्टाने संन्यास घेतल्याचे आणि त्यानंतर हा ग्रंथ लिहिल्याचे कळते. (१०) समयनय – हा ग्रंथ संभाजी राजांकरिता लिहिला होता. (११) आपस्तंबपद्धती (१२) आशौचदीपिका (१३) तुलादानप्रयोग व (१४) प्रयोगसार.

गागाभट्टाचा शिवाजीमहाराजांच्या राज्याभिषेकाशी कसा संबंध आला, त्याबद्दल बखरीत वेगवेगळ्या हकीगती आहेत. सभासदबखरीत म्हटले आहे, की गागाभट्ट स्वतः राजांच्या भेटीला आला आणि त्याने राजांच्या मनात प्राचीन पद्धतीने अभिषेक करून घेण्याचे भरविले. राजे शिसोदिया वंशातील आहेत, असा गागाभट्टाने शोध लावला आणि आधी त्याचा व्रतबंध करून, मग त्यांच्यावर वैदिक पद्धतीने राज्याभिषेक केला.

गागाभट्ट त्यासाठी काशीहून आला तो दोन–तीन वर्षे महाराष्ट्रात राहिला. शिवाजीराजांनी त्याला तीन लक्ष होन एवढी दक्षिणा दिली. गागाभट्टाने महाराजांचा व्रतबंध करून त्याना राज्याभिषेक करविला व त्यामुळे त्याला पुष्कळ धन व कीर्ती मिळाली, याचे पुष्कळांना वैषम्य वाटले. या कामी त्याला विरोधही झाला असावा. पण गागाभट्टाने व शिवाजीमहाराजांनी मोठ्या धैर्याने सर्व गोष्टी पार पाडल्या.

इ. स. १६ व्या व १७ व्या शतकातील राजेरजवाड्यांच्या व मुसलमान बादशहांच्या दरबारातही भट्ट घराण्यातील विद्वान पुरुषांना मोठा मान होता. धर्मकृत्यांच्या प्रसंगी त्यांना आवर्जून बोलावले जात असे. अद्यापिही काशीत भट्ट घराण्याला अग्रपूजेचा मान मिळतो. गागाभट्टाच्या विद्वत्तेचा दक्षिणेत मोठा लौकिक होता. एखादा माणूस विद्येचा गर्व मिरवू लागला, तर अद्यापि लोक उपरोधाने म्हणतात, की 'मोठा आला आहे गागाभट्ट !' महाराष्ट्रात त्याची कीर्ती राहिली आहे, ती अशी. [ म. च. को.; म. ज्ञा. को.; श्रीशिवछत्रपती आणि गागाभट्ट– पां. वा. काणे. ]

**गाग्रा** पंजाबातील एक जात. या जातीत मुसलमानही आहेत. यांची वस्ती लाहोरच्या आसपासच आढळते. ते किडे पकडीत गावोगाव हिंडतात. पण यांचा मूळ व्यवसाय रुग्ण माणसांना जळवा लावणे, हा आहे. या त्याच्या धंद्यावरून यांना जुकेशी असेही म्हणतात. [ म. ज्ञा. को. ]

**गाजबीज** भाद्र० शु. २ येचे नाव. एक व्रत. उ. प्रदेशात पुत्रवती स्त्रिया संततीचे आयुष्य वाढावे या उद्दे-

शाने हे व्रत करतात. त्यासाठी भिंतीवर एक चित्र काढतात. त्या चित्रात एका झाडाखाली एक मुलगा उभा असतो व जवळच्या एका खोपटात एक मुलगा मरून पडलेला असतो. चित्रावर आकाशातून वीज उतरलेली असते. व्रतिनी स्त्रिया या चित्राची पूजा करतात व मग कथा ऐकतात. या व्रताची कथा अशी—

एक राजपुत्र रानात शिकारीला गेला होता. एवढ्यात विजे-सह पाऊस आला. राजपुत्र घाबरून जवळच्या एका गुराख्याच्या खोपटात शिरला. एवढ्यात त्या खोपटावर वीज पडली आणि राजपुत्र मरण पावला. जवळच्या झाडाखाली एक गुराखी मुलगा उभा होता, तो मात्र वाचला. त्याची आई रोज गाईला एक भाकरी देत होती. वीज पडायच्या वेळी त्या भाकरीने गुराखी मुलावर छत्र धरले आणि त्यामुळे तो मुलगा बचावला. राज-पुत्राजवळ असे काही पुण्य नव्हते, म्हणून तो दगावला. राजाला वाटले, की आपण इतका दानधर्म करीत असूनही आपला मुलगा का मरावा ? त्यावर पुरोहिताने त्याला सांगितले. ‘राजा तू दानधर्म करतोस; पण त्यात तुझा अहंकार आहे. त्यामुळे तुझे पुण्य क्षीण होते.’ राजा म्हणाला, की मग मी काय करू ? त्यावर पुरोहिताने त्याला गाजबिजेची पूजा करायला सांगितले. तेव्हापासून हे व्रत प्रचारात आले.

## ग़ाज़ी

गजवा म्हणजे धर्मयुद्ध होय. इस्लामसाठी धर्मयुद्ध करून विजयी झालेल्या वीराला ग़ाजी म्हणतात व अशा युद्धात जो मृत्युमुखी पडतो, त्याला शहीद म्हणतात. शही-दाला स्वर्ग प्राप्त होतो आणि ग़ाज़ीला वैभव प्राप्त होते, असे मुहंमद पैगंबराने सागितले आहे. प्रेषिताच्या आदेशानुसार जी धर्मयुद्धे झाली, त्यात स्वेच्छेने भाग घेणारे सैनिक वा अधिकारी यांनाच ग़ाज़ी म्हणावे, असे मुस्लिम पंडिताचे मत होते. जे सैनिक व अधिकारी नियमित वेतन घेऊन लढत, ते ग़ाजी मानले जात नसत. कालांतराने मुसलमान लोक आक्रमक बनले व साम्राज्य-वादी बादशहांच्या अकित असलेले पंडित सर्वच मुस्लिम वीराना ग़ाज़ी म्हणू लागले. इस्लामला न मानणाऱ्या लोकांवर आक्रमण म्हणजे जिहाद होय. अशा युद्धात महापराक्रम गाजवणाऱ्या सेनापतीला ग़ाज़ी ही पदवी देण्याची प्रथा सुरू झाली. काही मुस्लिम विद्वानांनी या प्रथेला विरोध केला; पण बादशहा व त्यांचे महत्त्वाकांक्षी अधिकारी यांनी तो जुमानला नाही. [ डि. इ.; हिं. वि. को. ]

## ग़ाज़ी मियाँ

पंचपीरांपैकी एक. उ. भारतातातील मुसल-मान आणि काही कनिष्ठ हिंदू जमाती, यांच्यामध्ये याचे फार माहात्म्य आहे. उफाली नामक एका मुसलमान जमातीचे लोक ग़ाजी मियाँच्या दंतकथा सांगत गावोगाव हिंडतात. गाज़ी मियाँचे प्रतीक म्हणून एका लोखंडी सळीला तांबडे फडके गुडाळलेले असते व त्याबर फुलांची माळ असते.

हा एक ऐतिहासिक पुरुष असून याचे खरे नाव सय्यद सालार मसूद असे होते. हा गज़नीच्या महंमुदाचा भाचा होता आणि भारतावरच्या एका मुसलमानी आक्रमणाचा नेता होता. इ. स. १०३४ मध्ये एका लढाईत हा मारला गेला व इस्लामचा हुतात्मा ठरला. त्याला हुतात्म्यांचा राजा या नावाने संबोध-तात. बहराइच येथे त्याचा मकबरा असून, दरवर्षी शेकडो लोक त्याच्या दर्शनाला जातात. [ फो. लो. नॉ. इं.; से. इं. १९५१. ]

## गाठले-माठले

कोकणातील काही घराण्यांतल्या ब्राह्मण स्त्रियांचा एक संस्कार. प्रसूतीनंतर तिसऱ्या दिवशी कच्चे सूत हळद लावून पिवळे करतात. त्याला काळचा घोंगडीची दशी व निरगुडीचा पाला बांधतात. अशी चार गाठली– माठली करून ती बाळंतिणीच्या ओटीत घालतात. त्यातले एक ती स्वतःच्या गळ्यात घालते व उरलेली तीन मुलाच्या गळ्यात, हातात व पायात बांधते. [ बदलापूर ]

## गाडगे महाराज

(१८७६ ते १९५६ इ. स.) आधुनिक संत व समाजसेवक. विदर्भातील दर्यापूर तालुक्यात शेण-गावी एका परीट घराण्यात यांचा जन्म झाला. यांचे लहानपणचे नाव डेबूजी असे होते. यांच्या वडिलांचे नाव झिंगराजी व मातेचे सखूबाई. वडील देवकार्ये करता करता विपन्नावस्थेला पोचले व १८८४ साली वारले. मग सखूबाई डेबूजीला घेऊन माहेरी राहायला गेली. डेबूजी तिथे गुरे चारू लागला. गुरे चारताना



गाडगे महाराज

तो भजन करीत असे. त्याने मुलांची भजनी मंडळेही स्थापन केली. लहानपणापासून तो जातिभेद मानीत नसे व गोरगरीबाना मदत करीत असे. पुढे तो मामाला शेतीच्या कामातही मदत करू लागला. मामा वारल्यावर त्याने आजोळची जमीन सावकाराच्या तावडीतून सोडविली. इ. स. १९१२ साली त्याचे कुंताबाईशी लग्न झाले.

डेबूजी अर्थात गाडगे महाराज यांची वृत्ती लहानपणापासूनच धार्मिक, सत्त्वशील, परोपकारी व कष्टाळू अशी होती. संसारात त्यांचे मनच रमेना. एक दिवस ते घरातून निघून गेले. पुढे ऋणमोचन यात्रेच्या वेळी त्यांची व त्यांच्या आईची भेट झाली. आईने घरी येण्याविषयी त्यांची खूप मनधरणी केली. पण ते त्या मोहाला बळी पडले नाहीत. त्यांनी पुढच्या काळात संसाराकडे कधीच लक्ष दिले नाही. त्यामुळे त्यांच्या घरच्या लोकांचे हालच झाले. रानावनात व गावोगावी फिरत त्यांनी आत्मसाधना केली.

त्यांच्या हातात गाडगे व अंगावर गोधडी असे; म्हणून लोक त्यांना गाडगेबाबा किंवा गोधडेबुवा म्हणू लागले. गावात आले, की ते प्रथम त्या गावाची सफाई करीत. पुढे ते भजन-कीर्तन करू लागले. त्यांची भाषा साधी पण हृदयाला भिडणारी असे. लोक कसे आहेत आणि त्यांनी कसे असायला पाहिजे, हेच ते सांगत. सामाजिक ढोंगांवर ते कडक टीका करीत. सेवा, प्रेम, भूतदया, इ. गोष्टींविषयी कळकळीचा उपदेश करीत. शिक्षणाशिवाय तरणोपाय नाही, असे ते प्रतिपादीत. काही वेळा प्रश्नोत्तररूपानेही त्यांचे कीर्तन चाले. कीर्तनाला जमलेल्या सर्व लोकांना ते भंडारा घालीत. भंडाऱ्यात गोडधोड असले, तरी ते स्वतः मात्र भाजी-भाकरीच खात. तुकारामबुवा आमचे सर्वांचेच गुरू आहेत व माझा कोणीच शिष्य नाही, असे ते म्हणत. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे त्यांची गादी किंवा मठ नाही. त्यांनी आपल्या आयुष्यात पंचवीस लाख रुपये मिळवले आणि ते लोकसेवेत खर्च केले. ऋणमोचन येथे त्यांनी घाट व मंदिर बांधले आणि पंढरपूर, नाशिक, आळंदी, देहू, त्र्यंबकेश्वर, पुणे इ. ठिकाणी धर्मशाळा व गोरक्षण संस्था उभारल्या. लगेच त्या विश्वस्तांच्या हवाली करून ते मोकळेही झाले. महाराष्ट्रातील लोकसमाजात गाडगेबुवांविषयी अपार श्रद्धा आहे. [ गाडगे महाराज; म. प. ]

## गाडी लोहार

एक जात. गाडी लोहार म्हणजे लोखंडी हत्यारे बनविणारे आणि बैलगाडीतून हिंडून ती विकणारे कारागीर होत. ही जात प्रथम राजस्थानमध्ये होती. पुढे ती इतस्ततः भटकू लागली. या जातीच्या दोन पोटजाती आहेत. एकीला गाडी लोहार व दुसरीला माल्विया म्हणतात. हे लोक आपणास पीठवोचे वंशज म्हणवीत असून त्यांच्या उत्पत्तीची दंतकथा आहे ती अशी–

पार्वतीने शिवाच्या पाठीवरील विभूतीपासून त्यांना उत्पन्न केले. शिवाला अंधार व ढंढकार या दोन राक्षसांना ठार मारायचे होते व त्यासाठी त्यांना हत्यारांची आवश्यकता होती. ती तयार करण्यासाठी पार्वतीने यांची निर्मिती केली.

चितोडगडावरील राजपूत वीरांना युद्धोपयोगी हत्यारे बनवून देण्याचे काम हे लोक करीत. चितोडगडचा, तिथल्या राज्यकर्त्यांचा आणि सगळ्या राजस्थानाच्याच स्वातंत्र्याचा त्यांना जाज्वल्य अभिमान होता. इ. स. १५६८ साली अकबराने चितोडगड काबीज केला ही गोष्ट गाडी लोहारांना दुःखदायक आणि अपमानकारक वाटली. म्हणून त्यांनी ठरविले, की यापुढे चितोडच्या परिसरात राहावयाचे नाही व चितोड पुनश्च स्वतंत्र होईपर्यंत गंभीरा नदी ओलांडून आत जायचे नाही. राजस्थान सोडताना त्यांनी पुढील पाच पण केले –



गाडी लोहार पुरुष

(१) कुठेही स्थायिक वस्ती करायची नाही. (२) छपराखाली राहायचे नाही. (३) विहिरीतून दोराने पाणी काढायचे नाही. (४) दिवा लावायचा नाही आणि (५) खाटेवर झोपायचे नाही.

४०० वर्षे चितोडपासून परागंदा झालेल्या या स्वाभिमानी जातीची दखल भारत स्वतंत्र झाल्यावर राजस्थान सरकारने घेतली व त्यांच्या चितोडप्रवेशाचा मोठा समारंभ प. नेहरूंच्या अध्यक्षतेखाली घडवून आणला. त्या प्रसंगी गाडी लोहारांच्या त्या समुदायाला पं. नेहरू म्हणाले, तुमचा ‘ पण ’ सिद्धीस गेला आहे. आता तुम्ही गंभीरा नदी ओलांडून चितोडच्या किल्ल्यात प्रवेश करा. मी तुम्हांला माझ्या बरोबर चलण्याची विनंती करतो. ’

त्यानंतर त्या समुदायाने आपल्या श्रेष्ठ नेत्याच्या समागमे

गडाच्या परिसरात पदार्पण केले. तो त्या जातीच्या जीवनातला सोनियाचा दिवस ठरला.

गाडी लोहारांचे जीवन फार कष्टमय आहे. निरनिराळी अवजारे बनविणे व ती विकण्यासाठी भटकणे हा त्यांचा धंदा होय. यंत्रयुगाच्या उदयापासून तर त्यांना अधिकच कष्टमय दशा आली. कित्येकदा त्यांना पोटासाठी बैल विकावे लागत व नादुरुस्त गाड्या दुरुस्त करण्यासाठी पैसा नसल्याने त्या रस्त्याच्या कडेला टाकून देऊन पुढे जावे लागे.

गाडी लोहार पुरुष पगड्या आणि रंगीत कपडे वापरतात. ओढणी, चोळी व घागरा हा स्त्रियांचा पोशाख असतो. यांचा जादूटोण्यांवर फार विश्वास असतो. मद्य-पानाचे व्यसन या जातीत सर्रास आढळून येते. त्यांच्यांत शिक्षणाचा फारसा प्रसार झालेला नाही.



गाडी लोहार स्त्री

**देव-धर्म**—राजपूतांच्या प्रमाणेच गाडी लोहार एकलिंगजीचे भक्त आहेत. त्यांची एक कुलदेवीही आहे. हे लोक आपल्या गाडीत त्या कुलदेवीची मूर्ती बाळगतात. शपथ घ्यायला सांगितले, तर चितोडची शपथ घेतात. यावरून चितोड हे त्यांच्या धार्मिक जीवनाचे एक महत्त्वाचे अंग आहे, हे समजून येते.

**विवाहप्रथा**—मातापित्यांकडून नाते असलेल्या मुलीशी विवाह करीत नाहीत. या जातीत कन्याविक्रयाची प्रथा आहे. बालविवाहही रूढ आहे. मुलामुलीची लग्ने पाळण्यातदेखील होतात.

यांची जातपंचायत आहे. त्यांचे तंटेबखेडे पंचायतीमार्फत सोडविले जातात. १० गाड्यांच्या गटाची एक समिती असते. या समितीत पाच सदस्य असतात. हे सदस्य पंचायतीकडे येणाऱ्या सर्व तंट्यांचा न्यायनिवाडा करतात. एखाद्यावर गुन्हा शाबीत झाला तर त्याला दंड करतात व ती दंडाची रक्कम दानधर्मासाठी उपयोगात आणतात. गंभीर गुन्ह्यासाठी अपराध्याला तीर्थयात्रा करायला सांगतात. [रा. जा.; राजस्थान; वि. मुं. रा. प.]

**गाण** कर्नाटकातील एक कलावंत जात. **पाहा**– कलावंत.

**गाणगापूर** एक दत्तक्षेत्र. पुणे-रायचूर लोहमार्गावर म्हैसूर राज्यातील गुलबर्गा जिल्ह्यात गाणगापूर हे गाव आहे. स्टेशनपासून चौदा मैलांवर भीमा-अमरजेच्या संगमस्थानी हे क्षेत्र वसले आहे. श्रीगुरुचरित्रात गाणगापूरचा उल्लेख गाणगापूर, गाणगाभवन, गंधर्वभवन व गंधर्वपूर या नावांनी येतो. दत्तावतार श्रीनरसिंहसरस्वती वाडीहून इथे आले आणि सुमारे तेव्वीस वर्षे इथे राहिले. त्याच्या या प्रदीर्घ निवासामुळे या स्थानाला दत्तसंप्रदायात फार महत्त्व प्राप्त झाले. श्री. नरसिंहसरस्वती प्रथम संगमावरच राहत असत. नंतर ते गावात बांधलेल्या मठात राहू लागले. या मठातच सांप्रत त्यांच्या पादुका आहेत. येथील पादुकांना निर्गुण पादुका अशी संज्ञा आहे.

हा मठ किंवा निर्गुणपादुकामंदिर गावाच्या मध्यभागी आहे. मठाच्या पूर्वेला व पश्चिमेला दोन महाद्वारे आहेत. पश्चिम महाद्वार प्रशस्त असून त्यावर नगारखाना आहे. मठात सात ओवऱ्या असून त्यात सेवेकरी लोक अनुष्ठान करीत बसतात. मठातील पादुकांच्या गाभाऱ्याला द्वार नाही. चांदीने मढविलेल्या एका लहान झरोक्यातून भक्तांना पादुकांचे दर्शन घ्यावे लागते.



मठाचे पश्चिम महाद्वार

इथली नित्योपासना पहाटेपासून सुरू होते. येथील पादुका सुट्या व चल असून त्या चांदीच्या दोन संपुटात ठेवल्या आहेत. संपुटातून त्या बाहेर काढल्या जात नाहीत. संपुटाना झाकणे आहेत. पूजेच्या वेळी झाकणे काढून पादुकांना अष्टगंध आणि केशर याचा लेप देतात. बाकी सर्व पूजोपचार ताम्हनात सोडतात. या पादुकांना जलाचा अभिषेक करीत नाहीत. दर गुरुवारी रात्री पालखी निघते.

गावापासून एक मैल अंतरावर भीमा-अमरजा संगम आहे. संगमाजवळच भस्माचा डोंगर आहे ही कोण्या प्राचीन काळची यज्ञभूमी असावी व अनेक यज्ञांतली राख एकत्र टाकली गेल्या-

मुळे हा डोंगर निर्माण झाला असावा. भाविक लोक इथले भस्म घरी घेऊन जातात व स्नान केल्यावर अंगाला लावतात. येथील संगमेश्वराच्या देवालयापुढे श्रीनरसिंहसरस्वतीची तपोभूमी आहे.

गाणगापूरच्या परिसरात आणि संगमापासून गावापर्यंत आठ तीर्थे आहेत. या अष्टतीर्थातील स्नानाचे पुण्य त्रिस्थळी यात्रेच्या पुण्याइतके मानलेले आहे. ही तीर्थे पुढीलप्रमाणे–

(१) **षट्कुल तीर्थ–** हे प्रत्यक्ष संगमातच आहे. या तीर्थाची निर्मिती अमरजेच्या अमृतमय स्वरूपात आहे.

निर्गुण पादुका – गाणगापूर

(२) **नरसिंह (मनोहर) तीर्थ** – हे संगमावरील मंदिरासमोरच्या भागात आहे. यात स्नान करून श्रीसंगमेश्वराची पूजा केल्यास श्रीशैलमल्लिकार्जुनाच्या पूजेचे फल प्राप्त होते, असे सागितले आहे.

(३) **भागीरथी (वाराणसी) तीर्थ–** हे संगमापासून गावाकडे येणाऱ्या रस्त्यावर मध्यभागी भीमेला मिळणाऱ्या एका लहानशा प्रवाहात आहे.



संगमावरील श्रीगुरुमंदिर – गाणगापूर

(४) **पापविनाशी तीर्थ–** श्रीनरसिंहसरस्वतीच्या आदेशानुसार या तीर्थात त्रिरात्र स्नान केल्यामुळे त्याची बहीण रत्नाबाई हिचा कुष्ठरोग नाहीसा झाला, अशी कथा गुरुचरित्रात वर्णिली आहे (४८. ८३–८५).

बेदरच्या बादशहाचा स्फोटक बरा होणे, शुष्क काष्ठाला पल्लव फुटणे, नरहरीचे कुष्ठ जाणे, इ. गुरुचरित्रात वर्णिलेल्या अनेक घटना गाणगापुरीच घडलेल्या आहेत.

(५) **कोटितीर्थ–** या तीर्थात स्नान करून दान केल्यास त्याचे कोटिगुणित पुण्य प्राप्त होते, अशी समजूत आहे.

(६) **रुद्रपादतीर्थ–** या तीर्थातील स्नान गयास्नानाच्या योग्यतेचे मानतात. इथे विष्णुपद असून, गयेप्रमाणेच क्षौरश्राद्धादी विधी करतात.

(७) **चक्रतीर्थ–** हे तीर्थ गावाजवळ असून याच्या सनिध केशवदेवाचे स्थान आहे. या तीर्थात स्नान केल्यास द्वारकायात्रेचे पुण्य मिळते, असे समजतात.

(८) **मन्मथतीर्थ–** गावाच्या पूर्वेला थोड्याच अंतरावर असलेल्या कल्लेश्वराच्या मंदिरासमोर हे तीर्थ आहे.

गाणगापूरच्या उत्सव-समारभात दत्तजयंती आणि श्रीनरसिंहसरस्वतीची पुण्यतिथी हे दोन उत्सव विशेष महत्त्वाचे आहेत.

आधिव्याधींनी ग्रस्त झालेले अनेक जीव दुःखमुक्तीसाठी इथे येऊन राहतात व गुरुचरित्राची पारायणे करून भिक्षेवर जगतात. या श्रद्धेचा उगम गुरुचरित्रातील चमत्कारकथांमध्ये आहे. मठात मध्याह्नकाली महानैवेद्य झाल्यानंतर इथले सर्व सेवेकरी मधुकरीसाठी बाहेर पडतात. त्यांना मधुकरी मिळावी म्हणून अनेक सधन दत्तभक्तांनी क्षेत्रात द्रव्यद्वारा तशी सोय करून ठेवली आहे. इथे येणाऱ्या प्रत्येक यात्रेकरूने दत्तव्रत म्हणून पाच घरी तरी मधुकरी मागितलीच पाहिजे, असा संकेत आहे. भाविक भक्त तो संकेत पाळतात. [श्री क्षेत्र गाणगापूर– रा. चिं. ढेरे]

## गाणपत्य संप्रदाय

गणपती हा सर्व हिंदूंना पूज्य असला व अनेकांच्या घरी त्याची नित्य वा नैमित्तिक पूजा-अर्चा होत असली तरी तोच ज्यांचा मुख्य उपास्य देव आहे, असे काही पंथ भारतात निर्माण झाले. त्यांना गाणपत्य पंथ किंवा संप्रदाय म्हणतात. रुद्राचे मरुदादी असंख्य गण प्रसिद्ध आहेत. त्या गणांच्या नायकाला विनायक किंवा गणपती असे म्हणतात. महाभारताच्या अनुशासनपर्वात (अ. १५१) गणपतीविषयी पुढील वर्णन आले आहे—

तो स्तुतीने प्रसन्न होतो व पातके आणि संकटे यापासून भक्तांचे रक्षण करतो. तो परात्पर ब्रह्माचा अवतार आहे. त्याला महागणाधिपती असे म्हणतात.

याज्ञवल्क्यस्मृतीच्या पहिल्या अध्यायात गणपतीचे याहून विशेष वर्णन दिले आहे, ते असे —

ब्रह्मा व रुद्र यांनी विनायकाला गणाधिप बनवले. सृष्टीच्या प्रारंभी क्रियेबरोबरच प्रतिक्रिया उत्पन्न करण्यासाठी, तसेच प्रवृत्तिमार्गात विशेष उत्तेजना व प्रेरणा निर्माण करण्यासाठी मरुदादी गणांची निर्मिती झाली व त्यांच्यावर स्वामित्व करण्यासाठी परब्रह्मरूप महागणाधिपतीने विनायक नामक अवतार धारण केला. हा विनायक आपल्या गणासह सर्वत्र विघ्नाची उत्पत्ती करीत चालला. त्यामुळे ती विघ्ने दूर व्हावी म्हणून लोकांना गणपतीचे ध्यान, पूजन व स्मरण करण्याची आवश्यकता निर्माण झाली. विनायकाने विघ्न न करता आरब्ध कार्य सिद्धीस न्यावे, म्हणून लोक त्याला भजू-पुजू लागले.

**गाणपत्य तत्त्व** — गणपती हाच साक्षात परमात्मा असून त्यानेच सकल ब्रह्मांड निर्मिले. त्याच्यापासूनच सकल देवही निर्माण झाले. तो अजर, अमर, निर्गुण, निराकार व अनाद्यनन्त असा देवाधिदेव आहे, असे गाणपत्य तत्त्व आहे. गणपतीची उपासना दोन प्रकारे करावी असे सांगितले आहे. गणपती हा परमात्मा मानून त्याचे ध्यान करणे, हा पहिला प्रकार व त्याच्या मूर्तीची पूजा करणे, हा दुसरा प्रकार. गणपती हा शिवपुत्र असला, तरी शिवाने त्याला प्रसन्न करून घेण्यासाठी दहा वर्षे तपश्चर्या केली व आपल्या हातून त्रिपुरासुराचा वध व्हावा, असा वर मागून घेतला (ब्रह्म वै. गणेशखड). राधेनेही गणपतीची उपासना केल्याचे ब्रह्मवैवर्त पुराणात सांगितले आहे.

**सांप्रदायिक ग्रंथ** — गणपतितापनीय उपनिषद, गणपत्युपनिषद, गणेशसंहिता, गणेश पुराण, मुद्गल पुराण, ब्रह्मवैवर्त पुराणाचा गणेशखंड, गणपतिकल्प, गणपतिकवच, गणपति पंचरत्न, पंचावरणस्तोत्र, पुरश्चरणविधी, मंत्रविधान, रत्नप्रदीप, गणपतिरहस्य, वेदपादस्तोत्र, गणपतिसहस्रनाम, गणपतिसूक्त, स्तवराज, गणेशमाहात्म्य, इ. ग्रंथ हे गाणपत्याचे सांप्रदायिक ग्रंथ आहेत.

**संप्रदायाचा उदय** — गणपतिदेवतेचे प्राचीनत्व सिद्ध असले, तरी गाणपत्य पंथाचा उदय मात्र पाचव्या शतकानंतर व नवव्या शतकाच्या पूर्वी केव्हा तरी झाला असला पाहिजे, असे डॉ. भांडारकर यांचे मत आहे. या काळात रचलेल्या याज्ञवल्क्यस्मृतीत व भवभूतीच्या मालती-माधवात गणेशाचे प्राधान्येकरून स्तवन आहे. ८ व्या व ९ व्या शतकांतल्या शिलालेखांतच गणेशाचे व गाणपत्यांचे उल्लेख आढळतात. गणेशोपासनेचे सर्व ग्रंथ याच कालात निर्माण झाले, असे म्हणायला हरकत नाही.

**सहा संप्रदाय** — आनंदतीर्थयतीने लिहिलेल्या शांकरदिग्विजय या ग्रंथात पुढील सहा गाणपत्य संप्रदायांचा निर्देश झालेला आहे—

(१) महागणाधिपती या देवतेची उपासना करणारा. या पंथाचे लोक गणपतीला अनाद्यनन्त मानून त्याची उपासना करतात.

(२) हरिद्रागणपतीची उपासना करणारा. या पंथाचे लोक गणपतीला परब्रह्म मानून त्याची उपासना करतात व ऋग्वेदाच्या दुसऱ्या मंडलातले २३ वे सूक्त प्रमाण मानतात.

(३) उच्छिष्ट गणपतीची उपासना करणारा. या पंथाचे लोक गणपतीची हेरब या नावाने पूजा करतात. यांचा गणपती डाव्या सोंडेचा असतो. हे गणपतीची पूजाही डाव्या हातानेच करतात. देवीला गणपतीची शक्ती मानतात. हे जातिभेद आणि विवाहबंधनही मानीत नाहीत. हा एक गुप्त पंथ होता व त्यात स्त्री-पुरुषांमधले लैंगिक व्यवहार स्वैरपणे चालत. शांकरदिग्विजयात यांना वाममार्गी म्हटले आहे. या पंथाचे उपासक तोंडात तोबरा भरून मंत्र म्हणत. म्हणून त्यांच्या देवाला उच्छिष्टगणपती हे नाव पडले, असे सांगतात.

(४–६) नवनीत–स्वर्ण–सतान गणपतीचे उपासक. हे स्वत.ला श्रुतिमार्गी म्हणवतात व संपूर्ण विश्व हीच गणेशाची मूर्ती मानतात.

सांप्रत हे पंथ इतर शैव-वैष्णव पंथाप्रमाणे प्रचारात राहिलेले नाहीत. कुठे असले तरी ते मर्यादित स्वरूपातच आढळतात.

गणपत्युपासनेचे माहात्म्य विशेषतः द. भारतात आढळून येते. तो मूळचा द्रविड लोकांचाच देव असावा, असेही एक मत आहे. केरळात गणपतीची पुष्कळ मंदिरे असून त्यांना होमपुरे म्हणतात. तिथे गणपतीनिमित्त नित्य होम केला जातो. महाराष्ट्रात अष्टविनायक या नावाने आठ गणेशक्षेत्रे प्रसिद्ध आहेत. याशिवाय महाराष्ट्रातील शहराशहरातून गणेशमंदिरे आढळतात ती वेगळीच. यादवकालीन नगररचनेत नगरातल्या प्रत्येक चवाठ्यावर गणपती बसवला जात असे, असे ज्ञानेश्वरीतल्या ‘ चतुष्पथीचे गणेश ’ या उल्लेखावरून कळून येते. आंबेजोगाई येथील यादव सेनापती खोलेश्वर याच्या एका शिलालेखात चतुष्पथीच्या गणेशमंदिरांचे पुढीलप्रमाणे वर्णन आहे—

**यत्र भाति नभोबिम्बचुम्बि लम्बोदरालयम् ।**
**चतुष्पथे पथश्रान्तैः सार्थैरनिशमाश्रितम् ।।**

अर्थ — इथे गणेशाचे गगनचुंबी असे मंदिर नगराच्या चौकात शोभत आहे. वाटचालीच्या श्रमाने थकलेले पथिकांचे तांडे त्या मंदिरात नेहमी विश्रांती घेतात.

**प्रमुख गाणपत्य** — गृत्समद, मेधातिथी, भृशुंडी, वरेण्य, इ. महान गाणपत्य भारतात होऊन गेले. मोरया गोसावी, जनी

जनार्दन, राघवचैतन्य, मध्वमुनीश्वर, यदुमाणिक, गोसावी नदन, निरंजनस्वामी, निरंजनदास, बल्लाळ, शंकरदास, इ. कित्येक गणेशोपासक सत्पुरुष महाराष्ट्रात होऊन गेले. यापैकी कित्येकांनी मराठी भाषेत गणपतिविषयक विपुल वाङमय निर्माण केले. खास गाणपत्यांनी रचलेल्या गणेशभक्तिपर वाङ्मयाशिवाय अन्य परंपरांतील संतांनी व कवीनीही गणेशविषयक वाङमय रचले आहे.

छत्रपती शिवाजीमहाराज यांची कुलदेवता भवानी ही असली, तरी ते गणपतीचेही भक्त होते. ही गणेशभक्ती त्यांनी आपल्या वडिलांपासून स्वीकारली असावी, असे दिसते. शिवाजीमहाराज चतुर्थीचा उपवास करीत. पुणे जिल्ह्यातल्या आंबवडे या गावी असलेला गणपती शिवाजीमहाराजांनीच स्थापला आहे. त्यांनी मोरया गोसाव्यांचा वंशज नारायण गोसावी यांजकडून गाणपत्यानुग्रह घेतला सावा, असेही म्हणतात (भूतावर भ्रमण).

पेशवे हेही मोठे गणेशभक्त होते. गणपती हा त्याचा कुलस्वामीच होता· नानासाहेब पेशवे यांनी शनिवारातल्या आपल्या वाड्यात गणपतिपूजेचा व उत्सवाचा प्रघात पाडला. शनिवारवाड्यातील हा उत्सव भाद्र. शु. १ देपासून १० मी पर्यंत चाले. [ हिंदुत्व; म. ज्ञा. को.; वि. ज. स्मृ. ग्रं. ]

## गातु आत्रेय

एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या ५ व्या मंडलातले ३२ वे सूक्त याच्या नावावर आहे. या सूक्तात त्याने अहीला मारणाऱ्या इंद्राच्या पराक्रमाचे वर्णन केले आहे.

अही हा एक मातबर दानव होता. तो यज्ञाचे हविरन्न खाऊन तुंद झाला होता. त्याने सर्वत्र धुके पसरून दिले होते. तो गडद अंधारात दबा धरून बसला होता. तो सज्जनांना शिवीगाळ करीत होता. त्याला आपल्या सामर्थ्याची विलक्षण घमेंड होती. पण अशा त्या अहीचे मर्मस्थान अचूक हुडकून काढून इंद्राने त्याला ठार केले.

अही ठार होताच काय काय चमत्कार घडून आले, ते गातूने पुढील ऋचेत सांगितले आहे—

**अदर्दरुत्समसृजो वि खानि**
**त्वमर्णवान् बद्बधानाँ अरम्णाः ।**
**महान्तमिन्द्र पर्वतं वि यद् वः**
**सृजो वि धारा अव दानवं हन् ॥**

(ऋ. ५.३२.१)

अर्थ – हे इंद्रा तू (ज्ञानामृताचा) बुजलेला झरा त्याचे झाकण फोडून खुला केलास. उदकांचे प्रवाह मोकळे सोडलेस. कोंडून गेलेला (आणि त्यामुळे प्रक्षुब्ध झालेला) समुद्र तू मर्यादेच्या आत ठेवलास. तसेच प्रचंड पर्वतप्राय मेघ दुभंगून त्यातून मुसळधार पर्जन्यवृष्टी केलीस. (आणि) हे सर्व चमत्कार त्या दुष्ट दानवाचा (अही) नि:पात केलास, त्याच वेळी केलेस.

## गात्र्य हरिद्रा

बंगाली लोकांच्या लग्नातला एक सोहळा. वराला मंगलस्नान घालतात व त्या वेळी पाच सुवासिनी त्याच्या अंगाला हळद लावून त्यापैकी जी शिल्लक राहील ती वधूकडे पाठवतात. त्याच वेळी साड्या, गाद्या, उश्या, मासे, मिठाई, इ. वस्तूही वधूला पाठवण्याची प्रथा आहे. [ ल. वि. सो. ]

## गाथा

गै=गाणे, या धातूवरून हा शब्द निष्पन्न झाला आहे. 'गीयते इति गाथा' = जी गायिली जाते ती गाथा होय, अशी त्या शब्दाची व्युत्पत्ती आहे. वैदिक साहित्यातला हा एक महत्त्वपूर्ण शब्द आहे. ऋग्वेदात तो पुढील ठिकाणी येतो—

**प्रकृतान्यृजीषिणः कण्वा इन्द्रस्य गाथया ।**
**मदे सोमस्य वोचत ॥**

(ऋ. ८.३२.१)

अर्थ– हे कण्वकुलोत्पन्न पुरुषांनो ! धुमश्चक्री उडवून देणारा जो इंद्र, त्याने सोमरसाच्या आवेशात केलेल्या पराक्रमाच्या तुम्ही गाथा गा.

**तं गाथया पुराण्या पुनानमभ्यनूषत ।**

(ऋ. ९.९९.४)

अर्थ– पुरातन गाथेच्या योगाने या भक्तपावन सोमाची महती ऋत्विजांनी गायिली.

गाथपती, ऋजुगाथ, गाथिन् असे शब्द गाथा या शब्दावरून बनले आहेत. रुद्राला गाथाचा पती अर्थात नायक म्हटले आहे. ऋजुगाथ शब्द शुद्ध रूपाने मंत्रांचे गायन करणाऱ्या पुरुषाला लावलेला आहे. गाथिन हा शब्द केवळ गायक याच्यासाठी योजलेला आढळतो. वैदिक काळात यज्ञप्रसंगी गाथा गाण्याची प्रथा होती. या गाथा गाणाऱ्यांना गाथिन असे म्हणत.

**इन्द्रमिद् गाथिनो बृहदिन्द्र मर्केभिरर्किणः ।**

(ऋ. १.७.१)

अर्थ– गाथा गाणाऱ्या ऋषींनी अनेक गाथांनी इंद्राचीच स्तुती केली. अर्कपाठकांनीही इंद्राचेच अर्चन केले.

ऋग्वेदात विश्वामित्राला गाथिन म्हटले आहे (३.१९.२२). गाथेला गातु असेही म्हटले आहे. गातु शब्दाचा अर्थ गीत किंवा कविता असा होतो. ऐतरेय ब्राह्मणात ऋचा ही दैवी

आणि गाथा ही मानुषी असते, असे म्हटले आहे (७.१८). गाथा या छंदोबद्ध असतात, असेही ऐतरेय ब्राह्मण म्हणते. ऋग्वेदात नाराशंसी व रैभी या पद्यसमूहाशी गाथेची सांगड घातलेली आहे–

**रैभ्याऽऽसीदनुदेयी नाराशंसी न्योचनी ।**
**सूर्याया भद्रविद्वासो गाथयैति परिष्कृतम् ।।**

(ऋ. १०.८५.६)

अर्थ– रैभ्या ही जिची पाठराखीण झाली व नाराशंसी जिची सेविका झाली, अशा त्या सूर्यकन्येचे मंगलवस्त्र गाथेनेच अलंकृत केले.

नाराशसी ( नराणा शंसनार्था = मनुष्यांची प्रशंसा करणारी ) गाथा म्हणजे दानस्तुती होय, असे शौनक म्हणतो व तो अर्थ सर्वमान्य झालेला आहे. तैत्तिरीय ब्राह्मणात 'कोण्या उदार पुरुषाचे स्तुतिस्तोत्र ' असे नाराशंसी गाथेबद्दल म्हटले आहे ( १.३.२.६ ). अथर्ववेदात गाथा व नाराशंसी ही नावे इतिहासपुराणांसह घेतलेली आहेत.

**इतिहासस्य च वै स पुराणस्य च गाथानां च नाराशंसीनां च ।**
**प्रियं धाम भवति य एवं वेद ।**

(अथर्व. १५.६.१२)

अर्थ– जो अशा प्रकारे जाणतो, तो इतिहास, पुराण, गाथा व नाराशंसी यांचे प्रिय असे स्थान होतो.

**यद् ब्रह्मणः शमलमासीत् । सा गाथा नाराशंस्यभवत् ।**

(तै. ब्रा. १.३.२.६)

अर्थ– ब्रह्म म्हणजे यंत्र. त्याचा मळ किंवा गाळ म्हणजे नाराशंसी गाथा होय.

यज्ञप्रसंगी ज्या गाथा गायिल्या जात, त्यांना यज्ञगाथा असे म्हणत. ऐतरेय ब्राह्मणात यज्ञकर्त्या भरताविषयी पुढील गाथा दिलेल्या आहेत—

**हिरण्येन परीवृतान् कृष्णान् शुक्लदतो मृगान्**
**मष्णारे भरतोऽददाच्छतं बद्वानि सप्त च ।**
**भरतस्यैष दौष्यन्तेरग्निः साची गुणे चितः**
**यस्मिन् सहस्रं ब्राह्मणा बद्वशो गा विभेजिरे ।।**

(ऐ. ब्रा. २.३९.९.१–२)

अर्थ–भरताने मष्णार नामक देशात सुवर्णाभरणयुक्त, कृष्ण-वर्ण व शुभ्रदंत अशी एकशेसात हत्तीची बद्वे ( शतकोटी ) ऋत्विजांना दान दिली. दुष्यंतपुत्र भरताने साचीगुण नामक देशात अग्निचयन केले. त्या अग्निचयनात सहस्र ब्राह्मण प्रत्येकी शतकोटी संख्येने गायीचा विभाग करते झाले ( प्रत्येक ब्राह्मणाला वरील सख्येने गायी मिळाल्या).

यज्ञात भरघोस दान देणारे व विशिष्ट पुरोहितांच्या द्वारे अभिषेक केले गेलेले अशा प्रसिद्ध राजांच्या स्तुतिपर अनेक प्राचीन गाथा ऐतरेय ब्राह्मणात उद्धृत केल्या आहेत –

**न मा मर्त्यः कश्चन दातुमर्हति**
**विश्वकर्मन्भौवन मां दिदासिथ ।**
**निमङ्क्ष्येऽहं सलिलस्य मध्ये**
**मोघस्त एष कश्यपायाऽऽस सङ्गरः ।**

(ऐ. ब्रा. २.३९.८०)

अर्थ– ( भूमी भौवन नामक राजाला म्हणते ) हे विश्व-कर्म्या भौवना, मनुष्य माझे दान करू शकत नाही. असे असता तू माझे ( कश्यपाला ) दान करू इच्छितोस. तसे केल्यास मी पाण्यात (समुद्रात) बुडून जाईन. मग तुझा आचार्य जो कश्यप त्याचा हा भूमिप्रतिग्रहाचा प्रयत्न व्यर्थच ठरणार आहे.

दुसरी गाथा मरुत्त या राजाविषयी आहे–

**मरुतः परिवेष्टारो मरुत्तस्यावसन्गृहे ।**
**आविक्षितस्य कामप्रेर्विश्वेदेवाः सभासदः ।।**

अर्थ – मरुत्त राजाच्या घरी मरुत् संज्ञक देव (जेवणाच्या पंक्तीत) वाढपी होते. अविक्षितपुत्र व सर्व कामना पूर्ण कर-णारा जो मरुत्त त्यांच्या घरी सर्व देव सभेत बसून त्याची सेवा करीत.

गाथांमध्ये पुष्कळदा मनोहर कथाप्रसंग गुंफलेले असतात. याचे नमुनेदार उदाहरण म्हणजे ऐतरेय ब्राह्मणातले शुन.शेपाचे आख्यान होय.

शुनःशेप हा अजीगर्ताचा मधला मुलगा होता. हरिश्चंद्र राजाला मुलगा होत नव्हता. म्हणून त्याने वरुणाला नवस केला, की ' मला मुलगा झाल्यास मी तो तुला बळी देईन. ' हरिश्चंद्राला त्या नवसाने मुलगा झाला. त्याने आपल्या मुलाचे नाव रोहित ठेवले. पण नवस फेडण्याची गोष्ट तो लांबणीवर टाकू लागला. रोहिताला जेव्हा ही नवसाची गोष्ट समजली, तेव्हा तो भयाने घरातून पळून गेला. पुढे हरिश्चद्राला उदररोगाने ग्रासले. रोहिताला हे समजले. त्याने विचार केला, की आपल्याऐवजी दुसरा कोणी माणूस बळी देऊन वरुणाचा नवस फेडावा व आपल्या पित्याला रोगमुक्त करावे. म्हणून त्याने शुनःशेपाला अजीगर्ताकडून विकत घेतले. त्याला बळी देण्यासाठी यज्ञ-स्तंभाला बांधले असता विश्वामित्राने त्याला वाचवले व आपला पुत्र मानले.

वरील कथाभाग सांगत असाताना ऐतरेय ब्राह्मणात ज्या गाथा आल्या आहेत, त्यातली एक गाथा अशी–

**आस्ते भग आसीनस्योर्ध्वस्तिष्ठति तिष्ठतः ।**
**शेते निपद्यमानस्य चराति चरतो भगः ।।**

(ऐ. ब्रा. २.३३.३.३)

अर्थ – जो बसून राहिला त्याचे भाग्य बसून राहते. जो उभा राहिला त्याचे भाग्य उभे राहते (पण वाढत नाही). जो झोपून राहिला त्याचे भाग्यही झोपते. आणि जो (अर्थार्जनासाठी) फिरत राहिला त्याचे भाग्य फिरते. (दिवसा-दिवसाला वाढते).

वेदात ‘ गातुविद ’ = गाथा जाणणारे असा शब्दप्रयोग येतो. त्यावरून गाथा रचणे, गाथाचा संग्रह करणे आणि विशिष्ट प्रसंगी वीणेच्या साथीवार त्या गाऊन समारंभ साजरा करणे, या व्यवसायाची कित्येक घराणी वेदकाली असावी, असे दिसते. वैदिक साहित्यात उपलब्ध होणाऱ्या गाथांची भाषा मंत्रांच्या भाषेहून भिन्न असते. वैदिक व्याकरणाहून त्याचे व्याकरण ही भिन्न असते. वेदमंत्राहून गाथांची भाषाही सुबोध असते.

पुत्रजन्म, उपनयन, विवाह, इ. मंगल प्रसंगी गाथागायनाची प्रथा भारतात पुरातन कालापासून चालत आलेली आहे. रामकृष्णांच्या जन्मप्रसंगी स्त्रियाकडून गाथा गायिल्या गेल्याचा उल्लेख रामायण व भागवत यांमध्ये आहे. विवाहप्रसंगी गायिल्या जाणाऱ्या गाथांचा उल्लेख मैत्रायणी संहितेत आढळतो (३. ७.३). आजही ज्या जातीत लग्नाचे मंत्र नाहीत, त्या जातीत विवाहातले सर्व विधी गाथांच्या (लग्नगीते) आधारेच साजरे केले जातात. या मांगलिक गाथा वीणेच्या साथीवर गायिल्या जात होत्या, असेही उल्लेख मिळतात.

बौद्ध व जैन वाङ्मयातही गाथांचा आढळ होतो. बौद्ध गाथा पाली भाषेत व जैन गाथा अर्धमागधीत आहेत. बुद्ध व महावीर यांच्या उपदेशाचा निष्कर्ष सांगणाऱ्या पद्यांना त्यानी गाथा म्हटले आहे. धम्मपद हा उपदेशात्मक गाथाचाच संग्रह आहे. जातककथा गद्यमय असते, पण तिचे तात्पर्य सांगणारी एक गाथा प्रायः प्रत्येक कथेच्या शेवटी आढळते. जैन प्राकृत वाङ्मयातही असेच आहे. संस्कृतातल्या आर्येप्रमाणे पाली व प्राकृत या भाषांत गाथा हा एक विशिष्ट छंद समजला जातो. जैन-बौद्धांनी गाथेसाठी अनुष्टुभ छंदाचाच स्वीकार केला आहे. थेरगाथा व थेरीगाथा यांत संसारातल्या भोग-विलासांचा परित्याग करून सन्यस्त वृत्तीने आयुष्य घालविणाऱ्या थेर व थेरी यांच्या अनुभवाचे सार ग्रथित झालेले आहे.

कविप्रणीत गाथांचा संग्रह म्हणजे हालाची सप्तशती हा होय. हा ग्रंथ प्राकृत भाषेत असून सरसमनोज्ञ आहे.

पुढे गाथेचा प्रकार मागे पडला आणि प्रांतपरत्वे याचे ओवी, चौपाई, दोहा, साखी इ. अनेक पद्यप्रकारांत रूपांतर झाले. **पाहा–** गाथासप्तशती, धम्मपद, थेरीगाथा. [ लो. सा. रू.; हिं. सा. को.; हिं. वि. को. ].

**गाथासप्तशती** महाराष्ट्री प्राकृतातील निवडक अशा सातशे पद्यात्मक सूक्तींचा संग्रह. या सूक्ती पद्यमय असून त्याना गाथा असे सामान्य अभिधान आहे. गाथांची ही सात शतके सोयीसाठी विभागली गेलेली दिसत असली तरी त्यामागे श्लोकांचे विषयानुसार वर्गीकरण अभिप्रेत असावे असे अंतर्गत पुराव्यावरून वाटते.

हा ग्रंथ हालाच्या नावावर मोडत असला, तरी त्यातल्या गाथा भिन्न काळी भिन्न कवींनी रचलेल्या असल्या पाहिजेत. हालाखेरीज इतरही अनेक कवींची नावे निरनिराळ्या गाथांशी संबद्ध असून टीकाकारानी ती नावे दिली आहेत. मात्र त्या नावात एकवाक्यता नाही. या कवि-कवयित्रींची एकूण संख्या ११२ पेक्षा अधिक भरते.

ग्रथकार हाल याच्याविषयीची प्रत्यक्ष माहिती या संग्रहात नाही. तो कविजनाचा चाहता असून, या सूक्तिसंकलनाची कामगिरी त्याने स्वतः केली, एवढाच उल्लेख खुद्द सप्तशतीत आढळतो. हाल हा सातवाहन कुलातला राजा होता व त्यानेच या ग्रंथाचे संपादन केले, असे वाङ्मयीन परंपराही सांगते.

याचे मूळचे नाव गाथाकोश असे होते. सप्तशती हे नाव इ. स. च्या नवव्या (काहींच्या मते १३ व्या) शतकानंतर रूढ झाले असावे. या संग्रहावर संस्कृतात तेरा टीका लिहिल्या गेल्या असून त्यातील बऱ्याच उपलब्ध आहेत.

वेबरच्या मते गाथासप्तशती इ. स. च्या तिसऱ्या शतकात रचली गेली. हालाची राजवटही काही विद्वानांच्या मते इ. स. च्या २ ऱ्या शतकात होऊन गेली.

महाराष्ट्री प्राकृतात जे काव्यवाङ्मय आज उपलब्ध आहे, त्यात प्रस्तुत गाथाकोशाचे स्थान अनन्यसाधारण आहे. एक तर हा पहिला प्राचीन काव्यसंग्रह आहे आणि दुसरे म्हणजे पुढील कालातील काव्यगत कृत्रिमता त्यात अजिबात आढळत नाही.

गाथासप्तशती ही ललितमधुर सौंदर्याने नटलेली असून तिची गोडी अवीट आहे. तिच्यात प्रतिभेचे नवनवोन्मेष, निसर्गाचे वास्तव चित्रण व रुचिर भावदर्शन या गोष्टी विपुल प्रमाणात आढळतात. जीवनाची करुण, दारुण व हृद्य अशी सर्व अंगे सारख्याच कुशलतेने गाथासप्तशतीत रेखाटलेली आहेत. मानवी जीवनात व व्यवहारात आढळणारी शाश्वत मूल्ये इथे भावनात्मक भूमिकेवर अधिष्ठित झालेली आहेत.

निसर्गाप्रमाणे मानवी कृतीची व पशुपक्ष्यांच्या जीवनाचीही लोभसवाणी चित्रे सप्तशतीत भरपूर आढळतात. ही वर्णने ठरीव वा सांकेतिक नसून, त्यांचा घाट व थाट सर्वस्वी नवीन आहे. उदा० स्वत.च्या धाग्याला लोंबकळणाऱ्या या कोळ्याचे वर्णन पाहा –

**उअह पडलंतरोइण्ण-णिअअ-तंतुद्ध-पाअ-पडिलग्गं।**
**दुल्लक्ख-सुत्त-गुत्थेक्क-बउल-कुसुमं व मक्कडव्वं ।**
(१.६३)

अर्थ– पटईवरून उतरून, पाय वर करून स्वतःच्या धाग्याला लोंबकळणारा हा कोळी सहजासहजी न दिसणाऱ्या दोऱ्यात ओवलेल्या एखाद्या बकुळीच्या फुलासारखा दिसत आहे.

जुन्या देवळाच्या भग्न कळसावर घुमणाऱ्या पारव्याचा ध्वनी म्हणजे सुळी दिलेल्या माणसाचे जणू आक्रंदनच, अशी कल्पना पुढील गाथेत मांडली आहे–

**उवरि-दर-दिट्ठ-थण्णुअ-णिलुक्क-पारावआण विरुएहिं ।**
**नित्थणइ जाअ–वेअणँ सूलाहिण्णं व देवउलं ।**
(१.६४)

अर्थ – (कळस कोसळल्यामुळे) वरच्या बाजूस किंचित उघड्या पडलेल्या (लोखंडी) मेखेवर बसलेले पारवे घुमत आहेत. त्यामुळे, त्यांच्या रूपाने हे देऊळ सुळी दिलेल्या माणसा-प्रमाणे व्यथित होऊन आक्रंदन करीत आहे, असे वाटते.

खेळकर विनोद हे या गाथासंग्रहाचे आणखी एक वैशिष्टय होय. एक सुंदरी फुंकर घालून विस्तव पेटवीत होती; पण तो काही केल्या पेटेना. तेव्हा कवी तिला म्हणतो–

**रंधण-कम्म-णिउणिए, मा जूरसु रत्त-पाडल-सुअंधं ।**
**मुह-मारुअं पिअंतो धुमाइ सिहो न पज्जलइ ।।**
(१.१४)

अर्थ – सुग्रणी, तू खंत करू नकोस. लालबुंद पाटल फुलाचा सुगंध असलेला तुझा मुखवायू पीत असताना हा अग्नी धुमसणारच; तो पेट घेणार नाही.

रागावलेली प्रेयसी अनुनय करणाऱ्या पतीला, पाठमोरी होऊन, शय्येवर पहुडलेल्या स्थितीत विचारते–

**उण्हाइँ नीससंतो कीस मएँ परंमुहीएँ सअणद्धे ।**
**हिअअं पलीविअ वि अणुसएण पुट्ठिं पलीवेसि ।।**
(१.३३)

अर्थ– आधी तू माझे हृदय पेटवून दिलेस; आणि आता मी अर्ध्या शय्येवर तोंड फिरवून पहुडले असता पश्चात्तापाने कढत झालेले सुस्कारे सोडून माझी पाठही का बरे भाजून काढीत आहेस ?

गाथासप्तशतीत संसारी व पतिव्रता गृहिणींचा खेळकर, प्रेमळ व आनंदी स्वभाव जागोजाग व्यक्त झालेला आहे. अशा बहुसख्य गाथांवरून तत्कालीन गृहजीवनाची समृद्धता उत्तम रीतीने प्रत्ययाला येते.

या ग्रंथात करुण रसाचा आविष्कार विरहिणींच्या व खंडिता नायिकांच्या संदर्भात झालेला दिसतो.

प्रेमात विजयी होऊन पतीवर सत्ता गाजविणाऱ्या स्वाधीन-पतिकांचा मानी स्वभाव चित्रित करणे, हा गाथासप्तशतीचा आणखी एक विशेष आहे. पती मुठीत असलेली व्याधस्त्री केवळ एका मोरपिसाच्या भूषणाच्या जोरावर इतर अलंकृत सवतींना तुच्छ लेखते, असे तिथे दाखवले आहे (२.७३)

प्रणयचित्रण व निसर्गरेखन याखेरीज नीती व व्यवहार यांविषयीही अनेक सुभाषिते सप्तशतीत इतस्ततः विखुरलेली आहेत. सज्जनप्रशंसा, दुर्जननिंदा, भरघोस पीक पाहून चांदण्यात स्वच्छंद गाणारा शेतकरी, मृतपत्नीसाठी विलाप करणारा हलिकपुत्र, पशुपक्ष्यांचे निरुपाधिक जीवन, त्यांचा निरागस प्रणय, यौवनात पदार्पण केलेल्या शेतकऱ्याच्या मुलीचे मुग्ध व वेधक सौंदर्य ही सर्व गाथासप्तशतीतली वर्णने मानवी भावना हेलावून सोडणारी आहेत. [ गाहासत्तसई – मंगरूळकर व हातवळणे ]

## गाथी

एक सूक्तद्रष्टा. याच्या नावावर ऋग्वेदाच्या तिसऱ्या मंडलातील १९ ते २२ ही सूक्ते आहेत. त्यांपैकी दोन सूक्तांत अग्नीची स्तुती केलेली आहे.

गाथी हा कुशिकाचा पुत्र व विश्वामित्राचा पिता होता, असे सर्वानुक्रमणीत सांगितले आहे. ऐतरेय ब्राह्मणात गाथीच्या 'दैववेदा' चा उल्लेख आहे. विश्वामित्राने शुनःशेपाला दत्तक घेतल्याने शुनःशेपाला त्या गाथीच्या दैववेदात भाग घेता आला. गाथांच्या अनुषंगाने गाथिन किंवा गातुविद हे शब्द येतात. त्यावरून वैदिक काळात गाथा गाणारी व गाथा जाणणारी अनेक घराणी असावीत असे अनुमान होते. [ वे. इं.; म. ज्ञा. को.; लो. सा. रू. ]

## गानबंधू

एक गायनाचार्य. वाराहकल्पाच्या पूर्वीच्या घोर-कल्पात याचा जन्म झाला. नारद याच्याकडेच गानविद्या शिकला. कालांतराने काही कारणाने गानबंधूला उलूकयोनी प्राप्त झाली. [ हिं. क. को. ]

## गाबीत

कोकणातील एक जात. हे मूळचे मराठे असून, शिवाजी महाराजांचे आरमार चालवीत असत. महाराजांच्या आरमारात तिर्कटी, तारू, गलबत, मचवा, पडाव, होडी, ग्राब, अशी निरनिराळी गलबते होती. ग्राब हे लढाऊ जहाज असून त्यावर तोफा असत. या ग्राबावर जे मराठे कोकणी लोक काम करीत, त्यांना ग्राबती असे म्हणू लागले. त्याचेच पुढे गाबीत, गाबती असे रूपांतर झाले. मराठी आरमाराचा नाश झाल्यावर हे लोक मासे मारून निर्वाह करू लागले.

याच्यात तांडेल, सातताडेल, पडताडेल, फडताडेल, मायनाक, नाईक, सारंग, मोठेसारंग, इ. हुद्देदर्शक आडनावे आहेत. यांच्यामध्ये गोत्रे, कुळे व देवकेही आहेत. हे लोक लग्नाच्या वेळी वराच्या डोक्यावर धारेच्या उलटचा बाजूने शस्त्र धरतात. लग्नानंतर वधू-वर कोणातरी इष्टमित्राच्या घरी पाहुणचारा-साठी जातात. तिथे रात्री वर आपली अगठी वधूला देतो. विवाहादी सर्व संस्कार ग्रामजोशी चालवतो.

महादेव व पार्वती ही याची कुलदैवते आहेत. याच्यापैकी काही वारकरी व काही रामदासी संप्रदायाचे अनुयायी आहेत.

पूर्वी गावोगावी याच्या पचायती होत्या. प्रमुख पंचायत मालवण येथे होती पंचायतीचा निर्णय न पाळल्यास त्या माण-साला बहिष्कृत करीत.

हे मृताना जाळतात किंवा पुरतात. मृत्युतिथीस श्राद्ध करतात. [ मु. इ. जा; म. ज्ञा. को. ]

## गामवक्कल

एक जात. याची वस्ती फक्त कर्नाटकात आढळते. याना गामगौडा असेही म्हणतात. हे शेती करतात. यांच्यांत चौदा बळी (देवके) असून समान बळीत लग्नसबंध होत नाहीत. व्यंकटरमण हा यांचा कुलदेव आहे. त्याशिवाय हे हनुमान, जतगा व म्हास्ती (महासती) या देवतांनाही भजतात. [ मु. इ. जा. ]

## गामिट

गुजरातेत आढळणारी एक जात. यांना गामडा असेही म्हणतात. हे लोक उपाध्येपण करतात. यांना मद्यमांस चालत नाही. वागदेव, सम्लदेव व देवली या देवतांना हे भजतात. मुलगा ताडाच्या झाडावर चढू लागला म्हणजे तो विवाहास योग्य झाला, असे समजतात. [ रज.कण ]

## गाय

भारतीय हिंदूना अत्यंत पवित्र वाटणारा एक चतुष्पाद प्राणी. गायीला पवित्र मानणे व अनेक धर्मकृत्यांत तिचा व तिच्या गोरसाचा समावेश करणे, हे हिंदुधर्माचे एक वैशिष्टच आहे. वैदिक काळापासून भारतात गायीचा महिमा गाजत आलेला आहे. ऋग्वेदात शबर ऋषीचे एक सूक्त आहे. त्यात तो म्हणतो–

**याः सरूपा विरूपा एकरूपा**
**यासामग्निरिष्टचा नामानि वेद ।**
**या अङ्गिरसस्तपसेह चक्रुस्ताभ्यः**
**पर्जन्य महि शर्म यच्छ ।।**

(ऋ. १०.१६९.२)

अर्थ – या धेनू समान रूपाच्या, विभिन्न रूपाच्या व एक रूपाच्या अशा आहेत. त्यांची नावे त्यांना योग्य अशा यज्ञावरूनच पडली आहेत. ही सर्व नावे अग्नीच जाणतो. आंगिरस ऋषींनी आपल्या तपश्चर्येच्या बळावर या गायींची उत्पत्ती व व्यवस्था केली. हे पर्जन्या ! अशा या धेनूंना तू सुख व कल्याण दे.



अंगोल गाय

ऋग्वेदात बार्हस्पत्य भारद्वाजाचे एक सूक्त आहे. या सूक्तात गायीविषयीचा प्रेमादर गौरवपूर्ण शब्दात वर्णिलेला आहे. त्या सूक्ताचा सारांश असा–

या पाहा गायी आल्या. त्या आता गोठ्यात बसून आनंद करोत. याना पुष्कळ वासरे होवोत. भगवद्भक्तजनांच्या विस्तीर्ण आणि भयरहित कुरणात त्या यथेच्छ फिरत असतात. इंद्र मला गोधन देवो. गायीचे दूध हा सोमाचा आवडता पदार्थ आहे.

**यूयं गावो मेदयथा कृशं चिदश्रीरं चित् कृणुथा सुप्रतीकम् ।**
**भद्रं गृहं कृणुथ भद्रवाचो बृहद् वो वय उच्यते सभासु ।।**
**प्रजावतीः सूयवसं रिशन्तीः शुद्धा अपः सुप्रपाणे पिबन्तीः ।**
**मा वः स्तेन ईशत माघशंसः परि वो हेती रुद्रस्य वृज्याः ।।**

(ऋ ६.२८.६–७)

अर्थ – धेनूनो, दुर्बल झालेल्या मनुष्याला तुम्ही पुष्ट करता. ज्याच्या मुखावर कळा नाही, त्याला तेजस्वी बनविता. तुमचा स्वर मंगलकारक आहे. तुम्ही आमचे घर मंगलमय करा. तुमच्या महान सामर्थ्याची वाखाणणी लोकसभेतसुद्धा होत असते. तुम्हाला पुष्कळ वासरे आहेत. तुम्ही कोवळे गवत खाता व पाणवठ्यावर निर्मल उदक पिता. चोराची मात्रा तुमच्यावर न चालो किंवा पातकाने प्रमत्त झालेल्या अन्य कोणाचीही न चालो. रुद्राचे शस्त्र तुम्हांला वगळून दुसरीकडेच वळो.

ऋग्वेदात अन्य ठिकाणीही गायीची प्रशंसा केली आहे. ती अमृताची नाभी आहे. देवांचे यजन करण्याचे ती एक मुख्य

साधन आहे. ती रुद्रांची माता, वसूची दुहिता व आदित्याची बहीण आहे (८·१०१·१५).

ऋग्वेदात उपमा व रूपक यांच्या द्वारे गायीचे अनेक वस्तूंशी सादृश्य दाखवले आहे. उदा०– उषेच्या किरणांना गायी म्हटले आहे. वर्षाव करणाऱ्या मेघालाही गाय मानून त्याच्यातल्या विद्युल्लतेला तिचे वासरू म्हटले आहे. अदिती ही वैदिकांची एक परमपूज्य देवता असून तिलाही काही ठिकाणी गाय म्हटले आहे. तसेच अदिती ही देवमाता असल्याने देवांना 'गोजाताः' (गायीपासून उत्पन्न झालेले) असे म्हटले आहे. गायीचे हंबरणे म्हणजे सूक्ताचे गायन व गायींचा कळप म्हणजे अप्सरांचा समुदाय अशीही रूपके आढळतात. (ऋ ७·३२·२२; १०.९५.६).



कांगरेज गाय

वैदिकांच्या यज्ञसंस्थेतही गायीला फार महत्त्व मिळाले होते. प्राचीन काळी प्रत्येक यज्ञकर्त्या यजमानाची गोशाळा असे व तिच्यात दुभत्या गायी बाळगलेल्या असत. यज्ञाला लागणारे दूध, दही, लोणी व तूप हे गायीचेच असावे लागे. त्यावरूनच पूजासंस्थेतही गायीच्याच दुधा-तुपाची आवश्यकता मानली गेली. वेदकाळात गायीला संपत्तीचे स्थान प्राप्त झाले होते. वैदिक आर्य मुख्यत्वे घोडे व गाय-बैल याचे आस्थेने पालन करीत. गुप् = राखणे, हा धातू गो-पाय = गायी राखणे यापासूनच आलेला आहे. गायीसाठी लढायाही (गविष्टी) झाल्याचे ऋग्वेदावरून कळून येते. त्या काळी गाय ही विनिमयाचेही साधन बनली होती. वैदिक आर्य गायीच्या मोबदल्यात आपल्याला आवश्यक त्या वस्तू खरेदीत. ऋत्विजांना व ब्राह्मणांना दक्षिणा द्यायची ती गायीच्याच रूपात देत. ऋग्वेदातील दानस्तुतीच्या सूक्तांवरून त्या काळच्या गायींच्या खिल्लारांची कल्पना येऊ शकते. या सूक्तांत थोडीफार अतिशयोक्ती असली, तरी त्यावरून तत्कालीन गोधनाची समृद्धी अनुमानिता येते. ऋग्वेदात इंद्रादी देवांच्या प्रार्थना केलेल्या आहेत, त्यात आमचे गोधन समृद्ध कर' हे वाक्य बहुधा असतेच (ऋ. १.८३.१; २.२३.१८; अथर्व. ३ ११.१८; वाज. सं. २१.२०; श. ब्रा. २.४.३.१३; ४.५.५.१०).

ऋग्वेदात तांबडी, काळी, भुरी व रंगीबेरंगी अशा भिन्नरंगी गायीचे उल्लेख आहेत (१·६२·९). वैदिक काळात दुधाचा अन्न म्हणून अनेक प्रकारे उपयोग करीत. दिवसातून तीनदा



गोदोहनशिल्प – महाबलिपुरम्

गायीची धार काढीत. या तीन वेळांना प्रातर्दोह, सगव व सायदोह असे म्हणत (तै. सं. ७.५.३.१). प्रातर्दोहाच्या (सकाळची धार) वेळी दूध अधिक मिळे व इतर दोन वेळी ते त्या मानाने कमी मिळे.

गायींना दिवसभर कुरणे किंवा मैदाने या ठिकाणी चरायला सोडीत. दुभत्या गायी सायंकाळी गोशाळेत येत व भाकड गायी मैदानातच सांभाळल्या जात. दुभत्या गायींना चरायला सोडीत असताना त्यांची वासरे मात्र गोशाळेतच बांधून ठेवीत. सायंकाळी धार काढल्यानंतर त्यांना एकत्र करीत. गायी चरायला गेल्या असता त्यांच्या रक्षणासाठी गुराखी असत. त्यांच्या हातात पराणी (अष्ट्रा) असे. गुराखी सावध असूनही कित्येकदा गायी संकटात पडत. कधी त्या एखाद्या खड्डयात पडून पाय मोडून घेत, तर कधी कळपाबाहेर चरत असता दस्यूंच्या किंवा पणींच्या हाती लागत (ऋ. १·१२०·८). पणी लोक

आर्यांच्या गायी पळविण्यात मोठे हुशार असत. त्यामुळे गोपालन हे आर्यांना कित्येकदा जिकिरीचे होत असे. म्हणून मग ते पूषा या देवतेची प्रार्थना करीत. आर्यांनी पूषा या देवतेला गोरक्षक व वाट चुकलेल्या गायींना मार्ग दाखवून घरी आणून सोडणारी असे मानलेले आहे (ऋ. १०.१७.२).



हरियाणा गाय

गायीची ओळख पटावी म्हणून गायीच्या कानांना छिद्रे पाडीत किंवा त्यांचा कर्णच्छेद करीत. आठ ठिकाणी कर्णच्छेद केलेल्या गायीला अष्टकर्णी म्हणत. गायीच्या अंगावर मिथुनचिन्हे अंकित करण्याचीही पद्धत होती, असे अथर्ववेदावरून कळते.

**अवध्या गाय –** ऋग्वेदात पुष्कळदा गायीचा 'अघ्न्या'= अवध्या, असा उल्लेख आढळतो. त्यावरून यज्ञप्रसंगी गायीची हत्या होत असावी पण दुभती गाय अवध्य मानली जात असावी असे वाटते. गाय ही निष्पाप असून ती प्रत्यक्ष अदितीच आहे, म्हणून तुम्ही तिला मारू नका, अशी भार्गव जमदग्नीने प्रार्थना केली आहे (८.१०१.१५). ब्राह्मणग्रंथांवरूनही असे दिसते, की यज्ञप्रसंगी मांसभक्षणार्थ गायीची हिंसा केली जात असे. याज्ञवल्क्य हा गोमांसभक्षक होता. तो म्हणतो, 'माझ्याविषयी बोलायचे झाल्यास मी गोमांस खावे या पक्षाचा आहे, मात्र ते कोवळे असले पाहिजे (श. ब्रा. ३.१.२.२१). घरी पाहुणा आला तर आणि विशेषेकरून मधुपर्क पूजेच्या वेळी गोवध करण्याची पद्धत होती, असे गृह्यसूत्रावरून दिसते सांप्रतही मधुपर्क पूजेच्या प्रयोगात गायीचा समावेश आहे. मात्र तिथे गोवध न करता गायीचे उत्सर्जन केले जाते.

गायीच्या विविध उपयुक्ततेमुळे तिला मारू नये व तिचे मांस खाऊ नये, असा विचार वैदिक काळातच प्रकर्षाने पुढे आला व पुराणकाळात तो सर्व समाजात दृढमूल झाला. गाय मारण्याच्या नुसत्या कल्पनेनेही हिंदूचे अंतःकरण कंपित व्हावे, इतकी त्या विचाराला पुढे दृढता आली. गायीचे पावित्र्यही गायीपुरतेच केवळ उरले नाही; तर गायीचे मूत्रादी पंचगव्यही पवित्र मानले गेले. महाभारतात याविषयीची एक कथा आली आहे ती अशी—

श्री ही पूर्वी असुराकडे होती. तिने देवांसाठी असुरांचा त्याग केला व गायींच्या मध्ये राहण्याची इच्छा प्रदर्शित केली; पण त्या चंचल देवतेला गायी आपल्यामध्ये थारा द्यायला तयार होईनात. परंतु श्री जेव्हा फारच विनवणी करू लागली, तेव्हा गायींनी तिला सांगितले, की तू आमच्या मलमूत्रात रहा; कारण ती दोन्ही पवित्र आहेत (अनु. ८२).

महाभारताच्या अनुशासनपर्वात नृगराजाचे आख्यान सांगताना गोदान आणि त्यापासून प्राप्त होणारे पुण्य याचे भरघोस वर्णन केलेले आहे. कोणत्या प्रकारच्या गायी दान द्याव्या व कोणत्या प्रकारच्या देऊ नयेत, हेही त्या ठिकाणी सांगितले आहे. भीष्म युधिष्ठिराला गोमाहात्म्य सांगताना म्हणतो —

**मातरः सर्वभूतानां गावः सर्वसुखप्रदाः ।**
**वृद्धिमाकाङ्क्षता नित्यं गावः कार्याः प्रदक्षिणाः ।।**
**सन्ताड्या न तु पादेन गवां मध्ये न च व्रजेत् ।**
**मङ्गलायतनं देव्यस्तस्मात्पूज्याः सदैव हि ।।**

(अनु. ७ व ८)

अर्थ – गायी या सर्वभूतांच्या माता आहेत. त्या सर्व सुखे देणाऱ्या आहेत. ज्याला आपल्या अभिवृद्धीची कामना असेल, त्याने गायींना प्रदक्षिणा कराव्या (गोसेवा करावी). त्यांना कधी लाथ मारू नये. त्यांच्या कळपात घुसून त्यांना अडथळा करू नये. गायी या मंगलांचे स्थान आहेत आणि म्हणून त्या सदैव पूज्य होत.

गायीच्या पवित्रतेची महती सांगत असताना शास्त्रकारांनी तिच्या हिंसेबद्दल व तिचे मांस खाण्याबद्दल सर्वत्र निषेध केला आहे. जे कोणी गोहत्या करतात वा तिला परवानगी देतात किंवा जे गोमांसभक्षण करतात, ते गायीच्या अंगावर जितके केस असतील, तितकी वर्षे नरकात खितपत पडतात, अशी लोकधारणाही आहे.

**गायींची उत्पत्ती –** गायीच्या उत्पत्तीची कथा शतपथ ब्राह्मणात पुढीलप्रमाणे सांगितली आहे—

दक्ष प्रजापतीने प्राणिसृष्टी निर्माण केल्यानंतर थोडे अमृत प्राशन केले. त्या अमृताने तो संतुष्ट झाला. त्या वेळी त्याच्या नाकातून जो श्वास बाहेर पडला, त्याचा सुगंध सर्वत्र दरवळला. त्या श्वासातून एक गाय जन्माला आली. सुगंधातून जन्मल्यामुळे दक्ष प्रजापतीने तिचे सुरभी असे नाव ठेवले. सुरभीपासून अनेक गायी जन्माला आल्या. सुरभी ही गोवंशाची माता ठरली.

या सुरभीने एकदा तप आरंभिले. ब्रह्मदेव त्या तपाने प्रसन्न झाला. त्याने सुरभीला अमरत्व दिले व त्रैलोक्याच्या वर अस-

लला एक स्वर्गही बहाल केला. तो स्वर्ग गोलोक या नावाने ओळखला जातो. सुरभी त्या गोलोकात राहते आणि तिच्या कन्या पृथ्वीवर राहतात. या गोलोकाचा अधिपती ' गोविंद ' अर्थात श्रीकृष्ण हा आहे. सुरभी एकदा इंद्राच्या बरोबर श्रीकृष्णाच्या भेटीला गेली आणि पशुराज्याच्या विषयीची कृष्णाची सदिच्छा पाहून तिने त्याला आपल्या गोलोकाचा इंद्र म्हणून निवडले.

कृष्णाची गोभक्ती प्रसिद्धच आहे. त्याने आपले लहानपण गायी-वासरांच्या सेवेतच घालविले. जे गोसेवा आणि गोदान करतात ते पुण्यात्मे मृत्यूनंतर गोलोकात जातात व तिथे आनंद करतात, असे महाभारतात सांगितले आहे (अनु. ८०).

**गोरूप पृथ्वी** – गाय हे पृथ्वीचे प्रतीक मानलेले आहे. ज्या ज्या वेळी दैत्य माजतात व अधर्म वाढतो, त्या वेळी पृथ्वी गोरूप घेऊन विष्णूला शरण जाते व अवतार घेण्याविषयी प्रार्थना करते. पृथ्वीचे व गायीचे हे एकरूपत्व पृथुराजाच्या आख्यानातही सांगितले आहे—

पृथुराजाला राज्याभिषेक झाल्यावर त्याचे सर्व प्रजाजन ' अन्न, अन्न ' करीत त्याच्याकडे आले व पृथ्वी अन्न पिकवीत नाही म्हणून त्याच्याकडे गाऱ्हाणे करू लागले. त्या वेळी पृथूला पृथ्वीचा राग आला आणि तिला शासन करण्यासाठी त्याने शरसंधान केले. तेव्हा पृथ्वी घाबरली व गायीचे रूप घेऊन पळत सुटली. पृथू तिच्या पाठीमागे लागला. तो काही केल्या तिची पाठ सोडीना; तेव्हा गोरूप पृथ्वी पृथूला शरण गेली. तिने त्याला विनविले. ' हे राजा, पृथ्वीवरच्या औषधी वनस्पती मी खाऊन पचवल्या आहेत. त्या तुला परत हव्या असतील, तर माझ्या दुग्धरूपाने त्या तुला मिळतील. सबब तू एखादा वत्स आणून माझ्या कासेला लाव आणि त्या औषधी वनस्पती दोहून घे. '

पृथूने मग तसे केले. त्याशिवाय मग अन्य देव, ऋषी, गंधर्व, मानव या लोकानीही त्या प्रसंगी आपापले वत्स पृथ्वीच्या कासेला लावून आपापल्या इच्छित वस्तू दोहून घेतल्या.



कृष्ण गायींसह घरी येत आहे. राजस्थानी चित्रशैली

गाय ही इतरही अनेक वस्तूंचे व व्यक्तींचे प्रतीक बनली आहे.' इमे लोका गौ.' = हे सगळे लोक (अर्थात विश्व) गोरूप आहेत (श. ब्रा. ६. ५. २. १७). ' यज्ञो वै गौ: ' = यज्ञ म्हणजेच गाय होय (तै. ब्रा. ३. ९. ८. ३). ' अन्नं वै गौ: ' = अन्न म्हणजेच गाय होय (तै. ब्रा. ३· ९. ८. ३). ' विराजो वा एतद्रूपं यद् गौ: '= गाय ही विराजाचे (सकल सृष्टी) रूप आहे (तां. ब्रा. ४. ९. ३). गाय हे वाणीचेही प्रतीक आहे. ' वाचं धेनुमुपासीत ' = वाचारूपी धेनूची उपासना करावी (बृहदा. ५. ८. १). गाय ही गायत्रीचेही प्रतीक आहे. ब्रह्मा

ध्यानस्थ बसला असता, त्याच्या मुखातून एक धेनू बाहेर पडली. ती दुसरी कोणी नसून गायत्रीच होती. एवंच, भारतीय संस्कृतीत ही विविध प्रकारे विश्व व्यापून उरली आहे. महाभारतातही तसेच म्हटले आहे —

**यया सर्वमिदं व्याप्तं जगत्स्थावरजङ्गमम् ।**
**तां धेनुं शिरसा वन्दे भूतभव्यस्य मातरम् ।।**

(अनु. ८०·१५)

अर्थ– ज्या धेनूने हे सर्व स्थावर-जगमात्मक विश्व व्यापले आहे, त्या भूत-भविष्याची माता असलेल्या धेनूला मी शिरसावदन करतो.

सर्व गायींत कपिला गाय विशेष मंगलकारक मानली आहे. ज्याच्या घरात गाय-वासरू नाही, तो समस्त मंगलांना मुकतो, असे म्हटले आहे. गोदान हे एक श्रेष्ठ दान मानले आहे. प्रत्येक शातिक-पौष्टिकाच्या अखेरीस गोप्रदान द्यावे, असे सागितले आहे. गृहस्थाने गायीला रोज गोग्रास द्यावा व श्राद्धाचे पिड गायीला खाण्यास द्यावे असेही सागितले आहे. गायीच्या गोठयाला मंदिराइतके पवित्र मानलेले आहे. मुलाला जन्मकाळी दुष्ट तिथिनक्षत्र लागल्यास गोप्रसवशाती सागितली आहे. गाय वीत असता तिला प्रदक्षिणा घातल्यास पृथ्वीप्रदक्षिणेचे व दान दिल्यास पृथ्वीदानाचे पुण्य लागते, असे सांगितले आहे. गोरक्षणाचे महत्त्व सागताना मनू म्हणतो–

**ब्राह्मणार्थे गवार्थे वा सद्यः प्राणान्परित्यजन् ।**
**मुच्यते ब्रह्महत्याया गोप्ता गोब्राह्मणस्य च ।।**

( ११.७९ )

अर्थ – जो कोणी ब्राह्मण व गाय यांचा प्रतिपाळ करतो व जो गो-ब्राह्मणाच्या रक्षणासाठी प्रसंगी प्राणत्याग करतो, तो ब्रह्महत्येच्या पातकापासून मुक्त होतो.

महाराष्ट्रात शिवछत्रपतीनी स्वत:ला गोब्राह्मणप्रतिपालक असे बिरुद लावून घेतले होते. त्याची मूळ प्रेरणा मनूच्या वरील श्लोकातच असली पाहिजे.

दिलीप राजाने वसिष्ठाची होमधेनू नदिनी हिची सेवा कशी केली व सिंहाने तिच्यावर झडप घातली असता, तो तिच्या रक्षणासाठी स्वत:च्या प्राणांवरही कसा उदार झाला, ती गोष्ट याच सदर्भात सागण्याजोगी आहे. कालिदासाने हा प्रसंग ओजस्वी वाणीने वर्णिला आहे. प्रारंभीच तो म्हणतो–

**तां देवतापित्रतिथिक्रियार्था–**
**मन्वग्ययौ मध्यमलोकपाल: ।**
**बभौ च सा तेन सतां मतेन**
**श्रद्धेव साक्षाद्विधिनोपपन्ना ।।**

(रघु. २.१६)

अर्थ– देव, पितर व अतिथी यांच्या कार्यासाठी म्हणजेच याग, श्राद्ध व अतिथिभोजन यासाठी (आवश्यक) असलेल्या त्या धेनूच्या मागोमाग तो पृथ्वीपती दिलीप जात असे आणि त्या वेळी सन्मान्य अशा त्या राजामुळे ती धेनू विधियुक्त अशा साक्षात श्रद्धेप्रमाणे शोभत असे.

पचांगात गोपाष्टमी, गोकुळाष्टमी, गोवत्सद्वादशी, गोक्रीडनम् असे गायीविषयीचे अनेक सण-उत्सव आहेत. नेपाळमधील नेवरी उत्सव व उत्तर भारतातील मौनछोन हे व्रत गायीविषयीच आहे. गोपद्मव्रत हेही गोविषयकच आहे.

सकाळी उठून गायीचे दर्शन घ्यावे व त्या वेळी पुढील श्लोक म्हणावा असे सांगितले आहे–

**गावो मे अग्रत: सन्तु गावो मे सन्तु पृष्ठत: ।**
**गावो मे हृदये नित्यं गवां मध्ये वसाम्यहम् ।।**

अर्थ– गायी माझ्यापुढे असोत. गायी माझ्यामागे असोत. गायी माझ्या हृदयात वास्तव्य करोत. मी गायीच्या कळपात राहीन.

**पाहा**– गोपूजा, गोप्रदान, गोलोक, गोप्रसव, पंचगव्य.

**गायक** गवयाला गायक अशी संज्ञा आहे. गायकाचे उत्तम, मध्यम आणि अधम असे तीन भेद आहेत. रागाचा आरंभ, विस्तार व शेवट करण्याचे ज्ञान, विविध राग व त्यांची अगे यांचे ज्ञान, देशी रागाचे रूपभेदज्ञान, तालबद्ध रूपके गाण्याची निपुणता, तीन्ही स्थानात गमक प्रयोग करण्याची अनायास शक्ती, कंठाची वशता, तालाचे ज्ञान, गाण्यासाठी श्रम करण्याची तयारी, संप्रदायशुद्ध गाण्याची पद्धती, धारणा शक्ती, दोषरहित गाणे हे सर्व उत्तम गायकाचे गुण मानलेले आहेत. जो गायक गायनातले दोष वगळतो, पण ज्याच्या अंगी गुण कमी आहेत, असा गायक मध्यम होय. जो सदोष गातो तो अधम समजावा. याशिवाय गायकाचे आणखी पाच प्रकार कल्पिले आहेत, ते असे –

(१) **शिक्षाकार** — गाण्याचे यथायोग्य शिक्षण देऊ शकणारा गायक.

(२) **अनुकार** – दुसऱ्या गायकाचे सहीसही अनुकरण करणारा.

(३) **रसिक** – गाताना जो स्वत: गाण्याचा रसास्वाद घेतो, तो.

(४) **रंजक** – जो आपल्या सुश्राव्य गायनाने लोकाना रजवितो, तो.

(५) **भावुक** – आपल्या भावना गाण्यात ओतून जो गातो, तो.

गायकाचे एकल, यमल आणि वृंदगायक असेही तीन प्रकार आहेत. यांपैकी एकल म्हणजे दुसऱ्याच्या साथीशिवाय एकटाच गाणारा गायक होय. यमल म्हणजे दुसऱ्या गायकाच्या जोडीने गाणारा आणि वृंदगायक म्हणजे समूहाबरोबर गाणारा होय. गायकाप्रमाणेच गायिकेचेही प्रकार समजावे. तिच्या ठिकाणी रूप, यौवन, कंठमाधुर्य आणि चातुर्य या गोष्टी विशेष आवश्यक सांगितलेल्या आहेत. [ सं. शा. ]

**गायजत्रा** नेपाळमधील अंत्यसस्कारातील एक विधी. हा विधी हे नेपाळचे एक वैशिष्टच आहे. नेपाळमधील नेवार लोकांची परंपरागत समजूत आहे, की मृताच्या नातेवाईकांनी मृताला मोक्ष मिळावा म्हणून एक गाय ब्राह्मणास दान दिली पाहिजे. तसेच ती दान दिलेली गाय मृताच्या आप्तेष्टांच्या घराभोवती हिंडली पाहिजे.

पण गरीब लोकांना ही प्रथा आर्थिक दृष्टचा पेलण्यासारखी नसल्याने ते लोक एका माणसाला गाईचे शीर व शिंग असलेला मुखवटा घालून त्याला मृताच्या घराभोवती फिरवतात.

**गायत्र** सामवेदातील एक सूक्त. हे तडागोत्सर्जनाच्या विधीत म्हणतात. हे ब्रम्हचाच्या मुखापासून उत्पन्न झाले, असे सांगितले आहे. [ पु. इ. ].

**गायत्री** (१) एक वैदिक छद. सात छंदामध्ये हा पहिला आहे. ऋग्वेदात यालाच गायत्र म्हटले आहे (१. १६४. २५). गो + त्रा या पदापासून हा शब्द बनलेला असून, वाणीचे संरक्षण करणारा छंद, असा त्याचा मूळ अर्थ आहे. गायत्री या स्त्रीलिगी शब्दाची व्युत्पत्ती 'गायन्तं त्रायसे' = गाणाऱ्याचे रक्षण करतेस म्हणून गायत्री, अशी दिलेली आहे. कृतकृत्य झालेली पृथ्वी गाऊ लागली, म्हणून पृथ्वीला गायत्री म्हणू लागले, असा उल्लेख शतपथब्राह्मणात आढळतो (६. १. १. १).

गायत्री या स्त्रीलिगी छंदाचे मूर्त स्वरूपही कल्पिलेले आढळते. गायत्रीने सुपर्णीचे रूप घेऊन देवांसाठी कृशानूच्या ताब्यात असलेला सोम स्वर्गातून आणला, अशी कथा शतपथात आली आहे (१. ७. १. १). गायत्री ही पंख असलेली व प्रकाशाचे डोळे असलेली पक्षिणी आहे, असा उल्लेख ऐतरेय ब्राह्मणात येतो (४. २३). गायत्रीला लिग-रूप देण्याची क्रिया अशा प्रकारे ब्राह्मणवाङमयातच पूर्ण झालेली दिसते. 'गायत्री छन्दसामहम्' = सर्व छंदात मी गायत्री आहे, असे म्हणून श्रीकृष्णानेही तिचे महत्त्व वाढवले आहे ( गीता १०.३५ ).

गायत्री छदाचे तीन चरण असतात. म्हणूनच तिला त्रिपदा गायत्री असे म्हटले आहे. प्रत्येक चरणात आठ अक्षरे असतात. या छंदाचे एक उदाहरण पुढीलप्रमाणे ––

**इन्द्र त्वा वृषभं वयं सुते सोमे हवामहे ।**
**स पाहि मध्वो अन्धसः ।।**

(ऋ. ३. ४०. १)

अर्थ – हे इंद्रा, कामना पूर्ण करणाऱ्या अशा तुला, आम्ही सोमरस गाळून बोलावीत आहो. (तू येऊन) तो मद उत्पन्न करणारा व अन्नरूप असा (सोम) प्राशन कर.

गायत्रीच्या प्रत्येक चरणात आठ अक्षरे असतात, म्हणून तिला 'अष्टाक्षरा गायत्री' असे म्हटले जाते. कधी कधी गायत्रीच्या उच्चारापूर्वी प्रणवाचा उच्चार होतो, म्हणून तिला नवाक्षरा असेही म्हणतात. ऋग्वेदात गायत्रीचे अग्नीशी ऐक्य कल्पिलेले आहे. ऋग्वेदातील अग्निसूक्ते बहुधा गायत्री छदातच आहेत. गायत्री या शब्दाचे अर्थ कालानुसार बदलत गेलेले आढळतात. [ लो. सा. रू. ]

(२) एक मंत्र. या मंत्राचा ऋषी विश्वामित्र असून, सविता ही त्याची देवता आहे. प्रस्तुत मत्र असा –

**तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि ।**
**धियो यो नः प्र चोदयात् ।।**

(ऋ. ३. ६२. १०)

अर्थ – अखिल चराचराला प्रेरणा देणारा जो सविता देव त्याचे सर्वाना अत्यत प्रिय असे जे सर्वश्रेष्ठ अवर्णनीय असे तेज आहे, त्याचे ध्यान करणे, हे आमचे कर्तव्य होय तोच भगवान आमच्या बुद्धीला आणि ध्यानभक्तीला उत्तम रीतीने प्रेरणा करो (श्रुतिबोध).

हा मत्र सवित्याला उद्देशून म्हटलेला आहे. संध्योपासनेत या मंत्राचा जप करावयाचा असतो. त्रैवर्णिकाना उपनयनप्रसगी गुरूकडून हाच मंत्र शिकविला जातो. गायत्रीमंत्र मिळाल्यानतरच त्या बटूला वेदाध्ययनाचा अधिकार प्राप्त होतो. काही गृह्यसूत्रांत त्रैवर्णिकांसाठी हा एकच मंत्र सागितला आहे, तर काहीत प्रत्येक वर्णासाठी वेगवेगळचा वृत्तांतला गायत्रीमंत्र सांगितला आहे (पार. गृ. सू. २. ३)

गायत्रीमंत्राच्या पठनापूर्वी ओकार व 'भूर्भुवस्वः' या व्याहृती, याचा उच्चार करावा, असे सागितले आहे. मंत्रपठनानंतर 'आपो ज्योतीरसोऽमृतम् ब्रह्म भूर्भुवः स्वरोम्' हा मंत्र म्हणायचा असतो. शंखस्मृतीत याला गायत्रीचे शिर मानलेले आहे. गायत्रीमंत्राचा जप हे संध्येतील मुख्य अंग होय. हा जप कसा करावा, याविषयी मनू म्हणतो –

**पूर्वां सन्ध्यां जपंस्तिष्ठेत् सावित्रीमाऽर्कदर्शनात् ।**
**पश्चिमां तु समासीनः सम्यगृक्षविभावनात् ।।**
( मनु. २.१०१ )

अर्थ– प्रातःसंध्येत सूर्यदर्शन होईपर्यंत उभे राहून गायत्री जप करावा व सायंसंध्येत नक्षत्रे दिसू लागेपर्यंत बसून गायत्रीमंत्र जपावा.

पापाचा परिहार होऊन देह-मन शुद्ध होण्यासाठी रोज सहस्र, शंभर, निदान दहा वेळा तरी गायत्रीमंत्र जपावा, असे वसिष्ठधर्मसूत्रात (२६.१५) व मनुस्मृतीत (२.७९) सांगितले आहे. ब्रह्मचाऱ्याने तर गायत्री जप केलाच पाहिजे, असा दंडक घातलेला आहे (मनु. २.१०४). गोभिलाने गायत्रीचे आवाहन-विसर्जन मंत्रही दिले आहेत. जपाच्या प्रारंभी आवाहनमंत्र म्हणायचा असतो, तो असा–

**आयाहि वरदे देवि अक्षरे ब्रह्मवादिनि ।**
**गायत्रि छन्दसां मातर्ब्रह्मयोने नमोऽस्तु ते ।।**

अर्थ– वर देणारी, देवता, अक्षर, ब्रह्मवादिनी, ब्रह्मयोनी व सर्व छंदांची माता अशा हे गायत्री, तू ये. मी तुला नमस्कार करतो.

जपसमाप्तीनंतर विसर्जनमंत्र म्हणायचा, तो असा–

**उत्तरे शिखरे जाता भूम्यां पर्वतवासिनि ।**
**ब्रह्मणा समनुज्ञाते गच्छ देवि यथासुखम् ।।**

अर्थ– उत्तरशिखरावर जन्मलेली, भूमी व पर्वत या ठिकाणी वास करणारी, अशा हे देवी, ब्रह्मदेवाकडून तुला अनुज्ञा मिळाली आहे. तू तुला जिकडे सुख होईल, तिकडे जा.

या मंत्राचा पाठभेद प्रचारात आहे, तो असा–

**उत्तमे शिखरे जाते भूम्यां पर्वतमूर्द्धनि ।**
**ब्राह्मणेभ्योऽभ्यनुज्ञाता गच्छ देवि यथासुखम् ।।**

गायत्रीमंत्र जपल्याने सर्व वेद म्हटल्यासारखे होते, असे सांगितले आहे. अथर्ववेदाने गायत्रीला वेदमाता म्हटले असून, ती मंत्रजप करणाऱ्याला दीर्घायुष्य, संतती, पशू, कीर्ती, द्रव्य व ब्रह्मवर्चस् देते, असे सांगितले आहे (१९.७१.१).

बृहदारण्यकात या मंत्राची व्युत्पत्ती दिली आहे, ती पुढील-प्रमाणे–

गय = प्राण व त्रै = वाचवणे, रक्षण करणे. यावरून जी प्राणांचे रक्षण करते, ती गायत्री होय. जेव्हा आचार्य शिष्याला गायत्री मंत्राचा पाठ देतो, तेव्हा तो त्या शिष्याचे अज्ञानापासून रक्षण करतो (बृहदा. ५.१४.४).

गायत्रीमंत्र कसा निर्माण झाला, याविषयी मनू सांगतो–

**त्रिभ्य एव तु वेदेभ्यः पादं पादमदूदुहत् ।**
**तदित्यृचोऽस्याः सावित्र्याः परमेष्ठी प्रजापतिः ।।**
(मनु. २.७७)

अर्थ– तद् इ. गायत्रीमंत्राचे तीन चरण परमेष्ठी प्रजापतीने तीन वेदांतून एकेक करून दोहून घेतले.

त्यापुढे मनू म्हणतो, की त्रिपदागायत्री हे वेदाचे मुख आहे. हिचा जप करणाऱ्याला वेदत्रयाच्या अध्ययनाचे पुण्य मिळते. जो तीन वर्षे सतत प्रणवव्याहृतियुक्त गायत्रीमंत्राचा जप करतो, तो ब्रह्मलोकाला जातो. एतावता गायत्रीमंत्राहून श्रेष्ठ असा मंत्र नाही (मनु. ७८–८३).

**मूर्तिध्यान–** गायत्रीमंत्राच्या पंचमुखी देवतेचे मूर्तिध्यान पुढील श्लोकाने करतात–

**मुक्ताविद्रुमहेमनीलधवलच्छायैर्मुखैस्त्रीक्षणै–**
**र्युक्तामिन्दुकलानिबद्धमुकुटां तत्त्वार्थवर्णात्मिकाम् ।**
**गायत्रीं वरदाभयाङ्कुशकशा शुभ्रकपालं गुणं**
**शङ्खं चक्रमथारविन्दयुगलं हस्तैर्वहन्तीं भजे ।।**

अर्थ– मोती, पोवळे, सोने, नील यांच्यासारखी व धवल-वर्ण अशी ज्यांची कांती आहे, अशा (पाच) मुखांनी युक्त, त्रिनेत्र, जिच्या मुकुटात चंद्रकला जडवलेली आहे,


पंचमुखी गायत्री

जिच्या नावाच्या वर्णांना तात्त्विक अर्थ आहे, वरद व अभय या मुद्रा, त्याचप्रमाणे अंकुश, चाबूक, शुभ्रकपाल, दोरी, शंख, चक्र व दोन कमळे, जी आपल्या (दहा) हातांनी धारण

करते, अशा गायत्रीची मी उपासना करतो.

सकाळ, दुपार व संध्याकाळ या त्रिकाळी गायत्रीची तीन भिन्न रूपे सांगितली आहेत. सकाळ, दुपार व संध्याकाळ या वेळी ती अनुक्रमे गायत्री, सावित्री व सरस्वती, ऋक्यजुः सामरूप, हंस वृषभ व गरुडवाहना, बाला, तरुणी व वृद्धा, आरक्त, कर्पूरगौर व श्यामा अशी असते ( नारदपूर्वतापिनी. २७.५५.५७ ).

गायत्रीमंत्र हा सवितृदेवाच्या उपासनेसाठी आहे. हाच मंत्र त्यासाठी का सांगितला, याचे निश्चित कारण कळत नाही. कदाचित ऋग्वेदसंहितेतील सवितृदेवतात्मक गायत्री छंदातला हा पहिलाच मंत्र आहे, हे कारणही असू शकेल. सूत्रकारांनी या मंत्राला गायत्री न म्हणता सावित्री म्हटले आहे. मात्र सूत्रोत्तर कालात या मंत्राची देवता सवित्याऐवजी सूर्य ठरली. पुढे पुढे हा मंत्र इतका लोकप्रिय झाला, की त्या मंत्राची देवताही गायत्रीच समजली जाऊ लागली. कालक्रमाने मंत्राचे महत्त्व इतके वाढले, की आर्य व व्रात्य यांच्यांतला मुख्य फरक गायत्रीचा उपदेश व त्याचा अभाव यांवरच अवलंबून राहिला.

गायत्रीरहस्य व गायत्रीउपनिषद् असे तिच्याविषयीचे दोन ग्रंथ असून त्यांत तिची बहुविध प्रशंसा आहे. गायत्रीमंत्रातील प्रत्येक अक्षर प्रतीकात्मक मानलेले आहे. या चोव्वीस अक्षरांनी आग्नेयादी चोव्वीस देवता, वसिष्ठादी चोव्वीस ऋषी, प्रल्हादिन्यादी चोव्वीस शक्ती, पृथिव्यादी चोव्वीस मूलतत्वे व चंपकादी चोव्वीस पुष्पे दर्शविली जातात.

**अमृतमंत्र** – गायत्री हा वेदवाङ्मयातला अमृतमंत्र आहे. या मंत्रात सवितृदेवाची तेजोमय आराधना आहे. सविता सूर्य हा तेज व ज्योती याचा मूलस्रोत आहे. विश्वाचे जीवन त्याच्यावरच अवलंबून असते. सूर्यतेज ही मानवाच्या मानसिक क्रियांचीही प्रेरणा आहे. म्हणूनच त्या मंत्रात बुद्धीला प्रेरणा देण्याबद्दल प्रार्थना केली आहे. योगदर्शनात सूर्य हे आत्म्याचे प्रतीक मानलेले आहे. म्हणून सूर्यतेजाचा अर्थ आत्मतेज असाही होऊ शकतो. या मंत्राच्या द्वारे केली जाणारी सूर्योपासना जीवन, प्राण, मन, बुद्धी व आत्मा या सर्वांच्या कल्याणासाठी असते. साधनेच्या परंपरेत गायत्रीमंत्राला कामप्रद चिंतामणी मानलेले आहे. या मंत्राच्या विधिपूर्वक पुरश्चरणाने ओज, तेज व मंगल यांची प्राप्ती होते. गायत्री ही मानवाची करुणामयी माता आहे. ती आधिभौतिक व आध्यामिक मंगलांची अधिष्ठात्री आहे.

**गायत्रीविद्या**– गायत्रीमंत्राची उपासना ही प्राणविद्या मानून छांदोग्यात तिचे व्याख्यान केलेले आहे. गायत्री ही लोकत्रयाची संज्ञा आहे. सूक्ष्म दृष्टीने विचार केल्यास वेदांतल्या अनेक विद्यांचा अंतर्भाव गायत्रीविद्येत होतो. उपनिषदातली प्राणविद्या हे गायत्रीचेच रूप आहे. ब्राह्मणग्रंथात गायत्री व प्राण यांचा तादात्म्यसंबंध सांगितला आहे. 'प्राणो गायत्री प्रजननम्' (ता. ब्रा. १६.१४.५), 'प्राणो गायत्रम्' (ता. ब्रा. ७.१.९), 'प्राणो गायत्री' (श. ब्रा. ६.२.१.२४), 'प्राणो वै गायत्र्यः' (कौषी. ब्रा. १५.२), असे प्राण व गायत्री याच्या एकरूपतेचे अनेक उल्लेख वैदिक वाङ्मयात आहेत.

**शताक्षरा गायत्री** – शंभर अक्षरी गायत्रीचा उल्लेख काही ठिकाणी येतो. ती शंभर अक्षरे पुढील तीन मंत्र मिळून भरतात– 'तत्सवितुर्वरेण्यं' या मंत्राची २४ अक्षरे, 'जातवेदसे सुनवाम' या मंत्राची ४४ अक्षरे व 'त्र्यम्बकं यजामहे' या मंत्राची ३२ अक्षरे, मिळून १००.

**गायत्रीविषयी जैनकल्पना** – वैदिकांप्रमाणेच जैनांनीही प्रणवव्याहृतीसह गायत्रीमंत्राचा स्वीकार केलेला आहे. मात्र त्यांनी सवितृदेवतेच्या जागी आदिनाथ ही मंत्रदेवता मानली आहे. गायत्रीचा जैन अर्थ असा–

ज्या आदिनाथाने जन्म – मरणादी दुःखाने पीडित अशा आम्हाला संसार व मोक्षमार्ग यांचा उपदेश दिला, सर्व प्रकारचे भय दूर करून आमचे रक्षण केले व पश्चात अर्हन्तपद मिळवून मोक्षप्राप्ती करून घेतली, त्या आदिनाथाची आम्ही उपासना करतो. या आदिनाथ परब्रह्माकडूनच आमच्या बुद्धीला रत्नत्रय मार्गाकडे जाण्याची प्रेरणा मिळते अथवा त्याच्याकडून समस्त दुःखसंकटातून मुक्त करणाऱ्या तेजोमय कल्याण मार्गाची प्राप्ती होते.

या मंत्राच्या एकाही अक्षराचा एकवार ध्यानपूर्वक जप केला, तरी जपकर्त्याला समस्त कर्मातून निवृत्ती प्राप्त होते. समस्त मंत्र एकाग्र भावाने जो ध्याईल व जपेल, त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतात.

**गायत्री व थिऑसफी** – डॉ. ॲनी बेझंट व श्री. लेडबीटर यांनी गायत्रीमंत्राचे संशोधन केले होते. अनेकविध प्रयोग करून त्यांनी त्या मंत्राचे अदृश्य सृष्टीत कोणते परिणाम होतात, त्याविषयी माहिती दिली आहे. तिचा सारांश असा–

गायत्रीमंत्र हा ध्वनीचा मंत्र नसून त्याचा परिणाम अर्थावर अवलंबून असतो. म्हणजे अर्थाकडे लक्ष देऊन हा मंत्र जपला तरच त्याचा परिणाम होतो. गायत्रीजपाच्या आधी प्रणवाचा उच्चार करायचा असतो. त्या उच्चाराने माणसाच्या सूक्ष्म देहातल्या द्रव्यांचे कण शिस्तबद्ध होतात व अंतरंगात प्रविष्ट होणारी मंत्रशक्ती सुव्यवस्थितपणे आत येऊ शकते.

गायत्रीच्या अर्थाकडे लक्ष ठेवून जप केल्याने सूर्यापासून एक तेजोधारा निघते व ती जपकर्त्याच्या अंतरंगात प्रवेश

करते. मग ती नानारंगी प्रवाहांनी माणसाच्या शरीरातून बाहेर पडते. ही रेषा शुभ्रवर्णी व किंचित सोनेरी असते. तिचे शरीरातून बाहेर पडणारे प्रवाह सात असतात. त्यांचे रंग भिन्न असतात व त्यांचा आकार केवडयाच्या मोठ्या पाना-सारखा असतो. हे प्रवाह ज्वालारूप असतात. त्यांचे टोक जवळ येणाऱ्या माणसाच्या मेंदूला किंवा हृदयाला स्पर्श करून तिथे तेज निर्माण करते. अनेक माणसांनी सामुदायिक जप केल्यास प्रत्येकासाठी एकेक स्वतंत्र रेषा सूर्यापासून न येता सबंध समुदायाकडे एक रुंदसा प्रवाह येतो. तो प्रवाह समुदा-यातली माणसे नकळत जणू वाटून घेतात. गायत्री मंत्र हा माणसाच्या प्रगतीला अशा अनेक प्रकारे साहाय्य देतो. त्यामुळे जपकर्त्याच्या बुद्धीला व सद्भावनांना उत्तेजन मिळते. या मंत्राने माणसाच्या भोवतीचे वातावरण उच्च श्रेणीचे होते. [श. क.; म. ज्ञा. को.; हिं. वि. को.; आह्निकसार; नारद पुराण; हि. ध.; डॉ. रामानंद शास्त्री तिवारी– भारती, १० फेब्रु. १९५७; रा. स. भागवत– पुरुषार्थ, सप्टें. १९५८; लो. सा. रू.; वेद-विद्या; पु. इं.; क्रि. स्ट. ले. उ.; जैन सिद्धान्त भास्कर, डिसें. १९५२]

(३) ब्रह्मदेवाच्या दुसऱ्या पत्नीचे नाव. हिच्याविषयी स्कंद पुराणात कथा आली आहे, ती अशी–

एकदा ब्रह्मदेवाने यज्ञ करायचे ठरवले. यज्ञदीक्षा घेण्याचा मुहूर्त जवळ आला, तरी त्याची पत्नी सरस्वती यज्ञमंडपात उपस्थित झाली नाही. शोध करूनही ती कुठे सापडेना. त्यामुळे यज्ञविघ्न निर्माण झाले. पत्नीवाचून यज्ञ होत नाही, हा तर नियम. मग ब्रह्मदेवाला दुसरी एखादी पत्नी मिळते की काय, ते पाहण्यासाठी इंद्र निघाला. फिरता फिरता गायत्री नावाची एक सुंदर गवळण त्याला दिसली. इंद्राने तिला विचारले, की 'यज्ञ करण्यासाठी तू ब्रह्मदेवाची पत्नी होशील का ?' त्यावर गायत्रीने 'हो' म्हटले. लगेच तिला वस्त्रालंकारांनी सजवून ब्रह्मदेवाशी तिचे लग्न लावण्यात आले. मग तिला शेजारी बसवून ब्रह्मदेवाने यज्ञदीक्षा घेतली.

**गायत्रीतीर्थ** हे गयेत असून स्नान व प्रातःसंध्या यांच्या-साठी पुण्यप्रद मानलेले आहे. [पु. इं.]

**गायत्री पुरश्चरण** जप, होम, तर्पण, मार्जन व ब्राह्मण-भोजन अशी पाच अंगे असलेल्या क्रियेला पुरश्चरण असे म्हणतात. मंत्राची जेवढी अक्षरे असतील, तितके लक्ष किंवा कोटी अशी संख्या पुरश्चरणासाठी घेतात. गायत्री-मंत्र चोवीस अक्षरांचा असल्यामुळे सामान्यतः त्याचे चोवीस लक्षांचे पुरश्चरण करतात. गुरूकडून मंत्र मिळाल्यावर तो सिद्ध करावा लागतो. पुरश्चरणाने तो सिद्ध होतो व त्यात सामर्थ्यही उत्पन्न होते, अशी परंपरागत श्रद्धा आहे.

थंडी, वारा, पाऊस यांची बाधा होणार नाही व कोण-त्याही उपसर्गाने चित्ताची एकाग्रता भंग पावणार नाही, अशी जागा पुरश्चरणासाठी असावी, असे सांगितले आहे. जागा निश्चित झाल्यावर मग शुभमुहूर्त पाहतात. गावातील प्रमुख लोकांना बोलावून आपला पुरश्चरणाचा संकल्प उद्घोषित करतात. पुरश्चरणाधिकार प्राप्त होण्यासाठी प्रथम कृच्छ्रादी प्रायश्चित्ते करतात. १० हजार गायत्रीजप, आपोहिष्ठा इ. सूक्तांचा पाठ, रुद्रसूक्तांचा पाठ व ऋषितर्पण ही आदल्या दिवसाची कृत्ये असतात.

दुसऱ्या दिवशी संकल्पपूर्वक पुण्याहवाचन, मातृकापूजन व नांदीश्राद्ध करतात. जपाला बसण्यासाठी दर्भासन किंवा हरि-णाजिन किंवा लोकरीचे कापड घेतात. 'पृथ्वि त्वया धृता लोका' इ. मंत्रांनी आसनविधी करतात. नंतर न्यास कर-तात. मग देवताची प्रार्थना, जपमाळेचे प्रोक्षण व सवित्याचे ध्यान करून जपाला सुरुवात करतात. एकाग्र मनाने जप कर-तात. जप करीत असताना कोणाशी बोलायचे नसते. प्रत्येक दिवशी ठराविक संख्येचा जप करणे व तो मध्याह्नापर्यंत संपविणे आवश्यक असते.

जपमाळ ५४ किंवा १०८ मण्यांची असावी व ती बोटाच्या मधल्या पेरावर ठेवून तिच्यातले मणी अंगठ्याच्या टोकाने ओढावे, असा साधारण नियम आहे. तुटकी, फुटकी, लोकांनी वापरलेली व अपवित्र अशी माळ जपाला घ्यायची नसते.

जपसंख्या पूर्ण झाल्यानंतर त्याच्या १/१० हवन करतात. हव-नाची प्रधानदेवता सविता ही असते. चरु, तिल, पायस, दूर्वा व समिधा ही होमद्रव्ये असतात. पुरश्चरणाची जी कामना असेल, तिच्याप्रमाणे हवनीय द्रव्यात बदल करावा लागतो. त्याचे कोष्टक पुढीलप्रमाणे—

| कामना | हवनद्रव्ये |
|---|---|
| सर्वपापनाश | तिल |
| शांती | यव |
| आयुष्य | घृत ( तिलघृत, घृतौदन ) |
| कार्यसिद्धी | मोहरी |
| ब्रह्मवर्चस, विद्या | दूध (पलाश) |
| पुत्र | दही |
| धान्य | साळी |
| ग्रहशांती | समिधा |
| धन | बेलफळे |

| कामना | हवनद्रव्ये |
|---|---|
| ऐश्वर्य | कमल |
| आरोग्य | दूर्वा व दूध |
| सौभाग्य | गुग्गुळाच्या गोळ्या |

(विष्णुधर्मोत्तर १.१६५.३४-३९)

हवनाच्या दशांश मार्जन, त्याच्या दशांश तर्पण आणि त्याच्या दशांश ब्राह्मणभोजन विहित आहे. त्याचे कोष्टक पुढीलप्रमाणे—

| | |
|---|---|
| पुरश्चरण | २४०००००० |
| मंत्राला स्वाहाकार जोडून हवन | २४०००० |
| मंत्राच्या शेवटी ' सवितारं तर्पयामि ' हे शब्द जोडून तर्पण | २४००० |
| मंत्राच्या शेवटी ' आत्मानं मार्जयामि ' हे शब्द जोडून मार्जन | २४०० |
| ब्राह्मणभोजन | २४० |
| एकूण संख्या | २६,६६,६४० |

एखाद्याला वरील हवनादी पुरश्चरणांगे पूर्ण करणे अशक्य असल्यास तितक्या संख्येने गायत्री जप केल्यानेही पुरश्चरणफल मिळते. वरील दशांश पद्धतीप्रमाणे शतांशपद्धतीही स्वीकारण्याची चाल आहे.

पुरश्चरण पूर्ण झाल्यावर कर्त्याने आचार्याला यथाशक्ती दक्षिणा देऊन कर्म ईश्वरार्पण करायचे असते. पुरश्चरणकालात असत्य भाषण व पुरश्चरणभूमीच्या बाहेर जाणे वर्ज्य आहे. कर्त्याने त्या काळात भूमिशयन करावे व चातुर्मास्यात पुरश्चरण करू नये असे सांगितले आहे.

विद्यारण्यस्वामींनी हंपी येथील विरूपाक्ष मंदिरात तीन गायत्रीपुरश्चरणे करून विजयनगरच्या राज्याची आर्थिक अडचण दूर केली, असे सांगतात. नाशिकजवळ टाकळी येथे समर्थ रामदासांनीही गायत्रीपुरश्चरण केल्याचा उल्लेख त्यांच्या चरित्रात आहे. [ध. सि.; सिद्धेश्वरशास्त्री चित्राव]

## गायत्रीव्रत

कोणत्याही महिन्याच्या शुद्ध १४ शीस सूर्याची पूजा व गायत्री मंत्राचा जप शंभरपासून दहा हजारांपर्यंत यथाशक्ती करतात. फल—विविध रोगपरिहार.

## गायत्रीशापमोचन

गायत्रीमंत्राला अनेक ऋषींनी निष्फलतेचे शाप दिलेले आहेत. त्या शापातून त्याला मुक्त केल्यावाचून गायत्रीचे अनुष्ठान फलदायक होत नाही, असे काहींचे म्हणणे आहे. ते वेगवेगळे शाप नष्ट होण्यासाठी पुढील मंत्र जपावे, असे सांगितले आहे—

**ब्रह्मशापविमोचन**— 'ॐ गायत्री सतत भजामि । विश्वगर्भातुर्यस्मिन् देवा जाता अजायन्त अग्रे ता प्रजापति मारुत शक्तिः सावित्री भजे विश्वमाद्य सृजन्तीम् । ब्रह्मशापविमुक्ता भव ।'

(२) **विश्वामित्रशापविमोचन**— 'ॐ गायत्री सततं भजामि । सुमुखी विश्वगर्भा यदुद्भवा देवश्चक्रिरी विसृष्टिः । यत्कल्याणी अभीष्टकरी प्रपद्ये । यन्मुखान्निःसृतो वेदगर्भः । विश्वामित्रशापमुक्ता भव ।'

(३) **वसिष्ठशापविमोचन**— 'ॐ अहो महान् विश्वरूपे दिव्ये सध्ये सरस्वति । अजरे अमरे देवि ब्रह्मविद्ये नमोऽस्तु ते । वसिष्ठशापमुक्ता भव ।'

## गायत्रीष्टी

एक इष्टी. सवर्ग अग्नीसाठी अष्टाकपाल पुरोडाशाचा याग करणे, याला हे नाव आहे. या इष्टीला गायत्रीष्टी का म्हटले याविषयी मैत्रायणी संहितेत एक कथा आहे, ती अशी—

देव आणि असुर आपसात भांडू लागले, तेव्हा दोघांचेही अन्न गायत्रीने घेतले व ती त्या दोघांच्या मध्यभागी उभी राहिली. तेव्हा देव आणि असुर म्हणाले, की आपण गायत्रीला बोलावू. ती ज्याच्याकडे जाईल त्याना अन्न मिळेल. दोघांनीही तसे केले. पण ती कोणाकडेच गेली नाही. अशा वेळी देवाना एक मंत्र दिसला. ' बल, इंद्रिय, धैर्य, स्वर्ग, इ. तूच आहेस ' असा त्या मंत्राचा अर्थ होता. देवानी तो मंत्र जपला. त्यामुळे गायत्री संतुष्ट होऊन देवांकडे गेली. नंतर देवानी संवर्ग अग्नीसाठी याग केला (२.१.११).

अन्न मिळविण्यासाठी अथवा राष्ट्राराष्ट्रामध्ये स्पर्धा उत्पन्न होईल तेव्हा ही इष्टीकरावी, असे मैत्रायणी संहितेत व तैत्तिरीय संहितेतही सांगितले आहे ( तै. सं. २.४.३ ). या इष्टीचे सर्व तंत्र दर्शपूर्ण मासाप्रमाणेच असते [ विद्याधरशास्त्री भिडे ].

## गायनवृंद

गायक व वादक यांच्या ताफ्याला गायनवृंद असे नाव आहे. जुन्या काळी गायनवृंदातील लोकांच्या संख्येवरून त्याचे उत्तम, मध्यम आणि अधम असे प्रकार कल्पिलेले होते. उत्तम गायनवृंदात एकूण बत्तीस कलाकार असत. त्यापैकी चार प्रमुख गायक, आठ दुय्यम गायक, बारा गायिका, चार बासरीवादक व चार ढोलवादक असत. मध्यम गायनवृंदात उत्तमाच्या निम्मे कलावंत असत. आणि अधम प्रकारात एकूण बारा कलाकार असत. त्यांपैकी एक मुख्य व तीन साहाय्यक गायक, चार गायिका, दोन बासरीवादक व दोन ढोलवादक. एकूण कलाकाराची संख्या

बत्तीसपेक्षा जास्त असे, तेव्हा त्याला कोलाहलवृंद असे म्हणत. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

**गारपगारी** एक जात. हिची वस्ती नागपूर, वऱ्हाड व मध्य प्रदेश या भागात आढळते. पिकाचे गारापासून रक्षण करणे हे याचे काम असते. वास्तविक हे लोक नाथपंथी आहेत. पण वरील व्यवसायावरून यांची वेगळी जात बनली आहे. त्याविषयी पुढील आख्यायिका आहे–

राऊत नावाच्या एका जोग्याने एकदा जादूटोणा करून आपल्या शेतावर गाराचा वर्षाव ओढवून घेतला. पण त्याने गावातील इतर लोकांच्या पिकाचे रक्षण केले. तो राऊन या जातीचा पूर्वज होय.

**विवाहप्रथा** – यांचा लग्नविधी मराठ्याप्रमाणे असतो. यांच्यांतल्या काही विधवा स्त्रिया पुरुषवेष घेऊन यात्रा करतात. स्त्रियांची संख्या कमी असल्यामुळे याच्यांत सहसा घटस्फोट होत नाहीत.

**देवधर्म** – हे लोक महादेव आणि महावीर ( हनुमान ) यांचे अद्वैत मानून त्याना भजतात. माही हा यांचा प्रमुख उत्सव असून, पौष शु. १ देस तो साजरा करतात. कारण त्या वेळेपासून बहुधा गारांचा पाऊस सुरू होतो. नंतर चैत्र शु. १ देस मादो अमावास नावाचा दुसरा एक उत्सव असतो. हे कालभैरवाला पशुबळी देतात. हे गाराविषयी भविष्य सांगतात. गारांपासून संरक्षण व्हावे म्हणून मंत्रतंत्र व जादूटोणाही करतात.

**मर्तिकप्रथा** – मृताला बसलेल्या स्थितीत पुरतात. त्यासाठी मरणासन्न व्यक्तीला बसवून ठेवतात. एका भोपळ्यात डाळ, तांदूळ, एक नाणे व मृताचे आवडते मादक पेय घालून तो मृताच्या हातात देतात. पुरायचा खड्डा मीठमातीने भरतात. एक रात्र मृत्युस्थानी दिवा लावून ठेवतात. तिसऱ्या दिवशी त्या ठिकाणी नारळ फोडून सुतक सपवतात. [ ट्रा. का. सें. प्रॉ. इं.; म. ज्ञा. को. ]

**गारा** एक राग. हा राग खमाज थाटातून निघतो. याचा आरोहावरोह सात स्वराचा असतो. म्हणून याची जाती संपूर्ण-संपूर्ण आहे. याचा वादी षड्ज व संवादी पंचम आहे. हा राग सार्वकालिक आहे. याच्या आरोहात तीव्र गंधार व तीव्र निषाद व अवरोहात कोमल निषाद व कोमल गाधार असे स्वर लागतात. हा क्षुद्रगीताई राग आहे. मद्र सप्तकातील मध्यमाला षड्ज कल्पून, मध्य सप्तकातील मध्यमापर्यंतच्या क्षेत्रात गायक जेव्हा हा राग गातो, तेव्हा तो फार गोड लागतो. झिंझोटी व पिलू हे राग या रागात मिसळलेले दिसतात. [ सु. वि. को. ]

**गारागीर** एक प्राचीन शैव पंथ. व्रात्यांच्या निरनिराळ्या विभागांबद्दल सविस्तर लिहीत असता पंचविंश ब्राह्मणात यांचे नाव येते. ‘ ज्याना सामान्य माणसांचे खाद्यपदार्थ ब्राह्मणांच्या अन्नाप्रमाणे रुचकर लागतात ’ असा तिथे त्याच्याविषयी उल्लेख आहे. गारागीर याचा अर्थ विषप्राशन करणारे असा होतो. या शब्दप्रयोगाला विशिष्ट महत्त्व आहे. त्यावरून शिवाच्या नीलकठ या विशेषणाकडे लक्ष जाते. समुद्रमथनातून निघालेले विष शिवाने प्राशन केले व त्यामुळे त्याचा कंठ निळा झाला, असे पुराणांनी या विशेषणाचे स्पष्टीकरण दिले आहे. तदनुसार शिवाचे काही भक्त इतर सामान्य खाद्य पदार्थाबद्दल अनासक्ती दाखवून शिळे मास, विषारी वनस्पती, विषारी द्रव आणि नखे भक्षण करतात, त्यावरून त्या लोकांच्या पंथाला गारा (गर = विष ) + गीर = गिळणारे, असे नाव पडले. [ रि. इ. ]

**गारुडकल्प** चौदाव्या कल्पाचे नाव. या कल्पात कृष्णाने गरुड पुराण सागितले. [ गरुड पु. ५३.५२ ]

**गारुडी** धंद्यावरून बनलेली एक जात. गारुड्यांना मेडिसर व मदारी अशीही नावे आहेत. पैकी मदारी हे मुसलमान आहेत. ते १४ व्या शतकात बाटून मुसलमान झाले



गारुडी, पुंगी व साप

असे म्हणतात. हे बाटलेले मुसलमान सुंता करून घेण्यापलीकडे इस्लामचे कोणतेही आचार पाळीत नाहीत. महाराष्ट्र व

गुजरात या राज्यात ही जात प्रामुख्याने आढळते.

सापांचे खेळ करून दाखवणे हाच याचा उपजीविकेचा व्यवसाय आहे. या व्यवसायाचे शिक्षण देणारी एक शाळा दिल्लीजवळील मोलाडबड नामक एका खेडेगावात आहे. या शाळेत या व्यवसायाला असणारी सर्व प्रात्यक्षिकेही दाखविण्यात येतात. गारुड्यांचा हा व्यवसाय बराच प्राचीन असावा; असे गरुड पुराणात व जातकात आलेल्या तद्विषयक उल्लेखावरून वाटते.

हिंदू गारुडी हे भवानीचे उपासक आहेत.

या जातीत हिंदू व मुसलमान याचा समावेश असल्याने मृताचे दहन व दफन या दोन्ही गोष्टी प्रचलित आहेत. [ बॉ. बे. क्रा. ]

**गारो** आसामच्या नैर्ऋत्य भागातील गारो टेकड्यांवर राहणारी एक आदिवासी जमात. गारो लोकाच्या वस्तीवरूनच या टेकड्यांना गारो हे नाव मिळाले आहे. याच नावाचा जिल्हाही आहे. त्याच्या पूर्वेला खासी व जयंतिया या टेकड्या आहेत. गारो टेकड्यांत नोकरेक हे शिखर सर्वात उच (४,६५२ फूट) आहे. गारो जिल्ह्यात सरासरी १२५ इंच पाऊस पडतो. इथली हवा आरोग्याला हितावह नाही. तुर्रा, गारोबाधा व फुलबाडी ही गारो टेकड्यामधली मुख्य गावे आहेत.

गारो लोक स्वतःला गारो न म्हणता अचिक किंवा मंडे म्हणतात. अचिक म्हणजे डोंगर किंवा पहाड होय. त्यावरून गारो स्वतःला पहाडी समजतात. मंडे म्हणजे मनुष्य होय.

गारो लोकात अवे, चिसक, मत्ची–दुअल, अंबेंग, गर–गचिंग अटोंग, रूग व मेगम असे अनेक पोटविभाग आहेत. मेगम सोडल्यास बाकीच्या पोटविभागाच्या मूळ संस्कृतीत फारसा फरक नाही. अंबेंग लोकांवर सुधारलेल्या समाजाचा फारसा प्रभाव पडलेला नाही. त्यांनी आपली पुरातन संस्कृती अद्याप टिकवून धरली आहे. मेगम लोकाची खासी टेकड्यांवरही बरीच वस्ती आहे. तिथे ते लिंगम या नावान ओळखले जातात.

गारो लोकाची वस्ती टेकड्याच्या पायथ्याशी, बहुधा एखाद्या ओढ्याच्या काठावर असते. कारण त्यांना स्वच्छ पाण्याची व स्नान करण्याची फार आवड असते. टेकड्यांवरील झऱ्याचे पाणी बांबूच्या नळांनी गावात खेळवलेले असते.

गारो लोकांची घरे बांबू व गवत याची असतात. घराची जमीन बांबूच्या कामट्यांची बनवितात. तरुण मुले गावातील सामुदायिक शय्यागृहात झोपतात. या घराला डेकाचांग असे म्हणतात.

टोळ्याच्या नायकांची घरे मोठी असतात. ही घरे साल वृक्षाच्या खांबावर उभारतात. आवाराभोवती नायकाच्या गुलामांची घरे असतात. खेड्यातील सुस्वरूप स्त्रिया व तरुण पुरुष असा त्याचा गुलाम परिवार असतो. टोळीचे नायक आपल्या गुलामाना भरपूर खायला प्यायला घालतात व चागल्या तऱ्हेने वागवितात.

गारो लोक मोंगोलाइड वंशाचे असून त्यांचे नाक बसके व डोळे बारीक असतात. ते ठेंगणे असून त्यांचा बांधा मजबूत असतो. त्यांच्यातले मागासलेले पुरुष फक्त एक लंगोटी लावतात व स्त्रिया कमरेभोवती फडके गुंडाळतात. बायका कानात पितळेची वलये व गळ्यात मण्यांच्या माळा घालतात. बाजारात जाताना मात्र पुरुष अंगरखा व स्त्रिया पोलके घालतात. सुधारलेले स्त्री-पुरुष साडी व धोतर नेसतात.

गारो लोकाचे मुख्य अन्न भात व आमटी हे होय. याशिवाय कोणत्याही प्राण्याचे मांस त्यांना चालते. पूर्वी या लोकांना दूध मुळीच आवडत नसे. हल्ली मात्र ते दूध पिऊ लागले आहेत. हे लोक गावठी दारू बनवून ती यथेच्छ पितात.

गारो लोक झूम पद्धतीने शेती करतात त्यामुळे त्याच्या शेतीची जमीन लवकरच निकस होते. आणि त्यांना दुसरे क्षेत्र शोधावे लागते. ते शेतात भात, कापूस, कडधान्ये व मिरची ही पिके काढतात.

**विवाहप्रथा –** गारो लोकात मातृसत्ताक कुटुंबपद्धती अस्तित्वात आहे. गारो टोळ्यांची विभागणी अनेक घराण्यांत झालेली असते. अशा घराण्यांना मचोंग म्हणतात. एकाच मचोंगमधील स्त्री-पुरुषांचे आपसात लग्न होत नाही. मुलाचे लग्न बहुधा मामेबहिणीशी होते. यांच्यांत बहुपत्नीत्व रूढ आहे. वयस्क पुरुष बायको म्हातारी झाली, की दुसरी तरुण बायको आणतो. यांच्यांत लग्न झाल्यावर मुलगाच वधूच्या घरी राहायला जातो. तिथे त्याला बायकोचा आणि सासूचाही वारसाहक्क मिळतो. त्यांच्या वारसाहक्काच्या कायद्यानुसार गारोची सासू ही त्याची पत्नीही असते. त्यामुळे त्याला सासूशीही शरीरसंबंध ठेवावा लागतो. मध्य भारतातील आदिवासी लोकांमध्येही पूर्वी ही प्रथा होती, पण आता ती लोपली आहे.

गारो लोकांत सर्वसाधारणपणे मुलगी वयात आल्यावर तिचे लग्न होते. काही तरुणी वराची निवड स्वतःच करतात. सामुदायिक शय्यागृहातील तरुणतरुणीचा एकमेकाशी वरचेवर संबंध येतो व त्यांतून त्याचे प्रेमसंबध निर्माण होतात. एखादी तरुणी एखाद्या तरुणाच्या प्रेमात पडली, की ती त्याच्याजवळ आपले प्रेम व्यक्त करते. तो बहुधा त्या प्रेमाचा अव्हेर करीत नाही. मग ती दोघे रानातील एखाद्या घळीत जाऊन राहतात

दोन तीन दिवसांनी ती दोघे परत वस्तीत येतात. गावात त्यांच्या प्रेमाचा आधीच गवगवा झालेला असतो. त्यामुळे ती परत आल्यावर लगेच त्यांचा विवाहही होऊन जातो.

नृत्य, गायन आणि मेजवानी हे विवाहसमारंभातील मुख्य कार्यक्रम असतात. प्रथम वधूला जवळच्या झऱ्यावर नेऊन आंघोळ घालतात. मग सर्व लोक वरगृही जातात. नवरा मुलगा आपण विवाहाला तयार नसल्याचा बहाणा करतो व पळून जातो. पण जमलेले लोक त्याला पकडून आणून आघोळ घालतात. मात्र त्याचा विरोध लग्न होईपर्यंत सतत चालू असतो. त्याचे आई-वडीलही दु खाचा आविर्भाव करीत असतात. वराला मग वधूगृही नेतात. वधूवराना आशीर्वाद देण्यासाठी आणि देवाची प्रार्थना करण्यासाठी पुरोहिताची आवश्यकता असते. शुभाशुभ लक्षणेही बघायची असतात. त्यासाठी एक कोबडा आणि कोबडी आणतात व त्याची डोकी एकत्र धरून पुरोहित त्याच्यावर काठीचा प्रहार करतो. त्यामुळे ती मरून एकमेकांशेजारी पडली, तर नवविवाहित दापत्याचा संसार सुखाचा होईल असे समजतात. दोघापैकी एकजण उडून गेल्यास किंवा मरण्यापूर्वी ती दोघे वेगवेगळी झाल्यास नवीन जोडप्याचा संसार सुखाचा होणार नाही, असे मानतात.

**मृतकप्रथा** – गारो लोक मृताना जाळतात. काही टोळ्यांत मृताचे नातेवाईक जमेपर्यंत प्रेत तसेच ठेवतात व सर्वजण जमल्यानंतर ते जाळतात. सधन व्यक्तीच्या दहनाच्या वेळी एखाद्या गायीचा वा बैलाचा बळी देतात. रात्रभर मद्यपान करून पहाटे मयताच्या घराच्या आवारातच दहनविधी करतात. लगेच रक्षा गोळा करून ती एका खड्ड्यात पुरतात व त्यावर दगड ठेवतात. चितेच्या जागी बांबूचा एक माडव घालतात. त्याला एक मोडकी घंटा आणि मृताच्या काही वस्तू टांगतात. त्यावर एक सूपही पालथे घालतात. मृतात्म्याला बाहेर निसटता यावे, म्हणून सुपाला एक भोक पाडतात. सात दिवस त्या माडवापुढे अन्न ठेवतात. सुगीच्या दिवसात मांडवाला कणसे टांगतात. कापणी झाल्यानंतर तो बाबूचा माडव जाळून टाकतात. गारो लोकांची समजूत असते, की मृतात्मा त्या मांडवाच्या आसपास घोटाळत असतो. मांडव जाळला जातो तो त्याला तिथून हाकलण्यासाठी.

सांसर्गिक रोगाने मेलेल्याला मात्र गावाबाहेर नेऊन पुरतात. पूर्वी गारो लोकामध्ये एक अमानुष चाल होती. त्यांच्यातला एखादा मोठा माणूस मरण पावला, की गारो लोक प्रथम जो बंगाली माणूस भेटेल त्याला मारून त्याचे शिर कापून आणीत व मृताला अर्पण करीत. इंग्रजांनी ही प्रथा बंद केली.

गारोंची सामाजिक व्यवस्था थोड्याफार प्रमाणात लोकशाहीप्रधान आहे. जमातीत एखादा वादग्रस्त प्रश्न उत्पन्न झाल्यास सर्व स्त्रीपुरुष जमून त्याचा विचार करतात.

प्रत्येक खेड्यातील वनात त्याचे काही दगड पुरलेले आढळतात. त्यांना खोशी म्हणतात. त्या दगडांच्या जागी शत्रूची मुंडकी पुरलेली आहेत, अशी गारोची समजूत असते. प्रत्येक पेरणीच्या हगामात ते या दगडाना सजवितात व त्यांचा उत्सव करतात.

**देव-धर्म** – गारो लोक भुताखेतांना भजतात. त्यांच्यावर श्रद्धा असणाऱ्यांना सोंगसरेक म्हणतात. घरातील कोणी आजारी पडल्यास तो कोणत्या देवाचा कोप आहे, हे सांगण्यासाठी पुरोहिताला बोलावितात. देवाला संतुष्ट करण्यासाठी पुरोहित त्यांना बलिदान करायला सागतो. अलिकडे बऱ्याच गारो लोकांनी ख्रिस्ती धर्म स्वीकारलेला आहे. पण हे धर्मांतर निष्ठापूर्वक झालेले नाही. शिक्षण घेणे म्हणजेच ख्रिस्ती होणे, अशी मुलाची व अडाणी लोकाची समजूत असते. शाळा सोडून मुले घरी गेली, की ती लगेच सोंगसरेक बनतात. बाप्तिस्त या ख्रिस्ती पंथात मद्यपानाला तीव्र विरोध आहे. त्या पंथात शिरलेले गारो लोक मद्यपानाची तीव्र इच्छा झाली, की सोंगसरेक बनतात व दारू पितात. एकाच कुटुबात भिन्नधर्मी लोक सलोख्याने राहतात.

सालगाँग हा त्यांचा सर्वश्रेष्ठ देव आहे. तो आपल्या पत्नीसह मृत्युलोकात तुर्रा येथे येऊन राहिला. त्याला दोन मुले झाली. त्यांपैकी केंग्रा बरसा हा मुलगा अग्नीचा आणि आकाशातील ताऱ्यांचा पिता झाला. मुलगी मिनिग मिजा ही मानवमात्राची माता असलेल्या डॉजाँग्माची सून झाली.

विश्वाच्या उत्पत्तीसंबंधी गारोंची कल्पना पुढीलप्रमाणे आहे–

नस्तू (एक देवता) ही स्वयंनिर्मित अंड्यातून बाहेर आली आणि तिने विश्वाची उत्पत्ती केली. तत्पूर्वी ती एका कमळावर राहत होती. पण तिथे राहणे अशक्य झाल्यावर तिने पाताळाचा राजा हिरामण याला पृथ्वीवर पाठविले. त्या दोघांनी मग पशुपक्षी, वनस्पती व मानवी प्रजा निर्माण केली. [से. इं. १९३१; इं. स्ट. पा. प्रे., व्हॉ. १ (२) जानेवारी १९६०; दी गारोज्]

## गार्गायणी बालाकी

गायत्रीमंत्राच्या चोव्वीस ऋषींपैकी हा तिसरा ऋषी होय. याचा उल्लेख बृहदारण्यकात येतो. याने सूर्य, चंद्र, ढग, वारा, अग्नी, आकाश, पाणी व विद्युत यातील पुरुषांची ब्रह्म म्हणून उपासना केली; परंतु शेवटी त्याचे त्यालाच हे मत बरोबर नसल्याचे कळून

आले व त्याने परमात्म्याचे खरे ज्ञान मिळविले. [ क्रि. स्ट. ले. उ. ]

**गार्गी** एक ब्रह्मवादिनी. गर्ग कुलोत्पन्ना असल्यामुळे गार्गी व वचक्नू ऋषीची कन्या म्हणून वाचक्नवी अशा जोड नावाने तिला ओळखतात. सांख्यायनाच्या मते गार्गी व वाचक्नवी या दोन भिन्न स्त्रिया होत्या; पण बृहदारण्यकोपनिषदाच्या मते ही एकच व्यक्ती आहे.

विदेह जनकाच्या यज्ञप्रसंगी जी वादसभा भरली, त्या सभेत गार्गी उपस्थित होती. तिचा व याज्ञवल्क्याचा जो वाद झाला, तो बृहदारण्यकात दिला आहे, तो असा –

याज्ञवल्क्याने तिला सांगितले, की सारी पृथ्वी जलात सामावलेली आहे. त्यावर गार्गीने प्रश्न केला, की जल कशात व्याप्त आहे ? आकाशात हे याज्ञवल्क्याचे उत्तर. आकाश कशात व्याप्त आहे ? वायूत हे उत्तर. वायू कशात ओतप्रोत आहे ? अंतरिक्ष लोकात, हे उत्तर. अशा प्रकारच्या या प्रश्नमालिकेच्या शेवटी याज्ञवल्क्य म्हणाला, की सर्वच गोष्टी ब्रह्मात सामावलेल्या आहेत. त्यावर गार्गी म्हणाली की ब्रह्म कशात सामावलेले आहे ? यावर मात्र याज्ञवल्क्याने हा अतिप्रश्न विचारू नकोस असे तिला बजावले. पण या तिच्या प्रश्नमालिकेवरूनच गार्गी ही एक विदुषी स्त्री मानली जाते. [ प्रा. च. को.; हिं. वि. को.; तर्पण ]

**गार्ग्य** एक ऋषी. हा सामवेद्यांच्या उपाकर्मांगतर्पणात आहे. शांत्युदक घेताना कोणता मंत्र घ्यावा, याबद्दल कौशिकसूत्रात याच्या मताचा उल्लेख आहे (९.१०). हा अंगिरस कुलातील गोत्रकार व मंत्रकार आहे. हे कुल मूळचे क्षत्रिय असून ते तपाने ब्राह्मण झाले (भाग. पु. ९.२१.२९).

हा धर्मशास्त्रकार असल्याबद्दलही उल्लेख आढळतो. अपरार्क, स्मृतिचंद्रिका, मिताक्षरा, इ. ग्रंथात याच्या ग्रंथातले विविध विषयांवरचे उतारे घेतले आहेत. याचा संपूर्ण ग्रंथ मात्र उपलब्ध नाही. [ प्रा. च. को ]

(२) ऋषभाचा पुत्र. विष्णूचा एक अवतार. [ पु. इं. ]

**गार्सी देवी** मध्य बंगालमधील जेसोर जिल्ह्यातील हिंदू स्त्रिया आश्विन मासाच्या अमावास्येस या देवीची पूजा करतात. हिला अलक्ष्मी असेही नाव आहे. हिचा कोप झाल्यास दारिद्र्य, रोगराई व इतर आपत्ती येतात, अशी समजूत आहे. पूजेच्या दिवशी घरातील सर्व माणसे लवकर उठून घराची सर्व दारे व खिडक्या उघडतात. गोठा असल्यास त्याचाही दरवाजा उघडतात. मग एक मुलगा सूप व काठी घेऊन घराच्या कोनाकोपऱ्यात जातो आणि काठीने सूप बडवून पुढील गाणे म्हणतो —

**ए बाड़ीर पोका माकड़ बने जंगले या।**
**अन्य वाडीया दूर या, दूर या, दूर या**
**ए बाडीर रोग व्याधि दूर या, दूर या।**
**आरेर धान नटि पटि,**
**आमार धान बायान्न पटि**
**धान रे ! साध खा, साध खा।**

**अर्थ** – कोळीकीटकानो, घरातून बाहेर जा. रानात जा. दुसऱ्याच्या घरात जा. दूर दूर जा. निघून जा. या घरातल्या माणसांना जे रोग त्रास देत आहेत, त्या रोगानो, तुम्ही दूर निघून जा. इतरांचे धान्य नऊपट तर माझे बावन्नपट पिकले आहे. भाताच्या पिका, असेच भरघोस पिकत जा.

नंतर स्त्रिया अंगणात शेकोटी पेटवितात. या अग्नीला गार्सी देवीचा अग्नी असे म्हणतात. नंतर सर्वजण त्याच्या भोवती बसून आपले हातपाय शेकवतात. या शेकण्यामुळे रोग नाहीसे होतात अशी समजूत आहे. मग प्रत्येक जण तागाची वाळलेली काटकी घेऊन तिचे एक टोक विस्तवात धरतो व दुसरे तोंडात धरून धूर ओढतो. असे केल्याने वर्षभर सर्दी-खोकला होत नाही, असे समजतात. मग हिरवी चिंच भाजून तिचा गर अंगाला लावतात. नंतर मोहरीच्या तेलात हळद कालवून ती सर्वांच्या अंगाला लावतात. त्यामुळे त्वचारोग होत नाहीत, असे समजतात.

नतर सुवासिनी स्त्रिया भांगात शेंदूर भरतात आणि तागाचे लांब धागे केसांना लावून वेणी घालतात. त्यामुळे केस लाब होतात, अशी समजूत आहे. नंतर पणतीवर काजळ धरून ते डोळ्यात घालतात.

गार्सीदेवीचे प्रतीक म्हणून एक कलश सजवून गवताच्या चुंबळीवर ठेवतात व त्याची पूजा करतात. नैवेद्य म्हणून धुतलेले तांदूळ उन्हात वाळवून एका परळात मध्यभागी त्याचा ढीग करतात व त्याच्याभोवती निरनिराळी फळे, मिठाई, ताजी हळद, खोबरे, दही, इ. पदार्थ ठेवतात. पूजा झाल्यावर घरातील वृद्ध स्त्री गार्सी देवीची कहाणी सांगते, ती अशी—

एका ब्राह्मणाला एक मुलगा व सून होती. सून सदाचरणी व धार्मिक होती. त्यामुळे त्या कुटुंबात सुख नांदत होते. गार्सीदेवीला ते पाहवले नाही. तिने त्यात बिघाड उत्पन्न करायचे ठरविले. ती एका लावण्यवतीचे रूप घेऊन त्या घरी आली व ब्राह्मणावर तिने आपली मोहिनी घातली. तो ब्राह्मण तिच्याशी लग्न करायलाही तयार झाला. पण सून-मुलगा या गोष्टीला

विरोध करतील, अशी त्याला भीती वाटली. तेव्हा तिने ब्राह्मणाला युक्ती सांगितली, की कसेही करून संक्रांतीच्या दिवशी सुनेला भात खायला लाव, म्हणजे तुझी इच्छा पुरी होईल.

त्याप्रमाणे संक्रांतीच्या दिवशी ब्राह्मणाने सुनेजवळ हट्ट धरला, की तू भात खाल्याशिवाय मी गार्सीदेवीचा प्रसाद घेणार नाही. तेव्हा तिने एका ताटलीत नारळाचा कीस ठेवला व त्याच्या भोवती नैवेद्याचे पदार्थ ठेवले. ब्राह्मणाला तो भातच आहे, असे वाटले. एवढ्यात अलक्ष्मी एका भेसूर राक्षसीच्या रूपात तिथे प्रगट झाली व ब्राह्मणासमोर मरून पडली. ब्राह्मण ते पाहून बेशुद्ध पडला. सुनेने त्याला सावध केले, तेव्हा त्याला स्वतःची चूक कळून आली. त्याने सुनेला धन्यवाद दिले. नंतर ते कुटुंब पुन्हा सुखाने राहू लागले.

पूर्व बंगालमध्ये या देवीला गाडशीदेवी म्हणतात. पूर्व बगालमधील या देवीचा पूजाविधी थोडा निराळा आहे. तो असा—

कोजागरी पौर्णिमेला लक्ष्मीची पूजा केली असेल, तरच संक्रातीला गाडशी देवीची पूजा करतात. संक्रातीच्या आदल्या रात्री चौथ्या प्रहरी घरातील सर्व स्त्रिया व मुले अंगणात जमतात. तिथे एक दिवा लावतात. मग जवळच्या तळ्यातून पाण्याची एक घागर आणून ती अंगणात ठेवतात. संक्रातीच्या दिवशी सूर्योदयानंतर सर्वजण त्या घागरीतील पाण्याने तोंड धुतात व कल्क अंगाला लावून स्नान करतात. मग डोळ्यांत काजळ घालतात. दुपारी देवीची पूजा करताना मंत्र म्हणतात. मंत्राचा अर्थ असा, की ‘आश्विन महिन्यात अन्न शिजवून जे कार्तिक मासात भक्षण करतात, त्याचे सर्व मनोरथ गार्सीदेवी पूर्ण करते.’ [ ज. अॅ. सो. बॉ; व्हॉ. १२, नं ४, १९२२ ]

## गार्हपत्य

एक अग्नी. अग्निहोत्रशाळेत सत्तावीस अंगुळे व्यास धरून एक वर्तुळाकार कुंड तयार करतात. याला दोन मेखला करतात. सहा बोटे रुंद आणि सहा बोटे उंच असा वर्तुळाकार एक ओटा म्हणजे पहिली मेखला. त्याच्यावर चार बोटे रुंद आणि सहा बोटे उंच असा दुसरा एक ओटा ही दुसरी मेखला. दोन मेखलानी युक्त असे हे जे वर्तुळाकार कुंड बनते, त्याला गार्हपत्यायतन म्हणतात व त्यात अग्नी ठेवतात.

अग्निहोत्र घेण्याच्या वेळी अरणीचे मंथन करून हा अग्नी विधिपूर्वक उत्पन्न करतात. हा अग्नी गार्हपत्यायतनात ठेवणे म्हणजेच अग्न्याधान होय. हे अग्न्याधान करणाऱ्या यजमानाला गृहपती म्हणतात. त्यावरून या अग्नीला गार्हपत्य असे नाव मिळाले आहे. तीन अग्नीत हा मुख्य अग्नी असतो. याचे नित्य संरक्षण करायचे असते. यातूनच प्रत्येक कर्माच्या वेळी आहवनीयाचे व दक्षिणाग्नीचे उद्धरण किंवा प्रणयन करतात. म्हणून गार्हपत्य हा योनिस्वरूप मानलेला आहे. त्याला पिता असेही म्हणतात.

**पिता वै गार्हपत्योऽग्निर्माताग्निर्दक्षिणः स्मृतः ।**

(मनु. २.२३१)

अर्थ – गार्हपत्य अग्नी हा पिता व दक्षिणाग्नी ही माता असे मानलेले आहे.

गार्हपत्य, आहवनीय व दक्षिणाग्नी हे तीन्ही अग्नी नित्य धारण करावे, असा एक पक्ष आहे. त्याचप्रमाणे गार्हपत्याचे आयतन चौकोनी करावे, असेही एक मत आहे. [ विद्याधरशास्त्री भिडे ]

## गार्हपत्यचिती

अग्निचयन पाहा.

## गाऱ्हाणे

एक प्रार्थना. द. कोकणात रवळनाथ, सांतेरी, भगवती इ. ग्रामदेवतांच्या उत्सवाच्या अखेरीस गावाचे भले व्हावे म्हणून जी सामुदायिक प्रार्थना केली जाते, तिला गाऱ्हाणे म्हणतात. गावातला मुख्य किंवा गावकार हे गाऱ्हाणे ठराविक पद्धतीने म्हणतो व गावकरी ‘ होय म्हाराजा ’ असे प्रत्येक वाक्यागणिक म्हणून त्याला आपली अनुमती दर्शवतात. हे गाऱ्हाणे सांगणाऱ्यास शेंडी सोडून देवापुढे उभे राहावे लागते. प्रस्तुत गाऱ्हाण्याचा काही भाग पुढीलप्रमाणे आहे—

**बा देवा म्हाराजा समर्ता**
**आज तूं देव रवळनाथ**
**गांवसंबंधान् देसधाम रोग राय**
**तू आज येशीक बांध**
**मायेच्या पूर्वसाक्, बारांच्या पूर्वसाक्**
**रामेसरा जैनाक्, कानोबा भरगिन्याक्,**
**गिन्या गावडयाक्, सांतेरी स्थान पुरुसाक्,**
**जैन महालक्ष्मीक्, आज घोंगडयाची तूं**
**समजूत घाल, पूर्वेच्या गुंडयांचा गणित**
**पुरां कर, बारा पांचांचां गणित येक कर**
**देसधाम दूर कर**
**आणि सेवाचाकरी करून घेरे म्हाराजा**

गाऱ्हाणे झाल्यावर नारळ फोडतात व त्याची शेरणी सर्वांना वाटतात.

## गालव

(१) एक वैय्याकरण. निरुक्त व ऐतरेय आरण्यक यात गालवाचे मत उद्धृत केले आहे. शैशिरिशाखेत गालवाला शौनकाचा शिष्य व शाखाप्रवर्तक म्हटले

आहे. गालवाचा चरण हा देवमित्र शाकल्याच्या चरणाचा अवांतर विभाग होता, असे श्री. भगवद्दत्त म्हणतात. बाभ्रव्य पांचाल नामक आचार्याने प्रथम क्रमपाठ रचला होता. गालवाने तो व्यवस्थित केला व एक शिक्षा रचली, असे महाभारताच्या शांतिपर्वात म्हटले आहे (३३०.३७-३८). ऋक्प्रातिशाख्यात याला पहिला क्रमप्रवक्ता म्हटले आहे. गालवाचे एक व्याकरणही आहे. [ पा. भा. ]

(२) एक आयुर्वेदाचार्य. याने शालाक्यतंत्र रचले होते. हिमालयाच्या उपत्यकेवर भरलेल्या ऋषिसमेलनाला हा उपस्थित होता, असे चरकाने सांगितले आहे. हा सर्वलोकचिकित्सक होता, असे शालिहोत्र म्हणतो. [ आ. इ. ]

**गालिब** ( इ. स. १७९७–१८६९ ) मूळ नाव मिर्जा असदुल्लाखान. हा तुर्क वंशाचा असून, समरकंद हे याच्या घराण्याचे मूलस्थान होते. याचा जन्म आग्रा येथे झाला. याचे बालपण आजोळी गेले व शिक्षण नजीर अकबराबादी व महमद मोअज्जम या विद्वानांच्या देखरेखीखाली झाले. अब्दुस्समद नामक आपला एक गुरू होता असे गालिबने नमूद केले आहे; पण ती व्यक्ती काल्पनिक असावी असे कित्येकांचे मत आहे. गालिबला लहानपणापासूनच कविता रचण्याचा नाद होता.

गालिबचे उर्दू व फारशी या दोन्ही भाषांवर प्रभुत्व होते. त्याने या दोन्ही भाषांमध्ये विपुल गद्य व पद्य रचना केली आहे. उर्दूतील त्याचे प्रमुख ग्रंथ म्हणजे उर्दू कवितांचा संग्रह आणि प्रचंड पत्रव्यवहार हे होत. काव्यसंग्रह, तैमूर घराण्याचा इतिहास, फारसी पत्रव्यवहार आणि दस्तंबो हे त्याचे फारसी साहित्य होय. त्याची फारसी कविता संख्येने उर्दू कवितेच्या चौपट भरेल. पण त्याला जी कीर्ती लाभली, ती मात्र त्याच्या उर्दू कवितेमुळेच. गालिबने कसीदा व रुबाया रचल्या; पण त्याच्या गजलांमुळेच तो कविश्रेष्ठ मानला गेला. प्रारंभीची त्याची उर्दू काव्यरचना फारसी शब्दांच्या मिश्रणाने फार क्लिष्ट बनत होती; पण पुढे त्याने आपली भाषा सोपी केली.

गालिबच्या काव्याचे विषय प्रेम, प्रेमिक, प्रेयसी, उत्कंठा, विरह, वियोग, मीलन हे तर आहेतच; पण जीवनातील संघर्ष, आशा-निराशांचे द्वंद्व, सृष्टिविषयक तत्त्वज्ञान, धर्म इ. विषयांवरही त्याने आपले विचार व्यक्त केले आहेत. तो म्हणतो——

**कशाकश हाये हस्ती करे क्या सईये आजादी**
**हुओ जंजीर मौजे आबको फुरसत खानी की**
**ताब लाये ही बनेगी गालिब**
**वाकिया सख्त है और जान अजीज**

अर्थ—जीवनाच्या संघर्षातून सुटून जाण्याचा प्रयत्न करण्यात काही अर्थ नाही. समुद्राच्या लाटा किनाऱ्यापर्यंत पोचतात तोच पायात शृंखला घालून ओढल्यागत मागे जातात. जीवनाचेही तसेच आहे. गालिब म्हणतो, संकटे सहन करणे हाच त्यावरचा एकमेव उपाय आहे. कारण एकीकडे प्रसंग बाका आहे तर दुसरीकडे प्राण प्रत्येकाला प्रिय आहे.

त्याचे काव्य जीवनातील अनुभवातून आणि आंतरिक तळमळीतून निर्माण झालेले आहे म्हणूनच त्यात कृत्रिमता नाही. तो रसिक, दिलदार व महत्त्वाकांक्षी होता. प्रेमाशिवाय जीवनात रस नाही, अशी त्याची भावना होती——

**इश्कसे तबीयतने जीस्तका मजा पाया**
**दर्दकी दवा पायी दर्देलादवा पाया**

अर्थ— प्रेमामुळे प्रकृतीला जीवन आकर्षक वाटू लागले, व्यथेला औषध मिळाले व ज्याला औषध नाही अशा ( एका नव्या) व्यथेचा लाभ झाला.

तरुणपणी त्याचे एका नर्तकीवर प्रेम बसले होते; पण दुर्दैवाने ती लवकर मरण पावली. गालिबचे वैवाहिक जीवन विशेष सुखाचे होते असे दिसत नाही. तो म्हणतो——

**मेरी किस्मत में ग़म गर इतना था**
**दिल भी यारब कयी दिये होते**

अर्थ — माझ्या नशिबात तू इतकी दुःखे लिहिली होतीस, तर ती सारी सहन करण्यासाठी हृदये तरी अनेक द्यायची होतीस

**दिल् ही तो है न संग व ख़िश्तदर्दसे**
**भरे न आये क्यौं**
**रोयेंगे हम हजार बार कोयी हमे सताय क्यौं**

अर्थ — हे हृदय शेवटी हृदयच आहे. ते काही दगड नव्हे की धोंडा नव्हे. ते व्यथेने का बरे भरून येणार नाही ? आम्ही अनंत वेळा रडू; पण त्यात आम्हाला कुणी का बरे त्रास द्यावा ?

गालिब मदिरासक्त होता. आपल्या काव्यातही त्याने मदिरेचे खूप स्तुतिस्तोत्र गायिले आहे——

**फिर देखिये अंदाजे गुलफ़शानीये गुफ़तार**
**रखदे भोयी पैमाना व सहबा मेरे आगे**

अर्थ — माझ्यासमोर मद्याची सुरई व चषक ठेवा आणि मग माझ्या मुखातून शब्दरूपी पुष्पांची वृष्टी कशी होते ती पाहा.

इ. स. १८४७ साली जुगार खेळल्याच्या आरोपावरून गालिबला तुरुंगवास घडला. या घटनेमुळे आप्तस्वकीयात त्याची प्रतिष्ठा कमी झाली; पण नंतर लवकरच त्याला दिल्लीच्या दरबारात प्रवेश मिळाल्यामुळे पुनश्च ती वाढली. इ. स. १८५० मध्ये बहादूरशहाने त्याला मिर्जा नजमोद्दौला

दबी रुल्मुल्क निजामजंग ही पदवी दिली व तैमूर घराण्याचा इतिहास फारसी भाषेत लिहिण्याबद्दल फर्मावले. गालिबने तो लिहायला प्रारंभ केला खरा; पण तो त्याच्या हातून पुरा मात्र झाला नाही.

१८५७ च्या धामधुमीत गालिबवर अनेक संकटे गुदरली. त्यांचे वर्णन त्याने दस्तंबो या पुस्तकात केले आहे. त्या प्रसगांतून तो जिवानिशी सुटला; पण त्याच्या आप्तजनाची व मालमत्तेची मात्र वाताहत झाली.

गालिबच्या काव्यात त्याच्या भोवतालच्या समाजाचे चित्र स्वच्छ उमटले आहे पण तत्कालीन धार्मिक–सामाजिक नियम व रूढी यांची त्याने अनेक ठिकाणी चेष्टाच केली आहे. या चेष्टेसाठी त्याने एक नवीनच काव्यशैली निर्माण केली. त्याच्या स्वभावातील विनोद व वक्रता हे दोन्ही गुण त्याच्या त्या शैलीत जागोजाग दिसतात. कर्मठ प्रवचनकारांची टिगल गालिबने केली आहे ती अशी–

**कहाँ मैरवाने का दरवाजा गालिब और कहाँ वाएज**
**पर इतना जानते हैं कल वह जाता था के हम निकले**

अर्थ – कुठे मद्यालयाचे दार व कुठे प्रवचनकार! पण आम्हाला इतके माहीत आहे, की काल आम्ही मद्यालयातून बाहेर पडत होतो त्या वेळी तो आत प्रवेश करीत होता.

गालिब हा एका नवीन गद्यलेखनप्रकाराचा प्रवर्तक मानला जातो त्याचे साहित्य म्हणजे आधुनिक उर्दू गद्याचा पायाच होय. त्याचे दोन उर्दू पत्रसग्रह आहेत. त्यात तत्कालीन सामाजिक, आर्थिक व राजकीय घटनाचे उत्तम वर्णन आहे. त्यात त्याची विनोदप्रियताही ठायी ठायी दिसते. त्याची सरळ सुंदर व आकर्षक शैली अजूनही कोणाला साधली नाही. **पाहा**– उर्दू भाषा व साहित्य. [ मिर्ज़ा ग़ालिब; हिं. वि. को. ]

## गावडा

गोमंतकातील एक आदिवासी जमात. रत्नागिरी जिल्ह्यातील सावंतवाडी भागातही एका काळी यांची वसती होती. गौड सारस्वत ब्राह्मण उ. प्रदेशातून गोव्यात आले, तेव्हा त्यांच्याबरोबरच गावडे इकडे आले व गौड देशातून आल्यामुळे त्यांना गावडे म्हणू लागले, अशी समजूत आहे.

ऑस्ट्रेलॉइड वंशातील मुंड शाखेशी यांचा सबध दिसतो. वर्ण, रूप व काही चालीरीती या बाबतीत संताळांशी यांचे बरेच साम्य आहे. सताळांप्रमाणेच माचील (पालखी) वाहण्याचे काम हे लोक पूर्वी करीत होते. यांचा मुख्य व्यवसाय शेती हा आहे. जे कोणी मीठ बनविण्याचा उद्योग करतात, त्यांना मीठ गावडे म्हणतात. यांची कुळंबी, गावकर, वेळीप अशी अन्यही नावे आहेत.

गावड्यांत मूळचे हिंदू, ख्रिस्ती आणि मसूरकर महाराजांनी शुद्ध करून घेतलेले नवहिंदू असे मुख्यतः तीन वर्ग आहेत. यांखेरीज यांच्यांत पोटजाती नाहीत. हे लोक मागासलेले असले, तरी प्रामाणिक व स्वाभिमानी आहेत. काष्टी (लंगोटी), मुंडासे व खांद्यावर कांवळे एवढाच पुरुषाचा पोषाख असतो. सकच्छ लुगडे, हे एकच वस्त्र त्यांच्या स्त्रियांना पुरते. त्या चोळी न घालता लुगड्याच्या पदराने ऊर झाकून उजव्या खांद्याजवळ त्याच्या टोकाची किनारीशी गाठ बांधतात. या प्रकाराला देठली म्हणतात. त्यावरूनच गोव्यातील गावड्यांना देठली



गावडा पुरुष

गावडे असे म्हटले जाते. पोर्तुगीज सरकारने इ. स. १९४० च्या सुमारास, स्त्रियांनी चोळी घातल्याशिवाय बाजारात येऊ नये, असा कायदा केल्यामुळे तेव्हापासून गावडा स्त्रिया चोळी किंवा पोलके घालू लागल्या आहेत. पूर्वी गावडे पुरुष समारंभाच्या प्रसंगी कमरेभोवती पोटऱ्यापर्यंत पोचणारे पांढरे वस्त्र गुंडाळीत. आता ते इतर लोकांप्रमाणे पोषाख करू लागले आहेत.

संताळांप्रमाणे गावडा स्त्रिया कोपरापर्यंत पितळेच्या बांगड्या घालतात. त्यांच्या नाकांत मोती, गळ्यात मणी व पोवळ्याचे दागिने असतात. अलिकडच्या मुली मात्र

काचेच्या बांगडया, सोन्याची साखळी, अंगठी, चमकी इ. अलंकार वापरू लागल्या आहेत.

गावडे लोक दणकट नसले तरी काटक असतात. उंच नारळीच्या झाडावर ते सरसर चढू शकतात. पानविडीचे व्यसन त्यांच्यांतल्या लहानथोर सर्व स्त्री-पुरुषांना असते. हिंदू आणि ख्रिस्ती गावडयांत फारसा भेद नाही. जन्म, लग्न व मृत्यू या प्रसगी होणारे त्यांचे धार्मिक सस्कार तेवढे भिन्न असतात. बाकीच्या चालीरीती सारख्याच आहेत. याच्यांत देवके आहेत. त्यांच्या कोकणी लग्नगीतात या देवकाना आवाहन केलेले असते, ते असे—

**आरे आरे रुंबडा, ताळी मुळी आकरीया**
**या ताळचा डोलती पांच फडाचे नागा**
**उपसाचे होवर गे बसले गोड उदक दिया हो ।**

या गीतात रुंबड = उंबर या वृक्ष-देवकाचे आवाहन आहे बहुतेक खेडेगावात आणि काही शहरांत यांच्या वाडया असतात. पण बरेच जण कूळ म्हणून भाटकाराच्या (मालकाच्या) भाटात (नारळाच्या बागेत) राहतात. मातीच्या भिंती व त्यावर चुडताचे छप्पर असे त्याचे घर असते. ते घरातल्या जमिनी शेणान सारवून स्वच्छ ठेवतात. त्याचा आहार व राहणीही स्वच्छ असते.

**देव-धर्म**—गावडे हे रामभक्त आहेत. त्याची धार्मिक कृत्ये करणाऱ्या गुरवांना जलमी किंवा वेळीप म्हणतात. देवाचा प्रसाद (कौल) घेणे, शेतीची रोपणी, कापणी, घरांची शाकारणी, इ. कामे सुरू करणे, ही जलम्याची कामे असतात.

देवदेवस्कीवर गावडयांचा पूर्ण विश्वास असतो. अंत्यक्रिया केली तरी मृत मनुष्य मसणातच राहतो अशी त्यांची समजूत असते. त्याचा कोप झाल्यास त्याला शांत करण्यासाठी ते गुरवाकरवी देवाला प्रसाद लावतात. त्या वेळी एक तांब्याचा तुकडा गुरवाजवळ देतात. गुरव देवाला आवाहन करून मृताचा आत्मा त्या तुकडयात आणतो व घरातील माणसांवर त्याची कृपा असावी अशी देवाला विनंती करून तो तुकडा यजमानाला परत देतो. या तुकड्याला दाम म्हणतात. हा दाम एका करंडयात ठेवतात व प्रत्येक अमावास्येस आणि सणाच्या दिवशी त्याची पूजा करतात.

**विवाहप्रथा**—एकाच देवकात लग्नसंबध होत नाही. मामेबहिणीशी विवाह होतो. लग्न ठरविण्यापूर्वी ग्रामदेवतेचा प्रसाद ( कौल ) घेतात. लग्नापूर्वी वराकडून वधूला फुले व फळे यांच्या ओझ्याची पाटी येत असते. ओझ्यात केळी, ओली पोफळे, विडयाची पानें, केळीची पाने, इ. वस्तू असतात. लग्न वधूच्या घरी होते. त्यात हळद लावणे, मंगलाष्टके, वधूच्या गळयात मुहूर्तमंणी बांधणे, वरात वगैरे विधी असतात. वरात घरी आल्यावर वधू-वरांना भाताच्या मुडीवर किंवा पोत्यावर



गावडा स्त्री

बसवितात. वधूच्या पायाने लक्ष्मी घरात आली, ही भावना त्यामागे असते. विवाहसमारंभात गावडयांच्या बायका ज्या कोकणी ओव्या गातात, त्यांतल्या काही अशा——

**यजमाननी बाये गे तू गे किल्याक वोगी,**
**रुपयांची पोगी काय रिती झाली ॥**
**जाल्यार जाली गे । करू नाका चिंता ।**
**घोडयार बसून येता तुजी राम-सीता ॥**
**आज बापा दिता म्हणशी फाल्या बापा ना म्हणशी ।**
**रूमडाच्ये फुला काय बापा गांजीयशी ॥**
**गाठीचे मोडयनु पाचशांचे धडपनु ।**
**जाचातली सोडय तू काय लेकी तुका ॥**
**देवु गेले रानी वनी त्येंनी घडयलो म्हूर्तमणी ॥**
**तो मणी बांदता काय रामचंद्र सीतेच्या गळा ॥**

तागडी नाच, धालो, जागर, या नृत्यप्रकारांची गावडयांना फार हौस असते. जागरात ते नाना प्रकारची सामाजिक व दैवी सोंगे सजवून नाचतात. त्यासाठी उंची पोशाख भाडयाने आणतात. [ चं. म. साखळकर. ]

• •